## स्वभाव मत. ६

अंगप्रत्यंगनिर्वृतिःस्वभावादेवजायतइति सन्निवेशःशरीराणांदंतानां पातनोद्गमौ ॥ तलेष्वसंभवोयश्चरोम्णामेतत्स्वभावतः ॥ पुनश्चोक्तं धातुषुक्षीयमाणेषुवर्धतेद्वाविमौतदा ॥ स्वभावंप्रकृतिंकृत्वानखकेशा वितिस्थितिरिति. ॥

अर्थ- अंगें. आणि प्रत्यंगें. यांची उत्पत्ती स्वभावानेंच होत्ये. असीच सर्व शरीरावयव यांची रचना. व दंतपतन व उद्गम. व तळव्यांस केशांची अनुत्पत्ती. हें सर्व स्वभावानें होतें. जसें धातु क्षीण होत असतां नख व केश हे सर्वकाळ वाढतात यास कारण स्वभाव.

## पुनः सांगतो.

निद्राहेतुस्तमः सत्वंबोधनेहेतुरुच्यते ॥
स्वभावएववाहेतुर्गरीयान्परिकीर्तितइति ॥

अर्थ—निद्रेचें कारण तमोगुण आणि जागृदवस्थेचें कारण सत्वगुण अथवा स्वभावच दोही अवस्थेचें कारण सांगितलें.

## आणखी सांगतो.

स्वभावाल्लघवोमुद्गास्तथालावकपिंजलाः ॥
स्वभावाद्गुरवोमाषावराहमहिषादयः ॥

अर्थ—मूग. लावे. आणि तितिरपक्षी. हे स्वभावानें लघु, आहेत. आणि उडीद, डुकर, महिष, हे स्वभावानेच जड आहेत.

## अग्नीला ईश्वरत्व व जीवित्व कारणत्व सांगतो.

जाठरोभगवानग्निरीश्वरोन्नस्यपाचकः
सौक्ष्म्याद्रसानाददानोविवेक्तुंनैवशक्यते ॥
अग्निमूलंबलंपुंसांबलमूलंचजीवितमिति ॥

अर्थ—स्वतंत्र व षड्गुणैश्वर्य संपन्न असा ईश्वर जठराग्नी होत्साता अन्नाचा पाक करितो, व रसांचें ग्रहण करितो. परंतु सूक्ष्म आहे यास्तव दिसत नाहीं. बळाचें मूळ कारण अग्नी. व बलमूलक जीवित आहे असें जाणावें.

## काळही प्रकृतीचाच भेद आहे याविषईं प्रमाण.

महाभूतविशेषास्तुशीतोष्णद्वयभेदतः ॥
कालइत्यध्यवस्यंतिन्यायमार्गानुसारिणः ॥

अर्थ—शीत, ऊष्ण या भेदानें जे आकाशादि महाभूतांचे विशेष त्यांसच नैय्यायिक काळ ह्मणतात. तो काळ वातादि दोषांचे संचय व प्रकोप व उपशम यांचे द्वारा हेतू असें ऋतुचर्याध्यायाचे ठाईं सांगितलें आहे.

## याहच्छिक मतास प्रमाण.

यदृच्छापुनरलक्षितआकस्मिकःसर्वपदार्थाविर्भावः ।

अर्थ—यदृच्छा ह्मणजे. अलक्षित असून आकस्मिक असा जो पदार्थाचा आविर्भावली.

## पुनः सांगतो.

यदृच्छयाचोपगतानिपाकंपाकक्रमेणउपचरेद्विधिज्ञइति.

अर्थ—सर्व वस्तुमात्र यदृच्छेनें परिणाम पावतात. यास्तव विचारवंत. पुरुषानी त्याक्रमेंकरून आचरण करावें.

## कर्मवादी मताला प्रमाण.

ब्रह्मस्त्रीसज्जनवतोपरस्वहरणादिभिः ॥

कर्मभिःपापरोगस्यप्राहुःकुष्ठस्यसंभवं.

अर्थ—ब्राह्मण स्त्रीगमन. व परद्रव्य हरण. इत्यादिक पापकर्मांनी कुष्ठादिक रोग उत्पन्न होतात. यास्तव कर्मही कारण आहे असें जाणावें.

## परिणामाला हेतुत्व सांगतात.

जठराग्नेस्तुसंयोगाद्यदुदेतिरसांतरं ॥ रसानांपरिणामांतेसाविपाकइतिस्मृतः ॥ ताएवौषधयःकालपरिणामात्परिणतवीर्याभवंतिहेमंतेभवंत्यापश्चसम्यक्परिणतस्याहारस्यसारोरसः ॥ एवंबालानामपिवयःपरिणामाच्छुक्रप्रादुर्भावोभवति ॥

अर्थ—जठराग्नीचा संयोगें करून अन्नापासून जें रसांतर उत्पन्न होतें. रस ह्मणजे उत्तम प्रकारें जीर्ण जाहालेल्या आहाराचा सारांश. रसाचे परिणाम झाले असतां त्याला विपाक ह्मणतात. तशा औषधी. काल परिणामानें पूर्ण वीर्य होतात. जशीं हेमंत ऋतूमध्यें उदकें पूर्ण वीर्य होतात. त्याप्रकारेंच बाळांचा वय परिणामें करून वीर्य प्रादुर्भाव होतो. या प्रकारें स्वभावादिकांस प्रकृतित्व. वैद्यशास्त्र संमत आहे असें दाखविलें. याप्रकारानें वैद्यकानुमतें पूर्वोक्त प्रकृती दाखविल्या.

## प्रकृतीच कारण असें स्वमत सांगतो.

परमार्थतस्तुगुणत्रयात्मिकाप्रकृतिरेवकारणंयतःस्वभावादयश्चत्वारःप्रकृतिपरिणामस्यधर्मविशेषतयाप्रकृतावेवांतर्भवंति

अर्थ—वास्तवीक अर्थ तर गुणत्रयात्मकप्रकृतीच सर्व जगाचें कारण. स्वभावादि चारप्रकृति परिणामाचे धर्म विशेष आहेत, ह्मणून प्रकृती मध्यें त्यांचा अंतर्भाव जाणावा.

## स्वभावमत खंडण.

स्वभावस्तावत् सत्वरजस्तमसां तद्विकाराणांपृथिव्यादिमहाभूतानांच याहशोविशेषइतिप्रकृतिपरिणामादन्योनभवति.

अर्थ–स्वभावतर साकल्यें करून सत्वादिगुण आणि त्यांचे विकार पृथिव्यादि महाभूतें यांचे परिणामाचा विशेष आहे यास्तव स्वभाव प्रकृतीहून भिन्न नव्हे.

## नियतिमत खंडण.

नियतेरपिपूर्वकृतसदसत्कर्मरूपायारजोगुणपरिणामरूपत्वेननप्रकृतेरन्यत्वं ।।

अर्थ–नियति, पूर्व जन्मकृत जें शुभाशुभ कर्म तत्स्वरूप होय, यास्तव ती रजोगुण ह्मणून नियति प्रकृतीहून भिन्न नव्हे असें जाणावें.

## कालमत खंडितो.

कालोपिचंद्रार्कादिगतिःक्रियालक्षणः।। तथाचमहाभूतानांपरिणामविशेषाःशीतोष्णाभवंतितदुक्तंमहाभूतविशेषास्तुशीतोष्णद्वयभेदतः।। कालइत्यध्यवस्यंतिन्यायमार्गानुसारिणइति ।। क्रियात्वेनरजोगुणपरिणामित्वात्महाभूतविशेषत्वाच्चनकालस्यप्रकृतेरन्यत्वं ।।

अर्थ–काल, चंद्र सूर्यादिक ग्रहांचा गतिवरून परिछिन्न. यास्तव क्रिया लक्षण, महाभूतांचा परिणाम विशेष, शीत, उष्ण, काळ होतो, याविषयीं प्रमाण. महाभूतविशेषाइति. ह्मणजे शीत, उष्ण, याभेदें करून जे महाभूतांचे विशेष, त्यांला नैय्यायिक काल ह्मणतात. यास्तव कालाला क्रियात्व आहे ह्मणून रजोगुणांचा परिणाम काल, आणि महाभूतांचा परिणाम विशेष शीतोष्णादिकाल, यास्तव प्रकृतीहून भिन्न नव्हे. ईश्वर पंचविसावा पुरुष व प्रकृतिचा क्षोभक, यास्तव त्याला कारण ह्मणतात. यदृच्छाही आकाशादि भूतांचा परिणाम विशेष आहे, यास्तव प्रकृतिहून अन्य नव्हे.

## या शास्त्राचा निश्चय.

किंचास्मिन्शास्त्रेप्रकृतिपरिणामात्मकंविश्वंपठ्यते

अर्थ–आणखी या शास्त्राचे ठायीं प्रकृति परिणामात्मक विश्व आहे. असें सांगीतलें.

## शरीर सांगतो

सात्विकंकायलक्षणं राजसंकायलक्षणं ।।

तथासत्वबहुलमाकाशमित्यादि.

अर्थ–काय ह्मणजे शरीर. हें सत्वरजोगुणात्मक व आकाश सत्वगुण प्रधान असें जाणावें.

## सर्वमतांची एकवाक्यता करितो.

तेचस्वभावादयःसमुच्चयेनजगदुत्पत्तौकारणभूताः ।।

तत्रप्रकृतिपरिणामस्योपादानत्वं स्वभावादीनांपंचानांनिमित्तकारणत्वंइति.

अर्थ–ते स्वभावादिक सर्व मिळून जग उत्पन्न करतात. परंतु त्यामध्यें प्रकृति परिणाम उपादान कारण. आणि इतर स्वभावादिक पांच निमित्त कारण, असें जाणावें.

तन्मयान्येवभूतानितद्गुणान्येवचादिशेत् ॥

अर्थ—आकाशादिपंचमहाभूतें तन्मय ह्मणजे अवकाश, घन, उष्ण, द्रव, स्वभावादि धर्म विशेषानें युक्त जे प्रकृति परिणाम, ते तन्मय असून तद्गुण असतात. सत्व बहुल आकाश असें पूर्वी सांगीतलें आहे असें जाणावें.

## परमत सांगतो.

गयीतु ततोजातानिभूतानिइतिपठित्वाव्याख्यानयति.

अर्थ—गयीतर व्याख्यान करितो कीं स्वभावादिक निमित्त कारणें जीं त्यांपासून व प्रकृतीचे परिणाम उपादन कारण त्यापासून झालीं जीं आकाशादिक भूतें तीं कारण गुणात्मक अशीं होतात.

## चिकित्सास्थान दाखवितो.

तैश्चतल्लक्षणःकृत्स्नोभूतग्रामोव्यजन्यते
तस्योपयोगोभिहितश्चिकित्सांप्रतिसर्वदा
भूतेभ्योहिपरंतस्मान्नास्तिचिंताचिकित्सिते ॥

अर्थ—आकाशादिक भूतें जीं त्यांपासून स्थावर जंगम पृथिव्यादिकांचीं जीं लक्षणें स्थिर गुरू कठिणत्वादि त्याणीं युक्त असा. अनेक प्रकारें भूतग्राम प्रकट होतो, तस्य ह्मणजे पंचमहाभूतारब्ध व परस्परोपयोगी असा भूतग्राम जो त्याचें प्रयोजन सर्वकाळ रोगापनया विषई कारण आहे यास्तव भूतेभ्यःपरं ह्मणजे पंचमहाभूतारब्ध जो भूतग्राम त्याहून परजें अव्यक्तादिक त्याचे ठाईं रोगापनयनाविषईं विचार नाहीं असें जाणावें.

## पुरूषस्वरूप सांगतो.

तदुक्तमाद्येध्याये तत्रास्मिन्पंचमहाभूतशारीरसमवायः
पुरूषइत्युच्यते ॥ तस्मिन्पुरुषःप्रधानंतस्योपकरणमन्यदिति ॥

अर्थ—तेथें पंच महाभूतांचा जो शरीर समवाय. ह्मणजे शुक्र शोणिताचा संयोगविशेष. त्याला पुरुष असें ह्मणतात. त्या पुरुष प्रकृतीचा साधन भूत देहाचे ठाईं चिकित्सा होत्ये. यास्तव देहाहून परजीं अव्यक्तादिक त्यांचें चिकित्से मध्यें प्रयोजन नाहीं. हा अर्थ अन्यत्र दाखविला आहे असें सांगतो.

यतोभिहितंतत्संभवद्रव्यसमूहोभूतादिरुक्तः

अर्थ—हें सूत्र बीजाध्यायाचे ठाईं केलें परंतु येथें बोधार्थ थोडक्यें व्याख्यान करतो. जा कारणास्तव पुरुषाचा शुक्र शोणित संयोगानें पंचभूत प्रधान स्थूल देह तो भूतादि ह्मणून चिकित्सोपयोगी, त्याहून पराचा उपयोग नाहीं.

## वैद्यकांत प्रतिपाद्य सांगतो.

भौतिकानिचेंद्रियाण्यायुर्वेदेवर्ण्यंते तथेंद्रियार्थाः

अर्थ—इंद्रियें श्रवण, स्पर्शन, दर्शन, रसन, घ्राण, व यांचे अर्थ. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, हेही भौतिक असें आयुर्वेदाचे ठाईं वर्णितात.

तेच सांगतो.

तथाचोक्तंपंचभूतात्मकत्वेपि॥श्रोत्रेखंस्पर्शनेवायुर्द।
र्शनेतेजउत्कटंसलिलंरसनेभूमिर्घ्राणेतज्ज्ञैर्निरूपिताइति. ॥

अर्थ—सर्वेंद्रियांस पंचभूतात्मकत्व जरी आहे. तथापि श्रोत्रेंद्रियाचे ठाईं आकाशमुख्य व त्वक्, चक्षु, जिव्हा, घ्राण, या चोहोंचे ठाईं क्रमानें वायु, तेज, उदक, पृथ्वी, हीं चारभूतें मुख्य असतात.

विषयानांपांचभौतिकत्व सांगतो.

शब्दोवैहायसःस्पर्शोवायव्यःप्रकीर्तितः ॥
रूपमाग्नेयमाप्यस्तुरसोगंधस्तुपार्थिवइति

अर्थ—शब्द आकाशसंबंधी, स्पर्श वायुसंबंधी, रूपतेजसंबंधी, रसउदकसंबंधी. गंधभूमि संबंधी शब्दादिक पंचभूतांचे विकार. परंतु जाभूतांचें जाइंद्रियाचे ठाईं आधिक्य तो शब्दादिगुण त्याइंद्रियानें घेतला जातो असें दाखवितो.

इंद्रियालास्वविषयग्राहकत्वआणिअन्यविषयनिषेध सां०

इंद्रियेणेंद्रियार्थंतुस्वंस्वंगृण्हातिमानवः ॥
नियतंतुल्ययोनित्वान्नान्येनान्यमितिस्थितिः

अर्थ—मनुष्य इंद्रियें करून त्यात्याविषयाचें ग्रहण करितो. जसें. चक्षु. नियमेंकरून रूपघेतें. तशीं, शब्द, स्पर्श, रस, गंध, यांस कर्ण, त्वचा, जिव्हा, घ्राण, हीं ग्राहक होतात. याविषईं हेतु सांगतो. तुल्ययोनित्वात् ह्मणजे आपल्या आपल्या योनीप्रत भूतें जातात. जसें जळजळाप्रत जातें अन्य इंद्रियानें कारणभूता वांचून दुसऱ्याविषयाचें ग्रहण होत नाहीं असें जाणावें.

अन्यसांख्यादिकांशींक्षेत्रज्ञाविषईंआयुर्वेदाचाभेद. सांगतो.

नचायुर्वेदशास्त्रेषूपदिश्यंतेसर्वगताःक्षेत्रज्ञाःकिंतर्ह्या
युर्वेदेअसर्वगताःपुरुषाउपदिश्यंतेसत्वोपाधित्वात्.

अर्थ—आयुर्वेद शास्त्राचेठाईं क्षेत्रज्ञसर्वगत असेंमानित नाहीं. सत्वोपाधी आहे यास्तव क्षेत्रज्ञ असर्वगत असें मानितात. सांख्यादिकाचे ठाईं. क्षेत्रज्ञसर्वगत असें मानितात. क्षेत्रज्ञएकदेशी यास्तव अनित्यत्व येईल तर नित्याश्चोपदिश्यंते इतिशेषः पुरुषनित्य असें मानितात.

नित्यत्वकसेंतेंदाखवितो.

असर्वगतेषुक्षेत्रज्ञेषुनित्येषुनित्यपुरुषव्यापकत्वात्वेतूनुदाहरंति·

अर्थ—असर्वगत जे क्षेत्रज्ञ नित्य त्यांचेठाईं नित्यत्वप्रतिपादक असें सत्कारणत्वादिक हेतु दाखवितात ॥

तथाहिसन्नात्मासुखादिलिंगोपलंभात्अविषयोकारणश्च अतोनित्यः

अर्थ— आत्मासत्तावान् ह्मणजे भूत, भविष्य, वर्तमानकाळीं,आहे कारण त्यास सुखदुःखा दिलिंगांचा अनुभव होतो यास्तव अदृश्यअसून कारण आहे ह्मणूनच नित्य असें जाणावें.

यांविषयींभोज वचन,

शुभाशुभाभ्यांकर्मभ्यांप्रेरणान्मनसोगतेः देहाद्देहांतरंयातिकृमिवच्छा इवतोऽव्ययः ॥ नित्यइत्युच्यतेसद्भिःसन्नकारणवान्यतइति.

अर्थ—शुभाशुभ कर्मांनी मनाच्यागतीची प्रेरणा जी तीणें पूर्वदेहापासून उत्तर देहाप्रतग- मन करितो.यास दृष्टांत.जशी तृणजलूका अन्यतृणाश्रयकरून पहिलें धरिलेंलें तृणसोडिते. तसा पुरुष देहांतर घेतो. यास्तव पुरुष. शाश्वत, अव्यय, नित्य, याकरितां तो सत् अका- रण असा आहे.

सर्व मतांचा उपसंहार

आयुर्वेदशास्त्रसिध्दांतेषुअसर्वगताःक्षेत्रज्ञानित्याश्चेति.

अर्थ—आयुर्वेद शास्त्रसिध्दांताचेंठाईं पुरुष असर्वगत. व नित्य. असे जाणावें

असर्वगत जीवानां सर्व योनिगमन सां०

तिर्यग्योनिमानुषदेवेषुसंसरंतिधर्माधर्मनिमित्तं.

अर्थ—तिर्यग्योनि पशुपक्ष्यादिक व मानुष देव यांचे ठाईं पुरुष जन्म पावतात. याविषईं निमित्त. धर्माधर्म. परंतु तिर्यग्योनीचाठाईं फारजन्म होतात. यास्तव सूत्रांत तिर्यग्योनि प- द आदि घातलें. कारण पाप अधर्मफळ. पुण्यपापसमान मनुष्य देह. व पुण्यप्रधानदेवदेह असें जाणावें.

याविषयीं अनुमान

तेएतेनुमानग्राह्याःसुखदुःखोपलब्धिरूपेणलिंगेनाव्यभिचारिणा

अर्थ—ते आत्मे आनुमानग्राह्य जाणावे. अनुमान सुखदुःखोपलब्धी जाणावी. स्पष्टार्थ आत्म्यावांचून सुखदुःखानुभव होत नाहीं. जसें धूमानें अग्निचें अनुमान होतें. तशी सुखदुःखोपलब्धी आत्मज्ञानास कारण होत्ये.

प्रत्यक्ष प्रमाणानें क्षेत्रज्ञ कसे घेतले जात नाहीं तें सांगतो.

परमसूक्ष्माश्चेतनावंतः॥शाश्वत

लोहितरेतसःसन्निपातेषुअभिव्यज्यंते

अर्थ—क्षेत्रज्ञ परम सूक्ष्म परमाणू सारिखे चेतनावंत नित्य असे आहेत यास्तव दिसत नाहींत तर उत्पन्न कसे होतात तें सांगतो आत्मे परम सूक्ष्म असे होत्सातेही पंचभूतात्मक जीं शुक्र शोणितें त्याचा संयोगाचेठायीं प्रगट होतात जसे त्रसरेणू अन्यत्र न दिसतां गवा- क्षांतल्येकवडशांत स्पष्ट दिसतात.

वैद्यकानुमत पुरुषाला षट्धातुक संज्ञा सांगतात.

एषएवचसूक्ष्मपुरुषाणांभूतानांचसंयोगो वैद्यकेषट्धातुकःपुरुषःपरिभाषितः

अर्थ—वैद्य शास्त्रांत सूक्ष्म पुरुष व भूतें यांचा संयोगाला षड्धातुक पुरुष अशी अपर्व संज्ञा कशा वरून केली अशी शंका जाहाल्यास सांगतो.

याविषयीं प्रथमाध्यायस्थ वाक्य.

यतोभिहितंपंचमहाभूतशरीरसमवायःपुरुषइति

अर्थ—पंचमहाभूतांचा जो संयोग त्याला पुरुष ह्मणतात.

त्यालाच औषधोपयोगित्व.

सएषकर्मपुरुषश्चिकित्साधिकृतः

अर्थ—तो पुरुष कर्म फल भोक्ता यास्तव चिकित्सित कर्म फलही प्राप्त होतें असें जाणावें.

मनाचे संयोगानें जीवास गुण होतात ते सांगतो.

तस्यसुखदुःखेइच्छाद्वेषौप्रयत्नःप्राणापानौउन्मेषनिमेषौबुद्धिर्मनः

संकल्पविचारणा ॥ स्मृतिर्विज्ञानमध्यवसायोपलब्धिश्चगुणाः ॥

अर्थ—सुख दुःख, अभिलाष, अप्रीति, कार्या रंभक उत्साह, वक्र संचारी वायू, अधोवायू, डोळ्यांची उघडमिट, निश्चयात्मक अंतःकरण विशेष, संकल्प विकल्पात्मक, ऊहापोह, अनुभूत पदार्थाचें स्मरण, शिल्प शास्त्रादिकांचा बोध, बुध्दीचा व्यापार, शब्दादि विषयांची अवगती, या प्रकारें हे गुण जाणावे, हे कर्म पुरुषाचे सोळागुण यांला कळा ह्मणतात.

सत्वादिगुण युक्त मनाचे धर्म सांग०

सात्विकाआनृशंस्यंविभागरुचितातितिक्षासत्यंधर्म

आस्तिक्यंज्ञानंबुध्दिर्मेधाधृतिरनभिषंगश्च.

अर्थ—क्रूर कर्मा विषई अप्रवृत्ती, अन्न विभाग करून भोजनेच्छा, क्षमा, भूतहित, काय वाक् मनें करून उत्तमाचरण. परलोक, धर्म, मोक्षादिकां विषई विश्वास, आत्मज्ञान, ग्रंथाकर्षण शक्ती, मनोनियम, धैर्य फल निरपेक्ष बुध्दी. हे सत्वगुण युक्त जें मन त्याचे गुण जाणावे.

रजोधिक मनाचेगुण.

राजसादुःखबहुलता,अटनशीलता,अधृति,अहंकार,

अनृतिकत्व,मकारुण्यंदंभो,मनोहर्षःकामःक्रोधश्च.

अर्थ—अंतःकरण रजोगुणाशीं संयुक्त झालें असतां, दुःख बाहुल्य, अटनशीलता, अधृति, अहंकार, मिथ्यावचनशीलत्व, निर्दयपणा, कपटवृत्ती, आपल्या ठाईं उत्कर्षबुद्धी, कामक्रोधादिक, हे रजोगुणाचे धर्म जाणावे.

## तामस मनाचे धर्म.

तामसाविषादित्वंनास्तिक्यंअधर्मशीलताबुद्धिनि
रोधःअज्ञानंदुर्मेधत्वंअकर्मशीलत्वंनिद्रालुत्वंचेति.

**अर्थ**—रागिटपणा, नास्तीकपणा, सर्वकाळ अधर्मी बुद्धि, दुर्बुद्धिपणा, हे तमोगुणाशीं युक्त अंतः करणाचे गुण जाणावे.

## महाभूतांचे गुण सां०

अंतरिक्षाःशब्दःशब्देंद्रियंसर्वच्छिद्रसमूहो विविक्तताच ।।

**अर्थ**—आकाशाचेगुण शब्द व शब्देंद्रिय व सर्व छिद्रसमूह विविक्तता ह्मण० सर्व शरीरसंबंधी जे पदार्थ शिरा, स्नायु, अस्थि, पेशी इत्यादिक त्यांचें जातिव्यक्ती करून पृथक् करण असें जाणावें.

## वायुचेगुण.

वायव्याःस्पर्शःस्पर्शेंद्रियंसर्वचेष्टासमूहःसर्वशरीरस्पंदनंलघुताच.

**अर्थ**—वायूचे गुण, स्पर्श, स्पर्शेंद्रिय, व सर्वचेष्टासमूह, व सर्वशरीरस्पंदन, व लघुता हे जाणावे.

## तेजाचे गुण.

तैजसाःरूपंरूपेंद्रियंवर्णःसंतापोभ्राजिष्णु
तापंक्तिरमर्षःतैक्ष्ण्यंआशुक्रियाशौर्यविक्रांतता.

**अर्थ**—तेजाचे गुण रूप रूपेंद्रिय वर्ण संताप व शोभणें व पंक्ती व अमर्ष तैक्ष्ण्यव सर्व कर्मीविषई त्वरा, व महाशूरत्व हे जाणावे,

## उदकाचे गुण.

आप्यारसोरसनेंद्रियंसर्वद्रवसमूहोगुरुताशैत्यंस्नेहोरेतश्च.

**अर्थ**—उदकाचे गुण, रस, रसनेंद्रिय, सर्वद्रवसमूह, गुरुता, शैत्य, स्नेह, व रेत, असे, जाणावे.

## पृथ्वीचे गुण.

पार्थिवास्तुगंधोगंधेंद्रियंसर्वमूर्तिसमूहोगुरुताचेति.

**अर्थ**—पृथ्वीचे गुण. गंध, गंधेंद्रिय, सर्व मूर्तिसमूह, व गुरुता हे जाणावें.

## आकाशादि भूतांचे सत्वादिगुणाचें स्वरूप सांगतो.

तत्रसत्वबहुलमाकाशंप्रकाशकत्वात्.

**अर्थ**—आकाश प्रकाशक आहे, यास्तव त्यामध्यें सत्वगुण बहुत आहे. असें जाणावें.

## वायुचेधर्म.

रजोबहुलोवायुःचलत्वात्

**अर्थ**—वायु चंचल आहे यास्तव. रजोगुण त्याचाठाई बहुत आहे असें जाणावें.

## अग्नि धर्म.

सत्वरजोबहुलोऽग्निःप्रकाशकत्वाच्चलत्वाच्च.

**अर्थ**—तेज, प्रकाशक, आणि चंचल, आहे यास्तव त्यामध्यें सत्वरजोगुण आहेत.

## उदक धर्म.

सत्वतमोबहुलाःआपःस्वच्छत्वात्प्रकाशकत्वात्गुर्वाचरणत्वात् ॥

**अर्थ**—उदक, स्वच्छ, व प्रकाशक, व गुरु, आहे यास्तव त्यामध्यें सत्व तमोगुण बहुत आहेत.

## पृथ्वी धर्म.

तमोबहुलापृथ्वीअत्यंतावरकत्वात्.

**अर्थ**—पृथ्वी, फार जड यास्तव तीमध्यें तमोगुण विशेष आहे असें जाणावें,

## पंचीकरण सांगतो.

अन्योन्यानिप्रविष्टानिसर्वाण्येतानिनिर्दिशेत् ॥
स्वेस्वेद्रव्येषुसर्वेषांव्यक्तंलक्षणमिष्यते ॥

**अर्थ**—आकाशादि पंच महाभूतें परस्परांमध्यें प्रविष्ट आहेत त्यांचीं लक्षणें आपआपल्ये द्रव्याचे ठाई व्यक्त असतात असें जाणावें.

## कारण गुणाची कार्यांत व्याप्ती सांगतो.

तत्रशब्दगुणमाकाशंमारुतेप्रविष्टंशब्दस्पर्शगुणत्वान्मारुतस्य.

**अर्थ**—शब्द गुणक आकाश. वायुमध्यें प्रविष्ट आहे, यास्तव वायूला आकाशाचा गुण शब्द, व स्वनिष्ठ स्पर्श. असे दोन गुण आहेत, व आकाश, वायू, हे तेजांत प्रविष्ट, तेणें करून तेजाचे ठाई शब्द, स्पर्श, आणि तेजांचा गुण रूप, हे तीन आहेत. आकाश, वायू, तेज, हीं उदकांत प्रविष्ट आहेत तेणें करून उदकाला शब्द, स्पर्श, रूप, व स्वनिष्ठ रस असे चार आहेत. व आकाश, वायू, तेज, जल, हीं पृथ्वींत प्रविष्ट. तेणें करून पृथ्वीला शब्द, स्पर्श, रूप, रस, व स्वनिष्टगुण गंध, असे पांच आहेत.

एवंव्योमानिलानलजलोर्वीणांपरस्परप्रवेशकत्वा
नुप्रवेशकत्वेतावत्स्थितानांअन्योन्यानुप्रवेशकत्वमुक्तं.

**अर्थ**—या प्रकारें आकाशादि पंचमहाभूतें परस्परांमध्यें प्रविष्ट अनुप्रविष्ट होऊन राहिलीं आहेत, त्यांला अन्योन्यानु प्रविष्टत्व सांगितलें.

## अन्य आचार्य अन्योन्यानुप्रविष्टानि याचें अन्यप्रकारें करून व्याख्यान करतात.

तत्रआकाशेभूरणुरूपेणावास्थिता.

**अर्थ**—आकाशामध्यें पृथ्वी अणुरूपें करून आहे, व वायुहि सूक्ष्मरूपें करून, उदक व

तेज यांचेठाईं संचार करीत आहे. यास्तव आकाशाचे ठाईं वायू, तेज, व उदक, हीं आहेत तसें आकाशव्यापक आहे यास्तव वायूमध्येंहि आहे असें जाणावें.

## याविषईं प्रमाण दाखवितात.

**अनुष्णाशीतस्पर्शोयंद्रव्यश्चैवायुरिष्यते ।।**

**दाहकृत्तेजसायुक्तःशीतकृत्सोमसंश्रयादिति.**

**अर्थ**—अनुष्ण, अशीत, असा ज्याचा स्पर्श आहे त्याला पृथव्यादि नव द्रव्यांचे जाणते वायू ह्मणतात, तो वायू तेजाशीं युक्त होऊन दाह करितो. व उदकाशीं युक्त होऊन शैत्य करतो. येणें करून असें सिद्ध होतें कीं. वायू. उदकं, तेज, यांत आहे, व वायूचे ठाईं तेज व उदक हीं राहातात व पृथ्वी अणुरूपें करून वायूचा ठाईं राहात्ये. तसें तेजो द्रव्याचे ठाईं आकाश व्यापक आहे यास्तव राहातें. वायू प्रेरणात्मक आहे यास्तव. तेजाचे ठाईं आहे असें अनुमान होतें. तसें तेजाचे ठाईं उदकाचें अनुमान होतें. याला हेतु कार्य आणि कारण यांचें ऐक्य, येथें उदक कारण, आणि तेज कार्य, उदका पासून अग्नी उत्पन्न होतो असें ऋषि वचन आहे यास्तव.

## पृथ्वीचा प्रवेश अन्यत्र दाखवितो.

**भूमिरपिभूमादिरूपेणतेजसिव्यवस्थिता.**

**अर्थ**—भूमी हि. भूमादिरूपें करून तेजाचे ठाईं राहात्ये.................................

## कार्यांतकारण व्याप्ती दाखवितो.

**अथतोयद्रव्येप्याकाशंवावस्थितंव्यापकत्वात्.**

**अर्थ**—आकाश व्यापक आहे. ह्मणून उदकाचे ठाईं राहातें. व वायू. तरंग. बुदबुदा दिकाचें कारण. यास्तव उदकाचेठाईं राहातो, अग्निही उदका पासून उत्पन्न आहे यास्तव त्याचे ठाईं राहतो असें जाणावें.

**अद्भ्योग्निरश्मनोलोहमुत्थितं ।। तेषांसर्वत्रगंतेजःस्वासुयोनिषुशाम्यति ।।**

**अर्थ**—उदका पासून, अश्मा पाषाणा पासून लोह, उत्पन्न होतें. या प्रकारें सर्वत्र राहाणारें तेज आपल्ये कारणाचेठाईं शांत होतें.

## पृथ्वी उदकांत कशी राहत्ये.

**भूमिरपितोयद्रव्येअणुरूपेणव्यवस्थिता.**

**अर्थ**—पृथ्वी ही उदकाचेठाइ अणुरूपें करून राहात्ये ..................................

**तथापृथिव्यामपि आकाशपवनदहनतोयानिएवंभूमेः**

**प्रविभागीयेपंचविधायाभूमेःप्रोक्तत्वात्**

**अर्थ**—भूमीचेठाईं ही. आकाशादि पंच महाभूतें आहेत प्रमाण ज्यास्थळीं भूमिचे वि-

भाग सांगितले त्यास्थळीं पांच प्रकारची भूमी सांगितली आहे. यास्तव या प्रकारें करून पंच महाभूतांचें अन्योन्यानुप्रवेशत्व सांगितलें.

## स्वेस्वेद्रव्ये इत्यादि.

अर्थ—स्वकीय द्रव्याचेठाई. आकाशादिकांचे व्यक्त लक्षण असतें, जसें आकाश द्रव्याचे ठाईं आकाश लक्षण शब्द. तो व्यक्त आहे, तसें सर्वत्र जाणावें.

## सर्वांचा उपसंहार करितो.

अष्टौप्रकृतयःप्रोक्ताविकाराःषोडशैवतु॥

क्षेत्रज्ञश्चसमासेनस्वतंत्रपरतंत्रतइति ॥

अर्थ—अव्यक्त, महान्, अहंकार, पंचभूतें, या प्रकारें आठ प्रकृती सांगितल्या, व श्रोत्र त्वक्, चक्षु, जिव्हा, घ्राण, वाक्, पाणी, पाद, पायु, उपस्थ, मन, या प्रकारें एकादश इंद्रियें. व पंच महाभूतें. एकूण सोळा विकार सांगितले. स्थूल, सूक्ष्म, शरीर यांतें जाणतो तो क्षेत्रज्ञ. त्याला पुरुष ह्मणतात. या प्रकारें पंचविंशति तत्वाचें निरूपण शल्यतंत्र व सांख्यतंत्र यांचेठाईं केलें आहे असें जाणावें ॥ इति शारीरे निबंध संग्रहे प्रथमो ध्यायः ॥ १ ॥

---

श्री. शुक्र शोणिताचे संयोगानें पुरुष अभिव्यक्त होतात. असें पूर्वी सांगितलें. येथें शुध्द जीं शुक्रशोणितें त्यांचेचठाई पुरुष अभिव्यक्त होतात यास्तव शुक्रशोणिताचे शुध्दीचें प्रतिपादन करितो.

## अथातःशुक्रशोणितशुद्धिंशारीरंव्याख्यास्यामः

**अर्थ**—पंचविंशति तत्वनिरूपणानंतर शुक्रशोणित शुद्धी शारीर सांगतो. शुक्रशोणित यांत शोणित शब्द स्त्रियांचें आर्तवाचा बोधक जाणावा. शुद्धी ह्मणजे दुष्ट जे वातादिक त्यांची असंपर्कता, ती शुद्धी. वातादिकानीं दुष्ट झालें जें शुक्र याचीच जाणावी.

## प्रजोत्पादन न होणाऱ्या रेतशुक्राचीं लक्षणें.

वातपित्तश्लेष्मशोणितकुणपगंध्यनल्पग्रंथि
पूतिपूयक्षीणरेतसःप्रजोत्पादनेनसमर्थाः

**अर्थ**— वायु, पित्त, कफ, रक्त, इहिंकरून दूषित आहे वीर्य ज्याचें, व कुणप गंधि, अनल्प, व ग्रंथि, व पूति, पूयनिभ, ह्म० दुर्गंधयुक्त पुवासारिखें, व क्षीण वीर्य, ते पुरुष प्रजोत्पादना विषईं समर्थ नाहींत.

## वातादिकानीं दुष्ट शुक्राचीं लक्षणें.

तत्र वातवर्णवेदनंवातेन पित्तवर्णवेदनांपित्तेनश्लेष्मवर्णवेदनंश्लेष्मणाशो
णितवर्णपित्तवेदनंरक्तेन कुणपगंध्यनलंचरक्तेन ग्रंथिभूतंश्लेष्मवाता
भ्यांपूतिपूयनिभंपित्तश्लेष्मभ्यांक्षीणशुक्रंप्रागुक्तंपित्तमारुताभ्यांमूत्रपु
रीषगंधिसर्ववर्णवेदनंसान्निपातेनेति.

**अर्थ**—दुष्टजाले जे वातादिदोष त्यामध्यें. वायूनें जें शुक्रदूषित झालें, तें वायूचें वर्ण कृष्ण, आरक्तादि, व तोदादिकाहीं युक्त होतें. यद्यपि वायूला वर्ण नाहीं. तथापि वायूनें दूषित. जो मनुष्य त्याचेठाई कृष्ण अरुणादि. वर्ण भासतात. तेच वायूचे वर्ण जाणावे. अहो एका वायूपासून अनेक वेदना तोदादिक कशा होतील अशी आशंका करून उत्तर देतो.

## बहुकारणंप्रकोपस्य.

**अर्थ**— वायूचे प्रकोपाचीं कारणें अनेक आहेत. यास्तव बहुत प्रकारचे विकार होतात. गंध तर वायूला नाहींच, व पित्तेंकरून दूषित झालें जें शुक्र त्याला उष्णपणा. दाह. आणि पीत, नील, वर्ण, व शवगंधी, व दुर्गंधयुक्त पुवासारिखें असतें, व कफानें दूषित जें शुक्र तें कफाचावर्ण, कफ विकार, यांणीं युक्त असतें. व रक्तानें दूषित जें शुक्र तें आरक्त वर्ण. व पित्त विकारानीं युक्त असतें, व रक्तेंकरून शुक्र. प्रेतगंधि आणि बहुत होतें. येथें रक्तानें दूषित शुक्र असा व्यवहार होतो तो जसा तुपानें, तेलानें, भाजला असा व्यवहार होतो तसा,

भाग सौ. तात्पर्य जशी घृतादिक अग्नीनें उत्पन्न होऊन दुसऱ्यास तप्त करितात. तसें येथें रक्त पंच दिकानीं दूषित होऊन, शुक्रादिकांला दूषित करितें. कफ आणि वायू यांणीं दूषित शुक्र तें गांठळ होतें, व पित्त कफानें दूषित शुक्र दुर्गंधयुक्त, पुवासारिखें होतें. व पित्तवायूनीं दूषित शुक्र क्षीण होतें. यांचें लक्षण दोष, धातु, मळ, यांचें क्षय वृद्धिप्रकरणी सांगितलें आहे. सन्निपातानें दूषित शुक्र, जें मूत्र, विष्ठागंधि, व पूर्वोक्त, सर्व दोषाचे विकार त्यांहीं युक्त असतें.

## दुष्ट शुक्राचे साध्यासाध्य प्रकार सांगतों.

### तेषुकुणपग्रंथिपूयक्षीणरेतसःकृछ्रसाध्याःमूत्रपुरीषारेतसोअसाध्याः

अर्थ—त्यामध्यें कुणप, ग्रंथी, पूय, आणि क्षीण, या चार प्रकारचें शुक्र कृछ्र साध्य. आणि मूत्र, पुरीष गंधि, शुक्र असाध्य, राहिलें तें साध्य.

## आर्तवाचे दोष सांगतों.

### आर्तवमपित्रिभिर्दोषैःशोणितचतुर्थैःपृथक्द्वंद्वैःसमस्तैश्चोपसृष्टंअबीजंभवति.

अर्थ—आर्तव वातादि दोष व रक्त या प्रत्येक कानीं अथवा द्वंद्वानें किंवा सर्वांनीं मिळून दूषित झालें असतां गर्भ धारणा विषईं योग्य होत नाहीं असें जाणावें.

## त्याचि परीक्षासांगतो.

### तदपिदोषवर्णवेदनाभिर्विज्ञेयं.

अर्थ—विकृत आर्तवही. पूर्वोक्त वातादिकांचे जे वर्ण व विकार त्यांणीं जाणावें.

## त्यांचें साध्या साध्यलक्षण.

### तेषुकुणपग्रंथिपूतिपूयक्षीणमूत्रपूरीषप्रकाशम
### साध्यंसाध्यमन्यच्चेति आर्तवदोषायाप्यानभवंति.

अर्थ—आर्तव दोषामध्यें, कुणप गंधि, ग्रंथि, दुर्गंध युक्त, पुवा सारिखें, क्षीण व मूत्र आणि पुरीषगंधि, हे असाध्य जाणावे. अन्य राहिले ते साध्य जाणावे. आर्तव दोष याप्य होत नाहींत, अतः पर शुक्र दोषांची चिकित्सा सांगतो.

## शुक्र दोष चिकित्सा.

### तेष्वाद्यान्शुक्रदोषान्त्रीन्स्नेहस्वेदादिभिर्जयेत् ॥
### क्रियाविशेषैर्मतिमान्तथाचोत्तरबस्तिभिः ॥

अर्थ—त्या शुक्र दोषामध्यें. पहिले कुणपगंधादि तीन दोष घृतादि स्नेह. पान, वाम काढणें व वमन, ढाळक, निरूह बस्ती, अनुवासन बस्ती, व उत्तर बस्ती, यांणीं जिंकावे ( निरूहादि बस्ती ह्मणजे मल मूत्र द्वारांत स्नेह मिश्रित कषाया दिकांच्या चिप्नळय सोडायाचा प्रयोग आहे ) तो त्या त्या प्रकरणीं स्पष्ट होईल. पुनः उत्तर बस्ती कथन मूलामध्यें विशेषानें केलें ते तिला सर्व उपचारामध्ये प्राधान्य सुचवायासाठीं जाणावें

## चिकित्सा.

पाययेत्तंनरंसर्पिर्भिषक्कुणपरेतसि ॥ धातुकीपु
ष्पखदिरदाडिमार्जुनसाधितं ॥ पाययेदथवासर्पिः
शालसारादिसाधितं ॥

अर्थ—ज्या मनुष्याचे रेताला शवाचा गंध येतो. त्याला वैद्यानीं गाईचें तुप घेऊन धाइ-टीची फुलें व खैराचाकात डाळिंब व अर्जुन सादडा या औषधांचा कल्क किंवा कषाय करून त्या तुपाला संस्कार करून तें तुप पाजावें. अथवा राळेचे कल्क कषायादिके करून त्या तुपाला संस्कार करून पाजावें.

ग्रंथिभूतेशठीसिद्धंपालाशेवापिभस्मनि ॥

अर्थ—ज्याचें रेत ग्रंथिभूत झालें आहे. त्या पुरुषाला कचोऱ्याचे कांद्याचा कल्क व कषा या मध्यें तूप सिध्द करून पाजावें. किंवा पळसाचा क्षारानें तूप सिध्द करून पाजावें.

## पुवासारिखे वीर्यावर घृत.

परूषकवटादिभ्यांपूयप्रख्येचसाधितं

अर्थ—परूषकादिगण. व न्यग्रोधकादि गण. पुढें सांगायाचे आहेत त्या औषधांचे कल्क. व कषायादिकें करून तूप सिद्ध करून पाजावें.

## क्षीण रेतावर उपचार.

प्रागुक्तंवक्ष्यतेयच्चतत्कार्यंक्षीणरेतसि.

अर्थ—ज्याचें वीर्य क्षीण झालें आहे त्या पुरुषाला. पूर्वी सांगितलीं जीं स्वयोनिवर्धन द्रव्यें तीं व पुढें सांगावयाचीं आहेत तीं वाजीकरणें क्षणिरेतस पुरुषाला योजावीं.

## मळगंधि शुक्रावर घृत.

विड्भेतुपिबेत्सिद्धंचित्रकोशीरहिंगुभिः ॥

अर्थ—ज्या पुरुषाचें विर्य मळगंध झालें. त्याला चित्रक, वाळा, हिंग, याचे कल्के करून सिद्ध केलेलें तूप पाजावें. जरी पुरुषासारिखें वीर्य असाध्य आहे तथापि दुःखकारक वि-ष्ठादि गंध निवार्णार्थ हा उपचार करावा. सर्वथा रोग आग्याविषीं नव्हे.

## शुक्र दोषावर सामान्य उपचार.

स्निग्धंवांतंविरक्तंचनिरूहमनुवासितं ॥
योजयेच्छुक्रदोषार्तंसम्यगुत्तरबस्तिना ॥

अर्थ—ज्या पुरुषाचें वीर्य. कुणप गंधतुल्य झालें आहे. त्या पुरुषाला, स्नेहपान, वमन, विरेच, निरूह बस्ती, अनुवासन बस्ती, उत्तर बस्ती, इत्यादि उपचार करून साधावा.

## शुध्दशुक्रलक्षण.

स्फटिकाभंद्रवंस्निग्धंमधुरंमधुगंधिच ॥
शुक्रमिच्छंतिकेचित्तुतैलक्षौद्रनिभंतथा॥

अर्थ—जें शुक्र. स्फटिका सारिखें निर्दोष असून द्रवरूप व स्निग्ध व मधुर व जाला मधाचा गंधा सारिखा गंध येतो. तें शुक्र गर्भ धारणा विषईं श्रेष्ठ जाणावें. कोणी ह्मणतात कीं. तेला सारिखें, व बारीक माशांचे मधा सारिखें, असतें तें शुद्ध गर्भ धारणास योग्य असें जाणावें.

## आर्तवावरसामान्य उपचार.

विधिमुत्तरबस्त्यंतंकुर्यादार्तवसिद्धये ॥
स्त्रीणांस्नेहादियुक्तानांचतसृष्वार्तवार्तिषु ॥ कुर्यात्
कल्कान्पिचूंश्चापिपथ्यान्याचमनानिच ॥

अर्थ—वात, पित्त, कफ, आणि रक्त, या चार आर्तव पीडा. त्यांचे शमना विषईं स्नेह, वमन, विरेकादि, उत्तर बस्त्यंत उपचार, वातादि दोषांचा तारतम्यें करून करावे, व वातादि दोष हरक द्रव्यांचे कल्क, कषाय करून योनीचें प्रक्षालन व लेप व पिचू करावे. पिचू ह्मणजे तेल, कल्क, कषायादिकें करून कापुस भिजउन त्याची घडी देण्याचा प्रकार, हा प्रकार. नेत्र, तालु, योनी, मुख इत्यादिकांचे ठाईं करीत असतात, उदाहरण कापुस थानातल्ये दुधानें भिजउन डोळ्यांवर निवळ घालितात. तो नेत्र पिचू जाणावा. व वातादि हारक कषाय व घृतादिस्नेह ईहीं करून निरूहबस्ती, अनुवासनबस्ती, प्रयोग करावे. व त्याप्रकारें सर्व प्रकारांवर उत्तरबस्ती प्रयोग करावा. गयीनुचतसृषु या पदामधली चवथी शोणित प्रकृतिभूत जी बस्तगंधी शोणितार्तवार्ति मानितो याचें कारण. ही बस्तगंधी शोणितार्ति मात्र साध्य आहे. कुणप गंधी आर्तवार्ति साध्य नाहीं. यास्तव वातादि दोष हारक द्रव्य संबंधीं कल्कादिक योनि दोष प्रकरणीं सांगितले आहेत ते घ्यावे.

## आर्त व दोषांवर सामान्य उपचार.

ग्रंथिभूतेपिबेत्पाठांत्र्यूषणंवृक्षकानिच ॥ दुर्गंधेपूयसं
काशेमज्जतुल्येतथार्तवे ॥ पिबेद्भद्रश्रितंकाथंचंदनक
थमेवच ॥ शुक्रदोषहराणांचयथास्वमवचारणं ॥ यो
गानांशुद्धिकरणंशेषास्वप्यार्तवार्तिषु ॥

अर्थ—आर्तव गांठळ जालें अस्तां. पाहाड मूळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, चिंचेचीसाल या औषधांचा काढा करून प्यावा. व मूत्रपुरीषगंधि व दुर्गंध युक्त. पूयासारिखें ह्म० कफ पित्तानें दुष्ट, व मज्जे सारिखें ह्म० त्रिदोष दुष्ट. असें आर्तव झालें असतां. श्वेतचंदन व रक्तचंदन, यांचा काढा करून पाजावा, गयी ह्मणतो श्वेत चंदन आणि रक्तचंदन ह्मणजे गोरोचन, याचें कारण रक्तचंदनाला दुर्गंध दूरकरण्याची शक्ती नाहीं. यास्तव गोरोचन घ्यावें. व दुर्गंध ह्म० कुणपगंधी असें व्याख्यान करितो. यद्यपि कुणप गंधादि पांच आ-

सर्वे असाध्य तथापि पूर्ववत् दुर्गंध नाशार्थ उपचार करावे. अन्य राहिले जे वातादि संबंधी आर्तव दोष, त्यांचे ठायीं पूर्वी सांगितले जे शुक्र दोष हरक उपचार ते करावे.

## सर्व आर्तव दोषांचे पथ्य सांगतो.

अन्नंशालियवंमद्यंहितंमांसंचापिच्छिलं ।।

अर्थ—शाली व यव यांचें अन्न व मद्य मांस व पिच्छल पदार्थ आर्तव दोषांविषई पथ्यकर जाणावें.

## शुध्दआर्तवाचें लक्षणसांगतो.

शशास्रप्रतिमंयच्चयद्वालाक्षारसोपमं ।।
तदार्तवंप्रशंसंतियद्वासोनविरंजयेत् ।।

अर्थ—जें आर्तव, ससाचे रक्ता सारखें आरक्तवर्ण, किंवा लाखेचे रंगासारिखें आरक्तवर्ण, असतें आणि वस्त्रावर पडलें असता ही वस्त्रावर डाग पडत नाहीं, वस्त्र धुतल्यावर स्वच्छ होतें. तें आर्तव, निर्दोष, जनन योग्य, असें जाणावें.

## रक्त प्रदराचें लक्षण.

तदेवातिप्रसंगेनप्रवृत्तमनृतावपि ।। असृ
ग्दरंविजानीयात्अतोन्यद्रक्तदर्शनात्.

अर्थ—तें आर्तवच अतिप्रसंगेन प्रवृत्त म्हणजे ऋतुकाळा वांचूनही बहूतस्त्रवुं लागलें असतां तें असृग्दर जाणावें. परंतु पूर्वी सांगीतलीं जीं शुध्द आर्तवाचीं लक्षणें, शशास्रप्रतिम इत्यादि त्या वांचून जीं अन्य लक्षणें फेनिल, शीघ्रगामी, कंडूर, इत्यादिक तीं असतां, असें जाणावें.

## असृग्दराचे दोष संबंधकृत व व्याधिस्वभाव कृत सामान्य लक्षण सांगतो.

असृग्दरोभवेत्सर्वःसांगमर्दःसवेदनः ।।
तस्यातिवृद्धौदौर्बल्यंभ्रमोमूर्छामदस्तृषा ।। दाहः
प्रलापःपांडुत्वंतंद्रारोगाश्चवातजाः ।।

अर्थ असृग्दराचे सर्व प्रकारांचेठाई. आंगमोडे, व शूलादि वेदना होतात, आणि या रोगाची अति वृध्दी झाली अस्तां म्ह० आर्तवफार स्त्रवुं लागलें असतां. अशक्तपणा, मूर्छा, भ्रम. (मद. धोत्र्याचाबिया खाल्यासारिखी आवस्था) तृषा व आगांचा दाह व प्रलाप आंगाम पांडुरपणा, डोळ्यांस झांपण आणि वातजरोग आक्षेपकादि इत्यादि उपद्रव होतात असें जाणावें.

## रक्त प्रदरावर वयपरत्वें उपचार.

तरुण्याहितसेविन्यास्तदाल्पोपद्रवंभिषक्
रक्तपित्तविधानेनयथावत्समुपाचरेत् ।।

अर्थ जी स्त्री तरूण षोडश वार्षिकी असून हितपदार्थ सेविते. तिचा असृग्दर. अल्प उपद्रव युक्त असतां रक्तपित्त संबंधी उपचारें करून वैद्यांनीं जिंकावा.

## आर्तवाची अप्रवृत्ति लक्षण विकृति चिकित्सेसुद्धां सांगतो.

दोषैरावृतमार्गत्वादार्तवंनश्यातिस्त्रियः

तत्रमत्स्यकुलित्थाम्लतिलमाषसुराहिता

मुत्रपानमुदश्विचदधिसूक्तंचभोजनं ॥

अर्थ मुळामध्यें दोषैः एथें दोषशब्दें करून कफ व वायू अथवा वायू कफ मिळून घ्यावे पित्तनव्हे पित्तें करून आर्तवाची अति प्रवृत्ति होते. असें सांगीतलें आहे. यास्तव. या वात कफ दोषांनी आर्तवाचा मार्ग रोधिला असतां स्त्रियांचें आर्तवनष्ट होतें, ह्मणजे प्रवृत्त होउ न दिसत नाहीं असें होतें. सर्वथा नष्ट होतें असें नाहीं. अशि अवस्था जाली असतां, मत्स्य कुलित्थ अम्ल ह्म० कांजी व तीळ उडीद हे पदार्थ भक्षणांस हित कारक होतात, गोमूत्राचें पान व उदश्वित् ह्म० अर्धेपाणि व अर्धे दहीं घुसळून केलेला मठ्ठा, व दहीं, व सूक्त ह्मणजे चुका यानामें करून एक भाजी आहे ती, हे पदार्थ भोजना विषई हितकारक जाणावें.

क्षीणंप्रागीरितंरक्तंसलक्षणचिकित्सितं ॥

तथाप्यत्रविधातव्यंविधानंनष्टरक्तवत् ॥

अर्थ—क्षीणरक्त लक्षणा सह वर्तमान व चिकित्से सहवर्तमान पूर्वीदोष, धातुमल, क्षय, वृद्धि प्रकरणीं सांगीतले आहेत तथापि येथें त्याचें ग्रहण केलें आहे यास्तव नष्टरक्ता विषईं सांगीतले जे उपचार. मत्स्य, कुलित्थ, इत्यादिक ते याविषईं उपचार करावें पूर्वोक्ताचा उपसंहार करून बोलतो. एवमदुष्ट शुक्रः शुद्धार्तवीच या प्रकारें अदुष्टवीर्य पुरुष आणि शुद्धार्तवाची होये असें जाणावें.

## ऋतुकालीं सुपुत्रो त्पादक स्त्रियांचा आचार.

ऋतौप्रथमदिवसप्रभृतिब्रह्मचारिणीदिवास्वप्नांजना

श्रुपातस्नानानुलेपनाभ्यंगनखच्छेदनप्रधावनहसन

कथनातिशब्दश्रवणावलेखनानिलायासान्परिहरेत् ॥

अर्थ—स्त्रीला ऋतू प्राप्त झाला असतां ती प्रथम दिवसा पासून त्रिरात्र ब्रह्मचारिणी होत्ये तिणें दिवसास निद्रा, कज्जल, धारण, रोदन, स्नान. अनुलेपन, अभ्यंग, नखच्छेदन ह्मणजे नखें काढणें किंवा कुर्तुडणें व धांवणें हसणें फार गोष्टी करणें व अतिशब्द श्रवण लेखन, पंख्यानें वारा घेणें. इत्यादिक वर्जावीं याचें कारण सांगतो, दिवसास निजलें असतां गर्भस्थ झोंपाळू होतो, काजळ घातलें तर अंध रोदनें करून विकृत दृष्टि होतो, स्नानानुलेपनें करून दंत, ओष्ठ, तालु, जिव्हाही श्यामवर्ण होतात, अतिकथनें करून प्रलापी होतो वायू व आयास यांच्या सेवनानें उन्मत्त होतो, यास्तव हीं सर्व वर्जावीं.

## रजस्वला धर्म.

दर्भसंस्तरशायिनींकरतलशरावपर्णान्यतमभोजिनीं
हविष्याहारांत्र्यहंभर्तुःसंरक्षयेत् ॥

**अर्थ**—दर्भास्तरणावर शयन करणारी आणि तळाथ, परळ, पान, यां मधून कोणत्या एकावर अन्न घेऊन जेवणारी, व हविष्याहारा, ह्मणजे घृत शाल्योदनादि, किंवा क्षीर संस्कृत यवान्नादिक यांचा आहार करणारी, अशा स्त्रीतें वैद्यांनी भर्त्या पासून त्रिरात्र संवरक्षावी ह्मणजे तीन दिवस भर्त्याचे दृष्टीस पाडूं नये.

ततःशुध्दस्नातांधौतवाससमलंकृतां ॥ कृत
मंगलस्वस्तिवाचनंभर्तारंदर्शयेत् ॥

**अर्थ**—ततः तृतीय दिवसा नंतर शुध्दा ह्मणजे सांचलेले जीर्ण शोणिताचा लोप होऊन नवे आर्तव प्राप्त होतें यास्तव आर्तवें करून स्त्री शुध्द. होत्ये या विषईं प्रमाण तदुक्तं.

॥ नवेऋतौचसंजातेविगतेजीर्णशोणि
नारीभवतिसंशुध्दापुमांसंसृजतेतदा

**अर्थ**—नवें आर्तव प्राप्त होऊन जुनें सांचलेलें गेलें अस्तां स्त्री शुध्द होत्ये त्या कालीं. पुरुषासहवर्तमान युक्त व्हावयास योग्य होत्ये. तशी शुध्द झालेली नंतर चवथ्ये दिवशीं स्नान करून धौतवस्त्र परिधान करून व हरिद्रा कुंकुमादि उत्तम अळंकार करणारी अशी स्त्री जे तीतें मंगल स्वस्तिवाचन केलें आहे जाणें असा भर्ता जो त्यालाच उत्तम प्रकारें दाखवावी.

## याविषयीं प्रमाण.

पूर्वंपश्येदृतुस्नातायादृशंनरमंगना ॥
तादृशंजनयेत्पुत्रंभर्तारंदर्शयेत्ततः ॥

**अर्थ**—ऋतु स्नाता स्त्री पहिल्यानें ज्या पुरुषाला पाहात्ये. त्या सारिख्या पुत्राला प्रसवत्ये. यास्तव पूर्वीं भर्त्यालाच दाखवावी.

ततोविधानंपुत्रीयंउपाध्यायःसमाचरेत् ॥
कर्मांतेचक्रमंह्येतमारभेच्चाविचक्षणः॥

**अर्थ**—ततः ह्मणजे भर्त्याला दाखविल्यानंतर. विचक्षण आचार्य ह्मणजे ब्राह्मण वरिला होताता उत्तम धौत असें वस्त्र परिधान करून मृगासनावर बसलेला. त्या आचार्यानें पुत्र जन्म सूचक असें आज्य होम प्रधान कर्म आहे. तें आरंभावें. समाप्त झाल्यानंतर वक्ष्यमाण विविध विधि करवावा तो सांगतो.

गर्भादानदिवसीनियमवगमनदिवस.

ततोपराण्हेपुमान्मासंब्रह्मचारीसर्पिःस्निग्धः सर्पिःक्षीराभ्यांशाल्योदनंभुक्त्वा ॥ मासंब्रह्मचारिणींतैलस्निग्धांतैलमाषोत्तराहारांनारीमुपेयाद्रात्रौसामभिर्निश्वास्य ॥ विकल्प्यैवचतुर्थीषष्ठ्यांअष्टम्यांदशम्यांद्वादश्यांचोपेयात्पुत्रकामइति.

अर्थ—उक्तकर्मे समाप्त झाल्या नंतर मासपर्यंत ब्रह्मचारि व्रत धारण करणाऱ्या पुरुषानें अपराण्हकाळी आंगाला तूपलाउन स्नानकरून तूप व दुग्धयाणीं स्निग्ध असें शाल्योदन भक्षण करावें. नंतर, मासपर्यंत ब्रह्मचर्य व्रतस्थ आणि आंगाला तेललावून स्नानकरून तैलमाष प्रधान भोजन केलेली अशा स्त्रीला सामवाक्यानी आश्वासन देऊन त्या स्त्रीप्रत चवथी, साहावी, आठवी, दाहावी, बारावी, यारात्री मधून एका रात्रीचे ठाईं. सुमुहूर्त पाहून व वक्ष्यमाण श्रुतीचा विचारकरून गमनकरावें. तीफलश्रुती सांगतो.

उत्तरोत्तरदिवशींगमनफळ.

एषूत्तरोत्तरंविद्यादायुरारोग्यमेवच ॥
प्रजासौभाग्यमैश्वर्यंबलंचदिवसेषुच ॥

अर्थ—चतुर्थादि पुर्वोक्त रात्री जा त्यांचा ठाईं, उत्तरोत्तर आयुष्य, आरोग्य, प्रजा, सौभाग्य ऐश्वर्य, बल, ईहीं करून युक्त असा गर्भ होतो. व कन्येच्छू पुरुषानें विषम रात्रीजा सप्तम्यादि त्याचेठाईं स्त्री प्रत जावें. ( त्रयोदश प्रभृतयो निंद्याः ) तेराव्या रात्री पासून पुढल्या रात्री निंद्य जाणाव्या.

तत्रप्रथमेदिवसेऋतुमत्यांमैथुनमनायुष्यंभवति यतस्तत्राधीयतेगर्भःप्रसवमानोविमुच्यति ॥

अर्थ—पहिल्या दिवशीं ऋतुमतीचे ठाईं गमन निष्फळ होतें. कारण त्या दिवशीं स्थापित जो गर्भ तो उत्पन्न होतांच प्राण सोडितो. दुसरेदिवशीं स्थापितगर्भ उत्पन्न होतांच. अथवा दाहादिवसांत मरतो. तृतीयदिवशीं उत्पन्न होतांच मरतो अथवा असंपूर्णांग ह्मणजे थोटा, पांगळा, लुला, किंवा अल्पायु, होतो, चवथ्ये रात्रीचें ठाईं संपूर्णांग, व दीर्घायु. असा होतो.

त्रिरात्रस्त्रीवर्जनाविषयींयुक्तिसां.

नचप्रवर्तमानेरक्तेबीजंप्रविष्टंगुणकरंभवति ॥ यथा नद्यांप्रतिस्रोतःप्लाविद्रव्यंप्रक्षिप्तंप्रतिनिवर्तते ॥ नोर्ध्वंगच्छतितद्वदेवद्रष्टव्यंतस्मान्नियमवतींत्रिरात्रंपरिहरेत्

अर्थ—योनी पासून रक्त स्रवत अस्तां जर तींत विर्य प्रविष्ट जालें तरतें गुण करणारें होत नाहीं ह्मणजे गर्भ धारणास समर्थ होतनाहीं जसें नदीचे प्रवाहांत वाहाणारा काष्ठादिक पदार्थ वाहून जातो. वर्ती चढत नाहीं यास्तव त्रिरात्र स्त्री वर्जावी.

यावद्ग्रंथंअग्रतमाध्यायेऋतुस्तुद्वादशरात्रंभ वतिदृष्टार्तवेइत्यस्याप्यग्रेपठति.

अर्थ—ग्रंथसमाप्त होईपर्यंत पुढील आध्यायीं असा सिध्दांतकरीं. दृष्टार्तव ऋतुकाळ स्त्रि-यांस बारादिवस पर्यंत राहातो.

अतःपरंमासादुपेयात् ।। अर्वाग्गमनेगर्भद्वारंविघटते.

अर्थ ऋतुकाळ निवृत झाल्यानंतर. एक महिन्यांत स्त्रीजवळ जावें आलीकडे गेल्यास गर्भद्वार विकृत होतें.

गर्भिणीचे उपचार सांगतो.

लब्धगर्भायाश्चैतेष्वहःसुलक्ष्मणावटशुंगासहदेवा विश्वेदेवामन्यतमाक्षीरेणाभिपुत्यत्रींश्चतुरोवोबिं दूनद्यात् ।। दक्षिणेनासापुटेपुत्रकामइति.

अर्थ—स्त्री गर्भवती झालीअस्तां. त्यादिवशीं. लक्ष्मणावनस्पती व वडाचे कोंवळे ढिरे व पिंवळे फुलाचाचिकणा. व विश्वेदेवा ह्मणजे गांगेरुकी. अन्यमतें पांढरे फुलांचाचिकणा. या वनस्पतींतून एक वनस्पती गाईचे दुधांत वाटून पुत्रेच्छु पुरुषानें स्त्रीचे उजवे नाकपुडींत तीन किंवाचारबिंदुपिळावे.

लक्ष्मणेचें स्वरूप. सांगतो.

तत्रकाकारिरक्ताल्पबिंदुभिर्लक्षितच्छदा ।। लक्ष्मणापुत्रजननीबस्तगंधाकृतिर्भवेत् ।।

अर्थ—लक्ष्मणेचे पानांवर घुबडाचे रक्तासारिखे रक्तवर्ण बिंदू थोडे थोडे जागजागी अ. सतात. व ती आकृतीनें माल्यतुळशी सारिखी असत्ये, ती पुत्रउत्पन्न करणारी असी जाणा- वी हीं आणायाचा प्रकार.

तांशरत्कालेपुष्पफलोपेतांदृष्ट्वाशनिदिनेसंध्यायांतस्या श्चतुर्षुभागेषु ।। खदिरकीलकान्निखाद्यअपरेद्युर्हस्त मूलपुष्येयोंगंगतेसवितरिमंत्रवत्गृहीत्वासमानव र्णवत्सगोक्षीरेणयथाविधिनस्यंदद्यात् ।।

अर्थ—लक्ष्मणेला शरत्कांळी पुष्पफलयुक्तपाहून नंतर शनवारी सायंकाळी तीचे भोव- त्या चोहों दिशेस खैराच्या खुंट्या माराव्या, नंतर हस्त किंवा मूळ, पुष्य. नक्षत्रीं सूर्य गेला

अस्तां मंत्रयुक्त तीचे ग्रहण करून तांबड्या गाईचे दुधांत वांटून त्या स्त्रीला नस्यद्यावें. केवळ शुक्रशोणिताने गर्भधारण होतें असें नव्हे. अन्य सामग्रीही गर्भ धारणांस लागते ती सांगतो.

ध्रुवंचतुर्णांसान्निध्यात्गर्भःस्याद्विधिपूर्वकः
ऋतुक्षेत्रांबुबीजानांसामर्थ्यादंकुरोयथा.

**अर्थ**—ऋतू. वर्षा कालादिक, भूमी, उदक, बीज, शाल्यादिक, या चोहोंचा संयोगानें अंकुर उत्पन्न होतो, तसा ऋतु ह्म० पुष्प, क्षेत्र ह्म० गर्भाशय, अंबू ह्म० जठराग्नीनें अन्नाचा पाक होऊन शरीरपालनीयरस उत्पन्न होतो तो. व बीज ह्म० आर्तवशुक्र. या चौंहोंचें विधिपूर्वक सान्निध्य झालें अस्तां गर्भ उत्पन्न होतो,

विधिपूर्वक झालेल्या गर्भाचें फळ सांगतो.

एवंजातारूपवंतःसत्ववंताश्चिरायुषः ॥
भवंत्यृणस्याभोक्तारःसत्पुत्राःपुत्रिणोहिताः ॥

**अर्थ**—पूर्वोक्त विधि प्रमाणें जे पुरुष उत्पन्न होतात. ते रूपवान्, सत्वगुण संपन्न, चिरायुषी, ऋण भक्षणार नव्हेत, संपत्तिमान्, आई बापास सुख देणारे, असे सत्पुत्र होतात.

शरीराचा वर्णाचें कारण सांगतो.

तत्रतेजोधातुवर्णानांप्रभवःसयदागर्भोत्पत्तौ
अब्धातुप्रायोभवति तदागर्भंगौरंकरोति
पृथ्वीधातुप्रायःकृष्णश्यामःतोयाका
शधातुप्रायःगौरश्यामः

**अर्थ**—सर्वांत तेजो, धातू शरीराचे वर्णाचें कारण तो. गर्भाधान काळीं उदक धातुबहुल होतो तेव्हां गर्भाला गौर करितो पृथ्वी धातु. बहुल, गर्भाला कृष्ण श्याम करतो, व उदक धातु आणि आकाश धातु बहुल, गर्भाला गौर श्यामवर्ण करितो,

याविषयीं मतांतर.

यादृक्वर्णमाहारमुपसेवेतगर्भिणी
तादृक्वर्णप्रसवाभवतीत्येकेभाषंते.

**अर्थ**—गर्भिणी जशीं शुक्ल, पीत, कृष्णादिक-अन्नें भक्षण करील, त्या वर्णाचा गर्भ होतो असें कितीक ह्मणतात.

जात्यंध व रक्त पिंग. शुक्ल, विकृत, अशानेत्र संभवाचें
कारण सांगतो.

तत्रदृष्टि भागमप्रतिपन्नंतेजोजात्यंधंकरोति, तदेवरक्ता नुगतंरक्ताक्षं, पित्तानुगतंपिंगाक्षं, श्लेष्मानुगतंशुक्लाक्षं, वातानुगतंविततार्क्षमिति ॥

अर्थ—तें तेजच चवथ्या महिन्यांत इंद्रिय विभागकाळीं, पूर्व जन्मार्जित दुष्कर्में करून दृष्टि भागाचा ठाईं गेलें नसतां गर्भाला जन्माध करितें. तसें तें तेज रक्ताला मिळून दृष्टि भागाप्रत गेलें असतां गर्भाला रक्ताक्ष करितें. तसेंच पित्ताशीं मिळून पिंगाक्ष करितें. कफाप्रत जाऊन गर्भाला श्वेताक्ष करितें. वायूशीं मिळून दृष्टि प्रत गेले तर तिरवा, काणा, असा गर्भ करितें.

घृतकुंभोयथैवाग्निमाश्रितःप्रविलीयते ॥
विसर्पत्यार्तवंनार्यस्तथापुंसांसमागमे ॥

अर्थ—जशी थिजले तुपाची घागर अग्नि संयोगानें वितुळल्ये तसें दोहों इंद्रियांचे संघर्षणें करून उत्पन्न जो ऊष्मा तेणें करून स्त्रियांचें आर्तव पातळ होऊन शुक्राशीं मिळून, त्याला गर्भाशयाप्रत घेऊन जातें नंतर जीवाशीं मिळून गर्भास कारण होतें.

शुक्रही स्त्री संयोगानें क्षरतें तें गर्भास कारण नव्हे असें दाखवितो.

योषितोपिस्त्रवंत्येवंतथापुंसांसमागमे ॥
तत्रगर्भस्यकिंचित्तुकरोतीतिनचिंत्यते ॥

अर्थ—स्त्रि संयोगानें पुरुषाचें वीर्य नुस्ते गळतें तें गर्भ धारणाचे उपयोगीं पडत नाहीं.

जुंवळाचे उत्पत्तीचें कारण.

बीजेंतवायुनाभिन्नेद्वेबीजेकुक्षिमाश्रिते ॥
यमावित्यभिधीयेतेधर्मेतरपुरःसरौ ॥

अर्थ—बीज ह्मणजे मिश्रित शुक्र शोणितें तीं आंतल्या वायूनें द्वि भाग होऊन गर्भाशयांत गर्भ रूपें करून राहातात. त्याला यमल ह्मणतात. ते धर्मा धर्म पुरोगामी जास्तव श्रुतींत अधर्मानें जुळे उत्पन्न होतात यास्तव यमल जन्मीं प्रायश्चित्त सांगितलें आहे.

पंच षंढाचे उत्पत्तीचें कारण सांगतो त्यामध्ये आसेक्य षंढ लक्षण.

पित्रोरत्यल्पवीर्यत्वादासेक्यःपुरुषोभवेत् ॥ सशुक्रंप्राश्यलभतेध्वजोछ्रायमसंशयं ॥

अर्थ—गर्भाधान काळीं आई बाप अतिअल्प वीर्य असतात त्यांपासून जो गर्भ राहातो तो आसेक्यनामा षंढ होतो, तो आपले मुखांत दुसऱ्या करवीं मैथुनानें वीर्य भक्षून नंतर त्याचें शिश्न उठतें याचे दुसरें नाम मुखयोनी आहे.

## सौगंधिक षंढ.

यःपूतियोनौजायेतससौगंधिकसंज्ञितः ॥
सयोनिशेफसोगंधमाघ्रायलभतेबलं ॥

**अर्थ**—दुर्गंध युक्त जी स्त्रीची योनी ती पासून जो पुरुष उत्पन्न होतो. तो सौगंधिक महाषंढ जाणावा त्या षंढाचें योनी व शिस्न यांचा वास घेऊन शिस्न उठतें. याचें दुसरें नाम नासायोनी असें आहे.

## कुंभिक षंढ.

स्वेगुदेब्रह्मचर्यायःस्त्रीषुपुंवत्प्रवर्तते ॥
कुंभीकःसतुविज्ञेयः ॥

**अर्थ**—जो पुरुष आपले गुदविवराचे ठाई दुसऱ्या पुरुषा कडून पाठीमागून चढउंन मैथुन करवितो त्याणें त्याचें शिश्न उठून नंतर तो स्त्रियांचे ठाई पुरुषा सारिखे मैथुन करितो, याला कुंभीक षंढ ह्मणतात.

## कुंभीकोत्पत्ति कारण सांगतो.

मातुर्व्यवायप्रतीपेनवक्रीस्या
तद्बीजदौर्बल्यतयापितुश्च.

**अर्थ**—गर्भाधान काळीं आईचे मैथूनांत विपरीत पणा झाला त्या मुळें, आणि बापाचे बीजाचे नैर्वल्य पणा मुळें, कुंभीक उत्पन्न होतो.

## याविषयीं काश्यप मत.

अरजस्कांयदानारींश्लेष्मरेताव्रजेत्पुनः॥
अन्यसक्ताभवेत्प्रीतिर्जायतेकुंभिलस्तदा॥

**अर्थ**—अल्प रजस्क नारी जी ती प्रत शिथिल रेता पुरुष, ऋतुकाळीं गमन करितो. त्या पुरुषा पासून तिची काम शांती न होऊन अन्य पुरुषासह मैथुनेच्छा राहात्ये. त्या काळीं कुंभिल षंढ उत्पन्न होतो.

## ईर्ष्यक लक्षण.

दृष्ट्वाव्यवायमन्येषांव्यवायेयःप्रवर्तते ॥
ईर्ष्यकःसतुविज्ञेयोदृग्योनिरयमीर्ष्यकः॥

**अर्थ**—जो पुरुष दुसऱ्याचें मैथुन पाहून नंतर आपण मैथुना विषयीं प्रवृत्त होतो. दुसऱ्याचें पाहिल्या शिवाय शिश्न उठत नाहीं, त्याला ईर्ष्यक ह्मणतात. व दृग्योनीही ह्मणतात.

## ईर्ष्यकाचे उत्पत्तीचें कारण.

ईर्ष्याभिभूतावपिमंदहर्षाईर्ष्योव्हयस्यापिवदंतिहेतुं ॥

अर्थ—स्त्री पुरुषें उभयतां परोक्षपणें करून पराभव पाऊन चिंतातुर असतां मैथुनास प्रवृत्त होतांत, त्यांजपासून ईर्ष्यक होतो.

## स्त्र्याकृती पांचवा षंढ त्याचें कारण व लक्षण सांगतो.

योभार्यायांऋतौमोहादंगनेवप्रवर्तते ॥
तत्रस्त्रीचेष्टिताकारोजायतेषंढसंज्ञितः ॥

अर्थ—जो पुरुष मूर्ख पणानें ऋतुकालीं भार्येचे ठाईं आपण स्त्री सारिखा उताणा राहून तिज करवीं मैथुन करवितो, त्या कालीं पुरुषाचे बीजा पासून स्त्रीचेष्टिताकार षंढ उत्पन्न होतो, याला वीर्य नसतें दुसऱ्या करवीं आपले शिश्नावर वीर्य पाडून शांत होतो या प्रकारें पुरुष षंढ सांगीतले.

## षंढ स्त्री सांगतो.

ऋतौपुरुषवद्वामाप्रवर्तेतांगनायदि ॥
तत्रकन्यायदिभवेत्साभवेन्नरचेष्टिता ॥

अर्थ—जी स्त्री, पुरुषाला खालती घालून, आपण पुरुषा सारिखी वर चढून मैथुन करिते. त्या समईं गर्भ राहून तिला कन्या होत्ये. ती पुरुषा सारिखी वर चढून दुसरे स्त्रीचे योनीस योनी लाऊन मैथुन करत्ये.

## षंढ संग्रह श्लोक.

आसेक्यश्चसुगंधीचकुंभीकश्चेर्ष्यकस्तथा ॥
सरेतसस्त्वमीज्ञेयाअशुक्रःषंढपंचमः ॥

अर्थ आसेक्य, सुगंधी, कुंभीक, ईर्ष्यक, या चार षंढांस वीर्य आहे, आणि स्त्रीचेष्टिताकार पांचवा षंढ जो त्याला वीर्य नाहीं, तें सांगतो.

## सवीर्य चोहोनां षंढ ह्मणण्याचे कारण.

अनयाविप्रकृत्यातुतेषांशुक्रवहाःशिराः ॥ हर्षा
त्स्फुटत्वमायांतिध्वजोछ्रायस्ततोभवेत् ॥

अर्थ पूर्वी सांगितले जे विरुध चार, वीर्य प्राशनादिक त्यांणीं त्या पुरुषाचा शुक्र वाहाणाऱ्या शिरा हर्ष युक्त होऊन फुगल्यात नंतर लिंग उठतें, यास्तव षंढ ह्मणतात, हे पुरुष दोष, स्त्रियांसही असतात, या विषईं प्रमाणचरके नरनारी षंढौ इत्युक्तेःभनुक काय वाणी मनयांचे भेदाचे हेतू सांगतात.

आहाराचारचेष्टाभिर्याद्दशीभिःसमन्वितौ.

स्त्रीपुंसौसमुपेयातांतयोःपुत्रोपिताद्दशः ॥

अर्थ आई बाप, जसे आहार, आचार, चेष्टा, याणीं युक्त असून मैथुनास प्रवृत्त होतात. तसे तसे गुण त्यांचें अपत्याचे ठाईं उत्पन्न होतात.

अति पापानें षंढाहून निकृष्ट असे गर्भ उत्पन्न होतात त्याचें कारण सांगतो.

यदानार्यावुपेयातांवृषस्यंत्यौकथंचन ॥
मुंचतःशुक्रमन्योन्यंअनस्थिस्तत्रजायते॥

अर्थ जा काळीं दोघी स्त्रिया अति दुर्जय कामानें व्याप्त होऊन सुरतातें इच्छित होत्सा त्या संयुक्त होऊन योनीशीं योनी लाऊन परस्परांचें वीर्य कोणत्याही प्रकारें सोडितात. त्या काळीं त्यापासून अनस्थि गर्भ उत्पन्न होतो.

स्वप्नमैथुनानें गर्भ संभवसांगतो.

ऋतुस्नातातुयानारीस्वप्नेमैथुनमावहेत् ॥ आर्तववायु
रादायस्वप्नेगर्भंकरोतिच ॥ मासिमासिविवर्धेतगर्भि
ण्यागर्भलक्षणं॥कललंजायतेतस्यावर्जितंपितृलक्षणैः॥

अर्थ ऋतु स्नात स्त्री चवथ्ये दिवसा पासून द्वादश रात्रांमध्यें स्वप्नांत मैथुन करित्ये त्या काळीं त्या स्त्रीचें आतर्व घेऊन. वायूच गर्भ करितो व त्या गर्भे करून गार्भिणीचीं लक्षणें प्रति मासाचे ठाईं उत्तरोत्तर वाढतात, आणि त्या गर्भिणी पासून कलल होतें व पितृ लक्षणें केश, श्मश्रु, लोम, नख, शिरा,स्नायु, धमनी, या लक्षणानी रहित मनुष्याकृती मांसाचा गोळा होतो तें कलल असें जाणावें.

सर्पवृश्चिककूष्मांडविकृताकृतयस्तुये॥
गर्भास्त्वेवंत्रयश्चैवज्ञेयाःपापकृताभृशं॥

अर्थ सर्प, विंचू कूष्मांड, यां सारिखे व विकृत, थोंटे, पांगळे, व एक काळीं तीन,गर्भ, हे सर्व गर्भ प्रसवणारीचे पापानें होतात.

कुब्जादिगर्भांचे हेतू सांगतो.

गर्भोवातप्रकोपेनदोहदेवाविमानिते ॥ भवेत्
कुब्जःकुणिःपंगुर्मूकर्मिमिणएवच । माता
पित्रोस्तुनास्तिक्यादशुभैश्चपुराकृतैः ॥ वाता
दीनांचकोपेनगर्भोवैकृतमाप्नुयात् ॥

अर्थ वायूचा कोपेंकरून, व आईचे डोहळ्यांचे प्रतिघातें करून, गर्भ. कुबडा, थोंटा, पांगळा, मुका गेंगणा, भ्रमा होतो. व आई बापाचे नास्तिक पणामुळें,व पूर्व जन्मार्जित दु.

ष्कृताने, व वायूच्या कोपानें, गर्भ विकृत होतो ह्मणजे आडवा, तिडवा, येतो. किंवा मल राहातें.

## उदरांतील गर्भ मलमूत्रादिक करीत नाहीं याचें कारण.

मलाल्पत्वादयोगाच्चवायोःपक्वाशयस्यच ॥
वातमूत्रपुरीषाणिनगर्भस्थःकरोतिच ॥

**अर्थ**—गर्भ शरीरांमध्यें मळ. अल्प असतात, व पक्वाशय संबंधी वायूही अल्प असतो, यास्तव, गर्भाशयस्थ प्राणी, वात. मूत्र, मळ, यांचा विसर्ग करीत नाहीं.

## गर्भ रडत नाही याविषयीं प्रमाण.

जरायुणामुखेछन्नेकंठेचकफवेष्टिते ॥
वायोर्मार्गनिरोधाच्चनगर्भस्थःप्ररोदिति॥

**अर्थ**—जरायूने मुख आच्छादिलें असतें, व कंठ. कफानें दाटलेला असतो. आणि दुष्ट वायूने मार्ग निरोधिला असतो. यास्तव. गर्भ रोदन करीत नाहीं.

निश्वासोछ्वाससंक्षोभात्स्वप्नान्गर्भोधिगच्छति ॥
मातुर्निश्वाससंश्वाससंक्षोभात्स्वप्नसंभवात् ॥

**अर्थ**—गर्भाचे श्वासोश्वास व चलन वलन निद्रा इत्यादिक क्रिया आईचे श्वासादिकें करून होतात.

## शरीरावयवाचे सन्निवेशाचे हेतु सांगतो.

सन्निवेशःशरीराणांदंतानांपतनोद्गमौ
तलेष्वसंभवोयच्चरोम्णामितत्स्वभावतः ॥

**अर्थ**—गर्भाचे अवयवांचा रचना विशेष. व दंताचा उद्गम, पतन, व तळाथावर रोमांचा या अनुद्भव हें सर्व स्वभावानें होतें.

## पूर्वजन्माभ्यासासारिखीं बुध्यादि होतात असें सांगतो.

भाविताःपूर्वदेहेषुसततंशास्त्रबुध्दयः ॥
भवंतिसत्वभूयिष्ठाःपूर्वजातिस्मरानराः ॥

**अर्थ**—मागें सोडिल्या शरीरांचे ठाईं. जा गुणाचा फार अभ्यास असतो. ते गुण वर्तमान देहाचे ठाईं येतात. व जापुरुषांचीं अंतः करणें मागील देहीं शास्त्राचे ठाईं संस्कार विशेषें करून तन्मय झालीं. ते पुरुष वर्तमान देहीं शास्त्र बुध्धी होतात. व जे सत्वगुण प्रधान असतात ते सत्वगुण बहुल होतात. व मागील जन्मांतली जाती ही ते स्मरतात शरीर, वाणी, मन, यांचे जे पूर्वोक्त जाति स्मरणादिक गुण ते सर्व स्वभावादिकें करून सिध्दहोतात.

### कर्मे करूनच होतात असें सांगतो.

कर्मणानोदितोयेनतदाप्नोतिपुनर्भवे ॥ अभ्यस्ताःपूर्वदेहेयेतानेवभजते गुणान् ॥

अर्थ—पूर्व जन्मार्जित कर्मानें प्रेरिला असा पूर्वदेहीं जा गुणाचा अभ्यास घडला त्याच गुणांला वर्तमान देहीं पावतो असें जाणावें इतिश्री शारीर निबंध संग्रहे द्वितीयोध्यायः ॥ ॥ २ ॥ ॥ श्रीः

---

## शारीर आध्याय ३.

### शुद्धजीं शुक्रार्तवें त्यांपासून गर्भाचा संभव होतो यास्तव शुक्रार्तवांची शुद्धीसांगितल्या नंतर गर्भाची अवतरण क्रियासांगायास युक्त होत्ये यास्तव तीतें सांगतों ॥

अथातोगर्भावक्रांतिशारीरंव्याख्यास्यामः

अर्थ—अथ ह्मणजे शुक्रार्तवांची शुद्धी सांगितल्या नंतर गर्भाची ह्मणजे गर्भाशयाचे ठायीं राहाणारा असून आत्मा आणि प्रकृती इहींकरून संमूर्छित झालेला असाजो शुक्रार्तवाचा संयोग त्याला गर्भ ह्मणतात त्याची अवक्रांति ह्मणजे आनरण ह्मणजे गर्भाशयाप्रत नीट जाऊन जमून आकारास यावयाचा प्रकार ती अवक्रांती जाचे ठायीं आहे असा शारीराध्याय जो त्याची व्याख्या करतो.

### शुक्रार्तवांचें स्वरूप सांगतो.

॥ सौम्यंशुक्रमार्तवमाग्नेयं ॥

अर्थ—वीर्य उदक गुण बहुल आहे. स्त्रियांचें पुष्प तेजोगुण बहुल आहे. उदक व तेज याचा संबंध सागून पाचांही भूतांचा संबंध दाखवितो.

इतरेषामपिभूतानांसान्निध्यमस्तिअणुनाविशेषेण

अर्थ—पृथ्वी, वायु, आकाश, या भूतांचे सूक्ष्म रूपेंकरून आश्रयत्व आहे.

### याचें कारण सांगतो.

॥ परस्परोपकारात् ॥ परस्परानुग्रहात् ॥ परस्परानुप्रवेशाच्च ॥

अर्थ—पृथिव्यादिक पंच महाभूतें. आपआपले गुण एकामेकाला देऊन एकामेकावर उपकार करतात. स्पष्टार्थ पृथ्वीचा गुण धारण. तेणेंकरून इतरांवर उपकार करत्ये. उदकाचा गुण संहरण. तेणेंकरून तें इतरावर उपकार करतें. तेजाचा गुण परिपाक करणें. वा-

गूचा गुण आकारास आणणें. आकाशाचा गुण अवकाश देणें. असे उपकार करतात स्पष्टा-र्थ घटादि पार्थिव द्रव्याचे ठायीं. पृथिव्याख्य भूत एकदें बळकट असतें. उदकादिक चार. दुर्बल असतात, तथापि तें, आपला आश्रय देऊन त्यांवर अनुग्रह करतें तशीं. अन्य द्रव्याचे ठायीं. उदकादिक इतर चार द्रव्यें. बळकट असून पृथिव्याख्य भूतांवर अनुग्रह करतात. व परस्परांमध्यें प्रविष्ट असतात. असें अन्योन्यानुप्रविष्टानिसर्वाण्येतानिनिर्देशत या वाक्यें करून पूर्वी सांगितलें आहे. यास्तव गर्भजनना विषयीं अन्य भूतांचेंही सान्निध्य आहे असें जाणावें.

## गर्भाची अवतरण क्रिया सांगतो.

**तत्रस्त्रीपुंसयोः संयोगेतेजः शरीरात्वायुरुदीरयति ॥ ततस्तेजो निलसंयोगातशुक्रंच्युतंयोनिमभिप्रपद्यतेसंसृज्यतेचार्तवेन**

अर्थ—तेथें स्त्री पुरुष संयोग ह्मणजे. स्त्री पुरुषांनीं स्पर्श विशेषाचे इच्छें करून आरंभिला प्रयोग ह्मणजे मैथुन त्याचे ठायीं. तेज ह्मणजे स्त्री पुरुषाचें दोहों इंद्रियांचें संघर्षणे करून उत्पन्न झाला जो ऊष्मा त्यातें वायू शरीरापासून उठवितो. नंतर त्या तेजें करून पुरुषाचे रेत पातळ होऊन वायूचा योगें करून स्वस्थाना पासून सुटून योनींमध्यें पडून सर्व योनी-ला व्यापून आर्तवाशीं संयुक्त होतें.

**ततोऽग्नीषोमसंयोगात्संसृज्यमानोगर्भाशयमनुप्रतिपद्यते ॥ क्षेत्रज्ञोवेदयिता स्प्रष्टाघ्राताद्रष्टाश्रोतारसयितापुरुषः स्रष्टागंतासाक्षीधातावक्ताय:कोसावि त्येवमादिभिःपर्यायवाचकैरभिधीयतेदैवसंयोगात् ॥ अक्षयोव्ययोचिंत्योभू तात्मनासहाचक्षसत्वरजस्तमोभिर्दैवासुरैरपरैश्चभावैर्वायुनाचप्रेर्यमाणोगर्भा शयमनुप्रविश्यावतिष्ठते.**

अर्थ—शुक्रार्तवांचा संयोग झाल्या नंतर. त्या क्षणींच. क्षेत्रज्ञ ह्मणजे पंच महा भूतांनीं रचिलें शरीररूप क्षेत्र जे त्याचा जाणता कर्मपुरुष तो. शुक्रार्तव संयोगाचे ठायीं प्रतिबिंबित होऊन. गर्भाशयाप्रत जातो. तो कोणा महवर्तमान जातो. तें सांगतो. सूक्ष्म लिंग, शरीरा सहवर्तमान जातो. आणि सत्व, रज, तम, स्वरूप. प्राकृत गुणें करून युक्त. व ब्रह्मा, महेंद्र, वरूण, कुबेर, गंधर्व, यम, आणि ऋषी ह्या सात देवांचें सात्विक भाव. त्यांणीं किंवा असुर, सर्प, शकुनी, राक्षस, पिशाच, प्रेत, हे साहा असुर, गुण. राजसभाव. अथवा पशु, मत्स्य वनस्पती, त्यां तिहींचे तामस भाव. यांणीं युक्तमान होत्साता गर्भाशयाप्रत जाऊन राहातो.

## कोण राहातो तें सांगतो.

**यः कोसावित्यादि.**

अर्थ—मुनी जाला यः कः असौ इत्यादिक पर्यायवाचक नावें बोलतात. तो येथें आचा-र्यांनीं यः कः ह्या सर्वनामबोधक दोन पदांनीं सांगीतला. तेणें करून असें सुचविलें कीं

क्षत्रज्ञ. परम दुर्बोध आहे. आणि सर्वगामी आहे. त्याचें ज्ञान सद्गुरूचे उपदेशावांचून होत नाहीं. असें ही सुचविलें. नावें कोणतीं तीं सांगतो. वेदयिता ह्मणजे मनाचा प्रवर्तक, स्प्रष्टा ह्मणजे त्वगींद्रियाला स्पर्शज्ञान देणारा. घ्राता आघ्राणकरणारा व द्रष्टा, श्रोता, ह्मणजे दृगिंद्रिय व श्रोत्रेंद्रिय यांस रूप व शब्द यांचा बोधाचें कारण तो क्षेत्रज्ञ असें जाणावें. व क्षेत्रज्ञ पुरुष. पुर ह्मणजे शरीर त्याचे ठायीं वास करतो. ह्मणून क्षेत्रज्ञ असें सुचविलें.

## क्षेत्रज्ञाला कर्तृत्व सांगतो.

॥ चेतवान्यतश्चात्माततःकर्तानिरुच्यते ॥

अर्थ—आत्मा ह्मणजे क्षेत्रज्ञ तो चेतना युक्त आहे यास्तव तो कर्ता जाणावा. व गंता संसरणशील, व धाता शरीरादि संयोगाचें धारणाचा हेतु. वक्ता ह्मणजे बोलतो. क्षेत्रज्ञच येणें करून असें सुचविलें कीं कर्मेंद्रियांचाही प्रवर्तक आत्मा.

## आत्मदेह संयोग कारण सांगतो.

दैवसंयोगात् इत्यादि

अर्थ—दैव संयोगात् ह्मणजे प्राकृत कर्म जें त्याचा संबंधे करून आत्मा अक्षय ह्मणजे क्षीण. होत नाहीं व नष्ट होत नाहीं ज्याचे चिंतनही करतां येत नाहीं असा जरी आहे तथापि गर्भाशयांत जाऊन गर्भ रूपें करून राहतो असें जाणावें.

## स्त्री पुरुष नपुंसक होण्याचे कारण.

॥ तत्रशुक्रबाहुल्यात्पुमानार्तवबाहुल्यात्
स्त्रीसाम्याद्भुभयोर्नपुंसकं ॥

अर्थ—गर्भाधान समयीं शुक्राचा अधिकपणा झाला असता, पुरुष गर्भ. होतो, आणि आर्तवाचा अधिकपणा झाला असतां स्त्री गर्भ होतो. व दोहोंचा समान पणा झाला असतां नपुंसक होतो, असें जाणावें.

## शुक्रापेक्षां आर्तवाधिक्य सांगतो.

आर्तवंचतुरंजलिप्रमाणंशुक्रंप्रस्थप्रमाणमिति.

अर्थ—आर्तवाचें प्रमाण चार ओंजळी, आणि शुक्राचें प्रमाण पसाभर आहे. असे असतां आशंका करितो. शुक्राचा अधिकपणा असतां पुरुष होतो. असें कसें घडेल तर सांगतो आर्तव मल रहित असून गर्भ जननार्थ जितुकें गर्भाशयांत राहतें त्याशीं शुक्राचा अधिकपणा व उणेपणा घेतो. अथवा आपापल्या प्रमाणा पेक्षां शुक्रार्तवांचा अधिकपणा व उणेपणा येथें विवक्षित आहे. कारण शुक्र उत्पन्न झालेलें होतसातें एखादे वेळेस हर्ष युक्त अंतः करण असतां अधिक स्रवतें, आणि दुःखयुक्त असतां थोडें स्रवतें. असें सर्वांस प्रसिद्ध आहे. व अन्य आचार्य ह्मणतात कीं शुक्रार्तवांचा न्यूनाधिक पणा व समान पणा हे पराक्रमें करून होतात. तात्पर्य कीं स्त्री पुरुषाची शरीर शक्ति. न्यून, अधिक, जशी असेल तसे होतात, असें जाणावें. अहो जर शुक्राचें आधिक्य झालें असता पुत्र जन्म

होतें तर पूर्वी पुत्रीकरण सांगितलें तें व्यर्थ होईल. तर त्याचें तात्पर्य असें नव्हे त्याचें तात्पर्य असें कीं पुत्री करणादि पुण्य कर्में करून पुरुष रूपवंत, व गुणवंत, व सत्वादिगुण संपन्न, असे होतात.

## याविषयीं प्रमाण.

एवंजातारूपवंतःसत्ववंताश्चिरायुषः ॥
॥ भवंत्यऋणमोक्तारःसत्पुत्राःपुत्रिणोहिताः ॥

अर्थ—या वचनावरून पुत्री करण संस्कारादिकानीं संस्कृत गर्भ रूपवान् बलवान्. चिरायु. पराक्रमानें मिळवून खाणारे. सत्पुत्र. आई बापांला आनंद देणारे होतात.

## अपत्य जनक काल सांगतो.

॥ ऋतुस्तुद्वादशरात्रंभवतिदृष्टार्तवः ॥

अर्थ—ज्याकाळीं स्त्रियांचें आर्तव दर्शन योग्य असतें त्या कालाला ऋतू ह्मणतात. तो बारादिवस असतो. याचें तात्पर्य सोळा दिवसां मध्ये पहिले तीन दिवस, व शेवटला योनि संकोचाचा सोळावा दिवस गणनेंत घेत नाहीं.

## अदृष्टार्तव ऋतु सांगतो.

॥ अदृष्टार्तवोप्यस्तीत्येकेभाषंते ॥

अर्थ—एक आचार्य असें ह्मणतात कीं आर्तव दिसत नाहीं असाही ऋतुकाल आहे.

## अदृष्टार्तव ऋतुमतीचें लक्षण.

॥ पीतप्रसन्नवदनांप्रक्लिन्नात्ममुखद्विजां ॥
॥ नरकामप्रियकथांस्रस्तकुक्ष्याक्षिमूर्धजां ॥
॥ स्फुरद्भुजस्तनश्रोणीनाभ्यूरुजघनस्फिजं ॥
॥ हर्षौत्सुक्यपरांचापिविंद्यादृतुमतींस्त्रियं ।

अर्थ—ज्या स्त्रीचें मुख. पीतवर्ण. व प्रसंन दिसतें. आणि देह व मुख हिरड्या हीं अत्यंत ओलसर होतात. व तिला पुरुष संबंधी आणि काम संबंधी गोष्टी प्रिय वाटतात. व तिचा कुशी नेत्र व केश हे. गळतात व जिचे भुज स्तनाच्या बाजू नाभी, माड्या जघन, आणि ढोंगणाचा बाजू. या स्फुरतात. व तिला मैथुना विषयीं अतिशय इच्छा असल्ये ती स्त्री ऋतुमती आहे असें जाणावें.

## संकुचितयोनींत बीज प्रवेश होत नाहीं याविषयीं दृष्टांत.

॥ नियतेदिवसेतीतेसंकुचत्यंबुजंयथा ॥
॥ ऋतौव्यतीतेनार्यस्तुयोनिःसांव्रियतेतथा ॥

अर्थ—जसें कमळे आपले फुलायाचे पांच, सात, दिवस असतात ते सरले ह्मणजे ऊ पले आपण मिटतें. तसें ऋतुकालाचे दिवस सरले असतां. तीचा गर्भाशय आप आपण आकुंचित होतो. यास्तव बीज प्रवेश होत नाहीं.

## आर्तव प्रतीचा काळ व स्वरूप सांगतो.

॥ मासेनोपचितंकालेधमनीभ्यांतदार्तवं ॥
॥ ईषद्रक्तंविवर्णंचवायुर्योनिमुखंनयेत ॥

अर्थ—आर्तवाचा काल द्वादश वर्षादि तो प्राप्त झाला असतां तें आर्तव प्रतिमासा ठायीं सांचून वायूचायोगें करून दोहों धमनी मार्गानीं अळित्या सारखें अथवा गढू योनि मुखाप्रत येतें.

## आर्तवाचा प्रवृत्ति निवृत्ति काळ सांगतो.

॥ तद्वर्षात्द्वादशात्कालेवर्तमानमसृक्पुनः॥
जरापक्वशरीराणांयातिपंचाशताक्षयं

अर्थ—तें आर्त्तव बारावे वर्षी प्राप्त होऊन, नंतर जशा जशा शरीरांतील सप्त धा वाढून शरीर वाढतें, तसें तसें तें वाढून मासा मासाचे ठायीं प्रवृत्त होतें. आणि पंनास व झाल्या नंतर. ह्यातारपणानीं शरीर व धातू पक्क होऊन उत्तरोत्तर जशा जशा क्षीण होतात तसें तसें क्षीण होऊन साठ वर्षांचें सुमारें नाहींसे होतें.

## समविषम दिवस भेदानें गर्भभेद सांगतो.

युग्मेषुतुपुमान्प्रोक्तोदिवसेष्वन्यथाबला॥
पुष्पकालेशुचिस्तस्मादपत्यार्थीस्त्रियंव्रजेत्॥

अर्थ—ऋतु संबंधी सम दिवस ४ ६ ८ १० १२ १४ याचे ठायीं स्त्री संयोग झाला असतां पुत्र होतो. आणि विषम दिवस ५ ७ ९ ११ १३ १५ यांचे ठायीं झाला असता कन्या होत्ये. असें जाणून जा पुरुषाला अपत्याची इच्छा आहे आणि जाचा काम शुद्ध आहे त्या पुरुषानें इच्छे प्रमाणें त्या त्या दिवशीं संयोग करावा.

अन्य आचार्यांचा मतें पांचवे दिवशीं ही पुत्र होतो. अहो पूर्वी सांगितले कीं शुक्राचा अधिकपणा झाला असता पुत्र होतो आणि आतां असें सांगतो यास्तव विचारितो कीं एकाचा मतें कन्या होत्ये आणि अन्य आचार्यांचा मतें पुत्रच होतो किंवा दोहों वाक्याचें तात्पर्य एकच आहे या प्रकारें सम दिवशीं आर्तव फार थोडें होतें यास्तव त्या दिवशीं शुक्राचा अधिकपणा होऊन पुत्र होतो. विषम दिवशीं स्त्रियांचें आर्तव फार प्रवृत्त होतें. यास्तव कन्या होत्ये.

## याविषयीं प्रमाण.

युग्मेषुदिवसेष्वासांभवत्यल्पतरंरजः॥

संयोगंतत्रयागच्छेत्सापुमांसंप्रसूयते ॥ अयुग्मेषुदिनेष्वासांभवेत्र हुतररंजः ॥ संयोगंतत्रयागच्छेत्सातुकन्यांप्रसूयते ॥

अर्थ—पूर्वोक्त सम दिवशीं स्त्रियाचें आर्तव फार अल्प असतें यास्तव, त्या दिवशी जी स्त्री पुरुष संयोग करिल्ये ती पुत्र प्रसवत्ये आणि विषम दिवशीं आर्तव फार असतें, यास्तव जी स्त्री पुरुष संयोग करत्ये ती कन्या प्रसवत्ये असें विदेह वचन आहे.

## गर्भधारण काळीं स्त्रीचीं लक्षणें.

॥ श्रमोग्लानिःपिपासासक्थिसदनंशुक्रशोणितयोरनुबंधःस्फुरणंचयोनेः॥

अर्थ—स्त्रीस गर्भ धारण होतें त्या वेळेस. तीचा चित्तास खेद होतो. ताहान, लागत्ये, शरिरास ग्लानी येत्ये. मांड्या फार थकतात. व शुक्र, शोणित, स्त्री उठल्या नंतर तें बाहेर पडत नाहीं व योनीचे स्फुरण होतें.

## गरभार स्त्रीचें लक्षण सांगतो.

स्तनयोःकृष्णमुखतारोमराज्युद्गमस्तथा॥ अक्षिपक्ष्माणिचाप्यस्याः संमील्यंतेविशेषतः ॥ अकामतश्छर्दयतिगंधादुद्विजतेशुभात्॥ प्रसेकःसदनंचापिगर्भिण्यालिंगमुच्यते॥

अर्थ—स्त्री गरभार झाल्या नंतर. तीचा स्तनाची अग्रें कृष्णवर्ण होतात. अंगावर रोमांच उठतात. डोळ्याचा पापण्या एक मेकाशी मिळतात. व कारणावांचून ओकारी येत्ये. उत्तम गंध सेवनें करून मन त्रास पावतें. तोंडाला पाणी सुटतें. शरीर कृश होतें. इत्यादि गार्भिणीचीं लक्षणें जाणावीं.

## गार्भिणीचे आचार सांगतो.

तदाप्रभृतिव्यायामंव्यवायमपतर्पणं॥अधिकाशनंरात्रिजागरणंशोकं यानावरोहणं॥भयमुत्कटकासनंचैकांततःस्नेहादिक्रमकालेवेगनि धारणंचनसेवेत ॥

अर्थ पूर्वोक्त लक्षणें करून गर्भ धारणाचा निश्चय झाल्या नंतर त्या दिवसा पासून गर्भार स्त्रीनें शरिरास आयास देणारें कर्म व मैथुन, जा पदार्थें करून तृप्ती होत नाहीं तसे ते पदार्थ सेवन, अधीक भक्षण, रात्रीस जागरण, शोक करणें, गाडा, घोडा, इत्यादिकावर बसणें, भय हेतुक पदार्थ दर्शन, वांकडेतिकडे हस्तपादादि करून बसणें, उच्च नीच. आसनावर बसणें आठवे महिन्या वांचून इतर महिन्यांत घृतादि स्नेहांत बसविणें. अनुवासन बस्ति देणें. आणि मल मूत्रावरोध हे वर्ज करावे.

## गर्भिणीच्या दुःखाने गर्भाला दुःख सांगतो.

दोषाभिघातैर्गर्भिण्यायोयोभागःप्रपीड्यते॥

सप्तभागःशिशोस्तस्यागर्भस्थस्यप्रपीड्यते॥

अर्थ—वातादि दोष. व लगुडादिकांचा आघात, इहीं करून गर्भिणीचा. जो, जो, अवयव दुखतो. तो तो अवयव गर्भांतल्ये बालकाचा दुखतो. असें जाणावें.

गर्भाची मासपरत्वें अवस्था सांगतो.

॥ तत्रप्रथमेमासिकललंजायते॥

अर्थ—गर्भ धारण झाल्या नंतर, पहिल्या महिन्यांत तो गर्भ, गर्भा शयांत शेंबडा सारिखा होतो.

॥ द्वितीयेशीतोष्मानिलैरभिपच्यमानानां
महाभूतानांसंघातोघनःसंजायते॥

अर्थ—दुसऱ्या महिन्यांत कफ, पित्त, वायू, इहीं करून कांहीं परिणाम दशे प्रत पावलीं जीं पंच महा भूतें त्यांचा शुक्र शोणितात्मक जो संघात तो कांहीं कठिण होतो.

त्याचा विशेष सांगतो.

॥यदिपिंडःपुमान्स्त्रीचेत्पेशीनपुंसकंचेदर्बुदमिति.।

अर्थ—तो गर्भ वाटोळ्या गोळ्या सारखा स्पर्शें करून भासतो तर पुरुष गर्भ. आणि जर वरवंटया सारिखा लांबोडा आहे तर स्त्री गर्भ, आणि वाटोळे फळाचे अर्धा सारिखा भासला तर नपुंसक गर्भ आहे असें जाणावें.

गयी भोजवचना वरून पिंडादिकाचें स्वरूप
दुसऱ्या प्रकारचें वर्णितो ॥

॥ चतुरस्राभवेत्पेशीवृतःपिंडोघनःस्मृतः ॥ शाल्मलीमुकुलाकारमर्बुदंसंप्रचक्षते ॥

अर्थ—विटे सारिखा चौकोनी, व वाटोळा असून कठिण,व सांवरीचे कळ्या सारिखा असा भासला तर, क्रमें करून. स्त्री, पुरुष, नपुंसक, गर्भ जाणावे.

तृतीयमासगर्भवृध्दी.

॥ तृतीयेहस्तपादशिरसांपंचपिंडानिर्वर्तंते ॥ अंगप्रत्यंगविभागश्च सूक्ष्मोभवति ॥

अर्थ—तिसरे महिन्यांत गर्भाला जा ठिकाणी हात, पाय, मस्तक, उत्पन्न व्हावयाचें त्या ठिकाणीं पांच पिंड उत्पन्न होतात. नंतर त्यांच महिन्यांत हात, पाय, मस्तक इत्यादि अंगांचा आकार, व हनुवटी, नाक, ओंठ, डोळे, कान, बोटें, इत्यादि प्रत्यंगांचाहिं आकार फार सूक्ष्म उत्पन्न होतो.

## चतुर्थमासींगर्भवृध्धी.

।। चतुर्थेसर्वांगप्रत्यंगविभागःप्रव्यक्तोभवति ।।

अर्थ—चवथे महिन्यांत. अंगें, प्रत्यंगें, स्पष्ट होतात. ।। आणि ह्या महिन्यांत गर्भाचें ह्द-य प्रगट झाल्या नंतर त्याचेठायीं प्रतिबिंबित आत्म्याचा योगें करून ह्दय स्फुरूं लाग-. कारण. ह्दय आत्म्याचें स्थान आहे. यास्तव.

।। तस्माद्गर्भश्चतुर्थेमासिअभिप्रायामिंद्रियेषुकरोति ।।

अर्थ—चवथे महिन्यांत जीव व्यक्त होतो. यास्तव शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, यां विषीं मनाला योजितो. ।।

## गर्भिणीचेंच नामांतर ।।

।। द्विह्दयांनारींदौह्दिनीमित्याचक्षते।।

अर्थ—चवथे महिन्यांत स्त्रीला. दुसरें गर्भाचें ह्दय प्राप्त होतें. यास्तव तीला द्विह्द - ह्मणतात ।।

## कुब्जषंढादिगर्भहोण्यासकारण.

।। दौह्दविमानात्कुब्जंकुणिंषंढंवामनंविकृताक्षंवा
नारीसुतंजनयति ।। तस्मात्सायदिच्छेत्तत्तस्यैदेयं।।
लब्धदोहदावीर्यवंतांचिरायुषंपुत्रंजनयति ।।

अर्थ—स्त्रीचे डोहळे पूर्ण झाले नसतां. ती स्त्री. कुबडा, थोंटा, पंढ, खुजा, तिरव्या डोळ्यांचा, अशा पुत्राला प्रसवत्ये. यास्तव स्त्री जेंजें इच्छील. तें देऊन डोहळे पुरवले असतां पराक्रमी, व दीर्घायू, अशा पुत्राला प्रसवत्ये ।।

## स्त्रियांचे डोहळे कशाकरितां पूर्ण करावे याविषयीं प्रमाण ।।

इंद्रियार्थान्प्रियान्यांस्तुभोक्तुमिच्छतिगर्भिणी ।। गर्भबाधाभयात्तान्वै भिषगाह्त्यदापयेत् ।। साप्राप्तदौह्दापुत्रंजनयेतगुणान्वितं ।। अलब्धदौह्दागर्भेलभेदात्मनिवाभयं ।।

अर्थ—गर्भिणी स्त्री. गायनादिकांचे श्रवण, आणि अलंकारांचा उपभोग. देवतादिकांदर्शन. षड्रस भोजनादि. भक्षणीय पदार्थांचें सेवन. गंधांचें आघ्राण. या मधून जें इच्छील. तें वैद्यानी आणून गर्भास कांहीं विकृती होईल या भयास्तव तिला द्यावें. तिची इच्छा पुरविली असतां उत्तम प्रकारचे पुत्राना प्रसवत्ये आणि जीचे डोहळे पूर्ण झाले नाहीं तीचा गर्भाला किंवा शरीराला भय होईल असें जाणावें ।।

## गर्भिणीचा मनोरथ भंगतोच गर्भास इंद्रिय नाशक होतो.

॥ येषुयेष्विंद्रियार्थेषुदौर्व्हदेयाविमानिता ॥
॥ प्रजायतेसुतस्यार्तिस्तस्मिंस्तस्मिंस्तदिंद्रिये ॥

अर्थ—श्रोत्र, त्वक्, नेत्र, जिव्हा, नासिका, ह्या पांचा इंद्रियांचे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, हे पांच विषय यांतून जो विषय प्राप्त न होऊन जा इंद्रियाची तृप्ती झाली नाहीं, त्या इंद्रियाचे ठायीं गर्भाला, पीडा होये कशी ती सांगतो. गायनादिकाचें श्रवण न होऊन गर्भिणीचें श्रोत्रेंद्रिय तृप्त झालें नाहीं तर, तीचे पोटांतले मुलाचें श्रोत्रेंद्रिय पीडित होतें. असेंच इतर इंद्रियां विषयीं जाणावें.

## डोहळ्यांवरून मुलाचें लक्षण सांगतो.

॥ राजसंदर्शनेयस्यादौर्व्हदंजायतेस्त्रियः ॥
॥ अर्थवंतंमहाभागंकुमारंसाप्रसूयते ॥
॥ दुकूलपटकौशेयभूषणादिषुदौर्व्हदात् ॥
॥ अलंकारैषिणंपुत्रंलालितंसाप्रसूयते ॥

अर्थ—जा स्त्रीला राजदर्शन करावें असे डोहळे. ती स्त्री द्रव्यवान् असून, पुण्यवान्, अशा पुत्रातें प्रसवये व बारीक, उत्तम, वस्त्र, व पाटांव, व पीतांबर, इत्यादिकांचें परिधान करावें असे डोहळे होतात. ती स्त्री अलंकारांचा भोक्ता आणि रूपवान्, अशा पुत्रातें प्रसवये.

आश्रमेसंयतात्मानंधर्मशीलंप्रजायते ॥
॥ देवताप्रतिमायांतुप्रसूतेपार्षदोपमं ॥

अर्थ—जा स्त्रीला. मुनींचे आश्रम पाहवे, व तेथें राहावें, असे डोहळे होतात. ती स्त्री धर्मशील, जितेंद्रिय, अशा पुत्राला प्रसवये. व जा स्त्रीला. देवांचा मूर्ती पुजाव्या, व सर्वकाळ पाहाव्या, असें वाटतें. ती स्त्री. सभेचा अधिकारी पुरुषा सारिख्या पुत्राला प्रसवये.

॥ दर्शनेव्यालजातीनांहिंस्त्रालुंसाप्रसूयते ॥
॥ गोधामांसाशनेपुत्रंसुषुप्तंधारणात्मकं ॥

अर्थ—जा स्त्रीला. सर्प, व्याघ्रादि, हिंस्र पशुनां, सर्वकाल पाहावेंसें वाटतें. ती स्त्री. दुष्ट, घातक, अशा पुत्राला प्रसवये. व जीला घोरपडीचें मांस खावेंसें वाटतें. ती स्त्री झोपाळू दुराग्रही, अशा पुत्राला प्रसवये.

॥ गवांमांसेतुमलिनंसर्वक्लेशसहंतथा ॥
॥ माहिषेदौर्व्हदात्शूरंरक्ताक्षंलोमसंयुतं ॥
॥ वराहमांसात्स्वप्नालुंशूरंसंजनयेत्सुतं ॥
॥ मार्गात्विक्रांतजंघालंसदावनचरंसुतं ॥

अर्थ—जा स्त्रीला. गोमांस खावेंसें वाटतें. तिला मलिन, सर्वदुःखें अनुभविणारा, असा पुत्र होतो. व जीला, माहिशाचें मांस खावेंसें वाटतें. ती स्त्री. शूर आरक्तनेत्र, व ज्याचा अंगावर लोम फार अशा पुत्राला प्रसवये जी डुकराचें मांस इच्छिये तिला झोंपाळू, शूर, असा पुत्र होतो. व जिला. मार्ग चालावा. अशी इच्छा होये. तिला जलद चालणारा पुत्र होतो.

सामरोद्विग्नमनसंनित्यंभीतंचतैत्तिरात्॥

अर्थ— जी स्त्री. सांबराचें मांस इच्छित्ये. तिला फार उद्विग्न असा पुत्र होतो. व जी तित्तिरी पक्ष्याचें मांस इच्छित्ये. तिला भित्रा पुत्र होतो.

## अनुक्तगर्भ दोहदसंग्रह श्लोक.

अनुक्तेषुतुयानारीसमभिध्यातिदौर्हृदं ॥
॥ शरीराचारशीलैः सासमानंजनयिष्यति ॥

अर्थ—पूर्वीं सांगितले नाहींत जे पदार्थ त्याविषयीं. जी स्त्री इच्छा करील. ती स्त्री. शरीर आचार स्वभावें करून त्यासारिख्या पुत्रानां प्रसवेल.

## डोहळ्यांसहि प्रारब्ध कर्म कारण सांगतो.

कर्मणानोदितंजंतोर्भवितव्यंपुनर्भवेत्
यथातथादैवयोगात्दौर्हृदंजनयेत्धृदि

अर्थ—प्राण्याचें प्रारब्ध कर्मानें प्रेरिलें भवितव्य. जसें पुढें होणार असेल. तसे डोहळे हि. दैव वशें करून त्या सारिखे होतात.

## प्रकृत सांगतो

पंचमेमनःप्रतिबुद्धतरंभवतिषष्ठबुद्धिः

अर्थ—पांचवे महिन्यांत मन जागृत होतें. साहावे महिन्यांत बुद्धि उत्पन्न होत्ये. ॥

॥ सप्तमेसर्वांगप्रत्यंगविभागःप्रव्यक्ततरोभवति

अर्थ सातवें महिन्यांत हस्त पादादि, अंगे. आणि नासिका, अंगुली, लोम, इत्यादि त्यंगें. सर्व चांगलीं स्पष्ट होतात.॥

## अष्टममासीं गर्भ शांतीयोग

॥ अष्टमेस्थिरीभवत्योजः ॥ तत्रजातश्चेन्नजीवेतानिरोजस्त्वा
नैर्ऋतभागधेयत्वाच्च ॥ ततोबलिंमाषोदनमस्मैदापयेत् ॥

अर्थ—आठवे महिन्यांत. हृदयाचें ठायीं राहणारें सर्व धातु संबंधी तेज. तें स्थिर असतें. यास्तव त्या महिन्यांत उत्पन्न होतो तो वांचत नाहीं. कारण तें तेज पूर्ण जमलेलें नसतें.

आणि तो राक्षसांचा भाग असतो. यास्तव त्या महिन्यांत. राक्षसानां उडीद व भात यांचा बली द्यावा. राक्षसानां बली. बालांचा रक्षणा विषयीं रुद्रानें दिला. असें कुमार तंत्राचे ठायीं प्रसिद्ध आहे.

।।नवमेकादशद्वादशानामन्यतमस्मिन्जायते ।। अतोऽन्यथाविकारीभवति ।।

अर्थ—नवव्या महिन्या पासून बाराव्या महिन्या पर्यंत. कोणत्या एका महिन्यांत बाल उत्पन्न होतो. त्या महिन्यांत उत्पन्न न झाला असतां. विकृत झाला असें जाणावें.

## आहार नसतां गर्भ वाढतो याचें कारण.

मातुस्तुरसवहायांनाड्यांगर्भनाभिनाडीप्रतिबद्धा ।। सास्यमातु राहारंसवीर्यमभिवहति ।। तेनोपस्नेहेनास्याभिवृद्धिर्भवति ।।

अर्थ—आईची रस वाहणारी नाडी. तीशीं गर्भाची नाभि नाडी बांधलेली असत्ये. ती नाडी. आईचे आहार वीर्या पासून कांहीं स्नेहाचा अंश आणून गर्भाला वाढवित्ये.

पूर्वोक्त अंग, प्रत्यंग, विभाग झाल्या नंतर. गर्भाचे उक्त प्रकारें पोषण होईल. परंतु अंग प्रत्यंग विभाग झाल्याचे पूर्वी कसें पोषण होतें तें सांगतो.

## अंग विभागापूर्वी गर्भ पोषण ज्ञान.

।। असंजातांगप्रत्यंगविभागमानिमेषात्प्रभृतिसर्वशरीरावयवा नुसारिणीनांरसवहानांतिर्यग्धमनीनामुपस्नेहोजीवयति ।।

अर्थ—जा गर्भाचा, अंग, प्रत्यंग, विभाग, व्यक्त झाला नाहीं, त्या गर्भाला, सर्व शरीरांत आपाद मस्तक पर्यंत जाण्याऱ्या, व त्या त्या अवयवांचे ठायीं रस नेणाऱ्या, बारीक, मोठ्या, वांकड्या, तिकड्या, धमनींचा. उपस्नेह गर्भाला पोशितो. जसें नद्यादिकांचे तिरींचे वृक्षादिक. नदींतल्ये पाण्याचे ओलाव्यानें वाढतात.

## पूर्वोक्ती विषयीं भोजवाक्य.

गर्भोरुणद्धिस्रोतांसिरसरक्तवहानिवै।। रक्ताज्जरायुर्भवतिनाडीचै वरसात्मिका ।। सानाडीगर्भमाप्नोतितथागर्भस्यवर्तनं।। यद्यदश्नाति मातास्यभोजनंहिचतुर्विधं ।।तस्माद्रक्ताद्रसीभूतंवीर्यैत्रेधाप्रवर्तते ।। भागः शरीरंपुष्णातिस्तन्यंभागेनवर्धते ।। गर्भःपुष्यतिभागेनवर्धतेचयथाक्रमं ।। गर्भंकुल्येवकेदारंनाडीप्रीणातितर्पितेति ।।

अर्थ—गर्भ मातेचे उदरांत राहात होत्साता. तिचा रस, रक्त, वाहणाऱ्या, शिरांचा निरोध करितो. त्या रक्तापासून गर्भ वेष्टन होतें. आणि त्या रसा पासून नाभिनाल उत्पन्न होतें. नंतर ती नाडी गर्भांत येऊन नाभि नालरूप होऊन राहात्ये. तीणेकरून गर्भाचें. हिकडे, तिकडे, चलन होत नाहीं. व आई जें जें खाद्य, पेय, लेह्य, चोष्य, असें चतुर्विध अन्न

भक्षिल्ये. त्या भक्षिल्या अन्ना पासून रसदशे प्रत पावलेल्या अन्नाच्या रसाचे तीन विभाग होतात. त्यांतून एक भाग आईच्या शरीराला पोशितो. दुसऱ्या भागानें स्तनांत दूध वाढतें. तिसरे भागें करून गर्भाचें पोषण होऊन क्रमे करून हळू हळू वाढतो. जसें पाणी पाठ मार्गानें शेतांत जाऊन सर्व क्षेत्राला भिजवून थंड करतें. तशी ती नाडी. आईचे शारीर रस आणून त्या रसानें आपण तृप्त होऊन गर्भाला तृप्त करित्ये.

सर्व ज्ञानेंद्रियाचें मूल मस्तक. यास्तव गर्भाला अवयव उत्पन्न होण्याचे पूर्वी मस्तक उत्पन्न होतें. असें शौनक ऋषी ह्मणतात. कार्तवीर्याचें मत. कीं! बुद्धि, व मन, यांचें स्थान हृदय. वास्तव. पूर्वी हृदय उत्पन्न होतें. व नाभी पासून सर्व देह वाढतो. यास्तव नाभी पूर्वी होत्ये. असें पराशर मत आहे. हातापायांपासून सर्व शरीरास चेष्टा येत्ये. यास्तव ते पूर्वी होतात. असे मार्कंडेय ह्मणतात. सुभूती व गौतम ह्मणतात कीं पूर्वी शरीर होतें. कारण त्याच्या ठायीं सर्व अवयव बांधलेले असून वाढतात. यास्तव सर्व अंगें, प्रत्यंगे, एका कालीं उत्पन्न होतात. असें धन्वंतरि ह्मणतो. परंतु गर्भ सूक्ष्म असतो. यास्तव अंगें दृष्टीस येत नाहींत. जसें आंब्याचे फल पक्क झाल्यां वाचून. कोवळेपणीच त्यांतील केसर, गर, बांठा, कोय, इत्यादिक दिसूं येत नाहींत. तसें जाणावें.

## गर्भास बाप, आई, रस, सत्व, आत्मा, यांपासून झालेलीं लक्षणें सांगतो.

गर्भस्यकेशश्मश्रूलोमनखदंतशिरास्नायूधम
निरेतःप्रभृतीनिस्थिराणि पितृजानि.

अर्थ—गर्भाचे केस, मिशा, लोम, नखें, दांत, शिरा, स्नायू, धमनी, रेत, इत्यादिक. कठिण पदार्थ. बापा पासून होतात.

मांसशोणितमेदोमज्जाहृन्नाभियकृत्प्ली
हांत्रमुदरप्रभृतीनिमृदूनिमातृजानि.

अर्थ—गर्भाचे मांस, रक्त, मेद, मज्जा, हृदय, नाभी, काळीज, कवळू, आंतडीं, इत्यादिक मृदु पदार्थ आई पासून होतात.

## रसजन्य.

शरीरोपचयोबलंवर्णस्थितिहानिश्चरसजानि.

अर्थ—गर्भाच्या शरीराची. वृद्धी, बल, कांति, स्थिती, हानि, इत्यादिक रसापासून होतात असें जाणावें.

## आत्मजन्य धातू सांगतो.

इंद्रियाणिज्ञानविज्ञानमायुः सुखदुःखादिकंचात्मजानि.

अर्थ—श्रोत्रादि इंद्रियें, ज्ञान, व. अपरोक्षज्ञान, आयुष्य, सुख, दुःख, इत्यादि. आत्म्याचा

सन्निकर्षे करून होतात. असें जाणावें. व नाना योनीचे ठायीं जन्मादिक. सत्व गुणें करून होतात. असें पुढें सांगेल.

## सात्म्यज सांगतो.

वीर्यमारोग्यंबलवर्णौमेधाचसात्म्यजानि.

अर्थ—पराक्रम, आरोग्य, बल, वर्ण, मेधा, बुद्धि, इत्यादि सात्म्यें करून होतात.

## मातेचे दुग्धदर्शन लक्षणानेंगर्भाचीं स्त्री पुन्नपुंसक लक्षणें सांगतो.

यस्यादक्षिणस्तनेप्राक्पयोदर्शनंभवति ॥ दक्षिणमहत्वंच ॥ पूर्वंचदक्षिणसक्थिउत्कर्षयति ॥ बाहुल्याच्चपुंन्नामधेयेषुद्रव्येषुदौर्व्हदमभिध्यायतिस्वप्नेषुचोपलभेतपद्मोत्पलकुमुदाम्रातकादीनिपुन्नामान्येवप्रसन्नमुखवर्णाचभवतितांविंद्यात्पुत्रमियंजनयिष्यति.

अर्थ—जीचा उजवे स्तनांत पहिल्यानें दूध दिसूं लागतें. व उजवा डोळा मोठासा वाटतो. व पहिल्यानें उजवी मांडी. गर्भ भारें करून उचललेलीशी दिसत्ये, व जीं पुन्नामधेय द्रव्यें. आंबा, पेरू, हर्त्ता, घोडे, इत्यादिका विषयीं प्रीती धरित्ये. व स्वप्नामध्यें पांढरीं कमळें, व सूर्यकमळें, कुमुदें, व अंबाडे, इत्यादिक पुरुष नांवांचीफळें पाहात्ये, व जीचें मुख सर्वकाळ टवटवीत दिसतें, ती स्त्री पुत्र प्रसवेल. आणि उक्त विपरीत लक्षणें असतां कन्या प्रसवेल.

## नपुंसक गर्भ लक्षण.

यस्याःपार्श्वद्वयमुन्नतंपुरस्तान्निर्गतमुदरं प्रागभिहितलक्षणंचतस्यान पुंसकंविंद्यात्

अर्थ—जिचा दोन्ही कुशी उचलेल्या दिसतात. आणि पुढलें आंगून पोट सपाट दिसतें. आणि पूर्वी सांगितलीं लक्षणें असतात. ती स्त्री नपुंसकाला प्रसवत्ये.

## जुवळाचें लक्षण.

यस्यामध्येनिम्नंद्रोणीभूतमुदरंसायुग्मंप्रसूयते.

अर्थ— जिचें पोट मध्यें खोलकट असून दोणी सारखें दिसतें. ती जुवळीं मुलें प्रसवत्ये.

## अन्य प्रमाण सांगतो.

रोमराजिर्भवेन्निम्नायस्यासासूयतेयमौ॥

अर्थ—जीची रोम पंक्ती गर्भार पणा मध्यें निम्न होत्ये. ती स्त्री, जुळ्या मुलानां प्रसवत्ये.

## गर्भिणीचे कायिक वाचिक मानसिक लक्षणां वरून पुत्राचे गुण सांगतो.

देवताब्राह्मणपराशौचाचारहितेरता ॥ महा
गुणाप्रसूयेतविपरीतांस्तुनिर्गुणान्॥

अर्थ–जी स्त्री देवता, ब्राह्मण, पूजनादि सदाचार, व दंत धावनादि शौचाचार युक्त असल्ये. ती महा गुणवान् पुत्राला प्रसवल्ये आणि पुर्वोक्त विपरीत आचरण करिल्ये ती निर्गुण पुत्रांना प्रसवल्ये.

## विकृत अवय होण्यास कारण.

अंगप्रत्यंगनिर्वृत्तौयेभवंतिगुणागुणाः ॥
तेवैगर्भस्यविज्ञेयाधर्माधर्मनिमित्तजाः

अर्थ– पूर्वीं सांगितलीं जीं हस्तपादादि अंगे. आणि अंगुल्यादि प्रत्यंगे. यांचें उत्पत्ति कालीं जो चांगला वाईट पणा होणें तो शुभाशुभ कर्में करून होतो असें जाणावें.
इति शारीरे निबंध संग्रहे तृतीयोध्यायः ॥

---

# शारीर आध्याय ४.

## गर्भाची अवतरण क्रिया सांगितल्यानंतर. उत्पन्न झालेल्या गर्भा चें वर्णन करितो.

अथातोगर्भव्याकरणंशारीरंव्याख्यास्यामः॥

अर्थ–गर्भाची अवतरण क्रिया सांगितल्या नंतर. गर्भाचे वर्णन जांत आहे अशा शारीराध्यायाची व्याख्या करितो.

गर्भाचे वर्णना मध्यें प्राण आणि त्वचा आदि करून वर्णनीय पदार्था मध्यें प्राण सर्व शरीराला चांगले पोशितात. यास्तव ते पूर्वी सांगतो.

## प्राण वर्णन.

अग्निःसोमोवायुःसत्वंरजस्तमःपंचेंद्रियाणिभूतात्मेतिप्राणाः॥

अर्थ– अग्नि, सोम, वायू, सत्व, रज, तम, पंचेंद्रियें, भूतात्मा, हे प्राण जाणावे. प्राण शब्दें करून येथें शरीराचें पोषण करितात. व कांत्यादिक देतात ते. अग्नि शब्दें करून पाचक, भ्राजक, आलोचक, रंजक, साधक, असे. भौतिक पांच, ऊष्मे. आणि सर्व धातुगत ऊष्म्यानां शक्ति देणारा असून वाणीचें अधिदैवत तो; व सोम पदें करून श्लेष्मा, रस, शुक्र, आदिकरून रसात्मक पदार्थ. रसनेंद्रियास शक्ति देणारा, मनाचें अधिदैवत! तो; वायुशब्दें करून प्राण अपान. व्यान उदान, समान, असा पांच प्रकारचा तो. व सत्व-रज, तम. हे पूर्वोक्त अष्टविध प्रकृतीचे गुण आहेत.

इंद्रिय शब्दें करून श्रवणादि पंच ज्ञानेंद्रियें. आणि भूतात्मा हे शुभाशुभ कर्में करून व्याप्त झाला जो कर्म पुरुष तो जाणावा.

## अग्न्यादि प्राण कोणत्या कर्मानें शरीराचें प्रीणन करितात तें सांगतो ॥

॥ तत्राग्निस्तावदाहारपाकादिकर्मणाप्रीणयति॥

**अर्थ**—त्यामध्यें अग्नी. आहार. पाकादिकानीं शरीराचें प्रीणन करितो.

॥ सोमश्चसौम्यधातोरोजःप्रभृतेःपोषणेन ॥

**अर्थ**—चंद्र. सौम्य धातूचें प्रीणन सारभूत तेजादिकाचा पोषणानें शरीर पोषण करितो.

॥ वायुश्चदोषधातुमलादीनांसंचारणेनो च्छ्वासनिश्वासाभ्यांच ॥

**अर्थ**—वायू. वात, पित्त, कफ, व सप्त धातू व मल, यांचा संचारानें आणि उच्छ्वास निःश्वासानें शरीराचें पोषण करतो.

॥ सत्वंरजस्तमश्चमनोरूपतयापरिणतं ॥

**अर्थ**—सत्व, रज, तम, गुण. हे मनोरूपानें परिणाम पावून. कर्म पुरुषाला शरीरांतराचे ग्रहणास हेतु होऊन प्रीणन करितात. श्रोत्रादि इंद्रियें शब्दादिकांचें ग्रहणानें पोषण करितात कर्म पुरुष तो. सर्वा वयवांचा आणि चैतन्याचा हेतू. यास्तव प्रीणन करितो.

प्राण असतांच शुक्र शोणिताचा परिणामें करून त्वगादिकांचा संभव होतो यास्तव प्राण वर्णना नंतर त्वगादि वर्णन करितो.

## सप्तत्वचा सांगतो.

॥ तस्यखल्वेवंप्रवृत्तस्यशुक्रशोणितस्याभिपच्यमानस्य क्षीरस्येवसांतानिकाःसप्तत्वचोभवंति ॥

**अर्थ**—एवं भूतात्म्याच्या योगानें पचन होणाऱ्या शुक्र शोणितांचा विकारा पासून सप्तत्वचा उत्पन्न होतात. जसें दूध तापल्या नंतर साय इत्यादि उत्पन्न होतात. असें जाणावें.

## त्वग्भेद सांगतो.

॥ तासांप्रथमावभासिनीनामयासर्वेवर्णानवभासयति ॥ पंचविधांछायांप्रकाशयति ॥

**अर्थ**—सप्तत्वचां मध्ये. पहिली अवभासिनी ह्मणतात? ती. भ्राजक अग्नीचा योगें करून गौरादिक सर्व वर्ण भासविते. आणि पंच महाभूतानीं केली जी पांच प्रकारची छाया. आणि

प्रभा. त्यातें प्रकाशित करिते. छाया जवळून कळूंयेते. आणि प्रभा दुरून प्रकाशित होते इतुका छाया आणि प्रभायांचा भेद आहे.

## ह्या त्वचेचें प्रमाणादि सांगतो ॥

॥ साव्रीहेरष्टादशभागप्रमाणासिध्मकंटकाधिष्ठाना ॥

**अर्थ**—सर्व त्वचांचे प्रमाणा विषयीं यवाचे विस्ताराचे वीसभाग कल्पावे. प्रस्तुत, अवभासिनीचें प्रमाण अठरा भाग आहे. व अवभासिनी त्वचा सिध्म व कंटक ह्मणून चर्म रोग आहे. त्याचे उत्पत्तीची भूमी जाणावी.

## द्वितीयत्वचा.

॥ द्वितीयालोहितानामषोडशभागप्रमाणाति
लकालकमच्छव्यंगाधिष्ठाना ॥

**अर्थ**—दुसरी त्वचा लोहिता. हिचें प्रमाण यवाचे सोळा भाग आहे. व ही तीळ, मच्छ, वांग, याची उत्पत्तिभूमी आहे.

## तृतीयत्वचा.

॥ तृतीयाश्वेताद्वादशभागप्रमाणाचर्मदलाजगल्लिकामशकाधिष्ठाना ॥

**अर्थ**—तिसरी त्वचा श्वेता. हिंचे प्रमाण यवाचे बारा भाग आहे. व ही चर्मदल, अजगल्लिका, ( ह्मग ) लागें व मस ह्या चर्म रोगांची उत्पत्तिभूमी आहे.

## चतुर्थत्वचा.

॥ चतुर्थीताम्रा अष्टभाग प्रमाणा किलासकुष्ठाधिष्ठाना ॥

**अर्थ**—चवथी त्वचा ताम्रा. तिचें प्रमाण आठ भाग ही किलास कुष्ठचर्म रोगाचें. अधिष्ठान जाणावें.

## पंचमत्वचा.

पंचमीवेदिनीनामपंचभागप्रमाणाकुष्ठविसर्पाधिष्ठाना.

**अर्थ**—पांचवी त्वचा वेदिनी तिचें प्रमाण पांच भाग व कुष्ट. विसर्प. याचर्म रोगाचें अधिष्ठान होय.

## षष्ठत्वचा.

॥ षष्ठीलोहिताव्रीहिप्रमाणाग्रंथ्यापच्यर्बुदश्लीपदगलगंडाधिष्ठाना॥

**अर्थ**—साहावी त्वचा लोहिता. तिचें प्रमाण एक यव आहे. ही ग्रंथी, अपची, अर्बुद, श्लीपद, गलगंड, गंडमाला, ह्या रोगांची उत्पत्ति भूमि आहे.

## सप्तमीत्वचा.

॥ सप्तमीमांसधराव्रीहिद्वयप्रमाणाभगंदरविद्रध्यर्शोधिष्ठाना ॥

अर्थ—सातवी त्वचा मांसधरा तिचें प्रमाण दोन यव आहे. ही भगंदर, विद्रधी, अर्श, या रोगाचें अधिष्ठान आहे या प्रकारें सातां त्वचांचीं नांवें, व प्रमाणादिक, सांगितलीं. परंतु हे प्रमाण. मांसल देशावरल्ये त्वचांचें जाणावें ललाट, अंगुली, इत्यादि सूक्ष्म देशाचे-त्वचेचें नव्हे.

## स्थूलावयवींत्वचेचें प्रमाण सांगतो.

॥ उदरेव्रीहिमुखेनांगुष्ठोदरप्रमाणभवगाढंविध्येदिति ॥

अर्थ—उदराचे ठायीं अंगुष्ठोदर प्रमाण एकाशी एकत्वचा लागलेल्या आहेत तेथें अंगुष्ठोदर प्रमाण वेधावें. असें सांगितलें आहे. तात्पर्य सात त्वचा मिळून अंगुष्ठोदर प्रमाण आहे. अंगुष्ठोदर ह्मणजे साहा यव आणि एक तिसावा भाग ६ १/३० असें जाणावें.

## कलांचें स्थान.

॥ कलाःखल्वपिसप्तधात्वाशयांतरमर्यादाः ॥

अर्थ— कलाहि सात आहेत. त्या येथें धातु शब्दें करून रक्त, मांसादि आणि कफ, पित्त पुरीष, इत्यादि धातूंचे अवस्थान प्रदेशाचा मध्याचे ठायीं सीमा झालेल्या अशा जाणाव्या. कला ज्ञान प्रत्यक्ष नाहीं यास्तव दृष्टांतानें सांगतात.

॥ यथाहिसारःकाष्ठेषुच्छिद्यमानेषुदृश्यते ॥
तथाहिधातुर्मांसेषुच्छिद्यमानेषुदृश्यते॥

अर्थ—काष्ठादिकांचा ठायीं साडलचादिकानीं आच्छादिलेला असतो. ह्मणून त्याचें छेदन केलें असतां प्रत्यक्ष दिसतो. तसा धातु मांसादिकांचें छेदन केलें असतां दिसतो

## कला अदृश्य या विषयीं प्रमाण.

॥ स्नायुभिश्चपरिच्छिन्नान्संततांश्चजरायुणा ॥
श्लेष्मणावेष्टितांश्चापिकलाभागांस्तुतान्विदुः ॥

अर्थ—कलांचें विभाग विशेष. स्नायूनीं आच्छादित, आणि जरायू ह्मणून गर्भ वेष्टना सारखा पदार्थ आहे जाला कला वेष्टक ह्मणतात त्याणें उत्तम प्रकारें व्याप्त, व कफानें वेष्टित असतात. यास्तव दिसत नाहींत.

## प्रथम कला.

॥ तासांप्रथमामांसधरायस्यांमांसेशिरास्ना
युधमनीस्रोतसांप्रतानानिभवंति॥

अर्थ—सप्तकलांमध्ये पहिली मांसधरा. जा कलेचा आधारानें राहिलेले मांसाचे ठायीं शिरा, स्नायू धमनी, स्रोतस, इत्यादिक पसरल्या आहेत.

## मांसशिरा राहाण्यांस दृष्टांत.

॥ यथाबिसमृणालानिविवर्धंतेसमंततः ॥
भूमौपंकोदकस्थानितथामांसेशिरादयः ॥

अर्थ—जसें भूमीचा ठायीं चिखल व उदक यांमध्ये होणारे कमलाचे देंठ, तंतु, पानें, इत्यादि आसमंतात् पसरलेले असतात. तसें कलाश्रित मांसाचे ठायीं शिरादि पसरतात. असें जाणावें.

## द्वितीय कला.

द्वितीयारक्तधरामांसस्याभ्यंतरतस्तस्यांशोणि
तंविशेषतश्चशिरायकृत्प्लीहाश्चभवंति ॥

अर्थ— दुसरी कला रक्तधरा. ती मांसा मध्यें असत्ये. तिचे ठायीं रक्त, आणि विशेषें करून शिरा, यकृत्, प्लीह, हे होतात.

## रक्तादिराहाण्याविषयींदृष्टांत

वृक्षाद्यथाभिप्रहितात्क्षीरिणःक्षीरमास्रवेत् ॥
मांसादेवंक्षतात्क्षिप्रंशोणितंसंप्रसिच्यते. ॥

अर्थ— जा वृक्षानां दुधासारिखा चीक आहे. त्यानां कांहीं क्षत केलें असतां. त्यांपासून चीक गळूं लागतो. तसें, मांसाला क्षत केलें असता. रक्त स्त्रवतें.

## तृतीय कला.

तृतीयामेदोधरा ॥ मेदोहिसर्वभूतानामुदरस्थोण्वस्थिषुच ॥

अर्थ— तिसरी कला मेदोधरा. मेद सर्व प्राणिमात्रांचे उदरांत आणि बारीक अस्थि मध्यें राहतो. मोठ्या अस्थि मध्यें मज्जा राहत्ये.

## या वीषयीं प्रमाणांतर.

॥ स्थूलास्थिषुविशेषेणमज्जात्वभ्यंतरेस्थिता
अस्थ्यंतरेषुसर्वेषुसरक्तोमेदउच्यते ॥

अर्थ—मोठाल्या अस्थिचें आंत फारकरून मज्जा राहत्ये, आणि इतर सर्व अस्थीचें ठायीं रक्ता सहवर्तमान मेद राहता. तशीच वसा असती.

उप धातु वसाती सांगतो.

शुद्धमांसस्ययःस्नेहःसावसापरिकीर्तिता ॥
तप्यमानस्यवास्नेहोमेदसःसावसामता ॥

अर्थ—शुद्ध मांसाचा अथवा कढवलेल्या मेदाचा जो तूप, तेल, यां सारीखा पदार्थ त्याला वसा ह्मणतात.

चतुर्थ कला

चतुर्थीश्लेष्मधरा सर्वसंधिषुप्राणभृतांभवति ॥

अर्थ—चवथी कला श्लेष्मधरा. ती सर्व प्राण्याचे संधीचे ठायीं राहून कफाचें धारण करित्ये याकर्फे करून. संधीचे चलन वलन निर्विघ्नपणें होतें.

संधिचलनाविषयीं दृष्टांत.

स्नेहाभ्यक्तेयथैवाक्षेचक्रंसाधुप्रवर्तते ॥ संधयः
साधुवर्ततेसंश्लिष्टाःश्लेष्मणातथा ॥

अर्थ— रथाचा आंस, व चाकाची भोंगळी, यांला तेल लाविले असतां जसें चाक चांगलें फिरतें. तशा संधी. श्लेष्म्यानें चांगल्या लिप्त असतात ह्मणून निर्विघ्नपणें फिरतात. असें जाणावें.

पंचमी कला.

पंचमीपुरीषधरानामयांतःकोष्ठेमलमभिविभजति ॥ पक्वाशयस्था ॥

अर्थ—पांचवी कला पुरीषधरा. जी पक्वाशयांत राहून कोष्ठामध्यें राहाणाऱ्या मलाचा व मूत्राचा विभाग करित्ये.

कोष्ठ सांगतो.

स्थानान्यामाग्निपक्वानांमूत्रस्यरुधिरस्यच ॥
हृदुंडुकः फुप्फुसश्चकोष्ठइत्याभिधीयते ॥

अर्थ— आमाशय, व अग्न्याशय, व पक्वाशय, व मूत्रस्थान, व यकृत्, आणि प्लीहा, व हृदय व गुद, आणि गुदांतला मळ आणणारें मोठें आंतडें, व फुप्फुस, यानां कोष्ठ ह्मणतात.

पंचमीकलेचें कोष्ठाश्रितत्व स्पष्टकरितो.

यकृत्समंतात्कोष्ठंचतथांत्राणिसमाश्रिता ॥
उंडुकस्थंविभजतेमलंमलधराकला.

अर्थ— मलधरा पांचवी कला ही. यकृत्, प्लीहा, हृदय, फुप्फुस, व आंतडी, यां सर्वांचे अवयवानां व्यापून राहून उंडुकस्थ मलाचा विभाग करित्ये.

कोष्ठाची मर्यादा. उर्ध्व प्रदेशी ह्रदय पर्यंत. व अधोभागी. गुदपर्यंत. त्यानेंहि आश्र-यऊन राहले.

## साहावी कला.

॥ षष्ठीपित्तधराचतुर्विधमन्नपानमुपयुक्तमामा
शयात्प्रच्युतंपक्काशयोपस्थितंधारयति ॥

**अर्थ**—साहावी कला पित्तधरा. ही. भक्षण केलेलें जें चतुर्विध अन्न पाणी यातें आमाशयद्वारा पक्का शयांत पित्त स्थाना प्रत प्राप्त झालें जे त्यातें पक्क करायासाठीं धरिले. ती.

### हा अर्थ श्लोकानें सांगतो. ॥

॥ अशितंखादितंपीतंलीढंकोष्ठगतंनृणां ॥
तज्जीर्यतियथाकालंशोषितंपित्ततेजसा ॥

**अर्थ**— विशेष दंतव्यापारा वांचून भक्षिलें, तें व चाऊन खालें, व दुग्धादि, व चाटून खातात तें, चोहों प्रकारचें अन्न मनुष्याचे कोष्ठामध्यें गेलें असतां पित्ताचा तेजानें शोषित होऊन तीक्ष्ण, मध्यम, मंद, अशा त्रिविध अग्नी विषयीं उचित काल. व मात्रा, लघु, गुरू. यांविषयीं उचित कालाचा अतिक्रम नहोतां जिरतें. असें जाणावें.

### याविषयीं अन्य प्रमाण ॥

॥ षष्ठीपित्तधरानामयाकलापरिकीर्तिता ॥
पक्कामाशयमध्यस्था ग्रहणीपरिकीर्तिता ॥

**अर्थ**— साहावी पित्तधरा कला. पक्काशय व आमाशयाचामध्यें अग्नीचे अधिष्ठान रूपानें राहून. पूर्वोक्त चतुर्विध अन्न. पित्ताचा तेजें करून पक्क करिले. यास्तव ग्रहणीही ह्मणतात.

## सातवी कला.

॥ सप्तमीशुक्रधरानामसर्वप्राणिनांसर्वशरीरव्यापिनी ॥

**अर्थ**—सातवी कला शुक्रधरा. ती सर्व प्राण्यांचे सर्व शरीरांत राहणाऱ्या शुक्रांचें धारण करिले.

### शुक्र सर्वांग व्यापक आहे याविषयीं दृष्टांत सांगतो.

यथापयसिसर्पिस्तुगूढश्चेक्षौरसोयथा ॥
शरीरेषुतथाशुक्रंनृणांविद्याद्भिषग्वरः ॥

**अर्थ**—जसें दुग्धाचे सर्वावयवामध्यें तूप, व उंसामध्यें रस, गुप्तरूपें करून राहतो. तसा शरीरामध्यें शुक्रधातू राहतो.

## शुक्राचा गमन मार्ग सांगतो.

द्व्यंगुलेदक्षिणेपार्श्वेबस्तिद्वारस्यचाप्यधः ॥
मूत्रस्रोतःपथात्शुक्रं पुरुषस्यप्रवर्तते ॥

अर्थ—मूत्राशय द्वाराचे अधोभागीं उजवे बाजूकडे दोन अंगुळांवर जी मूत्र वाहिनी आहे तिचे मार्गापासून पुरुषाचें वीर्य प्रवृत होतें.

## याविषयीं प्रमाण वृद्धवाग्भट्ट

सप्तमीशुक्रधराद्व्यंगुलेदक्षिणेपार्श्वेबस्तिद्वारस्यचाधो
मूत्रमार्गमाश्रितासकलशरीरव्यापिनीशुक्रंप्रवर्तयति ॥

अर्थ—सातवी शुक्रधरा कला बस्तिद्वाराचा अधोभागी दोन अंगुलावर दक्षिण बाजूस मूत्रमार्गाचा आश्रय करून सर्व शरीराला व्यापून शुक्राला प्रवृत करते.

## वीर्य क्षरण सांगतो.

॥ कृत्स्नदेहाश्रितंशुक्रंप्रसन्नमनसस्तथा ॥
स्त्रीषुव्यायच्छतश्चापिहर्षात्तत्संप्रवर्तते ॥

अर्थ—जा पुरुषाचें चित्त, क्रोधादिकें करून रहित असतें, व स्त्री सह मैथुनादि शरी ायास करितो, त्यापुरुषाचे सर्व देहाला व्यापून राहणारें शुक्र, सुखानें प्रवृत्त होतें.

## गर्भिणीला आर्तव निषेध सांगतो.

॥ गृहीतगर्भाणामार्तववहानांस्रोतसांवर्त्मान्यवरु
ध्यंतेगर्भेणतस्माद्गृहीतगर्भाणामार्तवंनदृश्यते ॥

अर्थ—स्त्रियांस, गर्भधारण झाल्या नंतर, आर्तव वाहिन्याचीं तोंडें गर्भानें रुद्ध होतात यास्तव त्यांचें आर्तव, गर्भधारण झाल्या नंतर दिसत नाही.

## स्तनदुग्धोत्पत्ति ॥

ततस्तदधःप्रतिहतमूर्ध्वमागतमपरांचापचीयमानमपरेभिधीयते ॥
शेषंचोर्ध्वतरमागतंपयोधरावभिप्रतिपद्यते ॥ तस्माद्गर्भिण्याःपी
नोन्नतपयोधराभवंति ॥

अर्थ—गर्भ धारणानंतर तें आर्तव, अधोभागीं थबकून, उर्ध्वभागी जाऊन संचित होऊन, स्त्रीतें पुष्ट करून स्तनाप्रत जाऊन, स्तनालाही पुष्ट व उंच करितें.

## यकृत् प्लीहा सांगतो.

गर्भस्ययकृत्प्लीहानौशोणितजौ ॥

अर्थ—गर्भाचें. काळिज, आणि कवळूं हीं रक्ता पासून होतात काळिज. उजव्ये कडेस ाजव्ये स्तना खालचे फांसळ्यानीं अच्छादिलेलें असतें. व कवळूं डावेकडे फांसळ्यानीं आ-च्छादिली असत्ये. यकृत् प्लीहा हें उपलक्षण. तेणें करून पिपासास्थान ही रक्तजन्य जाणावें.

## काळीज सांगतो.

॥ रक्तादनिलयुक्तात्कालीयकमिति ॥

अर्थ वायूनें युक्त जें रक्त त्यापासून काळिज होतें.

## फुप्फुस सांगतो.

शोणितफेनप्रभवःफुप्फुसोत्हृदयनाडिकालग्नःस्वनाम्नाख्यातः ॥

अर्थ रक्ताचे फेनापासून फुप्फुस. होतो. तो हृदय नाडीशीं लागलेला आहे. तो फुप्फु यांनामें करून व्यवहार पावतो.

## उंदुक सांगतो.

शोणिताकिट्टप्रभवउंदुकः॥

अर्थ रक्ताचे मला पासून उंदुक होतो.

## आंतडया दिकांचा उप्तति प्रकार सांगतो ॥

असृजःश्लेष्मणश्चापियःप्रसादःपरोमतः ॥ तंपच्यमानंपित्तेनवातश्चाप्यनुधावति ॥ ततोंत्राणिप्रजायंतेगुदंबास्तिश्चदेहिनः ॥ उदरेपच्यमानानामाध्मातादुक्मसारवत् ॥ कफशोणितमांसानांसारान्मज्जाप्रजायते ॥

र्थ—रक्त, व कफ यांचा उत्कृष्ट सार पदार्थ पित्ताचा ऊष्म्यानें पचन होत असतां त्याला ् येऊन मिळतो. त्या सर्वांचा मेलना पासून आंतडी, बस्ति, व गुद, हीं होतात. व उ-ाचे ठायीं. कायाग्नीचा योगानें पच्यमान. कफ, रक्त, मांसाचा सारापासून मज्जा होत्ये. ां सुवर्ण. तापतां तापतां त्यापासून सार पदार्थ सिद्ध होतो. गयदास हृदयीं पच्यमान ादि असेंच सांगतो.

## ऊष्मोत्पत्ती.

यथार्थमूष्मणायुक्तोवायुःस्रोतांसिदारयेत्.

—पित्ताशीं युक्त वायू होऊन जसें ज्याचें कार्य आहे. तसे. रस, रक्त, शब्द, वीर्य, इत्यादि- ां वाहणाऱ्या नाडीला करितो.

## पेश्युत्पत्ती.

अनुप्रविश्यपिशितंपेशीर्विभजतेतथा.

**अर्थ**—वायू. मांसामध्यें प्रविष्ट होऊन. पेशींचा विभाग करितो | पेशी ह्मणजे. कांहीं चतुरस्त्र, व कांहीं लांबोडीं, अशीं मांसाचीं खंडें आहेत त्यांची संख्या पुढें सांगेल.-

## स्नायुउत्पत्ती·

मेदसःस्नेहमादायशिरास्नायुत्वमाप्नुयात् ॥
शिराणांतुमृदुःपाकःस्नायूनांतुततःखरः॥

**अर्थ**— वायू. मेदाचे स्नेहाला घेउन. पूर्वोक्त ऊष्म्यानें पक्व करून शिरा आणि स्नायू यांतें उत्पन्न करतो. एक पदार्था पासून दोन प्रकारचे पदार्थ कसे होतात. यांचें कारण. शिरांचा पाक. अल्प, मृदू, असतो. आणि स्नायूचा पाक. किंचित्कठिण असतो. तेणें करून दोन प्रकारचे पदार्थ होतात. जसें उसाचे रसा पासून राब व ढेप असे दोन पदार्थ होतात.

## आशयोत्पत्ती.

आशय्याभ्यासयोगेनकरोत्याशयसंभवं·

**अर्थ**— वायू आपली स्थिती करून आपले सहवासानें आशयांलां करतो.

## रक्तमेदःप्रसादात्वृक्कौ.

**अर्थ**—रक्त व मेद यांचा सारा पासून कुक्षि गोलक होतात.

## वृषणोत्पत्ती.

मांसासृक्कफमेदःप्रसादाद्वृषणौ. ॥

**अर्थ**—मांस, रुधिर, कफ, मेद, यांचा सारा पासून, वायूचा योगें करून पूर्ववत्. वृषण होतात.

## ह्रदयोत्पत्ती.

शोणितकफप्रसादजंह्रदयंयदाश्रिताधमन्यःप्राणवहाः॥ तस्याधोवा मतःप्लीहाफुप्फुसश्चदक्षिणतोयकृत्क्लोमच ॥ तत्ह्रदयंविशेषेणचे तनास्थानमतस्तस्मिन्तमसावृतेसर्वेप्राणिनःस्वपंति.

**अर्थ**— रक्त. व कफ. यांचे सारापासून ह्रदय होतें. जाचा आश्रयानें राहिलेल्या धमन्या प्राणांतें वाहातात. व ह्रदयाचे अधोभागीं डावे कडे प्लीहा, व उजवे कडे फुप्फुस, असतो. व ह्रदयाचे उजवे कडे किंचित् खालीं. यकृत् आणि क्लोम, हीं असतात. यकृत् ह्मणजे काळीज. क्लोम ह्मणजे तिलक. तें पिपासा स्थान. व विशेषें करून. शरीर स्थान आहे. याविषयीं प्रमाण ॥ चरक. ॥

## शरीर चेतनास्थान सांगतो.

चेतनानामधिष्ठानंमनोदेहश्चसेंद्रियं ॥

केशलोमनखाग्रांतमलद्रव्यगुणैर्विना ॥

अर्थ—इंद्रियांसह मन. सर्व देह चेतनाचें अधिष्ठान आहे. परंतु केश, लोम, नखाग्रें. यादि मलद्रव्यांचे गुणा वांचून असें जाणावें, व हृदय विशेषें करून चेतनेचें अधिष्ठान हे आणि चेतना सहचरित मनहि विशेषें करून हृदयीं राहतें यास्तव तमोगुणानें आ-र झालें असतां सर्व प्राण्यांस निद्रा लागते.

हृदय स्वरूप सांगतो ॥

पुंडरीकेणसदृशंहृदयंस्यादधोमुखं ॥
जाग्रतस्तद्विकसतिस्वपतश्चनिमीलति ॥

र्थ—हृदय. कमला सारखें. व अधोमुख, आहे. तें जागृत अवस्थे मध्यें विकसित, आणि द्रावस्थे मध्यें मिटलें असतें.

प्रसंगात् निद्रा सांगतो ॥

निद्रातुवैष्णवीमायापाप्मानमुपदिश्यति ॥
सास्वभावतएव सर्वप्राणिनोभिस्पृशति ॥

अर्थ—निद्रा. विष्णुची माया तीचा स्वभाव असा कीं ती सर्व प्राणि मात्रांस स्पर्श क-न शुभा शुभ कर्माचा निरोध करित्ये यास्तव पापाचाच उपदेश करित्ये. यद्यपि. अन्य तं-ीं सप्तविध निद्रा सांगितली. तथापि तामसी, स्वाभाविकी, वैकारिकी, अशी तीन प्रका-ची आहे.

तामसी निद्रा सांगतात.

यदासंज्ञावहानिस्त्रोतांसितमोभूयिष्ठंश्लेष्माणंप्रतिपद्यंते ॥
तदातामसीनिद्राभवतिअनवबोधिनीसाप्रलये ॥

अर्थ—जाकालीं. शरीरांतें चैतन्य वाहणाऱ्या शिरां प्रत. तमोगुण प्रधान कफ. नि-न रोधितो. त्याकालीं घोर निद्रा लागत्ये. तीचा मध्यें ज्ञान नसतें. व ही प्रलय का-ीं, मूर्छेचे ठायीं होत्ये यद्यपि सर्व निद्रांचा हेतू तमोगुण आहे. तथापि हीचे ठायीं अधि-क असतो. यास्तव हिला तामसी निद्रा ह्मणतात.

स्वाभाविकी सांगतो·

तमोभूयिष्ठानामहःसुनिशासुचभवति ॥ रजो
भूयिष्ठानामनिमित्तं ॥ सत्वभूयिष्ठानामर्धरात्रे॥

अर्थ—निद्रा. तमोगुण प्रधानानां. अहोरात्र. आणि रजोगुण पुरुषानां. कदाचित् रा-त्रीस, कदाचित् दिवसास, व अवशीस, पाहाटेस, सूर्योदयीं, दिनमाजे, अशी भलते वे-

ळेस येत्ये. आणि सत्वगुण प्रधान पुरुषानां. अर्धरात्रीं सत्वगुण अल्प होतो आणि तमो-गुण अधिक होतो यास्तव अर्धरात्री येत्ये.

वैकारिकी सांगतो ॥

क्षीणश्लेष्मधातूनामनिलबहुलानांमनःशरीरा
भिघातवतांचनैवसावैकारिकीभवति ॥

अर्थ—जो प्राण्याचा शरिरास बल देणारा कफ, आणि समधातु हे क्षीण झाले, व शरिरांत वायु, प्रबल झाला, व मन आणि शरीर यांस कांहीं अभिघात झाला, त्या प्राण्यानां निद्रा येत नाहीं. कदाचित् स्वल्पआली असतां, ती वैकारिकी जाणावी ॥ लंघन श्रमादिकें करून, शरीरांत वायु प्रकुप्त होतो आणि श्लेष्मा क्षीण होतो, त्या-काली निद्रा कशी येते ती सांगतो.॥ त्या कालीं मन फार ग्लान होतें. त्यामुळें भूता-त्म्याची विषया पासून परावृत्ति होऊन प्राणी निजतात. असें जाणावें ॥

या विषयीं प्रमाण तदुक्तं चरके॥

यदातुमनसिक्लांतेकर्मात्माचश्रमान्वितः ॥ विषये
भ्योनिवर्ततेतदास्वपितिमानवः ॥

अर्थ—जा कालीं मन ग्लान होतें व कर्मे पुरुषाला श्रम होऊन विषयां पासून निवृत्त होतो त्याकाळीं मनुष्य निजतो.॥

पूर्वी गद्यें करून सांगितला अर्थ सुखबोधार्थ पुनः दोहीं श्लो-कानीं सांगतो ॥

हृदयंचेतनास्थानमुक्तंसुश्रुतदेहिनां॥ तमोभिभूतेतस्मिंस्तुनिद्राविशति
देहिनां ॥ निद्राहेतुस्तमःसत्वंबोधनेहेतुरुच्यते ॥स्वभावएववाहेतुर्ग
रीयान्परिकीर्तितः ॥

अर्थ—हृदय प्राण्याचे चेतना स्थान, तें तमोगुणाने व्याप्त झालें असतां निद्रा येत्ये. निद्रेचे कारण तमोगुण . आणि जागृतीचें कारण सत्वगुण अथवा परमश्रेष्ट स्वभावच दोहों अवस्थांचें कारण सांगितलें ॥

निद्रावस्थे मध्यें स्वप्न दर्शन कसें होतें तें सांगतो

पूर्वदेहानुभूतानांभूतात्मास्वपतःप्रभु ॥ रजो
युक्तेनमनसागृण्हात्यर्थान्शुभाशुभान्

अर्थ—भूतात्मा जो निजणाऱ्या देहाचा नियंता क्षेत्रज्ञ, तो, पूर्वी अनंत जन्मी अनुभविलेल्या विषयांचीं सुखदुःखे भोगा संकि रूप मनानें ग्रहण करितो त्यास स्वप्न ह्मणतात.

## इंद्रियांचा लयानें आत्मा निद्रित सादिसतो असें सांगतो

करणानांतुवैकल्येतमसाभिप्रवर्धिते अस्वपन्नपिभूतात्मा प्रसुतइवचोच्यते

**अर्थ**—तमोगुणाचे वृद्धीनें इंद्रियें विकळ झालीं असतां क्षेत्रज्ञ. न निजतांही निजल्या-सारिखा भासतो.

## दिवसास निद्रेचा विधिनिषेध सांगतो

सर्वर्तुषुदिवास्वापः प्रतिषिद्धोन्यत्रग्रीष्मात्

**अर्थ**—ग्रीष्मऋतूवांचून इतर ऋतूं मध्यें दिवसास निद्रेचा निषेध जाणावा.

॥ प्रतिषिद्धेष्वपिबालवृद्धस्त्रीकर्षितक्षतक्षीणनित्यमद्यपानवाहनाध्वकर्मपरिश्रांतानामभुक्तवतांमेदस्वेदकफरसरक्तक्षीणानामजीर्णिनांचमुहूर्तंस्वपनमप्रतिषिद्धं ॥

**अर्थ**—निषिद्ध ऋतूचे ठायीं ही बाल, वृद्ध, आणि मैथुनानेंक्षीण व उरःक्षतानें क्षीण. व नित्य मद्यपान कर्ता. व अश्वादि वाहनानें व मार्ग गमनें करून श्रांत. व उपवासी. व ज्याचे मेद, स्वेद, कफ, रस, रक्त, हे क्षीण झाले आहेत तो. व अजीर्ण झालेला. या सर्वांस दिवसास दोनघटिका निद्राविषयीं निषेध नाहीं. तसें रात्रीस जागरण झालें असेल तर त्या जागरण कालाचे अर्ध काल पर्यंत दिवसास निद्रा हितावह होत्ये ॥

## अति निद्रेला दोष सांगतो

विकृतिर्हिदिवास्वापोनामतत्रस्वपतामधर्मःसर्वदोषप्रकोपश्चकासश्वासप्रतिश्यायशिरोगौरवअंगमर्दारोचकज्वराग्निदौर्बल्यानिभवंति॥

**अर्थ**—दिवसास निद्रा घेतली असतां विकृती होत्ये. आणि अधर्म घडतो. व वात पित्तादि. सर्व दोषांचा प्रकोप होऊन खोकला, श्वास, पडसें, मस्तकासजडपणा, अंग तळणें, अरोचक, ज्वर, अग्निमांद्य, दुर्बलपणा, इत्यादि विकार होतात.

तस्मान्नजागृयाद्रात्रौदिवास्वप्नंतुवर्जयेत्॥ ज्ञात्वादोषकरावेतौबुधः स्वप्नंमितंचरेत्॥ अरोगः सुमनाह्येवंबलवर्णान्वितोवृषः॥ नातिस्थूलकृशःश्रीमान्नरोजीवेत्समाःशतं॥

**अर्थ**—पूर्वोक्त अधर्म, व विकार, होतात यास्तव रात्रीं जागरण, आणि दिवसास निद्रा करूं नये. सुज्ञानीं हे दोन दोषकर असें जाणून निद्रा व जागरण, परिमित करावें असें करणारे पुरुष रोगरहित, ज्यांचें मन निर्दोष व बलें करून व वर्णें करून युक्त व स्त्रीरमण करणेंस युक्त फार स्थूल व फार कृश नाहींत असे होतात व ते शरीर शोभायुक्त असून शंभर वर्षें पर्यंत वांचतात.

## निद्रा नाशाचा हेतु सांगतो.

निद्रानाशोनिलात्पित्तान्मनस्तापात्क्षयादपि॥संभवत्य
भिघाताच्चप्रत्यनीकैःसशाम्यति॥

अर्थ—वात, पित्त, क्षय, व मनःसंताप, इत्यादि कारणें करून निद्रेचा नाश होतो, आणि तो कारणाशीं विरुद्ध. अभ्यंगादि उपचारें करून शांत होतो.

## प्रत्यनीक सांगतो.

निद्रानाशेभ्यंगयोगोमूर्ध्निंतैलनिषेवणं॥ गात्रस्योद्वर्तनंचैवहितसंवा
हनानिच॥शालिगोधूमपिष्टान्नभक्ष्यैरैक्षवसंस्कृतैः॥भोजनंमधुरंस्नि
ग्धंक्षीरमांसरसादिभिः॥रसैर्बिलेशयानांचविष्किराणांतथैवच ॥
द्राक्षासितेक्षुद्रव्याणामुपयोगोभवेन्निशि॥ शयनासनयानानिमनो
ज्ञानिमृदूनिच॥ निद्रानाशेचकुर्वीततथान्यानपिबुद्धिमान्॥

अर्थ—निद्रा नाश झाला असतां, तेल, उटणें, लावून उष्णोदकानीं चागले नाहावें, व मस्तकास तेल चोळावें, व शरीर चांगलें चोळून धुवावें, व आंग हळू हळू चांगलें रगडवावें, व शालीचें अन्न, व शर्करें करून संस्कृत गोधूम पिष्टान्नाचें भक्ष्य, व दूध, आणि मांस, इत्यादिकें करून स्निग्ध, मधुर, असें भोजन करावें, व घोंपडी आदी करून पंचनखवाति तित्तिरी आदि करून पक्षी यांचा मांस रसें करून, व द्राक्षा, शर्करा, व ऊंस, यांचा रात्री सेवनें करून शयन, स्थान, आसन, व यान, हीं चांगलीं मृदु, मनास आल्हाद करणारीं, आणि, प्रावरणादिकें करून निद्रा नाशाचा उपशम होतो.

## निद्राति योगा विषयीं प्रतीकार सांगतो.

निद्रातियोगेवमनंहितंसंशोधनानिच ॥
लंघनंरक्तमोक्षश्चमनोव्याकुलतापिच ॥

अर्थ—निद्रेचा. अतियोग झाला असतां. वमन, हितकारक होतें. व वमन, विरेचन, स्वेद इत्यादिकें करून शरीराचें शोधन, व लंघन, व रक्त काढणें, व मनोग्लानी, इत्यादि उपचार हिता वह होतात. संशोधनें करून वमन प्राप्तझालें असतां पुनः वमनाचें ग्रहण केलें तें विशेषे करून उपयुक्त होतें असें जाणावें.

## जाणी रात्रीं निद्रा करूं नये ते सांगतो.

कफमेदोविषार्तानांरात्रौजागरणंहितं ॥

अर्थ—कफ, मेद, विष, याणी पीडित पुरुषानां रात्रीचे ठायीं जागरण हितावह होतें. ॥

## दिवसा कोणी निजावें तें सांगतो.

दिवास्वापश्चतृट्शूलहिक्काजीर्णातिसारिणां ॥

**अर्थ** तृषा, शूल, उचकी, अजीर्ण आणि अतिसार, इंहीकरून व्याप्त पुरुषानां दिवसास नि द्रा.हितावह होये.

## निद्रेचा प्रसंगे करून तंद्रा सांगतात.

इंद्रियार्थेष्वसंप्राप्तिर्गौरवंजृंभणंक्लमः।।
निद्रार्तस्येवतस्येहातस्यैतंद्राविनिर्दिशेत्।।

**अर्थ**—जा अवस्थे मध्यें शब्दादिकांचे अज्ञान, शरीराला जड पणा, व जांभया, ग्लानी, ही होतात; व निद्रायुक्त असुन चेतना असत्ये. त्या अवस्थेला तंद्रा ह्मणतात. निद्रेचे ठायीं जागृत केल्यानंतर ग्लानि नसत्ये आणि तंद्रे मध्यें असत्ये असें जाणावें.

## जांभईचे लक्षण सांगतो ॥

पीत्वैकमनिलोच्छ्वासमुद्वेष्टंविवृताननः।।
यंमुंचतिसनेत्रांशुंसजृंभइतिकीर्तितः।।

**अर्थ**— जा अवस्थे मध्यें मनुष्य. एक उच्छ्वास संबंधि वायू मुख पसरूनप्राशन करून पुनः सोडते वेळेस मुख विकासित करून अश्रूतें सोडितो. त्या अवस्थेला जांभयी, ह्मणतात

## शिंका सांगतो ॥

प्राणोदानौसमौस्यातांमुर्ध्निस्रोतःपथिस्थितौ ।।
नस्तःप्रवर्ततेशब्दःक्षवथुंतंविनिर्दिशेत् ।।

**अर्थ**—हृदयस्थ वायू, आणी कंठस्थ वायू, हे मस्तका मध्यें जाऊन. शिरांचा मार्ग बंद करून. क्षणमात्र स्थिर होऊन. अकस्मात् नासिके पासून शब्द युक्त बाहेर निघतात. त्या अवस्थेला शिंक ह्मणतात.

## क्लमसांगतो.

योनायासश्रमोदेहेप्रवृद्धश्वासवर्जितः ॥
क्लमःसइतिविज्ञेयइंद्रियार्थप्रबाधकः ॥

**अर्थ**—जा अवस्थें मध्यें. आयासा वांचून देहाचे ठांयीं श्रम होतो. परंतु श्रमामध्यें मोठा श्वास असतो. तो असत नाहीं. आणि इंद्रियांची सर्व कर्मा विषयीं प्रवृत्ती होत नाहीं त्या अवस्थेला क्लम आणी ग्लानी. ह्मणतात.

## आलस्य सांगतो.

सुखस्पर्शप्रसंगित्वंदुःखद्वेषणलोलता ॥
शक्तस्यचाप्यनुत्साहःकर्मण्यालस्यमुच्यते ॥

**अर्थ**— जा अवस्थे मध्यें. सुखस्पर्शाची इच्छा आणि दुःखाचा द्वेष असतो. आणी श-क्ती असून कर्म करण्या विषयीं उत्साह नसतो, त्या अवस्थेला आलस्य ह्मणतात.

## कोणी येथें उत्क्लेश आणी ग्लानीयांचें लक्षण सांगतात.

उत्क्लिश्यान्नंननिर्गच्छेत्प्रसेकष्ठीवनेरितं ।। हृदयंपीड्यतेचास्यतमुत्क्लेशंविनिर्दिशेत् ।। वक्त्रेमधुरतातंद्राहृदयोद्वेष्टनंभ्रमः ।। नचान्नमभिकांक्षेतग्लानिस्तस्यविनिर्दिशेत् ।।

**अर्थ**— जा अवस्थे मध्यें. पोठांत ढवळून ऊर्ध्व वेग येतात. परंतु त्या वेगां बरोबर अन्न बाहेर निघत नाहीं. आणी ओकारी येत्ये, तोंडाला मळमळ व पाणीं सुटतें. व हृदयांत पीडा होते, त्या अवस्थेला उत्क्लेश ह्मणतात. व तोंडाला गोडपणा येऊन तंद्रा येत्ये व हृदय जड व ओढल्या सारिखें वाटतें, भ्रम होतो अन्नावर इच्छा होत नाहीं त्या अवस्थेला ग्लानी ह्मणतात.

## गौरव लक्षण सांगतो ।।

आर्द्रचर्मावनद्धंवायेगात्रंमन्यतेनरः ।।
तथागुरुशिरोत्यर्थंगौरवंतद्विनिर्दिशेत् ।।

**अर्थ**—जा अवस्थे मध्यें मनुष्यास आपलें आंग ओल्या चर्मानें वेष्टिले असें जडभासतें व-मस्तक जड असतें त्या अवस्थेला गौरव ह्मणतात.

## मूर्छादिकांस कारण सांगतो ।।

मूर्छापित्ततमः प्रायारजः पित्तानिलात्भ्रमः ।।
तमोवातकफात्तंद्रानिद्राश्लेष्मतमोभवा ।।

**अर्थ**—अकस्मात् भोंवळ येउन मनुष्य निश्चेष्ट पडतो अशी अवस्था पित्त व तमो. गुण यांणीं होत्ये व ती मूर्छा. चाकावर घालुन फिरविल्यानें जी अवस्था ती रजोगुण, पित्त, वायु, इहीं करून होत्ये व तिला भ्रमह्मणतात. तंद्रा. तमोगुण, वायु, कफ, इहीं करूनहोत्ये. व निद्रा. श्लेष्मा, आणि तमोगुण, यांणीं होत्ये.

## गर्भवृध्दी विषयीं अन्य हेतु सांगतो.

गर्भस्यखलुरसनिमित्तामारुताध्माननिमिताचपरिवृद्धिर्भवति ।।

**अर्थ**—गर्भाची वृद्धी दोहों प्रकारची होत्ये. रसनिमित्ता, आणि मारुता ध्माननिमित्ता, रसनिमित्ता ह्मणजे आईचे रसवाहिनी नाडीशीं गर्भाची नाभिनाडीबांधलेली आहे. ती. आईचे आहार रसा पासून रस आणून गर्भाचे पोषण करित्ये. हा प्रकार पूर्वी सांगितला आहे. दुसरे प्रकारची वृद्धी. वायुनें शिरांचे पूरण होऊन गर्भाचे सर्वावयवांची वृद्धी होत्ये. असें जाणावें.

स्रोतसांचे आध्मानाचीप्राप्तिसांगतो.

तस्यांतरेणनाभेस्तुज्योतिस्थानंध्रुवंस्मृतं ॥
तदाधमतिवायुस्तुदेहस्तेनाभिवर्धते ॥

अर्थ गर्भाचे नाभी मध्यें, अग्नीचें स्थान आहे. असें मुनीनीं सांगितलें. त्या अग्नीतें वायु प्रज्वलित करतो. तो अग्नी. वायू सह वर्तमान शिरांप्रत प्रविष्ट होऊन. पूर्ण झाला असतां गर्भाची वृद्धि होत्ये.

सर्व देहाची वृद्धी सांगतो.

ऊष्मणासहितश्चापिदारयत्यस्यमारुतः ॥
ऊर्ध्वंतिर्यगधस्ताच्चस्रोतांस्यपियथातथा ॥

अर्थ—ऊष्म्या सहवर्तमान वायु. जसा जसा आपाद मस्तकपर्यंत शिरांनां पूरित करतो. तसा तसा. गर्भाचा देह वाढतो.

जसें जसें शरीर वाढते तशा दृष्टयादिक वाढत नाहींत त्यातें सांगतो.

दृष्टिश्चरोमकूपाश्चनवर्धंतेकथंचन ॥
ध्रुवाण्येतानिमर्त्यानामितिधन्वंतरेर्मतं ॥

अर्थ—दृष्टि, आणि रोमकूप, हे मनुष्यांचे निश्चल आहेत. यास्तव देहाबराबर ते वाढत नाहींत. असें धन्वंतरीचें मत आहे.

शरीर क्षीण होत असतां कांहीं अवयवांची वृद्धी होत्ये तीतें सांगतो.

शरीरेक्षीयमाणेपिवर्धेतेद्वाविमौसदा ॥
स्वभावंप्रकृतिंकृत्वानखकेशावितिस्थितिः ॥

अर्थ—शरीर. क्षीण होत असतांहीं! नख, आणि केश, हे सर्वकाल वाढतात. याचें कारण स्वभाव जाणावा.

प्रसंगें करून प्रकृतीचें रूप हेतू लक्षण क्रम करून सांगतो.

सप्तप्रकृतयोभवंतिपृथक्द्विशःसमस्तैश्च ॥

अर्थ—मनुष्याचा प्रकृति वात, पित्त, कफ, या भेदें करून तीन. आणि द्वंद्वज, तीन. व सन्निपात, एक' अशा सात प्रकारचा होतात.

त्यांचा उत्पत्ती विषयीं हेतूसांगतो.

शुक्रशोणितसंयोगाद्योभवेद्दोषउत्कटः ॥

प्रकृतिर्जायतेतेनतस्यामेलक्षणंशृणु ॥

अर्थ—शुक्र, शोणित संयोग कालीं. वातादि दोषां मधून जो जो दोष स्वभावें करून प्रबल होतो. त्या दोषें करून मनुष्याची प्रकृती होत्ये. त्यांची लक्षणें पुढें सांगतो. श्रवणकर. उदाहरण. गर्भाधान कालीं वायू उत्कट झाला असतां वात प्रकृतिक मनुष्य होतो असें इतरां विषयीं जाणावें.

वातादि दोष दोहों प्रकारें प्रबल होतात एक स्वभावेंकरून व दुसरे कुपित होउन होतात त्यामध्यें स्वभावें करून प्रबल होतात ते प्रकृतीचें कारण असून शरीरास मात्र उत्पन्न करिता-त आणि कुपित होउन उत्कट होतात ते रोगाचें कारण होउन गर्भाचा नाश करतात असें जाणावें.

## वातप्रकृतिलक्षणसांगतो.

तत्रजागरूकःशीतद्वेषीदुर्भगःस्तेनोमत्सर्यनार्योगांधर्वचित्तःस्फुटित करचरणोल्परूक्षश्मश्रुनखकेशःक्रोधीदंतनखखादीचभवति ॥ अधृतिरदृढसौहृदःकृतघ्नःकृशपरुषोधमनीततःप्रलापी ॥ द्रुतगतिर टनोनवस्थितात्माबियतिचगच्छतिसंभ्रमेणसुप्तः ॥ अव्यवस्थितमति श्चलदृष्टिर्मंदरत्नधनसंचयमित्रः ॥ किंचिदेवविलपत्यनिबद्धंमारुतप्र कृतिरस्थिरसत्वः ॥

अर्थ—जा मनुष्याची वात प्रकृती असत्ये तो अतिशयें करून जागरणशील, व शीत पदार्थांचा द्वेष करणारा व आकृति करून वाईट असतो. व चोरटा. व त्याला परो-त्कर्ष सहन होतनाहीं व दुराचरण करतो. सर्वकाल नृत्य गीतादिकांचे ठायीं रत असतो व त्या मनुष्याचे हात पाय फुटीर असतात. व मिशा, नख, केश हे अल्प असून रूक्ष असतात. व हिंसनशील. व त्याला दांत नखें खावयाची सवय असत्ये. झोंपेंमध्यें दांत खातो. व त्याला धैर्य नसतें. व तो अल्प कारणें करून मैत्री तोडितो. व परोपकार जाण-त नाहीं. व त्याचा धमनी बारीक असून कठोर असतात. व बडबड फार करतो. व गमन आणि भाषण फार त्वरित असतें. व चंचल चित असतो व त्याची बुद्धी स्थीर नसत्ये. व निद्रे मध्यें भ्रम पाऊन विपत्ती मध्यें पडतो. व आकाशांत फिरतो. व दृष्टी चंचल असत्ये व त्याचे रत्न. मित्र व धन संचय. हे अल्प असतात. व किंचित् विलाप पूर्वक अबद्ध भाषण करतो. या प्रकारें लक्षणें जाणावीं.

## पित्त प्रकृतिक पुरुषाचीं लक्षणें सांगतो.

स्वेदनोदुर्गंधःपीतशिथिलांगस्ताम्रनखनयनमुखतालुजिव्हौष्ठपाणि पादतलोवलीपलितखालित्यजुष्टोबहुभुगुष्णद्वेषीक्षिप्रकोपप्रसादोम ध्यमबलोमध्यमायुश्चभवति ॥ मेधावीनिपुणमतिर्विगृह्यवक्तातेजस्वी

समितिषुदुर्निवारवीर्यः ॥ सुप्तःसन्कनकपलाशकर्णिकारान्संपश्ये दपिचहुताशविद्युदुल्काः॥नभयात्प्रणमेदनतेष्वमृदुःप्रणतेष्वपिसांत्वन दानरुचिः॥भवतीहसदाव्यथितास्यगतिःसभवेदिहपित्तकृतप्रकृतिः ॥

र्थ—जा मनुष्याची पित्त प्रकृती असते त्यास दुर्गंधयुक्त घर्म बहुत येतो, व त्याचें आंग तवर्ण असून शिथिल असतें, व नेत्र, मुख, तालु, जिव्हा, ओष्ठ, व हात, पायांचे तळवे आरक्त असतात. व आंगास वली, व टक्कल पडतें. व तो फार खातो. व त्याला उष्ण प- ार्थ अप्रिय असतात. व रागें भरण्यास व प्रसन्न होण्यास उशीर लागत नाहीं आणि ायुष्य व बळ, मध्यम असतात। व बुद्धिमान् असून परम कुशल असतो व तो दुसऱ्यावर ाप ठेऊन बोलतो, व तेजस्वी, भाणी युद्धा मध्यें दुर्निवार असतो. व झोपे मध्यें सुवर्ण ़णी पळसाचीं पुष्पें, व अग्नि, विजा, जळकीं लांकडें, पाहतो. व काहीं भयानें धीर सो- त नाहीं, व कोणी धट्ट पुरुष भेटला असतां आपण त्यापेक्षां धट्ट हातो, व कोणी नम्र ला त्याशीं नम्र होऊन चांगलें सत्काराचें भाषण करतो, व तो मुखरोगें करून पीडि- असतो, व गमन कालीं पीडा पावतो, त्याला धांवतां येतनाहीं या प्रकारें त्याचीं लक्षणें ़ीतलीं.

## कफ प्रकृतिक पुरुषाचीं लक्षणें सांगतो.

दूर्वेंदीवरनिस्त्रिंशार्द्रारिष्टशरकांडानामन्यतमवर्णःसुभगःप्रियदर्शनोमधुरप्रियःकृतज्ञोधृतिमान्सहिष्णुरलोलुपोबलवान्चिरग्राहीदृढवैरश्चभवति॥ शुक्लाक्षःस्थिरकुटिलाक्षनीलकेशोलक्ष्मीवान्जलदमृदंगशब्दवर्णः ॥ सुप्तःसन्सकमलहंसचक्रवाकान्संपश्येदपिच जलाशयान्मनोज्ञान् ॥ रक्तांतनेत्रःसुविभक्तगात्रःस्निग्धच्छविः सत्वगुणोपपन्नः ॥ क्लेशक्षमोमानयितागुरूणांज्ञेयोबलासप्रकृतिर्मनुष्यः ॥

र्थ—दुर्वा, व नील कमल, व खड्ग, व ओला काळा रिठा, व जांचें कांडें तिराला तात त्या वस्तूच्या वर्णासारिखा शरीरवर्ण असतो, व भाग्यवान्, असून रूपवान्, असतो ला मधुर पदार्थ प्रिय, व परोपकार स्मरतो, व धैर्यवान्, असून सहनशील, व निर्लो- व बळकट, व कांहीं गोष्ट मनांत धरिली असतां लवकर सोडीत नाहीं, गंभीर, व री, नेत्र शुक्लवर्ण, केश वक्र असून फार काळे असतात, लक्ष्मीवान्, ज्याचा शब्द मेघा ा, व मृदंगा सारिखा गंभीर, स्वप्नामध्यें कमलें, हंस चक्रवाकादिकें करून शोभित शय पाहतो, ज्याचे नेत्रप्रांत आरक्त, सर्व अवयव उत्तम असून निरनिराळे असतात, ़ाची कांति स्निग्ध असते, सत्वगुण संपन्न, आपत्कालीं धैर्य न मोडणारा, गुरु, देव- कांस फार मानणारा अशाप्रकारचा मनुष्य कफ प्रकृति जाणावा.

## द्वंद्वज, संनिपातज प्रकृति सांगतो.

द्वयोर्वातिसृणांवापिप्रकृतीनांतुलक्षणैः ॥
ज्ञात्वासंसर्गजावैद्यैःप्रकृतीरभिनिर्दिशेत् ॥

अर्थ—वैद्यांनी दोहों, तिहीं, दोषांचीं लक्षणें जाणून द्वंद्वज, संन्निपातज, प्रकृति जाणाव्या.

## ते प्रकृतिभाव अन्यगुण करीत नाहीं असें सांगतो.

प्रकोपोवान्यभावोवाक्षयोवानोपजायते ॥
प्रकृतीनांस्वभावेनजायतेतुगतायुषः ॥

अर्थ—पूर्वोक्त प्रकृतीचा स्वभावें करून प्रकोप, विकार, व क्षय, हे होत नाहींत; परंतु मनुष्य गतायु होतो त्याकाळीं जी प्रकृति असते त्या दोषाचें प्राबल्य होऊन मरण येतें असें जाणावें.

## वातादि प्रकृतीचे दोष कोणत्या हेतूस्तव रोग उत्पन्न करून पीडा देत नाहींत त्यांतें सांगतो.

विषजातोयथाकीटोनविषेणविहन्यते ॥
तद्वत्प्रकृतयोमर्त्यंशक्नुवंतिनबाधितुं ॥

अर्थ—जसा विषामध्यें उत्पन्न झालेला किडा. त्याविषें करून पीडा पावत नाहीं. तसें प्रकृतिगत वातादि दोष. स्वजन्य मनुष्यांना. विशेष बाधित नाहीं, स्फुटित करचरणादि विकारें करून अल्प बाधा करितात. ॥

## अन्य मत सांगतो॥

प्रकृतिमिहनराणांभौतिकींकेचिदाहुःपवनदहनतोयैःकीर्तितास्तास्तु तिस्रः ॥ स्थिरविपुलशरीरःपार्थिवश्चक्षमावान्शुचिरथचिरजीवी नाभसःखैर्महद्भिः ॥

अर्थ—कोणी आचार्य असें बोलतात कीं, मनुष्याची प्रकृति पंच महा भूतांनीं केलेली आहे. त्यांतून वात, पित्त, कफ, इहीं करून तीन प्रकारच्या सांगितल्या, आणि ज्याचें शरीर. स्थिर, पुष्ट, व जो क्षमावान्, तो पार्थिव प्रकृतिक जाणावा. व जो शुचि, असून चिरकाल वांचतो, तो आकाश प्रकृतिक. या प्रकारें पंच भूतात्मक प्रकृति सांगितली. ती एक, दोहों, तिहीं, व चोहों, भूतांच्या संबंधें करून अनेक विध होत्ये. तात्पर्य, एका एका भूताच्या सबंधें करून पांच प्रकारची. दोहोंचा संबंधानें दाहा प्रकारची, अशी अनेक प्रकारची जाणावी. व सत्वादि गुणें करून, सात प्रकारची. असें नागार्जुन मत आहे.

## ब्राह्मकाय लक्षण.

शौचमास्तिक्यमभ्यासोवेदेषुगुरुपूजनं॥
प्रियातिथित्वमीज्याचब्राह्मकायस्यलक्षणं॥

अर्थ—शुचिता, परलोकीं आस्तिक्य बुद्धि, वेदाचे ठायीं अभ्यास, गुरु पुजन, सत्कर्माचरण, अभ्यागताचे ठायीं भक्ति योग, क्रिये विषयीं प्रीति, इत्यादिक लक्षणें निरंतर ज्याचे शरीरीं राहातात तो ब्रह्म काय जाणावा.

## माहेंद्र काय लक्षण.

माहात्म्यंशौर्यमाज्ञाचसततंशास्त्रबुद्धिता॥
भृत्यानांभरणंचापिमाहेंद्रंकायलक्षणं॥

अर्थ— थोरपणा, शौर्य, आज्ञा शक्ति, शास्त्राभ्यास, सेवकाचेंपोषण, इत्यादिक लक्षणें निरंतर ज्याचे ठायीं राहातात. तो माहेंद्र काय जाणावा.

## वरुण काय लक्षण.

शीतसेवासहिष्णुत्वंपैंगल्यंहरिकेशता॥
प्रियवादित्वमित्येतद्वारुणंकायलक्षणं॥

अर्थ—शीत पदार्थाची प्रीति, सहनपणा, पिंगाक्षता, कपिश वर्णकेश व मधुर भाषण त्यादि लक्षणें करून युक्त तो वरुण. काय.

## कुबेर काय लक्षण.

मध्यस्थतासहिष्णुत्वमर्थस्यागमसंचयौ॥
महाप्रसवशक्तिश्चकौबेरंकायलक्षणं॥

र्थ—मध्यस्थ पणा, सहन शक्ति, द्रव्याचें अर्जन, आणि संग्रह करणें, व प्रबल प्रजोत्पादन कि, हीं लक्षणें ज्याचे ठायीं असतात. तो कुबेर देह.

## गांधर्व काय लक्षण.

गंधमाल्यप्रियत्वंचनृत्यवादित्रकामिता॥
विहारशीलताचैवगांधर्वंकायलक्षणं॥

र्थ—जाला गंध, पुष्प, नृत्य, वाद्य, इत्यादिकांची आवड, व विहार करण्याचा ज्याचा भाव तो गंधर्व काय जाणावा.

## यम काय लक्षण.

प्राप्तकारीदृढोत्थानोनिर्भयःस्मृतिमान्शुचिः॥

रागमोहभयद्वेषैर्वर्जितोयमसत्ववान्॥

अर्थ–जो यथार्थ कर्म करणारा, आरंभिलें कर्म समाप्तीस नेतो, भयरहीत, स्मृतिमान् शुचि, व राग, लोभ, मोह, भय, ईहीं करून जो वर्जित, तो यमाचे शरीरें करून युक्त असें जाणावें.

ऋषि काय लक्षण

जपव्रतब्रह्मचर्यहोमाध्ययनसेवनं॥
ज्ञानविज्ञानसहितंऋषिसत्वंविदुर्नरं॥

अर्थ–जप, व्रत, ब्रह्मचर्य, होम, अध्ययन व ज्ञान विज्ञान यालक्षणें करून जो युक्त तो ऋषिकाय जाणावा याप्रकारेंसात्विक सातकायसांगितले॥

रजोगुण प्रधान कायसांगतो॥

आसुरकायलक्षण॥

ऐश्वर्यवंतंरौद्रंचशूरंचंडमसूयकं॥
एकाशिनंचौदरिकमासुरंसत्वमीदृशं॥

अर्थ–ऐश्वर्यवान् भयानक शूर अतिक्रोपिष्ठ पराचे गुणाची निंदाकरतो वएकल्याने वसून जेवावें असाज्याचास्वभाव व भक्षक व गयदास औदरिक स्थानीं औपधिक असें पढून. छद्म काढणारा अशीव्याख्याकरतो याप्रकारें असुर काय जाणावा.

सर्प काय लक्षण.

तीक्ष्णमायासिनंभीरुंचंडमायान्वितंतथा॥
विहाराचारचपलंसर्पसत्वंविदुर्नरं॥

अर्थ–जो तीव्रवेगवान् असून आयास युक्त व क्रोधरहित व भित्रा आणिक्रोधयुक्त असून फार शूर व तीव्रक्रोपी मायावी ज्याचा विहार आणि आचार फारचपल तोपुरुष सर्प काय.

पाक्षिकायलक्षण॥

प्रवृद्धकामसेवीचाप्यजस्राहारएवच॥
अमर्षणोनवस्थायीशाकुनंकायलक्षणं॥

अर्थ–जो प्रबळ काम सेवा करणारा, व स्वभावेंकरून निरंतर भक्षक, क्रोधी, एकास्थळीं क्षणभर न वसणारा, तो पक्षि काय जाणावा.

राक्षसकायलक्षण.

एकांतग्राहितारौद्राप्रकृतिर्धर्मबाह्यता॥

भृशमांत्रतमश्चापिराक्षसंकायलक्षणं ॥

अर्थ—एकांतस्थलीं राहणें, उग्र स्वभाव, धर्म निंदा, अत्यंत तामसपणा; इत्यादि राक्षस कायाचीं लक्षणें जाणावीं.

पैशाचकायलक्षण.

उच्छिष्टाहारतातैक्ष्ण्यंसाहसाप्रियतातथा ॥
स्त्रीलोलुपत्वंनैर्लज्ज्यंपैशाचंकायलक्षणं ॥

अर्थ—उच्छिष्टभक्षण, शास्त्रविरुद्ध कर्मावर प्रीति, स्त्री विषयीं लंपट, निर्लज्जपणा, इत्यादि लक्षणांनी जो युक्त तो पिशाच काय जाणावा.

प्रेतकायलक्षण

असंविभागमलसदुःखशीलमसूयकं ॥
लोलुपंचाप्यदातारंप्रेतसत्वंविदुर्नरं ॥
षडेतेराजसाःकायास्तामसांस्तुनिबोधमे ॥

अर्थ—जो कार्याकार्य विचार शून्य, आळशी, दुःखशील, निंदक, लोभी, कृपण, तो प्रेत सत्व जाणावा. याप्रकारें राजस काय सात प्रकारचे सांगितले. अतःपर तामस काय सांगतों श्रवण कर.

पशुकाय लक्षण.

दुर्मेधस्त्वंमंदताचस्वप्नेमैथुनमिच्छति ॥
निराकारिषुताचैवविज्ञेयाःपाशवागुणाः ॥

अर्थ—मूर्खपणा, सर्वकार्यां विषयीं मंदपणा, झोंपेंमध्यें मैथुनानुभव, निःकाळजीपणा, इत्यादिक. पशु देहाचे गुण जाणावे.

मत्स्यकाय लक्षण.

अनवस्थितताभौर्ख्यंभीरुत्वंसलिलार्थिता ॥
परस्पराभिमर्शश्चमत्स्यसत्वस्यलक्षणं ॥

अर्थ—सर्व कार्यां विषयीं अव्यवस्थितपणा, मूर्खपणा, भित्रेपणा, सर्वकाळ उदकाची प्रीति, परस्पर द्वेष, हीं मत्स्य कायाचीं लक्षणें जाणावीं.

एकस्थानेरतिर्नित्यमाहारेकेवलेरतः ॥
वानस्पत्येनरःसत्वेधर्मकामार्थवर्जितः ॥

अर्थ—सर्व कालीं आहाराचे ठायीं रत असून एकास्थानीं प्रीति धरतो, व धर्म, काम अर्थ ईहीं करून वर्जित असतो तो मनुष्य वनस्पति प्रकृतिक जाणावा. या प्रकारें त्रिविध

तामस काय सांगितले. त्या सर्व कायांची प्रकृति जाणून वैद्यांनीं तदनुकूल उपचार करावे.

महाप्रकृतयस्त्वेतारजःसत्वतमःकृताः॥
प्रोक्तालक्षणतःसम्यक्भिषक्ताश्चविभावयेत् ॥

अर्थ—ह्या सत्व, रज, तमो गुणांनीं केलेल्या महा प्रकृती, लक्षणें करून उत्तम प्रकारें सांगितल्या. यांचा विचार वैद्यांनीं चांगला करून उपचार योजावे.

॥ इति शारीरे निवंध संग्र हे चतुर्थो ध्याय. ॥

---

## शारीर अध्याय ५

### गर्भाचें वर्णन केल्यानंतर गर्भ शरीरावयवाची संख्या करायास युक्त होते यास्तव तीं करितो.

अथातःशरिरसंख्याव्याकरणंशारीरंव्याख्यास्यामः

अर्थ—गर्भ वर्णना नंतर गर्भाचे शरीरावयवाचें वर्णन केलें पाहिजे या करितां त्याचें वर्णन करितों.

### शरीर संज्ञा केव्हां होत्ये ती सांगतो.

तंचेतनावस्थितंवायुर्विभजति॥ तेजएनंपचाति॥ आपःक्लेदयंति॥
पृथ्वीसंहनयति॥ आकाशंविवर्द्धयति॥ एवंविवर्धितःसयदाहस्ता
द्यंगैरुपेतस्तदाशरीरमितिसंज्ञांलभते॥

अर्थ—वायू प्रसव काळ पर्यंत चेतना युक्त जो गर्भ त्याचे दोष, धातु, मल, अंगें प्रत्यंगें, यांचा विभाग करितो, नंतर तेज त्या गर्भाला कांहीं रूपांतर उत्पन्न करितें, गर्भाला विभाग व परिणाम यांतें करणारे वायू आणि अग्नी यांणीं शोषण केले असतां ही उदक ओलावा करितें, उदकानें गर्भ क्लिन्न झाला असतां ही त्याला पृथ्वी मूर्तिमान् करिते तेव्हां शरीर संज्ञा प्राप्त होते. आणि त्या गर्भाला आकाश वाढवितें. तें शरीर षडंग आहे, तीं अंगें हस्त पादादि चार, मध्यमभाग पांचवें, व मस्तक साहावें. हीं साहा जाणावीं.

### प्रत्यंगें सांगतो.

मस्तकोदरपृष्ठनाभिललाटनासाचुबुकबस्तिग्रीवाइत्येताएकैकाः॥

अर्थ—आतां प्रत्यंगांची संख्या करितो. त्यामध्यें मस्तक, पोट, पाठ, नाभी, ललाट, नासिका, हनुवटी, बस्ती, मान, हे अवयव एकक आहेत. व कर्ण, नेत्र, भ्रुकुटी, स्कंध,

गाल, काखा, स्तन, वृषण, कुशी, स्फिक्, गुडघे, हात, मांड्या, ओष्ठ, सृक्किणी, ह्मणजे तोंडचा कोरा. व कमरेच्या देशांत दोन फळ्या आहेत तो देश, हे अवयव दोन दोन आहेत. व बोटें विस, व स्रोतस् सांगायाचीं आहेत.

## त्वचादिकांला संख्या पूर्वक सांगतो.

तस्यपुनः संख्यानंत्वचःकलाधातवोमलायकृत्प्लीहानौफुप्फुसउंदुको

ह्रदयामीआशयाअंत्राणिवृक्कोस्रोतांसिकंडराजालानिकूर्चारज्जवः

सेवन्यसंघातासीमंतीअस्थीनिसंधयःस्नायवःपेश्योमर्माणिशिराध

मन्योयोगवहानिस्रोतांसिच

अर्थ— त्या गर्भाचें अंगें, प्रत्यंगें याणीं युक्त जें शरीर तें ज्याणी जमलें जातें तीं अंगें सांगतात, त्वचा, कला, धातू, मल, दोष, काळिज, कवलू, फुप्फुस, ह्रदय, उंदु कआयश, आंतडीं, वृक्क, स्रोतस्, कंडरा, जाळें, कूर्चा, रज्जू, सेवनी, संघात सीमंती, अस्थि, संधी, स्नायू, पेशी, मर्में, शिरा, धमनी, व योगवह स्रोतस्, ह्मणजे धमनी, प्राण, उदक, अन्न, यांते वाहाणारिं स्रोतस्. येकूण येकुणतीस अंगें जाणावीं.

## विस्तार पूर्वक व्याख्या करितो.

रक्तस्याधःक्रमात्परे ।। कफामपित्तपक्कानांवायोर्मूत्र

स्यचस्मृताः।।गर्भाशयोष्टमस्त्रीणांपित्तपक्काशयोत्तरे।।

अर्थ—रक्त, कफ, आम, पित्त, पक्क, वायू, मूत्र, यांचे आशय क्रमें करून एका खालीं एक आहेत. व गर्भाशय. पित्त व पक्क यांचे आशयामध्यें आहे.

## स्रोतस् सांगतो.

स्रोतांसिनासिकेकर्णौनेत्रेपाय्वास्यमेहनं।।

स्तनौरक्तपथश्चेतिनारीणामधिकंत्रयं।।

अर्थ—श्रवण, नयन, वदन, घ्राण, गुद, मेंढ्र, या प्रकारें वहिर्मुख स्रोतस्. हीं स्त्री पुरुष साधारण्यें करून, व स्त्रियांस वहिर्मुख तीन अधिक, दोन स्तन संबधी, व तिसरें योनी संबधी, आर्तव वहस्रोतस् आहे. स्मरातपत्र योनीचे तृतीयावर्ती असतें यास प्रामाण.

विपुलपिप्पलपत्रसमाकृतेरवयवस्याशिरस्तलमाश्रितं।।

सकलकामशिरामुखचुंबितंविमर्दितंमदनातपवारणं।।

अर्थ— विपूल असून अश्वत्थ पत्रा कृती अवयव जो योनी तिचा मस्तकाचे आश्रयानें राहिलेलें असून सर्वकाम वाहिनी सर्वशिराजा यांचा मुखानीं चुंबित व मर्दित असें मद

नाचें छत्र आहे, असें जाणावें. कंडरा ह्मणजे मोटाले स्नायू सोळा १६ आहेत त्या मधून चार पायांचे ठाईं चारहातात चार ग्रीवेंत चार पाठीचे ठाईं आहेत, यांचा अग्रिम भाग सांगतो.

**तत्रहस्तपादगतानांनखाग्रप्ररोहाः ।। ग्रीवाहृदयनिबंधनीनांअधो भागगतानांबिंबंश्रोण्यासहपृष्ठनिश्चलबंधंकुर्वतीनांपृष्ठजानांचतसृणा मधोभागगतानांबिंबमंडलंआपांत्रितंबस्यमूर्धोरुवक्षोक्षिपिंडादीनांच ।।**

**अर्थ**—त्या स्नायू मधून हात पाय यांत गेलेले स्नायू त्यांचे शेवट नखाग्रें आहेत. व ग्रीवा आणि हृदय यांचे बंधन करून आधोभागीं गेलेले जे स्नायू त्यांचें शेवट बिंब ह्मणजे मंडळ आहेत. व श्रोणी ह्मणजे कटी, ती सहवर्तमान पृष्ठाचें बंधन करून अधोभागीं जाणारे जे स्नायू त्यांचें अग्र उदक, व कटि हीं आहेत, तसें मस्तक, ऊर, वक्षस्थल, व अक्षिपिंड, त्यांचें मंडल व आदिशब्दें करून स्तनपिंडाचे मंडल, हे स्नायूचे अग्रिमभाग जाणावे.

## जालक सांगतो.

**मांसशिरास्नाय्वस्थिजालानिप्रत्येकंचत्वारिचत्वारितानिम णिबंधगुल्फसंश्रितानिपरस्परनिबद्धानिपरस्परसंश्लिष्टानि परस्परगवाक्षितानिचेतियैर्गवाक्षितमिदंशरीरं ।।**

**अर्थ**—मांस, शिरा, स्नायू, अस्थि, यांचीं जालें ह्मणजे गवाक्षाकार छिद्रयुक्त पदार्थ ते येकायेकाचे चारचार आहेत. ते मणिबंध ह्मणजे मणगट, व गुल्फ, यांचे ठाईं आहेत. त्याणी हें शरीर गवाक्षित झालें आहे. तीं चार प्रकारचीं जालें परस्पराशीं लागलेलीं व परास्पराशीं बांधलेलीं आहेत. तात्पर्य एका मणिबंधाचे ठाईं एक मांसजाल व एक शिराजाल व एकस्नायुजाल वएक अस्थिजाल अशींचारजालीं असतात तशींइतर मणिबंध व गुल्फ, यांचे ठाईं जाणावीं.

## कूर्च सांगतो.

**षट्कूर्चास्तेहस्तपादग्रीवामेंढ्रेषु ।।**

**अर्थ**—येथें कूर्च शब्देंकरून कुर्चा सारिखे, व तांबडे, तेजस्वी, पदार्थ. मांस, शिरा, स्नायू, यांचा जालकांचा विस्तरानें झालेले त्यांमधून हात, व पांय, यामध्यें चार व एक ग्रीवे मध्यें एक शिस्नांत, असें साहा जाणावे.

**महत्योमांसरज्जवश्चतस्रःपृष्ठवंशे उभयतःपेशीबंधनार्थंबाह्येआभ्यंतरेचद्वेद्वे**

**अर्थ**—मोठ्या मांसमय दोऱ्यांसारिखे चार पदार्थ आहेत, ते पाठीचे कण्याचे दोहों बाजूस असतात, त्याचें कार्य पेशीचें बंधन करणें, त्यामधून दोन आंतल्ये आंगास व दोन बाहेर आहेत.

## शिवण सांगतो.

सप्तसेवन्यःशिरसिविभक्ताःपंचजिव्हाशेफसोरेकैकाताःपरिहर्तव्याःशस्त्रेण ॥

**अर्थ**–शिवणी सात आहेत. त्यांत मस्तकामध्यें निरनिराळ्या पांच, आणि जीभ व शिश्न यांमध्यें एकेक एकूण सात, त्या शस्त्रानें तोडाव्या.

## संघात सांगतो.

चतुर्दशास्थ्नांसंघातास्तेषांत्रयोगुल्फजानुवंक्षणेषु ॥

एतेनइतरसक्थिबाहूचव्याख्यातो ॥ त्रिकशिरसोरेकैकः ॥

**अर्थ**–हाडांचे सांधे चवदा आहेत. त्यांत पायांचे घोंटे, गुडघे, आडसांधे यांचेठायीं तीन यावरून दुसरा पाय व दोन हात सांगितले. त्रिकामध्यें एक, आणि मस्तकामध्यें एक एकूण चवदा. आतां अन्यमतें अठरा आहेत; ते असे पूर्वोक्त चवदा, श्रोणिकांडाचे वरता एक, वक्षस्थळावरलीकडे एक, उदर व ऊर यांचे संधीचेठाईं एक, अंसकूटावरलीकडे एक, असे अठरा होतात.

## अस्थिसंख्या सांगतो.

त्रिषष्ठीन्यस्थिशतानिवेदवादिनोभाषंते.

**अर्थ**–अस्थि तीनशें साठ आहेत, असें आयुर्वेदवेत्ते सांगतात.

शल्यतंत्रेत्रीण्येवास्थिशतानि ॥ तेषांविंशमधिकंशतंशाखासु ॥

सप्तदशोत्तरंश्रोणिपार्श्वपृष्ठोदरोरः सुग्रीवांप्रत्यूर्ध्वंत्रिषष्टिः ॥

**अर्थ**–शल्यतंत्रामध्यें अस्थि तीनशें सांगितल्या. त्यांत १२० शाखामध्यें, व ११७ कंबर पार्श्व, ऊर यांचेठाईं; आणि मानेपासून वरतीं ६३ एकूण ३००

## शाखागत १२० एकशेवीस त्या सांगतो.

एकैकस्यांपादांगुल्यांत्रीणितानिपंचदश ॥ तलगुल्फकूर्चसंश्रितानिदश ॥ पार्ष्णावेकंजंघायांद्वेजानुन्येकमेकमूराविति त्रिंशदेवमेकस्मिन्सक्थीनि भवंति ॥ एतेनेतरसक्थिबाहूचव्याख्यातो ॥

**अर्थ**–पायांचे एकएका अंगुलींत तीन तीन मिळून सर्व १५ पादतल, गुल्फ, पादपृष्ठ यांमध्यें १०, खोटेंत १, पोटरींत २, गुडघ्यांत १, तिला वाटी ह्मणतात. ती मांडींत १, एकूण एका पायांत ३० याप्रमाणें दुसरा पाय व दोन हात मिळून १२०.

## श्रोण्यादिकांत ११७ तीं सांगतो.

श्रोण्यांपंचतेषांभगनुदनितंबेषुचत्वारित्रिकसंश्रितमेकंपार्श्वेषट्त्रिंशदेकस्मिन्द्वितीयेप्येवंपृष्ठेत्रिंशत्अष्टावुरसिद्वेअक्षकसंज्ञे.

**अर्थ**–कमरेंत पांच. त्यांतून उपस्थ, गुद, नितंब, कमरेच्या दोन बाजू यांमध्यें ४ चार व

तिज्यांत एक मिळून पांच, एका कुशीत ३६ व दुसरींत तितकीच पाठीमध्यें ३० उदरामध्
८ आठ, २ अक्षसंज्ञक; मिळून एकशें सतरा होतात.

## मानेपासून वर ६३ आहेत त्या सांगतो.

ग्रीवायांनवकंठनाड्यांचत्वारिहन्वोःद्वेदंतानांद्वात्रिंशत्नासायांत्रीणिए
कंताल्युनि ॥ गंडकर्णशंखेष्वेकेकंषट्शिरसि ॥

अर्थ—मानेंत नऊ ९ कंठांत ४ हनुवटीचीं दोन २ दंतसंबंधीं ३२ नाकांत ३ तालूंत
आणि गाल, कर्ण, शंख, यांत दोनदोन मिळून सहा ६ व मस्तकांत सहा सर्व मिळून ६३

## अस्थींचे प्रकार पांच ते सांगतो.

कपालतरुणरुचकवलयनलकसंज्ञानि ॥ तेषांजानुनितंबांसगंडता
लुशंखशिरःसुकपालानि ॥ दशनास्तुरुचकाः ॥ घ्राणकर्णग्रीवा
क्षिकोशेषुतरुणानि ॥ पाणिपादपार्श्वपृष्ठोदरःसुवलयानि ॥
शेषाणिनलकानि ॥

अर्थ—अस्थि—कपाल, तरुण, रुचक, वलय, आणि नळक अशा पांच प्रकारच्या आहे
त्यांत गुडघे, कटिपश्चात्भाग, स्कंद, गाल, तालु, शंख, मस्तक यामध्यें कपालसंज्ञक अस्थि आहे
आणि दांतांचा अस्थि रुचकसंज्ञक, व नाक, कान, मान, नेत्रकोश यांत तरुणसंज्ञक आ
हात, पाय, कुशी, पाठ, ऊर, यांमध्यें वलयास्थि, बाकीच्या जागीं, नलसंज्ञक अस्थि आहे
त्या हात, पाय, कुशी, पाठ, ऊर, यांमध्यें नळ्या. आहेत.

## अस्थीचीं स्थळें व शरीरधारण सामर्थ्य सांगतो.

अभ्यंतरगतैःसारैर्यथातिष्ठंतिभूरुहाः ॥ अस्थिसारैस्तथादेहाध्रियंतेदे
हिनांध्रुवं ॥ तस्माच्चिरविनष्टेषुत्वङ्मांसेषुशरीरिणां ॥ अस्थीनिनवि
नश्यंतिसाराण्येतानिदेहिनां ॥ मांसान्यत्रनिबद्धानिशिराभिःस्नायुभि
स्तथा ॥ अस्थीन्यालंबनंकृत्वानशीर्यंतपतंतिच ॥

अर्थ—जसे वृक्ष आंतील गाभ्याच्या आश्रयानें व सालीनें वेष्टित उभे राहतात. लवत
पडत नाहींत. तसेच अस्थींच्या आश्रयानें मनुष्यांचे देह राहतात. अस्थींचा नाश हे
नाहीं. ह्या मनुष्यदेहाचें सार आहेत. याकरितां त्वचा, मांस हीं नष्ट झालीं असतांही अ
नष्ट होत नाहींत. यानां शिरा व स्नायु यांणीं मांस बांधलेलें आहे; ह्मणून अस्थिनां धर
राहतें. गळून पडत नाहीं. सर्व अस्थिनां धरून राहतें ह्मणून गळत नाहीं व पडतही नाहीं

## अस्थींचे संधि सांगतो.

संधयस्तुद्विधातेषांचेष्टावंतश्चलास्थिराअचलाः ॥

अर्थ—अस्थिसंधि दोन प्रकारचे एक चल तो फिरणारा. आणि स्थिर तो अचल जाणावा.

## संधिची संख्या सांगतो.

एकैकस्यांपादांगुल्यांत्रयस्त्रयोद्वावंगुष्ठेतेचतुर्दश ॥ जानुगुल्फवंक्षणे ष्वेकैकएवंसप्तदशैकस्मिन्सक्थीनिभवंति ॥ एतेनेतरसक्थिबाहूच व्याख्यातौ ॥

अर्थ—एकाएका पादांगुलीचे ठायीं तीन व आंगठ्यांत दोन मिळून १४ व गुडघा, घोटा, आणि आडसंधि यांत एकेक मिळून एका पायांत १७ संधी आहेत. यावरून दुसरा पाय दोन हात समजावे.

## मध्यभाग व मानेपासून वरचे संधि सांगतो.

त्रयःकटिकपालेषुचतुर्विंशतिपृष्ठवंशेतावंतएवपार्श्वयोरुरस्यष्टौतावं तएवग्रीवायांत्रयःकंठेनाडीषुहृदयक्लोमनिबद्धास्वष्टादशदंतपरिमितादं तमूलेएकःकाकलकेनासायांचद्वौवर्त्ममंडलौनेत्राश्रयौगंडकर्णशंखेष्वे केकाद्वौहनुसंधीद्वावुपरिष्टात्भ्रुवोःशंखयोश्चपंचशिरःकपालेष्वेकोमूर्ध्नि ॥

अर्थ—कटिसंबंधि कपालास्थिमध्ये संधि तीन पाठीच्या कण्यांत २४ चवीस, दोन कुशी मिळून २४ चवीस, व उरामध्ये ८ आठ मिळून ५९ संधि मध्यप्रदेशांत व ग्रीवा (मानेंत) ८ कंठांत (गोगटींत) तीन "हृदयक्लोमनिबद्धासुनाडीषु" म्हणजे अन्न व पान वाहणाऱ्या नाडी-२ हृदय व क्लोम यांशी बांधलेल्या आहेत. त्या स्पष्टार्थ गळनाडी, व कंठनाडी यांचेठायीं ठरा संधि आहेत. दंतमूलसंधि ३२ व काकलकांत (गालमणी किंवा घाटींत) एक नासिकास्थीचेठायीं एक व नेत्रकोश संबंधि तरुणास्थीमध्यें २ गंड, कर्ण, शंख हे तीन डि मिळून ६ व हनुवटींत दोन संधि व भिवयांचेवरल्ये आंगां २ संधि, आणि मस्तकसंबंधि पालस्थींत पांच ५ व एक १ मस्तकांत मिळून ५३ सर्व मिळून दोनशें २००.

## संधींचे प्रकार सांगतो.

कोरोदूखलसामुद्गप्रतरातुन्नसेवनी ॥ वायसतुंडमंडलःशंखावर्ता तेषामंगुमिलमणिबंधजानुगुल्फकूर्परेषुकोराःसंधयः ॥ कक्षवंक्षणदशने षुउदूखलाः ॥ अंसपीठगुदपादनितंबेषुसामुद्गाः ॥ ग्रीवापृष्ठवंशयोः प्रतराःशिरःकटिकपालेषुतुन्नसेवनी हन्वोस्तुवायसतुंडाः ॥ कंठहृदय नेत्रक्लोमनाडीषुमंडलाः ॥ श्रोत्रशृंगाटकेषुशंखावर्ताः ॥

अर्थ—कोर, उलूखल, सामुद्ग, प्रतर, तुन्नसेवनी, वायसतुंड, मंडल, शंखावर्त, या नामेंकरून ये आठप्रकारचे आहेत. त्यांतून बोटें, मनगटें, गुल्फ, जानु, कोंपर, यांचेठाईं कोर (गर्ता वा कलिका) तिचेसारिखे व कक्षा, वंक्षण, दंत, यांमध्यें उखळासारिखे. व स्कंध पीठ, गुद,

पाद, नितंब, यांमध्यें सामुद्र, (संपुटासारिखी) ग्रीवा, व पाठीचा कणा (यामध्यें प्रतर, सांगडी, सारिखें) आणि शिर, कटी, यांची कपालास्थीचे संधि तुन्नसेवनी (भांड्याच्या सांध्यासारिखा किंवा शिवण घातल्यासारिखा) असतो आणि हनवटीच्या दोहोंबाजूचे संधी वायसतुंड व कंठ, कंठनाडी, नेत्र यांमध्यें मंडलाकृति व कर्ण शृंगाटकाचेठायीं शंखाच्या भोंवऱ्यासारिखा संधि आहे. या संधींची कोरादि संधिनामावरूनच आकृती लक्षांत आणाव्या.

अस्थ्नांतुसंधयोह्येतेकेवलाःपरिकीर्तिताः ॥
पेशीस्नायुशिराणांतुसंधिसंख्यानविद्यते ॥

अर्थ–हे वर सांगीतलेले हे केवळ अस्थीचे संधि होत; आणि पेशी, स्नायु, शिरा, यानां संधि नाहींत.

## स्नायु सांगतो. ९००

नवस्नायुशतानितेषांशाखासुषट्शतानिद्देशते
त्रिंशच्चकोष्ठेग्रीवायांप्रत्यूर्ध्वंसप्ततिः ॥

अर्थ–स्नायु ९०० त्यामधून हस्तपादाचे ठाई साहाशें. मध्यप्रदेशांत २३० व ग्रीवेपासून ऊर्ध्व प्रदेशामध्यें ७० एकूण नऊशें.

## हस्तपादादिकांतील स्नायु सांगतो.

एकैकस्यांपादांगुल्यांषट्षट्चिताः ॥ तास्त्रिंशत्तावंत्योनलकूर्पगुल्फेषु ॥
तावंत्यएवजंघायांदशजानुनिचत्वारिंशदूरौदशवंक्षणे ॥

अर्थ–दर पायांच्या आंगठीत ६ सर्व मिळून ३० व नल, कूर्प, गुल्फ, यांमध्येंही ३० व मांड्यांत ३० जानूमध्यें १० ऊरूमध्यें ४० आणि वंक्षणाचेठायीं १०, सर्व मिळून १५० याप्रमाणें इतर हात व पाय यांच्या मिळून स्नायु जाणावे.

## मध्यप्रदेशगत स्नायु.

षष्टिःकट्यांमध्येअशीतिःपार्श्वयोःषष्टिरुरसित्रिंशत् ॥

अर्थ–कमरेंत ६०, पाठींत ८०, कुशींत ६०, ऊरसंबंधि ३०, सर्व मिळून २३०.

## मानेपासून वरचे स्नायु.

षट्त्रिंशत्ग्रीवायांमूर्ध्निचतुस्त्रिंशत् ॥

अर्थ–ग्रीवेमध्यें ३६ मस्तकांत ३४ स्नायु आहेत. मिळून सत्तर ७० आहेत. सर्व मिळून ९०० आहेत. स्नायूचे चार प्रकार आहेत ते. कंडरा, सुषिर, पृथुल आणि वर्तुल त्यांमधून हस्तपाद ग्रीवायांचे ठायीं कंडरा, आणि आमाशय, पक्काशय, व बस्ति यांमध्यें सुषिरसंज्ञक (बिलयुक्त,) कुशींत पृथुल (जाडे;) मस्तकांत वर्तुल, असे आहेत. यांणीं सर्व शरीर बांधलें आहे

## याविषयीं दृष्टांत.

नौर्यथाबंधनैर्बहुभिर्वृता ॥ भारक्षमाभवेदाशुनृयुक्तासुसमाहिता ।

अर्थ—नौका फळ्यानीं व बांधयानीं युक्त आहे. ह्मणून भार सहन करिते. तीच मनुष्ययुक्त उत्तम तरण्याचें साधन होतें.

## स्नायुप्रशंसा.

नह्यस्थीनिनवापेश्योनशिरानचसंधयः ॥ व्यापादितास्तथाहन्युर्यथा
स्नायुःशरीरिणः ॥ यःस्नायूःप्रविजानातिबाह्याश्चाभ्यंतरास्तथा ॥
सगूढशल्यमाहर्तुंदेहाच्छक्नोतिदेहिनां ॥

अर्थ—जशा स्नायू विकृत झाल्या असतां मनुष्याच्या प्राणाला भय होतें, त्याप्रमाणें अस्थि, पेशी, संधि इत्यादिक विकृत झालीं असतां होत नाहीं. व जो मनुष्याला बाह्य व अभ्यंतर स्नायूचा चांगला भेद ठाऊक आहे, तो शरीरांतील गुप्तशल्य काढण्याविषयीं समर्थ होतो.

## पेशी ५०० त्यासांगतो.

पंचपेशीशतानि. तासांचत्वारिशतानिशाखासु.
कोष्ठेषट्षष्टिः ग्रीवांप्रत्यूर्ध्वंचतुस्त्रिंशत ॥

अर्थ—परस्पर विभक्त अशा मांसावयव संघाताला पेशी ह्मणतात. ते पांचशें. त्यांतून ४०० हातांत पायांत व मध्यप्रदेशांत ६६, मानेपासून वरचा भागांत ३४ आहेत. गयदासमतें मध्यप्रदेशीं ६० साठ व ऊर्ध्वप्रदेशीं ४० चाळीस आहेत.

## पेशीचें निराळें वर्णन.

एकैकस्यांपादांगुल्यांतिस्रस्ताःपंचदश. दशप्रपदे. पादोपरिकूर्चसंनि
विष्टास्तावंत्यएव॥ दशगुल्फतलयोः। गुल्फजान्वंतरेविंशतिः ॥
पंचजानुनि। विंशतिरूरौ. दशवंक्षणे. शतमेवमेकस्मिन्सक्थीनिभवंति॥

अर्थ—एका एका पादांगुलींत ३ तीन पेशी आहेत, सर्व मिळून १५, व पादाग्राचेठायीं १०, व पादपृष्ठाचेठायीं १० गुल्फ व तळवे यांत १० व गुल्फ आणि गुडघे यांचे मध्यदेशाचेठायीं २० गुडघ्यांत ५ मांडींत २० वंक्षणात १० दाहा, एकूण एका पायांत १०० याप्रमाणें दुसरा हात व पाय यांचे ठाईं सर्व मिळून ४०० पेशी जाणाव्या.

## मध्यप्रदेशांतील पेशी सांगतो.

तिस्रःपायौएकामेंढ्रेसेवन्यांचापरेद्वेवृषणयोःस्फिजोःपंच ॥ द्वेबस्तिशि
रसि ॥ पंचोदरेनाभ्यामेकापृष्ठोर्ध्वसन्निविष्टाःपंचपंचदीर्घाःषट्पार्श्वयो
र्दशवक्षसि ॥ अक्षकांसौप्रतिसमंतात्सप्तद्वेहृदयामाशयोःषट्यकृ
त्प्लीहोंदुकेषु ॥

अर्थ—गुदामध्यें ३ तीन पेशी, वलित्रयांत व शिश्नांत १, व शिवणीमध्यें १, व वृषणांत २ कमरेंत १०, बस्तीच्या मस्तकाचे ठायीं २, उदरांत ५, नाभींत १, पायांत ऊर्ध्व रचित लांब अशा १०, कुशींत ६, वक्षस्थलांत १०, दोन खांदे व अक्षक मिळून ७, हृदय व आमाशय

यांत २, यकृत्, प्लीहा व उंदुक यांमध्यें ६, एकूण ६६ पेशी आहेत, आणि गयदास, वाग्भट मताला अवलंबून कोष्ठांत ६०, व ऊर्ध्व प्रदेशीं ४० असें ह्मणतो.

## ऊर्ध्वप्रदेशांतील ३४ पेशी त्या सांगतों.

ग्रीवायांचत्वारअष्टौहन्वोः एकैकाकाकलकगलयोः द्वेतालुनि एका
जिव्हायांद्वेओष्ठयोर्द्वेनासायांद्वेनेत्रयोःगंडयोश्चतस्रोद्वेकर्णयोश्चतस्रो
ललाटे एकाशिरसीति एवंमेतानिपंचपेशीशतानि ॥

**अर्थ**—पेशी—मानेंत ४, हनुवटींत ८, काकलक व गाल यांमध्यें एक एक मिळून २, टाळूंत २ जिव्हेंत १, ओष्ठांत २, नासिकेंत २, नेत्रांत २, दोन गंड मिळून चार ४, कर्णांत २, ललाटामध्यें ४, मस्तकांत १ एक, एकंदर ५०० पेशी होतात. या पेशी शिरा, स्नायु, अस्थिपर्वें संधि, यांचें धारण करितात. याकरितां शिरादिक बलवंत होऊन सर्व शरीरास बळ देतात.

## स्त्रियानां पेशी अधीक सांगतो.

· स्त्रीणांविंशत्यधिकास्तासांस्तनयोरेकैकस्मिनपंचपंचयौवनेतासांप्रवृद्धिः ॥
अपत्यपथेचतस्रःप्रसृतेरभ्यंतरतोद्वेमुखाश्रितवृत्तेचद्वे गर्भछिद्रसंश्रिता
स्तिस्रःशुक्रार्तवप्रवेशिन्योगर्भाशयेचतिस्रएव ॥

**अर्थ**—स्त्रियांना वीस पेशी अधीक आहेत. त्यांमधून स्तनाचे ठायीं पांच पांच मिळून १०, त्या यौवनामध्यें मोठ्या होतात. योनींत ४ चार. त्यांमधून दोन आंत, व योनिकर्णिकेचे बाजूवर २ दोन वर्तुल व स्पर्शानें सुख पावणाऱ्या अशा दोन आहेत. व गर्भमार्गामध्यें भोंवऱ्यासारिख्या ३ तीन व गर्भाशयांत शुक्रार्तव प्रवेश करविणाऱ्या अशा ३ तीन, एकूण २० आहेत. गर्भाशय योनीच्या तिसऱ्या आवर्तामध्यें रोहितमत्स्याचे मुखासारिखा आहे.

## पेशीचें स्थान विशेषानें स्वरूप सांगतों.

तासांबहलपेलवस्थूलाणुपृथुवृत्तह्रस्वदीर्घस्थिरमृदुश्लक्ष्णकर्कशभावाः ॥
संधिशिरास्नायुप्रच्छादकायथाप्रदेशंस्वभावतएवभवंति ॥

**अर्थ**—त्या पेशी मोठ्या, लहान, बारीक, जाड्या, वाटोळ्या, आंखूड, लांब अशा आकृतीनें अनेक प्रकारच्या आहेत. त्या संधि, अस्थि, शिरा, स्नायु, यांचें आच्छादन करणाऱ्या त्या त्या प्रदेशीं स्वभावेंकरूनच मृदु, कोमल, श्लक्ष्ण, कर्कश अशा अनेक प्रकारच्या आहेत.

## स्त्रियानां शिश्न व वृषण नाहींत याकरितां तेथील पेशींची अन्यत्र कल्पना करितात ती सांगतों.

पुंसांपेश्यःपुरस्ताद्याःप्रोक्तालक्षणमुष्कयोः ॥
स्त्रीणामावृत्यतिष्ठंतिफलमंतर्गतंहिताः ॥

**अर्थ**—पूर्वी पुरुषाला तीन एक शिश्नांत, व दोन वृषणांत सांगितल्या, त्या स्त्रियांचे गर्भाशयांत

राहतात. गयदास हें तंत्रांतरांतील वचन न घेतां पांचशें पेशी आहेत असें जें वचन सांगतो त्यामध्यें "पुंसां" या पदानें पुरुषांस ५०० आणि स्त्रियांना तीन उण्या असें व्याख्यान करितो.

### याविषयीं भोजवचन प्रमाण.

पंचपेशीशतान्येवस्त्रीवर्ज्यंविद्धिभूमिप ॥
अतस्त्रिहीनानिपुनःस्त्रीणांशेफसिमुष्कयोः ॥

अर्थ—भोज ह्मणतो राजा पेशी पांचशें आहेत; परंतु स्त्रियांवांचून कारण शिश्न व वृषण संबंधी पेशी स्त्रियांस नाहींत, त्यांना तीन कमी पांचशें आहेत.

### गर्भशय्या सांगतो.

शंखनाभ्याकृतिर्योनिस्त्र्यावर्तासाप्रकीर्तिता ॥ तस्यास्तृतीयेत्वावर्ते गर्भशय्याप्रतिष्ठिता ॥ यथारोहितमत्स्यस्यमुखंभवतिरूपतः ॥ तत्सं स्थानंतथारूपंगर्भशय्यांविदुर्बुधाः ॥

अर्थ—योनी आकृतीनें शंखाच्या नाभीसारिखी तीन भोंवऱ्यांनीं युक्त आहे. तीचे आंतले तिसरे भोंवऱ्यामध्यें गर्भाशय स्वरूपानें, व आंतील आकारानें रोहित मत्स्याच्या मुखासारिखा आहे. ह्मणजे तोंडाजवळ लहान आंत मोठा असा आहे.

### मूढगर्भ काढण्याकरितां गर्भस्थिति सांगतो.

अभुग्नोभिमुखःशेतेगर्भोगर्भाशयेस्त्रियः ॥
सयोनिंशिरसायातिस्वभावात्प्रसवंप्रति ॥

अर्थ—गर्भ, गर्भाशयामध्यें सन्मुख व अंगसंकुचित करून राहतो. तो पूर्व कर्मानें प्रसवकाळीं योनीप्रत मस्तकाकडून येतो.

### शल्यतंत्रोत्कर्ष सांगतो.

त्वक्पर्यंतस्यदेहस्ययोयमंगविनिश्चयः ॥ शल्यज्ञानादृतेनैषवर्ण्यतेंगेषुकेषुचित् ॥ तस्मान्निःसंशयंज्ञानंहर्त्राशल्यस्यवांछति ॥ शोधयित्वामृतं सम्यक्द्रष्टव्योंगविनिश्चयः ॥ प्रत्यक्षतोहियदृष्टंशास्त्रदृष्टंचयद्भवेत् ॥ समागम्यद्वयंतत्तुभूयोज्ञानविनिश्चयः ॥

अर्थ—अस्थ्यादिकपर्यंत देह ज्ञानाचा निश्चय शल्य तंत्रज्ञावांचून कोणत्याही अंगानें करतां येत नाहीं, आणि शरीरांत गुप्त झालेल्या शल्याला काढणाऱ्या वैद्याला सर्वांगाचें ज्ञान निःसंदेह झालें पाहिजे, याकरितां वैद्यानें मृतशरीर चांगलें धुवून शरीराचा निश्चय करावा नंतर अंगाचें ज्ञान एक प्रत्यक्ष पाहिल्यानें व दुसरें शास्त्र ज्ञान या दोहोंचा चांगला विचार केला असतां ज्ञान अधीक वाढतें. मृतशरीर धुण्याचा प्रकार संपूर्ण अवयवयुक्त व विषादिकानीं किंवा फार दिवसांच्या रोगानें कृश, व शंभर वर्षांहून अधीक न वांचलेला, अशा पुरुषाचें

शव घेऊन त्याचीं आंतडीं काढून मोळ किंवा दर्भ माळी इत्यादिकानीं चांगलें वेष्टून पेटी-मध्यें घालून, जीला खळाळी नसेल अशा नदींत बुडवून एकाजागीं बांधून ठेवावें. तें सात दिवस झाल्यानंतर काढून दर्भादिकानीं हळूहळू घांसून, धुतून त्वगादि सर्व बाह्य अभ्यंतरगत अंगप्रत्यंग विशेष पूर्वी वर्णन केल्याप्रमाणें पाहावें

## देहामध्यें आत्म्याला अदृश्यत्व सांगतो.

नशक्यश्चक्षुषाद्रष्टुंदेहेसूक्ष्मतमोविभुः ॥
दृश्यतेज्ञानचक्षुर्भिस्तपश्चक्षुर्भिरेववा ॥

अर्थ—देहामध्यें आत्मा अत्यंत सूक्ष्म आहे, ह्मणून डोळ्यांनीं दिसत नाहीं. जे ज्ञानचक्षु किंवा तपश्चक्षु त्यांला मात्र दिसतो.

### संदेहनाशनार्थ प्रत्यक्ष आणि शास्त्रद्वारा शारीर सांगतो.

शरीरेचैवशास्त्रेचदृष्टार्थःस्याद्विशारदः ॥
दृष्टश्रुताभ्यांसंदेहमपोह्याचरभतेक्रियां ॥

अर्थ—शरीर आणि शास्त्र यांचे ठायीं सकल अर्थ पाहिले असतां मनुष्य कुशल ह्मणजे चतुर होतो. याकारितां उभय प्रकारें संदेह निवृत्ति करून क्रिया करावी. इति पंच-मोध्यायः ॥ ५ ॥

### मर्म सांगतो.

अथातःप्रत्येकंमर्मनिर्देशशारीरंव्याख्यास्यामः ॥

अर्थ—मांस, शिरा, इत्यादिकांच्या वर्णनानंतर मांसादि मर्म कथनरूप शारीराध्याय सांगतो.

## मर्मांची संख्या.

सप्तोत्तरंमर्मशतंतानिमर्माणिपंचात्मकानिभवंति ॥ तद्यथामांसमर्माणिशिरामर्माणिस्नायुमर्माणिअस्थिमर्माणिसंधिमर्माणिचेति ॥

अर्थ—मर्मे १०७ एकशें सात आहेत. तीं पांच प्रकारचीं जाणावीं. ते प्रकार सांगतो. मांसमर्मे, शिरामर्मे, स्नायुमर्मे, अस्थिमर्मे, संधिमर्मे, असे आहेत.

## मांसादि भेदानें मर्मांची संख्या.

तत्रैकादशमांसमर्माणि एकचत्वारिंशच्छिरामर्माणि सप्तविंशतिस्नायुमर्माणिअष्टावस्थिमर्माणिविंशतिःसंधिमर्माणि ॥

अर्थ—मांसमर्मे ११, शिरामर्मे ४१, स्नायुमर्मे २७, अस्थिमर्मे ८, संधिमर्मे २०, एकंदर १०७ आहेत.

## मांसमर्मे सांगतो.

चत्वारितलहृदयानि तावंत्येंद्रबस्तीनि गुदमेकं द्वेस्तनरोहिते ॥

**अर्थ**—मांसमर्मे ११ त्यांतून तलहृदयांत ४, व इंद्रबस्तिसंज्ञक ४, गुद १, आणि स्तनरोहित संज्ञक २, या प्रकारें जाणावीं.

## शिरामर्मे.

चतस्रोधमन्याअष्टौमातृकाः चत्वारिशृंगाटकानि द्वेअपांगे एकास्थ-
पणीफणौद्वेस्तनमूलेद्वावपस्तंबौ द्वावपलापौएकंहृदयं एकानाभीद्वेपा
र्श्वसंधी चत्वारिलोहिताक्षाणि चतस्रऊर्व्यः एवमेकचत्वारिंशत् ॥

**अर्थ**—शिरामर्मे ४१ सांगितलीं त्यामधून ग्रीवासंबंधि धमनी ४, मातृका ८, व शृंगाटकें ४, अपांग २, स्थपणी १, फण २, स्तनमूळें २, अपस्तंब २, अपलाप २, हृदय १, नाभी १, पार्श्वसंधी २, बृहती २, लोहिताक्ष ४, उर्वी ४, अशीं आहेत.

## स्नायुमर्माचें वर्णन.

चतस्रआण्यौद्वौविटपौद्वौकक्षधरौचत्वारःकूर्चाश्चत्वारिकूर्चशिरांसि
एकोवस्तिश्चत्वारिक्षिप्राणिद्वावंसौद्वेविधुरेद्वावुत्क्षेपौएवंसप्तविंशतिः ॥

**अर्थ**—स्नायुमर्मे २७ सांगितलीं त्यांमध्यें आणिसंज्ञक ४, विटप २, कक्षधर २, कूर्च ४, कूर्चशिरें ४, बस्ति १, क्षिप्रसंज्ञक ४, अंस २, विधुरें २, उत्क्षेप २, याप्रकारें स्नायुमर्मे जाणावीं.

## अस्थिमर्मे.

द्वेकटिकतरुणेद्वौनितंबौद्वेअंसफलकेद्वौशंखौएवमष्टौ ॥

**अर्थ**—अस्थिमर्मे ८, त्यांमध्यें कटिकतरुणसंज्ञक २, नितंब २, अंसफलक २, आणि शंख २, अशीं आहेत.

## संधिमर्मे.

द्वेजानुनीद्वौकूर्परौपंचसीमंताः एकोधिपतिरितिद्वौगुल्फौद्वौमणिबंधौद्वेक
कुंदरेद्वावावर्तौद्वेकृकाटिकेएवंविंशतिः

**अर्थ**—संधिमर्मे २० त्यांत जानुसंबंधि २, कोपरसंबंधी २ सीमंतसंज्ञक ५, अधिपतिसंज्ञक १, गुल्फ २ मनगटसंबंधी २, ककुंदर २, आवर्तसंज्ञक २, कृकाटिकसंज्ञक २, याप्रमाणें जाणावीं.

## मर्माचें विशेष ज्ञान होण्यासाठीं प्रदेश सांगतो.

तेषामेकदेशैकस्मिन्सक्थीन्भिवंति ॥

**अर्थ**—सप्तोत्तर शतमर्मामधून एकापायांत ११, यावरून इतर पाय व हात मिळून मर्मे ४४ होतात. पायांतील मर्माचीं नांवें. क्षिप्र १ तलहृदय १, कूर्च १, कूर्चशिरस १, गुल्फ १,

इंद्रबस्ति १, जानु १, आणि उर्वी १, लोहिताक्ष १, विटप १, अशीं आहेत. उदर उर मिळून १२ मर्मे, आणि पृष्ठामध्यें १४, ग्रीवेपासून वर ३७, उदर आणि उर या मर्म नावें. गुद १, बस्ति १, नाभि १, हृदय १, स्तनमूल २, स्तनरोहित २, अपलाप अपस्तंब २, अशीं बारा आहेत. पृष्ठगत १४ मर्मे त्यांचीं नावें. कटितरुण २, कुकुंदर २ नितंब २, पार्श्वसंधी २, बृहती २, अंसफलक २, अंस २, अशीं आहेत. पायांतील ११ मर्मांचीं नावें सांगितलीं तींच हातांतील मर्मांचीं नावें आहेत, परंतु गुल्फ आणि विटप यास्थानीं मणिबंध, व कक्षधर अशींमात्र निराळीं आहेत. जत्रूपासून वर ३७ त्यांचीं नावें. धमनी ४, मातृका ८, कृकाटिक २, विधुर २, फण २, अपांग २, आवर्त २, उत्क्षेप २, शंख २, स्थपणी १, सीमंत ५, शृंगाटकें ४, अधिपति १ अशीं आहेत.

## मर्मांचे पांच प्रकार सांगतों.

सद्यःप्राणहराणिकालांतरप्राणहराणिशल्यघ्नानिवैकल्यकराणिरुजाकराणि

अर्थ—मर्मे पांच प्रकारचीं. कांहीं मर्मांना आघात झाला असतां तात्काळ आठादिवसांत मरतो. तीं सद्यः प्राणहारक, व कांहीं कालांतर प्राणहारक ह्मणजे मासपक्षांत मरतो. कांहीं विशल्य ह्म० शल्य उपटून काढिलें असतां मरतो. व कांहीं वैकल्यकर ( ज्यांस विकार झाला असतां बरीं झालीं तरीं नीट होत नाहींत. आंखुडतो किंवा विकृत होतो. ) व रुजाकर जा मर्मांस विकार झाला असतां पीडा फार होत्ये, सद्यः प्राणहरण करणारीं मर्मे १९, कालांतर प्राणहारक मर्मे ३३, विशल्यघ्न ३, वैकल्यकर ४४, व रुजाकर ८, सर्व मिळून १०७ सद्यः प्राणहारक मर्मे १९ त्याचीं नावें शृंगाटक ४, अधिपति १, शंख १, कंठसंबंधीं शिरा८, जानां मातृका ह्मणतात, व गुद, हृदय, बस्ति, नाभि, अशीं आहेत.

कालांतर प्राणहारक मर्मे ३३, त्यांचीं नावें. वक्षस्थलसंबंधी ८, स्तनमूलें २, स्तनरोहित २, अपलाप २, अपस्तंब २, सीमंत ५, तलहृदय ४, क्षिप्र ४, इंद्रबस्ति ४, कटितरुण २, पार्श्वसंधी २, बृहती २, नितंब २, अशीं आहेत.

विशल्यमर्मे ३ त्यांचीं नावें उत्क्षेप २, स्थपणी १, अशीं आहेत.

वैकल्यकार कर्मे ४४ त्यांचीं नावें लोहिताक्ष ४, जानु २, उर्वी ४, कूर्च ४, विटप २ कूर्पर २, ककुंदर २, कक्षधर २, विधुर २, कृकाटिका २, अंस २, अंसफलक २, अपांग२ नीलधमनी २, मन्या २, फण २, आवर्त २, अशीं जाणावीं.

रुजाकर ८ त्यांचीं नावें. गुल्फ २, मणिबंध २, कूर्चशिरस ४, अशीं आहेत.

## प्राणहारकादि मर्मांचें कार्य. व त्यांविषयीं युक्ति सांगतों.

मर्माणिमांसशिरास्नाय्वस्थिसंधिसंनिपाताः ॥
तेषुस्वभावतएवविशेषेणप्राणास्तिष्ठंति ॥

अर्थ—मांस, शिरा, स्नायु, अस्थि, संधि, यांचा संनिपात ह्मणजे अत्यंत मिश्रीभाव त्याला व त्यामध्यें अग्न्यादिक प्राण स्वभावेंकरून राहतात. त्याला मर्म ह्मणतात. त्यास अभिघातादि विकार झालेअसतां भ्रम, प्रलाप, पतन, प्रमेह, इत्यादि उपद्रव होतात.

## मर्मांचा भेदाचें कारण.

तत्रसद्यःप्राणहराणिआग्नेयानिकालांतरप्राणहराणिसौम्यानिविशल्यघ्नानिवायव्यानिवैकल्यकराणिसोमवायव्यानिअग्निवायव्यानिरुजाकराणि ॥

**अर्थ**—जा मर्मामध्यें अग्निरूप प्राण राहतात. तीं लवकर मारितात. कारण. अग्नीमध्यें त्वरा, फार आहे, व शीतरूप प्राण जा मर्मामध्यें राहतो तीं कालांतरीं प्राण हरण करितात. सोम ह्मणजे कफ तो स्थिर आहे ह्मणून, आणि वायुरूप प्राण जा मर्मामध्यें राहतो तीं विशल्यघ्न. कारण शल्यानें वायु कोंडून राहतो. तें उपटून काढिलें असतां त्यांतील वायु जाऊन मनुष्य मरतो. व जा मर्मामध्यें सोमवायू राहतात. तीं वैकल्यकारक, व जामध्यें अग्नि आणि वायु राहतात किंवा कफवायू राहतात तीं रुजाकर जाणावीं

## मर्मभेदाचें दुसरें कारण.

केचिदाहुर्मांसादीनांपंचानामपिसमृद्धानांसमवायात्सद्यःप्राणहराणि एकहीनानामल्पानांवाकालांतरप्राणहराणिद्विहीनानांविशल्यघ्नानित्रिहीनानांवैकल्यकराणिएकस्मिन्नेवरुजाकराणि ॥

**अर्थ**—कोणी आचार्य असें ह्मणतात. कीं मांसादिक पांच पदार्थ जा एका मर्मामध्यें आहेत तीं सद्यः प्राणहारक. त्यांतून एक हीन असतां किंवा आघातादि अल्प झालाअसतां कालांतरीं मारितात. आणि जांत मांसादि दोन पदार्थ हीन आहेत तीं विशल्यघ्न. व तीन पदार्थ कमीं आहेत तर वैकल्यकारक. व मांसादिक एकच आहे तर रुजाकर, जरीं गुद, बस्ति, नाभि हृदय हीं मर्में सद्यः प्राणहारक आहेत यांत अस्थि व्यक्त दिसत नाहींत. परंतु अव्यक्त अस्थीच्या शक्तीनें सद्यः प्राणहर सांगितलीं.

## मर्मांत मांसादिक पांच आहेत याविषयीं प्रत्यक्ष प्रमाण.

यतश्चैवमस्थिविद्धेष्वपिशोणितदर्शनंभवत्येतत्प्रत्यक्षप्रमाणात् ॥

**अर्थ**—अस्थिमर्माचेठायीं वेध झाला असतां रक्त निघतें. त्यावरून समजावें. कीं सर्व मर्मांत सर्वांचा संयोग आहे.

## शिरांचे प्रकार

चतुर्विधास्तुशिराःप्रायेणमर्मसुसन्निविष्टाः ॥
स्नाय्वस्थिसंधिमांसानिसंतर्प्यदेहंपुष्णाति ॥

**अर्थ**—वात, पित्त, कफ, रक्त वाहणाऱ्या नाडी बहुतकरून मर्मांमध्यें असून स्नायु, अस्थि, मांस, संधि यांला पुष्ट करून शरीराला पोशितात.

## एकदेश मर्मा घातानें सर्व शरीराला पीडा, किंवा प्राणवियोग सांगतो.

ततःक्षतेमर्मणिताःप्रवृद्धःसमंततोवायुरभिस्तृणाति ॥ प्रवर्धमानस्तु समातरिश्वारुजःसुतीव्राःप्रतनोतिकाये ॥ रुजाभिभूतंतुततःशरीरंप्र लीयतेनश्यतिचास्यसंज्ञा ॥ अतोहिशल्यंविनिहर्तुमिच्छन्मर्माणियत्नेनपरीक्ष्यकर्षेत् ॥

अर्थ—मर्माला क्षत झालें असतां वायु वाढतो, आणि शिरांप्रत प्रवेश करून सर्व शरीराला व्यापितो; व पीडा करितो. त्याणें शरीर ग्लान होऊन नष्ट होतें किंवा मरतो. याकरितां शल्य उपटून काढणाऱ्या वैद्यानें सर्व मर्मे संरक्षण करून परिक्षेनें शल्य उपटून काढावें.

## मर्मांत शल्य चांगलें न लागलें तर त्याच्या क्रियेचा विकल्प सांगतो.

तत्रसद्यःप्राणहरमंतेविद्धंकालांतरेणमारयति ॥ कालांतरेअंतेविद्धं विशल्यवद्भवति ॥ विशल्यंप्राणहरंवैकल्यकरंभवति ॥ वैकल्यकरंच कालांतरेक्लेदयतिरुजांचकरोति ॥

अर्थ—सद्यः प्राण हरण करणाऱ्या मर्माला शेवटीं वेध झाला असतां. कालांतरां मारितें. कालांतर मारक मर्म शेवटीं विद्ध झालें असतां विशल्यासारिखें होतें. विशल्य अंतीं विद्ध झालें असतां प्राणनाश किंवा वैकल्यकरितें. वैकल्यकर मर्म अंतीं विद्ध झालें असतां पुढें कांहीं दिवसानीं वाहूं लागतें, व पीडा करितें. मर्मे अतिशयित विद्ध झालीं असतां पूर्ववत् पूर्वीचें कार्य करितात. म्हणजे रुजाकर मर्म अतिविद्ध झालें असतां वैकल्यकारक होतें याप्रमाणें इतरांविषयीं ही जाणावें.

## सद्यः प्राण हरादि मर्माविषयीं कालावधि सांगतो.

तत्रसद्यःप्राणहराणिसप्तरात्रान्मारयंति ॥ कालांतरहराणिपक्षान्मासा द्वा ॥ तेष्वपिक्षिप्राणिकदाचिदाशुमारयंति ॥ विशल्यप्राणहराणिचेति ॥

अर्थ—सद्यः प्राणहारक मर्मे सातादिवसांत मारितात; व कालांतर प्राणहरक मर्मे पंधरा दिवसांत किंवा महिन्यांत मारितात. त्यामध्यें क्षिप्रसंज्ञक मर्मे कदाचित् अति विद्ध झालीं असतां त्वरित मारितात. तशींच विशल्यादि मर्मे मारितात.

## क्षिप्रादि मर्मांचीं स्थानें.

### स्नायुमर्म.

तत्रपादस्यांगुष्ठांगुल्योःक्षिप्रमितिमर्म. तत्रविद्धस्याक्षेपकेमरणं ॥
स्नायुमर्मेदमर्धांगुलंकालांतरप्राणहरंच ॥

**अर्थ**—पायांचा आंगठा त्याचे जवळची आंगठी यांमध्यें अर्धांगुल जाग्यांत स्नायु मर्म आहे, त्याला क्षिप्रमर्म ह्मणतात. त्याला वेध झाला असतां आक्षेपक वायु होऊन मरतो. हें कालांतरीं प्राण हरण करितें.

### मांसमर्म.

मध्यमांगुलीमनुक्रमेणमध्येपादंतलहृदयंतत्ररुजाभिर्मरणंमां
समर्मेदमर्धांगुलंकालांतरप्राणहरंच ॥

**अर्थ**—पायांच्या मध्यमांगुली समोर तळव्यांत तलहृदयनामक मर्म आहे, त्याला वेध झाला असतां मरण येतें. हें अर्धांगुलप्रमाण मांसमर्म कालांतरीं प्राणहारक आहे.

### स्नायुमर्म.

क्षिप्रस्योपरिष्टात्उभयतःकूर्चस्तत्रपादस्यभ्रमणवेपनेभवतः
स्नायुमर्मेदंचतुरंगुलंवैकल्यकरं ॥

**अर्थ**—क्षिप्रसंज्ञक मर्माचे वरलेकडे दोहोंबाजूंस ( खालींवर ) कूर्च आहे तें स्नायु मर्म. हें चार अंगुलेंप्रमाण वैकल्यकारक ह्याला वेध झाला असतां पाय कांपतो, किंवा फिरतो.

### स्नायुमर्म सांगतो.

गुल्फसंधेरधः उभयतः कूर्चशिरस्तत्ररुजाशोफौ ॥ इदमपिस्नायुम
र्मएकांगुलंवैकल्यकरं ॥

**अर्थ**—घोंट्यांच्या संधीच्या खालीं दोहोंबाजूंस कूर्चशिरस नामक मर्म आहे, तें विद्ध झालें असतां ठणका, सूज इत्यादि होतात. हें स्नायुमर्म एकांगुलप्रमाण वैकल्य करणारें आहे.

### संधिमर्म.

जंघापादयोः संघातेगुल्फस्तत्ररुजास्तब्धपादताखंजतावासंधिमर्मेदं
द्व्यंगुलप्रमाणंवैकल्यकरं ॥

**अर्थ**—पोटरी आणि पाऊल यांचे संधीला गुल्फ ह्मणतात. हें संधिमर्म दोन अंगुलप्रमाण वैकल्यकारक आहे. यास विकार झाला असतां फार पीडा होते. पाऊल ताठतें व लंगडें होतें.

## मांसमर्म.

पार्ष्णिप्रतिजंघामध्येइंद्रबस्तितत्रशोणितक्षये
मरणंमांसमर्मैदमर्धांगुलंकालांतरप्राणहरं ॥

**अर्थ**–खोटेपासून तेरा अंगुळांवर वरचेबाजूस इंद्रबस्ति नामक मांसमर्म अर्धांगुलप्रमाण आहे, त्यांतून रक्तस्राव झाला असतां कालांतरीं मरण येतें. भोज व गयदास मतें हें मर्म दोन अंगुळें आहे.

## संधिमर्मसांगतो.

जंघोर्वोः संघातेजानुसंधिमर्मैदंवैकल्यकरं

**अर्थ**–पोटरी व मांडी यांचे संधीला गुडघा म्हणतात. हें संधिमर्म वैकल्यकर दोन अंगुलप्रमाण आहे. यास विकार झाला असतां लंगडा होतो.

## स्नायुमर्मसांगतो.

जानुनउभयतस्त्र्यंगुलादाणि ॥ तत्रशोफाभिवृद्धिस्तब्धसक्थिताच ॥
स्नायुमर्मैदमर्धांगुलं ॥

**अर्थ**–गुडघ्याचे वरती तीन अंगुळांवर दोहोंबाजूस आणि संज्ञक स्नायुमर्म अर्धांगुलप्रमाण आहे. त्याला विकार झाला असतां सूज येत्ये व मांडी ताठत्ये.

## शिरामर्म.

ऊरूमध्येऊर्व्यस्तत्रशोणितक्षयात्सक्थिशोषःशिरामर्मैदमर्धांगुलंवैकल्यकरं ॥

**अर्थ**– मांडीचे मध्यदेशीं ऊर्वी संज्ञक शिरामर्म अर्धांगुलप्रमाण वैकल्यकारक आहे. त्यापासून रक्तस्राव झाला असतां मांडी वाळत्ये.

## शिरामर्म.

ऊर्ध्वमधोवंक्षणसंधेरूरुमूलेलोहिताक्षं ॥ तत्रलोहितक्षयेनपक्षा
घातःसक्थिसादोवा. शिरामर्मैदमर्धांगुलंवैकल्यकरंच ॥

**अर्थ**–वंक्षण संधीचे खालीं व वरल्या अंगास ऊरूमूळाचे ठायीं लोहिताक्ष संज्ञक शिरामर्म अर्धांगुलप्रमाण वैकल्यकर आहे. त्यापासून रुधिरस्राव झाला असतां पक्षाघात होतो, किंवा पाय वाळतो.

## स्नायुमर्म.

वंक्षणवृषणयोर्विटपंतत्रषांढ्यमल्पशुक्रतावास्नायुमर्मैदमेकांगुलंवै
कल्यकरंच ॥ एवमेतानिएकादशसक्थिमर्माणिव्याख्यातानि ॥

**अर्थ**–वंक्षण आणि वृषण यांचे बंधनरूप स्नायूला विटप संज्ञक मर्म म्हणतात. याला

विकार झाला असतां षंढपण किंवा अल्पशुक्रता होये. याप्रमाणें एक पायांतील ११ मर्में सांगितलीं यावरून दुसरा पाय व दोन हात मिळून ४४ चवेचाळीस मर्में होतात.

## पोट व ऊर यांतील मर्में.

अतऊर्ध्वमुदरोरसोर्मर्माणिव्याख्यास्यामः ॥ तत्रवातवर्चोविरसनं स्थूलांत्रप्रतिबद्धंगुदंनाममर्मतत्रसद्योमरणं ॥

अर्थ–आतां उदर आणि ऊर यांतील मर्में सांगतो. त्यामध्यें मोठ्या आंतड्याला बांधलेलें व ज्यांपासून विष्ठा व अपानवायु यांची प्रवृत्ति होते त्याला गुद म्हणतात. त्याला अघात झाला असतां तात्काळ मरण येतें. हें मांस ... ळें आहे.

## मूत्राशयबस्ति मर्म.

अल्पमांसशोणिताभ्यंतरतःकट्यांमूत्राशयोबस्तिः। तत्रापिसद्योमरणं अश्मरीव्रणादृतेतत्राप्युभयतोभिन्नेनजीवतिएकतोवाभिन्नेमूत्रस्रावी व्रणोवाभविष्यति ॥

अर्थ–थोडें मांस व थोडें रक्त इहींकरून झालेला, आणि कमर, नाभि, पृष्ठ, मुष्क, गुद, वंक्षण, शिश्न, या सर्वांचामध्यें अधोमुख व एक द्वार व मूत्राचा आशय असा हा बस्तिसंज्ञक मर्म आहे. या मर्माला अश्मरीकृत व्रणावांचून अन्य विकार झाला असतां, तत्काळ मरण येतें. या बस्तीला दोहोंबाजूनें छिद्र पडलें असतां तत्काळ मरण येतें. एका अंगाला छिद्र पडलें असतां मूत्र त्यामधून स्रवूं लागतें असा व्रण होतो. हें स्नायुमर्म चार अंगुलप्रमाण आहे.

## नाभिमर्म.

पक्वामाशययोर्मध्येशिराप्रभवानाभिस्तत्रापिसद्योमरणंशिरामर्मेदंचतुरंगुलं ॥

अर्थ–पक्वाशय. आणि आमाशय यांचेमध्यें शिरा समुदायानीं झालेली अशी नाभी आहे. या मर्माला विकार झाला असतां लवकर मरण येतें हें शिरामर्म चार अंगुळें प्रमाण आहे.

## आमाशयमर्म.

स्तनयोर्मध्यमधिष्ठायोरसिआमाशयद्वारंसत्वरजस्तमसामधिष्ठानंहृदयं तत्रापिसद्यएवमरणंशिरामर्मेदंकमलमुकुलाकारंअधोमुखंचतुरंगुलंच ॥

अर्थ–दोहोंस्तनाचा मध्यदेश व्यापून उराचे आंत. आमाशयाचें द्वार आणि सत्व रजस्तमोगुणाचें अधिष्ठान असें हृदयसंज्ञक शिरामर्म आहे. हें कमळाचे कळ्यासारिखें व अधोमुख, चतुरंगुलप्रमाण हें सद्यः मरण देणारें आहे.

## स्तनमूलशिरामर्म.

स्तनयोरधस्तात्द्व्यंगुलमुभयतस्तनमूले. तत्रकफपूर्णकोष्ठतयाम्रियते

अर्थ—दोहोंस्तनाचे खालीं दोन अंगुळांवर स्तनमूलसंज्ञक शिरामर्म दोन अंगलप्रमाण

कालांतर मारक असें आहे. यास विकार झाला असतां कफेंकरून कोष्ठ पूर्ण होऊन मरण येतें.

## रोहितसंज्ञकमांसमर्म.

स्तनचुचुकयोरूर्ध्वंस्तनरोहितेतत्रलोहितपूर्णकोष्ठतयाश्वासकासाभ्यांम्रियते.

अर्थ—स्तनचुचुकाचे वर दोन अंगुळ देशामध्यें अर्धांगुलप्रमाण मांसमर्म स्तनरोहित संज्ञक आहे. त्यास आघात झाला असतां रक्तानें कोष्ठ पूर्ण होऊन श्वास कास लागून कांहीं दिवसांनीं मरतो.

## अपलापशिरामर्म.

अंसकूटयोरधस्तात्पार्श्वयोपरिभागेपलापस्तत्ररक्तेनपूर्णभावग

तेनमरणं ॥ शिरामर्मणीअर्धांगुलेकालांतरप्राणहरे ॥

अर्थ—अंसकूटाचे खालती, आणि कुशीचे वरल्येकडे ह्मणजे बावळ्याच्या फळ्याजवळ अपलापसंज्ञक शिरामर्म अर्धांगुलप्रमाण कालांतरीं प्राण हरण करणारें आहे. त्यास विकार होऊन रक्त बहुत सांचलें असतां मरण येतें.

## अपस्तंब शिरामर्म.

उभयतोरसोनाड्यौवातवहेअपस्तंबौ. तत्रवात

पूर्णकोष्ठतयाश्वासकासाभ्यांचम्रियते. ॥

अर्थ—उदराचे दोहींबाजूचे ठायीं वातवाहक नाडी आहेत, त्यांना अपस्तंबमर्म ह्मणतात त्या शिरामर्मास विकार झाला असतां वायूनें कोष्ठ पूर्ण होऊन श्वास आणि कास लागून कांहीं दिवसांनीं मरतो. हीं शिरामर्मे अर्धांगुलप्रमाण कालांतर प्राणनाशक जाणावीं. याप्रमाणें उदर व उर यांतील बारा मर्मे सांगितलीं.

## आतां पाठींतील मर्मे सांगतो:

अतऊर्ध्वंपृष्ठमर्माणिव्याख्यास्यामः ॥ तत्रपृष्ठवंशमुभयतःप्रतिश्रोणी

कांडमस्थीनिकटितरुणे. तत्रशोणितक्षयात्पांडुर्विवर्णोहीनश्चम्रियते ॥

अर्थ—पाठीचे कण्याचे शेवटीं दोहींकडल्ये अंगीं ज्या कमरेच्या अस्थी आहेत, त्यांना कटि तरुण संज्ञक अस्थिमर्मे ह्मणतात. त्यांस आघात होऊन रक्तस्राव झाला असतां, मनुष्य विवर्ण व हीनवर्ण होऊन कांहीं दिवसांनीं मरतो.

## कुकुंदर संधिमर्म.

पार्श्वजघनबहिर्भागेपृष्ठवंशमुभयतःकुकुंदरे.तत्रस्पर्शाज्ञानमधःकाये

चेष्टोपघातश्च.

अर्थ—पाठीचे कण्याचे दोहीं बाजूवर कंबरेचे अस्थीचे संधी आहेत, त्या संधिमर्माला कुकुंदर ह्मणतात. त्यांची बाहेर खूण कमरे मध्यें खळी आहे ती या मर्माला विकार झाला असतां तें स्थळ बधिर होतें; आणि कंबरेपासून खालचे आंगाचा जीव जातो.

## नितंब अस्तिमर्म.

श्रोणिकांडयोरुपर्यामाशयाच्छादकौ. पार्श्वांतरप्रतिबद्धौनितंबौ ॥
तत्राधःकायशोषोदौर्बल्याच्चमरणं ॥

**अर्थ**—कटि तरुण अस्थिमर्मे पूर्वी सांगितलीं त्यांचे वरलेकडे आमाशयांचीं आच्छादक व पार्श्व संधांनीं बांधलेलीं जशी नितंब संज्ञक अस्थिमर्मे आहेत. स्पष्टार्थ—कंबरेवर मुलगें जा अस्थीच्या आधारानें घेतात, तीं ६ ढोंगणाचीं दोन फळी त्यांस विकार झाला असतां खालचे अर्धांगाचा शोष होऊन निर्बळपणा येऊन मनुष्य मरतो.

## पार्श्वसंधि शिराबंधनमर्म.

जघनमध्यपार्श्वयोस्तिर्यगूर्ध्वंचजघनात्पार्श्वसांधिस्तत्रलोहितपूर्णको
ष्ठतयाम्रियते ॥

**अर्थ**—जघनाचे मागल्ये आंगापासून डाव्ये व उजव्ये पार्श्वांचे ठायीं उभीं व किंचित तिरकस अशीं शिरांचीं बंधनें आहेत. त्यांनां पार्श्वसंधि ह्मणतात. त्यांनां विकार झाला असतां रक्तानें कोष्ठ पूर्ण होऊन कांहीं दिवसांनीं मरतो. याचें प्रमाण अर्धांगुल आहे.

## बृहतीसंज्ञक शिरामर्म.

स्तनमूलाद्युभयतःपृष्ठवंशस्यबृहतीतत्रशोणितातिप्रवृत्तिनिमित्तैरुपद्रवैर्म्रि
यतेशिरामर्मणीअर्धांगुले.

**अर्थ**—स्तनमूल मर्माचे सुमारानें पृष्ठवंशाचे दोहोंकडल्ये आंगीं बृहती संज्ञक शिरामर्मे अर्धांगुल प्रमाण आहेत, त्यांपासून रक्ताची प्रवृत्ति होऊन मनुष्य मरतो.

## अंसफलक मर्मे.

पृष्ठोपरिपृष्ठवंशमुभयतस्त्रिकसंधावंसफलके ॥

**अर्थ**—पाठीचे कण्याचे वरल्ये शेवटाचे दोहोंकडल्ये आंगीं व ज्या स्थळीं मानेचा आणि अंसाचा संयोग आहे, त्या स्थळींचे संधीला त्रिक ह्मणतात. त्याचे जवळ अंसफलक मर्मे अर्धांगुल वैकल्य कर आहेत.

## स्नायुबंधन अंसमर्म.

बाहुमूर्धग्रीवामध्येंसपीठस्कंधबंधनेअंसेतत्रस्तब्धबाहुता
स्नायुमर्मणि अर्धांगुलेवैकल्यकरे ॥

**अर्थ**—बाहूचा मस्तक आणि मान यांमध्यें अंसफलकासहवर्तमान भुज शिराला बांधलेलीं स्नायुचीं बंधनें आहेत. त्यांनां अंस ह्मणतात. स्पष्टार्थ जा स्थळीं पालखीची दांडी किंवा कावडीची दांडी बसत्ये त्या स्नायु; हीं स्नायुमर्मे अर्धांगुल प्रमाण वैकल्य कर आहेत.

## जत्रुमूलापासून वरचीं मर्मे सांगतों.

तत्रकंठनाड्यामुभयतश्चतस्रोधमन्योद्वेनीलेद्वेमन्येव्यत्यासेनतत्र
मूकतास्वरवैकृतमरसग्राहिताचशिरामर्मणीचतुरंगुलेवैकल्यकरे ॥

अर्थ—कंठ नाडीचे दोहोंकडल्ये बाजूवर चार धमन्या आहेत, त्यांचीं नावें मन्या व नीला. त्यांमधून एका एका बाजूवर एक मन्या व नीला, आशा आहेत. हीं शिरामर्में चार अंगुल प्रमाण त्यांस विकार झाला असतां मुकेपणा, स्वरभेद, इत्यादि विकार होतात.

## मातृका शिरामर्म.

ग्रीवामुभयतश्चतस्रश्चतस्रःशिरामातृकास्तत्रसद्योमरणं ॥

अर्थ—मानेचे दोहों बाजूंवर चार चार शिरा आहेत. त्या आठानां मातृका ह्मणतात. हें शिरामर्म चार अंगुल प्रमाण सद्यः प्राणहारक जाणावें.

## कृकाटिक संधिमर्म.

शिरोग्रीवयोःसंधानेकृकाटिके ॥ तत्रचलमूर्धनासंधिमर्मणीअर्धांगुले ॥

अर्थ—मस्तक आणि मान यांच्या संयोगामध्यें कृकाटिक संज्ञक संधिमर्में अर्धांगुल प्रमाण आहेत. यांस विकार झाला असतां मस्तक कांपतें. हीं मर्में पाठीचे कण्याचे समोर मानेचे मागल्ये आंगीं आहेत.

## विधुरसंज्ञक स्नायुमर्म.

कर्णपृष्ठयोरधःसंश्रितेविधुरेतत्रबाधिर्यंस्नायुमर्मणीकिंचिन्निम्नाकारे वैकल्यकारिणीच ॥

अर्थ—कानामागें किंचित् खालती व किंचित् खोलगट विधुर संज्ञक स्नायुमर्में आहेत त्यांस विकार झाला असतां बाधिर्य येतें.

## फणसंज्ञक शिरामर्में.

घ्राणमार्गमुभयतःस्रोतोमार्गप्रतिबद्धेअभ्यंतरतःफणेतत्रगंधाज्ञानं ॥

अर्थ—नासिकेचे आंतल्ये आंगीं दोहों मार्गांचे बाजूंशीं बांधलेलीं फण संज्ञक शिरामर्में, अर्धांगुल प्रमाण, वैकल्यकर आहेत, त्यांस विकार झाला असतां गंधाचें अज्ञान होतें.

## अपांगसंज्ञक शिरामर्में.

भ्रूपुच्छांतयोरधोक्ष्णोर्बाह्यतोपांगौतत्रांध्यंदृष्ट्युपघातोवा शिरामर्मणीअर्धांगुलेवैकल्यकारिणीच ॥

अर्थ—भिंवईचे शेवटाखालीं डोळ्यांचे बाहेरलेकडे अपांग संज्ञक शिरामर्में अर्धांगुल प्रमाण वैकल्यकर आहेत. त्यांस विकार झाला असतां आंध्य किंवा नेत्र विकार होतो.

## आवर्तसंज्ञक संधिमर्में.

भ्रुवोरुपरिनिम्नयोरावर्तौतत्राप्यांध्यंदृष्ट्युपघातोवा ॥

अर्थ—भिंवईंचे वरल्ये आंगीं किंचित् खोलगट प्रदेश आहे. त्यामध्यें आवर्त संज्ञक

संधिमर्मे अर्धांगुल प्रमाण वैकल्य कर त्यांस आघात झाला असतां आंध्य येतें, किंवा दृष्टीचा उपघात होतो.

## शंखनामक अस्थिमर्म.

भ्रुवोरंतरोपरिकर्णललाटयोर्मध्येशंखौतत्रसद्योमरणंअस्थिमर्मणीअर्धांगुले ॥

**अर्थ**—भिवयाचे शेवटावर कर्ण आणि ललाट यामध्यें शंखनामक अस्थिमर्म अर्धांगुल प्रमाण आहे, त्याला विकार झाला असतां तात्काळ मरतो.

## उत्क्षेपसंज्ञकमर्मं.

शंखयोरुपरिकेशांतेउत्क्षेपौतत्रसशल्योजीवेत् ॥

**अर्थ**—शंखाचे वर केशांपर्यंत उत्क्षेप संज्ञक मर्म आहे. त्यांत जोपर्यंत शल्य आहे तों पर्यंत वांचेल, व काढलें असता मरतो.

## स्थपणी शिरामर्म.

भ्रुवोर्मध्येस्थपणीतत्रोत्क्षेपवत ॥

**अर्थ**—दोहों भिवयांमध्यें स्थपणी संज्ञक शिरामर्म आहे. यांत ही शल्य आहे तों पर्यंत वांचतो. व काढिलें असता मरतो.

## सीमंतसंधिमर्म.

पंचसंधयःशिरसिविभक्ताःसीमंताः ॥

**अर्थ**—मस्तकाचे ठाई भांड्याचे सांध्यासारखे भिरनिराळे पांच सांधि आहेत. त्यानां सीमंत ह्मणतात. हीं मर्मे चार अंगुळ प्रमाण कालांतर प्राण हरण करणारीं जाणावीं.

## शृंगाटकनामकशिरासंयोगमर्म.

घ्राणश्रोत्राक्षिजिव्हासंतर्पणीनांशिराणांमध्यशिरःसन्निपातःशृंगाटकानि
तानिचत्वारिमर्माणितत्रापिसद्योमरणं ॥

**अर्थ**—नासिका, कर्ण, नेत्र, जिव्हा, या चोहों इंद्रियांनां तृप्त करणाऱ्या ज्या शिरा त्यांचे तोंडाचा संयोग मस्तकांत जा स्थळीं झाला आहे, त्या स्थळीं शृंगाटक संज्ञक चार शिरामर्मे सद्यः प्राण नाशक आहेत.

## अधिपति. शिरामर्मं.

मस्तकाभ्यंतरतोपरिष्टात्शिरासंधिसन्निपातोरोमावर्तोधिपतिः ॥

**अर्थ**—मस्तकामध्यें शेंडीचे जागीं सर्व शिरा व संधी यांचा संयोग झाला आहे. या स्थळीं अधिपति संज्ञक शिरामर्मे अर्धांगुल प्रमाण आहेत- त्यांची बाहेरली खूण त्या स्थळीं केशांचा भोवरा आहे. हें मर्म सद्यः प्राण हारक जाणावें.

## मर्माचें सूत्रोक्त मान सांगतो.

ऊर्व्यःशिरांसिविटपेचसकक्षपार्श्वेएकैकमंगुलमितास्तनपूर्वमूलं ॥
विध्यंगुलद्वयमितंमणिबंधगुल्फंत्रीण्येवजानुमपरंचसकूर्पराभ्यां ॥
हृद्बस्तिकूर्चगुदनाभिवदंतिमूर्ध्निचत्वारिपंचचगलेदशयानिचद्वे ॥
तानिस्वपाणितलकुंचितसंमितानिशेषाण्यवेहिपरिविस्तरतोंगुलार्धं ॥

अर्थ——ऊर्वी, कूर्च, शिरस, विटप, कक्षधर, हीं चौंदों प्रकारचीं मर्में विस्तारानें एकेक अंगुल प्रमाण, आणि मणिबंध, गुल्फ, स्तनमूल. हीं दोन अंगुल प्रमाण, जानु, कूर्पर हीं तीन अंगुल प्रमाण; व हृदय, बस्ति, कूर्च, गुद, नाभि, सीमंत, शृंगाटक, मातृका; मन्या आणि नीलधमनी' हीं मर्में चार अंगुल प्रमाण, आणि बाकी शेष राहिलीं तीं अर्धांगुल प्रमाण जाणावीं.

## मर्माचें प्रयोजन सांगतो.

एतत्प्रमाणमभिवीक्ष्यवदंतितज्ज्ञाःशस्त्रेणकर्मकरणंपरिहृत्यकार्यं ॥
पार्श्वाभिघातिमतमप्पीहनिहंतिमर्मतस्माच्चमर्मसदनंपरिवर्जनीयं ॥

अर्थ——पूर्वी सांगितल्याप्रमाणें मर्मांचें प्रमाण पाहून मर्मस्थान सोडून वैद्यांनीं शस्त्रक्रिया करावी. कारण मर्माला शस्त्र लागलें असतां मृत्यु येतो; आणि हात व पाय यांचा छेद झाला असतां मनुष्य वांचतो; परंतु तदवयव भूत मर्माचा छेद झाला असतां मरतो असें जाणावें.

## हातपाय तुटलेअसतां वाचतो व मर्मभेदानें मरतो हें सांगतो.

छिन्नेषुपाणिचरणेषुशिरानराणांसंकोचमाप्रसृगल्पमतोनिरेति ॥
प्राप्यामितव्यसनमुग्रमतोमनुष्यःसंछिन्नशाखतनुवन्निधनंनयाति ॥
क्षिप्रेषुनश्चसतलेषुहतेषुरक्तंगच्छत्यतीवपवनश्चरुजंकरोति ॥
एवंविनाशमुपयांतिहितत्रविद्धावृक्षाइवायुधनिपातवशंघ्रनीशाः ॥

अर्थ——मनुष्याचे हात पाय तोडले असतां, तेथील शिरांचीं तोंडें आकुंचित होऊन रुधिर बहुत निघत नाहीं. पीडा मात्र फार होये; परंतु मरत नाहीं; आणि हात, पाय, तुटल्ये वेळेस क्षिप्र मर्म, किंवा तल हृदय यानां शस्त्र लागलें असतां, रुधिर फार निघून तेथील वायु कुपित होऊन फार पीडा करतो. तेणेंकरून मनुष्य मरतो. याविषयीं दृष्टांत जसे वृक्ष कुठारादिकेंकरून शाखा संधीचे ठायीं खंडित झाले असतां पर्णादिक वाळून मरतात तसे.

## मर्में कोणत्या कार्याला उपयोगी पडतात तें सांगतो.

मर्माणिशल्यविषयार्धमुदाहरंतियस्माच्चमर्मसुहतानभवंतिसद्यः ॥
जीवंतितत्रयदिवैद्यगुणेनकेचित्तेप्राप्नुवंतिविकलत्वमसंशयंहि ॥

अर्थ—मर्मे शल्या (कंटक शस्त्र) विषयीं सांगितलीं आहेत, असें कोणी ह्मणतात. व शल्य, कंटकादिकेंकरून शरीर, आणि मन यांस पीडा देणें किंवा मारणें ह्यामधून मरणकारक धर्म तोशल्य विषयक आघातानें होतो; परंतु तत्काळ मरत नाहीं. सातां दिवसांचे आंत मरतो. यास्तव मर्मे शल्य विषयाचें अर्थ आहेत; आणि मर्मस्थानीं शल्य लागलें असताही वांचतो. असें पाहिलें आहे असें ह्मणाल तर, तो वैद्याचे कुशलपणानें कदाचित् कोणी वांचला असतां त्या त्या अंगास विकलत्व येतें. कार्योपयोगीं राहात नाहींत.

## मर्महत अनेक उपद्रवानीं मरतो तें सांगतो.

तंभिन्नजर्जरितकोष्ठशिरःकपालाजीवंतिशस्त्रविहतश्चशरीरदेशे ॥
छिन्नश्चसक्थिभुजपादकरैरशेषैर्येषांनमर्मसुकृताविषयाःप्रहाराः ॥

अर्थ—शस्त्रानें हत शरीरांतील मर्मांचा प्रदेश, त्या विकारानें ज्याचे कोष्ट, मस्तक, कपाळ हे जर्जर झाले तो वांचत नाहीं; आणि मर्मांवांचून इतर अवयव जे हस्त पादादिक याचे ठाईं विघात झाला असताही जर्जरित होऊन वांचतात.

## मर्माभिघातानें मनुष्य मरण्याचें कारण सांगतो.

सोममारुततेजांसिरजःसत्वतमांसिच ॥ मर्मसुप्रायशःपुंसांभूतात्मा चावतिष्ठते ॥ मर्मस्वभिहतास्तस्मान्नजीवंतिशरीरिणः ॥

अर्थ—पांच प्रकारचा कफ, पांच प्रकारचा वायु, पांच प्रकारचें पित्त, भूतात्मा, रज, सत्व, आणि तम हे सर्व बहुतकरून मर्मांमध्यें राहतात. याकरितां मर्मांचा छेद व भेद हे झाले असतां मरण येतें.

## सद्यः प्राणहरादि मर्मपंचक लक्षण सांगतो.

इंद्रियार्थेष्वसंप्राप्तिर्मनोबुद्धिविपर्ययः ॥ रुजश्चविविधास्तीव्राभवंत्याशुहतेहते ॥ हतेकालांतरघ्नेतुध्रुवोधातुक्षयोनृणां ॥ ततोधातुक्षया ज्जंतुर्वेदनाभिश्चनश्यति ॥ हतेवैकल्यजनने केवलंवैद्यनैगुणात् ॥ शरीरंक्रिययायुक्तंविकलत्वमवाप्नुयात् ॥ विशल्यघ्नेतुविज्ञेयंपूर्वोक्तं यत्तुकारणं ॥

अर्थ—सद्यः प्राणहरण करणारें मर्माला आघात झाला असतां सर्व इंद्रियें विकल स्वस्व विषयांचे ग्राहक शक्ति राहत नाहीं, व मन, बुद्धि यांस विपर्यास, नानाप्रकारच्या उग्र पीडा होतात. आणि कालांतर मर्म अभिहत झालें असतां शरीरांतील धातु नष्ट होतात; आणि मनुष्याला वेदना होऊन मरण पावतो. आणि वैकल्यकारक मर्माला आघात झाला असतां वैद्याच्या कौशल्यानें शरीर नीट होतें, परंतु विकल होतें; आणि विशल्य मर्मांत जों शल्य आहे, तोंपर्यंत वांचतो हीं पूर्वोक्त कारणें लक्षणानें जाणावीं.

## रुजाकर मर्मे कुवैद्य बिघडतो हे सांगतो.

रुजाकराणिमर्माणिक्षतानिविविधारुजः ॥ कुर्वंत्येतानिवैकल्यंकुवैद्यवशगापदि ॥

अर्थ—रुजाकर मर्में विकृत झालीं असतां नानाप्रकारची पीडा होतात; आणि चांगला वैद्य मिळाला नसतां शरीर व बळ यानां हीन करितात.

## मर्मसमीप आघातानें मर्मतुल्य वेदना सांगतो,

छेदभेदाभिघातेभ्योदहनाद्दारणादपि ॥ उपघातंविजानीयान्मर्मणांतुल्यलक्षणं ॥

अर्थ—मर्म समीपदेशीं छेद, भेद, आघात, अग्निस्पर्श, अथवा विदारण झालें किंवा मर्मानां उपघात झाला असतां, त्याचीं लक्षणें पूर्वोक्त मर्म लक्षणासारिखीं जाणावीं.

## मर्माभिघाताविषयीं वैद्ययत्न सांगतो,

मर्माण्यधिष्ठायचयेविकारामूर्छंतिकायेविविधानराणां ॥
प्रायेणतेकृछ्रतमाभवंतिनरस्ययत्नेनपिसाध्यमानाः ॥

अर्थ—मर्मामध्यें जे विकार होतात ते, सर्व शरीर व्यापून फार क्लेशदायक होतात. यास्तव वैद्यानीं तें मोठ्या यत्नानें साधावें.

इति षष्ठोध्यायः

## शिराविभाग सांगतो,

अथातःशिरावर्णविभक्तिशारीरव्याख्यास्यामः॥

अर्थ—शिरा आणि त्यांचे शुक्ल लोहितादिवर्ण. आणि त्यांचे समुदायापासून पृथक्करण, जांत वर्णन केलें आहे असा शिरावर्ण विभक्ति शारीराध्यायाची व्याख्या करितो.

## एकंदर शिरांची संख्या.

सप्तशिराशतानिभवंति ॥

अर्थ—शिरा एकंदर सातशें आहेत.

## शिरांचें कार्य सांगतो.

याभिरिदंशरीरमारामजलमिवजलहारिणीभिःकेदारमिवकुल्या
भिरुपस्निह्यते ॥ अनुगृह्यतेचाकुंचनप्रसरणादिभिर्विशेषैः ॥

अर्थ—शिरा सर्व शरीरांत आपाद मस्तकपर्यंत रस नेऊन शरीराला स्निग्ध करितात याविषयीं दृष्टांत, जसे बागेला पाट उदकानें परिपूर्ण होऊन तृप्त करितात. तशीच कृत्रिम नदी उदकानें शेताला तृप्त करिते तशाच प्राण सरख्या लहान मोठ्या शिरा शरीरांत. रस नेऊन त्याला पोशितात; आणि आकुंचन, प्रसरण, भाषण, निद्रा, जागृति इत्यादि कर्में करून शरीराचें पालन करितात.

## शिरांचे अति सूक्ष्म प्रकार दृष्टांतानें सांगतो.

द्रुमपत्रसेवनीनामिवतासांप्रतानाः ॥ तासांनाभिर्मूलं ॥
ततश्चप्रसरंत्यूर्ध्वमधश्चतिर्यक्चप्रतानाः ॥

**अर्थ**—शिरांचे फांटे वृक्षाचे पर्णांचे शिराप्रमाणें असंख्यात आहेत. त्यांचें मूळ नाभि, तिजपासून निघून वर खालीं आणि बांकडे तिकडे सर्व शरीरांत पसरतात.

## याविषयीं वचन प्रमाण.

यावंत्यस्तुशिराःकायेसंभवंतिशरीरिणां ॥
नाभ्यांसर्वानिबद्धास्तुप्रतन्वंतिसमंततः ॥

**अर्थ**—जितक्या शरीरांत शिरा आहेत तितक्या नाभीचे ठाईं बांधल्या असून तेथून सर्व शरीरांत पसरतात.

## शिरांचा व प्राणाचा आधारा धेयभाव संबंध सांगतो.

नाभिस्थाःप्राणिनांप्राणाःप्राणान्नाभिर्व्यपाश्रिताः ॥
शिराभिरावृतानाभिश्चक्रनाभिरिवाकरैः ॥

**अर्थ**—सर्व प्राण्याचे प्राण नाभिमध्यें नाभीच्या आवरक शिरांच्या आश्रयानें राहतात त्याशिरानीं नाभी चक्राचे नाभीप्रमाणें वेष्टिली आहे.

## शिराचे भेद सांगतो.

तासांमूलशिराश्चत्वारिंशत् तासांवातवाहिन्योदश
पित्तवाहिन्योदशकफवाहिन्योदशरक्तवाहिन्योदश ॥

**अर्थ**—त्या नाभिचक्रस्थ शिरासमुदायामध्यें मुख्य चाळीस शिरा आहेत. त्यातून १० दाहा वात वाहणाऱ्या, १० दाहा पित्त वाहणाऱ्या, दाहा १० कफ वाहणाऱ्या, आणि १० दाहा रक्त वाहणाऱ्या मिळून ४० चाळीस.

तासांवातवाहिनीनांवातस्थानगतानांपंचसप्तशतंभवति ॥ एवंपित्त
वाहिन्यःपित्तस्थाने. कफवाहिन्यःकफस्थाने रक्तवाहिन्योरक्तस्थाने
यकृत्प्लीहोरेवमेतानिसप्तशिराशतानिभवंति ॥

**अर्थ**—वातवाहिनी शिरांचे फाटे वातस्थानाप्रत गेलेले एकशें पंच्याहात्तर १७५, कफवाहिनीचे कफस्थानाप्रत गेलेले १७५, पित्तवाहिनीचे पित्तस्थानाप्रत गेलेले १७५, आणि रक्तवाहिनीचे रक्तस्थानात (यकृत्प्लीह) गेलेले १७५, याप्रमाणें सर्व मिळून ७०० होतात.

## अंग विभागानें शिरा सांगतो.

तत्रवातवहाशिराएकस्मिन्सक्थिनिपंचविंशतिः ॥ एतेनेतरसक्थि
बाहूचव्याख्यातौ ॥

**अर्थ**—वातवाहिनी शिरांमधून एक पायांचेठाईं पंचवीस आहेत. तसाच दुसरा पाय व २ दोन हात मिळून १०० होतात.

## कोष्टगत शिरा विभाग.

विशेषनस्तुकोष्टेचतुस्त्रिंशत् ॥ तासांगुदमेंढ्राश्रिताश्रोण्यामष्टौ ॥
द्वेपार्श्वयोःषट्पृष्ठेतावत्यएवोदरेदशवक्षसि ॥

**अर्थ**–कोट (मध्यप्रदेश) यांमध्यें चवतीस वातवाहिनी त्यामधून गुद, व लिंग यांचा आश्रयानें राहिलेल्या श्रोणीमध्यें ८ आठ, दोहों कुशींत २ पाठींत ६ पोटांत ६ उरामध्यें १० सर्व मिळून चवतीस.

## मानेवरचे शिरांचाविभाग.

एकचत्वारिंशज्जात्रुणऊर्ध्वंतासांचतुर्दशग्रीवायांकर्णयोश्चतस्रोनवजि
व्हायांषट्नासिकायामष्टौनेत्रयोः ॥ एवंपंचसप्तशतंवातवहानांव्याख्यातं ॥

**अर्थ**–मानेचे मुळापासून ऊर्ध्व प्रदेशामध्यें ४१ वातवाहिनी आहेत. त्यांमधून मानेंत १४ कर्णगत ४, जिव्हेंत ९, नासिकेंत ६, नेत्रामध्यें ८, मिळून ४१, सर्व मिळून १७५ होतात. याचप्रमाणें पित्त वाहिन्यादिकांचा विभाग जाणावा; परंतु पित्तवाहिनी शिरा नेत्रगत१० व कर्णगत २ इतकाच भेद आहे.

## शिराश्रित वातादिकांचे प्राकृत व वैकृत कार्य सांगतो.

क्रियाणामप्रतीघातःअमोहोबुद्धिकर्मणां ॥
करोत्यन्यान्गुणांश्चापिस्वाःशिराःपवनश्चरन् ॥

**अर्थ**–वायु स्ववाहिनी शिरांत सुप्रकृतीमध्यें संचार करीत असतां आकुंचन, प्रसारण, भाषण, इत्यादि क्रिया यथास्थित होतात. व नेत्रादि बुद्धींद्रियें, मन, बुद्धी यांची शक्ती आपआपले कार्याविषयीं चांगली राहते; आणि वायु अन्यगुण प्रक्षोदन, उद्वहन, पूरण, इत्यादि कार्तेंही कारितो.

## वातवाहिनी शिरागत कुपित वात विकार सां०

यदातुकुपितोवायुःस्वाःशिराःप्रतिपद्यते ॥
तदास्यविविधारोगाजायंतेवातसंभवाः ॥

**अर्थ**–जा काळीं वायु कुपित होऊन स्ववाहिनी मधून संचार करूं लागतो त्या काळीं नानाप्रकारचे वातसंभव रोग होतात.

## पित्ताचें कार्य.

भ्राजिष्णुतामन्नरुचिमग्निदीप्तिमरोगतां ॥
संतर्प्यस्वशिराःपित्तंकुर्यादन्यान्गुणानपि ॥

**अर्थ**–पित्त, स्ववाहिनी शिरांप्रत सुप्रकृतीनें राहून त्यांस तृप्त करीत असतां शरीराचेठायीं कांती व अन्नावरचाची, जठराग्नीची दीप्ति, निरोगीपणा, तेजस्वीपणा, रागपंक्ति, ढवटणी इत्यादि करतें. आणि विकृत होऊन राहात असतां नानाप्रकारचे पित्त संभव रोग होतात.

## कफकार्य सांगतो.

स्नेहमंगेषुसंधीनांस्थैर्यंबलमुदीर्णतां ॥
करोत्यन्यानगुणांश्चापिबलासःस्वाःशिराश्चरन् ॥

अर्थ–कफ, स्ववाहिनीप्रत सुप्रकृतीमध्यें वाहात असतां आंगावर तुकतुकी, संधीनां स्थैर्य, ल इत्यादि गुण करितो; आणि विकृत होऊन राहिला असतां नानाप्रकारचे कफसंभव कार श्वास, कास, शिरांचे पूरण, स्पर्शाज्ञान इत्यादि व्याधि करतो असें जाणावें.

## रक्ताचें कृत्य.

स्वाःशिरासंचरद्रक्तंकुर्याच्चानुगुणानपि ॥

अर्थ–रक्त स्ववाहिनीमध्यें निर्दोष वहात असतां, पित्ताचे गुणासारिखे गुण करितें; आणि कृत होऊन वहात असतां, नानाप्रकारचे रक्त संभव रोग करितें.

## वातादि शिरा सर्व दोषानां वाहतात तें सांगतो.

नहिवातंशिराःकाश्चित्नपित्तंकेवलंतथा ॥
श्लेष्माणंवाहयंत्येताअतःसर्ववहाःशिराः ॥

अर्थ–कोणत्याही शिरा एकट्या वायूला किंवा एकट्या पित्ताला ; अथवा एकट्या कफाला वाहात नाहींत. तर सर्व शिरा अंशतः वात, पित्त, कफादिकानां वाहातात. यास्तव यानां सर्ववह ह्मणतात.

## सर्व दोष वाहणाऱ्या शिरांलाही सर्व वहत्व सांगतो.

प्रदुष्टानांहिदोषाणांमूर्छितानांप्रधावतां ॥ ध्रुवमुन्मार्गगमनमतःसर्ववहाःस्मृताः ॥

अर्थ–कुपित वातादि दोषानांही सर्वशिरा अंशाशाप्रमाणें वाहतात; यास्तव त्यानां सर्वह ह्मणतात.

## शिरांचा वर्ण विभाग सांगतो.

त्वारुणावातवहाःपूर्यंतेवायुनाशिराः॥पित्तादुष्णाश्चनीलाश्चशीतागौर्यःस्थिराःकफात्
असृग्वहास्तुरोहिण्यःशिरानात्युष्णशीतलाः ॥ अतऊर्ध्वंप्रवक्ष्यामिनविच्छिद्ये
च्छिराभिषक् ॥ वैकल्यंमरणंचाशुव्यधात्तासांध्रुवंभवेत् ॥

अर्थ–वातवाहिनी शिरा आरक्त व वायुनें पूर्ण झालेल्या, पित्तवाहिनी ऊष्ण, नीलवर्ण, आणि कफवाहिनी थंड, गौरवर्ण, स्थीर, आणि रक्तवाहिनी फार ऊष्ण नव्हत, व फार थंड नव्हत परंतु मध्यम लोहितवर्ण अशा असतात त्या वैद्यानें तोडूं नये. तुटल्या असतां शरीर विकल होतें. व मरणही येतें.

## अवेध्य शिरा सांगतो

शिराशतानिचत्वारिविंद्याच्छाखासुबुद्धिमान् ॥ षट्त्रिंशच्चशतंकोष्ठे चतुःषष्ठंचमूर्धसु ॥ शाखासुषोडशशिराःकोष्ठेद्वात्रिंशदेवतु ॥ पंचाशज्जत्रुणश्चोर्ध्वंनव्यध्याःपरिकीर्तिताः ॥

अर्थ–हात पायांत पूर्वोक्त प्रकारानें ४०० शिरा आहेत. त्यांमधून सोळा अव्यध्या ह्मणजे वेधण्यास उपयुक्त नाहींत. व मध्यप्रदेशांत १३६ त्यांतून ३२ शिरा वेधूं नयेत. व मस्तकांत १६४ त्यांतून ५० शिरा वेधायाचे उपयोगी नाहींत.

## शाखागत १६ अव्यध्य शिरा सांगतो.

जालधरावेकानिस्त्रश्चाभ्यंतराः तत्रोर्वीसंज्ञेद्वे ॥ लोहिताख्यसंज्ञिका ॥

अर्थ–हात व पाय यांमध्यें १६ शिरा अवध्य आहेत. त्यांमधून १ जालधरा, व तीन अभ्यंतर गत ह्मणजे २ उर्वी संज्ञक, आणि तिसरी लोहित संज्ञक अशा एका पायांत चार, व दुसरे पायांत चार, दोन हात मिळून ८, सर्व मिळून सोळा अव्यध्य जाणाव्या. पृष्ठ, उदर, ऊर यांमध्यें बत्तीस शिरा अवेध्य आहेत. एथें पृष्ठ शब्दानें श्रोणी व पार्श्व यांचेंही ग्रहण होतें. सारांश श्रोणीगत ८, पार्श्वगत २, पृष्ठगत ४, उदरांत १४ याप्रमाणें मध्य प्रदेशांतील ३२ शिरा शस्त्रकर्मास योग्य नाहींत. कमरेंत ३२ त्यांमध्यें विटप संज्ञक ४, कटितरुणास्थि संबंधीं ४, अशा आठ मात्र अशस्त्रकृत्या; व एका एका कुशीमध्यें आठ आठ शिरा आहेत, त्यांमधून वर गेलेल्या दोन मात्र अशस्त्रकृत्या, व पृष्ठ वंशाचे दोहों अंगा २४ शिरा आहेत त्यांमधून वर गेलेल्या बृहतीसंज्ञक ४ मात्र अशस्त्रकृत्या ; व उरामध्यें ४० शिरा आहेत. त्यांमधून चवदा अशस्त्रकृत्या; त्यांचें वर्णन. हृदयगत २, स्तनमूलगत ४, व स्तनरोहितगत ४, अपलाप आणि अपस्तंब मिळून ४, अशा १४ आहेत. उदरगत २४ त्यांमधून चार अशस्त्रकृत्या, अशा ३२ शिरा मध्यप्रदेशगत जाणाव्या. व जत्रूपासून ऊर्ध्व प्रदेशामध्यें १६४ शिरा आहेत त्यांमधून मानेंत ५८, त्यांत मातृका ४, मन्या २, नीला २, कृकाटिकगत २, विधुरगत २, सर्व मिळून १६ शिरा मानेमध्यें अशस्त्रकृत्या जाणाव्या.

## हनुवटीतील शिरावेध.

हनोरुभयतोष्टावष्टौतासांसंधिधमन्यौद्वेपरिहरेत् ॥

अर्थ–हनुवटीचे दोहों बाजूनीं सोळा शिरा आहेत, त्यांमधून हनुसंधीच्या हेतुभूत अशा एका एका बाजूमध्यें २ आहेत. त्या चार मात्र अशस्त्रकृत्या आहेत. हनुवटीच्या सोळा शिरा मानेचे शिरांत अंतर्भूत आहेत, यास्तव निराळ्या सांगितल्या नाहींत. गयदासमतें त्या सोळा शिरा निराळ्याच आहेत; त्यांतून दोन संधिबंधन मर्मरूप वर्जाव्या.

## जिव्हेंतील शिरावेध.

षट्त्रिंशज्जिव्हायांतासामधःषोडशअशस्त्रकृत्यारसवहेवाग्वहेच ॥

**अर्थ**—जिव्हेमध्यें ३६ शिरा आहेत. खालचेभागीं १६, वरल्याभागीं २० त्यांमधून ोन रसवाहिनी आणि दोन वाग्वाहिनी अशा चार मात्र शस्त्रोपयोगीं नाहींत.

## नासिकेंतील शिरावेध.

द्विर्द्वादशनासायांतासामौपनासिक्यश्चतस्रःपरिहरेत् ॥

तासामेवतालुन्येकामृदावुद्देश्ये ॥

**अर्थ**—नासिकेमध्यें चवदा शिरा आहेत. त्यांतून नासिकेचे समीप चार, व तालूचे ायीं घंटेजवळची १ एकूण पांच शस्त्र कर्मोपयोगीं नव्हत.

## अपांगांतील शिरावेध.

षट्त्रिंशदुभयोर्नेत्रयोस्तासामेकैकामपांगयोःपरिहरेत् ॥

**अर्थ**—नेत्रांत ३६ शिरा आहेत त्यांमधून अपांगगत एकेक मात्र वर्जावी.

## नासानेत्रादिकांतील शिरावेध.

नासानेत्रतालुललटिषष्टिस्तासांकेशांतानुगताश्चतस्रः

आवर्तयोरेकैकास्थपण्यांचैकापरिहर्तव्याः

**अर्थ**—ललाटाचे ठायीं ६० शिरा आहेत. त्यांमधून आवर्त मर्माजवळ गेलेल्या ४ व ावर्ताचे ठायीं १ स्थपणीचे ठाई १, अशा सात शिरा मात्र वर्जाव्या. ललाटगत साठ ारा नासिका व नेत्र यांपासून गेलेल्या आहेत यास्तव सांगितल्या नाहींत.

## शंखगत शिरावेध.

शंखयोर्दशतासामेकैकांपरिहरेत् ॥

**अर्थ**—शंखाचे ठायीं १० शिरा आहेत, त्यामधून एकेक मात्र वर्जावी. शंखगत शिराही ासिका व नेत्र यांपासूनच गेल्या आहेत.

## मस्तक सीमंत व अधिपति यांतील शिरावेध.

द्वादशमूर्धनितासामुत्क्षेपयोर्द्वेपरिहरेत् ॥

सीमंतेष्वेकैकामेकामधिपतौ ॥

**अर्थ**—मस्तकांत १२ शिरा त्यांमधून उत्क्षेप मर्मगत एकेक सीमंतगत ५, अधिपति त एक, अशा आठ वर्जाव्या. याही नेत्रगतच आहेत, यास्तव पृथक् सांगितल्या नाहींत.

## संख्येंत शिरांचा कमीजास्तपणा सांगतो.

व्याप्नुवंत्यभितोदेहंनाभितःप्रसृताःशिराः ॥

प्रतानाःपद्मिनीकंदाद्बिसादीनांजलंयथा ॥

अर्थ–शिरा, नाभी पासून निघून विस्तार पावून सर्व शरीर व्यापितात. जसे कमळिणी कंदापासून मृणाल तंतु निघून जल व्यापितात. यास्तव उक्त संख्ये मध्यें न्यूनाधिकपणा भासेल.

इति सप्तमोध्यायः समाप्तः

## अष्टमोध्यायप्रारंभः

अथातःशिराव्यधविधिशारीरंव्याख्यास्यामः ॥

अर्थ–शिरा वर्ण विभागा नंतर शिरा वेध शारीर सांगतो.

### शिरा काढूनयेत ते.

बालस्थविररूक्षक्षतक्षीणभीरुपरिश्रांतमद्याध्वस्त्रीकर्षितवातविरिक्तास्थापितानुवासितजागरितक्लीबकृशगर्भिणीनांकासश्वासशोषप्रवृद्धज्वराक्षेपकपक्षाघातोपवासपिपासामूर्छाप्रपीडितानांशिरांनविध्येत् ॥

अर्थ–बाल, क्षतक्षयानें क्षीण, आघातादिकानीं सप्तधातु क्षीण झालेला, भित्रा, दमलेला मद्यपानानें शुष्क, मार्ग किंवा स्त्रीयांचा योगानें दमलेला, फार ओकलेला, रेचझालेला, निरूह बस्ति व अनुवासन बस्ति हे उपचार केलेला, षंढ, कृश, गर्भिणी, खोकला, दमा, क्षयरोग, मोठाज्वर, आक्षेपक वायु, पक्षाघात, उपवास, मूर्छा, ताहान, यार्णी पीडित, त्याचा शिरांचा वेध करूंनये. कारण खोकला, दमा, मोठाज्वर, आक्षेपक, पक्षघात, क्षतक्षीण, यांचा रक्ताचा स्राव झाला असतां वायूचें भयहोतें. भित्रामनुष्य तमोगुण असतो याकरितां त्याला रक्त दर्शनानें मूर्छा येत्ये, व श्रीमंत मनुष्याचा वायु कुपितअसतो. तो रक्तस्रावानें अधिक कुपित होऊन शरीराचा नाशकरितो. मद्यप्याचें रक्त काढिलें असतां मदानें विक्षिप्त चित्तफार मूर्छितहोतें; आणि मार्ग व स्त्री यार्णी कृशमनुष्याचें रक्त काढिलें असतां वातकोप होतो. आस्थापित, वकुपित यांचें रक्त काढिल्यानें वातकोप होतो. अनुवासिताच्या जठराग्नि मंद असतो. तो रक्त काढल्यानें फार मंदहोतो. नपुंसकाचें रक्त काढल्यानें सर्वप्रधान धातूचा क्षयहोऊन निःसंदेह मरतो. कृश व गार्भिणी यांचें रक्त काढिल्यानें धातुक्षीण झाल्यामुळें देह नाशाचें भयहोतें. श्वास, कास, शोष, यार्णी ग्रस्त मनुष्यानें रक्त काढिलें असतां धातुक्षीण होऊन देह नाश शंका प्राप्त होईल.

### रक्तस्राव साध्यविकार सांगतो.

शोणितावसेकसाध्याश्चयेविकारास्तेषुवापक्वेषुअन्येषुचानुरक्तेषुयथाभ्यासंयथान्यायंशिरांविध्येत् ॥

अर्थ–जे विकार रक्त स्राव साध्य, त्वक्दोष, ग्रंथि, सूज, रक्तविकार, हे रक्तस्राव साध्य असें शोणित वर्णन प्रसंगीं सांगितलें, ते विकार पक्व झाले असतांही रक्तस्राव करावा, व जांपासून पुढें दाहादिविकार होणार असे पुर्वी रक्त सेक साध्यामध्यें सांगितले नाहींत. त्याचे ठायीं ही रोगस्थलाचे समीप प्रदेशींचें रक्त, स्नेह, स्वेदादिउपचार पूर्वक काढावें.

## रक्त काढूंनये त्यांचेंही काढावें ह्मणून सांगतो.

प्रतिषिद्धानामपिविशेषोपसर्गेआत्ययिकेवाशिराव्यधनमप्रतिषिद्धं ॥

अर्थ—रक्तस्रावाविषयीं जे प्रतिषिद्ध बाल, क्षीण इत्यादि पूर्वीं सांगीतले त्यांस अति उपद्रव देणारा व्याधि किंवा मृत्युकारक विद्रध्यादिक रक्तस्रावसाध्य व्याधि झाला असतां रक्त काढावें त्याचा निषेध नाहीं.

## शिरवेधाचें पूर्वकृत्य.

तत्रस्निग्धस्विन्नमातुरंयथादोषप्रत्यनीकंद्रवप्रायमन्नंभुक्तवंतंयवागूंपी तवंतंवायथाकालमुपस्थाप्यासीनंस्थितंवाप्राणानबाधमानोवस्त्रपट चर्मवल्कलानामन्यतमेनयंत्रयित्वानातिगाढंनातिशिथिलंशरीरप्रदेश मासाद्यंप्राप्तंशस्त्रमादायशिरांविध्येत् ॥

अर्थ—रक्त काढण्यापूर्वीं रोग्याला तैलाभ्यंगादि उपचार करावा. घर्मकाढावा. आणि स्वस्थाचें रक्त काढूंनये. व दोषाशीं विरुद्ध नहोई असें द्रवद्रव्यप्रधान अन्न, अथवा पेजबुडा भात, स्वस्थअसतां भक्षण करवून, पाऊस व अभ्रनसतें तेदिवशीं वैद्यानें रोग्याला आपल्याजवळ उभा करून अथवा बसवून धीर देऊन वस्त्र, पट्टवस्त्र, चर्म, अथवा वल्कल यांतून कोणत्या एकानें वेष्टून तें वेष्टन मस्तकाला फार गच्च न होई व हात पाय सईल न होत असें बांधून मर्मभिन्न प्रदेशघेऊन व जसें असावें असें शस्त्रघेऊन शिरा वेधून रक्त काढावें.

## वेधकाल सांगतो.

नवातिशीतेनात्युष्णेनप्रवातेनचाभ्रिते ॥
शिराणांव्यधनंकार्यमरोगेवाकदाचन ॥

अर्थ—अतिशीतदेश, काल; व अत्युष्णदेश, काल; व अति वायु सुटतो, तो दिवस, व अभ्रयुक्त दिवस, यांचे ठाईं शिरा वेधूं नयेत. तशाच कांहीं रोग नसतां वेधूं नयेत.

## शिरोत्थानाचा प्रकार सांगतो.

तत्रव्यध्यशिरंपुरुषंप्रत्यादित्यमुखंअरत्निमात्रोच्छ्रितंउपवे श्यासनेसक्थ्योराकुंचितयोर्निवेश्यकूर्परसंधिद्वयस्योपरि हस्तावन्तर्गूढांगुष्ठकृ[illegible]यित्वायंत्रेणशाट कंग्रीवामुष्टचोरुपरिपरिक्षि[illegible]पुरुषेणपश्चात्स्थितेनवा महस्तेनोत्तानशाटकांतद्वयंग्राहयित्वाततोवैद्योयानत्शि रोत्थापनार्थंनात्यायितशिथिलंयंत्रमाचरेत् अस्टकूलावणा-

थैचयंत्रंपृष्ठमध्येपीडयेदितिकर्मपुरुषमुखंवायुनापूरयेदेषउ
त्तमांगगतानांअंतर्मुखवर्जानांशिराणांयंत्रेणव्यधनेविधिः

अर्थ—जा पुरुषाच्या शिरा वेधायाच्या आहेत त्या पुरुषाला सूर्याकडे तोंड करवून मुंडा-हात उंच तिवई, किंवा अन्य तसें आसन त्यावर पाय खालते सोडून, आणि यत्किंचित् आटोपून उकिडव्यासारिखा बसवावा; आणि त्या पुरुषाचे दोन्हीं कोंपर, गुडघ्याचे संधीचे वर्ते ठेववावे, आणि आंगठा आंत सांपडून मूठी मिटवाव्या; अथवा हातांत वस्त्राचा बोळा देऊन घट्ट धरवावा; आणि मानें भोंवता वस्त्राचा पट्टा गुंडाळावा, आणि यंत्राने म्ह० दोन बोटें रुंदीची कापडादिकांची घट्ट पट्टी घेऊन तिणें कोंपराच्या संधीवर तीन अंगुळें जागा टाकून घट्ट बंधन करावें; आणि दुसऱ्या मनुष्यानें त्या मनुष्याचे पाठीमागें उभें राहून, त्या यंत्ररूप शाटकांची दोन्ही बोटें डावे हातानें धरून उभें राहावें, नंतर त्याला वैद्याने आज्ञा करावी, कीं शिरांचें उत्थापन झालें पाहिजे, याजकरितां उजव्या हातानें फार घट्ट न होई, व फार-शिथिल न होई असें यंत्र वेष्टन करावें; आणि रक्त चांगलें स्रवायासाठीं पृष्ठमध्याचेठाईं यंत्र चांगलें आंवळावें. ज्याला शिरावेधरूप कर्म करितात, त्याचें मुख वायुकरून पूर्ण करावें, म्ह० तोंडावाटे श्वासोश्वास होऊं देऊं नये. याप्रकारें उत्तमांगगत शिरांचा वेध यंत्रेंकरून करावा परंतु मुखांतील शिरांशिवाय इतर उत्तमांगगत शिरांचा जाणावा.

## पादादिगत शिरा वेधण्याचा प्रकार सांगतो.

पादंविध्यस्यपादंसमेस्थानेसुस्थितंस्थापयित्वाअन्यपादमीषत्संकु
चितमुच्चैःकृत्वाव्यध्यशिरपादंजानुसंधेशाटकेनावेष्टचहस्ताभ्यांवाप्रपीड्य
गुल्फंव्यध्यप्रदेशस्योपरिचतुरंगुलेप्लोतादीनामन्यतमेनबध्वाशिरांविध्येत् ॥

अर्थ—जा मनुष्याचे पायांची शीर वेधायाची आहे, त्या मनुष्याचा पाय, सपाट जाग्यावर चांगला ठेवून, दुसरा पाय यत्किंचित् आटोपून उचलून धरावा, आणि जा पायांची शीर वेधायाची असेल, त्या पायांचे गुडघ्याचे खालीं घट्ट कापडाचे पट्टीनें वेष्टावा, अथवा हातानें गच्च आंवळावा. नंतर गुल्फ संधीचेठायीं व्यध्यस्थल सोडून, चार अंगुळावर वस्त्रचर्मादिकानें बांधून शीर वेधावी.

## हस्त शिरावेधप्रकार सांगतो

अथोपरिष्टाद्धस्तेगूढांगुष्टकृतमुष्टिसम्यगासनेस्थापयित्वा
सुखोपविष्टस्यपूर्ववद्यंत्रंबध्वाहस्तशिरांविध्यात्.

अर्थ—ऊर्ध्वप्रदेशीं, हस्तादिकांचा शिरावेध करायाचा असतां पूर्ववत् अंगुष्ठ आंत सांपडवून मूठ मिटवून, आणि व्यध्यप्रदेश सोडून, वरचेकडे चार अंगुळावर पट्टीनें बांधून शिरा वेधून रक्त काढावें. याप्रमाणें गृध्रसी, आणि विश्वाची, या वातरोगांमध्यें आखडलेली जी गुडघ्याची कोंपराची, शीर ती वेधावी.

## श्रोणी, पाठ, खांदे, यांतील शिरावेध.

श्रोणीपृष्ठस्कंधेषुउन्नामितपृष्ठस्यावटुः
शिरस्कंधस्यविस्फूर्जितपृष्ठस्य ॥

अर्थ—जा मनुष्याचें पृष्ठ, उन्नामित ह्मणजे कुबड वाढलेलें आहे. व जा मनुष्याचा अवटु ह्मणजे मानेचे पाठीमागचा शिरा, आणि मस्तक व स्कंध यांस विकार होऊन ताठल्यासारिखी झाली असतां, व पृष्ठ, विस्फूर्जित ह्म० ताठलें असतां, श्रोणि, पृष्ठ, स्कंध, यांचेठायींची शिरा वेधून रक्त काढावें. व जाचें मध्य शरीर ताठलें त्याच्या शिरा वेधाव्या.

## कोणाच्या कोठें शिरा वेधाव्या त्या सांगतो.

बाहुभ्यामवलंबमानदेहस्यपार्श्वयोरवनामितमेढ्रस्यमेढ्रे ॥
विदष्टजिह्वाग्रस्याधोजिह्वायाः॥
अतिव्यात्तानस्यतालुनिदंतमूलेषुच ॥

अर्थ—जा पुरुषाचे दोनही हात, ताठल्यासारिखे लंबायमान होऊन दोनही कुशींस चिकटून राहिले; याचे पार्श्वसंबंधीं शिरा वेधाव्या; व शिश्न, स्तब्ध झालें, असतां शिश्नसंबंधीं शिरा वेधाव्या. व जिव्हाग्र उचलल्यासारिखें होऊन बाधिर झालें असतां जिव्हेच्या खालच्या आंगांची शीर वेधावी; व तोंड वासल्यासारिखें झालें असतां तालुसंबंधीं आणि दंतलसंबंधी शीर वेधावी.

## अनुक्त यंत्रप्रकार सांगतो.

एवंयत्रोपायानन्यांश्चशिरोत्थापनहेतून्बुध्यावेद्यशरीरवशेनव्याधिवशेनविदध्यात् ॥

अर्थ—याप्रकारचे यंत्रोपाय, व अन्य यंत्रोपाय, शिरांचा उत्थापनास हेतु, अशा उपायातें वैद्यानें स्वबुध्दीनें पाहून व्याधि व शरीराचें बल, पाहून त्याप्रमाणें उपचार करावे. शरीरप्रदेशीं विशेषेंकरून शस्त्रविशेषाची योजना करावी.

## वेध्यशरीरास तारतम्यानें शस्त्रयोजना सांगतो.

मांसलेषुअवकाशेषुयवमात्रंशस्त्रंविदध्यात् ॥
अतोन्यथाअर्धयवमात्रंव्रीहिमात्रंव्रीहिमुखेनअस्थ्नामुपरि ॥

अर्थ—मांसल शरीरप्रदेश ह्म० जठर, स्फिगादिक, त्यांचेठायीं शिरा वेधून रक्त काढायाचें असल्यास, यवप्रमाण शस्त्र योजावें. आणि इतर स्थळीचें काढावयाचें असल्यास अर्ध यव एवढें घ्यावें, व फार हाडकळ प्रदेशसंबंधी शीर वेधायाची असल्यास, भाताचा कणाग्रा एवढें घ्यावें. शीत, उष्ण, वर्षा, या भेदेंकरून काल त्रिविध आहे; त्याचा विशेष सांगतो.

## शिरावेध काळ सांगतो.

व्यभ्रेवर्षासुग्रीष्मेशीतलेहेमंतेउष्णे ॥

अर्थ—वर्षकाळीं अभ्र नसेल त्यादिवशीं. आणि ग्रीष्मऋतूमध्यें, ज्यादिवशीं, फार उष्णता नसेल त्यादिवशीं; अथवा तृतीयप्रहरानंतर थंडवेळेस रक्त काढावें. हेमंतऋतूंत ज्यादिवशीं थंडी असेल त्यादिवशीं शिरावेधादिक करून रुधिर काढावें. परंतु हेमंतऋतूमध्यें रक्त काढणें तें रोग जर प्राणहारक आहे तरच काढावें. अन्यथा काढूंनये. एथें हेमंतग्रहण सामान्य शीत काळाचे बोधक असें जाणावें.

## सुविद्ध शिरालक्षण.

सम्यक्शस्त्रनिपातेनधारयावास्रवेदसृक् ॥
मुहूर्तंरुध्वातिष्ठेत्तुसुविद्धांतांविनिर्दिशेत् ॥

अर्थ—चांगलें शस्त्र लागून धारारूपेंकरून क्षणभर रक्त स्रवतें; आणि पट्टी बांधल्यानंतर स्रवत नाहीं, ती शिरा चांगली विद्ध झाली असें जाणावें.

## दुष्ट शिरा वेधली असतां पूर्वी वाईट रक्त स्रवतें असें दृष्टांतानें सांगतो.

यथाकुसुंभपुष्पेभ्यःपूर्वंस्रवतिपीतिका ॥
तथाशिरासुदुष्टासुदुष्टमग्रेप्रवर्तते ॥

अर्थ—जशीं कुसुंबपुष्पें भिजविलीं असतां पहिल्यानें पिंवळठ पाणी निघतें, नंतर चांगला रंग निघतो. त्याप्रकारें शिरा वेधिली असतां पहिल्यानें विकृत रक्त निघून मग चांगलें रक्त निघतें.

## शिरा चांगली विध्द झाली असतां हीं रक्त निघत नाहीं तें सांगतो.

मूर्छितस्यातिभीतस्यश्रांतस्यतृषितस्यच ॥
नवहंतिशिराविद्धास्तथानुत्थितयंत्रिताः ॥

अर्थ—शिरा वेधकालीं ज्या मनुष्याला मूर्छा आली, किंवा फार भ्याला, व फार श्रमला किंवा तान्हेला, आहे त्या मनुष्याच्या शिरा चांगल्या स्रवत नाहींत. कारण मूर्छादिकेंकरून वायु कुपित होऊन शिरांचीं तोंडें रोधितो; व ज्या शिरा फुगल्यावांचून वेधिल्या त्यांपासूनही रक्त स्रवत नाहीं. कारण त्यांतील रक्त प्रवाहाभिमुख होत नाहीं.

## क्षीण मनुष्याचें रक्त काढावयाचें फार अगत्य [illegible] सांगतो.

क्षीणस्यबहुदोषस्यमूर्छयाभिहतस्यच ॥
भूयोपराण्हेविस्राव्याअपरेद्युस्त्र्यहेपिवा ॥

अर्थ—जो मनुष्य फार क्षीण झाला आहे व ज्याचे देहांत वातादि दोष फार प्रबल आहेत

त्या मनुष्याचे रक्त एकदांच काढूं नये. पुनः अपराण्हीं, किंवा दुसरे, तिसरे, दिवशीं काढावें; व रक्त काढितेवेळेस जो मूर्छित झाला, त्याचेंही रक्त एकदांच काढूं नये. हळूहळू अपराण्ह काळीं किंवा दुसरे, तिसरे दिवशीं पुनः काढावें.

## रक्तस्रावाचा बहुधा निषेध करतो.

रक्तंसशेषदोषंतुकुर्यादपिविचक्षणः ॥
नचातिनिसृतंकुर्यात्शेषंसंशमनैर्जयेत् ॥

अर्थ—विचक्षण वैद्यानीं पुष्कळ रक्त काढून एकदांच दोष दूर करूंनये. तो दोष थोडा राहिला तथापि औषधादिकानीं जिंकावा.

## रक्त काढण्याची परमावधि.

बलिनोबहुदोषस्यवयस्थस्यशरीरिणः ॥
परंप्रमाणमिच्छंतिप्रस्थंशोणितमोक्षणे ॥

अर्थ—जो मनुष्य बलवंत आहे, व ज्याचे शरीरांत वातादि दोषही बलवत्तर आहेत व प्रौढ वयांत आहे, त्या मनुष्याचे रक्ताचे मोठे परमावधीनें प्रस्थपरिमित काढावें. प्रस्थ ह्म० साडेतेरा पलें जाणावीं.

## रक्त काढण्याचें मान.

वमनेचविरेकेचतथाशोणितमोक्षणे ॥
सार्धत्रयोदशफलंप्रस्थमाहुर्मनीषिणः ॥

अर्थ—वमन व ढाळक व रक्तस्राव याविषयीं साडेतेरा पळांचा प्रस्थ जाणावा.

## कोणत्या रोगास कोणती शिरा काढावी.

तत्रपाददाहपादहर्षअपबाहुकाचिमचिमविसर्प
वातशोणित वातकंटक विचर्चिका पाददारिप्रभृ
तिषुक्षिप्रमर्मोपरिष्टात्द्व्यंगुलेंव्रीहिमुखेनशिरांविध्येत् ॥

अर्थ—पाद दाहादि नव रोग, तत्सदृश अन्यरोग, व तत्संबाधाचे अन्य रोग, यांचे ठाईं क्षिप्रसंज्ञक मर्माचे वरल्ये कडे दोन अंगुळ जागा सोडून, तेथील शिरा व्रीह्यग्र प्रमाण शस्त्रानें वेधावी. श्लीपद रोगाचेठायीं त्याचे चिकित्साप्रकरणीं जाप्रमाणें सांगितलें आहे, त्याप्रमाणें शिरा वेधावी. कोष्टु शीर्ष, खंज, पंगू, इत्यादिक वात वेदनांचें ठायीं, पोटरीचे ठायीं इंद्रमर्माचे खालची शीर वेधावी.

## अपचीवर शिरावेध.

अपच्यामिंद्रबस्तेरधस्तात्द्व्यंगुले ॥

अर्थ—अपची रोगाचेठायीं इंद्रबस्तिमर्माचे अधोभागीं दोन अंगुळ जागांतील शिरा वेधावी, परंतु अपची उत्पन्न होतांच वेधावी.

## गृध्रसीवर शिरावेध.

जानुसंधेरुपर्यधोवाचतुरंगुलेगृध्रस्यां ॥

अर्थ—गृध्रसी नामक वात रोगाचे ठायीं, गुडघ्याचे वरती किंवा खालती चार अंगुल देशामधील शीर वेधावी. जानु मूलाश्रित शीर गलगंडाचे ठायीं वेधावी. येणें करून दुसरा पाय, व हात यांचे शिरांचे वर्णन झालें. कारण हस्ताचे ठायीं ही दाहादि रोग आहेत आणि तशा शिराही आहेत.

## हस्त पादादिकांचे विशेष सांगतो.

### प्लीहावर शिरावेध.

विशेषतस्त्कवाहौकूर्परसंधेरभ्यंतरतोबाहुमध्येप्लीन्हि
कनिष्ठिकानामिकयोर्मध्येवा ॥

अर्थ—पायांपेक्षां हातास विशेष इतका कीं प्लीह संबंधी रोगांचा दमनार्थ कोंपरांचे संधीचे जवळ बाहुमध्याचे ठांईची शिरा अथवा करंगळी आणि अनामिका, या दोहों मधील शीर वेधावी. तशी यकृद्दाल्युदर व कफोदर, कफजन्यक सश्वास, कफावृत्त वायु जन्य कास, आणि श्वास, यांचे ठायीं उजव्या हाताची शीर वेधावी. परंतु यकृद्दाल्युदराचे पूर्वावस्थेमध्यें वेधावी. गयी ह्मणतो कीं, कास, श्वास, अल्प असतां त्यांचा मार्ग मोकळा करायासाठीं मात्र शिरावेध सांगितला. अतिरिक्त झाले असतां करूंनये कारण श्वास कांसा-विषई शिरा वेधाचा निषेध पूर्वी केला आहे यास्तव गृध्रसीचे ठायीं जी शिरा वेधायास सांगीतली, तीच विश्वाचींचे ठांई जाणावी.

## प्रवाहिकेवर शिरावेध.

श्रोणींप्रतिसमंताद्व्यंगुलेप्रवाहिकायांशूलिन्यां ॥

अर्थ—जी रक्तकृत वातशूलाने युक्त व फारदिवसांची प्रवाहिका, तिचा शांत्यर्थ श्रोणचे आसमंतात् भागाची द्व्यंगुल देशामधील शिरा वेधावी. आणि परिकार्तिका, उपदंश, शुक्रदोष, शुक्र व्यापत्, या रोगांचेठायीं शिश्नाचेमध्यें शीर वेधावी.

## मूत्रवृद्धीवर शिरावेध.

वृषणयोःपार्श्वेमूत्रवृध्यां ॥

अर्थ—मूत्रवृद्धी रोग पूर्णदशेप्रत पावला असतां वृषणाचा दोहों बाजूचा शिरा वेधाव्या; आणि नाभीचे अधोभागीं सेवनीचे डाव्ये बाजूवरली शीर वेधावी.

## विद्रधी व पार्श्वशूळ यांवर शिरावेध.

वामपार्श्वेकक्षास्तनयोरंतरेविद्रधौपार्श्वशूलेच

अर्थ—येथें वामपार्श्वेंकरून उभय पार्श्व यांचेठायीं विद्रधि किंवा पार्श्वशूल झाला असतां दोहोंकडल्या कक्षा, आणि स्तन, यांचे मध्यदेशींची शीर वेधावी. उदाहरण, डाव्ये आंगास झालें असतां डावास्तन, आणि डावी खांक, या दोहोंचे मधली शीर वेधावी. याप्रमाणेंच उजवी बाजू जाणावी. कोणी असें ह्मणतात कीं कफोदराचेठाईं हीच शीर वेधावी. परंतु तें मत चांगलें नव्हे; कांकीं पूर्वी यकृद्दाल्युदर व कफोदर यांचेठाईं दक्षिण बाहुसंबंधी शीर वेधायास सांगितली आहे यास्तव.

## बाहुशोष व अपबाहुक यांवर शिरावेध.

बाहुशोषापबाहुकयोरप्येकेवदंत्यंसयोरंतरे ॥

अर्थ—शोणितावृत वातजन्य जे बाहुशोष आणि अपबाहुक, त्यांचे ठायीं अंसाचे मध्यदेशींची शीर वेधावी. एकल्या वायूनें झालेल्यांचे ठाईं वेधूं नये. असें कोणी ह्मणतात; परंतु अपबाहुकाला स्नेहन, स्वेदनादि, उपचारांचा निषेध आहे. सामान्य शिरावेधाचा निषेध नाहीं. बाहु शोषाचे ठायीं एकला वायूच असतो. परंतु अवस्था भेदानें शिरावेध करावा; व जा काळीं उष्णाम्ल लवणादिकानें पित्तकोप होऊन त्याणें वायु आवृत होऊन पीडा देतो; त्या काळीं शिरावेध करावा.

## तृतीयक ज्वरावर शिरावेध.

त्रिकसंधिमध्यगतांतृतीयके

अर्थ—तृतीयक ज्वराचे ठायीं अंसमध्यगत त्रिकसंधि ह्मणजे मानेचा त्रिक त्याची शिरा वेधावी.

## चातुर्थिक ज्वरावर शिरावेध.

अधस्कंधगतामन्यतरपार्श्वस्थितांचतुर्थके

अर्थ—चातुर्थिक ज्वराचे ठायीं स्कंधाचे आंगाची डाव्ये किंवा उजव्ये बाजूची शिरा वेधावी.

## अपस्मारावर शिरावेध.

हनुसंधिगतामपस्मारे

अर्थ—अपस्मार ह्म० फेंपरें या रोगाचे ठायीं हनुसंधि समीपस्थ शीर वेधावी.

## उन्माद रोगांवर शिरावेध.

शंखकेशांतसंधिताभुरोपांगललाटेषुउन्मादे के-

चिदत्रउन्मादेअपस्मारेचेनिपठंति ॥

अर्थ—उन्माद रोगाचे ठायीं शंखगत, केशांत् संधिगत, उरोग, अपांग, आणि ललाट, यांमधील शिरा वेधावी व कोणी अपस्माराचे ठायीं ही ह्या शिरा वेधाव्या, असें ह्मणतात. परंतु वाग्भट्टादि ग्रंथविरोधास्तव हा पाठ चांगला नव्हे.

## जिव्हारोग व दंतव्याधि यांवर.

जिव्हारोगेअधोजिव्हायाःदंतव्याधिषुच

अर्थ—कंटकादि जिव्हारोग, व कृमिदंतादि दंतरोग, यांचे ठायीं जिव्हेचे अधोभागाची शीर वेधावी.

## तालुरोगावर शिरावेध.

तालुनितालव्येषु.

अर्थ—तालुसंबंधि रोगाचे ठायीं तालुसंबंधि शीर वेधावी.

## कर्णशूल व कर्णरोग यांवर शिरावेध.

कर्णयोरुपरिसमंतात्कर्णशूलेतद्रोगेच ॥

अर्थ—कर्णशूल, व इतर कर्णरोग, यांचे ठायीं कर्णाचे वरले आसंतात् भागींची शिरा वेधावी.

## गंधाग्रहणादि नासारोगांवर.

गंधाग्रहणेनासारोगेषुचनासाग्रे

अर्थ—नासिकेचें गंधज्ञान जातें त्या रोगाविषयीं व इतर नासारोगाविषयीं नासाग्रसंबंधि शीर वेधावी. कर्णशूल, आणि गंधाग्रहण, या दोहों रोगांचे कर्णरोग व नासारोग याणीं ग्रहण झालें असतां, त्याचें पृथक् ग्रहण केलें, तें विशेष जाणवावयासाठीं असें जाणावें.

## तिमिर. पाकादि नेत्ररोगांवर शिरावेध.

तिमिरपाकप्रभृतिषुअक्ष्यामयेषु ॥ उपनासिकाललाटस्थाअपांगीवा ॥

अर्थ—तिमिर, व अक्षिपाक, इत्यादि नेत्ररोगांचेठायीं नासिकेजवळची किंवा ललाटस्थ अथवा अपांगस्थ शीर वेधावी, व अधिमंथ प्रभृति शिरो रोगाचे ठायीं ह्याच शिरा वेधाव्या. येथें प्रभृति ग्रहण आहे, यास्तव तेणेंकरून क्षुद्र रोगामध्यें पठित जे अरूंषिकादि शिरोरोग ते घ्यावे.

## दुष्ट शिरावेधाचें लक्षण.

अतऊर्ध्वंदुष्टव्यध्यान्मनुष्यान्व्याख्यास्यामः ॥ तत्रदुर्विद्धाभिविद्धा संकुचितापिचिताकुटिताप्रसृताऽत्युदीर्णांतेविद्धापरिशुष्ककणितापेयिताऽनुत्थिता ॥ अविद्धशस्त्रहतातिर्यग्विद्धाअपविद्धाअव्यध्याविद्रुता धेनुकापुनःपुनर्विद्धाशिरास्नाय्वस्थिसंधिमर्मसुचेतिविंशतिर्दुष्टव्यध्याः

अर्थ—दुर्विद्धा १ अभिविद्धा २ संकुचिता ३ पिचिता ४ कुटिता ५ अप्रसृता ६ अत्युदीर्णा ७ अंतेविद्धा ८ परिशुष्का ९ कणिता १० पेयिता ११ अनुत्थिता १२ अविद्धशस्त्रहता १३ तिर्यग्विद्धा १४ अपविद्धा १५ अव्यध्या १६ विद्रुता १७ धेनुका १८ पुनःपुनर्विद्धा १९ शिरा-

स्नायु अस्थिसंधि मर्मसु विद्धा २० या प्रकारें दुर्विद्ध शिरा वीस प्रकारच्या जाणाव्या. दुर्विद्ध म्ह० जी शीर सूक्ष्म विद्ध झाल्यामुळें फार थोडें रक्त स्रवये, व ठणका आणि सूज असये ती. व जी प्रमाणापेक्षां अधिक वेधली, त्यामुळें रक्त आंत प्रविष्ट होऊन चांगलें स्रवत नाहीं, ती अभिविद्धा, व संकुचिता, ही या प्रकारेंच जाणावी, व बोंधट शस्त्रानें टोंचल्यावर जी शीर दाडळून जाड झाली ती पिचिता जाणावी, व जी शीर चांगली सांपडली नाहीं, त्यामुळें वारंवार अनेक शस्त्रांनीं टोंचून चिवडली, ती कुटिता; व शीत, भय, मूर्छा, इत्यादिक कारणामुळें जी स्रवत नाहीं, ती अप्रस्नुता; व तीक्ष्ण असून महामुख शस्त्रानें विंध झाली ती अत्युदीर्णा; व अल्प रक्त स्रवये ती अंतेविद्धा; व रक्त क्षीण झाल्यानंतर वायूनें पूर्ण होये, ती परिशुष्का; व चोहोंजागीं टोंचली जाये, आणि अल्परक्तस्रवये ती कूणिता; व भलतेच जागीं बांधल्यामुळें कंपयुक्त होये आणि रक्त स्रवत नाहीं ती पेयिता; व जी चांगली फुगल्यावांचून वेधली जाये, तिचे ठाईं ही या प्रकारें रक्त स्रवत नाहीं; ती अनुत्थिता, व जी शस्त्रानें तुटये, आणि अति रक्तस्रवये त्यामुळें अवयवांचे चलनवलनादि व्यापार बंद होतात ती शिरा अविद्धशस्त्रहता; व वांकडें शस्त्र लागल्यामुळें नीट वेधली नाहीं, व कांहीं वेधायाची राहिली ती तिर्यग्विद्धा; व बहुत शतावधी शस्त्रांनीं नीट वेधली जात नाहीं ती अपविद्धा; व जी भलये जागींच टोंचली गेली ती अव्यध्या; व जागजागीं टोंचली गेली ती विद्रुता; व अधीक टोंचल्यामुळें वारंवार स्रवये ती धेनुका; फार सूक्ष्म शस्त्रानें टोंचून रक्तस्रवत नाहीं म्हणून पुन्हा टोंचली अशी जागोजागीं छिद्रें पडलीं ती पुनः पुनर्विद्धा; व स्नायु, अस्थि, शिरा, संधि मर्मांचे ठायीं विद्ध झाली त्यामुळें तो तो अवयव अखुडतो; ती मर्मविद्धा जाणावी.

## शिरावेधाला यत्न फार आहे असें सांगतो.

भवतिचात्रशिरासुशिक्षितोनास्ति ॥ चलाह्येतामत्स्यवत्परिसर्पंति ॥
तस्मात्यत्नेनताडयेत् ॥

अर्थ—शिरांविषयीं अभ्यासेंकरून निपुण असा कोणीही होत नाहीं. कारण त्या स्वभावानें मत्स्यासारिख्या अति चंचळ आहेत, यास्तव यत्नानें वेधाव्या. शस्त्रकर्मामध्यें निपुण वैद्य जो त्यापासून ही कधीं विपर्यास होतो असें सांगतो.

## अयोग्यशस्त्राने वेधलीं असतां विपर्यास होतो हें सांगतो.

अजानतागृहीतेतुशस्त्रेकायनिपातिते ॥
भवंतिव्यापदश्चैताबहवश्चाप्युपद्रवाः ॥

अर्थ—वैद्यानें न जाणतां भलतेंच शस्त्र घेऊन शिरावेधली असतां नानाप्रकारचे उपद्रव व व्याधि होतात.

## इतर उपचारापेक्षां शिरावेधाला आधिक्य सांगतो.

स्नेहादिभिःक्रियायोगैर्नतथालेपनैरपि ॥
यांत्याशुव्याधयः शांतिंयथाशांतिंशिराव्यधात् ॥

**अर्थ**–जसे शिरावेधानें व्याधि लवकर शांत होतात तसे स्नेहन लेपनादि उपचारानें लवकर शांत होत नाहींत.

## शिरावेध चिकित्सेचे अर्धांग आहे.

शिराव्यधचिकित्सार्धंशल्यतंत्रेप्रकीर्तितं ॥
यथाप्रणिहितंसम्यक्बस्तिःकायचिकित्सिते ॥

**अर्थ**–चिकित्सा म्ह० रोगप्रतिक्रिया तीमध्यें शिरावेध प्रधान अंग आहे. जसें कोष्ठ शोधनाविषयीं बस्तिप्रयोग प्रधान आहे, असें शल्यतंत्रांत सांगितलें आहे. स्निग्ध, स्विन्न, वांत, विरिक्त आस्थापित, अनुवासित, व शिराविद्ध, या पुरुषांनीं क्रोध, उपवास, मैथुन व दिवानिद्रा, व अतिभाषण, अध्ययन, व स्थान, आणि आसन, यांची उलटा पालट, व शीत, वात, उष्ण, व विरुद्ध, असात्म्य, अजीर्ण, अशीं अन्नें, इत्यादिक वर्जावीं, शिरावेध विषाण इत्यादि रक्तस्रावाचे उपाय यांचे विषय सांगतो.

## रक्तस्राव करण्यास साधन.

शिराविषाणतुंबैस्तुजलौकाभिःपदैस्तथा ॥
अवगाढंयथापूर्वंनिर्हरेद्दुष्टशोणितमिति ॥

**अर्थ**—दुष्ट झालेलें असून अभ्यंतराश्रित असें रक्त, शिरा, विषाण, तुंबडी, जळवा, किंवा फासण्यां, इत्यादिकानें पूर्वीचा अतिक्रम न करितां काढावें. स्पष्टार्थ फार खोल नसेल तर फासण्यानीं काढावें. अभ्यंतराश्रित, जळवा लाऊन काढावें. व फार खोल असेल तर तुंबड्यानीं व त्याहून ही खोल असेल तें शृंगानीं काढावें, व सर्व शरीरगत असून अवगाढतम म्ह० फार खोल असतें तें शिरावेधून काढावें.

## स्थानभेदानें उपाय विशेष सांगतो.

अवगाढेजलौकास्यात्प्रच्छन्नंपिंडितेहितं ॥
शिरांगव्यापकेरक्तेशृंगालाबुत्वचिस्थितं ॥ १ ॥

**अर्थ**–अभ्यंतराश्रित रक्त दुष्ट झालें असतां जळवा लावाव्या; आणि जमून गांठलें असतां फासण्यानीं काढावें आणि सर्वांग रक्त दुष्ट झालें असतां शिरा वेधून काढावें. त्वक्गत असतां तुंबड्या किंवा वेतोजें लावावीं.

इतिश्रीशारीरनिबंधसंग्रहेअष्टमोध्यायसमाप्तः ॥

## नवमोध्यायः प्रारंभः

## शिरा, धमनी, स्रोतस्, हीं सर्व सारखीं दिसतात भेदें-करून ओळखतां येत नाहींत यास्तव धमनीचें वर्णन करितो.

अथातोधमनीव्याकरणंशारीरंव्याख्यास्यामः ॥

**अर्थ**—धमनीचें वर्णनरूप शारीराध्यायाची व्याख्या करितो.

## धमनी शब्दाची व्युत्पत्ति.

धमनीशब्दव्युत्पत्तिर्ध्मानादनिलपूरणात् ॥

**अर्थ**—वायूनें पूरित असून ज्यांला स्फुरण असतें त्यांला धमनी ह्मणतात.

## धमनींची संख्या सांगतो.

चतुर्विंशतिधमन्योनाभिप्रभवावाभिहिताः

**अर्थ**—नाभी पासून चोवीस धमनी उत्पन्न झाल्या असें शोणित वर्णन प्रकरणीं सांगितलें.

## शिराधमनीस्त्रोतसांला ऐक्य सांगतो.

शिराधमनीस्रोतसामविभागःशिराविकाराएवधमन्यःस्रोतांसिच.

**अर्थ**—कोणी ह्मणतात शिरा, धमनी, स्रोतस् हीं भिन्न नाहींत तर कर्म भेदें करून नांवें मात्र पृथक् आहेत.

## शिरादिकांचे भेद सांगतो.

शरणात्शिरास्ताएवध्मानात्धमन्यःस्रवणात्स्रोतांसि ॥

**अर्थ**—शरणात् ह्म० सर्वरस शरीरांत जाग जागीं नेऊन शरीराला पोषितात यास्तव शिरा नाम पावतात; त्यांमधून कांहीं वायूनें पूर्ण होऊन स्फुरण युक्त असतात; त्या धमनी नाम पावतात; व कांहीं प्रकारचा शिरा, मळ मूत्रादिकांला स्रवतात यास्तव स्रोतस् म्हणतात.

## आणखीं मत सांगतो.

आकाशियावकाशानांदेहेनामानिदेहिनां ॥ शिरःस्रोतांसिभागाः
खंधमन्योनाड्यआशयाइत्यादि ॥

**अर्थ**—देहधारण करणारे जे त्यांचे देहाचे ठायीं, आकाश संबंधी जे अवकाश आहेत, त्यांलाच शिरा, धमनी, स्रोतस्, आशय, इत्यादि, नामें होतात.

## ह्या मताचें खंडन करितो.

तन्नुनसम्यक्अन्याएवधमन्यःस्रोतांसिचशिराभ्यःकस्मात्व्यंजनान्य
त्वात्मूलजानियमात् ॥ कर्मवैशेष्यात्आगमाच्च ॥

**अर्थ**—शिरांहून धमनी, स्रोतस्, हीं निराळींच आहेत. कारण यांचे पृथक् पण यीं चार हेतु आहेत. ते कोणते तर, व्यंजनान्यत्वात् ह्म० यांचीं लक्षणें व वर्ण नील, [illegible]ण, शुक्ल, रोहित, इत्यादिक आहेत; आणि शब्दादि वह धमन्याचा तर वर्ण सांगितलाच [illegible]हीं. यास्तव त्याचें स्वधातुसमवर्णत्वं लक्षणं ह्म० धमन्या ज्या ज्या धातूला वाहवितात त्या-[illegible]चा वर्णासारिखा वर्ण धमन्यांचा जाणावा. याप्रकारें स्रोतसांचें हीं लक्षण जाणावें.

## स्वधातु समवर्णत्व सांगतो.

स्वधातुसमवर्णानिवृत्तस्थूलान्यणूनिच ॥
स्रोतांसिदीर्घाण्याकृत्याइत्यादिकं ॥

अर्थ—स्रोतस् जाजा धातूंला वाहवितात त्याच्या धातूं सारिखा त्यांचा वर्ण जाणावा. व स्रोतस् आकृतीनें वाटोळीं, व कांहीं जाडीं, कांहीं बारीक, लांब, लांब, अशीं असतात. या प्रकारें शिरा व धमन्या यांचा भेद जाणावा.

## मूलनियम सांगतो.

मूलजान्नियमात् ॥ तासांमूलशिराश्चतुश्चत्वारिंशत्इत्यारभ्ययावत्
तानिसप्तशिराशतानिभवंति ॥ धमनीनांचतुर्विंशतिर्धमन्यः
स्रोतसांपुनर्द्वाविंशतिः ॥

अर्थ—मूळ शिरा ४४ त्यापासून ७०० शिरा निघतात व मूल भूत धमनी २४ व स्रोतस् २२ याप्रकारें मूलभूत शिरा, धमनी, स्रोतस् यांचा, भेद जाणावा.

## कर्मभेदसांगतो.

शिराणांकर्मवैशेष्यंधमनीनांशब्दरूपरसगंधवह
त्वादिकंप्राणान्नरसशोणितमांसवहत्वादिकंस्रोतसां ॥

अर्थ—शिरांचें कर्म अति घातादिक, धमनींचें कर्म शब्दादि वहत्वादिक, व स्रोतसांचें कर्म, प्राण, अन्नरस, शोणित, मांस, भेद, यांचें वहन रूप जाणावें. याप्रकारें कर्म भेदरूप ततिग हेतु जाणावा.

## आगमरूप चतुर्थहेतु सांगतात.

आगमोत्रायुर्वेदः ॥ तद्यथाशिराधमन्योयोगवहानिस्रोतांसीति ॥

अर्थ—आयुर्वेदांमध्यें शिरा, स्रोतस्, धमनी, असा पृथक् निर्देश केला आहे. तसेंच मर्म शिरा, स्नायु, संध्यस्थि, धमनी, परिहरन् इत्यादि वाक्यामध्यें शिरांहून धमनी निर्देश पृथक् केला आहे. यावरून स्पष्ट होतें कीं शिरादि पृथक् पृथक् आहेत.

## अतां शिरास्रोतसादि परस्पर भिन्नआहेत, तथापि त्यांचीं कर्मैं अविभक्त सारिखीं दिसतात, असेंसांगतो.

केवलंतुपरस्परसन्निकर्षात्सदृशागकर्मकत्वात्सौक्ष्म्याच्च ॥
विभक्तकर्मणामपिअविभागइवकर्मसुभवति अतिसंनिकृष्ट
त्वादिहेतुचतुष्टयेनकर्मसुअपृथक्त्वमिवभवति ॥

अर्थ—शिरा, धमनी, स्रोतस्, हीं परस्पर अति संयुक्त आहेत. व सर्वांचा आगम, आणि

कर्मे, ही समान आहेत, व सर्व अति सूक्ष्म आहेत, यास्तव कर्मे करून विभक्त असतांही कर्मा-चे ठायीं अविभक्तासारिखीं होतात. या विषयीं दृष्टांत. पांच सात प्रकारचे पदार्थ एकत्र करून पेटविले असता सर्वांची ज्वलनक्रिया वस्तुतः भिन्न असतांही एक अशीच दिसते. तसें जाणावें. दुसरा हेतु सांगतात. सदृशागमकत्वात् ह्म० शिरादिकांचें अन्नवाक्यं आकाशी यावकाशानां, इत्यादि तें सर्वांचें समान आहे. तिसरा हेतु सांगतात, सदृशकर्मकत्वात् ह्म० शिरा, धमनी, स्रोतस्, यांचें रसादिवहनरूप कर्म समान आहे; व ह्या अतिसूक्ष्म आहेत; चौहों हेतूस्तव शिरादिकर्माविषयीं एकसारख्या दिसतात.

## नाड्यादिकांची गति सांगतो.

तासांखलुनाभिप्रभवानांधमनीनामूर्ध्वगादशदशचाधोगामिन्यश्चतस्त्रस्तिर्यगाः ॥

अर्थ—नाभीपासून उत्पन्न झाल्या ज्या २४ धमनी त्यांमधून. ऊर्ध्वभागीं १० जातात; व, अ-धोभागीं १० व आडव्या तिडव्या जाणाऱ्या४ एकूण २४ जाणाऱ्या.

## नाडीचीं कर्मे सांगतात.

उर्ध्वगाःशब्दरूपरसगंधप्रश्वासोछ्वासजृंभितक्षुतहसितकथितरुदिता-
दीन्विशेषानभिवहंत्यःशरीरंधारयंति ॥

अर्थ—उर्ध्वगतधमनी शब्दादिक्रियाविशेषातें वाहात होत्साया शरीराचें धारण करितात. प्रश्वासोछ्वास ह्म० वायु घेणें व सोडणें. स्वप्रकृत् धमनीचा धर्म, रोदनादिक अश्रुवाहिन्यांचें कर्म, आदिशब्दानें रूपादिवाहिनी संबंधि प्रेक्षणादिकर्माचें ग्रहण जाणावें.

## धमनींचें कार्य सांगतो.

तास्तुहृदयमभिपन्नास्त्रिधाजायंते

अर्थ—उर्ध्वगतधमनी नाभीपासून हृदयाप्रत येऊन तीन प्रकारच्या होतात. त्यामध्यें दोहों धमनीं करून भाषण, दोहोंनीं घोषण, दोहोंनीं निद्रा, दोहोंनी जागृति, व दोन अश्रुवाहिन्या, व दोन स्तनाश्रित होत्साया स्त्रियांचे स्तन्य वाहवितात, व त्याच स्तनाश्रित होत्साया पुरुषाचें शुक्र वाहवितात, याप्रकारें उर्ध्वगत धमनी तीन प्रकारचा ३० विभाग सांगितल्या. ह्या उदर, पार्श्व, पृष्ठ, उर, स्कंध, ग्रीवा, बाहू, यांतें धारण करितात; व शब्द, घोष, निद्रा, प्रबोध, यांला प्रत्येकीं दोन दोन धमन्या वाहतात. अशा ह्या आठ धमनींनीं आत्मा शब्दादिकाचें ग्रहण करितो. परंतु मन परिमाणुरूप आहे, यास्तव एककालीं त्या धमनीचे ठायीं प्रवृत्त होत नाहींत तर त्यांमधून जी धमनी मनासहवर्तमान युक्त होते, तिचा योगेंकरून शब्दादिकांचें ग्रहण होतें. एककालींच सर्व शब्दस्पर्शादिकांला सर्व धमनीकरून घेत नाहींत. स्पर्शादिक तिर्यगत धमनींचें कर्म असें याच अध्याया मध्यें पुढें सांगेल. भाषण ह्म० ताल्वादिस्थान व्यापार निष्पादित अकारादिवर्णयुक्तशब्द, आणि घोष ह्म० एतद्विपरीत अव्यक्तशब्द व द्वाभ्यांस्वपिति ह्म० तमोयुक्त दोन धमनींनीं निद्रा घेतो. सत्वयुक्त दोन धमनींनीं जागृत होतो; व ऊर्ध्वगत धमनीं उदरादिकाचें धारण करितात. असें जाणावें

## अधोगत धमनींचे कार्य सांगतो.

ऊर्ध्वंगमास्तुकुर्वंतिकर्माण्येतानिसर्वशः ॥
अधोगमास्तुवक्ष्यामिकर्मचासांयथायथं ॥

अर्थ—ऊर्ध्वभागीं जाणाऱ्या धमनीं शब्दादिग्रहणादिक सर्वकर्मे करतात; आणि अधोभागीं जाणाऱ्या धमनी वात, मूत्र, मळ, शुक्र, आर्तव, इत्यादिकांला अधोभागीं वाहाववितात; व त्या धमनी पित्ताशयाप्रत प्राप्त होऊन तेथील अन्न, पान, संबंधी रस, जठराग्नीचे ऊष्म्यानें पक्क झाला, त्याची यथास्थित योजनाकरून जितुका पक्क झाला तितुक्यातें जेथील तेथें पोंचवून सर्व शरीराला पोषितात.

## अधोगत धमनींनीं ऊर्ध्व शरीरपोषण कसें होईल तें सांगतो.

ऊर्ध्वंगानांरसस्थानंचाभिपूरयंतिमूत्रपुरीषस्वेदांश्चविवेचयंति ॥

अर्थ—अधोगतधमनी ऊर्ध्वदेशगत धमनींचें रसस्थान पूर्ण करितात. स्पष्टार्थ त्या धमनी आमाशय व पक्काशय यांप्रत जाऊन अन्नरसाला वर्तुलीकृत करून रसस्थान पूर्ण करितात; आणि ऊर्ध्वगामिनी धमनीं तेथील रस जाग जागीं नेऊन सर्व शरीर तृप्त करितात. यास्तव अधोगत धमनींच सर्व शरीर पोशितात असें फलित होतें; व आम, पक्काशयामध्यें, अधोगत धमनी विपक्क झालेल्या अन्नापासून मूत्र, पुरीष, इत्यादिकांला पृथक् करितात; व त्या जागीं त्रिप्रकार होतात. यास्तव ३० धमनी जाणाव्या.

## अधोगत ३० धमनीचीं कर्में सांगतो.

तासांवातपित्तकफशोणितरसान्द्वेद्वेवहतस्तादशद्वेअन्नवाहिन्यौअंत्रा-
श्रितेतोयवहेद्वेमूत्रबस्तिमभिप्रपन्नमूत्रवहेद्वेशुक्रप्रादुर्भावायद्वेविसर्गायद्वेतेएव
रक्तमभिवहतोविसृजतश्चनारीणामार्तवसंज्ञेद्वेवर्चोनिरासि-
न्यौस्थूलांत्रप्रतिबद्धे ॥

अर्थ—त्यामधून वात, पित्त, रस, रक्त, यांतें वाहाणाऱ्या प्रत्येकीं दोन दोन सर्व मिळून १० व अंत्राश्रित असून अन्नवाहाणाऱ्या २, व उदकवाहिनी २, व मूत्राश्रित मूत्र वाहाणाऱ्या २, व शुक्र उत्पन्न करणाऱ्या २, व शुक्राचा विसर्ग करणाऱ्या २, त्याच स्त्रियांचें आर्तवसंज्ञक रक्त वाहाणाऱ्या २, व विसर्ग करणाऱ्या जाणाव्या, व २ स्थूलांत्राशीं बांधलेल्या असून पुरीष वाहवितात, व दुसऱ्या आठ आहेत, त्या तिर्यग्गत धमनीचा मुखांप्रत स्वेद नेऊन त्यांस तृप्त करितात. याप्रकारें अधोगत धमनींस विभाग सांगितला. त्या नाभीचे अधोभागी पदार्थ, पक्काशय, कटि, मूत्र, पुरीष, गुद, बस्ति, शिश्न, मांड्या, यांचें चांगलें धारण करितात; व वातादिकाला वाहाणें यांचें सामान्य कर्म जाणावें.

## तिर्यक् धमनी सांगतो.

अधोगमास्तुकुर्वंतिकर्माण्येतानिसर्वशः ॥

तिर्यगाःसंप्रवक्ष्यामिकर्मचासांयथायथं ॥

**अर्थ**—नाभीचे अधोभागीं जाणाऱ्या धमनीं पूर्वोक्तप्रकारें कर्म करितात. व तिर्यग्गत धमनींचें कर्म जसें जसें आहे तसें तसें सांगतो.

## तिर्यक् धमनींचें कर्म सांगतो.

तिर्यगानांचतसॄणांधमनीनामेकैकाशतधासहस्रधाचोत्तरोत्तरंविभज्यंते तास्त्वसंख्येयास्ताभिरिदंशरीरंगवाक्षितंविबद्धंमाततंचतासांतुमुखानि रोमकूपप्रतिबद्धानियैःस्वेदमाभिवहंति ॥ रसंचाभिसंतर्पयंत्यंतर्बहिश्चतैरे वाभ्यंगपरिषेकावगाहालेपनवीर्याणिअंतःशरीरमभिप्रतिपद्यत्वचिवि पक्कानितैरेवस्पर्शंसुखमसुखंवागृण्हीते ॥

**अर्थ**—बेंबीपासून शरीरांत वांकड्यातिकड्या जाणाऱ्या अशा चार धमनीं आहेत. त्या एक एक शतधा, सहस्त्रधा, अशा उत्तरोत्तर विभाग पावून असंख्य झाल्या. त्यांणीं हें शरीर सर्व व्यापून जालाकार केलें आहे. व त्या धमन्यांचीं मुखें रोमकूपाशीं बांधलेलीं आहेत. त्यांणी स्वेद वाहातात; व त्या मुखेंकरून सर्व शरीरांत आंत, बाहेर, त्वचादिकांप्रत, रस नेतात. व तीहींकरून अभ्यंग, परिषेक, व जलादिकांचे ठायीं मज्जन, व लेपन, इत्यादिकांचें वीर्य शरीरांत पोंचवितात; व मनोनुगता त्या धमनी जा तीहींकरून त्वचेचे ठायीं सुख, दुःख, स्पर्श, आत्मा अनुभवितो याप्रकारें तिर्यग्गत चार धमनी सर्वांगगत विभागपूर्वक सांगितल्या आतां शब्दादिकांचा ग्राहिणी, आणि सर्ग स्थिति प्रलय यांचे ठायीं प्रकृतीभूत अशा धमनी ज्या त्यांची प्रक्रिया सांगतो.

## शब्दादिग्राहिणी व सर्गादिकारक धमनी यांची क्रिया सांगतो.

पंचाभिभूतास्त्वथपंचकृत्वःपंचेंद्रियंपंचसुभावयित्वा ॥ पंचत्वमायांतिविनाशकाले ॥ पंचाभिभूताःपंचेंद्रियंपंचकृत्वःपंचसुभावयंतिच परंविनाशकालेपंचत्वंआयांति· किंकृत्वा पंचेंद्रियंपंचसुभावयित्वा असा अन्वय जाणावा.

**अर्थ**—पंचभूतानी व्याप्त, अथवा शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधानीं व्याप्त अशा धमनी, त्या पंचेंद्रियं ह्म० कर्मपुरूष जो त्यातें पंचधाकृत्वा ह्म० पंचधाकरून पंचेंद्रियांचे ठायीं भावयंति ह्म० योजितात विनाशकाल प्राप्त झाला असतां श्रोत्रादि इंद्रियपंचकाला पृथक् पृथक् आकाशादि पंचमहाभूतांचें ठायीं योजून आपण विनाश पावतात.

## अन्य आचार्य मत सांगतो.

पंचादिभूतान्यथपंचकृत्वइतिपठंतिव्याख्यानयंतिच

**अर्थ**—अन्य आचार्य पंचादिभूतानि असें पढतात; आणि त्याचें व्याख्यान करितात.

कीं आकाशादि पंच महाभूतें कर्मपुरुषाला श्रोत्रादि इंद्रियाधिष्ठानाचे ठायीं योजून आपण विनाशकाल प्राप्त झाला असतां पंचत्व पावतात.

## स्रोतस् सांगतो.

अतऊर्ध्वंस्रोतसांमूलविधिलक्षणंउपदेक्ष्यामः

**अर्थ**—धमन्यांचें सविस्तर वर्णनानंतर स्रोतसांचें मूळ विधिलक्षण सांगतो.

तानितुप्राणान्नोदकरक्तमांसमेदोमूत्रपुरीषशुक्रार्तववहानिये-
ष्वधिकारः ॥

**अर्थ**—ज्यांचें मूलविधिलक्षण सांगायाविषयीं अधिकार तीं स्रोतस् प्राण, अन्न, उदक, रस, रक्त, मांस, मेद, मूत्र, पुरीष, शुक्र, आर्तव, यांतें वाहातात. हें स्रोतसांचें मूलविधिलक्षण जाणावें.

## स्वरूप सांगतो.

स्वधातुसमवर्णानिवृत्तस्थूलान्यणूनिस्रोतांसिदीर्घाण्याकृत्याप्रतान
सदृशानिचेति ॥

**अर्थ**— स्रोतस जाजा धातूंला वाहावितात त्यात्या धातूं सारिखा स्रोतसांचा वर्ण जाणावा; स्रोतस् वाटोळीं, जाडीं, लांब लांब, व कांहीं बारिक, अशीं असून सर्व शरीरांत कमल तंतु-मंडला सारिखीं पसरलेलीं आहेत व प्राणादि आर्तवांत एकादश पदार्थ जे त्यांला वाहाणारीं स्रोतस् प्रत्येकीं दोन दोन आहेत; व अस्थि, मज्जादि, स्रोतस् जरीं आहेत, तथापि त्याविषयीं हा अधिकार नाहीं कारण अस्थिवह सर्वस्रोतसांचें मेद मूल, आणि मज्जावहांचें सर्व अस्थिमूल, तें सर्व शरीरगत आहे यास्तव त्यांचा विधि लक्षण हे साध्यासाध्यादि ज्ञानाविषयीं नियामक नव्हत तसें स्वेदवहस्रोतसांचे मेद मूल यास्तव शल्यतंत्राचें ठायीं त्यांचा विधि, लक्षण, अधिकार केला नाहीं. हाच अर्थ मनांत घेऊन येष्वधिकारः असें आचार्य बोलले. चिकित्सेविषयीं स्रोतोदुष्टलक्षण असें बोलावें. तात्पर्य चिकित्सेविषयीं सर्व शरीरगत स्रोतसांचा अधिकार आणि शल्यतंत्रांत नियत देशस्थित स्रोतस् विद्ध झालीं असतां वेदनाविशेष व साध्यासाध्य ज्ञानविषयीं नियामक अधिकार आहे, व देहचिकित्साधिकार सर्व शरीरगतत्वें करून साध्यादि ज्ञाननियामक होतो. यास्तव अस्थिमज्जादिवहस्रोतसांचा अधिकार नाहीं असें उक्तग्रंथाचें तात्पर्य जाणावें.

## अन्यमत सांगतो.

एकेषांबहूनि.

**अर्थ**—एक आचार्यांचा मतें स्रोतस् बहूत आहेत. परंतु त्यांचा अधिकार येथें नाहीं.

## स्रोतसांचे भेद सांगतो.

एतेषांविशेषाबहवः ॥

**अर्थ**—स्वतंत्रोक्त प्राणादिवह २२ स्रोतस् जीं त्यांचे अनेक भेद आहेत.

## प्राणवह स्रोतसांचें मूळ सांगतो.

तत्रप्राणवहेद्वेतयोर्मूलंहृदयरसवाहिन्यश्चधमन्यः तत्रविद्धस्यक्रोशनंविनमनंभ्रमणंवेपनंनिःसरणंवाभवति ॥

अर्थ–पूर्वोक्त प्रकरणीं प्राणवह स्रोतस् दोन सांगितलीं त्यांचें मूळ हृदय, आणि रसवाहिनी धमनीं जाणाव्या. त्या मुळास वेध झाला असतां आर्तस्वरयुक्त रोदन, वक्रता, भ्रमण, कंप, इत्यादि उपद्रव होतात.

## अन्नवह स्रोतसांचें मूळ सांगतो.

अन्नवहेद्वेतयोर्मूलमन्नाशयोन्नवाहिन्यश्चधमन्यः तत्रविद्धस्याध्मानंशूलान्नद्वेषोमरणंच ॥

अर्थ–अन्नवहस्रोतस् दोन त्यांचे मूळ अन्नाशय व अन्नवाहिनी धमन्या, त्यांचे मुळास वेध झाला असतां आध्मान होतें; व शूल, अन्नद्वेष, होतो व मरण हीं कधीं येतें.

## उदकवह स्रोतसांचें मूळ सांगतो.

उदकवहेद्वेतयोर्मूलंतालुक्लोमच ॥ तत्रविद्धस्यपिपासाश्यावास्यतामरणंच ॥

अर्थ–उदकवह स्रोतस् दोन त्यांचें मूळ तालु, व पिपासास्थान, त्यांस वेध झाला असतां पिपासा, मुखावर कालिमा येऊन मरण येतें.

## रसवह स्रोतसांचें मूळ सांगतो.

रसवहेद्वेतयोर्मूलंहृदयंरसवाहिन्यश्चधमन्यः तत्रविद्धस्यशोषःप्राणवहविद्धवच्चमरणंतत्रहविद्धवल्लिंगानिच.

अर्थ–रसवहस्रोतस् २ त्यांचें मूळ हृदय, व रसवाहिनीं धमन्या, त्यांस वेध झाला असतां शरीर शोष; व प्राणवह स्रोतस् विंध झालीं असतां जीं लक्षणें होतात तीं लक्षणें रसवह धमनीं-विंधझालीं असतां होतात.

## रक्तवह स्रोतसांचें मूळ सांगतो.

रक्तवहेद्वेतयोर्मूलंयकृत्प्लीहानौरक्तवाहिन्यश्चधमन्यः तत्रविद्धस्यश्यावांगताज्वरदाहपांडुताशोणितागमनंच ॥

अर्थ–रक्तवह स्रोतस् २ त्यांचें मूळ, यकृत्, प्लीहा, आणि रक्तवाहिनी धमन्या, त्यांस वेध झाला असतां, आंगावर कालिमा येतो, व ज्वर, दाह, पांडुरपणा, व ऊर्ध्वाधरमार्गानें रक्तस्राव, व नेत्रांस आरक्तपणा, इत्यादि उपद्रव होतात.

## मांसवह स्रोतसांचें मूळ सांगतो.

मांसवहेद्वेतयोर्मूलंस्नायुत्वचेरक्तवाहिन्यश्चधमन्यः तत्रविद्धस्यश्वयथु

मांसशोषःशिराग्रंथयोमरणंच ॥

अर्थ—मांसवहस्रोतस् २ त्यांचें मूळ स्नायु, व त्वगादिक रसरक्तवह धमन्या, त्यांस वेध झाला असतां, सूज येत्ये, व मांसशोष होतो, व शिरा गांठळ गांठळ होतात, व मरणही येतें, येथें त्वक्शब्दानें तदाश्रित रस घेतात.

## मेदोवह स्रोतसांचें मूळ सांगतो.

मेदोवहेद्वेतयोर्मूलंकटिवृक्कौतत्रविद्धस्यस्वेदागमनं

स्निग्धांगतातालुशोषस्थूलशोफतापिपासाच.

अर्थ—मेदोवह स्रोतस् २ त्यांचें मूळ कटि, व वृक्क, त्यांस वेध झाला असतां, घर्म फार सुटतो. आंग स्निग्ध होतें, व तालु शुष्क होत्ये, स्थूलता, व आंगास फुगवटी येत्ये, व ताहान लागत्ये

## मूत्रवह स्रोतसांचें मूळ सांगतो.

मूत्रवहेद्वेतयोर्मूलंबस्तिर्मेढ्रं ॥ तत्रविद्धस्यानद्धबस्ति

तामूत्रनिरोधस्तब्धमेढ्रताच ॥

अर्थ—मूत्र वहस्रोतस् २ त्यांचें मूळ बस्ति, व शिश्न, त्यांस आघात झाला असतां मूत्राशय ताणल्या सारिखा होतो, व मूत्र निरोध होतो, शिश्न ताठतें.

## पुरीषवह स्रोतसांचें मूळ सांगतो.

पुरीषवहेद्वेतयोर्मूलंपक्वाशयोगुदंचतत्रविद्धस्याना

होदुर्गंधोग्रंथितांत्रताच

अर्थ—पुरीषवह स्रोतस् २ त्यांचें मूळ पक्वाशय, व गुद, त्यांस आघात झाला असतां आनाह म्हणून वातरोग आहे तो होतो, व दुर्गंध येतो, आंतडीं गांठळतात.

## शुक्रवह स्रोतसांचें मूळ सांगतो.

शुक्रवहेद्वेतयोर्मूलंस्तनवृषणौचतत्रविद्धस्यक्लीबताचिरात्प्र

सेकोरक्तशुक्रताच ॥

अर्थ—शुक्रवह स्रोतस् २ त्यांचें मूळ, स्तन, आणि वृषण, त्यांस आघात झाला असतां, षंढत्व येतें, अथवा चिरकाळें करून वीर्याचा स्रावहोतो, व शुक्र आरक्तवर्ण होतें.

## आर्तववह स्रोतसांचें मूळ सांगतो.

आर्तववहेद्वेतयोर्मूलंगर्भाशयोआर्तववहधमन्यश्चतत्रवि

द्धायावंध्यात्वंमैथुनासहिष्णुत्वमार्तवनाशश्च

अर्थ—आर्तववह स्रोतस् २ त्यांचें मूळ, गर्भाशय, आणि आर्तववह धमन्या, त्यांस वेध झाला असतां वंध्यात्व येतें, व मैथुन साहावत नाहीं, व आर्तवाचा नाश होतो, व शुक्रवह स्रोतसांचें अव-

लघी सेवनी विध झाली असतां तिचें लक्षण, अश्मरी, चिकित्सित बस्तिप्रसंगानें सांगितलें. आतां चिकित्सासूत्र सांगतो.

## चिकित्सा सांगतो.

स्रोतोविद्धंतुप्रत्याख्यायोपाचरेदिति.

**अर्थ**-उक्तस्रोतसांचे ठाईं विध झाला असतां, असाध्यत्व सांगून शल्योध्धरण प्रकारानें चिकित्सा करावी.

## उध्धृत शल्य चिकित्सा.

उध्धृतशल्यंतुक्षतविधानेनोपचरेदिति.

**अर्थ**-शल्य काढलेल्या पुरुषाचा क्षतविधानें करून चिकित्सा करावी.

## स्रोतोलक्षण सांगतो.

मूलात्खादंतरंदेहेप्रसृतत्वाभिवाहियत् ॥
स्रोतस्तदितिविज्ञेयंशिराधमनिवर्जितं ॥

**अर्थ**-मूलात् खात् ह्मणजे हृदयछिद्रापासून जें अंतर छिद्र प्रवहन शील आहे. तें स्रोतस् जाणावें. परंतु धमनी, आणि शिरा, यावांचून.

॥ इतिशारीरनिर्बंधसंग्रहेनवमोध्यायः ॥

## गर्भिणी शारीर सांगतो.

**अर्थ**—धमनी व्याख्यानानंतर शुक्रार्तव स्रोतसांचें वर्णन झालें. आतां शुक्रार्तव मूलक पूर्वी वर्णिल्या गर्भाची आश्रयभूत गर्भिणी तिचें वर्णन करण्यास युक्त यास्तव तें करतो.

अथातोगर्भिणीव्याकरणंशारीरंव्याख्यास्यामः ॥

**अर्थ**-यानंतर गर्भिणीचें वर्णन ज्यांचे ठायीं आहे, अशा शारीराध्यायाची व्याख्या करतो.

## गर्भिणीचे नियम सांगतो.

गर्भिणीप्रथमदिवसात्प्रभृतिनित्यंप्रहृष्टाशुचिरलंकृताशु-
क्लवसनाशांतिमंगलदेवताब्राह्मणगुरुपराभवेत् ॥
मलिनविकृतहीनगात्राणिनस्पृशेत्उद्वेजनीयाश्चकथाः ॥
शुष्कंपर्युषितंकुथितंक्लिन्नंचान्नंनोपभुंजीतबहिर्निष्क्रमणं
शून्यागारचैत्यश्मशानवृक्षाश्रयान्क्रोधभयसंस्कारांश्च
भावानुच्चैर्भाष्यादिकंचपरिहरेत् ॥

**अर्थ**-गर्भिणीनें गर्भधारण दिवसा पासून सर्वकाल आनंदयुक्त असावें, व भर्त्यानें तिला प्रिय पदार्थ देऊन संतुष्ट राखावी, व तिनें सर्वकाळ पवित्र असून अलंकार धारण, श्वेतवस्त्र परिधान, करावें. शांति मंगलदेवता, ब्राह्मण, गुरु, यांचें ठायीं प्रीति धरावी. मलिन, विकृत, हीनगात्र, यां-

स स्पर्श करूंनये; व शुष्क, मलिन, शिळें, भिजलेलें, आंबलेलें, अन्न भक्षूनये; व बाहेर फार जाऊंनये, व ओसाड गृह, व ज्या वृक्षावर किंवा खालती देव असतो तो वृक्ष, अथवा बौद्धालय, व श्मशानवृक्ष, यांचा आश्रय करूंनये; व क्रोध येईल असें कर्म करूंनये, व मोठ्यानें भाषण करूंनये, व जे गर्भपात हेतु गर्भावक्रांतीचे ठायीं सांगितलेलें ग्राम्य धर्म. वाहानादिक ते वर्जावे; व नित्य तैलाभ्यंगादिक सेवूंनये, व शरीरास आयास होईल असें कर्म करूंनये, व ऋतुमतीला निषिद्ध जे दिवास्वापादिक ते वर्जावे.

शयनासनसमृद्वास्तरणंनात्युच्चमपाश्रयोपेतमसंबाधंच
विदध्यात् ॥ हृद्यंद्रवंमधुरप्रायंस्निग्धंदीपनीयसंस्कृतं
चभोजनंभोजयेत् ॥

अर्थ—गर्भिणीला शयन, व आसन, हीं जावर मऊ गादी व फार उंच नव्हे व सरपोससहित असावी. प्रिय, द्रव, मधुरप्राय, स्निग्ध, आणि दीपनीय द्रव्यें, यांणीं संस्कृत केलेलीं भोजनें द्यावीं. बाहेर फार हिंडुनये, येणें करून शरीर नियम, व क्रोधादिक सोडावे, येणेंकरून मनाचे क्रियांचा नियम, व उच्चस्वरें करून भाषण, करूंनये. येणें करून वाङ्नियम केला, असें जाणावें.

## गर्भिणीला अन्न सांगतो.

गर्भिणींप्रथमद्वितीयमासेषुषष्टिकांपयसाभोजयेत् ॥

अर्थ—गर्भिणीला पहिल्ये व दुसरें महिन्यांत साठादिवसांत पक्व होणारें धान्यांचे पयोमिश्रित भोजन फार द्यावें.

## अन्यमत सांगतो.

चतुर्थेदध्नापंचमेपयसाषष्ठेसर्पिषेत्येके ॥

अर्थ—कोणी ह्मणतात चवथे महिन्यांत दधिमिश्रित, पांचवे महिन्यांत दुधमिश्रित, सांहावें तूपमिश्रित, षाष्टिकेचे भोजन द्यावें.

## स्वमत सांगतो.

चतुर्थेपयोनवनीतसंस्टष्टमाहारयेत ॥

अर्थ—चवथ्ये महिन्यांत, दूध, व लोणी एतन्मिश्रित व घोरपड आदि करून आरण्यस्थ श्वापदाचें मांस सहित भोजन द्यावें. पांचवे महिन्यांत दूध, आणि तूप, मिश्रित भोजन द्यावें साहाव्ये महिन्यांत, गोखरूनीं सिद्ध घृताची मात्रा, यवागू सहित द्यावी. सातवे महिन्यांत भुइकोहळें करून सिद्ध केलेलें तूप पाजावें. आठव्ये महिन्यांत. चिकणा, व पांढरा फुलाचा चिकणा, बडीशोप, व मांस, दूध दहीं, पेज, मदनफळ, मध, तूप, इहीं करून मिश्रित. दनोदकानीं निरुह बस्ति द्यावा. तेणें करून. पुराण पुरीषाची शुद्धि, व वायूची अनुलोमगति, होये. अनंतर दूध, मधुर यांचा कषायें करून सिद्ध केलेलें तैलानीं अनुवासन बस्ति, द्यावा. तेणें करून वायुची अनुलोमगति होये तेणें करून सुखानीं बाळंत होये. आणि उ-

पद्रव होत नाहीत. आठव्ये महिन्या नंतर प्रसव कालपर्यंत स्निग्धादिकें करून व यवागू-जांगलरस, इहींकरून उपचार करावे. या प्रकारें उपचार केलें असतां गर्भिणी. स्निग्ध, व बलवती, असून सुखेंकरून उपद्रव रहित प्रसूत होये. नवव्ये महिन्यांत चांगला दिवस पाहून तिला सूतिकागृहांत प्रवेश करवावा. सूतीकागृहाचे भूमिप्रदेश. ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य, शूद्र, या भेदें करून पांढरे, तांबडे, पिवळे, काळे, असे चहों प्रकारचे असावे. सूतीकागृहांत बाळंतिणीची बाज ब्राह्मणादिक्रमेंकरून बिल्व, वड, टेंटू, वेहळा, यांचे काष्ठानीं सर्वावयव निर्मित असावी. सूतीकागृहाच्या भिंती चांगल्या सारवाव्या. व त्यास्थलीं चांगले पडदे लावून निराळ्या मर्यादा कराव्या; व तें गृह प्राग्द्वार, दक्षिणद्वार, युक्त आठहात लांबी, व चारहात रुंदीचें असावें, रक्षा, व तोरणें, बांधलेलें असें करावें.

## आसन्नप्रसवालक्षण.

जातेहिशिथिलेकुक्षौमुक्तेहृदयबंधने ॥
सशूलेजघनेजातेज्ञेयासानुप्रजायिनी ॥

**अर्थ**—जीची कुक्षि शिथिल, आणि हृदयबंधन मुक्त झालें, व नाभीचे खालचा योनीचे जवळचा भाग शूल युक्त झाला, असतां ती स्त्री आसन्न प्रसवा जाणावी व प्रसव समय फार जवळ आला असतां, कटी असमंतात् भागीं वेदना युक्त होये व क्षण क्षणा परसाकडे लागते, व योनीमुखापासून मूत्र स्रवूं लागतें, अथवा कफा सारखा पदार्थ ह्मणजे सोडे निघूं लागतात, व प्रसव समयकालीं स्त्रीला अभ्यंगपूर्वक उष्णोदक स्नान करवून मंगलकर्में स्वस्ति वाचनादिक करून लहान मुलगे तिच्या समीप ठेवून पुन्नामकफलें, आंबे, नारळ, इत्यादिक हस्तांत देऊन घृतमिश्रित यवागू आकंठ मर्यादा पाजावी. नंतर चांगला मृदु पलंगपोस घातलेल्या शयनावर मऊघडया टाकून उताणी निजवावी. नंतर चांगल्या वृद्ध प्रजननाविषयीं कुशल व नखें चागलीं काढलेल्या सुइणी तिच्या संरक्षणार्थ योजाव्या.

अथास्याविशिखामनुलोममनुसुखमभ्यज्यात् ॥

**अर्थ**—नंतर गर्भिणीच्या अपत्यमार्गातें तैलादिकेंकरून अनुकूल व सुख होईल असें अभ्यंग करावें. आणि बोलावें हे सुभगे स्वस्थ अंतःकरणेंकरून प्रसवाविषयीं प्रयत्न करावा प्रसववेदना साहाव्या, नंतर गर्भनाडी बंध विमुक्त झाला असतां, व श्रोणि, वंक्षण, बस्तिशिरस् हीं शूलयुक्त झालीं असतां, हळू हळू प्रवाह होतो. नंतर गर्भाचे निःसरण झालें पाहिजे यासाठीं तिला हळू हळू चालवावी. तेणेंकरून मोठा प्रवाह होऊन गर्भ स्वस्थान सोडून योनिमुखाप्रत येतो.

## अकाल प्रसूत गर्भ लक्षण.

अकालप्रवाहनात्बधिरंकुणिंकुब्जंस्तब्धहनुमूर्ध्वाभि-
घातकंकासश्वासोपद्रुतंविकटंवाजनयति ॥

**अर्थ**—अकाळीं योनीपासून प्रवाह होऊं लागला असतां बहिरा, थोटा, पांगळा, कुबडा,

मुख संधि विघटित झालेला, उर्ध्वजत्रु, रोगी, व नेत्र पादादि अवय स्वस्थानीं नसतात, अशा गर्भाला प्रसवत्ये. ॥

## अकालप्रसूती चिकित्सा.

तत्रप्रतिलोममनुलोमयेत् ॥

अर्थ—अकालीं स्राव होऊं लागला असतां, त्याविषयीं मूढ गर्भनिदानोक्त चिकित्सा करावी; व गर्भ योनिमुखांत प्राप्त होऊन अडकून राहिला असतां योनीला धूप द्यावा. अथवा हिरण्यपुष्पीचें मूल हाताला किंवा पायाला बांधावें; किंवा सुवर्चला, विशल्या, या वनस्पतीचें धारण करावें.

## प्रसूतिहोतांच कृत्य.

अथजातस्योल्बंमुखंचसैंधवसर्पिषाविशोध्यघृताक्तंमूर्ध्निपिचुंदद्यात् ॥

अर्थ—बाळ उत्पन्न होताच. त्याचे आंगावरची जारायु काढून टाकून शेंदेलोण, तुपांत कालवून बोटानें तोंडांत घालून कंठात कफ जमला असतो, तो दूरकरून मुखनिर्मळ करावें; आणि तुपांत कापूस चांगला भिजवून त्याची चवघडी टाळवेवर ठेवावी. नंतर नाभिनाल, आठ अंगुळें वगळून तेथें सूत्र बांधून छेदावें; आणि त्या सूत्राचीं दोन्हीं शेवटें धरून तें नाल बालाचे ग्रीवेला बांधावें. नंतर जातकर्माचे ठायीं तूप, आणि मद, एकत्र करून त्या मध्यें थोडें सोनें उगाळून अनामिकेनें चाटवावें. सांप्रतकालीं नालच्छेदनापूर्वी मधुसर्पि प्राशन करवितात. जातकर्म झाल्यानंतर चिकण्याचे तेल, अथवा वटादि क्षीरवृक्षांचा कषाय, किंवा सर्व प्रकारचीं गंधोदकें, आंगाला चोपडून सुवर्ण किंवा रुपें तापवून पाण्यांत विझवून किंवा हीं पाण्यांत घालून पाणी तापवून तशा. मंदोष्ण पाण्यानें त्या बाळाला न्हाऊं घालावें. त्याचा प्रकार कालाचा अतिक्रम नहोता, व वातादि दोषांतून ज्याचे प्राबल्य असेल तशातशा औषधांचा काषाय घेऊन त्यांही न्हाऊं घालावें. व आपल्या विभवासारिखें सर्व सुगंधोदकेंकरून न्हाऊं घालावें. वृद्धवाग्भट्ट अन्यप्रकारें प्राशन सांगतात. तें या प्रकारें ऐंद्री, शंखपुष्पी, ब्राचाकल्क, हीं औषधें मध व तुपाशीं मिळवून, गुंजाप्रमाण घेऊन कुशेंकरून अभिमंत्रण करून, व सुवर्णकरून युक्त करून पिंपळाचे पानानें चाटवावीं. तीं, मेधा, आयुष्य, बल, यांतें देतात; व ब्राह्मी, वचा, सुवर्ण, शतावरी, यांतून कोणत्यें एकीचें चूर्ण मधुसर्पिमिश्रित करून चाटवावें.

## याचें फल सांगतो.

धमनीनांहृदिस्थानांनिवृत्तत्वादनंतरं ॥

चतूरात्रात्त्रिरात्राद्वास्त्रीणांस्तन्यंप्रवर्तते ॥

अर्थ—स्त्री प्रसूत झाल्यानंतर तिच्या हृदयसंबंधि धमन्यांचीं तोंडें विकासित होऊन, तीन चार दिवसानंतर स्तनामध्यें दूध येतें. यास्तव पहिलेदिवशीं मध आणि तुपांत गुंजभर सोनें उगाळून मंत्रपूत करून तीनवेळा चाटवावें. द्वितीय दिवशीं रक्षोघ्न औषधें हात, पाय ग्रीवा, मस्तक, यांचे ठायीं बांधावीं; व तीळ, जवस, सर्षप, व अन्य धान्यें आसमंतात्भागीं विखरावीं. व प्रसूतिका गृहामध्यें अग्नि प्रज्वलित करावा, व प्राक्शिरः शयन, व निरंतर दीप सान्निध्य, व माला, दाम, इत्यादिक व्रणी पुरुषानां उपचार सांगितले ते येथें योजावे.

## दशमदिनकृत्य सांगतो.

ततोदशमेहनिमातापितरौकृतकौतुकमंगलौस्वस्ति
वाचनंकृत्वाकुर्यातांयदभिप्रेतंनाक्षत्रंनामवा ॥

**अर्थ**—बालाचे उपचार झाल्यानंतर दशमादिवस अतिक्रांत झाला असतां अकरावे दिवशीं आईबापानीं मंगलस्नान व नानाप्रकारचे अलंकारधारणादिकौतुकेंकरून स्वस्तिवाचन पूर्वक नक्षत्रनाम, किंवा आवडतें नाव ठेवावें. नंतर स्ववर्णाची स्तन पाजणऱ्या दायीप्रत बालाला द्यावा

## उपमाता कशी असावी तिची लक्षणें सांगतो.

मध्यप्रमाणांमध्यमवयसमरोगांशीलवतीमबालामलोलुपामकृशाम-
स्थूलांप्रसन्नमुखीमलंबोर्ध्वस्तनीमव्यंगामवमनींजीवद्वत्सांवत्सलां
दोग्ध्रीमक्षुद्रकर्मिणींकुलेजातांभूयिष्ठैश्चगुणैरन्वितांश्यामामारोग्यब
लवृद्धयेबालस्य ॥

**अर्थ**—उपमाता फार उंच, व फार ठेंगणी, नसावी; व मध्यम वयस्क व रोगरहित, व चांगल्ये स्वभावाची, व निर्लोभी, फार कृश, फार स्थूल, नव्हे अशी, सर्वकाल प्रसन्नमुखी, स्तन फार लांब, आणि उभे नाहींत, अशी असावी. कारण उभे स्तन असले तर बाल कराल दंत होतो; आणि लांब असले तर पिग्रेवेळेस नाकावर पडून नासिकामुखाचे आच्छादन होऊन दम कोंडून प्राण घात, किंवा नाक, चपटें होतें. व्यंग व मृतवत्सा नसावी, व जीचें दूध अरोगी असून पुष्कळ दुधाची, व क्षुद्रकर्माविषयीं अप्रवृत्त अशी, व कुलीन, अनेकगुणसंपन्न व श्यामा, अशी असली तर बालकाला वृद्धि, आरोग्य, बल यांतें देये.

## स्तन पानाचा प्रकार सांगतो.

ततःशिरःस्नातांहतवसनोदङ्मुखींउपविश्यधात्रींप्राङ्मुखींचोप
विश्यदक्षिणंस्तनंधौतमीषत्परिस्तुतमभिमंत्र्यमंत्रेणानेन ॥

**अर्थ**—अनंतर बालमातेनें मस्तका वरून स्नान करून धौत नवीन वस्त्र परिधान करून उदङ्मुख बसावें; आणि उपमातेला हि स्नानादिक करवून प्राङ्मुख बसवून तिचा उजवा स्तन चांगला धूऊन थोडा पिळून टाकून पुढें सांगतो या मंत्रानें मंत्रावा.

## मंत्र सांगतो.

चत्वारःसागरास्तुल्याःस्तनयोःक्षिरवाहिनोः ॥ भवंतुसुभगेनित्यंबाल
स्यबलवृद्धये ॥ पयोमृतरसंपीत्वाकुमारस्तेशुभानने ॥ दीर्घमायुरवा
प्नोतिदेवाःप्राश्ययथामृतं ॥

**अर्थ**—हे सुभगे तुझे स्तन बालाचे वृध्यर्थ व बल देण्याविषयीं चतुःसमुद्र तुल्य होऊत, आणि तुझ्या स्तन पानें करून दीर्घायुष्य होवो. जसें देव अमृत पान करून अजरामर झाले तसें.

## अनेक उपमातांला दोष सांगतो.

अतोन्यथा ॥ नानास्तन्योपयोगश्चासात्म्यत्वाव्यादिजन्माभवति ॥

अर्थ—अनेक उपमाता झाल्या असतां त्यांचें दूध बालाचे प्रकृतीस न मानून वातादि रोग संभव होतो. थोडा स्तन पिळून बालाचे तोंडात द्यावा. याचें कारण पान्हा येऊन स्तन भरून नाठल्या सारिखा होतो. तो तसाच दिला असतां तोंड भरून ठस्का लागून कास श्वासादि उपद्रव होतात.

## स्तन्य येण्याविषयीं उपचार.

क्रोधशोकावात्सल्यादिभिश्चस्त्रियःस्तन्यनाशोभवति ॥ अथास्याःक्षीर जननार्थंसौमनस्यमुत्पाद्ययवगोधूमशालीषष्टिकामांसरससुरासौवीर-कपिण्याकलशुनमत्स्यकसेरुकशृंगाटकबिसविदारीकंदमधुकशता-वरीनालीकालाबूकालशाकप्रभृतीनिविदध्यात् ॥

अर्थ—क्रोध, शोक, निर्दयत्व, व लंघन, व्यायाम, इहीं करून स्त्रियांचें दूध नाहींसें होतें यास्तव दूध यावयासाठीं तिचें मन संतुष्ट करून गव्हांचें सत्व, शाल्योदन, साठ्या साळी, मांस रस, मद्य, कांजी, पेंड, लशुन, मत्स्य, कचरा, सिंगाडे, बिस, भुइकोहळीचा कंद, जेष्ठ-मद, शतावरी, नालीची भाजी आणि कालशाक, इत्यादिक सुसंस्कृत करून भक्षणास द्यावें.

## दुधाची परीक्षा.

अथास्यास्तन्यमप्सुपरीक्षेत् ॥ तच्चेच्छीतलममलंतनुशंखावभासम प्सुस्तन्यमेकीभावंगच्छति ॥ अफेनिलमतंतुमन्नोत्प्लवतेसीदतिचत-च्छुद्धमितिनिर्दिशेत् ॥

अर्थ—जें दूध शीतल, व स्वच्छ, पातळ, व शंखासारिखें पांढरें, असून उदकांत टाकिलें असतां लवकर एका जागीं होतें; व फेनरहित, व तंतुरहित, तरत नाहीं आणि बुडत नाहीं, तें शुद्ध जाणावें. तसल्या दुधाच्या पानें करून बालाला; आरोग्य, बल, आणि, शरीर पुष्ट हीं होतात.

## स्तनपान निषेध सांगतो.

नचक्षुधितशोकार्तश्रांतप्रदुष्टधातुगर्भिणीज्वरितातिक्षीणस्थूलविद ग्धभुक्तविरुद्धाहारतार्पितायास्तन्यंपाययेत् ॥

अर्थ—जी स्त्री क्षुधित, शोकार्त, दमलेली, व जिच्या रसादि धातूंस विकार, गर्भीण, ज्वरित, अतिक्षीण, अतिस्थूल, व करपलेलें, आणि मत्स्यादि अन्न पोटभर खाणारी त्या स्त्रीचें दूध बालकास पाजूंनये.

## दुष्ट स्तन्यापासून विकार.

धात्र्यास्तुगुरुभिर्भोज्यैर्विषमैर्दोषलैस्तथा ॥ दोषादेहेप्रकुप्यंतिततस्तन्यंप्रदुष्यति ॥ मिथ्याहारविहारिण्यादुष्टावातादयस्त्रियः ॥ दूषयंति पयस्तेनशारीराव्याधयःशिशोः ॥ भवंतिकुशलास्तांश्चभिषक्सम्यक् विभावयेत्

**अर्थ**—उपमातेनें गुरु, विषम, दोषकृत्, असे रोगपदार्थ भक्षिलें असतां, व मिथ्याविहार केलें असतां तिचे शरीरीं वातादि दोष कुपित होऊन स्तन्य दूषित करून बालाचे शरीरांत नानाप्रकारचे रोग उत्पन्न करितात. यास्तव वैद्यानीं विचार करून त्यांनां निरोगी करावें.

## रोग ज्ञानाचे उपाय सांगतो.

अंगप्रत्यंगदेशेतुरुजायस्यात्रजायते ॥ मुहुर्मुहुःस्पृशतितंस्पृश्यमानेच रोदिति ॥ निमीलिताक्षोमूर्धन्येशिरोरोगेणधारयेत् ॥ बस्तिस्थे मूत्र संसर्गोरुदिष्यतिचमूर्छति ॥ विण्मूत्रसंगवैवर्ण्यंछर्द्याध्मानांत्रकूजनैः ॥ कोष्टेरोगान्विजानीयात्सर्वत्रस्थांश्चरोदिति ॥ तेषुयथाविहितंत्ररुच्छेदनीयौषधमात्रयाक्षीरस्यक्षीरसर्पिषाधात्र्यास्तुकेवलमेवविदध्यात् ॥ क्षीरान्नादस्यात्मनिधात्र्याश्च ॥ अन्नादस्यकषायादीन्यात्मन्येवनधात्र्याः ॥

**अर्थ**—अंगे, व प्रत्यंगे, यां मधून जाजा अंग प्रत्यंगानां पीडा होसे त्याचा अंगाला वारंवार बालक स्पर्श करितो; आणि स्पर्श करून रडतो. मस्तकीं पीडा असतां डोळे मिटून धरून वारंवार डोकें धरतो. बस्तिगत रोग असतां मूत बंद होतें, आणि रडतो, व मूर्छा पावतो सर्व कोष्ठगत रोग असतां, विष्ठा मूत्र बंद होतात, शरीरास वैवर्ण्य होतें, व ओकारियेत्ये, पोट फुगतें, आंतड्यांत विलक्षण शब्द होतो, व रडतो, इत्यादि लक्षणानीं रोग चांगले जाणून त्याचा रोगाविषयीं क्लृप्त औषधांची मात्रा पुढे सांगायाची आहे ती दूध व तूप, मिळवून द्यावी. परंतु बाल केवळ अंगावरच पीत असतां उपमातेलाच क्षीरादि मेलन न कर्ता द्यावी. आणि दूध व अन्न, दोहों तें सेवणारा असतां उपमातेला आणि बालाला अशी दोघानां द्यावी; आणि केवळ अन्न खात असतां औषधाचे कषायादिक त्यासच द्यावे. उप मातेला पाजूंनये. ॥

## बालाला औषधादिक द्यायाची मात्रा सांगतो.

तत्रमासादूर्ध्वंक्षीरपस्यांगुलिपर्वद्वयग्रहणसंमितांकल्कमात्रांक्षीरान्नादायकोलसंमितामन्नादायेति ॥

**अर्थ**—एक महिन्या नंतर व दूध पिणाऱ्या बालातें मधलें बोट व अनामिका एकत्र करून त्याचे शेवटले पेरा जवळ आंगठा ठेवून पेराचे खळीमध्यें जितका कल्क राहील, तितकी मात्रा योजावी. परंतु तो कल्क मध, तूप, किंवा दूध, मिळवून द्यावा; व दूध आणि अन्न खाणारा अथवा केवल अन्न खाणारा, त्याला कोल प्रमाण मात्रा योजावी.

## अन्यतंत्रीं दुसरा प्रकार सांगितला तो.

प्रथमेमासिजातस्यशिशोर्भेषजरक्तिका ॥ अवलेह्यातुकर्तव्यामधु क्षीरसिताघृतैः ॥ एकैकंवर्धयेत्तावद्यावत्संवत्सरोभवेत् ॥ ततो र्ध्वंमाषवृद्धिःस्याद्यावत्षोडशकाब्दिके ॥

**अर्थ**—एका महिन्याच्या मुलाला औषधांत दूध व तूप मिश्रित करून चाटायास योग्य करून त्याची मात्रा एक गुंजप्रमाण जाणावी. नंतर वर्षपर्यंत प्रतिमासीं एकेक गुंज वाढवावी. नंतर सोळा वर्षे पर्यंत प्रतिवर्षी एकेक मासा वाढवावा.

## प्रकारांतरेंकरून औषधोपाय सांगतो.

येषांगदानांयेयोगाःप्रवक्ष्यंतेगदंकराः ॥
तेषुतत्कल्कसंलिप्तौपाययेत्तशिशुंस्तनौ ॥

**अर्थ**—ज्या रोगाचे जेजे परिहारक औषधोपाय सांगिले, त्याच्या औषधांच्या कल्केंकरून स्तनालिप्त करून शिशूला पाजावे.

## ज्वराविषयीं विशेष सांगतो.

एकंद्वित्रीणिवाह्यानिवातपित्तकफज्वरे ॥
स्तन्यंपयोहितंसर्पिरिनराभ्यांयथार्थतः ॥

**अर्थ**—जो बालक केवळ अंगावरच पितो त्याला वात, पित्त, कफ, ज्वराचे ठायीं स्तन्य, दूध, तूप, एक दोन तीन दिवसांचे अंतरानें पाजावें. व क्षीर व अन्न खाणारा, आणि केवळ अन्न, खाणाऱ्यास जसें प्रयोजन लागेल तितुकें तूप हितावह होतें; व ज्वरामध्यें तृष्णेचे भयास्तव शिशूला स्तनपान द्यावें. परंतु विरेक, बस्ति, वमनरूप, नाशकारक विकार नसतां स्तनपान द्यावें.

## बालाची टाळू पडल्ये त्यावर.

मस्तुलुंगक्षयाद्यस्यवायुस्ताल्वस्थिनामयेत् ॥ तस्यतृट्दैन्ययुक्तस्य सर्पिर्मधुरकैःशृतं ॥ पानालेपनयोर्योज्यंसीतांबुव्यजनंतथा ॥

**अर्थ**—मस्तकांत वायु अभ्यंतर स्नेहाच्या कांहीं कारणानीं क्षय करून ताल्वस्थीला नमवून उग्र पीडा उत्पन्न करतो. त्यामुळें बाल, तृष्णा व दैन्य, इहीं करून युक्त होतो. यास्तव त्याला मध, तुपांत घालून चांगलें तापवून पाजावें; व अंगाला लावावें; व थंड पाणी, वारा घालणें इत्यादि उपचार करावे.

## बालाची नाभि फुगते व गुदपाक यांवर उपचार.

वातेनाध्मापितांनाभिंसरुजांतुंडसंज्ञितां ॥ मारुतघ्नैःप्रशमयेत्स्नेह स्वेदोपनाहनैः ॥ गुदपाकेतुबालानांपित्तघ्नांकारयेत्क्रियां ॥ रसां जनंविशेषेणपानलेपनयोर्हितं ॥

अर्थ—बालाची नाभी, वायुनें वेदना युक्त फुगून, फार मोठी झाली असतां, वायुनाशक स्नेहादिक उपचार करावे, व गुदपाक झाला असतां पित्तघ्न उपचार योजावे; व पान, लेपन, याविषयीं रसांजन हितकारक होतें.

## बालाला तूप सर्वकाल हितावह होतें. हें सांगतो.

क्षीराहारायसर्पिः सिद्धार्थकवचामांसीपयस्यापामार्गशतावरीसारिवा ब्राह्मीपिप्पलीहरिद्राकुष्ठसैंधवसिद्धं ॥ क्षीरान्नादायमधूकवचापिप्पलीमूलत्रिफलासिद्धं ॥ अन्नादायद्विपंचमूलीक्षीरभद्रदारुमरीचमधूकविडंगद्राक्षाद्विब्राह्मीसिद्धं. तेनारोग्यबलमेधायूंषिशिशोर्भवंति ॥

अर्थ—जो बालक केवळ स्तनपानच करतो त्याला शिरीष, वेखंड, जटामांसी, अकपुष्पी, अघाडा, शतावरी, उपळसरी, ब्राह्मी, पिंपळी, हळद, कुष्ठ, सैंधव, या औषधांचें कल्क व कषायें करून सिद्ध केलेले तूप पाजावें. आणि दूध अन्न भक्षितो त्याला ज्येष्ठमध, वेखंड, पिंपळमूळ, त्रिफला, यांचा कल्क व कषायादिकें करून सिद्ध केलेलें तूप पाजावें. व अंगाला लावावें, आणि केवळ अन्नच भक्षितो त्याला द्विपंचमूळी, क्षीर, तगर, भद्रदारु, मिरें, ज्येष्ठमध, वावडिंगें, द्राक्षा, दोन प्रकारची. ब्राह्मी, इहीं करून सिद्ध केलेलें तूप पाजावें, व अंगाला लावावें; तेणें करून बालाला आरोग्य, बल, मेधा, व आयुष्य यांची वृद्धि होये.

## बालका विषयीं सेवक जनाचे कर्म सांगतो.

बालंपुनर्गात्रसमंगृण्हीयात्नचैनंभर्त्सयेत्सहसावानप्रतिबोधयेत्तद्वित्रासभयात्सहसानापहरेत्उत्क्षिपेद्वावातभयात्. नोपवेशयेत्कुब्जभयात्. नित्यंचैवमनुवर्तेतप्रयतेतनजिघांसुः ॥

अर्थ—परिचारक जनानें बालाला हळु, फुलासारिखा, त्याचे शरीराला सुखहोई असा घ्यावा, भेडावूनये, अकस्मात् जागृत करूंनये, भयपावेल यास्तव अकस्मात् उचलूंनये, वातादि दोषांचा नाशहोईल याभयास्तव उंच उडवूंनये, कुबडाहोईल याभयास्तव फारवेळ बसवूंनये; आणि सर्वकाल त्याच्या अनु लक्षानें वागावें; नाना प्रकारचे बालक्रीडनक पदार्थ देऊन संतोषवीत असावें. याप्रकारें निरंतर उपचार घडलें असतां चांगला वाढतो. उन्नत, सत्व संपन्न, निरोगी, व सुप्रसन्न अंतःकरण, असा होतो.

## बालरक्षण प्रकार सांगतो.

वातातपविद्युत्प्रभापादपलतानानागृहनिम्नस्थानगृहच्छायादिभ्योग्रहोपसर्गतश्चबालंरक्षेत् ॥

अर्थ—बालाला वायु, उष्ण, विद्युत्प्रभा, वृक्ष, वेली, नानास्थानें, निम्नस्थान, गृहच्छाया व ग्रह संबंधि नानाप्रकारचे उपसर्ग यांपासून रक्षावा.

नाशुचौविसृजेद्बालमाकाशविषमेपिच ॥

नोष्णमारुतवर्षेषुरजोधूमोदकेषुच ॥

**अर्थ**—बालाला अशुचिस्थान, आकाश, व निम्नोन्नत प्रदेशीं, विसंबूनये. ऊष्ण, वायु पर्जन्य, धूम, धूली, आणि उदक, यांचे ठायींही विसंबूनये.

## स्त्रीस्तन्याचे अभावीं अन्यदूध सांगतो.

क्षीरसात्म्यतयाक्षीरमाजंगव्यमथापिवा ॥

दद्यादास्तन्यपर्यंतंबालानांवीक्ष्यमात्रया ॥

**अर्थ**—बालाला आईचें दूध न मिळालें असतां गाय, व शेळी, यांमधून जिचें सोसेल तिचें दूध आहार पाहून द्यावें. तें जोंकालपर्यंत स्तनपान योग्यता आहे तोंपर्यंत द्यावें.

## अन्नदानकाल सांगतो.

षष्मासंचैनमन्नंप्राशयेल्लघुहितंच ॥

**अर्थ**—साहाव्ये महिन्यांत बालाला अन्न लघु असून हितावह असेल तें द्यावें. गयी ह्मणतो सातवे महिन्यांत द्यावें. व नानाप्रकारचे उपसर्गांपासून रक्षण करावें. ॥

## ग्रहोपसर्गाचें लक्षण सांगतो.

अथकुमारउद्विजतेत्रस्यतिरोदितिनष्टसंज्ञोभवति.

नखदशनैर्धात्रीमात्मानंचपरिद्रुह्यति.

दंतान्खादति. कूजतिजृंभतेभ्रुवौविक्षिपत्यूर्ध्वंनिरीक्षते

फेनमुद्वमतिच ॥ संदष्टोष्टःक्रूरोभिन्नवर्चाआर्तस्वरोनिशिजागर्ति ॥

**अर्थ**—बाल, मातृकादि ग्रहांनीं पीडित झाला असतां उद्विग्न होऊन क्षणोक्षणीं दचकतो, भितो, रडतो, निश्चेष्ट होतो, आणि नखें, व दंत इहींकरून आईला आणि आपल्याला ओर्बाडितो. दांत खातो, किंकाळतो, जांभया फार देतो, भिवया वरती चढवितो, कांपवितो, उर्ध्व दृष्टी लावितो, तोंडाला फेंस आणतो, ओंठ चावतो, क्रूर दिसतो, निस्तेज होतो, आर्तस्वर करतो, सर्वकाळ जागतो, दुर्बल, म्लान दिसतो. मुखाला आणि आंगाला मत्स्य, चिचुंद्री, आणि ढेंकूण, यासारिखा गंध येतो. पूर्ववत् स्तनपान इच्छित नाहीं. हीं सामान्येंकरून ग्रहग्रहाचीं लक्षणें जाणावीं. विशेष पुढें सांगेन.

## कुमाराची पुरुषार्थ साधनहेतुभूत क्रिया सांगतो.

शक्तिमंतंचैनंविज्ञाययथावर्णंविद्यांग्राहयेत ॥

**अर्थ**—बाल, विद्यार्जन क्लेश क्षम झाला असें पाहून त्याला ब्राह्मण असला तर वेद विद्या; क्षत्रिय 'स दंडनीति; वैश्यास वार्ता; याप्रकारें विद्या ग्रहण करवावें.

## अन्यदृष्टादृष्ट साधनभूत क्रिया सांगतो.

अथास्मैपंचविंशतिवर्षायद्वादशवर्षांपत्नीमावहेत् ॥

पित्र्यधर्मार्थकामप्रजाःप्राप्स्यतीति ॥

**अर्थ**—विद्या संपन्न होऊन पंचवीस वर्षांचा झाल्यानंतर त्याला द्वादश वर्षांची पत्नी द्यावी, तिच्या योगानें पित्र्युद्देश्यक श्राद्धदानादिक, व श्रुतिविहित यज्ञादिक धर्म, सुवर्णादि अर्थ, इंद्रियांची स्वस्वकर्माविषयीं अनुकूल्यानें प्रवृत्तिरूप काम, व पुत्रपौत्रादि प्रजारूप पुरुषार्थ प्राप्त होतात.

## पंचवीस वर्षांहून न्यून पुरुषाला द्वादश वर्षांपेक्षां लाहान स्त्रीचा योग झाला असतां दोष सांगतो.

ऊनद्वादशवर्षायामप्राप्तःपंचविंशतिं ॥
यद्याधत्तेपुमान्गर्भंकुक्षिस्थःसविपद्यते ॥
जातोवानचिरंजीवेज्जीवेद्वादुर्बलेंद्रियः ॥
तस्मादत्यंतबालायांगर्भाधानंनकारयेत् ॥

**अर्थ**—जा पुरुषाला पंचवीस वर्षें झालीं नाहींत, व जिला बारा वर्षें झालीं नाहींत, तशा स्त्रीचें ठायीं, तशा पुरुषानें गर्भ स्थापिला असतां तो गळून पडतो; अथवा उत्पन्न झाला तर फारादिवस वांचत नाहीं. कदाचित् वांचला असतां दुर्बल होतो. यास्तव लाहान स्त्रीचे ठायीं गर्भस्थापन करूनयें. हा लाहानपणाचा दोष, पुरुषास व स्त्रीस समान आहे. यास्तव पंचवीस वर्षांचे आंत पुरुषाला गर्भाधाना विषयीं अधिकारच नाहीं असें जाणावें.

## सहेतुक सप्रतीकार गर्भस्राव लक्षणें सांगतो.

तत्रपूर्वोक्तैःकारणैःपतिष्यतिगर्भेगर्भाशयकटिवंक्षण
बस्तिशूलानिरक्तदर्शनंच

**अर्थ**—पूर्वोक्त कारणें मूढ गर्भ निदानीं सांगितलीं. ग्राम्यधर्म व यान वाहनादिक इहीं करून गर्भपात होणार असतां गर्भाशय, कटि, वंक्षण, बस्ति, यांचे ठायीं शूल, होतो. व योनिमुखा पासून रक्तस्राव होतो; त्या विषयीं थंडपाणी शिंपडून व स्नान वगैरे घालून शीतोपचार करावे.

## गर्भपातावर उपचार.

जीवनीयाश्रितशीतक्षीरपानैश्च ॥

**अर्थ**—जीवनी म० कांकोली, तिचा कल्क दुधांत घालून चांगलें तापवून थंड करून द्यावें

## पृथक् पृथक् चिकित्सा.

गर्भस्यस्रवणेमुहुर्मुहुस्तत्साधनार्थंक्षीरमुत्पलादिसिद्धंपाययेत् ॥

**अर्थ**—गर्भस्राव होऊं लागला असतां त्याच्या संधारणार्थ रक्तोत्पलादिकांकरून सिद्ध केलेलें दूध वारंवार पाजावें.

## गर्भस्थिर क्रियोपचार.

प्रलंसमानेदाहपार्श्वशूलास्टक्प्रदरानाहमूत्रसंगस्थानात्स्थानंचप्रक्रामतिगर्भेकोष्ठेसंरंभः ॥

**अर्थ**–गर्भ पतनाविषईं किंचित्स्वस्थानापासून चळूं लागला असतां. दाह, पार्श्व, पृष्ठशूल आनाह, रुधिरस्राव, मूत्रनिरोधन, इत्यादि उपद्रव होतात; व गर्भस्थानापासून अन्यस्थळाप्रत फिरूं लागला असतां कोठामध्यें अत्युग्र पीडा होते. त्याविषईं स्निग्ध, व शीतल उपचार करावे. व वेदना विशेष होऊं लागल्या असतां महामधुक, रास्ते, कंटकारी, यांणीं सिद्ध केलेलें दूध शर्करा, व मधु, यांणीं मिश्रित पाजावें. मूत्रबंद झालें असतां दर्भादितृणपंचकमूलानें सिद्ध केलेलें दूध पाजावें. आनाहवाताविषईं लशुनानें सिद्ध केलेलें दूध पाजावें. हिंगु सौवर्चल यांची गोळी करून खायाला द्यावी. अतिरुधिर योनीपासून स्रवूं लागलें असतां असृग्प्रदर रोग झाला समजून त्याला, कुंभारिणीकीटाच्या घराची मृत्तिका, धायटीचीं फुलें, नवमलिका, गेरू, राळ, रसांजन, चूर्ण, यथालब्ध हीं सर्व औषधें मधाशीं मिळवून चाटवावीं; अथवा न्यग्रोधाची साल, बाळवेल, यांचा कल्क करून दुधाशीं मिळवून प्यावा; अथवा कचरा, शिंगाडे, कमळकंद, यांचा कल्क करून तसदुधाशीं मिळवून पाजावा; व उंपरादिकाथ, शर्करा, मध, यांहीं मधुर करून त्याशीं साळीचें पीठ लावून त्यांत न्यग्रोधादिकांचे स्वरस मिळवून त्याची वडी वस्त्रानें वेष्टून योनींत धारण करावी.

## रक्तस्रावाची चिकित्सा.

अथदृष्टशोणितायांमधूकदेवदारुपयस्यासिद्धंपयःपाययेत् ॥
तंदेवाअश्मंतकशतावरीपयस्यासिद्धंवा ॥ विदारीगंधादिसिद्धंवा
बृहतीद्वयोपलशतावरीपयस्यामधुकसिद्धंवा ॥

**अर्थ**—योनिद्वारानें रक्त चांगलें दृष्टियोग्य वाहूं लागलें असतां ज्येष्ठमध, देवदारू, पयस्या, यांणीं सिद्ध केलेलें दूध पाजावें. अथवा देवदारू, आपटा, शतावरी, पयस्या, यांणीं सिद्ध केलेलें दूध पाजावें. व भुयकोहळा, अश्वगंधा, यांणीं सिद्ध केलेलें दूध, पाजावें; व रिंगणी, डोरली, किंवा मोतारिंगणी, उपळसरी, पयस्या, ज्येष्टमध, यांणीं सिद्ध केलेलें दूध पाजावें.

एवमुपक्रांतायाउपावर्तंतेरुजोगर्भश्चाप्यायते ॥

**अर्थ**–याप्रमाणें उपचार केले असतां संपूर्ण गर्भपातसंबंधि उपद्रव शांत होतात आणि गर्भ वाढतो.

## पूर्वोक्तास प्रमाण.

तथाचचरके ॥ नयस्याः पुनरुष्णतीक्ष्णोपयोगात्गर्भिण्यामहतीरुजाजातसारेगर्भेपुष्पदर्शनंयोनिस्रावात्तस्या-
गर्भोवृद्धिनप्राप्नोतिकालांतरमुपतिष्ठतेसस्पंदनश्चभवति

**अर्थ**–गर्भिणीला उष्ण, तीक्ष्ण, पदार्थांचा संबंध झाला असतां फार पीडा होतात; आणि

गर्भाला अस्थिसंभव होऊन स्थिर झाला असतांही तीक्ष्ण, उष्ण, पदार्थांचे संबंधानें गर्भिणी बिटाळशी होत्ये. योनींतून रक्त स्रवूं लागल्यामुळें गर्भ वाढत नाहीं. बहुत दिवस पोटांत तसाच राहातो; आणि पोटांत फिरूं लागतो.

## गर्भवृध्युपचार.

व्यवस्थितेगर्भेचोदुंबरशलाटुसिध्धेनपयसाभोजयेत् ॥

अर्थ—गर्भाशयांत गर्भ राहिला असतां उदुंबराचे कोंवळे फळानीं दूध सिध्ध करून त्या-बरोबर भोजन द्यावें.

## गर्भस्रावानंतर उपचार.

अनीतिलवणस्नेहगर्भाभिर्यवागूरुद्दालकादीनांपाचनी-
योपसंस्कृताभिरुपक्रमेत्यावंतोमासागर्भस्यतावंत्यहानि ॥

अर्थ—गर्भपात झाला असतां जितके महिन्याचा गर्भ असेल तितके दिवस त्या स्त्रीला घृतादि स्नेहयुक्त तींत थोडें मीठ घालून व उडदांच्या पाचनानें युक्त यवागू लंघनपूर्वक द्यावी.

## बस्तिशूलादि चिकित्सा.

बस्त्युदरशूलेपुराणगुडंदीपनीयसंयुक्तंपाययेत्

अर्थ—बस्ति व उदर यांमध्यें शूल जाहाला असतां जुना गुळ, दीपनीय औषधाशीं. मिश्रित करून पाजावा.

## चिरकाळ राहिल्या गर्भाचा विकार सांगतो.

वातोपद्रवगृहीतत्वात्स्रोतसांलीयतेगर्भः ॥
सोतिकालमवस्तिष्ठमानोव्यापद्यतेतंमृदुनास्नेहादिक्रमेणोपचरेत् ॥

अर्थ—गर्भ निर्गम मार्गरूप स्रोतस्, वायूच्या संकोचादि उपद्रवानें गृहीत झालीं असतां गर्भ गुंतून बहुत दिवस राहातो. तो अतिकालभव जाणावा. तो नष्ट होतो. त्याला स्नेहा-दि मृदु उपचारानीं साधावा.

## त्यावर उपचार.

उत्क्रोशरससिध्धामनल्पस्नेहांयवागूंपाययेत्
माषतिलबिल्वशलाटुसिध्धान्वाकुल्माषान्भक्षयेत्

अर्थ—उत्क्रोशरसानें म्हणजे कुररपक्ष्याचे रसानें सिध्ध केलेली, व जींत घृतादि स्नेह फार घातले आहेत, अशी यवागू पाजावी. अथवा उडीद, तीळ, बिल्व कोमल फळ, यांणीं सिध्ध केलेले कुळीथ खावयास द्यावे; व मोहाचे फुलाचें मधु पाजावें.

## पूर्वोक्त विशेषघृतादि प्रक्षेप प्रमाण.

यस्यापुनर्गर्भः प्रसुप्तत्वान्नस्पंदनेतांश्येनगव्यग्निशिखिनाम्र-

चूडतित्तिरीणामन्यतमस्यसर्पिष्मतारसेनयूषेणप्रभूत-
सर्पिषावाभोजयेदिति ॥

अर्थ—ज्या गर्भिणीचा गर्भ वातोपसृष्ट होऊन प्रसुप्त होतो पोटांत फिरत नाहीं. तिला श्येन, गव्य, मयूर, कुक्कुट, तित्तिरि, यांमधून कोणते एकाचे मांसरसामध्यें पुष्कळ तूप घालून, अथवा यांच्या कषायांत तूप मिळवून पाजावें.

## गर्भाचा निर्गमोपाय.

कालातीतस्थायिनिगर्भेविशेषतःसधान्यमुलू
खलंमुसलेनाभिहन्यात् ॥ विषमंवायानादिभिर्हन्यात् ॥
विषमेवायानासनेसेवेत् ॥

अर्थ—जो गर्भ प्रसवकाळ सोडून आईच्या कुशींत लीन होऊन राहातो. त्याकाळीं गर्भिणी कडून भात कांडवावें, व विषमयान ह्म० गाड्या, घोडे वर, पाठुंगळीस घेऊन चालवावी. अथवा उंचनीच जागीं वांकडी, तिकडी, बसवावी. ह्मणजे गर्भ मोकळा होईल.

## शुष्कगर्भ सांगतो.

वाताभिपन्नएवशुष्यतीतिगर्भःसमातुःकुक्षिंनपूरयतिमंदस्पंदनेच ॥
तंबृंहणैःपयोभिर्मांसरसैश्चोपाचरेत्

अर्थ—गर्भ वायूनें विकृत झाला असतां वाळतो; आणि तो लीनगर्भासारिखा मार्गावरोध करीत नाहीं. त्याचें लक्षण आईची कुक्षी ही पूर्ण करित नाहीं, व हळू हळू हालतो. त्याला बृंहणीय क्रियेकरून संस्कृत केलेलीं दुधें, व मांसरस, हे उपचार करावे, व लीनगर्भास उपचार सांगितले तेही करावे.

## वृद्धकाश्यपाचे शुष्कगर्भ लक्षण.

गर्भनाड्याप्रवहनादअल्पत्वाद्रारसस्यच ॥
चिरेणाप्यायतेगर्भस्तथैवाकालभोजनात् ॥
आकुक्षिपूरणंगर्भोमंदस्पंदतएवचेति ॥

अर्थ—गर्भ पोषण करणारी शिरा ती नीट वाहात नाहीं, आईचे शरीरांतील रस अल्प असतो, त्यामुळें बहुत काळानें गर्भ शुष्क होतो तसा आईनें अकाळीं भोजन केल्यानें ही होतो, तो गर्भ मातृकुक्षि पूर्ण करीत नाहीं. व हळू हळू पोटांत फिरतो.

## वातग्रस्तगर्भ सांगतो.

शुक्रशोणितंवायनाभिपन्नमवक्रांतजीवमाध्मापयत्युदरंतत्कदाचिद्य-
दृच्छयोपशांतनैगेमयोपहृतमितिभाषंतेतमेवकदाचित्प्रविलीयमानं
नागोदरमित्याहुः ॥

अर्थ—शुक्र शोणितें वायूनें उपसृष्ट होऊन गर्भाशयांत राहिली असतां तो शुक्रार्तवावरोधक वायु गार्भिणी सारिखे पोटफुगवितो. तें आपोआप शांत झाल्यास गर्भ बाल पहानां नेला असें ह्मणतात; आणि तो गर्भ कुक्षीमध्यें पडून राहून नाहींसा झाला असतां नागोदर झालें ह्मणतात. त्या उभयतांस गर्भवृत्तीसारिखी चिकित्सा करावी.

## गर्भिणीस प्रतिमासीं उपचार.

मधुकंशाकबीजंचपयस्यासुरदारुच ॥
अश्मंतकस्तिलाःकृष्णास्ताम्रवल्लीशतावरी ॥
वृक्षादनीपयस्याचलतासोत्पलसारिवा ॥
अनंतासारिवारास्नापद्ममधुकमेवच ॥
बृहत्यौकाश्मरींचापिक्षीरशुंगास्त्वचोघृतं ॥
षष्टिपर्णीबलाशिग्रुश्वदंष्ट्रमाधुपर्णिका ॥
शृंगाटकविषद्राक्षाकसेरुमधुकंसिता ॥
वस्त्वैतेसप्रयोगास्युरर्धश्लोकसमामताः
यथासंख्यंप्रयोक्तव्यागर्भस्त्रावेपयोयुताः ॥

अर्थ—मधुक, शाकबीज, पयस्या, देवदारु, १ अश्मंतक, काळे तीळ, ताम्रवल्ली, शतावरी २ वृक्षादनी, पयस्या, लता, उत्पल, सारिवा, ३ अनंता, सारिवा, रास्ना, पद्म, मधुक, ४ रिंगणी, डोरली, काश्मरी, वडादिक्षीरवृक्षांच्या डिऱ्या, व त्वचा, घृत, ५ षष्टिपर्णिका, बला, शिग्रू, सरांटे, मधुपर्णिका, ६ शृंगाटक, बिस, द्राक्षा, कसेरु, मधुक, सिता, ७ याप्रकारें सातयोग अर्ध अर्ध श्लोकानें सांगितले हे योग प्रथम मासा पासून सात मास पर्यंत क्रमानें गर्भस्त्राव भयास योजावे; व यांचें चूर्ण देणें जाहाल्यास दुधाशीं मिळवून द्यावें.

## दुसरे उपचार.

कपित्थबिल्वबृहतीपटोलेक्षुनिदिग्धिका ॥ मूलानिक्षीरसिध्दानिपाय येद्भिषगष्टमे ॥ नवमेमधुकानंतापयस्यासारिवापिबेत् ॥ क्षीरंशुंठी पयस्याभ्यांसिध्दंस्याद्दशमेहितं ॥ सक्षीरंवाहिताशुंठीमधुकंसुरदारुच ॥

अर्थ—कपित्थ, बिल्व, रिंगणी, पटोल, इक्षु, निदिग्धिका, यांचीं मुळें दुधांत शिजवून तें दुध आठवे महिन्यांत पाजावें; मधुक, अनंता, पयस्या, सारिवा, या वनस्पति दुधांत शिजवून तें दुध नववेमहिन्यांत पाजावें; व दाहाव्ये महिन्यांत, शुंठी, व पयस्या, याणीं दूध सिध्द करून दुधपाक कल्पनेनें सिध्द करून पाजावें. किंवा सुंठ, ज्येष्टीमध, देवदारु, यांचें चूर्णकरून दुधांत घालून प्यावयास द्यावें परम हितावह आहे.

## मर्यादा पुर्वी गर्भधारण दोष सांगतो.

निवृत्तप्रसवायास्तुपुनःषड्भ्योवर्षेभ्यऊर्ध्वंप्रसवमानायाकुमारोल्पायुर्भवति ॥

**अर्थ**—निवृत्तगर्भास्त्री पुनः साहा वर्षांनंतर प्रसवली असतां तिचें अपत्य अल्पायुष्य होतें, यास्तवच साहा वर्षानंतर स्त्रीला निवृत्तगर्भा ह्मणावी. आतां वमनादि क्रिया गर्भ व्याघातक आहेत ह्मणुन त्या निषेधिल्या परंतु प्राणघातक व्याधीचे ठाईं मृदु द्रव्या बरोबर प्रति प्रसवें योजाव्या.

## रोग विशेषानें गर्भिणीस व मनक्रिया सांगतो.

अथगर्भिणींव्याध्युत्पत्तावत्ययेछर्दयेत् ॥

**अर्थ**—गर्भिणिला प्राणनाशक रोग झाला असतां ओकवावी.

## गर्भिणीचा आहार नियम.

सौवर्णंशौक्तिकंचूर्णंकुष्ठंमधुघृतंवचा ॥ मत्स्याक्षिकाशंखपुष्पीमधुस-
र्पिश्चकांचनं॥अर्कपुष्पीघृतंक्षौद्रंचूर्णितंकनकंवचा॥हेमचूर्णानिकैड
र्यः श्वेतदूर्वाघृतंमधु ॥ चत्वारोभिहिताः प्राश्याश्लोकार्धेषुचतुर्ष्वपि ॥
कुमाराणांपुनर्मेधाबलपुष्टिविवर्धनाः॥

**अर्थ**—सुवर्ण, मोत्यांची शिंपी, कुष्ठ, ज्येष्ठमध, वेखंड, हीं औषधें तुपांत उगाळून चाटवावीं. १ प्रयोग. ब्राह्मी, शंखपुष्पी, तूप, मध, सोनें, २ पयस्या, तूप, लघुमक्षिकांची मध, सुवर्ण, वेखंड, ३ सुवर्णचूर्ण, कढयानिंब, पांढऱ्या दूर्वा, तूप, मध, ४ याप्रकारें चारप्रयोग अर्धार्ध श्लोकानें सांगि-तले हे प्रयोग संवत्सरपर्यंत योजावे. तेणेंकरून गर्भाची बुद्धि, बल, पुष्टि, यांची वृद्धि होत्ये. कोणाचे मतें द्वादश वर्षांपर्यंत योजावे.

## बाळांस औषध प्रमाण विश्वामित्रोक्त सांगतो.

विडंगफलमात्रंतुजातमात्रस्यभेषजं ॥ एतेनैवप्रमाणेनमासि-
प्रवर्धितः ॥ कोलास्थिमाक्षीरादेर्द्द्यान्भेषजकोविदः ॥

**अर्थ**—उत्पन्न मात्र बाल जो त्यास वावडिंगप्रमाण औषधाची योजना करावी. नंतर ती मात्रा प्रतिमासीं एकएक फळानें वाढवावी. व जोंपर्यंत दूध पितो, तों पर्यंत बोराचे बी एवढी औषधाची मात्रा योजावी. अन्न खाऊं लागल्यानंतर उंबराचे फळा एवढी मात्रा योजावी.

इतिशारीरेनिबंधसंग्रहेदशमोध्यायः॥१०॥

---

# अष्टविधपरीक्षा.

## दूतपरीक्षा.

दूरादेवयथावन्हिर्धूमाद्विज्ञायतेजनैः ॥
साध्योसाध्यस्तथारोगीज्ञायतेदूतचेष्टया ॥

अर्थ–जनाला धूमावरुन अग्नीचे ज्ञान होते. तसें दूताचे चेष्टेनें रोग्याचें साध्यासाध्य लक्षण समजतें.

## दूतलक्षण.

स्वज्ञातिःश्वेतवस्त्रोद्रविणयुतकरःक्षत्रियोब्राह्मणोवा
तांबूलाढ्यःसुशीलःशुभवचनवदःस्यात्प्रशस्तोत्रदूतः ॥

अर्थ–जो दूत रोग्याचा जातीचा; व श्वेतवस्त्र धारण केलेला, हातात द्रव्य घेतलेला, क्षत्रीय अथवा ब्राह्मण, तांबूलभक्षण केलेला, सुशील, आणि शुभवचन बोलणारा, असा दूत उत्तम जाणावा.

## दुसरें दूतलक्षण.

यश्चिकित्सकमानेतुंयातिदूतःसकथ्यते ॥ सचयादृक्समुचित
स्तादृगत्रनिगद्यते ॥ दूताःस्वजातयोव्यंगाःपटवोनिर्मलांबराः ॥
सुखिनोश्ववृषारूढाःशुभवस्त्रफलैर्वृताः ॥

अर्थ–जो वैद्याला बोलाउं जातो तो दूत सजातीय, अव्यंग, कुशल, स्वच्छ वस्त्रें घेणारा, सुखी, अश्व किंवा बैल यांवर आरोहण कर्ता; आणि पांढरीं पुष्पें व फळें हास्तामधें घेणारा. असा रोग्याच्या सुखाला कारण होतो.

## अयोग्यदूत.

शस्तायोषिन्नदूत्येनचजनयुगुलंनांगहीनोनरोगी
शोकार्तोवारुदन्वानिहतपतितभ्रष्टशब्दान्ब्रुवाणः ॥

अर्थ– दूतकर्माविषयीं स्त्री, दोनमनुष्य, अंगहीन, रोगी, शोकार्त, रडणारा, निरंतर पाप करणारा; आणि वाईटशब्दबोलणारा असा दूत योग्य नव्हे.

## द्वितीयलक्षण.

दूतोरक्तकषायकृष्णवसनोदंडीजटीमुंडितस्तैलाभ्यक्ततनुर्भयं करवचोदीनोश्रुपूर्णेक्षणः ॥ भस्मांगारकपालपाशमुसलीसूर्ये स्तगेव्याकुलोयःशून्यस्वरमीरितोगदवतोदूतस्तुकालानलः ॥

अर्थ–जो दूत आरक्त, भगवें; किंवा काळें नेसलेला, हातांत दंड घेतलेला, मुंडन केलेला, आंगास तेल लावलेला, भयंकर शब्द बोलणारा, दीन, डोळ्यांस पाणी आलेला; व भस्म कपाल, अंगार, यांनें धारण केलेला, मळकट, हातांत मुसळ घेणारा, केवळ संध्याकाळीं आलेला, व्याकूळ; आणि शून्यस्वर यां प्रकारांतून कोणत्याही एका प्रकारानें आला असतां केवळ काळरूपी आहे.

याम्यांदिशिप्रांजलयोविषमैकपदास्थिताः ॥
येवैद्यमुपसर्पंतिदूतास्तेस्युर्विगर्हिताः ॥

अर्थ–जो दूत वैद्याकडे जाऊन दक्षिण दिशेस हातजोडून, उंच नीच जागेवर, एका पायावर, बसतो; किंवा उभा राहतो; तो निंद्य आहे.

## जाणाऱ्या दूतानें शकुन पाहाण्याचें कारण.

साध्यासाध्यत्वमाख्यातिशकुनस्तुशुभाशुभः ॥
अतोभिभास्येशकुनंतद्विज्ञातुंरुजावतां ॥

अर्थ शुभाशुभ शकुनानें रोग्याचें साध्यासाध्यत्व कळतें म्हणून ते सांगतों.

## वैद्याकडे जाणाऱ्या दूताला प्रश्न.

वैद्याव्हानायदूतस्यगच्छतोरोगिणःकृते ॥
नशुभंसौम्यशकुनंप्रदीप्तंचसुखावहं ॥

अर्थ–रोग्याचे निमित्तें वैद्याला बोलावण्या विषयीं दूत मार्गामध्यें चालूं लागला असतां भेरी मृदंगादिक जे सौम्य शकुन ते रोग्याला शुभदायक होत नाहींत; व अंगार तेल, कुळिथ इत्यादिक जे प्रदीप्त अशुभ शकुन ते शुभदायक होतात.

## दग्धादिशांची संज्ञा व त्यावरून शुभाशुभ.

दग्धादिक्दिनकृत्यक्ताधूमितायांसयास्यति ॥ दीप्तायत्रास्त्य सौशेषाःपंचशांताःशुभादिशः ॥ दग्धैशानीसुप्रभातेऐंद्रीदिक् धूमिताननाः ॥ प्रत्येकमष्टप्रहरैर्भुंक्तेष्टौभास्करोदिशः ॥ दिक्षुशां तासुवक्तारोमधुरंपृष्ठतोनुगाः ॥ वामगादक्षिणावापिशकुनाः कर्मसिद्धिदाः ॥ पुरतोदिक्षुदीप्तासुवक्तारोनात्रसाधकाः ॥

अर्थ–जी सूर्यानें सोडिली ती दिशा दग्ध; व जे दिशेस सूर्य जाणार ती धूमित; आणि जा दिशेस असतो ती दीप्त; आणि बाकीच्या पांच दिशा शांत जाणाव्या; व प्रात काळीं ईशानी दग्ध; व पूर्व दिशा धूमित; याप्रमाणें आठप्रहरांत आठ दिशा फिरतो त्यामध्यें शांतदिशेस दूत उभा राहून किंवा बसून गोडशब्द बोलतो; आणि त्या बरोबर वामभागीं किंवा दक्षिण भागीं सोबती आहे असा आला असतां तो शकून वैद्याला सिद्धि देणारा आहे; व पुढें दीप्त दिशेस बसून बोलतो तर वैद्याला यश देणारा शकून नव्हे.

## दूतप्रश्नाच्या अक्षरांवरून प्रश्न.

दूतस्योदितवर्णवृंदमखिलंद्वेधाविभज्यात्रिभिर्भ

क्त्वाव्योमतिमृत्युमाशुविवदेदन्यत्रसंजीवनं ॥

अर्थ–दूत जी अक्षरें बोलेल तीं मोजून निमें करावीं; आणि तिहींनीं भागावीं. बाकी शून्य राहिलें असतां मृत्यु; व अंक राहिला असतां रोगी वांचेल.

दूतस्यप्रश्नाक्षरयोगसंख्यात्रिधाष्टभाज्याप्रवदंतिशेषे ॥

समेचमृत्युर्विषमेचनैवविलोक्यवैद्यैःखलुप्रश्नकाले ॥

अर्थ–वैद्यानें दूताचे प्रश्नांचीं अक्षरें मोजून त्यांचे तीन भाग करावे, आणि त्या भागाला आठांनीं भागावें बाकी सम आली असतां मृत्यु; आणि विषम बाकी राहिली असतां आरोग्य हें प्रश्न काळीं पाहावें.

## वैद्यानें पाहण्यास योग्य दूताचें चिन्ह.

आगत्योपाश्रयेद्योपुरमथनदिशंपश्चिमामुत्तरांवाशंभोःकाष्ठां

सशस्तोपरदिशिनतुपांगारभस्मादिसंस्थः ॥ रक्तस्रग्गंधवस्त्र

स्तृणलगुडदलच्छेदनःपंकतैलाभ्यक्तोवक्षोजनासालिकनिहि

तकरोयश्चविक्षिप्तकेशः ॥

अर्थ–जो दूत येऊन पूर्वदिशेस; किंवा पश्चिमेस; अथवा उत्तरेस; किंवा ईशान्येस, बसतो तो चांगला; आणि पूर्वोक्त दिशांहून अन्य दिशांस बसणारा किंवा कोंडा, अंगार भस्म, यांवर बसणारा; व आरक्तमालागंधवस्त्रधारणकर्ता; व तृण, काटक्या, पानें, यांचा छेद करणारा; आणि चिखल; किंवा तेल यांणीं मळकट; आणि नासिका, स्तन, ललाट यांवर हात ठेवणारा; व केश पसरलेला, असा दूत योग्य नाहीं.

## दूतलक्षणें.

सजातयःसुचेष्टाश्चसजीवदिशिसंस्थिताः ॥ भिषजंसमयेप्राप्ता

रोगिणःसुखहेतवः ॥ यस्यांप्राणमरुद्वातिसादिशाजीवसंज्ञिता ॥

अर्थ–दूत, सजाति, उत्तम चेष्टाकरणारा; व जीवदिशेचा आश्रय करणारा; आणि वेळेवर वैद्याकडे आलेला असा दूत रोग्याच्या सुखाला कारण होतो; व जे दिशेस प्राण वायू वाहतो ती जीवसंज्ञित दिशा जाणावी.

## रोग्याकडे जाणाऱ्या वैद्याला शुभाशुभ शकुन.

चिकित्सांरोगिणःकर्तुंगच्छतोभिषजःशुभम् ॥
यात्रेयःसौम्यशकुनःप्रोक्तोदीप्तोनशोभनः ॥

अर्थ–रोग्याला औषध देण्याविषयीं मार्गाच्याठायीं चालणारा असा जो वैद्य त्याला यात्रेविषयीं योग्य असे जे भेरी मृदंगादिक सौम्य शकुन ते शुभदायक होतात; व अंगार, तेल, कुलित्थ, इत्यादिक जे प्रदीप्त शकुन ते शुभदायक होत नाहींत.

यानेमातंगविप्रास्तुरगवृषफलछत्रमांसोदकुंभायोषित्पुत्रान्विता
वासुरभिरपितथाखंजरीटामयूराः॥ वीणाभेरीमृदंगांबुजपटहरवा
वेदमांगल्यघोषाश्चाषःसिद्धान्नभूभृत्कुसुमपुरवधूचंदनाद्याःप्रशस्ताः

अर्थ–रोग्याकडे जाण्याला वैद्य निघाल्यावर वाटेंत प्रथमतः हत्ती, ब्राह्मण, घोडा, बैल, फळ, छत्र, मांस, उदकुंभ, अपत्ययुक्त सुवासिनी, गाई, तसेंच खंजरीट, मोर; व वीणा, नौबत, मृदंग, शंख, भेरी, यांचे शब्द आणि वेदपाठ, स्तोत्रादिपाठ, व चाषपक्षी, सिद्धान्न, राजा, फुलें, कलावंतीण; आणि चंदन हे शकून प्रशस्त आहेत.

एणःकाकोप्यसव्येशुभइहकथितःसव्यतःसारमेयश्चक्रीवानाखु
बभ्रूशफरदधिपयोरूप्यगोमायुमेषाः ॥ प्रेतोनीराजनश्चज्वल
दलनशिखाश्वेतवस्त्रोध्वजोवाचित्तेशस्तेत्रसिद्धिःप्रभवतिभिष
जोनान्यथाकिंबहूक्तैः ॥

अर्थ–हरिण, कावळा हे उजव्या बाजूस; आणि कुत्रा, सर्प, उंदीर, मुंगुस, मासे दहीं, दूध, रुपें, लांडगे, बकरा, रडण्यावांचून प्रेत, पेटल्या अग्निच्या ज्वाला, श्वेतवस्त्र आणि ध्वज हे डावीकडे प्रशस्त आहेत; किंवा चित्ताचा उल्लासानें सर्व सिद्धि होतात हें सांगण्याची कांहीं जरूर नाहीं.

## रोग्याकडे जाणाऱ्या वैद्याला शकून.

छत्रंगोद्विजकन्यकामिषसुरापण्यांगनार्चनंमांगल्यंनृपवा
जिवारणदधिस्तोत्रादिपाठःशुभः ॥ संगीतंकरुणाभयानकमहा
रौद्रैर्विहीनंस्मरन्क्रीडाभावमनोहरंकिमपिवाबालाश्चसद्योगिनः ॥

अर्थ—वैद्य रोग्याकडे जाण्याकरितां निघाल्यावर पुढें छत्र, गाई, ब्राह्मण, कन्यका, मांस, मद्य, वेश्या, गोरोचन, मांगल्यपदार्थ, राजा, घोडा, हत्ती, दहीं, स्तोत्रपाठ, करुण, भयानक, क्रूर यांवाचून संगीत, आणि क्रीडादिकानियुक्त मनोहर काहींवस्तू, बाल, साधू आणि योगी हे पुढे भेटले असतां शुभ आहे

पुन्नामावामतःश्रेष्ठागजखच्चरवर्जिता. ॥
स्त्रीनामादक्षिणेश्रेष्ठाशिवाश्यामाविवर्जिताः ॥

अर्थ—रोग्याकडे जातेवेळेस दक्षिणबाजूस हत्ती, खेचर यांवांचून पुरुषनामवाचक जीव भेटलेअसतां श्रेष्ठ; आणि डाविबाजूस भालूव व्याला गाई या वांचून स्त्रीवाचक श्रेष्ठ जाणावें.

## वैद्याला अपशकुन.

मार्गच्छेदोहिमार्जारोगोधासरठवानरैः ॥
रोगिद्वाराभिगमनेमंगलंतदमंगलं ॥

अर्थ—रोग्याकडे जाण्यास निघाल्यावर मांजर, घोरपड, सरडा, किंवा, वानर, आड-ने गेले किंवा मंगल पदार्थ तेथें भेटले तर अमंगल कारक होतात.

## वैद्यगमनास निषिध्धकाल.

संध्याकालेतथारात्रौस्नानभोजनसंगमे ॥
विपरीतेषुकालेषुनगच्छेत्तत्रबुधिमान् ॥

अर्थ—वैद्यानें रोग्याकडे संध्याकाळीं, रात्रीं, स्नानाचे वेळेस, भोजन काळीं, किंवा अडचणीच्या वेळेस जाऊं नये.

## वैद्यरोगिविषयक नियम.

नसुप्याद्रोगिसदनेनभुंजीयात्कदाचन ॥
विनाव्हाननंगच्छेच्चनब्रूयान्मरणंभिषक् ॥

अर्थ—वैद्यानें रोग्याच्या घरीं निजूं नये; व रोग्याचे घरीं जेवण करूं नये; व बोलाविल्या वाचून जाऊं नये; व मरण सांगूंनये.

## वैद्यलक्षण.

चिकित्सांकुरुतेयस्तुसचिकित्सकउच्यते ॥
सचयादृक्समीचीनस्तादृशोपिनिगद्यते ॥

अर्थ—जो मनुष्य रोगांवर औषधादि उपचार करितो तो चिकित्सक, त्याचा चांगली लक्षणें सांगतो.

तत्वाधिगतशास्त्रार्थोदृष्टकर्मास्वयंकृतिः ॥ लघुहस्तःशुचिः
शूरःसज्जोपस्करभेषजः ॥ प्रत्युत्पन्नमतिर्धीमान्व्यवसायीप्रि
यंवदः ॥ सत्यधर्मपरोयश्चवैद्यईदृक्प्रशस्यते ॥

अर्थ–वैद्य गुरुपासून वैद्यक शास्त्र शिकलेला, संपूर्ण क्रिया पाहिलेला, स्वतः कुशळ, जलदकार्यकर्ता, शुचिर्भूत, शूर, व औषधादिकांची तयारी ठेवणारा, चांगले बुध्दीचा, बुध्दिवान्, उद्योगी, गोडबोलणारा, सत्यधर्मानें वागणारा असा वैद्य असावा.

सद्वैद्योयश्चसोसाध्यंनारभेतचिकित्सितुं ॥
दक्षस्तीर्थात्तशास्त्रार्थोदृष्टकर्माशुचिर्भिषक् ॥

अर्थ–तो सद्वैद्य जो असाध्यरोग्याची चिकित्सा करीत नाहीं; व हुशार गुरुपासून वैद्यक शिकलेला, जाणें सर्व कर्मे पाहिलीं आहेत; आणि शुद्ध असा वैद्य असावा.

## अथ निपिध्यवैद्य.

कुचैलःकर्कशस्तब्धोग्रामणीःस्वयमागतः ॥
पंचवैद्यानपूज्यंतेधन्वंतरिसमाअपि ॥

अर्थ–मळकट वस्त्र घेणारा, कर्कश गर्विष्ट, ग्रामकुठार, स्वतः आलेला, असा या पांच प्रकारचा वैद्य जरी धन्वतरीसारिखा आहे; तथापि पूजेला योग्य नाहीं.

## वैद्याचें कर्तव्य सांगतों.

व्याधेस्तत्वपरिज्ञानंवेदनायाश्चनिग्रहः ॥
एतद्वैद्यस्यवैद्यत्वंनवैद्यःप्रभुरायुपः ॥

अर्थ–वैद्यानें रोगाचा निश्चय करून त्याचें शमन करावें, एवढेंच आहे; तो आयुष्याचा स्वामी नाहीं.

एकोत्तरशतंमृत्युंअथर्वाणःप्रचक्षते ॥ तत्रैकःकालसंयुक्तःशेपा
स्त्वागंतवःस्मृताः ॥ ममापिग्रसतेकालःकुतःपुत्ररसायनं ॥

अर्थ–अथर्वणानी एकशें एक प्रकारचे मृत्यू आहेत, असें सांगीतलें; त्यामध्यें एकच काल संज्ञक आहे. बाकीचे आगंतूक मृत्यू आहेत. तो चिरायू अथर्वा पुत्राला ह्मणतो बाबा मला ही काळ भक्षण करितो; मग तुह्मी जे अल्पायु त्या तुह्मास रसायनें काय करितील.

योरोगीभिषजंसम्यक्रोगशांतौनपूजयेत् ॥
तस्यार्जितस्यपुण्यस्यप्राप्नोत्यर्धंभिषग्वरः ॥

अर्थ–जो रोगी बरा झाल्यावर वैद्याची पूजा व सत्कार करीत नाहीं; तो बरा झाल्यावर जें पुण्य करितो; त्या पुण्याचें अर्ध वैद्य घेतो.

## रोग्याचें लक्षण.

आढयोरोगीभिषग्वश्योज्ञापकःसत्ववानपि ॥
वैद्येशास्त्रेचविश्रब्धःकृतज्ञःपथ्यकारकः ॥

अर्थ–जो रोगी धनवान, वैद्याला वश्य, प्रकृती बराबर सांगणारा, धैर्यवान्, चिकित्से विषयीं व शास्त्राविषयीं विश्वासू, उपकार जाणणारा; आणि पथ्य करणारा, असा असल्यास उत्तम जाणवा.

निजप्रकृतिवर्णाभ्यांयुक्तःसत्वेनसंयुतः ॥
चिकित्स्योभिषजारोगीवैद्यभक्तोजितेंद्रियः ॥

अर्थ–जा रोग्याची मुळची प्रकृती सुटली नाहीं; व ज्याचा शरीराचा वर्ण फिरला नाहीं; व सत्व गुण युक्त, वैद्याच्या आज्ञेंत वागणारा; आणि इंद्रियांचा निग्रह करणारा, अशा रोग्याला वैद्यानें औषध द्यावें.

## द्रव्यापेक्षा सांगतो.

सर्वेद्रव्यमपेक्षंतेरोगिप्रभृतयोयतः ॥
विनावित्तंनभैषज्यंचिकित्सांगंततोधनं ॥

अर्थ–रोगी आदिकरून सर्व प्राणिमात्र द्रव्याची इच्छा करितात; व औषध द्रव्यावांचून होत नाहीं; या करिता द्रव्य चिकित्सेचें अंग आहे.

## परिचारक लक्षण.

स्निग्धोऽजुगुप्सुर्बलवान्युक्तोव्याधितरक्षणे ॥ वैद्यवाक्यकृद
श्रांतोयुज्यतेपरिचारकः ॥ अनुरक्तःशुचिर्दक्षोबुध्दिमान्परिचारकः ॥

अर्थ–स्नेहबाळगणारा, अनिंदित, बलवान, रोग्याचें संरक्षण करण्याविषयीं दक्ष, वैद्यानें सांगीतलेले करणारा, नदमणरा, कृपाळु, शुद्ध, कुशल; आणि बुध्दिमान असा सेवक रोग्याजवळ असावा.

## औषधलक्षण.

वैद्योव्याधिहरेद्येनतद्व्यंप्रोक्तमौषधं ॥ तद्यादृशमवश्यंस्याद्रो
गघ्नंतादृशंब्रुवे ॥ बहुकल्पंबहुगुणंसंपन्नंयोग्यमौषधं ॥

अर्थ–वैद्य जा द्रव्यानें व्याधीचा नाश करितो त्या द्रव्यास औषध ह्मणावें; व तें औषध रोगाचा निश्चयें करुन नाश करणारें, बहुत रोगावर चालणारें, बहुत गुणानीं युक्त, योग्य असें औषध असावें.

## औषधाची आवश्यकता.

आयुष्मान्पुरुषोजीवेत्सव्यथोभेषजंविना ॥
भेषजेनपुनर्जीवेत्सएवहिनिरामयः ॥

अर्थ–जा रोग्याचें आयुष्य सबल आहे; तो औषधावाचून ही तसाच वांचेल; परंतु रोग बरा होणार नाहीं. तोच औषध घेईल तर निरोगी होऊन वांचेल.

सतिचायुषिनोपायंविनोत्त्थातुंक्षमोरुजी ॥
दर्शितश्चात्रदृष्टांतःपंकमग्नोमहागजः ॥

अर्थ–आयुष्य असताहीं रोगी उपचारावांचून बरा होतनाहीं, याविषयीं दृष्टांत. जसा मोठा हत्ती चिखलांत रुतला असतां काढल्या वांचून बाहेर निघतनाहीं.

सतिचायुषिनष्टःस्यादामयैश्चाचिकित्सितः ॥
यथासत्यपितैलादौदीपोनिर्वातिवात्यया ॥

अर्थ–रोगी आयुष्य असतां ही उपाय केला नाहीं, तर त्या रोगानें मरेल. जसा तेल, वात, अग्नि, ही साहित्यें असतांही वाऱ्यानें दिवा जातो.

साध्यायाप्यत्वमायांतियाप्यागच्छंत्यसाध्यतां ॥
घ्नंतिप्राणानसाध्यास्तुनराणामक्रियावताम् ॥

अर्थ–जे रोगी रोगांवर उपचार करीत नाहींत; त्याचें ते रोग साध्य असतां ही याप्य होतात; आणि जे याप्यरोग ते असाध्य होतात; व जे असाध्य रोग ते तत्काळ प्राणनाश करितात.

तावत्प्रतिक्रियाकार्यायावच्छ्वसतिमानवः ॥
कदाचिद्दैवयोगेनदृष्टारिष्टोपिजीवति ॥

अर्थ–रोगी जो पर्यंत श्वासोश्वास सोडितो तों पर्यंत चिकित्सा करावी. कांकीं मृतप्राय झालेला रोगी उपचार केलाअसतां दैवयोगानें वाचूशकेल.

रोगमादौपरीक्षेतततोनंतरमौषधं ॥
ततःकर्मभिषक्कुर्यात्ज्ञानपूर्वंविचक्षणः ॥

अर्थ–वैद्यानें प्रथम विचक्षणा पूर्वक रोगाची परीक्षा करून नंतर औषध योजना करावी.

## औषध देण्याविषयीं निषिद्ध रोगी.

जारंचोरंतथाम्लेंछंब्रह्मघ्नंमत्स्यघातिनं ॥ द्वेष्टारंग्रामकूटंचबद्ध
कंमांसविक्रिणं ॥ एतेतुव्याधिनाग्रस्तानकुर्याच्छमनक्रियां ॥
तेषांजीवाप्तिसंजाताद्वैद्योभवतिपापभाक् ॥

अर्थ–जार कर्म करणारा, चोर, म्लेंछ, ब्रह्महत्याकरणारा, मांसेमारणारा, ग्रामकंटक, परीट; आणि मांसविकणारा. असे व्याधीनें ग्रस्त झालेअसतां त्याला औषध देउंनये. कारण, ते वांचल्यावर जीं हत्या वगैरे पातकें करितील, तीं पातकें वैद्याला लागतील.

दर्शनस्पर्शनप्रश्नैःपरीक्षेतचरोगिणं ॥ भिषक्द्रव्याण्युपस्थाता रोगीपादचतुष्टयं ॥ चिकित्सितस्यनिर्दिष्टंप्रत्येकंतच्चतुर्गुणं ॥

अर्थ–वैद्यानें दर्शन, स्पर्श, प्रश्न, इत्यादिकानीं रोग्याची परीक्षा करावी, व वैद्य, द्रव्य सेवक, रोगी हीं चार चिकित्सेचीं अंगें आहेत, हीं एकाहून एक चौपट अधीक आहेत.

ऋतुहरनयनकरांबुधिमुनिरसवेदाग्निचंद्रदिग्दुर्गाः ॥ विन्य स्याधोविलिखेदादन्हि/तांस्तथावर्णान् ॥ पंचांत्यस्वरवर्ज्या नथकृत्वाचोहलश्चपृथक् ॥ दूतातुरयोर्नाम्नोर्वसुभिःसंशोधिता सुसंख्यासु ॥ जीवत्यधिकेरोगीम्रियतेहीनेसमेव्याधिः ॥

अर्थ–ऋतु ६ हरनयन ३ हस्त २ अंबुधी ४ मुनि ७ रस ६ वेद ४ अग्नि ३ चंद्र १ दिक् १० दुर्गा ९ याप्रमाणें वरचे कोष्टक पंक्तीत अंक घालून खालच्या कोष्ट-कांत अकारापासून हकारपर्यंत वर्ण लिहावे ते असे कीं शेवटील पांच स्वर सोडून बाकीचे स्वर व हे पृथक् करून मांडावे. असें चक्र तयार झाल्यावर दूत व रोगी या दोघांचे नावांचा अक्षरांची कोष्टकाक्षरांवरून संख्या तयार करून ती संख्या ८ आठांत वजा करावी आणि पहावी. रोग्याची संख्या अधिक आली तर वांचेल. कमी आली तर मरतो. सम आलेतर व्याधिस्थच राहील.

| ६ | ३ | २ | ४ | ७ | ६ | ४ | ३ | १ | १० | ९ | ० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अ | आ | इ | ई | उ | ऊ | ऋ | ॠ | ऌ | ॡ | अं | ० |
| क | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ | ञ | ट | ० |
| ठ | ड | ढ | ण | त | थ | द | ध | न | प | फ | ० |
| ब | भ | म | य | र | ल | व | श | ष | स | ह | ० |

वर्णांकात्मनिमंडलेअइउएओकादिवर्णान्लिखेत्स्यत्काङक्षञ णंळमप्यथतिथीन्सर्वांश्चपंक्तिक्रमात् ॥ अर्कग्लौगुरुशुक्रसौ रिकुजविच्छून्यान्यधोधःक्रमात्पौष्णादीन्यपिसप्तभानिचपूरा वत्पंचपंचाग्रतः ॥ आख्यायाःप्रथमाक्षरंभवतियत्कोष्ठेततः

कोष्ठकोबालाख्यश्चकुमारकोप्यथयुवावृधोमृतश्चक्रमात् ॥ भं

वारश्चतिथित्रयंभवतिचैतन्मृताख्यंतदामृत्युर्निश्चयतोन्यथाक

चिदितिप्रोक्तोनृणांनिश्चयः ॥ किंचिल्लाभकरोबालःकुमारस्त्व

र्धलाभकृत् ॥ सर्वसिध्दियुवादत्तेवृधोहानिंमृतोमृतिं ॥

अर्थ–वर्णात्मक व अंकात्मक मंडलाचे ठाई. अ इ उ ए ओ; आणि कइत्यादिक वर्ण लिहावे त्यांत ङ क्ष ञ ण ळ हीं अक्षरें सोडावी आणि पंधरा तिथी पंक्तिक्रमानें लिहाव्या आणि रवि, चंद्र, गुरु, शुक्र, शनि, मंगळ, बुध; आणि शून्यें. हीं लिहावीं नंतर रेवतीपासून प्रत्येक उभ्या पंक्तीत सातच बाकीच्या पंक्तीत पांच पांच याप्रमाणें लिहावीं. याप्रमाणे कोष्टक तयार करावें, मग दूताच्या प्रश्नाचें प्रथमाक्षर ज्या कोष्टकांत असेल त्या कोष्टकापासून बाल, कुमार, युवा, वृध; आणि मृत, याक्रमानें नक्षत्र, वार, तीथ हीं जर मृताख्य कोष्ठकें आलीं तर मृत्यू अन्यथा सुख असें जाणावें. बाल किंचित् लाभकारक, कुमार अर्धालाभ करणारा, युवा सर्व सिध्दी देणारा, वृध हानिकरणारा, मृत मृत्यु देणारा असा आहे.

| अ | इ | उ | ए | ओ |
|---|---|---|---|---|
| क | ख | ग | घ | च |
| छ | ज | झ | ट | ठ |
| ड | ढ | त | थ | द |
| ध | न | प | फ | ब |
| भ | म | य | र | ल |
| व | श | ष | स | ह |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| ६ | ७ | ८ | ९ | १० |
| ११ | १२ | १३ | १४ | १५ |
| र | चं | गु | शु | श |
| मं | बु | ० | ० | ० |
| रे | पु | उ | अ | श्र |
| अ | प | ह | ज्ये | ध |
| भ | आ | चि | मू | श |
| कृ | म | स्वा | पू | पू |
| रो | पू | वि | उ. | उ. |
| मृ | ० | ० | ० | ० |
| आ | ० | ० | ० | ० |

## स्वप्नाध्याय.

शुभाशुभंभाविफलंब्रूतेस्वप्नोनृणांयतः ॥

अतस्तदिहविज्ञातुंयोग्यंस्वप्नंब्रवीम्यहं ॥

अर्थ–स्वप्न हें बरें किंवा वाइट फल जें पुढें होणार; त्याला सुचवितें, यासाठीं स्वप्नाचें लक्षण जाणावयास योग्य, आहे; ह्मणून प्रथमतः स्वप्नलक्षण सांगतो,

## स्वप्नलक्षण.

स्वप्नास्तुप्रथमेयामेसंवत्सरविपाकिनः ॥ षड्भिर्मासैर्द्वितीयेतुत्रि

भिर्मासैस्तृतीयके ॥ चतुर्थेप्रहरेस्वप्नोमासिकेनफलप्रदः ॥ अरु

णोदयवेलायांदशाहेनफलंभवेत् ॥

अर्थ–स्वप्न रात्रीचा पहिल्याप्रहरीं पाहिलें आसतां त्याचें फळ एकवर्षानें व द्वितीय प्रहरीं पाहिल्यास साहा महिन्यानंतर. तृतिय प्रहरीं पाहिल्यास तीन महिन्यानंतर. चौथे प्रहरीं पाहिल्यास एक महिन्यानें. अरुणोदयीं पाहिल्यास दाहा दिवसांत फळ होईल असें जाणावें.

अरोहणंगोवृषकुंजराणांप्रासादशैलाग्रवनस्पतीनां ॥

विष्ठानुलेपोरुदितंमृतंचस्वप्नेष्वगम्यागमनंचधर्म्यं ॥

अर्थ–स्वप्नामधें पांढराबैल; व हत्ती, यांजवर बसला; व बंगल्यावर, पर्वताचेमाथ्यावर; किंवा हिरवेझाडावर चढला; व आंगाला विष्ठा लागली; व आपण रडतो, अथवा अपलेमरण किंवा अयोग्यस्त्रीगमन असें पाहतो, तर धर्म घडेल असें जाणावें.

स्वप्नेषुवीक्षतेयस्तुराजानंकुंजरंहयं ॥

सुवर्णंवृषभंगाश्चकुटुंबंतस्यवर्धते ॥

अर्थ–जो स्वप्नामधें राजा, हत्ती, घोडा, सोनें, बैल, गाइ, यांला पाहील त्याचें कुटुंब वाढेल.

प्रासादाग्रेऽन्नमश्नातियोवातरतिसागरं ॥

अपिदासकुलेजातःसराजानियतंभवेत् ॥

अर्थ–जो स्वप्नामध्यें उंचबंगल्यावर भोजन करितो; व समुद्र तरून जातो, तो दासकुळांतील असताही निश्चयानें राजा होईल.

दिपंवाफलितंवृक्षंकन्यांचक्रंध्वजंरथं ॥

लभतेयःपुमान्स्वप्नेराज्यंतस्यविनिर्दिशेत् ॥

अर्थ–ज्याला स्वप्नात, दीप, फळांनीं युक्त वृक्ष, कन्या, चक्र, ध्वज, रथ, हे पदार्थ मिळतात त्यास राज्य प्राप्त होईल.

मानुषस्यतुमांसानियस्तुस्वप्नेपुभक्षयेत् ॥

अपक्वान्येवसर्वाणिशृणुतस्यतुयत्फलं ॥

अर्थ–जो मनुष्य स्वप्नात मनुष्याचें हिरवेमांस भक्षणकरितो; त्याचें फळ सांगतो, तें ऐक.

पदेपंचशतीलाभःसहस्रंदक्षिणेभुजे ॥

मस्तकाशनकेराज्यंमंत्रित्वंहृदयाशनात् ॥

अर्थ–जर स्वप्नात पाय खाला, तर पांचशेंचा व उजवी भुजा खाल्यास; सहस्ररुपयांचा लाभ होतो, व मस्तक भक्षिलें असतां राज्यप्राप्ति; आणि हृदय भक्षिल्यास प्रधान होईल.

उपानहौध्वजंचक्रंलब्ध्वायःप्रतिबुध्यते ॥

असिंवानिर्मलंतीक्ष्णमध्वानंतस्यनिर्दिशेत् ॥

अर्थ–ज्या मनुष्याला स्वप्नांत वाहाणा; किंवा जोडा, ध्वज, चक्र, यांतील पदार्थ मिळून जागा होईल; किंवा उत्कृष्ठ पाजळलेली तलवार मिळेल, तर त्यास मार्ग चालावा लागेल.

नावमारुह्ययःस्वप्नेनदींतुविपुलांतरेत् ॥
प्रवासंनिर्दिशेत्तस्यशीघ्रमागमनंपुनः ॥

**अर्थ**–जो मनुष्य स्वप्नांत नावेंत बसून मोठीनदी तरून जाईल, त्याला प्रवास घडून पुनः तो शीघ्र परत येईल

दंतायस्यविशीर्यंतेकेशायस्यपतंतिच ॥
धननाशोभवेत्तस्यव्याधिपीडाप्यसंशयं ॥

**अर्थ**–जो स्वप्नांत आपले दांत पडले; किंवा केंस गळले, असें पाहील त्याचें द्रव्य हरपल; किंवा निःसंशय शरीरास रोगपीडा होईल.

अभिद्रवंतियंस्वप्नेशृंगिणोदंष्ट्रिणोथवा ॥
वानरावावराहावातस्यराजकुलाद्भयं ॥

**अर्थ**–ज्यामनुष्याचा स्वप्नांत शिंगांचे रेडा बैल वगैरे, व दाढांचे व्याघ्रादि पशू, व वानर डुकर, इत्यादिक पाठीस लागले, त्याला राजाचा कुळापासून भय होईल.

स्वप्नेभ्यक्तस्तुरजसातैलेनचघृतेनच ॥
स्नेहेनवातथान्येनव्याधितस्यविनिर्दिशेत् ॥

**अर्थ**–जो, स्वप्नांत, धुळीनें, तेलानें, तुपानें; अथवा दुसऱ्याजातीचा तेलानें, स्नान करील, त्यास व्याधि होणार, असें जाणावें.

रक्तांबरधरानारिरक्तगंधानुलेपना ॥
अवगूहतियंस्वप्नेतस्यहत्यांविनिर्दिशेत् ॥

**अर्थ**–ज्याला स्वप्नांत तांबडेंवस्त्र नेसलेली, व लालचंदन, कुंकु यांची उटी केलेली, अशीस्त्री भेटून आलिंगील तर. त्याच्या हातून हत्या होईल असें जाणावें.

पीतांबरधरानारीपीतगंधानुलेपना ॥
अवगूहतियंस्वप्नेकल्याणंतस्यनिर्दिशेत् ॥

**अर्थ**–पिंवळवस्त्र नेसलेली, व पिंवळयागंधाची उटी लावलेली अशा स्त्रीनें स्वप्नांत घट्ट आलिंगन केल्यास त्यापुरुषाचें कल्याण होईल असें जाणावें.

कृष्णांबरधरानारिकृष्णगंधानुलेपना ॥
अवगूहतियंस्वप्नेतस्यमृत्युंविनिर्दिशेत ॥

अर्थ–ज्या पुरुषास काळेवस्त्र नेसलेली, व काळ्याचंदनाची उटी लाऊन काळेंकुंकु लावलेली, अशी स्त्री स्वप्नांत घट्ट आलिंगन देईल, तर तो खचित मृत्यू पावेल असें जाणावें.

श्वेतांबरधरानारीश्वेतमाल्योपशोभिता ॥

अवगूहतियंस्वप्नेतस्यश्रीःसर्वतोमुखी ॥

अर्थ–स्वप्नामध्यें ज्या पुरुषास पांढरेंवस्त्र नेसलेली, पांढराचंदन अंगास लाऊन पांढ-ऱ्या फुलांचा माळानीं शोभणारी, अशी स्त्री घट्ट भेट देईल, तर तो पुरुष जाईलतीकडे ऐश्वर्य पावेल.

वपनंचविवाहंचस्वप्नांतेयस्तुपश्याति ॥

स्वगृहेनर्तनंचैवमृत्युंतस्याविनिर्द्दिशेत् ॥

अर्थ–जो पुरुष स्वप्नांत हजामत करितो, लग्नपाहतो; तसेंच आपल्याघरांत नाच चा-लला आहे; असें पाहतो, तर तो मृत्यू पावेल असें समजावें.

## स्वप्नाची लक्षणे त्यामध्यें प्रथम दुष्टस्वप्नें.

स्वप्नेपुनग्नान्मुंडांश्चरक्तकृष्णांबरावृतान् ॥ व्यंगांश्चविकृतान्कृष्णान्सपाशान्सायुधानपि ॥ बध्नतोनिघ्नतश्चापिदक्षिणांदिश माश्रितान् ॥ महिषोष्ट्रखरारूढान्स्त्रीपुंसोर्यस्तुपश्यति ॥ सस्वस्थोलभतेव्याधिंरोगीयात्येवपंचताम् ॥

अर्थ–पुरुषानीं अथवा स्त्रियानीं स्वप्नामध्यें नागवे, संन्यासी, व गोसावी इत्यादिक मुंडलले, तांबडी व काळीं पाघरुणे पांघरलेले, नाक कान कापलेले, पांगळे, कुबडे, खुजे, काळे, हातामध्यें पाश, तरवार, भाला, बरची इत्यादिक धारण केलेले, चोरादिकांना बांधणारे, व त्यांला मारणारे, दक्षिणदिशेचे आश्रयें करून राहिलेले, व म्हैस, उंट, गाढव, याजवर बसलेले इत्यादिकांला पाहिलें असतां, ज्याची प्रकृति स्वस्थ आहे, त्याला रोग होतो; व जाला रोग आहे तो मरण पावतो.

## दुसरीं दुष्टस्वप्नें.

अधोयोनिपतत्युच्चाज्जलेऽग्नौवाविलीयते ॥ श्वापदैर्हन्यतेयोऽपिमत्स्याद्यैर्गिलितोभवेत् ॥ यस्यनेत्रेविलीयेतेदीपोनिर्वाणतांव्रजेत् ॥ तैलंसुरांपिबेद्वापिलोहंवालभतेतिलान् ॥ पक्वान्नंलभतेश्नातिविशेत्कूपंरसातलम् ॥ सस्वस्थोलभतेव्याधिंरोगीयात्येवपंचताम् ॥

अर्थ–जो मनुष्य स्वप्नामध्यें आपणाला पर्वत, झाडें इत्यादिक उंचस्थानावरून पडलों असें पाहातो, व पाण्यामध्यें बुडालों, अग्नीनें जळलों, व कुत्र्यानीं नखानीं ओरखडलें, मत्स्यानीं भक्षिलें, अकस्मात् डोळे गेले व अकस्मात् दिवे मालवले असें पाहातो, व तेल सुरा[1] यांतें प्यालों, लोखंड, तिळ यांचा लाभ जाहाला, व शिजल्या अन्नाचा लाभ होऊन भक्षिलें व आडांत शिरलों, व पाताळांत शिरलों, या प्रकारचीं दुष्ट स्वप्नें पाहिलीं असतां ज्याची प्रकृति स्वस्थ आहे त्याला रोग होतो, व ज्याला रोग आहे तो मरण पावतो.

## दुष्टस्वप्नाचा परिहार.

दुःस्वप्नान्येवमादीनिदृष्ट्वाब्रूयान्नकस्यचित् ॥ स्नानंकुर्यादुष
स्येवदद्याद्धेमतिलानयः ॥ पठेत्स्तोत्राणिदेवानांरात्रौदेवालये
वसेत् ॥ कृत्वैवंत्रिदिनंमर्त्योदुःस्वप्नात्परिमुच्यते ॥

अर्थ–पूर्वीं सांगितलीं जीं नग्नमुंडादिक दुष्ट स्वप्नें तीं पाहून कोणाएकाजवळही न बोलतां प्रातःकाळीं स्नान करून सोनें, तिळ; व लोखंड यांचा धर्म करून दुष्ट स्वप्नाचा नाश करणारीं अशीं देवाचीं स्तोत्रें पठण करावीं. याप्रकारें दिवसास कृति करून रात्रीचे ठायीं देवळांत राहून जागरण करावें. या प्रमाणें तीन दिवस केलें असतां तो मनुष्य दुष्टस्वप्नापासून मुक्त होतो.

## चांगलींस्वप्नें.

स्वप्नेपुयःसुरान्भूपान्जीवंतःसुहृदोद्विजान् ॥
गोसमिद्धाग्नितीर्थानिपश्येत्सुखमवाप्नुयात् ॥

अर्थ–जो मनुष्य स्वप्नामध्यें इंद्रादिदेव, व राजे, मित्र, ब्राह्मण यांना सजीव पाहतो, व गाय, देदीप्यमान अग्नि, प्रयागादि तीर्थें इत्यादिकांना पाहतो तो सुख पावतो.

तीर्त्वाकलुषनीराणिजित्वाशत्रुगणानपि ॥
आरुह्यसौधगोशैलकरिवाहान्सुखीभवेत् ॥

अर्थ–जो मनुष्य स्वप्नामध्यें चिखलानें गढुल झालेल्या पाण्यातून उतरून गेला शत्रूंचे समुदायास जिंकिलें, व पांढऱ्या रंगानें सारविलेली माडी, बैल, पर्वत, हत्ती, घोडे इत्यादिकांवर [illegible] असें पाहातो तो मनुष्य सुख पावतो.

## दुसरींचांगलींस्वप्नें.

अगम्यागमनंलेपोविष्टायारुदितंमृतिं ॥
आममांसाशनंस्वप्नेधनारोग्याप्तयेविदुः ॥

---

१ धान्यादिकांना वाटून सिद्ध केली जी सुरा (ह्मo मद्य) ती स्वप्नाचे ठायीं प्याला असें पाहिलें असतां त्या पासून कल्याण नाहीं; व याहून इतर मद्यें स्वप्नाचे ठायीं प्याली असें पाहिल्यास शुभदायक होतात.

अर्थ—जो मनुष्य स्वप्नामध्यें आपल्याला जी स्त्री उपभोगास योग्य नाहीं तिजपाशीं गेलों अथवा जें स्थान जाण्यास योग्य नाहीं त्यास्थानीं गेलों असें पाहातो; व विष्ठें करून अंग भरलें, व आपलें रडणें अथवा दुसऱ्यांचें रडणें, व मरण पावलों असें पाहणें, व कच्चें मांस भक्षण केलें, इत्यादिकांला जो पाहतो; तो मनुष्य रोगरहित होतो; व त्याला धन प्राप्त होतें.

## दुसरींचांगलींस्वप्नें.

जलौकाभ्रमरीसर्पोमक्षिकावापियंदशेत् ॥
रोगीसभूयादारोग्यःस्वस्थोधनमवाप्नुयात् ॥

अर्थ—ज्या मनुष्याला स्वप्नामध्यें जळू, व काळ्या मधावरचा माशा व सर्पादिक, व दुसऱ्या लहान मधावरचा माशा, व श्लोकांतल्या वाशब्दें करून; गांधीलमाशा, व मशकादिक डसतात तो मनुष्य रोगी असला तर रोगरहित होतो, व स्वस्थ आहे त्याला धन प्राप्त होतें असें जाणावें.

## दुसरींचांगलींस्वप्नें.

शुभ्रपुष्पाणिवासांसिमांसमत्स्यफलान्यपि ॥
प्राप्यरोगीसुखीभूयात्स्वस्थोधनमवाप्नुयात् ॥

अर्थ—स्वप्नांत पांढरीं फुलें, वस्त्रें, मांस, मासे, आंबा, इत्यादी फळें जास मिळतील. तो रोगी असल्यास निरोगी होईल. रोगी नसल्यास धनलाभ पावेल.

आदित्यमंडलंस्वप्नेचंद्रंवायादिपश्यति ॥
व्याधिभिर्मुच्यतेरोगीस्वस्थस्तुश्रियमाप्नुयात् ॥

अर्थ—जो मनुष्य स्वप्नांत. सूर्यमंडळ किंवा चंद्र यांला पाहील, तो सर्व रोगापासून मोकळा होऊन स्वस्थ प्रकृतिहोत्साता लक्ष्मीतें पावेल.

यस्तुश्वेतेनसर्पेणदश्यतेदक्षिणेभुजे ॥
द्रव्यलाभोभवेत्तस्यसंपूर्णोदशमेदिने ॥

अर्थ—स्वप्नांत जा पुरुषाचा उजव्याभुजेस पांढऱ्या सर्पानें दंश केला, त्याला दाहावे दिवशीं बहुत द्रव्यलाभ होईल.

निगडैर्बध्यतेयस्तुपाशैर्वाबध्यतेभृशं ॥
सुपुत्रोजायतेतस्यप्रतिष्ठांचसाविंदति ॥

अर्थ—जा पुरुष स्वप्नांत आपल्यास बेडया घातल्या; किंवा पाशानीं बांधले असें पाहील, तर त्यास चांगला पुत्र होऊन प्रतिष्ठा मिळेल.

रक्तंपिबतियःस्वप्नेसुरांवापिकथंचन ॥
ब्राह्मणोलभतेविद्यामितरस्तुधनंबहु ॥

अर्थ–जो पुरुष स्वप्नांत रक्त अथवा मद्य पितो असें पाहील, तर ब्राह्मण असल्यास त्यास सर्व विद्या प्राप्त होतील. क्षत्रियादिकांस बहूत धन लाभ होईल.

क्षीरंपिबतियःस्वप्नेसफेनंदोहनीकृतं ॥
अहोभिर्दशभिश्चैवप्राप्नोत्यर्थंनसंशयः ॥

अर्थ–जो पुरुष स्वप्नांत ताजें काढलेलें व फेण आलेलें दूध प्राशन करील, तर त्यास दहा दिवसांनीं द्रव्य लाभ होईल, यांत संशय नाहीं.

नवौदनंपयःपानंधनलाभकरंपरं ॥
श्वेतमाल्यांबरंछत्रंचंदनंचधनप्रदं ॥

अर्थ–नूतन पक्क केलेलें अन्न व दुग्धप्राशन हें स्वप्नांत पाहिल्यास श्रेष्ठ धनलाभ होईल. तसेंच पांढरींपुष्पें, पांढरेंवस्त्र, छत्री, व चंदन, हीं पाहिल्यास धनलाभ होईल.

आसनेशयनेयानेशरीरेवाहनेगृहे ॥
ज्वलमानेविबुध्येततस्यश्रीःसर्वतोमुखी ॥

अर्थ–जो आसनास, किंवा अथरुणास, पालखीस, शरीरास, व वाहनास अग्नीलागून जळत आहे. असें पाहातांच जागा होईल. त्याला चोहींकडून लक्ष्मी प्राप्तहोईल.

यस्तुमध्येतडागस्यभक्षयेद्दधिपायसं ॥
निपण्णंपुष्करेपात्रेसभवेद्धरणीधव. ॥

अर्थ–जो स्वप्नांमध्यें तलावांत असून कमळाचा पानावर दहीं किंवा दूध भक्षण करील तो पृथ्वीपती होईल.

रक्तंदेहात्स्रवेद्यस्ययःस्नायाद्रुधिरेणवा ॥
शिरोवाछिद्यतेयस्यतस्यराज्यंविनिर्द्दिशेत् ॥

अर्थ–जो स्वप्नांत आपल्या देहापासून रक्तवाहात आहे, किंवा रक्तानें स्नान केलें अथवा आपलें शीर तोडितात, असे पाहतो.त यास राज्यप्राप्ति होइल असें समजावें.

खरोष्ट्रंमाहिषंयानमेकाकीयोधिरोहति ॥
तत्रस्थःप्रतिबुध्येतमरणंतस्यनिर्द्दिशेत् ॥

अर्थ–जो स्वप्नांत गाढव, उंट, रेडा यांवर एकला बसून जातआहे; अथवा बसला असतां तसाच जागा होईल, तर त्यास मरण प्राप्त होईल याप्रमाणे स्वप्नाचीं लक्षणे जाणावीं

## रोग्याचीं अष्टस्थानें.

रोगाक्रांतशरीरस्यस्थानान्यष्टौनिरीक्षयेत् ॥
नाडींमूत्रंमलंजिव्हांशब्दस्पर्शदृगाकृतीः ॥

अर्थ—ज्याचें शरीर रोगानें ग्रासिलें, त्यारोग्याचीं आठस्थानें पाहून वैद्यानें रोगाची परीक्षा करावी. तीं स्थानें नाडी, १ मूत्र, २ मळ, ३ जिव्हा, ४ शब्द, ५स्पर्श, ६ नेत्र, ७ शरीराचा आकार, ८ अशीं आठ आहेत

दोषकोपेघनेल्पेचपूर्वनाडींपरीक्षयेत् ॥ अंतेचादौस्थितिस्तस्या विज्ञेयाभिषजास्फुटं ॥ यथावीणागतातंत्रीसर्वान्रागान्प्रभाषते ॥ तथाहस्तगतानाडीसर्वान्रोगान्प्रकाशयेत् ॥

अर्थ—कफवातपित्तांत कोणांचा कोप, व कोणता दोष, अल्प आहे; हें समजण्याकरितां प्रथम रोग्याची नाडीपरीक्षा करावी; आणि वैद्यानें नाडीची आद्यंती स्थिती समजून घ्यावी, कारण जशी विण्यांची तार सर्वराग बोलवे तशीच नाडी हातांत राहून शरीरांतील सर्व रोगांला उघड करून दाखविते.

सर्वेषामेवरोगाणांनिदानंकुपितामलाः ॥ तत्प्रकोपस्यतुप्रोक्तं विविधाहितसेवनं ॥ निदानार्थकरोरोगोरोगस्याप्युपलभ्यते ॥

अर्थ—कोष्ठांत नानाप्रकारचे कुत्सितमळ कोपलेअसतां, सर्व रोगांचा उत्पत्तीस कारण होतात; व मळ कोपण्यास नानाप्रकारचे अपथ्यपदार्थ, आणि अन्नोदकादि कारणें आहेत असें जाणावें; व रोग ह्मणजे निदानाचा अर्थ, आणि निदान रोगार्थ आहे.

आदौसर्वेषुरोगेषुनाडींजिह्वांचमुत्रतां ॥
परीक्षांकारयेद्वैद्यःपश्चाद्रोगीचिकित्सयेत् ॥

अर्थ—वैद्यानें प्रथमतः सर्व प्रकारचे रोग उत्पन्न जाहालेअसतां, नाडी, मूत्र, हीं पाहून परीक्षा करावी, नंतर रोग्यास औषधांची योजना करावी.

नाड्यामूत्रस्यजिव्हायालक्षणंयोनविंदति ॥
मारयत्याशुवैजंतूत्सवैद्योनयशोलभेत् ॥

अर्थ—जो वैद्य नाडी, मूत्र, जिव्हा, यांचा परीक्षेचीं लक्षणें जाणतनाहीं, तो प्राण्यांस मारील; व आपणही यश पावणार नाहीं.

लक्षयित्वादेशकालंज्ञात्वारोगबलाबलं ॥
चिकित्सामारभेद्वैद्योयशःकीर्तिमवाप्नुयात् ॥

अर्थ—वैद्यानें देश, काळ, रोगाचें बलाबळ, हीं सर्व लक्षणें पाहून नंतर चिकित्सेस आरंभ करावा. असें केल्यानें वैद्यास यश व कीर्ति मिळते.

नाडीमंगुष्ठमुलाधःस्पृशेद्दक्षिणगेकरे ॥
ज्ञानार्थरोगिणोवैद्योनिजदक्षिणपाणिना ॥

अर्थ–दक्षिणहस्तांगुष्ठमुळाचा अधोभागीं नाडी आहे, यास्तव वैद्यानें रोग ज्ञाना करितां आपल्या दक्षिण हस्तानें तिला स्पर्श करून परीक्षा करावी.

स्थिराचित्तःप्रशांतात्मामनसाचविशारदः ॥ स्पृशेदंगुलिभिर्ना
डींजानीयाद्दक्षिणेकरे ॥ प्रायस्फुटाभवतिवामकरेवधूनांपुंसां
चदाक्षिणकरेतदियंपरीक्षा ॥

अर्थ–नाडी पाहते वेळीं निपुण वैद्यानें चित्त स्वस्थ, व आत्मा व मन हीं शांत ठेवून आपल्या अंगुलीनी रोग्याचा दक्षिणहस्तीं नाडी पाहून दोष जाणावे. त्यांत स्त्रियांची स्पष्ट नाडी वामहस्तीं, व पुरुषांची दक्षिण हस्तीं पाहावी.

## दुसरे प्रकार.

ईपद्विनामितकरंविततांगुलीयंवाहुंप्रसार्यरहितंपरिपीडनेन ॥

अर्थ–कोपरांजवळ किंचितवक्र व हाताची अंगुळी कळा लागल्यावांचून सोडिले ला, नाडीचा गतीस बंद करणारी बंधनादि अडचण नाहि, असा रोग्याचा बाहु प सरून नंतर नाडी पाहावी.

ईपद्विनम्रकृतकूर्परवामभागहस्तेप्रसारितसदंगुलिसंधिकेच ॥
अंगुष्ठमूलपरिपश्चिमभागमध्येनाडींप्रभातसमयेप्रथमंपरीक्षेत् ॥

अर्थ–कोपराच्या खालचा भाग किंचित् वक्र, व अंगुलीची पेरें विस्तारयुक्त अशा हाताचे आंगठयाच्या मूळाच्या खालच्या भागीं प्रातःकाळीं रोग्याची नाडीपरीक्षा करावी.

वारत्रयंपरीक्षेतधृत्वाधृत्वाविमुंचयेत् ॥
विमृश्यबहुधाबुध्यारोगव्यक्तिंविनिर्दिशेत् ॥

अर्थ–वैद्यानें रोग्याची नाडी पुनःपुनः धरून; व सोडून, परीक्षा करावी; आणि बुध्दीनें चांगला विचार करून पश्चात् रोगाची उत्पत्ती सांगावी.

अंगुलीत्रितयैःस्पृष्ट्वाक्रमाद्दोषत्रयोद्भवैः ॥
मंदांमध्यगतांतीक्ष्णांत्रिभिर्दोषैस्तुलक्षयेत् ॥

अर्थ–नाडीला, तीन अंगुळीनीं, स्पर्श करून क्रमानें कफ, वात, पित्त, यांचा योगा नें मंद, मध्यम, तीव्र, अशा नाडीच्या तीन प्रकारच्या गती त्रिदोषानीं होतात. त्या वैद्या ने सूक्ष्मदृष्टीने लक्षांत आणाव्या.

वातंपित्तंकफंद्वंद्वत्रितयंसान्निपातिकं ॥
साध्यासाध्यविवेकंचसर्वंनाडीप्रकाशते ॥

अर्थ-वात, पित्त,कफ, हे दोष, व यांचीं द्वंद्वे, ह्मणजे वातपित्त, पित्तकफ, कफवात हीं; व तिन्हींदोष मिळून सन्निपात, आणि रोगी साध्य, किंवा असाध्य, याचा वेगळेपणा, हे सर्व नाडी उघड करून दाखविते.

## नाडीचा पर्यायवाचकशब्दांचीं नावें.

स्नायुर्नाडीतथाहींस्राधमनीधारिणीधरा ॥
तंतुकीजीवनज्ञानाशब्दाःपर्यायवाचकाः ॥

अर्थ-स्नायु, नाडी, हींस्रा, धमनी, धारिणी, धरा, तंतुकी, जीवनज्ञान, अशीं आहेत.

## नाडीज्ञानास अयोग्य सांगतो.

सद्यस्नातस्यभुक्तस्यतथास्नेहावगाहिनः ॥
क्षुत्तृषार्तस्यसुप्तस्यनाडीसम्यक्नबुध्यते ॥

अर्थ-जो सद्यस्नानकेलेला, भोजनकेलेला, तसाच तैलादिकेकरून अभ्यंगकेलेला, क्षुधा, ताहान यांणीं पीडित; व निजलेला, यांची नाडी चांगली समजत नाहीं.

अंगुष्ठमूलभागेयाधमनीजीवसाक्षिणी ॥
तच्चेष्टयासुखंदुःखंज्ञेयंकायस्यपंडितैः ॥

अर्थ-जी मनुष्याचा अंगुष्ठाचा मूळभागीं नाडी आहे, ती या देहाची साक्षिभूत आहे, कारण तिचा गतीवरून यादेहाचा सुखदुःखाचें ज्ञान नाडिज्ञाते पंडितांस होतें.

## स्त्रियांची नाडी सांगतो.

स्त्रीणांभिषग्वामहस्तेवामेपादेचयत्नतः ॥ शास्त्रेणसंप्रदायेन तथास्वानुभवेनवै ॥ परीक्षेद्रत्नवच्चासावभ्यासादेवजायते ॥

अर्थ-वैद्यानें स्त्रियांची नाडी डाव्याहस्तांत, व डाव्या पायांत सूक्ष्मरीतीनें पाहावी, आणि तिची शास्त्राधारानें, व पूर्वीचा संप्रदायानें, आणि आपल्या अनुभवानें परीक्षा करावी. जशी रत्नाची परीक्षा अभ्यासानेंच होते, तशीच नाडीपरीक्षा निरंतर अभ्यासानेच होईल; नाहींतर अन्यउपायानें होणार नाहीं.

वातनाडीभवेत्ब्रह्मापित्तनाडीचशंकरः ॥
श्लेष्मनाडीभवेद्विष्णुस्त्रिदेवानाडिदेवताः ॥

अर्थ-वातपित्त व कफवाहिनीं नाडींचा देवता अनुक्रमें ब्रह्मा, शिव, विष्णू, आहेत.

## वातादि नाडीची स्थानें व तिचा गती.

अग्रेवातवहानाडीमध्येवहतिपित्तला ॥ अंतेश्लेष्मविकारेणना
डीज्ञेयाबुधैःसदा ॥ वाताद्वक्रगतिर्नाडीपितादुत्प्लुत्यगामिनी ॥
कफान्मंदगतिर्ज्ञेयासन्निपातादतिद्रुतं ॥

**अर्थ**–वातविशेष नाडी मूळीं वाहत्ये, पित्तविशेष नाडी मध्यें वाहत्ये व कफानें शेवटी ल भाग वाहातो. यावरून दोषत्रय जाणावें. वायूचा योग विशेष असतां नाडी वांकड्या गतीनें जात्ये, पित्तोदेकानें मंडूकासारिखी उडून उडून वाहत्ये; व कफानें मंदगती; व सन्निपातानें फार जलद वाहत्ये.

सर्पजलौकादिगतिंविदंतिविबुधाःप्रभंजनेनाडीं ॥ पित्तेनका
कलावकमंडूकादेस्तथाचपलां ॥ राजहंसमयूराणांपारावतक
पोतयोः ॥ कुक्कुटस्यगतिंधत्तेधमनीकफसंगिनी ॥ पित्तेव्यक्ताम
ध्यमायांतृतीयांगुलिगाकफे ॥ वातेधिकेभवेन्नाडीप्रव्यक्तातर्जनीतले ॥

**अर्थ**–सर्प व जळू यांचा गतीसारखी असल्यास वैद्य वातप्रकोप आहे असें जाणतात, व कावळा, लावापक्षी, बेडूक, यां सारिखी चपळ नाडीची गती असतां पित्तप्रकोप; राजहंस, मयूर, पारवा, कवडा, कोंबडा, यासारिखी गती असल्यास कफ प्रबळ आहे असें जाणतात. दुसराप्रकार. वात अधीक असल्यास आंगठयाजवळील तर्जनीचा मू. ळीं, पित्ताधिक्य असतां मध्यमांगुळीखाली, कफाधिक्य असल्यास तिसऱ्या अंगुलीखा. ली नाडीव्यक्त भासत्ये.

मुहुःसर्पगतिंनाडीमुहुर्भेकगतिंतथा ॥ तर्जनीमध्यमामध्येवात
पित्तेधिकेस्फुटा ॥ वक्रमुत्प्लुत्यचलतिधमनीवातपित्ततः ॥

**अर्थ**–वातपित्तनाडी वारंवार सर्पाचा व बेडकाचा गतीसारिखी तर्जनी आणि मध्यमा या दोहोंमध्यें उघड भासत्ये; व वक्रगतीनें उडीमारिल्या प्रमाणें चालत्ये.

सर्पहंसगतिंतद्वद्वातश्लेष्मवतींवदेत् ॥ अनामिकायांतर्जन्यां
व्यक्तावातकफेभवेत् ॥ वहेद्वक्रंचमंदंचवातश्लेष्माधिकत्वतः ॥

**अर्थ**–सर्प व हंस यांचा मिश्रगतिनें व तर्जनी आणि अनामिका यांचा खालीं वक्र व मंदगतीनें नाडी वाहत असल्यास वातकफाधिक्य आहे; असें जाणावें.

हरिहंसगतिंधत्तेपित्तश्लेष्मान्विताधरा ॥ मध्यमानामिकामध्ये
स्फुटापित्तकफेधिके ॥ उत्प्लुत्यमंदंचलतिनाडीपित्तकफेधिके ॥

**अर्थ**–बेडूक आणि हंस यांचा मिश्रगतीनें व मध्यांगुली आणि तृतीयांगुळी यांचाखालीं उड्या मारित मंदगतीनें जी नाडी वाहात्ये; ती पित्त कफाधिक आहे; असें जाणावें.

काष्ठकुट्टोयथाकाष्ठंकुट्टतेचातिवेगतः ॥ स्थित्वास्थित्वातथाना

डीसन्निपातेभवेत्ध्रुवं ॥ अंगुलीत्रितयेपिस्यात्प्रव्यक्तासन्निपाततः ॥

अर्थ–काष्ठकुट्टपक्षिविशेष (सुतारी) जसा अतिवेगानें काष्ठावर चोंच मारतो तशी. राहून राहून. वाहाणारी, व तीनही आंगुळीचा खालीं नाडी व्यक्त नसल्यास सन्निपाताची जाणावी.

स्पंदतेचैकमानेनत्रिंशद्वारंयदाधरा ॥ स्वस्थानेनतदानूनंरोगी

जीवतिनान्यथा ॥ स्थित्वास्थित्वावहतियासाज्ञेयाप्राणघातिनी ॥

अर्थ–जा रोग्याची नाडी एकाचगतीनें एकजाग्यावर सारिखी तीसवेळ वाहील; तर रोगी वांचेल. जी नाडी राहून राहून वाहात्ये; ती प्राणनाश करणारी जाणावी.

## नाडीवरून असाध्य लक्षण.

मंदंमंदंशिथिलशिथिलंव्याकुलंव्याकुलंवास्थित्वास्थित्वावह

तिधमनीयातिसूक्ष्माचसूक्ष्मा ॥ नित्यंस्कंधेस्फुरातिपुनरप्यंगु

लीःसंस्पृशेद्वाभावैरेवंबहुविधतरैःसन्निपातादसाध्या ॥ तस्यमृ

त्युंविजानीयाद्यस्येदंनाडिलक्षणं ॥

अर्थ–हळू[1] हळू शिथिल शिथिल, व्याकुळ व्याकुळ, व राहून राहून, फारच सूक्ष्म सूक्ष्म अशी क्षणांत हाताचा मूळीं, (बाउसांत) व क्षणांत अंगुळीचा मुळीं वाहूं लागत्ये, अशा अनेक प्रकारचा गती नाडी क्षणोक्षणीं स्थाननष्ट होऊन वाहूं लागल्यास ती सांन्निपातग्रस्त; व मृत्युदायक असें जाणावें.

पूर्वेपित्तगतिंप्रभंजनगतिंश्लेष्माणमाबिभ्रतीस्वस्थानात्भ्रमणं

मुहुर्विदधतीचक्रादिरूढेवया ॥ भीमत्वंदधतीकदाचिदपिवासू

क्ष्मत्वमातन्वतीनोसाध्यांधमनींवदंतिमुनयोनाडीगतिज्ञानिनः ॥

अर्थ–नाडी पूर्वी पित्तगतीने जात असतां केव्हां मध्येच वायू व कफ, यांचां गतीने वाहूं लागते, व आपली जागा सोडून वारंवार अनेक तऱ्हेने चाकावर बसऊन भोंवडिल्या प्रमाणे भ्रमण करित्ये, आणि कधीं भयंकर, व केव्हां केव्हां अतिसूक्ष्म मंद अशी झाली असतां ती साध्य नव्हे, असे नाडी परिक्षक ऋषी बोलतात.

गंभीरायाभवेन्नाडीसाभवेन्मांसवाहिनी ॥

ज्वरवेगेनधमनीसोष्णावेगवतीभवेत् ॥

---

१ हळू हळू इत्यादि शब्द द्विरुक्तीने व पुष्कळ लिहिण्याचे कारण नाडीची अनियमित गती दाखविण्याकरित.

अर्थ—जी नाडी खोल वाहत्ये ती मांसामध्ये, वाहाणारी समजावी; आणि ज्वराचा वेगानें नाडी उष्ण व फार जलद वाहात्ये.

कामक्रोधाद्वेगवहाक्षीणाचिंताभयान्विता ॥
मंदाग्नेःक्षीणधातोश्चनाडीमंदतराभवेत् ॥

अर्थ—काम, किंवा क्रोध यांणीं जो व्याप्त त्याची नाडी फार वेगानें वाहत्ये, चिंता व भय यांणीं जो युक्त त्याची नाडी क्षीण वाहत्ये; आणि मंदाग्नीची व धातुक्षीणाची नाडी फार मंदगतीनें वाहत्ये.

असृक्पूर्णाभवेत्सोष्णागुर्वीसामागरीयसी ॥ लघ्वीवहतिदीप्ता
ग्नेस्तथावेगवतीमता ॥ चपलाक्षुधितस्यापितृप्तस्यवहतिस्थिरा ॥

अर्थ—जी नाडी रक्तानें पूर्ण असत्ये ती उष्ण आणि जड, आमयुक्ताची जड, दीप्ताग्नीची हलकी, किंवा वेगानें; व क्षुधायुक्ताची चपळ, आणि तृप्ताची स्थिर वाहत्ये.

मरणेडमरूकाराभवेदेकदिनेनच ॥

अर्थ—एकादिवसात मरणाराची नाडी डमरूच्या क्रियेसारखी वाहत्ये.

कंपतेस्पंदतेत्यंतंपुनस्पृशतिचांगुलीः ॥
तामसाध्यांविजानीयान्नाडींदूरेणवर्जयेत् ॥

अर्थ—जी नाडी अत्यंत कांपत्ये व किंचित हालत्ये व नाहिशी होत्ये, आणि पुनः हातांचा अंगुळींला स्पर्श करित्ये, ती असाध्य जाणून वैद्यानें सोडावी.

स्थिरानाडीभवेद्यस्यविद्युत्द्युतिरिवेक्षते ॥
दिनैकंजीवितंतस्यद्वितीयेमृत्युरेवच ॥

अर्थ—जा रोग्याची नाडी बहुधा, स्थिर असून, कधींकधीं, विजेसारिखी मध्येच उसाळी देते त्या रोग्याचें जिवीत एकदिवसपर्यंत द्वितयदिवशीं मृत्यूच जाणावा.

शीघ्रानाडीमलोपेताशीतलावाथदृश्यते ॥
द्वितीयेदिवसेमृत्युर्नाडीविज्ञातृभाषितं ॥

अर्थ—जा रोग्याची, मळदूषित नाडी शीघ्र वाहत्ये, किंवा शीत लागत्ये, त्या रोग्याचा दुसरेदिवशीं मृत्यु समजावा; असें नाडिज्ञानगारंगतानीं सांगीतलें आहे.

मुखेनाडीवहेत्तीव्राकदाच्छीतलावहेत् ॥
आयातिपिच्छलःस्वेदःसप्तरात्रंनजीवति ॥

अर्थ—वातनाडी तीव्रगती, व केव्हा शीतळ वाहत्ये, व अंगाला चिकट घाम येतो तो रोगी सातरात्री वांचणार नाहीं.

देहेशैत्यंमुखेश्वासोनाडीतीव्राविदाहिनी ॥
मासार्धजीवितंतस्यनाडीविज्ञातृभाषितं ॥

अर्थ–शरीरास थंडपणा मुखाने फार श्वास सोडणे, व नाडी तीव्र दाहयुक्त वाहत्ये त्याचे अर्धमास आयुष्य असें नाडिज्ञात्यानी सांगीतले आहे.

मुखेनाडीयदानास्तिमध्येशैत्यंबहिःक्लमः ॥
यदामंदावहेन्नाडीत्रिरात्रंनैवजीवति ॥

अर्थ–जेव्हा वातनाडी उमगत नसून, अंतर्यामीं शीतळ, व बाहेर ग्लानीं असून मंदमंद वाहत्ये तेव्हा रोगी तीनरात्री वांचणार नाहीं

अतिसूक्ष्मातिवेगाचशीतलाचभवेद्यदि ॥
तदावैद्योविजानीयात्सरोगीत्वायुषःक्षयी ॥

अर्थ–जेव्हां नाडी अति सूक्ष्म किंवा अति वेगवान आणि शीतळ वाहत्ये तेव्हा रोगी क्षिणायुष्य आहे, असे वैद्यानें जाणावें.

विद्युद्द्रोगिणोनाडीदृश्यतेनचदृश्यते ॥
अकालविद्युत्पातेवसगच्छेद्यमसादनं ॥

अर्थ–ज्या रोग्याची नाडी केव्हां केव्हां विजेसारखी व केव्हां केव्हां ज्ञान होते; किंवा न होतें, अशी सूक्ष्म भासतें किंवा भासत नाहीं, तो रोगी अकाळीं वीज जशी पडते तसा यमाचा घरीं जाइल असें जाणावें

तिर्यगुष्णाचयानाडीसर्पगावेगवत्तरा ॥
कफपूरितकंठस्यजीवितंतस्यदुर्लभं ॥

अर्थ–नाडी उष्ण वक्रगती, व सर्पासारिखी फार वेगवान, व गळा कफानें दाटलाआहे' अशा रोग्याचें जीवित. दुर्लभ जाणावें.

चलाचलितवेगाचनासिकाधारसंयुता ॥
शितलादृश्यतेयाचयाममध्येचमृत्युदा ॥

अर्थ–ज्याची नाडी कांपणारी, व चंचल अशी असून नासिकेचा श्वासोच्छ्वासाचा आधारानें चालणारी, आणि शीतळ अशी भासत्ये, तो रोगी येक प्रहरांत मृत्यू पावेल असें जाणावें.

शीघ्रानाडीमलोपेतामध्यान्हेग्निसमोज्वरः ॥
दिनैकंजीवितंतस्यद्वितीयेन्हिम्रियेतसः ॥

अर्थ–जा रोग्याची त्रिदोषयुक्त नाडी फार जलद वाहांये, व ज्यास दोनप्रहरी अमीसा रिखा ज्वर येतो, त्या रोग्याचें आयुष्य एकदिवस दुसऱ्यादिवशी तो मृत्यू पावेल असें जाणावें.

दृश्यतेचरणेनाडीकरेनैवाधिदृश्यते ॥
मुखंविकासितंयस्यतंदूरंपरिवर्जयेत् ॥

अर्थ–जा रोग्याची नाडी पायांत मात्र भासत्ये. हस्तांत भासतच नाहीं; आणि ज्याचे मुख वासल्यासारिखें दिसते त्या रोग्याचा वैद्याने दुरूनच त्याग करावा.

वातपित्तकफाश्चापित्रयोयस्यांसमाश्रिताः ॥
कृच्छ्रसाध्यामसाध्यांवाप्राहुर्वैद्यविशारदाः ॥

अर्थ–वात, पित्त, कफ, हे तीनही दोष जा नाडीत एकदांच आश्रय करितात, ती नाडी फार यत्नाने साध्य होत्ये; अथवा होतच नाही असे पूर्वीचे कुशल वैद्यानी सांगीतले आहे.

## वात ज्वरी नाडी परीक्षा.

वक्राचचपलाशीतस्पर्शावातज्वरेभवेत् ॥

अर्थ–वातज्वर झाला असतां नाडी वांकड्या चंचळ गतीनें वाहत असून, हाताव जिचा स्पर्श थंड लागतो, अशी होत्ये.

द्रुताचसरलादीर्घाशीघ्रापित्तज्वरेभवेत् ॥

अर्थ–पित्तज्वरामध्यें अतिघाईनें जलद, व सरळ अशी वाहत्ये.

मंदाचसुस्थिराशीतापिच्छिलाश्लेष्मलेभवेत् ॥

अर्थ–कफज्वरामध्यें नाडी फारस्थिर, शीत, स्निग्ध, अशी होत्ये.

वक्राचईषच्चपलाकठिनावातपित्तजा ॥

अर्थ–वातपितानें नाडी वांकडी, किंचित् चंचळ, कठीण अशी होत्ये.

ईषच्चदृश्यतेदृष्ट्यामंदास्याच्छ्लेष्मवातजा ॥

अर्थ–कफ वात प्रबळ असतां नाडी किंचित् दिसत्ये; व मंद होत्ये असें जाणावें.

सूक्ष्माशीतास्थिरानाडीपित्तश्लेष्मसमुद्भवा ॥

अर्थ–पित्तकफाचा योगानें नाडी सूक्ष्म, स्थिर आणि शीतळ असत्ये.

हंसगाचैवयानाडीतथैवगजगामिनी ॥
मुखंप्रशस्तंचभवेत्तस्यारोग्यंभवेत्सदा ॥

अर्थ–जाची नाडी हंसगती तशीच हस्तिगती भासत्ये; आणि मुख सुप्रसन्न दिसते, त्याला सर्वदा आरोग्य होईल असें जाणावें.

योरोगिणःकरंस्पृष्ट्वास्वकरंक्षालयेद्यदि ॥
रोगास्तस्यविनश्यंतिपंकःप्रक्षालनाद्यथा ॥

अर्थ—जर वैद्य रोग्याची नाडी पाहून आपला हात धुवील, तर धुतल्याने जसा चिखल जातो तसा त्याचा रोग नाश पावेल.

## मूत्रपरीक्षा.

अथातःसंप्रवक्ष्यामिमूत्रस्यचपरीक्षणं ॥
येनविज्ञातमात्रेणरोगचिन्हंप्रकाशते ॥

अर्थ—नाडीपरीक्षेनंतर मूत्रपरीक्षा सांगतो, जा मूत्रपरीक्षेचा ज्ञानानें सर्व रोगांचीं लक्षणें उघड दिसतात.

## मूत्रपाहण्याची वेळ.

निशांतयामेघटिकाचतुष्टयेउत्थाप्यवैद्यःकिलरोगिणंच ॥
मूत्रंधृतंकाचमयेचपात्रेसुर्योदयेतत्सततंपरीक्षेत् ॥

अर्थ—वैद्यानें रात्रीचा शेवटीलप्रहरांत चारघटिका रात्र राहिलीअसता पाहाटेस रोग्याला उठउन काचेचे भांड्यात मूत्र धरून ठेऊन सुर्योदयीं त्याची परीक्षा करावी.

## मूत्रधरण्याचा प्रकार.

तस्याद्यधारांपरित्यज्यमध्यधारोद्भवंतत्परिधारायित्वा ॥
सम्यक्परिज्ञायगदस्यहेतुंकुर्याच्चिकित्सांसततंहिताय ॥

अर्थ—रोग्याचें मूत्र धरतेवेळेस पहिले व शेवटचे मूत्र सोडून मध्यमूत्र धरावें, आणि त्या मूत्रावरून रोगाचे कारण जाणून रोग्याचा हिताकरितां औषध योजना करावी.

वातेचपांडुरंमूत्रंसफेनंकफरोगिणां ॥ रक्तवर्णंभवेत्पित्तेद्वंद्वजे मिश्रितंभवेत् ॥ सन्निपातेचकृष्णंस्यादेतन्मूत्रस्यलक्षणं ॥

अर्थ—रोग्याचें मूत्र वातविकारानें पांढरे, कफविकारानें फेनयुक्त, पित्तविकारानें आरक्त वर्ण, द्वंद्वजव्याधीनें मिश्रवर्ण, आणि सन्निपातानें कृष्णवर्ण, होतें. हें मूत्राचें सामान्य लक्षण जाणावें.

परीक्षाविधिवत्कार्यारोगिमूत्रस्यतत्वतः ॥
तृणेनदापयेत्तैलबिंदुंतत्रातिलाघवात् ॥

अर्थ—रोग्याचा मूत्राची यथाविधिनें चांगली परिक्षा करावी, ती आशी पूर्वी धरून ठेविलेल्या मूत्रामध्यें गवताची काडी घेऊन तिणें मोठ्या कुशलतेनें तेलाचा बिंदू मूत्रांत टाकावा.

विकासिचेत्तैलमथाशुमूत्रेसाध्यःसरोगीनविकाशितंचेत् ॥
स्यात्कष्टसाध्यस्तलगेत्वसध्योनागार्जुनेनैवकृतापरीक्षा ॥

अर्थ–मूत्रांत टाकिलेला तैलबिंदु जर सर्व मूत्रभर पसरेल तर रोगी साध्य, व पसरल नाहीं; तर कष्ट साध्य, आणि तळास जाउन बसला, तर असाध्य याप्रकारें नागार्जुना अनुभव घेऊन सांगितलें आहे.

नीलंचरूक्षंकुपितेचवायौपीतारुणंतैलसमंचपित्ते ॥ स्निग्धंक
फेपल्वलवारितुल्यंस्निग्धोष्णरक्तंरुधिरप्रकोपे ॥

अर्थ–रोग्याचें मूत्र वायूचा प्रकोप झाला असतां, निळ्यारंगाचें, व रुक्ष, पित्त प्रकोपां तांबुस, पिवळ्यारंगाचें, तैलासारखें, कफ प्रकोपाने चिकट, सांचलेल्या उदकासारिखें, र विकाराने उष्ण, चिकण, लाल, असतें.

मातुलिंगरसाभासंसौवीराभंजलोपमं ॥
प्रपाकरहितानांचमूत्रंचंदनसन्निभं ॥

अर्थ–जाचें अन्न चांगलें पचन होतनाहीं, त्याचें मूत महाळुंगाचा रसासारिखें, किं कांजीसारिखें, अथवा पाण्यासारिखें, किंवा चंदनासारिखें, असतें.

अजीर्णप्रभवेरोगेमूत्रंतंडुलतोयवत् ॥
नवज्वरेधूम्रवर्णंबहुमूत्रंप्रजायते ॥

अर्थ–अजीर्णापासून विकार उत्पन्न झाला असतां, मूत्र तांदुळांचा धुवणासारिखें अ सतें, व नवज्वरामध्यें रंगानें धुरासारिखे; व पुष्कळ होतें.

पित्तानिलेधूम्रजलाभमुष्णंश्वेतंमरुच्छ्लेष्मणिबुद्बुदाभं ॥ सश्ले
ष्मपित्तेकलुषंसरक्तंजीर्णज्वरेसृक्सदृशंचपीतं ॥ स्यात्संन्निपा
तादपिमिश्रवर्णंतूर्णंविधिज्ञेनविचारणीयं ॥

अर्थ–मूत्र पित्तवातांचा कोपानें धूम्रवर्ण उष्ण उदकासारिखें, वातकफाचा कोपा पांढरें व बुडबुड्यांसारिखें, कफपित्तविकारानें लाल, व गढुळ, जीर्णज्वर असतां पीव व रक्तासरिखें, आणि सन्निपात झालाअसतां, सर्व मिश्रितरंगाचें होतें. याप्रकारें चिकि त्सकांनि जाणवों.

पूर्वाशांवर्धतेबिंदुर्यदाशीघ्रंसुखीभवेत् ॥
दक्षिणाशांज्वरोज्ञेयस्तथारोग्यंक्रमाद्भवेत् ॥

अर्थ–पुर्वी सांगीतल्याप्रमाणें मूत्रांत टाकिलेला तैलबिंदु जर पूर्वेकडे वाढत जाईल तर रोगी लवकर सुखी होइल. जर दक्षिदिशेस पसरेल, तर ज्वर आहे; व तो रोगी औषधीनें आरोग्य पावेल.

उत्तरस्यांयदाबिंदोःप्रसरःसंप्रजायते ॥
अरोगितातदानूनंपुरुषस्यनसंशयः ॥

अर्थ–जर तैलबिंदु, उत्तरदिशेस पसरेल; तर तो रोगी रोगरहित आहे. यांत संशय नाहीं

वारुण्यांप्रसरेद्बिंदुःसुखारोग्यंतदादिशेत् ॥

अर्थ–जर पश्चिमदिशेस तैलबिंदु वाढेल; तर रोग्यास सुख व आरोग्य होईल.

ईशान्यांवर्धतेबिंदुर्ध्रुवंमासेननश्यति ॥ आग्नेय्यांतुतथाज्ञेयंनैऋ त्यांप्रसरेद्यदि ॥ छिद्रितंचभवेत्पश्चाध्रुवंमरणमादिशेत् ॥

अर्थ–जर बिंदु इशान्यदिशेस वाढेल; तर तो रोगी येकमहिन्यानें नाश पावेल. जर आग्नेयीदिशेस वाढेल, तर एक महिन्यानेंच नाश पावेल; आणि जर नैऋत्यदिशेस बिंदु पसरून नंतर त्यांत छिद्रें होतील, तर निश्चयेंकरून त्या रोग्यास मरण येइल, असें जाणावें.

वायव्यांप्रसरेद्बिंदुःसुसाध्योपिनजीवति ॥

अर्थ–जर वायव्यादिशेस बिंदू पसरेल, तर तो रोगी साध्य दिसला तथापि वांचणार नाहीं

विकाशितंहलंकूर्मसैरिभाकारसंयुतं ॥ करंडमंडलंवापिनरंमूर्ध विवर्जितं ॥ गात्रखंडंचशस्त्रंचखड्गंमुसलपट्टिशं ॥ शरंचलगु डंचैवतथैवात्रिचतुःपथं॥बिंदुरूपंनरोदृष्ट्वानकुर्वीत।क्रियांक्वचित्

अर्थ–जर तेलाचा बिंदू नांगरासारिखा, किंवा कांसव, रेडा, व करंड्याचे आकारासारिखा; किंवा मनुष्याचा धडासारिखा, किंवा तोडलेल्या हातपायांसारिखा, अथवा शस्त्र, तलवार, मुसळ, पट्टा, बाण, दांडा, किंवा चवाठा यासारिखा आकार झाला असतां, त्या रोग्याला औषध देऊनये.

हंसकारंडताडागंकमलंगजचामरं ॥ छत्रंवातोरणंहर्म्यंसुपूर्ण दृश्यतेयदि ॥ आरोग्यताध्रुवंज्ञेयातदाकुर्यात्प्रतिक्रियां ॥

अर्थ–जर तैलबिंदू हंसपक्षी, कारंड. तलाव, कमळ, हत्ती, चवरी, छत्र. तोरण, किंवा बंगला. इतक्यांचा आकारासारिखा होईल, तर त्या रोग्यास खचित आरोग्य होईल याजकरितां औषधी उपाय करावा.

तैलबिंदुर्यदामूत्रेचालनीसदृशोभवेत् ॥
कुलेदोषोध्रुवंज्ञेयःप्रेतदोषसमुद्भवः ॥

अर्थ–जेव्हां तैलबिंदू मूत्रांत वर चाळणीसारिखा छिद्रयुक्त होईल, तेव्हां रोग्याचा कुळांत प्रेताचा दोषापासून रोग उत्पन्न जाहाला असें जाणावें.

नराकारंप्रजायेतकिंवास्यान्मस्तकद्वयं ॥
भूतदोषंविजानीयाद्भूताविद्यांतदाचरेत् ॥

**अर्थ**–तैलबिंदू मूत्रांवर मनुष्याकार, किंवा दोन मस्तकांचा आकारासारिखा होईल, तर त्यास भूतदोष आहे, असें समजून यंत्रविद्येचा प्रयोग करावा.

मंजिष्ठाभंधूम्रवर्णचनीलंस्निग्धंमूत्रंवारितुल्यंचशीतं ॥
ज्ञात्वाचित्तेबुद्धिमान्मानुषाणांकुर्यात्वंतर्भेषजंरोगिणांच ॥

**अर्थ**–जर मूत्र मंजिष्ठच्या रंगासारखें, किंवा धूम्रवर्ण, निळें, चिकट, किंवा पाण्या सारिखें थंड जाहाल्यास बुद्धिमंताने रोग्यास औषधउपाय करावा.

सर्पाकारंभवेद्वाताच्छत्राकारंतुपित्ततः ॥
मुक्ताकारंभवेच्छ्लेष्मणाइत्येतन्मूत्रलक्षणं ॥

**अर्थ**–तैलबिंदू मूत्रावर वातविकारानें सर्पासारिखा, व पित्तकोपाने छत्रासारिखा, व कफकोपानें मोत्यांसारिखा, होतो; असें मूत्रलक्षण जाणावें.

## मलपरिक्षा.

त्रुटितंफेनिलंरूक्षंधूमलंवातकोपतः ॥
वातश्लेष्मविकारेचजायतेकपिशंमलं ॥

**अर्थ**–मळ वातकोपानें त्रुटित, फेनयुक्त, रूक्ष, धूम्रवर्ण; आणि वात कफ विकृतीनें पिवळा वर्ण असून तांबूस असा होतो.

बद्धंसुत्रुटितंपीतंश्यामंपित्तानिलाद्भवेत् ॥
पीतश्यामंश्लेष्मपित्तादोषदार्द्रंचपिच्छलं

**अर्थ**–पित्त वायूचा योगानें मळ त्रुटित पिवळा काळा खड्यासारिखा; आणि कफ पित्तानें पिवळा, काळा, आणि किंचित् आर्द्र, व चिकट असा होतो.

श्यामंत्रुटितपीताभंबद्धंश्वेतंत्रिदोषतः ॥

**अर्थ**–त्रिदोष कोपानें मळ काळा, त्रुटित, पीतवर्ण, खड्यासारिखा श्वेतवर्ण असा होतो.

दुर्गंधःशिथिलश्चैवविष्ठोत्सर्गोयदाभवेत् ॥
तदाजीर्णमलंवैद्यैर्दोषज्ञैःपरिभाष्यते ॥

**अर्थ**–दुर्गंध, शिथिल, असा मळ झाला असतां; त्याला अजीर्ण झालें असें समजावें.

कपिलंगुंठियुक्तंचयदिवर्चोवलोक्यते ॥ प्रक्षीणमलदोषेणदू
षितःपरिकथ्यते ॥ सितंमहत्पूतिगंधंमलंज्ञेयंजलोदरे ॥

अर्थ–मळ वातादिदोष क्षीण झाल्यामुळें पिवळट, व गांठीळ होतो; आणि जळोदरानें, पांढरा दुर्गंध असा होतो.

श्यामंक्षयेत्वामवातेपीतंसकटिवेदनं ॥ अतिकृष्णंचातिशुभ्र

मतिपीतंतथारुणं ॥ मरणायमलंकिंतुभृशोष्णंमृत्यवेध्रुवं ॥

अर्थ–मळ श्यामवर्ण क्षयानें होतो; आणि पीतवर्ण असून कटिवेदनायुक्त आमवातानें होतो; आणि अतिशुभ्र, किंवा अतिकृष्ण तसाच पीत, किंवा अरुणवर्ण असून अत्यंत ऊष्ण असा झाला असतां मृत्युकारक जाणावा.

वातस्यचमलंकृष्णंततःपित्तस्यपीतविट् ॥

रक्तवर्णमलंकिंचिन्मलंश्वेतंकफोद्भवं ॥

अर्थ–मळ वातानें कृष्णवर्ण, पित्तानें पीतवर्ण किंवा रक्तवर्ण, व कफानें श्वेतवर्ण होतो.

आमंवाश्वेतजंप्राहुर्मिश्रितंद्वंद्वजंवदेत् ॥

अपक्वंस्यादजीर्णेतुपक्वंस्वस्थमलंभवेत् ॥

अर्थ–मळ दोनदोषाचा कोपानें आम, किंवा श्वेतवर्ण, किंवा मिश्रवर्ण होतो; आणि अजीर्णानें अपक्व होतो; व स्वस्थ प्रकृतीचा पक्व होतो.

अत्यग्नौपीडितंशुष्कंमंदाग्नौतुद्रवीकृतं ॥

दुर्गंधंचंद्रिकायुक्तमसाध्यंमललक्षणं ॥

अर्थ–तीक्ष्णाग्नीचा मळ गांठळ होतो, व मंदाग्नीचा पातळ होतो, आणि दुर्गंध, व चकचकीत मळ झालाअसतां, रोगी असाध्य आहे असें जाणावें.

बद्धंश्य.मंमरुतिकुपितेपित्तकोपेतुपीतंपानीयाभंसफेनंकफरुपिचमलेसां

द्रपांडूरवर्णं ॥ रक्तेक्रुद्धेसरक्तंजलनिभमथतद्द्वंद्वकोपेद्विलिंगंसर्वैर्दोषैस

रोषैर्भवतिकिलमलंरोगिणःसर्वलिंगं ॥

अर्थ–बांधलेला, काळा मळ, वातकोपानें, पित्तकोपानें पीतवर्ण, कफकोपानें पाण्यासारिखा, फेनयुक्त, घण, पांढरा, असा होतो; आणि रक्तकोपानें रक्तवर्ण, पाण्यासारखा मळ होतो. द्वंद्वकोपानें, द्विचिन्ह होतो. तसाच त्रिदोषांचे कोपानें सर्व चिन्हयुक्त होतो.

दुर्गंधिश्यामवर्णमलमरुणनिभंपांडुराभंविचित्रंमांसाभंमेचकंतत्प्रभवति

मरणायैवरोगान्वितस्य ॥ विस्रंशैथिल्ययुक्तंमुहुरतिनिपतत्स्यादजीर्णा

च्चवर्चोदिङ्मात्रंचैतदेवंनिगदितमगदैर्लक्षणंवर्चसोपि ॥

अर्थ–दुर्गंध, काळा, किंचितलाल, पांढरा, अनेकवर्णयुक्त, मांसासारिखा, काळासावळा, असा मळ झालाअसतां रोगी मरतो; आणि अजीर्णानें त्रुटित, शिथिल, वारंवार, आसा मळ होतो. हें वैद्यानी किंचित दिङ्मात्र लक्षण मळांचें सांगितलें.

## जिव्हापरीक्षा.

जिव्हाशीताखरस्पर्शास्फुटितामारुताधिके ॥ रक्तश्यामाभवे
त्पित्तेकफेशुभ्रातिपिच्छला ॥ कृष्णासकंटकाशुष्कासंन्निपाता
धिकेतुसा ॥ मिश्रितेमिश्रिताज्ञेयासर्वलक्षणवर्जिता ॥

अर्थ–जीभ वातानें थंड. खरखरीत, फुटलेली, अशी होत्ये; आणि पित्तकोपानें रक्तवर्ण, कृष्णवर्ण. अशी होत्ये. आणि कफानें शुभ्र, व चिकट अशीहोत्ये. व सन्निपाताने कृष्णवर्ण, कंटकयुक्त, शुष्क, अशी होत्ये; आणि द्वंद्वांमध्ये द्वंद्वरूप होत्ये.

शाकपत्रप्रभारूक्षास्फुटितारसनानिलात् ॥ रक्ताश्यामाभवे
त्पित्ताल्लिप्ताद्रार्धवलाकफात् ॥ परिदग्धाखरस्पर्शाकृष्णादो
षत्रयाधिके ॥ सैवदोषद्वयाधिक्येदोषाद्वितयलक्षणा ॥

अर्थ–जीभ वायूने पोकळ्याचा भाजीचा पानासारिखी लाल, रूक्ष, फुटलेली; पित्त कोपाने रक्तवर्ण; व श्यामवर्ण, कफकोपाने, चिकट, ओली, पाढरी, त्रिदोषांचे कोपाने भाजलेल्यासारिखी, खरखरीत, काळी; आणि द्विदोषांचे कोपाने दोनदोषांचा लक्षणानी युक्त असत्ये.

## शब्दपरीक्षा.

गुरुःस्वरोभवेत्श्लेष्मीस्फुटवक्ताचपित्तलः ॥
उभाभ्यांरहितोवात.स्वरतश्चैवलक्षयेत् ॥

अर्थ–कफाने स्वरमोठा, पित्ताने स्पष्टबोलणारा, आणि वायूने दोहोलक्षणाहून भिन्न ह्मणजे घर्घर स्वर होतो.

## स्पर्शपरीक्षा.

पित्तरोगीभवेदुष्णोवातरोगिचशीतलः ॥ पिच्छलःश्लेष्मरोगी
स्यात्त्रिलिंगात्संन्निपातवान् ॥ आर्द्रकःसभवेच्छेष्मास्पर्शत
श्चैवलक्षयेत् ॥

अर्थ–पित्तरोगी उष्णस्पर्श, वातरोगी शीतल, कफरोगीचिक्कण; अथवा ओलसर; आणि सन्निपाताने सर्वलक्षणयुक्त असतो.

## नेत्रपरीक्षा.

### वातनेत्र.

नेत्रंस्यात्पवनाद्रूक्षंधूम्रवर्णतथारुणं ॥
कोटरांतःप्रविष्टंचतथास्तब्धविलोकनं ॥

अर्थ–डोळे वातविकार जाहालाअसता, रुक्ष, धुरकट, किंचित लाल, बाजूचे मर्यादे आंत ओल्यासारिखे, व ताठलेले, असे होतात.

## पित्तनेत्र.

हरिद्राखंडवर्णंवारक्तंवाहरितंतथा ॥
दीपद्वेषिसदाहंचनेत्रंस्यात्पित्तकोपतः ॥

अर्थ–नेत्र पित्तकोपापासून हळदीसारिखे व, लाल, किंवा हिरवे, आणि दिवा पाहवत-नाहीं, असे होतात.

## कफनेत्र.

चक्षुर्बलासबाहुल्यात्स्निग्धंस्यात्सलिलप्लुतं ॥
तथाधवलवर्णंचजोतिर्हीनंकफान्वितं ॥

अर्थ–नेत्र कफविकारानें चिकट, उदकानेंभरलेले, पांढरे, तेजहीन, असे होतात.

## त्रिदोष व त्रिदोषदूषितनेत्र.

नेत्रंद्विदोषबाहुल्यात्स्याद्दोषद्वयलक्षणं ॥ त्रिदोषलिंगसंघनेतन्मारयातेरोगिणं ॥ त्रिदोषदूषितंनेत्रमंतर्मग्नंभृशंभवेत् ॥ त्रिलिंगं सलिलप्लाविप्रांतेनोन्मीलयत्यपि ॥

अर्थ–नेत्र कोणत्याही दोनदोषांचा लक्षणानीं युक्त दिसतील, तर द्विदोषलक्षण वळखावें; आणि जर कफ वात, पित्त, या तिघांचेही विकारसमुदायानें दिसतील, तर ते रोग्याला मारितील. ज्याचे त्रिदोषयुक्तनेत्र असून आंत फार ओढिल्यासारिखें, पाण्यानें भरलेलें, शेवटास मात्र उघडतात, व मिटतात; तो रोगी सन्निपातग्रस्त वळखावा.

एकंरौद्रंचभुग्नंविकसितमपरंमीलितंयस्यचक्षुस्तारावायस्यपश्येन्नकिमपिकुटिलंचोर्ध्वगंयस्यवास्यात् ॥ रौद्रंयःप्रेक्षतेवा भ्रमयुतमथवाकंपयुक्तारकोवादृष्टिर्यस्यात्रसाध्योनभवतिमनुजोरोगयुक्तःकदाचित् ॥

अर्थ–ज्या रोग्याचा एकनेत्र उघडा असून विक्राळ, आणि वक्र, व दुसरामिटलेला व डोळ्यातील तारा कांहीं पाहात नाहीत; व वांकडा वर चढलेला, व भयंकर पाहातो व डोळा कापतोसा दिसतो असे नेत्र असल्यास तो रोगी साध्य होणार नाहीं.

एकदृष्टिरचैतन्योभ्रमस्फुरिततारकः ॥
एकरात्रेणनियतंपरलोकपथंव्रजेत् ॥

अर्थ–ज्याचा नेत्र एक चेतनारहित, व भ्रमानें डोळयांतील बारीक शिरा फुरफुरतात असा रोगी एकरात्रीनें खचित परलोकमार्गी जाईल.

रूक्षंधूमाभमंतर्ज्वलदनिलरुषिस्याच्चलंचक्षुरुग्रंपित्तात्पीतंहरि
द्रानिभमरुणनिभंदीपविद्वेषिदाहि ॥ श्वेतंसस्त्रावितेजारहित
मतिकफात्द्वंद्वकोपेद्विलिंगंनिर्भुग्नंरक्तवर्णंकलुषमसितंभभीष
णंसन्निपातात् ॥

अर्थ–नेत्र वातकोपानें रूक्ष, धूम्रवर्ण, दाहयुक्त, काळसर, चंचल, उग्र पित्तकोपाने पिंवळे अरुणवर्ण, दिव्याचा द्वेष करणारे दाहयुक्त; आणि कफकोपाने श्वेत, स्रवणार, तेजरहित; व द्विदोषकोपाने दोनदोषांच्या लक्षणानींयुक्त आणि सन्निपातानें वक्र, रक्तवर्ण, गढुळ, कृष्णवर्ण, भयंकर असे होतात.

द्वंद्वदोषेभवेन्मिश्रंतूर्णंतूर्णंविलोचनं ॥ श्यामवर्णंचनिर्भुग्नंतं
द्रामोहसमन्वितं ॥ रौद्रंचरक्तवर्णंचभवेच्चक्षुस्त्रिदोषतः ॥

अर्थ–डोळे द्विदोषकोपानें दोनदोषांचा लक्षणानीं मिश्रित असतात. त्रिदोष जाहा ल्यास काळे, मोडल्यासारिखे, आळसयुक्त, भ्रमिष्ट, भयंकर, व किंचित्तांबडे असें होतात.

एकंचक्षुर्यदाभीमंद्वितीयंमीलितंभवेत् ॥
त्रिभिर्दिनैस्तदारोगीसयातियममंदिरं ॥

अर्थ–जेव्हां एकनेत्र भंयकर, व दुसरा मिटलेला राहील, तेव्हां, रोगी तीनादिवसानीं यमाचे घरीं जाईल.

ज्योतिर्विहीनंसहसारोगिणोयस्यलोचनं ॥
ईषत्कृष्णंसानियतंप्रयातियमसादनं ॥

अर्थ–जारोग्याचे नेत्र तेजानें हीन किंचित्काळें होतात, तोही यमाचा गृहास जाईल.

सरक्तंकृष्णवर्णंचरौद्रंयःप्रेक्षतेयदा ॥
इतिलिंगैर्विजानीयान्मृत्युरेवनसंशयः ॥

अर्थ–ज्याचे नेत्र लाल, व काळसर, असून भयंकर दिसतात. यांचिन्हावरून रोग्यास निःसंशय मृत्यू जाणावा.

## मुखपरीक्षा

वातेचमधुरास्यत्वंपित्तेचकटुकंतथा ॥ मधुराम्लंकफेचैवसर्व
लिंगंत्रिदोषजे ॥ अजीर्णेघृतपूर्णंस्यात्कषायंचाग्निमांद्यके. ॥

अर्थ–तोंड वायुने मधुर, पित्तानें कडू, कफानें मधुराम्ल. त्रिदोषानें संपूर्णलक्षणानीं युक्त, अजीर्णानें तुपासारिखें, व अग्निमांद्यानें तुरट होतें.

## स्वरूपपरीक्षा.

विभुत्वादाशुकारित्वाद्बलित्वादन्यकोपनात् ॥
स्वातंत्र्यात्बहुरोगत्वाद्दोषाणांप्रबलोनिलः ॥

अर्थ–वायू संपूर्णदोषामध्यें व्यापकपणानें, जलदस्वभावें, बळानें, दुसऱ्याला कोपविणा, स्वतंत्र, बहुत व्याधिकारक, याकारणानीं प्रबळ आहे.

प्रायस्तएवपवनाध्युषितामनुष्यादोषात्मकाःस्फुटितधूसरकेश गात्राः ॥ शीतद्विपश्चलधृतिस्मृतिबुध्धिचेष्टासौहार्ददृष्टिग तयोपिबहुप्रलापाः ॥

अर्थ–प्रायः वातदूषित मनुष्य अनेकदोषयुक्त; व ज्यांचे हातपाय फुटिर, केश, आंग हीं धूपवर्ण, शीतद्वेषी अधीर, स्मृती, बुध्धी, चेष्टा, मैत्री, दृष्टी आणि गती हीं अल्प, बडबड करणारे, असे असतात.

पित्तंवन्हिर्वन्हिजंवायदस्मात्पित्तोद्रिक्तस्तीव्रतृष्णाबुभुक्षुः ॥
गौरोष्णांगस्ताम्रहस्तांघ्रिवक्त्रःशूरोमानीपिंगकेशोल्परोमाः ॥

अर्थ–पित्तच अग्नी किंवा अग्नीपासून होणारें, म्हणून पित्ताधिक रोगी तृषावान, भुकाळु, गोरा ऊष्णांग, आणि हात, पाय, तोंड हीं लाल, शूर, अभिमानी, केश पिंगट; व थोडे असा असतो.

श्लेष्मासोमश्लेष्मलस्तेनसौम्योगूढस्निग्धश्लिष्टसंध्यस्थिमांसः ॥ क्षुत्तृट्शोकक्लेशधर्मैरतप्तोबुध्यायुक्तःसात्विकःसत्यसंधः

अर्थ–कफ साक्षात्चंद्र याजकरितां कफप्रकृती मनुष्य थंड असतो; व त्याच्या संधि, अस्थि; आणि मांसे हीं गूढ, स्निग्ध अशीं असतात; आणि भूक, तहान, शोक, श्रम, ऊन, इतक्यानीं संताप पावत नाहीं; बुध्धिमान, सात्विक, सत्यप्रतिज्ञ असा असतो.

### तत्रआयुर्विचारः ॥

भिषगादौपरीक्षेतरुग्णस्यायुःप्रयत्नतः ॥
यतआयुषिविस्तीर्णेचिकित्सासफलाभवेत् ॥

अर्थ–वैद्यानें प्रथम यत्नेकरुन रोग्याचा आयुष्याची परीक्षा करावी. कारण रोग्यास आयुष्य बहुत असल्यास; औषधादिक उपाय सफळ होईल.

## आयुर्लक्षण.

सौम्यादृष्टिर्भवेयस्यश्रोत्रंवक्त्रंतथैवच ॥
रवादुगंधंविजानातिससाध्योनात्रसंशयः ॥

**अर्थ**—ज्या रोग्याची दृष्टी, कान, मुख, ही सौम्य, आणि प्रसन्न दिसतात; व सुगंध जाणतो, तो रोगी साध्य जाणावा, याविषयीं संशय नाहीं.

पाणिपादौचयस्योष्णौदाहःस्वल्पतरोभवेत् ॥
जिव्हासुकोमलायस्यसरोगीनविनश्यति ॥

**अर्थ**—ज्या रोग्याचे हातपाय उष्ण असून शरीराला स्वल्पदाह, व जीभ फार कोमल असा रोगी नाश पावणार नाहीं.

स्वेदहीनोज्वरोयस्यश्वासोनासिकयासरेत् ॥
कंठश्चकफहीनःस्यात्सरोगीजीवतिध्रुवम् ॥

**अर्थ**—ज्या रोग्याचा ज्वर घामरहित, व श्वासोश्वास नाकांतून यथास्थित वाहातात; आणि गळ्यात कफ नाहीं, असारोगी निश्चयानें वांचेल.

## कालज्ञान.

अक्षैर्लक्षितलक्षणेनपयसापूर्णेंदुनाभानुनापूर्वादक्षिणपश्चिमोत्तरदिशांपट्त्रिद्विमासैककं ॥ छिद्रंपश्यतिचेत्चदादशदिनंधूम्राकृतिंपश्चिमेज्वालांपश्यतिसद्यएवमरणंकालोचितंज्ञानिनां ॥

**अर्थ**—जो रोगी पाण्यांत सूर्य किंवा चंद्र यांचा प्रतिबिंबावर पूर्वेस, दक्षिणेस, पश्चिमेस, आणि उत्तरेस छिद्र पाहील तर क्रमानें सहा, तीन, दोन; आणि एक इतके महिने वांचेल; आणि चंद्रसूर्याला धूम्रवर्ण पाहील तर दाहादिवस; आणि त्या प्रतिबिंबावर पश्चिमेस ज्वाला पाहील; तर लागलाच मरण पावेल. हें ज्ञात्यानीं कालज्ञान सांगीतलें.

अरुंधतींध्रुवंचैवविष्णोस्त्रीणिपदानिच ॥
आयुर्हीनानपश्यंतिचतुर्थंमातृमंडलम् ॥

**अर्थ**—अरुंधती, ध्रुव, विष्णूचीं तीन पदें चवथें मातृमंडल हे चार पदार्थ ज्याचे आयुष्य संपलें असेल तो पाहात नाहीं, आतां अरुंधती इत्यादिक चार पदार्थांचा अर्थ सांगतो.

अरुंधतीभवेज्जिव्हाध्रुवोनासाग्रमेवच ॥
विष्णुस्तुभ्रूद्वयोर्मध्येभ्रूद्वयंमातृमंडलं ॥

**अर्थ**—अरुंधती म्ह० जिव्हा; ध्रुव म्ह० नासिकेचें अग्र ( नाकाचा शेंडा ) दोन भिवयामध्यें विष्णूचीं तीन पदें; आणि दोन भिवया हें मातृमंडल याप्रकारें जाणावें.

नासाग्रंभ्रूयुगंजिव्हांमुखंचैवनपश्यति ॥
कर्णघोषंनजानातिसगच्छेद्यममंदिरं ॥

**अर्थ**—नाकाचा शेंडा, भिवया, जिव्हा, मुख इतकीं जो पाहात नाहीं, आणखी कान दाबून धरले असतां आंतील शब्द ज्याला ऐकूं येत नाहीं तो यममंदिराप्रत जाईल.

नवभ्रूपंचचक्षुश्चसप्तकर्णत्रिनासिका ॥
जिव्हाचादिनमेकंतुकालचिन्हंदिनेदिने ॥

अर्थ—भृकुटी, नेत्र, कान, नाक, जीभ हीं अंगे नऊ, पांच, सात, तीन; आणि एक दिवस पर्यंत मरण्याच्या पूर्वी जाणत नाहीं हें काळाचें प्रतिदिवशी चिन्ह पाहावे.

अकस्माद्धिभवेत्स्थूलोह्यकस्माच्चकृशोभवेत् ॥
अकस्मादन्यथाभावेषण्मासैश्चविनश्यति ॥

अर्थ—जो अकस्मात शरीरानें जाडा, किंवा बारीक होतो; आणि ज्याची प्रकृती अकस्मात बदल होत्ये, ह्मणजे रागीट असला तर शांत, किंवा शांत असला तर रागीट या प्रमाणे झालेला तो साहा महिन्यांनीं मरेल.

रसनायाःकृष्णभावोमुखंकुंकुमसन्निभं ॥
जिव्हास्पर्शंनजानातिदुर्लभंतस्यजीवितं ॥

अर्थ—जिव्हा काळी, मुख तांबडें, जिव्हेला स्पर्श कळत नाहीं, अशा मनुष्याचें वांचणें कठीण.

## रोग्याकडे जाण्यास लग्नशुध्दी.

सूर्येकेंद्रेज्वरमतितरंशीतवातंचचंद्रेभौमेरक्तंज्ञगुरुभृगवोरोग
निर्मुक्तिकाःस्युः ॥ मंदेमंदंशिथिलमरणंजीवनाशंचराहौलग्नं
शस्तंग्रहबलयुतंयातुवैद्योविलोक्य ॥

अर्थ—वैद्य रोग्याकडे जातेवेळेस जें लग्न असेल त्या लग्नापासून पहिलें १ चवथें ४ सातवें ७ दाहावें १० जें स्थान त्यास केंद्र असें ह्मणतात; त्या स्थानीं सूर्य असेल तर अत्यंत ज्वरयुक्त रोगी होईल, याप्रमाणें केंद्रीं चंद्र मंगळ असतील तर क्रमें करून कफवात, रक्त हे दोष रोग्यास होतील असें जाणावें; बुध, गुरु, शुक्र हे केंद्रीं असले तर रोगी रोगापासून निर्मुक्त होईल; शनि केंद्रीं असेल तर दुखणें लांबणीखालीं पडून मरण दूर होईल; राहु केंद्रीं असेल, तर रोगी मरेल; हेंच फळ केतूचें जाणावें यासाठीं प्रशस्त व ग्रहबल हीं पाहून वैद्यानें रोग्याकडे जावें.

रात्रौदाहोभवतिचदिवाजायतेशीतलत्वंकंठेश्लेष्माविरसवद
नःकुंकुमाकारनेत्रे ॥ जिव्हाकृष्णावहतिचसदास्थूलसूक्ष्माच
नाडीतद्वैपज्यंस्मरणमधुनारामरामेतिनाम ॥

अर्थ—ज्या रोग्यास रात्रीस दाह होतो; दिवसास थंडी वाजत्ये; घशांत कफ; तोंडास अरुचि; डोळे लाल; जिव्हा काळी; काहीं वेळ नाडी फुगलेली आणि काहीं वेळ अतिबारिक अशीं लक्षणें झालीं असतां त्याला राम राम हें औषध.

सौम्यादृष्टिर्वदतिविमलंहस्तपादौसदोष्णौस्वल्पोदाहःसुरसव
दनःकोमलायस्यजिव्हा ॥ नासाश्वासोवहतिसरलंस्वेदहीनो
ज्वरोसौसाध्योरोगीभवतिनियतंवैद्यभैषज्ययोग्यः ॥

अर्थ—पाहाणें सौम्य, भाषण यथास्थित, हात पाय गार नाहींत, दाह थोडा, तोंडास रुची, जिव्हा मऊ, नाकांतला श्वास सरळ वाहातो, ज्यांत घाम नाहीं असा ज्वर, इतकीं लक्षणें ज्या रोग्यास असतील तो रोगी साध्य व वैद्याला चिकित्सा करण्यास योग्य होय.

## मरणचिन्हानि.

शुष्कास्यःश्यामकोष्ठोप्यसितरदततिःसीतनासाप्रदेशःशोणा
क्षश्चैकनेत्रोलुलितपदकरःश्रोत्रपातित्ययुक्तः ॥ शीतश्वासोथ
वोष्णश्वसनसमुदयःशीतगात्रप्रकंपःसोद्वेगोनिष्प्रपंचःप्रभव
तिमनुजःसर्वथामृत्युकाले ॥

अर्थ—मृत्युकाळीं मनुष्याचें तोंड सुकतें व अंगावर काळेडाग, दंतपंक्ती काळी, नासिकेचा समीप जागा थंड, व एकडोळा लाल, व हात पाय लुळे कानांच्या पाळया पडतात.थंड, अथवा फारच ऊष्ण श्वासोश्वास सोडितो, शरीर थंड कांपतें, उद्विग्न होतो, कर्तव्याकर्तव्य, समजतनाहीं; असें लक्षण होतें.

स्वेदोललाटेहिभवेन्नरस्यशीतादितस्यापिसुपिच्छलस्य ॥
कंठस्थितोयस्यनयातिवक्षोमार्गेयमस्येतिगृहंसमर्त्यः ॥

अर्थ—जो रोगी हींव लागत असून मस्तकास मात्र घाम येतो, व अंग चिकट होतें, गळयांत कफ असून पडत नाहीं; व ह्रदयमार्गांतही उतरत नाहीं; तो यमाचा गृहीं जातो.

यस्यनिद्रासुखेनस्यात्शरीरंसोद्यमंभवेत् ॥
इंद्रियाणिप्रसन्नानिसरोगीनैवनश्यति ॥

अर्थ—ज्या रोग्याला, निद्रा सुखानें येत्ये, आणि शरीराला उद्योगाची हुशारी; व इंद्रियें सुप्रसन्न आहेत, तो रोगी कधीं नाश पावणार नाहीं.

## स्वल्पायुषोलक्षणानि.

शरीरशीलयोर्यस्यप्रकृतिर्विकृतिर्भवेत् ॥
तदरिष्टंसमासेनव्यासतश्चनिबोधमे ॥

अर्थ—शरीर व त्याचा स्वभाव यांमध्यें पुर्वींपासून चालत आल्यारीतीस विपर्यास पडला असतां तें अरिष्ट समजावें. तें थोडक्यांत विस्तारानें ऐकावें.

शृणोतिविविधान्शब्दान्विपरीतंशृणोतिवा ॥
नशृणोतिचयोकस्मात्तंवदंतिगतायुषं ॥

**अर्थ**–जो अनेकतऱ्हेचे शब्द ऐकतो, अथवा सांगितलें तें उलटतें ऐकतो, किंवा अकस्मात् ऐकूच येत नाहीं असें जाहाल्यास त्याचें आयुष्य संपलें असें जाणावें.

यस्तूष्णमिवगृण्हातिशीतमूष्णंचशीतवत् ॥ उष्णगात्रोतिमात्रंयोभृशंशीतेनकंपते ॥ प्रहारंनैवजानातियोगच्छेदन्यथापि वा ॥पांशुनेवावकीर्णानियश्चगात्राणिमन्यते ॥ वर्णान्यतावा राज्योवायस्यगात्रेभवंतिहि ॥ स्नातानुलिप्तंयंचापिभजंतेनीलमाक्षिकाः ॥ विपरीतेनगृण्हातिरसान्यश्चोपयोजितान् ॥ योवारसान्नसंवेत्तिगतायुंतंप्रचक्षते ॥

**अर्थ**–ज्याला उष्णपदार्थ थंड लागतो, व थंडपदार्थ उष्ण लागतो, आणि शरीर संतप्त असतां थंडी फार लागत्ये, त्याला; आणि ज्याला मारिलें तत्रापि समजत नाहीं, व मारिलें नसता मारिताहेत असें वाटतें; व आपलीं सर्व अंगें धुळीनें भरलीं आहेत असें वाटतें; त्याला, आणि ज्याचा शरीराचा रंग बदलेल, अथवा आंगावर मोंहऱ्या पाहील, किंवा स्नान करून आंगास गंधाची उटी लाविलीअसतां आंगाला निळ्यामाशा चावताहेत असें वाटतें त्याला; आणि ज्याला गोडपदार्थ कडू लागतात व कडूपदार्थ मधुर लागतात, किंवा कोणत्याही पदार्थाची रुची जाणत नाहीं. त्याला गतायुर्षी ह्मणतात.

सुगंधंवेत्तिदुर्गंधंदुर्गंधंचसुगंधवत् ॥
गृण्हातियोन्यथागंधंशाम्येद्दीप्तोयथानलः ॥

**अर्थ**–जो दुर्गंधाला सुगंध, व सुगंधाला दुर्गंध, किंवा गंधाला विपरीत मानितो; तो दीप्ताग्निप्रमाणें शांत होतो.

रात्रौसूर्यंज्वलंतंवादिवावाचंद्रवर्चसं ॥ दिवाज्योतींषियश्चापिज्वलितानिविपश्यति ॥ विमानयानप्रासादैर्यश्चसंकुलमंबरं ॥ यश्चानिलंमूर्तिमंतमंतरिक्षेवलोकते ॥ धूमनीहारवासोभिरावृतांयश्चमेदिनीं ॥ प्रदीप्तमिवयोलोकंयोवाप्लुतमिवांभसा ॥ भूमिमष्टापदाकारांलेखाभिर्यश्चपश्यति ॥ योनपश्यतिऋक्षाणि यश्चदेवीमरुंधतीं ॥ ध्रुवमाकाशगंगांचतंवदंतिगतायुषं ॥

**अर्थ**--जो मनुष्य रात्री सूर्यप्रकाश, व दिवसास चांदणें, आणि दिवसा नक्षत्रें पेटताहेत अशीं पाहील, व आकाशांत पालख्या घोडीं गाड्या बंगले विमानें यांची दाटी; व देहधारी वायू पाहिल. आणि पृथिवी धूर, धुकें, वस्त्रें, पाणी व्याप्त; आणि सर्वलोक जळाला किंवा उदकांत बुडाला, किंवा पृथ्वी अष्टदळासारिख्या रेघांनीं युक्त पाहील, आणि जो नक्षत्रें,व अरुंधती, ध्रुव, आकाशगंगा, हीं पाहातनाहीं, त्याचें आयुष्य संपलें असें ऋषी सांगतात.

## स्वल्पायुलक्षण

आदर्शेंबुनिधर्मेवाछायांयश्चनपश्यति ॥ पश्यत्ये
कांगहीनांवाविकृतांवान्यसत्वजां ॥

**अर्थ**--जो आरशांत किंवा पाण्यांत प्रतिबिंब आणि उन्हांत छाया ही पाहातनाहीं; किंवा पाहिली तर अर्धी किंवा विकृत पाहतो; अथवा ही अन्य प्राण्याची आहे अशी पाहतो.

श्वकाककंकगृध्राणांप्रेतानांयक्षरक्षसां ॥
आतुरोलभतेमृत्युंस्वस्थोव्याधिमवाप्नुयात् ॥

**अर्थ**--कुत्रा, कावळा, गिध प्रेत, यक्ष, राक्षस, यांची छाया पाहतो; तो रोगी असल्यास मृत्यु पावेल, आणि प्रकृतीनें स्वस्थ असल्यास रोगी होईल

ह्रीश्रियौनश्यतोयस्यतेजओजस्मृतिप्रभाः ॥
अकस्माद्यंभजंतेवासपरासुरसंशयं ॥

**अर्थ**--ज्याची अकस्मात् लाज, लक्ष्मी, शक्ती, तेज, स्मरण आणि कांती हीं जातात किंवा इतकीं सर्व एकदांच येतात तो गतायुषी जाणावा.

यस्याधरोष्ठःपतितःक्षिप्तश्चोर्ध्वंतथोत्तरः ॥ उभौ
वाजांबवाभासौदुर्लभंतस्यजीवितं ॥

**अर्थ**--ज्याचा खालचा ओंठ खालीं पडला व वरचा फार वर गेला; किंवा दोन हो ओठ पिकल्या जांबळासारिखे झाले, त्याचें वांचणें दुर्लभ जाणावें.

आरक्तादशनायस्यशावावास्युःपतंतिवा ॥
खंजनप्रतिमावापितंवदंतिगतायुषं ॥

**अर्थ**--ज्याचे दांत लाल, किंवा काळे, धुरकट; किंवा पडतील; किंवा खंजनासारिखे दिसतील, तो गतायुषी समजावा.

कृष्णातथानुलिप्ताचाजिव्हासूनाचयस्यवै ॥
कर्कशावाभवेद्यस्यसोचिराद्विजहात्यसून् ॥

अर्थ—ज्याचीजीभ काळी, फार चिकट, व शून्य, किंवा फार खरखरीत अशी होते; तो थोडक्याच काळानें प्राण सोडील.

कुटिलास्फुटिताचापिशुष्कावायस्यनासिका ॥
अवस्फूर्जतिभग्नावासनजीवतिमानवः ॥

अर्थ—ज्याचें नाक वांकडें, किंवा फुटल्यासारिखें, अथवा शुष्क होतें, किंवा फुरफुरतें व मोडलेंसें होतें, तो मनुष्य वांचणार नाहीं.

संक्षिप्तानिविपक्ष्माणिसोचिराद्यातिमृत्यवे ॥

अर्थ—ज्याचा डोळ्याचा पापण्या आंत फार ओढल्यागेल्या; तो लवकर मरेल.

नाहरत्यन्नमास्यस्थंनधारयतियःशिरः ॥
एकाग्रदृष्टिर्मुढात्मासद्यःप्राणान्समुंचति ॥

अर्थ—ज्याचा तोंडांत ग्रास असून खाववत नाहीं; व मान संभाळवत नाहीं. एकीकडे नजर फिरते, ज्याला कांहीं समजत नाहीं, तो तत्क्षणीं प्राण सोडील.

उत्थाप्यमानोबहुशःसंमोहंयोधिगच्छति ॥
बलवान्दुर्बलोवापितंपक्वंभिषगादिशेत् ॥

अर्थ—ज्याला उठविला असतां वारंवार घेरी येउन मोह पावतो. बलवान् असताही मग-दीं दुर्बळ होतो; तो पिकला असें वैद्यानें समजावें.

निद्रानिरंतरंयस्ययोजागर्तिचसर्वदा ॥
मुह्येद्वावक्तुकामश्चप्रत्याख्येयःसजानता ॥

अर्थ—ज्याला निरंतर झोप येते; अथवा सार्वकाल मुळींच येतनाहीं, व बोलूं लागला असतां मोह पावतो, त्या रोग्याला वैद्यानें असाध्य जाणून सोडावा.

## स्वल्पायुलक्षण.

ऊत्तरोष्ठंचयोलिह्यादुत्करांश्चकरोतियः ॥
प्रेतैर्वाभाषतेमायंप्रेतरूपंतमादिशेत् ॥

अर्थ—जो वारंवार जिभल्या चाटितो, व हातपाय झाडितो. व सायंकाळीं भूतप्रेताबरोबर बोलतो. तो प्रेतरूप झाला असें जाणावें.

स्वेभ्यःसरोमकूपेभ्योयस्यरक्तंप्रवर्तते ॥
पुरुषस्याविघातस्यसद्योजीवितंत्यजेत् ॥

अर्थ—ज्याचा सर्व इंद्रियांतून, व केसांचा छिद्रांतून विघ्नबाधा नसतां रक्त स्रवतें, तो तत्क्षणीं जीविताला टाकील.

सम्यक्चिकित्स्यमानस्यविकारोयोभिवर्धते ॥
प्रक्षीणबलमांसस्यलक्षणंतद्गतायुषः ॥

**अर्थ**–जा रोग्याला औषधोउपाय केला, तथापि विकार अधीकच वाढतो, व मांस आणि बळ क्षिण जाहालें. तो गतायुषी वळखावा

भूताःप्रेताःपिशाचाश्चरक्षांसिविविधानिच ॥
मरणाभिमुखंजंतुमुपसर्पंतिनित्यशः ॥

**अर्थ**–भुते, प्रेते, पिशाच, राक्षस, व यक्षादि नेहेमी समोर येतात तो लौकर मरेल.

तानिभेषजवीर्याणिप्रतिघ्नंतिजिघांसया ॥
तस्मान्मोघाःक्रियाःसर्वाभवंत्येवगतायुषः ॥

**अर्थ**–भुते व प्रेते गतायू रोग्याला मारण्याच्या इच्छेने औषधाचे वीर्य हरण करितात. याकरितां संपूर्ण औषधक्रिया व्यर्थ होतात.

## छायापुरुष लक्षण.

अथातःसंप्रवक्ष्यामिछायापुरुषलक्षणं ॥
येनविज्ञातमात्रेणत्रिकालज्ञोभवेन्नरः ॥

**अर्थ**–आतां छायापुरुषाचें लक्षण सांगतो जें समजल्यानें मनुष्य त्रिकाळज्ञानी होतो.

कालोदूरस्थितस्यापियेनोपायेनलक्षते ॥
तंवक्ष्यामिसमासेनयथोद्दिष्टंशिवागमे ॥

**अर्थ**–काळ दूर असतांही ज्या उपायानें जाणतां येतो; तो उपाय संक्षेपानें शिवपुराणांत जसा सांगितला आहे तसा सांगतो.

एकांतेविजनेगत्वाकृत्वादित्यंचपृष्ठतः ॥
निरीक्षेतनिजांछायांकंठदेशेसमाहितः ॥

**अर्थ**–मनुष्य जेथे नाहीं अशा एकांतस्थळीं जाऊन सूर्याकडे पाठ करून अपल्या छायेचे कंठ देशी एकाग्र दृष्टी लाऊन पहात राहावे.

ततश्चाकाशमीक्षेतततःपश्यतिगव्हरं ॥ ओम्र्हींपरब्रह्मणेनमः ॥
अष्टोत्तरशतंजप्त्वाततोदृश्येतशंकरं ॥

**अर्थ**–नंतर कांहीं काळ छायेकडे पाहून मग आकाश पहावें ह्मणजे गुह्ये दृष्टीस पडत्ये, नंतर सांगीतल्या मंत्राचा अष्टोत्तर जप करून शंकराचे दर्शन करावे.

शुद्धस्फटिकसंकाशंनानारूपधरंहरं ॥
षण्मासाभ्यासयोगेनभूचराणांपतिर्भवेत् ॥

अर्थ–जो महादेव स्वरूपाने शुभ्रस्फुटिकासारिखा व नानाप्रकारचीं रूपें धारण करणारा, असें साहामहिने ध्यान केलें असतां, संपूर्ण भूमी वरिल प्राण्यांचा धनी होईल.

वर्षद्वयेनहेनाथकर्ताहर्तास्वयंप्रभुः ॥
त्रिकालज्ञत्वमाप्नोतिपरमानंदमेवच ॥

अर्थ–पूर्वी सांगितिल्याप्रमाणे दोनवर्षे अभ्यास केलाअसतां, स्वत: संहार व रक्षण करणारा आणि कालत्रय जाणणारा होऊन आनंद पावेल.

सतताभ्यासयोगेननास्तिकिंचनदुर्लभं ॥ तद्रूपंकृष्णवर्णंयःप
श्यतिव्योम्निनिर्मले ॥ षण्मान्मृत्युमाप्नोतिसयोगीनात्रसंशयः ॥

अर्थ–जर निरंतर या प्रमाणें अभ्यास करील, तर त्यास त्रैलोक्यांत कोणती ही वस्तू दुर्लभ होणार नाहीं; आणि त्या स्वच्छ आकाशांत छायापुरुष शरीर काळें पाहील; तर साहामहिन्याने मृत्यू पावेल, यांत संदेह नाहीं.

पीतेव्याधिभयंरक्तेनीलेहत्यांविनिर्दिशेत् ॥
नानावर्णस्वरूपेस्मिन्नुद्वेगोजायतेमहान् ॥

अर्थ–छायापुरुष पिवळा दिसल्यास रोगभय, आरक्त; व निळा दिसल्यास हत्या;व नानाप्रकारचें रंग दिसल्यास चित्तास फार उद्वेग होईल.

पादेगुल्फेचजठरेविनष्टेमृत्युमादिशेत् ॥
अर्धवर्षेणवर्षेणक्रमाद्वर्षद्वयेनच ॥

अर्थ–छायापुरुष पायांवर, घोट्यांवर; किंवा पोटावर बसला आहे; असें दृष्टीस पडल्यास क्रमे करून सहामहिन्यानी वर्षानें दोनवर्षांनीं मृत्यू पावेल.

विनष्टेदक्षिणेबाहौस्वबंधुर्म्रियतेध्रुवं ॥
वामेबाहौतथाभार्याविनश्यतिनसंशयः ॥

अर्थ–छायापुरुषाचा उजवा बाहू दिसला नाहीं; तर भाउ मरेल डावाबाहू न दिसला; तर स्त्री मरेल, यांत संशय धरूनये.

शिरोदक्षिणबाव्होस्तुविनाशेमृत्युमादिशेत् ॥ अशिरामासिमर
णंविनाजंघादिनेनवा ॥ अष्टभिःकंधरानाशेछायालुप्तेचतत्क्षणात् ॥

अर्थ–छायापुरुषाचें शिर व उजवा बाहू न दिसल्यास मृत्यू जाणावा शिर दिसलेनाहीं तर एक माहिन्याने मरेल, मांडया न दिसल्यास एकादिवस वाचेल, किंवा न वाचेल; व मान नाहीं असा पाहिल्यास आठदिवसानीं, व मुळींच छाया नादिसल्यास तत्क्षणीं मृत्यू येईल, असे छायापुरुष लक्षण जाणावें.

## अथव्याधिर्लक्षणं.

रोगस्तुदोषवैषम्यंदोषसाम्यमरोगिता ॥
रोगादुःखस्यदातारोज्वरप्रभृतयोहिते ॥

**अर्थ**–वातादि दोषांचें साम्य असलें, ह्मणजे त्या स्थितीस आरोग्य ह्मणतात; आणि त्यांचें साम्य नसले, तर तिला रोग ह्मणतात. तेच ज्वरादिरोग पुढे दुःखदायक होतात.

नरोदिनादिचर्याभिर्नानवर्ततेनित्यशः ॥ सएवलभतेरोगमथ
रोगस्यलक्षणं ॥ जीवात्मनोर्दुःखयोगकारीव्याधिर्निगद्यते ॥
तस्यज्वरादयोभेदावहवःसमुदाहृताः ॥

**अर्थ**–जो पुरुष नेहमीं दिनचर्यादि विधीनें वागत नाहीं, त्याला व्याधी होतात. त्या व्याधींचें लक्षण सांगतो, जीवात्म्याला जो दुःखाचा योग करणारा; त्याला व्याधी ह्मणतात. त्या व्याधींचें ज्वरादिक अनेक भेद सांगीतले आहेत.

तेचस्वाभाविकाःकेचित्केचिदागंतवःस्मृताः ॥
मानसाःकेचिदाख्याताःकथिताःकेपिकायिकाः ॥

**अर्थ**–ते व्याधी कितीएक स्वाभाविक ( अंध, पंगु, बहिरा, इत्यादि ), व कितीएक आगंतुक ( अभिघातादि, किंवा जन्मानंतर होणारे ), आणि कितीएक मानस ( काम, क्रोध, इत्यादिक ), व कितीएक कायिक ह्मणजे शरीरालाच होणारे, असे आहेत.

## व्याधींचे प्रकार सांगतो.

कर्मजाःकथिताःकेचिद्दोषजाःसंतिचापरे ॥
कर्मदोषोद्भवाश्चान्येव्याधयस्त्रिविधास्मृताः ॥

**अर्थ**–ते व्याधी कितीएक कर्मापासून, व कितीएक वातादि दोषांपासून, आणि कितीएक कर्म, व दोष यांपासून होणारे, असे तीन प्रकारचे आहेत.

## कर्मज व्याधिलक्षण.

यथाशास्त्रंतुनिर्णीतायथाव्याधिचिकित्सिताः ॥
नशमंयांतियेरोगास्तेज्ञेयाःकर्मजाबुधैः ॥

**अर्थ**–जे व्याधी यथाशास्त्र परीक्षा करून त्यावरचे उपाय केलेअसतां शांत होत नाहीत, ते कर्मजन्य जाणावे.

कर्मक्षयात्कर्मकृतादोषजाःस्वस्वभेषजैः ॥
कर्मदोषोद्भवायांतिकर्मदोषक्षयात्क्षयं ॥

अर्थ-कर्मज व्याधी कर्म क्षय झाला म्हणजे, आणि दोषज व्याधी दोषाला शांतिकर औषधांनीं, व कर्म दोषोद्भव व्याधी कर्म, व दोष यांचा क्षय झाला; म्हणजे शांत होतात.

## साध्यादिभेद.

साध्यायाप्याअसाध्याश्चव्याधयस्त्रिविधामताः ॥

सुखसाध्यःकष्टसाध्योद्विविधःसाध्यउच्यते ॥

अर्थ-व्याधीचे साध्य, याप्य, असाध्य असे तीनभेद आहेत. व साध्यामध्ये एकसाध्य, दुसरा कष्टसाध्य असे दोन साध्यभेद सांगीतले आहेत.

## याप्यलक्षण.

यापनीयंतुतंविद्यात्क्रियाधारयतेहियं ॥

क्रियायांतुनिवृत्तायांसद्योयश्चाविनश्यति ॥

अर्थ-जा रोग्याला औषधोपाय आहे तोंपर्यंत दुःख होतनाहीं, आणि औषधोपाय बंद झाला असतां, तत्काळ मरेल असें भासते, तो रोगी याप्य जाणावा.

प्राप्ताक्रियाधारयतिसुखिनंयाप्यमातुरं ॥

प्रपतिष्यदिवागारस्तंभोयत्नेनयोजितः ॥

अर्थ-याप्य रोग्याला औषधोपाय आहेत तोंपर्यंत सुखानें जिवंत ठेविते. जसें घर पडूलागलें असतां, टेंका दिल्यावर राहतें तसें.

साध्यायाप्यत्वमायांतियाप्याश्चासाध्यतांतथा ॥

घ्नंतिप्राणानसाध्यास्तुनराणामक्रियावतां ॥

अर्थ-रोग्याला औषध नपोंचलें; तर जे साध्य रोग ते याप्य होतात; आणि जे याप्य ते असाध्य होतात; व जे असाध्य असतात ते मारतात, असें जाणावें.

## उपद्रव लक्षण.

रोगारंभकदोषस्यप्रकोपादुपजायते ॥

योन्योविकारःसबुधैरुपद्रवइहोदितः ॥

अर्थ-जो रोगाला उत्पन्नकरणारा वातादिदोष, त्याच्या कोपानें जो रोगाहून दुसरा विकार होतो; त्याला उपद्रव म्हणतात. उदाहरण, वातज्वरामध्यें जसे मस्तकशूलादिक उपद्रव होतात, तसे.

## अरिष्टलक्षण.

रोगिणोमरणंयस्मादवश्यंभाविलक्ष्यते ॥

तल्लक्षणमरिष्टंस्याद्रिष्टंचापितदुच्यते ॥

**अर्थ**—जा लक्षणावरून रोगी खचीत मरेल, असें ज्ञान होतें; त्या लक्षणाला अरिष्ट, किंवा रिष्ट असें ह्मणतात.

## चिकित्सालक्षण.

याक्रियाव्याधिहारिणिसाचिकित्सानिगद्यते ॥
दोषधातुमलानांयासाम्यकृत्सैवरोगहृत् ॥

**अर्थ**—जी क्रिया व्याधीचा नाश करून वातादि दोष, रसादिधातु, आणि मल यांचें साम्य करिते; आणि व्याधीचा नाश करित्ये; त्या क्रियेला चिकित्सा ह्मणतात.

## वैद्याचें कृत्य.

याभिःक्रियाभिर्जायंतेशरीरेधातवःसमाः ॥
साचिकित्साविकाराणांकर्मतद्भिषजांमतं ॥

**अर्थ**—जा औषधादिक्रियानीं शरीरामध्यें रसादि धातू सम होतात; तीच विकारांची चिकित्सा; आणि तेच वैद्यसंमत कर्म जाणावें.

## चिकित्साविध्युपदेश.

जातमात्रश्चिकित्स्यःस्यान्नोपेक्ष्योल्पतयागदः ॥
वन्हिशत्रुविषैस्तुल्यःस्वल्पोपिविकरोत्यसौ ॥

**अर्थ**—व्याधी उत्पन्न झाल्याबरोबर त्याची चिकित्सा करावी. तो अल्प आहे ह्मणून त्याची उपेक्षा करूनये. उपेक्षा केली असतां तो अग्नि, शत्रु, विष य सारिखा विकार करील.

## वैद्याचें कर्तव्य.

रोगमादौपरीक्षेतततोनंतरमौषधं ॥
ततःकर्मभिषक्पश्चात्ज्ञानपूर्वंसमाचरेत् ॥

**अर्थ**—वैद्यानें प्रथम रोग्याची परीक्षा करावी; नंतर ज्ञानपूर्वक औषधाची योजना करून चिकित्सा कर्म करावें.

## रोगाच्या अज्ञानीं दोष सांगतो.

यस्तुरोगमविज्ञायकर्माण्याचरतेभिषक् ॥
अप्यौषधविधानज्ञस्तस्यसिद्धिर्यदृच्छया ॥

**अर्थ**—जो वैद्य रोग जाणल्या वांचून औषध देतो, तो औषध जाणणारा जरी आहे; तत्रापि गुण प्रारब्धयोगानें होणार.

औषधंकेवलंकर्तुंयोजानातिनचामयं ॥
वैद्यकर्मसचेत्कुर्याद्वधमर्हतिराजतः ॥

**अर्थ**–जो वैद्य रोगज्ञाना वांचून केवळ औषधें मात्र जाणतो; तो जर औषध देईल, तर राजापासून दंडाला पात्र होईल.

## रोगज्ञान असून औषध जाणत नाहीं त्याला दोष सांगतो.

यस्तुकेवलरोगज्ञोभिषजेष्वविचक्षणः ॥
तंवैद्यंप्राप्यरोगीस्याद्यथानौर्नाविकांविना ॥

**अर्थ**–जो वैद्य केवळ रोगांचें निदान मात्र जाणतो; आणि औषध देण्याविषयीं कुशल नाहीं. त्याजवळ रोगी गेला असतां नाश पावतो. जशी नावाड्या वांचून समुद्रांत नौका नाश पावत्ये तसा.

यस्तुकेवलशास्त्रज्ञःक्रियास्वकुशलोभिषक् ॥
समुत्यत्यातुरंप्राप्यप्राप्यभीरुरिवाहवं ॥

**अर्थ**–जो वैद्य केवळ शास्त्र मात्र जाणतो; आणि औषधी देण्याविषयीं चांगला कुशळ नव्हे; तो वैद्य रोग्याला पाहून मोह पावतो. जसा भित्रा युद्धामध्यें भितो तसा.

## रोग व औषध यांचा जो ज्ञानी त्याचे गुण सांगतो.

यस्तुरोगविशेषज्ञःसर्वभैषज्यकोविदः ॥
देशकालविभागज्ञस्तस्यसिद्धिर्नसंशयः ॥

**अर्थ**–जा वैद्याला रोगज्ञान चांगलें आहे; व संपुर्ण चिकित्सेमध्यें कुशल, आणि देश, काल, विभाग यांतें जाणणारा त्यापासून रोग्याला आरोग्य होतें, याविषयीं संशय नाहीं.

आदावंतेरुजांज्ञानेप्रयतेतचिकित्सकः ॥
भेषजानांविधानेथततःकुर्याच्चिकित्सितम् ॥

**अर्थ**–वैद्यानें प्रथमतः रोग्याचा परीक्षेविषयीं यत्न करावा; नंतर औषधयोजना करण्यास आरंभ करावा.

विकारनामाकुशलोनजिन्हीयात्कदाचन ॥
नहिसर्वविकाराणांनामतोस्तिध्रुवास्थितिः ॥

**अर्थ**–कुशल वैद्यानें विकार पाहून लाजों नये; कां तर संपूर्ण विकाराला नामें करून परीक्षा सांगीतली नाहीं.

नास्तिरोगोविनादोषैर्यस्मात्तस्माच्चिकित्सकः ॥
अनुक्तमपिदोषाणांलिंगैर्व्याधिमुपाचरेत् ॥

**अर्थ**–दोषावांचून व्याधी नाहीं, असें वैद्यानें जाणून जे दोष शास्त्रांत सांगीतले नाहींत; ते दोष रोग्याचा उपद्रवांवरून आणावे.

येनकुर्वंत्यसाध्यानांचिकित्सांतेभिषग्वराः ॥
अतोवैद्यःश्रमंकुर्यात्साध्यासाध्यपरीक्षणे ॥

अर्थ–जे वैद्य असाध्य व्याधीला औषध देत नाहींत, ते श्रेष्ठ जाणावे. या करितां वैद्यानें पूर्वीं साध्यासाध्य विचाराविषयीं यत्न करावा.

शीतेशीतप्रतीकारमुष्णेतृष्णनिवारणं ॥
कृत्वाकुर्यात्क्रियांप्राप्तांक्रियाकालंनहापयेत् ॥

अर्थ–वैद्यानें शीतापासून झालेल्या व्याधीला उष्ण उपचार करावे; आणि उष्णानें व्याधी झाली असतां शीत उपचार करावे. या प्रमाणें क्रिया करावी; परंतु औषध देण्याचा काळ जाऊं देऊं नये.

अप्राप्तेवाक्रियाकालेप्राप्तेवानक्रियाकृता ॥
क्रियाहीनातिरिक्ताचसाध्येष्वपिनसिध्यति ॥

अर्थ–औषध देण्याचा समय प्राप्त झाला नसतां औषध दिलें, किंवा औषध देण्याचा समयीं नादिलें; अथवा कमी किंवा जास्ती दिलें असतां चिकित्सा साध्य रोगी असला तरी गुणावह होतनाहीं.

## अतिरिक्त व हीन क्रियेचा निषेध.

विकारेल्पेमहत्कर्मक्रियालघ्वीगरीयसी ॥
द्वयमेतदकौशल्यंकौशल्यंयुक्तकर्मता ॥

अर्थ–अल्पविकारावर मोठी क्रिया व मोठया विकारावर अल्प क्रिया हे दोनीं प्रकार वैद्याचें अज्ञान सुचवितात; याकरितां जेवढा रोग तेवढी क्रिया वैद्यानें करावी, ह्मणजे तो वैद्य कुशल समजावा.

क्रियायास्तुगुणालाभेक्रियामन्यांप्रयोजयेत् ॥
पूर्वस्यांशांतवेगायांनक्रियासंकरोहितः ॥

अर्थ–एक औषध देऊन रोग्यास गुण न आला तर पूर्वीचा औषधाचें वीर्य शांतझाल्या वर दुसरा उपचार करावा औषधांचा संकर हितकारक होतनाहीं

क्रियाभिरल्यरूपाभिर्नाक्रियासंकरोहितः ॥
ताभिस्तुभिन्नरूपाभिःसांकर्यंनैवदुष्यति ॥

अर्थ–वैद्यानें एक सारख्या च दोन चिकित्सा एककालीं करूनयेत, त्या हितकारक होत नाहींत परंतु त्याच जर भिन्न असल्यातर त्यांचा संकर दोषकारक होतनाहीं.

लंघनंवालुकास्वेदोनस्यंनिष्ठीवनंतथा ॥
अवलेहांचनंचापिप्राक्प्रयोज्यंत्रिदोषजे ॥

अर्थ–वैद्यानें त्रिदोषजनित व्याधीवर पूर्वी, लंघन, वाळवेचा शेक, नस्य, लाळपाडणें अवलेह, अंजन ह्या क्रिया कराव्या.

नचैकांतेननिर्दिष्टेशास्त्रेनिर्विशतेबुधः ॥

स्वयमप्यत्रभिषजातर्कनीयंचिकित्सता ॥

अर्थ–शास्त्रामध्यें सर्व सांगीतलें आहे, तत्रापि वैद्य सर्व जाणतो, असें होत नाही, यांकरिता वैद्यानें स्वतः तर्क चालवून चिकित्सा करावी.

उत्पद्यतेचसावस्थादेशकालबलंप्रति ॥

यस्यांकार्यमकार्यंस्यात्कर्मकार्यंविवर्जितं ॥

अर्थ–देश, काळ, बल, या अवस्था पाहून वैद्यानें रोग्याला औषध दिलें असतां ही विकार होत्ये; तर तें औषध वैद्यानें सोडावें.

## चिकित्साफल सांगतो.

क्वचिदर्थःक्वचिन्मैत्रीक्वचिद्धर्मःक्वचिद्यशः ॥

कर्माभ्यासःक्वचिच्चेतिचिकित्सानास्तिनिष्फला ॥

अर्थ–वैद्याला चिकित्सेपासून कोठें द्रव्य, कोठें मैत्री, कोठें धर्म, कोठें यश, व कचित्स्थळीं कर्माचा अभ्यास असे होतात, याकरितां चिकित्सा निष्फळ होत नाहीं.

आयुर्वेदोदितांयुक्तिंकुर्वाणाव्याहिताश्चये ॥

पुण्यायुर्वृद्धिसंयुक्तानीरोगाश्चभवंतिते ॥

अर्थ–जे रोगी निश्चयानें आयुर्वेदामध्यें जी युक्ती सांगीतली तीच करितात, ते पुण्य आयुष्य वृद्धि यांणीं युक्त होऊन निरोगी होतात.

## वैद्यानें द्रव्य कोणापासून घ्यावें तें सांगतो.

नैवकुर्वीतलोभेनचिकित्सापुण्यविक्रयं ॥

ईश्वराणांवसुमतांलिप्सेतार्थंतुवृत्तये ॥

अर्थ–वैद्यानें लोभेंकरून गरिबाजवळ चिकित्सेचा विक्रय करूनये. जे धनवान् समर्थ त्यांपासून आपले पोषणा करितां द्रव्य घ्यावें.

## रोग्यानें वैद्याला द्रव्य न दिल्यास दोष.

चिकित्सितशरीरंयोनानिष्क्रीणातिदुर्मतिः ॥

सयत्करोतिसुकृतंसर्वंतद्भिषगश्नुते ॥

अर्थ–रोग्यानें वैद्यापासून औषध घेतलें ह्मणजे त्याचें शरीर वैद्याचें होतें, ह्मणून तें शरीर जो रोगी परत विकत घेतनाहीं, तो जें सुकृत कर्म करितो त्याचें फळ वैद्यास प्राप्त होतें.

## औषध न देणाऱ्या वैद्याला दोष सांगतो.

दीर्घतीव्रामयग्रस्तंब्राह्मणंगामथापिवा ॥
दृष्ट्वापथिनिरातंकमकृत्वाब्रह्महाशुचिः ॥

अर्थ–जो वैद्य मार्गामध्यें तीव्ररोगानें ग्रस्त ब्राह्मण, किंवा गाई यानां पाहून तसेच टाकून जातो त्यास ब्रह्महत्येचें पाप लागून अशुचि होतो.

## चिकित्सेचीं अंगें.

रोगीदूतोभिषक्दीर्घमायुर्द्रव्यंसुसेवकः ॥
सदौषधंचिकित्सायाइत्यंगानिबुधाजगुः ॥

अर्थ–रोगी, दूत, वैद्य, दीर्घायु, द्रव्य, चांगला चाकर; आणि उत्तम औषध हीं ज्ञात्यानीं चिकित्सेचीं अंगें सांगितलीं आहेत-

## रोगिलक्षण.

रोगोयस्यास्तिरोगीससचिकित्स्यस्तुयादृशः ॥
यादृशश्चाचिकित्स्योपिवक्ष्यमाणोनिशम्यतां ॥

अर्थ–ज्याला व्याधी झाला तो रोगी, यास्तव त्याची चिकित्सा करावी; किंवा चिकित्सा नकरावी तें पुढें सांगतो.

## चिकित्सेस जे योग्य त्यांचें लक्षण.

निजप्रकृतिवर्णाभ्यांयुतःसत्वेनचक्षुषा ॥
चिकित्स्योभिषजारोगीवैद्यभक्तोजितेंद्रियः ॥

अर्थ–जो रोगी अपले प्रकृतीनें, वर्णानें, धैर्यानें, नेत्रानीं, युक्त; व वैद्याची भक्ति करणारा; आणि जितेंद्रिय, त्याला वैद्यानें औषध द्यावें.

आयुष्मान्सत्ववान्साध्योद्रव्यवान्मित्रवानपि ॥
चिकित्स्योभिषजारोगीवैद्यवाक्यकृदास्तिकः ॥

अर्थ–जो रोगी दीर्घायु, धैर्ययुक्त, साध्य, द्रव्यवान्, मित्रवान्, वैद्यानें सांगीतल्या प्रमाणें करणारा; आणि आस्तिक अशा रोग्याची चिकित्सा वैद्यानें करावी.

## चिकित्सा करूनये ते.

चंडःसाहसिकोभीरुःकृतघ्नोव्यग्रएवच ॥ शोकाकुलोमुमूर्षुश्च
विहीनःकरणैश्चयः ॥ वैरीवैद्यविदग्धश्चश्रद्धाहीनश्चशंकितः ॥
भिषजामविधेयश्चनोपक्रम्यभिषग्विधः ॥ एतानुपचरेद्वैद्योब

हून्दोषानवाप्नुयात् ॥ सनसिध्यतिवैद्यस्तुगेहेयस्यनपूज्यते ॥

अर्थ–जो क्रूर, साहसी, भित्रा, कृतघ्न, व्यग्र, शोकार्त, मरणाची इच्छा करणारा, गतेंद्रिय, वैरकरणारा, स्वतःवैद्यपणाचा अभिमान बाळगणारा, अविश्वासू, शंकापावणारा, स्वतः औषधप्रकार जाणणारा; आणि वैद्याचे स्वाधीन न राहाणारा, त्याला वैद्यानें औषध देऊ नये, औषध दिलें असतां, वैद्याला फार दोष लागतात; व ज्यारोग्याचा घरीं वैद्याचा सत्कार होत नाहीं तो रोगी बरा होत नाहीं.

## वैद्याचें कर्म सांगतो

व्याधेस्तत्वपरिज्ञानंवेदनायाश्चनिग्रहः ॥
एतद्वैद्यस्यवैद्यत्वंनवैद्यःप्रभुरायुषः ॥

अर्थ–व्याधीचें चांगलें ज्ञान; आणि त्या व्याधीचा शम येवढेंच वैद्याचें वैद्यपण नव्हे तर वैद्य आगंतुकव्याधींचा नाश करितो; याकरितां आयुष्याचा ही स्वामी आहे.

## मृत्युसंज्ञा व कालसंज्ञा.

एकोत्तरंमृत्युशतमथर्ववाणःप्रचक्षते ॥
तत्रैकःकालसंयुक्तःशेषास्त्वागंतवःस्मृताः ॥

अर्थ–अथर्वण ऋषींनीं एकशेएक मृत्यू आहेत, असें सांगीतले, त्यामध्यें कालसंज्ञक; एकच मृत्यू बाकीचे आगंतुक मृत्यु सांगीतलें.

## आगंतुकमृत्युलक्षण.

यथासत्यपितैलादौदीपंनिर्वापयेन्मरुत् ॥
एवमायुष्ययुक्तंचहिंसंत्यागंतुमृत्यवः ॥

अर्थ–जसें तैलादि साहित्य असतां वाऱ्यानें दिवा जातो; याप्रमाणें आयुष्य असतांही आगंतुक मृत्यू नाश करितो.

दोषागंतुनिमित्तेभ्योरसमंत्रविशारदौ ॥
रक्षेतांनृपतिंनित्यंयत्नाद्वैद्यपुरोहितौ ॥

अर्थ–वातादिदोष; व आगंतुक मृत्यूचीं कारणें यांपासून औषधज्ञ वैद्य; आणि मसलती पुरोहित यांणीं राजाचें संरक्षण करावें-

## देशज्ञान.

देशोल्पवारिद्रुनगोजांगलःस्वल्परोगदः ॥
अनूपोविपरीतोस्मात्समःसाधारणःस्मृतः ॥

अर्थ—जा देशांत अल्प उदक, अल्प वृक्ष, अल्प पर्वत त्या देशाला जांगल देश ह्मणावा, ह्यांत फार रोग होत नाहींत; आणि जात फार उदक, फार वृक्ष, बहुत पर्वत, तो अनूप, त्यांत व्याधी बहूत होतात, आणि या दोहोगुणानीं जो सम तो साधारण देश सांगीतला.

## जांगलादिदेशांत दोषप्रवृत्ति सांगतात.

जांगलंवातभूयिष्ठमानूपंतुकफोल्बणं ॥
साधारणंसममलंत्रिधाभूदेशमादिशेत् ॥

अर्थ—जो जांगल देश तो वातप्रचुर, जो आनूप तो कफकारक आणि जो साधारण तो सम जाणावा.

## अनूप, जांगल; आणि साधारणदेश यांचें लक्षण.

देशःप्रचुरपानीयोबहुवृक्षसमाकुलः ॥ बहुवातकफव्याधिर
नूपइतिकथ्यते ॥ स्वल्पोदकःस्वल्पवृक्षोबहुपित्तासृगामयः ॥
कथ्यतेजांगलोदेशस्ताभ्यांसाधारणःपरः ॥

अर्थ—जा देशांत पाणी पुष्कळ, आणि बहुत वृक्ष आहेत, तो अनूप, ह्यांत वात, आणि कफ संबंधी व्याधी फार होतात. जा देशांत उदक कमी, व वृक्षही अल्प आहेत, तो जांगल देश. यामध्ये पित्तरोग, व रक्तविकार हे बहुत होतात. या दोहोदेशांहून अन्य-जो देश तो साधारण राहाण्यास उत्तम आहे.

## दोषत्रयप्रकोपाचे महिनें

## वातप्रकोपमहिनें.

मार्गेपौषेतथामाघेआषाढेश्रावणेपिच ॥
भाद्रपदेचिकित्सज्ञैर्वातोराजाप्रकीर्तितः ॥

अर्थ—मार्गशीर्ष, पौष, माघ, आषाढ, श्रावण, भाद्रपद, हे महिनें वातप्रधान आहेत, असें वैद्यानीं सांगीतलें आहे.

## पित्तप्रकोपमहिनें.

आश्विनेकार्तिकेमासेवैशाखज्येष्टयोर्ध्रुवं ॥
सर्वशास्त्रविचारज्ञैःपित्तंराजाप्रकिर्तितः ॥

अर्थ—वैद्यांत पंडितपुरुषानीं आश्विन, कार्तिक, वैशाख, ज्येष्ठ, यामहिन्यांत पित्त राजा सांगीतला आहे.

## कफप्रकोपमहिनें.

फाल्गुनेचैत्रमासेचजंतुपिडाकारोमतः ॥

शितलांबुसमुद्भूतःश्लेष्माराजाप्रकिर्तितः ॥

**अर्थ**—फाल्गुन, आणि चैत्र, हे दोनमहिने जंतुपीडाकरणारे आहेत; ह्यामहिन्यांत थंडपाण्याच्या प्राशनानें श्लेष्मा उत्पन्न होतो.

## ऋतुविशेषानें दोषांची उत्पती.

हेमंतवर्षाशिशिरेपुवायोःपित्तस्यनोयांतनिदाघयोश्च ॥

कफस्यकोपःकुसुमागमेचकुर्वीतयद्यद्विहितंतथैषां

**अर्थ**—हेमंतऋतु, वर्षाऋतु; आणि शिशिरऋतु यांमध्यें वायूचा कोप होतो; आणि शरदृतु; व ग्रीष्मऋतु यांमध्यें पित्ताचा कोप होतो; व वसंतऋतूमध्यें कफाचा कोप होतो. यांवर जे जे विहित उपचार असतील ते वैद्यानीं करावें.

## रात्रदिवसांत दोषत्रयाचा प्रकोप व शमन.

श्लेष्माप्रायस्तुपूर्वाण्हेप्रदोषेचप्रवर्तते ॥ पित्तंप्रायस्तुमध्यान्हेक्षपामध्येप्रवर्तते ॥ अपराण्हेनिलःप्रायोनिशिथांतेप्रवर्तते ॥

**अर्थ**—दिवसाचे पूर्वभागीं; व प्रदोषकाळीं श्लेष्मकोप होतो; आणि मध्यान्ह व मध्यरात्रीं पित्तकोप होतो; व अपराण्हकाळीं; आणि मध्यरात्रीनंतर वायूचा कोप होतो.

## दोषत्रयशमन.

कफंतुरिपुवत्तीक्ष्णैर्वातंस्नेहेनमित्रवत् ॥

पित्तंजामातरमिवमधुरैःशीतलैर्जयेत् ॥

**अर्थ**—कफाला शत्रुसारिखा तीक्ष्णऔषधांनीं वायूला स्नेहनद्रव्यानीं मित्रासारिखा; आणि पित्ताला मधुर, व शीतळ पदार्थांनीं जांवयासारिखा, वैद्यानीं जिंकावा.

## कोणत्या दोषावर काय योजावें तें सांगतो.

कफप्रकोपेवमनंसनस्यंविरेचनंपित्तभवेविकारे ॥

वाताधिकेबस्तिविशोधनंचसंसर्गजेचप्रविमिश्रमेतत् ॥

**अर्थ**—कफप्रकोप झाला असतां; नस्यवमन, पित्त व्याधीवर रेचक; आणि वातव्याधीवर शोधन बस्ति द्यावें; व त्रिदोषजनितव्याधीवर सर्व उपचार करावे.

## वातप्रकोपकारण.

नीवारस्त्रिपुटःसतीनचणकश्यामाकमुद्गाढकीनिष्यावाश्वमकुष्ठकश्चवरटामंगल्यकःकोद्रवः ॥यद्द्रव्यंकटुकंसतिक्ततुवरंशी

तंचरूक्षंलघुस्वल्पाशोविषमाशनंनिरशनंभुक्तेत्वजीर्णेशनं ॥ भुक्तंजीर्णतरंपरिश्रमभरोगर्तादिकोल्लंघनंबाहुभ्यांतरणंतरोःप्रपतनं मार्गेतियानंपदा ॥ दंडादिप्रहतिस्तथोच्चपठनंधातुक्षयेजागरोमार्गस्यावरणंव्यवायभृशतात्रातादिवेगाहतिः ॥ अत्यर्थवमनंविरेचनमतिस्रावोधिकश्वासजोरोगान्मांसविहीनतातिमदनःचिंताचशोकोभयं ॥ वर्षावैशिशिरेदिनस्यरजनेर्भागेतृतयेघनाःप्राग्वातस्तुहिनंशरीरमरुतोदुष्टेर्माहेतवः ॥

**अर्थ**—देवभात, लांक, वाटाणे, हरभरे, सांवें, मूग, तुरी, पावटे, रानमूग, मठ, कर्डई, ईचें बीज, मसूरा, हरीक, कडुपदार्थ, तिखट, तुरट, शीतळ, रूक्ष, लघु, अल्पभोजन, विषमभोजन, निरशन, भोजनोत्तर लागलेंच भोजन, भोजन जिरल्यावर फार श्रम, भार वाहणें, खंदकादिकांवरून उड्या मारणें, पोंहणें, झाडावरून पडणें, फार मार्ग चालणें, दंडादिकांचा आघात, मोठ्यास्वरानें अध्ययन, धातुक्षय, जागरण, मलमूत्रादिकांचा, निरोध, वारंवार मैथून, आपनादिवायूचा रोध, फारवांति, फाररेच, अतिरक्तस्राव, रोगादिकांनीं मासक्षय, अतिकाम, चिंता, शोक, भय, वर्षाऋतु, शिशिरऋतु, दिवसाचा व रात्रीचा तिसराभाग, मेघोद्गम, पुर्वेकडील वारा, आणि थंडी, इत्यादि शरीरांत वायू कोपविण्याचीं कारणें जाणावीं.

## दुसरें वातप्रकोप कारण.

संधारणाध्यशनजागरणोच्चभाषाव्यायामयानकटुतिक्तकषायरूक्षैः ॥
चिंताव्यवायभयलंघनशीतशोकैर्वातःप्रकोपमुपयातिघनागमेच ॥

**अर्थ**—मूत्र पुरीषादिकाचा अवरोध, भोजनोत्तर लागलेंच भोजन, जागरण, मोठ्यानीं संभाषण, व्यायाम, पालखी इत्यादिकांत बसणें, तिखट, कडु, तुरट, रूक्ष, चिंता, स्त्रीगमन, भीति, लंघन, शीत, शोक; आणि पर्जन्य येण्याचे दिवस याकारणानीं वात कोपतो.

## वातदोषाचीं कर्में.

पारुष्यसंकोचनतोदशूलश्यामत्वमंगव्यथचेष्टभंगान् ॥
सुप्तत्वशीतत्वखरत्वशोषाःकर्माणिवायोःप्रवदंतितज्ज्ञाः ॥

**अर्थ**—आंगाला खरखरीतपणा, संकोचन, ठणका, शूळ काळेंपणा अंगग्रह, चेष्टानाश, स्पर्शाचें अज्ञान, शैत्य, रुक्षत्व; आणि शोष हीं वायूचीं कर्में असें वैद्यानीं सांगीतले.

## वात शमन.

स्निग्धोष्णस्थिरवृष्यबल्यलवणस्वाद्वम्लतैलातपस्नानाभ्यंजनबस्तिमांसमदिरासंवाहनोद्वर्त्तनं ॥ स्नेहस्वेदनिरूहनस्यशयनस्थानोपनाहादिकंपानाहारविहारभेषजमिदंवातप्रशांतिंनयेत् ॥

**अर्थ**–स्निग्ध, उष्ण, जड, वृष्य, बलकर, खारट, गोड, आंबट, तेल, ऊन, स्नान, अभ्यंग, बस्ति, मांस, मद्य, रगडणें, आंगास उटणीं लावणें; स्नेहन, घाम, निरूहबस्ति, नस्य शयन, बसणें, पेंड, इत्यादिप्रकार ह्मणजे पानें, आहार, व विहार हे उपचार वायूची शांती करितात.

## पित्तप्रकोपकारण.

कट्वम्लमद्यलवणोष्णाविदाहितीक्ष्णक्रोधातपानलभयश्रमशु
ष्कशाकैः ॥ क्षाराद्यजीर्णविषमाशनभोजनैश्चपित्तंप्रकोप
मुपयातिघनात्ययेच ॥

**अर्थ**–तिखट, आंबट, मद्य, खारट, उष्ण, विदाहि, तीक्ष्ण, क्रोध, सूर्यताप, अग्नि, भय, श्रम, शुष्कशाका, क्षारादिक अजीर्ण, अजीर्णकारक भक्षण, व भोजन; आणि पर्जन्य जाण्याचे दिवस इत्यादि कारणानीं पित्ताचा कोप होतो.

## प्रकार. २

माषैस्तिलैःकुलित्थैश्चमत्स्यैर्मेषामिषेणच ॥
गव्येनदधितक्रेणनृणांपित्तंप्रकुप्यति ॥

**अर्थ**–उडीद, तीळ, कुळीद, मत्स्य, मेंढ्यांचें मांस, गाईचें दहीं, व तक्र हीं पित्तप्रकुपितकरणारी होत.

## प्रकार. ३

कट्वम्लोष्णविदाहितीक्ष्णलवणक्रोधोपवासातपस्त्रीसंभोगतृ
षाक्षुधानिहननव्यायाममद्यादिभिः ॥ भुक्तेजीर्यतिभोजनेच
शरदिग्रीष्मेतथाप्राणिनांमध्यान्हेचतथार्धरात्रसमयेपित्तप्र
कोपोभवेत् ॥

**अर्थ**–तिखट, आंबट, ऊष्ण, विदाहि, तीक्ष्ण, क्षार, क्रोध, उपवास, सूर्यताप, स्त्रीसंग, ताहान भूक यांचा निरोध, मेहेनत, मद्य, आहार जिरण्याचा काळात, शरदृतु, ग्रीष्म ऋतु, मध्यान्ह, आणि मध्यरात्री इत्यादि कारणानीं पित्ताचा कोप होतो.

## पित्ताचीं कर्में.

परिश्रमस्वेदविदाहरागवैगंध्यसंक्लेदविपाककोठाः ॥
प्रलापमूर्छाभ्रमपित्तदाहाःपित्तस्यकर्माणिवदंतितज्ज्ञाः ॥

**अर्थ**–अत्यंतश्रम, घाम, दाह, आंगावर लाली, दुर्गंधपणा, आंगाला ओलसरपणा, मुखादिकाचा पाक, अंगावर गांधी, बडबड, मूर्छा, भ्रम, आणि दाह, हीं पित्ताची कर्में असें सुज्ञानीं सांगीतलें आहे.

## पित्तोपशमन.

तिक्तस्वादुकषायशीतपवनछायानिशाजीवनंज्योत्स्नाभूग्रह
वारियंत्रजलजस्त्रीगात्रसंस्पर्शनं ॥ सर्पिःक्षीरविरेकसेकरु
धिरस्रावप्रलेपादिकंपानाहारविहारभेषजमिदंपित्तंप्रशांतिनयेत् ॥

अर्थ–कटु, गोड, तुरट, थंड वारा, छाया, रात्र, पाणी, चांदणें, भुयार, कारंजी, कमळें, स्त्रियाचें आलिंगन, तूप, दूध, रेचक, अंगावर पाण्यादिकांचें सेचन, रक्तस्राव, आणि लेप, इत्यादि ह्मणजे पान, आहार, विहार, हे उपचार पित्ताला शांत करितात.

## कफप्रकोपकारण.

गुरुपटुमधुराम्लस्निग्धमाषैस्तिलैश्चद्रवदधिदिननिद्राशीत
निश्चेष्टताभिः ॥ प्रथमदिवसभागेरात्रिभागेपिचाद्येभवतिहि
कफकोपोभुक्तमात्रेवसंते ॥

अर्थ–गुरु, क्षार, मधुर, आंबट, स्निग्ध, उडीद, तिळ, द्रवपदार्थ, दहीं, दिवानिद्रा, शीत, निश्चेष्टपणा; आणि दिवसाचा व रात्रीचा पहिला अंश, भोजनोत्तरकाल; आणि वसंत, याकारणानी कफाचा प्रकोप होतो.

स्वप्नाद्दिवामधुरशीतलमत्स्यमांसगुर्वम्लपिच्छलातिलेक्षुपयोवि
कारैः ॥ स्निग्धातितृप्तिलवणोदकपानभक्ष्यैःश्लेष्माप्रकोपमुप
यातितथावसंते ॥

अर्थ–दिवसास निद्रा, मधुर, शीतळ पदार्थ, मासे, मांस, जड, आंबा, चिक्कन, तिळ, उसांचे प्रकार, दुधाचे पदार्थ, स्निग्ध, व तृप्तिकारक पदार्थ, वसंतऋतू, उदकपान, क्षार इत्यादि, ह्मणजे पाने, व भक्षणें, यांणीं कफकोप होतो.

## कफाचीं कर्में.

श्वेतत्वशीतत्वगुरुत्वकंडूस्नेहोपदेहस्तिमितत्वलेपाः ॥
उत्सेधसंक्रांतचिरक्रियाश्चकफस्यकर्माणिवदंतितत्ज्ञाः ॥

अर्थ–शरीराला पांढरेपणा, थंडपणा, जडपणा, कंडू, चिकटपणा, बद्धपणा, लेपत्व, सूज, काम लौकर न होणें, ही कफाचीं कर्में तज्ञ सांगतात.

## कफोपशामक उपचार.

रूक्षक्षारकषायतिक्तकटुकव्यायामनिष्ठीवनंस्त्रीसेवाध्वनियुद्ध
जागरजलक्रीडापदाघातनं ॥ धूम्रस्तापशिरोविरेकवमनंस्वे
दोपनाहादिकंपानाहारविहारभेषजमिदंश्लेष्माणमुग्रंजयेत् ॥

अर्थ–रूक्ष, क्षार, तुरट, कडु, तिखट, व्यायाम, लालास्राव, स्त्रीगमन, मार्गगमन युध्द, जागरण, जलक्रीडा, पायानीं रगडणें, धूम्रपान, ताप, मस्तकरेच, वांती, घाम; आणि पेंडबांधणें इत्यादि, ह्मणजे पान, विहार, आहार, औषधें हे उपचार कफाचा नाश करितात.

## आमव्याधिलक्षण.

आलस्यतंद्राल्हदयाविशुद्धिर्दोषाप्रवृत्त्याकुलमूलभावैः ॥
गुरूदरत्वादरुचिसुप्तताभिरामान्वितंव्याधिमुदाहरंति ॥

अर्थ–आळस, झापड, चित्ताला अस्वास्थ्य; आणि मलमूत्राचा अवरोध, पोटाला जडपणा, अरुची, अंगाला बधिरपणा, यालक्षणानीं आमयुक्त व्याधी आहे, असे जाणावें.

## आमप्रतीकार.

आमंजयेल्लंघनकोष्णपेयालघ्वन्नरूक्षोदनतिक्तयूषैः ॥
निरूहणैःस्वेदनपाचनैश्चसंशोधनैरूर्ध्वमधस्तथाच ॥

अर्थ–लंघन, मंदोष्णपेज, लघुअन्न, रूक्षान्न, कडू, मुद्गरसवगैरे, निरूहबस्ति, शेक, पाचन, रेचन, आणि वांति, याप्रकारानीं आम व्याधीचा नाश करावा.

## वयोविचार.

बाल्यमाषोडशाद्वर्षात्ततोमध्योधिसप्ततिः ॥
वृत्धस्तदूर्ध्वविज्ञेयोवयोमानमितित्रिधा ॥

अर्थ–जन्मांपासून सोलावेंवर्षपर्यंत बाल, उपरांत सत्तरवर्षेपर्यंत मध्यम, सत्तरांउपरांत वृध्दअवस्था, याप्रमाणें वयाचा तीनप्रकारचा अवस्था आहेत.

## रोग्याला आरोग्य होण्याचें चिन्ह.

मंगलाचारसंपन्नोपरीवारस्तथातुरः ॥ श्रद्दधानोनुकूलश्चप्रभूतद्रव्यसंग्रहः ॥ सत्वलक्षणसंयुक्तोभक्तिर्वैद्यद्विजातिषु ॥ चिकित्सायामनिर्वेदस्तदारोग्यस्यलक्षणं ॥

अर्थ–रोगी, आणि त्याचे सेवक मंगलाचारसंपन्न, भक्तिमान्, वैद्याला अनुकूल, बहुतद्रव्याचा संग्रह, सत्वादि लक्षणानीं युक्त, वैद्य, ब्राह्मण यांचे भक्त, चिकित्सेविषयीं अनिर्वेद, हें रोग्याला आरोग्य होण्यांचें लक्षण जाणावें.

## रोगिसामान्यलक्षण.

अत्यंतकुत्सितावेतौसदास्थूलकृशौनरौ ॥ श्रेष्ठोमध्यशरीरस्तुरस्थूलःक्षीणोनपूजितः ॥ कर्षयेत्वृंहयेच्चापिसदास्थूलकृशौनरौ ॥
रक्षणंचापिमध्यस्यकुर्वीतकुशलोभिषक् ॥

**अर्थ**—निरंतर स्थूल, व कृश हे पुरुष अत्यंत निंदित आहेत; व मध्यमशरीर पुरुष उत्तम, याकरितां कुशल वैद्याने स्थूलाला कर्षण, आणि कृशाला पौष्टिक उपचार करावे; आणि मध्यकायाचें संरक्षण करावें.

## स्वस्थलक्षण.

समदोषःसमाग्निश्चसमधातुमलक्रियः ॥ प्रसन्नात्मेंद्रियमनाः
स्वस्थइत्यभिधीयते ॥ यत्समत्वंहिदोषाणांभिषग्भिरवधार्यते ॥
नतत्स्वास्थ्यंविनावक्तुंशक्यमन्येनहेतुना ॥

**अर्थ**—दोष, अग्नि, धातु, मल, व क्रिया हीं ज्याचीं समान; आणि मन, इंद्रियें, आत्मा, हे प्रसन्न असतात, त्याला स्वस्थ असें ह्मणतात. वैद्यानीं दोषाचें समत्वांचा निश्चयकरणें, तर तो सुप्रकृती वांचून अन्य हेतूनीं करतां येणार नाहीं.

## अतिवृत्धदोषांचींलक्षणे.

## वातवृत्धीलक्षणें.

वातेवृत्धेभवेत्कार्श्यंपारुष्यंचोष्णकामिता ॥
गाढंमलंबलंचाल्पंगात्रस्फूर्तिर्विनिद्रता ॥

**अर्थ**—वायू वाढला असतां कृशता, खरखरीतपणा, ऊष्णाची इछा, मळाचाखडा, अशक्तता, गात्रांची स्फूर्ती; आणि निद्रानाश हीं होतात.

## पित्तवृत्धिलक्षण.

विण्मूत्रनेत्रगात्राणांपीतत्वंक्षीणमिंद्रियं ॥
शीतेच्छातापमूर्छाःस्युःपित्तेवृत्धेल्पनिद्रता ॥

**अर्थ**—पित्त वाढलें असतां विष्ठा, मूत्र, नेत्र, अंग यांनां पिंवळेपणा, इंद्रियानां क्षीणता, थंडपदार्थांची इछा, संताप, मूर्छा; आणि निद्रा अल्प, हीं लक्षणें होतात.

## कफवृत्धिलक्षण.

विष्ठादिशौक्ल्यंशीतत्वंगौरवंचातिनिद्रता ॥
संधिशैथिल्यमुत्क्लेदोमुखसेकःकफेधिके ॥

**अर्थ**—कफ अधीक वाढला असतां मल, मूत्र, त्वचा, नखें, नेत्र, हीं शुक्लवर्ण; आणि थंडपणा, आंगाला जडपणा, अतिनिद्रा, ग्लानी, संधीनां शिथिलपणा; आणि तोंडाला पाणी सुटणें, हीं लक्षणें होतात.

## रसवृत्धिलक्षण.

रसेवृद्धेन्नविद्वेषोजायतेगात्रगौरवं ॥
मुखप्रसेकश्छर्दिश्चमूर्छासादोभ्रमःकफः ॥

अर्थ–रसधातू वाढला असतां अन्नद्वेष, आंगाला जडपणा, तोंडाला पाणीसुटणें, ओकारी, मूर्छा, ग्लानि, श्रम; आणि कफ हीं लक्षणें होतात.

## रक्तवृद्धिलक्षण.

प्रवृद्धंरुधिरंकुर्याद्गात्रमारक्तवर्णकं ॥ लोचनंचतथारक्तंशिराः पूरयतेपिच ॥ रक्तंतुकुरुतेवृद्धंविसर्पप्लीहविद्रधीन् ॥ कुष्टंवातास्रकंगुल्मंशिरापूर्णत्वकामले ॥ गात्राणांगौरवंनिद्रामदोदाहश्चजायते ॥ व्यंगाग्निसादसंमोहरक्तत्वङ्नेत्रमूत्रता ॥ गुदमेंढ्रास्यपाकार्शःपिटकामसकास्तथा ॥ इंद्रलुप्तांगमर्दोसृग्दरारक्तापःकरांघ्रिषु ॥ शमयेद्रक्तवृध्युत्थान्रक्तस्रुतिविरेचनैः ॥

अर्थ–शरीरामध्यें रक्त वाढलें असतां गात्रें, व नेत्र आरक्त होतात; आणि शिरा फुगतात; व विसर्प, प्लीह, विद्रधी, कुष्ट, वातरक्त, गुल्म, व शिराला पुष्टि, कावीळ, अंगाला जडपणा, निद्रा, मद, दाह, तोंडावर वांग; व अग्निमांद्य, मोह; आणि त्वचा, नेत्र, मूत्र, मल, हे रक्त व गुद, शिश्न, मुख यांचा पाक, व अर्श, पिटिका, मस, चामखीळ, चाई, आंगमोडे, प्रदर, आणि हातपायांची आग, हीं लक्षणें होतात. हे रक्त वृद्धिपासून झालेले विकार रक्तस्राव, रेंच यांणी शमवावे.

## मांसवृद्धिलक्षण.

मांसंवृद्धंतुगंडौष्ठस्फिगुपस्थोरुबाहुषु ॥
जंघयोःकुरुतेवृद्धिंतथागात्रस्यगौरवं ॥

अर्थ–शरीराचेठाई मांस वाढलें असतां गाल, ओंठ, कमरेचा माज, उपस्थ, मांड्या, बाहु; आणि पायांच्या पोटऱ्या, यांचेठाई वृद्धि करितें; आणि गात्राला जड करितें.

## मेदोवृद्धिलक्षण.

उदरेपार्श्वयोर्वृद्धिःकासश्वासादयस्तथा ॥ दौर्गंध्यंस्निग्धतागात्रेमेदोवृद्धौभवेदिति ॥ प्रवृद्धंकुरुतेमेदःश्रममल्पेपिचेष्टिते ॥ तृट्स्वेदगलगंडौष्ठरोगमेहादिजन्मच ॥ श्वासंस्फिक्जठरग्रीवास्तनानांलंबनंतथा ॥

अर्थ–मेद वाढला असतां पोट, पार्श्व, यांची वृद्धी करितो; व खोकला, दमा, आंगाला दुर्गंधी; व चिकटपणा, थोड्या मेहेनतीने श्रम, तृषा, घाम, गलगंड, ओष्ठरोग, मेह, श्वास, होतो, व माज, पोट, मान, स्तन, हे लोंबूलागतात. अशीं लक्षणें होतात.

## अस्थिवृध्धिलक्षण.

वृद्धान्यस्थीनिकुर्वंतिअस्थीन्यन्यानिचास्थिषु ॥
आचरंतितथादंतान्विकटान्महतस्तथा ॥

**अर्थ**–अंगामध्ये अस्थि वाढले असतां; अस्थीचेठाईं अन्य अस्थी उत्पन्न होतात; आणि दांत मोठे विक्राळ होतात.

## मज्जावृध्धिलक्षण.

मज्जावृद्धासमस्तांगनेत्रगौरवमाचरेत् ॥

**अर्थ**–शरीरांत मज्जा वाढली असतां; संपूर्ण अंगे व नेत्र यानां जडपणा येतो.

## शुक्रवृध्धिलक्षण.

शुक्राश्मरीशुक्रवृध्धौशुक्रस्यातिप्रवर्तनं ॥

**अर्थ**–शुक्रधातू वाढला असतां, शुक्राश्मरी, व धाधू फार जाणें हे विकार होतात.

## मूत्रवृध्धिलक्षण.

मुत्रेवृध्धेमुहुर्मूत्रमाध्मानंबस्तिवेदना॥

**अर्थ**–शरीरामध्यें मूत्र वाढलें असतां; पोट फुगतें, व बस्तिचे टाईं वेदना होतात.

## स्वेदवृध्धि.

स्वेदेवृध्धेतुदौर्गंध्यंत्वचिकडूश्चजायते ॥

**अर्थ**–शरीरामध्यें घर्म वाढला असतां; अंगाला दुर्गंध येतो; व कंडू होतो.

## आर्तववृध्धि.

आर्तवातिप्रवृतिःस्याद्दौर्गंध्यंचार्तवेभवेत् ॥
अंगमर्दश्चजायेतलिंगंस्यादार्तवेधिके ॥

**अर्थ**–शरीराचेठायीं आर्तव वाढलें असतां; आर्तवाचा फार स्राव होतो; व त्याला दुर्गंध आसतो; आणि आंगमोडे होतात.

## स्तन्यवृध्धिलक्षण.

स्तनयोरतिपीनत्वंक्षीरस्रावोमुहुर्मुहुः ॥
तोदश्चतत्रभवतिस्तन्याधिक्यस्यलक्षणं ॥

**अर्थ**–शरीराचेठाईं स्तन्य फार झालें असतां स्तन पुष्ट होतात; व त्यांतून दुग्धस्राव वारंवार होतो; व स्तनांत ठणका लागतो.

## उदरवृध्दिलक्षण.

उदरादिप्रवृध्दिस्तुवृध्येगर्भेविजायते ॥
स्वेदश्चगर्भवत्याःस्यात्प्रसवेव्यसनंमहत् ॥

अर्थ–पोटामध्यें गर्भ मोठा वाढला असतां; पोट मोठें वाढतें: आणि त्या गर्भारी ला घाम फार येतो; व प्रसवाचे वेळेस फार दुःख होतें.

## दोष, धातु, मल, यांचा ऱ्हास सांगतो.

तत्तध्दासकराहारविहारपरिवेषणैः ॥ दोषधातुमलानांहिऱ्हा
सोनिगदितोनृणां ॥ पूर्वःपूर्वोतिवृद्धत्वाद्धर्धयेध्दिपरस्परं ॥
तस्मादतिप्रवृध्धानांधातूनांऱ्हासनंहितं ॥

अर्थ–शरीरामध्यें दोष, धातु,मल यांचा नाश करणारे आहार, विहार, भक्षण. यांणीं त्यांचा ऱ्हास होतो; आणि पहिलेपहिले धातु वाढले म्हणजे दुसऱ्या धातूला वाढवितात; याकरितां फार वाढलेजे दोष,धातु, मळ यांचा नाश हित कारक होतो.

## दोष, धातु, मल, यांचें क्षयनिदान.

असात्म्यान्नसदाक्रोधशोकचिंताभयश्रमैः॥ अतिव्यवायानश
नात्यर्थसंशोधनैरपि ॥ वेगनांधारणाच्चापिसाहसादभिघाततः ॥
दोषाणामथधातूनांमलानांचभवेत्क्षयः ॥

अर्थ–धातु, दोष, मल यांचा शरीराला न मानणारीं अन्नें व पानें, क्रोध, शोक, चिंता, भय, श्रम, अतिमैथुन, अनशन, रेचकें, वेगधारण, साहसकर्म; आणि अभिघात यांपासून क्षय होतो.

## वातक्षयल०

वातक्षयेल्पचेष्टात्वंमंदवाक्त्वंविसंज्ञता ॥

अर्थ–वायूचा क्षय झाला असतां; अल्पचेष्टा, हळूभाषण; आणि चेतनेचा नाश हे होतात.

## पित्तक्षयल०

पित्तक्षयेधिकःश्लेष्मावन्हिमंदःप्रभाक्षयः ॥

अर्थ–पित्त क्षीण झालें असतां; श्लेष्मा वाढतो; आणि अग्नि मंद होउन कांतीचा क्षय होतो.

## कफक्षयल०

संधयःशिथिलामूर्छारौक्ष्यदाहाःकफक्षये ॥

अर्थ–कफ क्षीण झाला; म्हणजे संधिना शिथिलता, मूर्छा, रूक्षता; आणि दाह हीं लक्षणें होतात.

## रसक्षयलक्षण.

त्हृत्पीडाकंठशोषश्चत्वक्शून्यातृट्रसक्षये ॥

**अर्थ**-रसधातु क्षीण झाला असतां; कंठशोष, त्वचेला बधिरपणा, तृषा हीं लक्षणें होतात

## रक्तक्षय.

शिराश्लथाहिमाम्लेच्छात्वक्पारुष्यंक्षयेसृजः ॥

**अर्थ**-रक्ताचा क्षय झाला असतां; शिरा शिथिल; व गार होतात, त्वचा फिकट होत्ये; व अंगाला खरखरीतपणा येतो; अशीं लक्षणें होतात.

## मांसक्षयलक्षण.

गंडोष्ठकंधरास्कंधवक्षोजठरसंधिषु ॥ उपस्थप्रोथपिंडीषुशु

ष्कतागात्ररूक्षता ॥ तोदोधमन्यःशिथिलाभवेयुर्मांससंक्षये ॥

**अर्थ**-मांसाचा क्षय झाला असतां, गाल, आणि ओंठ, मान, खांदे, छाती, पोट, संधी, उपस्थ, नाकपुड्या; आणि पोटऱ्यांचे गोळे यांचे ठायीं शुष्कपणा, गात्रें रूक्ष, ठणका, नाडीनां शिथिलपणा, हिं लक्षणें होतात.

## मेदक्षयल०

प्लीहाभिवृध्दिसंधीनांशून्यतातनुरूक्षता ॥

प्रार्थनास्निग्धमांसस्यालिंगंस्यान्मेदसःक्षये ॥

**अर्थ**-मेदक्षय झाला असतां, प्लीहा वाढत्ये. अंगाच्या संधी शून्य होतात, शरीराला रूक्षता येत्ये; आणि स्निग्ध मांस खाण्याची इच्छा होत्ये अशीं लक्षणें होतात.

## अस्थिक्षयल०

अस्थिशूलंतनौरौक्ष्यंनखदंतत्रुटिस्तथा ॥

**अर्थ**-अस्थिक्षय झाला असतां; हाडे दुखतात, शरिर रूक्ष होतें, नख, दांत, हे फुटतात हीं अस्थिक्षीणाचीं लक्षणें जाणावी.

## मज्जाक्षयल०

शुक्राल्पत्वंपर्वभेदस्तोदःशून्यत्वमस्थिनि ॥

लिंगान्येतानिजायंतेनराणांमज्जसंक्षये ॥

**अर्थ**-मज्जेचा क्षय झाला असतां; शुक्र अल्प होतें, सांधे फुटतात, हाडांमध्यें ठणका; आणि शून्यत्व हीं लक्षणें होतात.

## शुक्रक्षयल०

शुक्रक्षयेरतेशक्तिर्व्यथाशेफासिमुष्कयोः ॥

चिरेणशुक्रसेकःस्यात्सेकेरक्ताल्पशुक्रता ॥

अर्थ–शुक्राचा क्षय झाला असता; रतिविषयीं अशक्तता शिश्न व वृषण यांचेठायीं पिडा आणि रतिकाळीं फार वेळानें थोडें शुक्र व रक्तपडतें; अशीं लक्षणें होतात.

## ओजःक्षयल०

ओजःक्षयेतुकोपक्षुत्‌चिंताशोकश्रमादिभिः ॥ रूक्षतीक्ष्णोष्णक
टुकैःकर्षणैरपरैरपि ॥ बिभेतिदुर्बलोभीक्ष्णंचिंतयेद्व्यथितेंद्रियः ॥
दुश्छायोदुर्मनारूक्षःशामःस्यादोजसःक्षये ॥

अर्थ–क्रोध, क्षुधा, चिंता, शोक, श्रम, यांणीं; किंवा रूक्ष, तीक्ष्ण, उष्ण, कडु, यांणीं; अथवा अन्य कृशकरणारे पदार्थांनीं, ओजःक्षय झाला असतां; अत्यंत दुर्बलता, भीति, चिंता, इंद्रियानां व्यथा कांतिनाश, काळजी, याहींकरून रूक्ष, व कृश होतो. हीं लक्षणें होतात.

## पुरीषक्षयल०

पुरीषस्यक्षयेपार्श्वेत्दृदयेचव्यथाभवेत् ॥
सशब्दस्यानिलस्योर्ध्वगमनंकुक्षिसंवृतिः

अर्थ–पुरीष (मल) क्षय झाला असतां, पार्श्व, हृदय, यांचेठाईं व्यथा, सशब्दवायूची उर्ध्वगती; आणि कुशीनां फुगवटी येत्ये हीं लक्षणें होतात.

## मूत्रक्षय; व स्वेदक्षय.

मूत्रक्षयेल्पमूत्रत्वंबस्तौतोदश्चजायते ॥ स्वेदनाशेत्वचोरौक्ष्यंच
क्षुषोरपिरूक्षता ॥ स्तब्धाश्चरोमकुपास्युर्लिंगंस्वेदक्षयेभवेत् ॥

अर्थ–मूत्राचा क्षय झाला असतां; मूत्र अल्प; व बस्तींत दुःख होतें; आणि स्वेदाचा नाश झाला असतां; त्वचा, नेत्र, रूक्ष, होतात; आणि रोमांच उभारतात हीं लक्षणें होतात.

## आर्तवक्षयलक्षण.

आर्तवस्यस्वकालेनाभावस्तस्याल्पताथवा ॥
जायतेवेदनायोनौलिंगंस्यादार्तवक्षये ॥

अर्थ–स्त्रियांचे रजाचा क्षय झाला असतां योग्यकाळीं ऋतु होतनाहीं; व झाला असता आल्प होतो; आणि योनीमध्यें दुखतें हीं लक्षणें होतात.

## स्तन्यक्षय.

अभावःस्वल्पतावास्यास्तन्यस्यभवतस्तथा ॥
म्लानौपयोधरावेतल्लक्षणंस्तन्यसंक्षये ॥

अर्थ–स्त्रियांचे दुग्धाचा क्षय झाला असतां; दुग्ध मुळींच नाहींसें होतें; किंवा अल्प होतें; आणि तिचे स्तन म्लान होतात.

## गर्भक्षयल०.

अनुन्नताभवेत्कुक्षिर्गर्भस्यास्पंदनंतथा ॥
इतिगर्भक्षयेप्राज्ञैर्लक्षणंसमुदाहृतम् ॥

**अर्थ**–गर्भक्षय झाला असतां, कूस उंच वर येत नाहीं, व कुशींत गर्भ फिरत नाहीं, याप्रमाणें ज्ञात्यानीं लक्षण सांगीतलें आहे.

## जे क्षिण धातु, मल, इत्यादि त्यांची वृध्दी सांगतो.

तत्तत्संवर्धनाहारविहारातिनिषेवणात् ॥
तत्तत्प्राप्यनरःशीघ्रंतत्तत्क्षयमपोहति ॥

**अर्थ**–जाजा धातूचा क्षय झाला असेल; त्यात्या धातूला वाढविणारें भक्षण, विहार, यांचें अतिसेवन करावें, ह्मणजे तो तो धातू वाढून लवकर मनुष्य त्यात्या धातुक्षयापासून मुक्त होतो.

## ओजवृध्दी सांगतो.

ओजस्तुवर्धतेन्दृणांसुस्निग्धैस्वादुभिस्तथा ॥
वृष्यैरन्यैर्विशेषात्तुक्षीरमांसरसादिभिः ॥

**अर्थ**–मनुष्याचे शरीरांत स्निग्ध, गोड, वृष्य, क्षीर, मांसरस यानीं; आणखीं अशाजा तींच्या पदार्थांनीं ओजधातू वाढत्ये.

दोषधातुमलक्षीणोबलक्षीणोपिमानवः ॥
तत्तत्संवर्धयेयद्यदन्नपानंप्रकांक्षति ॥

**अर्थ**–दोष, धातु, मल; आणि बल हीं क्षीण झालीं असतां; मनुष्य तेते दोष, धातु, मल; आणि बल यानां वाढविणारें अन्न, पान यांची इच्छा करितो.

यद्यदाहारजातंतुक्षीणःप्रार्थयतेनरः ॥
तस्यतस्यसलभेनतत्तत्क्षयमपोहति ॥

**अर्थ**–क्षीणरोग्याला जेजे आहार मागेल, तेते त्याला मिळाले ह्मणजे त्याचा तोतो क्षय नाश पावतो.

## वातक्षीणवर्धन.

कषायकटुतिक्तानिरूक्षशीतलघूनिच ॥
यवमुद्गप्रियंगुश्चवातक्षीणोभिकांक्षति ॥

**अर्थ**–वातक्षीण रोगी तुरट, कडु, तिखट, रूक्ष, शीत, लघु, अशीं अन्नें; व यव, मूग, सांवें, यांचीं इच्छा करितो.

## पित्तक्षीणवर्धन.

तिलमाषकुलित्थादिपिष्टान्नविकृतितथा ॥ मस्तुसूक्ताम्लतक्रा
णिकांजिकंचतथादधि ॥ कट्वम्ललवणोष्णानितीक्ष्णंक्रोधंवि
दाहिच ॥ समयंदेशमुष्णंचपित्तक्षीणोभिकांक्षति ॥

अर्थ—पित्तक्षीण रोगी तीळ, उडीद, कुळिथ, पिष्टान्न, पिठाचे पदार्थ, दह्यांची निवळ, कांजीचा भेद, आंबट, ताक, कांजी, दहीं, कडु, आंबट, खारट, उष्ण, तीक्ष्ण, यांचा इच्छा करितो, रागभरतो; आणि विदाहीपदार्थ दाह होणारासमय, उष्णदेश, ऊन यांचीं इच्छा करितो.

## कफक्षीणवर्धन.

मधुरस्निग्धशीतानिलवणाम्लगुरूणिच ॥
दधिक्षीरंदिवास्वप्नंकफक्षीणोभिकांक्षति ॥

अर्थ—कफक्षीणरोगी गोड, स्निग्ध, शीतळ, मीठ, आंबट, जडपदार्थ भक्षण, दहीं, दूध, दिवानिद्रा यांची इच्छा करितो.

## रसक्षीणवर्धन.

रसक्षीणोनरःकांक्षत्यंभोतिशिशिरंमुहुः ॥
रात्रिनिद्रांहिमंचंद्रंभोक्तुंचमधुरंरसं ॥

अर्थ—रसक्षीण रोगी अत्यंत थंडपाणी वारंवार पिण्याची, रात्रीनिद्रा, हिम, चंद्र; आणि मधुरदहीं, इत्यादि भक्षणाची इच्छा करितो.

## रक्तक्षीणवर्धन.

इक्षुंमांसरसंमंथंमधुसर्पिर्गुडोदकं ॥ द्राक्षादाडिमसूक्तानिस
स्नेहलवणानिच ॥ रक्तसिद्धानिमांसानिरक्तक्षीणोभिकांक्षति ॥

अर्थ—रक्तक्षीण पुरुष. ऊस, मांसरस, मंथ, (साकर, द्राक्ष, उसाचा रस,) हे तीनपदार्थ एकत्र झाले ह्मणजे तो मंथ, मध, तूप, गुळ, पाणी, द्राक्षे, डाळिंब व (कांजिभेद मद्य व कंद, मूळ, फळ स्नेह, लवण, इहींकरून उत्पन्न झाले ते सूक्त,) आणि रक्तसिद्ध पदार्थ मांसें, यांची इच्छा करितो.

## मांसक्षयवर्धन.

अन्नानिदधिसित्थानिखांडवांश्चबहूनापि ॥
स्थूलक्रव्यादमांसानिमांसक्षीणोभिकांक्षति ॥

**अर्थ**—मांसक्षीण पुरुष दधिसिद्ध अन्न, श्रीखंड, शिकरण, इत्यादि. पदार्थांचें बहुत सेवन, आणि स्थूल; जड अशीं क्रव्यादमांसे यांची इच्छा करितो.

## मेदक्षीणवर्धन.

खांडवामधुराम्लादिरससंयोगपाचिताः

मेदःसिद्धानिमांसानिग्राम्यानूपौदकानिच ॥

सक्षाराणिविशेषणमेदःक्षीणोभिकांक्षति ॥

**अर्थ**—मेदक्षीण रोगी. श्रीखंड, शिकरण इत्यादि मधुर, अम्ल यांचा संयोगानें झालेले पदार्थ- मेद, सिद्धमासें, ग्राम्यमांसें, व जळांतीलमांसें; आणि विषेषानें खारटमासें, यांची इच्छा करितो.

## अस्थिक्षीण; व मज्जाक्षीण याचें वर्धन.

अस्थिक्षीणस्तथामांसंमज्जास्थिस्नेहसंयुतम् ॥

स्वाद्वम्लसंयुतंद्रव्यंमज्जाक्षीणोभिकांक्षति ॥

**अर्थ**—अस्थिक्षीण पुरुष. मांस, मज्जा, अस्थींचा स्नेह यांणी युक्त अन्नाची इच्छाकरितो; आणि मज्जाक्षीणपुरुष गोड, आंबट अशा अन्नाची इच्छा करितो.

## शुक्रक्षीणाभिवर्धन.

शिखिनःकुक्कुटस्यांडंहंससारसयोस्तथा ॥

ग्राम्यानूपौदकानांचशुक्रक्षीणोभिकांक्षति ॥

**अर्थ**—शुक्रक्षीण पुरुष. मयूरांचें, कोंबड्यांचे अंडें, तसेंच हंस, सारस यांचीं आंडीं व मांसें तशींच गावातलीं, जलस्थलज, आणि उदकस्थ अशीं मांसें यांची इच्छा करितो.

## मलक्षीणवर्धन.

यवान्नंयावकान्नंचशाकानिविविधानिच ॥

मसूरमाषयूषंचमलक्षीणोभिकांक्षते ॥

**अर्थ**—मलक्षीण पुरुष. यवांचें पिष्टान्न, यवांची उसळ; आणि अनेकप्रकारच्या शाका, मसुरा, उडीद, यांचे यूष, इत्यादिकांची इच्छा करितो.

## मूत्रक्षीणवर्धन.

पेयामिक्षुरसंक्षीरंसगुडंबदरोदकं

मूत्रक्षीणोभिलषतित्रपुसैर्वारुकानिच ॥

**अर्थ**—मूत्रक्षीण रोगी पेज, उसाचा रस, दूध, गूळ, बोरें, पाणी, कांकडी, आणि कांकडळ, ह्या पदार्थांची इच्छा करितो.

## स्वेदक्षीणाभिवर्धन.

अभ्यंगोद्वर्तनेमद्यंनिवातशयनासने ॥
गुरुप्रावरणंचैवस्वेदक्षीणोभिकांक्षति ॥

अर्थ–स्वेदक्षीण पुरुष अभ्यंग, उटणें, मद्य, निर्वातस्थानीं असणें; व निजणें; आणि जड पांघरूण यांची इच्छा करितो.

## आर्तवक्षयवर्धन.

कट्वम्ललवणोष्णानिविदाहीनिगुरूणिच ॥
फलशाकानुपानानिस्त्रीवांछत्यार्तवक्षये ॥

अर्थ–स्त्रियेचा आर्तवाचा क्षय झाला असतां कडु, आंबट, खारट, ऊष्ण, दाहक जड अशीं अन्नें; आणि फलशाका, पन्हीं इत्यादिपदार्थांची इच्छा करित्ये.

## स्तन्यक्षयवर्धन.

सुराशाल्यन्नमांसानिगोक्षीरंशर्करांतथा ॥
आसवंदधित्दृद्यानिस्तन्यक्षीणाभिवांछति ॥

अर्थ–स्त्रियांचें स्तन्य क्षीण झालें असतां मद्य, साळींचें अन्न, मांसें, गाईचें दूध, साकर, आसव, दहिं, आणि प्रिय असें अन्न इत्यादिकांची इच्छा करित्ये.

## गर्भक्षयवर्धन.

मृगाजाविवराहाणांगर्भान्वांछतिसंस्कृतान्॥
वसाशूल्यप्रकारादीन्भोक्तुंगर्भपरिक्षये ॥

अर्थ–गर्भक्षय झाला असतां हरण, शेळी, मेंढी, डुकर, यांचे गर्भ पचनादि क्रिया करून, तसेच वसा, शूल्यमांस, इत्यादि प्रकार यांचे भक्षणादिकांची इच्छा करित्ये.

## बललक्षण.

रसादिशुक्रपर्यंतपुष्टधातुनिमित्तकं ॥
चेष्टासुपाटवंयत्तुबलंतदभिधीयते ॥

अर्थ–रसधातूपासून शुक्रधातूंपर्यंत जा पुष्टधातू, तन्निमित्त जे चेष्टादि व्यापाराविषयीं कुशलत्व, त्याचें नांव बल असें ह्मणतात.

## बलक्षयनिदान.

अभिघाताद्भयाक्रोधाच्चिंतयाचपरिश्रमात् ॥
धातूनांसंक्षयाच्छोकाद्बलंसंक्षीयतेनृणां ॥

**अर्थ**—मनुष्यांचें बल अभिघात्त, भय, क्रोध, चिंता, परिश्रम, आणि धांतूचा क्षय शोक यांणीं क्षीण होतें.

## बलक्षयलक्षण.

गौरवंस्तब्धतागात्रेम्लानिर्ग्लानिर्विवर्णता ॥
तंद्रानिद्रावातशोथोबलव्यापत्तिलक्षणं ॥

**अर्थ**—बलक्षीणाचा अंगाला जडता, व स्तब्धपणा, गात्र म्लान, ग्लानि, कांतीचा बदल झांपड, निद्रा, आणि वातापासून सूज, हींलक्षणें जाणावी.

## बलवृध्दिनिदान.

दोषसाम्यकरंयत्तुवन्हिसाम्यकरंचयत् ॥
धातुपुष्टिकरंद्रव्यंबलंतदभिवर्धयेत् ॥

**अर्थ**—जीं दोषाला समकरणारीं; व अग्नीला समकरणारीं; व धातुवृद्धिकर, पुष्टिकारक, अशीं द्रव्ये तीं बलाला वाढवितात.

## बलवानाचें लक्षण.

कृशोपिबलवान्कश्चित्स्थूलोप्यल्पबलोयतः ॥
तस्माच्चेष्टापटुत्वेनबलवंतंविदुर्बुधाः ॥

**अर्थ**—कोणी पुरुष कृश असतां ही बलवान असतो; व कोणी स्थूळ असून अल्पबल असतो; याकरितां चेष्टांचा कुशलत्वेंकरून बलाचें अनुमान करावें.

---

# औषधांचे मानाची परिभाषा.

नमानेनविनायुक्तिर्द्रव्याणांज्ञायतेक्कचित् ॥
अतःप्रयोगकार्यार्थंमानमत्रोच्यतेमया ॥

अर्थ—मानावांचून औषधांची योजना कोठेंही होत नाहीं, यास्तव औषधें. सिद्ध करावयाचीं मानें मागधपरिभाषें करून सांगतो.

## त्रसरेणूचें परिमाण.

त्रसरेणुर्बुधैःप्रोक्तस्त्रिंशद्भिःपरमाणुभिः॥
त्रसरेणुस्तुपर्यायनाम्नावंशीनिगद्यते ॥

अर्थ—तीस परमाणूंचा एक त्रसरेणु व त्रसरेणूचा पर्याय शद्ब वंशी जाणावा.

## परमाणूचें लक्षण.

जालांतरगतेभानौयत्सूक्ष्मंदृश्यतरेजः ॥
तस्यत्रिंशत्तमोभागःपरमाणुःसउच्यते ॥

अर्थ—गृहामध्यें सूर्याचें किरण पडतें; त्या किरणांत सूक्ष्मरजःकण दिसतात, त्यातील एकारजाचा जो तिसावा भाग तो मरमाणू जाणावा.

## वंश्यादिकाचें परिमाण.

षड्वंशीभिर्मरीचिःस्याचाभिःषड्भिस्तुराजिका ॥ तिसृभी
राजिकाभिश्वसर्षपःप्रोच्यतेबुधैः ॥ यवोऽष्टसर्षपैःप्रोक्तोगुं
जास्यात्तच्चतुष्टयम्

अर्थ—साहा वंशींचा एक मरीची,साहा मरीचींचा एक राइ, तीन राईंचा एक शिरस, आठ शिरसांचा एक यव, चार यवांची एक गुंज, या प्रमाणें जाणावें.

## माशाचें पारिमाण.

षड्भिस्तुरक्तिकाभिःस्यान्माषकोहेमधान्यकौ

अर्थ—साहा गुंजाचा एक मासा, माशाचे पर्यायशद्ब हेम; आणि धान्यक जाणावें.

## शाणाचें वकोलाचें परिमाण.

माषैश्चतुर्भिःशाणःस्याद्धरणःसनिगद्यते ॥ टंकःसएवकथित
स्तद्द्वयंकोलउच्यते ॥ क्षुद्रभोवटकश्चैवद्रंक्षणःसनिगद्यते ॥

अर्थ–चार माशांचा एकशाण, शाणाचे पर्याय शब्द धरण व टंक जाणावे; व दोन शाणांचा एक कोल, कोलाचे पर्यायशब्द क्षूद्रभ, वटक, द्रंक्षण जाणावे.

## कर्षाचें परिमाण.

कोलद्वयंचकर्षःस्यात्सप्रोक्तःपाणिमानिका ॥ अक्षःपिचुःपाणि
तलंकिंचित्पाणिश्चतिंदुकम् ॥ बिडालपदकंचैवतथाषोडशि
कामता ॥ करमध्यंहंसपदंसुवर्णकवलग्रहम् ॥ उदुंबरंचपर्या
यैःकर्षएवनिगद्यते ॥

अर्थ–दोन कोलांचा एक कर्ष; व पाणिमानिका १ अक्ष २ पिचु ३ पाणितळ ४ किंचित्पाणि ५ तिंदुक ६ बिडालपदक ७ षोडशिका ८ करमध्य ९ हंसपद १० सुवर्ण ११ कवलग्रह १२ उदुंबर १३ हे कर्षाचे पर्यायशब्द जाणावे.

## अर्धपळाचें व पळाचें परिमाण.

स्यात्कर्षाभ्यामर्धपलंशुक्तिरष्टमिकातथा ॥ शुक्तिभ्यांचपलंज्ञे
यंमुष्टिराम्लंचतुर्थिका ॥ प्रकुंचःषोडशीबिल्वंपलमेवात्रकीर्त्यते ॥

अर्थ–दोन कर्षांचें अर्धपळ, अर्धपळाचे पर्यायशब्द शुक्ति व अष्टमिका जाणावे; व दोन शुक्तींचें एकपळ, व मुष्टि, आम्र, चतुर्थिका, प्रकुंच, षोडशी, बिल्व हे पळाचे पर्यायशब्द जाणावे.

## प्रसृतिआदिकरून मानिकापर्यंत परिमाण.

पलाभ्यांप्रसृतिर्ज्ञेयाप्रसृतश्चनिगद्यते ॥ प्रसृतिभ्यामंजलिः
स्यात्कुडवोर्धशरावकः ॥ अष्टमानंचसंज्ञेयंकुडवाभ्यांचमानि
का ॥ शरावोष्टपलंतद्वज्ज्ञेयमत्रविचक्षणैः ॥

अर्थ–दोन पळांचा एक प्रसृति, प्रसृतीचा पर्यायशब्द प्रसृत जाणावा, दोन प्रसृतीचा एक अंजलि; व अंजळीचे पर्यायशब्द कुडव, अर्धशराव, अष्टमान जाणावे. दोनकुडवांची एक मानिका; व मानिकेचे पर्यायशब्द शराव; आणि अष्टपळ जाणावे.

## प्रस्थाचें व आढकाचें परिमाण.

शरावाभ्यांभवेत्प्रस्थश्चतुःप्रस्थैस्तथाढकम् ॥
भाजनंकंसपात्रंचचतुःषष्टिपलंचतत् ॥

अर्थ–दोन शरावांचा एक प्रस्थ, चार प्रस्थाचा एक आढक, व आढकाचे पर्यायशब्द भाजन, आणि कंसपात्र, त्याचीं पळें चवसष्ट होतात असें जाणावें.

## द्रोणापासून द्रोणीपर्यंत परिमाण.

चतुर्भिराढकैर्द्रोणःकलशोनल्वणोन्मनौ ॥ उन्मानश्चघटोरा
शिर्द्रोणपर्यायसंज्ञकाः ॥ द्रोणाभ्यांशूर्पकुंभौचचतुःषष्टिशराव
काः ॥ शूर्पाभ्यांचभवेद्द्रोणीवाहोगोणचिसास्मृता ॥

अर्थ–चार आढकांचा एक द्रोण, व द्रोणाचे पर्यायशब्द कलश, नल्वण, उन्मन उन्मान, घट, राशि जाणावे; दोन द्रोणाचा एक शूर्प, आणि कुंभ, व त्या शूर्पाचे चवसष्ट शराव होतात असें जाणावें; दोन शूर्पाची एक द्रोणी, व द्रोणीचे पर्याय शब्द वाह गोणी जाणावे.

## खारीचें परिमाण.

द्रोणीचतुष्टयंखारीकथितासूक्ष्मबुद्धिभिः ॥
चतुःसहस्रपलिकाषण्णवत्यधिकाचसा ॥

अर्थ–चार द्रोणीची एक खारी त्या खारीचीं पळें चार हजार, शाण्णव होतात असें जाणावें.

## भाराचें व तुळेचें परिमाण.

पलानांद्विसहस्रंचभारएकःप्रकीर्तितः ॥
तुलापलशतंज्ञेयासर्वत्रैवैषनिश्चयः ॥

अर्थ–दोनसहस्रपळांचा एक भार; व शंभर पळांची एक तुळा असा निश्चय सर्वत्र जाणावा.

## सुखबोधार्थ पूर्वी सांगितलीं जीं मानें तीं सर्व एका श्लोकेंकरून सांगतों.

माषटंकाक्षबिल्वानिकुडवःप्रस्थमाढकम् ॥
राशिर्गोणीखारिकेतियथोत्तरचतुर्गुणाः ॥

अर्थ–माशापासून खारी पर्यंत एकाहून एक चौपट जाणावें. उदाहरण. चार माशांचा एक शाण, चार शाणाचा एक कर्ष, चार कर्षांचा एक बिल्व, चार बिल्वांचा एक अं-जली, चार अंजलींचा एक प्रस्थ, चार प्रस्थांचा एक आढक, चार आढकांचा एक रा-शि, चार राशींची एक गोणी, चार गोणीची एक खारी, या प्रकारें होतात.

## ओलीं, वाळलेलीं औषधें; व दूधआदीकरून पातळ औषधें याचे योगाचें मान.

गुंजादिमानमारभ्ययावत्स्यात्कुडवस्थितिः ॥ द्रवार्द्रशुष्कद्र
व्याणांतावन्मानंसमंमतं ॥ प्रस्थादिमानमारभ्यद्विगुणंतद्द्रवा
र्द्रयोः ॥ मानंतथातूलायास्तुद्विगुणंनक्वचित्स्मृतं ॥

अर्थ–पाणी आदिकरून पातळ पदार्थ, ओलीं औषधें, व सुकीं औषधें, हीं गुंजेपासून, कुडव पर्यंत समान घ्यावीं; व पाणी आदिकरून पातळ पदार्थ व ओलीं औषधें हीं घ्यावयाचीं आसतां, प्रस्थापासून तुळेपर्यंत यांचें मान सुक्या औषधापेक्षां दुप्पट घ्यावें; व तुळे पासून द्रोण पर्यंत याचें मान दुप्पट घ्यावें, असें कोठेंही नाहीं यास्तव यांचें मान सुक्या औषधांशीं समान घ्यावें.

## दूधआदिकरून पातळऔषधें मोजावयाचीं मापें.

मृदस्तुवेणुलोहादेर्भांडंयच्चतुरंगुलम् ॥
विस्तीर्णंचतथोच्चंचतन्मानंकुडवंवदेत् ॥

अर्थ–चार अंगुळें लांब; व रुंद; व तितुकेंच खोल असें मातीचें, वेळूचें, अथवा लोखंडाचें पात्र निर्माण करावें, त्या पात्राला कुडव संज्ञा जाणावी.

## औषधें तोलावयाविषयीं मागध परिभाषेचीं वजनें.

| | |
|---|---|
| तीस परमाणुचा त्रसरेणु एक, त्याला वंशी ह्मणतात | १ |
| साहा वंशींची मरीची | १ |
| साहा मरीचीची राई | १ |
| तीन राईचा शिरीस | १ |
| आठ शिरसांचा यव | १ |
| चार यवांची गुंज | १ |
| साहा गुंजाचा मासा | १ |

त्याचीं दुसरीं नामे हेम, आणि धान्यक.

| | |
|---|---|
| चार माशांचा शाण १, त्याचे व्यावहारिक मासे | ३ |

त्याचीं दुसरीं नामे निष्क, धरण, आणि टंक.

| | |
|---|---|
| दोन टंकांचा कोल १, त्याचे व्यवहारिक मासे. | ६ |

त्याचीं दुसरीं नामें क्षुद्रभ, वटक, आणि द्रंक्षण.

| | |
|---|---|
| दोन कोलांचा कर्ष १, त्याचा व्यावहारिक तोळा | १ |

त्याचीं दुसरीं नामें पाणिमानिका, अक्षापिचु, पाणितल, किंचित्पाणि, तिंदुक, बिडालपदक, षोडशिका, हंसपद, सुवर्ण, कवलग्रह, उदुंबर, जाणावीं.

| | |
|---|---|
| दोन कर्षांचें अर्धपळ त्याचे व्यावहारिक तोळे | २ |

त्याचीं दुसरीं नामें शुक्ति आणि अष्टमिका.

| | |
|---|---|
| दोन अर्धपळांचें पळ १ त्याचे व्यावहारिक तोळे | ४ |

त्याचीं दुसरीं नामें मुष्टि, आम्र, चतुर्थिका, प्रकुंच, षोडशी, बिल्व, जाणावी.

| | |
|---|---|
| दोन पळांची प्रसृति १, तिचे व्यावहारिक तोळे | ८ |

तिचें दु०नाम प्रसृत जाणावें.

मागधपरिभाषेंचीं वजनें.

| | |
|---|---|
| दोन प्रसृतींचा अंजली १, त्याचे व्यावहारिक तोळे | १६ |

त्याचीं दु० नामें कुडव, अर्धशराव, आणि अष्टमान.

| | |
|---|---|
| दोन अंजलींची मानिका १, तिचे वेव्हारिक तोळे. | ३२ |

तिचीं दुसरीं नामें शराव, आणि अष्टमिका.

| | |
|---|---|
| दोन मानिकांचा प्रस्थ १, त्याचे व्यावहारिक तोळे | ६४ |
| चार प्रस्थांचा आढक १, त्याचे व्यावहारिक तोळे | २५६ |

त्याचीं दु० नामें भाजन, आणि कंसपात्र.

| | |
|---|---|
| चार आढकांचा द्रोण १, त्याचे व्यवहारिक तोळे | १०२४ |

त्याचीं दुसरीं नामे कलश, नल्वण, उन्मन, उन्मान, घट आणि राशि.

| | |
|---|---|
| दोन द्रोणाचा शूर्प १, त्याचे शराव ६४ त्याचे व्याव० तोळे | २०४८ |

त्याचें दुसरें नाम कुंभ.

| | |
|---|---|
| दोनशूर्पांची द्रोणी १ तिचे व्यावहारिक तोळे | ४०९६ |

तिचीं दुसरीं नामें वाह आणि गोणी.

| | |
|---|---|
| चारद्रोणींची खारी १ तिचे व्यावहारिक तोळे | १६३८४ |
| शंभर पळांची तुळा १, तिचे व्यवहा० तोळे | ४०० |
| दोन हजार पळांचा भार १, त्याचे व्यावहा० तोळे | ८००० |
| चार माशांचा टंक | १ |
| चार टंकाचा अक्ष १, त्याचा तोळा | १ |
| चार अक्षांचा बिल्व १, त्याचे तोळे | ४ |
| चार बिल्वांचा कुडव १, त्याचे तोळे | १६ |
| चार कुडवांचा प्रस्थ १, त्याचे तोळे | ६४ |
| चार प्रस्थांचा आढक १, त्याचे तोळे | २५६ |
| चार आढकांचा राशि १, त्याचे तोळे | १०२४ |
| चार राशींची गोणी १, तिचे तोळे | ४०९६ |
| चार गोणींची खारी १, तिचे तोळे | १६३८४ |

## प्रयोगाचें पहिल्याऔषधाचें नाम, विशिष्टप्रयोगाला ठेवावें.

यदौषधंतुप्रथमंयस्ययोगस्यकथ्यते ॥
तन्नाम्नैवसयोगोहिकथ्यतेऽत्रविनिश्चयः ॥

अर्थ–ज्या प्रयोगामध्यें जें पहिलें औषध असेल, त्याच औषधाचें नामें करून तो प्रयोग जाणावा. उदाहरण, कोहळे पाक, व रास्नादि काढा, कोहळे पाकाचे औषधामध्यें पहिल्यानें कोहळा आहे, ह्मणून त्याला कोहळे पाक असें ह्मणतात; रास्नाकाढयाचें औषधांमध्यें पहिल्यानें रास्ना आहे, ह्मणून त्याला रास्ना काढा असें ह्मणतात; व कोण्ही रास्नादि काढा असेंही ह्मणतात, याप्रकारें उदाहरणे जाणावीं.

## भक्षणरूपमात्रेचा नियम.

स्थितिर्नास्त्येवमात्रायाःकालमग्निंवयोबलं ॥
प्रकृतिंदोषदेशौचदृष्ट्वामात्रांप्रयोजयेत् ॥

अर्थ–औषधांचा सेवनाचें प्रमाण निश्चयें करून करतां येत नाहीं, यास्तव काळ, जठराग्नि, वय, बळ, प्रकृति, दोष, देश यांचा विचार करून औषधांचे मात्राची योजना करावी.

## औषधांचे सेवनाचें प्रमाण कलिंगपरिभाषेंकरून सांगतों.

यतोमंदाग्नयोऽह्रस्वाहीनसत्वानराःकलौ ॥
अतस्तुमात्रातद्योग्याप्रोच्यतेसूज्ञसंमता ॥

अर्थ–कलियुगाचेठायीं मनुष्य मंदाग्नि, लहान, व बलहीन जाहाले, यास्तव त्यांचे उपयोगी व वैद्यास मान्य असें औषधांचें प्रमाण सांगतों.

## कलिंगपरिभाषेचीं वजनें.

यवोद्वादशभिर्गौरसर्षपैःप्रोच्यतेबुधैः ॥ यवद्वयेनगुंजास्यात् त्रिगुंजोवल्लउच्यते ॥ माषोगुंजाभिरष्टाभिःसप्तभिर्वाभवेत्क्कचित् ॥ स्याच्चतुर्माषकैःशाणःसनिष्कष्टंकएवच ॥ गद्याणोमाषकैःषड्भिःकर्षः स्याद्दशमाषकः ॥ चतुःकर्षैःपलंप्रोक्तं दशशाणमितंबुधैः ॥ चतुःपलैश्चकुडवंप्रस्थाद्याःपूर्ववन्मताः ॥

अर्थ– बारा पांढरे शिरसांचा एक यव; दोन यवांची एक गुंज; तीन गुंजांचा एक वल्ल, आठ गुंजांचा एक मासा, क्वचित सात गुंजाचाही मासा जाणावा; व चार माशांचा एक शाण, शाणाचे पर्याय शब्द निष्क; व टंक जाणावे, साहा मांशाचा एक गद्याण, दाहा माशांचा एक कर्ष, चार कर्षांचें एक पळ, त्या पळाचे दाहा शाण होतात; व चार पळांचा एक कुडव; व प्रस्थादिकांचीं मानें मागधपरिभाषेचा मानें करून औषध भक्षणाविषयीं घ्यावी, या प्रमाणें कलिंगपरिभाषा जाणावी.

## औषधांचा युक्तायुक्तविचार.

नवान्येवहियोज्यानिद्रव्याण्यखिलकर्मसु ॥
विनाविडंगकृष्णाभ्यांगुडधान्याज्यमाक्षिकैः ॥

अर्थ–संपूर्ण कार्यांचा ठायीं नवीन औषधांचीच योजना करावी, परंतु वावडिंग पिंपळी, गूळ, साळी, मध, तूप हे साहा पदार्थ पुराणे असावे.

## ओलीं औषधें कोणतीं घ्यावीं तीं.

वासानिंबपटोलकेतकबलाकुष्मांडकैंद्रीवरीवर्षाभूकुटजाश्वकं
दसहिताःसापूतिगंधाःस्मृताः ॥ मांसीनागबलाकुरंटकपुरोहिं
ग्वार्द्रकंचैक्षवंगृण्हीयात्सरसान्यमूनिनपुनःकुर्यात्द्विभागानिच ॥

अर्थ–अडुळसा, लिंब, पडवळ, केतक, तुपकडया, कोहाळी, कांवडल, शतावरी, पुनर्नवा, कुडा, अश्वकंद, वांवचा, जटामांसी, गांगरुकी नागवला, कोरांट, हिंग, ऊंस, इतक्या औषधी ओल्या घ्याव्या; ओल्या ह्मणून द्विगुण घालू नयेत.

## साधारण औषधांची योजना.

जीर्णमेवप्रशस्तंस्यात्तांवूलंकांजिकंतथा ॥ शुष्कंनवीनद्रव्यंचयो
ज्यंसकलकर्मसु ॥ आर्द्रंचद्विगुणंयुंज्यादेषसर्वत्रनिश्चयः ॥

अर्थ–सुपारी व कांजी हीं जुनी, पूर्वश्लोकीं नऊ औषधें सांगितलीं त्यांवाचून इतर औषधें संपूर्ण कार्यांचे ठायीं प्रशस्त; आणि सुकीं असून नवी अशीं घ्यावीं, व ओलीं असतां दुप्पट घ्यावीं हाच निश्चय सर्वत्र जाणावा.

## अनुक्तकालादिकांची योजना.

कालेऽनुक्तेप्रभातंस्यादंगेऽनुक्तेजटाभवेत् ॥
भागेनुक्तेतुसाम्यंस्यात्पात्रेनुक्तेचमृन्मयं ॥

अर्थ–जा प्रयोगाचे ठायीं काळ सांगितला नाहीं, तेथें प्रभातकाळ घ्यावा, व जा औषधींचें अंग सांगितलें नाहीं, त्या औषधींचें मूळ घ्यावें, व जा प्रयोगीं भाग सांगितला नाहीं तेथें भाग समान घ्यावा, व जेथें पात्र सांगितलें नाहीं, तेथें मातीचें पात्र योजावें.

## जाप्रयोगांत एक औषध दोनवेळ आलें त्याची योजना.

एकमप्यौषधंयोगेयस्मिन्यत्पुनरुच्यते ॥
मानतोद्विगुणंप्रोक्तंतद्द्रव्यंतत्वदर्शिभिः ॥

अर्थ–प्रयोगामध्यें एक औषध दोनवेळ आलें असतां तें औषध वैद्यांनीं दुप्पट घ्यावें.

## औषधें हीनवीर्य केव्हां होतात तो काळ सांगतो.

गुणहीनंभवेद्वर्षादूर्ध्वंतद्रूपमौषधं ॥ मासद्वयात्तथाचूर्णंहीन
वीर्यत्वमाप्नुयायात् ॥ हीनत्वंगुटिकालेहौलभेतेवत्सरात्परं ॥
हीनाःस्युर्घृततैलाद्याश्चतुर्मासाधिकास्तथा ॥ औषध्योलघुपा
काःस्युर्निर्वीर्यावत्सरात्परं ॥ पुराणाःस्युर्गुणैर्युक्ताआसवाधा
तवोरसाः ॥ व्याधेरनुक्तंयद्द्रव्यंगणोक्तमपितत्त्यजेत् ॥ अनुक्तम
पियुक्तंयद्युज्यतेतत्रतद्बुधैः ॥

अर्थ–एका वर्षानंतर औषधांचें तेज व त्यांचे गुण कमी होतात, त्यामध्यें दोन महिन्या नीं चूर्ण हीनवीर्य होतें; व गुटिका आणि अवलेह हीं वर्षानंतर हीनवीर्य होतात, व तूप आणि तैलादिक हीं चार महिन्यांनीं हीनवीर्य होतात, व औषधी हलके पाक हे वर्षा नंतर हीनवीर्य होतात, व आसव आणि सोनें आदी करून सर्वधातूंचीं भस्में, व रसायनें हीं जितुकीं जुनी होतात, तितुका गुण विशेष होतो असें जाणावें; व व्याधीचे ठायीं चूर्ण व कषायादिकांची योजना गणें करून करावयाची असतां, त्या गणामध्यें एखादें औषध व्याधीला विरुद्ध असेल, तें गणोक्त जरीं आहे तथापि काढून टांकावें, व एखा दें औषध व्याधीला उपयुक्त असतां त्या गणांत नसलें तरीं स्वबुद्धीनें घालावें.

## देशभेदेंकरून औषधांचे भेद.

आग्नेयाविंध्यशैलाद्याःसौम्येहिमगिरिर्मतः॥अतस्तदौषधानि
स्युरनुरूपाणिहेतुभिः ॥ अन्येष्वपिप्ररोहंतिवनेषूपवनेषुच ॥

अर्थ–विंध्याद्रिपर्वतादिकांचे ठायीं उष्णवीर्यऔषधी राहातात, व हिमाद्रि पर्वतादिकां- चे ठायीं सौम्य औषधी राहातात; यास्तव जशी जशी जमीन असेल तशा तशा औष- धी इतर वनाचे ठायीं व उपवनाचे ठायीं राहातात असें जाणावें.

## औषधी आणावयाचा प्रकार.

गृण्हीयात्तानिसुमनाःशुचिःप्रातःसुवासरे॥ आदित्यसन्मुखो
मौनीनमस्कृत्यशिवंहृदि ॥ साधारणधराद्द्रव्यंगृण्हियादुत्तरा
श्रितं ॥ वल्मीककुत्सितानूपश्मशानोषरमार्गजा॥ जंतुवन्हि
हिमव्याप्तानौषधीकार्यसिद्धिदा ॥

अर्थ–औषधी आणावया करितां प्रातःकाळीं उठून, स्वस्थचित्त करून, शुचिर्भूत होऊन चांगला दिवस पाहून, सूर्यापुढें उभे राहून, त्याला नमस्कार करून आणि हृदयाचेठायीं शिवाचें ध्यान करून, कोणाशीं नबोलतां जी औषधी आणावयाची असेल, तेथें जाऊन

त्या औषधीचे उतरे कडील साल अथवा मूळ काढून आणावें; वारुळावर असते ती, वाइटजाग्यावर असते ती, जलमय जाग्याचा आश्रयें करून असते ती, स्मशानभूमीवर होते ती, जा जाग्यावर गवत होत नाहीं त्या जाग्यावरची, चव्हाट्यावरची, कीड लागलेली, अग्नीनें जळालेली, आणि थंडीनें करपलेली, आशाप्रकारची औषधी आणूंनये; तिजपासून काहींच कार्य होत नाहीं.

## ऋतुविशेषेंकरून रोगविशेषांवर औषधी आणावयाचा काळ.

शरद्यखिलकार्यार्थंग्राह्यंसरसमौषधम् ॥
विरेकवमनार्थंचवसंतांतेसमाहरेत् ॥

अर्थ—आश्विन; कार्तिक या महिन्यांत सर्व औषधी रसभरित होतात, यास्तव सर्व कार्याकरितां त्या दोन महिन्यांत औषधी आणून ठेवाव्या; व ढाळ होण्याविषयीं; आणि ओकारी होण्याविषयीं वैशाख, व ज्येष्ठ या दोनमहिन्यांत आणाव्या.

## औषधीविशेषेंकरून औषधींचे अंगविशेषाचें ग्रहण.

अतिस्थूलजटायाःस्युस्तासांग्राह्यास्त्वचोबुधैः ॥
गृण्हीयात्सूक्ष्ममूलानिसकलान्यपिबुद्धिमान् ॥

अर्थ—जा वृक्षाचें मूळ मोठें आहे, त्याचा मूळाची साल घ्यावी, जसे निंब, आंबा इ॰ त्यादिक जाणावे. जा वनस्पतीचें मूळ लाहान आहे, त्या वनस्पतीचें मूळ घ्यावें; व मूळश्लोकांत सकल अपि अशीं पदें आहेत; ह्मणून ती वनस्पती पानें, फुलें, मूळेंसुद्धाही घ्यावी; जशी रिंगणी, गोखरु इत्यादिक जाणावीं; व कितेक वैद्यांचे मतें मूळ्या मात्रघ्याव्या.

न्यग्रोधादेस्त्वचोग्राह्याःसारंस्याद्बीजकादितः ॥ तालीसादेश्च पत्राणिफलंस्यात्त्रिफलादितः ॥ धातक्यादेश्चपुष्पाणिस्नुह्यादेःक्षीरमाहरेत् ॥

अर्थ—वड आदीकरून पायरी, जांभुळ, आवांडा, आणि पिंपळ इत्यादिकांची साल घ्यावीं; बिबळा आदकरून खैर, आसाणा, मोहा, बाभुळ, इत्यादिकांचा सार (ह्मणजे अंतरसाल) घ्यावीं, तालीस आदीकरून तमालपत्र, कोरफड, नागवेली इत्यादिकांचीं पानें घ्यावीं, त्रिफळा आदिकरून सुपारी, बोरी, इत्यादिकांचीं फळें घ्यावीं; धायटी आदिकरून पळस, गुलाब, इत्यादिकांचीं फुलें घ्यावीं, निवडुंग आदिकरून रुइ, मांदार, इत्यादिकांचे चीक. याप्रकारे औषधींचें हरण करावें.

क्वचिन्मूलंक्वचित्कंदःक्वचित्पत्रंक्वचित्फलं ॥
क्वचित्पुष्पंक्वचित्सर्वंक्वचित्सारःक्वचित्त्वचः ॥

**अर्थ**–मूळ, कंद, पान, फळ, पुष्प, सर्वांग, डीक, साल, याप्रमाणें औषधींचीं अंगे आठ आहेत. तीं कोठे कोठें घ्यावीं तें सांगतो.

चित्रकोसूरणोनिंबोवासाचत्रिफलाक्रमात् ॥
धातकीकंटकारीचखदिरःक्षीरपादपः ॥

**अर्थ**–चित्रकाचें मूळ सुरणाचाकांदा अडुळशाचीं पानें हरडा, बेहेडा, अवळीं यांचीं फळें, धायटीचें पुष्प, रिंगणीचें सर्वांग, खैराचा डीक, याप्रमाणें घ्यावीं.

क्वचिन्निंबस्यगृण्हीयात्पत्राभावेत्वचामपि ॥
बालंफलंतुबिल्वस्यपक्कमारग्वधस्यतु ॥

**अर्थ**–लिंबाचीं पानें न मिळाल्यास क्वचित्स्थलीं साल घ्यावी. बेलाचें फळ कोंवळें घ्यावें बाहाव्याची जून शेंग घ्यावी.

## पुनः ऊष्ण करूनये ते पदार्थ.

घृतंतैलंचपानीयंकषायंव्यंजनादिकं ॥
पक्त्वाशीतीकृतंतप्तंतत्सर्वंस्याद्विषोपमं ॥

**अर्थ**–तूप, तेल, पाणी, काढा, वरण; इत्यादि. पदार्थ एकदा शिजऊन थंड जाहाले; ते पुनः ऊष्ण केल्यास विषासमान जाणावे.

## द्रव्यांची परीक्षा.

सूक्ष्मास्थिमांसलापथ्यासर्वकर्मणिपूजिता ॥
क्षिप्तांभसिनिमज्जेद्याभल्लातक्यभयोत्तमा ॥

**अर्थ**–जींतकीं बारिक व वर त्वचा जाड, ती बाळहर्डी सर्व कामास फार उत्तम; व ज्या पाण्यांत बुडतात त्या हरीतक्या व बिबवे उत्तम जाणावे.

## वाराहीकंद, संचळ; व सैंधव, यांची परीक्षा.

वराहमूर्धवत्कंदोवाराहीकंदसंज्ञितः ॥
सौवर्चलंतुकाचाभंसैंधवंस्फटिकप्रभं ॥

**अर्थ**–डुकराचा मस्तकासारिखा जो कांदा तो वराहकंद. जें काचेसारिखें दिसतें तें पादेलोण, व स्फटिकासारिखें स्वछ दिसते तें शेंदेलोण उत्तम.

## स्वर्णमाक्षीक; व रौप्यमाक्षिक यांची परीक्षा.

सुवर्णछायकंज्ञेयंस्वर्णमाक्षिकमुत्तमं ॥
उडुपुष्पप्रतीकाशामनोव्हाचोत्तमोत्तमा ॥

अर्थ–सोन्याचा रंगासारिखा ज्याचा रंग तें स्वर्णमाक्षिक, व चंद्रासारिखें स्वच्छ, पांढरें तें रौप्यमाक्षिक उत्तम जाणावें.

## शिलाजितपरीक्षा.

श्रेष्ठंशिलाजतुज्ञेयंयत्क्षिप्तंनविशीर्यते ॥
तोयपूर्णेकांस्यपात्रेप्रतानेनविवर्धते ॥

अर्थ–जें शिलाजित उदक पात्रांत टाकिल्यास फुटतनाहीं, कांशाचा भांड्यात उदक घालून त्यांत टाकिल्यास नफुटतां, तारातारा सुटून जाळ्यासारिखें वाढतें तें उत्तम.

## कापूर, एलची; व चंदन याची परीक्षा.

कर्पूरस्तुवरास्निग्धएलासूक्ष्मफलावरा ॥
श्वेतचंदनमत्यंतंसुगंधिगुरुपूजितं ॥

अर्थ–कापूर तुरट व चिक्कण, बारिक वेलदोडे व अत्यंतसुगंध, व जड असा पांढरा चंदन तो चांगला.

## रक्तचंदनपरीक्षा.

रक्तचंदनमत्यंतंलोहितंप्रवरंमतं ॥
काकतुंडनिभःस्निग्धोगुरुःश्रेष्ठोगुरुर्मतः ॥

अर्थ–रक्तचंदन जो फारलाल, व कावळ्याचा तोंडातील मांसासारिखा लाल असून, चिकट; व जड, असतो तो श्रेष्ठ जाणावा.

## देवदार; आणि सरल यांची परीक्षा

सुगंधिलघुसूक्ष्मंचसुरदारुवरंमतं ॥
सरलंस्निग्धमत्यर्थंसुगंधिचगुणावहं ॥

अर्थ–सुगंध, हलका, सूक्ष्म असा देवदार; आणि चिकट, व सुगंध असा सरल देवदारु; फारचांगला. गुणकर जाणावा.

## दारुहळद; व जायफळ यांची परीक्षा

अतिपीताप्रशस्तातुज्ञेयादारुनिशाबुधैः ॥
जातीफलंगुरुस्निग्धंसमंशुभ्रेतरद्वरं ॥

अर्थ–अतिपिंवळी अशी दारुहळद उत्तम, व जायफळ जड, तेलकट, वाटोळें; व काळसर तें उत्तम जाणावें.

## द्राक्षाची परीक्षा.

मृद्वीकासोत्तमाज्ञेयायास्याद्गोस्तनसन्निभा ॥
करमर्दफलाकारामध्यमासाप्रकीर्तिता ॥

अर्थ–गाईचा आंचळासारिखें जें द्राक्ष तें उत्तम, व करवंदीचा फळासारिखें तें मध्यम असें जाणावें.

## खडीसाकर; व मध यांची परीक्षा.

खंडंतुविमलंश्रेष्ठंचंद्रकांतसमप्रभं ॥
गवाज्यसदृशंरुच्यंगंधंमधुवरंमतं ॥

अर्थ–खडीसाकर. चंद्रकांतासारिखी पांढरी ती उत्तम, व रंगानें गाईचा तुपासारिखा रुचिकर, सुगंध असा मध उत्तम जाणावा.

## स्वभावानें हितकर द्रव्यें.

शालीनांलोहितःशालिःषष्टिकेषुचषष्टिका ॥
शूकधान्येष्वपियवोगोधूमःप्रवरोमतः ॥

अर्थ–सर्व साळींमध्यें तांबड्यासाळी आणि साटक्या साळी श्रेष्ठ, व कुसवांच्या धान्यांत, गहूं व यव हे उत्तम.

## शेंगांच्या धान्यांत उत्तमधान्यें सांगतो.

शिंबीधान्येवरोमुद्गोमसूराश्चाढकीतथा ॥
रसेषुमधुरःश्रेष्ठोलवणेषुचसैंधवं ॥

अर्थ–शिंबिधान्यांत मूग, तुरी, मसुरा, ह्या उत्तम, आणि सर्व रसांत मधुर रस उत्तम व मिठांत सैंधव उत्तम.

## उत्तमफळें सांगतो.

दाडिमामलकंद्राक्षाखर्जूरंचपरूपकं ॥
राजादनंमातुलुंगंफलवर्गेप्रशस्यते ॥

अर्थ–सर्वफळांत डाळिंब, आंवळा, द्राक्ष, खजूर, फालसा, इरसाल आंबा, माहाळुंग हीं उत्तम आहेत.

## पत्र, फळ; आणि कंद या शाकांत उत्तम सांगतो.

पत्रशाकेषुवास्तूकंजीवंतीपोतिकावरा ॥
पटोलंफलशाकेषुकंदशाकेषुसूरणं ॥

**अर्थ**–पालेभाज्यात चाकवत, जीवंती, बडीशेप ह्या, आणि फळभाज्यांत पडवळ; व कांद्यांत सुरण उत्तम.

## मृग, पक्षी; मासे यांत उत्तम सांगतो.

एणःकुरंगोहारिणोजंघालेपुचशस्यते ॥
पक्षिणांतित्तिरिर्लावोवरोमत्स्येपुलो।हितः ॥

**अर्थ**–जंघालपशूंत एण, कुरंग, हरिण हे. पक्ष्यांत तित्तिर, लावा हे. माशांत लोहित मत्स्य उत्तम.

## हरिणजातींत श्रेष्ठ सांगतो.

हारिणस्ताम्रवर्णःस्यादेणःकृष्णस्तथामतः ॥
कुरंगस्ताम्रउद्दिष्टोहरिणाकृतिकामेहान् ॥

**अर्थ**–तांबड्यारंगाचा हरिण; व काळ्यारंगाचा एण; आणि किंचित् तांबडा व शरीरानें मोटा असा कुरंग उत्तम.

## जल, दूध, तूप, तेल, इक्षुविकार यांत उत्तम सांगतो.

जलेपुदिव्यंदुग्धेपुगव्यमाज्येपुगोद्भवं ॥
तैलेपुतिलजंतैलमैक्षवेपुसिताहिता ॥

**अर्थ**–उदकांत मेघोदक, दूध व तूप यांत गाइचे, तेलांत तिळांचें तेल; व उसांच्या सर्व पदार्थांत साकर ही उत्तम जाणावी.

## स्वभावानें अहितकारक द्रव्यें.

शिंबीपुमापान्ग्रीष्मतोलवणेष्वौखरंत्यजेत् ॥
फलेपुलकुचंशाकेसार्पपंनहितंमतं ॥

**अर्थ**–द्विदळधान्यांत उडीद, व मिठांत उखर जमिनीचें मीठ, व फळांत लहानफणस, आणि शाकांमध्यें मोहरीची भाजी अहित. कारक आहे.

गोमांसंग्राम्यमांसेपुनहितामाहिपीवसा ॥
मेषीपयःकुसुंभस्यतैलंत्याज्यंचफाणितं ॥
इक्षुरसःपरिपक्कोयोर्धघनःफाणितंतद्धि ॥

**अर्थ**–मांसांत गोमांस, व म्हैशीची वसा, आणि दुधांत मेंढीचें दूध, तेलांत करडीचें तेल व उंसाचा रस कढऊन अर्धा राहिला असतां, त्यास फाणित म्हणतात, ती काकवी अपथ्य समजावी.

## संयोगविरुध द्रव्यें.

मात्स्यमानूपमांसंचदुग्धयुक्तंविवर्जयेत् ॥
कापोतंसार्षपस्नेहभर्जितंपरिवर्जयेत् ॥

अर्थ–मासे; व जलस्थलज प्राण्याचें मांस दुधाबरोबर; व कवड्याचें मांस, मोहोऱ्याच्य तेलांत तळलेलें हें विरुध ह्मणून टाकावें.

मत्स्यानिक्षोर्विकारेणतथाक्षौद्रेणवर्जयेत् ॥
सक्तून्मांसपयोयुक्तानुष्णैर्दधिविवर्जयेत् ॥

अर्थ–मासे, उसाच्या पदार्थांशीं; आणि सातु मांस व दूध यांशीं; व दहीं ऊनपदार्थां शीं खाऊं नये.

उष्णैर्दध्यंतुनाक्षौद्रंपायसंकृसरान्वितं ॥
रंभाफलंत्यजेत्तक्रंदधिबिल्वफलान्वितं ॥

अर्थ–उष्णपदार्थ, दह्यांबरोबर; व दूध खीचडी बरोबर, केळें ताकाबरोबर; व बेलफल दह्याबरोबर अशीं भक्षूं नयेत.

दशाहमुषितंसर्पिःकांस्येमधुघृतेसमं ॥
कृतान्नंचकषायंचपुनरुष्णीकृतंत्यजेत् ॥

अर्थ–तूप कांशाचा भांड्यांत दहादिवस ठेविलेलें; व मध, तूप, हीं समान भाग; व शिजलें अन्न; व काढा, हीं पुनः ऊन केलेलीं विषासमान जाणून भक्षूं नयेत.

एकत्रबहुमांसानिविरुध्यंतेपरस्परं ॥
मधुसर्पिर्वसातैलपानीयानियथातथा ॥

अर्थ–एकत्र केलेलीं अनेक पशुपक्ष्यांचीं मांसें; आणि मध, तूप, वसा, तेल; आणि पाणी; हीं एकत्र केलेलीं असतां तीं अपथ्य होतात ह्मणून खाऊं नयेत.

## औषधग्रहणाविषयीं संकेत.

लवणंसैंधवंप्रोक्तंचंदनंरक्तचंदनं ॥ चूर्णलेहासवस्नेहाःसाध्याध वलचंदनैः ॥ कषायलेपयोःप्रायोयुज्यतेरक्तचंदनं ॥ अंतःसंमा र्जनेज्ञेयाह्यजमोदायवानिका ॥ बहिःसैवचाविद्वद्भिर्विज्ञातव्याज मोदिका ॥ पयःसर्पिःप्रयोगेषुगव्यमेवहिगृह्यते ॥ शकृद्रसो गोमयजोमूत्रंगोमूत्रमुच्यते ॥

अर्थ—औषधामध्यें जेथें सामान्यत: लवण सांगेल, तेथें सैंधव; आणि चंदन सांगेल तेथें काढ्यांत रक्तचंदन, व चूर्ण, लेह, आसव पांढराचंदन; आणि रक्तचंदन; व पोटांत अजमोदा घ्यावा असें सांगितल्यास ओंवा; आणि बाहेर लेपादिकांत यवानी घ्यावी. दूध, तूप, शेणाचा रस; व मूत हीं गाईचीं घ्यावीं.

## औषधांचे भक्षणाचा काळ.

भैषज्यमभ्यवहरेत्प्रभातेप्रायशोबुधः ॥
कषायांश्चविशेषेणतत्रभेदस्तुदर्शितः ॥

अर्थ—वैद्यांनीं रोग्यास बहुतकरून औषध प्रात:काळीं भक्षण करावयास द्यावें; व अंगरस, कल्क, काढे, फांट, हिम हे तर विशेषें करून प्रात:काळींच भक्षण करावे; त्यांविषयीं दुसरे काळ वक्ष्यमाणप्रकारें करून सांगतो.

## औषध भक्षणाचे पांच काळ.

ज्ञेयःपंचविधःकालोभैषज्यग्रहणेनृणाम् ॥ किंचित्सूर्योदयेजाते
तथादिवसभोजने ॥ सायंतनेभोजनेचमुहुश्चापितथानिशि ॥

अर्थ—मनुष्यास औषध भक्षणाविषयीं पांच काळ आहेत, ते सांगतो, किंचित् सूर्योदय जाहला असतां त्यासमयीं औषध घेणें तो प्रथम काळ, दिवसास भोजन समयीं औषध घेणे तो द्वितीय, सायंकाळीं भोजन समयीं औषध घेणें तो तृतीय, वारंवार औषध घेणे तो चतुर्थ, रात्रीचेठायीं औषध घेणे तो पंचम याप्रकारें पांच काळ जाणावे.

## पहिला काळ.

प्रायःपित्तकफोद्रेकेविरेकवमनार्थयोः ॥ लेखनार्थंचभैषज्यंप्र
भातेनान्नमाहरेत् ॥ एवंस्यात्प्रथमःकालोभैषज्यग्रहणेनृणाम् ॥

अर्थ—पित्त आणि कफ यांचा प्रकोप जाहला असतां, पित्ताला विरेचन; आणि कफाला वमन, तसेच लेखन ह्मणजे पतलीकरण[१] याविषयीं औषध प्रात:काळीं घ्यावें, व रोग्याला प्रात:काळीं भोजन देऊनये.

## दुसरा काळ.

भैषज्यंविगुणेपानेभोजनाग्रेप्रशस्यते ॥ अरुचौचित्रभोज्यैश्च
मिश्रंरुचिरमाहरेत् ॥समानवातेविगुणेमंदेग्नावग्निदीपनम् ॥
दद्याद्भोजनमध्येचभैषज्यंकुशलोभिषक् ॥ व्यानकोपेचभैष

१ वातादि दोषांना स्नेहादिकांचे योगें करून पातळ करणें, तसेंच स्थूल मनुष्याला मध पाणी इत्यादिक देऊन कृश करणें.

ज्यंभोजनांतेसमाहरेत् ॥ हिक्काक्षेपककंपेषुपूर्वमंतेचभोजना
त् ॥ एवंद्वितीयकालाश्चप्रोक्ताभैषज्यकर्मणि ॥

अर्थ–गुदसंबंधी वायु क्रुद्ध जाहाला असतां भोजनाचे किंचितआदीं औषध भक्षण करावें, व अरुचि पडली असतां नाना प्रकारचीं अन्नें, व नाना प्रकारचीं रुचिकर तोंडीं लावणीं, यांचे बरोबर औषध भक्षण करावें, व नाभिसंबंधी वायु क्रुद्ध जाहला असतां, अग्निमांद्य जाहलें असतां अग्निप्रदीप्त होई असें औषध भोजनाचेमध्यें भक्षण करावें; व सकळशरीर व्यापी असा व्यानवायु त्याचा कोप झाला असतां, भोजनाचे अंतीं भक्षण करावें; व उचकी आणि आक्षेपवायु व कंपवायू यांचा कोप झाला असतां, भोजनाचे पूर्वीं व अंतीं औषध भक्षण करावें. या प्रकारें द्वितिय काळ जाणावा.

## तिसरा काळ.

उदानेकुपितेवातेस्वरभंगादिकारिणि ॥ ग्रासेग्रासांतरंदेयंभैष
ज्यंसांध्यभोजने ॥ प्राणेप्रदुष्टेसांध्यस्यभक्ष्यस्यांतेचदीयते ॥
औषधंप्रायशोधीरैःकालोयंस्यात्तृतीयकः ॥

अर्थ–कंटसंबंधी उदान वायूचा कोप होऊन, स्वरभंगादिक रोग जाहले असतां, सायंकाळाचे भोजन समयीं ग्रासाबरोबर; व दोहों ग्रासामध्यें औषध भक्षण करावें; व हृदयस्थित प्राणवायूचा कोप जाहला असतां बहुतकरून सायंकाळाचे भोजनांतीं औषध भक्षण, करावें याप्रकारें तृतीयकाळ जाणावा.

## चवथा काळ.

मुहुर्मुहुश्चतृट्छर्दिहिक्काश्वासगरेषुच ॥
सान्नंचभेषजंदद्यादितिकालश्चतुर्थकः

अर्थ–तृषा, ओकारी, व उचकी, श्वास, विषदोष, हे रोग झाहले असतां वारंवार अन्नसहित औषध भक्षण करावें श्लोकांत चकार आहे ह्मणून अन्नरहितही भक्षण करावें या प्रकारें चतुर्थकाळ जाणावा.

## पांचवाकाळ.

ऊर्ध्वजत्रुविकारेषुलेखनेबृंहणेतथा ॥पाचनंशमनंदेयमनन्नं
भेषजंनिशि ॥ इतिपंचमकालःस्यात्प्रोक्तोभैषज्यकर्मणि ॥

अर्थ मानेचा मूळाचा उर्ध्वभागीं कर्णरोग, नेत्ररोग, मुखरोग, नासिकारोग इत्यादि रोगाविषयीं; व प्रवृद्ध वातादि दोषांचे ऱ्हासनाविषयीं, आणि अतिक्षीण दोषांचे वर्धनाविषयीं रात्रीचे ठायीं पाचनरूप, व शमनरूप औषध अन्नरहित भक्षण करावें, याप्रकारें पंचमकाळ जाणावा.

## औषधिप्रतिनिधी.

चित्रकाभावतोदंतीक्षारःशिखरिजोथवा ॥
आभावेधन्वयासस्यप्रक्षेप्तव्यादुरालभा ॥

**अर्थ**—औषधांत चित्रक नमिळेतर, त्याचा अभावीं दांती घ्यावी. क्षार; नमिळाल्यास, आघाड्याचा क्षार, व धमांशाचा अभावीं तांबडा धमासा घ्यावा.

तगरस्याप्यभावेतुकुष्टंदद्याद्विपग्वरः ॥
मूर्वाभावेत्वचोग्राह्याझिंगिनीप्रभवाबुधैः ॥

**अर्थ**—तगर नसल्यास कोष्टकोलिंजन, व मोरवेलीचा अभावीं मंजिष्टा घ्यावी.

अहिंस्रायाअभावेतुमानकंदःप्रकीर्तितः ॥
लक्ष्मणायाअभावेतुनीलकंठशिखामता ॥

**अर्थ**—फडीचें निवडुंग नसल्यास, मालाकंद, व पांढऱ्या रिंगणीचा अभावीं मण्यार-शिखा घ्यावा.

वकुलाभावतोदेयंकल्हारोत्पलपंकजं ॥
नीलोत्पलस्याभावेतुकुमुदंदेयमिष्यते ॥

**अर्थ**—बकुळीचा अभावीं कल्हार; किंवा तांबडें कमळ; व नीळकमळाचा अभावीं रात्रीं फुलणारें कुमुद घ्यावें; असें पूर्ववैद्य सांगतात.

जातीपुष्पंनयत्रास्तिलवंगंतत्रदीयते ॥
अर्कपर्णादिपयसोह्यभावेतद्रसोमतः ॥

**अर्थ**—जाईचे फुलाचा अभावीं लवंग घ्यावी. रुइसारिख्या वनस्पतीचा चीक नमिळाल्यास त्यांचा स्वरस घ्यावा.

पौष्कराभावतःकुष्टंतथालांगल्यभावतः ॥
स्थौणेयकस्यचाभवेभिषग्भिर्दीयतेगदः ॥

**अर्थ**—पुष्करमूल, कळलावी, आणि ग्रंथिपर्णी याचा अभावीं कोष्टकोलिंजन घ्यावें.

चविकागजपिप्पल्यौपिप्पलीमूलवत्स्मृताः ॥
अभावेसामराज्यास्तुप्रपुन्नाटफलंस्मृतं ॥

**अर्थ**—पिप्पलीमूळाचा अभावीं मिरवेलीचें मूळ; किंवा थोरपिंपळाचें मूळ घ्यावें; व बावचीचा अभावीं टाकळ्याचें बीं घ्यावें.

यदिनस्याद्दारुनिशातदादेयानिशाबुधैः
रसांजनस्याभावेतुसम्यक्दार्वीप्रयुज्यते ॥

**अर्थ**–दारुहळदीचा अभावीं सामान्यहळद, रसांजनाचा अभावीं दारुहळद योजावी.

सौराष्ट्र्यभावतोदेयास्फटिकातद्गुणाजनैः ॥
तालीसपत्रकाभावेस्वर्णतालीप्रशस्यते ॥

**अर्थ**–सोरटीमातीचा अभावीं फटकी ती गुणानीं त्यासारिखीच आहे, व तालीसपत्राच्या अभावीं स्वर्णताली योजावी.

भांर्ग्यभावेतुतालीसंकंटकारिजटाथवा ॥
रूचकाभावतोदद्याल्लवणंपांशुपूर्वकं ॥

**अर्थ**–भार्गीचा अभावीं तालीसपत्र, किंवा रींगणीमूळ, आणि संचळाच्या अभावीं मीठ घ्यावें.

अभावेमधुयष्टयास्तुधातकींतुप्रयोजयेत् ॥
अम्लवेतसकाभावेचुक्रंदातव्यामिष्यते ॥

**अर्थ**–ज्येष्टमधाचा अभावीं लघुधायटी; आणि आम्लवेतस ह्या०निंबुभेद त्याचा अभावीं चुका घ्यावा.

द्राक्षायदिनलभ्येतप्रदेयंकाश्मरीफलं ॥
तयोरभावेकुसुमंमधूकस्यमतंबुधैः ॥

**अर्थ**–द्राक्षांचा अभावीं लघुशिवणीचें फळ घ्यावें; व तीं दोनही नमिळाल्यास; मोहाचा वृक्षाचें फूल घ्यावें-

लवंगकुसुमंदद्यान्नखस्याभावतःपुमान् ॥
कस्तूर्यभावेकंकोलंक्षेपणीयंविदुर्बुधाः ॥

**अर्थ**–नखल्याचा, अभावीं लवंगफूल;व कस्तुरीचा अभावीं कंकोळ, शाहाण्यावैद्यानी योजावा

कंकोलस्याप्यभावेतुजातीपुष्पंप्रदीयते ॥
सुगंधमुस्तकंदेयंकर्पूराभावतोबुधैः ॥

**अर्थ**–कंकोळाच्या अभावीं जाईचें फूल; व कापुराचा अभावीं सुगंध असा नागरमोथा घ्यावा.

कर्चूराभावतोदेयंग्रंथिपर्णविशेषतः ॥
कुंकुमाभावतोदद्यात्कुसुंभकुसुमंनवं ॥

**अर्थ**–कचोऱ्याचा अभावीं ग्रंथिपर्णी; व केशराचा अभावीं कुसुंब्याचें नवें फूल योजावें.

श्रीखंडचंदनाभावेकर्पूरंदेयमिष्यते ॥
अभावेत्वेतयोर्वैद्यःप्रक्षिपेद्रक्तचंदनं ॥

**अर्थ**—श्रीखंडचंदनाचा अभावीं कापूर; व त्यादोघांचा अभावीं रक्तचंदन, योजावा.

रक्तचंदनाकाभावेनवोशीरंविदुर्बुधाः ॥
मुस्ताचातिविषाभावेशिवाभावेशिवामता ॥

**अर्थ**—रक्तचंदनाचा अभावीं नवा वाळा; व अतिविषाच्या अभावीं नागरमोथा; व बाळहर्डीचा अभावीं आंवळकाठी योजावी.

अभावेनागपुष्पस्यपद्मकेसरमिष्यते ॥ मेदाजीवककाकोली
ऋद्धिर्वृद्धिपिचासति ॥ वरीविदार्यश्वगंधावाराहीश्चक्रमात्क्षिपेत् ॥

**अर्थ**—नाकेशराचा अभावीं कमळाचें केसर; व मेदा जीवक काकोली ऋद्धि वृद्धी या चौहोंचा अभावीं क्रमानें शतावरी; भुयकोहाळी, अश्वगंधा, डुकरकंद; हीं चार औषधें योजावीं.

वाराह्याश्चतथाभावेचर्मकारालुकामता ॥ वाराहीकंदसंज्ञस्तु
पश्चिमेगृष्टिसंज्ञकः ॥ वाराहीकंदएवान्यैश्चर्मकारालुकामता
अनूपेसंभवेद्देशेवाराहइवलोमवान् ॥

**अर्थ**—पांढऱ्या भुईकोहळ्याचा अभावीं डुकरकंद घ्यावा, ह्याला पश्चिमदेशीं गृष्टी व चर्मकारालुक ह्मणतात. हा कंद उदक व्याप्तदेशांत होतो; याचे आंगावर डुकरासारिखे केस असतात.

भल्लातकासहत्वेतुरक्तचंदनमिष्यते ॥
भल्लाताभावतश्चित्तंनलश्चेक्षोरभावतः ॥

**अर्थ**—बिब्व्याचा अभावीं रक्तचंदन अथवा चित्रक. आणि ऊसांचा अभावीं देवनळ घ्यावा.

सुवर्णाभावतोवैद्योमाक्षिकंप्रक्षिपेद्बुधः ॥
श्वेतंतुमाक्षिकंज्ञेयंबुधैरजतवद्ध्रुवं ॥

**अर्थ**—सुवर्णाचा अभावीं स्वर्णमाक्षीक; व रुप्याच्या अभावीं रौप्यमाक्षिक घ्यावें.

माक्षिकस्याप्यभावेतुप्रदद्यात्स्वर्णगैरिकं ॥ सुवर्णमथवारौप्यं
मृतंयत्रनलभ्यते ॥ तत्रलोहेनकर्माणिभिषक्कुर्याद्विचक्षणः ॥

**अर्थ**—स्वर्णमाक्षीक नसतां सोनगेरू घ्यावी; व सोनें रुपें यांची भस्में नमिळाल्यास लोहभस्मानें मात्रादिक कर्म करावें.

कांताभावेतीक्ष्णलोहंयोजयेद्वैद्यसत्तमः ॥
अभावेमौक्तिकस्यापिमुक्तशुक्तिंचयोजयेत् ॥

**अर्थ**—लोहकांताचा अभावीं पोलाद; व मोतीं न मिळाल्यास शिंपी योजावी.

मधुयत्रनलभ्येततत्रजीर्णोगुडोमतः ॥
मत्स्यंडयभावतोदद्युर्भिषजःसितशर्करां ॥

**अर्थ**–जा ठिकाणीं मध नमिळे तेथें जुनागूळ; व खडीसाकरेचा अभावीं पांढरी साकर घ्यावी.

असंभवेसितायास्तुबुधैःखंडंप्रयुज्यते ॥
क्षीराभावेरसोमौद्गोमासुरोवाप्रदीयते ॥

**अर्थ**–धूवासाकरेचा अभावीं खडीसाकर, व दुधाचा अभावीं मूग; अथवा मसुरांचारस योजावा.

अत्रप्रोक्तानिवस्तूनियानितेपुचतेपुच ॥
योज्यमेकतराभावेपरंवैद्येनजानता ॥

**अर्थ**–यांत जीं जीं औषधादिक सांगितलीं आहेत; तींतीं नमिळाल्यास ज्ञात्या-**वैद्यानें** सांगितल्या प्रमाणें त्यांचा प्रतिनिधी घ्यावा.

रसवीर्यविपाकाद्यैःसमंद्रव्यंविचिंत्यच ॥
युंज्यात्तद्विधमन्यञ्चद्रव्याणांचरसादिवत् ॥

**अर्थ**–जें द्रव्य मिळत नाहीं त्याचा रस सामर्थ्य, परिणाम, हीं पाहून त्या मारी-**खेच** रस, सामर्थ्य, परिणाम यांणीं बरोबरीचें द्रव्य मोबदला औषधांत योजावें.

योगेयदप्रधानंस्यात्तस्यप्रतिनिधिर्मतः ॥
यत्तुप्रधानंतस्यापिसदृशंनैवगृह्यते ॥

**अर्थ**–जें द्रव्य काढयांत व चूर्णांत मुख्य ह्मणून सांगितलें; त्या वांचून बाकीचीं जीं औषधें त्यांचा प्रतिनिधी सर्वांस मान्य; परंतु मुख्यद्रव्याचा अभावीं त्यासारिखें **दुसरें** घेऊं नये

## द्रव्यगतपदार्थपंचक सांगतो.

द्रव्येगुणोरसोवीर्यौविपाकःशक्तिरेवच ॥
पदार्थाःपंचतिष्ठंतिस्वंस्वंकुर्वंतिकर्मच ॥

**अर्थ**–प्रत्येक द्रव्यामध्यें गुण, रस, वीर्य, विपाक, शक्ति हे पांच पदार्थ आहेत, ते आपआपलें कर्म करितात.

## रस सांगतो.

रसाःस्वाद्वम्ललवणतिक्तोषणकषायकाः ॥ षट्द्रव्यमाश्रिता
स्तेचयथापूर्वंबलावहाः ॥ क्ष्मांभोग्निक्ष्मांबुतेजःखंवाय्वग्न्यनि
लगोनिलैः ॥ द्वयोल्वणैःक्रमाद्भूतैर्मधुरादिरसोद्भवः ॥

अर्थ—गोड, आंबट, लवण, तिखट, कडू, तुरट, हे साहा रस द्रव्याचा आश्रयानें राहातात, व ते क्रमानें एकापेक्षाएक कमी बलवान् आहेत; आणि ते रस दोन दोन भूतांनीं झाले आहेत; ते असे. पृथ्वी व उदक यांपासून गोडरस, अग्नि व पृथ्वी यांपासून आंबट; उदक व तेज यांपासून लवण, आकाश व वायू यांपासून तिखट, अग्नि आणि वायू मिळून कडू, आणि तेज व वायू यांपासून तुरट असे रस उत्पन्न झाले.

## कोणत्यारसानीं कोणते दोष शमतात; व कोपतात तें सांगतो.

तत्राद्यामारुतंघ्नंतित्रयस्तिक्तादयःकफं ॥
कषायतिक्तमधुराःपित्तमन्येतुकुर्वते ॥

अर्थ—त्या साहारसांमध्ये पहिले तीन ह्मणजे गोड, आंबट, लवण हे वायूचा नाश करितात, व तिखट, कडू, तुरट हे कफाचा नाश करितात; आणि तुरट, कडू मधूर हे पित्ताचा नाश करितात, याशिवाय बाकीचे रस दोषाला कोपवितात.

येरसावातशमनाभवंतियदितेपुवै ॥
रौक्ष्यलाघवशैत्यानिनतेहन्युःसमीरणं ॥

अर्थ—जे रस वातशामक आहेत; त्यामध्ये जर रूक्षता, लघुता, आणि शीतता हे धर्म आहेत; तर ते रस वायूचें शमन करीत नाहीत.

येरमाःपित्तशमनाभवंतियदितेपुवै ॥
तैक्ष्ण्योष्णलघुनाचैवनतेतत्कर्मकारिणः ॥

अर्थ—जे रस पित्तशामक आहेत, त्यामध्ये जर तिखट, ऊष्ण, लघु हे धर्म आहेत; तर ते पित्तशमन करीत नाहींत.

येरसाःश्लेष्मशमनाभवंतियदितेपुवै ॥
स्नेहगौरवशैत्यानिनतेहन्युःकफंसदा ॥

अर्थ—जे रस कफशामक आहेत. त्यांमध्यें जर स्निग्धता, गौरव, आणि शीतता हे धर्म आहेत. तर ते कफाचा नाश करीत नाहींत.

## मधुररसगुण.

मधुरोहिरसःशीतोधातुस्तन्यबलप्रदः ॥ चक्षुष्योवातपित्तघ्नः कुर्यात्स्थौल्यमलक्रमीन् ॥ बालवृद्धक्षतक्षीणवर्णकेशेंद्रियौजसां ॥ प्रशस्तोबृंहणःकंठ्योगुरुःसंधानकृन्मतः ॥ विषघ्नःपिच्छिलश्चापिस्निग्धःप्रीत्यायुषोर्हितः ॥

अर्थ—मधुररस शीत तो धातु, स्तन्य, बल यांनां उत्पन्न करितो, चक्षूला हितावह, वात, पित्त यांचा नाशक, व स्थूलता, मल, कृमी यांनां करितो, व बाल, वृद्ध, क्षतक्षीण केश, इंद्रियें, तेज यांविषयी प्रशस्त वर्णकारक, बृंहण, पुष्टिकर कंठाला हितावह, जड, भग्नसंधानकारक, विषनाशक, पिच्छल, स्निग्ध, प्रिय, आयुष्य वाढविणारा असा आहे.

## अतिभुक्तमधुरगुण.

सोतियुक्तोज्वरश्वासगलगंडार्बुदक्रमीन् ॥
स्थौल्याग्निमांद्यमेहांश्चकुर्यान्मेदःकफामयान् ॥

अर्थ—मधुररस अति सेवन केला असतां, ज्वर, श्वास, गलगंड, गर्लार्बुद, कृमि स्थूलता, अग्निमांद्य, मेद, आणि कफ या रोगांनां उत्पन करितो.

## आम्लरसगुण.

रसोम्लःपाचनोरुच्यःपित्तश्लेष्मास्रदोलघुः ॥ लेखनोष्णोब
हिःशीतःक्लेदनःपवनापहः ॥ स्निग्धस्तीक्ष्णःसरःशुक्रविबंधा
नाहदृष्टिहा ॥ हर्षणोरोमदंतानांअक्षिभ्रुविनिकोचनः ॥

अर्थ—आंबट रस पाचक, रुचिकर, पित्त, कफ, रक्तविकार यांना करणारा, लघु, लेखन, ऊष्ण, बाहेरशीत, मुखालापाणी उत्पन्न करणारा, वातनाशक, आणि दंताला आंबविणारा, रोमांच उत्पन्नकरणारा, नेत्र व भ्रुकुटी यांचा संकोचकरणारा असा आहे.

## अतिभुक्ताम्लरसगुण.

सोतियुक्तोभ्रमंकुर्यात्तृट्दाहातिमिरज्वरान् ॥
कंडूपांडुत्ववीसर्पशोथविस्फोटकुष्ठकृत् ॥

अर्थ—आम्लरस अतिभक्षणकेला असतां. भ्रम, तृषा, दाह, तिमिर, ज्वर, कंडू, पाडुत्व, विसर्प, शोथ, विस्फोटक, आणि कुष्ठ. यांनां उत्पन्न करितो.

## लवणरसगुण.

लवणःशोधनोरुच्यःपाचनःकफपित्तहा ॥ पुंस्त्ववातहरःकाय
शैथिल्यमृदुताकरः ॥ बलघ्नआस्यजलदःकपोलगलदाहकृत् ॥

अर्थ—लवणरस शोधन, रुचिकर, पाचन, कफ, पित्त, पुरुषत्व, वायु, यांचा नाशक, शरीराला शिथिलपणा व मृदुत्व यानां देणारा, बलनाशक, तोंडाला लाळउत्पन्नकरणारा, व गाल आणि गळा यांचा दाह करणारा आहे.

## अतिभुक्तलवणरसगूण.

सोतियुक्तोक्षिपाकास्रपित्तकोठक्षतार्तिकृत् ॥
वलीपलितखालित्यकुष्ठवीसर्पतृट्प्रदः ॥

**अर्थ**–अतिभक्षित लवणरस नेत्रपाक, रक्तपित्त, गांधी, क्षतपीडा, वलीपलित, चाइ, कुष्ठ, विसर्प; आणि तृषा यानां करणारा आहे.

## तिखटरसाचा गुण.

कटुरुष्णश्चतीक्ष्णश्चविशदोवातपित्तकृत्॥ श्लेष्मघ्नस्तल्लघुराग्नेयः
कृमिकंडूविषापहः ॥ रूक्षस्तन्यहरश्चापिमेदस्थौल्यापकर्षकृ
त् ॥ अश्रुदोनासिकास्याक्षिजिव्हाग्रोद्वेजकोमतः ॥ दीपनः
पाचनोरुच्योनासिकाशोषणोभृशं ॥ क्लेदमेदोवसामज्जाशकृ
न्मूत्रोपशोषणः ॥ स्रोतःप्रकाशकोरूक्षोमेध्योवर्चोविबंधकृत्॥
आग्नेयोह्यधिकाग्न्यंशोमेध्योमेधायैहितः ॥

**अर्थ**–तिखट रस ऊष्ण, तीक्ष्ण, स्वच्छ, वात पित्त यानां करणारा, श्लेष्मनाशक, लघु, आग्नेय, विसर्प, कृमि, कंडू, विष, यांचा नाशक, रुक्ष, स्तन्यहारक, मेदाचा नाशक, नेत्रांला पाणीआणणारा, नाक, डोळे, जिव्हाग्र यांनां उद्वेगकरणारा, दीपन, पाचक, रुचिकर, नासिकेचें शोषणकरणारा, क्लेद, मेद, वसा, मज्जा, मल, मूत्र यांचा शोषकर णारा स्रोतःप्रकाशक, रूक्ष, मेधाबुध्दिदेणारा, व मलबंध करणारा, हाआग्नेय. व यांत अग्नीचा अंश अधीक आहे.

## अतिभक्षिलेल्या तिखटरसाचे गुण.

सोतिभुक्तोभ्रांतिदाहमुखताल्वोष्ठशोषकृत् ॥
कंठादिपीडामूर्छातृट्कंपदोबलशुक्रहृत् ॥

**अर्थ**–अतिभक्षित तिखट रस भ्रांति, दाह, यांते करितो, व मुख, तालु, ओष्ठ, यांचा शोषकरणारा, कंठादिकांचे ठायीं पीडा, व मूर्छा, तृषा, कंप यानां करणारा, व बल आणि शुक्र यांचा नाशक आहे.

## कडुरसगुण.

तिक्तःशीततृषामूर्छाज्वरपित्तकफान्जयेत् ॥ कृमिकुष्ठविषो
त्क्लेददाहरक्तगदापहः ॥ रुच्यःस्वयमरोचिष्णुःकंठस्तन्यास्य
शोधनः ॥ वातलोग्निकरोनासाशोषणोरूक्षणोलघुः ॥

**अर्थ**–कडुरस शीत, तृषा, मूर्छा, ज्वर, पित्त, कफरोग, कृमि, कुष्ठ, विष, तोंडास पाणीसुटनें, दाह, रक्तविकार यांचा नाशक; आणि स्वतःरुचिहीन असून दुसरे पदा र्थात घातलाअसता रुचिकर, व गळा, स्तनांतीलदूध, मुख, यांनां स्वच्छकरणारा, वात, व अग्नी यानां करणारा, नाकाला सुकिवणारा, रूक्ष, लघु असा आहे.

## अतिभक्षितकटुरसगुण.

सोतियुक्तःशिरःशूलमन्यास्तंभश्रमार्तिकृत् ॥

कंपमूर्छातृषाकारीबलशुक्रक्षयप्रदः ॥

अर्थ—अतिभक्षित कटुरस मस्तकशूल, मानेचा स्तंभ, श्रम, पीडा, कंप, मूर्छा, तृषा यां तें करितो; आणि बल, शुक्र यांचा क्षय करणारा आहे.

## तुरटरसगुण.

कषायोरोपणोग्राहीस्तंभनःशोधनस्तथा ॥ लेखनः

पीडनःसौम्यःशोषणोवातकोपनः ॥ कफशोणितपित्तघ्नोरूक्षः

शीतोलघुर्मतः ॥ त्वक्प्रासादनआमस्यस्तंभनोविशदाम

तः ॥ जिव्हायाजाड्यकृत्कंठस्रोतसांचाविबंधकृत् ॥

अर्थ—तुरटरस व्रणरोपक, ग्राहक, स्तंभक, शोधन, लेखन, पीडाकर, सौम्य, शोषक, वातकोप करणारा असा आहे; आणि कफ, रक्तविकार, पित्त यांचा नाशक; आणि रूक्ष, शीतल, लघु, त्वचेला स्वच्छकरणारा; व आमाचा स्तंभनस्वच्छताकारक, व जिव्हेला जड करणारा, कंठ मूत्रादिक यांना बंदकरणारा असा आहे.

## अतियुक्ततुरटरसगुण.

सोतियुक्तोग्रहाध्मानहृत्पीडाक्षेपणादिकृत् ॥

अर्थ—अतियुक्त कषायरस बध, पोट फुगणें, हृदयाचे ठाईं पीडा, आक्षेप इत्यादि करणारा आहे.

## मधुरादिकांचे आणखी विशेष गुण.

## मधुररसविशेषगुण.

मधुरंश्लेष्मलंसर्वमृतेशालेःपुरातनात् ॥

मुद्गाद्गोधूमतःक्षौद्रात्सितायाजांगलामिषात् ॥

अर्थ—संपूर्ण मधुर पदार्थ श्लेष्मकारक आहेत; परंतु जुन्यासाळी, मूग, गहूं, मध, साकर, आणि जांगलमांसे हे पदार्थ खेरीजकरून.

## अम्ल; व लवण रसाचे विशेषगुण.

अम्लंपित्तकरंप्रायोविनाधात्रींचदाडिमं ॥

लवणंप्रायशोद्वेषिनेत्रयोःसैंधवंविना ॥

अर्थ—प्रायशः सर्व आंबट पदार्थ आंवळे व डाळिंब यांवाचून. पित्तकरणारे आहेत; आणि सर्व लवणें प्रायः नेत्रांना विकार करणारीं आहेत.

## तिखटरसाचे विशेषगुण.

प्रायःकटुतयातिक्तमवृष्यंवातकोपनं॥
शुंठीकृष्णारसोनानिपटोलममृतंविना॥१॥

**अर्थ-**प्रायः तिखट द्रव्यें वातकोपकरणारीं आहेत; परंतु सुंठ, पिंपळी, लसूण, पडवळ, गुळवेल यांवांचून.

पिप्पलीनागरंमुस्तंकटुचावृष्यमुच्यते॥
प्रायशस्तंभनंप्रोक्तंकषायमभयांविना॥१॥

अर्थ-पिंपळी, सुंठ, नागरमोथा, यांवांचून प्रायः तिखट द्रव्य धातुनाशक आहे; आणि तुरटरस स्तंभन आहे; परंतु हरीतकी वांचून.

सामान्येनात्रनिर्दिष्टागुणाःषड्रससंभवाः॥
रसानांयोगतस्तुस्यादन्यएवगुणोदयः॥

अर्थ-हे षड्रसांचे सामान्य गुण सांगितले; परंतु दुसऱ्या रसांचा योगानें अन्य गुण होतात.

## संयोगी गुण.

संयोगाद्विषतांयातिसममाज्येनमाक्षिकं॥
अमृतत्वंविषंयातिसर्पदष्टस्यवैयथा॥१॥

अर्थ-तूप आणि मध हे संयोगानें समान असतां विषरूप होतात. जसें सर्पदंश झालेल्या पुरुषाला अमृत विषरूप होतें तसें जाणावें.

## पृथिव्यादिभूतांचे गुण.

गुरुर्लघुस्तथास्निग्धोरूक्षस्तीक्ष्णइतिक्रमात्॥
भूनभोवारिवातानांवन्हेरेतेगुणाःस्मृताः॥

अर्थ-गुरु, लघु,स्निग्ध, रूक्ष, तीक्ष्ण, हे क्रमानें आकाश, भूमी, उदक, वायू, अग्नि यांचे गुण आहेत.

## गुरु लघु इत्यादिपदार्थांचे गुण.

गुर्वादयोगुणाद्रव्येपृथिव्यादौरसाश्रये॥
रसेपुव्यपदिश्यंतेसाहचर्योपचारतः॥

अर्थ-गुरु आदिकरून गुण पृथिव्यादि द्रव्यांचे ठायीं राहतात. ते त्यां पृथिव्यादिच्या साहचर्यामुळें पृथिव्यादिकांचे रसादिगुणांमध्यें राहतात.

## गुरुगुण.

गुरुर्वातहरंपुष्टिश्लेष्मकृच्चिरपाकिच ॥

स्निग्धंवातहरंश्लेष्मकारिवृष्यंबलावहं ॥

अर्थ—गुरुगुण—वातनाशक, पुष्टि व कफ यांतें करणारा, चिरकालानें पचन होणारा असा आहे; आणि स्निग्धगुण वातहारक, श्लेष्मकारक, वृष्य; आणि बल देणारा असा आहे.

## लघुगुण.

लघुपथ्यंपरंप्रोक्तंकफघ्नंशीघ्रपाकिच ॥

अर्थ—लघुगुण—अत्यंत पथ्यकारक, कफनाशक, आणि लवकर पचणारा असा आहे.

## रूक्ष व तीक्ष्ण पदार्थांचे गुण.

रूक्षंसमीरणकरंपरंकफहरंमतं ॥

तीक्ष्णंपित्तकरंप्रायोलेखनंकफवातनुत् ॥

अर्थ—रूक्ष गुण वातकारक, कफनाशक आहे; आणि तीक्ष्ण गुण—प्रायशः पित्तकर, लेखन, कफ, आणि वायू यांचा नाश करितो,

## सुश्रुतोक्त विंशति गुण.

सुश्रुतेतुगुणाएतेविंशतिस्तानहंब्रुवे ॥ गुरुर्लघुस्निग्धरूक्षौ तीक्ष्णःश्लक्ष्णःस्थिरःसरः ॥ पिच्छिलोविशदःशीतउष्णश्चमृदु कर्कशौ ॥ स्थूलसूक्ष्मौद्रवःशुष्कआशुमंदःस्मृतागुणाः ॥

अर्थ—सुश्रुतामध्यें हे गुण वीस सांगीतले, ते मी सांगतो. गुरु, लघु, स्निग्ध, रूक्ष, तीक्ष्ण, श्लक्ष्ण, स्थिर, सारक, पिच्छल, विशद, शीत, उष्ण, मृदु, कर्कश, स्थूल, सूक्ष्म द्रव, शुष्क, शीघ्र, मंद, असे आहेत.

## गुरु व लघु गुण सांगतों.

तीक्ष्णोगुरुस्तथारूक्षोलघुस्निग्धउदाहृतः ॥

अर्थ—गुरुगुण तीक्ष्ण आहे, तसाच लघुगुण रूक्ष आणि स्निग्ध आहे.

## श्लक्ष्ण, स्थिर; व सारक गुण.

श्लक्ष्णःस्नेहंविनापिस्यात्कठिणोपिहिचिक्कणः ॥

स्थिरोवातमलस्तंभीसरस्तेषांप्रवर्तने ॥

अर्थ—श्लक्ष्णगुण स्नेहावांचून कठीण असून ही चिक्कण आहे; आणि स्थिर गुण वायू व मल यांनां स्तंभन करितो; आणि सारकगुण वायू, मल यांनां सरण करितो.

## पिच्छल; आणि विशद गुण.

पिच्छिलस्तंतुलोबल्यःसंधानःश्लेष्मलोगुरुः ॥
क्लेदच्छेदकरःख्यातोविशदोव्रणरोपणः ॥

**अर्थ**–पिच्छलगुण तंतुसुटणारा, बल, भग्नसंधान; आणि श्लेष्म यांना करणारा, व जड असा आहे; आणि विशदगूण क्लेदाचा नाशक, सारक आणि व्रणाला भरून आणणारा असा आहे;

## शीत व उष्ण गुण सांगतो.

शीतस्तुल्हादनस्तंभीमूर्छातृट्स्वेदादाहनुत् ॥
उष्णोभवातिशीतस्याविपरीतश्चपाचनः ॥

**अर्थ**–शीतगुण आनंदकारक, स्तंभक, व मूर्छा, तृषा, घाम, दाह, याचा नाश करितो; आणि ऊष्णगूण शीताचा विपरीत असून पाचक आहे.

## स्थूल व सूक्ष्म गुण.

स्थूलःस्थौल्यकरोदेहेस्रोतसामवरोधकृत् ॥
देहस्यसूक्ष्मछिद्रेषुविशेद्यत्सूक्ष्ममुच्यते ॥

**अर्थ**–स्थूल गूण देहाला स्थूल करितो; व स्रोतसांचा अवरोध करितो, आणि सू-क्ष्मगूण देहाचा सूक्ष्म छिद्र चा ठाईं प्रवेश करितो, असें जाणावें.

## द्रव, शुष्क, आशुकारी; आणि मंद गुण.

द्रवःक्लेदकरोव्यापीशुष्कस्तद्विपरीतकः ॥ आशुराशुकरोदेहे
धावत्यंभसितैलवत् ॥ मंदःसकलकार्येषुशिथिलःसोपिकथ्यते ॥

**अर्थ**–द्रवगूण शरीराला ओलें करितो, आणि सर्व शरीरव्यापितो; व शुष्क गूण द्रवगु णाच्या विपरीत गूण करितो; आणि आशुगूण देहाचे ठायीं त्वरित गूण करितो, जसा उ दकांत तैल बिंदु पसरतो; तसा मंद गूण संपूर्ण कार्यांविषयी शिथिल असें जाणावें

## दीपनपाचनादिऔषधगण.

पचेन्नामंवन्हिकृच्चदीपनंतद्यथामिशिः ॥ पचत्यामंनवन्हिंच
कुर्याद्यत्तद्धिपाचनम् ॥ नागकेसरवद्विंद्याच्चित्रोदीपनपाचनः ॥

**अर्थ**–जें औषध आंवेचें पाचन करीत नाहीं; आणि अग्नीस प्रदीप्त करितें, तें औषध दीपन संज्ञक जाणावें. उदाहरण, बडीशोप, जें औषध आंवेचें पाचन करतें; आणि अग्नि प्रदीप्त करित नाहीं, तें औषध पाचन संज्ञक जाणावें, उदाहरण नागकेशर. अग्नि प्रदीप्त करणारा व आंवेला पचविणारा असा चित्रक जाणावा.

## संशम औषधें.

नशोधयतिनद्वेष्टिसमान्दोषांस्तथोद्धतान् ॥
समीकरोतिविषमान्शमनंतद्यथामृता ॥

अर्थ–जें औषध वातादि दोष समान असतां त्यांचा द्वेष व त्यांचें शोधन करीत नाहीं; आणि विषम भाव पावून शरीरांत माजले जे वातादिदोष त्यांचें मात्र शमन करितें; तें औषध शमन संज्ञक जाणावें. उदारण, गुळवेल.

## अनुलोमन औषधें.

कृत्वापाकंमलानांयद्भित्वाबंधमधोनयेत् ॥
तच्चानुलोमनंज्ञेयंयथाप्रोक्ताहरीतकी ॥

अर्थ–जें औषध मळ ह्मणजे वातादिदोष यांचा पाक करून परस्पर बद्ध जाहले जे वातादिदोष त्यांना वेगळे करून अधोभागीं नेतें; अथवा वात, मूत्र, पुरीष यांचा जो बंध त्या बंधाला ह्मणजे बद्धकोष्टकतेला मोकळे करून अधोभागीं नेऊन गुदावाटे पाडितें, तें औषध अनुलोमन जाणावें. उदारण हरीतकी.

## स्रंसनऔषध.

पक्तव्यंयदपक्त्वैवश्लिष्टंकोष्टेमलादिकं ॥
नयत्यधःस्रंसनंतद्यथास्यात्कृतमालकः ॥

अर्थ–पुढें पाक होण्याविषयीं योग्य असे जे वातादिक दोष ते कोठाचे आश्रयंकरून राहिले आसतां त्यांचा पाक नकरितां त्यांतें जें औषध अधोभागीं दडपून गुदावाटें पाडितें, तें औषध स्रंसन संज्ञक जाणावें. उदाह० वाहव्याचा शेंगाचा मगज.

## भेदनऔषध.

मलादिकमबद्धंवायद्बद्धंपिंडितंमलैः ॥
भित्वाधःपातयतितद्भेदनंकटुकीयथा ॥

अर्थ–वातादि दोषेंकरून अबद्ध अथवा बद्ध असे जे मळमूत्रादिक ते ग्रथित जाहले असतां, त्यांचा भेद करून त्यांतें जें औषध अधोभागीं नेऊन गुदावाटें पाडितें; तें भेदन संज्ञक जाणावें. उदा० कटुकी. (प्राकृतांत कुटकी असें नाव होय.)

## रेचन औषधें.

विपक्वंयदपक्वंवामलादिद्रवतांनयेत् ॥
रेचयत्यपितज्ज्ञेयंरेचनंत्रिवृतायथा ॥

अर्थ–पोटामध्यें विशेषें करून अन्नादिकांचा चांगला पाक जाहला असतां, अथवा कांहीं कच्चे राहिलें असतां, त्या अन्नादिकांस, व वातादिकांस पातळ करून त्यांस जें औषध अधोभागीं नेऊन गुदावाटें ढाळ करितें; तें औषध रेचन संज्ञक जाणावें. उदाहरण निसोत्तर. (याचें नाव निशोत्तर असेंही आहे.)

## वमनऔषध.

अपक्कपित्तश्लेष्माणंबलादूर्ध्वंनयेत्तुयत् ॥
वमनंतद्धिविज्ञेयंमदनस्यफलंयथा ॥

अर्थ पक्वदशेस आलें नाहीं असें पित, व कफ यानां हटें करून जें औषध तोंडावाटे ओकवितें तें औषध वमन संज्ञक जाणावें. उदा० गेळफळ. (कोणी मेणफळ असेंही ह्मणतात.)

## संशोधनऔषधें.

स्थानाद्बहिर्नयेदूर्ध्वमधोवामलसंचयम् ॥
देहसंशोधनंतत्स्याद्देवदालीफलंयथा ॥

अर्थ–आपल्या स्वस्थानीं वातादिकांचा जाहला जो संचय त्याला ऊर्ध्वभागीं नेऊन त्यातें जें औषध तोंडावाटें व नाकावाटें बाहेर काढितें, अथवा त्या संचयाला अधोभागीं नेऊन गुदावाटें ढाळाबरोबर, किंवा शिश्नावाटें मूत्राबरोबर काढितें, तें औषध देहाचें संशोधन जाणावें; उदा०, देवडांगरी. (देशांत देवडांगर असें ह्मणतात.)[2]

## छेदनऔषधें.

श्लिष्टान्कफादिकान्दोषानुन्मूलयतियद्बलात् ॥
छेदनंतद्यवक्षारोमरिचानिशिलाजतु ॥

अर्थ–जें औषध परस्पर एकांत एक मिळाले असे जे कफादिदोष, त्यांस आपल्या शक्तीनें फोडून वेगळे वेगळे करितें; तें औषध छेदन जाणावें. उदाहरण, यवक्षारादिक व मिरें. सुंठ, पिंपळी व शिलाजित, इत्यादि.

## लेखनऔषधें.

धातून्मलान्वादेहस्यविशोष्योल्लेखयेच्चयत् ॥
लेखनंतद्यथाक्षौद्रंनीरमुष्णंवचायवाः ॥

**अर्थ–जीं औषधें रसादिधातु; व वातादिदोष यांचें शोषण करून त्यांना पातळ करितात, तीं औषधें लेखन जाणावीं. उदा० मध, उष्णजळ, वेखंड, जव ,इत्यादि.**

---

१ आदिशब्दें करून मळमूत्रादिक जाणावें.

२ देवडंगरीला देशावर कांटेवृंदावन; अथवा कुकडवेल असें ह्मणतात; किंवा देवडांगरी ही प्रसिद्ध आहे.

## ग्राही औषधें.

दीपनंपाचनंयत्स्यादुष्णत्वाद्द्रवशोषकम् ॥
ग्राहितच्चयथाशुंठीजीरकंगजपिप्पली ॥

**अर्थ**—जीं औषधें अग्नी प्रदीप्त करितात, व अमादिकांचें पाचन करितात, व उष्णवीर्य आहेत ह्मणून, जलस्वरूप जे कफादिदोष, धातू व मळ यांचें शोषण करितात तीं औषधें ग्राही जाणावीं. उदाहरण, सुंठ, जिरें, गजपिंपळीइत्यादि.

## स्तंभन औषधें.

रौक्ष्याच्छैत्यात्कषायत्वाल्लघुपाकाच्चयद्भवेत् ॥
वातकृत्स्तंभनंतत्स्याद्यथावत्सकटुंटुकौ ॥

**अर्थ**—जीं औषधें रूक्षगुणेंकरून, व तुरटरसेंकरून युक्त असतात, व पाकेंकरूनही हलकीं असतात; अशा प्रकारचीं जीं औषधें तीं वायूला उत्पन्न करितात, यास्तव तीं औषधें स्तंभन जाणावीं. उदाहरण, कुडा व टेंटु, इत्यादि.

## रसायन औषधें.

रसायनंचतज्ज्ञेयंयज्जराव्याधिनाशनम् ॥
यथामृतारुदंतीचगुग्गुलुश्चहरीतकी ॥

**अर्थ**—जीं औषधें शरीराचा जरा व रोग यांस दूरकारतात, तीं औषधें रसायनें जाणावी. उदाहरण, गुळवेल, रुदंती, गुग्गुळ, हरीतकी इत्यादि.

## धातूची वृद्धिकरणारीं औषधें.

यस्माद्द्रव्याद्भवेत्स्त्रीषुहर्षोवाजीकरंचतत् ॥
यथानागबलाद्यास्तुबीजंचकपिकच्छुजं ॥

**अर्थ**—जीं औषधें धातूला वाढवून स्त्रियांविषयीं हर्षयुक्त शक्ती देतात, तीं औषधें वाजीकरण जाणावीं. उदा०—नागबला, आदिशब्दें करुन शतावरी, साखर, दूध इत्यादि; व कवचबीज.

## धातूची वृद्धिकरणारीं औषधें.

यस्माच्छुक्रस्यवृद्धिःस्याच्छुक्रलंचतदुच्यते ॥
यथाश्वगंधामुसलीशर्कराचशतावरी ॥

**अर्थ**—ज्या औषधांपासून धातूची वृद्धि होते, तीं औषधें शुक्रल जाणावीं. उदाहरण, आसंध, मुसळी, साखर, शतावरी, इत्यादिक जाणावीं.

## धातूला चेतविणारीं; व त्याची वृद्धिकरणारीं औषधें.

दुग्धंमाषाश्चभल्लातफलमज्जमलानिच ॥
प्रवर्तकानिकथ्यंतेजनकानिचरेतसः ॥

अर्थ—शुक्रधातूला चेतविणारीं; व त्या धातूला उत्पन्न करणारीं अशीं औषधें, दूध उडीद, भिलाव्याचे फळाची मज्जा ( मध्यें बी असते ती, ) व आंवळकाठी इत्यादिक जाणावीं.

## वाजीकरणऔषधांचा निषेध.

प्रवर्तनीस्त्रीशुक्रस्यरेचनंबृहतीफलम् ॥
जातीफलंस्तंभकंचशोषणीचहरीतकी ॥

अर्थ—शुक्रधातूला चेतविणारी स्त्री आहे, व त्या धातूला रेचक करणारें मोतरिंगणीचें फळ, अथवा रानवांगें; किंवा रिंगणीफळ आहे; व स्तंभन करणारें जायफळ आहे, व शोषण करणारी हरीतकी ( हिरडा ) आहे. असें जाणावें; "शोषणीचहरीतकी या ठिकाणीं श्लोकांत कालिंगंक्षयकारिच असाही पाठ आहे," त्याचा अर्थ, कलिंगड वीर्याचा क्षय करितें, असें जाणावें.

## सूक्ष्मऔषधें.

देहस्यसूक्ष्मछिद्रेषुविशेद्यत्सूक्ष्ममुच्यते ॥
तद्यथासैंधवंक्षौद्रंनिंबस्तैलं[1]रुबूद्भवम् ॥

अर्थ—शरीराचे ठायीं बारीक बारीक रोमरध्रादिक छिद्रें आहेत, त्यांचेठायीं जीं औषधे प्रवेश करितात, तीं औषधें सूक्ष्म जाणावीं उदाहर० सैंधव, मध, कडूनिंब, तिळाचें तेल, एरंडेल इत्यादिक जाणावीं.

## व्यवायी औषधें.

पूर्वंव्याप्याखिलंकायंततःपाकंचगच्छति ॥
व्यवायितद्यथाभंगाफेनंचाहिसमुद्भवं ॥

अर्थ—जीं औषधें अपक्वचें[2] साऱ्या देहाला व्यापून मग मद्य व विष यांचे सारिखीं पाकाप्रत जातात; तीं औषधें व्यवायी जाणावीं. उदाहरण भांग, व अफू.

## विकाशी औषधें.

संधिबंधांस्तुशिथिलान्यत्करोतिविकाशितत् ॥
विश्लेष्यौजश्चधातुभ्योयथाक्रमुककोद्रवाः ॥

---

१ कोणाचे मतें निंबतैलं असाही पाठ आहे, त्यामतें निंबाचें तेल घ्यावें.

२ पोटांत पाकदशेप्रत जाताच.

अर्थ–जीं औषधें सर्वांगाचे संधीचे बंधनास शिथिल करून रसादि धातु पासून उत्पन्न जाहलें जें ओज ह्म० बळ त्याला शिथिल करितात, तीं औषधें विकाशी जाणावीं. उदाहरण, सुपारी व कोद्रुधान्य.

## मदकारी पदार्थ.

बुद्धिंलुंपतियद्द्रव्यंमदकारितदुच्यते ॥
तमोगुणप्रधानंचयथामद्यंसुरादिकं ॥

अर्थ–जो पदार्थ तमोगुणप्रधान असून बुद्धीला आच्छादितो; तो पदार्थ मदकारी जाणावा. उदाहरण सुरादिक, मद्य.

## प्राणहारक औषधें.

व्यवायिचविकाशिस्यात्सूक्ष्मंछेदिमदावहं ॥
आग्नेयंजीवितहरंयोगवाहिस्मृतंविषं ॥

अर्थ–पूर्वी सांगितली जीं व्यवायी, विकाशी, सूक्ष्म, छेदि, मदकारी, आग्नेय औषधें या साहींचे गुणेंकरून जें द्रव्य युक्त असतें, तें द्रव्य प्राणहारि जाणावें; उदाहरण, विष, बचनागादिक तें योगवाही ही जाणावें, कारण कोणी आचार्य, श्लोकात योगवाह्यमृतविषं, असाही पाठ ह्मणतात. त्याचा अर्थ तेंच विष योगवाहि ह्मणजे त्याला कांहीं संस्कार विशेषेंकरून जा जा अनुपानाशीं योजिलें त्या त्या अनुपानाचे गुण वाढवून अमृततुल्य होतें.

## प्रमाथी औषधें.

निजवीर्येणयद्द्रव्यंस्रोतोभ्योदोषसंचयं ॥
निरस्यतिप्रमाथिस्यात्तद्यथामरिचंवचा ॥

अर्थ–जीं औषधें आपल्या प्रभावे करून कान , तोंड, नाक इत्यादिकांचे छिद्रामध्यें कफादि दोषांचा संचय जाहला असतां, त्या संचयाला दूर करितात; तीं औषधें प्रमाथी जाणावी. उदाठरण,वेखंड, व मिर्चे. इत्यादि.

## अभिष्यंदिपदार्थ.

पैच्छल्याद्गौरवाद्द्रव्यंरुध्वारसवहाःशिराः ॥
धत्तेयद्गौरवंतत्स्यादभिष्यंदियथादधि ॥

अर्थ–जो पदार्थ आपल्या पिच्छिलगुणेंकरून रसवाहिनी शिरांना रोधून शरीराला जड करितो; तो पदार्थ अभिष्यंदि ह्म०कफकारक जाणावा. उदा० दहीं.

## विदाही पदार्थ.

विदाहिद्रव्यमुद्गारमम्लंकुर्यात्तथातृषां ॥
हृदिदाहंचजनयेत्पाकंगच्छतितच्चिरात्

**अर्थ**—विदाहिद्रव्य जें आंबट ढेकर, तृषा, दाह, यांनां उत्पन्न करून. फार वेळानें पचन होतें तें.

## योगवाहि.

गृण्हातियोगवाहिद्रव्यंसंसर्गवस्तुजांश्चगुणान् ॥

पचमानवयथैतन्मधुजलतैलाज्यसूतलोहादि ॥

**अर्थ**—योगवाहि द्रव्य. ज्या द्रव्या बरोबर जा द्रव्याचा संयोग करावा, त्याचे गुण करितें. तें असे मध, उदक, तेल, तूप, पारा, लोह, हे पदार्थ जसे दुसऱ्याचे गुणासारिखे आपण गुण करितात, तसें.

## अथवीर्य.

उष्णशीतगुणोत्कर्षाद्दुधैर्वीर्यंद्विधास्मृतं ॥

तत्सर्वमग्निषोमीयंदृश्यतेभुवनत्रयम् ॥

**अर्थ**—ऊष्ण व शीत या गुणांचा उत्कर्षानें वीर्य दोनप्रकारचें आहे. याकरितां संपूर्ण त्रिभुवनांमध्यें संपूर्ण वस्तुजात अग्नी, आणि उदक यास्वरूपानें भासतें.

## त्यांचें गूण.

उष्णंवातकफौहन्यात्पित्तंतुतनुतेतरां ॥

शीतंवातकफातंकान्कुरुतेपित्तह्रत्परं ॥

**अर्थ**—उष्णगूण वात व कफ यांचा नाश करितो, आणि पित्ताला वाढवितो. शित गूण वात व कफ या रोगाला उत्पन्न करितो, व पित्तला शमवितो.

## उष्णगुण.

तत्रोष्णंभ्रमतृट्ग्लानिस्वेददाहाशुपाकताः ॥ शमंचवातकफ

योःकरोतिशिशिरंपुनः ॥ ल्हादनंजीवनंस्तंभंप्रसादंरक्तपित्तयोः ॥

**अर्थ**—त्यामध्यें उष्णगूण भ्रम, तृषा, ग्लानि, स्वेद, दाह, शीघ्रपाक, यानां करितो; आणि वायू व कफ यांची शांती करितो. शीतगूण आनंद, जीवन, आणि स्तंभन, हें करितो; व रक्त आंणि पित्त यानां स्वच्छ करितो.

## अथविपाकाः

जाठरेणाग्निनायोगाद्यदुदेतिरसांतरं ॥ रसानांपरिणामांतेस

विपाकइतिस्मृतः ॥ मिष्टःपटुश्चमधुरमम्लोम्लंपच्यतेरसः ॥

कटुतिक्तकषायाणांपाकःस्यात्प्रायशःकटुः ॥ त्रिधारसनांपा

कःस्यात्स्वाद्वम्लकटुकात्मकः ॥

अर्थ–जठराग्नीचा योगानें रस उत्पन्न होऊन, त्यारसापासून जो रस उत्पन्न होतो, त्याला विपाक ह्मणतात; तो मिष्ट, क्षार, यांचा पाक व मधुर, आंबट यांचा पाक आंबट आणि कटु, तिखट, तुरट, यांचा पाक प्रायः तिखट होतो; याप्रमाणे रसांचा गोड, आंबट, तिखट, असा तीनप्रकारचा पाक होतो.

## विपाकगुण.

श्लेष्मकृन्मधुरःपाकोवातपित्तहरोमतः ॥
आम्लस्तुकुरुतेपित्तंवातश्लेष्मगदापहः ॥
कटुःकरोतिपवनंकफंपित्तंचनाशयेत् ॥
विशेषएषरसतोविपाकानांनिदार्शितः ॥

अर्थ–मधुरपाक श्लेष्मकारक, आणि वात, व पित्त, यांचा नाशक; आणि आंबटपाक पित्तकारक; आणि वायु, कफ यांचा नाशक; व तिक्तपाकें वातकारक; आणि कफ व पित्त यांचा नाशक आहे. हा रसविपाकाचा विशेष गुण सांगीतला.

## प्रभाव.

रसादिसाम्येयत्कर्मविशिष्टंतत्प्रभावजं ॥ दंतीरसाद्यैस्तुल्यापि
चित्रकस्याविरेचनी ॥ मधुकस्यचमृद्वीकाघृतंक्षीरस्यदीपनं ॥
प्रभावस्तुयथाधात्रीलकुचस्यफलादिभिः ॥ समापिकुरुतेदो
षत्रितस्यविनाशनं ॥ क्वचित्तुकेवलंद्रव्यंकर्मकुर्यात्प्रभावतः ॥
ज्वरंहंतिशिरोबद्धासहदेवीजटायथा ॥

अर्थ–परस्पर औषधींचें रसादिसाम्य असतां जो विशिष्ट गुण होतो तो प्रभाव जाणावा. जशी दंती, ही रसादिकानीं चित्रकासारिखी असतां तिचेमध्यें रेचक गुण आहे हा प्रभाव; आणि द्राक्षे, ज्येष्टमध, हे समानरस असतां, द्राक्षें रेचक आहेत; व तूप दूध यांचे परस्पर सारखे गुण असतां तूप दीपन आहे, आणि आंवळे, व ओटाचें फळ हे समानरस असतांही आंवळे दोषत्रयांची शांती करितात; आणि कोठें केवळ एकटेच द्रव्य प्रभावानें विलक्षण कर्म करितें. जसे सहदेवीचें मूळ मस्तकाचेठाईं बांधिलें असतां ज्वरनाश करितें.

अमीमांस्यान्यचिंत्यानिप्रसिद्धानिस्वभावतः ॥
आगमेनोपयोज्यानिभेषजानिविचक्षणैः ॥

अर्थ–जीं औषधें स्वभावानें प्रसिद्ध आहेत, तीं शास्त्र जेथें सांगेल तेथेच योजावीं, त्यांचें वीर्य अचिंत्य आहे; याकरितां त्यांचा विचार करूंनये.

प्रत्यक्षलक्षणफलाःप्रसिद्धाश्चस्वभावतः ॥
नौषधीर्हेतुभिर्विद्वान्परीक्षेतकदाचन ॥

अर्थ–ज्या औषधी प्रत्यक्ष फलदेणाऱ्या आणि लक्षणेंही प्रसिद्ध आहेत, त्यांची शहाण्यानें कधीं परीक्षा करूंनये.

विरुद्धगुणसंयोगेभूयसाल्पंहिजायते ॥
रसंविपाकस्तौवीर्यंप्रभावस्तान्व्यपोहति ॥

अर्थ–विरुद्धगुण औषधी पुष्कळ एकेठिकाणीं झाल्या असतां, विपाक रसाचा नाश करितो, व रस आणि विपाक यांचा वीर्य नाश करितें, आणि रस, विपाक व वीर्य यांचा प्रभाव नाश करितो, असे जाणावें.

## अथदिनचर्या.

मानवोयेनविधिनास्वस्थस्तिष्ठतिसर्वदा ॥ तमेवकारयेद्वैद्योयतः
स्वास्थ्यंसदेप्सितं ॥ दिनचर्यांनिशाचर्यांऋतुचर्यांयथोदितां ॥
विहरन्पुरुषःस्वस्थःसदातिष्ठतिनान्यथा ॥

अर्थ–वैद्यानें रोगी ज्यारीतीनें सार्वकाळ स्वस्थ राहील, तसे उपचार करावे. निरोगीपणा सर्वांला इष्ट आहे, म्हणून दिनचर्या, रात्रिचर्या, ऋतुचर्या यांचे ठायीं जशीं जशीं कर्मे सांगीतलीं, तशींतशीं आचरण केलें असतां, सर्वकाळ स्वास्थ्य राहातें.

## स्वस्थाचें लक्षण सांगतों.

समदोषःसमाग्निश्चसमधातुबलक्रियः ॥ प्रसन्नात्मेंद्रियमनाः
स्वस्थइत्यभिधीयतेः ॥ यत्समत्वंहिदोषाणांभिषग्भिरवधार्यते
नतत्स्वास्थ्यंविनावक्तुंशक्यमन्येनहेतुना ॥

अर्थ–दोष, अग्नि, धातु, बल, आणि कर्म हीं ज्याची समान, व इंद्रियें, मन, देह हीं प्रसन्न त्याला स्वस्थ म्हणावें, व ज्याला वैद्य दोषसमत्व म्हणतात; तें शरीरस्वास्थ्यावाचून दुसऱ्या हेतूनें सांगतां येणार नाहीं.

## दिनचर्या सांगतों.

ब्राह्मेमुहूर्तेबुध्येतस्वस्थोरक्षार्थमायुषः ॥ तत्रसर्वाघशांत्यर्थंस्म
रेच्चमधुसूदनं ॥ दध्याज्यादर्शसिद्धार्थबिल्वगोरोचनस्रजं ॥
दर्शनस्पर्शनंकार्यंप्रबुद्धेनशुभावहं ॥ स्वमाननंघृतेपश्येद्यदी
च्छेच्चिरजीवितं ॥

**अर्थ**–प्राण्याने पहाटेच्या चारघटिका रात्रीस उठोन आयुष्याचा रक्षणार्थ व संपूर्ण पातकनाशनार्थ, मधुरिपू जो विष्णू त्याचे स्मरण करावें; आणि दहीं, तूप, आरसा, मोहोऱ्या, बेल, गोरोचन, आणि पुष्पमाला. यांचे दर्शन किंवा स्पर्शन करावें; ते शुभकारक आहे. व जाला फार वाचण्याची इच्छा आहे, त्याणे आपले मुख आरशांत पाहावें.

## मलत्याग सांगतो.

आयुष्यमुषसिप्रोक्तंमलादीनांविसर्जनं ॥ तदंत्रकूजनाध्मानो दरगौरववारणं ॥ आटोपशूलौपरिकीर्तिकाचसंगःपुरीषस्यत थोर्ध्ववातः ॥ पुरीषमास्यादथवानिरेतिपुरीषवेगेभिहतेनरस्य ॥ वातमूत्रपुरीषाणांसंगोध्मानंक्लमोरुजा ॥ जठरेवातजाश्चान्ये रोगास्युर्वातनिग्रहात् ॥

**अर्थ**–प्रातःकाळीं उठून मळ, मूत्र यांचे विसर्जन केले असतां आयुष्य वाढते; आणि आंतड्यांत वायूचा शब्द, पोटाला फुगवटी, व पोटाचा जडपणा यांचा नाश होतो; आणि मलमूत्रादिकांचा वेगाचा रोध केला असतां, पोटांत गुडगुडशब्द, शूल, कापलेल्यासारिखी पीडा, मलरोध, उद्गारबाहुल्य, अथवा मुखावाटे मलाचें गमन, आणि वायू, मूत्र, मळ यांचा रोध, आध्मान, ग्लानि, पोटांत शूल, आणि वायूचे उपद्रव हे होतात.

## मूत्राचा रोधाचें गुण.

बस्तिमेहनयोःशूलंमूत्रकृच्छ्रंशिरोरुजा ॥ विनामोवंक्षणानाहः स्याल्लिंगंमूत्रनिग्रहे ॥ नवेगितोन्यकार्यःस्यान्नवेगान्नीरयेद्ब लात् ॥ कामशोकभयक्रोधान्मनोवेगान्विधारयेत् ॥

**अर्थ**–मूत्रवेगाचा निग्रह केला असतां, बस्ति व मूत्रमार्ग यांचेठाई शूळ, मूत्रकृच्छ्र, मस्तकशूळ, शरीराला वांकिवणे आणि बद होण्याचा जाग्यास ओढल्यासारिखी पीडा हीं लक्षणें होतात; याकरितां मलमूत्रादिकांचा वेग आला असतां दुसरें कांहीं काम करूनये, आणि स्वतः होतनसतां कुंथून मलमूत्र करूनये, व काम, शोक, भय, क्रोध ह्या मनाच्या वेगांचा रोध करावा.

## शौचादिकांचे गुण.

गुदादिमलमार्गाणांशौचंकांतिबलप्रदं ॥ पावित्र्यकरमायुष्यमलक्ष्मीकलिपापहृत् ॥

**अर्थ**–गुदादिक मलमार्गांचे शौच ह्मणजे चांगले धुणें, हें कांति, बल, व पवित्रता, आयुष्य, यांला वाढविते; आणि अलक्ष्मी, कलि, व पातक यांचा नाश करितें.

## हस्तपादप्रक्षालन.

प्रक्षालनंमृदापाण्योःपादयोःशुद्धिकारकं ॥
मलश्रमहरंवृष्यंचक्षुष्यंराक्षसापहं ॥

अर्थ–हाताला, व पायांला माती लावून धुवावे; ह्मणजे शुद्ध होतात, आणि मल, श्रम, राक्षसबाधा यांचा नाश होतो, व वृष्य, आणि चक्षुला हितावह आहे.

## मुखप्रक्षालन.

भक्षयेद्दंतपवनंद्वादशांगुलमायतं ॥ कनिष्ठिकाग्रवत्स्थूलमृ
ज्वग्रंथितथाव्रणं ॥ एकैकंघर्षयेद्दंतंमृदुनाकूर्चकेनतु ॥ दंतशो
धनचूर्णेनदंतमांसान्यबाधयन् ॥ क्षौद्रात्रिकटुकाक्तेनतैलसिंधु
भवेनवा ॥ चूर्णेनतेजोवत्याश्चदंतान्नित्यंविशोधयेत् ॥ मधु
कोमधुरेश्रेष्ठःकरंजःकटुकेतथा ॥ निंबःस्यात्तिक्तकेश्रेष्ठःकषाये
खदिरस्तथा ॥ समयंचसमालोक्यदोषंचप्रकृतिंतथा ॥
यथोचितैरसैर्वीर्यैर्युक्तंद्रव्यंप्रयोजयेत् ॥

अर्थ–दंतधुण्याचे काष्ठ बाराआंगळें लांब, व करांगुलीच्या अग्राइतके बारीक, सरळ असून त्याला पेरी नसावी, व त्या काष्ठाला चावून पुढे कुंचासारिखे करून त्याणे हळु हळु एकेक दांत घासावा; व दंतशोधन चूर्णानीं, दंतमांसाला पीडा दिल्यावांचून हळू घांसावे; आणि मध, सुंठ, मिरीं, पिंपळी, तेल, सैंधव यांचे चूर्णानें; अथवा तेजबळाचा चूर्णाने दंतशोधन करावे, व दंतकाष्ठ मधुरवृक्षांत मोह; तिखट द्रव्यांमध्ये करंज, कडु द्रव्यांमध्ये निंब, आणि तुरटामध्ये खैर, श्रेष्ठ जाणावा. यांमधून समय, दोष, प्रकृति हीं पाहून यथोचित रसवीर्यांनीं युक्त असे योजावे.

## मुखप्रक्षालनगुण.

तेनास्यरसवैरस्यगंधाजिव्हास्यजागदाः ॥
रुचिवैशद्यलघुतानभवंतिभवंतिच ॥

अर्थ–मुखप्रक्षालनानें तोंडाची अरुची, व गंध जाऊन जिव्हा आणि मुख यांसंबंधी व्याधी होतनाहींत; व रुचि, स्वच्छता, लघुता हे गुण होतात.

## दंतधावनकाष्ठांचें वेगळे गुण.

अर्केवीर्यंवटेदीप्तिःकरंजेविजयोभवेत् ॥ प्लक्षेचैवार्थसंपत्तिर्ब
दर्यांमधुरोध्वनिः ॥ खदिरेमुखसौगंध्यंबिल्वेतुविपुलंधनं ॥

उदुंबरेतुवाक्सिद्धिराम्रेत्वारोग्यमेवच ॥ कदंबेचधृतिर्मेधाचं पक्वेबलवच्छ्रुतिः ॥ शिरीषेकिर्तिसौभाग्येआयुरारोग्यमेवच ॥ अपामार्गेधृतिर्मेधाप्रज्ञाशक्तिस्तथाध्वनिः ॥ दाडिम्यांसुंदरा कारःककुभेकुटजेतथा ॥ जातीतगरमंदारैर्दुस्वप्नंचविनश्यति ॥

**अर्थ**—दंतधावन काष्ठ रुईचे असल्यास वीर्य प्राप्त होतें; वटाचें दीप्तिकर, करंजाचें विजय देणारें, पायरीचे अर्थ व संपत्ति देणारें, बदरीचें मधुरध्वनिकर, खैराचें मुखाला-सुगंध देणारें, बिल्वकाष्टाचें बहुत द्रव्यप्राप्ति, उंबराचें वाक्सिध्दिकर, आम्रकाष्ठानें आरोग्यता, कळंबाचे काष्ठानें धैर्य,व बुधि,याची प्राप्ती,आणि चाप्याचे काष्ठानें श्रवणेंद्रिय चांगले होते, व शिरसाचे काष्ठानें कीर्ति, सौभाग्य, आयुष्य, आरोग्य होतें, आघाडयाचा काष्ठानें धैर्य, बुध्दि, पाठशक्ती, व उत्तमध्वनि, दाडिम अर्जुन, कुडा यांचे काष्ठानें शरीराला सुंदरपणा येतो;आणि जाई, तगर, व मांदार यांचे काष्ठानें दंतधावन केलें असतां दुस्वप्ननाश होतो.

## दंतकाष्ठ घेऊंनये ते रोगी सांगतो.

नखादेद्गलताल्वोष्ठजिव्हादंतगदेषुतत् ॥ मुखस्यपाकेशोषे चश्वासकासवमीपुच ॥ दुर्बलोजीर्णभुक्तश्चहिक्कामूर्छामदान्वितः ॥ शिरोरुजार्तस्तृषितःश्रांतःश्यानःक्लमान्वितः ॥ अर्दितीकर्णशूलीचनेत्ररोगीनवज्वरी ॥ वर्जयेद्दंतकाष्ठंचतद्दामययुतोपिच ॥

**अर्थ**—गळा, तालु, ओष्ठ, जिव्हा, दंत याला व्याधि; अथवा तोंड फुटे, व शोष, श्वास, खोकला, वांति हे विकार व दुर्बल, अजीर्ण, जेवलेला, उचकी, मूर्छा, मद, मस्तकशूल, तृषित, श्रमकेलेला, ग्लान, विकलेंद्रिय आर्दित वायू, कर्णशूल, नेत्ररोग नवज्वर, आणि ऊरांतील व्याधी हे उपद्रव असतां दंतकाष्ठानें दांत घासूनये.

## जीभ घांसण्यांस योग्य धातूची पट्टी सांगतो.

जिव्हानिर्लेखनंहैमंराजतंताम्रजंतथा ॥
पाटितंमृदुतत्काष्ठंमृदुपत्रमयंतथा ॥

**अर्थ**—जीभ घांसण्याकरितां सोनें, रुपें, तांबें, यांची पाती असावी; अथवा मऊलाकडाचा पट्टीनें किंवा मऊपानानें जीभ घासावी.

## दंतकाष्ठप्रमाण.

दशांगुलंमृदुस्निग्धंतेनजिव्हांलिखेन्मुखं ॥
तज्जिव्हामलवैरस्यदुर्गंधजडताहरं ॥

अर्थ–दंतकाष्ठ दाहा आंगुळे लांब, मऊ, चिक्कण असें असावें; त्याणें दांत आणि मुख घांसलें असतां त्यांचा मल, विरसपण, दुर्गंध, आणि जाड्य यांचा नाश होतो,

## गंडूषविधी (चुळभरणें) व गूण.

गंडूषमथकुर्वीतशीतेनपयसामुहुः ॥ कफतृष्णामलहरंमुखांतः शुद्धिकारकं ॥ सुखोष्णोदकगंडूषःकफारुचिमलापहः ॥ दंत जाड्यहरश्चापिमुखलाघवकारकः ॥

अर्थ–दांत घासल्यानंतर थंडपाण्याने वारंवार चूळ भरून टाकावी. तेणेंकरून कफ ताहान, मल हे नाश पावतात, व तोंडाची आंतून शुद्धी होये. अथवा सोंभाळे पाण्यानें चूळ भरली असतां कफ, अरुची, मल, आणि दंतजाड्य यांचा नाश होतो, व तोंड हलके वाटते.

## चूळ भरूनये ते रोगी सांगतो.

विषमूर्छामदार्तानांशोषिणांरक्तपित्तिनां ॥
कुपिताक्षिमलक्षीणरूक्षाणांसनशस्यते ॥

अर्थ–विष, मूर्छा, मद याणी पीडित; व क्षयी रक्तपित्ती, नेत्ररोगी, मलक्षीण, व रूक्ष, झालेले रोगी याणी चूळ भरुनये.

## तोंडधुण्याचे पाण्याचे गुण.

मुखप्रक्षालनंशीतपयसारक्तपित्तजित् ॥ मुखस्यपीडिकाशो षनीलिकाव्यंगनाशनं ॥ कुर्याद्वापिकदुष्णेनपयसास्यविशो धनं ॥ कफवातहरंस्निग्धंमुखशोथविनाशनं ॥

अर्थ–शीतोदकानें मुखप्रक्षालन केलें असतां रक्तपित्त, तोंडावरचा पुळगा, सूज, नीलिकारोग, वांग, यांचा नाश करितें; अथवा सोंभाळे उदकानें कफ, वात, मुखशोथ यांचा नाशकरितें; आणि स्निग्ध आहे.

## नस्यविधि व त्याचे गुण.

कटुतैलादिनस्यार्थेनित्याभ्यासेनयोजयेत् ॥ प्रातःश्लेष्मणिम ध्यान्हेपित्तेसायंसमीरणे ॥ सुगंधिवदनास्निग्धनिस्वनाविम लेंद्रियाः ॥ निर्वलीपलितव्यंगाभवेयुर्नस्यशीलिनः ॥

अर्थ–नस्याचा नित्याभ्यास असावा; आणि नस्य शिरसाचा तैलादिकानीं करावें, ते कफ असतां, प्रातःकाळीं; आणि पित्तव्याधीवर मध्यान्हकाळीं, वातरोगावर सायंकाळीं,

नस्य द्यावें, असें नस्य केलें असतां मुखाला सुगंध, सुस्वरभाषण; आणि इंद्रियांना स्वच्छ-ता येते, व त्यास वली, पलित, वांग, हे व्याधी कधींही होणार नाहींत.

## अंजनविधी व त्याचे गुण.

सौवीरमंजनंनित्यंहितमक्ष्णोस्ततोभजेत् ॥ लोचनेभवतस्तेन मनोज्ञेसूक्ष्मदर्शने ॥ दृष्टेःकंडूमलहरंदाहक्लेदरुजापहं ॥ अक्ष्णोरूपावहंचैवसहतेमारुतातपौ ॥ नेत्ररोगानजायंतेतस्मादंजनमाचरेत् ॥

अर्थ—सुर्मा हा नेत्राला फार हितावह आहे, याकरितां नेत्रामध्यें रोज घालावा, तेणेकरून नेत्र सुरेख होऊन दृष्टि सूक्ष्म होत्ये, व सिंधुनामक पर्वतावर जो सुर्मा होतो, तो श्रेष्ठ व शोधन आहे, तो नेत्राचा कंडू, मल, दाह, चिकटा यांचा नाश करितो; आणि-नेत्र सुरेख करून वायू, ऊन यांचें सहन करितो, अंजन घातलें असतां नेत्ररोग होतनाहींत, याकरितां नित्य अंजन करावें.

## अंजन करावयास जे अयोग्य ते सांगतो.

रात्रौजागरितःश्रांतश्छर्दितोभुक्तवांस्तथा ॥
ज्वरातुरःशिरस्नातोनाक्ष्णोरंजनमाचरेत् ॥

अर्थ—रात्रीं जागलेला, श्रमलेला, वांती झाली असतां, भोजनानंतर, ज्वरी, मस्तकावरून स्नान केलें असतां, डोळ्यांत सुर्मा घालूंनये.

## श्मश्रुवपनकेशप्रसाधनकाल; व गुण.

पंचरात्रान्नखश्मश्रुकेशरोमाणिकल्पयेत् ॥ केशश्मश्रुनखादीनांकर्तनंसंप्रसाधनं ॥ पौष्टिकंधन्यमायुष्यंशौचकांतिकरंपरं ॥ उत्पाटयेत्तुलोमानिनासायांनकदाचन ॥ तदुत्पाटनतोदृष्टेर्दौर्बल्यंत्वरयाभवेत् ॥ केशपाशेप्रकुर्वीतप्रसाधन्याप्रसाधनं ॥ केशप्रसाधनंकेश्यंरजोजंतुमलापहं ॥

अर्थ—पांचरात्री गेल्यानंतर मिशा, दाढी, नखें, केश, हे काढावे. केश, मिशा, नखें, हीं कापून टाकलीं असतां पुरुष सुंदर दिसतो. व पुष्टि, धन्यपणा, आयुष्य, शुचिता, कांति, हीं वाढतात. पुरुषानें नाकांतले केश कधींहीं उपटूंनये. उपटले असतां, त्वरेनें दृष्टि मंद होते, फणीनें शेंडी विंचरावी, म्हणजे केश चांगले होतात; व मळ; आणि उवा नाहींशा होतात.

## आरसा पाहण्याचे गुण.

आदर्शालोकनंप्रोक्तंमांगल्यंकांतिकारकं ॥ पौष्टिकंबल्यमायुष्यं पापालक्ष्मीविनाशनं ॥ लाघवंकर्मसामर्थ्यंविभक्तघनगात्रता ॥

अर्थ—प्रातःकाळीं आरशांत मुख पाहावें, तें मंगल, कांति, पुष्टि, बल, आयुष्य, यांनां देणारें, व पाप; आणि अलक्ष्मी यांचा नाश करितें; आणि शरीराला लाघव, कर्म करण्यास सामर्थ्य, गात्रानां पुष्टी हीं होतात.

## व्यायामविधी व त्याचे गुण.

दोषक्षयोग्निवृध्दिश्चव्यायामादुपजायते ॥ व्यायामदृढगात्राणांव्याधिर्नास्तिकदाचन ॥ विरुद्धंवाविदग्धंवाभुक्तंशीघ्रंविपच्यते ॥ भवंतिशीघ्रंनैतस्यवलीशिथिलतादयः ॥ नचैनंसहसाक्रम्यजरासमधिरोहति ॥ नचास्तिसदृशंतेनकिंचित्स्थौल्यापकर्षणं ॥ सर्वदागुणमाधत्तेबलिनांस्निग्धभोजिनां ॥ वसंतेशीतसमयेसुतरांसहितोमतः ॥ अन्यदापिचकर्तव्योबलार्धेनयथाबलं ॥

अर्थ—श्रम केल्यानें वातादिदोषांचा क्षय, व अग्नीची वृद्धि होत्ये, व्यायामानें गात्रें दृढ झालीं ह्मणजे व्याधी कधींही होतनाहीं; आणि विरुद्धाहार; किंवा विदग्धाजीर्णावर भोजन हें लौकर पचन होतें; आणि अंगाचेठायीं वली व शिथिलपणा हे होतनाहींत, पुरुष लौकर ह्मातारा होतनाहीं; आणि व्यायामांवाचून जाडमाणसाला सुकविणारा दुसरा नाहीं; व बलवान्; आणि स्निग्धभोजी याना सर्वकाळ स्थूलतारूप गुण करितो. तो व्यायाम वसंतऋतु व शीतकाळाचे दिवशीं विशेषेंकरून करावाच; आणि अन्यकाळींही करावा, ह्मणजे बल वाढतें.

## बलार्धाचें लक्षण.

हृदयस्थोयदावायुर्मुखंशीघ्रंप्रपद्यते ॥ मुखंचशोषंलभतेतद्बलार्धस्यलक्षणं ॥ किंवाललाटेनासायांगात्रसंधिपुकक्षयोः ॥ यदासंजायतेस्वेदोबलार्द्धंतुतदादिशेत् ॥

अर्थ—जांचा अल्पश्रमानें श्वासोश्वास मुखानें जातो; आणि तोंड सुकतें, तो निम्यावळाचा; किंवा कपाळ, नाक, गात्रें, सांधे, खाका, यानां घाम येतो, तोही निमावळवान जाणावा.

## व्यायाम करण्यास अयोग्य.

भुक्तवान्कृतसंभोगःकासश्वासीकृशःक्षयी ॥ रक्तपित्तीक्षतीशो षीनतंकुर्यात्कदाचन ॥ अतिव्यायामतःकासोज्वरश्छर्दिःश्र मःक्लमः ॥ तृष्णाक्षयःप्रतमकोरक्तपित्तंचजायते ॥

अर्थ–जेऊन लागलाच संभोग केला असतां कास, श्वास, कृशता, रक्त पित्त, क्षत, आणि शोष, हे होतात. याकरितां तो करूनये; आणि अतिश्रम केला असतां खोकला, ज्वर, ओकारी, श्रम, ग्लानि, तृषा, क्षय, प्रतमक, आणि रक्तपित्त हे होतात.

## अभ्यंगविधिगुण.

अभ्यंगंकारयेन्नित्यंसर्वेष्वंगेषुपुष्टिदं ॥ शिरःश्रवणपादेषुत द्विशेषेणशीलयेत् ॥ सार्षपंतैलगंधंचयत्तैलंपुष्पवासितं ॥ अ न्यद्रव्ययुतंतैलंनदुष्यतिकदाचन ॥ अभ्यंगोवातकफत्दृत्श्र मंशांतिबलंसुखं ॥ निद्रावर्णमृदुत्वायुष्कुरुतेदृढपुष्टिकृत् ॥ अभ्यंगःशीलितोमूर्ध्निसकलेंद्रियतर्पणः ॥ दृष्टिपुष्टिकरोहंतिशि रोभूमिगतान्गदान् ॥ केशानांबहुतांदार्ढ्यंमृदुतांदीर्घतांतथा ॥ कृष्णतांकुरुतेकुर्याच्छिरसःपूर्णतामपि ॥

अर्थ–नित्य संपूर्ण अंगाला तैलाचा अभ्यंग करावा. तो पुष्टि देतो, व तो मस्तक, कान, पाय यांचे ठायीं विशेषें करून करावा. तें तेल सर्षपतैल, गंधयुक्त तेल, फुलांचें तेल; व आणखी दुसरें द्रव्यांनीं युक्त असलें तरी अवगूण करीत नाहीं. अभ्यंग वात व कफ यांचें नाशक आहे. आणि श्रम, शांति, सुख, निद्रा, वर्ण मृदुत्व, आयुष्य, यानां करणारें आहे. आणि दृष्टि, व पुष्टि यानां करून मस्तकसंबंधीं रोगांचा नाश करितें; आणि केश मृदु, दाट, पुष्कळ, लांब, काळे, असे होतात; आणि मस्तक दृढ होतें.

## कानांत तेल घालण्याचे गुण.

नकर्णरोगानमलोनचमन्याहनुग्रहः ॥ नोच्चैःश्रुतिर्नबाधिर्यं स्यान्नित्यंकर्णपूरणात् ॥ रसाद्यैःपूरणंकर्णेभोजनात्प्राक्प्रशस्य ते ॥ तैलाद्यैःपूरणंकर्णेभास्करेस्तमुपागते ॥

अर्थ–कानांत रोज तेल घालीत गेलें असतां कधींही कर्णरोग, मळ, मन्याग्रह, हनुग्रह हळु बोलणें चांगलें आइकूयेणे असे गुण होतात. कर्णामध्यें रसादिक घालणें असेल तर; भोजनाचे पूर्वी घालावा; आणि तैलादिक रात्रीं घालावीं.

## पादाभ्यंग.

पादाभ्यंगस्तुतत्स्थैर्यनिद्रादृष्टिप्रसादकृत् ॥ पादसुप्तिश्रमस्तंभ संकोचस्फुटनप्रगुत् ॥ व्यायामक्षुण्णवपुषपभ्द्यांसंमर्दितंतथा ॥ व्याधयोनोपसर्पंतिवैनतेयमिवोरगाः ॥ रोमकूपशिराजालध मनीभिःकलेवरं ॥ तर्पितंबलमाधत्तेस्नेहोयुक्तोवगाहने ॥ अ द्भिःसंसिक्तमूलानांतरूणांपल्लवादयः ॥ वर्धंतेचतथानृणांस्नेह संसिक्तधातवः ॥

अर्थ–पायानां तैलादिक लावणें हें स्थिरता, निद्रा, दृष्टिप्रसाद, यानां; करितें, व पांयांचे मेहेरी, श्रम, स्तंभ, संकोच, फुटीरपणा यांचा नाश करितें. जो मनुष्य फार चालून श्रमला; त्याचा पायांनां मर्दन केलें असतां व्याधी होतनाहींत. जसे गरुडाजवळ सर्प येतनाहींत; आणि स्नेहानें देह शिराजाल, धमनी, रोमकूप यांचे द्वारा तृप्त होऊन बळकट होतो. या करितां स्नानाचे वेळेस आंगाला स्नेह लावणें युक्त आहे. जसें वृक्षाचे मूळांत पाणी घालून शिंपिला असतां पानें, खांद्या इत्यादिक वाढतात. तसेच स्नेहनानें देह संसिक्त केला असतां धातु वाढतात.

## अभ्यंगास अनधिकारी.

तरुणज्वरीत्यजीर्णीचनाभ्यक्तव्यःकदाचन ॥ तथाविरिक्तोवां तश्चनिरूढोयश्चमानवः ॥ पूर्वयोःकृच्छ्रताव्याधेरसाध्यत्वमथा पिवा ॥ शेषाणांतदधःप्रोक्तावन्हिसादादयोगदाः ॥ उद्वर्तनं कफहरंमेदोघ्नंशुक्रदंपरं ॥ बल्यंशोणितकृत्कांतित्वक्प्रसादमृ दुत्वकृत् ॥

अर्थ–तरुणज्वरी, अजीर्ण झालेला, आणि रेचक, वांती, निरूहबस्ती घेतलेला, यां नीं अभ्यंग करूंनये. तरुणज्वरी व अजीर्णी यांनां अभ्यंग केलाअसतां त्यांचा व्याधि कृच्छ्र साध्य होतो; आणि विरेकादिक यानां अभ्यंग केलाअसतां अग्निमांद्यादिक व्याधी होतात; उद्वर्तन, कफ मेद यांचा नाश करितें; व धातु, बळ, आणि रक्त यानां वाढवितें; आणि त्व चेला स्वच्छ व मृदु करिते.

## मुखलेप

मुखलेपादृढंचक्षुःपीनोगंडस्तथाननं ॥
कांतमव्यंगपिटकंभवेत्कमलसन्निभं ॥

अर्थ–मुखाला अभ्यंग केलाअसतां नेत्र बळकट होतात; आणि गाल पुष्ट दिसतात, व मुखावर वांग, पुळया न येतां मुख कमलासारिखें सुंदर होतें.

## स्नान विधिगुण

दीपनंवृष्यमायुष्यंस्नानामोजोबलप्रदं ॥ कंडूमलश्रमस्वेदतं
द्रातृट्दाहपापनुत् ॥ बाह्यैश्चसेकैःशीताद्यैरूष्मांतर्यातिपीडि
तः ॥ नरस्यस्नातमात्रस्यदीप्यतेतेनपावकः ॥ शीतेनपयसा
स्नानंरक्तपित्तप्रशांतिकृत् ॥ तदेवोष्णेनतोयेनबल्यंवातकफाप
हं ॥शिरस्नानमचक्षुष्यमत्युष्णेनांबुनासदा ॥ वातश्लेष्मप्रको
पेनुहितंतच्चप्रकीर्तितं ॥ अशीतेनांभसास्नानंपयःपानंनवास्त्रि
यः ॥ एतद्वोमानवाःपथ्यंस्निग्धमल्पंचभोजनं ॥ यःसदामल
कैःस्नानंकरोतिसचनिश्चितं ॥ वलीपलितनिर्मुक्तोजीवेद्वर्षश
तंनरः ॥

**अर्थ**–स्नान अग्नीप्रदिप्तकरणारें, वृष्य, आयुष्य वाढावीणारें, तेज, बल, यांना देणारें; आणि कंडू, मल, श्रम, घाम, झांपड, तृषा, दाह, पाप यांचा नाश करितें; आणि बाहेरून आंगावर शीत पाणीं घेतल्यानें ऊष्मा पीडित होऊन आंत प्रवेश करितो, ह्मणून मनुष्य स्नान केल्याबरोबर अग्नी प्रदीप्त होतो. थंड पाण्यानें स्नान केलें असतां रक्त पित्ताची शांति होत्ये, तेंच स्नान ऊष्णोदकानें केलेंअसतां. बल कारक आहे; व वायू, कफ यांचा नाश करितें. मस्तकावर फार उष्ण पाणीं घेतलें असतां, नेत्रांना पीडा करितें. वात पित्त यांचा प्रकोप झाला असतां, मस्तकावरून ऊष्णोदकानें स्नान हित कारक होतें. हे मानवहो ऊनपाण्याचें स्नान, दुग्धपान, तरुणास्त्रिया, आणि स्निग्ध, व अल्प असें भोजन हें हितकारक आहे. जो नित्य निश्चयानें आंवळ्याचा कल्क अंगाला लावून स्नान करील, त्याला वली पलित हे नहोतां तो शंभर वर्षें वांचेल.

## स्नानास अयोग्य

स्नानंज्वरेतिसारेचनेत्रकर्णानिलार्तिषु ॥
अध्मानपीनसाजीर्णाभुक्तवत्सुचगर्हितं ॥

**अर्थ**–ज्वर, अतिसार, नेत्ररोग, कर्णरोग, वातव्याधि, पोटफुगणें, पडसें, अजीर्ण हे व्याधी झाले असतां; व जेवल्यानंतर स्नान करूनये.

## अंगमार्जन.

स्नानस्यानंतरंसम्यग्वस्त्रेणतनुमार्जनं ॥
कांतिप्रदंशरीरस्यकंडूत्वग्दोषनाशनं ॥

**अर्थ**–स्नान करून वस्त्रानें आंग पुसावें; ह्मणजे शरीराची कांती चांगली होत्ये, आणि कंडू व त्वचासंबंधि दोष यांचा नाश होतो.

## वस्त्रधारण

कौशेयंचित्रवस्त्रंचरक्तवस्त्रंतथैवच ॥ वातश्लेष्महरंतत्तुशीतकालेविधारयेत् ॥ मेध्यंसुशीतंपित्तघ्नंकषायंवस्त्रमुच्यते ॥ तद्धायेदुष्णकालेतच्चापिलघुशस्यते ॥ शुक्लंचशुभदंवस्त्रंशीतातपनिवारणं ॥ नचोष्णंनचवाशीतंतत्तुवर्षासुधारयेत् ॥ यशस्यंकाम्यमायुष्यश्रीदमानंदवर्धनं ॥ त्वच्यंवशीकरंरुच्यंनवंनिर्मलमंबरं

**अर्थ**—पीतांबर, पांटाव, तांबडे पीतांबर इत्यादिकांचा धारणानें वात कफ यांचा नाश होतो, तीं वस्त्रें थंडीचा दिवसांत धारण करावीं, आणि पवित्र, थंड, पित्तनाशक, भगवें असें वस्त्र ऊष्णकाळीं धारण करावें, तें लहान असावें, शुभ्र वस्त्र शुभकारक आहे; आणि शीत व ऊन यांचें निवारण करितें. व तें अतिउष्ण व शीत नव्हे. हें वर्षाॠतु मध्यें धारण करावें. तसेंच नवें वस्त्र यशदेणारें, कामना पुरविणारें, आयुष्य देणारें, लक्ष्मी व आनंद यानां वाढीवणारें त्वचेला हितावह, वशीकरण, व सुंदर असें आहे.

## मलीनवस्त्र निषेध

कदापिनजनैःसद्भिर्धार्यमालिनमंबरं ॥
तत्तुकंडूक्रमिकरंग्लान्यलक्ष्मीकरंपरं ॥

**अर्थ**—शाहाण्या प्राण्यानीं कधींहि मलीन वस्त्र धारण करूंनये. केलें असतां कंडू, ऊवा, ग्लानि, अलक्ष्मी यानां करणारें आहे.

## चंदनधारण

कुंकुमंचंदनंवापिकृष्णागरुविमिश्रितं ॥ उष्णंवातकफध्वांसि
शीतकालेतदिष्यते ॥ चंदनंघनसारेणवालकेनचमिश्रितं ॥
सुगंधिपरमंशीतमुष्णकालेप्रशस्यते ॥ चंदनंघुसृणोपेतंमृगनाभिसमायुतं ॥ नचोष्णंनचवाशीतंवर्षाकालेतदिष्यते ॥

**अर्थ**—केशर, चंदन किंवा कृष्णागुरु यांणीं युक्त केलें असतां ऊष्ण वात, कफ यांचा नाश करितें, हें शीतकाळामध्यें योग्य आहे. व चंदन कापूर, व वाळा यांणीं मिश्र केलें असतां तें सुगंधिकर परमशीत ह्मणून उष्ण काळामध्यें चांगलें, तसेंच चंदन, व केशर कस्तूरी. याणी युक्त केलें असतां उष्ण व शीत नव्हे असें होतें हें वर्षाॠतूमध्यें श्रेष्ठ आहे

## चंदनगुण.

अनुलेपस्तृषामूर्छादुर्गंधिश्रमदाहनुत् ॥
सौभाग्यतेजस्त्वग्वर्णप्रीत्योजोबलवर्धनः ॥

अर्थ–सुगंधानुलेपन. तृषा, मूर्छा, दुर्गंध, श्रम, दाह, यांचा नाश करितें; आणि सौभाग्य, तेज, त्वचेचा रंग, प्रीति, तेज, आणि बळ यांनां वाढवितें.

## चंदनधारणास अयोग्य.

स्नानानर्हमनुष्याणांमनुलेपोपिनोहितः ॥
सुगंधिपुष्पपत्राणांधारणंकांतिकारकं ॥

अर्थ–जे स्नानाला योग्य नाहींत त्यांला. अनुलेपनविधी हितकारक होत नाहीं, व सुगंधपुष्पें, पत्रें, यांचें धारण केलेंअसतां ते कांतिकारक आहे.

## सुवर्णालंकारधारणगुण.

भूषणैर्भूषयेदंगंयथायोग्यंविधानतः ॥
शुचिसौभाग्यसंतोषदायकंकांचनंस्मृतं ॥

अर्थ–सुवर्णभूषणानीं यथाविभागानें भूषितकरावें. ह्मणजे शुद्धता व सौभाग्य, संतोष हे होतात.

## रत्नाचे अलंकारगुण; व उत्पत्ती.

ग्रहदृष्टिहरंपुष्टिकरंदुःस्वप्ननाशनं ॥ पापदौर्भाग्यशमनंरत्नाभरणधारणं ॥ माणिक्यंतरणेःसुजातममलंमुक्ताफलंशीतगोर्माहेयस्यचविद्रुमोनिगादितःसौम्यस्यगारुत्मतं ॥ देवेज्यस्यचपुष्परागमसुराचार्यस्यवज्रंशनेर्नीलंनिर्मलमन्ययोश्चगदितेगोमेदवैडूर्यके ॥ वासःस्रग्गंधरत्नानांधारणंप्रीतिवर्धनं ॥
रक्षोघ्नमर्थ्यनायुष्यंसौभाग्यकरमुत्तमं ॥

अर्थ–रत्नाचे अलंकार धारण केलेअसतां, ग्रहांचे दृष्टीचा नाश करितात, पुष्टि देतात; व दुःस्वप्न, पाप, दौर्भाग्य यांचा नाश करितात.– माणिक, सूर्याचें. मुक्ताफल, चंद्राचें पोवळें, मंगळाचें. गरुडपाच, बुधाचें. पुष्कराज, गुरूचें. हिरा, शुक्राचें. नीळ, शनीचा, राहू व केतू यांचा गोमेद, व वैडूर्य. याप्रमाणें ग्रहांची रत्नें धारण केलीअसतां त्या त्या ग्रहाची प्रीती होत्ये; आणि रत्नधारण भूतबाधाचें नाशक, प्रार्थनाकरण्यास योग्य, व आयुष्य देणारें, व सौभाग्यकारक असें आहे.

## मांगल्यधारण.

सततंसिद्धमंत्रस्यमहौषध्यास्तथैवच ॥ रोचनासर्षपादीनांमांगल्यानांचधारणं ॥ आयुर्लक्ष्मीकररक्षोहरंमंगलदंशुभं ॥ हिंसा

दिभयविध्वंसिवशीकरणकारणं ॥ देवगोविप्रवृद्धानांगुरूणां

चैवपूजनं ॥ आयुष्यंवृद्धिदंपुण्यंअलक्ष्मीकलिनाशनं ॥

अर्थ–निरंतर सिद्धमंत्र, महौषधि, गोरोचन, सर्षप इत्यादिक मांगल्यवस्तूचें धारण करावें. तेणेंकरून मंगल, आयुष्य, लक्ष्मी हीं प्राप्त होतात, व राक्षसांचें भय, हिंस्रप्राण्याचें भय, यांचा नाश करून त्यांला वशकरणारें आहे, व देव, गाई, ब्राह्मण, वृद्ध, गुरु यांचें पूजन करावें. तें आयुष्यवृद्धि, पुण्य, यांतें करणारें, व अलक्ष्मी, व कलि यांचा नाश करणारें आहे.

## मंगलपदार्थदर्शन.

ततोभोजनवेलायांकुर्यान्मंगलदर्शनं ॥ तस्यप्रदक्षिणंनित्यमा

युर्धर्मविवर्धनं ॥ लोकेस्मिन्मंगलान्यष्टौब्राह्मणोगौर्हुताश

नः ॥ हिरण्यंसर्पिरादित्यआपोराजातथाष्टमः ॥

अर्थ–भोजनसमयीं ब्राह्मण, गाई, अग्नी, सुवर्ण, तूप, सूर्य, उदक, राजा, ह्या मंगलकारक आठपदार्थांचें दर्शन, व त्यानां प्रदक्षणा कराव्या. ह्मणजे नित्य आयुष्य, व धर्म हे वाढतात.

## पादुकारोहण.

पादुकारोहणंकुर्यात्पूर्वंभोजनतःपरं ॥

पादरोगहरंवृष्यंचक्षुष्यंचायुषेहितं ॥

अर्थ–भोजनाचेपूर्वी किंवा भोजनोत्तर फिरणें झाल्यास, पादुका घालाव्या. त्या पादरोगनाशक, वृष्य, नेत्रानां हितावह, आणि आयुष्यवाढविणाऱ्या आहेत.

## भोजनादिविघातदोष.

शरीरेजायतेनित्यंवांछानृणांचतुर्विधा ॥ बुभुक्षाचपिपासाच

सुषुप्सासुरतस्पृहा ॥ भोजनेच्छाविघातात्स्यादंगमर्दोरुचिश्र

मः ॥ तंद्रालोचनदौर्बल्यंधातुदाहोबलक्षयः ॥ विघातेनपि

पासायाःशोषःकंठास्ययोर्भवेत् ॥ श्रवणस्यावरोधश्चरक्तशो

षोहृदिव्यथा ॥ निद्राविघाततोजृंभाशिरोलोचनगौरवं ॥

अंगमर्दस्तथातंद्रास्याद्न्नापाकएवच ॥

**अर्थ**–मनुष्याला. भोजन, प्राशन, निद्रा, सुरत, अशा चारप्रकारच्या इच्छा होतात त्यांत भोजनेच्छेचा विघात झाला असतां अंगमर्द, अरुची, श्रम, झांपड, नेत्रांनां दुर्बलपणा, धातूचा दाह, बलाचा क्षय; आणि तृषेचा विघात झाला असतां. गळा,तोंड सुकतात, कर्णरोध, रक्तशोष, ह्रदयाचेठांयी व्यथा, आणि निद्राविघात झाला असतां जांभ-या, व मस्तक, नेत्र यानां जाडथता, आंगमोडे, झांपड, अन्नाचा आविपाक हे विकार होतात.

बुभुक्षितोनयोश्नातितस्याहारेंधनक्षयात् ॥ मंदीभवतिकाया ग्निर्यथाचाग्निर्निरिंधनः ॥ आहारंपचतिशिखीदोषानाहारव र्जितःपचति ॥ दोषक्षयेचधातून्पचतिचधातुक्षयेप्राणान् ॥

**अर्थ**–मनुष्याला भूक लागल्यावर भोजन न मिळाले तर, आहाररूप इंधन नस. ल्यामुळें जठराग्नि मंद होतो. जसा काष्ठहीन अग्नी,आणि अग्नीला आहार मिळाला ह्मणजे त्याला पचन करितो. तो नमिळाला ह्मणजे कफादिक दोषानां पचवितो, ते दोष संपले ह्मणजे धातूनां पचवितो, नंतर प्राणाला पचवितो.

## आहारगुण.

आहारःप्रीणनःसद्योबलकृद्देहधारणः ॥
स्मृत्यायुःशक्तिवर्णौजःसत्वशोभाविवर्धनः ॥

**अर्थ**–प्राणिमात्राला आहार हा संतुष्ट करणारा, देहधारक, व बल, स्मृति, आयुष्य शक्ति, वर्ण, तेज, सत्व, आणि शोभा यानां वाढविणारा आहे.

## भोजनविधान.

यथोक्तगुणसंपन्नमुपसेवेतभोजनं ॥ विचार्यदोषकालादीन्का लयोरुभयोरपि ॥ सायंप्रातर्मनुष्याणामशनंश्रुतिनोदितं ॥ नांतराभोजनंकुर्यादग्निहोत्रसमोविधिः ॥

**अर्थ**–मनुष्यानें प्रातःकाळीं व सायंकाळीं, दोष व काल यांचा विचार करून जे शास्त्रामधें गुण सांगितले ते पाहून भोजन करावें. दोनप्रहरीं व रात्रीं भोजन करण्याला वेदांची आज्ञा आहे. या दोनवेळां वांचून मध्यें भोजन करूनये. ह्मणजे अग्निहोत्राचेंफल प्राप्त होतें.

## भोजनकाळ.

याममध्येनभोक्तव्यंयामयुग्मंनलंघयेत् ॥ याममध्येरसोत्पत्ति र्यामयुग्माद्बलक्षयः ॥ क्षुत्संभवतिपक्केपुरसदोषमलेषुच ॥ का लेवायदिवाकालेसोन्नकालउदाहृतः ॥

अर्थ—प्रहरांत दोनवेळ जेउंनये, आणि दोनप्रहर पर्यंत उपाशीं राहूंनयें. पाहिल्याप्रहरांत भोजन न केल्यानें रस चांगले उत्पन्न होतात; व दोनप्रहरी भोजन न केल्यानें बलक्षय होतो, आणि रस, दोष, व मल. हे पक्क झाले असतां चांगली क्षुधा उत्पन्न होये. ती कोणतेही वेळेस होऊ. तो भोजनाचा समय सांगीतला आहे.

## रसादिक जिरल्याचें ज्ञान.

उद्गारशुद्धिरुत्साहोवेगोत्सर्गोयथोचितः ॥
लघुताक्षुत्पिपासाचयदाकालःसभोजने ॥

अर्थ—चांगलेढेकर, उत्साह, मलमूत्र वेगाने चांगलें स्वच्छ होतात; देहाला हलकेपणा क्षुधा, ताहान, हीं जाकालीं होतील तो भोजनाचा काळ जाणावा.

## भोजनस्थान.

आहारंतुरहःकुर्यान्निर्हारमपिसर्वदा ॥ उभाभ्यांलक्ष्म्युपेतः स्यात्प्रकाशेन्हीयतेश्रिया ॥ आहारनिर्हारविहारयोगाःसदैव सद्भिर्विजनेविधेयाः ॥

अर्थ—मनुष्यानें भोजन व शौच हीं एकांतीं करावीं. हीं दोन्हीं एकांतीं केलीं असतां मनुष्य लक्ष्मीयुक्त होतो; व तींच उघडयावर केलीं तर अलक्ष्मी कारक होतात; याकरितां आहार, मलोत्सर्ग, स्त्रीसंभोग हे सदासार्वकाल शाहण्यानीं एकांतीं करावे.

## भोजन जाणी पाहूनयें ते सांगतो.

हीनदीनक्षुधार्तानांपापपाखंडरोगिणां ॥
कुक्कुटाहिशुनांदृष्टिर्भोजनेनैवशोभना ॥

अर्थ-हलका, भिकारी, क्षुधित, पापी, पाखांडी, रोगी, कोंबडे, सर्प, कुतरा, यांची दृष्टी भोजनावर पडली तर चांगली नाहीं.

## जाणीं भोजन पाहावें ते.

पितृमातृसुहृद्वैद्यपाककृद्धंसबर्हिणां ॥
सारसस्यचकोरस्यभोजनेदृष्टिरुत्तमा ॥

अर्थ—पिता, आई, सोयरे, वैद्य, पाककर्ता, हंस, मोर, सारस, आणि चकोर, यांची दृष्टी भोजनावर पडलीं असतां उत्तम आहे.

## दुष्टानी अन्न पाहिल्यास शांती.

अन्नंब्रह्मरसोविष्णुर्भोक्तादेवोमहेश्वरः ॥ इतिसंचित्यभुंजानं दृष्टिदोषोनविद्यते ॥ अंजनीगर्भसंभूतंकुमारंब्रह्मचारिणं ॥ दृष्टिदोषविनाशायहनूमंतंस्मराम्यहं ॥

**अर्थ**-अन्नरस हा ब्रह्मरूप आहे, याचा भोक्ता महेश्वरदेव आहे, असें मनानें चिंतन करून भोजन केलेंअसतां त्याला दृष्टिदोष होतनाहीं; तसेंच जो अंजनीगर्भाचेठाइं झाला; आणि कुमारपणापासून ब्रह्मचारी असा जो हनुमान, त्याचें दृष्टिदोषनाशार्थ स्मरण करून भोजन करावें.

## भोजनपात्रें प्रशस्त सांगतो.

दोषघ्नंदृष्टिदंपथ्यंहैमंभोजनभाजनं ॥ रौप्यंभवतिचक्षुष्यंपित्तघ्नंत्कफवातकृत् ॥ कांस्यंचबुध्दिदंरुच्यंरक्तपित्तप्रसादनं ॥ पैत्तलंवातकृद्रूक्षंशूलकृमिकफप्रणुत् ॥ आयसेकांतपात्रेचभोजनं सिध्दिकारकं ॥ शोथपांडुहरंबल्यंकामलापहमुत्तमं ॥ शैलजेमृन्मयेपात्रेभोजनंश्रीनिवारणं ॥ दारूद्भवंविशेषेणरुचिदं श्लेष्मकारिच ॥ पात्रंपत्रमयंरुच्यंदीपनंविषपापनुत् ॥ जलपत्रंतुताम्रस्यतदभावेमृदोहितं ॥ पवित्रंशीतलंपात्रंघटितंस्फाटिकेनयत् ॥ काचेनरचितंतद्वत्तथावैडूर्यसंभवं ॥

**अर्थ**-सोन्याचें भोजनपात्र दोषनाशक, चक्षुष्य, व पथ्य असें आहे; आणि रुप्याचें चक्षुष्य, पित्तनाशक व कफ वायू यानां करणारें आहे; आणि कांश्याचें बुध्दि व रुचि यानां देणारें, रक्तपित्त स्वच्छकरणारें आहे; आणि पितळ्याचें वातकारक, रुक्ष, व शूळ, कृमि, कफ याचें नाशक आहे; आणि लोखंडी व चुंबक यांचें सिद्धिकारक,व सूज, पांडुरोग यांचें नाशक. व बलकारक, व कामला नाशक आहे, आणि दगडाचें किंवा मातीचें लक्ष्मीनाशक आहे; आणि काष्ठाचें पात्र विशेषकरून रुचिदेणारें, कफकारक आहे; व पत्रावळीवर भोजन केलें असतां रुचिकारक, दीपन, विष, पातक यांचे नाशक आहे. पाणीपिण्याचें भांडें तांब्याचें किंवा मातीचें हितकारक आहे. स्फटिकाचें पात्र पवित्र व थंड आहे. काच व पोंवळें याचें पात्र गुणानीं स्फटिकासारिखें जाणावें.

## भोजनांत प्रथम खावें तें सांगतो.

भोजनाग्रेसदापथ्यंलवणार्द्रकभक्षणं ॥ अग्निसंदीपनंरुच्यंजिव्हाकंठविशोधनं ॥ लवणंसैंधवंज्ञेयंचंदनंरक्तचंदनं ॥ सैंधवंलवणंस्वादुदीपनंपाचनंलघु ॥ स्निग्धंरुच्यंहिमंवृष्यंसौक्ष्म्यंनेत्र्यं त्रिदोषघ्नत् ॥ आर्द्रकाभेदिनीगुर्वीतीक्ष्णोष्णादीपनीमता ॥ कटुकामधुरापाकेरूक्षावातकफापहा ॥

अर्थ–भोजनाचे पूर्वी मीठ व आलें भक्षण करावे ते पथ्यकर, अग्निदीपक, व रुचिकर, व जिव्हा आणि गळा यांचे शोधन करिते. वैद्यकामध्ये जेथे लवण सांगेल तेथे सैंधव घ्यावे. काढ्यांत चंदन सांगेल तेथे रक्तचंदन घ्यावा सैंधवमीठ, स्वादु, दीपक पाचक, लघु, स्निग्ध, रुचिकर, हिम, वृष्य, सूक्ष्म, नेत्रांला हितावह, आणि त्रिदोषनाशक आहे; तसेंच आलें मलभेदक, जड, तिखट, उष्ण, दीपन, कडू, पाककाळीं मधुर रूक्ष, असें आहे; आणि वायू, व कफ यांचा नाश करितें.

## भोजनक्रम सांगतो.

अश्नीयात्तन्मनाभूत्वापूर्वंतुमधुरंरसं ॥ मध्येम्ललवणौपश्चा
त्कटुतिक्तकषायकान् ॥ फलान्यादौसमश्नीयाद्दाडिमादीनिबु
द्धिमान् ॥ विनामोचाफलंतद्वद्वर्जनीयाचकर्कटी ॥ मृणाल
बिसशालूककंदेक्षुप्रभृतीनिच ॥ पूर्वमेवाहिभोज्यानिनतुभु
क्त्वाकदाचन ॥ गुरुपिष्टसमंद्रव्यंतंडुलान्पृथुकानपि ॥ न
जातुभुक्तवान्खादेन्मात्रांखादेद्बुभुक्षितः ॥

अर्थ–जेऊंबसले ह्मणजे प्रथम एकाग्र होऊन मधुर रस भक्षण करावा. भोजनाच्यामध्ये आंबट, व खारट हे रस भक्षावे, नंतर कडु, तिखट, तुरट, रस खावे. त्यामध्ये डाळिंब इत्यादिक फळे भक्षण करावीं; परंतु केळे, व काकडी यां वांचून, आणि मृणाल, बिस कमळकंद, ऊंस इत्यादिक भोजनाचे पूर्वीच खावे. भोजनकरून मग कधींहीं भक्षण करूं. नये. तसेंच जड पिठाचे पदार्थ, तांदुळांचे पदार्थ, व पोहे हे पदार्थ भोजन केल्यानंतर भक्षण करूनये. भूक लागली असेल तरच थोडे खावे.

घृतपूर्वंसमश्नीयात्कठिनंप्राक्ततोमृदु ॥ अंतेपुनर्द्रवाशीतुबला
रोग्येनमुंचति ॥ आदौद्रवंसमश्नीयात्तत्रांबुनपिबेद्बहु ॥ मध्ये
तुकठिनेभक्ष्येयथेष्टंशस्यतेजलं ॥ यद्यत्स्वादुतरंतद्धिविदध्या
दुत्तरोत्तरं ॥ भुक्त्वायत्प्रार्थ्यतेभूयस्तदुक्तंस्वादुभोजनं ॥

अर्थ–भोजनामध्ये पूर्वी रोटी इत्यादि कठिण पदार्थ घृताशीं खावे, नंतर मृदु भात वरण इत्यादि भक्षावी. आणि अंतीं पुनः ताक, दहि इत्यादिक खावीं. ह्मणजे बल, आरोग्य ही कधीं सोडीत नाहींत. पूर्वी जर द्रवपदार्थ भक्षण केले तर, फार पाणी पिऊंनये, आणि भोजनांत कठिण द्रव्य भक्षणसमयीं पाणी पाहिजे तितके प्यावे, आणि गोडपदार्थ अंतीं भक्षण करावे. ज्या द्रव्याची पोटभरल्यावर ही इच्छा राहाते त्याला गोड ह्मणावे.

## मधुरअन्नाचे गुण.

सौमनस्यंबलंपुष्टिमुत्साहंरसनासुखं ॥
स्वादुसंजनयत्यन्नमस्वादुचविपर्ययं ॥

**अर्थ**—गोडपदार्थ मनाला आनंद, बल, पुष्टि, उत्साह, आणि जिव्हेला सुख करितात; आणि कडुपदार्थ या गुणाचे विपरति होतात.

## योग्यायोग्य अन्नें सांगतो.

अत्युष्णान्नंबलंहंतिशीतंशुष्कंचदुर्जरं ॥ अतिक्लिन्नंग्लानिकरंयुक्तियुक्तंहिभोजनं ॥ अतिद्रुताशिताहारोगुणान्दोषान्नाविंदति ॥ भोज्यंशीतमत्द्वेष्यंचस्याद्विलंबितमश्नतः ॥

**अर्थ**—अतिकढत अन्न भक्षण केलें असतां बलनाश करितें; व शीत शुष्क अन्न दुर्जर होतें, अतिजलद भक्षण केलेलें अन्न ग्लानि करितें, त्यापासून गुण व दोष होत नाहींत; आणि फारवेळ भक्षण करीतराहिलें असतां तें अन्न थंड अप्रिय असें होतें.

## गुरुअन्न तिनप्रकारचें; व आहाराचे साहाप्रकार ते सांगतो.

मंदानलोनरोद्रव्यमात्रागुरुविवर्जयेत् ॥ स्वभावतश्चगुरुयत्तथासंस्कारतोगुरु ॥ मात्रागुरुस्तुमुद्रादिर्माषादिःप्राकृतोगुरुः ॥ संस्कारगुरुपिष्टान्नंप्रोक्तमित्युपलक्षणं ॥ आहारंषड्विधंचोष्यंपेयंलेह्यंतथैवच ॥ भोज्यंभक्ष्यंतथाचर्व्यंगुरुविद्याद्यथोत्तरं ॥

**अर्थ**—मंदाग्नी व ज्वरी रोग्यानें बहुतअन्न भक्षण करूनये, तें जड होतें, एक स्वभाववत: जड मुग आदिकरून, तसेंच संस्कारानें जड पिष्टान्नादि, मानानें उडिद जड हे गुरुद्रव्यांचें उपलक्षण सांगीतलें, आहार साहाप्रकारचा ते प्रकार एकाहूनएक पुढेंपुढें जड आहेत, उंस डाळिंब इत्यादिक चोष्य, पेय, पन्हें, साकरपाणी इत्यादि, लेह्य रसाला कथिता इत्यादि, भोज्य वरणादि, भक्ष्य लाडु, मांडे इत्यादि, चर्व्य पोहे, हरभरे इत्यादि जाणावे.

## गुरुआदिअन्नाचें परिमाण.

गुरूणामर्धसौहित्यंलघूनांतृप्तिरिष्यते ॥ द्रवोद्रवोत्तरश्चापिनमात्रागुरुरिष्यते ॥ पेयलेह्यादिभक्ष्याणांगुरुविद्याद्यथोत्तरं ॥ द्रवाद्यमपिशुष्कंतुसम्यगेवोपपद्यते ॥

**अर्थ**–जडान्न अर्धपोटी भक्षण करावें; आणि लघ्वन्न जें मुग आदिकरून तें प्रमाणानें तृप्तिपर्यंत भक्षण करावे, आदि पेज इत्यादि प्राशन करून नंतर तक्रादि फार भक्षण केले तत्रापि त्यांची मात्रा फार मानूनये, पिण्याचे पदार्थ सर्व लघु आहेत पेय, व लेह्य इत्यादि भक्षण्यामध्ये उत्तरोत्तर सांगीतलेले जड जाणावे, पातळ पदार्थाबरोबर शुष्कपदार्थ चांगले पचन होतात.

## शुष्कान्नभक्षणीं दोष-

विशुष्कमन्नमभ्यस्तंनपाकंसाधुगच्छति ॥
शुष्कंविरुद्धंविष्टंभिवन्हिव्यापादमावहेत् ॥

**अर्थ**–सुकेंअन्न वारंवार भक्षण केलेंअसतां चांगलें पचन होतनाहीं; आणि सुकेंअन्न, विरुद्धान्न, व विष्टंभकारकअन्न अग्निमांद्य करितें.

## अग्नी चारप्रकाचा सां०

मंदस्तीक्ष्णोविषमसमश्चवन्हिश्चतुर्विधःपुंसां ॥
लघुमंदेगुरुतीक्ष्णेस्निग्धंविषमेसमेसमंभोज्यं ॥

**अर्थ**–मंद, तीक्ष्ण, अतिविषम, सम, असे चारप्रकारचे अग्नि आहेत; ह्मणून लघुअन्न मंदाग्नीला; आणि जड अन्न तीक्ष्णाग्निला, व स्निग्ध अन्न विषमाग्निला द्यावें; आणि समाग्निला सम भोजन द्यावें.

## भोजनीं नियम.

भुंजानोनबहुब्रूयान्ननिंदेदपिकंचन ॥
जुगुप्सितकथांनैवश्रृणुयादपिवावदेत् ॥

**अर्थ**–जेवीतअसतां फार बोलूनये; व कोणाची निंदाहि करूनये; आणि निंद्यकथाश्रवण करूनये, व आपणही बोलूनये.

## सक्तुभक्षणप्रकार.

नभुक्त्वानरदैश्छित्वाननिशायांनवाबहून् ॥ नजलांतरितान्न द्विःसक्तूनद्यान्नकेवलान् ॥ पुनर्दानंपृथक्पानंसामिषंपयसा निशि ॥ दंतच्छेदनमुष्णंचसप्तसक्तुषुवर्जयेत् ॥

**अर्थ**–सातु हे भोजन केल्यानंतर, दांतांनीं चाऊन, रात्रौ, पुष्कळ, पाण्यात घोळवून, किंवा केवल सातूच, खाऊंनयेत, सातु खाऊन पुनः सातूचें भक्षण, पुनः प्राशन, रात्रीं, मांस व दूध याशी, दांतानीं चाऊन, कढत, हे सातप्रकार सक्तुभक्षणकरणारानें वर्जावे.

## विषमभोजनाचें लक्षण.

बहुस्तोकमकालेवाज्ञेयंतद्विषमाशनं

अर्थ—अकाळीं, फार, किंवा थोडे, भोजनाला विषमाहार ह्मणावें.

## फार; किंवा थोड्या भक्षणाचें दोष.

आलस्यगौरवाटोपशद्वांश्चकुरुतेभृशं ॥
हीनमात्रंतनोःकार्श्यंकरोतिचबलक्षयं ॥

अर्थ—बहुतअन्न भक्षण केलें असतां आळस, जडपणा, पोटांत गुडगुडशद्व हे होतात, तेंच कमी भक्षण केलें असतां शरीराला कृशता; आणि बलाचा क्षय, होतो.

## अकाळीं भोजनाचे दोष.

अप्राप्तकालेभुंजानोह्यसमर्थतनुर्नरः ॥ तांस्तान्व्याधीनवाप्नोतिमरणंचाधिगच्छति ॥ कालेतीतेश्चतोजंतोर्वायुनोपहतेनले कृच्छ्राद्विपच्यतेभुक्तंनस्याद्भोक्तुंपुनःस्पृहा ॥ रसेनान्नस्यरसनाप्रथमेनोपतर्पिता ॥ नतथास्वादमाप्नोतिततःसेव्यंतुनांतरा ॥

अर्थ—भोजनकाल प्राप्तहोण्याचे पूर्वी भोजन केलें असतां दुर्बल होतो; व शिरोव्यथा अतिसार विलंबिका अलसक इत्यादि अनेक व्याधि होतात; व त्या व्याधि शांत नझाल्या तर मरणाहि येतें; आणि भोजनकाळ निघून गेल्यावर भोजन केलें असतां, वायूचा कोपानें अग्नी मंद होतो, आणि भक्षण केलेलें अन्न संकटानें पचन होतें, व पुनः भोजनाची इच्छा होतनाहीं, जीभ प्रथम अन्नरसानें तृप्त होत्ये, तशी इतर पदार्थांनीं तृप्त होतनाहीं, याकरितां एक पदार्थाबरावर दुसरा पदार्थ सेऊनये.

## भोजनाचें; व उदकाचें प्रमाण.

कुक्षेर्भागद्वयंभोज्यैस्तृतीयेवारिपूरयेत् ॥ वायोःसंचारणार्थाय चतुर्थमवशेषयेत् ॥ अत्यंबुपानान्नविपच्यतेन्नमनंबुपानाच्च सएवदोषः ॥ तस्मान्नरोवन्हिविवर्धनायमुहुर्मुहुर्वारिपिवेद भूरि ॥ भुक्तस्यादौजलंपीतंकार्श्यमंदाग्निदोषकृत् ॥ मध्येग्नि दीपनंश्रेष्टंअंतेस्थौल्यकफप्रदं ॥

अर्थ—मनुष्यानें कुशीचे दोनभाग अन्नानें पूर्ण करावे; व तिसराभाग पाण्यानें पूर्ण करावा; आणि चवथाभाग वायुसंचारार्थ रिकामा राहूंद्यावा, फार पाणी प्यालें असतां अन्न पचन होतनाहीं, याकरितां अग्निवृध्यर्थ थोडथोडें वारंवार पाणी प्यावें, भोजनाच्या पूर्वी पाणी प्यालें असतां कृशपणा, मंदाग्नी यानां करितें; भोजनामध्यें प्राशन केलें असतां अग्नीला प्रदीप्त करितें, व भोजनाचे अंती पाणी प्यालें असतां स्थूलता, व कफ यानां करितें

तृषितस्तुनचाश्नीयात्क्षुधितोनजलंपिबेत् ॥
तृषितस्तुभवेद्गुल्मिक्षुधार्तस्तुजलोदरि ॥

अर्थ—ताहान लागली असतां भोजन करूनये; आणि क्षुधा लागली असतां पाणी-पिऊंनये, जर ताहान लागली असतां जेवला तर गुल्म होतो; आणि क्षुधेवर पाणी प्यालें असतां जलोदर होतें.

## भोजनांती दूध पिण्याची शंकासमाधान.

त्रिधाविभक्तस्यभोजनकालस्यप्रथमःकालोवातस्य द्वितीयः पित्तस्य तृतीयःकफस्यअतःपूर्वंभुक्तोमधुरोरसोवायोशमको भवतिमध्येभुक्तौअम्ललवणौपित्ताशयेवन्हिवृद्धिंकुरुतः अंतेभुक्ताःकटुतिक्तकषायरसाःकफंशमयंति दुग्धंस्वादुरसंस्निग्धंश्लेष्मलंगुरुशीतलं ॥ पयसःअंतेकफजनकत्वात्कथंमंतेपिबेत् ॥ उच्यतेविदाहीन्यत्रपानानियानिभुंक्तेहिमानवः ॥ तद्विदाहप्रशांत्यर्थंभोजनांतेपयःपिबेत् ॥ लवणाम्लकटूष्णानि विदाहीन्यत्तियानितु ॥ तद्दोषंहर्तुमाहारंमधुरेणसमापयेत् ॥

अर्थ—भोजनामध्यें तीनकाळ आहेत. ते असे, भोजनाच्या आरंभी वायूचा, मध्यें पित्ताचा; आणि अंतीं कफाचा काळ असे असतांत भोजनाच्या पूर्वीं मधुररस भक्षण केला असतां वायूला शमवितो, व भोजनाच्या मध्यें आंबट व मीठ हे अग्निदीप्त करितात; आणि भोजनाचे अंती कटु तिक्त कषायरस कफाला शमवितात; आणि दुग्ध हें गोड, स्निग्ध, कफकारक, जड, थंड असें असतां भोजनांतीं दुग्धप्राशन कांसांगीतलें? समाधान, मनुष्य-भोजनामध्यें विदाह करणारी अशीं जीं अन्नें व पानें भक्षण करितो, त्याचा दाह शांत होण्याकरितां भोजनाचे अंतीं दुग्ध प्राशन करावें, व खारट, आंबट, कडू, उष्ण, आणि दाहकारक जीं अन्नें व पानें भक्षण करितो, त्या दोषांचा शांतीकरितां आहाराची-समाप्ती मधुररसानें करावी, असें सांगीतलें आहे याकरितां भोजनांतींच दुग्ध प्राशन करावें.

जग्धाःसर्वेपिगच्छंतिबलिनोवश्यतांरसाः ॥
यथाप्रकुपितादोषावशंयांतिबलीयसः ॥

अर्थ—संपूर्ण भक्षण केलेल्या रसांत जो अधिक रस असेल त्याचे गूण होतात. जसे कुपितदोष, बलवान दोषाचे स्वाधीन राहतात.

## आचमनविधी.

एवंभुत्कासमाचामेद्दंतग्रहणपूर्वकं ॥ भोजनेदंतलग्नानिनिर्हृ
त्याचमनंचरेत् ॥ दंतांतरगतंचान्नंशोधनेनाहरेच्छनैः ॥ कु
र्यादनिर्हृतंतद्धिमुखस्यानिष्टगंधतां ॥ दंतलग्नमनिर्हार्यलेपं
मन्येतदंतवत् ॥ नतत्रबहुशःकुर्याद्यत्नंनिर्हरणंप्रति ॥

अर्थ–याप्रमाणें भोजन केल्यानंतर हात व तोंड धुवावें. भोजनामध्यें दांतांत जें अन्न अडकलें असेल तें काढून चूळ भरावी. दंताला भोजनामध्यें लागलेलें अन्न हळूच शोधून काढावें. नकाढलें तर तोंडाला दुर्गंध उत्पन्न होईल; आणि जें अन्न दंतांत अडकलेलें निघतनाही, तें दांतासारिखेंच जाणावें. त्याला काढण्याविषयीं फार प्रयत्न करूंनये.

आचम्यजलयुक्ताभ्यांपाणिभ्यांचक्षुषीस्पृशेत् ॥ भुक्त्वापाणित
लेघृष्ट्वाचक्षुषोर्दीयतेयादि ॥ अचिरेणैवतद्वारितिमिराणिव्यपोहति ॥

अर्थ–आचवल्यानंतर आचमन करून हातानीं नेत्रांला स्पर्शकरावा; आणि हाताचे तळव्यानें पाणी चोळून नेत्रांत घातलेंअसतां त्या पाण्यानें लवकर तिमिररोग नाहींसा होतो.

## भोजनोत्तर कृत्य सांगतो.

भुत्काचसंस्मरेन्नित्यमगस्त्यादीन्सुखावहान् ॥ विष्णुरत्तात
थैवान्नंपरिणामश्चवैयथा ॥ सत्येनतेनमेभुक्तंजीर्यत्वन्नमिदं
तथा ॥ अगस्तिरग्निर्वडवानलश्चभुक्तंममान्नंजरयंत्वशेषं ॥
सुखंचमेतत्परिणामसंभवंयच्छंत्वरोगंममचास्तुदेहं ॥ अंगार
कमगस्तिंचपावकंसूर्यमश्विनौ ॥ यश्चैतान्संस्मरेन्नित्यंभुक्तंत
स्याशुजीर्यति ॥

अर्थ–भोजन झाल्यानंतर अगस्ती आदिकरून जे सुखावह त्यांचें स्मरण करावें; आणि विष्णू भोजनकर्ता तसेंच अन्नही विष्णू, व त्या अन्नाचा जो परिणाम तोही विष्णू हे सत्यरूप आहे, ह्मणून सत्यानें माझें भक्षण केलेलें अन्न जिरो; आणि अगस्ति अग्नि, वडवानळ, हे मी भक्षण केलेलें अन्न जिरऊत; आणि अन्नाचे परिणामापासून जें सुख तें मला देऊत, व माझा देह निरोगी करोत; अथवा मंगळ, अगस्ति, अग्नि, सूर्य अश्विनीकुमार यांचें जो नेहमी स्मरण करितो, त्याचें भोजन लवकर जिरतें.

इत्युच्चार्यस्वहस्तेनपरिमार्ज्यतथोदरं ॥ अनायासप्रदायीनि
कुर्यात्कर्माण्यतंद्रितः ॥ जागृतस्तिष्ठेत् ॥ कुतः भुक्तमात्रस्यतु
स्वप्नाद्धंत्यग्निंकुपितःकफः ॥ इतिवचनात् ॥

अर्थ–वर सांगीतल्याप्रमाणें स्मरण करून पोटावरून हात फिरवावा; आणि आयास न देणारीं कर्में निरालस्य होऊन करावीं. भोजनोत्तर झोप घेऊंनये. जेवल्यानंतर लागलीच निद्रा केली असतां कफ कोपून अग्नीचा नाश करितो.

## भोजनोत्तर केव्हां कोणते दोष वाढतात तें सांगतो.

जीर्णेन्नेवर्धतेवायुर्विदग्धेपित्तमेधते ॥

भुक्तमात्रेकफश्चापिक्रमोयंभोजनोपरि ॥

अर्थ–अन्न जिरलें ह्मणजे वायू वाढतो, आणि अन्न जिरतेवेळेस पित्त वाढतें, व जेवल्या नंतर लागलाच कफ वाढतो. हा क्रम भोजन झाल्यावर जाणावा.

## भोजनोत्तर कफप्रतिकार सांगतो.

धूमेनापोह्यत्दृद्यैर्वाकषायकटुतिक्तकैः ॥ पूगकर्पूरकस्तूरिलवं गसुमनःफलैः ॥ फलैःकटुकषायैर्वामुखवैशद्यकारिभिः ॥तांबु लपत्रसहितैःसूगंधैर्वाविचक्षणः ॥

अर्थ–अगरू इत्यादिकांचे धूमानें; अथवा प्रिय, तुरट, कडू, तिखट, यारसांनी, सुपारी, कापूर, कस्तुरी, लवंग, जायफळ, इत्यादिकानी; अथवा कडू, तुरट, व जों कांहीं मुखाला स्वच्छ करणारीं फळें; अथवा तांबूलपत्रासहित सुगंध पदार्थ यांणीं भोजनानंतर वाढलेल्या कफाचा नाश करावा.

## तांबूलभक्षणाचे गुण.

रतेसुप्तोत्थितेस्नातेभुक्तेवांतेचसंगरे ॥ सभयांविदुषांराज्ञांकुर्या त्तांबूलचर्वणं ॥ तांबूलमुक्तंतीक्ष्णोष्णंरोचनंतुवरंसरं ॥ तिक्तंक्षारो षणंकामरक्तपित्तकरंलघु ॥ वश्यंश्लेष्मास्यदौर्गंध्यमलवातश्रमा पहं ॥ मुखवैशद्यसौगंध्यकांतिसौष्टवकारकं ॥ हनुदंतमलध्वं सिजिव्हेंद्रियविशोधनं ॥ मुखप्रसेकशमनंगलामयविनाशनं ॥

अर्थ–रतिकाळीं, निजून उठल्यावर, स्नान केल्यावर, भोजनकेल्यावर, वांतीझाल्यावर, युद्धामध्यें, राजे किंवा पंडित यांचा सभेमध्यें, तांबूल भक्षण करावें, तें तांबूल तीक्ष्ण, उष्ण, रुचिकर, सारक, कडु, खारट, तिखट, आहे; आणि काम, रक्तपित्त, यानां करणारें व लघु, वशकारक असें आहे; आणि मुखदुर्गंध, मल, वायू, श्रम यांचा नाश करितें; आणि मुखाची स्वच्छता, सुगंधिता, कांति याना करणारें आहे; आणि हनुवटी, दंत, यांचे मलाचा नाश करितें, व जिव्हेंद्रियाला शोधन करितें, व तोंडांतील फार लाळसुटणे, गलरोग यांचा नाश करितें.

नवंतदेवमधुरंकषायानुसरंगुरु ॥ बलासजनकंप्रायःपत्रशाक गुणंस्मृतं ॥ पर्णपुराणमकटुक्षुल्लकंतनुपांडुरं ॥ विशेषाद्गुणवत् ज्ञेयंअन्यद्धीनगुणंमतं ॥ पूगंगुरुहिमंरूक्षंकषायंकफपित्तनुत् ॥ मोहनंदीपनंरुच्यंआस्यवैरस्यनाशनं ॥

**अर्थ**–पानवेलीचें पान नवे असतां मधुर, तुरट, सारक, गुरु आहे; आणि प्रायः कफकारक पत्रशाकेसारिखे आहे, तेंच जून असलें तर तिखट नसतें. लहान, पातळ, पांढरें असतें, तें विशेषगुण करितें; आणि कोंवळें हनिगूण असतें, सुपारि जड, हिम, रूक्ष; व तुरट आहे; कफ पित्त यांची नाशक, व मोहक, दीपन, वृष्य; आणि मुखाची अरुची घालविणारी आहे.

पूगंस्यात्दृढमध्यंयत्स्विन्नंवा।पित्रिदोषनुत् ॥ सरसंगुर्वभिष्यं दितद्भ्रंशंवन्हिनाशनं ॥ खदिरःकफपित्तघ्नश्चूर्णंवातबलासनुत् ॥ संयोगतस्त्रिदोषघ्नंसौमनस्यंकरोतिच ॥ मुखवैशद्यसौगंध्यकांतिसौष्टवकारकं ॥

**अर्थ**–सुपारी, मध्यम जून व शिजवून तयार केलेली ती त्रिदोष नाशक, सारक, जड, लालगाळीवणारी व अत्यंत अग्नि नाशक आहे; आणि कात कफ, पित्त यांचा नाश करितो; व चुना वातकफनाशक आहे, हे पदार्थ संयोगानें त्रिदोषघ्न, आनंदकारक, मुखस्वच्छताकरक, व सुगंध; आणि सुंदरपणा यानां करणारे आहेत.

## पर्णभक्षण.

आयुरग्रेयशोमूलेलक्ष्मीर्मध्येव्यवस्थिता ॥ तस्मादग्रंतथामूलं मध्यंपर्णस्यवर्जयेत् ॥ पर्णमूलेभवेद्व्याधिःपर्णाग्रेपापसंभवः ॥ चूर्णपत्रंहरत्यायुःशिराबुद्धिविनाशिनी ॥

**अर्थ**–पानाच्या अग्रभागीं आयुष्य, मूळाचेठायीं यश, मध्यभागीं लक्ष्मी राहाते. याकरितां पानाचे मूल, मध्य, अग्र, हीं भक्षण करूंनयेत. पानाचे मूळ भक्षण केलें, तर व्याधी होते. अग्र भक्षण केलें असता पाप लागतें, व चुरलेलेपान भक्षण केलेंअसतां आयुष्य नाश होतो, व शिरा भक्षण केल्याअसतां बुद्धीचा नाश करितात.

आद्यंविषोपमंपीकंद्वितीयंभेदिदुर्जरं ॥ तृतीयादितुपातव्यंसुधातुल्यंरसायनं ॥

**अर्थ**–विडा चाऊन त्याची प्रथमपिंक टाकावी. ती विषासारिखी मारक आहे; कारण दुसरी पिंक रेचक, व दुर्जर आहे;आणि तिसरी पिंक टाकूनये ती गिळूनजावी. ती अमृततुल्य हितकारक व जराव्याधि यांची नाशक आहे.

## तांबूलनिषेध.

तांबूलं नातिसेवेत नविरिक्तो बुभुक्षितः ॥ देहदृक्केशदंताग्निश्रोत्रवर्णबलक्षयः ॥ शोषः पित्तानिलास्रस्यादतितांबूलभक्षणात् ॥ तांबूलं न हितं दंतदुर्बलेक्षणरोगिणां ॥ विषमूर्छामदार्तानां क्षात नां रक्तपित्तिनां ॥

अर्थ–जाला रेच झाले, व भूक लागली, त्यांणीं तांबूल भक्षण करूंनये. केलें असतां देह, दृष्टी, केश, दंत, अग्नि, कान, कांति, आणि बल यांचा क्षय होतो. व शोष, पित्त,वात रक्त, हे विकार होतात; आणि ज्यांचे दांत दुर्बल, व नेत्ररोग, विष, मूर्छा, मद. यांणीं पीडित, उरःक्षती, व रक्तपित्ती यांला तांबूल हित करीत नाहीं.

## शतपदी.

भुक्त्वा शतपदीं गच्छेच्छनैस्तेनतु जायते ॥ अन्नसंघातशैथिल्यं ग्रीवाजानुकटीसुखं ॥ भुक्त्वोपविशतस्तुंदं शयानस्यतु पुष्टता ॥ आयुश्चंक्रममाणस्य मृत्युर्धावति धावतः ॥

अर्थ–भोजनानंतर हळूहळू शतपदी करावी, त्याणें अन्न शिथिल होतें; आणि मान, मांड्या, कंबर, यानां सुख होतें. जेऊन लागलाच बसतो त्याचें पोट सुटतें. निजला असतां पुष्टता येते फिरलें असतां आयुष्य वाढतें; आणि भोजनोत्तर लागलाच धांवतो त्याचा मृत्यूच धांवतो असें जाणावें.

## शयनक्रम.

श्वासानष्टौसमुत्तानस्तान्द्विःपार्श्वेनुदक्षिणे ॥ ततस्तुद्विगुणान्वामेपश्चात्सुप्याद्यथासुखं ॥ वामदिशायामनलोनाभेरूर्ध्वोस्तिजंतूनां ॥ तस्मात्तुवामपार्श्वेशयीतभुक्तप्रपाकार्थं ॥

अर्थ–जेऊन उठल्यानंतर आठ श्वास होत तोंपर्यंत उताणें निजावें; नंतर दक्षिण-कुशीवर सोळाश्वास होतो तोंपर्यंत निजावें; नंतर वामकुक्षीवर बत्तीस श्वास होत तोंपर्यंत निजून; नंतर पाहिजे तसें शयन करावें. जंतूंचा वामभागीं नाभिवर आमस्थान आहे, याकरितां भोजनकेलेलें जिरण्याकरितां डाव्याकुशीवर शयन करावें.

## खट्वादिगुण.

त्रिदोषशमनीखट्वातूलीवातकफापहा ॥ भूशय्याबृंहणीवृष्याकाष्ठपट्टीतुवातला ॥ अन्यमते भूशय्यावातलातीव रूक्षापित्तास्रनाशिनी ॥

अर्थ–खाटेवर निजलें असतां त्रिदोषनाश होतो; आणि गादीवर वायू व कफ यांचा नाश होतो. व भूशय्या स्थूलता करित्ये; आणि लांकडाचे फळीवर निजलें तर वायु कोपतो, अन्यमत भूशय्या वातकर, रुक्ष, व रक्तपित्त यांचा नाश करित्ये.

## शय्या व पादसंवाहन.

सुशय्याशयनंहृद्यंपुष्टिनिद्राधृतिप्रदं ॥ श्रमानिलहरंवृष्यंवि-
परीतमतोन्यथा ॥ संवाहनंमांसरक्तत्वक्प्रसादकरंपरं ॥ प्री-
तिनिद्राकरंवृष्यंकफवातश्रमापहं ॥

अर्थ–चांगले शय्येवर निजले असतां प्रियकारक, व पुष्टि, निद्रा, धैर्य यांतें करितें; आणि श्रम, वायू यांचा नाश करितें, आणि स्त्रीविषयीं आवड उत्पन्न करितें, ते असें नसेल, तर याहून विपरीत गुण करील, आणि पादसंवाहन हें मांस, रक्त, त्वचा यांनां स्वच्छ करितें, व प्रीती, निद्रा यास उत्पन्न करितें, आणि कफ, वायू, श्रम यांचा नाश करितें.

## निजल्यावर वायूनिषेध.

प्रवातंरौक्ष्यवैवर्ण्यस्तंभकृद्दाहपित्तनुत् ॥
स्वेदमूर्छापिपासाघ्नमप्रवातमतोन्यथा ॥

अर्थ–निजल्यावर वारा घेतलाअसतां तो रूक्ष आहे. व विवर्णता, स्तंभ, यांनां करितो, आणि दाह, पित्त, स्वेद, मूर्छा, ताहान यांचा नाश करितो, आणि वारा घेतला नाहीं तर याहून विपरीत गूण होतात.

## वायु घेण्यास काळ.

सुखंप्रवातंसेवेतग्रीष्मेशरदिचांतरा ॥
निर्वातमायुषेसेव्यंआरोग्यायचसर्वदा ॥

अर्थ–ग्रीष्मऋतु व शरदृतु यांचेठाई सुखानें वारा घ्यावा. वारा मनुष्यानें कधींहीं घेऊं नये, व घेतला तर सर्वकाळ आरोग्य होतो.

## दिशापरत्वें वायुगुण.

## पूर्वेच्या वाऱ्याचे गुण.

पूर्वोनिलोगुरुःसोष्णःस्निग्धःपित्तास्रदूषकः ॥ विदाहिवातलः
श्रांतिकफशोषवतांहितः ॥ स्वादुःपटुरभिष्पंदीत्वग्दोषार्शोमु-
खकृमीन् ॥ सन्निपातज्वरंश्वासमामवातंचकोपयेत् ॥

अर्थ–पूर्वेकडील वायू जड, उष्ण, स्निग्ध; आणि पित्त, व रक्त यानां कोपविणारा दाहक, वातकर असा आहे; व श्रमी, कफ झालेला, शोषी यानां हितावह, गोड, खारट पौष्टीक, त्वग्दोष, अर्श, दांतांतीलकिरडे, सन्निपातज्वर, श्वास, व आमवात यानां कोपवितो.

## दक्षिणवायुचे गुण.

दक्षिणःपवनःस्वादुःपित्तरक्तहरोलघुः ॥
वीर्येणशीतलोबल्यश्चक्षुष्योनतुवातलः ॥

अर्थ–दक्षिणेकडील वारा गोड, लघु, रक्तपित्ताचा नाशक, वीर्याने थंड, बलकारक, नेत्रांला हितावह असा आहे, व वाताला करित नाहीं.

## पश्चिमवायूचे गुण.

पश्चिमःपवनस्तीक्ष्णःशोषणोबलहृल्लघुः ॥
मेदपित्तकफध्वंसीप्रभंजनविवर्धनः ॥

अर्थ–पश्चिमेकडील वारा तीक्ष्ण, शोषक, बलहारक, लघु आहे; व मेद, पित्त, कफ, यांचा नाशक; आणि वायूला वाढविणारा असा आहे.

## उत्तरवायूचे गुण.

उत्तरोमारुतःशीतःस्निग्धोदोषप्रकोपकृत् ॥
क्लेदनःप्रकृतिस्थानांबलदोमधुरोमृदुः ॥

अर्थ–उत्तरेकडील वायू थंड, स्निग्ध, दोषाला कोपविणारा, वातप्रकृतीला ग्लानिकरणारा; आणि बलकारक, गोड, मृदु, असा आहे.

## अग्नेय व नैऋत्य दिशांकडील वायूचे गुण.

अग्नेयोदाहकृद्रूक्षोनैऋतोनचदाहकृत् ॥

अर्थ–अग्नेयीकडील वायू दाहकारक, रूक्ष असा आहे; आणि नैऋत्येकडील वायू दाह करित नाहीं.

## वायव्य व ईशान वायूचे गुण.

वायव्यस्तुभवेत्तिक्तऐशानःकटुकःस्मृतः ॥

अर्थ–वायव्येकडचा वायू कडू आहे, व ईशान्यदिशेचा वारा तिखट आहे.

## अनेकदिशांचा जौळीवायूचे गुण.

विष्वग्वायुरनायुष्यःप्राणिनांबहुरोगकृत् ॥
अतस्तंनैवसेवेतसेवितःस्यान्नशर्मणे ॥

अर्थ–जौळीवारा आयुष्यनाशक, व प्राण्याला अनेकरोग उत्पन्नकरणारा याकारितां तो घेऊनये. घेतलाअसतां सुख होत नाही.

## व्यजनवायूचे गुण.

व्यजनस्यानिलोदाहस्वेदमूर्छाश्रमापहः ॥ तालवृंतभवोवा तस्त्रिदोषशमकोमतः ॥ वंशव्यजनजस्तूष्णोरक्तपित्तप्रकोपनः ॥ चामरोवस्त्रसंभूतोमायूरोवेत्रजस्तथ ॥ एतेदोषाजितो वाताःस्निग्धाल्हृद्याःसुपूजिताः ॥

अर्थ–विंझण्याचा वारा दाह, घाम, मूर्छा, श्रम यांचा नाशक आणि ताडाचे पात्यांचा विंझण्याचा वारा त्रिदोषशामक आहे; व वेळवाचा विंझण्याचा वारा उष्ण, रक्तपित्ताला कोपवितो. आणि चंवरी, वस्त्र, मोरांचीं पिसें, वेत, यांपासून झालेला वारा त्रिदोषशामक, स्निग्ध, प्रिय, उत्तम आहे.

## दिवसा निद्रानिषेध.

दिवास्वापंनकुर्वीतयतोसौस्यात्कफावहः ॥
ग्रीष्मवर्ज्येषुकालेषुदिवा स्वापोनिषिध्यते ॥

अर्थ–दिवसांमध्यें निजूनये. निजलें असतां कफ होतो. व ग्रीष्मऋतूवांचून सर्व ऋतूंमध्यें दिवास्वापाला निषेध सांगितला आहे.

## दिवसा निजण्यास योग्य ते.

उचितोहिदिवास्वापोनित्यंयेषांशरीरिणां ॥ वातादयःप्रकुप्यंतितेषामस्वपतांदिवा ॥ व्यायामप्रमदाध्ववाहनरतान्क्लांतानतीसारिणःशूलश्वासवतस्तथापरिगतान्हिक्कामरुत्पीडितान ॥ क्षीणान्क्षीणकफान्शिशून्मदहतान्वृद्धांस्तथाजीर्णिनोरात्रौजागरितान्नरान्निरशनान्कामंदिवास्वापयत ॥

अर्थ–ज्यांणा दिवसांमध्यें निद्रा घेतली नाहीं तर वायू कोपतो. त्या प्राण्याला दिवास्वाप योग्य आहे. आणि व्यायाम, व स्त्रीसंग करणारा, मार्गामध्यें फिरणारा, वाहनावर बसणारा, ग्लान, अतिसारी, शूळी, श्वासी, हिक्की, वातरोगी, क्षीण, ज्याचा कफ क्षीण झाला तो, बालक, मादक पदार्थ भक्षण करणारा, वृद्ध, अजीर्णरोगी, रात्रीं जागलेला, आणि उपवासी यांनी दिवसांमध्यें यथेच्छ निजावें.

## निद्रास्वाधीनपणा.

दिवावायदिवारात्रौनिद्रासात्म्यंकृतातु यैः ॥
नतेषांस्वपतांदोषोजाग्रतांचोपजायते ॥

अर्थ-दिवसास किंवा रात्रीं जागीं निद्रा साम्य केली आहे. ते निजले तरी दोष नाहीं. न निजले असतां दोषकोप होतो.

## भोजनोत्तर निद्रागुण.

भोजनानंतरंनिद्रावातंहरतिपित्तकृत् ॥ कफंकरोतिवपुषः पुष्टिं सौख्यंतनोतिहि ॥ शयनंपित्तनाशायवातनाशायमर्दनं ॥ वमनंकफनाशायज्वरनाशायलंघनं ॥ आसीनघूर्णितंयत्तुना भिष्पंदिनलक्षणं ॥

अर्थ-भोजनानंतर निद्रा केली असतां, वायूचा नाश, व पित्त, व कफ यांना करिते, व शरीराला पुष्टि करिते. पित्तनाश करण्याकरितां निद्रा घ्यावी, आणि वायूचा नाश होण्याकरितां मर्दन करावें, व कफनाशार्थ वमन, ज्वरनाशार्थ लंघन प्रशस्त आहे; आणि बसून झोप घेतली असतां ती पक्की, व रूक्षता यांना करीत नाहीं.

## पोटांत अन्न चांगलें राहाण्याचें कारण.

शब्दान्स्पर्शांश्चरूपाणिरसान्गंधान्मनःप्रियान् ॥
भुक्तवानुपसेवेततेनान्नंसाधुतिष्ठति ॥

अर्थ-भोजनानंतर मनाला प्रिय असे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, यांचे सेवन करावें. म्हणजे अन्न उदरांत चांगलें राहतें.

## अन्नाचें वमन होण्यास हेतु सांगतात.

शब्दःस्पर्शस्तथारूपंरसोगंधोजुगुप्सितः ।
भुक्तमप्रयतश्चान्नमतिहास्यंचवामयेत् ॥

अर्थ-अप्रिय असे जे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, हे, आणि फार खाणें, व अतिहास्य हीं पुरुषाला ओकवितात.

## भोजनोत्तर आणखी वर्ज्य सांगतो.

शयनंचाशनंचातिनभजेन्नद्रवाधिकं ॥ नाग्न्यातपौनप्लवनंन यानंनाधिवाहनं ॥ व्यायामंचव्यवायंचधावनंयानमेवच ॥ युद्धंगीतंचपाठंचमुहूर्तंभुक्तवांस्त्यजेत ॥

अर्थ-अतिनिजणें, अतिखाणें, अतिद्रवरूप पदार्थांचें भक्षण, अग्नी, ऊन घेणें, पोहणें, यान, वाहन, व्यायाम, स्त्रीगमन, धांवणें, चालणें, युद्धकरणें, गाणें, आणि अध्ययन हीं जेवल्यानंतर एकमुहूर्त पर्यंत करूं नयें.

## अजीर्णाची कारणे.

अत्यंवुपानाद्विषमाशनाच्चसंधारणात्स्वप्नविपर्ययाच्च ॥ का
लेपिसात्म्यंलघुचापिभुक्तमन्नंनपाकंभजतेनरस्य ॥ ईर्ष्याभय
क्रोधपरिप्लुतेनलुब्धेनरुग्दैन्यनिपीडितेन ॥ विद्वेषयुक्तेनचसे
व्यमानमन्नंनसम्यक्परिपाकमेति ॥

अर्थ–अतिजलपान, भोजनावर पुनःभोजन, मलमूत्रादिकांचे वेगधारण, झोपेचाविपर्यास आणी अकाळीं नेहेमी जिरणारें थोडें जरी अन्न भक्षण केलें, तरी तें चांगलें पचन होतनाहीं; आणि ईर्ष्या, भय, क्रोध, यांणीं युक्त पुरुषानें लोभ्यानें, किंवा रोगी भिकारी द्वेषी यांणीं भक्षण केलेलें अन्न चांगलें पचन होतनाहीं.

## अध्यशनाचें लक्षण.

अजीर्णेभुज्यतेयत्तुतदध्यशनमुच्यते ॥

अर्थ–अजीर्ण झालेंअसतां त्यावर जें अन्न भक्षण केलें तें अध्यशन सांगितलें आहे.

## त्याचेंनिवारण.

प्राग्भुक्तेत्वनलेमंदेद्विरन्होनसमाहरेत् ॥ प्रातराशेत्वजीर्णेतु
सायमाशोनदुष्यति ॥ पूर्वभुक्तेविदग्धेन्नेभुंजानोहंतिपावकं ॥
सायमाशेत्वजीर्णेतुप्रातर्भुक्तंविषोपमं ॥

अर्थ–रात्रो भोजनाचें अजीर्ण झालेंअसतां, दिवसांत दोनवेळ भोजन करूंनये. रात्रींत सेच राहिलें तर लघुभोजन करावें. याविषयीं सुश्रुतमत. सायंकाळचे भोजनाचें अजीर्ण झालेंअसतां दुसरेदिवशीं जेवला तर अग्निनाश होतो, व रात्रीचे अजीर्णावर प्रातःकाळीं भोजन विषासारिखें होतें.

## रात्रीचा अजीर्णावर भोजनोपाय.

भवेद्यदिप्रातरजीर्णशंकातदाभयांनागरसैंधवाभ्यां ॥ विचू
र्णितांशीतजलेनभुक्त्वाभोक्ताह्यशंकोमितमन्नकाले ॥

अर्थ–जर प्रातःकाळीं अजीर्णाची शंका राहिली, तर बाळहरीतकी, सुंठ, सैंधव, यांचें चूर्ण थंडपाण्याशीं घ्यावें; आणि भोजनकाळीं मितभोजन करावें.

## दिवसास स्त्रीनिषेध.

आयुःक्षयभयाद्विद्वान्नान्हिसेवेतकामिनीं ॥ अवंशोयदिसेवे
ततदाग्रीष्मवसंतयोः ॥ आस्यावर्णकफस्थौल्यसौकुमार्य
सुखप्रदा ॥

अर्थ–विचारवंतानें. आयुष्याचा क्षय होईल याकारणास्तव दिवसाचे स्त्रीगमन करूंनये. जर इंद्रियाच्या स्वाधीन होऊन करणार तर ग्रीष्मऋतु, व वसंतऋतु यांचेठाई करावें; आणि उगाच बसणे हें कफ, स्थूलता, सुकुमारता, सुख, यांतें देणारें आहे.

## मार्ग सेवनाचे गुण.

अध्वावर्णकफस्थौल्यसौकुमार्यविनाशनः ॥ यत्तुचंक्रमणंना
तिदेहपीडाकरंभवेत् ॥ तदायुर्बलमेधाग्निप्रदामिंद्रियबोधनं ॥

अर्थ–मार्गचालणें हें कफ, स्थूलता, सुकुमारता, यांचा नाश करितें; आणि बागांत मौजेनें फिरणें हें देहाला पीडा देत नाहीं. व आयुष्य, बल, बुद्धि, अग्नि यांना वाढवितें; आणि इंद्रियें हुशार करितें.

## उष्णीषविधान.

उष्णीषंकांतिकृत्केश्यंरजोवातकफापहं ॥
लघुतच्छस्यतेयस्मात्गुरुपित्ताक्षिरोगकृत् ॥

अर्थ–पागोटें कांतिकारक, केशांना हितावह, रेज, वायू, कफ यांचा नाश करितें. तें हलकें असावें. तेंच जड असलें तर पित्त व नेत्ररोग यानां करितें.

## उपानहधारणगुण

उपानद्धारणंनेत्र्यमायुष्यंपादरोगहृत् ॥
सुखप्रचारमोजस्यंवृष्यंचपरिकीर्तितं ॥

अर्थ–पायांत जोडा किंवा वाहणा घालाव्या. त्या नेत्रांना हितावह, आयुष्यद; व पादरोग याचा नाश करितात; आणि सुखानें फिरणें होतें; व ओज वाढतें; आणि वृष्य ही आहेत.

## जोडा न घातल्यापासून विकार सांगतो.

पादाभ्यामनुपानद्भ्यांसदाचंक्रमणंनृणां ॥
अनारोग्यमनायुष्यमिंद्रियघ्नमदृष्टिदं ॥

अर्थ–पायांत जोडा घातल्या वांचून फिरणें हें रोगी, अल्पायु करितें; आणि इंद्रियें व दृष्टी यानां विकार करितें.

## छत्रधारणगुण.

छत्रस्यधारणंवर्षातपवातरजापहं ॥
हिमघ्नंहितमक्ष्णोश्चमंगल्यमपिकीर्तितं ॥

अर्थ–फिरतेवेळी डोकीवर छत्रधारण केलें असतां पाऊस, हिम, ऊन, धूळी यांचा नाश करितें; आणि नेत्रांला हितकारक व मांगल्यकारक ही आहे.

## दंडधारण.

सत्वोत्साहबलस्थैर्यधैर्यवीर्यविवर्धनं ॥
अवष्टंभकरंचापभयघ्नंदंडधारणं ॥

अर्थ–वाहेर फिरतेवेळीं हातांत दांडा घ्यावा. तो सत्व, उत्साह, बल, स्थिरता, धैर्य वीर्य, यानां वाढवितो; आणि आश्रय देतो, व भयाचा नाश करितो.

## शिबिकारोहण.

ऊर्ध्वाच्छादनसंयुक्ताशिबिकासर्ववल्लभा ॥
तस्यामारोहणंनृणांत्रिदोषशमकंमतं ॥

अर्थ–वरून मजरे घातलेली पालखी सर्वांना प्रिय आहे. तिच्यावर मनुष्यानें आरोहण केलें असतां त्रिदोषांचा नाश करिते.

## नौकायान.

वातश्लेष्मगदार्तानामहिताभ्रमकृत्तरी ॥

अर्थ–नौकायान, वायुरोगी, कफरोगी यांना भ्रम करितें; ह्मणून त्यानां हितकारक होत नाहीं.

## हस्तियान.

पित्तानिलकरोहस्तीलक्ष्म्यायुःपुष्टिवर्धनः ॥

अर्थ–हत्तीवर बसलें असतां वातपित्ताला करितें; आणि लक्ष्मी, आयुष्य, पुष्टी यानां वाढवितें.

## अश्वयान.

घोटकारोहणंवातपित्ताग्निश्रमकृन्मतं ॥
मेदोवर्णकफघ्नंचहितंतद्बलिनांवरं ॥

अर्थ–घोड्यावर बसणें वायु, पित्त, अग्नि, श्रम, यानां करितें; आणि मेद, वर्ण, कफ यांचा नाश करितें. तें बलिष्ठपुरुषाला योग्य, व हितकारक आहे.

## उन्हाचे दोष; व छायेचे गुण.

आतपःस्वेदमूर्छास्रपित्ततृष्णाक्लमश्रमान् ॥
दाहंविवर्णतांकुर्यादेतांश्छायाव्यपोहति ॥

अर्थ–ऊन घेतलें असतां घाम, मूर्छा, रक्तपित्त, तृष्णा, ग्लानि, श्रम, दाह, आणि वर्णाचा बदल यांते करितें; आणि छाया या विकारांचा नाश करिते.

## वृष्टिगुण.

वृष्टिर्वृष्याहिमाबल्यानिद्रालस्यविधायायिनी ॥
भयावहामोहकरीकुवृष्टिःकफवातला ॥

अर्थ–मेघांची वृष्टि वृष्य, शीत, बलप्रद, झोंप, व आळस यानां देणारी आहे. व अतिवृष्टि भय, मोह, अंगमोडं, कफ, वात यानां करणारी आहे.

## अग्निगुण.

अग्निर्वातकफस्तंभशतिवेपथुनाशनः ॥
आमाभिष्पंदशमनोरक्तपित्तप्रकोपनः ॥

अर्थ–अग्नी. वायु, कफ, आंगाचें ताठणें, थंडी, व तीचा योगानें कंप, आम, अभिष्पंद इ० नेत्ररोग यांचा नाशक, व रक्तपित्ताला कोपविणारा आहे.

## धूमगुण.

सद्यःश्लेष्मकरोधूमोनेत्रयोरहितोभृशं ॥
शिरोगौरवकृच्चापिवातंपित्तंचकोपयेत् ॥

अर्थ–धूर तत्क्षणी कफकर, डोळ्यांस अत्यंत वाईट, मस्तकाला जडकरणारा, व वातपित्ताला कोपविणारा असा आहे.

## सदाचार.

मैत्रींसद्भिरसद्भिश्चकुर्यात्सत्सुतुसर्वथा ॥ संसर्गंसाधुभिःकुर्या
दसत्संगंपरित्यजेत् ॥ सेवेतदेवभूदेववृद्धवैद्यनृपातिथीन् ॥

अर्थ–साधु व दुष्ट यांशीं मैत्री करावी. त्या मधून साधूशीं तर सर्वथा करावीच. व संसर्ग उत्तमांशीं ठेवावा. असतांची संगती बहुधा टाकावी; व देव, ब्राह्मण, वृध, वैद्य, राजा अतिथि, यांची सेवा करावी.

विमुखान्नार्थिनःकुर्यान्नावमन्येतकानपि ॥ गुरूणांसन्निधौति
ष्ठेत्सदैवविनयान्वितः ॥ पादप्रसारणादीनितत्रनैवसमाचरेत् ॥

अर्थ–आपले घरीं आलेले अतिथीला विमुख करूनये; व कोणाचाही अपमान करूनये; आणि सर्वदा विनययुक्त होऊन गुरूजवळ राहावें; आणि गुरूसमीप पाय पसरून वेडें वांकडें बसूनये.

अपकारपरेपिस्यादुपकारपरःपुमान् ॥ आत्मवत्सकलान्पश्ये
द्वैरिणोदूरतोवसेत् ॥ नकंचिदात्मनःशत्रुंनात्मानंकस्यचिद्रि
पुं ॥ प्रकाशयेन्नापमानंनचनिःस्नेहतांप्रभो ॥

अर्थ—कोणी आपणावर अपकार केला असतां ही आपण त्यावर उपकारच करावे; आणि संपूर्ण भूतें आपले सारिखीं पाहवीं; व वैऱ्यापासून दूर रहावें, आपले शत्रु व मित्र व आपण कोणाचा द्वेष करितों हें व अपमान, हें ही कोणाजवळ सांगूनये.

नात्मानमुदकेपश्येन्ननग्नःप्रविशेज्जलं ॥ तथानाज्ञातगांभीर्यं नहिंस्रप्राणिसेवनं ॥ कालेहितंमितंसत्यंसंवादिमधुरंवदेत् ॥ भुंजीतमधुरंप्रायःस्निग्धंकालेहितंमितं ॥ नरात्रौदधिभुंजीतन चनिर्लवणंतथा ॥ नामुद्गसूपंनाक्षौद्रंनचाप्यघृतशर्करं ॥

अर्थ—आपलें प्रतिबिंब उदकांत पाहूनये, आणि नग्न होऊन उदकांत प्रवेश करूंनये, व घातक प्राणी यांचे सेवन करूंनये; आणि कालीं हित, मित, सत्य, आइकणाराला मधुर, असे भाषण करावे; आणि गोड, स्निग्ध, हित असे पदार्थ कालीं सेवन करावे, तसेच रात्रीं दहीं भक्षण करूंनये. व मिठावाचून भक्षण करूंनये; आणि मुगांचे वरण, अथवा घृत, साकर यां वांचून भोजन करूं नये.

जनस्याशयमालक्ष्ययोयथापरितुष्यति ॥ तंतथैवानुवर्तेतपराराधनपंडितः ॥ नैकःसुखीनसर्वत्रविश्वस्तोनचशंकितः ॥ नोद्यमाद्विरमेत्क्वापिहितावीर्षेत्फलेनतु ॥

अर्थ—लोकांचे अंतःकरण जाणून जो जसा संतुष्ट होईल, तसे त्याचेजवळ वागावें, व मीं एक सुखीं आहे असें मानूनये, व सदासर्वदा शंकायुक्त राहूनये, आणि उद्योग सोडून रिकामे बसूनये, व कोणत्याही कामाची इच्छा करावी, परंतु फलाची ईर्षा करूंनये.

वेगंनधारयेत्किंचिन्मनोवेगान्विधारयेत् ॥ नपीडयेदिंद्रियाणिनचैतानतिलालयेत् ॥ वर्षातपादिषुछत्रीदंडीरात्र्यटवीषु च ॥ सोपानत्करस्तनुंरक्षन्विचरेद्युगमात्रदृक् ॥

अर्थ—मनाच्या वेगांवाचून मलमूत्रादिकांचा वेग धारण करूंनये; आणि इंद्रियानां फार पीडा करूंनये; व त्यांचे अतिलालनही करूंनये; आणि वर्षाऋतु, व उन्हांचे दिवसांत छत्री घ्यावी. अरण्यांत जातेवेळीं, किंवा रात्रीं फिरतेवेळीं हरतांत दंड, व पायांत वाहाणा घालून पुढें चारहात जागा पाहून चालावें.

नदींतरेन्नबाहुभ्यांनाग्निस्कंधमभिव्रजेत् ॥ संदिग्धनावंवृक्षंच नारोहेद्दुष्टयानवत् ॥ नासंवृतमुखःकुर्यात्सभायांसुविचक्षणः ॥ कासंहासंतथोद्गारंजंभणंक्षवथुंतथा ॥

अर्थ–नदीत पोहूनये, वणव्यांत जाऊनये, फार जुनेंगलबत, किंवा वृक्ष, व दुष्टघोडा, व दुष्टहत्ती, यांवर बसूनये, आणि सभेमध्यें विचक्षणपुरुषानें खोकला, हास्य, ढेकर, जांभइ, शिंक, हीं आलींअसतां मुखावर वस्त्र घेतल्यावांचून करूंनयेत.

नासिकांनविकुष्णीयान्नासीतोत्कटुकःक्काचित् ॥ नोर्ध्वजानुश्चिरंतिष्टेन्ननखेनालिखेद्भुवं ॥ संमार्जनीरजोनैवदेहेदध्यात्ककदाचन ॥ ननखेनतृणंछिंद्यान्नोच्छिष्टोब्राह्मणंस्पृशेत् ॥

अर्थ–नाकांत बोटें घालून कुसकुरूंनये. भयंकरजाग्यावर बसूंनये. नखानें जमिनीवर लिहूंनये, आणि वाढवणीचा केर कधींहीं अंगावर घेऊंनये, नखानें तृणछेद करूंनये; आणि उष्टयानीं ब्राह्मणाला स्पर्श करूंनये.

नोपरक्तंचोद्यंतंनास्तंयातंदिवाकरं ॥ सर्वथानसमीक्षेतनजलेप्रतिबिंबितं ॥ नेक्षेतसततंसूक्ष्मदीप्तामेध्याप्रियाणिच ॥ पौरंदरंधनुर्नैवदर्शयेत्कमपिक्काचित् ॥

अर्थ–सूर्याला ग्रहणाचे वेळीं, उदय काळीं, अस्तमान काळीं, किंवा जलामध्यें प्रतिबिंबित कधींहीं पाहूं नये, आणि निरंतर सूक्ष्म, प्रदीप्त, अमंगळ, अप्रिय, या पदार्थांनां पाहूनये; आणि इंद्राचे धनुष्य कोणाला केव्हांही दाखऊंनये

नेच्छेद्बलवतायुध्दंनभारंशिरसावहेत् ॥ गात्रंनताडयेत्केशान्हस्तेनधुनुयान्नच ॥ नगच्छेत्पूज्ययोर्मध्येदंपत्योरंतरेणच ॥ रिपोरन्नंनभुंजीतगणिकान्नमपिक्कचित् ॥ प्रतिभूर्नभवेत्क्कापिनचसाक्षीवृथाभवेत् ॥

अर्थ–बलवंताशीं युद्ध करूंनये. मोठाभार मस्तकावर वाहूंनये. व हातानें गात्र ताडण करूंनये, केश हातानें धरून झाडूनये, आणि देव, व पूजाकरणारा, किंवा स्त्रीपुरुष यांमधून गमन करूंनये, व शत्रूचें आणि गणिकेचें अन्न कधींहीं भक्षण करूंनये. कोणाला जामीन होऊंनये. खोटीसाक्ष देऊंनये.

असाद्विरंनबिभृयाद्यूतंदूरात्परित्यजेत् ॥ विश्वासंनाचरेत्स्त्रीणांतास्वतंत्राश्चनाचरेत् ॥ रक्षणीयाःसदायत्नाद्यौवनेतुविशेषतः ॥ नभिन्नेशयनेस्वप्यान्नानेकविवरेपिच ॥ नैकोदेवालयेनैवरात्रौतरुतलेनच ॥

अर्थ–मिथ्या बोलूनये. जुगारा.पासून दूर जावें, स्त्रियांचा ठाईं विश्वास व त्यांला स्वतंत्र ठेउंनये. सार्वकाळ मोठ्यायत्नाने राखाव्या. त्यामध्यें तारुण्यांत विशेषानें रक्षाव्या, व त्यांला आपल्या शयनाहून दुसरीकडे निजऊनये, व एकटा, अनेक असतील तेथें, बिळें, व देवळांत, रात्रीं वृक्षाखालीं निजूनये.

## दिनचर्या समाप्त करितात.

एवंदिनानिगमयेत्सदाचारपरःसदा ॥ ततोरात्रिप्रयुक्तानिकु
र्यात्कर्माणिमानवः ॥ इत्याचारंसमासेनभाषितंयःसमाचरेत् ॥
सविंदत्यायुरारोग्यंप्रीतिंधर्मंधनंयशः ॥

**अर्थ**—याप्रकारें निरंतर सदाचारानें दिवस घालवावे. नंतर रात्रीं शास्त्रांत सांगीतले-
लीं संध्यादिकर्मे करावी. असा आचार जो नित्य करितो, त्याला आयुष्य, आरोग्य-
मनाला प्रसन्नता, धर्म, धन, आणि यश हीं प्राप्त होतात.

## संध्याकाळीं निषिद्ध.

एतानिपंचकर्माणिसंध्यायांवर्जयेद्बुधः ॥ आहारंमैथुनंनिद्रां
संपाठंगतिमध्वनि ॥ भोजनाज्जायतेव्याधिर्मैथुनाद्गर्भवैकृतिः ॥
निद्रायांनिस्वतापाठादायुर्हानिर्मतेर्भयं ॥

**अर्थ**—ज्ञानीमनुष्यानें संध्येचे वेळेस. आहार, मैथुन, निद्रा, वेदपठण, मार्गचालणे, हीं.
कर्मे करूंनयेत. संध्येचे वेळेस भोजन केल्यास रोग होतो. मैथुन केल्यास गर्भ व्यंग होतो.
निद्रा केल्यास दरिद्र येते. पठण केल्यास आयुष्य क्षीण होते, व मार्ग चालल्यास भीति
उत्पन्न होत्ये.

# अथरात्रिचर्या.

## चांदण्याचे गुण.

ज्योत्स्नाशीतास्मरानंदप्रदातृट्पित्तदाहहृत् ॥

**अर्थ**—चंद्राचें चांदणें शीत, व कामसुख देणारें, व तृषा, पित्त, दाह, यांचे नाशक आहे.

## धुक्याचे गुण.

ततोहनिगुणःकुर्यादवश्यायोनिलंकफं ॥

**अर्थ**—धुकें. किंचित् चांदण्याहून गुणानीं कमी, व वायु, कफ, यांस करणारें आहे.

## आंधाराचे गुण.

तमोभयावहंमोहादिङ्मोहजनकंभवेत् ॥
पित्तहृत्कफकृत्कामवर्धनंक्लमकृच्चतत् ॥

**अर्थ**—आंधार भय, मोह, दिशांविषईं भ्रांति व कफ यानां करणारा, पित्तनाशक. काम,
व ग्लानी यानां करणारा आहे.

## रात्री भोजनविधि.

रात्रौचभोजनंकुर्यात्प्रथमप्रहरांतरे ॥
किंचिदूनंसमाश्नीयाद्दुर्जरंतत्रवर्जयेत् ॥

अर्थ–रात्रीचे पहिल्याप्रहरीं भोजन करावें, व तें किंचित्कमी करावें, व दुर्जर म॰ जडपदार्थ खाउंनये.

## व्यवायविधिगुण.

शरीरेजायतेनित्यंदेहिनांसुरतस्पृहा ॥
अव्यवायान्मेहमेदोवृद्धिःशिथिलतातनोः ॥

अर्थ–प्राणिमात्रास नित्य स्त्रीभोगाविषयीं इच्छा उत्पन्न होत्ये, तो स्त्रीभोग नकेल्यास मेह, व मेद वाढतात; आणि शरीराला अगदीं सैलपणा येतो.

## प्रशस्तस्त्रीविचार.

बालेतिगीयतेनारीयावद्वर्षाणिषोडश ॥ ततस्तुतरुणीज्ञेयाद्वा
त्रिंशद्वत्सरावधि ॥ तदूर्ध्वमधिरूढास्यात्पंचाशद्वत्सरावधि ॥
वृद्धातत्परतोज्ञेयासुरतोत्सववर्जिता ॥

अर्थ–स्त्रीला जों पर्यंत सोळावर्षें होत तों पर्यंत ती बाला, त्या नंतर बत्तीसवर्षें पर्यंत तरुणी; आणि बत्तीसवर्षांनंतर पन्नासवर्षें पर्यंत अधिरूढा, पन्नासवर्षांनंतर वृद्धा ह्मणतात. तिला कामभोगाविषयीं आनंद असत नाहीं.

## दिनपरत्वें प्रशस्त स्त्री.

निदाघशरदोर्बालाहिताविषयिणोमता ॥ तरुणीशीतसमयेप्रौ
ढावर्षावसंतयोः ॥ नित्यंवासेव्यमानाहिबालावर्धयतेबलं ॥
तरुणीह्रासयेच्छक्तिंप्रौढोद्भावयतेजरां ॥

अर्थ–विषयीपुरुषाला ग्रीष्मऋतूमध्यें बालास्त्री हितकर, व मान्य आहे; आणि थंडीचादिवसांत तरुणीस्त्री उत्तम, व वर्षाऋतूमध्यें व वसंऋतूमध्यें प्रौढास्त्री उत्तम जाणावी. बालास्त्री निरंतर भोगीली असतां पुरुषाचें बल वाढवित्ये. तरुणीस्त्री पुरुषाचा शक्तीचा नाश करित्ये, व नित्य प्रौढस्त्री भोगिल्यास ह्मातारपणा आणित्ये.

## वासे व ताजे पदार्थ हितकर.

सद्योमांसंनवंचान्नंबालास्त्रीक्षीरभोजनं ॥ घृतमुष्णोदकस्ना
नंसद्यःप्राणकराणिषट् ॥ पूतिमांसंस्त्रियोवृद्धाबालार्कस्तरुणं
दधि ॥ प्रभातेमैथुनंनिद्रासद्यःप्राणहराणिषट् ॥

अर्थ–ताजेमांस, नवेंअन्न, बालास्त्री, दुधाबरोबर भोजन, घृतभक्षण, ऊनपाण्याचें स्नान, हीं साहा तत्क्षणीं प्राणाला बलदेणारीं आहेत; आणि वासिमांस, वृद्धस्त्री, प्रातःकाळचें ऊन, ताजेंदहीं, प्रातःकाळीं मैथुन, व निद्रा; हीं साहा लागलाच प्राणाचा नाश करणारीं आहेत.

## तरुणस्त्रियादिकांचे गुण.

वृद्धोपितरुणींगत्वातरूणत्वमवाप्नुयात् ॥ वयोधिकांस्त्रियंग
त्वातरुणःस्थविरायते ॥ आयुष्मंतोंगदजरावपुर्वर्णबलान्विताः ॥
स्थिरोपचितमांसाश्चभवंतिस्त्रिषुसंयताः ॥

अर्थ–तरूणस्त्री भोगिल्यानें म्हाताराही तरुण होतो; आणि तरुण पुरुष आपल्याहून अधिक वयाचा स्त्रीला भोगील; तर वृध होतो; आणि स्त्रीला भोगिणाऱ्या पुरुषास आयुष्य, तारुण्य, कांती, बल, मांसाची वृद्धि, स्थिरपणा हीं प्राप्त होतात.

## स्त्रीसेवनकाळ.

सेवेतकामतःकामंबलाद्वाजीकृतोहिमे ॥ प्रकामंतुनिषेवतमै
थुनंशिशिरागमे ॥ त्र्यहाद्वसंतशरदोःपक्षाद्वृष्टिनिदाघयोः ॥

अर्थ–पुरुषानें हेमंतऋतूमध्यें वाजीकरणादि योगानें यथेष्ट काम सेवावा, व शिशिरऋतूंत पाहिजे तितकें मैथुन करावें; परंतु वसंत व शरदृतू यांत तीनदिवसांनीं, आणि वर्षा व ग्रीष्मऋतूमध्यें पंधरादिवसांनीं मैथुन करावें.

## सुश्रुतप्रमाण.

त्रिभिस्त्रिभिरहोरात्रैःसमयात्प्रमदांनरः ॥
सर्वेष्वृतुषुघर्मेतुपक्षात्पक्षाद्व्रजेद्बुधः ॥

अर्थ–पुरुषानें सर्वऋतूंत तीन तीन दिवसांनीं स्त्रीसंभोग करावा; परंतु ग्रीष्मऋतूमध्यें मात्र पंधरादिवसांपूर्वी करूं नये.

## ऋतुपरत्वें कामस्थानें.

शीतेरात्रौदिवाग्रीष्मेवसंतेतुदिवानिशि ॥
वर्षासुवारिदध्वानेशरत्सुसरसिस्मरः ॥

अर्थ–काम थंडीचा दिवसांत रात्रीं, व ग्रीष्मऋतूंत दिवसास, व वसंतऋतूमध्यें रात्रदिवस, व वर्षाऋतूंत मेघाचा शब्दांत; व शरदृऋतूंत सरोवराचाठायीं यापांचठिकाणीं राहातो.

## मैथुनाला निषिद्धकाळ.

नोपेयात्पुरुषोनारींसंध्ययोर्नचपर्वसु ॥
गोसर्गेचार्धरात्रेचतथामध्यंदिनेपिच ॥

अर्थ–पुरुषानें सायंसंध्या, व प्रातःसंध्या, व अमावास्या, पौर्णिमा, व गाईसोडण्याचे वेळेस, मध्यरात्रीस, व दोनप्रहरीं संभोग करूं नये.

## स्त्रीसेवनविधि.

विहारंभार्ययाकुर्याद्देशेतिशयसंवृते ॥
रम्येश्राव्यांगनागानेसुगंधेसुखमारुते ॥

अर्थ—पुरुषानें स्त्रीभोग गुप्त व रम्य अशास्थानीं, व स्त्रीयांचें गायन ऐकुंयेत आहे, व सुगंध वायू वाहातो; अशाठिकाणीं करावा.

## संभोगास अयोग्यस्थान.

देशेगुरुजनासन्नेविवृतेतित्रपाकरे ॥
श्रूयमाणव्यथाहेतुवचनेचरमेन्नच ॥

अर्थ—पुरुषानें आपल्याहून वडीलमनुष्यांचा समीप, व उघडी, लज्जाकर, आणि दुःखाचे शब्द ऐकुंयेतात, अशा जागीं स्त्रीशीं रत होऊं नये.

## संभोगसमयीं वेष.

स्नातःश्चंदनालिप्तांगःसुगंधःसुमनोन्वितः ॥ भुक्तवृष्यःसुवस
नःसुवेशःसमलंकृतः ॥ तांबूलवदनःपत्न्यामनुरक्तोधिकस्म
रः ॥ पुत्रार्थीपुरुषोनारीमुपेयाच्छयनेशुभे ॥

अर्थ—स्नान करून आंगास सुगंधचंदन, व सुगंधपुष्पांचा माळा यांचें धारण, व धातुवृद्धिकर पदार्थ भोजन, व उत्तमवस्त्र, व अळंकार, व उत्तमवेष यांचें धारण, तांबूलभक्षण, इत्यादि करून स्त्रीविषयीं, व रतिविषयीं आसक्त; आणि पुत्रेच्छू अशा पुरुषानें उत्तम बिछान्यावर स्त्रीशीं रति करावी.

## मैथुनास अयोग्य पुरुष.

अत्याशितोधृतिःक्षुद्वान्सव्यथांगःपिपासितः ॥
बालोवृद्धोन्यरोगार्तस्त्यजेद्रोगीचमैथुनं ॥

अर्थ—जो फार भोजन केलेला, अधीर, भुकेला, व्यथितांग, व तृषार्त, बाळक, म्हातारा, व रोगानें आर्त, व मैथुनानें अधिकरोग वाढणारा अशा पुरुषानीं मैथुन करूंनये.

## ज्याणीं संभोग करूंनये ते पुरुष.

क्षुधितःक्षुब्धचित्तश्चमध्यान्हेतृषितोबलः ॥ स्थितश्चहानिंशु
क्रस्यवायोःकोपंचाविंदति ॥ व्याधितस्यरुजाप्लीहामूर्छामृत्यु
श्चजायते ॥

अर्थ—भुकेला, उद्विग्नचित्त, दोनप्रहरीं ताहानेला, दुर्बल, क्षयी, असा पुरुष संभोग करील, तर त्याचा रेताचा नाश होऊन वातकोप होईल; आणि रोगी असून संभोग करील तर, त्याला रोग प्लीहा, घेरी, व मृत्यु हीं होईल.

## स्त्री योग्य.

भार्यारूपगुणोपेतांतुल्यशीलांकुलोद्भवां ॥ अभिकामोभिका
मांतुल्टष्टोत्दष्टामलंकृतां ॥ सेवेतप्रमदांयुक्त्यावाजीकरणबृंहितः ॥

अर्थ–स्त्री रूपानें सुंदर, गुणवान्, व आपल्यासारिख्या स्वभावाची, सत्कुळीण, अशा स्त्रीशीं आपण सकाम व वाजीकर्णानें पुष्ट होऊन युक्तीनें संभोग करावा.

## त्याज्यस्त्री.

रजस्वलामकामांचमलिनामप्रियांतथा ॥ वर्णवृत्धांवयोवृत्धां
तथाव्याधिप्रपीडितां ॥हीनांगींगर्भिणींद्वेष्यांयोनिरोगसमन्वि
तां सगोत्रांगुरुपत्नींचतथाप्रव्रजितामपि ॥ नाभिगच्छेत्पुमान्ना
रींभूरिवैगुण्यशंकया ॥

अर्थ–रजस्वला, व कामरहित, मळीण, नावडती, जातीनें, व वयानें आपल्याहून श्रेष्ठ, व रोगपीडित; व्यंग, गरोदर, द्वेषकरणारी, योनिरोगानें युक्त, आपल्या गोत्रांतली, गुरुस्त्री, विरक्ता, इतक्या स्त्रीयाशीं पुरुषानें फार वाईट होईल, या शंकेनें गमन करूंनये.

गर्भिणीसप्तमान्मासादुपरिष्टाद्विशेषतः ॥
निषिद्धात्वष्टमेमासिमैथुनंनसमाचरेत् ॥

अर्थ–गरोदरस्त्रीस साहामहिनें भोगावी, नंतर सातव्यांत, व आटव्या महिन्यांपासून निषिद्ध ह्मणून पुरुषानें मैथुन करूं नये.

## रजस्वलेशीं गमन केल्यास.

रजस्वलांगतवतोनरस्यासंयतात्मनः ॥
दृष्टयायुस्तेजसांहानिरधर्मश्चततोभवेत् ॥

अर्थ–जो पुरुष चित्ताचा स्वाधीन होऊन रजस्वला स्त्रीस भोगितो; त्याला नेत्र व कांति यांचा नाश व अधर्म हीं होतो.

लिंगिनींगुरुपत्नींचसगोत्रामथपर्वसु ॥ वृत्धांचसंध्ययोश्चा
पिगच्छतोजीवितक्षयः ॥ गर्भिण्यांगर्भपीडास्यात्व्याधितायां
बलक्षयः ॥ हीनांगींमलिनांद्वेष्यांक्षामांवंध्यामसंवृते ॥ देशे
भिगच्छतोरेतःक्षीणंम्लानंमनोभवेत् ॥

अर्थ–विरक्त, गुरुस्त्री, आपल्या गोत्राची, वृत्ध, अशास्त्रियांशीं; व अमावास्यादि पर्वीं, व सायंप्रातः संध्याकाळीं जो मैथुन करितो, त्याचा आयुष्याचा क्षय होतो. गर्भिणीस भोगिली

तर, आंतील गर्भास पीडा होत्ये. रोगीस्त्री भोगिल्यास बलक्षय होतो, व्यंग मळीण, द्वेष करणारी, कृश, वांझ, अशा स्त्रीला, उघड पणें मोकळ्या जागीं भोगिल्यास रेत क्षिण होतें; व मनाला ग्लानी होत्ये.

## पुंसवनानंतर गर्भिणीला नियम

ततस्त्यजेन्नदीतीरंदेवखातोदकंतथा ॥ भर्तुःशय्यांमृतापत्यांतथैवामिषभोजनं ॥ आमिषस्याशनंयत्नात्प्रमदापरिवर्जयेत् ॥ देवाराम नदीयानंप्रयोगंपुरुषस्यच ॥

अर्थ–गर्भिणीनें द्वितीयमासीं पुंसवन झाल्यानंतर नदीतिरीं, देवकृततीर्थीं, व पतीचे शेजेवर जाउंनये; व मरतवांझस्त्रीशीं फार संगती करूंनये; व मांसाचें भोजन करू नये. यत्नानें मांस भक्षण, देव दर्शन, बागांत जाणें नदीदिरीं जाणें पुरुषसंग यांचा त्याग करावा.

## वातपित्तप्रकोपसमय.

प्रत्यूषस्यर्धरात्रेचवातापित्तेप्रकुप्यतः ॥ तिर्यग्योनावयोनौवा दुष्टयोनौतथैवच ॥ उपदंशस्तथावायोःकोपःशुक्रसुखक्षयः ॥

अर्थ–प्रातःकाळीं, व मध्यरात्रीं स्त्रिसंभोग केला असतां, वायु व पित्त यांचा कोप होतो; आणि पश्वादिकांची योनी, किंवा रोगी यांशीं संभोग केला असतां, उपदंश, वायूचा कोप, आणि धातुक्षय होतो.

## शुक्रवेगनिरोधफल.

उच्चारितेमूत्रितेचरेतसश्चविधारणे ॥ उत्तानेचभवेच्छीघ्रंशुक्राश्मर्याश्चसंभवः ॥ सर्वमेतत्त्यजेत्तस्माद्यतोलोकद्वयाहितं ॥ शुक्रंतूपस्थितंमोहान्नसंधार्यंकदाचन ॥

अर्थ–मल, मूत्र, रेत; कामोत्पत्तीनें ऊर्ध्व रेत, यांचा अवरोध केलाअसतां, शुक्राश्मरी रोग होतो; आणि इह लोकीं, व पर लोकीं नाश होतो. याकारितां हे सोडावे; आणि शुक्राचा वेग आलाअसतां कधींही धारण करूंनये.

## मैथुनांतीं हितकर.

स्नानंसशर्करंक्षीरंभक्ष्यमैक्षवसंस्कृतं ॥ वातोमांसरसःस्वप्नोव्यवायांतेहिताअमी ॥

अर्थ–मैथुनानंतर स्नान, साकरमिश्रित दूध, व उंसाचा रसांचा संयोगाने केलेला पदार्थ, व शीतळ वायू, मांसरस, निद्रा, इतके पदार्थ हीतकारक आहेत.

## अतिमैथुनफळ.

शूलकासज्वरश्वासकार्श्यपांड्वामयक्षयाः ॥
अतिव्यवायाज्जायंतेरोगाश्चाक्षेपकादयः ॥

**अर्थ**—अतिमैथुन केल्यानें पोटशूळ, खोकला, ज्वर, दमा, कृशपणा, पांडु, क्षयरोग व आणखीही. आक्षेपकादिकरोग उत्पन्न होतात.

## जागरणाचे दोष.

रात्रौजागरणंरूक्षंकफदोषविषार्तिजित् ॥

**अर्थ**—रात्रीस जागरण केलें तर, तें रूक्ष, कफदोष, आणि विषपीडा यांचें नाशक आहे

## निद्रागुण.

निद्रातुसेविताकालेधातुसाम्यमतांद्रितं ॥
पुष्टिवर्णबलोत्साहवन्हिदीप्तिंकरोतिच ॥

**अर्थ**—सांगितल्या वेळेस निद्रा केली, तर ती धातूचें साम्य, व अनालस्य, पुष्टि, कांती, बळ, उमेद, जटराग्नीची दीप्ती यांतें करित्ये.

## निद्रेचा पूर्वी अवलेह.

योलेढिशयनसमयेमधुमिश्रंबीजपूरदलचूर्णं ॥
सचपीडाकरवातप्रसरानिरोधात्सुखंस्वपिति ॥

**अर्थ**—जो मनुष्य निजतेवेळेस महाळुंगीचा पानाचें चूर्ण मधाबरोबर चाटून खातो; त्याचा दुखदायक वायूचा वेग बंद होऊन सुखानें निद्रा घेतो.

## उषःपान.

सवितुरुदयकालेप्रसृतीःसलिलस्यापिबेदष्टौ ॥
रोगजरापरिमुक्तोजीवेद्वत्सरशतंसाग्रं ॥

**अर्थ**—सूर्योदय काळीं. पुर्वी रात्री ठेविलेलें आठ अंजुळी उदक प्राशन करील, त्याचे सर्व रोग; व जरा हे जाऊन सवाशें वर्षेंपर्यंत वांचेल.

## उषःपानगुण.

अर्शःशोथग्रहण्योज्वरजठरजराकोष्ठमेदोविकारामूत्राघातास्त्र
पित्तश्रवणगलशिरःश्रोणिमूलाक्षिरोगाः ॥ येचान्येवातापित्तक्षत
कफकृताव्याधयःसांतिजंतोस्तांस्तानभ्यासयोगापदहरतिपयः
पतिमंतेनिशायाः ॥

अर्थ-रात्रीचा चवथ्या प्रहरीं पूर्वी सांगितल्या प्रमाणें उषःपान करील त्याचे अर्श सूज, ग्रहणी, ज्वर, उदररोग, वृद्धपणा, कोष्ठरोग, मेदोरोग, मूत्राघात, रक्त; व आणखी वायू, पित्त, व कान, गळा, मस्तक, कटिपश्चाद्भाग, नेत्र, यांचे रोग, व आणखी वायू, पित्त, रक्त, कफ, यांणीं झालेले सर्व व्याधी नाश पावतात.

विगतघननिशीथेप्रातरुत्थायनित्यंपिबतिखलुनरोयोघ्राणरंध्रे
णवारि ॥ सभवतिमतिपूर्णश्चक्षुषातार्क्ष्यतुल्योवलिपलितविही
नःसर्वरोगैर्विमुक्तः ॥ पातव्यंनासयानीरंप्रसृतित्रयमात्रकं ॥
व्यंगवलीपलितघ्नंपीनसवैस्वर्यकासशोथहरं ॥ रजनीक्षयेंबुन
स्यंरसायनंदृष्टिसंजननं ॥

अर्थ-जो मनुष्य पाहांटेस उठून नित्य नासिकेनें उदक पितो, तो बुद्धीनेंपूर्ण, व डोळे गरुडासारिखे, व आंगाचा वळकटया, व म्हातारपण जाऊन सर्व रोगांपासून मुक्त होतो; आणि नाकाचा छिद्रानें तीनअंजुळी उदक प्राशन केल्यास व्यंगपणा, व अंगाचा चिर्म्या, पडसें, विस्वरता, खोकला, सूज, यांचा नाश करितें, व रसायन आहे, आणि दृष्टि निर्मळ करितें.

## उषःपान करण्यास अयोग्य.

स्नेहपीतेक्षतेशुद्धाःवाध्मानेस्तिमितोदरे ॥
हिक्कायांकफवातोत्थेव्याधौतद्वारिवारयेत् ॥

अर्थ-स्नेहप्राशन, व रक्तशुद्धी केली, व पोट फुगलें, उदरमांद्य, व उचकी, आणि कफ-वायू यांपासून व्याधि उत्पन्न जाहाल्याअसतां उषःपान करूंनये.

## इतिरात्रिचर्यासमाप्त.

## ऋतुचर्या.

चयकोपसमायस्मिन्दोषाणांसंभवंतिहि ॥
ऋतुषट्कंतदाख्यातंरवेराशिपुसंक्रमात् ॥

अर्थ-दोषाचे संचय, व कोप ज्या मध्यें होतात, असे साहा ऋतु रविच्या राशि गमनानें होतात, तें सांगतों.

ग्रीष्मेमेषवृषौप्रोक्तौप्रावृण्मिथुनकर्कटौ ॥ सिंहकन्येस्मृतौवर्षा
तुलावृश्चिककौशरत् ॥ धनुर्ग्राहौचहेमंतोवसंतःकुंभमीनकौ ॥

अर्थ-मेष वृषभ ग्रीष्मऋतू, व मिथुन कर्क मिळून प्रावृट् काळ; आणि सिंह कन्या हे वर्षाऋतू, तूळ वृश्चिक शरदृतू, धन, मकर हेमंतऋतू, कुंभ व मीन वसंत ऋतू, याप्रमाणें जाणावे.

उत्तरायणमाद्यैस्तैःपरैःस्याद्दक्षिणायनं ॥
आद्यमुष्णंबलहरंततोन्यद्बलदंहिमं ॥

अर्थ—आद्यतीन ऋतू मिळून उत्तरायण; आणि दुसरे तीन मिळून दक्षिणायन होतें, उत्तरायण उष्ण व बलनाशक आहे; व दक्षिणायन बलकारक व थंड आहे.

## हेमंतऋतु.

हेमंतःशीतलःस्निग्धःस्वादुर्जठरवन्हिकृत् ॥

अर्थ—हेमंतऋतू शीतल, स्निग्ध, वनस्पतीमध्यें गोडरस, उत्पन्न करणारा जठराग्नीला वाढविणारा असा आहे.

## शिशिर.

शिशिरःशीतलोतीवरूक्षोवाताग्निवर्धनः ॥

अर्थ—शिशिरऋतू अतिशीतल, रूक्ष, वायू; व अग्नी यांला वाढविणारा आहे.

## वसंत.

वसंतोमधुरःस्निग्धःश्लेष्मवृद्धिकरश्चसः ॥

अर्थ—वसंतऋतु मधुर, स्निग्ध, आणि कफवृधि करणारा आहे.

## रस उत्पन्न करणारा ग्रीष्म.

ग्रीष्मोरूक्षोतिकटुकःपित्तकृत्कफनाशनः ॥

अर्थ—ग्रीष्मऋतु. रूक्ष, अतितिखट, रस उत्पन्न करणारा, पित्तकारक, व कफनाशक असा आहे.

## वर्षाऋतू.

वर्षाःशीताविदाहिन्योवन्हिमांद्यानिलप्रदाः ॥

अर्थ—वर्षाऋतू. शीत, विदाहि, व अग्निमांद्य, वायू, यांतें करितो.

## शरदृतु.

शरदुष्णापित्तकर्त्रीनृणांमध्यबलावहा ॥

अर्थ—शरदृतू. उष्ण, पित्तकर, मनुष्यानां मध्यमबल देणारा आहे.

चयप्रकोपोपशमावायोर्ग्रीष्मादिपुष्टिषु ॥ वर्षादिषुचपित्तस्य श्लेष्मणःशिशिरादिषु ॥ चीयतेलघुरूक्षाभिरोषधीभिःसमीरणः तद्विधस्तद्विधेदेहेकालस्यौष्ण्यान्नकुप्यति ॥

अर्थ–वाताचा संचय, व कोप ग्रीष्मादिक तीन ऋतुमध्यें होतो; तसा वर्षादिक ३ ऋतूमध्यें पित्ताचा चयकोप होतो; आणि कफाचा चय व कोप शिशिरादि ऋतूमध्यें होतो, व लघु, रूक्ष, अशा औषधींनीं वातसंचय होतो; आणि रूक्ष व लघु अशा शरीरामध्यें व काळाचा ऊष्णपणामुळें वातकोप होतनाहीं.

अद्भिरम्लविपाकाभिरोषधीभिश्चतादृशं ॥ पित्तंयातिचयंकोपं
ननुकालस्यशैत्यतः ॥ चीयतेस्निग्धशीताभिरुदकौषधिभिः
कफः ॥ तुल्येपिकालेदेहेचस्कन्नत्वान्नप्रकुप्यति ॥

अर्थ–अम्लपाक होणारी उदकें, व औषधी यांणीं अम्लपाक असें जें पित्त त्याचा संचय होतो; परंतु काळाचा शैत्यपणामुळें कोपत नाहीं; आणि स्निग्ध व शीत अशीं औषधी, उदकें, याणी स्निग्ध व शीतकाळामध्यें; व स्निग्ध, शीत देहाचेठायीं कफाचा संचय होतो; तो गळून जातो ह्मणून कोपत नाहीं.

हिमेयातिशमंपित्तंवायुःश्लेष्मोपचीयते ॥ सवायुःशिशिरे
कोपंयात्येवोपहातिकफः ॥ हेमंतेसंचितःश्लेष्माशिशिरेत्वति
चीयते ॥ शीतस्निग्धगुरुद्रव्यैःशैत्यास्कंदोनकुप्यति ॥

अर्थ–हेमंतऋतूमध्यें पित्त शांत होतें; आणि वायू व कफ यांचा संचय होतो. तो वायू शिशिर ऋतूमध्यें कोप पावतो; व कफ शांत होतो; आणि हेमंतऋतू मध्यें संचित कफ, शिशिर ऋतूमध्यें फार जमतो; आणि शीत, स्निग्ध, जड यापदार्थांनीं व शैत्यानें सुटून पडतो, तो कोप पावत नाहीं.

इतिकालस्वभावोयंआहारादिवशात्पुनः ॥ चयादीन्यांतिस
द्योपिदोषाःकालेविशेषतः ॥ चयकोपशमान्दोषाविहाराहार
सेवनैः ॥ समानैर्यातिकालेपिविपरीतैर्विपर्ययं ॥

अर्थ–याप्रमाणें काळाचा स्वभाव आहे. ते दोष पुनः आहारादिकांचा योगानें सद्यः चय व कोपादिक पावतात. परंतु त्या त्याकाळीं विशेषें करून होतात; आणि विहार व आहार याच्या समसेवनानें दोष समान होतात; व तेंच विपरीत झालें असतां विपरीत दशा पावतात.

## चयलक्षण सांगतो.

स्वस्थानस्थस्यदोषस्यवृद्धिःस्यात्स्तब्धकोष्ठता ॥ पीतावभासता
वन्हिमंदताचांगगौरवं ॥ आलस्यंचयहेतौतुद्वेषश्चचयलक्षणं ॥

अर्थ–आपलेस्थानींच दोषाचा संचय होऊंलागला असतां, कोष्टामध्यें स्तब्धता, पिंवळेपणा, अग्निमांद्य, अंगाला जडता, आळस, हे विकार होतात; व दोषाचा संचय झाला ह्मणजे अन्नद्वेष होतो.

संचयेपल्हृतादोषालभंतेनोत्तरागतीः ॥

तेतूत्तरासुगतिषुभवंतिबलवत्तराः ॥

अर्थ—संचयकाळींच दोषानां पाडून टाकले असतां पुढें गती करींत नाहींत. तेच अस्थानीं गेले, ह्मणजे बलवत्तर होतात.

## वर्षाऋतूत हितपदार्थ.

वर्षासुप्रबलोवायुस्तस्मान्मिष्टादयस्त्रयः ॥ रसाःसेव्याविशेषे णपवनस्योपशांतये ॥ भवेद्वर्षासुवपुषःक्लिन्नत्वंयद्विशेषतः ॥ तत्क्लेशशांतयेसेव्याअपिकट्वादयस्त्रयः ॥

अर्थ—वर्षाऋतुमध्यें वायू प्रबल असतो; याकारितां गोड, आंबट, लवण, हे रस वातशांती व्हावी ह्मणून विशेषेंकरून सेवन करावे; आणि वर्षाऋतुमध्यें देहाचे ओलसरपणामुळे कफ वाढतो, त्याचा विकार शांत व्हावा, ह्मणून कटु, तिखट, तुरट, हे तीनरस विशेषेंकरून सेवन करावे.

## सेव्यासेव्य.

स्वेदनंमर्दनंसेव्यंदध्युष्णंजांगलामिषं ॥ गोधूमाःशालयोमाषाजलंकौपंदिवश्रुतं ॥ नभजेत्पूर्वपवनंवृष्टिघर्मंहिमंश्रमं ॥ नदीनीरंदिवास्वप्नंरूक्षंनित्यंचमैथुनं ॥

अर्थ—घामकाढणें, मर्दन, ऊष्णदहिं, अरण्यसंबंधीं मांसे, गहू, भात, उडीद, विहिरीचें किंवा पर्जन्याचें उदक, हे सेवन करावे, आणि पूर्वेकडील वारा, वृष्टि, ऊन, थंडी, श्रम, नदीचे पाणी, दिवानिद्रा, रूक्ष, नित्यमैथून, हीं सेवन करूंनयेत.

## शरदृतूत हितपदार्थ.

सर्पिःस्वादुकषायतिक्तकरसंयच्छीतलंयल्लघुक्षीरंस्वच्छासितेक्षवःपटुरसःस्वल्पःपलंजांगलं ॥ गोधूमायवमुद्गशालिसहितानादेयमंशूदकंचंद्रश्चंदनमिंदुरादिरजनौमाल्यंपटोनिर्मलः ॥

अर्थ—तूप, गोड, तुरट, कडु, हे रस, शीतल, व हलके पदार्थ, दूध, खांडरीसाकर उसांचा रस, थोडा क्षाररस, अरण्यसंबंधीं मांस, गहू, यव, मूग, तांदूळ, नदीचें उदक, व अंशूदक, चंद्र, चंदन, कापूर, व रात्रीचेठायीं माळा, निर्मळवस्त्र, हे पदार्थ शरदृतूत सेवन करावे.

## सेव्यासेव्य.

विश्रामःसुहृदांगणेषुमधुरावाचःसरःक्रीडनंपित्तानांचविरेच
नंबलवतोयुक्तंशिरामोक्षणं ॥ एतान्यत्रघनावसानसमयेपथ्या
निमुंचेद्दधिव्यायामाम्लकटूष्णतीक्ष्णदिवसस्वप्नंहिमंचातपं ॥

अर्थ–मेघांचा समाप्ती समईं आप्त, मित्र, यांचाठाईं विश्रांती; व गोड वाचा ऐकणें, सरोवरांमध्यें क्रीडा, व पित्तांचें रेचन, व बळवंताला शिराकाढणें हीं हितकर आहेत; आणि दहीं, अतिव्यायाम, आंबट, कडू, उष्ण, तिखट, व दिवसास नीज, थंडी, ऊन, हे पदार्थ अपथ्य सेवन करूं नयेत.

## अंशूदक लक्षण.

दिवारविकरैर्जुष्टंनिशिशीतिकरांशुभिः ॥
ज्ञेयमंशूदकंनामस्निग्धंदोषत्रयापहं ॥

अर्थ–दिवसास सूर्यकिरणानीं तापविलें, व रात्रीं चंद्रकिरणानीं शीत जाहालें, असें जें उदक त्याला अंशूदक असें ह्मणतात. तें स्निग्ध असून त्रिदोषांचा नाश करितें.

## शरदृतूंत हितपदार्थ.

ऐक्षवःशालयोमुद्गःसरोंभःकथितंपयः ॥
शरद्येतानिपथ्यानिप्रदोषेचंद्ररश्मयः ॥

अर्थ–शरदृतूंत. ऊंस, साळीचा भात, मूग, तळावाचें पाणी, आटवलेलें दूध, व सायंकाळीं चंद्राचे किरण, इतके पदार्थ हितकर जाणावे.

## हेमंतऋतूंत हित पदार्थ.

प्रातर्भोजनमम्लपिष्टलवणानभ्यंगघर्मश्रमान्गोधूमैक्षवशा
लिमाषपिशितंपिष्टनवान्नंतिलान् ॥ कस्तूरींवरकुंकुमागरुयु
तामुष्णांबुशौचानलंस्निग्धंस्त्रीषुसुखंगुरूष्णवसनंसेवेतहेमंतके ॥

अर्थ–हेमंतऋतुमध्यें प्रातःकाळीं भोजन, आंबट, पीठ, मीठ, हे पदार्थ, अभ्यंग करणें, घामकाढणें, व श्रम करणें, व गव्हांचें अन्न, उसाचा रसाचे पदार्थ, साळींचा भात, उडीद, मांस, पीठ, नवअन्न, तीळ, कस्तूरी, केशर, कृष्णागरु, उष्णोदक, निर्धूमअग्नी, तैजस घृतादिपदार्थ, स्त्रीसुख, व जड उष्ण असे पांघरूण, इतके पदार्थ हितकर जाणावे.

## शिशिरऋतु.

शिशिरेशीतमधिकंरौक्ष्यंचादानकालजं ॥
विशेषतस्ततस्तत्रहेमंतस्यमतोविधिः ॥

अर्थ–शिशिरऋतूत. विशेषकरून थंडी, व वायूनें तत्काली रूक्षपणा हीं अधिक होतात, यास्तव पूर्वी हेमंतऋतूत सांगितलें त्याप्रमाणें आहारादिक करावें.

## वसंतऋतु.

वांतिंनस्यमथाभयांचमधुनाव्यायाममुद्वर्तनंसंसेवेतमधौकफ
घ्नममलंशून्यंपलंजांगलं ॥ गोधूमान्बहुशालिभेदसहितान्मु
द्गान्यवान्षष्टिकान्लेपंचंदनकुंकुमागरुकृतंरूक्षंकटूष्णंलघुं ॥

अर्थ–वसंतऋतूंत वांती, व नस्य, आणि मधाबरोबर हरीतकी, व्यायाम, व अभ्यंग ह्म० तैलादि आंगास लाऊन ऊनपाण्यानें स्नान, व कफनाशक पदार्थ, निर्मळ रसाळ व भाजलेले मांस, व अरण्यपशूंचे मांस, गहूं, साळीचा भाताचे अनेक भेद, मूग, यव साटक्याचें भात, हे व यांचे पदार्थ करून भक्षावे, आणि आंगास चंदन, केशर, कुंकुमागर इत्यादिक सुगंधपदार्थ लावावे. व रूक्ष, कटु, उष्ण, लघु, असे पदार्थ सेवावे.

### वर्ज्य सांगतो.

मिष्टमम्लंदधिस्निग्धंदिवास्वप्नंचदुर्जरं
अवश्यायमपिप्राज्ञोवसंतेपरिवर्जयेत् ॥

अर्थ–गोड व आंबट दही, दिवसां निज, व दुर्जरपदार्थ खाणे, व धुकें हे पदार्थ वसंतांत शाहाण्यानें सेऊनये.

## ग्रीष्मऋतु.

स्वादुस्निग्धाहितंलघुद्रवमयंद्रव्यंरसालांसितांसक्तुक्षीरदशांगु
लानिसितयाशालिरसंमांसजं ॥ शीतांशुंशयनंदिवामलयजंशी
तंपयःपानकंसेवेतोष्मदिनेत्यजेत्तुकटुकक्षाराम्लघर्मश्रमान् ॥

अर्थ–ग्रीष्मऋतूंत मधुर, स्नेहयुक्त, हित, हलके, पातळ, असे पदार्थ, व रसाळ, श्रीखंडादिक, व सातू, दूध, बोटवे यांची क्षीर; व साळी, मांसरस, व चंद्रमा, दिवसास निद्रा, अंगास उत्तमचंदनाची उटी, व दुग्धप्राशन हे पदार्थ हितकारक ह्मणून सेवावे, आणि कडू व खारट, आंबट असे पदार्थ खाऊनये. व घाम फार येण्याजोगा श्रमही करूं नये.

ऋतुष्वेषुयएतैस्तुविधिभिर्वर्ततेनरः ॥
दोषानृतुकृतान्नैवलभतेसकदाचन ॥

अर्थ. या साहाऋतूंचा ठाई. सांगीतल्याप्रमाणें यथा योग्य नियमानें जो मनुष्य आहारविहारादि करील, त्यास त्या त्या ऋतूंचे पूर्वी सांगीतले वातादिकां पासून होणारे उपद्रव कधींही होणार नाहींत.

## इतिऋतुचर्या समाप्त.

## स्नेहप्रकरण.

स्नेहश्चतुर्विधःप्रोक्तोघृतंतैलंवसातथा ॥
मज्जाचतंपिबेन्मर्त्यःकिंचिदभ्युदितेरवौ ॥

अर्थ–स्नेह, च्यार प्रकारचे आहेत, ते तूप[1], तेल, मांसस्नेह[2], हाडाचें तेल, हे च्यारस्नेह यत्किंचित् सूर्योदय जाहला न जाहला त्यावेळेस प्यावे.

## ते स्नेह दोनप्रकारचे.

स्थावरंजंगमंचैवद्वियोनिःस्नेहउच्यते ॥
तिलतैलंस्थावरेषुजंगमेषुघृतंवरं ॥

अर्थ–स्थावर[3] व जंगम[4] या भेदेंकरून स्नेह दोनप्रकारचे त्यांमध्यें स्थावर पदार्थांचे स्नेह अनेक आहेत, त्यांमध्यें तिळांचें तेल श्रेष्ठ आहे असें जाणावें, व जंगम पदार्थांचें तूप आदिकरून वसादिक स्नेह अनेक आहेत त्यांमध्यें तूप श्रेष्ठ आहे, याप्रकारें स्नेहाचे दोन प्रकार जाणावे.

## स्नेहाचे भेद.

द्वाभ्यांत्रिभिश्चतुर्भिस्तैर्यमकस्त्रिवृतोमहान् ॥

अर्थ–तूप व तेल हीं दोन एकाजागीं जाहलीं असतां त्याला यमक असें ह्मणतात, व तूप, तेल, व मांसस्नेह हीं तीन एकाजागीं जाहलीं असतां त्याला त्रिवृत असें ह्मणतात, तूप, तेल, व मांसस्नेह, व हाडांचे तेल हीं च्यार एकाजागीं जाहलीं असतां त्याला महान् असें ह्मणतात. याप्रकारें स्नेहाचे तीन भेद जाणावे.

## स्नेह प्यावयाचा क्रम.

पिबेत्त्र्यहंचतुरहंपंचाहंषडहंतथा

अर्थ–तूप तीन दिवस प्यावें, व तेल च्यारदिवस, व मांसस्नेह पांच दिवस, व हाडांचें तेल साहा दिवस प्यावें, या प्रमाणें क्रमेंकरून घृतादिस्नेह प्यावयाचा क्रम जाणावा.

सप्तरात्रात्परंस्नेहःसात्मीभवतिसेवितः ॥

अर्थ–सातां दिवसांनंतर घृतादिक स्नेह प्यालें असतां आहारासारिखे होतात, त्यापासून गुण व अवगुण कांहीं एक होत नाहीं.

---

१ मांसापेक्षां अष्टगुण घृत आहे, ह्मणून पूर्वीं घेतलें.

२ मांसापासून तुपासारिखें तेल निघतें, त्याचें नांव मांसस्नेह, त्याला कोणी चर्बी ह्मणतात.

३ जे पदार्थ चालत नाहींत, तें स्थावर जाणावें.

४ जे पदार्थ चालतात तें जंगम जाणावें.

## स्नेह आहारासारिखा केव्हां होतो तें.

दोषकालाग्निवयसांबलंदृष्ट्वाप्रयोजयेत् ॥
हीनांचमध्यमांज्येष्ठांमात्रांस्नेहस्यबुद्धिमान् ॥

**अर्थ**–वातादिक दोष काळ, अग्नि, वय, यांचें बलाबल पाहून घृतादिक स्नेहांची पोटांत घ्यावयाची मात्रा हीनें[1] ह्मणजे अल्प व मध्यमे[2] व ज्येष्ठ[3] यांतून शक्तितारतम्य पाहून योजावी.

## स्नेहाच्या मात्रेचे प्रमाण सोडून स्नेह घेतला असतां दोष होतो तें.

अमात्रयातथाकालेमिथ्याहार[4]विहारतः[5] ॥
स्नेहःकरोतिशोफार्शस्तंद्रानिद्राविसंज्ञितं ॥

**अर्थ**–घृतादिक स्नेह घ्यावयाचें प्रमाण सांगीतलें आहे, त्यापेक्षां कमी अथवा अधिक घ्यालें असतां, व घ्यावयाचा काळ सोडून भलत्याच काळीं घ्यालें असतां; व घृतादिक स्नेह पिऊन मिथ्याहार व मिथ्याविहार केले असतां, त्या स्नेहापासून सूज व मुळव्याध हे रोग होतात, व डोळ्यांवर झांपड पडोन फार निद्रा येते; आणि संज्ञेचा नाश होतो.

## दीप्ताग्नि, व मध्यमाग्नि, व अल्पाग्नि यांचेठायीं स्नेहाची मात्रा किती द्यावी तें प्रमाण.

देयादीप्ताग्नयेमात्रास्नेहस्यपलसंमिता ॥
मध्यमायत्रिकर्षास्याज्जघन्यायद्विकार्षिकी ॥

**अर्थ**–ज्या मनुष्याचा अग्नि प्रदीप्त आहे, त्या मनुष्यास घृतादिक स्नेह एक पळ प्रमाण घ्यावयास द्यावा; व ज्याचा मध्यम अग्नि आहे, त्या मनुष्यास तीनकर्ष प्रमाण द्यावा, व ज्याचा मंद अग्नि आहे, त्या मनुष्यास दोन कर्ष प्रमाण द्यावा.

---

१ स्नेह घ्यावयाची जी दोन कर्ष प्रमाणाची मात्रा ती हीन मात्रा जाणावी.

२ तीन कर्ष प्रमाणाची जी मात्रा ती मध्यम जाणावी.

३ एकपळ प्रमाणाची जी मात्रा ती ज्येष्ठ जाणावी.

४ अकाळीं, थोडें, अथवा फार भक्षण केलें असतां; व आपल्या प्रकृतीस पदार्थ भावत नाहीं; तो पदार्थ भक्षण केला असतां, व देशविरुद्ध पदार्थ, व कालविरुद्ध पदार्थ, व संयोग विरुद्ध पदार्थ हे भक्षण केले असतां; त्याला मिथ्याहार ह्मणतात.

५ कांहीं एक कर्म करावयाचे सामर्थ्य नसतां बळेंच कर्म करितो. त्याला मिथ्या विहार ह्मणतात.

## दुसऱ्या स्नेहाच्या तीन मात्रा आहेत त्या.

अथवास्नेहमात्राःस्युस्तिस्रोन्याःसर्वसंमताः ॥ अहोरात्रेणमहती जीर्यत्यन्हितुमध्यमा ॥ जीर्यत्यल्पादिनार्धेनसाविज्ञेयासुखावहा ॥

अर्थ—सांप्या ऋषींस मान्य अशा दुसऱ्या घृतादिकस्नेह प्यावयाच्या मात्रा तीन प्रकारच्या आहेत; त्या सांगतो. जी मात्रा आठाप्रहरानीं पचन होते, तिला महती ह्मणतात. ती एक पळ प्रमाण जाणावी; व जी मात्रा एका दिवसानें पचन होते, तिला मध्यमा ह्मणतात. ती तीन कर्ष प्रमाण जाणावी; व जी मात्रा दोन प्रहरानीं पचन होते, तिला अल्पा ह्मणतात. ती दोन कर्ष प्रमाण जाणावी, व ही सुखदेणारी जाणावी.

## अल्पादिक मात्रांचे गुण.

अल्पास्याद्दीपनीवृष्यास्वल्पदोषेषुपूजिता ॥ मध्यमास्नेहनीज्ञेया बृंहणीभ्रमहारिणी ॥ ज्येष्ठाकुष्ठविषोन्मादग्रहापस्मारनाशिनी ॥

अर्थ—घृतादिकस्नेह प्यावयाची जी दोनकर्ष प्रमाणाची अल्प मात्रा आहे, ती जठराग्नि प्रदीप्त करून स्त्रीसंगाविषयीं इच्छा देते; व वातादिक दोषांचा अल्प प्रकोप दूर करिते; व तीन कर्ष प्रमाणाची जी मध्यम मात्रा आहे, ती शरीराला पुष्ट करून धातूची वृद्धि करिते; व भ्रम दूर करिते; व पळ प्रमाणाची जी ज्येष्ठ मात्रा आहे, ती कुष्ठरोग, विषदोष, उन्माद, भूतादिग्रह, व अपस्मार हे रोग दूर करिते.

## दोषांचे ठायीं अनुपान विशेष.

केवलंपैत्तिकेसर्पिर्वातिकेलवणान्वितं ॥
देयंबहुकफेवापिव्योषक्षारसमन्वितं ॥

अर्थ—पित्ताचा कोप असतां नुस्ते तूप प्यावयास द्यावें, व वायूचा कोप असतां तुपांशीं सैंधव मेळउन द्यावें; व कफाचा फार कोप असतां, व्योष[1] व जवखार यांचे चूर्ण करून तुपांत मेळऊन तें तूप द्यावें.

## ज्यांना तूप द्यावयाचें ते.

रूक्षक्षतविषार्तानांवातपित्तविकारिणां ॥
हीनमेधास्मृतीनांचसर्पिःपानंप्रशस्यते ॥

अर्थ—रूक्ष, उरःक्षतरोग, व विषदोष इहीं करून पीडित आहे, शरीर ज्यांचें अशा मनुष्यांस, व ज्या मनुष्यास वातपित्ताचा विकार आहे त्यांस, व हीन आहे, धारणरूपा व स्मरणरूपा बुद्धि ज्यांची, इतक्या मनुष्यांस तुपाचें पान प्रशस्त आहे.

---

१ सुंठ, मिरें, पिंपळी यांचे समुदायाला व्योष ह्मणतात.

## जे तेल प्यावयास योग्य ते रोगी.

क्रुमिकोष्ठानिलाविष्टाःप्रवृद्धकफमेदसः ॥
पिबेयुस्तैलसात्म्यायेतैलंदीप्ताग्नयस्तुये ॥

अर्थ–जंतविकार आहे, पोटांमध्यें ज्यांचा, व वायुकरून व्याप्त आहे शरीर ज्यांचें, व प्रवृद्ध जाहला आहे, कफ, व मेद ज्यांचा आशा मनुष्यानीं तेल प्यावें; व ज्यांच्या प्रकृतीला तेल भावतें, त्याणीं, व प्रदीप्त आहे, अग्नि ज्यांचा त्या मनुष्यांनीं तेल प्यावें.

## जे मांसस्नेह प्यावयास योग्य ते.

व्यायामकर्षिताःशुष्करेतोरक्तामहारुजः ॥
महाग्निमारुतप्राणावसायोग्यानराःस्मृताः ॥

अर्थ–मल्लादियुद्ध, व धनुष्यादिकांचे आकर्षण इहींकरून पीडित आहे शरीर ज्यांचें, व क्षीणआहे धातु व रक्त ज्यांचें, व शरीराचेठायीं मोठ्या आहेत वेदना ज्यांच्या, व अग्नि व वायू हे आहेत, प्रबळ ज्यांना अशा प्रकारचे मनुष्य मांसाचा स्नेह प्यावयास योग्य आहेत, असें जाणावें.

## हाडांचे तेल प्यावयास योग्य ते.

क्रूराशयाःक्लेशसहावातार्तादीप्तवन्हयः ॥
मज्जानंचपिबेयुस्तेसर्पिर्वासर्वतोहितं ॥

अर्थ–दुष्ट आहे कोष्ठ ज्यांचा, व दुःखसहन करणारे मनुष्य, व जे मनुष्य वायूनें पीडित आहेत ते, व प्रदीप्त आहे अग्नि ज्यांचा, अशा मनुष्यानी हाडांचे तेल प्यावें, अथवा तूप प्यावें, तेणेंकरून शरीरास हित होतें.

## स्नेह केव्हां घ्यावे तें.

शीतकालेदिवास्नेहमुष्णकालेपिबेन्निशि ॥
वातपित्ताधिकेरात्रौवातश्लेष्माधिकेदिवा ॥

अर्थ–शीतकालाचेठाई घृतादिकस्नेह दिवसास प्यावें, व उष्ण काळाचेठायीं वातपित्त प्रबळ असतां रात्रीस प्यावें, व कफवायू प्रबळ असतां दिवसास, प्यावें; याप्रमाणें स्नेह प्यावयाचा क्रम जाणावा.

---

१ ज्या मनुष्यांचा अग्नि प्रदीप्त आहे, व वायू शरीराचेठायीं जसा वर्तावा तसा वर्ततो, व अग्नीला सामील होऊन अन्नाचे पचन करवितो; यास्तव अग्नि व वायु हे शक्ति देणारे आहेत, व हे अनुकूल असले तर मांसाचा स्नेह पचन होतो, नाहीं तर होत नाहीं.

२ आम १ अग्नि २ पक्व ३ मूत्र ४ यकृत ५ प्लीहा ६ यांचीं स्थानें, व ऱ्हदय ७ उंदुक ८ फुफुस ९ यानवांचे समुदायाला कोष्ठ ह्मणतात; हे पदार्थ कोष्ठाचे ठायीं राहातात असें जाणावें.

## स्नेहाची स्थळविशेषीं योजना.

नस्याभ्यंजनगंडूषमूर्धकर्णाक्षितर्पणे ॥
तैलंघृतंवायुंजीतदृष्ट्वादोषबलाबलं ॥

अर्थ—नाकांत घालण्याविषयीं, व अंगास मर्दन करण्याविषयीं, चुळा टांकण्याविषयी, व मस्तक, कर्ण, व डोळ्यांचे तृप्ति विषयीं वातादिक दोषांचे बलाबल पाहून तेल; अथवा तूप यांची योजना करावी.

## स्नेहाची वेगळीं वेगळीं अनुपानें.

घृतेकोष्णजलंपेयंतैलेयूषःप्रशस्यते ॥
वसामज्जोःपिबेन्मंडमनुपानंसुखावहं ॥

अर्थ—तूप पिऊन त्याजवर कोमट पाणी प्यावें; व तेल पिऊन त्याजवर यूष[1] प्यावा; मांसस्नेह व हाडांचें तेल पिऊन त्याजवर मंड[2] प्यावा; तेणेंकरून सुखावह होतें. याप्रमाणें अनुपानें जाणावीं.

## भाताबरोबर स्नेह द्यावयाचा तो.

स्नेहद्विषःशिशून्वृद्धान्सुकुमारान्कृशानपि ॥
तृष्णातुरानुष्णकालेसहभक्तेनपाययेत् ॥

अर्थ—घृतादिक स्नेहाचा द्वेष आहे ज्यांस, व बाल, वृद्ध, नाजुक मनुष्य, व तृषेकरून पीडित अशा मनुष्यांस उष्ण काळाचे ठायीं भाताबरोबर घृतादिक स्नेह द्यावें.

## स्नेहावांचून यवागूपासून सद्यः स्नेहन होतें तें.

सर्पिष्मतीबहुतिलायवागूःस्वल्पतंदुला ॥
सुखोष्णासेव्यमानातुसद्यःस्नेहनकारिणी ॥

अर्थ—तीळ कुटून त्याची कोंद करून त्यांत थोडके तांदुळ मेळऊन तूप व पाणी त्यांत घालून चुलीवर कढऊन पातळ लापशी करावी; तिला यवागू असे ह्मणतात ती यवागू कोमट कोमट घेतली असतां त्याच वेळेस शरीराचे ठायीं धातु उत्पन्न होते असें जाणावें.

---

१ तांदूळ, कुलित्थ, इत्यादिक धान्य एक पळ प्रमाण घेऊन त्यांत पाणी एक प्रस्थ घालून कढवून किंचित् घणसर पेजे सारिखें करावें ह्मणजे त्याला यूष असे ह्मणतात.

२ भातावरले पेजेला मंड ह्मणतात.

## धारोष्णदुधापासून तत्काळ धातू उत्पन्न होते तें

शर्कराचूर्णसंभृष्टेदोहनस्थेघृतेतुगां ॥
दुग्ध्वाक्षीरंपिबेदुष्णंसद्यःस्नेहनमुच्यते ॥

अर्थ–खडीसाखरेचें चूर्ण तुपांत घालून तें तूप चुलीवर थोडें गरम करून दूध काढावयाचे भांड्यांत घालावें, मग त्या भांड्यांत गाईचे दूध त्याचवेळेस गरम गरम आहे तोंच प्यावें. तेणेकरून त्याचवेळेस शरीराचे ठायीं धातु उत्पन्न होते.

## मिथ्याचारेंकरून स्नेह जिरला नाहीं त्याचा प्रतीकार.

मिथ्याचाराद्बहुत्वाद्वायस्यस्नेहोनजीर्यति ॥
विष्टभ्यवापिजीर्येतवारिणोष्णेनवामयेत् ॥

अर्थ–घृतादिक स्नेह पिऊन त्याचेवर व्यायामादिक परिश्रम जाहले असतां, तेणेंकरून ते स्नेह जिरले नाहींत, अथवा फार पिण्यांत आले, यास्तव जिरले नाहींत, अथवा मळाचा अवरोध करून जिरले, अशा मनुष्याला उष्ण पाणी देऊन ओकवावें, तेणेंकरून अजीर्णाचा दोष दूर होतो.

## दुसरा स्नेहाचे अजीर्णाचा प्रतीकार.

स्नेहस्याजीर्णशंकायांपिबेदुष्णोदकंनरः ॥
ततोद्गारोभवेच्छुद्धोभक्तप्रीतरुचिस्तथा ॥

अर्थ–घृतादिक स्नेह पिऊन अजीर्ण जाहले अशी शंका प्राप्त जाहली असतां, त्यावर उष्ण पाणी प्यावें, तेणेंकरून शुद्ध चांगला ढेंकर येऊन अन्नावर इच्छा गेली असतां; अजीर्ण दूर जाहलें असें जाणावें.

## स्नेहेकरून पित्ताचा कोप होऊन ताहान वाढली असतां उपाय.

स्नेहेनपैत्तिकस्याग्निर्यदातीक्ष्णतरीकृतः ॥ तदास्योदीयतेतृष्णा
विषमांतस्यपाययेत् ॥ शीतंजलंवामयेच्चपिपासातेनशाम्यति ॥

अर्थ–ज्या मनुष्याची आधींच पित्ताची प्रकृति त्यांत तो मनुष्य घृतादिक स्नेह प्याला, तेणेंकरून त्या मनुष्याचा अग्नि फार तीक्ष्ण होउन त्यापासून ताहान फार वाढली असतां तिचे शमनार्थ मनुष्यांस थंड पाणी द्यावें, व ओकारी करवावी, तेणेकरून तहान दूर होते.

## जे स्नेह प्यावयास योग्य नाहींत ते.

अजीर्णीवर्जयेत्स्नेहमुदरीतरुणज्वरी ॥ दुर्बलोरोचकीस्थूलो मूर्छार्तोमदपीडितः ॥ दत्तबस्तिर्विरिक्तश्चवांतितृष्णासमन्वितः ॥ अकालप्रसवानारीदुर्दिनेचविवर्जयेत् ॥

**अर्थ**–अजीर्णाचा विकार, उदररोगादि आहेत ज्यांस ते, तरुण ज्वरी[1], दुर्बळ मनुष्य, व आवडणें आहे ज्यांस तो, व ज्यांचे शरीर फार मोटें आहे तो, व मूर्छा व मद इहीं करून पीडित, व बस्तिकर्म[2] केलेला मनुष्य, व ज्याला ढाळ होतात तो, व ओकारी व तहान, इहींकरून युक्त व बाळत होण्याचाकाळ सोडून भलत्याच काळीं बाळंत जाहलेली स्त्री, इतक्या रोग्यास घृतादिक स्नेहपान करवूनये; व ज्यादिवशीं अभाळ येतें त्यादिवशीं देऊंनये.

## जे स्नेह प्यावयास योग्य ते.

स्वेद्यसंशोध्यमद्यस्त्रीव्यायामासक्तचिंतकाः ॥ वृद्धाबालाःकृशारुक्षाःक्षीणास्राःक्षीणरेतसः ॥ वातार्तितिमिरार्तायेतेपांस्नेहमनुत्तमं ॥

**अर्थ**–औषधादिकें करून ज्यांचे आंगाचा घाम काढिला आहे असे मनुष्य, रेचक औषधें करून शोधन केलेले मनुष्य, मद्य पिणारे, स्त्री, परिश्रम जाहलेले, चिंतेंकरून व्याप्त, वृद्ध, बाळ, कृश, रूक्ष, क्षीण आहे रक्त ज्यांचें असे मनुष्य, धातुक्षीण मनुष्य, वायुकरून पीडित, तिमिर रोगांनी व्याप्त, अशाप्रकारचे मनुष्य घृतादिक स्नेह प्यावयास योग्य आहेत असें जाणावें.

## स्नेह पिऊन चांगला स्निग्ध जाहला याचें लक्षण.

वातानुलोम्यंदीप्तोग्निर्वर्चःस्निग्धमसंहतं ॥ मृदुस्निग्धांगताग्लानिः स्नेहोद्वेगोथलाघवं ॥ विमलेंद्रियतासम्यक्स्निग्धेरुक्षेविपर्ययः ॥

**अर्थ**–घृतादिक स्नेह पिऊन अंगाचा रूक्षपणा जाऊन मनुष्य चांगला स्निग्ध जाहला असतां त्याचीं लक्षणें. वायु शरीरांत चांगला वर्ततो, व मळ सचिक्कण असोन मोकळा होतो, व शरीर मृदु असोन सचिक्कण होतें, व ग्लानि रहित होतें, व घृतादिक स्नेहाचें सेवन केलें असतां त्याचे उपद्रव होत नाहींत, शरीर हलकें होतें, व इंद्रियें निर्मळ होतात, याप्रमाणें लक्षणें जाणावीं; व रूक्ष मनुष्य जो त्याची या लक्षणाहून विपरीत लक्षणें जाणावीं. तात्पर्य शरीराचें ठायीं यथार्थ स्नेह झाले नसतां जो रूक्ष ह्मणजे भस्मरोगी त्यास विपरीत लक्षणें जाणावीं.

---

१ ज्वर परिपक्व जाहला नाहीं तो मनुष्य.

२ गुदादिकाचे ठायीं तेलादिकें करून चिपळ्या मारावयाचा प्रयोग आहे.

## स्नेहपान फार केलें त्याचे उपद्रव.

भक्तद्वेषोमुखस्रावोगुदेदाहःप्रवाहिका ॥
तंद्रातिसारःपांडुत्वंभृशंस्निग्धस्यलक्षणं ॥

अर्थ–जो मनुष्य घृतादिक स्नेह फार प्याला, त्याचीं लक्षणें अन्नाचा कंटाळा करितो, तोंडावाटें लाळ पडते, गुदाचे ठायीं दाह होतो, मळाचे भस्रे हगतो, डोळ्यांवर झांपड पडते, अतिसार होतो, व शरीर पीतवर्ण होतें, याप्रमाणें लक्षणें जाणावीं.

## रुक्षाला स्निग्ध करणें, व स्निग्धाला रुक्षकरणें त्याचा प्रकार.

रुक्षस्यस्नेहनंस्नेहैरतिस्निग्धस्यरुक्षणं ॥
श्यामाकचणकाद्यैश्चतक्रपिण्याकसक्तुभिः ॥

अर्थ–रुक्ष मनुष्य जो त्यास स्निग्ध पदार्थ जे लोणी काढिल्या वेगळें ताकाचा मठ्ठा, व तिळांचा कल्क, व जवांचे सत्व इहींकरून स्निग्ध करावा; व स्निग्ध मनुष्य जो त्यास रुक्ष पदार्थ जे सांवा, धान्य, व चणे इत्यादिकें करून रुक्ष करावा.

## स्नेहांचें सेवन केलें असतां प्रकृति कशी होते ती.

दीप्ताग्निःशुद्धकोष्ठश्चपुष्टधातुर्जितेंद्रियः ॥
निर्जरोबलवर्णाढ्यःस्नेहसेवीभवेन्नरः ॥

अर्थ–घृतादिक स्नेहांचें सेवन करणारा मनुष्य जो त्याचीं लक्षणें. अग्नि प्रदीप्त होतो. कोष्ठ शुद्ध असतो, शरीरांत रसादिक धातु पुष्ट होतात, व तोमनुष्य जितेंद्रिय असतो, व जरारहित असतो, बळ व कांति इहीं करून युक्त असतो, यांप्रमाणें लक्षणें जाणावीं.

## स्नेहपानाचें ठायीं वर्ज्य पदार्थ.

स्नेहेव्यायामसंशीतवेगाघातप्रजागरान् ॥
दिवास्वप्नमभिष्यंदिरुक्षान्नंचविवर्जयेत् ॥

अर्थ–स्नेह पिणारा जो मनुष्य त्याणें परिश्रम करूंनये, व अतिशीत पदार्थ, व मळमूत्रादिकांचे संधारण, व जागरण, व दिवसास नीज, व कफकारक पदार्थ, व रुक्षान्न इतके पदार्थ वर्ज्य करावे.

## स्नेहपाकविधि.

विघ्नेशक्षेत्रपालौबटुकमपिशुभेवासरेपूजयित्वा ॥ तैलस्याज्यस्याकिंवारचयतुनिपुणःसंस्कृतिंसंप्रदायात् ॥ आदौवान्हिप्रद

याल्लघुरथशनकैःफेनशब्दावधिःस्यात्पश्चान्मृत्पिंडकैस्तद्दश
भिरलघुभिर्नातिपीनैर्विशोध्यं ॥

अर्थ—गणपाल, क्षेत्रपाल, बटु, यांची, शुभ दिवशीं पूजा करून तैल किंवा तूप सिद्धी करण्याविषयीं गुरुसंप्रदायानें आरंभ करावा. प्रथमतः लहान अग्नी देऊन मग मोठा करीत जावा. तो जोपर्यंत तैलाचाठायीं फेनोत्पत्ति, आणि घृताचेठायीं शब्द होऊंलागले ह्मणजे सिद्ध झालीं. नंतर दाहा मातीचे गोळे अतिमोठे, व अतिलहान नव्हत, असे घेऊन त्याणी शोधावे.

तैलस्येंदुकलांशकेकरिकणाभागस्तुतस्यांशकायेचान्येपिवरा
पयोदरजनीव्हीबेरलोध्रादयः

अर्थ—तैलाचा सोळावा भाग गजपिंपळीं, आणि त्रिफळा, नागरमोथा, हळद, आले लोध्र हे घालावे.

जलस्नेहौषधीनांचप्रमाणंयत्रनोदितं ॥ तत्रस्यादौषधात्स्नेहः
स्नेहात्क्वाथश्चतुर्गुणः ॥ स्नेहाच्चतुर्गुणंक्वाथ्यंसदाचस्नेहसान्नि
धौ ॥ चतुर्गुणंजलंदत्वाक्वाथःक्वाथ्यसमोमतः ॥

अर्थ—जलस्नेह औषधी यांचें प्रमाण जेथें सांगीतलें नाहीं, तेथें औषधांचे चौपट स्नेह, स्नेहाचे चौपट काढा, आणि क्वाथ्यद्रव्य स्नेहाचे चौपट असावे; आणि चौपट पाणी घालून काढा क्वाथ्य तैलादिक द्रव्याबरोबर घ्यावा.

तैलंकृत्वाकटाहेदृढतरविमलेमंदमंदानलेतत्पक्वंनिःस्नेहभावं
गतमिहहियदाशैत्यभावंसमेत्य ॥ मंजिष्ठारात्रिलोध्रैर्जलधर
तगरैःसामलैःसाक्षपथ्यैःसूचीपुष्पांघ्रिनिंबैरुपहितमथितैस्तैल
गंधंजहाति ॥ आम्रजंबूकपित्थानांबीजपूरकबिल्वयोः ॥ शो
धनंतिलतैलस्यपल्लवानांतुपंचकं ॥

अर्थ—कढईमध्यें तेल घालून मदाग्नीवर पचन करावें, तें केवळ तैलच राहिलें, आणि शीत झाले, ह्मणजे मंजिष्ठ, हळद, लोध्र, नागरमोथा, तगर, आवळकाठी, बेहेडा, हरीतकी, पांढरेकेवड्याचा मुळया, कडूनिंब, हे आत घालून मथन करावे, ह्मणजे तैलाचा गंधी जात्ये, आणि आंबा, जांबूळ, कवठ, माहाळुंग, बेल, या पांच वृक्षांचे पल्लव तिलतैलाचे शोधक आहेत.

कल्काच्चतुर्गुणःस्नेहःस्नेहात्क्वाथश्चतुर्गुणः ॥ क्वाथाच्चतुर्गुणंवारि
क्वाथःक्वाथ्यसमोमतः ॥ मृदौचतुर्गुणंदेयंकठिणेष्टगुणंजलं ॥
कठिनात्कठिनेद्रव्येवारिषोडशभागिकं ॥ कर्षादितःपलंयाव

द्वारिषोडशकंक्षिपेत् ॥ तदूर्ध्वंकुडवंयावत्क्षिपेदष्टगुणंजलं ॥ प्रस्थादितःक्षिपेन्नीरंवारियावच्चतुर्गुणाः ॥ शब्दहीनोऽग्निनि क्षिप्तःस्नेहसिद्धिर्भवेत्तदा ॥

अर्थ–कल्कापेक्षा चौपट स्नेह, व स्नेहापेक्षां काढा चौपट, आणि काढ्यापेक्षां पाणी चौपट, आणि काढा क्वाथ्य द्रव्यासमान असावा. जर औषधें मृदु आहेत, तर पाणी चौपट, व कठिण असतील तर पाणी आठपट, आणि फार कठिण द्रव्यें, असली तर जल सोळाभाग घालावे. कर्षापासून, चारतोळे पर्यंत औषधें आहेत तर, पाणी सोळाभाग, चार तोळ्यापासून १७ तोळेपयत आठभाग, आणि शेरापासून पुढें पाणी चौपठ घालावे; व स्नेहसिद्धि झाल्याची परीक्षा अशी कीं, स्नेह अग्नीवर टाकिला असतां शब्द झाला नाहीं, ह्मणजे सिद्ध झाला.

यदाफेनोद्गमोतैलेफेनशांतिश्चसार्पिषि ॥ वर्णगंधरसोत्पत्तिःस्नेह सिद्धिस्तदाभवेत् ॥ अकल्कद्रव्ययोग्यानांकठिणानांविचारतः ॥ क्वाथोविधीयतेन्येषांकल्कएवभिषग्मतः ॥

अर्थ–जाकालीं कढतानां तैलावर फेण आला, व तुपावरचा फेण नाहींसा झाला, व वर्ण, गंध, रस, यांची उत्पत्ती झाली, ह्मणजे स्नेह सिद्ध झाले. जी द्रव्यें कल्क करण्याविषयीं योग्य नाहींत; आणि फार काठिण आहेत. त्यांचा काढा वैद्यानें विचारानें करावा, आणि बाकींचे मृदु द्रव्यांचा कल्कच वैद्यानां मान्य आहे.

तैलस्येंदुकलांशकेनविकसद्यात्वातुमूर्छाविधीयेचान्येत्रिफलाप योदरजनीन्हीबेरलोध्रान्विताः ॥ सूचीपुष्पवटावरोहनालिकास्त स्याथपादांशकाःपाच्यास्तैलजगंधदोषहृतयेकल्कीकृतास्तद्विधैः ॥

अर्थ–तैल व घृत यांच्या गंधापासून रोग्याला मूर्छादि होऊलागली असतां, तैलाचें निर्गंधिकरण करावें, तें असें तैलाचा सोळावा हिसा मंजिष्ठ, आणि त्रिफळा, नागरमोथा हळद, वाळा, लोध्र, पांढरेंकेतकीचे व वडाचे पारंबे, दालचिनी, हें चतुर्थांश, ह्या सर्वांचें कल्क त्या तैलात किंवा घृतात घालून पचन करावें. ह्मणजे त्यांचा दुर्गंध नाहींसा होतो.

## स्नेहपाकविधि.

दृषतिपिष्टोभवेत्कल्कःक्वाथोग्निक्वथितोमतः॥स्नेहपाकस्त्रिधाप्रो क्तोमृदुर्मध्यःखरस्तथा ॥ ईषत्सरसकल्कस्तुस्नेहपाकोमृदुर्भ वेत् ॥ मध्यपाकश्चसित्थश्चकल्केनीरसकोमले ॥ ईषत्कठिण कल्कश्चस्नेहपाकोभवेत्खरः ॥ तदूर्ध्वंदग्धपाकःस्याद्दाहकृ न्निष्प्रयोजकः ॥ अमपाकश्चनिर्वीर्योवन्हिमांद्यकरोगुरुः ॥

नस्यार्थस्यान्मृदुःपाकोमध्यमःसर्वकर्मसु ॥ अभ्यंगार्थंखरःप्रो क्तोयुंज्यादेवंयथोचितं ॥ घृततैलगुडादींश्चसाधयेन्नैकवासरे ॥ प्रकुर्वंत्युषिताश्चैतेविशेषाद्गुणसंचयं ॥

अर्थ–जो दगडावर पाणीघालून बारीक वांटून घ्यावयाचा तो कल्क, व जो अ- ग्नीवर सिध केला तो काढा, स्नेहाचा पाक तीनप्रकारचा. मृदु, मध्य, आणि खर त्यामध्यें जो थोडा कल्क घालून, किंवा खरस घालून करावा तो मृदु, व जा कल्कामध्यें निरस व कोमल द्रव्यें आहेत त्याचा पाक मध्य, व जा कल्कामध्ये कठिण द्रव्यें आहेत त्यांचा पाक खर जाणावा. याउपरांत जो खर पाक तो दाहकारक निःप्रयोजक आहे. जीं द्रव्यें आंबवून पचन केलीं तो पाक निर्वीर्य अग्निमांद्यकर गुरू आहे. मृदुपाक नस्या- र्थ घ्यावा, व मध्यम पाक सर्वकर्माविषयीं घ्यावा. आणि अभ्यंगार्थ खरपाक घ्यावा; या प्रमाणें यथायोग्य पाक योजावा. घृत, तेल, गुड हे एकदिवसांत तयार करूंनये हे शि ळे झाल्यावर जाजती गूण करितात.

तैलंसंस्थाप्यपात्रेविधिवदथपचेद्वासरादाग्निमानात्क्वाथैर्दुग्धैश्च कल्कैस्तदनुसुरभिभिःशोधनीयैर्विशुद्धैः ॥ कस्तूरीचंदनाक्कोज लजलजसटीरक्तपाठीरकुष्ठंत्वङ्मंजिष्ठातुरुष्काागरुनखरदलः पीतकंकोलमुख्यैः ॥

अर्थ–पात्रामध्यें तेल ठेऊन नंतर काढे, दुग्ध, कल्क, सुगंध, शोधक औषधें, कस्तूरी, चंदन, कापूर, वाळा, नागरमोथा, कचोरा, रक्तचंदन, कोष्ट, दालचीनी, मं जिष्ट, अगर, नखला, तमालपत्र, आणि कंकोळ ह्या मुख्य औषधांचे कल्कादिक घालून विधिपूर्वक एकदिसांत पचन करावें.

## लाक्षारसविधि.

दशांशंलोध्रमादायतद्दशांशंचसार्जिकां ॥ किंचिच्चबदरीपत्रंवा रिषोडशधास्मृतं ॥ वस्त्रपूतोरसोग्राह्योलाक्षायाःपादशोषितः ॥

अर्थ–लाखेचे दाहावा हिसा लोध्र, त्या लोध्राचे दशांश सर्जिक्षार, आणि थोडा बोरीचा पाला, आणि सोळापट पाणी घालून चतुर्थांश काढा उतरावा. याचें नाव लक्षारस. ह्मणजे लाखेचें शिरें.

## आसव.

द्रवेषुचिरकालस्थंयद्द्रव्यंसंधितंभवेत् ॥ आसवारिष्टभेदैस्तत्प्रो च्यतेभेषजोचितं ॥ यदपक्कौषधांबुभ्यांसिद्धंमद्यंसआसवः ॥

**अर्थ**—द्रवपदार्थामध्यें जें द्रव्य फारदिवस राहून मिळतें तें आसव, अरिष्ट, याभेदानें होतें, तें जनाला औषधाला उपयोगी पडण्यांजोगें आहे. व जें औषध पाण्यांत अभिवाचून सिद्ध झालें, त्याला मद्य किंवा आसव ह्मणावें.

## स्नेहपानानंतर घाम काढावयाचा विधि प्रथम त्याचे भेद.

स्वेदश्चतुर्विधःप्रोक्तस्तापोष्मौस्वेदसंज्ञितौ ॥
उपनाहोद्रवःस्वेदःसर्वेवातार्तिहारिणः ॥

**अर्थ**—चारप्रकारचे घाम आहेत, त्यांची नामें ताप, उष्ण, उपनाह, द्रव, हे चार प्रकारचे घाम वायूची पीडा दूर करणारे आहेत, असें जाणावें.

## वायूचे तारतम्येंकरून अधिक न्यून मध्यम याची योजना.

महाबलेमहाव्याधौशीतिस्वेदोमहान्स्मृतः ॥
दुर्बलेदुर्बलस्वेदोमध्येमध्यतमामितः ॥

**अर्थ**—ज्याचे शरीरात मोठा बळकट वायूचा रोग आहे, त्याचे अंगातून फार घाम काढावा; व हलका रोग आहे, त्याचे अंगातून थोडा घाम काढावा; व मध्यम रोग आहे, त्याचे अंगातून मध्यम घाम काढावा.

## रोगविशेषेंकरून घामाचा विशेष.

बलासेरूक्षणःस्वेदोरूक्षःस्निग्धःकफानिले ॥ कफमेदावृतेवा
तेकोष्णगेहरवेःकरान् ॥ नियुद्धंमार्गगमनंगुरुप्रावरणंध्रुवं ॥
चिंताव्यायामभारांश्चसेवेतामयमुक्तये ॥

**अर्थ**—कफाचा रोग असतां, रूक्ष पदार्थ जे वालुकादि इहींकरून अंगाचा घाम काढावा, व कफवायूचा रोग असतां, स्निग्ध व रूक्ष या दोहो पदार्थेंकरून घाम काढावा; व कफमेदोयुक्त वायूचा रोग असतां, घरांत ज्या जाग्यांत गर्मी असेल त्या जाग्यांत बसून अंगाला सहन होई असी थोडी थोडी गर्मी घ्यावी; व सूर्याचें किरण अंगावर घ्यावें, व कुस्ती करावी, व कांहीं थोडा मार्ग चालावा, कांबळें धाबळ इत्यादिक पांघरावी, व कांहींएक चिंतन करावें, उगेंच बसोंनये; परिश्रम करावा, व कांहींएक अंगावर भार घ्यावा. इतके उपाय घाम निघण्याविषयीं करावे तेणेंकरून कफमेदोयुक्त जो वायूचा रोग आहे तो दूर होतो.

## जांचा पूर्वी घाम काढावयाचे तें.

येषांनस्यंविधातव्यंबास्तिश्चापिहिदेहिनां ॥
शोधनीयाश्चयेकेचित्पूर्वंस्वेद्याश्चतेमताः ॥

अर्थ—नस्यकर्माविषयीं जे योग्य ते, बस्तिकर्माविषयीं जे योग्य ते, व ढाळक देण्याविषयीं जे योग्य ते, इतक्या मनुष्यांचे अंगाचा पाहिल्यानें घाम काढून नंतर नस्यादिक उपाय करावे.

स्वेद्याःपूर्वंत्रयोपीहभगंदर्यर्शसितथा ॥

आश्मर्याचातुरोजंतुःशमयेच्छस्त्रकर्मणा ॥

अर्थ—ज्या मनुष्याला भगंदर रोग आहे तो, व मुळव्याध आहे तो, व अश्मरी रोगेकरून पीडित आहे तो, अशा तीनप्रकारचे रोग्यांचे अंगाचा पहिल्यानें घाम काढून नंतर शस्त्रकर्मेकरून हे रोग शमवावे.

## ज्यांचा उत्तर घाम काढावयाचा ते.

पश्चात्स्वेद्यागतेशल्येमूढगर्भगदेतथा ॥

कालेप्रजाताकालेवापश्चात्स्वेद्यानितंबिनी ॥

अर्थ—ज्या स्त्रीचे पोटांत गर्भाचें सल असतें त्याचें पतन जाहलें असतां, व नऊ महिन्यानंतर, अथवा नऊ महिन्याचे आलीकडे बाळंत जाहली असतां तिचे अंगाचा घाम काढावा.

## घाम काढावयाचा देशकाल.

सर्वान्स्वेदान्निवातेचजीर्णाहारेचकारयेत् ॥

अर्थ—हे चोहोंप्रकारचे घाम मनुष्याचे आहाराचे पचन झाल्यानंतर ज्या जाग्यांत वायूचा लेश नसेल त्या जाग्यांत काढावे.

## घाम काढल्यावर कोणत्या मार्गानें दोष दूर होतात.

स्वेदाद्धातुस्थितादोषाःस्वेदःस्विन्नस्यदेहिनः ॥

द्रवत्वंप्राप्यकोष्टांतर्गतायांतिविरेकतां ॥

अर्थ—औषधादिकेंकरून मनुष्याचे अंगाचा घाम काढला असतां, त्या मनुष्याचे व मोठ्या भांड्यांत तेल घालून त्यांत मनुष्य बसविला असतां त्याचे वातादिक दोष रसादि सप्तधातूंचे ठायीं राहतहोतेसाता, कोष्ठामध्यें गेलेअसतां ते दोष पातळ होऊन गुदावाटे ढाळ होऊन पडतात.

## अंगाचा घाम काढल्यावर ढाळ जाहले असतां त्याची चिकित्सा.

स्वेद्यमानशरीरस्यहृदयंशतिलैःस्पृशेत् ॥

स्नेहाभ्यक्तशरीरस्यशीतैराच्छाद्यचक्षुषी ॥

अर्थ–मनुष्याचे अंगाचा घाम काढला असतां, त्या योगानें त्याचे पोटांतील दोष पातळ होऊन गुदावाटे ढाळ होऊन पडले असतां, त्याचे छातीला चंदनाचा लेप करावा; तेणेंकरून प्रकृती स्वस्थ होते; व जो मनुष्य तेलांत बसविला त्या योगानें त्याचे दोष पातळ होऊन गुदावाटे ढाळ होऊन पडले असतां, त्याचे डोळ्यावर कमळाची पानें अथवा केळीचीं पानें थंडाईकरितां ठेवावी. त्या थंडाईकरून ग्लानी दूर होऊन प्रकृती स्वस्थ होते.

## जे घाम काढण्याविषयीं योग्य नाहींत ते.

अजीर्णीदुर्बलोमेहीक्षतक्षीणोपिपासितः ॥ अतिसारीरक्तपि त्तीपांडुरोगीतथोदरी ॥ मदार्तोगर्भिणीचैवनहिस्वेद्याविजानता ॥ एतानपिमृदुस्वेदैःस्वेदसाध्यानुपाचरेत् ॥

अर्थ–ज्या मनुष्याला अजीर्ण आहे तो, व दुर्बळ मनुष्य, व ज्याला परमा आहे तो, व उरक्षतेंकरून पीडित, व ज्याला फार तहान आहे तो, व अतिसार, व रक्तपित्त, व पांडुरोग, व उदररोग हे रोग ज्या मनुष्यांस आहेत ते, व गर्भिणीस्त्री; हे इतके रोगी घाम काढण्याविषयीं योग्य नाहींत. यांचे अंगाचा घाम काढूंनये, जर हे रोगी घाम काढून साध्य होतअसलें, तर हलक्या उपायेकरून थोडा घाम काढावा.

## अल्पघाम काढावयाचीं स्थळें.

मृदुस्वेदंप्रयुंजीततथाह्टन्मुष्कदृष्टिषु ॥

अर्थ–ह्दय, व अंड, व नेत्र यांचा घाम काढणें तो हलका काढावा.

## घाम फार निघाला असतां त्याचे उपद्रव.

अतिस्वेदात्संधिपीडादाहतृष्णाक्लमोभ्रमः ॥ पित्तासृक्पिटिकाकोपस्तत्रशीतैरुपाचरेत् ॥

अर्थ–अंगांतून फार घाम निघालाअसतां, सर्व संधीनां पीडा, तृषा, ग्लानि, भ्रम, रक्तपित्त, हे उपद्रव होतात; व अंगावर फुटकळ्या उत्पन्न होतात; यांचे शमनाविषयीं शीत उपाय करावे. तेणेकरून उपद्रव दूर होतात.

## चारप्रकारचे घाम त्यामध्यें तापसंज्ञक जो घाम त्याचे लक्षण.

तेषुतापाभिधःस्वेदोवालुकावस्त्रपाणिभिः ॥ कपालकंदुकांगारैर्यथायोग्यंप्रजायते ॥

अर्थ–चारप्रकारचे घाम आहेत, त्यामध्यें ताप यानामेकरून जो घाम आहे, तो वाळु, वस्त्र, हात, खापर, चिरगुटांचा गेंद, व निखारे, ईहींकरून वालुकादिकामधून ज्यामध्यें,

जशी जशी शक्ती आहे, तसा तसा उत्पन्न होतो; हे साहा प्रकार सांगीतले, यांची क्रि या कशी करावी ती सांगतों. खैराचे अथवा कणखर लांकडाचे धूमरहित व जळजळी त असे निखारे करून त्यांजवर वाळू तापऊन ती वाळू सुती एरंडाचे पानांत घालू न, त्या पानांची पुरचुंडी करून त्या पुरचुंडीनें मनुष्याचें अंग शेकावें. तेणेंकरून अंगाचा घाम निघतो. हा एक प्रकार, व निखाऱ्यावर आपले हात ऊन करून करून रोग्याचें अंग हातानें शेकावें; व चिरगुटाचा गेंद करून निखाऱ्या जवळ धरून ऊन करून त्या गेंदानें रोग्याचें अंग शेकावें, व नुसतें फडकें निखाऱ्या जवळ धरून ऊन करून त्या फडक्यानें अंग शेकावें; व निखारे खाप्रांत घालून तें खापर रोग्याचे अंगास शेक लागे असें ठेवावें; इतक्या उपायें करून घाम काढावा.

## उष्मसंज्ञक जो घाम त्याचें लक्षण.

उष्मास्वेदःप्रयोक्तव्योलोहपिंडेष्टिकादिभिः ॥ प्रतप्तैरम्लसि क्तैश्चकायेरल्लकवेष्टिते ॥ अथवावातनिर्नाशीद्रव्यक्वाथरसा दिभिः ॥ उष्णैर्घटंपूरयित्वापार्श्वेछिद्रंनिधायच ॥ विमुद्या स्यंत्रिखंडांचधातुजांकाष्ठवंशजां ॥ षडंगुलास्यांगोपुच्छांन लींयुंज्याद्विहस्तिकां ॥ सुखोपविष्टंस्वभ्यक्तंगुरुप्रावरणावृतं हस्तिशुंडिकयानाड्यास्वेदयेद्वातरोगिणं ॥ पुरुषायाममात्रां वाभूमिमुत्कीर्यखादिरैः ॥ काष्ठैर्दग्ध्वातथाभ्युक्ष्यक्षीरधान्या म्लवारिभिः ॥ वातघ्नपत्रैराच्छाद्यशयानंस्वेदयेन्नरं ॥ एवंमाषा दिभिःस्विन्नैःशयानःस्वेदमाचरेत् ॥

**अर्थ**—उष्मा या नामेंकरून जो घाम आहे त्याची क्रिया लोखंडाचा गोळा अथवा वि टकर तापऊन त्याजवर थोडा आंबट[1] पदार्थाचा शिडका देऊन रोगी यास कांबळें पांघर ऊन त्या गोळ्यानें किंवा विटकरानें रोग्याचें अंग शेकावें. तेणें करून घाम निघतो, हा ए क प्रकार; अथवा दशमूळादिक[2] अशीं जीं वायु हारक औषधें त्यांचा काढा अथवा त्या औषधांचा रस उष्ण करून मातीचे घागरींत[3] भरून घागरीचें तोंड बुजऊन त्या घागरीचे कुशीला भोंक पाडून धातूची[4] अथवा लांकडाची अथवा बांबुची दोन हात नळी करावी.

---

१ ताक कांजी इत्यादि आंबट पदार्थ जाणावे.

२ सालवण १ पिठवण २ रिंगणी ३ डोरली ४ गोखरू ५ बेल ६ ऐरण ७ टेंटु ८ पाडळ ९ शिवण १० याचे मूळाला दशमूळ ह्मणतात.

३ त्या घागरीचे तोंडाला दाटा देऊन ती घागर जळजळीत निखाऱ्यावर ठेवा वी तेणें करून त्या नळीवाटें बाफ चांगली बाहेर निघते.

४ तांबें लोखंड इत्यादिक धातूंची नळी करवावी.

त्या नळीला तीन संधी करून तिचें तोंड साहा अंगुळें लांब रुंद करावें; अथवा गाईचे पुच्छासारखें करावें. यानळीचा आकार हत्तीचे सोंडेसारिखा होतो, यास्तव हिला हस्तिशुंडिका नाडी असें ह्मणतात; मग वायूनें पीडित जो मनुष्य त्याणें स्वस्थ बसून अंगाला तूप अथवा तेल लाऊन लेप किंवा रजई अथवा कांबळा पांघरून त्याचे आंत त्या नळीचें तोंड घालून अंगाचा घाम काढावा; अथवा मनुष्याचे साडेतीन अथवा चार हात लांब जमीन खणोन त्यांत खैराचीं लांकडें घालून जाळून कोळसे लवकर बाहेर काढून नंतर ती जमीन दूध व धण्याचें पाणी व ताक अथवा कांजी इहीं करून शिंपून त्या जमीनीवर वायू हारक औषधींचीं पानें हांतरून त्याजवर रोगी यास निजऊन अंगाचा घाम काढावा. याप्रकारें उडीद घेऊन त्याना थोडी वाफ देऊन अर्धकच्चे शिजउन त्या तापलेल्या पाणींत पसरून त्याजवर सुर्ती एरंड आदिकरून वातहारक औषधींचीं पानें घालून त्याजवर रोग्यास निजउन वरते कांबळे पांघरऊन त्याचे अंगाचा घाम काढावा. याप्रकारे उष्मसंज्ञक घामाचीं लक्षणें जाणावी.

## उपनाहसंज्ञक घामाचें लक्षण.

अथोपनाहस्वेदंचकुर्याद्वातहरौषधैः ॥ प्रदिह्यदेहंवातार्तंक्षीरमांसरसान्वितैः ॥ आम्लपिष्टैःसलवणैःसुखोष्णैःस्नेहसंयुतैः ॥

**अर्थ**—उपनाह यानामेंकरून जो घाम आहे, त्याची क्रिया दशमूलादि वायूहारक औषधें आणून कुटून चूर्ण करून त्यांत दूध व हरिणादिकाचे मांसाचा स्नेह हे दोन्हीं मेळवून थोडें गरम करून वायूनें पीडित जें अंग त्या अंगाला सहन होई असा दाट लेप करून वस्त्रादिकांनीं बांधून अंगाचा घाम काढावा; अथवा वायूहारक औषधें आणून कुटून चूर्ण करून ताकांत अथवा कांजींत वाटून त्यांत थोडें सैंधव व तिळांचे तेल मेळवून थोडें गरम करून वायूनें पीडित जें अंग त्या अंगाला सहन होई असा दाट लेप करून वस्त्रादिकानीं बांधून अंगाचा घाम काढावा.

## दुसरा प्रकार व महाशाल्वण प्रयोग.

उपग्राम्यानूपमांसैर्जीवनीयगणेनच ॥ दधिसौवीरकक्षारैर्वीरतर्वादिनातथा ॥ कुलित्थमापगोधूमैरतसीतिलसर्षपैः ॥ शतपुष्पादेवदारुशेफालीस्थूलजीरकैः ॥ एरंडमूलबीजैश्चरास्नामूलकशिग्रुभिः ॥ मिशिकृष्णाकुठेरैश्चलवणैरम्लसंयुतैः ॥ प्रसारण्यश्वगंधाभ्यांबलाभिर्दशमूलकैः ॥ गुडूचीवानरीबीजै

५ सुरती एरंड व रुई व निर्गुंडी इत्यादिकांची पानें वातहारक.

यथालाभंसमाहृतैः ॥ क्षुण्णैःस्विन्नैश्चवस्त्रेणबद्धैःसंस्वेदयेन्नरं महाशाल्वणसंज्ञोयंयोगःसर्वानिलार्तिजित् ॥

**अर्थ**—ग्राम्यमांस[1], आनूपमांस[2], जीवनीयगणाची[3] औषधें, व गाईचे दहीं, सौवीर[4], सज्जीखार, जवखार, बांगडखार, बीरतर्व्यादि गणाची औषधें, व कुलित्थ, उडीद, गहूं, अळशी, (ह्मणजे जवस,)बडीशोप, देवदार, निगुंडी, कलोंजी, एरंडमूळ, एरंडबीज, रास्ना मुळा, शेवगा, बाळंतशेप, पिंपळी रानतुळस, पंचलवण[5], डाळिंब, चांदवेल, आसंध, चिकणामूळ, दशमूळाची औषधे दहा, व गुळवेल, कवचबीज, हीं सारी औषधें यथालाभ जीं मिळतील तीं मेळऊन आणून कुटून थोडी उष्ण करून फडक्यांत पोतंडी बांधून त्या पोतंडीनें रोग्याचे अंग शेकावे. तेणेकरून साऱ्या वायूचा पीडा दूर होतात. व ह्या प्रयोगाला महाशाल्वण प्रयोग असे ह्मणतात, याप्रकारें उपनाह संज्ञक घामाची लक्षणे जाणावी.

## द्रवसंज्ञक घामाचे लक्षण.

द्रवस्वेदस्तुवातघ्नद्रव्यक्काथेनपूरिते ॥ कटाहेकोष्ठकेवापिसूपविष्टोवगाहयेत् ॥ नभिःषडंगुलंयावन्मग्नःक्काथस्यधारया ॥ कोष्ठकेस्कंधयोःसिक्तास्तिष्ठेत्स्निग्धतनुर्नरः ॥ एवंतैलेनदुग्धेनसार्पिषास्वेदयेन्नरं ॥ एकांतरेव्यंतरेवास्नेहोयुक्तोवगाहने ॥ शिरामुखैरोमकूपैर्धमनीभिश्चतर्पयेत् ॥ शरीरेबलमाधत्तेयुक्तस्नेहावगाहने ॥ जलसिक्तस्यवर्धंतेयथामूलेंकुरास्तरोः ॥ तथाधातुविवृद्धिर्हिस्नेहसिक्तस्यजायते ॥ नातःपरतरःकश्चिदु

---

१ कोंबडे बोकड इत्यादिकांचे मासाला ग्राम्य मांस ह्मणतात.

२ करंट ह्मणजे कासव, व चक्रवाक, व मत्स्य इत्यादिक जळचरांचें मांसाला आनूप मांस ह्मणतात.

३ कांकोळी १ क्षीरकांकोळी २ जीवक ३ ऋषभक ४ मेदा ५ महामेदा ६ हरणवेल ७ ज्येष्ठीमध ८ रानमूग ९ रानउडीद १० या दाहा औषधांचे समुदायाला जीवनीयगण असें ह्मणतात.

४ जव कच्चे अथवा भाजून कुटून त्यांत पाणी घालून तीन दिवस ठेवावे, त्याला सौवीर ह्मणतात. याप्रकारें गव्हांचे जाणावें.

५ सैंधव, संचळ, बिडलोण समुद्रमीठ बांगडखार या पांचानां पंचलवण असें ह्मणतात व उपनाहसंज्ञक घामाचा दुसरा प्रकार महाशाल्वण प्रयोग आहे, तेथें टीपेवर दशमुळांची औषधे आहेत त्याजवरून जाणावी.

पायोवातनाशनः ॥ सम्यक्स्विन्नंविमृदितंस्नानमुष्णांबुभिः शनैः ॥ भोजयेच्चानभिष्यंदिव्यायामंचनकारयेत् ॥ मुहूर्तैकंसमारभ्ययावत्स्यात्तच्चतुष्टयं ॥ तावत्तदवगाहेतयावदारोग्यनिश्चयः

**अर्थ**–द्रव यानामें करून जो घाम आहे, त्याची क्रिया दशमूळादि वायुहारक औषधांचा काढा करून रोग्यांचें अंगाला तूप अथवा तेल लाऊन त्याला कढईंत अथवा तांब्याचें मोठ्या भांड्यांत बसऊन तो काढा गरम गरम अंगाला सहन होईसा त्या मनुष्याचे खांद्यावर काढ्याची धार धरावी. ती धार बेंबीवर साहा अंगूळ काढा चढे तों पर्यंत धरावी. याप्रमाणें तेलाची अथवा दुधाची अथवा तुपाची धार धरून मनुष्य घर्मयुक्त करावा. याप्रमाणें एकादिवसाआड अथवा दोहों दिवसा आड करावें. तेणेंकरून शिरांचे मुखावाटे, रोमांच्या छिद्रावाटे, व नाडीवाटे ते स्नेहादि पदार्थ शरीराच्या अभ्यंतरी प्रविष्ट होऊन, शरीराला तृप्त करून बल उत्पन्न करितात, याविषयीं दृष्टांत, झाडांचे मुळांना पाणी घालघालून जशीं झाडें वाढतात, तशीं तेलादिकांत बसविलेल्या मनुष्याच्या रसादि सात धातू वाढतात; आणि वायूचा नाश होतो. याउपायापेक्षा वायूचा नाश होण्याविषयीं दुसरा उपाय नाहीं. हा उपाय पराकाष्ठेचा आहे असे जाणावे. एक मुहूर्तापासून चार मुहूर्त होत म्हणजे एक प्रहर होईपर्यंत. तैलद्रोणींत बसत जावें; तें जों-पर्यंत आरोग्यदर्शन होईल तोंपर्यंत बसत जावे.

## घाम केव्हां पुरे करावा तें.

शीतशूलाद्युपरमेस्तंभगौरवनिग्रहे ॥
दीप्तेग्नौमार्दवेजातेस्वेदनाद्विरतिर्मता ॥

**अर्थ**–अंगातील थंडी, व शूळ यांचा उपशम जाहला असतां, व अंगाचा स्तंभ, व जडपणा हे दूर जाहले असतां, व अग्नि प्रदीप्त जाहला असतां, व अंगाला मृदुपणा आलाअसतां रोग्यांचे अंगाचा घाम काढूंनये. पुरे करावा.

## घाम काढल्यानंतरचे उपचार.

सम्यक्स्विन्नंविमृदितंस्नानमुष्णांबुभिःशनैः ॥
भोजयेच्चानभिष्यंदिव्यायामंचनकारयेत् ॥

**अर्थ**–ज्या मनुष्याचे अंगाचा घाम काढिला आहे, त्यास, व ज्याचें अंगाला तेल लाविलें आहे त्यास, हलके हलके उष्णपाण्यानीं स्नान घालावे; व कफकारक पदार्थ खावयास देऊनये, व परिश्रम करवूंनये, याप्रकारें द्रवसंज्ञक घामाचें लक्षण जाणावे.

## वमनास ऋतुप्राधान्य.

शरत्कालेवसंतेचप्रावृट्कालेचदेहिनां ॥
वमनंरेचनंचैवकारयेत्कुशलोभिषक् ॥

अर्थ–शरदृतू वसंतऋतू वर्षाऋतू यांचे ठायीं मनुष्याना वमन आणि रेचन हीं कुशल वैद्यानें द्यावीं.

## ओकारीविषयीं निषिद्ध पदार्थ.

अजीर्णंशीतपानीयंव्यायामंमैथुनंतथा ॥
स्नेहाभ्यंगंप्रकोपंचदिनैकंवर्जयेत्सुधीः ॥

अर्थ–जडपदार्थ, थंडपाणीं, परिश्रम, व मैथुन, अंगाला तेल लावणें; व रागें भरणें हे विषय ज्यादिवशीं ओकारीचें औषध घ्यावें त्यादिवशीं वर्ज करावे.

## यामानंतर ओकारीचा विधि.

## प्रथम ओकावयाचा काळ.

शरत्कालेवसंतेचप्रावृट्कालेचदेहिनां ॥
वमनंरेचनंचैवकारयेत्कुशलोभिषक् ॥

अर्थ–शरत्कालाचेठायीं[1] व वसंतकालाचेठायीं[2] व प्रावृट्[3] कालाचेयीं कुशल वैद्यानीं मनुष्यास ओकारीचें औषध देऊन ओकवावें व ढाळ द्यावे तेणेंकरून प्रकृती साफ राहते.

## जे ओकावयास योग्य ते.

बलवंतंकफव्याप्तंल्हल्लासार्तिनिपीडितं ॥ तथावमनसात्म्यंच
धीरचित्तंचवामयेत् ॥ विषदोषेस्तन्यरोगेमंदेग्नौश्लीपदेर्बुदे ॥
ल्हृद्रोगकुष्ठवीसर्पमेहाजीर्णभ्रमेषुच ॥ विदारिकापचीकास
श्वासपीनसवृद्धिषु ॥ अपस्मारज्वरोन्मादेतथारक्तातिसारिषु
नासाताल्वोष्ठपाकेषुकर्णस्रावेद्विजिव्हके ॥ गलशुंडयामती
सारेपित्तश्लेष्मगदेतथा ॥ मेदोगवेरुचौचैववमनंकारयेद्भिषक् ॥

अर्थ–बलवंत मनुष्य, व जो कफें करून व्याप्त आहे तो, व ज्याचें तोंडावाटे लाळ पडते तो, व ज्याला ओकारीची सवै आहे तो, व ज्याचें चित्त धीर आहे, व विषदोष, स्तन्यरोग, अग्निमांद्य, श्लीपदरोग, अर्बुद रोग, ल्हृद्रोग, कुष्ठ, विसर्प रोग, परमा, अजीर्ण, भ्रम, विदारिका, गंडमाळेचाभेद, अपचीरोग, कास, श्वास, पीसन, वृद्धि, अपस्मार, ज्वर,

उन्माद, रक्तातिसार, नासापाक, तालुपाक, ओष्ठपाक, कर्णस्राव, द्विजिव्हक, गलशुंड, अतीसार, पित्तश्लेष्म रोग, मेदोरोग, अरुची हे रोग आहेत व इतक्यां रोगांतून एखादा रोग आहे; त्या रोग्यास वैद्यानीं ओकवावें.

## जे ओकवावयास योग्य नाहींत ते.

नवामनीयस्तिमिरीनगुल्मीनोदरीकृशः ॥ नातिवृद्धोगर्भिणी चनचस्थूलक्षतातुरः ॥ मदार्तोबालकोरूक्षःक्षुधितश्चनिरूहितः उदवर्त्यूर्ध्वरक्तीचदुच्छर्दिःकेवलानिली ॥ पांडुरोगीकृमिव्याप्तःपठनात्स्वरघातकः ॥ एतेप्यजीर्णव्यथितावाम्यायेविषपीडिताः ॥ कफव्याप्ताश्चतेवाम्यामधुकक्काथप्रपानतः ॥

**अर्थ**–तिमिररोग, गुल्मरोग, उदररोग हे आहेत ज्या मनुष्यांस ते, व कृश, अतिवृद्ध, गर्भिणीस्त्री, मोठें अंग आहे ज्याचे तो, उरक्षतें करून व मदें करून पीडित आहे तो, बाल, रुक्ष, क्षुधित, निरूहित, ह्मणजे गुदावाटे पिचपनळ्या मारलेल्या आहेत; तो व ज्याला उदावर्तरोग आहे तो, ऊर्ध्वरक्ती[1], व ज्याला ओकारा सहन होत नाहीं तो, ज्याला केवळ वायूचारोग आहे तो, पांडुरोगी, जो जंताचा उपद्रवें करून व्याप्त आहे तो, वेदशास्त्राचें अतिघोषें करून ज्याच्या कंठाचा स्वर फुटला आहे तो इतक्या रोग्यांस ओकारीचें औषध देऊनये, जर हे रोगी अजीर्णेंकरून व विषदोषें करून कफें करून व्याप्त आहेत, तर याना ज्येष्ठीमधीचा अथवा मोहांचे सालीचा काढा पाजून ओकवावे.

## विशेषेंकरून ओकवावयास योग्य नाहींत ते.

सकुमारंकृशंबालंवृद्धंभीरुंनवामयेत् ॥

**अर्थ**–नाजुकमनुष्य, कृश[2], बाल, वृद्ध, भित्रा, या पांचां मनुष्यास ओकारीचें औषध देऊनये

## ओकवावयास विहित पदार्थ.

पीत्वायवागूमाकंठंक्षीरतक्रदधीनिवा ॥ असात्म्यैःश्लेष्मलैर्भोज्यैर्दो पानुत्क्लिश्यदेहिनः ॥ स्निग्धस्विन्नायवमनंदत्तंसम्यक्प्रवर्तते ॥

---

१ रक्तपित्ताचा कोपेंकरून ऊर्ध्वे ज्यांच्या मुखादिकांवाटे रक्त पडतें तो ऊर्ध्व रक्ती जाणावा.

२ कृश, व बाल, व वृद्ध याना ओकऊनये. असें पूर्वी सांगीतले, परंतु हे निश्चयेकरून ओकऊंनये; ह्मणोन फिरोन सांगीतले असे जाणावे.

३ तांदुळाच्या कण्या करून त्यांत साहापट पाणीं घालून कढऊन पातळ कण्हेरी करणे ती यवागू.

**अर्थ**-ज्या मनुष्याला ओकावयाचा त्याला पहिल्याने पोटभर यवागू[1] पाजावी, अथवा दूध, ताक, दहीं हीं पोटभर प्यावयास द्यावी, व प्रकृतीला भावत नाहीं ते पदार्थ, व कफकारक पदार्थ खावयास देऊन मनुष्याचे दोष उचंबळवावे. तेणेंकरून मनुष्य चांगला ओकतो, व ज्या मनुष्यानें घृतपान केलें आहे, त्या मनुष्यास एका दिवसानंतर ओकारीचा प्रयोग केला असतां उत्तम प्रकारचा ओकतो.

## ओकारीविषयीं सात्म्य पदार्थ.

वमनेषुचसर्वेषुसैंधवंमधुवाहितं ॥
बीभत्संवमनंदद्याद्विपरीतंविरेचनं ॥

**अर्थ**-जितके ओकारीचे प्रयोग आहेत, तितक्या प्रयोगामध्यें सैंधव, अथवा मध यांचे मेलन करावें, म्हणजे हितकारक होतात; व बीभत्स[2] वमन द्यावें; मनुष्याला ढाळक देणे तें तुपावांचून द्यावें.

## ओकण्याविषयीं काढा करावयाचे प्रमाण.

क्वाथ्यद्रव्यस्यकुडवंश्रपयित्वाजलाढके ॥
अर्धभागावशिष्टंचवमनेष्ववचारयेत् ॥

**अर्थ** – काढ्याचीं औषधें एक कुडव प्रमाण घेऊन थोडीं कुटून त्यांत एक आढक प्रमाण पाणीं घालून अर्धें पाणीं राही तों पर्यंत काढा करून ओकारी होण्याविषयीं प्यावयास द्यावा.

## ओकण्याविषयीं काढा प्यावयाचें प्रमाण.

क्वाथपानेनवप्रस्थाज्येष्टामात्राप्रकीर्तिता ॥ मध्यमाषण्
मिताप्रोक्तात्रिप्रस्थाचकनीयसी ॥

**अर्थ**– ज्यामनुष्यास ओकावयाचा त्यामनुष्यास नऊ प्रस्थ काढा पाजिला असतां ती मोठी मात्रा जाणावी; व सहा प्रस्थ काढा पाजिला असतां मध्यम मात्रा जाणावी; व तीन प्रस्थ काढा पाजिला असतां हलकी मात्रा जाणावी.

## ओकारीविषयीं कल्कादिकांचें प्रमाण.

कल्कचूर्णावलेहानांत्रिपलंश्रेष्ठमात्रया ॥
मध्यमंद्विपलंविद्यात्कनीयस्तुपलंभवेत् ॥

---

१ तांदुळांच्या कण्या करून त्यांत साहापट पाणीं घालून कढऊन पातळ कण्हेरी करावी, ती यवागू.

२ ओकारीचे औषधांमध्ये तूप घालून वमन द्यावें, त्याला बीभत्स वमन म्हणतात.

**अर्थ**– कल्क, चूर्ण, व अवलेह हीं तीन पळें मनुष्यास दिल्हीं असतां, तीं मोठी मात्रा जाणावी, व दोन पळें दिल्ही असतां मध्यम मात्रा जाणावी, व एक एक पळ दिल्ही असतां हलकी मात्रा जाणावी.

## ओकारीविषयीं उत्तम, मध्यम, कनिष्ठ वेगांचें प्रमाण.

वमनेचापिवेगास्युरष्टौपित्तांतमुत्तमाः
षड्वेगामध्यवेगाश्चचत्वारस्त्ववरामताः

**अर्थ**– मनुष्यास ओकारीचें औषध दिल्हें असतां सातवेग पर्यंत सारे दोष पडोन आठव्ये वेगास पित्त पडलें असतां तें उत्तम वेग जाणावें.तसेच पांच वेग पर्यंत दोष पडोन सहावे वेगाचे ठायीं पित्त पडलें असतां ते मध्यम वेग जाणावे; व तीन वेगपर्यंत दोष पडोन चवथ्या वेगाचे ठायीं पित्त पडलें असतां ते कनिष्ट वेग जाणावे.

## ओकारीविषयीं प्रस्थाचें प्रमाण.

वमनेचविरेकेचतथाशोणितमोक्षणे॥
सार्धत्रयोदशपलंप्रस्थमाहुर्मनीषिणः

**अर्थ**– ओकारी होण्याविषयीं व ढाळ होण्याविषयीं जें औषध प्रस्थ प्रमाण घ्यावयास सांगेल, तेथें साडेतेरा पळांचा प्रस्थ घ्यावा, व शिरा तोडून एक प्रस्थप्रमाण रक्त काढावयाचें असतां तेथे ही साडेतेरा पळांचा प्रस्थ जाणावा.

## ओकारीचे ठायीं औषध विशेषेंकरून कफादिकांचा जय.

कफंकटुकतीक्ष्णेनपित्तंस्वादुहिमैर्जयेत्॥
सस्वादुलवणाम्लोष्णैःसंसृष्टंवायुनाकफं॥

**अर्थ**– तीक्ष्ण औषधें करून कफ जिंकावा, व मधुर असोन जें थंड औषध तेणें करून पित्त जिंकावें, व मधुर व क्षार व आम्ल व उष्ण इहीं करून वायुला मिळाला जो कफ त्यातें जिंकावें.

## कफादिकांनां ओकऊन पाडावयाचीं औषधें.

कृष्णाराठफलैसिंधुकफेकोष्णजलैःपिबेत्॥
पटोलवासानींबैश्चपित्तेशीतजलंपिबेत्॥
सश्लेष्मवातपीडायांसक्षीरंमदनंपिबेत्॥
अजीर्णेकोष्णपानीयंसिंधुपीत्वावमेत्सुधीः॥

अर्थ- कफदोषाचे ठायीं पिंपळी, व गेळफळ, व सैंधव यांचें चूर्ण करून कोमट पाण्यांत मेळऊन प्यालें असतां; ओकारी बरोबर कफ पडतो, व पित्त दोषाचे ठायीं पटोल, व अडुळसा, व कडु निंब यांच्या पानाचें चूर्ण करून थंड पाण्यांत घालून प्यालें, असतां ओकारी बरोबर पित्त पडतें, व कफवायूची पीडा असतां गेळफळाचें चूर्ण दुधांत घालून प्यावें, तेणें करून मनुष्य ओकून कफवायूची पीडा दूर होते; व अजीर्णाचे ठायीं कोमट पाण्यांत सैंधव घालून प्यालें असतां मनुष्य ओकून अजीर्ण दूर होतें.

## ओकिवग्याचे बाह्योपचार.

वमनंपाययित्वाचजानुमात्रासनेस्थितं ॥ कंठमेरंडनालेनस्पृ
शंतंवामयेद्भिषक् ॥ ललाटंवमतःपुंसःपार्श्वौद्वौचप्रबोधयेत् ॥

अर्थ– मनुष्यास ओकारीचें औषध देऊन भुईला गुढगे टेकऊन बसवावा, आणि एरंडाचें मूळ बारीक व लांब असेल तें घेऊन त्याचे तोंडांत घालून तें मूळ कंठाला स्पर्श होई तो हलक्या हातानें पुढें सारावें, या प्रमाणें मागें पुढें सारून वैद्यानीं मनुष्य ओकवावा; व त्या ओकणाराचे कपाळाचे ठायीं व दोन्ही कुशीचे ठायीं हलक्या हातानें चोळावे.

## ओकारी विकोपास गेल्याचीं लक्षणें.

प्रसेकोत्हृद्ग्रहःकोठःकंडुर्दुश्छर्दिताद्भवेत् ॥

अर्थ – मनुष्याला ओकारीचें औषध देऊन त्यामध्यें कांहीं विकार जाहला असतां; त्याचे तोंडावाटे लाळ पडते, व हृदयांस पीडा होते, व अंगावर कंडू होतो.

## ओकारी फार जाहली असतां तिचे उपद्रव.

अतिवांतेभवेत्तृष्णाहिक्कोद्गारोविसंज्ञिता ॥ जिव्हानिःसर्पणंचा
क्ष्णोर्व्यावृत्तिर्हनुसंहतिः ॥ रक्तछर्दिष्ठीवनंचकंठेपीडाचजायते ॥

अर्थ–मनुष्यास ओकारी फार जाहली असतां त्याला तहान फार लागते, उचकी व अंग जड होतें, संज्ञेचा नाश होतो, जीभ वांकडी पडते; नेत्र ताठून ते चंचळ होतात; अथवा भ्रम पडतो, हनुवटीचा स्तंभ होतो, अथवा पीडा होत्ये; तोंडावाटे रक्त पडतें; वारंवार थुंका येतो; व कंठाचे ठायीं पीडा होते, याप्रकारचीं लक्षणें होतात.

## ओकारी फार जाहली असतां चिकित्सा.

वमनस्यातियोगेनमृदुकुर्याद्विरेचनं ॥

अर्थ–मनुष्यास ओकारी फार जाहली असतां, त्याला हलकें ढाळक द्यावें.

## ओकतांओकतां जीभ खोल गेली असतां चिकित्सा.

वमनांतःप्रविष्टायांजिव्हायांकवलग्रहः ॥ स्निग्धाम्ललवणैर्हृद्यैर्घृतक्षीररसैर्हितः ॥ फलान्यम्लानिखादेयुस्तस्यचान्येग्रतोनराः ॥

अर्थ–फार ओकून ओकून मनुष्याची जीभ आंत गेली असतां, मनाला प्रियकर असे आंबट, तिखट, गोड, खारट, पदार्थ भाता बरोबर खावयास द्यावे; व तूप व दूध हीं भाताबरोबर खावयास द्यावीं, व त्या रोग्याचा पुढें दुसऱ्या मनुष्यानीं लिंबू अथवा नारिंग चोखून चोखून खावे, तेणेकरून मनुष्याची जीभ ठिकाणीं येऊन प्रकृती स्वस्थ होते.

## ओकतांओकतां जीभ बाहेर आली असतां उपचार.

निसृतांतुतिलद्राक्षाकल्कलिप्त्वाप्रवेशयेत् ॥

अर्थ–मनुष्याची जीभ ओकून ओकून बाहेर आली असतां, तीळ व द्राक्ष यांचा कल्क करून त्या जिभेला वैद्यानीं लेप करून जीभ आंत न्यावी.

## ओकारीनें डोळ्यांस विकार जाहला असतां उपचार.

व्यावृत्ताक्षिणिघृताभ्यक्तेपीडयेच्चशनैःशनैः ॥

अर्थ– मनुष्याचे ओकून ओकून डोळे ताठले असतां, त्याचे डोळ्याना हलक्या हातानें तूप लाऊन डोळे ठिकाणीं आणावे.

## ओकून ओकून हनुवटीचा स्तंभ जाहला असतां उपचार.

हनुमोक्षेस्मृतःस्वेदोनस्यंचश्लेष्मवातहृत् ॥

अर्थ–मनुष्य फार ओकून ओकून हनवटीचा स्तंभ जाहला असतां त्याचे अंगाचा घाम काढावा. व कफवायुहारक नाकांत औषध घालावें, तेणेकरून हनवटीचा स्तंभ दूर होतो.

## ओकतांओकतां रक्त पडों लागलें असतां उपचार.

रक्तपित्तविधानेनरक्तछर्दिमुपाचरेत् ॥

अर्थ–मनुष्य फार ओकून ओकून रक्त ओकूं लागला असतां, जे उपाय रक्तपित्तास सांगीतले आहेत, ते उपाय करून रक्ताची ओकारी बंद करावी.

## ओकारी फार होऊन तहान लागली असतां उपचार.

धात्रीरसांजनोशीरलाजाचंदनवारिभिः ॥ मंथंकृत्वापाययेच्चसघृतक्षौद्रशर्करं ॥ शाम्यंत्यनेनतृष्णद्याःपीडाश्छर्दिसमुद्भवाः ॥

अर्थ–आंवळकाठी, रसांजन[1], वाळा, साळीचा लाह्या, रक्तचंदन, नेत्रवाळा, या साहा औषधांचे मंथ करून त्यांत तूप व मध व साखर घालून प्यालें असतां, ओकारी पासून जे तृष्णादिक उपद्रव होतात, ते दूर होतात.

## ओकारी चांगली जाहाल्याचें लक्षण.

हृत्कंठशिरसांशुद्धिर्दीप्ताग्नित्वंचलाघवं ॥
कफपित्तविनाशश्चसम्यक्वांतस्यचेष्टितं ॥

अर्थ–जो मनुष्य उत्तम प्रकारें चांगला ओकला, त्याचे लक्षण. ह्रदय, कंठ; व मस्तक यांचेठायीं जे कफादिक दोष असतात, ते दूर होऊन त्यांची शुद्धी होते; व अग्नि प्रदीप्त, व अंग हलके होते; व कफदोष व पित्तदोष हे दूर होतात.

## ओकारी चांगली जाहल्यानंतरचें पथ्य.

ततोपराण्हेदीप्ताग्निमुद्गषष्टिकशालिभिः ॥
हृद्यैश्चजांगलरसैःकृत्वायूषंचभोजयेत् ॥

अर्थ मनूष्य चांगला ओकल्यानंतर तिसऱ्या प्रहरीं अग्नि प्रदीप्त होई असा मूग व साठी[2] तांदूळ यांचा, मनाला प्रियकर त्यसे रानांतील हरिणादिकाच्या मांसाचे रस यांचा यूष[3] करून त्या यूषांबरोबर भोजन करावें.

## ओकारी चांगली जाहली असतां जे होतनाही ते.

तंद्रानिद्रास्यदौर्गंध्यंकंडूश्चग्रहणीविषं ॥
सुवांतस्यनपीडायैभवंत्येतेकदाचन ॥

अर्थ– जो मनुष्य उत्तम प्रकारचा ओकला त्याला डोळ्यांवर झांपड, व निद्रा, व तोंडाला दुर्गंधि, व कंडू, व संग्रहणी रोग, व विषदोष हे उपद्रव कधीं ही होत नाहींत.

## वमनानंतर ढाळकाचा विधि.

स्निग्धस्विन्नस्यवांतस्यदद्यात्सम्यक्विरेचनं ॥ अवांतस्यत्व

---

१ दारुहळदीचा काढा करून त्याचे समसमान शेळीचें दूध त्यांत घालून कढऊन खवा करून वाळऊन चूर्ण करावें त्याला रसांजन ह्मणतात.

२ साठा दिवसानीं जें भात पिकतें त्याचे तांदुळानां साठी तांदुळ ह्मणतात.

३ मूग व साठी तांदूळ एक पळ प्रमाण घेऊन त्यांत एक प्रस्छ पाणीं घालोन कढऊन किंचित् घणसर पेजेसारिखे करावे, त्याला यूष ह्मणतात. या प्रकारें हरिणादिकांचें मांस आणून त्यांत पाणीं घालून शिजऊन पेजे सारिखे राखावें, त्याला मांसरस ह्मणतात. तोच यूष जाणावा.

धःस्रस्तोग्रहणींछादयेत्कफः ॥ मंदाग्निगौरवंकुर्याज्जनयेद्वा प्रवाहिकां ॥ अथवापाचनैरामंबलासंचविपाचयेत् ॥

अर्थ– पूर्वी मनुष्याला स्निग्ध करावा; ह्मणजे उक्त प्रकारें स्नेह पाजावा; नंतर स्विन्न करावा, ह्मणजे अंगाचा घाम काढावा; नंतर वांती करऊन ह्मणजे ओकऊन उत्तम प्रकारें विरेचन द्यावें, ह्मणजे ढाळक द्यावें. कारण अवांत मनुष्याला ढाळक दिल्हें असता तेणेंकरून अधोभागी गळला जो कफ तो ग्रहणी ह्मणजे साहावी पित्तधरा व अग्निधरा जी कला तिचें आच्छादन करितो. त्यामुळें अग्निमांद्य व गौरव ह्मणजे अंगाला जडपणा, व प्रवाहिका रोग अतिसाराचा भेद आहे तो, हे रोग उत्पन्न होतात; अथवा अधःस्रस्त जो कफ व आम त्यातें पाचनैःह्मणजे शुण्ठ एरंडमूळादिक जीं तिहीं करून पाचयेत् ह्मणजे पचवावें.

## ढाळकाचा दुसराविधि.

स्निग्धस्यस्नेहनैःकार्यस्वेदैःस्विन्नस्यरेचनं ॥

अर्थ– घृतदुग्धादिक स्नेह द्रव्यें जीं तिहीं करून स्निग्ध मनुष्य जो त्यास व पिंडेष्टिकादिकेंकरून[२] स्विन्न ह्मणजे अंगाचा घाम काढिला, असा मनुष्य जो त्यास ढाळक द्यावें.

## वमन केल्यावांचून विरेचनाचा दुसरा प्रकार.

शरदृतौवसंतेचदेहशुध्यैविरेचयेत् ॥

अन्यदात्ययिकेकालेशोधनंशीलयेद्बुधः ॥

अर्थ–शरत्कालाचे ठायीं, वसंत कालाचे ठायीं, मनुष्यानीं शरीराच्या शुद्धीकारणें ढाळक घ्यावें. तेणे करून देहाची शुद्धी होऊन शरीर चांगले वागतें, व उक्त कालाशिवाय दुसरे कालाचे ठायीं रोग उत्पन्न जाहला असतां; त्या कालाचे ठायीं ही वैद्यानें रोगी यास विचार करून ढाळक द्यावें.

## विशेषें करून ढाळक देण्याविषयीं जे योग्य रोग ते.

पित्तेविरेचनंदद्यादामोद्भूतेगदेतथा ॥

उदरेचतथाध्मानेकोष्ठशुद्धौविशेषतः ॥

---

१ वमना नंतर ढाळक केव्हां द्यावें, अशी शंका प्राप्त जाहली असतां; भेड, व च व सुश्रुत, व वाग्भट इत्यादिक ग्रंथाचा अभिप्राय कीं, वमन देऊन सहा दिवस जाहल्या नंतर मग तीन दिवस स्निग्ध करावा, नंतर तीन दिवस अंगाचा घाम काढावा, नंतर पुनः तिन दिवस लघुभोजन देऊन सोळावेदिवशीं रेचन द्यावें, हा ग्रंथकारांचा अभिप्राय श्लोकांत सम्यक् पद आहे येणें करून जाणावा.

२ मातीचा गोळा विटकर आदीकरून.

अर्थ– पित्तविकार, आमवायु, उदर[१]रोग, आध्मान वायु, बद्धकोष्ठ या रोगांचे ठायीं वैद्यानीं विशेषेंकरून ढाळक द्यावें.

## दोष दूर करण्याविषयीं ढाळकाची उत्कृष्टता.

दोषाःकदाचित्कुप्यंतिजितालंघनपाचनैः

येतुसंशोधनैःशुद्धानतेषांपुनरुद्भवः ॥

अर्थ– वातादिक दोष लंघन व पाचन इहीं करून शमन जाहले असतां एखादे वेळेस कोपातें पावतात, व जे दोष ढाळक देऊन शुद्ध जाहले, त्या दोषांचा फिरोन उद्भव होत नाहीं असें जाणावें.

## ढाळक देण्याविषयीं जे योग्य ते.

जीर्णज्वरीगरव्याप्तोवातरक्तीभगंदरी ॥ अर्शःपांडूदरग्रंथिहृ

द्रोगारुचिपीडिताः ॥ योनिरोगप्रमेहार्तागुल्मप्लीहव्रणार्दिताः

विद्रधिच्छर्दिविस्फोटविषूचीकुष्टसंयुताः ॥ कर्णनासाशिरो

वक्त्रगुदमेंढ्रामयान्विताः ॥ यकृत्शोथोक्षिरोगार्ताःकृमिक्षारा

निलार्दिताः ॥ शूलिनोमूत्रघातार्ताविरेकार्हानरामताः ॥

अर्थ– जीर्णज्वर, बचनागादिक विषदोष, वातरक्त, व भगंदर इहीं करून व्याप्त असा मनुष्य, अर्श, पांडुरोग, उदररोग, ग्रंथिरोग, हृद्रोग, अरोचक, परमा, योनिरोग, गुल्म, प्लीहा ह्मणजे कवळू, व्रणरोग, विद्रधि, ओकारी, विस्फोट, विषूची, कुष्ट, कर्णरोग, नासारोग, मस्तकरोग, मुखरोग, गुदरोग, शिस्नाचेठायीं उपदंशादिक रोग, यकृत्, सूज, नेत्ररोग, कृमिरोग, सोमल, क्षारजन्य विकार, वातरोग, शूळरोग, व मूत्राघातरोग इतक्यांतून एखाद्या रोगेंकरून व्याप्त जे मनुष्य, ते ढाळक देण्याविषयीं योग्य जाणावें.

## ढाळक देण्याविषयीं जे योग्य नाहींत ते.

बालवृद्धावतिस्निग्धक्षतक्षीणोभयान्वितः ॥ शांतस्तृषार्तस्थू

लश्चगर्भिणीचनवज्वरी ॥ नवप्रसूतानारीचमंदाग्निश्चमदात्य

यी ॥ शल्यार्दितश्चरूक्षश्चनविरेच्याविजानता ॥

अर्थ– बाल, वृद्ध, अतिस्निग्धमनुष्य, उरक्षतेंकरून क्षीणमनुष्य, भयेंकरून युक्त, श्रमित मनुष्य, तृषेंकरून पीडित, स्थूळ ह्मणजे शरीरें करून मोठे मनुष्य, गर्भिणी, नवज्वरें करून पिडित, नूतन बाळंत झालेली स्त्री, मंदाग्नी मनुष्य, मदात्यय रोगें करून पीडित

---

१ उदर रोगाला ढाळक द्यावें हें पूर्वी सांगीतलें परंतु विशेषेंकरून द्यावें ह्मणोन फिरोन हा रोग सांगीतला असें जाणावें.

शल्यैंकरून पीडित, व रुक्ष ह्मणजे निस्तेज मनुष्य, इतक्या मनुष्यानां सूज्ञ वैद्यानीं ढाळक देऊ नये.

## ढाळक देण्याविषयीं मृदु, मध्यम, क्रूर असे कोष्ठ.

बहुपित्तोमृदुःप्रोक्तोबहुश्लेष्माचमध्यमः॥बहुवातःक्रूरको

ष्ठोदुर्विरेच्यःसकथ्यते ॥ मृद्वीमात्रामृदौकोष्टेमध्यकोष्टेचम

ध्यमा॥ क्रूरेतीक्ष्णामतातज्ज्ञैर्मृदुमध्यमतीक्ष्णकैः ॥

**अर्थ** ज्या मनुष्याचा कोठा फार पित्तेंकरून व्याप्त आहे, तो मनुष्य मृदु कोष्ठ जाणावा, व ज्याचे कोठ्यांमध्यें फार कफ आहे, तो मध्यम कोष्ठ जाणावा, व ज्याचे कोठ्यांत फार वायू आहे, तो मनुष्य क्रूर कोष्ठ जाणावा. तो क्रूरकोष्ठ ढाळकाविषयीं दुःखदायक होय. ह्मणजे ढाळक दिल्हे असतां लवकर ढाळ होत नाहीं, असें जाणावें. आणि ज्याचा मृदु कोठा आहे, त्याला मृदु औषधें करून मृदु मात्रा द्यावी; व ज्याचा कोठा मध्यम आहे, त्याला मध्यम औषधें करून मध्यम मात्रा द्यावी; व ज्याचा क्रूर कोठा आहे त्याला तीक्ष्ण औषवें करून तीक्ष्ण मात्रा; तीं औषधें पुढील श्लोकांत सांगतो.

## मृदुमध्यमादिकोष्ठाचे ठायीं मृदुमध्यमादिक औषधें.

मृदुर्द्राक्षापयश्चंचुतैलैरपिविरिच्यते ॥ मध्यकस्त्रिवृतातिक्तारा

जवृक्षैर्विरिच्यते ॥ क्रूरःस्नुक्पयसाहेमक्षीरीदंतीफलादिभिः ॥

**अर्थ**—मृदु आहे कोठा ज्याचा त्याला द्राक्षें, दूध, व एरंडेल तेल इहीं करून ढाळक द्यावें, व मध्यम आहे कोठा ज्याचा त्याला निशोत्तर, कटुकी, व बाहव्याचे शेंगेंतला मगज या तीन औषधें करून ढाळक द्यावें; व क्रूर आहे कोठा ज्याचा त्याला निवडुंगाचें दूध, हेमक्षीरी ह्मणजे पिंसोळा, अथवा कांटेधोतरा, जेपाळ बीज, आदी शब्दें करून कांवडळीचें मूळ ह्मणजे इंद्रवारुणीचें मूळ, इत्यादिक इहीं करून ढाळक द्यावें, तेणेंकरून ढाळ होतात.

## उत्तमादिभेदेंकरून ढाळांचें प्रमाण.

मात्रोत्तमाविरेकस्यत्रिंशद्वेगैःकफांतिका ॥

वेगैर्विंशतिभिर्मध्याहीनोक्तादशवेगिका ॥

**अर्थ**—ढाळकांचे वेग तीस होऊन शेवटल्ये ढाळकांचे अंती कफ पडूंलागला असतां ती उत्तम मात्रा जाणावी; व ढाळांचे वेग वीस होऊन कफ पडोंलागला असतां ती

---

१ कांच अथवा नख अथवा केशकंटा इत्यादिक शरीरांत राहून त्यापासून जो पीडित मनुष्य तो शल्यार्दित जाणावा.

मध्यम मात्रा जाणावी; आणि दाहा वेग होऊन अंती कफ पडूं लागला असतां ती हीन मात्रा जाणावी.

## ढाळ होण्याविषयीं कषायादिकांच्या मात्रेचें प्रमाण.

द्विपलंश्रेष्ठमाख्यातंमध्यमंचपलंभवेत् ॥
पलार्धंचकषायाणांकनीयस्तुविरेचनं ॥

अर्थ–ढाळ होण्याविषयीं दोन पलें प्रमाण कषाय दिला असतां तें ढाळक उत्तम जाणावें. व एक पळ प्रमाण काढा दिला असतां तें ढाळक मध्यम जाणावें, व अर्धे पळ प्रमाण काढा दिला असतां तें ढाळक कनिष्ठ जाणावें.

## ढाळांविषयीं कल्कादिकांचें प्रमाण.

कल्कमोदकचूर्णानांकर्षमध्वाज्यलेहतः ॥
कर्षद्वयंपलंवापिवयोरोगाद्यपेक्षया ॥

अर्थ–कल्क, व मोदक व चूर्ण हीं प्रत्येक मधातूपांत मेळऊन ढाळ होण्याविषयीं द्यावीं; अथवा वय व रोग यांचें तारतम्य पाहुन दोन कर्ष प्रमाण, अथवा पळ प्रमाण द्यावी.

## ढाळकाचे ठायीं निशोतर आदिकरून औषधें घ्यावयाचा प्रकार.

पित्तातेरत्रिवृच्चूर्णंद्राक्षाक्काथादिभिःपिबेत् ॥ त्रिफलाक्काथगोमूत्रैःपिबेद्योषंकफार्दितः ॥ त्रिवृत्सैंधवशुंठीनांचूर्णमम्लैःपिबेन्नरः ॥ वातार्दितोविरेकायजांगलानांरसेनवा ॥

अर्थ– पित्ताचें आधिक्य असतां निशोत्तराचें चूर्ण करून द्राक्षांचे काढ्यांत घालून द्यावें. आदिशब्दें करून गुलकंद, गुलाब फूल, वडीशोप इत्यादिकाचे काढ्यांत द्यावें, व कफाचा प्रकोप जाहला असतां त्रिफळेचा काढा व गोमूत्र एका जागीं करून त्यांत सुंठ मिऱ्यें पिंपळी याचे चूर्ण घालून द्यावें, व मनुष्य वायूने पीडित असतां निशोत्तर, सैंधव व सुंठ यांचें चूर्ण करून लिंबूचा रसांत द्यावें; अथवा अरण्यसंबंधी मांसाचे रसांत द्यावें; तेणेकरून ढाळ होतात.

## अन्य औषधेंकरून ढाळकांचें विधान.

एरंडतैलंत्रिफलाक्काथेनद्विगुणेनच ॥
युक्तंपीत्वापयोभिर्वानचिरेणविरिच्यते ॥

अर्थ–एरंडेलतेलाचे दुप्पट त्रिफळेचा काढा करून त्यांत एरंडेल तेल घालून काढा द्यावा; अथवा तें तेल दुधांत घालोन द्यावें, तेणेकरून लवकर ढाळ होतात.

## ऋतुभेदेंकरून ढाळकें.

त्रिवृतांकौठबीजंचपिप्पलीविश्वभेषजं ॥
समृद्वीकारसक्षौद्रंवर्षाकालेविरेचनं ॥

अर्थ–निशोतर, इंद्रजव, पिंपळी, सुंठ, द्राक्षांचा रस, व मध हीं औषधें ढाळ होण्याविषयीं वर्षाकाळीं योजावी.

## शरत्कालाचेठायीं ढाळक.

त्रिवृद्दुरालभामुस्ताशर्करादिव्यचंदनं ॥
द्राक्षांबुनासयष्टीकंशीतलंचघनात्यये ॥

अर्थ–निशोत्तर, धमासा, नागरमोथें, उत्तम पांढरा चंदन, व ज्येष्ठीमध या औषधांचें चूर्ण करून द्राक्षांचे पाण्यांत मेळवून शरत्कालाचेठायीं घ्यावीं, तेणेंकरून ढाळ होतात. हे ढाळक शीतळ आहे असें जाणावें.

## हेमंतऋतूचे ठायीं ढाळक.

त्रिवृतांचित्रकंपाठामजाजीसरलांवचां ॥
हेमक्षीरीचहेमंतेचूर्णमुष्णांबुनापिबेत् ॥

अर्थ–निशोत्तर, चित्रक, पहाडमूळ, जिरें, देवदार, वेखंड, व हेमक्षीरी ह्मणजे पिसोळा, अथवा कांटेधोतरा यांचे चूर्ण करून उष्ण पाण्यांत घालोन हेमंतऋतूचे ठायीं घ्यावें, तेणेंकरून ढाळ होतात.

## शिशिर, व वसंत यांचेठायीं ढाळक.

पिप्पलीनागरंसिंधुशामात्रिवृतयासह ॥
लिहेत्क्षौद्रेणशिशिरेवसंतेचविरेचनं ॥

अर्थ–पिंपळी, सुंठ, सैंधव, वरधारा, व निशोत्तर या औषधांचे चूर्ण करून मधांत कालवून शिशिर व वसंत याऋतूचेठायीं चाटावें, तेणेंकरून ढाळ होतात.

## ग्रीष्मऋतूचेठायीं ढाळक.

त्रिवृताशर्करातुल्याग्रीष्मकालेविरेचनं ॥

अर्थ–निशोत्तराचे चूर्ण करून त्यांत साखर घालोन ढाळ होण्याविषयीं ग्रीष्मकाळीं घ्यावें.

## सुखेकरून ढाळ होण्याविषयीं अभयादि मोदक.

अभयामरिचंशुंठीविडंगामलकानिच ॥ पिप्पलीपिप्पलीमूलं
त्वक्पत्रंमुस्तमेवच ॥ एतानिसमभागानिदंतीचद्विगुणाभवे

त् ॥ त्रिवृदष्टगुणाज्ञेयाषड्गुणाचात्रशर्करा ॥ मधुनामोदकं कृत्वाकर्षमात्रप्रमाणतः ॥ एकैकंभक्षयेत्प्रातःशीतंचानुपिबेज्जलं ॥ तावद्विरिच्यतेजंतुर्यावदुष्णंनसेव्यते ॥ पानाहारविहारेषुभवेन्नियंत्रणंसदा ॥ विषमज्वरमंदाग्निपांडुकासभगंदरान् ॥ विदाहप्लीहमेहांश्चयक्ष्माणंनयनामयान् ॥ वातरोगंतथाध्मानंमूत्रकृच्छ्राणिचाश्मरीं ॥ पृष्ठपार्श्वोरुजघनकट्यूदररुजंजयेत् ॥ सततंशीलनादेषपलितानिविनाशयेत् ॥ अभयामोदकाह्येतेरसायनवराःस्मृताः ॥

**अर्थ**–हरीतकी, मिऱ्ये, सुंठ, वावडांग, आंवळकाठी, पिंपळी, पिंपळमूळ, दालचिनी, तमालपत्र, नागरमोथे, हीं दाहा औषधें समभाग घ्यावीं, व दांतीचें मूळ म्हणजे दांतुणीचें मूळ तें तीन भाग, व निशोत्तर आठभाग, व साखर साहा भाग, याप्रमाणे भाग घेऊन साऱ्यांचे चूर्ण करून मधांत मेळऊन एक एक कर्ष प्रमाण मोदक म्हणजे गोळ्या कराव्या, मग तो एक मोदक प्रातःकालाचे ठायी ढाळ होण्याविषयी भक्षण करावा; त्याजवर थोडे थंड पाणी प्यावे, आणि जोपर्यंत ढाळ होतात तोपर्यंत उष्ण पदार्थांचे सेवन करूंनये. व पान, आणि आहार, व विहार ह्मणजे श्रमादीक यांचेठायीं सर्वकाळ नियमित असावें. तेणेंकरून विषमज्वर, अग्निमांद्य, पांडुरोग, खोकला, भगंदर, कुष्ठ, गुल्म, अर्श, गलगंड, भ्रम, उदर, बिदाह, कवळू, परमा, राजयक्ष्मा, नेत्ररोग, वातरोग, पोटफुगी, मूत्रकृच्छ्र, अश्मरीरोग, व पाठ, पार्श्व, कंबर, मांड्या, पोट्ऱ्या, उदर यांचे ठायीं ज्या पीडा होतात त्या, हे सर्व रोग दूर होतात. या मोदकाला अभया मोदक ह्मणतात. हा अभयामोदक निरंतर सेविला असतां पलित ह्मणजे मनुष्याचे पांढरे केश होतात, ते येणेंकरून काळे होतात. व मोदक उत्तम रसायनरूप आहे, असें जाणावें.

### ढाळकास साह्य करणारे उपचार.

पीत्वाविरेचनंशीतजलैःसंसिच्यचक्षुषी ॥
सुगंधंकिंचिदाघ्रायतांबूलंशीलयेन्नरः ॥

**अर्थ**–मनुष्याला ढाळकाची मात्रा देऊन त्याजवर त्याचे डोळ्यांना थंड पाणी लाऊन डोळे पुसावे; आणि कांहीं एक सुगंध वास घ्यावयास अर्गजादिक द्यावें; व भक्षावयास विडा द्यावा, हें योग्य जाहलें असतां उत्तम प्रकारचे ढाळ होतात. असें जाणावें.

### ढाळ जाहल्यावर कसें राहावे तें लक्षण.

निर्वातस्थोनवेगांश्चधारयेन्नस्वपेत्तथा ॥
शीतांबुनस्पृशेत्क्वापिकोष्णनीरंपिबेन्मुहुः ॥

**अर्थ**– ढाळ जाहल्या नंतर वाऱ्यांत बसूंनये; वातमूत्र इत्यादिकांचें संधारण करूंनये; झोंप घेऊनये, थंडपाण्याचा स्पर्श अगदीं करूंनये, ढाळांचे मध्यें कोमट पाणीं वारंवार पीत असावें, तेणें करून चांगले ढाळ होतात.

## ढाळांबरोबर जे पदार्थ पडतात ते.

बलासौषधपित्तानिवायुर्वांतेयथाव्रजेत् ॥
रेकात्तथामलंपित्तंभेषजंचकफोव्रजेत् ॥

**अर्थ**– ओकारीचें औषध घेतलें असतां त्या पासून कफ, जें औषध घेतलें असेल तें, पित्त, वायु हे पदार्थ जसे ओकारी वाटे बाहेर पडतात, तसें ढाळक घेतलें असतां त्या पासून मळ, पित्त औषध, व कफ हे पदार्थ गुदा वाटे बाहेर पडतात.

## ढाळ चांगले जाहले नसतां जे उपद्रव होतात ते.

दुर्विरक्तस्यनाभेस्तुस्तब्धत्वंकुक्षिशूलता ॥ पुरीषवातसंगश्च
कंडुमंडलगौरवाः ॥ विदाहोऽरुचिराध्मानंभ्रमश्छर्दिश्चजायते

**अर्थ**– ढाळ चांगले जाहले नसतां मनुष्याचे नाभीचे ठायीं स्तब्धता कुक्षीचे ठायीं शूळ, मळ आणि वायु यांची अप्रवृत्ति, शरीराचे ठायीं कंडू, व मंडलें हीं उत्पन्न होतात. व अंगाला जडपणा, दाह अरुचि, पोटफुगी, भ्रम, व ओकारी हे उपद्रव होतात.

## ज्यास चांगले ढाळ जाहले नाहींत त्यांस उपचार

तंपुनःपाचनैःस्नेहैःपक्कासंस्नेह्यरेचयेत् ॥
तेनास्योपद्रवायांतिदीप्तोग्निर्लघुताभवेत् ॥

**अर्थ**– ज्या मनुष्याला चांगले ढाळ जाहले नाहींत, त्याला आरग्वधादि पाचन देऊन आंवेचें पचन करावें; नंतर त्याला स्नेह पान ह्मणजे तूप प्यावयास देऊन त्याचा कोठा स्निग्ध करून फिरून ढाळक द्यावें, तेणे करून सारे उपद्रव दूर होऊन जठराग्नि प्रदीप्त होतो; आणि अंग हलकें होतें.

## ढाळ फार जाहले असतां जे उपद्रव होतात ते.

विरेकस्यातियोगेनमूर्छाभ्रंशोगुदस्यच ॥ शूलंकफातियोगस्या
न्मांसधावनसंनिभं ॥ मेदोनिभंजलाभासंरक्तंचापिविरिच्यते ॥

**अर्थ**– मनुष्याला फार ढाळ जाहले असतां मूर्छा, गुदाचे ठायीं पीडा, व शूळ हे उपद्रव होतात; आणि कफ फार पडतो, व मांसाचे धुणासारिखें, व मेदासारिखें, व पाण्यासारिखें असें गुदावाटे रक्त पडतें.

## ढाळ फार होऊन जे उपद्रव होतात त्याजवर उपाय.

तस्यशीतांबुभिःसिक्तंशरीरंतंदुलांबुभिः ॥
मधुमिश्रैस्तथाशीतैःकारयेद्वमनंमृदु ॥

अर्थ–ढाळ फार जाहाले असतां मनुष्याचे शरीर थंडपाण्यांत भिजवावें; त्याप्रकारें तांदुळांचे धुणांत मध मेळवून मनुष्याला प्यावयास देऊन हलकी ओकारी करवावी, तेणेंकरून उपशम होतो.

## ढाळ बंद होण्याविषयीं उपाय.

सहकारत्वचःकल्कोदध्नासौवीरकेनवा ॥
पिष्टोनाभिप्रलेपेनहंत्यतीसारमुल्बणं ॥

अर्थ–आंब्याची साल गाईचे दह्यांत अथवा सौवेरींत वाटून कल्क करून नाभीचे ठायीं लेप करावा, तेणेंकरून ढाळ बंद होतात.

अजाक्षीरंपिबेद्वापिवैकिरंहारिणंतथा ॥ शालिभिःषष्टिकैःस्वल्पं
मसूरैर्वापिभोजयेत् ॥ शीतैःसंग्राहिभिर्द्व्यैःकुर्यात्संग्रहणंभिषक् ॥

अर्थ–ढाळ बंद होण्याविषयीं शेळीचे दूध प्यावें, अथवा शकुनीपक्षी याचा रस, व हरिणाचे मांसाचा रस याचे सेवन करावे, व साठीतांदुळाचा भात करुन थोडा खावा; अथवा मसूर शिजवून थोडे खावें, आणखी डाळिंब आदिकरून शीतळ आणि ग्राहक अशा पदार्थांचे सेवन करावे, तेणेंकरून ढाळ बंद होतात.

## जाला चांगले ढाळ जाहले त्याचें लक्षण.

लाघवेमनसस्तुष्ट्यामनुलोमेगतेनिले ॥
सुविरक्तंनरंज्ञात्वापाचनंपाययेन्निशि ॥

---

१ जव कच्चे अथवा भाजून कुटून त्यांत पाणीं घालून त्याचें तोंड झाकून तीनदिवस ठेवावें, त्याला सौवीर ह्मणतात; याप्रकारें गव्हांचें जाणावें. टीकाकारांनीं ढाळ बंद होण्याचा विषय आहे ह्मणून सौवीर शब्देंकरून कांजी घ्यावे असें सांगीतले आहे, त्याची कृती मातीची माथणी आणून तिचे आत शिरसेल तेलाचा चोपड करून त्यांत निर्मळ पाणी घालावें; व राई, जिरें, सैंधव, हिंग, सुंठ, हळद, या साहा औषधांचे चूर्ण, व भातासहित पेज कुळित्थांचा काढा, व थोडा बांबूचा पाला हीं सारीं त्या मडक्यांत घालावीं; व पाण्याचे अदमासे तुपांत तळलेले असे दाहा पांच उडदाचे वडे त्यांत घालून या मडक्याचें तोंड तीन दिवस झांकावें, नंतर त्या पाण्याला आंब येत्ये त्याला कांजी ह्मणतात.

अर्थ–ढाळ होऊन त्या योगानें देहाला हलकेपणा, व चित्ताचेठायीं प्रसन्नता, वायूचे स्वस्थानीं गमन इतुकीं लक्षणें झालीं असतां त्या मनुष्याला चांगले ढाळ जाहले असें जाणून रात्रीचेठायीं त्याला पाचन[२] द्यावें.

## ढाळक घेतलें असतां काय होतें तें.

इंद्रियाणांबलंबुद्धेःप्रसादोवन्हिर्दीप्तता ॥
धातुस्थैर्यंवयस्थैर्यंभवेद्रेचनसेवनात् ॥

अर्थ–मनुष्यानें ढाळकाचें सेवन केलें असतां इंद्रियांना बळ येतें, बुद्धी प्रसन्न होते, व जठराग्नी प्रदीप्त होतो, व धातु आणि वय यांना स्थिरपणा येतो.

## ढाळक घेतलें असतां वर्ज्य पदार्थ.

प्रवातसेवाशीतांबुस्नेहाभ्यंगमजीर्णतां ॥
व्यायामंमैथुनंचैवनसेवेतविरेचितः ॥

अर्थ–मनुष्यानें ढाळक जाहल्यानंतर फार वारा घेऊंनये, व थंडपाणी, व तेलाभ्यंग, व अजीर्ण, व परिश्रम, व मैथुन यांचें सेवन करूंनये.

## ढाळकाचे ठायीं पथ्य.

शालिषष्टिकमुद्गाद्यैर्यवागूंभोजयेत्कृतां ॥
जांगलैर्विष्किराणांवारसैःशाल्योदनंहितं ॥

अर्थ– ढाळ जाहल्या नंतर पथ्यास साठीं तांदुळ व मुग आदिकरून जीं धान्यें यांची यवागू करून घ्यावी; व अरण्य संबंधीं हरिणादिकांचे मांसाचा रस; अथवा शकुंतपक्षी, आणि कोंबडे इत्यादिकांचे मांसाचा रस या बरोबर तांदुळांचा भात खावा.

## नाराचन रस.

तुल्यंपारदटंकणंसमरिचंगंधाश्मतुल्यंत्रिभिर्विश्वंचात्रिगुणंत
तोनवगुणंजेपालबीजंक्षिपेत् ॥ खल्वेदंडयुगंविमर्द्यविधिव
त्संन्यस्यपर्णेततःस्विन्नंगोमयवन्हिनासतुभवेन्नारचनामारसः॥
गुंजैकप्रमितोरसोहिमजलैःसंसेवितोरेचयेद्यावत्कोष्णजलंभजे
त्खलुनरोभोज्यंतुदध्योदनं ॥

अर्थ– पारा, टांकणखार, मिरीं हीं समभाग; आणि गंधक त्या तिहींचे समान, व सुंठ तीन भाग, जेपाळाचें बीज नऊभाग हीं खलांत घालून दोन प्रहर खल करून पानावर काढून गोवऱ्यांच्या अग्नीवर शिजवावें. याचें नांव नाराचरस हा एक गुंज सां

२ एरंडमूळ सुंट धणे या तीन औषधांचा काढा करून पचनार्थ द्यावा.

करेशीं घ्यावा; आणि वर थंड पाणीं प्यावें. ह्मणजे रेच करितो, आणि ऊन पाणी प्यालें असतां रेच बंद होतात. यावर पथ्य दहीं भात द्यावा.

## द्वितीय नाराच रस.

जेपालेनसमैःसूतव्योषटंकणगंधकैः ॥ नाराचःस्याद्रसोमाष
मात्रःसर्पिःसितायुतः ॥ हंतिसंग्रहमानाहमामशूलंतथाज्वरं ॥
वेलाज्वरंविरेकेणशीतलांबुनिषेवणात् ॥

**अर्थ**– जेपाळबीज, पारा, सुंठ, मिरीं पिंपळी, टांकणखार, गंधक, हीं समभाग एकत्र करून खल करावा; ह्मणजे नाराच रस झाला. हा ६ गुंजा साकर आणि तूप यांशीं घ्यावा. आणि वर शीतोदक घ्यावें ह्मणजे मलसंग्रह, आनाहवायू, आमशूल, वेलाज्वर यांचा रेचानींच नाश करितो.

## इच्छाभेदीरस.

शुंठीतीक्ष्णरसेंद्रटंकणबलिःप्रोक्तःसमंतात्रिधाकुंभीबीजयुतंवि
मर्दसभवेदिच्छाविभेदीरसः ॥ वल्लंशर्करयायुतेनचुलकंपुंसः
सुखंरेचयेन्निःशेषंमलदोषमेपविनिहंत्युच्चैर्यथेभंहरिः ॥

**अर्थ**–सुंठ; मिरीं; पारा; टांकणखार; गंधक; हीं समभाग घेऊन त्यांत जेपाळ तिप्पट घालून मर्दन करावें. त्याला इछाभेदीरस ह्मणतात. तो रस एकवाल साकरेबरोबर चुळकाभर. पाण्यांसहवर्तमान भक्षण करावा. तो पुरुषास सुखानें रेचक होऊन सर्व दोषांचा नाश करील. जसा सिंह हत्तींचा नाश करितो.

## द्वितीय इच्छाभेदी रस.

शंभोर्वीर्यंचटंकंबलिमरिचयुतंशृंगवेरंचतुल्यंयोज्यंनैकुंभबीजंस
मशिखिसहितंमर्दितंयाममेकं ॥ भुक्तंगुंजाद्विमात्रांशिशिरजलयुतं
त्यक्ततल्पत्वमुच्चैर्यादिच्छाभेदरिसोयंप्रबलमलहरःसर्वरोगैकहर्ता

**अर्थ**–पारा १ तोळा, गंधक, मिरीं, सुंठ, जेपाळाचेंबीज, चित्रक, हीं सर्व समभाग घेऊन एक प्रहर खल करावा. याला इच्छाभेदी रस ह्मणतात- हा प्रबल मलांचा नाश करून संपूर्ण रोगांचें हरण करील.

## बस्तिचा विधि.

बस्तिर्द्विधानुवासाख्योनिरूहश्चततःपरं ॥ यःस्नेहैर्दीयतेस
स्यादनुवासननामकः ॥ कषायक्षीरतैलैर्योनिरूहःसनिगद्य
ते ॥ बस्तिभिर्दीयतेयस्मात्तस्मात्बस्तिरितिस्मृतः ॥

अर्थ–अंडकोशादिकें करून गुदादिकांचे ठयीं ज्या चिपनळ्या मारितात त्याला बस्ति ह्मणतात. तो बस्ति अनुवास आणि निरूह या भेदें करून दोन प्रकारचा त्यामध्यें तूप तेल इत्यादिक स्नेहें करून ज्या चिपनळ्या मारितात त्याला अनुवासन बस्ति म्हणतात व काढे दूध तेल हीं एकत्र करून ज्या चिपनळ्या मारितात त्याला निरूहबस्ति म्हणतात.

## प्रथम अनुवासन बस्ति.

तत्रानुवासनाख्योहिबस्तिर्यःसोत्रकथ्यते ॥ पूर्वमेवततोब
स्तिर्निरूहाख्योभविष्यति ॥ निरूहादुत्तरंचैवबस्तिस्यादु
त्तराभिधः ॥ अनुवासनभेदश्चमात्राबस्तिरुदीरितः ॥ पल
द्वयंतस्यमात्रातस्मादर्धापिवाभवेत् ॥

अर्थ–या दोहों बस्ति मध्यें जो अनुवासन नामक बस्ति आहे, तो प्रथम सांगून नंतर निरूहबस्ति व उत्तरबस्ति सांगेल. व त्या अनुवासन बस्तीचा भेद मात्राबस्ति आहे. त्या मात्राबस्तीचे स्नेहादिकांची मात्रा दोन पल प्रमाण, अथवा पळ प्रमाण जाणावी. बस्तीचे चार भेद जाणावे.

## अनुवासनबस्तीविषयीं जे योग्य ते.

अनुवास्यस्तुरूक्षःस्यात्तीक्ष्णाग्निःकेवलानिली ॥

अर्थ–रूक्ष ह्मणजे स्नेहपानरहित, व प्रदीप्त आहे अग्नि ज्याचा तो, व केवळ वातरोगी अशाप्रकारचे मनुष्य अनुवासन बस्तीविषयीं योग्य जाणावे.

## जे अनुवासन बस्तिविषयीं योग्य नाहीत ते.

नानुवास्यस्तुकुष्ठिस्यान्मेहीस्थूलस्तथोदरी ॥ नास्थाप्यानानु
स्याःस्युरजीर्णोन्मादतृड्युताः ॥ शोकमूर्छारुचिभयश्वास
कासक्षयातुराः ॥

अर्थ– कुष्ठी व मेही ह्मणजे परमा आहे ज्यास तो, व स्थूल, उदरी ह्मणजे उदररोग आहे ज्यास तो, अनुवासनबस्ती विषयीं योग्य नाहींत; व उन्माद, अजीर्ण, तृषा, शोक, मूर्छा, अरुची, भय, श्वास खोकला, व क्षय इहीं करून पीडित जे मनुष्य ते आस्थाप्य ह्मणजे निरूह बस्ती विषयीं योजावे. नानुवास्याः ह्मणजे त्यांची अनुवासनबस्ती विषयीं योजना करूं नये.

## बस्तीचेंमुख स्थापनाविषयीं सुवर्णादिकांचीं नळी.

नेत्रंकार्यंसुवर्णादिधातुभिर्वृक्षवेणुभिः ॥
नलैर्दंतैर्विषाणाग्रैर्मणिभिर्वाविधीयते ॥

अर्थ– नेत्र ह्मणजे गुदाचे ठायीं चिपनळया मारावयाची नळी ती सुवर्णादि धातु-ची अथवा बांबुची अथवा देवनळ, हस्तिदंत, व शिंगाचें अग्र व बिलोर अथवा सुर्य-कांतादिक मणी यांची करावी.

## रोग्याचा वयाचे प्रमाणावरून नळीचें प्रमाण करावें.

एकवर्षात्तुषड्वर्षंयावन्मानषडंगुलं ॥ ततोद्वादशकंयावन्मा नंस्यादष्टसंयुतं ॥ ततःपरंद्वादशभिरंगुलैर्नेत्रदीर्घता ॥

अर्थ– बस्तीची नळी एका वर्षा पासून साहा वर्षें पर्यंत साहा अंगुळ प्रमाण, व सहा वर्षां पासून बारा वर्ष पर्यंत आठ अंगुळ प्रमाण लांब, बारा वर्षा नंतर बारा अंगुळ प्रमाण लांब असावी.

## नळीचे छिद्राचें प्रमाण.

मुद्गछिद्रंकलायाभंछिद्रंकोलास्थिसन्निभं ॥ यथासंख्यंभवेन्ने त्रंश्लक्ष्णंगोपुच्छसन्निभं ॥ आतुरांगुष्ठमानेनमूलेस्थूलंविधीयते ॥ कनिष्ठिकापरिणाहमग्रेचगुटिकामुखं ॥ तन्मूलेकर्णिकेद्वेच कार्येभागाच्चतुर्थकात् ॥ योजयेत्तत्रबस्तिंचबंधद्वयविधानतः ॥

अर्थ–जी सहा अगुळ प्रमाण नळी आहे, तिचें छिद्र मुगाच्या दाण्या प्रमाणें, व जी आठ अंगुळ प्रमाण नळी आहे, तिचें छिद्र लाकेचे दाण्या प्रमाणें, व जी बारा अंगुल प्रमाण नळी आहे, तिचे छिद्र बोराचे आंठी प्रमाण, या प्रमाणें क्रमें करून नळीचीं छिद्रें करावीं; आणि ती नळी चिक्कण असून गाईचे पुच्छा सारिखी करावी; व त्या नळीचे मूळ रोग्याचे आंगठया इतकें मोठें आणि अग्रभागीं करंगुळा इतुकी जा डी असून तिचें तोंड वाटोळें करावें; व त्या नळीचे तीन भाग टाकून चवथ्ये भागीं मूळाचे ठायीं दोन कर्णिका कमळ पत्रासारिख्या करून हरिणादिकांचे अंडाचा-बस्ति तेथें योजून त्या कर्णिकेशीं बस्तीला दोहों बंधनें करून बांधून संधि मिळवाव्या.

## बस्ति कोणाचे अंडाचा असावा तो प्रकार.

मृगाजसूकरगवांमहिषस्यापिवाभवेत् ॥ मूत्रकोशस्यबस्तिस्तुत दलाभेनचर्मजः ॥ कषायरक्तःसुमृदुर्बस्तिःस्निग्धोदृढोहितः ॥

अर्थ–हरीण, बोकड, डुकर, बैल, अथवा टोणगा यांचे आंडाचा बस्ती योजावा. तो न. मिळे तर यांचेंच आंगाचा कातडयांचा बस्ति योजावा; आणि तो बस्ती बोर व तरवड इत्यादिकांचे सालीचे काढयांत रंगविलेला असून मृदु व चिक्कण व बळकट असा असावा.

## व्रणबस्तीचे प्रमाण.

व्रणबस्तेस्तुनेत्रंस्यात्श्लक्ष्णमष्टांगुलोन्मितं ॥
मुद्गछिद्रंगृध्रपक्षनलिकापरिणाहिच ॥

अर्थ– व्रणा विषयीं जो बस्ती योजावयाचा त्याचे नेत्र ह्मणजे नळी ती आठ अंगुल प्रमाण लांब, व चिक्कण तिचें छिद्र मुगा इतुकें व गिधाडाचे पक्षाला नळी असते तितुकी मोठी या प्रमाणें व्रण बस्तीची नळी जाणावी.

## बस्तीचे गुण.

शरीरोपचयंवर्णबलमारोग्यमायुषः ॥
कुरुतेपरिवृद्धिंचबस्तिःसम्यगुपासितः ॥

अर्थ– बस्तिचे उत्तम प्रकारें सेवन केलें असतां शरीराची वृद्धी, कांती, बळ, आरोग्य, व आयुष्याची वृद्धी हे गुण उत्पन्न होतात.

## बस्तीचा सेवनकाळ

दिवसांतेवसंतेचस्नेहेबस्तिःप्रदीयते ॥ ग्रीष्मवर्षाशरत्कालेरा
त्रौस्यादनुवासनं ॥ नचातिस्निग्धमशनंभोजयित्वानुवासयेत् ॥
मदंमूर्छांचजनयेत्द्विधास्नेहःप्रयोजितः ॥ रूक्षंभुक्तवतोत्यन्नं
बलंवर्णंचहीयते ॥ युक्तःस्नेहमतोजंतुंभोजयित्वानुवासयेत् ॥

अर्थ–वसंत ऋतूचे ठायीं स्नेह बस्ती ह्मणजे अनुवासन बस्ती तो सायंकाळीं योजावा, ग्रीष्म ऋतु,वर्षाऋतु व शरदृतु यांचे ठायीं रात्रीस योजावा; व रोग्यास फार स्निग्ध भोजन देऊन अनुवासन बस्तीचा प्रयोग करूंनये, तेणेंकरून मद व मूर्छा हें उत्पन्न होतात. व फार रूक्ष भोजन देऊन बस्तीचा प्रयोग केला असतां बल व कांति यांची हानी होते याकरीतां स्नेहयुक्त भोजन देऊन नंतर अनुवान बस्ती योजावा.

## बस्तिचे ठायीं हीन मात्रा; व अतिरिक्त मात्रा त्यांचें फळ.

हीनमात्रावुभौबस्तीनातिकार्यकरौस्मृतौ ॥
अतिमात्रौतथानाहक्लमातीसारकारकौ ॥

अर्थ–अनुवासनबस्ति व निरूहबस्ती यांची अल्पमात्रा जाहली असतां यांजपासून फार कार्य होत नाहीं. ह्मणजे रोग चांगले दूर होत नाहीत; व याची फार मात्रा जाहली असतां अनाहरोग, ग्लानि, व अतिसार हे रोग उत्पन्न होतात.

## उत्तमादिकांची मात्रा.

उत्तमस्यपलैःषड्भिर्मध्यमस्यपलैस्त्रिभिः ॥
पलद्वयर्धेनहीनस्ययुक्तामात्रानुवासने ॥

**अर्थ**—उत्तम प्रकारचें आहे बळ ज्याला त्याची मात्रा अनुवासन बस्तीचे ठायीं सहा पळ प्रमाण जाणावीं; व मध्यमबळ मनुष्य जो त्याची मात्रा तीन पळ प्रमाण जाणावी; व हीनबळ मनुष्य जो त्याची मात्रा दीड पळ प्रमाण जाणावी.

## स्नेहाचे ठायीं सैंधवादि मात्रेचें मान.

शताव्हासैंधवाभ्यांचदेयंस्नेहेचचूर्णकं ॥ तन्मात्रोत्तममध्यां
त्याःषट्चतुर्द्वयमाषकैः ॥

**अर्थ**—शतावरी व सैंधव यांचें चूर्ण आनुवासन बस्तीचेठायीं द्यावयाचें त्याची मात्रा जी साहा मासे प्रमाण ती उत्तम, व जी चार मासे प्रमाण ती मध्यम, व जी दोन मासे प्रमाण ती कनिष्ठ या प्रकारें मात्रा जाणाव्या.

## ढाळकादि दिल्या नंतर अनुवासन बस्ती द्यावयाचा प्र०

विरेचनात्सप्तरात्रेगतेजातबलायच ॥ भुक्ता
न्नायानुवास्यायवस्तिर्देयोनुवासनः ॥

**अर्थ**— मनुष्याला ढाळक देऊन सात दिवस गेल्यानंतर बळ आल्यावर त्याला भोजन देऊन अनुवासन नामक बस्तीविषयीं योग्य जो मनुष्य त्याला अनुवासन बस्ती योजावा.

## बस्ती ज्या प्रकारें करून योजावयाचा तो प्रकार.

अथानुवास्यंस्वभ्यक्तमुष्णांबुस्वेदितंशनैः ॥ भोजयित्वाय
थाशास्त्रकृतंचंक्रमणंततः ॥ उत्सृष्टानिलविण्मूत्रंयोजयेत्स्नेह
बस्तिना ॥ सुप्तस्यवामपार्श्वेनवामजंघाप्रसारिणः ॥ कुंचिताप
रजंघस्यनेत्रंस्निग्धेगुदेन्येसत् ॥ बध्वाबस्तिमुखेसूत्रंवामहस्तेन
धारयेत् ॥ पीडयेद्दक्षिणेनैवमध्यवेगेनधीरधीः ॥ जृंभाकासक्ष
वादींश्चबस्तिकालेनकारयेत् ॥

**अर्थ**—अनुवासनबस्तीविषयीं जो योग्य मनुष्य त्याचे अंगाला तेल लावून उष्ण पाण्यानें अंगाचा हलका घाम काढून त्याला यथाशास्त्र भोजन[1] देऊन अमळसा इकडे तिकडे हिंडवून त्याला मुतायास व शौचाला होत असल्यास बसवून व वायू सरत असल्यास

---

१ त्याला तांदुळांची पातळ कण्हेरी करून पाजावी.

सरवून बस्तीचेठायीं योजावा; आणि त्याला डाव्ये कुशीस निजवून डावा पाय लांब पसरवून उजवा पांय आंखडून धरवावा, आणि गुद स्निग्ध करून बस्तीची नळी बस्ती मुखाचे ठायीं दोऱ्यानीं बांधून त्या नळीला गुदाचे ठायीं ठेवावी आणि कुशळ वैद्यानीं ती नळी डाव्ये हातानें धरून उजव्ये हातानें मध्यम वेगेंकरून पीडन करावें; ह्मणजे चि-पनळ्या, व बस्तीकालीं जांभई खोकला, व शिंकादिक हीं रोग्यास येऊं देऊं नयेत.

## चिपनळ्या मारण्याविषयीं काळ.

त्रिंशन्मात्रामितःकालःप्रोक्तोवस्तेस्तुपीडने ॥
ततःप्रणिहितःस्नेहउत्तानोवाकृशतंभवेत् ॥

अर्थ—चिपनळ्या मारण्याविषयीं तीस मात्रा पर्यंत काळ जाणावा; आणि तो स्नेह अभ्यंतरीं प्राप्त जाहला असतां शंभर आंख मोजीतोंपर्यंत उताणे निजावें. त्या मात्रेचें प्रमाण पुढील श्लोकांत आहे.

## कितीकाळाची मात्रा होते त्याचें प्रमाण.

जानुमंडलमावेष्टयकुर्याच्छोटिकयायुतं ॥
एकामात्राभवत्येपासर्वत्रैपविनिश्चयः ॥

अर्थ—गुडघ्याभवता स्पर्श लागे असा हाताचा फेरा फिरवून टिचकी मारावी. इतक्या काळाची एक मात्रा जाणावी, असा निश्चय सर्वत्र आहे, असें जाणावें.

## वाङ्मात्रा.

निमेषोन्मेषणंपुंसांअंगुल्याछोटिकाथवा ॥
गुर्वक्षरोच्चारणंवावाङ्मात्रेयंस्मृताबुधैः ॥

अर्थ—निमेषोन्मेषणाचा, चुटकी वाजविण्याचा, किंवा गुरुअक्षर उच्चारणाचा जो काळ त्याला वाङ्मात्रा ह्मणावी.

## चिपनळ्या मारल्यानंतरची क्रिया.

प्रसारितैःसर्वगात्रैर्यथावीर्यंप्रसर्पति ॥ ताडयेत्तलयोरेनंत्रीन्वा रांश्चशनैःशनैः ॥ स्फिजोश्चैवंततःश्रोणींशय्यांचैवोत्क्षिपेत्त तः ॥ जातेविधानेतुततःकुर्यान्निद्रांयथासुखं ॥

अर्थ—चिपनळ्या मारल्या नंतर रोग्या करवून हस्तपादादिक सर्व गात्रे ढील सोडवून लांब करावीं. तेणेंकरून रसादिक धातु आपल्या स्थानाप्रत जातात; व रोग्याचे हाता पायांचे तळव्यानां तीन वेळ हलक्या हलक्या टाळ्या माराव्या. तशाच माड्यांचे ठायीं

---

१ गुदाचे ठायीं तूप लाऊन.

व कटिपश्चात् भागाचे ठायीं ती नवेळ टाळ्या मारून त्याला पलंगावर बसवावा. या प्रकारचा विधि जाहल्या नंतर रोग्यानें स्वस्थ निद्रा करावी.

## वस्तिकर्म चांगलें जाहलें असतां त्याचे गुण.

सानिलःसपुरीषश्चस्नेहःप्रत्येतियस्यतु ॥

उपद्रवंविनाशीघ्रंससम्यगनुवासितः ॥

अर्थ–गुदाचे आंत गेला जो स्नेह तो वायू व मळ यां सहवर्तमान उपद्रवा वांचून लवकर बाहेर आला असतां त्या मनुष्यास बस्ती कर्म चांगलें जाहलें असें जाणावें.

## स्नेहाचा विकार दूर होण्याविषयीं उपाय

जीर्णान्नमथसायान्हेस्नेहेप्रत्यागतेपुनः ॥ लघ्वन्नंभोजयेत्का मंदीप्ताग्निस्तुनरोयदि ॥ अनुवासितायेदद्यस्यादितरेन्हिसुखो दकं ॥ धान्यशुंठीकषायोवास्नेहव्यापत्तिनाशनं ॥

अर्थ– गुदावाटे स्नेह निःशेष बाहेर आला; आणि जर मनुष्याचा अग्नि प्रदीप्त आहे; तर त्याला सायंकाळीं जुनें अन्न[१] असून किंचित् नित्याचे आहारा पेक्षां कमी असें पथ्यास द्यावें; आणि अनुवासित मनुष्य जो त्याला दुसऱ्ये दिवशीं सुखोदक द्यावें, ह्मणजे कोमट पाणी प्यावयास द्यावें. अथवा धणे व सुंठ यांचा काढा करून द्यावा तेणेंकरून स्नेहाचा विकार दूर होतो.

## वातादिक दोषांचेठायीं चिपनळ्या मारावयाचें प्रमाण.

अनेनविधिनाषड्वासप्तचाष्टौनवापिवा ॥

विधेयाबस्तयःस्तेषामंतेचैवनिरूहणं ॥

अर्थ–पूर्वोक्त विधीकरून वातादिक दोषांचे ठायीं सहावेळ, अथवा आठवेळ, अथवा नऊवेळ चिपनळ्या माराव्या, त्या चिपनळ्यांचे अंतीं निरूहबस्ति योजावा.

## बस्तीचे गुण.

दत्तस्तुप्रथमोबस्तिस्नेहयेद्बस्तिवंक्षणौ ॥ सम्यक्दत्तोद्वितीय स्तुमूर्धस्थमनिलंजयेत्॥ बलंवर्णंचजनयेत्तृतीयस्तुप्रयोजितः॥ चतुर्थपंचमौदत्तौस्नेहयेतांरसासृजि ॥षष्ठोमांसंस्नेहयतिसप्त मोमेदएवच ॥ अष्टमोनवमश्चापिमज्जानंचयथाक्रमं ॥ एवं शुक्रगतान्दोषान्द्विगुणःसाधुसाधयेत् ॥ अष्टादशाष्टादशका

---

१ एकावर्षाचे तांदूळ अथवा साठां दिवसानीं जें भात पिकतें त्याचे तांदूळ पथ्यास द्यावे.

न्बस्तीनांयोनिषेवते ॥ सकुंजरबलोश्वस्यरमैचुल्योमरप्रभः ॥

अर्थ– प्रथम चिपनळी मारली असतां ती बस्ती वंक्षण ह्मणजे अंड सांधद्वारी शरीराचे ठायीं स्नेहन करिते, ह्मणजे धातु वाढविते, दुसरी चिपनळी दिल्ही असतां मस्तकांतील वायु दूर होतो, तिसरी चिपनळी दिल्ही असतां शरीराचे ठायीं बळ व कांती ही येतात, चवथ्याने, पांचव्याने, चिपनळी मारली असतां रस व रक्त यांची वृद्धि होते, साहाव्याने सातव्याने चिपनळी दिल्ही असतां मांसाला व मेदाला स्निग्धपणा येतो, आठव्याने व नवव्याने चिपनळी दिल्ही असतां मज्जेला व श्लोकांत चकार आहे तेणेंकरून शुक्रधातुला स्निग्धपणा येतो. याप्रकारें द्विगुण ह्मणजे अठरा चिपनळ्या दिल्या असतां शुक्रधातुगत जे दोष त्यांचा नाश होतो, व जो मनुष्य छत्तीस चिपनळ्यांचें सेवन करितो, त्याला हत्ती सारिखें बळ येऊन वेगानें अश्वाला देखील जिंकील, आणि देवासारिखी कांती होते.

## अनुवासन बस्ती व निरूहबस्ती हे कोणास द्यावयाचे ते प्रकार.

रूक्षायबहुवातायस्नेहबस्तिंदिनेदिने ॥ दद्याद्वैद्यस्तथान्येषांमन्यावाधामपाहरेत् ॥ स्नेहोल्पमात्रोरूक्षाणांदीर्घकालमनत्ययः ॥ तथानिरूहस्निग्धानामल्पमात्रःप्रशस्यते ॥

अर्थ– रूक्ष असून जो फार वायूनें पीडित मनुष्य त्याला वैद्यानीं दिवसादिवसाचे ठायीं स्नेहबस्ती द्यावा, ह्मणजे स्नेहाच्या चिपनळ्या नित्य माराव्या, त्याप्रकारें अन्येषां ह्मणजे स्निग्ध व स्थूलादिक मनुष्य जे त्यांत अन्या ह्मणजे निरुहण बस्ती तो दिवसादिवसाचे ठायीं द्यावा तेणेंकरून बाधा ह्मणजे रोग तो दूर होतो, व रूक्ष मनुष्य जे त्यांस स्नेह बस्ती थोडा द्यावा, ह्मणजे स्नेहाची हलकी चिपनळी मारावी परंतु रोगी बहुत दिवस वांचायाचा आहे, तर स्निग्धमनुष्य जो त्यांस निरुह बस्ती थोडा द्यावा.

## एकटाच स्नेह बाहेर आला असतां उपाय.

अथवायस्यतत्कालंस्नेहोनिर्यातिकेवलः ॥
तस्यान्योन्यतरोदेयोनहिस्निग्धस्यतिष्ठति ॥

अर्थ– स्निग्ध मनुष्य जो त्याचे गुदावाटें चिपनळ्या मारिल्यावर लागलाच स्नेह बाहेर येतो, ठरत नाहीं यास्तव स्नेहबस्ती देऊन लागलाच निरुहबस्ति द्यावा असे पालटून दोहों प्रकारचे बस्ति द्यावे.

## स्नेह बाहेर येतनाही त्याचे उपद्रव व उपाय.

अशुद्धस्यपलोन्मिश्रःस्नेहोनैतियदापुनः ॥ तदाशैथिल्यमा

ध्मानंशूलंश्वासश्चजायते ॥ पक्वाशयेगुरुत्वंचतत्रदद्यान्निरू
हणं ॥ तीक्ष्णंतीक्ष्णौषधियुताफलवर्तिर्हितातथा ॥ यथानुलो
मनोवायुर्मलस्नेहश्चजायते ॥ तथाविरेचनंदद्यात्तीक्ष्णंनस्यं
चशस्यते ॥

अर्थ— ढाळक व वमन इत्यादिक होऊन ज्या मनुष्याची शुद्धी केली नाहीं, त्याचे गुदावाटे मळमिश्रित स्नेह बाहेर जर आला नाहीं तर, शरीराला शिथिलपणा व आध्मान ह्मणजे पोटफुगी, व शूळ, व श्वास, व पक्वाशयाचे ठायीं जडपणा हे उपद्रव होतात. हे दूर होण्याविषयीं तीक्ष्ण असा निरूहण बस्ति योजावा. याप्रकारें तीक्ष्ण औषधें करून युक्त अशी फलवर्ती जणेकरून वायु अधोगामी होऊन मळमिश्रित स्नेह गुदावाटे बाहेर येई अशी योजावी; व तसेंच तीक्ष्णढाळक व तीक्ष्ण नस्यें हीं योजावीं.

## स्नेहबस्ती ज्याला उपद्रव करीत नाहीं त्याचें विधान

यस्यनोपद्रवंकुर्यात्स्नेहबस्तिरनिःसृता ॥
सर्वोल्पोव्यावृतेरौक्ष्यादुपेक्ष्यःसविजानता ॥

अर्थ - स्नेहबस्ति ह्मणजे स्नेहाची चिपनळी ती गुदांत घातल्यानंतर गुदाचा संपूर्णभाग व्यावृत ह्मणजे व्यापून राहिली होत्साती अथवा मनुष्यास रूक्षपणा आहे ह्मणोन गुदाचा एक देश व्यापून राहिलीहोत्साती शूलादिक उपद्रव करीत नाहीं, ती चिपनळी ह्मणजे स्नेहबस्ति तो बहुत वेळ तसाच ठेवावा.

## अहो रात्रींत स्नेह बाहेर आला नाहीं तर त्याजवर उपाय.

अनायातेत्वहोरात्रेस्नेहंसंशोधनैर्हरेत् ॥
स्नेहबस्तावनायातेनान्यःस्नेहोविधीयते ॥

अर्थ— स्नेहाची चिपनळी मारिली असतां जो स्नेह बाहेर येत नाहीं त्याला दोन वेळ चिपनळ्या मारून स्नेह बाहेर येईसें करावें व जो स्नेह अहोरात्रामध्येंही बाहेर येत नाहीं त्याला ढाळक देऊन बाहेर येईसा करावा.

## अनुवासन तेल

गुडूच्येरंडपूतीकभार्गीवृषकरोहितं ॥ शतावरीसहचरंकाक
नासापलोन्मितं ॥ यवमाषातसीकोलकुलित्थान्प्रसृतोन्मि
तान् ॥ चतुर्द्रोणांभसापक्त्वाद्रोणशेषेणतेनच ॥ पचेत्तैलाढ
केपेष्यैर्जीवनीयैःपलोन्मितैः ॥ अनुवासनमेतद्धिसर्ववात
विकारनुत् ॥

अर्थ—गुळवेल, एरंडमूळ, करंजसाल, भारंगमूळ, आडुळसा, रोहिसतृण, शतावरी, कोऱ्हांटा, कावळी, हीं नऊ औषधे पळ पळ प्रमाण, जव, उडीद, आळशी, बोरिचें बीज, व कुळिथ हीं पांच औषधें दोन दोन पळें हीं सारीं औषधें कुटून त्यांत पाणी च्यार द्रोण घालून एक द्रोण पाणी राही तोंपर्यंत काढा करून त्यांत तिळांचें तेल एक आढक परिमित घालावें आणि जीवनीय गणांचीं औषधें पळ पळ प्रमाण घेऊन चूर्ण करून बारीक वाटून त्या तेलांत घालून फिरून कढवावें आणि काढा आटून तेल राहिलें ह्मणजे खालीं उतरून तेल गाळून घ्यावें याला अनुवासन तेल ह्मणतात. हें तेल संपूर्ण वायूचे रोग दूर करितें.असें जाणावें.

## अनुवासनबस्तीमध्यें विपर्यास होऊन जे रोग होतात ते.

षट्सप्ततिर्व्यापदस्तुजायंतेबस्तिकर्मणः ॥
दूपितात्समुपायेनताश्चिकित्स्यास्तुसुश्रुतात् ॥

अर्थ— बस्तिकर्मामध्यें दोषरूप कांहीं विपर्यास होउन त्यापासून शहात्तर प्रकारचे रोग उत्पन्न होतात. त्यांची चिकित्सा सुश्रुत ग्रंथाचे ठायीं आहे त्याजवरून करावी.

## बस्तिकर्माचे ठायीं पथ्य.

पानाहारविहारश्चपरिहारश्चकृत्स्नशः ॥
स्नेहपानसमाःकार्यानात्रकार्याविचारणा ॥

अर्थ— अन्न, पान आणि विहारादिक, यांचे आचरण जसें स्नेहपानाचे ठायीं सांगितलें आहे, तसें सर्व प्रकारें या स्नेह बस्तीचे ठायीं करावें याविषयीं विचार करूं नये.

## निरूहबस्तीचा विधि.

निरूहबस्तिर्बहुधाभिद्यतेकारणांतरैः ॥
तैरेवतस्यनामानिकृतानिमुनिपुंगवैः ॥

अर्थ— निरूहबस्ति कारण भेदेंकरून अनेक प्रकारचा होतो; आणि जशीं जशीं कारणाचीं नामें असतील तशीं तशीं त्यांचीं होतात. उदाहरण उत्क्लेशनबस्ति, दोषहरबस्ति, दोषशमनबस्ति, इत्यादिक नामें जाणावीं.

## निरूहबस्तीचे दुसरें नाम.

निरूहस्यापरंनामप्रोक्तमास्थापनंबुधैः ॥
स्वस्थानस्थापनाद्दोषधातूनांस्थापनंमतं ॥

अर्थ— निरूहबस्तीचें दुसरें नाम आस्थापन असें जाणावें. त्याची व्युत्पत्ति दोष व रसादिक धातु यानां आपल्या स्वस्थानीं बसवितें, ह्मणोन त्याला आस्थापन ह्मणतात; व वातादिक दोष अथवा रोग यानां दूर करितो, ह्मणोन त्याला निरूह ह्मणतात.

## निरूहवस्तीचे ठायीं काढ्यादिकांचें प्रमाण.

निरूहस्यप्रमाणंतुप्रस्थपादोत्तरंमतं ॥
मध्यमंप्रस्थमुद्दिष्टंहीनस्यकुडवास्त्रयः ॥

अर्थ—निरूहबस्ति देण्याविषयीं कषायादिकांचे प्रमाण सवा प्रस्थ उत्तम, व एक प्रस्थ मध्यम, व तीन कुडव कनिष्ठ याप्रकारें जाणावें.

## जे निरूहवस्तीविषयीं योग्य नाहींत ते.

अतिस्निग्धोत्क्लिष्टदोषोक्षतोरस्कःकृशस्तथा ॥ आध्मानछर्दि हिक्कार्शःकासश्वासप्रपीडितः ॥ गुदशोफातिसारार्तोविषूची कुष्ठसंयुतः ॥ गर्भिणीमधुमेहीचनास्थाप्यश्चजलोदरी ॥

अर्थ—फार स्निग्ध जो मनुष्य तो, व ज्याचे ऊर्ध्वगामि दोष जाहले आहेत तो, व उरःक्षतेंकरून पीडित, कृश, व पोटफुगी रोग, ओकारी, उचकी, अर्श, खोकला, श्वास, इहींकरून पीडित जो मनुष्य तो, गुदाचे ठायीं पीडा, सूज, अतिसार, मोडशी, कुष्ठ, इहींकरून पीडित, गर्भिणीस्त्री, मधुमेही, व जलोदरी हे रोगी निरूहबस्तीविषयीं योग्य नाहींत.

## निरूहवस्तीविषयीं जे योग्य ते.

वातव्याधावुदावर्तेवातासृक्विषमज्वरे ॥ मूर्छातृष्णोदरानाह मूत्रकृछ्राश्मरीषुच ॥ वृध्यसृग्दरमंदाग्निप्रमेहेषुनिरूहणं ॥ शूलेम्लपित्तेहृद्रोगेयोजयेद्विधिवद्बुधः ॥

अर्थ— वातरोग, उदावर्त, वातरक्त, विषमज्वर, मूर्छा, तृषा, उदर, आनाहरोग, मूत्रकृछ्र, अश्मरीरोग, बहुत दिवसांचे असृग्दर ह्मणजे धुपणी, अग्निमांद्य, परमा[१], शूल-रोग, आम्लपित्त, हृद्रोग हे रोग निरूहबस्तीविषयीं योग्य जाणावें.

## निरूहबस्ति देण्याचा प्रकार.

उत्सृष्टानिलविण्मूत्रंस्निग्धस्विन्नमभोजितं ॥ मध्यान्हेगृहमध्ये चयथायोग्यंनिरूहयेत् ॥ स्नेहबस्तिविधानेनबुधःकुर्यान्निरूहणं ॥ जातेनिरूहेचततोभवेदुत्कटकासनः ॥ तिष्ठन्मुहूर्तमात्रंचनिरूहा गमनेच्छया ॥ अनायातंमुहूर्तेतुनिरूहंशोधनैर्हरेत् ॥

अर्थ— निरूहबस्ति ज्या मनुष्याला द्यावयाचा त्याला मुतायास व शौचाला होत अ-

---

१ मधुमेहावांचून दुसरे परमे बस्तीविषयीं योग्य जाणावें.

सल्यास जाऊं नये असें सांगून व त्याचे कोठ्यांत वायूचा फुगारा असला तर तो सरवून कोठा शुद्ध करून त्याचे अंगाला स्नेह पदार्थ लावून थोडा अंगाचा घाम काढून त्याला भोजन न देतां दोनप्रहरीं घरामध्यें जसा ज्या रोगावर बस्ति द्यावयाचा असेल तसा स्नेहबस्तीचे विधानेंकरून तैलादिकाच्या पिचकाऱ्या गुदावाटे माराव्या आणि निरूहबस्तीचे कर्म जाहाल्यानंतर तो निरूह बाहेर यावया करितां दोन घटिकापर्यंत उकिडवें बसावें. जर एका मुहूर्तांत तो निरूह बाहेर आला नाहीं तर त्याला शोधनकरून बाहेर येईसा करावा.

## निरूह बाहेर आला नाहीं त्याच्या शोधनाचीं औषधें.

निरूहैरेवमतिमान्क्षारमूत्राम्लसैंधवैः ॥

**अर्थ**–निरूहबस्ति गुदांतून बाहेर आला नसतां जवखार व गोमूत्र लिंबूचा रस, अथवा जंबीराचा रस व सैंधव हीं चार औषधें एकत्र करून गुदाचे ठायीं पुनः निरूह योजावा तेणेंकरून निरूह बाहेर येतो.

## ज्याला निरूहबस्ति उत्तम जाहाला त्याचें लक्षण.

यस्यक्रमेणगच्छंतिविट्पित्तकफवायवः ॥ लाघवंचोपजायेत सुनिरूहंतमादिशेत् ॥

**अर्थ**–ज्या मनुष्याला निरूहबस्ति दिल्हा, त्याचे मळ व पित्त व कफ आणि वायु हे क्रमेंकरून गुदावाटे बाहेर आले असतां व शरीराला हलकेपणा आला असतां निरूहबस्तीचें कर्म चांगलें असें जाणावें.

## ज्याला निरूहबस्ति चांगला जाहाला नाहीं त्याचें लक्षण.

यस्यस्याद्बस्तिरल्पाल्पवेगोहीनमलानिलः ॥ मूत्रार्तिजाड्यारुचिमान्दुर्निरूहंतमादिशेत् ॥

**अर्थ**–ज्याला निरूहबस्ति दिला आणि त्या बस्तीचा बाहेर येण्याचा वेग अल्प यास्तव मळ व वायु, हे जितुके बाहेर यावयाचे तितुके न आले, थोडे आले, आणि मूत्राचे ठायीं पीडा व शरीराला जडपणा, व अरोचक इतुक्या लक्षणें करून युक्त मनुष्य जो त्याला निरूहबस्ति चांगला जाहाला नाहीं असें जाणावें.

## निरूहबस्ति व स्नेहबस्ति यांचें चांगलें देण्याचें लक्षण.

विविक्ततामनस्तुष्टिःस्निग्धताव्याधिनिग्रहः ॥ आस्थापनस्नेहवस्त्योः सम्यक्दानेतुलक्षणं ॥ अनेनविधिनायुंज्यान्निरूहंबस्तिदानवित् ॥

**अर्थ**– रोग्याचे अंगास हलकेपणा, मनाचा संतोष, अंगाला घामाचा चिकटा, व

रोगाचा नाश हे आस्थापन ह्मणजे निरूहबस्ति व स्नेहबस्ति यांचे चांगलें दिल्याचें लक्षण जाणावें आणि पूर्वोक्त विधीकरून बस्तिकर्म जाणणारा वैद्य त्यानें निरूहबस्ति योजावा.

## निरूहणबस्ति कितीवेळा द्यावा त्याचा प्रकार.

द्वितीयंवातृतीयंवाचतुर्थंवायथोचितं ॥ सस्नेहएकःपवनेपित्तेद्वौ पयसासह ॥ कषायकटुरुक्षाद्याःकफेकोष्णास्त्रयोमताः ॥ पित्तश्लेष्मानिलाविष्टंक्षीरयूषरसैःक्रमात् ॥ निरूहंयोजयित्वा चततस्तदनुवासयेत् ॥

अर्थ–निरूहबस्ति दोनवेळ अथवा तीनवेळ अथवा चारवेळ जसा दोष असेल तसा योजावा व वातरोग असतां स्नेहयुक्त निरूहबस्ति एकवेळ द्यावा व पित्त रोग असतां दुग्धयुक्त दोनवेळ द्यावा व कफरोग असतां कषाय व कटु व रुक्ष इत्यादिक पदार्थ एकत्र करून किंचित् उष्ण करून तीनवेळ निरूहबस्ति द्यावा ह्मणजे या औषधाच्या तीनवेळा पिचकाऱ्या माराव्या अथवा कफ व पित्त वायु इहींकरून मनुष्य पीडित असतां दूध व यूष व रस ह्मणजे मांसरस यांचे क्रमेंकरून गुदादिकांचे ठायीं बस्ति द्यावे नंतर अनुवासन बस्ति द्यावा ह्मणजे स्नेहाच्या पिचकाऱ्या माराव्या.

## सुकुमारादिक मनुष्यांस निरूहबस्तीची योजना.

सुकुमारस्यवृद्धस्यबालस्यचमृदुर्हितः ॥ बस्तिस्तीक्ष्णःप्रयुक्तस्तेषांहन्याद्बलायुषी ॥

अर्थ–नाजूक मनुष्य व वृद्ध व बाल यांना हलक्या पिचकाऱ्या माराव्या; आणि यांचे ठायीं दारुण असा बस्ति योजिला असतां यांचे बळाचा व आयुष्याचा नाश होतो.

## आदि मध्य व अंत्य यांचेठायीं बस्तीची योजना.

दद्यादुत्क्लेशनंपूर्वंमध्येदोषहरंततः ॥ पश्चात्संशमनीयंचदद्याद्बस्तिंविचक्षणः ॥

अर्थ–प्रथम दोष उचंबळतील, अशा औषधांचा बस्ति योजावा, व मध्यें दोषनाशक अशा औषधांचा बस्ति द्यावा, व अंतीं आपलें स्वस्थानीं दोष बसतील, अशा औषधांच्या पिचकाऱ्या माराव्या.

## दोष उचंबळावयाचा बस्ति.

एरंडबीजंमधुकंपिप्पलीसैंधवंवचा ॥ हपुषाफलकल्कश्चबस्तिरुत्क्लेशनःस्मृतः ॥

अर्थ–एरंडाचे बीज, मोहाची साल, पिंपळी, सैंधव, वेखंड, हौरणीची फळें हीं

सहा औषधें समभाग घेऊन वाटून कल्क करून दोष उचंबळवावया करितां हा उत्क्लेशन बस्ति योजावा.

## दोषहर बस्ति.

शताव्हामधुकंबिल्वंकौटजंफलमेवच ॥
सकांजिकःसगोमूत्रोबास्तिर्दोषहरःस्मृतः ॥

अर्थ–शतावरी, ज्येष्ठमध, बेलफळ, कौंट हीं चार औषधें समभाग घेऊन कांजीत बारीक वाटून त्यांत गोमूत्र मेळवून गुदाचे ठायीं चिपनळया माराव्या, तेणेंकरून वातादिक दोषांचे शमन होतें.

## शोधन बस्ति.

शोधनद्रव्यनिक्काथस्तत्कल्कैःस्नेहसैंधवैः ॥
युक्त्याखजेनमथिताबस्तयःशोधनाःस्मृताः ॥

अर्थ– निशोत्तरादिक जीं शोधनद्रव्यें त्यांचा काढा करून त्याच औषधांचा कल्क व सैंधव त्या काढयांत मेळऊन युक्तीनें रवीनें घुसळून दोषांचे शोधनाविषयीं चिपनळ्या द्याव्या.

## दोषशमन बस्ति.

प्रियंगुर्मधुकोमुस्तातथैवचरसांजनं ॥
सक्षीरःशस्यतेबस्तिर्दोषाणांशमनेस्मृतः ॥

अर्थ–वाघांटीचे मूळ, अथवा राळे, मोहाची साल, नागरमोथे, रसांजन ,हीं चार औषधें समभाग घेऊन दुधांत बारीक वाटून दोष शमन होण्याविषयीं चिपनळ्या माराव्या.

## लेखन बस्ति.

त्रिफलाक्काथगोमूत्रक्षौद्रक्षारसमायुताः ॥
ऊपकादिप्रतीवापैर्बस्तयोलेखनाःस्मृताः ॥

अर्थ– त्रिफळेचा काढा करून त्यांत गोमूत्र, मध, जवखार घालून ऊषकादिक गणाचे औषधांचे चूर्ण त्यांत मेळवून मेदारोगादिकांचे कृशीकरणाविषयीं बस्ति योजावा.

## बृंहण बस्ति.

बृंहणद्रव्यनिक्काथःकल्कैर्मधुरकैर्युतः ॥
सर्पिर्मांसरसोपेताबस्तयोबृंहणामताः ॥

अर्थ–मुसळी, गोखरू, कवचबीज, इत्यादिक जी धातुवर्धन द्रव्यें त्यांचा काढा करून

त्यांत मोहाची साल, व द्राक्षें, व डाळिंब इत्यादिक मधुरद्रव्यें आणि कल्क, व तूप, व मांस रस, हीं सारीं घालून वर्धन होण्याविषयीं बस्ति योजावा.

## पिच्छल बस्ति.

बदर्यैरावतीसेलुशाल्मलीधन्वनागराः ॥ क्षीरसिद्धाःक्षौद्रयुक्तानाम्नापिच्छलसंज्ञिताः ॥ अजोरणैणरुधिरैर्युक्तादेयाविचक्षणैः ॥ मात्रापिच्छलबस्तीनांपलैर्द्वादशभिर्मताः ॥

अर्थ-बोरीची साल, नारंगी, भोकरीची साल, सांवरीची साल, धमासा, सुंठ, हीं सहा औषधें समभाग घेऊन दुधांत वाटून त्यांत बोकड, व मेंढा, व हरिण यांचे रक्त मिश्रित करून कुशल वैद्यानीं दोष पातळ होण्याविषयीं बस्ति योजावें. याला पिच्छल बस्ति ह्मणतात. या बस्तीच्या मात्रेचें प्रमाण. बारा पळें जाणावें.

## निरूहणमात्रेचा विधि.

दत्वादौसैंधवस्याक्षंमधुनःप्रसृतिद्वयं ॥ विनिर्मथ्यततोदद्यात् स्नेहस्यप्रसृतित्रयं ॥ एकीभूतेततःस्नेहेकल्कस्यप्रसृतिंक्षिपेत् ॥ संमूर्छितेकषायेतुचतुःप्रसृतिसंमितं ॥ क्षिप्त्वाविमथ्यदद्याच्च निरूहंकुशलोभिषक् ॥ वातेचतुःपलंक्षौद्रंदद्यात्स्नेहस्यषट्पलं ॥ पित्तेचतुःपलंक्षौद्रंस्नेहस्यचपलत्रयं ॥ कफेषट्पलकंक्षौद्रंस्नेहस्यैवचतुःपलं ॥

अर्थ-प्रथम सैंधव कर्षप्रमाण व मध चारपळें या दोहोंचे एकाजागीं मर्दन करून नंतर त्यांत तूप अथवा तेल साहापळें प्रमाण घालून एकाजागीं मेळवून त्यांत कल्काची जीं औषधें सांगेल त्यांचा कल्क करून त्यास्नेहांत मेळवावा. अथवा त्या कल्काचा काढाकरून त्या स्नेहांत मेळवून कुशल वैद्यानीं गुदाचे ठायीं चिपनळया माराव्या. हा निरूहबस्तीचा साधारण विधि जाणावा. विशेष विधी तर, वातरोग असतां मध चारपळें आणि स्नेह तीनपळें प्रमाण हीं एकत्र करून बस्ति योजावा, व कफरोग असतां मध सहापळें व स्नेह चारपळें हीं एकत्र करून बस्ति योजावा.

## मधुतैलबस्ति.

एरंडक्वाथतुल्यांशंमधुतैलंपलाष्टकं ॥ शतपुष्पापलार्धेनसैंधवार्धेनसंयुतं ॥ मधुतैलकसंज्ञोयंबस्तिःखजविलोडितः॥ मेदोगुल्मकृमिप्लीहमलोदावर्तनाशनः ॥ बलवर्णकरश्चैव वृष्योबृंहणदीपनः ॥

अर्थ— एरंडाचे मुळाचा काढा आठ पळें, व मध आणि तेल हीं चार चार पळें व बडीशोप आणि सैंधव हीं अर्धे अर्धे पळ, सारी एकाजागीं घुसळावीं, याला मधुतैलक बस्ति ह्मणतात. हा बस्ति गुदाचेठायीं योजिला असतां येणेंकरून मेदोरोग, गुल्मरोग, कृमिरोग, कवळू, आणि उदावर्तवायु यांचा नाश होतो, आणि हा बस्ति बळ व कांति आणि स्त्रीविषयीं प्रीति धातूची वृद्धि यांतें देतो, आणि यापासून अग्नि प्रदीप्त होतो.

## दीपनबस्ति.

क्षौद्राज्यक्षीरतैलानांप्रसृतिंप्रसृतिंभवेत् ॥
हपुषासैंधवाक्षांशौबस्तिःस्याद्दीपनःपरः ॥

अर्थ— मध, तूप, दूध हीं दोन दोन पळें व शेरणी आणि सैंधव हीं दोन औषधें कर्ष प्रमाण घेऊन बारीक वाटून त्या मधांत, तुपांत, दुधांत कालवून जठराग्नि प्रदीप्त होण्याविषयीं बस्ति योजावा

## युक्तरथबस्ति.

एरंडमूलनिःक्काथोमधुतैलंससैंधवं ॥
एषयुक्तरथोबस्तिःसवचापिप्पलीफलः ॥

अर्थ— एरंड मुळांचा काढा करून त्यांत मध व तेल घालून सैंधव, वेखंड, पिंपळी व गेळीचें फळ हीं चार औषधें समभाग घेऊन चूर्ण करून त्या काढ्यांत मेळवून गुदाचे ठायीं चिपनळ्या माराव्या याला युक्तरथबस्ति ह्मणतात. हा बस्ति सर्व रोगांवर आहे.

## सिद्धबस्ति.

पंचमूलस्यनिःक्काथस्तैलंमागधिकामधु ॥
ससैंधवःसमधुकःसिद्धबस्तिरितिस्मृतः ॥

अर्थ—पंचमुळांचा काढा करून तेल, पिंपळीचें चूर्ण, सैंधव व मोहाचे लांकडाचा आंतला भाग अथवा ज्येष्ठमध हीं सर्व त्या काढ्यांत घालून बस्ति योजावा, याला सिद्धबस्ति ह्मणतात. हाबस्ति सर्व रोगांवर द्यावा.

## बस्तीचेठायीं सेव्यपदार्थ, व निषिद्ध पदार्थ.

स्नानमुष्णोदकैःकुर्याद्दिवास्वप्नमजीर्णतां ॥
वर्जयेदपरंसर्वमाचरेत्स्नेहबस्तिवत् ॥

अर्थ—चिपनळ्या घेणारा मनुष्य जो त्याणें ऊनपाण्यानें स्नान करावें; व दिवसा निजूं नये, व अजीर्ण होऊंदेऊं नये, दुसरीं सर्व आचरणें स्नेहबस्तिसारिखीं करावीं,

## उत्तरबस्तीचा विधि.

अतःपरंप्रवक्ष्यामिबस्तिमुत्तरसंज्ञितं ॥ निरूहादुत्तरोयस्मात्त
स्मादुत्तरसंज्ञितः ॥ द्वादशांगुलकंनेत्रंमध्येचकृतकर्णिकं ॥
मालतीपुष्पवृंत्ताभंछिद्रंसर्षपनिर्गमं ॥

अर्थ–यानंतर उत्तरबस्तीचें प्रमाण सांगतो. बाराअंगुलप्रमाण नळी लांबीची अ-सून त्या नळीचा मध्यभाग कमळपत्राचे कर्णिकेसारिखा असावा; आणि ती नळी मोग-रीचे फुलाइतकी मोठीअसून तिचें छिद्र आंत एक मोहोरी जाई इतुकें असावें.

## वयोनुमानें करून मात्रेचें प्रमाण.

पंचविंशतिवर्षाणामधोमात्राद्विकार्षिकी ॥
तदूर्ध्वंपलमानंचस्नेहस्योक्ताविचक्षणैः ॥

अर्थ–मनुष्याला पंचवीस वर्षे होत तोंपर्यंत बस्तिविषयीं स्नेहाची मात्रा दोनकर्षप्रमाण विचक्षण वैद्यांनीं योजावी; व पंचवीस वर्षानंतर पळप्रमाण योजावी.

## उत्तरवस्तीची योजना कशी करावी तो प्रकार.

अथास्थापनशुद्धस्यतृप्तस्यस्नानभोजनैः ॥ स्थितस्यजानुमा
त्रेणपीठेस्लिष्टशलाकया ॥ स्निग्धयामेंढ्रमार्गेचततोनेत्रं
नियोजयेत् ॥ शनैःशनैर्घृताभ्यक्तंमेंढ्ररंध्रेंगुलानिषट् ॥
ततोवपीडयेद्बस्तिंशनैर्नेत्रंचनिर्हरेत् ॥ ततःप्रत्यागते
स्नेहेस्नेहबस्तिक्रमोहितः ॥

अर्थ–निरूहबस्तीकरून शुद्ध जाहाला, आणि स्नान व भोजन ईहींकरून तृप्त जाहाला असा जो त्याला आसनाचे ठायीं गुडघे टेंकून बसवून यथायोग्य सळई ती स्निग्ध अ-सून सळईच्या नळीला तूप लावून शिस्नमार्गाचेठायीं योजून त्या नळीचा शिस्नरंध्राचे आंत हलका हलका सहाअंगुळप्रमाण प्रवेश करून पिचनळी मारावी नंतर ती नळी हलकी हलकी बाहेर काढावी. तो स्नेह बाहेर आला असतां उत्तम बस्तिकर्म होय, याप्रकारें स्नेहबस्तीचा क्रम जाणावा.

## स्त्रियांस बस्ति देण्याचा प्रकार.

स्त्रीणांकनिष्ठिकास्थूलंनेत्रंकुर्याद्दशांगुलं ॥ मुद्गप्रवेशंयोज्यं
चयोन्यंतश्चतुरंगुलं ॥ द्व्यंगुलंमूत्रमार्गेचसूक्ष्मंनेत्रंनियोजयेत् ॥

अर्थ–स्त्रियांस बस्ति देण्याविषयीं बस्तीची नळी करंगुळी इतकी मोठी असून दाहा अंगुळ प्रमाण लांब व तीचें छिद्र मूग जाई इतुकें बारीक करून त्या नळीच्या योनीचे

आंत चार अंगुळ प्रमाण प्रवेश करून नंतर चिपनळी मारावी. व स्त्रियांचे मूत्र मार्गाचे ठायीं बारीक नळी योजून त्या नळीचा दोन अंगुळ प्रमाण त्यामूत्र मार्गांत प्रवेश करून चिपनळी मारावी.

## बाळकांस बस्ति देण्या विषयीं प्रमाण.

मूत्रकृच्छ्रविकारेषुबालानांत्वेकमंगुलं ॥
शनैर्निःकंपमाधेयंसूक्ष्मनेत्रंविचक्षणैः ॥

अर्थ–बालकांस मूत्रकृच्छ्र विकार जाहला असतां वैद्यांनीं हात नकांपतां बारीक नळी योजून हलका हलका त्या नळीचा शिस्नाचे आंत एक अंगूळ प्रमाण प्रवेश करून चिपनळी मारावी.

## स्त्रियांस व बाळांस बस्तिदेण्याविषयीं स्नेहाचे मात्रेचें प्रमाण.

योनिमार्गेपुनारीणांस्नेहमात्राद्विपालिकी॥मूत्रमार्गेपलोन्माना बालानांचद्विकार्षिकी ॥ उत्तानायैस्त्रियैदद्यादूर्ध्वजान्वैविच क्षणः ॥ अप्रत्यागच्छतिभिषक्बस्तावुत्तरसंज्ञिके ॥

अर्थ–स्त्रियांस योनिमार्गाचे ठायीं बस्ति देण्याविषयीं स्नेहाचें प्रमाण तें दोनपळ जाणावें. व स्त्रियांच्या मूत्र मार्गाचे ठायीं ती स्नेहमात्रा एक पळ प्रमाण जाणावी. व बाळकांस दोन कर्ष प्रमाण जाणावी; आणि उत्तरसंज्ञक बस्तीचे ठायीं कुशल वैद्यानी त्या स्त्रियेला उताणी निजवून तिचे गुडघे वरती उचलून धरून नंतर तो स्नेह बाहेर न येई अशी चिपनळी मारावी.

## शोधनद्रव्यें करून बस्तीचें विधान.

भूयोबस्तिंनिदध्यात्तुसंयुक्तैःशोधनैर्गणैः॥फलवर्तिंनिदध्याद्वा योनिमार्गेदृढंभिषक् ॥ सूत्रैर्विनिर्मितांस्निग्धांशोधनद्रव्यसं युतां ॥ दह्यमानेनथाबस्तौदद्याद्बस्तिंविचक्षणः॥ क्षीरवृक्षकषा येणपयसाशीतलेनच ॥ बस्तिःशुक्ररुजःपुंसांस्त्रीणामार्तवजा रुजः ॥ हन्यादुत्तरबस्तिस्तुनोचितामोहिनांक्वचित् ॥

अर्थ– मूत्रकृच्छ्रादिक जे रोग त्यांचे ठायीं शोधनद्रव्यें एरंडतैलादिक जीं औषधें त्यांचा समुदाय जो तिहीं करून योनिमार्गाचे ठायीं चिपनळ्या माराव्या, अथवा एरंड बीजादिक जीं औषधें त्यांची घट्ट वात करून, अथवा सुताची वात करून त्या वातीला एरंडबीजादिक जीं औषधें त्यांचा चोपड करून ती वात योनीचे ठायीं योजावी; जर

त्या वातीचे अधोभागीं वस्तिस्थान आहे तें विकृत जाहले तर उंबर, वड, आदीकरून क्षीरवृक्ष जे त्यांचा काढा करून बस्ति योजावा; अथवा थंड दुधाचा योजावा. तेणेंकरून बस्तिस्थान शुद्ध होतें; आणि हा बस्ति शुक्र धातु संबंधि ज्या पीडा होतात त्यांतें, व स्त्रियांस विटाळशिपणासंबंधि ज्या पीडा होतात त्यांतें दूर करितो, व ज्या मनुष्यानां परमा आहे त्यानां उत्तरबस्तीचा क्वचित् उपयोग होत नाहीं असें जाणावें.

## बस्तिकर्म चांगले जाहलें असतां त्याचें लक्षण.

सम्यक्दत्तस्यलिंगानिव्यापदःक्रमएवच ॥
बस्तेरुत्तरसंज्ञस्यशमनंस्नेहबस्तिना ॥

अर्थ–उत्तरसंज्ञकबस्ति स्नेहबस्तीकरून उत्तमप्रकारें योजिला असतां त्याचें लक्षण क्रमेंकरून शुक्र धातु संबंधीं ज्या प्रमेहादिक पीडा त्या दूर होतात.

## गुदाचे ठायीं फलवर्ति योजना.

घृताभ्यक्तेगुदेक्षेप्याश्लक्ष्णस्वांगुष्ठसंनिभा ॥
मलप्रवर्तिनीवर्तिःफलवर्तिश्चसास्मृता ॥

अर्थ–गुदाचे ठायीं तूप लावून रोग्याचे अंगुष्ठप्रमाण चांगली घट्ट वात करून मळ होण्याविषयीं एरंडबीजादिक जीं रेचक औषधें त्यांचा त्या वातीला लेप करून ती वात गुदाचे ठायीं योजावी. हिला फलवर्ति असें ह्मणतात.

---

## नस्यविधि

नस्यंतत्कथ्यतेधीरैर्नासाग्राह्यंयदौषधं ॥
नावनंनस्यकर्मेतितस्यनामद्वयंमतं ॥

अर्थ–जें औषध नाकांत घालावयाचें त्याला नस्य ह्मणतात. त्या नस्याचीं नामें नावन आणि नस्यकर्म अशीं दोन जाणावीं.

## नस्याचे भेद

नस्यंभेदोद्विधाप्रोक्तोरेचनंस्नेहनंतथा ॥
रेचनंकर्षणंप्रोक्तंस्नेहनंबृंहणमतं ॥

अर्थ–या नस्याचे भेद दोन, एक रेचन आणि एक स्नेहन, त्यामध्यें जें नस्य रेचन कर्षण जाणावें, ह्मणजे वातादि दोषाचें छेदन करणारें होय. व जें स्नेहन तें बृंहणन जाणावें ह्मणजे धातुवृद्धि करणारें होय.

## नस्याचे काळ

कफपित्तानिलध्वंसेपूर्वमध्यापराण्हके ॥
दिनस्यगृह्यतेनित्यंरात्रौत्वाप्युत्कटेगदे ॥

अर्थ–कफाचे नाशाविषयीं नकांत औषध प्रातःकाळीं घालावें; पित्ताचे नाशाविषयीं दोनप्रहरीं घालावें, वायूचे नाशाविषयीं सायंकाळीं घालावें, व रोगाचें फार बळ असलें तर रात्रीसही घालावें.

## नस्याचा निषेध

नस्यंत्यजेद्भोजनांतेदुर्दिनेचापतर्पणे ॥ तथानवप्रतिश्यायीग
र्भिणीगरदूषितः ॥ अजीर्णीदत्तबस्तिश्चपीतस्नेहोदकासवः ॥
क्रुद्धःशोकाभिभूतश्चतृषार्तोवृद्धबालकौ॥ वेगावरोधीस्नातश्च
स्नातुकामश्चवर्जयेत् ॥

अर्थ–नाकांत नस्य घालावयाचें तें भोजन केल्यावर लागलेंच व अकाळीं अभाळ आले असतां, व लंघन केलें असतां घालूं नये, ज्याला नूतन पीनस रोग आहे तो मनुष्य, व गर्भिणीस्त्री, व विषदोषेंकरून, व अजीर्णेंकरून पीडित मनुष्य, व ज्याला बस्तिप्रयोग केला आहे तो, व तूप तेल इत्यादिक स्नेह व पाणी, व मद्य यांचें सेवन केलेला, क्रोधिष्ट, शोकेंकरून व तृषेंकरून पीडित, वृद्ध, बाल, वात मूत्र मळ यांचा निरोध करणारा मनुष्य, व स्नान केलेला, व स्नान करावयाचें आहे तो मनुष्य, इतक्या मनुष्यांस नस्य देऊं नये.

## नसकर्माचेठायीं योग्य व अयोग्य.

अष्टवर्षस्यबालस्यनस्यकर्मसमाचरेत् ॥
अशीतिवर्षादूर्ध्वंचनावनंनैवदीयते ॥

अर्थ–आठ वर्षांचे बालकास नाकांत औषध घालावें, आणि ऐंशीं वर्षां पलीकडे मनुष्यांचे नाकांत औषध घालूं नये.

## रेचकनस्याचें विधान.

अथवैरेचनंनस्यंग्राह्यंतैलैःसुतीक्ष्णकैः ॥
तीक्ष्णभेषजसिद्धैर्वास्नेहैःक्वाथैरसैस्तथा ॥

अर्थ–जें रेचनाविषयीं औषध नाकांत घालावयाचें तें ओंवा मोहऱ्या इत्यादिकांचें तीक्ष्ण तेल काढून नाकांत घालावें, अथवा तीक्ष्ण औषध जें तेणेंशीं सह स्नेह सिद्ध करून अथवा तीक्ष्ण औषधांचा काढा अथवा रस त्यांत स्नेह सिद्ध करून नाकांत घालावें

## रेचननस्याचे प्रकार.

नासिकारंध्रयोरष्टौषट्चत्वारश्चबिंदवः ॥
प्रत्येकंरेचनेयोज्यामुख्यमध्यांत्यमात्रया ॥

अर्थ—रेचनाविषयीं नाकाचे दोहों छिद्रांमध्यें औषधांचे आठ बिंदु घातले असतां ती उत्तम मात्रा जाणावी. सहा बिंदु घातले असतां ती मध्यम मात्रा जाणावी. चार बिंदु घातले असतां ती कनिष्ठ मात्रा जाणावी.

## नस्यकर्माचेठायीं औषधाचे प्रमाण.

नस्यकर्मणिदातव्यंशाणैकंतीक्ष्णमौषधं ॥ हिंगुस्याद्यवमात्रं
तुमाषैकंसैंधवंमतं ॥ क्षीरंचैवाष्टशाणंस्यात्पानीयंचत्रिकार्षिकं ॥
कार्षिकंमधुरंद्रव्यंनस्यकर्मणियोजयेत् ॥

अर्थ—नस्यकर्माचेठायीं जें तीक्ष्ण औषध असेल ते एक शाण प्रमाण योजावें, व हिंग एक यव प्रमाण, सैंधव माषप्रमाण, दूध आठशाण, पाणी तीनकर्ष, व साखर, डाळिंब इत्यादिक मधुरद्रव्यें जीं ती प्रत्येक एक कर्ष प्रमाण, याप्रकारें त्यांची योजना करावी.

## विरेचननस्याचे दुसरे दोन भेद.

अवपीडः प्रधमनंद्वौभेदावपरौस्मृतौ ॥
शिरोविरेचनस्थानेतौतुदेयौयथायथं ॥

अर्थ—त्या विरेचननस्याचे भेद दोन. एक अवपीडन, व प्रधमन असे जाणावे. हे मस्तकाचें रेचनाविषयीं योजावे.

## अवपीडन व प्रधमन यांचें लक्षण.

कल्कीकृतादौषधाद्यःपीडितोनिसृतोरसः ॥ सोवपीडःसमुद्दि
ष्टस्तीक्ष्णद्रव्यसमुद्भवः ॥ षडंगुलाद्विवक्त्रायानाडीचूर्णंतयाध
मेत् ॥ तीक्ष्णकोलमितंवक्त्रवातैःप्रधमनंहितत् ॥

अर्थ—तीक्ष्ण औषध वाटून त्याचा कल्ककरून पिळून जो रस निघतो त्याला अवपीड ह्मणतात, व सहा अंगुळें प्रमाण लांब आणि सरळ अशी नळी करून तीमध्यें तिखट असें चूर्ण कोलप्रमाण घालून तोंडाचे वाऱ्यानें नाकांत फुंकावें. त्याला प्रधमन ह्मणतात

## रेचन व स्नेहन यांचें नस्याविषयीं जें योग्य तें.

ऊर्ध्वजत्रुगतेरोगेकफजेस्वरसंक्षये ॥ अरोचकेप्रतिश्यायेशिरः

शूलेचपीनसे ॥ शोफापस्मारकुष्ठेषुनस्यंवैरेचनंहितं ॥ भीरु
स्त्रीकृशबालानांनस्यंस्नेहेनदीयते ॥

अर्थ–ऊर्ध्वजत्रुगतरोग, कफ संबंधी स्वराचा क्षय, अरोचक, पडसें, मस्तकशूळ, पिनस सूज, अपस्मार, कुष्ठ या रोगांचे ठायीं रेचक नस्य हितकारक जाणावें, भित्रामनुष्य, कृश मनुष्य, व बाल यांचेठायीं स्नेहयुक्त नस्य द्यावें.

## अवपीडननस्याविषयीं जें योग्य तें.

गलरोगेसन्निपातेनिद्रायांविषमज्वरे ॥
मनोविकारेकृमिषुयुज्यतेचावपीडनं ॥

अर्थ–गलरोग, संनिपात, फार झोंप, विषमज्वर, मनोविकार, व कृमिरोग यांचेठायीं अवपीडन नस्य योजावें.

## प्रधमननस्याविषयीं जें योग्य तें.

अत्यंतोत्कटदोषेषुविसंज्ञेषुचदीयते ॥
चूर्णंप्रधमनंधीरैस्तद्धितीक्ष्णतरंयतः ॥

अर्थ–मूर्छा, अपस्मारादिक, संज्ञा नष्ट जाहाली आहे ज्यां पासून असे सन्यासादिक रोग, त्यांचे ठायीं अत्यंत तीक्ष्ण असें प्रधमन संज्ञक चूर्ण, नस्याविषयीं योजावें.

## रेचनसंज्ञक नस्य.

नस्यंस्याद्गुडशुंठीभ्यांपिप्पलीसैंधवेनच ॥ जलपिष्टेनतेनाक्षि
कर्णनासाशिरोगदाः ॥ हनुमन्यागलोद्भूतानश्यंतिभुजपृष्ठजाः ॥

अर्थ–सुंठ, कोमट पाण्यांत उगाळून त्यांत गूळ मेळवून नाकांत घालावी. पिंपळी, व सैंधव हीं कोमट पाण्यांत उगाळून नाकांत घालावें. तेणेंकरून डोळे, कर्ण, मस्तक, हनवटी, मान, भुज, व पाठ यांचेठायीं ज्या पीडा होतात त्या दूर होतात.

## रेचननस्याचा दुसरा प्रकार.

मधूकसारकृष्णाभ्यांवचामरिचसैंधवैः ॥ नस्यंकोष्णजलेपिष्टं
दद्यात्संज्ञाप्रबोधनं ॥ अपस्मारेतथोन्मादेसंनिपातेपतंत्रके ॥

अर्थ–मोहाचे लांकडाचे आंतला गाभा, पिंपळी, वेखंड, मिरें, व सैंधव हीं औषधें कोमट पाण्यांत वाटून नस्य द्यावें. येणेंकरून फेपरें, उन्माद, सन्निपात, व अपतंत्रक वायु यांपासून चेष्टा, ज्ञान, हीं नष्ट होतात; तीं दूर होऊन मनुष्य लवकर सावध होतो असें जाणावें.

## रेचननस्याचा तिसरा प्रकार.

सैंधवंश्वेतमरिचंसर्षपाःकुष्ठमेवच ॥
बस्तमूत्रेणपिष्टानिनस्यंतंद्रानिवारणं ॥

**अर्थ**—सैंधव, शेगव्याचे बीज, पांढऱ्या मोहऱ्या, व कोष्ठ हीं औषधें बोकडाचे मुतांत वाटून नस्य द्यावें; तेणेकरून डोळयावर झांपड पडते ती दूर होते; व पूर्वोक्त अपस्मारादिक रोग दूर होतात.

## प्रधमनसंज्ञक नस्य.

रोहितमत्स्यपित्तेनभावितंसैंधवंवचा ॥ मरीचंपिप्पलीशुंठी
कंकोलंलशुनंपुरं ॥ कट्फलंचेतितच्चूर्णंदेयंप्रधमनंबुधैः ॥

**अर्थ**—सैंधव, वेखंड, मिरें, पिंपळी, सुंठ, कंकोल, लसुण, गुग्गुळ, व कट्फळ, यांचे चूर्ण करून रोहितसंज्ञक मत्स्य जो त्याच्या पित्ताचे चूर्णाला पुट द्यावें; आणि वाळल्यावर पूर्वी नळीचे मान सांगितले आहे त्या रीतीनें नळी घेऊन त्यामध्यें हें चूर्ण घालून नाकांत फुंकावें; येणेंकरून पूर्वोक्त अपतंत्रादिक रोग दूर होतात. या चूर्णाला प्रधमन असें ह्मणतात.

## बृंहण नस्याची कल्पना.

अथबृंहणनस्यस्यकल्पनाकथ्यतेधुना ॥ मर्शश्चप्रतिमर्शश्चद्वौ
भेदौस्नेहनेमतौ ॥ मर्शस्यतर्पणीमात्रामुख्याशाणैःस्मृताष्टभिः
मध्यमाचचतुःशाणैर्हीनाशाणमितास्मृता ॥ एकैकास्मिंस्तुमा
त्रेयंदेयानासापुटेबुधैः ॥ मर्शस्यद्वित्रिवेलंवावीक्ष्यदोषबलाब
लं ॥ एकांतरंद्व्यंतरंवानस्यंदद्याद्विचक्षणः ॥ त्र्यहंपंचाहम
थवासप्ताहंवासुयंत्रितः ॥

**अर्थ** धातुवृद्धि करणारें असें नाकांत औषध घालावयाचें त्याची कल्पना सांगतों. त्या बृंहण नस्याचे भेद दोन मर्श, व प्रतिमर्श हे स्नेहनाविषयीं योग्य जाणावे. त्यामध्यें मर्श नस्याची तर्पणी मात्रा जाणावी; ती आठ शाण प्रमाणाची मुख्य मात्रा होय, व च्यार शाणाची मध्यम मात्रा, व एक शाणाची हीन मात्रा जाणावी; आणि ती मात्रा दोषांचे बळाबळ पाहून मनुष्याला वस्त्रादिकानीं वेष्टित करून एकेक्या नाकपुडींत दोन अथवा तीन वेळ अथवा एकादिवसा आड अथवा दोहीं दिवसा आड अथवा तीन दिवसा आड अथवा पांचवे दिवशीं अथवा सातवे दिवशीं घालावी.

## मर्शसंज्ञक नस्य व विरेचनसंज्ञकनस्य यांचें आधिक्यहोऊन जे रोग होतात त्याजवर उपाय.

मर्शेशिरोविकारेचव्यापदोविविधाःस्मृताः ॥ दोषोत्क्लेशात्क्ष याच्चैवविज्ञेयास्तायथाक्रमं ॥ दोषोत्क्लेशनिमित्तासुयुंज्याद्वम नशोधनं ॥ अथक्षयनिमित्तासुयथास्वंबृंहणंमतं ॥

**अर्थ**—मर्शनस्याची मात्रा धात्वादिकांची तृप्ति करणारी आहे. तिचें आधिक्य होऊन दोषांचा उत्कर्ष जाहला असतां व मस्तकाच्या विरेचना विषयीं विरेचन संज्ञक नस्याची मात्रा आहे तिचें आधिक्य होऊन मस्तकांतील मेदादिकांचा क्षय जाहला असतां त्या पासून अनेक प्रकारच्या पीडा होतात; ज्या दोषांचे उत्कर्ष निमित्त पीडा होतात त्या-दूर होण्याविषयीं ओकारीचें व ढाळकांचें औषध द्यावें; व क्षय निमित्त ज्या पीडा हो-तात त्या दूर होण्याविषयीं धातुवृद्धि करणारें औषध नाकांत अथवा पोटांत द्यावें.

## जें बृंहण नस्याविषयीं योग्य तें

शिरोनासाक्षिरोगेषुसूर्यावर्तार्धभेदके ॥ दंतरोगेबलेहीनेमन्या बाव्हंसजेगदे ॥ मुखशोषेकर्णनादेवातपित्तगदेनथा ॥ अका लपलितेचैवकेशश्मश्रुप्रपातने ॥ युज्यतेबृंहणंनस्यंस्नेहैर्वाम धुरद्रवैः ॥

**अर्थ**—मस्तकरोग, नासारोग, नेत्ररोग, सूर्यावर्तरोग, अर्धशिशी, दंतरोग दुर्बळ मनुष्य, मान, खांदे व बाहू यांचेठायीं ज्या पीडा होतात, त्या व मुखशोष, कर्णनादरोग, वातपित्तसंबंधी विकार, अवकाळीं मनुष्याचे पांढरे केश होतात तो पलितरोग, मस्त-काचे केश व मिशाचे केश गळून पडतात तो इंद्रलुप्तरोग, या सर्व रोगांचेठायीं तूप आदिकरून स्निग्ध पदार्थ व साखर आदिकरून जे मधुर पदार्थ आहेत इहींकरून असें नस्य द्यावें.

## पक्षघातादिक रोगांवर नस्य

माषात्मगुप्तारास्नाभिर्बलारुबुकरोहिषैः ॥ कृतोश्वगंधयाक्का थोहिंगुसैंधवसंयुतः ॥ कोष्णोनस्यप्रयोगेणपक्षाघातंसकंपनं ॥ जयेदर्दितवातंचमन्यास्तंभापबाहुकौ ॥

**अर्थ**— उडीद, कवचबीज, रास्ना, चिकणामूळ, एरंडमूळ, रोहिसतृण, आसंध या-सात औषधांचा काढा करून त्यांत भाजला हिंग व सैंधव घालून कोमट कोमट त्या काढ्याचें नस्य द्यावें. तेणेंकरून कंपसहित पक्षघात वायु, अर्दितवायु, मन्यास्तंभवायु, व अपबाहुक वायु हे दूर होतात.

## प्रतिमर्शनस्याची दोन बिंदुरूप मात्रा.

प्रतिमर्शस्यमात्रातुद्विद्विबिंदुमितामता ॥

प्रत्येकशोनस्तकयोःस्नेहेनेतिविनिश्चितं॥

अर्थ– तूप आदिकरून जे स्निग्ध पदार्थ त्यांचे दोन दोन बिंदु एका नाकपुडींत घातले असतां ती प्रतिमर्श नस्याची दोन बिंदुरूप मात्रा जाणावी.

## बिंदुसंज्ञक मात्रा.

स्नेहेयंथिद्वयंयावान्निमग्नाचोधृताततः ॥ तर्जनीयंस्रवेत्बिंदुं सामात्राबिंदुसंज्ञिता ॥ एवंविधैर्बिंदुसंज्ञैरष्टभिःशाणउच्यते ॥ सदेयोमर्शनस्येतुप्रतिमर्शोद्विबिंदुकः ॥

अर्थ– तूप तेल आदिकरून जे स्नेह पदार्थ त्या मध्यें तर्जनीचीं दोन पेरें बुडत अशी तर्जनी बुडवून बाहेर काढून त्या पेरां पासून जो बिंदु पडतो, त्याला बिंदुमात्रा ह्मणतात. या प्रकारें बिंदुसंज्ञक आठ मात्रा ज्या त्यांचा एक शाण होतो, ती एक शाण मात्रा मर्शनस्याचे ठायीं द्यावी; आणि प्रतिमर्शनस्याचे ठायीं दोन बिंदूची मात्रा द्यावी. इतुका मर्शनस्य व प्रतिमर्शनस्य यांचा विशेष जाणावा.

## प्रतिमर्श नस्याचे समय.

समयाःप्रतिमर्शस्यबुधैःप्रोक्ताश्चतुर्दश ॥ प्रभातेदंतकाष्ठांतेग्र हान्निर्गमनेतथा॥ व्यायामाध्वव्यवायांतेविण्मूत्रांतेंजनेकृते ॥ कवलांतेभोजनांतेदिवास्वप्नोत्थितेतथा॥ वमनांतेनथासायंप्र तिमर्शःप्रयुज्यते॥

अर्थ– प्रतिमर्शनस्याच्या वेळा चवदा आहेत. एक प्रभातकाळ, व तोंड धुतल्यावर घरांतून बाहेर निघत असतां, परिश्रमाचे अंतीं, मार्ग चालून आल्यावर, मैथुनाचे अंतीं मळ व मूत्र यांचे अंतीं, डोळ्यांत अंजन केल्यावर, ग्रासाचे, व भोजनाचे, व दिवसासच निजून उठल्यावर, ओकारीच्या अंतीं, सायंकाळीं इतुक्या समयाचे ठायीं प्रतिमर्श संज्ञक नस्य द्यावें.

## प्रतिमर्शनस्यें करून जो तृप्त जाहला त्याचें लक्षण.

ईषदुच्छिंकनात्स्नेहोयदावक्त्रंप्रदह्यते ॥ नस्येनिषिक्तंतंदद्यात्प्र तिमर्शप्रमाणतः ॥उच्छिंदनापिबेच्चैतन्निष्ठीवेन्मुखमागतं ॥

**अर्थ**—मनुष्याला नस्य दिल्हें असतां अल्प शिंक येऊन तो स्नेह तोंडांत उतरला असतां, तो मनुष्य प्रतिमर्श नस्येंकरून तृप्त जाहला असें जाणावें. त्या मनुष्यानें तोंडांत उतरला, जो स्नेह तो गिळूनये थुंकून बाहेर टाकावा.

## प्रतिमर्श नस्याचे ठायीं योग्य ते.

क्षीणेतृष्णास्यशोषार्तेबालेवृद्धेचयुज्यते ॥ प्रतिमर्शेनशाम्यंति रोगाश्चैवोर्ध्वजत्रुजाः ॥ वलीपलितनाशश्चबलमिंद्रियजंभवेत् ॥

**अर्थ**—धातुक्षीण मनुष्य, व बाल, वृद्ध यांचेठायीं प्रतिमर्शसंज्ञक नस्य द्यावें, येणेंकरून उपभोग होतो; आणि मानेच्या मूळाचे ऊर्ध्वभागीं जे रोग होतात ते व त्वचेला शिथिलपणा येतो व अकाळीं पांढरे केश होतात तो, पलितरोग हे सारेरोग, प्रतिमर्शनस्येंकरून दूर होतात, व चक्षुरादिक इंद्रियानां बल येतें.

## अकाळीं पांढरे केश होतात ते काळे होण्याविषयीं नस्य.

बिभीतनिंबकंभारीशिवाशेलुश्चकाकिनी ॥ एकैकंतैलनस्येन पलितंनश्यतिध्रुव ॥

**अर्थ**—बेहडा, कडुनिंब, शिवण, हरीतकी, भोंवरी, कांवळी इतक्या बियाचे आंतले मज्जेचे तेल वेगळें वेगळें काढून एकेकाची वेगळी वेगळी नस्यें द्यावीं. तेणेंकरून मनुष्याचे अकाळीं जे पांढरे केस होतात, ते तरुणावस्थे सारखे काळे निश्चयेंकरून होतात.

## नस्याचा विधि.

अथनस्यविधिंवक्ष्येनस्यग्रहणहेतवे ॥ देशेवानरजोमुक्तेकृतदंतनिघर्षणं ॥ विशुद्धंधूमपानेनस्विन्नभालगलंतथा ॥ उत्तानशायिनंकिंचित्प्रलंबशिरसंनरं ॥ आस्तीर्णहस्तपादंचवस्त्रच्छादितलोचनं ॥ समुन्नमितनासाग्रंवैद्योनस्येनयोजयेत् ॥ कोष्णमच्छिन्नधारंचहेमतारादिशुक्तिभिः ॥ शुक्तयावायत्रयुक्तयावा प्लोतैर्वानस्यमाचरेत् ॥

**अर्थ**—नस्य द्यावयाविषयीं नस्याचा विधि सांगतो, ज्यास्थानीं वायु व धुराळा नसेल त्या स्थानाचे ठायीं मनुष्यानें दंतधावन आणि धूमपान करून कपाळ व गळा हे शुद्धकरून घर्मयुक्त करावे, नंतर उताणें निजवून मस्तक लोंबतें ठेऊन हात पाय लांब पसरून वस्त्रानीं डोळे झाकावें. आणि वैद्यानीं हस्तेंकरून मनुष्याचे नाक ऊंच उचलून धरून जे नस्य घालावयाचें तें कोमट असून त्याची धार एकसारखी आणि तें नस्य सोनें व रुपें यांचे पात्रेंकरून व शिंपी व कवडी अथवा पोतडी इत्यादिकेंकरून नाकांत घालावें,

## नस्य घातल्यावर कसें असावें तें.

नस्येष्वासिच्यमानेषुशिरोनैवप्रकंपयेत् ॥ नकुप्येन्नप्रभाषेत नोच्छिदेन्नहसेत्तथा ॥ एतैर्हिविहितःस्नेहोनैवांतःसंप्रपद्यते॥ ततःकासप्रतिश्यायशिरोक्षिगदसंभवः ॥

**अर्थ**–मनुष्यानीं नस्य घेतलें असतां मस्तक कांपवूं नये, व कोप करूंनये, कोणाशीं भाषण करूंनये, कांहीं एक पदार्थाचें सेवन करूं नये, व हसूं नये, जर याप्रमाणें आचरण केलें नाहीं, तर तो स्नेह मस्तकाचें अभ्यंतरीं चांगला जात नाहीं, आणि त्यापासून खोकला व पडसें व मस्तक व नेत्र यानां पीडा इत्यादि उपद्रव होतात.

## नस्याचें संधारणाचा प्रकार.

शृंगाटकमभिप्लाव्यस्थापयेन्नागिलेद्द्रवं ॥ पंचसप्तदशैवस्यु र्मात्रानस्यस्यधारणे ॥ उपविश्याथनिष्ठीवेन्नासावक्त्रगतं द्रवं ॥ वामदक्षिणपार्श्वाभ्यांनिष्ठीवेत्सन्मुखेनहि ॥

**अर्थ**–मनुष्याला नस्य देऊन नासा वंशाचीं पुढें भ्रूमध्य देशीं चतुष्पथ आहे, त्यातें त्या नस्यानें भिजवून तें नस्य ठेवावें. त्याचें धारण पांच मात्रा सात मात्रा अथवा दहा मात्रा काळ पर्यंत करावें, नंतर बसलें राहून नाकांतून तोंडांत उतरला जो द्रव तो डाव्येकडे अथवा उजव्येकडे थुंकावा, समोर थुंकू नये.

## नस्यकर्म जाहल्या नंतर जे वर्जावयाचें तें.

नस्येनीतेमनस्तापंरजःक्रोधंचसंत्यजेत् ॥ शयीतनिद्रांत्यक्त्वाच उत्तानोवाक्शतंनरः ॥ तथाविरेचनस्यांतेधूमोवाकवलोहितः॥

**अर्थ**–नस्याचें कर्म जाहाल्या नंतर मनाला संताप येऊं देऊं नये. धूळ जेथें उधळत असेल तेथें बसूंनये, व क्रोध करूंनये, व झोंप येऊं नदेता शंभर आंख होत तोंकाळ पर्यंत उताणें निजावें. याप्रकारें विरेचननस्याचें अंतीं धूर व ग्रास हे घेऊं नये.

## नस्याचे ठायीं शुद्धादि भेद

नस्येत्रीण्युपदिष्टानिलक्षणानिसमासतः ॥ शुद्धिहीनातियोगानिविशेषाच्छास्त्रचिंतकैः ॥

**अर्थ**– नस्याचेंठायीं शुद्धिलक्षण, व हीनयोगलक्षण, व अतियोगलक्षण हीं तिन्हीं लक्षणें विशेषेंकरून शास्त्रज्ञ वैद्यानीं सांगीतलीं आहेत. तीं लक्षणें वक्ष्यमाण संक्षेपेंकरून सांगतों.

## उत्तमशुद्धीचें लक्षण.

लाघवंमनसःशुद्धिःस्रोतसांव्याधिसंक्षयः ॥
चित्तेंद्रियप्रसादश्चशिरसःशुद्धिलक्षणं ॥

अर्थ—नस्येंकरून मस्तकाची चांगली शुद्धि जाहली असतां शरीर हलकें होतें; व मनाची शुद्धि व मुख, नासा, कर्ण, गुद, इत्यादिक बहिर्द्वारक मार्ग जे यांचे शोधन होतें, व शिरोरोगादिक रोग दूर होतात; अंतःकरण व चक्षुरादिक इंद्रियें हीं प्रसन्न राहातात.

## हीनशुद्धीचें लक्षण.

कंडूपदेहोगुरुतास्रोतसांकफसंस्रवः ॥
मूर्ध्निहीनविशुद्धेतुलक्षणंपरिकीर्तितं ॥

अर्थ—नस्येंकरून मस्तकाची अल्पशुद्धि जाहली असतां, देहाचेठायीं कंडू, व चिकटपणा हीं लक्षणे होतात; मुखनासादिक बहिर्द्वारक मार्ग जे त्यांतून कफाचा स्राव होतो.

## अतिशुद्धीचें लक्षण.

मस्तुलुंगागमोवातवृद्धिरिंद्रियविभ्रमः ॥
शून्यताशिरसश्चापिमूर्ध्निगाढंविरेचिते ॥

अर्थ—नस्येंकरून मस्तकाची फार शुद्धि जाहली असतां, मस्तकाचे आंतला मगज यांचा नासिकादिकांवाटे स्राव होऊं लागतो, व वायूची वृद्धि होते, इंद्रियानां विभ्रम होतो, व मस्तकाला शून्यपणा येतो.

## हीनशुद्ध्यादिकांचेठायीं चिकित्सा.

हीनातिशुद्धेशिरसिकफवातघ्नमाचरेत् ॥
सम्यक्विशुद्धेशिरसिसर्पिर्नस्येनिषेचयेत् ॥

अर्थ—नस्येंकरून मस्तकाची अल्पशुद्धि व फार शुद्धि जाहली असतां कफवायुहारक अशीं नस्यें द्यावीं, व चांगली शुद्धि जाहली असतां, त्याचे नाकांत तुपाचें नस्य द्यावें.

## अतिस्निग्धलक्षण.

कफप्रसेकःशिरसोगुरुतेंद्रियविभ्रमः ॥
लक्षणंतदतिस्निग्धेरूक्षंतत्रप्रदापयेत् ॥

अर्थ— नस्येंकरून मनुष्याचा मस्तक फार स्निग्ध जाहला असतां कफाचा स्राव,

मस्तकाला जडपणा, व इंद्रियानां भ्रांति हीं लक्षणें होतात. यांचेठायीं रूक्ष पदार्थाचे नस्य द्यावें.

## नस्याचेठायीं पथ्य.

भोजयेच्चानभिष्यंदिनस्याचरितमादिशेत् ॥

अर्थ– अभिष्यंदि पदार्थ ह्मणजे ह्मशीचें दहीं आदिकरून कफ कारक पदार्थ हे भक्षण करूं नयेत; आणि नस्याचेठायीं जसें शिष्ट आचरण करीत आले तसें आचरण करावें.

## पंचकर्मांची संख्या.

वमनंरेचनंनस्यंनिरूहमनुवासनं ॥

एतानिपंचकर्माणिकथितानिमुनीश्वरैः ॥

अर्थ–वमन, रेचन, नस्य, निरूहबस्ति, अनुवासनबस्ति या पांचानां पंचकर्में ह्मणतात.

## धूमपानविधि.

धूमस्तुषड्विधःप्रोक्तः शमनोबृंहणस्तथा ॥

रेचनःकासहाचैववामनोव्रणधूपनः ॥

अर्थ–धूम सहा प्रकारचे त्यांचीं नामें शमन १ बृंहण २ रेचन ३ कासघ्न ४ वामन ५ व्रणधूपन ६ याप्रकारें सहा प्रकारचे धूम जाणावे.

## शमनादिकधूमाचे पर्यायशब्द.

शमनस्यतुपर्यायोमध्यःप्रायोगिकस्तथा ॥ बृंहणस्यापिपर्यायस्नेहनोमृदुरेवच ॥ रेचनस्यापिपर्यायोशोधनस्तीक्ष्णएवच ॥

अर्थ–या शमनधूमाचे पर्याय शब्द मध्य आणि प्रायोगिक असे दोन जाणावे. व बृंहण धूमाचे पर्याय शब्द स्नेह, आणि मृदु जाणावे. व रेचनधूमाचे पर्याय शब्द शोधन, आणि तीक्ष्ण जाणावे.

## धूमाचे सेवनाविषयीं योग्य नाहीत ते.

अधूमार्हाश्चखल्वेतेश्रांतोभीरुश्चदुःखितः॥ दत्तबस्तिर्विरिक्तश्च रात्रौजागरितस्तथा॥ पिपासितश्चदाहार्तस्तालुशोषीतथोदरी॥ शिरोभितापीतिमिरीछर्द्याध्मानप्रपीडितः॥क्षतोरक्तःप्रमेहार्तःपांडुरोगीचगर्भिणी ॥ रूक्षःक्षीणोभ्यवल्हतःक्षीरक्षौद्रघृतासवैः ॥

भुक्तान्नदधिमत्स्यश्चबालोवृद्धःकृशस्तथा ॥ अकालेचातिपीत श्चधूमःकुर्यादुपद्रवान् ॥

अर्थ–श्रमित मनुष्य, भित्रा, दुःखेंकरून पीडित मनुष्य, ज्याला बस्तिप्रयोग केला आहे तो, ज्याचा कोठा ढाळेंकरून रिक्त जाहाला आहे तो, रात्रींचे ठायीं जागरण करणारा मनुष्य, व तृषेंकरून व दाहेंकरून पीडित मनुष्य, तालुशोषी, उदररोगी, शिरोभितापेंकरून पीडित, तिमिररोगी, ओकारी. वायूनें पोट फुगते तो रोग, उरक्षत रोग, परमा, पांडुरोग इहींकरून पीडित मनुष्य, गर्भिणी स्त्री, रूक्ष व क्षीणमनुष्य, दूध व तूप व आसव ह्मणजे मद्य व अन्न व दहीं व मासळी यातें भक्षण केलेला मनुष्य, व बाल, व वृद्ध, व दुर्बळ मनुष्य, हे धूमपानाविषयीं योग्य नाहींत अकाळीं फार धूमपान केले असतां त्यापासून उपद्रव होतात, असें जाणावें.

## धूमेंकरून उपद्रव जाहाले असतां त्याजवर औषध.

तत्रेष्टंसर्पिषःपानंनावनांजनतर्पणं ॥ सर्पिरिक्षुरसंद्राक्षापयो वाशर्करांबुवा ॥ मधुराम्लौरसौवापिशमनायप्रदापयेत् ॥

अर्थ–धूमपानेंकरून उपद्रव जाला असतां त्या मनुष्याला तूप प्यावयास द्यावें. नाकांत नस्य घालावें, व डोळ्यांत घालावें, व तर्पण ह्मणजे देहाचे ठायीं तृप्ति करणारा असा द्राक्षादि मंड आहे तो द्यावा, व तूप, उसाचा रस, व द्राक्ष, व दूध, व साखरेचें पाणी अथवा साखर, पाणी, अथवा मधुर आणि आंबट पदार्थ, हे भक्षणास द्यावे; तेणेंकरून धूमसंबंधि उपद्रव दूर होतात.

## धूमाचे सेवन कोणत्या काळीं करावें, तें व त्याचे गुण.

धूमश्चद्वादशाद्वर्षाद्ग्राह्यतेशीतिकान्नच ॥ कासश्वासप्रति श्यायान्मन्याहनुशिरोरुजः॥वातश्लेष्मविकारांश्चहन्याद्धूमः सुयोजितः ॥

अर्थ– धूमाचे सेवन बारा वर्षांपासून ऐंशीं वर्षांपर्यंत करावें, नंतर करूंनये; आणि त्या धूमाची योजना चांगली जाहाली असतां श्वास, खोकला, पडसें, मान, हनवटी, मस्तक यांचे ठायीं पीडा होतात त्या, व वातकफसंबंधि विकार हे सारे रोग दूर होतात.

## धूमाचा उपयोग जाहला असतां प्रकृति कशी होते ती.

धूमोपयोगात्पुरुषःप्रसन्नेंद्रियवाङ्मनः ॥ दृढकेशद्विजश्मश्रुःसुगंधिवदनोभवेत् ॥

अर्थ–धूमाचा उपयोग जाहला असतां मनुष्य चक्षुरादिक इंद्रियें, व वाचा अंतःकरण ह्रींकरून प्रसन्न राहतो; आणि केश व दांत व मिशा व दाढी यानां बळ येतें.

## धूमाचेठायीं नळीचें विधान.

धूमनाडीभवेत्तत्रत्रिखंडाचत्रिपर्विका ॥ कनिष्ठिकापरीणाहा राजमाषागमांतरा ॥ धूमनाडीभवेद्दीर्घाशमनेरोगिणोंगुलैः ॥ चत्वारिंशन्मितैस्तद्वत्द्वात्रिंशद्भिर्मृदौस्मृता ॥ तीक्ष्णेचतुर्विंश तिभिःकासघ्नेषोडशोन्मितैः ॥ दशांगुलैर्वामनीयेतथास्याद्व्रण नाडिका ॥ कलायमंडलस्थूलाकुलित्थागमरंध्रिका ॥

अर्थ–धूमसेवनाविषयीं नळी तिहींखंडेंकरून व तीन ग्रंथीकरून युक्त, आणि करंगळीचे एवढी जाडी, व तिचे छिद्र चवळीचा दाणा आंत जाई असें पोकळ असावें. अशा प्रकारची नळी सामान्य धूमसेवनाविषयीं असावी. ती नळी रोग्याचे चाळीस अंगुळ प्रमाण लांब घ्यावी, व मृदुसंज्ञक जो धूम त्याचे सेवनाविषयीं बत्तीस अंगुळ प्रमाण लांब घ्यावी, व काससंज्ञक धूम जो त्याचे सेवनाविषयीं सोळा अंगुळ प्रमाण घ्यावी, व वामनीय संज्ञक धूम जो त्याचे सेवनाविषयीं दहा अंगुळ प्रमाण घ्यावी, त्या प्रकारें व्रणाचे धुरी विषयीं जी नळी ती दहा अंगुळें लांब घ्यावी, आणि ती नळी लाके-चे दाण्याप्रमाण जाडी व तिचे छिद्र कुळित्थाचा दाणा आंत जाई इतके बारीक असावें. याप्रकारची नळी व्रणाचे धुरीविषयीं जाणावी.

## धूपानार्थ ईषिकेचें विधान.

अथेषिकांप्रलिंपेच्चतुश्लक्ष्णांद्वादशांगुलां ॥ धूमद्रव्यस्यकल्के नलेपश्चाष्टांगुलःस्मृतः॥ कल्ककर्षमितंलिप्त्वाछायाशुष्कंचका रयेत् ॥ ईषिकामपनीयाथस्नेहाक्तांवर्तिमादरात् ॥ अंगारै र्दीपितांकृत्वाधृत्वानेत्रस्यरंध्रके ॥ वदनेनपिबेत्धूमंवदनेनैव संत्यजेत् ॥ नासिकाभ्यांततःपीत्वामुखेनैववमेत्सुधीः ॥ शरा वसंपुटेक्षिप्त्वाकल्कमंगारदीपितं ॥ छिद्रेनेत्रंसुवेश्याथव्रणंतेनै वधूपयेत् ।

अर्थ–ईषिका ह्मणजे लव्हाांची काडी ती बारा अंगुळ प्रमाण घ्यावी; आणि धूम घ्यावया-चीं औषधें असतील त्यांचा कल्क करून तो कल्क एक कर्ष प्रमाण घेऊन त्या काडी-चे ठायीं आठ अंगुळ पर्यंत लेप करावा. लेप वाळल्यावर त्या कल्कांतून ती काडी काढून घ्यावी; आणि त्या कल्काचे छिद्रांत दुसरी स्नेह युक्त वात घालून अंगारे करून

पेटऊन नळीचे छिद्राशीं धरावी, मग त्या नळीकरून तोंडांत धूर घेऊन तोंडावाटेच सोडावा; आणि नासिकेकरून धूर घेतला असतां तोही तोंडावाटे सोडावा, व शराव संपुटाचे वरले अंगी छिद्र पाडून त्यांत जळजळीत निखारे घालून त्याजवर व्रणाचें धुरी विषयीं कल्क केला असेल तो घालावा; आणि त्या छिद्राचे तोंडावर नळीचे छिद्र ठेऊन व्रणाचेठायीं धुरी द्यावी.

## कोणत्या औषधांचा कल्क कोणत्या धूमाचे ठायीं द्यावा तो प्रकार.

एलादिकल्कःशमनेस्निग्धंसर्जरसंमृदौ ॥ रेचनेतीक्ष्णकल्कंच कासघ्नेक्षुद्रिकोपणं॥ वामनेस्नायुचर्माद्यंदद्यात्धूमस्यपानकं ॥ व्रणेनिंबवचाद्यंचधूपनंसंप्रचक्षते ॥

अर्थ– शमनसंज्ञक धूम जो त्याचे ठायीं एलादिक औषधांचा गण आहे, त्यांचा कल्क करून तो द्यावा, व मृदुसंज्ञक धूमाचे ठायीं घृतादिक जे स्नेह पदार्थ त्यांत शिलारस घालून कल्क करून तो द्यावा. व रेचन संज्ञक धूमाचे ठायीं शिरिस मोहऱ्या इत्यादिक जीं औषधें यांचा कल्क करून द्यावा. व कासघ्न धूमाचे ठायीं रिंगणीं मिऱ्यें इत्यादिक औषधांचा कल्क करून द्यावा. व वामन धूम ह्मणजे ओकारी करविण्या विषयीं जो धूम त्याचे ठायीं स्नायु आणि चर्मादिक यांचा कल्क करून तो धूमपानार्थ द्यावा. व व्रणाचे ठायीं निंब आणि वेखंड इत्यादिकांचा कल्क करून त्याचा धूम द्यावा.

## बालग्रहादिक रोग दूर होण्याविषयीं धुरी.

अन्याहिधूमागेहेपुकर्तव्यारोगशांतये ॥ सयथा ॥ मयूरपिच्छंनिंबस्यपत्राणिबृहतीफलं॥मरिचंहिंगुमांसीचबीजंकार्पासंसंभवं ॥ छागरोमाहिनिर्मोकंविष्ठावैडालिकीतथा ॥ गजदंतश्चतच्चूर्णंकिंचित्घृतविमिश्रितं ॥ गेहेपुधूपनंदत्तं सर्वान्बालग्रहान्हरेत् ॥ पिशाचान्राक्षसानजित्वासर्वज्वरहरंभवेत् ॥

अर्थ–ग्रहाचे ठायीं बालग्रहादि रोग दूरहोण्याविषयीं आणखी ही धूम करावे, त्यामध्यें मयूर पिच्छादि धूम सांगतो. मोराचे पीस १ निंबाचा पाला २ रिंगणीचे फळ ३ मिऱ्यें ४ हिंग ५ जटामांसी ६ कापशीचें बीज ७ बोकडाचे केश ८ सापाची मेंग ९ मांजराची विष्ठा १० हत्तीचा दांत ११ या आकरा औषधांचें चूर्ण करून त्यांत

किंचित् तूप मिश्रित करून घरामध्यें त्या चूर्णाची धुरी दिल्ही असतां संपूर्ण बालग्रह व पिशाच व राक्षस यांचे सर्व उपद्रव दूर होतात, व संपूर्ण ज्वर दूर होतात.

## धूमाचे ठायीं परिहार.

परिहारस्तुखंडेषुकार्योरेचननस्यवत् ॥ नेत्रा

णिधातुजान्याहुर्नलवंशादिजान्यपि ॥

**अर्थ**– रेचनसंज्ञक नस्याचें ठायीं रोगांचे परिहाराविषयीं जे उपाय सांगितले तेच उपाय या धूमाचे ठायीं करावे. व नळीचें तोंड सुवर्णादि धातूचें अथवा देवनळ, व वांबू इत्यादिकांचें करावें.

## धूमप्राशनयंत्र.

चतुर्विंशत्यंगुलानित्रीणियुक्तानियुक्तितः ॥

योजितायात्रिखंडेयंनलिकानेत्रसंज्ञिता ॥

**अर्थ**–चोवीस अंगुलें लांबीच्या तीन नळ्या घेऊन युक्तीनें जोडाव्या. ही त्रिखंडा नलिका हिलाच नेत्र संज्ञा आहे.

## धूमपानगुण.

मनस्तापंरजःक्रोधंधूमपानोनिवारयेत् ॥

**अर्थ**–धूमपान केलें असतां मनाचा संताप, रज, क्रोध, हे निवारण करितें.

## गंडूष व कवल व प्रतिसारण यांचा विधि.

चतुर्विधःस्याद्गंडूषःस्नैहिकःशमनस्तथा ॥

शोधनोरोपणश्चैवकवलश्चापितद्विधः ॥

**अर्थ**–गंडूष चार प्रकारचा एक स्नेहिक, शमन, शोधन, व रोपण या भेदेंकरून जाणावा; व कवल ही याच भेदेंकरून चार प्रकारचा जाणावा.

## स्नेहिकादिक गंडूषाची दोषभेदेंकरून योजना.

स्निग्धोष्णैःस्नैहिकोवातेस्वादुशीतैःप्रसादनः ॥ पित्तेकट्वम्ललव

णैरूष्णैःसंशोधनःकफे ॥ कषायतिक्तमधुरैःकदुष्णेरोपणोव्रणे ॥

चतुःप्रकारोगंडूषःकवलश्चापिकीर्तितः ॥

**अर्थ**–स्निग्ध आणि उष्ण या पदार्थेंकरून जी चूळ भरणें ती स्नेहिक गंडूष जाणावा. तो वायूचे ठायीं योजावा; व मधुर आणि शितळ या पदार्थेंकरून प्रसादन ह्मणजे शमनगंडूष जाणावा. तो पित्ताचे ठायीं योजावा. तिखट, आंबट, खारट, उष्ण या पदार्थें करून शोधन गंडूष, तो कफा विषयीं योजावा. व तुरट, कडु, व मधुरा

या पदार्थे करून रोपण गंडूष जाणावा. तो कोमट असतां व्रणाचे ठायीं योजावा. याप्रकारे कवलही च्यार प्रकारचा जाणावा.

असंचारीमुखेपूर्णगंडूपःकवलश्चरः
तत्रद्रवेणगंडूपः कल्केनकवलःस्मृतः ॥

अर्थ—काढे आदिकरून जे द्रव पदार्थ त्या पदार्थें करून तोंड पूर्ण भरून येई असा आणि हिकडे तिकडे फिरवतां येईना असा चूळ भरून टाकणें त्याला गंडूष ह्मणतात, व कल्कादि पदार्थ तोंडामध्यें इकडून तिकडे फिरत असे धरणें त्याला कवल ह्मणतात.

## गंडूष व कवल यांचे औषधाचे प्रमाण.

दद्याद्द्रव्येषुचूर्णंचगंडूषेकोलमातृकं ॥
कर्षप्रमाणःकल्कश्चदीयतेकवलेबुधैः ॥

अर्थ—गंडूषाविषयीं जीं काढे आदिकरून द्रवद्रव्यें त्यांचे ठायीं चूर्ण एक कोल प्रमाण द्यावें; व कवलाचेठायीं कल्क कर्ष प्रमाण योजावा.

## कोणत्यावयांत गंडूषधारण करावे व किती करावे त्याचे प्रमाण.

धार्यतेपंचमाद्वर्षाद्गंडूपकवलादयः ॥ गंडूषान्सुस्थितःकुर्यात् स्विन्नभालगलादिकः ॥ मनुष्यस्त्रींस्तथापंचसप्तवादोपना शनात् ॥

अर्थ—गंडूष व कवलादिक यांचे पांच वर्षांनंतर ग्रहण करावे, व मनुष्यांनी स्वस्थ चित्तेंकरून बसून रोग दूर होण्याविषयीं कपाळ व गळा व आदिशब्देंकरून मुख यांचे ठायीं थोडा घाम येई तों पर्यंत तीन अथवा पांच अथवा सात गंडूष करावे; अथवा दोष दूर होत तोंपर्यंत करावे.

## दुसरे गंडूष धारणाविषयीं प्रमाण.

कफपूर्णास्यतांयावच्छेदोदोषस्यवाभवेत् ॥
नेत्रघ्राणस्रुतिर्यावत्तावद्गंडूषधारणं ॥

अर्थ-कफानें तोंड भरून येई तों पर्यंत अथवा दोषांचे छेदन होई तों पर्यंत, व नेत्र व नाक यानां स्राव सुटे तोंपर्यंत गंडूष धारण करावे.

## तालुरोगाचे ठायीं स्नैहिक गंडूष.

तिलकल्कोदकंक्षीरंस्नेहोवास्नैहिकोहितः ॥

अर्थ– तिळांचा कल्क, पाणी, दूध, तेल आदिकरून स्नेहपदार्थ हे स्नैहिकगंडूषाचे ठायीं योजावे.

## पित्तरोगावर शमनसंज्ञक गंडूष.

तिलानीलोत्पलंसर्पिःशर्कराक्षीरमेवच ॥

सक्षौद्रोहनुवक्त्रस्थोगंडूषोदाहनाशनः ॥

अर्थ–तीळ, निळें कमळ, तूप, साखर व दूध हे पदार्थ एका जागीं करून त्यांत मध घालून गंडूष करावे. तेणेंकरून पित्त संबंधि हनवटी व मुख यांचे ठायीं जो दाह होतो तो दूर होतो.

## व्रणादिकरोगांवर मधुगंडूष.

वैशद्यंजनयत्यास्येसंदधातिमुखव्रणान् ॥

दाहतृष्णाप्रशमनंमधुगंडूपधारणं ॥

अर्थ–मधीचे गंडूष धारण करावे, तेणेंकरून तोंडांत व्रण व चट्टे पडतात. ते व दाह, तृषा हे रोग दूर होऊन मुखाला स्वच्छता येते.

## गंडूषधारणगुण.

व्याधेरपचयस्तुष्टिर्वैशद्यंवक्त्रलाघवं ॥ इंद्रियाणांप्रसादश्च

गंडूषेविधृतेभवेत् ॥ हरेदास्यस्यवैरस्यंशोषंपाकंव्रणंतृषां ॥

दंतचालंचगंडूषोवैशद्यंतुकरोतिहि ॥

अर्थ–गंडूष (गुळण्या) त्या केल्यानें व्याधीचा नाश, तुष्टि, स्वच्छपणा, मुखास हलकेपणा, सर्व इंद्रियें प्रसन्न, होतात व हा मुखाची अरुचि, शोष, तोंड पिकतें, व्रण, ताहान, दातांचें हालणें, इत्यांचा नाश करून सर्व शरीराला निर्मळता करितो-

## कवल.

वातपित्तकफघ्नस्यद्रव्यस्यकवलंमुखे॥ अर्द्धंनिक्षिप्यसंचर्व्य

निष्ठीवेत्कवलेविधिः॥ कवलःकुरुतेकांक्षांभक्षेपुहरतेकफं ॥

तृषांशोषंचवैरस्यंदंतचालंचनाशयेत् ॥

अर्थ– वात, पित्त, कफ, यांला, नाश करणाऱ्या औषधींचा कवल ( ग्रास ) तोंडांत घेऊन त्यांतील अर्धा चाऊन थुंकावा. तो अन्न भक्षण करण्याची इच्छा, कफाचा नाश, करितो व शोष, ताहान, आणि अरुचि यांचा नाश करून दांत हालत असल्यास त्यांलाही घट्ट करितो.

## प्रतिसारण.

दंतजिव्हामुखानांचचूर्णकल्कावलेहकैः ॥ शनैर्घर्षणमंगु
ल्यातदुक्तंप्रतिसारणं ॥ वैरस्यंमुखदुर्गंधंमुखशोषंतथा
तृषां ॥ अरुचिंदंतपीडांचनिहन्यात्प्रतिसारणं ॥

**अर्थ**– दांत, जीभ, मुख, यांला चूर्ण, कल्क, चाटण अशा तीन प्रकारच्या औषधांनीं हळूहळू बोटांनीं चोळतात त्याला प्रतिसारण ह्मणतात. हें प्रतिसारण केलें तर तोंडाचा कडूपणा, दुर्गंध, कोरड, ताहान, अरुचि आणि दांताचे रोग हे सर्व नाश करितें.

## गंडूष, कवल; प्रतिसारण यांचाविधि.

क्षीरस्नेहकषायादिद्रव्यैःसंपूर्णमाननं ॥ आपूर्य
स्थीयतेतावद्विधिर्गंडूषधारणे ॥

**अर्थ**– दूध, व तुपादिस्निग्धपदार्थ, व कषाय आदिकरून पातळ औषधें तोंडांत घेऊन तोंडभरून किंचित् काळ राहून, नंतर पिकया टाकाव्या. हा गंडूष घेण्याचा विधि जाणावा.

## विषादिकांचेठायीं गंडूष

विषक्षाराग्निदग्धेचसर्पिर्धार्यंपयोथवा ॥

**अर्थ**– विषदोष, सोमल, क्षारादिजन्यविकार, व अग्निदग्धजन्यविकार यांचेठायीं तूप अथवा दूध यांचे गंडूष करावे.

## दंत हालत असतां गंडूष.

तैलसैंधवगंडूषोदंतचालेप्रशस्यते ॥

**अर्थ**–तिळाचे तेल, व सैंधव हीं एकत्र करून गंडूष करावे. तेणेंकरून दांत हालत असतात ते घट्ट होतात.

## मुखशोषावर गंडूष.

शोषंमुखस्यवैरस्यंगंडूषःकांजिकोजयेत् ॥

**अर्थ**– मुखशोष, व मुखाला विरसपणा यांचेठायीं कांजीचे गंडूष करावे.

## कफावर गंडूष.

सिंधुत्रिकटुराजीभिरार्द्रकेणकफेहितः ॥

**अर्थ**– सैंधव, सुंठ, मिरें, पिंपळी, व मोहऱ्या यांचें चूर्ण करून आल्याचे रसांत मेळवून त्याचे गंडूष केले असतां कफदोष दूर होतो.

## कफावर व रक्तपित्त यांजवर गंडूष.

त्रिफलामधुगंडूषःकफासृक्पित्तनाशनः ॥

**अर्थ**–त्रिफळेचे चूर्ण मधांत मेळवून त्याचे गंडूष केले असतां कफ व रक्तपित्त हे दूर होतात.

## मुखपाकावर गंडूष.

दार्वीगुडूचीत्रिफलाद्राक्षाजात्याश्चपल्लवाः॥ यवासश्चेतितत्क्काथः

षष्ठांशःक्षौद्रसंयुतः ॥ शीतोमुखेधृतोहन्यान्मुखपाकंत्रिदोषजं ॥

**अर्थ**–दारुहळद, गुळवेल, त्रिफळा, द्राक्षे, जाईचा पाला, धमासा हीं औषधें समभाग घेऊन यांचा काढा करून त्या काढ्याचा साहावा भाग मध घालून काढा थंड करून याचे गंडूष करावे. तेणेंकरून त्रिदोषजन्य जो मुखपाक तो दूर होतो.

यस्यौषधस्यगंडूषस्तथैवप्रतिसारणं ॥

कवलश्चापितस्यैवज्ञेयोत्रकुशलैर्नरैः ॥

अर्थ–ज्या औषधांचा गंडूष त्याच औषधांचे प्रतिसारण जाणावें. व कवलही त्याच औषधांचा कुशल वैद्यांनीं जाणावा.

## कवलाचा प्रयोग.

केसरंमातुलिंगस्यसैंधवंव्योषसंयुतं ॥हन्या

त्कवलतोजाड्यमरुचिंकफवातजां ॥

**अर्थ**–माहाळुंगीचे फळाचे आंतलें केसर, सैंधव, व सुंठ, मिऱ्यें, पिंपळी हीं औषधें एकत्रकरून यांचा कल्क केला असतां तोंड होतें, तें व कफवातजन्य अरोचक हीं दूर होतात.

## प्रतिसारणाचे भेद-

कल्कोवलेहश्चूर्णंचत्रिविधंप्रतिसारणं ॥

अंगुल्यग्रगृहीतंचयथास्वंमुखरोगिणां ॥

**अर्थ**–कल्क, अवलेह व चूर्ण या भेदेंकरून प्रतिसारण तीन प्रकारचें मुखरोगी मनुष्यांनीं त्यांस जसा दोष असेल तसें बोटाचें आग्रानें घेऊन जिभेला, गळ्याला व सगळ्या तोंडभर चोळावें.

## प्रतिसारणचूर्ण.

कुष्ठदार्वीसमंगाचपाठातिक्ताचपीतिका ॥ तेजनीमुस्तलोध्रंच

चूर्णंस्यात्प्रतिसारणं ॥ रक्तस्रुतिंदंतपीडांशोथंदाहंचनाशयेत् ॥

**अर्थ**–कोष्ठ १ दारुहळद २ धायटीफूल ३ पहाडमूळ ४ कटुकी ५ हळद ६ तेजबळ ७

नागरमोथे ८ लोध्र ९ या नउ औषधांचें चूर्ण करून जिभेला व साऱ्या तोंडांत बोटा-चें आग्रानें घेऊन चोळावें, तणेंकरून दांताचे हिरड्यांतून रक्त पडतें तें, दातांचे ठायीं पीडा होते ती, सूज व दाह हे रोग दूर होतात या चूर्णाला प्रतिसारण ह्मणतात.

## गंडूषादिकांचा हीनयोग जाहला असतां लक्षण.

हीनयोगात्कफोत्क्लेशोरसाज्ञानारुचीतथा ॥

अतियोगान्मुखेपाकःशोषस्तृष्णाक्लमोभवेत् ॥

अर्थ-गंडूषादिकांचा अल्पयोग जाहाला असतां कफाचें आधिक्य होतें, व मधुरादिक रसांचे यथार्थ स्वाद कळत नाहीं, व अन्नादिकांवर अरुचि होते, गंडूषादिकांचा फार योग जाहाला असतां तोंड पिकल्यासारखें उतून येतें व शोष व तहान हीं लक्षणे होतात.

## शुद्धगंडूषलक्षण.

व्याधेरपचयस्तुष्टिर्वैशद्यंवक्त्रलाघवं ॥

इंद्रियाणांप्रसादश्चगंडूषेशुद्धिलक्षणं ॥

अर्थ-गंडूषादिकांचा चांगला योग जाहला असतां व्याधीचा नाश, अंतःकरणाचेठा-यीं संतोष, मुखाचेठायीं निर्मळपणा, हलकेपणा व रसनादिक इंद्रियांचेठायीं प्रसन्नता हीं लक्षणें होतात असे जाणावें.

## रक्तस्रावाचा विधि.

शोणितंस्रावयेज्जंतोरामयंप्रसमक्ष्यिच ॥

प्रस्थंप्रस्थार्धकंवापिप्रस्थार्धार्धमथापिवा ॥

अर्थ- मनुष्याचे शरीराचेठायीं रक्तजन्य कुष्ठादिक जे रोग त्यातें अवलोकन क-रून रक्तस्राव करावा ह्मणजे शरीरांतील रक्त काढावें. त्याचें प्रमाण एक प्रस्थ, अथवा अ-र्धा प्रस्थ, अथवा अर्धाचे अर्धा प्रस्थ ह्मणजे कुडव प्रमाण जाणावें.

## रक्तस्रावाचा सामान्य काळ.

शरत्कालेस्वभावेनकुर्याद्रक्तस्रुतिंनरः ॥

त्वग्दोषग्रंथिशोथाद्यानस्यूरक्तस्रुतेर्यतः ॥

अर्थ- शरीरांतील रक्त काढिलें असतां त्वचेसंबंधीं दोष, व्रणादिकग्रंथि, सूज इ-त्यादिक रोग दूर होतात. यास्तव शरत्कालाचेठायीं स्वभावेंकरून मनुष्यानीं रक्तस्राव करावा.

## रक्ताचे रसादिकांचें स्वरूप.

मधुरंवर्णतोरक्तमशीतोष्णंतथागुरु ॥

शोणितंस्निग्धविस्रंस्याद्विदाहश्चास्यपित्तवत् ॥

अर्थ– रक्त रसेंकरून गोड, व वर्णेंकरून तांबडे, गुणेंकरून जड व मंदोष्ण, चिकण, आमगंधि आहे, व त्या रक्ताची दाहशक्ति पित्तासारिखी आहे. याप्रकारें रक्ताचे रस, व वर्ण, गुण, जाणावे.

## रक्ताचेठायीं पृथिव्यादिभूतांचे गुण आहेत, ते.

विस्रताद्रवतारागश्चलनंविलयस्तथा ॥

भूम्यादिपंचभूतानामेतेरक्तगुणाःस्मृताः ॥

अर्थ– विस्रता ह्मणजे आमगंधता हा पृथिवीचा गुण, द्रवता उदकाचा गुण, रक्तता अग्नीचा गुण, चलन वायूचा गुण, लीनता आकाशाचा गुण, या प्रकारें पृथिव्यादि पंचभूतांचे पांच गुण रक्ताचेठायीं आहेत, असें जाणावें.

## रक्त दुष्ट जाहलें असतां लक्षण.

रक्तेदुष्टेवेदनास्यात्पाकोदाहश्चजायते ॥

रक्तमंडलताकंडूःशोथश्चपिटिकोद्गमः ॥

अर्थ–मनुष्याचें रक्त दुष्ट जाहलें असतां शरिराला वेदना होतात, व अंग पिकल्या सारिखें होऊन दाह होतो; आणि शरीराचेठायीं रक्ताची मंडलें, कंडू, सूज व पुटकळ्या होतात, असे जाणावें.

## रक्त वृद्ध जाहलें असतां लक्षण.

वृद्धेरक्तांगनेत्रत्वंशिराणांपूरणंतथा ॥

गात्राणांगौरवंनिद्रामदोदाहश्चजायते ॥

अर्थ–रक्त वृद्धिंगत गेलें असतां शरीर, व नेत्र, आरक्तवर्ण होतात, धमन्यादिक शिरा फुगतात, व गात्राला जडपणा, निद्रा, मद, दाह, हे उपद्रव, होतात.

## क्षीण रक्त जाहलें असतां लक्षण.

क्षीणेम्लमधुराकांक्षामूर्छाचत्वचिरूक्षता ॥

शैथिल्यंचशिराणांस्याद्वातादुन्मार्गगामिता ॥

अर्थ– मनुष्याचें रक्त क्षीण जाहलें असतां आंबट व गोड पदार्थांवर इच्छा होत्ये, मूर्छा आणि वायूकरून त्वचेला रुक्षपणा, शिरांचेठायीं शिथिलपणा येतो, व वायु ऊर्ध्वमार्गी गमन करितो.

## वायूनें दुष्ट रक्त जाहले असतां लक्षण.

अरुणंफेनिलंरूक्षंपरुषंतनुशीघ्रगं ॥

अस्कंदिसूचिभिस्तोदंरक्तंस्याद्वातदूषितं ॥

अर्थ— वायुकरून दुष्टरक्त जाहले असतां तें रक्त अरुणवर्ण, व फेसासारिखें, रूक्ष, कर्कश, हलके, शीघ्रगमन करणारें, पातळ असे होतें; आणि सुया टोंचल्यासारिखी पीडा देतें, असें जाणावें.

## पित्तेंकरून दुष्ट रक्त जाहलें असतां लक्षण.

पित्तेनपीतंहरितंनीलंश्यामंचविस्रकं ॥

अस्कंद्युष्णंमक्षिकाणांपिप्पलीनामनिष्टकं ॥

अर्थ—पित्तेंकरून रक्त दुष्ट जाहलें असतां ते रक्त पीतवर्ण, हरितवर्ण, श्यामवर्ण, आमगंधि, उष्ण, चांचल्य रहित, असे होतें, व माशा आणि मुंग्या यांस भक्षणाविषयीं उपयोगी पडत नाहीं असें होतें.

## कफानें दुष्ट रक्त जाहलें असतां लक्षण.

शीतंचवहलंस्निग्धंगैरिकोदकसंनिभं ॥

मांसपेशीप्रभंस्कंदिमंदगंकफदूषितं ॥

अर्थ—कफेंकरून दुष्ट रक्त जाहलें असतां तें रक्त स्पर्शेंकरून फार भासते, व स्निग्ध असून गेरूचे रंगासारिखें दिसतें व मांसाचे बारिक बारिक ग्रंथीसारिखें होतें, व घण व मंदगमन करणारें असें होतें.

## द्विदोष व त्रिदोष इहींकरून रक्त दुष्ट जाहलें असतां लक्षण.

द्विदोषदुष्टंसंसृष्टंत्रिदोषंपूतिगंधकं ॥

सर्वलक्षणसंयुक्तंकांजिकाभंचजायते ॥

अर्थ—दोहों दोषेंकरून दुष्ट जाहलें जें रक्त तें दोहों दोषांचे लक्षणेंकरून युक्त असतें, त्रिदोषेंकरून दुष्ट जाहलें जें रक्त त्याला पुवाचा गंध येतो; आणि सर्व दोषांचे लक्षणें करून युक्त असतें, तें कांजीसारिखें दिसतें.

## विषेंकरून दुष्ट रक्त जाहलें असतां लक्षण.

विषदुष्टंभवेत्श्यामंनासिकोन्मार्गगंतथा ॥

विस्रंकांजिकसंकाशंसर्वकुष्ठकरंवहु ॥

अर्थ—विषेंकरून दुष्ट रक्त जाहले असतां तें रक्त कृष्णवर्ण होतें; आणि ऊर्ध्वमार्गी होऊन नाकांतून पडतें, आमगंधि असून कांजी सारिखें दिसतें, व अतिशयेंकरून सर्व कुष्ठांना उत्पन्न करितें.

## विकाररहित जें रक्त त्याचें लक्षण.

इंद्रगोपप्रभंज्ञेयंप्रकृतिस्थमसंहतं ॥

अर्थ—कांहींएक विकार नसतां जें रक्त प्रकृतीचेठायीं राहातें, ते रक्त बिरबोटी यानामेंकरून तांबडा किडा आहे त्याचे सारिखें आरक्त असून पातळ असतें असें जाणावें.

## रक्तस्रावाविषयीं योग्य ते.

शोथेदाहेंगपाकेचरक्तवर्णेसृजःस्रुतौ ॥ वातरक्तेतथाकुष्ठेसपी डेदुर्जयेनिले ॥ पाणिरोगेश्लीपदेचविपदुष्टेचशोणिते ॥ ग्रंथ्य र्बुदापचीक्षुद्ररोगरक्ताधिमंथिषु ॥ विदारीस्तनरोगेषुगात्राणां सादगौरवे ॥ रक्ताभिष्यंदतंद्रायांपूतिघ्राणास्यदेहके ॥ यकृ त्प्लीहविसर्पेषुविद्रधौपिटिकोद्गमे॥ कर्णौष्ठघ्राणवक्त्राणांपाके दाहेशिरोरुजि ॥ उपदंशेरक्तपित्तेरक्तस्रावःप्रशस्यते ॥

अर्थ— दाह, सूज, ज्याचें अंगाचा पाक, शरीरही रक्तवर्ण असा मनुष्य, ज्याचे नासिकादिकांवाटे रक्तस्राव होतो तो मनुष्य, वातरक्त, कुष्ठ, पीडायुक्त असून जिंकावयास अशक्य असा वायु, पाणिरोग, श्लीपद रोग, विषानें दुष्ट जाहलें असें रक्त, ग्रंथिरोग, अर्बुद, गंडमाळेचा भेद अपचीरोग, क्षुद्ररोग, रक्ताधिमंथरोग, नेत्रांमध्यें आहे तो, विदारीरोग, स्तनरोग, गात्रांनां शिथिलपणा, शरीराला जडपणा येतो, तो. रक्ताभिष्यंद नेत्ररोगांमध्ये आहे तो रोग, डोळयावर झांपड पडल्ये तो, व दुर्गंधयुक्त आहेत नाक, मुख, देह, ज्याचे तो मनुष्य, कालखंडरोग काळजाचे उजवेकडे होतो तो, व कवलु, विसर्प, विद्रधी, अंगावर पुटकुळयांची प्राप्ति, कान, ओंठ नाक, तोंड यांचा पाक. व दाह, मस्तक पीडा, उपदंश, रक्तपित्त, हे इतुके रक्त काढण्याविषयीं योग्य जाणावे.

## कोणत्याप्रकारानें रक्त काढावयाचें तो प्रकार सांगतों.

एषुरोगेषुशृंगैर्वाजलौकालाबुकैरपि ॥

अथवापिशिरामोक्षैःकुर्याद्रक्तस्रुतिंनरः ॥

अर्थ—रक्त काढण्याविषयीं जे योग्य रोग त्यांचे शिंगानें अथवा जळवानें अथवा तुंबडीनें अथवा शिरा देऊन रक्त काढावें.

## जे शिरादिण्याविषयीं योग्य नाहींत ते.

नकुर्वीतशिरामोक्षंकृशस्यातिव्यवायिनः ॥ क्लीबस्यर्भीरोर्ग र्भिण्याःसूतिकापांडुरोगिणां ॥ पंचकर्मविशुद्धस्यपीतस्नेहस्य

चार्शसां ॥ सर्वांगशोथयुक्तानामुदरिश्वासकासिनां ॥ छर्द्य
तीसारयुक्तानामतिस्विन्नतनोरपि॥ऊनषोडशवर्षस्यगतसप्त
तिकस्यच ॥ अघातस्रुतरक्तस्यशिरामोक्षोनशस्यते ॥ एषां
चात्ययिकेयोगेजलौकाभिस्तुनिर्हरेत् ॥ तथापिविषयुक्तानां
शिरामोक्षोपिशस्यते ॥

**अर्थ**—कशमनुष्य व स्त्रीचे ठायीं फार विषयासक्त मनुष्य, नपुंसक, भित्रा, गर्भिणी स्त्री, बाळंत जाहालेली, पांडुरोगी, वमनादिक पंचकर्मै जीं तिहींकरून शुद्ध जाहाला असा मनुष्य व जाणें स्नेहपान केलें तो मनुष्य व अर्शरोगी व ज्यांचे सुजेने सर्वांग व्याप्त असा मनुष्य, उदररोगी- श्वास खोकला, ओकारी व अतिसार ह्यींकरून पीडित मनुष्य, ज्याचे आंगाचा घाम फार निघाला आहे तो मनुष्य, ज्यांचें वय सोळावर्षां आलीकडे आहे तो मनुष्य, ज्याचे वयाला सत्तरवर्षे जाहली असा मनुष्य, आघातें-करून नासिकादिकांवाटे रक्तस्राव जाहलाआहे असा मनुष्य, इतुक्या रोग्यांस शिरा देऊन रक्त काढूंनये, समयीं अगत्यच पडल्यास जळवानीं रक्त काढावें, कदाचित् हे रोगी विष प्रयोगानें व्याप्त जाहले असतां शिरा देऊन रक्त काढावें.

## वातादिकानीं दुष्ट रक्त जाहलें असतां काढावयाचा प्रकार.

गोशृंगेणजलौकाभिरलाबुभिरपित्रिधा ॥ वातपित्तकफैर्दुष्टंशो
णितंस्रावयेद्बुधः ॥ द्विदोषाभ्यांतुसंसृष्टंत्रिदोषैरपिदूषितं ॥
शोणितंस्रावयेद्युक्त्याशिरामोक्षैःपदैस्तथा ॥

**अर्थ**—वायूनें दुष्ट जाहले जें रक्त तें गाईचे शिंगानें काढावें व पित्तानें दुष्ट जाहलें जें रक्त तें जळवानीं काढावें. कफेंकरून दुष्ट जाहलें जें रक्त तें तुंबडीनें काढावें, दोहों दोषेंकरून अथवा तिहीं दोषेंकरून दुष्ट जाहलें जें रक्त तें युक्तीनें शिरा, देऊन अथवा फांसण्या मारून काढावें.

## शिंगादिकांचें रक्तघेण्याविषयीं प्रमाण.

गृण्हातिशोणितंशृंगंदशांगुलमितंबलात् ॥ जलौकाहस्तमा
त्रंचतुंबींचद्वादशांगुलं ॥ पदमंगुलमात्रेणशिरासर्वांगशोधिनी ॥

**अर्थ**—शिंग लाविलें असतां आपल्या बळेंकरून दाहा अंगुळप्रमाण रक्त ओढून घेतें, जळू लाविली असतां एक हस्तप्रमाण, तुंबडी बारा अंगुळप्रमाण, फांसणीं एक अंगुळप्रमाण रक्त ओढून घेतात, व शीर दिल्ही असतां सर्वांगाचे रक्ताचें शोधन होतें.

## ज्यांचेअंगातून रक्त निघतनाहीं त्याचें कारण.

शीतेनिरस्नेमूर्छातितंद्राभीतिमदश्रमैः ॥

युतानांनस्रवेद्रक्तंतथाविण्मूत्रसंगिनां ॥

अर्थ—शीतकाळ असतां, मनुष्य उपोषित असतां, मूर्छा, डोळ्यांवर झांपड, भीति व श्रम इहींकरून युक्त असता, मळ व मूत्र हे साफ जाहले नसतां, मनुष्याचें शरीरांतून रक्त निघत नाहीं.

## शिरादिक देऊन रक्त निघालें नसतां उपाय.

अप्रवर्तिनिरक्तेचकुष्ठचित्रकसैंधवैः ॥

मर्दयेद्व्रणवक्त्रंचतेनसम्यक्प्रवर्तते ॥

अर्थ—शिरादिक देऊन रक्त बाहेर आलें नसतां कोष्ठ, चित्रक, सैंधव या तीन वान्यांचें चूर्ण करून व्रणाचे तोंडावर चोळावें, तेणेंकरून उत्तम प्रकारें रक्त बाहेर येतें.

## रक्तकाढण्याविषयीं काळाचें विधान.

तस्मान्नशीतेनात्युष्णेनस्विन्नेनातितापिते ॥

पीत्वायवागूंतृप्तस्यशोणितंस्रावयेद्बुधः ॥

अर्थ—शीतकाळ व फार ऊष्णकाळ हे नसतां, मनुष्याचे अंगाचा घाम काढिला नसतां, आणि शरिर फार तप्त जाहलें नसतां, अशामनुष्यानें यवाचां यवागू पिऊन तृप्त जाहला जो त्याचें वैद्यानीं रक्त काढावें.

## जेणेंकरून रक्त फार येऊं लागतें तो प्रकार.

अतिस्विन्नस्योष्णकालेतथैवातिशिराव्यधात् ॥

अतिप्रवर्ततेरक्तंतत्रकुर्यात्प्रतिक्रियां ॥

अर्थ— मनुष्याचे अंगाचा फार घाम काढून उष्णकालाचेठायीं रक्त काढिलें असतां व शिर देतेवेळीं शीर फार टोंचली असतां, आंगातून रक्त फार येऊं लागतें. तें बंद होण्याविषयीं उपाय पुढील श्लोकांत सांगेल.

## रक्त फार निघूं लागलें असतां उपाय.

अतिप्रवृत्तेरक्तेचलोध्रसर्जरसांजनैः ॥ यवगोधूमचूर्णैर्वाधवध न्वनगैरिकैः॥ सर्पनिर्मोकचूर्णैर्वाभस्मनाक्षौमवस्त्रयोः ॥ मुखं व्रणस्यबध्वाचशीतैश्चोपचरेद्व्रणं ॥ विध्येदूर्ध्वशिरांतांवादहेत्क्षारेणवाग्निना ॥ व्रणंकषायःसंधत्तेरक्तंस्कंदयतेहिमं ॥ व्रणास्यंपाचयेत्क्षारोदाहःसंकोचयेच्छिरां ॥

अर्थ— शिरांतून रक्त फार येऊं लागले असतां, तें बंद होण्याविषयीं लोध्र, राळ व रसांजन, या तिहींचें चूर्ण, अथवा जव आणि गहूं यांचें चूर्ण, अथवा धावडा, धमासा

व गेरु या तिहींचें चूर्ण, अथवा साळाचे मेंगेचें चूर्ण, अथवा सोवळें व चिरगूढ या दोहोंची राख, यांतून समर्थ जे औषध असेल तें व्रणमुखाचेठायीं दडपून बांधून त्या व्रणावर चंदनादिक शीतळ लेपादिक उपचार करावे. तेणेंकरून बंद रक्त होतें. जर इतुक्या उपायानें बंद होईना तर तीच शीर वरल्ये अंगीं पुनः द्यावी, अथवा त्या व्रणमुखाचे ठायीं टांकणखारादि अमिस्वरूप जे खार त्या खारांचा लेप करावा, अथवा तें मुख अग्नीनें डागावें, इतुक्या उपायेंकरून रक्त बंद होतें, कसें बंद होतें तें सांगतो. कषाय ह्मणजे तें लोध्रादिकचूर्ण व्रणाचे तोंड आवळून धरितें, व शीतोपचारेंकरून रक्त थांबतें क्षारेंकरून व्रणाचें पाचन होतें, अग्न्यादि दाहेंकरून शिरांचा संकोच होतो.

## दाहेंकरून जे रोग दूर होतात ते.

वामांडशोथेदक्षस्यकरस्यांगुष्ठमूलजां ॥ दहेच्छिरांव्यत्ययेतुवामांगुष्ठशिरांदहेत् ॥ शिरादाहप्रभावेनमुष्कशोथःप्रशाम्यति ॥ विपुच्यांपाददाहेनजायतेग्नेःप्रदीपनं ॥ संकुचंतियतस्तेनरसश्लेष्मवहाःशिराः ॥ यदावृद्धिर्यकृतप्लीन्होःशिशोःसंजायते सृजः ॥ तदातत्स्थानदाहेनसंकुचंत्यसृजःशिराः ॥

अर्थ–मनुष्याचे डावे वृषणाला सूज आली असतां उजव्ये हाताचे आंगठ्याची शीर डागावी, उजव्ये वृषणाला सूज आली असतां डाव्ये हाताचे मुळाची शीर डागावी. तेणेंकरून वृषणाची सूज दूर होत्ये. मोडशी झाली असतां लोखंडाची कोयती अथवा पळी तापवून पायांचे तळवे ओरपावे. तेणेंकरून रसवाहिनी व कफवाहिनी जा शिरा त्यांचा संकोच होऊन अग्नि प्रदीप्त होतो. आणि मोडशी दूर होत्ये. जाकाळीं बाळकाचे पोटांत उजव्ये कडे यकृत् ह्मणजे काळखंड व डावे कडे प्लीहा ह्मणजे कवळू यांची वृद्धि होत्ये, त्याकाळीं त्या जाग्यावर डाग द्यावे, तेणेंकरून ते यकृत् व प्लीहा हे मागे सरतात.

## दुष्टरक्त काढून किंचित् अवशिष्टराहिलें असतां त्याचे गुण.

रक्तेदुष्टेवशिष्टेपिव्याधिर्नैवप्रकुप्यति ॥ अतःस्राव्यंसावशेषं रक्तंनातिक्रमोहितः ॥ आंध्यमाक्षेपकंतृष्णांतिमिरंशिरसोरुजं ॥ पक्षाघातंश्वासकासौहिक्कांदाहंचपांडुतां ॥ कुरुतेविसृतंरक्तंमरणंवाकरोतिच ॥

अर्थ–शरीरांतील दुष्ट रक्त काढून थोडें अवशिष्ट राहिलें असतां रोगाचा प्रकोप होत नाहीं, यास्तव जें रक्त काढणें तें थोडें राखून काढावें; तें हितावह होतें आणि सारें रक्त

काढिलें असतां अंधता, अक्षेपक वायु, श्वास, खोकला, उचकी, दाह व पांडुरोग हे उपद्रव होतात, आणि मनुष्य मरणावस्थेप्रत जातो. यास्तव सारें रक्त काढूंनये.

## रक्तापासून देहाचे उत्पत्यादिकांचा प्रकार.

देहस्योत्पत्तिरसृजादेहस्तेनैवधार्यते ॥
विनातेनव्रजेज्जीवोरक्षेद्रक्तमतोबुधः ॥

अर्थ– रक्तापासून देहाची उत्पत्ति आहे, व त्या रक्तेंकरूनच देहाचे धारण होतें, आणि रक्तावांचून जीव राहत नाहीं, यास्तव सुज्ञानीं रक्ताचें रक्षण करावें.

## रक्त काढिल्यावर दोष प्रकोप झाला असतां उपाय.

शीतोपचारैःकुपितेसुतरक्तस्यमारुते ॥
कोष्णेनसर्पिषाशोथंसव्यथंपरिषेचयेत् ॥

अर्थ– रक्त काढिल्यावर व्रणस्थानाचेठायीं पित्ताचा प्रकोप झाला असतां चंदनादिक शीतळ उपचार करावा. वायूचा प्रकोप होऊन त्यापासून त्या व्रणस्थानीं पीडायुक्त अशी सूज आली असतां, तिचेठायीं तूप थोडें गरम करून लावावें.

## रक्त काढिलें असतां पथ्य.

क्षीणस्यैणशशोरभ्रहरिणच्छागमांसजः ॥
रसःसमुचितःपानेक्षीरंवाषष्टिकाहिता ॥

अर्थ– शरीरांतील रक्त काढिलें असतां त्यापासून क्षीण झाला असा जो मनुष्य त्याणें हरिण, ससा, मेंढा, काळाहरिण, बोकड यांचे मांसाचा रस प्यावा, आणि साठी तांदुळ गाईचें दुधांत घालून खीर करून खावी, अथवा गाईचें दूध प्यावें, आणि साठी तांदुळांचा भात खावा. याप्रमाणें हे पदार्थ सेविले असतां हितकारक होतात.

## रक्त चांगलें जाहलें असतां लक्षण.

पीडाशांतिर्लघुत्वंचव्याधेरुद्रेकसंक्षयः ॥
मनःस्वास्थ्यंभवेच्चिन्हंसम्यक्विस्राविते सृजि ॥

अर्थ– पीडेचा नाश, देहाचेठायीं हलकेपणा, रोगाचा जो उत्कर्ष त्याचा उत्तम प्रकारेंकरून नाश, मनाचेठायीं प्रसन्नता, हीं लक्षणें उत्तमप्रकारें रक्त निघालें असतां जाणावीं.

## रक्त काढिलें असतां निषेध.

व्यायाममैथुनक्रोधशीतस्नानप्रवातकान् ॥ एकाशनंदिवा
निद्रांक्षाराम्लकटुभोजनं ॥ शोकंवादमजीर्णंचत्यजेदाबल
दर्शनात् ॥

अर्थ-परिश्रम, मैथुन, क्रोध, थंडपाण्याने स्नान करणे, बहुत वारा घेणें, एकच धान्य खाणे, दिवसास निजणें, जवखारादिक खार, आंबट व तिखट हे पदार्थ भक्षण करणें, शोक, आणि वाद हे करणें, बहुत भोजनजन्य अजीर्ण करून घेणें, असें जो पर्यंत शरीरांत बळ येई तो पर्यंत वर्ज करावें.

## डोळे चांगले होण्याविषयीं उपचार.

सेकआश्चोतनंपिंडीबिडालस्तर्पणंतथा ॥
पुटपाकोंजनंचैभिःकल्कैर्नेत्रमुपाचरेत् ॥

अर्थ-सेक १ आश्चोतन २ तिंडी ३ बिडाल ४ तर्पण ५ पुटपाक ६ अंजन ७ हे सात प्रकार नेत्ररोगाविषयीं सांगीतले, यांचे कल्क करून ज्या रितीने नेत्ररोगावर उपचार करावयास सांगेल तसें करावे.

## सेकाचें लक्षण.

सेकस्तुसूक्ष्मधाराभिःसर्वस्मिन्नयनेहितः ॥
मीलिताक्षस्यमर्त्यस्यप्रदेहश्चतुरंगुलात् ॥

अर्थ-मनुष्याचे डोळे मिटवून दूध, तूप, रस, इत्यादिकांची सारे डोळ्यावर च्यार अंगुळाचे अंतराने बारीक धार धरावी. याला सेक ह्मणतात.

## त्या सेकाचे स्नेहनादि भेदेंकरून तीन प्रकार.

सचापिस्नेहनेवातेरक्तेपित्तेचरोपणः ॥
लेखनश्चकफेकार्यस्तस्यमात्राधुनोच्यते ॥

अर्थ- वातरोग असतां स्नेहन सेक योजावा, रक्त पित्ताचा कोप असतां रोपण सेक योजावा, कफ रोग असतां लेखन सेक योजावा.

## सेकाची मात्रा.

षड्वाक्शतैःस्नेहनेषुचतुर्भिश्चैवरोपणे ॥
वाक्शतैश्चत्रिभिःकार्यःसेकेलेखनकर्मणि ॥

अर्थ स्नेहन कर्म असतां सहाशे आंख होत तोपर्यंत डोळ्यांवर धार ज्या औषधाची सांगेल त्याची धरावी, रोपण कर्म असतां चारशे आंख होत तोपर्यंत धार धरावी, लेखन कर्म असतां तीनशें आंख होत तोपर्यंत धार धरावी.

## सेक केव्हां करावा तो काळ.

कार्यस्तुदिवसेसेकोरात्रौचात्ययिकेगदे ॥

अर्थ- जो डोळ्यांवर सेक करावयाचा तो दिवसासच करावा, जर रोगाचे आधिक्य-आहे, तर रात्रीस हीं करावा.

## वाताभिष्पंद रोगावर सेक.

एरंडत्वक्पत्रमूलैःशृतमाजंपयोहितं ॥
सुखोष्णंसेचनंनेत्रेवाताभिष्पंदनाशनं ॥

अर्थ– सुरतीएरंडाची साल, पानें, मुळें हीं सारीं शेळीचे दुधांत कढवून नंतर तें दुध सहन होई असें कोमट कोमट असून त्याची धार वाताभिष्पंदरोग दूर होण्या विषयीं डोळयावर धरावी.

## वाताभिष्पंद रोगावर दुसरा प्रकार.

परिषेकेहितंनेत्रेपयःकोष्णंससैंधवं॥ रजनीदारुसिंधिवासैंधवेनसमन्वितं ॥ वाताभिष्पंदशमनंहितंमारुतपर्यये॥ शुष्काक्षिपाकेचहितमिदंसेचनकंतथा ॥

अर्थ– शेळीचे दुधांत सैंधव घालून उष्ण करून सहन होई असी कोमट कोमट डोळयांवर त्या दुधाची धार धरावी, अथवा हळद, देवदार, सैंधव, यांचे चूर्ण करून त्या दुधांत घालून उष्ण करून कोमट कोमट डोळयांवर धार धरावी, तेणेंकरून वाताभिष्पंदरोग, व वातविपर्यय व शुष्काक्षिपाक हे रोग दूर होतात.

## पित्त, रक्त व अभिघात यांजवर.

सावरंमधुकंतुल्यंघृतभृष्टंसुचूर्णितं ॥
छागक्षीरेधृतंसेकात्पित्तरक्ताभिघातजित् ॥

अर्थ– लोध्र व ज्येष्टीमध हीं दोन औषधें समभाग घेऊन तुपांत भाजून चूर्ण करून शेळीचे दुधांत घालून त्या दुधाची कोमट कोमट डोळयांवर धार धरावी. तेणेंकरून पित्तविकार, रक्तविकार व अभिघातजन्य विकार हे दूर होतात.

## रक्ताभिष्पंदावर सेक.

त्रिफलालोध्रयष्टीभिःशर्कराभद्रमुस्तकैः ॥
पिष्टैःशीतांबुनासेकोरक्ताभिष्पंदनाशनः ॥

अर्थ–हरडे, बेहडे, आंवळकठी, लोध्र, जेष्ठीमध, साखर, नागरमोथ्याचा भेद भद्रमुस्ता, हीं औषधें समभाग घेऊन थंडपाण्यात वाटून त्या पाण्याची डोळयावर धार धरावी. तेणेंकरून रक्ताभिष्पंद दूर होतो.

## रक्ताभिष्पंदावर दुसरा सेक.

लाक्षामधुकमंजिष्ठालोध्रकालानुसारिवा ॥
पुंडरीकयुतःसेकोरक्ताभिष्पंदनाशनः ॥

अर्थ—लाख १ जेष्टीमध २ मंजिष्ठ ३ लोध्र ४ उपलसरी ५ पांढरें कमळ ६ हीं सहा औषधें पाण्यांत वाटून त्या पाण्याची डोळ्यांवर धार धरावी. तेणेंकरून रक्ताभिष्यंद दूर होतो.

## नेत्रशूळ दूर होण्याविषयीं सेक.

श्वेतलोध्रंघृतेभृष्टंचूर्णितंपटविस्रुतं ॥
उष्णांबुनाविमर्दितंसेकात्शूलघ्नमंबके ॥

अर्थ—पांढरा लोध्र तुपांत भाजून चूर्ण करून फडक्यांत गाळून ऊन पाण्यांत वाटून त्या पाण्याची डोळ्यावर धार धरावी. तेणेंकरून नेत्रशूळ दूर होतो.

## आश्चोतनाचें लक्षण.

अथआश्चोतनंकार्यंनिशायांनकथंचन ॥
उन्मीलितेक्षिणिदृङ्मध्येबिंदुभिद्व्यंगुलाद्धितं ॥

अर्थ—मनुष्याचे डोळे उघडून डोळ्यामध्यें दोन अंगुळांचे अंतरानें दूध, काढे इत्यादिकांचे बिंदु सोडावे, याला आश्चोतन म्हणतात, हें आश्चोतनकर्म रात्रीचेठायीं कदापि करूं नये.

## अथ आश्चोतनविधिः.

क्वाथक्षौद्रासवस्नेहबिंदूनांयत्तुपातनं ॥
यद्व्यंगुलोन्मीलितनेत्रेप्रोक्तमाश्चोतनंहितत् ॥

अर्थ—काढे, मध, आसव, स्नेह, यांचे बिंदु दोन अंगुळांवरून डोळा उघडून सोडावे, त्याचें नांव आश्चोतन, आहे.

## लेखनादिकआश्चोतनाचेठायीं किती बिंदु घालावे त्याचें प्रमाण.

बिंदवोष्टौलेखनेपुस्नेहनेदशबिंदवः ॥ रोपणेद्वादशप्रोक्तास्ते
शीतेकोष्णरूपिणः ॥ उष्णेचशीतरूपाःस्युःसर्वत्रैवैषनिश्चयः ॥

अर्थ— लेखनकर्म असतां डोळ्यामध्यें आठ बिंदु सोडावे, स्नेहनकर्म असतां दहा बिंदु सोडावे, रोपणकर्म असतां बारा बिंदु सोडावे, आणि ते बिंदु शीतळ असतां डोळ्यानां सहन होत असे कोमट कोमट सोडावे, उष्णकाळ असतां शीतरूप सोडावे.

## वातादिकांचेठायीं आश्चोतन द्यावयाची योजना.

वातेतिक्तंतथास्निग्धंपित्तेमधुरशीतलं ॥
तिक्तोष्णरूक्षंचकफेक्रमादाश्चोतनंहितं ॥

अर्थ–वातरोग असतां कटु आणि स्निग्ध असें आश्चोतन योजावें, पित्तरोग असतां मधुर व शीतळ असें योजावें, कफरोग असतां कटु, उष्ण, रुक्ष असें योजावें. याप्रकारें आश्चोतन योजिलें असतां हितकारक होतें.

## आश्चोतनाचे मात्रेचें लक्षण.

आश्चोतनानांसर्वेषांमात्रास्याद्वाक्शतंहितं ॥ निमेषोन्मेषणं पुंसामंगुल्योश्छोटिकाथवा ॥ गुर्वक्षरोच्चारणंवावाङ्मात्रेयं स्मृताबुधैः ॥

अर्थ–मनुष्याचे डोळयाच्या पापणी मिटोन उघडणें अथवा टिचकी मारणें अथवा गुरु ह्मणजे मोठें असें जें अक्षर त्याचें उच्चारण करणें ह्मणजे एक आंख मोजणें इतका जो काल त्या काळाची एक वाङ्मात्रा जाणावी, अशा शंभर वाङ्मात्रा संपूर्ण आश्चोतनें जीं त्यास हितकारक होतात.

## वाताभिष्पंदावर आश्चोतन.

बिल्वादिपंचमूलेनबृहत्येरंडशिग्रुभिः ॥
क्वाथआश्चोतनेकोष्णोवाताभिष्पंदनाशनः ॥

अर्थ–बेल आहे आदिज्यानां अशीं पांचें औषधांची मुळें, रिंगणी, एरंडमूळ, शेगव्याचे मुळाची साल, त्या साऱ्या औषधांचा काढा करून त्या काढ्याचे सहन होई असे डोळ्यामध्यें बिंदु सोडावे, तेणेंकरून वाताभिष्पंद रोग दूर होतो.

## वायूपासून व रक्तपित्तापासून झाला जो अभिष्पंद त्यावर आश्चोतन.

अंबुपिष्टैर्निंबुपत्रैस्त्वचंलोध्रस्यलेपयेत् ॥ प्रतापवन्हिनापिष्टा तद्रसोनेत्रपूरणात् ॥ वातोत्थंरक्तपित्तोत्थमभिष्पंदंविनाशयेत् ॥

अर्थ–कडूनिंबाचीं पानें पाण्यांत वाटून लोध्राचे सालीला त्याचा लेप करून अग्नीवर तापवून नंतर वाटून त्याचा रस काढून त्या रसाचे डोळ्यामध्यें बिंदु सोडावे, तेणेंकरून वातजन्य रक्त, पित्तजन्य जो अभिष्पंद, तो दूर होतो.

## संपूर्ण अभिष्पंदावर आश्चोतन.

त्रिफलाश्चोतनंनेत्रेसर्वाभिष्पंदनाशनं ॥

अर्थ–त्रिफळेचा काढा करून त्या काढ्याचे कोमट कोमट बिंदु डोळ्यामध्यें सोडावे, तेणेंकरून सर्व प्रकारचे अभिष्पंद दूर होतात.

---

१ बेलमूळ १ ऐरणीचेंमूळ २ टेंटूमूळ ४ दाडमूळ ५ हीं बिल्वादि पंचमूळ जाणावीं, याला थोर पंचमूळ ह्मणतात.

## रक्तपित्तादि जन्य जे अभिष्पंद त्यांजवर आश्चोतन.

स्त्रीस्तन्याश्चोतनंनेत्ररक्तपित्तानिलार्तिजित् ॥
क्षीरसर्पिर्घृतंवापिवातरक्तरुजंजयेत् ॥

अर्थ—स्त्रीच्या स्तनाचें जें दुग्ध त्या दुग्धाचे थेंब डोळ्यामध्यें सोडिले असतां रक्तपित्त व वायु यांपासून जी पीडा होते, ती दूर होत्ये; तशीच दुधावरली साय व तूप यांचे थेंब डोळ्यामध्यें सोडिले असतां वातरक्त संबंधीं पिडा दूर होत्ये

## पिंडिकेचें लक्षण.

पिंडीकवलिकाप्रोक्ताबध्यतेपट्टवस्त्रकैः ॥
नेत्राभिष्पंदयोग्यासाव्रणेष्वपिनिबध्यते ॥

अर्थ—औषध वाटून वडी करून डोळ्यावर ठेऊन सोवळ्याचे पट्टीनें बांधावी, हिला पिंडी अथवा कवलिका असें ह्मणतात, ही पिंडी नेत्राभिष्पंद रोगावर योग्य आहे; आणि व्रणाचे ठायींही बांधतात.

स्निग्धोष्णापिंडिकावातेपित्तेसाशीतलामता ॥
रूक्षोष्णाश्लेष्मणिप्रोक्ताविधिरुक्तोबुधैरयम् ॥

अर्थ— वातव्याधीवर स्निग्ध व उष्ण, पित्तावर थंड, कफावर रूक्ष, आणि ऊष्ण अशी पिंडी बांधावी, हा पिंडी बांधण्याचा विधि सांगितला आहे.

## नेत्राभिष्पंदरोगावर शिरोविरेचन.

अभिष्पंदेधिमंथेचसंजातेश्लेष्मसंभवे ॥
स्निग्धस्विन्नोत्तमांगस्यशिरस्तीक्ष्णैर्विरेचयेत् ॥

अर्थ—कफसंबंधीं अभिष्पंद व अधिमंथ हे रोग ज्या मनुष्याला आहेत, त्याचें मस्तकाला तेल लाऊन मस्तकाचा घाम काढावा, नंतर मस्तकाचें शोधन होण्याविषयीं तीक्ष्ण औषधेंकरून नाकांत नस्य द्यावें.

## अधिमंथरोगावर दुसरा उपचार.

अधिमंथेषुसर्वेषुललाटेवेधयेच्छिरां ॥
अशांतेसर्वथामंथेभ्रुवोस्तुपरिदाहयेत् ॥

अर्थ— संपूर्णअधिमंथाचेठायीं ललाटसंबंधी शिर टोचून रक्त काढावें, आणि सर्व प्रकारें अधिमंथ शांत होत नाहीं तर भ्रुकुटीचेठायीं डाग द्यावा.

## अभिष्पंदाचेठायीं क्रिया.

वाताभिष्पंदशांत्यर्थंस्निग्धोष्णापिंडिकाभवेत् ॥

अर्थ- संपूर्णअभिष्यंदरोगांचेठायीं डोळयावर जें औषध सांगेल त्याची वडी करून बांधावी, आणि वाताभिष्यंदशमनाविषयीं चिकण असून ऊष्ण अशी वडी बांधावी.

## वाताभिष्पंद व पित्ताभिष्पंद यांजवर पिंडी.

एरंडपत्रमूलत्वङ्निर्मितावातनाशिनी ॥
पित्ताभिष्पंदनाशायधात्रीपिंडीसुखावहा ॥

अर्थ-सुरतीएरंडाची पानें, मुळें व साल हीं एकाजागीं वाटून वडी करून वाताभिष्पंद नाशाविषयीं डोळयावर बांधावी, पित्ताभिष्पंदनाशाविषयीं आवळकठी वाटून वडी करून डोळयावर बांधावी.

## पित्ताभिष्पंदावर दुसरी पिंडी.

महानिंबफलोद्भूतापिंडीपित्तविनाशिनी ॥

अर्थ- बकाणनिंबाचीं फळें वाटून वडी करून पित्ताभिष्पंदनाशाविषयीं डोळयांवर बांधावी.

## श्लेष्माभिष्पंदावर पिंडी.

शिग्रुपत्रकृतापिंडीश्लेष्माभिष्पंदनाशिनी ॥

अर्थ-शेवग्याचा पाला वाटून वडी करून कफाभिष्पंदनाशाविषयीं डोळयावर बांधावी.

## कफपित्ताभिष्पंदावर पिंडी.

निंबपत्रकृतापिंडीश्लेष्मपित्तहराभवेत् ॥
त्रिफलापिंडीकाप्रोक्तानाशनेश्लेष्मपित्तयोः ॥

अर्थ-कफपित्ताभिष्पंद दूर होण्याविषयीं कडुनिंबाचीं पानें वाटून वडी करून डोळयांवर बांधावी व त्रिफळा वांटून वडी करून डोळयांवर बांधावी.

## रक्ताभिष्पंदावर पिंडी.

पिष्ट्वाकांजिकतोयेनघृतभृष्टिंचपिंडिका ॥
लोध्र यहरतिक्षिप्रमभिष्पंदमसृग्दरं ॥

अर्थ- लोध्रपिंडी कांजींत वाटून तुपांत भाजून वडी करून डोळयांवर बांधावी, तेणें करून रक्ताभिष्पंद दूर होतो.

## सूज, कंडू इत्यादिकांवर पिंडी.

शुंठीनिंबदलैःपिंडीसुखोष्णास्वल्पसैंधवा ॥
धार्याचक्षुषिसंयोगात्शोथकंडूव्यथापहा ॥

अर्थ—सुंठ व निंबाचीपानें हीं एकत्र वाटून त्यांत थोडें सैंधव घालून वडी करून सूज व कंडू दूर होण्याविषयीं ती वडी किंचित् गरम गरम डोळ्यांवर बांधावी.

## बिडालकाचें लक्षण-

बिडालकोबहिर्लेपोनेत्रपक्ष्मविवर्जितः ॥
तस्यमात्रापरिज्ञेयामुखलेपविधानवत् ॥

अर्थ— डोळ्यांच्या पापण्या झांकून डोळ्यांचे बाहेरल्ये आंगीं आसमंतात्भागीं लेप करावा. याला बिडालक ह्मणतात. त्याचे लेपाची मात्रा मुख लेपाचें विधान सांगितलें आहे, त्याप्रमाणे जाणावी.

## सर्वनेत्ररोगांवर लेप.

यष्टिगैरिकसंभूत्थदार्वितार्क्ष्यैःसमांशकैः ॥
जलपिष्टैर्बहिर्लेपःसर्वनेत्रामयापहः ॥

अर्थ— जेष्ठीमध, गेरू, सैंधव, दारुहळद, कलखापरी, हीं पांच औषधें समभाग घेऊन पाण्यांत वाटून डोळ्यांचे बाहेरल्या आंगीं आसमंतात्भागीं लेप करावा. तेणेंकरून सर्व अभिष्यंदनेत्ररोग दूर होतो.

## सर्वनेत्ररोगांवर दुसरा लेप.

रसांजनेनवालेपःपथ्याविश्वदलैरपि ॥ कुमारिकाग्निपत्रैर्वादा
डिमीपल्लवैरपि ॥ वचाहरिद्राविश्वैर्वातथानागरगैरिकैः ॥

अर्थ— रसांजन पाण्यांत वाटून लेप करावा, तसाच हरडे, सुंठ, तमालपत्र, हीं तीन औषधें पाण्यांत वाटून लेप अथवा कोरफड आणि चित्रकाचीं पानें हीं दोन औषधें एकाजागीं वाटून लेप अथवा डाळिंबीचीं पानें वाटून लेप अथवा वेखंड, हळद, व सुंठ हीं तीन औषधें पाण्यांत वांटन लेप तसाच सुंठ व गेरू हीं दोन औषधें पाण्यांत वांटून लेप हे साहा प्रकारचे लेप डोळ्यांचे बाहेरल्ये आंगीं असमंतात्भागीं केले असतां सर्वप्रकारचे नेत्ररोग दूर होतात.

## सर्वनेत्ररोगांवर तिसरा लेप.

दग्ध्वाग्नौसैंधवंलोध्रंमधूच्छिष्टयुतेघृते ॥
पिष्टमंजनलेपाभ्यांसद्योनेत्ररुजापहं ॥

अर्थ— सैंधव आणि लोध्र हीं दोन औषधें अग्नीवर भाजून मेण व तूप एकाजागीं करून त्यांत तीं औषधें वांटून डोळ्यांमध्यें अंजन करावें, आणि बाहेरल्ये आंगीं त्या औषधांचा लेप करावा, तेणेंकरून नेत्रसंबंधीं पीडा तत्काळ दूर होत्ये.

## चवथा लेप.

लोहस्यपात्रेसंघृष्टोरसोनिंबूफलोद्भवः ॥
किंचिद्घनोबहिर्लेपान्नेत्रबाधांव्यपोहति ॥

अर्थ–लोखंडाचे पात्रांत निंबूचा रस घोटून किंचित् घण जहाल्यावर डोळयांचे बाहेरल्ये आंगी लेप करावा. तेणेंकरून नेत्रसंबंधी रोग दूर होतो.

## अर्मरोगावर लेप

संचूर्ण्यमरिचंकेशराजस्वरसमर्दनात् ॥
लेपनादर्मणांनाशंकरोत्येषप्रयोगराट् ॥

अर्थ– मिऱ्यें माक्याचे रसांत वाटून डोळयांवर लेप करावा. तेणेंकरून शुक्लार्म व अधिमांसार्म इत्यादिक नेत्ररोगांमध्यें अर्मरोग आहेत ते दूर होतात.

## आंजणीपूळीवर प्रतिसारण.

स्विन्नांभित्वाविनिष्पीड्यभिन्नामंजननामिकां ॥
शिलैलानतासिंधूत्थैःसक्षौद्रैःप्रतिसारयेत् ॥

अर्थ–डोळयांचे कोरीचेठायीं अंजननामिका ह्मणून पुळी होत्ये, तिला आंजणी ह्मणतात त्या पुळीला वाफाऱ्यानें घाम काढून फाडून पिळावी, नंतर मनशीळ, एलची, तगर, सैंधव या चार वान्याचें चूर्णकरून मधांत कालवून त्या पुळीचेठायीं प्रतिसारण करावें ह्मणजे तें औषध त्या पुळीवर चोळावें.

## नेत्ररोगावर तर्पण.

अथतर्पणकंवच्मिनेत्रतृप्तिकरंपरं ॥ यद्रुक्षंपरिशुष्कंचनेत्रंकुटिलमाविलं ॥ शीर्णपक्ष्मशिरोत्पातकृच्छ्रोन्मिलनसंयुतं ॥ तिमिरार्जुनशुक्राद्यैरभिष्यंदाधिमंथकैः ॥ शुक्राक्षिपाकशोथाभ्यां युक्तंवातविपर्ययैः ॥ तन्नेत्रतर्पणेयोज्यंनेत्रकर्मविशारदैः ॥

अर्थ–नेत्रांचेठायीं तृप्ति करणारें असें तर्पण सांगतों; ज्या नेत्रांनां रूक्षपणा, शुष्कपणा, वांकडेपणा व गढूळपणा आहे, अशा प्रकारचे नेत्र, जा पापण्यांचे केश झडून गेले असे शिरोत्पात, कृच्छ्रोन्मिलन, तिमिर, अर्जुन, शुक्र ह्मणजे फूल, अभिष्यंद, अधिमंथ, शुक्राक्षिपाक, सूज व वाताविपर्यय इतक्या रोगेंकरुन व्याप्त जे नेत्र त्यांचेठायीं तर्पण योजावें ह्मणजे तृप्तिकरणारें औषध योजावें.

## हीनाधिकतर्पणीं उपचार.

पूर्णेचापांगतःस्नेहंस्रावयित्वाक्षिशोधयेत् ॥ स्विन्नेनयवपिष्टे

नस्नेहवीर्येरिततः ॥ यथास्वंधूमपानेनकफमस्यविरेचयेत् ॥
एकाहंवात्र्यहंवापिपंचाहंतर्पणंचरेत् ॥

अर्थ–नेत्र पूर्ण झाले ह्मणजे अपांग (नेत्र कोण)द्वारा स्नेह बाहेर काढून नेत्रांचें शोधन करावें. नंतर स्नेहवीर्यानें दुष्ट नेत्राला यवांचे पीठ भिजवून वाफ देऊन. तें वर बांधावें. किंवा धूमपानानें त्याचा कफ पाडून टाकावा. या प्रमाणें एक किंवा तीन अथवा पांच दिवस तर्पण करावें.

## ज्याचेठायीं तर्पण योग्य नाहीं तें.

दुर्दिनात्युष्णशीतेषुचिंतायासभ्रमेषुच ॥
अशांतोपद्रवेचाक्षिणितर्पणंनप्रशस्यते ॥

अर्थ–मळभ आले असतां, फार शीत व उष्णकाळ असतां, शरीराचेठायीं चिंता, परिश्रम, व भ्रम, हे उपद्रव असतां आणि नेत्रसंबंधीं शूळादिक उपद्रव शांत झाले नसतां ही तर्पणी मात्रा योजूनये.

## तर्पणाचें विधान.

वातातपरजोहीनेदेशेचोत्तानशायिनः ॥ आधारौमाषचूर्णेन
क्लिन्नेनपरिमंडलौ ॥ समौदृढावसंबाधौकर्तव्यौनेत्रकोशयोः ॥
पूरयेद्घृतमंडेनाविलीनेनसुखोदकैः ॥ अथवाशतधौतेनसर्पि
षाक्षीरजेनवा ॥ निमग्नान्यक्षिपक्ष्माणियावत्स्युस्तावदेवहि ॥
पूरयेन्मीलितेनेत्रेततउन्मीलयेच्छनैः ॥

अर्थ–वायु, उष्ण व धुरळा हीं ज्या जाग्यांत नाहींत त्या जाग्याचेठायीं मनुष्याला उताणे निजवून नेत्र कोशाचेठायीं ह्मणजे डोळ्यांचें भोंवती, उडीद भिजवून वाटून चांगले सारिखें वाटोळें असून बळकट असें आळें करावें नंतर–डोळे मिटून धरवून त्यांचेठायीं पातळ तूप अथवा मंड ह्मणजे पेज अथवा कोमट पाणी अथवा शतधौत केलेलें तूप अथवा दूध हे पदार्थ जोंपर्यंत डोळ्यांचा पापण्या बुडत तोंपर्यंत डोळ्यांवर सोडावें, नंतर हलके हलके नेत्र उघडावें.

## तर्पणमात्रेचें प्रमाण.

धारयेद्वर्त्मरोगेषुवाङ्मात्राणांशतंबुधः ॥ स्वच्छेकफेसंधिरो
गेमात्रापंचशतंहितं ॥ शुक्लेचषट्शतंकृष्णरोगेसप्तशतंमतं ॥
दृष्टरोगेष्वष्टशतमधिमंथेसहस्रकं ॥ सहस्रंवातरोगेषुधार्यमे
वंहितर्पणं ॥

अर्थ– नेत्रसंबंधीं पापण्याचे रोग जे त्यांचेठायीं शंभर वाङ्मात्रा होत तों पावेतों तर्पणरूप औषध डोळ्यांवर धारण करावें, एकलाच कफरोग असतां व डोळ्याचे संधिगत रोग असतां पांचशें, डोळ्यांचे पांढरें जाग्यावर रोग असतां सहाशें, काळें बुबुळावर रोग असतां सातशें, दृष्टिरोग असतां आठशें, अधिमंथ रोग असतां एकसहस्र, वातरोग असतां एकसहस्र याप्रमाणें वाङ्मात्रा होत तोंपर्यंत करणारें औषध तें डोळ्यांवर धारण करावें.

## तर्पणेंकरून स्नेहाचे योगानें कफाचें आधिक्य झालें असतां उपाय.

स्विन्नेनयवपिष्टेनस्नेहवीर्येरिततः ॥
यथास्वंधूमपानेनकफमस्याविशोधयेत् ॥

अर्थ– तर्पणाचे स्नेहवीर्येंकरून उत्पन्न जाहला जो कफ त्याचें, जव भिजवून वाटून धूमपान करून शोधन करावें.

## तर्पणप्रयोग कितीदिवस करावा त्याची मर्यादा.

एकाहंवात्र्यहंवापिपंचाहंचेष्यतेपरं ॥

अर्थ– नेत्राचेठायीं तर्पण प्रयोग करावयाचा तो एक दिवस किंवा तीन दिवस अथवा पांच दिवस पर्यंत करावा. हें उत्कृष्ट प्रमाण जाणावें.

## तर्पणाचें तृप्तिलक्षण.

तर्पणेतृप्तिलिंगानिनेत्रस्येमानिभावयेत् ॥ सुखस्वप्नावबोधत्व
वैशद्यंवर्णपाटवं ॥ निवृत्तिर्व्याधिशांतिश्चक्रियालाघवमेवच ॥

अर्थ– सुखेंकरून झोंप येत्ये, सुखेंकरून जागा होतो, डोळ्यानां निर्मळपणा येतो, डोळ्यांची कांति चांगली होत्ये, नदर साफ होत्ये, रोगाचा नाश होतो, आणि डोळे उघडणें मिटणें या क्रियेला हलकेपणा येतो. हीं लक्षणें तर्पणेंकरून नेत्रतृप्ति झालें असता होतात असें जाणावें.

## तर्पण फार झालें असतां लक्षण.

गुर्वाविलमतिस्निग्धमश्रुकंडूपदेहवत् ॥
घर्षतोदयुतंनेत्रमतितर्पितमादिशेत् ॥

अर्थ– जड, गढूळ, अतिस्निग्ध, अश्रु, कंडू, चिकटपणा, घर्षण, ठणका, यांणीं युक्त नेत्र झाले असतां ते अतितर्पित झाले असे समजावें.

## हीनतर्पणलक्षण,

आस्रावशोफरागाढ्यमुपदेहसमाकुलं ॥

रूक्षमसाविलंरुग्णंनेत्रंस्यात्धीनतर्पितं ॥

अर्थ– गळ, सूज, रक्तपणा, चिकटा, रूक्षपणा, लाली, ठणका यांणीं युक्त नेत्र, हीन तर्पित झालें असें समजावें.

## तर्पणानें अतिस्निग्ध व अतिहीनस्निग्ध झालें असतां उपाय.

अनयोर्दोषबाहुल्यात्प्रयतेतचिकित्सिते ॥

रूक्षस्निग्धोपचाराभ्यामेतयोःस्यात्प्रतिक्रिया ॥

अर्थ– अधिक किंवा हीन तर्पण झालें असतां वैद्यानें किंवा स्निग्ध उपचारानीं क्रिया करावी.

## पुटपाक.

अतऊर्ध्वंप्रवक्ष्यामिपुटपाकस्यसाधनं ॥ द्वौबिल्वमात्रौमांस स्यपिंडौस्निग्धौसुपेषितौ ॥ द्रव्याणांबिल्वमात्रंतुद्रवाणांकुड वोमतः ॥ तदेकस्थंसमालोड्यपत्रैःसुपरिवेष्टितं ॥ पुटपाकेन तत्पक्वागृण्हीयात्तद्रसंबुधः ॥ तर्पणोक्तविधानेनयथावदुपचारयेत् ॥

अर्थ– यानंतर पुटपाकाची साधनक्रिया सांगतों, हरिणादिकाचें मांस दोन बिल्व प्रमाण घेऊन तें मांस घृतादिक पदार्थ स्नेह याणें युक्त करून बारीक वाटावें, शुष्क औषधें जीं सांगेल तीं एक बिल्व प्रमाण व मध, पाणी इत्यादिक द्रवद्रव्यें एक कुडवप्रमाण हीं सारीं त्या मांसांत मेळवून मांसाचा गोळा करावा, नंतर जांबूळ अथवा आंबा इत्यादिकांचीं पानें आणून त्या गोळ्या भोंवतीं गुंडाळून त्याजवर मातीचा लेप करावा नंतर पुटपाकरितीनें तो गोळा भाजून नंतर बाहेर काढून माती व पानें दूर करून तो गोळा पिळून रस काढावा, आणि तर्पणाचे विधीची रीति वर सांगितली आहे तशी रीति करून तो रस डोळ्यामध्यें घालावा.

## पुटपाकासंबंधीं रस डोळ्यांत घालावयाचें विधान.

दृष्टिमध्येनिषेच्यःस्यान्नित्यमुत्तानशायिनः ॥

स्नेहनोलेखनश्चैवरोपणश्चेतिसत्रिधा ॥

अर्थ– तो पुटपाकसंबंधी रस स्नेहन, लेखन व रोपण या भेदेंकरून तीन प्रकारचा आहे, हा मनुष्याला उताणे निजवून डोळ्यांत दृष्टीचे मध्यभागीं नित्य घालावा.

## स्नेहनादिभेदेंकरून पुटपाकाची योजना.

हिनःस्निग्धोतिरूक्षस्यस्निग्धस्यापिहिलेखनः ॥

दृष्टेर्बलार्थमितरःपित्तासृक्व्रणवातनुत् ॥

अर्थ– रुक्षनेत्र त्यांस स्निग्ध पुटपाक, स्निग्धनेत्र जे त्यांस लेखन पुटपाक, दृष्टीस बळ येण्याविषयीं रोपण पुटपाक योजावा. तो पुटपाक नेत्रसंबंधी दुष्ट झालें जें पित्त, रक्त, व्रण व वायु हे दूर करितो या पुटपाकाची योजना पुढील श्लोकांत सांगेल.

## स्नेहपुटपाक

सर्पिर्मांसवसामज्जामेदस्वाद्वौषधैःकृतः ॥
स्नेहनःपुटपाकस्तुधार्योद्वेवाक्शतेदशोः ॥

अर्थ– तूप, हरिणादिकांचें मांस, मज्जा व मेद हीं सारीं तूपमिश्रित करून वाटावीं; आणि काकोल्यादिगणाची औषधें यांचे चूर्ण करून त्या मांसादिकांत मिळवून एक गोळाकरून भोंवतालीं जांबूळ, आंबा इत्यादिकांची पानें गुंडाळून त्यावर माती लावून पुटपाकाचे रितीनें अग्नि द्यावा नंतर तोगोळा बाहेर काढून माती व पानें दूर करून पिळून रस काढून डोळयामध्यें घालून नेत्राच्या दोनशें वाङ्मात्रा होत तोकाळ पर्यंत धारण करावा. याला स्नेहपुटपाक ह्मणतात.

## लेखन पुटपाक.

जांगलानांयकृन्मांसैर्लेखनद्रव्यसंयुतैः ॥ कृष्णलोहरजस्ताम्र
शंखविद्रुमसिंधुजैः ॥ समुद्रफेनकाशीसस्रोतोजदधिमस्तुभिः ॥
लेखनेवाक्शतंधार्यस्तस्यतावद्विधारणं ॥

अर्थ–हरिणादिकांचे मांस, लोहचूर्ण, तांब्याचे चूर्ण, शंख, पोवळीं, सैंधव, समुद्रफेस, हिराकशी, सुरमा व शेळीचे दह्यांवरली निवळी घालून वाटून गोळा करावा; आणि पुटपाकाची कृति पूर्वीं सांगितला आहे त्या कृतीनें तो गोळा भाजून नंतर बाहेर काढून पिळून रस काढून डोळयामध्यें घालून शंभर वाङ्मात्रा होत तो काळ पर्यंत धारण करावा. याला लेखन पुटपाक ह्मणतात.

## रोपण पुटपाक.

स्तन्यजांगलमध्वाज्यतिक्तकद्रव्यपाचितः ॥ लेखनात्त्रिगुणो
धार्यःपुटपाकस्तुरोपणः ॥ वितरेत्तर्पणोक्तांतुक्रियांव्यापत्तिदर्शने ॥

अर्थ–स्त्रीच्या स्तनांचे दूध, हरिणादिकांचे मांस, मध, तूप, व कटुकी हीं सारीं त्या मांसांत मेळवून गोळा करून पूर्व पुटपाकरीतीनें तो गोळा भाजून नंतर बाहेर काढून पिळून रस काढून डोळयामध्यें घालून तीनशे वाङ्मात्रा होत तोंकाळपर्यंत धारण करावा. याला रोपणपुटपाक ह्मणतात; जर पुटपाकाचे आधिक्य अथवा कमीपणा होऊन डोळयानां जडपणा व निस्तेजपणा इत्यादिक उपद्रव प्राप्तझाले तर तर्पणाचेठायीं जशी क्रिया सांगीतली आहे तसे उपाय करावे.

## दोष पक्क जाहला असतां अंजन व अंजनाचें साधारण विधान.

अथसंपक्वदोषस्यप्राप्तमंजनमाचरेत् ॥ हेमंतेशिशिरेचैवम
ध्यान्हेजनमिष्यते ॥ पूर्वाण्हेचापराण्हेचग्रीष्मेशरदिचेष्यते ॥
वर्षासुनाभ्रेनात्युष्णेवसंतेचसदैवहि ॥

अर्थ–परिपाकास गेले आहेत दोष ज्याचे असा जो मनुष्य त्याचे डोळयांनां अंजन घालणें प्राप्त झालें असतां पांच दिवसानंतर घालावें. अंजनाचा साधारण विधि हेमंतऋतु शिशिरऋतु यांचेठायीं दोनप्रहर दिवसास डोळयांत अंजन घालावें, ग्रीष्मऋतु,व शरदृतु यांचे ठायीं दोनप्रहर दिवसात, व त्याचे आलीकडे अंजन घालावें. मळभ असतां व फार उष्णकाळ असतां अंजन करूंनये, वसंतऋतूचेठायीं सर्वकाळ अंजन प्रशस्त आहे.

## अंजनाचे भेद.

लेखनंरोपणंचैवतथातत्स्नेहनांजनं ॥ लेखनंक्षारतीक्ष्णाम्लर
सैरंजनमिष्यते ॥ कषायतिक्तरसयुक्सस्नेहंरोपणंमतं ॥ मधु
रस्नेहसंपन्नमंजनंचप्रसादनं ॥

अर्थ–लेखन, रोपण, व स्नेहन या भेदेंकरून अंजन तीन प्रकारचें, त्यामध्यें खारट तिखट आंबट, हे रस ज्या अंजनामध्य आहेत, तें लेखनांजन जाणावें. व तुरट, कडू या दोहो रसेंकरून युक्त असून जें अंजन स्नेहयुक्त असतें तें स्नेहनांजन जाणावें.

## गुटिकादिभेदेंकरून अंजन तीन प्रकारचें.

गुटिकारसचूर्णभित्रिविधान्यंजनानिच ॥
कुर्याच्छलाकयांगुल्याहीनानिचयथोत्तरं ॥

अर्थ– गोळी, रसरूप अंजन व चूर्ण अशी तीन प्रकारचीं अंजनें जाणावीं; तीं अंजनें, गुटिकेपेक्षां रसगुणाला कमी व रसापेक्षां चूर्ण गुणाला कमी अशीं उत्तरोत्तर गुणाला हलकीं जाणावीं; आणि तीं अंजनें सळईनें अथवा अंगुळीकरून डोळयांत घालावीं.

## जे अंजनाविषयीं योग्य नाहींत ते.

श्रांतेप्ररुदितेभीतेपीतमद्येनवज्वरी ॥
अजीर्णेवेगघातेचनांजनंसंप्रचक्षते ॥

अर्थ–श्रमितमनुष्य, रुदनकेलेला, भयपावलेला, मद्यपान केलेला, नवज्वरी, अजीर्ण असतां, मूत्रादिकांचा अवरोध असतां यांचेठायीं अंजन करूंनये.

## वातीकरून अंजनाचें प्रमाण.

हरेणुमात्रांकुर्वीतवर्तितीक्ष्णांजनेभिषक् ॥
प्रमाणंमध्यमेध्यर्धीद्विगुणंतुमृदौभवेत् ॥

अर्थ–तीक्ष्ण अंजन जें त्याचेंठायीं हरेणुकेचे बियां इतके प्रमाणाची अंजनाची गोळी लांब वातीसारिखी करावी, तशीच मध्यम अंजनाचेठायीं हरेणुकेचे बियेपेक्षां जास्ती ह्मणजे दीड बियें इतके प्रमाणाची गोळी करावी, व मृदुअंजनाचेठायीं हरेणुकेचे दोहों बियें इतके प्रमाणाची गोळी वातीसारिखी लांब करावी.

## अंजनाविषयीं रसाचें प्रमाण.

रसक्रियातूत्तमास्यात्त्रिविडंगमिताहिता ॥
मध्यमाद्विविडंगास्याद्धीनात्वेकविडंगिका ॥

अर्थ–द्रवरूप अंजनाची मात्रा तीन वावडिंगाचे इतके प्रमाणाची डोळ्यांत घातली असतां ती उत्तम रसक्रिया जाणावी. दोन वावडिंगा इतके प्रमाणाची मात्रा डोळ्यांत घातली असतां ती मध्यम रसक्रिया जाणावी. एक वावडिंगा इतके प्रमाणाची मात्रा कनिष्ठ रसक्रिया जाणावी.

## वैरेचनअंजनाविषयीं चूर्णाचें प्रमाण.

वैरेचनिकचूर्णंतद्विशलाकंविधीयते ॥
मृदौतुत्रिशलाकंस्याच्चनस्नेहिकेंजने ॥

अर्थ– वैरेचनिक[1] चूर्ण जें तें द्विशलाक ह्मणजे सळईला दोन वेळ लावून ती सळई दोनदां डोळ्यांत आडवी फिरवून काढावी. मृदुअंजनाचेठायीं औषधांचें चूर्ण तीनवेळ सळई लावून तीनदां डोळ्यांत घालून काढावी, तूप आदिकरून जे स्नेहपदार्थ तिहिंशीं युक्त असें अंजन असतां सळईला चार वेळ चूर्ण लावून ती सळई चारवेळ डोळ्यांत घालून काढावी.

## सळईचें प्रमाण व ती कशी असावी तें.

मुखयोःकुंठिताश्लक्ष्णाशलाकाष्टांगुलोन्मिता ॥
अश्मजाधातुजावास्यात्कलायपरिमंडला ॥

अर्थ– पाषाणाची अथवा सुवर्णादिधातूंची अशी सळई आठ अंगुळ प्रमाणें करून तिचीं तोंडें गोलदार करावी. बारीक करूंनये, आणि तीं लांकेचे दाण्या प्रमाणें सुंदर वाटोळीं करावीं.

---

१ ज्या चूर्णेकरून डोळ्यांतून पाणी फार गळतें त्याला वैरेचनिक चूर्ण ह्मणतात.

## लेखनादिकांचेठायीं सळईचें प्रमाण.

ताम्रलोहाश्मसंजाताशलाकालेखनेमता ॥ सुवर्णरजतोद्भूता
शलाकास्नेहनेमता ॥ अंगुलीचमृदुत्वेनकथितारोपणेबुधैः ॥

अर्थ– लेखनअंजनाचेठायीं तांब्याची अथवा लोहाची अथवा पाषाणाची अशी सळई योजावी, स्नेहनअंजनाचेठायीं सोन्याची अथवा रुप्याची अशी सळई योजावी, अंगुळीला मृदुपणा असतो यास्तव रोपणअंजनाचेठायीं अंगुळीनें डोळयांत अंजन करावें.

## कोणत्यासमयीं व कोणत्याभागीं अंजन करावें तो प्रकार.

सायंप्रातर्वांजनंस्याचत्सदानैवकारयेत् ॥ नातिशीतोष्णवाता
भ्रवेलायांसंप्रशस्यते ॥ कृष्णभागादधःकुर्यादपांगंयावदंजनं ॥

अर्थ–सायंकाळीं व प्रातःकाळीं अंजन करावें, सर्वकाळ करूंनये फार शीतकाळ, फार उष्णकाल, वायु, मळभ, असतां अंजन करूंनये, डोळयांचे काळे बुबुळाचे अधोभागीं कोरीचेठायीं अंजन करावें.

## चंद्रोदयावर्ति.

शंखनाभिर्बिभीतस्यमज्जापथ्यामनःशिला ॥ पिप्पलीमरिचं
कुष्ठंवचाचेतिसमांशकं ॥ छागीक्षीरेणसंपिष्यवर्तिंकुर्याद्यवो
न्मितां ॥ हरेणुमात्रांसंघृष्यजलैःकुर्यादथांजनं ॥ तिमिरंमांस
वृद्धिंचकाचंपटलमर्बुदं ॥ रात्र्यंधंवार्षिकंपुष्पंवर्तिश्चंद्रोदया
जयेत् ॥

अर्थ–शंखनाभि, बेहडयाचे फळाचे आंतली बी, हरडे, मनशीळ, पिंपळी, मिरें कोष्ठ, वेखंड, हीं आठ औषधें समभाग घेऊन शेळीचे दुधांत बारीक वाटून जवप्रमाण गोळया वाती सारिख्या लांबोडया कराव्या, ह्यांस चंद्रोदयावर्ती असे नांव आहे. नंतर एक गोळी रेणुकेचे बि इतकी पाण्यांत उगाळून डोळयात अंजन करावें, तणेंकरून तिमिर, मांस वृद्धि, काचबिंदु, पटलगत रोग, अर्बुद, रातांधळें, व एक वर्षाचें फूल, हे रोग दूर होतात.

## फुलें, भूर इत्यादिक रोगांवर लेखनी वर्ति.

पलाशपुष्पस्वरसैर्बहुशःपरिभाविता ॥
करंजबीजवर्तिस्तुशुक्रादीन्शस्त्रवल्लिखेत् ॥

अर्थ–करंजाचे बियांचे चूर्ण करून पळसाचे फुलांचा रस काढून त्या चूर्णाला त्या रसाचीं बहुत वेळ पुटें देऊन बारीक खलून वातीसारख्या लांबट गोळया बांधाव्या,

नंतर ती गोळी पाण्यांत उगाळून डोळयांत अंजन करावें, तेणेंकरून शुक्र म्हणजे फुलें, मांसवृद्धि, भूर इत्यादिक रोग शस्त्रानें कापून काढिल्यासारिखे दूर होतात.

## दुसरा प्रकार.

समुद्रफेनसिंधूत्थशंखदक्षांडवल्कलैः ॥

शिग्रुबीजयुतैर्वर्तिःशुक्रादीन्शस्त्रवल्लिखेत् ॥

अर्थ— समुद्रफेण, सेंधव, शंख, कोंबडयाचे अंडयाचे वरचें टरफल, शेगव्याचें बीज, हीं पांच औषधें समभाग घेऊन पाण्यांत वाटून वातीसारखी लांबट गोळी करावी, आणि डोळयांत अंजन करावें, तेणेंकरून फुलें, भूर इत्यादिक रोग शस्त्रानें कापून काढिल्या सारिखे दूर होतात.

## लेखनीदंतवर्ति.

दंतैर्दंतिवराहोष्ट्रगोहयाजखरोद्भवैः ॥

शंखमुक्तांभोधिफेनयुतैःसर्वैर्विचूर्णितैः ॥

दंतवर्तिःकृताश्लक्ष्णाशुक्राणांनाशिनीपरा ॥

अर्थ—हत्ती, डुकर, बैल, घोडा, बोकड, आणि गाढव यांचे दांत, शंख, मोतीं, व समुद्रफेण या सार्‍यांचें चूर्ण करून पाण्यांत खलून वातीसारखी गोळी करावी, या गोळीला दंतवर्ति ह्मणतात. नंतर ती गोळी पाण्यांत उगाळून डोळ्यांतील फुलें दूर होण्या विषयीं अंजन करावें.

## तंद्रा दूर होण्याविषयीं लेखनीवर्ति.

नीलोत्पलंशिग्रुबीजनागकेशरकंतथा ॥

एतत्कल्कैःकृतावर्तिरतितंद्राविनाशयेत् ॥

अर्थ— निळें कमळ, शेवग्याचे बीज, नागकेशर हे तीन वानें समभाग घेऊन पाण्यांत खलून लांबोडी गोळी करून पाण्यांत उगाळून डोळयावर झांपड पडये ती दूर होण्याविषयीं अंजन करावें.

## रोपणीकुसुमितावर्ति.

तिलपुष्पाण्यशीतिःस्युःषष्टिसंख्याकणाकणाः ॥ जातीकुसुमपंचाशत्मरिचानिचषोडश ॥ सूक्ष्मंपिष्ट्वाजलेवर्तिः कृताकुसुमिकाभिधा ॥ तिमिरार्जुनशुक्राणांनाशिनीमांसवृद्धिल्हत् ॥ एतस्याश्चांजनेमात्राप्रोक्तासार्धहरेणुका ॥

अर्थ— तिळांचीं फुलें ऐशीं, पिंपळीचे आंतले दाणे साठ, जाईचीं फुलें पन्नास व

मिऱ्यें सोळा या साऱ्यांचें चूर्ण करून पाण्यांत वाटून गोळी करावी, हिला कुसुमिका वर्ति ह्मणतात. ही गोळी दीड रेणुकेचे बियां इतकी पाण्यांत उगाळून डोळ्यांत अंजन केलें असतां तिमिर, अर्जुन, फुलें व मांसवृद्धि हे रोग दूर होतात.

## रातांधळें दूर करण्याविषयीं वर्ति.

रसांजनंहरिद्रेद्वेमालतीनिंबपल्लवः ॥
गोशकृद्रससंयुक्तावर्तिर्नक्तांध्यनाशिनी ॥

अर्थ– रसांजन, हळद, दारुहळद, चमेलीचा पाला, निंबाचा पाला, हे पांच वानें समभाग घेऊन गाईचे शेणाचे रसांत बारीक वाटून गोळी करून रातांधळे दूर होण्याविषयीं डोळ्यांत अंजन करावें.

## नेत्रस्रावावर स्नेहनीवर्ति.

धात्र्यक्षपथ्याबीजानिएकद्वित्रिगुणानिच ॥ पिष्ट्वावर्तिंजलैः
कुर्यादंजनंद्विहरेणुकं ॥ नेत्रस्रावंहरत्याशुवातरक्तरुजंतथा ॥

अर्थ–आंवळ्याचे आंतले बीज एक भाग, बेहळ्याचे फळाचे आंतले बीज दोनभाग, हरड्याचे आंतले बीज तीनभाग हीं सारीबीजे एकत्रकरून पाण्यांत बारीक वाटून लांबोडी गोळी करावी, नंतर ती गोळी रेणुकेचे दोन बिया इतकी पाण्यांत उगाळून डोळ्यांत अंजन करावें, तेणें करून नेत्रांतून जलस्राव होतो, तो लवकर दूर होतो, व वातरक्त संबंधी पीडा दूर होये.

## रसक्रिया.

तुत्थमाक्षिकसिंधूत्थसिताशंखमनःशिलाः ॥ गैरिकोदधिफेनं
चमरिचंचेतिचूर्णयेत् ॥ संयोज्यमधुनाकुर्यादंजनार्थरसक्रियां ॥
वर्त्मरोगार्मतिमिरकाचशुक्रहरांपरां ॥

अर्थ– मोरचूत, स्वर्णमाक्षिक, सैंधव, खडीसाखर, शंख, मनशीळ, गेरु, समुद्रफेण, मिऱ्यें, हे नऊ वानें समभाग घेऊन बारीक चूर्ण करून मधांत कालवून डोळ्यांत अंजन करावें, येणेंकरून पाण्याचे रोग, अर्मरोग, तिमिर, काचबिंदु, व फुलें हे रोग दूर होतात.

## फुलें दूर होण्याविषयीं रसक्रिया.

वटक्षीरेणसंयुक्तोमुख्यःकर्पूरजःकणः ॥
क्षिप्रमंजनतोहंतिकुसुमंचद्विमासिकं ॥

अर्थ–वडाचे चिकांत कापूर वाटून डोळ्यांत अंजन केलें असतां दोन महिन्याचें फूल असलें तरी लवकर दूर होतें.

## फार झोंप येत्ये ती दूर होण्याविषयीं लेखनी रसक्रिया.

क्षौद्राश्वलालासंपृष्टैर्मरिचैर्नेत्रमंजयेत् ॥
अतिनिद्राशमंयातितमःसुर्योदयादिव ॥

अर्थ– मध व घोड्याची लाळ या दोहोंत मिर्थे वाटून फार झोंप येत्ये ती दूर होण्याविषयीं डोळ्यांत अंजन करावें, याविषयीं दृष्टांत. सूर्योदय झाला असतां जसा अंधार दूर होतो, तशी या अंजनेंकरून झोंप लवकर दूर होत्ये.

## डोळ्यांवर झांपडपडत्ये ती दूर होण्याविषयीं रस क्रिया.

जातीपुष्पंप्रवालंचमरीचंकटुकीवचा ॥
सैंधवंबस्तिमूत्रेणपिष्टंतंद्राघ्नमंजनं ॥

अर्थ जाईची फुलें, तिचे अंकूर आणि मिर्थे, कटुकी, वेखंड व सैंधव हीं औषधें समभाग घेऊन बोकडाचे मुतांत वाटून डोळ्यांवर झांपड पडते ती दूर होण्याविषयीं अंजन करावें.

## सन्निपातावर लेखनी रस क्रिया.

शिरीपबीजगोमूत्रकृष्णामरिचसैंधवैः ॥
अंजनंस्यात्प्रबोधायसरसोनशिलावचैः ॥

अर्थ– शिरिस, पिंपळी, मिर्थे, सैंधव, लसूण, मनशीळ, वेखंड, हीं सात औषधें समभाग घेऊन गोमूत्रांत वाटून सन्निपातापासून जी संज्ञा नष्ट होत्ये ती दूर होऊन मनुष्य सावध होण्याविषयीं हें डोळ्यांत अंजन करावें.

## तिमिरादिक रोगांवर रोपणी रसक्रिया.

गुडूचीस्वरसःकर्पःक्षौद्रंस्यान्माषकोन्मितं ॥ सैंधवंक्षौद्रतुल्यं
स्यात्सर्वमेकत्रमर्दयेत् ॥ अंजन्नयेयनंतेनपिल्लार्मंतिमिरंजयेत् ॥
काचंकंडूंलिंगनाशंशुक्लकृष्णगतान्गदान् ॥

अर्थ– गुळवेलीचा अंगरस १ कर्ष प्रमाण काढून त्यांत मध व सैंधव एकेक मासा घालून चांगलें मर्दन करून डोळ्यांत अंजन करावें. तेणेंकरून पिलार्म, तिमिर, कांच बिंदु, कंडू, लिंगनाश, डोळ्यांचे पांढरे भाग्यावरील व काळे बुबुळावरील हे सर्वरोग दूर होतात.

## अंजनाविषयीं पुनर्नवेचीं अनुपानें.

दुग्धेनकंडूंक्षौद्रेणनेत्रस्रावंचसर्पिषा ॥ पुष्पंतैलेनतिमिरंकांजि
केननिशांधतां ॥ पुनर्नवाजयेदाशुभास्करस्तिमिरंयथा ॥

अर्थ– पुनर्नवा दुधांत उगाळून डोळयांत अंजन केलें असतां डोळयांची कंडू दूर होते, मधांत उगाळून अंजन केलें असतां नेत्रस्राव दूर होतो, तुपांत उगाळून अंजन केलें असतां फुलें जातात. तेलांत उगाळून अंजन केलें असतां तिमिर जातें. कांजीत उगाळून अंजन केलें असतां रातांधळें दूर होतें. याविषयीं दृष्टांत, सूर्य जसा काळोखा-चा लवकर नाश करितो, तशी ही पुनर्नवा अनुपानाचे भेदेंकरून हे सर्व रोग दूर करिते.

## नेत्रस्रावावर रोपणी रसक्रिया.

बब्बूलदलनिःक्काथोलेहीभूतस्तदंजनात् ॥
नेत्रस्रावंजयत्येषमधुयुक्तोनसंशयः ॥

अर्थ– बाभुळीचे पानांचा काढा घण होई तोंपर्यंत करून त्यांत थोडी मध घालून डोळयांत अंजन करावें, तेणेंकरून नेत्रांचेठायीं जो जळस्राव होतो तो खचित दूर होतो

## दुसरा प्रकार.

हिज्जलस्यफलंघृष्ट्वापानीयेनित्यमंजनं ॥
चक्षुःस्रावोपशांत्यर्थंकार्यमेतन्महौषधं ॥

अर्थ–हिंगण बेटाचे फळ पाण्यांत उगाळून नेत्रस्राव दूर होण्याविषयीं नित्य डोळयांत अंजन करावें.

## नेत्र प्रसन्न होण्याविषयीं स्नेहनी रसक्रिया.

कतकस्यफलंघृष्ट्वामधुनानेत्रमंजयेत् ॥
इषत्कर्पूरसहितंस्मृतंनेत्रप्रसादनं ॥

अर्थ– निर्मळीचें फळ मधांत उगाळून त्यांत थोडा कापूर मिश्रित करून नेत्र प्रसन्न होण्याविषयीं अंजन करावें.

## शिरोत्पातरोगावर अंजन.

सर्पिःक्षौद्रंचांजनंस्यात्शिरोत्पातस्यशांतये ॥

अर्थ– तूप व मध हीं एकत्रकरून यांचे डोळयांत अंजन करावें, तेणेंकरून नेत्ररोगामध्यें शिरोत्पात रोग आहे तो दूर होतो.

## आंधळेपण दूर होण्याविषयीं रसक्रिया.

कृष्णसर्पवसाशंखःकतकाफलमंजनं ॥
रसक्रियेयमचिरादंधानांदर्शनप्रदा ॥

अर्थ– काळे सर्पाचा मांसस्नेह, शंख व निर्मळीचें बीज हीं तिन्ही एकत्र खलून डोळयांत अंजन करावें, येणेंकरून आंधळे मनुष्याला लवकर दिसूं लागतें.

## लेखनचूर्णांजन.

दक्षांडत्वक्शिलाकाचैःशंखचंदनगैरिकैः ॥
द्रवैरंजनयोगोयंपुष्पार्मादिविलेखनः ॥

अर्थ–कोंबड्याचे अंड्याची टरफलें, मनशीळ, पांढरीकांच, शंख, श्वेतचंदन, सोनगेरू, हे सहा वान समभाग घेऊन बारीकचूर्णकरून डोळ्यांत अंजन करावें. येणेंकरून फुलें व मांसार्मादिक रोग दूर होतात.

## रातांधळें दूर होण्याविषयीं लेखनचूर्णांजन.

कणाच्छागयकृन्मध्येपक्कातद्रसपेषिता ॥
अचिराद्धंतिनक्तांध्यंतद्वत्सक्षौद्रगूपणं ॥

अर्थ–बोकडाचे काळजाचे मांसामध्यें पिंपळी घालून त्यांचा निखाऱ्यावर पाककरून नंतर त्या मांसाचा रस व पिंपळी हीं दोन्हीं एकत्र वाटून रातांधळें दूर होण्याविषयीं डोळ्यांत अंजन करावें.

## कंडू, काचबिंदु इत्यादिकांवर लेखन चूर्णांजन.

शाणार्धमरिचंद्वौचपिपल्यर्णवफेनयोः ॥ शाणार्धंसैंधवंशाणान
वसौवीरकांजनं ॥ पिष्टंसुसूक्ष्मंचित्रायांचूर्णांजनमिदंशुभं ॥
कंडूकाचकफार्तानांमलानांचविशोधनं ॥

अर्थ–मिऱ्यें अर्धशाणप्रमाण, पिंपळी आणि समुद्रफेण हीं दोन दोन शाणप्रमाण, सैंधव अर्धशाणप्रमाण, सुर्मा नऊ शाणप्रमाण, हीं सारीं औषधें ज्या दिवशीं चित्रा नक्षत्र असेल तद्दिवशीं चांगलें बारीक वाटून चूर्ण करावें, नंतर या चूर्णाचें डोळ्यांत, अंजन करावें, येणेंकरून कंडू व कांचबिंदु हे दूर होतात, कफेंकरून पीडित नेत्र जे त्यांचें व मळाचें शोधन होतें.

## सर्वनेत्र रोगांवर मृदु चूर्णांजन.

शिलायारसकंपिष्ट्वासम्यगाप्लाव्यवारिणा ॥ गृण्हीयात्तज्जलं
सर्वंत्यजेच्चूर्णमधोगतं ॥ शुष्कंचतज्जलंसर्वंपर्पटीसन्निभंभवे
त् ॥ विचूर्ण्यभावयेत्सम्यक्त्रिवेलंत्रिफलारसैः ॥ कर्पूरस्यर
जस्तत्रदशमांशेननिक्षिपेत् ॥ अंजयेन्नयनेतेनसर्वदोषहरंहि
तत् ॥ सर्वरोगहरंचूर्णंचक्षुषोःसुखकारिच ॥

अर्थ–कलखापरी दगडाचें खलांत चांगली खलून काजळासारीखें बारीक चूर्ण करावें, नंतर तें चूर्ण पाण्यांत घालून तें पाणी चांगलें ढवळून खालीं जाडें चूर्ण राहीलें तें

टाकून तें सारें पाणी दुसरे पात्रांत घ्यावें नंतर तें पाणी आटून आटून घण करून वाळवून त्याच्या खरपुड्या होतात, त्यांचें चूर्ण करून त्या चूर्णाला त्रिफळेचे काढ्याचीं तीन पुटें देऊन नंतर त्या चूर्णाचे दाहावा हिस्सा कापूर त्या चूर्णांत मेळऊन डोळयांत अंजन करावें, येणेंकरून सर्वदोष व सर्व रोग दूर होऊन डोळ्यांस सुख होतें.

## सर्व नेत्ररोगांवर सौविरांजन चूर्ण.

अग्नितप्तंचसौवीरंनिषिंचेत्त्रिफलारसैः ॥ सप्तवेलंतथास्तन्यैः स्त्रीणांसिक्तंविचूर्णितं ॥ अंजयेन्नयनेतेनप्रत्यहंचक्षुषोर्हितं ॥ सर्वानक्षिविकारांस्तुहन्यादेतन्नसंशयः ॥

अर्थ– सुरमा अग्नीवर तापवून त्याजवर त्रिफळेचे काढ्याचे प्रोक्षण करून सुरमा थंड करावा. याप्रमाणें सातवेळ तो सुरमा तापवून सातवेळ त्या काढ्याचा आपका मारून थंड करावा. याचरीतीनें त्या सुरम्यावर स्त्रीचे दुधाचा सातवेळ आपका मारून नंतर त्या सुरम्याचें बारीक चूर्ण करून डोळ्यांत अंजन करावें. तें अंजन डोळयांना फार हितकारक होतें; आणि त्यापासून सर्व नेत्रविकार दूर होतात, यांत संशय नाहीं.

## शिशाला पुटें देऊन त्याची सळई करावयाची तो प्रकार.

त्रिफलाभृंगशुंठीनांरसैस्तद्वच्चसर्पिषा ॥ गोमूत्रमध्वजाक्षीरैः सिक्तोनागःप्रतापितः ॥ तच्छलाकाभवत्येवसर्वान्नेत्रभवान् गदान् ॥

अर्थ– त्रिफळेचा काढा करून माक्याचा अंगरस, सुंठीचा काढा, तूप, गोमूत्र, मध, शेळीचे दूध या एकेकामध्यें सात सात वेळ शिसें तापवून रस करून ओतावें. नंतर त्या शिशाची सळई डोळयांत फिरविली असतां संपूर्ण नेत्ररोग दूर होतात.

## प्रत्यंजन करण्याचें विधान.

गतदोषमपेताश्रुसंपश्यन्सम्यगंभसि ॥ प्रक्षाल्याक्षियथादोषंकार्यंप्रत्यंजनंततः ॥

अर्थ– त्या शिशाच्या सळईनें डोळयांत अंजन करून त्या पासून दोष दूर होऊन डोळयांतून पाणी पडून गेल्यानंतर रोगी याकरवून क्षणभर थंडपाण्याकडे अवलोकन करवून नंतर त्याचे डोळे पाण्यानें धुवून फिरून डोळयांत प्रत्यंजन करावें. तें प्रत्यंजन पुढील श्लोकांत सांगल.

## सदोष नेत्र असतां निषेध.

नचानिर्गतदोषेक्षिणिधावनंसंप्रयोजयेत् ॥ प्रत्यंजनंनीक्षणमम्नेनेत्रेचूर्णःप्रसादनः ॥

अर्थ—डोळयांतून दोष निघाले असतां डोळे पाण्यानें धुवूंनये; आणि तीक्ष्ण अंजन करून डोळे संतप्त झाले असतां त्याचेठायीं प्रत्यंजन चूर्ण करावें. तें पुढील श्लोकांत सांगेल अथवा प्रसादन चूर्ण करावें.

## प्रत्यंजन चूर्ण.

शुद्धेनागेद्रुतेतुल्यंशुद्धंसूतंविनिक्षिपेत् ॥ कृष्णांजनंतयोस्तुल्यं सर्वमेकत्रचूर्णयेत् ॥ दशमांशेनकर्पूरंतस्मिन्चूर्णेप्रदापयेत् ॥ एतत्प्रत्यंजनंनेत्रगदजिन्नयनामृतं ॥

अर्थ—शिसें शुद्ध करून अग्नीवर पातळ करावें; आणि याचे समभाग शुद्ध पारा घेऊन त्यांत घालावा. नंतर त्या दोहोंचे समभाग सुरमा घेऊन दोहोंत मिळवून नंतर साऱ्यांचें चूर्ण करून त्या चूर्णाचा दाहावा हिस्सा भीमसेनी कापूर त्या चूर्णांत मिळवावा. याला प्रत्यंजन चूर्ण ह्मणतात. येणेंकरून संपूर्ण नेत्ररोग दूर होतात; आणि हें चूर्ण नेत्रांस अमृतासारिखें सुख देतें.

## सर्पाचें विष दूर होण्याविषयीं अंजन.

जयपालस्यमज्जांचभावयेन्निंबुकद्रवैः ॥ एकविंशतिवेलंतत्त तोवर्ति प्रकल्पयेत् ॥ मनुष्यलालयाघृष्टाततोनेत्रेतयांजयेत् ॥ सर्पदष्टविषंजित्वासंजीवयतिमानवं ॥

अर्थ— जेपाळाचे बियांचे आंतल्याबियां घेऊन त्यांला निंबूचे रसाचीं एकवीस पुटें देऊन बारीक खलून लांबोडी गोळी करावी, नंतर ती गोळी मनुष्याचे लाळेंत उगाळून डोळयांत अंजन करावें, तेणें करून सर्प चाऊन विषबाधा होत्ये ती दूर होऊन मनुष्य सावध होतो.

## हाताचे तळव्यानीं डोळे पुसिले असतां गुण.

भुत्क्वापाणितलंघृष्ट्वाचक्षुषोर्यदिदीयते ॥
जातरोगाविनश्यंतितिमिराणितथैवच ॥

अर्थ— भोजन केल्यानंतर ओले हात असतांच हाताचे तळवे एकाशीं एक घांसून डोळयानां लावावे. तेणें करून उत्पन्न झाले जे नेत्र रोग व तिमिररोग हे दूर होतात.

## शीतोदकेंकरून सेचनाचा प्रकार.

शीतांबुपूरितमुखःप्रतिवासरंयःकालत्रयेणनयनद्वितयंजले न ॥ आसिंचतिध्रुवमसौनकदाचिदक्षिरोगव्यथाविधुरतां भजतेमनुष्यः ॥

अर्थ–प्रतिदिवशीं दिवसांत तीनवेळ थंडपाण्याने चूळ भरून आणि दुसरे थंडपाण्याने डोळे तीनवेळ शिंपावे तेणेंकरून अति दुःख देणारी नेत्ररोग संबंधी पीडा ती कधींही होत नाहीं.

## पंचकषायरूप औषधकथन.

अथातःस्वरसःकल्कःक्वाथश्चहिमफांटकौ ॥
ज्ञेयाःकषायाःपंचैतेलघवःस्युर्यथोत्तरम् ॥

अर्थ– आंगरस, कल्क, क्वाथ, हिम, फांट या पांचानां काढे ह्मणतात, व हे एकापेक्षां एक हलके जाणावे. उदाहरण, आंगरसापेक्षां कल्क हलका, कल्कापेक्षां काढा हलका; याप्रकारें जाणावे, रोग गणनानंतर, कषायादिकांचें कथन युक्त ह्मणून अथा असे श्लोकांत पद घातलें आहे.

## त्या पांचामध्यें प्रथम आंगरसलक्षण. ॥

अहतात्तत्क्षणाकृष्टात्द्रव्यात्क्षुण्णात्समुद्धरेत् ॥
वस्त्रनिष्पीडितोयःसरसःस्वरसउच्यते ॥

अर्थ– कीड, अग्नि इत्यादिकें करून दूषित नव्हे अशी वनस्पति आणून, त्याच वेळे कुटून, फडक्यांत गाळून जो रस निघतो तो, आंगरस जाणावा.

## आंगरसाचा दुसरा प्रकार.

कुडवंचूर्णितंद्रव्यंक्षिप्तंचद्विगुणेजले ॥
अहोरात्रंस्थितंतस्माद्भवेद्वारसउत्तमः ॥

अर्थ– कुडवप्रमाण सुकें औषध आणून, चूर्ण करून त्याचे दुप्पट मडक्यांत पाणी घालून त्यांत तें चूर्ण दिवसरात्र भिजत घालावें; नंतर दुसऱ्या दिवशीं पाणी गाळून घ्यावें. असाही एक प्रकार आंगरसाचा आहे.

## तिसराप्रकार.

अदायशुष्कद्रव्यंवास्वरसानामसंभवे ॥
जलेष्टगुणितेसाध्यंपादशिष्टंचगृह्यते ॥

अर्थ– जर औषधींचा सुकल्यामुळें स्वरस निघत नाहीं, तर ती सुकलेली औषधी कुटून तिच्या आठपट पाणी घालून मंदाग्नीवर शिजऊन चतुर्थांश उदक राहिल्या नंतर उतरून तो रस गाळून घ्यावा.

स्वरसस्यगुरुत्वाच्चपलमर्धंप्रयोजयेत् ॥
निःशोषितंचाग्निसिद्धंपलमात्रंरसंपिबेत् ॥

अर्थ– कोणत्याही औषधींच्या स्वरसांत जडपणा अधिक आहे; ह्मणून तो रस औ-षधांत घालणें असल्यास अर्धपळ घालावा; व सुकऊन काढिला किंवा अग्नीवर काढा करून काढिलेला एकपल प्राशन करावा.

## यवागूचें विधान.

साध्यंचतुःपलंद्रव्यंचतुःषष्टिपलेजले ॥

तत्क्वथिनार्धशिष्टेनयवागूंसाधयेद्धनाम् ॥

अर्थ– च्यारपळप्रमाण औषध घेऊन थोडें कुटून त्यांत ३४ पळें पाणी घालून अर्धे पाणी राही तों पर्यंत कढवून गाळून त्यांत दुसरें द्रव्य तंदुलादिक जें सांगेल तें मेळ-ऊन फिरून कढऊन घणसर करावें याला यवागू ह्मणतात.

## विलेपीलक्षण.

विलेपीचघनासिक्थासिद्धानीरेचतुर्गुणे ॥

बृंहणीतर्पणीहृद्यामधुरापित्तनाशिनी ॥

अर्थ– चतुर्गुणित पाणी घालून कढवून लापसी सारखी घण व चिकट अशी करावी; तिला विलेपी असें ह्मणतात, ती विलेपी धातूची वृद्धि करणारी, शरीर पुष्ट करणारी, हृदयास हितकारक, व मधुर होत्साती पित्ताचा नाश करणारी अशी जाणावी.

## पानादिकल्पना.

क्षुण्णंद्रव्यपलंसाध्यंचतुःषष्टिपलेंबुनि ॥

अर्धशिष्टंचतद्देयंपानेभक्तादिसंविधौ ॥

अर्थ– एकपळप्रमाण औषध आणून थोडें कुटून त्यांत ६४ पळें पाणी घालून अर्धे पाणी राही तोंपर्यंत कढवून, नंतर गाळून तहान लागली असतां थोडें थोडें द्यावें; व भोजनसमयीं द्यावयाचा प्रकार पुढें सांगेल.

मधुश्वेतागुडक्षारान्जीरकंलवणंतथा ॥

घृतंतैलंचचूर्णादीन्कोलमात्रान्रसेक्षिपेत् ॥

अर्थ–पांढरा मध, गुळ, क्षार, जिरें, लवण, तूप, तैल, व इतर चूर्णें हीं रसांत घालणे जाहल्यास साहामासे पर्यंत घालावीं.

## प्रमथ्याचें विधान.

प्रमथ्याप्रोच्यतेद्रव्यपलात्कल्कीकृतात्भृशं ॥

तोयेष्टगुणितेतस्याःपानमाहुःपलद्वयं ॥

अर्थ–एकपळप्रमाण औषध आणून वाटून कल्क करावा; सुकें औषध असल्यास

पाण्यांत वाटून कल्क करावा; त्यांत आठपट पाणी घालून दोनपळप्रमाण पाणी राही तो पर्यंत अळवावें; याला प्रमथ्या ह्मणतात; हिचे घ्यावयाचें प्रमाण दोन पळ जाणावें.

## यूपाचें विधान.

कल्कद्रव्यपलंशुंठीपिप्पलीचार्धकार्षिकी ॥

वारिप्रस्थेनविपचेत्सद्रवोयूपउच्यते ॥

अर्थ– कल्काचें औषध सामान्य एकपळप्रमाण घ्यावें; व ज्या प्रयोगीं सुंठ व पिंपळी आहेत, त्या प्रयोगीं तिखट आहेत ह्मणोन अर्धा अर्धा कर्षप्रमाण घ्यावीं; अथवा दोन्ही मिळोन अर्धा कर्ष घ्यावीं; नंतर त्यांचा कल्क करून, त्यांत पाणी एक प्रस्थ घालून कढवून किंचित् घणसर पेजेसारखें करावें, त्यास यूप असे ह्मणतात.

## पेयालक्षण.

द्रवाधिकास्वल्पसिक्थाचतुर्दशगुणेजले ॥ सिद्धापेयाबुधैर्ज्ञे

यायूपःकिंचिद्घनःस्मृतः ॥ पेयालघुतराज्ञेयाग्राहिणीधातुपुष्टि

दा ॥ यूपोबल्यस्ततःकंठयोलघुपाकःकफापहः ॥

अर्थ–द्रव्याचे चतुर्गुण पाणी घालून पातळ पेजेसारखें व थोडें चिकट होई तो पर्यंत कढवावें, त्याला पेया असें ह्मणतात. पेयेपेक्षां किंचित् जें घण असतें त्याला यूष ह्मणतात; व ती पेया बहुत हलकी असून मलांदिकांचे स्तंभन करणारी व धातुपुष्ट करणारी अशी जाणावी. व तो यूष बल देणारा, कंठास हितकारक, हलका, व कफाला दूर करणारा असा जाणावा.

## गुडूचीस्वरस.

अमृतायारसःक्षौद्रयुक्तःसर्वप्रमेहजित् ॥

हरिद्राचूर्णयुक्तोवारसोधाञ्याःसमाक्षिकः ॥

अर्थ–गुळवेलीचा स्वरस मध घालून भक्षिल्यास सर्व प्रमेहनाश करील. तसाच आंवळीचा स्वरस हळदीची पूड व मध घालून घेतला असतांही सर्वप्रमेहनाश करील

## पुटपाकाचा विधि.

पुटपाकस्यकल्कस्यस्वरसोगृह्यतेयतः ॥

अतस्तुपुटपाकानांयुक्तिरत्रोच्यतेमया ॥

अर्थ–पुटपाक व कल्क या दोहोंचेही अंगरस घेतात, यास्तव पुटपाकाची युक्ति सांगतो

## पुटपाकाची कृति.

पुटपाकस्यमात्रेयंलेपस्यांगारवर्णता ॥ लेपंचद्व्यंगुलंस्थूलंकु

यद्वांगुष्ठमात्रया ॥ काश्मरीवटजंब्वादिपत्रैर्वेष्टनमुत्तमम् ॥ पलमात्ररसोग्राह्यःकर्षमात्रंमधुक्षिपेत् ॥ कल्कचूर्णद्रवाद्यास्तु देयास्वरसवद्बुधैः ॥

**अर्थ**—पुटपाकाच्या मात्रेचें प्रमाण तो असा करावा कीं वर केलेला लेप अग्नीनें लाल इंगळासारिखा होई तो पर्यंत भाजावा; व द्रव्यावर लेप देणें तो दोन अंगुळें अथवा एक अंगुळ द्यावा; आणि लेपाच्या अगोधर ओलीं पानें गुंडाळावयाचीं तीं. शिवण, वड, जांबूळ, इत्यादिकांचीं उत्तम; व पुटपाकांत रस घालणें असल्यास चार तोळे, व तोळाभर मध, आणि कल्क, चूर्ण, द्रवादिक स्वरसाच्या माना प्रमाणें उत्तम ज्ञात्या वैद्यानीं घालावीं

## कुडयाचा पुटपाक सांगतों.

तत्कालंकृष्णकुटजत्वचंतंडुलवारिणा ॥ पिष्टांचतुःपलमितां जंबूपल्लववेष्टितां ॥ सूत्रबद्धांचगोधूमपिष्टेनपरिवेष्टितां ॥ लिप्तांचघनपंकेनगोमयैर्वन्हिनादहेत् ॥ अंगारवर्णांचमृदंदृष्ट्वाव न्हेःसमुद्धरेत् ॥ ततोरसंगृहीत्वाचशीतंक्षौद्रयुतंपिबेत् ॥ जयेत्सर्वानतीसारान्दुस्तरान्मुचिरोत्थितान् ॥

**अर्थ**—कुडयाचा पुटपाक काळया कुडयाची साल ताजी ओली आणून तांदुळाचें धुवणांत वाटून सोळा तोळे घेऊन त्याचा गोळा करून जांबळीच्या ओल्यापानांनीं गुंडाळून सुतानें बांधून गव्हांच्या पिठाचा लेप करून नंतर पातळसर माती भिजवून आंगुळभर जाडा लेप करावा; आणि तो गोवऱ्यांच्या रसाण्यांत घालून भाजावा; आणि इंगळा सारिखा लाल जाहाल्यानंतर काढावा; आणि निवाल्यानंतर त्यांतून रस घेऊन त्या थंड रसांत मध घालून प्यायला असतां तो कधीं जाणारा नव्हे; व फारदिवसांचा असाही अतिसार असला, तथापि त्याचाही नाश करील.

## कल्काची कल्पना.

द्रव्यमार्द्रंशिलापिष्टंशुष्कंवासजलंभवेत् ॥ प्रक्षेपावापकल्कास्तेतन्मानंकर्षसंमितम् ॥ कल्केमधुघृतंतैलंदेयंद्विगुणमात्रया ॥ सितागुडौसमौदद्यात्द्रवादेयाश्चतुर्गुणाः ॥

**अर्थ**—ओलें औषध आणून चटणी सारिखें बारीक वाटावें, व सुकें औषध असल्यास पाणी घाळून बारीक वाटावें, त्याला कल्क असें ह्मणतात; त्याचें घ्यावयाचें मान कर्ष प्रमाण जाणावें व त्याचीं नामें दोन प्रक्षेप आणि आवाप, अशीं जाणावीं; कल्कांत मध,तूप,

व तेल हीं घालावयाचीं असतां, कल्काचे दुप्पट घालावीं; व साखर आणि गूळ हे पदार्थ घालावयाचे असतां कल्काचे समान घालावे; व दूध पाणी आदीकरून पातळ पदार्थ घालावयाचे असतां कल्काचे चतुर्गुणीत घालावे.

## तांदुळांचे धुणाची क्रिया.

कंडिततंडुलपलंजलेष्टगुणितेक्षिपेत् ॥
भावयित्वाजलंग्राह्यंदेयंसर्वत्रकर्मसु

**अर्थ**—एक पळ प्रमाण सडीक तांदूळ घेऊन त्यांत आटपट पाणी घालून हातानें धुवावे, नंतर ते पाणी सर्व कर्माचेठायीं योजावें.

## दुसरा अलूरपुटपाक.

अलूरत्वक्कृतश्चैवपुटपाकोग्निदीपनः ॥
मधुमोचरसाभ्यांचयुक्तःसर्वातिसाराजित् ॥

**अर्थ**—टेंटूची साल ओली आणून त्याच वेळेस कुटून गोळा करून, पूर्वी पुटपाकाची कृति सांगितली आहे, त्या रितीनें कृति करून अग्नि द्यावा; नंतर तो गोळा बाहेर काढून पिळून रस काढून त्यांत मध व मोचरसाचें चूर्ण घालून द्यावा; तेणेंकरून सर्व प्रकारचे अतिसार नाश होतात.

## काढ्याची कल्पना.

पानीयंषोडशगुणंक्षुण्णेद्रव्येपलेक्षिपेत् ॥ मृत्पात्रेक्काथयेत्ग्राह्य
मष्टमांशावशेषितं ॥ तज्जलंपाययेद्धीमान्कोष्णंमृद्वग्निसाधितं॥
शृतःक्काथःकषायश्चनिर्य्यूहःसनिगद्यते ॥ आहाररसपाकेचसं
जातेद्विपलोन्मितम् ॥ वृद्धवैद्योपदेशेनपिबेत्क्काथंसुपाचितम् ॥

**अर्थ**—एकपळ प्रमाण औषध आणून थोडें थोडें कुटून त्या औषधाचें सोळापट पाणी घेऊन औषध व पाणीहीं दोन्ही मडक्यांत घालून आठवा हिस्सा पाणी राही तों पर्यंत हलका हलका अग्नि देऊन काढा करावा; नंतर तो काढा खाली उतरून गाळून थोडा थोडा गरम आहे तोंच रोग्यास द्यावा. रोगी यानें चांगलें अन्नाचें पचन जाहल्या नंतर वृद्धवैद्यांस विचारून काढा द्यावा. शृत, क्काथ, कषाय, निर्य्यूह, हे च्यार काढ्याचे पर्यायशब्द जाणावे.

## काढ्यांत साखर व मध घालावयाचें प्रमाण.

क्काथेक्षिपेत्सितामंशैश्चतुर्थाष्टमषोडशैः ॥
वातपित्तकफातंकेविपरीतंमधुस्मृतं ॥

अर्थ—काढ्यामध्यें साखर घालावयाची ती, वातरोग असतां काढ्याचे चवथाई घालावी, पित्तरोग असतां आठवा हिस्सा घालावी, कफरोग असतां सोळावा हिस्सा घालावी; आणि मध घालणें तो उलट क्रमानें घालावा.

## मंथ.

मंथोपिफांटभेदःस्यात्तेनचात्रैवकथ्यते ॥

अर्थ—मंथही फांटाचा भेद आहे; ह्मणून एथेंच सांगतो.

## मंथाचा विधि.

जलेचतुःपलेशीतेक्षुण्णंद्रव्यंपलंक्षिपेत् ॥
मृत्पात्रेमंथयेत्सम्यक्तस्माच्चद्विपलंपिबेत् ॥

अर्थ— एकपलप्रमाण औषध आणून चांगलें कुटून मग चारपळें थंड पाणी मडक्यांत घालून त्यांत औषध टाकून चांगलें मंथन करून, नंतर तें पाणी गाळून घ्यावें त्याला मंथ असें ह्मणतात. त्या मंथाचें प्यावयाचें मान दोन पलप्रमाण जाणावें.

## फांटकल्पना.

क्षुण्णेद्रव्यपलेसम्यक्जलमुष्णंविनिक्षिपेत् ॥ मृत्पात्रेकुडवोन्मानंततस्तुस्रावयेत्पटात् ॥ सस्याच्चूर्णद्रवःफांटस्तन्मानंद्विपलोन्मितं ॥ मधुश्वेतागुडादींश्चक्काथवत्तत्रनिक्षिपेत् ॥

अर्थ— एकपलप्रमाण औषध आणून चांगलें कुटून, एककुडवप्रमाण पाणी ढवळून नंतर तें पाणी वस्त्रानीं गाळून घ्यावें. याला फांट व चूर्णद्रव असें ह्मणतात. त्या फांटाचें प्यावयाचें मान दोनपलप्रमाण जाणावें व फांटांत मध, साखर व गूळ आदिकरून आणखी पदार्थ घालावयाचे असल्यास, जाप्रमाणें काढ्यांत घालावयास सांगितले आहेत त्याप्रमाणें घालावें.

## हिमकल्पना.

क्षुण्णंद्रव्यपलंसम्यक्षड्भिर्नीरपलैःप्लुतं ॥ निशोषितंहिमःसस्यात्तथाशीतकषायकः ॥ तन्मानंफांटवज्ज्ञेयंसर्वत्रैपसुनिश्चयः ॥

अर्थ एक पळप्रमाण औषध आणून चांगलें कुटून मग सहापळें पाणी मडक्यांत घालून त्यांत तें औषध मेळवून, रात्रींस भिजत ठेवून, प्रातःकाळीं तें पाणी गाळून घ्यावें; त्याला हिम व शीत काढा असें ह्मणतात. त्याचें प्यावयाचे मान फांटासारिखें दोन पळप्रमाण जाणावें.

## अवलेहकल्पना.

क्राथादीनांपुनःपाकात्घनत्वंसारसक्रिया ॥ सोवलेहश्चलेहः स्यात्तन्मात्रास्यात्पलोन्मिता ॥ सिताचतुर्गुणाकार्याचूर्णाच्च द्विगुणोगुडः ॥द्रवंचतुर्गुणंदद्यादितिसर्वत्रानिश्चयः ॥ सुपक्केतं तुमत्वंस्यादवलेहोप्सुमज्जति ॥ खरत्वंपीडितेमुद्रागंधवर्णरसो द्भवः ॥ दुग्धमिक्षुरसंयूपंपंचमूलकषायजं ॥ वासाक्राथंयथायो ग्यमनुपानंप्रशस्यते ॥

अर्थ—औषधांचे काढे, फांटादिक, हे फिरून आटऊन साखरेचे पाकासारिखे घण करितात. त्याला रसक्रिया ह्मणतात. त्या रसक्रियेचे पर्यायशब्द अवलेह, लेह असे आहेत. व त्या आवलेहाचे घ्यावयाचे मान एक पलप्रमाण जाणावें; व त्यांत साकर चूर्णाचे चौपट, गूळ चूर्णाचे दुप्पट, आणि पाणी, दूध, मूत्र, दुसरें पातळ पदार्थ हे चूर्णाचे चौपट घालावें. असा अवलेहाविषयीं सर्वत्र नियम जाणावा. त्या अवलेहाचा पाक चांगला झाल्याची परीक्षा, पाक झाला ह्मणजे अवलेहाला तार येत्ये, व पाण्यात टाकिला असतां बुडतो, व तो अवलेह बोटांनीं चेपिला असतां कठिण व चिकट लागतो, व त्या पाकाचा गंधवर्ण व रस हे अपूर्व होतात- याप्रकारें चांगला पाक जाहाल्याचीं लक्षणें जाणावीं; व त्या अवलेहाचीं अनुपानें दूध, उसाचा रस, पंचमूळांचे काढ्याचा यूष, अडुळशाचा काढा, इत्यादिक आहेत तीं रोग तरतम्य पाहून योजावीं.

## आसव, आणि अरिष्टादिक यांची कल्पना.

द्रवेषुचिरकालस्थंद्रव्यंयत्साधितंभवेत् ॥ आसवारिष्टभेदैस्त त्प्रोच्यतेभेषजोचितं ॥ यदपक्कौषधांबुभ्यांसिद्धंमद्यंसआसवः ॥ अरिष्टःक्राथसिद्धःस्यात्तयोर्मानंपलोन्मितं ॥ अनुक्तमानारिष्टे षुद्रवद्रोणेतुलांगुडं ॥ क्षौद्रंक्षिपेत्गुडादर्धंप्रक्षेपंदशमांशकं ॥ ज्ञेयःशीतरसःसिंधुरपक्कमधुरद्रवैः ॥ सिद्धपक्करसःसिंधुसंपक्क मधुरद्रवैः ॥ परिपक्कान्नसंधानसमुत्पन्नांसुरांजगुः ॥ सुरामं डःप्रसन्नास्यात्ततःकादंबरीघना ॥ तदधोजगलोज्ञेयोमेदको जगलाद्घनः ॥ पक्कोसौहृतसारःस्यात्सुराबीजंचकण्वकं ॥ यत्तालखर्जूररसैःसाधितासाहिवारुणी ॥ कंदमूलफलादीनि सस्नेहलवणानिच ॥ यत्रद्रवेभिषूयंतेतत्सूक्तमभिधीयते ॥

विनष्टमम्लतांयातंमधुवामधुरद्रवः ॥ विनष्टःसंधितोयस्तुत चुक्रमभिधीयते ॥ गुडांबुनासतैलेनकंदमूलफलैस्तथा ॥ संधितंचाम्लतांयातंगुडसूक्तंतदुच्यते ॥ एवमेवेक्षुसूक्तंस्यान्मृद्वीकासंभवंतथा ॥ तुषांबुसंधितंज्ञेयमामैर्विदलितैर्यवैः ॥ यवैस्तु निस्तुषैःपक्कैःसौवीरंसंधितंभवेत् ॥ कुल्माषधान्यमंडादिसंधितं कांजिकंविदुः ॥ संडाकीसंधिताज्ञेयामूलकैःसर्षपादिभिः ॥

अर्थ– उदकादिद्रवपदार्थांमध्यें औषधें घालून पात्राचे तोंडाला मुद्रा देऊन मास पक्ष पर्यंत ठेवावीं. ह्मणजे उत्कृष्ट औषध होतें, तें आसव आणि अरिष्ट या भेदेंकरून दोन प्रकारचें जाणावें. आसव आणि अरिष्ट यांचा भेद. उदक व औषधें याचा पाक केल्यावांचून पूर्वोक्त रीतीनें सिद्ध करितात. त्याला आसव ह्मणतात. काढा सिद्धकरून त्यामध्यें औषधें घालून पूर्वोक्त रीतीनें सिद्ध करितात. त्याला अरिष्ट ह्मणतात. त्या दोहोंची पोटांत धावयाची मात्रा पळप्रमाण जाणावी; व ज्या अरिष्टप्रयोगाचेठायीं जलादिकांचे मान सांगितलें नाहीं, त्या प्रयोगांत उदकादि द्रवपदार्थ एक द्रोण प्रमाण घेऊन त्यांत गूळ एक तुळा प्रमाण घालून व गुळाचे अर्धे मान मध घालावी, त्यांत औषधांचे चूर्ण टाकावयाचें तें गुळाचे दशमांश घालून अरिष्ट सिद्ध करावा. सिधु मद्याचे भेद सांगतो. अपक्क असे जे उसादिकांचे रस आदिकरून मधुर द्रवपदार्थ तिहीं-करून सिद्ध झालें जें मद्य त्याला सीतरससिंधु ह्मणतात; संपक्क असे जे मधुर द्रव पदार्थ तिहींकरून सिद्ध झालें जे मद्य त्याला पक्करस सिंधु ह्मणतात. सुरा, प्रसन्नादिक मद्यांचे भेद सांगतो. तंदुलादिक धान्य शिजवून अग्निसंयोगकरून यंत्रद्वारा जें मद्य उत्पन्न करितात त्याला सुरा ह्मणतात. त्या सुरेचा जो फेन त्याला प्रसन्ना ह्मणतात. त्या प्रसन्ने मध्यें जो घनभाग त्याला कादंबरी ह्मणतात. त्या सुरेचें अधोभागीं द्रवभाग आहे त्याला जगल ह्मणतात. त्या जगलामध्यें जो घनभाग आहे त्याला मेदक ह्मणतात. तो मेदक पक्क करून त्यांतील सार काढून शेष राहिलें जें त्याला सुराबीज व किण्वक ह्मणतात. ताडाचा रस व खजूराचा रस यांपासून अग्निसंयोगकरून यंत्रद्वारा उत्पन्न करितात जें मद्य त्याला वारुणी ह्मणतात. व कंदमुळें, फलादिक, स्नेह, व सैंधव हीं सारीं उदकादि द्रव पदार्थांमध्यें घालून अग्निसंयोगेकरून यंत्रद्वारा जें मद्य काढितात त्याला सूक्त ह्मणतात नासून आम्लतेप्रत पावलें जे मद्य अथवा मधुरद्रव त्यानां पात्रांत घालून तोंडाला मुद्रा देऊन मास पक्ष ठेऊन सिद्ध जाहलें जें मद्य त्याला चुक्र ह्मणतात; गूळ, पाणी, तैल, कंद, मूळ, फळें, हीं सारीं पात्रांत घालून तोंडाला मुद्रा देऊन मास पक्ष ठेऊन आम्लते-प्रत पावली असतां त्याला गुडसूक्त ह्मणतात. याप्रकारें उसाचें व द्राक्षाचें सूक्त करावें. व कच्चे जव भरडून त्यांत पाणी घालून पात्राचें तोंडाला मुद्रा देऊन कांहीं एक दिवस

ठेवावें. त्याला तुषांबु ह्मणतात. जवाचा कोंडा काढून शिजवून त्यांत पाणी घालून पात्राचे तोंडाला मुद्रा देऊन कांहीं एक दिवस ठेवावें. त्याला सौवीर ह्मणतात. कुळिथ अथवा तांदूळ घेऊन त्यांत पाणी घालून शिजवून त्यांतील पेज काढून त्यांत सुंठ, राई, जिरें, हिंग, सैंधव, हळद, इत्यादिक घालून पात्राचे तोंडाला मुद्रा देऊन तीन चार दिवस ठेवावें. त्याला कांजी ह्मणतात. मुळ्याचे काप काढून त्यांत पाणी घालून हळद, हिंग, मोहऱ्या, सैंधव, जिरें, सुंठ, इत्यादिकांचें चूर्ण त्यांत घालून पात्राचें तोंडें झाकून तीन चार दिवस ठेवावें. त्याला संडाकी ह्मणतात. याप्रकारें आसव आणि अरिष्टादिक यांची कल्पना जाणावी.

## चूर्णकल्पना.

अत्यंतशुष्कंयत्द्रव्यंसुपिष्टंवस्त्रगालितं ॥ तत्स्यात्चूर्णंरजःक्षोदस्तन्मात्राकर्षसंमिता ॥ चूर्णेगुडःसमोदेयःशर्कराद्विगुणाभवेत् ॥ चूर्णेषुभर्जितंहिंगुदेयंनोत्क्लेदकृद्भवेत् ॥लिहेत्चूर्णंद्रवैःसर्वैर्घृताद्यैर्द्विगुणोन्मितैः॥पिबेच्चतुर्गुणैरेवचूर्णमालोडितंद्रवैः ॥ चूर्णावलेहगुटिकाकल्कानामनुपानकं ॥ पित्तवातकफातंके त्रिद्व्येकपलंहरेत् ॥ यथातैलंजलेप्राप्तंक्षणेनैवप्रसर्पति ॥ अनुपानबलादंगेतथासर्पतिभेषजं ॥ द्रवेणयावतासम्यक्चूर्णंसर्वंप्लुतंभवेत् ॥ भावनायाःप्रमाणंतुचूर्णप्रोक्तंभिषग्वरैः ॥

अर्थ—चांगलें सुकें औषध आणून कुटून बारीक करावें. त्याला चूर्ण असें ह्मणतात, व त्या चूर्णाचीं नामें दोन रज व क्षोद हीं जाणावीं. त्या चूर्णाचें भक्षणाचें मान कर्षप्रमाण जाणावें, चूर्णामध्यें गूळ घालावयाचा असतां चूर्णाचे समान घालावा, साखर दुप्पट घालावी; व हिंग भाजलेला घालावा, तूप, मध, व आणखी चिक्कण पदार्थ यांमध्यें चूर्ण घालावयाचें असतां ते पदार्थ चूर्णाचे दुप्पट घ्यावे. दूध, गोमूत्र, पाणी व आणखी पातळ पदार्थ चूर्णाचे चतुर्गुणित घेऊन त्यांत चूर्ण टाकून प्यावें. चूर्ण, अवलेह, गुटिका, व कल्क यांचे अनुपान जें सांगेल तें पित्तरोग असतां तीनपळप्रमाण घ्यावें, वातरोग असतां दोनपळप्रमाण घ्यावें, व कफरोग असतां एक पळ घ्यावें. तेणेकरून औषध चांगलें पसरते. याविषयीं दृष्टांत. जसा पाण्यांत तेलाचा बिंदु टाकतांच पसरतो, तसें औषध अनुपानाचे बळेंकरून शरीरांत पसरतें. असें जाणावें. चूर्णास निंबूचे रसाचें अथवा दुसऱ्या वनस्पतीचे रसाचें पुट द्यावयाचें असतां चूर्ण रसांत बुडे तों पावेतों पुट द्यावें. याप्रकारें चूर्णाची कल्पना जाणावी.

## वटककल्पना.

वटकाश्चाथकथ्यंतेतन्नामगुटिकावटी ॥ मोदकोवटिकापिंडी गुडोवर्तिस्तथोच्यते ॥ लेहवत्साध्यतेवन्हौगुडोवाशर्करा थवा ॥ गुग्गुलुर्वाक्षिपेत्तत्रचूर्णंतन्निर्मितावटी ॥ कुर्यादवन्हिसिद्धेन क्वचित्गुग्गुलुनावटी ॥ द्रवेणमधुनावापिगुटिकांकारयेद्बुधः ॥ सिताचतुर्गुणादेयावटीषुद्विगुणोगुडः ॥ चूर्णात्चूर्णसमःकार्यो गुग्गुलुर्मधुतत्समं ॥ द्रवंचद्विगुणंदेयंमोदकेषुभिषग्वरैः ॥ कर्षप्रमाणातन्मात्राबलंदृष्ट्वाप्रयुज्यते ॥

अर्थ– गुटिका, वटी, मोदक, वटिका, पिंडी, गुड, वर्ति, हे सात वटकाचे पर्याय शब्द जाणावे. यांची कृति गुळाचा अथवा साखरेचा पाक करून त्यांत चूर्ण टाकून गोळ्या कराव्या, पाक केल्यावांचून गोळ्या करावयाच्या असतां गुग्गुळ शोधून वाटून त्यांत चूर्ण मेळऊन गोळ्या कराव्या. अथवा पाणी, मध, दूध, इत्यादिक द्रवद्रव्ये जीं त्यांत चूर्ण टाकून गोळ्या कराव्या, साखरेंत गोळ्या करावयाच्या असल्या तर चूर्णाचे चौपट साखर घालून कराव्या, गुळांत गोळ्या करावयाच्या असल्या तर तो चूर्णाचे दुप्पट घेऊन गोळ्या कराव्या, गुग्गुळ किंवा मध या दोहोंत गोळ्या करावयाच्या असल्या तर ते चूर्णाचे समभाग घेऊन गोळ्या कराव्या, पाणी मध इत्यादिक द्रवपदार्थांत गोळ्या करावच्या असल्या तर ते चूर्णाचे दुप्पट घेऊन त्यांत गोळ्या कराव्या, मात्रा कर्ष प्रमाण जाणाव्या, अथवा रोग्याचें शक्तितारतम्य पाहून योजना करावी.

## तूप, लेह इत्यादि स्नेहांचा साधनप्रकार.

कल्काच्चतुर्गुणीकृत्यघृतंवातैलमेववा ॥ द्रव्येचतुर्गुणेसाध्यंतस्यमात्रा पलोन्मिता ॥ निक्षिप्यक्काथवत्तोयंक्काथद्रव्याच्चतुर्गुणं ॥ पादशिष्टंगृहीत्वाचस्नेहंतेनैवसाधयेत् ॥ चतुर्गुणंमृदुद्रव्येकठिणेष्टगुणंजलं ॥ तथाच मध्यमद्रव्येदद्यादष्टगुणंपयः ॥ अत्यंतेकठिनेद्रव्येनीरंषोडशिकंमतं ॥ कर्षादितःपलंयावत्क्षिपेत्षोडशिकंजलं ॥ तदूर्ध्वंकुडवंयावत्क्षिपेदष्टगुणंपयः ॥ प्रस्थादितःक्षिपेन्नीरंखारियावच्चतुर्गुणं ॥ अंबुक्काथरसैर्यत्रपृथक्स्नेहस्यसाधनं ॥ कल्कस्यांशंतत्रदद्यात्चतुर्थंषष्ठमष्टमं ॥ दुग्धेदधिरसेतक्रेकल्कोदेयोष्टमांशकः ॥ कल्कस्यसम्यक्पाकार्थंतोयमत्रचतुर्गुणं ॥ द्रव्याणियत्रस्नेहेषुपंचादीनिभवंतिहि ॥ तत्रस्नेहस

मान्याहुर्यथापूर्वंचतुर्गुणं ॥ क्वाथेनकेवलेनैवपाकोयत्रेरितःक्वचित् ॥ क्वाथद्रव्यस्यकल्कोपितत्रस्नेहेप्रयुज्यते ॥ कल्कहीनस्तुयःस्नेहःससाध्यःकेवलद्रवे ॥ पुष्पकल्कस्तुयःस्नेहस्तत्रतोयंचतुर्गुणं ॥ स्नेहेस्नेहाष्टमांशश्चपुष्पकल्कःप्रयुज्यते ॥ वर्तिवत्कल्कस्नेहःस्याद्यदांगुल्याविमार्दितः ॥ शब्दहीनोग्निनिक्षिप्तःस्नेहःसिद्धोभवेत्तदा ॥ यदाफेनोद्भवस्तैलेफेनशांतिश्चसर्पिषि ॥ गंधवर्णरसोत्पत्तिःस्नेहसिद्धिस्तदाभवेत् ॥ स्नेहपाकस्त्रिधाप्रोक्तोमृदुसाध्यःखरस्तथा ॥ ईषत्सरसकल्कस्तुस्नेहपाकोमृदुर्भवेत्॥ मध्यपाकस्यासित्थिश्चकल्केनीरसकोमले॥ईषत्कठिनकल्कश्चस्नेहपाकोभवेत्खरः ॥ तदूर्ध्वंदग्धपाकःस्याद्दाहकृन्निष्प्रयोजकः ॥ आमपाकश्चनिर्वीर्योवन्हिमांद्यकरोगुरुः ॥ नस्यार्थेस्यान्मृदुःपाकोमध्यमःसर्वकर्मसु ॥ अभ्यंगार्थेखरःप्रोक्तोयुंज्यादेवंयथोचितं ॥ घृततैलगुडादींश्चसाधयेन्नैकवासरे ॥ प्रकुर्वंत्युषिताह्येतेविशेषाद्गुणसंचयं ॥

अर्थ— कल्काचीं जीं औषधें त्यांचे चौपट तूप अथवा तेल घ्यावें. त्या तूपा तेलाचे चौपट दूध, गवादिमूत्र इत्यादिक द्रवपदार्थ घेऊन सर्वांनां एकत्र करून अग्नि संयोगानें ते द्रव पदार्थ आटवून तूप व तेल शेष राखावें. तसल्या सिद्ध जाहालेल्या तुपाची व तेलाची पोटांत घ्यावयाची मात्रा वातादिरोगांवर एक पळ प्रमाण जाणावी. व काढ्यांचीं जीं औषधें त्यांचे चौपट पाणी घालून चवथाई पाणी राही तोंपावेतों काढा करून त्यांत तूप अथवा तेल घालून कढवून तूप व तेल शेष राखावें; नरम जीं गुडूच्यादि औषधें असल्यास त्यांत पाणी चौपट घालावें. वाहवा आदिकरून कठीण जीं औषधें व दशमूलादि मध्यम औषधें असल्यास पाणी आठपट घालावें. व पद्मकाष्ठादि अत्यंत कठिण औषधें आहेत तर त्यांत पाणी १६ पट घालावें. कर्षापासून पळमानपर्यंत औषधांचा काढा करावयाचा असतां पाणी १६ पट घालावें. पळपासून कुडवमानपर्यंत औषधांचा काढा करावयाचा असतां पाणी आठपट घालावें प्रस्थमानापासून खारीमानपर्यंत औषधांचा काढा करावयाचा असतां पाणी चौपठ घालावें. केवळ पाण्यांत स्नेह सिद्ध करावयाचा असतां त्यांत स्नेहाचे चतुर्थांश कल्क घालावा. व काढ्यांत स्नेह सिद्ध करावयाचा असतां त्यांत स्नेहाचे षष्ठांश कल्क योजावा. मांसाचे रसांत स्नेह सिद्ध करावयाचा असतां त्यांत स्नेहाचे अष्टमांश कल्क योजावा. दुधांत अथवा दह्यांत अथवा धत्तुरादिकांचे रसांत स्नेह सिद्ध करावयाचा असतां त्यांत स्नेहाचे अष्टमांश कल्क घालावा. कल्काचा पाक चांगला होण्याविषयीं पाणी स्नेहाचे चौपट घालावें. व स्नेहाचेठायीं दूध गो-

मूत्र इत्यादिक पांच द्रवपदार्थांपासून अधिक द्रवपदार्थ असतां स्नेहाचे समभाग घ्यावे. पांचाहून उणे द्रवपदार्थ असतां स्नेहाचे चौपट घ्यावे. व काढ्यांत स्नेह करावयाचा असतां कल्कद्रव पाण्यांत वाटून कल्क करून स्नेहांत घालून त्यांत स्नेहाचे चौपट पाणी घालावें. व क्वचित् प्रयोगाचे ठायीं काढ्यांत स्नेह सिद्ध करावयाचा असतां काढ्याच्या औषधांचा कल्क करून स्नेहांत मिळवून त्यांत पाणी चौपट घालावे. ज्या स्नेहांत कल्क नाहीं तो स्नेह द्रवपदार्थांत घालून कढवून द्रवपदार्थ जाळून स्नेह शेष राखावा. ज्या स्नेहांत फुलांचा कल्क आहे त्यांत पाणी फुलांचे चौपट घालावें. व फुलांचा कल्क स्नेहाचे आष्टमांश घालावा. यानंतर स्नेह चांगला सिद्ध झाल्याची लक्षणें. स्नेहांत कल्क असतो तो बोटानीं चेपला असतां त्याची वात होते व तो कल्क अग्नीवर टाकला असतां फुरफुर शब्द करीत नाहीं व तेलाचे पाकावर फेण आला असतां व तुपाचे पाकावर फेण येऊन गेला असतां व तो पाक सुगंधेंकरून व रक्तादिवर्णेंकरून व मधुरादि रसेंकरून युक्त जाहाला असतां तो स्नेह चांगला सिद्ध जाहाला असें जाणावे. व त्या स्नेहाचे पाक तीन प्रकारचे आहेत. ते नरम, मध्यम, कठीण, त्यांचीं लक्षणें स्नेहांत कल्क असतो त्याला पाण्याचा ओलावा राहिला असतां तो पाक नरम जाणावा. कल्काला मृदुपणा असून पाण्याचा अंश राहिला नाहीं तो पाक मध्यम जाणावा व किंचित् तीव्र कल्क जाहाला असतां तो पाक जळका, दाह करणारा, निष्प्रयोजक जाणावा. व कच्चा पाक राहिला असतां त्यामध्यें पराक्रम राहात नाहीं, अग्नि मंदकरितो, जड होतो. स्नेहाचा पाक नरम जाहाला असतां तो स्नेह नाकांत नस्य देण्याविषयीं योजावा, व मध्यम पाक जाहाला असतां तो स्नेह सर्व कर्माचे ठायीं योजावा. कठीण पाक जाहाला असतां तो स्नेह अंगाला लेपकरण्याविषयीं योजावा. तूप, तेल, गुडादिक हे एक दिवसांत सिद्ध करूं नयेत. तर सर्व द्रव्यें एकत्रकरून एकरात्र भिजत ठेऊन दुसरे दिवशीं सिद्ध करावें. याप्रकारें स्नेहाची साधन क्रिया जाणावी. त्यामध्यें प्रथम तुपें सांगून नंतर तेलें सांगेन.

# ज्वरप्रकरण.

## जोतिःशास्त्राचा अभिप्राय.

नीचस्थितस्यभानोर्दशाक्षिनाशोज्वरःशिरोरोगः ॥ बंधनम
होग्रपीडाकुष्ठस्यचदर्शनंचिन्हं ॥ क्षीणेंदुदशायामप्येवं ॥

अर्थ–नीचस्थित सूर्याच्या दशेमध्यें नेत्रनाश, ज्वर, मस्तकरोग, बंधन, महाभय, कोड आणि रोग इत्यादि पीडा होतात; व क्षीणचंद्राच्या दशेमध्येंहि हींच लक्षणें होतात.

सुह्द्बंधुसमायोगोभूनिमित्तंकलिर्भवेत् ॥ देहपीडाज्वरोव्या
धिःशिखिमध्यगतेबुधे ॥ शनेरंतर्गतेप्येवं ॥ तद्दोषकृतनिराक
रणेजपहोमादिकंकुर्यात् ॥

अर्थ–केतूच्या दशेमध्यें बुधाची दशा आलीअसतां सुह्द् व बंधु यांचा समागम; आणि भूमिविषयी कज्जा, देहाला पीडा, ज्वर, आणि व्याधि हे उपद्रव होतात. व शनीच्या दशेमध्यें बुधाची दशा आलीअसतां हि तेंच फळ जाणावें.

## सर्वज्वरकर्मविपाक.

देवस्वहरणाच्चैवजायतेविविधोज्वरः ॥
ज्वरोमहाज्वरश्चैवरौद्रोवैष्णवएवच ॥

अर्थ–देवाच्या द्रव्याचा अपहार केलाअसतां अनेक प्रकारचे ज्वर उत्पन्न होतात. त्यांत ज्वर रुद्रापासून आणि महाज्वर विष्णूपासून होतो.

## त्यांचा शम.

ज्वरेरुद्रजपंकुर्यान्महारुद्रंमहाज्वरे ॥
महारुद्रंजपेद्रौद्रेवैष्णवेतद्द्वयंजपेत् ॥

अर्थ–ज्वरशमनार्थ रुद्रजप करावा; आणि महाज्वर शमनार्थ महारुद्रजप करावा. रुद्र ज्वराला महारुद्र, आणि वैष्णव ज्वराला दोन महारुद्र करावे.

## ज्वरी कर्मविपाक.

येपुनःपूर्वजन्मनिक्रूराःपिशुनाः ॥
ततस्तेन्यजन्मानिसततंज्वरिणःस्युः ॥

अर्थ-पूर्वजन्मी जे क्रूर व खल असतात, ते त्यापातकानें दुसरे जन्मांत सतत ज्वरी होतात.

## शीतज्वरीं कर्मविपाक.

येपुनःक्रूरकर्माणःपापाःपिशुनचेतसः ॥
तेभवेयुःसदाशीतज्वरवंतस्तदेनसा ॥

अर्थ-जे कोणी क्रूरकर्म करणारे, पापी, व क्षुल्लकचित्ताचे असतात, ते पुरुष शीतज्वरानें पीडित होतात.

## त्याचा शम.

शांतयेयुतसंख्याकंप्रकुर्यात्प्रयतोजपं ॥ जातवेदसमंत्रेणब्राह्मणान्भोजयेत्ततः ॥ सुरामांसोपहाराद्यैर्बलिःसर्वत्रशस्यते ॥ सहस्रकलशस्नानंशतभोजनमेवच ॥ शीतज्वरेपुनःकुर्यादभिषेकंहरेर्बुधः ॥

अर्थ- वर सांगीतलेल्या शीतज्वरशांति करितां, जातवेदस यामंत्रानें दाहाहजार जप करावा; आणि ब्राह्मणभोजन करावें; अथवा सुरा व मांस यांणीं बलिदान करावें; किंवा सहस्रघागरी पाणी देवावर घालावें, अथवा शतब्राह्मणभोजन करावें, अथवा विष्णुवर अभिषेक करावा.

सहस्रकलशस्नानंरुद्रेणेशस्यकारयेत् ॥
ब्राह्मणान्भोजयेच्छक्त्याजपेद्वैजातवेदसं ॥

अर्थ-शिवाला सहस्र कलशांनीं रुद्राभिषेक करावा; आणि यथाशक्ति ब्राह्मणाला भोजन घालावें. अथवा जातवेदसमंत्राचा जप करावा.

## ज्वरी दैविक उपचार.

वेदानांश्रवणंहितस्यचरणंविप्रस्यसंतर्पणंकृष्णस्यस्मरणंशुभस्यकरणंद्रव्यस्यसंतर्पणं ॥ अश्वत्थभ्रमणंसुरत्नधरणंदीनस्यसंरक्षणंहन्यादष्टविधंज्वरंकुमुदिनीनाथोयथाग्रंतमः ॥

अर्थ-वेदश्रवण, हिताचरण, ब्राह्मणभोजन, कृष्णाचें स्मरण, शुभकार्य, द्रव्यदान अश्वत्थप्रदक्षिणा, उत्तमरत्नधारण, व दीनाचें पोषण, हे उपचार अष्टविध ज्वराला जसा चंद्र मोठ्याअंधकाराचा नाश करितो, त्याप्रमाणे नाश करितात.

सहस्रनेत्रस्यसहस्रबाहोःसहस्रवक्त्रस्यसहस्रमूर्ध्नः ॥
सहस्रपादस्यसहस्रनाम्नःसहस्रनाम्नांपठनंज्वरघ्नं ॥

अर्थ-नेत्र, बाहु, मुखें, मस्तकें, पाद, हस्तादिअंगे, व तशींच नामेंहीं अनेक आहे त अशा देवाचें सहस्रनाम पठन करावें. तो ज्वरनाश करितो.

गणेश्वरोवागरुडेश्वरोवागौरीश्वरोवादिवसेश्वरोवा ॥
महेश्वरोवाकुलदैवतंवातत्पूजनंतज्ज्वरिणांप्रशस्तं ॥

अर्थ-गणेश, विष्णु, शिव, गौरी, सूर्य, किंवा कुलदैवत यांचें पूजन ज्वरिताला हितकरितें.

## ज्वरनिदानानि.

प्रणम्यजगदुत्पत्तिस्थितिसंहारकारणं ॥ स्वर्गापवर्गयोर्द्वारंत्रैलोक्यशरणंशिवं ॥ नानामुनीनांवचनैरिदानींसमासतःसद्भिषजांनियोगात् ॥ सोपद्रवारिष्टनिदानलिंगोनिबध्यतेरोगविनिश्चयोयं ॥

अर्थ-ग्रंथाचा आद्यंती मंगल असावें अशी शास्त्राची आज्ञा व शिष्टाचारहीं आहे. यास्तव ग्रंथकार देवतानमस्काररूप मंगल करितात. तें असेंकीं जगाच्या उत्पत्ति स्थिति लयाचें जो आदिकारण, आणि जो स्वर्ग व मोक्ष देतो, व त्रैलोक्याचें पालनकर्ता असा जो शिव त्यातें नमस्कार करून, बहुमुनिवचनाच्या विचारेंकरून, व उत्तम वैद्याच्या शिक्षेनें, वातादिकांचा प्रकोप, मरणाचे चिन्ह, रोगाचें कारण, व रूप यांसहित रोगाचें विशेषज्ञान ज्यापासून होतें, असा ग्रंथ संक्षेपेंकरून मी करितो.

नानातंत्रविहीनानांभिषजामल्पमेधसां ॥
सुखंविज्ञातुमातंकमयमेवभविष्यति ॥

अर्थ-ज्यास इतर शास्त्राध्ययन नाही असे जे अल्पमति वैद्य, त्यांस सुखेंकरून निर्बाध रोगज्ञान होण्यास हाच ग्रंथ कारण होईल.

## रोगज्ञानाचे पांच उपाय.

निदानंपूर्वरूपाणिरूपाण्युपशयस्तथा ॥
संप्राप्तिश्चेतिविज्ञानंरोगाणांपंचधास्मृतं ॥

अर्थ-निदान ह्मणजे उत्पत्तिकारण, तें दोनप्रकारचें. एक समीप व दुसरें दूर-ज्वरादिकांना उत्पन्न करणारें असे जे वातादि कुपित दोष ते समीपकारण. कफादिकाला उत्पन्न करणारे जे वसंतादिकऋतु तें दूरकारण, पूर्वरूप जृंभा आलस्यादि, रूप अंगसंतापादिक, उपशय ह्मणजे औषधादिकेंकरून रोग्यास सुख होते तो, संप्राप्ति ह्मणजे रोगदोषाचे यथार्थ लक्षण. असे रोगविशेषज्ञानाचे पांचप्रकार मुनींनीं सांगितले.

## निदानाचे पर्याय शब्द.

निमित्तहेत्वायतनप्रत्ययोत्थानकारणैः ॥

निदानमाहुःपर्यायैः ॥

अर्थ—निमित्त, हेतु, आयतन, प्रत्यय, उत्थान, आणि कारण हे निदानाचे पर्यायशब्द शास्त्रव्यवहारार्थ मुनीनीं सांगीतले.

## पूर्वरूप सांगतो.

प्राग्रूपंयेनलक्ष्यते ॥ उत्पित्सुरामयोदोषविशेषेणानधि

ष्ठितः ॥ लिंगमव्यक्तमल्पत्वाद्व्याधीनांतद्यथायथं ॥

अर्थ— ज्या लक्षणानीं उत्पन्न होणाऱ्या व्याधीचें ज्ञान होतें, त्या लक्षणास प्राग्रूप असें ह्मणतात. तें सामान्य आणि विशेष या भेदानें दोन प्रकारचें. सामान्य प्राग्रूप ह्मणजे वातादि दोषांचें आधिक्य नसतां उत्पन्न होणारा जो व्याधि, त्या व्याधिचें ज्ञान ज्या लक्षणानीं होतें तें. विशेष प्राग्रूप ह्मणजे, व्याधि अल्प असल्यामुळे जीं थोड थोडीं लक्षणें दिसून आलीं तें

## रूप सांगतो,

तदेवव्यक्ततांयातंरूपमित्यभिधीयते ॥

संस्थानंव्यंजनंलिंगंलक्षणंचिन्हमाकृतिः ॥

अर्थ—तेंच प्राग्रूप स्पष्ट झालें असतां. त्यास रूप असें ह्मणतात. त्याचे संस्थान, व्यंजन, लिंग, लक्षण, चिन्ह आणि आकृति हे पर्याय शब्द, आहेत.

## उपशय व अनुपशय सांगतों.

हेतुव्याधिविपर्यस्तविपर्यस्तार्थकारिणां ॥

औषधान्नविहाराणामुपयोगंसुखावहं ॥

विंद्यादुपशयंव्याधेःसहिसात्म्यमितिस्मृतः ॥

विपरीतोनुपशयोव्याध्यसात्म्यमितिस्मृतः ॥

अर्थ – हेतुविपरीत, व्याधिविपरीत, हेतुव्याधिविपरीत, व हेतुविपर्यस्तार्थकारी, व्याधिविपर्यस्तार्थकारी, आणि हेतु व्याधि विपर्यस्तार्थकारी अशीं औषधें, अन्नें, आणि-विहार यांचा जो हितकारक उपयोग, त्याला रोगाचा उपशय ह्मणतात. याचा व्याधि सात्म्य हा पर्याय शब्द आहे; आणि औषधादिकांचा अहितकारक जो उपयोग त्याला अनुपशय ह्मणतात. याचा व्याध्यसात्म्य हा पर्याय शब्द व्यवहारार्थ सांगितला.

हेतुविपरीत ह्मणजे, रोगोत्पत्तिकारणाला विरुद्ध औषध, अन्न, आणि विहार. जसें शीत ज्वरावर शुंठ्यादि औषधें; व श्रम आणि वायु यांपासून झालेल्या रोगास मांसरस, व उत्तम भोजन इत्यादि अन्नें; आणि दिवा निद्रेपासून झालेल्या पडशास रात्रीचें जागरण इत्यादि विहार.

व्याधिविपरीत ह्मणजे, केवल रोगालाच विरुद्ध. जसें अतिसारावर स्तंभन पहाड मूळ, अफू इत्यादि. विषावर शिरीष, कुष्ठावर खैर इत्यादि; आणि मेहावर हळद हीं औषधें; व अतिसारावर स्तंभन मसूर, मेथ्या इत्यादि अन्नें; आणि उदावर्तावर कुंथणें, व गुरु, मंत्र, देवता इत्यादि विहार.

हेतुव्याधिविपरीत ह्मणजे निदान व रोग यानां विपरीत. जसें वायूपासून झालेल्या सुजेवर दशमूलादि वातनाशक, व शोथनाशक औषधें; वातकफग्रहणीवर ताक, वातकफनाशक आणि संग्रहणीनाशक; व शीतज्वरावर पेज इत्यादि अन्नें; आणि स्निग्ध अशा दिवानिद्रेपासून झालेल्या तंद्रेवर, रूक्ष असे रात्री जागरण इत्यादि विहार.

हेतुविपर्यस्तार्थकारी ह्मणजे, निदानापासून झालेल्या व्याधीस निदानसदृशगुण कारक. जसें पित्तप्रधान व्रणशोथावर पित्तकारक व उष्ण असा पेंड बांधणें. हें औषध; आणि पिकणाऱ्या व्रणाच्या सुजेवर विदाहकारक अन्न, आणि वातोन्मादावर त्रास देणें हा विहार.

व्याधिविपर्यस्तार्थकारी ह्मणजे, ओकारीवर वांतिकारक गेळफळ इत्यादि औषधें; आणि अतिसारावर रेचकारक दूध इत्यादि अन्नें; व वांतीवर बळानें ओकारी करणें इत्यादि विहार.

हेतुव्याधिविपर्यस्तार्थकारी ह्मणजे, अग्नीने भाजल्यावर अगरूचा लेप, अथवा विषावर विषनाशक विष इत्यादि औषधें; व मद्याच्या उन्मादावर मादक मद्यपान इत्यादि अन्नें; आणि आमापासून झालेल्या मूढवातावर पोंहणें इत्यादि विहार.

## संप्राप्ति सांगतो.

यथादुष्टेनदोषेणयथाचानुविसर्पता ॥

निर्वृत्तिरामयस्यासौसंप्राप्तिर्जातिरागतिः ॥

अर्थ—वातादि दोष कुपित होऊन ते आप आपल्या नाडिमार्गानें शरिरांत प्रवेश करूंलागले, ह्मणजे तेणेकरून जो रोग उत्पन्न होतो, त्यास संप्राप्ति असें ह्मणतात. तिचे पर्याय शब्द जाति आणि आगति असे आहेत.

## संप्राप्तीचे भेद सांगतो.

संख्याविकल्पप्राधान्यबलकालविशेषतः ॥

साभिद्यतेयथात्रैववक्ष्यंतेष्टौज्वराइति ॥

अर्थ–संख्या, विकल्प, प्राधान्य, बल, आणि काल यांच्या विशेषानें संप्राप्तीचे भेद, होतात. संख्याविशेष ह्मणजे जसा ज्वर आठ प्रकारचा.

## विकल्प व प्राधान्य सांगतो.

दोषाणांसमवेतानांविकल्पोंशांशकल्पना ॥

स्वातंत्र्यपारतंत्र्याभ्यांव्याधेःप्राधान्यमादिशेत् ॥

अर्थ–कोणत्याही व्याधीमध्यें वात, पित्त, आणि कफ, या दोषांतून कोणत्या एखाद्या दोषाचें अथवा दोषांचें प्राधान्य असून त्या दोषांतून कोणता एखादा दुसरा दोष गौणत्वानें त्या प्रधानदोषांशीं सहचारी आहे, हें जें जाणणें त्यास विकल्प असें ह्मणतात. व्याधींमध्यें जो व्याधि स्वातंत्र्यानें अगर पारतंत्र्यानें विशेष असतो, त्यास मुख्य अथवा प्रधान व्याधि ह्मणतात.

## रोगाचा बलाबल विचार.

हेत्वादिकात्स्न्यावयवैर्बलाबलविशेषणं ॥

नक्तंदिनर्तुभुक्तांशैर्व्याधिकालोयथामलं ॥

अर्थ–निदानादिक संपूर्ण पांच अवयवांनी व्याधि व्याप्त असतां तो व्याधि बलवान जाणावा; आणि न्यून अवयवांनी व्याप्त असतां अबल जाणावा. रात्र, दिवस, ऋतु आणि भक्ष यांमध्यें कफ पित्त आणि वात हे दोष प्रारंभी, मध्यें व अंतीं जागून त्यावरून व्याधिकालाचा निश्चय करावा. वाग्भट्टानें ऋतूच्या बदली आयुष्य घेतलें आहे.

## निदानपंचकाचा उपसंहार.

इतिप्रोक्तोनिदानार्थःसव्यासेनोपदिश्यते ॥

सर्वेषामेवरोगाणांनिदानंकुपितामलाः ॥

अर्थ–या प्रमाणें एथें निदानाचा अर्थ सांगितला. तोच पुढें दरदर रोगाचा विस्तार करून सांगतों कुपित झालेले जे वात, पित्त, आणि कफ हे दोष, ते सर्वरोगांस कारण आहेत.

तत्प्रकोपस्यतुप्रोक्तंविविधाहितसेवनं ॥

निदानार्थकरोरोगोरोगस्याप्युपजायते ॥

अर्थ–या वातादिदोषांचा प्रकोप होण्यास, अपथ्यसेवन हें कारण होय. व पुढें होणाऱ्या व्याधीचें निदान होण्यास पूर्वरोग ही कारण होतो जसें.

## निदानपरिभाषा.

तद्यथाज्वरसंतापाद्रक्तपित्तमुदीर्यते ॥ रक्तपित्ताज्ज्वरस्ताभ्यां

श्वासश्चाप्युपजायते ॥ प्लीहाभिवृध्याजठरंजठराच्छोफएवच ॥ अर्शोभ्योजाठरंदुःखंगुल्मश्चाप्युपजायते ॥ दिवास्वापादिदो वैश्चप्रतिश्यायश्चजायते ॥ प्रतिश्यायादथोकासःकासात्संजाय तेक्षयः ॥ क्षयोरोगस्यहेतुत्वेशोषश्चाप्युपजायते ॥

अर्थ–ज्वरसंतापापासून रक्तपित्त होतें, रक्तपित्तापासून ज्वर होतो. रक्तपित्त आणि ज्वर यांपासून दमा उत्पन्न होतो; आणि कवळूपासून शेवटीं उदर होतें. उदरापासून सूज येते. तसेंच मुळव्याधिपासून उदर होतें, अथवा गुल्मरोग होतो. तसेंच दिवसास निजणें इत्यादि दोषांतीं पडसें येतें, व पडशापासून खोकला; आणि खोकल्यापासून धातुक्षय होतो, तो धातुक्षय उरःक्षतास व राजयक्ष्म्यास कारण होतो.

तेपूर्वंकेवलारोगाःपश्चाद्धेत्वर्थकारिणः ॥
कश्चिद्धिरोगोरोगस्यहेतुर्भूत्वाप्रशाम्यति ॥

अर्थ–ते ज्वरसंतापादि रोगपूर्वी स्वतंत्र असून नंतर रक्तपित्तादि रोगांस कारण होतात; व कितीएक रोग दुसऱ्या रोगांस उत्पन्न करून आपण शांत होतात. जसें कावीळ पांडुरोगाला उत्पन्न करून आपण शांत होये.

नप्रशाम्यतिचाप्यन्योहेत्वर्थंकुरुतेपिच ॥
एवंकृच्छ्रतमान्नृणांदृश्यंतेव्याधिसंकराः ॥

अर्थ–कितीएक पडसें आदीकरून रोग, खोकला आदीकरून रोगांना उत्पन्न करून आपण तसेच रहातात. यावरून मनुष्यांमध्यें दुःसाध्य असे रोगांचे मिश्रीभाव दिसतात.

## निदान.

तस्माद्यत्नेनसद्वैद्यैरिच्छद्भिःसिद्धिमुत्तमां ॥
ज्ञातव्योवक्ष्यतेयोयंज्वरादीनांविनिश्चयः ॥

अर्थ– जे चांगले वैद्य आपणास यश यावें ह्मणून इच्छितात, त्यांणीं हीं पुढें सांगितलेलीं ज्वरादिकांचीं विशेष निदानें जाणावीं.

दक्षापमानसंक्रुद्धरुद्रनिश्वाससंभवः ॥
ज्वरोष्टधापृथग्द्वंद्वसंपातागंतुकःस्मृतः ॥

अर्थ– दक्षानें अपमान केल्यामुळें, संतप्त जहालेला जो शिव, त्याच्या त्या वेळच्या श्वासापासून ज्वर उत्पन्न जाहला. असा कीं वात, पित्त व कफ या दोषांपासून प्रत्येकीं तीन प्रकारचा दोन दोन दोष मिश्र होऊन त्यापासून तीनप्रकारचा तीनही दोषांपा-

सून एक आणि एक आगंतुक मिळून आठप्रकारचा ज्वर जाणावा. त्याची नावें वात ज्वर, पित्तज्वर, कफज्वर, वातपित्तज्वर, पित्तकफज्वर, संनिपातज्वर आणि आंगतुक.

## ज्वरसंप्राप्ति.

मिथ्याहारविहाराभ्यांदोषाह्यामाश्रयाश्रयाः ॥
बहिर्निरस्याकोष्ठाग्निंज्वरदाःस्यूरसानुगाः ॥

अर्थ–देश काल प्रकृति यांस जो विरुद्ध आहार तो मिथ्याआहार, आणि अशक्तानें बळवंताचें कर्म करणे तो मिथ्याविहार यांणीं वातादि दोष कुपित होऊन आमाशयाप्रत जाऊन जठराग्नीच्या उष्म्याला बाहेर काढून शरिरांतील रस दूषित करून ज्वर उत्पन्न करितात. ही वातादि दोषांपासून होणाऱ्या ज्वराची संप्राप्ति जाणावी. आगंतुक ज्वरांत दोष मागून जडतात.

## ज्वराचें सामान्य लक्षण.

स्वेदावरोधःसंतापःसर्वांगग्रहणंतथा ॥
युगपद्यत्रलक्ष्यंतेसज्वरोव्यपदिश्यते ॥

अर्थ–घामाचा प्रतिबंध, देह, इंद्रियें, व मन यांस संताप, सर्वांगास वेदना, हे तीन प्रकार एक काळीं ज्या रोगाचाठायीं होतात, त्याला ज्वर ह्मणतात.

## ज्वराचे पूर्वरूप सांगतो.

श्रमोरतिर्विवर्णत्वंवैरस्यंनयनप्लवः ॥ इच्छाद्वेषोमुहुश्चापिशीतवातातपादिषु ॥ जृंभांगमर्दोगुरुतारोमहर्षोरुचिस्तमः ॥ अप्रहर्षश्चशीतंचभवंत्युत्पत्स्यतिज्वरे ॥

अर्थ–मेहनतीवांचून श्रम होणें, उदासपणा, शरीराला ग्लानि, तोंडाला अरुचि, उदकानीं नेत्र भरून येणें, थंडी, वारा, व उष्ण यांविषयीं क्षणांत प्रीति, आणि क्षणांत तिरस्कार, जांभया, आंगमोडून येणें, शरिराला जडता, रोमांच थरारणें, अरुचि, आंधारांत बसल्यासारिखें वाटणें, चित्तास असंतोष, आणि थंडी वाजणें, हेप्रकार ज्वर उत्पन्न व्हावयाचा असतां पूर्वी होतात.

सामान्यतोविशेषात्तुजृंभात्यर्थंसमीरणात् ॥
पित्तान्नयनयोर्दाहःकफान्नान्नाभिनंदनं ॥

अर्थ–वातज्वरानें जांभाया येतात; पित्तज्वरानें डोळ्याची आग होत्ये, आणि कफज्वरानें अन्नावर अप्रिति होत्ये.

सर्वलिंगसमोवायुःसर्वदोषप्रकोपजैः ॥
रूपैरन्यतराभ्यांचसंसृष्टैर्द्वंद्वजंविदुः ॥

अर्थ–वातादि सर्व दोषांच्या प्रकोपानें वर सांगीतलेलीं जीं जांभया इत्यादि लक्षणें
ं सर्व होतात. द्वंद्वजांमध्यें त्यात्या दोनही दोषांची लक्षणें होतात; परंतु त्यांत
त समान असतो.

## वातज्वरनिदान.

वेपथुर्विषमोवेगःकंठोष्ठमुखशोषणं ॥ निद्रानाशक्षवस्तंभोगा
त्राणांरौक्ष्यमेवच ॥ शिरोहृद्गात्ररुग्वक्त्रवैरस्यंगाढविट्कता ॥
शूलाध्मानेजृंभणंचभवंत्यानिलजेज्वरे ॥

अर्थ–वातज्वरांमध्यें कंप, ज्वराच्या रेपा, कंठ, तोंड, आणि ओंठ यांस कोरड, निद्रेचा
ाश, शिंकेचा प्रतिबंध, आंगाला रुक्षपणा, मस्तक, उर, व सर्वशरीर यांत ठणका, तोंड
चव, मलावरोध, पोटशूळ, पोटफुगणें, आणि जांभया अशीं लक्षणें होतात.

## वातज्वरीं शुंठ्यादिपाचन.

विश्वभेषजकैरातकुरुविंदगुडूचिका ॥
पाचनंस्मृतमेतेपांदेयंपवनजेज्वरे ॥

अर्थ–सुंठ, किराईत, नागरमोथा व गुळवेल यांचा काढा वातज्वरावर पाचनार्थ द्यावा.

## गुडूच्यादिपाचन.

गुडूचिकोषणाजटामहौषधैश्चपाचनं ॥
मरुज्ज्वरेसलिंगकेदिनेचसप्तमेहितं ॥

अर्थ–गुळवेल, पिंपळी, जटामांसी, व सुंठ, यांचा काढा वातज्वराचें पूर्वरूप होऊन
गेल्यानंतर सातवे दिवशीं हितकारक आहे.

## शठ्यादिकाढा.

शठीनिशाद्वयंदारुशुंठीपुष्करमूलकं ॥ एलागुडूचीकटुकीपर्प
टश्चयवासकः ॥ शृंगीकिराततिक्तंचदशमूलंतथैवच ॥ क्वाथमे
षांपिबन्कृष्णासिंधुचूर्णयुतंनरः॥ज्वरान्त्सर्वान्द्रुतंहन्यान्नात्रका
र्याविचारणा ॥

अर्थ–कचोरा, दारुहळद, हळद, देवदारु, सुंठ, पुष्करमूळ, वेलदोडे, गुळवेल, कटुकी,
पित्तपापडा, धमासा, काकडशिंगी, काडेकिराईत, आणि दशमूळें, यांचा काढा पिंपळी,
व सैंधव यांचें चूर्ण घालून द्यावा; तो सर्व ज्वरांचा लौकर नाश करील. याविषयीं संशय नको.

## श्रीपर्ण्यादिपाचन.

श्रीपर्णीतर्कारीश्रीफलटिंटूकपाटलामूलैः ॥

पाचनमुचितंगाहृतजनितज्वरहारिवारिभिःक्वथितैः ॥

अर्थ–शिवणमूळ, ऐरण, बेलफळ, टेंटू, व पाडळमूळ यांचा काढा करून वातज्वरावर द्यावा, हें पाचन आहे.

## गुडूच्यादिकाढा.

गुडूचीसारिवाद्राक्षाबलाचांशुमतीतथा ॥

एषोपिपरमःसिद्धोवातज्वरविनाशनः ॥

अर्थ–गुळवेल, उपलसरी, द्राक्षे, चिकणा, व साळवण यांचा काढा वातज्वरावर द्यावा, हा उत्तम आहे.

## दर्भमूलादिकाढा.

दर्भबलागोक्षुरकंपचेत्पादावशेषितं ॥

शर्कराघृतसंयुक्तंपिबेद्वातज्वरापहं ॥

अर्थ–दर्भमूळ, चिकणामूळ, व गोखरू यांचा काढा चतुर्थांश करून निवाल्यावर साखर व मध घालून द्यावा, ह्मणजे वातज्वराचा नाश करितो.

## श्रीफलादिकाढा.

श्रीफलंसर्वतोभद्राकामदूतीचशोणकः ॥ तर्कारीगोक्षुरःक्षुद्रा

बृहतीकलशीस्थिरा॥रास्नाकणाकणामूलकुष्ठंशुंठीकिरातकः ॥

मुस्तामृतामृताबालंद्राक्षायासःशताव्हिका ॥ एषांक्वाथोनिहं

त्येवप्रभंजनकृतज्वरं ॥ सोपद्रवंचयोगोयंसर्वयोगवरःस्मृतः ॥

अर्थ–बेलफळ, लघुशिवण, रक्तपाडळ, पीतटेंटू, थोरऐरण, गोखरू, रिंगणी, डोरली, पिठवण, साळवण, रास्ना, पिंपळी, पिंपळमूळ, कोष्ठकोळिंजन, सुंठ, किराईत, नागरमोथा, गुळवेल, चिकणा, वाळा, द्राक्षे, धमासा, आणि शतावरी यांचा काढा वातज्वराचा नाश करितो.

## भूनिंबादिकाढा.

भूनिंबमुस्ताजलकंटकारिद्वयामृतागोक्षुरनागराणां ॥

सशालिपर्णीद्वयपौष्कराणांक्वाथंपिबेद्वातभवज्वरार्त्तः ॥

अर्थ–किराईत, नागरमोथे, वाळा, रिंगणी, डोर्ली, गुळवेल, गोखरू, सुंठ, डायडोला, पुष्करमूळ यांचा काढा वातज्वर येत असेल त्याणें घ्यावा.

## दुरालभादिकाढा.

दुरालभानागरतिक्तपाठाशठीवृषैरंडजटाकषायः ॥
पीतःसशूलंशमयेज्ज्वरंचसश्वासकासंपवनप्रसूतं ॥

अर्थ–धमासा, सुंठ, कुटकी, पाहाडमूळ, कचोरा, अडुळसा, आणि एरंडमूळ यांचा काढा पित्तशूळ, श्वासकास व वातज्वर यांचा नाश करितो.

## शुंठ्यादिकाढा.

विश्वामृताग्रंथिकसिद्धितोयंमरुज्ज्वरःस्यात्पिबतःकुतोयं ॥
क्वाथेथकुस्तुंबरुदेवदारुक्षुद्रौषधैःपाचनमत्रचारु ॥

अर्थ–सुंठ, गुळवेल, आणि पिंपळमूळ यांचा काढा पिणाऱ्या मनुष्यास वातज्वर कोठून राहिल; आणि या वातज्वरावर देवदारु, रिंगणी, आणि सुंठ, यांच्या काढ्याचें पाचन सुंदर आहे.

## पंचमूलादिकाढा.

पंचमूलीबलारास्नाकुलित्थैःसहपौष्करैः ॥
क्वाथोहन्याच्छिरःकंपंपर्वभेदंमरुज्ज्वरं ॥

अर्थ–पंचमूळें, चिकणा, रास्ना, कुळित्थ, आणि पुष्करमूळ, यांचा काढा शिरःकंप, सांध्यांच्या कळा, व वातज्वर यांचा नाशक आहे.

## कणादिकाढा.

कणारसोनामृतवल्लीविश्वानिदग्धिकासिंदुकभूमिनिंबैः। समु
स्तकैराचरितःकषायोहिताशिनांहंतिगदानिमांस्तु ॥ ज्वरंमरु
त्कोपसमुद्भवंतथाबलासजंचानलमंदतांच ॥ कंठावरोधंत्हृद
यावरोधंस्वेदंचहिक्कांचहिमत्वमोहान् ॥

अर्थ–पिंपळी, लसूण, गुळवेल, सुंठ, रिंगणी, कात्री निर्गुंडी, किराईत, आणि नागरमोथा यांचा काढा घेउन पथ्यकेलें असतां वातज्वर, कफज्वर, अग्निमांद्य, गळा व त्हृदय यांचा अवरोध, धाम, उचकी, आणि थंडी, मोह यांचा नाश करितो.

## काकोल्यादिकाढा.

काकोलीबृहतीमुस्ताकुष्ठंदारुवृषामता ॥
शुंठीक्वाथःसितायुक्तोहंतिवातज्वरंपरं ॥

अर्थ–कावळी, रिंगणी, नागरमोथे, कोष्ठकोळींजन, देवदारु, अडुळसा, आणि सुंठ यांचा काढा साखर घालून घ्यावा. हा वातज्वराला नाश करितो,

## अमृतादिकाढा.

अमृतानागरमुस्तानिशाव्हययवासकैः ॥
वातज्वरेप्रदातव्यःकृष्णायुक्तःकषायकः ॥

अर्थ–गुळवेल, सुंठ, नागरमोथे. हळद, आणि धमासा यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून वातज्वरावर द्यावा.

## ग्रंथ्यादिकाढा.

ग्रंथिकंपर्पटोवासामांर्गीविश्वागुडूचिका ॥
एभिःसुसाधितंतोयंतीव्रवातज्वरापहं ॥

अर्थ–पिंपळमूळ, पित्तपापडा, अडुळसा, भारंगमूळ, सुंठ, आणि गुळवेल यांचा काढा तीव्रवातज्वरनाशक आहे.

## शालिपर्ण्यादिकाढा.

शालिपर्णीबलाद्राक्षागुडूचीसारिवातथा ॥ आसांक्काथंपिबे
त्कोष्णंतीव्रवातज्वरच्छिदं ॥ काश्मरीसारिवाद्राक्षात्रायमाणा
मृताभवः ॥ कषायःसगुडःपीतोवातज्वरविनाशनः ॥

अर्थ–सालवण, चिकणा, द्राक्षे, गुळवेल, आणि उपळसरी, यांपांचा औषधांचा काढा थोडा गरम असतां प्याया; तेणेंकरून तीव्रवातज्वर नाश पावतो. शिवणीची साल, उपळसरी, द्राक्षे, त्रायमाण, आणि गुळवेल, या औषधांचा काढा गुळ मेळवून घेतला असतां वातज्वर नष्ट होतो.

## गुडूच्यादिपाचन.

गुडूचीपिप्पलीमूलनागरैःपाचनंस्मृतं ॥ दद्याद्वातज्वरेपूर्णलिंगे
सप्तमवासरे ॥

अर्थ–गुळवेल, पिंपळमूळ, व सुंठ या तीन औषधांचा काढा वातज्वर पूर्णदशेस आला असतां सातवे दिवशीं द्यावा, म्हणजे वातज्वर जातो.

## किरातादिकाढा.

किराताब्दामृतोदीच्यबृहतीद्वयगोक्षुरैः ॥
सस्थिराकलशीविश्वैःक्काथोवातज्वरापहः ॥

अर्थ–किराईत, नागरमोथे, गुळवेल, वाळा, रिंगिणी, डोर्ली, गोखरु, सालवण, पिठवण, व सुंठ इतक्यांचा काढा वातज्वरनाशक आहे.

## पिप्पल्यादिकाढा.

पिप्पलीसारिवाद्राक्षाशतपुष्पहरेणुभिः ॥
कृतःकषायःसगुडोहन्यात्पवनजंज्वरं ॥

अर्थ-पिंपळी, श्वेतउपळसरी, मनुका, बडीशेप, रेणुकाबीज,इतक्यांचा काढा करून, गूळ घालून घ्यावा. ह्मणजे तो वातज्वरनाशक आहे.

## उशीरादिकषाय.

उशीरकलशीमहौषधकिरातकांभोधरस्थिराबृहतिकाद्वयामृत
लतात्रिकंटैःकृतं ॥ कषायकममुंपिबेत्पवनजज्वरव्याकुलःपु
मान्दशशतच्छदच्छदमुदग्र्यसल्लोचने ॥

अर्थ– हेकमललोचने वाळा, पिठवण, सुंठ, चिराईत, नागरमोथे, साळवण, रिंगणी, डोर्ली, गुळवेल, आणि गोखरु यांचा काढा वातज्वरपीडितानें घेतला असतां त्याचा ज्वर शांत होतो.

## मरीच्यादिकाढा.

मरीचंरुचकंशुंठीकिरातंचहरीतकी ॥
पिप्पलीकटुकीचैववातज्वरविनाशनं ॥

अर्थ– मिरीं, एरंडमूळ, सुंठ, किराईत, बाळहर्डा, पिंपळी, कटुकी, यांचें चूर्ण अथवा काढा घेतला असतां वातज्वरनाशक आहे.

## त्रिफलाद्यचूर्ण.

त्रिफलाव्योषगुडकंशर्करात्रिवृतार्धकं ॥ मोदकंभक्षयित्वातु
पिबेच्चोष्णजलंपुनः॥ पार्श्वशूलेऽरुचौकासेज्वरेचानिलसंभवे ॥

अर्थ– त्रिफला, सुंठ, मिरि, पिंपळी, यांचें चूर्ण गुळाशीं अथवा तेढाचे चूर्णाशी दुप्पट साखर घालून भक्षण करावें. वर गरमपाणी प्यावें. ह्मणजे पार्श्वशूळ, अरुचि खोकला; आणि वातज्वर यांचा नाश करितो.

## पिप्पल्यादिचूर्ण.

तुल्यांशंमर्दयेत्खल्वेपिप्पलीहिंगुलंविषं ॥
द्विगुंजंमधुनादेयंवातज्वरविनाशनं ॥

अर्थ– पिंपळी, हिंगुळ, व बचनाग, हे समभाग खलामध्यें घोटावें; आणि तें चूर्ण दोनगुंजा मधाशी द्यावें; ह्मणजे वातज्वराचा नाश करितें.

## द्राक्षादिचूर्ण.

द्राक्षादुरालभापथ्याचिक्कणीसमभागतः ॥
एतागुडान्वितानूनंनाशयंत्यनिलज्वरं ॥

अर्थ–द्राक्षे, धमासा, बाळहरीतकी; व चिकणीसुपारी; यांचें समभाग चूर्ण गुळाशीं द्यावें, तें वातज्वरनाशक आहे.

## शतावरीस्वरस.

सद्योवातज्वरंहंतिशतावर्यामृतारसः ॥
समासात्सगुडःपीतोबलहीनस्यदेहिनः ॥

अर्थ–शतावरी, गुळवेल, यांचा रस गूळ घालून प्यावा; ह्मणजे निर्बळ पुरुषाचा वात शांत होतो.

## कल्पतरुरस.

शुद्धंशंकरशुक्रमक्षतुलितंमारारिनारीरजस्तावत्तावदुमापतिस्फुटगलालंकारवस्तुस्मृतं ॥ तावत्येवमनःशिलाचविमलातावत्तथाटंकणंशुंठीद्वयक्षमितंकणाचमरिचंदिक्पालसंख्याक्षकं ॥ विषादिवस्तूनिशिलोपरिष्टाद्विचूर्णयेद्वाससिशोधयेच्च ॥ ततस्तुखल्वेरसगंधकौचचूर्णैचतद्यामयुगंविमर्द्य ॥ कल्पतरुनामधेयोयथार्थनामारसश्रेष्ठः॥ समीरणश्लेष्मगदान्हरतेमात्रास्यगुंजैका ॥ आर्द्रकेणसममेषभक्षितोहंतिवातकफसंभवज्वरं ॥ श्वासकासमुखसेकशीततावन्हिमांद्यमरुचिंचनाशयेत् ॥ नस्येनाश्वेवहरतिशिरोर्तिंकफवातजां ॥ मोहंमहांतमपिचप्रलापंक्षवथुग्रहं ॥

अर्थ–पारा, गंधक, बचनाग, मनसीळ, टांकणखार, हीं शुद्ध केलेलीं औषधें प्रत्येकीं एकेक तोळा प्रमाणें घेऊन त्यांत सुंठ तोळे २, मिऱ्यें तोळे ८, पिंपळी तोळे ८, याप्रमाणें घालून बचनागादि औषधें बारीक कुटून वस्त्रगाळ करून नंतर पारा व गंधक यांची कज्जली करून त्यांत मेळवून तीं सर्व औषधें दोनप्रहर खलावीं, ह्मणजे कल्पतरु यानामाचा श्रेष्ठ रस होतो. हा एक गुंजभार सेवन केला असतां वातश्लेष्मरोग, हरण करितो; आणि हा आल्याचा रसाबरोबर भक्षिला असतां वातकफज्वराचा नाश करितो. तसाच श्वास, कास, मुखांतील लाळ, शैत्य, अग्निमांद्य, व अरुचि यांचा नाशक आहे; आणि याचें नस्य केलें असतां कफवातापासून झालेली जी मस्तकपीडा ती हरण करितो. तसाच मोठा मोह, बडबड व शिंकेचा प्रतिबंध यांचाही नाश करितो.

## भैरवरस.

विषमहौषधमागधिकोषणद्युमणिरक्तकमार्द्रकमर्दितं ॥
क्रमविवर्धितमुद्गलितज्वरंहरतिभैरवएषरसोवरः ॥

अर्थ– बचनाग, सुंठ, पिंपळि, मिरि, हीं औषधें एकोत्तरभागानें घेऊन हिंगुळ चित्रक व आल्याचा रस यांत खलावीं. हा भैरवरस सामर्थ्यपाहून द्यावा; ह्मणजे मोठ्या वातज्वरावर प्रशस्त आहे,

## शीतभंजीरस.

पारदंरसकंतालंशिखितुत्थंचटंकणं ॥ गंधकंचसमंपिष्ट्वाकारवे
ल्लरसैर्दिनं ॥ ताम्रपात्रोदरेलेप्यंयंत्रेपात्रंत्वधोमुखं ॥ दत्वारुध्वा
विशोष्याथवल्कलाभिःप्रपूरयेत् ॥ पचेद्दार्वाग्निनाचुल्यांताम्र
पृष्ठगतायदा ॥ स्फुटंतिव्रीहयःशुद्धोरसस्तंस्वांगशीतलं ॥
ताम्रपात्रात्समुद्धृत्यचूर्णयेन्मरिचैःसमं ॥ शीतभंजीरसोनामद्वि
गुंजंवातकेज्वरे ॥ दातव्यःपर्णखंडेनतत्क्षणान्नाशयेज्ज्वरं ॥
त्रैदिनंविषमंतीव्रंएकाद्वित्रिचतुर्थकं ॥

अर्थ–पारा, कलखापरी, हरताळ, मोरचूत, टांकणखार, व गंधक ही औषधें समभाग घेउन कारलीच्या रसांत एकदिवस खलावीं, नंतर त्याचा तांब्याच्या भांड्याला आंतून लेप करावा; आणि त्या भांड्यावर अधोमुख दुसरें ताम्रपात्र वर ठेऊन मातकापड करून सुकऊन शेणी चुलींत भरून तीव्राग्नीनें पचन करावें. त्या ताम्रपात्रावर भाताच्या लाह्या फुटों लागल्या ह्मणजे अग्नि कमीकरून आंतील औषध काढून मिऱ्याशीं खलून दोन गुंजा विड्याच्या पानाशीं द्यावें; ह्मणजे तत्क्षणीं वातज्वर नाश पावतो. व हा शीतभंजीरस त्रिदिन सेविला तर विषमतीव्रज्वर, व एकाहिक, द्व्याहिक, आणि चातुर्थिक ज्वरास शमवितो.

## मातुलिंगादिगुटिका.

मातुलिंगफलकेसरोधृतःसिंधुजन्ममरिचान्वितोमुखे ॥ हंति
वातकफरोगमास्यगंशोषमाशुजडतामरोचकं ॥ शर्करादाडि
माभ्यांचद्राक्षादाडिमयोस्तथा ॥ कल्कंविधारयेदास्येशोषवै
रस्यनाशनं ॥

अर्थ–महाळुंगाचे केसर, सैंधव, मिरीं, हिं तिन्हि औषधें एकत्र खलून गोळीकरून मुखांत धरावी. तेणेंकरून मुखसंबंधि कफवातरोग, शोष, जडपणा, व अरुचि ही

दूर होतात. साखर आणि डाळिंब अथवा द्राक्षें आणि डाळिंब यांचा कल्क शोष, व मुखाची विरसता हिं दूर होण्याकरितां खावा.

## द्राक्षादिप्रतिसार.

द्राक्षामलकयोःकल्कंसघृतंवदनेक्षिपेत् ॥ तेनघृष्टामुखस्यांतः कुर्वीतप्रतिसारणं ॥ जिव्हातालुगलांतस्थःसंशोषस्तेनशाम्यति ॥ सुरसंजायतेवक्त्रंरुचिर्भवतिभोजने ॥

अर्थ—द्राक्षें, आणि आंवळकाठी यांचा कल्क तुपाशीं मिळवून तो मुखाचे आंतून चोळावा. त्याला प्रतिसार ह्मणतात. हें केल्यावर त्याच औषधाची गोळी मुखांत धरावी. ह्मणजे जिव्हा, तालु व गळा यांचा शोष शांत होतो; आणि मुख सुरस होऊन भोजनीं रुचि होत्ये.

## हरीतक्यादिगुटिका.

हरीतकीत्रिवृद्रुद्रदारुकाणांपृथग्भवेत् ॥ पलद्वयंकणाशुंठीगुडूचीगोक्षुरोवरी ॥ सहदेवीविडंगंचप्रत्येकंपलसंमितं ॥ मधुनावटिकांकृत्वाखादन्ज्वरमपोहति ॥ कासंश्वासंमलस्तंभंवन्हिमांद्यंनियच्छति ॥

अर्थ—हरीतकी, तेड, व वरधारा, हीं प्रत्येकीं तोळे ८ पिंपळी, सुंठ, गरुडवेल, गोखरु, शतावरी, सहदेवी, व वावडिंगें हीं प्रत्येकीं तोळे ४ प्रमाणें घेऊन चूर्ण करून मधांत गोळी करावी. ती ज्वर, कास, श्वास, मलावरोध, अग्निमांद्य यांचा नाश करित्ये.

## स्वेद काढण्याविषयीं प्रमाण सांगतों.

वातश्लेष्मज्वरेस्वेदंजंघापार्श्वास्थिशूलिनि ॥ पीनसश्वासबाधिर्येकारयेत्तद्विधानवित् ॥ स्रोतसांमार्दवंकृत्वानीत्वापावकमाशयं ॥ हत्वावातकफस्तंभंस्वेदोज्वरमपोहति ॥

अर्थ वातश्लेष्मज्वरामध्यें मांड्या, पार्श्वभाग, व अस्थि, यामध्यें शूल, असून पडसें, श्वास, व बैहिरेपणा हे विकार असतील तर, घाम काढावा. ह्मणजे घामापासून इतके गुण होतात. रसवाहिनी शिरांला मृदुपणा येतो; व अग्निला स्वस्थानीं आणितो; आणि वात, व कफसंबंधि जडपणा घालवून ज्वराचा नाश करितो.

## खर्परभ्रष्टवालुकास्वेदयोग.

खर्परभ्रष्टपरस्थितकांजिकसंसिक्तावालुकास्वेदः ॥

शमयतिवातकफामयमस्तकशुलांगभंगादीन् ॥

**अर्थ**– वाळू खापरांत तापवून तीवर कांजि शिंपून तिचा बाफारा द्यावा. तो वातकफरोग, मस्तकशूळ, व आंगमोडेपणा यातें शमवितो.

## निद्रानाशनिदान.

नावनंलंघनंचिंताव्यायामःशोकभीक्रुधः ॥

एभिरेवभवेन्निद्रानाशःश्लेष्मातिसंक्षयात् ॥

**अर्थ**–नस्य, लंघन, चिंता, व्यायाम, शोक, भीति, व क्रोध यांपासून अति कफनाश झाला असतां निद्राभंग होतो.

## विजयाचूर्णयोग.

भ्रष्टंतुविजयाचूर्णंमधुनानिशिभक्षयेत् ॥

निद्रानाशेतिसारेचग्रहण्यांपावकक्षये ॥

**अर्थ**–रात्री भांग भाजून तिचे चूर्ण मधाशीं घ्यावें. त्याणें निद्रानाश अतिसार ग्रहणी, व अग्निमांद्य इत्यादिक नाश पावतात.

## निद्रा येण्यास गुडादिचूर्ण.

गुडंपिप्पलिमूलस्यचूर्णेनालोडितंलिहन् ॥

चिरादपिचसंनष्टांनिद्रामाप्नोतिमानवः ॥

**अर्थ**–पिंपळीच्या मुळांचे चूर्ण गुळाशी घेतलें असतां बहुत दिवसांचा निद्रानाश जाहाला असेल, तरी त्यास निद्रा येईल

## निद्रायेण्याचें औषध.

मूलंतुकाकमाच्याबध्दंसूत्रेणमस्तकेनियतं ॥

विदधातिनष्टनिद्रेनिद्रामाश्वेवसिध्दमिदं ॥

**अर्थ**–कावळीचें मूळ सुतांत बांधून शेंडीस बांधिलें असतां निद्राप्राप्ति येते. अनुभव सिध्दआहे.

## पित्तज्वरलक्षण.

वेगस्तीक्ष्णोतिसारश्चनिद्राल्पत्वंतथावमिः ॥ कंठोष्ठमुखनासानांपाकःस्वेदश्चजायते ॥ प्रलापोवक्त्रकटुतामूर्छादाहोमदस्तृषा ॥ पीतविण्मूत्रनेत्रत्वक्पैत्तिकेभ्रमएवच ॥

**अर्थ**–पित्तज्वरांमध्यें ज्वराचा वेग तीक्ष्ण, अतिसार, अल्पनिद्रा, वांति; व गळा, ओंठ,

मुख, व नासिका यांचा पाक होतो. घाम, बडबड, तोंडाला तिखटपणा, मूर्छा, दाह, उन्मत्तता, ताहान; आणि मळ, मूत्र, नेत्र, व त्वचा हीं पिवळीं; आणि भ्रम हीं लक्षणें होतात.

## छिन्नादिपाचन.

छिन्नरुहापिचुमंदकधान्यंविश्वनिशाजनितश्चकषायः ॥
मृदुपाचनकंगुडमिश्रितमेवपित्तभवेज्वरएवहिपेयं ॥

अर्थ-गुडूची, निंबाच्या काडया, धनें, सूंठ, व हळद, यांचा काढा गुळ घालून द्यावा. हें पित्तज्वरावर पांचन आहे.

## दुस्पर्शादिकाढा.

दुस्पर्शवासाकटुकाहरेणुप्रियंगुभूनिंबकृतःकषायः ॥
पीतोहिपित्तप्रभवंसदाहज्वरंजयेदाशुसितासमेतः ॥

अर्थ-धमासा, अडुळसा, कटुकी, पित्तपापडा, कांग व किराईत, यांचा काढा साकर घालून प्याला असतां दाहयुक्त पित्तज्वराचा नाश करितो.

## द्राक्षादिकाढा.

द्राक्षापटोलीपिचुमंदतिक्ताहरीतकीसिंहमुखीजलंच ॥
धान्याकलोध्रांबुदनागरंचपित्तज्वरांभोनिधिवाडवाग्निः ॥

अर्थ-द्राक्षें, कडुपडवळ कडुनिंब, कटुकी, बाळहरडा, रिंगणी, वाळा, धनें, लोध्र, नागरमोथा, व सुंठ यांचा काढा प्यावा. तो पित्तज्वर समुद्राला वडवाग्नीसारिखा आहे.

## पित्तज्वरीं प्रतीकर.

अमलैःकमलैरथानिलैरलसैःपुष्परजःसमन्वितैः ॥
जलकेलिकथाकुतूहलैरपिपित्तज्वरजारुजोजयेत् ॥

अर्थ-श्वेतकमलें, सुगंधि पुष्पांवरून आलेला मंद सुगंध वायु, आणि जलक्रीडा यांहिं करून वैद्यानें पित्तज्वरजनितपीडा जिंकावी.

## तिक्तादिकाढा

तिक्तामुस्तायवैःपाठाकट्फलाभ्यांसहोदकं ॥
पक्वंसशर्करंपीतंपाचनंपैत्तिकज्वरे ॥

अर्थ-कटुकी, नागरमोथा, यव, पाडमूळ, कायफळ, व वाळा यांचा काढा साखर घालून प्राशन करावा, हा पित्तज्वरीं पाचकआहे.

## पर्पटादिकाढा.

पर्पटोवासककटुकाकिरातोधन्वयासकः ॥ प्रियंगुश्चकृतःक्वा
थएषःशर्करयायुतः ॥ पिपासादाहपित्तास्रयुक्तंपित्तज्वरंहरेत् ॥

अर्थ–पित्तपापडा, अडुळसा, कुटकी, किराईत, धमासा, व कांग यांचा काढा साखर घालून घ्यावा. ताहान; दाह, व रक्तपित्त यांसहित पित्तज्वराला घालवितो.

## द्राक्षादि काढा.

द्राक्षाहरीतकीमुस्ताकटुकाकृतमालकः ॥ पर्पटश्चकृतःक्वाथए
षांपित्तज्वरापहः ॥ मुखशोषप्रलापांतर्दाहमूर्छाभ्रमप्रणुत् ॥
पिपासारक्तपित्तानांशमनोभेदनोमतः ॥

अर्थ–द्राक्षे, बाळहरकी, नागरमोथा, कटुकी, बाहव्याचा मगज व पित्तपापडा यांचा काढा घ्यावा. तो मुखशोष, बडबड, अंतर्दाह, मूर्छा, व भ्रम यांचा नाश करितो; आणि ताहन; व रक्तपित्त यास शमवितो; व मळ साफ करितो.

## पटोलादिकाढा.

पटोलयवधान्याकमधुकंमधुसंयुतं ॥
हंतिपित्तज्वरंदाहंतृष्णांचातिप्रमाथिनीं ॥

अर्थ–कडुपडवळ, यव, धने, व ज्येष्ठमध यांचा काढा मधाशीं घेतला असतां पित्त-ज्वर, दाह; व ताहान. यांतें शमवितो.

## गुडूच्यादिकाढा.

गुडूच्यामलकीयुक्तःकवलोवापिपर्पटः ॥
पित्तज्वरंहरेत्तूर्णंपित्तशोषभ्रमान्वितं ॥

अर्थ–गुळवेळ, आवळकठी; व पित्तपापडा यांचा; अथवा एकट्याच पित्तपापड्याचा काढा घेतला असतां शोष; व भ्रमयुक्त पित्तज्वराला हरितो.

## ह्रीबेरादिकाढा.

ह्रीबेरचंदनोशीरघनपर्पटसाधितं ॥
दद्यात्तुशीतलंवारितृड्वृद्धिज्वरदाहनुत् ॥

अर्थ–वाळा, रक्तचंदन, काळावाळा, नागरमोथा, व पित्तपापडा, यांचा काढा शीत-ल करून द्यावा; तो मोठी ताहान, ज्वर, व दाह यांतें हरितो.

## भूनिंबादिकाढा.

भूनिंबातिविषालोध्रमुस्तकेंद्रयवाःस्मृताः ॥ बालकंधान्यकं

बिल्वंकषायोमाक्षिकान्वितः ॥ भिनत्तिश्वासकासांश्चरक्तंपि
त्तंज्वरंहरेत् ॥

अर्थ–किराईत, अतिविष, लोध्र, नागरमोथा, इंद्रजव, गुळवेल, वाळा, धनें; व बेल. फळ यांचा काढा मधाशीं घ्यावा. तो अतिसार, श्वास, कास, रक्तपित्त, ज्वर यांचा नाश करितो,

## कट्फलादिकाढा.

कट्फलेंद्रयवांबष्ठातिक्तामुस्तैःशृतंजलं ॥
पाचनंदशमेन्हिस्यात्तीव्रपित्तज्वरेनृणां ॥

अर्थ–कायफळ, इंद्रजव, पाहाडमूळ, कटुकी व नागरमोथा, यांचा काढा तीव्र पित्तज्वरास दाहादिवसांनंतर पाचन होतो. ह्मणोन द्यावा. तेणेंकरून पित्तज्वर जातो.

## पंचभद्रादिकाढा.

पर्पटाब्दामृताविश्वाकैरातैःसाधितंजलं ॥
पंचभद्रमिदंज्ञेयंवातपित्तज्वरापहं ॥

अर्थ–पित्तपापडा, नागरमोथे, गुळवेल सुंठ, किराईत या पांचा औषधांचा काढा करून प्यालें असतां वातपित्तज्वर नाशितो.

## कलिंगादिकाढा.

कलिंगकट्फलंलोध्रंपाठाकटुकरोहिणी ॥
पक्कंसशर्करंपीतंपाचनंपित्तकेज्वरे ॥

अर्थ–कुडयाची साल, कायफळ, लोध्र पाहाडमूळ, व कुटकी यांचा काढा साखर घालून पित्तज्वरावर घ्यावा हा पाचन आहे.

## शर्करादिकाढा.

शर्करामधुरोहंतिकषायःपैत्तिकंज्वरं ॥
चंदनोशिरश्रीपर्णीपुरूषकमधूकजः॥

अर्थ–रक्तचंदन, वाळा, कायफळ, फालसाव, जेष्टीमध यांचा काढा साकर घालुन घ्यावा. तो पित्तज्वराचा नाशकरितो

## क्षुद्रादिकाढा.

क्षुद्राधान्यकशुंठीभिर्गुडूचीमुस्तपद्मकैः ॥ रक्तचंदनभूनिंबप
टोलवृषपौष्करैः ॥ कटुकेंद्रयवारिष्टभांर्गीपर्पटकैःसमैः ॥ का
थंप्रातर्निषेवेतशांतिंसर्वज्वरच्छिदं ॥

## लोध्रादिकाढा.

लोध्रोत्पलामृतापद्मसारिवाणांसशर्करः ॥

क्काथःपित्तज्वरंहन्यादथवापर्पटोद्भवः ॥

**अर्थ**–लोध्र, कमळकंद, गुळवेल, श्वेतउपलसरी, यांचा काढा साकर घालून द्यावा. तो पित्तज्वराचा नाश करितो; अथवा केवळ पित्तपापड्याचा काढा पित्तज्वराचा नाश करितो.

## पर्पटादि काढा.

पर्पटामृतधात्रीणांक्काथःपित्तज्वरंजयेत् ॥

द्राक्षारग्वधयोश्चापिकाश्मर्याश्चापिवापुनः ॥

**अर्थ**–पित्तपापडा, गुळवेल, व आंवळकाठि, यांचा अथवा द्राक्ष व बाहव्याचा मगज यांचा; किंवा एकट्या लघुशिवणीचा काढा पित्तज्वराला जिंकितो.

## विश्वादिकाढा.

विश्वपर्पटकोशीरघनचंदनसाधितं ॥

दद्यात्सुशीतलंवारितृट्छर्दिज्वरदाहनुत् ॥

**अर्थ**–सुंठ, पित्तपापडा, वाळा, नागरमोथा, व रक्तचंदन, यांचा काढा थंड करून द्यावा; तो तृषा, छर्दि, ज्वर, व दाह यांचा नाश करितो.

## गुडूच्यादिकाढा.

गुडूचीमुस्तधान्याकमधुकंकटुरोहिणी ॥

तृष्णाशूलारुचिच्छर्दिपित्तज्वरहरोगणः ॥

अर्थ–गुळवेल, नागरमोथे, धने, ज्येष्ठीमध, व किराईत, हा समुदायात्मक गण, तृषा, शूल, अरुचि, ओकारी, व पित्तज्वर यांचा नाश करितो.

## किरातादिकाढा.

किरातामृतधान्याकचंदनोशीरपर्पटैः ॥ सपद्मकैः कृतःक्काथोहं

तिपित्तभवंज्वरं ॥ दाहतृष्णाश्रमारुचिमुत्क्लेशंवमथुंक्लमं ॥

**अर्थ**–किराईत, गुळवेल, धणे, रक्तचंदन, वाळा, पित्तपापडा, पद्मकाष्ठ यांचा काढा पित्तज्वर, दाह, तृष्णा, श्रम, अरुचि, तोंडास पाणी सुटतें तें, वांति, व ग्लानि यांचा नाश करितो.

## चंदनादिकाढा.

चंदनंमधुकंद्राक्षांकटुकांसदुरालभां ॥

चंदनादिर्गणःप्रोक्तोहन्याद्दाहज्वरारुचीः ॥

अर्थ–रक्तचंदन, ज्येष्ठमध, द्राक्षे, कटुकी, व धमासा हा चंदनादिगण दाह, अरुचि व ज्वर यांचा नाश करितो.

## पर्पटादिकाढा.

एकएवखलुपैत्तिकंज्वरंहंतिपर्पटकृतःकषायकः ॥
चंदनोदकमहौषधान्वितश्चेत्तदाकिमुपुनर्विचारणा ॥

अर्थ–एकट्याच पित्तपापड्याचा काढा पित्तज्वराचा नाश करील. मग तो चंदन, वाळा, व सुंठ यांणी युक्त केला असतां ज्वराचा नाश करील. याविषयीं संशय नको.

## उदुंबरादिहिम.

उदुंबरशिफाछिन्नातज्जलंसितयान्वितं ॥
पीतंपित्तज्वरंहंतिपटोल्यावाशिफाजलं ॥

अर्थ–उंबराच्या पाळांचें स्रवलेलें पाणी साकर घालून किंवा कडूपडवळाच्या मुळाचें पाणी साकरेशी घ्यावें. तें पित्तज्वरनाश करितें.

## द्राक्षादिकाढा.

द्राक्षाभयापर्पटकाब्दतिक्ताक्काथःसशम्याकफलोविदध्यात् ॥
प्रलापमूर्छाभ्रमदाहशोषतृष्णान्वितेपित्तभवज्वरेच ॥

अर्थ–मनुका, हिरडा, पित्तपापडा, नागरमोथा, कटुकी, व बाहव्याचा मगज, इतक्यांचा काढा बडबड, मूर्छा, भोंवळ, दाह, शोष, व तृषा इतक्यांनीं युक्त जो पित्तज्वर त्याचा नाश करितो,

## दुरालभादिकाढा.

दुरालभापर्पटकप्रियंगुभूनिंबवासाकटुरोहिणीनां ॥
क्काथंपिबेच्छर्करयावगाढंतृष्णास्रपित्तज्वरदाहयुक्तः ॥

अर्थ–धमासा, पित्तपापडा, गहुला, किराईत, अडुळसा, व कटुकी इतक्यांचा काढा करून त्यांत साखर घालून तृषा, रक्तपित्तज्वर, व दाह, इतक्यांनीं युक्त जो रोगी असेल त्याणें घ्यावा.

## द्राक्षादिकाढा.

द्राक्षापर्पटराजवृक्षकटुकामुस्ताभयानांजलंमूर्छाशोषनिदाघ
तृट्प्रलपनभ्रांत्याढ्यपित्तज्वरे ॥ दुस्पर्शाप्रमदाकिरातकटुका
सिंहास्यरेणूद्भवःक्काथःशर्करयान्वितोहरतितृट्दाहास्रपित्तज्वरान् ॥

अर्थ-मनुका, पित्तपापडा, बाहव्याचा मगज, कटुकी, नागरमोथें, व हिरडेदळ यांचा काढा प्यावा, ह्मणजे पित्तज्वरजनित जी मूर्छा, शोष, तलखी तृषा, बडबड, व भ्रांति यांचा नाश होतो. धमासा, अतिविष, चिराईत, कटुकी, अडूळशीची पानें व पित्तपापडा यांचा काढा करून त्यांत साकर घालून प्यावा; ह्मणजे तृषा, दाह, रक्तपित्त, व ज्वर हीं नाश पावतात.

## छिन्नादिकाढा.

अहोकिमर्थबहवःकषायाःपराशराद्यैर्मुनिभिःप्रदिष्टाः ॥
छिन्नाशिवापर्पटतोयपानात्पित्तज्वरःकिंनसरीसरीति ॥

अर्थ-पराशरादि ऋषींनीं इतके पुष्कळ काढे कशाला सांगीतले, गुळवेल, हरीतकी, व पित्तपापडा यांचा काढा घेतल्यानें पित्तज्वर जातनाहीं काय,

## द्राक्षादिकाढा.

द्राक्षाचंदनपद्मानिमुस्तातिक्तामृतापिच ॥ धात्रीबालमुशीरं
चलोध्रेंद्रयवपर्पटाः ॥ परूषकंप्रियंगुश्चयवासोवासकस्तथा ॥
मधुकंकुलकंचापिकिरातोधान्यकंतथा ॥ एषांक्काथोनिहंत्येव
ज्वरंपित्तसमुत्थितं ॥ तृष्णांदाहप्रलापंचरक्तपित्तंभ्रमंक्लमं ॥
मूर्छांछर्दितथाशूलंमुखशोषमरोचकं ॥ कासंश्वासंचहृल्लासं
नाशयेन्नात्रसंशयः ॥

अर्थ-द्राक्षे, रक्तचंदन, कमळकंद, नागरमोथा, कटुकी गुळवेल, आवळकाठी, वाळा, काळावाळा, लोध, इंद्रजव, पित्तपापडा, फालसा, कांग, धमासा, अडूळसा, ज्येष्ठीमध, कडुपडवळ, किराईत, व धने यांचा काढा घेतला असतां पित्तापासून झालेला ज्वर, तृषा, दाह, प्रलाप, रक्तपित्त, भ्रम, ग्लानि, मूर्छा, ओकारी, शूळ, मुखशोष, अरुचि, कास, श्वास व तोंडालापाणी सुटतें तें या सर्वांचा नाश निःसंशय करील

## ससितादिकाढा.

ससितोनिशिपर्युषितःप्रातर्धान्याकतंडुलक्काथः ॥
पीतःशमयत्यचिरादंतर्दाहंज्वरंपैत्तं ॥

अर्थ-धणे, व तांदुळ रात्रीं पाण्यांत भिजत घालून प्रातःकाळीं काथ करून साकर घालून घ्यावा. तो अंतर्दाह, व पित्तज्वर यांस शांत करील.

## मुद्गादिकाढा.

मुद्गानामंजलिंचूर्णयष्टीमधुकसाधितं ॥
पाक्यंशीतकषायंवापिबेत्पित्तज्वरापहं ॥

अर्थ–ज्येष्ठीमध आणि मुगाचें आठतोळे चूर्ण पाण्याशी कढवून शीत करून प्राशन करावें. म्हणजे पित्तज्वर नाशकारितें

## ऱ्हीवेरादिकाढा.

ऱ्हीबेरंमुस्तकंधान्यंचंदनंयष्टिकामृता ॥ वृषोशीरयुतःक्काथः
शर्करामधुसंयुतः ॥ रक्तपित्तंजयत्युग्रंतृष्णादाहज्वरापहः ॥

अर्थ–वाळा, नागरमोथे, धने, रक्तचंदन, ज्येष्ठमध, अडुळसा, व काळा वाळा यांचा काढा. साकर व मध घालून घ्यावा. तो उग्र रक्तपित्त, तृष्णा, दाह, व ज्वर यांचा नाशक आहे.

## तिक्तादिकाढा.

तिक्तायासकभूनिंबश्यामापर्पटवासकैः ॥
शृतंजलंसितायुक्तंरक्तपित्तज्वरंजयेत् ॥

अर्थ–कटुकी, धमासा, किराईत, गुळवेल, पित्तपापडा, व अडुळसा यांचा काढा साकर घालून घ्यावा. तो रक्तपित्तज्वराचा नाश करील.

## पथ्यादिकाढा.

पथ्यांतैलघृतक्षौद्रैर्लिहेद्दाहज्वरापहां ॥
कासासृक्पित्तवीसर्पश्वासंहंतिवमिमपि ॥

अर्थ–हरीतकीचें चूर्ण तेल किंवा तूप किंवा मध यांबरोबर चाटिले असतां दाहज्वर, खोकला, रक्तपित्त, विसर्प, श्वास, व वांति यांचा नाश करितो.

## आम्रादिफांट.

आम्रजंबूकिसलयैर्वटशृंगप्ररोहकैः ॥ उशीरेणकृतःफांटःसक्षौद्रोज्वरनाशनः ॥ पिपासाछर्द्यतिसारान्मूर्छांजयातिदुस्तरां ॥

अर्थ–आंबा व जांबूळ यांची कोंवळीं पानें, व वडाच्या कोंवळ्या पानाच्या कळ्या, व त्याच्या कोंवळ्या पारंब्या आणि वाळा या औषधांचा पूर्वरीतीनें फांट करून प्याला असतां ज्वर, ताहान, ओकारी, अतिसार, व कष्टसाध्य असी मूर्छा हीं दूर होतात.

## गुडूच्यादिकाढा.

गुडूचीपद्मलोध्राणांसारिवोत्पलयोस्तथा ॥
शर्करामधुरःक्काथःशीतःपित्तज्वरापहः ॥

अर्थ–गुळवेल, पद्मकाठ, व लोध्र यांचा किंवा उपळसरी, व कमळकंद यांचा काढा शीत करून साकर घालून घ्यावा, म्हणजे तो पित्तज्वराचा नाश करितो.

## पटोलादिकाढा.

पटोलयवनिक्काथोमधुनामधुरीकृतः ॥
तीव्रपित्तज्वरोन्मर्दीपानात्तृट्दाहनाशनः ॥

अर्थ—कडुपडवळ व यव यांचा काढा शीत झाल्यावर मध घालून घ्यावा. तो तीव्रपित्त. ज्वर, तृषा, व दाह यांचा नाश करितो.

## केसरमातुलिंगादियोग.

जिव्हातालुगलक्लोमशोषेमूर्ध्निसदापयेत् ॥
केशरंमातुलिंगस्यमधुसैंधवसंयुतं ॥

अर्थ—जीभ, टाळू, गळा, क्लोम व टाळा यांचे ठायीं शोष झाला असतां माहाळुंगाचा गर, मध आणि सैंधव लावून घ्यावा.

## दुसरा प्रकार.

केसरंमातुलिंगस्यमधुसैंधवसंयुतं ॥ हरितकीप्रियंगुश्चपिप्पलीलोध्रमेवच ॥ दार्वीहरिद्रातेजोव्हासक्षौद्रंमुखधावनं ॥ एतेनकटुभावश्चमुखरोगश्चशाम्यति ॥ वक्त्रंविशदतामेतिभक्तछंदश्चजायते ॥ मुद्गयूषौदनोदेयःसितयापैत्तिकेज्वरे ॥

अर्थ—माहाळुंगाचा गर, मध व सैंधव यांणी किंवा हरितकी, कांग, पिंपळी, लोध्र दारुहळद, व तेजबळ यांचें चूर्ण मधांशी कालवून त्याणें तोंड धुवावें. म्हणजे तोंडचा कडूपणा, व मुखरोग शांत होतो. तोंड स्वच्छ होऊन रुचि येत्ये. त्या रोग्याला मुगांचें काट व भात पथ्य द्यावें.

## रसपर्पट.

शुद्धसूतंद्विधागंधंमर्द्यंभृंगीरसैःक्षणं ॥ पाचयेल्लोहपात्रस्थंचाल्यंतुचुटकेनच ॥ लोहभस्माथवाताम्रंपादांशेनविनिःक्षिपेत् ॥ पाच्यंप्रचालयेन्नैवयामार्धंमृदुवन्हिना ॥ तत्क्षिपेत्कदलीपत्रेगोमयस्योपरिस्थिते ॥ तत्पत्रंधारयेदूर्ध्वंतदूर्ध्वंगोमयंक्षिपेत् ॥ ततःसंचूर्णयेत्खल्वेनिर्गुंडयाभावयेद्दिनं ॥ जयंतीत्रिफलाकन्यावासाभार्ङ्गीकटुत्रयैः ॥ भृंग्यग्निमुनिमुंडीभिर्भावयेत्प्रत्यहंपृथक् ॥ आर्द्रकस्यद्रवैःपश्चाद्भावयेद्दिनसप्तकं ॥ अंगारैःस्वेदयेत्पश्चात्पर्पट्याख्योमहारसः ॥ चतुर्गुंजामितोदेयःसम्यक्श्लेष्माधिकेज्वरे ॥ वासाशुंठीभयाक्काथमनुपानंप्रकल्पयेत् ॥ चव्यकस्यरसैर्वाथपेयंश्लेष्मज्वरापहं ॥

अर्थ– शुद्ध पाराभाग.१ व गंधकभाग१ यांची कज्जली करून माक्याच्या रसांत क्षण भर खलावी; नंतर ती मंदाग्नि असलेल्या चुलीवर लोखंडांत टेऊन हळू चाळवावी; नंतर ताम्र, व लोह हीं भस्में चतुर्थांश घालावीं; आणि चार घटका हलवल्यावांचुन मंदाग्नीने पचन करावीं; नंतर केळीच्या पानावर ओतून केळीचे पानावर झांकण घालून निवाल्यावर खलांत घोटून निर्गुंडीच्या रसाचीं तीन पुटें देऊन नंतर टाकळी, त्रिफळा, कुमारी, अडुळसा, भारंगमूळ, त्रिकटु, माका, चित्रक, हातगा व मुंढी यांच्या रसाची प्रहर प्रहर भावना द्यावी; नंतर आल्याच्या रसाच्या सातदिवस भावना द्याव्या; आणि निखाऱ्यावर भाजवी. हा पर्पटीरस चार गुंजा अडुळसा, सुंठ, व हरीतकी यांच्या काढ्याशिं किंवा चवकाचे रसांत द्यावा. तो कफज्वराला हरितो.

## कलिंगादिचूर्ण.

कलिंगरोहिणीनिशाकटुत्रिकेभकेसरं ॥
विचूर्णितंकफज्वरेनिहंतिकोष्णवारिणा ॥

अर्थ– इंद्रजव, कटुकी, हळद, चित्रक, नागकेसर, व त्रिकटु यांचें चूर्ण ऊनपाण्याशिं घ्यावें. तें कफज्वराचें नाशक आहे.

## शृंग्यादिअवलेह.

शृंगिकणाकट्फलपौष्कराणांक्षौद्रान्वितानांविहितोवलेहः ॥
श्वासेनकासेनयुतंबलासंज्वरंजयेदत्रनकापिशंका ॥

अर्थ–कांकडशिंगी, पिंपळी, कायफळ, व पुष्करमूळ, यांचा अवलेह मध घालून द्यावा. हा कास, श्वास, कफ, आणि ज्वर यांला जिंकील यांत संशय नाहीं.

## सिंधुकवल.

सिंधुत्रिकटुराजीभिरार्द्रकेणकफोहितः ॥ कवलइतिशेषः ॥

अर्थ–सैंधव, त्रिकटु, मोहऱ्या, आलें, हीं एकत्र वांटून त्याची गोळी करून मुखांत धरावी. हा कवल कफावर प्रशस्त आहे.

## मुद्गयूष.

मुद्गयूषौदनोदेयोज्वरेकफसमुत्थिते ॥

अर्थ–कफज्वरावर मुगांच्या काढ्याबरोबर भात खावयास घालावा.

## त्रिफलादिचूर्ण,

लिहन्ज्वरार्त्तस्त्रिफलांपिप्पलींचसमाक्षिकां ॥
कासेश्वासेचमधुनासर्पिषाचसुखीभवेत् ॥

**अर्थ**–कफज्वरीरोग्यानें त्रिफला, व पिंपळी याचें चूर्ण मधांश घ्यावें. कास व श्वास यांवर तेंच चूर्ण मधातुपाशीं घ्यावें.

## अजाजियोग.

अजाजिशर्करायुक्तोदाडिमस्वरसेनतु ॥ रुचिष्योमधुनायुक्तःकर्तव्यःक वलग्रहः ॥ मुद्गयूषौदनश्चापिदेयःकफसमुत्थिते ॥

**अर्थ**–जिरें, साकर, किंवा डाळिंबाचा रस, व मध हे, रुचिदेणारे आहेत, ते तोंडांत धरावे, आणि मुगांचें कढण व भात, हें पथ्य घ्यावें.

## चंदनादिकाढा.

चंदनंचसुगंधंचवलकोशीरपर्पटाः ॥
मुस्ताशुंठीसमायुक्तापित्तज्वरनिषूदनाः ॥

**अर्थ**–रक्तचंदन, रोहिषतृण, वाळा, काळावाळा, पित्तपापडा, नागरमोथा, व सुंठ यांचा काढा पित्तज्वरनाशक आहे.

## शतधौत घृत.

शतधौतघृतस्यलेपतोदवथुर्नाशमुपैतितत्क्षणात् ॥
अथवापिचुमंदपत्रजस्वरसप्रोत्थितफेनलेपनः ॥

**अर्थ**–शतधौतघृत अंगास लावल्यानें, अथवा निंबाचा रस फेनयुक्त करून त्याचा लेप अंगास केल्यानें दाह शांत होतो.

## पलाशादिलेप.

पलाशस्यबदर्यावानिंबस्यमृदुपल्लवैः
आम्लपिष्टैःप्रलेपोयंहन्याद्दाहयुतंज्वरं ॥

**अर्थ**–पळसाची, बोरीची, किंवा निंबाची कोवळीं पानें ताकांत किंवा लिंबूचे रसांत वाटून लेप द्यावा. दाहज्वरनाश करील.

## उत्तानसुप्तयोग.

उत्तानसुप्तस्यगभीरताम्रकांस्यादिपात्रेनिहितेचनाभौ ॥
शीतांबुधाराबहुलापतंतीनिहंतिदाहंत्वरितज्वरंच ॥

**अर्थ**–ज्वरितमनुष्यास उताणें निजवून, त्याच्या नाभीवर तांब्याचें किंवा कांस्याचें खोल पात्र ठेवून, त्यांत गारपाण्याची मोठी धारा धरावी. ती दाहज्वर याचा त्वरित नाश करील.

## औदुंबरादियोग.

औदुंबरस्यनिर्यासःसितयादाहनाशनः ॥
छिन्नासारःसितायुक्तःपित्तज्वरनिषूदनः ॥

अर्थ–उंबराचा चीक साकर घालून ध्यावा. दाहनाश करितो; आणि गुडूचीचें सत्व साकर घालून घेतलें असतां पित्तज्वरनाशक आहे.

## धर्म.

अथगोतक्रसंसिक्तशीतलीकृतवाससा ॥
कांजिकार्द्रपटेनावगुंठनंदाहनाशनं ॥

अर्थ–गाईच्या ताकानें किंवा कांजीनें वस्त्र भिजवून त्या वस्त्रानें रोग्याला पांघरूण घालावें. दाह नष्ट होतो.

## द्राक्षादिकल्क.

द्राक्षामलककल्केनकवलोत्रहितोमतः ॥
पक्वदाडिमबीजैर्वाधानाकल्केनचक्वचित् ॥

अर्थ–द्राक्षें व आंवळकाठी यांचा कल्काचा, किंवा पिकलेल्या डाळिंबाचा, अथवा धण्याचा हिम करून त्याचा मुखांत कवल द्यावा. तो हितकारक आहे.

## मुद्गयूष.

दाहवम्यर्दितंक्षामंनिरन्नंतृष्णयान्वितं ॥
शर्करामधुसंयुक्तंपाययेल्लाजतर्पणं ॥
मुद्गयूषौदनोदेयःसितयापैत्तिकेज्वरे ॥

अर्थ–जो दाह व वांति यानीं पीडित, कृश, कांहीं खात नाहीं, ताहान फार लागत्ये; त्याला भाताच्या लाह्यांचें पीठ साकर व मध घालून द्यावें; आणि मुगाचा यूष, भात, व साकर हे पदार्थ भक्षणार्थ द्यावे.

## अमृतादिहिम.

अमृतायाहिमःप्रातःससितःपैत्तिकंज्वरं ॥
वासायाश्चतथाकासरक्तपित्तज्वरान्जयेत् ॥

अर्थ–गुळवेल रात्रीं कुटून पाण्यात भिजत घालून प्रातःकाळीं कुसकरून गाळून पाणि प्यावें; तें रक्तपित्तनाशक आहे. याचप्रमाणें अडुळशाचा हिम कास, रक्त, पित्तज्वर यांचा नाशक आहे.

## कफज्वराचें पूर्वरूप.

स्तैमित्यंस्तिमितोवेगआलस्यंमधुरास्यता ॥ शुक्लमूत्रपुरीषत्व

क्स्तंभस्तृप्तिरथापिवा ॥ नात्युष्णगात्रताछर्दिरंगसादोविपा

किता ॥ गौरवंशीतमुत्क्लेदोरोमहर्षोतिनिद्रता ॥ प्रतिश्यायो

रुचिःकासःकफजेक्ष्णोश्चशुक्लता ॥

**अर्थ**—कफज्वरामध्यें आंगावर ओलें वस्त्र धारण केल्यासारखें वाटणें ज्वराला मंदवेग, आळस, तोंड गुळमट, मळ, मूत्र, नेत्र, व आंग यांनां पांडुरपणा, अंगाला ताठा, तृप्ति, आंग अति उष्ण होत नाहिं, ओकारी, आंग गळाल्यासारिखें भासणें, अन्न नजिरणें, आंगाला जडता, थंडी वाजणें, तोंडाला पाणी सुटणें, रोमांच होणें, झोंप, पडसें, अरुचि, व खोकला, हीं लक्षणें होतात.

## नीरदादिपाचन.

नीरदाविश्वदुरालभवासासाधितमंबुहिपाचनमेवं ॥

पेयमिदंज्वरएवकफाख्येश्वासकासहरंधनशूलहरं ॥

**अर्थ**—नागरमोथा, सुंठ, धमासा, अडुळसा, यांचा काढा, पाचन असून ज्वरनाशक, श्वास, खोकला, शूळ, कफज्वर यांचा नाश कारितो.

## पिपल्यादिपाचन.

पिप्पलीपिप्पलीमूलंमरिचंगजपिप्पली ॥ नागरंचित्रकंचव्यंरेणुकाचा

जमोदिका ॥ सर्षपोहिंगुभार्गीचपाठेंद्रयवजीरकाः ॥ महानिंबश्चमूर्वा

चविषातिकाविडंगकाः ॥ पिप्पल्यादिगणोह्येपककमारुतनाशनः ॥ गु

ल्मशूलज्वरहरोदीपनश्चामपाचनः ॥

**अर्थ**-पिपळी, पिंपळमूळ, मिरें, गजपिंपळी, सुंठ, चित्रक, चवक, रेणुकाबीज, वेलदोडे, अजमोदा, शिरस, हिंग, भारंगमूळ, पाहाडमूळ, इंद्रजव, जिरें, बकाण लिंब, मोरवेल, अतिविष, कांडेकिराईत, व वावडिंग. हीं सर्व मिळून पिप्पल्यादिगण होतो. यांचा काढा कफवातनाशक, आणि गुल्म, शूल, व ज्वर यांचाहि नाश करणारा, दीपन व पाचक असा आहे.

## क्षौद्रादिकाढा.

क्षौद्रोपकुल्यासंयोगः श्वासकासज्वरापहः ॥

प्लीहानंहंतिहिक्कांचबालानामपिशस्यते ॥

**अर्थ**–मध पिंपळीचा योग कास, श्वास, ज्वर, प्लीहा, व हिक्का यांचा नाश करणारा बालकास प्रशस्त आहे.

## पिपल्यादिचूर्ण.

पिप्पलींत्रिफलांचापिसमभागांज्वरीलिहन् ॥
मधुनासर्पिषावापिकासीश्वासीसुखीभवेत् ॥

**अर्थ**–पिंपळी, व त्रिफळा हे, समभाग घेऊन, चूर्ण करून मधाबरोबर, किंवा तुपाशीं द्यावें. म्हणजे श्वासी व कासी सुख पावेल.

## कट्फलादिलेह.

कट्फलंपौष्करंशृंगीकृष्णाचमधुनासह ॥
कासश्वासज्वरहरोलेहोयंकफनाशनः ॥

**अर्थ**–कायफळ, पुष्करमूळ, कांकडशृंगी, पिंपळी, व मध यांचा लेह कास, श्वास व कफज्वर यांचा नाश करितो.

## कट्फलादिचूर्ण.

कट्फलंपौष्करंशृंगीयवानीकारवीतथा ॥ कटुत्रयंचसर्वाणि
समभागानिचूर्णयेत् ॥ आर्द्रकस्वरसैर्लिह्यान्मधुनावाकफज्व
रे ॥ कासश्वासारुचिछर्दीश्लेष्मानिलवृत्तये ॥

**अर्थ**–कायफळ, पुष्करमूळ, कांकडशृंगी, ओंवा, अजमोदा, त्रिकटु याचें चूर्ण आल्याच्या रसाशीं, किंवा मधाशीं द्यावें. हें कास, श्वास, अरुचि, ओकारी, सर्दी, वायु, कफज्वर यांचें नाशक आहे.

## निर्गुंड्यादिकाढा.

सिंदुवारदलक्वाथंकणाढ्यंकफजेज्वरे ॥
जंघयोश्चबलेक्षीणेकर्णेचापिहितेपिबेत् ॥

**अर्थ**–कफज्वर, व मांड्यास निर्बळता, आणि कानाचें दडें, असणें यांवर निर्गुंडीच्या पानाचा काढा, पिंपळीचें चूर्ण घालोन द्यावा.

## यवान्यादिकाढा.

यवानीपिप्पलीवासातथाखाससकल्कलां ॥
एषांक्वाथंपिबेत्कासेश्वासेचकफजेज्वरे ॥

**अर्थ**–ओंवा, पिंपळी, अडुळसा, व खसखसीची बोंडें, यांचा काढा प्राशन केला, असतां खोकला, श्वास, व कफज्वर यांचा नाशक आहे.

## वासादिकाढा.

वासाक्षुद्रामृताक्काथःक्षौद्रेणज्वरकासहृत् ॥

अर्थ—अडुळसा, गुळवेल, व रिंगणी यांचा काढा मधाशी ज्वर, खोकला यांचा नाश करितो.

## निंबादिकाढा.

निंबविश्वामृताभीरुयासभूनिंबपौष्करं ॥

पिप्पल्योबृहतीचेतिक्काथोहंतिकफज्वरं ॥

अर्थ—निंबाची साल, सुंठ, गुळवेल, शतावरी, धमासा, काडेकिराईत, पुष्करमूळ, रिंगणीमूळ, व पिंपळी यांचा काढा कफज्वरनाश करील.

## मरीच्यादिकाढा.

मरीचंपिप्पलीमूलंनागरंकारवीकणा ॥ चित्रकंकट्फलंकुष्ठंससुगंधिवचाशिवा ॥ कंटकारिजटाशृंगीयवानीपिचुमंदकः ॥ एषां क्काथोहरत्येवज्वरंसोपद्रवंकफात् ॥

अर्थ—मिऱ्ये, पिंपळमूळ, सुंठ, पिंपळी, चित्रक, कायफळ, कोष्ठ, निर्गुंडी, वेखंड, हरीतकी, रिंगणी, कांकडशिंगी, अजमोदा, व कडुकी, निंबाची साल यांचा काढा करून द्यावा. तो उपद्रवासहवर्तमान कफज्वराचा नाश करितो.

## निदिग्धिकादिकाढा.

निदिग्धिकाछिन्नरुहोपकुल्याविश्वौषधैःसाधितमंबुपीतं ॥

हंतिज्वरश्वासबलासकासशूलाग्निमांद्यंजठरानिलंच ॥

अर्थ—रिंगणी, गुळवेल, पिंपळी, व सुंठ यांचा कषाय ज्वर, श्वास, कफ, खोकला, शूळ, अग्निमांद्य यांचा नाश करितो.

## भार्ग्यादिकाढा.

ज्वरंनिहंतिश्वसनंक्षिणोतिक्षुधंकरोतिप्रहचिंतनोति ॥

अर्थ—भार्ङ्गी, गुळवेल, नागरमोथा, देवदारु, रिंगणी, सुंठ, पिंपळी, व पुष्करमूळ यांचा काढा ज्वर, व श्वास यांचा नाश करून, क्षुधा उत्पन्न करितो, व मुखास रुचि देतो.

## मातुलिंगादिकाढा.

मातुलिंगशिफाविश्ववयस्थाग्रंथिकोद्भवं ॥

कफज्वरेषुमक्षारंपाचनंवाकणादिकं ॥

अर्थ—महाळुंगाचे मूळ, सुंठ, गुळवेल, व पिंपळमूळ यांच्या काढ्यांत जवखार अथवा पिंपळी घालून द्यावी. कफज्वर दूर होईल, व पाचनही आहे.

## त्रिफलादिकाढा.

त्रिफलात्रिवृतामुस्तंकटुकंसकलिंगकं ॥ पटोलारग्वधंचैवरो
हिणीचित्रकंसमं ॥ क्काथःक्षौद्रयुतःश्लेष्मज्वरकासगतामये ॥

अर्थ—त्रिफला, तेड, नागरमोथा, त्रिकटु, इंद्रजव, कडुपडवळ, बाहवा, कटुकी, व चित्रक, हिं समभाग घेऊन यांचा काढा मधाशीं द्यावा. तो श्लेष्मज्वर, खोकला, व कंठरोग दूर करील.

## पिप्पल्यादिगण.

पिप्पलीपिप्पलीमूलंचव्यंचित्रकनागरं ॥ मरिचैलाजमोदेंद्रपा
ठारेणुकजीरकं ॥ भार्गीमहानिंबफलंहिंगुरोहिणिसर्षपं ॥ वि
डंगातिविषामूर्वागणोयंकफनाशनः ॥

अर्थ—पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, मिऱ्यें, एलची, ओंवा, इंद्रजव, पाहाडमूळ, रेणुकाबीज, जिरें, भारंगमूळ, कडुलिंबफळ, हिंग, कटुकी, सिरस, वावडिंगें, अतिविष, व मोरवेल ह्या औषधांचा गण कफनाशक आहे. ह्मणून कफज्वरावर ह्याचा काढा द्यावा.

## पंचकोल.

पिप्पलीपिप्पलीमूलंचव्यंचित्रकनागरं ॥
पंचकोलमिदंप्रोक्तंशोधनंकफनाशनं ॥

अर्थ—पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, व सुंठ, हें पंचकोल शोधन व कफनाशक आहे.

## पटोलादिकाढा.

पटोलत्रिफलातिक्तासठीवासामृताभवः ॥
क्काथोमधुयुतःपीतोहन्यात्कफकृतंज्वरं ॥

अर्थ—कडुपडवळ, हिरडा, बेहडा, आवळकाठी, कटुकी, कचोरा, अडुळसा, व गुळवेल इतक्यांचा काढा मध घालून घेतला असतां कफज्वर नाशील.

## बीजपूरादिकाढा.

बीजपूरशिवापथ्यानागरग्रंथिकैःशृतं ॥
सक्षारंपाचनंश्लेष्मज्वरेद्वादशवासरे ॥

अर्थ—महाळुंगीचें मूळ, बाळहिर्डे, सुंठ, व पिंपळमूळ, यां औषधांचा काढा करून त्यांत जवखार मेळवून बारादिवसानंतर कफज्वरावर पाचन द्यावा. कफज्वर दूर होईल.

## भूनिंबादिकाढा.

भूनिंबनिंबपिप्पल्यःसठीशुंठीशतावरी ॥
गुडूचीबृहतीचेतिक्काथोहन्यात्कफज्वरं ॥

अर्थ–किराईत, कडुनिंब, पिंपळी, कचोरा, सुंठ, शतावरी, गरुडवेल, व रिंगणी यांचा काढा कफज्वर दूर करितो.

## कटुक्यादिकाढा.

कटुकीचित्रकंनिंबंहरिद्रातिविषंवचा ॥ सप्तपर्ण्यमृतानिंबस्नु
ह्यर्कैःसाधितंजलं ॥ पेयंमाक्षिकसंयुक्तंबलासज्वरशांतये ॥

अर्थ–कटुकी, चित्रक, कडुनिंब, हळद, अतिविष, वेखंड, सातवणसाल, गुळवेल, किराईत, तिधारी निवडुंग, रुईचें मूळ यांचा काढा मधाशीं द्यावा. कफज्वर जाईल.

## त्रिकंटकादिकाढा.

त्रिकंटकबलाव्याघ्रीगुडनागरसाधितं ॥
वर्चोमूत्रविबंधघ्नंकफज्वरहरंपयः ॥

अर्थ–गोक्षुर, चिकणा, रिंगणी, गुळ, व सुंठ यांचा काढा आठपट दूध घालून व दुधाच्या चौपट पाणी घालून पाणी आटल्यावर तें दूध प्यावें, ह्मणजे मल व मूत्र साफ होऊन कफज्वर दूर होतो.

## कुष्ठादिकाढा.

कुष्ठमिंद्रयवंमूर्वापटोलेनापिसाधितं ॥
पिबेन्मरीचसंयुक्तंमक्षौद्रंकफजेज्वरे ॥

अर्थ–कोष्ठकोळिंजन, इंद्रजव, मोरवेल, व कडुपडवळ यांचा काढा मिरपूड व मध घालून कफज्वरावर द्यावा.

## त्रिफलादिकाढा.

त्रिफलापटोलवासाछिन्नरुहारोहिणीवचाशुंठी॥
मधुनाश्लेष्मसमुत्थेदशमूलीवासकस्यचक्काथः ॥

अर्थ–त्रिफला, कडुपडवळ, अडुळसा, गुळवेल, कटुकी, वेखंड, व सुंठ यांचा; अथवा दशमूळें, व अडुळसा यांचा काढा मधाशीं कफज्वरावर द्यावा.

## सप्तच्छदादिकाढा.

सप्तच्छदगुडूचीचनिंबस्फूर्जकमेवच ॥
क्काथंकृत्वापिबेत्तोयंसक्षौद्रंकफजेज्वरे ॥

अर्थ–सातवणीची साल, गुळवेल, कडुनिंब, व टेंभुर्णी यांचा काढा मधाशीं कफज्वरावर द्यावा.

## आमलक्यादिकाढा.

आमलक्यभयाकृष्णाचित्रकश्चेत्ययंगणः ॥
सर्वज्वरकफातंकभेदीदीपनपाचनः ॥

अर्थ—आवळकठी, हरीतकी, पिंपळी, व चित्रक हागण सर्वज्वर, व कफ यांवर रेचन दीपन, पाचन आहे.

## तिक्तादिकाढा.

तिक्तानिंबविषाव्योषशक्राव्हाभिःशृतंजलं ॥
पिबेत्कफज्वरंहंतिहिक्काकाससमन्वितं ॥

अर्थ—कटुकी, कडुनिंब, अतिविष, सुंठ, मिऱ्ये पिंपळी, इंद्रजव, व वाळा यांचा काढा उचकी, व खोकला यांणी युक्त कफज्वराचा नाश करितो.

## मुस्तादिकाढा.

मुस्तंमधुकबीजानित्रिफलाकटुरोहिणी ॥
परूषकाणिचक्काथःकफज्वरविनाशनः ॥

अर्थ—नागरमोथा, मोहाचें बीज, त्रिफला, फाळसा, कटुकी यांचा काढा कफज्वर नाशक आहे.

## चपलादिकाढा.

चपलाचपलापदनागरिकाचवकानलसंजनितंसलिलं ॥
श्वसनेकसनेत्हृदयोल्लसनेकफजूर्तिगदेप्रपिबेच्चमुदे ॥

अर्थ—पिंपळी, गजपिंपळी, सुंठ, चवक, व चित्रक यांचा काढा श्वास, कास, ह्ल्लास, व कफज्वर यांवर द्यावा सुखकारक आहे.

## पिचुमंदादिकाढा.

पिचुमंदमहौषधान्विताबृहतीपौष्करतिक्तकंसठी ॥
वृषकट्फलकंकणावरीकथितंवारिकफज्वरंजयेत् ॥

अर्थ—निंबाच्या काड्या, सुंठ, रिंगणी, पुष्करमूळ, कटुकी, कचोरा, अडुळसा, कायफळ पिंपळी, व शतावरी यांचा काढा कफज्वरास हरितो.

## वासादिकाढा.

वासाविशालादशमूलगौरीमहौषधंपुष्करभार्गियुक्ता ॥
एषांकषायोविनिहंतिकासंकफज्वरंशूलविबंधनंच ॥

**अर्थ**—अडुळसा, वृंदावन, दशमूळ, तुळस, सुंठ, पुष्करमूळ, व भारंगमूळ यांचा काढा श्वास, खोकला, व कफज्वर यांचा नाश करितो.

## कंटकाऱ्यादिकाढा.

कंटकार्यामृतादारुवृषविश्वासमाश्रितः ॥
क्वाथःकणारजोयुक्तःसद्यःश्लेष्मज्वरापहः ॥

**अर्थ**—रिंगणी, गुळवेल, देवदारु, अडुळसा, व सुंठ, यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून प्याला असतां कफज्वराचा नाश करितो.

## कणादिकाढा.

कणाविश्वामृतादारुकिरातैरंडमूलकः ॥
निंबएषांशृतःक्वाथःपित्तश्लेष्मज्वरापहः ॥

**अर्थ**—पिंपळी, सुंठ, गुळवेल, देवदारु, किराईत, एरंडमूळ, व निंब यांचा काढा पित्तश्लेष्मज्वरनाशक आहे.

## मुस्तादिकाढा.

मुस्तादुरालभाशुंठीक्वाथएषांसमांशतः ॥
हंतिश्लेष्मज्वरंतीव्रंनिपीतःपथ्यभोजने ॥

**अर्थ**—नागरमोथा, धमासा, सुंठ या समभाग औषधांचा काढा द्यावा; व पथ्य करावें, तीव्रश्लेष्मज्वराचा नाश करील.

## वातपित्तज्वरलक्षण.

तृष्णामूर्छाभ्रमोदाहःस्वप्ननाशःशिरोरुजः ॥ कंठस्यशोषोवम थूरोमहर्षोरुचिस्तमः ॥ पर्वभेदश्चजृंभाचवातपित्तज्वराकृतिः ॥

**अर्थ**—वातपित्तज्वरितास, ताहान, मूर्छा, भ्रम, दाह, निद्रानाश, मस्तकशूळ, गळा व तोंड, यांना कोरड, ओकारी रोमांच थरारणे, अरुचि, डोळ्यांपुढें आंधेरी, संधींतफूट आणि जांभयां हीं लक्षणें होतात.

## नीलोत्पलादिहिम.

नीलोत्पलंबलाद्राक्षामधूकंमधुकंतथा ॥ उशीरंपद्मकंचैवका श्मरीचैवरूषकं ॥ एतच्छीतकषायश्चवातपित्तज्वरंहरेत् ॥
विप्रलापभ्रमच्छर्दीमोहतृष्णानिवारणः ॥

अर्थ–निळें कमळ, चिकणा, द्राक्षे, मोह, ज्येष्ठमध, वाळा, पद्मकाष्ठ, शिवण, व फालसा या औषधांचा पूर्वरितीनें हिम करून प्यालें असतां वातपित्त, बडबड, भ्रम, ओकारी, ज्वर मूर्छा व ताहन, हे रोग, दूर होतात.

## निदिग्धिकाढा.

निदिग्धिकामृतारास्नात्रायमाणामृतायुतः ॥
ममूरविदलक्काथोवातपित्तज्वरंजयेत् ॥

अर्थ–रिंगणी, गुळवेल, रास्ना, त्रायमाण, हरीतकी, व मसुरांची डाळ यांचा काढा करून द्यावा. तो वातपित्तज्वराचा नाशक आहे.

## विश्वादिकाढा.

विश्वामृताब्दभूनिंबपंचमूलसमन्वितः ॥
कृतःकषायोहंत्याशुवातपित्तेभवंज्वरं ॥

अर्थ–सुंठ, गुळवेल, नागरमोथा, काडेकिराइत व पंचमूळें यांचा काढा द्यावा. तो वातपित्तज्वराचा नाश करील.

## निलोत्पलादिकाढा.

नीलोत्पलमुशीराणिपद्मकामलकानिच ॥ काश्मीरमधुकद्रा
क्षामधूकानिपरूपकान् ॥ पिवेच्छीतंकषायंचवातपित्तज्वराप
हं ॥ संप्रलापंचसंमोहंशमयेत्पैत्तिकंज्वरं ॥

अर्थ–कमळ, वाळा, पद्मकाष्ठ, आवळकाठी, शिवणी, मोहाचें फल, मनुका, ज्येष्ठमध व फालसा यांचा काढा शीतळ द्यावा. तो वातपित्तज्वर, संनिपात, बडबड, व मोह यांचा नाश करील.

## आरग्वधादिकाढा.

आरग्वधफलंमुस्तंयष्टीमधुकमेवच ॥ उशीरमभयाचैवहरिद्रा
दारुसाव्हया ॥ पटोलंपिचुमंदंचअमृताकटुरोहिणी ॥ एषांपी
तःकषायःस्याद्वातपित्तभवेज्वरे ॥

अर्थ–बाहाव्याचा मगज, नागरमोथा, ज्येष्ठमध, मोहाचें फूल, वाळा, हिरडे, हळद, दारुहळद, कडुपडवळ, निंबसाल, गुळवेल, व कटुकी यांचा काढा द्यावा. तो वातपित्ताला नाशील.

## द्राक्षादिकाढा.

द्राक्षाकिरातामृतवासकासठीक्काथंपिबेत्पित्तमरुज्वरंहरेत् ॥

अर्थ–मनुका, किराईत, गुळवेल, अडुळसा व कचोरा यांच्या काढयानें वातपित्त ज्वर नाश पावेल.

## पंचमूलादिकाढा.

पंचमूल्यमृतामुस्ताविश्वाभूनिंबसाधितः ॥
कषायःशमयत्याशुवायुमायुभवंज्वरं ॥

अर्थ–पंचमूळ, गुळवेल, नागरमोथा, सुंठ, किराईत यांचा काढा पित्तवातज्वरनाशक आहे.

## मुद्गादियूष.

मुद्गामलकयूषस्तुवातपित्तज्वरेहितः ॥ महादाहेप्रदातव्योयूष
श्चणकसंभवः ॥ दाडिमामलकमुद्गसंभवोयूषउक्तइहवातपैत्तिके ॥

अर्थ–मूग, व अवळकठी यांचा यूष वातपित्तज्वरावर हितकर आहे; व दाह होत असल्यास चण्याचा यूष द्यावा; किंवा आवळकठी, डाळिंब व मूग यांचा यूष वातपित्तनाशक आहे.

## मुद्गादियोग.

कफपित्तहरामुद्गाकारवेल्लादयस्तथा ॥ प्रायेणनचतेदेयावात
पित्तोत्तरेज्वरे ॥ दत्तास्तुज्वरविष्टंभशूलोदावर्त्तकारिणः ॥

अर्थ–वातपित्तज्वरावर मूग व कारलें इत्यादि देऊं नये. तीं कफपित्तहर आहेत. तीं दिली असतां ज्वर, मलावष्टंभ, शूल, व उदावर्त यांतें उत्पन्न करितात.

## मधुकादिकषाय.

मधुकंसारिवांद्राक्षामधुकंचंदनोत्पलं ॥ काश्मरीफलकंलोध्रं
त्रिफलापद्मकेसरं ॥ परूपकंमृणालंचक्षिपेत्संचूर्ण्यवारिणा ॥
निशोषितंसितक्षौद्रलाजयुक्तंतुतत्पिबेत् ॥ वातपित्तज्वरंदाहं
तृष्णांमूर्छारुचिभ्रमान् ॥ शमयेद्रक्तपित्तंचजीमूतमिवमारुतः ॥

अर्थ–मधुकाष्ठ, उपळसरी, द्राक्षें, ज्येष्ठमध, रक्तचंदन, कमलकंद, शिवणमूळ, लोध्र, त्रिफळा, कोष्ठ, नागकेशर, फालसा, व कमळाची बिसें, यांचा काढा साकर, मध व लाह्या-शीं द्यावा. तो वातपित्तज्वर, दाह, तृषा, मूर्छा, अरुचि, भ्रम, व रक्तपित्त यांसां शमवितो. जसा मेघाला वायु शमवितो तसा.

## पंचभद्रकषाय.

छिन्नोद्भवापर्पटवारिवाहभूनिंबशुंठीजनितःकषायः ॥
समीरपित्तज्वरजर्जराणांकरोतिभद्रंखलुपंचभद्रः ॥

अर्थ–गुळवेल, पित्तपापडा, नागरमोथा, किराईत, व सुंठ यांचा काढा वातपित्तज्वराचा नाशक आहे. याला पंचभद्र ह्मणतात.

## दुरालभादिकषाय.

दुरालभामृताघनोजलंचरोहिणीरजोज्वरंचवातपित्तजंनिहंत्यसौकषायकः ॥

अर्थ–धमासा, गुळवेल, नागरमोथा, वाळा, कटुकी व पित्तपापडा यांचा काढा वातपित्तज्वराचा नाश करितो.

## भूनिंबादिकषाय.

भूनिंबतिक्ताजलचंदनंचधानेयपथ्यादशमूलसंघाः ॥

व्हीबेरविश्वाकरमर्दकाचएषांशृतंपित्तमरुज्ज्वरेष्टं ॥

अर्थ–किराईत, कटुकी, वाळा, रक्तचंदन, धने, हरीतकी, दशमूळें, काळावाळा, सुंठ व करवंदमूळ यांचा काढा वातपित्तज्वरावर हितकारी आहे.

## त्रिफलादिकषाय.

त्रिफलाशाल्मलीरास्नाराजवृक्षाटरूपकैः ॥

शृतमंबुहरत्याशुवातपित्तभवंज्वरं ॥

अर्थ– त्रिफला, सांवरी, रास्ना, बाहवा व अडुळसा यांचा काढा वातपित्तज्वराचा नाश करील.

## मधुकादिफांट.

मधुपुष्पंमधूकंचचंदनंसपरूपकं ॥ मृणालंकमलंलोध्रंगंभारीनागकेसरं ॥ त्रिफलासारिवाद्राक्षालाजान्कोष्णेजलेक्षिपेत् ॥ सितामधुयुतःपेयःफांटोवासोहिमोथवा ॥ वातपित्तज्वरंदाहं तृषामूर्छारतिभ्रमान् ॥ रक्तपित्तंमदंहन्यान्नात्रकार्याविचारणा ॥

अर्थ–मोहाचीं फुलें, ज्येष्ठमध, रक्तचंदन. फालसा, कमळाचें पाल, ह्मणजे बिसंकमळ, लोध्र, शिवण, नागकेशर, हिरडा, बेहेडा, आवळकठी, उपळसरी, द्राक्षे, साळीच्या लाह्या यांचा फांट करून द्यावा. साकरेशीं किंवा मधाशीं घेतला असतां वातपित्तज्वर, दाह ताहान, अरुचि, भ्रम, रक्तपित्त, व मेद हे दूर होतात. किंवा पांच औषधांचा हिम करून घेतला असतांही याचप्रमाणें गुण जाणावे.

## द्राक्षादिक०

द्राक्षाकिरातकंधात्रीकर्पूरामृतवल्लरी ॥

क्वाथएषांगुडयुतःपीतोद्वंद्वजरोगहृत् ॥

अर्थ–द्राक्षे, किराईत, आवळकठी, कापूर व गुळवेल यांचा काढा गुळाशीं प्याला असतां द्वंद्वजज्वराचा नाश करितो.

## व्याघ्र्यादिक.

व्याघ्रीभार्गीसिंहवक्त्राचरास्नादुस्पर्शैषाशाल्मलीराजवृक्षः ॥
तद्वज्ज्ञेयंत्रैफलंक्वाथएषांशस्तःकासेवातपित्तज्वरेच ॥

अर्थ–रिंगणी, भारंगमूळ, अडुळसा, रास्ना, धमासा, मोचारस, बाहवा व त्रिफळा यांचा काढा वातपित्तज्वरावर हितकारी आहे.

## मुस्तादिकाढा.

जलदधान्यकिरातगुडूचिकानियमनंकटुकाचपटोलिका ॥
क्वथितमेभिरिदंतुजलंहरेत्पवनपित्तभवंज्वरमुन्नतं ॥

अर्थ–नागरमोथा, धने, किराईत, गुळवेल, कडुनिंब, कटुकी, व कडुपडवळ यांचा काढा वातपित्तज्वरनाशक आहे.

## बलादिकाढा.

बलामृतैरंडजलाब्दपद्मकभार्गीकणोशीरयुतैःसचंदनैः ॥
संक्वाथ्यतोयंकफपित्तजज्वरप्रणाशनंवन्हिविवृध्दिकारकं ॥

अर्थ–चिकणा, गुळवेल, एरंडमूळ, वाळा, नागरमोथा, पद्मकाष्ठ, भारंगमूळ, पिंपळी, रक्तचंदन व काळावाळा यांचा काढा कफपित्तज्वरनाशक व अग्निवृद्धिकारक आहे.

## रसायण.

त्रिफलामृतलोहंचभृंगराजंचचूर्णितं ॥ चूर्णमर्जुनपत्रस्यत्रिजा
तकशिलाजतु ॥ त्र्यूपणंतुल्यतुल्यांशंसर्वेपांचसमासिता ॥
क्षौद्रेणवटिकाकार्याकर्पमात्रंचभावयेत् ॥ वातपित्तज्वरंहंति
अनुपानंचकल्पयेत् ॥

अर्थ–त्रिफला, मृतलोह, माका, सांदडयाची पानें, त्रिजात, शिलाजित, व त्र्यूषण यां सर्वांचें चूर्ण करून सर्व चूर्णाबरोबर साकर घालून मधाशीं वटी करून एक तोळा अनुपानाशीं द्यावी. ती वातपित्तज्वरनाशक आहे.

## वातकफज्वरलक्षण.

स्तैमित्यंपर्वणांभेदोनिद्रागौरवमेवच॥शिरोग्रहःप्रतिश्यायःका
सःस्वेदप्रवर्तनं ॥ संतापोमध्यवेगश्चवातश्लेष्मज्वराकृतिः ॥

अर्थ–आंगावर ओलें वस्त्र घेतल्यासारखें भासणें, संधीत ठणका, गाढनिद्रा, आंगास जडपणा, मस्तकशूळ, पडसें, खोकला, घाम येतनाहीं, शरीराचा दाह; आणि ज्वराचा मध्यम वेग हीं वातकफज्वराचीं लक्षणें जाणावीं.

## चिकित्सा.

वातश्लेष्मज्वरेदेयमौषधंनवमेहनि ॥

अर्थ–वातकफज्वरावर नवमदिवशीं औषध द्यावें.

## यूष.

शुष्कमूलकयूषस्तुवातश्लेष्माधिकेहितः ॥

अर्थ–सुख्यामुळयाचा यूष वातश्लेष्मज्वरावर हितकारक आहे.

## पंचकोल.

पिप्पलीपिप्पलीमूलंचव्यचित्रकनागरैः ॥ दीपनीयःस्मृतोव गोवातश्लेष्मज्वरापहः ॥ कोलमात्रोपयोगित्वात्पंचकोलमिदं स्मृतं ॥ तीक्ष्णोष्णपाचनंश्रेष्ठंदीपनंकफवातनुत् ॥ गुल्मप्लीहोदरानाहशूलघ्नंपित्तकोपनं ॥

अर्थ–पिंपळी, पिंपळमूळ, चव्य, चित्रक, सुंठ, हा वर्ग अग्निदीपक व वातश्लेष्मज्वर-नाशक आहे. हिं औषधें प्रत्येकीं आठमासे घेतात ह्मणून यास पंचकोल ह्मणतात. हें तीक्ष्ण, उष्ण, पाचन, दीपन, कफवात, गुल्म, प्लीहा, उदर व आनाह, शूल यांचें नाशक असून पित्ताचा कोप करणारें आहे.

## निंबादिकषाय.

निंबामृताविश्वदारुकट्फलंकटुकावचा ॥ कषायंपाययेदाशु वातश्लेष्मज्वरापहं ॥ पर्वभेदशिरःशूलंकासारोचकपीडितं ॥

अर्थ–कडुनिंब, गुळवेल, सुंठ, देवदारु, कायफळ, कटुकी, व वेखंड यांचा काढा प्याला असतां संधिपीडा, मस्तकशूल, खोकला अरुचि, व वातकफज्वर यांचा नाश करितो.

## किरातादिकषाय.

किरातविश्वामृतवल्लिसिंहिकाकणाकणामूलरसोनसिंदुकः ॥ कृतःकषायोविनिहंतिसत्वरंज्वरंसमीरात्सकफात्समुत्थितं ॥

अर्थ–किराईत, सुंठ, गुळवेल, रिंगणी, पिंपळी, पिंपळमूळ, लसूण, कात्रीनिर्गुंड यांचा काढा वातकफज्वरनाशक आहे.

## बृहत्पिप्पल्यादिकाढा.

पिप्पल्यादिगणक्वाथंपिबेद्वातकफज्वरी ॥ नातःपरंकिंचिदस्मिन्ज्वरेभेषजमुत्तमं ॥ पिप्पलीपिप्पलीमूलंचव्यचित्रकना

गरं ॥ वचासातिविषाजाजिपाठावत्सकरेणुकं ॥ किराततिक्त
कोमूर्वासर्षपामरिचानिच ॥ कट्फलंपुष्करंभार्गीविडंगकक
टाव्हयं ॥ अर्कमूलंबृहत्सिंहीश्रेयसीसदुरालभा ॥ दीपकश्चा
जमोदश्चशुकनासासहिंगुका ॥ एतानिसमभागानिगणएषो
ष्टविंशतिः ॥ एषांक्काथोनिपीतःस्याद्वातश्लेष्मज्वरापहः ॥ हं
तिवातंतथाशीतंप्रस्वेदमतिवेपथुं ॥प्रलापंचातितंद्रांचरोमहर्षा
रुचीतथा ॥ महावातेपतंत्रेचशून्यत्वेसर्वगात्रजे ॥ पिप्पल्या
दिर्महाक्काथोज्वरेसर्वत्रपूजितः ॥

**अर्थ**–पिप्पल्यादिगणाचा काढा वातकफज्वरीरोग्यानें प्यावा. याहून या ज्वरावर दुसरें औषध चांगलें नाहीं. पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रकमूळ, सुंठ, वेखंड, अतिविष, जिरें, पाडळमूळ, कुडयाचीसाल, रेणुकबीज, काडेकिराईत, मोरवेल, सर्षप, मिऱ्ये कायफळ, एरंडमूळ, भारंगमूळ, वावडिंगें, काकडशिंगी, रुईचें मूळ, डोर्ली, रास्ना, धमासा, ओंवा, अजमोदा, शिवणसाल, व हिंग हीं औषधें समभाग घेऊन त्यांचा काढा करून प्राशन केला असतां; वातश्लेष्मज्वर, वायु, शीत, घाम, कांपरें, बडबड, झांपड, रोमांच, अरुचि, महावात, अपतंत्रवात, सर्वगात्राची शून्यता व संपूर्ण ज्वर यांचा नाश करितो. हा पिप्पल्यादिगण सर्वज्वरांवर प्रशस्त आहे.

## सिंहिकादिकषाय.

सिंहीयवानीच्छिन्नानांक्काथश्चपलयायुतः ॥
कफवातज्वरश्वासशूलपीनसकासजित् ॥

**अर्थ**–रिंगणी, ओंवा व गुळवेल यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे कफवातज्वर, श्वास, शूल, पडसें व खोकला यांचा नाश करितो.

## कट्फलादिकषाय.

कट्फलविश्ववचाघनपांशुधान्यशिवाजलशृंगिसुराव्हैः ॥
भार्गीयुतैःक्कथनंकिलपेयंवातकफघ्नगणोननुचैषां ॥

**अर्थ**–कायफळ, सुंठ, वेखंड, नागरमोथे, पित्तपापडा, धनें, हरीतकी, काकडशिंगी, देवदार व भारंगमूळ यांचा काढा वातकफनाशक आहे.

## दशमूलीक०

दशमूलीरसःपेयःकणाढ्यःकफवातजे ॥
ज्वरेविपाकेतंद्रायांपार्श्वरुक्श्वासकासके ॥

अर्थ–दशमूळांचा रस आंत पिंपळीचें चूर्ण घालून प्राशन करावा. तो ज्वर, अजीर्ण, तंद्रा, पार्श्वशूल, श्वास; आणि कास यांचा नाश करितो.

## पिप्पल्यादिक०

पिप्पलीभिःशृतंतोयमनभिष्यंदिदीपनं ॥
वातश्लेष्मज्वरंहंतिसेवितंप्लीहनाशनं ॥

अर्थ–पिंपळीचा काढा सेवन केला असतां कफनाशक, अग्निदीपक, असून वातश्लेष्मज्वर; व प्लीहा यांचा नाश करणारा आहे.

## दार्वादिक०

दारुपर्पटभार्ग्यब्दवचाधान्यककट्फलैः ॥ साभयाविश्वपूतीकैःक्वाथोहिंगुमधूत्कटः ॥ कफवातज्वरेपीतोहिक्काशोषगलग्रहान् ॥ श्वासकासप्रमेहांश्चहन्यात्तरुमिवाशनिः ॥

अर्थ–देवदार, पित्तपापडा, भारंगमूळ, नागरमोथा, वेखंड, धने, कायफळ, हरीतकी, सुंठ, व करंजसाल, यांचा काढा हिंग व मध घालून द्यावा. तो कफवातज्वर उचकी शोष, गलरोग, श्वास कास व प्रमेह यांचा नाश करितो. जसें वज्र वृक्षाचा नाश करितें.

## पटोलादिकाढा.

तृष्णान्वितेवातकफार्तिशूलेसश्वासकासारुचिविट्विबंधे ॥
हितंजलंदीपनपाचनंचपटोलशुंठीयवपिप्पलीनां ॥

अर्थ–ताहान, वात, कफरोग, शूल, श्वास, कास, अरुचि व बद्धकोष्ठ यांवर कडुपडवळ, सुंठ, यव व पिंपळी यांचा काढा दीपन, पाचन असून हितकारक आहे.

## क्षुद्रादिक०

क्षुद्रामृतानागरपुष्कराव्हयैःकृतःकषायःकफमारुतोत्तरे ॥ सश्वासकासारुचिपार्श्वशूलेज्वरेत्रिदोषप्रभवेपिशस्यते ॥

अर्थ–रिंगणी, गुडूची, सुंठ व पुष्करमूळ यांचा काढा कफवातज्वर, श्वास, कास, अरुचि, पार्श्वशूल; आणि त्रिदोषजनितज्वर यांवर प्रशस्त आहे.

## आरग्वधादिक०

आरग्वधकणामूलंमुस्तातिक्ताभयाकृतः ॥
क्वाथःशमयतिक्षिप्रंज्वरंवातकफोद्भवं ॥

अर्थ—बाहव्याचा मगज, पिंपळीमूळ, नागरमोथा, कटुकी, व हरीतकी यांचा काढा वात कफज्वराला जलद शमवितो.

## मुस्तादिकाढा.

मुस्तापर्पटकंशुंठीगुडूचीसदुरालभा ॥
कफवातारुचिछर्दिदाहशोषज्वरापहः ॥

अर्थ—नागरमोथा, पित्तपापडा, सुंठ, गुडूची व धमासा यांचा काढा कफवात, अरुचि, दाह, शोष व ज्वर यांचा नाश करितो.

## भूनिंबादिकाढा.

भूनिंबमुस्ताकटुकागुडूचीदुरालभापर्पटनागराख्यः ॥
क्वाथोनिलश्लेष्महरोवदंतिसूर्योयथानाशयतेंधकारं ॥

अर्थ—काडेकिराईत, नागरमोथा, कटुकी, गुळवेल, धमासा, पित्तपापडा व सुंठ यांचा काढा वायु व शैत्य यांचा नाश करितो. जसा सूर्य अंधकाराला नाशितो तसा.

## चातुर्भद्रादिकाढा.

किराततिक्तकंमुस्तंगुडूचीविश्वभेषजं ॥
चातुर्भद्रकमित्याहुर्वातश्लेष्मज्वरापहं ॥

अर्थ—किराईत, नारमोथा, गुडूची व सुंठ हा चातुर्भद्रकाढा वातश्लेष्मज्वराचा नाश करितो.

## स्वेदशोषक चूर्ण.

स्वेदोद्गमेभ्रष्टकुलित्थचूर्णनिर्यातनंशस्तमितिब्रुवंति ॥
जीर्णशकृद्रोलवणस्यभाजनंसंचूर्णितंस्वेदहरंसुधूलनात् ॥

अर्थ—घाम आल्यावर कुळीथ भाजून त्याचें पीठ आंगाला लावावें; अथवा गाईचें सुखें शेण व मिठाचें जुनें मडकें यांचें चूर्ण करून आंगास लाविलें असतां घाम नाहिंसा करितें.

## मरिचाद्युत्धूलन.

मरीचंपिप्पलीशुंठीपथ्यालोध्रश्चपुष्करं॥ भूनिंबःकटुकाकुष्ठं कर्चूरोलिंगिकासठी ॥ एतानिसमभागानिसूक्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ एतदुत्धूलनंश्रेष्ठंस्रोतोवत्स्वेदनिर्गमे ॥

अर्थ—सुंठ, मिरें, पिंपळी, हरीतकी, लोध्र, पुष्करमूळ, काडेकिराईत, कटुकी, कोष्ट, कचोरा, शिवलिंगी व कापूरकचरी हीं औषधें समभाग घेउन त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून आगांस लाविलें असतां घामाचे जरी झरे लागले असतील; तरी ते नाहींसे करण्याविषयां श्रेष्ठ आहे.

## भूनिंबाद्युत्धूलन.

भूनिंबकारवीतिक्तावचाकट्फलजंरजः ॥

एषामुत्धूलनंश्रेष्ठंसततंस्वेदसंप्लवे ॥

अर्थ–किराईत, ओंवा, कटुकी, वेखंड, व कायफळ यांचें चूर्ण आंगास लाविलें असतां सतत येणारा घाम बंद करण्याविषयीं श्रेष्ठ आहे.

## सूतशेखररस.

सूतकंटंकणभ्रष्टंगंधशुत्धंसमंसमं ॥ द्विगुणंसूतकाद्देयंजैपालं तुषवर्जितं ॥ सैंधवंमरिचंचिंचात्वक्क्षारःशर्करापिच ॥ प्रत्येकं सूततुल्यंस्याज्जंबीरैर्मर्दयेद्दिनं ॥ सूर्यशेखरनामायंरसोगुंजाद्व योन्मितः ॥ भक्षितस्तप्ततोयेनवातश्लेष्मज्वरापहः ॥

अर्थ–पारा १ भाग, टांकणखाराची लाहि १ भाग, शुद्धगंधक १ भाग, शुद्धजेपाळ२ भाग, सैंधव, मिऱ्यें, चिंचेचा खार व साखर हीं प्रत्येकीं पाऱ्याबरोबर घेऊन लिंबाच्या रसांत खलावा. हा सूर्यशेखर नामा रस दोनगुंजाप्रमाणें ऊनपाण्याबरोबर घेतला असतां, वातश्लेष्मज्वरनाशक आहे.

## कफपित्तज्वरलक्षण.

लिप्ततिक्तास्यतातंद्रामोहःकासोऽरुचिस्तृषा ॥ तथास्तंभश्चसं स्वेदःकफपित्तप्रवर्तनं ॥ मुहुर्दाहोमुहुःशीतंपित्तश्लेष्मज्वराकृतिः ॥

अर्थ–तोंडास चिकटा व कडुपणा, डोळ्यास झापड, मोह, खोकला, अरुचि, ताहान, पोटांत जडता, असून घाम फार येणें, कफपित्तमिश्रितवमन, क्षणात दाह, क्षणात शीत, क्षणात घाम येणे, हीं कफपित्तज्वराचीं लक्षणें जाणावीं.

## कफपित्तज्वरप्रक्रिया.

पित्तश्लेष्मज्वरेदेयमौषधंदशमेहनि ॥

अर्थ–पित्तश्लेष्मज्वरावर औषध दाहाव्या दिवशीं द्यावें.

## कंटकार्यादिकाढा.

कंटकार्यमृताभार्गीविश्वेंद्रयववासकं ॥ भूनिंबचंदनंमुस्तंपटोलं कटुरोहणी ॥ विपाच्यपाययेत्क्वाथंपित्तश्लेष्मज्वरापहं ॥ दाहतृ ष्णारुचिच्छर्दिकासशूलनिवारणं ॥

अर्थ–रिंगणी, गुळवेल, भारंगमूळ, सुंठ, इंद्रजव, अडुळसा, काडेकिराईत, चंदन नागरमोथा, कडूपडवळ, व कटुकी यांचा काढा पित्तकफज्वर, दाह, अरुचि, ओकारी कास, आणि शूल यांचा नाश करितो.

## नागरादिकाढा.

नागरोशीरबिल्वाब्दधान्यमोचरसांबुभिः ॥
कृतःक्काथोभवेद्ग्राहीपित्तश्लेष्मज्वरापहः ॥

अर्थ–सुंठ, वाळा, नागरमोथा, धने, मोचरस, व काळावाळा, यांचा काढा ग्राही पित्तश्लेष्मज्वराचा नाशक आहे.

## शृंगबेरादिकाढा.

कषायःपरिपीतस्तुशृंगवेरपटोलयोः ॥
पित्तश्लेष्मज्वरवमीदाहकंडूविसर्पनुत् ॥

अर्थ–कडुपडवळ, व आलें यांचा काढा पित्तश्लेष्मज्वर, ओकारी, वमी, दाह व कं यांचे हरण करील.

## पटोलादियूप.

पटोलधान्ययोर्यूपःपित्तश्लेष्मज्वरापहः ॥
दीपनःकफविच्छेदीपित्तवातानुलोमनः ॥

अर्थ–कडुपडवळ, व धने यांचा मंड पित्तश्लेष्मज्वराचा नाश करील. हा दीपः कफनाशक, व वातपित्ताला त्याच्या त्याच्या मार्गानें नेवविणारा आहे. अनुलोमकरणारा आ

## पटोलादिकाढा.

पटोलंपिचुमंदश्चत्रिफलामधुकंबला ॥
साधितोयंकषायःस्यात्पित्तश्लेष्मभवेज्वरे ॥

अर्थ–कडुपडवळ, कडुनिंब, हिरडे, बेहेडे, आवळकाठी, व चिकणा, यांचा का करून द्यावा; ह्मणजे पित्तश्लेष्मज्वर दूर होईल.

## तिक्तादिकाढा.

तिक्तोशीरबलाधान्यपर्पटांभोधरैःकृतः ॥
क्काथःपुनःसमायातंज्वरंशीघ्रंनिवारयेत् ॥

अर्थ–कटुकी, वाळा, चिकणा, धने, पित्तपापडा व नागरमोथा या औषधांचा का ज्वराला दूर करील.

## लोहितचंदनादिकाढा.

लोहितचंदनपद्मकधान्यंछिन्नरुहापिचुमंदकषायः ॥
पित्तकफज्वरदाहपिपासावांतिविनाशहुताशकरःस्यात् ॥

अर्थ-रक्तचंदन, पद्मकाष्ठ, धने, गुळवेल व निंबाची साल ह्या पांच औषधांचा काढा पित्तकफज्वर, दाह, तान्हान व वांति यांचा नाशक असून अग्नि प्रदीप्त करणारा आहे.

## जीरकादिकाढा.

जीरकंकारवेल्यंबुशीतपूर्वज्वरेहितं ॥
पाक्यंशीतकषायंचमुस्तापपटकंभवेत् ॥

अर्थ-जिरें व कारलीचा रस दिलाअसतां तो शीतपूर्वज्वराचा नाश करितो. नागरमोथा व पित्तपापडा यांचा काढा शीत दिला असतां पाचक आहे.

## यवादिकाढा.

यवःपर्पटकंधान्यंपटोलारिष्टसाधितं ॥
पिबेत्ससशर्करक्षौद्रंपित्तश्लेष्मज्वरापहं ॥

अर्थ-यव, पित्तपापडा, धनें, कडुपडवळ व कडुनिंब यांचा काढा मध व साकर घालून घ्यावा. तो पित्तश्लेष्मज्वराचा नाश करील.

## नागरादिकाढा.

नागरेंद्रयवंमुस्तंचंदनंकटुरोहिणी ॥ पिप्पलीचूर्णसंयुक्तंकषायं तुपिबेन्नरः ॥ भ्रममूर्छारुचिछर्दिपित्तश्लेष्मज्वरापहं ॥

अर्थ-सुंठ, इंद्रजव, नागरमोथा, रक्तचंदन, व कुटकी यांचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून घ्यावा. तो भ्रम, मूर्छा, अरुचि, वांति, पित्तकफज्वर यांचा नाश करील.

## द्राक्षादिकाढा.

द्राक्षाशम्याकटुकामुस्तंग्रंथिकधान्यकं ॥
पक्वंहन्यादुदावर्त्तंशूलंपित्तकफज्वरं ॥

अर्थ-मनुका, बाहव्याचा मगज, कुटकी, नागरमोथा, पिंपळीचें मूळ व धने यांचा काढा द्यावा. तो उदावर्त, पोटफुगणें, शूळ, आणि पित्तकफज्वर यांस दूर करील.

## पटोलादिकाढा.

पटोलयवधान्याकमुस्तामलकचंदनं ॥
श्लैष्मिकश्लेष्मपित्तोत्थज्वरतृट्छर्दिदाहनुत् ॥

अर्थ–कडुपडवळ, इंद्रजव, धने, नागरमोथे, आवळकाठी व रक्तचंदन यांचा काढा कफपित्तज्वर, कफज्वर, तृषा, वांति, दाह, यांस दूर करील.

## यवादिकाढा.

यवपद्मकधान्याकंद्वेहरिद्रेसचंदने ॥ गुडूचीदेवकाष्ठंचतेजो
व्हासदुरालभा ॥ श्रपयित्वापिबेत्क्वाथंकफपित्तज्वरापहं ॥ पि
पासाछर्दिदाहघ्नंवृष्यंवन्हिविदीपनं ॥

अर्थ–इंद्रजव, पद्मकाष्ठ, धने, हळद, दारुहळद, रक्तचंदन, गुळवेल, तेजबळ व धमासा यांचा काढा कफपित्तज्वर व तहान, ओकारी, व दाह, यांचा नाश करितो; आणि अग्निदीपक आहे.

## त्रायंत्यादिकाढा.

त्रायंतीमेघकटुकारामसेनापटोलिका ॥
ज्वरेपैत्तकफेह्येतद्देयंदीपनपाचनं ॥

अर्थ–त्रायमाण, नागरमोथा, कटुकी, श्वेतरिंगणी, व कडुपडवळ, यांचा काढा पित्तकफज्वरावर दीपन पाचनार्थ द्यावा.

## किरमालादिकाढा.

किरमालेवचाहिंगुबालकंधान्यकंनिशा ॥ मुस्तायष्टिस्तथा
भार्गीपर्पटःसमभागतः ॥ अष्टावशेषितःक्वाथोमधुनाप्रतिपा
कतः ॥ श्लेष्मपित्तज्वरंहंतिरोगिणःपथ्यभोजिनः ॥

अर्थ–किरमाणी ओंवा, वेखंड, हिंग, वाळा, धने, हळद, नागरमोथा, ज्येष्ठमध, भारंगमूळ, व पित्तपापडा हीं औषधें समभाग घेऊन यांचा अष्टमांश काढा मध घालून घ्यावा. पथ्यकरावें. तेणेकरून श्लेष्मपित्तज्वरनाश पावतो.

## पटोलादिकाढा.

पटोलमुस्ताजलरक्तचंदनंतिक्तारजोविश्वमुशीरवासकं ॥
संक्वाथ्यतोयंकफपित्तजंज्वरंनिहंतिचारात्त्वरितंतृषायुतं ॥

अर्थ–कडुपडवळ, नागरमोथा, वाळा, रक्तचंदन, कटुकी, पित्तपापडा, सुंठ, वाळ व अडुळसा यांचा काढा कफपित्तज्वर व तृषा यांचा नाश करितो.

## गुडूच्यादिकाढा.

गुडूचीनिंबधान्याकपद्मकंचंदनान्वितं ॥
तृष्णादाहारुचिच्छर्दिसर्वज्वरहरोगणः ॥

**अर्थ**-गुळवेल, कडुलिंब, धने, पद्मकाष्ठ, व रक्तचंदन ह्या औषधांचा कषाय तृषा, दाह, अरुचि, वांति व संपूर्णज्वर यांचा नाश करितो.

## सुंठ्यादिकाढा.

सनागरंपर्पटकंपिबेद्वासदुरालभं ॥

किराततिक्तकंमुस्तंगुडूचींसदुरालभां ॥

**अर्थ**-सुंठ, पित्तपापडा, व धमासा, यांचा काढा; किंवा किराईत, नागरमोथा, गुळवेल, व धमासा, यांचा काढा द्यावा.

## क्षुद्रादिकपंचतिक्तकाढा.

क्षुद्रामृताभ्यांसहनागरेणसपुष्करंचैवकिराततिक्तं ॥

पिबेत्कषायंभुविपंचतिक्तंविधिःसमस्तज्वरमाशुहंति ॥

**अर्थ**-रिंगणी, गुळवेल, सुंठ, पुष्करमूळ, व काडेकिराईत यांचा पंचतिक्तनामक काढा सर्व ज्वरांस तात्काळ दूर करितो.

## भांर्ग्यादिकाढा.

भांर्गीपुष्करमूलंचमुस्तकंकंटकारिका ॥ त्रिकंटकबृहत्यौचकर्णिनीनागरैःशृता ॥ गणोभांर्ग्यादिकोनामपित्तश्लेष्मज्वरापहः॥

कासश्वासारुचिहरःपार्श्वशूलनिवारणः ॥

**अर्थ**-भारंगमूळ, पुष्करमूळ, नागरमोथा, रिंगणी, गोखरु, थोरडोरली, बाहव्याचा मगज, सुंठ, या औषधांचा काढा पित्तश्लेष्मज्वर, खोकला, श्वास, अरुचि, व बरगडया दुखणे यांना दूर करितो.

## पटोलादिकाढा.

पटोलंचंदनंमूर्वातिक्तापाठामृताकणाः ॥

पित्तश्लेष्मारुचिच्छर्दिज्वरकंडूविषापहाः ॥

**अर्थ**-कडुपडवळ, चंदन, मोरवेल, कटुकी, पाहाडमूळ, गुळवेल, व पिंपळी, इतक्यांचा काढा पित्तकफ, अरुचि, वांति, ज्वर, कंडू व विष यांचा नाशक आहे.

## त्रिफलादिकाढा.

त्रिफलात्रायमाणाचमृद्वीकाकटुरोहिणी ॥

पित्तश्लेष्मज्वरेह्येषांकषायोह्यनुलोमिकः ॥

**अर्थ**-त्रिफळा, त्रायमाण, द्राक्षे व कटुकी यांचा काढा पित्तकफज्वरावर शमनार्थ द्यावा.

## वत्सकादिकाढा.

वत्सकंपद्मकाष्ठंचनागरंचंदनामृते ॥ पटोलंधान्यकंचैवमुस्त
कंरक्तचंदनं ॥ पाठांमूर्वामृतांशुंठीमुशीरंकटुरोहिणीं ॥ सम
भागाशृतंतोयंसर्वज्वरहरंपिबेत् ॥ पित्तासृक्दाहशूलघ्नमम्ल
पित्तविनाशनं ॥

**अर्थ**–कुडयाची साल, पद्मकाष्ठ, सुंठ, रक्तचंदन, पाहाडमूळ, मोरवेल, गुळवेल, वाळा, कटुकी, या समभाग औषधांचा काढा सर्वूणज्वर, रक्तपित्त, दाह, शूल, व आम्लपित यांचा नाशक आहे.

## अमृतादिकाढा.

अमृतारिष्टकटुकामुस्तेंद्रयवनागरैः ॥ पटोलंचंदनाभ्यांचपिप्प
लीचूर्णयुक्कृतं ॥ अमृताष्टकमेतच्चपित्तश्लेष्मज्वरापहं ॥ छर्द्य
रोचकहृल्लासदाहतृष्णानिवारणं ॥

अर्थ–गुळवेल, कडुलिंब, कटुकी, नागरमोथा, इंद्रजव, सुंठ, कडुपडवळ, व चंदन यांचा काढा पिंपळीच्या चूर्णा सहित द्यावा. याला अमृताष्टक असें ह्मणतात. हें पित्तश्लेष्मज्वराचें नाशक आहे; व वांति, अरुचि, उर दाटणें, दाह, तृषा, यांचा नाशक आहे.

## वासास्वरस.

सपत्रपुष्पवासायारसःक्षौद्रसितायुतः ॥
कफपित्तज्वरंहंतिसास्रपित्तंसकामलं ॥

अर्थ–पानां फुलांसहित अडुळशाचा रस काढून साकर व मध घालून द्यावा. त्यानें कफपित्तज्वर, रक्तपित्त व कावीळ हीं दूर होतात.

## कटुकीचूर्ण.

सशर्करामक्षमात्रांकटुकींचोष्णवारिणा ॥
पीत्वाज्वरंजयेज्जंतुःपित्तश्लेष्मसमुद्भवं ॥

**अर्थ**–कटुकीचें चूर्ण एकतोळा चारमासे साकरेशीं उष्णपाण्याबरोबर घेतलें असत तें पित्तश्लेष्मज्वराचा नाश करील.

## लाजमंड

लाजैर्वातंडुलैर्भ्रष्टैर्लाजमंडःप्रकीर्तितः ॥
श्लेष्मपित्तहरोग्राहीपिपासाज्वरजिन्मतः ॥

अर्थ–साळीच्या लाह्यांचा, किंवा तांदूळ भाजून त्याचा मंड दिला असतां श्लेष्मपित्त, ताहान, व ज्वर हे दूर करील.

## वाट्यमंड.

सुकंडितैस्तथाभ्रष्टैर्वाट्यमंडोयवैर्भवेत् ॥
कफपित्तहरःकंठयोरक्तपित्तप्रसादनः ॥

अर्थ–जव चांगले कांडून कोंडा काढून त्यांत चवदागुण पाणी घालून शिजवून नंतर तें पाणी गाळून घ्यावें. याला वाट्यमंड ह्मणतात. हा प्याला असतां कफपित्त दूर होऊन कंठा सहित करून रक्तपित्त हरण करितो.

## मुस्तादिनिर्यूह.

मुस्तापर्पटकैरातनिर्यूहेनप्रसाधितः ॥
कफपित्तज्वरहरोयूषोधान्यपटोलयोः ॥

अर्थ–नागरमोथा, पित्तपापडा, व किराईत यांचा निर्यूह, अथवा धनें, व पित्तपापडा यांचा यूष, कफपित्तज्वराचा नाश करितो.

## निंबादियूष.

निंबकूलकयूषस्तुहितःपित्तकफात्मके ॥

अर्थ–निंबाची साल, व कडुपडवळ यांचा यूष पित्तकफाचा नाश करणारा आहे.

## भूनिंबादिउद्धूलन.

भूनिंबकारवीतिक्तावचाकट्फलजंरजः ॥
एषामुत्धूलनंश्रेष्ठंसततंस्वेदसंस्रवे ॥

अर्थ–किराईत, ओंवा, कटुकी, वेखंड, व कायफळ यांचें चूर्ण घाम आल्यावर आंगास लावण्यास प्रशस्त आहे.

## चंद्रशेखररस.

शुध्धसूतंसमंगंधंमरिचंटंकणंतथा ॥ चतुस्तुल्याशिलायोज्या
मत्स्यपित्तेनभावयेत् ॥ त्रिदिनंभावयेत्तेनरसोयंचंद्रशेखरः ॥
द्विगुंजमार्द्रकद्रावैर्देयंशीतोदकंपुनः ॥तक्रौदनंचवृंताकंपथ्यंत
त्रनिवेदयेत् ॥ त्रिदिनात्श्लेष्मपित्तोत्थमत्युष्णंनाशयेज्ज्वरं ॥

अर्थ–शुद्धपारा, शुद्धगंधक, मिरीं, टांकणखार व यां सर्वांच्या समान मनशीळ एकत्र करून त्यास मासाच्या पित्ताची तीन दिवस भावना द्यावी. ह्मणजे हा चंद्रशेखर रस

जाला. तो दोन गुंजा आल्याच्या रसाशीं घ्यावा. वर शीतोदक प्यावें; आणि पथ्य ताक-भात, व वांग्याचें भरित हें द्यावें. ह्मणजे तें तीन दिवसांत कफपित्तज्वराचा नाश करील.

## संनिपातज्वरलक्षण.

क्षणेदाहःक्षणेशीतमस्थिसंधिशिरोरुजः ॥ सस्रावेकलुषेरक्ते निर्भुग्नेचापिलोचने ॥ सस्वनौसरुजौकर्णौकंठःशूकैरिवावृतः ॥ तंद्रामोहःप्रलापश्चकासश्वासोरुचिर्भ्रमः ॥ परिदग्धाखरस्पर्शाजिव्हास्रस्तांगतापरं ॥ ष्ठीवनंरक्तपित्तस्यकफेनोन्मिश्रितस्यच ॥ शिरसोलोठनंतृष्णानिद्रानाशोहृदिव्यथा ॥ स्वेदमूत्रपुरीषाणांचिराद्दर्शनमल्पशः ॥ कृशत्वंनातिगात्राणां सततंकंठकूजनं ॥ कोठानांश्यावरक्तानांमंडलानांचदर्शनं ॥ मूकत्वंस्रोतसांपाकोगुरुत्वमुदरस्यच ॥ चिरात्पाकस्यदोषाणांसंनिपातज्वराकृतिः ॥

अर्थ—क्षणांत आंगाची आग होणें; क्षणांत थंडी वाजणें, अस्थि, संधि व मस्तक, यांस वेदना, नेत्र गढूळ व आरक्त होऊन पाण्यानें भरून लाठल्या सारिखे होणें; कानांत विलक्षण शद्ब व वेदना होणें, कंठाचेठायीं कांटे उत्पन्न होऊन टोचल्यासारिखें वाटणें कंठांतून दोनप्रकारची ध्वनि निघणें; डोळयांस झांपड, मूर्छा, बडबड, खोकला, श्वास, अरुचि, भ्रम, जीभ भाजल्यासारिखी काळसर खरखरीत, व आंग विकळ, रक्त, कफ व पित्त यांणीं मिश्रित असा वारंवार थुंका मस्तक डुलल्यासारिखें होणें; ताहान. निद्रानाश उरांतदुःख, घाम, मळ, मूत्र, हीं फार वेळानें थोडीं थोडीं होतात. आंगास फार कृशपणा नसणें; सर्वकाळ गळा वाजणें, काळसर, तांबुसवर्ण, व वर्तुळ अशा आंगावर गांधी येतात. मुकेपणा, मुख नासिका व कर्ण यांचा पाक होणें पोटाला जडपणा आणि वातादि कुपित दोषांचा पाककालें करून होणें, हीं सन्निपाताची लक्षणें जाणावीं.

## धातुपाकलक्षण.

निद्रानाशोहृदिस्तंभोविष्टंभोगौरवारुची ॥
अरतिर्बलहानिश्चधातूनांपाकलक्षणं ॥

अर्थ—धातुपाक जाला असतां ऊर दाटणें, मलावरोध, सर्वांगाला जडता, पदार्थमात्रावर अप्रीति व अशक्तपणा येतो. हीं लक्षणें होतात.

## दोषपाकलक्षण.

दोषप्रकृतिवैकृत्यंलघुताज्वरदेहयोः ॥
इंद्रियाणांचवैमल्यंदोषाणांपाकलक्षणं ॥

**अर्थ**—वातादिक दोष व प्रकृति यांस विकार, ज्वरकमी असून आंग हलकें वाटणें; आणि इंद्रियांची स्वस्वविषय ग्राहक शक्ति कमी होणें, हें दोषपाकाचें लक्षण जाणावें.

## संन्निपातज्वराचें विशेष लक्षण.

संनिपातज्वरस्यांतेकर्णमूलेसुदारुणः ॥
शोथःसंजायतेतेनकश्चिदेवप्रमुच्यते ॥

**अर्थ**—संन्निपातज्वराचें अंतीं कर्णमूळाशीं दारुण सूज येत्ये ती आली ह्मणजे रोगी बहुशः वांचत नाहीं.

ज्वरस्यपूर्वंज्वरमध्यतोवाज्वरांततोवाश्रुतिमूलशोथः ॥
क्रमेणसाध्यःखलुकृच्छ्रसाध्यःकृच्छ्रादसाध्योमुनिभिःप्रदिष्टः ॥

**अर्थ**—ज्वराच्यापूर्वीं, मध्यें, किंवा अंतीं कर्णमूळाचेठायीं सूज आली असतां तो ज्वर क्रमानें साध्य, कष्टसाध्य, आणि असाध्य होय असें मुनीनीं सांगीतलें आहे.

## साध्यासाध्यलक्षण.

दोषेविवृद्धेनष्टेग्नौसर्वसंपूर्णलक्षणः ॥
संन्निपातज्वरोसाध्यःकृच्छ्रसाध्यस्ततोन्यथा ॥

**अर्थ**—वात, पित्त व कफ यांची वृद्धि झाली असतां आणि जठराग्नि नष्ट झाला असतां व जीं संन्निपाताचीं पूर्वोक्त लक्षणें तीं सर्व जाली असतां संनिपातज्वर असाध्य जाणावा काहीं न्यून असतां साध्य जाणावा.

## संनिपाताची कालमर्यादा.

सप्तमेदिवसेप्राप्तेनवमेकादशेपिवा ॥ पुनर्घोरतरोभूत्वाप्रशमं यातिहंतिवा ॥ सप्तमीद्विगुणायावन्नवम्येकादशीतथा ॥ एषात्रिदोषमर्यादामोक्षायचसुखायच ॥

अर्थ—संन्निपातज्वर जर सातव्या, नवव्या, अकराव्या, चवदाव्या, अठराव्या, आणि बाविसाव्या दिवशीं जास्त होईल तर, तो रोगी या मर्यादादिवसांमध्यें मरेल, आणि मर्यादा चुकली तर तो रोगी वांचेल असें समजावें.

## दोषजनितकालमर्यादा.

पित्तकफानिलवृध्यादशदिवसद्वादशाहसप्ताहात् ॥
हंतिविमुंचत्याशुत्रिदोषजोधातुमलपाकात् ॥

**अर्थ**—पित्त, कफ आणि वात यांचा पाक होण्याची मर्यादा अनुक्रमें दाहाव्या, बाराव्या, आणि सातव्या दिवशीं आहे. ह्मणोन त्याच्या दिवसांत धातुपाक झाला तर रोगी मरतो; आणि मलपाक झाला तर रोगी वांचतो.

## कट्फलादिपान.

कट्फलंत्रिफलादारुचंदनंसपरूषकं ॥ कटुकापद्मकोशीरंवि
पचेत्कार्षिकंजले ॥ त्रिदोषदाहतृष्णाघ्नंपानमात्रेणपूजितं ॥ दी
र्घकालज्वरार्त्तानामेतत्स्यादमृतोपमं ॥

अर्थ—कायफळ, त्रिफळा, देवदा[illegible] फालसा, कटुकी, पद्मकाष्ठ आणि वाळा हीं औषधें एकेक तोळा घेऊन का[illegible] तला असतां तो त्रिदोष, दाह व तृष्णा यांना शमवितो; आणि दीर्घकाळज्वरितास केवळ अमृतोपम होतो.

## दशमूलादिमंड.

पाचनोदीपनःसोष्णोलाजमंडोयतःस्मृतः ॥
दशमूलादिसिद्धःससंनिपातज्वरेहितः ॥

अर्थ—दशमूलांचा कषायाशीं सिद्ध केलेला जो लाह्यांचा मंड, तो पाचन, दीपन व उष्ण आहे ह्मणून संनिपातावर हितकारक होईल.

## दुःस्पर्शादिसिक्थान्न.

दुस्पर्शगोक्षुरक्षुद्रसिद्धमाहारमर्पयेत् ॥
दोषशांतिबलाग्न्यर्थंत्रिदोषज्वरिणेपृथक् ॥

अर्थ—धमासा, गोखरू व रिंगणी यांच्या काढ्यांत सिद्ध केलेला आहार द्यावा. त्याणें दोष शांति होते, व बळ आणि अग्नि हे वाढतात, आणि त्रिदोषीरोग्याला हितकारक होतो.

## लाजसक्तु.

लाजसक्तून्समश्नीयात्सैंधवेनसमान्वितान् ॥
तच्चेज्जीर्यत्यविघ्नेनज्वरीजीवेत्तदाध्रुवं ॥

अर्थ— त्रिदोषज्वरिताला लाह्यांचें पीठ सैंधव घालून द्यावें; तें जर निर्विघ्नपणें जिरलें, तर तो रोगी निश्चयानें वांचेल.

## लाजसक्तुनिषेध.

रक्तपित्तेहितत्वेनतृष्णादाहज्वरेषुच ॥
लाजानांसक्तवःशीतानचतेत्रहितामताः ॥

अर्थ—लाह्यांचें पीठ शीत आहे, तें रक्त, पित्त, तृषा, दाह व ज्वर यावर द्यावें; परंतु संनिपातावर देऊं नये.

## पित्ताचें शमन करण्याचें कारण.

निर्हरेत्पित्तमेवादौज्वरेषुसमवायिषु ॥
दुर्निवारतरंतद्धिज्वरार्त्तेषुविशेषतः ॥

**अर्थ**– संनिपातज्वरामध्यें प्रथमतः पित्त शमवावें; तेंच दुर्निवार आहे.

## शीतोदकसेचनाचा निषेध.

संनिपातेतुदाहार्तंयःसिंचेच्छीतवारिणा ॥
आतुरःसकथंजीवेद्भिषग्वासकथंभवेत् ॥

**अर्थ**–जो वैद्य संनिपातामध्यें दाह होतो त्याला शीतोदकानें सिंचन करतो. त्याला वैद्य कसा ह्मणावा व तो रोगी कसा वांचेल.?

## शिरीषाद्यंजन

शिरीषबीजगोमूत्रकृष्णामरिचसैंधवैः ॥
अंजनंस्यात्प्रबोधायसरसोनशिलारसैः ॥

**अर्थ**–शिरस, पिंपळी, मिरीं व सैंधव हीं गोमूत्रांत उगाळून अंजन करावें; तें रोग्याला शुद्धीवर आणील; अथवा मनशीळ व वेखंड यांचें लसुणीच्या रसांत अंजन करावें.

## कस्तूरिकाद्यंजन.

कस्तूरीमरिचंवाजिलालाचमधुनांजनं ॥
तंद्रांनिवारयत्याशुव्योषंक्षिप्तंयथानसि ॥

**अर्थ**–कस्तुरी, व मिऱ्यें हिं घोडयाचा लाळेंत उगाळून मध घालून अंजन करावें; तें तंद्रेला शीघ्र निवारण करितें. तसेंच त्रिकटूचें चूर्ण नाकांत फुंकलें असतां तें हि तंद्रा नाशक आहे.

## लंघन.

सन्निपातज्वरीपूर्वंसम्यग्लंघनमाचरेत् ॥
शृतशीतंपिवेदंभःसमयेभेषजंभजेत् ॥

**अर्थ**–सन्निपातज्वरितानें पूर्वी चांगलें लंघन करावें; आणि मुसत्या पाण्याचा काढा करून तो शीत झाल्यावर फार ताहान लागल्यास प्यावें; आणि वेळेवर औषध घ्यावें.

## शीतजलपाननिषेध.

सन्निपातेनतृष्यंतंपार्श्वरुक्तालुशोषिणं ॥
यःपाययेज्जलंशीतंसमृत्युर्नरविग्रहः ॥

**अर्थ**—सन्निपातज्वरिताला शोष पडला आहे, आणि कुशींत शूळ व टाळा शुष्क आला आहे; ह्मणून जो वैद्य तापविल्यावाचून पाणी देतो, तो वैद्य नररूपी मृत्यूच जाणावा.

## वालुकास्वेद.

वातश्लेष्मकृतेस्वेदान्कारयेद्रुक्षनिर्मितान् ॥
स्निग्धस्वेदोनिषिद्धोत्रविनाकेवलवातजात् ॥

**अर्थ**—वातश्लेष्मज्वरामध्यें स्वेद, रूक्ष उपचारानीं काढावा; स्निग्ध स्वेद केवळ वातावाचून अन्याला निषिद्ध आहे.

## सैंधवादिनस्य.

सैंधवंश्वेतमरिचंसर्षपाःकुष्ठमेवच ॥
बस्तमूत्रेणसंपिष्टंनस्यंतंद्रानिवारणं ॥

**अर्थ**—सैंधव, शेवग्याचें बीं, शिरस, आणि कोष्ट हीं शेळीच्या मूत्रांत वाटून त्याचें नस्य दिलें असतां तंद्रानाश होतो.

## मातुलिंगादिनस्य.

मातुलिंगार्द्रकरसंकोष्णंत्रिलवणान्वितं ॥ अन्यद्वासिद्धविहि
तंनस्यंतीक्ष्णंप्रयोजयेत् ॥ तेनप्रभिद्यतेश्लेष्माप्रभिन्नश्चप्रसिच्य
ते ॥ शिरोत्हृदयकंठास्यपार्श्वरुक्चोपशाम्यति ॥

**अर्थ**—महाळुंगाचा व आल्याचा रस किंचित् गरम करून त्यांत सैंधव, बिडलोण व काचलोण घालून नस्य करावें; किंवा कोणी सिद्धानें केलेलें तीक्ष्ण नस्य द्यावें. तेणेंकरून श्लेष्मा पातळ होऊन पडतो; आणि तेणेंकरून मस्तक, ऊर, गळा, तोंड व पार्श्वभाग यांचे विकार शांत होतात.

## कल्पतरुनस्य.

मोहामयेनमुग्धंबोधयितुंयादृशःशक्तः ॥
कल्पतरुनामधेयोरसोनतादृक्परंकिंचित् ॥

**अर्थ**—मोहानें मोहितास शुद्धीवर आणण्यास कल्पतरु रसायन जसें समर्थ आहे, तसें दुसरें समर्थ नाहीं.

## द्राक्षादिजिव्हालेप.

जिव्हातालुगलक्लोमभरुत्पित्तेनवोच्छितः ॥ तदासचाचरेच्छोषं
जिव्हायाःखरतांतथा ॥ स्फुटनंचतदाजिव्हांलेपयेन्मधुपिष्ट
या ॥ द्राक्षयासाज्ययातेनजिव्हास्यात्सरसामृदुः ॥

अर्थ-जीभ, तालु, गळा, व क्लोम हीं पित्तानीं ग्रासिली असतां रोग्याला ताहान लागून जीभ फुटत्ये, व खरखरीत होत्ये त्याला मध, तूप व द्राक्ष एकत्र करून खलून त्याचा लेप जिभेला करावा. त्याणें जीभ सरस मृदु होत्ये.

## आर्द्रकादिकवलग्रह.

आर्द्रकस्वरसोपेतंसैंधवंकटुकत्रयं ॥ आकंठाद्धारयेदास्येनिष्ठी
वेच्चपुनःपुनः ॥ तेनास्यत्दृदयक्लोममन्यापार्श्वशिरोगलात् ॥
लीनोप्याकृष्यतेश्लेष्मालाघवंचास्यजायते॥ पर्वभेदोज्वरोमूर्छा
निद्राश्वासगलामयाः ॥ मुखाक्षिगौरवंजाड्यमुत्क्लेशश्चोपशा
म्यति ॥ सकृद्द्वित्रिचतुःकुर्याद्दृष्ट्वारोगबलाबलं ॥ एतद्धि
परमंप्राहुर्भेषजंसन्निपातिनां ॥

अर्थ—आल्याचा रस, सैंधव व त्रिकटु हीं एकत्र करून गोळी मुखांत ठेऊन पुनःपुनः कफ येईल, तो थुंकावा. त्याणें तोंड, उर, क्लोम, मान, पार्श्वभाग व गळा यापासून कफ लीन असला तरी पडतो; आणि शरीरास हलकेपणा येतो; आणि पर्वभेद, ज्वर, मूर्छा, निद्रा, श्वास, गलरोग, तोंड नेत्र यांना ज्याड्य, तोंडाला पाणी सुटतें तें, हे व्याधि नष्ट होतात. हा प्रकार दोषांचे बलाबल पाहून दोन चारवेळ करावा. हें संनिपाति रोग्याला चांगलें आहे.

## अष्टांगावलेह.

ऊर्ध्वजत्रुगदघ्नीयासासायमवलेहिका ॥
अधोरोगहरीयासाभोजनात्प्राक्प्रयुज्यते ॥

अर्थ—जत्रूच्या ऊर्ध्व्याधीवर सायंकाळी अवलेह घ्यावा, आणि अधोभागींचे रोगांवर भोजनाचे पूर्वी घ्यावा.

## कट्फलादिअवलेह.

कट्फलंपुष्करंशृंगीव्योषंयासश्चकारवी ॥ श्लक्ष्णचूर्णकृतंचैत
न्मधुनासहलेहयेत् ॥ एषावलेहिकाहंतिसंनिपातंसुदारुणं ॥
हिक्कांश्वासंचकासंचकंठरोगंचनाशयेत् ॥ एतद्योज्यंकफोद्रेके
चूर्णमार्द्रकजैरसैः ॥

अर्थ—कायफळ, पुष्करमूळ, काकडशिंगी, त्रिकटु, धमासा व अजमोदा यांचे वस्त्रगाळ चूर्ण करून मधाशीं चाटण द्यावें. तें दारुण संन्निपात, उचकी, श्वास, खोकला व कंठरोग यांचा नाश करितें. हेंच चूर्ण कफ फार जाला असतां आल्याचा रस घालून चाटण द्यावें.

## आर्द्रकादिस्वरस.

अष्टांगमधुनालिह्यादार्द्रकस्यरसेनवा ॥
संमोहंदारुणंहन्याचंद्राकाससमन्वितं ॥

अर्थ–वर सांगितलेला अष्टांग लेह मधाशीं किंवा आल्याच्या रसाशीं चाटला असतां खोकला, झांपड, आणि फार मोह यांचा नाश करितो.

## मधुनिषेध.

सर्वेषुसंनिपातेषुनक्षौद्रमवचारयेत् ॥ शीतोपचारिक्षौद्रंस्या
च्छीतंचात्रविरुध्यते ॥ उष्णैर्विरुध्यतेसर्वंविषान्वयतयामधु ॥
उष्णार्तमुष्णैरुष्णंचतंनिहंतियथाविषं ॥

अर्थ–संपूर्ण संनिपातांवर मध देऊं नये. मध भक्षण केला असतां त्यावर शीतोपचार केले पाहिजेत; आणि संनिपातांत शीत उपचार विरुद्ध आहेत. व सर्व उष्णाशी मधाचा विषासारिखा विरोध आहे. ह्मणून जो मनुष्य मुळीं उष्णानें पीडित असून त्यावर उष्ण उपचार झाले, तर ते विषासारिखे मारक होतात.

## प्रक्रिया.

संनिपातज्वरेपूर्वंकुर्यादामकफापहं ॥
पश्चाच्छ्लेष्मणिसंक्षीणेशमयेत्पित्तमारुतौ ॥

अर्थ–संनिपातज्वरावर पूर्वी आमकफनाशक औषध द्यावें. कफक्षीण झाल्यावर पित्त वात शमवावे.

## दुसरा प्रकार.

लंघनंवालुकास्वेदोनस्यंनिष्ठीवनंतथा ॥
अवलेहांजनंचैवप्राक्प्रयोज्यंत्रिदोषजे ॥

अर्थ–संनिपातावर लंघन, वालुकास्वेद, नस्य, गुळण्या, अवलेह, व अंजन हीं पूर्वी करावीं

## लंघनाचें असहन.

दोषाणामेवसाशक्तिर्लंघनेयासहिष्णुता ॥
कश्चिद्दोषविमुक्तोनलंघनंसहतेनरः ॥

अर्थ–लंघन सहन होणें ही दोषांची शक्ती आहे. दोषमुक्त झाल्यावर रोग्यास लंघन सहन होत नाहीं.

## एकाकाळीं दोन प्रकारचें औषध देण्याचा निषेध.

क्रियायास्तुगुणालाभेक्रियामन्यांप्रयोजयेत् ॥
पूर्वस्यांशांतवेगायांनक्रियासंकरोहितः ॥

**अर्थ**-एका औषधक्रियेचा गुण नांहीं तर दुसरी औषधक्रिया करावी; परंतु पूर्वौषधाचा वेग नष्ट झाल्यानंतर करावी. एककाळीं दोन औषधक्रिया हितकारक होत नाहींत.

## अन्यप्रतिकार.

तप्तायोलांछनंपंचताल्वादिषुत्रिदोषजे ॥ रुद्राभिषेकोभूदेवभो
जनंग्रहजाप्यतः ॥ मंत्ररक्षादिभिःकार्यासंनिपातेप्रतिक्रिया ॥

**अर्थ**-संनिपातावर ताल्वादि पांच ठिकाणी तप्तलोखंडाचा डाग द्यावा; व रुद्राभिषेक, ब्राह्मणभोजन, ग्रहजप व मंत्रभस्मादिक रोगनाशार्थ अन्य उपाय ही चालवावे.

## कंटकार्यादिपाचन.

कंटकारिद्वयंशुंठीधान्यकंसुरदारुच ॥
एभिःशृतंपाचनंस्यात्सर्वज्वरनिवारणं ॥

**अर्थ**-रिंगणी, डोर्ली, सुंठ, धने व देवदारु यांचा काढा सर्व ज्वरावर पाचक व ज्वरनाशक आहे.

## मनःशिलादिअंजन.

तुरंगलालासहितामनःशिलानिहंतितंद्रासकृदंजनेन ॥
बब्बूलपत्राणिहरीतकीचसंस्वेदितास्वेदविकारहंत्री ॥

**अर्थ**-मनशीळ, घोडयाचे लाळेंत उगाळून अंजन करावें. त्याणें झांपड नष्ट होतये; आणि बाभुळीचा पाला व हरीतकी यांची वाफ स्वेदनाशक आहे.

## भूनिंबादिमर्दन व उद्धूलन.

भूनिंबकटुकाकुष्ठंकारवींद्रयवाःसटी ॥ एतानिसमभागानिसूक्ष्म
चूर्णानिकारयेत् ॥ प्रस्वेदेकंठरोधेचसंधौमर्दनमिष्यते ॥ एत
दुद्धूलनंश्रेष्ठंसंनिपातहरंपरं ॥

**अर्थ**-किराईत, कटुकी, कोष्ठ, ओंवा, इंद्रजव व कचोरा यांचीं समभाग चूर्णें करून तीं एकत्र करून आंगास चोळावीं; व संधींचेठायीं विशेष मर्दन करावें. तेणेंकरून कफानें झालेला कंठावरोध, आणि संनिपातज्वर हे शांत होतात.

## यवानिकाद्युत्धूलन.

यवानिकावचाशुंठीपिप्पलीकारवीतथा ॥

एतैरुत्धूलनंश्रेष्ठंत्रिदोषोत्थेज्वरेनृणां ॥

अर्थ—ओंवा, वेखंड, सुंठ, पिंपळी, व अजमोदा यांचें चूर्ण संनिपातज्वरीं घाम आल्यावर लावण्यास प्रशस्त आहे.

## विषाद्युत्धूलन.

विषभागोभवेदेकामरीचंत्रिगुणंमतं ॥ आरण्योपलजंभस्मषो

डशांशसमान्वितं॥एकत्रमीलितंचूर्णंधूर्त्तस्वरसभावितं ॥ आत

पेशोषितंतच्चशीतस्वेदहरंपरं ॥

अर्थ—बचनाग, मिरीं, रानशेणीचें भस्म सोळावा भाग, मिळवून धोत्र्याचे रसाची भावना देऊन उन्हांत वाळवून आंगास लावावें. शैत्य व घाम यांचें हरण करील.

## चणकाद्युत्धूलन.

अथवाचणकाभ्रष्टायवानीचूर्णमिश्रिताः ॥

वचोषणारजोयुक्ताःस्वेदसंशोषणामताः ॥

अर्थ—भाजलेल्या हरभऱ्यांचें पीठ, ओंवा, वेखंड व मिरीं यांच्या चूर्णांत मिळवून आंगास लावावें. घाम नष्ट होईल.

## चाटण.

सुरसार्जकनिर्यासिसमधुव्योपसैंधवः ॥

महत्श्लेष्मानिलोद्रेकेसंज्ञानाशविनाशनः ॥

अर्थ—तुळशीचा रस, अजोला, त्रिकटु, सैंधव व मध यांचें चाटण करावें. तें कफवाताधिक ज्वराला आणि मूर्छेला नष्ट करील.

## लंघनविधि.

त्रिरात्रंपंचरात्रंवादशरात्रमथापिवा ॥

लंघनंसन्निपातेषुकुर्यादारोग्यदर्शनात् ॥

अर्थ—सन्निपात्याला आरोग्य होण्याकरितां तीन, पांच किंवा दाहा दिवस लंघन द्यावें.

## लंघन.

शस्तंसुलंघितस्यादौविधायकवलग्रहं ॥

अर्थ—रोग्यानें लंघन केल्यावर पूर्वोक्त कवल मुखांत धरावा.

## अतिलंघनलक्षण.

कफपित्तद्रवौधातूसहेतेलंघनंमहत् ॥
आमक्षयादूर्ध्वमपिवायुर्नसहतेक्षणं ॥

अर्थ–कफ व पित्त हे द्रवधातू आहेत. ह्मणून रोग्याला आमक्षय झाल्यावर हीं मोठें लंघन सहन होतें. परंतु वायूला मोठें लंघन क्षणमात्र सहन होत नाहीं.

## लंघिताला अन्न.

ग्राम्येगुरुत्वंश्रद्धाचविकृतिर्हीनलंघिते ॥ प्रकांक्षालाघवंग्लानिः
स्वच्छतासुप्रसन्नता ॥ उपद्रवनिवृत्तिश्चसम्यक्लंघितलक्षणं ॥
संमोहःसंधिशैथिल्यंवातरुक्चातिलंघिते ॥

अर्थ–हीनलंघन झालें असतां मैथुनाविषयीं अश्रद्धा व अंगगौरव हीं लक्षणें होतात. चांगलें लंघन झालें असतां अन्नाची इच्छा, आंगास हलकेपणा, ग्लानि, स्वस्थता, सुप्रसन्नता व ज्वरोपद्रवांचा नाश हीं लक्षणें होतात. आणि अतिलंघन झालें तर मोह, संधिला शिथिलपणा व वायुविकार हे होतात.

## पंचमुष्टिकयूष.

पंचमुष्टिकयूषेणत्रिकंटककृतेनच ॥ आदोपशमनान्नित्यंभिषक्
श्रेष्ठस्तुसाधयेत् ॥ यवकोलकुलित्थानांमुद्गमूलकशुंठिनां ॥
एकैकमुष्टिमादायपचेदष्टगुणेजले ॥ पंचमुष्टिकइत्येषवातपित्त
कफापहः ॥ शस्यतेशूलगुल्मेचश्वासेकासेज्वरेक्षये ॥

अर्थ–गोखरू घालून पंचमुष्टिक यूष दोषशमन होई पर्यंत द्यावा. पंचमुष्टिक सांगतो यव, बोरांच्या बिया, कुलित्थ, मूग, वाळलेले मुळे, व सुंठ हीं चार चार तोळे घ्यावी आणि आठपट पाण्यांत काढा करावा. त्याला पंचमुष्टिक संज्ञा आहे. तो वात, पित्त व कफ यांचा नाशक आणि शूळ, गुल्म, श्वास, कास, व क्षय यांवर प्रशस्त आहे.

## सप्तमुष्टिकयूष.

यवकोलकुलित्थैश्चशुष्कमूलकमुद्गकैः ॥ धान्याकैर्विश्वयुक्तैश्च
यूषोवातज्वरापहः ॥ सप्तमुष्टिकइत्येषसांनिपातज्वरापहः ॥ क
फवातामदोषघ्नःकंठत्हृद्वक्त्रशोधनः ॥

अर्थ–यव, बोरबिया, कुलित्थ, मूग, सुके मुळे, व सुंठ, धने, हीं प्रत्येक चार चार तोळे घेऊन यूष करावा. तो सप्तमुष्टिक संज्ञक यूष वातज्वर, सन्निपातज्वर, कफ, वायु व आमदोष यांचा नाश करितो; आणि गळा, ऊर, व तोंड, यांनां स्वच्छ करणारा आहे.

### कंपादिचिकित्सा.

सन्निपातज्वरेयस्तुकंपतेप्रलपत्यपि ॥
किंचिदेवनजानातिचिकित्सातस्यकथ्यते ॥

अर्थ–सन्निपातज्वरामध्यें कंप सुटतो, बडबड, मूर्छा, यांजवर चिकित्सा सांगतो.

### अभ्यंजन.

अभ्यंजयेत्पुराणेनसर्पिषापूर्वमेवतं ॥
बलारास्नागुडूच्याद्यैस्तैलैश्चपरिषेचयेत् ॥

अर्थ–पूर्वी त्या रोग्याच्या आंगाला जुनें तूप लावावें; किंवा बला, रास्ना, गुळवेल यांचे तेल आंगास लावावें.

### वर्तकादिरस.

वर्तकोवर्तकालावोवार्तीकस्तित्तिरिःशशः ॥
कुलिंगश्चरसेनैषांतर्पयेतयथानलं ॥

अर्थ–गांजीणपक्षी, आवर्तक, लवे, वार्तिक, तित्तिर, ससा, आणि चिमणा, यांच्या मांसाचा रस अग्निबळ पाहून द्यावा.

### सन्निपातीं मांसनिषेध.

सन्निपातेक्षुधार्तयोभोजयेत्पिशितौदनैः ॥
सकथंभिषगाख्यातिंलभतेभिषजाधमः ॥

अर्थ–सन्निपातज्वरामध्यें क्षुधार्तरोग्याला जो वैद्य मांस भक्षणार्थ देतो, तो अधम वैद्य लोकांत प्रतिष्ठा कशी मिळवील?

### सुवर्णादिलेप.

सुवर्णमुक्तारजतप्रवालंकस्तूरिकाकुंकुमरोचनंच ॥ वराटरुद्राक्षमधूकबिल्वंकुष्ठंचखर्जूरपुनर्नवाच ॥ द्राक्षाकणानागरपुत्रजीवीसारंगशृंगंकतकस्यबीजं ॥ एरंडमूलंशरशीर्षकंचमयूरिकाश्वेतपुनर्नवाच ॥ स्तन्येनपिष्ट्वाकुरुसन्निपातेलेपःसदासर्वगदान्निहंति ॥

**अर्थ**–सोनें, मोतीं, रूपें, पोंवळें, कस्तूरी, केशर, गोरोचन, कवडी, रुद्राक्ष, ज्येष्ठमध, बेलफळ, कोष्ठ, खजूर, पुनर्नवा, द्राक्षे, पिंपळी, सुंठ, पुत्रवती, हरणाचें शिंग, निंबळीचें बीं, एरंडमूळ, शरजाततृण, आंवाडी व श्वेतपुनर्नवा, हीं सर्व औषधें आंगावरच्या दुधांत वांटून त्याचा सन्निपातरोग्याच्या आंगास लेप करावा. तो सर्व विकार शमवितो.

## चिकित्साप्रक्रिया.

श्लेष्मनिग्रहमेवादौकुर्याद्व्याधौत्रिदोषजे ॥ निरस्तेश्लेष्मणि
त्वस्यस्रोतःसूद्घाटितेषुच ॥ लाघवंजायतेसद्यस्तृष्णाचैवोपशाम्यति ॥

**अर्थ**–सन्निपातज्वरामध्यें पूर्वीं कफाला जिंकावा. कफ कमी झाल्यावर, व शिरांचे मार्ग मोकळे झाल्यावर, शरीराला हलकेपणा येतो, व ताहान नाहींशी होत्ये.

## अन्यसन्निपातनिदानें.

एकोल्बणास्त्रयस्तेस्युर्द्व्युल्बणाश्चतथेतिषट् ॥ उल्बणश्चभवेदे
कोविज्ञेयःसतुसप्तमः ॥ प्रवृद्धमध्यहीनाश्चवातपित्तकफैश्चष
ट् ॥ सन्निपातज्वरस्यैवंस्युर्विशेषास्त्रयोदश ॥

**अर्थ**–सन्निपातामध्यें कफ, वात व पित्त या प्रत्येक दोषांच्या उल्बणापासून तीन; दोन दोषांच्या उल्बणानें तीन; व तीनही दोषांच्या उल्बणानीं मिळून एक; एकूण सात आणि प्रवृद्ध, मध्य, व हीन जे वात, पित्त, आणि कफदोष यांच्या पर्यायानें साहा. असे सन्निपाताचे तेरा भेद होतात.

## वातोल्बणसन्निपात.

संध्यस्थिशिरसःशूलंप्रलापोगौरवंभ्रमः ॥
वातोल्बणेस्याद्व्यनुगेतृष्णाकंठास्यशुष्कता ॥

**अर्थ**–वाताधिक्य आणि कफ व पित्त हीन अशा सन्निपातामध्यें संधि, हाडें, आणि मस्तक यांमध्यें शूल, बडबड, आंगाला जडत्व, भ्रम, ताहान, व गळा आणि तोंड यांना शोष हीं लक्षणें होतात.

## वातोल्बणसन्निपातचिकित्सा.

पंचमूलीकषायंतुदद्याद्वातोत्तरेज्वरे ॥
भृशोष्णंवासुखोष्णंवादृष्ट्वादोषबलाबलं ॥

**अर्थ**–वाताधिकसन्निपातावर पंचमूळांचा काढा ऊष्ण किंवा सुखोष्ण असा दोषांचें बलाबल पाहून द्यावा.

## मुस्तादिकाढा.

समुस्तंपंचमूलंचदद्याद्वातोत्तरेज्वरे ॥
भृशोष्णंवासुखोष्णंवादृष्ट्वादोषबलाबलं ॥

अर्थ–नागरमोथा व पंचमुळें यांचा काढा करून, तो दोषांचे बल असतां गरम, व दोष अल्प असतां सुखोष्ण द्यावा.

## कट्फलादिकाढा.

कट्फलाब्दवचापाठपुष्कराजातिपर्पटैः ॥ देवदार्वभयाशृंगी कणाभूनिंबनागरैः ॥ भार्गीकलिंगकटुकासठीकट्तृणधान्यकैः ॥ समांशैःसाधितःक्वाथोहिंग्वार्द्रकरसैर्युतः ॥ कर्णमूलोद्भवंशोथंहंतिमन्यागलाश्रयं ॥ कफवातज्वरंश्वासंकासंहिक्कां हनुग्रहं ॥ गलगंडंगंडमालांस्वरभेदंकफात्मकं ॥ शिरोगुरुत्वंबाधिर्यंवृद्धिंचकफमेदसोः ॥ दशमूलज्वरान्घोषःसन्निपातज्वरान्जयेत् ॥ अभिन्यासमसंज्ञांचकट्फलादिर्निहंतिच ॥

अर्थ–कायफळ, नागरमोथे, वेखंड, पाहाडमूळ, पुष्करमूळ, जिरें, पित्तपापडा, देवदार, हरीतकी, कांकडशिंगी, पिंपळी, किराइत, सुंठ, भारंगमूळ, इंद्रजव, कुटकी, कचोरा, रोहिषतृण व धने हीं औषधें समभाग घेऊन त्यांचा काढा करून त्यांत हिंग व आल्याचा रस घालून प्राशनार्थ द्यावा; ह्मणजे कर्णमूळ, मान व गळा यां संबंधी सूज, कफवातज्वर, श्वास, कास, उचकी, हनुग्रह, गलगंड, गंडमाला, कफापासून झालेला स्वरभेद, मस्तकाची जडता, बहिरेपणा, कफ व मेद यांची वृद्धि, दाहा प्रकारचे ज्वर, सन्निपात अभिन्यास, आणि संज्ञानाश यांचा हा कट्फलादि काढा नाश करितो.

## पित्तोल्बणसन्निपातनिदान.

रक्तविण्मूत्रतादाहोस्वेदस्तृड्बलसंक्षयं ॥
मूर्छाचेतित्रिदोषेस्याल्लिंगंपित्तेगरीयसि ॥

अर्थ– पित्ताधिक सन्निपात झाला असतां मळ व मूत्र यांना रक्तता, दाह, धाम, ताहान, बलक्षय, आणि मूर्छा हीं लक्षणें होतात.

## पित्तोल्बणसं० चिकि० काढा.

परूपकाणित्रिफलादेवदारुसकट्फलं ॥ चंदनंपद्मकंचैवतथा कटुकरोहिणी ॥ पृश्निपर्णीशृतंत्वेभिरूषितंशीतलंजलं ॥ पित्तोत्तरेणामेतत्सन्निपातेचिकित्सितं ॥

अर्थ– फालसा, हरडा, बेहेडा, आवळकाठी, देवदार, कायफळ, चंदन, पद्मकाष्ठ, कुटकी, आणि पिठवण हीं औषधें समभाग एकत्र ठेंचून थंडपाण्यांत रात्रीं भिजत घालून त्याचा काढा करून तो प्रातःकाळीं थंड द्यावा. हीच पित्ताधिकसन्निपातावर चिकित्सा सांगितली.

## चंदनादिपाणी.

चंदनंपद्मकंचैवतथाकटुकरोहिणी ॥ पृथक्पर्णीसमंसिद्धमुषितंशीतलंजलं ॥ पित्तोत्तरेनृणामेतत्सन्निपातेचिकित्सितं ॥

अर्थ– चंदन, पद्मकाष्ठ, कुटकी, आणि पिठवण हीं औषधें समभाग ठेंचून रात्रीं थंडपाण्यांत घालून ठेवावीं, तें थंडपाणी दुसरे दिवशीं द्यावें. हें पित्ताधिकसन्निपातावर औषध सांगितलें.

## मुस्ताद्यष्टादशांग.

मुस्तापर्पटकोशीरदेवदारुमहौषधं ॥ त्रिफलाधन्वयासश्चनीलीकंपिल्लकंत्रिवृत् ॥ किराततिक्तकंपाठाबलाकटुकरोहिणी ॥ मधुकंपिप्पलीमूलंमुस्ताद्योगणउच्यते ॥ अष्टादशांगमुदकंसन्निपातज्वरापहं ॥ पित्तोत्तरेसन्निपातेहितमुक्तंमनीषिभिः ॥ मन्यास्तंभेउरोघातेहनुस्तंभेशिरोग्रहे ॥

अर्थ– नागरमोथें, पित्तपापडा, वाळा, देवदार, सुंठ, हरडा, बेहेडा, आवळकाठी, धमासा, लघुनीली, कपिला, निशोत्तर, किराईत, पहाडमूळ, चिकणा, कुटकी, ज्येष्ठमध, व पिंपळीमूळ, हा मुस्तादि अष्टादशांग गण याचा शीत काढा सन्निपातज्वराचा नाश करितो; आणि हा ऋषींनीं पित्ताधिक सन्निपात, मानेचा स्तंभ, उरोघात, हनुस्तंभ, व मस्तकशूल यांवर सांगितला आहे.

## किराततिक्तादिकाढा.

किराततिक्तकंमुस्तंगुडूचीविश्वभेषजं ॥
पाठोदीच्यंमृणालंचशृतंपित्ताधिकेपिबेत् ॥

अर्थ–पित्ताधिकसन्निपातावर. किराईत, नागरमोथा, गुळवेल, सुंठ, पाहाडमूळ, वाळा आणि कमळाचीं बिसें यांचा शीत काढा द्यावा.

## शठ्यादिकाढा.

शठीपुष्करमूलंचव्याघ्रीशृंगीदुरालभा ॥ वत्सकस्यचबीजानिपटोलंकटुरोहिणी ॥ एषशठ्यादिकोवर्गःसंन्निपातज्वरापहः ॥

कासंश्वासंदिवानिद्रांरात्रौजागरणंतथा ॥ मुखशोषंतृषांदाहं त्रिदोषंचनियच्छति ॥

अर्थ—कचोरा, पुष्करमूळ, रिंगणी, कांकडशिंगी, धमासा, इंद्रजव, कडूपडवळ, व कुटकी हा शठ्यादिवर्ग सन्निपातज्वर, दमा, खोकला, दिवा निद्रा, रात्रीं जागरण, मुखशोष, ताहान, दाह, आणि त्रिदोष यांचा नाश करितो.

## कफोल्वणसन्निपातनिदान.

आलस्यारुचिहृल्लासदाहवम्यरतिभ्रमैः ॥
कफोल्बणंसान्निपातंतंद्राकासेनचादिशेत् ॥

अर्थ—कफाधिक सान्निपात झाला असतां आळस, अरुचि, मळमळ, दाह, वांति, चैन नपडणें, भ्रम, झांपड, आणि खोकला हीं लक्षणें होतात.

## कफोल्वणचिकित्सा.

बृहत्यौपुष्करंभार्गीशठशृंगीदुरालभा ॥ वत्सकस्यचबीजानिपटोलंकटुरोहिणी ॥ बृहत्यादिगणःशस्तःसन्निपातेकफोत्तरे ॥ श्वासादिपुचसर्वेषुहितःसोपद्रवेषुच ॥

अर्थ—रिंगणी, डोरली, पुष्करमूळ, भारंगमूळ, कचोरा, कांकडशिंगी, धमासा, इंद्रजव कडूपडवळ व कुटकी हा बृहत्यादिगण कफाधिकसन्निपात, दमा, आणि सर्व उपद्रव यांवर हितकारक आहे.

## कफोल्बणावरकाढा.

कफोत्तरेबृहत्यादिगणश्चदशमूलजः ॥
परूपकाणित्रिफलादेवदारुसकट्फलं ॥

अर्थ—कफाधिकसन्निपातावर बृहत्यादिगण, दशमुळें, फालसा, त्रिफळा, देवदार, आणि कायफळ यांचा काढा द्यावा.

## त्र्युल्वणसन्निपात.

सर्वलक्षणसंयुक्तस्त्र्युल्बणस्तुमतोबुधैः ॥

अर्थ—संपूर्ण लक्षणानीं युक्त असतो, तो त्र्युल्बण सान्निपात जाणावा.

## नागरादिकाढा.

नागरंधान्यकंभार्गीपद्मकंरक्तचंदनं ॥ पटोलःपिचुमंदश्चत्रिफलामधुकंबला ॥ शर्कराकटुकामुस्तागजाव्हाव्याधिघातकः ॥

किराततिक्तममृतादशमूलीनिदिग्धिका ॥ योगराजोनिहंत्येष:सन्निपातज्वरापहः ॥ सन्निपातसमुत्थानंमृत्युमप्यागतंजयेत् ॥

अर्थ—सुंठ, धने, भारंगमूळ, पद्मकाष्ठ, रक्तचंदन, कडूपडवळ, कडुनिंब, हरडा, बेहेडा, आवळकाठी, जेष्ठमध, चिकणा, साखर, कुटकी, नागरमोथा, गजपिंपळी, बाहव्याचा मगज, किराईत, गुळवेल, दशमुळें व रिंगणी यांचा काढा मृत्यूसारिख्या ही संनिपातज्वराचा नाश करितो.

## व्योषादिकाढा.

व्योषाब्दत्रिफलारिष्टपटोलीतिक्तवत्सकैः ॥
सभूनिंबामृतापाठैस्त्रिदोषज्वरजिज्जलं ॥

अर्थ—सुंठ, मिरीं, पिंपळी, नागरमोथा, हरडा, बेहेडा, आवळकाठी, कडुनिंब, कडूपडवळ, कुटकी, इंद्रजव, किराईत, गुळवेल आणि पाहाडमूळ यांचा काढा त्रिदोष ज्वराचा नाश करितो.

## वातपित्तोल्वण सन्निपात.

भ्रमःपिपासादाहश्चगौरवंशिरसोतिरुक् ॥
वातपित्तोल्बणेविंद्याल्लिंगंमंदकफज्वरे ॥

अर्थ—भ्रम, ताहान, दाह, आंगाला जडत्व, मस्तकशूल, हीं वातपित्तोल्बणे, आणि हीनकफ अशा सन्निपातामध्यें लक्षणें होतात.

## वातपित्तोल्बणचिकित्सा.

वातपित्तहरंवृष्यंकनियःपंचमूलकं ॥
तत्क्वाथोमधुनाहंतिवातपित्तोल्वणंज्वरं ॥

अर्थ—वातपित्त नाशक, आणि वृष्य असें लघुपंचमूळ आहे, ह्मणून त्याचा काढा मध घालून द्यावा; तो वातपित्तोल्बणसन्निपाताचा नाश करितो.

## वातश्लेष्मोल्वण.

शैत्यंकासोरुचिस्तंद्रापिपासादाहरुक्तथा ॥
वातश्लेष्मोल्बणेव्याधौलिंगंपित्तावरेविदुः ॥

अर्थ—वातकफाधिक, व हीनपित्त असा सन्निपात झाला असतां, शैत्य, खोकला, अरुचि, झांपड, ताहान, दाहा, व आंगांत ठणका हीं लक्षणें होतात.

## चिकित्सा.

किराततिक्तकंमुस्तंगुडूचीविश्वभेषजं ॥
चातुर्भद्रकमित्याहुर्वातश्लेष्मोल्बणेज्वरे ॥

**अर्थ**–किराईत, नागरमोथे, गुळवेल, आणि सुंठ यांचा काढा करून तो वातकफोल्बणज्वरावर द्यावा; याला चातुर्भद्र ह्मणतात.

## पित्तकफोल्बण.

छर्दिःशैत्यंमुहुर्दाहस्तृष्णामोहोस्थिवेदना ॥
मंदेवातेव्यवस्यंतिलिंगंपित्तकफोल्बणे ॥

**अर्थ**–पित्तकफाधिक व हीनवात असा सन्निपात कोप पावला असतां; वांति, शैत्य, वारंवार दाहा, ताहान, मोह, आणि अस्थिमध्यें ठणका हीं लक्षणें होतात.

## चिकित्सा.

पर्पटःकट्फलंकुष्ठमुशीरंचंदनंजलं ॥ नागरंमुस्तकंशृंगीपिप्पल्येषांशृतंहितं ॥ तृष्णादाहाग्निमांद्येषुपित्तश्लेष्मोल्बणेज्वरे ॥

**अर्थ**–पित्तपापडा, कायफळ, कोष्ट, वाळा, चंदन, काळा वाळा, सुंठ, नागरमोथे, कांकडशिंगी, आणि पिंपळी यांचा काढा ताहान, दाह, अग्निमांद्य, आणि पित्तकफात्मकज्वर यांचा नाश करितो.

## हीनवात, मध्यपित्त, व श्लेष्माधिकसं.

प्रतिश्याछर्दिरालस्यंतंद्रारुच्याग्निमार्दवं ॥
हीनवातेमध्यपित्तेचिन्हंश्लेष्माधिकेमतं ॥

**अर्थ**–कफाधिक, हीनवायु, आणि मध्यपित्त असा सन्निपात झाला असतां; पडसें, वांति, आळस, झांपड, अरुचि, आणि अग्निमांद्य हीं लक्षणें होतात.

## हीनवात, मध्यकफ, व पित्ताधिकसं.

हारिद्रनेत्रमूत्रत्वक्दाहस्तृष्णाभ्रमोरुचिः ॥
हीनवातेमध्यकफेलिंगंपित्ताधिकेमतं ॥

**अर्थ**–पित्ताधिक, हीनवायु, आणि मध्यकफ असा सन्निपात झाला असतां; नेत्र, मूत्र, आणि त्वचा हीं पिवळीं होतात; व दाह, ताहान, भ्रम, आणि अरुचि हीं लक्षणें होतात.

## हीनपित्त, मध्यकफ, व वाताधिकसं.

शिरोरुग्वेपथुश्वासप्रलापश्छर्द्यरोचकाः ॥
हीनपित्तेमध्यकफेलिंगंवाताधिकेमतं ॥

**अर्थ**–हीनपित्त, मध्यमकफ, आणि वाताधिक अशा सन्निपातामध्यें; मस्तकशूल, कंप, दमा, बडबड, वांति, आणि अरुचि हीं लक्षणें होतात.

## हीनपित्त, मध्यकफ, श्लेष्माधिकसं.

शीतगौरवतंद्राश्चप्रलापोस्थिशिरोतिरुक् ॥
हीनपित्तेमध्यवातेलिंगंश्लेष्माधिकेमतं ॥

अर्थ–हीनपित्त, मध्यमवात, आणि कफाधिक असा संन्निपात झाला असतां; थंडी वाजते, व आंगाला जडता, झांपड, बडबड, व हाडें, आणि मस्तक यांत फार ठणका हीं लक्षणें होतात.

## कफहीन, मध्यवात, व पित्ताधिकसं.

पर्वभेदोग्निदौर्बल्यंतृष्णादाहोरुचिर्भ्रमः ॥
कफेहीनेमध्यवातेलिंगंपित्ताधिकेविदुः ॥

अर्थ–कफहीन, मध्यम वायु, आणि अधिकपित्त अशा सन्निपातांमध्यें; सांध्यांत ठणका, अग्निमांद्य, ताहान, दाहा, अरुचि, आणि भ्रम हीं लक्षणें होतात.

## हीनकफ, मध्यपित्त, व वाताधिकसं.

कासश्वासप्रतिश्यायमुखशोषोतिपार्श्वरुक् ॥
कफेहीनेमध्यपित्तेलिंगंवाताधिकेस्मृतं ॥

अर्थ– वाताधिक, हीनकफ, आणि मध्यमपित्त असा सन्निपात झाला असतां; खोकला, दमा, पडसें, मुखाला शोष, आणि पार्श्वभागीं फार ठणका हीं लक्षणें होतात.

## सहाची एकतंत्रानें चिकित्सा.

प्रवृद्धंकर्षयेद्दोषंक्षीणंसंवर्धयेद्भिषक् ॥
चिकित्सेयंविधातव्यादोषयोर्हीनवृद्धयोः ॥

अर्थ–जो दोष वाढला, त्याला क्षीण करावा; आणि क्षीण असेल त्याला वाढवावा. अशी वैद्यानें क्षीण वृद्ध दोषांची चिकित्सा करावी.

प्रवृद्धेशमितेदोषेमध्यमःस्वयमेवाहि ॥
शांतिंयातिशमंनीतेत्वनुबंध्यनुबंधवत् ॥

अर्थ–वाढलेल्या दोषाला शमविला, ह्मणजे मध्यम दोष स्वतः शांत होतो. जसा सोबती शमविला, ह्मणजे दुसरा दुर्बळहोत्साता आपणच शांत होतो.

## द्वात्रिंशांग.

भार्गीभूनिंबनिंबाघनकटुकवचाव्योषवासाविशालारास्नातंता
पटोलीमुरतरुरजनीपाटलातिंदुकैश्च ॥ ब्राह्मीदार्वीगुडूची

त्रिवृतमतिविषापुष्करत्रायमाणैर्व्याघ्रीसिंहीकालिंगैस्त्रिफलश
ठियुतैःकल्पितस्तुल्यभागैः ॥ क्काथोद्वात्रिंशनामात्रिभिरधिक
दशान्सन्निपातान्निहंतिशूलंकासादिहिक्काश्वसनगदरुजाध्मा
नविध्वंसकारी ॥ ऊरुस्तंभांत्रवृद्धीगलगदमरुचिंसर्वसंधिग्रहा
तींमातंगौघान्निहन्यान्मृगरिपुरिहचेद्रोगजालंतथैव ॥

अर्थ–भारंगमूळ, किराईत, कडुनिंब, नागरमोथे, कटुकी, वेखंड, सुंठ, मिरीं, पिंपळी अडूळसा, कडुवृंदावन, रासना, धमासा, कडुपडवळ, देवदार, हळद, पाहाडमूळ, कुचला, ब्राह्मी, दारुहळद, गुळवेल, निशोत्तर, अतिविष, पुष्करमूळ, त्रायमाण, रिंगणी, डोर्ली, इंद्रजव, हरडा, बेहडा, आवळकाठी, आणि कचोरा, हीं सर्व औषधें समभाग घेऊन त्यांचा काढा करावा. त्यांचे नाव बत्तीसी काढा. हा तेरा प्रकारचे सन्निपात, शूल खोकला, उचकी, दमा, पोटफुगी, ऊरुस्तंभ, अंत्रवृद्धि, गलरोग, अरुचि, व संधिग्रह यांचा जसा हत्तीच्या पंक्तीचा सिंह नाश करितो, त्याप्रमाणें हा काढा नाश करितो.

## अष्टादशांगकाढा.

भूनिंबदारुदशमूलमहौषधाब्दतिक्तेंद्रबीजधनिकेभकणाकषा
यः ॥ तंद्राप्रलापकसनारुचिदाहमोहश्वासादियुक्तमखिल
ज्वरमाशुहंति ॥ अष्टादशांगइत्येषमृत्युकल्पंज्वरंजयेत् ॥

अर्थ–किराईत, देवदार, दशमूळें, सुंठ, नागरमोथा, कुटकी, इंद्रजव, धने, व गजपिंपळी यांचा काढा करून द्यावा तो झांपड, बडबड, खोकला, अरुचि, दाह, मोह, दमा, यांणीं युक्त सर्व ज्वरांचा नाश करितो. हा अष्टादशांग काढा मृत्युतुल्यज्वरांचा नाश करितो.

## द्वादशांग.

दशमूलीकषायस्तुसपौष्करकणान्वितः ॥
सन्निपातज्वरेदेयःश्वासकाससमन्विते ॥

अर्थ–दशमूळें, पुष्करमूळ, आणि पिंपळी यांचा काढा सन्निपातज्वरावर द्यावा, ह्मणजे दमा, खोकला, व सन्निपात यांचा नाश करितो.

## सन्निपातावर रेचन.

बिल्वकांत्रिवृतादंतीसमूलंचतुरंगुलं ॥ पक्कंकषायंविश्राव्यनी
लीचूर्णविमिश्रितं ॥ ससर्पिष्कंपिबेच्चूर्णंसन्निपातेविरेचनं ॥

अर्थ–बेलफळ, निशोत्तर, दांतीमूळ, व बाहव्याचा मगज यांचा काढा करून त्यांत नीळीचें चूर्ण, आणि तूप घालून द्यावा, ह्मणजे तो सन्निपाताचा नाश करितो

## संज्ञानाशचिकित्सा.

कंपःप्रलपनंयस्यसंज्ञानाशश्चदारुणः ॥ रसैश्चलाववर्तैश्चकुलिंगैःशशतित्तिरैः ॥ तर्पयेत्प्राक्पुराणेनसर्पिषाभ्यंजयेन्नरं ॥ बलारास्नागुडूच्याद्यैस्तैलैश्चपरिषेचयेत् ॥

**अर्थ**–जो रोगी कांप, वडबड, आणि संज्ञानाश यांणीं युक्त आहे; त्याला लावे, व तींक, धूम्याटपक्षी, ससा, व तित्तिर यांचे रस पूर्वीं पाजून, नंतर आंगाला जुनें तूप लावावें, व बला, रासना, आणि गुडूची यांचें तैल आंगावर शिंपावें.

## बिल्वादिकाढा.

बिल्वोग्निमंथःस्योनाकःकाश्मरीपाटलातथा ॥ शालिपर्णीपृश्निपर्णीबृहतीद्वयगोक्षुरैः ॥ उभयंदशमूलंस्यात्सन्निपातहरोगणः ॥

**अर्थ**–बेल, टाकळी, टेंटू, शिवण, पाडळ, सालवण, पिठवण, रिंगणी, डोरली, आणि गोखरू हीं दशमुळें. यांचा काढा सन्निपातनाशक आहे.

## शुंठ्यादिकाढा.

शुंठीदारुशठीरजोबृहतिकातिक्ताकिरातांबुदानंताभिर्जनितःकषायकवरःकृष्णामधुभ्यांयुतः ॥ निःशेषंत्रितयोद्भवज्वरहरोजीर्णज्वरस्यांतकृत्कासारिर्विषमापहोनिगदितःशुंठ्यादिकःसूरिभिः ॥

**अर्थ**–सुंठ, देवदार, कचोरा, पित्तपापडा, रिंगणी, कुटकी, किराईत, नागरमोथें; आणि धमासा यांचा काढा, पिंपळीचें चूर्ण व मध घालून द्यावा, ह्मणजे तो निःशेष सन्निपात, जीर्णज्वर व खोकला यांचा हा शुंठ्यादिकाढा नाश करितो.

## अर्कादिकाढा.

अर्कानंताकिरातामरतरुरसनासिंधुवारोग्रगंधातर्कारीशिग्रुपंचोपणघुणदयितामार्कवाणांकषायः ॥ सद्यस्तीव्रान्त्रिदोषान्पहरतितथामारुनंदंतबंधंशैत्यंगात्रेषुगाढंश्वसनकसनकंसूतिकावातरोगान् ॥

**अर्थ**–रुईचीं पानें, धमासा, किराईत, देवदार, रासना, निर्गुंडी, वेखंड, ऐरण, शेवगा, पिंपळी, पिंपळीमूळ, चवक, चित्रक, सुंठ, अतिविष, आणि माका यांचा काढा द्यावा. तो तीव्र असे त्रिदोष, धनुर्वात, वायूनें दांतखिळी बसल्ये ती, आंगांतील फार शीतता, श्वास, खोकला, बाळंतरोग यांचा नाश करितो.

## तिक्तादिकाढा.

तिक्तातिक्तकपर्पटामृतनटीरास्नाकणापौष्करंत्रायंतीबृहतीसु रौषधशिवादुःस्पर्शभांर्गीकृतः ॥ क्काथोनाशयतित्रिदोषनिक रंस्वापंदिवाजागरंनक्तंतृण्मुखशोषदाहकसनश्वासानशेषानपि ॥

अर्थ—कुटकी, किराईत, पित्तपापडा, गरुडवेल, कचोरा, रास्ना, पिंपळी, पुष्करमूळ, त्रायमाण, रिंगणी, देवदार, सुंठ, हरीतकी, धमासा. आणि भारंगमूळ; यांचा काढा करून द्यावा, तो त्रिदोष, दिवानिद्रा, रात्रि जागर, ताहान, मुखशोष, दाहा, खोकला, आणि संपूर्ण श्वास यांचा नाश करितो.

## त्रिदोषावर.

पित्तप्रायेचशठ्यादिर्बृहत्यादिःकफाधिके ॥ वातोत्तरेसन्निपातिकट्फलादिःप्रयोजयेत् ॥

अर्थ—पित्ताधिक सन्निपाताला शठ्यादि, कफाधिकाला बृहत्यादि, आणि वाताधिकाला बृहत्यादि गणांची कोणत्या तरी प्रकारानें योजना करावी.

## दार्व्याद्यष्टादशांग.

दारुनागरभूनिंबधान्यतिक्ताकलिंगजैः ॥ गजाव्हादशमूलाब्दैर्मृत्युकल्पंज्वरंजयेत् ॥ अष्टादशांगइत्येषःसन्निपातज्वरापहः ॥ कासहृद्ग्रहपार्श्वार्तिश्वासहिक्कावमीहरः ॥

अर्थ—देवदार, सुंठ, किराईत, धने, कुटकी, इंद्रजव, गजपिंपळी, दशमुळें, व नागरमोथे या अठरा औषधांचा काढा द्यावा. तो अत्यंत कठिण मृत्युसारिखा ज्वर, सन्निपातज्वर, खोकला, हृदयशूल, पार्श्वपीडा, दमा, उचकी, आणि वांति यांचा नाश करितो.

## गुडूच्यादिकाढा.

गुडूचीचंदनंपद्मंनागरेंद्रयवासकं ॥ अभयारग्वधोशीरपाठाधान्याब्दरोहिणी ॥ कषायंपाययेदेतंपिप्पलीचूर्णसंयुतं ॥ तंद्राकासज्वरश्वासपिपासाज्वरनाशनः ॥ विण्मूत्रानिलविष्टंभत्रिदोषप्रभवस्यच ॥ गुडूच्यादिगणोह्येषःपाचनोदीपनःपरः ॥

अर्थ—गुळवेल, चंदन, पुष्करमूळ, सुंठ, इंद्रजव, धमासा, हिरडे, बाहव्याचा मगज, वाळा, पहाडमूळ, धने, नागरमोथा, व कटुकी यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा, तो तंद्रा, कास, श्वास, ज्वर, तृषा, दाह, मलमूत्ररोध, वायु, अवष्टंभ, त्रिदोषभवज्वररोग यांतें दूर करून दीपन, पाचन ही आहे.

## अमृतादिकाढा.

अमृतादशमूलीभ्यांसाधितंविधिवज्जलं ॥
संन्निपातज्वरंहन्यात्रयोदशविधंनृणां ॥

**अर्थ**–गुळवेल व दशमुळे यांचा काढा तेराप्रकारच्या सन्निपातज्वराला दूर करितो.

## विश्वादिकाढा.

विश्वशुंठीदशमूलीछिन्नापाठाघ्नपिप्पलींद्रयवैः ॥
सकिराततिक्तवासाशमयतिहतौजसंसद्यः ॥

**अर्थ**–अतिविष, सुंठ, दशमुळें, गुळवेल, पाहाडमूळ, पिंपळी, इंद्रजव, काडेकिराईत, आणि अडुळसा यांचा काढा द्यावा. तो ज्वरानें क्षीण झालेल्याला लौकर बरा करील.

## त्र्यूषणादिकाढा.

त्र्यूषणदशमूलशुंठीभांर्गीछिनोद्भवःक्काथः ॥
पीतःशमयतिसहसाज्वरमुग्रंसंनिपाताख्यं ॥

**अर्थ**–त्रिकटु, दशमूळें, कचोरा, भारंगमूळ, व गुळवेल यांचा काढा उग्रसंनिपाताला शमवितो.

## दशमूलादिकाढा.

द्विपंचमूलीषट्ग्रंथाविश्वगृध्रनखीद्वयं ॥
कफवातहरःक्काथोसंनिपातहरःपरः ॥

**अर्थ**–दशमुळें, पिपळीमूळ, सुंठ, बोर व रानबोर यांचा काढा कफवातहारक आणि संनिपातज्वरनाशक आहे.

## आटरूषादिकाढा.

सिंहास्यपर्पटारिष्टयष्टीधान्याष्टनागरं ॥ दारूग्रगंधेंद्रयवाश्च
दंष्ट्राग्रंथिकंतथा ॥ एषांकषायमात्दृत्यसंनिपातज्वरीपिबेत् ॥
श्वासातिसारकासघ्नंशूलारुचिहरंपरं ॥

**अर्थ**–अडुळसा, पित्तपापडा, कडुनिंब, ज्येष्टमध, धने, नागरमोथा, सुंठ, देवदार, वेखंड, इद्रंजव, गोखरूं, व पिंपलमूळ, यांचा काढा संनिपातज्वरावर द्यावा. तो श्वास अतिसार, खोकला, शूल, व अरुचि यांचा नाशक आहे.

## कट्फलादिकाढा.

कट्फलंत्रिफलादारुचंदनंसपरूषकं ॥ कटुकंपद्मकोशीरंविपचे
त्कार्षिकंजले ॥ तत्संनिपातदाहघ्नंपानमात्रेणपूजितं ॥ दीर्घका
लप्रयुक्तानांज्वराणाममृतोपमं ॥

अर्थ–कायफळ, त्रिफळा, देवदार, चंदन, फालसा, कडूपडवळ, पद्मकाष्ठ, वाळा, यांचा काढा करून द्यावा. तो सन्निपात, दाह, जीर्णज्वर, यांवर साक्षात् अमृतोपम आहे.

## किरातादिकाढा.

चिरज्वरेवातकफोल्बणेवात्रिदोषजेवादशमूलमिश्रः ॥ किरात
तिक्तादिगणःप्रयोज्यःशुध्यर्थिनेवात्रिवृताविमिश्रः ॥ किरात
तिक्तकोमुस्तंगुडूचीविश्वभेषजं ॥ किरातादिगणोह्येषश्चातुर्भ
द्रकमित्यपि ॥

अर्थ–फार दिवसांचा वातकफोल्बणज्वर आणि त्रिदोषज्वर यांवर किराईत, नागरमोथा, गुळवेल, आणि सुंठ, हा किरातादिगण, आणि दशमुळांचीं औषधें, यांचा काढा करून. द्यावा. हाच रेचकाविषयीं देणें जाहाल्यास त्यांत निशोत्तर मिळवावें.

## अष्टादशांग काढा.

दशमूलीशठीशृंगीपौष्करंसदुरालभं ॥ भार्गीकुटजबीजंचप
टोलंकटुरोहिणी ॥ अष्टादशांगइत्येषःसन्निपातज्वरापहः ॥
कासहृद्ग्रहपार्श्वार्तिश्वासहिक्कावमीहरः ॥

अर्थ–दशमुळें, कचोरा, कांकडशिंगी, पुष्करमूळ, धमासा, भारंगमूळ, इंद्रजव, कडू पडवळ व कटुकी ह्याला अष्टादशांग असें ह्मणतात. हा काढा सन्निपातज्वर, खोकला, हृद्रोग, पार्श्वशूल, श्वास, उचकी, आणि वांति यांचा नाश करितो.

## पंचतिक्तक काढा.

क्षुद्रापुष्करभूनिंबगुडूचीविश्वभेषजैः ॥
पंचतिक्तकनामायंक्काथोहंत्यष्टधाज्वरं ॥

अर्थ–रिंगणी, पुष्करमूळ, किराईत, गुळवेल, व सुंठ हा पंचतिक्तनामक गण होय, याचा काढा आठ प्रकारचा ज्वरांचा नाश करितो.

## दार्व्यंबुदादिकाढा.

दार्व्यंबुदातिक्तफलत्रिकंचक्षुद्रापटोलीरजनीसनिंबा ॥
क्काथंविदध्याज्ज्वरसन्निपातेनिश्चेतनेपुंसिविबोधनार्थं ॥

अर्थ–दारुहळद, नागरमोथा, किराईत, त्रिफळा, रिंगणी, कडूपडवळ, हळद, आणि कडुनिंब, यांचा काढा सन्निपातज्वरांमध्यें मूर्छा येते तिचा नाश करितो.

## ग्रंथ्यादिकाढा.

ग्रंथींद्रजामरपुरक्रमिशत्रुभार्गीभृंगत्रिकट्वनलकट्फलपौष्कराणां ॥ रास्नाभयाबृहतिकाद्वयदीप्यभूतकेशीकिरातकवचाचविकावृकीणां ॥ क्वाथोहन्यात्संनिपातान्समग्रान्बुद्धिभ्रंशस्वेदशैत्यप्रलापान् ॥ शूलाध्मानंविद्रधिंश्लेष्मवातान्वातव्याधिन्सूतिकानांचतद्वत् ॥

अर्थ–पिंपळीमूळ, इंद्रजव, देवदार, गुग्गुळ, वावडिंग, भारंगमूळ, माका, त्रिकटु, चित्रक, कायफळ, पुष्करमूळ, रास्ना, हरीतकी, रिंगणी, डोरली, ओंवा, निर्गुंडी, किराईत, वेखंड, चवक, आणि पाहाडमूळ यांचा काढा सर्व सन्निपात, बुद्धिभ्रंश, घाम, शैत्य, बडबड, पोटफुगी, विद्रधि, कफवात, वातरोग, आणि सूतिकारोग, यांचा नाश करितो.

## लशुनादिकाढा.

लशुनंतिक्तकंकांडंभार्गीचातिविपातथा ॥
नरमूत्रेणचक्वाथःसन्निपातेसुदारुणे ॥

अर्थ–लसुण, किराईत, तिरकांडे, भारंगमूळ, व अतिविष यांचा घोड्याच्या मूत्रांत काढा करून द्यावा. तो दारुणसन्निपातज्वरनाशक आहे.

## दशमूलादिकाढा.

दशमूलस्यनिर्यूहःकट्फलादिरजोयुतः ॥
तुल्यार्द्रकरसोपेतोमृत्युकल्पंज्वरंजयेत् ॥

अर्थ–दशमुळांचा निर्यूह त्यांत कायफळाचे चूर्ण, व काढ्यासमान आल्याचा रस, घालून द्यावा, ह्मणजे तो मृत्युसारिख्या कठिणज्वराचा नाशकरितो.

## पंचमूलीकाढा.

पंचमूलीकिरातादिर्गणोयोज्यस्त्रिदोषजे ॥
पित्तोत्कटेतुमधुनाकणयाचकफोत्कटे ॥

अर्थ–पंचमूळें, व किरातादिगण यांचा काढा त्रिदोषजनितज्वरावर, व पित्तोत्कटावर मधाशीं; आणि कफोत्कटावर पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा.

## अर्कादिकाढा.

अर्कग्रंथिकशिग्रुदारुचविकानिर्गुंडिकापिप्पलीरास्नाभृंगपुन
र्नवानलवचाभूनिंबशुंठीकृतः ॥ क्वाथःसंहरतित्रिदोषमखिलं
स्वापानिलंसूतिकानानामारुतशैत्यशांतिकृदपस्मारस्मरत्र्यंबकः ॥

अर्थ–रुईचें मूळ, पिंपळीमूळ, शेवग्याची साल, देवदारु, चवक, निर्गुंडी, पिंपळी, रास्ना, माका, पुनर्नवा, चित्रक, वेखंड, किराईत, व सुंठ यांचा काढा सर्व त्रिदोषज्वर, सुप्ति वात, बाळंतरोग, नानाप्रकारचे वायु, शैत्य, अपस्मार, यांचा नाशक आहे.

## मृतसंजीवनी वटिका.

विषंत्रिकटुकंगंधंटंकणंमृतशुल्बकं ॥ धत्तूरस्यचबीजानिहिंगू
लंनवमंमतं ॥ एतानिसमभागानिदिनैकंविजयाद्रवैः ॥ मर्द
येच्चणकाकारांकर्तव्यावटिकाथसा ॥ भक्षणीयानुपातव्योर
विमूलकषायकः ॥ मृतसंजीवनीनाम्नासंनिपातज्वरांतकृत् ॥

अर्थ–बचनाग, त्रिकटु, गंधक, टांकणखार, ताम्रभस्म, धोत्र्याचे बीज, हिंगुळ, हीं नउ औषधें समभाग घेऊन चूर्ण करून भांगेच्या रसांत एकदिवस खल करावा; नंतर चण्याएवढ्या गोळ्या बांधाव्या; आणि त्यांतून एक गोळी भक्षण करून मागून रुई-च्या मुळांचा काढा द्यावा; ह्मणजे सन्निपातज्वराचा नाश करितो.

## त्रिनेत्ररस

शुद्धसूतंसमंगंधंसूतांशंमृतताम्रकं ॥ त्रिभिस्तुल्यैर्गवांक्षीरैर्मर्दयेदातपेख
रे ॥ मर्दयेद्दिनमेकंतुनिर्गुंडीशिग्रुजद्रवैः ॥ विधायगोलंतंगोलमंधमूषा
गतंपचेत् ॥ त्रियामान्वालुकायंत्रेततःखल्वेविचूर्णयेत् ॥ अष्टमांशंवि
षंतत्रक्षिपेत्तेनापिमर्दयेत् ॥ त्रिनेत्राख्योरसोदेयोगुंजाद्वयोन्मितः ॥
पंचकोलकषायेणछागीदुग्धेनवासह ॥ रसेनानेनभुक्तेनसन्निपातज्वरो
महान् ॥ संक्षयंव्रजतिक्षिप्रंकर्तव्योनात्रसंशयः ॥

अर्थ–शुद्धपारा, शुद्धगंधक, ताम्रभस्म, हीं समभाग व या औषधांच्या समान गाईचे दुग्ध घालून तीव्र उन्हांत मर्दन करावें; आणि एक दिवस निर्गुंडीचे रसांत, एकदिवस शेवग्याचे रसांत खल करून गोळा करावा. तो अंधमूषेत ठेऊन तीन प्रहर वालुकायंत्रांत पचवावा. तो सिद्ध जाहाल्यानंतर अष्टमांश शुद्धबचनाग घालून पुन्हा खलावा. हा त्रिनेत्राख्य रस दोन गुंजाप्रमाणे पंचकोलाच्या काढ्याशीं, अथवा शेळीचे दुधाशीं द्यावा; ह्मणजे तो निःसंशय महासन्निपातज्वराचा नाश करील.

## भस्मेश्वररस.

भस्मषोडशनिष्कंस्यादारण्योपलसंभवं ॥ मरिचंनिष्कमात्रंच विषंनिष्कंविचूर्णयेत् ॥ रसोभस्मेश्वरोनाम्नासंनिपातज्वरांत कृत् ॥ एकगुंजामितोभक्ष्यआर्द्रकस्यद्रवेणहि ॥

अर्थ–रानगोवरीची राख सोळा तोळे, मिरें व बचनाग हीं प्रत्येकीं एकेक तोळ घेऊन सूक्ष्म चूर्ण करावें. हा भस्मेश्वररस एक गुंज आल्याच्या रसाशीं द्यावा. ह्मणजे सन्निपातज्वराचा नाश करितो.

## अग्निकुमाररस.

द्वौकर्षौसूतकाद्ग्राह्यौगंधकाद्द्वौतथैवच ॥ यत्नतस्तूभयंमर्द्यदिनंहंसप दीरसैः ॥ कल्कस्यवटिकांकृत्वानिक्षिपेत्काचभाजने ॥ कर्षैकममृतं तत्रक्षिप्त्वावक्त्रंनिरोधयेत् ॥ कूपिकायाःशरौभागौवालुकाभिश्चपूरयेत् ॥ सार्द्धयावदहोरात्रंतावत्तत्रपचेद्रसं ॥ दीपमात्रोनलोदेयःस्वांगशीतंसमु द्धरेत् ॥ तोलार्धममृतंतत्रक्षिपेत्तावत्तथोषणं ॥ भक्षितोरक्तिकामात्रोरस स्त्वग्निकुमारकः ॥ सन्निपातज्वरंहन्याद्वातंमंदाग्नितामपि ॥ शूलंसंग्र हणींगुल्मंक्षयंपांडुगदंतथा ॥ श्वासकासादिकान्सर्वान्गदानेषविनाशयेत् ॥

अर्थ–पारा व गंधक दोन दोन कर्ष घेऊन त्यांची कज्जली हंसपदीचा रसांत एक दिवस खलून मग त्या कल्काचा लहान वड्या करून कांचेच्या कुपीत भरून त्यावर एक कर्ष बचनाग घालून कुपीचें मुख बंद करावें; नंतर त्या कुपीला मोठ्या भांड्यांत ठेऊन गळ्यापर्यंत वाळू भरावी; आणि बारा प्रहर दीपाग्निनें पचन करावें. स्वांग शीतल झाल्यावर उतरून, नंतर खलून आंत अर्ध तोळा बचनाग व अर्धतोळा मिरें घालून खलावा. हा अग्निकुमार रस एक गुंज द्यावा. ह्मणजे तो सन्निपातज्वर, वायु, मंदाग्नी, शूल, संग्रहणी, गुल्म, क्षय, पांडु, श्वास, व कास इत्यादि रोगांचा नाश करितो.

## पंचवक्त्ररस.

गंधेशटंकंमरिचंविषंधत्तूरजैरसैः ॥ दिनंसंमर्दितंशुष्कंपंचवक्त्रो रसोभवेत् ॥ आर्द्रकस्यद्रवेणप्रदातव्योरक्तिकामितः ॥ सन्नि पातज्वरंघोरंनाशयेन्नात्रसंशयः ॥

अर्थ–गंधक, पारा, टांकणखार, मिरें व बचनाग, हीं औषधें धोत्र्याच्या रसांत एक दिवस खलून सुकली ह्मणजे पचवक्त्र रस झाला. तो आल्याचा रसांशीं एक गुंज द्यावा तो घोरसन्निपातज्वराचा नाश करील.

## दुसरा प्रकार.

शुद्धसूतंविषंगंधंमरिचंटंकणंकणा ॥ मर्दयेत्धूर्तजद्रावैर्दिनमेकंतुशोषये त् ॥ पंचवक्त्रोरसोनामाद्विगुंजःसन्निपातहा ॥ अर्कमूलकषायंतुसत्र्यूष मनुपाययेत् ॥ युक्तंदध्योदनंपथ्यंजलयोगंचकारयेत् ॥ रसेनानेनशाम्यं तिसक्षौद्रेणकफादयः ॥ मध्वार्द्रकरसेनैनंपिबेदग्निविवृद्धये ॥ यथेष्टंघृत मांसाशीशक्तोभवतिपावकः ॥

अर्थ–शुद्ध केलेला पारा, शुद्ध केलेला बचनाग, गंधक, मिऱ्यें, टांकणखाराची लाही व पिंपळी, या साहा औषधांचा धोत्र्याचे रसांत, एकदिवस खल करून दोन गुंजाप्रमाणे गोळया करून वाळवाव्या. याला पंचवक्त्ररस ह्मणतात. हा रुईच्या मुळांचा काढा करून त्यांत त्रिकटूचे चूर्ण घालून द्यावा. पथ्याला दहींभात योजावा. प्यावयास शीत जल योजावें. तेणेंकरून सन्निपातज्वर दूर होतो. हा मधाशीं घेतला असतां कफादिरोग दूर करितो. व आल्याचे रसांत मध मेळऊन घेतला असतां, जठराग्नीची वृद्धि होत्ये; व घृतमांसादिक जड अन्ने यथेष्ट भक्षण केलीं असतांहीं पचवितो.

## उन्मत्त रस.

रसगंधकतुल्यांशंधत्तूरफलजैरसैः ॥ मर्दयेद्दिनमेकंचतत्तुल्यंत्रि कटुक्षिपेत् ॥ उन्मत्ताख्योरसोनामनस्येस्यात्संनिपातजित् ॥

अर्थ–शुद्ध पारा एकभाग, गंधक एक भाग, याला धोत्र्याच्या फळांच्या रसांत एक दिवस खलून याचें नस्य करावें, ह्मणजे तें सन्निपाताचा नाश करील.

## कनकसुंदर रस.

कनकस्याष्टशाणाःस्युःसूतोद्वादशभिर्मतः ॥ गंधोपिद्वादशप्रोक्त स्ताम्रंशाणद्वयोन्मितं ॥ अभ्रकस्यचतुःशाणंमाक्षिकस्यद्विशाण कं ॥ वंगोद्विशाणःसौवीरंत्रिशाणंलोहमष्टकं ॥ विषंत्रिशाणकंकु र्यात्लांगलीपलसंमिता ॥ मर्दयेद्दिनमेकंचरसैरम्लफलोद्भवैः ॥ दद्यान्मृदुपुटेवन्हौततःसूक्ष्मंविचूर्णयेत् ॥ माषमात्रोरसोदेयःसं निपातेसुदारुणे ॥ आर्द्रकस्वरसेनैवरसोनस्वरसेनवा ॥ किला संसर्वकुष्ठानिविसर्पंचभगंदरं ॥ ज्वरंगरमजीर्णंचजयेद्रोगहरोरसः ॥

अर्थ–सोनें आठ शाण, पारा बारा शाण, गंधक बारा शाण, ताम्रभस्म दोन शाण, अभ्रकभस्म चार शाण, स्वर्णमाक्षिकभस्म दोन शाण, वंगभस्म दोन शाण, शुद्ध सुर्मा ती-

न शाण, लोहभस्म आठ शाण, शुद्ध बचनाग तीन शाण व कळलावीच्या मुळ्या च्यार तोळे या प्रमाणें घेऊन निंबूच्या रसांत एक दिवस खलून मातीच्या शरावसंपुटांत घालून कापडमाती करून रानगोंवऱ्यांचा हलका अग्नि द्यावा. थंड जाहाल्यावर बाहेर काढून बारीक करून ठेवावा. याचें नाम कनकसुंदर. हा एक मासा आल्याच्या रसांत, अथवा लसुणाच्या रसांत घ्यावा. ह्मणजे तो घोर संनिपातास दूर करितो; व कीलासकुष्ठ, इतर कुष्ठें, विसर्प, भगंदर, ज्वर, विषदोष व अजीर्ण हे रोग दूर करितो.

## तंद्रासा०.

सन्निपातज्वरोत्पन्नांयुक्त्यातंद्रांजयेद्भिषक् ॥
उपद्रवःकष्टतमोज्वराणांसविशेषतः ॥

अर्थ–सन्निपातज्वरांमध्यें तंद्रा उत्पन्न होत्ये; परंतु तिला युक्तीनें जिंकावी. हा ज्वरांमध्यें कष्टसाध्य उपद्रव आहे.

## तंद्रालक्षण.

आचितामाशयकफेसन्निपातज्वरेदृढे ॥ शांतेत्ववश्यंतस्याशु
तंद्रासमुपजायते ॥ अभिद्रवरसक्षीरादिवास्वापनिषेवणात् ॥
दुर्बलस्याल्पवातस्यजंतोःश्लेष्माप्रकुप्यति ॥ वायुर्मार्गेसमावृ
त्यधमनीरनुसृत्यसः॥तंद्रांसुघोरांजनयेत्तस्यावक्ष्यामिलक्षणं॥
उन्मीलितविनिर्भुग्नेपरिवर्तिततारके ॥ भवतस्तस्यनयनेलुलि
तेचलपक्ष्मणी॥विवृताननदंतोष्ठंमुहुरुत्तानशायिनां॥पिच्छि
लोच्छिन्नतंतुश्चकंठेश्लेष्मास्यगच्छति ॥ कंठमार्गविरोधश्चवै
कृतंचोपजायते ॥ सोर्वाक्त्रिरात्रंसाध्यःस्यादसाध्यस्तुततःपरं ॥

अर्थ–जा ज्वरामध्यें आमाशयांत आम, आणि कफ यांच्या संचयानें दृढ सन्निपातज्वर होऊन शांत झाल्यावर त्या रोग्याला निश्चयें करून तंद्रा उत्पन्न होत्ये; आणि पातळ रस दूध, व दिवानिद्रा यांच्या सेवनानें दुर्बल व अल्पवायु अशा रोग्याचा कफ कोपतो; आणि तो कफ वायूच्या मार्गाला रोधून धमनीमध्यें प्रवेश करितो; आणि घोर तंद्रा उत्पन्न करितो. तिचें लक्षण सांगतो. त्या रोग्याचे डोळे अर्धे मिटलेले, किंवा वटारलेले असून तारका फिरतात; आणि बुबूळ चंचळ असून डोळे गळलेले दिसतात. पांपण्या अचंचल असून तोंड उघडें, व दांत बाहेर दिसतात. वारंवार उताणा निजतो. चिकट, तंतुयुक्त असा श्लेष्मा गळ्यांतून येतो, व कंठमार्गाचा रोध होतो. याप्रमाणें विकृति होतात. तो त्रिरात्रापूर्वी साध्य होतो; आणि त्रिरात्रानंतर असाध्य होतो.

## असुरादिअंजन.

अमुराव्हस्यविट्चूर्णकस्तूरीमधुसंयुतं ॥
अंजनाद्बोधयेन्मुग्धंतंद्रितंसन्निपातिनं ॥

अर्थ–काशाच्या मळाचें चूर्ण, कस्तूरी, आणि मध यांचें अंजन केलें असतां संनिपात रोग्याची तंद्रा दूर होये.

## लोहांजन.

अयोरजःश्वेतलोध्रमंजनंमरिचंतथा ॥
गोरोचनसमायुक्तंतंद्रानाशनमुत्तमं ॥

अर्थ–लोहाचें भस्म, पांढरा लोध्र, मिरें व गोरोचन हीं सर्व औषधें खलून अंजन करावें. तें झांपडेचा नाश करण्याविषयीं उत्तम आहे.

## सैंधवादिअंजन.

अंजनंसम्यगारब्धंमधुसिंधुशिलोषणैः ॥
प्रमोहद्रोहिभवतिभाषितंभिषजांवरैः ॥

अर्थ–सैंधव, मनशीळ, व त्रिकटु, हीं औषधें मधांत खलून अंजन करावें. तें झांपडीचा नाश करील.

## ज्योतिष्मतीनस्य.

ज्योतिष्मत्यास्तथातैलंमूलंपिंडारकस्यच ॥
बस्तमूत्रेणसंपिष्टानस्यंतंद्रानिवारणं ॥

अर्थ–ज्योतिष्मतीतैल, पेंढ्राचें मूळ हीं बकऱ्याचा मुतांत वाटून नस्य करावें. तें तंद्रा निवारण करितें.

## जातीपुष्पनस्य.

जातीपुष्पप्रवालंचमरिचंरोहिणीवचा ॥
सैंधवंबस्तमूत्रेणतंद्रानाशनमुत्तमं ॥

अर्थ–जाईचें फूल व पाला, मिरीं, कटुकी, वेखंड, सैंधव, ह्यांचे बकऱ्याचा मुत्रांतून नस्य द्यावें. तें तंद्रा नाशक उत्तम आहे.

## द्राक्षाद्यवलेह.

स्विन्नमामलकंपिष्ट्वाद्राक्षयासहमेलयेत् ॥ विश्वभेषजसंयुक्तंम
धुनासहलेहयेत् ॥ तेनास्यशाम्यतिश्वासःकासोमूर्छारुचिस्तथा ॥

अर्थ–आंवळे शिजऊन वाटावें; आणि त्यांत मनुका, सुंठ, यांचे चूर्ण घालून मधाशीं द्यावें. त्याणें खोकला, श्वास, मूर्छा, अरुचि, हे रोग दूर होतात.

## संनिपातप्रकोपकारण.

अम्लस्निग्धोष्णतीक्ष्णैःकटुमधुरसुरातापसेवाकषायैःकामक्रो धातिरूक्षैर्गुरुतरपिशिताहारसौहित्यशीतैः ॥ शोकव्यायामचिं ताग्रहणवनितात्यंतसंगप्रसंगैःप्रायःकुप्यंतिपुंसांमधुसमयशरद्व र्षणेसंनिपाताः ॥

अर्थ–आंबट, स्निग्ध, उष्ण, विदाहि, तिखट, मधुर, मद्य, ऊन, शेक घेणें, काम, क्रोध, अतिरुक्ष, जडपदार्थांचें आकंठभोजन, मांसभक्षण, शीतपदार्थसेवन, शोक, श्रम, चिंता, पिशाचबाधा, अतिस्त्रीप्रसंग, याकारणांनीं; आणि चैत्र वैशाख, आश्विन, कार्तिक, श्रावण, भाद्रपद, या महिन्यांत संनिपाताचा प्रायःप्रकोप होतो.

## संनिपाताची नावें.

संधिकश्चांतकश्चैवरुग्दाहश्चित्तविभ्रमः ॥ शीतांगस्तंद्रिकःप्रो क्तःकंठकुब्जश्चकर्णकः ॥ विख्यातोभुग्ननेत्रश्चरक्तष्ठीवीप्रलाप कः ॥ जिव्हकश्चेत्यभिन्यासःसन्निपातास्त्रयोदश ॥

अर्थ–संधिक, अंतक, रुग्दाह, चित्तविभ्रम, शीतांग, तंद्रिक, कंठकुब्ज, कर्णक, भुग्ननेत्र, रक्तष्ठीवी, प्रलापक, जिव्हक, आणि अभिन्यास असे तेरा १३ सन्निपात भेद आहेत.

## त्यांची मर्यादा.

संधिकेवासराःसप्तचांतकेदशवासराः ॥ रुग्दाहेविंशतिर्ज्ञेयाव न्द्यष्टौचित्तविभ्रमे ॥ पक्षमेकंतुशीतांगेतंद्रिकेपंचविंशतिः ॥ वि ज्ञेयावासराश्चैवकंठकुब्जेत्रयोदश ॥ कर्णकेचत्रयोमासाभुग्ननेत्रे दिनाष्टकं ॥ रक्तष्ठीवीदशाहानिचतुर्दशप्रलापके ॥ जिव्हके षोडशाहानिकलाभिन्यासलक्षणे ॥ परमायुरिदंप्रोक्तंम्रियते तत्क्षणादपि ॥

अर्थ–संधिक ७, अंतक १०, रुग्दाह २०, चित्तविभ्रम २४, शीतांग १५, तंद्रिक २५, कंठकुब्ज १३, कर्णक ९०, भुग्ननेत्र ८, रक्तष्ठीवी १०, प्रलापक १४, जिव्हक १६; आणि अभिन्यास १६ दिवस. इतकी परम आयुमर्यादा सांगितली कधी कधी तत्काल ही मरतो.

## साध्यासाध्य.

संधिकस्तंद्रिकश्चैवकर्णकःकंठकुब्जकः ॥

जिव्हकश्चित्तविभ्रंशःषट्साध्याःसप्तमारकाः ॥

अर्थ–संधिकादि पूर्वे साहा साध्य; आणि बाकीचे सात मारक जाणावे.

## संधिकसन्निपात.

पूर्वरूपकृतशूलसंभवंशोपवातबहुवेदनान्वितं ॥

श्लेष्मतापबलहानिजागरंसन्निपातमितिसंधिकंवदेत् ॥

अर्थ–ज्या ज्वराचा पूर्वरूपामध्यें शूल, शोष, वायूच्या फार वेदना, कफ, संताप, बलाची हानि; आणि जागरण हीं लक्षणें होतात. तो संधिक सन्निपात जाणावा.

## संधिकारिरस.

शुद्धसूतंसमंगंधमारितंचाभ्रकंसमं ॥ त्रिक्षारजीरकव्योषत्रिफलालवणैःसमं॥चित्रकस्यकषायेणदिनैकंमर्दयेद्दृढं ॥ गुंजापंचमितंखादेत्संधिकारिरितिस्मृतः॥पिप्पलीमधुनाचानुपिबेदुष्णोदकंतथा ॥

अर्थ– शुद्ध पारा, शुद्ध गंधक, अभ्रकभस्म, त्रिक्षार, जिरें, त्रिकटु, त्रिफला, मीठ, हीं समभाग औषधें चित्रकाच्या काढ्यांत एक दिन मर्दन करावीं. तो संधिकारि रस पांच गुंजा मध व पिंपळी यांशीं घ्यावा; आणि वर उष्णोदक प्यावें; ह्मणजे तो संन्निपात हरण करितो.

## संनिपातानलरस.

रसभस्मसमंगंधंताम्रभस्मद्वयोःसमं ॥ ताम्रतुल्यंखर्परंचखर्परांशंचहिंगुलं ॥ आम्लवेतसकाभावेक्षारंचणकसंभवं ॥ जंबीरैर्गर्भितंरुध्वापुटकेभूधरेपचेत् ॥ आदायखल्वयेच्चूर्णंहिंगुकर्पूरत्र्यूषणं ॥ चत्वारःसूततुल्याःस्युःसप्तब्राम्हयार्द्रकद्रवैः भावयेच्च महाराष्ट्र्यानिर्गुंड्याकरवीरजैः ॥ द्रवैरेतैःपृथग्भाव्यसप्तधा सप्तधाक्रमात् ॥ चूर्णयित्वातुषड्गुंजंदापयेदार्द्रकद्रवैः ॥ सन्निपातानलःसोयंरसःस्यात्सन्निपातजित् ॥ अतितंद्राज्वरश्वासक्षमकासातिसारजित् ॥

अर्थ–पारदभस्म व गंधक हीं एकेक भाग, ताम्रभस्म, कलखापरी आणि हिंगूळ हीं प्रत्येकीं दोन दोन भाग घेऊन तीं चग्याचा क्षार व निंब यांच्या रसांशीं खलून भूधरयंत्रामध्यें येक पूट द्यावें; नंतर तें हिंग, कापूर, सुंठ, मिरीं, पिंपळी, हीं एकेक भाग घेऊन त्याच्याशीं खलावें; आणि त्यास ब्राह्मी, आलें, जलपिंपळी, निर्गुंडी, कण्हेर, यां प्रत्येकाच्या सात सात भावना द्याव्या; ह्मणजे हा संनिपातानलरस तयार झाला. तो साहा गुंजा रस आल्याच्या रसाशीं द्यावा. ह्मणजे तो संनिपात, तंद्रा, ज्वर, श्वास, ग्लानि, खोकला व अतिसार यांचा नाश करितो.

## निर्गुंड्यादिधूप.

निर्गुंडीपुरसहितःसिद्धार्थकनिंबपत्रसंयुक्तः ॥
सर्जरसेनसमेतोधूपःसंधिकग्रहंहरति ॥

अर्थ–निर्गुंडी, गुग्गुळ, मोहोर्‍या, कडुनिंबाची पानें, व राळ यांचा धूप संधिक सन्निपाताचा नाश करितो.

## दुसरा निर्गुंड्यादिधूप.

निर्गुंडीपिचुमंदकुष्ठविजयाकार्पाससिद्धार्थकैःषड्ग्रंथातगरामरै
द्रतरुभिमातैडमूलान्वितैः ॥ चंडापावकरुद्रमाल्यसहितैर्मध्वा
सवैर्मोदितैर्धूपोयंग्रहसंनिपातजनितांपीडांपिनष्टिक्षणात् ॥

अर्थ–निर्गुंडी, निंब, कोष्ठ, भांग, कापसाच्या सरक्या, मोहोर्‍या, वेखंड, तगर, देवदार, रुईचें मूळ, किरमाणी ओंवा, चित्रक, व बेल यांचें चूर्ण करून तें मध व आसव याणी भिजवून त्यांचा धूप द्यावा. तो सन्निपात व ग्रहाची पीडा, यांचा क्षणांत नाश करितो.

## देवदारुकाढा.

सुरदारुसठीसुधालतासुवहाशुंठियुताःशृताजलेन ॥
सपुराःशमयंतिसेविताःसततंहंतसदासदागतिं ॥

अर्थ–देवदार, कचोरा, गरुडवेल, रास्ना, व सुंठ यांचा काढा आंत गुग्गूळ घालून घेतला असतां वायूचा नाश करितो.

## मुस्तादिकाढा.

मुस्तैरंडप्राणदाबाणदारुच्छिन्नारास्नाभीरुकर्चूरतिक्ताः ॥
वासाविश्वापंचमूलीयुगाढ्योहन्यान्मन्यास्तंभसंधिग्रहार्तिं ॥

अर्थ–नागरमोथा, एरंडमूळ, जळपिंपळी, नीलकोरांटी, तेल्यादेवदार, गुळवेल, रास्ना, शतावरी, कचोरा, कुटकी, अडुळसा, सुंठ, आणि दशमूळें यांचा काढा मन्यास्तंभ व संधिवात यांचा नाश करितो.

## वचादिकाढा.

वचाकवचकच्छुरासहचरामृताभंगुरासुराव्हघननागरातरुणदा
रुरास्नापुरा ॥ वृषातरुणभीरुभिःसहभवंतिसंधिग्रहव्यथोरुज
डिमक्लमभ्रमणपक्षघातापहाः ॥

अर्थ–वेखंड, धमासा, गुळवेल, भारंगमूळ, कोरांटा, देवदार, नागरमोथा, सुंठ, वृद्धदारु, रास्ना, गुग्गुळ, अश्वगंध, एरंडमूळ, शतावरी यांचा काढा संधिक सन्निपात, जडता, ग्लानि, भोंवळ, आणि पक्षघात यांचा नाश करितो.

## रास्नादिकाढा.

रास्नाशुंठीगुडूचीसहचरजलदैर्भीरुपथ्यासुराव्हैस्तिक्ताकर्चूर
वासानिलरिपुसहितैःपंचमूलीद्वयेन ॥ एभिर्द्रव्यैःकषायस्त्व
रितमपहरेत्पीतमात्रःप्रभातेमन्यास्तंभांत्रवृद्धिंज्वरपिटिकक
टीसंधिसर्वांगपीडाः ॥

अर्थ–रास्ना, सुंठ, गुळवेल, कोरांटा, नागरमोथा, शतावरी, हरीतकी, देवदार, कटुकी, कचोरा, अडुळसा, एरंडमूळ, आणि दशमुळे, यांचा काढा मान धरणें तो, आंत्रवृद्धि. ज्वर, पीटिका, कमर व सांधे यांतील शूळ आणि सर्वांगातील कळा यांचा नाश करितो,

## अमृतादिकाढा.

अमृतोरुबूकविश्वासुरतरुरास्नाहरीतकीक्काथः ॥
सकलसमीरणरोगान्प्रातःसद्योहरेत्पीतः ॥

अर्थ–गुळवेल, एरंडमूळ, सुंठ, देवदार, रास्ना, हरीतकी, यांचा काढा प्रातःकाळी घेतला असतां सर्व वातरोगांचा नाश करितो.

## ग्रंथ्यादिकाढा.

ग्रंथीकलितरुपथ्याकृतमालशिवाटरूपकैर्विहितः ॥
एरंडतैलयुक्तःक्काथोहन्यान्मरुन्मांद्यं ॥

अर्थ–पिंपळमूळ, बेहेडा, हरीतकी, बाहव्याचा मगज, आवळकाठी, अडुळसा, यांचा काढा एरंडतैल घालून द्यावा- तो वायूनें आलेलें मंदत्व दूर करितो.

## पंचमूल्यादिकाढा.

मूलीपंचककल्ककल्पितमिदंसन्मागधीमिश्रितं
कौलत्थेनरसेनसैंधवयुतंपेयंचविश्वौषधं ॥

अर्थ–पंचमूळें, पिंपळी, सैंधव, सुंठ, यांचें चूर्ण कुळिथांच्या पाण्याबरोबर द्यावें. तें वायुनाशक आहे.

## रास्नादिकाढा.

रास्नागुडूचीशठिवृद्धदारुसुराव्हविश्वात्रिफलावरीभिः ॥

क्वाथंपिबेद्गुग्गुलुसंनियुक्तंसमग्रसंधिग्रहसंनिपाते ॥

अर्थ–रास्ना, गुळवेल, कचोरा, वरधारा, देवदार, सुंठ, त्रिफला व शतावरी यांचा काढा गुगुळाशीं घ्यावा. तो संधिकसन्निपाताला दूर करील.

## क्षारादिपरिमाण.

जीरकंगुग्गुलुंक्षारंलवणंचशिलाजतु ॥

हिंगुत्रिकटुकंचैवक्वाथेशाणोन्मितंक्षिपेत् ॥

अर्थ–जिरें, गुगुळ, जवखार, सैंधव, शिलाजित, हिंग, त्रिकटु, यांचें चूर्ण कषायादिकांत देणें तर चारमासे द्यावें.

## संधिकावर लंघन.

संधिस्थेहितमस्तिलंघनविधिःस्वेदोपनाहादिकं ॥

सूक्ष्मंकर्मसमग्रमेवविहितंकुर्याद्यवागूरसं ॥

अर्थ–संधिकसन्निपातावर लंघन, स्वेदन, पेंड बाधणें, इत्यादि गात्रें लघुकरण्याचा उपचार विहित आहे. कणेरी वगैरे पथ्य आहे.

## अंतकसं० निदान.

दाहंकरोतिपरितापनमातनोतिमोहंददातिविदधातिशिरःप्रकंपं ॥

हिक्कांकरोतिकसनंचसमाजुहोतिजानीहितंविबुधवर्जितमंतकाख्यं ॥

अर्थ–दाह, संताप, मोह शिरःकंप, उचकी, व खोकला हीं अंतकसन्निपाताचीं लक्षणें होत. हा अंतकसन्निपात सुज्ञवैद्य सोडितात.

## अंतक० रोटिकाबंध.

अयंप्रयोगोयदिसन्निपातेभिषग्वराणांकथितोनुभूतः ॥ सुरागिका पिष्टपलांडुतोयंविधायसम्यक्कमुरोटिकांच ॥ मृद्वीपुनःस्निग्धविभर्जिताचसोष्णाचताल्वोपरिबंधनीया ॥ यामद्वयंबध्यपुनश्चब ध्यायावन्मनुष्योधृतिमातनोति ॥ एवंविधिश्चांतकसंनिपातेमृत्युर्व्यथागच्छतिनिश्चयेन ॥

अर्थ—वैद्यानीं बहुत अनुभव घेऊन अंतकसन्निपातावर हा विधि सांगीतला, तो असा. नाचण्याचें पीठ लसुणीच्या रसांत मळून त्याची भाकर तेलांत किंवा तुपांत भाजून ती गरम अशी मस्तकावर बांधावी. दोन प्रहर गेल्यावर पुन: बांधावी, ह्मणजे अंतकसन्निपातव्यथा दूर होते. माझ्या मतें ती भाकर एरंडेलांत भाजावी.

## मृतसंजीवनीरस.

शुद्धंसूतंसमंगधंखल्वेवैकज्जलीकृतं ॥ तथालोहकभस्मात्रताम्रभस्म समंसमं ॥ विषतालककंकुष्टंशिलाहिंगुलचित्रकैः ॥ हस्तिमुंडीचाति विषंत्र्यषणंहेममाक्षिकं ॥ भृंगीकुंभीमेघनादाःप्रतिचूर्णरसांशकं ॥ त्रि दिनंमर्दयेत्खल्वेद्रवैरार्द्रकसंभवैः ॥ निर्गुंडीविजयाद्रावैस्त्रिदिनंमर्दये त्पुनः ॥ जंबीरस्यचचांगेर्याद्रवैःसंमर्दयेद्दिनं ॥ काचकुप्यांनिवेश्याथ वालुकायंत्रगंपचेत् ॥ द्वियामांतेसमुद्धृत्यमर्दयेच्चार्द्रकद्रवैः ॥ दिनैं कंशोषितंचूर्णंत्रिगुंजंसंनिपातजित् ॥ मृतसंजीवनोनामरसोयंशंकरो दितः ॥ मृतोपिसंनिपातेनजीवत्येवनसंशयः ॥ सक्षीरंदापयेत्पथ्यंदे योवानंदभैरवः ॥

अर्थ—पारा व गंधक यांची कज्जली, लोहभस्म, बचनाग, हरताळ, मुरदाडशिंग, मन शिळ, हिंगुळ, चित्रक, इंद्रावरुणी, अतिविष, त्रिकटु, सुवर्णमाक्षिक, भांग, जेपाळ, व पळस हीं औषधें सर्व समभाग घेऊन, नंतर आल्याचा रस व भांगेचा काढा या प्रत्येकां त तीन तीन दिवस खलावीं; तशींच लिंबू व चुका यांच्या रसांत एकेक दिवस मर्दन करून काचकुपींत भरून वाळुकायंत्रांत दोन प्रहर पचन करावीं; नंतर आल्याच्या रसांत एक दिवस घोटावीं. ह्मणजे शंकरोक्त मृतसंजीवनीरस तयार झाला. तो तीन गुंजाप्र माणें दिला असतां, सन्निपातानें आसन्नमरण झालेल्या रोग्यासही वांचवितो. यावर दूधभात पथ्य द्यावें. अथवा हा रस नसल्यास नुसता आनंदभैरव द्यावा.

## पथ्यादिकाढा.

पथ्यावृषारग्वधदारुतिक्तारास्नागुडूचीगदजःकषायः ॥
सोपद्रवांच्चांतकनामधेयाज्ज्वरान्नरंमोचयतीतिचित्रं ॥

अर्थ—हिरडा, अडुळसा, फालसा, देवदारु, कटुकी, रास्ना, गुळवेल, व कोष्टकोळींजन, यांचा काढा उपद्रवासहित नराला अंतकज्वरापासून मुक्त करितो, यांत काय आश्चर्य आहे.

## असाध्यत्व सांगतो.

इहापहायवृतमुष्णवारिज्वरारियूषादिगदापहारि ॥
ज्वरच्छिदंजीवितदंचनित्यंमृत्युंजयंचेतसिचिंतयस्व ॥

**अर्थ**—अंतक संनिपात जाहला असतां उष्णोदकें, ज्वरनाशक काढे, यूष, इत्यादिक सोडून जीवित देणारा व ज्वरनाश करणारा जो मृत्युंजय शिव त्याचें चिंतन करावें.

भिषग्भिरितिनिर्णीतंसंनिपातेंतकाभिधे ॥
भेषजंजान्हवीनीरंवैद्योगोविंदएवहि ॥

**अर्थ**—अंतक संनिपात जाहला असतां वैद्यांनीं असा निश्चय केला आहे कीं, विष्णु हाच वैद्य, आणि गंगोदक हेंच औषध.

## रुग्दाहसंनि० निदान.

प्रलापपरितापनप्रबलमोहमांद्यश्रमःपरिभ्रमणवेदनाव्यथि
तकंठमन्याहनुः ॥ निरंतरतृषाकरःश्वसनकासहिक्काकुलः
सकष्टतरसाधनोभवतिहंतिरुग्दाहकः ॥

**अर्थ**—बडबड, संताप, फार मोह, मंदत्व, श्रम, भोंवळ, आणि कंठ, मान व हनुवटि यांत ठणका, सर्वकाळ तृषा, श्वास, खोकला व उचकी या लक्षणांनीं युक्त, असा रुग्दाहसंनिपात कष्टसाध्य व मारक आहे.

## जलधरकाढा.

जलधरमलयजनागरसवालकोशीरपर्प्पटैःक्कथितं ॥
यःपिबतिपयःसुशीतंशाम्यतिरुग्दाहकस्तस्य ॥

**अर्थ**—नागरमोथा, रक्तचंदन, सुंठ, वाळा, काळा वाळा व पित्तपापडा यांचा काढा थंड झाल्यावर द्यावा, तो रुग्दाहसन्निपातास शमवितो.

## अभयादिकाढा.

अभयापर्पटमुस्ताकटुकीशम्याकगोस्तनीक्काथः ॥
पीतःकरोतिनाशंरुग्दाहरुजोनसंदेहः ॥

**अर्थ**—हरितकी, पित्तपापडा, नागरमोथा, कटुकी, बाहाव्याचा मगज, व गोस्तनी द्राक्षें यांचा काढा रुग्दाहसन्निपातनाशक आहे.

## ब्राम्ह्यादिकाढा.

ब्राह्मीद्राक्षाजलधरवचोशीरशम्याकतिक्तापथ्याधात्रीकलितरु
बलानिंबकोशातकीभिः ॥ भूनिंबाढ्याभवतिसहितःपंचमूलीद्व
येनपीतःक्काथःसकलपवनव्याधिरुग्दाहहंता ॥

**अर्थ**–ब्राह्मी, द्राक्षे, नागरमोथा, वेखंड, वाळा, बाहवा, कटुकी, त्रिफला, चिकणा, कडुनिंब, कडुदोडका, दशमुळें व काडेकिराईत यांचा काढा सकल वातव्याधि, आणि रुग्दाहसंनिपात यांचा नाशक आहे.

## उशीरादिषडंगकाढा.

उशीरचंदनोदीच्यद्राक्षामलकपर्पटैः ॥
शृतंशीतंजलंदद्याद्दाहतृड्ज्वरशांतये ॥

**अर्थ**–वाळा, रक्तचंदन, काळा वाळा, द्राक्षे, आवळकाठी व पित्तपापडा यांचा काढा शीत करून दिला असतां; त्यापासून दाह, तृषा व ज्वर हे शांत होतात.

## धान्याक काढा.

ससितोनिशिपर्युषितःप्रातर्धान्याकतंडुलक्काथः ॥
पीतःशमयत्यचिरादंतर्दाहंज्वरंपैत्तं ॥

**अर्थ**–धणे व तांदूळ रात्रीं भिजत घालून प्रातःकाळीं त्याची पेज करून थंड करून द्यावी. ती अंतर्दाह आणि पित्तज्वर यांना शमविते.

## अगर्वादिधूप.

अगरुघनसारसल्लकनखरहनतनीरचंदनैर्यु
क्तः ॥ सर्जरसेनसमेतोधूपोरुग्दाहकंहंति ॥

**अर्थ**–कृष्णागरु, कापूर, सालई, नखला, तगर, वाळा, चंदन, व राळ यांचा धूप रुग्दाहनाशक आहे.

## दध्यादिलेप.

शमयतिदाहमचिराद्दधियुक्तकर्कंधुपल्लवैर्लेपः ॥
लेपोहिमकरमलयजनिंबदलैस्तक्रपिष्टैर्वा ॥

**अर्थ**–बोरीचा पाला वाटून दह्यांत कालवून आंगास लेप करावा; अथवा कापूर, चंदन, निंबाचा पाला, हीं एकत्र ताकांत वाटून त्याचा लेप करावा, ह्मणजे त्याणे दाह शमतो.

## बदर्यादिलेप.

बदरीपल्लवलेपःश्रीखंडारिष्टकेनसंयुक्तः ॥
दातव्यःपादतलयोस्त्वरयारुग्दाहसंनिपातघ्नः ॥

**अर्थ**–बोरीचा पाला, चंदन व कडुनिंब हीं औषधें एकत्र वाटून पायांच्या तळव्यास लेप केला असतां रुग्दाह शमतो.

## लाजतर्पण.

दाहवम्यर्दितंक्षामंनिरन्नंतृष्णयान्वितं ॥
शर्करामधुसंयुक्तंपाययेल्लाजतर्पणं ॥

**अर्थ**–दाह व वांति याणीं कृश, अन्न चालत नाहीं व तृषार्त अशा रोग्यांला लाह्यांचें पीठ साकर व मध घालून पाजावें.

## स्त्रीचें आलिंगन.

पयोधराढ्यांकुशलांसुरूपांनवयौवनां ॥
प्रमदांस्वभुजाश्लेषैर्भजेद्रुग्दाहपीडितः ॥

**अर्थ**–रुग्दाहयुक्त नरानें सुरूप पीनस्तनी, विलास चतुर, अशा स्त्रीचें आलिंगन केलें असतां; रुग्दाह शमतो.

## पथ्यावलेह.

पथ्यांतैलघृतक्षौद्रैर्लिहेद्दाहज्वरापहां ॥
कासासृक्सर्ववीसर्पश्वासान्हंतिवमीरपि ॥

**अर्थ**–हरीतकीचें चूर्ण, तैल, तूप किंवा मध याशीं घ्यावें, ह्मणजे खोकल्यानें रक्त पडतें तें, विसर्प, श्वास, वांति, यांचा नाश होतो.

## भैरवी गुटी.

शुद्धसूतंद्विधागंधंमर्दयेदिक्षुकद्रवैः ॥ दिनंभाव्यंचमर्द्यंचशोषयित्वातुभृंगिजैः ॥ चतुर्धाभावयेद्द्रावैस्तिलपर्ण्याद्रवैश्चसः ॥ भावितंचविशोष्याथचूर्णयेद्वस्त्रगालितं ॥ चूर्णतुल्यंमृतंताम्रंताम्रादष्टांशकंविषं ॥ कृष्णाशीतविडंगानिकृष्णाजीरासनंबला ॥ ताम्रार्धप्रतिचूर्णंस्यात्सर्वमेकत्र कारयेत् ॥ यामैकंभृंगजद्रावैर्मर्दयेत्कल्कतांगतं ॥ सिग्धभांडगतंपाच्यं पिंडंयामात्कृशाग्निना ॥ चणमात्रावटीयोज्याचित्रकार्द्रकसैंधवैः ॥ सम्यक्त्रिदोषजंहंतिसंनिपातंसुदारुणं ॥ भैरवीगुटिकाख्यातादध्यन्नंपथ्यमाचरेत् ॥

**अर्थ**–शुद्ध पारा व गंधक यांची कज्जली करून उसाच्या रसांत येक दिवस भावना द्यावी; नंतर माक्याच्या रसाच्या चार भावना द्याव्या; नंतर तिलपर्णीच्या रसाची भावना देऊन सुकवून गाळून घ्याव. नंतर त्या चूर्णाच्या समभाग ताम्रभस्म, ताम्राच्य अष्टमांश बचनाग, आणि काळें व पांढरें वावडिंग, पिंपळी, जिरें, रास्ना, चिकणा,

हीं प्रत्येक ताम्राच्या अर्धाबरोबर घेऊन एकत्र करून माक्याच्या रसांत एक प्रहर घोटावीं. तीं पाताळकल्कासारिखीं आहेत; तीच तुपानें राबलेल्या भांड्यांत भरून मंदाग्नीवर गोळा होई तों पचवावीं; आणि त्याची चण्या एवढी गोळी चित्रक, आलें व सैंधव यांशीं द्यावी. ह्मणजे ती त्रिदोषसंनिपाताचा नाश करित्ये. तिला भैरवी गुटी ह्मणतात. हिवर दहींभात पथ्याला द्यावा.

## चित्तभ्रमसन्निपात.

यदिकथमपिपुंसांजायतेकायपीडाभ्रममदपरितापोमोहवैकल्यभावः ॥
विकलनयनहासोद्गीतनृत्यप्रलापीह्यभिदधतिनसाध्यंकेपिचित्तभ्रमाख्यं॥

अर्थ– कोणत्याहि प्रकारें शरीराला वेदना, भ्रम, उन्माद, संताप, मोह, विकलपणा, डोळ्यांना व्याकुळता, हसणें, गाणें, नाचणें व बडबड करणें हीं लक्षणें जाहल्यास याला चित्तविभ्रमसन्निपात ह्मणतात, हा असाध्य आहे.

## मध्वादिकाढा.

मधुनखशाल्मलिकृष्णावनतरुपथ्यामुरागरूमिश्र ॥
मलयजसहितैरेतैःक्वाथश्चित्तभ्रमंहंति ॥

अर्थ– मोहाची साल, नखांला, सांवरी, पिंपळी, अर्जुनवृक्षाची साल, हरीतकी, एकांगी मुरा व रक्तचंदन यांचा काढा चित्तभ्रमाला शमवितो.

## द्राक्षादिकाढा.

मृद्वीकामरदारुमत्स्यशकलामुस्तामलक्योमृ
तापथ्यारेवतरामसेनकरजाराजीपलैःसंयुतः ॥
हन्युश्चित्तरुजोथदर्दुरदलद्राक्षापटोलीपयःप
थ्यापर्पटराजवृक्षकटुकाशंबूकपुष्पशृतः ॥

अर्थ– द्राक्षें, देवदारु, कटुकी, नागरमोथा, आवळकाठी, गुळवेल, हरीतकी, बाहव्याचा मगज, किराईत, पित्तपापडा व कडुपडवळ यांचा, अथवा ब्राह्मी, द्राक्षें, कडुपडवळ, बाळा, हरीतकी, पित्तपापडा, बाहव्याचा मगज, कुटकी व शंखपुष्पी यांचा काढा चित्तभ्रम शमवितो.

## ब्राम्ह्यादिकाढा.

ब्राह्मीवचाभीरुफलात्रिकेणतिक्तावलारग्वधतिक्तकेन ॥ निंबा
व्हकोशातकिहारहूराद्विपंचमूलीभिरसौकषायः ॥ पीतोहि
चित्तभ्रमसंनिपातंनिहंतिरुग्दाहमपिप्रभूतं ॥

अर्थ- ब्राह्मी, वेखंड, शतावरी, त्रिफला, कुटकी, चिकणा, बाहव्याचा मगज, किराईत, कडुनिंब, कडुपडवळ, द्राक्षें, आणि दशमूळें यांचा काढा चित्तभ्रमसंनिपात व रुग्दाह यांना शमवितो.

## पथ्यादिकाढा.

पथ्यापर्पटकटुकामृद्वीकादारुजलदभूनिंबाः ॥
शम्याकपटोलशिवाक्काथश्चित्तभ्रमंहंति ॥

अर्थ- हिरडा, पित्तपापडा, कटुकी, द्राक्षें, देवदार, नागरमोथा, काडेकिराईत, बाहव्याचा मगज, कडुपडवळ व आवळकाठी यांचा काढा चित्तभ्रमसन्निपातनाशक आहे.

## हरीतक्यादिकाढा.

हरीतकीपर्पटहारहूराशंबूकपुष्पैःकटुकीपयोदैः ॥
शम्याकदेवाह्वयभारतीभिश्चित्तभ्रमंहंतिकृतःकषायः ॥

अर्थ- हिरडा, पित्तपापडा, काळें द्राक्ष, शंखपुष्पी, कटुकी, नागरमोथा, देवदार, बाहव्याचा मगज, ब्राह्मी यांचा काढा चित्तभ्रमसंनिपाताचा नाशक आहे.

## कणाद्यंजन.

कणोषणोग्रालवणोत्तमानिकरंजबीजक्षणदामलानि ॥ पथ्याक्षसित्धार्थकहिंगुशुंठीयुतानिबस्तांबुविमिश्रितानि ॥ पिष्ट्वागुटीयंनयनेविधेयाप्रचेतनेतिप्रथितान्वितार्था ॥ चित्तभ्रमापस्मृतिभूतदोषशिरोक्षिरोगभ्रमनाशहेतुः ॥

**अर्थ**-पिंपळी, मिरीं, वेखंड, सैंधव, करजाचें बीज, हळद, आवळकाठी, हरीतकी, बेहेडा, मोहोऱ्या, सुंठ व हिंग यांचीं चूर्णें एकत्र करून बकऱ्याच्या मूत्रांत खलून गोळी करून ठेवावी. तीचें नेत्रांत अंजन केलें असतां; चेतना देत्ये व चितभ्रम, फेंपरें, भूतबाधा, मस्तकरोग, नेत्ररोग व भ्रम यांचा नाश करित्ये.

## कुंभोद्भवनस्य.

कुंभोद्भवनरोरंभोगुडविश्वाकणान्वितं ॥
निहितंनसिनूनंस्याच्चित्तभ्रमविनाशनं ॥

**अर्थ**-आगस्त्याचे पाल्याच्या रसांत गूळ, सुंठ व पिंपळी घालून नस्य द्यावें. तें चित्तभ्रमनाशक आहे.

## धूप.

मुरामूर्वजमेघाव्हमधूकमलयोद्भवैः ॥ महत्तरुमधून्मिश्रैःपुर पाणिजपांसुभिः ॥ लोहलमज्जकैलाभिर्धूपश्चितभ्रमापहः ॥ ग्रहदोषहरःश्रीदःसौभाग्यकरउत्तमः ॥

अर्थ—एकांगीमुरा, वाळा, मधुकाष्ठ, चंदन, देवदार, मध, नखला, पित्तपापडा, अगरु, पीतवाळा, आणि एला यांचा धूप चित्तभ्रमसन्निपात व ग्रहदोष यांचा नाशक; आणि लक्ष्मीकारक व कांतिप्रद आहे.

## संनिपातगजांकुश.

शुद्धसूतंमृतंचाभ्रंशुद्धेतालकमाक्षिके ॥ हिंगुचतुल्यतुल्यंस्यान्मर्दयेत्खल्वकेद्रवैः ॥ वंध्यापटोलनिर्गुंडीसुगंधानिंबचित्रकैः ॥ धत्तूरलांगलीपाठाभृंगाजंबीरजद्रवैः ॥ त्रिदिनंमर्दयेदेभिश्चूर्णीकृत्यविमिश्रयेत् ॥ त्रिक्षारंसैंधवंबालंविषमधुरसारकं ॥ तुल्यंतुल्यंविचूर्ण्याथपूर्वोक्तंचंद्रभासमं ॥ एकीकृत्यभवेत्सिद्धःसन्निपातगजांकुशः॥ सन्निपातंनिहंत्याशुमापमात्रःप्रयोजितः ॥

अर्थ—पारा, अभ्रकभस्म, हरताळ, माक्षिक, हीं शुद्ध घेऊन त्यांत समभाग हिंग घालून तीं कुमारी, वांझकर्कोली, कडुपडवळ, निर्गुंडी काळी व पांढरी, कडुनिंब, चित्रक, धोत्रा, कळलावी, पाहाडमूळ, भांग व निंबु यांचे रसांत तीन दिवस घोटावीं; आणि त्यांत क्षारत्रय, सैंधव, बचनाग, कांकोली व जेपाळ हीं भागानी समभाग असून पूर्वोक्त औषधांइतकी वजनानें होतील, अशीं मिश्र करावीं; ह्मणजे तो सन्निपातगजांकुश होतो, हा एक मासाभर दिला असतां सन्निपाताचा नाश करील.

## प्राणेश्वर रस.

रसंगंधंसमंशुद्धंमृततात्म्रंमृतंरसं ॥ दिनैकंतालमूल्याश्चवाराह्वारसमर्दितं ॥ निरुद्धंकाचकुप्यांतुवालुकायंत्रगंपचेत् ॥ दिनंवाभूधरेपक्कासमादायविचूर्णयेत् ॥ त्रिक्षारंपंचलवणंत्रिफलाव्योपचित्रकैः ॥ सजीरकैःसेंद्रयवैर्हिंगुगुग्गुलुदीप्यकैः ॥ सर्वैःसमैःपूर्वसमंचूर्णीकृत्यविमिश्रयेत् ॥ माषमात्रंप्रदातव्यंकिंचिदुष्णोदकंपिबेत् ॥ सन्निपाताचलेवज्रंसज्वरग्रहणीप्रणुत् ॥ कुर्यात्प्राणपरित्राणमतःप्राणेश्वरोरसः ॥

अर्थ—शुद्ध पारा, गंधक, ताम्रभस्म, पारदभस्म, हीं सर्व ताडमूळ व पांढरा भूयकोहाळा यांच्या रसांत खलून; नंतर कुपींत भरून, वालुकायंत्रांत किंवा भूधरयंत्रात पच-

वावी. शीतझाल्यावर, त्यांत क्षारत्रय, लवणपंचक, त्रिफळा, त्रिकटु, चित्रक, जिरें, इंद्रजव, हिंग, गुग्गुळ, आणि ओवा हीं सर्व समभाग घेऊन त्यांचें चूर्ण पूर्व औषधाइतकें घेऊन मिळवावें. तें एकमासा घेऊन किंचित् ऊनपाणी प्यावें. तें संनिपात, संग्रहणी व ज्वर यांचा नाश करील. हा प्राणेश्वररस प्राणाचें रक्षण करील असा आहे.

## मोरेश्वर रस.

शुद्धसूतंद्विधागंधंदिनैकंचार्द्रकद्रवैः ॥ मर्दयित्वाचतंगोलंगोलार्धेताम्र संपुटे ॥ क्षिप्त्वानिरुध्यतत्संधिंमृन्मूषायांनिरुध्यच ॥ रात्रौगजपुटेपा च्यंप्रातरादायचूर्णयेत् ॥ गुंजैकंनागरसमंसघृतंसन्निपातनुत् ॥ अनुपा नंपिबेत्पश्चात्तप्तंवारिपलद्वयं ॥ दध्यन्नंदापयेत्पथ्यंतृषायांशीतलंजलं ॥ कृशंचकुरुतेस्थूलंनरंमोरेश्वरोरसः ॥

अर्थ– शुद्धपारा एक भाग व गंधक दोनभाग यांचा एकदिवस आल्याच्या रसांत खल करून गोळा करावा. त्या गोळ्याच्या निमें तांबें घेऊन त्याचा करंडा करून त्यांत तो गोळा भरून तो करंडा दुसऱ्या मातीच्या भांड्यांत ठेऊन,नंतर संधिलेप करावा; आणि एकरात्र गजपुट द्यावें. प्रातःकाळीं काढून चूर्ण करावें; आणि तें एक गुंज प्रमाण सुंठ व तूप यांशीं द्यावें; आणि वर आठ तोळे उष्णोदक द्यावें. वर दहिभात पथ्याला द्यावा. तृषा लागल्यास शीतजल प्यावें. ह्मणजे हा मोरेश्वररस कृशपुरुषाला पुष्ट करितो.

## शीतांगसं॰निदान.

हिमसदृशशरीरोवेपथुःश्वासहिक्काशिथिलितसकलांगःखिन्न नादोग्रतापः ॥ क्लमथुदवथुकासच्छर्द्यतीसारयुक्तस्त्वरितमर णहेतुःशीतगात्रःप्रभावात् ॥

अर्थ– शरीर अत्यंत गार, कंप, श्वास, उचकी, आंगाला शिथिलता, शब्द ओढलेला, अंतरीं संताप, आनायासानें श्रम, संताप, खोकला, वांती, आणि अतिसार या लक्षणांनी युक्त संनिपातास शीतगात्र संनिपात ह्मणतात, हा त्वरित प्राणनाशक आहे.

## शीतांगाचीचिकित्सा.

मृतसंजीवनोवाथरसोगुंजाद्वयोहितः ॥ सर्वांगसुंदरोवाथस्व च्छंदोभैरवोपिवा ॥ दातव्यःपंचवक्त्रोवाशीतांगनाशयेद्ध्रुवं ॥

अर्थ– शितांग संनिपातावर मृतसंजीवन रस दोनगुंजा, किंवा सर्वांग सुंदर, अथवा स्वच्छंद भैरव, किंवा पंचवक्त्र रस द्यावा. ह्मणजे शीतांगसंनिपात नाश पावतो.

## अर्कादिकाढा.

भास्वन्मूलंजीरकव्योषभार्गीव्याघ्रीशृंगीपुष्करंगोजलेन ॥
सिद्धंसद्यःशीतगात्रातिमोहश्वासश्लेष्मोद्रेककासान्निहंति ॥

अर्थ– रुईचें मूळ, जिरें, त्रिकटु, भारंगमूळ, रिंगणी, काकडशिंगी व पुष्करमूळ यांचा काढा गोमूत्रांत सिद्ध करून प्याला असतां; तत्काल शीतगात्रसंनिपात, मोह, श्वास, आणि कफवृद्धि यांचा नाश करील.

## मातुलिंगादिकाढा.

मातुलिंगादिभूनिंबग्रंथिकंदेवदारुच ॥
दशमूलाजमोदंचशुंठीशीतांगनाशनं ॥

अर्थ– माहाळुंग, किराईत, पिंपळमूळ, देवदार, दशमूळें, अजमोदा व सुंठ यांचा काढा शीतांगसंनिपातनाशक आहे.

## कर्कोटकाद्युद्वर्तन.

कर्कोटिकाकंदरजःकुलित्थाकृष्णावचाकट्फलकृष्णजीरैः ॥
किराततिक्ताग्निककट्वलांबुपथ्याभिरुद्वर्त्तनमत्रशस्तं ॥

अर्थ– कर्टोलीचा कांदा, पित्तपापडा, कुलित्थ, पिंपळी, वेखंड, कायफळ, शाहाजिरें, काडेकिराईत, चित्रक, कडुभोंपळा व हिरडा यांचें चूर्ण आंगास चोळलें असतां; शीतगात्रसंनिपाताचा नाश करील.

## श्रीवेष्टादिचूर्ण.

श्रीवेष्टफलसंभूतभस्मभागाष्टकंशुभं ॥ मरीचस्यचचत्वारो
रसस्यैकोविषस्यच ॥ सूक्ष्मचूर्णततःकृत्वामर्दयेदतियत्नतः ॥
असाध्येपिहिशीतांगेस्वेदोयातिहिनिश्चितं ॥ चूर्णचणकभृष्टो
लित्थंभृष्टभंगभिवंतथा॥कुलत्थकोत्थचूर्णेनस्वेदोयातिहिनिश्चितं ॥

अर्थ– सरळ वृक्षाच्या फळाचें भस्म आठ भाग, भांग चार भांग, चारभाग मिरीं, पारा व बचनाग हीं सर्व एकत्र खलून त्यांचें फार बारिक चूर्ण करून द्यावें. ह्मणजे असाध्यशीतांगालाहि निश्चित घाम येतो. भाजलेल्या चण्याचें चूर्ण, भाजलेल्या भांगेचें चूर्ण व कुळिथाचें चूर्ण यांणीं घाम नाहींसा होतो.

## तंद्रिकसं० निदान.

प्रभूतातंद्रार्तिज्वरकफपिपासाकुलतरोभवेच्छ्वास॥जि

ह्वापृथुलकाठिनाकंटकवृता ॥ अतीसारःश्वासःक्ल
मधुपरितापःश्रुतिरुजोभृशंकंठजाड्यंशयनमनिशंतं
द्रिकगदे ॥

अर्थ– तंद्रिकसंनिपातांत डोळयास झांपड, शूळ, ज्वर, कफ, ताहान, यांनीं रोगी पीडित होऊन जीभ काळी, कठिण, व वर कांटे आलेली, दमा, ग्लानि, तलखी कणवेदना, गळयास जडत्व व निरंतर झोंप हीं लक्षणें होतात.

## तंद्रिकपरीक्षा.

ज्वरेप्रथममुत्पन्नेचक्षुर्भ्यांनैवपश्यति ॥
तंद्रिकःसंनिपातोयंकष्टसाध्योभवेत्ततः ॥

अर्थ– ज्वर उत्पन्न होतांच डोळयास आंध्य येते. तेव्हां तो तंद्रिक संनिपात कष्टसाध्य जाणावा.

## भांग्यादिकाढा.

भार्गीगुडूचीधनकंटकारिहरीतकीपौष्करनागराणां ॥
कृतःकषायोत्रिदिनंनिपीतोघोरंजयेत्तंद्रिकसंनिपातं ॥

अर्थ– भारंगमूळ, गुळवेल, नागरमोथा, रिंगणी, हरीतकी, पुष्करमूळ व सुंठ यांचा काढा तीन दिवस घ्यावा. त्याणें तंद्रिकसंनिपात दूर होतो.

## दुसरा प्रकार.

भार्गीपुष्करपथ्यानिदग्धिकानागरामृताक्काथः ॥
अपनयतितंद्रिकभयंनिःसंशयंप्रगेतनेपीतः ॥

अर्थ–भारंगमूळ, पुष्करमूळ, हिरडा, रिंगणी, सुंठ व गुळवेळ यांचा काढा प्रातःकाळीं घेतला असतां; तो निःसंशय तंद्रिकसंनिपातास शमवितो,.

## अमृतादिकाढा.

अमृतापटोलवासाव्योपयुतस्तंद्रिकेक्काथः ॥

अर्थ–गुळवेल, कडुपडवळ, अडुळसा व त्रिकटु यांचा काढा तंद्रिकावर द्यावा.

## रास्नाद्यंजन.

रास्नामनःशिलातैलमंजनंचैवतंद्रिके ॥

अर्थ–रास्ना व मनशील याणी सिद्ध केलेल्या तेलाचें अंजन तंद्रिकसंनिपातनाशक अ

## तुरंगलालाअंजन.

तुरंगलालालवणोत्तमेंदुमनःशिलामागधिकामधूनि ॥
नियोजितान्यक्षिणिनिश्चितंद्राकृतंद्रांसनिद्रांविनिवारयंति ॥

अर्थ-सैंधव, कापूर, मनशील व पिंपळी हीं चार औषधें घोड्याचे लाळेंत आणि मधांत खलून अंजन करावें, तें तंद्रिकाला दूर करितें.

## कृष्णादिनस्य.

कृष्णामनःशिलातालमंजनमेवतंद्रिकेत्विष्टं ॥
अमृतापटोलयूषोव्योषयुतस्तंद्रिकंजयति ॥

अर्थ-पिंपळी, मनशील व हरताळ यांचें अंजन हितकर आहे; आणि गुळवेल, कडुपडवळ, यांचा काढा त्रिकटुचूर्णाशीं दिला असतां; तो तंद्रिक संनिपाताचा नाश करितो.

## कुष्ठादिनस्य.

कुष्ठगवाक्षीनागरनिशाद्वयमरीचकणावचायुक्तं ॥
बस्तसलिलेनपिष्टंतंद्रिकहिंस्त्रंभवेन्नस्यं ॥

अर्थ-कोष्ठ, कंवडळ, संठ, हळद, दारुहळद, मिरीं, पिंपळी, वेखंड, हीं बकऱ्याच्या मूत्रांत वाटून नस्य द्यावें. तें तंद्रिकसंनिपाताला दूर करितें.

## मरिचादिनस्य.

मरीचकंचपचंपचावचारुक्कृमिहरनागरशर्वरीगवाक्ष्यः ॥
छगलकजलकान्वितानितांतंनसिनिहितानतुतंद्रिकंजयंति ॥

अर्थ-मिरीं, दारुहळद, वेखंड, कोष्ठ, वावडिंगें, सुंठ, हळद व कंवडळ हीं शेळीच्या मूत्रांत खलून त्याचें नस्य करावें, तें तंद्रिकाला निःसंशय दूर करील.

## क्षुद्रादिनस्य.

क्षुद्रामृतापौष्करनागराणिशृतानिपीतानिशिवायुतानि ॥
शुंठीकणागस्त्यरसोषणानिनस्येनतंद्राविजयोल्बणानि ॥

अर्थ-रिंगणी, गुळवेल, पुष्करमूळ, सुंठ व हिरडा यांचा काढा देऊन अगस्त्याचे रसांत त्रिकटु उगाळून नस्य करावें. हें नस्य व वरचा काढा तंद्रा घालविण्यास समर्थ आहे

## कंठकुब्जनिदान.

शिरोर्त्तिकंठग्रहदाहमोहकंपज्वरोरक्तसमीरणार्तिः ॥
हनुग्रहस्तापविलापमूर्छास्यात्कंठकुब्जःखलुकष्टसाध्यः ॥

**अर्थ**–कपाळ दुखणें, मान धरणें, दाह, असावधपणा, कंप, ज्वर, रक्तवात, रक्तपीडा, हनुवटी धरणें, संताप, बडबड, आणि मूर्छा इतक्या लक्षणांनी युक्त जो ज्वर त्याला कंठकुब्जसंनिपात ह्मणावा. हा कष्टसाध्य आहे.

## शृंग्यादिकाढा.

शृंगीवत्सकचेतकीघनसठीभूनिंबभार्गीनिशातिक्तापुष्करचित्रकैःसमरिचैर्व्याघ्रीवृषामिश्रितैः ॥ धात्रीदारुबिभीतकैश्चचविकाविश्वाक्षणाकट्फलैःपीतःकृंततिकंठकुब्जमचिरात्कोष्णःकषायस्त्विह ॥

**अर्थ**–कांकडशिंगी, कुडा, हरीतकी, नागरमोथा, कचोरा, किराईत, भारंगमूळ, हळद, कटुकी, पुष्करमूळ, चित्रक, मिरीं, रिंगणी, अडुळसा, आवळकाठी, देवदार, बेहेडा, चवक, सुंठ, पिंपळी व कायफळ यांचा काढा किंचित् उष्ण प्याला असतां कंठकुब्जसन्निपाताला जिंकील.

## त्रिकट्वादिकषाय.

त्रिकटुककलिंगककटुकाहरीतकीबिभीतकामलकैः ॥
ध्वंसयतिकंठकुब्जंवृषरजनीद्वययुतःकषायः ॥

**अर्थ**–त्रिकटु, इंद्रजव, कटुकी, त्रिफला, दारुहळद व हळद यांचा काढा कंठकुब्जाला हरितो.

## फलत्रिकादिकाढा.

फलत्रिकत्र्यूषणमुस्तकट्वीकलिंगसिंहाननशर्वरीभिः ॥
क्काथःकृतःकृंततिकंठकुब्जंकंठीरवःकुंजरमाशुयद्वत् ॥

**अर्थ**–त्रिफला, त्रिकटु, नागरमोथा, कटुकी, कुड्याची साल, अडुळसा व हळद यांचा काढा करून द्यावा. तो सिंह जसा हत्तीला जिंकितो, तसा हा कंठकुब्जाला जिंकील.

## किराताादिकाढा.

किरातकटुकाकणाकुटजकंटकारीसठीकलिंद्रुकिलिमाभयाकटुककट्फलांभोधरैः ॥ विषामलकपुष्करानलकुलीरशृंगीवृषैर्महौषधसखैरयंजयतिकंठकुब्जंगणः ॥

**अर्थ**–किराईत, कटुकी, पिंपळी, इंद्रजव, रिंगणी, कचोरा, बेहेडा, देवदार, हरीतकी, मिरें, कायफळ, नागरमोथा, अतिविष, आवळकाठी, पुष्करमूळ, चित्रक, कांकडशिंगी, अडुळसा व सुंठ यांचा काढा कंठकुब्जसंनिपाताला जिंकितो.

## कृष्णादिनस्य.

अपनयतिकंठकुब्जंकृष्णापामार्गयुक्नस्यं ॥
अथहंतिसलिलसहितंत्रिकटुककटुतुंबिनीनस्यं ॥

अर्थ–पिंपळी व आघाड्याचा रस याचें, किंवा त्रिकटु, कडुभोपळ्याचे बीज हीं पाण्यांत उगाळून यांचें नस्य केलें असतां; कंठकुब्जाला दूर करील.

## सिद्धवटी.

शुद्धसूतंतथागंधंकांकडंसैंधवंसमं ॥ सद्योबालस्यविष्टांचद्रवै ब्राम्ह्याविमर्दयेत् ॥ गुटिकाबदराकाराभक्षितारोगनाशिनी ॥ इयंसिद्धवटीनामसंनिपातंनियच्छति ॥ पूर्वोक्तेनानुपानेनदेयो वानंदभैरवः ॥

अर्थ–शुद्धपारा, शुद्ध गंधक, कांकडशिंगी, सैंधव व सद्यः उत्पन्न झालेल्या बालाची विष्ठा, हे पदार्थ समभाग घेऊन ब्राह्मीच्या रसांत खलून बोरायेवढी गोळी करावी, ती संनिपातरोगनाशक आहे; किंवा पूर्वोक्त अनुपानाशीं आनंदभैरव रस द्यावा. तोही संनिपात नाशक आहे.

## कर्णकसंनिपातनिदान.

प्रलापश्रुतिर्‍हासकंठग्रहांगव्यथाश्वासकासप्रसेकप्रभावं ॥
ज्वरंतापकर्णांतयोर्गल्लपीडाबुधाःकर्णकंकष्टसाध्यंवदंति ॥

अर्थ–बडबड, बहिरेपणा, गळाधरणें, आंगांत तिडका, दमा, खोकला, लालास्राव, संताप, कान व गाल यांना शूळ इत्यादि लक्षणानीं कर्णकसंनिपात जाणावा. हा कष्टसाध्य ज्वर आहे.

## रास्नादिकषाय.

रास्नाश्वगंधाघनकंटकारिभांर्गीवचापौष्कररोहिणीनां ॥
क्वाथः कृतःशृंग्यभयायुतानांपीतोजयेत्कर्णकसंनिपातं ॥

अर्थ–रास्ना, अश्वगंधा, नागरमोथा, रिंगणी, भारंगमूळ, वेखंड, पुष्करमूळ, कटुकी, काकडशिंगी, हरीतकी यांचा काढा कर्णकसंनिपातनाशक आहे.

## रास्नादिकाढा.

रास्नाबृहतीपथ्याव्योषकटुकाघनपुष्कराब्दंच ॥
शृंगीधाराभांर्गीक्वाथोयंकर्णकंहरेत्पानात् ॥

अर्थ–रास्ना, रिंगणी, हरीतकी, सुंठ, मिरीं, पिंपळी, कटुकी, नागरमोथा, पुष्करमूळ, कांकडाशिंगी, आवळकाठी व भार्गी यांचा काढा कर्णकसंनिपात दूर करितो.

## मरीचादिकाढा.

मरीचदशमूलमगधाफलत्रयनिशामहौषधीतिक्ता ॥
भूनिंबसैंधवयुतःकर्णकहंताभवेत्क्काथः ॥

अर्थ–मिरें, दशमुळें, पिंपळी, त्रिफळा, हळद, सुंठ, कटुकी व काडेकिराईत यांचा काढा सैंधव घालून घेतला तर तो कर्णक दूर करितो.

## भार्ग्यादिकाढा.

भार्गीजायापुष्करकंटकारिकटुत्रिकोग्रावनकंडुलीभिः ॥
कुलीरशृंगीकटुकारसाभिःकृतःकषायःकिलकर्णकघ्नः ॥

अर्थ–भारंगमूळ, लघुशमी, पुष्करमूळ, रिंगणी, त्रिकटु, वेखंड, गोडा सुरण, कांकडशिंगी, कटुकी व रास्ना यांचा काढा कर्णकसंनिपातनाशक आहे.

## दशमूलादिकाढा.

दशमूलमत्स्यशकलाचपलात्रिफलामहौषधकिरातयुताः ॥
मरिचपरिक्कथितमायुबलादपहंतिकर्णकरुजःसकलाः ॥

अर्थ–दशमुळें, कटुकी, पिंपळी, त्रिफळा, सुंठ, किराईत, मिरीं यांचा काढा कर्णकसन्निपातास शीघ्र हरील.

## इंगुद्यादिलेप.

इंगुदिनिशाविशालासैंधवसुरदारुरविदुग्धैः ॥
दत्तःक्रमेणलेपोहरतिमहाकर्णकग्रंथिं ॥

अर्थ–हिंगणबेटें, हळद, कौंडळ, सैंधव, देवदारु व रुईचाचिक यांचा लेप कर्णमूळावर एकावर एक असा वारंवार करावा; त्याणे कर्णमूळ बरें होतें.

## प्रलेप.

प्रलेपस्तमस्तंनयत्यल्पमेकःसमुद्रिक्तशोथंचरक्तावसेकः ॥
विपक्वंचशस्त्रक्रियापूयजित्स्याद्व्रणत्वंगतेचेतद्रुतंतच्चिकित्सा ॥

अर्थ–प्रथम कर्णमूळावर शीघ्रलेप द्यावा. त्याणे बसतें. सूज मोठी झाली तर रक्त काढावें. पिकल्यावर फोडून पूय काढिल्यानंतर त्याजवर व्रणचिकित्सा करावी.

## व्रणचिकित्सा.

निशाविशालामयपाणिमंथदार्वींगुदीमूलकृतःप्रलेपः ॥
प्रभाकरक्षीरयुतःप्रभावाद्यस्तःसमस्तोप्यथकर्णकघ्नः ॥

अर्थ–हळद, वृंदावन, कोष्ठ, करवंदीचे पाळ, दारुहळद व हिंगणबेटमूळ हीं औषधें रुईच्या चिकांत उगाळून त्याचा लेप द्यावा. हीं सर्व नमिळाल्यास जी मिळतील तीं उगाळून लेप करावा. ह्मणजे कर्णकसन्निपाताचा नाश होईल.

## कुलित्थादिलेप.

कुलित्थःकट्फलंशुंठीकारवीतैःसमांशकैः ॥
सुखोष्णैर्लेपनंकार्यंकर्णमूलेमुहुर्मुहुः ॥

अर्थ–कुळिथ, कायफळ, सुंठ व ओवा यांचे समभाग चूर्ण उष्णोदकांशीं कालवून वारंवार लेप करावा; ह्मणजे कर्णमूळ बसेल.

## गैरिकादिलेप.

गैरिकंकंटिनीशुंठीकट्फलैःसवचैःसमैः ॥
उष्णैःकांजिकसंपिष्टैःप्रलेपःकर्णमूलनुत् ॥

अर्थ–गेरु, गोखरूं, सुंठ, कायफळ व वेखंड हीं सर्व कांजीत उगाळून त्याचा उष्ण उष्ण लेप द्यावा. तो कर्णमूळ शमवितो.

## शिग्र्वादिलेप.

शिग्रुराजिकयोःपिष्टंकर्णमूलेप्रलेपयेत् ॥
कर्णमूलभवःशोफस्तेनलेपेनशाम्यति ॥

अर्थ–शेवग्याची साल व शिरस हीं वाटून कर्णमूलावर लेप करावा. त्याणें कर्णमूलसंबंधि सूज शांत होते.

## रुईचा लेप.

दशशतकरदुग्धंपुष्करत्वक्समेतंदहनगुडनिकुंभाकुष्ठकासीसयुक्तं ॥
अपनयतिवितीर्णंलेपनंसप्तरात्रात्श्वयथुहरणयुक्तंकर्णकग्रंथिमेतत् ॥

अर्थ–पुष्करमूळ, दालचिनी, चित्रक, गूळ, कायफळ, कोष्ठ व हिराकस या औषधांचें चूर्ण करून रुईच्या चिकांत घोटून लेप द्यावा. तो लेप सात दिवसांत कर्णमूळ शमवितो व सूज बसवितो.

## दंत्यादिलेप.

दंतीचित्रकयोर्मूलंस्नुह्यर्कपयसागुडः ॥
भल्लातकास्थिकासीसंलेपोभवतिकर्णके ॥

अर्थ–दंतीमूळ, चित्रकमूळ, निवडुंग, रुईचा चीक, गुळ, बिब्व्याची आंतील गोडांबी, आणि हिराकस यांचा लेप कर्णकावर द्यावा.

## नागरादिलेप.

सनागरंदेवदारुरास्नाचित्रकपेषितं ॥
प्रलेपनमिदंश्रेष्ठंगलशोफनिवारणं ॥

अर्थ–सुंठ, देवदार व रास्ना हीं चित्रकाचे रसांत उगाळून लेप द्यावा. तो गळ्यांचे सूज निवारण करितो.

## निशादिलेप.

निशेंगुदींसैंधवदारुकुष्ठदार्वीविशालारविदुग्धलेपः ॥
तंकर्णग्रंथिसमपाहरेद्वाजलौकयापातनमत्रशस्तं ॥

अर्थ–हळद, नेप्ती, सैंधव, देवदार, कोष्ठ, दारुहळद, कांवडळ, आणि रुईचा चीक यांचा लेप कर्णग्रंथिला शमवितो; अथवा त्या ग्रंथिला जळवा लाऊन रक्तस्राव करावा तेणे करून कर्णकग्रंथि वसतो.

## बीजपुरादिलेप.

बीजपूरकमूलत्वकूवन्हिमंथस्तथैवच ॥ शरपुंखाशिखींतुंबीस
कृष्णाविषमुष्टिभिः ॥ प्रलेपोवाहिडिंबीभिःश्वयथौकर्णमूलजे ॥

अर्थ–महाळुंगीचें मूळ, दालचिनी, नरवेल, शरपुंखा, चित्रक, कडुभोपळा, पिंपळी व कुचल्याची बी यांचा लेप कर्णमूळाचे सुजेवर द्यावा.

## वज्रमुष्ट्यादिलेप.

वज्रमुष्टिभवःकंदोशोथविध्वंसनक्षमः ॥ कर्कटस्यचमांसेन
स्वेदनंबंधनंतथा ॥ कर्णमूलभवंशोथंनाशयत्यविलंबतः ॥

अर्थ– लुतीचा कांदा कर्णकाची सूज घालवण्यास समर्थ आहे; आणि कुरल्या मांसानें शेकून तेंच मांस त्यावर बांधावें. ह्मणजे कर्णमूळसंबंधि सूज शीघ्र नाश पावते.

## सिधार्थादिलेप.

सित्धार्थसैंधववचाग्रहधूमाविश्वैःपिष्टैर्जलेननिशयासहितंसुसूक्ष्मं ॥
लेपोहितोरुधिरनिष्क्रमणेप्रभातेशोफव्रणस्यशमनःसरुजश्चकर्णे ॥

अर्थ– प्रथम कर्णमुळाच्या सुजेस जळवा लावून रक्त काढावें; आणि दुसऱ्या दिशीं प्रातःकाळीं त्यासुजेवर मोहोऱ्या, सैंधव, वेखंड, घरोसा, सुंठ, हळद हीं पाण्यांत वाटून त्यांचा लेप द्यावा. ह्मणजे तो सुजेला, व्रणाला आणि ठणक्याला शमवितो.

## रोहितकादिलेप.

लेपनरोहीतकपीलुसिंधुपुत्रींद्रवल्लीकटुहंजिकावा ॥ तुत्थाल
सर्पपशिलानवसारगंधकासीसकुष्ठपटुहंसपदीकरंजः ॥ लेपा
त्पलंकपयुताश्वसयावशूकानिःसंशयंसपदिकर्णकवेदनाघ्नाः ॥

**अर्थ**–रक्तरोडा, अक्रोडवृक्षाची साल, मोत्याची शिंप, कंवडळ, कारळीं, मोरचूत, हर्ताळ, शिरस, मनशीळ, नवसागर, गंधक, हिराकस, कोष्ठ कोळिंजन, मीठ, रक्तलाजाळू, करंज, गुग्गुळ व जवखार यांचा लेप कर्णमूळावर करावा. तो तत्काळ कर्णमूळाच्या वेदना दूर करितो.

## मरीचादिनस्य.

अशिशिरजलपरिमृदितंमरिचकणालवणजंरजस्त्वरितं ॥
नस्यविधौसेवितंकिलकर्णकरुङ्नाशनंगदितं ॥

अर्थ– ऊनपाण्यांत मिरें, पिंपळी व सैंधव उगाळून नस्य केलें; तर तें कर्णकाचा नाश त्वरित करील.

## कर्णकावर नस्य.

अशिशिरजलयुक्तंनावनंकर्णकातींजनयतिसुखसिद्धिंघ्राणरंध्र
प्रवेशात् ॥ लवणपरमकृष्णाचूर्णयुक्तंप्रभातेसकलमुनिभिरुक्तं
व्याधिविध्वंसकारि ॥

अर्थ– कर्णकावर सैंधव व पिंपळी यांचें चूर्ण गरम पाण्यांत घालून त्याचें नस्य प्रातःकाळीं द्यावें. तें सुखकारक आहे.

## सामान्यउपचार.

तंजयेच्छोणितस्रावैःसर्पिःपानप्रलेपनैः ॥
प्रदाहैःकफपित्तघ्नैर्वमनैःकवलग्रहैः ॥

अर्थ– रक्तस्राव, घृतपान, लेप, डाग, कफपित्तनाशकवमनें व तोंडांत गुळणा धरणें इत्यादिक उपचार सुजेवर करावे.

## कांजिकादिलेप.

कांजिकेनसुपिष्टंतुधूर्त्तबीजप्रलेपनं ॥
राजिकागुडमिश्रेणकर्णमूलेसुखावहं ॥

अर्थ– धोतऱ्याच्या बीया, मोहऱ्या व गुळ हीं एकत्र करून वांटून कांजींत कालवून लेप द्यावा. तो सुखप्रद आहे.

## उपचार.

रक्तस्रावोजलौकाभिर्घृतपानंचयुज्यते ॥

कर्णग्रंथिविनाशार्थमायुर्वेदविदांवरैः ॥

अर्थ– कर्णमूळास जळवा लावून रक्त काढावें; आणि घृत पाजावें. त्याणें बरें होतें. असे उपचार महावैद्य करितात.

## अन्न.

जीर्णानांरक्तशालीनांज्वरघ्नःक्काथसाधितः॥ प्रसृतस्त्वोदनोद्विस्त्रिः

कार्योयूषादिकोपिवा ॥ सचेज्जीर्यत्यविघ्नेनज्वरीजीवेत्तदाध्रुवं ॥

अर्थ– जुन्या तांबडया भाताचे तांदुळांचा ज्वरघ्नकाढयांमध्यें भात, किंवा यूष तयार करून द्यावा. तो जर त्यारोग्यास निर्विघ्नपणें जिरला; तर रोगी निःसंशय वांचेल.

## भुग्ननेत्रसन्नि० निदान.

ज्वरबलापचयस्मृतिशून्यताश्वसनभुग्नविलोचनमोहितः॥

प्रलपनभ्रमवेपथुशोथवान्त्यजतिजीवितमाशुसभुग्नदृक् ॥

अर्थ– ज्वरानें बलक्षय, स्मृतिनाश, श्वास, वक्रदृष्टि, मूर्छा, बडबड, भ्रम, कंप, हें लक्षणें भुग्ननेत्रसंनिपातांत होतात. हा रोगी त्वरित मरण पावतो.

## दार्व्यादिकाढा.

दार्वीपटोलाघनकंटकारीतिक्तानिशाबिंबफलत्रिकाणां ॥

क्काथोनियोज्योज्वरसंनिपातेविभुग्ननेत्रेप्रतिबोधनाय ॥

अर्थ– दारुहळद, कडुपडवळ, नागरमोथा, रिंगणी, कटुकी, हळद, कडुनिंब, हिरडा, बेहेडा व आवळकाठी यांचा काढा ज्वर व भुग्ननेत्रसंनिपात यांवर बोधनार्थ द्यावा.

## श्रेष्ठादिकाढा.

श्रेष्ठापटोलकटुकाघननिंबसुराव्हधावनीसहिताः ॥

घ्नंतिभृशंमोहंपित्तज्वरमुग्रसंनिपातोत्थं ॥

अर्थ– पिंपळी, कडुपडवळ, कटुकी, नागरमोथा, कडुनिंब, देवदार व रिंगणी यांचा काढा मोह, पित्तज्वर व संनिपातज्वर यांचा नाश करितो.

## यष्ट्यादिकाढा.

यष्टीपटोलकटुकाघनानिंबसुराव्हधावन्यः ॥

अपहरंतिमोहपित्तंज्वरमुग्रंसंनिपातोत्थं ॥

अर्थ—ज्येष्ठीमध, कडुपडवळ, कटुकी, नागरमोथा, कडुनिंब, देवदार व रिंगणी यांचा काढा मोह, पित्तज्वर व उग्र सन्निपातज्वर यांचा नाशक आहे.

## मरिचादिनस्य.

मरिचतुरगगंधामागधीसिंधुजातंलशुनमधुकसारैरुग्रगंधार्द्र
काभ्यां ॥ छगलकजलपिष्टंसंयुतंशास्त्रविद्भिःसपदिभवतिन
स्यंभुग्ननेत्रप्रमाथि ॥

अर्थ—मिऱ्यें, आस्कंध, पिंपळी, सैंधव, लसूण, मोहाचा चीक, वेखंड व आलें हीं बकऱ्याच्या मूत्रांत खलून, त्याचें नस्य केलें असतां; तें भुग्ननेत्रसन्निपाताला मंथन करणारें आहे.

## अश्वगंधादिनस्य.

तुरंगगंधालवणोग्रगंधामधूकसारोषकमागधीभिः ॥
बस्तांबुशुंठीलशुनान्विताभिर्नस्यंत्वसंभुग्नदृशंकरोति ॥

अर्थ—अश्वगंधा, मीठ, वेखंड, ज्येष्ठमध, डाळींब, त्रिकटु व लसूण यांचें बकऱ्याचे मुत्रांतून नस्य द्यावें. तें नेत्र स्वच्छ करील.

## भूनिंबादिअवलेह, अंजन व नस्य.

भूनिंबमाक्षिकवचासहितंचकुर्याल्लेहंकणोपणरसोनसुराजिकाभिः ॥
नेत्रांजनंचलवणोत्तमपिप्पलीभ्यांनस्यंवचामरिचहिंगुमधूकसारैः ॥

अर्थ—किराईत, मध, वेखंड, पिंपळी, मिऱ्यें, लसूण व मोहऱ्या यांचा अवलेह द्यावा; व मीठ आणि पिंपळी यांचें अंजन करावें; आणि वेखंड, मिऱ्यें, हिंग, ज्येष्ठीमध आणि डाळिंब यांचें नस्य करावें.

## मार्तंडभैरव रस.

शुद्धसूतसमंगंधंगंधात्पादांशटंकणं ॥ ताम्रपात्रेक्षिपेत्पिष्टंजयंत्यालोड
येद्द्रवैः ॥ शिग्रुमूलरसेनाथभावयेदष्टधातपे ॥ कटुत्रयस्यवासायाव
न्हिरुद्रजटाद्रवैः ॥ तिलपर्णीतथाजातीपिप्पलीपत्रमूलकैः ॥ द्रावैरे
वतुसप्ताहंशोष्यंशोष्यंविभावयेत् ॥ ताम्रपात्रात्समुत्धृत्यकृत्वागोलंवि
शोपयेत् ॥ वस्त्रेबध्दामृदाप्यत्रभूधरेस्वेदयेत्पुटे ॥ द्वियामांतेसमुत्धृत्यचू
र्णयेदौषधैःसह ॥ विषकर्पूरजात्येलारसस्यदशमांशतः ॥ भावयेद्विजयाद्रा
वैर्दिनमेकंचमर्दयेत् ॥ चतुर्गुंजासकर्पूरमधुनासन्निपातजित् ॥ मार्तंडो
यंरसोनामअसाध्यंसाधयेत्ध्रुवं ॥ दशमूलंपिबेच्चानुपथ्यंस्यान्मुद्गयूपकैः

अर्थ–पारा एकभाग, गंधक एकभाग, टांकणखार चतुर्थांश, एकत्र करून ताम्रपात्रांत घालून टाकळीच्या रसाच्या व शेवग्याच्या मूळाचे रसाच्या आठआठ भावना उन्हांत द्याव्या; आणि त्रिकटु, अडुळसा, चित्रक, ईश्वरी, तिलपर्णी, जातिपत्र, पींपळीचें पान व मूळ, यांच्या रसाच्या प्रत्येकीं सातसात भावना देऊन घोटून सुकवावें. याप्रमाणें करून नंतर ताम्रपात्रांतून काढून त्याचा गोळा करून सुकवून मातकापड करून भूधरयंत्रांत दोन प्रहर पचन करावा. शीत जहाल्यावर काढून बारिक घोटून त्यांत बचनाग, कापूर, जातिपत्र व एलची हे पदार्थ पाऱ्याच्या दशांश घालून भांगेच्या काढ्यांत एकदिवस घोटावें. ह्मणजे तो मार्तंडरस जाहला. तो चार गुंजा मध व कापूर यांशीं देऊन मागून दशमुळांचा काढा द्यावा. तो असाध्य अशाही सन्निपाताचा नाश करितो.

## रक्तष्ठीवीसंनिपातनिदान.

रक्तष्ठीवीज्वरवमितृषामोहशूलातिसारहिक्काध्मानभ्रमणदवथुश्वा
ससंज्ञाप्रणाशः ॥ श्यामारक्ताधिकतररसनामंडलोत्थामरूपारक्तष्ठी
वीनिगदितइहप्राणहंताप्रसिद्धः ॥

अर्थ–रक्तओकणें, ज्वर, वांति, ताहान, मूर्छा, शूळ, अतिसार, उचकी, पोटफुगी, भोवळ, तलखी, दमा, चित्तभ्रम, जिव्हा काळी किंवा तांबडी व तीजवर मंडळें उठणें अशा लक्षणानीं जो युक्त त्याला रक्तष्ठीविसंनिपात ह्मणतात. हा संनिपात प्राणनाशक ह्मणून प्रसिद्ध आहे.

## पर्पटादिकाढा.

पर्पटकधन्वयासकवासाभूतृणकैःकटुकीफलनस्यं ॥
शर्करयासहितोपिकषायोलोहितमास्यगतंविनिहंति ॥

अर्थ–पित्तपापडा, धमासा, अडुळसा, सुगंधिरोहिसतृण यांचा काढा साकर घालून द्यावा; आणि कंकोळाचें चूर्ण करून त्याचें नस्य करावें, तें मुखांतलें रक्त दूर करितें.

## जलदादिकाढा.

जलदाव्हयपद्मकपर्पटकमलयोद्भवजातिवरीमधुकैः ॥
मधुनिंबजलानलचंदनकैःक्वथितंसुखरक्तदरंसलिलं ॥

अर्थ–नागरमोथा, पद्मकाष्ठ, पित्तपापडा, चंदन, जाई, शतावरी, ज्येष्ठीमध, मकडुनिंब, वाळा, चित्रक व रक्तचंदन यांचा काढा मुखांतील रक्त बंद करील.

## रौहिषादिकाढा.

रौहिषधन्वयासवासकवासापर्पटगंधलताकटुकाभिः ॥
शर्करयासममेषकषायःक्षतजष्ठीविनउदितउपायः ॥

अर्थ–सुगंधतृण, धमासा, अडुळसा, पित्तपापडा, सांवे व कटुकी यांचा काढा साकरेशीं द्यावा. तो रक्तष्ठिवीस शमवितो.

## पद्मादिकाढा.

पद्मकचंदनपर्पटमुस्ताजातिवराहणचंदनवारि ॥
क्लीतकनिंबयुतंपरिपक्कंवारिभवेदिहशोणितहारि ॥

अर्थ–पद्मक, चंदन, पित्तपापडा, नागरमोथा, जाईचा पाला, त्रिफळा, रक्तचंदन, वाळा, ज्येष्ठमध व कडुनिंब यांचा काढा मुखावाटे जें रक्त पडतें; त्याचा नाश करितो.

## मधुकादिकाढा.

मधुकमधूकपरूषकषायश्चंदनपल्लवदारुसनाथः ॥
श्रीपर्णीफलशीतकषायःससितइहस्यादस्रजयाय ॥

अर्थ–मोहोटी, ज्येष्ठमध, फालसा, रक्तचंदन, पत्रक, देवदार व सालवणीची फळें यांचा काढा शीतळ करून साकरेशीं दिला असतां; तो रक्त बंद करितो.

## दूर्वादिनस्य.

देयंदूर्वारसैर्नस्यंरसैर्दाडिमपुष्पजैः ॥
अथवात्रिफलादूर्वाजलंरक्तहरंपरं ॥

अर्थ–दूर्वाच्या रसाचें किंवा डाळिंबाच्या फुलांचें किंवा त्रिफला व दूर्वा यांच्या रसाचें नस्य द्यावें. तें रक्तष्ठीवीनाशक आहे.

## आम्रादिनस्य.

आम्रास्थिचपलांडुर्वानासिकाच्युतरक्तजित् ॥

अर्थ–आंब्याच्या बाठीचें किंवा कांद्याच्या रसाचें नस्य द्यावें. तें नासिकारक्ताला जिंकील

## चिकित्सा.

पंचवक्त्रोरसोप्यत्रदेयोगुंजाद्वयोहितः ॥
भस्मेश्वरोरसोवाथमाषैकंसंनिपातजित् ॥

अर्थ–पंचवक्त्ररस दोन गुंजा, अथवा भस्मेश्वर एकमासा द्यावा. तो रक्तष्ठीवीनाशक आहे.

## रक्तष्ठीवीचिकित्सा.

रक्तमारेश्वरोदेयोरसोगुंजाद्वयंघृतैः॥ सनागरोनिहंत्याशुसंनिपातंसुदारुणं ॥ अनुपानविशेषाच्चतप्तंवारिपलद्वयं ॥ दध्यन्नं दापयेत्पथ्यंतृषार्तेशीतलंजलं ॥

अर्थ– रक्तभैरेश्वर घृताशीं व सुंठीचे चूर्णाशीं दोन गुंजा द्यावा. अनुपानविशेषीं उष्णोदकहि मागून आठ तोळे द्यावें. पथ्यास दहीभात द्यावा, व अतितृषा असल्यास शीतोदक द्यावें.

## सोमपाणी रस.

सूतनिष्कंगंधनिष्कंमर्दयेच्चित्रकद्रवैः ॥ माषैकंमृततीक्ष्णंस्यान्मृतंशुल्बंच माक्षिकं ॥ माषैकैकंचसंमिश्र्यपूर्वसूतेथमर्दयेत् ॥ धत्तूरत्रिफलाकन्यावृद्धादार्व्यार्द्रकद्रवैः॥ कोशाम्रकस्यमंडूक्यानिर्गुंड्याभृंगिचित्रकैः ॥ वयस्थापिचवातारिशक्रासनद्रवैरपि॥ प्रतिद्रावंपलैकैकंदत्वास्वल्पंविमर्दयेत् ॥ रसांशंत्र्यूषणंक्षिप्त्वाचणमात्रावटीकृता ॥ तांमिश्रसंनिपातार्तेदापयेज्जीरकद्रवैः ॥ कषायःपंचमूलानामनुपानंप्रशस्यते ॥ दध्यन्नंदापयेत्पथ्यंतृषार्तेशीतलंजलं ॥ संनिपातंनिहंत्याशुसोमपाणिरसोवरः ॥

अर्थ– पारा व गंधक चार चार मासे घेऊन त्यानां चित्रकाच्या रसांत खलावें. नंतर एकमासा तिख्याचें भस्म, एकमासा ताम्रभस्म व एकमासा माक्षिक शुद्ध हीं एकत्र करून त्यांत मिसळून धोत्रा, त्रिफला, कोरफड, वृद्धदारु, आलें, लाल आंबा, भेकपर्णी निर्गुंडी, माका, चित्रक, आवळे, एरंडमूळ, व इंद्रजव, यांच्या एकपल काढयांत, किंवा रसांत घोंटावीं; नंतर पाऱ्याचा समभाग त्रिकटुचूर्ण घालून चण्याएवढी गोळी करावी. ती रक्तष्ठीवीसंनिपातावर जिऱ्याचा काढयाशीं द्यावी; आणि मागून पंचमूळांचा काढा द्यावा, व दहिभात पथ्याला द्यावा; व अतितृषा असल्यास शीतोदक द्यावें. हा सोमपाणीरस संनिपाताला त्वरित दूर करितो.

## प्रलापकसंनिपातनिदान.

कंपप्रलापपरितापनशीर्षपीडाप्रौढप्रभावपवमानपरोन्यचिंता ॥
प्रज्ञाप्रणाशविकलप्रचुरप्रवादःक्षिप्रंप्रयातिपितृपालपदंप्रलापी ॥

अर्थ–कंप, बडबड, संताप, कपालशूल, प्रौढगोष्टी सांगणें, स्वच्छपणाविषयीं आसक्ति दुसऱ्याची काळजी, बुद्धिनाश विकलता, असंगत फार बोलणें, अथवा वाद करणें. या लक्षणांनीं प्रलापक संनिपात जाणावा- तो रोग्यास लवकर यमसदनास पाठवितो.

## मुस्तादिकाढा.

मुस्तवारिदशमूलनागरंपर्पटोमलयजंधवत्वचः ॥
वासकःकृतसमानविभागःक्वाथएवहरतिप्रलापकं ॥

अर्थ–नागरमोथा, वाळा, दशमुळें, सुंठ, पित्तपापडा, रक्तचंदन, धावडयाची साल अडुळसा या समभाग औषधांचा काढा प्रलापकसंनिपाताचा नाश करितो.

## तगरादिकाढा.

तगरतुरगगंधापर्पटीशंखपुष्पीत्रिदशविटपितिक्ताभारतीभू
तकेशी ॥ जलधरकृतमालश्वेतकीगोस्तनीभ्यांसहहरतिकषा
योमंक्षुपानात्प्रलापं ॥

अर्थ-तगर, आस्कंध, कुंभा, शंखाहुली, देवदार, कटुकी, ब्राह्मी, जटामांसी, नागरमोथा, बाहवा, हिरडा व द्राक्षे, यांचा काढा प्रलापकसंनिपाताचा त्वरित नाश करितो.

## जलधरादिकाढा.

जलधरदशमूलंवारिशुंठीसमेतंमलयजकृतमालंवासकंपर्पटंच ॥
समधरणघृतांशःक्वाथएषप्रभातेशमयतिसमुदीर्णंपीतमात्रःप्रलापं ॥

अर्थ-नागरमोथा, दशमूळें, वाळा, सुंठ, चंदन, बाहवा, अडुळसा, व पित्तपापडा, हीं प्रत्येक पावतोळा घेऊन त्यांचा काढा घेतला असतां; तो शीघ्र प्रलापकसंनिपात शमवील.

## दुसरा तगरादिकाढा.

सतगरवरतिक्तारेवतांभोधतिक्तानलदतुरगगंधाभारतीहारहूराः ॥
मलयजदशमूलीशंखपुष्प्यःसुपक्वाःप्रलपनमवहन्युःपानतोनातिदूरात् ॥

अर्थ-तगर, पाहाडमूळ, बाहव्याचा मगज, नागरमोथा, कटुकी, जटामांसी, अश्वगंध, ब्राह्मी, द्राक्षें, चंदन, दशमूळें व शंखाहुली, यांचा काढा प्यावा. तो प्रलापक सन्निपाताला त्वरित हारितो.

## उपचार.

सांत्वनैरंजनैर्नस्यैस्तीक्ष्णैस्तिमिरसेवनैः ॥
सर्वतोविकृतंचित्तमस्यप्रकृतिमानयेत् ॥

अर्थ-सांत्वभाषण, अंजन, तीक्ष्ण नस्य, अंधकारनाश, या उपायांनीं विकृत झालेलें चित्त प्रकृतिवर आणावें.

## मृतोत्थापनरस.

शुद्धसूतंद्विधागंधंशिलाचविषहिंगुलौ ॥ मृतकांताभ्रताम्रायस्तालकं
माक्षिकंसमं ॥ आम्लवेतसजंबीरचांगेरीनागरेणच ॥ निर्गुंड्याहस्त
शुंड्याश्चरसैर्मर्द्यदिनद्वयं ॥ रुध्वाथभूधरेपक्त्वादिनांतेतत्समुद्धरेत् ॥
चित्रकस्यकषायेणमर्दयेत्प्रहरद्वयं ॥ माषमात्रंप्रदातव्योहिंगुत्र्यूषार्द्र

कद्रवैः ॥ सकर्पूरानुपानैःस्यान्मृतोत्थापनकोरसः ॥ पीडितःसन्निपातेनगतोवापियमालयं ॥ तत्क्षणाज्जीवदःसत्यंपथ्यंक्षीरंप्रयोजयेत् ॥

अर्थ—शुद्ध पारा एकभाग, गंधक दोनभाग, मनशीळ, बचनाग, हिंगूळ, कांतभस्म, ताम्रभस्म, हरताळ व माक्षिक, हीं एकेक भाग घेऊन एकत्र करून त्यांला आम्लवेतस, लिंबु, चुका, आलें, निर्गुंडी, या प्रत्येकाच्या रसांत एकेक दिवस व मुंडीच्या रसांत दोन दिवस खलून, शरावांत घालून मातकापड करून भूधरयंत्रांत चार प्रहर पचन करावीं. सायंकाळीं काढून चिकाच्या काढ्यांत दोन प्रहर मर्दन करावीं. ह्मणजे तो मृतोत्थापन रस होतो. त्यांतून एक मासा आल्याचा रसांत हिंग, त्र्यूषण व कापूर घालून द्यावा. ह्मणजे सन्निपातानें मृतप्राय जाहला असतांही त्यास तत्क्षणीं सावध करितो. यावर दूधभात पथ्यास द्यावा.

## जिव्हकसंनिपातनिदान.

श्वसनकासपरितापविव्हलःकठिनकंटकवृतोतिजिव्हकः
बधिरमूकबलहीनलक्षणोभवतिकष्टतरसाध्यजीवकः ॥

अर्थ—खोकला, श्वास, संताप यांणीं विव्हल, कठीन व कंटकयुक्तजिव्हा, बेहरेपणा, मूकत्व, आणि बलहानि या लक्षणांनींयुक्त असा जिव्हकसन्निपात कष्टसाध्य आहे.

## उग्रादिकाढा.

उग्रासिंहीयासरास्नामृताव्हाशुंठीतिक्ताशृंगिकापौष्कराणां ॥
ब्राह्मीभार्गीतिक्तवासासठीनांक्वाथोहन्याज्जिव्हकंसंनिपातं ॥

अर्थ—वेखंड, रिंगणी, धमासा, रास्ना, गरुडवेल, सुंठ, कटुकी, कांकडशिंगी, पुष्करमूळ, ब्राह्मी, भारंगमूळ, किराइत, अडुळसा व कचोरा, यांचा काढा जिव्हकसन्निपातनाशक आहे.

## क्षुद्रादिकाढा.

क्षुद्रानागरपुष्करामृतलताब्राह्मीवचासुव्रताभार्गीवासकयासतोयसुरसाक्वाथोजयेज्जिव्हकं ॥ विश्वाचर्मविभावरीयुगवरावत्सादनीवारिदव्याघ्रीनिंबपटोलपुष्करजटारुक्दारुभिर्वाकृतः ॥

अर्थ—रिंगणी, सुंठ, पुष्करमुळ, गरुडवेल, ब्राह्मी, वेखंड, कापूरकचरी, भारंगमूळ अडुळसा, धमासा, वाळा, तुळसी यांचा अथवा सुंठ, पित्तपापडा, हळद, दारुहळद त्रिफळा, गुळवेल, नागरमोथा, रिंगणी, कडुनिंब, कडुपडवळ, पुष्करमूळ, कोष्ठ व देवदार यांचा काढा द्यावा. तो जिव्हकसन्निपाताला जिंकितो.

## सिंह्यादिकाढा.

सिंहीनागरपुष्करैःसकटुकैरास्नागुडूचीयुतैर्भार्गीकर्कटशृंगिका
सठिसमैर्दुःस्पर्शवासाघनैः ॥ पीतंजिव्हकहारिवारिभवतिब्रा
ह्मीवचामिश्रितैःप्रोक्तंवैद्यवरेणवंद्यमुनिभिर्भूनिंबमिश्रंशृतं ॥

अर्थ-रिंगणी, सुंठ, पुष्करमूळ, कटुकी, रास्ना, गुळवेल भारंगमूळ, काकडशिंगी, कचोरा, धमासा, अडुळसा, नागरमोथा, ब्राह्मी, वेखंड व किराईत, यांचा काढा जिव्हकसन्निपाताला हरण करितो.

## देवदार्वादिकाढा.

सुरतरुकटुनिंबैरक्षपथ्यापटोलीरजनियुगुलविश्वासिंहिकापु
ष्कराव्हैः ॥ सलिलधरगुडूचीवासकःसर्वमेभिःप्रशमयतिक
पायोजिव्हकंकष्टसाध्यं ॥

अर्थ-देवदार, कडुनिंब, बेहेडा, हिरडा, कडुपडवळ, हळद, दारुहळद, सुंठ, रिंगणी, पुष्करमूळ, नागरमोथा, गुळवेल व अडुळसा यांचा काढा कष्टसाध्य अशा जिव्हकाचा नाशक आहे.

## किरातकवल.

किराततिक्ताकुलकृत्कलिंजकर्चूरकृष्णाकटुतैलयुक्तः ॥ अम्ल
द्रवःसंशमयेद्रसज्ञादोषांस्तुतोदाशरथिर्यथाघं ॥

अर्थ-किराईत, अक्कलकारा, कोळिंजन, कचोरा व पिंपळी यांचें चूर्ण शिरसांचें, तेल व मातुलुंगरस एकत्र करून मुखांत धरावा. त्याणें जिव्हेचा दोष शमवितो. जसा रामचंद्र स्तविला असतां पाप शमवितो तसा.

## शालूरपर्ण्यादिअवलेह.

शालूरपर्णीमालूरमूलामयमधुप्लुता ॥
शंबूकपुष्पीसहितासेव्यावाचांविशुद्धये ॥

अर्थ-कमळकंद, पिठवण, कोष्ठ व शंखपुष्पी यांचें चूर्ण मध घालून चाटण करून घ्यावें. तें वाणी शुद्ध करितें.

## त्रिपुरभैरवरस.

विश्वाभर्मविभावरीयुगवरावत्सादनीवारिदव्याघ्रीनिंबपटोल
पुष्करजटादारुभिर्वाकृतः ॥ विषमहौषधमागधिकोषणा

शुमणिरक्तकमार्द्रकमर्दितं ॥ क्रमविवर्धितमुद्गलितंज्वरंत्रिपुर
भैरवएषरसोवरः ॥

अर्थ–सुंठ, सुवर्ण, दारुहळ, हळद, त्रिफला, गुळवेल, नागरमोथा, रिंगणी, कडुलिंब, कडुपडवळ, पोखरमूळ कोष्ट व तेल्यादेवदार, यांचा काढा द्यावा. ह्मणजे तो जिव्हकसंनिपातनाशक आहे; अथवा बचनाग, सुंठ, पिंपळी, गजपींपळी, रई, व रक्त एरंड हीं औषधें पहिले एकभाग, व दुसरें दोनभाग व तिसरें तीनभाग याप्रमाणें क्रम वृद्धीनें घेऊन आल्याच्या रसांत खलून ठेवावें. त्याला त्रिपुरभैरवरस ह्मणतात. यांचें चाटण जिव्हकसन्निपाताचा नाश करितें.

## सामान्यउपचार.

गुंजैकंमधुनाप्यत्रदेयोह्यानंदभैरवः ॥
दध्यन्नंदापयेत्पथ्यंत्रिनेत्राख्योरसोहितः ॥

अर्थ–आनंदभैरव मधाशीं द्यावा; आणि दहींभात पथ्याला द्यावा; किंवा त्रिनेत्राख्य रस द्यावा. ह्मणजे तो जिव्हकसन्निपातनाशक होतो.

## अभिन्याससन्निपातनिदान.

दोषत्रयस्निग्धमुखत्वनिद्रावैकल्यनिश्चेष्टनकष्टवाग्मी ॥
बलप्रणाशःश्वसनादिनिग्रहोभिन्यासउक्तोननुमृत्युकल्पः ॥

अर्थ–दोषत्रयांच्या विकोपानें तोंडावर तुळतुळितपणा, झोंप, अंग गळणें, निश्चेष्टपणा, शद्बबोलण्यास आयास लागणें, बलनाश, दमकोंडणें, हीं लक्षणें अभिन्याससंनिपातांत होतात. हा केवळ मृत्यूच आहे.

## औषधांचा अवधि.

यावच्छ्वसितेजीवोयावन्नामतिभेषजं ॥
तावत्क्रियाप्रकर्तव्यादैवस्यकुटिलागतिः ॥

अर्थ–जोंपर्यंत रोगी श्वासोश्वास सोडितो आहे; आणि औषध घशानें उतरत आहे. तोंपर्यंत औषधाविषयीं उपेक्षा करूं नये. कांतर दैवगति विचित्र आहे. याकरितां कदाचित रोगी वांचू शकेल.

## यास दृष्टांत.

दुर्गंभसियथामज्जन्भाजनंत्वरयाबुधः ॥ गृण्हीयात्तलमप्राप्तं
तथाभिन्यासपीडितं ॥ निद्रोपेतमभिन्यासंक्षिप्रंविद्याद्गतौजसं ॥

अर्थ–खोल पाण्यांत भांडें पडलें असतां तळास पोंचण्याच्या पूर्वी जसें काढावें. तसा

अभिन्यास पीडिताला लौकर उपचार करावा. अभिन्यासामध्यें निद्रा आलि, ह्मणजे तो हीनवीर्य जाणावा.

## सामान्यउपचार.

सन्निपातांतकश्चात्रमाषैकंदापयंद्रसं ॥
पथ्यंपूर्वोदितंदेयंरसोह्यानंदभैरवः ॥

अर्थ—अभिन्याससन्निपातावर एक मासाभार सन्निपातांतक रस द्यावा; किंवा आनंदभैरव द्यावा. पथ्य पूर्वोक्त द्यावें.

## सिंव्ह्यादिकाढा.

सिंहिव्याग्रीमृताद्राक्षाअजाजीसकटुत्रिकं ॥ शृंगीविडंगंचस
मंपक्त्काविश्राव्यसाधयेत् ॥ घृताक्तैस्तंडुलैर्भ्रष्टैःपेयामुष्णांज्वरी
पिबेत् ॥ हिक्काश्वासीचकासीचतथाभिन्यासपीडितः ॥ विबद्ध
वातविण्मूत्रोपानमस्मिन्प्रयोजयेत् ॥

अर्थ—रिंगणी, डोरली, गुळवेल, द्राक्षे, जिरे, सुंठ, मिरीं, पिंळी, कांकडशिंगी व वावडिंग यांचा काढा करून त्या काढयानें तांदूळ तुपांत भाजून त्यांची पेज करावी; आणि ती ऊन ऊन अशी ज्वरिताला द्यावी; ह्मणजे उचकी, श्वास, कास, अभिन्याससंनिपात, आणि वायु, मळ, मूत्र यांचा अवरोध हीं दूर होतात.

## रिंगण्यादिकाढा.

बृहतीपौष्करंभार्गीसठीशृंगीदुरालभा ॥
पक्त्कापानंप्रशंसंतिश्लेष्मातेनोपशाम्यति ॥

अर्थ—रिंगणी, पुष्करमूळ, भारंगमूळ, कचोरा, कांकडशिंगी, धमासा, यांचा काढा द्यावा, ह्मणजे त्याणें श्लेष्मा शांत होतो.

## त्रिवृतादिकाढा.

त्रिवृद्विशालात्रिफलाकटुकारग्वधैःकृतः ॥
सक्षारोभेदनःक्वाथोज्ञेयःसर्वज्वरापहः ॥

अर्थ—तेड, कडुवृंदावन, हरडा, बेहेडा, आवळकाठी, कुटकी व बाहव्याचा मगज यांचा काढा, आंत यवखार घालून द्यावा. तो रेचक व सर्वज्वरनाशक आहे.

## त्रायंत्यादिकाढा.

त्रायंतीदशमूलपुष्करजटावातारिभिःक्लरवभिर्भार्गीस्यादमृताट

रूषकशठीगोमूत्रसंयोजितैः ॥ शृंगीव्योषपुनर्नवाभिरचिरादु
ष्णःकषायोहरेत्साभिन्यासगदंकफज्वरहरंनिःसंशयंपाययेत् ॥

अर्थ–त्रायमाण, दशमुळें, पोखरमूळ, एरंड, ओंवा, भारंगमूळ, गुळवेल, अडुळसा, कचोरा, कांकडशिंगी, सुंठ, मिरीं, पिंपळी, पुनर्नवा, यांचा गोमूत्रांत काढा करून किंचितूउष्ण आहे तोंपर्यंत द्यावा, ह्मणजे तो अभिन्याससन्निपातज्वराचा नाश करील.

## सुरभ्यादिकाढा.

सुरभिसलिलयुक्तःसिंहिकाश्रीफलाभ्यांप्रवरलवणयासोविश्व
पाषाणभेदैः ॥ पवनरिपुजटाभिःसंयुतःक्काथएषांप्रतिदिनमपि
पीतोहंत्यभिन्यासशूलं ॥

अर्थ– रिंगणी, बेलफळ, सैंधव, धमासा, सुंठ, पाषाणभेद, एरंडमूळ, यांचा काढा करून गोमूत्राबरोबर द्यावा; ह्मणजे अभिन्याससन्निपात व शूल यांचा नाश करील.

## शृंग्यादिकाढा.

शृंगीभांर्ग्यभयाजाजीकणाभूनिंबपर्पटैः ॥ देवदारुवचाकुष्ठयासकट्फ
लनागरैः ॥ मुस्तधान्याकतिक्तेंद्रयवपाठाहरेणुभिः ॥ हस्तिपिप्पल्यपा
मार्गपिप्पलीमूलचित्रकैः॥ विशालारग्वधारिष्टशठीवाकूचिकाफलैः॥
विडंगरजनीदार्वीयवानीद्वयसंयुतैः ॥ समांशैर्विहितःक्काथोहिंग्वार्द्रकर
सान्वितः ॥ अभिन्यासज्वरंघोरंहंतितंद्रांचतत्क्षणात् ॥ प्रमोहंकर्णमूलं
चसन्निपातांस्त्रयोदश ॥ हिक्काश्वासंचकासंचतथासर्वानुपद्रवान् ॥

अर्थ– कांकडशिंगी, भारंगमूळ, हिरडे, जिरें, पिंपळी, किराईत, पित्तपापडा, देवदार वेखंड, कोष्ठ, धमासा, कायफळ, सुंठ, नागरमोथा, धने, कुटकी, इंद्रजव, पाहाडमूळ रेणुकबीज, गजपिंपळी, आघाडा, पिंपळी मूळ, चित्रक, कडुवृंदावन, बाहव्याचा मगज कडुनिंब, कचोरा, बावंची बीज, वावडिंग, हळद, दारुहळद, ओंवा व चोरओंवा हीं औषधें समभाग घेऊन त्यांचा काढा करून त्यांत हिंग व आल्याचा रस घालून घेतल असतां अभिन्याससन्निपातज्वर; झांपड, मोह, कर्णमूळ, तेरा प्रकारचे सन्निपात, उचकी, श्वास, खोकला, आणि ज्वराचे सर्व उपद्रव, यांचा नाश करितो.

## शृंग्यादिकाढा,

शृंगीधन्त्रयवासपुष्करजटाभार्गीशठीसिंहिका
क्काथःपानविधानतःकफहराभिन्यासविध्वंसकः ॥

**अर्थ**– कांकडशिंगी, लाल धमासा, पुष्करमूळ, भारंगमूळ, कचोरा, रिंगणी, यांचा काढा प्राशन केला असतां कफ व अभिन्याससन्निपात यांचा नाश करितो.

## तिक्तादिकाढा.

तिक्ताभयाबृहद्दंतीत्रायंतीराजवृक्षकः ॥
क्षाराढ्यःसैंधवोपेतःक्वाथोभेदीज्वरापहः ॥

**अर्थ**– कटुकी, हिर्डे, थोरदांती, त्रायमाण व बाहव्याचा मगज यांचा काढा यवक्षार व सैंधव घालून द्यावा; तो भेदी व ज्वरनाशक आहे.

## व्याघ्र्यादिकाढा.

व्याघ्रीदुरालभाभार्गीसठीशृंगीसपौष्करं ॥
पत्क्वांबुश्लेष्महृदयमभिन्यासप्रशांतये ॥

**अर्थ**– रिंगणी, धमासा, भार्गी, कचोरा, कांकडशिंगी व पुष्करमूळ यां औषधांचा काढा करून घ्यावा; ह्मणजे कफ, उदरदुखणें व अभिन्याससन्निपात हीं शांत होतात.

## भार्ग्यादिकाढा.

भार्गीपुष्करमूलंचरास्नाबिल्वंसमुस्तकं ॥ नागरंदशमूलं चपिप्पल्याविश्वसाधितं ॥ हिंग्वार्द्रकरसोपेतंपीप्पलीचूर्णसंयुतं ॥ सन्निपातज्वरंघोरमभिन्यासंचदारुणं ॥ हृत्पार्श्वशूलमात्राहंसद्यःपीतंनियच्छति ॥

**अर्थ**– भार्गी, पुष्करमूळ, रास्ना, बेलफळ, नागरमोथे, सुंठ, दशमूळ, पिंपळी, अतिविष या औषधांचा काढा करून त्यांत हिंग, आल्याचा रस व पिंपळीचें चूर्ण मिळवून द्यावा. तो सन्निपातज्वर, अभिन्यास, हृदय व पार्श्व यांतील शूल यांचा नाश करितो.

## बीजपूरादिकाढा.

बीजपूरकबिल्वाश्मभेदकंबृहतीद्वयं ॥ सकार्षिकंतथैरंडजले चाष्टगुणेशृतं ॥ पक्कंगोमूत्रसंयुक्तंबिडसौवर्चलान्वितं ॥ हृद्बस्तिशूलेसानाहेअभिन्यासेज्वरेहितं ॥

**अर्थ**–महाळुंग, बेलफल, पाषाणभेद, रिंगणी, डोरली, हीं प्रत्येकीं एकेक तोळा घेऊन त्यांत आठ तोळे एरंडमूळ टाकून त्याचा आठपट पाण्यांत काढा करून आंत गोमूत्र, बिडलोण व पादेलोण घालून द्यावा. तो हृदय व बस्ति यांतील शूल, मलबद्धता व अभिन्यासज्वर यांवर हितकारक आहे.

## मातुलुंगादिकाढा.

मातुलुंगाश्ममिद्बिल्वव्याघ्रीपाठारूबूकजः ॥
क्वाथोलवणमूत्राढ्योभिन्यासानाहशूलनुत् ॥

अर्थ–महाळुंग, पाषाणभेद, बेलाचा मगज, रिंगणी, पाहाडमूळ, एरंडमूळ यांचा काढा गोमूत्रांत मीठ घालोन व शिजऊन द्यावा. ह्मणजे अभिन्यास, पोटफुगणें व शूल हे रोग दूर होतात.

## कारव्यादिकाढा.

कारवीपौष्करेरंडत्रायंतीनागरामृता ॥ दशमूलसठीशृंगीवा
साभार्गीपुनर्नवा ॥ तुल्यामूत्रेणनिःक्वाथ्यपीतोश्रोतोविशोधनी ॥
अभिन्यासज्वरायासमाशुघ्नंतिसमुद्धतं ॥

अर्थ–तिळवण, पुष्करमूळ, एरंडमूळ, त्रायमाण, सुंठ, गुळवेल, दशमुळें, कचोरा, कांकडशिंगी, अडुळशाची पानें, भारंगमूळ व पुनर्नवा, यांचा गोमूत्रांत काढा करून द्यावा. तो नाडीचें शोधन करून अभिन्यासज्वर दूर करितो.

## पटोलादिगुळण्या.

पटोलपत्रंबृहतीसुपवींकंटकारिका ॥ मरीचंपिप्पलीबिल्वं
चिरिबिल्वंसचित्रकं ॥ करंजबीजंमंजिष्ठात्रायंतीविश्वभेषजं ॥
गलप्रबोधनंश्रेष्ठमभिन्यासज्वरापहं ॥

अर्थ–कडूपडवळाचा पाला, रिंगणी, आंवा, डोरली, मिरीं, पिंपळी, बेलफळ, करंज साल, चित्रक, करंजबीज, मंजिष्ठा, त्रायमाण व सुंठ, यांचा काढा करून त्याच्या गुळण्या करवाव्या, ह्मणजे गळा साफ होऊन अभिन्यासज्वर शांत होईल.

## जयमंगलरस.

मृतसूताभ्रकंनिंबक्षीरंमरिचमुंडकं ॥ तालकंमाक्षिकंव्योषंवि
षंटंकणचित्रकं ॥ समांशंमर्दयेत्खल्वेपाठानिर्गुंडिबिल्वजैः ॥
द्रवैर्यष्ट्यादिनैकंतुरुध्वापाच्यंतुभूधरे॥ पुटैकेनभवेत्सिद्धोरसो
यंजयमंगलः ॥ दशमूलकषायेणमाषैकःसन्निपातजित् ॥ अं
जनेवाथवानस्येअभिन्यासांतकोभवेत् ॥

अर्थ–पारदभस्म, अभ्रकभस्म, बकाणानिंब, मिरीं, मुंडलोह, हरताळ, माक्षिक सुंठ, मिरीं, बचनाग, टांकणखार व चित्रक, हे पदार्थ समभाग घेऊन ते पाडळ

निर्गुंडी, बेल, आणि ज्येष्टीमध यांच्या रसांत किंवा काढ्यांत घालून पणतींत घालून मातकापड करून त्यास भूधरयंत्रांत एक दिवस पुट द्यावें; ह्मणजे जयमंगलरस सिद्ध होतो. तो दशमुळांच्या काढ्यांत एक मासा द्यावा; ह्मणजे सन्निपाताचा नाश करितो व याचेच अंजन किंवा नस्य केलें असतां अभिन्याससन्निपाताचा नाश करितो.

## स्वच्छंदनामकरस.

शुद्धसूतंद्विधागंधंसूतांशंमृतहेमकं ॥ मृतरौप्यंचताम्रंचसततु
ल्यंपृथक्पृथक् ॥ सूर्यावर्तस्यनिर्गुंड्यास्तुल्यंचाद्रार्द्रकद्रवैः ॥
भृंगोन्मत्ताखुकर्णीनामग्निकर्ण्याग्निमथयोः ॥ तिलपर्णीचित्र
कयोःकाकमाच्यारसैःसह ॥ मर्दयेत्रिदिनंखल्वेशुष्कंपित्तैर्वि
भावयेत् ॥ मच्छमाहिषवाराहछागमायूरजैर्दिनं ॥ अंधमूषा
गतंपाच्यंवालुकायंत्रगैर्दिनं ॥ आदायचूर्णितंखादेन्मापैकंचा
र्द्रकद्रवैः ॥ निर्गुंड्यादशमूलानांकषायंमरिचंपिबेत् ॥ अभि
न्यासंनिहंत्याशुरसःस्वच्छंदनामकः ॥ पथ्यंस्यान्मुद्गयूषेण
क्षीरैर्वाज्यैर्विधापयेत् ॥

अर्थ—शुद्ध पारा एक भाग, शुद्ध गंधक दोन भाग, सुवर्णभस्म एक भाग, रौप्यभस्म एक भाग व ताम्रभस्म एक भाग, हीं एकत्र करून त्यांचा निळा माका, निर्गुंडी, आलें, माका, धोतरा, उंदीरकानी, अग्निकर्णी, टाकळा, तिलपर्णी, चित्रक व कावळी, यांच्या रसांत तीन दिवस खल करून सुकल्यावर त्यास मासा, माहिष, डुकर, बोकड व मोर यांच्या पित्ताची एकेक दिवस भावना द्यावी; आणि अंधमूषेंत घालून वालुकायंत्रांत एक दिवस पचन करावीं; ह्मणजे स्वच्छंदनामक रस तयार झाला. त्याचें चूर्ण आल्याच्या रसाशीं एक मासा द्यावें. मागून निर्गुंडी व दशमूळें यांचा काढा द्यावा. ह्मणजे तो अभिन्याससन्निपाताचा नाश करितो. पथ्याला मुगांचा यूष, दूध व तूप द्यावें.

## मातुलुंग्यादिरस.

मातुलुंगरसंतस्यहिंगुशुंठीयुतंमुखे ॥
दद्यात्प्रधमनंतीक्ष्णंकटुतीक्ष्णोपसंहितं ॥ १ ॥

अर्थ—माहाळुंगाच्या रसांत हिंग व सुंठ घालून तो मुखामध्यें धरण्यास द्यावा; आणि कडु व तिखट औषधें डोळ्यांत व कानांत फुंकावीं. तीं सन्निपातनाशक आहेत.

## आर्द्रकादिनस्य.

आर्द्रकंस्वरसोपेतंमिधस्थंसकटुत्रिकं ॥

प्रबोधायमुखेदद्यान्नस्यंवामरिचेनच ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी व सैंधव यांचें चूर्ण आल्याच्या रसांत घालून तोंडांत धरण्यास द्यावें; आणि आल्याच्या रसांत मिरीं उगाळून त्याचें नस्य द्यावें; ह्मणजे सावध होतो.

## रामठादिनस्य.

रामठनागरसहितंभृंगरसाम्ललेहतःप्रातः ॥
अथकटुतिक्तोपयुतंभवतिसुखप्रबोधनंनस्यं ॥

अर्थ–हिंग, व सुंठ हिं औषधें, माका व लिंबु यांच्या रसांत घालोन चाटण द्यावें; किंवा तिखट. व कडु अशा औषधांचें नस्य द्यावें; ह्मणजे रोगी सावध होईल.

## मरीचादिनस्य.

मरिचलवणकृष्णाभूतकेशीमधूकैःकटुफलमृदुकृत्वाकोष्णनीरेणनस्यं ॥
प्रकटयतिविकीर्णश्चाष्टभिर्वाचतुर्भिःसकलकरणबोधंबिंदुभिर्दीयमानं ॥

अर्थ–मिरीं, सैंदेलोण, पिंपळी, निर्गुंडी, मोहाचें फूल, व कायफळ या औषधांचें चूर्ण करून ऊनपाण्यात घालोन त्याचे आठ किंवा चार बिंदु नस्यार्थ द्यावें, ह्मणजे सन्निपाती सावध होईल.

## लशुनादिअंजन.

लशुनमरिचकृष्णामाणिमंथोग्रगंधाशुकतरुफलबीजैर्वि
श्वगोमूत्रपिष्टैः ॥ कफपवनविकारेरक्तपित्तप्रभेदेगदि
तमगदविद्भिर्नेत्रयोरंजनंस्यात् ॥

अर्थ–लसुण, मिऱ्ये, पिंपळी, सैंधव, वेखंड, शिरसाचें फळ व सुंठ या औषधांचें चूर्ण गोमुत्रांत खलून अंजन करावें ह्मणजे कफ, वायू, व रक्तपित्त याला दूर करितें.

## जात्यादिअंजन.

जातीपुष्पंप्रवालंचमरिचंरोहिणींवचां ॥
सैंधवंबस्तमूत्रेणतंद्रानाशनमुत्तमं ॥

अर्थ–जाईचे फुलांचा व आल्याचा रस, मिरीं, कुटकी, वेखंड, व सैंधव यांचें चूर्ण करून त्याचें शेळीच्या मुतांतून अंजन करावें. ह्मणजे तंद्रानाश होईल.

## शिरीषबीजादिअंजन.

शिरीषबीजंमरिचंबस्तमूत्रेणतत्समं ॥
अंजनंनदभिन्यासेसंज्ञाबोधनमिष्यते ॥

अर्थ—शिरसवृक्षाचें बीज व मिरीं हीं समभाग बकऱ्याच्या मुतांत उगाळून त्याचें अंजन करावें. तें अभिन्याससन्निपातामध्यें; उत्तम संज्ञाप्रबोध करितें.

## दंभ, अथवा डाग.

संज्ञायस्यनजायतेचरणयोर्द्वंद्वंसमादह्यतेभाले
लोहशलाकयासतिकृतेसर्वक्रियाकर्मणि ॥

अर्थ—सन्निपातानें ज्याची संज्ञा जात्ये, त्याचे दोन पाय व कपाळ यांला लोखंडाचे सळईनें डाग द्यावा.

## डागदिल्यानंतर उपाय.

एवंविधेस्मिन्विहितेविधानेनयातिसंज्ञांयदियश्चजंतुः ॥
तंपादमूलेभृकुटीललाटेशलाकयालोहजयादहेत्तु ॥

अर्थ—याप्रमाणे डाग दिल्यावर ज्याला संज्ञा येत नाहीं, त्याच्या पादमूळीं, भृकुटी व ललाट यांचेठायीं लोहशलाकेनें डाग द्यावा.

## हारिद्रकसंनिपातनिदान.

हारिद्रदेहनखनेत्रकरांघ्रितापनिष्ठीवनादिकसनैरुपलक्षितोयः ॥
हारिद्रकःसकथितःकिलसंनिपातःसाध्योनचैषभिषजांज्वरकालरूपः ॥

अर्थ—देह, नखें, नेत्र, हात व पाय हे हळदीप्रमाणें पिंवळे होणें, ज्वर, थुंकापडणें व खोकला, हीं लक्षणें ज्या सन्निपातामध्यें होतात; तो हारिद्रक सन्निपातज्वर होय. हा काळरूपी आहे, ह्मणून वैद्यास साध्यच नव्हे. हा तेरांहून भिन्न आहे.

## त्याची मर्यादा.

सद्यस्त्रिपंचसप्ताहाद्दशाहाद्द्वादशादपि ॥
एकविंशद्दिनैःशुध्वःसन्निपातात्सुजीवति ॥

अर्थ—सन्निपात झाल्यानंतर तत्काळ किंवा तीन, पांच, सात, दाहा, आणि बारा दिवस वाहिवाटून २१ दिवस लोटल्यावर या सन्निपातांतून मुक्त झालेला रोगी चांगला वांचतो.

## त्रिदोषज्वरांची साधारण मर्यादा.

सप्तमीद्विगुणायावन्नवम्येकादशीतथा ॥ एषात्रिदोषमर्यादा
मोक्षायचवधायच ॥ पित्तकफानिलवृध्यादशदिवसद्वादशा
हसप्ताहात् ॥ हंतिविमुंचतिगुरुषंत्रिदोषनोधातुमलपाकात् ॥

अर्थ–त्रिदोष जाहाल्यापासून तो रोग्यास सात, चवदा, नऊ, अठरा, अकरा, अथवा बेवीस, इतक्या दिवसांत मारीलच; किंवा पुढें वांचल्यास ज्वरमुक्त होईल. त्यांत सात, नऊ आणि अकरा या तीन मर्यादा वाताधिक, पित्ताधिक व कफाधिक, या क्रमाने आहेत. या मर्यादांमध्यें त्रिदोषज्वरांत धातुपाक झाला असतां; रोगी मरेल. व मलपाक झाला असतां; तो रोगी सन्निपातांतून मुक्त होईल.

## धातुपाकलक्षण.

निद्रानाशोहृदिस्तंभोविष्टंभोगौरवारुची ॥
अरतिर्बलहानिश्चधातूनांपाकलक्षणं ॥

अर्थ निद्रेचा नाश, उरांत ताठल्यासारिखी पीडा, मळमूत्रांचा अवरोध, शरीर जड, अरुचि, चैन न पडणें, शक्तीला क्षीणता, हीं धातुपाकाचीं लक्षणें होतात.

## मलपाक.

दोषप्रकृतिवैकृत्यंलघुताज्वरदेहयोः ॥
इंद्रियाणांचवैमल्यंदोषाणांपाकलक्षणं ॥

अर्थ– पूर्वदोषांचा फेरफार, ज्वर कमी, शरीराला हलकेपणा, इंद्रियास शुद्धता, हीं मलपाकाचीं लक्षणें जाणावीं.

## सन्निपाताचें असाध्यलक्षण.

दोषेविबद्धेनष्टेग्नौसर्वसंपूर्णलक्षणः ॥
सन्निपातज्वरोसाध्यःकृच्छ्रसाध्यस्ततोन्यथा ॥

अर्थ– मलादि व पित्तादिदोष बद्ध झाले असतां, व अग्नि शांत झाला असतां, वातादि सर्वदोषांचीं संपूर्ण लक्षणें होऊन सन्निपातज्वर असाध्य होतो; आणि याचा उलट ह्मणजे दोष प्रवृत्ति असून, अग्नि थोडासा दीप्त असून सर्वांचा लक्षणें थोडथोडं झालीं तर सन्निपातज्वर कष्टसाध्य होतो.

## आगंतुकज्वर.

अभिचाराभिघाताभ्यामभिषंगाभिशापतः ॥
आगंतुर्जायतेदोषैर्यथास्वंतंविभावयेत् ॥

अर्थ–मारणादिप्रयोग, ताडण, भूतप्रेतबाधा व ब्राह्मण, गुरु, सिद्ध, वृद्ध, यांचा के व शाप, याकारणानीं वातादि दोष कोपून आगंतुकज्वराला उत्पन्न करितात, तो ज्व वात, पित्त व कफ अशा भेदांनीं तीनप्रकारचा.

## आगंतुकज्वरचिकित्साक्रम.

आगंतुकज्वरेनैवनरःकुर्वीतलंघनं ॥
शुद्धवातक्षयागंतुजीर्णज्वरेषुलंघनं ॥

अर्थ– आगंतुकज्वरामध्यें मनुष्यानें लंघन करूं नये. केवळ शुद्ध वातक्षयदोषजन्य आगंतुकज्वर, व जीर्णज्वर यांवर लंघन करावें.

## अभिचाराभिघातज्वरनिदान.

अभिचाराभिघाताभ्यांमोहस्तृष्णाचजायते ॥

अर्थ–अभिचार व अभिघात, यांनी जाहालेल्या ज्वरांत मोह होतो, व ताहान लागते.

## अभिचारज्वरावर चिकित्सा.

अभिचाराभिशापोत्थौज्वरौहोमादिनाजयेत् ॥
देहंस्वस्त्ययनैस्तीर्थैरुत्पातग्रहपूजनैः ॥

अर्थ–अभिचार आणि अभिशाप यांनी झालेले ज्वर होम, देवपूजा व देहावर मंगल कारक मण्यादिकांचें धारण, तीर्थस्नान व ज्यापासून पीडा असेल त्याग्रहाचें पूजन यांणीं जिंकावे.

## अभिघातज्वरावर चिकित्सा.

अभिघातज्वरेयुंज्यात्क्रियामुष्णविवर्जितां ॥
कषायंमधुरंस्निग्धंयथादोषमथापिवा ॥

अर्थ–अभिघातज्वरावर उष्णवर्जित, आणि तुरट, मधुर, स्निग्ध अशी किंवा जो दोष असेल त्यावरची चिकित्सा करावी.

## सामान्यउपचार.

अभिघातज्वरोनश्येत्पानाभ्यंगेनसर्पिषः ॥
रक्तावसेकैर्मेध्यैश्चतथामांसरसोदनैः ॥

अर्थ–अभिघातज्वरावर तुपाचें पान व आंगास तूप लावणें, रक्त काढणें, शेक देणें, हे उपचार करून पथ्याला मांसरस, आणि भात द्यावा.

## व्यधादिकांवर.

व्यधबंधश्रमात्यध्वभंगभ्रंशसमुद्भवान् ॥
ज्वरानुपचरेत्पूर्वंक्षीरमांसरसोदनैः ॥

अर्थ-वेध, बंध, श्रम, फार मार्ग चालणें, पडून मोडणें यांपासून झालेल्या ज्वरांवर पूर्वी दूध, मांसरस व भात द्यावा.

## मार्गश्रमजन्यज्वरावर.

अध्वश्रांतेषुचाभ्यंगंदिवानिद्रांचकारयेत् ॥

अर्थ-मार्ग चालून श्रम झाल्याने आलेल्या ज्वरावर अभ्यंग करून दिवसास निद्रा करावी.

## दुसरा प्रकार.

व्यधबंधसमावेशभग्ननष्टसमुद्भवान् ॥

ज्वरानुपाचरेत्पूर्वंमदिराक्षीरभोजनैः ॥

अर्थ-वेध, बंध, भूतबाधा, मोडल्यानें व प्रियवस्तूच्या नाशानें आलेल्या ज्वरावर पूर्वी मद्य व दूध यांचें भोजन द्यावें.

## भूताभिषंगज्वरनिदान.

कामशोकभयाद्वायुःक्रोधात्पित्तंत्रयोमलाः ॥

भूताभिषंगात्कुप्यंतिभूतसामान्यलक्षणं ॥

अर्थ-काम, शोक व भय यांपासून वायु कोपतो, व क्रोधानें पित्त कोपतें; आणि भूतबाधेनें तीन्ही दोष कोपतात. हें भूतबाधेचें सामान्य लक्षण भूतोन्मादांत सांगल तेथें पाहावें.

## दुसराप्रकार.

भूताभिषंगादुद्वेगोहास्यरोदनकंपनं ॥

अर्थ-भूतबाधेनें ज्वर आला, तर चित्त उद्विग्न होतें; व हंसणें, रडणें, आणि कांपणें हीं लक्षणें होतात.

## सामान्यचिकित्सा.

शीतभंजीरसोवात्रह्यनुपानेद्विगुंजकः ॥

अर्थ-भूतज्वरावर शीतभंजीनामक रसायण, योग्य अनुपानाशीं दोन गुंजा द्यावें.

## त्रिकट्वादियोग.

गंधकंत्रिकटुंसाज्यंपिबेद्भूतज्वरापहं ॥

अर्थ-गंधक व त्रिकटु यांचें चूर्ण तुपांतून द्यावें. हें भूतज्वरनाशक आहे.

## गंधकादियोग.

गंधकेनसमाधात्रीभुक्तासाभूतजंज्वरं ॥

कर्षमात्रंप्रदातव्यंसर्वभूतज्वरेहितं ॥

अर्थ–गंधक आणि आवळकाटी यांचें समभाग चूर्ण दाहामासे पर्यंत द्यावें. हें सर्व भूतज्वरांवर हितकर आहे.

## अष्टमूर्तिरस.

हेमरूप्यंताम्रनागंमृतंगंधकमाक्षिकं ॥ विमलाचशिलाशुद्धा सर्वांशंशुद्धसूतकं ॥ अम्लेनमर्दयेद्यामंपुटेकुंभधरेपचेत् ॥ अष्टमूर्तिरसोनामगुंजैकंभूतिकेज्वरे ॥ देयश्चातुर्थिकंत्र्याहंद्वया हिकंचविनाशयेत् ॥

अर्थ–सोनें, रुपें, तांबें व शिसें यांचीं भस्में, गंधक, विमला, मनशीळ, हीं शुद्ध घेऊन या सर्वांबरोबर शुद्धपारा घेऊन एकत्र करून लिंबाच्या रसांत एक प्रहर घोटून त्याला कुंभपुट द्यावें. हा अष्टमूर्तिरस एक गुंज द्यावा. ह्मणजे भूतज्वर, चातुर्थिक, त्र्याहिक, द्वयाहिक ज्वरांचा नाश करितो.

## मधुकनस्य.

मधूकसारमरिचंसैंधवंपिप्पलीवचा ॥
संज्ञाप्रबोधनंनस्यंदेयंभूतज्वरेसदा ॥

अर्थ–मोहाचा डीक, मिर्यें, सैंधव, पिंपळी व वेखंड यांचें नस्य भूतज्वरावर द्यावें.

## व्योषादिनस्य.

कुर्याद्भूतज्वरेनस्यंव्योषाष्टतुलसीदलैः ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, आणि तुळशीचीं आठ पानें, यांच्या रसाचें नस्य द्यावें. तें भूतज्वराचा नाश करितें.

## सहदेवीमूलिकाबंध.

सहदेवायामूलंविधिनाकंठेनिबद्धमपहरति ॥
एकद्वित्रिचतुर्भिर्दिवसैर्भूतज्वरंपुंसां ॥

अर्थ–चिकण्याचें मूळ, विधियुक्त गळ्यांत बांधिलें असतां; तें एक, दोन, चार दिवसांत भूतज्वर घालवितें.

## सूर्यावर्तबंध.

सूर्यावर्त्तस्यमूलंचकर्णेभूतज्वरापहं ॥

अर्थ–सूर्यफूलवल्लीचें मूळ कानांत ठेवल्यावर भूतज्वर जातो.

## विजयाबंध.

सायंकालेभिमंत्र्यैवविजयांप्रातरुत्धरेत् ॥
बध्वाशिरसितन्मूलंभूतज्वरहरंपरं ॥

अर्थ–विजयेला सायंकाळीं आंवतून प्रातःकाळीं तिची मूळी काढून घ्यावी; आणि मस्तकीं बांधावी. ती भूतज्वरनाशक आहे.

## पुष्यार्कयोग.

पूष्यार्केकाकतुंड्याश्चमूलंभूतज्वरापहं ॥
बंधयेद्रक्तसूत्रेणबाहौशिरसिवागले ॥

अर्थ–पुष्यार्क योगावर थोर श्वेतकावळीचें मूळ आणावें. तें लाल सुतानें बाहूला अथवा गळा, मस्तक यांला बांधावें. तें भूतज्वराला घालवितें.

## मृत्तिकातिलक.

कर्कटस्यविलोद्भूतमृदातुतिलकेकृते ॥

अर्थ–कुर्ल्याचे बिळांतील मातीचा तिळक केला असतां, तो भूतज्वराचा नाश करितो.

## मंत्र.

गोमयंमंडलंकृत्वापुष्पगंधाक्षतादिभिः ॥ अर्चयेन्मंत्रवित्सम्य
कूस्वहस्तंमंडलोपरि ॥ स्थापयित्वाजपेन्मंत्रंस्पृशेत्साध्यस्य
मस्तकं ॥ स्पृष्ट्वातत्रजपेन्मंत्रंयावदष्टोत्तरंशतं ॥
अथमंत्रः ॥ कालकालमहाकालकालदंडनमोस्तुते ॥ काल
दंडनिपातेनभूम्यंतर्निहितंज्वरं ॥ त्रिदिनंकारयेदेवंहन्याद्भू
तादिकान्ज्वरान् ॥

अर्थ–गाईच्या शेणाचें मंडळ करून त्याची पूजा करावी; आणि त्यावर हात ठेऊन खालीं सांगितला मंत्र १०८ वेळ जपून तो हात रोग्याच्या मस्तकावर ठेऊन १०८ वेळ पुनः जप करावा. याप्रमाणें तीन दिवस करावें. ह्मणजे जाहालेला ज्वर दूर होतो.

## अभिषंगज्वरावर चिकित्सा.

भूतविद्यासमुद्दिष्टैर्बंधावेशनताडनैः ॥
जयेद्भूताभिषंगोत्थंअनुशांत्यादिभिर्ज्वरं ॥

अर्थ– भूतविद्येमध्यें सांगितले जे गाडणें, आगांत आणणें व मारणें इत्यादि प्रयोग त्यानीं, किंवा शांत्यादिकांनीं भूतबाधाजनित ज्वर जिंकावा.

## अभिशापज्वरावर चिकित्सा.

लंघनंनहितंकामशोकाचिंताप्रहारजे ॥ भयभूतश्रमक्रोधलंघ
नैश्चकृतेज्वरे ॥ किंतुदीप्ताग्नयेतत्रदद्यान्मांसरसोदनं ॥

अर्थ— काम, शोक, चिंता, प्रहार, भय, भूतबाधा, श्रम, क्रोध, आणि लंघन, यांपासून झालेल्या ज्वरावर लंघन हित करीत नाहीं. कारण अशा रोग्याचा जठराग्नि प्रदीप्त असतो, या करितां त्यास मांसरस व भात पथ्याला द्यावा.

## दुसरा प्रकार.

अभिचाराभिशापोत्थौज्वरौहोमादिभिर्जयेत् ॥
दानस्वस्त्यनातिथ्यैरुत्पातग्रहदूषितौ ॥

अर्थ— अभिचार, अभिशाप, उत्पात व दुष्टग्रह यांपासून झालेले ज्वर होम, दान, पुण्याहवाचन व आतिथ्य या उपचारांनीं जिंकावे.

## विषजन्यआगंतुकज्वर.

शावास्यताविषकृतेदाहोतीसारएवच ॥
भक्तारुचिःपिपासाचतोदश्चसहमूर्छया ॥

अर्थ—विषसंबंधानें ज्वर झाला असतां; तोंडावर काळिमा, दाह, अतीसार, अरुचि, तृषा, बोचल्यासारिखी शरीरांत पिडा, आणि मोह हीं लक्षणें होतात. याजवर चिकित्सा विषनिदानांत सांगितली आहे.

## औषधींचा वासानें झालेला ज्वर.

औषधीगंधजेमूर्छाशिरोरुग्वमथुःक्षवः ॥

अर्थ—औषधींच्या वासानें जो ज्वर येतो, त्यांत मूर्छा, मस्तकशूल, वांति, मळमळ, आणि शिंका हीं लक्षणें होतात.

## चिकित्सा.

औषधीगंधविषजौविषपित्तप्रबाधनैः ॥
जयेत्कषायैर्मतिमान्सर्वगंधकृतैर्भिषक् ॥

अर्थ—औषधिगंध, आणि विष, यांपासून झालेला ज्वर, विषें व पित्तनाशक औषधें यानीं किंवा सर्वगंधादिगणाचा कषाय. इत्यादिकानीं जिंकावा.

## सर्वगंध सांगतो.

चातुर्जातककर्पूरकंकोलागरुकुंकुमं ॥
लवंगसहितंचैवसर्वगंधंविनिर्दिशेत् ॥

अर्थ–विलाची, दालचिनी, तालीसपत्र, नागकेशर, कापूर, कंकोळ, कृष्णागरु, केशर आणि लवंग हीं एकत्र केलीं असतां त्यास सर्वगंध ह्मणतात.

## कामज्वरनिदान.

कामजेचित्तविभ्रंशस्तंद्रालस्यमभोजनं ॥
हृदयेवेदनाचास्यगात्रंचपरिशुष्यति ॥

अर्थ–चित्तभ्रम, झांपड, आळस, भोजनावर अरुचि, हृदयांत पीडा, आणि गात्रांला शुष्कता हीं लक्षणें कामज्वरांत होतात.

## चिकित्सा.

श्रीखंडमंडितकलेवरवल्लरीणांमुक्ताफलाकुलविलोलकुचस्थ
लीनां ॥ वैदग्ध्यमुग्धवचसांसुविलासिनीनामालिंगनंसकल
दाहमपाकरोति ॥

अर्थ–आंगाला सुगंध चंदनादिलेप केलेल्या, मुक्ताहार ज्यांचे स्तनावर लोंबतात, व शृंगाररसभारित भाषण करण्यांत चतुर; आणि रूपलावण्यसंपन्न अशा स्त्रियांचे आलिंगन केलें असतां; कामज्वर शांत होतो.

## दुसरा प्रकार.

शय्यापल्लवपद्मपत्ररचितावासोवयस्यैःसमंकांतारेकुसुमस्फुर
त्तरुवरेवापीजलालोकनं ॥ आलापाश्चशुकालिकोकिलकृ
ताःकांताश्चकांताःकथाःवाताश्चामलवालकव्यजनजादाहंनि
राकुर्वते ॥

अर्थ–झाडांचे कोवळया पानांची किंवा कमळाच्या पानांची शेज करून त्याजवर निद्राकरणें, मित्रांबराबर सहवास, बागांतून फिरणें, विहिरीच्या किंवा तळ्याचा कांठीं बसून वायु घेणें, सुस्वर गायन व शुकसारिका यांचें मंजुळ शब्द ऐकणें, थट्टा मस्करी बोलणें व वाळयाचा पंख्यांनीं वारा घेणें हे उपचार कामज्वराची शांति करितात.

## तिसरा प्रकार.

अयिनितंबिनिकाममदालसेमधुरवाणिनिकाममदालसे ॥व
पुपिदाहवतांविहितंहितंहिमहिमांशुजलैरनुलेपनं ॥

अर्थ–हेसखे! चंदन, कापूर, आणि वाळा, यांची उटी द्यावी, ह्मणजे दाह शांत होतो.

## चौथा प्रकार.

शुभ्राभ्रविभ्रमधरेशशांककरसुंदरे ॥

चंदनैश्चर्चितेहर्म्येस्वापस्तापमपोहति ॥

अर्थ—शुभ्र मेघासारिख्या शोभणाऱ्या व चंद्रकिरणांनी सुंदर, आणि चंदनलिप्त अशा गच्चीवर निजलें असतां संताप दूर होतो.

## पांचवा प्रकार.

यदिपर्युषितंधान्यसलिलंसितयासह ॥
प्रभातसमयेपीतमंतर्दाहंविनाशयेत् ॥

अर्थ—सायंकाळीं धने पाण्यांत भिजत घालोन ते दुसऱ्या दिवशीं पांहाटेस हातानें कुसकरावे; आणि तें पाणी गाळून त्यांत खडीसाकर घालोन द्यावें, ह्मणजे अंतर्दाह नाहिंसा होतो.

## साहवा प्रकार.

पित्तज्वरेकिंरसफांटलेपैःकिंवाकषायैरमृतेनकिंवा ॥ पेयंप्रियायामुखमेकमेवलोलिंबराजेनसदानुभूतं ॥ प्राणप्रेयसिमापिबंतुपुरुषाःपित्तज्वरव्याकुलानानावल्लिजलंविलंबितफलंपानेविपादप्रदं ॥ तैस्तैःकिंक्रियतांचिकित्सकपतेमुग्धेसुखंसेव्यतांसद्यस्तापहरःसुधाधिकतरःकांताधरःकेवलं ॥

अर्थ—हेसख्ये पित्तज्वरावर ह्म० कामज्वरावर रस, फांट, लेप, किंवा कषाय; अथवा अमृत दिलें तरी काय उपयोग? तर त्याला प्रियेचें मुखचुंबन केलें पाहिजे. याचा मीं पुरा अनुभव घेतला आहे.

हेप्रिये, कामज्वरपीडितपुरुषांनीं चिरकाळानें गुणास येणारे, असे नानावल्लीचे रस व कडु काढे पिऊं नये; तर त्याणि सुखकरून अमृतापेक्षां गोड व तत्काळ ताप हरण करणारा असा स्त्रियांचा अधरोष्ठ चुंबन करावा.

## सातवा प्रकार.

कांताकटाक्षदग्धानांवदवैद्यकिमौषधं ॥
दृढमालिंगनंपथ्यंक्वाथश्चाधरचुंबनं ॥

अर्थ—विरहीपुरुषांस हेंच औषध योग्य आहे कीं, सुंदरस्त्रीचें अधरचुंबन हा काढा व आलिंगन करणें हें पथ्य.

## भय, शोक, व कोप यांपासून झालेल्या ज्वराचें निदान.

भयात्प्रलापःशोकाच्चभवेत्कोपाच्चवेपथुः ॥

अर्थ– भय व शोक यांपासून झालेल्या ज्वरांत रोगी बडबड करितो; आणि क्रोधापासून झालेल्या ज्वरांत कांपतो.

## सामान्यउपचार.

व्याघ्रचित्तकघातार्थंस्थापयेज्जलमध्यगं ॥

अनयाशीतक्रिययाभयरोगःप्रशाम्यति ॥

अर्थ– व्याघ्रादिकांचें भय चित्तांतून जाण्याकरितां रोग्याला पाण्यांत बसवावा. या शीत क्रियेनें भय शांत होतें.

## चिकित्सा.

हर्षणैश्चसमंयांतिकामशोकभयज्वराः ॥

कामैरर्थेर्मनोज्ञैश्चपित्तघ्नैश्चाप्युपक्रमैः ॥

अर्थ– काम, शोक व भय यांपासून झालेला ज्वर, हर्षोत्पादक पदार्थांनीं अथवा गोष्टीनीं, नाश पावतो; किंवा इच्छीत पदार्थांच्या लाभानें अथवा पित्तनाशकउपचारानीं शांत होतो.

## दुसरा प्रकार.

अश्वासनेष्टलाभेनवायोःप्रशमनेनच ॥

हर्षणेनशमंयांतिकामशोकभयज्वराः ॥

अर्थ– आश्वासन देणें, इष्टवस्तूचा लाभ, वायूचा नाश करणारे व आनंददायक पदार्थ याणीं काम, शोक व भय यांपासून झालेले ज्वर शांत होतात.

## कामज्वर व क्रोधज्वर यांवर सामान्य उपचा..

कामात्क्रोधज्वरोनश्येत्क्रोधात्कामज्वरस्तथा ॥

यांतिताभ्यामुभाभ्यांचकामक्रोधज्वराःक्षयं ॥

अर्थ–क्रोधज्वर–कामोत्पत्तीनें नाश पावतो; आणि कामज्वर क्रोध उत्पन्न झाल्यास नाश पावतो. याप्रमाणें ते परस्पर एकमेकांच्या उत्पत्तीनें नाश पावतात.

## क्रोधज्वरचि०

क्रोधजेपित्तजित्कार्यानार्याःसद्वाक्यमेवच ॥

आश्वासेनेष्टलाभेनवायोःप्रशमनेनच ॥

अर्थ–क्रोधानें झालेल्या ज्वरावर, पित्तनाशक उपाय, सुंदरस्त्रियांचीं भाषणें, चांगल्या गोष्टी, आश्वासन व इष्टपदार्थांचा लाभ, आणि वायूचा नाश करणारे उपचार इत्यादि उपाय करावे.

## विसर्पादिज्वरीं घृतपान.

विसर्पेणज्वरोयश्चयश्चविस्फोटकज्वरः ॥
तत्रादौसर्पिषःपानंकफपित्तोत्तरेभवेत् ॥

अर्थ–विसर्पापासून, किंवा विस्फोटकानीं आलेला, कफपित्ताधिकज्वर यावर पहि ल्यानें तूप प्राशन करवावें.

## विषमाची संप्राप्ति.

आतंकमुक्तेःकृशताश्रयाणांविमुक्तपथ्याद्युचितक्रियाणां ॥
अल्पोपिदोषोविषमंविदध्यात्ज्वरंविवृत्थंप्रतिपक्षरुद्धं ॥

अर्थ–रोगापासून मुक्त जाहल्यानंतर कृशपणामुळें, किंवा पथ्य योग्य सेवन नकेल्यामुळें, विरुद्ध दोषानीं उठविला असतां अंती दोष आहे; तथापि तो विषमज्वराला उत्पन्न करितो.

## दुसरा प्रकार.

दोषोल्पोहितसंभूतोज्वरोत्सृष्टस्यवापुनः ॥
धातुमन्यतमंप्राप्यकरोतिविषमंज्वरं ॥

अर्थ–ज्वरानें नुकताच सोडलेला मनुष्याचा क्षीण झालेल्या दोष पुनः अपथ्य सेव नादिकानीं कोपून तो रस, व रक्तादिधातूंप्रत प्रवेश करून विषम ह्मणजे संतत, अन्ये द्युष्क इत्यादिज्वरांला उत्पन्न करितो. ग्रंथकार वाशब्दानें पहिल्या पासून ही विषमज्वर होतो; असें सुचवितो; आणि अल्पपदानें दोष बलवान नसल्यामुळें, कोपकाळीं बलवान होऊन ज्वर उत्पन्न करितो. असें सुचवितो. व दोष बलवान असलेतर नित्यच ज्वराला उत्पन्न करितो. विषमज्वर लक्षण भालुकितंत्रांत सांगितले ते असें. ( यःस्यादनियतात्काला च्छीतोष्णाभ्यांप्रवर्तते ) म्हणजे जो शीत किंवा उष्ण याणीं अनियतकाळीं ज्वर येतो; त्याला विषमज्वर ह्मणतात. दुसरें लक्षण. ( मुक्तानुबंधित्वंविषमत्वं ) ह्मणजे ज्वर निघतो; आणि पुनः येतो. त्याला विषम ह्मणतात.

## विषमज्वराची नांवें.

संततःसततोन्येद्युस्तृतीयकचतुर्थकौ ॥

अर्थ–संतत, सतत, अन्येद्युष्क, तृतीयक, आणि चतुर्थक, असे विषमज्वराचे पांच भेद आहेत.

## संततादिकांमध्यें नियत दूष्यें सांगतो.

संततोरसधातुस्थःसततोरक्तधातुगः ॥ भिषजासचविज्ञेयःसोन्ये
द्युःपिशिताश्रितः ॥ मेदोगतस्तृतीयेन्हिअस्थिमज्जागतःपुनः ॥

कुर्याच्चातुर्थिकंघोरमंतकंरोगसंकरं ॥

**अर्थ**—रसधातुगत दोष संततज्वराला उत्पन्न करितो; व रक्तधातुगत दोष सतत ज्वराला उत्पन्न करितो. तोच दोष मांसाश्रित झाला असतां अन्येद्युष्क (द्व्याहिक) ज्वराला उत्पन्न करितो; आणि मेदोगत दोष झाला असता त्र्याहिक (तिजारे) ज्वराला उत्पन्न करितो; आणि दोष अस्थि व मज्जा यांप्रत गेला असतां अंतकासारिखा, व रोगांचा संकर अशा घोर चातुर्थिक ज्वराला उत्पन्न करितो.

## विषमज्वरचिकित्सा.

विषमाश्चज्वरासर्वेसन्निपातसमुद्भवाः ॥
अथोल्बणस्यदोषस्यतेषुकार्यंचिकित्सितं ॥

**अर्थ**—संपूर्णविषमज्वर सन्निपातापासून होतात; परंतु त्यांत अधिकदोष त्यावर चिकित्सा करावी.

## शोधन-

विषमेष्वथकर्तव्यमूर्ध्वंचाधश्चशोधनं
स्निग्धोष्णैरन्नपानैश्चशमयेद्विषमज्वरं ॥

**अर्थ**—विषमज्वरावर ऊर्ध्व वांत्यादि व अधःशोधन असें रेचन द्यावें; आणि स्निग्ध व उष्ण अशीं अन्नें व पानें याणीं विषमज्वर शमवावा.

## विषमावर अन्न सांगतो.

तक्रंमांसंपयोमांसंदधिमांसमथापिवा ॥
माषमांसंतुभुंजानोमुच्यतेविषमज्वरात् ॥

**अर्थ**—तक्र व मांस; किंवा दूध मांस, अथवा दधिमांस, व माषमांस, यांच्या भक्षणानें विषमज्वर जातो.

## दुसऱ्याप्रकारचें अन्न.

सुरासमंडापानायभोजनेचरणायुधाः ॥
तित्तिराविष्किरापथ्याःकुक्कुटाविषमज्वरे ॥

**अर्थ**—मद्य व मद्दा यांचें प्राशन व कोंमडा, तितिर, विष्किर यांचें मांस भक्षणास द्यावें. तें विषम ज्वरावर पथ्यकारक आहे.

## विषमज्वरावर सामान्य चिकित्सा.

सततंविषमंवापिक्षीणस्यसुचिरोत्थितं ॥
ज्वरंसंभोजनैःपथ्यैर्ज्वरघ्नैःसमुपाचरेत् ॥

अर्थ–क्षीणरोग्याचा फार दिवसांचा संतत, किंवा विषमज्वर पथ्यकारक भोजन व ज्वरघ्न औषधें यांणीं शमवावा.

## घृतपान.

ज्वरःकषायैर्विविधैर्लेपनैर्लघुभोजनैः ॥
रूक्षस्यतेनशाम्यंतिसर्पिस्तेपांभिषङ्मतं ॥

अर्थ–रूक्षरोग्याचा ज्वर नानाप्राकारचे काढे, नानाप्रकारचे लेप व लघुभोजन यांणीं शांत होत नाहीं, याकरितां त्याला वैद्याचा मतें घृतपान द्यावें.

## वाताधिकविषमज्वर.

विषमज्वरनाशायचिकित्सावक्ष्यतेधुना ॥
वातप्रधानंसर्पिर्भिर्बस्तिभिःसानुवासनैः ॥

अर्थ–विषमज्वराच्या नाशार्थ चिकित्सा सांगतों. वातप्रधान विषमज्वर. घृतें व अनुवासनबस्ति यांणीं जिंकावा.

## पित्ताधिकविषमचिकित्सा.

विरेचनंचपयसासर्पिषासंस्कृतेनच ॥
विषमंतिक्तशीतैश्चज्वरंपित्तोत्तरंजयेत् ॥

अर्थ–पित्ताधिकविषमज्वराला दूध तापऊन त्यांत तुप घालोन रेचनार्थ द्यावें. व कडु, शीत अशा उपचारांनीं जिंकावा.

## कफाधिकविषमचिकित्सा.

वमनंपाचनंरूक्षमन्नपानंचलंघनं ॥
कषायोष्णंचविषमेज्वरेशस्तंकफोत्तरे ॥

अर्थ–कफाधिक विषमज्वराला वमन, पाचन व रूक्ष असें अन्न व पान, लंघन व तुरट आणि उष्ण असें औषध इत्यादि उपचार करावे.

## मार्कंडयादिपाचन.

मार्कंडीबालपथ्याचमृद्वीकास्थूलजीरकं ॥
पाचनंस्मृतमेतेषांदेयंचविषमज्वरे ॥

अर्थ–भुइतरवड, बाळहरडे, काळीं द्राक्षें व जिरें यांचा काढा विषमावर पाचनार्थ द्यावा.

## महौषधादिपाचन.

महौषधाग्रंथिकतालपर्णीमार्कंडिकारग्वधबालपथ्या ॥
सक्षारमेषांविषमज्वरेचहितंशृतंपाचनरेचनंच ॥

अर्थ–सुंठ, पिंपळमूळ, बडीशोप, भूइतरवड, बाहव्याचा मगज व हरीतकी यांचा काढा सैंधव घालोन द्यावा. तो विषमज्वरावर पाचन व रेचन आहे.

## पाचनव रेचन.

नलिकाबालपथ्यानांचूर्णंचसितयासह ॥
पाचनंरेचनंचोष्णमलिलैश्चगुडैःसमं ॥

अर्थ–उतरीणीमूळ व हरीतकी याचे चूर्ण साखर किंवा गुळ घालोन ऊन पाण्याशी द्यावे; ह्मणजे पाचन व रेचन आहे.

## द्राक्षादिपाचन.

गोस्तनीत्रिफलाविश्वधान्यकैःक्वथितंशृतंपाचनंमतं ॥
द्रावकंस्मृतंभेषजोत्तमंयोजयेत्सदासर्वकर्मणि ॥

अर्थ–काळी द्राक्षे, त्रिफळा, सुंठ व धने यांचा काढा. पाचन व द्रावक असा आहे. हा औषध कर्मात योजावा.

## कुमारिमूलादिवमन.

कुमारिमूलंकर्षैकंपीत्वाकोष्णजलैर्वमेत् ॥
विषमंतुज्वरंहंतिवमनेनचिरंतनं ॥

अर्थ–कोर्फडाचा कंद दाहा मासे घेऊन तो कोमट पाण्याशी द्यावा, ह्मणजे वांती करितो; आणि फारदिवसांचे विषमज्वराचा नाश करितो.

## पटोलादिकाढा.

पटोलयष्टीमधुतिक्तरोहिणीघनाभयाभिर्विषमज्वरघ्नः ॥
कृतःकषायस्त्रिफलामृतावृषैःपृथक्पृथग्वाविषमज्वरापहः ॥

अर्थ–कडूपडवळ, ज्येष्ठमध, किराईत, कुटकी, नागरमोथे व हरितकी यांचा; किंवा त्रिफला, गुळवेल, आणि अडुळसा यांचा काढा विषमज्वर नाशितो. हे दोन काढे वाटल्यास एकत्र करून द्यावे.

## यष्ट्यादिकाढा.

यष्टीदुरालभावासात्रिफलावालकामृता ॥
मुस्ताक्वाथःसितायुक्तोविषमज्वरनाशनः ॥

अर्थ–ज्येष्ठमध, धमासा, अडुळसा, त्रिफळा, वाळा, गुळवेल व नागरमोथे यांचा काढा साकर घालून द्यावा; ह्मणजे तो विषमज्वर नाश करितो.

## मुस्तादिकाढा.

मुस्ताक्षुद्रामृताशुंठीधात्रीक्वाथःसमाक्षिकः ॥

पिप्पलीचूर्णसंयुक्तोविषमज्वरनाशनः ॥

**अर्थ**—नागरमोथे, रिंगणी, गुळवेल, सुंठ व आंवळकाठी या पांच औषधांचा काढा, मध व पिंपळीचें चूर्ण घालून घ्याला असतां विषमज्वर नाश पावतो.

## महाबलादिकाढा.

महाबलामूलमहौषधाभ्यांक्वाथोनिहन्याद्विषमज्वरंहि ॥

शीतंसकंपंपरिदाहयुक्तंविनाशयेद्द्वित्रिदिनप्रयोगात् ॥

**अर्थ**—पेटारीचीं मुळें व सुंठ यांचा काढा शीत्य, कफ व दाह यांणीं युक्त अशा विषमज्वरावर दोन अथवा तीन दिवस घेतल्यानें ज्वर नाश होतो.

## नागरादि दुसरा काढा.

सनागरायाःसपयोधरायाःससिंहिकायाःसगुडूचिकायाः ॥

धात्र्याःकषायोमधुनाविमिश्रःकणाविमिश्रोविषमज्वरघ्नः ॥

अर्थ—सुंठ, नागरमोथे, रिंगणी, गुळवेल व आंवळकाठी या औषधांचा काढा मध व पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. तो विषमज्वराचा नाश करितो.

## पटोलादिकाढा.

स्वकांतिजितरोचनेचपललोचनेमालतिप्रसूननिकरस्फुरत्कब

रिपंचवक्त्रोदरि ॥ पटोलकटुरोहिणीमधुकचेतकीमुस्तकप्रक

ल्पितकषायकोविषममाशुजेजायते ॥

अर्थ—हे चपललोचने कडूपडवळ, कुटकी, जेष्ठमध, हरीतकी व नागरमोथे, यांचा काढा करून दिला असतां तो विषमज्वराला लौकर जिंकितो.

## कुलकादिकाढा.

किमुभ्रमयसिप्रियेकुवलयंकराभ्यामिदंमदीयवचनंसुधारस

समंसमाकर्णय ॥ पुराणविषमज्वरेकुलकनिंबसिंहींद्रजामृता

कृतकषायकोमधुयुतोवरीवर्तति ॥

**अर्थ**—कडुपडवळ, निंब, डोरली, इंद्रजव, गुळवेल यांचा काढा करून मध घालून घेतल्यास जुना विषमज्वर नाश पावतो.

## भार्ग्यादिकाढा.

भार्गीपर्पटविश्ववासककणाभूनिंबनिंबामृतामुस्ताधन्वकभेषजै

श्चदशभिर्निघ्नंतिसर्वज्वरान् ॥ जीर्णान्धातुगतांस्तथाचविषमान्

सोपद्रवान्दारुणान्क्वाथोयंयदियुग्मवासरमिदंदद्याद्यमाद्रक्षिता ॥

अर्थ भारंगमूळ, पित्तपापडा, सुंठ, अडुळसा, पिंपळी, किराईत, कडुनिंब, गुळवेल, नागरमोथा व धमासा, यांचा काढा जीर्णज्वर, धातुगतज्वर, उपद्रवांसहित विषमज्वर व सर्वज्वर, यांचा नाश करितो. हा दोन दिवस घेतला असतां त्याचें यमापासून ही रक्षण होईल.

## भाग्र्यादिकाढा.

भार्ग्यब्दपर्पटकधन्वयवासविश्वभूनिंबकुष्ठकणसिंव्ह्यमृताकषायः ॥

जीर्णज्वरंसततसंततकौनिहन्यादन्येद्युकंसहतृतीयचतुर्थकंच ॥

अर्थ–भारंगमूळ, नागरमोथा, पित्तपापडा, धमासा, सुंठ, किराईत, कोष्ठ, पिंपळी, रिंगणी, आणि गुळवेल, यांचा काढा जीर्णज्वर, संततज्वर, सततज्वर, अन्येद्युष्कज्वर, तृतीयकज्वर व चातुर्थिक यांचा नाश करितो.

## निशाद्यंजन.

ज्वरेंजनंनिशातैलकृष्णामरिचसैंधवैः ॥

अर्थ–हळद, तिळांचें तेल, पिंपळी, मिरीं व सैंधव यांचें अंजन विषमज्वरावर द्यावें.

## नरकेशनस्य.

नरकेशोत्थितेतैलेकाकचंचुंविघर्षयेत् ॥

नस्यंसर्वज्वरहरंनात्रकार्याविचारणा ॥

अर्थ–नरकेसांच्या तेलांत कावळ्याची टोंक उगाळून त्याचें नस्य द्यावें; ह्मणजे ज्वर नाश होतो. याविषयीं विचारणा करूं नये.

## कणादिनस्य.

कृष्णामलकसरामठदार्वीवचाराजसर्षपरसोनैः ॥

छागमूत्रसुपिष्टैर्नस्यंचैकाहिकादिहरं ॥

अर्थ–पिंपळी, आवळकाठी, हिंग, दारुहळद, वेखंड, पांढरे शिरस व लसूण, हीं औषधें बकऱ्याच्या मुतांत वाटून त्याचें नस्य द्यावें; ह्मणजे एकाहिकादि विषमज्वर नाश पावतो.

## सैंधवादि अंजन.

सैंधवंपिप्पलीनांचतंडुलाःसमनःशिलाः ॥

नेत्रांजनंतैलपिष्टंशस्यतेविषमज्वरे ॥

अर्थ– सैंधव, पिंपळीचे दाणे व मनशीळ हीं तेलांत वाटून नेत्रांला अंजन केलें तर विषमज्वर नाश पावतो.

## लशुनादिअंजन.

लशुनंपिप्पलीराजीवचाकुष्टंसमांशतः ॥
एतच्चूर्णंजलेपिष्टंचक्षुष्यंज्वरनाशनं ॥

अर्थ–लसूण, पिंपळी, मोहऱ्या, वेखंड व कोष्ठ, यांचे समभाग चूर्ण पाण्यात वांटून अंजन केल्यानें ज्वर शांत होतो.

## चतुःषष्टिककाढा.

शृंगीरामठरामसेनरजनीरुक्रेणुकारोहिणीरास्नैरंडरसोनदारुरजनी
राजद्रुराजीफलैः॥ त्रायंतीत्रिवृताहुताशनलतानंतामृतामुद्रितादंतीतुं
बरुचित्रतंडुलत्रुटित्वकूतिकनकंचरैः ॥ वासावत्सकबीजवासवसुरा
बल्यावरीवेल्लजंब्राह्मीब्राह्मणयष्टिवारणकणाविश्वावयस्थावृषैः ॥ मू
र्वामालविकासमूलमगधामुस्ताजमोदाद्वयैर्मिश्रेयागरुचंदनेंद्रचवि
कास्फोटावचाकट्फलैः ॥ इत्येतैर्दशमूलयुङ्निगदितःक्वाथश्चतुःषष्टि
कःशृंग्यादिर्मदनागसिंहगिपजासर्वामयोन्मूलने ॥ पुंसामष्टविधज्वरा
तिशमनेवाताग्निसंधुक्षणेसर्वांगेपुसमीरणद्विपघटेशार्दूलविक्रीडितं ॥

अर्थ–कांकडशिंगी, हिंग, कायफळ, हळद, कोष्ठ, रेणुकबीज, कुटकी, रास्ना, एरंड मूळ, लसूण, दारुहळद, बाहव्याचा मगज, कडूपडवळ, त्रायमाण, तेंड, चित्रक, मोरवेल, धमासा, गुळवेल, चिकणा, दांतीमूळ, चिरफळ, वावडिंग, बारीक एलचीचे दाणे, दालचिनी, किराइत, गुग्गुळ, अडुळसा, इंद्रजव, काळे मूग, क्षीरकांकोली, बला, शतावरी, मिरीं, ब्राह्मी, भारंगी, गजपिंपळी, सुंठ, हरीतकी, फालसा, मोरवेल, मोगरी, पिंपळीमूळ, नागरमोथा, अजमोदा, ओंवा, बडिशोप, कृष्णागरू, रक्तचंदन, कुडयाची साल, चवक, श्वेतउपळसरी, वेखंड, कायफळ, आणि दशमूळें हीं एकत्र मिळवून हा चतुःषष्टिक काढा; याला शृंग्यादि किंवा मदनादि ह्मणतात. हा रोगरूपी हत्तीला मारण्यांस सिंहासारिखा आहे. हा आठ प्रकारची ज्वरपीडा यांचा शामक आहे, व अग्नीला वाढविणारा व सर्व वायूंचा, नाश करितो.

## निंबादिचूर्ण.

भूनिंबपथ्याघनकंटकारीत्रायंतिकानागरयासतिक्तः ॥ वाट्या
लकचूर्रकणापटोलीक्षुद्राजलग्रंथिकपर्पटाश्च ॥ एषांततोषोड
शकांगचूर्णंज्वरान्समस्तान्विषमान्निहंति ॥

अर्थ–किराईत, हरीतकी, नागरमोथे, रिंगणी, त्रायमाण, सुंठ, धमासा, कुटकी, चिकणामूळ, कचोरा, पिंपळी, कडूपडवळ, डोर्ली, वाळा, पिंपळमूळ व पित्तपापडा, या सोळा औषधांचें चूर्ण सर्व विषमज्वरांचा नाश करितें.

## जीरकादिचूर्ण.

कालाजाजीतुसगुडाविषमज्वरनाशिनी ॥

मधुनाचाभयालीढाहंत्याशुविषमज्वरं ॥

अर्थ–शाहाजिऱ्याचें चूर्ण गुळाशीं, किंवा बाळहर्डीचें चूर्ण मधाशीं घेतलें असतां विषमज्वर नाश पावतो.

## तुलसी व द्रोणपुष्पीस्वरस.

पीतोमरीचचूर्णेनतुलसीपत्रजोरसः ॥

द्रोणपुष्पीभवोवापिनिहंतिविषमज्वरान् ॥

अर्थ–तुळशीच्या पानांचे रसांत मिऱ्याचें चूर्ण अथवा कुंभ्याच्या सालीचे रसांत मिरीं घालून तें द्यावें, ह्मणजे तें विषमज्वराचा नाश करितें.

## कुमारीमूलकादियोग.

कुमारिमूलंकर्षैकंपीत्वाकोष्णजलैर्वमेत् ॥

विषमंतुज्वरंहंतिवातश्लेष्मगदानपि ॥

अर्थ–कोरफडीचें मूळ, १ तोळा भार घेऊन कोमटपाण्याशीं प्यावें, ह्मणजे ओकारी होऊन विषमज्वर, वातरोग व कफरोग यांचा नाश होईल.

## वर्धमानपिंपळी.

क्षीरेणपंचवृध्यावादुग्धान्नाशीकणांपिबेत् ॥ यावत्पूर्णशतंत

त्स्यात्तांतथैवापकर्षयेत् ॥ वातास्रस्तापपांडुर्शोगुल्मशोफो

दरापहं ॥ विषमेषुचतद्वृष्यंपिप्पलीवर्धमानकं ॥

अर्थ–दुधाशीं पांच पांच वृद्धीनें पिंपळ्या वांटून प्याव्या. जों शंभर होत तों पर्यंत; नंतर पूर्वी प्रमाणें पांच पांच दररोज उतरीत आणाव्या; आणि दूधभात भक्षण करावा. ह्मणजे वातरक्त, दाह, पांडु, अर्श, गुल्म, सूज, उदर व विषमज्वर, यांचा नाश होतो. ही वृष्य, आहे हिला वर्धमान पिंपळी ह्मणतात.

## गुडजीरकयोग.

जीरकंगुडसंयुक्तंविषमज्वरनाशनं ॥

अग्निमांद्यंजयेच्छीतंवातरोगहरंपरं ॥

अर्थ– जिरें गुळाशीं भक्षण केलें असतां ते विषमज्वर, अग्निमांद्य, शीत आणि वातरोग यांचा नाश करितात.

## हिरडयादिकांचे चूर्ण

भवतिविषमहंत्रीचेतकीक्षौद्रयुक्ताभवतिविषमहंत्रीपिप्पलीवर्धमाना ॥
विषमरुजमजाजीहंतियुक्तागुडेनप्रशमयतितथाग्र्यासेव्यमानागुडेन ।

अर्थ–हिरडयाचें चूर्ण मधांत द्यावें; किंवा वर्धमान पिंपळी द्यावी; अथवा जिरें आणि गुळ एकत्र करून त्याची गोळी द्यावी. तसेंच त्रिफळाचूर्ण गुळांत कालऊन खावें. हे चार योग विषमज्वरनाशक जाणावें.

## वंदाकयोग.

वंदाकंविषजातंचतक्रेणविषमज्वरे ॥
सर्पिषादधिमंडेनहिंगुनाचप्रयोजितं ॥

अर्थ–विषवृक्षांवरील बांदें, ताकाशीं, तुपाशीं, मठ्ठयाशीं, अथवा हिंगाशीं विषमज्वरावर द्यावें.

## निंबादिचूर्ण.

निंबच्छदोदशपलंत्र्यूषणंचपलत्रयं ॥ त्रिपलंत्रिफलाचैवत्रिपलंलवणत्रयं ॥ द्वौक्षारौद्विपलंचैवयवानीपलपंचकं ॥ सर्वमेकीकृतंचूर्णंप्रत्यूषंभक्षयेन्नरः ॥ एकाहिकंद्याहिकंचतथात्रिदिवसंज्वरं ॥ चातुर्थिकंमहाघोरंशमयेत्सततज्वरं ॥

अर्थ–कडूनिंबाचा पाला चाळीस तोळे, सुंठ, मिरीं, पिंपळी बारा तोळे, त्रिफला बारा तोळे, लवणत्रय बारा तोळे, दोनक्षार आठ तोळे, आणि ओंवा वीस तोळे या सर्वांचें चूर्ण एकत्र करून प्रातःकाळीं द्यावें. ह्मणजे एकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक, आणि संतत ज्वर, हे. शांत होतात.

## भृंगराजचूर्ण.

समूलंभृंगराजंचछायाशुष्कंविचूर्णयेत् ॥ तत्समंत्रिफलाचूर्णं
सर्वतुल्यासितामिवेत् ॥ एकीकृत्यपलैकैकंभक्षयेच्चानुपानतः ॥
अग्निमांद्यंचविट्बंधंपांडुतांहरतेध्रुवं ॥

अर्थ–मूळांसहवर्तमान माका छायेंत सुकऊन त्याचें चूर्ण आणि तितकेंच त्रिफळाचें चूर्ण व या सर्वांबरोबर साकर याप्रमाणें एकत्र करून ते चार तोळे योग्य अनुपानाशीं द्यावें. ह्मणजे अग्निमांद्य, विट्बंध व पांडुरोग यांचा नाश करितें.

## दीप्यादिचूर्ण.

दीप्याजयारामठवन्हिविश्वाक्षारद्वयंजीरकयुग्मकृष्णा ॥

फलत्रयंसंचलसैंधवंचकृतंहिचूर्णंविषमज्वरघ्नं ॥

**अर्थ**–अजमोदा, हरीतकी, हिंग, चित्रक, सुंठ, जवखार, यवखार, जिरें, शाहाजिरें, पिंपळी, त्रिफळा, पादेलोण व सैंधव यांचें चूर्ण विषमज्वरनाशक आहे.

## पंचसार.

सर्पिःक्षौद्रंसिताक्षीरंपिप्पल्यःसितशर्करा ॥ पिबेत्खजेनमथि

तंपंचसारमिदंस्मृतं ॥ विषमज्वरहृद्रोगकासश्वासक्षयापहं ॥

**अर्थ**–तूप, मध, दूध, पिंपळ्या, पांढरी साकर, हीं पांच एकत्र करून घुसळून, द्यावें; ह्मणजे हें पंचसार विषमज्वर, हृद्रोग, खोकला, दम, आणि क्षय, यांचा नाश करितें.

## पद्मकादिसार.

पद्मकंबिल्वजंपेयंसर्पिषामथितेनवा ॥

विषमज्वरनाशायक्षीरंवागोमयान्वितं ॥

**अर्थ**–पद्मकाष्ठ, बेलफळ, यांचें चूर्ण तूप किंवा मठ्ठा, याशीं एकत्र कालऊन विषम ज्वरनाशाकरितां घ्यावें.

## लशुनादिकल्क.

तिलतैललवणयुक्तःकल्कोलशुनस्यसेवितःप्रातः ॥

विषमज्वरमपहरतेवातव्याधीनशेषांश्च ॥

**अर्थ**–लसूणीच्या कल्कांत तिळांचें तेल व मीठ घालून प्रातःकाळीं सेवन केले असतां विषमज्वर व संपूर्ण वातव्याधि, यांस हरण करितो.

## गुडूचीकल्क.

अमृतायाःशतंचूर्णंवाससापरिशोधितं ॥ पृथक्षोडशभागाः

स्युर्गुडमाक्षिकसर्पिषां ॥ यथाग्निभक्षयदेतन्नरोहितमिताशनः ॥

नास्यकश्चिद्भवेद्व्याधिर्नजरापलितंनच ॥ नज्वराविषमानैव

मेहाश्चानिलरक्तकं ॥ नचनेत्रगतारोगाःपरमेतद्रसायनं ॥

मेधाकरंत्रिदोषघ्नंप्रयोगादस्यबुद्धिमान् ॥ जीवेद्वर्षशतंसाग्रंय

थैवादितिजस्तथा ॥

अर्थ–गुळवेलीचें वस्त्रगाळ चूर्ण शंभर तोळे व गुळ, मध, तूप, हीं प्रत्येक सोळा सोळा तोळे घेउन एकत्र करावीं; आणि अग्निबळ पाहून भक्षावीं, व हितकारक, परिमित, असें अन्न भक्षण करावें. ह्मणजे त्याला कोणतीही व्याधि, व ह्मातारपण, केसांचा पांढरपणा, ज्वर, विषमज्वर, मेह, वातरक्त व नेत्ररोग, हे रोग होत नाहींत. हें उत्कृष्ट रसायन बुद्धिदेणारें, त्रिदोष नाशक, याच्या सेवनानें पुरुष शंभर वर्षे वांचतो, व दैत्यासारिखा बळवान् होतो.

## विषमावर महाज्वरांकुश रस.

शुद्धसूतंविषंगंधंधूर्तबीजंत्रिभिःसमं ॥ चतुर्णांद्विगुणंव्योषंचूर्णं गुंजाद्वयंहितं ॥ जंबीरिकस्यमज्जाभिरार्द्रकस्यद्रवैर्युतं ॥ महाज्वरांकुशोनामज्वराणामंतकोभवेत् ॥ एकाहिकंद्व्याहिकंवा त्र्याहिकंवाचतुर्थकं ॥ विषमंवात्रिदोषोत्थंनाशयेद्यामभात्रतः ॥

अर्थ–पारा, बचनाग व गंधक हे समभाग आणि या तिहींच्या समान धोत्र्याचे बीज व या सर्वांच्या दुप्पट सुंठ, मिरीं व पिंपळी, यांचें चूर्ण घालून तीं सर्व लिंबाच्या व आल्याच्या रसांत खलून दोन गुंजाची गोळी करावी. हा महाज्वरांकुश सर्वज्वरांचा काळ आहे. असें समजावें; आणि एकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक, विषम, किंवा सन्निपातज्वर यांचा तर एका प्रहरांत नाश करील.

## दुसरा रस.

रसस्यद्विगुणोगंधोगंधतुल्यश्चटंकणः ॥ रसतुल्यंविषंयोज्यंमरीचंपंचधाभिषक् ॥ कटूफलंदंतिबीजंचक्षिणोतिज्वरमुत्कटं ॥ क्वचिद्रात्रौदिवाक्वापिद्वितीयंत्र्याहिकंक्वचित् ॥ चलंचातुर्थिकंचापिविषमज्वरलक्षणं ॥

अर्थ–पारा एक भाग, गंधक दोन भाग, टांकणखार दोन भाग, बचनाग एक भाग, मिऱ्यें पांच भाग, आणि कायफळ व जेपाळ, हे एकेकभाग. या सर्वांचे एकत्र चूर्ण करून द्यावें; ह्मणजे तें कधीं दिवसा व कधीं रात्रीं येणारा असा ज्वर, द्व्याहिक, त्र्याहिक, चलज्वर, आणि चातुर्थिकज्वर अशा विषमज्वरांची शांति करील.

## मेघनाद रस.

आरंकांस्यंमृतंताम्रंत्रिभिस्तुल्यंतुगंधकं ॥ क्वाथेनमेघनादस्य पिष्ट्वारुध्वापुटेपचेत् ॥ षड्भिस्तुजायतेसिद्धोमेघनादोमहारसः ॥ पर्णखंडेनमाषैकोविषमज्वरनाशनः

अर्थ–लोहभस्म, कांस्यभस्म व ताम्रभस्म, हीं समभाग, आणि या सर्वांबरोबर गंधक हीं सर्व एकत्र करून पळसाच्या काढ्यांत घोटून गोळा करून गजपुट द्यावें. याप्रमाणें साहा पुटें द्यावीं; ह्मणजे मेघनादनामक रस सिद्ध होतो. हा विड्याच्या पानाशीं एक मासा पर्यंत द्यावा; ह्मणजे तो विषमज्वराचा नाश करितो.

## गोपीड्यादिघृत.

गोपीड्यामलकीस्थिरामगधजातिक्तापयःपालिनीद्राक्षाश्रीफल धावनीहिमविषामुस्तेंद्रजैःसाधितं ॥ स्यादाज्यंविषमज्वरक्षयशिरःपार्श्वव्यथारोचकच्छर्दीशोषहलीमकप्रशमनंलीलालतामंजरि ॥

अर्थ–हे लीलावति उपळसरी, भुयआंवळी, आवळकाठी, साळवण, पिंपळी, कुटकी, वाळा, मनुका, बाळबेल, रिंगणी, रक्तचंदन, अतिविष, नागरमोथे व इंद्रजव, यांच्या काढ्यांत तूप घालून पुनः तो काढा. आटऊन नि.शेष करून शेष राहिलेलें तूप दोन तोळे प्यावें; ह्मणजे विषमज्वर, क्षय, मस्तकशूल, अरुचि, वांति, शोष, आणि संधिगत उष्ण वायु. यांचा नाश करितें

## पंचतिक्तकघृत.

वृषनिंबामृताव्याघ्रीपटोलानांश्रितेनच ॥ कल्केनपक्कंसर्पिस्तु निहन्याद्विषमज्वरान् ॥ पांडुकुष्ठंविसर्पंचकृमीनर्शांसिनाशयेत् ॥

अर्थ–अडुळसा, कडूनिंब, गुळवेल, रिंगणी, पडवळ, ह्या पांच औषधांचा काढा यांत तूप घालोन पचन करून घृत सिद्ध करावें. तें तूप पोटांत घ्यावें. तणेंकरून विषमज्वर, पांडुरोग, कुष्ठ, विसर्प, जंत व मूळव्याध हे रोग दूर होतात.

## षट्पलघृत.

शुंठीकणाचित्रकंचचव्यंग्रंथिकमेवच ॥ कुर्यात्पंचपलान्भागानेकैकस्यचकुट्टितान् ॥ जलद्रोणेविपक्तव्यंयावत्पादावशेषितं ॥ एतैस्तुपल्किकैःकल्कैःसैंधवेनसमन्वितैः ॥ षट्पलंनामविख्यातंविषमज्वरनाशनं ॥ कासश्वासातिदौर्बल्यप्रतिश्यायित्वमेवच ॥ प्लीहोर्ध्ववातश्वयथुपांडुरोगांश्चनाशयेत् ॥

अर्थ–सुंठ, पिंपळी, चित्रमूळ, चवक व पिंपळीमूळ, हीं प्रत्येकीं औषधें वीस तोळे प्रमाणें घेऊन कुटून त्यांत १०२४ तोळे पाणी घालोन चतुर्थांश काढा करून त्यांत वरच्याच औषधांचे कल्क व सैंधव घालून काढा जाळून घृत तयार करावें. तें षट्पल-

घृत विषमज्वर, कास, श्वास, दुर्बळता, पडसें, प्लीहा, उर्ध्व वात, सूज, आणि पांडुरोग यांचा नाश करितें.

## क्षीरषट्पलघृत.

पंचकोलैःससिंधूत्थैःपालिकैःपयसासमं ॥
सर्पिःप्रस्थंघृतंप्लीहविषमज्वरनाशनं ॥

अर्थ–पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ व शेंदलोण हीं औषधें चार तोळे घेऊन कुटून त्यांचा काढा व काढ्यासमान दूध व तूप एकशेर घालून पचन करावें. तें घृत प्राशनार्थ द्यावें; ह्मणजे तें प्लीहा व विषमज्वर यांचा नाश करितें.

## दुसरा प्रकार.

दशमूलरसेसर्पिःसक्षीरेपंचकोलकैः ॥ पक्कंनिहंतितत्पीतंज्वर
कासाग्निमार्दवं ॥ वातपित्तज्वरव्याधिंप्लीहानंचापिपांडुतां ॥

अर्थ–दशमूळें व पंचकोल यांचा काढा करून त्या काढ्याबरोबर दूध व तूप घालून घृत सिद्ध करावें. तें प्राशन केलें ह्मणजे ज्वर, कास, अग्निमांद्य, वातपित्तज्वर, प्लीहा व पांडु यांचा नाश करील.

## अमृताद्यघृत.

अमृतात्रिफलापटोलयासैःसंपक्कंविधिवत्घृतंविपक्कं ॥
विषमज्वरनाशनंप्रधानंक्षयगुल्मारुचिकामलापहारि ॥

अर्थ–गुळवेल, त्रिफला, कडूपडवळ व धमासा यांचा काढा व तूप एकत्र पचवून घृत सिद्ध करावें. तें विषमज्वर, क्षय, गुल्म, अरुचि आणि कावळी यांचा नाश करितें.

## शुंठ्यादिघृ०

शुंठीकणाग्रंथिकचव्यवन्हिक्षाराःपृथक्त्वेकपलप्रमाणाः ॥ प्र
स्थंघृतंनागरवारिमस्तूप्रस्थद्वयंतद्विपचेत्कषाये ॥ संसिद्धमा
ज्यंविषमज्वरेपुजीर्णज्वरेवर्पभवेपिशस्तं ॥

अर्थ–सुंठ, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, यवखार, हीं प्रत्येकीं चार तोळे घेऊन यांचा काढा करून त्यांत तूप एक शेर, आल्याचा रस व दह्यांची निवळी दोन शेर हीं सर्व एकत्र करून घृत सिद्ध करावें. तें घृत विषमज्वर, जीर्णज्वर, एकवर्षाचा ज्वर यांचा नाश करितें.

## चंदनाद्यघृ०

चंदनंचित्रकंसिंहीवत्सकंमुस्तनागरैः ॥ कटुकात्रायमाणाच
धात्र्युशीरेद्विसारिवे ॥ द्रव्यार्धपलमात्राणिसौम्यवारिपुसंहरेत् ॥

क्षीराढकसमायुक्तांसर्पिषोर्धतुलांपचेत् ॥ चातुर्थिकंहरेत्पीतं उन्मादंविषमज्वरं ॥ ऱ्याहिकंश्वासकासौचसर्वापस्मारमेवच ॥

अर्थ—चंदन, चित्रक, रिंगणीमूळ, इंद्रजव, नागरमोथें, सुंठ, कुटकी, त्रायमाण, आंवळकाठी, वाळा व दोनप्रकारची उपळसरी या औषधांचा काढा करून त्यांत दूध चार शेर व तूप येक शेर घालून पुनः शिजवावें; ह्मणजे जें तूप राहील तें चातुर्थिक, उन्माद, विषमज्वर, दमा, खोकला व फेंफरें, यांचा नाश करील.

## महाकल्याणघृ०

एतदेवहविःपक्वंजीवनीयोपसंसृतं ॥ द्विपंचमूलक्वाथेनशतावर्यारसेनच ॥ चतुर्गुणेनपयसामहाकल्याणमिष्यते ॥ अपस्मारज्वरंशोषंक्लैब्यंकाश्मर्यवीजतः ॥ घृतमेतन्निहंत्याशुये चापिविषमज्वराः ॥ जीवनीयगणत्वेनकाकोल्यादिगणग्रहः ॥ महाकल्याणकेकार्योघृतेतुदशकार्षिकः ॥

अर्थ—कल्याणघृताचीं औषधें व जीवनीयगण दाहा कर्ष, काकोल्यादिगण दशकर्ष व दशमूळें या औषधांचा काढा घेऊन त्यांत शतावरीचा रस घालून त्यांत चौपट दूध घालावें; आणि आटऊन तूप राहील तें द्यावें. तें फेंफरें, ज्वर, ताहान, यांचा नाश करितें. व लघु शिवणीच्या फळांचें चूर्ण घालून घेतलें तर नपुंसकत्व व विषमज्वर यांचा नाश करितें

## कल्याणघृत.

विडंगमुस्तत्रिफलामंजिष्ठादाडिमोत्पलैः॥ श्यामैलवालुकैलानिचंदनागरुदारुभिः ॥ बर्हिष्ठकुष्ठरजनीपर्णिनीसारिवाद्वयैः॥ हरेणुत्रिवृतादंतीवचातालीसपत्रकैः ॥ बलाविशालबृहतीमालतीपृष्ठिपर्णिभिः ॥एतैश्चकार्षिकैःकल्कैर्घृतप्रस्थंविपाचयेत् ॥ चतुर्गुणेनपयसाद्विगुणेनजलेनच ॥ एतत्कल्याणकंनामसर्पिः पक्वंत्रिदोषनुत् ॥ विषमज्वरश्वासकासगुल्मोन्मादज्वरापहं॥

अर्थ—वावडिंगें, नागरमोथे, त्रिफळा, मंजिष्ठ, दाळिंब, निळें कमळ, पिंपळी, वाळा, एलचीदाणे, चंदन, कृष्णागरू, देवदारु, काळा वाळा, कोष्ठ, हळद, साळवण, उपळसरी श्वेत व कृष्ण, पित्तपापडा, तेंड, दांतिमूळ, वेखंड, तालीसपत्र, चिकणा, कडुवृंदावन, रिंगणी, मालती व पिठवण. हिं सर्व औषधें, तोळा तोळा घेऊन त्यांचा कल्क करावा; आणि त्यांत शेर तूप, चौपट दूध आणि दुप्पट पाणी घालून तूप शिलक राही पर्यंत आटऊन उतरावें. तें कल्याणघृत घेतल्यांन त्रिदोष, विषमज्वर, श्वास, खोकला, गुल्म, उन्माद, आणि ज्वर या रोगांचा नाश करितें.

## कोलादिघृत.

कोलाग्निमंथत्रिफलाक्वाथोदध्नाघृतैःपिबेत् ॥
तिल्वकावापमेतद्धिविषमज्वरनाशनं ॥

अर्थ–बोर, टाकळा व त्रिफळा यांचा काढा करून त्यांत दहीं व तूप व हिंगणबेटा चें चूर्ण घालून घृत तयार करावें. तें विषमज्वराचा नाश करील.

## अमृतषट्पलघृत.

नागरंचविकाक्षारःपिप्पलीमूलचित्रकं ॥ कृष्णाचपलिकान्भा
गान्घृतप्रस्थेविपाचयेत् ॥ शृंगवेररसंप्रस्थंमधुप्रस्थंतथैवच ॥
एकाहिकंद्व्याहिकंचत्र्याहिकंचचतुर्थकं ॥ एतान्सर्वान्ज्वरान्हं
तिस्थूलंचकुरुतेभृशं ॥ दुर्नामश्वासकासघ्नंबलवर्णाग्निवर्द्धनं ॥

अर्थ–सुंठ, चवक, यवक्षार, पिंपळीमूळ, चित्रक, पिंपळी, हीं प्रत्येक चार तोळे घेऊन त्यांच्या काढ्यांत किंवा कल्कांत एक शेर तूप, आल्याचा रस एकशेर व मध एकशेर घालून पचऊन सिद्ध करून द्यावें. तें एकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक व चातुर्थिक या सर्वज्वरांचा नाश करून स्थूलता देतें; व अर्श, श्वास व खोकला यांचा नाश करितें; आणि बल, वर्ण व अग्नि यांला वाढवितें.

## घृतपान.

सर्पिर्दद्यात्कफेमंदेवातपित्तोत्तरेज्वरे ॥
पक्वेषुदोषेष्वमृतंतद्विषोपममन्यथा ॥

अर्थ–घृतपान मंदकफ व वातपित्तोल्बण अशा ज्वराला करावें. हें पक्वदोषांवर अमृतासारिखें व अपक्वदोषांवर विषासारिखें जाणावें.

## षट्तक्रतैल.

सुवर्चिकानागरकुष्ठमूर्वालाक्षानिशालोहितयष्टिकाभिः ॥ तै
लंज्वरेषट्गुणक्वाथसिद्धमभ्यंजनात्शीतविदाहनुत्स्यात् ॥ द
ध्नासंसारकंतस्यात्षट्तक्रंतैलमुत्तमं ॥

अर्थ–तेल एकभाग; व सज्जीखार, सुंठ, कोष्ठ, मोरवेल, लाख, हळद व मंजिष्ठ यांचा काढा साहा भाग व दहीं एकभाग घेऊन तैल सिद्ध करावें. तें षट्तक्र तैल अंगाला लावेलें असतां दाह शांत करितें. हें विषमावर अति प्रशस्त आहे.

## लाक्षादितैल.

पद्मकोत्पलकल्हारमृणालविषपौष्करैः ॥ कुमुदोशीरमंजिष्ठा

ग्नेयगौरिककट्फलैः ॥ सारिवाद्वयलोध्राब्दक्षीरीखर्जूरमुस्त कैः॥ धात्रीशतावरीयुक्तैःक्राथकल्पैःप्रयोजितैः ॥ लाक्षारस पयस्तक्रमस्तुभिःसहकांजिकैः ॥ पक्वंतैलमिदंत्वच्यंदाहज्व रहरंपरं ॥

अर्थ-पद्मकाष्ठ, कोष्ठ, तांबड्या कमळाचीं बिसें, अतिवीष, पुष्करमूळ, कमोद, वाळा, मांजिष्ट, अगस्त्या, गेरू, कायफळ, काळी व पांढरी उपळसरी, लोध्र, नागरमोथा, क्षीर-कांकोली, खजूर, भद्रमोथा, आंवळे व शतावरी यांचा काढा, आणि कल्क व लाखेचें शिरं, ताकाची निवळी व कांजी. या सर्वांत तैल सिद्ध करावें. तें त्वचेला हितकारक व दाहपूर्वकज्वरनाशक आहे.

## दुसरा प्रकार.

लाक्षारसाढकेप्रस्थंतैलस्यविपचेद्भिषक् ॥ मस्त्वाढकसमायु क्तंपिष्टाचात्रविनिःक्षिपेत्॥शतपुष्पांहरिद्रांचमूर्वांकुष्टंहरेणुकं॥ कटुकंमधुकंरास्नाअश्वगंधाचदारुच ॥ मुस्तकंचंदनंचैवपृथ गक्षसमांशकैः॥ द्रव्यैरेतैस्तुसंसिद्धमभ्यंगान्मारुतापहं ॥ वि षमाख्यान्ज्वरान्सर्वान्नाश्वेवप्रशमनयेत् ॥ कासंश्वासंप्रति श्यायंकंडूदौर्गंध्यमेववा ॥ त्रिकपृष्ठगृहंशूलंगात्राणांकुट्टनंत था ॥ पापालक्ष्मीप्रशमनंसर्वग्रहनिवारणं ॥ अश्विभ्यांनिर्मि तंसम्यक्तैलंलाक्षादिकंत्विदं ॥

अर्थ–दोनशें छपन्न तोळे लाखेचा काढा, चौसष्ट तोळे तेल, दह्याची निवळी दोनशें छप्पन्न तोळे हीं एकत्र करून त्यांत, बडिशोप, हळद, मोरवेल, कोष्ठ, पित्तपापडा, कुटकी, मोहाचीं फुलें, रास्ना, अश्वगंध, देवदार, नागरमोथा व चंदन, हीं प्रत्येकीं तोळा घेऊन त्यांचा कल्क करून पूर्वीच्या मिश्रणांत टाकून तेल सिद्ध करावें. तें वायु, विषमज्वर, कास, श्वास, पडसें, कंडू, आंगाचा दुर्गंध व तिडें, पाठ यांतील शूल, गात्रस्फुरण, पाप, औदसा व सर्व ग्रहदोष यांचा नाश करितें. हें अश्विनीकुमारांनी उत्पन्न केलेलें लाक्षा तैल जाणावें.

## षट्चरण तैल.

लाक्षामधुकमंजिष्ठामूर्वाचंदनसारिवाः ॥
तैलंषट्चरणंनामअभ्यंगाज्ज्वरनाशनं ॥

अर्थ–लाख, ज्येष्ठमध, मांजिठ, मोरवेल, चंदन व उपळसरी यांचा काढ्यांत तेल घालून सिद्ध करावें तें षट्चरणतैल होतें याच्या अभ्यंगानें सर्वज्वरनाश होतो.

## अजादिधूप.

अजायाश्चर्मरोमाणिवचाकुष्टंपलंकपा ॥

निंबपत्राणिमधुचधूपनंज्वरनाशनं ॥

अर्थ–शेळीचें कातडें व केंस, वेखंड, कोष्ठ, गुग्गुळ, कडुनिंबाचीं पानें व मध, यांचा धूप ज्वरनाशक आहे.

## वचादिधूप.

वचाहरीतकीसर्पिर्धूपःस्याद्विषमज्वरे ॥

अर्थ–वेखंड, हिरडा व तूप यांचा धूप विषमज्वरनाशक आहे.

## मसुराधूप.

मसुरातूपकैर्धूपःसर्वज्वरगदापहः ॥

अर्थ–मसुरांच्या कोंड्याचा धूप, सर्वज्वरनाशक आहे.

## सहदेव्यादिधूप.

सहदेवीवचाभद्रानाकुलीभिःप्रधूपनं ॥

प्रदेहोद्वर्तनंकुर्यादेभिर्वाज्वरशांतये ॥

अर्थ–चिकणामूळ, वेखंड, हळद व रास्ना यांचा धूप द्यावा. अथवा त्यांचा आंगाला लेप करावा; ह्मणजे ज्वर शांति होत्ये.

## गुग्गुलादिधूप.

पुरध्यामवचासर्जनिंबार्कागरुदारुभिः ॥

सर्वज्वरहरोधूपःश्रेष्ठोयमपराजितः ॥

अर्थ–गुग्गुळ, रोहिसगवत, वेखंड, राळ, कडुनिंब, रुई, चंदन व दारुहळद, यांचा धूप सर्वज्वरनाशक आहे.

## माहेश्वरधूप.

रुद्रजटागोशृंगंबिडालविष्ठोरगस्यनिर्मोकः ॥ मदनफलभूत

केशैर्वैशल्वकृरुद्रनिर्माल्यं ॥ घृतयवमधुरंचंद्रकलाछागलरो

माणिसर्षपाःसवचाः ॥ हिंगुगवाक्षीमरिचाःसमभागाश्छागम्

त्रसंपिष्टाः ॥ धूपनविधिनाशमयंत्येतेसर्वज्वरान्नियतं ॥ ग्रह
शाकिनीपिशाचप्रेतविकारानयंधूपः ॥

अर्थ–शिवलिंगी, गाईचें शिंग, मांजराची विष्ठा, सापाची मेंग, गेळफळ, जटामांसी, वेळूची साल, गंगोदक, घृत, यव, गूळ, बांवचा, बकऱ्याची लोंकर, मोहऱ्या, वेखंड, हिंग, कंवडळ, मिरीं, हीं समभाग, घेऊन बकऱ्याचे मुतांत वाटून धूप द्यावा; ह्मणजे तो सर्वज्वर, शाकिनी, पिशाच व प्रेतविकार यांचा नाश करितो.

## सर्पत्वचादिधूप.

सर्पत्वचासर्षपहिंगुनिंबपत्राण्यमीषांसमचूर्णधूपः ॥
विनिग्रहंराक्षसडाकिनीनांकरोतिरक्षांविषमज्वरस्य ॥

अर्थ–सर्पाची मेग, शिरस, हिंग, कडुनिंबाचीं पानें, यांचे समभाग चूर्ण करून त्याचा धूप राक्षस व डाकिनी, यांस प्रतिबंध करून तें विषमज्वराचा नाश करील.

## पलंकपादिधू०

पलंकपानिंबपत्रंवचाकुष्टंहरीतकी ॥
सर्षपाःसयवाःसर्पिर्धूपनंज्वरनाशनं ॥

अर्थ–लाख, कडुनिंबाचीं पानें, वेखंड, कोष्ठ, हरीतकी, शिरस, यव, आणि तूप यांचा धूप ज्वरशांति करितो.

## माहेश्वरधू०

कार्पासास्थिमयूरपिच्छबृहतीनिर्माल्यपिंडीतकत्वङ्मांसीविष
दंशविट्नखवचाकेशाहिनिर्मोचनैः ॥ वागेंद्रद्विजशृंगहिंगुम
रिचैस्तुल्यंकृतंधूपनंस्कंदोन्मादपिशाचराक्षससुरावेशज्वरघ्नंपरं ॥

अर्थ–कापसाच्या सरकया, मोराचे पीस, रिंगणी, लाजाळू, गेळ, दालचिनी, मांजराची विष्ठा, नखला, वेखंड, केस, सापाची मेग, हस्तीदंत, शिंग, हिंग, आणि मिरीं हीं समभाग घेऊन त्यांचे चूर्ण करून धूप द्यावा; ह्मणजे तो स्कंदग्रहोन्माद, पिशाच, यक्ष, राक्षस, आणि देव अंगांत येतात त्यांचा नाश करितो.

## निंबपत्रादिधू०

निंबपत्रंवचाकुष्ठंपथ्यासिद्धार्थकंघृतं ॥
विषमज्वरनाशायगुग्गुलुश्चेतिधूपनं ॥

अर्थ–कडुनिंबाचा पाला, वेखंड, कोष्ट, हरीतकी, शिरस, तूप आणि गुग्गुळ यांचा धूप विषमज्वरनाशक आहे.

## मार्जारविष्ठाधू०

बैडालंवाशकृद्योज्यंवेपमानस्यधूपने ॥

**अर्थ**–मांजराच्या विष्ठेचा धूप थंडीनें कांपतो त्याला द्यावा. तो ज्वरनाशक आहे.

## सहदेवीमूलिकाबंध.

स्मशानसहदेव्यावादूर्वायावाथमूलिका ॥

सुत्रेणवेष्टिताबध्धाहस्तेसर्वज्वरापहा ॥

**अर्थ**–स्मशानांत उत्पन्न जाहालेल्या सहदेवीचें, किंवा दूर्वाचें मूळ सुतानें वेष्टून हातांत बांधिलें असतां सर्व ज्वराला शमवितें.

## बांदेबंध.

आम्रबंदंविशेषोयंकरेबध्वाज्वरंजयेत् ॥ आहरेदनुराधायांक रवीरस्यबंदकं ॥ ब्रह्मवृक्षस्यबंदंवाऋक्षेउत्तरभाद्रके ॥ करेब द्धंज्वरंहंतिसर्वमेतत्पृथक्पृथक् ॥

**अर्थ**–अनुराधा किंवा उत्तराभाद्रपदा यांतून कोणत्याहीं नक्षत्रांवर आंबा, कण्हेरी व ऊस याचे बांदे घेऊन हातांत बांधिल्यास ज्वर जातो.

## उलूकपक्षबंध.

उलूकदक्षिणंपक्षंसितसूत्रेणवेष्टयेत् ॥

बध्धंवावामकर्णेतुहरत्येकाहिकंज्वरम् ॥

**अर्थ**–घुबडाच्या उजवीकडचा पंख घेऊन तो पांढऱ्या सुतांत बांधून डाव्या कानास धावा; ह्मणजे एकाहिकज्वर जातो.

## गोपालिकामूलबंध.

गोपालपत्रिकामूलंसहदेवीबलाथवा ॥

गोजिव्हाविजयामूलंगलेबध्धंज्वरापहं ॥

**अर्थ**–चिभूड, सहदेवी, चिकणा, पाथरी, किंवा विजया यांतून कोणाचें हीं मूळ गळ्यांत बांधिलें असतां ज्वर जातो.

## भूतकेशीमूलबंध.

भूतकेश्याश्चमूलंवासप्तखंडानिकारयेत् ॥

बंधयेद्रक्तसूत्रेणहस्तेचज्वरनाशनं ॥

अर्थ–भूतकेशीची मुळी घेऊन तिचे सात तुकडे करावे; आणि ते लालसुतांत गांठऊन हातांत बांधावें; ह्मणजे ज्वर नाश पावतो.

## निर्गुंडीबंध.

निर्गुंड्याःसहदेव्याश्चकटौबद्धंजटाद्वयं ॥
प्रातरादित्यवारेचसर्वज्वरविनाशकृत् ॥

अर्थ–निर्गुंडी आणि सहदेवी यांच्या मुळ्या रविवारीं प्रातःकाळीं कमरेस बांधल्या ह्मणजे संपूर्ण ज्वरांचा नाश होतो.

## कण्हेरमूलिकाबंध.

कर्णेबद्धारवौश्वेततुरंगरिपुमूलिका ॥
सर्वज्वरहराश्वेतमंदारस्यचमूलिका ॥

अर्थ–रविवारी पांढऱ्या कण्हेरिची, किंवा श्वेत मांदाराची मुळी, कानांला बांधिली, तर ती सर्व ज्वरांना नाश करित्ये.

## संततज्वरनिदान.

सप्ताहंवादशाहंवाद्वादशाहमथापिवा ॥
संतत्यायोविसर्गीस्यात्संततःसनिगद्यते ॥

अर्थ–सात, दाह, किंवा बारा, दिवस पर्यंत एकसारिखा जो ज्वर राहतो त्याला, संतत ज्वर ह्मणतात. सात, दाहा व बारा हे विकल्प सांगीतले. ते अनुक्रमाने वात पित्त व कफ यांच्या उल्बणाने सांगितले. हा सतत ज्वर त्रिदोषज आहे. वातादि दोषांनीं ३ सप्तधातू ७ मूत्र ११ पुरीष १२ हे दुष्ट झाले असतां यांच्या कोपाने मलाकर्षण होऊन संतत होतो असे चरक मत आहे.

## पटोलादिकाढा.

पटोलेंद्रयवादारुगुडूचीनिंबपल्लवाः ॥
हंतिक्काथेनिपीतोयंसंततंविषमज्वरं ॥

अर्थ–कडूपडवळ, इंद्रजव, देवदार, गुळवेल, आणि कडूनिंबाचा पाला यांचा काढा प्राशन केला; तर तो संततनामक विषमज्वराचा नाश करितो.

## दुसरा प्रकार.

पटोलेंद्रयवादारुत्रिफलामुस्तगोस्तनैः ॥ मधुकामृत
वासानांक्काथंक्षौद्रयुतंपिबेत् ॥ संततेसततेचैवद्वितीयक
तृतीयके ॥ ऐकाहिकेवाविषमेदाहपूर्वेनवज्वरे ॥

अर्थ—कडूपडवळ, इंद्रजव, देवदार, हिरडा, बेहडा, आवळकाठि, नागरमोथे, द्राक्ष, ज्येष्ठ-मध, गुळवेल व अडूळसा या अकरा औषधांचा काढा करून त्यांत मध मेळऊन प्याले असतां तो संततज्वर, सततज्वर, द्वितीयक, तृतीयक, एकाहिक, विषमज्वर, दाहपूर्वकज्वर, व नवज्वर यांचा नाश करितो.

## तिसरा प्रकार.

पटोलाब्दवृपातिकासारिवाभिःशृतंजलं ॥
संतताख्येज्वरेदेयंवातादीनांनिवृत्तये ॥

अर्थ—कडूपडवळ, नागरमोथे, अडुळसा, कुटकी व उपळसरी, यांचा काढा करून तो सततज्वरामध्ये वातादिकांचे निवारणार्थ प्राशनास द्यावा.

## चवथा प्रकार.

पटोलेंद्रयवानंतापथ्यारिष्टामृतंजलं ॥
क्वथितंतज्जलंपीतंज्वरंसंततकंजयेत् ॥

अर्थ—कडूपडवळ, इंद्रजव, धमासा, हिरडे, कुटकी व गुळवेल या औषधांचा काढा करून द्यावा, तो सततज्वराचा नाश करितो.

## आमलक्यादिकाढा.

आमलकीघननागरसिंहिछिन्नलताविहितश्चकषायः ॥
माक्षिकमागधिकापरिमिश्रोहंत्यनिशंसंततज्वरमाशु ॥

अर्थ—आवळकाठी, नागरमोथा, सुंठ, रिंगणी व गुळवेल, यांचा काढा मध व पिंपळी यांचे चूर्ण घालून द्यावा; हा सतताख्यविषमज्वराचा लवकर नाश करितो.

## ज्वरभेद.

एकद्वित्रिचतुर्थःस्याद्विषमोन्यस्तुजीर्णकः ॥
एतेपंचज्वराःपीडयंत्येवबहुवासरं ॥

अर्थ—एकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक व चातुर्थिक. हे चार विषमज्वर आणि दुसरा जीर्णज्वर असे हे पांच ज्वर फार दिवस पीडा देतात.

## सतत व अन्येद्युष्कादिकांचें लक्षणनिदान.

अहोरात्रेसततकोद्वौकालावनुवर्तते ॥ अन्येद्युष्कस्त्वहोरात्रेए
ककालंप्रवर्तते ॥ तृतीयकस्तृतीयेन्हिचतुर्थेन्हिचतुर्थकः ॥ के
चिद्भूताभिषंगोत्थंवदंतिविषमज्वरं ॥

अर्थ—सततज्वर अहोरात्रांत दोनवेळ येतो. अन्येद्युष्क ज्वर अहोरात्रांत एकवेळ येतो तृतीयज्वर आल्या दिवसापासून तिसरे दिवशी येतो. चातुर्थिक चौथे दिवशी येतो. हे विषमज्वर भूताभिषंगोत्थ आहे असे कोणी ह्मणतात.

## त्रायंत्यादिकाढा.

त्रायंतीकटुकानंतासारिवाभिःशृतंजलं ॥
सतताख्येज्वरेदेयंवातादीनांनिवृत्तये ॥

अर्थ—त्रायमाण, कुटकी, धमासा व पांढरी उपळसरी या औषधांचा काढा करून द्यावा; ह्मणजे तो सततादिकांमध्ये वातादिकांचें निवारण करितो.

## पटोलादिकाढा.

पटोलपथ्यापिचुमंदशक्रबीजामृतायासकृतःकषायः ॥
निपीतमात्रःशमयत्युदीर्णंकासादियुक्तंसततंज्वरंहि ॥

अर्थ—कडूपडवळ, हरीतकी, निंब, इंद्रजव, गुडूची, व धमासा, यांचा काढा प्राशन केला, ह्मणजे तो खोकला व सततज्वर यांचा नाश करितो.

## द्राक्षादिकाढा.

द्राक्षापटोलनिंबाब्दाशक्राव्हात्रिफलाशृतं ॥
जलंजंतुःपिबेच्छीघ्रंअन्येद्युज्वरशांतये ॥

अर्थ—द्राक्षे, कडूपडवळ, कडुनिंब, नागरमोथा, इंद्रजव व त्रिफळा यांचा काढा एकाहिकज्वर जाण्याकरितां प्राशन करावा.

## पटोलादिकाढा.

पटोलत्रिफलानिंबद्राक्षाशम्याकवासकैः ॥
क्काथःसितामधुयुतोजयेदेकाहिकंज्वरं ॥

अर्थ—कडूपडवळ, हिरडा, बेहेडा, आवळकाठी, कडूलिंबाची पानें, द्राक्षें, बाहव्याचा मगज व अडुळसा या आठ औषधांचा काढा मध व साकर घालून घ्याले असतां प्रतिदिवशीं जो ज्वर येतो, तो दूर होतो.

## ब्रह्मदंडीनस्य.

एकाहिकंज्वरंहंतिनस्याद्वागिरिकर्णिका ॥
ब्रह्मदंडीतिविख्याताअधःपुष्पीतुनामतः ॥

अर्थ—गिरिकर्णिकेच्या किंवा जिला ब्रह्मदंडी अथवा अधःपुष्पी ह्मणतात, तिच्या रसाचें नस्य द्यावें; तें एकाहिक ज्वराचा नाश करितें.

## सर्पाक्षीमूलिकाबंध.

सोमग्रहणवेलायांसर्पाक्षीमभिमंत्रयेत् ॥ शिफांहिकृष्णसूत्रेण
वामकर्णेनिबंधयेत् ॥ ऐकाहिकंज्वरंहंतिद्याहिकंदक्षकर्णके ॥

अर्थ–चंद्रग्रहणाच्या वेळीं मुंगुसवेलीला आंवतून तिची मुळी काळ्या सुतानें डाव्या कानाला बांधावी; ह्मणजे एकाहिकज्वर जातो. व द्व्याहिकज्वर असला तर उजव्या कानाला बांधावी; ह्मणजे तोहि ज्वर नाश पावतो.

## ऐकाहिकावर अपामार्गमूलीकाबंधन.

कन्याकर्तितसूत्रेणबद्धापामार्गमूलिका ॥
ऐकाहिकंज्वरंहंतिशिखायामतिवेगतः ॥

अर्थ–कुमारीनें काढिलेल्या सुतानें गुंढाळून आघाड्याची मुळी शेंडीस बांधावी; ह्मणजे ती एकाहिक ज्वराचा अतिवेगानें नाश करिते.

## काकमाचीमूलिकाबंधन.

काकमाच्याश्चमूलंतुकर्णेबद्धंनिशिज्वरं ॥

अर्थ–कावळीची मुळी कानांत बांधिल्यास ती रात्रिज्वराचा नाश करिते.

## सर्पाक्षीतिलक.

स्मशानजातसर्पाक्ष्यारवौमूलंसमुद्धरेत् ॥
घृतैर्घृत्वाललाटेतुतिलकःस्याद्दिनत्रणुत् ॥

अर्थ–स्मशानांमध्यें रुजलेल्या मुंगुसवेलीची मुळी आदितवारीं घ्यावी; आणि तिचा तुपाशीं उगाळून ललाटावर तिलक करावा; ह्मणजे एकाहिकज्वर जातो.

## दान.

अंगवंगकलिंगेषुसौराष्ट्रमगधेषुच ॥
वाराणस्यांचयद्दत्तंतत्तदैकाहिकेस्मरेत् ॥

अर्थ–अंग, वंग, कलिंग, सौराष्ट्र, आणि मगध या देशांचेठायीं किंवा श्रीकाशीक्षेत्रीं एकाहिकाचें स्मरण करून दान द्यावें; ह्मणजे एकाहिक ज्वर जातो.

## तर्पण.

योसौसरस्वतीतीरेअपुत्रस्तापसोमृतः ॥
तस्मैतिलोदकंदद्यान्मुंचेदैकाहिकोज्वरः ॥

अर्थ–जो सरस्वतीचे तीरीं अपुत्र तपस्वी मेला, त्याला तिळांजळी दिल्यानें [ए]काहिकज्वर जातो.

## उलूकपक्षबंध अन्येद्युष्कावर.

उलूकस्योत्तरंपक्षंरक्तसूत्रेणवेष्टयेत् ॥
बद्धंतुदक्षिणेकर्णेद्व्याहिकंवाज्वरंजयेत् ॥

**अर्थ**–घुबडाचा डावा पक्ष लालसुतानें वेष्टन करावा; आणि तो उजव्या हातांत बांधावा; ह्मणजे तो अन्येद्युष्क व द्व्याहिक यां ज्वरांचा नाश करील.

## वासादिकाढा.

वासापटोलत्रिफलाद्राक्षाशम्याकनिंबजः ॥
समधुःससितःक्काथोहन्याद्वैद्व्याहिकज्वरं ॥

**अर्थ**–अडुळसा, कडुपडवळ, त्रिफळा, द्राक्षे, बाहव्याचा मगज, आणि कडूनिंब यांच्या काढ्यांत मध व साकर घालोन द्यावा; ह्मणजे तो द्व्याहिकज्वराचा नाश करील.

## पटोलादिकाढा.

पटोलारिष्टमृद्वीकाशम्याकास्त्रिफलावृषं ॥
क्काथएैकाहिकंहंतिशर्करामधुसंयुतः ॥

**अर्थ**–कडुपडवळ, कडुनिंब, द्राक्षे, बाहव्याचा मगज, हरडा, बेहडा, आवळकाठी, आणि अडुळसा यांचा काढा मध व साकर घालोन द्यावा. तो द्व्याहिकज्वराचा नाश करील.

## अंजन.

ऊर्णनाभिस्थजालेनवर्तिंकृत्वाप्रयत्नतः ॥ ज्वालयेत्तिलतैलेन
कज्जलंग्राहयेच्छनैः ॥ अंजयेन्नेत्रयुगलंद्व्याहिकंतुज्वरंनयेत् ॥

**अर्थ**–कोळ्याचा जाळ्याचे सुताची वात करून ती तिळांच्या तेलांत पेटऊन काजळ धरावें; आणि त्याचें दोनही नेत्रांत अंजन करावें; ह्मणजे त्याणें द्व्याहिकज्वर नाश पावेल.

## ऐकाहिकादिकांवर हिंगुलयोग.

म्लेच्छंसमंविषंपिष्ट्वाप्रदद्याद्गुंजिकासमं ॥ ऐकाहिकंद्व्याहिकं
वातृतीयंचचतुर्थकं ॥ निहन्यान्नात्रसंदेहोयथासूर्योदयेतमः ॥

अर्थ–हिंगुळ व बचनाग हे समान एकत्र खलून त्याचें चूर्ण एक गुंज द्यावे; ह्मणजे ते एकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, आणि चातुर्थिक यां ज्वरांचा नाश करील.

## तृतीयकज्वरनिदान.

कफपित्तात्त्रिकग्राहीपृष्ठाद्वातकफात्मकः ॥
वातपित्ताच्छिरोग्राहीत्रिविधःस्यात्तृतीयकः ॥

अर्थ—कफपित्तात्मक जो तृतीयकज्वर, तो कमर व पाठीचा कणा यांचे संधीत उत्पन्न होऊन नंतर शरिरांत प्रवेश करितो; आणि जो वातकफात्मक तृतीयकज्वर, तो पाठींतून उत्पन्न होतो. तसा वातपित्तजन्य जो तृतीयकज्वर, तो मस्तकापासून उत्पन्न होतो. असा तीन प्रकारचा तृतीयक ज्वर जाणावा.

## महौषधादिकाढा.

महौषधामृतामुस्ताचंदनोशीरधान्यकैः ॥
क्काथस्तृतीयकंहंतिशर्करामधुयोजितः ॥

अर्थ—सुंठ, गुळवेल, नागरमोथा, चंदन, वाळा व धने यांचा काढा साकर व मध घालोन घेतला असतां तृतीयकज्वर शांत होईल.

## शिशिरादिकाढा.

सशिशिरःसघनःसमहौषधःसनलदःसकणःसपयोधरः ॥
समधुशर्करएपकषायकोजयतिबालमृगाक्षितृतीयकं ॥

अर्थ—हे बालमृगाक्षि, रक्तचंदन, धने, सुंठ, वाळा, पिंपळी व नागरमोथे या औषधांचा काढा करून त्यांत मध व खडिसाकर घालोन द्यावा; ह्मणजे तृतीयक ज्वर नाश पावेल.

## उशीरादिकाढा.

उशीरंचंदनंमुस्तंगुडुचीधान्यनागरं ॥ अंभसाक्कथितंपेयंशर्करामधुयोजितं ॥ ज्वरेतृतीयकेपुंसांतृष्णादाहसमन्विते ॥

अर्थ—वाळा, चंदन, नागरमोथे, गुळवेल, धने व सुंठ यांचा काढा करून मध व साकर घालून रोग्यास द्यावा; ह्मणजे तो तृतीयकज्वर, तृषा, दाहपूर्वकज्वर. यांचा नाश करील.

## शीतभंजीरस.

शीतभंजीरसोप्यत्रसानुपानोद्विगुंजकः ॥
मुसलीमारनालेनपीत्वाहंतितृतीयकं ॥

अर्थ—शीतभंजीरस अनुपानाशीं दोन गुंजा द्यावा; किंवा मुसली, कांजीत वाटून द्यावा; ह्मणजे तृतीयकज्वराचा नाश होतो.

## अपामार्गमूलिकाबंध.

अपामार्गजटाकट्यालोहितैःसप्ततंतुभिः ॥
बद्धावारेरवेस्तूर्णंज्वरंहंतितृतीयकं ॥

अर्थ–आघाड्याची मूळी आदितवारीं तांबड्या सुताच्या सात तंतूंनीं गुंढाळून कमरेस बांधावी; ह्मणजे तृतीयकज्वर शांत होईल.

## वाराहीमूलिकाबंध.

वाराहीशिखिकामूलंकर्णबद्धंतृतीयकं ॥ ज्वरंहंत्यथबाहुस्थो
पक्षस्तूलूकसंभवः ॥ वेष्टयेत्पंचरंगेणसूत्रेणाबंधयेद्गले ॥

अर्थ–डुकरकंदाची खांदी किंवा मुळी, किंवा घुबडाचा पंख पंचरंगी दोऱ्यानें बाहूस. किंवा गळयांत बांधिल्यानें तृतीयकज्वर नाश पावतो.

## चातुर्थिकज्वरनिदान.

चातुर्थिकोदर्शयतिप्रभावंद्विविधंज्वरः ॥ जंघाभ्यांश्लेष्मिकः
पूर्वंशिरसोनिलसंभवः ॥ विषमज्वरएवान्यश्चातुर्थिकविपर्ययः ॥
समध्येज्वरयत्यन्हिआदावंतेचमुंचति ॥

अर्थ–चातुर्थिकज्वर आपलें समर्थ्य दोन प्रकारचें दाखवितो. जो कफजन्य चातुर्थिक, तो पूर्वी पायांचे पोटऱ्यांतून आंगांत भरतो; व वातजन्य चातुर्थिक, मस्तकांतून शरीरांत संचार करितो, आणि मध्यावस्थेचे ठायीं दाह करितो, तो पूर्वी व ज्वरानंतर नमता दाखवीत नाहीं.

## विषमसामान्यउपद्रव.

विषमज्वरस्यनेस्युःपंचसाध्याउपद्रवाः ॥ अधिशेतेयथाभूमिंबी
जंकालेप्ररोहति ॥ अधिशेतेतथाधातौदोषःकालेप्रकुप्यति ॥

अर्थ–विषमज्वराचे पूर्वी सांगितले पांच उपद्रव ते औषधादिकानीं साध्य जाणावे. जसें भूमींतबीज पूर्वीं पडतें; नंतर वर्षाकाळीं उत्पन्न होतें. तसें धातूचा ठायीं वातादिक सूक्ष्मरूपाने राहून नंतर प्रकोपकाळीं कोपतात.

वेगेतुसमतिक्रांतेगतोयमितिलक्ष्यते ॥
धात्वंतरेपुलीनत्वात्सौक्ष्मान्नैवोपलक्ष्यते ॥

अर्थ–ज्वराचा वेग शांत जाहाल्यानें तो गेलासा वाटतो; परंतु तो ज्वर अन्यधातूंप्रत जाऊन सूक्ष्मरूपानें राहातो; ह्मणून दिसत नाहीं.

## सामान्यचिकित्सा.

कर्मसाधारणंत्यक्त्वातृतीयकचतुर्थकौ ॥
भिषजाप्रतिकर्तव्यौविशेषोक्तचिकित्सितैः ॥

अर्थ–तृतीयक आणि चातुर्थिक ज्वराला साधारण क्रिया सोडून ज्या विशेषक्रिया सांगितल्या त्या क्रियानींच प्रतीकार करावा.

## दुसरा प्रकार.

ज्वरस्यवेगकालंचचिंतयन्ज्वर्यतेतुयः ॥
तस्येष्टैरद्भुतैर्वापिविपयैर्नाशयेत्स्मृतिं ॥

अर्थ–रोग्याला ज्वराच्या वेळेच्या धास्तीनें ह्मणजे चिंतनानें ज्वर येतो. याकरितां इष्टसाधनानीं अथवा अद्भुतसाधनानीं ज्वरिताचें मन तिकडून फिरवावें.

## तिसरा प्रकार.

सततंविषमंवापिक्षीणस्यसुचिरोत्थितं ॥
ज्वरंसंभोजनैःपथ्यैर्ज्वरघ्नैःसमुपाचरेत् ॥

अर्थ–संतत अथवा विषमज्वर क्षीणपुरुषाला फारदिवस येतो. त्याला उत्तम भोजन, पथ्य अशा ज्वरघ्न उपायानीं यत्न करावा.

## वासादिकाढा.

वासाधात्रीस्थिरादारुधान्यानागरसाधितं ॥
सितामधुयुतंकुर्याच्चातुर्थिकनिवारणं ॥

अर्थ–अडुळसा, आवळकाठी, सालवण, देवदार, धने, आणि सुंठ यांचा काढा मध व साकर घालून घ्यावा; ह्मणजे चातुर्थिकज्वर जातो.

## पथ्यादिकाढा.

पथ्यास्थिरानागरदेवदारुधात्रीवृषैरुत्क्वथितःकषायः ॥
सितोपलामाक्षिकसंप्रयुक्तश्चातुर्थिकंहंत्यचिरेणपीतः ॥

अर्थ–हरडा, सालवण, सुंठ, देवदार, अवळकाठी व अडुळसा यांचा काढा खडिसाकर व मध घालून प्यावा. तो चातुर्थिकज्वराचा नाश करितो.

## देवदार्व्यादिकाढा.

देवदारुशिवावासाशालिपर्णीमहौषधैः ॥ धात्रीयुतंश्रितंशी
तंदद्यान्मधुसितायुतं ॥ चातुर्थिकज्वरेश्वासेकासेमंदानलेतथा ॥

अर्थ–देवदार, बाळहिरडे, अडुळसा, रानगांजा, सुंठ, आणि आवळकाठी या साहा औषधांचा काढा थंड जाहाल्यावर त्यांत मध व साकर घालून घेतल्यानें चातुर्थिक ज्वर शांत होईल.

## स्थिरादिकाढा.

स्थिरासामलकादारुश्रीवेष्टकमहौषधैः ॥ श्रितंशीतंजलंदद्या
त्सितामधुविमिश्रितं ॥ चातुर्थिकेज्वरेतीव्रेमंदेचैवाथपावके ॥

अर्थ–साळवण, आवळकाठी, देवदार, सरलवृक्ष व सुंठ यांचा काढा करून थंड जाहाल्यावर मध व साकर घालून घेतल्यास चातुर्थिक ज्वर जातो.

## दुस्पर्शादिकाढा.

दुस्पर्शौशीरसिंहीघनमधुकशिवावाजिविश्वाटरूपश्छिन्नारेणूकषायःसमधुमगधकोवापितश्चाष्टमांशं ॥ दाहंस्वेदंचशोषंकृमिमथरुधिरंशैत्यमुद्भ्रांतचित्तंश्वासंशूलंचतृष्णांदिनानिशिविषमंहंतिचातुर्थिकाद्यं ॥

अर्थ–रिंगणमूळ, वाळा, डोरली. नागरमोथा, मोहाचें फूल हिरडे, असगंध, सुंठ, अडुळसा, गुळवेल व पित्तपापडा या औषधांचा काढा करून त्यांत मध व पिंपळी घालून द्यावा; ह्मणजे दाह, घाम, ताहान, जंत, रक्त, शैत्य, भ्रांति, श्वास, शूल, दिवाज्वर, रात्रिज्वर, आणि चातुर्थिक ज्वर हे नाश पावतात.

## दार्व्यादिकाढा.

दार्वीदारुकलिंगलोहितलताशम्याकपाठाशठीशौंडीविश्वकिरातवारणकणात्रायंतिकापद्मकैः ॥ उग्राधान्यकनागराब्दसरलैःशिग्रुत्वगंबुशिवाव्याघ्रीपर्पटदर्भमूलकटुकानंतामृतापौष्करैः ॥ धातुस्थंविषमंत्रिदोषजनितंचैकाहिकंद्व्याहिकंकाथोहंतितृतीयकंज्वरभयंचातुर्थिकंभूतजं ॥

अर्थ–दारुहळद, देवदार, इंद्रजव, मांजिष्ठ, बाहवा, पाहाडमूळ, कचोरा, पिंपळी, सुंठ, काडेचिराईत, गजपिंपळी, त्रायमाण, पद्मकाष्ठ, वेखंड, धने, आलें, नागरमोथे, सरू, शेवगा, दालचिनी, वालुक, हिरडे, रिंगणी, पित्तपापडा, दर्भमूळ, कुटकी, धमासा, गुळवेल, आणि पुष्करमूळ या औषधांचा काढा करून द्यावा. तो धातुगत, विषम, त्रिदोष ज्वर, एकाहिक, द्वयाहिक, त्र्याहिक, आणि चातुर्थिक ज्वर यांचा नाश करील.

## मुस्तादिकाढा.

मुस्तापाठाशिवाक्काथश्चातुर्थिकज्वरापहः ॥
दुग्धेनत्रिफलापीताहंतिचातुर्थिकंज्वरं ॥

अर्थ–नागरमोथे, पाहाडमूळ व अवाळकाठी यांचा काढा, किंवा त्रिफळाचूर्ण, दुधाशीं प्यालें असतां चातुर्थिकज्वर नाश पावेल.

## बेलफळचूर्ण.

शैलूषमंडनरजोवयसानुरूपशुभ्रांगवत्ससुरभीपयसानिपीतं ॥
आदित्यवारभवपालिदिनेनरेणचातुर्थिकंसुचिरजंजयतिक्षणेन ॥

अर्थ—बेलफळ व मधुमाधवी यांचें चूर्ण करून तें वयास योग्य व तरुण व पांढरा-वत्स जीचा आहे अशा त्या गाईचें दुधाशीं आदितवारच्या पाळीवर प्यालें असतां फार दिवसांचा हि चातुर्थिकाचा क्षणांत नाश करील.

## पुनर्नवादुग्धयोग.

सितवर्षाभुवोमूलंपयसापीतंचपैत्तिकंहरति ॥
चातुर्थिकंसुचिरजंतांबूलेनैवभक्षणादथवा ॥

अर्थ—पांढऱ्या पुनर्नव्याचें मूळ दुधाशीं प्राशन केल्यानें, अथवा विड्याशीं भक्षण केल्यानें फार जुनाट हि चातुर्थिक नाश पावतो.

## वृषदंशपुरीषादियोग.

वृषदंशपुरीषंचपयसालोड्यपाययेत् ॥
चातुर्थिकस्यागमनेनियतंनभविष्यति ॥

अर्थ—गोमाशीची विष्ठा दुधांत कालवून चातुर्थिक ज्वर येण्याचे वेळेस प्राशनार्थ द्यावी, म्हणजे खचित ज्वर येणार नाहीं.

## शिरीषकल्क.

कल्कःशिरीषपुष्पस्यरजनीद्वयसंयुतः ॥
तस्यसर्पिःसमायोगाज्ज्वरंचातुर्थिकंजयेत् ॥

अर्थ—शिरसाचीं फुलें, हळद व दारुहळद हीं एकत्र वाटून त्यांचा कल्क तुपाशीं द्यावा. तो चातुर्थिक ज्वराचा नाश करितो.

## हिंगुनस्य.

चातुर्थिकोगच्छतिरामठस्यघृतेनजीर्णेनयुतस्यनस्यात् ॥
लीलावतीनांनवयौवनानांमुखावलोकादिवसाधुभावः ॥

अर्थ—जुन्या तुपांत हिंग उगाळून नाकांत नस्य द्यावें. त्याणें चातुर्थिक ज्वर नाश पावतो. जसा तरुण व सुंदर स्त्रियांच्या मुखावलोकनानें साधुपणा जातो. तसा.

## अगस्तिपत्रनस्य.

अखंडितशरत्कालकलानिधिसमानने ॥
चातुर्थिकहरंनस्यंमुनिद्रुमदलांबुना ॥

अर्थ-हे शरत्कालीनचंद्रानने, अगस्त्याचे पानांचा रस काढून त्याचें नस्य करावें; ह्मणजे चातुर्थिक ज्वर जातो.

## उलूकपक्षधूप.

कृष्णांबरेदृढंबद्धोगुग्गुलूलूकपक्षकः ॥
धूपश्चातुर्थिकंहन्यात्तमःसूर्यइवोदितः ॥

अर्थ-काळ्या फडक्यांत गुग्गुळ व घुबडाचा पक्ष हे एकत्र बांधून त्याचा धूप द्यावा; ह्मणजे चातुर्थिक ज्वर सूर्योदय झाल्यावर जसा अंधार नाश पावतो. तसा नाश पावेल

## अपामार्गमूलिकाबंध.

कन्याकर्तितमूत्रेणअपामार्गस्यमूलिका ॥
रवौबद्धाज्वरंहंतितृतीयकचतुर्थकं ॥

अर्थ-कुंवारीनें कांतल्या सुतानें रविवारीं आघाड्याची मुळी ज्वरिताचे हातांत बांधावी. ती चातुर्थिक ज्वराचा नाश करित्ये.

## सहदेवीमूलबंध.

विवस्त्रेणघृतादेवीमूलिकाकर्णबंधनात् ॥
चातुर्थिकंज्वरंहंतिद्रोणपुष्पीरसांजनात् ॥

अर्थ-नागवें होऊन सहदेवीचें मूळ घ्यावें; आणि कानांत बांधावें. तसेच द्रोणपुष्पी-च्या रसाचें अंजन करावें; ह्मणजे चातुर्थिकज्वर जातो.

## काकजंघादिबंध.

काकजंघाबलाश्यामाभृंगराजापमार्गकाः ॥
एकैकंपुष्ययोगेनबध्वाचातुर्थिकंहरेत् ॥

अर्थ-लघुकावळी, चिकणा, पिंपळी, माका, अथवा आघाडा, यांतून कोणाचेंही मू-ळ पुष्यनक्षत्रीं हातास बांधिलें असतां चातुर्थिकज्वराचा नाश होतो.

## पंचपंचकषाय.

कालिंगकःपटोलस्यपत्रंचकटुरोहिणी ॥ पटोलंसारिवामुस्तंपा
ठाकटुकरोहिणी ॥ निंबःपटोलंत्रिफलामृद्वीकामुस्तवासकौ ॥
किराततिक्तोह्यमृताचंदनंविश्वभेषजं ॥ गुडूच्यामलकंमुस्तम
र्धश्लोकसमापनाः॥ कषायाःशमयंत्याशुपंचपंचविधंज्वरं ॥

अर्थ-(१)कुड्याची साल, कडूपडवळीचीं पानें व कुटकी यांचाव (२)कडूपडवळ, उप-ळसरी,नागर मोथा, पाडळ, कुटकी, यांचा व(३)कडुनिंब, कडूपडवळ, त्रिफळा द्राक्षे, नागर-

मोथें, व अडुळसा, यांचा व (४) किराईत, गुळवेल, रक्तचंदन व सुंठ यांचा व (५) गुळवेल, आवळकाठी व नागरमोथें यांतील कोणताही कषाय या पांच प्रकारच्या ज्वरांना शमवितो.

## धातुशोषणारा अत्यंत कष्टसाध्य असा विषमज्वर सांगतो.

विदग्धेऽन्नरसेदेहेश्लेष्मपित्तेव्यवस्थिते ॥
तेनार्धंशीतलंदेहमर्धंमुष्णंचजायते ॥

अर्थ–शरीरांमध्यें अन्नरस दुष्ट जहाले असतां व कफ आणि पित्त हीं कोपलीं असतां शरीराचा अर्धभाग, ( कमरेच्या वरचा अथवा खालचा; किंवा डावा, उजवा ) कफानें थंड असतो व पित्तानें उष्ण असतो.

कायेदुष्टंयदापित्तंश्लेष्माचांतेव्यवस्थितः ॥
तेनोष्णत्वंशरीरस्यशीतत्वंहस्तपादयोः ॥

अर्थ–ज्याकालीं कोष्ठांत पित्त दुष्ट होतें, आणि कफ शाखागत होतो. त्याकालीं शरीरास उष्णत्व येतें; आणि हात पाय थंड होतात.

कायेश्लेष्मायदादुष्टःपित्तंचांतेव्यवस्थितं ॥
शीतत्वंतेनगात्राणामुष्णत्वंहस्तपादयोः ॥

अर्थ–ज्याकालीं कोष्ठांत कफ दुष्ट होतो, व इतर अवयवांचे ठायीं पित्त दुष्ट होऊन राहातें, त्याकालीं शरीर थंड होतें; आणि हातापायांची आग होत्ये.

ऋतेनिलान्नविषमोज्वरःसमुपजायते ॥
कफपित्तेहिनष्टेचेच्चेष्टयत्यनिलःसदा ॥

अर्थ–वायूवांचून विषमज्वर होत नाहीं. व कफ आणि पित्त हीं नष्ट झालीं असतां वायु विशेषेंकरून शरीरांत संचार करितो.

## शीतपूर्वक व दाहपूर्वक संतताादि विषमाचें स्वरूप सांगतो.

त्वक्स्थौश्लेष्मानिलौशीतमादौजनयतोज्वरं ॥
तयोःप्रशांतयोःपित्तमंतेदाहंकरोतिच ॥

अर्थ–त्वचेमध्यें ह्मणजे रसधातूमध्यें कफ व वात हे राहून शीतपूर्वक ज्वर उत्पन्न करतात; नंतर कफ व वात हे शांत झाले असतां उत्तरकालीं पित्त व दाह होतो.

## विषमभेद वातबलासक ज्वर.

नित्यंमंदज्वरोरूक्षःशूनःकृच्छ्रेणसिध्यति ॥
स्तब्धांगःश्लेष्मभूयिष्ठोनरोवातबलासकी ॥

**अर्थ**–ज्या रोग्याला अल्प ज्वर, रूक्षता, सूज, आंगाला जडत्व व अति कफाधिक्य हीं लक्षणें सार्वकाल असतात, त्याला वातबलासकी असें ह्मणतात. हा कष्टसाध्य आहे.

## प्रलेपकलक्षण.

प्रलिंपन्निवगात्राणिश्लेष्मणागौरवेणच ॥
मंदज्वरोविलेपीचसशीतःस्यात्प्रलेपकः ॥

**अर्थ**–ज्या ज्वरांत गात्रे घामानें सारावेळ चिकटतात, व जड होतात; त्या योगानें ज्वर मंद असतो, थंडी वाजते, हा ज्वर कफपित्तजन्य आहे. हा राजयक्ष्मांत होत असतो.

## चिकित्सा.

प्रलेपकेप्रयुंजीतश्लेष्मज्वरहरींक्रियां ॥

**अर्थ**–प्रलेपकावर श्लेष्मज्वरनाशक उपाय करावे; ह्मणजे तो नाश पावतो.

## शीतदाहपूर्वविषम.

करोत्यादौतथापित्तंत्वक्स्थंदाहमतीवच ॥
तस्मिन्प्रशांतेत्वितरौकुरुतःशीतमंततः ॥

**अर्थ**–त्वचेमध्यें ह्मणजे रक्तधातूंत पित्त राहून अत्यंत दाहपूर्वक ज्वर उत्पन्न करितें; नंतर पित्त शांत झालें असतां, उत्तरकाळीं कफ व वात, शीत उत्पन्न करितात.

## दुसरा प्रकार.

द्वावेतौदाहशीतादिज्वरौसंसर्गजौस्मृतौ ॥
दाहपूर्वस्तयोःकष्टःकृच्छ्रसाध्यस्तथेतरः ॥

**अर्थ**–हे दोन शीतपूर्वक आणि दाहपूर्वकज्वर हे त्रिदोषसंसर्गज असे मुनींनी सांगितलें. त्यांतून दाहपूर्वक जो ज्वर तो अत्यंत दुःसाध्य, आणि शीत पूर्वक जो ज्वर तो कष्टसाध्य असा जाणावा.

## सामान्यचिकित्सा.

शीताभिभूतेपुरुषेकुर्याच्छीतहरांक्रियां ॥
दाहाभिभूतेतुविधिंविदध्याद्दाहनाशनं ॥

**अर्थ**–शीतज्वरानें रोग्यास थंडी वाजूं लागल्यास, शीतनाशक उपचार करावे; व दाह जाहाला असतां दाहनाशक क्रिया कराव्या.

## शीतनाशक क्रिया.

आच्छादनैर्बहुतरैर्गुरुभिःकंबलादिभिः ॥
तूलवस्त्रमहाशीतंशीतादिज्वरिणोहरेत् ॥

अर्थ–शीतज्वरितांचें पुष्कळ पांघरुणें व जड कांबळी, रजई इत्यादिकांनीं शीत-निवारण करावें.

## क्षुद्रादिकाढा शीतपूर्वावर.

क्षुद्रानागरमुस्तपर्पटधनाभूनिंबनिंबामृताभार्ङ्गीचंदनपुष्करा
व्हकुलकैस्तिक्ताटरूपान्वितैः ॥ पद्मास्थैंद्रयवान्वितैश्चरचि
तःक्वाथोनिपीतःप्रगेशीताद्यंज्वरमुत्थितंनुविषमंत्रिद्येकप्रसोद्भवं ॥

अर्थ–रिंगणी, सुंठ, नागरमोथा, पित्तपापडा, धने, किराईत, कडुनिंब, गुडूची, भारंगमूळ, रक्तचंदन, पोखरमूळ, कडुपडवळ, कुटकी, अडुळसा, मांजिष्ठ व इंद्रजव यांचा काढा प्रातःकाळीं द्यावा. तो शीतज्वर, विषमज्वर, एकाहिक, द्व्याहिक आणि त्र्याहिक इत्यादि ज्वरांचा नाश करील.

## शुक्राव्हादिकाढा.

शुक्राव्हदद्रुघ्नवृषामृतानांनिर्गुंडिकाभृंगमहौषधानां ॥
क्षुद्रायवानीसहितःकषायःशीतज्वरारण्यहिरण्यरेताः ॥

अर्थ–कुडयाची साल, टांकळीमूळ, अडुळसा, गुडूची, निर्गुंडी, माका, सुंठ, रिंगणी व ओंवा, यांचा काढा शीतज्वररूप अरण्यास अग्नीसारिखा नाशक आहे.

## घनादिकाढा.

घननिंबमहौषधामृताकटुवार्ताकिपटोलवत्सजैः ॥
विहितंमधुनायुतंपिबेत्किलशीतज्वरशांतयेशृतं ॥

अर्थ–नागरमोथे, कडुनिंब, सुंठ, गुळवेल, डोरली, कडुपडवळ व इंद्रजव, यांचा काढा मध घालून द्यावा, तो शीतज्वरनाश करितो.

## भद्रादिकाढा.

भद्राधान्याकशुंठीभिर्गुडूचीमुस्तपद्मकैः ॥ रक्तचंदनभूनिंबपटो
लवृषपौष्करैः ॥ कटुकेंद्रयवारिष्टभार्ङ्गीपर्पटकैःसमं ॥ क्वाथंप्रात
र्निपिबेतसर्वशीतज्वरापहं ॥

अर्थ–निवडुंग, धने, सुंठ, गुळवेल, नागरमोथे, पद्मकाष्ठ, रक्तचंदन, किराईत, पडवळ, अडुळसा, पुष्करमूळ, कुटकी, इंद्रजव, कडुनिंब, भारंगमूळ व पित्तपापडा, या समभाग औषधांचा काढा प्रातःकाळीं दिल्यानें तो सर्वशीतज्वरनाश करील.

## दाहपूर्वविषमावर बिभीतादिकाढा.

बिभीतोव्याधिघातश्चकटुकीत्रिवृताभया ॥
क्वाथोह्ययंतृषादाहविषमज्वरनाशकृत् ॥

अर्थ-बेहेडे, बाहाव्याचा मगज, कुटकी, तेड व हरीतकी, यांचा काढा. ताहान, दाह व विषमज्वर यांचा नाश करितो.

## महाबलादिकाढा.

महाबलामूलमहौषधाभ्यांक्काथोनिहन्याद्विषमज्वरंहि ॥
शीतंसकंपंपरिदाहयुक्तंविनाशयेद्विंत्रिदिनप्रयोगात् ॥

अर्थ-चिकणामूळ व सुंठ यांचा काढा शीत, कंप व दाह यांणीं युक्त ज्वराचा दोन तीन दिवसांत नाश करितो.

## व्याघ्र्यादिकाढा.

व्याघ्रीविश्ववितुन्नपुष्कररजोभूनिंबवासामृताभांर्गीनिंबपटोल
पद्मकघनैस्तिक्ताकलिंगैःकृतः ॥ क्वाथोहंतिसचंदनःकफमरु
त्पित्तंसदाहंतृषांकासंपंचविधंज्वरंकृमिरुजंपांडुवमिकामलां ॥

अर्थ-रींगणी, सुंठ, कुरडूचीं फुलें, पुष्करमूळ, पित्तपापडा, किराईत, अडुळसा, गुळवेल, भारंगमूळ, कडुनिंब, कडुपडवळ, पद्मकाष्ठ, नागरमोथा, कुटकी, इंद्रजव, आणि रक्तचंदन यांचा काढा कफ, वात, पित्त, दाह, ताहान, पांच प्रकारचा खोकला, ज्वर, कृमि, पांडुरोग, वांति व काविळ यांचा नाश करिल.

## देवतापूजन.

सोमंसानुचरंदेवंसमातृगणमीश्वरं ॥
पूजयन्प्रयतःशीघ्रंमुच्यतेविषमज्वरात् ॥

अर्थ-पार्वती व तिचे गण, मातृगण, आणि प्रमथादिगण यांसह शिवाची भक्तीनें पूजा केल्यावर विषमज्वरापासून शीघ्र मुक्त होईल.

## दुसरा प्रकार.

विष्णुंसहस्रमूर्धानंचराचरपतिंविभुं ॥
स्तुवन्नामसहस्रेणज्वरान्सर्वान्व्यपोहति ॥

अर्थ-जो अनंतमस्तक व स्थावरजंगमाचा स्वामी, त्या विष्णूला सहस्र नामानें स्तवन करावें; ह्मणजे सर्वज्वर नाश पावतात.

## ज्वरपूजा.

तीर्थाध्ययनेदवाग्निगुरुवृद्धोपसर्पणैः ॥
श्रद्धयापूजनैश्चापिसहसाशाम्यतिज्वरः ॥

अर्थ–तीर्थसेवन, अध्ययन, देव, अग्नि, गुरु, आणि वृद्ध यांची सेवा व भक्तीनें पूजा केली असतां विषमज्वर नाश पावतो.

## पद्मकादितैल.

पद्मकोत्पलकल्हारमृणालबिसपौष्करैः ॥ कुमुदोशीरमंजिष्ठाप द्मगैरिककट्फलैः ॥ सारिवाद्वयलोध्राब्दक्षीरीखर्जूरमस्तकैः ॥ धात्रीशतावरीयुक्तैःक्वाथैकल्कैप्रयोजितैः ॥ द्राक्षारसपयःशुक्ता मस्तुभिःसहकांजिकैः ॥ पक्वंतैलमिदंपाच्यंदाहज्वरहरंपरं ॥

अर्थ–कोष्ठ, कमळकंद, तांबडा कमळकंद, काळा वाळा, बिसें, पोखरमूळ, कुमुदकंद, वाळा, मांजिष्ठ, पद्मकाष्ठ, गेरू, कायफळ, लाहान व मोटी दोन प्रकारची उपळसरी, लोध्र, नागरमोथा, मोखवृक्ष, खजूर, भद्रमोथा, आवळकाटी व शतावरी, यांचा काढा करून त्यांत याच औषधांचा कल्क, लाखेचें शिरें, दूध, भुयकोहाळयाचा रस मस्तु व कांजी हीं प्रत्येक तेलाचे समान घालोन तैल सिद्ध करावें. तें त्वचा चांगली करून दाहज्वराचा नाश करितें.

## माहेश्वरधूप.

जटाधारीतुगोशृंगंबिडालविष्ठोरगस्यनिर्मोकः ॥ मदनफलभू तकेशीवंशत्वगुग्रनिर्माल्यं ॥ घृतयवमयूरचंद्रच्छगलकलोमा निसर्षपाःसवचाः ॥ हिंगुगवास्थिमरीचासमभागाश्छागमू त्रसंपिष्टाः ॥ धूपनविधिनाशमयंत्येतेसर्वान्ज्वरान्नियतं ॥ ग्र हडाकिनीपिशाचप्रेतविकारानयंधूपः ॥

अर्थ–ईश्वरी, गोशृंग, मांजराची विष्ठा, सापाची मेंग, गेळफळ, भूतकेशी, जटामांसी, वेळूची साल, शिवनिर्माल्य, तूप, यव, मोरपिस, मेंढयाची लोंकर, शिरस, वेखंड, हिंग, गाईचें हाड आणि मिरें हिं औषधें समभाग घेऊन मेंढयाच्या मुतांत वांटून गोळया करून त्याचा धूप द्यावा. हा संपूर्ण ज्वर, ग्रहपीडा, डाकिनी, पिशाच व प्रेतबाधा यांचा नाश करितो.

## गोजिव्हादिचूर्ण.

गोजिव्हाचजयामूलंपिष्ट्वातंडुलवारिणा ॥ पीतंशीतज्वरंहंतिपाठाद्रिमरिचानिच ॥

अर्थ–पाथरी आणि जया ह्यांचें मूळ तांदुळांचे धुणाशीं वाटून प्यावें. किंवा पाहाड-मूळांच्या काढयाशीं मिरें द्यावीं, ह्मणजे शीतज्वर शांत होतो.

## जीरकादिचूर्ण.

जीरकंलशुनंव्योषंपाठापिष्टोष्णवारिणा ॥
शीतज्वरस्यागमनेपिबेद्गुडयुतेनच ॥

अर्थ–जिरें, लसूण, सुंठ, मिरीं, पिंपळी व पाडळ हीं औषधें ऊन पाण्याशीं वाटून त्या कल्कांत, गुळ घालून शीतज्वर येण्याच्या वेळेस द्यावा; ह्मणजे शीतज्वर शांत होईल.

## त्रपुसभक्षण.

त्रपुसंभक्षयित्वाग्रेतक्रमम्लंपिबेदनु ॥ ततोहुताशंसेवेतप्रावृतोवातपेस्फुटं ॥ ततःप्रस्विद्यसर्वांगंयातिशीतज्वरःक्षयं ॥

अर्थ–कांकडी खाऊन त्यावर आंबट ताक प्यावें; आणि शेक घ्यावा, किंवा उन्हांत पांघरूण घेऊन बसावें; ह्मणजे सर्वांगाला घाम येऊन शीतज्वर नाश पावतो.

## कायस्थादिधूप, लेपन व तैल.

कायस्थानाकुलीतिक्तावयस्थापुरचोरकैः ॥ सहदेवीवचाकुष्ठैःशीतघ्नैर्धूपलेपनैः ॥ एतैरेवौषधैःपिष्टैर्लवणक्षारसंयुतैः ॥
साम्लैर्विपाचितंतैलमभ्यंगाच्छीतनाशनं ॥

अर्थ–तुळस, रास्ना, कटुकी, दारुहळद, गुग्गुळ, गठोना, बृहच्छिकणा, वेखंड व कोठ यांचा धूप किंवा लेप द्यावा; किंवा या औषधांचा कल्क, आणि सैंधव, जवखार व लिंबाचा रस घालून तेल सिद्ध करावें. त्याणें अभ्यंग केल्यानें शीतज्वर नाश पावतो.

## मृतकर्पटकधूप.

मृतकर्पटधूपेनसद्यःशीतज्वरंजयेत् ॥

अर्थ–मुरद्यावरच्या कापडाचा धूप द्यावा; ह्मणजे शीतज्वर जातो.

## जयामूलीबंध.

जयामूलंशिरोबध्वाहंतिशीतज्वरंध्रुवं ॥ किंवागुंडफलामूलंकर्णबद्धंनिशिज्वरं ॥ शीतज्वरंहरेत्तूर्णमथवाम्रस्यमूलकं ॥
शिखायांचकरेबद्धंहंतिचोष्णज्वरंद्रुतं ॥

अर्थ–जयेचें मूळ मस्तकीं बांधिलें असतां शीतज्वर जातो; किंवा देवडांगरीचें मूळ कानांत बांधिल्यानें तें रात्रिज्वरनाश करितें; व आंब्याचें मूळ शेंडीस किंवा हातास बांधिलें असतां तें उष्णज्वराचा नाश करितें.

## बांदेबंध.

ऋक्षेपुनर्वसौग्राह्यंमंदारस्यतुवंदकं ॥

तद्दक्षिणकरेबद्धंशीतज्वरविनाशनं ॥

अर्थ–पुनर्वसुनक्षत्रीं मंदाराचें बांदें उजव्या हातांत बांधावें; ह्मणजे शीतज्वर शांत होईल.

## कांतालिंगन.

चेतोमुषांपीनपयोधराणांकस्तूरिकाचंदनचर्चितानां ॥

शीतज्वरेशस्तमथांगनानामालिंगनंचारुहिमावधिस्यात् ॥

अर्थ–चित्ताला हर्ष देणाऱ्या, पुष्ट स्तनाच्या, तरुण व कस्तूरी अंगास लावणाऱ्या अशा स्त्रियांचे आलिंगन थंडी जाई पर्यंत द्यावें.

## दूरीकरण.

कांतांगसंगसंजातातूतस्यशीतेनिवारिते ॥

प्रल्हादंचास्यविज्ञायपृथक्तांकारयेत्स्त्रियं ॥

अर्थ–स्त्रीच्या आलिंगनापासून शीत गेल्यावर रोग्याला हर्ष झाला असें वाटल्यास त्यापासून स्त्री दूर करावी.

## रसोनकल्क.

रसोनकल्कंतैलेनसर्पिषावातिलैरपि ॥

सेवितंविषमंहंतिवातश्लेष्मगदानपि ॥

अर्थ–लसुनाचा व तिळांचा कल्क तुपाशीं किंवा तेलाशीं सेवन केला असतां, विषम ज्वर आणि वातश्लेष्मसंबंधिज्वर नाश करितो.

## रास्नादिकाढा.

रास्नानागरकृष्णानांकल्कमुष्णांबुनापिबेत् ॥

श्वासकासाग्निमांद्यंचज्वरंशीतंविनाशयेत् ॥

अर्थ–रास्ना, सुंठ व पिंपळी यांचा कल्क करून ऊन पाण्याशीं घ्यावा. तो कास, श्वास, अग्निमांद्य व शीतज्वर त्यांचा नाश करील.

## भूतभैरवचूर्ण.

तालकंशुक्तिकाचूर्णंतुल्यंतत्रोभयोरपि ॥ नवमांशंतुतुत्थंस्यान्म

र्दयेत्कन्यकाद्रवैः ॥ तत्तुसंशुष्कमुपलैर्वन्यैर्गजपुटेपचेत् ॥ शी

तंतत्पेषयेच्चूर्णंगुंजामात्रंसितायुतं ॥ प्रभातेभक्षयेत्तेनयातिशी

तज्वरःक्षयं ॥ वांतिर्भवतिकस्यापिकस्यापिनभवत्यपि ॥ एके
नदिवसेनैवशीतज्वरहरंपरं ॥ मध्यान्हसमयेपथ्यंभक्तंशिख
रिणीतथा ॥

**अर्थ**–हरताळ व शिंपीचा चुना हे समभाग. व याचे नवमांश मोरचूत घालून कोरफडाच्या रसांत खल करावा; आणि सुकऊन त्याला गजपुट द्यावें. शीत जाहाल्यावर काढून खल करावा; आणि गुंजभर साकरेशीं प्रातःकाळीं भक्षावें, ह्मणजे शीतज्वर, एक दिवसांत जातो. दोनप्रहरीं भात आणि शिकरण द्यावी. या औषधानें कोणाला वांति होत्ये व कोणाला होत नाहीं.

## पथ्यादिचूर्ण.

पथ्याशक्रशताचूर्णंकर्षमात्रंगुडेनतु ॥
भक्षितंनाशयत्याशुशीतकंविषमज्वरं ॥

**अर्थ**–हरीतकी व इंद्रजव, त्याचें एक तोळा चूर्ण गुळाशीं भक्षण केल्यानें तें तत्काळ शीतज्वराचा नाश करील.

## हरिद्रादिचूर्ण.

हरिद्रानिंबमत्रापिपिप्पल्यामरिचानिच ॥ भद्रमुस्तविडंगा
निसप्तमंविश्वभेषजं ॥ सैंधवंचित्रकंकुष्ठंविषपाठाहरीतकी ॥ ए
तानिसमभागानिअजामूत्रेणपेषयेत् ॥ नावनांजनपानेषुगो
मत्रासृग्रसांजनैः ॥ जयेत्प्रयुक्तंविषमंज्वरमाशुनिकृंतति ॥ स
र्वजंसमधुव्योषंगवांमूत्रेणशीतलं ॥ मधुनाशीतकंदेयंरक्तापि
त्तंवृषस्यता ॥ क्षयंक्षीराश्वगंधाभ्यांकासश्वासादितान्गदान् ॥
तक्रादिग्रहणीरोगान्कृच्छ्रंतंडुलवारिणा ॥ प्रमेहंमधुनागुल्मशू
लंचगुडवारिणा ॥ पीतमुष्णांभसावातंशूलस्यालेपनाद्रुजात् ॥

**अर्थ**–हळद, कडुनिंबाचीं पानें, पिंपळ्या, मिरें, नागरमोथे, वावडिंग, सुंठ, सैंधव, चित्रक, कोष्ठ, अतिविष, पाहाडमूळ, आणि हरीतकी हीं समभाग घेऊन शेळीचे मुतांत घोटावीं. हें चूर्ण गोमूत्राशीं नस्यार्थ द्यावें. रक्ताबरोबर अंजन व रसांजनाशीं पान करविलें असतां विषमज्वर जातो; आणि सन्निपातावर मध व त्रिकटुशीं; शीतज्वरावर गोमूत्राशीं किंवा मधाशीं; रक्तपित्तावर अडुळशाचे रसांत; व क्षय, कास, श्वास यांवर दुग्ध व अश्वगंधाचें चूर्ण यांबरोबर; संग्रहणीवर ताकाशीं; मूत्र कृछ्रावर तांदुळाचे धुवणाशीं; प्रमेहावर मधाशीं; गुल्म व शूल यांवर गुळाचे पाण्याशीं; वायूवर ऊन पाण्याशीं द्यावें. व शूळावर आल्याच्या रसांत लेप करावा.

## आरोग्यरागी रस.

रसोगंधःकणामूलंवंशजंजयपालकं ॥ व्योपंचव्याणलवणंबिडं
चंद्रलवंक्षिपेत् ॥ तांबूलरसतोमर्द्यदिनंतांबूलपत्रयुक् ॥ दत्तो
नवज्वरंहंतितापेशीतक्रियोचिता ॥ सर्वज्वरेसन्निपातेददेत्तं
तुद्विगुंजकं ॥ आरोग्यरागिनामायंरसःपरमदुर्लभः ॥

अर्थ—पारा, गंधक, पिंपळीमूळ, वंशलोचन, जेपाळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, पंच लवणें, बिड, हीं एकेक भाग. एकत्र करून विड्याच्या पानाच्या रसांत एकदिवस खल करून दोन विड्याच्या पानाशीं दोन गुंजा द्यावा; ह्मणजे हा आरोग्यरागिरस संपूर्णज्वर व सन्निपात यांचा नाश करितो. हा रस अत्यंत दुर्लभ आहे.

## शीतांकुश.

तुत्थंटंकणसूतखर्परविषंस्याद्गंधकंतालकंसर्वंखल्वतलेविमर्द्य
घटिकांतंकारवेल्लीरसैः ॥ गुंजैकागुटिकासशर्करयुतासंजीरके
णाथवाएकद्वित्रिचतुर्थशीतहरणाच्छीतांकुशोनामतः ॥

अर्थ—मोरचूत, टांकणखार, पारा, कलखापरी, बचनाग, गंधक व हरताळ हीं सर्व खलांत घालून कारलीच्या रसांत एक घटिका खल करावा. त्याची एक गुंज गोळी साकर व जिरें याशीं द्यावी; ह्मणजे हा शीतांकुश एकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक ज्वरांचा नाश करितो.

## तालकादिशीतारिरस.

तालकखर्परमूषकयुग्मंकांचनपल्लवजरसेनघृष्टं ॥
मर्दयमर्दयपुनरपिमर्दयशीतभयादिनिवारणगुटिका ॥

अर्थ—हरताळ, कलखापरी व लहान व थोर उंदिरकानी ह्यांचा कांचनाच्या पत्ररसांत खूब खल करून गुटिका द्यावी. ती शीतज्वरनाश करिते.

## दुसरा प्रकार.

पिष्टातालकमेकभागममलंशंबूकचूर्णंक्षिपेद्दत्वाचायनवांश
तोपिचशिखिग्रीवंपुनःपेपयेत् ॥ कौमारीरसमर्दितंगजपुटेपा
कंचशीतंततोगृण्हीयादथगुंजयाज्वरहरंखंडेनसंयोजयेत् ॥
एकद्वित्रिभवंचतुर्थकमयंवेलाज्वरंनाशयेत्च्छीतारिश्चपला
ययेज्ज्वरमिमंभानुंयथाशर्वरी ॥

**अर्थ**--हरताळ भाग, शंखभस्म, व मोरचूत नवमांश या तिहींचें चूर्ण कोरफडीचे **रसांत** खलून गजपुट द्यावें. शीत जाहाल्यावर काढावें. तें खडिसाकरेबरोबर दोन गुंजा **द्यावें;** ह्मणजे एकाहिक, द्वयाहिक, चातुर्थिक व वेलाज्वर यांचा नाश करितें. याला **शीतारि** ह्मणतात. याला पाहूनच ज्वर पळतो. जशी सूर्यास पाहून रात्र जाते.

## तिसरा प्रकार.

मनःशिलातालकतुत्थताम्ररसेनगंधंसमकर्षभागं ॥ संमर्दयेत्त
त्रिफलारसेनगोलंन्यसेत्संपुटकेप्रदद्यात् ॥ पुटांततोधृत्यच
भानुवज्रादुग्धेनभाव्यःकिलसप्तवारं ॥ क्काथेनदंतीत्रिवृतोद्भ
वेनविभावनाःसप्तपुनःप्रदेयाः ॥ ततोस्यमाषंमरिचैःशतार्धं
गद्याणमात्रेणगुडेनयुक्तं ॥ संभक्षयेद्वातुलसीदलाभ्यांदिनत्रयं
पथ्यमितोदनंच ॥ शीतारिनामारसएषहंतिशीतज्वरंघोरतरंसवातं ॥

**अर्थ–**मनशीळ, हरताळ, मोरचूत, ताम्र, पारा, गंधक, हीं समान भाग घेऊन त्रिफळ्याच्या रसांत गोळा करून तो संपुटांत ठेऊन मातकापड करून गजपुट द्यावें; नंतर रुई. व निवडुंग यांचे चिकाच्या सात भावना द्याव्या; नंतर जेपाळ, तेंड, यांचे काढ्याच्या सात भावना द्याव्या; ह्मणजे हा शीतारिनामा रस तयार झाला. हा एक-मासा तुळसीचा रस, पंनास मिरें, साहामासे गूळ यांशी द्यावा; आणि तीन दिवस पथ्य व अल्पभोजन करावें; ह्मणजे तो घोरशीतज्वराचा नाश करितो.

## चवथा प्रकार.

रसंगंधंचदरदंजेपालंक्रमवर्धितं ॥ दंतीरसेनसंपिष्यवटीगुंजा
मिताकृता ॥ प्रभातेसिनयासार्धंभक्षिताशीतवारिणा ॥ एके
नदिवसेनैवशीतज्वरमपोहति ॥

अर्थ–पारा एकभाग, गंधक दोनभाग, हिंगूळ तीनभाग व जेपाळ चारभाग घेऊन दंतीच्या रसांत वाटून गुंजमानाची वटी करावी; आणि प्रातःकाळीं साकर व थंड पाणी यां बरोबर द्यावी; ह्मणजे हा शीतारी जीर्णज्वराचा नाश करितो.

## भूतभैरवरस.

एककर्षभवेत्तालंद्विकर्षंतुत्थकंभवेत् ॥ षट्कर्षंभृष्टशुक्तीनांचू
र्णमेकत्रकारयेत् ॥ धत्तूरपत्रस्वरसैर्मर्दयेद्यामयात्रकं ॥ निधायभा
जनेलोहेमंमर्दंक्रमशोबुधः ॥ उपर्यग्नेःस्थापयित्वातच्चसंशोष
येद्भिषक् ॥ पुनःपर्युषितंप्रातर्गृहीत्वाकिंचिदग्नितः ॥ कोष्णं

कृत्वाकल्कमेतत्ततोवैद्यःप्रसाधितः ॥ चणकप्रमितांदद्यादेकां
शर्करयासह ॥ शीतज्वरंनिहंत्येवसर्वंनास्त्यत्रसंशयः ॥

**अर्थ**–हरताळ एकतोळा, मोरचूत दोनतोळे, शिंपीचें भस्म सहातोळे, एकत्र करून लोहपात्रांत धोतऱ्याच्या रसांत एक प्रहर घोंटून चुलीवर ठेऊन तो रस सुकवून तसेंच निंबू द्यावें. प्रातःकाळीं घेऊन अग्नीवर किंचित उष्ण करून धोतऱ्याचा कल्क घालून तें सिद्ध करावें; आणि त्याच्या चण्याएवढ्या गोळ्या कराव्या. त्यांतून एक साकरेबरोबर द्यावी; ह्मणजे हा भूतभैरव सर्वशीतज्वरांचा निःसंशय नाश करितो.

## दाहपूर्वावर शीतोपचार.

एरंडस्यनुपत्राणिलिप्तभूमौनिधापयेत् ॥ दाहादिज्वरिणोदेहे
तानिपत्राणिधारयेत् ॥ तेननश्यतिदाहोस्यज्वरश्चैवोपशाम्य
ति ॥ दाहेशांतेयदाशैत्यंतच्चयुक्त्यानिवारयेत् ॥

**अर्थ**–एरंडाचीं पानें सारवलेले भूमीवर पसरून ठेवावीं; आणि तीं दाहज्वरिताच्या आंगावर घालावीं. तेणें करून त्याचा ज्वर शांत होतो. व दाह शांत झाल्यावर शीत या जो लागतें, तें युक्तीनें निवारण करावें.

## दाहावर स्त्रीचें आलिंगन.

जघनचक्रचलन्मणिमेखलासरसचंदनचंद्रावलेपना ॥
वनलतेवतरूंपरिवेष्टयेत्प्रबलदाहनिपीडितमंगना ॥

**अर्थ**–प्रबलदाहानें पीडित जो रोगी त्यास जिच्या कटिपश्चाद्भागीं मेखला शब्द करित्ये, व जिणें सुगंध चंदन व कापुर आंगास लावला आहे, अशा स्त्रिकरवीं जशी वृक्षास वेल आलिंगत्ये, तसें पुरुषास आलिंगन देववावें.

## स्त्रीदूरीकरण.

तदंगसंगसंजातैःशैत्यैर्दाहेनिवारिते ॥
प्रल्हादंचास्यविज्ञायतांस्त्रीमपनयेत्पुनः ॥

**अर्थ**–नंतर त्या स्त्रिच्या आलिंगनानें दाहा शांत जाहला, व रोग्यास हर्ष जहाला; ह्मणजे युक्तीनें स्त्रीला दूर करवावें.

## शीतोपचार.

उत्तानसुप्तस्यगभीरताम्रकांस्यादिपात्रंप्रणिधायनाभौ ॥
तत्रांबुधाराबहलापतंतीनिहंतिदाहंत्वरितंसुशीतं ॥

अर्थ—दाहपीडित पुरुषास उताणा निजऊन त्याच्या नाभीवर तांब्याचें किंवा कांशाचें भांडें ठेउन त्यांत थंड पाण्याची धारा धरावी. अशा सुशीतधारांनीं त्वरित दाह शांत होतो.

## दाहपूर्वावर पट्तक्रतैल.

सुवर्चिकानागरकुष्ठमूर्वालाक्षानिशालोहितयष्टिकाभिः ॥
सिद्धंहरेत्षड्गुणतक्रपक्वंतैलंज्वरंदाहसमन्वितंच ॥

अर्थ—साजेखार, सुंठ, कोष्ठ, मोरवेल, लाख, हळद, पतंग व ज्येष्ठमध यांचे काढयांत तेल आणि तैलाचे साहापट ताक घालून तेल सिद्ध करावें. तें दाहयुक्तज्वराचा नाश करितें.

## महापट्कतैल.

रास्नानागरकुष्ठचंदननिशायष्ट्याव्हकृष्णाबलालाक्षासैंधवसा
रिवामधुरसादेवद्रुरोहीतकैः ॥ सोशीरांबुधिफेनरोहिषजलैस्तै
लंपचेत्षड्गुणेतक्रेतच्छमयेज्ज्वरंदृढतरंदाहादिशीतादिकं ॥

अर्थ—रास्ना, सुंठ, कोष्ठ व रक्तचंदन, हळद, ज्येष्टीमध, पिंपळी, चिकणामूळ, लाख, सैंधव, उपळसरी, मोरवेल, देवदार, रक्तरोहिडा, वाळा, समुद्रफेन व रोहिषतृण यांचें काढयांत तेल आणि तेलाचे साहापट ताक एकत्र करून तेल सिद्ध करावें. तें दाहपूर्वक व शीतपूर्वक ज्वराचें शमन करितें.

## अंगारतैल.

मूर्वालाक्षाहरिद्रेद्वेमंजिष्ठासेंद्रवारुणी ॥ बृहतीसैंधवंकुष्ठंरा
स्नामांसीशतावरी ॥ आरनालाढकेचैवतैलप्रस्थंविपाचयेत् ॥
तैलमंगारकंनामसर्वज्वरविमोक्षणं ॥

अर्थ—मोरवेल, लाख, हळद, दारुहळद, मंजिष्ठा, कडुवृंदावन, डोरली, सैंधव, कुष्ठ, कोळिंजन, रास्ना, जटामांसी व शतावरी, यांचा काढा आणि कांजी दोनशें छपन्न तोळे व तेल एक शेर एकत्र करून तेल सिद्ध करावें, तें अंगारनामकतेल संपूर्ण ज्वरनाशक आहे.

## रसादिधातुगतज्वरलक्षण.

गुरुतात्हृदयोत्क्लेदसदनंछर्द्यरोचकौ ॥
रसस्थेतुज्वरेलिंगंदैन्यंचास्योपजायते ॥

अर्थ—रसधातुगत ज्वर झाला असतां जडपणा, हृदयस्थदोष ओकून पडेलसें वाटणें, अवयवांस ग्लानि, ओकारी, अरुचि, आणि उदासपणा हीं लक्षणें होतात.

## रसरक्तगत.

रसस्थेचज्वरेतस्मिन्कुर्याद्वमनलंघनं ॥

अर्थ–रसधातुगतज्वर झाला असतां; वमन व लंघन करावें.

## धातुगतज्वराची चिकित्साप्रक्रिया.

रसस्थेरससंशुध्धीरक्तस्थेरक्तमोक्षणं ॥ मांसस्थेरेचनंशस्तंमेद स्थेचासहिष्णुता ॥ रेचनंवमनंस्वेदंचास्थिस्थेस्वेदमर्दनं ॥ मज्जाशुक्राशयंदृष्ट्वातमसाध्यंज्वरंजयेत् ॥

अर्थ–रसधातुगत ज्वर झाला असतां, घाम काढावा. रक्तधातुगत ज्वर झाला असतां, रक्तमोक्ष करावा. मांसधातुगत ज्वर झाला असतां; त्यावर रेचक प्रशस्त आहे; आणि मेद धातुगत ज्वर झाला असतां; कांहीं सहन होत नाहीं, परंतु रेचन, वमन, आणि घाम ह्या क्रिया कराव्या. अस्थिगत ज्वर झाला असतां; घाम काढावा, व मर्दन करावें. मज्जा आणि शुक्र या धातूंप्रत ज्वर प्रविष्ट झाला असतां; तो असाध्य जाणावा.

## रक्तधातुगतज्वरलक्षण.

रक्तनिष्ठीवनंदाहोमोहश्छर्दनविभ्रमः ॥
प्रलापःपीटिकातृष्णारक्तप्राप्तेज्वरेनृणां ॥

अर्थ–रक्तमिश्रित थुंका, वमन, आंगाची आग, मोह, ओकारी, भ्रम, असंबद्ध भाषण, आंगावर पुटकुळ्या, आणि ताहान हीं रक्तधातुगतज्वरलक्षणें जाणावीं.

## गायत्र्यादिकाढा.

गायत्रीत्रिफलानिंबपटोलीवासकामृता ॥
क्वाथोमधुघृताभ्यांचरक्तदोषेतिशस्यते ॥

अर्थ–खैर, हरडा, बेहेडा, आंवळकाठी, कडुनिंब, कडुपडवळ, अडुळसा व अमृता यांचा काढा मध व तूप घालून द्यावा. हा रक्तदोषावर अति प्रशस्त आहे.

## वराप्यजादिकाढा.

वराप्यजाजीबृहतीहरिद्रावेण्वाटरूपप्रभवःकषायः ॥
जहातिदूरंमधुनाविमिश्रितोरक्तोद्भवंदारुणमूर्तिवेगं ॥

अर्थ–त्रिफळा, ओंवा, रिंगणी, हळद, वेणुबीज व अडुळसा यांचा काढा मध घालून द्यावा; ह्मणजे रक्तापासून दारुण झालेल्या ज्वराचा नाश करितो.

## वृषादिकाढा.

वृषादुरालभाश्यामापर्पटःकटुरोहिणी ॥ किरातमथमेतेषांक्वा

थःपीतःसितायुतः ॥ रक्तोद्भवंमहादाहंतृष्णांमूर्छांमतिभ्रमं ॥
पित्तज्वरंहरत्याशुपापमीशोयथास्मृतः ॥

अर्थ—अडुळसा, धमासा, पिंपळी, पित्तपापडा, किराईत व कुटकी यांचा काढा मध. घालून द्यावा, ह्मणजे रक्ताश्रित ज्वर, दाह, तृष्णा, मूर्छा, मतिभ्रंश व पित्तज्वर यांचा नाश करितो. जसें विष्णुस्मरण पापनाश करितें.

## रक्तगतचिकित्साक्रम.

सेकसंशमनालेपरक्तमोक्षस्त्वसृग्गते ॥

अर्थ—रक्तगत ज्वर झाला असतां; आंगावर पाणी शिंपणें, ज्वरशामक औषधें घेणें, लेप करणें आणि रक्त काढणें हे उपचार करावे.

## मांसगतज्वरलक्षण.

पिंडिकोद्वेष्टनंतृष्णासृष्टमूत्रपुरीषता ॥
ऊष्मांतर्दाहविक्षेपौग्लानिःस्यान्मांसगेज्वरे ॥

अर्थ—गुडघ्याचे खालीं पोटऱ्यांस मांसाचे गोळे उचलतात, ताहान लागते, मळ, मूत्र हीं बहुत होतात, उष्मा व अंतर्दाह होतो. हात, पाय, अस्ताव्यस्त हालवितो. शरीरास ग्लानि येते, इत्यादिक मांसगतज्वराचीं लक्षणें होतात.

## मांसगतज्वर चिकित्सा.

तीक्ष्णान्विरेकांश्चतथाकुर्यान्मांसगतेज्वरे ॥

अर्थ—मांसगत ज्वर झाला असतां तीक्ष्ण रेचक द्यावे.

## मेदगतज्वरलक्षण.

भृशंस्वेदस्तृषामूर्छाप्रलापश्छर्दिरेवच ॥
दौर्गंध्यारोचकौग्लानिर्मेदस्थेचासहिष्णुता ॥

अर्थ—आंगास अत्यंत घाम, ताहान, मूर्छा व बडबड, ओकारी, आंगास गंधि, अरोचक व ग्लानि, आणि थोडक्या कारणानें फार राग येणें, हीं मेदगतज्वराचीं लक्षणें जाणावीं.

## अस्थिगतज्वरलक्षण.

भेदोस्थ्नांकूजनंश्वासोविरेकश्छर्दिरेवच ॥
विक्षेपणंचगात्राणांविद्यादस्थिगतेज्वरे ॥

अर्थ—हाडांत ठणका, थुंकणें, दमा, ढाळ, व ओकारी, आणि हात पाय अस्ताव्य-व्यस्त चाळवितो, इत्यादिक अस्थिगत ज्वराचीं लक्षणें जाणावीं.

## शास्त्रार्थ.

अस्थिस्थेवांतिनाशनं ॥ बस्तिकर्मप्रयोक्तव्य

मपभ्यंगोद्वर्तनंतथा ॥

**अर्थ**–अस्थिगत ज्वर झाला असतां; वांतिनाशक औषधें, बस्तिकर्म, अभ्यंग आणि उद्वर्तन हे उपचार करावे.

## मज्जागतज्वरलक्षण.

तमःप्रवेशनंहिक्काकासःशैत्यंवमिस्तथा ॥

अंतर्दाहोमहाश्वासोमर्मछेदश्चमज्जगे ॥

**अर्थ**–अंधकारांत गेल्या सारिखें वाटणें, उचकी, खोकला, अतिशैत्य, ओकारी, अंतर्दाह, महाश्वास, आणि वृषण, ललाट, हृदय, डोळ्यांचे आंख या मर्मस्थानांस फार व्यथा होत्ये; हीं मज्जागतज्वरलक्षणें जाणावीं.

## मज्जाशुक्रगतज्वर.

मज्जाशुक्रेक्रियानोक्तामरणंतत्रभाषितं ॥

**अर्थ**–मज्जा व शुक्रधातुगत ज्वर झाला असतां; त्यांवर क्रिया सांगितली नाहीं. तसा ज्वर झाला असतां रोगी वांचत नाहीं.

## शुक्रगतज्वरलक्षण.

शेफसःस्तब्धतामोक्षःशुक्रस्यतुविशेषतः ॥

मरणंप्राप्नुयात्तत्रशुक्रस्थानगतेज्वरे ॥

**अर्थ**–शुक्रस्थानीं ज्वरगेला असतां शिस्नाची स्तब्धता व वीर्याचा क्षणक्षणा बहुस्राव होतो. हा मनुष्य मरण पावतो.

## रसादिधातुसंबंधानें साध्यासाध्य.

रसरक्ताश्रितःसाध्योमांसमेदगतश्चयः ॥

अस्थिमज्जागतस्थोपिशुक्रस्थोपिनजीवति ॥

**अर्थ**–रस, रक्त, मांस, मेद, यां धातुगत ज्वर औषधानें साध्य होतो; आणि अस्थि, मज्जागत, दुःसाध्य. व शुक्रगतज्वर झाला असतां मनुष्य मरण पावतो.

## प्राकृत व वैकृतज्वर.

वर्षाशरद्वसंतेषुवाताद्यैःप्राकृतैःक्रमात् ॥

वैकृतोन्यःसुदुःसाध्यःप्राकृतश्चानिलोद्भवः ॥

अर्थ—वर्षा, शरद् व वसंत, यांचा ठायीं क्रमेंकरून वातादिकांनीं जो ज्वर उत्पन्न होतो, तो प्राकृत जाणावा; आणि अन्यऋतूचा ठायीं उत्पन्न जो ज्वर तो वैकृत जाणावा. वर्षाकाळीं वातज्वर, शरत्काळीं पैत्तिकज्वर, वसंतकाळीं श्लैष्मिकज्वर हे प्राकृत; व वर्षाकाळीं पित्तज्वर, शरत्काळीं कफज्वर, वसंतकाळीं वातज्वर, हे वैकृत दुःसाध्य जाणावे; आणि प्राकृत वातज्वर दुःसाध्य आहे, व प्राकृत पित्तज्वर सुसाध्य आहे.

## प्राकृतज्वराचा उत्पत्तिक्रम सांगतो.

वर्षासुमारुतोदुष्टःपित्तश्लेष्मान्वितोज्वरं ॥ कुर्याच्चपित्तंशरदि तस्यचानुबलःकफः ॥ तत्प्रकृत्याविसर्गाच्चतत्रनानशनाद्भयं ॥ कफोवसंतेतमपिवातपित्तंभवेदनु ॥

अर्थ—ग्रीष्मऋतूंत जमलेला वायु वर्षाकाळीं कुपित झाला असतां; पित्तकफयुक्त होऊन ज्वर उत्पन्न करितो. तसेंच वर्षाकाळीं जमलेलें पित्त शरत्काळीं दुष्ट होऊन ज्वर करितें, त्याला कफानुबंध असतो, त्या ज्वरांत कफपित्ताच्या स्वभावानें आणि विसर्गकाल असतो ह्मणून लंघनापासून भय होत नाहीं. त्या प्रमाणेंच हेमंतकाळीं सांचलेला कफ वसंतकाळीं ज्वर करितो, त्याला वातपित्त हीं साहाय्य करितात.

कालेयथास्वंसर्वेषांप्रवृत्तिर्वृद्धिरेववा ॥
निदानोक्तोनुपशयोविपरीतोपशायिता ॥

अर्थ—काल जसा दोषांस उत्पन्न करून वाढविणारा आहे, तसा उपशयानुपशय ही आहे. दोषांस वाढविणारे जे आहारादि आचार ते अनुपशय, ह्मणजे त्यापासून पीडा होते; व दोषांस नाश करणारे जे आहारादि आचार ते उपशय, ह्मणजे त्यापासून सुख होतें.

## अंतर्वेगज्वराचें लक्षण.

अंतर्दाहोधिकातृष्णाप्रलापःश्वसनंभ्रमः ॥ संध्यस्थिशूलमस्वेदोदोषवर्चोविनिग्रहः ॥ अंतर्वेगस्यलिंगानिज्वरस्यैतानिलक्षयेत् ॥

अर्थ—अंतर्दाह, फार ताहान असंबद्धभाषण, श्वास, भ्रम, संधि आणि अस्थि यांस ठणका, घाम न येणें आणि अपानवायु व पुरीष यांचा निरोध होणें, हीं अंतर्वेगज्वराचीं लक्षणें जाणावीं. हा असाध्य आहे.

## बहिर्वेगज्वरलक्षण.

संतापोह्यधिकोबाह्यस्तृष्णादीनांचमार्दवं ॥
बहिर्वेगस्यलिंगानिसुखसाध्यत्वमेवच ॥

अर्थ—बाह्यत्वचादिकांचे ठायीं फार संताप आणि तृष्णादिक लक्षणें अल्प असतात. हीं बहिर्वेगज्वराचीं लक्षणें जाणावीं. हा सुसाध्य ह्मणून सांगितला; त्यावरून अंतर्वेगज्वर दुःसाध्य सांगितला.

## आमाशयगतज्वरलक्षण.

लालाप्रसेकहृल्लासहृदयाशुध्यरोचकाः ॥ तंद्रालस्याविपाका स्यवैरस्यंगुरुगात्रता ॥ क्षुन्नाशोबहुमूत्रत्वंस्तब्धताबलवान्ज्व रः ॥ आमज्वरस्यचिन्हानिनदद्यात्तत्रभेषजं ॥ भेषजंह्यामदोष स्यभूयोजनयतिज्वरं ॥ शोधनंशमनीयंचकरोतिविषमज्वरं ॥

**अर्थ**—लाळपडणें, ओकारी होईलशी भ्रांति, ऊर भरून येणें, अन्नद्वेष, अरुचि, झांपड, आळस, अन्न जिरत नाहीं, तोंड बेचव, गात्रांला जडत्व, क्षुधा नसणें, वारंवार मूत्र होणें, अंग ताठल्यासारिखें वाटणें व अंगात पुष्कळ ज्वर असणें, हीं अपक्वज्वराचीं लक्षणें जाणावीं. ह्या ज्वरावर औषध देऊं नये. अपक्व दोषाला औषध दिलें, तर ज्वर वाढतो. शोधन किंवा शमन औषध दिलें, तर विषमज्वरावर घालवितो.

## कटुक्यादिकाढा.

कटुकारोहिणीमुस्तापिप्पलीमूलमेवच ॥
हरीतकीचतत्तोयमामाशयगतेज्वरे ॥

**अर्थ**—कुटकी, नागरमोथा, पिंपळीमूळ व बाळहरडे यांचा काढा दिला असतां आमाशयगत ज्वर नाश पावतो.

## सर्वेश्वररस.

रसात्द्विगुणितंगंधंचतुर्भागंतुटंकणं ॥ तथाष्टभागंजेपालंत्र्यहं संमर्दयेद्दृढं ॥ वल्लोनवज्वरंहंतिरसःसर्वेश्वराभिधः ॥ वल्लद्वय हरीतक्यायुक्तंवातज्वरंतथा ॥ द्विवल्लोमधुखंडेनपीतःक्षौद्रयुतः कफं ॥ गुंजाजीर्णज्वरंघोरमतिलंघितजंतथा ॥ वल्लस्तुसूति कारोगेपिप्पलीमधुसंयुतः ॥ पंचवर्षस्थबालस्ययवमात्रोज्वरं जयेत् ॥ गुंजाभिवृध्याविषयान्यावच्चातुर्थिकानपि ॥ मलखं डेनसंयुक्तोहन्याज्ज्वरत्रयंतथा ॥ यवानीक्रिमिशत्रुभ्यांवल्लोह न्यात्क्रमीनपि ॥ एवंसर्वगदान्हंतिरसोभैरवभाषितं ॥

**अर्थ**—पारा १ भाग, गंधक २ भाग, टांकणखार ४ भाग, व जेपाल ८ भाग, हीं स- एकत्र करून तीन दिवस मर्दन करावीं. हा सर्वेश्वररस नवज्वराचा नाश करितो. हरीत- कीशीं वातज्वरावर द्यावा; दोन वाल प्रमाण मध व साकर यांशीं कफावर द्यावा. एक गुंज जीर्णज्वरावर द्यावा; आणि पिंपळी व मध यांशीं वाल प्रमाण बाळंत रोगावर द्यावा.

हा पांच वर्षांच्या बालाचे ज्वरावर यवमात्र द्यावा. हा गुंजावृद्धीनें विषमावर द्यावा; ह्मणजे चातुर्थिकादिकांचा नाश करितो. व गुळये खडिसाकरशीं ज्वरत्रयाचा नाश करितो. व एक वाल ओंवा व वावडिंगाशीं दिला ह्मणजे कृमिनाश करितो. याप्रमाणे हा सर्वरोगांचा नाश करितो, असें भैरवाचें वाक्य आहे.

## त्रिपुरभैरव.

विषटंकंबलिम्लेच्छदंतीबीजंक्रमाद्बहु ॥ दंत्यंबुमर्दितोयामंरस स्त्रिपुरभैरवः ॥ वल्लव्योषेणचार्द्रस्यरसेनासितयाथवा ॥ दत्तोन वज्वरंहंतिमांद्यमानिलशोथहा ॥ हंतिशूलंसविष्टंभमर्शांसिकृ मिजान्गदान् ॥ पथ्यंतक्रेणभुंजीतरसेस्मिन्रोगहारिणि ॥

अर्थ—बचनाग १ तोळा, गंधक, ताम्रभस्म व जेपाळ हे सम भाग घेऊन त्याचा जेपाळाच्या रसांत एक प्रहर खल करावा. याचें नांव त्रिपुरभैरव. हा एकवाल सुंठ, मिरीं व पिंपळी यांचें चूर्ण, आल्याचा रस, किंवा साकर यांशीं दिला असतां नवज्वर, अग्निमांद्य, वातशोथ, शूल, मलस्तंभ, मुळव्याध व कृमीपासून झालेले व्याधि यांचा नाश करितो. यावर पथ्याला ताकभात द्यावा.

## रत्नगिरि.

सूताभ्रताम्रवर्णानिगंधश्चार्धांशलोहकं ॥ लोहार्धंमृतवैक्रांतंमर्द येद्भृंगजैर्द्रवैः ॥ पर्पटीरसवत्पाच्यंचूर्णितंभावयेच्छनैः ॥ शिग्रुवा सकनिर्गुंडीगुडूच्याग्निभृंगजैः ॥ क्षुद्रामुंडीजयंत्याथमुनिब्राम्ह्य थतिक्तकैः ॥ कन्यायाश्चद्रवैर्भाव्यंत्रिवारंतुपृथक्पृथक् ॥ ततोल घुपुटेपक्वंस्वांगशीतंसमुद्धरेत् ॥ माषोदत्तःकणायान्ययुक्तश्चाभिन वज्वरं ॥ कुर्याज्ज्वरविनिर्मुक्तंरोगिणंघटिकाद्वयात् ॥ अयंरत्न गिरिर्नामरसोयंयोगवाहकः ॥ मुद्गान्नंमुद्गयूषंवासमीरंतक्रभुक्तकं ॥ रसेचोक्तंपथ्यमस्मिन्शाकंसर्वज्वरोदितं ॥

अर्थ—पारा, अभ्रक, ताम्र व सुवर्ण यांचीं भस्में, आणि गंधक. हीं समभाग. लोहभस्म अर्धाभाग व वैक्रांत रत्नाचें भस्म पावभाग, याप्रमाणें एकत्र करून त्यांचा माक्याच्या रसांत खल करून पर्पटीसारिखा पचन करावा; नंतर खलांत घालून शेवगा, अडुळसा, निर्गुंडी, गुळवेल, चित्रक, माका, रिंगणी, मुंडी, जयंती, अगस्त्या, ब्राह्मी, किराईत, आणि कोरफड यांच्या रसाच्या निरनिराळया तीन तीन भावना द्याव्या; नंतर एकलघु पुट द्यावें. शीत झाल्यावर काढून यांतून एक मासा पिंपळीच्या दाण्याशीं द्यावा; ह्मण-

जे नूतन ज्वराचा दोन घटकांत नाश करितो. हा रत्नगिरिरस योगवाहक आहे. या वर पथ्य मुगांचें अन्न, मुगांचें काट, वायु, ताक, आणि सर्व रसावरच्या शाका व ज्वरावरचें पथ्य भोजन द्यावें.

## नवज्वरेभसिंह.

शुद्धसूतंतथागंधंलोहंताम्रंचसीसकं ॥ मरीचंपिप्पलीविश्वंसम भागानिचूर्णयेत् ॥ अर्धभागंविषंदत्वामर्दयेद्वासरद्वयं ॥ शृंग वेरानुपानेनदद्याद्गुंजाद्वयंभिषक् ॥ नवज्वरेमहाघोरेवातसंग्रह णीगदे ॥ नवज्वरेभसिंहोयंसर्वरोगेप्रशस्यते ॥

अर्थ–शुद्धपारा, गंधक, लोह, ताम्र, शिशाचें भस्म, मिरीं, पिंपळी, आणि सुंठ हे सम. भाग घेऊन त्यांचें चूर्ण करावें; आणि अर्धा भाग बचनाग घालून त्याचा आल्याच्या र- साशीं दोन दिवस खल करावा; आणि दोन गुंजाची गोळी करून ती आल्याच्या रसा- शीं उग्र नवज्वरावर व वातसंग्रहणीवर द्यावी. हा नवज्वरेभसिंह सर्व रोगांवर हि द्यावा.

## ज्वरघ्नी वटिका.

एकभागोरसःशुद्धोशैलेयःपिप्पलीशिवा ॥ आकारकरभोगंधः कटुतैलेनशोधितः ॥ फलानिचेंद्रवारुण्याश्चतुर्भागमिताअमी ॥ एकत्रमर्दयेच्चूर्णमिंद्रवारुणिकारसैः ॥ माषोन्मितावटीकृत्वाद द्यात्सद्योज्वरेबुधः ॥ छिन्नारसानुपानेनज्वरघ्नीवटिकामता ॥

अर्थ–शुद्ध पारा १ भाग आणि शिलाजित, पिंपळी, हरीतकी, अकलकरा, शिरसाचे तेलांत शुद्ध केलेला गंधक, कंवडळें हीं प्रत्येक चार चार भाग घेऊन कंवडळीच्या रसांत. सर्वांचा खल करून एक मासा प्रमाण गोळी करून नवीन ज्वरावर द्यावी. याला अनुपा न गुळवेलीचा रस योजावा. हिला ज्वरघ्नी वटी ह्मणतात.

## विश्वतापहरण.

सूतंशुल्बंत्रिवृताबलितिक्तादंतीबीजंचपलाविषतिंदु ॥ पथ्यया सहविचूर्ण्यसमांशंहेमवारिसहितंदिनमेकं ॥ वल्लयुग्मगुटिका र्द्रकतोयैर्नाशयेदभिनवज्वरमाशु ॥ विश्वतापहरणोत्रचपथ्यं मुद्गयूषसहितंलघुभुक्तं ॥

अर्थ–पारा, ताम्रभस्म, निशोत्तर, गंधक, कुटकी, जेपाळ, पिंपळी, बचनाग, कुचला, आणि हरीतकी हीं समभाग घेऊन त्यांचा धोतऱ्याच्या रसांत एक दिवस खल करावा. त्याची दोन वालांची गोळी अल्याच्या रसाशीं द्यावी. ह्मणजे ती नूतन ज्वराचा नाश क- रित्ये. या विश्वतापहरणावर मुगांचें काट व लघु असें अन्न द्यावें.

## श्वासकुठाररस.

सूतंगंधंविषंचैवटंकणंचमनःशिला ॥ एतानिटंकमात्राणिमरिचं त्वष्टटंककं ॥ कटुत्रयंचषट्टंकंखल्वेक्षिप्त्वाविचूर्णयेत् ॥ रसः श्वासकुठारोयंश्वाससर्वज्वरापहः ॥

अर्थ—पारा, गंधक, बचनाग, टाकणखार, आणि मनशीळ हीं प्रत्येक एकेक तोळा आणि मिरीं आठ तोळे व सुंठ, मिरीं, पिंपळी, हीं साहा तोळे खलांत घालून बारीक खल करावा. हा श्वासकुठार श्वास आणि सर्वज्वर यांचा नाश करितो.

## उदकमंजरीरस.

सूतोगंधश्चोषणंटंकणंचसर्वैस्तुल्याशर्करामत्स्यपित्तैः ॥ भूयो भूयोमर्दयेत्तंत्रिरात्रंवल्लोदेयःशृंगवेरद्रवेण ॥ तापेशीतंवीजनै स्तक्रभक्तंवृंताकाढ्यंपथ्यमेतत्प्रदिष्टं ॥ अन्हैवोग्रंहंतिसद्योज्व रंतुपित्ताधिक्येमूर्ध्नितोयंचदद्यात् ॥

अर्थ—पारा, गंधक, मिरें व टांकणखार हीं समभाग आणि या तिहींचे बरोबर साकर घालून त्या सर्वांचा माशाचे पित्तांत खल करावा. एकसारखा तीन दिवस खल झाल्यावर एक वालप्रमाणें आल्याच्या रसांतून द्यावा. दाह झाल्यास विंझण्याचा वारा घ्यावा. ताक, भात, वांग्यांची भाजी हीं पथ्यास द्यावीं. याप्रमाणें केले असतां, एक दिवसांत नूतनज्वराचा नाश करील. जर पित्त अधिक असेल तर मस्तकावर पाणी शिंपावें.

## ज्वरधूमकेतुरस.

अद्यात्समंसूतसमुद्रफेनंहिंगूलगंधंपरिमर्द्ययामं ॥
नवज्वरेवल्लयुगंत्रिघस्रमाद्रांभसायंज्वरधूमकेतुः ॥

अर्थ—पारा, गंधक, हिंगूळ, समुद्रफेण हीं आल्याच्या रसांत एक प्रहरभर खलावीं; नंतर दोन वालप्रमाणें आल्याच्या रसाबरोबर तीन दिवस द्यावा; ह्मणजे नवज्वराचा नाश करील. ह्याला ज्वरधूमकेतु असें ह्मणतात.

## वटिका.

रसंगंधंचदरदंजैपालंक्रमवर्द्धितं ॥ दंतीरसेनसंपिष्यवटीगुंजा मिताकृता ॥ प्रभातेसितयासार्धमशिताशीतवारिणा ॥ एकेन दिवसेनैषानवज्वरहराभवेत् ॥

अर्थ—पारा एक भाग, गंधक दोन भाग, हिंगुळ तीन भाग, जेपाळ चार भाग या प्रमाणें घेऊन दांतीच्या मुळांचे काढ्यांत खलून गुंजेप्रमाणे गोळी करून प्रातःकाळी थंडपाणी व साकर यांच्या बरोबर खावी; ह्मणजे ती एक दिवसानें नवज्वराचा नाश करील.

## दुसरी वटी.

रसोगंधोविषंशुंठीपिप्पलीमरिचानिच ॥ पथ्याबिभीतकंधात्री दंतीबीजंचशोधितं ॥ चूर्णमेषांसमांशानांद्रोणपुष्पीरसैर्भवेत् ॥ वटींमाषनिभांकुर्याद्भक्षयेन्नूतनज्वरे ॥

अर्थ–पारा, गंधक, बचनाग, सुंठ, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकाठी व शुद्ध जेपाळबीज. हीं समभाग घेऊन चूर्ण करून कुंभ्याचा रसाची भावना द्यावी; नंतर एक मासाप्रमाणाची गोळी भक्षण करावी; ह्मणजे नूतनज्वराचा नाश करील.

## ज्वरांकुश.

खंडितंहरिणशृंगंज्वालमुख्यारसैःसमं ॥ रुध्वाभांडेपचेच्चुल्यां यामयुग्मंततोनयेत् ॥ अष्टांशंत्रिकटुंदद्यान्निष्कमात्रंचभक्षयेत् ॥ नागवल्यारसैःसार्धंवातपित्तज्वरापहं ॥ अयंज्वरांकुशोनामरसःसर्वज्वरापहः ॥

अर्थ–हरणाच्या शिंगाचे बारिक तुकडे मडक्यांत ठेऊन त्यांत भारजांबळीचा रस घालून त्याचे तोंडावर दुसरें लहानसर मडकें उपडें घालून कापडमाती करून चुलीवर ठेऊन दोन प्रहर पर्यंत अग्नि द्यावा. मग थंड जाहाल्यावर त्या तुकड्याचें भस्म होतें, तें बाहेर काढून त्याचे आठवा हिस्सा सुंठ, मिऱ्यें, पिंपळी यांचे चूर्ण करून त्या भस्माला मेळवून तें चूर्ण निष्कप्रमाण विड्याच्या पानाचे रसांत द्यावें. तेणेंकरून हा ज्वरांकुश सारे ज्वर दूर करितो; परंतु विशेषेंकरून वातपित्तज्वर हे दूर करितो.

## नवज्वरेभांकुश.

सगंधटंकंरसमूषणंचविमर्दितंभावयमीनपित्तैः ॥ दिनत्रयंवल्लयुगंप्रदद्याद्वृंताकतक्रौदनपथ्यमत्र ॥ नवज्वरेभांकुशनामधेयः क्षणेनघर्मोद्गममातनोति ॥

अर्थ–गंधक, टाकणखार, पारा व मिऱ्यें यांचा मत्स्यपित्तांत तीन दिवस खल करावा. तो दोन वाल द्यावा. पथ्य वांगें व तक्रभात. हा रस क्षणांत घाम उत्पन्न करितो.

## अमृतकलानिधि.

अमृतवराटिकामरीचैर्द्विपंचनवमांशकैःकुर्यात् ॥ मुद्गप्रमाणावटिकाज्वरपित्तकफाग्निमांद्यहारीस्यात् ॥

अर्थ–बचनाग दोन भाग, कौडीचे भस्म पांच भाग, मिरें नऊ भाग घेऊन त्याचा

खल करावा; ह्मणजे रस तयार जाहला; हा रस मुगाप्रमाणें द्यावा; ह्मणजे ज्वर, पित्त, कफ व मंदाग्नि यांना दूर करील.

## पंचामृतरस.

स्वर्णरौप्यरविनागलोहकंचंद्रदकृशिखिचतुःशरभागं॥ मर्दितं दृढतरंदिनमेकंभावितंमकरपित्तरसेन ॥ वल्लयुग्ममखिलज्व रशांत्यैशर्करार्द्रकरसेनददीत ॥

अर्थ—सोनेंभस्म एक भाग, रौप्यभस्म दोन भाग, ताम्रभस्म तीन भाग, शिशाचे भस्म चार भाग व लोह पांच भाग, हीं सर्व एकत्र करून सुसरीच्या पित्तानें भावना देऊन खल करावा; आणि संपूर्णज्वर शांति करितां आल्याचा रस व साकर यांशीं दोन वाल द्यावा.

## जीर्णज्वरांकुश.

मृतंसूताभ्रनागार्ककांतंवैक्रांतमेवच ॥हिंगुलंटंकणंगंधंविषंकु ष्ठंसमांशकं ॥ त्रिकटुत्रिफलामुस्ताभृंगनिर्गुंडिकाद्रवैः ॥ भा वयेत्रिदिनंचैवमाषमात्रानुपानतः ॥ जीर्णज्वरंक्षयंकासंदोषा न्मंदानलंतथा ॥ पांडुहलीमकंगुल्ममुदरंचार्दितंजयेत् ॥ ग्र हणीशूलरोगांश्चअरोचकमनेकधा ॥ कांतितेजोबलंपुष्टिंवीर्य वृद्धिंविवर्धयेत् ॥ साध्यासाध्यंनिहंत्याशुरसोजीर्णज्वरांकुशः ॥

अर्थ—पाऱ्याचे भस्म, अभ्रकभस्म, शिशाचे भस्म, ताम्रभस्म, कांतलोहभस्म, वैक्रांत मण्याचे भस्म, हिंगुळ, टांकणखार, गंधक, बचनाग व कोष्ठकोळिंजन हीं औषधें समभाग घेऊन सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहडा, आवळकाठी व नागरमोथा यांचा काढा व माका निर्गुंडी यांच्या रसाची तीन दिवस भावना द्यावी; आणि तो योग्य अनुपानाशीं द्यावा. हा जीर्णज्वर, क्षय, खोकला, त्रिदोष, मंदाग्नि पांडुरोग, हलीमक, गुल्म,उदर, अर्दितवायु, संग्रहणी, शूलरोग व सर्वप्रकारची अरुचि यांचा नाश करील, व कांति, तेज, बल, पुष्टि व वीर्यवृद्धि यानां वाढवितो; आणि हा जीर्णज्वरांकुश असाध्य किंवा साध्य रोगांचा नाश करितो.

## पच्यमानज्वरलक्षण.

ज्वरवेगोधिकातृष्णाप्रलापःश्वसनंभ्रमः ॥
मलप्रवृत्तिरुत्क्लेदोपच्यमानस्यलक्षणं ॥

**अर्थ**–ज्वराचा वेग व तहान यांचें आधिक्य व प्रलाप, श्वास, भ्रम, मलाची प्रवृत्ति आणि वांति येणें हीं पच्यमानज्वराचीं लक्षणें जाणावीं.

## निरामज्वरलक्षण.

क्षुत्क्षामतालघुत्वंचगात्राणांज्वरमार्दवं ॥
दोषप्रवृत्तिरुत्साहोनिरामज्वरलक्षणं ॥

**अर्थ**–अल्पक्षुधा, आणि शरीर हलकें, ज्वर अल्प, स्वस्वमार्गानें वातादिकांची प्रवृत्ति आणि चित्तास हुशारी, हीं निरामज्वराचीं लक्षणें जाणावीं.

## ग्रंथांतरोक्त जीर्णज्वरनिदान.

त्रिःसप्ताहेव्यतीतेतनुज्वरोयस्तनुतांगतः ॥
प्लीहाग्निमांद्यंकुरुतेसजीर्णज्वरउच्यते ॥

**अर्थ**–एकवीस दिवस लोटल्यावर जो ज्वर बारीक होऊन अंगांत राहातो, त्यापासून पोटांत कवळू व जठराग्नि मंद होतो, त्याला जीर्णज्वर ह्मणतात.

## सामान्यचिकित्साशास्त्रार्थ.

जीर्णज्वरीनरःकुर्यान्नोपवासंकदाचन ॥
लंघनात्सभवेत्क्षीणोज्वरस्तुस्याद्बलीयतः ॥

**अर्थ**–जीर्णज्वरीरोग्यानें कधींही उपवास करूं नये. लंघनानें रोगी क्षीण होऊन ज्वर व्याधि बळवान् होतो.

## लंघन

पुराणेपिज्वरेदोषायद्यपथ्यैःपुनस्तथा ॥
लंघयेत्तत्रतंपश्चात्पूर्ववत्कारयेत्क्रियां ॥

**अर्थ**–जर जीर्णज्वरामध्यें अपथ्यानें दोष कोपला, तर त्या जीर्णज्वरिताला लंघन घालून दोष शांत जाहाल्यावर मग पूर्वी प्रमाणें क्रिया करावी.

## ज्वरक्षीणाला वांतिनिषेध.

ज्वरक्षीणस्यनहितंवमनंनविरेचनं ॥
कामंतुपायसंतस्यनिरूहैर्वाहरेन्मलान् ॥

**अर्थ**–ज्वरानें क्षीणपुरुषाला वमन व विरेचन हितकारक होत नाहींत. त्याला यथेच्छ दूध पाजावें. अथवा निरूहबस्तीनें मलहरण करावें.

## ज्वर पुनः येण्याचें कारण.

आवर्ततेगात्रसादेवैवर्ण्यमंगलादिषु ॥
शांतज्वरोप्यसाध्यःस्यादनुबंधभयान्नरः ॥

**अर्थ**—आंग गळणें, विवर्णता इत्यादि विकारानीं किंवा अमंगलादिकांचे दर्शनानें ज्वर शांत आहे, तथापि पुनः येतो.

## वातजीर्णज्वर.

ज्वरोष्मणाज्वरेजीर्णेवायुःकुप्यातिरूक्षिते ॥
घृतंसंशमनंतस्यदीप्तस्येवांबुवेश्मनः ॥

**अर्थ**—जीर्णज्वराचे उष्म्यानें देह रुक्ष झाला असतां; वायूचा कोप होतो. त्याची शांति होण्या करितां घृतपान योग्य आहे. जसें पेटलेल्या अग्नीवर पाणी.

## जीर्णज्वरीं पक्काशयाश्रितदोषचिकित्सा.

जीर्णज्वरेषुसर्वेषुदोषेपक्काशयाश्रिते ॥
स्नेहबस्तिःप्रकर्तव्यःसनिरूढोयथाविधि ॥

**अर्थ**—संपूर्ण जीर्णज्वरांमध्यें दोष पक्काशयाश्रित झाले असतां, स्नेहबस्ति किंवा यथाविधि निरूहबस्ति करावा.

## छिन्नादिकाढा.

पिप्पलीचूर्णसंयुक्तःक्काथश्छिन्नोद्भवोद्भवः ॥
जीर्णज्वरकफध्वंसीपंचमूलकृतोथवा ॥

**अर्थ**—गुळवेलीचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. अथवा पंचमूळांचा काढा द्यावा; ह्मणजे तो जीर्णज्वर व कफ यांचा नाश करील.

## त्रिकंटकादिकाढा.

निदिग्धिकानागरकामृतानांक्काथंपिबेन्मिश्रितपिप्पलीकं ॥
जीर्णज्वरारोचककासशूलश्वासाग्निमांद्यार्दितपीनसेषु ॥ हंत्यू
र्ध्वजानयंप्रायःसायंतेनोपयुज्यते ॥

**अर्थ**—रिंगणी, सुंठ, व गुळवेल, यांच्या काढ्यांत पिंपळी घालून द्यावा; ह्मणजे तो ज्वर, अरुचि, खोकला, शूल, श्वास, अग्निमांद्य, अर्दितवायु, पडसें व ऊर्ध्वविकार यांचा नाश करितो. हा काढा सायंकाळी द्यावा.

## गुडूचीकाढा.

अमृतायाःकषायंतुशीतलीकृतमीरीतं ॥
मधुपादयुतंपीतंजीर्णज्वरहरंपरं ॥

अर्थ—गुळवेलीचा काढा करून थंड जाहाल्यावर त्यांत चतुर्थांश मध घालून द्यावा. तो जीर्णज्वरनाशक आहे.

## द्राक्षादिअष्टादशांगकाढा.

द्राक्षामृताशठीशृंगीमुस्तकंरक्तचंदनं ॥ नागरंकटुकापाठाभू
निंबःसदुरालभः ॥ उशीरंधान्यकंपद्मंबालकंकंटकारिका ॥
पुष्करंपिचुमंदश्चस्यादष्टांगमिदंस्मृतं ॥ जीर्णज्वरारुचिश्वास
कासश्वयथुनाशनं ॥

अर्थ—द्राक्षे, गुळवेल, कचोरा, कांकडशिंगी, नागरमोथा, रक्तचंदन, सुंठ, कटुकी, पाडळमूळ, किराईत, धमासा, वाळा, धने, पद्मकाष्ट, काळा वाळा, रिंगणी, पोखरमूळ व कडुनिंब यांचा काढा जीर्णज्वर, अरुचि, श्वास, कास व सूज यांचा नाश करितो.

## शुंठीकाढा.

अरुचिमनलमांद्यंपीनसश्वासकासानुदरमुदकदोषानाशुह
न्यादशेषान् ॥ जनयतितनुकांतिंचित्तनेत्रप्रसादंपलपरि
मितशुंठीक्षौद्रसिद्धःकषायः ॥

अर्थ—चार तोळे सुंठ घेऊन तिचा काढा द्यावा. तो अरुचि, अग्निमांद्य, पडसें, श्वास, खोकला, उदर, पाण्याचे दोष, यांचा नाश करितो. व कांति, चित्त व नेत्र यांला प्रसन्नता देतो.

## कणादिकाढा.

कणामधुकमृद्वीकाबलाचंदनसारिवा ॥
निःक्वाथ्यपयसापीताःक्षीणज्वरविनाशनाः ॥

अर्थ—पिंपळी, मोहाचें फूल, मनुका, चिकणा, रक्तचंदन व उपळसरी या औषधांचा काढा करून द्यावा. तो जीर्णज्वराचा नाश करील.

## तिक्तादिकाढा.

तिक्तापर्पटभूनिंबमुस्तच्छिन्नरुहांपिबेत् ॥
अभ्यासेनजयत्येषज्वरमामृत्युमातुरः ॥

**अर्थ**–कुटकी, पित्तपापडा, काडेचिराईत, नागरमोथे व गुळवेल यांचा काढा करून द्यावा. याच्या चिरकाळ सेवनाने असाध्यही ज्वर जातो.

## कलिंगादि काढा.

कलिंगकटुकीमुस्ताभूनिंबोग्रंथिनागरं ॥ राजकन्यादेवदारु पिबेत्क्काथंसकृष्णकं ॥ जीर्णज्वरगदेनित्यंसामेचैवनिरामये ॥ ज्वरांश्चविषमांश्चैवशीतंचातुर्थिकंजयेत् ॥

**अर्थ**–इंद्रजव, कुटकी, नागरमोथे, किराईत, पिंपळमूळ, सुंठ, केविका, देवदार, यांचा काढा, पिंपळीचे चूर्ण घालून द्यावा; म्हणजे आमसहित जीर्णज्वर किंवा निराम ज्वर, शीतज्वर व चातुर्थिक. यांचा नाश करितो.

## द्राक्षादि चूर्ण.

द्राक्षामृतानागरतोयमुष्णंकृष्णाविपाकंबहुरोगनिघ्नं ॥ श्वासंचशूलंकसनंचमांद्यंजीर्णज्वरंचैवजलेनतृष्णां ॥

**अर्थ**–द्राक्षे, गुळवेल व सुंठ यांचा काढा आंत पिंपळीचे चूर्ण घालून द्यावा. तो श्वास, शूल, खोकला, अग्निमांद्य, जीर्णज्वर व तृष्णा यांचा नाश करील.

## लवंगादि काढा.

देवपुष्पचपलाग्रथितंचसिंहिकानलकिरातपयोदाः ॥ त्रायमाण भृगुजासुरवासाब्राह्मिकाकरिकणादशमूलं ॥ शक्रपुष्पशरटीन वरास्नाशृंगिनागरवचाःसमभागाः ॥ साधितंचक्कथनंकिलपेयंयो जितंचसुरसास्वरसेन ॥ ज्वरेचसूतिकारोगेशीतेरोचकसंभ्रमे ॥ अग्निमांद्येवातगुल्मेलवंगादिःप्रशस्यते ॥

**अर्थ**–लवंग, पिंपळी, पिंपळमूळ, रिंगणी, चित्रक, किराईत, नागरमोथे, त्रायमाण, भारंगमूळ, देवदार, अडुळसा, कारिवणा, गजपिंपळी, दशमूळ, इंद्रजव, खादिरपर्णी, रास्ना, काकडशिंगी, सुंठ व वेखंड यांचा काढा तुळशीचा रस घालून द्यावा. ज्वर, बाळंतरोग, शैत्य, अरुचि, भ्रम, अग्निमांद्य, वातगुल्म, यांवर हा प्रशस्त आहे.

## तालीसादि चूर्ण.

तालीसंमरिचंशुंठीपिप्पलीवंशरोचनं ॥ एकद्वित्रिचतुःपंचकर्षैर्भागा न्प्रकल्पयेत् ॥ एलात्वचोस्तुकर्षार्धंप्रत्येकंभागमावहेत् ॥ द्वात्रिंश त्कर्षतुलिताप्रदेयाशर्करावुधैः ॥ तालीसाद्यमिदंचूर्णंरोचनंपाचनं

स्मृतं ॥ कासश्वासज्वरहरंछर्यतीसारनाशनं ॥ शोफाध्मानहरंप्ली हग्रहणीपांडुरोगजित् ॥ पक्त्वावाशर्करांचूर्णंक्षिप्त्वागुटिकामता ॥

अर्थ-तालीसपत्र एक भाग, मिरीं दोन भाग, सुंठ तीन भाग, पिंपळी चार भाग व वंशलोचन पांच भाग, या भागां प्रमाणें औषधें घ्यावीं. व एलची, दालचिनी, हीं अर्धा अर्धा भाग आणि साकर बत्तीस तोळे याप्रमाणें तीं चूर्णें एकत्र करावीं; ह्मणजे हें तालीसादिचूर्ण होतें. हें रोचक व पाचन आहे; व खोकला, श्वास, ज्वर, वांति, अतिसार, सूज, पोटाची फुगवटी, प्लीहा, संग्रहणी व पांडुरोग, यांचा नाश करितें. याची गोळी करणे झाल्यास साकरेच्या पाकांत करावी.

## त्रिफलादिचूर्ण.

कासश्वासज्वरहरापिप्पलीत्रिफलायुता ॥
चूर्णितामधुनालीढाभेदिनीचाग्निबोधिनी ॥

अर्थ-पिंपळी व त्रिफळा. यांचें चूर्ण मधाशीं चाटीत गेलें असतां, तें भेदक, आणि अग्नि प्रदीप्त करणारें आहे.

## कट्फलादिचूर्ण.

कट्फलंमुस्तकंतिक्तासठीशृंगीचपौष्करं ॥ चूर्णमेतांचमधुनाशृं गवेररसेनवा ॥ लिहेज्जीर्णज्वरहरंकासश्वासारुचीर्जयेत् ॥ वा युंशूलंतथाछर्दिंक्षयंचैवव्यपोहति ॥

अर्थ-कायफळ, नागरमोथे, कुटकी, कचोरा, कांकडशृंगी व पुष्करमूळ, यांचें चूर्ण मधाशीं किंवा आल्याच्या रसाशीं द्यावें. तें जीर्ण ज्वर, कास, श्वास, अरुचि, वायु, शूळ, ओकारी व क्षय, यांचा नाश करितें.

## त्रिवृच्चूर्ण.

चूर्णंत्रिवृत्कणाश्यामात्रिफलानांसितासमं ॥
भेदिकोष्ठरुजादाहगौरवज्वरनाशनं ॥

अर्थ-तेड, पिंपळी, उपळसरी, हरडा, बेहेडा व आवळकाठी यांचे समभाग चूर्ण व सर्वचूर्णबरोबर साकर मिसळून द्यावें. तें भेदि, पोटांतील शूळ, दाह, जडता व ज्वर यांचा नाश करितें.

## दुसरें लवंगादिचूर्ण.

लवंगजातीफलपिप्पलीनांभागंप्रकल्प्याक्षसमानमेषां ॥ पला र्धमेकंमरिचस्यदेयंपलानिचत्वारिमहौषधस्य ॥ सितासमंच

र्णमिदंप्रगृह्यरोगांश्चचाशुप्रबलान्निहंति ॥ कासज्वरारोचक
मेहगुल्मश्वासाग्निमांद्यग्रहणीप्रदोषं ॥

**अर्थ**—लवंगा, जायफळ व पिंपळी हीं अर्धा तोळा, मिरीं दोन तोळे व सोळा तोळे सुंठ, घेऊन त्यांचें चूर्ण करून त्यांत चूर्णाबरावर साकर घालावी आणि द्यावें; ह्मणजे प्रबळ रोग, खोकला, ज्वर, अरुचि, मेह, गुल्म, श्वास, अग्निमांद्य आणि संग्रहणी दोष, यांचा नाश करितें.

## पंचाजादि.

पंचाज्यंपंचगव्यंवापंचाविकमथापिवा ॥ जीर्णज्वरविनाशार्थं
पिवेद्वापंचमाहिषं ॥ दधिदुग्धंतथाज्यंचविण्मूत्रेपंचशस्यते ॥
पूर्वोक्तंपंचकंज्ञेयंचिकित्सायांभिषग्वरः ॥

**अर्थ**—शेळी व गाय यांचें दूध, दहीं, तूप, शेण व मूत्र हीं एकत्र करून जीर्णज्वर नाशनार्थ द्यावीं; किंवा ह्मशींचे हीं द्यावें. दहीं, तूप, दूध, शेण व मूत्र, हे पांच, पदार्थ चिकित्सेमध्यें घ्यावें; ह्मणून वैद्यानीं सांगीतलें आहेत.

## लोध्रादिचूर्ण.

लोध्रचंदनपट्ग्रंथिशर्करावृतमाक्षिकैः ॥
सक्षीरेणविषंयुक्तंजीर्णज्वरहरंपरं ॥

**अर्थ**—लोध्र, चंदन, पिंपळमूळ व अतिविष यांचें चूर्ण साकर, तूप, मध, आणि दूध, यांशीं घेतलें असतां, तें चांगलें जीर्णज्वरनाशक आहे.

## वर्धमानपिप्पलीयोग.

क्रमवृध्यादशाहानिदशपैप्पलिकंदिनं ॥ वर्धयेत्पयसासार्धं
तथैवानमयेत्पुनः ॥ पिप्पलीनांसहस्रस्वप्रयोगोयंरसायने ॥ पि
ष्टास्तावलिभिःपेयाःशतामध्यबलैर्नरैः ॥ चूर्णताहीनबलिनांहि
तामधुसमायुताः ॥ कासाजीर्णारुचिश्वासहृत्पांडुक्रमिरोगि
णां ॥ मंदाग्निविषमाग्नीनांशस्यतेगुडपिप्पली ॥ पंचद्वौसप्त
दशवापिप्पल्यःक्षौद्रसर्पिषा ॥ लीढाज्वरंश्वासकासंहृद्रोगंपां
डुकामलां ॥ प्रदरंचप्रमेहांश्चहन्यात्तत्रकिमद्भुतं ॥

**अर्थ**—क्रमवृद्धीनें दाहादिवस दाहा पिंपळ्या दुधाबरोबर घ्याव्या. याप्रमाणें रसायना मध्यें हा सहस्रपिंपळ्यांचा प्रयोग सांगितला आहे. त्या बलिष्ठपुरुषानें वाटून घ्याव्या; व

मध्यमबलपुरुषानीं दुधांत शिजवून घ्याव्या; हीनबलपुरुषानीं चूर्ण करून मधाशीं घ्याव्या. त्या खोकला, अजीर्ण, अरुचि, श्वास, हृद्रोग पांडुरोग, कृमि, मंदाग्नि व विषमाग्नि यानां प्रशस्त व ह्या गुळ, मध, तूप, यांतून दाहा किंवा त्याहून अधिक घ्याव्या; क्षणजं श्वास, खोकला, हृद्रोग, पांडुरोग, कामला, प्रदर व प्रमेह यांचा नाश करितील यांत आश्चर्य नाहीं.

## पिप्पलीमोदक.

क्षौद्राद्द्विगुणितंसर्पिर्घृताद्द्विगुणपिप्पली ॥ सिताचद्विगुणात स्याःक्षीरंदेयंचतुर्गुणं ॥ चातुर्जातंक्षौद्रतुल्यंपक्त्वाकुर्याच्चमोद कान् ॥ धातुस्थांश्चज्वरान्सर्वान्श्वासंकासंचपांडुतां ॥ धातु क्षयंवन्हिमांद्यंपिप्पलीमोदकोजयेत् ॥

**अर्थ**– मध एक भाग, तूप दोन भाग, पिंपळी चार भाग, साकर आठ भाग, दुध बत्तीस भाग आणि चातुर्जात एक भाग या प्रमाणें घालून पचन करून त्याचे मोदक करावे; त्यांतून एक मोदक भक्षण केला असतां हा पिप्पलीमोदक धातुगत संपूर्ण ज्वर, दमा खोकला, पांडुरोग, धातुक्षय व अग्निमांद्य यांचा नाश करितो.

## मधुपिंपळीयोग.

पिप्पलीमधुसंयुक्तामेदःकफविनाशिनी ॥
श्वासकासज्वरहरापांडुप्लीहोदरापहा ॥

**अर्थ**–पिंपळी मधांशीं घेतली असतां मेद, कफ, श्वास, कास, ज्वर, पांडुरोग व प्लीहा यांचा नाश करिते.

## दुग्धयोग.

क्षीणेकफेज्वरेजीर्णेअल्पदोषेपिपासिते ॥
दाहार्तेतुपयोयोज्यंतन्नवेतुविषंभवेत् ॥

**अर्थ**–कफ क्षीण जाहाला व ज्वर ही जीर्ण झाला असतां, अल्पदोषानीं ताहान व दाह होतो. त्याला दूध द्यावें. व तेंच नूतनज्वरावर दिलें असतां, विषोपम आहे.

## पंचमूलीक्षीर.

सर्वज्वराणांजीर्णानांक्षीरंभैषज्यमुत्तमं ॥ श्वासात्कासाच्छिरःशूला त्पार्श्वशूलात्सपीनसात् ॥ मुच्यतेज्वरितःपीत्वापंचमूलीशृतंपयः ॥

**अर्थ**–रानगांजा, रानभाळ, रिंगणी, मोतरिंगणी व गोखरूं, या पांच औषधांच्या मुळ्या आणून थोड्या कुटून त्यांत आठपट दूध व दुधाचे चौपट पाणी घालून दूध

राही तों कढऊन तें दूध प्यावें. त्याणें श्वास, कास, मस्तकशूल, पाठीचा शूल, पडसे, व जीर्णज्वर हे दूर होतात. व संपूर्ण जीर्णज्वरांस हें दुधाचें औषध उत्तम आहे असे जाणावें.

## सितादिपेय.

सिताज्याविश्वखर्जूरीमृद्वीकाभिःशृतंपयः ॥ पृथ्वीचबिल्वबर्षा भूपयश्चोदकमेवच ॥ क्षीरावशिष्टंतत्पीतंतद्विसर्वेज्वरापहं ॥

अर्थ—साकर, तूप, सुंठ, खारीक व द्राक्षें हीं घालून तापविलेलें दूध किंवा बारीक वेलची, बेलफळ, पुनर्नवा, दूध व पाणी एकत्र करून दूध शेष राहीपर्यंत कढऊन प्राशन करावें; ह्मणजे तें सर्वज्वरपरिहार करितें.

## बिल्वादिकाढा.

साधितंबिल्वपेशीभिर्मूलेनामंडकस्यच ॥
सद्योहंतिपयःपीतंज्वरंसंपरिवर्तकं ॥

अर्थ—दुधांत बेलाचे पाळांचा, किंवा पांढऱ्या मोठ्या जाईचे पाळांचा काढा करून घेतला असतां, तो मोठ्या उत्पातज्वराचा नाश करील.

## मधुकादिकाढा.

मधुकारग्वधाद्राक्षातिक्तायासफलत्रिकैः ॥
सपटोलैर्जलंभेदिज्वरंहंतित्रिदोषजं ॥

अर्थ—ज्येष्ठमध, बाहव्याचा मगज, द्राक्षें, कुटकी, धमासा, हर्डा, बेहडा, आवळकाठी, व कडुपडवळ यांचा काढा रेचक व त्रिदोषज्वरनाशक आहे.

## अमृतादिहिम.

अमृतायाहिमःपेयोजीर्णज्वरहरःपरः ॥

अर्थ—पूर्वी सांगीतल्या प्रमाणें गुळवेलीचा हिम करून प्यावा. तो जीर्णज्वराचा नाशकरितो.

## गुडयोग.

गुडंपिप्पलिमूलस्यजलेनालोडितंपिवेत् ॥
चिरादपिचसन्नष्टांनिद्रामाप्नोतिमानवः ॥

अर्थ—पिंपळमूळाचें चूर्ण करून गुळ घालोन पाण्याशीं द्यावें; ह्मणजे फार दिवस गेलेली झोंप येते.

## वार्ताकभक्षणयोग.

सायंस्विन्नमशेपंकृत्वावार्ताकमेवपूर्वाण्हे ॥
मधुयुतमश्नन्चिरान्नष्टामथोजयेन्निद्रां ॥

**अर्थ**—संध्याकाळी वांगें भाजून मधांत कालवून पूर्वाण्हीं द्यावें; ह्मणजे तत्काळ निद्रा येईल.

## गुडूचीस्वरस.

पिप्पलीमधुसंमिश्रंगुडूचीस्वरसंपिबेत् ॥
जीर्णज्वरकफप्लीहाकासारोचकनाशनं ॥

**अर्थ**—गुळवेलीचे रसांत पिंपळी व मध घालोन द्यावा; ह्मणजे जीर्णज्वर, कफ, प्लीहा कास व अरुचि, यांचा नाश करील.

## गुडपिप्पलीयोग.

जीर्णज्वरेग्निमांद्येचशस्यतेगुडपिप्पली ॥ कासाजीर्णारुचिश्वास
हृत्पांडुक्रमिरोगनुत् ॥ द्विगुणःपिप्पलीचूर्णात्गुडोत्रभिषजांमतः ॥

**अर्थ**—जीर्णज्वरावर आणि अग्निमांद्यावर, गुळ आणि पिंपळी प्रशस्त आहे. व ती खोकला, अजीर्ण, अरुचि, श्वास, पांडुरोग व कृमि यांचा नाश करिते, येथें गूळ पिंपळीच्या दुप्पट घ्यावा.

## वातकफात्मकज्वरावर.

वातश्लेष्मज्वरोक्तास्याक्क्रियावातबलामके ॥ जीर्णज्वरेकफे
क्षीणेदाहतृष्णासमन्विते ॥ पयःपीयूषसदृशंतन्नवेतुविषोप
मं ॥ चंदनाद्यंहितंतैलंशोषाधिकारकीर्तितं ॥ तथानारायणंतै
लंजीर्णज्वरहरंपरं ॥

**अर्थ**—वातकफसंबंधी जीर्णज्वरावर, वातश्लेष्मज्वरोक्तक्रिया करावी; आणि जेंव्हा कफ नाहीं, दाह व तहान हे विकारमात्र आहेत, त्याला दूध अमृतासारिखें आहे. तेंच नूतनज्वर आहे तर विषासारिखें होतें; आणि शोषाधिकारामध्यें चंदनादितैल सांगितलें आहे; तें व नारायणतैल हीं जीर्णज्वरनाशाविषयीं उत्तम आहेत.

## वर्धमानपिंपळी.

त्रिवृध्यापंचवृध्यावासप्तवृध्याथवाकणाः ॥ गव्यक्षीरेणसंपि
ष्टाःपिबेद्दशदिनानिह ॥ तथैवन्हासयेदेताएवंविंशतिवासरा
न् ॥ पिबतांज्वरशांतिःस्यात्पांडुरोगश्चशाम्यति ॥ कासश्वा
सोग्निमांद्यंचकफाधिक्यंचनश्यति ॥

**अर्थ**—तीन तीन वृद्धीनें, अथवा पांच पांच वृद्धीनें पिंपळ्या गाईच्या दुधांत वाटून दाहा दिवसपर्यंत प्राशन कराव्या; नंतर तशाच क्रमानें कमी करीत आणाव्या. याप्रमाणें वीस दिवस घेतली ह्मणजे ज्वराची शांति होते, व पांडुरोग, कास, श्वास, अग्निमांद्य व कफ यांचा नाश करिते.

## नस्य.

शिरोगौरवशूलघ्नमिंद्रियप्रतिबोधनं ॥ जीर्णज्वरेरुचिकरंद
द्याच्छिर्षविरेचनं ॥ मधुनावाथतैलेनज्वरघ्नेनप्रयोजयेत् ॥

**अर्थ**–जीर्णज्वरामध्यें मस्तकाची जडता, शूल यांचा नाश करणारें आणि इंद्रियांला हुशारी देणारें; आणि रुचि देणारें असें मस्तकरेचन द्यावें. तें मधाशीं, तेलाशीं किंवा ज्वरघ्नयोगाशीं द्यावें.

## रक्तकरवीरादिलेप.

रक्तकरवीरपुष्पंकुष्ठधात्रीफलंसधान्यांबु ॥
कल्कैःकोष्णोलेपोज्वरेषुशिरसोरुजोहंति ॥

**अर्थ**–रक्तकण्हेराची फुलें, कोष्ठकोळिंजन, आवळकाठी, धनें व वाळा यानां उष्ण पाण्यांत वाटून गरम करून थोडें गरम असतां, लेप करावा. तो मस्तकपीडा दूर करील.

## हिंग्वादि नस्य.

हिंगुसैंधवसंयुक्तंनस्यंस्यादनवंघृतं ॥

**अर्थ**–जुन्या तुपांत हिंग व सैंधव घालून नस्य द्यावें; त्याणें ज्वर शांत होतो.

## जयंतीमूलिकाबंध.

श्वेतजयंतीमूलंविधिनाबद्धांशिखांतरेहंति ॥
क्षीणज्वरंनराणांखलइवदुरितेनचात्मानं ॥

**अर्थ**–पांढरे टाकळीचें मूळ विधियुक्त शेंडीस बांधावें; त्याणें जीर्णज्वर जाईल. जसा दुष्टपुरुष पापानें आत्म्याला दूर करितो.

## वायसजंघाबंध.

वायसजंघामूलंशिरसिकाकमाच्याश्च ॥
विधृतंनिद्राकरणंस्नुह्मूलंवाशितंसगुडं ॥

**अर्थ**–कांगाचे झाडाचें मूळ, अथवा कावळीचें मूळ मस्तकावर धारण केलें असतां, तें निद्रा उत्पन्न करितें. अथवा निवडुंगाचें मूळ गुळाशीं घेतलें असतां, निद्राकारक होतें.

## मुक्तापंचामृत.

मुक्ताप्रवालखुरवंगककंबुशुक्तिभूनिंबभूदधिदिगिंदुसुधांशुभागं ॥ इक्षू
रसेनसुरभेःपयसाविदारीकन्यावरीपुरसहंसपदरिसैश्च ॥ संमर्दयाम
युगुलंचवनोत्पलाभिर्दद्यात्पुटानिमृदुलानिचपंचपंच ॥ पंचामृतंरसवि

भुंभिषजाप्रयोज्यंगुंजाचतुष्टयमितंचपलारजश्च ॥ पात्रेनिधायचिरसूतवनस्पतीनांदुग्धेनयःप्रपिबतःखलुचाल्पभुक्तं ॥ जीर्णज्वरःक्षयमियादथसर्वरोगाःस्वीयानुपानकलिताश्चशमंप्रयांति ॥

अर्थ—मोतीं एकभाग, पोंवळी चार भाग, उत्तम कथील दोन भाग, शंख एक भाग, शिंपी एक भाग, यांचीं भस्में व किराईत एकभाग हीं एकत्र करून उसाचा रस, गाईचें दूध, भुयकोहळी, कोरफड, शतावरी, दर्भ, हंसपदी यांचे रस यांशीं दोन प्रहर खलून मृदु अशीं गोंवऱ्याचीं पांच पांच पुटें द्यावीं. हा पंचामृत रस रोज चार गुंजा व पिंपळीचें चूर्ण पात्रांत घालून पाडशा गाईचें वनस्पति खाऊन उत्पन्न झालेलें दूध यांशीं घ्यावा, व अल्प आहार करावा; ह्मणजे जीर्णज्वर व रोगोक्तअनुपानाशीं दिला असतां, सर्व रोगांचा नाश करितो.

## जीर्णज्वरांकुश.

मृतसूताभ्रनागार्ककांतवैक्रांतमेवच ॥ हिंगुलंटंकणंगंधंविषंकुष्ठंसमांशकं ॥ त्रिकटुत्रिफलामुस्ताभृंगनिर्गुंडिकाद्रवैः ॥ भावयेत्रिदिनंचैवमाषमात्रानुपानतः ॥ जीर्णज्वरेक्षयेकासेदोपेमंदानलेषुच ॥ पांडूहलीमकेगुल्ममुदरंचार्दितंजयेत् ॥ ग्रहणींशूलरोगांश्चअरोचकमनेकधा ॥ कांतितेजोबलंपुष्टिवीर्यवृद्धिंविवर्धयेत् ॥ साध्यासाध्यंनिहंत्याशुरसोजीर्णज्वरांकुशः ॥

अर्थ—पारदभस्म, अभ्रक, शिसें, तांबें, कांत, व वैक्रांत यांचीं भस्में व हिंगुळ, टांकणखार, गंधक, बचनाग व कोष्ठ, हीं औषधें समभाग घेऊन नंतर त्रिकटु, त्रिफला, नागरमोथा, माका व निर्गुंडी यांचे काढे किंवा स्वरस याच्या तीन दिवस भावना द्याव्या; आणि अनुपानाशीं एक उडीद मात्रा द्यावी. ह्मणजे जीर्णज्वर, क्षय, खोकला, मंदाग्नि, पांडुरोग, हलीमक, गुल्म, उदर, अर्दितवायु, संग्रहणी, शूलरोग, संपूर्ण प्रकारचें अरोचक, हीं साध्य किंवा असाध्य असलीं तरी त्यांचा नाश करितो, व हा जीर्णज्वरांकुश कांति, तेज, बल, पुष्टि, व वीर्य, यांना वाढवितो.

## धातुज्वरांकुश

लोहाभ्रकंताम्रभस्मपारदंगंधकंविषं ॥ व्योषंफलत्रिकंकुष्ठंसमभागेनमर्दयेत् ॥ भृंगनीरेणचार्द्रस्यवरानिर्गुंडिकारसैः ॥ त्रिदिनंमर्दयित्वातुमुद्गमानावटीकृता ॥ यथारोगानुपानेनसर्वव्याधि

विनाशिनी ॥ अजीर्णवातकासघ्नीदीपनीरुचिवर्धनी ॥ सर्वधातु ज्वरान्हंतिसोयंधातुज्वरांकुशः ॥

अर्थ—लोह, अभ्रक व ताम्र. यांचीं भस्में व पारा, गंधक, बचनाग, सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहेडा, आवळकाटी व कोष्ठकोलिंजन, हीं समभाग एकत्र खलून त्याला माका, आलें व निर्गुंडी यांचें रसाच्या तीन दिवस भावना द्याव्या; आणि मुगाएवढी गोळी करावी. ती रोगोक्त अनुपानाशीं द्यावी; ह्मणजे सर्वव्याधींचा नाश करिते, व अजीर्ण व वातकास यांचा नाश करिते; व दीपन, रुचिवाढविणारी, आणि सर्वधातुज्वरनाशक आहे. हिला धातुज्वरांकुश ह्मणतात.

## कल्याणघृत.

तालीसत्रिफलैलबालफलिनीसौम्यापृथक्पर्णिनीदंतीदाडिमचारुचंदननिशादार्वीविशालोत्पलैः ॥ जातीपद्महरेणुपद्मकयुतैर्जंतुघ्नमंजिष्ठकाह्रकसिंहीत्रुटिसारिवाद्वयनतैर्नागेंद्रपुष्पान्वितैः ॥ अष्टाविंशतिभिश्चतुर्गुणजलंकल्याणमेभिःशृतंहंत्येतत्त्रिचतुर्थकज्वरमुरःकंपंसवंध्यामयं ॥ सापस्मारगदोदरामपवनोन्मादाःसजीर्णज्वराजायंतेन पुनःकृतेनहविषाकल्याणकेनामुना ॥

अर्थ—तालीसपत्र, त्रिफळा, एलची, वाळा, खडशानाग, साळवण, पिठवण, दांती, डाळिंब, उत्तम चंदन, हळद, दारुहळद, कडुवृंदावन, कमळकंद, जाई, कमळ, पित्त-पापडा, पद्मकाष्ठ, वावडिंग, मंजिष्ठ, कोष्ठ, रिंगणी, बारिक वेलची, उपळसरी दोन प्रकारची, तगर, वांझकर्टोली, लवंगा, ह्या अठ्ठावीस औषधांचा चौपट पाणी घालोन काढा करावा. त्या काढ्यांत तूप घालोन पचन करून सिद्ध करावें. तें कल्याण घृत त्र्याहिक ज्वर, चातुर्थिक ज्वर, उराचा कंप, वंध्यात्व, फेंपरें, उदर, आमवात. उन्माद, जीर्णज्वर ह्या व्याधींला पुनः होऊं देत नाहीं.

## चंदनादितैल.

चंदनाद्यंहितंतैलंशोषाधीकारकीर्तितं ॥
तथानारायणंतैलंजीर्णज्वरहरंपरं ॥

अर्थ—शोषाधिकारामध्यें सांगितलेलें चंदनादि व नारायण तैल हें जीर्णज्वरनाशक आहे.

## लाक्षादितैल.

लाक्षारसस्याढकमस्तुतैलप्रस्थंपचेन्मस्तुचतुर्गुणंच ॥ पिष्ट्वाशताव्हारजनीमधूकरास्नाश्वगंधाकटुकासमूर्वा ॥ हरेणुकंचं

दनमुस्तदारुकुष्ठंपृथक्कर्षमितंक्षिपेत्तत् ॥ लाक्षादिकंतैलमिदंसुसिद्धंनिहंतिसर्वान्विषमज्वरांस्तु ॥ पृष्ठत्रिकांगस्फुटनंसशूलंदौर्गंध्यकंडूभ्रमवातरोगान् ॥

अर्थ–दोनशें छपन्न तोळे लाखेचें शिरें, तेल शेर, दह्यांवरची निवळी चार शेर, शतावरी, हळद, ज्येष्ठिमध, रास्ना, अश्वगंध, कुटकी, मोरवेल, पित्तपापडा, चंदन, नागरमोथे, देवदार, कोष्ठ, हीं प्रत्येकीं एकेक तोळा. हे सर्वपदार्थ एकत्र करून तैल सिद्ध करावें. त्याला लाक्षादितेल ह्मणतात. हें सर्व विषमज्वर व पाठ, तिडें, आंगयातील फूट, शूल, दौर्गंध्य, कंडू, भ्रम व वातरोग यांचा नाश करितें.

## दुसरें चंदनादितैल.

चंदनांबुनखवाटयंयष्टिशैलेयपद्मकं ॥ मंजिष्ठासरलादारुसठयेलानागकेसरं ॥ पत्रंतैलंसुरामांसीकंकोलंचनतांबुदं ॥ हरिद्रेसारिवेतिक्तंलवंगागरुकुंकुमं ॥ त्वग्रेणुनलिकाचेतितैलंमस्तुचतुर्गुणं ॥ लाक्षारससमंसिद्धंग्रहघ्नंबलवर्णकृत् ॥ अपस्मारक्षयोन्मादक्षतालक्ष्मीविनाशनं ॥ गात्रस्यस्फुटनंदाहंकंडूजीर्णज्वरापहं ॥

अर्थ–चंदन, वाळा, रांजणीचा वृक्ष, चिकणा, ज्येष्ठमध, शिलाजित, पद्मकाष्ठ, मांजिष्ठ, सरळदेवदारभेद देवदार, कचोरा, एलची, नागकेशर, तमालपत्र, तेल, कांकोली, जटामांसी, कंकोळ, तगर, नागरमोथे, हळद, दारुहळद, उपरसाळ, किराईत, लवंगा, कोष्ठ, केशर, दालचिनी, पित्तपापडा, उतरणी, तेल व दह्यांची निवळीं यांचे चौपट व तितकेंच लाखेचें शिरें, हें घेउन तैल सिद्ध करावें. तें ग्रहपीडानाशक, बल, कांति, यानां करणारें, व अपस्मार, क्षय, उन्माद, क्षत, अलक्ष्मी, गात्रस्फोटन, दाह, कंडू, जीर्णज्वर, यांचा नाश करितें.

## हरीतकीपाक.

प्रस्थमेकंशिवानांचजलद्रोणेनिधापयेत् ॥ द्विप्रस्थंदशमूलस्यसार्धप्रस्थायवाःस्मृताः ॥ ग्रंथिकंचित्रकंभांगींशंखपुष्पीबलासठी ॥ विश्वापामार्गमेघाश्वपुष्करंगजपिप्पली ॥ इमानितत्रयोज्यानिप्रत्येकंचपलंपलं ॥ अष्टांशेनिःसृतेचैपांपथ्यांपिष्ट्वापचेत्ततः ॥ गुडप्रस्थत्रयंयोज्यंगोघृतंपलपंचकं ॥ जातीफलंकेसरंचचतुर्जातंचधात्रिका ॥ दीप्याक्षी

जातिपत्रींचताम्रंलोहंकटुत्रिकं ॥ चूर्णमेषांक्षिपेत्तत्रप्रत्येकंचपलार्धकं॥ पथ्यापाकइतिख्यातःकथितोभृगुणापुरा ॥ जीर्णज्वरहरःसद्यस्तुष्टिपुष्टिबलप्रदः ॥ रसकोपेग्रहण्यांचक्षीणधातौचनिःसृतौ ॥ गुदामयेश्वासकासेवातरक्तेहितोमतः ॥

अर्थ–चौसष्ट तोळे हरीतकी, पाणी दाहाशें चौविसें तोळे, दशमूळें एकशें अठ्ठावीस तोळे, यव शांणव तोळे व पिंपळमूळ, चित्रकमूळ, भारंगमूळ, शंखाहुली, चिकणा, कचोरा, सुंठ, आघाडा, नागरमोथा, पुष्करमूळ, गजपिंपळी, हीं प्रत्येक चार चार तोळे यांचा अष्टमांश काढा करून. त्यांत हरीतकी वाटून घालावी, व त्यांत गुळ एकशें शांणव तोळे, गाईचें तूप वीस तोळे व जायफळ, केशर, चातुर्जात, आवळकाठी, ओंवा, बेहडे, जातिपत्री, ताम्रभस्म, लोहभस्म, सुंठ, मिरीं, पिंपळी, या प्रत्येकाचें दोन तोळे चूर्ण घालावें; आणि पाक सिद्ध करावा. याला हरीतकीपाक ह्मणतात. हा जीर्णज्वर नाशक आहे, व तत्काळ तुष्टि, पुष्टि, बळ यानां देतो; व रसकोप, संग्रहणी, क्षीण धातु, अतिसार, मुळव्याध, दमा, खोकला, आणि वातरक्त यांवर हितकारक आहे.

## कौक्कुटघृत

कुक्कुटंतरुणंसद्यःशिरःपादांत्रवर्जितं ॥ तस्यमांसस्यकुर्वीतशृतंपलशतंभिषक् ॥ बृहतींकंटकारींचशृंगींकर्कटकस्यच ॥ बदराणिकुलित्थाश्चभार्गीआमलकीतथा ॥ शठीपुष्करमूलंचपंचमूलंमहत्तथा ॥ एतत्तुलांचसंगृह्यद्विद्रोणेत्वंभसःपचेत् ॥ पादशेषंपरिश्राव्यकषायंग्राहयेद्भिषक् ॥ षड्गुणंक्षीरमाल्हत्यविपचेत्तुघृताढकं ॥ तत्रकल्कीकृतंदद्यादस्वल्पंपंचमूलकं ॥ तत्साधुसिद्धंविश्राव्यशुभे भांडेनिधापयेत् ॥ तस्यकालेपिबेन्मात्रांबलदोषमवेक्ष्यच ॥ जीर्णेतस्मिंस्तुभुंजीतरक्तशाल्योदनंतथा ॥ जीर्णज्वरोपसृष्टानांशण्यतांश्वासकासितान् ॥ प्रयोज्यंकौक्कुटंसर्पिर्यक्ष्मिणांविषमज्वरे ॥ लेखनंबृंहणीयंचबलवर्णाग्निवर्धनं ॥

अर्थ–चांगल्या तरुण कोंबड्याचा मस्तक, पाय व आंतडी टाकून त्याच्या मांसाचा कषाय चारशें तोळे घेऊन त्यांत डोरली, रिंगणी, कांकडशिंगी, बोरें, कुळिथ, भारंगमूळ, आवळकाठी, कचोरा, पौष्करमूळ व बृहत्पंचमूळी, मिळून चारशें तोळे घेऊन त्यांचा वीसशें अठ्ठेचाळीस तोळे पाणी घालून चतुर्थांश काढा करून घ्यावा; आणि का-

द्याचे साहापट दूध आणि दाहाशें चौविस तोळे तूप घालून त्यांत बृहत्पंचमुळांचा कल्क घालून सर्व एकत्र करून मंदाग्नीवर तूप शेष राही पर्यंत पचवावें. व तें चांगल्या भांड्यांत ओतून ठेवावें; आणि दोषांचे बलाबल पाहून द्यावें. तें जिरल्यावर तांबड्या साळीच्या तांदुळांचा भात द्यावा. हें जीर्णज्वरी, श्वासी, कासी, क्षयी, विषमज्वरी, यानां द्यावें. हें लेखन, बृंहण, आणि बल, वर्ण व अग्नि यानां वाढविणारें आहे, याला कौकुटघृत ह्मणतात.

## वासाद्यघृत.

वासांगुडूचीत्रिफलांत्रायमाणांदुरालभां ॥ पक्त्वातेनकषायेण पयसोद्विगुणेनच ॥ पिप्पलीमुस्तमृद्वीकाचंदनोत्पलनागरैः ॥ कल्कीकृतैश्चनिपचेद्घृतंजीर्णज्वरापहं ॥

**अर्थ**–अडुळसा, गुळवेल, त्रिफळा, त्रायमाण व धमासा यांचा काढा व काढ्याचे दुप्पट दूध आणि पिंपळी, नागरमोथा, द्राक्षें, रक्तचंदन, कमळकंद व सुंठ, यांचे कल्क घालून सर्व एकत्र करून त्यांत घृत सिद्ध करावें. तें जीर्णज्वरनाश करितें.

## पिप्पल्यादि घृत.

पिप्पल्यश्चंदनंमुस्तमुशीरंकटुरोहिणी ॥ कलिंगकास्त्वामलकीसारिवातिविषंस्थिरा ॥ द्राक्षामलकबीजानित्रायमाणानिदिग्धिका ॥ सिद्धमेतद्घृतंसद्योजीर्णज्वरमपोहति ॥ क्षयंकासंशिरःशूलंपार्श्वशूलमरोचकं ॥ अंगाभितापमग्निंचविषमंसन्नियच्छति ॥ पिप्पल्यादिर्विदंक्वापितंत्रेक्षीरेणपच्यते ॥

**अर्थ**–पिंपली, चंदन, नागरमोथा, वाळा, कुटकी, इंद्रजव, आवळकाटी, उपळसरी, अतिविष, सालवण, द्राक्ष, आवळयाच्या बिया, त्रायमाण, रिंगणी, यांच्या काढ्यांत किंवा कल्कांत घृत सिद्ध करावें. तें जीर्णज्वराचा सद्यः नाश करितें. व क्षय, कास, मस्तकशूल, पार्श्वशूल, अरुचि, अंगाची तप्तता व अग्नि यांचा नाश करितें. हें पिप्पल्यादिघृत कोठें तंत्रांत दुधाशीं पचन करावें, असें सांगितलें आहे.

## क्षीरवृक्षादितैल.

क्षीरवृक्षासनारिष्टाजंबूसप्तच्छदार्जुनैः ॥ शिरीषखदिरास्फोतामृतवल्याटरूपकैः ॥ कटुकापर्पटोशीरवचातेजोवतीघनैः साधितंतैलमभ्यंगादाशुजीर्णज्वरःक्षयं ॥

**अर्थ**–पिंपळी, आसणा, कडुनिंब, सांतवण, सांदडा, शिरसवृक्ष, खैर, उपळसरी, गुळवेल, अडुळसा, कुटकी, पित्तपापडा, वाळा, वेखंड, मालकांगोणी व नागरमोथा, यांच्या काढ्यांत किंवा कल्कांत तैल सिद्ध करावें. तें अंगास लावल्यानें तत्काळ, जीर्णज्वराचा नाश करितें.

## सेवंतीपाक.

श्वेतपुष्पसहस्राणिघृतप्रस्थेविपाचयेत् ॥ घृतेपक्केकृतेतस्मिन्विक्षिपेद्वैतदौषधं ॥ सितोपलाचतुर्भागाचातुर्जातंपलंपलं ॥ मृद्वीकाषट्पलंचैवक्षिपेन्मधुपलाष्टकं ॥ धारासत्वंचार्धपलंसर्वमेकत्रकारयेत् ॥ कर्षप्रमाणंतत्सेव्यंसततंचगदातुरैः ॥ जीर्णज्वरेक्षयेकासेअग्निमांद्येप्रमेहके ॥ प्रदररंकजान्रोगान्कुष्ठार्शांसिविनाशयेत् ॥ नेत्ररोगान्सुदुःसाध्यास्तथासर्वान्मुखोत्थितान् ॥

**अर्थ**–पांढरें शेवंतीची फुलें एक हजार घेऊन तुपांत शिजवावी. त्यांत खडिसाकर चार भाग व दालचिनी, तमालपत्र, एलची, नागकेशर, हीं प्रत्येकी चार चार तोळे, द्राक्षें चोवीस तोळे व मध बत्तीस तोळे व गुळवेलीचें सत्व दोन तोळे हीं सर्व एकत्र करावीं; आणि त्याचा पाक करावा. तो येक तोळा प्रातःकाळीं द्यावा. हा सेवंतीपाक जीर्णज्वर, क्षय, खोकला, अग्निमांद्य, प्रमेह, प्रदर, रक्तविकार, कुष्ठ, अर्शरोग व दुःसाध्य नेत्ररोग आणि मुखरोग यांचा नाश करील.

## पिप्पलीपाक.

प्रस्थंपिप्पलिमादायक्षीरेणैवानुपेपयेत् ॥ अर्धाढकंघृतंगव्यंशुद्धखंडाढकंतथा ॥ पचेन्मृद्वग्निनातावद्यावत्पाकमुपागतं ॥ शीतीभूतेक्षिपेत्तस्मिंश्चातुर्जातंपलत्रयं ॥ योजयेन्मात्रयायुक्तंदोषधात्वग्निसाम्यतः ॥ बल्यंवृष्यंतथाल्हादयेतेजोवृद्धिकरंपरं ॥ जीर्णज्वरक्षतक्षीणमश्रांतंचैवबृंहयेत ॥ छर्दितृष्णारुचिश्वासशोपजिव्हासकामलां ॥ त्द्रोगंपांडुरोगंचप्रदरंचत्रिदोषजं ॥ वातरक्तप्रतिश्यायमामवातंविनाशयेत् ॥ संवत्सरप्रयोगेणवलीपलितवर्जितः

**अर्थ**–चौसष्ट तोळे पिंपळी घेऊन ती दुधामध्यें वांटावी; आणि एकशेअठ्ठावीस तोळे तूप घेऊन त्यांत मंदाग्नीवर तीं परतावी, आणि त्यांत दहाशेचौवीस तोळे साकर घालून तिच्या पाकांत ती पिंपळी टाकावी. आणि दालचिनी, तमालपत्र, एलची. नागकेशर यांचे चूर्ण बारा तोळे टाकावें. व त्याच्या वड्या कराव्या; आणि रोग्याचे

दोष धातुबल व अग्निबल पाहून त्या मानानें द्याव्या. तो पाक धातुवर्धक, बलकारक, हृदयाला हितावह व तेजाची वृद्धिकरणारा आहे. व जीर्णज्वरितास व क्षतक्षयानें क्षीणास पुष्टिकर असून व ओकारी, ताहान, अरुची, श्वास, शोष, जिव्हारोग, काविळ, हृद्रोग, पांडुरोग, प्रदर, त्रिदोष, वातरक्त, पडशें व आमवात यांचा नाश करितो हा पाक एक वर्ष सेवन केला असतां आंगाच्या वळकट्यांचा नाश होऊन तरुणासारिखा होतो.

## ज्वरमुक्तलक्षण.

प्रकाशोलाघवंग्लानिःस्वस्थतासुप्रसन्नता ॥
उपद्रवानिमित्तंचसम्यक्लंघितलक्षणं ॥

अर्थ–इंद्रियें आपले विषय घेण्या विषयीं समर्थ, शरीरास हलकेपणा, ग्लानि, चित्ताची स्वस्थता व सुप्रसन्नता आणि सर्वोपद्रवशांति हीं ज्वरमुक्ताचीं लक्षणें जाणावीं.

## साध्यज्वरलक्षण.

बलवत्स्वल्पदोषेतुज्वरःसाध्योनुपद्रवः ॥

अर्थ–जा ज्वरांमध्यें मनुष्याची शक्ति क्षीण होत नाहीं; आणि वातादिक दोषांचा कोप अल्प असतो; व ज्वराचे ही उपद्रव विशेष नसतात, तो ज्वर साध्य जाणावा.

## असाध्यज्वरलक्षण.

हेतुभिर्बहुभिर्जातोबलिभिर्बहुलक्षणः ॥ ज्वरःप्राणांतकृद्यश्च
शीघ्रमिंद्रियनाशनः ॥ ज्वरक्षीणस्यशूनस्यगंभीरोदैर्घरात्रिकः ॥
असाध्योबलवान्यश्चकेशसीमंतकृज्ज्वरः ॥

अर्थ–पुष्कळ ज्वर व प्रबल हेतूंनीं उत्पन्न जाहलेला व जो उत्पन्न जाहल्या बरोबरच कोणतें ही एखादें इंद्रिय नष्ट करितो, तो ज्वर प्राणांतक समजावा. व ज्वरांमध्यें मनुष्य क्षीण होऊन आंगास सूज आली तो, ज्वर व अपरात्रीस येउन बहुत वेळ आंगात राहातो, तो ज्वर व अंतर्वेद किंवा धातुगत व जो ज्वर फार येऊन केशाचे ठाईं स्त्रीयांच्या भांगा सारिखे भाग पडतात, हे ज्वर प्राणहारक जाणावे.

## गंभीरज्वरलक्षण.

गंभीरश्चज्वरोज्ञेयोह्यंतर्दाहेनतृष्णया ॥
आनद्धत्वेनदोषाणांश्वासकासोद्गमेनच ॥

अर्थ–अंतर्दाह, तृष्णा, दोषांची प्रबलता, श्वास, खोकला, हीं लक्षणें जा ज्वराचे ठायीं असतात; त्याला गंभीर ज्वर म्हणतात.

## असाध्यलक्षण.

आरंभाद्विषमोयस्तुयस्तुस्याद्दैर्घ्यरात्रिकः ॥

क्षीणस्यचातिरूक्षस्यगंभीरोयस्यहंतितं ॥

**अर्थ**–जो ज्वर आरंभापासून संतत, सतत, इत्यादिरूपेंकरून विषम झाला; अपरात्रीस येतो; व गंभीर, हे तीन ज्वर व क्षीण, किंवा रूक्ष, यांचा ज्वर हे प्राणनाशक जाणावे.

## दुसरा प्रकार.

शंखस्वेदोतिबहुलंपिच्छलोयातिसर्वशः ॥

देहिनःशीतगात्रस्यतदामरणमादिशेत् ॥

**अर्थ**–शंख ह्मणजे कानशिलाचे गोळे यांस बहुत घाम येऊन सर्वांगास मात्र चिकट घर्म येतो, व रोग्याची गात्रें थंड पडतात, तो ज्वर प्राणनाशक जाणावा.

## तिसरा प्रकार.

विसंज्ञस्ताम्यतेयस्तुशेतेनिपतितोपिवा ॥

शीतार्दितोंतरुष्णश्चज्वरेणम्रियतेनरः ॥

**अर्थ**–जो मनुष्य ज्वरानें विव्हळ होऊन मोह पावतो, आणि निजला असतां अथवा बसला असतां उठवत नाहीं; व बाहेर शीत, आणि अंतरीं दाहयुक्त असतो, तो पुरुष ज्वरेंकरून मरण पावतो असें जाणावें.

## चौथा प्रकार.

शीतस्वेदोल्ललाटस्यश्लथसंधानबंधनः ॥

मुह्यत्युत्थाप्यमानस्तुसस्थूलोप्यनुजीवति ॥

**अर्थ**–ज्या मनुष्याचे कपाळाला थंड घाम येतो, सर्वांगाचीं बंधनें शिथिल होतात; आणि उठविला असतां मोह पावतो, तो मनुष्य पुष्ट जरी आहे; तथापि यत्नाने वांचेल.

## पांचवा प्रकार.

योत्दृष्टरोमारक्ताक्षोत्दृदिसंघातशूलवान् ॥

वक्त्रेणचैवोच्छ्वसितितंज्वरोहंतिमानवं ॥

**अर्थ**–ज्वराचे ठायीं रोग्याचे रोमांच उभे राहतात, नेत्र आरक्त होतात; आणि त्दृदयाचे ठायीं शस्त्रप्रहारानीं होणाऱ्या वेदनेसारिखा शूल, आणि घाबरट असा तोंडानें श्वास सोडणें, अशाप्रकारचा ज्वर प्राणनाशक जाणावा.

## दुसरे प्रकारचें असाध्यलक्षण.

प्रेतैःसहपिबेन्मद्यंस्वप्नेयःकृष्यतेशुना ॥ सघोरंज्वरमासाद्यन जीवेन्नचमुच्यते ॥ ज्वरःपूर्वाण्हिकोयस्यशुष्ककासश्चदारुणः ॥ बलमांसविहीनश्चयथाप्रेतस्तथैवसः ॥ ज्वरोयस्यापराण्हेतुश्लेष्माकासश्चदारुणः ॥ बलमांसविहीनश्चयथाप्रेतस्तथैवसः ॥ सहसाज्वरसंतापस्तृष्णामूर्छाबलक्षयः ॥ विश्लेषणंच संधीनांमुमूर्षोरुपजायते ॥ गोसर्गेवेदनायस्यस्वेदःप्रच्यवतेध्रुवं ॥ लेपज्वरोपसृष्टस्यदुर्लभंतस्यजीवितं ॥ स्वेदोललाटेहिमवान्नरस्यशीतार्दितस्यातिसपिच्छिलस्य ॥ कंठस्थितोयस्यनयातिवक्षोनूनंयमस्यैतिगृहंसमर्त्यः ॥ यस्यस्वेदोतिबहलःपिच्छिलोयातिसर्वतः ॥रोगिणःशीतगात्रस्यतदामरणमादिशेत् ॥

अर्थ–जो स्वप्नांत प्रेतांबरोबर मद्य पितो, किंवा ज्याला कुत्रीं ओढितात, तो भयंकर तापानें मरतो. ज्याला पूर्वाण्हीं मोठा ज्वर येतो, कोरडा खोकला येतो व बल, मांसें नाश पावतात, तो प्रेतासारिखा जाणावा. ज्याला अपराण्हीं ज्वर येऊन कफ व खोकला फार असतो, बल, मांस नाहींशीं होतात, तो प्रेतासारिखा जाणावा. अकस्मात् ज्वराचा दाह, तृषा, मूर्छा, आणि बलक्षय व सांधे ढिले पडणें हीं लक्षणें आसन्नमरणाचीं होतात. पहांटेस ज्याच्या तोंडावरून पुष्कळ घाम सुटतो; आणि लेपज्वरानें व्याप्त होतो, तो वांचणे कठीण. ज्याचे मस्तकीं थंड घाम येतो, व थंडी फार वाजत्ये, आंग बुळबुळीत होतें; आणि गळ्यावरचा घाम उरःस्थळावर येत नाहीं, तो मनुष्य यमाचे घरीं लवकर जातो, व ज्याला दाट व बुळबुळीत घाम चहूंकडे सर्वांगाला येतो; आणि आंग थंड होतें, तेव्हां तत्क्षणीं तो रोगी मरेल ह्मणून जाणावें.

## दुसरा प्रकार.

हिक्काश्वासतृषायुक्तंमूढंविभ्रांतलोचनं ॥
सततोच्छ्वासिनंक्षीणंनरंक्षपयतिज्वरः ॥

अर्थ–उचकी, श्वास, तृषा, यांणीं युक्त व रोगी भ्रमिष्ठ होतो, व ज्याचे नेत्रांसही भ्रम होतो; आणि निरंतर श्वासोश्वास टाकितो, व क्षीण झाला, त्याला ज्वर मारितो असें जाणावें.

## असाध्यलक्षणज्वर.

हतप्रभेंद्रियंक्षाममरोचकनिपीडितं ॥
गंभीरतीक्ष्णवेगार्तंज्वरितंपरिवर्जितं ॥

**अर्थ**–जा मनुष्यास निस्तेजपणा आला, इंद्रियांची शक्ति गेली, कृश झाला व जाला अरुचि झाली व जो अंतर्वेग आणि बाह्यवेग यांणीं पीडित झाला, त्याला वैद्यानीं वर्जावा. चिकित्सा करूंनये.

## ज्वरमोक्षाचीं पूर्वरूपें.

दाहःस्वेदोभ्रमस्तृष्णाकंपोविड्भेदसंज्ञिता ॥
कूजनंचातिवैगंध्यमाकृतिर्ज्वरमोक्षणे ॥

**अर्थ**–दाह, स्वेद, भ्रम, तृष्णा, कंप, विड्भेद, मूर्छा, कुंथणें, आंगास घामाची गांधि हीं पुढें ज्वर जावयाचा असतां, पूर्वरूपें होतात; परंतु हीं त्रिदोषज ज्वराविषयीं होतात असें जाणावें.

## ज्वरमुक्तलक्षण.

देहोलघुर्व्यपगतक्लममोहतापंपाकोमुखेकरणसौष्ठवमव्यथत्वं ॥ स्वेदः क्षवःप्रकृतियोगमनोन्नलिप्साकंडूश्चमूर्ध्निविगतज्वरलक्षणानि ॥

**अर्थ**–शरीर हलकें होतें, क्लम, मोह व ताप, हे जातात. मुखाचा पाक होतो. कर्णेंद्रिय फार चांगलें होतें, शरीराच्या सर्व व्यथा दूर होतात, घाम येतो, प्रकृति तारतम्यें करून शिंका येतात, अन्नावर इच्छा होत्ये; आणि डोकीस कंड सुटत्ये, हीं ज्वरमुक्तमनुष्याचीं लक्षणें जाणावीं.

## मधुरज्वरलक्षण.

ज्वरोदाहोभ्रमोमोहोह्यतीसारोवमिस्तृषा ॥ अनिद्राचमुखंर क्तंतालुजिव्हाचशुष्यति ॥ ग्रीवायांपरिदृश्यंतेस्फोटकाःसर्षपो पमाः ॥ घृताशनात्स्वेदरोधान्मंथरोजायतेनृणां ॥

**अर्थ**–ज्वर, दाह, भ्रम, मोह, अतीसार, वांति, ताहान, निद्रानाश, तोंडाला लाली, व तालु आणि जिव्हा ह्यांला शोष, मानेवर मोहोऱ्या सारिखे बारीक फोड उठतात, तो मधुर ज्वर. हा फार घृतपानानें, अथवा स्वेदरोधानें होतो.

## सुरसादियोग.

सुरसागोमयरसोअजाजीमृतमक्षिका ॥ अथवासांबरशृंगंचंद नंजीरकंजलं ॥ कैरातंकुटजोजाजीछिन्नेलापद्मकंफलं ॥ घृष्ट्वा पीत्वानिहंत्याशुज्वरंमधुरकाभिधं ॥

**अर्थ**–तुळशी, गाईचे शेणाचा रस, जिरें, मेलेली माशी, सांबरशिंग रक्तचंदन, शाहाजिरें, वाळा, किराईत, इंद्रजव, गुळवेल, एलची व कमळाक्ष, हे पदार्थ एकत्र वाटून त्यांचा चार तोळे कल्क द्यावा. तो शीघ्र मधुरज्वराचा नाश करितो.

## मुस्तादिकाढा.

मुस्तापर्पटकोयष्टीगोस्तनीसमभागतः ॥ अष्टावशेपितःक्का
थोनिपीतोमधुनासह ॥ पित्तभ्रमंज्वरंदाहंहंतिछर्दिंसमंथरां ॥

अर्थ–नागरमोथा, पित्तपापडा, ज्येष्ठीमध व द्राक्षे हीं समभाग घेऊन अष्टमांश काढा मध घालून द्यावा; ह्मणजे पित्तसंबंधी भ्रम, ज्वर, दाह, वांति व मधुराज्वर यांचा नाश करितो.

## विण्मक्षिकादिकाढा.

विण्मक्षिकोद्भवसमूलसुश्वेतमिक्षुकर्पूरिकापणदरंसुरसार्द्रशाखा ॥
न्यग्रोधपर्णक्कथनंसमभागकर्षमष्टावशेषंज्वरमंथरघातिशीघ्रं ॥

अर्थ–माशांची विष्ठा, समूळ पांढऱ्या ऊंसाचें मूळ, कापूर, कवडी, शंख, तुळशीच्या मंजुऱ्या, वडाचीं पानें हीं एकेक तोळा घ्यावीं; आणि अष्टमांश काढा करून द्यावा; ह्मणजे मधुराज्वर नाश पावतो.

## चंदनादिकाढा.

चंदनोशीरधान्यंचवालकंपर्पटंतथा ॥
मुस्ताशुंठिसमायुक्तंमंथरज्वरनाशनं ॥

अर्थ–रक्तचंदन, वाळा, धने, काळा वाळा, पित्तपापडा, नागरमोथा, सुंठ, यांचा काढा मधुरज्वराचा नाशक आहे.

## मक्षिकादियोग.

मक्षिकागुडसंयुक्ताज्वरेमंथरकेहिता ॥
भ्रममोहातिसारश्चनाशयत्यविलंबतः ॥

अर्थ–मधुरज्वरामध्यें माशी गुळाशीं घ्यावी; ह्मणजे ती भ्रम, मोह व अतीसार यानां लौकर शमवितें.

## कृष्णमधुरालक्षण.

ज्वरंचचक्षुर्मोहंचदंतोष्ठौचैवश्यामकौ ॥ जिव्हाकंठमुखघ्राण
रक्तताचाक्षिकर्बुरं ॥ कंठेमुक्तावलीहारःसप्ताहाद्धार्यतेनबा ॥
त्रिसप्तकादिनादर्वाक्स्फोटाःस्युःसर्पपोपमाः ॥

अर्थ–ज्वर, नेत्रांना झांपड, आणि दांत व ओंठ, जिव्हा, कंठ, मुख व नासिका हीं काळीं व नेत्र चित्रवर्ण हीं लक्षणें होतात. याच्या गळ्यांत सातदिवसांचे आंत मोत्यांचा हार न घातला तर, एकवीस दिवसांत मोहऱ्यांसारिखे फोड येतात.

## सहस्रवेधपाषाणादियोग.

सहस्रवेधपाषाणंकपालंकच्छपस्यच ॥ वृद्धैलातुलसीपत्रंनारिकेलास्थिचूतजं ॥ दाणाखसखसाख्याश्चगोमयस्यरसेनच ॥ घृष्ट्वापानायदातव्यंमधोरकप्रशांतये ॥

**अर्थ**–हिंगाचा लहान खडा, कांसवाची पाठ, जाडी एलची, तुळसीची पानें, नारळाची करोटी, आंब्याची कोय, खसखस, हीं सर्व गाईचे शेणाच्या रसांत वाटून तें पिण्याकरितां द्यावें; ह्मणजे मधुराज्वर शांत होतो.

## भूनिंबादिकाढा.

भूनिंबातिविषालोध्रंमुस्तकेंद्रयवामृता ॥ बालकंधान्यबिल्वंचकपायोमाक्षिकान्वितः ॥ विड्भेदश्वासकासांश्चरक्तपित्तज्वरंहरेत् ॥

**अर्थ**–किराईत, अतिविष, लोध्र, नागरमोथे, इंद्रजव, गुळवेल, वाळा, धने व बेलफळ, यांचा काढा मध घालून द्यावा; ह्मणजे रेंच, दमा, खोकला व रक्तपित्तज्वर यांचा नाश करितो.

## वासाद्यकाढा.

वासाद्राक्षाभयाक्काथःपीतःसक्षौद्रशर्करः ॥
निहंतिरक्तपित्तार्तिश्वासंकासंज्वरंतथा ॥

**अर्थ**–अडुळसा, द्राक्षे व हरीतकी यांचा काढा मध व साकर घालून द्यावा. तो रक्तपित्तज्वर, श्वास, खोकला, आणि ज्वर यांचा नाश करितो.

## मधुकादिकाढा.

मधुकंवल्कलंकुष्ठमुत्पलंचंदनंवचा ॥ त्रिफलादुर्लभावासाद्राक्षाशिरीषपद्मकं ॥ मूर्वायष्टिरयंक्काथोदाहंमूर्छांतृषांभ्रमं॥ रक्तपित्तज्वरंहंतिनिपीतोमधुनासह ॥

**अर्थ**–ज्येष्ठीमध, दालचिनी, कोष्ठ, निळें कमळ, रक्तचंदन, वेखंड, त्रिफळा, सादडा, अडुळसा, द्राक्षे, शिरसवृक्ष, पद्मकाष्ठ, मोरवेल व भारंगमूळ, यांचा काढा मध घालून द्यावा. तो दाह, मूर्छा, ताहान, भ्रम व रक्तपित्तज्वर यांचा नाश करितो.

## दुर्जलजज्वरीं पटोलादिकाढा.

पटोलमुस्तामृतवल्लिवासकंसनागरंधान्यकिरातदतिकर्कं ॥
कषायमेषांमधुनायुतंनरोनिवारयेद्दुर्जलदोषमुल्वणं ॥

**अर्थ**–कडुपडवळ, नागरमोथा, गुळवेल, अडुळसा, सुंठ, धने, काडेचिराईत व कुटकी या औषधांचा काढा मध मिळऊन द्यावा; ह्मणजे दुर्जलजनितज्वर जातो.

## किराततिक्तादिचूर्ण.

किराततिक्तात्रिवृदंबुपिप्पलीविडंगविश्वाकटुरोहिणीरजः ॥
निहंतिलीढंमधुनातिसत्वरंसुदुस्तरंदुर्जलदोषजंज्वरं ॥

**अर्थ**–काडेकिराईत, तेड, वाळा, पिंपळी, वावडिंग, सुंठ व कुटकी, यां सर्वांचा काढा करून मधाशीं द्यावा; ह्मणजे दुर्जलजनितज्वराला तात्काल घालवील.

## हरीतक्यादिचूर्ण.

हरीतकीनिंबपत्रंनागरंसैंधवोनलः ॥
एषांचूर्णंसदाखादेद्दुर्जलज्वरशांतये ॥

**अर्थ**–हिरडे, निंबाचीं पानें, सुंठ, शेंदेलोण व चित्रक यांचें चूर्ण दुर्जलजनितज्वराचा नाश करितें.

## शुंठ्यादिकल्क.

भोजनादौनरैर्भुक्तंशुंठीराज्यभयोत्थितं ॥
कल्कंतुसहतेनित्यंनानादेशोद्भवंजलं ॥

**अर्थ**–सुंठ, मोहरी व हरडा या औषधांचा कल्क करून भोजनापूर्वीं द्यावा. तो नाना प्रकारच्या देशांचें पाणी सोशिवतो.

## आर्द्रकादिचूर्ण.

महार्द्रकयवक्षारौपीत्वाचोष्णेनवारिणा ॥
नानादेशसमुद्भूतंवारिदोषमपोहति ॥

**अर्थ**–सुंठ व जवखार यांचे चूर्ण ऊनपाण्याशीं द्यावें, तो नाना जळांच्या उपद्रवाला शमवितो.

## दुर्जलजेता रस.

विषंभागद्वयंदग्धकपर्दःपंचभागकः ॥ मरीचंनवभागंचचूर्णंव स्त्रेणशोधयेत् ॥ आर्द्रकस्यरसेनास्यकुर्यात्मुद्गसमांवटीं ॥ वारिणावटिकायुग्मंप्रातःसायंचभक्षयेत् ॥ अयंरसोज्वरेयोज्यस्तस्मिन्दुर्जलजेपिच ॥ अजीर्णाध्मानविष्टंभशूलेपुश्वासकासयोः ॥

**अर्थ**–बचनाग दोनभाग, कवडीचें भस्म पांचभाग व मिरें नऊ भाग या औषधांचें चूर्ण वस्त्रगाळ करून आल्याचे रसांत खलून मुगाएवढया गोळ्या कराव्या. त्यांतून एकेक पाण्याबराबर दोनवेळ द्याव्या; म्हणजे अजीर्ण, पोट फुगणें, मळावष्टंभ, शूल, दम, खोकला व दुष्टजलापासून जाहालेला ज्वर शांत करील.

## ज्ञानोदयरस.

कलावेदांकचंद्रांशैःसर्वांशसितयायुतैः ॥ शक्रासनरजोजाती

फलंशुक्कैःसुमेलितैः॥ ज्ञानोदयोभवेदेपसाधकानंदसिद्धिदः ॥

सेवितःसात्म्यतोग्राहीजलदोपापनोदकः ॥

**अर्थ**–इंद्रजव सोळा भाग, पित्तपापडा चार भाग, जायफळ नउ भाग, श्वेतएरंडमूळ एक भाग, याप्रमाणें घ्यावें. व सर्वांचे समान साकर घालावी; म्हणजे ज्ञानोदय होतो. हा सेवन करणाराला सिद्धि देतो; आणि सात्म्य होऊन जलसंबंधि दोष घालवितो.

## हरिद्रकवृक्षयोग.

सहरिद्रयवक्षारौपीत्वाचोष्णेनवारिणा ॥

नानादेशसमुद्भूतंवारिदोपमपोहति ॥

**अर्थ**–हळद व यवक्षार, यांचें समभाग चूर्ण ऊन पाण्याशीं घ्यावें; म्हणजे तें नानादेशींच्या जळांपासून झालेल्या दोषांचा नाश करितें.

## मद्योद्भवज्वर.

मद्याजीर्णसमालोक्यवामयेच्छर्करोदकैः ॥ पित्तज्वरोपचारेण

मद्यज्वरमुपाचरेत् ॥ मद्यपानज्वरस्यादौलंघनंनैवकारयेत् ॥

**अर्थ**–मद्याचें अजीर्ण झालें, असें पाहून त्याला साकर पाणी देऊन वांति करवावी; आणि पित्तज्वरोपचारांनीं मद्य ज्वरावर उपचार करावे. लंघन करवूं नये.

## उलटलेल्याज्वरावर लंघन.

अपथ्यदोपाद्यादिसंप्रवृत्तोभवेत्ज्ज्वरश्चेद्बलिनश्चपुंसः ॥

हितंपुनर्लंघनमादिशंतिसतोल्पदोपस्यचभेषजानि ॥

**अर्थ**–ज्वर निघाल्यानंतर अपथ्यानें पुनः ज्वर येऊं लागला तर; बलिष्ठरोग्याला पुनः लंघन करवावें. हें लंघन अल्प दोपाला औषधच आहे.

## रेचन.

यदिनिर्व्यात्हृतमलःपुनरेवभवेज्ज्वरः ॥

मलंचनिर्हरेच्छीघ्रंततःसंपद्यतेसुखं ॥

**अर्थ**–जर रेचकानें ज्वर निघून पुनः आला तर; पुनः रेचक देऊन मळ काढून टाकावे; ह्मणजे त्याला सुख होतें.

## किराततिक्तादिकाढा.

किराततिक्तकंतिक्तामुस्तापर्पटकामृता ॥
निःक्काथ्यपीतानिघ्नंतिपुनरावर्तिकज्वरं ॥

**अर्थ**–कुटकी, किराईत, नागरमोथ, पित्तपापडा, गुळवेल, यांचा काढा प्राशन केला असतां, उलटलेल्या ज्वराचा नाश करितो.

## तिक्तादिकाढा.

तिक्तोशीरबलाधान्यपर्पटांभोधरैःकृतः ॥
क्काथःपुनःसमायातंज्वरंशीघ्रंनिवारयेत् ॥

**अर्थ**–कुटकी, वाळा, चिकणा, धने, पित्तपापडा, नागरमोथा, यांचा काढा उलटलेल्या ज्वराचा शीघ्र नाश करितो.

## अपथ्यज्वरलक्षण.

अपथ्यजेमद्यभवेचहेतुर्हेतुर्ज्वरेपित्तमुदाहरंति ॥ दाहश्चशैत्यं चशिरोव्यथाचकोष्ठाभिवृद्धिःकटितोदकंडू ॥ मलातिपातस्त्व तिबद्धताचअपथ्यदोषेणभवेज्वरेच ॥

**अर्थ**–अपथ्यापासून व मद्यापासून झालेल्या ज्वरामध्यें पित्त प्रधान असतें. त्यांत अपथ्यापासून झालेल्या ज्वरामध्यें दाह, शैत्य, मस्तकशूळ, उदरवृद्धि व कमरेंत शूळ, कंडू, रेच, किंवा मलबद्धता हे विकार होतात.

## कटुक्यादिकाढा.

कटुकीपिप्पलीमूलंमुस्ताचैवहरितकी ॥
गिरिमालसमःक्काथःसर्वज्वरविनाशनः ॥

**अर्थ**–कुटकी, पिंपळमूळ, नागरमोथे, हिरडा व बाहवा इतक्यांचा काढा सर्वज्वर नाशक आहे.

## आमलक्यादिचूर्ण.

आमलंचित्रकंपथ्यांसैंधवंपिप्पलीकृतं ॥ चूर्णसोयंगणोह्येपस र्वज्वरविनाशनः ॥ भेदीरुचिकरःश्लेष्मजेतादीपनपाचनश्च ॥

**अर्थ**–आंवळकाठी, चित्रक, हिरडा, सैंधव व पिंपळी यांचें चूर्ण ऊनपाण्याशीं भक्षण केल्यानें सर्वज्वरनाश करितें; आणि तें भेदि, रुचिकर, दीपन, पाचन व कफनाशक आहे.

## गुडूच्यादिकाढा.

गुडूचीधनकारिष्टपद्मकोरक्तचंदनं ॥ गुडूच्यादिगणःक्राथः
सर्वज्वरहरःपरः ॥ दीपनोदाहहृल्लासतृष्णाछर्द्यरुचीर्जयेत् ॥

**अर्थ**–गुळवेल, धने, कडुनिंबाचीसाल, पद्मकाष्ठ, रक्तचंदन या पांच औषधांचा काढा घ्यावा. तो सर्वज्वराला शांत करितो. व दीपन आहे. आणि दाह, लाळ, पडसें, तृषा, ओकारी, व अरोचक, यांचा नाश करितो.

## क्षुद्रादिकाढा.

क्षुद्राकिराततिक्तंचशुंठीछिन्नाचपौष्करं ॥
कषायएपांशमयेत्पीतश्चाष्टविधंज्वरं ॥

**अर्थ**–रिंगणी, किराईत, सुंठ, गरुडवेल व एरंडमूळ, यां साहा औषधांचा काढा प्याला असतां, आठ प्रकारचे ज्वरांला दूर करितो.

## नागरादिपाचन.

नागरंदेवकाष्ठंचधान्यकंबृहतीद्वयं ॥
दद्यात्पाचनकंपूर्वंज्वरितानांज्वरापहं ॥

**अर्थ**–सुंठ, देवदार, धने, रिंगणी व मोरिंगणी, या पांच औषधांचा काढा ज्वरां-वर पाचन आहे. त्याणें सर्वज्वरपरिहार होतो.

चलदलतरुसेवाहोममंत्रौत्रिनेत्रद्विजगुरुजनपूजाविष्णुनाम्नां
सहस्रं ॥ मणिधृतिरपिदानान्याशिषस्तापसानांसकलमिदमरि
ष्टंयुक्तमष्टज्वराणां ॥

**अर्थ**–पिंपळाची सेवा, होम, मंत्रजप व सांब, ब्राह्मण, गुरु पूजन, विष्णुसहस्रनाम पठण, मणिधारण, दान व तपस्व्यांचे आशीर्वाद याणीं अष्टविधज्वर शांत होतात.

समुद्रस्योत्तरेतीरेद्विरदोनामवानरः ॥
तस्यस्मरणमात्रेणज्वरोयातिदिगंतरं ॥

**अर्थ**–समुद्राचे उत्तरतीरीं द्विरद ह्मणून वानर आहे. त्याचें स्मरण केलें तर सर्वज्वर दिगंतरीं जातात.

## वेलाज्वर.

शोकात्क्रोधात्तथाजीर्णात्संतापाद्वालहानितः ॥
अंतकालेचमर्त्यानांजायंतेदारुणाज्वराः ॥

अर्थ–शोक, क्रोध, अजीर्ण, संताप व बलहानि, यांपासून मनुष्याला अंतकाळीं भयंकर ज्वर उत्पन्न होतात.

## मूलिबंधन.

सर्वज्वरापहंनीलिमूलंरात्रिर्ज्वरापहं ॥
दुग्धिकामूलिकाकर्णेहंतिवेलाज्वरंतथा ॥

अर्थ–निळीचे झाडाचे मूळ आणि हळद हीं सर्वज्वरनाशक आहेत. तशीच दुधीचीमुळी कानांत ठेविली असतां, वेलाज्वर नाश पावतो.

## पिप्पलीचूर्ण ज्वरावर.

मधुनापिप्पलीचूर्णंलिहेत्कासज्वरापहं ॥
हिक्काश्वासहरंकंठ्यंप्लीहघ्नंबालकोचितं ॥

अर्थ–एकमासा पिंपळीचें चूर्ण करून मधांत चाटावें. तेणेंकरून कासज्वर, उचकी व श्वास हे दूर होतात; व हें चूर्ण कंठास हितकारक होऊन कवलु रोग दूर होतो; व बालकांस उपयोगीं पडतें.

## धान्यादिचूर्ण.

धान्यंलवंगंत्रितयंचशुंठीकोष्णांबुपीतंतरुणज्वरापहं ॥
तेभ्यःशतंवारितथाग्निमांद्यंश्वासाद्यजीर्णंविषमंचवातं ॥

अर्थ–धने, लवंगा, तेड व सुंठ, यांचें चूर्ण मंदोष्ण पाण्याशीं घेतलें असतां, तरुण, ज्वराचा नाश करील; अथवा याच औषधांचा काढा द्यावा. तो अग्निमांद्य, श्वास अजीर्ण, विषमज्वर व वात यांचा नाश करितो.

## गोरोचनादिचूर्ण.

गोरोचनंचमरिचंरास्नाकुष्ठंचपिप्पली ॥
उष्णोदकेनपीतंचसर्वज्वरविनाशनं ॥

अर्थ–गोरोचन, मिऱ्ये, रास्ना, कोष्ठ व पिंपळी यांचें चूर्ण गरम पाण्याशीं घेतलें असतां; तें संपूर्णज्वरांचा नाश करील.

## सीतोपलादिचूर्ण.

सीतोपलाषोडशीस्यादष्टौस्याद्वंशरोचना ॥ पिप्पलीस्याच्चतुःकर्षाएलास्याच्चद्विकर्षिका ॥ एककर्षंत्वचःकार्यश्चूर्णयेत्सर्वमेकतः ॥ सीतोपलादिकंचूर्णंमधुसर्पिर्युतंलिहेत् ॥ कासश्वा

सक्षयहरंहस्तपादांगदाहजित् ॥ मंदाग्निसुप्तजिव्हत्वंपार्श्व
शूलमरोचकं ॥ ज्वरमूर्ध्वगतंरक्तंपित्तमाशुव्यपोहति ॥

**अर्थ**–खडीसाकर सोळा तोळे. वंशलोचन आठ तोळे, पिंपळी चार तोळे एला दोन तोळे, दालचिनी एक तोळा यांची सर्व चूर्णें एकत्र करावीं. हें सीतोपलादि चूर्ण मध व तूप यांशीं द्यावें; ह्मणजे कास, श्वास, क्षय, हातपायांचा दाह, मंदाग्नि, सुप्तजिव्हत्व, पार्श्वशूल, अरुचि, ज्वर, ऊर्ध्वगतरक्तविकार, आणि पित्त यांचा नाश करितें.

## भाग्यार्दिचूर्ण.

भार्गीकर्कटशृंगीचचव्यंतालीसपत्रकं ॥ मरिचंमागधीमूलंप्र
त्येकंद्विपलंभवेत् ॥ षट्पलंशृंगवेरंचद्विपलंपिप्पलीद्वयं ॥
चातुर्जातमुशीरंचपलमेकंपृथक्पृथक् ॥ चातुर्जातसमाशुभ्रा
शर्करासमयोजिता ॥ ज्वरमष्टविधंहंतिकासंश्वासंचदारुणं ॥
शोफशूलोदराध्मानदोषत्रयहरंपरं ॥

**अर्थ**–भारंगमूळ, काकडशिंगी, चवक, तालीसपत्र, मिरीं व पिंपळीमूळ, हीं प्रत्येक आठ आठ तोळे, सुंठ चोवीस तोळे व आठ तोळे पिंपळी व गजपिंपळी, चातुर्जात, आणि वाळा हीं चार तोळे व साकर चार तोळे हीं सर्व चूर्णें एकत्र करावीं. हें भार्ग्यादि चूर्ण आठप्रकारचे ज्वर, खोकला, श्वास, सूज, उदर, पोटाची फुगवटी, आणि त्रिदोष यांचा नाश करितें.

## अनंतादिचूर्ण.

अनंतंवालकंमुस्तानागरंकटुरोहिणी ॥ सुखांबुनाप्रागुदया
त्पिबेदक्षसमंरवेः ॥ एतत्सर्वज्वरान्हंतिदीपयत्याशुचानलं ॥

**अर्थ**–धमासा, वाळा, नागरमोथा, सुंठ व कुटकी यांचें एक तोळा चूर्ण सुखोष्ण पाण्याशीं सूर्योदयापूर्वीं प्राशन केलें असतां, तें सर्वज्वरनाश करून अग्निदीपन करितें.

## भेडोक्तसुदर्शनचूर्ण.

तालीसंत्रिफलात्रुटीत्रिकटुकंत्वक्त्रायमाणंत्रिवृन्मूर्वाग्रंथिनिशायुगंश
ठिबलाहक्कंटकारीयुगं ॥ मुस्तापर्पटनिंबपुष्करजटाभार्गीयवानीहिमं
चव्यंचित्रकपुंडरीकतगरंसेव्यंविडंगंवचा ॥ यासोवत्सककुंडलींद्रयव
कंदेवद्रुमंवालकंबीजंशिग्रुभवंपटोलकटुकापद्माव्हपत्रंविषा ॥ काको
लीमधुकुंकुमंचसतवक्षीरिलवंगंपृथक्पर्णीशैलजशालिपर्णिसहितंशामं

तकीपुष्पकं ॥ सर्वसमंचूर्णतदर्धभागंकैरातकंश्रेष्ठतमंहिचूर्णं ॥ सुदर्शनंनाममरुद्बलासामयोद्भवान्हंतिपृथक्कृतान्ज्वरान् ॥ संसर्गजान्सकलजान्विषमान्निहन्याद्धातूद्भवान्विपकृतानभिघातजांश्च ॥ सामान्समानसकृतानतिदाहयुक्तान्शीतान्तृतीयकचतुर्थविपर्ययांश्च ॥ ऐकाहिकद्व्याहिकसान्निपातान्नानाविधान्पाक्षिकमासजातान् ॥ तृट्दाहमोहभ्रमदैन्यतंद्राश्वासकासारुचिपांडुरोगान् ॥ हलीमकंकामलपार्श्वशूलंपृष्ठोद्भवंजानुभवंतथैव ॥ त्रिकग्रहंवातविकारजातंविनाशयत्येवशिरोग्रहंच ॥ नानाप्रदेशोद्भववारिदोषान्दूषीविषादिप्रभवान्विकारान् ॥ स्त्रीणांरजोदोषसमुद्भवांश्चविनाशयेदुष्णजलेनपीतं ॥ शीतांबुनापित्तभवान्विकारान्नानामुनींद्रैर्गदितंजगद्धितं ॥ सुदर्शनंदानवनाशनंयथासुदर्शनंरोगविनाशनंतथा ॥

अर्थ–तालिसपत्र, त्रिफळा, बारीक विलायची, त्रिकटु, त्रायमाण, तेड, मोरवेल, पिंपळमूळ, हळद, दारुहळद, कचोरा, चिकणामूळ, कोष्ठ, रिंगणी, डोरली, नागरमोथा, पित्तपापडा, कडुनिंब, पोखरमूळ, भारंगमूळ, ओवा, वाळा, चवक, चित्रकमूळ, श्वेतकमळिणीकंद, तगर, काळा वाळा, वावडिंग, वेखंड, धमासा, कुडयाची साल, गुळवेल, इंद्रजव, देवदार, पीतवाळा, शेवग्याच्या बिया, कडुपडवळ, कुटकी, पद्मकाष्ठ, तमालपत्र, कळलावी, कांकोळी, ज्येष्ठमध, केशर, तवक्षीर, लवंगा, पिठवण, दगडफूल, माळवण, सुक्याआंब्या, आणि या चूर्णाचें निमें किराइताचें चूर्ण हीं सर्व मिळून एकत्र केली ह्मणजे सुदर्शननामक चूर्ण होतें. हें वातकफात्मक; आणि वात, पित्त, कफ, यां पासून झालेले ज्वर, द्वंद्वज्वर, त्रिदोषात्मकज्वर, विषमज्वर, धातुज्वर विषमज्वर, अभिघातज्वर, सामज्वर, मानसज्वर, दाहज्वर, शीतज्वर, तृतीयक, चतुर्थक, विपर्ययज्वर, एकाहिक, द्व्याहिक, सन्निपातज्वर, पक्षज्वर, मासज्वर, तृषा, दाह, मोह, भ्रम, दैन्य, झांपड, श्वास, कास, अरुचि, पांडुरोग, हलीमक, कामला, पार्श्वशूळ, पृष्ठशूळ, जानुशूल, तिडयांतील शूळ, संपूर्ण वातविकार, मस्तकशूल, नानादेशांतील उदकांचे दोष, दूषीविष, स्त्रियांचे रजोदोष, या सर्वांतें ऊन पाण्याशीं घेतलें असतां, नाश करितें; आणि थंड पाण्याशीं पित्तविकारांचा नाश करितें. हें पूर्वी मुनींनीं जगताचे हितार्थ सांगीतलें. जसें सुदर्शनचक्र, दैत्यांचा नाश करितें. तसें हें रोगांचा नाश करितें.

## सुदर्शनचूर्ण.

त्रिफलारजनीयुग्मंकंटकारीयुगंसठी ॥ त्रिकटुग्रंथिकंमूर्वागुडूचीधन्वयासकः ॥ कटुकापर्पटोमुस्तात्रायमाणाचवालकं ॥ निंबुपुष्करमूलंचमधु

यष्टीचवत्सकः ॥ यवानींद्रयवाभांर्गीशिग्रुबीजंसुराष्ट्रजा ॥ वचात्वक्पद्म कोशीरचंदनातिविपाबला ॥ शालिपर्णीपृष्ठिपर्णीविडंगंतगरंतथा ॥ चित्रकंदेवकाष्ठंचचव्यंद्राक्षापटोलजं ॥ जीवकर्षभकौचैवलवंगंवंशलोचना ॥ पुंडरीकंचकाकोलीपत्रंजातिपत्रकं ॥ तालीसपत्रंचतथासमभागानिचूर्णयेत् ॥ सर्वचूर्णस्यचार्धांशंकैरातंप्रक्षिपेत्सुधीः ॥ एतत्सुदर्शनं नामचूर्णंदोपत्रयापहं ॥ ज्वरांश्चनिखिलान्हंतिनात्रकार्याविचारणा ॥ पृथग्द्वंद्वागंतुकांश्चधातुस्थान्विषमज्वरान् ॥ सन्निपातभवांश्चापिपीनसानपिनाशयेत् ॥ शीतज्वरैकाहिकादीन्मोहंतंद्रांभ्रमंतृषां ॥ श्वासकासौचपांडुंचत्हृद्रोगंहंतिकामलां ॥ त्रिकपृष्ठकटीजानुपार्श्वशूलनिवारणं ॥ शीतांबुनापिबेद्धीमान्सर्वज्वरनिवृत्तये ॥ सुदर्शनंयथाचक्रंदानवानांविनाशनं ॥ तद्वज्ज्वराणांसर्वेपामिदंचूर्णंप्रणाशनं ॥

अर्थ—हिरडा, बेहडा, आवळकाठी, हळद, दारुहळद, रिंगणी, डोरली, कचोरा, सुंठ, मिऱ्यें, पिंपळी, पिंपळमूळ, मोरवेल, धमासा, कुटकी, पित्तपापडा, नागरमोथा, मेंदीचें बीज, वाळा, कडुनिंब, पुष्करमूळ, ज्येष्ठीमध, पांढरा कुडा, ओंवा, इंद्रजव, भारंगमूळ, शेवग्याचें बीज, तुरटी, वेखंड, दालचिनी, पद्मकाष्ठ, काळा वाळा, चंदन, अतिविष, चिकणमूळ, साळवण, पिठवण, वावडिंग, तगर, चित्रक, देवदार, चवक, कडुपडवळाची पानें, जीवक व ऋषभक, यांचे अभावीं भुयकोहळा, लवंग, वंशलोचन, पांढरें कमळ, कांकोली, याचे अभावीं ज्येष्ठीमध, तमालपत्र, जायपत्री, आणि तालीसपत्र, हीं सर्व समभाग घेऊन चूर्ण करावें; आणि सर्वचूर्णाचें निमें काडेकिराइताचें चूर्ण त्यांत मिळवावें. याला सुदर्शनचूर्ण ह्मणतात. हें संपूर्ण वात, पित्त व कफज्वर यांचें नाशक आहे. या विषईं विचार करूं नये. हें वातज्वर, पित्तज्वर, कफज्वर, वातपित्तज्वर, वातकफज्वर, पित्तकफज्वर, आगंतुकज्वर, धातुगतज्वर, विषमज्वर, सन्निपातज्वर, पीनस, शीतज्वर, ऐकाहिकादिज्वर, मोह, तंद्रा, भ्रम, तृषा, श्वास, कास, पांडु, हृद्रोग, कावीळ, माकडहाड, पाठ, कंबर, गुडघे व कुशी, इतक्यांचे ठिकाणींचा शूल यांचा नाश करितें. हें चूर्ण थंड पाण्याबरोबर प्यावें; ह्मणजे सर्व ज्वरांचा नाश करितें.

## लघुसुदर्शनचूर्ण.

गुडूचीपिप्पलीमूलंकणातिक्ताहरीतकी ॥ नागरंदेवकुसुमंनिंबत्वक्चंदनं तथा ॥ सर्वचूर्णस्यचार्धांशंकैरातंप्रक्षिपेत्सुधीः ॥ एतत्सुदर्नंलघ्वंनाम्नादोपत्रयापहं ॥ ज्वरांश्चनिखिलान्हन्यान्नात्रकार्याविचारणा ॥

अर्थ–गुळवेल, पिंपळी, पिंपळमूळ, कुटकी, हरीतकी, सुंठ, लवंगा, कडुनिंब, दालचिनी व चंदन या सर्वांचे निमे काडेकिराइताचें चूर्ण त्यांत मिळवावें; ह्मणजे त्याला लघुसुदर्शनचूर्ण ह्मणतात. हें त्रिदोषनाशक व सर्वज्वरनाश करणारें आहे. यांत संशय नाहीं.

## आमलक्यादिचूर्ण.

धात्रीशिवासैंधवचित्रकाणांकणायुतानांसमभागचूर्णं ॥
जीर्णज्वरारोचकवन्हिमांद्येविड्विग्रहेशस्तमितिप्रतिज्ञा ॥

अर्थ–आवळकाठी, हर्डे, सैंधव, चित्रकमूळ व पिंपळी यांचे समभाग चूर्ण जीर्णज्वर, अरुचि, अग्निमांद्य व मलबद्धता यांचा नाश करितें.

## केसरादि.

केसरंमातुलिंगस्यमधुसैंधवसंयुतं ॥
जिव्हातालुगलक्लोमशोषेमूर्धनिदापयेत्

अर्थ–माहाळुंगाचें केसर, मध व सैंधव घालून जिव्हा, तालु, गळा, क्लोम, आणि मस्तक इतक्यांचे ठाईं शोष पडला तर द्यावें.

## विदार्यादिलेप.

विदारीदाडिमंलोध्रंदधित्थंबीजपूरकं ॥
एभिःप्रलिंप्यान्मूर्धानंतृड्दाहार्तस्यदेहिनः ॥

अर्थ–भुईकोहळा, डाळिंब, लोध्र, कवठ व माहाळुंग इतकीं वाटून तृषेनें व दाहानें पीडित मनुष्याच्या मस्तकावर लेप करावा.

## ज्वरघ्नी गुटिका.

भागैकःस्याद्रसाच्छुद्धादेलीयःपिप्पलीशिवा ॥ आकारकरभोगंधःकटुतैलेनशोधितः ॥ फलानिचेंद्रवारुण्याश्चतुर्भागमिताअमी ॥ एकत्रमर्दयेच्चूर्णमिंद्रवारुणिकारसैः ॥ माषोन्मितांगुटींकृत्वादद्यात्सर्वज्वरेबुधः ॥ छिन्नारसानुपानेनज्वरघ्नीगुटिकामता ॥

अर्थ–शुद्ध केलेला पारा एक भाग, एल्याबोळ, पिंपळी, बाळहिर्डे, अकलकरा, व शिरसेल तेलांत शोधलेला गंधक व कडुवृंदावनाची फळें हीं साहा औषधें चार चार भाग घेऊन चूर्ण करून कडुवृंदावनाच्या फळांच्या रसांत खल करून मासा मासा प्रमाण गोळ्या कराव्या; नंतर ती गोळी गुळवेलीच्या रसांत द्यावी. तिणें सर्व ज्वर जातात.

## बलाद्यघृत.

बलांश्वदंष्ट्रांबृहतींकलशींधावनींपुनः ॥ निंबपर्पटकंमुस्तांत्रायमाणां दुरालभां ॥ कृत्वाकषायंकल्कार्थंदद्यादामलकींसठीं ॥ द्राक्षापुष्कर मूलंचमेदामामलकानिच ॥ घृतंपयश्चतत्सिद्धंसर्पिर्ज्वरहरंपरं ॥ क्षय कासप्रशमनंशिरःपार्श्वरुजापहं ॥

**अर्थ**–चिकणा, गोखरू, रिंगणी, पिठवण, धायटीफूल, कडुनिंब, पित्तपापडा, नागरमोथा, त्रायमाण, धमासा, यांच्या काढ्यांत, भूयआंवळी, कचोरा, द्राक्षे, पोखरमूळ, मेदा, आवळकाठी, यांचा कल्क आणि चौसष्ट तोळे तूप व चौसष्ट तोळे दूध घालून अग्नीवर तूप सिद्ध करावें. तें ज्वर, क्षय, खोकला, मस्तकशूल, पार्श्वशूल, यांचा नाश करितें.

## मंजिष्ठाद्यघृत.

मंजिष्ठातिविषापथ्यावचानागररोहिणी ॥ देवदारुहरिद्राचद्रोणिन्यां पालिकांपचेत् ॥ क्वाथेस्मिन्साधयेत्पिष्टैर्घृतप्रस्थंपिचून्मितैः ॥ शृंगवेर कणाहिंगुद्विक्षारकटुपंचकैः ॥ तत्कफावृतसर्वैकज्वरिणाममृतोपमं ॥ वर्ध्महिध्मारुचिश्वासपांडुरोगविकारिणि ॥ मलग्रहप्रमेहार्शप्लीहाप स्मारशोषिणां ॥ उदावर्तपरीतानांमंदाग्निक्रमिकुष्ठिनि ॥

**अर्थ**–मंजिष्ठ, अतिविष, हरीतकी, वेखंड, सुंठ, कुटकी, देवदार, हळद, आणि उतरणी हीं सर्व चार चार तोळे घेऊन काढा करावा. त्यांत सुंठ, पिंपळी, हिंग, जवखार, यवखार व कटुपंचक यांचे कल्क एक तोळा घालून त्यांत चौसष्ट तोळे तूप घालावें; आणि सिद्ध करावें. तें कफज्वराला अमृता सारिखे आहे. हें अंडवृद्धि, उचकी, अरुचि. श्वास, पांडुरोग, मलबद्धता, प्रमेह, अर्श, प्लीहा, अपस्मार, क्षय, उदावर्त, मंदाग्निता व कृमि यांचा नाश करितें.

## कुलित्थाद्यघृत.

कुलित्थकोलत्रिफलादशमूलयवान्पचेत् ॥ त्रिफलासलिलद्रोणेघृ तेपक्त्वाक्षकान्क्षिपेत् ॥ पंचकोलकसप्ताव्हावयस्थाहिंगुतुंबरुः ॥ स ठीपुष्करमूलार्कमूलप्रतिविषावचा ॥ किराततिक्तकंमुस्तंकर्कटाख्यां दुरालभां ॥ नक्तमालमुभेपाठेकटुकाशिग्रुतेजिनी ॥ सोमवल्कश्चर जनीकटुकीकंटकारिका ॥ पटोलनिंबगोजिव्हाकसकामदनोजटाः ॥ लवणानिपलांशानिक्षारानर्धपलोन्मितान् ॥ प्रस्थंवाज्यस्यतत्सिद्धं

दीपनंकफवातनुत् ॥ गृध्रसीग्रहणीगुल्मश्वासकासार्शसांहितं ॥ दीर्घज्वराभिभूतानांज्वरिणाममृतोपमं ॥

अर्थ—कुळीत्थ, बोरें, हरडे, बेहेडे, आवळकठी, दशमूळ व यव हे व त्रिफळयाच्या १६३८४ तोळे काढ्यांत पंचकोल, सातवण, आवळकठी, हिंग, चिरफळ, कचोरा, पोखरमूळ, रुईचें मूळ, अतिविष, वेखंड, किराईत, नागरमोथा, कांकडाशिंगी, धमासा, करंज, पाडळ, काष्टपाडळ, कुटकी, रिंगणी, कडुपडवळ, कडुनिंब, पायरी, काशिंदा, मदनफळ, सुगंध जटामांसी हीं सर्व एकेक तोळा, संपूर्ण लवणें चार तोळे, क्षार२ तोळे, आणि तूप ६४ तोळे घालून सिद्ध करावें. तें कफवात, गृध्रसीवायु, ग्रहणी, गुल्म, श्वास, कास, अर्श यांवर हितकारक, आणि फार दिवसांचे ज्वरावर अमृतासारिखें आहे.

## अमृताद्यघृत.

अमृतात्रिफलापटोलयासैःसपयस्कंविधिवत्घृतंविपक्कं ॥
विषमज्वरनाशनंप्रधानंक्षयगुल्मारुचिकामलापहारि ॥

अर्थ—गुळवेळ, हरडा, बेहडा, आवळकाठी, कडुपडवळ व धमासा यांचा काढा अथवा कल्क दुध व तूप हीं एकत्र करून त्यांत तूप घालोन घृत सिद्ध करावें. तें विषमज्वर, क्षय, गुल्म, अरुचि व कामला यांचा नाश करितें.

## गुडूच्यादिघृत.

गुडूच्यारसकल्काभ्यांत्रिफलायारसेनतु ॥
मृद्वीकायाबलायाश्चसिद्धाःस्नेहाज्वरच्छिदः ॥

अर्थ—गुळवेलीचा रस व गुडूचीकल्क, त्रिफळारस, द्राक्षांचा रस व चिकण्याचा रस या एकेकांमध्यें सिद्ध जाहालेलें घृत सर्वज्वरनाश करितें.

## पंचतिक्तघृत.

वृषनिंबामृताव्याघ्रीपटोलानांकृतेनच ॥ कल्केनपक्कंसर्पिस्तुनिहन्याद्विषमज्वरान् ॥ पांडुंकुष्ठंविसर्पंचकृमनिर्शांसिनाशयेत् ॥

अर्थ—अडुळसा, कडुनिंब, गुळवेल, रिंगणी व कडुपडवळ यांचे कल्काबरोबर तूप कढवावें. तें तूप विषमज्वर, पांडु, कुष्ट, विसर्प, कृमि व मूळव्याध यांचे नाशक आहे. याला पंचतिक्त घृत ह्मणतात.

## अमृताद्यघृत.

अमृतात्रिफलापटोलयासैःसपयस्कंविधिवद्घृतंविपक्कं ॥ ससैंधवै

श्चपलिकैर्घृतप्रस्थंविपाचयेत् ॥ क्षीरंचतुर्गुणंदत्वातद्घृतंप्लीहनाशनं ॥ विषमज्वरमंदाग्निहरंरुचिकरंपरं ॥

अर्थ–गुळवेल, त्रिफळा, कडुपडवळ व धमासा यांचा काढा त्यांत सैंधव चार तोळे, दूध दोनशें छप्पन तोळे, चौसष्ट तोळे तूप हीं एकत्र कढवून तें तूप प्लीहा, विषमज्वर, मंदाग्नि व अरुचि यांचें नाशक आहे.

## महाषट्पलघृत.

पूतिकाग्निकपंचकोलरुचकैःसाजाजियुग्मोद्भिदैःसक्षारैःसविडैःसहिंगुहपुषासिंधूद्भवैःकल्कितैः ॥ सूक्तेनार्द्रकसंभवेनचरसेनैतन्महाषट्पलंसर्पिःपक्वमरोचकाग्निसदनप्लीहज्वरश्वासजित् ॥

अर्थ–करंज, चित्रक, सुंठ, मिरें, पिंपळी, पिंपळीमूळ, चवक, पादेलोण, जिरें, शाहाजिरें, सोराखार, जवखार, बिडलोण, हिंग, शेरणी व सैंधव यांचें चूर्ण सूक्तांत किंवा आल्याच्या रसांत घालून त्यांत तूप घालून कढवावें. त्याला षट्पलघृत ह्मणतात. हें अरुचि, अग्निमांद्य, प्लीहा व श्वास यांचा नाश करितें.

## दुसरा प्रकार.

पिप्पलीपिप्पलीमूलंचव्यचित्रकनागरैः ॥ ससैंधवैश्चपलिकैर्घृतप्रस्थं विपाचयेत् ॥ क्षीरंचतुर्गुणंदत्वातद्घृतंप्लीहनाशनं ॥ विषमज्वरमंदाग्निहरंरुचिकरंपरं ॥

अर्थ–पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ व सैंधव हीं सर्व औषधें च्यार तोळे प्रमाणें घेऊन कुटून चौपट पाणी घालून काढा करावा; आणि त्यांत चौपट दूध घालावें; व तूप चौसष्ट तोळे घालून कढवावें. याला महाषट्पलघृत ह्मणतात. हें प्लीहा, विषमज्वर, मंदाग्नि आणि अरुचि यांना दूर करणारें आहे.

## लघुलाक्षादितैल.

लाक्षाहरिद्रामंजिष्ठाकल्कैस्तैलंविपाचयेत् ॥ षड्गुणेनारनालेनदाहशीतज्वरापहं ॥

अर्थ–लाख, हळद व मंजिष्ठ यांचा कल्क आणि तेलाचे साहापट कांजी असें तेलांत घालून तेल कढवावें. तें तेल दाह व शीतज्वर यांचें नाशक आहे.

## लाक्षादितैल.

लाक्षादशाक्षाअरुणाषडक्षासचंदनंलोहितचंदनंच ॥ त्वक्पत्रकंवारिमुरासमुस्ताप्रत्येकमेतानिपलोन्मितानि ॥ किराततिक्तस्त्रिवृतास

विश्वामृताकणापर्पटकंटकार्यः ॥ विडंगविश्वामलकानिवासारसा निशावारुणसिंधुवाराः ॥ एतानिदेयानिपृथक्पलार्धमानानिसर्वाणि चऔषधानि ॥ कल्काह्यमीषांविदधीतगव्यदुग्धेनवैसार्धतुलोन्मितेन ॥ तैलंतिलानांतुतुलानुमानंतेनैवकल्केनशनैःपचेत्तत् ॥ हन्यात् ज्वरांस्तैलमिदंसमस्तान्कुर्याद्बलंवीर्यमतीवपुष्टं ॥ विमर्दनादाशु परिश्रमंभ्रमंशमंनयेत्संजनयेत्द्युतिंतनोः ॥ तथाव्यथामास्थिसमुद्भवामपिप्रहत्यनिद्रांसमुपार्जयेत्सुखं ॥

**अर्थ**–लाख १० तोळे, मंजिष्ठ ६ तोळे, चंदन, रक्तचंदन, दालचिनी, तमालपत्र, वाळा, एकांगीमुग व नागरमोथा हीं प्रत्येक चार चार तोळे प्रमाणें घ्यावीं. व काडेकिराईत, निशोत्तर, सुंठ, गुळवेल, पिंपळी, पित्तपापडा, रिंगणी, वावडिंग, सुंठ, आवळकाठी, अडुळसा, हळद, वायवर्णा व निगुंडी हीं प्रत्येक दोन दोन तोळे प्रमाणें घेऊन सर्व औषधें कुटून. त्यांचा कल्क करून ६०० तोळे गाईचे दुधांत टाकून त्यांत ४०० तोळे तिळांचें तेल घालून मंदाग्नीने पचवावें. हें तेल सर्वज्वरांचा नाश करील; आणि बल, वीर्य व पुष्टि यांतें करील. याचे मर्दनानें श्रम, भ्रम, यांची शांति होये. शरीरास कांति आणि अस्थिपीडा नासून निद्रा व सुख यानां उत्पन्न करील.

## मध्यमलाक्षादितैल.

तैलंप्रस्थमितंचतुर्गुणजतुक्काथंचतुर्मुस्तरुग्यष्टीदारुनिशाब्दमूर्वकटुकामिश्यश्वकौंतीहिमैः॥ रास्नाव्हैःपिचुसंमितैःकृतमिदं शस्तंतुजीर्णज्वरेसर्वस्मिन्विषमेपियक्ष्मिणिशिशौवृद्धेसगर्भासुच ॥

**अर्थ**–तेल ६४ तोळे व चारपट लाखेचा काढा. त्यांत नागरमोथे, कोष्ठकोळिंजन, ज्येष्ठमध, दारुहळद, भद्रमोथा, मोरवेल, कुटकी, बडीशेप, रेणुकबीज, चंदन, रास्ना, हीं एकेक तोळा सर्व घेऊन त्यांचा कल्क लाखेचे काढयांत घालोन शिजऊन तेल सिद्ध करावें. तें तेल अभ्यंग केल्यानें जीर्णज्वर, सर्वविषमज्वर, राजयक्ष्मा, गर्भिणीरोग व बाळंतरोग, हे दूर होतील.

## षट्तक्रतैल.

लाक्षानिशाकुष्ठशुंठिमंजिष्ठाचसुवर्चिका ॥ मूर्वाचंदनसंसिद्धेतैलंत क्रेथषड्गुणे ॥ अभ्यंगेनप्रशमयेद्दाहंशीतज्वरंनृणां ॥

**अर्थ**–लाख, हळद, कोष्ठ, सुंठ, मांजिष्ठ, सज्जीक्षार, मोरवेल व चंदन यांचा काढा

व तेल आणि तेलाचे साहापट ताक घालून सिद्ध करावें. तें मनुष्याला अभ्यंगाने दाह व शीतज्वर यांचा नाश होतो.

## स्वर्जिकाद्यतैल.

स्वर्जिकाकुष्ठमंजिष्ठालाक्षामूर्वाविषौषधैः ॥
सक्षीरैःसाधितंतैलमभ्यंगाद्दाहशीतनुत् ॥

**अर्थ**—सज्जीखार, कोष्ठ, मांजिष्ठ, लाख, मोरवेल, अतिविष व सुंठ यांचा काढा व दूध यांनीं सिद्ध केलेलें तेल आंगास अभ्यंग केले असतां, दाहज्वर व शीतज्वर यांचा नाश करितो.

## बलाद्यतैल.

बलामधुकमंजिष्ठापद्मपद्मकचंदनैः ॥ समुद्रफेनव्हीबेरजनगैरिकोत्पलैः ॥ पिष्टैरेतैःपचेत्तैलंमस्तुक्षीरंचतुर्गुणं ॥ वातपित्तज्वराज्जीर्णात्तेनाभ्यक्तोविमुच्यते ॥

**अर्थ**—चिकणामूळ, ज्येष्ठीमध, मांजिष्ठ, पद्मकाष्ठ, एरंडमूळ, चंदन, समुद्रफेण, सुंठ, हळद, गेरू व कमलकंद यांचा कल्क करून त्यांत तेल, दूध व दह्यांची निवळी दुधाचे चौपट घालून तैल सिद्ध करावें. तें बलादिक तेल आंगास लाविलें असतां वातपित्तज्वर व जीर्णज्वर यांचा नाश करितें.

## पटोलाद्यस्नेह.

पटोलपिचुमंदाभ्यांगुडूच्यामलकेनच ॥
मदनैश्चशतःस्नेहोज्वरघ्नमनुवासनं ॥

**अर्थ**—कडुपडवळ, कडुनिंब, गुळवेल, आवळकाटी व मदनफळ यांचे काढ्यांत सिद्ध केलेलें तेल ज्वरावर पिचकारीनें गुदद्वारांत सोडण्यास योग्य आहे. हें ज्वरघ्न आहे.

## चंदनाद्यनुवासन.

चंदनोत्पलकाश्मर्यमधुकागरुमूलकैः ॥
सिद्धतैलंविधातव्यंबस्तौसर्वज्वरापहं ॥

**अर्थ**—चंदन, कोष्ठ, सिवण, मोहाचीं फुलें, अगरु व मुळे यांचे कषायांत सिद्ध केलेल्या तेलाचा अनुवासन बस्ति केला असतां, तें संपूर्णज्वरनाशक आहे.

## पटोलाद्यनुवासन.

पटोलमदनारिष्टगुडूचीमधुकैःस्मृतं ॥ श्वदंष्ट्रामदनशृंगामधू

कारिष्टवासकैः ॥ अश्वगंधेतितैलस्यकार्षिकैराढकंपचेत् ॥ अनुवासनकेतैलंसर्वज्वरविनाशनं ॥ कृछ्रान्वातविकारांश्च नाशयेदपिचोत्थितान् ॥

अर्थ—कडुपडवळ, गेळफळ, कडुनिंब, गुळवेल, मोहाचीं फुलें, गोखरू, खैर, कांकडशिंगी, मधुकाष्ट, रिठा, अडुळसा व अश्वगंध हीं प्रत्येक तोळा तोळा घेऊन त्यांचे काढयांत तेल दोनशेंछपन्न तोळे घालोन पचन करावें. तें अनुवासनबस्तीनें उपयुक्त केलें असतां, संपूर्ण ज्वर व कष्टसाध्यवातविकार यांचा नाश करितें.

## आरग्वधादिनिरूहबस्ति.

आरग्वधमुशीरंचमदनस्यफलानिच ॥ पर्ण्यश्चतस्रोमधुकंनिरूहमनु कल्पयेत् ॥ प्रियंगुमदनंमुस्तंमधुकंचशताव्हयं ॥ कल्कःसर्पिर्गुडक्षौद्रैर्ज्वरघ्नोबस्तिरुत्तमः ॥

अर्थ—बाहव्याचा मगज, वाळा, गेळयाचीं फळें, चार प्रकारच्या पर्णी व मधुकाष्ठ यांचा काढा करून निरुह बस्ति द्यावा. अथवा कांग, गेळफळ, नागरमोथा, ज्येष्टमध व शतावरी यांचा कल्क, तूप, गूळ व मध घालोन यांचा बस्ति द्यावा. हा उत्तम ज्वरघ्न आहे.

## तैलपाकविधि.

घृततैलगुडादींस्तुएकाहान्नैवसाधयेत् ॥ उषितास्तुप्रकुर्वंतिविशेषेण गुणान्बहून् ॥ स्नेहकल्कोयदांगुल्यावर्तितोवर्तिवद्भवेत् ॥ वन्हौक्षिप्तेचनोशब्दस्तदासिद्धंविनिर्दिशेत् ॥

अर्थ—घृत, तैल व गुड आदीकरून औषधें एकेच दिवशीं सिद्ध करूं नये. हीं शिळीं झालीं ह्मणजे विशेषेकरून बहुत गुण करितात. ज्या वेळेस तेलांतील कल्क बोटानीं पिळल्यावर वातिसारखा होतो; आणि तेल अग्नीवर टाकिलेंअसतां, तड तड शब्द होत नाहीं. त्या वेळेस तेल सिद्ध झालें असें समजावें.

## मंद, मध्यम, व तीक्ष्ण स्नेहपाक.

नस्येमृदुःखरोभ्यंगेस्नेहेकिट्टंतुमध्यमं ॥
नातिस्थिरंपचेद्बस्तौखरमभ्यंजनेपचेत् ॥

अर्थ—स्नेह. नस्याविषयीं मृदु करावा. अभ्यंगाविषयीं खरपाक स्नेह सिद्ध करावा. मध्यम स्नेह कल्काचा किट्ट होईपर्यंत पचन करावा. तोच बस्तीविषयीं, जलद पचवून करावा.

## खरपाकलक्षण.

स्नेहपाकोत्थकल्केस्यान्मृदुरंगुलिकेपिन ॥
अगृण्हात्यंगुलिमथर्शीर्यमाणोखरःस्मृतः ॥

अर्थ–पचनकालीं स्नेहपाकांतील कल्क मृदु नसून बोटानां चिकटत नाहीं; आणि ठिमूळ असा झाला ह्मणजे खरपाक झाला.

## खर व मृदु पाकाचें फळ सांगतो.

खरोभ्यंगेमृदुर्नस्येमध्यःस्याद्बस्तिपानयोः ॥ परंपाकोमृदुःकार्योद्रव्य स्यनखरोमतः ॥ किंचित्तुशीर्षमाद्दत्तेनजहातिस्वरःपुनः ॥

अर्थ–खरपाकस्नेह, अभ्यंगाविषयीं, व मध्यपाक बस्ति व प्रकाशन यांविषयीं योजावा; परंतु द्रव्यपाक मृदु करावा. खर करूं नये. खर पाक झाला असतां, मस्तकशूलादि विकार करितो. ते पुनः नीट होत नाहींत.

## चंदनबलातैल.

चंदनंचबलामूलंलाक्षालामज्जकंतथा ॥ पृथक्पृथक्प्रस्थमात्रंद्रोणेचस लिलेपचेत् ॥ चतुर्भागावशेषेस्मिन्तैलंप्रस्थद्वयंक्षिपेत् ॥ चंदनोशीरम धुकशताव्हाकटुरोहिणी ॥ देवदारुनिशाकुष्ठंमंजिष्ठागुरुवालकं ॥ अ श्वगंधाबलादार्वीमूर्वामुस्तासमूलिका ॥ एलात्वङ्नागकुसुमंरास्ना लाक्षासुगंधिका ॥ चंपकंपीतसारंचसारिवारोचकद्वयं ॥ कल्कैरेतैःस मायुक्तंक्षीराढकसमन्वितं ॥ तैलमभ्यंजनेश्रेष्ठंसप्तधातुविवर्धनं ॥ का सश्वासक्षयहरंसर्वच्छर्दिनिवारणं ॥ असृग्दररक्तपित्तंहंतिपित्तंकफाम यं ॥कांतिकृद्दाहशमनंकंडूविस्फोटनाशनं ॥ शिरोरोगंनेत्रदाहमंगदाहं चनाशयेत् ॥ वातामयहतानांचक्षीणानांक्षीणरेतसां ॥ बालमध्यमवृध्दा नांशस्यतेशोफकामलां ॥ पांडुरोगंविशेषेणज्वरान्सर्वान्विनाशयेत् ॥

अर्थ–चंदन, चिकणामूळ, लाख व वाळा हीं चार औषधें पृथक् पृथक् ६४ तोळे घेऊन १० २४ तोळे पाणी घालोन शिजवावीं. चौथा हिस्सा पाणी राहिलें ह्मणजे तेल १२८ तोळे घालोन नंतर चंदन, वाळा, मोहाचें फूल, शोपा, कुटकी, देवदारु, हळद, कोष्ठ, मांजिष्ठ, अगर, काळा वाळा, आस्कंद, चिकणा, दारुहळद, मोरवेल, नागरमोथे, वेलची, दालचिनी, नागकेशर, रास्ना, लाख, निर्गुंडी, चांफा, शिळारस, उपळसरी, शादेलोण व पादेलोण हीं सर्व समभाग घेऊन त्यांचा कल्क करावा; आणि तो कल्क

व दूध २५६ तोळे मिळऊन पहिल्या काढया बरोबर शिजवावें; आणि तैल सिद्ध करावें. तें अभ्यंगानें सप्तधातु वाढविणारें व कांतिकारक, कास, श्वास, क्षय, छर्दि. प्रदर, रक्तपित्त, कफ, दाह, कंडू, फोड, मस्तकशूल, नेत्रदाह, अंगदाह, वायु यांचा नाश करितें व क्षीण, धातुक्षीण, बाल, तरुण व वृद्ध, यांला हितकर आहे. व सूज, कावीळ, पांडु व ज्वर इत्यादिकांचा नाश करितें.

## अश्वगंधादितैल.

अश्वगंधाबलालाक्षाप्रस्थंप्रस्थंपृथक्पृथक् ॥ जलेद्रोणेविपक्तव्यंच तुर्भागावशेपितं ॥ तैलंत्रिमानकंदद्याद्दधिमस्तुचतुर्गुणं ॥ अश्वगंधाशिलादारुकौंतिकुष्टाब्दचंदनैः ॥ निशातिक्ताशताव्हाचलाक्षामूर्वासमूलकैः ॥ सुरदारुचमंजिष्ठामधुकोशिरसारिवा ॥ समभागानिसर्वाणिकल्कीकृत्यविपाचयेत् ॥ सर्वज्वरान्हरत्याशुसर्वधातुविवर्धनं ॥ एतदभ्यंजनेनाशुक्षयरोगंविमुंचति ॥

अर्थ–आस्कंद, चिकणा, लाख, हीं प्रत्येक ६४ तोळे घेऊन १०२४ तोळे पाण्यांत कढऊन चौथा हिसा टेऊन त्यांत १९२ तोळे तेल घालोन कषायाचें चौपट दह्यांचें पाणी घालावें; नंतर आस्कंद, मनशीळ, देवदार, रेणुकबीज, कोष्ट, नागरमोथे, चंदन, हळद, कुटकी, शोफा, लाख, मोरवेल, देवदार, मांजिष्ट, मोहाचीं फुलें, वाळा व उपळसरी, हीं सर्व औषधें कुटून त्याचा कल्क घालोन शिजवावें; आणि तेल राहील त्याणें अभ्यंग केल्यानें सर्वज्वरनाश होईल. व तें धातुवृद्धिकर व क्षयरोग नाशक आहे.

## बृहल्लाक्षादितैल.

तैलंलाक्षारसंक्षीरंपृथक्प्रस्थंसमंपचेत् ॥ चतुर्गुणेरितक्राथेद्रव्यैरेतैःपलोन्मितैः ॥ लोध्रकट्फलमंजिष्ठामुस्तकेसरपद्मकैः ॥ चंदनोशिरयष्ट्याव्हैस्तैलंगंडूपधारणात् ॥ दंतरोगाःप्रणश्यंतिलेपात्सर्वान्ज्वरान्जयेत् ॥ एतल्लाक्षादिकंतैलंबलपुष्टिप्रदायकं ॥

अर्थ–लाखेचा काढा, दूध, हीं प्रत्येक ६४ तोळे घेऊन चतुर्थांश काढा करावा. त्यांत लोध्र, कायफळ, मांजिष्ट, नागरमोथे, केशर, पद्मकाष्ठ, चंदन, वाळा व ज्येष्ठमध, हीं सर्व औषधें चार चार तोळे घेऊन कुटून कल्क करावा. तो पूर्वी केलेल्या कषायांत टाकून शिजवावें. त्याणें दंतरोग दूर होतात. व अभ्यंगानें सर्व ज्वर नाश पावतात.

## पंचम महालाक्षादितैल.

लाक्षाहरिद्रामंजिष्ठाफेनिलंमधुकंबला ॥ लामज्जकंचंदनंचचंपकं

नीलमुत्पलं ॥ प्रत्येकमेषांपणमुष्टीःपक्त्वातोयेचतुर्गुणे ॥ चतुर्भागा वशेषेतुगर्भेचैतत्समावपेत् ॥ रेणुकापद्मकंचैववाजिगंधातथैवच ॥ वेतसंचोरकंकुष्टंदेवदारुनखंत्वचं ॥ शतपुष्पांपुंडरीकंमांसीमधुकमेव च ॥ एभिरक्षमितैःकल्कैःकषायेणैवपेषितैः ॥ मस्तुसूक्तारनालाना माढकाढकमावपेत् ॥ क्षीराढकसमायुक्तंतैलप्रस्थंविपाचयेत् ॥ अभ्यं गात्तैलमेतद्धिशीघ्रंदाहमपोहति ॥ व्यपोहतितथावातपित्तश्लेष्मभवं ज्वरं ॥ सप्रलापंसतृष्णंचतालुशोषभ्रमान्वितं ॥ ग्रहोपसृष्टायेबाला रक्षःसंदूषिताश्चये ॥ तेषांकष्टंशमयतेतैलंलाक्षादिकंमहत् ॥

अर्थ—लाख, हळद, मंजिष्ठ, बोर, ज्येष्ठमध, चिकणा, पिवळें गवत, चंदन, चांफा, निळें कमळ, हीं प्रत्येक २४ तोळे आणि या सर्व औषधांचे चौपट पाणी घेऊन त्यांत शिजवावीं. चतुर्थांश शेष पाणी राहिलें ह्मणजे, त्यांत रेणुकबीज, पद्मकाष्ठ, आस्कंद, वेत, आठोना, कोष्ठ, देवदार, नखला, दालचिनी, बडिशेप, कमळ, जटामांसी, ज्येष्ठीमध, हीं औषधें प्रत्येक तोळा घेऊन पूर्वींच्या काढ्यांत वाटून त्यांत घालावीं; नंतर दह्यांचा मंड, सूक्त, कांजी, दूध हीं प्रत्येक २५६ तोळे प्रमाणें त्यांत घालोन मग ६४ तोळे तेल व २५६ तोळे दूध घालावें; आणि पचन करावें. तेल शिलक राहिलें ह्मणजे सिद्ध झालें. याच्या अभ्यंगानें दाह, वायु, कफ, सर्वज्वर, यांचा नाश होतो, व ग्रह, राक्षस, यांच्या पीडेने पीडित जीं बाळकें त्यांची पीडा शांत करितें.

## निरूहबस्तिद्रव्यमानें.

एकादशाष्टौषट्कंचकषायस्यपलंमतं ॥ कफपित्तानिलोत्थेषुत्रिकारेपुय थाक्रमं ॥ स्नेहस्यत्रिचतुःषट्यश्चत्वारोमधुनस्तथा ॥ पलद्वयंतुकल्कस्य कर्षःस्यात्सैंधवस्यच ॥ रसक्षीराम्लमत्स्यानामेकैकंप्रक्षिपेत्पलं ॥ निरूह कल्पनामात्राकथितेपामहर्षिणा ॥

अर्थ—निरूहबस्तिविषयीं काढा घेणें तर कफावर अक्रा तोळे, पित्तावर आठ तोळे, वातावर आठ तोळे, या प्रमाणें घ्यावा; आणि मध व स्नेह घेणें तर, कफ, वात व पित्त यांवर क्रमानें चार, साहा, आणि चार. पळें घ्यावें; आणि कल्क दोन पळें, सैंधव एक तोळा. आणि मांसरस, दूध, आम्ल, मत्स्य, घालणें तर, चार चार तोळे घालावीं. हीं निरूहमध्य द्रव्यें टाकण्याचीं मानें महर्षीनीं सांगीतलीं आहेत.

## चतुर्थ लाक्षादितैल.

लाक्षारससमंतैलंतैलान्मस्तुचतुर्गुणं ॥ अश्वगंधानिशादारुकौंतीकुष्ठा

ब्दचंदनैः ॥ समूर्वारोहिणीरास्नाक्षताव्हामधुकैःसमैः ॥ सिद्धंलाक्षादि कनामतैलमभ्यंजनादिना ॥ सर्वज्वरक्षयोन्मादश्वासापस्मारवातनुत् ॥ यक्षराक्षसभूतघ्नंगर्भिणीनांचशस्यते ॥

अर्थ–लाखेचा काढा व त्याचे बरोबर तिळांचे तेल, आणि त्याचे चौपट दह्यांचा मंड, आणि आस्कंद, देवदार, रेणुकाबीज, कोष्ठ, नागरमोथा, चंदन, मोरवेल, कटुकी, रास्ना, शतावरी, व ज्येष्ठीमध, हीं औषधें समभाग घालोन तेल सिद्ध करावें. तें लाक्षादि तेल. अभ्यंग व प्राशन केल्यानें सर्वज्वर, क्षय, उन्माद, श्वास, अपस्मार, वात, क्षय, राक्षसबाधा व भूतबाधा यांचा नाश करितें. हें गर्भिणीस ही प्रशस्त आहे.

## घृतें व तैलें पक्क झाल्याची परीक्षा.

शब्दव्युपरमेप्राप्तेफेनव्युपरमेतथा ॥ गंधवर्णरसादीनांसम्यक्त्वेसिद्धमादिशेत् ॥ फेनातिमात्रंतैलस्यशब्दंघृतवदादिशेत् ॥

अर्थ–घृतसिद्धिचे वेळेला कडकडशब्द बंद जाला- ह्मणजे, आणि तैल सिद्धीसमयीं फेण नाहींसा झाला असतां, व गंधक, वर्ण व रस यांना शुद्धपणा आला ह्मणजे घृतें व तैलें चांगलीं सिद्ध झालीं असें समजावें.

## औषधें किती दिवस उपयोगीं पडतात.

पक्वैतैलोद्भवेवीर्यंहीनमब्दार्धतःपरं ॥ घृताच्चाब्दात्पुरावृध्यागुडादेस्त्वब्दतःपरं ॥ गुणहीनंभवेद्वर्षादूर्ध्वतोन्यूनमौषधं ॥ मासद्वयात्तथाचूर्णंहीनवीर्यंप्रजायते ॥ हीनत्वंगुटिकालेहाद्यब्दात्तेवत्सरात्परं ॥ हीनाःस्युर्घृततैलाद्याश्चातुर्मासाधिकास्तथा ॥

अर्थ–सिद्ध झालेलें तैल एक वर्षानंतर हीनवीर्य होतें, तसेच घृत एकवर्ष पर्यंत चागला गूण करितें; आणि गुळादिक वर्षाउपरांत गूण करितात. सामान्य काष्ठौषधी एक वर्षानंतर हीनवीर्य होतें, दोन महिन्यानीं चूर्ण हीनवीर्य होतें, व गुटिका, आणि लेह. दोन वर्षांनीं हीनवीर्य होतात; आणि घृतें, व तैलें आदिकरून द्रव्यें चार महिन्यानंतर हीनवीर्य होतात;

## दुसरा महाज्वरांकुश.

शुद्धसूतोविषंगंधःप्रत्येकंशाणसंमिताः ॥ धूर्तबीजंत्रिशाणंस्यात्सर्वेभ्योद्विगुणाभवेत् ॥ हेमाव्हाकारयेदेषांसूक्ष्मचूर्णंप्रयत्नतः देयंजंबीरमज्जाभिश्चूर्णंगुंजाद्वयोन्मितं ॥ आर्द्रकस्वरसैर्वापि ज्वरंहंतित्रिदोषजं ॥ ऐकाहिकंद्व्याहिकंवात्र्याहिकंवाचतुर्थकं ॥ विषमंचज्वरंहन्याद्विख्यातोयंज्वरांकुशः ॥

अर्थ—शुद्धपारा तीन मासे, शुद्ध केलेला बचनाग तीन मासे, गंधक तीन मासे, धोतऱ्याचें बीज नऊ मासे, चोक ह्मणजे पिसोळ्याचें मूळ, अथवा कांटे धोतऱ्याचें मूळ हें सर्वांचे दुप्पट घेऊन साऱ्यांचें एकाजागीं चांगलें बारीक चूर्ण करून जंबीराचे रसांत अथवा आल्याचे रसांत दोन गुंजा प्रमाण घ्यावें. तेणेंकरून त्रिदोषापासून जो ज्वर येतो तो दूर होतो, व दिवसारात्री दोन वेळां येतो तो, व एकादिवसा आड येतो तो, व चवथ्यारोजीं येतो तो, हे सारे ज्वर दूर होतात. व हा ज्वरांकुश विषमज्वर दूर करण्याविषयीं विख्यात आहे, असें जाणावें.

## ज्वरघ्नी वटिका.

एकोभागोरसाच्छुल्वाच्छैलेयःपिप्पलीशिवा ॥ आकारकरभोगंधःकटुतैलेनशोधितः ॥ फलानिचेंद्रवारुण्याश्चतुर्भागमिताअमी ॥ एकत्रमर्दयेच्चूर्णमिंद्रवारुणिकारसैः ॥ माषोन्मितांवटींकृत्वादद्यात्सद्योज्वरेबुधः ॥ छिन्नारसानुपानेन ज्वरघ्नीवटिकामता ॥

अर्थ—शुद्ध पारा एक भाग, आणि शिलाजित, पिंपळी, हरीतकी, अक्कलकरा, शिरसांचे तेलांत शुद्ध केलेला गंधक व कंवडळें हीं प्रत्येक चार भाग प्रमाणें घेऊन कंवडळीचे रसांत सर्वांचा खल करून एक मासा प्रमाणाची गोळी करून नवीनज्वरावर द्यावी. ह्याला अनुपान गुळवेलीच्या रसाचें. हिला ज्वरघ्नी वटिका असें ह्मणतात.

## दुसराज्वरमुरारि.

त्रिःसप्तजंभजलभावितखर्परस्यचूर्णंनिशोत्थनवनीतविमर्दितंस्यात् ॥
वल्लद्वयंहरतिशर्करयानुपानंसद्योज्वरंज्वरमुराररिसश्चपुंसां ॥

अर्थ—कलखापरीचे चूर्णाला लिंबाच्या रसाच्या २१ भावना द्याव्या; नंतर त्याचा ताजा लोण्यांत खल करावा. याची मात्रा दोन वाल साकरेशी द्यावी; ह्मणजे ती सद्यः ज्वराचा नाश करिते. याचें नाव ज्वरमुरारि.

## स्वर्णमालिनीवसंत.

स्वर्णमुक्तादरदमरिचंभागवृध्याप्रदेयंखर्परंस्यष्टौप्रथमनवनीतेन निंब्वंबुनाच ॥ यावत्स्नेहोव्रजतिविलयंमर्दयेद्दीयतेसौगुंजा द्वंद्वंमधुचपलयासर्वरोगेवसंतः ॥

अर्थ—सुवर्ण एक भाग, मोतीं दोन भाग, मिरीं तीन भाग व कलखापरी आठ भाग, हीं चूर्णें एकत्र करून लोण्यामध्ये खलावीं; आणि निंबाचें रसांत जों पर्यंत लो-

णी नाहींसें होई तो पर्यंत खलावी. हा दोन गुंजा मध व पिंपळीचे चूर्ण यांशीं द्यावा. हा सर्वरोगांवर चालतो. याचें नाव स्वर्णमालिनीवसंत.

## लघुमालिनिविसंत.

रसकयुगुलभागंवह्निजंभागमेकंद्वितयमथसुखल्वेमर्दयेन्मसृणेन ॥ भवतिघृतविमुक्तोनिंबुनीरेणयावज्ज्वरहरमधुकुल्योमालिनीप्राग्वसंतः ॥ जीर्णज्वरेधातुगतेअतिसारेरक्तान्वितेरक्तभवेविकारे ॥ घोरव्यथेपित्तभवेचदोषेवल्लद्वयंदुग्धयुतंचपथ्यं ॥ प्रदरंनाशयत्याशुतथादुर्नामशोणितं ॥ विषमंनेत्ररोगंचगजेंद्रमिवकेसरी ॥ वसंतोमालिनीपूर्वःसर्वरोगहरःशिशोः ॥ गर्भिण्यैतच्चदेयंचजयंत्यापुष्पकैर्युतं ॥ सर्वज्वरहरंश्रेष्ठंगर्भपालनमुत्तमं ॥

अर्थ—कलखापरी दोन भाग व मिरीं एक भाग एकत्र करून लोण्यांत खल करावा; नंतर निंबाचे रसाच्या भावना लोणी नाहींसें होई पर्यंत द्याव्या; आणि मध व पिंपळी यांशीं ज्वरावर दोन वाल द्यावा. याला मालिनीवसंत ह्मणतात. हा जीर्णज्वर, धातुगतज्वर, अतिसार, रक्तातिसार, रक्तापासून झालेले विकार, महान् पित्तविकार, प्रदर, अर्शसंबंधि रक्त, विषमज्वर व नेत्ररोग, यांवर द्यावा. हा हत्तीला सिंहासारिखा सर्व रोगनाशक आहे. व जयंतीपुष्पाशीं गर्भिणीला द्यावा, ह्मणजे संपूर्णज्वरनाश करून उत्तम गर्भाचे पालन करितो. याला पथ्याला दूधभात द्यावा.

## दार्व्यादिवटिका.

दारुनिशाशिखिग्रीवारसकंचपृथक्पृथक् ॥ टंकत्रयानुमानेन गृहीत्वाकनकद्रवैः ॥ मर्द्दयेत्त्रिदिनंकार्यावटीचणकमात्रया ॥ मरीचैरेकविंशत्यासप्तभिस्तुलसीदलैः ॥ खादेद्वटीद्वयंपथ्यं दुग्धभक्तंसशर्करं ॥ तरुणंविषमंजीर्णंहन्यात्सर्वंज्वरंध्रुवं ॥

अथ—दारुहळद ३ तोळे, मोरचूत ३ तोळे, कलखापरी ३ तोळे या प्रमाणें घेऊन धोत्र्याचे रसांत तीन दिवस खलून हरभऱ्याप्रमाणे गोळ्या कराव्या. त्या एकूणीस मिरें व सात तुळशीचीं पानें यांबरोबर दोन गोळ्या खाव्या, आणि दूधभात, साखर, हें पथ्यास द्यावें, ह्मणजे तरुणज्वर, विषमज्वर व जीर्णज्वर इत्यादि सर्वज्वरांचा नाश करील.

## हुताशनरस.

नागरंकर्षमात्रंस्यात्कर्षमात्रंचटंकणं ॥ मरिचंसार्धकर्षंस्यात्तावद्दग्धवराटकं ॥ विषंकर्षचतुर्थांशंसर्वमेकत्रचूर्णयेत् ॥ रसोहुताशनोनाम्नाखाद्योगुंजामितोज्वरे ॥

अर्थ--सुंठ तोळा, टांकणखार तोळा, मिरें तोळा, कवडीचें भस्म तोळा, बचनाग पावतोळा त्या सर्वांचें एकत्र चूर्ण करावें. ह्याला हुताशनरस ह्मणतात. हा गुंजभर द्यावा. हा ज्वरनाशक आहे.

## दुसरा लघुमालिनीवसंत.

खर्परंमानुपेमूत्रेस्थितंघस्रेत्रिसप्तकं ॥ निस्त्वक्कृतदर्धमरिचंन वनीतेनमर्दयेत् ॥ शतधाभावयेन्निंबुरसैःस्याद्रसकेश्वरः ॥ पिप्पलीमधुयुग्दत्तःससितोवास्यभेषजं ॥ ज्वरंधातुगतंपित्तंभ्रमंपित्तास्रजान्गदान् ॥ रक्तातिसारंग्रहणीदुर्नामास्रंनिवारयेत् ॥ अनम्लंदधिवादुग्धंपथ्यंचास्मिन्प्रयोजयेत् ॥

अर्थ– कलखापरी मनुष्याचे मुतांत २१ दिवस भिजत घालोन तीचे चूर्ण व त्याच्या निमे साली वांचून मिऱ्यांचें चूर्ण, एकत्र करून लोण्यामध्ये खल करावा; आणि लिंबाच्या रसाच्या १०० भावना द्याव्या, ह्मणजे तयार झाला. हा रसकेश्वर पिंपळी, मध, आणि साकर, यांशीं द्यावा, ह्मणजे धातुगतज्वर, पित्त, भ्रम, रक्तपित्त, रक्तातीसार, ग्रहणी, अर्शविकारज रक्त, यांचा नाश करील. यावर आदुरें; किंवा दूध पथ्याला द्यावें.

## अपूर्व मालिनीवसंत.

वैक्रांतमभ्रंरवितार्प्यरौप्यंवंगंप्रवालंरसभस्मलोहं ॥ सुटंकणंकंबुकभस्मसर्वंसमांशकंपाच्यवरीहरिद्रा ॥ द्रव्यैर्विभाव्यंमुनिसंख्ययाचमृगांकजाशीतकरेणपश्चात् ॥ वल्लप्रमाणोमधुपिप्पलीभिर्जीर्णज्वरेधातुगतेनियोज्यः॥ गुडूचिकासत्वसितायुतश्चसर्वप्रमेहेषुनियोजनीयः॥ कृच्छ्राश्मरींनिहंत्याशुमातुलुंगंघ्रिजेर्द्रवैः ॥ रसोवसंतनामायमपूर्वोमालिनीपदः ॥

अर्थ–तोरमलीचें भस्म, अभ्रक भस्म, ताम्र, सुवर्ण, माक्षिक, रुपें, वंग, प्रवाळ, पारा, लोह यांचीं भस्में टांकणखार, शंखभस्म हीं समभाग घेऊन शतावरी आणि हळद यांची भावना सातवेळ द्यावी; आणि चांदण्यांत ठेवावा. तो मध व पिंपळी यांशीं एकवाल द्यावा. हा जीर्णज्वर, धातुगतज्वर, यांवर द्यावा; आणि गुडूचीसत्वाशीं सर्व प्रमेहांवर द्यावा, व माहाळुंगाचे पाळांचे रसाशीं अश्मरीचा नाश करितो, ह्याला अपूर्व मालिनी वसंत ह्मणतात.

## दुसरा लघुमालिनीवसंत.

नरांबुमध्येरसकस्यचूर्णंदिनानिसप्तत्रिगुणानिपूर्वं ॥ धृत्वातपेशोपित मेतदेवनृवारिजीर्णंभवतीतिभावत् ॥ पलप्रमाणंमरिचंचनिस्तुपंप लद्वयंस्याद्रसकस्यतस्य ॥ एकत्रसंचूर्णकृतंतदेवपलार्धकंगोनवनीत कंच ॥ निंबूत्थतोयेनविमर्दनीयंशतैकमानंभिपजावरिष्ठं ॥ वल्लद्वयं चास्यकणामधुभ्यांप्रदापयेद्व्याधिगजस्यकेसरी ॥ नाम्नाप्रसिद्धोर सराजएषःसद्योग्रहणामतिसारकेच ॥ ज्वरेक्षयेर्शस्सुतथैवतापेशूले ग्निमांद्येनिलजेविकारे ॥ प्रदरंनाशयत्याशुतथादुर्नामशोणितं ॥ वि षमंनेत्ररोगंचगजेंद्रमिवकेसरी ॥

अर्थ—घोडयाच्या मुतांत कलखापरीचें चूर्ण २१ दिवस घालोन ठेवावें; आणि उन्हांत ठेऊन सुकवावें. त्याचें चूर्ण ८ तोळे आणि त्यांत चार तोळे मिऱ्यांचें चूर्ण, आणि ८ तोळे हिंगूळ, या सर्वांचें एकत्र चूर्ण करून त्यांत दोन तोळे गाईचें लोणी घालोन खला. वें; नंतर १०० निंबांच्या रसांत खल करावा. याची मात्रा चार गुंजा मध आणि पिंपळी. यांशीं द्यावी. हा व्याधिगजकेसरीरस संग्रहणी, अतिसार, ज्वर, क्षय,अर्श, ताप, शूल, अ- ग्निमांद्य, वातविकार, आणि प्रदर, यांचा नाश करितो. तसेच अर्शसंबंधीं रक्त, विषमज्वर, नेत्ररोग,यांवर द्यावा. हा हत्तीवर सिंव्हासारिखा आहे.

## लघुसूचिकाभरणरस सन्निपातावर.

विपंपलमितंसूतःशाणिकंचूर्णयेद्द्वयं ॥ तच्चूर्णंसंपुटेक्षिप्त्वाकाचालि प्तशरावयोः ॥ मुद्रांदत्वाचसंशोष्यततश्चूल्यांनिवेशयेत् ॥ वन्हिश नःशनैःकुर्यात्प्रहरद्वयसंख्यया ॥ ततउद्धाटयन्मुद्रामुपरिस्थांशरा वकात् ॥ संलग्नोयोभवेत्सूतस्तंगृण्हीयाच्छनैःशनैः ॥ वायुस्पर्शोय थानस्यात्तथाकुप्यांनिवेशयेत् ॥ यावत्सूच्यामुखेलग्नःकूप्यानिर्याति भेपजं ॥ तावन्मात्रोरसोदेयोमूर्छितेसन्निपातिनि ॥ क्षरेणप्रास्थितेमू र्ध्नितत्रांगुल्याचघर्षयेत् ॥ रक्तभेपजसंपर्कान्मूर्छितोपिहिजीवति ॥ तथै वसर्पदंष्ट्रस्तुमृतावस्थोपिजीवति ॥ यदातापोभवेत्तस्यमधुरंतत्रदीयते ॥

अर्थ—बचनाग एकपळ व शुद्धकेलेला पारा तीनमासे, घेऊन दोहोंचा एकाजागीं खल करून चूर्ण करावें; नंतर मातीचे प्याल्यांस कांच वाटून लेप करून सिद्ध केलेले असे कांचचे मोठे मोठे दोन प्याले आणून त्या एकांत ते चूर्ण घालून कापडमाती

करून वाळल्यावर चुलीवर ठेऊन हलका हलका अग्नि दोनप्रहर पर्यंत देऊन नंतर खालीं उतरून त्या पेल्यांची मुद्रा काढून वरचे पेल्यांत पारा लागून राहिला तो हलक्या हातानें युक्तीनें वारा नलागतां काढून कुपींत भरून ठेवावा; नंतर कुपींत सुयी घालून जितका सुईचे अग्राला पारा येईल तितका बाहेर काढून ज्या मनुष्याला सन्निपात होऊ. न मूर्छा येते. त्या मनुष्याचे मस्तकाचे ठायीं टाळूचे जाग्यावर वस्तऱ्यानीं चांगले केश काढून त्या जाग्यावर फासण्या द्याव्या. तें औषध त्या जाग्यावर लावून बोटानीं जों पर्यंत औषध रक्ताला मिळे तों पर्यंत चोळावें. मग रक्ताचा व औषधाचा संबंध जाहाल्यावर मनुष्याची मूर्छा दूर होऊन सावध होतो. तसाच मनुष्याला सर्प चाऊन मूर्छा येऊन मरणावस्थेप्रत जातो. तोच मनुष्य या उपायें करून वांचतो, व या उपायेंकरून शरीरांत दाह विशेष होऊं लागला असतां, गुलकंद, डाळिंब व द्राक्षें इत्यादिक मधुर पदार्थ भक्षणास द्यावे. तेणेंकरून दाह शांत होतो.

## जलचूडामणिरस.

भस्मसूतसमंगंधंगंधात्पादंमनःशिला ॥ माक्षिकंपिप्पलीव्योषंप्रत्येकंशिलयासमं ॥ चूर्णयेद्भावयेत्पित्तैर्मत्स्यमायूरसंभवैः ॥ सप्तधाभावयेच्छुष्कंदेयंगुंजाद्वयेहितं ॥ तालपर्णीरसश्चानुपंचकोलशृतेनवा ॥ जलचूडोरसोनामसन्निपातंनियच्छति ॥ जलयोगश्चकर्तव्यस्तेनवीर्यंभवेद्रसे ॥

अर्थ—पाऱ्याचें भस्म एक भाग, गंधक एक भाग, गंधकाचे चवथा हिस्सा मनशीळ, सोनामुखीचें भस्म, पिंपळी, सुंठ, मिऱ्यें, सर्व पांच औषधें मनशीळाचे समभाग घेऊन साऱ्यांचे चूर्ण करून खलांत घालून माशाचे काळजांत पित्त असतें, त्याची सात पुटें द्यावीं; नंतर मोराचे काळजांत पित्त असतें त्याची पुटें सात देऊन वाळवावें. याला जलचूडामणिरस असें ह्मणतात. हा जलचूडामणि दोन गुंजाप्रमाण मुसळीचे रसांत अथवा पंचकोलाचे काढ्यांत द्यावा, व रोग्याचे जवळ थंड पाण्याचा योग करावा. तेणेंकरून रसायनाला वीर्य येऊन सन्निपात दूर होतो.

## कनकसुंदररस सन्निपातादिकांवर.

कनकस्याष्टशाणाःस्युःसूतोद्वादशभिर्मितः ॥ गंधोपिद्वादशप्रोक्तस्ताम्रंशाणद्वयोन्मितं ॥ अभ्रकस्यचतुःशाणंमाक्षिकंचद्विशाणिकं ॥ वंगोद्विशाणःसौवीरंत्रिशाणंलोहमष्टकं ॥ विषंत्रिशाणिकंकुर्याल्लांगलीपलसंमिता ॥ मर्दयेद्दिनमेकंचरसैरम्लफलोद्भवैः ॥ दद्यान्म

दुपुटेवन्हौततःसूक्ष्मंविचूर्णयेत् ॥ माषमात्रोरसोदेयःसन्निपातेसुदारु
णे ॥ आर्द्रकस्वरसेनैवरसोनस्यरसेनवा ॥ किलासंसर्वकुष्ठानिविस
र्पंचभगंदरं ॥ ज्वरंगरमजीर्णंचजयेद्रोगहरोरसः ॥

**अर्थ**–धोतऱ्याचें बीज आठ शाण, पारा बारा शाण व गंधक बारा शाण, ताम्रभस्म दोन शाण, अभ्रकभस्म चार शाण, स्वर्णमाक्षिकभस्म दोन शाण, वंगभस्म दोन शाण, सुरमा शुद्ध करून तीन शाण, लोहभस्म आठ शाण, शुद्ध बचनाग तीन शाण व कळलावीच्या मुळ्या एक पळप्रमाण घेऊन सारीं बारीक करून खलांत घालोन निंबूचें रसांत एक दिवस पर्यंत खलोन मातीचे शरावसंपुटांत घालोन कापडमाती करून रानगोंवऱ्यांचा हलका अग्नि द्यावा. थंड झाल्यावर बाहेर काढून बारीक करून ठेवावा, याला कनकसुंदर रस असें ह्मणतात. हा रस एक मासा प्रमाण आल्याचे रसांत अथवा लसुणीचे रसांत घालोन ध्यावा. तेणेंकरून मोटा दुर्घट सन्निपात दूर होतो, व किलास कुष्ठ व दुसरीं सारीं कुष्टें, विसर्प, भगंदर, ज्वर, विषदोष व अजीर्ण हे रोग दूर होतात.

## सन्निपातभैरवरस.

रसोगंधस्त्रिस्त्रिकर्षौकुर्यात्कज्जलिकाद्वयोः ॥ ताराभ्रताम्रवंगाहिसा
राश्चैकैककार्षिकाः ॥ शिग्रुज्वालामुखीशुंठीबिल्वेभ्यस्तंदुलीयकान् ॥
प्रत्येकंस्वरसैःकुर्याद्यामैकैकंविमर्दयेत् ॥ कृत्वागोलंवृतंवस्त्रेलवणा
पुरितेन्यसेत् ॥ काचभांडेततःस्थाल्यांकाचकूपींनिवेशयेत् ॥ वालु
काभिःप्रपूर्याथवन्हिर्यामद्वयंभवेत् ॥ ततउत्धृत्यतंगोलंचूर्णयित्वावि
मिश्रयेत् ॥ प्रवालचूर्णकर्षेणशाणमात्रविषेणच ॥ कृष्णसर्पस्यगरले
दिवसंभावयेत्तथा ॥ तगरंमुसलीमांसीहेमाव्हावेतसःकणा ॥ नीलिनी
पत्रकंचैलाचित्रकश्चकुठेरकः ॥ शतपुष्पादेवदालीधत्तूरागस्त्यमुंडिका ॥
मधूकजातिमदनरसैरेषांविमर्दयेत् ॥ प्रत्येकमेकवेलंचततःसंशोष्यधा
रयेत् ॥ बीजपूरार्द्रकद्रावैर्मरिचैःषोडशोन्मितैः ॥ रसोद्विगुंजाप्रमि
तःसन्निपातस्यदीयते ॥ प्रसिद्धोयंरसोनाम्नासान्निपातस्यभैरवः ॥

**अर्थ**–शुद्ध पारा तीन कर्ष व गंधक तीन कर्ष घेऊन दोहोंचा एकाजागीं खल करून कज्जली करावी; नंतर रुप्याचें भस्म, अभ्रकभस्म, ताम्रभस्म, वंगभस्म, नागभस्म व लोहभस्म हीं साहा भस्में एकेक कर्ष कर्ष प्रमाण घेऊन त्या पाऱ्यागंधकाचे कज्जलींत घालोन मेळवावीं. मग शेवग्याचे सालीचे रसांत खल एक प्रहर करावा; नंतर भारजां-बळीचे रसांत व सुंठीचे काढ्यांत व बेलफळाचे रसांत व तांदुळज्याचे रसांत एके-

काचा वेगळा वेगळा खल एकेक प्रहर करून त्याचा गोळा करून त्याचे भोंवतें फडकें गुंडाळून तो गोळा कांचेचे प्याल्यांत ठेऊन त्याजवर दुसरा प्याला उपडा घालोन कापडमाती करून मातीचे मडक्यांत मीठ अर्धें खालीं व अर्धें वरतीं मध्यें तो कांचेचा संपुट ठेऊन तें मडकें चुलीवर चढवून खाली जाळ दोन प्रहर पर्यंत करावा. मग तें थंड झाल्यावर बाहेर काढून त्या गोळयाचें चूर्ण करून त्यांत पोंवळयाचें चूर्ण एक कर्ष व शोधलेला बचनाग एकशाणप्रमाण घालून कृष्णसर्पाची गरळ आणून त्या रसायनांत घालून एक दिवस पर्यंत खल करून नंतर तें रसायन कांचेचें कुपींत घालोन कुपीला कापडमाती करून तोंडाला मातीची गुडदी बसवून ती कुपी वालुकायंत्रांत घालोन चुलीवर ठेऊन दोनप्रहर पर्यंत फिरून अग्नि द्यावा. थंड झाल्यावर त्या कुपींतून औषध बाहेर काढून खलांत घालोन त्याला दुसरें औषधांची पुटें द्यावयाची तीं औषधें येणेंप्रमाणें. तगर, मुसळी, जटामांसी, चोकपरळ, पिंपळी, नीलपुष्पी, तमालपत्र, विलायची, चित्रक, रानतुळस, बडीशोफ, देवडंगरी, धोत्रा, अगस्ता, मुंडी, मोहा, जाई व मेणफळ, या एकुणीस औषधांचे आंगरस वेगळे वेगळे काढून त्यांतून प्रथम त्या रसायनांत एका औषधाचा रस घालोन खल करून वाळल्यावर दुसऱ्या औषधाचा रस घालोन खल करावा. याप्रमाणे साऱ्या औषधाचा वेगळा वेगळा खल करावा. ज्या औषधाचा रस निघत नाहीं त्यांचा काढा करून त्या रसायनांत घालोन खल करून वाळल्यावर त्याच्या गोळ्या बांधून ठेवाव्या. याला सन्निपातभैरवरस असे ह्मणतात. हा रस दोनगुंजाप्रमाण महाळुंगीचे फळाचा व आल्याचा रस हे दोन्हीं एकाजागीं करून त्यांत सोळा मिऱ्यांचें चूर्ण घालोन ज्याला सन्निपात होतो त्याला द्यावा. तेणेंकरून सन्निपात दूर होतो. हा सन्निपातभैरवरस प्रसिद्ध आहे.

## रसपर्पटी.

जयापत्ररसेनापिवर्धमानरसेनच ॥ भृंगराजरसेनापिकाकमाच्यारसेनच ॥ रसंसंशोध्ययत्नेनतत्समंशोधयेद्बलिं ॥ भृंगराजरसैःपिष्ट्वाशोषयेदर्करश्मिभिः ॥ सप्तधावात्रिधावापिपश्चाच्चूर्णंचकारयेत् ॥ चूर्णयित्वासमंतेनरसेनसहमर्दयेत् ॥ नष्टसूतंयदाचूर्णंभवेत्कज्जलसन्निभं ॥ निर्धूतेबदरांगारेद्रवीकुर्यात्प्रयत्नतः ॥ तत्रतन्माहिषीविष्ठास्थापितेकदलीदले ॥ निक्षिप्यतदुपर्यन्यपत्रंदत्वाप्रपीडयेत् ॥ शीतलत्वंगतेपत्रात्समुत्धृत्यविचूर्णयेत् ॥ एवंसिद्धाभवेद्व्याधिघातिनीरसपर्पटी ॥ ज्वरादिव्याधिभिव्योप्तंविश्वंदृष्ट्वापुराहरः ॥ चकारकृपया

१ लज्जासारखा ओहोळाचे कडेला होतो, त्याचा देंठ तांबडा असून पान लांबट असतें.

युक्तःसुधावद्रसपर्पटीं ॥ रक्तिकासंमितांतावद्भ्रष्टजीरकसंयुतां ॥ गुंजार्धभ्रष्टहिंग्वाढ्यांभक्षयेद्रसपर्पटीं ॥ रोगानुरूपभैषज्यैरपितांभक्षयेद्बुधः ॥ पिबेत्तदनुपानीयंशीतलंचुलकत्रयं ॥ प्रत्यहंवर्धयेत्तस्याएकैकांरक्तिकांभिषक् ॥ नाधिकांदशगुंजातोभक्षयेत्तांकदाचन ॥ एकादशदिनारंभात्तांतथैवापकर्षयेत् ॥ एवमेतांसमश्नीयान्नरोविंशतिवासरान् ॥ शिवंगुरुंतथाविप्रान्पूजयित्वाप्रणम्यच ॥ श्रद्धयाभक्षयेदेतांक्षीरमांसरसाशनः ॥ ज्वरंचग्रहणींचापितथातीसारएवच ॥ कामलांपांडुरोगंचशूलप्लीहजलोदरं ॥ एवमादीन्गदाहत्वात्दृष्टःपुष्टश्चवीर्यवान् ॥ जीवेद्वर्षशतंसाग्रंवलीपलितवर्जितः ॥

अर्थ–टाकळीचा पाला, एरंडाचा पाला, माका व कावळी यांचे रसांत पारा शोधावा; आणि तसाच गंधक माक्याचा रसांत वाटून उन्हांत सुकवावा. याप्रमाणें सात वेळ किंवा तीन वेळ शोधून नंतर तो पारा व गंधक यांची कज्जली करावी. ती निर्धूम बोरीचे निखाऱ्यांवर पातळ करून गोमयमंडळांत केळीचें पान ठेऊन त्यावरती ओतून नंतर दुसरें पानावर घालोन वर शेण दाबावें; आणि थंड जाहाल्यावर काढून घ्यावी. ही रसपर्पटी पूर्वीं शिवानीं ज्वरव्याप्त जग पाहून कृपेनें उत्पन्न केली, ही एक गुंज भर्जित जिरें आणि अर्धी गुंज भाजलेला हिंग घालोन द्यावी. अथवा रोगोक्त अनुपानाशीं द्यावी; आणि मागून तीन चुळकें थंड पाणी द्यावें, याप्रमाणें रोज येक येक गुंज चढवावी. ती दाहा गुंजा होत पर्यंत. मग कमी करीत एक गुंज पावेतों कमी करावी. याप्रमाणें वीस दिवस भक्षण करावी. ही देवांला नमस्कार करून श्रद्धापूर्वक भक्षण करून दूध व मांस, हीं पथ्यास खावीं, ह्मणजे ज्वर, ग्रहणी, अतिसार, कावीळ, पांडुरोग, शूल, प्लीहा व जळोदर इत्यादि रोगांचा नाश करून पुरुषांला हृष्ट, पुष्ट, वीर्यवान्, असा करील. ह्मातारपण आल्यावांचून शंभरवर्षें वांचेल.

## रविसुंदररस.

द्विभागतालेनहतंचताम्रंरसंचगंधंचसमानमाहुः ॥ विषंसमंचद्विगुणंचताम्रंत्रिःसप्तरात्रेणदिवाकरांशौ ॥ विमर्दयेदिष्टस्वरसेनचूर्णंगुंजैकदत्तंसितयासमेतं ॥ ज्वरांकुशोयंरविसुंदराख्यो ज्वरान्निहंत्यष्टविधान्समग्रान् ॥

अर्थ–दोन भाग हरताळ, घेऊन त्यांत एक भाग तांबें, घालोन मारलेलें ताम्र तें दोन भाग, पारा एक भाग, गंधक एक भाग व बचनाग एक भाग, याप्रमाणें घेऊन एकवीस

दिवस कडुलिंबाचे रसांत उन्हांत खल करावा; नंतर तें एक गुंज प्रमाणें साकरेबरोबर खावें. ह्याला रविसुंदर ज्वरांकुश ह्मणतात. हा रस अष्टविध सर्वज्वरांचा नाशक आहे.

## कज्जलीगुण.

शुद्धसूतंतथागंधंखल्वेतावद्विमर्दयेत् ॥ सूतोनदृश्यतेयावत्किंतु कज्जलवद्भवेत् ॥ एषाकज्जलिकाख्याताबृंहणीवीर्यवर्धिनी ॥ नानानुपानयोगेनसर्वव्याधिविनाशिनी ॥

**अर्थ**–शुद्ध पारा व शुद्ध गंधक खलांत एकत्र काजळासारिखे खलावे, याला कज्जली ह्मणतात. ही बृंहण, वीर्यवर्धक व नानाप्रकारचे अनुपानयोगानें सर्वरोगनाशकारणारी आहे.

## गदमुराररस.

रसबलिफणिलोहव्योमताम्रेणतुल्यान्यथरसदलभागोवत्सनागःप्रदिष्टः ॥ भवतिगदमुरारिश्चास्यगुंजार्द्रवाराक्षपयतिदिवसेनप्रौढमामज्वराख्यं ॥

**अर्थ**–पारा, गंधक, शिशाचें भस्म, लोहभस्म, अभ्रक व ताम्र, हीं समभाग आणि पाऱ्याचे निमे बचनाग या सर्वांचा खल एकत्र करून ठेवावा. हा गदमुरारि एक गुंज आल्याचे रसांत द्यावा, ह्मणजे तो तरुण आमज्वराचा एक दिवसांत नाश करितो.

## बालार्करस.

रंगहिंगूलजेपालवृध्यादंत्यंबुमर्दयेत् ॥ दिनार्धेनज्वरंहंतितमःसूर्योदयोयथा ॥

**अर्थ**–पारा, गंधक, हिंगूळ व जेपाळ हीं चार औषधें, दांतीचे मुळांचे काढयांत खलून दोन गुंजाभार वजनाच्या गोळ्या कराव्या. एक गोळी भक्षण केली ह्मणजे, जसा सूर्य उदयीं तमनाश करितो, तसा एक दिवसांत ज्वर नाश करील.

## ज्वरांकुश.

शुद्धसूतंविषंगंधंधूर्तबीजंत्रिभिःसमं ॥ चतुर्णांद्विगुणांव्योषचूर्णंगुंजाद्वयंहितं ॥ पक्कजंबीरकद्रावैर्युक्तार्द्रस्यद्रवैर्युतं ॥ महाज्वरांकुशोनामज्वराणामंतकोभवेत् ॥ ऐकाहिकंद्व्याहिकंवा त्र्याहिकंवाचतुर्थकं ॥ विषमंवात्रिदोषोत्थंनाशयेद्याममात्रतः ॥

**अर्थ**–पारा, गंधक व बचनाग, हीं तीन समभाग घेऊन, या तिहींबरोबर धोत्र्याचें बीज मिळवावें व या चहूंचे दुप्पट सुंठ, मिरीं व पिंपळी यांचे चूर्ण घ्यावें; आणि सर्व एकत्र करून लिंबाचे आणि आल्याचे रसांत खलावें. आणि दोन गुंजाप्रमाणें भक्षण करावें.

ह्मणजे येका प्रहरानें एकाहिक, द्वयाहिक, त्र्याहिक, चातुर्थिक, विषम व सन्निपातज्वर यांचा नाश करील. याला महाज्वरांकुश ह्मणतात, हा सर्व ज्वरांचा नाश करणार काळा सारिखा आहे.

## विश्वतापहरण.

सूतशुल्बत्रिवृताबलितिक्तादंतिबीजचपलाविषतिंदुः ॥ पथ्यासहविचूर्ण्यसमांशंहेमवारिसहितंदिनमेकं ॥ वल्लयुग्मगुटिकार्द्रकवारानाशयेदभिनवज्वरमाशु ॥ विश्वतापहरणोत्र चपथ्यंमुद्गयूपसहितंदिनमेकं ॥

अर्थ–पारा, ताम्रभस्म, तेड, गंधक, कुटकी, जेपाळ, पिंपळी, कुचला व हिरडा, हीं सर्व समांश घेऊन चूर्ण करावें; आणि धोत्र्याचे रसांत एक दिवस खलावें; नंतर दोनवाल वजनाची गोळी करावी. ती गोळी आल्याचे रसाबराबर भक्षिली तर नवीनज्वराचा नाश करील. याला विश्वतापहरण रस ह्मणतात. याला पथ्याला मुगांचें काट आणि भात द्यावा.

## सन्निपातभैरवरस.

सूतंगंधंलोहकिट्टंत्रिमर्धंसर्वैस्तुल्यंवत्सनागांनियुंज्यात् ॥ आर्द्रभृंगंबीजपूरंजयंतीनिर्गुंडीकाभृंगराजद्रवैश्च ॥ युक्त्यावैद्यो भावयित्वाविधेयाशाणार्धार्धंसन्निपातस्यनूनं ॥ शीतंवातंनिर्मलंस्नानपानंपथ्यंदुग्धंशर्कराभिर्युतंच ॥

अर्थ–पारा, गंधक व मंडूरभस्म हीं समभाग व तिहींबरावर बचनाग, आलें, माका, महाळुंग, भांग व निर्गुंडी, हीं घेऊन माक्याच्या रसांत खलून भावना द्याव्या; आणि एकमासा प्रमाणें गोळी भक्षण करावी, ह्मणजे सन्निपाताचा नाश करील. गारपाण्यानें स्नान करावें. वारा घ्यावा. थंड पाणी द्यावें. यास पथ्य दूधभात आणि साकर द्यावी.

## त्रिभुवनकीर्ति.

हिंगुलंचविषंव्योषंटंकणंमागधीशिफा ॥ संचूर्ण्यभावयेत्रेधा सुरसार्द्रकहेमभिः ॥ रसेभुवनकीर्तिःसगुंजैकार्द्रद्रवेणवै ॥ सर्वज्वरविनाशंचसन्निपातांस्त्रयोदश ॥

अर्थ–हिंगूळ, बचनाग, सुंठ, मिरीं, पिंपळी, टांकणखार व पिंपळमूळ, हीं सर्व औषधें बारीक करून त्याला तुळस, आलें, धोत्रा, यांच्या रसांत निरनिराळीं खलावीं. याला त्रिभुवनकीर्तिरस ह्मणतात. हा एकगुंजभार आल्याचे रसाबरोबर खावा, ह्मणजे सर्वज्वर, तेराप्रकारचे सन्निपात यांचा नाश करील.

## मृतप्राणदायी रस.

रसंगंधकंटंकणंवत्सनाभंसंमर्दयेद्धूर्तबीजेनयामं ॥ ततोवत्सनागेनहै मैश्वबीजिरसैर्भावयेच्चत्रिवारंत्रिवारं ॥ कटुत्र्यादिनापंचवारंततःस्याद यंसूतराजोमृतप्राणदायी ॥ ज्वरेसन्निपातेज्वरेनूतनेवामहाश्लेष्मरोगे चगुंजाप्रमाणं ॥ पयःपायसंदाधिकंतक्रभक्तंसितावानवज्वरेचार्द्रनीरैः ज्वरेचातिसारेघनद्रावयुक्तेग्रहण्यर्शसांक्षौद्रसंसीतयावा ॥ ज्वरेवायु नात्रेकटूवह्निपितप्रकंपेचबाहूकफेकांगवाते ॥ अपस्मारमुन्मादवा तंनिहंतिप्रयुक्तोसिताभिःपंचभिर्धूर्तबीजैः ॥

अर्थ–पारा, गंधक, टांकणखार, बचनाग व धोतऱ्याचे बीज हीं सर्व समभाग घेऊन धोतऱ्याचे बीजांचा काढा करून त्यांत व बचनागाचा काढा यांच्या तीन भावना द्याव्या. नंतर सुंठ, मिरें व पिंपळी ह्यांचे काढ्याच्या भावना पांचवार द्याव्या, ह्मणजे हा सूतराज मृतप्राणदायी रस होतो, हा सन्निपातज्वर, नूतनज्वर, मोठा कफरोग यांवर एकगुंज-प्रमाण आल्याचे रसांत द्यावा. पथ्य दूधभात, क्षिर, दहींभात, ताकभात द्यावें; आणि हा रस ज्वरातिसार, आमातिसार, संग्रहणी, मूळव्याध, यांचे ठाईं मध व साकर यांचे बरोबर द्यावा. व वातज्वर, प्रकंपवायु, बाहुकंप, एकांगवायु, यांचे ठाईं सुंठ, मिऱ्यें, पिंपळी व चित्रक यांचे बरोबर द्यावा; आणि अपस्मारवायु, उन्मादवायु, यांचे ठाईं साकर आणि पांच धोत्र्याचा बियांचे बरोबर द्यावा.

## ज्वरोपद्रव.

श्वासोमूर्छारुचिश्छर्दिस्तृष्णातीसारविड्ग्रहः ॥
हिक्काकासांगभेदश्चज्वरस्योपद्रवादश ॥

अर्थ–दमा, मूर्छा, अरुचि, वांति, तृष्णा, अतिसार, मलबद्धता, उचकी, खोकला, व आंगमोडे हे दाहा ज्वरांचे उपद्रव होतात.

## ज्वरोपद्रवाची चिकित्सा.

संजातोपद्रवोव्याधिस्त्याज्योनस्याच्चिकित्सकैः ॥ व्याधौशांतेप्रणश्यंतिसद्यःसर्वेप्युपद्रवाः ॥ अतोव्याधिजयेद्यत्नात्पूर्वंप श्चादुपद्रवं ॥ भिषग्यःकुशलःसोत्रजयेत्पूर्वमुपद्रवं॥ तेष्वपि प्रचुरेषुप्राङ्नाशयेदाशुकारिणं ॥ मूलव्याधिंजयेत्पूर्वंजेयोयो वाभवेद्बली ॥ अविरोधेनवाकुर्यादुभयोरपिचक्रियां ॥

अर्थ–वैद्यानीं उपद्रवसहित ज्वरव्याधि टाकूं नये. व्याधि शांत झाल्यावर संपूर्ण उपद्रव लागलेच शांत होतात. याकरितां यत्न करून पूर्वी व्याधि जिंकावा. मग उपद्रवांची चिकित्सा करावी, व कुशल वैद्यानें पूर्वी ही उपद्रवाना जिंकावें. त्यामध्यें जो शीघ्रकारी उपद्रव असेल त्याला पहिल्यानेंच शांत केलें पाहिजे. वैद्यानें प्रथमतः मूळ व्याधि जिंकावा. किंवा त्यामध्यें जो बलवत्तर उपद्रव असेल, त्याला प्रथम जिंकावें. किंवा दोघांची अविरोधानें चिकित्सा करावी.

## सिंह्यादिकषाय.

सिंहीव्याघ्रीताम्रमूलीपटोलीशृंगीभार्गीपुष्कररोहिणीच ॥
साकंशठयाशिलमल्याश्चबीजंश्वासंहन्यात्सन्निपातेदशांगः॥

अर्थ–रिंगणी, डोरली, धमासा, कडुपडवळ, कांकडशिंगी, भारंगमूळ, पुष्करमूळ, कुटकी, कचोरा, कैरया, हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे, ह्या दाहा औषधांचा काढा सन्निपातोत्पन्नश्वासाचा नाश करितो.

## द्वात्रिंशांगकाढा.

भार्गीनिंबघनाभयामृतलताभूनिंबवासाविषात्रायंतीकटुकाव
चात्रिकटुकस्योनाकशक्रद्रुमैः ॥ रास्नायासपटोलपाटलिश
ठीदार्वीविशालात्रिवृत्ब्राह्मीपुष्करसिंहिकाद्वयनिशाधात्र्या
क्षदेवद्रुमैः ॥ क्काथोयंखलुसन्निपातनिवहान्द्वात्रिंशता
त्पानतोदुर्धर्षान्निजतेजसाविजयतेसर्पान्गरुत्मानिव ॥ किं
चश्वासबलासकासगदहृद्रोगहिक्कामरुन्मन्यास्तंभगलामया
र्दितमलावष्टंभवर्ध्मानपि ॥

अर्थ–भारंगमूळ, कडुनिंब, नागरमोथा, बाळहरडी, गुळवेल, किराइत, अडुळसा, अतिविष, त्रायमाण, कुटकी, वेखंड, सुंठ, मिरीं, पिंपळी, दिंडयाचें मूळ, कुडयाची साल रासना, धमासा, कडुपडवळ, पाडळ, कचोरा, दारुहळद, कडुवृंदावन, निशोत्तर, ब्राह्मी, पोखरमूळ, रिंगणी, डोरली, हळद, बेहेडा व देवदार, यांचा समभाग काढा करावा. हा द्वात्रिंशांग काढा प्राशन केला असतां, आपल्या तेजानें श्वास, खोकला, कफ, उचकी, वायु, मानजखडणें, गलरोग, अर्दितवायु, मलावष्टंभ व वृद्धि यांचा नाश करितो. जसा गरुड आपल्या तेजानें सर्पाला जिंकितो.

## मृतप्राणदायी रस.

रसंगंधकंटंकणंवत्सनाभंसमर्दयेत्धूर्तबीजेनयामं ॥ ततोवत्सनागेनहै मैश्चबीजरसेर्भावयेच्चत्रिवारंत्रिवारं ॥ कटुत्र्यादिनापंचवारंततःस्याद यंसूतराजोमृतप्राणदायी ॥ ज्वरेसन्निपातेज्वरेनूतनेवामहाश्लेष्मरोगे चगुंजाप्रमाणं ॥ पयःपायसंदाधिकंतक्रभक्तंसितावानवज्वरेचार्द्रनीरैः ज्वरेचातिसारेघनद्रावयुक्तेग्रहण्यर्शसांक्षौद्रसंसीतयावा ॥ ज्वरेवायु नात्रिकटूवन्हिपीतंप्रकंपेचबाहूकफेकांगवाते ॥ अपस्मारमुन्मादवा तंनिहंतिप्रयुक्तोसिताभिःपंचभिर्धूर्तबीजैः ॥

अर्थ–पारा, गंधक, टांकणखार, बचनाग व धोतऱ्याचे बीज हीं सर्व समभाग घेऊन धोतऱ्याचे बीजांचा काढा करून त्यांत व बचनागाचा काढा यांच्या तीन भावना द्याव्या. नंतर सुंठ, मिरें व पिंपळी ह्यांचे काढ्याच्या भावना पांचवार द्याव्या, ह्मणजे हा सूतराज मृतप्राणदायी रस होतो, हा सन्निपातज्वर, नूतनज्वर, मोठा कफरोग यांवर एकगुंजप्रमाण आल्याचे रसांत द्यावा. पथ्य दूधभात, क्षीर, दहींभात, ताकभात द्यावें; आणि हा रस ज्वरातिसार, आमातिसार, संग्रहणी, मूळव्याध, यांचे ठाईं मध व साकर यांचे बरोबर द्यावा. व वातज्वर, प्रकंपवायु, बाहुकंप, एकांगवायु, यांचे ठाईं सुंठ, मिऱ्यें, पिंपळी व चित्रक यांचे बरोबर द्यावा; आणि अपस्मारवायु, उन्मादवायु, यांचे ठाईं साकर आणि पांच धोत्र्याचा बियांचे बरोबर द्यावा.

## ज्वरोपद्रव.

श्वासोमूर्छारुचिश्छर्दिस्तृष्णातीसारविड्ग्रहः ॥
हिक्काकासांगभेदश्चज्वरस्योपद्रवादश ॥

अर्थ–दमा, मूर्छा, अरुचि, वांति, तृष्णा, अतिसार, मलबद्धता, उचकी, खोकला, व आंगमोडे हे दाहा ज्वरांचे उपद्रव होतात.

## ज्वरोपद्रवाची चिकित्सा.

संजातोपद्रवोव्याधिस्त्याज्योनस्याच्चिकित्सकैः ॥ व्याधौशां तेप्रणश्यंतिसद्यःसर्वेप्युपद्रवाः ॥ अतोव्याधिंजयेद्यत्नात्पूर्वंप श्चादुपद्रवं ॥ भिषग्यःकुशलःसोत्रजयेत्पूर्वमुपद्रवं ॥ तेष्वपि प्रचुरेषुप्राङ्नाशयेदाशुकारिणं ॥ मूळव्याधिंजयेत्पूर्वंजेयोयो वाभवेद्बली ॥ अविरोधेनवाकुर्यादुभयोरपिचक्रियां ॥

अर्थ–वैद्यानीं उपद्रवसहित ज्वरव्याधि टाकूं नये. व्याधि शांत झाल्यावर संपूर्ण उपद्रव. लागलेच शांत होतात. याकरितां यत्न करून पूर्वी व्याधि जिंकावा. मग उपद्रवांची चिकित्सा करावी, व कुशळ वैद्यानें पूर्वी ही उपद्रवाना जिंकावें. त्यामध्यें जो शीघ्रकारी उपद्रव असेल त्याला पहिल्यानेंच शांत केलें पाहिजे. वैद्यानें प्रथमतः मूळ व्याधि जिंकावा. किंवा त्यामध्यें जो बलवत्तर उपद्रव असेल, त्याला प्रथम जिंकावें. किंवा दोषांची अविरोधानें चिकित्सा करावी.

## सिंह्यादिकषाय.

सिंहीव्याघ्रीताम्रमूलीपटोलीशृंगीभार्गीपुष्कररोहिणीच ॥
साकंशठ्याशैलमल्याश्चबीजंश्वासंहन्यात्सन्निपातेदशांगः॥

अर्थ–रिंगणी, डोरली, धमासा, कडुपडवळ, कांकडाशिंगी, भारंगमूळ, पुष्करमूळ, कुटकी, कचोरा, कैरया, हिंदुस्थानांत प्रसिद्ध आहे, ह्या दाहा औषधांचा काढा सन्निपातोत्पन्नश्वासाचा नाश करितो.

## द्वात्रिंशांगकाढा.

भार्गीनिंबघनाभयामृतलताभूनिंबवासाविषात्रायंतीकटुकाव
चात्रिकटुकस्योनाकशक्रद्रुमैः ॥ रास्नायासपटोलपाटलिश
ठीदार्वीविशालात्रिवृत्ब्राह्मीपुष्करसिंहिकाद्वयनिशाधात्र्या
क्षदेवद्रुमैः ॥ क्वाथोयंखलुसन्निपातनिवहान्द्वात्रिंशता
त्पानतोदुर्धर्षान्निजतेजसाविजयतेसर्पान्गरुत्मानिव ॥ किं
चश्वासबलासकासगदहृद्रोगहिक्कामरुन्मन्यास्तंभगलामया
र्दितमलावष्टंभवर्ध्मानपि ॥

अर्थ–भारंगमूळ, कडुनिंब, नागरमोथा, बाळहरडी, गुळवेल, किराइत, अडुळसा, अतिविष, त्रायमाण, कुटकी, वेखंड, सुंठ, मिरीं, पिंपळी, दिंडयाचें मूळ, कुडयाची साल रासना, धमासा, कडुपडवळ, पाडळ, कचोरा, दारुहळद, कडुवृंदावन, निशोत्तर, ब्राह्मी, पोखरमूळ, रिंगणी, डोरली, हळद, बेहेडा व देवदार, यांचा समभाग काढा करावा. हा द्वात्रिंशांग काढा. प्राशन केला असतां, आपल्या तेजानें श्वास, खोकला, कफ, उचकी, वायु, मानजखडणें, गलरोग, अर्दितवायु, मलावष्टंभ व वृद्धि यांचा नाश करितो. जसा गरुड आपल्या तेजानें सर्पाला जिंकितो.

## मध्वाद्यकाढा.

मधुनाकृष्णाकट्फलकर्कटशृंगिभवंचूर्णं ॥
श्वासामयेमहोग्रेलीढ्वालोकःसुखीभवति ॥

**अर्थ**–पिंपळी, कायफळ व कांकडाशिंगी, यांचें चूर्ण मधाशीं चाटिलें असतां, तें मोठया उग्रश्वासामध्यें लोकांना सुखी करील.

## श्वासावर डाग.

वन्योपलाग्नितापितदात्रस्याग्रेणपंजरेदाहः ॥
अपहरतिश्वासामयमसंशयंभाषितंमुनिभिः ॥

**अर्थ**–रानगोंवऱ्यांचे अग्नींत कोयती तापवून तिच्या अग्रानें पांजऱ्यावर डाग दिला असतां, तो श्वासाला घालवितो. असें ऋषींनीं सांगितलें आहे.

## आर्द्रकादिनस्य.

आर्द्रकस्यरसैर्नस्यंमूर्छायामाचरेन्नरः ॥
अंजनंचप्रयुंजीतमधुसिंधुशिलोषणैः ॥

**अर्थ**–ज्वरामध्यें मूर्छा आली असतां, आल्याच्या रसाचें नस्य द्यावें; आणि मध, सैंधव, मनशीळ व मिरीं यांचें अंजन करावें.

## शीतांभसादियोग.

शीतांभसाक्षिसेकःसुरभिर्धूपःसुगंधिपुष्पंच ॥
मृदुतालवृंतवातःकोमलकदलीदलस्पर्शः ॥

**अर्थ**–मूर्छा आली असतां, थंडपाणी डोळ्यांवर शिंपावें, सुगंध धूप, किंवा फुलें, द्यावीं. ताडाचे विंझण्याचा मृदु वारा घालावा, किंवा केळीचीं कोंवळीं पानें अंगावर ठेवावीं.

## अरुचिचिकित्सा.

अरुचौशृंगवेरजरसकैःसहसिंधुजैःकवलः ॥
सिंधूत्थमातुलुंगीफलकेसरधारणंवक्त्रे ॥

**अर्थ**–ज्वरामध्यें अरुचि झाली असतां, आल्याच्या रसांत सैंधव घालोन तें तोंडांत धरावें. अथवा माहाळुंगाचा गीर सैंधवांत घोळवून तोंडांत धरावा.

## मातुलिंगकवल.

अरुचौमातुलुंगस्यकेसरंसाज्यसैंधवं ॥
धात्रीद्राक्षासितानांवाकल्कमास्येतुधारयेत् ॥

अर्थ—अरुचि झाली असतां; महाळुंगाचा गीर सैंधव घालोन तूप लावून तोंडांत धरावा, अथवा आवळकाठी, द्राक्षे, साकर यांचा कल्क तोंडांत धरावा.

## सैंधवादियोग.

नीरेणसिंधूत्थरजोतिसूक्ष्मंनस्येतिनूनंविनिहंतिहिक्कां ॥
शुंठीहठाद्वासितयासमेताधूपोथवाहिंगुसमुद्भवश्च ॥

अर्थ—ज्वरामध्यें उचकी झाली असतां, सैंधव पाण्यांत विरघळवून नस्य द्यावें, किंवा सुंठ, साकर व तिखट अशी सेवन केली असतां; अथवा हिंगाचा धूर दिला असतां उचकीला शमविते.

## अश्वत्थक्षार.

अश्वत्थंवल्कलंशुष्कंदग्धंनिर्वापितंजले ॥
तज्जलंपानमात्रेणहिक्कांछर्दिंचनाशयेत् ॥

अर्थ—पिंपळाची सुकी साल जाळून पाण्यांत भिजवून त्याचें पाणी काढून घ्यावें. तें उचकी, आणि वांति यांचा नाश करितें.

## शुष्कअश्वपुरीपयोग.

शुष्कस्याश्वपुरीपस्यधूपोहिक्कांनिवारयेत् ॥
अपिसर्वात्मिकांचैवयोगराडयमीरितः ॥

अर्थ—सुकलेल्या घोड्याच्या लिंदीचा धूप सन्निपातात्मकउचकीचा नाशक आहे.

## यावकादिनस्य.

यावकस्वरसेनापिनस्यतोहंतिहिक्किकां ॥

अर्थ—शिजविलेल्या जवांच्या रसाचें नस्य करावें, ह्मणजे त्याणे उचकीचा नाश होतो.

## ज्वरकासीं कणाद्यलेह.

कासेकणाकणामूलंकलिद्रुमफलंरजः ॥
सविश्वभेपजंलिह्यान्मधुनावावृपारसं ॥

अर्थ—ज्वरामध्यें खोकला झाला असतां, पिंपळी, पिंपळीमूळ, बेहेडा, पित्तपापडा, व सुंठ, यांचा चूर्णाचा लेह अडुळशाचा रस व मध यांत द्यावा.

## पुष्करादिचाटण.

पुष्करमूलकटुत्रिकशृंगीकटूफलयासककारविकाभिः ॥
मधुललिताभिरयंखलुलेहःकासरिपुःकफरोगहरश्च ॥

अर्थ–पोखरमूळ, त्रिकटु, कांकडशिंगी, कायफळ, धमासा व ओंवा, यांचें चूर्ण. मधांत चाटलें असतां, तें कास व कफ यांचा नाश करितें.

## बिभीतकयोग.

बिभीतकंघृताभ्यक्तंगोशकृत्परिवेष्टितं ॥
स्विन्नमग्नौहरेत्कासंध्रुवमास्यविधारितं ॥

अर्थ–बेहेडयाला तूप लावून गाईचें शेणानें लिंपून अग्नींत भाजून तोंडांत धरावा. ह्मणजे खोकल्याचा नाश करितो.

## लवंगादिवटी.

बिभीतकत्वक्मरिचंलवंगंसर्वैःसमानंखदिरस्यसारं ॥
वब्बूलजक्काथकृतावटीयंमुखस्थिताकासहरक्षिणेन ॥

अर्थ–बेहेडेदळ, मिरीं व लवंग हे समभाग व यासर्वांच्या समान कात, हे एकत्र करून बाभळीच्या काढ्यांत घोंटून गोळी करावी; आणि ती तोंडांत धरावी, ह्मणजे क्षणांत खोकला शांत होतो.

## ज्वरीं दाहचिकित्सा.

दाहाधिकारलिखितंदाहेकुर्याच्चिकित्सितं ॥
परंज्वराविरुद्धंयन्मुख्योनाश्योज्वरोयतः ॥

अर्थ–ज्वरामध्यें दाह झाला असतां, दाहावर चिकित्सा करावी; परंतु ज्वरदाहामध्यें ज्वर मुख्य आहे. ह्मणून अविरुद्धक्रिया करावी.

## गुडुच्यादिकाढा.

क्काथोगुडूच्याःसमधुःसुशीतःपीतःप्रशांतिंवमनस्यकुर्यात् ॥
विण्मक्षिकाणांमधुनावलीढासचंदनाशर्करयान्वितावा ॥

अर्थ–गुळवेलीचा काढा शीत झाल्यानंतर आंत मध घालून प्राशन केला असतां; वांतीचें शमन करितो. अथवा माशींची विष्ठा मधाशीं चंदनाचें चूर्ण घालोन दिली असतां; किंवा साकर व चंदन घालोन दिली असतां; वांतीचें शमन करिते.

## दंतशठादिकाढा.

दंतशठबीजपूरकदाडिमबदरैःसचुक्रकैर्वदने ॥
लेपोजयतिपिपासामथरजतगुटीमुखांतस्था ॥

अर्थ–जांबेरें लिंबू, माहाळुंग, डाळिंब, बोर व आम्लवेतस यांचा कल्क टाळयास, जिभेस व गालफडाला आंतून लेप केला असतां, ताहानेला शमवितो; अथवा रुप्याची गोळी तोंडांत धरिली असतां तीही ताहानेला शमविते.

## जलादियोग.

शीतंपयःक्षौद्रयुतंनिपीतमाकंठमाश्वेवतदुद्वमेच्च ॥
तर्षप्रकर्षप्रशमायवक्त्रेदध्याद्रदक्षौद्रवटाग्रलाजान् ॥

अर्थ—ज्वरांमध्यें तृषा शमविण्याकारितां थंडपाणी मध घालोन आकंठ प्राशन करावें; आणि पुनः लागलेच वांतीने टाळयांत बोटे इत्यादि घालून पाडून टाकावें; अथवा कोष्ठ, वडाचे कोंवळे पारंबे व लाह्या ह्यांचा लेह मधाशीं तोंडांत धरावा, ह्मणजे तृषा शांत होते.

## ज्वरेतिसारचिकित्सा.

लंघनमेकंमुत्क्वानचान्यदस्तीहभेषजंबलिनः ॥
समुदीर्णदोपनिचयंशमयतितत्पाचयत्यपिच ॥

अर्थ—ज्वरामध्यें अतिसार झाला असतां, रोगी बलिष्ठ आहे तर त्याला लंघन हे औषधच आहे. तें लंघन वाढलेल्या दोषसमूहाचा नाश करितें; आणि त्यांचें पचनही करितें.

## वत्सादन्यादिकाढा.

वत्सादनीवत्सकवारिवाहविश्वंभरानिंबविपाःसविश्वाः ॥
ज्वरेतिसारंत्वरितंजयंतीविश्वामृतावत्सकवारिवाहाः ॥

अर्थ—गुळवेल, कुडयाची साल, नागरमोथा, किराईत, कडुनिंब, अतिविष व सुंठ, यांचा अथवा सुंठ, गुळवेल, कुडयाची साल व नागरमोथा, यांचा काढा घ्यावा, ह्मणजे तो ज्वरामध्यें झालेल्या अतिसाराचा नाश करितो.

## पाठादिकाढा.

पाठामृतापर्पटमुस्तविश्वाकिराततिक्तेंद्रयवान्विपाच्य ॥
पिबन्हरत्येवहठेनसर्वज्वरातिसारानपिदुर्निवारान् ॥

अर्थ—पाडळ, गुळवेल, पित्तपापडा, नागरमोथा, सुंठ, किराइत व इंद्रजव यांचा काढा प्राशन केला असतां, निश्चयेकरून तो दुर्निवार ज्वरातिसारास घालवील.

## ज्वरीं विड्ग्रहाची चिकित्सा.

विड्ग्रहेवातजित्कर्मकुर्यादत्रानुलोमनं ॥
मलंप्रवर्तयेदाशुतीक्ष्णाभिःफलवर्तिभिः ॥

अर्थ—ज्वरामध्यें मळ बंद झाला असतां, वातनाशक असें अनुलोमन द्यावें, किंवा प्रथमतः त्याला तीक्ष्ण अशी गुदांत वात घालोन शौच होईल असें करावें.

## पथ्यादिकाढा.

पथ्यारग्वधतिक्तात्रिवृदामलकैःशृततोयं ॥
जीर्णज्वरेविबंधेदद्यादाश्वेवविड्ग्रहःशाम्येत् ॥

अर्थ–बाळहर्डे, बाहव्याचा मगज, कुटकी, तेड व आवळकाटी यांचा काढा जीर्णज्वर तसीच मलबद्धता यांचा नाश करितो.

## ज्वरीं पथ्य.

वमनंलंघनंकालेयवागुःस्वेदनानिच ॥ कटुतिक्तोरसश्चेति
पाचनंतरुणज्वरे ॥ सन्निपातेत्विदंसर्वंकुर्यादामेकफापहं ॥
अवलेहोंजनंनस्यंगंडूषश्चरसक्रिया: ॥ पादयोर्हस्तयोर्मूलेकं
ठकूपेचगंडयोः ॥ स्वेदेभ्रष्टकुलित्थानांचूर्णघर्षणमेवच ॥

अर्थ–वांति व लंघन करावें. प्रातःकाळीं यवागू द्यावी. घाम काढणें व तिखट, कडु हे रस आणि पाचन हे उपचार तरुण ज्वरावर करावे; आणि सन्निपातावर सर्व करावें, व आमज्वरावर कफनाशकक्रिया करावी, अवलेह व अंजन, नस्य, गंडूष, घाम काढणें व पाय, हात यांच्या मुळाशीं व गळ्याच्या खळग्याशीं व दातखिळीच्या मुळाशीं घाम आला असतां कुळीथ भाजून त्याचें चूर्ण चोळावें.

## तरुणज्वरावर अपथ्य.

स्नानंविरेकःसुरतंकषायंव्यायाममभ्यंजनमन्हिनिद्रा ॥ दुग्धं
घृतंवैदलमामिषंचतक्रंसुरांस्वादुगुरुद्रवंच ॥ अन्नंप्रवातंभ्रम
णंचक्रोधंत्यजेत्प्रयत्नात्तरुणज्वरार्तः ॥

अर्थ–स्नान, रेच, मैथुन, काढे, व्यायाम, दिवानिद्रा, दुग्ध, घृत, द्विदल, मांस, ताक, मद्य, गोड पदार्थ, जडपदार्थ, द्रवपदार्थ, अन्न, वायु, फिरणें, क्रोध, आणि बोलणें, हीं सर्व तरुणज्वरीं रोग्यानें सोडावीं.

## मध्यमज्वरे पथ्य.

पुरातनाःषष्टिकशालयश्चवार्ताकसौभांजनकारवेल्लं ॥ वेत्रा
ग्रमापाढफलंककोटिकंमूलकपोतिकांच ॥ मुद्गैर्मसूरैश्चणकैः
कुलित्थैर्मकुष्ठकैर्वाविहितश्चयूषः ॥ पाठामृतावास्तुकतंदुलीय
जीवंतिशाकानिचकाकमाची ॥ द्राक्षाकपित्थानिचदाडिमा
निवैकंकतान्येवपचेलिमानि ॥ लघूनिसात्म्यानिचभेषजानि
पथ्यानिमध्यज्वरिणाममूनि ॥

अर्थ—जुन्या साटक्यासाळी, वांगें, शेवगा, कारलें, वेशांकुर, उडीद, तुरी, आषाढफळ, कांटील, मुळे, मयाळ, मूग, मसूर, चणे, कुळिथ आणि रानमूग यांचे यूष पाहाडमूळ, गळवेल, चाकवत, तांदुळजा व जीवंती याच्या भाज्या, कावळी, द्राक्षे, कंवठ, डाळिंब, वेकत, उडीद आणि लघु व हितकारक अशीं औषधें हीं ज्वरीमनुष्याला पथ्यें सांगीतलीं.

## ज्वरीं पथ्य.

तंदुलीयकवास्तूकबालमूलकपर्पटान् ॥ पटोलंतिक्तशाकंचगुडूचीपल्लवान्यपि ॥ कालशाकंनिंबपुष्पंमारिषंदार्विकादलं ॥ जीवंतीचापिचांगेरीसुनिषण्णाकमाविकैः ॥ पत्रशाकप्रियाणांतुज्वरितानांप्रदापयेत् ॥ मुद्गान्मसूरान्चणकान्कुलित्थांश्चमकुष्टकान् ॥ यूषार्थंयूषसात्म्यानां ज्वरितानांप्रदापयेत् ॥ लावान्कपिंजलानेणान्पृषतान्शरभान्शशान् ॥ कालपुच्छान्कुरंगांश्चतथैवमृगमात्रकान् ॥ मांसार्थंमांससात्म्यानां ज्वरितानांप्रदापयेत् ॥ सारसक्रौंचशिखिनस्तथातित्तिरकुक्कुटाः॥ज्वरितानांनशस्यंतेइतिकेचिद्व्यवस्थिताः ॥ वृंताकंपीलुककोंटपटोलककठिल्लकं ॥ फलशाककृतेदेयंसर्वंनिस्नेहमेवच ॥ वत्सरोषितधान्यस्यतंदुलाद्यंज्वरेहितं ॥ रोटिकार्थंप्रदातव्यंद्विवर्षोषितमल्पशः ॥ गोधूमादियथासात्म्यमन्यदप्यल्पमर्पयेत् ॥

अर्थ—तांदुळजा, चाकवत, कोवळा मुळा, पित्तपापडा, पडवळ, वायवारणा, गुळवेल, पालेभाजी, कालशाक, निंबाचें फूल, माठाची भाजी, पाथरीची भाजी, गुळवेल, चुका, कुरडू, शेळीचे दुधाचे पदार्थ, अथवा अवडल्यास पाले भाज्या द्याव्या. व मूग, मसूर, चणे, कुळीथ, रानमूग, मठ, यांचे यूष सोसल्यास द्यावें. तसेच लावे, कपिंजल, शरभ सर्व मृगमांसे हीं ज्वरिताला सोसतील तर द्यावी. व सारस पक्षी, करढोक, मोर, तित्तिर, कोंबडे, इत्यादि पक्षी ज्वरिताला देऊं नये, असें कितीएक सांगतात. व वांगें, पीलु, अक्रोड, कंचुकशाक, दोडकी, पडवळ, कांटील, हीं फळें शाकार्थ द्यावीं; परंतु स्नेहयुक्त पदार्थ देऊं नये. भात देणें तर एक वर्षाचे तांदुळाचा द्यावा. भाकरी देणे तर दोन वर्षांचा तांदळाची द्यावी, गोधूमादिक नित्य सवईचीं असतील तीं थोडीं थोडीं द्यावीं.

## जीर्णज्वरपथ्य.

बिरेचनंछर्दनमंजनंचनस्यंचधूमोप्यनुवासनंच ॥ संशोधनंसंशमनं व्यवायोभ्यंगोवगाहःशिशिरोपचारः ॥ एणःकुलिंगोहरिणोमयूरोला

वःशशस्तित्तिरिकुक्कुटोच ॥ क्रौंचःकुरंगःपृषतश्चकोरःकपिंजलोवार्तिककालपुच्छौ ॥ गवामजायाश्चपयोघृतंचहरीतकीपर्वतनिर्झरांभः ॥ एरंडतैलंसितचंदनंचद्रव्याणिसर्वाणिपुरेरितानि ॥ ज्योत्स्नाप्रियालिंगनमप्यथस्याद्वर्गःपुराणज्वरिणांसुखाय ॥

अर्थ–रेचन, वांति, अंजन, नस्य, धूम, अनुवासनबस्ति, घामकाढणें, शमन, स्त्रीसंभोग, अभ्यंग, पाण्यांत शिरून स्नान, थंड उपचार, हरिण, चिकणा, काळवीट, मोर, लावे, ससा, तित्तिरि, कोंबडा, करढोक पक्षी, भेकरें, रोही, चकोर, कपिंजल पक्षी, वार्तिक, व कालपुच्छ यांचीं मांसें, आणि गाईचें किंवा शेळीचें दूध व तूप, हरीतकी, पर्वतांतील झऱ्याचें पाणी, एरंडाचें तेल, पांढरा चंदन व पूर्वी सांगितलेलीं संपूर्ण द्रव्यें, चांदणें, स्त्रीचें आलिंगन, हा जीर्णज्वरीरोग्याच्या सुखाकरितां पथ्यवर्ग सांगितला.

## आगंतुकज्वरपथ्य.

आगंतुजेज्वरेनैवनरःकुर्वीतलंघनं ॥ अभिघातसमुत्थानेपानाभ्यंगेचसर्पिषः ॥ रक्तावसेकैर्मद्यैश्चतथामांसरसोदनैः ॥ क्षतजेव्रणजेवापिशस्तव्रणचिकित्सितं ॥ इत्यागंतुज्वरेपूर्वंभिषग्भिःपथ्यमीरितं ॥ क्रोधजेपित्तजित्कार्याक्रियासद्वाक्यमेवच ॥ औषधीगंधजेकुर्यात्कर्मपित्तप्रसादनं ॥ अभिचाराभिशापोत्थेजपहोमादिभेषजं ॥ उत्पातग्रहपीडोत्थेदानंस्वस्त्ययनादयः ॥ क्रोधोत्थितेपित्तहरंकामजेक्रोधमेवच ॥ कामशोकभयोद्भूतेसर्वावातहरीक्रिया ॥ आश्वासनंचेष्टलाभोहर्षदायीनियानिच ॥ हर्षेणचसमायांतिकामशोकभयज्वराः ॥ विशेषतः पुनश्चात्रकामक्रोधसमुत्थिते ॥ भयशोकसमुद्भूतेकामक्रोधकरौषधं ॥ भूताभिषंगजेभूतबाधावेशनताडनं ॥ अध्वश्रांतेषुचाभ्यंगंदिवानिद्रांचकारयेत् ॥ मनःक्षोभेसमुत्पन्नेमनसःसांत्वनानिच ॥ इत्यागंतुज्वरेपूर्वैर्भिषग्भिःपथ्यमिष्यते ॥

अर्थ–आगंतुकज्वरामध्यें लंघन करूं नये; अभिघातज्वरामध्यें तुपाचें पान व अभ्यंग, रक्तमोक्ष, मद्यपान, मांसरस व जेवण हीं पथ्य होत. व क्षतजनित किंवा व्रणजनित ज्वरामध्यें क्षत किंवा व्रण यांवरची चिकित्सा करावी, हें आगंतुकज्वरावर पहिलें पथ्य आहे. क्रोधज्वरावर पित्तशामक क्रिया करावी, व चांगल्या गोष्टी सांगाव्या, औषधीगंधज्वरावर चित्ताला प्रसन्नकारक चिकित्सा करावी, आणि अभिचार व अभिशाप या ज्वरांवर जप व होम इत्यादि क्रिया करावी. उत्पात व ग्रहपीडा यांपासून झालल्यावर दान पुण्याहवाचन इत्यादि, व क्रोधज्वरावर पित्तहरचिकित्सा, व कामज्वरावर क्रोधचि-

कित्सा आणि काम, शोक व भय यांपासून झालेल्या ज्वरावर सर्व वातनाशकक्रिया व आश्वासन, इष्टलाभ व हर्षदायक पदार्थ हे द्यावे. व काम, क्रोध, यांपासून झालेल्यावर अनुक्रमेंकरून क्रोध व काम उत्पन्न करणाऱ्या क्रिया कराव्या. भूताभिषंगजनितावर आंगांत आणणें, ताडन करणें इत्यादि. मार्गश्रमानें आलेल्यावर अभ्यंग, दिवानिद्रा, इत्यादि; व मनाच्या क्षोभानें झालेल्या ज्वरावर मनाची शांति करणें. याप्रमाणें आगंतुकज्वरावर वैद्यानीं पथ्य सांगितलें आहे

## विषमावर.

विषमेप्रतिकुर्वीतभिषग्वमनरेचनैः ॥ विष्णोर्नामसहस्रस्य
पठनंश्रवणंश्रुतेः ॥ देवानांब्राह्मणानांचगुरूणामपिपूजनं ॥
ब्रह्मचर्यंतपोहोमःप्रदानंनियमोजपः ॥ साधूनांदर्शनंनित्यं
रत्नौषधविधारणं ॥ मंगलाचरणंचैववर्गःसर्वज्वरापहः ॥

अर्थ—विषमज्वरावर वमन व रेचन द्यावें. विष्णुसहस्रनामाचा पाठ, वेदश्रवण, देव, ब्राह्मण, गुरु यांचे पूजन, ब्रह्मचर्य, तप, होम, दान, नियम, जप, साधूंचें दर्शन, रत्नें व औषधि यांचें धारण व मंगलकर्म हा पथ्यवर्ग जाणावा.

## सर्वज्वरांवर अपथ्य.

वमिवेगंदंतकाष्ठमसात्म्यमपिभोजनं ॥ विरुद्धधान्यन्नपाना
निविदाहीनिगुरूणिच ॥ दुष्टांबुक्षारमम्लानिपत्रशाकंविरूढकं ॥
ललदंबुचतांबूलंकालिंगंलकुचंफलं ॥ तोडिमत्स्यंचपिण्याकं
नवान्नंपिष्टवैकृतं ॥ अभिष्यंदीतिचैतानिज्वरितःपरिवर्जयेत् ॥
व्यायामंचव्यवायंचस्नानंचाक्रमणानिच ॥ ज्वरमुक्तोनसेवे
तयावन्नोबलवान्भवेत् ॥

अर्थ—ओकारी करणें, काष्ठानें दंत घासणें, न सोसेल तें खाणें, विरुद्ध खाणें, विदाही व जड पदार्थ, दुष्टोदक, क्षार, आंबट, पालेभाज्या, अंकुर आलेलें धान्य, सांचवणीचें पाणी, तांबूल, कालिंगड, फणस व तोडिजातीचा मासा, पेंड, नवें धान्य, पिठाचे पदार्थ व पौष्टिक हे पदार्थ ज्वरितरोग्यानें सोडून द्यावे. तसेंच मेहेनत, स्त्रीसंग, स्नान क्रीडा व इत्यादि ज्वरमुक्तरोग्यानें शक्ती आल्यावांचून करूं नये.

## मंत्र

वज्रहस्तोमहाकायोवज्रतुंडोमहेश्वरः ॥ हतोसिवज्रतुंडेनभू

म्यांगच्छमहाज्वर ॥ ठःशःशंतः ॥ तालपत्रेलिखित्वातुकंठे बाहौचबंधयेत् ॥

अर्थ–वरील मंत्र ताडाच्या पातीवर लिहून गळ्यांत किंवा बाहूंला बांधावा.

## पेज.

आम्रातकसहस्रेणदलेनसुकृतीपिबेत् ॥
पेयांघृतप्लुतांजंतुश्चातुर्थिकहरींत्र्यहे ॥

अर्थ–जो आंत तूप घातलेली पेज तीनदिवस पर्यंत मोहांच्या हजार पानाशीं प्राशन करील. तर त्याचा चातुर्थिक ज्वर जाईल.

## ज्वरमुक्ति लक्षण.

संक्षोभणाच्चधातूनांदोषसंचालनादपि ॥ भूयभिवातिवेगस्तुमोक्षकाले ज्वरस्यतु ॥ त्रिदोषजेज्वरेह्येतदंतर्वेगेचधातुगे ॥ लक्षणंमोक्षकाले स्यादन्यस्मिन्स्वेददर्शनं ॥

अर्थ–ज्वर जाण्याचे वेळेस धातूंच्या क्षोभानें व दोषांच्या चलनानें ज्वरवेग फार होतो, त्रिदोषज्वर, अंतर्वेगज्वर, धातुगतज्वर, यांचे मात्र असें लक्षण होतें. व अन्यज्वरांत घाम येतो.

## इति ज्वरप्रकरण समाप्त.



# अतिसारीं कर्मविपाक

स्मार्ताग्निशमयेद्यस्तुसोतिसारयुतोभवेत् ॥ अग्निरश्मीत्यृचं जप्त्वादशांशंजुहुयात्तिलान् ॥ सर्पिषाचाप्लुतान्दद्याद्धिरण्यं ब्राह्मणायवै ॥ अग्निरश्मीतियमृक्कतारतम्येनवाजपेत् ॥

अर्थ–जो ब्रह्मणादिक स्मार्तामीचा त्याग करितो, तो अतिसारी होतो. यास्तव अग्नि रश्मी) या ऋचेचा रोगतारतम्यानें जप करून त्याचा दशांश होम करावा. व घृत युक्त तिल व सुवर्ण यांचें दान करावें.

## दुसरा प्रकार.

अतिसारीसभवतियस्त्रेताग्निविनाशकः ॥ सुवर्णेनाथताम्रेणकुर्यात्प्र तिकृतिंबुधः ॥ वन्हेःशक्त्यनुसारेणपलेनार्धेनवापुनः ॥ तथाज्वाला कुलांरक्तचंदनेनविलेपितां ॥ रक्तवस्त्रेणसंवीतांमेषस्योपरिसंस्थितां ॥ रक्तमाल्यैश्चसंछन्नांमुक्तादामपरिष्कृतां ॥ कनकाचलवर्णाभांद्वादशा र्कनिभांशुभां ॥ ब्रह्मचर्यान्वितेविप्रेकनिष्ठेचाग्निहोत्रिणि ॥ अंगुलो यकवस्त्राद्यैर्भूषितेतांनिवेदयेत् ॥ मंत्रेणानेनविधिवदग्निप्रीत्यर्थमादृतः॥

अर्थ–जो अग्नित्रयीचा नाश करितो, तो अतिसारी होतो. त्याणें सुवर्णाची किंवा तांब्याची स्वशक्त्यनुसार अग्नीची प्रतिमा निदान दोन तोळे पावेतों करून ब्राह्मणाला द्यावी. तिचें ध्यान सांगतो. जी मूर्ति अग्निज्वाळांनी व्याप्त, रक्तचंदन लावलेली, लाल वस्त्र नेसलेली, बोकडावर बसलेली, लालपुष्पांच्या माळांनी भूषित, मोत्यांचे अलंकारानी शोभित आणि सुवर्णाच्या पर्वतासारिखी व बारा सूर्यांसारिखा कांतीनें युक्त अशी करून ब्रह्मचारी किंवा कनिष्ठतरी अग्निहोत्री, यांची वस्त्रालंकारानी पूजा करून पुढें सांगतो त्या मंत्रानें दान करावी.

## दानाचा मंत्र.

त्रेतारूपोग्निरीड्यस्त्वमंतनश्चासिवैनृणां ॥ त्वंवेत्थप्राक्तनंपाप मतिसारंविनाशय ॥ एवंकृत्वानरःसम्यगतिसारंव्यपोहति ॥ निरुजःससुखीनित्यंदीर्घमायुश्चविंदति ॥

अर्थ–हे अग्ने तूं अग्नित्रयरूपी व पूज्य, मनुष्यांला मरणपर्यंत असणारा व माझे जन्मांतरीचे पाप जाळणारा असा आहेस. ह्मणून ह्या माझा अतिसारव्याधीचा नाश कर. असें ह्मणून

वरील मंत्राने दान द्यावें. याप्रमाणें विधि केला असतां, अतिसारापासून मोकळा होतो व व्याध जाऊन दीर्घायुषी होतो.

## तिसरे प्रकारचा कर्मविपाक.

स्त्रीहंताचातिसारीस्यादश्वत्थान्रोपयेद्दश ॥

दद्याच्चशर्कराधेनुंभोजयेच्चशतंद्विजान् ॥

**अर्थ**–स्त्रीहत्या करणारा अतिसारी होतो. त्याणें दाहा पिंपळ लावावे. शर्कराधेनूचें दान करावें. व शंभर ब्राह्मणाकडून भोजन करवावें. हें शर्कराधेनुदान राजयक्ष्मप्रकरणीं सांगितलें आहे.

## रक्तातिसारी चिकित्सा.

दावाग्निदायकश्चैवरक्तातिसारवान्भवेत् ॥

तेनोदपानंकर्तव्यंरोपणीयस्तथावटः ॥

**अर्थ**–जो अरण्याला वणवा लावितो, तो रक्तातिसारी होतो. त्याणें पाणपोई इत्यादि उदक दान करावें; व वटवृक्ष लावावे, ह्मणजे तेणेंकरून अतिसार जाईल.

## अतिसारनिदान.

गुर्वतिस्निग्धतीक्ष्णोष्णद्रव्यस्थूलातिशीतलैः ॥ विरुध्दाध्यशनाजीर्णैर्विषमैश्चातिभोजनैः ॥ स्नेहाद्यैरतियुक्तैश्चमिथ्यायुक्तैर्विषैर्भयैः ॥ शोकदुष्टांबुमद्यातिपानैःसात्म्यर्तुपर्ययैः ॥ जलाभिरमणैर्वेगविघातैः कृमिदोषतः ॥ नृणांभवत्यतीसारोलक्षणंतस्यवक्ष्यते ॥

**अर्थ**–जड, स्निग्ध, तिखट, उष्ण, पातळ, भरड व शीतल, यांचे अतिसेवन, आणि देश, काल व संयोग यांशी विरुद्ध ह्मणजे जसें गुर्जरदेशीं मरीच्यादि भक्ष देशविरुद्ध, वसंतकाळीं नद्युदकपान कालविरुद्ध, क्षीरमत्स्यादिसंयोग संयोगविरुद्ध व जेवणावर जेवण, अजीर्ण, भोजनाचा काळ चुकऊन उणें अधिक खाणें, स्नेहाधिकद्रव्यांचें अतिपान, विरुद्धफल देणारे हीनाधिक योग, विष, भय, शोक यांपासून, व वाईट पाणी व मद्य, यांच्या अतिपानापासून, ऋतुविपरीत भक्षण, पाण्यांत डुंबणें, मळमूत्रवेगाचा निरोध व जंतु यांपासून अतिसार होतो. त्याचें लक्षण सांगतो.

## संप्राप्ति.

संशाम्यापांधातुरग्निंप्रवृद्धोवर्चोमिश्रोवायुनाधःप्रणुन्नः ॥

सरत्यतीवातिसारंतमाहुर्व्याधिघोरंषड्विधंतंवदंति ॥

**अर्थ**–शरीरांतील द्रवरूपधातुपासून व अतिवाढून अग्नीला शांत करितो, आणि

मलाशीं मिश्रित होऊन वायूनें अपानमार्गानें वारंवार सवूं लागतो. त्याला अतिसार ह्मणतात. तो घोर व्याधि साहा प्रकारचा आहे.

## षट्प्रकार.

एकैकशःसर्वशश्चापिदोषैःशोकेनान्यःषष्ठआमेनयुक्तः ॥
केचित्त्वाहुर्नैकरूपप्रकाराइत्येवंतंकाशिराजोह्यवादीत् ॥

अर्थ—वातातिसार, पित्तातिसार, कफातिसार, सन्निपातातिसर, शोकातिसार व आमातिसार, असे साहा प्रकारचे अतिसार होतात. व सातवा द्वंद्वज अतिसार विद्वानांस मान्य आहे. वरील श्लोकांत ही द्वंद्वज अतिसार निष्पन्न होतो. व अन्यग्रंथीं यावर चिकित्सा आढळत्ये, व काशिराजाचे ही याप्रमाणें अनेक अतिसार आहेत असें मत आहे.

## पूर्वरूप.

हृन्नाभिपायूदरकुक्षितोदगात्रावसादानिलसन्निरोधाः ॥
विट्संगआध्मानमथाविपाकोभविष्यतस्तस्यपुरःसराणि ॥

अर्थ—हृदय, बेंबि, गुद, पोट व कुशी यांत शूळ, आंग गळणें, वाताचा निरोध, मळावरोध, पोट फुगणें व अपक्व अन्न पोटांत राहाणें हीं अतिसार पुढें होणार असला तर लक्षणें होतात.

## अतिसारपूर्वरूपचिकित्सा.

हितंलंघनमेवादौपूर्वंवत्तेनपाचनं ॥ षडंगयूषंकृत्वावापिपासादिषु योजयेत् ॥ मुद्गयूषंरसंतक्रंधान्यजीरकसंयुतं ॥ षडंगंयूषमित्याहुःसैंधवेनसमन्वितं ॥ अग्निसंदीपनंप्रोक्तंग्रहणीदोषनाशनं ॥ अरोचके ज्वरेचैवश्रेष्ठमेतत्प्रवाहिके ॥

अर्थ—अतिसाररोग्याला पूर्वीं लंघन हितकारक आहे. तें लंघन पाचन करितें; नंतर षडंगयूष ताहान इत्यादि उपद्रव असतां द्यावा; किंवा मुगांचा यूष, रस, ताक, धने, जिरें व सैंधव यांला षडंगयूष ह्मणतात. हा अग्निसंदीपन, ग्रहणीचा नाशक व अरोचक ज्वर व प्रवाहिका यांवर श्रेष्ठ आहे.

## बिल्वादिषडंगयूष.

बिल्वंचधान्यंचसजीरकंचपाठाचशुंठीतिलसंयुताच ॥
पिष्टाषडंगःसहितोनराणांयूषस्त्वतीसारहरःप्रदिष्टः ॥

अर्थ—बेलफळ, धनें, जिरें, पाडळमूळ, सुंठ व तीळ यांच्या चूर्णांचा यूष करावा. या षडंगयूषाच्या प्राशनानें अतिसार नाश पावतो.

## यवागू.

तृष्णापनयनीलघ्वीदीपनीबस्तिशोधिनी ॥ विरेकेचातिसारे

चयवागूःसर्वदाहिता ॥

अर्थ—यवागू—तृष्णानाशक, लघु, दीपनी, बस्तिशोधनी, रेचक, आणि अतिसार यांवर सर्वदाहितकारक आहे.

## औषधाला वर्ज्य.

नस्तंभयेदतीसारमपक्कंवृध्दिमागतं ॥

विनाक्षीणस्यवृध्दस्यगर्भिण्याबालकस्यच ॥

अर्थ—क्षीण, बाळ, वृध्द व गर्भिणी, यांला जाहालेल्या अतिसारावांचून, अपक्व व वाढलेल्या अतिसारावर स्तंभन देऊं नये.

## अतिसारावर लंघन.

तस्यादौलंघनंप्रोक्तंज्ञात्वादेहबलाबलं ॥ पाचनंचविधातव्यंत्र्यूप णाद्यंभिषग्वरैः ॥ नपित्तेनविनासोपिजायतेशृणुपुत्रक ॥ तस्यनो लंघनंप्रोक्तंज्वरजेचातिसारके ॥ तस्यादौलंघनंचैवमन्येवानैवलंघ नं ॥ तस्माद्देयंकषायंतुपाचनंभोजनेनच ॥

अर्थ—देहशक्ति पाहून अतिसारावर प्रथम लंघन करावें; नंतर त्र्यूषणादिकांचें पाचन द्यावें. कोणी वैद्य पुत्रास बोलतो, पुत्रा अतिसार हा पित्तावांचून होत नाहीं. याकरितां पित्ताधिक अतिसारावर लंघन करूं नये. तसेंच ज्वरातिसारावर ही लंघन न करूं नये. तर त्याला पाचनकषाय भोजनाबरोबर द्यावा.

## यवान्यादि दीपन.

यवानीनागरोशीरधानिकाबिल्वमुस्तकं ॥

द्विपर्णिकापचेच्चैतद्दीपनंपाचनंस्मृतं ॥

अर्थ—ओंवा, सुंठ, वाळा, धने, बेलफळ, नागरमोथा, डाय व डवला यांचा काढा दीपन व पाचन आहे.

## अतिसारप्रक्रिया.

अतिसारेज्वरेचैवरक्तपित्तेदृगामये ॥

आदौनप्रतिकुर्वीतव्याधिवेगोहिदुस्तरः ॥

अर्थ—अतिसार, ज्वर, रक्तपित्त, नेत्ररोग, इतक्यांचे ठायीं प्रथमतः प्रतीकार करूं नये. कारण व्याधीचा वेग कठीण आहे. तो कमी झाला म्हणजे उपचार करावा.

## दुसरा प्रकार.

आमपक्वक्रियाहित्वानातिसारेक्रियाहिता ॥

अतःसर्वातिसारेपुज्ञेयंपक्वामलक्षणम् ॥

**अर्थ**—आम पक्व करण्याची क्रिया सोडून दुसरी अतिसारावर क्रिया हितावह नाहीं. या साठीं, सर्वातिसारांचे ठायीं आम पक्व आहे किंवा नाहीं. हें पाहावें.

## तिसरा प्रकार.

आमेविलंघनंशस्तमादौपाचनमेवच ॥

कार्यंवानशनस्यांतेसद्रवंलघुभोजनम् ॥

**अर्थ**—आमातिसाराचे ठायीं पूर्वीं लंघन आणि पाचन प्रशस्त आहे, अथवा लंघना नंतर पातळ लघु असें भोजन करावें.

## धान्यपंचक पाचन.

धान्यवालकबिल्वाब्दनागरैःसाधितंजलं ॥ आमशूलहरंग्राहिभेदि दीपनपाचनं ॥ पित्तेधान्यचतुष्कंतुशुंठीत्यागाद्ददंतिहि ॥

**अर्थ**—धनें, वाळा, बेलफळ, नागरमोथा व सुंठ यांचा काढा आमशूलनाशक, ग्राही, रेचक, दीपन, आणि पाचन असा आहे. व पित्तावर सुंठीवांचून धान्यचतुष्क द्यावा.

## धातक्यादिमोदक.

धातकीविश्वपाषाणमालूरमजमोदकं ॥

मुस्तंमोचरसंचुक्रंसर्वातीसारशांतये ॥

**अर्थ**—धायटीचीं फुलें, सुंठ, हाताजोडीपाषाणभेद, बेलफळ, अजमोदा, नागरमोथे, सांवरीचा चीक व चुका यांचा मोदक सर्वातिसारनाशक आहे.

## कुटजाष्टककाढा.

कुटजबाळविषाघनधातुकीकुसुमदाडिमलोध्रमथोवृकी ॥ क्वथनमेभिरिदंमधुनायुतंविमलमोचरसेनसमाहितं ॥ पीयमानंमहातीव्रमतिसारंसदाहकं ॥ रक्तशूलामरोगंचनिहंतिकुटजाष्टकं ॥

**अर्थ**—कुडयाची साल, बाळबेल, अतिविष, नागरमोथे, धायटीचीं फुलें, डाळिंब, लोध्र, आणि पाहाडमूळ यांचा काढा मध व सांवरीचा चीक घालून द्यावा. तो महान् तीव्र दाहयुक्त अतिसार, रक्तशूल, आमव्याधि, यांचा नाश करितो.

## वातातिसारनिदान.

अरुणंफेनिलंरूक्षमल्पमल्पंमुहुर्मुहुः ॥

शकृदामंसरुक्शब्दंमारुतेनातिसार्यते ॥

अर्थ–वायूच्या योगानें आरक्तवर्ण, फेनयुक्त, रुक्ष व अपरिपक्व असा मळ पोटांत वारंवार गुरगुरून आपानद्वारावाटे थोडा थोडा पडतो तो वातातिसार होय.

## पूतिकादिकाढा.

पूतिकंमागधीशुंठीबलाधान्यंहरीतकी ॥
पक्त्वांबुनापिबेत्सायंवातातीसारशांतये ॥

अर्थ–करंज, पिंपळी, सुंठ, चिकणा, धने, हरीतकी यांचा काढा सायंकाळीं घेतला तर आम व वातातिसार यांला शमवितो.

## पथ्यादिकाढा.

पथ्यादारुवचाशुंठीमुस्ताचातिविषामृता ॥
क्वाथएषांहरेत्पीतोवातातीसारमुल्वणं ॥

अर्थ–हिरडे, देवदार, वेखंड, सुंठ, नागरमोथा, अतिविष व गुळवेल, यांचा काढा दुर्धर वातातिसाराचा नाश करितो.

## वचादिकाढा.

वचाचातिविषामुस्तंबीजानिकुटजस्यच ॥
श्रेष्ठःकषायएतेषांवातातीसारशांतये ॥

अर्थ–वेखंड, अतिविष, नागरमोथे व इंद्रजव यांचा काढा वातातिसारनाश करितो.

## सुवर्चलादिकाढा.

सुवर्चलंवचाहिंगुहैमज्योतिविषासमं ॥
वातातीसारहृत्प्रोक्तंसकटुत्रयमंभसा ॥

अर्थ–पादेलोण, वेखंड, हिंग, किराइत, चित्रक, अतिविष, सुंठ, मिरीं व पिंपळी यांचा काढा, वातातीसारनाशक आहे.

## कपित्थाष्टकचूर्ण.

अष्टौभागाःकपित्थस्यषड्भागाशर्करामता ॥ दाडिमंतिंत्तिडीकंचश्रीफलं धातकीतथा ॥ अजमोदाचपिप्पल्यःप्रत्येकंस्युस्त्रिभागिकाः ॥ मरीचंजीरकंधान्यंग्रंथिकंवालकंतथा ॥ सौवर्चलंयवानीचचातुर्जातंसचित्रकं ॥ नागरंचैकभागाःस्युःप्रत्येकंसूक्ष्मचूर्णिताः ॥ कपित्थाष्टकसंज्ञंस्याच्चूर्णमेतज्जलामयान् ॥ निहंतिग्रहणीरोगानतिसारंव्यपोहति ॥

अर्थ–आठ भाग कवठ, साहा भाग साकर व डाळिंब, चिंच, बेलफल, धायटीची फुलें, अजमोदा व पिंपळी हीं प्रत्येकी तीन तीन भाग व मिरीं, जिरें, धने, पिंपळीमूळ,

वाळा, सैंधव, ओंवा, दालचिनी, तमालपत्र, एलची, नागकेशर, चित्रक आणि सुंठ हीं प्रत्येकीं एकेक भाग, यांची चूर्णें एकत्र करावीं. याला कपित्थाष्टक चूर्ण ह्मणतात. हें संपूर्ण जलसंबंधिरोग, ग्रहणी आणि अतिसार यांचा नाश करील.

## लाई चूर्ण.

चित्रकंत्रिफलाव्योषंविडंगंजीरकद्वयं ॥ भल्लातकंयवानीचहिंगुलव णपंचकं ॥ गृहधूमंवचाकुष्ठंघनमभ्रंचगंधकं ॥ क्षारत्रयंचाजमोदापा रदंगजपिप्पली ॥ एतेषांचूर्णितंयावत्तावच्छक्राशनस्यच ॥ अभ्य क्ैलाइकांप्रातर्योगिनींकानरूपिणीं ॥ बिडालपदमात्रंतुभक्षयेदस्यगु डकं ॥ मंदाग्निकासदुर्नामप्लीहपांडुचिरज्वरान् ॥ प्रमेहशोथविष्टंभसं ग्रहग्रहणीहरः ॥ सर्वातीसारशमनःसर्वशूलनिवारणः ॥ आमवातग जोच्छेदीसूतिकातंकनाशनः ॥ नैतस्मिन्व्याधयःसंतिवातपित्तकफो द्भवाः ॥ काष्ठमप्युदरेतस्यभक्षणाद्यातिजीर्णतां ॥ वार्यनचव्यवायंच स्नानंपिशितभोजनं ॥ कांजिकाम्लंसदापथ्यंदग्धमीनंतथादधि ॥ त स्मादसौसदासेव्योगुडकोलाइकाकृतिः ॥

अर्थ–चित्रक, त्रिफळा, सुंठ, मिरीं, पिंपळी वावडिंग, जिरें, शाहाजिरें, बिबवे, ओंवा, हिंग, मीठ, टांकणखार, सैंधव, बिडलोण, संचळ, घरोसा, वेखंड, कोष्ठ, नागरमोथा, अभ्रक, गंधक, जवखार, सज्जीखार, टांकणखार, अजमोदा, पारा, वांझकर्टोली, गजपिंपळी, यांचें चूर्ण व सर्वचूर्णासमान इंद्रजव घेऊन चूर्ण करावें. तें सूर्योदयीं दोन तोळे घ्यावें, ह्मणजे मंदाग्नि, खोकला, अर्श, प्लीहा, पांडु, अरुचि, ज्वर, प्रमेह, सूज, विष्टंभ, संग्रहणी, सर्वातिसार, शूल, आमवात, सूतिकारोग, त्रिदोषोत्थव्याधि, हीं नाश पावतात. हें चूर्ण घेणारानें लांकडें भक्षण केलीं तरी पचन होतात. याला पथ्य नाहीं. मैथुन, स्नान, मांस, हे पदार्थ वर्ज्य नाहींत. याला पथ्याला. आंबटकांजी, भाजलेले मासे, दहीं भक्षण करावें, आणि लाइकाकृति गोळा घ्यावा.

## कुटजचूर्ण.

इंद्रजमेघमदाकुसुमंश्रीलोध्रमहौषधमोचरसानां ॥
चूर्णमिदंगुडतक्रनिपीतंहरयचिरादतिसारमुदारम् ॥

अर्थ–इंद्रजव, नागरमोथा, धायटीचीं फुलें, बेलफळ, लोध्र, सुंठ, आणि सांवरीचा चीक, यांचें चूर्ण गूळ व ताक यांशीं घ्यावें, ह्मणजे तें मोठ्या ही अतिसाराचा नाश करितें.

## शुंठीचूर्ण.

कल्याणिकांचनलतालुलितांगयष्टितांबूलशालिलपनेममवाक्शृणुत्वं ॥
शुंठीमदाकुसुममोचरसाजमोदातक्रान्विताःप्रशमयंत्यतिसारमुग्रं ॥

अर्थ—सुंठ, धायटीची फुलें, सांवरीचा चीक व ओंवा यांचें चूर्ण ताकाशीं घ्यावें, ह्मणजे उग्रअतिसाराचा नाश होतो.

## बृहल्लवंगादिक चूर्ण.

लवंगमेलातजपत्रजोत्पलमुशीरमांसीतगरंसवालकं ॥ कंकोलकृष्णा गरुनागकेसरंजातीफलंचंदनजातिपत्रिका ॥ द्विजाजिसत्र्यूषणपुष्क रंसठीफलत्रिकंकुष्ठविडंगचित्रकं ॥ तालीसपत्रंसुरदारुधान्यकंयवा नियष्टीखदिराम्लवेतसं ॥ तुंगाजमोदाघनसारमभ्रकंशृंगीविषाग्रंथि कमग्निमंथकं ॥ प्रियंगुमुस्तातिविषाशतावरीसत्वंगुडूच्यास्त्रिवृता दुरालभा ॥ समानिसर्वैश्चसमासिताभवेद्बृहल्लवंगाद्यमिदंनिगद्य ते ॥ सायंप्रगेखादतिकर्षसंमितंभवंतिदेहेबलवीर्यपुष्टयः ॥ प्रमेह कासारुचियक्ष्मपीनसक्षयास्रदाहंग्रहणीत्रिदोषनुत् ॥ हिक्कातिसा रप्रदरंगलग्रहंनिहंतिपांडुस्वरभंगमश्मरीं ॥

अर्थ—लवंगा, एलची, तमालपत्र, कमलकंद, वाळा, जटामांसी, तगर, काळा वाळा, कंकोळ, कृष्णागरु, नागकेशर, जायफळ, चदन, जायपत्री, जिरें, शहाजिरें, सुंठ, मिरीं, पिंपळी, पुष्करमूळ, कचोरा, हरडा, बेहडा, आवळकाठी, कोष्ठ, वावडिंग, चित्रकमूळ, तालीसपत्र, देवदार, धने, ओंवा, ज्येष्ठीमध, खैर, आम्लवेतस, वंशलोचन, किरमाणी ओंवा, कापूर, अभ्रकभस्म, कांकडशिंगी, काळें अतिविष, पिंपळमूळ, टाकळी, सांवें, नागरमोथे, श्वेत अतिविष, शतावरी, गुडूचीसत्व, निशोत्तर व धमासा हीं सर्व समभाग. व या सर्व चूर्णाबरोबर साकर घालून तें एकत्र मिळवावें. याला बृहल्लवंगादि चूर्ण ह्मणतात. हें एक कर्ष सायंकाळीं व प्रातःकाळीं द्यावें, ह्मणजे देहाला बल, व वीर्य, आणि पुष्टि याला देतें. व मेह, खोकला, अरुचि, राजयक्ष्मा, पीनस, क्षय, रक्तदाह, संग्रहणी, सन्निपात, उचकी, अतिसार, ओंळणी, गलग्रह, पांडुरोग, स्वरभंग, आणि अश्मरी यांचा नाश करितें.

## विजयायोग.

मधुनाविजयाभवंरजोनिशिलीढंमधुनासुभर्जितं ॥
अतिसारमनिद्रतांहरेद्ग्रहणींवैदहनस्यमंदतां ॥

अर्थ-रात्रीं भांगेंत भाजलेलें चूर्ण मधाशीं द्यावें. ह्मणजे अतिसार, निद्रानाश, संग्रहणी, आणि अग्निमांद्य यांचा नाश करितें.

## कुटजावलेह

क्षुण्णंकुटजमूलस्यचूर्णंतोयार्मणेपचेत् ॥ क्वाथेपादावशेषेस्मिन्लेहेपूतेपुनःपचेत् ॥ सौवर्चलयवक्षारबिडसैंधवपैप्पलं ॥ पाठाचेंद्रयवाजाजीचूर्णंदत्वापलद्वयं ॥ लिह्याद्दरमात्रंतुतच्छीतंमधुसंयुतं ॥ पक्वापक्वमतीसारंनानावर्णंसवेदनं ॥ दुर्वारंग्रहणीरोगंजयेच्चैतत्प्रवाहिकं

अर्थ-कुडयाचा पाळांची साल, बारीक कुटून १०२४ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा; व त्यांत संचळ, यवक्षार, बिडलोण, सैंधव, पिंपळी, पाडळमूळ, इंद्रजव, व जिरें यांचें चूर्ण दोन पळें घालून थंड जाहाल्यावर तो कुटजावलेह बोराएवढा मधाशीं द्यावा. ह्मणजे पक्व, अपक्व, नानावर्ण, वेदनायुक्त असा अतिसार, व दुर्वारग्रहणीरोग, व प्रवाहिका, यांचा नाश करितो.

## दुसराकुटजावलेह.

क्वाथोवत्सकजोनितांतविमलैःपादावशेषःस्थितोमुस्ताक्षीरविडंगबीजरुचकंसिंधूद्भवंधातकी ॥ कृष्णाचेतिविचूर्णितंसममिदंसंपाचयेत्पावकेयावद्घनतांप्रयात्यतितरांशीतेमधुक्षेपणं ॥ कृत्वावत्सकलेहएपशमयेत्कृच्छ्रातिसारंरुचंदुर्नामग्रहणीभगंदरगदान्श्वासप्रमेहानपि ॥

अर्थ-कुडयाचा सालीचा चतुर्थांश काढा करून त्यांत नागरमोथा, दुध, वावडिंग, पादेलोण, सैंधव, धायटीचीं फुलें, व पिंपळी यांचें चूर्ण समभाग घालून अग्नीवर दाट होईपर्यंत पचऊन थंड झाल्यावर त्यांत मध घालून अनुपानाशीं द्यावा. ह्मणजे हा कुटजावलेह अतिसार, मूळव्याध, संग्रहणी, भगंदर, श्वास, व मेह यांचा नाश करितो.

## कुटजपुटपाक.

तत्कालंकृष्णकुटजत्वचंतंडुलवारिणा ॥ पिष्ट्वाचतुःपलमितांजंबूपल्लववेष्टितां ॥ सूत्रेणबद्धांगोधूमपिष्टेनपरिवेष्टितां ॥ लिप्त्वाचघनपंकेनगोमयैर्वन्हिनादहेत् ॥ अंगारवर्णांचमृदंदृष्ट्वावन्हेःसमुद्धरेत् ॥ ततोरसंगृहीत्वाचशीतंक्षौद्रयुतंपिबेत् ॥ जयेत्सर्वानतीसारान्दुस्तरान्सुचिरोत्थितान् ॥

अर्थ-काळ्या कुडयाची ओली साल १६ तोळे घेऊन तांदूळांचें धुणांत वांटावी; नंतर गोळा करून बाहेरून जांवळीचा पानानीं वेष्टून सुतानें बांधून त्यावर कणकीचा लेप करावा. त्यावर दाट चिखल लिंपावा. आणी तो गोळा गोंवऱ्यांचे अग्नींत माती

लाल होईपर्यंत पचवावा; नंतर त्याचा रस काढून तो निवाल्यावर मध घालून द्यावा; ह्मणजे तो फार दिवसांचा अतिसाराचा नाश करील.

## तंदुलजल.

कंडितंतंदुलपलंजलेष्टगुणितेक्षिपेत् ॥
भावयित्वाजलंग्राह्यंदेयंसर्वत्रकर्मसु ॥

अर्थ—चांगले कांडलेले तांदूळ ३५ तोळे घेऊन आठ पट पाण्यांत धुवावे; आणि तें. पाणी सर्वत्र योगांत योजावें.

## मृतसंजीवनरस.

शुध्दसूतंसमंगंधंसूतपादंविषंक्षिपेत् ॥ सर्वतुल्यंमृतंचाभ्रमर्द्यंधत्तूरजैर्द्रवैः ॥ सर्पाक्ष्याश्चद्रवैर्यामंकषायेणाथभावयेत् ॥ धातक्यतिविषा मुस्ताशुंठीवालकजीरकं ॥ यवानीधातकीबिल्वंपाठापथ्याकणान्विता ॥ कुटजस्यत्वचंबीजंकपित्थंदाडिमीबला ॥ प्रत्येकंकर्षमात्रंस्यात्कल्कितंक्वथितंजलैः ॥ कल्काच्चतुर्गुणंतोयंक्वाथंपादावशेषितं ॥ अनेनत्रिदिनंभाव्यंपूर्वोक्तंमर्दितंरसं ॥ रुध्वातद्वालुकायंत्रेक्षणंमृद्वग्निना पचेत् ॥ मृतसंजीवनोनामरसोगुंजाचतुष्टयं ॥ दातव्यमनुपानेनअसाध्यमपिसाधयेत् ॥ नागरातिविषामुस्तादेवदारुवचाकणा ॥ यवानीधान्यकंबालकुटजस्यत्वचाभया ॥ धातुकींद्रयवापाठाबिल्वमोचरसं समं ॥ चूर्णितंमधुनालेह्यमनुपानंसुखावहं ॥

अर्थ—शुद्धपारा, व गंधक समभाग, व चतुर्थांश बचनाग, आणि सर्वांचे समान अभ्रकभस्म हीं सर्व एकत्र करून त्यांचा धोत्र्याच्या रसांत खल करावा; नंतर मुंगुसवेलीचा रस किंवा काढा याची एक प्रहर भावना द्यावी; आणि धायटीचीं फुलें, अतिविष, नागरमोथा, सुंठ वाळा, जिरें, ओंवा, जव, गेळफळ, पाहाडमूळ, हरीतकी, पिंपळी, कुड्याचीसाल, इंद्रजव, कंवठ, डाळींब, व चिकणा हीं प्रत्येक कर्ष प्रमाण घेऊन त्यांचा कल्क, किंवा काढा करणे झाल्यास कल्काचे चौपट पाणी घालोन त्याचा चतुर्थांश काढा घेऊन त्याणें त्यापूर्वोक्त औषधाला तीनदिवस भावना द्यावी; नंतर पणतींत भरून मातकापड करून सुकवून वालुकायंत्रांत एक क्षण पचन करावा. याला मृतसंजीवन रस ह्मणतात. हा चार गुंजा अनुपानशीं द्यावा. ह्मणजे असाध्य रोगाचा ही नाश करितो. हा रस सुंठ; अतिविष, नागरमोथे, देवदार, वेखंड, पिंपळी ओंवा, धनें, वाळा, कुड्याची साल, हरीतकी, धायटीपुष्पें, इंद्रजव, पाहाडमूळ, बेलफळ, व मोचरस यांचें चूर्ण व मध यांशीं घ्यावा. हें अनुपान सुखावह आहे.

## कारुण्यसागर.

रसभस्माद्विधागंधंतस्माद्विघ्नंमृताभ्रकं ॥ दिनंसक्रबुतैलेनपिष्टाया मंविपाचयेत् ॥ रसंमार्कवमूलोत्थेनिर्यासेसंविमर्द्यच ॥ त्रिक्षारंपं चलवणंविषंव्योषाग्निजीरके ॥ सचित्रकैःसमानांशैर्युक्तःकारुण्यसाग रः ॥ माषद्वयंप्रयुंजीतरसःस्यादतिसारके ॥ सज्वरेविज्वरेवाथसशू लेशोणितोद्भवे ॥ निरामेशोथयुक्तेवाग्रहण्यांसानुपानकः ॥ अनुपा नंविनाह्येषकार्यसिद्धिकरिष्यति ॥

अर्थ—एक भाग पारदभस्म, दोन भाग गंधक व चार भाग अभ्रकभस्म हीं एकत्र करून एरंडतैलाशीं एक दिवस खलून एक प्रहर पचन करावी; नंतर माक्याच्या मुळां चा रसांत त्याला खलावा; आणि जवखार, सज्जीखार, टांकणखार, लवण, सैंधव, बिडलोण, संचळ, बचनाग, सुंठ, मिरीं, पिंपळी, केशर, जिरें, व चित्रक यांचें समभाग चूर्ण मिळवावें; ह्मणजे याला कारुण्यसागर ह्मणतात. हा अतिसारावर दोन मासे· द्यावा. हा सज्वर किंवा विज्वर, व सशूल असा रक्तातिसार, किंवा शोथयुक्त अतिसार, संग्रहणी, यांवर अनुपानाशीं द्यावा. अथवा हा अनुपानावांचून ही कार्यसिद्धिकरणारा आहे.

## कुंकुमवटी.

कीटनिष्ठविनेघृष्टंनागफेनंसकुंकुमं ॥ तंडुलप्रमितंदत्तंआतिसारानि षूदनं ॥ इदंमयागुरोर्लब्धंनतुशास्त्राद्भिषग्वराः ॥ भवतामुपकाराय गुरोस्तत्वंप्रकाशितं ॥

अर्थ—मेण, अफु, व केशर हे पदार्थ एकत्र खलोन तांदुळभार चूर्ण द्यावें. तें अतिं-साराचा नाश करितें. हें गुरूपासून समजलें, शास्त्रांत मिळालें नाहीं; परंतु सर्वोपकारा करितां गुरूचें तत्व ह्मणून सांगितलें.

## कपित्थादि पेया.

कपित्थबिल्वचांगेरीतक्रदाडिमसाधिता ॥
ग्राहिणीपाचनीपेयावातेवापंचमूलिका ॥

अर्थ—कवठ, बेलफळ, चुका, ताक, व डाळिंब यांणीं केलेली पेया ( पेज ) ग्राहिणी, व पाचनी, अशी आहे; किंवा वाताधिकावर पंचमूळानीं केलेली पेया द्यावी.

## पंचमूलबलादि पेया.

पंचमूलीबलाविश्वाधान्यकोत्पलबिल्वजा ॥
वातातिसारिणेदेयासक्तेनान्यतमेनच ॥

अर्थ–पंचमुळें, चिकणा, सुंठ, धने, कमळ, बेलफळ, याहीं केलेली पेया. वातातिसार नाशक आहे. किंवा ही सूक्ताशीं किंवा दुसऱ्या यांगाशीं द्यावी.

## मसुराद्यघृत.

मसूराणांपलशतंजलद्रोणेविपाचयेत् ॥ पादशेषंशृतंनीत्यादत्वाबि ल्वपलाष्टकं ॥ घृतप्रस्थंपचेतेनसर्वातीसारनाशनं ॥ ग्रहणींभिन्न विट्कंचनाशयेच्चप्रवाहिकां ॥

अर्थ–चारशें तोळे मसुरा घेऊन दाहाशें चोवीस तोळे पाणीं घालोन पचन करावें. आणि तोचतुर्थांश काढा गाळून घ्यावा. नंतर बेलफळाचें चूर्ण ३२ तोळे, आणि तूप ६४ तोळे घालोन करावें. तें तूप सर्व अतिसार, ग्रहणी, भिन्नविट्कता, व प्रवाहिका, यांचा नाश करितें.

## लोकनाथरस.

रसभस्मभागमेकंचत्वारःशुद्धगंधकं ॥ पिष्ट्वावराटिकामूलंटंकणेननिरुध्यच ॥ भांडेरुध्वापुटेपाच्यंस्वांगशीतंविचूर्णयेत् ॥ लोकनाथोरसोनाम्नाक्षौद्रेगुंजा चतुष्टयं ॥ नागरातिविषामुस्तादेवदारुवचान्वितं ॥ कषायमनुपानंस्याद्वा तातीसारनाशनं ॥ क्षीरिण्यावाकषायेणयोगवाहंनियोजयेत् ॥

अर्थ–पारदभस्म एक भाग, व शुद्ध गंधक चार भाग, हे एकत्र खलून त्या कज्जलीनें कवड्या भराव्या. आणि त्या कवड्यांचीं तोंडें टांकणखारानें बंद करावीं; आणि शरावांत घालोन मातकापड करून गजपुट द्यावें. स्वांगशीत झाल्यावर काढून खल करून काच पात्रांत भरून ठेवावा. याचें नांव लोकनाथरस, हा चार गुंजा मधाशीं द्यावा. किंवा सुंठ, अतिविष, नागरमोथा, देवदारु, वेखंड, यांच्या काढ्याशीं, अथवा क्षीरिणीच्या काढ्याशीं, किंवा योगवाहक अनुपाशीं द्यावें; ह्मणजे तो वातातिसाराचा नाश करितो.

## महारस.

भस्मसूतस्यतीक्ष्णस्यमरिचाज्यंसमंसमं ॥ स्नुक्क्षीरकाकमाचीभ्यांमर्द येद्याममात्रकं ॥ निरुध्यभूधरेपाच्यंदिनैकेनमहारसं ॥ निष्कार्धंभावये च्चानुपाययेद्दधिमंयुतं ॥ सर्पाक्षिकर्षमात्रंतुपीत्वावातातिसारनुत् ॥

अर्थ–पारदभस्म, तिख्याचें भस्म, मिर्यें, व तूप, हे पदार्थ समभाग घेऊन. ते निवडुंग, कावळी यांच्या रसाशीं एक प्रहर खलावें. नंतर शरावांत घालोन मतकापड करून एक दिवस भूधरयंत्रानें पचन करावें. ह्मणजे हामहारस सिद्ध होतो, हा दीड मासा अनुपानाशीं द्यावा; आणि मागून दहीं व सर्पाक्षी निळून दाहा मासे प्राशन करण्या करितां द्यावें. ह्मणजे तो वातातिसाराचा नाश करितो.

## द्वितीय महारस.

शुध्दसूतंसमंगंधंमरिचंटंकणंकणा ॥ स्वर्णबीजंसमंमर्द्यभृंगेद्रावैर्दि नार्धकं ॥ सूततुल्योरसोयोज्योरसःकनकसुंदरः ॥ योज्योगुंजाद्वयंहं तिवातातिसारमद्भुतं ॥ दध्यन्नंदापयेत्पथ्यमाज्यंवाथगवांदधि ॥

अर्थ–शुद्ध पारा, शुद्ध गंधक, मिऱ्यें, टांकणखार, पिंपळी व धोतऱ्याचें बीज, हे पदार्थ समभाग घेऊन माक्याच्या रसांत अर्धा दिवस खल करावा. याचें नांव कनकसुंदर. हा दोन गुंजा द्यावा; ह्मणजे अद्भुतवातातिसाराचा नाश करितो. याला पथ्य गाईचें किंवा शेळीचें दहीं, आणि भात द्यावा.

## वातातिसारावर भाज्या.

फंजीशाल्मलिरक्ताक्षकिपित्थंदाडिमान्यथ ॥ श्लेष्माटोबदरीवाथक्षी रिणीवाकुचीतिवा ॥ तर्कारीबाबळीचैषांबालपत्राणिवापुनः ॥ पक्का निव्यंजनार्थाययोजयेदतिसारिणां ॥

अर्थ–फांज, सावरी, गुग्गुळ, कंवठ, डाळिंब, भोंकरें, बोरें, क्षीरिणी, बावच्या, टाकळी व बाबुळ यांचे कोंवळे पानाची किंवा जून पानाची भाजी यथायोग्य करून द्यावी. ती वातातिसारावर हितकारक आहे.

## पित्तातिसारनिदान.

पित्तात्पीतंनीलमालोहितंवातृष्णामूर्छादाहपाकोपपन्नं ॥

अर्थ–पित्तापासून पिंवळा, निळा, किंवा थोडासा तांबडा, मळ होतो, आणि तहान, भोंवळ, सर्वांगाचा दाह व गुदाचे ठिकाणीं पुरळ हीं लक्षणें होतात.

## पित्तातिसारचिकित्साक्रम व पेया.

आमान्वितमतीसारंपैत्तिकंलंघनैर्जयेत् ॥ लंघितस्ययथासात्म्यंयवा गूमंडतर्पणैः ॥ शृतंचंदनमुस्ताभ्यांपटोलादीप्यनागरैः ॥ पेयामम्ला मतक्रांवापाचनींग्राहिणींपिबेत् ॥

अर्थ–जो आमयुक्त पित्तातिसार त्याला लंघनानें जिंकावा, व लंघन केल्यावर यथासात्म्य यवागू, मंड, तृप्तिकर पदार्थ, आणि चंदन, मोथे, कडुपडवळ, जिरें व सुंठ, यांचा काढा द्यावा; आणि आंबट, ताका वांचून, पाचनी व ग्राहक अशी पेज द्यावी.

## पित्तातिसारावर पाणी व अन्न.

धान्योदीच्यशृतंतोयंतृष्णादाहातिसारवान् ॥
ताभ्यामेवसपाठाभ्यांसिद्धमाहारमाचरेत् ॥

**अर्थ**–धने व वाळा, यांचा काढा दाह, तृषा व अतिसार यांचे निवारणार्थ पाण्या-ऱ्या ऐवजीं द्यावा; आणि धने, वाळा व पाहडमूळ, यांचे काढ्यांत सिद्ध केलेलें अन्न द्यावें.

## मधुकादियोग.

मधुकंकट्फलंलोध्रंदाडिमस्यफलत्वचौ ॥
पित्तातिसारेमध्वक्तंपाययेत्तंदुलांबुना ॥

**अर्थ**–ज्येष्ठीमध, कायफळ, लोध्र, डाळिंबाची साल व फळें, ह्यांचें चूर्ण किंवा कल्क तांदुळांच्या धुवणाशीं मध घालोन द्यावा; ह्मणजे तो योग पित्तातिसारनाशक होतो.

## शुंठ्यादिकाढा.

शुंठीसुवर्चलाहिंगुरभयेंद्रयवामताः ॥
पित्तातिसारस्तत्काथोनिपीतोमधुनासह ॥

**अर्थ**–सुंठ, ब्राह्मी, हिंग, हरीतकी व इंद्रजव, यांच्या काढ्यांत मध घालून द्यावा. हा पित्तातिसारनाशक आहे.

## बिल्वादिकाढा.

बिल्वशक्रयवांभोदवालकातिविषाकृतः ॥
कषायोहंत्यतीसारंसामंपित्तसमुद्भवं ॥

**अर्थ**–बेलफळ, इंद्रजव, नागरमोथा, वाळा व अतिविष यांचा काढा आमसहित पित्तातिसाराचा नाश करितो.

## कट्फलादिकाढा.

कट्फलातिविषांभोदवत्सकंनागरान्वितं ॥
शृतंपित्तातिसारघ्नंदातव्यंमधुसंयुतं ॥

**अर्थ**–कायफळ, अतिविष, नागरमोथे, कुड्याची साल, सुंठ यांचा काढा मध घालोन द्यावा, तो पित्तातिसाराचा नाश करील.

## मधुयष्ट्यादिकाढा.

मधुयष्टिःसितालोध्रमुत्पलंसमभागतः ॥
मधुक्षीरयुतंपीतंरक्तपित्तातिसाराजित् ॥

**अर्थ**–ज्येष्ठमध, लोध्र, कमळकंद व साकर, हीं समभाग घेऊन. काढा करून त्यांत मध व दूध घालून द्यावा, ह्मणजे रक्तपित्तातिसाराचा नाश करील.

## समंगादिचूर्ण.

समंगाधातकीपुष्पंबिल्वंसौवर्चलंबिडं ॥ सक्षौद्रंदाडिमंचैवपीतंतंदुल वारिणा ॥ चूर्णंपित्तातिसारघ्नंशूलंचाशुनियच्छति ॥

अर्थ-चिकणा, धायटीची फुलें, बेलफळ, पादेलोण, बिडलोण, डाळिंबाची साल, यांचें चूर्ण तांदुळांचे धुवणाबरोबर मध घालून प्यावें; ह्मणजे पित्तातिसार व शूळ यांचा नाश करितें.

## अतिविषादियोग.

सक्षौद्रातिविषापिष्टावत्सकस्यफलंत्वचं ॥
तंदुलोदकसंयुक्तंपेयंपित्तातिसारनुत् ॥

अर्थ-अतिविष, कुडयाची साल व इंद्रजव यांचें चूर्ण तांदुळाच्या धुवणाशीं मध घालून द्यावें. तें पित्तातिसाराचा नाश करितें.

## जंब्वादिचूर्ण.

जंबूचूतफलस्यास्थिद्राक्षापथ्याचपिप्पली ॥ खर्जूरंशाल्मलीछल्लीउदुंबरसवल्कलं ॥ एतच्चूर्णसमंश्लक्ष्णंमधुनासहभक्षितं ॥ रक्तपित्तोद्भवंशीघ्रंहंत्यतीसारमुल्बणं ॥

अर्थ-जांबूळ व आंबा यांची आंठी, द्राक्षें, हरीतकी, पिंपळी, खजूर, सांवरीची साल, भवरसाली व उंबर, लोध्र, यांचें समभाग चूर्ण मधाशीं द्यावें; ह्मणजे तें रक्त व पित्त यांपासून झालेल्या अतिसाराचा शीघ्र नाश करितें.

## लोकेश्वररस.

रसस्यभस्मनाहेमपादांशंमारितंक्षिपेत् ॥ उभयोर्द्विगुणंगंधंमर्दयेच्चित्रकांबुना ॥ पूर्वावराटिकातेनटंकणेननिरोधयेत् ॥ मृत्तिकाचूर्णलिप्तेतुभांडेक्षिप्त्वानिरुध्यच ॥ शुष्कंगजपुटेपक्त्वाउग्राह्यंसुशीतलं ॥ रसोलोकेश्वरोनामचूर्णंगुंजाचतुष्टयं ॥ मधुनासहदातव्यंसर्वातिसारनाशनं ॥ बालबिल्वंगुडंतैलंपिप्पलीनागरंसमं ॥ लेहयेन्मधुनासार्धमनुपानंसुखावहं ॥

अर्थ-पाऱ्याचें भस्म एक तोळा, स्वर्णभस्म पाव तोळा व गंधक अडीच तोळे यांचा चित्रकाच्या रसांत खल करून तें कवडयांत भरावें; आणि त्यांचें तोंड टांकणखारानें बंद करावें. नंतर त्या कवडया बोळक्यांत भरून मातकापड करून सुकऊन गजपुट द्यावें. थंड झाल्यावर काढावें; आणि खलून चूर्ण करावें. याला लोकेश्वर रस ह्मणतात. हा चार गुंजा मधाशीं दिला असतां, सर्व अतिसारांचा नाश करितो. याला अनुपान कोंवळें बेलफळ, गुळ, तेल, पिंपळी व सुंठ यांचें चूर्ण मधाशीं द्यावें.

## दुसरा प्रकार.

लोकनाथोरसोप्यत्रक्षौद्रैर्गुंजाचतुष्टयं ॥
दातव्यश्चपिबेच्चानुपेपितंतंडुलोदकं ॥

**अर्थ**–पित्तातिसारावर मधाशीं लोकनाथरस चार गुंजा द्यावा; आणि मागून तांदुळांचे धुवण प्यावयास द्यावें.

## वत्सकादि घृत.

पलंवत्सकसंसिद्धंचतुर्गुणजलेघृतं ॥
पित्तातिसारेभिपजादेयंदीपनपाचनं ॥

**अर्थ**–चार तोळे तूप कुड्याचे सालीच्या सोळा तोळे काढ्यांत सिद्ध करावें. तें पित्तातिसारावर दीपन व पाचन आहे.

## कफातिसारनिदान.

शुक्लंसांद्रंसकफंश्लेष्मयुक्तंविस्रंशीतंत्दृष्टरोमामनुष्यः ॥

**अर्थ**–कफातिसारामध्यें पांढरा, घट्ट, कफमिश्रित, आमगंधि आणि थंड, असा मळ पडतो; व त्या मनुष्याचे आंगावर रोमांच उभे राहातात.

## कफातिसारचिकित्साक्रम.

श्लेष्मातिसारेप्रथमंहितंलंघनपाचनं ॥
योज्यश्चामातिसारघ्नोयथोक्तोदीपनोगणः ॥

**अर्थ**–कफातिसारावर प्रथम लंघन व पाचन हितकारक होतें; व आमातिसारनाशक जो दीपनगण सांगितला तो योजावा.

नतुसंग्रहणंदद्यात्पूर्वमामातिसारिणां ॥
दोषोह्यादौवर्धमानोजनयत्यामयान्बहून् ॥

**अर्थ**–आमातिसारावर पूर्वी बंदाचें औषध देऊं नये, कारण प्रथमतः बंदाचे औषधानें आम बंद झाला; ह्मणजे दोष वाढून बहुत रोग उत्पन्न करतो.

डिंभजःस्थाविरोवापिवातापित्तात्मकश्चयः ॥ क्षीणधातुबलार्तस्यबहु
दोषोतिविश्रुतः ॥ आमोपिस्तंभनीयःस्यात्पाचनान्मरणंभवेत् ॥

**अर्थ**–लहान मुलास, वृद्धास, किंवा धातुक्षीणास झालेला आम फार वाढला असतां, तो पित्तयुक्त आहे; तर स्तंभनकरण्यास योग्य आहे. त्याचें पाचन केलें असतां, तो मरणप्रद होतो.

## पंथ्यादिकाढा.

पथ्याग्निकटुकापाठावचामुस्तकवत्सकैः ॥
सनागरैर्ज्जयेत्क्काथःकल्कोवाश्लैष्मिकांस्रुतिं ॥

अर्थ–हिरडे, चित्रक, कुटकी, पाहाडमूळ, वेखंड, नागरमोथे, इंद्रजव व सुंठ इत्यांचा काढा किंवा कल्क, कफातिसाराचा नाशक आहे.

## कृमिशत्रवादिकाढा.

कृमिशत्रुवचाबिल्वपेशीधान्याककट्फलं ॥
एषांक्वाथंभिषग्दद्यादतीसारेबलासजे ॥

अर्थ–वावडिंग, वेखंड, बेलफळाचा गीर, धने व कायफळ यांचा काढा वैद्याने कफापासून झालेल्या अतिसारावर द्यावा.

## पूतिकादिकल्क.

पूतिकव्योषबिल्वाग्निपाठादाडिमहिंगुभिः ॥
योजयेत्सत्कृतैःपेष्यैःश्लेष्मातीसारपीडितम् ॥

अर्थ–करंज, सुंठ, मिरीं, पिंपळी, बेलफळ, चित्रक, पाहाडमूळ, दाळिंब व हिंग हे पदार्थ वांटून त्यांचा कल्क द्यावा. त्याणें श्लेष्मातिसार नाश पावतो.

## गोकंटकादिकाढा.

गोकंटकंगुहोव्याघ्रीकषायंसुश्रितंपिबेत् ॥
आमश्लेष्मातिसारघ्नंदीपनंपाचनंपरं ॥

अर्थ–गोखरू, कांग व रिंगणी यांचा काढा प्राशनार्थ द्यावा; ह्मणजे तो श्लेष्मातिसारनाश करितो. व तो दीपन व पाचन असा आहे.

## चव्यादिकाढा.

चव्यंसातिविषाकुष्टंबालबिल्वंसनागरं ॥
वत्सकत्वक्फलंपथ्याछर्दिश्लेष्मातिसारनुत् ॥

अर्थ–चवक, अतिविष, कोष्ठ, बाळबेल, सुंठ, कुडयाची साल, इंद्रजव व हरीतकी यांचा काढा वांति व कफज अतिसार यांचा नाशक आहे.

## कणादिचूर्ण.

पाठावचात्रिकटुकंकुष्ठंकटुकरोहिणी ॥
उष्णांबुनाविनिघ्नंतिश्लेष्मातीसारमुल्बणं ॥

अर्थ–पाहाडमूळ, वेखंड, सुंठ, मिरें, पिंपळी, कोष्ठ व कटुकी यांचें चूर्ण ऊनपाण्याबरोबर प्यालें असतां, तें श्लेष्मातिसारनाशक आहे.

## हिंग्वादिचूर्ण.

हिंगुसौवर्चलंव्योषमभयातिविषावचा ॥
पीतमुष्णांबुनाचूर्णमेतत्श्लेष्मातिसारनुत् ॥

अर्थ हिंग, पादेलोण, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, अतिविष व वेखंड यांचें चूर्ण ऊनपाण्याबरोबर प्यालें असतां, तें श्लेष्मातिसार दूर करणारें आहे.

## बब्बूलादियोग.

बब्बूलपत्रंसंपिष्टंरात्रौजीरद्वयंहितं ॥
कर्षमात्रंभवेद्भक्ष्यंकफातीसारनाशनं ॥

अर्थ–बाभळीचीं पानें, जिरें व शाहाजिरें, हीं वांटून एक तोळा भक्षणार्थ रात्रीं द्यावीं, म्हणजे कफातिसाराचा नाश होतो.

## पथ्यादिचूर्ण.

पथ्यापाठावचाकुष्टंचित्रकःकटुरोहिणी ॥
चूर्णमुष्णांभसापीतंश्लेष्मातीसारनाशनं ॥

अर्थ–हरीतकी, पाहाडमूळ, वेखंड, कोष्ठ, चित्रक व कुटकी यांचें चूर्ण ऊनपाण्याशीं द्यावें. तें श्लेष्मातिसारनाशक आहे.

## अभयादिचूर्ण.

अभयातिविषाहिंगुसौवर्चलकटुत्रयं ॥
एतच्चूर्णसुतप्तांभःपीतंश्लेष्मातिसारजित् ॥

अर्थ–हरीतकी, अतिविष, हिंग, सौवर्चल, सुंठ, मिरीं व पिंपळी यांचें चूर्ण ऊन पाण्याशीं द्यावें. तें श्लेष्मातिसारनाशक आहे.

## पथ्यादिचूर्ण.

पथ्यासौवर्चलंहिंगुसैंधवातिविषावचा ॥
आमातिसारंसकफंपीतमुष्णांबुनाजयेत् ॥

अर्थ–बाळहिरडे, सौवर्चल, हिंग, सैंधव, अतिविष व वेखंड यांचें चूर्ण उष्णोदकाशीं प्यालें असतां, आमातिसार व कफ यांचा नाश करितें.

## शुंठीपुटपाक.

महौषधंसुक्ष्मचूर्णंकृत्वातोयेनपेषयेत् ॥ ततस्तुगोलकंकृत्वालेपयेत्त
दनंतरं ॥ वातारिशूलकल्केनश्रीपत्रैर्वेष्टयेत्तथा ॥ सूत्रबद्धंमृदालि

प्तंमृदुवन्हौविपाचयेत् ॥ सुस्निग्धंगोलकंतंतुस्फोटयित्वासमुद्धरेत् ॥ शीतीभूतंमधुयुतंखादेन्माषद्वयोन्मितं ॥ अथतक्रेणगव्येनसहदेयंप लेनच ॥ योगोयंकफवातोत्थदुष्टातीसारनाशनः ॥ शोफकासहरः कांतिकृष्णवर्त्मविवर्धनः ॥

अर्थ–सुंठीचें बारीक चूर्ण करून पाण्याशीं मळावें, त्याचा गोळा करून त्यावर एरंडाच्या कल्काचा थलक द्यावा; नंतर वेलाच्या पानानीं वेष्टून सुतानें बांधून वर मातीचा थलक देऊन मंदाग्नीनें भाजावा; नंतर फोडून थंड झाल्यावर दोन मासे चूर्ण, गाईच्या चारतोळे ताकाशीं द्यावें- हा योग कफ व वायु यांपासून झालेले दुष्ट अतिसार, सूज व खोकला यांचा नाश करितो; आणि कांति व अग्नि यानां वाढवितो.

## त्रिदोषातिसारनिदान.

वराहस्नेहमांसांबुसदृशंसर्वरूपिणं ॥
कृच्छ्रसाध्यमतीसारंविद्याद्दोषत्रयोद्भवं ॥

अर्थ–डुकराच्या वसेसारिखा, मांस धुतलेल्या पाण्यासारिखा व वातादि सर्व अतिसारांच्या लक्षणानीं युक्त जो अतिसार तो त्रिदोष जाणावा. तो कष्टसाध्य आहे.

## कुटजावलेह.

कुटजस्यत्वचःक्वाथोवस्त्रपूतोघनीकृतः ॥ सलीढोतिविषायुक्तःस्यात्त्रिदोषातिसारनुत् ॥ इच्छंत्यत्राष्टमांशेनक्वाथादतिविषारजः ॥ प्रक्षिपेद्वाचतुर्थांशमितिकेचिद्वदंतिहि ॥

अर्थ कुड्याच्या सालीचा काढा करून गाळून घ्यावा; आणि त्यांत अतिविषाचें चूर्ण घालून पुनः पचवून दाट करावा; आणि त्याचें चाटण द्यावें; ह्मणजे त्रिदोषज अतिसार नाश पावतो. यांत कोणी अतिविष अष्टमांश घालावें असें ह्मणतात; व कोणी चातुर्थांश घालावें ह्मणून सांगतात.

## समंगादिकाढा.

समंगातिविषामुस्ताविश्वन्हीबेरधातुकी ॥
कुटजत्वक्फलंबिल्वंक्वाथःसर्वातिसारनुत् ॥

अर्थ–चिकणा, अतिविष, नागरमोथे, सुंठ, वाळा, धायटीचीं फुलें, कुड्याची साल, इंद्रजव व बेलफळ यांचा काढा. सर्व अतिसारांचा नाशक आहे.

## पंचमूलीबलादिकाढा.

पंचमूलीबलाबिल्वगुडूचीमुस्तनागरैः ॥ पाठाभूनिंबबर्हिष्ठकुटजत्व

कफलैःशृतं ॥ सर्वजंहंत्यतीसारंज्वरंचापितथावमिं ॥ सशूलोपद्रवं श्वासंकासंवापिसुदुस्तरं ॥

अर्थ–पंचमूळें, चिकणा, बेलफळ, गुळवेल, नागरमोथे, सुंठ, पाहाडमूळ, किराइत, वाळा, कुडयाची साल, इंद्रजव, यांचा काढा त्रिदोषातिसार, ज्वर, वांति, शूल, श्वास, व खोकला यांचा नाश करितो.

## पंचमूलयोजना.

पंचमूल्यत्रसामान्यापित्तेयोज्याकनीयसी ॥
वातेपुनर्बलासेचसायोज्यामहतीमता ॥

अर्थ–पित्तावर लघुपंचमूळ योजावें, आणि वायु व कफ यांवर बृहत्पंचमूळ योजावें.

## कुटजपुटपाक.

अवेदनंसुसंपक्वंदीप्ताग्नेःसुचिरोत्थितं ॥ नानावर्णमतीसारंपुटपाकैरुपाचरेत् ॥ स्निग्धंघनंकुटजवल्कलजंत्वजग्धमादायतत्क्षणमतीवचपेषयित्वा ॥ जंबूपलाशदलतंदुलतोयसिक्तंवद्धंकुशेनचबहिर्घनपंकलिप्तं ॥सुस्विन्नपिष्टमपिपिंडितरसंगृहत्वाक्षौद्रेणयुक्तमतिसारवतेप्रदद्यात् ॥ कृष्णात्रिपुत्रमतपूजितएषयोगःसर्वातिसारहरणेस्वयमेवराजा ॥

अर्थ–शूलावांचून, पक्क,दीप्ताग्नीचा, अनेकवर्णांनीं युक्त, अशा अतिसारावर पुटपाक योजावा. कुडयाची ओली साल आणून तत्काळ वांटून व तांदळांचें धुवण घालून गोळा करावा; आणि जांबळीच्या पानांनीं वेष्टण करून सुतानें बांधावें; आणि त्यावर दाट चिखलाचा लेप करावा. नंतर मंदाग्नीनें भाजून काढावा. त्याचा रस मध घालोन अतिसारी रोग्याला द्यावा. हा योग सर्वातिसाराचा नाश करितो. असें कृष्णनामक अत्रिपुत्रानें सांगितलें आहे.

## सूतादिवटी.

मृतंसूतंमृतंस्वर्णंमृतंताम्रंसमंसमं ॥ तुल्यंचखादिरंसारंतथामोचरसंक्षिपेत् ॥ द्रवैःशाल्मलिमूलोत्थैर्मर्दयेत्प्रहरद्वयं ॥ चणमात्रांवटींकृत्वा खादेज्जीरकसंयुतां ॥ त्रिदोषाढ्यमतीसारंसज्वरंनाशयेद्ध्रुवं ॥

अर्थ–पारदभस्म, सुवर्णभस्म, ताम्रभस्म हीं तीन समभाग आणि या तिहींचे बरोबर खदिरसार, आणि मोचरस, घेऊन सांवरीचे मुळांचा रस काढून त्या रसांत दोन प्रहर खलून चण्याइतक्या गोळ्या करून त्यांतून जिऱ्याबरोबर एक एक खावी, ह्मणजे तो त्रिदोषापासून झालेल्या अतिसाराची निश्चयें करून शांति करील.

## चतुःसमागुटी.

अभयानागरंमुस्तंगुडेनसहयोजितं ॥ चतुःसमेयंगुटिकात्रिदोषघ्नीप्र कीर्तिता ॥ आमातिसारमानाहंसविबंधंविषूचिकां ॥ कृमीनरोच कंहन्याद्दीपयत्याशुचानलं ॥

अर्थ—हिरडे, सुंठ, नागरमोथे व गुळ यांचे समभाग औषधांची गोळी करून खावी; ह्मणजे ती त्रिदोष, आमातिसार, आनाह, विबंध व विषूचिका यांची नाशक आहे.

## तृप्तिसागररस.

रसभस्मचभागैकंरसाद्द्विगुणगंधकं ॥ गंधकाद्द्विगुणंचाभ्रंनिश्चंद्रंमर्द येत्ततः ॥ दिनैकंकटुतैलेनरुध्वाचुल्यांविपाचयेत ॥ यामैकंवालुका यंत्रेसमुत्धृत्यविमर्दयेत् ॥ हयमारकमूलोत्थरसैर्यामंनिरुध्यच ॥ पूर्व वत्पाचयेच्चुल्यांसमादायविमिश्रयेत् ॥ त्रिक्षारंपंचलवणंनिष्काग्निद्वय जीरकैः ॥ विडंगेनचतत्तुल्यंयुक्तोयंतृप्तिसागरः ॥ भक्षयेन्माषमात्रं चसान्निपातातिसारजित् ॥ सज्वरांग्रहणींहंतिह्यनुपानंविनारसः ॥

अर्थ—पारदभस्म एक भाग, गंधक दोन भाग, अभ्रक चार भाग हे पदार्थ एकत्र करून व त्यांचा मोहऱ्यांचे तेलांत एक दिवस खल करावा; नंतर कुपींत भरून मुख बंद करून एक प्रहर वालुकायंत्रांत पचन करावा; नंतर कण्हेरीच्या मुळांच्या रसामध्यें जव- खार, सज्जीखार, टंकणखार, मीठ, टांकणखार, सैंधव, बिडलोण व संचळ, हे व चि- त्रक, जिरें, शहाजिरें, वावडिंग, यांचे चूर्ण तीन तीन मासे त्यांत मिळवावें; याला तृप्ति सागर ह्मणतात. हा एक मासा द्यावा; ह्मणजे सान्निपात, अतिसार, ज्वर, आणि संग्रहणी यांचा अनुपानावांचून नाश करितो.

## आनंदभैरवी.

मूलंकटुकरोहिण्याविल्वमज्जागुडूचिका ॥ दध्नापिष्ट्वापिबे च्चानुवटीचानंदभैरवी ॥ सन्निपातातिसारघ्नीपथ्यमूलाचपूर्ववत् ॥

अर्थ—कुटकी, बेलफळाचा मगज व गुळवेल, यांचें चूर्ण दह्याशीं द्यावें; ह्मणजे सन्नि पातातिसार नाश होतो. याला आनंदभैरवी ह्मणतात. ह्यावर पथ्यादि पूर्ववत् द्यावें.

## शोकभयातिसारनिदान.

तैस्तैर्भावैःशोचतोल्पाशनस्यबाष्पोष्मावैवन्हिमाविश्यजंतोः ॥ कोष्ठं गत्वाक्षोभयेत्तस्यरक्तंतच्चाधस्तात्काकणंतीप्रकाशं ॥ निर्गच्छेद्वैविड्विमि

श्चयविड्वाऽनिगंधंवागंधवद्वातिसारः ॥ शोकोत्पन्नोदुश्चिकित्स्योति मात्रंरोगोवैद्यैःकष्टएषप्रदिष्टः ॥

अर्थ—ज्याचें धनव बंधु इत्यादिकांचा नाश होऊन अतिभीति झाली; आणि त्यामुळेंच त्याचें अन्न तुटलें, त्याचे नेत्रांतील उदकादि व देहावरील कांत्यादि तेज हीं अंतःप्रवण होऊन कोठ्यांत शिरून जठराग्नीला व्याकूळ करून रक्ताला क्षोभवितात. मग तें रक्त अपानद्वारा स्रवूं लागतें. त्याचा रंग गुंजे सारिखा असतो. तें रक्त कधीं कधीं मलमिश्रित किंवा एकाकीं गंधरहित किंवा सगंध असें असतें. त्याला शोकातिसार ह्मणतात. हा कष्ट साध्य आहे. यावर वैद्यांनीं बहुशः चिकित्सा करूं नये. कांतर शोक नष्ट जहाल्या वांचून हा अतिसार बरा होणे कठीण.

## चिकित्सा.

भयशोकसमुद्भूतौज्ञेयौवातातिसारवत् ॥
तयोर्वातहरीकार्याहर्षणाश्वासनैःक्रिया ॥

अर्थ—भय व शोक यांपासून झालेले अतिसार वातातिसारासारिखे समजावे. व त्यांला हर्षकारक पदार्थ अथवा उमेद देणें, यांणीं अशी वातनाशकक्रिया करावी.

## पृश्निपर्ण्यादिकाढा.

पृश्निपर्णीवलाबिल्वधान्यकोत्पलनागरैः ॥ विडंगातिविषामुस्तादारुपाठाकलिंगकैः ॥ मरिचेनसमायुक्तंशोकातीसारनाशनं ॥

अर्थ—सालवण, चिकणा, बेलफळ, धने, कोष्ठ, सुंठ, वावडिंग, अतिविष, नागरमोथे, दारुहळद, पहाडमूळ व कुड्याची साल, यांचा काढा, मिरीं घालोन घ्यावा. तो शोकातिसाराचा नाश करितो.

## आमातिसारनिदान.

अन्नाजीर्णात्प्रद्रुताःक्षोभयंतःकोष्ठंदोषाधातुसंघान्मलांश्च ॥
नानावर्णंनैकशःसारयंतीशूलोपेतंपष्ठमेनंवदंति ॥

अर्थ—अन्नाच्या अजीर्णानें वातादिक दोष स्वस्थानापासून उठून सर्व उदराला दूषित करित होत्सातें सगळ्या पोटांत फिरूं लागतात; नंतर रसादि सप्त धातु, आणि पुरीषादि मळ यातें अनेकवर्णानीं व अनेकप्रकारानीं अपानद्वारा शूलयुक्त थोडथोडा मल बाहेर काढितात. त्याला आमातिसार ह्मणतात. तो साहावा जाणावा.

## आमातिसारीं चिकित्साक्रम.

आमपक्वक्रमंहित्वानातिसारेक्रियाहिता ॥
अतोतिसारेसर्वस्मिन्नामंपक्वंचलक्षयेत् ॥

अर्थ—आमपचन झाल्यावांचून अतिसारावर औषध हितकारक होत नाहीं. याकरितां सर्वातिसारांमध्यें आम पचन झाला किंवा नाहीं तें पाहावें.

आमेपिलंघनंशस्तमादौपाचनमेवच ॥
कार्यंवानशनस्यांतेसद्रवंलघुभोजनं ॥

अर्थ—आमातिसारांत लंघन व पाचन करावें; किंवा लंघनांतीं द्रवरूप लघु भोजन करावें

लंघनमेकंमुक्त्कानान्यदस्तीहभेषजंबालिनां ॥
समुदीर्णदोषनिचयंशमयतितत्पाचयत्येव ॥

अर्थ—बलवान आमातिसाऱ्याला लंघनावांचून दुसरें औषध नाहीं. लंघन हें वाढलेल्या दोषानां शमवितें, व पाचन करितें.

ननुसंग्रहणंदद्यात्पूर्वमामातिसारिणां ॥ दोषोह्यादौवर्धमानोजनयत्यामयान्बहून् ॥ शोफपांड्वामयप्लीहकुष्ठगुल्मोदरज्वरान् ॥ दंडकालसकाध्मानग्रहण्यर्शोगदांस्तथा ॥ डिंभस्थःस्थविरस्थश्चवातपित्तात्मकश्चयः ॥ क्षीणधातुबलस्यापिबहुदोषोतिविश्रुतः ॥ आमोनस्तंभनीयःस्यात्पाचनान्मरणंभवेत् ॥ अतिसारेज्वरेचैवयस्तुपित्तेदृगामये ॥ आदौनप्रतिकुर्याद्वाव्याधिवेगोहिदुस्तरः ॥

अर्थ—आमातिसारीरोग्याला पूर्वी मलबंधक औषध देऊं नये. वर्धमान आमरूप दोष. सूज, पांडु, प्लीहा, कुष्ठ, गुल्म, उदर, ज्वर, दंडक, अलसक, आध्मान, संग्रहणी, मुळव्याध, इत्यादि अनेक रोगानां उत्पन्न करितो; आणि बालक व म्हातारा यांच्या व वात पित्तात्मक, आणि धातुक्षीण, बलक्षीण, यांच्या अनेक दोषयुक्त आमाचें स्तंभन करूं नये. स्तंभन केलें असतां, मरण येतें; आणि अतिसार, ज्वर, पित्त, नेत्ररोग व कफ. यांवर प्रथमच उपचार करूं नये. कां तर व्याधीचा वेग दुःसह आहे म्हणून.

## धान्यकादिकाढा पाचन व दीपन.

धान्यनागरजःक्वाथःपाचनोदीपनस्तथा ॥
एरंडमूलयुक्तश्चजयेदामानिलव्यथां ॥

अर्थ—धने व सुंठ, या दोन औषधांचा काढा प्याला असतां, दीपन व पाचन करितो. व त्याकाढ्यांत एरंडमूळ घालोन घेतला तर आमवायूचा नाश करितो.

## अभयाविरेचन.

स्तोकंस्तोकंविबद्धंवासशूलंयोतिसार्यते ॥
अभयापिप्पलीकल्कैःसुखोष्णैस्तंविरेचयेत् ॥

**अर्थ**–थोडा किंवा बहूत शूलयुक्त असा अतिसार होतो, त्याला हरीतकी व पिंपळी, यांच्या कल्काचें रेचन द्यावें.

## विडंगादिरेचन.

दीप्ताग्निर्बहुदोषोयोविबद्धमतिसार्यते ॥
विडंगत्रिफलाकृष्णाकषायैस्तंविरेचयेत् ॥

**अर्थ**–दीप्ताग्निपुरुषाला बहुत दोषयुक्त व गांठळ असा अतिसार होतो, त्याला वावडिंग, त्रिफला व पिंपळी यांच्या काढ्यानें रेच करवावे.

## क्षुधिताचा अतिसार.

क्षुत्क्षामस्यविरेकेतुपेयांयुंज्याद्विचक्षणः ॥
भेषजैर्मारुतघ्नैश्चदीपनीयैश्चकल्पितां ॥

**अर्थ**–क्षुधेनें पीडित होऊन अतिसार आहे, तर त्याला वातनाशक, दीपन, अशा औषधानीं केलेली पेज पाजावी.

## देवदारुजलपान.

योतिबद्धंप्रभूतंचपुरीषमतिसार्यते ॥ तस्यादौवमनंयोज्यंपश्चाल्लंघन मेवच ॥ देवदारुवचाकुष्ठनागरातिविषाभया ॥ सर्वाजीर्णप्रशमनं पेयमेतैःशृतंपयः ॥

**अर्थ**–ज्याला अतिगांठळ आणि बहूत मळ होतो, त्याला प्रथम वमन, मग लंघन, नंतर देवदारु, वेखंड, कोष्ठ, सुंठ, अतिविष व हरीतकी यांमध्यें दूध तापवून द्यावें. तें अजीर्णनाश करितें.

## चित्रकादिकाढा.

चित्रकंपिप्पलीमूलंवचाकटुकरोहिणी ॥ पाठावत्सकबीजानिहरीत क्योमहौषधं ॥ एतदामसमुत्थानमतिसारंसवेदनं ॥ कफात्मकंसपित्तं चसवातंहंतिवैध्रुवं ॥

**अर्थ**–चित्रकमूळ, पिंपळीचें मूळ, वेखंड, कुटकी, पाहाडमूळ, इंद्रजव, हरीतकी व सुंठ यांचा काढा आमातिसार, कफातिसार, पित्तातिसार, आणि वातातिसार यांचा नाश करितो

## विश्वादियोग.

विश्वाभयाघनवचातिविषासुराव्हाक्काथोथविश्वजलदातिविषाशृतोवा ॥
आमातिसारशमनःक्कथितःकषायोशुंठिघनाप्रातिविषामृतवल्लिजोवा ॥

अर्थ–सुंठ, हरीतकी, नागरमोथे, वेखंड, अतिविष व देवदार यांचा; किंवा सुंठ, नागरमोथे व अतिविष यांचा; किंवा सुंठ, नागरमोथे, अतिविष व गुळवेल यांचा काढा आमातिसारनाशक आहे.

## पथ्यादिकाढा.

पथ्यादारुवचामुस्तैर्नागरातिविषान्वितैः ॥
आमातिसारनाशायक्काथमेभिःपिबेन्नरः ॥

अर्थ–हरीतकी, दारुहळद, वेखंड, नागरमोथा व अतिविष यांचा काढा द्यावा; ह्मणजे आमातिसारनाश करितो.

## एरंडादिरस.

एरंडरससंपिष्टंपक्कमामंचनागरं ॥
आमातिसारशूलघ्नंदीपनंपाचनंपरं ॥

अर्थ–एरंडाचे रसांत सुंठ भाजलेली व नुसती एकत्र वाटावी; आणि द्यावी, ह्मणजे आमातिसार, शूल याचां नाश करित्ये. व दीपन, आणि पाचनही आहे.

## शुंठ्यादिचूर्ण.

शुंठीप्रतिविषाहिंगुमुस्ताकुटजचित्रकैः ॥
चूर्णमुष्णांबुनापीतमामातीसारनाशनं ॥

अर्थ–सुंठ, अतिविष, हिंग भाजून, नागरमोथे, इंद्रजव व चित्रक, या ६ औषधांचें चूर्ण करून चूर्णाचे चौपट ऊनपाण्यांत घेतले असतां, आमातिसार दूर होतो.

## दुसरें हरीतक्यादिचूर्ण.

हरीतकीप्रतिविषासिंधुसौवर्चलंवचा ॥ हिंगुचेतिकृतंचूर्णंपिबेदुष्णेनवारिणा ॥ आमातिसारशमनंग्राहिचातिप्रबोधनं ॥

अर्थ–बाळहिरडे, अतिविष, सैंधव, पादेलोण, वेखंड व भाजला हिंग या साहा औषधांचें चूर्ण करून ऊन पाण्यांत घेतलें असतां, आमातिसार दूर होतो. व मळाचा अवष्टंभ होऊन अग्नि प्रदीप्त होतो.

## शुंठीपुटपाक.

चूर्णंकिंचित्घृताभ्यक्तंशुंठ्याएरंडजैर्दलैः ॥ वेष्टितंपुटपाकेनविपचेन्मंदवन्हिना ॥ ततउत्धृत्यतच्चूर्णंग्राह्यंप्रातःसितासमम् ॥ तेनयांतिशमंपीडाह्यामातीसारसंभवाः ॥ कुक्षिशूलामशूलघ्नंविबंधाध्मानसाराजित् ॥

अर्थ-सुंठीचें चूर्ण, तुपाचें मोहन लाऊन एरंडाचे पानांत गुंडाळून शेण व माती लाऊन फोपाटयांत भाजावें; आणि साखरेबरोबर प्रातःकाळीं खावें; ह्मणजे आमातिसार दूर होतो. व तत्संबंधी सर्व पीडा नाश पावतात; आणि कुक्षिशूल, आमशूल, मलबद्धता, पोटाची फुगवटी व अतिसार यांचा नाश करितें.

## दुसरें शुंठ्यादिचूर्ण.

शुंठीजीरंसैंधवंहिंगुजातिबीजंतद्वत्साहकारंप्रशस्तं ॥ ज्ञेयंसद्भिःसाव रूढंसबिल्वंमार्कंडयावाशोधितंसूक्ष्मचूर्णं ॥ दध्नाचवटिकांकुर्यात्तेनैव सहलेहयेत् ॥ आमातिसारमांद्यंचअरुचिंहंतितत्क्षणात् ॥

अर्थ-सुंठ, जिरें, सैंधव, हिंग, जायफळ, आंब्याची आंठी, बेलफळ, वडाचे पारंबे व भुईतरवड, यांचें बारीक वस्त्रगाळ चूर्ण घेऊन त्याची दह्यांत गोळी करावी. व दह्यांशींच भक्षण करावी; ह्मणजे तत्क्षणीं आमातिसार, अग्निमांद्य आणि अरुचि यांचा नाश करितें.

## तिसरें शुंठ्यादिचूर्ण.

सत्वाशुंठयोषणंभृंगीसमांशंसूक्ष्मचूर्णकं ॥ यथासात्म्यंसेवनीयंशीत तोयानुपानतः ॥ सशूलमामदोषंचनाशमायातिसत्वरं ॥ दध्योदनं पथ्यमात्रमुचितंरोगशांतये ॥

अर्थ-सत्वासुंठ, मिरीं, भांग, यांचे समभाग औषधांचें चूर्ण सोसेल तितकें थंडपाण्याशीं घ्यावें; ह्मणजे शूल, आमातिसार हे लौकर नाश पावतात, यावर दहीं भात पथ्य द्यावें.

## साखरुंडचूर्ण.

जयाखंडसाखरुंडजीरकंदधिमिश्रितं ॥
आमातिसाररक्तंचहंतिवेगेनकौतुकं ॥

अर्थ-भांग, साकर, साखरुंड, जिरें व दहीं हे पदार्थ एकत्र करून घ्यावें; ह्मणजे ते आमातिसार व रक्तातिसार यांनां फारजलद नाश करितात. हें कौतुक आहे.

## यवान्यादिकाढा.

यवानीनागरोशीरधानिकातिविषाघनैः ॥
बालबिल्वाद्विपर्णीभिर्दीपनंपाचनंभवेत् ॥

अर्थ-ओंवा, सुंठ, वाळा, धने, अतिविष, नागरमोथे, बाळबेल, डाय व डौला यांचा काढा दीपन व पाचन आहे.

## कलिंगादिकाढा.

कलिंगातिविषाहिंगुपथ्यासौवर्चलंवचा ॥
शूलस्तंबविबंधघ्नंपेयंदीपनपाचनं ॥

अर्थ–कुडयाची साल, अतिविष, हिंग, हिरडे, संचळ व वेखंड यांचा काढा शूल व विट्बंध यांचा नाशक व दीपन आणि पाचन आहे.

## त्रिकंटादियवकांजी.

त्रिकंटकैरंडबिल्वैःसाधितंयावकांजिकं ॥
आमातिसारशूलानिजयेत्क्षौद्रान्विताशिवा ॥

अर्थ–गोखरू, एरंडमूळ, बेलफळ, हे पदार्थ घालून यवांची कांजी करावी. ती आमातिसार, शूल, यांचा नाश करिते; किंवा मध आणि हरीतकी द्यावी.

## शोषावर ऱ्हीबेरादिकाढा.

ऱ्हीबेरशृंगवेराभ्यांमुस्तापर्पटकेनच ॥
मुस्तोदीच्यशृतंतोयंदेयंवापिपिपासिते ॥

अर्थ–वाळा, आलें, नागरमोथा, भद्रमोथा व काळा वाळा यांचा काढा ताहानेवर द्यावा.

## त्र्यूषणादि चूर्ण.

त्र्यूषणातिविषाहिंगुवचासौवर्चलाभया ॥
पीतोष्णेनांभसादद्यादामातीसारमुत्तमं ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, अतिविष, हिंग, वेखंड, संचल व हरीतकी यांचें चूर्ण ऊनपाण्याबरोबर द्यावें; ह्मणजे मोठया ही आमातिसाराचा नाश करील.

## पाठादि चूर्ण.

पाठाहिंग्वाजमोदोग्रापंचकोलाब्दजंरजः ॥
उष्णांबुपीतंसरुजंजयत्यामंससैंधवं ॥

अर्थ–पाहाडमूळ, हिंग, अजमोदा, वेखंड, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ व नागरमोथा यांचे चूर्ण ऊनपाण्याशीं सैंधवयुक्त प्राशन केलें असतां, पीडेसुद्धां आमाचा नाश करितें.

## पयमुस्तायोग.

पयसिक्काथ्यमुस्तानांविंशतिंत्रिगुणांभसि ॥
क्षीरावशेषंतत्पीतंहंत्यामंशूलमेवच ॥

**अर्थ**–दूध एक भाग, पाणी तीन भाग व नागरमोथे वीस एकत्र करून आटऊन दूध शेष राहील तें प्यावें; ह्मणजे आम व शूल, यांचा नाश करितें.

## आमपक्वातिसारलक्षण.

संसृष्टमेभिर्दोषैस्तुन्यस्तमप्स्ववसीदति ॥ पुरीषंभृशदुर्गंधिपिच्छिलंचा मसंज्ञितं ॥ एतान्येवंतुलिंगानिविपरीतानियस्यवै ॥ लाघवंचविशेषेण तस्यपक्वंविनिर्दिशेत् ॥

**अर्थ**–मागें सांगीतलेल्या वातादिक अतिसारांच्या लक्षणानीं युक्त असें पुरीष पाण्यांत पडलें असतां, आम जड आहे. यास्तव बुडतें. व तें फार दुर्गंधयुक्त व बुळबुळीत असतें. त्याला आमसंज्ञा आहे. याच्या विपरीत ज्याचीं लक्षणें असतात; आणि शरीराला विशेषानें लाघव असतें. त्याचें पुरीष पक्व झालें असें समजावें.

## असाध्यलक्षण.

पक्वजांबवसंकाशंयकृत्पिंडनिभंतनु ॥ घृततैलवसामज्जावेसवारपयो दधि ॥ मांसधावनतोयाभंकृष्णंनीलारुणप्रभं ॥ मेचकंकर्बुरंस्निग्धं चंद्रिकोपगतंघनं ॥ कुणपंमस्तुलिंगाभंदुर्गंधंकुथितंबहु ॥ तृष्णादाहा रुचिश्वासहिक्कापार्श्वास्थिशूलिनं ॥ संमूर्छारतिसंमोहयुक्तंपक्ववलीगु दं ॥ प्रलापयुक्तंचभिषग्वर्जयेदतिसारिणं ॥

**अर्थ**–पिकलेल्या जांभळाच्या रंगासारिखा, काळजाच्या रंगाचा व तूप, तेल, वसा, मज्जा यासारिखा वेसवाराच्या पाण्यासारिखा, दह्यांसारिखा, मांस धुतलेल्या पाण्याच्या रंगासारिखा, काजळाप्रमाणें काळा, निळया व शेंदरीरंगाचा, मृदंगाच्या शाईसारिखा, नानाप्रकारच्या रंगाचा, तुळतुळीत, मोराच्या पिसावर जसे नानाप्रकारचे रंग दिसतात. तसा, घट्ट, मुर्दाचा दुर्गंधाचा, मस्तकांतील मेंदासारिखा, दुर्गंधयुक्त, कुजक्या घाणीचा, पुष्कळ, असा मळ पडतो; आणि रोग्याला तृषा, दाह, अन्नद्वेष, दमा, उचकी, बरगड्यांचा हाडांत दुखणें, मनाला मोह, अस्वस्थपणा, हीं लक्षणें होतात; आणि त्याच्या गुदाच्या वळया पिकतात. व बडबडतो, अशा रोग्याला वैद्यानीं सोडावें.

## दुसरें असाध्यलक्षण.

असंवृतगुदंक्षीणंदुराध्मानमुपद्रुतं ॥
गुदेपक्वेगतोष्माणमतिसारिणमुत्सृजेत् ॥

**अर्थ**–ज्याचे गुद मिटत नाहीं, असा क्षीण झालेला, अत्यंत आध्मानानें युक्त सूज, इत्यादि उपद्रवानीं व्याप्त व गुदावर बारिक बारीक फोड येऊन चिघळणें, व ज्याचा शरीरांत उबारा नाहींसा झाला, किंवा जठराग्नि शांत जाहला, अशा अतिसारी रोग्याला वैद्यानें सोडावा.

## अतिसाराचे उपद्रव.

शोथंशूलंज्वरंतृष्णांश्वासंकासमरोचकं ॥
छर्दिंमूर्छांचहिक्कांचदृष्ट्वातीसारिणंत्यजेत् ॥

**अर्थ**–सूज, शूल, ज्वर, तृष्णा, श्वास, खोकला, अन्नद्वेष, वांति, मूर्छा, उचकी, हीं लक्षणें झालीं असतां, अतिसारीरोग्याला सोडावा.

## असाध्यलक्षण.

श्वासशूलपिपासार्तंक्षीणंज्वरनिपीडितं ॥
विशेषेणनरंवृद्धमतिसारोविनाशयेत् ॥

**अर्थ**–श्वास, शूल, ताहान व ज्वर यानें पीडिलेला; क्षीण आणि वृद्ध असा असेल; तर त्याचा अतिसार नाश करील.

## लोध्रादि चूर्ण.

सलोध्रंधातकीबिल्वंमुस्ताम्रास्थिकलिंगकं ॥
पिबेन्माहिषतक्रेणपक्वातीसारनाशनं ॥

**अर्थ**–लोध्र, धायटीफुलें, बेलफळ, नागरमोथे, आंब्याची कोय, व कुडयाची साल, यांचें चूर्ण महिषीच्या ताकांत ध्यावें, ह्मणजे पक्वातिसाराचा नाश होतो.

## पद्मादि चूर्ण.

पद्मंसमंगामधुकंबिल्वजंतुशलाटुच ॥
पिबेत्तंडुलतोयेनसक्षौद्रमगदंकरं ॥

**अर्थ**–पद्मकाष्ठ, मंजिष्ठा, जेष्ठमध, बेलफळ, हिरवें व कोवळें, उंबर हीं सर्व एकत्र वांटून त्यांत तांदुळांचें धुवण व मध घालून ध्यावें. हें चांगलें औषध निरोगकर आहे.

## कुटजादिचूर्ण.

कुटजातिविषाचूर्णमधुनासहलेहितं ॥
चिरोत्थितमतिसारंपक्वंपित्तास्रजंजयेत् ॥

**अर्थ**–कुडयाची साल, व अतिविष, यांचें चूर्ण मधाशीं घेतलें असतां; फारादिवसांचा अपक्व अतिसार व पित्तरक्त यांचा नाश करितें.

## अंबष्टादिगण.

अंबष्टाधातकीलोध्रसमंगापद्मकेसरं ॥
मधुकारंलुबिल्वंचपक्वातिसारहागणः ॥

अर्थ—पाहाडमूळ, धायटीफुलें, लोध्र, मंजिष्ठा, कमूळकेसर, मधुकाष्ठ, दिंडा, व हिरवें बेलफळ यांचें चूर्ण किंवा काढा पक्कातिसाराचा नाशक आहे.

## समंगादिचत्वारिचूर्ण.

समंगाधातकीपुष्पंमंजिष्ठालोध्रएवच ॥ शाल्मलीवेष्ठकोलोध्रोदाडिमद्रुफलत्वचौ ॥ आम्रास्थिमध्यंलोध्रंचबिल्वमध्यंप्रियंगुच ॥ मधुकंशृंगबेरंचदर्धिवृतत्वगेवच ॥ चत्वारएतेयोगाश्चपक्वातिसारनाशनाः ॥ तेयोगाउपयोज्यावैसक्षौद्रास्तंडुलांबुना ॥

अर्थ—लाजाळू, धायटीफूल, मांजिष्ठा, व लोध्र; किंवा मोचरस, लोध्र, डाळिंब, व डाळिंबसाल; अथवा आंब्याची कोय, लोध्र, बेलफळाचा मगज, व वाघांटी; किंवा ज्येष्ठमध, आलें, दिंडा, व दालचिनी, हे चार योग तांदुळांचें धुवण व मध यांशीं दिले असतां, पक्कातिसाराचा नाश करितात.

## कंचटादिचूर्ण.

कंचटजंबूदाडिमशृंगाटकपत्रबिल्वबर्हिष्टं ॥
जलधरनागरसहितंगंगामपिवेगवाहिनींसंध्यात् ॥

अर्थ—गजपिंपळी, जांबूळ, डाळिंब, शिंगाड्याचीं पानें, बेलफळ, बर्हिष्ठ, नागरमोथा, व सुंठ यांचें चूर्ण प्रवाहरूप गंगेचाही रोध करील, मग अतिसाराची काय कथा.

## अंकोटकल्क.

अंकोटमूलकल्कस्तंदुलपयसासमाक्षिकःपीतः ॥
सेतुरिववारिवेगंझटितिनिरुंध्यादतीसारं ॥

अर्थ—आंकोटांच्या मुळांचा कल्क, तांदळांचे धुवण व मध एकत्र करून घेतलीं असतां, जसा नदीवेगाला बांध बंद करितो, तसा अतिसाराला हा योग बंद करील.

## मोचरसादिचूर्ण.

मोचरसमुस्तानागरपाठारलुधातुकीकुसुमैः ॥
चूर्णमथितसमेतंरुतध्दिगंगाप्रवाहमपि ॥

अर्थ—सावरीचा चीक, नागरमोथे, सुंठ, पाहाडमूळ, दिंडा व धायटीचीं फुलें यांचें चूर्ण मठ्ठ्याशीं घेतलें असतां, प्रवाहरूप गंगेचाही रोध करील.

## मुस्तादिचूर्ण.

मुस्तमोचरसलोध्रधातुकिपुष्पबिल्वगिरिकोटजैःफलैः ॥
चूर्णितंसगुडतक्रसेवितंनिम्नगाजलरयोपिरुध्यते ॥

अर्थ—नागरमोथा, मोचरस, लोध्र, धायटीचीं फुलें, बेलफळ इंद्रजव यांचें चूर्ण ताक व गूळ यांशीं घेतलें असतां, नदीवेगाचाही रोध करील, मग अतिसाराची काय कथा.

## विश्वादिवटी.

विश्वजीरकसिंधूत्थहिंगुजातिफलानिच ॥ साम्रास्थिशंखखंडंचदध्ना म्लेनप्रपेषयेत् ॥ ईषदंगारकैर्भ्रष्टावटिकाकर्षसंमिता ॥ पक्वापक्वम तीसारंसशूलंग्रहणीगदं ॥ चिरोत्थमचिरोत्थंचनाशयेन्नात्रसंशयः ॥

अर्थ—सुंठ, जिरें, सैंधव, हिंग, जायफळ, आंब्याची कोय, शंखाचे तुकडे, हें आंबट दह्याशीं घोटावें; आणि निखाऱ्यावर किंचित् भाजून एक तोळा गोळी द्यावी. ही पक्वातिसार, अपक्वातिसार, शूल, संग्रहणी, हे रोग फार दिवसांचे किंवा ताजे असले तरी त्यांचा नाश करील.

## वटप्ररोहयोग.

वटप्ररोहंसंपिष्ट्वाश्लक्ष्णंतंडुलवारिणा ॥
तंपिबेत्तक्रसंयुक्तंअतिसारप्रशांतये ॥

अर्थ—तांदुळांचे धुवणांत वडाचे पारांबे वांटून ताक घालोन अतिसारनाशनार्थ प्राशन करावें.

## कुटजावलेह.

कुटजत्वक्तुलामार्द्रांद्रोणाद्भिश्चपचेद्भिषक् ॥ पादशेषंशृतंनीत्वावस्त्र पूतंपुनःपचेत् ॥ लज्जालुधातुकीबिल्वंपाठामोचरसस्तथा ॥ मुस्तंप्राति विषाचैवचूर्णमेषांपलंपलं ॥ निक्षिप्यप्रपचेत्तावद्यावद्दर्वीप्रलेपनं ॥ जलेनछागदुग्धेनपीतोमंडेनवाजयेत् ॥ घोरान्सर्वानतीसारान्नाना वर्णान्सवेदनान् ॥ असृग्दरंसमस्तंचतथार्शांसिप्रवाहिकां ॥

अर्थ—ओली कुड्याची साल चारशें तोळे व पाणी दाहाशें चोवीस तोळे घेऊन त्यांत चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा नंतर त्यांत लाजाळूचा कांदा, धायटीचीं फुलें, बेलफळ, पाहाडमूळ, सांवरीचा चीक, नागरमोथे, अतिविष, यांचीं चार चार तोळे चूर्णें घालोनें पुनःअग्निवर जों पर्यंत पळीला चिकटून राही तों पर्यंत पचन करावा; नंतर जलाशीं, शेळीच्या दुग्धाशीं, मंडाशीं द्यावा. ह्मणजे घोर व नानावर्ण सर्व अतिसार, शूल, रक्तप्रदर, मूळव्याध आणि प्रवाहिका, यांचा नाश करितो.

## राळयोग.

चिरोत्थितमतीसारंरालोहन्यात्सितायुतः ॥

अर्थ—राळ साकरेशीं घेतली असतां; फार दिवसाच्या अतिसाराचा नाश करील.

## नाभ्यौक्षेपणीय.

कृत्वालवालंसुदृढंपिष्टैरामलकैर्भिषक् ॥ आर्द्रकस्वरसेनाशु
पूरयेन्नाभिमंडलं ॥ नदीवेगोपमंघोरंप्रवृद्धंदुर्जरंनृणां ॥ वृद्धा
तिसारमजयंनाशयत्येषयोगराट् ॥

अर्थ–रोग्याचा नाभीभोवतें आवळकाठीचा चूर्णाचें अळें करून त्यात आल्याच रस ओतावा; आणि रोग्याला तसाच चार घटीका राहूं द्यावा; ह्मणजे नदीवेगासारख घोर वाढलेला दुर्जय अशा अतिसाराचा हा योगराज नाश करितो.

## पाठादियोग.

पाठापिष्टाचगोदध्नातथामध्यत्वगाम्रजा ॥
अतिसारंव्यथादाहयुक्तंहंत्युदरेधृता ॥

अर्थ–पाहाडमूळ. किंवा आंब्याची अंतर्साल. दह्यांशीं वांटून घेतली असतां दाह व अतिसार, यांचा नाश करित्ये.

## जातीफलादियोग.

जातीफलंनागरसर्जकेनौखर्जूफलंभिन्नमिदंचनित्यं ॥ योज्यंद्विनिष्कंचक
रीषजातादरण्यजाद्भस्मसमंचसर्वैः॥निष्कार्धमात्रंभिषजाप्रयोज्यंद्विवारमे
तच्छुभतंदुलोदकैः ॥ जीर्णातिसारेरुधिरामयुक्तेहितःसशूलेबहुवेगयुक्ते ॥

अर्थ–जायफळ, सुंठ, राळ, केनी, व खजूर ही प्रत्येकी साहामासे; आणि सर्वचूर्णाचे समान रानशेणीची राख, हें सर्व एकत्र करून दीडमासा तांदळांचे धुवणाशी दुवेळ द्यावें; ह्मणजे जीर्णातिसार, रक्तासार, आमातिसार,व शूळ यांवर हें चूर्ण हितकारक आहे.

## रक्तातिसार निदान.

पित्तकृंतियदात्यर्थंद्रव्याण्यश्नातिपैत्तिके ॥
तदोपजायतेभीक्ष्णंरक्तातिसारउल्बणः ॥

अर्थ–पित्तातिसार जाहाला असतां; किंवा व्हावयाचा असतां; जर पित्तकरणारीं द्रव्यें पुष्कळ आणि निरंतर भक्षण केलीं, तर मोठा उग्र रक्तातिसार उत्पन्न होतो. त्याचा तांबड्या व काळ्या वगैरे रंगांनीं वातादिक दोष जाणावा. कोणी असें ह्मणेल, की रक्तजहि अतिसार आहे; तो सातवा ह्मटला तर षट्त्वसंख्येला बाध येईल; ह्मणून हा पैत्तिकाचाच एक अवस्थाभेद आहे असें मानावें.

## यष्ट्यादिकाढा.

यष्टिमधुसितालोध्रंमधुकंनीलमुत्पलं ॥
अजाक्षीरेणक्वथितंरक्तातिसारशांतये ॥

अर्थ–ज्येष्ठमध, साकर, लोध्र, मोहाटी व नीलकमल, यांचा शेळीच्या दुधांत काढा करून द्यावा; ह्मणज रक्तातीसार शांत होतो.

## कुटजादि काढा.

कुटजातिविषामुस्तावालकंलोध्रचंदनं ॥ धातुकीदाडिमंपाठाक्का थंक्षौद्रयुतंपिबेत् ॥ दाहेरक्तेचशूलेचआमरोगेचदुस्तरे ॥ कुटजाष्ट मिदंख्यातंसर्वातीसारनाशनं ॥

अर्थ–कुडयाची साल, अतिविष, नागरमोथे, वाळा, रक्तचंदन, धायटीची फुलें, व पाहाडमूळ, यांचा काढा मध घालून प्यावा; ह्मणजे दाह, रक्तशूल, आम, आणि सर्वातिसार, यांचा नाश करितो, याला कुटजाष्टक ह्मणतात.

## वत्सकादि काढा.

सवत्सकःसातिविषःसबिल्वःसोदीच्यमुस्तश्चकृतःकषायः ॥
सामेसशूलेचसशोणितेचचिरप्रवृत्तेपिहितोतिसारे ॥

अर्थ–कुडयाची साल, अतिविष, बेलफळ, वाळा व नागरमोथा यांचा काढा आमसंबंधी शूल, रक्तातिसार व फारदिवसांचा अतिसार यांवर हितकारक आहे.

## तंदुलजलयोग.

लघुचेतकीजीरकेसमेमृदुभृष्टेचसुचूर्णितेपीते ॥
सहतंदुलवारिणामतोतिसृतिघ्नइतिप्रसिद्धयोगः ॥

अर्थ–बाळहर्डी व जिरें समभाग घेऊन थोडें भाजून त्याचें चूर्ण करून तांदळाच धुवणाशीं द्यावें; ह्मणजे तें अतिसाराचा नाश करितें. हा सिद्धयोग सांगीतला आहे.

## डाळिंबादि काढा.

अयिकंदुकतिंदुकस्तनेप्रमदारूपमदापहारिणि ॥
रुधिरातिसृतौकषायकःसमधुदाडिमवत्सकत्वचः ॥

अर्थ–डाळिंबसाल व कुडयाची साल यांचा काढा मध घालोन द्यावा; ह्मणजे रक्तातिसाराचा नाश होतो.

## चंदनादि योग.

चंदनंविमलतंदुलांबुनासंयुतंमधुयुतंसितायुतं ॥
तृड्विखंडनमसृग्विखंडनंखंडनंप्रचुरदाहमोहयोः ॥

अर्थ–तांदळाचें धुवणांत चंदन उगाळून त्यांत मध व साकर घालोन द्यावा; ह्मणजे तृषा, रक्तातिसार, दाह, आणि मोह यांचा नाश करितो.

## ह्रीबेरादि काढा.

ह्रीबेरातिविषामुस्ताबिल्वधान्यकवत्सकं ॥ समंगाधातकीलोध्रंवि

श्वंदीपनपाचनं ॥ हंत्यरोचकपिच्छामविबंधंचातिवेदनं ॥ सशोणि

तमतीसारंसज्वरंवाथविज्वरं ॥

**अर्थ**–वाळा, अतिविष, नागरमोथे, बेलफळ, धने, कुडयाची साल, मंजिष्ठा, धाय-टीची फुलें, लोध्र, आणि सुंठ यांचा काढा द्यावा. हा दीपन व पाचन आहे. व अरुचि, आम, विट्बंध, शूल, रक्तातिसार, सज्वर किंवा विज्वर अतिसार यांचा नाश करितो.

## बिल्वादि योग.

बिल्वंछागपयःसिद्धंसितामोचरसान्वितं ॥

कलिंगचूर्णसंयुक्तंरक्तातीसारनाशनं ॥

**अर्थ**–बेलफळ मेंढीचे दुधांत पचन करावें; आणि तें साकर, सांवरीचा डीक, कुडयाचे सालीचें चूर्ण घालोन द्यावें; ह्मणजे रक्तातिसाराचा नाश करितें.

## कलिंगयवषट्क.

सहरीतकीप्रतिविषारुचकंसहिंगुसकलिंगयुतं ॥

इतितत्कलिंगयवषट्कमिदंरुधिरातिसारगदशूलहरं ॥

**अर्थ**–हरीतकी, अतिविष, सैंचळ, हिंग, कुडयाची साल व यव यांचा काढा किंवा चूर्ण रक्तातिसार, शूल, यांचा नाश करितें. याला कलिंगयवषट्क ह्मणतात.

## कुटजक्षीर.

निःक्वाथ्यमूलममलंगिरिमल्लिकायाःसम्यक्पलद्वितयमंबुचतुःशरावे ॥

तत्पादशेषसलिलंखलुशोषणीयंक्षीरेपलद्वयमितेकुशलैरजायाः ॥ प्रक्षिप्य

मानकानष्टौमधुनस्तत्रशीतले ॥ रक्तातिसारीतत्पीत्वानीरुजत्वमवाप्नुयात् ॥

**अर्थ**–कुडयाच्या पाळाची साल आठ तोळे घेऊन एकशे तोळे पाण्यांत, काढा करून चतुर्थांश उतरून घ्यावा; आणि पुनः चुलीवर ठेऊन आठ तोळे शेळीचें दूध घालोन आटवावा. आटल्यावर उतरून शीत झाल्यावर त्यांत आठ मासे मध घालावा; आणि प्राशनार्थ द्यावा; ह्मणजे रक्तातिसाऱ्याला लौकर निरोगी करितो.

## रसांजनादिचूर्ण.

रसांजनंसातिविषंकुटजस्यफलंत्वचं ॥ धातकीशृंगवेरंचपिबे

त्तंदुलवारिणा ॥ क्षौद्रेणयुक्तंनुदतिरक्तातीसारमुल्बणं ॥

**अर्थ**–रसांजन, अतिविष, इंद्रजव, कुडयाची साल, धायटीचें फूल व सुंठ, हीं औषधें धुवणाशीं वाटून मध घालून घेतली असतां, रक्तातीसार दूर होतो.

## कुटजावलेह.

कुटजस्यपलंग्राह्यमष्टभागजलेभृतं ॥ तथैवाद्भिःपचेद्भूयोदाडिमोदक संयुतं ॥ कुटजक्काथतुल्योत्रदाडिमस्यरसोमतः ॥ यावच्चरसिकाभासं भृतंतमुपकल्पयेत् ॥ तस्यार्धकर्षतक्रेणपिबेद्रक्तातिसारवान् ॥ अव श्यंमरणीयोपिनमृत्योर्यातिगोचरं ॥

**अर्थ**–कुडयाची साल चार तोळे घेऊन आठपट पाण्यांत अष्टमांश काढा करावा; आणि कुडयाचा काढ्या इतका डाळिंबाचा रस घालून पुनः पचवावा. तो दाट झाल्यावर थंड करून साहा मासे ताकाबरोबर रक्तातिसाऱ्याला द्यावा; ह्मणजे अवश्य मरणारा ही रोगी वांचतो.

## सल्लक्यादिस्वरस.

सल्लकीबदरीजंबूप्रियाल्वाम्रार्जुनत्वचः ॥
पीताःक्षीरेणमध्वाढ्याःपृथक्शोणितनाशनाः ॥

**अर्थ**–हरपररेवडी, बोर, जांबूळ, चारोळी, आंबा व अर्जुन इतके झाडांतून कोणा एकाची साल दूधांत वाटून मध घालून प्यालें असतां, रक्तातीसारनाशक आहे.

## जंब्वादिआंगरस.

जंब्वाम्रामलकीनांचपल्लवोत्थोरसोजयेत् ॥
मध्वाज्यक्षीरसंयुक्तोरक्तातीसारमुल्बणम् ॥

**अर्थ**–जांभूळ, आंबा व आवळी या तिहींच्या पानाचें आंगरसांत मध, तूप व दूध मेळवून प्यालें असतां, महान् रक्तातीसार दूर होतो.

## गुडबिल्वयोग.

गुडेनखादयेद्बिल्वंरक्तातीसारनाशनं ॥
आमशूलविबंधघ्नंकुक्षिरोगविनाशनं ॥

**अर्थ**–गुळाबरोबर बेलफळ खावें; ह्मणजे रक्तातीसार, आम, शूल, अवष्टंभ, कुक्षिरोग यांचा नाश होतो.

## शतावरीकल्क.

पीत्वाशतावरीकल्कंपयसाक्षीरभुग्जयेत् ॥
रक्तातिसारंपीत्वावातथासिद्धंघृतंनरः ॥

अर्थ–शतावरीच्या मुळ्या वाटून दुधाबरोबर प्याव्या; आणि दूध भात खावा; ह्मणजे रक्तातीसार दूर होईल. अथवा शतावरीचे रसांत तूप घालोन रस आटवून, तस सिद्ध झालेलें तूप प्यावें.

## तिलादिकल्क.

कल्कस्तिलानांकृष्णानांशर्करादयश्चभागिकः ॥
आजेनपयसापीतःसद्योरक्तंनियच्छति ॥

अर्थ–काळे तीळ वाटलेले एक भाग, साखर दोन भाग, शेळीचें दूध चार भाग, याप्रमाणें एकत्र करून प्यावें; ह्मणजे रक्त बंद होतें.

## नवनीतावलेह.

गोदुग्धंनवनीतंतुमधुनासितयासह ॥
लीढंरक्तातिसारेषुग्राहिकंपरमंमतं ॥

अर्थ–गाईच्या दुधाचें लोणी काढून त्यांत मध व खडीसाकर घालोन द्यावें; ह्मणजे रक्तातिसाराला बंद करितें.

## शाल्मलिपुष्पयोग.

शाल्मलेरार्द्रपुष्पाणिपुटपाककृतानिच ॥ संकुटयोलूखलेतस्यगृण्हीयात्पयसिश्रिते ॥ गृहीत्वाचपलंतस्यत्रिपलंघृततैलयोः ॥ युक्तंमधुककल्केनमाक्षिकत्रिपलेनच ॥ युक्तस्तुवपुपोदद्यात्बस्तौप्रयागतेरसे ॥ भोजयेत्पयसावापिपित्तातीसारपीडितं ॥

अर्थ–सांवरीचीं ओलीं फुलें घेऊन पुटपाकविधीनें पचवून वाहिनांत कुटून तापलेल्या दुधांत रस एक पळ काढून घ्यावा; व त्यांत घृत व तेल बारा तोळे व ज्येष्ठीमधाचा कल्क बारा तोळे, मध बारा तोळे हीं एकत्र करून द्यावीं. हा रस बस्तीमध्यें आला ह्मणजे दूध भात भोजनार्थ द्यावा.

## गुदपाक.

विरेकैर्बहुभिर्यस्यगुदंपित्तेनदह्यते ॥
पच्यतेवातयोःकार्यसेकप्रक्षालनादिकं ॥

अर्थ जाचें फार शौच होऊन गुद पित्तानें जळजळे, किंवा पिकतें, त्याला सेचन किंवा प्रक्षालन करावें.

## पटोलादिकाढा गुदक्षालनार्थ.

पटोलयष्टिमधुकक्काथेनाशिशिरेणहि ॥
गुदप्रक्षालनंकार्यंतेनैवगुदसेचनं ॥

अर्थ—कडुपडवळ, ज्येष्ठीमध व मोहाची साल यांचा थंड काढा करून त्याणें गुद प्रक्षालन व सेचन करावें.

## गुदक्षालनार्थ जल.

दाहेपाकेहितंछागीदुग्धंसक्षौद्रशर्करं ॥
गुदस्यक्षालनेसेकेयुक्तंपानेचभोजने ॥

अर्थ—गुदाचा दाह, किंवा पाक झाला असतां, शेळीच्या दुधांत मध व साकर घालोन त्याणें गुदक्षालन, सेचन, पान आणि भोजन, करावें.

## चांगेरीघृत.

गुदनिःसरणेशस्तंचांगेरीघृतमुत्तमं ॥ अतिप्रवृत्यामहतीभवेद्यदिगुदव्यथा ॥ स्विन्नमूषकमांसेनतथासंस्वेदयेद्गुदं ॥

अर्थ—गुदभ्रंश झाला असतां, चांगेरीघृत उत्तम आहे; व आंग फार बाहेर येऊन मोठी पीडा होऊं लागली तर उंदराचें मांस शिजवून त्याणें गुद शेकावें.

## मूषकमांसस्वेद.

स्वेदोथमूषिकामांसैस्तद्रसामृक्षणंतथा ॥ शंबूकमांसंसुस्विन्नंसतैललवणान्वितं ॥ ईषद्धस्तेनचाभ्यक्तंस्वेदयेत्तेनयत्नतः ॥ गुदभ्रंशमशेषेणनाशयेत्क्षिप्रमेवच ॥

अर्थ—गुदभ्रंश झाला असतां, उंदराचे मांसाचा वाफारा द्यावा; व वर बांधावें. तसेच [illegible]क शंखांचें मांस शिजवून त्यांत तेल व मीठ घालोन गुदाला तेल लावून त्या मांसानें [illegible]क द्यावा; ह्मणजे निःशेष लौकर बरा होतो.

## गोधूमचूर्णस्वेद.

अथगोधूमचूर्णस्यास्विन्नितस्यतुवारिणा ॥
साज्यस्यगोलंकृत्वामृदुसंस्वेदयेद्गुदं ॥

अर्थ—गव्हांची कणीक पाण्यांत भिजवून तूप घालोन गोळा करून भाजावा; आणि गोळा कढत आहे तों त्याणें गुद शेकावें.

## गुदांत प्रवेशन.

गुदभ्रंशेगुदंस्नेहैरभ्यज्यांतःप्रवेशयेत् ॥ प्रविष्टंस्वेदयेन्मंदंमूषकस्यामिषेणहि ॥ गुदभ्रंशाभिधोव्याधिःप्रणश्यतिनसंशयः ॥

अर्थ—गुदभ्रंश झाला असतां, त्याला तेल लावून आंत लोटावें; नंतर उंदराच्या मांसानें [illegible] हळू शेकावें; ह्मणजे हा व्याधि नाश पावतो. यांत संशय नाहीं.

## चांगेरीघृत.

चांगेरीकोलदध्यम्लक्षारनागरसंयुतं ॥
घृतंविपक्कंपातव्यंप्रणश्यतिनसंशयः ॥

**अर्थ**–चुका, बोरें, दधि, लिंबू, यवक्षार व सुंठ, यांचे काढ्यांत तूप घालोन पचन करून सिद्ध करावें. तें घृत प्राशनार्थ दिलें असतां, गुदभ्रंशाचा नाश होतो, यांत संशय नाहीं.

## कमळपत्रभक्षण.

कोमलंपद्मिनीपत्रंयःखादेच्छर्करान्वितं ॥
एतन्निश्चित्यनिर्दिष्टंनतस्यगुदनिर्गमः ॥

**अर्थ**–कोंवळीं कमळाचीं पानें साकरेशीं जो भक्षण करितो; त्याचें गूद कधींही बाहेर येणार नाहीं हें निश्चयें सांगितलें आहे.

## ज्वरातिसारचिकित्साक्रम.

ज्वरातिसारयोरुक्तंभेषजंयत्पृथक्पृथक् ॥ नतन्मीलितयोःकार्यमन्यो न्यंवर्धयेद्यतः ॥ अतस्तौप्रतिकुर्वीतविशेषोक्तचिकित्सितैः ॥

**अर्थ**–ज्वर व अतिसार यांना जीं निरनिराळीं औषधें सांगितलीं तीं एकत्र करून ज्वरातिसारावर उपचार करूं नये. जर औषधें मिळवून दिलीं तर, परस्परांना वाढवि-तात. या करितां ज्वरातिसारावर विशेषानें जी क्रिया सांगेल तीच करावी.

## उत्पलषष्टिक.

लंघनमुभयोरुक्तंमीलितकार्येविशेषतस्तदनु ॥
उत्पलषष्टिकसिद्धंलाजकमंडादिकंपेयं ॥

**अर्थ**–ज्वर व अतिसार या दोघांवर लंघन सांगितलें. तें लंघन ज्वरातिसारावर विशेषेंकरून करावें; नंतर कमळकंद व साटकीचे तांदूळ यांच्या लाह्यांचा मंड द्यावा.

## दाडिमावलेह.

दाडिंबादिरसप्रस्थंचतुःप्रस्थेजलेपचेत् ॥ चतुर्भागकषायेस्मिन्शर्क राप्रस्थमेवच ॥ नागरंपिप्पलीमूलंकणाधान्यकदीप्यकं ॥ जातीपत्र मरीभंजीजीरकंकरकंतुगा ॥ विजयानिंबपत्रंचसमंगावत्सशाल्मली ॥ अरलातिविषापाठालवंगंचपृथक्पलं ॥ घृतस्यमधुनःप्रस्थंसर्वंले हंविपाचयेत् ॥ दाडिंबलेहकंनामज्वरातीसारनाशनं ॥

**अर्थ**–डाळिंबाचा रस एक शेर, पाणी पांच शेर यांचा चतुर्थांश काढा करून त्यांत साकर एकशेर व सुंठ, पिंपळी मूळ, पिंपळी, धने, ओवा, जायपत्री, कासिवदा, जिरें,

वंशलोचन, भांग, निंबाचीं पानें, लाजाळूकंद, कुडयाची साल, सांवरी, टेंटू, अतिविष, पाहाडमूळ व लवंगा हीं प्रत्येक चार चार तोळे व तूप, मध, केशर, हीं सर्वत्र एकत्र करून लेह सिद्ध करावा. त्याला कुटजावलेह ह्मणतात. हा ज्वरातिसाराचा नाश करितो.

## कणादिकाढा.

कणाकरेणुजलदक्काथोमधुसितायुतः ॥

पीतोज्वरातिसारस्यतृष्णावम्योश्चनाशनः ॥

अर्थ–पिंपळी, गजपिंपळी व नागरमोथे यांचा काढा मध व साकर घालून ध्यावा; ह्मणजे अतिसार, तृष्णा व वांति, यांचा नाश करितो.

## पाठादिकाढा.

पाठेंद्रयवभूनिंबमुस्तपर्पटकःशृतः ॥

जयत्याममतीसारंज्वरंचसमहौषधं ॥

अर्थ–पाहाडमूळ, इंद्रजव, किराइत, नगारमोथे, पित्तपापडा, आणि सुंठ, यांचा काढा आमातिसार व ज्वर यांचा नाश करितो.

## नागरादिकाढा.

नागरातिविषामुस्ताभूनिंबामृतवत्सकैः ॥

सर्वज्वरहरःक्काथःसर्वातीसारनाशनः ॥

अर्थ-सुंठ, अतिविष, नागरमोथे, किराइत, गुळवेल व कुडयाची साल यांचा काढा संपूर्ण ज्वर व संपूर्ण अतिसार, यांचा नाशक आहे.

## कलिंगादिकाढा.

कलिंगातिविषाशुंठीकिरातांबुयवासकं ॥

ज्वरातिसारसंतापंनाशयेदविकल्पतः ॥

अर्थ–कुडयाची साल, अतिविष, सुंठ, किराइत, वाळा आणि धमासा यांचा काढा ज्वरातिसारसंबंधी संताप यांचा निःसंशय नाश करील.

## गुडूच्यादिकाढा.

गुडूच्यतिविषाधान्यशुंठीबिल्वाब्दवालकैः॥ पाठाकुटजभूनिंबचंदनोशीरपर्पटैः ॥ पिबेत्कषायंसक्षौद्रंज्वरातीसारशांतये ॥ हृल्लासारोचकच्छर्दिपिपासादाहनाशनं ॥

अर्थ–गुळवेल, अतिविष, धने, सुंठ, बेलफळ, नागरमोथा, वाळा, पाहाडमूळ, कुडयाची साल, किराइत, रक्तचंदन, काळा वाळा व पित्तपापडा, यांचा काढा मध घालून ध्यावा; ह्मणजे ज्वरातिसार, हृल्लास, अरोचक, वांति, तहान व दाह यांचा नाश करितो.

## वत्सकादि दोन काढे.

वत्सकस्यफलंदारुरोहिणीगजपिप्पली ॥ श्वदंष्ट्रापिप्पलीधान्यबिल्वपाठायवानिका ॥ द्वावप्येताविमौयोगौश्लोकार्धेनावभाषितौ ॥ ज्वरातिसारशमनौविशेषाद्दाहनाशनौ ॥

अर्थ–इंद्रजव, देवदार, कुटकी, गजपिंपळी यांचा; किंवा गोखरू, पिंपळी, धने, बेलफळ, पाहाडमूळ व ओंवा, यांचा काढा ज्वरातिसार, आणि विशेषानें दाह यांचा नाश करितो.

## उशीरादिकाढा.

उशीरंवालकंमुस्तंधान्यकंबिल्वमेवच ॥ समंगाधातकीलोध्रंविश्वंदीपनपाचनं ॥ हंत्यरोचकपिच्छामंविबंधमतिवेदनं ॥ सशोणितमतीसारं सज्वरंवाथविज्वरं ॥

अर्थ–वाळा, काळा वाळा, नागरमोथे, धने, बेलफळ, मंजिठ, धायटीचीं फलें, लोध्र व सुंठ याचा काढा दीपन व पाचन आहे. व अरुचि, आमातिसार, विट्बंध, शूल रक्तातिसार. आणि ज्वर यांचा नाश करितो. हा काढा ज्वररहित अतिसारावर ही चालतो.

## बिल्वादिकाढा.

बिल्ववालकभूनिंबगुडुचीधान्यनागरैः ॥
कुटजाब्दामृताक्काथोज्वरातीसारशूलनुत् ॥

अर्थ–बेलफळ, वाळा, किराइत, गुळवेल, धने, सुंठ, कुडयाची साल, नागरमोथा आणि आवळकाठी, यांचा काढा ज्वरातिसार व शूल यांचा नाशक आहे.

## पंचमूलादिकाढा.

पंचांघ्रिवृक्यब्दबलेंद्रबीजत्वक्सेव्यतिक्तामृतविश्वबिल्वैः ॥
ज्वरातिसारान्सवमीन्सकासान्सश्वासशूलान्शमयेत्कषायः ॥

अर्थ–पंचमुळें, रिंगणी, नागरमोथा, चिकणा, कुडयाची साल, इंद्रजव, वाळा, कुटकी, गुळवेल, सुंठ, बेलफळ यांचा काढा ज्वरातिसार, वांति, खोकला, श्वास आणि शूल यानांशमवालि

## अरल्वादिकाढा.

अरल्वतिविषामुस्ताशुंठीबिल्वंसदाडिमं ॥
सर्वज्वरहरःक्काथोसर्वातीसारनाशनः ॥

अर्थ–टिंडा, अतिविष, नागरमोथा, सुंठ, बेलफळ, आणि डाळिंब, यांचा काढा संपूर्ण ज्वर व संपूर्ण अतिसार यांचा नाश करितो.

## उत्पलादिचूर्ण.

उत्पलंदाडिमत्वचंसंचूर्ण्यपद्मकेसरं ॥
पिबेत्तंदुलतोयेनज्वरातीसारनाशनं ॥

अर्थ—कोष्ठकोळिंजन, डाळिंबाची साल व कमळाचे केसर हे वाटून तांदळांचे धुवणाशीं प्यावें; ह्मणजे ज्वरातिसार नाश पावतो.

## व्योषादिचूर्ण.

व्योषंवत्सकबीजानिनिंबभूनिंबमार्कवं ॥ चित्रकंरोहिणीपाठादार्वी ह्यतिविषासमं ॥ श्लक्ष्णचूर्णीकृतानेतानन्तुल्यांवत्सकत्वचं ॥ सर्व मेकत्रसंयोज्यपिबेत्तंदुलवारिणा ॥ सक्षौद्रंवालिहेदेवंपाचनंग्राहि भेषजं ॥ तृष्णारुचिप्रशमनंज्वरातीसारनाशनं ॥ कामलाग्रहणीरो गान्गुल्मंप्लीहानमेवच ॥ श्वयथुंपांडुरोगंचप्रमेहंचविनाशयेत् ॥

अर्थ—सुंठ, मिरीं, पिंपळी, इंद्रजव, कडूनिंब, किराइत, माका, चित्रक, कुटकी, पाहाडमूळ, दारुहळद, अतिविष, ह्यांची समान भाग चूर्णें व सर्वचूर्णाबरोबर कुडयाचे सालीचे चूर्ण हीं सर्व एकत्र करून तांदळांचे धुवणाशीं किंवा मधाशीं द्यावें. हे पाचन व ग्राहक आहे. व तृषा, अरुचि, ज्वरातिसार, कावीळ, संग्रहणी, गुल्म, प्लीहा, सूज, पांडुरोग व प्रमेह यांचा नाश करितें.

## इसबगोलयोग.

इसबगोलइतिप्रथितंजनेहरतितज्ज्वरभाजमतिसृतिं ॥
अनुभवाल्लिखितंनतुशास्त्रतोभवतुतद्भिषजामुपयोगिकं ॥

अर्थ—जाला लोकामध्यें इसबगोल ह्मणतात. तो ज्वरातिसारनाशक आहे. हे आपल्या अनुभवानें लिहितो. हें शास्त्रत: लिहित नाहीं, हे वैद्यांचे उपयोगार्थ होवो.

## लाजमंड.

उत्पलषष्टिकसिद्धंलाजकमंडादिकंपेयं ॥

अर्थ—कमल, साठकीभाताच्या लाह्यांच्या मंडांत, कमलकेसरांचे चूर्ण घालून. द्यावें, तें उत्तम आहे.

## पृश्निपर्ण्यादिपेया.

पृश्निपर्णीबलाबिल्वानागरोत्पलधान्यकैः ॥
ज्वरातिसारीपेयांवापिबेत्साम्लांशृतांनरः ॥

अर्थ—पिठवण, चिकणा, बेलफळ, सुंठ, कमळ व धने, यांची आंबट, पक्क केलेली पेज ज्वरातिसाऱ्यानें प्राशन करावी.

## धातक्यादिपेया.

धातकीक्काथसंसिद्धाविश्वभेषजकल्पिता ॥

दाडिमाम्लयुतापेयाज्वरातीसारशूलिनां ॥

अर्थ—धायटीच्या फुलांचा काढा, सुंठीचा कल्क व डाळिंबाचा रस, यांणीं तयार केलेली पेज ज्वरातिसारामधील शूलावर हितकर आहे.

## विजयायोग.

एरंडबिल्वयवगोक्षुरकारनालैःस्विन्नांलिहंतिविजयांमधुनान्वितांये ॥

तेषांप्रणाशमुपयांत्युदरामयास्तुसर्वेसशूलविषमज्वरकासहिक्काः ॥

अर्थ—एरंडमूळ, बेलफळ, यव, गोखरू, यांच्या पेजेंत भांग किंवा मोचरस मधुयुक्त सेवन करणाराचे संपूर्ण उदररोग, संपूर्ण शूल, विषमज्वर, खोकला व उचकी, हे उपद्रव नाश पावतात.

## पंचामृतपर्पटीरस.

सूतायसीचताम्राभ्रसमंद्विगुणगंधकं ॥ लोहपात्रेबादराग्नौमृदुपाकोभवेद्रसः। लेपयेत्कदलीपत्रेकर्तव्यारसपर्पटी ॥ पंचामृतापर्पटीचरसोबन्हिप्रदीपनः ॥ ज्वरातिसारकासघ्नीकामलापांडुमेहजित् ॥ अनुपानंमलेबद्धेज्वरेजीर्णेजमूत्रकं ॥ पलंपथ्यंतुतैलाम्लवर्ज्यमन्यच्चयुक्तितः ॥

अर्थ—पारा, लोहभस्म, ताम्रभस्म व अभ्रकभस्म, हीं समान आणि गंधक दोन भाग, लोहपात्रामध्यें बोरीचे काष्ठाग्नीनें मंद पचवून रस झाला ह्मणजे केळीच्या पानावर ही रसपर्पटी, किंवा पंचामृतपर्पटी ओतावी. ही पर्पटी अग्निदीपक आहे; आणि ज्वरातिसार, खोकला, कावीळ, पांडुरोग व मेह यांचा नाश करितें. ही मलावष्टंभ झाला असतां, किंवा जीर्णज्वर असतां शेळीच्या चार तोळे मुतांत द्यावी. हिला पथ्य तेल व आंबट वर्ज्य करावें. बाकीचें युक्तीनें जाणावें.

## दरदादिपुटपाक.

दरदश्चैकभागोहिसार्धभागोहिफेनकः ॥ अर्धभागोभवेट्टंकःपिष्टिकांचप्रलेपयेत् ॥ जातीफलंचविन्यस्यसर्वेचपुटपाचितं ॥ मुद्गमात्रंपिबेन्नित्यंपयसाचगवांहितं ॥ ज्वरातिसारेमांद्येचनिद्रानाशेरुचौतथा ॥ योजयेद्भिषजानित्यंबलपुष्टिकरंपरं ॥

**अर्थ**–हिंगूळ एक भाग, अफु दीड भाग, टांकणखार अर्धा भाग व जायफळ हीं सर्व एकत्र करून पुट द्यावें; आणि मुगा येवढें गाईचे दुधाशीं द्यावें; ह्मणजे ज्वरातिसार, अग्निमांद्य, निद्रानाश, अरुचि यांवर योजावें; आणि हें औषध बल व पुष्टि यांला देणारें आहे.

## दुग्धयोग.

विबद्धवातोविट्शूलपरीतःसप्रवाहिकः ॥ सरक्तपित्तश्चपयः
पिबेत्तृष्णासमन्वितः ॥ यथामृतंतथाक्षीरमतिसारेषुपूजितम् ॥
सरक्तोत्थेषुतत्पेयमपांभागेषुसंस्कृतम् ॥

**अर्थ**–निमें पाणी व निमें दूध एकत्र करून दुग्ध शेष राही तों कढवावें; आणि तें पोटांत वायु धरला व शूळ, प्रवाहिका, रक्तपित्त व ताहान यांवर योजावें. हें जसें अमृत तसेंच हें दूध आहे. हें सवरक्तविकारावर योजावें.

## कट्फलादिचूर्ण.

कट्फलंमधुकंलोध्रंत्वग्दाडिमफलस्यच ॥
सतंदुलजलंचूर्णंवातपित्तातिसारनुत् ॥

**अर्थ**–कायफळ, ज्येष्ठीमध, लोध्र व डाळिंबाची साल यांचें चूर्ण तांदळांचें धुवणाशीं घ्यावें.

## पित्तकफातिसारनिदान.

द्विदोषलक्षणैर्विद्यादतिसारंद्विदोषजं ॥
तेषांचिकित्साप्रोक्तैवविशिष्टाचानिगद्यते ॥

**अर्थ**–दोन दोषांच्या लक्षणांनीं द्विदोषज अतिसार जाणावा. त्या द्विदोषजांची चिकित्सा सांगितली; परंतु विशेष चिकित्सा सांगतो.

## मुस्तादिकाढा.

मुस्तासातिविषामूर्वावचाचकुटजःसमाः ॥
एषांकषायःसक्षौद्रःपित्तश्लेष्मातिसारहृत् ॥

**अर्थ**–नागरमोथे, अतिविष, मोरवेल, वेखंड व कुडयाची साल, यांचा काढा. मधुयुक्त सेवनानें पित्तश्लेष्मातिसाराचा नाश करितो.

## समंगादिकाढा.

समंगाधातुकीबिल्वमम्रास्थ्यंभोजकेसरं ॥ बिल्वंमोचरसंलोध्रं
कुटजस्यफलत्वचौ ॥ पिबेत्तंदुलतोयेनकषायंकल्कमेवच ॥
श्लेष्मपित्तातिसारघ्नंरक्तंवाथनियच्छति ॥

अर्थ-चिकणामूळ, धायटीचीं फुलें, बेलफळ, आंब्याची आंठी, कमळकेसर, अथवा बेलफळ, सांवरीचा चीक, लोध्र, कुड्याची साल व इंद्रजव यांचा काढा किंवा चूर्ण तांदळाचे धुवणाशीं द्यावें; ह्मणजे श्लेष्मपित्तातिसार व रक्तातिसार यांचा नाश होतो.

## वातकफातिसारनिदान.

रसैःस्वादुकटुप्रायैरुभौवातकफौनृणाम् ॥ कुरुतस्तावतीसाररौद्रौव न्हिंनिहत्यच ॥ द्रवंसफेनंपरिपंतस्त्वतोह्यामगंधिकं ॥ सशब्दंवेदना वच्चतत्रसंपरिपच्यते ॥ नित्यंगुडगुडावंतंतंद्रामूर्छाभ्रमक्लमैः ॥ प्रस क्तसक्थिकश्यूरुजानुपृष्ठास्थिशूलिनः ॥

अर्थ-गोड व तिखट, हे रस फार भक्षण केले असतां, ते दोन्ही वातकफाला कोपवितात; आणि अग्नीला शांत करून अतिसार उत्पन्न करितात. तो द्रवरूप, फेनयुक्त, आमगंधि, सशब्द व शूल, आम, गुडगुडशब्दयुक्त असतो. व झांपड, मूर्छा, भ्रम, ग्लानि, आणि मांड्या, कमर, गुडघे, ढोंपर व पाठ या मध्यें शूल यांणीं युक्त असतो.

## वातकफातिसारीं अन्न.

धान्यपंचकसंसिद्धोधान्यविश्वकृतोथवा ॥
आहारोभेषजायोज्योवातश्लेष्मातिसारिणे ॥

अर्थ-वातश्लेष्मातिसारीरोग्याला धान्यपंचकाचे काढ्यांत, किंवा धने व सुंठ, यांच्या काढ्यांत सिद्ध केलेला आहार वैद्यानें योजावा.

## चित्रकादि काढा.

चित्रकातिविषामुस्तंबलाबिल्वंसनागरं ॥
वत्सकत्वक्फलंपथ्यावातश्लेष्मातिसारनुत् ॥

अर्थ-चित्रकमूळ, अतिविष, नागरमोथे, चिकणामूळ, बेलफळ, सुंठ, इंद्रजव, कुड्याची साल व बाळहरीतकी यांचा काढा वातश्लेष्मातिसारनाशक आहे.

## उपचारक्रम.

वातातिसारेयच्चोक्तंपाचनंग्राहिभेषजं ॥
तदत्रापिचयुंजीतसपित्तकफमारुते ॥

अर्थ-जे वातातिसारावर उपाय सांगितले. ते किंवा पाचन, बंदेज अशीं औषधें. आणि अन्नें हीं सर्व पित्त, वात व कफ यानीं युक्त अतिसारावर योजावीं.

## बिल्वादिकाढा.

बिल्वचूतास्थिनिर्यूहःपीतःसक्षौद्रशर्करः ॥
निहन्याच्छर्द्यतीसारंवैश्वानरइवाहुतिं ॥

अर्थ–बेलफळ, आंब्याच्या बाठींचा रस, साकर व मध घालोन घेतला असतां, वांति व अतिसार, यांचा नाश करितो. जसा अग्नि सर्वत्राचा नाशकरितो.

## प्रियंग्वादिकाढा.

प्रियंग्वंजनमुस्ताख्यंपाययेत्तुयथाबलं ॥
तृष्णातिसारछर्दिघ्नंसक्षौद्रंतंदुलांबुना ॥

अर्थ–गव्हुला, शेवगा व नागरमोथे यांचे चूर्ण किंवा कल्क तांदुळांचे धुवणांत मध घालोन बलाबल पाहून द्यावा. तो तृषा, अतिसार व वांति यांचा नाश करितो.

## आम्रादिकाढा.

आम्रास्थिमध्यंमालूरफलक्काथःसमाक्षिकः ॥
शर्करासहितोहन्याच्छर्द्यतीसारमुल्बणं ॥

अर्थ–आंब्याच्या आंठीचा मगज व बेलफळ, यांचा काढा मध व साकर घालोन द्यावा. हा मोठ्या ही ओकारीसहित अतिसाराचा नाश करितो.

## मुद्गकषाय.

कषायोभ्रष्टमुद्गानांसलाजमधुशर्करः ॥
निहन्याच्छर्द्यतीसारंतृष्णांदाहंज्वरंभ्रमं ॥

अर्थ–भाजलेल्या मुगांचा काढा, लाह्या, मध व साकर घालोन द्यावा; ह्मणजे छर्दि, अतिसार, तृषा, दाह, ज्वर व भ्रम, यांचा नाश करितो.

## पटोलादिकाढा.

पटोलयवधान्याकक्काथःपीतःसुशीतलः ॥
शर्करामधुसंयुक्तश्छर्द्यतीसारनाशनः ॥

अर्थ–कडुपडवळ, इंद्रजव व धने यांचा काढा थंड करून मध व साकर घालून प्यावा; ह्मणजे तो छर्द्यतीसारनाशक आहे.

## जंब्वादिकाढा.

जंब्वाम्रपल्लवोशीरंवटशृंगावरोहकं ॥ रसःक्काथोथवाचूर्णंक्षौद्रेणस हयोजितं ॥ छर्दिज्वरमतीसारंमूर्छांतृष्णांचदुर्जयां ॥ नियच्छत्यचि राद्धंतिस्त्रुतिंवानेकहेतुकां ॥

अर्थ–जांभूळ व आंबा या दोघांचे पल्लव, वाळा, वडाच्यापारंब्या व शिंगाडे यांचा काढा अथवा चूर्ण, अथवा रस, मधाशीं सेवन केला असतां, ओकारी, ज्वर, अतिसार मूर्छा व तृषा, हीं दुर्जय जरीं असलीं तरी त्यांचा नाशक आहे; आणि अनेकप्रकारचा अतिसार याचा नाशक आहे.

## पुरीषातिसारावर.

दीप्ताग्निभिःपुरीषंयत्सार्यतेफेनिलंशकृत् ॥
सपिबेत्फाणितंशुंठीदधितैलंपयोघृतं ॥

अर्थ–दीप्ताग्निपुरुषाला फेनयुक्त व मळमिश्रित ढाळ होतात. त्याणें राब, सुंठ, दहीं, तेल, दूध, तूप, हे पदार्थ प्राशन करावे.

## पुरीषक्षयावर.

बलाविश्वशृतंक्षीरंगुडतैलानुयोजितं ॥
दीप्ताग्निंपाययेत्प्रातःसुखदंवर्चसःक्षये ॥

अर्थ–दीप्ताग्निपुरुषाला मलक्षय झाला असतां, त्याला चिकणा, सुंठ, यांच्या योगानें तापविलेलें दूध, तेल व गूळ घालून प्रातःकाळीं पाजावें; ह्मणजे सुखकारक होतें.

## दुसरा प्रकार.

रंभाखंडंरुचिकरंसघृतंदधिमिश्रितं ॥
खादेत्सेवेच्चमृद्वन्नंतत्हितंशकृत्क्षये ॥

अर्थ–केळयाचीं खंडें तूप व दहीं यांत पचऊन भक्षावीं; आणि मृदु अन्न भक्षावें. तें पुरीषक्षयावर फार हितकर होय.

## शोफातिसारीं देवदार्व्यादिकाढा.

सदेवदारुःसविषःसपाठःसजंतुशत्रुःसघनःसतीक्ष्णः ॥
सवत्सकःक्वाथउदाहृतोसौशोफातिसारांबुधिकुंभजन्मा ॥

अर्थ–देवदार, अतिविष, पाहाडमूळ, वावडिंग, नागरमोथा, मिरें, कुडा, यांचा काढा शोफातिसार हाच समुद्र याला अगस्तीऋषीसारखा आहे.

## विडंगादिकाढा.

विडंगातिविषामुस्तादारुपाठाकलिंगकं ॥
मरीचेनसमायुक्तंशोथातीसारनाशनं ॥

अर्थ–वावडिंग, अतिविष, नागरमोथा, देवदारु, पाहाडमूळ, कुडा व मिरें, यांचा काढा; शोथातीसारनाशक आहे.

## किरातादिकाढा.

किराताब्दामृताविश्वचंदनोशीरवत्सकैः ॥
शोथातीसारशमनंविशेषाज्ज्वरनाशनं ॥

अर्थ–किराइत, नागरमोथा, गुळवेल, सुंठ, चंदन, वाळा व कुडा यांचा काढा शोथा. तीसार आणि विशेषेंकरून ज्वर यांचा नाशक आहे.

## पाठादिकाढा.

पाठाविषावत्सकमेघदारुविडंगकामोचरसैःकषायं ॥
कृतंप्रभातेप्रपिबेद्ददातिशोफातिसारार्णववाडवाग्निः ॥

अर्थ–पाहाडमूळ, अतिविष, कुड्याची साल, नागरमोथा, दारुहळद, वावडिंग व मोचरस यांचा काढा प्रातःकाळीं प्राशन केला असतां,तो शोफातिसारसमुद्राला,वाडवाग्निसारखाआहे.

## शोथघ्न्यादिकाढा.

शोथघ्नींद्रयवापाठाविडंगातिविषाघनाः ॥
क्वथित्वासोषणाःपीताःशोथातीसारनाशनाः ॥

अर्थ–पुनर्नवा, इंद्रजव, पाहाडमूळ, वावडिंग, अतिविष व नागरमोथा, यांचा काढा सुंठ, मिरीं व पिंपळी यांचें चूर्ण घालोन घेतल्यानें शोथातिसार नाश पावतो.

## भस्रातिसारनिदान.

कोष्ठाग्निःशीतपवनेनपच्यतेनवारितृषार्तःसमयेनपिबतिजंतुः ॥
शैथिल्यस्निग्धसदृशंद्रवमामयुक्तंभस्रातिसारकगदःखलुएषदिष्टः ॥

अर्थ–शीतवायूनें युक्त कोष्ठाग्नि आहाराला चांगला पचवीत नाहीं. व तृषा लागली असतां, वेळेवर पाणी पीत नाहीं. त्याला शिथिल, चिकण, द्रवरूप व आमयुक्त असा भस्रा शौचाला होतो. तो भस्रातिसार सांगितला आहे.

## शाल्मलिचूर्ण.

शाल्मलीशुष्कनिर्यासयवानीधातकीशिफा ॥ तिलासर्जरसःस
र्पिर्लोध्रंसमविचिंत्रितं ॥ तद्भक्षणमतीसारंनिहंतिभस्रापहं ॥

अर्थ–मोचरस, ओंवा, धायटीचीं मुळें, तिळ, राळ व लोध्र, यांचें चूर्ण तुपाशीं द्यावें ह्मणजे तें भस्रातिसाराचा नाश करितें.

## हिंग्वादिजलयोग.

हिंगुशुंठीविडंगंचसौवर्चलसमन्वितं ॥
कर्षयुग्ममितंतोयंभक्षितंभस्रापहं ॥

अर्थ–हिंग, सुंठ, वावडिंग व सैंचळ यांचें चूर्ण दोन तोळे पाण्याशीं द्यावें; म्हणजे तें भग्नातिसाराचा नाश करितें.

## रोहिण्यादिपाचन.

रोहिण्यतिविषापाठावचाकुष्ठसमुद्भवः ॥

क्काथःपीतोनिहंत्येवसर्वातिसारजांरुजं ॥

अर्थ–कुटकी, अतिविष, पाहाडमूळ, वेखंड व कोष्ठ यांचा काढा प्याला असतां, सर्वातिसारनाश करील.

## ऱ्हीबेरादि काढा.

ऱ्हीबेरधातकीलोध्रपाठालज्जालुवत्सकैः ॥ धान्यकातिविषामुस्तगुडूचीबिल्वनागरैः ॥ कृतःकषायःशमयेदतिसारंचिरोत्थितं ॥ अरोचकामशूलास्रज्वरघ्नःपाचनःस्मृतः ॥

अर्थ–वाळा, धायटीफूल, लोध्र, पाहाडमूळ, लाजाळू, कुडयाची साल, धने, अतिविष, नागरमोथे, गरुडवेल, कोंवळें बेलफळ व सुंठ, या बारा औषधांचा काढा प्याला असतां, फारदिवसांचा अतिसार, अरुचि, आमशूल व ज्वर यांस दूर करितो; तसाच बेलाची साल व मोठ्या आंब्याची साल यांचा काढा करून त्यांत मध व साकर घालोन घतला असतां, सर्व अतिसार जातात, असें ग्रंथांतरीं आहे.

## धातक्यादिकाढा बाळांचे सर्वातिसारावर.

धातकीबिल्वलोध्राणिवालकंगजपिप्पली ॥ एभिःकृतंशृतंशीतंशिशुभ्यःक्षौद्रसंयुतं ॥ प्रदद्यादवलेहंवासर्वातिसारशांतये ॥

अर्थ–धायटीफूल, कोंवळें बेलफळ, लोध्र, वाळा व गजपिंपळी या पांच औषधांचा काढा करून थंड जाहाल्यावर त्यांत मध मेळवून द्यावा; अथवा चाटण करून द्यावें त्याणें बाळकांचे सर्व अतिसार जातात.

## आनंदभैरवरस.

दरदंवत्सनाभंचमरिचंटंकणंकणा ॥ चूर्णयेत्समभागेनरसोह्यानंदभैरवः ॥ गुंजैकंवाद्विगुंजंवाबलंज्ञात्वाप्रयोजयेत् ॥ मधुनालेहयेच्चानुकुटजस्य फलंत्वचं ॥ चूर्णितंकर्षमात्रंतुत्रिदोषोत्थातिसारनुत् ॥ दध्यन्नंदापयेत्पथ्यंगव्याज्यंतक्रमेवच ॥ पिपासायांजलंशीतंविजयाचाहितानिशि ॥

अर्थ–हिंगूळ, शुद्धकेलेला बचनाग, मिरें, टांकणखार, व पिंपळी, हीं पांच औषधें समभाग घेऊन साऱ्यांचा एकाजागीं खल करून बारीक चूर्ण करावें. याला आनंदभै-

रव असें ह्मणतात. हा आनंदभैरव रस इंद्रजव व कुडेसाल हीं दोन्ही एक कर्षप्रमाण घेऊन चूर्ण करून त्याशीं रोगाचे बळाबळ पाहून एक गुंजाप्रमाण अथवा दोन गुंजा प्रमाण मधांत ध्यावा. तेणेंकरून त्रिदोषापासून जाहाला जो अतिसार तो दूर होतो; आणि पथ्याला गाईचें दहीं, भात, अथवा तूपभात अथवा ताकभात ध्यावा. व ताहान लागली असतां, थंड पाणी ध्यावें, व रात्रीस थोडी भांग शुद्ध करून ध्यावी. ती भांग अतिसारी यास हितकारक होते, असें जाणावें.

## आनंदरस.

जातीफलंसैंधवहिंगुलंचवराटशुंठीविषहेमबीजम् ॥ सपिप्पलीकंवटिकांचकुर्याद्गुंजाप्रमाणांजठरामयघ्नीं ॥ निहंतिवातंकफशूलमात्रमामातिसारंग्रहणीविकारम् ॥ निहंतिशुष्कंसितयासमेतंरसोयमानंद इतिप्रदिष्टः ॥

अर्थ–जायफळ, सैंधव, हिंगूळ, कवडीचें भस्म, सुंठ, बचनाग, धोत्र्याचें बीं, पिंपळी हीं सर्व एकत्र खलून गुंजभार गोळी, साखरे बरोबर खावी; ह्मणजे पोटांतील रोग, वात, कफ, शूळ, आमातिसार, संग्रहणी व योनिरोग यांचा नाश करील. याला आनंदरस असें ह्मणतात.

## दाडिमाष्टक.

कर्षोन्मितातुगोक्षीरीचातुर्जातंत्रिकार्षिकम् ॥ यवानीधान्यकाजाजीग्रंथिव्योषपलांशकम् ॥ पलानिदाडिमान्यष्टौसितायाश्चैकतःकृतं ॥ गुणैःकपित्थाष्टकवच्चूर्णंतद्दाडिमाष्टकं ॥

अर्थ–वंशलोचन एक तोळा, दालचिनी, तमालपत्र, वेलांचे दाणे, नागकेशर मिळून तीन तोळे, ओवा, धने, जिरें, पिंपळमूळ, सुंठ, मिरें, पिंपळी मिळून चार तोळे, डाळिंबें बत्तीस तोळे, साखर बत्तीस तोळे, सर्व एकत्र करून चूर्ण करावें. त्याला दाडिमाष्टक चूर्ण असें ह्मणतात. गुणानीं कपित्थाष्टकासारखें आहे.

## लघुगंगाधरचूर्ण.

मुस्तमिंद्रयवंबिल्वंलोध्रंमोचरसंतथा ॥ धातकींचूर्णयेत्तक्रगुडाभ्यां पाययेत्सुधीः ॥ सर्वातिसारशमनंन्यरुणद्धिप्रवाहिकां ॥ लघुगंगाधरंनामचूर्णंसंग्राहकंपरं ॥

अर्थ–नागरमोथे, इंद्रजव, कोंवळें बेलफळ, लोध्र, मोचरस व धायटीफूल या साहा औषधांचें चूर्ण करून ताकांत गूळ मेळवून त्यांत तें चूर्ण टाकून ध्यावें. तेणेंकरून

सारे अतिसार दूर होतात, व प्रवाहिका ह्मणजे पातळ मळ हगतो, तें बंद होतें. या चूर्णाला लघु गंगाधरचूर्ण असें ह्मणावें. व हें चूर्ण मलाचा अवष्टंभ करणारें चांगलें आहे, असें जाणावें.

## वृद्धगंगाधरचूर्ण.

मुस्तारलुकशुंठीभिर्धातकीलोध्रबालकैः ॥ बिल्वमोचरसाभ्यांचपाठें द्रयववत्सकैः ॥ आम्रबीजंप्रतिविषालज्जालुरितिचूर्णितं ॥ क्षौद्रतं दुलपानीयैःपीतैर्याति प्रवाहिका ॥ सर्वातिसारग्रहणीप्रशमंयातिवे गतः ॥ वृद्धगंगाधरंचूर्णंसरिद्वेगविबंधकं ॥

अर्थ—नागरमोथे, टेंटू, सुंठ, धायटीफुलें, लोध्र, वाळा, कोंवळें बेलफळ, मोचरस, पाहाडमूळ, इंद्रजव, कुडेसाल, आंब्याची कोय, अतिविष व लाजेरी, या १४ औषधांचें चूर्ण तांदुळाचें धुणांत मध मेळवून घ्यावें. तेणेंकरून प्रवाहिका ह्मणजे पातळ हगवण लागते ती दूर होत्ये. सारे अतिसार व संग्रहणी लवकर दूर होतात. या चूर्णाला वृद्ध गंगाधर चूर्ण असें ह्मणतात. हें चूर्ण अतिसाराचा वेग नदीचे वेगासारखा असला तरी त्याला थांबवितो.

## अजमोदादिचूर्ण.

अजमोदामोचरसंसशृंगवेरंसधातकीकुसुमं ॥
गोदधिमंथितयुक्तंगंगामपिवाहिनींरुध्यात् ॥

अर्थ—अजमोदा, मोचरस, आलें व धायटीफुलें या चार औषधांचें चूर्ण पाण्यावांचून घुसळलेल्या गाईचे दह्यांत घोळून घ्यावें. तेणेंकरून गंगेचे प्रवाहासारखा प्रवाह ज्या अतिसाराचा आहे, तोही बंद होतो.

## बृहद्दाडिमाष्टक.

दाडिमस्यफलान्यष्टौशर्करायाःपलाष्टकं ॥ पिप्पलीपिप्पलीमूलं यवानीमरिचंतथा ॥ धान्यकंजीरकंशुंठीप्रत्येकंपलसंमितं ॥ कर्षमा त्रातुगोक्षीरीत्वक्पत्रैलाश्चकेसरं ॥ प्रत्येकंकोलमात्राःस्युस्तच्चूर्णंदाडि माष्टकं ॥ अतिसारंक्षयंगुल्मंग्रहणींचगलग्रहं ॥ मंदाग्निंपीनसंकासं चूर्णमेतद्व्यपोहति ॥

अर्थ—डाळिंबसाल आठ पळें, साकर आठ पळें, पिंपळी, पिंपमूळ, अजमोदा, मिरें, धने, जिरें व सुंठ, हीं सात औषधें एक एक पळ व वंशलोचन एक कर्ष, दालचिनी, तमालपत्र, विलायची व नागकेशर, हीं चार औषधें कोल कोल प्रमाण घ्यावीं. मग सारीं

औषधें कुटून चूर्ण करावें. याला मोठें दाडिमाष्टक असें ह्मणतात. हें चूर्ण घेतलें असतां, अतिसार, क्षय, गुल्म, संग्रहणी, कंठरोग, अग्निमांद्य, पडसें व कास, हीं दूर होतात.

## धातक्यादि चूर्ण.

श्रीधातकीमोचरसाब्दलोध्रकलिंगविश्वौषधचूर्णमेतत् ॥
पेयंगुणाढ्यंगुडतक्रयुक्तंगाढंत्वतीसारकनाशकंच ॥

अर्थ—बाळबेल, धायटीफूल, मोचरस, नागरमोथा, लोध्र, कुडयाची साल व सुंठ यांचें चूर्ण गूळ व ताक यांशीं घ्यावें; ह्मणजे अतिसारनाश होतो.

## भल्लातादिचूर्ण.

भल्लातानांद्विखंडानांद्वेपलेभर्जितेक्षिपेत् ॥ शुंठ्याःपलंतुचेतक्याःपलार्धं सुमनापलं ॥ कर्षंमेथीत्रेल्लजीराःसर्षपाःकोलमात्रतः ॥ ततोयवान्यर्धं पलंपिप्पलीरामठोषणं ॥ बिडंसैंधवजीरंचकिर्माणिसंज्ञिकंतथा ॥ कर्ष प्रमाणंविज्ञेयंवैद्यविद्याविशारदैः ॥ सर्वमेकत्रसंचूर्ण्ययथासात्म्यंतुभक्ष येत् ॥ दध्नासहतथाखादेत्सर्वातीसारनाशनं ॥

अर्थ—बिबवे दुखंड करून भाजलेले आठ तोळे, सुंठ चार तोळे, हरीतकी दोन तोळे, गहूं च्यार तोळे, मेथी, मिरीं व जिरें हीं कर्ष व शिरस दोन मासे, ओंवा दोन तोळे आणि पिंपळी, हिंग, चित्रक, बिडलोण, सैंधव, जिरें व किर्माणि ओंवा हीं प्रत्येकीं एकेक तोळा. या प्रमाणें सर्व एकत्र करून सोसेल त्या मानानें दह्यांशीं द्यावें. तें सर्वातिसाराचा नाश करितें.

## लघुलाईचूर्ण.

सूतंगंधंत्रिकटुकंदीप्यकंजीरकद्वयं ॥ सौवर्चलंसैंधवंचरामठं बिडमेवच ॥ शक्राव्हस्यचचूर्णंतुचूर्णतुल्यंप्रदापयेत् ॥ संग्रहं शूलमानाहंहन्यान्नानातिसारकं ॥

अर्थ—पारा, गंधक, सुंठ, मिरीं, पिंपळी, ओंवा, जिरें, शहाजिरें, संचळ, सैंधव, हिंग व बिडलोण हीं समभाग आणि या सर्वांबरोबर कुडयाच्या सालीचें चूर्ण. हीं सर्व एकत्र करावीं. याला लघुलाईचूर्ण ह्मणतात. हें संग्रहणी, शूल, आनाह वायु, आणि नाना प्रकारचे अतिसार यांचा नाश करितें.

## यवान्यादिचूर्ण.

यवानीपिप्पलीमूलचतुर्जातकनागरैः ॥ मरीचाग्निजलाजाजीधान्य सौवर्चलैःसमैः ॥ वृक्षाम्लधातुकीकृष्णाबिल्वदाडिमदीप्यकैः ॥ त्रिगु

णैःषड्गुणासीतैःकपित्थाष्टगुणीकृतैः ॥ चूर्णोतिसारग्रहणीक्षयगुल्मा न्गलामयान् ॥ कासश्वासारुचीहिक्कांकपित्थाष्टमिदंजयेत् ॥

अर्थ—ओंवा, पिंपळीमूळ, दालचिनी, तमालपत्र, एलची, नागकेशर, सुंठ, मिरीं चित्रक, वाळा, जिरें, धने व संचळ हीं समभाग आणि आंबसोल, धावशीचीं फुलें, पिंपळी, बेलफळ, डाळिंब व पिंवळे जिरें हीं तिप्पट, साकर साहापट, आणि कवठें आठपट, यांचें चूर्ण एकत्र करावें, याला कपित्थाष्टक ह्मणतात. हे अतिसार, ग्रहणी, क्षय, गुल्म, गलरोग, खोकला, श्वास, अरुचि व उचकी यांचा नाश करितें.

## वत्सकादिघृत.

वत्सकस्यचबीजानिदार्व्याश्चैवत्वगुत्तमा ॥ पिप्पलीशृंगवेरंच लाक्षाकटुकरोहिणी ॥ षड्भिरेतैर्घृतंसिद्धंपेयंमंडविमिश्रितं ॥

अर्थ—इंद्रजव, दारुहळद, पिंपळी, सुंठ, लाख व कुटकी, ह्या साहा औषधानीं घृत सिद्ध करून मंडाबरोबर घ्यावें; ह्मणजे अतीसार शमतो.

## बिल्वतैल.

तुलांसंकुटयबिल्वस्यपचेत्पादावशेषितं ॥ सक्षीरंसाधयेत्तैलंश्लक्ष्णपिष्टैरिमैःसमैः ॥ बिल्वंसधातुकीकुष्ठंशुंठीरास्नापुनर्नवा ॥ देवदारुवचामुस्तालोध्रमोचरसान्वितं ॥ एतन्मृद्वग्निनापक्कंग्रहण्यर्शोतिसारनुत् ॥ बिल्वतैलमितिख्यातमत्रिपुत्रेणभाषितं ॥ ग्रहण्यर्शोविकारेये स्नेहाःसमुपदर्शिताः ॥ प्रयोज्यास्तेतिसारेपित्रयाणांतुल्यहेतुना ॥

अर्थ—बेलफळें ४०० तोळे कुटून त्याचा चतुर्थांश काढा करावा, त्यांत दूध व तेल हीं घालोन नंतर बेलफळ, धायटीचीं फुलें, कोष्ठ, सुंठ, रास्ना, पुनर्नवा, देवदार, वेखंड, मोथे, लोध्र व सांवरीचा चीक, यांचे कल्क घालावे; आणि तें तेल शेष राही पर्यंत पचन करावें. हे बिल्वतैल अत्रिपुत्रानें सांगितलें, हें संग्रहणी, मुळव्याध, आणि अतिसार यांवर योजावें. व जे संग्रहणी व अर्श यांवर सांगितलेले उपचार ते तिघांस ही सारखे हेतु आहेत, याकारितां ते सर्व अतिसारावर योजावे.

## शंखोदररस.

सुतभस्मबलीलोहंविषंत्रिकटुकंसमं ॥ पिष्ट्वानिंबुजतोयेनशंखेसर्वंचतुर्गुणे ॥ क्षिप्त्वामृदंशुकैर्लिप्त्वाभांडेगजपुटेपचेत् ॥ शीतेचप्राग्विषं क्षिप्त्वावल्लमात्रंप्रयोजयेत् ॥ जातीफलंचविजयामधुनातिसृतौददेत् ॥ ग्रहण्यांचित्रकाद्रांबुविजयाविश्वभेषजं ॥ पृथक्देयंसमधुनामरि

चैश्वघृतान्वितं ॥ वन्हिमांद्यक्षयेतद्वदुदरात्यनिलामये ॥ पथ्यंदध्ना चतक्रेणक्षीरशाकैश्चसंयुतं ॥

अर्थ—पारदभस्म, गंधक, लोह, बचनाग, सुंठ, मिरीं व पिंपळी हीं समभाग लिंबाच्या रसांत खलून चौपट शंखामध्यें भरावें; आणि मातकापड करून भाड्यांत घालोन गजपुट द्यावें. थंड झाल्यावर त्यांत एक भाग बचनाग मिळवावा, व भरून ठेवावें; आणि वालमात्र जायफळ, भांग व मध यांशीं अतिसार व संग्रहणी यांवर द्यावा. व चित्रक, आलें, वाळा, भांग व सुंठ, मिरीं, याचें चूर्ण, तूप व मध यांशीं अग्निमांद्य, क्षय, उदर व वायु यांवर द्यावें; आणि पथ्याला दहीं, ताक, दूध व शाक हे पदार्थ द्यावे.

## मूलिकाबंध.

रक्तसूत्रैःकटौबध्वासर्पाक्षीवाटयमूलकैः ॥
स्नुह्यावासहदेव्यावामूलंस्यादतिसारजित् ॥

अर्थ—तांबड्या सुतानें कमरेंत गुळवेल, बला, निवडुंग किंवा सहदेवी यांचें मूळ बांधावें; ह्मणजे तें अतिसाराचा नाश करितें.

## दाडिमीवटी.

शुंठीजातीफलंचाहिफेनंकद्विगुणंभवेत् ॥ अपक्वंदाडिमीबीजंसर्वतुल्यंप्रदापयेत् ॥ अपक्वदाडिमीबीजकोशेक्षिप्त्वामृदालिपेत् ॥ पुटपाकविधानेनपक्त्वाकोशसमन्वितं ॥ पिष्ट्वाकल्कंविधायाथगुटिकाः संप्रकल्पयेत् ॥ बादरास्थिप्रमाणेनतक्रेणसहदापयेत् ॥ पक्वातिसारशमनीदाडिमीवटिकामता ॥

अर्थ—सुंठ व जायफळ यांचे दुप्पट अफू आणि त्यांच्या समान हिरव्या डाळिंबाचे दाणे अपक्वडाळिंबांत घालून मातकापड करून पुटपाक विधीनें पाक करून वाटून कल्क करून बोराचे बी एवढ्या मोठ्या गोळ्या करून ताकाबरोबर एकेक द्यावी. तीं पक्वातीसाराचा नाश करील.

## बब्बूल्यादिआंगरस.

स्थूलबब्बूलिकापत्ररसःपानाद्व्यपोहति ॥
सर्वातिसारान्श्योनाककुटजत्वक्रसोथवा ॥

अर्थ—निःकंटक थोर बाभळीचे पानांचा आंगरस प्याला असतां, सारे अतिसार दूर होतात; किंवा टेंटूचे सालीचा अंगरस, अथवा कुड्याचे सालीचा अंगरस यांतील कोणताही आंगरस घेतला असतां; सारे अतिसार दूर होतात.

## न्यग्रोधादिपुटपाक.

न्यग्रोधादेश्वकल्केनपूरयेद्गौरतित्तिरैः ॥ निरंत्रमुदरंसम्यक्पुटपाके

नतत्पचेत् ॥ तत्कल्कःस्वरसःक्षौद्रयुक्तःसर्वातिसारनुत् ॥

अर्थ–वड, उंबर, पिंपळ, पायरी व जलवेतस यांच्या सालीचे चूर्ण करून पाण्यांत वाटून कल्क करून, तो कल्क पांढरे तित्तिरपक्षी यांचे पोटामध्यें भरून, पूर्वी पुटपाकाची कृति सांगीतली आहे, त्या रितीनें कृति करून अग्नि द्यावा; नंतर तो तित्तीर बाहेर काढून त्याचे उदरांत कल्क असतो, त्याचा रस काढून त्यांत मध मेळवून प्याले असतां, सारे अतिसार दूर होतात.

## अहिफेनयोग.

अहिफेनंसुसंभृष्टंखर्परेमृदुवन्हिना ॥

पक्कातिसारशमनंभेषजंनास्त्यतःपरं ॥

अर्थ–खापरांत मंदाग्नीवर अफू भाजून द्यावी. यासारिखें पक्कातिसार शमविणारें दुसरें औषध नाहीं.

## मुक्ताभस्मयोग.

मुक्ताभस्मेतिनामेदंदोषंदृष्ट्वाप्रदापयेत् ॥ गुंजार्धमेकगुंजंवाक

र्पूरेणसुवासितं ॥ जातीफलादिसंयुक्तंरहस्यंपरमंमतं ॥

अर्थ–मोत्याचें भस्म दोष पाहून गुंज, अर्धगुंज किंवा दीड गुंज कापुराचा वास लाऊन जायफळादिकांबरोबर द्यावें. हें अतिसारावर परम रहस्य आहे.

## जातीफलादिवटी.

जातीफलंचखर्जूरमहिफेनंतथैवच ॥ समभागानिसर्वाणिना

गवल्लीरसेनच ॥ वल्लमात्रावटीकार्यादेयातक्रानुपानतः ॥

अतिसारंजयेद्घोरंवैश्वानरइवाहुतिं ॥

अर्थ–जायफळ, खारीक व अफू, हे पदार्थ समभाग घेऊन पानवेलीच्या रसांत वाल प्रमाण गोळी करून ताकाशीं द्यावी; ह्मणजे ती घोररूपअतिसाराचा नाश करित्ये. जसा अग्नि आहुतीचा नाश करितो तशी.

## मरीचादिवटी.

मरीचंखर्परंनागफेनंतंदुलतज्जलैः ॥ मर्द्यंतंदुलतोयेनगुटीस

र्वातिसारजित् ॥ जीरकंविजयाबिल्वंनागफेनंसमांशकं ॥ द

धिनीरेणसाकार्यागुटीसर्वातिसारजित् ॥

अर्थ--मिरें, कलवापरी व अफु हे पदार्थ तांदुळांचे धुवणाशीं घोटावे. त्याची गोळी द्यावी. ती सर्व अतिसारांचा नाश करिते; अथवा जिरें, भांग, बेलफळ व अफीम हे पदार्थ समभाग घेऊन दह्यांचे निवळीशीं वाटून त्याची गोळी करावी. ही गोळी सर्वअतिसारांचा नाश करिते.

## अंकोलकल्क.

अंकोलमूलकल्कश्चसक्षौद्रस्तंदुलांबुना ॥
अतिसारहरःप्रोक्तस्तथाविषहरःस्मृतः ॥

अर्थ—अंकोलवृक्षाच्या मुळ्या वाटून कल्क करून त्यांत मध मेळवून तांदुळांच्या धुणांत प्यालें असतां, अतिसार दूर होतो; व बचनागादिक विष व सर्पादिकांचीं विषें दूर होतात.

## कपित्थकल्क.

मध्यंलीढ्वाकपित्थस्यसव्योषक्षौद्रशर्करम् ॥
कट्फलंमधुयुक्तंवामुच्यतेजठरामयात् ॥

अर्थ—कवठाचा गीर, सुंठ, मिरें, पिपळी व मध, साकर, हीं एकत्र करून खावीं; अथवा कायफळ मधाबरोबर खावें; ह्मणजे पोटांतला रोग जातो.

## आर्द्रकुटजावलेह.

कुटजत्वक्तुलामार्द्रांद्रोणनीरेविपाचयेत् ॥ पादशेषंशृतंनीत्वाचूर्णान्येतानिदापयेत् ॥ लज्जालुर्धातकीबिल्वंपाठामोचरसस्तथा ॥ मुस्तंप्रतिविषाचैवप्रत्येकंस्यात्पलंपलं ॥ ततस्तुविपचेद्भूतोयावद्दर्वीप्रलेपनं ॥ जलेनछागदुग्धेनपीतोमंडेनवाजयेत् ॥ सर्वातिसारान्घोरांस्तुनानावर्णान्सवेदनान् ॥ असृक्दरंसमस्तंचसर्वार्शांसिप्रवाहिकां ॥

अर्थ—कुडयाची साल ओली एक तुला प्रमाण आणून थोडी कुटून त्यांत पाणी एक द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही तों पर्यंत काढा करून गाळून घ्यावा; नंतर लाजेरी, धायटीफूल, कोंवळें बेलफळ, पाहाडमूळ, मोचरस, नागरमोथे व आतिविष हीं सात औषधें पळ पळ प्रमाण घेऊन चूर्ण करून त्या काढ्यांत टाकुन फिरून लोखंडाचे पळीला लेप लागे असा कढून घण करावा. मग हा लेप पाण्यांत अथवा शेळीचे दुधांत किंवा मंडांत द्यावा. तेणें करून वेदनायुक्त व नीलपीतादिक नानाप्रकारचे वर्ण ज्या अतिसारामध्यें आहेत, व घोररूप असे संपूर्ण अतिसार दूर होतात, व स्त्रियांस संपूर्ण प्रकारची धुपणी लागते ती व संपूर्ण मुळव्याधि व प्रवाहिकारोग ह्मणून अतिसाराचा भेद आहे तो. हे सारे रोग दूर होतात.

## दाडिंबपुटपाक.

पुटपाकेनविपचेत्सपक्वंदाडिमीफलं ॥
तद्रसोमधुसंयुक्तःसर्वातिसारनाशनः ॥

अर्थ–पिकलेलें दाळिंब आणून, पूर्वी सांगितली जी पुटपाकाची कृति त्या रितीनें कृति करून अग्नि द्यावा; नंतर तें दाळिंब बाहेर काढून पिळून रस काढून त्यांत मध मेळवून प्यालें असतां, सारे अतिसार दूर होतात.

## जातीफलादिपुटपाक.

जातीफलंसर्वफेनंटंकंगंधकजीरके ॥ ऐतानिसमभागानिबा
लदाडिमबीजकैः ॥ पेषयेत्तेनकल्केनपूरयेद्दाडिमीफलम् ॥
अंगारेतच्चगोधूमचूर्णेनालेपितंपचेत् ॥ अतिसारस्तंभनंस्या
त्परंदीपनपाचनम् ॥

अर्थ–जायफळ, अफू, टाकणखार, गंधक व जिरे, हीं समभाग, आणि यांच्या बरोबर कोंवळ्या डाळिंबाच्या बिया घेऊन एकत्र खलून तो कल्क ह्मणजे खलेला गोळा डाळिंबांत भरून बाहेरून कणीक लावून निखाऱ्यांत भाजावें; ह्मणजे तें अतिसाराचें स्तंभन करणारें, दीपन, पाचन असें होतें. शक्ति पाहून वाल किंवा दोन वाल द्यावें.

## मोचरसादिपुटपाक.

समोचसारंसहनागफेनंसजातिसस्यंपुटपाकयोगात् ॥
निहंतिमालूरफलंनराणांसर्वातिसारंह्यनुभूतमेतत् ॥

अर्थ–कांटेसांवरीचा डीक, अफू, जायफळ व बेलफळाचा गीर एकत्र करून माहाळुंगांत भरून पुटपाक करावा. तो सर्वातीसारनाशक हें अनुभूत आहे.

## प्रवाहिकासंप्राप्ति.

वायुःप्रवृद्धोनिचितंबलासंनुदत्यधस्तादहिताशनस्य ॥
प्रवाहतोल्पंबहुशोमलाक्तंप्रवाहिकांतांप्रवदंतितद्ज्ञाः ॥

अर्थ–शरीरांत वायु कुपित होऊन अपथ्यपदार्थ भक्षणार पुरुषाचे शरीरांत संचित जो कफ, त्यातें मळमिश्रित असा अपानद्वारावाटे प्रवाहणेंकरून बाहेर टाकितो, त्या रोगाला वैद्य प्रवाहिका ह्मणतात.

प्रवाहिकावातकृतासशूलापित्तात्सदाहासकफाकफाच्च ॥
सशोणिताशोणितसंभवाच्चताःस्नेहरूक्षप्रभवामतास्तु ॥

अर्थ–वातजन्यप्रवाहिकेचे ठायीं शूल असतो, पित्ताधिक प्रवाहिका दाहयुक्त असत्ये, व कफजन्यप्रवाहिका कफयुक्त असत्ये. रक्तसंभव जी प्रवाहिका ती रक्तयुक्त असत्ये. या सर्व प्रवाहिका प्रायः स्नेह व रूक्ष अशा पदार्थांच्या सेवनेकरून होतात, असें जाणावें.

## प्रवाहिकालक्षणादि.

तासामतीसारवदादिशेच्चलिंगंक्रमंचामविपक्कतांच ॥

अर्थ—त्याप्रवाहिकांचीं सर्व लक्षणें व चिकित्साक्रम व आमाचा विपाक इत्यादिक अतिसाराप्रमाणें जाणावीं.

## अतिसारनिवृत्तिलक्षण.

यस्योच्चारंविनामूत्रंसम्यग्वायुश्चगच्छति ॥

दीप्ताग्नेर्लघुकोष्ठस्यास्थितस्तस्योदरामयः ॥

अर्थ—ज्या अतिसाऱ्याला शौचावांचून मुतायास होतें, अपानवायु चांगला सरतो, जठराग्नि प्रदीप्त होतो, व पोट ही हलकें होतें, त्यापुरुषाचा अतिसार निवृत्त जाहाला असें समजावें.

## बालबिल्वकल्क.

कल्कःस्याद्बालबिल्वानांतिलकल्कश्चतत्समः ॥

दध्नःसारोम्लस्नेहाढ्योहन्याद्वैतत्प्रवाहिकां ॥

अर्थ—कोंवळ्या बेलफळांचा कल्क व त्याचें समान तिलकल्क, दह्यांची सायी व स्नेहयुक्त आंबट, हीं एकत्र करून भक्षण केलीं असतां, प्रवाहिकेचा नाश करील.

## मुद्गयूषादि.

मुद्गयूपरसंतक्रंधान्यजीरकसंयुतं ॥ तत्षड्गुणमितिप्रोक्तंसैंधवेनसमन्वितं ॥ अग्निसंदीपनंप्रोक्तंग्रहणीदोपनाशनं ॥ अरोचकंज्वरंचैवश्रेष्ठमेतत्प्रवाहिके ॥

अर्थ—मुगांचा यूष, रस, ताक, धने, जिरें, आणि सैंधव यांच्या यूषाला षड्गुण यूष ह्मणतात. हा अग्निदीपन आहे. ग्रहणी, अरुचि, ज्वर आणि प्रवाहिका यांवर उत्तम आहे.

## बालबिल्वादियोग.

बालबिल्वंगुडंतैलंपीतंवामारिचोद्भवं ॥

त्र्यहात्प्रवाहिकांहन्याच्चिरकालानुबंधिनीं ॥

अर्थ—बाळबेल व मिरीं यांचा काढा गुळ व तेल घालून घ्यावा. तो तीन दिवसांत फार दिवसांच्या ही प्रवाहिकेचा नाश करितो.

## बिल्वपेश्यादिकाढा.

बिल्वपेशीगुडंलोध्रंतैलंमरिचसंयुतं ॥

लिह्यात्प्रवाहिकाक्रांतःसत्वरंसुखमाप्नुयात् ॥

अर्थ—बेलाच्या पाळांचे तंतु, गुळ, लोध्र, तेल व मिरीं हे पदार्थ समभाग चूर्ण करून चाटावे; ह्मणजे प्रवाहिकारोग्याला सुख होईल.

## धातक्यादियोग.

धातुकीबदरीपत्रंकपित्थरसमाक्षिकं ॥
सलोध्रमेकतोदध्नापिबेन्निर्वाहिकार्दितः ॥

अर्थ—धायटीचीं फुलें, बोरीच्या पाल्याचा अथवा कवठांचा रस, मध व लोध्र, हे पदार्थ दह्यांमध्यें कालवून प्रवाहिकारोग्यानें प्यावे.

## मुस्तावत्सकादियोग.

मुस्तावत्सकबीजंमोचरसोबिल्वधातुकीलोध्रं ॥
भृगुमथितसंप्रयुक्तंगंगामपिप्रवाहिकांरुंध्यात् ॥

अर्थ—नागरमोथा, इंद्रजव, मोचरस, बेलफळ, धायटीफूल व लोध्र, हे पदार्थ एकत्र करून रवीनें थोडें मंथन केलेल्या दह्यांबरोबर घेतलें असतां, तें प्रवाहरूप गंगला ही रोधील.

## तैलादियोग.

तैलंसर्पिर्दधिक्षौद्रंविषाविश्वंसफाणितं ॥
सर्वमालोड्यपातव्यंसद्योनिर्वाहिकंहरेत् ॥

अर्थ—तेल, तूप, दहीं, मध, अतिविष, सुंठ आणि राब, हीं एकत्र करून प्यावीं; ह्मणजे प्रवाहिकेला जिंकितात.

## त्र्यूषणादिघृत.

त्र्यूषणात्रिफलाचैवचित्रकोगजपिप्पली ॥ बिल्वकर्कटिका
हिंस्राविडंगंसनिदिग्धिकं ॥ घृतप्रस्थंपचेदेभिर्गवांमूत्रेचतु
र्गुणे ॥ तत्प्रयोगंपिबेत्कोलंहन्यात्तिनप्रवाहिकां ॥

अर्थ—सुंठ, मिरीं, पिंपळी, त्रिफळा, चित्रकमूळ, गजपिंपळी, बेलफळ, कांकडशिंगी, जटामांसी, वावडिंग व रिंगणी, यांचा काढा एक भाग व गोमूत्र चार भाग यांमध्यें ६४ तोळे तूप सिद्ध करावें. तें सहा मास घेतलें असतां, प्रवाहिका नाश पावत्ये.

## मुस्तादिगुटी.

मुस्तंमोचरसंलोध्रंधातुकीबिल्वकौटजं ॥ अहिफेनरसंगंधंसूक्ष्मचू
र्णानिकारयेत् ॥ वल्लमात्रमिदंखादेत्गुडतक्रसमन्वितं ॥ अतिसा
रेप्रवाहेचग्रहण्यांचविशेषतः ॥

अर्थ—नागरमोथे, मोचरस, लोध्र, धायटीचीं फुलें, बेलफळ, इंद्रजव, अफु, पारा व गंधक, हे एकत्र करून वालभर गुळ व ताक यांशीं अतिसार व प्रवाहिका यांवर विशेषानें द्यावें, व संग्रहणीवर ही द्यावें.

## पथ्य.

वमनंलंघनंनिद्रापुराणाःशालिषष्टिकाः॥विलेपीलाजमंडश्चमसूरस्तुवरीरसः ॥ शशोवैलावहरिणकपिंजलभवारसाः ॥सर्वक्षुद्रझषाशृंगीडिंडिशौमधुरालिका॥तैलच्छागघृतंक्षीरंदधितक्रंगवामपि ॥ दधिजंवापयोजंवानवनीतंगवांजयेत् ॥ नवरंभाफलंपुष्पंक्षौद्रंजंबुफलानिच॥भव्यंसहार्द्रकंविश्वंशालूकंचविकंकतं ॥ कपित्थंबदरंबिल्वंतिंदुकंदाडिमद्वयं ॥ तालंवटफलंवापिचांगेरीविजयाकणा ॥ जातीफलमफेनंचजीरकंगिरिमल्लिका ॥ कुस्तुंबरुमहानिंबकषायःसकलोरसः ॥ अन्नपानानिसर्वाणिदीपनानिलघूनिच॥ नाभेर्द्व्यंगुलतोधस्ताच्छस्त्रेणार्धेंदुवद्दहेत् ॥ तथावंशास्थिमूलेपिपथ्यवर्गोतिसारिणां ॥

अर्थ—वांति, लंघन, निद्रा, जुने साटकीभाताचे तांदुळ, आटवल, लाह्याचा मंड, मसरा, तुरी यांचा रस, व ससा, लावा, हरिण, कपिंजलपक्षी, यांचे रस, बारकेजातीचे मास व शृंगी जातीचे मास, घेडशोचें फळ, मध, राळ, तेल, बकरीचे व गाईचें तूप, दूध, दहि, ताक, व गाईचे दह्याचें किंवा दुधाचें लोणी, नवें केलफुल, मध, जांबळें, करंबळ, आलें, सुंठ, कमळकंद, वेकळ, कवट, बोर, बेलफळ, टेंभुर्णी, घेडशी, खाटें व गोडें डाळिंब, व वड यांची फळें, चुका, भांग, पिपळी, जायफळ, अफीण, जिरें, कुडा व धनें, कडवा निंब, संपूर्ण तुरटपदार्थ व दीपन लघु अशीं अन्नें व पाम आणि बेंबच्या खालीं व वर दोन अंगुळावर अर्धचंद्राकार डाग व माकडहाडाचे खालीं अर्धचंद्राकार डाग, हा अतिसारी रोग्याला पथ्य वर्ग सांगितला.

## पाणी.

दशांशंषोडशांशंवाशतांशंवाशृतंजलं ॥ सुशीतंपाचनंग्राहीदीपनंदोषनाशनं ॥ यथायथाशृतंतोयंज्वरातिसारिणोभवेत् ॥दीपनंपाचनंग्राहीआरोग्यंचतथातथा ॥

अर्थ—दशांश, षोडशांश, किंवा शतांश तापवून थंडकेलेलें पाणी ग्राहक, दीपन, आणि अशेषदोषनाशक असें होतें. व जसें जसें तापविलेलें पाणी तसें तसें जासति गुणकारक व आरोग्य देणारें होतें.

## अतीसारास अपथ्य.

स्नानावगाहमभ्यंगगुरुस्निग्धान्नभोजनं ॥ व्यायाममग्निसंतापम तिसारीविवर्जयेत् ॥ नवान्नोष्णंगुरुस्निग्धंभोजनंनहितंनवं ॥ व्या याममैथुनंचिंतामतिसारीविवर्जयेत् ॥ स्वेदोंजनंरुधिरमोक्षणमंबुपा नंस्नानंव्यवायमपिजागरधूमनस्यं ॥ अभ्यंजनंपललवेगविधारणंच रूक्षाण्यसात्म्यशयनंचविरुद्धमन्नं ॥ गोधूममाषभववास्तुककाकमा चीनिष्पावकंचमधुशिग्रुरसालपूरं ॥ कूष्मांडतुंबिबदरंगुरुचान्नपानं जांबूलमिक्षुगुडमद्यमुपोदिकाच ॥ द्राक्षाम्लवेतसफलंलशुनंचधात्री दुष्टांबुमस्तुग्रहवारिचनारिकेलं॥ संस्नेहनंमृगमदाखिलपत्रशाकाक्षा रंरसानिसकलानिपुनर्नवाच॥ उर्वारुकंलवणमाम्लमपिप्रकोपंवर्ज्यो तिसारगदपीडितमानवेषु ॥

अर्थ—स्नान, अवगाहन, अभ्यंग, जड व स्निग्ध असें भोजन, व्यायाम, अग्निसंताप, नवान्न, उष्ण, गुरु, स्निग्ध, अपथ्यपदार्थ, व्यायाम, मैथुन, चिंता, घाम काढणें, अंजन, रक्त काढणें, उदक पिणें, स्नान, स्त्रीगमन, जागरण, धूमपान, नस्य, अभ्यंजन, मांस, वेगधारण व रूक्ष; आणि असात्म्य असें भोजन, विरुद्धाशन, गहूं, उडीद, चाकवत, कावळीची भाजी, पावटे, मद्य, शेवगा, आंबा, खापरपोळी, पुरणपोळी, कोहळा, पांढरा भोपळा, बोर, जडान्न, किंवा जडपदार्थांचें प्राशन, विडा, ऊंस, गूळ, मद्य, मयाळेची भाजी, द्राक्षें, आम्लवेतसाचें फळ, लसूण, आंवळी, बिघडलेलें पाणी, मस्तु, घरांतील शिळें पाणी, नारळ, स्नेहन, कस्तुरी, संपूर्ण पत्रशाक, क्षार, संपूर्ण रसमूपपदार्थ, पुनर्नवा, कांकडी, मीठ, आंबट पदार्थ; आणि कोप हा अतिसारी रोग्यानें वर्ज करावा.

---

## संग्रहणी, कर्मविपाक.

अनन्यगतिकांभार्यामदुष्टांकारणंविना ॥
परित्यजतियःसोपिग्रहणीरोगवान्भवेत् ॥

अर्थ—जो दुष्टपुरुष अनन्यगतिक, व पवित्र अशा स्त्रीला कारणावांचून टाकितो, त्याला संग्रहणी रोग होतो.

### संग्रहणीशांति.

शिवसंकल्पसूक्तस्यजपस्यात्तत्रशांतये ॥ अष्टोत्तरसहस्रंहिहि

रण्यंचतथामधु ॥ दद्याद्वित्तानुसारेणसौरमंत्रजपस्तथा ॥ धे
नुंसलक्षणांदद्याद्वस्त्राभरणसंयुतां ॥ पयस्विनींगुणोपेतांब्राह्म
णायकुटुंबिने ॥ वत्साभरणसंयुक्तांवस्त्रेणाभरणेनच ॥

अर्थ—त्या पातकाच्या शांति करितां शिवसंकल्पसूक्ताचा एक हजार आठ जप करावा; व ब्राह्मणाला सुवर्ण व मध हें द्रव्यानुसार द्यावें. तसाच सौरमंत्राचाही जप करावा. व सलक्षण व वस्त्राभरणानींयुक्त असें गोदान कुटुंबी व विद्वान्ब्राह्मणास द्यावें; व त्या गाईच्या वत्सांला ही वस्त्रें आभरणें घालावीं.

## दंभ.

नाभेर्द्व्यंगुलकादधोर्ध्वशशिवद्वंशास्थिमूलेतथा ॥
दाहःप्रज्वलितायसस्यकथितोदंभोग्रहण्यातुरे ॥

अर्थ—ग्रहणीरोगाकरितां नाभीवर दोन अंगुळावर व खाली दोन अंगुळावर अर्धचंद्राकार; आणि तसाच वंशास्थिमूळाचेठायीं लोखंड तापवून डाग द्यावा.

## दुसरा प्रकार.

दंभंताम्रशलाकयाग्रहणिकांलोहस्यवास्वर्णयादेयंनाभिरधस्थद्व्यं
गुलमितंबस्तिद्वयोर्मध्यगं ॥ पूयस्त्रावमपथ्यमेवविहितंपेयंजलंशी
तलंवातोत्थामपिपित्तजामपिचिराद्धन्याद्बलासादिकं ॥

अर्थ—संग्रहणीवर ताम्र, लोह किंवा सुवर्ण याच्या शलाकेनें नाभीचे खाली दोन अंगुळांवर व वर दोन अंगुळांवर नाभी व बस्ती यांमध्यें डाग द्यावा; आणि पूयस्त्राव होईल असें पथ्य करावें; आणि थंड पाणी प्यावें; ह्मणजे वातपित्तकफात्मक फारादिवसांची संग्रहणी नाश पावते.

## गुदरोगकर्मविपाक.

सुरालयेजलेवापिसकृद्भेपंकरोतियः ॥ गुदरोगोभवेत्तस्यपाप
रूपःसुदारुणः ॥ मासंसुरार्चनेनैवगोदानद्वितयेनच ॥ प्रा
जापत्येनचैकेनशाम्यंतिगुदजारुजः ॥

अर्थ—देवालय किंवा उदक यांचा जो नाश करितो, त्या पापानें तो गुदरोगी होतो. त्याणें एक मासपर्यंत देवपूजा, दोन गोदानें; आणि प्रायश्चित्तार्थ एक प्राजापत्य द्यावें; ह्मणजे गुदसंबंधिरोग शांत होतो.

## संग्रहणीनिदान.

अतिसारेनिवृत्तेपिमंदाग्नेरहिताशिनः ॥

भूयःसंदूषितोवन्हिर्ग्रहणीमपिदूषयेत् ॥

अर्थ—अतिसारापासून मुक्त जाहला; ह्मणजे जठराग्नि मंद असतां, वारंवार अपथ्य भोजन घडलें; तर वारंवार अग्नि दूषित होऊन ग्रहणीस दूषित करितो.

## ग्रहणीस्थान.

षष्ठीपित्तधरानामयाकलापरिकीर्तिता ॥

पक्कामाशयमध्यस्थाग्रहणीसाप्रकीर्तिता॥

अर्थ—पक्काशय व आमाशय यांमध्यें पित्तास धारणकरणारी जी साहावी कला तिला संग्रहणी असें ह्मणतात.

## ग्रहणीची संप्राप्ति व लक्षण.

एकैकशःसर्वशश्चदोषैरत्यर्थमूर्छितैः ॥ सादुष्टाबहुशोभुक्तमा मर्मेवविमुंचाति ॥ पक्कंवासहजंपूतिंमुहुर्बद्धंमुहुर्द्रवं ॥ ग्रह णीरोगमाहुस्तमायुर्वेदविदोजनाः ॥

अर्थ—प्रत्येक दोष अथवा सर्व दोष दुष्ट होऊन ग्रहणी दूषित होत्ये; आणि जेंजें खावें त तें पक्क किंवा अपक्क मुरडा होऊन दुर्गंधयुक्त केव्हां केव्हां पातळ पातळ अशा मळाला बारंवार सोडित्ये, त्या रोगाला आयुर्वेद जाणणार ग्रहणी असें ह्मणतात.

## संग्रहणीचें पूर्वरूप.

पूर्वरूपंतुतस्येदंतृष्णालस्यंबलक्षयः ॥

विदाहोन्नस्यपाकश्चचिरात्कायस्यगौरवं ॥

अर्थ—तृषा, आळस, बलक्षय, भक्षण केल्यानंतर पोटांत जळजळणें, अन्नाचा फार वेळानें पाक होणें, आणि आंगाला जडपणा हें ग्रहणीचें पूर्वरूप होय.

## वातिकग्रहणीचें कारण.

कटुतिक्तकषायातिरुक्षसंदुष्टभोजनैः ॥ प्रमितानशनात्यध्ववे गनिग्रहमैथुनैः ॥ मारुतःकुपितोवन्हिंसंछाद्यकुरुतेगदान् ॥

अर्थ—तिखट, कडु, तुरट, अत्यंत रूक्ष, अत्यंत शिळें वगैरे, विरुद्ध भोजन, अत्यंत अल्प भोजन, उपोषण, अतिमार्गगमन, मलमूत्रादि कोंडून धरणें व अतिमैथुन इत्यादि कारणानीं वायु कुपित होऊन अग्नीला दूषित करून संग्रहणीला उत्पन्न करितो.

## वातिकग्रहणीचें रूप.

तस्यान्नंपच्यतेदुःखंशुक्तपाकंखरांगता ॥ कंठास्यशोषःक्षुत्तृष्णातिमिरंकर्णयोःस्वनः ॥ पार्श्वोरुवंक्षणग्रीवारुगभीक्ष्णंविषूचिका ॥ हृत्पीडाकार्श्यदौर्बल्यंवैरस्यंपरिकर्तिका ॥ गृध्दिःसर्वरसानांचमनसःसदनंतथा ॥ जीर्णेजीर्यतिचाध्मानंभुक्तेस्वास्थ्यमुपैतिच ॥ सवातगुल्महृद्रोगप्लीहाशंकीचमानवः ॥ चिराद्दुःखंद्रवंशुष्कंतन्वामंशब्दफेनवत् ॥ पुनःपुनःसृजेद्वर्चःकासश्वासार्दितोनिलात् ॥

**अर्थ**–मोठ्यादुःखानें अन्न पचन, अन्नाचा आंबट पाक, आंग खरखरीत, गळा व तोंड यांना कोरड, भूक, ताहान, डोळ्यापुढें आंधारी, कानांत शब्द, कुशी, मांड्या, आडसंधी व मान, यांनां पीडा, अजीर्णांत पोटामध्यें वारंवार सुवा टोंचल्या सारखें मारणें, उरांत दुखणें, कृशपणा, दुर्बलता व तोंडाला पचपचीतपणा, गुदाला कातरल्यासारिखी पीडा, सर्वरसभक्षणाची इच्छा, मनाला ग्लानि व अन्न जिरल्यानंतर किंवा जिरत असतां, पोट फुगणें, कांहीं भक्षण केलें असतां, स्वस्थ वाटणें आणि वातगुल्म, हृद्रोग, किंवा प्लीहा, झाला यांची शंका, आणि फार वेळानें, मोठ्याकष्टानें, केव्हां पातळ केव्हां शुष्क, द्रवरूप, फेनयुक्त, सशब्द असा आमयुक्त मळ वारंवार होतो; आणि खोकला येतो व दमा लागतो. त्यास वातसंग्रहणी म्हणतात.

## शुंठीघृत.

घृतंनागरकल्केनसिद्धंवातानुलोमनं ॥
ग्रहणीपांडुरोगघ्नंप्लीहकासज्वरापहं ॥

**अर्थ**–सुंठीच्या कल्कांत तूप घालून अग्नीवर सिद्ध करावें. तें तूप वाताचे अनुलोमन करतें; व ग्रहणी, पांडुरोग, प्लीहा, कास व ज्वर यांचा नाश करितें.

## पंचमूलघृत.

पंचमूलाभयाव्योषपिप्पलीमूलसैंधवैः ॥ रास्नाक्षारद्वयाजाजीविडंगसटिभिर्घृतं ॥ पक्केनमातुलुंगस्यस्वरसेनार्द्रकस्यच ॥ शुष्कमूलककोलांबुचुक्रिकादाडिमस्यच ॥ तक्रमस्तुसुरामंडसौवीरकतुषोदकैः ॥ कांजिकेनचतत्पक्त्वापीतमग्निकरंपरं ॥ शूलगुल्मोदरानाहकार्श्यानिलगदापहं॥

**अर्थ**–पंचमूळें, बाळहर्डी, सुंठ, मिरीं, पिंपळी, पिंपळीमूळ, सैंधव, रास्ना, सज्जिखार, जवखार, जिरें, वावडिंग व कचोरा यां औषधांच्या कल्कांत घृत सिद्ध करून पुनः तें घृत पिकलेल्या माहळुंगाचा रस, आल्याचा रस, सुकलेल्या मुळ्यांचा काढा, सुक्या

बोरांचा काढा, चुक्याचा रस, डाळिंबाचा रस, ताक, दह्यांवरील साय, सुरा, जवांची पेज, तुषांचा काढा व कांजी या प्रत्येकांत सिद्ध करावें. तें अग्निकारक, शूळ, गुल्म, उदर, मलबद्धता, कृशता व वातरोग यांचें नाशक आहे.

## संग्रहणीचिकित्साक्रम.

ग्रहणीमाश्रितंदोषमजीर्णवदुपाचरेत् ॥ लंघनैर्दीपनीयैश्चसदातीसार भेषजैः ॥ दोषमामंनिरामंचविंद्यादत्रातिसारवत् ॥ अतिसारोक्तविधिनातस्यचामंविपाचयेत् ॥ पेयादिपटुलघ्वन्नंपंचकोलादिभिर्युतं ॥ दीपनानिचतक्रंचग्रहण्यांयोजयेद्भिषक् ॥

**अर्थ**–ग्रहणीदोषावर अजीर्णाप्रमाणें उपचार करावा. लंघन, दीपन आणि अतिसारावर उक्त असें औषध द्यावें. अतिसाराप्रमाणेंच दोष आमसहित किंवा आमरहित हे पूर्वी पहावें; आणि अतिसारावर उक्त विधि त्या विधिनें आम पाचन करावा, पेया इत्यादि, क्षार, पंचकोलादिकेंकरून युक्त असें लघु अन्न सेवन करावें. दीपन पदार्थ व तक्र ह्यांची योजना वैद्यानीं करावी.

## तक्रसेवन.

दुःसाध्योग्रहणीरोगोभेषजैर्नैवशाम्यति ॥ सहस्रशोपिविहितैर्विनातक्रस्यसेवनात् ॥ दोषधातुवलापेक्षीग्रहण्यांतक्रमापिबेत् ॥

**अर्थ**–संग्रहणीरोग दुःसाध्य आहे. तो सहस्र औषधें घेतलीं तत्रापि शांत होत नाही. या करितां दोष, धातु, आणि बल यांच्या इच्छेसाठी तक्रसेवन करावें. तक्रसेवनावांचून तो ग्रहणीरोग शांत होणार नाहीं.

## वातसंग्रहणीचिकित्साक्रम.

ज्ञात्वातुपरिपक्वंचवातजंग्रहणीगदं ॥
दीपनैर्भेषजैःपक्वैःसर्पिभिःसमुपाचरेत् ॥

**अर्थ**–परिपक्वातग्रहणीची परिक्षा करून त्याला दीपन औषधें व घृतें यांणीं उपचार करावे.

## शालिपर्ण्यादिकाढा.

शालिपर्णीबलाबिल्वंधान्यशुंठीकृतःशृतः ॥
आध्मानशूलसहितांवातजांग्रहणींजयेत् ॥

**अर्थ**–रानगांजा, चिकणामूळ, कोंवळें बेलफळ, धने व सुंठ, या पांच औषधांचा काढा करून त्याला असतां, पोटफुगी व शूल यां सहवर्तमान वातसंग्रहणीला दूर करितो.

## तक्रसेवन.

ग्रहणीरोगिणांतक्रंसंग्राहिलघुदीपनं ॥ सेवनीयंसदागव्यंत्रिदोषश मनंहितं ॥ तक्रंचमधुरंशुंठीचूर्णयुक्तंपिबेत्सदा ॥ शनैःशनैर्हरेदन्नंत क्रंतुपरिवर्धयेत् ॥ तक्रमेवयथाहारोभवेदन्नविवर्जितः ॥ तक्रसात्म्यं यथाकुर्यान्नैवान्नंतत्रभक्षयेत् ॥ बुभुक्षायांपिपासायांपिबेत्तक्रंसनाग रं ॥ मौनंचकुर्याद्बहुशोनकुर्याद्बहुभाषणं ॥ नकुर्यान्मैथुनंतक्रपानेक्रो धंविवर्जयेत् ॥ एवंयःसेवतेतक्रंग्रहणीतस्यनश्यति ॥ शीघ्रमेवनसं देहःश्रीर्यथानृतकारिणः ॥

अर्थ—संग्रहणीरोग्याला ताक द्यावें. तें ग्राहक, लघु व दीपन आहे. गाईचें ताक त्रिदोषनाशक व हितकारक आहे, तें सुंठीचें चूर्ण घालून प्यावें; आणि अन्न हळू हळू कमी करावें; व ताक वाढवीत जावें, इतकें कीं ताकच अन्नावांचून आहार होईल. अन्न खाऊं नये. भूक व तहान लागली असतां, सुंठीचें चूर्ण घालून ताक प्यावें. व बहुधा मौन धरावें. फार भाषण करूं नये. व तक्रपान करणाराने मैथुन व क्रोध हे वर्जावे. या प्रमाणें तक्र सेवन केलें असतां; शीघ्र संग्रहणीरोग नाश पावतो.

## दुसरा प्रकार.

वातेम्लंसैंधवोपेतंपित्तेस्वादुसशर्करं ॥ पिबेत्तक्रंकफेचापिक्षा रत्रिकटुसंयुतं ॥ हिंगुजीरयुतंघोलंसैंधवेनावधूलितं ॥ ग्रह ण्यर्शोतिसारघ्नंभवेद्वातहरंपरं ॥

अर्थ—वातसंग्रहणीवर आंबट ताक, सैंधव घालून द्यावें. पित्तसंग्रहणीवर गोड ताक, साकर घालून द्यावें. कफसंग्रहणीवर क्षार व त्रिकटु घालून द्यावें; आणि हिंग, जिरें व सैंधव याणीं युक्त केवळ दहीं घुसळलेलें ताक द्यावें; तें संग्रहणी, अर्श, अतिसार, आणि वायु यांचा नाश करितें.

## मधुपक्वहरीतकी.

हरीतकीनांचशतंदोलायंत्रेशनैःपचेत् ॥ सुस्विन्नंगोमयेनीरेसंमृष्टंवा पुनस्ततः ॥ पश्चात्क्षुद्रशलाकाभिश्छिद्रितंतत्समंततः ॥ शतंपलानां मधुनोवस्त्रपूतंविनिःक्षिपेत् ॥ स्निग्धभांडेविनिःक्षिप्यक्षौद्रंदेयंतथात था ॥ यथायथाहिमधुनोजलत्वंयातिनिश्चितं ॥ पुनर्देयंमधुतथाया वन्नायातिविक्रियां ॥ तिष्ठत्येवंतथापथ्याकषायगुणवर्जिता ॥ पिप्प

लीमरिचंशुंठीलवंगंवंशलोचनं ॥ प्रत्येकंकर्षमात्रंहिचूर्णितंतत्रनिःक्षिपेत् ॥ मधुपक्काभिधापथ्याबलवर्णाग्निदीपनी ॥ एकैकांभक्षयेत्प्रातःसर्वरोगनिवारिणीम् ॥ दुष्टवातंसंग्रहंचतथामंदुष्टशोणितं ॥ जीर्णज्वरंप्रतिश्यायंव्रणंविस्फोटकंतथा ॥ वातशूलंसंग्रहणींसरुजांनाशयत्यपि ॥

अर्थ—शंभर हिरडे दोलायंत्रांत गाईचे शेणाच्या पाण्यात मऊ होत पर्यंत शिजवावे; नंतर सभोंवति त्याला बारीक छिद्रें पाडावीं; नंतर ४०० तोळे मध तुपानें रावलेल्या मडक्यांत घालून त्यांत ते हिरडे घालावे; नंतर पुनःपुनः मध घालावा. जोंपर्यंत मधाचे पाणि न होतां जसाचे तसाच राहिल. असें केल्यानें त्या हिरड्यानां तुरटपणा नाहींसा होतो; नंतर त्यांत संठ, मिरें, पिंपळी, लवंगा, वंशलोचन, हीं प्रत्येक तोळा प्रमाणें चूर्ण करून घालावीं. ह्याला मधुपक्वनामक पथ्या असें ह्मणतात. ही हरीतकी बलदेणारी, वर्णकर, अग्निदीपक, अशी आहे. दररोज प्रातःकाळीं एक एक भक्षण करावी. तेणेंकरून दुष्टवात, संग्रहणी, आमांश, दुष्टरक्त, जीर्णज्वर, पडसें, व्रण, विस्फोट, वातशूळ व सशूळ संग्रहणी, इत्यादि सर्वरोगांचा नाश करील.

## मुद्गयूष.

मुद्गयूषंरसंतक्रंधान्यजीरकसंयुतं ॥
सैंधवेनान्वितंदद्यात्षड्यूषमितिकीर्तितं ॥

अर्थ—मुगांचा यूष, मुगांचा रस, ताक, धने व जिरें यांचा यूष सैंधव घालून द्यावा. ह्याला षड्यूष असें ह्मणतात.

## कपित्थादियवागू.

कपित्थबिल्वचांगेरीतक्रदाडिमसाधिता ॥
यवागूःपाचयत्यामंशकृत्संवर्तयत्यपि ॥

अर्थ-कंवठ, बेल, चुका व डाळिंब, यांची ताकामध्यें यवागू करावी. ती आमाला पचवित्ये. आणि मलाचें सारण करित्ये.

## पित्तसंग्रहणीनिदान.

कट्वजीर्णविदाह्यम्लक्षाराद्यैःपित्तमुल्बणं ॥ आप्लावयद्धंत्यनलंजलंतप्तमिवानलं ॥ सोजीर्णंनीलपीताभंपीताभंसार्यतेद्रवं ॥ सधूमोद्गारहृत्कंठदाहारुचितृडर्दितः ॥

अर्थ—तिखट, अजीर्ण, वेळूचे कोंब इत्यादि विदाह कारक, आंबट, व क्षार, इत्यादि पदार्थांचा सेवनानें पित्त कोपून जसें उष्णोदक अग्नीला विझवितें त्याप्रमाणें तें पित्त-

जठराग्नीच्या उष्म्याला शमवितें. व शरीर पिंवळें होऊन अपक्व, निळा, पिंवळा, द्रवरूप असा मळ होतो, व सधूम ढेकर येतात, ऊर व गळा, यांमध्यें दाह, अरुचि, ताहान, यांणीं रोगी पिडित होतो.

## चंदनादि घृत.

चंदनंपद्मकोशीरपाठामूर्वाकटुत्रयं ॥ षड्ग्रंथासारिवास्फोतासप्तपर्णी परूषकं ॥ पटोलोदुंबराश्वत्थवटप्लक्षकपित्थकं ॥ कटुकारोहिणीमुस्तनिंबंचाद्विपलांशकं ॥ द्रोणेंभसिक्षिपेत्पादशेपेप्रस्थंघृतंपचेत् ॥ किराततिक्तेंद्रयववीरामागधिकोत्पलैः ॥ कल्कैरक्षसमैःपेयंतत्पित्तग्रहणीगदे ॥

अर्थ–चंदन, पद्मकाष्ठ, वाळा, पाहाडमूळ, मोरवेल, सुंठ, मिरें, पिंपळी, वेखंड, उपळसरी, गोकर्णी, सांत्विण, फालसा, कडुपडवळ, उंबर, पिंपळ, वड, पायरी, कंवठ, कटुकी, हरीतकी, नागरमोथे व कडुलिंब हीं सर्व प्रत्येकीं आठ आठ तोळे घेऊन १०२४ तोळे पाण्यांत घालून कढवावीं. चतुर्थांश शेष उरलें ह्मणजे ६४ तोळे तूप घालून पुनः चुलीवर ठेऊन त्यांत किराइत, इंद्रजव, कांकोली, पिंपळी, कमळ, यांचा एक एक तोळा कल्क घालून सिद्ध करावें. तें घृत शक्तिप्रमाणें घ्यावें; ह्मणजे पित्तसंग्रहणीचें नाशक आहे.

## तिक्तादिकाढा.

तिक्तामहोपधरसांजनधातुकीभिःपथ्येंद्रबीजघनकौटजभंगुराभिः ॥ क्काथोहरेद्बहुविधंग्रहणीविकारंपित्तोद्भवंसगुदशूलमतिप्रवृद्धं ॥

अर्थ–कुटकी, सुंठ, रसांजन, धायटीचीं फुलें, हरीतकी, इंद्रजव, नागरमोथे, कुड्याची साल, आणि श्वेत अतिविष यांचा काढा अनेकप्रकारची संग्रहणी, गुदशूळ, आणि पित्तसंग्रहणी यांचा नाश करितो.

## श्रीफलादिकल्क.

श्रीफलशलाटुकल्कोनागरचूर्णेनमिश्रितःसगुडः ॥
ग्रहणीगदमत्युग्रंतक्रभुजातुशीलितोजयति ॥

अर्थ–कोंवळ्या बेलफळाच्या कल्कांत सुंठीचें चूर्ण व गूळ घालून द्यावा; आणि ताकभात पथ्याला द्यावा; ह्मणजे संग्रहणीचा नाश करितो.

## नागरादि चूर्ण.

नागरातिविषामुस्ताधातकीसरसांजनं ॥ वत्सकत्वक्फलंबिल्वंपाठातिक्तकरोहिणी ॥ पिबेत्समांशकंचूर्णसक्षौद्रंतंदुलांबुना ॥ पित्तजेग्रहणीदोषेरक्तंयश्चोपवेश्यते ॥ अर्शांसिल्दद्गुह्यशूलंजयेच्चैवप्रवाहिकां ॥ नागराद्यमिदंचूर्णंकृष्णात्रेयेणभापितं ॥

अर्थ–सुंठ, अतिविष, नागरमोथे, धायटीचीं फुलें, रसांजन, कुडयाची साल, इंद्रजव, बेलफळ, पाहाडमूळ, किराइत व कुटकी यां समभाग औषधांचें चूर्ण तांदुळांचे धुवणाशीं मध घालोन द्यावें. तें पित्तसंग्रहणी, रक्तसंग्रहणी, अर्श, हृद्रोग, गुदरोग, शूल व प्रवाहिका यांचा नाश करितें. हें नागरादिचूर्ण कृष्णात्रेयानें सांगितलें आहे.

## यवान्यादिचूर्ण.

यवानीपिप्पलीमूलंचातुर्जातकनागरैः ॥ धातुकीतिंतिणीकृष्णावाल कश्चैकभागिकः ॥ सितापट्भागसंयुक्तंसर्वंचूर्णंप्रकल्पयेत् ॥ कर्षैकं भक्षयेन्नित्यमजाक्षीरंपिबेदनु ॥ नाशयेत्ग्रहणीरोगंपित्तोत्थंसप्रवाहिकं ॥

अर्थ–ओंवा, पिंपळीमूळ, चातुर्जात, सुंठ, धायटीफुलें, चिंच, पिंपळी, आणि वाळा हीं एकेक तोळा व साकर साहा भाग या सर्वांचें चूर्ण करून रोज एक तोळा घ्यावें. वर शेळीचें दूध प्यावें; ह्मणजे संग्रहणी, पित्तसंग्रहणी व प्रवाहिका यांचा नाश करितें.

## चंदनादिकाढा.

चंदनंपद्मकोशीरपाठामूर्वाकुटंनटं ॥ सौराष्ट्र्यतिविषापत्रत्वगेलादे वदारुच ॥ मरिचंचूर्णयेत्तुल्यंमधुनालेहयेदनु ॥ अजाक्षीरंजलाधेन क्काथ्यदुग्धावशेषकं ॥ पिबेत्पित्तहरंरात्रौक्षीरिणीशाकमाचरेत् ॥ द ध्यन्नंदापयेत्पथ्यंदुग्धैर्वालाजमंडकं ॥

अर्थ–चंदन, पद्मकाष्ठ, वाळा, पाहाडमूळ, मोरवेल, टेंटू, सोरटी माती, अतिविष, तमालपत्र, दालचिनी, इलाची, देवदार व मिरीं यांचें चूर्ण मधाशीं द्यावें; आणि मागून शेळीचें दूधांत निमें पाणी घालोन त्याचा दूध शेष राहील असा काढा करून तो पित्तहारक असा रात्रीं प्यावा. खिरणीची भाजी पथ्याला द्यावी, व दहींभात अथवा लाह्यांचा मंड द्यावा.

## रसांजनादिचूर्ण.

रसांजनंप्रतिविषावत्सकस्यफलत्वचौ ॥ नागरंधातकीचैतत्सक्षौद्रंतं दुलांबुना ॥ पित्तग्रहणिदोषार्शरक्तपित्तातिसारनुत् ॥

अर्थ–रसांजन, अतिविष, इंद्रजव, कुडयाची साल, सुंठ व धायटीचें फूल ह्यांचें चूर्ण तांदुळांचे धुवणांत मध घालोन घेतलें असतां, पित्त, ग्रहणिदोष, अर्श, रक्तपित्त, आणि पित्तातिसार यांचें नाशक आहे.

## भूनिंबादिपुटपाक.

भूनिंबरोहिणीपथ्यापटोलंनिंबपर्पटं ॥ तुल्यंमहिषिमूत्रेणमर्द्य मंतःपुटेदहेत् ॥ कर्षैकंलेहयेदाज्यैर्वन्हिदीपनमुत्तमं ॥ दीप नंबहुपित्तस्याक्तिक्तंमधुरसंयुतं ॥

अर्थ–किराइत, कुटकी, हरीतकी, कडुपडवळ, कडनिंब व पित्तपापडा हे समभाग घेऊन माहिषीच्या मुतांत वाटून पुटपाकानें भाजून तें एक कर्ष तुपाशीं घ्यावें; ह्मणजे अग्नीचें दीपन करितें; व पित्ताधिकावर घेणें तर कुटकी व मध याशीं घ्यावें.

## आम्रादियोग.

आम्रास्थिविश्वागोशृंगावत्सश्चाम्ररसेनतु ॥ मर्दयेत्रिदिनंस म्यक्सितयासहयोजयेत् ॥ तस्यपित्तोद्भवांहंतिग्रहणींरोगका रिणीं ॥ ज्वरातिसारंतीव्रंचरक्तस्रावंसशूलनुत् ॥

अर्थ–आंब्याची आंठी, सुंठ, बाभूळ व कुडा हे पदार्थ आंब्याचा रसांत तीन दिवस खलून तें साकरेशीं द्यावें; ह्मणजे पित्तसंग्रहणी, ज्वरातिसार, रक्तस्राव आणि शूल यांचा नाश करितें.

## आम्रादिपेया.

आम्रमाम्रातकंजंबूत्वक्कषायेपचेद्भिषक् ॥
यवागूंशालिभिर्युक्तांभुक्त्वातांग्रहणींजयेत् ॥

अर्थ–आंबा, आंबाडा व जांबूळ यांच्या झाडाच्या साळीचा काढा त्यांत साळीच्या तांदुळांची आंबील शिजवून खावी; ह्मणजे संग्रहणी दूर होईल.

## कफसंग्रहणीनिदान.

गुर्वतिस्निग्धशीतादिभोजनादतिभोजनात् ॥ भुक्तमात्रस्यचस्वप्ना द्धंत्यग्निंकुपितःकफः ॥ तस्यान्नंपच्यतेदुःखंहृल्लासच्छर्द्यरोचकाः ॥ आस्योपदेहमाधुर्यकासष्ठीवनपीनसाः ॥ हृदयंमन्यतेस्तब्धमुदरंस्ति मितंगुरु ॥ दुष्टोमधुरमुद्गारःसदनंस्त्रीष्वहर्षणं ॥ भिन्नामश्लेष्मसंसृ ष्टगुरुवर्चःप्रवर्तनं ॥ अकृशस्यापिदौर्बल्यमालस्यंचकफात्मके ॥

अर्थ–जड, स्निग्ध, शीत, मधुर असें भोजन; किंवा अतिभोजन व भोजनोत्तर लागलीच निद्रा, यांमुळें कफकोप होतो, तेणेकरून त्या रोग्याचें भक्षित अन्न कष्टानें पचन होतें; आणि मळमळ, वांति, अरुचि, तोंडाला कफाचा चिकटा व गोडपणा, खोकल्यावाटे कफ पडणें, पडसें, हृदयाला स्तब्धता, पोट स्तब्ध व जड होतें, विकार युक्त व मधुर असा ढेंकर येतो, अग्निमांद्य होतें, स्त्रीसंभोगाविषयीं इच्छा होत नाहीं; आणि पातळ, आम व कफ, यानीं युक्त व जड असा मळ होतो, व कृश नसतां दुर्बळपणा, आणि आळस, हीं कफसंग्रहणीचीं लक्षणें जाणावीं.

## सठ्यादिचूर्ण.

सठीव्योपाभयाक्षारौग्रंथिकंबीजपूरकं ॥
लवणाम्लांबुनापेयंश्लेष्मिकेग्रहणीगदे ॥

अर्थ–कचोरा, सुंठ, मिऱ्यें, पिंपळी, हरितकी, जवखार, सज्जीखार, पिंपळमूळ, व माहाळुंग यांचे चूर्ण सैंधव आणि लिंबाचा रस यांचे बरोबर घ्यावें; ह्मणजे तें कफसंग्रहणीनाशक आहे.

## रास्नादिचूर्ण.

रास्नापथ्यासठीव्योषंद्वौक्षारौलवणानिच ॥ ग्रंथिकंमातुलुंगंचसम मेकत्रचूर्णयेत् ॥ पिबेदुष्णेनतोयेनश्लैष्मिकेग्रहणीगदे ॥

अर्थ–रास्ना, हरीतकी, कचोरा, सुंठ, मिरें, पिंपळी, जवखार, सज्जीखार, सैंधव, संचळ, बिडलोण, पिंपळमूळ व माहाळुंग याचे चूर्ण ऊनपाण्याबरोबर घ्यावें; ह्मणजे तें कफसंग्रहणीचा नाश करितें.

## पथ्यादितक्रयोग.

पथ्याकणानागरवन्हिचूर्णंतक्रेणपीतंग्रहणीगदघ्नं ॥
तक्रेणहन्यात्किलकेवलंवाशुंठीकणाभ्यांग्रहणींसशूलां ॥

अर्थ–हरीतकी, पिंपळी, सुंठ व चित्रक यांचे चूर्ण ताकाशीं घ्यावें; ह्मणजे सशूळ संग्रहणी व कफसंग्रहणी यांचा नाश करितें; किंवा केवळ सुंठ व पिंपळीचें चूर्ण ताकांतून घ्यावें; ह्मणजे संग्रहणीचा नाश करितें.

## चतुर्भद्रादिकाढा.

गुडूच्यतिविषाशुंठीमुस्तैःक्वाथःकृतोजयेत् ॥
आमानुपक्कांग्रहणींग्राहीदीपनपाचनः ॥

अर्थ–गुळवेल, अतिविष, सुंठ आणि नागरमोथे यांचा काढा घेतला असतां, आमसंग्रहणीचा नाश करितो. व ग्राहक, अग्निदीपक व पाचन असा आहे.

## कठिणमलचिकित्सा.

कृच्छ्रेणकठिणत्वेनयःपुरीषंविमुंचति ॥
सघृतंलवणंतस्यपाययेत्क्लेशशांतये ॥

अर्थ–जाला कष्टानें आणि कठीण असा मळ होतो, त्याला तुपांत लवण घालून पाजावें; ह्मणजे त्या दुःखापासून मुक्त होतो.

## विडंगादियोग.

विडंयवानीविष्टंभेपिबेदुष्णेनवारिणा ॥

**अर्थ**—वावडिंग व ओवा यांचें चूर्ण ऊनपाण्याशीं प्राशन करावें; ह्मणजे विष्टंभनाश होतो.

## वातश्लेष्मसंग्रहणी.

वातश्लेष्माधिकेयोज्याकुटजाद्यवलेहिका ॥ पर्पटीरसगुंजा ष्टौलिहेन्मध्वाज्यकेनया ॥ सहिंगुजीरकंव्योषंनिष्कार्धंभक्षये दनु ॥ ग्रहणींकफवातोत्थांशमयेत्तक्रभोजने ॥

**अर्थ**—वातकफाधिकसंग्रहणीवर—कुटजावलेह योजावा; किंवा पर्पटीरस आठ गुंजा मध व तूप यांशीं द्यावा; आणि मागून हिंग, जिरें, सुंठ, मिरीं व पिंपळी, यांचें चूर्ण दोन मासे द्यावें; आणि ताकभात जेवावा; ह्मणजे कफवातजनितसंग्रहणीचा नाश होतो.

## कर्चूरादिचूर्ण.

कर्चूरोलवणंपंचरास्नाऽयूषणंहरीतकी ॥ सर्जिक्षारंयवक्षारंमातुलुं गंसमंसमं ॥ चूर्णमुष्णांबुनापेयंबलवर्णाग्निवर्धनं ॥ श्लेष्मिकंग्र हणीदोषंसवातंचविनाशयेत् ॥

**अर्थ**—कचोरा, पंचलवणें, रास्ना, सुंठ, मिरीं, पिंपळी, हरीतकी, साजेखार, यवखार व माहाळुंग हीं समभाग घेऊन यांचे चूर्ण ऊन पाण्याशीं प्यावें; ह्मणजे बल, वर्ण व अग्नि यानां वाढवितें; आणि कफवातसंग्रहणीचा नाश करितें.

## तालीसादिवटी.

तालीसपत्रचविकामरिचानांपलंपलं ॥ कृष्णातन्मूलयोर्द्वेद्वेपलेशुंठीपल त्रयं ॥ चातुर्जातमुशीरंचकर्पांशंसूक्ष्मचूर्णितं ॥ चूर्णस्यत्रिगुणेनैवगुडेन वटिकाकृता ॥ भक्षयेत्तुपलार्धंचवातश्लेष्मोत्थितेगदे ॥ उत्कटांग्रहणीं छर्दिकासंश्वासंज्वरारुची ॥ शोफगुल्मोदरंपांडुतालीसाद्येननाशयेत् ॥

**अर्थ**—तालीसपत्र, चवक, मिऱ्यें हीं चार चार तोळे, पिंपळी व पिंपळमूळ हीं आठ आठ तोळे, सुंठ बारा तोळे, आणि चातुर्जात व वाळा हें एकेक तोळा यां सर्वांचे चूर्ण आणि चूर्णाचें तिप्पट गूळ यांत दोन तोळ्याची गोळी करावी, ती भक्षण केली असतां, कष्टतरसंग्रहणी, ओकारी, खोकला, दमा, ज्वर, अरुचि, सूज, गुल्म, उदर व पांडु यांचा नाश करिते. हिला तालीसादि वटी ह्मणावी.

## कफपित्तसंग्रहणीवर रसादिवटिका.

शुद्धसूतंत्रिभागंधंजंबीरैर्मर्दयेद्दिनं ॥ सर्वांशंजीवशंबूकमरीचिमधुसं युतं ॥ निष्ककेननिहंत्याशुग्रहणींकफपित्तजां ॥

अर्थ—शुद्ध पारा एक भाग व गंधक तीन भाग यांची कज्जली करून त्यांत सर्वांशीं जिवंत क्षुद्रशंख घालून जंबीररसांत एक दिवस मर्दन करावा; आणि मिरीं व मध यांशीं च्यार मासे द्यावी, ह्मणजे कफपित्तजग्रहणीचा नाश होतो.

## मुसल्यादियोग.

मुसलींपिपयेत्तक्रेअथवातंडुलोदकैः ॥
कर्षैकंयोजयेच्चानुपथ्यंतक्रौदनंहितं ॥

अर्थ—मुसळी ताकांत किंवा तांदळांचे धुवणांत वाटून एक तोळा द्यावी, व पथ्याला ताकभात द्यावा; ह्मणजे हे ग्रहणीनाशक आहे.

## वातपित्तसंग्रहणीवर मुंड्यादिगुटिका.

मुंडीशतावरीमुस्तावान्नरीदुग्धिकामृता ॥ यष्टिकंसैंधवंतुल्यंसूक्ष्मचूर्णंप्रकल्पयेत् ॥ चूर्णस्यद्विगुणंयोज्याविजयामृदुभर्जिता ॥ घृतस्निग्धेपचेद्भांडेदुग्धंदशगुणंगवां ॥ यावत्पिंडत्वमापन्नातावन्मृद्वग्निना पचेत् ॥ पिंडतुल्यंतुसत्क्षौद्रंनिश्रांनिष्कत्रयंत्रयं ॥ भक्षयेद्विजयेदेवद्वंद्वजग्रहणीगदं ॥ पित्तवातेश्लेष्मपित्तेसम्यक्पित्तेचयोजयेत् ॥

अर्थ—मुंडी, शतावरी, नागरमोथा, कुहिलीचें बीज, दुधी, गुळवेल, ज्येष्ठमध व सैंधव यांचें बारीक चूर्ण करून चूर्णाच्या दुप्पट भाजलेली भांग घालून तुपाच्या भांड्यांत गाईचें दसपट दूध मंदाग्नीनें पचन करावें. गोळा होऊं लागला, ह्मणजे त्या गोळ्याइतका मध घालावा; आणि त्यांतून एक तोळा तीनतोळे साकरेशीं भक्षण करावा; ह्मणजे द्वंद्वज संग्रहणी, पित्तवात, श्लेष्मपित्त व पित्त यांचा नाश करितो.

## सन्निपातग्रहणीनिदानलक्षण.

पृथक्वातादिनिर्दिष्टहेतुलिंगसमान्विते ॥
त्रिदोषंनिर्दिशेदेनंतस्यवक्ष्यामिलक्षणं ॥

अर्थ—वातादिसंग्रहणीची जीं निदानें आणि लक्षणें सांगितलीं. तीं सर्व जा संग्रहणीचे ठायीं झालीं, तिला सन्निपातग्रहणीरोग ह्मणतात. त्याचीं लक्षणें पुढें सांगतो.

आमंबहुसपैच्छिल्यंसशब्दंमंदवेदनं ॥
पक्षान्मासाद्दशाहाद्वानित्यंचापिविमुंचति ॥

अर्थ–त्रिदोषग्रहणीरोग अपक्व, बहुत चिकट, मंदवेदना, आणि शब्द याहीं करून युक्त अशा मळाला पंधरा दिवसानीं, किंवा मासानीं, अथवा दाहावे दिवशीं, किंवा नित्य अपानद्वारा सोडिते.

## असाध्यलक्षण.

दिवाप्रकोपोभवतिरात्रौशांतिंव्रजत्यपि ॥
दुर्विज्ञेयादुर्निवाराचिरकालानुबंधिनी ॥

अर्थ–जी ग्रहणी दिवसास प्रकुपित होत्ये; आणि रात्रिचे ठायीं यत्किंचित शांत होत्ये. ती अत्यंत दुर्ज्ञेय आणि दुर्निवार व बहुत काळ राहाणारी अशी जाणावी.

## घटीयंत्रग्रहणीलक्षण.

प्रसुप्तिःपार्श्वयोःशूलंतथाजलघटीध्वनिः ॥
तंवदंतिघटीयंत्रमसाध्यंग्रहणीगदं ॥

अर्थ–ज्या ग्रहणीचे ठायीं आंगास चिमटा घेतला असतां, कळत नाहीं, असें बधिर होतें, व दोहोंकुशींत शूल होतो, पोटांत गुडगुड भडभड असा शब्द होतो; त्या व्याधीला घटीयंत्रग्रहणी ह्मणतात; ती ग्रहणी असाध्य जाणावी.

लिंगैरसाध्योग्रहणीविकारोयैस्तैरतीसारगदोनिषिध्येत् ॥
वृद्धस्यनूनंग्रहणीविकारोहत्वातनुंनोविनिवर्ततेच ॥

अर्थ–जा लक्षणें करून अतिसार असाध्य होतो. तीं लक्षणें जा ग्रहणीचे ठायीं आलीं तीही ग्रहणी असाध्य जाणावी; व वृद्धमनुष्यास ग्रहणीविकार झाला असतां, मारल्या वांचून सोडित नाहीं.

अतीसारस्यरिष्टानिग्रहण्यामपिलक्षयेत् ॥

अर्थ–अतिसाराचे जे उपद्रव ते प्रायः ग्रहणीचे ठाईं होतात. असें समजावें.

## ज्वालालिंगरस.

शुद्धसूतंमृतंस्वर्णमरिचंतुत्थकंसमं ॥ ज्वालामुख्याग्निजैर्द्रावैर्जलंमंदं विपाचयेत् ॥ दिनैकंमर्दयेत्खल्वेगुंजामात्रंचभक्षयेत् ॥ ज्वालालिंग रसोनामत्रिदोषेयोजयेत्सदा ॥ कर्षैकंवन्हिमूलंतुतक्रेपिष्ट्वापिबेदनु ॥ तक्रारिष्टयुतंपथ्यंशाल्यन्नंभक्षयेत्सदा ॥

अर्थ–शुद्ध पारा, सुवर्णभस्म, मिरीं व मोरचूत हे समभाग घेउन भाटजांबूळ व चित्रक यांच्या रसांत मंदाग्निवर पचन करावें; नंतर एक दिवस खल करावा, यांतून

एक गुंज त्रिदोषावर द्यावा. मागून चित्रक मूळ ताकांत वांटून तें एक तोळा ताक पिण्यास द्यावें; आणि पथ्याला ताकभात, मद्य हे द्यावें.

## ग्रहणीकपाटरस.

तारमौक्तिकहेमानिसाराश्चैककभागिकाः ॥ द्विभागोगंधकःसूतस्त्रिभागोमर्दयेद्भिषक् ॥ कपित्थस्वरसैर्गाढंमृगशृंगेतुतत्क्षिपेत् ॥ पुटेन्मध्यपुटेनैवततउद्धृत्यमर्दयेत् ॥ बलारसैःसप्तवेलमपामार्गरसैस्त्रिधा ॥ माषमात्रंरसोदेयोमधुनामरिचैस्तथा ॥ हन्यात्सर्वानतीसारान्ग्रहणींसर्वजामपि ॥ कपाटोग्रहणीरोगेरसोयंवन्हिदीपनः ॥

अर्थ—रौप्यभस्म, मौक्तिकभस्म, सुवर्णभस्म, कांत, हीं एकेक तोळा; व गंधक दोन भाग व पारा तीनभाग एकत्र करून कवठाच्या रसांत खलोन, हरणाच्या शिंगांत भरून मध्यम पुट द्यावें; शीत झाल्यावर काढून चिकण्याच्या रसाच्या सात भावना द्यावा; आणि आघाड्याच्या रसाच्या तीन भावना द्याव्या; ह्मणजे ग्रहणीकपाट रस होतो. हा रस एक मासा मध व मिऱ्याचें चूर्ण यांशीं द्यावा; ह्मणजे संपूर्ण अतिसार व सन्निपातात्मकसंग्रहणी यांचा नाश करितो; व अग्निदीपन करितो.

## दुसरा प्रकार.

रसेनगंधातिविषाभयाभ्रंदशत्रयंमोचरसंवचाच ॥
जयाचजंबीररसेनपिष्टःपिंडीकृतःस्याद्ग्रहणीकपाटः ॥

अर्थ—पारा, गंधक, अतिविष, हरीतकी व अभ्रकभस्म हीं प्रत्येकीं दाहा भाग; आणि मोचरस, वेखंड व भांग हीं प्रत्येकीं तीन तीन भाग एकत्र करून लिंबाच्या रसांत गोळी करावी. याला ग्रहणीकपाट रस ह्मणतात.

## तिसरा प्रकार.

शुद्धैःकर्कवराटकैर्गणनयाभल्लातकान्तत्समान्स्रोतान्बब्बुलकंटकैर्लघुपुटैस्तस्यांघ्रिभागस्यच ॥ लेलीतेनसमंविचूर्ण्यजययासप्तानुभाव्यांशिवप्रोक्तोयंग्रहणीकपाटकरसस्त्रैवल्लकःस्वौषधैः ॥

अर्थ—चांगल्या पांढऱ्या दहिंकवड्या घेऊन त्यांचे संख्ये इतके बिबे घ्यावे; आणि त्यांनां बाभळीच्या कांट्यानें टोंचून लघुपुटानें तेल काढून तें चतुर्थांश व गंधक कवड्याबराबर हीं सर्व एकत्र खलावीं; आणि त्यास भांगेचीं सात पुटें द्यावीं. हा ग्रहणीकपाट शिवानें सांगितला हा अनुपानाशीं तीन वाल द्यावा.

## वज्रकपाटरस.

मृतसूताभ्रकंगंधयवक्षारंसटंकणं ॥ अग्निमंथवचांकुर्यात्सूततुल्या निमान्त्सुधीः ॥ ततोजयंतीजंबीरभृंगद्रावैर्विमर्दयेत् ॥ त्रिवासरंततो गोलंकृत्वासंशोष्यसाधयेत् ॥ लोहपात्रेशरावेचदत्वोपरिचमुद्रयेत् ॥ अधोवन्हिंशनैःकुर्यात्यामार्धंततउद्धरेत् ॥ रसतुल्याप्रतिविषादद्या न्मोचरसस्तथा ॥ कपित्थविजयाद्रावैर्भावयेत्सप्तधापृथक् ॥ धातकी द्रयवामुस्तालोध्रबिल्वगुडूचिका ॥ एतैर्द्रवैर्भावयित्वावल्लैकैकंतुशो षयेत् ॥ रसंवज्रकपाटाख्यंमाषैकंमधुनालिहेत् ॥ वन्हिशुंठींविडंबि ल्वंलवणंचूर्णयेत्समं ॥ पिबेदुष्णांबुनाचानुसर्वजांग्रहणींहरेत् ॥

**अर्थ**–पारदभस्म, अभ्रकभस्म, गंधक, जवखार, टांकणखार, टाकळी व वेखंड हीं समभाग चूर्ण घेऊन त्यांला भांग, लिंबु व माका यांच्या रसांत तीन दिवस मर्दन करावें; नंतर त्याचा गोळा करून सुकवून लोहपात्र किंवा शराव यांमध्यें ठेऊन मुद्रा करावी; आणि अग्नीवर चार घटका पचवून उतरून घ्यावा; नंतर पाऱ्या इतकें अतिविष व मोच-रस हे घालोन त्याला कंवठ. व भांग याच्या रसाच्या सात भावना द्याव्या; आणि धायटी, इंद्रजव, नागरमोथा, लोध्र, बेल व गुळवेल, यांच्या काढयानें किंवा रसानें एकेक भावना द्यावी; वालप्रमाण गोळी बांधावी; म्हणजे वज्रकपाट रस तयार होतो. हा एक-मासा रस मधाशीं द्यावा; आणि मागून चित्रक, सुंठ, वावडिंग, बेलफळ. व मीठ याचें समभाग चूर्ण उनपाण्याशीं प्यावयास द्यावें; म्हणजे सन्निपातसंग्रहणीचा नाश करितो.

## ग्रहणिकामदवारणसिंह.

सुरभिपारदहिंगुलचित्रकान्गगनभ्रष्टसुटंकणजातिकान् ॥ कनकबी जमथोतिविषाकटुत्रयहरीतकिभस्मसुदीप्यकान् ॥ गरलबिल्वकालिं गकपित्थकाननलदमोचकदाडिमधातकी ॥ जलदशाल्मलिपिच्छयुता न्समान्कनकसाम्यमफेनमिदंदृढं ॥ कनकपत्ररसैःपरिमर्दयेन्मरिचमा नवटीमधुसंयुता ॥ विनिहरेद्ग्रहणीगदमुत्कटंज्वरयुतामसतींचविषू चिकां ॥ अग्निमांद्यमक्षशूलविबंधगुल्मशूलमथपांडुममंदं ॥ सरुधि राममतीवसमुत्कटंग्रहणिकामदवारणसिंहः ॥

**अर्थ**–शुद्ध पारा, हिंगुळ, चित्रक, अभ्रक, टांकणखार भाजलेला, धोत्र्याचें बीज, अतिविष, सुंठ, मिरीं, पिंपळी, बाळहिर्डे, माळशेणीची राख, ओंवा, बचनाग, बिल्वफळ, इंद्रजव, कंवठ, वाळा, सांवरीचा चीक, डाळिंब, धायटीचें फूल, नागरमोथा, सांवरीचा

फुलें व धोत्र्याच्या समान अभ्रक हीं सर्व घेऊन धोत्र्याचे पानाच्या रसांत मर्दन करून मिऱ्याएवढी गोळी मधाबरोबर द्यावी. ती ज्वरयुक्तग्रहणी, दुष्ट विषूचिका, अग्निमांद्य, शूल, अनेक गुल्म, तीव्र पांडुरोग व रक्तस्रावी आम यांचा नाश करित्ये. यास्तव याला ग्रहणिकामदवारणसिंह ह्मणतात.

## पारदादिवटी.

पारदंगंधकंतारममृतंचानुशुल्बकं ॥ त्रिफलात्रिसुगंधीचचित्र कोशीररेणुकाः ॥ रजनीद्वयसंयुक्तंसंपेष्यवटकीकृतं ॥ ग्रहण्य ष्टविधंशूलंशोथातीसारनाशनं ॥

अर्थ—पारा, गंधक, रूप्यभस्म, बचनाग, ताम्रभस्म, त्रिफळा, त्रिसुगंध, चित्रक, वाळा, पित्तपापडा, हळद व दारुहळद हीं सर्व एकत्र करून घोटावीं; आणि त्याची गोळी करावी. ती संग्रहणी, आठ प्रकारचा शूळ, सूज व अतिसार यांचा नाश करित्ये.

## सज्जीक्षारादियोग.

सर्जिकायवशूकंवाविजयातिविषासमं ॥ दीप्यकंपारदंगंधंनिं बुनीरेणभावयेत् ॥ माषार्धमधुनादेयंसितयावाघृतान्वितं ॥ अनुदद्यात्ग्रहण्यार्तिज्वरातीसारशांतये ॥ सशूलशोथसहि तांग्रहण्यार्तिंप्रणाशयेत् ॥

अर्थ—सर्जक्षार, जवखार, भांग, अतिविष, ओंवा, पारा व गंधक हे समान एकत्र करून त्याला लिंबाच्या रसाची भावना द्यावी; हीं चार गुंजा मधाशीं द्यावीं. मागून साकर तूप द्यावें, तो योग संग्रहणी, व ज्वर, अतिसार, शूल व सूज, यांणीयुक्त संग्रहणी यांचा नाश करितो.

## वराटादियोग.

दग्ध्वावराटकान्पीतान्त्र्यूषणंटंकणंविषं ॥ गंधकंशुद्धसूतंच समंजंबीरजैर्द्रवैः ॥ मर्दयेत्भक्षयेत्माषंमरीचाज्यंलिहेदनु ॥ निहंतिग्रहणीरोगान्पथ्यंतक्रौदनंहितं ॥

अर्थ—पिवळ्या कवड्या घेऊन भाजाव्या; आणि त्यांबरोबर सुंठ, मिरीं, पिंपळी, टांकणखार, बचनाग, गंधक, आणि पारा हे समभाग घेऊन त्यांचा लिंबाच्या रसांत खल करावा. त्यांतून एक मासा रस मिऱ्ये व तूप यांशीं द्यावा. पथ्य ताक भात द्यावा; तो संग्रहणीचा नाश करितो, व ज्वरप्रकरणामध्यें त्यावेगजकेसरी रस सांगितला आहे, तोही द्यावा.

## सुवर्णरसपर्पटी.

शुद्धसूतंपलमितंतुर्यांशंस्वर्णसंयुतं ॥ मर्दयेन्निंबुनीरेणयावदेकत्वमा

मुयात् ॥ प्रक्षाल्योष्णांबुनापश्चात्पलमात्रेमुगंधके ॥ द्रुतेलोहमयेपा
त्रेबादरानलयोगतः ॥ प्रक्षिप्यचालयेल्लौह्यामदंमंदंविलोक्यच ॥
ततःपाकंविदित्वातुरंभापत्रेविनिःक्षिपेत् ॥ गोमयस्थेतदुपरिरंभापत्रे
णयंत्रयेत् ॥ शीतंतच्चूर्णितंगुंजाक्रमवृध्यानिषेवयेत् ॥ माषमात्रंभवे
द्यावत्ततोमात्रांनवर्धयेत् ॥ सक्षौद्रेणोषणेनैवलेहयेद्भिषगुत्तमः ॥ ग्रह
णींहंतिशोषंचमुवर्णरसपर्पटी ॥ सद्योवलकरीशुक्रवर्धनीवन्हिदीप
नी ॥ क्षयकासश्वासमेहशूलातीसारपांडुनुत् ॥

अर्थ—शुद्ध पारा ४ तोळे व मुवर्ण १ तोळा एकत्र करून लिंबाच्या रसांत मर्दन करावीं. एकरूप झाल्यावर धुवून च्यार तोळे शुद्ध गंधक लोहपात्रांत बोरीच्या अग्नीवर पातळ करून त्यांत तो स्वर्ण पारा टाकून लोखंडाच्या पळीने मंद मंद चाळवून पक्क झाल्यावर शेणाच्या खळींत केळीचें पान ठेऊन त्यावर ओतावा; आणि दुसरें केळीचें पान वर घालून वर शेण टाकावें; शीत झाल्यावर काढून घ्यावा. ही एक गुंजेपासून क्रमानें साहा गुंजा पावेतों मध व त्रिकटु यांशीं घेत जावी; ह्मणजे संग्रहणी, शोष, क्षय, खोकला, दमा, मेह, शूल, अतिसार व पांडुरोग यांचा नाश करित्ये, व ही सुवर्णरसपर्पटी तात्काळ बळ, शुक्र व अग्नि यानां वाढवित्ये.

## पर्पटी.

शुद्धपारदगंधाभ्यांकृतापर्पटिकानृणां ॥
निहंतिग्रहणींक्षौद्रयुक्तांपथ्यभुजांभृशं ॥

अर्थ—शुद्धपारा व गंधक यांच्या कज्जलीची पर्पटी करून ती मधाशीं द्यावी. ती संग्रहणीचा नाश करित्ये. हीवर पथ्य करावें.

## ग्रहणीगजकेसरी रस.

गंधंपारदमभ्रकंचदरदंलोहंचजातीफलंबिल्वंमोचरसंविषंप्रतिविषं
व्योषंतथाधातकी ॥ भ्रष्टाभप्यभयांकपित्थजलदौदीप्यानलौदाडि
मंटंकाद्भस्मकलिंगकात्कनकजंबीजंचयक्षेक्षणं ॥ एतत्तुर्यमफेनमेत
दखिलंसंमर्द्यसंचूर्णयेद्धत्तूरच्छदजैरसैःसुमतिमान्कुर्यान्मरीचाकृतिं ॥
दत्तासाग्रहणीगदंसरुधिरंसामंसशूलंचिरातीसारंविनिहंतिजूर्तिस
हितांतीव्रांविषूचीमपि ॥ साध्यासाध्यमपिस्वयंपरिहरेदुक्तानुपानै
रपिनाम्नातुग्रहणीमतंगजमदध्वंस्येपकंठीरवः ॥

अर्थ—गंधक, पारा, अभ्रकभस्म, हिंगुळ, लोह, जायफळ, बेलफळ, मोचरस, बचनाग, अतिविष, सुंठ, मिरीं, पिंपळी, धायटीफुलें, भाजलेली हरीतकी, कवठ, नागरमोथा, ओंवा, चित्रक, डाळिंब, कुड्याच्या साळीची राख १ तोळा, धोतऱ्याचें बीं व सागरगोटा हीं समभाग व अफीण चार भाग, हीं सर्व एकत्र करून धोतऱ्याच्या पाल्याच्या रसांत मिऱ्या एवढी गोळी करावी. ती दिली असतां, संग्रहणी, रक्त, आंव, शूल, फारदिवसांचा अतिसार, ज्वर, तरळ, आणि साध्यासाध्य संग्रहणी यांचा नाश करिते याला ग्रहणीगजकेसरी रस ह्मणतात.

## अग्निसूनुरस.

भागोदग्धकपर्दकस्यचतथाशंखस्यभागद्वयंभागोगंधकसूतयोर्मिलित योःपिष्टामरीचादपि ॥ भागस्यत्रितयंनियोज्यसकलंनिंबूरसेचूर्णितं नाम्नावन्हिसुतोरसोयमचिरान्मांद्यंजयेद्दारुणं ॥ घृतेनखंडैःसहभक्षि तोसौक्षीणान्नरान्नाशुसमीकरोति ॥ समागधीचूर्णघृतेनलीढोनरःप्रमु चेद्ग्रहणीविकारात् ॥ शोपज्वरारोचकशूलगुल्मान्पांडूदरार्शोग्रह णीविकारान् ॥ तक्रानुपानोजयतिप्रमेहान्युक्त्याप्रयुक्तोग्निसुतोरसेंद्रः ॥

अर्थ—कवडीभस्म १ भाग, शंखभस्म २ भाग, गंधक व पारा मिळून एक भाग व मिऱ्याचें चूर्ण तीन भाग हीं सर्व एकत्र करून त्यांचा निंबाच्या रसांत खल करावा. हा अग्निसूतरस. युक्तीनें तूप साकरेशीं घेतला असतां, बहुत दिवसाचें अग्निमांद्य क्षीणता यांचा नाश करितो, व पिंपळीचें चूर्ण व तूप यांशीं संग्रहणीविकार व ताका-शीं शोष, ज्वर, अरोचक, शूल, गुल्म, पांडू, उदर, अर्श, संग्रहणी, यांचा नाश करितो, हा प्रमेहावर युक्तीनें द्यावा; ह्मणजे त्यांचा नाश करितो.

## ग्रहणीकपाट रस.

पारदाद्द्विगुणोगंधस्ताभ्यांतुल्यंकटुत्रयं ॥ अजाजिटंकणंधान्यंहिंगुजी रयवानिकाः ॥ प्रत्येकंद्विगुणंसूताद्द्विचकंचचतुर्गुणं ॥ सर्वेषांचसमाज्ञे यादग्धासुज्ञैर्वराटिका ॥ सर्वमेकीकृतंचूर्णंमाषद्वयमितंततः ॥ तक्रेणालो ड्यमतिमान्भक्षयेत्सततंनरः ॥ ग्रहणीकपाटोह्येषहितःस्याद्ग्रहणीगदे ॥

अर्थ—पारा एक भाग, गंधक दोन भाग, त्रिकटु तीन, भाग जिरें, टांकणखार, धने हिंग, जिरे व ओंवा हीं प्रत्येक पाऱ्याच्या दुप्पट; आणि पादेलोण पाऱ्याच्या चौपट व या सर्वांबरोबर कवडीचें भस्म हीं संपूर्ण एकत्र खलावीं; ह्मणजे ग्रहणीकपाट झाला. यातून दोन मासे ताकाशीं भक्षण करावा. हा संग्रहणीचा नाश करितो.

## सूतादिगुटी.

सूतकंगंधकंलोहंविषचित्रकपत्रकं ॥ विडंगंरेणुकामुस्तमेलाग्रंथिककेसरं ॥ फलत्रिकंत्रिकटुकंशुल्बभस्मतथैवच ॥ एतानिसमभागानिदीयतेद्विगुणोगुडः ॥ कासेश्वासेक्षयेगुल्मेप्रमेहेविषमज्वरे ॥ लूतायाग्रहणीमांद्येशूलेपार्श्वामयेतथा ॥ हस्तपादादिरोगेषुगुटिकेयंप्रशस्यते ॥

**अर्थ**–पारा, गंधक, लोह, बचनाग, चित्रकमूळ, तमालपत्र, वावडिंग, पित्तपापडा, नागरमोथा, एला, पिंपळमूळ, नाकेशर, त्रिफळा, त्रिकटु व ताम्रभस्म हीं समभाग, आणि गूळ दोन भाग यांची गोळी खोकला, दमा, क्षय, गुल्म, प्रमेह, विषमज्वर, लूता, संग्रहणी, अग्निमांद्य, शूल, कुक्षिरोग; आणि हातपायांचे रोग यांवर द्यावी. ही फार प्रशस्त आहे.

## कणादिलेह.

कणानागरपाठाभिस्त्रिवर्गद्वितयेनच ॥ बिल्वचंदनन्हीबेरैःसर्वातिसारनुन्मतः ॥ सर्वोपद्रवसंयुक्तामपिहंतिप्रवाहिकां ॥ नानेनसदृशोलेहोविद्यतेग्रहणीहरः ॥

**अर्थ**–पिंपळी, संठ, पाहाडमूळ, त्रिफळा, त्रिकटु, बेलफळ, चंदन व वाळा यांचा, लेह करावा. तो संपूर्ण उपद्रवयुक्त संग्रहणी व प्रवाहिका यांचा नाश करितो. याविषयीं दुसरा प्रयोग उत्तम नाहीं.

## अभ्रकादिवटी.

रसंगधंविषंव्योषंटंकणंलोहभस्मकं ॥ अजमोदाहिफेनंचसर्वतुल्यंमृताभ्रकं ॥ चित्रकस्त्वक्कषायेणमर्दयेद्याममात्रकं ॥ मरीचाभांवटींकृत्वाखादेदेकांजयेदसौ ॥ चतुर्विधांचग्रहणींरहस्यंतदिदंस्मृतं ॥

**अर्थ**–पारा, गंधक, बचनाग, सुंठ, मिरीं, पिंपळी, टांकणखार, लोहभस्म, अजमोदा, व अफीम हीं समभाग व सर्वांसमान अभ्रकभस्म. हे पदार्थ चित्रक व दालचिनी यांच्या काढयांत एक प्रहर खलावे; आणि मिऱ्या एवढी गोळी बांधावी. वेळेस एकेक खातजावी; ह्मणजे चार प्रकारचे संग्रहणीचा नाश करितें. हें गुह्य सांगितलें.

## सूतराज.

रसगंधाभ्रकाणांचभागानेकद्विकाष्टकान् ॥ संचूर्ण्यसर्वरोगेषुयुंज्याद्वल्लचतुष्टयं ॥ ग्रहणीक्षयगुल्मार्शोमेहधातुगतज्वरान् ॥ निहंतिसूतराजोयंमंडलस्यचसेवनात् ॥

अर्थ–पारा १ भाग, गंधक २ भाग, अभ्रकभस्म ८ भाग, याप्रमाणें मिळवून तो चार वाल सर्व रोगांवर एक मंडल पर्यंत द्यावा. हा सूतराज संग्रहणी, क्षय, गुल्म, अर्श मेह व धातुगतज्वर यांचा नाश करितो.

## पूर्णचंद्ररसेंद्र.

सूतंगंधंचाश्वगंधागुडूचीयष्टीतापैर्मर्दयदेकघस्रं ॥ क्षुद्रंशंखंमौक्तिकं लोहकिट्टंभस्मीभूतंसूततुल्यंतुदद्यात् ॥ भूकूष्मांडैस्तवादसंरसंसविमर्द्य गोलंकृत्वाभूधरंतंपुटेच्च ॥ चूर्णंकृत्वानागवल्लीरसेनदद्यादेतंमर्दयित्वैकयामं ॥ मध्वाज्याभ्यांपूर्णचंद्रोरसेंद्रःपुष्टिंवीर्यंदीपनंचैवकुर्यात् ॥ प्रायोयोज्यःपित्तरोगेग्रहण्यामर्शोरोगेपित्तजेघोलयुक्तं ॥ स्त्रीणांतापेशाल्मलीनीरयुक्तंयोज्यंचाज्यंवाशताव्हाविपक्कं ॥

अर्थ–पारा. गंधक, यानां अश्वगंध, गुळवेल व ज्येष्ठमध, यांचे काढ्यांत एक दिवस घोटून नंतर क्षुद्रशंख, मौक्तिक व मंडूर यांचीं भस्म पारदाबरोबर घालावीं; नंतर भुयकोहळ्याच्या रसांत एक दिवस खलून त्याचा गोळा करून भूधरयंत्रांत पचवावा. शीत झाल्यावर बारीक करून नागवेलीच्या रसांत एक प्रहर खलावा; ह्मणजे हा पूर्ण चंद्ररसेंद्र झाला हा तूप व मध यांशीं घेतला असतां, व पुष्टि, वीर्य, यांतें देतो, व अग्निदीपन करितो. हा प्रायः पित्तरोग, पित्तसंग्रहणी, पित्तज मूळव्याध, यांवर घोलाशीं द्यावा; व स्त्रियांच्या संतापावर शेवरीच्या रसाशीं द्यावा. किंवा शताव्हाघृताबरोबर द्यावा.

## चित्रांबररस.

शुद्धसूतंमृतंचाभ्रंगंधकंमर्दयेत्समं ॥ लोहपात्रेघृताभ्यक्तेक्षणंमृद्वाग्निनापचेत् ॥ चालयेल्लोहदंडेनअवतार्यविभावयेत् ॥ त्रिदिनंजीरकक्काथैर्माषैकंभक्षयेत्सदा ॥ ग्रहणीशांतिमायातिसर्वोपद्रवसंयुता ॥ रसश्चित्रांबरोनामग्रहणीग्रहत्दन्मतः ॥ शमयेदनुपानेनआमशूलंप्रवाहिकं

अर्थ–शुद्ध पारा व गंधक, यांची कज्जली व अभ्रकभस्म, हे पदार्थ लोखंडीत तुपावर मंदाग्नीनें शिजवावे; आणि लोखंडाच्या दंडानें घोटावें; नंतर उतरून तीन दिवस जिऱ्याच्या काढ्याची भावना द्यावी; ह्मणजे चित्रांबर रस झाला हा अनुपानाशीं एक मासा द्यावा. तो संपूर्ण उपद्रवांनीं युक्त अशी संग्रहणी, आमशूल आणि प्रवाहिका यांचा नाश करितो.

## अगस्तिसूतराजरस.

रसबलिसमभागंतुल्यहिंगूलयुक्तंद्विगुणकनकबीजंनागफेनेनतुल्यं ॥ सकलविहितचूर्णंभावयेद्भृंगनीरैर्ग्रहणिजलधिशोषेसूतराजोह्यगस्तिः ॥

त्रिकटुकमधुयुक्तोसर्ववांतिंचशूलंकफपवनविकारंवन्हिमांद्यंचनिद्रां ॥
घृतमरिचयुतोयंगुंजमात्रःप्रवाहिंहरतिषडतिसारान्जीरजाजीफलेन ॥

अर्थ–पारा, गंधक व हिंगूळ हीं तोळा तोळा, धोत्र्याचें बीज व अफू हीं दोन दोन तोळे एकत्र करून त्यास माक्याचे रसाची भावना द्यावी. हा अगस्तिसुतराज सुंठ, मिरीं, पिंपळी व मध या अनुपानानें एक गुंज द्यावा; ह्मणजे वांति, शूल, कफवातसंबंधी विकार, अग्निमांद्य व निद्रा यांचा नाश करितो. व सहाप्रकारच्या अतिसाराबर जिरें व जायफळ यांबरोबर द्यावा.

## कनकसुंदर रस.

हिंगुलंमरिचंगंधंपिप्पलीटंकणंविषं ॥ कनकस्यचबीजानिसमांशं विजयाद्रवैः ॥ मर्दयेद्याममात्रंतुचणमात्रावटीकृता ॥भक्षणाद्ग्रहणींहंतिरसःकनकसुंदरः ॥ अग्निमांद्यंज्वरंतीव्रमतिसारंचनाशयेत् ॥ दध्यन्नंदापयेत्पथ्यंतथातक्रोदनंचरेत् ॥

अर्थ–हिंगूळ, मिरें, गंधक, पिंपळी, टांकणखार, बचनाग व धोत्र्यांचें बीं, सर्व समांश घेऊन भांगेच्या काढ्यांत प्रहरभर खल करावा; आणि हरभऱ्या एवढी गोळी खावी; ह्मणजे संग्रहणी, अग्निमांद्य, ज्वर व अतिसार यांचा नाश होतो. याला दहीं भात किंवा ताकभात हें पथ्य आहे. याला कनकसुंदर रस असें ह्मणतात.

## क्षारताम्र रस.

शंखक्षारार्कभूतिंचवराटंलोहभस्मकं ॥ अयोमलंयवक्षारंटंकणक्षारमेवच ॥ त्रिकटुसैंधवंतुल्यंभृंगतोयेनमर्दयेत् ॥ आटरूपरसैर्मर्द्यमार्द्रकस्वरसेनच ॥ चणमात्रांवटींकृत्वारसोयंक्षारताम्रकः ॥ श्वासेकासेप्रतिश्यायेपुराणज्वरपीडिते ॥ मंदाग्नौग्रहणीदोषेत्वनुपानंयथोचितं ॥ सेवयेत्सप्तरात्रेणनाशयेन्नात्रसंशयः ॥ चिरकालानुबंधेचसेवयेन्मंडलावधि ॥ तत्तद्याधिहितंपथ्यंनियमेनसमाचरेत् ॥

अर्थ–शंखभस्म, जवखार, ताम्रभस्म, कवडीभस्म, लोहभस्म, मंडूर, यवखार, टाकणखार, सुंठ, मिरें, पिंपळी, सैंधव, हीं सर्व समभाग घेऊन माक्याचा रस, अडुळशाचा रस व आल्याचा रस, यांच्या निरनिराळ्या भावना द्याव्या; आणि हरभऱ्या येवढी गोळी करावी. हा क्षारताम्ररस श्वास, कास, पडसें, जीर्णज्वर, मंदाग्नि व ग्रहणीदोष यांवर यथोक्त अनुपान योजून द्यावा. सात दिवसांत हा गुण करितो. हा चिरकालाचे व्याधींबर मंडल पर्यंत ध्यावा, व त्या त्या व्याधीचें पथ्य करावें.

## चित्रकादिगुटी.

चित्रकंपिप्पलीमूलंद्वौक्षारौलवणानिच ॥ व्योषंहिंग्वजमोदं
चचव्यमेकत्रचूर्णयेत् ॥ गुटिकामातुलिंगस्यदाडिमस्यरसेन
वा ॥ कृताविपाचयत्यामंदीपयत्याशुचानलं ॥

अर्थ–चित्रक, पिंपळमूळ, सज्जीखार, जवखार, मीठ, सैंधेलोण, पादेलोण, सुंठ, मिरें, पिंपळी, हिंग, ओंवा व चवक, हीं एकत्र कुटून महाळुंगाचे किंवा डाळिंबाचे रसांत गोळ्या करून शक्त्यनुसारेंकरून खाव्या; ह्मणजे आमाचें पाचन आणि मंदाग्नीचें दीपन होईल.

## शंबूक योग.

दग्धंशंबूकसिंधूत्थंतुल्यंक्षौद्रेणलेहयेत् ॥
निष्कैकैकंनिहंत्याशुग्रहणीरोगमुत्कटं ॥

अर्थ–शंखभस्म व सैंधव समभाग करून तीन मासे मधाशीं द्यावें; ह्मणजे मोठा ही ग्रहणीरोग नाश पावतो.

## कांकायनगुटी.

पथ्यापंचपलान्येकमजाज्यामरिचस्यच ॥ पिप्पलीपिप्पलीमूलंचव्य
चित्रकनागरैः ॥ पलाभिवृद्धैःक्रमशोयवक्षारंपलद्वयं ॥ भल्लातकप
लान्यष्टौसूरणोद्विगुणोमतः ॥ द्विगुणेनगुडेनैषावटिकाचाक्षसंमिता ॥
एकैकांभक्षयेत्प्रातस्तक्रमम्लंपिबेदनु ॥ वन्हिंसंदीपयत्याशुग्रहणीपां
डुरोगजित् ॥ कांकायनेनशिष्येभ्यःशस्त्रक्षाराग्निभिर्विना ॥ कथिता
गुटिकाचैषागुदजानांविनाशिका ॥

अर्थ–हरीतकी २० तोळे, व जिरें, मिरीं, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, हीं प्रत्येक चार चार तोळे वृद्धीनें घ्यावीं; आणि यवखार ८ तोळे, बिबवे ३२ तोळे, सुरण ६४ तोळे व गूळ सर्व चूर्णांच्या दुप्पट घालोन त्याची १ तोळ्याची गोळी करावी; आणि प्रातःकाळीं एकेक द्यावी. मागून आंबट ताक पिण्यास द्यावें; ह्मणजे अग्निदीपन करितें. व संग्रहणी व पांडुरोग, यांचा नाश करितें. ही गुटी कांकायनानें आपल्या शिष्यांला शस्त्रकर्म, क्षारकर्म, यां वाचून मुळव्याध व गुदरोग नाश करण्याकरितां सांगितली.

## महाकल्याणकगुड.

पिप्पलीपिप्पलीमूलंचित्रकंगजपिप्पली ॥ धान्याकंचविडंगानियवा
नीमरिचानिच ॥ त्रिफलाचाजमोदाचनलिनीजीरकस्तथा ॥ सैंधवं

रोमकंचापिसामुद्रंरुचकंविडं ॥ आरग्वधश्चत्वक्पत्रंसूक्ष्मैलाचोपकुंचिका ॥ शुंठीशक्रयवाश्चैवप्रत्येकंकर्षसंमितं ॥ मृद्विकायापलान्यत्रचत्वारिकथितानिहि ॥ त्रिवृत्तायाःपलान्यष्टौगुडस्यार्धतुलांतथा ॥ तिलतैलंपलान्यष्टौचामलक्यारसस्यतु ॥ प्रस्थत्रयमिदंसर्वंशनैर्मृद्वग्निनापचेत् ॥ उदुंबरंचामलकंबादरंवायथाफलं ॥ तावन्मात्रमिदंखादेद्भक्षयेद्वायथाबलं ॥ निखिलान्ग्रहणीरोगान्प्रमेहांश्चैकविंशतिं ॥ उरोघातंप्रतिश्यायंदौर्बल्यंवन्हिसंक्षयं ॥ ज्वरानपिहरेत्सर्वान्कुर्यात्कांतिंमतिंस्वरं ॥ यथाबलंवर्धितासारक्तपित्तंचविड्ग्रहं ॥ धातुक्षीणवयःक्षीणस्त्रीषुक्षीणःक्षयिचयः ॥ तेभ्योहितश्चवंध्यायैमहाकल्याणकोगुडः ॥

**अर्थ**–पिंपळी, पिंपळीमूळ, चित्रक, गजपिंपळी, धने, वावडिंग, ओंवा, मिऱ्यें, त्रिफला, अजमोदा, कमळकंद, जिरें, सैंधव, सांबरमीठ, मीठ, पादेलोण, बिडलोण, बाहव्याचा मगज, दालचिनी, तमालपत्र, बारीक एलची, एलची, सुंठ, इंद्रजव, हीं प्रत्येकी एकेक तोळा व काळीं द्राक्षें १६ तोळे, तेड ३२ तोळे, गूळ २०० तोळे, तिळाचें तेल ३२ तोळे व आंवळ्यांचा रस ६४ तोळे, हीं संपूर्ण एकत्र करून मंदाग्निवर पचन करावीं त्यांतून उंबर, आंवळा, किंवा बोर, या एवढी बल पाहून गोळी द्यावी; ह्मणजे संपूर्ण ग्रहणीरोग, वीस प्रमेह, उरोघात, पडसें, दुर्बलता, अग्निमांद्य व संपूर्णज्वर, यांचा नाश करितें. ही थोडी थोडी यथाबल वाढविली असतां रक्तपित्त, विड्बंध, धातुक्षीण, वयःक्षीण, स्त्रीक्षीण, क्षय, यांवर हितकारक आहे. व महाकल्याण गुड वंध्येला हितकारक आहे.

## कूष्मांडगुड.

कूष्मांडानांसुपक्कानांस्विन्नानांनिष्कलत्वचां ॥ सर्पिःप्रस्थेपलशतंताम्रपात्रेशनैःपचेत् ॥ पिप्पलीपिप्पलीमूलंचित्रकंगजपिप्पली ॥ धान्यकानिविडंगानिनागरंमरिचानिच ॥ त्रिफलाचाजमोदाचकलिंगाजाजिसैंधवं ॥ एकैकस्यपलंचैकंत्रिवृतोष्टौपलानिच ॥ तैलस्यचपलान्यष्टौगुडात्पंचदशैवतु ॥ आमलकरसस्यचात्रप्रस्थत्रयमुदीरितं ॥ तावत्पाकंप्रकुर्वीतमृदुनावन्हिनाभिषक् ॥ यावद्दर्वीप्रलेपःस्यात्तदैनमवतारयेत् ॥ औदुंबरंचामलकंबदरंवायथाबलं ॥ तावन्मात्रमिदंखादेद्भक्षयेद्वायथाबलं ॥ अनेनैवविधानेनप्रयुक्तश्चदिनेदिने ॥ निहंति

ग्रहणीरोगान्कुष्ठमर्शोभगंदरं ॥ ज्वरमानाहहृद्रोगगुल्मोदरविषुचिकाः ॥ कामलांपांडुरोगंचप्रमेहांश्चैकाविंशतीन् ॥ वातशोणितवीसर्पदद्रुयक्ष्महलीमकान् ॥ वातपित्तकफान्सर्वान्कुष्ठान्सर्वान्समाहरेत् ॥ व्याधिक्षीणावयःक्षीणास्त्रीषुक्षीणाश्चयेनराः ॥ तेभ्योहितोगुडोयंस्याद्वंध्यानामपिपुत्रदः ॥ वृष्योबल्योबृंहणश्चवयःसंस्थापनःपरः ॥

**अर्थ**—चांगले पिकलेले व सोलून शिजवलेले कोहाळयाचे तुकडे ४०० तोळे, ६४ तोळे तुपावर ताम्रपात्रामध्यें मंदाग्नीवर पचन करावे; नंतर पिंपळी, पिंपळीमूळ, चित्रक, गजपिंपळी, धने, वावडिंग, सुंठ, मिरीं, त्रिफला, अजमोदा, कुडयाची साल, जिरें व सैंधव, ही प्रत्येकीं चार चार तोळे; आणि तेड ३२ तोळे व तेल ३२ तोळे, गूळ ६० तोळे व आवळीचा रस १९२ तोळे, एकत्र करून मंदाग्नीवर पळीला चिकटे तोंपर्यंत कढवून उतरावें; आणि त्यांतून उंबर, आवळा किंवा बोर या इतकें बल पाहून द्यावें. याप्रमाणें नित्य देत गेलें असतां, संग्रहणीरोग, कुष्ठ, मुळव्याध, भगंदर, ज्वर, आनाह, हृद्रोग, गुल्म, उदर, विषूची, कावीळ, पांडुरोग, एकवीस प्रमेह, वातरक्त, खरूज, क्षय, हलीमक, वात, पित्त, कफ, संपूर्ण कुष्ठें, यांवर व रोगानें क्षीण, वयानें क्षीण, स्त्रीसंभोगानें क्षीण, यांवर हा हितकारक आहे; आणि वंध्यानां पुत्र देणारा, वृष्य, बलकारक, पौष्टिक, आणि वयःस्थापक असा आहे.

## कल्याणगुड.

पाठाधान्ययवान्यजाजिहपुषाचव्याग्निसिंधूद्भवैःसश्रेयस्यजमोदकोटरिपुभिःकृत्वाजटासंयुतैः ॥ सव्योषैःसफलत्रिकैःसत्रुटिभिस्त्वक्पत्रजैरौषधैःप्रत्येकंपलिकैःसुतैलकुडवैःसार्धत्रिवृन्मुष्टिभिः ॥ सर्वैरामलकीरसस्यतुलयासार्धंतुलार्धगुडःसंपाच्योभिषजावलेहवदयंप्राग्भोजनाद्भक्ष्यते ॥ येकेचिद्ग्रहणीगदाःसुगुदजाःकासाःसशोषामयाःसश्वासश्वयथुश्चिरोदररुजःकल्याणकस्तान्जयेत् ॥

**अर्थ**—आवळ्याचा रस तोळे ४०० व गूळ तोळे २०० या दोहोंचा पाक करून त्यांत पाहाडमूळ, धने, ओंवा, जिरें, शेरणी, चवक, चित्रक, सैंधव, गजपिंपळी, अजमोदा, वावडिंगें, पिंपळमूळ, सुंठ, मिरे, पिंपळी, हिरडे, बेहेडे, आवळकाठी, एलची, दालचिनी, तमालपत्र, हीं औषधें चार चार तोळे घालून नंतर १६ तोळे तेल आणि निशोत्तर ४ तोळे घालून सर्व एकत्र करून अवलेहासारिखा होई पर्यंत पचन करावा; आणि भोजनापूर्वी एक तोळा भक्षण करावा. ह्याला कल्याणगुड असें ह्मणतात. हा संग्रहणी, मुळव्याध, श्वास, कास, शोष, सूज व उदर, यांचा नाशक आहे.

## शुंठ्यादिकाढा.

शुंठींसमुस्तातिविषांगुडूचींपिबेज्जलेनक्कथितांसमांशां ॥
मंदानलत्वेसततामवातेसामानुबंधेग्रहणीगदेच ॥

अर्थ–सुंठ, नागरमोथा, अतिविष व गुळवेल, यांचा काढा मंदाग्नि, आमवात व आमसहित संग्रहणी यांचा नाशक आहे.

## पुनर्नवादिकाढा.

पुनर्नवावह्निजबाणपुंखाविश्वाग्निपथ्याचिरबिल्वबिल्वैः ॥
कृतःकषायःशमयेदशेषान्दुर्नामगुल्मग्रहणीविकारान् ॥

अर्थ–घेटुळीचे मूळ, मिरें, उन्हाळी, सुंठ, चित्रकमूळ, बाळहिरडे, करंजसाल, बाळबेल यांचा काढा करून घ्यावा; ह्मणजे मुळव्याध व गुल्म, ग्रहणी यां सर्वांस शांत करतो.

## नागरादिकाढा.

नागरोशीरधनिकायवान्यतिविषाघना ॥
श्रीपर्ण्यौचशृतंचैपांदीपनंपाचनंस्मृतं ॥

अर्थ–सुंठ, वाळा, धने, यवानी, अतिविष, नागरमोथे, सालवण, पिठवण यांचा काढा दीपन व पाचन आहे.

## अतिविषादिकाढा.

अतिविषाघनवालकधातुकीकुटजदाडिमलोध्रमथोदकी ॥ विहितमेभिरिदंसलिलंपिबेद्ग्रहणिकाविजितःप्रसभंनरः ॥ सर्वज्वरहरंज्ञेयंग्रहणीवेगनाशनं ॥ अरोचमांद्यदलनंधातुवर्धनकारकं ॥

अर्थ–अतिविष, नागरमोथा, वाळा, धायटीफूल, कुडयाची साल, लोध्र व पाहाडमूळ यांचा काढा घ्यावा; ह्मणजे संग्रहणी, सर्वज्वर, अरोचक व अग्निमांद्य यांचा नाश करितो. व धातूची वृद्धि करितो.

## भूनिंबादिचूर्ण.

भूनिंबकौटजकटुत्रिकमुस्ततिक्तःकर्षांशकाःसशिखिमूलपिचुद्वयाश्च ॥
त्वक्कौटजीपलचतुष्कमितांगुडांभःपीतंनृणामिहहरेद्ग्रहणीविकारान् ॥

अर्थ–किराइत, इंद्रजव, सुंठ, मिरीं, पिंपळी, नागरमोथा व कुटकी हीं एकेक, तोळा व चित्रकमूळ दोन तोळे, आणि कुडयाची साल १६ तोळे. ह्याचें चूर्ण एकत्र करून गुळाच्या पाण्याशीं प्राशनार्थ द्यावें; ह्मणजे संग्रणीजनितविकार नाश पावतात.

## बिल्वादिदुग्ध.

बिल्वाब्दशक्रयववालकमोचसिद्धमाजंपयःपिबतियोदिवसत्रयंच ॥
सोतिप्रवृद्धचिरकृद्ग्रहणीविकारंमासंसशोणितमसाध्यमपिक्षिणोति ॥

अर्थ–बेलफळ, नागरमोथे, इंद्रजव, वाळा व मोचरस हे घालून तापविलेलें शेळीचें दूध तीन दिवस जो प्राशन करितो, त्याचें संग्रहणीसंबंधी विकार नाश पावतो. व महिना घेतलें असतां, असाध्य दुष्ट रक्ताचा हीं नाश होतो.

## व्योषादिचूर्ण.

व्योषंदीप्याजमोदाक्रिमिरिपुदहनंरामठंचाश्वगंधंसिंधूत्थंजीरकेद्वे
रुचककलयुतंधान्यकंतुल्यभागं ॥ भंगीचूर्णंलवंगंघृतमधुसहितं
शाणमात्रंचदद्याद्दीप्तिंपुष्टिंचकांतिंबलमपिकुरुतेनाशयेत्संग्रहाख्यं ॥

अर्थ–संठ, मिरीं, पिंपळी, ओंवा, अजमोदा, वावडिंग, चित्रक, हिंग, असकंद, सैंधव, जिरें, शहाजिरें, पादेलोण, बारसाल, धने यांबराबर भांगेचें चूर्ण व लवंगाचें चूर्ण घालून एकत्र करावें. तें तीन मासे तूप व मध यांतून द्यावें; ह्मणजे तें दीप्ति, पुष्टि, कांति व बल यांतें करितें; व संग्रहणीचा नाश करितें.

## तालिसादिचूर्ण.

तालीसोग्रनिशापडूषणनिशाबिल्वाजमोदासठीचातुर्जातलवंगधातु
किविषाजातीफलंदीप्यकं ॥ पाठामोचरसाम्लपंचलवणाजातीद्वयं
वेल्लकंवृक्षाम्लाम्लवरापलाशतरुजंमांस्यर्बुदंवालकं ॥ ऐंद्रीब्रह्मुव
र्चलादृढपदाकुष्ठंसमस्तैःसमंबल्यासर्वसमाजयाखिलसमामत्स्यंडि
कावासिता ॥ चूर्णोयंग्रहणीक्षयादिकसनश्वासारुचिप्लीहहृद्दुर्नामा
तिसृतिज्वरार्तिपवनस्थौल्यप्रमेहप्रणुत् ॥ तंद्रापस्मृतिपांडुगुल्मजठ
रश्लेष्मोत्थपित्तोद्भवोन्मादाध्मानविषूचिहंतिसकलंमासार्धसंसेवनात्
एवंतालिसयुक्तमेवविहितंचूर्णंसुसिद्धंमुनिबालानांचविशेषतोहितक
रंसंस्पष्टवाणिप्रदं ॥ मांद्यध्वंसविधायकंविजयतेसर्वामयध्वंसकंपुष्ट्या
युर्बलकांतिधीस्मृतिमहामेधाविलासप्रदं

अर्थ–तालीसपत्र, वेखंड, हळद, सुंठ, मिरीं, पिंपळी, पिंपळमूळ, चित्रक, चवक, आंबेहळद, बेलफळ, अजमोदा, कचोरा, चातुर्जात, लवंग, धायटीफूल, अतिविष, जायफळ, ओंवा, पहाडमूळ, सांवरीचा चीक, आमसोल, पंचलवणें, जिरें, शाहाजिरें, वावडिंग,

अम्लवेतस, चिंच, त्रिफळा, पळसपापडी, जटामांसी, तरवड, वाळा, एलची, ब्राह्मी, जवस, भुयआंवळी व कोष्ठ, हीं समभाग आणि सर्वांच्या बरोबर थोर चिकणा, त्या सर्वांच्या बरोबर हर्डी ती सुधां सर्वांच्या बरोबर खडीसाकर, हीं घालून चूर्ण करावें. तें १५ दिवस घेतले असतां, संग्रहणी, क्षय, खोकला, दमा, अरुचि, प्लीहा, मुळव्याध, अतिसार, ज्वर, वायु, स्थूलता, प्रमेह, अपस्मार, पांडु, गुल्म, उदर, कफजव्याधि, पित्तजव्याधि, उन्माद, पोटफुगणें व विषूचिका, यांचा नाश करितें. या प्रमाणें हें तालिसादिचूर्ण या भूमीमध्यें सिद्ध आहे. व बालानां हें विशेषेंकरून उपयोगीं पडतें. हें वाचा देणारें आहे; व अग्निमांद्य, संपूर्ण रोग, यांचा नाश करितें; आणि पुष्टि, आयुष्य, बल, कांति, बुद्धि व स्मृति व धारणा यांतें देणारें आहे.

## मसुरादियोग.

मसूरायाःकषायेणबिल्वगर्भंविपाचयेत् ॥

हंतिकुक्ष्यामयान्सर्वान्ग्रहणीपांडुकामलान् ॥

अर्थ—मसुरांच्या काढयांत बेलफळाचा मगज शिजवावा; आणि द्यावा. तो संपूर्ण कुक्षिरोग, संग्रहणी, पांडुरोग, आणि कामला यांचा नाश करितो.

## दशमूलादिकाढा.

विश्वौषधस्यगर्भेणदशमूलजलंशृतं ॥

निहन्यात्तेनश्वयथुंग्रहणींसाममामयं ॥

अर्थ—दशमुळें, आणि सुंठ यांचा काढा सूज व आमसंग्रहणी, यांचा नाश करितो.

## कुटजावलेह.

कुटजस्यतुलांदत्वाचतुर्द्रोणांभसापचेत् ॥ द्रोणशेषेरसेतस्मिन्पूतेगुड तुलार्धकं ॥ घृतंचटंकवत्तत्रक्षिप्त्वामृद्वाग्निनापचेत् ॥ समंगाबिल्वक शिलाबिल्वार्धंचपुनर्नवा ॥ मुस्ताभल्लातकंचापिधातकीगजपिप्पली ॥ अंबष्ठावालकंचैवद्वेबृहत्यौसचित्रकं ॥ सद्रार्गींपिप्पलीमूलंविडंगा निहरीतकी ॥ नागकेसरयष्टीकारलुकापत्रकंतथा ॥ विश्वाचेंद्रयवाः पाठासूक्ष्मैलाजीकरद्वयं ॥ जातिपत्रीजातिफलंलवंगंतगरंतथा ॥ शृतोद्विपालिकैर्भागैर्लेहोयंसाधयेत्ततः ॥ तक्रेणवासुतक्रंवापथ्यंदेयंविचक्षणैः ॥ अनेनग्रहणीरोगानतिसारान्सुदारुणान् ॥ रोगानीकविघातायकुटजोलेहउच्यते ॥

अर्थ—४०० तोळे कुडयाची साल घेऊन तिच्या १६३८४ तोळे पाण्यांत चतुर्थांश

काढा करावा. तो गाळून त्यांत गूळ २०० तोळे, घृत एक टांक घालोन मंदाग्निवर आटवावा; आणि त्यांत लघु चिकणा, बेलफळ व शिलाजित हे दोन दोन तोळे, आणि पुनर्नवा, नागरमोथा, बिबो, धायटीचीं फुलें, गजपिंपळी, चुका, वाळा, रिंगणी, डोरली, चित्रकमूळ, भारंगमूळ, पिंपळीमूळ, वावडिंग, बाळहर्डी, नागकेशर, ज्येष्ठमध, दिंढा, तमालपत्र, सुंठ, इंद्रजव, पाहाडमूळ, बारीक वेलची, जिरें, शाहाजिरें, जायपत्री जायफळ, लवंग, आणि तगर यांचें चूर्ण आठ आठ तोळे घालोन लेह सिद्ध करावा. हा लेह ताकाशीं द्यावा; आणि पथ्यालाही ताक द्यावें; ह्मणजे संग्रहणी, कठीण ही अतिसार, आणि अनेक प्रकारचे रोग, यांचा नाश करितो. याला कुटजावलेह ह्मणतात.

## द्राक्षासव.

मृद्विकायाःपलशतंचतुर्द्रोणांभसापचेत् ॥ द्रोणशेषेतुशीतेचपूतेतस्मिन्प्रदापयेत् ॥ द्विशतेक्षौद्रखंडाभ्यांधातक्याःप्रस्थमेवच ॥ कंकोलंच लवंगंचफलंजात्यास्तथैवच ॥ पलांशकानिमरिचंत्वगेलापत्रकेसरं ॥ पिप्पलीचित्रकंचव्यंपिप्पलीमूलरेणुकं ॥ घृतभांडस्थितमिदंचंदनागरुधूपितं ॥ कर्पूरवासितोह्येषग्रहणीदीपनःपरः ॥ अर्शसांनाशनःश्रेष्ठउदावर्तास्रगुल्मनुत् ॥ जठरंक्रमिकुष्ठानिव्रणांश्चविविधांस्तथा ॥ अक्षिरोगशिरोरोगगलरोगविनाशनः ॥ ज्वरमाममहाव्याधिंपांडुरोगंसकामलं ॥ नाम्नाद्राक्षासवोह्येषबृंहणोबलवर्णकृत् ॥

अर्थ–४०० तोळे द्राक्षें घेऊन त्यांचा ८१९२ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा; आणि थंड झाल्यावर त्यांत मध १०० तोळे, खडिसाकर १०० तोळे, आणि धायटीफुलें ६० तोळे, व कंकोळ, लवंग, जायफळ, मिरीं, दालचिनी, एलची, तमालपत्र, नागकेशर, पिंपळी, चवक, चित्रक, पिंपळीमूळ, पित्तपापडा हीं चार चार तोळे घालोन तें तुपाच्या भांड्यांत ठेऊन त्याला चंदन व अगरु यांचा धूप द्यावा. आंत कापूर घालोन वास लावावा. हा द्राक्षासव घेतला असतां, दीपन आहे; आणि संग्रहणी, अर्श, उदावर्त, गुल्म, उदर, कृमि, कुष्ठें, व्रण, नेत्ररोग, शिरोरोग, गलरोग, ज्वर, आम, माहाव्याधि, पांडुरोग व कावीळ यांचा नाश करण्याविषयीं श्रेष्ठ आहे.

## बिल्वाग्निघृत.

बिल्वाग्निचव्यार्द्रकशृंगवेरक्काथेनकल्केनचसिद्धमाज्यं ॥
सच्छागदुग्धंग्रहणीगदोत्थंशोफाग्निसादारुचिनुद्वरंतत् ॥

अर्थ–बेलफळ, चित्रक, चवक, आलें व सुंठ यांचा काढा; आणि कल्क व शेळीचें दूध यांचे सिद्ध केलेलें घृत संग्रहणीरोग, सूज, अग्निमांद्य व अरुचि यांचा नाश करण्याविषयीं श्रेष्ठ आहे.

## चित्रकघृत.

चित्रकक्काथकल्काभ्यांग्रहणीघ्नंशृतंहविः ॥
गुल्मशोथोदरप्लीहशूलाशोंघ्नंप्रदीपनं ॥

अर्थ–चित्रकाचा काढा, आणि कल्क यांच्याशीं सिद्ध केलेलें तूप घेतलें असतां, गुल्म, सूज, उदर, प्लीहा, शूल, आणि मुळव्याध यांचा नाश करितें. व तें दीपन ही आहे.

## चांगेरीघृत.

पाठागोक्षुरकंशुंठीपिप्पलीचूर्णयेत्समं ॥ सर्वेषांषोडशगुणैस्तोयैःक्का थंप्रकारयेत् ॥ पादशेषंवस्त्रपूतमादायैतत्समंघृतं ॥ घृतांशंचांगेरीद्रावं त्रयाणांत्रिगुणंदधि ॥ गंडारीपिप्पलीमूलंत्र्यूषणंचव्याचित्रकं ॥ प्रत्येकं द्विफलंचूर्णंक्षिप्त्वासर्वंविचूर्णयेत् ॥ मृद्वग्निनाघृतंयावत्तत्तमवतार येत् ॥ योजयेद्भोजनेपानेग्रहण्यामतिसारके ॥ अग्निसंदीपनंरुच्यंचां गेरीघृतमुत्तमं ॥

अर्थ–पाहाडमूळ, गोखरू, सुंठ व पिंपळी यांचें समान चूर्ण घेऊन त्याचा सोळा पट पाण्यांत चतुर्थांश काढा करावा, तो गाळून घ्यावा; आणि त्यांत काढ्याच्या सम-भाग तूप घालावें. तुपाइतका चुक्याचा रस, आणि ह्या तिघांच्या तिप्पट दहीं व रक्त कांचन, पिंपळीमूळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, चवक, चित्रकमूळ, प्रत्येकांचा ८ तोळे कल्क घालोन सर्व एकत्र करून मंदाग्नीवर पाचन करावें. घृत सिद्ध झालें ह्मणजे उतरून घ्यावें. तें भोजनांत, किंवा प्राशनाला द्यावें; ह्मणजे हें उत्तम चांगेरीघृत संग्रहणी व अतिसार यांचा नाश करितें; आणि अग्निदीपन व रुचिकारक आहे.

## दाडिमाष्टक.

पलद्वयंदाडिमस्यव्योषस्यचपलद्वयं ॥ त्रिगंधस्यपलंचैकंखं डस्याष्टपलानिच ॥ सर्वमेकीकृतंचूर्णप्रशस्तंदाडिमाष्टकं ॥ दीपनंरुचिदंकंठ्यंसंग्राह्यंग्रहणीहरं ॥

अर्थ–डाळिंब, सुंठ, मिरीं, पिंपळी, हीं आठ आठ तोळे, त्रिजात ४ तोळे व खडिसाकर ३२ तोळे या सर्वांचें एकत्र चूर्ण करावें. याला दाडिमाष्टक ह्मणतात. हें दीपन, रुचिकर, कंठाला हितावह व ग्राहक आहे; आणि संग्रहणीचा नाश करितें.

## दुसरा प्रकार.

दाडिमस्यपलान्यष्टौपलंसौगंधिकस्यच ॥ अजाजीनांपलंचार्धपला र्धंधान्यकस्यच ॥ पृथक्पलांशकान्भागान्त्रिकटुग्रंथिकस्यच ॥

त्वक्क्षीरीवालकंचैवदद्यात्कर्षसमंभिषक् ॥ शर्करायापलान्यष्टौत देकस्थंविचूर्णयेत् ॥ आमातिसारशमनंकासहृत्पार्श्वशूलनुत् ॥ हृद्रोगमरुचिंगुल्मंग्रहणीमग्निमार्दवं ॥

अर्थ-डाळिंब ३२ तोळे, त्रिसुगंध ४ तोळे, जिरें २ तोळे, धने २ तोळे, त्रिकटु १२ तोळे, पिंपळमूळ ४ तोळे व दालचिनी, वंशलोचन आणि वाळा हीं एकेक तोळा आणि खडिसाकर ३२ तोळे घेऊन हीं सर्व चूर्णें एकत्र करावीं; ह्मणजे हें दाडिमाष्टक आमातिसार, खोकला व हृदय, पार्श्व यांची व्यथा, आणि हृद्रोग, अरुचि, गुल्म, संग्रहणी व अग्निमांद्य यांचा नाश करितें.

## लाईचूर्ण.

कर्षंगंधकमर्धपारदमुभेकुर्याच्छुभांकज्जलीमक्षंत्र्यूषणतश्चपंच लवणंसार्धंचकर्षंपृथक् ॥ भ्रष्टंहिंगुचजीरकद्वययुतंसर्वार्धभं गायुतंखादेट्टंकमितंप्रवृत्तिगदवान्तक्रस्यबिल्वेनच ॥

अर्थ-गंधक १ भाग व पारा अर्धा भाग यांची कज्जली व सुंठ, मिरीं पिंपळी, हीं मिळून १ तोळा, पंचलवणें प्रत्येक दीड तोळा, व भाजलेला हिंग जिरें, शाहाजिरें हीं १ तोळा व सर्व चूर्णांचा निमी भांग यांची सर्व चूर्णें एकत्र करावीं; आणि त्यांतून एक तोळा चूर्ण. ४ तोळे ताकाशीं द्यावें; ह्मणजे संग्रहणी जाते.

## मुस्तादिचूर्ण.

मुस्तकातिविषाबिल्वकुटजंसूक्ष्मचूर्णितं ॥
मधुनाचसमालीढंग्रहणींसर्वजांहरेत् ॥

अर्थ-नागरमोथा, अतिविष, बेलफळ व इंद्रजव यांचे चूर्ण मधाशीं द्यावें. हें सन्निपात व संग्रहणी यांचें नाशक आहे.

## लवंगादिचूर्ण.

लवंगकंकोलमुशीरचंदनंनतासनीलोत्पलकृष्णजीरकं ॥ एलासकृष्णागरुभृंगकेसरंकणासविश्वानलदंसहांबुना ॥ कर्पूरजातीफलवंशरोचनासिद्धार्थभागाःसहसूक्ष्मचूर्णितं ॥ सरोचनंतर्पणमग्निदीपनंबलप्रदंवृष्यतमंत्रिदोषनुत् ॥ अर्शोविबंधंतमकंगलग्रहंसकासहिक्कारुचियक्ष्मपीनसं॥ग्रहण्यतीसारमथासृजक्षयंप्रमेहगुल्मांश्चनिहंतिसत्वरं॥

अर्थ-लवंगा, कंकोळ, वाळा, चंदन, तगर, निळें कमळ, काळे जिरें, एलची, पिंपळी, अगरु, माका, नागकेशर, पिंपळी, सुंठ, जटामांसी, काळा वाळा, कापूर, जायफळ,

वंशलोचन व मोहऱ्या हीं समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करावें. तें रोचन, तृप्तिदायक, अग्नि दीपक, बल्य, वृष्य आहे; आणि त्रिदोष, अर्श, मलबद्धता, तमक, गलग्रह, खोकला, उचकी, अरुचि, क्षय, पडसें, संग्रहणी, अतिसार, रक्तक्षय, प्रमेह, आणि गुल्म, यांचा नाश करितें.

## पाठादिचूर्ण.

पाठाविषाकुटजवृक्षफलत्वगब्दतिक्तामदारसजनागरबिल्वचूर्णं ॥
सक्षौद्रतंदुलजलंग्रहणीप्रवाहिरक्तप्रवाहगुदरुग्गुदजेषुदद्यात् ॥

अर्थ–पाहाडमूळ, अतिविष, इंद्रजव, कुडयाची साल, नागरमोथे, कुटकी, धायटीपुष्प, रसांजन, सुंठ, बेलफळ यांचें चूर्ण तांदळांचें धुवण व मध यांशीं संग्रहणी, प्रवाहिका, गुदरोग व मुळव्याध यांवर द्यावें.

## तक्रसेवन.

ग्रहणीरोगिणांतक्रंदीपनंग्राहिलाघवात् ॥
पथ्यमम्लमपाकीचरक्तपित्तप्रकोपनं ॥

अर्थ–संग्रहणीरोग्याला ताक दीपन, ग्राहक व लघु असें आहे, तें पथ्यकारक होय व आंबट ताक असलें तर तें अपाकी, आणि रक्तपित्त यांना कोपविणारें आहे.

## महालुंगादितक्रयोग.

अरुचौमातुलिंगस्यकेसरंसार्द्रसैंधवं ॥
दद्याद्भोजनकालेतुप्रातस्तक्रंचरोगिणे ॥

अर्थ–संग्रहणीरोगामध्यें अरुचि झाली असतां, माहाळुंगाचें केसर, आलें व सैंधव हे भोजनकाळीं द्यावें; आणि प्रातःकाळीं ताक पाजावें.

## चित्रकादितक्रयोग.

दहनाजमोदसैंधवनागरमरिचंपिबाम्लतक्रेण ॥
सप्ताहादग्निबलंग्रहण्यतिसारशूलघ्नं ॥

अर्थ–चित्रक, अजमोदा, सैंधव, सुंठ व मिरीं हे पदार्थ आंबट ताकाशीं वाटून प्यावें; ह्मणजे सात दिवसांत अग्निदीपन करून संग्रहणी, अतिसार, आणि शूळ यांचा नाश करितें.

## योगांतर.

त्रिकंसेतक्रस्याद्विकुडवपटोःपष्टिरभयाःपचेत्प्रस्थःसार्धघृततिल
जविश्वाग्निकुडवैः ॥ समावाप्याजाजीमरिचचपलादीप्यक
पलैर्लिहेत्नान्यंवन्हिंद्रढयतिविकारांश्चजयति ॥

अर्थ–७६८ तोळे ताकांत मीठ ३२ तोळे व हरीतकी ६० तोळे घालून पचन वें; नंतर त्यांत तूप, तिळ, सुंठ व चित्रक हीं प्रत्येकीं १६ तोळे व जिरें, मिरीं, पिंपळी, ओंवा, हीं प्रत्येकी ४तोळे घालून लेह सिद्ध करावा; आणि द्यावा. तो अग्नीला वाढवितो, आणि विकारांचा नाश करितो.

## शंखवटी.

चिंचाक्षारपलंपटुत्रयपलंनिंबूरसेकल्कितंतस्मिन्शंखपलं प्रतप्तमसकृन्निर्वाप्यशीर्णावधि ॥ हिंगुव्योषपलंरसामृतबलिनिःक्षिप्यनिष्कांशकान्बध्वाशंखवटीक्षयेग्रहणिकारुक्पक्तिशूलादिषु ॥

अर्थ–चिंचेचा क्षार ४ तोळे, सैंधव, बिडलोण, संचळ, हीं चार चार तोळे. यांचा लिंबाच्या रसांत कल्क करून त्यांत चार तोळे शंख तापवून विझवावा. पुनः तावून विझवावा. याप्रमाणे शंख विरे तोंपर्यंत करून नंतर हिंग, सुंठ, मिरीं, पिंपळी, पारा, बचनाग, गंधक, हे चार चार मासे घालून त्याची गोळी बांधावी. ती क्षय, संग्रहणी, पक्तिशूल, यांचा नाश करित्ये.

## जातीफलादितक्र.

जातीफलौषधशिवाविडहिंगुजीरगंधंद्विशोमिथितकल्कितराजिकाच ॥ अंगारभर्जितमरिष्टकपिष्टकंचतक्रेगकोलमितमामगदग्रहण्यां ॥

अर्थ– जायफळ, सुंठ, आवळकाठी, वावडिंग, हिंग, जिरें, हीं समभाग व गंधक २ भाग व मठ्यांत वाटलेली मोहरी व लसूण हीं सर्व एकत्र करून त्या ताकाला हिंग भाजून ठेकरी द्यावी; आणि तें ताक चार मासे द्यावें; ह्मणजे आमसंग्रहणी दूर होत्ये.

## वार्ताकगुटी.

चतुःपलंसुधाकांडंत्रिपलंलवणत्रयं ॥ वार्ताकाःकुडवंचार्कमूलाद्दिल्वे तथानलात् ॥ दग्ध्वाद्रवेणवार्ताकैर्गुटिकाभोजनोत्तरं ॥ भुक्ताभुक्तंप चेच्चाशुनाशयेद्ग्रहणीगदं ॥ कासंश्वासंतथार्शांसिविषूचींचहृदामयं ॥

अर्थ–१६तोळे निवडुंगाचें कांडें व सैंधव, बिडलोण, काचलोण, हे १२ तोळे आणि वांगीं १६ तोळे, रुईचीं मुळें ८ तोळे, चित्रकमूळ ८ तोळे. हे सर्व एकत्र करून वांग्यांच्या रसांत भाजावें; आणि त्याची गोळी भोजनोत्तर भक्षण करावी; ह्मणजे भक्षण केलेलें अन्न लौकर पचन होतें; आणि संग्रहणी, खोकला, दमा, मुळव्याध, तरक, आणि हृद्रोग, यांचा नाश करित्ये.

## भल्लातकक्षार.

भल्लातकंत्रिकटुकंत्रिफलालवणत्रयं ॥ अंतर्धूमंद्विपलकंगोपु

रीषाग्निनादहेत् ॥ सक्षारःसर्पिषापीतोभोज्येवाथविचूर्णितः ॥
हृद्रोगपांडुग्रहणीगुल्मोदावर्त्तशूलनुत् ॥

अर्थ–बिबवे, सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहडा, आवळकाठी, सेंदलोण, पादेलोण, संचळ व ग्रहधूम हे आठ तोळे घेऊन गोंवऱ्याच्या अग्नींत जाळावें. त्याचा क्षार तुपाशीं ध्यावा अथवा भोजनांत द्यावा; ह्मणजे हृद्रोग, पांडुरोग, संग्रहणी, गुल्म, उदावर्त, शूल, यांचा नाश करितें.

## चवकादिचूर्ण.

चूर्णंचव्यकचित्रश्रीविश्वभेषजनिर्मितं ॥
तक्रेणसहितंहंतिग्रहणींदुःखकारिणीं ॥

अर्थ–चवक, चित्रक, बेलफळ व सुंठ यांचें चूर्ण ताकाबरोबर खावें; ह्मणजे फार दुष्टसंग्रहणीचा नाश करील.

## रुचकादिचूर्ण.

रुचकाग्निमरीचानांचूर्णंतक्रेणसेवितं ॥
ग्रहण्युदरगुल्मार्शःक्षुन्मांद्यप्लीहनाशनं ॥

अर्थ–पादेलोण, चित्रक व मिरें यांचें चूर्ण ताकाबरोबर सेवन करावें; ह्मणजे संग्रहणी, उदर, गुल्म, मुळव्याध, अग्निमांद्य, पाथरी यांचें नाशक आहे.

## कपित्थाष्टकचूर्ण.

अष्टौभागाःकपित्थस्यषट्भागाशर्करामता ॥ दाडिमंतिंतिडीकंचश्री
फलंधातकीतथा ॥ अजमोदाचपिप्पल्यःप्रत्येकंस्युस्त्रिभागिकाः ॥ म
रिचंजीरकंधान्यंग्रथिकंवालकंतथा ॥ सौवर्चलंयवानीचचातुर्जातंस
चित्रकं ॥ नागरंचैकभागाःस्युःप्रत्येकंसूक्ष्मचूर्णितं ॥ कपित्थाष्टक
संज्ञंस्याच्चूर्णमेतद्गलामयान् ॥ अतिसारंक्षयंगुल्मंग्रहणींचव्यपोहति ॥

अर्थ–कंवठ आठ भाग व साकर आठ भाग, आणि डाळिंबसाल, चिंचेची साल, कोंवळें बेलफळ, धायटीफुलें, अजमोदा व पिंपळी हीं साहा औषधें तीन तीन भाग व मिऱ्ये, जिरें, धने, पिंपळमूळ, वाळा, संचळ, अजमोदा, दालचिनी, विलायची, तमालपत्र, नागकेशर, चित्रक, सुंठ, हीं १३ औषधें एक एक भाग घ्यावीं. मग साऱ्या औषधाचें बारिक चूर्ण करावें. या चूर्णाला कपित्थाष्टक चूर्ण असें ह्मणतात. हें कपित्थाष्टक चूर्ण घेतलें असतां, कंठाचे रोग व अतिसार, क्षय, गुल्म व संग्रहणी हे रोग दूर होतात.

## लाहीचूर्ण दुसरें.

त्रिजातकव्योषवरारसेंद्रगंधाजमोदाभिशिवेल्लरात्रयः ॥ बिल्वानला

जाजिलवंगधान्यगजोपकुल्यामधुकंपटूनि ॥ हिंगुःकुबेराव्हयमोचसा रीक्षारीजयासर्वचतुर्थभागा ॥ इदंहिचूर्णंविनिहंतितूर्णंप्रसूतिकासंग्रह णीविकारं ॥ समस्तरोगांतकमग्निकारिभ्राजिष्णुताकारिसुतक्रपीतं ॥ इमंप्रयोगंबहुधानुभूतंचकारधात्रीकिलकापिलाही ॥

अर्थ—दालचिनी, तमालपत्र, वेला, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडे, ब्याहडे, आवळ-काठी, पारा, गंधक, अजमोदा, बडिशेप, वावडिंग, हळद, बाळवेल, चित्रकमूळ, जिरें, लवंग, धनें, गजपिंपळी, ज्येष्ठमध, पंचलवण, भाजलेला हिंग, सागरगोट्याचो मज्जा, सांवरीचा डीक, सज्जिखार, जवखार, सर्वांचे चौपट शुद्ध केलेली भांग यांचें बारीक चूर्ण करावें; नंतर ते ताकांत घ्यावें; ह्मणजे संग्रहणीरोग, सूतिकारोग, अग्निमांद्य इत्या-दिक सर्वरोगांस हितावह होतें. हा प्रयोग कोणीएक लाहीनामक दाईनें बहुतवेळ अ-नुभव घेऊन केला आहे. ह्मणून यास लाहीचूर्ण असें ह्मणतात.

## जातिफलादिचूर्ण ग्रहण्यादिकांवर.

जातीफललवंगैलापत्रत्वङ्नागकेसरैः ॥ कर्पूरचंदनतिलैस्त्वक्क्षीरी नागरामलैः ॥ तालीसपिप्पलीपथ्यास्थूलजीरकचित्रकैः ॥ शुंठीविडं गमरिचैःसमभागेनचूर्णितैः ॥ यावंत्येतानिसर्वाणिकुर्याद्भंगांचताव तीं ॥ सर्वचूर्णसमादेयाशर्कराचभिषग्वरैः ॥ कर्षमात्रंततःखादेन्मधु नाप्लावितंसुधीः ॥ अस्यप्रभावाद्ग्रहणीकासश्वासारुचिक्षयाः ॥ वा तश्लेष्मप्रतिश्यायाःप्रशमंयांतिवेगतः ॥

अर्थ—जायफळ, लवंगा, विलायची, तमालपत्र, दालचिनी, नागकेशर, कापूर, श्वेतचंदन, काळे तीळ, वंशलोचन, तगर. आवळकाठी, तालिसपत्र, पिंपळी हिरडे, काळे जिरे, चित्रक, सुंठ, वावडिंग व मिऱ्यें, हिं वीस औषधें समभाग घ्यावीं, व या औषधांचे समभाग भांग शोधून घ्यावी. मग साऱ्यांचें चूर्ण करून त्या चूर्णाचे समभाग साकर घेऊन त्यांत मेळवावी. मग तें चूर्ण एक कर्ष प्रमाण मधांत घेतलें असतां, संग्रहणी, कास, श्वास, अरुचि, क्षय, वातकफाचा विकार व पडसें हे रोग लवकर दूर होतात.

## बेलफलादिचूर्ण.

श्रीघनवालकमोचकशक्रंचूर्णमजापयसापरिपेयं ॥
हंतिचतद्ग्रहणीभयमाशुसामगदंरुधिरेणविमिश्रं ॥

अर्थ—बेलफळ, नागरमोथे, वाळा, मोचरस व इंद्रजव, यांचें चूर्ण शेळीच्या दुधाशीं घ्यावें. तें संग्रहणी व आंवरक्त, यांचा नाश करितें.

## दुसरें जातीफलादिचूर्ण.

जातीफलाग्निहिमवेल्लतिलेंदुजीरवंशीत्रिकत्रयमनक्षमिभोनतंच ॥
तालीसदेवकुसुमेअपिचूर्णमेपांद्विःशर्करंचसमगंजमिदंग्रहण्यां ॥

अर्थ—जायफळ, चित्रक, वाळा, वावडिंग, तिळ, कापर, जिरें, वंशलोचन, त्रिसुगंध, बेहडयाशिवाय त्रिफळा, त्रिकटु, गजपिंपळी, तगर, तालिसपत्र व लवंग यांचें समभाग चूर्ण व चूर्णाच्या दुप्पट साकर घालून द्यावें. हें चूर्ण संग्रहणीचें नाशक आहे.

### पथ्य.

निद्राछर्दनलंघनंचिरभवायःशालयःषष्टिकामंडोलाजकृतोमसूरतुवरीमुद्गप्रभूतारसाः ॥ निःशेषंस्द्दतसारमेवदधिजंगोक्षीरजातंगवांछागंवानवनीतमेवविमलंतद्भूत्पयःसंभवं ॥ छागल्याजपयोदधीनितिलजंतैलंसुरामाक्षिकंशालूकंलकुचंचदाडिमयुगंनव्यानिभव्यानिच ॥ रंभायाःकुसुमंफलंचतरुणंबिल्वंचशृंगाटकंचांगेरीविजयाकपित्थकुटजाजातीकसेरूणिच ॥ न्यग्रोधस्यफलंचतक्रममलंजातीफलंजांबवंधान्याकानिचतिंदुकानिचमहानिंबोरुणाफेनवत् ॥ क्रव्यालांबुशशैणतित्तिररसाःक्षुद्राझषासर्वशोडिंडीशोमधुरालिकाचखालिपाःसर्वःकषायोरसः

अर्थ—निद्रा, ओकारी, लंघन, जुन्या साठया साळी, लाह्यांचा मंड व मसुरा, तुरी, मूग यांचे रस, व निःशेष लोणी काढिलेलें ताक, गाईचें, शेळीचें व मेंढीचें दूध, लोणी, दहीं, व तिळांचें तेल, मद्य, मध, कमळकंद, फणस, खाटें व गोड डाळिंब, केळफूल, जून केळें, बेलफळ, शिंगाडे, चुका, भांग, कवठ, कुडा, जिरें, कचरा, वडाचीं फळें, चांगलें ताक, जायफळ, जांबूळ, धने, टेंभुर्णी, धेडशी, कुचला, महानिंब, अरुणा, अफीम, मांस, पांढरा भोपळा, ससा, हरण, तित्तिरपक्षी यांचे रस, संपूर्ण बारीक जातीचे मासे, धेडसेफळ, साळोखी, कोकिला, बिळांत राहाणाराचें मांस, संपूर्ण तुरट पदार्थ हे संग्रहणीवर पथ्यकारक आहे.

### अपथ्य.

रक्तस्रुतिंजागरमंबुपानंस्नानंस्त्रियंवेगविनिग्रहश्च ॥ नस्यांजनंस्वेदनधूपपानंश्रमंविरुद्धांजनमातपंच ॥ गोधूमनिष्पावकलायमाषयवारकंछत्रकराजमाषाः ॥ उपोदकीवास्तुककाकमाचीकूष्मांडतुंबीमधुशिग्रुकंदान् ॥ तांबूलमिक्षुंबदरंरसालउर्वारुकंपूगफलंरसानां ॥ धान्याम्लसौवीरतुषोदकानिदुग्धंगुडंमस्तुचनारिकेलं ॥ पुनर्नवाबार्हतबैल्व

कानिसर्वाणिशाकानिचपत्रवंति ॥ दुष्टांगगोवारिकुरंगनाभीक्षारंस मस्तानिसराणिचापि ॥ द्राक्षामथाम्लंलवणंरसंचगुर्वन्नपानंसकलंच पूगं ॥ वैद्यश्चिकित्सेद्ग्रहणीविकारंविवर्जयेत्संततमप्रमत्तः ॥

अर्थ–रक्तस्राव, जागरण, उदकपान, स्नान, स्त्री, वेगधारण, नस्य, अंजन, घाम, धूमपान, श्रम, विरुद्धान्न, अंजन, निंबर, गहू, पावटे, वाटाणे, उडीद, यव, अळंबे, चवळया, मधाळ, चाकवत, कावळी, कोहळा, पांढरा भोंपळा, गोड शेवगा, कंद, तांबूल, ऊंस, बोर, आंबा, कांकडी, सुपारी, रसामध्यें धान्याम्ल, सौवीर, तुषोदक, दूध, गूळ, दह्यांची निवळी, नारळ, पुनर्नवा, रिंगणी, बेलफळ, संपूर्ण पाल्यांच्या भाज्या, दुखणेकारिंगाईचें दूध, कस्तुरि, क्षार, संपूर्ण सारकद्रव्यें, द्राक्षें, आंबठ, मीठ, हे रस जडान्न, पान सुपारी, हे पदार्थ ग्रहणी रोग्याला देऊं नये.

## सुखसाध्यलक्षण.

बाह्यायांतुवलौजातान्येकदोषोल्बणानिच ॥
अर्शांसिसुखसाध्यानिनचिरोत्पतितानिच ॥

अर्थ–बाहेरल्यावळीवर झालेले एकदोषोल्बण व ज्यांस एक वर्ष जाहालें नाहीं, असे मोड सुखसाध्य होतात.

## कृच्छ्रसाध्यलक्षण.

द्वंद्वजानिद्वितीयायांवलौयान्याश्रितानिच ॥
कृच्छ्रसाध्यानितान्याहुःपरिसंवत्सराणिच ॥

अर्थ–दोन दोषांपासून झालेले व जे दुसऱ्यावळीवर असणारे व ज्यांला एक वर्ष लोटलें आहे; असे मुळव्याधीचे मोड कृच्छ्रसाध्य होतात; आणि जे बाह्यवळीवर असूनही दोषोल्बण असतील, आणि एक दोषोल्बण एकाबळीवर जाहाले असतील, तेही कृच्छ्रसाध्य होत.

## असाध्यलक्षणें.

सहजानित्रिदोषाणियानिचाभ्यंतरावलिं ॥
जायंतेर्शांसिसंश्रित्यतान्यसाध्यानिनिर्दिशेत् ॥

अर्थ–सहज ह्मणजे जन्माबरोबर झालेले, त्रिदोषज व आंतल्या वळीवर झालेले, ते सर्व असाध्य जाणावे.

## याप्यलक्षण.

शेषत्वादायुषस्तानिचतुष्पादसमन्विते ॥
याप्यंतेदीप्तकालाग्नेःप्रत्याख्येयान्यतोन्यथा ॥

अर्थ—असाध्य मुळव्याध जरी असली; तरी रोग्याचें आयुष्य बाकी असलें, आणि तो चतुष्पाद संपत्तियुक्त असेल, व वैद्य, औषध, परिचारक, आणि रोगी हे जसे असावे तसे असतील तर, व रोग्याचा अग्नि प्रदीप्त असला तर, याप्य ह्मणजे शम पावतें. या विपरीत असेल तर रोगी असाध्य जाणावा.

## उपद्रवानें असाध्यत्व.

हस्तेपादेगुदेनाभ्यांमुखेवृषणयोस्तथा ॥
शोथोहृत्पार्श्वशूलश्चतस्यासाध्योर्शसोहितः ॥

अर्थ—हात, पाय, नाभि, गुद व मुख यांवर सूज येते, व हृदय, पार्श्वभाग दुखतात; तो रोगी असाध्य जाणावा.

## दुसरीं असाध्यलक्षणें.

हृत्पार्श्वशूलसंमोहश्छर्दिरंगस्यरुग्ज्वरः ॥
तृष्णागुदस्यपाकश्चनिहन्युर्गुदजातुरं ॥

अर्थ—हृदय, पार्श्वशूल, इंद्रियें, आणि मन यांचा मोह, ओकारी, अंगांत शूल, ज्वर, तृषा, गुदाचा पाक व गुदावर पिवळे फोड, हीं लक्षणें आलीं; ह्मणजे रोगी असाध्य जाणावा.

तृष्णारोचकशूलार्तमतिप्रस्रुतशोणितं ॥
शोथातीसारसंयुक्तमर्शांसिक्षपयंतिहि ॥

अर्थ—तृषा, अरुचि व शूल यानी पीडलेला व ज्याचें रक्त फार स्रवलें; आणि सूज व अतिसार याणी युक्त अशा रोग्याचा अर्शरोग नाश करितो.

मेढ्रादिष्वपिवक्ष्यंतेयथास्वंनाभिजान्यपि ॥
गंडूपदास्यरूपाणिपिच्छिलानिमृदूनिच ॥

अर्थ—शिश्न, आदिशब्दानें नाक व कान इत्यादिकांचे ठायीं दोषभेदेंकरून अंकुर होतात; व नाभीला ही अर्श होतात. त्याचे मोड गांडूळाच्या तोंडासारिखे गुळगुळीत आणि मृदु असे असतात.

## चामखीळ याची संप्राप्ति.

व्यानोगृहीत्वाश्लेष्माणंकरोत्यर्शस्त्वचोबहिः ॥
कीलोपमंस्थिरखरंचर्मकीलंतुतद्विदुः ॥

अर्थ—व्यानवायु कफाला घेऊन त्वचेवर खिळ्यासारिखा घट्ट व खरखरीत असा मोड उत्पन्न करितो. त्याला चामखीळ ह्मणतात.

## वातादिभेदानें त्याचें लक्षण.

वातेनतोदपारुष्येपित्तादसितरक्तता ॥
श्लेष्मणास्निग्धताचास्यग्रथितत्वंसवर्णता ॥

अर्थ–वायूनें त्यांत सुई टोंचल्या सारिखी पीडा, आणि कर्कशपणा, पित्तानें त्याचा रंग काळा व तांबडा आणि कफानें त्याला तुळतुळीतपणा, गांठाळलेला, आणि त्वचे सारिखा वर्ण असतो.

## द्वंद्वजार्शकारण.

हेतुलक्षणसंसर्गाद्विद्याद्द्वंद्वोल्बणानिच ॥

अर्थ–दोन दोन दोषांचीं कारणें, आणि लक्षणें मिळालीं तर द्वंद्वार्श आहे असें जाणावें.

## दोषकोपानें अर्शोरोग.

पंचात्मामारुतःपित्तंकफोगुदवलित्रये ॥ सर्वएवप्रकुप्यंतिगु
दजानांसमुद्भवे ॥ तस्मादर्शांसिदुःखानिबहुव्याधिकराणिच ॥
सर्वदेहोपतापीनिप्रायःकृच्छ्रतमानिच ॥

अर्थ–गुदाच्या तीन्ही वळींवर मुळव्याधीचे मोड उत्पन्न झाले असतां, पांचप्रकारचा वायु, पांच प्रकारचें पित्त, आणि पांच प्रकारचा कफ हे सर्वच दोष कोप पावतात; ह्मणजे प्राण, अपान, समान, उदान; आणि व्यान हे पांच प्रकारचे वायु. हृदय, गुद, नाभी, कंठ, आणि सर्व शरीर हीं अनुक्रमानें त्यांचीं स्थानें होत. तसेंच आलोचक, रंजक, साधक, पाचक व भ्राजक असे पित्ताचे पांच भेद. त्यांचीं स्थान आलोचन नेत्रांत, रंजक यकृत व प्लीहा यांमध्यें, साधक हृदयामध्यें, पाचक पक्वाशय व आमाशय यामध्यें, भ्राजक त्वचेमध्यें राहातें. तसा कफही अवलंबक, क्लेदक, बोधक, तर्पक व श्लेषक या पांच भेदांनें क्रमेंकरून हृदय, आमाशय, जिव्हा, मस्तक, आणि संधि. या पांच ठिकाणीं राहातो. याप्रमाणें सर्व दोष आपआपल्या पांच दोषांनीं कोपतात. ह्मणून हा अर्शरोग फार दुःखदायक, बहुत प्रकारच्या व्याधि, उदर व अग्निमांद्य इत्यादि उपद्रव करणारा, सर्वदेहाला क्लेशदायक, आणि बहुतकरून कृच्छ्रसाध्य असा होतो.

## असाध्यलक्षण.

दोषत्रयाणिसहजानिवलौतथांतर्जातानिहंतिगुदजानिपृथूदरस्य ॥ पा
दस्यहस्तगुदजाभ्युदरांडकोशशूनस्यपार्श्वहृदयव्यथितस्यपुंसः ॥ हृ
त्पार्श्वशूलवमनज्वरमोहतृष्णापाकोगुदेश्वितनुतारुचिरंगभंगः ॥ यस्या
स्तियातियमधामगुदांकुरोध्यंशूनोदराक्षिकरपादगुदांडशोफः ॥ तृष्णा
शूलहृदिश्वासशोपातीसारसंयुतं ॥ अतिनिःसृतरक्तंचनिहन्युर्गुदजानरं ॥

अर्थ–जे अर्श त्रिदोषात्मक, किंवा शरीरावरोबरच उत्पन्न झालेले व आंतल्या वळी-चे व ज्याचें पोट मोठें झालें त्याचे, आणि पाय, हात, गुद, पोट व आंड यांला सूज, व पार्श्व आणि हृदय यामध्यें शूळ, वांति, ज्वर, मोह, तृषा, गुदाचा पाक, अग्निमांद्य, अरुचि व अंगनाश ह्या लक्षणानीं युक्त जो रोगी तो मरतो; आणि ज्या मुळव्याधीमध्यें आंध्य व पोट, नेत्र, पाय, हात, गुद, आंड यांचे ठाई सूज, ताहान, हृदयांत शूळ, श्वास, शोष, अतिसार, आणि ज्याला फार रक्त पडतें, त्याला ती मुळव्याध मारिते.

## अर्शास पथ्य.

विरेचनंलेपनरक्तमोक्षंक्षाराग्निशस्त्रंचरितंचकर्म ॥ पुरातनालोहितशालयश्चसषष्टिकाश्चापिजवाकुलित्थाः ॥ पटोलधत्तूररसेनवन्हिपुनर्नवासूरणवास्तुकानि ॥ जीवंतिकादंतशठासुरावंशुंठीर्वयस्यानवनीततक्रं ॥ कंकोलधात्रीरुचकंकपित्थमौष्ट्राणिमूत्राज्यपयांसिचापि ॥ भल्लातकंसर्पपजंचतैलंगोमूत्रसौवीरतुपोदकानि ॥ गोधाखुलोमानिखरोष्ट्रलोमश्वाविल्कुलंगानथधौतकोशाः ॥ तरक्षवासाश्वमृगालिकाकायेत्यल्पमांसप्रसहाश्चतेपि ॥ वातापहंयच्चयदग्निकारितदन्नपानंहितमर्शसेभ्यः ॥

अर्थ–विरेचन, लेपन, रक्तकाढणें, क्षार, अग्नि व शस्त्र यांचे उपचार; जुनें साठके भात, साठकी यव, कुलित्थ, पडवळ, धोतरा, लसूण, चित्रक, पुनर्नवा, सूरण, चाकवत, गुळवेल, कवीठ, सुरात (आनंद करणारे शब्द) सुंठ, हरितकी, लोणी, ताक, कंकोळ, आंवळें, पादेलोण, कवठ, उंटाचे मूत, तूप, दूध, बिब्बे, शिरसळ, गोमूत्र, सौवीर, तुषोदक व घोरपड व उंदीराचे केश व गाढव व उंट यांची लोकर, साळशीत, कुलिंग, रुपें, वानर, तरस, अडुळसा, मृग, भ्रमर, कावळा व जे अल्पमांस, गृध्र, उलूक, घार, वाज, चाष, भास, कुक्कुर, वातनाशक व अग्निकारक असे अन्न व पान हें अर्शरोग्याला हितकारक आहे.

## अपथ्य.

अनूपमामिषंमत्स्यंपिण्याकंदधिपिष्टकं ॥ माषान्करीरंनिष्पावतंदुलातुंब्युपोदिका ॥ पक्वाम्रशालुकंसर्वंविष्टंभीणिगुरूणिच ॥ आतपंजलपानानिवमनंबस्तिकर्मच ॥ विरुद्धानिचसर्वाणिमारुतंपूर्वदिग्भवं ॥ वेगावरोधःस्त्रीपृष्ठयानमुत्कटकासनं ॥ यथास्वंदोषलंचान्नमर्शसांपरिवर्जयेत् ॥

अर्थ–आनूपदेशीं राहणारे जीवाचे मांस, मासे, पेंड, दहीं, पीठ, उडीद, वेळूचा

कोंब, पावटे, पांढरा भोपळा, थोर मयाळ, पिकलेला आंबा, कमळकंद, संपूर्णविष्टंभकारक व जडपदार्थ, निवर, जलपान, वमन, बस्तिकर्म, विरुद्धपदार्थ, पूर्वेचा वारा, मलमूत्रादिवेगांचा अवरोध, स्त्रीसंग, पृष्ठयान, उकिडवें बसणें, दोषांला उत्पन्न करणारें अन्न, हे पदार्थ अर्शरोग्यानें वर्जावे.

## रक्तार्श व चामखीळ यांवर.

यत्पथ्यंयदपथ्यंचवक्ष्यतेरक्तपित्तिनां ॥ रक्तार्शोरोगिणांतत्तुदेयांविद्याद्विशेषतः ॥पानंयानंदिवास्वप्नंगुर्वन्नमतिभोजनं ॥ व्यायामंकलहंचैवतीक्ष्णंक्षारविधिंत्यजेत् ॥ यद्युक्तमर्शसामादौभेषजंपथ्यमेवच ॥ तदेवचर्मकीलानांकार्यंदोषादिभेदतः ॥

अर्थ–जें पथ्य किंवा अपथ्य रक्तपित्तीरोग्यानां सांगेल, ते रक्तार्शरोग्याला विशेषें करून द्यावें; व पान, यान, दिवसास झोंप, जडान्न, अतिभोजन, व्यायाम, कलह, खारट, आणि जें वर अर्शव्याधीला पथ्य सांगीतलें तें औषध; असें चामखिळांवर पथ्य द्यावें.

---

## अर्शरोगी कर्मविपाक.

दत्वाथवेतनंयोध्येत्यादायापिचवेतनं ॥
अध्यापयेज्जुहुयाज्जपेद्वार्शोयुतोभवेत् ॥

अर्थ–जो वेतन देऊन अध्ययन करितो, किंवा वेतन घेऊन अध्ययन सांगतो, किंवा हवन अथवा जप करितो; तो अर्शोरोगी होतो.

## सामान्यार्शोनिदान.

पृथक्दोषैःसमस्तैश्चशोणितात्सहजानिच ॥
अर्शांसिषट्प्रकाराणिविद्यात्गुदवलित्रये ॥

अर्थ–वात, पित्त, कफ, सान्निपात, रक्तज व सहज अशी साहाप्रकारची मुळव्याध गुदाचा ठायीं त्रिवळींतून कोणत्याही वळींत होत्ये.

## अर्शाची संप्राप्ति व रूप.

दोषाःस्त्वङ्मांसमेदांसिसंदूष्यविविधाकृतीन् ॥
मांसांकुरानपानादौकुर्वंत्यर्शांसितान्जगुः ॥

अर्थ–वातादिदोष कुपित होऊन, त्वचा, मांस व मेद यांत दूषित करून नानाप्रकारचे मांसांकुर गुदादिकाचे ठायीं उत्पन्न करितात, त्याला अर्श ह्मणतात.

## अर्शाचें पूर्वरूप.

विष्टंभोंगस्यदौर्बल्यंकुक्षेराटोपएवच ॥ कार्श्यमुद्गारबाहुल्यं
सक्थिसादोल्पविट्कता ॥ ग्रहणीदोषपांडुर्तेराशंकाचोदर
स्यच ॥ पूर्वरूपाणिनिर्दिष्टान्यर्शसामभिवृद्धये ॥

अर्थ—मळाचा प्रतिबंध, शरीराला दुर्बलता, कुशीमध्यें गुडगुडणें, कृशपणा, फार ढेकर, पायांच्या पोटऱ्या गळणें, मळ जाहाल्यास थोडा होणें व ग्रहणी, पांडु व उदर जहालें आहे असें वाटणें, इत्यादि लक्षणें अर्शरोग होणार असला ह्मणजे होतात.

## चिकित्साप्रक्रिया.

अर्शोतिसारग्रहणीविकाराःप्रायेणचान्योन्यनिदानभूताः ॥
सन्नेनलेसंतिनसंतिदीप्तेरक्षेदतस्तेषुविशेषतोग्निं ॥

अर्थ—अर्श, अतिसार व संग्रहणी हे विकार प्रायः अन्योन्याच्या आश्रयानें होतात. व हे अग्नि प्रदीप्त असतां होत नाहींत. मंद झाला ह्मणजे होतात. याकरितां याविकारामध्यें विशेषेंकरून अग्नीचें संरक्षण करावें.

## चिकित्साप्रकार.

दुर्नाम्नांसाधनोपायोच्चतुर्धापरिकीर्तितः ॥
भैषजक्षारशस्त्राग्निसाध्यत्वंयाप्यमुच्यते ॥

अर्थ—अर्शरोग साध्य होण्याविषयीं औषध, क्षार, शस्त्र, आणि अग्नि असे च्यार उपाय आहेत. त्याणि बरा होतो, तो साध्य व इतर असाध्य.

अर्शसामौषधैःक्षारैःशस्त्रेणचयथाग्निना ॥
चिकित्सास्याच्चतुर्धैवंमुख्यंतत्रौषधंविधिः ॥

अर्थ—अर्शरोगाला औषध, क्षार, शस्त्र, आणि अग्नि याप्रमाणें चिकित्सा आहे; परंतु त्यामध्यें औषध मुख्य आहे.

## चिकित्साक्रम.

शस्त्रैर्वाथजलौकाभिःप्रोच्छूनकठिनार्शसः ॥
शोणितंसंचितंदृष्ट्वाहरेत्प्राज्ञःपुनःपुन. ॥

अर्थ—शस्त्रानें किंवा जळवानीं सुजलेले कठिण असे जे मोड, त्यांचें संचित झालेलें रक्त वारंवार काढावें.

यद्वायोरनुलोमस्याद्यदग्निबलवृद्धये ॥
अन्नपानौषधंसर्वंतत्सेव्यंनित्यमर्शसः ॥

अर्थ—अर्शरोगावर जें वायूला अनुलोमन करितें; व जें अग्नीला वाढवितें, असें अन्न, पान व औषधसेवन करावें.

स्नेहस्वेदादयोवातेपित्तेपुरेचनादयः ॥ कफेवांत्यादयोर्शस्सुमिश्रे मिश्राप्रतिक्रिया ॥ पित्तवद्रक्तजेकार्यःप्रतीकारोर्शसिध्रुवम् ॥

अर्थ—स्नेह व घाम हे वायूला व पित्ताला रेच होत; आणि कफाला वांति, तसेच मिश्र दोषांवर मिश्रप्रतीकार करावे; आणि रक्तजअर्शाला पित्तासारिखे उपचार करावे.

अर्शांसिभिन्नवर्चांसिवातातिसारवद्दिशेत् ॥
उदावर्तविधानेनगाढविट्कान्युपाचरेत् ॥

अर्थ—ज्या अर्शामध्यें रेच व शौच इत्यादि होतात, त्यावर वातातिसारासारखी; आणि गाढविट्क अर्शावर उदावर्तासारिखी औषधक्रिया करावी.

गुदजान्शोणितवहान्पित्तशोणितनाशनैः ॥
योगैरूपाचरेत्तत्तुविड्बंधेतुप्रशस्यते ॥

अर्थ—रक्त वाहणाऱ्या मुळव्याधीवर रक्तपित्तनाशक उपचार, आणि विड्बंध असेल तर विड्बंधावरील उपचार करावे.

## वातार्शनिदान.

कषायकटुतिक्तानिरूक्षशीतलघूनिच ॥ प्रमितात्पाशनंतीक्ष्णं मद्यंमैथुनसेवनं ॥ लंघनंदेशकालौचशीतौव्यायामकर्मच ॥ शोकोवातातपस्पर्शोहेतुर्वातार्शसांमतः ॥

अर्थ—तुरट, कडु, तिखट, रूक्ष, शीत, लघु, मोजकें व अति अल्प भोजन व तीक्ष्ण, मद्य, मैथुन, लंघन, थंडदेश व थंडकाल, अतिव्यायाम, शोक, वायु, निबर याचा स्पर्श इत्यादिक वातार्शाचे हेतु जाणावे.

## वातार्शलक्षण.

गुदांकुराबव्हनिलाःशुष्काश्चिमिचिमान्विताः ॥ म्लानाःश्यावारुणास्तब्धाविशदाःपुरुषाःखराः ॥ मिथोविसदृशावक्रास्तीक्ष्णाविस्फुटिताननाः ॥ बिंबीकर्कंधुखर्जूरकार्पासीफलसन्निभाः ॥ केचित्कदंबपुष्पाभाःकेचित्सिद्धार्थकोपमाः ॥ शिरःपार्श्वांसकटयूरुवंक्षणाभ्यधिकव्यथाः ॥ क्षवथूद्गारविष्टंभत्दृद्ग्रहारोचकप्रदाः ॥ कासश्वासाग्निवैषम्यकर्णनादभ्रमावहाः ॥ तैरार्तोग्रथितंस्तोकंसशब्दंसप्रवाहि

कं ॥ रुक्फेनपिच्छानुगतंविबद्धमुपवेश्यते ॥ कृष्णत्वङ्-नखविण्मूत्रनेत्रवक्त्रंचजायते ॥ गुल्मप्लीहोदराष्ठीलासंभवस्ततएवच ॥

अर्थ–वाताधिक गुदांतील मोड, अर्श, स्रावरहित, चिमचिम वेदनायुक्त, निर्जीव, श्याम व अरुणवर्ण, ताठर, बुळबुळीत नसणारे, कर्कश, खरखरीत, एकसारिखे नसणार, वाकडे, तिकडे, बारीक अग्राचे, कित्येकांचीं तोंडें भंगलेली व आकृतीनें तोंडली, बोर, खजूर, किंवा कापूस यांच्या फळासारखे व कितीएक कळंबाच्या फुलासारिखे व कांहीं शिरसासारिखे बारीक, असे असतात; त्यामुळें मस्तक, बरगडया, खांदे, कंबर, मांडया, व आडसंधि यांत ठणका लागतो; व शिंका, ढेकर, मलावरोध, हृदय ओढल्यासारिखी वेदना, अरुचि, हीं होतात. व खोकला, दमा, अन्नाचें केव्हां पचन होतें केव्हां होत नाहीं, कानामध्यें नाद व भ्रम हीं लक्षणें होतात. अशा अर्शांनीं पीडित मनुष्याला गांठ-ळ, थोडा सशब्द व ठणका, फेण, चिकटा यांणीं युक्त अल्प अल्प असा मळ होतो, व त्याची त्वचा, नखें, मळ, मूत्र, डोळे, आणि, तोंड कांहीं काळसर होतात; आणि गुल्म, प्लीहा, उदरें, अष्ठीला ह्मणून वातग्रंथि, यांची उत्पत्ति या अर्शापासूनच होत्ये.

## अर्कपत्रक्षार.

तरुणान्यर्कपत्राणिपंचैवलवणानिच ॥ युक्तानितैलेनाम्लेनदहेत्क्षारश्चयुक्तितः ॥ उष्णोदकेनमद्यैर्वापीतोवाताऽर्शसांहितः ॥

अर्थ–जून पिकलेलीं रुईचीं पानें व पंच लवणें हीं, तेल व आंबट यांचे बरोबर जाळून त्याचा क्षार युक्तीनें काढून ऊन पाण्याशीं किंवा मद्य यांशीं प्याला असतां, अर्शरोग्याला हितकारक आहे.

## विडंगादिचूर्णलेह.

विडंगंत्रिफलात्र्यूषंत्रिमिताचोपकर्णिका ॥ कंपिल्लंनलिनीचूर्णंतुल्यक्षौद्रंलिहेदनु ॥ गुडेनसितयावाथवातोत्थानर्शसान्जयेत् ॥

अर्थ–वावडिंग, त्रिफळा, त्र्यूषण, साकर, मूषकर्णिका, निशोत्तर, पवारी यांचें चूर्ण मधाशीं किंवा गूळ व साकर यांशीं घ्यावें; ह्मणजे वातोत्पन्न अर्श नाश पावतात.

## लवणादिमट्ठा.

लवणोत्तमवन्हिकलिंगयुतंबिडबिल्वमहापिचुमंदयुतं ॥ पीतंसप्तदिनंमथितंलुलितंयदिमर्दितुमिच्छसिवायुरुजं ॥

अर्थ–सैंधव, चित्रक, इंद्रजव, बिडलोण, बेलफळ व कडुनिंब यांचें चूर्ण घालून सात दिवस मट्ठा प्यावा; ह्मणजे वातसंबंधि अर्शपिडा नाश पावत्ये.

## मरीचादिचूर्ण.

मरीचंपिप्पलीकुष्ठंसैंधवंजीरनागरं ॥ वचाहिंगुविडंगानिपथ्यावन्ह्य जमोदकं ॥ एतेषांकारयेच्चूर्णंचूर्णस्यद्विगुणंगुडं ॥ खादेत्कर्षमितंचा पिपिबेदुष्णजलंततः ॥ सर्वाण्यर्शांसिनश्यंतिवातजानिविशेषतः ॥

अर्थ—मिरीं, पिंपळी, कोष्ठकोलिंजन, सैंधव, जिरें, सुंठ, वेखंड, हिंग, वावडिंग, हरीतकी, चित्रक व ओंवा यांचें चूर्ण करून चूर्णाच्या द्विगुण गुड घालावा; आणि तोळाभर खावें, व मागून ऊनपाणी प्यावें; ह्मणजे संपूर्ण अर्श नाश पावतात; व विशेषानें वातार्श नाश पावतात.

## सूरणमोदक.

शुष्कात्सूरणकंदतोयमिलितंव्योषंतथाचित्रकंश्रेष्ठाजीरकरामठंसमलवं दीप्याजमोदान्वितं ॥ सर्वस्यांघ्रिकसिंधुजंपरिभवेन्निंबूद्रवैर्वासरंसिद्धःसू रणमोदकोगदहरःश्रेष्ठोभवेत्प्राणिनां ॥ शूलंसंग्रहणीगदंत्वतिसृतिंदुष्टां प्रवाहींजयेद्दीप्ताग्निंकुरुतेबलंवितनुतेगुल्मप्रणाशंतथा ॥ अर्शांस्युद्धतमा रुतामयहरोबालेचवृद्धेहितोगर्भिण्यांचनशस्यतेननिपुणैर्नोरक्तपित्तेपिच ॥

अर्थ—जुन्या सुकलेल्या सुरणाचा रस घेऊन त्यांत मिरीं, पिंपळी, सुंठ, चित्रक, श्रेष्ठ जिरें, हिंग, ओंवा, अजमोदा हीं समभाग, व संपूर्णांचा चवथा हिस्सा सैंधव घालोन सुकवावें; नंतर लिंबाचे रसाचो भावना एक दिवस द्यावी; ह्मणजे हा सूरणमोदक सिद्ध झाला. हा प्राण्याचे व्याधिनाश करण्या विषयीं श्रेष्ठ व शूल, संग्रहणी, अतिसार, प्रवाहिका, गुल्म, अर्श व वायूचा प्रकोप यांचा नाश करितो; आणि अग्नि प्रदीप्त करितो; व बळ देतो. हा सूरणमोदक निपुण वैद्यानीं गर्भिणी, रक्तपित्ती यानां देऊं नये.

## बाहुशालगुड.

इंद्रवारुणिकामुस्तंशुंठीदंतीहरीतकी ॥ त्रिवृत्सटीविडंगानिगोक्षी रश्चित्रकस्तथा ॥ तेजोव्हाचद्विकर्षाणिपृथक्द्रव्याणिकारयेत् ॥ सूरण स्यपलान्यष्टौवृध्दादारुचतुष्पलं ॥ चतुःपलंस्यात्भल्लातःक्वाथयेत्सर्व मेकतः ॥ जलद्रोणेचतुर्थांशंगृण्हीयात्क्वाथमुत्तमं ॥ क्वाथद्रव्यात्त्रि गुणितंगुडंक्षिप्त्वापुनःपचेत् ॥ सम्यक्पक्वंचविज्ञात्वाचूर्णमेतत्प्रदाप येत् ॥ चित्रकस्त्रिवृतादंतीतेजोव्हापलिकापृथक् ॥ पृथक्त्रिपलिकाः कार्याव्योषैलामरिचत्वचः ॥ निक्षिपेन्मधुशीतेचतस्मिन्प्रस्थप्रमाणि

तं ॥ एवंसिध्दोभवेत्श्रीमान्बाहुशालगुडःशुभः ॥ जयेदर्शांसिसर्वाणिगुल्मंवातोदरंतथा ॥ आमवातंप्रतिश्यायंग्रहणीक्षयपीनसान् ॥ हलीमकंपांडुरोगंप्रमेहंचरसायनं ॥

**अर्थ**—कडुवृंदावन, नागरमोथे, सुंठ, दांतीमूळ, बाळहर्तकी, निशोत्तर, कचोरा, बावडिंग, गोखरू, चित्रक, तेजबळ, ही अकरा औषधें दोन कर्ष घ्यावीं. व सूरण आठ पळें व वरधारा चार पळें व बिबवे चार पळें घ्यावे. मग हीं सारीं औषधें कुटून त्यांत दोन द्रोण प्रमाण पाणी घालोन चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून मान्या औषधांचे तिप्पट गूळ घालोन फिरून कढवून पाक करावा. त्यांत चूर्ण टाकावयाचे तें येणेंप्रमाणें. चित्रक, निशोत्तर, दांतीमूळ, तेजबळ, हीं पांच औषधें एक एक पळ प्रमाण घ्यावीं. मग सान्या मूळव्याधि दूर होतात. गुल्म, वातोदर, वायूनें अंग जखडून राहातें तें व पडसें, संग्रहणी, पीनस, हलीमक, पांडुरोग, परमा हे रोग दूर होतात. व हा बाहुशालगुड रसायन आहे, असें जाणावें.

## पित्तार्शहेतु.

कट्वम्ललवणोष्णानिव्यायामाग्न्यातपश्रमाः ॥ देशकालावशिशिरौक्रोधोमद्यमसूयनं ॥ विदाहितीक्ष्णमुष्णंचसर्वंपानान्नभोजनं ॥ पित्तोल्बणानांविज्ञेयःप्रकोपेहेतुरर्शसां ॥

**अर्थ**—तिखट, आंबट, खारट व ऊष्ण इत्यादिकांचें सेवन, व्यायाम, अग्नि व ऊन याचें सेवन, आणि ऊष्णदेश, उष्णकाळ, क्रोध, मद्य, दुसऱ्याच्या उत्कर्षाचें असहन, व विदाहि, तीक्ष्ण, उष्ण असें पान व अन्न इत्यादिक पित्तार्शाचे हेतु जाणावे.

## पित्तार्शलक्षण.

पित्तोत्तरानीलमुखारक्तपीतासितप्रभाः ॥ तन्वस्रस्राविणोविस्रास्तनवोमृदवःश्लथाः ॥ शुकजिह्वायकृत्खंडजलौकावक्त्रसन्निभाः ॥ दाहपाकज्वरस्वेदतृण्मूर्छारुचिमोहदाः ॥ सोष्माणोद्रवनीलोष्णपीतरक्तामवर्चसः ॥ यवमध्याहरित्पीतहारिद्रत्वङ्नखादयः ॥

**अर्थ**—पित्ताधिक मुळव्याधीचे मोड निळया अग्राचे, त्याचा रंग तांबडा, पिवळा, अथवा काळा असतो. त्यांतून पातळ रक्ताचा स्राव होतो, व त्यांना आंबूस घाण येते, ते बारिक, कोमल व शिथिल असतात; व त्यांचा आकार पोपटाची जीभ, काळीज, व जळवांची तोंडें यासारिखे असतात. त्यांणीं दाह, गुदपाक, ज्वर, घाम, ताहान, मूर्छा, अरुचि व मोह हीं होतात. व त्यांचा स्पर्श ऊष्ण असतो. त्यामुळें पातळ, नीळ, वर्ण, उष्ण, पीत, किंवा रक्तवर्ण, आमयुक्त असा मळ होतो. व ते अंकुर जवांसारिखे

मध्ये मोठे असतात; आणि त्या रोग्याची त्वचा, नखें व नेत्र इत्यादि हिरवे, पिवळे, किंवा हळदिवे होतात.

## तिलादिचूर्ण.

चूर्णंतिलानांसितयासमेतंहैमान्नबीजंगजकेसरंच ॥
लिहेन्नरोयोनहितस्यदुष्टान्यर्शांसिपित्तप्रभवाणिजातु ॥

अर्थ—तिळांचे चूर्ण, लाल रातांळूबीज व नागकेशर यांचे चूर्ण साकरेशी द्यावें; ह्मणजे त्याला पित्तार्श कधींही होणार नाहीत.

## तिलादि व कुटजादि काढे.

तिलभल्लातकक्काथमनुपित्वार्तिनासुखी ॥ सक्षौद्रःकुटजःक्काथोनित्यं
रात्रौचपाययेत् ॥ पथ्यंमुद्गरसैर्देयंशालितंडुलसंयुतं ॥

अर्थ—तिळ व बिबवे यांचा काढा किंवा इंद्रजवांचा काढा मध घालोन द्यावा; आणि पथ्याला मुगांचें काट, आणि भात द्यावा; ह्मणजे पित्तार्श नाश पावतात.

## भल्लातामृत.

गुडूचीलांगलीशृंगीमुंडीगुंजाचकेतकी ॥ पण्णांपत्ररसैर्मर्द्यंबा
लभल्लातबीजकं ॥ दिनैकंमर्दयेद्गाढंनिष्कार्धंभक्षयेत्सदा ॥
भल्लातामृतयोगोयंसर्वाशार्न्पित्तजान्जयेत् ॥

अर्थ—गुळवेल, कळलावी, कांकडाशिंगी, मुंडी, गुंज व केतकी या साहा वनस्पतींच्या रसांत कोवळीं बिब्याचीं फळें एकदिवस खूब घोंटावीं. त्यांतून चार मासे रोज भक्षण करावीं. हा भल्लातामृतयोग संपूर्ण पित्तज अर्शांचा नाश करितो.

## धत्तूरादिचूर्ण.

धत्तूरस्यफलंपक्कंपिप्पलीनागराभया ॥ बालकंगुडसंयुक्तंभक्ष्यं
गुंजाष्टकंनिशि ॥ सितामध्वाज्यकर्षैकंपिबेत्पित्तार्शसांजये ॥

अर्थ—धोतऱ्याचें पिकलेलें फळ, पिंपळी, सुंठ, हरीतकी व वाळा यांचें चूर्ण रात्रीं आठ गुंजा तोळाभर तूप, साकर व मध यांत घ्यावें; ह्मणजे पित्तार्श शांत होतो.

## भल्लातकादिमोदक.

भल्लातकंतिलंपथ्याचूर्णंगुडसमन्वितं ॥
मोदकोभक्षयेत्कर्षंमासात्पित्तार्शसांजये ॥

अर्थ—बिबवे, तिळ व हरीतकी यांचें चूर्णाची गुळाशीं एक तोळा गोळी करून दररोज एक महिना घ्यावी; ह्मणजे पित्तार्श शांत होतात.

## बोलबद्ध रस.

गुडूचिकासत्वसमंरसेंद्रंगंधंसमांशंनिखिलेनबर्बरः ॥ विमर्द्दयेच्छा
ल्मलिकाभवाद्भिःस्याद्बोलबद्धोमधुयुक्त्रिमापः ॥ रक्तार्शसांनाशकृ
देपसूतःपित्तार्शसांपित्तजविद्रधेश्च ॥ रक्तप्रमेहस्यखुडस्यचापिस्त्री
णांप्रवाहस्यभगंदरस्य ॥

अर्थ–गुडुचीसत्व, पारा व गंधक हीं समान व तिप्पट रक्तबोळ हीं एकत्र करून त्यांचा सांवरीच्या साळीच्या रसांत खल करावा. हा बोलबद्ध रस तीन मासे प्रमाण मधाशीं सेविला असतां, रक्तार्श, पित्तार्श, पित्तविद्रधि, रक्तप्रमेह, रक्तपित्त, आणि स्त्रियांचें रक्तप्रदर व भगंदर यांचा नाश करितो.

## लोहादिमोदक.

मृतलोहमिंद्रयवंशुंठभिल्लातचित्रकं ॥ बिल्वमज्जाविडंगानिपथ्या
तुल्यंविचूर्णयेत् ॥ सर्वतुल्योगुडोयोज्यःकर्षंभुक्त्वार्शसांजये ॥

अर्थ–लोहभस्म, इंद्रजव, सुंठ, बिब्बे, चित्रक, बेलफळाचा मगज, वावडिंग व बाळहर्डी हीं समान चूर्णें एकत्र करून सर्वचूर्णांबरोबर गूळ घालावा. त्यांतून दाहा मासे अर्शरोग जाण्याकरितां भक्षण करावें.

## तीक्ष्णमुख रस.

मृतसूताभ्रलोहार्कतीक्ष्णंमुंडंचगंधकं ॥ मंडूरंचसमंताप्यंमर्द्यंकन्याद्र
वैर्दिनं ॥ अंधमूषागतंपाच्यंत्रिदिनंतुषवन्हिना ॥ चूर्णितंसितया
माषंखादेत्पित्तार्शसांजये ॥ रसस्तीक्ष्णमुखोनामह्यनुयोज्यंमधुत्रयं ॥

अर्थ–पारदभस्म, अभ्रकभस्म, लोहभस्म, ताम्र, कांत, मुंडलोह, गंधक, मंडूर, आणि ताप्य या सर्वांचीं समभाग भस्में घेऊन एकदिवस कोरफडाच्या रसांत खलून नंतर मुसेंत घालून तीन दिवस तुषाग्नि द्यावा. शीत झाल्यावर त्यांतून एक मासाभार साकरेशीं द्यावा. हा तीक्ष्णमुख रस घेतल्यावर मागून मधुत्रय प्राशन करावें; ह्मणजे पित्तार्श शांत होतात.

## कफार्शनिदान.

मधुरस्निग्धशीतानिलवणाम्लगुरूणिच ॥ अव्यायामादिवा
स्वप्नशय्यासनसुखेरतिः ॥ प्राग्वातसेवाशीतौचदेशकालाव
चिंतनं ॥ श्लेष्मिकाणांसमुद्दिष्टमेतत्कारणमर्शसां ॥

**अर्थ**—मधुर, स्निग्ध, शीतळ, लवण, आंबट व गुरु इत्यादिकांचें सेवन, व्यायाम न करणें, दिवा निद्रा, शय्या आणि आसन यांचा ठायीं सुखेंकरून बसणें, व पूर्वेकडील वायूचें सेवन, शीतळ देश व काळ, कांहीं चिंतन करीत उगीच आळशासारखें बसणें इत्यादिक कफार्शाचीं कारणें जाणावीं.

## कफजअर्शाचें लक्षण.

श्लेष्मोल्बणामहामूलाघनामंदरुजःसिताः ॥ उत्सन्नोपचिताःस्निग्धा स्तब्धावृत्तगुरुस्थिराः ॥ पिच्छिलास्तिमिताःश्लक्ष्णाःकंड्वाढयाःस्पर्श नप्रियाः ॥ वंक्षणानाहिनःपायुबस्तिनाभिविकर्षिणः ॥ सश्वासकास त्दृल्लासप्रसेकारुचिपीनसाः ॥ मेहकृच्छ्रशिरोजाड्यशिशिरज्वरका रिणः ॥ क्लैब्याग्निमार्दवच्छर्दिरामप्रायविकारदाः ॥ वसाभसकफ प्राज्यपुरीषाःसप्रवाहिकाः ॥ नस्त्रवंतिनभिद्यंतेपांडुस्निग्धत्वगादयः ॥

**अर्थ**—कफात्मक अर्शाचे मोड खोल धातूंप्रत जाणारे, कठीण, मंदपीडाकरणारे, पांढरे, लांब लांब, तुळतुळीत, ताठर, वाटोळे, गुदाला जडवाटणारे, स्थिर, बुळबुळीत, ओलसर, मण्याप्रमाणें गुळगुळीत, कंडूकरणार, स्पर्शानें सुख वाटणारे, नेंपी व फणस, यांच्या आंठीसारिखे व गाईच्या आंचळा सारिखे, आडसंधीला जखडणारे, गुद, बस्ति, आणि नाभि यानां ओढल्या सारिखे, दमा, खोकला, मळमळ, लालास्राव अरुचि, आणि पडसें, तसेंच मेह, मूत्रकृच्छ्र, मस्तकाला जडता, शीतज्वर व नपुंसकत्व,, अग्निमांद्य, वांति, आणि आमबहल रोग ( आमातिसारादिक ) यानां करणारे, आणि चर्बी व कफ यांणी मिश्रीत असा पुष्कळ मळ पाडणारे, प्रवाहिका उत्पन्न करणारे व त्यांपासून क्लेद व रक्तादिक कांहीं स्रवत नाहीं; आणि ते बळकट पिळले असतां, ही फुटत नाहींत. त्यांच्या योगानें त्वचा, नखें, नेत्र आदिकरून पांढरे व तुळतुळीत होतात.

## कफार्शचिकित्सा.

श्लेष्मार्शसोगुदेपार्श्वेरक्तमोक्षोजलूकया ॥
कृत्वाचार्करसैर्लेपंदाहंवात्रापिशस्यते ॥

**अर्थ**—श्लेष्मार्शावर, गुदाचे व पार्श्वभागाचें जळवानीं रक्त काढावें; आणि रुई च्या रसांत औषधांचा लेप करावा, अथवा डाग ही द्यावा तो प्रशस्त आहे.

## सामान्यचिकित्सा.

सुरणंकासमर्दंचशिग्रुवार्ताकवालुकं ॥ सुपक्वंयोजयेच्छाकंपथ्यंगोधू मतंडुलं ॥ कुसुंभमृदुपत्राणिआरनालेनपेचयेत् ॥ भक्षयेच्छाकवच्छा

त्यैस्वयमग्निरसस्तथा ॥ निष्कत्रयंत्रयंनित्यंगुंजंवानंदभैरवं ॥ काकतुंडीद्रवापूरदेवदाल्याश्वबीजकं ॥ सगुडंगुदलेपेनशूलरोगहरंपरं ॥

अर्थ–सुरण, कारिंवदा, शेवगा, वांगे व वाळुक यांची शाक शिजऊन खावी. पथ्याला गहूं व तंदुळ खावे, व कुमुव्याची मृदु पानें कांजींत वाटून शाकेसारिखीं भक्षावीं; आणि स्वयमग्निरस चार मासे किंवा एक गुंज आनंदभैरव द्यावा; आणि कावळीच्या रसांत देवडांगरीचें बीज व गूळ वाटून त्याणें गुदाला लेप करावा; ह्मणजे टणका शांत होतो

## अर्शभेद ललित.

गुदद्वारात्पृष्ठदेशेजायंतेपांडुरांकुराः ॥ ललितास्तेविशुष्यंतेशूलरोगस्यलक्षणं ॥ श्लेष्मार्शसामयंभेदोहन्याल्लेपरसायनैः ॥

अर्थ–गुदद्वाराच्या मागें पांढरे अर्शासारिखे अंकुर येतात, त्यांला ललित ह्मणतात. हे सुकले असतां, शूल रोग होतो. हा भेद श्लेष्मार्शालाच आहे. ह्या लेपानीं, किंवा रसायनानीं शांत करावा.

## देवदाल्यादिलेप.

देवदाल्याश्वबीजानिसैंधवेनसुचूर्णितं ॥
आरनालेनलेपोयंशूलरोगनिवृत्तये ॥

अर्थ–देवडांगरीचें बीज व सैंधव यांचें चूर्ण कांजींत वाटून लेप केला असतां, शूलरोग जातो.

## कांचनीलेप.

कांचनीकुसुमंचूर्णंशस्त्रचूर्णमनःशिला ॥ गजपिप्पलिसंतोयैर्लेपोह्यर्शोनिपातकः ॥ पूर्ववन्निःक्षिपेद्गुह्येलिप्त्वानागस्यालिंकं ॥ घृतसैंधवसंयुक्तंकटुविड्बंधनाशनं ॥

अर्थ–हळद व लवंग, यांचें चूर्ण लोह, मनशीळ व गजपिंपळी हीं एकत्र पाण्यांत वाटून लेप करावा; ह्मणजे तो अर्शाला पाडितो; किंवा पूर्वी सांगितल्या प्रमाणें गुदामध्यें शिशाच्या नळीनें घृत व सैंधवयुक्त असा कटुपदार्थांचा काढा सोडावा; ह्मणजे विट्बंध नाश पावतो.

## सूरणादिलेप.

सूरणंरजनीवन्हिटंकणंगुडमिश्रितं ॥
पिष्टारनालकैर्लेपोहंत्यर्शांसिमहांत्यपि ॥

अर्थ–सुरण, हळद, चित्रक, टांकणखार व गूळ हे एकत्र वाटून कांजीनें गुदाला लेप करावा; ह्मणजे अर्शांचे मोठे ही मोड नाश पावतात.

## कटुतुंबीलेप.

आरनालेनसंपिष्टासजीवकटुतुंबिका ॥
सगुडाहंतिलेपेनअर्शांसिमूलतोध्रुवं ॥

अर्थ—ओली कडु भोंपळी कांजींत वाटून त्यांत गूळ घालून गुदाला लेप द्यावा; ह्मणजे मुळव्याध मुळापासून गळून पडत्ये.

## पीलुतैलवर्ति.

पीलुतैलेनसंलिप्तावर्तिकागुदमध्यगा ॥
पातयत्यर्शसांसिद्धंनवलीवेदनात्क्वचित् ॥

अर्थ—कांकडा करून तो अक्रोडाच्या तेलांत बुडवून गुदांत घालून ठेवावा; ह्मणजे अर्शकंद पाडील. कधींहीं वलीला वेदना होणार नाहींत.

## दंत्यासव.

दशमूलाग्निदंतीनांप्रत्येकंचपलपलं ॥ जलद्रोणेततःक्वाथ्यंपादशेषंसमुद्धरेत् ॥ गुडैलातुपलैकंतुशीतभूतंविमिश्रयेत् ॥ घृतभांडेस्थितंपक्षंयथाशक्तिपिबेत्ततः ॥ अयंदंत्यासवःख्यातःशमनेचार्शसांकिल ॥ ग्रहणींपांडुरोगंचसर्वव्याधिहरंपरं ॥

अर्थ—दशमुळें, चित्रक व दांती यांचीं मुळें चार चार तोळे घेऊन त्यांचा २०४८ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा. थंड झाल्यावर त्यांत गूळ व एलची हे चार चार तोळे घालून तुपाच्या भांड्यांत पंधरा दिवस ठेवावा. हा दंत्यासव शक्ति पाहून द्यावा; ह्मणजे अर्शरोग, संग्रहणी, पांडुरोग; आणि सर्व व्याधि यांचा नाश करितो.

## पथ्यादिगुड.

द्वात्रिंशत्पलपथ्यानांतदर्धामलकीफलं ॥ कपित्थंस्याद्दशपलंविशालापलपंचकं ॥ विडंगंपिप्पलीलोध्रंमरिचंसैंधवालुकं ॥ द्विपलांशंतुप्रत्येकंजलंद्रोणचतुष्टयं ॥ क्वाथंपादावशेषंतुशीतिभूतंक्षिपेद्गुडं ॥ पलानांद्विशतंचैवधातुकीपलपंचकं ॥ घृतभांडेस्थितेतस्मिन्यथाशक्तिपिबेत्ततः ॥ अर्शांसिग्रहणीपांडुहृद्रोगप्लीहगुल्मनुत् ॥ मंदाग्निंचोदरंशोथंकुष्ठघ्नंपरमौषधं ॥

अर्थ—हरीतकी १२८ तोळे, आवळकाठी ६४ कवठ ४० इंद्रावण २० आणि वावडिंग, पिंपळी, लोध्र, मिरीं, सैंधव, अळूचें फळ, हीं प्रत्येक ८ तोळे याप्रमाणें

घेऊन २०४८ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा. निवाल्यावर त्यांत ८०० तोळे गूळ व धायटीचें फूल २० तोळे घालोन ठेवावा. हा यथाशक्ति प्राशन करावा; ह्मणजे मुळव्याध, संग्रहणी, पांडुरोग, हृद्रोग, प्लीहा, गुल्म, मंदाग्नि, उदर, सूज व कुष्ठें यांचा नाश करितो.

## भल्लातकहरीतकी.

भल्लातकहरीतक्यौपाठाकटुकरोहिणी ॥ यवानीजाजिकुष्ठंचचित्रकोतिविषावचा ॥ कचोरंपौष्करंमूलंहिंगुइंद्रयवंतथा ॥ शुंठीसौवर्चलंतुल्यंगवांमूत्रेणपेषयेत् ॥ छायाशुष्काचवटिकामाषमात्रंचभक्षयेत् ॥ पिबेदुष्णोदकंपश्चात्कफोत्थानार्शसांजये ॥

अर्थ—बिबवे, बाळहर्डी, पाडळ, कुटकी, ओंवा, जिरें, कोष्ठ, चित्रक, अतिविष, वेखंड, कचोरा, पुष्करमूळ, हिंग, इंद्रजव, सुंठ व संचळ हीं सर्व समभाग घेऊन गौईच्या मुतांत वाटावीं; आणि छायेमध्यें सुकवून एक माशाची गोळी भक्षण करावी; आणि मागून ऊन पाणी प्यावें; ह्मणजे कफार्श नाश पावतात.

## लांगल्यादिमोदक.

लांगलींद्रयवाकृष्णावन्ह्यपामार्गतंडुलाः ॥ भूनिंबसैंधवंतुल्यं सर्वस्यद्विगुणंगुडं ॥ भक्षयेत्कर्षमात्रंतुश्लेष्मोद्भूतार्शसांजये ॥

अर्थ—कळलावी, इंद्रजव, पिंपळी, चित्रकमूळ, आघाड्याचे तांदूळ, किराइत व सैंधव हीं सर्व समभाग घेऊन सर्वचूर्णाच्या दुप्पट गुळ घालावा; आणि यांतून दाहा मासे घ्यावा. हा लांगल्यादिमोदक श्लेष्मार्शांचा नाश करितो.

## पथ्यादिमोदक.

पथ्याशुंठीकणावन्हिप्रत्येकंचूर्णयेत्पलं ॥ त्वगेलापत्रकंचाथ प्रत्येकंकर्षमात्रकं ॥ गुडंदशपलंयोज्यंकर्षंभुक्त्वार्शसांजये ॥

अर्थ—हरीतकी, सुंठ, पिंपळी व चित्रक या प्रत्येकाचें चार तोळे चूर्ण व दालचिनी, एलची व तमालपत्र हां प्रत्येक एक तोळा व गूळ ४० तोळे हीं सर्व एकत्र करून त्यांची १० माशाची गोळी घ्यावी. ही अर्शांचा नाश करित्ये.

## यवान्यादिमोदक.

यवान्यक्षभयाजाजीपिप्पलींचूर्णयेत्समं ॥ चूर्णाद्गुडंद्विधायोज्यंकर्षंभुक्त्वार्शसांजये ॥

अर्थ—ओंवा, बेहडे, हरीतकी, जिरें आणि पिंपळी यांची समभाग चूर्णें घेऊन एकत्र

करावी. व सर्वचूर्णाचा दुप्पट गूळ घालोन त्यांतून दाहा मासे द्यावा; ह्मणजे अर्शाचा नाश करितो.

## भल्लातकादिलेप.

भल्लातकगजास्थीनिदंतीनिंबकपोतविट् ॥
गुडसौराष्ट्र्यमृतजैर्लेपःश्लेष्मार्शसांजये ॥

अर्थ—बिबवे, हत्तीचीं हाडें व दांती, निंब, कवडयाची विष्ठा, गूळ, तुरटी, आणि बचनाग यांचा लेप कफार्शनाशक आहे.

## शृंगवेरक्काथ.

कफजेशृंगवेरस्यक्काथोनित्योपयौगिकः ॥

अर्थ—कफजअर्शावर आल्याचा काढा रोज उपयोगाचा आहे.

## रक्तार्शनिदान.

रक्तोल्बणागुदेकीलापित्ताकृतिसमन्विताः ॥ वटप्ररोहसदृशागुंजाविद्रुमसन्निभाः ॥ तेत्यर्थंदुष्टमुष्णंचगाढविट्कप्रपीडिताः ॥ स्रवंतिसहसारक्तंतस्यचातिप्रवृत्तिनः ॥ भेकाभःपीड्यतेदुःखैःशोणितक्षयसंभवैः ॥ हीनवर्णबलोत्साहोहतौजःकलुषेंद्रियः ॥ विट्श्यावंकठिनंरूक्षमधोवायुर्नगच्छति ॥

अर्थ—रक्तविकारेंकरून खिळ्यासारिखे मांसांकुर गुदाचे ठायीं उत्पन्न होतात. त्याची सर्व लक्षणें पित्तार्शाच्या लक्षणांसारिखीं होतात, व ते आकृतीनें वडाचे पारंब्यासारिखे व वर्णानें गुंज व पोंवळ्यासारिखे असतात; आणि अत्यंत दुष्ट, उष्ण व खडयासारिखा कठीण अशा मळानें फार पीडा पावतात, व या अर्शाचे ठायीं रक्ताची वृद्धि फार होत्ये. तेणें करून ते अंकुर अकस्मात रक्त स्रवों लागतात, व तो रोगी रुधिरक्षयजन्यदुःखानें पीडित होऊन बेडकासारिखा पिंवळट वर्ण व निस्तेज होतो; आणि वर्ण, बळ, उत्साह व तेज यांणीं हीन. इंद्रियांना ग्लानि व कृष्णवर्ण, कठीण व रुक्ष असा मळ, अपानवायूचा प्रतिबंध हीं लक्षणें होतात.

## वातादियुक्तरक्तार्शलक्षण.

तनुचारुणवर्णंचफेनिलंचासृगर्शसां ॥ कट्यूरुगुदशूलंचदौर्बल्यंयदिचाधिकं ॥ तत्रानुबंधोवातस्यहेतुर्यदिचरूक्षणं ॥ शिथिलश्वेतपित्तंचविट्स्निग्धंगुरुशीतलं॥ यद्यर्शसांघनंचासृक्तंतुमत्पांडुपिच्छलं॥ गुदंसपिच्छंस्तिमितंगुरुस्निग्धंचकारणं॥ श्लेष्मानुबंधोविज्ञेयस्तत्ररक्तार्शसांबुधैः ॥

अर्थ–जा अर्शाचें रुधिर पातळ, फेनयुक्त आणि फार आरक्तवर्ण असें असतें; व कटी, गुद व मांड्या यांस शूल असतो; व फार दौर्बल्य येतें, व ज्याचा हेतु रूक्ष असतो. त्या रक्तार्शाचे ठायीं वातसंबंध जाणावा. व जा अर्शाचेठायीं मळ शिथिल, श्वेत, पीतवर्ण व गुरु असून थंड असा असतो; आणि अर्शसंबंधि रुधिर दाट असून तंतुयुक्त, पांडुवर्ण व बुळबुळीत असतें, व गुद ही बुळबुळीत व स्तिमित असतें; आणि ज्याचा हेतु गुरु किंवा स्निग्ध असतो, त्या रक्तार्शांचे ठायीं कफसंबंध जाणावा.

## सामान्यचिकित्सा.

स्वयमग्निरसोप्यत्रभक्षयेदर्शसांजये ॥
सितामध्वाज्यकर्षैकमनुपानंपिबेत्सदा ॥

अर्थ–रक्तार्शावर स्वयमग्निरस द्यावा; आणि मागून साकर, तूप व मध मिळून एक तोळा प्राशनार्थ द्यावें; म्हणजे अर्शनाश होतो.

## अश्वगंधादिधूप.

अश्वगंधोथनिर्गुंडीबृहतीपिप्पलीफलं ॥
धूपोयंस्पर्शमात्रेणह्यर्शसांशमनेह्यलं ॥

अर्थ–अश्वगंध, निर्गुंडी, रिंगणी व पिंपळी यांची धुरी अर्शाला लागतांच बरे होतात.

## अर्कमूलादिधूप.

अर्कमूलंशमीपत्रंनृकेशाःसर्पकंचुकी ॥
मार्जारचर्मचाज्यंचगुदधूपोर्शसांहितः ॥

अर्थ–रुयीचीं मुळें, शमीचीं पानें, मनुष्याचे केश, सर्पाची मेंग, मांजराचें चामडें, आणि तूप या सर्वांचा धूप गुदाला दिला असतां, हितकारक आहे.

## पिपीलिकातैल.

पिपीलीमदनंबिल्वंवचायष्टिकचूरकं ॥ शताव्हापुष्करंकुष्ठंचित्रकं देवदारुकं ॥ तुल्यांशंकारयेत्कल्कंकल्कात्तैलंचतुर्गुणं ॥ तैलात्क्षीरंद्विधायोज्यंपचेत्तैलावशेषकं ॥ अर्शसांवातयुक्तानांतत्श्रेष्ठमनुवासनं ॥ पिपील्यादिमिदंख्यातंलेपनेमर्दनेहितं ॥

अर्थ–मुंग्या, गेळफळ, बेलफळ, वेखंड, ज्येष्ठमध, कचोरा, शतावरी, पुष्करमूळ, कोष्ठ, चित्रकमूळ व देवदार हीं सर्व समभाग घेऊन त्यांचा कल्क करावा; आणि कल्कापेक्षां तेल चौपट आणि तैलाच्या दुप्पट दूध हीं सर्व एकत्र करून तेल शेष राहीतों कढवावें. तें वातार्शाला अनुवासनाविषयीं चांगलें आहे.

## विषमुष्टिचूर्ण.

विषमुष्टिभवंबीजंषड्वासप्ताष्टवापिच ॥ चूर्णंतंससितंभक्ष्यंरक्तार्शो विनिवारणं ॥ महाप्रमेहशमनंत्वग्दोषक्रमिनाशनं ॥

अर्थ–कुचल्याच्या साहा, सात, किंवा आठ बियांचें चूर्ण करून बलाबल पाहून थोड. थोडें साकरेतून द्यावें. तें रक्तार्श, महामेह, त्वग्दोष, आणि क्रमि यांचा नाश करितें.

## नवनीतादियोग.

नवनीततिलाभ्यासात्केसरनवनीतशर्कराभ्यासात् ॥
दधिरसमथिताभ्यासाद्गुदजाःशाम्यंतिरक्तवाहाश्च ॥

अर्थ–लोणी, तीळ किंवा नागकेशर, लोणी, साकर अथवा दह्याची निवळी, मठ्ठा यांचे निरंतर सेवन केलें असतां, रक्तवाहणाऱ्या मुळव्याधीला शमवितात.

## भल्लातकामृत.

भल्लातकचतुःषष्टिपलंदुग्धंचतत्समं ॥ दुग्धाच्चतुर्गुणंवारिपाच्यंदुग्धावशेषकं ॥ दुग्धतुल्यंघृतंयोज्यंघृतपादंसितांक्षिपेत् ॥ मधुधात्रीसितातुल्यंसिताधर्मभयारजः ॥ मृतलोहंगुडूचाचप्रत्येकमभयार्धकं ॥ क्षिपेत्स्निग्धघटेसर्वं धान्यराशौनिवेशयेत् ॥ सप्ताहादुद्धृतंतत्तुखादेन्निष्कत्रयंत्रयं ॥ भल्लातकामृतंनाममहंतिरक्तार्शसांकिल ॥ क्षारतीक्ष्णंनभोक्तव्यंतैलाभ्यंगंचवर्जयेत् ॥

अर्थ–बिब्बे २५६ तोळे व तितकेंच दूध, व दुधापेक्षां चौपट पाणी, आणि दुधा इतकें तूप घालून दूध शेष राही तों पचन करावें; आणि तुपाच्या चतुर्थांश साकर, मध, आवळकाठी व साकरेच्या निमें हरीतकीचे चूर्ण, हरीतकीच्या निमें लोहभस्म व गुळवेलीचें सत्व घालून तुपानें राबलेल्या भांड्यांत भरून धान्यराशीमध्यें सातदिवस ठेऊन नंतर काढून त्यांतून एक तोळा द्यावें; हें भल्लातकामृतनामक औषध रक्तार्शाचा नाश करितें, यावर खारट व तिखट खाऊं नये; व तैलाभ्यंग ही करूं नये.

## सित्थरस.

द्वात्रिंशत्पलकंचाज्यंछागदुग्धंतथादधि ॥ छागमांसरसश्चैवदाडिमस्य फलद्रवं ॥ प्रत्येकंघृततुल्यांशंभांडेचूर्णमिदंक्षिपेत् ॥ आम्राडंत्र्यूषणंमुस्तंमज्जाबिल्वकपित्थयोः ॥ तिंतिणीधातुकीपुष्पंरक्तचंदनचंदनं ॥ उशीरंवालकंलोध्रंप्रियंगुंपद्मकेसरं ॥ मंजिष्ठाबदरीचव्यंत्वगेलापद्मकंवला ॥ यष्टिमोचरसंचैवउत्पलंप्रतिकर्षकं ॥ सर्वमेकीकृतंपाच्यंग्रा

ह्यमाज्यावशेषकं ॥ योजयेदर्शसांहंतृग्रहणीकृच्छ्रपांडुषु ॥ ज्वरंस्रावम तीसारंकटिशूलंचनाशयेत् ॥ इदंसिद्धघृतंनामरक्तपित्तार्शसांहितं ॥

अर्थ–१२८ तोळे तूप व शेळीचें दूध, दहीं, बोकडाचे मांसाचा रस व डाळिंबाचा रस हीं सर्व तुपाबरोबर; आंबाडे, सुंठ, मिरीं, पिंपळी, नागरमोथे, बेलफळाचा मगज, कवटाचा मगज, चिंच, धायटीपुष्प, रक्तचंदन, चंदन, वाळा, काळावाळा, लोध्र, राळे, पद्मकेशर, मंजिष्ठ, बोरें, चवक, दालचिनी, एला, पद्मकाष्ठ, चिकणा, ज्येष्ठमध, सांवरीचा डिंक व कोष्ठ हीं प्रत्येक तोळा तोळा घेऊन एकत्र करून तूप शेष राही तोंपर्यंत पचन करावें. तें तूप मूळव्याध, संग्रहणी, मूत्रकृच्छ्र, पांडुरोग, ज्वर, कटिशूल, आणि पित्तार्श यांचा नाश करितें. याला सिद्धघृत असे नाव आहे.

## शिवरस.

सूतवैक्रांतशुल्बाभ्रंकांतभस्मसगंधकं ॥ तुल्यांशंमर्दयेच्चादाडिमोत्थैरसैस्तथा ॥ भक्षयेन्मापमेकंतुहंत्यर्शांसिशिवोरसः ॥

अर्थ–पारा, वैक्रांतमणी, तांबें, अभ्रक व कांत यांचीं भस्में व गंधक हीं सर्व समभाग घेऊन डाळिंबाच्या रसांत त्यांचा खल करावा. यांतून एक मासा द्यावा; ह्मणजे हा शिवरस अर्शरोगचा नाश करितो.

## अपामार्गबीजादिचूर्ण.

अपामार्गस्यबीजानिवन्हिशुंठीहरीतकी ॥ मुस्ताभूनिंबतुल्यांशं सर्वतुल्यंगुडंभवेत् ॥ कर्षैकंभक्षयेच्चानुजीर्णेतक्रभोजनं ॥

अर्थ–आघाड्याचें बीं, चित्रक, सुंठ, हरीतकी, नागरमोथे व किराइत हीं सर्व समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करावें; व सर्व चूर्णाच्या समान गूळ घालावा; आणि त्यांतून एक तोळा द्यावें. हें औषध जिरल्यावर ताकभात पथ्याला द्यावा.

## लोहामृतरस.

संग्राह्यमृतलोहस्यपलान्यष्टादशानिच ॥ त्रिकटुत्रिफलादार्वीवन्हि मुस्तादुरालभा ॥ किराततिक्तकोनिंबपटोलकटुकामृता ॥ देवदारु विडंगानिपर्पटंप्रतिकर्षकं ॥ मध्वाज्याभ्यांलिहेत्कर्षमर्शांसिग्रहणीं जयेत् ॥ वातपित्तकफंरक्तंनाशयेद्रोगसंचयं ॥ ख्यातोलोहामृतोनामदेहदार्ढ्यकरःपरः ॥

अर्थ–लोहभस्म ७२ तोळे, व त्रिकटु, त्रिफला, दारुहळद, चित्रक, नागरमोथे, धमासा, किराइत, कडुनिंब, कडुपडवळ, कुटकी, गुळवेल, देवदार, वावडिंग व पित्तपापडा

हीं प्रत्येक तोळा तोळा घेऊन सर्व चूर्णें व लोह एकत्र करून त्यांतून एक तोळा मध व तूप यांशीं द्यावा; ह्मणजे अर्शरोग, संग्रहणी, वात, पित्त, कफ, रक्त, आणि अनेक रोग यांचा नाश करितो; व हा लोहामृतनामक रस, देहाला दृढ करण्याविषयीं उत्तम आहे.

## बिंबीपत्रादिलेप.

बिंबाश्वायरजैःपत्रैर्हितंलेपनमर्शसां ॥

अर्थ सुंठ व देवदाराचीं पानें एकत्र वाटून त्याणें अर्शाला लेप केला असतां, हित होतें.

## ज्योतिष्कबीजलेप.

ज्योतिष्कबीजकल्केनलेपोरक्तार्शसांहितः ॥

अर्थ–मालकांगोणीचें बीं वाटून लेप करावा; ह्मणजे रक्तापासून झालेली मुळव्याध दूर होते.

## गुंजाकूष्मांडलेप.

गुंजाकूष्मांडबीजंचसूरणेनचवर्तिकां ॥
लेपयेच्छाययाशुष्कागुदगाह्यर्शसांजये ॥

अर्थ–गुंजा, कोंहळ्याच्या बिया, आणि सुरण, हे एकत्र वाटून त्या कल्कानें फडक्याला लेप करून तो छायेंत भुकवून त्याची वात करून ती गुदांत घालावी; ह्मणजे अर्शनाश होतो.

## कनकार्णव रस.

नवंधात्रीभवंचूर्णंपलानांशतमात्रकं ॥ विडंगंमरिचंपाठाचव्यंचित्रकवालकं ॥ मंजिष्ठापिप्पलीमूलंलोध्रंपूगफलंतथा ॥ प्रत्येकंपलमात्रंस्यात्पिप्पलीगजपिप्पली ॥ कुष्ठदारुनिशामुस्ताशताव्हासारिवाद्वयं ॥ इंद्रवारुणिकामूलंचूर्णमर्धपलोन्मितं ॥ चत्वारिनागपुष्पस्यपलानिचूर्णयेत्ततः ॥ चूर्णादष्टगुणंतोयंक्वाथंपादावशेषकं ॥ आदायवस्त्रपूतंतुतुल्यंद्राक्षारसःकृतः ॥ सितापलशतंयोज्याक्षौद्रंचपलषोडशं ॥ घृताक्तेनिक्षिपेद्भांडेशर्करागुडधूपिते ॥ त्वगेलागंधपत्राणिउशीरंनागकेसरं ॥ वालकंक्रमुकंचूर्णंप्रतिकर्षंचनिःक्षिपेत् ॥ मुखंरुध्वास्थितंपक्षंख्यातोयंकनकार्णवः ॥ यथेष्टंपाययेद्द्रव्यंदीपकःसर्वरोगहा ॥ अर्शांसिग्रहणींपांडूंक्षयथुंचाविनाशयेत् ॥

अर्थ–नव्या आवळकठीचें चूर्ण ४०० तोळे, आणि वावडिंग, मिरीं, पाहाडमूळ, चवक, चित्रकमूळ, वाळा, मांजिष्ठ, पिंपळीमूळ, लोध्र व सुपारी हीं प्रत्येकीं ४ तोळे;

व पिंपळी, गजपिंपळीचें मूळ हीं प्रत्येकीं २ तोळे, नाकेशर १६ तोळे, हीं सर्व एकत्र कुटून चूर्णाच्या आठपट पाणीं घालोन चतुर्थांश काढा गाळून घ्यावा; आणि त्या काढ्या इतका द्राक्षारस व ४०० तोळे साखर व मध ६४ तोळे, हीं सर्व एके जागीं करून तुपाच्या भांड्यांला साखर गूळ यांचा धूर देऊन त्यांत भरावीं; आणि त्यांत दालचिनी, एलची, तमालपत्र, वाळा, नाकेशर, काळावाळा व सुपारी, या प्रत्येकाचें तोळा तोळा चूर्ण आंत घालून तोंड बंद करून पंधरा दिवस तसेंच ठेवावें. याला कनकार्णव ह्मणतात. यावर यथेष्ट भक्षण करावें. हा दीपक आहे, व सर्व रोग, अर्श, संग्रहणी, पांडुरोग, आणि सूज यांचा नाश करितो.

## योगराजगुग्गुल.

कणागजकणावन्हिविडंगेंद्रयवायवैः ॥ कटुकापिप्पलीमूलंभार्गीपाठाजमोदकं ॥ मूर्वाशुंठीहिंगुचव्यंसमंसर्वांशगुग्गुलुः ॥ चूर्णयेन्मधुनाखादेत्कर्षांशंयोगराजकं ॥ रक्तवातार्शसोगुल्मग्रहणीपांडुजिद्भवेत् ॥

अर्थ–पिंपळी, गजपिंपळी, चित्रक, वावडिंग, इंद्रजव, धमासा, कुटकी, पिंपळीमूळ, भारंगमूळ, पाहाडमूळ, ओंवा, मोरवेल, सुंठ, हिंग, चवक आणि या सर्वांबरोबर गुग्गुळ हीं सर्व एकत्र करून त्यांतून मधाशीं एक तोळा द्यावा; ह्मणजे रक्तार्श, वातार्श, गुल्म, संग्रहणी, आणि पांडुरोग यांचा नाश करितो. याला योगराज ह्मणतात.

## राल.

रालचूर्णस्यतैलेनमार्षपेणयुतस्यच ॥
धूपदानेनयुक्तयार्शोरक्तस्रावोनिवर्तते ॥

अर्थ–राळेचें चूर्ण व सिरसेल एकत्र करून धूप दिलाअसतां, अर्श व रक्तस्राव बंद होतो.

## कर्पूरधूप.

रक्तौघशांतयेदेयंगुदेकर्पूरधूपनं ॥

अर्थ–कापुराचा धूप गुदाला द्यावा; ह्मणजे रक्ताची शांति करितो.

## पयसादियूष.

पयसाशृतेनयूषैःसतिलमुद्गाढकिमसूराणां ॥
ओदनमद्यादम्लैर्मधुरैरीषत्सुगंधैश्च ॥

अर्थ–तिळ, गुळ, तुरी, आणि मसूरा यांचा काढा किंवा यूष यांत किंचित् आंबट घालून मधुर करून व सुगंध लावून त्याशीं भात भक्षण करावा.

## कालकलांतकवटी.

शुद्धसूतंमृतवंगंतालंसिंधूत्थलांगली ॥ पलंतूरीपलैकैकंलसूनंचचतुः पलं ॥ कारवल्याद्रवैर्मर्द्यदिनैकंवटकीकृतं ॥ गुंजामात्रंसदाखादेद्गुदद्वारेचतांक्षिपेत् ॥ रक्तवातकफोत्थानामर्शसांशमयेद्ध्रुवं ॥ वटीकालकलांतेयमनुपानंचकथ्यते ॥ भल्लातत्रिफलादंतीवन्हिचूर्णसमंसमं ॥ सैंधवंसर्वतुल्यंस्याद्भर्जयेत्खर्परेचिरं ॥ मृद्वग्निनाभवेत्सिद्धंकर्षंतक्रैःपिबेदनु

अर्थ–पारा, वंगभस्म, हरताळ, सैंधव, कळलावी व तुरी, हीं चार तोळे, व लसूण १६ तोळे एकत्र करून कारतीच्या रसांत एक दिवस खल करावा; आणि यांतून एक गुंज भक्षण करावा; व गुदांत ही एक गुंज घालावा; ह्मणजे रक्तवात व कफ यांपासून झालेल्या अर्शांचा शीघ्र नाश करील. या कालकलांतकवटीला अनुपान सांगतो. तें बिबवे, त्रिफळा, जेपाळ, चित्रक, आणि सैंधव हीं समभाग घेऊन यांचे चूर्ण खापरांत मंदाग्नीनें भाजावें; आणि तें ताकांतून एक तोळा प्यावें.

## अपामार्गादिकल्क.

अपामार्गस्यबीजानांकल्कस्तंदुलवारिणा ॥
पीतोरक्तार्शसांनाशंकुरुतेनास्तिसंशयः

अर्थ–आघाड्याचें बीं तांदुळाचे धुणांत वाटून प्यावें; ह्मणजे रक्तार्शांचा नाश करितो.

## पद्मकेसर योग.

सपद्मकेसरक्षौद्रनवनीतंनवंलिहन् ॥
सिताकेसरसंयुक्तंरक्तार्शीसुमुखीभवेत् ॥

अर्थ–कमळाचे केशर, मध, नवें लोणी, साकर व नागकेशर हीं सर्व समभाग घेऊन गोळी करून खावी. रक्तार्शावर प्रशस्त आहे.

## समंगादिदुग्ध.

समंगोत्पलमोचाव्हतिरीटतिलचंदनैः ॥
सिद्धंछागीपयोदद्याद्गुदजेशोणितात्मके ॥

अर्थ–लाजाळू, कमळ, मोचरस, लोध्र, तिळ व चंदन इतक्यानीं सिद्ध केलेले शेळीचे दूध रक्तार्शावर द्यावें.

## रक्तार्शावर काढा.

चंदनकिराततिक्तकधन्वयवासाःसनागराःक्वथिताः ॥
रक्तार्शसांप्रशमनादार्वीत्वगुशीरनिंबाश्च ॥

अर्थ–चंदन, किराइत, कुटकी, धमासा, सुंठ, दारुहळद, दालचिनी, वाळा व कडुनिंब, यांचा काढा रक्तार्शशामक आहे.

## द्राक्षादियोग.

द्राक्षाहरिद्रामधुकंमंजिष्ठानीलमुत्पलं ॥
अजाक्षीरेणसंपीतंरक्तजार्शोविनाशनं ॥

अर्थ–द्राक्षें, हळद, मधुकाष्ठ, मांजिष्ठ व निळें कमळ, यांचा कल्क शेळीच्या दुधाशीं घ्यावा; ह्मणजे तो रक्तार्शाचा नाश करितो.

## त्रिकट्वादियोग.

त्रिकटुत्रिफलादंतीवन्हिभल्लातसैंधवं ॥ सुवर्चलंचसामुद्रंलवणंघृततैलकं ॥ छागमज्जावसामूत्रंगोमूत्रंनरमूत्रकं ॥ महिषीगर्दभाश्वानामेषांमूत्रैर्दिनत्रयं ॥ भावयेच्छोषयेत्तं चरुध्वागजपुटेपचेत् ॥ निष्कद्वयंपिबेत्त्वाज्यैरक्तवातार्शसांजये ॥ क्षीरेमांसरसैर्भोज्यंशूलगुल्मंचनाशयेत् ॥

अर्थ–त्रिकटु, त्रिफळा, जेपाळ, चित्रक, बिब्बे, सैंधव, सोरा, मीठ, तूप, तेल व बकऱ्याची मज्जा, चर्बी व मूत; आणि गाई, मनुष्य, महिषी, गाढव व घोडा यांची मुतें यामध्यें तीन दिवस ठेऊन सुकवून शरावांत घालून गजपुट द्यावें. थंड झाल्यावर काढून ८ मासे औषध तुपाशीं द्यावें; ह्मणजे रक्तार्श व वातार्श यांची शांति होत्ये. यावर दूध व मांसरस हें भोजनांत पथ्याला द्यावें. हा त्रिकट्वादियोग शूल व गुल्म यांचा नाश करितो.

## विड्बंध.

नागेननलिकांकृत्वाघृतसैंधवलेपितां ॥
गुदद्वारेक्षिपेन्नित्यंमलरोधप्रशांतये ॥

अर्थ–शिशाची नळी करून तिला सैंधव व तूप लाऊन ती रोज गुदांत घालावी; ह्मणजे मलरोधाची शांति होत्ये.

## रक्तस्राव.

धूपनेलेपनेभ्यंगेप्रस्रवंतिगुदांकुराः ॥
सपित्तदुष्टंरुधिरंततःसंपद्यतेसुखं ॥

अर्थ–मुळव्याधीचे मोड धूपानें, लेपानें, किंवा अभ्यंगानें पित्तासहवर्तमान नासलेलें रक्त स्रवतात, तेणें करून सुख होतें.

## दुसरा प्रकार.

विबंधेर्शसिचोत्सिक्तेकंडुमद्रक्तवाहिनि ॥

जलौकापाननादन्यःप्रयोगोनास्तिकश्चन ॥

अर्थ–विड्बंध कराणाऱ्या. आसमंतात कंडू करणाऱ्या व रक्त वाहणाऱ्या अशा अर्शावर जळवानीं रक्त काढल्या वांचून दुसरा उपाय नाहीं.

## सक्तुपिंडीबंधन.

तेनैवसुखमाप्नोतमुच्यतेस्वेदपिंडिका ॥

घृततैलाक्तसक्तूनांपिंडिकांबंधयेद्गुदे ॥

अर्थ–सातूचें पोटीस करून त्याची पिंडी करून तिला तेल किंवा तूप लाऊन ती गुदावर बांधावी; ह्मणजे अर्शांतून घाम स्त्रवून जातो; आणि सुख होतें.

## नासार्शचिकित्सा.

नासानाभिसमुत्थेतुतथामेढ्राक्षिकर्णयोः ॥

क्रियामर्शस्सुकुर्वीततत्रतत्रयथोदितां ॥

अर्थ–नाक, बेंबी, शिश्न नेत्र व कान यांमध्यें अर्श झाला असतां; त्या त्या जागीं उचितक्रिया असेल ती करावी.

## रजनीचूर्णयोग.

भावितंरजनीचूर्णस्नुहिक्षीरैःपुनःपुनः ॥

बंधयेत्सुदृढंसूत्रंछिनत्यर्शोभगंदरं ॥

अर्थ–हळद व निवडुंगाचा चीक यांत वारंवार सूत भिजवून वाळवावें. त्याणें अर्शाचे मोड बांधावे; ह्मणजे ते तुटून पडतात. याप्रमाणें भगंदराला ही बांधावें. तें त्याचा ही नाश करितें.

## चामखीळ.

चर्मकीलंतुसंस्विद्यदह्यःक्षारेणचाग्निना ॥

अर्थ–चामखीळ शेकून त्याला क्षारानें किंवा अग्नीनें भाजावा.

## दुग्धिकादिघृत.

दुग्धिकाकंटकारीभ्यांकल्कंक्षीरैश्चतुर्गुणं ॥ कल्कतुल्यंघृतंयोज्यंघृत शेषंविपाचयेत् ॥ भोजनेलेपनेपानेजयेच्छिप्तार्शसांकिल ॥

अर्थ–दुग्धी व रिंगणी यांचा कल्क व त्याच्या चौपट दूध; आणि कल्काइतकें तूप

घालून तूप शेष राही तों पर्यंत कढवून तें तूप काढून घ्यावें. तें भोजनामध्यें प्राशनास द्यावें; व अर्शाला लावावें; ह्मणजे त्यांचा नाश करितें.

## व्योषादिमोदक.

गुडव्योषवरावेल्लतिलारुष्कारचित्रकैः ॥
अर्शांसिहंतिगुटिकात्वग्विकारंचशीलिता ॥

अर्थ—गुळ, सुंठ, मिरें, पिंपळी, हरडा, बेहडा, आवळकाठी, मिरीं, तिळ, बिबवे व चित्रक यांचे चूर्णाची गुळाशीं गोळी करावी; आणि द्यावी. ती मुळव्याध, आणि त्वग्विकार यांचा नाश करिते.

## गुडचतुष्क.

गुडेनशुंठीमथवोपकुल्यांपथ्यांतृतीयामथदाडिमंच ॥
आमेष्वजीर्णेपुगुदामयेषुवर्चोविबंधेषुचनित्यमद्यात् ॥

अर्थ—सुंठ, पिंपळी, हरीतकी, आणि डाळिंब, हे चार पदार्थ क्रमानें गुळाशीं नित्य द्यावे; ह्मणजे आम, अजीर्ण, मुळव्याध, आणि मलबध्दता यांचा नाश करितात.

## कार्पासमज्जागुटी.

कार्पासमज्जालशुनंस्वर्जिकाक्षारहिंगुकं ॥
घृतेनकोलमात्राहिगुटिकार्शोविनाशिनी ॥

अर्थ—कापसाचे बीजांचा मगज, लसुण, साजेखार व हिंग हीं एकत्र खलून त्यांची बोराएवढी तुपाशीं गोळी करून द्यावी; ह्मणजे ती अर्शरोगाचा नाश करिते.

## त्रिफलादिगुटिका.

त्रिफलापंचलवणंकुष्ठंकटुकरोहिणी ॥ देवदारुविडंगानिपिचुमंदफलानिच ॥ बलाचातिबलाचैवद्विहरिद्रासुवर्चला ॥ एतत्संभृतसंभारंकरंजत्वग्रसेनतु ॥ पिष्ट्वाचगुटिकांकृत्वाबादरास्थिसमांबुधः ॥ एकैकांतांसमुध्दृत्यरोगेरोगेपृथक्पृथक् ॥ अर्शांसिहंतितक्रेणगुल्मानम्लेननिर्हरेत् ॥ उष्णेनवारिणापीताशांतमग्निंप्रदीपयेत् ॥ जंतुजुष्टातुयोगेनत्वग्दोषखदिरांबुना ॥ मूत्रकृच्छ्रंतुतोयेनत्दद्रोगेतैलसंयुता ॥ इंद्रस्वरससंयुक्तासर्वज्वरविनाशिनी ॥ मातुलुंगरसेनाथसद्यःशूलहरीस्मृता ॥ कपित्थतिंदुकानांतुरसेनसहमिश्रिता ॥ विषाणिहंतिसर्वाणिपानाशनप्रयोगतः ॥ गोशकेंद्रसमायुक्ताहन्यात्कुष्ठानिसर्वशः ॥

शामाकषायसहिताजलोदरविनाशिनी ॥ भक्तछन्दांहिजयातिभुक्त स्योपरियोजिता ॥ अक्षरोगेषुसर्वेषुमधुनाबृष्यतांजयेत् ॥ लेपमात्रेण नारीणांसद्यःप्रदरनाशिनी ॥ व्यवहारेतथाद्यूतेसंग्रामेमृगयादिषु ॥ स मालभ्यवरोप्येनांक्षिप्रंविजयमाप्नुयात् ॥

अर्थ–हरडा, बेहडा, आवळकाठी, पंचलवण, कोष्ठ, कुटकी, देवदार, वावडिंग, निंबोळ्या, चिकणा, चिकणाभेद, हळद, दारुहळद व साजेखार हे सर्व पदार्थ एकत्र मिळवून करंजाचे सालीच्या रसांत घोटून बोराच्या आंठी एवढी गोळी करावी, ती एकेक गोळी अनुपानाशीं अनेकरोगावर द्यावी. ती अशी अर्शावर ताकाशीं, गुल्मावर निंबूच्या रसाशीं, मंदाग्नीवर ऊनपाण्याशीं, अंतावर वावडिंगाच्या काढ्याशीं, त्वग्दोषावर खैराच्या काढ्याशीं, मूत्रकृछ्रावर पाण्याशीं, हृद्रोगावर तेलाशीं, संपूर्णज्वरावर कुडयाच्या स्वरसाशीं, शूलावर महाळुंगाच्या रसाशी, संपूर्णविषावर कवठ व टेंभुरणी यांच्या रसाशीं व सर्वकुष्ठावर इंद्रगोपकमीबरोबर, जलोदरावर पिंपळीच्या काढ्याशीं द्यावी; व भोजन जिरण्याकरितां भोजनोत्तर घ्यावी; व संपूर्ण नेत्ररोगांवर मधाशीं अंजन करावें; आणि स्त्रियांचे प्रदरावर लेप दिल्याने गुण करितें; व ह्या गुटिकेला स्पर्श करून गेलें असतां, व्यवहार, द्यूत, युद्ध व शिकार यांचे ठायीं विजयी होतो.

## गुग्गुलादिवटी.

गुग्गुलंलशुनंनिंबबीजंरामठनागरैः ॥
गुटीशीतोदकेनोक्ताअर्शान्हंतिचतत्क्षणात् ॥

अर्थ–गुग्गुळ, लसूण, निंबोळ्या, हिंग, व सुंठ यांची गोळी शीतोदकाशीं द्यावी; ह्मणजे तत्काळ अर्शांचा नाश करिते.

## चंद्रप्रभावटी.

मृतलोहंपलद्वंद्वंलोहांशंशुद्धगुग्गुलुः ॥ द्वयोस्तुल्यासितायोज्यात्रि भिस्तुल्यंशिलाजतु ॥ तवक्षीरपलैकंतुअन्याकर्षांशकाःशृणु ॥ विडं गंत्रिफलात्र्यूपंभूनिंबगजपिप्पली ॥ द्विनिशापिप्पलीमूलंदेवदारुसु वर्चलं ॥ सैंधवंधनिकाताप्यंकचोरोतिविषावृता ॥ ताप्यंसज्जीयव क्षारंवचामुस्तासपत्रकं ॥ दंतीएलासूक्ष्मचूर्णमधुनागुटिकाकृता ॥ कर्षमात्रासदाखादेन्नाम्नाचंद्रप्रभावटी ॥ सर्वाशांसिनिहंत्याशुपांडु रोगंभगंदरं ॥ कृछ्रान्मेहान्क्षयंकासंनानारोगहरापरा ॥

अर्थ-लोहभस्म ८ तोळे, शुद्ध गुग्गुळ ८ तोळे, साकर १६ तोळे, शिलाजित ३२ तोळे, तवकिर ४ तोळे, आणि वावडिंग, त्रिफला, त्र्यूषण, किराइत, गजपिंपळी, हळद, दारुहळद, पिंपळीमूळ, देवदार, सौवर्चल, सैंधव, धने, स्वर्णमाक्षिक, कचोरा, अतिविष, सोनें, सज्जिखार, यवक्षार, वेखंड, नागरमोथे, तमालपत्र, दांती व एलची हीं प्रत्येक एक तोळा. या सर्वांचें चूर्ण एकत्र करून मधाशीं गोळी, १० माशाची करावी. ही चंद्रप्रभावटी संपूर्ण प्रकारची मुळव्याध, पांडुरोग, भगंदर, मूत्रकृच्छ्र, प्रमेह, क्षय व खोकला अशा अनेक रोगांचा नाश करिते.

## सूरणपुटपाक.

सौरणंकंदमादायपुटपाकेनपाचयेत् ॥
सतैलगुडसंयुक्तोरसश्चार्शोविकारनुत् ॥

अर्थ-सुरणाचा कांदा पुटपाकेंकरून पक्क करावा; आणि शिरसाचें तेल, गूळ यांचे बरोबर खावा; ह्मणजे मुळव्याधीचा विकार दूर करील.

## चित्रकादिदधि.

त्वचंचित्रकमूलस्यपिष्ट्वाकुंभंप्रलेपयेत् ॥
तक्रंवादधिवातत्रजातमर्शोहरंपिबेत् ॥

अर्थ-चित्रकाचे मुळाची साल कुटून त्याचा लेप मडक्याला आंतून करावा; आणि त्यांत दहीं किंवा तक्र ठेऊन मुळव्याध झाली असेल त्याणे प्यावें; ह्मणजे मुळव्याध जाईल.

## कांचन्यादिविषयोग.

कांचनीविषपाषाणंयवक्षारंचहिंगुलं ॥ जलेपिष्ट्वान्यसेद्गुह्ये
वंकुर्याद्दिनत्रयं ॥ क्षीरस्वेदंतथाकुर्यात्क्षीराहारीघृतौदनं ॥
अर्शरोगंनिहंत्याशुसिद्धयोगउदाहृतः ॥

अर्थ-हळद, सोमल, जवखार, हिंगूळ हे पाण्यांत वाटून गोळी करून गुदांत ठेवावी, आणि दुधाची वाफ गुदास द्यावी; दूध प्यावें, तूपभात खावा. याप्रमाणें तीन दिवस केलें असतां; मुळव्याधीचा नाश होतो, हा सिद्धयोग सांगितला आहे.

## वृद्धादारुमोदक.

वृद्धादारुकभल्लातशुंठीचूर्णेनपोषितः ॥
मोदकःसगुडोहन्यात्षड्विधार्शःकृतारुजः ॥

अर्थ-वरधारा, भिलावा, सुंठ, हीं तीन औषधें समान घेऊन चूर्ण करून त्यांत त्याचे दुप्पट गुळ घालून गोळ्या करून द्याव्या; तेणेंकरून साहा प्रकारची मूळव्याध दूर होते

## सूरणवटक.

शुष्कसूरणचूर्णस्यभागान्द्वात्रिंशदाहरेत् ॥ भागान्षोडशचि
त्रस्यशुंठयाभागचतुष्टयं ॥ द्वौभागौमरिचस्यापिसर्वाण्येक
त्रकारयेत् ॥ गुडेनपिंडिकांकुर्यादर्शसांनाशिनींपरां ॥

अर्थ–सुरण वाळवून चूर्ण करून ते बत्तीस भाग, चित्रक १६ भाग, सुंठ चार भाग, मिऱ्यें दोन भाग घ्यावीं. मग सारीं औषधें चूर्ण करून त्यांत गूळ साऱ्या औषधांचे दुप्पट घालून गोळ्या करून घ्याव्या, तेणेंकरून साहा प्रकारची मुळव्याध दूर होते.

## बृहत्सूरणवटक.

सूरणोवृद्धदारुश्चभागैःषोडशभिःपृथक् ॥ मुसलीचित्रकौज्ञेयावष्टभा
गमितौपृथक् ॥ शिवाबिभीतकौधात्रीविडंगंनागरंकणा ॥ भल्लातः
पिप्पलीमूलंतालीसंचपृथक्पृथक् ॥ चतुर्भागप्रमाणानित्वगेलामरिचं
तथा ॥ द्विभागमात्राणिपृथक्ततस्त्वेकत्रचूर्णयेत् ॥ द्विगुणेनगुडेनाथ
वटकान्कारयेद्बुधः ॥ प्रबलाग्निकराएतेतथार्शोनाशनाःपराः ॥ ग्रहणीं
वातकफजांश्वासंकासंक्षयामयं ॥ प्लीहानंश्लीपदंशोफंहिक्कांमेहंभगंद
रं ॥ निहन्युःपलितंवृष्यास्तथामेध्यारसायनाः ॥

अर्थ–सुरण १६ भाग, वरधारा १६ भाग, मुसळी ८ भाग, चित्रक ८ भाग, हिरडे, बेहेडे, आवळकाठी, वावडिंग, सुंठ, पिंपळी, भिलावा, पिंपळीमूळ, तालीसपत्र, हीं नऊ औषधें चार चार भाग व दालचिनी, विलायची, मिऱ्यें हीं तीन औषधें दोन दोन भाग घ्यावीं, मग सारीं औषधें कुटून चूर्ण करून त्याचे दुप्पट त्यांत गूळ घालून गोळ्या करून घ्याव्या. तेणेंकरून अग्नि प्रदीप्त होतो. मुळव्याध व वातकफापासून उत्पन्न झाली जी संग्रहणी ती व श्वास, कास, क्षय, पोटांत डावेकडे कवळूरोग होतो तो, श्लीपदरोग, सूज, उचकी, परमा, भगंदर, जेणेंकरून पांढरे केश होतात तो, व पलित-रोग हे सारे रोग दूर होतात, व ह्या गोळ्या स्त्रीगमनाविषयीं इच्छा देतात, व बुद्धि देतात, व शरीराची जरा दूर करितात.

## कोशातकीघर्षण.

कोशातकीरजोघर्षान्निपतंतिगुदोद्भवाः ॥

अर्थ–कडुदोडक्याचे चूर्ण मोडांनां घासावें; ह्मणजे गुदांकुर गळून पडतात.

## निशादिलेप.

निशाकोशातकीचूर्णस्नुक्पयःसैंधवान्वितं ॥
गोमूत्रेणसमायुक्तोलेपोदुर्नामनाशनः ॥

**अर्थ**–हळद व कडुदोडकी यांचे चूर्ण, निवडुंगाचा चीक व सैंधव हीं एकत्र वाटून त्यांचा गोमूत्राशीं लेप करावा; ह्मणजे मुळव्याधीचा नाश होतो.

## दुसरा निशादि व अर्कमूलादिलेप.

निशाकोशातकीलेपोसर्वदुर्नामनाशनः ॥
अर्कपत्रंशिग्रुमूलंलेपनंहितमर्शसां ॥

**अर्थ**–हळद व कडुदोडकी, यांचा किंवा रुईची पानें व शेवग्याच्या मुळया यांचा लेप करावा. तो अर्शव्याधीवर हितकारक आहे.

## निंबादिलेप.

निंबाश्वत्थस्यपत्राणांलेपोदुर्नामनाशनः ॥
आरनालेनवाहन्यात्सगुडाकटुतुंबिका ॥

**अर्थ**–कडुनिंबाचा पाला व पिंपळाचा पाला एकत्र वाटून लेप करावा, अथवा कडव्या पांढऱ्या भोंपळ्याचीं पानें व गुळ कांजीत वाटून त्याणें लेप करावा; ह्मणजे मुळव्याधीचा नाश करितो.

## एरंडमूलादिस्वेद व पेंड.

एरंडमूलंसुरदारुरास्नायष्टीमधूकंमसृणंविचूर्ण्य ॥ पिष्टंयवानांचचतुर्गुणंस्यात्साध्यंहिवन्हौपयसासमस्तं ॥ स्वेदोपनाहौबहुतेनकुर्यादर्शासिशूलानिलयंप्रयांति ॥

**अर्थ**–एरंडाचें मूळ, देवदार, रास्ना, ज्येष्टीमध व लोणीं एकत्र वाटून त्यांत चौपट यवांचें पीठ घालून दुधांत मळावें; आणि अग्नीवर भाकरीसारिखें भाजून त्याणें मोड शेकावे; किंवा वर बांधावी; ह्मणजे शूलासहवर्तमान अर्श नाश पावतात.

## स्नुह्यादिलेप.

स्नुह्यग्निलांगलीदंतीमूलैर्लेपोर्शसांहितः ॥

**अर्थ**–निवडुंगाचा चीक, चित्रक, कळलावी, अथवा कुइली, दांतीमूळ, यांचा लेप मुळव्याधीवर हितकारक आहे.

## कृष्णाशिरीषलेप.

कृष्णाशिरीषबीजार्कक्षीरैःसामरसैंधवैः ॥ हरिद्राऋक्षविड्गुंजागोमूत्रैःपिप्पलीयुतैः ॥ एतल्लेपत्रयंयोज्यंशीघ्रमर्शोविनाशनं ॥

**अर्थ**–जटामांसी, शिरीस, रुईचा चीक, सांबराचें शिंग, सैंधव, हळद, आस्वलीची विष्ठा, गुंज, गोमूत्र, पिंपळी, हीं सर्व एकेजागी वाटून तीन वेळा लेप करावा; ह्मणजे मुळव्याधीचा लौकर नाश होईल.

## अर्कादिलेप.

आर्कपयःसुधाकांडकटुकालाबुपल्लवाः ॥
करंजोवस्तमूत्रेणलेपनंश्रेष्ठमर्शसां ॥

**अर्थ**–रुईचा चीक, निवडुंगाचें कांडें, कुटकी, कडुभोपळयाचे पल्लव, करंजाचें बी, बोकडांचे मूत यांचा लेप मुळव्याधीवर श्रेष्ठ आहे.

## गुंजासूरणलेप.

गुंजासुरणकूष्मांडबीजैर्वर्तिस्तथागुणा ॥

**अर्थ**–गुंज, सुरण, कोहळयाचे बी हीं पाण्यांत वाटून वस्त्राचे वातीनें लेप करावा, वात गुदांत ठेवावी; ह्मणजे मुळव्याधीचा नाश करील.

## गौरीपाषाणलेप.

गौरीपाषाणकर्षैकंस्नुहिकांडेविनिःक्षिपेत् ॥ पाचयेत्पुटपाके नततउत्धृत्ययत्नतः ॥ रेवाचिनीचकुष्ठंचकल्कीकृत्यत्र्यंसमं लेपयेत्तेनअर्शांसिनिवार्यंतेनसंशयः ॥

**अर्थ**–सोमल, निवडुंगाचे कांड्यांमध्ये भरावा; आणि पुटपाकानें पक्व करावा; नंतर रेवाचिनी, कोष्ठकोळिंजन तिन्ही समभाग घेऊन वाटून मुळव्याधीस लेप करावा; ह्मणजे मुळव्याध जाईल.

## न्यग्रोधपत्रलेप.

दग्ध्वान्यग्रोधपत्राणितैलेनसहलेपयेत् ॥

**अर्थ**–वडांची पानें जाळून त्याची राख तेलांत खळून मुळव्याधीस लेप करावा; ह्मणजे मुळव्याध जाईल.

## कटुतुंब्यादिलेप.

कटुतुंब्यास्तथादंत्याःशकृच्चकुक्कुटस्यच ॥ मुसल्याश्चाश्वगंधायाश्च

त्रकस्यचयत्नतः ॥ मूलैस्तुल्यैःकृतंचूर्णमर्कक्षीरेणभावयेत् ॥ स्नुहि
क्षीरेणमतिमान्वारिणापरिपेषयेत् ॥ वस्त्रवर्त्यागुदंतेनसमालिप्यस
न्ततः ॥ गुदेवीनःक्षिपेद्यत्नात्प्रातःसायंचबुद्धिमान् ॥ वेदनाचभवेत्ती
व्रावन्हिनास्वेदयेद्गुदं ॥ नोपशाम्येद्यदातेनतदाचैवोष्णवारिणा ॥
विनिवेश्यगुदंतिष्ठेद्वेदनाशमकारणात् ॥ अद्याद्वृष्यमथान्नंचशिशिरं
जलमापिबेत् ॥ गुदजानांविनाशार्थंसप्ताहंतुसमाहितः ॥ विधिमेनं
प्रकुर्वीतगतशंकस्तुमानवः ॥

अर्थ–कडुभोपळयाचे पल्लव, दांतीमूळ, कोंबडयाची विष्ठा, सफेदमुसळी, आस्कंद, चित्रक, हीं समभाग घेऊन चूर्ण करून रुईचे चिकाची आणि निवडुंगाचे चिकाची भावना द्यावी; नंतर पाण्यांत वाटून वस्त्राचे वातीनें गुदास लेप करावा; आणि ती वात गुदामध्यें प्रातःकाळी व सायंकाळीं घालावी. वेदना फार होईल. यासाठी गुदास शेक घ्यावा, शेक घेऊन शांत न झाली तर ऊन पाण्यांत बसावे; आणि वृष्यान्नाचे भक्षण करावें; ह्मणजे मधुर, स्निग्ध, मनास हर्ष देणारें, पुष्टिप्रद असें अन्न खावें, थंड पाणी प्यावें. या प्रमाणें सात दिवस करावें; ह्मणजे मुळव्याधीचा नाश होईल.

## देवदालीबीजलेप.

सिंधूत्थदेवदाल्याश्चबीजंकांजिकपेषितं ॥
गुदांकुरप्रलेपेनपातयेत्पर्वतानपि ॥

अर्थ–सैंधव व देवडांगरीचें बी हे कांजींत वाटून मुळव्याधीच्या तोंडानां लेप करावा; ह्मणजे तें गळून पडतात; ह्या लेपानें पर्वतही पडतील.

## चव्यादि घृत.

चव्यंत्रिकटुकंपाठाक्षाराःकुस्तुंबरूणिच ॥ यवानीपिप्पलीमूलमुभेच
बिडसैंधवे ॥ चित्रकंबिल्वमभयापिष्ट्वासर्पिर्विपाचयेत् ॥ सकृद्वाता
नुलोमार्थंजातेदधिचतुर्गुणं ॥ प्रवाहिकागुदभ्रंशंमूत्रकृच्छ्रंपरिश्रवं ॥
गुदवंक्षणशूलंचघृतमेतद्व्यपोहति ॥

अर्थ–चवक, सुंठ, मिरीं, पिंपळी, पाहाडमूळ, सर्व क्षार, धने, ओंवा, पिंपळीमूळ, बिडलोण, सैंधव, चित्रक, बेलफळ व हरीतकी हे सर्व एकत्र वाटून त्यांच्या कल्कानें तूप सिद्ध करावें. तें वायूला अनुलोमन करणारें आहे; आणि चौपट दहीं घालून सिद्ध करावें, तें प्रवाहिका, गुदभ्रंश, मूत्रकृच्छ्र, गुदस्राव व गुद आणि आडसंधी, यांतील शूल यांचा नाश करितें.

## शुंठीघृत.

त्रिंशत्पलानि शुंठीनां जलद्रोणे विपाचयेत् ॥ तेनपादावशेषेण कल्केनान्यं पचेद्घृतं ॥ दुर्नामश्वासकासघ्नं प्लीहपांड्वामयापहं ॥ विषमज्वरशांत्यर्थं तृष्णारोचकनाशनं ॥ शुंठीघृतमिति ख्यातं कृष्णात्रेयेण पूजितं ॥ नागरेण जले पक्वं बस्तिकुक्षिगदापहं ॥

अर्थ—१२० तोळे सुंठीचा २०४८ तोळे पाण्यांत काढा करून तो चतुर्थांश उतरून घ्यावा. त्यांत त्या औषधांच्या कल्कानें तें घृत पचन करावें. तें मुळव्याध, श्वास, खोकला, प्लीहा, पांडुरोग, विषमज्वर, ताहान व अरुचि यांचा नाश करितें. हें कृष्णात्रेयानें स्तुत्य असें शुंठीघृत आहे. हेंच आल्याच्या रसांत केलें असतां, बस्ति व कुक्षी यांच्या रोगांला शमवितें.

## लघुचव्यादिघृत.

चव्यतिक्ताकलिंगानिशताव्हालवणानिच ॥
सर्पिरर्शोविकारघ्नं ग्रहणीदीपनंपरं ॥

अर्थ—चवक, कुटकी, इंद्रजव, शतावरी व पंचलवणें या पदार्थांनीं सिद्ध केलेलें घृत मुळव्याध आणि संग्रहणी यांचा नाश व दीपन करण्याविषयीं उत्तम आहे.

## ऱ्हीबेरघृत.

ऱ्हीबेरमुत्पलंलोध्रंसमंगाचव्यचंदनं ॥ यासाचातिविषाबिल्वंधातुकीदेवदारुच ॥ दार्वीत्वङ्नागरंमांसीमुस्ताक्षारोयवाग्रजः ॥ चित्रकश्चेतिपेष्याणिचांगेरीस्वरसेघृतं ॥ एकत्रसाधयेत्सर्वंतत्सर्पिःपरमौषधं ॥ अर्शोतिसारग्रहणीपांडुरोगेज्वरेरुचौ ॥ मूत्रकृच्छ्रेगुदभ्रंशेबस्त्यानाहप्रवाहिके ॥ पिच्छास्त्रावेर्शसांमूलेयोज्यमेतत्त्रिदोषत्दृत् ॥

अर्थ—वाळा, कोष्ठ, लोध्र, मंजिष्ठ, चवक, चंदन, धमासा, अतिविष, बेलफळ, धायटीचीं फुलें, देवदार, दारुहळद, दालचिनी, सुंठ, जटामांसी, नागरमोथा, यवखार व चित्रकमूळ, हे पदार्थ चुकाच्या रसांत वाटून त्या कल्का इतकें त्यांत तूप घालून सिद्ध करावें. तें चांगेरीघृत उत्तम औषध आहे. हें मुळव्याध, अतिसार, संग्रहणी, पांडुरोग, ज्वर, अरुचि, मूत्रकृच्छ्र, गुदभ्रंश, बस्ति, आनाह, प्रवाहिका, रक्तस्राव, मुळव्याधीचे मोड, आणि त्रिदोष यांवर प्रशस्त व त्रिदोषनाशकरणारें आहे.

## रोहितारिष्ट.

रोहितकतुलामेकांचतुर्द्रोणेजलेपचेत् ॥ पादशेषेरसेशीतेपूतेपलश

तद्द्वयं ॥ दद्यान्गुडस्यधातक्याःपलषोडशिकामताः ॥ पंचकोलंत्रिजातंचत्रिफलांचविनिःक्षिपेत् ॥ चूर्णयित्वापलांशेनततोभांडेनिधापयेत् ॥ मासादूर्ध्वंचपिबतांगुदजायांतिसंक्षयं ॥ ग्रहणीपांडुत्हृद्रोगप्लीहगुल्मोदराणिच ॥ कुष्ठशोफारुचिहरोरोहितारिष्टसंज्ञकः ॥

अर्थ—रक्तरोडा एक तुळा आणून थोडा थोडा कुटून त्यांत चार द्रोण पाणी घालोन चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून थंड जाहाल्यावर त्यांत गूळ दोनशें पळें व धायटीचीं फुलें सोळा पळें घालोन पंचकोल औषधें, त्रिजात औषधें व त्रिफळा हीं अकरा औषधें एक एक पळ प्रमाण घेऊन साऱ्यांचें चूर्ण करून त्या काढ्यांत मेळवून सारीं मडक्यात घालोन त्याचे तोंडाला मुद्रा देऊन एक महिनापर्यंत ठेऊन नंतर मुद्रा काढावी. याला रोहितारिष्ट ह्मणतात. हा अरिष्ट पोटांत घ्यावा. येणेकरून मूळव्याध, संग्रहणी, पांडुरोग, ह्द्रोग, पोटांत डांवकडे कवळूरोग होतो तो, गुल्म, उदर, कुष्ठ, सूज, आंवढणें. हे रोग दूर होतात.

## मधुपक्वहरीतकी.

कदंबनिंबचिंचानांत्वक्चूर्णंपलषोडशं ॥ अजागोमहिषीमूत्रंत्वक्षोडशगुणोत्तरं ॥ क्वाथयेत्पादशेषंतुशुद्धंकृत्वाविनिःक्षिपेत् ॥ अभयानांशतंकंतुक्वाथयेच्चकषायकं ॥ जीर्यतेह्यभयापश्चाद्भित्वाअंडंनिवारयेत् ॥ भृंगमिवर्चलंचूर्णंतुल्यंतेनप्रपूरयेत् ॥ अभयांवेष्टयेत्सूत्रैर्मधुमध्येत्र्यहंक्षिपेत् ॥ नित्यंक्षौद्रसमंभक्ष्यात्रिदोषार्शप्रशांतये ॥

अर्थ—कळंब, कडुनिंब, चिंच यांच्या सालिचें चूर्ण ६४ तोळे, व शेळी, गाई, व ह्मैस यांचें मूत. १००४ तोळे, यांचा चतुर्थांश काढा गाळून घ्यावा. यांत शंभर हरीतकी घालोन त्याचा काढा करावा; ह्मणजे हरीतकी मऊ होतात. त्या फोडून त्याची आंठी काढून टाकावी; आणि ह्या हरीतकींत भांग व साजेखार भरून सुतानें बांधाव्या; आणि तीन दिवस मधामध्यें टाकून ठेवाव्या; नंतर त्यांतून मधासहवर्तमान खात जाव्या; ह्मणजे त्रिदोषजनित अर्शांची शांति होत्ये.

## गोजिव्हादिकाढा.

गोजिव्हामूलमेकंद्विगुणबर्हिशिखामूलकस्तुंबराणामष्टांशेक्वाथतोयेमधुसिकतरजोमिश्रमंतेपिबेत्तत् ॥ तस्यार्शःषड्विधोपिहरतिगुदरुजःस्रावमामानुबंधंकीलंकंडुग्रहण्यांगुलभृतिभिषजामंडलात्पथ्यसेवी ॥

अर्थ—१भाग पाथरीचें मूळ, २ भाग मयूरशिखामूळ, व धने यांच्या अष्टमांश

काढ्यांत मध व साकर घालोन द्यावा; ह्मणजे साहा प्रकारचे अर्श, गुदरोग, गुदस्राव, आमांश, अर्शाचे मोड, कंडू, संग्रहणी व शूल यांचा नाश करितो. हा एक मंडल घेऊन पथ्य करावें.

## कल्याणलवण.

भल्लातकानित्रिफलादंतीचित्रकमेवच ॥ समभागानिसर्वाणि सैंधवंद्विगुणंभवेत् ॥ कपालपुटसंपक्वंमृदुनागोमयाग्निना ॥ कल्याणनामलवणंश्रेष्ठमर्शोविकारिणां ॥

अर्थ—बिबवे, हरडा, बेहडा, आवळकाठी, दांतीमूळ, व चित्रकमूळ हीं सर्व समभाग आणि सैंधव दुप्पट हे सर्व एकत्र करून शरावांत घालोन मातकापड करून गोवऱ्यांचा मंदाग्नि द्यावा. शीतझाल्यावर काढून द्यावें. हें कल्याणनामक लवण अर्शांवर श्रेष्ठ आहे.

## तक्रादि योग.

सतक्रंलवणंदद्याद्वातवर्चोनुलोमनं ॥ नप्ररोहंतिगुदजाःपुनस्तक्रसमाहताः ॥ तक्राभ्यासोर्शसैःकार्योबलवर्णाग्निवृद्धये ॥ स्रोतस्सुतक्रशुद्धेषुसम्यक्फलतितद्रसः ॥ तनुपुष्टिस्तथातुष्टिर्बलंवर्णश्चजायते ॥ वातश्लेष्मविकाराणांशतंचविनिवर्तयेत् ॥

अर्थ—मिठांत ताक घालोन द्यावें. तें वायु व मळ यांला अनुलोमन करितें, व तक्राच्या योगानें नाश पावलेले गुदांकुर पुनः उत्पन्न होत नाहींत. बल, वर्ण, आणि अग्नि यांची वृद्धी व्हावी, ह्मणून अर्श रोग्यानें ताकाचा अभ्यास ठेवावा. तक्रानें नाडीमार्ग शुद्ध झाले; ह्मणजे शरीर पालनीयरस उत्तम प्रकारानें गमन करितो. तेणेंकरून शरीराला पुष्टि, संतोष, बल, आणि कांति हीं उत्पन्न होतात; आणि शेकडों वातकफविकारांचा नाश करील.

## दुसरा प्रकार.

विट्विबंधेहितंतक्रंयवानीविश्वसंयुतं ॥ नप्ररोहंतिगुदजाःप्रायस्तक्रसमन्विताः ॥ यज्जातंगोरसक्षीराद्वन्हिमूलावचूर्णितान् ॥ पिबंस्तदेवतेनैवतक्रंभुज्यांकुराअपि ॥ पिबेदहरहस्तक्रंनिरन्नोवासकामतः ॥ सप्ताहंवादशाहंवामासार्धमासमेवच ॥ बलकालविकारज्ञो भिषक्तंचप्रयोजयेत् ॥ हरीतकींतक्रयुतांत्रिफलांवाप्रयोजयेत् ॥ चित्रकंहपुषाहिंगुदद्याद्वातक्रसंयुतं ॥ पंचकोलकयुक्तंवातक्रेणैनप्रदाप

येत् ॥ त्वचंचित्रकमूलस्यपिष्ट्वाकुंभंप्रलेपयेत् ॥ तक्रंवादधिवातत्र जातमर्शहरंपिबेत् ॥ तक्रेणार्शांसिनिघ्नंतिमुसलीकटुकान्विता ॥

अर्थ—विट्बंधावर ओंवा व सुंठ घालून ताक प्यावें; ह्मणजे तक्रानें नाश पावलेले गुदांकुर पुन: येत नाहींत. जें गाईंचा दुधापासून झालें ताक व त्यांत चित्रक मुळाचें चूर्ण घातलें, ह्मणजे केवळ त्या ताकानेंच अंकुर नाश पावतात. या करितां अन्नावांचून दररोज वारंवार ताक प्यावें. तें असें सात, दाहा, किंवा पंधरा दिवस अथवा महिनाभर बल व काल. विकार जाणण्याविषयीं कुशल वैद्यानें ताक योजावें; आणि ताकांतून हरीतकी किंवा त्रिफला द्यावी. किंवा चित्रक, हपुषा व हिंग, हे ताकांत घालून द्यावें. किंवा पंच कोलांचें चूर्ण ताकांतून द्यावें; अथवा चित्रक मूळाचा कल्कानें कुंभाला आंतून लेप करून त्यांत दूध विरजावें. तें दहीं किंवा ताक अर्शनाशक आहे. किंवा मुसळी व धुटकी यांचें चूर्ण घालून ताक द्यावें; ह्मणजे अर्श नाश पावतात.

## अरलुत्वक्.

अरलुत्वक्वन्हिसुरेंद्रयवान्चिरबिल्वसुसैंधवशुंठियुतान् ॥
मथितेनपिबेद्यदिसप्तदिनमर्शांसिपतंतिसमूलानिवलात् ॥

अर्थ—टेंटूची साल, चित्रकमूळ, इंद्रजव, करंज, सैंधव, आणि सुंठ यांचें चूर्ण मठ्ठयांत घालून सात दिवस प्यावें; ह्मणजे मुळापासून अर्श गळून जातात.

## शर्करासव.

दुरालभायाःप्रस्थस्यचित्रकस्यवृषस्यच ॥ पथ्यामलकयोश्चैवपाठायानागरस्यच ॥ दद्याद्द्विपलिकान्भागान्जलद्रोणेविपाचयेत्॥ पादशेषेरसेपूतंसुशीतंशर्कराशतं ॥ दत्वाकुंभेदृढेस्थाप्यंमासार्धंघृतभाजनं प्रलिप्यपिप्पलीचव्यप्रियंगुमधुसर्पिषा ॥ तस्यमात्रांपिबेत्कालेशार्करस्ययथाबलं ॥ अर्शांसिग्रहणीरोगमुदावर्तमरोचकं ॥ शकृन्मूत्रानिलोद्गारविबंधानलमार्दवं ॥ हृद्रोगंपांडुरोगंचसर्वरोगान्प्रणाशयेत् ॥

अर्थ—१ शेर धमासा व चित्रकमूळ, अडुळसा, हरीतकी, आवळकाठी, पाहाडमूळ, सुंठ, हीं प्रत्येकी ८ तोळे. हीं सर्व २०४ तोळे पाण्यांत वाटून चतुर्थांश काढा करून घ्यावा. तो थंड झाल्यावर त्यांत ४०० तोळे साकर घालावी; आणि मोठया तुपानें राबलेल्या भांडयांत भरून पंधरा दिवस तसाच बंद करून ठेवावा, व त्या भांडयास आंतून पिंपळी, चवक, कांग, मध व तूप हीं लावावीं; या आसवांतून प्रात: काळीं बल पाहून द्यावा; ह्मणजे मुळव्याध, संग्रहणी, उदावर्त व अरुचि यांचा नाश करितो. व मळ, मूत्र वायु, ढेंकर, अग्निमांद्य, हृद्रोग, पांडुरोग, व सर्वरोग यांचा नाश करितो.

## द्राक्षासव.

द्राक्षापलशतंदत्वाचतुर्द्रोणांभसापचेत् ॥ द्रोणशेषेरसेतस्मिन्पूतशेषं प्रदापयेत् ॥ शर्करायास्तुलांदत्वातत्तुल्यंमधुनस्तथा ॥ पलानिसप्तधातक्याःस्थापयेदाज्यभाजने ॥ जातीलवंगकंकोलंलवलीफलचंदनैः कृष्णात्रिगदितंयुक्त्याभागैरर्धपलांशकैः ॥ त्रिःसप्ताहात्भवेत्येवं तत्रमात्रांयथाबलं ॥ नाम्नाद्राक्षासवोह्येषनाशयेद्गुदकीलकान् ॥ शोषारोचकहृद्रोगपांडुरक्तपित्तभगंदरान् ॥ गुल्मोदरकृमिग्रंथिक्षतशोषज्वरांतकृत् ॥ वातपित्तप्रशमनंशस्तंचबलवर्णकृत् ॥

अर्थ—द्राक्षें ४०० घेऊन ८१७२ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा. त्यांत साकर ४०० तोळे व मध ४०० तोळे व धायटीचे फूल ५८ तोळे घालून तुपानें राबलेल्या भांड्यांत भरून त्यांत जायफळ, लवंग, कंकोल, हरपरेवडीची फळें व चंदन ही प्रत्येक दोन तोळे घालून एकवीस दिवस तसाच बंद करून ठेवावा; आणि त्यांतून बल पाहून द्यावा. हा द्राक्षासव गुदांकुराचा नाश करितो. व शोष, अरुचि, हृद्रोग, पांडुरोग, रक्तपित्त, भगंदर, गुल्म, उदर, कृमि, ग्रंथि, क्षतक्षय, ज्वर व वातपित्त यांचाही नाश करितो, व बल आणि कांति यानां करितो.

## सन्निपातार्शधूप.

गोधूमपिष्टंपलमेकंहिंगुशाणार्धभल्लातकवेदयुक्तः ॥
स्याद्धूपदानेगुदशूलनाशःस्यात्संनिपातगुदतोद्भवानां ॥

अर्थ— कणीक तोळे ४ हिंग २ मासे व बिबवे ४ हीं एकत्र कुटुन गुदाला धुरी द्यावी; ह्मणजे गुदशूल व सान्निपातोद्भव अर्श नाश पावतात.

## हपुषादितक्रारिष्ट.

हपुषांकुचिकाधान्यमजाजीकारवीसठी ॥ पिप्पलीपिप्पलीमूलंचित्रकोगजपिप्पली ॥ यवानीचाजमोदाचतच्चूर्णंतक्रसंयुतं ॥ मंदाम्लं कटुकंविद्वान्स्थापयेद्घृतभाजने ॥ व्यक्ताम्लंकटुकंजातंतक्रारिष्टं कटुप्रियं ॥ प्रपिबेन्मात्रयाकालेप्रातर्भोज्येतथातृषि ॥ दीपनंरोचनं वर्ण्यंकफवातानुलोमनं ॥ गुदश्वयथुकंड्वार्तिनाशनंबलवर्धनं ॥

अर्थ—थोर शेरणी, मेथी, धनें, जिरें, बडीशेप, कचोरा, पिंपळी, पिंपळीमूळ, चित्रक, गजपिंपळी, ओंवा व अजमोदा, यांचे चूर्ण थोडे आंबट ताकाशीं कालऊन तुपा

च्या भांड्यांत ठेवावे. तें चांगले आंबट व तिखट झालें; ह्मणजे त्याला तक्रारिष्ट ह्मणतात. हा तिखट भक्षण करणाराला प्रिय आहे; हा थोडा प्रातःकाळीं व भोजनकाळीं; आणि ताहान लागेल त्या वेळेस घ्यावा. हा दीपन, रुचिकारक, वर्ण चांगला करणारा व वायूला अनुलोमन करणारा आहे. हा गुदरोग, सूज व कंडू यांचा नाश करितो; व बळाला वाढवितो.

## भर्जितहरीतकीयोग.

घृतसंभर्जितापथ्यापिप्पलीगुडसंयुता ॥
भक्षयेद्वात्रिवृद्धंतिभक्षिताचानुलोमनी ॥

अर्थ—हरीतकी तुपांत भाजून त्यांत पिंपळीचें चूर्ण व गुळ घालून द्यावी; किंवा निशोत्तर घालून द्यावी; ह्मणजे मलाचें अनुलोमन करितें.

## पाहाडमूळयोग.

दुःस्पर्शकेनबिल्वेनयवान्यानागरेणवा ॥
एकैकेनापिसंयुक्तापाठाहंत्यर्शसोरुजं ॥

अर्थ—धमासा, बेलफळ, ओंवा व सुंठ यांतून एकाशीं पाहाडमूळ मिळवून द्यावें; ह्मणजे अर्श विकारांचा नाश करितें.

## सन्निपातिक आणि सहजअर्श.

सर्वैःसर्वात्मकान्याहुर्लक्षणैःसहजानिच ॥

**अर्थ**—सर्वदोषांचीं लक्षणें जाअर्शांचेठायीं असतात, ते सन्निपातिक अर्श जाणावे, आणि उत्पत्तिकालाचीं लक्षणें जा अर्शांचे ठायीं असतात; ते सहज अर्श जाणावे.

## द्वंद्वज, सन्निपातक व सहजअर्श.

हेतुलक्षणसंसर्गाद्विद्याद्वंद्वोल्बणानिच ॥
सर्वोहेतुस्त्रिदोषाणांसहजैर्लक्षणैःसमं ॥

अर्थ—वातादिकांचे हेतु आणि लक्षणे हीं दोघांची येकच जाहालीं असतां; द्वंद्वज अर्श जाणावे. आणि सर्वांचे हेत्वादिक एकत्र झाले असतां; सन्निपात अर्श जाणावे. व उत्पत्तिकालाबरोबर जीं लक्षणें असतात; तींहिंकरून सहज अर्श जाणावें.

## अजीर्णहरमहोदधिवटी.

दंतीबिजमकल्मषंसदहनंशुंठीलवंगंसमंगंधंपारदटंकणंचमरिचंश्री वृद्धदारूविषं ॥ खल्वेयामयुगंविमर्द्यविधिनादंतिद्रवैर्भावनादेयापंचदशानुनिंबुकजलैस्त्रेधात्रिधाचित्रकैः ॥ त्रेधाचार्द्रकजैरसैःशुभधिया

सप्तैवचावेदितापश्चाच्छुष्ककलायसंमितवटीकार्याभिषक्सम्मता ॥
क्षुद्बोधंप्रकरोतिशूलशमनीजीर्णज्वरध्वंसिनीकासारोचकपांडुतोदरग
दःसामामरुहृन्नाशिनी ॥ बस्त्याटोपहलीमकामयहरीमंदाग्निसंदीप
नीसिद्धेयंतुमहोदधिप्रकटितासर्वामयघ्नीसदा ॥

अर्थ–शुद्ध केलेलें जेपाळाचें बीज, चित्रक, सुंठ, लवंग, गंधक, पारा, टांकणखार, मिरीं, वृद्धदारु, बचनाग, हीं समभाग घेऊन खलांत दोन प्रहर विधिपूर्वक खल करून त्याला दांतीच्या रसाच्या पंधरा व लिंबाच्या रसाच्या तीन, चित्रकाच्या तीन, आल्याच्या रसाच्या सात, भावना देऊन सुक्या वाटाण्या एवढ्या गोळ्या कराव्या. त्यांतून एक द्यावी; ह्मणजे क्षुद्बोधाला करिते, व शूल अजीर्ण, ज्वर, खोकला, अरुचि पांडुरोग, उदर, आमरोग, पोटांतील गुडगुडशब्द, हलीमक, मंदाग्नि, व सर्व रोग यांचा नाश करिते.

## क्षुधासागरवटी.

त्रिकटुत्रिफलाचैवतथालवणपंचकं ॥ क्षारत्रयंरसोगंधोद्विभागंपूर्ववद्
द्विषं ॥ आर्द्रकस्यरसेनैवगुंजाभावटकीकृता ॥ अजीर्णेद्विवटीखादे
ल्लवंगैःपंचसप्तभिः ॥ क्षुधासागरनाम्न्येयंवटीसूर्येणनिर्मिता ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहेडा, आंवळकाठी, पंचलवणें, जवखार, साजेखार टांकणखार, पारा, गंधक, हीं समभाग व बचनाग, २ भाग हे सर्व एकत्र करून गुंजेएवढी गोळी करावी, ती अजीर्णावर पांच किंवा सात लवंगाशीं दोन गोळ्या घ्याव्या. हीक्षुधासागर नामकवटी सूर्यानें उत्पन्न केली.

## अग्नितुंडवटी.

शुद्धसूतंविषंगंधमजमोदंफलत्रयं ॥ सर्जिक्षारंयवक्षारंवन्हिसैंधवजी
रकं ॥ सौवर्चलंविडंगानिसामुद्रंत्र्यूषणंसमं ॥ विषमुष्टिःसर्वतुल्यंजं
बीराम्लेनमर्दयेत् ॥ मरिचाभांवटींखादेदग्निमांद्यप्रशांतये ॥ पथ्यशुंठी
गुडंचानुपलार्धंभक्षयेत्सदा ॥ अग्नितुंडावटीख्यातासर्वरोगकुलांतका ॥

अर्थ–शुद्ध पारा, बचनाग, गंधक, ओंवा, हरडा, बेहेडा, आंवळकाठी, साजेखार, यवखार, चित्रक, सैंधव, जिरें, पादेलोण, वावडिंग, मीठ, सुंठ, मिरें व पिंपळी हीं समभाग व कुचल्याच्या बिया सर्व चूर्णाच्या समान, एकत्र करून जंबीराच्या रसांत खलून मिऱ्या एवढी गोळीकरून ती भक्षण करून वर हरीतकी, सुंठ, आणि गूळ मिळून दोतोळे भक्षण करावें. ही अग्नितुंडवटी संपूर्ण रोगकुलाचा अंतक आहे.

## क्षुद्बोधकरस.

व्योषसिंधूत्थबलिभिरेकद्वित्रिलवैस्मृतः ॥
निंबांबुमर्दितोगाढंनाम्नाक्षुद्बोधकोरसः ॥

अर्थ—सुंठ, मिरीं व पिंपळी हीं तीन मिळून एक भाग, सैंधव दोन भाग, गंधक तीन भाग याप्रमाणें औषधें घेऊन त्यांचा निंबूच्या रसांत खल करावा. याला क्षुद्बोधकरस ह्मणतात.

## दुसराप्रकार.

टंकणकणामृतानांसहिंगुलानांसमोभागः ॥ मरिचस्यभागयुगुलंनिंबूनीरैर्वटीकार्या ॥ वटींकलायसदृशींमेकामेवसमश्नियात् ॥ सत्वरमजीर्णशांत्यैवन्हेर्वृध्यैकफध्वस्त्यै ॥

अर्थ—टांकणखार, पिंपळी, बचनाग व हिंगुळ हे समभाग व मिरीं २ भाग, यांचें चूर्ण एकत्र करून लिंबूच्या रसांत वाटाण्याएवढी गोळी करावी, त्यांतून अजीर्ण नाशा. करितां व अग्निच्या वृद्धीकरितां एक गोळी घ्यावी.

## भस्मवटी.

रजीकृतंपंचपलंतुपाम्लेस्विन्नंशिवायुग्विषतिंदुबीजं ॥ हिंगुकृमिघ्नंत्रिपटुत्रिदीप्यंपलंपृथक्त्र्यूषणगंधयुक्तं ॥ चूर्णीकृतंनिंबुरसेनभाव्यंकोलास्थिमात्रावटिकाविधेया ॥ संसेविताहंतिनृणामजीर्णंत्दृद्रोगगुल्मंकृमिजांश्चरोगान् ॥ प्लीहाग्निमांद्यार्तितथामवातंशूलातिसारंग्रहणीरुजंच ॥ जलोदरार्शःकृमिजांश्चरोगान्हन्याद्बहून्वातकफोद्भवांश्च ॥

अर्थ—हरीतकी व कुचल्याच्या बिया, बारीक करून कोंड्याच्या आम्लामध्यें पचन करून नंतर हिंग, वावडिंग, सैंधव, बिडलोण, संचळ, ओंवा, अजमोद खुरासनी ओंवा, सुंठ, मिरीं, पिंपळी, हीं प्रत्येकीं, चार चार तोळे घेऊन त्यांचें चूर्ण करून त्यांत मिळवून लिंबूरसाची भावना द्यावी; आणि बोराच्या आंठी एवढी गोळी करून द्यावी. ती अजीर्ण, त्दृद्रोग, गुल्म, कृमी, प्लीहा, अग्निमांद्य, आमवात, शूल, अतिसार, संग्रहणी, जलोदर, अर्श व कृमीपासून झालेल्या व वायु आणि कफ यांपासून झालेल्या बहुत व्याधीचा नाश करित्ये.

## शंखवटी.

पलंचिंचाक्षारःपलपरिमितंपंचलवणंद्वयंसम्यक्पिष्टंभवतिलघुनिंबूफलरसैः ॥ ततस्तप्तंतस्मिन्पलपरिमितंशंखशकलंक्षिपेद्वारान्सप्तद्रव

तितदनेनैवविधिना ॥ पलप्रमाणंकटुकत्रयंचतुलार्धमानेनचहिंगुभागः ॥ विषंपलद्वादशभागयुक्तंलावद्रसोगंधकएषचोक्तं ॥ बादरास्थिप्रमाणेनवटीमितस्यकारयेत् ॥ भक्षयेत्सर्वदासास्यात्सर्वाजीर्णप्रशांतये ॥ सर्वोदरेषुशूलेषुविषूच्यांविविधेषुच ॥ अग्निमांद्येषुगुल्मेषुसदाशंखवटीहिता ॥

अर्थ–चिंचेचा क्षार ४ तोळे व पंचलवणे ४ तोळे यांचा खल करून ते लिंबाच्या रसांत घालून त्यांत चार तोळे शंखाचे तुकडे तापवून त्या रसांत सातवेळ विझवावे; ह्मणजे गळून जातात. त्यांत सुंठ, मिरीं व पिंपळी हीं चार तोळे, हिंग २ तोळे व बचनाग १२ तोळे, व गंधक १२ तोळे, घालून घोटून त्याची बोराच्या आंठीएवढी गोळी करून. ती खावी; ह्मणजे अजीर्ण, संपूर्ण उदरें, शूल, तरळ, अग्निमांद्य व गुल्म हे नाश पावतात, हिला क्षंखवठी ह्मणतात.

## अग्निकुमाररस.

पारदंचविषंगंधंटंकणंसमभागतः ॥ मरीचादष्टभागास्युर्द्वौशंखकवराटयोः ॥ पक्कजंबीरजैर्गाढंरसैःसप्तविभावयेत् ॥ गुंजाद्वयमितोदेयोरसोह्यग्निकुमारकः ॥ समीरणसमुद्भूतमजीर्णंचविषूचिकां ॥ क्षणेनक्षपयत्येषक्षयरोगनिकृंतनः ॥

अर्थ–पारा, बचनाग, गंधक व टांकणखार, हे समभाग, मिरीं ८ भाग, शंखभस्म व कवड्याचे भस्म २ भाग याप्रमाणें एकत्र करून त्याला पिकलेल्या लिंबूच्या रसाच्या सात भावना द्याव्या, त्याची दोन गुंजा प्रमाणाची गोळी करुन द्यावी; ह्याला अग्निकुमार ह्मणतात; हा वायुपासून झालेलें अजीर्ण, तरळ, आणि क्षयरोग यांचा क्षणांत नाश करील.

## दुसरा प्रकार.

रसेनगंधंसहटंकणेनसमंविषंयोज्यमतस्त्रिभागं ॥ कपर्दशंखावपिनेत्रभागौमरीचकंचाष्टगुणंविमर्द्य ॥ सुपक्कजंबीररसेनखल्वेशुद्धोभवत्यग्निकुमारकोयं ॥ अजीर्णवातंगुदगुल्मवातंविषूचिकाद्यंविनिहंतिसद्यः ॥

अर्थ–पारा, गंधक, टांकणखार हे समभाग व बचनाग ३ भाग, आणि कवड्या व शंख यांचे भस्म २ भाग व मिरीं ८ भाग एकत्र करून लिंबूरसांत भावना द्यावी; ह्मणजे हा शुद्ध अग्निकुमार होतो. हा अजीर्ण, वायु व गुदवात, गुल्मवात, तरळ आदिकरून व्याधींचा नाश करितो.

## तिसरा प्रकार.

टंकणंरसगंधौचसमभागंत्रयंविषात् ॥ कपर्दशंखौद्विलवौवसुभागंमरी

चकं ॥ दिनंजंभांभसापिष्टानागवल्यार्द्रवन्हिना ॥ शिग्रुमूलेनलुंगेनभ वेदग्निकुमारकः ॥ अजीर्णशूलमंदाग्निप्लीहपांडुामयेषुच ॥ वातरोगेषुस र्वेषुमूत्ररोगेषुवातजे ॥ कासेदुर्नाम्न्यतीसारेग्रहण्यांसन्निपातके ॥

अर्थ-टांकणखार, पारा व गंधक हे समभाग; बचनाग ३ भाग, कवड्या व शंख यांचें भस्म २ भाग, मिरीं ८ भाग, हीं एकत्र करून त्यांचा जांबरें, विड्याचीं पानें, चित्रक, शेवग्याचीं मूळें व महाळुंग, यांचा रसांत एकेक दिवस खल करावा. हा अग्निकुमार अजीर्ण, शूल, मंदाग्नि, प्लीहा, पांडुरोग, संपूर्ण वातरोग, मूत्ररोग, खोकला मुळव्याध, अतिसार, संग्रहणी, आणि सन्निपात यांचा नाश करितो.

## चवथा प्रकार.

समानौगंधकरसौतदर्धवत्सनाभकं ॥ रसस्यताम्रभस्मापिसमंचूर्ण्य विमर्दयेत् ॥ हंसपादिरसेनाथकाचकुप्यांविनिक्षिपेत् ॥ वालुकायंत्र विधिनात्रियामंपाचयेद्भिषक् ॥ रसार्धममतंक्षिप्त्वापुनःसंचूर्ण्यमर्दयेत् वन्हित्रिकटुसिंधूत्थयुक्तेनार्द्रकवारिणा ॥ गुंजामात्रंहिदातव्यंमंदाग्नौ सन्निपातके ॥ धनुर्वातेप्यजीर्णेचशूलेचक्षयकासयोः ॥ अयमग्निकुमा राख्योरसःस्यात्प्लीहगुल्मनुत् ॥

अर्थ-गंधक व पारा हे समभाग, व बचनाग अर्धाभाग, ताम्रभस्म एक भाग, हे पदार्थ एकत्र करून, हंसपादी रसानें खल करून सुकवून काच कुपीत भरून वालुका. यंत्रांत तीन प्रहर पचन करावा. शीत झाल्यावर काढून त्यांत बचनाग अर्धाभाग, मिळवावा; नंतर सुंठ, मिरीं, पिंपळी व सैंधव यांच्या चूर्णाशीं एक गुंज प्रमाण मंदाग्नि, सन्निपात, धनुर्वात, अजीर्ण, शूल, क्षय व खोकला यांवर द्यावा. हा अग्निकुमाररस गुल्म व प्लीहा यांचा नाश करितो.

## बृहत्क्रव्यादरस.

द्विपलंगंधकंशुद्धंद्रावयित्वाविनिक्षिपेत् ॥ पारदंपलमानंतुमृतशुल्वा यसंपुनः ॥ ततोविचूर्ण्ययत्नेनलोहपात्रेविचक्षणः ॥ स्थापयेत्त्वरसंतत्र पात्रंचोपरिनिक्षिपेत् ॥ वस्त्रपूतंततःकृत्वालोहपात्रेविनिक्षिपेत् ॥ प लमानेनसंमिश्र्यपंचांगुलदलेक्षिपेत् ॥ मृद्वग्निनापचेत्तत्तुदर्व्यासंचा लयेन्मुहुः ॥ पत्रमात्रंरसंशुद्धंदद्याज्जंबीरिकस्यतु ॥ संचूर्ण्यपंचकोलोत्थैः कषायैःसाम्लवेतसैः ॥ भावनाःकिलदातव्याःपंचाशत्प्रमिताःपृथक् ॥

भ्रष्टटंकणचूर्णंचतुल्येनसहमेलयेत् ॥ तदर्धंकृष्णलवणंमरिचंसर्वतुल्य कं ॥ सप्तधाभावयेत्पश्चाच्चणकक्षारवारिणा ॥ ततःसंशोष्यवैपश्चात्कूप्या श्चजठरेक्षिपेत् ॥ अत्यर्थंगुरुमांसानिगुरुभोज्यान्यनेकशःभुक्त्वाचा कंठपर्यंतंचतुर्वल्लमितोनरः ॥ कट्वम्लतक्रसहितःपीतमात्रोहिपाचयेत् ॥ पुनर्भोजयतिक्षिप्रंकापुनर्मंदवान्हिता ॥ रसःक्रव्यादनामायंप्रोक्तोमंथान भैरवैः ॥ सिंहलक्षोणिपालस्यभूरिमांसप्रियस्यच ॥ पुनर्भोजनकाम स्यभैरवानंदयोगिना ॥ कुर्याद्दीपनमूर्ध्वजत्रुगदत्त्वत्कुष्ठामसंशोधनं स्कंधस्थौल्यनिवर्हणोगदहरःशूलार्तिमूलापहः ॥ गुल्मप्लीहविनाशको बहुरुजांविध्वंसनोवातत्त्वद्वातग्रंथिहरोमदापहरणोक्रव्यादनामारसः ॥

अर्थ—गंधक ८ तोळे घेऊन तो लोहपात्रांत पातळ करावा. त्यांत पारा, ताम्र, व लोह ही चार चार तोळे मिळवून नंतर बारिक करावा; आणि पुनः लोहपात्रांत घालून त्यावर दुसरें झांपण ठेवावें; आणि किंचित् पुनः पातळ करून सुकवून त्यावर गाळून पुनः लोहपात्रांत एरंडाच्या पानावर टेऊन मंदाग्नीनें पचन करावा; आणि लोखंडाच्या पळीनें वारंवार चाळवावा; नंतर ४ तोळे लिंबूरस, व पंचकोलांचा काढा, आम्ल वेतस यांचा ५० पन्नास भावना द्याव्या; नंतर त्या औषधांइतके भाजलेल्या टांकणखाराचें चूर्ण घालावें. व पादेलोण टांकणखाराच्या निमें व सर्व चूर्णाच्या समान मिऱ्यांचें चूर्ण घालून त्यास हरभऱ्याच्या आंबीच्या सात भावना द्याव्या; नंतर सुकवून कुपींत भरून ठेवावा. हा क्रव्यादरस अत्यंत जड भोजन, जड मांसें, आकंठ भक्षण करून त्यावर चार वाल तिखट, आंबट व ताक यांशी घ्यावा; ह्मणजे पुनः भोजनाची इच्छा करितो. मग मंदाग्नीची काय कथा? हा क्रव्यादरस मंथानभैरवानीं बहुत मांस खाणाऱ्या, पुनः भोजनाची इच्छा करणाऱ्या, अशा सिंहल देशच्या राजाला सांगितला. हा अग्निदीपन करून गळ्यावरचे व्याधी, कुष्ट, आम, स्कंधाचा स्थुलता, शूल, गुल्म, प्लीहा, व अनेक व्याधी, वातग्रंथी, आणि उन्माद यांचा नाश करितो.

## क्रव्यादरस.

मस्तुनिंबुरसप्रस्थंमृतीयांशार्द्रकान्वितं ॥ वरांगेलापलंदेवपुष्पंपंचद शस्मृतं ॥ टंकणंवन्हिसहितंपलार्धंकटुकत्रयं ॥ वरंसार्धपलंसर्वंपि ष्ट्वासंशोध्यवाससा ॥ रसःक्रव्यादसंज्ञोयंराजारामप्रकाशितः ॥

अर्थ—ताकाची निवळी, व लिंबूचा रस ६४ तोळे, व आल्याचा रस २१ तोळे, हरडा, बेहडा, आवळकाठी हीं १६ भाग, व एळा ४ तोळे, लवंगा १५ तोळे, टांकण-

खार, चित्रक हे २ तोळे; सुंठ, मिरी, व पिंपळी, ही साहा साहा तोळे; या सर्वांचें चूर्ण करून वस्त्रावर गाळून घ्यावें. हा क्रव्यादरस राम राजानें सांगितला आहे.

## वडवानळ चूर्ण.

रसेनगंधंद्विगुणंगृहीत्वातौनागवंगौरसतुल्यभागौ ॥
कृत्वासमंषोडशभागसंख्ययामरीचचूर्णंवडवानलस्य ॥

**अर्थ**–पारा, १ गंधक, २ व शिसें, वंग यांचें भस्म १ भाग, आणि मिरीं १६ भाग या सर्वांचें चूर्ण एकत्र करावें. याला वडवानल चूर्ण ह्मणतात.

## अग्निदीपनीवटी.

गंधकंमरिचंशुंठीसैंधवंयवजंतवं ॥
निंबूरसेनवटिकाचणमात्राग्निदीपनी ॥

**अर्थ**–गंधक, मिरी, सुंठ, सैंधव, इद्रजव, व वावडिंग यांची चूर्ण एकत्र करून लिंबू रसांत खलोन चण्या एवढी गोळी करावी. ही अग्नि दीपक आहे.

## अग्निकुमार.

पारदंशुत्धगंधंचविषंमात्रंत्रिभिःसमं ॥ कपर्दंविषतुल्यांशंतत्तुल्यंस्व
र्जिकाकणा ॥ शुंठीचाष्टगुणायुक्तामरिचंमेलयेद्बुधः ॥ मर्दयित्वाख
लेकृत्वायावरसाकज्जलप्रभा ॥ जंबीरनीरैर्दयाचभावनासप्तवैततः ॥
आर्द्रकस्यरसेनैवततःसिद्धंद्विगुंजकं ॥ रसश्चाग्निकुमारोयंआमसंचय
जांरुजं ॥ अग्निमांद्यमजीर्णंचनाशयेत्कफत्दृत्परः ॥

अर्थ–पारा, गंधक, व बचनाग, हे समभाग व कवड्याचें भस्म ३ भाग. साजे खार, टांकणखार, पिंपळी, हे १ भाग, सुंठ ८ भाग व मिरीं ८ भाग हीं सर्व खलांत घालून काजळासारिखे होत, तों खलून लिंबाचे रसाच्या सात भावना व आल्याच्या रसाच्या सात भावना देऊन त्यांतून दोन गुंजा द्यावा; हा अग्निकुमाररस आमाला शोषितों; व अग्निमांद्य, अजीर्ण, आणि कफ यांचा नाश करितो.

## लघुपानीयभक्तवटी.

रसोर्धभागिकस्तुल्याविडंगमरिचाभ्रकाः ॥ भक्तोदकेनसंम
र्द्यकुर्याद्गुंजासमागुटी ॥ भक्तोदकानुपानैश्चसेव्यावन्हिप्रदी
पनी ॥ वार्यन्नभोजनंचात्रप्रयोगेसात्म्यमिष्यते ॥

**अर्थ**–पारा अर्धा भाग व वावडिंग, मिरीं, अभ्रक, हे प्रत्येक १ भाग. हे भाताच्या

पेजेत खलोन एक गुंजेची गोळी करावी, व भाताच्या पेजेशीं द्यावी; ह्मणजे अग्निदीपन करितें, यावर पथ्य नाहीं, परंतु सात्म्यभोजन करावें.

## राजवल्लभरस.

रसनिष्कंगंधकैकंनिष्कमात्रंप्रदीपनं ॥ सार्धपलंप्रदातव्यंचूलिकाल वणंततः ॥ खल्वेनमर्दयेत्ततुसूक्ष्मवस्त्रेणगालयेत् ॥ माषमात्रंप्रदा तव्योभुक्तमांसादिजारकः ॥ अजीर्णेषुत्रिदोषेषुदेयोयंराजवल्लभः ॥

अर्थ–पारा ४ मासे, गंधक १ तोळा, चित्रक ४ मासे, नवसागर ६ तोळे, हे सर्व खलोन वस्त्रावर गाळून, त्यातून एक मासा हा राजवल्लभरस द्यावा; ह्मणजे मांसादिकानां जिरवितो, व अजीर्ण, त्रिदोष, यांवरही द्यावा.

## लब्धानंदरस.

पारदंगंधकंलोहमभ्रकंविषमेवच ॥ समांशंमरिचंचाष्टौटंकणंचचतु र्गुणं ॥ भृंगराजरसैःसप्तभावनाचाम्लदाडिमैः ॥ गुंजाद्वयंपर्णखंडैः खादेत्सोयंनिहंतितान् ॥ वातश्लेष्मोद्भवान्रोगान्मंदाग्निंग्रहणींज्व रान् ॥ अरुचिंपांडुतांचैवजयेदचिरसेवनात् ॥

अर्थ–पारा, गंधक, लोहभस्म, अभ्रकभस्म, बचनाग, हे प्रत्येक समभाग, व मिरीं ८ भाग, टांकणखार ४ भाग, याप्रमाणें एकत्र करून त्याला माका व आंबटें डाळिंब, यांचा सात सात भावना द्याव्या, आणि त्यातून दोनगुंजा विड्याच्या पानाशीं घ्यावा; ह्मणजे वायु, कफ, यांपासून झालेल्या व्याधी, मंदाग्नि, संग्रहणी, ज्वर अरुची, पांडु रोग, यांचा शीघ्र नाश करितो.

## महोदधिवटी.

एकैकंविषसूतंचजातिटंकाद्विकंद्विकं ॥ कृष्णात्रिकंविश्वषट् कंदग्धंकपर्दकंतथा ॥ देवपुष्पंबाणमितंसर्वंसंमर्दयेत्ततः ॥ महोदधिवटीनामनष्टमग्निंप्रदीपयेत् ॥

अर्थ–बचनाग, १ पारा, १ जायफळ, २ टांकणखार, २ पिंपळी, ३ सुंठ, ६ कव डीचें भस्म, ६ लवंगा, ५ भाग हे सर्व एकत्र खलावें, याला महोदधिवटी ह्मणतात. ही अग्नीला वढवितें.

## सूरण चूर्ण.

शर्करायुतसूरणकंदंगुंजाकेशरमेवतथान्यत् ॥
क्षौद्रयुतंनवनीतमथोवासूदनकारणमर्शसएव ॥

अर्थ—साकर, सुरणाचा कांदा, गुंजा व नाकेशर यांचें चूर्ण, मध, किंवा लोणी यांशीं द्यावें; ह्मणज मुळव्याधीचा नाश करितें.

## वैक्रांताख्यरस.

मृतसूताभ्रवैक्रांतकांतताम्रंसमंसमं ॥ सर्वतुल्येनगंधेनमर्द्यंभल्लातका
चितं ॥ दिनैकंतद्रवैरेववटींकुर्याद्द्विगुंजकां ॥ भक्षयेद्गुदजान्हंतिद्वं
द्वजंचत्रिदोषजं ॥ प्रत्यष्टमुसलीवन्हिभागाःकुष्ठस्यषोडश ॥ पिप्पली
पिप्पलीमूलंक्षिपेद्भागद्वयंद्वयं ॥ चतुष्कंतुविडंगस्तुमरिचंकटुशुंठिका ॥
ब्रह्मदंडितथैकैकंचूर्णितंद्विगुणंगुडं ॥ कर्षांशंभक्षयेच्चानुह्यर्शोरोगप्रशां
तये ॥ वैक्रांताख्योरसोनामसाध्यासाध्यार्शशांतये ॥

अर्थ—पारदभस्म, अभ्रकभस्म, वैक्रांत भस्म, कांतभस्म व ताम्रभस्म हीं समभाग; या सर्वांच्या समान गंधक आणि बिबवे हे घालून एक दिवस खल करावा व बिबव्याच्या तेलांत गोळी दोन गुंजाची करावी. ती अनुपानाशीं द्यावी; आणि मुसली, चित्रक ८ भाग, कोष्ट १६ भाग, व पिंपळी २ भाग, पिंपळी मूळ २ भाग, व वावडिंग चार भाग व मिरीं कोथिंबीर, सुंठ, व ब्रह्मदंडी हीं प्रत्येकीं एकेक भाग यांचें चूर्ण करून त्याचे दुप्पट गुळ घालून त्याची गोळी तोळा प्रमाण करून ती मागून खाण्यास द्यावी, ह्मणजे मुळव्याधीची शांती होत्ये. हा वैक्रांतरस साध्यासाध्य अर्शनाशनाविषयीं प्रशस्त आहे.

## पर्पट्यादियोजना.

गोमूत्रेणसमंपीत्वागुंजाष्टौपर्पटीरसं ॥ ताम्रपर्पटिकातद्वत्गुडशुंठिभ
यान्विता ॥ भक्षयेदर्शसांशांत्यैअनुपानंचकथ्यते ॥ जीवंतिपुष्करंवन्हि
बिल्वमज्जकचोरकं ॥ करवीरंयवक्षारंजाजिचूर्णंपलंपलं ॥ द्विपलं
तित्तिणीचूर्णंलाजाचूर्णंचतुःपलं ॥ तिलतैलंघृतंचैवप्रत्येकंतुपलद्वयं ॥
भ्रष्टंसर्वंप्रयोक्तव्यंकर्षैकमनुपानकं ॥

अर्थ—पर्पटीरस आठ गुंजा गोमुत्राशीं द्यावा; किंवा ताम्रपर्पटी रस गुळ, सुंट व हरीतकी यांशीं द्यावा, त्याचें अनुपान सांगतों. जीवंती, पुष्करमूळ, चित्रक बेलफळाचा मगज, कचोरा, अर्जुनवृक्षाची साल, यवक्षार व जिरें यां प्रत्येकांचे चूर्ण ४ तोळे व चिंच ८ तोळे लाह्याचूर्ण १६ तोळे, व तिळांचें तेल व तूप हीं प्रत्येकीं ८ तोळे घेऊन सर्व भाजून त्यातून एक तोळा मागून भक्षणार्थ द्यावें.

## कुटजावलेह.

कुटजत्वक्तुलांद्रोणेजलस्यविपचेत्सुधीः ॥ कषायंपादशेषंचगृण्ही

याद्वस्त्रगालितं ॥ त्रिंशत्पलंगुडस्यात्रदत्वाचविपचेत्पुनः ॥ सांद्रत्व मागतंज्ञात्वाचूर्णानीमानिदापयेत् ॥ रसांजनंमोचरसंत्रिकटुंत्रिफलां तथा ॥ लज्जालुंचित्रकंपाठांबिल्वमिंद्रयवान्वचां ॥ भल्लातकंप्रतिवि षंविडंगानिचवालकं ॥ प्रत्येकंपलसंमानंघृतस्यकुडवंतथा ॥ सिद्ध शीतेततोदद्यान्मधुनःकुडवंतथा ॥ जयेदेषोवलेहस्तुसर्वाण्यर्शांसिवेग तः ॥ दुर्नामप्रभवान्रोगानतीसारमरोचकं ॥ ग्रहणींपांडुरोगंचरक्त पित्तंचकामलां ॥ आम्लपित्तंतथाशोफंकार्श्यंचैववाहिकां ॥ अनुपाने प्रयोक्तव्यमाजंतक्रंपयोदधि ॥ घृतंजलंवाजीर्णेचपथ्यभोजीभवेन्नरः ॥

**अर्थ**—कुडयाची साल एक तुला प्रमाण घेऊन थोडी कुटून त्यांत पाणी एक द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राहोतोंपर्यंत काढा करून फडक्यांत गाळून त्यांत गूळ तीस पळ प्रमाण टाकून फिरून घण होई तोपर्यंत पाक करून नंतर त्यांत चूर्ण करून टाकावयाचीं औषधें यणेंप्रमाणें. रसांजन, मोचरस, सुंठ, मिऱ्यें, पिंपळी, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, लाजेरी, चित्रक, पाहाडमूळ, लहान बेलफळ, इंद्रजव, वेखंड, भिलावा, अतिविष, वावडिंग, वाळा, हीं १८ औषधें पळपळ प्रमाण घेऊन चूर्ण करून पाकांत टाकावीं. व तूप एक कुडवप्रमाण टाकून थंड झाल्यावर त्यांत मध एक कुडवप्रमाण मे- ळवून मग हा अवलेह शेळीचे दुधांत अथवा ताकांत; किंवा दह्यांत, तुपांत; अथवा पाण्यांत घ्यावा. व अन्न जिरणी पडलें असतां घ्यावा. व चांगलें पथ्य करावें. तेणेंकरून संपूर्ण मूळव्याधी लवकर दूर होतात. व दुष्ट नाम आहे ज्यांना असे भगंदरादिक रोग, अतिसार, आंवढणें संग्रहणी, पांडुरोग, रक्तपित्त, डोळ्यात कावील होते ती, आम्लपित्त, सूज, कृशता, प्रवाहिकारोग अतिसाराचा भेद आहे तो, हे रोग दूर होतात.

## कूष्मांडावलेह.

युक्त्याकूष्मांडखंडानिसूरणंविपचेत्सुधीः ॥
अर्शांसिगुडवातानांमंदाग्निषुप्रयुज्यते ॥

**अर्थ**—कोहळ्याचे तुकडे, सुरण हे युक्तीनें पचन करावे; आणि ते द्यावे; ह्मणजे अर्श, खुडवात व मंदाग्नि यांचा नाश करितात.

## भल्लातकावलेह.

सुपक्वभल्लातफलानिसम्यक्द्विधाकृतान्याढकसंमितानि ॥ विपाच्य तोयेनचतुर्गुणेनचतुर्थशेषेव्यपनीयतानि ॥ पुनःपचेत्क्षीरचतुर्गुणेन

घृतांशयुक्तेनघनंयथास्यात् ॥ शीतोपलाषोडशभिःपलैश्चविमर्द्यसं स्थाप्यदिनानिसप्त ॥ ततःप्रयुंज्यानिबलेनमात्रांजयेद्विकारानखि लान्गुदोत्थान् ॥ कचान्सुनीलान्घनकुंचिताग्रान्सुपर्णदृष्टिंचशशां ककांतिं ॥ जवाहयानांबलमुत्तमंचस्वरंमयूरस्यहुताशदीप्तिं ॥ स्त्री वल्लभत्वंविविधंप्रभावंनीरोगतांद्विस्त्रिशतायुषंच ॥ नचान्नपानेपरि हारमस्तिनचातपेनाध्वनिमैथुनेच ॥ प्रयोगकालेसकलामयानांरा जाधिराजाचरसायनानां ॥

अर्थ—चांगले पिकलेले व फोडलेले बिबवे १०२४ तोळे घेऊन ते ४०९६ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून तो गाळून घ्यावा. व त्यांत काढयाच्या चौपट दूध व चतुर्थांश तूप घालून घण होई तोंपर्यंत आटवून त्यांत खडी साकर ६४ तोळे घालून घोटून तसाच सात दिवस ठेवावा; नंतर अग्नि व बळ पाहून द्यावा; ह्मणजे संपूर्ण गुद रोगाचा नाश करितो; व केश काळे, दृष्टि गरुडासारिखी, कांति चंद्रासारिखी, वेग घोड्यासारिखा, उत्तम बळ, मोरासारिखा शब्द, अग्निसारिखी दीप्ति, आणि स्त्रियानां प्रिय निरोगी, व शंभराहून ज्याजती आयुष्य करितो. याला अन्नपान, ऊन व मैथुन यांची बंदी नाहीं. हा घेतला असतां, संपूर्ण रोगाचा नाश करितो; व संपूर्ण रसायनामध्यें राजाधिराज आहे.

## स्नुहिक्षीरलेप.

स्नुहिक्षीरनिशालेपस्तथागोमूत्रकल्कितः ॥ योजितोगोभवक्षीरवन्हि मूलावचूर्णितं ॥ पिबंस्तदेवतेनैवभुंजानोगुदजांकुरान् ॥

अर्थ—निवडुगाचा चीक, हळद, गोमूत्र यांचा लेप करावा, आणि गाईचे दुधाबरोबर चित्रकाचें चूर्ण खावें; याला पथ्य दूध भात जेवावा; ह्मणजे मुळव्याध बरी होईल.

## कोकंबादिचूर्ण.

समूलपत्रकोकंबंपलद्वयमितंशुभं ॥ भल्लातफलमज्जायामरी चस्यपलंपलं ॥ एतच्चूर्णीकृतंसूक्ष्मंभक्षयेत्कर्षसंमितं ॥ अर्शी कुरान्निहंत्याशुसबाह्याभ्यंतरानपि ॥

अर्थ—कोकंबाचे पंचांग ह्मणजे मूळ, पानें, फळें यासहित झाड, ८० मासे, बिब्यांचा मगज (ह्मणजे गोडंब्या) ४० मासे व मिरें ४० मासे, यांचें चूर्ण कर्षप्रमाण ह्मणजे १० मासे खावें; ह्मणजे आंतले व बाहेरले मोड नाश पावतील.

## समशर्करयोग.

शुंठीकणामरिचनागदलत्वगेलंचूर्णीकृतंक्रमविवर्धितमूर्ध्वमंत्यात् ॥
खादेदिदंसमसितंगुदजाग्निमांद्यगुल्मोदरश्वयथुपांडुगुदांकुरेषु ॥

अर्थ–६ भाग सुंठ, ५ पिंपळी, ४ मिरीं, ३ विडयाची पानें, २ दालचिनी व १ भाग एलची यांचे चूर्ण करावें, आणि चूर्णाचा समान साकर घालून द्यावें; ह्मणजे मुळव्याध, अग्निमांद्य, गुल्म, उदर, सूज, पांडुरोग, आणि गुदांकुर यांचा नाश करितें.

## व्योषादिचूर्ण.

व्योषाढयपुष्करविडंगतिलाभयानांचूर्णंगुडेनसहितंसततंप्रयोज्यं ॥
दुर्नामशोफगरकुष्ठशकृद्विबंधमग्नेर्जयत्यबलतांकृमिपांडुतांच ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, चित्रक, वावडिंग, तिळ व हरीतकी यांचे चूर्ण गुळाशीं द्यावें; ह्मणजे अर्श, सूज, विष, कोड, विट्बंध, अग्निमंदता, कृमि, आणि पांडुरोग यांचा नाश करितें.

## करंजादिचूर्ण.

करंजशुंठींद्रयवारलूतासिंधूत्थवान्हिप्रतिमिश्रितानां ॥
तक्रेणचूर्णंपिबतोस्यनित्यंअर्शांसिरक्तेनपतंतिसार्धं ॥

अर्थ–करंज, सुंठ, इंद्रजव, दिंडा, सैंधव व चित्रक यांचें चूर्ण एकत्र करून तें ताकाशीं पिण्याकरितां द्यावें; ह्मणजे अर्श, आणि रक्तार्श हे गळून जातात.

## विजयाचूर्ण.

त्रिकत्रयंवचाहिंगुपाठाक्षारौनिशाद्वयं ॥ चव्यतिक्ताकालिंगानिशता
व्हालवणानिच ॥ ग्रंथिबिल्वाजमोदाचगणोष्टाविंशतिर्मतः ॥ एता
निसमभागानिसूक्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ चूर्णंविडालपदकंपिबेदुष्णेनवा
रिणा ॥ एरंडतैलसंयुक्तंलिह्याच्चूर्णमिदंनरः ॥ हन्यादर्शांसिसर्वाणि
श्वासशोषभगंदरान् ॥ हृच्छूलंपार्श्वशूलंचवातगुल्मंतथोदरं ॥ हि
क्काश्वासंप्रमेहंचपांडुरोगंसकामलं ॥ आमवातमुदावर्तमंत्रवृद्धिंगुद
कृमीन् ॥ हन्याच्चग्रहणीरोगान्भिषग्भिर्यत्प्रकीर्तितः ॥ विजयानाम
चूर्णोयंसर्वव्याधिहरःपरः ॥ महाज्वरोपसृष्टानांभूतोपहतचेतसां ॥ अप्र
जानांचनारीणांहितमेतद्धिभेषजं ॥

अर्थ—त्रिफळा, त्रिकटु, त्रिसुगंध, वेखंड, हिंग, पाहाडमूळ, क्षार दोनप्रकारचे, हळद, दारुहळद, चवक, कुटकी, इंद्रजव, शतावरी, पंचलवणें, पिंपळीमूळ, बेलफळ व अजमोदा हा अठावीस औषधांचा गण समभाग घेऊन त्याचें सूक्ष्म चूर्ण करुन १० मासे ऊन पाण्याशीं घ्यावें, किंवा एरंड तैलाशीं घ्यावें; ह्मणजे सर्व प्रकारचे अर्श, श्वास, शोष, भगंदर, ह्रदयांतील शूल, पार्श्वशूल, वातगुल्म, उदर, उचकी, श्वास, प्रमेह, पांडुरोग, कामला, आमवात, उदावर्त, अंत्रवृद्धि, मुळव्याध, कृमि व संग्रहणी यांचा नाश करितें. हें विजया चूर्ण सर्व व्याधिनाशक आहे, व माहाज्वर, भूतबाधा व वंध्या-स्त्रीयानां हें औषध हितकारक आहे.

## देवदाल्यादियोग.

देवदालिकषायेणशौचमाचरतांनृणां ॥
किंवातद्धिमसेवाभिःकुतःस्युर्गुदजांकुराः ॥

अर्थ—देवडांगरीच्या कषायानें गुदप्रक्षालन करीत गेलें असतां; किंवा देवडांगरीचा हिम करून घेतला असतां; त्याला गुदांकुर होणारच नाहींत.

## मरीचादिमोदक.

मरिचमहौषधचित्रकसूरणभागायथोत्तरंद्विगुणाः ॥
सर्वसमोगुडभागोसेव्योवैमोदकःप्रसिद्धफलः ॥

अर्थ—मिरीं, सुंठ, चित्रकमूळ व सुरण हीं प्रत्येकीं एकाहून दुप्पट घ्यावीं; आणि सर्वांच्या चूर्णासमान गूळ घालून त्याचा मोदक द्यावा. हा अर्शावर प्रसिद्ध गुणकारी आहे.

## प्राणदमोदक.

तालीसज्वलनोपणासचविकास्तुल्यंद्विभागाभवेत्कृष्णामूलसमन्वि
तात्रिपलिकाशुंठीचतुर्जातकं ॥ स्यान्मुष्टिप्रमितंगुडत्रिगुणितैरेभिः
कृतोमोदकोकासश्वासमदाग्निमांद्यगुदजप्लीहप्रमेहापहः ॥

अर्थ—तालीसपत्र, चित्रक, मिरीं व चवक हीं समभाग, पिंपळी दोनभाग व पिंपळी-मूळ व सुंठ हीं बारा तोळे दालचिनी, तमालपत्र, एलची व नाकेशर हीं चार चार तोळे; व या सर्वांच्या तिप्पट गुळ घालून त्याचा मोदक द्यावा. हा खोकला, श्वास, मंदाग्नि, मुळव्याध, प्लीहा, आणि प्रमेह यांचा नाश करितो.

## कांकायनीगुटी.

पथ्यादलस्यपलपंचकमेवमेकमेकंपलंचमरिचादपिजीरकस्य ॥ कृष्णा
तदुद्भवजटाचविकाग्निशुंठीकृष्णादिपंचकमिदंपलतःप्रवृद्धं ॥ पलाष्ट

भल्लातकसंप्रयुक्तंदारूकरुष्करपलाद्विगुणंप्रकल्प्या:॥स्याद्यावशूककुड वार्धमत:समस्तयोज्योगुडाद्विगुणितावटककिताश्च ॥ कांकायनेनमुनि नावटक:किलायमुक्त:प्रजाहितमेनगुदामयघ्नः ॥ क्षाराग्निशस्त्रपत नैरपियेनसिद्धासिध्यंत्यनेनवटकेनगुदामयास्ते ॥

अर्थ–हिरडादळ २० तोळे व मिरीं, जिरें, पिंपळी, पिंपळीमूळ, चवक, चित्रक, सुंठ, हीं चार चार तोळे व बिबवे ३२ तोळे तेल्यादेवदार ६४ तोळे व जवखार ८ तोळे यासर्वांच्या दुप्पट गूळ घालून गोळी करून द्यावी. ही कांकायनानें सांगितली. ही गुदरोगनाशक आहे, आणि जे अर्श क्षार, अग्नि व शस्त्र यांणी बरे होत नाहींत, ते या गोळीनें बरे होतात.

## सूरणमोदक.

चित्रकस्यपलंत्वेकंद्विपलंसूरणस्यच ॥ पलार्धंनागरस्यापिमरिचंको लमात्रकं ॥ भल्लातककणामूलंविडंगंत्रिफलाकणा ॥ तालीससहिता न्सर्वानक्षमात्रान्प्रयोजयेत् ॥ द्विपलेवृद्धदारस्यतालमूलंपलंभवेत् ॥ त्वगेलामरिचांशेचसर्वानेकत्रचूर्णयेत् ॥ गुडेनमर्दयित्वातुद्विगुणेनेह बुद्धिमान् ॥ मोदक:सूरणोनामअक्षमात्र:प्रमाणत: ॥ उपयुक्तोनिहं त्याशुगुदकीलान्नसंशयः ॥ अग्निवृद्धिकर:पुंसांसेव्यमानोमहागुण: ॥

अर्थ–चित्रकमूळ ४ तोळे, सुरण ८ तोळे, सुंठ २ तोळे, मिरीं ८ मासे, व बिबवे, पिंपळीमूळ, वावडिंग, त्रिफळा, पिंपळी व तालीसपत्र हीं प्रत्येकीं एकेक तोळा; व वृद्ध-दारु ८ तोळे, तालमूल १ तोळा, दालचिनी व एलची हीं प्रत्येकीं ८ मासे, हीं सर्व एकत्र चूर्ण करावें; व सर्वचूर्णाच्या दुप्पट गूळ घालून त्याचा मोदक करावा; हा सूर-णमोदक १ तोळा दिला असतां; तत्काळ मुळव्याधीचा नाश करितो; व घेत गेला असतां, अग्निवृद्धि करितो.

## लघुसूरणमोदक.

कणामरीचविश्वाग्निसूरणैस्तुगुडै:क्रमात्
द्विगुणैर्मोदकोर्शोघ्नःपर:पाचनदीपन: ॥

अर्थ–पिंपळी, मिरीं, सुंठ, चित्रक व सुरण हीं समभाग; आणि गूळ दोनभाग, यांचा मोदक अर्शनाशक व दीपन आणि पाचन आहे.

## अर्शकुठार.

संमर्दप्रतिसारितावहुरसौताभ्यांचगंधंसमंलांगल्यासितसूरणेनच

पृथक्कृत्याचतावत्पचेत् ॥ गोलंज्वालमुपैतिभांडनिहितंचूल्यामथ स्वौपधंमस्यादर्शकुठारकोस्रपवनार्शःपर्वकव्याधिषु ॥

अर्थ–प्रतिसारिता; आणि बहुरस या दोघाचे बरोबर गंधक घेऊन मर्दन करावे; नंतर कुहिली आणि पांढरा सुरण त्यांत मिळवून खलावे; नंतर गोळा करून भाड्यांत घालोन पेट होई तोपर्यंत पक्क करावे, याला अर्शकुठार असे ह्मणतात. हा रक्तवात व मुळव्याध इत्यादिकाचे ठायीं प्रशस्त आहे.

## अभ्रकहरीतकी.

मृताभ्रकपलंविंशन्मृतलोहस्यपंचकं ॥ गंधकस्यपलपचात्रामाद्विगुण माक्षिकं ॥ पथ्याशतपलंयोज्यंधात्रीपलशतद्वयं ॥ सर्वमेकत्रतच्चूर्णंजं बीरैर्भावयेद्दिनं ॥ भृंगीपुनर्नवाद्रावैःपातालगरुडाकुलैः ॥ भल्लातवन्हि कोरांटैर्हस्तशुंडीतुलांगली ॥ क्षीरिणीजलकुंभीचप्रत्येकंप्रत्यहंद्रवैः ॥ भावयेन्मर्दयेदित्थंमध्वाज्याभ्यांविलोलयेत ॥ स्निग्धभांडेस्थितंखादे न्नित्यंनिष्कद्वयंद्वयं ॥ सिद्धसावरयोगोत्थंत्रिदोषार्शासिनाशयेत् ॥

अर्थ–अभ्रकभस्म ८० तोळे, गंधक २० तोळे व माक्षिक या तिघांचे दुप्पट व हरितकी ४०० तोळे, आवळकाठा ८०० तोळे, ह्या पदार्थांची सर्व एकत्र चूर्ण करून ऱ्हंबूरसांत एक दिवस घोटावीं; व माका, पुनर्नवा, पातालगरुडी, बिबवे, चित्रक, कोरांटा, वृंदावन, कळलावी, दुधभोपळी व जलकुंभी या प्रत्येकाच्या रसात एकेक दिवस खलावीं. या प्रमाणे तयार झाल्यावर मध व तूप त्यांत मिळवून तुपाने रावलेल्या भांड्यांत ठेऊन त्यांतून १ तोळा खात जावे. हा सिद्धसावरयोग त्रिदोषजअर्शांचा नाश करितो.

## मंत्र.

कंकरकुरंकरंतरकंताझिलतिरीयेराजकरंतरआरकासारकाजोजाणेइहमं त्राताकेबमनहोयआरिसाजाणबुझप्रकटनकरितांकेसप्तकार्पलामाकिहत्या

अस्यमंत्रस्य प्रत्यहं जपंकुर्यात् अर्थ–या मंत्राचा रोज जप करावा.

## सूरणपुटपाक.

मृल्लिप्तंसूरणंकंदंपक्त्वाग्नौपुटपाकवत् ॥
अद्यात्सतैललवणंदुर्नामविनिवृत्तये ॥

अर्थ–सुरणाच्या कांद्याला मातीचा लेप करून पुटपाकासारिखा भाजावा; तो तेल व मीठ घालोन खावा; ह्मणजे मुळव्याध जातये.

## काशीसादितैल.

काशीसंलांगलीकुष्ठंशुंठीकृष्णाचसैंधवं ॥ मनःशीलाश्वमारंचविडंगं चित्रकोवृषः ॥ दंतीकोशातकीबीजहेमाव्हाहारितालकः ॥ कल्कैःकर्ष मितैरेतैस्तैलप्रस्थंविपाचयेत्॥ सुधार्कपयसीदद्यात्पृथक्द्विपलसंमिते ॥ चतुर्गुणंगवांमूत्रंदत्वासम्यक्प्रसाधयेत् ॥ कथितंखरनादेनतैलमर्शो विनाशनं ॥ क्षारवत्पातयत्येतदर्शांस्यभ्यंगतोभृशं ॥ वलीर्नदूपय त्येतत्क्षारकर्मकरंस्मृतं ॥

अर्थ—हिराकशी, कळलावी, कोष्ठ, सुंठ, पिंपळी, सैंधव, मनशीळ, कण्हेर, वावडिंग, चित्रक, अडुळसा, दांतीमूळ, कडुदोडक्याचें बीज, चोक व हरताळ हीं पधरा औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करुन तिळांचें तेल एक प्रस्थ प्रमाण घेऊन त्यांत तो कल्क टाकून व निवडुंगाचा चीक व रुईचा चीक हे दोन्ही दोन दोन पळें घेऊन त्या तैलांत टाकावे. व तेलाचे चौपट गाईचें मूत्र त्यांत टाकून ते तेल शेष राही तोपर्यंत पाक करून तेल गाळून घ्यावें. हें तेल खरनादऋषींनी सांगितलें आहे, हे मुळव्याधीचे मोडास सोमलादिक क्षार लावितात. त्या प्रमाणें लावावें, तेणेंकरून क्षाराचे लेपाप्रमाणें गुदाचे आंत तीन वळी आहेत, त्याना उपद्रव नहोतां मोड गळून मूळव्याध दूर होते.

---

# अजीर्ण.

## मंदाग्निहर.

मंदोदराग्निर्भवतिसतिद्रव्येनवैयजेत् ॥
प्राजापत्यत्रयंकृत्वाभोजयेत्सशतंद्विजान् ॥

अर्थ—जवळ द्रव्य असतां जोपुरुष वैश्वदेवादि नित्य यजन करीत नाहीं, तो मंदाग्नि होतो; त्याणे तीन प्राजापत्यकृच्छ्र प्रायश्चित्त करून शंभर ब्राह्मणाला भोजन द्यावें.

## पाराशर.

गोमांसभक्षकोमंदजठराग्निर्भवेन्नरः ॥ प्राजापत्यंचरेत्कृच्छ्रमतिकृच्छ्रं तथैवच ॥ अग्निमंत्रंजपेन्नित्यंश्रीसूक्तंचविचक्षणः ॥

अर्थ—जो मूर्ख गोमांस भक्षण करितो, तो मंदाग्नि होतो; त्याणे कृच्छ्रातिकृच्छ्र प्रायश्चित्त करून अग्निरश्मीतिमंत्र व श्रीसूक्त यांचा जप करावा.

## कर्मपाकसंग्रह

अकारणंगरंदत्वाप्रमारयतियःपुनः ॥ समंदाग्निर्भवेदेवमृतकल्पश्च जायते ॥ यातिरुद्रेणसूक्तेनचरुंचजुहुयाद्घृतं ॥ अष्टोत्तरयुतसम्य कृतत्पापस्यापनुत्तये ॥ तामग्निवर्णामितिचजपेत्सूक्तंसहस्रकं ॥ भो जयेद्ब्राह्मणान्सम्यक्चत्वारिंशत्सुखिभवेत् ॥

अर्थ—जो कोणी कारणावांचून दुसऱ्याला विष घालतो; तो मंदाग्नि होतो. तो पुरुष या पृथ्वींत मेल्यासारिखा आहे. त्याणें यातिरुद्र या सूक्तानें चरु व घृत यांचा अष्टोतरशत होम करावा; व तामग्निवर्णा० हे सूक्त सहस्रसंख्या जपावें; आणि चाळिस ब्राह्मणाला भोजन घालावें; ह्मणजे सुखी होतो.

## विषूचिका, आलसिका निदान.

मंदस्तीक्ष्णोतिविषमःसमश्चेतिचतुर्विधः ॥
कफपित्तानिलाधिक्यात्तत्साम्याज्जाठरोनलः ॥

अर्थ—जठराग्नि कफाधिक्यानें मंद, पित्ताधिक्यानें तीक्ष्ण व वाताच्या आधिक्यानें विषम होतो; आणि तिघांच्या साम्येकरून सम होतो. असा चोहोंप्रकारचा जठराग्नि जाणावा.

## विषूच्यादिनिदान.

अजीर्णमामंविष्टब्धंविदग्धंचयदीरितं ॥
विषुच्यलसकौतस्माद्भवेच्चापिविलंबिका ॥

अर्थ—मळावरोध, आम व विदग्ध, असें तीन प्रकारचें अजीर्ण सांगितलें; त्या अजीर्णाच्या विकोपापासून विषूची, अलसक; आणि विलंबिका हे व्याधि होतात.

## चोहोअग्नीचें कार्य सांगतो.

विषमोवातजान्रोगान्तीक्ष्णःपित्तनिमित्तजान् ॥
करोत्यग्निस्तथामंदोविकारान्कफसंभवान् ॥

अर्थ—विषमाग्नि वातापासून होणाऱ्या रोगास, तीक्ष्णाग्नि पित्तापासून होणाऱ्या रोगास व मंदाग्नि कफापासून होणाऱ्या रोगास उत्पन्न करितो.

समासमाग्नेरशितामात्रासम्यग्विपच्यते ॥ स्वल्पापिनैवमंदाग्नेर्विष माग्नेस्तुदेहिनः ॥ कदाचित्पच्यतेसम्यक्कदाचिन्नविपच्यते ॥ मा त्रातिमात्राप्यशितासुखंयस्यविपच्यते ॥ तीक्ष्णाग्निरितितंविद्यात्स माग्निःश्रेष्ठउच्यते ॥

**अर्थ**–समाग्नि पुरुषानें क्षुधेइतकें भोजन केलें असतां, चांगले पचतें. मंदाग्नीनें क्षुधेपेक्षां अल्पमात्र भोजन केलें तरी पचन होत नाहीं; आणि विषमाग्नीनें भक्षितअन्न केव्हां पचन होतें; केव्हां पचन होत नाहीं; आणि तीक्ष्णाग्निपुरुषानें अतिअन्न भक्षण केलें तरी सुखानें पचन होतें, या सर्व अग्नींत समाग्नि श्रेष्ठ आहे

## हिंग्वाष्टक चूर्ण.

त्रिकटुकमजमोदासैंधवंजीरकेद्वेसमचरणधृतानामष्टमोहिंगुभागः ॥
प्रथमकवलभोजीसर्पिषाचूर्णमेतज्जनयतिजठराग्निंवातगुल्मंनिहंति ॥

**अर्थ**–सुंठ, मिरें, पिंपळी, ओंवा, सैंधव, जिरें, शहाजिरें व हिंग, हीं समभाग घेऊन यांचें चूर्ण तूप लाऊन भोजनसमई पहिले घासाबरोबर खावें; ह्मणजे अग्नि प्रदीप्त होतो; आणि वातगुल्माचा नाश होतो.

## विडंगादिचूर्ण.

विडंगभल्लातकचित्रकाभयाःसनागरास्तुल्यगुडेनसर्पिषा ॥
निहंतितेमंदहुताशनान्नराभवंतितेवाडवतुल्यवन्हयः ॥

**अर्थ**–वावडिंग, बिब्बा, चित्रक, हिरडा व सुंठ यांचे चूर्ण आणि त्यांचे बरोबर गुळ, तूप घालून खावें; ह्मणजे मंदाग्नीचा नाश होऊन वडवाग्निसारिखा त्याचा अग्नि होतो.

## जिरकादिचूर्ण.

जरणरुचकशुंठीपिप्पलीतीक्ष्णवेल्लंसलवणमजमोदाहिंगुपथ्येतिकर्षं ॥
पृथगथपलमात्रास्यात्रिवृच्चूर्णमेषांजननमुदरवन्हेःपाचनंरोचनंच ॥

**अर्थ**–जिरें, संचळखार, सुंठ, पिंपळी, मिरें, वावडिंग, सैंधव, अजमोदा व हिंग हीं तोळा तोळा; आणि तेड ४ तोळा घेऊन एकत्र कुटुन चूर्ण करून खावें. हें अग्नि वाढवणारें, पाचक, रुचिकारक असें आहे.

## वडवानळचूर्ण.

सैंधवंपिप्पलीमूलंपिप्पलीचव्यचित्रकं ॥ शुंठीहरीतकीचेतिक्रम
वृद्धानिचूर्णयेत् ॥ वडवानलनामैतच्चूर्णस्यादग्निदीपनं ॥

**अर्थ**–सैंधव एक भाग, पिंपळमूळ दोन भाग, पिंपळी ३ भाग, चवक ४ भाग, चित्रक ५ भाग, सुंठ ६ भाग व बाळहिरडे ७ भाग घेऊन चूर्ण करावें. या चूर्णाला वडवानळचूर्ण असें ह्मणतात. हें चूर्ण घेतलें असतां, अग्नि प्रदीप्त होतो.

## वन्हिनामकरस.

जातीजातंत्रिकर्षमरिचमपिपलंचार्धकर्षप्रमाणंगंधंसूतंलवंगंविषमि

दमखिलंचिंचिणीरस्यतोये ॥ पिष्ट्वामापैकमात्रावितरतिदहनंवन्हि
मांद्यचसद्योरोगानशूलानिलादीन्दहतिकृतगुणोवन्हिनामारसोयं॥

अर्थ–जायपत्री तोळा १॥, जायफळ तोळा १॥, मिरें तोळे ४, गंधक ॥, पारा ॥, लवंग ॥, बचनाग अर्धा तोळा हीं सर्व बारिक करून त्याचा चिंचेच्या रसांत खल करावा; नंतर त्याच्या गोळ्या उडदा एवढ्या कराव्या त्या अनुपानांत योजून सकाळीं व संध्याकाळीं एक याप्रमाणें दिल्यास, अग्नि प्रदीप्त होऊन दुर्धर शूळ व वायु इत्यादि रोग दूर होतात.

## कर्मविपाक.

अन्नहर्तात्वजीर्णान्नोभवेदस्यतुनिष्कृतिः॥ उपवासत्रयंकुर्या
त्प्राजापत्यमथापिवा ॥ जुहुयाच्चरुसर्पिर्भ्यामग्निरश्मीत्यृचा
मथ ॥ अष्टोत्तरसहस्रंहिजुहुयाच्चजपेत्तथा ॥

अर्थ–जो कोणी अन्नाची चोरी करितो, त्याला अजीर्ण होतें. त्याणे तीन उपवास करून तीन प्राजापत्य प्रायश्चित करावें; आणि अग्निरश्मी या मंत्रानें भात व तूप, यांचा अष्टोत्तर सहस्र होम करावा; आणि तसाच जप करावा.

## दुसरा प्रकार.

परान्नविघ्नकरणादजीर्णमपिजायते ॥
लक्षहोमंप्रकुर्वीतप्रायश्चित्तंविधीयते ॥

अर्थ–दुसऱ्याच्या अन्नाला विघ्न केलें असतां; अजीर्णरोग प्राप्त होतो. त्याणें प्रायश्चितपूर्वक लक्ष होम करावा; ह्मणजे त्याची शांति होत्ये.

## भस्मकनिदान.

नरेक्षीणकफेपित्तंकुपितंमारुतानुगं ॥ सोष्मणापाचकस्थानेबलमग्नेः
प्रयच्छति ॥ तदालब्धबलोदेहंरूक्षयेत्सानिलोनलः॥ अभिभूयपत्य
न्नंतैक्ष्ण्यादाशुमुहुर्मुहुः ॥ पक्त्वान्नंसततोधातून्शोणितादीन्पचत्यपि
ततोदौर्बल्यमातंकंमृत्युंचोपानयेत्परं ॥ भुक्तेन्नेलभतेशांतिंजीर्णमात्रं
प्रताम्यति ॥ तृट्कासदाहमोहाःस्युर्व्याधयोत्यग्निसंभवाः ॥

अर्थ–जो मनुष्याचा कफ क्षीण जाहाला; आणि वायु पित्ताला साह्य होऊन स्वस्थानींच अग्नीला अत्युग्र वाढवितो. तो लब्धबल अग्नि वायूच्या साहाय्यानें देहाला रूक्ष करितो; आणि आपल्या तीक्ष्णपणानें वारंवार भक्षित अन्नाला पचवितो. अन्नपाकानंतर रक्तादिक धातूंला पचन करितो, तेणेंकरून दुर्बळपणा, रोग, मृत्यु, यानां करितो; हा रोगी अ-

न्न खाल्लें ह्मणजे स्वस्थ होतो; आणि जिरलें ह्मणजे व्याकूळ होतो; आणि अत्यग्नि वाढला असतां; तृषा, खोकला, दाह, मोह, हे व्याधि होतात.

## भस्मकलक्षण.

कफेक्षीणेयदापित्तंस्वस्थानेमारुतानुगं ॥ तीव्रंप्रवर्धयेद्वन्हितदातंभस्मकंवदेत् ॥ तृड्दाहश्वासमूर्छादीन्कृत्वैवात्यग्निसंभवान् ॥ पक्वान्नमाशुधात्वादीन्संक्षिप्रंनाशयेत्तनु ॥ क्षणाद्भुक्तंभवेद्भस्मसरोगोभस्मकःस्मृतः ॥

अर्थ–शरीरामध्यें कफ क्षीण झाला असतां; जा काळीं वातानुबंधी पित्त स्वस्थानीच अग्नीला तीव्र वाढवितें; आणि अत्यग्नि कोपानें होणारे तृषा, दाह, मद व मूर्छा इत्यादि करितें; व तें अन्नाला शीघ्र पचन करुन जलदीनें रसादि धातूचा नाश करितें; व भक्षण केल्या पदार्थाचें क्षणांत भस्म होतें. तेव्हां त्याला भस्मक ह्मणावा.

## चिकित्साक्रम

तंभस्मकंगुरुस्निग्धसांद्रमंडहिमस्थिरैः
अन्नपानैर्नयेच्छांतिंपित्तघ्नैश्चविरेचनैः ॥

अर्थ–भस्मकरोगाला जड, स्निग्ध, अशीं अन्नें; व घट्ट पदार्थ, मंड, हिम, फार वेळानें पचन होणारीं अन्नें; व पानें, आणि पित्तनाशक उपचार, यांणीं शमवावा.

## भस्मकचिकित्सा

कफेपूर्वंजितेपित्तेमारुतेचानलःसमः ॥
समधातोःपचत्यन्नंपुष्ट्यायुर्बलवर्धनः ॥

अर्थ–कफ, पित व वायु पूर्वीं जिंकल्यावर समधातु मनुष्याचा अग्नि सम होऊन अन्न चांगले पचवून आयुष्यपुष्टि करणारा, आणि बल वाढिवणारा होतो.

आहारंपचतिशिखीदोषानाहारवर्जितःपचति ॥
दोषक्षयेचधातून्धातुक्षेण्येतथाप्राणान् ॥

अर्थ–अग्नि पूर्वीं आहार पचिवतो. आहाराचे अभावीं वातादि दोष पचिवतो; दोषांचा नाश झाल्यावर धातु पचिवतो; धातु क्षीण झाल्यावर प्राणाचा नाश करतो.

मुहुर्मुहुरजीर्णेपिभोज्यान्यस्योपहारयेत् ॥
निरिंधनोंतरंलब्ध्वायथेनंनविपादयेत् ॥

अर्थ–भस्मकरोग्याला अजीर्ण झालें, तरीं वारंवार भोजन द्यावें; नाहीं तर अग्नी लभक्षण न मिळल्यामुळें रोग्याचा नाश करील.

## शमन.

अत्युद्धताग्निशांत्यैमाहिषदधिदुग्धसर्पींषि ॥
संसेवेतयवागूंसमधूच्छिष्टांससर्पिष्कां ॥

अर्थ–अति वाढलेला अग्नि माहिषाचें दहीं, दूध व तूप यांचे सेवनानें, किंवा तूप व मेण घालून केलेली कांजी हिच्या सेवनानें शांत करावा.

## विरेचन.

असकृत्पित्तहरणंपायसंप्रतिभोजनं ॥
श्यामात्रिवृद्विपक्वंचपयोदद्याद्विरेचनं ॥

अर्थ–वारंवार पित्तनाश करावा, पायसाचें भोजन करावें, काळें व पांढरें निशोत्तर घालून आटलेलें दूध रेचनार्थ द्यावें; ह्मणजे भस्मक शांत होईल.

## शास्त्रार्थ.

यत्किंचिन्मधुरंमेध्यंश्लेष्मलंगुरुभोजनं ॥
सर्वंतदत्यग्निहितंभुक्त्वाप्रस्वपनंदिवा ॥

अर्थ–मधुर, कफकारक, जड व शुद्ध, असें भोजन अत्यग्नीला हितकारक आहे; आणि दिवसास भोजनोत्तर निद्रा हि तशीच आहे.

## कोलास्थियोग.

कोलास्थिमज्जकल्कस्तुपीतोवाप्युदकेनवै ॥
अचिराद्विनिहंत्येनंप्रयोगोभस्मकंनृणां ॥

अर्थ–बोराचे बींचा मधला मगज वाटून पाण्याबरोबर प्यावा; ह्मणजे तो मनुष्याचा भस्मकरोगाचा नाश करितो.

## क्षीर.

नारीक्षीरेणसंपिष्टांपिबेदौदुंबरत्वचं ॥
ताभ्यांवापायसंसिद्धंपिबेदत्यग्निशांतये ॥

अर्थ–स्त्रियांचे दुधात उंबराची साल वाटून प्यावी, अथवा त्या दोहोंनी सिद्ध केलेलें पायस ह्मणजे ( खीर ) प्यावी, ती अत्यग्नीची नाशक आहे.

सिततंडुलसितकमलंछागक्षीरेणपायसंसिद्धं ॥
भुक्त्वाघृतेनपुरुषोद्वादशदिवसान्बुभुक्षितोनभवेत् ॥

अर्थ–पांढरे तांदूळ, पांढरें कमळ, आणि शेळीचे दूध, यांची खीर करून तूप घालून बारा दिवसपर्यंत दर रोज खावी, ती भस्मकनाशक आहे.

## विदारीकल्क.

विदारीस्वरसंक्षीरेपचेदष्टगुणंघृतं ॥
माहिषंजीवनीयेनकल्केनात्यग्निनाशनं ॥

**अर्थ**—भुयकोहळ्याचा रस ८ भाग, दूध ११ भाग, ह्मशीचें तूप १ भाग व जीवनीयगण, हरणवेल, ज्येष्ठमध, रानमूग, रानउडीद, मेदा, महामेदा, कांकोली, क्षीरकांकोली, जीवक; आणि ऋषभक या औषधांचा कल्क १ भाग घालोन पचवून घृत सिद्ध करावे; तें अग्निनाशक आहे.

त्रिफलामुस्तविडंगैःकणयासितयासमैः ॥
स्यात्खरमंजिरिबीजैर्लेहोभस्मकनाशनः ॥

**अर्थ**—त्रिफळा, नागरमोथे, वावडिंग, पिंपळी, साकर व श्वेतआघाड्याचें बी याणी केलेला लेह भस्मकनाशक आहे.

## अपामार्गादियोग.

अपामार्गस्यबीजानिपिष्ट्वाक्षीरेणसाधयेत् ॥
तत्पायसंमहाघोरेभस्मकेसंप्रशस्यते ॥

**अर्थ**—आघाड्याचे बीज घेऊन तें सडून त्याची दुधांत खीर करावी, ती महाघोर भस्मकावर देण्यास उत्तम आहे.

## कदलीफलयोग.

कदलीफलंसुपक्कंपट्पलंसुप्रभातेघृतसममभिनित्यंभक्षयेन्मंडलंच ॥
हरतिसकलमग्नेस्तीव्रतांभस्मरोगंअनुभावितमिदंमुक्तमग्निमांद्यंकरोति ॥

**अर्थ**—एकेचाळीस दिवसपर्यंत प्रातःकाळीं २४ तोळे पिकलेली केळी तुपाशीं खावीं; ह्मणजे तीं संपूर्ण अग्नीची तीव्रता व भस्मरोग यांचा नाश करितात; व अग्निमांद्य करितात. हे मी अनुभविक सांगितले.

## अजीर्णाचे भेद.

आमंविदग्धंविष्टब्धंकफपित्तानिलैस्त्रिभिः ॥ अजीर्णंकेचिदिच्छंतिचतुर्थंरसशेषतः ॥ अजीर्णंपंचमंकेचिन्निर्दोषंदिनपाकि च ॥ वदंतिषष्ठंचाजीर्णंप्रकृतंप्रतिवासरं ॥

**अर्थ**—अजीर्णें साहाप्रकारचीं तीं कफ, पित्त, आणि वायु, या तिन दोषानीं क्रमानें, आमाजीर्ण, विदग्धाजीर्ण, विष्टब्धाजीर्ण, अशी तीन, व रसशेषानें होणारें तें चवथें, व

कोणाचे मतें पांचवें अजीर्ण अहोरात्रामध्यें पचन होणारें, हें निर्दोष असतें. आणि साहावें स्वभावत: प्रकृतिवशात् व दररोज होणारें अशीं साहाप्रकारचीं अजीर्णें जाणावीं. सहाव्याविषयीं सुश्रुतामध्यें वामपार्श्वावर शयनादिक उपाय सांगितला, तो असा; (भुक्त्वा शतपदंगच्छेद्वामपार्श्वेनसंविशेत् ॥ शब्दरूपरसस्पर्शगंधांश्चमनसःप्रियान् ॥ भुक्तवानुपसेवेतते नान्नंसाधुतिष्ठतीति ॥ अर्थ–जेवल्यावर शतपावली करून डावे बाजूवर शयन करावें; आणि मन:प्रिय अशा गंधादिविषयांचें सेवन करावें; ह्मणजे अन्न चांगलें पचन होतें.

## अजीर्णाचें निदान.

अत्यंबुपानाद्विषमाशनाच्चसंधारणात्स्वप्नविपर्ययाच्च ॥ कालेपिसात्म्यंलघुचापिभुक्तमन्नंनपाकंभजतेनरस्य ॥ ईर्ष्याभयक्रोधपरिक्षितेनलुब्धेनशुग्दैन्यनिपीडितेन ॥ प्रद्वेषयुक्तेनचसेव्यमानमन्नंनसम्यक्परिपाकमेति ॥

अर्थ–फार उदकपान, अकालीं भोजन, मलमूत्रादिवेगाचा रोध व झोंपेचा विपर्यास या कारणानीं वेळेवर हितकारक, थोडें, असें भोजन केलें तरी चांगलें पचन होत नाहीं; व इर्ष्या, भय, कोप, लोभ, शोक, आणि भिकारपणा, या कारणानीं व द्वेषानें भक्षण केलेलें अन्न चांगलें पचन होत नाहीं.

## आमाजीर्णलक्षण.

तत्रामेगुरुतोत्क्लेदःशोथोगंडाक्षिकूटगः ॥
उद्गारश्चयथाभुक्तमविदग्धःप्रवर्तते ॥

अर्थ–आमाजीर्णामध्यें अंगाला जडपणा, मळमळ, गाल व नेत्र, कूट यानां सूज; आणि जसें अन्न खावें तसा ढेंकर, हीं लक्षणें होतात.

## वचादिवमन.

वचालवणतोयेनवांतिरामेप्रशस्यते ॥ धान्यनागरसिद्धंवातोयंदद्याद्विचक्षणः ॥ आमाजीर्णप्रशमनंशूलघ्नंबस्तिशोधनं ॥

अर्थ–आमाजीर्णावर वेखंड व सैंधव यांचें चूर्ण उष्णपाण्याशीं द्यावें, तें वांतीविषयीं प्रशस्त आहे. नंतर धने व सुंठ यांचा काढा द्यावा; ह्मणजे आमाजीर्णाचा नाश व बस्तिशोधन होईल.

## लवंगादि काढा.

लवंगपथ्ययोःक्काथःसैंधवेनावधूलितः ॥
पीतःप्रशमयत्युग्रमजीर्णंरेचयत्यपि ॥

अर्थ—लवंगा व हरीतकी यांचा काढा सैंधव घालून द्यावा; ह्मणजे अजीर्णाचा नाश करितो व रेच करितो.

## वैश्वानरक्षार.

स्नुह्यर्कचित्रकैरंडलवणंसपुनर्नवं ॥ तिलापामार्गकदलीपलाशाति त्तिणीतथा ॥ गृहीत्वाज्वालयेदेतत्प्रस्थंभस्माखिलंचतत् ॥ जलाढ केविपक्तव्यंयावत्पादावशेषितं ॥ सुप्रसन्नंविनिःश्राव्यलवणप्रस्थ संयुतं ॥ पक्कंनिर्धूमकाठिणंसूक्ष्मंचूर्णंकृतंपुनः ॥ यवानीजीरकव्योष स्थूलजीरकहिंगुभिः ॥ पृथगर्धपलैरेभिश्चूर्णितैस्तद्विमिश्रयेत् ॥ आ र्द्रकस्वरसेनापिभावयेच्छोषयेत्पुनः ॥ शीतोदकेनतच्चूर्णंपिबेत्प्रातर्हि मात्रया ॥ तस्मिन्जीर्णेन्नमश्नीयाद्यूषैर्जांगलजैरसैः ॥ ईषदम्लैःसल णैःसुखोष्णैर्वन्हिदीपनैः ॥ एतेनाग्निश्चवर्धेतबलमारोग्यमेवच ॥ त त्रानुपानंशस्तंहितक्रंवाभोजनेहितं ॥ मंदाग्न्यर्शोविकारेषुवातश्लेष्मा मयेषुच॥ सर्वांगशोथरोगेषुशूलगुल्मोदरेषुच ॥ आमार्शशर्करायांतु विण्मूत्रानिलरोगिषु ॥

अर्थ—निवडुंग, रुई, चित्रक, एरंड, मीठ, पुनर्नवा, तिल, आघाडा, केळ, पळस व चिंचेची साल, याना घेऊन जाळून त्याचें २५६ तोळे भस्म घेऊन १०२४ तोळे पाण्यांत घालून कढवावें. चतुर्थांश काढा राहिला ह्मणजे तो गाळून घ्यावा, त्यांत ६४ तोळे मीठ घालून पुनः कढवावा; ह्मणजे निर्धूम कठिण असा क्षार उत्पन्न होतो, तो घेऊन बारीक करून त्यांत ओंवा, जिरें, सुंठ, मिरीं, पिंपळी, जाडें जिरें व हिंग हे प्रत्येकीं दोन तोळे मिळवून त्याला आल्याच्या रसाची भावना देऊन सुकवावा. त्यांतून प्रातःकाळीं बळ पाहून थंड पाण्याशीं द्यावा; नंतर औषध जिरल्यावर आरण्यसंबंधी मांसाचे रस व यूष किंचित् आंबट व मीठ घालोन मंदोष्ण व अग्नीला प्रदीप्त करणार असे द्यावें; ह्मणजे अग्नि, बल, आरोग्य, यांची वृद्धि होते. ह्या औषधावर मागून ताक प्यावें; किंवा भोजनकाळीं द्यावें. मंदाग्नि, मूळव्याध, वायु, कफ, सर्वांगाला सूज येते ती व शूल, गुल्म, उदर, आम, अर्श, शर्करा, आणि मळ व मूत्रसंबंधी वायुरोग यांचा नाश होतो.

## सामुद्रादिचूर्ण.

सामुद्रसौवर्चलसैंधवानांक्षारोयवानांचतथाजमोदा ॥ हरीतकीपिप्प लिशृंगबेरंहिंगुर्विडंगंचसमानिकुर्यात् ॥ एतानिचूर्णानिघृतप्लुतानि

भुंजीतग्रासान्प्रथमंचपंच ॥ अजीर्णवातंगुदगुल्मवातंवातप्रमेहंविष
मंचवातं ॥ विषूचिकाकामलपांडुरोगंश्वासंचकासंचहरेत्प्रयुक्तं ॥

**अर्थ**–मीठ, पादेलोण, सैंधव, जवखार, ओंवा, हिरडा, पिंपळी, सुंठ, हिंग व वावडिंग हीं समभाग घेऊन चूर्ण करून त्याला तूप लावावें; आणि भोजनसमयीं प्रथम पांच घांस त्या चूर्णाबरोबर खावें; ह्मणजे अजीर्ण,वात, गुदवात, गुल्मवात, वातप्रमेह, विषमवात, विषूचिका, कावीळ, पांडुरोग, श्वास व खोकला यांचा नाश करील.

## हरीतक्यादियोग.

हरीतकीतथाशुंठीभक्ष्यमाणागुडेनवा ॥
सैंधवेनयुतावास्यात्सातत्येनाग्निदीपनी ॥

**अर्थ**–हरीतकी किंवा सुंठ गुळाशीं किंवा सैंधवाशीं नित्य नेमानें भक्षण केली, तर अग्निदीपन करणारी आहे.

## गुडादिचतुष्क आमाजीर्णादिकावर.

गुडेनशुंठीमथवोपकुल्यांपथ्यांतृतीयामथदाडिमंवा ॥
आमेष्वजीर्णेषुगुदामयेषुवर्चोविबंधेषुचनित्यमद्यात् ॥

**अर्थ**–गुळाबरोबर सुंठ किंवा पिंपळी; अथवा हरीतकी, अथवा डाळिंब भक्षण करावें; ह्मणजे तें आमाजीर्ण, मुळव्याध, मलावष्टंभ, यांवर प्रशस्त आहे.

## गुडाष्टक.

व्योषदंतीत्रिवृच्चित्रंकृष्णामूलंविचूर्णितं ॥ तच्चूर्णंगुडसंमिश्रंभ
क्षयेत्प्रातरुत्थितः ॥ एतद्गुडाष्टकंनामबलवर्णाग्निवर्धनं ॥
शोथोदावर्तशूलघ्नंप्लीहपांडुमयापहं ॥

**अर्थ**–सुंठ, मिरें, पिंपळी, दांतीमूळ, तेड, चित्रक व पिंपळमूळ यांचें चूर्ण गुळमिश्रित करून सकाळीं उठून खावें, याला गुडाष्टक ह्मणतात. हें बळ देणारें व अग्नि वाढविणारें आणि शोथ, उदावर्त, शूळ, प्लीहा, पांडु, यांचें नाशक आहे.

## पथ्यादिचूर्ण.

पथ्यापिप्पलिसंयुक्तंचूर्णंसौवर्चलंपिबेत् ॥ मस्तुनोष्णोदकेना
थमत्वादोषगतिंभिषक् ॥ चतुर्विधमजीर्णंचमंदानलमथारुचिं ॥
आध्मानंवातगुल्मंचशूलंचाशुविनाशयेत् ॥

**अर्थ**–हरीतकी व पिंपळी यांशींयुक्त संचळखाराचें चूर्ण अथवा दह्यांचे मंडाबरोबर संचळखार, अथवा ऊनपाण्याबरोबर जशी दोषांची गति असेल त्याप्रमाणें यांतून एक

द्यावें; ह्मणजे चारप्रकारचें अजीर्ण, मंदाग्नि, अरुचि, आध्मानवात, गुल्म व शूल यांचा लवकर नाश करील.

## बृहच्छंखवटी.

स्नुगर्कचिंचापामार्गरंभातिलपलाशजान् ॥ क्षारांश्चभिषगादद्यात्प्रत्येकंपलमात्रया ॥ लवणानिपृथक्पंचग्राह्याणिपलमात्रया ॥ सर्जिकाचयवक्षारंटंकणंत्रितयंपलं ॥ सर्वंत्रयोदशपलंसूक्ष्मंचूर्णंविधायतु ॥ निंबूफलरसेप्रस्थसंमितेतत्परिक्षिपेत् ॥ तत्रशंखस्यशकलंपलंवन्हौप्रताप्यतु ॥ वारान्निर्वापयेत्सप्तसर्वंद्रवतितद्यथा ॥ नागरंत्रिपलंग्राह्यंमरिचंचपलद्वयं ॥ पिप्पलीपलमानास्यात्पलार्धंभ्रष्टहिंगुनः ॥ ग्रंथिकंचित्रकंचापियवानीजीरकंतथा ॥ जातीफलंलवंगंचपृथक्कर्षद्वयोन्मितं ॥ रसोगंधोविषंचापिटंकणंचमनःशिला ॥ एतानिकर्षमात्राणिसर्वंसंचूर्ण्यमिश्रयेत् ॥ शरावार्धेनचुक्रेणसन्नीयवटिकांचरेत् ॥ माषप्रमाणासावैद्यैर्बृहच्छंखवटीस्मृता ॥ सर्वाजीर्णप्रशमनीसर्वशूलनिवारिणी ॥ विषूच्यलसकादीनांसद्योभवतिनाशिनी ॥

**अर्थ**—निवडुंग, रुई, चिंच, आघाडा, केळ, तीळ व पळस इतक्यांचे क्षार चार चार तोळे; आणि मीठ, टांकणखार, सैंधव, बिडलोण व संचळ हीं प्रत्येक चार तोळे; सर्जिकाक्षार, जवखार, टांकणखार, हे तीन मिळून चार तोळे; एकंदर ५२ तोळे घेऊन बारीक चूर्ण करून ६४ तोळे लिंबाचे रसांत टाकून नंतर ४ तोळे शंखाचें तुकडे तावून त्यांत टाकावे. असे पुनः पुनः तावून सातवेळा टाकल्यावर ते त्यांत मिळून जातात; नंतर सुंठ १२ तोळे, मिरे ८ तोळे, पिंपळी ४ तोळे, भाजलेला हिंग २ तोळे, पिंपळमूळ, चित्रक, ओंवा, जिरें, जायफळ, लवंग, हीं प्रत्येकीं दोन तोळे, पारा, गंधक, बचनाग, टांकणखार व मनशीळ हीं प्रत्येकीं एकेक तोळा. याप्रमाणें घेऊन सर्व एकत्र करून १६ तोळे चुक्याचा रस घेऊन त्यांत खलून वडी करावी. त्यांतून एकमासाभर खावी; ह्मणजे अजीर्ण, शूल, विषूची, अलसक, ह्यांचा तत्काळ नाश करील. ह्याला बृहच्छंखवटी असें ह्मणतात.

## लघुक्रव्यादरस.

पारदाद्द्विगुणंगंधमर्धांशंमृतलोहकं ॥ पिप्पलीपिप्पलीमूलमग्निशुंठीलवंगकं ॥ लोहसाम्यंपृथक्कुर्याद्रससाम्यंसुवर्चलं ॥ टंकणंमरिचंचाग्निगंधतुल्यंप्रदापयेत् ॥ एतद्विचूर्ण्ययत्नेनभावयेत्सप्तधाम्लकैः ॥ ए

तद्रसायनंश्रेष्ठंमाषमात्रंप्रदापयेत् ॥ तक्रेणकेवलंवापिदद्या द्भोजनपाचने ॥ क्षिप्रंतज्जीर्यतेभुक्तंदीपनंभवतिध्रुवं ॥ सर्वा जीर्णप्रशमनंलघुक्रव्यादसंज्ञितं ॥

अर्थ–पारा एक भाग, गंधक दोन भाग, लोहभस्म पाऱ्याच्या निमें व पिपळी, पिंपळ मूळ, चित्रक, सुंठ, लवंग प्रत्येक २ भाग, पादेलोण, टांकणखार, मिरें, हीं सर्व प्रत्येक एक भाग, याप्रमाणें घेऊन एकत्र चूर्ण करून सातवेळा आंबट रसाच्या भावना द्याव्या; नंतर हा लघु क्रव्यादरस सिद्ध होतो. हा मासाभार ताकाबरोबर किंवा नुसताच भोज· नाचे पाचन होण्याविषई द्यावा; ह्मणजे लवकर भोजन जिरतें; आणि अग्नि प्रदीप्त होतो; आणि सर्वाजीर्णाचा नाश होतो.

## विदग्धाजीर्णलक्षण.

विदग्धेभ्रमतृण्मूर्छापित्ताच्चविविधारुजः ॥
उद्गारश्चसधूमाम्लःस्वेदोदाहश्चजायते ॥

अर्थ–विदग्धाजीर्णामध्यें, भ्रम, तृषा व मूर्छा; व पित्तापासून दाह व तुंबडी लाग· ल्यासारिखी वेधना असे अनेक विकार, सधूम व आंबट असा ढेंकर, घाम, आणि दाह, हीं लक्षणें होतात.

## विदग्धाजीर्णनिदान.

अन्नंविदग्धंचनरस्यशीघ्रंशीतांबुनावैपरिपाकमेति ॥
तदास्यशैत्येननिहंतिपित्तमाक्लेदिभावाच्चनयत्यधस्तात् ॥

अर्थ–मनुष्याचें विदग्ध अन्न थंड पाण्यानें निश्चयेंकरून पचतें; आणि शैत्याचे योगा नें पित्त शामवितें; आणि आर्द्रपणामुळें अधोगति करतें.

## निद्रानियम.

भोजनात्प्राक्दिवास्वापात्पाषाणोपिचजीर्यति ॥ भोजनांते दिवास्वापाद्वातपित्तकफैःकृतं ॥ आलिप्यजठरंप्राज्ञोहिंगुत्र्यू षणसैंधवैः ॥ दिवास्वापंप्रकुर्वीतसर्वाजीर्णप्रणाशनं ॥

अर्थ–प्रातःकाळीं भोजनाच्या पूर्वी निद्रा केली असतां, पाषाण जरी भक्षण केलें तरीं जिरतात. व भोजनानंतर निद्रा केली असतां; वात, पित व कफ हे कोपतात. याकरितां शाहाण्या मनुष्यानें हिंग, सुंठ, मिरीं, पिंपळी व सैंधव, यांणीं उदराला लेप करावा; नंतर निजावें; ह्मणजे संपूर्ण अजीर्णाचा नाश होतो.

## दिवानिद्रा.

व्यायामप्रमदाध्ववाहनरतान्क्लिन्नानतीसारिणोशूलश्वासवतस्तृषाप

रिगतानृहिक्कामरुत्पीडितान् ॥ क्षीणान्क्षीणकफान्शिशून्मदहतान्वृ
द्धांस्तथाजीर्णिनोरात्रौजागरितान्नरान्निरशनान्कामंदिवास्वापयेत् ॥

अर्थ–जे व्यायाम, स्त्री, मार्ग, वाहन, यांच्या सेवनानें थकलेले, अतिसारी, शूल, श्वास, तान्हान, उचकी व वायु यांच्या विकाराचे व क्षीण, क्षीणकफ, बालक, मदानें व्याप्त, वृद्ध, अजीर्ण झालेला, रात्री जागलेला; उपवास केलेला यांला दिवसास यथेच्छ निजवावें.

## विष्टब्धाजीर्णलक्षण.

विष्टब्धेशूलमाध्मानंविविधावातवेदनाः ॥
मलवाताप्रवृत्तिश्चस्तंभोमोहांगपीडनम् ॥

अर्थ–विष्टब्धाजीर्णामध्यें शूल, पोटाला फुगवटी, अनेक वातसंबंधी पीडा, मल व वायु यांचे गतीचा रोध, आंगाला ताठेपणा, मोह, आणि आमवातासारिख्या कळा, हीं लक्षणें होतात.

## विष्टब्धाजीर्णशास्त्रार्थ.

विष्टब्धेस्वेदनंकार्यंपेयंचलवणोदकं ॥

अर्थ–विष्टब्धाजीर्णावर घाम काढावा; आणि मिठाचें पाणि प्यावें.

## रसशेषाजीर्णलक्षण.

रसशेषेन्नविद्वेषोहृदयाशुध्दिगौरवे ॥

अर्थ–रसशेषअजीर्णामध्यें अन्नद्वेष, हृदयाला अस्वास्थ्य, आंगाला जडता, हीं होतात

## रसशेषाजीर्णशास्त्रार्थ.

रसशेषेदिवास्वापंलंघनंवातवर्जनं ॥ आलिप्यजठरंप्राज्ञोहिंगुत्र्यूप
णसैंधवैः ॥ दिवास्वापंप्रकुर्वीतसर्वाजीर्णप्रणाशनं ॥

अर्थ–रसशेषअजीर्णावर दिवसास झोंप घ्यावी, लंघन करावें, वाऱ्यावर बसूं नये आणि हिंग, सुंठ, मिरें, पिंपळी व सैंधव यांचा पोटावर लेप करावा; आणि सर्वाजीर्णावर दिवसास झोंप प्रशस्त आहे.

## अजीर्णहोण्याला कारण.

अनात्मवंतःपशुवद्भुंजंतेशनलोलुपाः ॥
रोगानीकस्यतेमूलमजीर्णंप्राप्नुवंतिहि ॥

अर्थ जे अविचारी, खाण्याचे लोभी, गुरासारिखें फार खातात, त्याला अनेकरोगांना कारणभूत असें अजीर्ण होतें.

## अजीर्णाचें सामान्य लक्षण.

ग्लानिगौरवविष्टंभभ्रममारुतमूढता ॥
विबंधोतिप्रवृत्तिर्वासामान्याजीर्णलक्षणं ॥

**अर्थ**—ग्लानि, गौरव, विष्टंभ, भ्रम, अपानवायूचा प्रतिबंध व विबंध ह्मणजे मळमूत्राचा रोध, किंवा अप्रवृत्ति, इत्यादिक अजीर्णाचीं सामान्य लक्षणें जाणावीं.

## अजीर्णाचे उपद्रव.

मूर्छाप्रलापोवमथुःप्रसेकःसदनंभ्रमः ॥
उपद्रवाभवंत्येतेमरणंचाप्यजीर्णतः ॥

**अर्थ**—अजीर्णापासून मूर्छा, बडबड, वांति, तोंडाला पाणी सुटणें, ग्लानि, आणि भ्रम हे उपद्रव होतात; किंवा मरण ही येतें.

स्वल्पंयदादोषविबंधमामंलीनंनतेजःपथमावृणोति ॥
भवत्यजीर्णेपितदाबुभुक्षासामंदबुद्धिंविषवन्निहंति ॥

**अर्थ**—जा काळीं दोषयुक्त अल्प असें आमाजीर्ण अग्नीच्या मार्गाचा रोध करीत नाहीं. तेव्हां अजीर्णांत ही भोजनाची इच्छा होत्ये. ती भोजनेच्छा अल्पबुद्धिपुरुषाला विषासारिखी मारित्ये.

प्रायेणाहारवैषम्यादजीर्णंजायतेनृणां ॥
तन्मूलोरोगसंघातस्तद्विघाताद्विनश्यति ॥

**अर्थ**—प्रायः आहाराचे न्यूनाधिकपणेंकरून मनुष्यांस अजीर्ण होतें. त्या अजीर्णेंकरून नानारोग होतात. तेणेंकरून रोग्याचा नाश होतो.

## भास्करलवणचूर्ण.

पिप्पलीपिप्पलीमूलंधान्यकंकृष्णजीरकं ॥ सैंधवंचविडंचैवपत्रंताली सकेसरान् ॥ एषांद्विपलिकान्भागान्पंचसौवर्चलस्यच ॥ मरीचाजाजिशुंठीनामेकैकस्यपलंपलं ॥ त्वगेलाचार्धभागास्यात्सामुद्रंकुडवद्वयं ॥ दाडिमात्कुडवंचैवद्विपलंचाम्लवेतसं ॥ एतच्चूर्णीकृतंश्लक्ष्णं गंधाढ्यममृतोपमं ॥ लवणभास्करोनामभास्करेणविनिर्मितः ॥ जगतोस्यहितार्थायवातश्लेष्मामयापहः ॥ वातगुल्मंनिहंत्येषवातशूलानियानिच ॥ तक्रमस्तुसुरासिंधुयुक्तःकांजिकयोजितः ॥ मंदाग्निनां

विनाश्यैवशकोभवतिपावकः ॥ हृद्रोगमामदोषंचविविधान्युदराणिच ॥ अन्यानपिनिहंत्याशुरोगान्लवणभास्करः ॥

अर्थ-पिंपळी, पिंपळीमूळ, धने, काळें जिरें, सैंधव, बिडलोण, तालीसपत्र, नागकेसर हीं प्रत्येकीं ८ तोळे; संचळ १० तोळे; व मिरें, ओंवा व सुंठ हे प्रत्येकीं ४ तोळे; व दालचिनी व एलची २ तोळे; आणि मीठ ३२ तोळे व डाळिंबाचीसाल १६ तोळे, व आम्लवेतस ८ तोळे, यासर्वांचें चूर्ण एकत्र करावें; ह्मणजे लवणभास्करनामक चूर्ण होतें. हें उत्तम गंधयुक्त, अमृतासारिखें, जगत्रयाच्या हिताकरितां सूर्यानें उत्पन्न केलें; हें वायु, कफ, वातगुल्म व वातशूल यांचा नाश करितें; आणि हें ताक, ताकाची निवळी, मद्य, सैंधव, किंवा कांजी यांतून मंदाग्नीला द्यावें; ह्मणजे अग्निवृद्धि होत्ये व हृद्रोग, आमदोष, संपूर्ण उदरें व इतर अनेक व्याधि यांचा नाश करितें.

## अग्निमुखचूर्ण.

हिंगुभागोभवेदेकोवचाचद्विगुणाभवेत् ॥ पिप्पलीत्रिगुणाज्ञेयाशृंगवेरंचतुर्गुणं ॥ यवानिकापंचगुणाषड्गुणाचहरीतकी ॥ चित्रकंसप्तगुणितंकुष्ठंचाष्टगुणंभवेत् ॥ एतद्वातहरंचूर्णंपीतमात्रंप्रसन्नया ॥ पिबेद्दध्नामस्तुनावासुरयाकोष्णवारिणा ॥ उदावर्तमजीर्णंचप्लीहानमुदरंतथा ॥ अंगानियस्यशीर्यंतेविषंवायेनभक्षितं ॥ अर्शोहरोदीपनश्च शूलघ्नोगुल्मनाशनः ॥ कासंश्वासंनिहंत्याशुतथैवक्षयनाशनः ॥ चूर्णोह्यग्निमुखोनाम्नानकस्मिन्प्रतिहन्यते ॥

अर्थ-हिंग १ भाग, वेखंड २, पिंपळी ३, आलें ४, ओंवा ५, बाळहरीतकी ६, चित्रक ७, व कोष्ठ ८ भाग, याप्रमाणें भाग मिळवून चूर्ण करावें, तें मद्याशीं, दह्याशीं किंवा दह्यांच्या निवळीशीं, सुरेशीं, किंवा ऊन पाण्याशीं द्यावें; ह्मणजे उदावर्त, अजीर्ण, प्लीहा, उदरें व आंग गळतें तें, किंवा भक्षितविष, मुळव्याध, शूल, गुल्म, खोकला, दमा, आणि क्षय यांचा नाश करितें; आणि हें अग्निमुख चूर्ण दीपन आहे.

## वृद्धाग्निचूर्ण.

द्वौक्षारौचित्रकंपाठाकरंजोलवणानिच ॥ सूक्ष्मैलापत्रकंभार्गीकृमिघ्नंहिंगुपुष्करं ॥ शठीदार्वीत्रिवृन्मुस्तावचाचेंद्रयवास्तथा ॥ धात्रीजीरकवृक्षाम्लयवासाचोपकुंचिका ॥ आम्लवेतसमम्लीकादाडिमंसकटुत्रिकं ॥ भल्लातकाजमोदाचयवानीसुरदारुच ॥ आपश्चातिविषा

श्यामाहपुषारग्वधसमं ॥ तिलमुष्ककशिग्रूणांकोकिलाक्षपलाशयोः ॥ क्षीराणिलोहकिट्टंचतप्तंगोमूत्रभावितं ॥ समभागानिसर्वाणिसूक्ष्म चूर्णानिकारयेत् ॥ मातुलुंगरसेनैवभावयेत्तुदिनत्रयं ॥ दिनत्रयंतुसू क्तेनतथैवार्द्ररसेनच ॥ अत्यंताग्निकरंचूर्णप्रदीप्ताग्निसमप्रभं ॥ उप युक्तंविधानेननाशयत्यचिराद्ददान् ॥ अजीर्णकमथोगुल्मंप्लीहानमु दराणिच ॥ ग्रहणींपांडुरोगांश्चश्वासंकासंचदारुणं ॥ प्रतिश्यायंक्ष यंशोषंविद्रधिंकफजंतथा ॥ जठराण्यंत्रवृद्धिंचअष्ठीलांवातशोणि तं ॥ प्रणुदत्युल्बणान्दोषान्नष्टमग्निंचदीपयेत् ॥ समस्तव्यंजनो पेतंभक्तंदत्वातुभोजयेत् ॥ दापयेदस्यचूर्णस्यबिडालपदमात्रकं ॥ गोदोहमात्रंतत्सर्वंद्रवेपक्त्वातिसोष्मकं ॥ एषोह्यग्निमुखश्चूर्णश्चूर्णरा जोनिगद्यते ॥ ब्रह्मणानिर्मितोह्येषअश्विभ्यांपरिकीर्तितः ॥

अर्थ—टंकणखार, यवखार, चित्रक, पाहाडमूळ, करंज, पंचलवणें, बारीकएलची, तमालपत्र, भारंगमूळ, वावडिंग, हिंग, पुष्करमूळ, कचोरा, दारुहळद, तेड, नागरमोथे, वेखंड, इंद्रजव, आंवळकाठी, जिरें, आमसोल, धमासा, कलौंजी जिरें, आम्लवेतस, चिंच, डाळिंब, सुंठ, मिरी, पिंपळी, बिबवे, अजमोद, ओंवा, देवदार, वाळा, अतिविष, पिंपळी, हपुषा व बाहव्याचा मगज, हीं समभाग; व तिळ, घंटापाटली वृक्ष, शेवगा, उंसाचें बीं, पळसपापडी, रुई इत्यादिकांचे चीक तापवून गोमूत्राच्या भावना दिलेला मंडूर, हीं सर्व समभाग एकत्र करून त्याला महाळुंगाच्या रसांत तीन दिवस भावना द्याव्या, व कांजीच्या आणि आल्याच्या रसाच्या तीन तीन भावना द्याव्या; हें चूर्ण अ ग्नीला अत्यंत वाढविणारें आहे. हे रोज घेत गेलें असतां थोड्या दिवसांत व्याधि दूर करितें; आणि अजीर्ण, गुल्म, प्लीहा, उदरें, संग्रहणी, पांडुरोग, दमा, खोकला, पडसें, क्षय, शोष, कफजविद्रधि, अंत्रवृद्धि, अष्ठीला, वातरक्त, त्रिदोष, व नष्टाग्नी यांचा नाश करितें. यावर संपूर्ण पदार्थयुक्त भोजन द्यावें. याचे मान एक तोळा आहे, हें अग्निमुख चूर्ण संपूर्ण औषधांत श्रेष्ठ असें ब्रह्मदेवानें अश्विनीकुमाराला सांगितलें. हे द्रवरूप द्रव्या- मध्यें गाईचें दूध काढी तों पर्यंत कढवावें.

## यावशूकादिचूर्ण.

सयावशूकनागरंशिवाजलंचसादरं ॥
निहंत्यजीर्णजंदरंसदामितेपुरंदरं ॥

अर्थ—यवक्षार, सुंठ, हरीतकी, यांचा काढा अजीर्णापासून होणाऱ्या भयाचा नाश करितो.

## लघुचित्रकादिचूर्ण.

दहनाजमोदसैंधवनागरमरिचाम्लतक्रेण ॥
सप्ताहादग्निकरंयदर्शोनाशनंपरं ॥

**अर्थ**–चित्रक, अजमोदा, सैंधव, सुंठ व मिऱ्यें, यांचें चूर्ण आंबट ताकाशीं सातदिवस द्यावें; ह्मणजे अग्निवृद्धि कारते, व मुळव्याधीचा नाश करितें.

## शुंठ्यादिचूर्ण.

यवक्षारान्वितंशुंठीचूर्णलीढंघृतान्वितं ॥
ऊष्णोदकेनवापीतंशुंठीचूर्णंक्षुधाकरं ॥

**अर्थ**–सुंठ व यवक्षार यांचें चूर्ण एकत्र करून तुपांतून किंवा ऊन पाण्याशीं द्यावें; ह्मणजे क्षुधा उत्पन्न करितें.

## कणाद्यचूर्ण.

कणासिंधुशिवावन्हिचूर्णमूष्णेनवारिणा ॥
पीतंप्रातःक्षुधांकुर्यात्पावकस्यापिदीपनं ॥

**अर्थ**–पिंपळी, सैंधव, हरीतकी व चित्रक यांचें चूर्ण ऊन पाण्याशीं प्रातःकाळीं द्यावें; ह्मणजे क्षुधा व अग्निवृध्दि यानां करितें.

## कपित्थादियोग.

कपित्थतक्रचांगेरीमरिचाजाजिचित्रकैः ॥
कफवातहरोग्राहीबल्योदीपनपाचनः ॥

**अर्थ**–कवंठ, ताक, चुका, मिऱ्यें, जिरें व चित्रकमूळ यांचा योग कफवातहारक, ग्राहक, बळदेणारा, दीपन, आणि पाचन असा आहे.

## ज्वालामुखचूर्ण.

हिंग्वाम्लवेतसकटुत्रिकचित्रकाणांकर्षाःपृथक्गुडपलंयवचूर्णकंच ॥
ज्वालामुखोयमनलस्यकरोतिदीप्तिंचाजीर्णमात्रशमनेहिकृशानुरेषः ॥

**अर्थ**–हिंग, आम्लवेतस, त्रिकटु, चित्रकमूळ, आणि यवक्षार हीं प्रत्येक एक तोळा, आणि त्यात गूळ चार तोळे, घालावा. याला ज्वालामुखचूर्ण ह्मणतात. हें अग्निवृद्धि करितें; आणि अजीर्णाचा नाश करितें.

## व्योषादि चूर्ण.

व्योषैलाहिंगुभार्गीविडलवणयवक्षारपाठायवानीचिंचात्वग्भस्मच

व्यंदहनगजकणात्वक्पटुग्रंथ्यजाजी ॥ एतच्चूर्णंघृताढ्यंत्रिदिवस
मशनेहन्यतेरोगजालंविश्वंवैश्वानरोयंदहातिसरभसंकिंपुनर्भुक्तमन्नं ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, एलची, हिंग, भारंगमूळ, बिडलोण, यवक्षार, पाहाडमूळ, ओंवा, चिंचेचे सालीचें भस्म, चवक, चित्रक, गजपिंपळी, दालचिनी, मीठ, पिंपळमूळ व जिरें यांचें चूर्ण तुपाशीं तीन दिवस द्यावें; ह्मणजे संपूर्णरोगजालाचा नाश करितें. मग भोजनाची काय कथा. याला वैश्वानर चूर्ण ह्मणतात.

## शुंठ्यादि चूर्ण.

शुंठीबाणमिताकणार्णवमितादीप्यायवानीक्रमाद्भागानांत्रितयंद्वयंच
लवणंभागैःशिवातत्समा ॥ कोष्ठाटोपरुगामगुल्ममलरुद्धोलिंबरा
जोदितश्चूर्णोद्रीनपिभस्मसात्प्रकुरुतेकिंभोजनंभोजनाः ॥

अर्थ–सुंठ ५ पिंपळी ४ अजमोदा ३ ओंवा २ मीठ १ व हरीतकी १६ भाग ह्यांचें चूर्ण पोटांत गुडगुड शब्द होतो तो, आम गुल्म व मळ यांचा नाश करितें; व हें भस्म पर्वताचें ही भस्म करील; मग भोजनाची काय कथा.

## विश्वादि चूर्ण.

विश्वकणोषणनागदलैश्चत्वक्त्रुटिभिर्विहितंक्रमवृद्धं ॥
चूर्णमिदंसमखंडमरोचश्वासगुदोद्भवगुल्मवमीषु ॥

अर्थ–सुंठ, पिंपळी, मिरीं, विड्याचीं पानें, दालचिनी व बारीक एलची हे पदार्थ क्रमवृद्धीनें घेऊन एकत्र करून त्या सर्व चूर्णासमान खडीसाकर घालून द्यावें; ह्मणजे अरुचि, दमा, मुळव्याध, गुल्म, आणि वांति यांचा नाश करितें.

## चित्रकादि चूर्ण.

कृशानुश्चव्यंवामरिचमगधाहिंगुचपलाशठीदीप्योविश्वायव
जयुगुलंपंचलवणं ॥ समंबीजद्रावैर्लुलितमथवादाडिमरसैर्ज
येदामान्रोगान्ग्रहणिकफतांवन्हितनुतां ॥

अर्थ–चित्रक, चवक, मिरीं, पिंपळी, हिंग, गजपिंपळी, कचोरा, ओंवा, सुंठ, यवक्षार, सैंधव पंच लवणें, हीं प्रत्येक समभाग घेऊन महाळुंगाच्या रसांत भिजवावीं; ह्मणजे आमरोग, संग्रहणी, कफ, वायु, आणि अग्निमांद्य यांचा नाश करितें.

## विडलवणादि चूर्ण.

विडंचित्रकंजाजियुग्मंयवानींशिवात्र्यूषणंधान्यसौवर्चलंच ॥ त्वचाति

त्तिडीकाजमोदाम्लवेतसमंयोज्यमेतत्समंचाविडंगं ॥ बिडादिरोगदार कंगदार्तिनांचतारकंह्यनेनजीर्यतेधराकथंनजानतेनरा: ॥

अर्थ–बिडलोण, चित्रक, जिरें, शाहाजिरें, ओंवा, हरीतकी, सुंठ, मिरीं, पिंपळी, धने, पादेलोण, दालचिनी, चिंच, अजमोदा, आम्लवेतस व वावडिंग, यांचें समभाग चूर्ण एकत्र करावें. तें बिडादिचूर्ण, संपूर्णव्याधींचें नाशक आहे.

## वडवानलचूर्ण.

शिवाकरंजचित्रकंकणाजटाकटुत्रिकं ॥
सशर्करंसमांशकंत्विदंहिवाडवाग्निकं ॥

अर्थ–हरीतकी, करंजाची साल, चित्रक, पिंपळीमूळ, सुंठ, मिरीं, पिंपळी आणि साकर यांचे समभाग चूर्ण एकत्र करावें. त्याला वडवाग्निचूर्ण असें ह्मणतात. हें अजीर्णावर पाचन आहे.

## पंचाग्निचूर्ण.

आम्लवेतसधनंजयवज्रीमोरटातदनुसूरणएषः ॥
पंचवन्हिजठरानलवृध्यैतक्रसाकमिदमाशुहिपेयं ॥

अर्थ–आम्लवेतस, अर्जुनसादडा, निवडुंग, मोरवेल व सुरण या पांचांचे चूर्ण ताकाशीं घ्यावें; ह्मणजे अग्निवृद्धि करितें.

## विश्वभेषजचूर्ण.

विश्वभेषजंहिंगुटंकणंमागधीचसौवर्चलंत्विदं ॥
शिग्रुपादजैर्भावितंरसैःशूलनाशनंक्षुत्प्रबोधनं ॥

अर्थ–सुंठ, हिंग, टांकणखार, पिंपळी व पादेलोण यांचे चूर्णाला शेवग्याच्या मुळांचे रसाची भावना द्यावी; ह्मणजे तें शूलनाश करितें, व क्षुधा उत्पन्न करितें.

## संजीवनीगुटी.

विडंगंनागरकृष्णापथ्यावन्हिबिभीतकाः ॥ वचागुडूचभिल्लातंविषंचात्रप्रयोजयेत् ॥ एतानिसमभागानिगोमूत्रेणैवपेषयेत् ॥ गुंजाभांवटिकांकुर्याद्दद्यादार्द्रकजैरसैः ॥ एकामजीर्णयुक्तस्यद्वेविषूच्यांप्रदापयेत् ॥ तिस्रोभुजंगदष्टस्यचतस्रःसन्निपातिनः ॥ गुटिकाजीवनीनाम्नासंजीवयतिमानवं ॥

अर्थ–वावडिंग, सुंठ, पिंपळी, हरीतकी, चित्रक, बेहेडे, वेखंड, गुळवेल, बिबवे

व अतिविष ही सर्व समभाग चूर्ण घेऊन त्यांचा गोमुत्रांत खल करावा; नंतर गुंजे एवढी गोळी करून ती आल्याच्या रसाशीं अजीर्णावर एक द्यावी; व विषूचीवर दोन, साप चावला असतां तीन, आणि सन्निपातावर चार द्याव्या. ही संजीवनीनामक गुटी मनुष्यांला संजीवन करित्ये.

## धनंजयवटी.

जरिकंचित्रकंचव्यंसमुगंधवचात्वचौ ॥ एलाकर्पूरहपुषाकारवीनाग केसरं ॥ पृथक्कर्षमितख्यातमितिकर्षार्धसंमितं ॥ यवानीपिप्पलीमूलंस्वर्जिकाचहरीतकी ॥ जातीफललवंगंचपृथक्कर्षयुगंमतं ॥ धान्यकंपत्रकंचापिकर्षत्रयमितंपृथक् ॥ कृष्णापलप्रमाणंस्यात्पलमानंतुरोमकं ॥ मरिचानिचनःसप्तत्रिवृन्मूलापलद्वयं ॥ पृथग्दशाक्षंसामुद्रंसैंधवंनागरंतथा ॥ शरावसंमितंचुक्रंतदर्धंतिंतिणीफलं ॥ धनंजयवटीह्येषा धनंजयविवर्धिनी ॥ जीर्णंचजरयत्याशुशूलमुन्मूलयेद्द्रुतं ॥ हरेद्विबंधेनसममाध्मानंकर्षयत्यपि ॥ ग्रहण्यानिग्रहंकुर्याद्रचयेद्रुचिमुत्तमां ॥

अर्थ—जिरें, चित्रक, चवक, संचळ, वेखंड, दालचिनी, एलची, कापूर, हंसपादी अजमोदा, नांकेशर, हीं प्रत्येकीं १ तोळा; ओंवा, पिंपळीमूळ, सार्जिखार, हरीतकी, हीं प्रत्येक अर्धा तोळा; आणि जायफळ व लवंग, हीं दोन दोन तोळे; व धने, तमालपत्र, हीं तीन तोळे, पिंपळी व सांबरमीठ ४ तोळे, मिरीं ७ तोळे, तेड ८ तोळे, मीठ १० तोळे, सैंधव व सुंठ १० तोळे, व चुका ३२ तोळे व चिंच १६ तोळे, हीं सर्व चूर्ण एकत्र करून त्याची गोळी करून द्यावी. ती धनंजयवटी अग्नीला वाढवित्ये; व अजीर्णाला जिरवित्ये, व शूलाला उपटून काढित्ये, व विटूबंध, आध्मान व संग्रहणी यांचा नाश करित्ये; आणि रुचि उत्पन्न करित्ये.

## शंखवटी.

चिंचाश्वत्थस्नुहिक्षारादपामार्गार्ककंतथा ॥ लवणंपंचसंगृह्यततोलवणपंचकात् ॥ सैंधवाद्यान्समादायसर्वमेतत्पलद्वयं ॥ द्वौद्वौकर्षौपृथक्कार्यौतथाद्वौशंखचूर्णतः ॥ फलत्रयाच्चकर्षैकंद्विकर्षंतुलवंगकं ॥ एतत्सर्वंसमासाद्यश्लक्ष्णचूर्णीकृतंशुभं ॥ भावयेदम्लयोगेनसप्तधाचप्रयत्नतः ॥ रसःशंखवटीनामसेवितःसर्वरोगजित् ॥ गुंजामात्रमिमंखादेद्वह्वेर्दीपनपाचनं ॥ अजीर्णवातसंभूतंपित्तश्लेष्मभवंतथा ॥ विषूचींशूलमानाहंहन्यादत्रनसंशयः ॥

अर्थ–चिंच, पिंपळ, निवडुंग, आघाडा, रुई, यांचे क्षार, पंच लवणें सैंधवादिक हीं प्रत्येकी ८ तोळे, शंखभस्म २ तोळे, त्रिफळा १ तोळा व लवंग २ तोळे, या संपूर्णांचें चूर्ण एकत्र करून त्याला निंबूच्या रसांत ७ भावना द्याव्या. हा शंखवटी रस १ गुंज सेवन केला असतां, संपूर्ण रोगांला जिंकितो, व दीपन व पाचन आहे; आणि अजीर्ण, वात, पित्त व कफ यांपासून झालेलें अजीर्ण. व विशूचिका, शूल व आनाहवायु यांचा नाशकरितो.

## लवंगामृतवटी.

सर्वार्थदेवपुष्पंमरिचमगधयोस्त्रिस्त्रिकर्षंयवान्योरष्टावष्टाग्नितोपित्रिप टुरथपलंग्रंथिकंसप्तकर्षं ॥ शुंठीपथ्यादशाक्षामलककलिफलाजाजिच व्याघ्रषट्षट्सुत्रामप्रीतिपात्रंनखमितमखिलंचूर्णितंवस्त्रपूतं ॥ त्रिर्भा व्यंचार्द्रकस्यद्रवमपिविधिवन्माषयुग्मप्रमाणाबद्धाचुक्रेणसिद्धाप्रभव तिगुटिकासौलवंगामृताख्या ॥ भुक्तायुक्तासकलसुखकरीदीप्तिमग्ने र्विधत्तेवृष्यापुष्यावपुष्यामयनिचयत्दतिख्यातिपूर्णाविभाति ॥

अर्थ–मिरीं व पिंपळी हीं प्रत्येक ३ तोळे, ओंवा व चित्रक ८ तोळे, लवणत्रय ४ तोळे, पिंपळीमूळ ७ तोळे, सुंठ व हरीतकी १० तोळे, बेहेडे, आवळकाठी, बिबवे, जिरें, व चवक हीं ६ तोळे, इंद्रजव २० तोळे, या सर्वांचें चूर्ण गाळून घेऊन एकत्र करावें; आणि सर्वचूर्णासमान लवंगाचें चूर्ण मिळवून त्याला आल्याच्या रसाच्या व चुक्याच्या रसाच्या तीन तीन भावना द्याव्या; आणि दोन माशांची गोळी करावी. ही लवंगामृताख्या वटी भक्षण केली असतां, अग्नि प्रदीप्त करिते, व वृष्य आणि संपूर्ण सुखें देणारी आहे; आणि रजसंबंधीं व्याधीचा नाश करिते.

## व्योषादिगुटी.

त्रिकटुपिप्पलीमूलमेलालवणपंचकं ॥ द्विजीरधान्यकंनागके सरंसारत्वक्समैः ॥ चुक्राम्हातिंतिडीकाद्रिलवणंमर्द्यचार्द्रकं ॥ निंबुनीरेणतद्वाव्यंरोगत्दद्वन्हिदीपनं ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, पिंपळमूळ, एलची, पंच लवणें, जिरें, शाहाजिरें, धनें, नाकेशर, कात, दालचिनी, चुका, चिंच व सैंधव हीं समभाग एकत्र करून त्याला आल्याच्या व निंबूच्या रसाच्या भावना द्याव्या, ही वटी रोगनाशक व अग्निदीपक आहे.

## हरीतक्यादिवटी.

हरीतकीहरिहरतुल्यषड्गुणाचतुर्गुणाचतुरविशालपिप्पली ॥ चित्रकंवरदवरैकसैंधवंरसायनंकुरुनृपवटीवन्हिदीपनी ॥

**अर्थ**–बाळहरीतकी ६ भाग, व पिंपळी, आणि गजपिंपळी ४ भाग, चित्रक १ भाग, व सैंधव १ भाग, हीं सर्व एकत्र करावीं; ह्मणजे अग्नि प्रदीप्त करणारी अशी वटिका होत्ये. ही रसायन आहे.

## तक्रहरीतकी.

तक्रेसुसंस्वेद्यशिवाशतानितद्बीजमुद्धृत्यचकौशलेन ॥ षड्‌पणंपंचपटूनिहिंगुक्षारावजाजीमजमोदकंच ॥ षड्‌पणादेस्त्रिवृदर्धभागंगणेत्रदेयंपटगालितस्य ॥ विभाव्यचुक्रेणरजांस्यमीषांक्षिपेच्छिवांबीजनिवासगर्भे ॥ समूह्यघर्मेषुविशोष्यतासांहरीतकीमन्यतमांनिषेवेत् ॥ अजीर्णमंदानलजाठरामयान्समूलशूलग्रहणीगुदांकुरान्॥ विबंधमानाहरुजो जयत्यसौसआमवातावमृताहरीतकी ॥

**अर्थ**–१०० हरीतकी घेऊन त्या ताकांत पचन कराव्या; व त्यांचें बीज काढून टाकावें; आणि पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रकमूळ, सुंठ, मिरीं, मीठ, टांकणखार, सैंधव, बिडलोण, संचळ, हिंग, यवक्षार, जिरें व अजमोद, हीं प्रत्येकीं १ तोळा; आणि निशोत्तर अर्धा तोळा, यां सर्वांची वस्त्रगाळ चूर्णें एकत्र करून त्याला चुक्याच्या रसाची भावना द्यावी; आणि तें पूर्वोक्त हरीतकींत भरून त्या उन्हांत ठेवून सुकवाव्या. त्यांतून एक हरीतकी खात जावी; ह्मणजे अजीर्ण, मंदाग्नि, उदररोग, शूळ, संग्रहणी, मुळव्याध, विट्‌बंध, आनाह वायु, आणि आमवात यांचा नाश करित्ये. हिलाच अमृत हरीतकी ह्मणतात.

## चित्रकगुड.

वन्हेर्द्विपंचमूलस्यक्काथेपलशतद्वये ॥ अमृतायारसस्यैकंपूतेस्मिन्नभयाढकं ॥ पचेद्गुडतुलांदत्वायावदापाकलक्षणं ॥ अन्येद्युस्तुसुशीतेस्मिन्मधुनःकुडवद्वयं ॥ प्रत्येकंस्याद्यवक्षाराच्छुक्तिस्तस्मिन्रसायने ॥ उत्तमंकथितंपुंसामश्विभ्यामग्निवृद्धये ॥ जीर्यत्यपिचकाष्ठानि कासश्वासक्रिमिक्षयान् ॥ गुल्मोदरार्शकुष्ठानिसांत्रवृद्धीनिहंतिच ॥ योगैःशतैरप्यजितान्त्र्यहाज्जयतिपीनसान् ॥

**अर्थ**–चित्रक, आणि दशमुळें यांचा ८०० तोळे काढा व गुडूचीरस २५६ तोळे, व हरीतकी २५६ तोळे, आणि गूळ ४०० तोळे, घालून पाक होई इतकें कढवून त्यांत दुसरे दिवशीं ३२ तोळे मध व यवक्षार २ तोळे घालून सर्व एकत्र करावें. हा चित्रकगुड अश्विनीकुमारांनीं पुरुषांला अग्निवृद्धिकरितां उत्तम सांगितला आहे. हा भक्षण करू

न वर काढें भक्षण केलीं तरी जिरतात; व दमा, खोकला, कृमि, क्षय, गुल्म, उदर, अर्श, सर्व कुष्ठें व अंत्रवृद्धि यांचा नाश करितो; आणि तीन दिवसांत पीनसरोगाला जिंकितो.

## द्राक्षादियोग.

विदह्यतेयस्यतुभुक्तमात्रंदह्यंतित्दृत्कोष्टगतामलाश्च ॥
द्राक्षासितामाक्षिकसंप्रयुक्तालीढ्वाभयांवासुखंलभेत्स ॥

अर्थ–जेवल्यावर पोटांत जळजळते, आणि कोष्ठ व त्द्दय, यांत आग होत्ये. त्याणें द्राक्षें, साखर, मध, आणि हरीतकी, हीं भक्षण करावीं; ह्मणजे सुख होईल.

## यवागू.

चित्रकचविकानागरभागाभ्यधिकाग्रकैर्यवागूःस्यात् ॥
गुल्मानिलशूलहरीसचित्रदावन्हिजननीच ॥

अर्थ–चित्रक १ चवक २ व सुंठ ३ भाग घेऊन त्यांशीं यवागू सिद्ध करावी. ती गुल्म, वायु व शूल यांचा नाश करित्ये; व अग्नि प्रदीप्त करित्ये. ही यवागू आश्चर्य कारक आहे.

## क्रव्यादकल्क.

एलालवंगमरिचंकृष्णाशुक्तिसमन्वितं ॥ चुक्रनागरसिंधूत्थ
शूकंलवणपंचकं ॥ एषांचूर्णंवस्त्रपूतंक्रव्यादोनातिरिच्यते ॥

अर्थ–एलची, लवंगा, मिरीं, शिंपोचें भस्म, चुका, सुंठ, सैंधव, भटोरा व पंच लवणें यांचें वस्त्रगाळ चूर्ण एकत्र करावें. तें क्रव्यादरसाबरोबर गुणकारी आहे.

## क्षारयोग.

द्वौक्षारौटंकणंसूतंलवंगंलवणत्रयं ॥ पिप्पलीगंधकंशुंठीमरिचंपलसं
मितं ॥ कर्षमेकंविषंदत्वासूक्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ अर्कदुग्धस्यदातव्या
भावनाःसप्तवासरं ॥ अंधमूषागजपुटेस्वांगशीतंसमुद्धरेत् ॥ ततोल
वंगंमरिचंफाटिकानांपलंपलं ॥ सर्वंसंमर्द्यसुदृढंदृढभांडेनिधापयेत् ॥
सोयंगुंजाद्वयंखादेद्भुक्तंद्रावयतिक्षणात् ॥ पुनर्भोजनवांछांचजनयेत्प्र
हरोपरि ॥ आममांसंद्रावयतिश्लेष्मरोगनिकृंतनः ॥

अर्थ–सज्जीखार व यवखार, टांकणखार, पारा, लवंगा, सैंधव, बीड, काचलोण, पिंपळी, गंधक, सुंठ व मिरीं हीं प्रत्येकीं चार चार तोळे व बचनाग १ तोळा यांचें बारीक चूर्ण करून त्याला रुईचे चिकाच्या ७ भावना द्याव्या; नंतर अंधमूषेंत घालून गजपुट द्यावें. शीत झाल्यावर काढून लवंग, मिरीं व फटकी यांचें चार चार

तोळे चूर्ण करून त्यांत मिळवावें; नतर घोटून भांड्यांत भरून ठेवावें. तें दोन गुंजा द्यावें; ह्मणजे क्षणांत भोजनाला जिरवितें; व पुनः भोजन करण्याची इच्छा उत्पन्न करितें; आणि हिरव्या मांसाला द्रववितें; व कफरोगाला शमवितें.

## अग्निमुखरस.

सुतंगंधंविषंतुल्यंमर्दयेदार्द्रकद्रवैः ॥ अश्वत्थचिंचापामार्गक्षारक्षारौ चटंकणं ॥ जातीफलंलवंगंचत्रिकटुत्रिफलासमं ॥ शंखक्षारंपंचपटूकंहिंगुजीरंद्विभागकं ॥ मर्दयेदम्लयोगेनगुंजामात्रंवटीकृता ॥ पाचनीदीपनीसद्योजीर्णशूलविषूचिकाः ॥ हिक्कांगुल्मंचोदरंचनाशयेन्नात्रसंशयः ॥ रसेंद्रसंहितायाश्चनाम्नावन्हिमुखोरसः ॥

अर्थ—पारा, गंधक व बचनाग हे आल्याच्या रसांत खलून, नंतर पिंपळ, चिंच व आघाडा यांचे खार, यवखार, साजेखार, टांकणखार, जायफळ, लवंग, सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहेडा, आवळकाठी, शंखभस्म व जवखार, पुष्कर, सज्जीखार, पळस, तिळाची कांडी, यव यांचे क्षार, हिंग व जिरें हे दोन भाग, हे सर्व एकत्र करून आम्लयोगानें मर्दन करून गुंजे एवढी गोळी करून द्यावी, ती दिपन व पाचन आहे; आणि अजीर्ण, तरळ, उचकी, गुल्म व उदर यांचा नाश करित्ये. हिला रसेंद्रयुक्तना, वानें वन्हिमुख रस ह्मणतात.

## अजीर्णारिरस.

शुद्धंसूतंगंधकंचपलमानंपृथक्पृथक् ॥ हरितकीचद्विपलानागरस्त्रिपलः स्मृतः ॥ कृष्णाचमरिचंतद्वत्सैंधवंत्रिपलंपृथक् ॥ चतुःपलाचविजया मर्दयेन्निंबुकद्रवैः ॥ पुटानिसप्तदेयानिघर्ममध्येपुनःपुनः ॥ अजीर्णारिरयंप्रोक्तःसद्योदीपनपाचनः ॥ भक्षयेद्द्विगुणंभक्ष्यंपाचयेद्रेचयेदपि ॥

अर्थ—शुद्ध पारा व गंधक हे चार चार तोळे व हरीतकी ८ तोळे, सुंठ १२ तोळे व पिंपळी, मिरीं, सैंधव, हीं प्रत्येकी बारा तोळे, व भांग १६ तोळे यांचे चूर्ण एकत्र करून उन्हांत लिंबूच्या रसाचीं सात पुटें द्यावीं. हा अजीर्णारिरस दीपन व पाचन आहे. हा भक्षण करून दुप्पट जेवावें; त्याला पचन करून रेचन ही करितो.

## पाशुपतरस.

कर्षंसूतंद्विधागंधंत्रिभागंभस्मतीक्ष्णकं ॥ त्रिभिःसमंविषंयोज्यंचित्रकद्रवभावितं ॥ द्विधात्रिकटुकंयोज्यंलवंगैलातुतत्समे ॥ जातीफलंजातिपत्रीचार्धभागमितंसमं ॥ तथार्धपंचलवणंस्नुह्यर्कौवापितित्तिणी ॥

अपामार्गाश्वत्थएषांलवणंचपलार्धकं ॥ टंकणंयावकक्षारंस्वर्जिकांहिंगुजीरकं ॥ हरीतकीसुतस्तुल्यामर्दयेदम्लयोगतः ॥ धूर्तबीजस्यभस्मंतुसर्वैसप्तमभागतः ॥ रसःपाशुपतोनामप्रोक्तःप्रत्ययकारकः ॥ गुंजामात्रावटीकार्यासर्वाजीर्णविनाशिनी ॥ तालमूलीतक्रयोगादुदरामयनाशिनी ॥ मोचरसेनातिसारंग्रहणींतक्रसैंधवैः ॥ शूलेनागरकंशस्तं हिंगुसौवर्चलान्वितं ॥ अर्शस्सुतक्रेणहितापिप्पलीराजयक्ष्मणि ॥ वातरोगंनिहंत्याशुशुंठीसौवर्चलान्विता ॥ गुडूचीशर्करायोगात्पित्तरोगविनाशिनी ॥ पिप्पलीक्षौद्रयोगेनश्लेष्मरोगंनिकृंतति ॥ अतःपरतरानास्तिधन्वंतरमतेवटी ॥

**अर्थ**–पारा १ तोळा, गंधक २ तोळे व कांतभस्म ३ तोळे, या सर्वांसमान बचनाग घेऊन चित्रकाच्या रसांत खल करावा; आणि सुंठ, मिरीं व पिंपळी, हीं २ भाग व लवंग, एलची २ भाग, जायफळ व जायपत्री, हीं एकेक भाग, पंचलवणें ५तोळे, व निवडुंग, रुई, चिंच, अघाडा व पिंपळ, यांचे क्षार प्रत्येकीं तोळे २ टांकणखार, यवक्षार, सर्जिक्षार, हिंग, जिरें व हरीतकी, हीं प्रत्येकीं एकेक तोळा घेऊन अम्लवर्गांत भावना देऊन त्यांत धोतऱ्याच्या बियांचें भस्म ७ भाग घालावें; आणि गुंजेची गोळी करावी. हा पाशुपतनामक रस सद्यः प्रत्यय करणारा आहे. हा संपूर्ण अजीर्णाचा नाश करितो. व तालमूल व ताक यांशीं उदरावर, अतिसारावर मोचरसाशीं, ग्रहणीवर ताक व सैंधव, यांशीं शूलावर सुंठ, हिंग, व पादेलोण यांशीं, अर्शावर ताकाशीं, क्षयावर पिंपळीशीं, वायूवर सुंठ व पादेलोण यांशीं, पित्तावर गुळवेल व साखर यांशीं, कफरोगावर पिंपळी व मध यांशीं द्यावा. ह्या पाशुपत रसाहून दुसरा धन्वंतरिमतें श्रेष्ठ रस नाहीं.

## आदित्यरस.

दरदंचविषंगंधंत्रिकटुत्रिफलासमं ॥ जातीफलंलवंगंचलवणानिचपंचवै ॥ सर्वमेकीकृतंचूर्णमम्लयोगेनसप्तधा ॥ भावयित्वावटीकुर्याद्गुंजार्धप्रमितावुधैः ॥ रसोह्यादित्यसंज्ञोयमजीर्णक्षयकारकः ॥ भुक्तमात्रंपाचयतिजठरानलदीपनः ॥

**अर्थ**–हिंगुळ, बचनाग, गंधक, सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहेडा, आवळकाठी, जायफळ, लवंग, बांगडखार, सैंधव, लवण, बिडलोण, संचळ, हीं संपूर्ण एकत्रकरून आम्लवर्गाच्या सात भावना द्याव्या; आणि अर्धगुंजेची वटी करावी. हा आदित्यनामक रस अजीर्णनाशक आहे. व जें खावें तें पचवितो व अग्नि प्रदीप्त करितो.

## हुताशनरस.

एकंचदिग्द्वादशभागमानंयोज्यंविषंटंकणमूषणंच ॥
हुताशनोनामहुताशनस्यकरोतिवृद्धिंकफवातहंता ॥

अर्थ–बचनाग १, टांकणखार ८, व मिरीं १२ भाग, हे एकत्र करून घोटावा. हा हुताशनरस अग्निवृद्धि करितो; आणि वायु व कफ यांचा नाश करितो.

## अजीर्णकंटकरस.

शुद्धसूतविषगंधकंसमंतुल्यभागमरिचंचचूर्णितं ॥ मर्दयेत्तुबृहतीफल द्रवैरेकविंशतिविभावितंपुनः ॥ गुंजिकात्रयमिदंसुभक्षितंसद्यएवज ठराग्निवर्धनं ॥ एषकंटकरसोविषूचिकाजीर्णमारुतगदान्निहंतिच ॥

अर्थ–शुद्ध पारा, बचनाग व गंधक हे समभाग, व मिरीं तिहींचे समान घेऊन रिंग. णीच्या रसाच्या २१ भावना द्याव्या; आणि तीन गुंजा द्यावा; ह्मणजे तो अग्नीची वृद्धि करितो; आणि हा कंटकरस तरळ, अजीर्ण व वायु यांचा नाश करितो.

## रामबाणरस.

पारदामृतलवंगगंधकंभागयुग्ममरिचेनमिश्रितं ॥ तत्रजातिफलम र्धभागिकंतिंतिणीफलरसेनमर्दितं ॥ वन्हिमांद्यदशवक्त्रनाशनोराम बाणइतिविश्रुतोरसः ॥ संग्रहग्रहणिकुंभकर्णयोःसा[illegible]वातखरदूषणंज येत् ॥ दीयतेतुचणकानुमानतःसद्यएवजठराग्निदीपनः ॥ रोचनोक फकुलांतकारकोश्वासकासवमिजंतुनाशनः ॥

अ[illegible]–पारा, बचनाग, लवंगा व गंधक हीं समभाग; व मिरीं २ भाग व जायफळ अर्धा भाग, [illegible]कत्र करून चिंचेच्या रसांत खल करावा. हा रामबाण रस चण्याएवढा द्यावा; ह्मणजे संग्रहण[illegible], आमवात, मंदाग्नि, कफ, दमा, खोकला, वांति आणि कृमि, यांचा नाश करितो.

## दुसरा प्रकार.

त्रिनिष्कंशुद्धजेपालंविषंगंधेशटंकणं ॥ भृंगराजरसैःपिष्ट्वाभू योवटकसाधितः ॥ रामबाणरसःख्यातोद्विगुंजःश्लेष्मवातहा ॥
अजीर्णाध्मानावष्टंभशूलेषुश्वासकासयोः ॥

अर्थ–शुद्ध जेपाळ ४ मासे व बचनाग, गंधक व पारा हे एकेक मासा एकत्र करून माक्याच्या रसांत घोटावे, त्याची दोन गुंजेची गोळी करून द्यावी- ती कफ, वायु, अजीर्ण, आध्मान, विष्टंभ, शूल, दमा व खोकला, यांचा नाश करित्ये.

## ज्वालानलरस.

एलात्वक्‌गगनपुष्पाणामत्रोत्तरविवर्धिताः ॥ मरीचांपिप्पलींशुंठीचतुः पंचषडुत्तरा ॥ द्रव्याण्येतानियावंतितावद्भिसितशर्करा ॥ चूर्णमेतत्प्रयो क्तव्यमग्निसंदीपनंपरं ॥ क्षारत्रयंसूतगंधौपंचकोलमिदंशुभं ॥ सर्वैस्तुल्या जयाभ्रष्टातदर्धांशिग्रुजाजटा ॥ एतत्सर्वंजयाशिग्रुवन्हिमार्द्रकजैर्द्रवैः ॥ भावयेत्रिदिनंघर्मैततोलघुपुटेक्षिपेत् ॥ सप्तधार्द्रद्रवैर्घृष्टोरसोज्वाला नलोभवेत् ॥ निष्कंचमधुनालिह्यानुपानंगुडनागरं ॥ हंत्यजीर्णमती सारंग्रहणीमग्निमार्दवं ॥ श्लेष्मत्दृल्लासवमनमालस्यमरुचिंजयेत् ॥

अर्थ—एलची १, दालचिनी २, अभ्रक भस्म ३, लवंगा ४, मिरीं ४, पिंपळी ५, सुंठ ६ भाग याप्रमाणें घेऊन सर्व चूर्णाचे समान पांढरी साकर घालोन तयार करावें. तें दिलें असतां, अग्नीला दिपन करितें.व तीन क्षार, पारा, गंधक, पिंपळी, पिंपळीमूळ, चवक, चित्रकमूळ, सुंठ, हे समभाग व सर्वचूर्णासमान भाजलेली भांग व भांगेच्या निमे शेवग्याचे मूळ, ह्या सर्वांचीं चूर्णे एकत्र करून त्याला जया, शेवगा, चित्रक व आले, यांच्या रसांत घालून उन्हात ठेवावें; नंतर त्याला लघुपुट द्यावें. शीत झाल्यावर आल्याच्या रसाच्या सात भावना द्याव्या. हा ज्वालानल रस ४ मासे मधाशीं द्यावा. व मागून सुंठ व गूळ भक्षणार्थ द्यावा; ह्मणजे अजीर्ण, अतिसार, संग्रहणी, मंदाग्नि, कफ, मळमळ, वांति, आळस आणि अरुचि, यांचा नाश करितो.

## चिंतामणिरस.

रसंगंधंमृतंशुल्बंमृतमभ्रंफलत्रिकं ॥ त्र्यूषणंजयपालंचसमंखल्वेविमर्द येत् ॥ द्रोणपुष्पीरसंभाव्यंशुष्कंतद्वस्त्रगालितं ॥ चिंतामणिरसोह्येष अजीर्णेशंसतेसदा ॥ ज्वरमष्टविधंहंतिसर्वशूलहरःपरः ॥ गुंजैकंवा द्विगुंजंवाआमवातहरःपरः ॥

अर्थ—पारा, गंधक, ताम्रभस्म, अभ्रकभस्म, हरडा, बेहेडा, आवळकाठी, सुंठ, मिरीं, पिंपळी व जेपाल, हीं सर्व समभाग घेऊन कुंभ्याच्या रसांत खलोन सुकल्यावर वस्त्रावर गाळून घ्यावी. हा चिंतामणि रस. अजीर्णावर सांगितला आहे. हा आठ प्रकारचे ज्वर, संपूर्ण शूल, आणि अमवात, यांचा नाश करितो. याचें मान दोन गुंजा आहे.

## पंचमूल्यादिघृत.

पंचमूल्याभयाव्योषपिप्पलीमूलसैंधवं ॥ रास्नाक्षारद्वयाजाजीविडंग

सटिभिर्घृतं ॥ युक्तेनमातुलिंगस्यस्वरसेनार्द्रकस्यच ॥ तक्रमस्तुसुरा मंडसौवीरकतुषोदकैः ॥ कांजिकेनतुयत्पक्कंपीतमग्निकरंस्मृतं ॥ गुल्म शूलोदरश्वासकासानिलकफापहं ॥

अर्थ–पंचमुळें, हरीतकी, सुंठ, मिरीं, पिंपळी, पिंपळीमूळ, सैंधव, रासना, यवखार, सैंधव, जिरें, वावडिंग, यांचा काढा करून तो तूप, महाळुंगाचा रस, आल्याचा रस, ताकाची निवळी, मध, गव्हाची कांजी, तुषांचा काढा व कांजी, यांत पचवावा; आणि घृत घ्यावें. तें पिण्याकरितां द्यावें; ह्मणजे अग्निवृद्धि करितें. व गुल्म, शूळ, उदर, दमा, खोकला, वायु, आणि कफ, यांचा नाश करितें

## दशमूलादिघृत.

मरिचंपिप्पलीमूलंनागरंपिप्पलीतथा ॥ भल्लातकयवानीचविडंगंग जपिप्पली ॥ हिंगुसौवर्चलंचैवअजाजीबिडधान्यकं ॥ सामुद्रसैंधवं क्षारंचित्रकंवचयासह ॥ एभिरर्धपलैर्भागैर्घृतप्रस्थंविपाचयेत् ॥ दश मूलरसेसिद्धंपयसाष्टगुणेनवा ॥ मंदाग्नेश्चहितंसिद्धंग्रहणीदोपनाशनं ॥ विष्टंभमामंदौर्बल्यंप्लीहानमपिकर्षयेत् ॥ कासंश्वासंक्षयंवापिदुर्नामानं भगंदरं ॥ कफजान्हंतिरोगांश्चवातजान्कृमिसंभवान् ॥ तान्सर्वान्ना शयत्याशुशुष्कंदावानलोयथा ॥

अर्थ–मिरीं, पिंपळीमूळ, सुंठ, पिंपळी, बिबवे, ओंवा, वावडिंग, गजपिंपळी, हिंग, संचळ, जिरें, बिडलोण, धने, मीठ, सैंधव, यवक्षार, चित्रक, वेखंड, हीं प्रत्येकीं २ तोळे घेऊन त्यांचा काढा करून तो तूप ६४ तोळे, दशमुळांचा रस, दूध, हे आठपट घा-लोन मंदाग्निवर सिद्ध करावें, तें संग्रहणी, विष्टंभ, आम, दुर्बळपणा, प्लीहा, श्वास, कास, क्षय, मुळव्याध, भगंदर, कफरोग, वातरोग, कृमिरोग, यांला जसा शुष्क अर-ण्याला अग्नि नाश करितो, तसें नाश करील.

## धान्यादिघृत.

धान्यजीरकसंसिद्धंघृतमग्निविवर्धनं ॥
रोचनंदोषशमनंवातपित्तविनाशनं ॥

अर्थ–धने व जिरें यांच्या काढ्यांत घृत सिद्ध करावें. तें अग्निला वाढविणारें, रोचक व दोषनाशक, आहे. व वायु व पित्त यांचा नाश करितें.

## अग्निघृत.

पिप्पलीपिप्पलीमूलंचित्रकंगजपिप्पली ॥ हिंगुचव्याजमोदाचपंचै

वलवणानिच ॥ द्वौक्षारौहपुषाचैवदद्यादर्धपलोन्मिता ॥ दधिकांजि कसूक्तानिस्नेहमात्रसमानिच ॥ आर्द्रकस्वरसप्रस्थंघृतप्रस्थेविपाचये त् ॥ एतदग्निघृतंनाममंदाग्नीनांप्रशस्यते ॥ अर्शसांनाशनंश्रेष्ठंतथा गुल्मोदरापहं ॥ नाशयेद्ग्रहणीदोषंश्वयथुंसभगंदरं ॥ येचबस्तिगतारो गायेचकुक्षिसमाश्रयाः ॥ सर्वांस्तान्नाशयत्याशुसूर्यस्तमइवोदितः ॥

अर्थ–पिंपळी, पिंपळीमूळ, चित्रक, गजापिंपळी, हिंग, चवक, अजमोदा. पंच लवण, दोन क्षार, हपुषा, हीं प्रत्येक दोन तोळे. घेऊन त्यांचा काढा किंवा कल्क, दहीं, कांजिक, सूक्त, घृत; आणि आल्याचा रस हीं प्रत्येकीं ६४ तोळे एकत्र करून मंदाग्नीवर पचन करावीं; तें अग्निनामकघृत मंदाग्नीला प्रशस्त आहे. व अर्श, गुल्म, उदर, संग्रहणी, सूज, भगंदर, बस्ति; आणि कुक्षि, यांतील रोग या सर्वांचा नाश करितें. जसा सूर्यो-दय झाला असतां, अंधकाराचा नाश होतो तसा.

## शार्दूलकांजिक.

पिप्पलींशृंगवेरंचदेवदारुंसचित्रकं ॥ चवींसंबिल्वपेशींचअजमोदांहरी तकीं ॥ महौषधिंयवानींचधान्यकंमरिचंतथा ॥ जीरकंचापिनिहितंकां जिकंसाधयेद्भिषक् ॥ एषशार्दूलकोनामकांजिकोग्निबलप्रदः ॥ सिद्धा र्थतैलसंभृष्टोदशरोगान्व्यपोहति ॥ कासंश्वासमतीसारंपांडुरोगंचकाम लां ॥ आमंचगुल्मशूलंचवातशूलंसवेदनं ॥ अर्शांसिश्वयथुंचैवभुक्त पातंचशाश्वतं ॥ क्षीरपाकविधानेनकांजिकस्यापिसाधनं ॥

अर्थ–पिंपळी, आलें, देवदार, चित्रक, चवक, बेलाची पाळें, अजमोदा, हरीतकी, सुंठ, ओंवा, धनें, मिरीं व जिरें हे पदार्थ घालून कांजी सिद्ध करावी, तिचें नाव शार्दूल कांजिक. हिला मोहोऱ्यांच्या तेलाची फोडणी द्यावी; ह्मणजे खोकला, दमा, अतिसार, पांडुरोग, कावीळ, आंव, गुल्म, शूल, वातशूल, पोटदुखी, मुळव्याध, सूज, भुक्तवांति यांचा नाश करित्ये. ही कांजी क्षीरपाकासारिखी सिद्ध करावी.

## विषूचिकादिसंप्राप्तिनिदान.

सूचीभिरिवगात्राणितुदन्संतिष्ठतेनिलः ॥
यत्राजीर्णेचसावैद्यैर्विषूचीतिनिगद्यते ॥

अर्थ–ज्या अजीर्णामध्यें वायूनें गात्रांत सूईनें टोचल्यासारिख्या पिडा होतात, त्याला वैद्य विषूचिका ह्मणतात.

नतांपरिमिताहारालभंतेविविधागगाः ॥
मूढास्तामजितात्मानोलभंतेशनलोलुपाः ॥

**अर्थ**–जे वैद्यकशास्त्र वेत्ते पुरुष, आहारादि परिमित करतात, त्यांला विषूचिका होत नाहीं; आणि ज्यांचें अंतःकरण स्वाधीन नाहीं. खाण्याकरितां परम लुब्ध आणि मूर्ख त्यांला ही विषूचिका होत्ये, असें जाणावें.

## विषूचिकेचे लक्षण.

मूर्छातिसारोवमथुःपिपासाशूलभ्रमोद्वेष्टनजृंभदाहाः ॥
वैवर्ण्यकंपौह्रदयेरुजश्चभवंतितस्यांशिरसश्चभेदः ॥

**अर्थ**–मूर्छा, अतिसार, ओकारी, तृष्णा, शूल, भ्रम, उद्वांसे, जांभया, दाह, निस्तेजपणा, हृद्रोग, आणि मस्तकशूल इत्यादिक विषूचिकेचे उपद्रव जाणावे.

## विलंबिका व अलसक यांची चिकित्सा.

विलंबिकालसकयोरूर्ध्वाधःशोधनंहितं ॥ नालेनफलवर्त्या चतथाशोधनभेषजैः ॥ दंडाद्यलसकेप्युक्तैरयमेवक्रियाक्रमः ॥

**अर्थ**–विलंबिका, अलसक, यां दोघांस वांति व रेच हित, व फळवर्ती व शोधनऔषधानीं हित. दंडालसकास ही हाच क्रियाक्रम जाणावा.

फलवर्तिवमिस्वेदं लंघनंचापतर्पणं ॥
विशेषादलसेकुर्याद्विपूच्यामतिसारवत् ॥

**अर्थ**–वस्त्राची वात करून तिला रेचक औषधांत भिजवून गुदांत घालणें, वांति देणें घाम काढणें, लंघन, अतृप्त ठेवणें, हे प्रकार अलसावर विशेषानें करावे. बाकीचे अतिसारोक्त उपचार करावे.

## आलसकनिरुक्ति.

प्रयातिनोर्ध्वंनाधस्तादाहारोनविपच्यते ॥
आमाशयेलसीभूतस्तेनासौलसकोमतः ॥

**अर्थ**–जा व्याधीमध्यें वर व खालीं दोष नजातां, आणि आमांश याचा पाक नहोतां आमाशयामध्यें लसीसारखा होऊन राहतो. ह्मणून त्याला लसक ह्मणतात.

## आलसक व दंडालसकलक्षण.

कुक्षिरानह्यतेत्यर्थंप्रताम्येत्परिकूजति ॥ निरुद्धोमारुतश्चैवकु

क्षावुपरिधावति ॥ वातवर्चोनिरोधश्चयस्यात्यर्थंभवेदपि ॥
तस्यालसकमाचष्टेतृष्णोद्गारौतुयस्यच ॥

अर्थ–ज्याची कूस अत्यंत फुगत्ये, मोह पावतो, कुंथतो, बंद झालेला वायु कुशींत वर येतो, मळ व मूत्र बंद होतात, ताहान लागत्ये व ढेकरा येतात. हीं आलसकाचीं लक्षणें जाणावीं.

वायुःकंपभ्रमानाहशूलादीन्प्रकरोतिच ॥ पित्तंज्वरातिसारौचदाहादी न्स्वेदनानिच ॥ श्लेष्मांगगुरुताछर्दिर्वाक्संगष्ठीवनानिच ॥ लुब्धा स्तेलसकेदोषाश्छर्द्यतीसारवर्जिताः॥ कारकास्तत्रिशूलादेःस्रोतसःस न्निरोधकाः ॥ तिर्यग्गतास्तनुंस्तब्धादंडवत्स्तंभयंतिच ॥ सदंडाल्स कस्त्याज्यःशीघ्रंदेहविनाशकृत् ॥

अर्थ–ज्या आलसकामध्यें वायूनें कंप, भ्रम, पोटाला फुगवटी; आणि शूल हे उपद्रव होतात; तो वातज, व ज्वर, अतिसार, दाह, आणि घाम ज्यांत होतात; तो पित्तज, आणि अंगाला जडता, ओकारी, शब्दाचा प्रतिबंध; आणि तोंडाला लाळ सुटणें हे ज्यांत होतात; तो कफज जाणावा. आलसकामध्यें वातादिदोष, वांति व अतिसार यां वांचून शूलादिक ही उत्पन्न होतात, नाडीमार्गांचा रोध करितात, आणि तिर्यग्गति होऊन दंडासारिखा देहाला ताठवितात. त्याला दंडालसक ह्मणतात.

## विलंबिकालक्षण.

दुष्टंचभुक्तंकफमारुताभ्यांप्रवर्ततेनोर्ध्वमधश्चयस्य ॥ विलं बिकांतांभृशदुश्चिकित्स्यामाचक्षतेशास्त्रविदःपुराणाः ॥

अर्थ–कफ; आणि वायू यांणी भक्षिलेलें अन्न दुष्ट होऊन अधः ह्मणजे अपानद्वारावाटे मळरूपंकरून निघत नाही, ऊर्ध्वगती होऊन तोंडावाटे निघतें. त्या रोगाला वैद्य बिलं-बिका ह्मणतात; ती अत्यंत दुःसाध्य जाणावी.

## अजीर्णापासून झालेल्या आमाचे कार्य.

यत्रस्थमामंविरुजेत्तमेवदेशंविशेषेणविकारजातैः॥
दोषेणयेनावततंशरीरंतल्लक्षणैरामसमुद्भवैश्च ॥

अर्थ–शरीरांत ज्याठिकाणीं आम कोपला असेल ; आणि शरीरांत जे वातादिदोष वाढले असतील, त्यांच्या शूल, दाह व जडता इत्यादिलक्षणानीं त्या स्थळीं वातादिदोष व आम याणीं पीडा उत्पन्न होत्ये. यत्र या शब्दानें वातादिकासारिखी सर्वशरीरांत ही आमप्रवृत्ती सुचविली.

## विषूची आणि अलसक यांचे असाध्यलक्षण.

यःश्यावदंतोष्ठनखोल्पसंज्ञोवम्यर्दितोभ्यंतरयातनेत्रः ॥
क्षामस्वरःसर्वविमुक्तसंधिर्यायान्नरोसौपुनरागमाय ॥

अर्थ ज्याचे दंत, ओष्ठ, नखें, काळसर जाहाली, आणि शक्ती फार क्षीण झाली, व ओंकारीने फार पीडा झाली, आणि नेत्र खोल गेले, व स्वरही फार सूक्ष्म झाला, सर्वसंधी शिथिल झाल्या. इत्यादिलक्षणेकरून युक्त जो रोगी तो असाध्य जाणावा.

## जीर्णआहारलक्षण.

उद्गारशुद्धिरुत्साहोवेगोत्सर्गोयथोचितः ॥
लघुताक्षुत्पिपासाचजीर्णाहारस्यलक्षणं ॥

अर्थ–ढेकर चांगली येते, व जसा वेग यावा तसा येऊन शौचास चांगले होते, अंग हलके वाटतें, क्षुधा, तृषा, यथास्थित लागतात. इत्यादिक अन्न पचन झाल्याची लक्षणे जाणावी.

## विषूकेचेउपद्रव.

निद्रानाशोरतिःकंपोमूत्राघातोविसंज्ञता ॥
अमीउपद्रवाघोराविषूच्यांपंचदारुणाः ॥

अर्थ–निद्रानाश, अरति, कंप, मूत्रनिरोध, मूर्छा हे पांच उपद्रव विषूचिकेचे जाणावे.

## विषूचिकाचिकित्सा.

विषूच्यामतिवृद्धायांपार्ष्ण्योर्दाहःप्रशस्यते ॥
गंधकंकुंकुमंवापिदद्यान्निंबुजलेनवा ॥

अर्थ–विषूची फार वाढली असतां; पायांला टांचाचे वर्ती डाग द्यावा, अथवा गंधक किंवा केशर लिंबाचे रसांत पाजावें.

## लशुनाद्य चूर्ण.

लशुनजीरकसैंधवसंचलंत्रिकटुरामठचूर्णमिदंसमं ॥
सपदिनिंबुरसेनविषूचिकांहरतिभोरतिभोगविचक्षणे ॥

अर्थ–लसूण, जिरें, सैंधव, पादेलोण, सुंठ, मिरें, पिंपळी, व हिंग यांचे चूर्ण लिंबाचे रसांत कालवून खावें; ह्मणजे हे रतिभोगविचक्षणें विषूचिकेचा नाश करितें.

## आपामार्गादियोग.

जलपीतमपामार्गमूलंहन्याद्विषूचिकां ॥
सतैलंकारवेल्यंबुविधुनोतिविषूचिकां ॥

**अर्थ**—आघाड्याचें मूळ पाण्यांत उगाळून प्यावें; किंवा कारलीचा रस तेलाबरोबर प्यावा; ह्मणजे विषूचिका नाश पावत्ये.

## वालमूत्रादिकाढा.

वालमूत्रस्यनिःक्वाथःपिप्पलीचूर्णसंयुतः ॥
विषूचीनाशनःश्रेष्ठोजठराग्निविवर्धनः ॥

**अर्थ**—लहान मुलाचे मुताचा काढा, पिंपळीचें चूर्ण घालून प्यावा; ह्मणजे विषूचिकानाशक आणि जठराग्निवर्द्धक आहे.

## तक्रयोग.

तक्रेणयुक्तंयवचूर्णमुष्णंसक्षारमार्तिंजठरस्यहन्यात् ॥
स्वेदोघटैर्वाबहुवाष्पपूर्णैरुष्णैस्तथान्यैरपिपाणितापैः ॥

**अर्थ**—सातूचें चूर्ण ताक घालून उष्ण करून जवखार घालून प्यावें. तसेंच उष्ण पाण्याची वाफ, किंवा शेक, किंवा हात ओरपणें; हे उपचार विषूचिकानाशक आहेत

## बिल्वादिकाढा.

बिल्वनागरनिःक्वाथोहन्याच्छर्दिंविषूचिकां ॥
बिल्वनागरकैडर्यक्वाथःस्यादधिकोगुणैः ॥

**अर्थ**—बेल व सुंठ यांचा काढा ओकारी, विषूचिका यांचा नाशक आहे; आणि बेल व सुंठ व कायफळ यांचा काढा त्यांचेपेक्षां अधिक गुणकारी आहे.

## यवपिष्टलेप.

यवपिष्टयवक्षारलेपस्तक्रेणसंयुतः ॥
ऊष्णीकृतोहरेत्सद्योजठरार्तिंसुदुर्जयाम् ॥

**अर्थ**—जवांचें पीठ व यवखार, हे ताकांत कालवून कढवून त्याचा लेप करावा; ह्मणजे कसाही उदरशूल, असला तरी शांत होतो.

## कुष्टादि लेप.

कुष्ठसैंधवयोःकल्कंचुक्रतैलसमन्वितं ॥
विषूच्यांमर्दनंकोष्णंखल्लीशूलनिवारणं ॥

**अर्थ**—कोष्टकोळिंजन व सैंधव यांचें चूर्ण आंबसोलाचे तेलांत कालवून मंदोष्ण करून अंगास चोळावें; ह्मणजे विषूचिका आणि खल्लीशूल यांचें निवारण होतें.

## साधारण लेप.

सरुग्वानद्धमुदरमम्लपिष्टैःप्रलेपयेत् ॥
दारुहैमवतीकुष्ठशताव्हाहिंगुसैंधवैः ॥

अर्थ–शूळयुक्त फुगलेलें पोटास आंबटरसांत दारुहळद, हिरडा, कोष्ठ, शतावरी; हिंग व सैंधव वाटून लेप करावा.

## लवंगादि चूर्ण.

शाणद्वयंस्यात्तुलवंगमेलाजातीफलंकोलसुनागफेनं ॥ माष
प्रमाणंसकलंविचूर्ण्यशाणंकवोष्णेनजलेनपीतं ॥ विषूचिकांहं
तिसुदारुणांचशूलातिसारौवमथुःप्रसक्तः ॥

अर्थ– ८ मासे लवंगा, एलची व जायफळ, हीं अर्धतोळा, आणि अफीम १ मासा, ह्या सर्वांचें चूर्ण एकत्र करून तें ऊनपाण्याशीं ॥ तोळा द्यावें; ह्मणजे दारुण तरळ, शूल, अतिसार, आणि वांति यांचा नाश करितें.

## पथ्यादि चूर्ण.

पथ्यावचाहिंगुकलिंगभृंगसौवर्चलैःसातिविषैःसचूर्ण्य ॥
सुखांबुपीतोविनिहंत्यजीर्णशूलंविषूचींकसनंचसद्यः ॥

अर्थ–हरीतकी, वेखंड, हिंग, कुडयाची साल, माका, पादेलोण व अतिविष यांचें चूर्ण सोसेल तशा ऊनपाण्याशीं द्यावें; ह्मणजे अजीर्ण, शूल, तरळ, आणि खोकला, यांचा नाश करितें.

## शंखद्राव.

लवणानितथाक्षाराःप्रत्येकंपंचभागिकाः ॥ कासीसंटंकणंतुत्थंगंधकं
निंबुकद्रवं ॥ तिलापामार्गजंक्षारंप्रत्येकंवेदभागिकं ॥ नवसागरसौ
राष्ट्रीसर्जिकानेत्रभागिकाः ॥ एतत्सर्वंसमालोड्यभाव्यंजंबीरनीरतः ॥
सरंध्रेनलिकायंत्रेयामयुग्मंविपाचयेत् ॥ शंखद्रावोभवेदेषःसर्वदोष
निकृंतनः ॥ लोहपाषाणशंखानांद्रावकोयंनसंशयः ॥

अर्थ–पंच लवणें व सर्व क्षार हीं प्रत्येकीं ५ भाग; हिराकस, टांकणखार, मोरचूत, गंधक, लिंबाचा रस, तीळ, आघाडा, यांचे खार प्रत्येकीं ४ चार भाग; नवसागर, तुरटी व साजिखार हे प्रत्येकीं २ भाग. हीं सर्व एकत्र करून लिंबाचे रसांत खलावीं; नंतर नलिकायंत्रांत दोन प्रहर पचन करावीं; ह्मणजे हा शंखद्राव सिद्ध होतो. हा सर्व दोषांचा नाशक आणि लोखंड, दगड, शंख, यांचे पाणी करणारा आहे. यांत संशय नाहीं.

## दालचिनीतेल.

त्वक्पत्ररास्नागरुशिग्रुकुष्ठैरम्लप्रपिष्टैःसवचाशताह्वैः ॥
उद्वर्तनंखल्लिविषूचिकाघ्नंतैलंविपक्कंचतदर्थकारि ॥

अर्थ—दालचिनी, तमालपत्र, रास्ना, अगर, शेवग्याचें मूळ, कोष्ठ, वेखंड व शतावरी हीं सर्व लिंबूरसांत वाटून आंगास लावावीं, किंवा यांचे तेल सिद्ध करून आंगास लावावें; ह्मणजे वायुरोग आणि तरळ, यांचा नाश करितें.

## चुक्रतेल.

पलंचुक्रंकुष्ठंपिचुयुगमितंसैंधवकणातदर्धंप्रत्येकंकरतलमितंजातिफलकं ॥ कटुतैलंकिंचित्कुडवमितिमग्नावधिशतंतदेतच्चुक्राख्यंशमयति विषूचींचगदहं ॥ कुष्ठसैंधवयोःकल्कंचुक्रतैलसमन्वितं ॥ विषूच्यांमर्दनंकोष्णंखल्लीशूलनिवारणं ॥

अर्थ—चुका व कोष्ठ हीं चार तोळे, कोष्ठ दोन तोळे व सैंधव, पिंपळी हीं एकेक तोळा, जायफळ एक तोळा, मोहोऱ्यांचें तेल १६ तोळे, किंवा सर्व चूर्ण बुडे इतकें घालून तेल सिद्ध करावें. तें विषूचीचा नाश करितें; आणि कोष्ठ व सैंधव यांचा कल्क, व चुक्याचें तेल घालून विषूचीवर उष्ण करून मर्दन करावें. तें वायुरोग व शूल यांचें निवारण करितें.

## अर्कादि तेल.

अर्कस्यचरसप्रस्थंप्रस्थंधत्तूरकस्यच ॥ श्वेतस्नुहिरसप्रस्थंप्रस्थंसौभांजनाद्रसात् ॥ कुष्ठसैंधवयोःकल्कंपलेद्वेद्वेप्रमाणतः ॥ तैलप्रस्थंकांजिकेनपचन्मृद्वग्निनासमं ॥ खल्लींविषूचिकांहंतिपक्षाघातंचगृध्रसीं ॥

अर्थ—रुईचा चीक ६४ तोळे, धोतऱ्याचा रस ६४ तोळे, पांढऱ्या निवडुंगाचा रस १६ तोळे, शेवग्याचा रस १६ तोळे, कोष्ठ व सैंधव, यांचा कल्क दोन दोन तोळे, तेल १६ तोळे, व कांजी १६ तोळे, घालून तेल पचन करावें. तें तेल खल्लीवात, विषूचिका, पक्षाघात, आणि गृध्रसी, यांचा नाश करितें.

## तक्र.

विषूच्यामतिवृद्धायांतक्रंदधिसमंजलं ॥
नारिकेरांबुपेयांवाप्राणत्राणाययोजयेत् ॥

अर्थ—विषूची अति वाढली असतां; ताक किंवा दहीं, समभाग पाणी घालून द्यावें अथवा नारळाचे पाण्याने पेया करावी; आणि ती पाजावी; ह्मणजे प्राण रक्षण होईल.

## पाणी.

पिपासायांतथोत्क्लेशेलवंगस्यांबुशस्यते ॥
जातीफलस्यवाशीतंशृतंभद्रघनस्यवा ॥

**अर्थ**–तृषा, किंवा उमासा यांवर लवंग किंवा जायफळ अथवा नागरमोथा यांचे पाणी तापवून निवालेलें द्यावे.

## विलंबिका व अलसिका चि॰

विलंबिकालसकयोरयमेवक्रियाक्रमः ॥
अतएवतयोरुक्तंपृथङ्-नैवचिकित्सितं ॥

**अर्थ**–विलंबिका; आणि अलसक यांवर विषूचिकेवरचाच उपचार युक्त आहे. यास्तव त्या दोघांवर निराळी चिकित्सा सांगीतली नाहीं.

## हस्तिकर्णयोग.

हस्तिकर्णश्चदंतश्चपिप्पलीकंदसंयुता ॥
पीताकोष्णेनतोयेनक्षिप्रंहन्याद्विषूचिकां ॥

**अर्थ**–एरंडमूळ व थोर मुळा, पिंपळी; आणि कांदा हें ऊन पाण्यांत वाटून प्राशनार्थ द्यावें; ह्मणजे विषूचिकेचा नाश करितो.

## निंबुरसयोग.

निंबूरसंचिंचिणिकासमेतंविषूचिकाशोषहरंकफंच ॥
दुग्धेनपीतोयदिटंकणोसौप्रशाम्यतेयंवमनंनिरुध्यात् ॥

**अर्थ**–निंबाचे रसांत जुनी चिंच कुवळून पाजावी; ह्मणजे विषूचिका, शोष व कफ यांचा नाश होतो; आणि दुधांत टाकणखार घालून पाजावा; ह्मणजे विषूचिका व ओकारी बंद होईल.

## करंजादिकषाय.

करंजनिंबुशिखरीगुडूच्यर्जुनवत्सकः ॥
पीतःकषायोवमनात्घोरांहन्याद्विषूचिकां ॥

**अर्थ**–करंजसाल, लिंबाच्या काड्या, आघाड्याचें मूळ, गुळवेल, अर्जुनसादडा व कुड्याची साल यांचा काढा द्यावा; ह्मणजे वांतिकरून विषूचीला शमवितो.

## उत्क्लेशलक्षण.

उत्क्लिश्यान्नंननिर्गच्छेत्प्रसेकष्ठीवनेरितं ॥
ह्रदयंपीड्यतेचास्यतमुत्क्लेशंविनिर्दिशेत् ॥

अर्थ—मळमळ व तोंडाला पाणी सुटून थुंका येऊन ह्रदय दुखूं लागतें; परंतु वांति होत नाहीं. त्याला उत्क्लेश ह्मणतात.

## कटुत्रयरस.

कटुत्रिकंजीरकहिंगुसिंधूरसोनगंधंचसमंविमर्द्य ॥
निंबुद्रवेणाशुनिहंतितूर्णंविषूचिकांदुष्टविलंबिकांच ॥

अर्थ—सुंठ, मिरीं, पिंपळी, जिरें, हिंग, सैंधव, लसूण; आणि गंधक हे पदार्थ समभाग घेऊन वाटून त्यांचा कल्क लिंबूरसाशीं द्यावा; ह्मणजे तो दुष्ट तरळ; आणि विलंबिका यांचा नाश करितो.

## व्योषादि अंजन.

व्योषंकरंजस्यफलंहरिद्रेमूलंसमावाप्यचमातुलुंग्याः ॥
छायाविशुष्कागुटिकाःकृतास्ताहन्युर्विषूचींनयनांजनेन ॥

अर्थ—सुंठ, मिरे, पिंपळी, करंजाची बी, दारुहळद, हळद व माहाळुंगीचे मूळ हीं सावलींत वाळवून कुटून गोळी करून उगाळून अंजन करावें; ह्मणजे विषूचिकेचा नाश करील.

## अपामार्गाद्यंजन.

अपामार्गस्यपत्राणिमरिचानिसमानिच ॥
अश्वस्यलालयापिष्टान्यंजनाद्धंतिसूचिकां ॥

अर्थ—आघाड्याची पानें; आणि मिऱ्यें, हीं समभाग घेऊन घोड्याचे लाळेत खलून अंजन केलें असतां; विषूचिकेचा नाश होतो.

## बिल्वादि अंजनं.

बिल्वस्यमलंशिरसस्यमलंफलंकरंजस्यनतंसुराव्हं ॥ फलत्रयंव्योष निशाद्वयंचबस्तस्यमूत्रेणसुसूक्ष्मपिष्टं ॥ भुजंगलूतोदरवृश्चिकादिवि षूचिकाजीर्णहरंज्वरघ्नं ॥

अर्थ—बेलाचे मूळ, शिरसाचे मूळ, करंजाच्या बिया, तगर, देवदार, हरडा, बेहडा, आवळकाठी, सुंठ, मिरीं, पिंपळी, हळद व दारुहळद हे समभाग घेऊन बकऱ्याच्या मुतांत खलावें; आणि त्याचे अंजन करावें; तें साप, लूता, विंचू, इत्यादिकांचीं विषें, व उदर, तरळ, अजीर्ण; आणि ज्वर यांचा नाश करितें.

## अजीर्णादिकांवर पथ्य.

श्लैष्मिकेवमनंपूर्वंपैत्तिकेमृदुरेचनं ॥ वातिकेस्वेदनंवाथयथावस्थंहि

तंचतत् ॥ नानाप्रकारव्यायामोदीपनानिलघूनिच ॥ बहुकालसमुत्पन्नामुद्गलोहितशालयः ॥ विलेपीलाजमंडश्चमंडोमुद्गरसस्तथा ॥ एणोबर्हिःशशोलावःक्षुद्रमत्स्याश्वसर्वशः ॥ शालिंचशाकंवंशाग्रंवास्तुकंबालमूलकं ॥ लसुनंवृद्धकूष्मांडनवीनंकदलीफलं ॥ सौभांजनंपटोलंचवार्ताकंलदंबुजं ॥कर्कोटकंकारवेल्लंवार्हतंचमहार्द्रकं॥ प्रसारणींचचांगेरीतथैवसुनिषण्णकं ॥ धात्रीफलंनागरंचदाडिमंयवपर्पटाः ॥ आम्लवेतसजंबीरमातुलुंगानिमाक्षिकं ॥ नवनीतंघृतंतक्रंसौवीरकतुषोदकं ॥ धान्याम्लंकटुतैलंचरामठंलवणार्द्रकं॥ यवानीमरिचंमेथीधान्यकंजीरकंदधि ॥ तांबूलंतप्तसलिलंकटुतिक्तोरसोपिवा ॥ मंदानलेप्यजीर्णेन्चपथ्यमेतन्नृणांभवेत् ॥

अर्थ–मंदाग्नि, अजीर्ण, विषूचिका; आणि भस्मक हे जर श्लैष्मिक आहेत, तर पूर्वी वमन द्यावें; व पित्ताधिक आहेत, तर मृदु रेचक द्यावें; आणि वातजनित आहेत तर स्वेदन करावें, हे यथाकाळीं हितकारक आहे; आणि नानाप्रकारचा व्यायाम, दीपन, लघु व फार दिवसांचे तांबड्या भाताचे तांदूळ, आटवल, लाह्यांचा मंड, मंड, मुगांचा रस व हरण, मोर, ससा, लावा, बारीकजातीचें मांस, शालि, टाकळा, वंशाग्र, चाकवत, कोंवळा मुळा, लसुण, जुना कोहळा, ताजें केळें, शेवग्याच्या शेंगा, पडवळ, वांगें, कमळ, कांकडी, कारेतें, जांभूळ, आलें, लाजाळु, चुका, कुरडु, आवळे, सुंठ, डाळिंब, यव, पित्तपापडा, आम्लवेतस, जंबीर, माहाळुंग, मद्य, लोणी, तूप, ताक, कांजी, साळीच्या करलाचें पाणी, धान्य घालोन आंबट केलेलें पाणी, तिखट, तेल, हिंग, लवण, ओवा, मिरीं, मेथी, धनें, जिरें, दहीं, विडा, तापलेलें पाणीं, कडु व तिखट, असे रस मंदाग्नीवर व अजीर्णावर हे पदार्थ पथ्यकारक आहेत.

## अपथ्य.

विरेचनानिविण्मूत्रवातवेगविधारणं॥ अतिरिक्तंचाध्यशनंजागरंविषमाशनं ॥ रक्तस्रुतिंशिंबिधान्यंमच्छमांसमुषोदिकं ॥ जलपानंचविष्टंभजांबवंसर्वशालुकं ॥ कर्चिकांमोरटंक्षीरंकिलाटंचप्रपानकं ॥ लालनंसस्यतद्वालस्नेहनंदुष्टवारिच ॥ विरुद्धासात्म्यपानानांविष्टंभीनिगुरूणिच ॥ अग्निमांद्येप्यजीर्णेचसर्वाणिपरिवर्जयेत् ॥

अर्थ–रेच, मळ व मूत्र यांचे वेगाचें धारण, भोजनोत्तर लागलेच अतिरिक्त अन्न

भक्षण, जागरण, विषप्राशन, रक्तस्राव, द्विदळ धान्ये, मासे, वाळी, जलपान, विष्टंभ, जांबूळ, सर्वकमळाचे कंद, तांदूळ तुपांत भाजून दुधांत शिजवावे ते, सातादिवसांचे गाईचे दूध, खर्बूज, पनी, चारोळी, धान्ये, वाळा, स्नेहपदार्थ खराब पाणी, विरुद्ध व असात्म्य असे अन्न व पान, विष्टंभकारक द्रव्यः आणि जडपदार्थ हे अग्निमांद्य, अजीर्ण यांवर वर्ज करावे.

## ‡नित्यादित्यरस.

विषरविगगनायःसूतगंधंसमांशंसमहुतभुजद्रावैर्भावितंसप्तवारं ॥ प्रबलगुदजकीलंहंतिनित्योदितोसौमलहतिमलबंधेमापमात्रःससर्पिः ॥

अर्थ–बचनाग, ताम्र, अभ्रक, लोह, पारा व गंधक हे समभाग; घेऊन त्यास चित्रकाच्या मुळांच्या रसाच्या सात सात भावना द्याव्या. हा नित्यादित्यरस मुळव्याध व मलबंध यांवर एकमासा तुपाशीं द्यावा. हा यांचा नाश करितो.

## दुसरा प्रकार.

मृतसूताभ्रलोहार्कविषगंधंसमंसमं ॥ सर्वतुल्यांशंभल्लातफलमेकत्रचूर्णयेत् ॥ द्रवैःसूरणकंदोत्थैःखल्वेमर्द्यंदिनत्रयं ॥ मापमात्रंलिहेदाज्यै रसश्चार्शांसिनाशयेत् ॥ रसोनित्योदितोनामगुदोद्भवकुलांतकः ॥ हस्तेनाभौमुखेपादेगुदेवृषणयोस्तथा ॥ शोथोरहृत्पार्श्वशूलंचयस्यासाध्यार्शसांहितः ॥ असाध्यस्यापिकर्तव्याचिकित्साशंकरोदिता ॥

अर्थ–पारदभस्म, अभ्रक, लोह, ताम्र, बचनाग व गंधक हे समभाग, सर्वांबरोबर बिबव्याचें चूर्ण एकत्र करून सुरणाच्या कंदाच्या रसांत तीन दिवस खल करावा. हा १ मासा तुपाशीं द्यावा. हा नित्योदितरस मुळव्याधीचा नाश करितो. व हात, पाय, नाभि, मुख, गुद व वृषण यांची सूज, आणि हृदय व पार्श्व यांचा शूळ; व असाध्य अर्श यांचा नाश करितो; आणि असाध्य अर्शाची चिकित्सा शंकरानें सांगितलेली करावी.

## अर्शकुठार.

भागःशुद्धरसस्यभागयुगुलंगंधस्यलोहाभ्रयोःपट्बिल्वाग्निहर्यूषणाभयरजोदंतीचभागैःपृथक् ॥ पंचस्युःस्फुटटंकणस्यचयवक्षारस्यसिंधूद्भवाभागाःपंचगवांजलेसुविमलेद्वात्रिंशदेतत्पचेत् ॥ स्नुक्दुग्धंचगवांजलावधिशनैःपिंडीकृतंतद्भवेद्द्वौमाषौगुदकीलकाननजटाच्छेदेकुठारोरसः ॥

---

‡ हा नित्यादित्यरसापासून भल्लातकलेहपर्यंत चिकित्सा अर्शाची आहे.

अर्थ—शुद्ध पारा १ भाग, शुद्ध गंधक २ भाग, लोह व अभ्रकभस्म ६ भाग, बेलफळ, चित्रक, त्र्यूषण, हरीतकी व जेपाळ हे प्रत्येकी १ भाग; टाकणखार, यवक्षार, सैंधव हीं ५ भाग, हीं सर्व एकत्र करून गोमूत्र ३२ भाग घेऊन त्यांत पचन करावीं, व निवडुंगाचा चिक ३२ तोळे घालोन पुनः पचन करून त्याची दोन माशांची गोळी करून द्यावी. हा गुदांकुरांच्या शिखा च्छेदनकरण्याविषयीं, कुऱ्हाडीसारिखा आहे.

## षडाननरस.

वैक्रांतताम्राभ्रकगंधकानांरसस्यकांतस्यसमानभागं ॥
चूर्णंभवेत्तेनषडाननोयमर्शोविनाशायचवल्लमात्रं ॥

अर्थ—वैक्रांतमणी, ताम्र, अभ्रक, गंधक, पारा, कांत यांची भस्में समभाग एकत्र करावीं. हा षडाननरस अर्शनाशनाकरितां वालमात्र द्यावा.

## पीयूषसिंधु.

शुद्धंसूतंषड्गुणंजीर्णगंधंकाचेपात्रेवालुकायंत्रयोगात् ॥ भस्मीकृत्वायोजयेदत्रहेमतत्तुल्यांभस्मलोहाभ्रयोश्च ॥ सूतात्तुल्यंगंधकंमेलयित्वाखल्वेमर्धंमरणस्यद्रवेण ॥ दंतीमुंडीकाकमाचीहलाख्याभृंगार्कोग्निःसप्तमेपांरसेन ॥ क्षिप्त्वापश्चात्धान्यराशौत्रिधस्तंचूर्णंकृत्वा माषमात्रंददीत ॥ अर्शोरोगेदारुणेचग्रहण्यांशूलेपांडावाम्लपित्तेक्षयेच ॥ श्रेष्ठंक्षौद्रंचानुपानंप्रशस्तंरोगोक्तंवामासषट्कप्रयोगात् ॥ सर्वरोगायांतिनाशंजरायांवपैद्वंद्वंसेवनीयंप्रयत्नात् ॥ पथ्यंसात्म्यंचाम्लयोगादियोषिद्वर्ज्यंदेयंसर्वरोगप्रशांत्यै ॥ पुष्टिंकांतिंवीर्यवृद्धिंसदाचसेवायुक्तोमानवःसंलभेत ॥

अर्थ—शुद्ध पारा घेऊन त्याला वालुकायंत्रांत षड्गुण गंधक जारण करावें; आणि त्या पाऱ्याच्या समभाग सुवर्ण, लोहभस्म, अभ्रकभस्म व गंधक हे मिळवून त्याला सुरणाच्या रसांत, दांती, मुंडी, कावळी, मद्य, माका, रुई व चित्रक यांच्या प्रत्येक रसांच्या सात भावना द्याव्या; नंतर गोळा करून तीन दिवस साळीचे राशींत पुरून ठेवावा; नंतर काढून त्यांतून १ मासा द्यावा. हा उग्र अर्शरोग, संग्रहणी, शूल, पांडु, आम्लपित्त व क्षय यांवर मधाशीं द्यावा; किंवा रोगोक्त अनुपानाशीं द्यावा. हा साहा मासे भक्षण केल्यानें संपूर्ण रोग व म्हातारपण नाश पावतें. याकरितां हा प्रयत्नानें सेवन करावा. याला आंबट व स्त्रीयांवांचून सात्म्य असें पथ्य द्यावें; म्हणजे पुष्टि, कांति व वीर्यवृद्धि हीं प्राप्त होतात.

## चक्रबंधरस.

दिनत्रयंगंधसमंरसेंद्रंविमर्दयेच्छुतवसुद्रवेण ॥ ताम्रस्यचक्रेणनिबध्य

वन्हिहरीतकीभृंगरसैर्विमर्द्य ॥ कटुत्रयेणापिददीतगुंजाद्वयंमरुत्पायुरुहप्रशांत्यै ॥ चक्रबंधरसोयंहिसर्वरोगोपकारकः ॥ एतैस्तुगंधकेनैकंपुटंचैवप्रदापयेत् ॥

अर्थ–पारा व गंधक हे श्वेत पुनर्नव्याच्या रसांत तीन दिवस खलावे. व त्यांत ताम्रभस्म घालोन खलावा; ह्मणजे चक्रासारिखा पारा बद्ध होतो; नंतर त्याला चित्रक, हरीतकी, माका, सुंठ, मिरीं व पिंपळी यांच्या रसांत मर्दन करून त्यांतून दोन गुंजा वातार्शाच्या नाशाविषयीं द्यावा. हा चक्रबंध रस सर्वरोगनाशक आहे. याला गंधकाशीं एक पुट द्यावें,

## पर्पटीरस.

रसेंद्रगंधंसुदृढंविमर्द्यसर्पिर्युतंतद्द्विगुणंचबोलं ॥ तावत्क्षिपेल्लोहमयेद्रवंस्यात्क्षिपेच्चरंभादलयुग्ममध्ये ॥ ततोरसःपर्पटिकाभिधानःसमस्तदुर्नामनिकंतनःस्यात् ॥ संसेवितोवल्लचतुष्कमात्रःशोफातिसारंवमिरंगसादनं ॥ तृष्णाज्वरारोचकवन्हिमांद्यंगुदस्यपाकंत्दृदयेहिशूलं ॥

अर्थ–पारा व गंधक यांची कज्जली करून त्यांत तूप व बोळाचें चूर्ण दुप्पट घालोन तें सर्व लोहपात्रांत घालून अग्नीवर ठेऊन पातळ करावें; नंतर केळीच्या पानावर ओतून दुसरें पान वर ढांपण घालून त्यावर गाईचें शेण थापावें. हा पर्पटीरस चार वाल अनुपानाशीं द्यावा; ह्मणजे संपूर्णप्रकारच्या मुळव्याधी, सूज, अतिसार, वांति, आंगमोडे, ताहान, ज्वर, अरुचि, अग्निमांद्य, गुदपाक, हृदयांतील शूल, संपूर्ण अर्शविकार आणि शूल यांचा नाश करितो.

## भल्लातकलेह.

चित्रकंत्रिफलामुस्तंग्रंथिकंचविकामृता ॥ हस्तिपिप्पल्यपामार्गौदंडोत्पलकुठेरकः ॥ एषांचतुःपलान्भागान्जलद्रोणेविपाचयेत् ॥ भल्लातकसहस्रेद्वेछित्वातत्रैवदापयेत् ॥ तत्रपादावशेषेणलोहपात्रेपचेद्भिषक् ॥ तुलार्धंतीक्ष्णलोहस्यघृतस्यकुडवद्वयं ॥ त्र्यूषणंत्रिफलावन्हिसैंधवंबीडमौद्भिदं ॥ सौगंधिकविडंगानिपलिकांशानिकल्पयेत् ॥ कुडवंवृद्धदारोश्चतालमूल्यास्तथैवच ॥ सूरणस्यपलान्यष्टौचूर्णीकृत्वाविनिःक्षिपेत् ॥ सिद्धेशीतेप्रदातव्यंमधुनःकुडवद्वयं ॥ प्रातर्भोजनकालेवाततःखादेद्यथाबलं ॥ अर्शांसिग्रहणीदोषंपांडुरोगमरोचकं ॥ कृ

मिगुल्माश्मरीनाहान्शूलंचापिव्यपोहति ॥ भवेच्छुक्रोपमंचक्षुर्व
लीपलितनाशनं ॥ रसायनमिदंश्रेष्ठंसर्वरोगहरंपरं ॥

अर्थ—चित्रक, त्रिफला, नागरमोथे, पिंपळीमूळ, चवक, गुळवेल, गजपिंपळी आघाड्याचीं मुळें, सहदेवीचीं मुळें व आजवला हे प्रत्येकीं १६ तोळे घेऊन २०४ तोळे पाण्यांत घालावे; आणि २००० बिबवे फोडून त्यांत टाकावे; आणि लोहपात्रामध्यें चतुर्थांश काढा करावा. त्यांत तिख्याचें भस्म २०० तोळे, तूप ३२ तोळे व त्रिकटु, त्रिफला, चित्रक, सैंधव, बिडलोण, सोरा, संचल व वावडिंग हीं प्रत्येकीं ४ तोळे, व वृद्धदारु १६ तोळे, तालमूळ १६ तोळे, व सुरण ३२ तोळे, या सर्वांचें चूर्ण करून त्यांत टाकावें; आणि अग्नीवर ठेउन घट्ट होईपर्यंत आटवावा. घट्ट झाल्यावर उतरून थंड झाला ह्मणजे त्यांत मध ३२ तोळे घालावा; ह्मणजे सिद्ध झाला. हा प्रातःकाळीं किंवा भोजनाच्या वेळेस बळ पाहून द्यावा; ह्मणजे मुळव्याध संग्रहणी, पांडुरोग, अरुचि, कृमि, गुल्म, अश्मरी, आनाह, आणि शूल यांचा नाश करील. व शुक्रासारिखे नेत्र करितो; व वली, आणि पलित यांचा नाश करितो. हा सर्वरोगनाशाविषयीं उत्तम रसायन आहे.

---

## कृमिनिदान.

कृमयस्तुद्विधाप्रोक्ताबाह्याभ्यंतरभेदतः ॥ बहिर्मलकफासृ
ग्विट्जन्मभेदाच्चतुर्विधाः ॥ नामतोविंशतिविधाः

अर्थ—कृमि आंतील व बाहेरील या भेदानीं दोन जातींचे ; ते बाहेरचा मळ, कफ, रक्त, आणि विष्ठा या कारणांनीं चार प्रकारचे; परंतु नावांनीं वीस प्रकारचे.

### बाह्यकृमि सांगतों.

बाह्यास्तत्रमलोद्भवाः ॥ तिलप्रमाणसंस्थानवर्णाःकेशांबराश्र
याः ॥ बहुपादाश्चसूक्ष्माश्चयूकालीक्षादिनामतः ॥ द्विधातेको
ठपिटिकाकंडूगंडान्प्रकुर्वते ॥

अर्थ—बाह्यकृमि मलोत्पन्न आहेत. ते वर्णानें काळे किंवा पांढरे व आकारानें तिळासारखे असतात. ते सूक्ष्म असून बहुपाद असतात. हे केश व वस्त्रें यांवर होतात. त्यानां उवा लिखा म्हणतात. त्या पासून गांधी, पुटकुळया, कंडू व गांठी हीं उत्पन्न होतात.

### कृमीचें कारण.

अजीर्णभोजीमधुराम्लनित्योद्रवप्रियःपिष्टगुडोपभोक्ता ॥
व्यायमवर्जीचदिवाशयानोविरुद्धभुक्सन्लभतेकृमींश्च ॥

**अर्थ**–अजीर्ण झालें असतां, भोजन आणि नेहेमीं गोड, आंबट, द्रवरूप, पीठ व गूळ यांचें भक्षण करणारा, निरुद्योगी, दिवसा निजणारा, आणि विरुद्ध पदार्थ भक्षण करणारा अशा पुरुषास कृमि होतात.

## पुरीषकफरक्तजकृमिकारण.

माषपिष्टान्नलवणगुडशाकैःपुरीषजाः ॥ मांसमाषगुडक्षीरद धिसक्तैःकफोद्भवाः॥ विरुद्धाजीर्णशाकाद्यैःशोणितोत्थाभवंतिहि ॥

**अर्थ**–उडीद, पिठाचें अन्न, खारट, गूळ आणि भाज्या या पासून पुरीषज (विठोत्पन्न) कृमि होतात; व मांस, उडीद, गूळ, दूध, दहीं, आणि कांजी इत्यादि कारणानीं कफोत्पन्न कृमि होतात; आणि विरुद्ध व शाकादिक कचें अन्न इत्यादि पदार्थांनीं रक्तज कृमि होतात.

## पोटांत कृमि झाल्याचें लक्षण.

ज्वरोविवर्णताशूलंहृद्रोगःसदनंभ्रमः ॥
भक्तद्वेषोतिसारश्चसंजातकृमिलक्षणं ॥

**अर्थ**–ज्वर, वर्णाचा बदल, शूल, उरांत शूल, आंग गळणें, भ्रम, अन्नाचा द्वेष, आणि अतिसार हीं कृमि झाले असतां, लक्षणें होतात.

## कफजकृमीचें लक्षण.

कफादामाशयेजातावृद्धाःसर्पंतिसर्वतः ॥ पृथुवर्ध्मनिभाःकेचित्केचि द्गंडूपदोपमाः ॥ रूढधान्यांकुराकारास्तनुदीर्घास्तथाणवः ॥ श्वेता स्ताम्रावभासाश्चनामतःसप्तधातुते ॥ अंत्रादाउदरावेष्टाहृदयादाम हारुजः ॥ चुरवोदर्भकुसुमाःसुगंधास्तेचकुर्वते ॥ हृल्लासमास्यश्रव णमविपाकमरोचकं ॥ मूर्छाछर्दितृषानाहकार्श्यश्वयथुपीनसान् ॥

**अर्थ**–कफानें अमाशयांत कृमि उत्पन्न होऊन वाढतात; आणि ते चोहोंकडे फिरतात. त्यांत कितीएक रुंद वादीसारिखे व बेडकीसारिखे, धान्याचा अंकुरासारिखे, बारीक, लांब, सूक्ष्म, पांढरे व तांबूस रंगाचे असे कृमि होतात, त्यांचीं नावें अंत्राद, उदरावेष्ट, हृदयाद, महारुज, चुरु, दर्भकुसुम, आणि सुगंध असे सात प्रकारचे भेद आहेत. या नांवांत कांहीं नावें अन्वर्थक आहेत. हे कृमि झाले असतां; मळमळ, तोंडाला पाणी सुटणें, अन्न पचन न होणें, अरुचि, मूर्छा, वांति, ताहान, पोट फुगणं, शरीराला कृशपणा, सूज आणि पडसें हीं लक्षणें होतात.

## रक्तजकृमीचें लक्षण.

रक्तवाहिशिरास्थानारक्तजातंतवोणवः ॥ अपादावृत्तताम्राश्च

सौक्ष्म्यात्केचिददर्शनाः ॥ केशादारोमविध्वंसारोमद्वीपाउदुंब
राः ॥ षट्तेकुष्ठैककर्माणःसहसौरसमातरः ॥

अर्थ—रक्त वाहणाऱ्या शिरांतील रक्तामध्यें होणारे कृमि सूक्ष्म, पादरहित, वाटोळे, तांबडे, व कितीएक फार बारीक ह्मणून न दिसणारे असे आहेत, त्यांचीं नावें केशाद, रोमविध्वंस, रोमद्वीप, उदुंबर, सौरस, आणि मातर अशीं आहेत. हे मुख्यत्वेंकरून कुष्ठ उत्पन्न करितात.

## पुरीषजकृमींचें लक्षण.

पक्वाशयेपुरीषोत्थाजायंतेधोविसर्पिणः ॥ प्रवृद्धाःस्युर्भवेयुश्चतेयदामा
शयोन्मुखाः ॥ तदास्योद्गारनिश्वासाविड्गंधानुविधायिनः ॥ पृथुवृ
त्ततनुस्थूलाःश्यावपीतसितासिताः ॥ तेपंचनाम्नाकृमयःककेरुकमके
रुकाः ॥ सौसुरादामलूनाश्चलेलिहाजनयंतिच ॥ विड्भेदशूलविष्टं
भकार्श्यपारुष्यपांडुताः ॥ रोमहर्षाग्निसदनगुदकंडूर्विमार्गगाः ॥

अर्थ—पक्वाशयामध्यें मळापासून झालेले कृमि गुदावाटे बाहेर पडतात, तेच आंत राहून वाढले असतां; आमाशयाकडे जातात. त्याकाळीं ढेकरा व विष्ठेचा गंधीचे श्वासोश्वास येतात; ते कृमि जाड, वाटोळे, बारिक, मोठे व वर्णानें निळे, काळे, पिंवळे, पांढरे, असे असतात. त्यांचीं नावें ककेरुक, मकेरुक, सौसुराद, मलूद, आणि लेलिह अशीं पांच आहेत, हे होऊन अन्य आशयात गेले असतां; ढाळ, शूळ, पोटफुगणें, कृशपणा, खरखरीतपणा, निस्तेजपणा, रोमांच, अग्निमांद्य आणि गुदाला कंडू हीं लक्षणें होतात.

## कृमिचिकित्साप्रक्रिया.

कृमीणांविट्कफोत्थानामेतदुक्तंचिकित्सितं ॥
रक्तजानांतुसंहारंकुर्यात्कुष्ठचिकित्सया ॥

अर्थ—ही चिकित्सा जंतु व अभ्यंतर कृमि यांची सांगीतली; आणि रक्तजकृमीची चिकित्सा करणें तर कुष्ठासारिखी करावी.

तेषामन्यतमंवैद्योजिघांसुःस्निग्धमातुरं ॥ सुरसादिविपक्केनसर्पिषंवां
तआदिभिः ॥ विरेचयेत्तीक्ष्णतरैर्योगैरास्थापयेद्धिच ॥

अर्थ—त्या आभ्यंतर किंवा बाह्यकृमीचा नाश करण्याविषयीं पूर्वी मिर्गुंडी इत्यादिकांत सिद्ध केलें घृतादिकानीं रोग्याला स्निग्ध करून वांति देऊन नंतर तीक्ष्ण रेच किंवा पिचकारी इत्यादि क्रिया करावी.

## पोळी.

शालिपिष्टंकणासिंधुविडंगंभोपनीत्वचैः ॥

सुपक्कापोलिकाजंतून्पातयेन्मधुभक्षिता ॥

**अर्थ**–तांदळाचे पीठ, पिंपळी, सैंधव, वावडिंग, हीं एकत्र करून त्याची भोपनीच्या रसाशीं भाकरी सिद्ध करावी; आणि ती मधाशीं खावी; ह्मणजे कृमीला पाडिते.

## अन्न.

प्रत्यहंकटुकंतिक्तंभोजनंकफनाशनं ॥

कृमीणांनाशनंहृच्यमग्निसंदीपनंपरं ॥

**अर्थ**–कृमिरोग्यानें रोज तिखट, कडु, व कफ, कृमि यांचे नाशक आणि अग्निदीपक असें भोजन करावें.

पथ्याखुपर्णिकायुक्तागोधूमैश्चक्रमात्हता ॥

सुपक्कापोलिकाजंतून्पातयेन्मधुभक्षिता ॥

**अर्थ**–हरीतकी, उंदिरकानी, गव्हाचा कणीक, यांची पोळी भाजून ती मधाशीं भक्षण करावी; ह्मणजे जंतांना पाडिते.

## कृमिलेप.

पारदंमर्दयेन्निष्कंकृष्णधत्तूरकद्रवैः ॥ नागवल्लीद्रवैर्वाथवस्त्र खंडंप्रलेपयेत् ॥ तद्वस्त्रंमस्तकेबध्वाधार्ययामत्रयंततः ॥ यूकाःपतंतिनिश्चेष्टाःपरीक्ष्यंनात्रसंशयः ॥

**अर्थ**–काळ्या धोतऱ्याच्या किंवा पानवेलीचे रसांत ३ मासे पारा खलावा; आणि त्याचा लहान वस्त्राला लेप करून तें वस्त्र मस्तकावर दोन प्रहर बांधून ठेवावें; ह्मणजे उवा मरून पडतात.

## यवागू.

विडंगतंदुलव्योषशिग्रुभिमरिचंनतं ॥

तक्रसिद्धायवागूःस्यात्कृमिघ्नीससुवर्चिका ॥

**अर्थ**–वावडिंग, तांदुळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, शेवग्याची साल, मिरीं, तगर, यांची ताकामध्यें यवागू साहापट पाणी घालोन पातळ भात करितात, तसी सिद्ध करून त्यांत पादेलोण घालोन द्यावी; ह्मणजे ती कृमिनाश करिते.

## त्रिवृतादिकल्क.

त्रिवृत्पलाशबीजंचपारसीकयवानिच ॥ कंपिल्लकंविडंगंचगु
डश्चसमभागिकः ॥ तक्रेणकल्कएतेषांकृमिकोटिगणापहः ॥

अर्थ–तेड, पळसपापडी, चोरओंवा, कपिला, वावडिंग, यांचें चूर्ण व चूर्णासमान गुळ घेऊन त्याचा ताकांत कल्क करावा. तो कृमिच्या कोटिगणांचा नाश करील.

## पलाशबीजरस व कल्क.

पलाशबीजस्वरसंपिबेन्माक्षिकसंयुतं ॥
पिबेत्तद्बीजकल्कंवातक्रेणकृमिनाशनं ॥

अर्थ–पळसाच्या बीजांचा स्वरस मधाशीं; किंवा पळसपापडिचा कल्क ताकाशीं द्यावा; ह्मणजे कृमींचा नाश करितो.

## स्वरस.

पारिभद्रकपत्रोत्थरसंक्षौद्रयुतंपिबेत् ॥
रुबकस्यरसंवापिधत्तूरस्यापिवारसं ॥

अर्थ–कडुलिंबाच्या पाल्याचा स्वरस व एरंड अथवा धोतरा यांचा रस मध घालून प्यावा.

## तैल.

विडंगंचशिलयासिद्धंसुरभिजलेनकटुतैलं ॥
निखिलान्नयतिविनाशंलिक्षासहितादिनैर्यूकाः ॥

अर्थ वावडिंग, मनशीळ, यांचा कल्क व गोमूत्र, यांत शिरसेल घालोन सिद्ध करावें. तें एक दिवसांत लिखा व उवा यांचा नाश करितें.

## विडंगादितैल.

विडंगगोमूत्रमनःशिलानांसुगंधिकाभिःपरिपाचितंयत् ॥
तैलंभवेत्सर्षपसंभवंचयूकासुलीक्षासुहितंहिसद्यः ॥

अर्थ–वावडिंग, गोमूत्र, मनशीळ, आणि काळी निर्गुड यांच्या कल्कानें शिरसांचें तेल पचन करावें, तें उवा व लिखा, यानां तात्काळ मारितें.

## धत्तूरपत्रतैल.

धत्तूरपत्रकल्केनतद्रसेनैवपाचितं ॥
तैलमभ्यंगमात्रेणयूकानाशयतिक्षणात् ॥

**अर्थ**—धोतऱ्याच्या पानांचा कल्क किंवा रस यांत तेल घालोन सिद्ध करून अंगास लावावें; ह्मणजे क्षणांत उवांचा नाश करितें.

## दाडिमादिकाढा.

दाडिमत्वक्कृतःक्काथस्तिलतैलेनसंयुतः ॥
त्रिदिनात्पातयत्येवकोष्ठतःकृमिजालकं ॥

**अर्थ**—डाळिंबाच्या सालीचा काढा करून त्यांत तिळांचें तेल घालून द्यावा; ह्मणजे तीन दिवसांत कृमिला कोठ्यांतून पाडितो.

## नियमनादिकाढा.

नियमनत्रिफलाकुटजोवचात्रिकटुकंखदिरंत्रिवृतायुतं ॥
मुनिदिनंहिगवांसलिलेनचसृतमिदंकृमिनाशकरंपिबेत् ॥

**अर्थ**—कडुनिंब, हरडा, बेहेडा, आवळकाठी, कुड्याची साल, सुंठ, मिरीं, पिंपळी, खैराची साल व तेड यांचा गाईच्या मुतांत काढा करून द्यावा; ह्मणजे तो सात दिवसांत कृमींचा नाश करितो.

## विडंगादिकाढा.

विडंगशृतपानीयंविडंगेनावधूलितं ॥
पीतंकृमिहरंदृष्टंकृमिजातान्प्रदापयेत् ॥

**अर्थ**—वावडिंगाच्या काढ्यांत वावडिंगाचे चूर्ण घालोन घ्यावा; ह्मणजे तो कृमींचा नाश करितो.

## मुस्तादिकाढा.

मुस्ताखुपर्णीफलदारुशिग्रुक्काथःसकृष्णाकृमिशत्रुकल्कः ॥
मार्गद्वयेनापिचिरप्रवृत्तान्कृमीन्निहन्यात्कृमिजांश्चरोगान् ॥

**अर्थ**—नागरमोथा, उंदीरकानी, इंद्रजव, देवदारु व शेवगा यांचा काढा पिंपळी, आणि वावडिंग यांचें चूर्ण घालोन घ्यावा; ह्मणजे दोन्ही द्वारांनी फार दिवस पडणारे जरी जंत असले, तरी त्यांचा, आणि त्यां पासून झालेले रोग यांचा नाश होतो.

## खदिरादिकाढा.

खदिरःकुटजःपिचुमंदवचात्रिकटुत्रिफलात्रिवृतासहितं ॥
पशुमूत्रयुतंपिबसप्तदिनंकृमिकोटिशतान्यपिहंत्यचिरात् ॥

**अर्थ**—खैर, कुडा, कडुनिंब, वेखंड, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहेडा, आवळकाठी व तेड यांचें चूर्ण किंवा काढा गोमूत्रांत घालोन सात दिवस घ्यावा; ह्मणजे कोट्यावधि कृमि असले, तरी लौकर नाश पावतील.

## रस.

हिंगुलःकर्षमानःस्याद्दंतिवर्जितदर्धकं ॥ अर्कक्षीरेणसंमर्द्यदापयेद्भाव नादश ॥ माषमात्रंप्रदातव्यमर्कमूलरसंपुनः ॥ प्रपिबेद्धिंगुसंयुक्तं कृमिजालनिपातनं ॥

अर्थ–हिंगुळ १ तोळा व जेपाळ ६ मासे यांचें चूर्ण करून त्यास रुईचा चिकाचा १० भावना द्याव्या. त्यांतून एक मासा औषध रुईच्या मुळांचा रस आणि हिंग यांबरोबर द्यावें; ह्मणजे कृमि पडतात.

## पारदादियोग.

शुद्धसूतमिंद्रयवमजमोदमनःशिला ॥ पलाशबीजतुल्यांशंदेवदाल्याद्रवैर्दिनं ॥ मर्दयेद्भक्षयेन्निष्कंमूषपर्णिकषायकं ॥ सितायुक्तंपिबेच्चानुकृमिपातोभवत्यलं ॥

अर्थ–शुद्धपारा, इंद्रजव, ओंवा, मनशीळ व पळसपापडी, याची समभाग चूर्णे घेऊन त्यांला देवडांगरीच्या रसांत एकदिवस खलावे, त्यांतून ४ मासे औषध उंदिरकानीच्या काढ्यात साकर घालून द्यावें; ह्मणजे कृमि पडतात.

## कृमिकुठार.

कर्पूरंचाष्टभागंचकुटजश्चैकभागकः ॥ तत्समानंत्रायमाणमजमोदा विडंगकं ॥ हिंगूलंविषभागंचतत्समानंचकेसरं ॥ सर्वंदृढंचसंमर्द्यभृंगराजरसैस्तथा ॥ पलाशबीजसंमिश्रंउंदरीरसभावितं ॥ ब्राह्मीरसंततोदत्वासिध्येत्कृमिकुठारकः ॥वल्लमात्रांवटींकुर्याद्दद्याद्भेमसमन्वितां ॥ कुर्यात्कृमिविनाशंचएवंसप्तविधंदृढं ॥

अर्थ–कापूर ८ भाग, कुडयाची साल, त्रायमाण, ओंवा, वावडिंग, हिंगुळ, बचनाग, केशर व पळसपापडी हीं सर्व एकेक भाग एकत्र करून त्याला माका, उंदिरकानी व ब्राह्मी, यांचा रसाचा भावना द्याव्या. हा कृमि कुठार एकवाल धोतऱ्याशीं द्यावा; ह्मणजे सर्व प्रकारचा कृमीचा नाश करितो.

## कृमीमुद्गरस.

क्रमेणवृद्धंरसगंधकाजमोदाविडंगंविषमुष्टिकाचं ॥ पलाशबीजस्यच चूर्णमस्यनिष्कप्रमाणंमधुनावलीढं ॥ पिबेत्कषायंघनजंतदूर्ध्वंरसोप्र युक्तःकृमिमुद्गराख्यः ॥

अर्थ–पाराभाग १, गंधक २, अजमोदा ३, वावडिंग ४, बकाणालिंब ५ व पळसपापडि ६ भाग यांचे चूर्ण एक तोळा अथवा शक्तिप्रमाणे मधाबरोबर चाटावें; नंतर नागरमोथ्याचा काढा प्यावा, याला कृमिमुद्गररस ह्मणतात.

## विडंगादिचूर्ण.

विडंगसिंधूद्भवहिंगुपथ्याकंपिल्लसौवर्चलपिप्पलीनां ॥
चूर्णंकवोष्णोदकसंगृहीतंकृमीन्निहंत्याशुदहेद्द्रमिंच ॥

अर्थ–वावडिंग, सैंधव, हिंग, हरीतकी, कपिला, पादेलोण, आणि पिंपळी यांचें चूर्ण कोमटपाण्याशीं द्यावें; ह्मणजे तें कृमि, आणि वांति यांचा नाश करितें.

## दुसरा प्रकार.

विडंगानांतुचूर्णंचकर्षार्धंकर्षमेवच ॥
मधुनासहितंलिह्यात्कृमिकोटिनिवृत्तये ॥

अर्थ–वावडिंगाचें चूर्ण तोळा किंवा साहामासे घेऊन मधाशीं द्यावें; ह्मणजे तें कृमींच्या समुदायाचा नाश करितें.

## पारसिकयवानीचूर्ण.

पारसिकांयवानींतुपर्णेनसहभक्षयेत् ॥
कृमिजालंनिहंत्याशुपीनोनिंबरसोथवा ॥

अर्थ–चोरओवा विड्याच्या पानांतून खावा; किंवा कडुनिंबाचा रस प्यावा; ह्मणजे कृमींचा नाश होतो.

## निंबादिचूर्ण.

निंबाजमोदाजंतुघ्नंब्रह्मबीजंसचोरकं ॥
सहिंगुकंसमगुडंसद्योजंतुविनाशनं ॥

अर्थ–कडुनिंब, ओंवा, वावडिंग, चोरओंवा व हिंग यांचें चूर्ण समभाग गुळाशीं द्यावें; ह्मणजे कृमिनाश करितें.

विडंगव्योपसंयुक्तंभक्तमंडंपिबेन्नरः ॥
दीपनंकृमिनाशायजठराग्निविवृद्धये ॥

अर्थ–वावडिंग, सुंठ, मिरीं व पिंपळी, यांचें चूर्ण घालून भाताची पेज प्यावी; ह्मणजे ती दीपन आहे, आणि कृमिनाश करून जठराग्नीला वाढवित्ये.

## त्रिफलाद्यघृत.

फलत्रयंवचादंतीत्रिवृत्कंपिल्लकैःसमैः ॥

सिद्धंसर्पिर्गवांमूत्रेपीतंचकृमिनाशनं ॥

अर्थ—हरडा, बेहडा, आवळकाठी, वेखंड, दांतीचें बीज, तेड, कपिला व गोमूत्र, यांच्या कल्काशीं घृत पाचन करावें. तें प्राशन केलें असतां, कृमींचा नाश होतो.

## विडंगघृत.

त्रिफलायास्त्रयःप्रस्थाविडंगप्रस्थमेवच ॥ दीपनंदशमूलंचलाभतः समुपाहरेत् ॥ पादशेषेजलद्रोणेपूतेसर्पिर्विपाचयेत् ॥ प्रस्थोन्मितंसिंधुयुतंतत्परंकृमिनाशनं ॥ विडंगघृतमेतत्तुलेह्यंशर्करयासह ॥ सर्वान्कृमीन्प्रणुदतिवज्रमुक्तमिवासुरान् ॥

अर्थ—त्रिफला १९२ तोळे, वावडिंग ६४ तोळे, दीपनीयगण व दशमुळें यांतून मिळतील तीं औषधें घेऊन त्यांचा २०४८ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून त्यांत ६४ तोळे तूप व सैंधव घालून घृत सिद्ध करावें; तें विडंग घालून घृत साकरेशीं द्यावें; ह्मणजे कृमींचा नाश करितें.

## सारनालयोग.

सारनालाखुपर्णीवातक्रंपालाशबीजयुक् ॥
हिंग्वाजमोदातक्रेवाकृमिरोगंविनाशयेत् ॥

अर्थ—कांजीतून, उंदीरकानी, व ताकांतून, पळसपापडी, किंवा ताकांतून हिंग व ओवा, हीं कृमिरोगनाशक आहेत.

## भल्लातकयोग.

भल्लातकंवादध्नाचचिंचाम्लेनहरेत्कृमीन् ॥

अर्थ—बिबा दह्यांबरोबर किंवा चिंचेबरोबर खावा; ह्मणजे तो कृमिनाश करील.

## विडंगादियोग.

विडंगंपारिभद्राग्रंब्रह्मबीजंपृथक्पृथक् ॥
मधुनाकृमिनाशायनिंबंवाहिंगुसंयुतं ॥

अर्थ—वावडिंग, अथवा कडुलिंबाची पानें, किंवा पळसपापडी, मधाबरोबर खावी; ह्मणजे कृमिनाश होतो; अथवा लिंबाची पानें हिंगाबरोबर खावीं.

## पलाशबीजयोग.

पलाशबीजंवल्केंस्नुहिक्षीरेणजंतुजित् ॥

अर्थ—पळसपापडी निवडुंगाचे रसाबरोबर खावी; ह्मणजे जंत मरतील.

## खुरासनीओंव्याचा कल्क.

पारसीयवानीपीतापर्युषितवारिणाप्रातः ॥
गुडपूर्वाकृमिजालंकोष्ठगतंपातयत्याशु ॥

अर्थ–खुरासनीओंवा शिळ्यापाण्यांत वाटून त्यांत गूळ घालून द्यावा; ह्मणजे कोष्ठगत कृमिजाळाला पाडवितो.

## निशोत्तरादियोग.

भंडीपिष्टारनालेनगोमूत्रेणातिमुक्तकः ॥
कुनटीकटुतैलेनयोज्यायूकापहास्त्रयः ॥

अर्थ–पांढरें निशोत्तर कांजीशीं, किंवा टेंभुरणी गोमुत्राशीं, अथवा मनशीळ शिरसांचे तेलाशीं. हे तिनी योग उवानाशक आहे.

## पिप्पल्याद्यचूर्ण.

पिप्पलीपिप्पलीमूलंसैंधवंकृष्णजीरकं ॥ चव्यचित्रकतालीसपत्रकंनागकेसरं ॥ एषांद्विपलिकान्भागान्पंचसौवर्चलस्यच ॥ मरिचाजाजिशुंठीनामेकैकस्यपलंपलं ॥ दाडिमात्कुडवंचैवद्विदलंचाम्लवेतसात् ॥ सर्वमेकत्रसंयुक्तंयोजयेत्कुशलोभिषक् ॥ पिप्पल्यादिरितिख्यातंनष्टवन्हेश्चदीपनं ॥ अर्शांसिग्रहणीगुल्ममुदरंसभंगदरं ॥ कृमिकंडूरुचिहरंसुरयोष्णोदकेनवा ॥ नातःपरतरंकिंचिदामशोथनिषूदनं ॥

अर्थ–पिंपळी, पिपळीमूळ, सैंधव, शाहाजिरें, चवक, चित्रकमूळ, तालीसपत्र, नाकेशर, हीं प्रत्येकीं ८ तोळे, पादेलोण ५ तोळे, व मिरें, जिरें, सुंठ, हीं चार चार तोळे; डाळिंब १६ तोळे, आम्लवेतस ८ तोळे हीं संपूर्ण एकत्र करून कुशल वैद्यानें हें पिप्पल्यादि चूर्ण द्यावें. हें मंदाग्निला दीपन करितें; व अर्श, संग्रहणी, गुल्म, उदर, भगंदर, कृमि, कंडु, अरुचि, यांवर मद्याशीं किंवा ऊन पाण्याशीं द्यावें; याहून दुसरें आम व सूज यांचा नाश करणारें औषध नाहीं.

## आखुपर्ण्यादिचूर्ण.

आखुपर्णदिलैःपिष्टैःपिष्टकेनचपूपकान् ॥
भुक्त्वासौवीरकंचानुपिबेत्कृमिहरंपरम् ॥

अर्थ–उंदीरकानीची पानें कुटून चूर्ण करून त्यांत पीठ मिश्र करून त्याचे घारगे करून खावे; आणि वरीं सातूची कांजी प्यावी; ह्मणजे कृमींचा नाश होतो.

## सुवर्चिकादिचूर्ण.

सुवर्चिकारामठपत्रिकाव्हाविडंगबाल्हीककणाग्निविश्वा ॥
यवानिकाग्रंथिकभद्रमुस्तातक्रेणचूर्णंकृमिकोटिहारि ॥

अर्थ–सज्जीखार, हिंग, जायपत्री, वावडिंग, केशर, पिंपळी, चित्रक, सुंठ, ओवा, पिंपळमूळ व नागरमोथा यांचें चूर्ण ताकाबरोबर प्यावें; ह्मणजे कोट्यावधि कृमींचा नाश होईल.

## निंबादिचूर्ण.

निंबुवत्सकविडंगसंयुतंरामठेनसहजंतुनाशनम् ॥
निंबपत्रमजमोदकान्वितंचूर्णमेवमधुनाप्रशस्यते ॥

अर्थ–लिंब, कुडा, वावडिंग व हिंग यांचें चूर्ण जंतनाशक आहे; आणि लिंबाचीं पानें ओंवा यांचें चूर्ण मधाबरोबर खावें; ह्मणजे तेंही जंतनाशक आहे.

## उवा इत्यादिकांवर तेल.

चित्रकंदंतिनीमूलंकोशातकिसमन्वितं ॥
कल्कंपिष्ट्वापचेत्तैलंकेशशत्रुविनाशनं ॥

अर्थ–चित्रक, दांतीमूळ, दोडकी, यांचा कल्क घालोन जें तेल करावें, तें उवा व लिखा यांचें नाशक आहे.

## विडंगादितेल.

सविडंगंजतुशिलयासिद्धंसुरभेर्जलेनकटुतैलं ॥
निखिलानयतिविनाशंलिक्षासहिताश्चवैयूकाः ॥

अर्थ–वावडिंग, शिलाजित, आणि गोमूत्र यांत शिरसांचें तेल सिद्ध करावें, तें लिखा, ऊवा यांचा नाश करितें.

## कपिलाचूर्ण.

कांपिल्यचूर्णकर्षार्धंगुडेनसहभावितं ॥
पातयेत्तुकृमीन्सर्वानुदरस्थान्नसंशयः ॥

अर्थ–कपिलाचूर्ण अर्धा तोळा, गुळाबरोबर भक्षिलें असतां, पोटांतले संपूर्ण कृमि पडतील; यांत संशय नाहीं.

## निंबादिरस.

निंबपत्रसमुद्भूतंरसंक्षौद्रयुतंपिबेत् ॥

धत्तूरपत्रजंवापिकृमिनाशनमुत्तमं ॥

अर्थ–कडुलिंबाच्या पाल्याचा रस अथवा धोत्र्याचे पाल्याचा रस मध घालून प्यावा; ह्मणजे तो कृमींचा नाश करितो.

## हरीतकीचूर्ण.

हरीतकींचैवतथाहरिद्रासौवर्चलंचैवसमंविचूर्णितं ॥
इंद्रवारुणिजलेनभावितंकाटसंघविनिवारणंपरं ॥.

अर्थ–हरीतकी, हळद व पादेलोण हीं समभाग घेऊन चूर्ण करून त्यास कंवडळीचे काढ्याची भावना द्यावी; हें चूर्ण कृमिसमुदायाचें नाशक आहे.

## सावित्रवटक.

पलंकषापलेद्वेचकार्ष्णायसपलद्वयं ॥ पथ्यामृताक्षधात्रीणांपृथगेकैकशःपलं ॥ पूतीकचव्यव्योषाग्निकारवीकृमिनाशनैः ॥ चूर्णितैरर्धपलिकैस्तिलतैलंपलद्वयं ॥ त्रिफलायारसप्रस्थेखंडप्रस्थयुगंभवेत् ॥ दार्वीप्रलेपात्पाकश्चचातुर्जातकसंयुतं ॥ सावित्रवटकाह्येतेयथाग्निबलभक्षिताः ॥ कृमिकोष्ठाग्निदौर्बल्यशोथगुल्मोदरव्रणान् ॥ कामलापांडुरोगार्शोभगंदरगदव्रणान् ॥ निहंत्येतान्धिसंसित्वंवयस्थैर्यबलप्रदं ॥ वायुमेहप्रशमनाश्चक्षुषःप्रीतिवर्धनाः ॥ भवंत्यतिस्निग्धभुजोवातातपनिषेविणः ॥

अर्थ-पळसाचें बीज ८ तोळे, लोहभस्म ८ तोळे हरीतकी, गुळवेल, बेहडा, आवळकाठी, हीं प्रत्येकीं ४ चार तोळे व घाणेरा करंज, चवक, सुंठ, मिरीं, पिंपळी, चित्रक, ओंवा, वावडिंग, हीं २ तोळे व तिळांचे तेल ८ तोळे, त्रिफळ्याचा काढा किंवा रस १६ तोळे व खडिसाकर ३२ तोळे हीं एकत्र करून पळीला चिकटे तों पर्यंत कढवावें. व त्यांत चातुर्जात (दालचिनी, तमालपत्र, एलची, नागकेशर) हीं घालोन तें एकत्र केलें असतां, त्याला सावित्रवटक ह्मणतात. हा अग्नि व बल पाहून द्यावा; ह्मणजे कृमि, अग्निमांद्य, दुर्बलता, सूज, उदर, व्रण, कावीळ, पांडुरोग, अर्श, भगंदर, यांचा नाश करितो, व वय, बल, आणि स्थैर्य, यांना करितो, व गुद व मेह यांचा नाश करितो, व नेत्रांना हितावह असा आहे व यांवर स्निग्ध भोजन आणि वायु व ऊन यांचे सेवन करावें.

## विशालादिधूप.

विशालायाःफलंपक्वंतप्तलोहोपरिक्षिपेत् ॥
तद्धूमोदंतलग्नश्चेत्कीटानांपातनःपरः ॥

अर्थ–कडुवृंदावनाचें पिकलेलें फळ तापलेल्या लोखंडावर टाकून त्याचा धूर दांतास द्यावा, तो उत्कृष्ट कृमि पाडणारा आहे.

## अष्टसुगंधधूप.

लाक्षाभल्लातकश्चश्रीवासःश्वेतापराजिता ॥ अर्जुनस्यफलंपुष्पं विडंगंसर्जगुग्गुलुः ॥ एभिःकृतेनधूपेनश्याम्यंतिनिहितेग्रहे ॥ भुजंगमूषकादंशाघुणामशकमत्कुणाः ॥

अर्थ–लाख, बिबवे, धूप, पांढऱ्या विष्णुक्रांताची मुळी, अर्जुनाचें फल व फुलें, वावडिंग राळ व गुग्गुळ यांचा धूप करून घरांत ठेविला असतां, साप, उंदिर, माशा, बारीक कीट, आणि ढेंकूण, यांचा नाश करितो.

## ककुभादिधूप.

ककुभकुसुमविडंगंलांगलीभल्लातकंतथोशीरं ॥ श्रीवेष्टकंसर्जरसंचंदनमथकुष्ठमष्टमंदद्यात् ॥ एषसुगंधोधूपःसत्कृमीनां विनाशकःप्रोक्तः ॥ तथासमत्कुणानांशिरसिचगात्रेषुयूकानां ॥

अर्थ–अर्जुनवृक्षाचीं फुलें, वावडिंग, पिठवण, बिबवा, वाळा, सुरूचा डीक, राळ, चंदन, कोष्ठ, यांचा धूप एकवेळ घेतला असतां, कृमिनाशक आहे, व हा धूप शय्येला दिला असतां, ढेंकूण उवा ही मरतील.

## कृमीवर पथ्य.

आस्थापनंकायशिरोविरेचनंधूपःकफघ्नानिशरीरशोधनं ॥ चिरंतनावैणवरक्तशालयःपटोलवेत्राग्ररसोनवास्तुकं ॥ हुताशमंदारदलानिसर्षपानवीनमोचंबृहतीफलान्यपि ॥ तिक्तानिनालीचफलानिमौषिकंमाषंविडंगंपिचुमंदपल्लवं ॥ तैलंतिलानामथसर्षपोद्भवंसौवीरमूक्तंचतुषोदकंमधु ॥ पचेलिमंतारमरुष्करंगवांमूत्रंचतांबूलसुरामृगंरजः ॥ औष्ट्राणिमूत्राज्यपयांसिरामठंक्षारोजमोदाखदिरश्चवत्सकं ॥ जंबीरनीरंसुपवीयवानिकासाराःसुराव्हागुरुशिंशिपोद्भवः ॥ तिक्तःकषायःकटुकोरसोयंवर्गोनराणांकृमिरोगिणांसुखः ॥

अर्थ–पिचकारी, शरीर व मस्तक यांचे रेच, धूम, कफनाशक पदार्थ, शरीराला शोधन, फारदिवसांचे वेळूचे बीज, तांबडे भात, पडवळ, वेताचे मूळ, लसूण, चाकवत, चित्रक, मंदाराची पानें, मोहऱ्या, जुन केळे, रिंगणी, कडुपदार्थ, नालीकफळें, मौषिक, उडीद,

वावडिंग, कडुनिंबाचा पाला, तिळ व सर्षप यांचे तेल; कांजी, दह्याची निवळी, तुषाचा काढा, मध, उडीद, रुपें, बिबवा, गोमूत्र, विडा, मद्य, कस्तूरी, उंटाचें मूत, तूप, दूध, हिंग, क्षार, ओंवा, खैर, कुडा, लिंबूरस, कारली, अजमोदा, देवदार व शिसवा यांचा नार, व कडु, तुरट, तिखट, हे रस. इत्यादि कृमिरोगावर पथ्यवर्ग सांगितला.

## अपथ्य.

छर्दिंचतद्वेगविधारणंचविरुद्धपानाशनमन्हिनिद्रा ॥ द्रवंचपिष्टानि मजीर्णभोजनंघृतानिमापादधिपत्रशाकं ॥ मांसंपयोम्लंमधुरोरसश्चकृ मीन्जिघांसुःपरिवर्जयेत्तु ॥

अर्थ–वांति, वांतिवेगधारण, विरुद्ध अन्न व पान, दिवानिद्रा, द्रव पदार्थ, पिष्टान्न, अजीर्णावर भोजन, तूप, उडीद, दहीं, पालेभाज्या, मांस, दूध, आंबट, मधुर, हे रस कृमि झालेल्या रोग्यानें सोडावे.

## दुसरा प्रकार.

शीतांबुमधुरक्षीरंदधिक्षारघृतादिकं ॥
सौवीरंपत्रशाकांश्चवर्जयेत्कृमिवान्नरः ॥

अर्थ–थंडपाणी, मधुर रस, क्षीर, दधि, मीठ, तूप, बोर व पालेभाज्या, हे ही पदार्थ कृमि झालेल्या रोग्यानें सोडावे.

---

# पांडुरोग कर्मविपाक.

देवद्विजद्रव्यहारीपांडुरोगीभवेन्नरः ॥ कृछ्रातिकृछ्रेकुर्याच्चचां द्रायणमतंद्रितः ॥ कुर्यात्कूष्मांडहोमंचस्वर्णचंद्रेणवाससी ॥ ब्राह्मणेभ्योयथाशक्तिपांडुरोगस्यशांतये ॥

अर्थ–देव व ब्राह्मण यांचें द्रव्य हरण करणारा, पांडुरोगी होतो. त्याणें पांडुरोग नाशार्थ कृछ्र, अतिकृछ्र, चांद्रायण प्रायश्चित्त; किंवा कूष्मांडहोम; अथवा सुवर्णाचा चंद्र व वस्त्रें द्यावीं, व यथाशक्ति द्रव्य द्यावें; ह्मणजे रोगी पांडुरोगापासून मुक्त होतो.

## शिरोवेदनासहितपांडुरोगहर.

अग्निष्टोमादिकर्माणिप्रक्रम्यनसमापयेत् ॥ सपांडुरोगीभवति

शिरोवेदनवांस्तथा ॥ कृछ्रातिकृछ्रेकुर्याच्चचांद्रायणमतंद्रितः ॥
शतंचभोजयेद्विप्रान्मिष्टान्नेनयथेप्सितं ॥

**अर्थ**–जो अग्निष्टोमादिकर्माला आरंभ करून समाप्तीस नेत नाहीं, तो कपालशूल युक्त पांडुरोगी होतो, त्याणें कृछ्र, अतिकृछ्र, चांद्रायण प्रायश्चित्त, किंवा शंभर ब्राह्मणाला मिष्टान्नयुक्त व इच्छित भोजन द्यावें; ह्मणजे त्या व्याधीपासून तो मुक्त होतो.

## पांडुरोगनिदान.

पांडुरोगाःस्मृताःपंचवातपित्तकफैस्त्रयः ॥
चतुर्थःसन्निपातेनपंचमोभक्षणान्मृदः ॥

**अर्थ**–पांडुरोग वात, पित्त, कफ, सन्निपात आणि मृत्तिकाभक्षणजन्य मिळून पांच प्रकारचा जाणावा.

## निदानपूर्वकसंप्राप्ति.

व्यवायमम्लंलवणानिमद्यंमृदंदिवास्वप्नमतीवतीक्ष्णं ॥
निषेव्यमाणस्यविदूष्यरक्तंकुर्वंतिदोषास्त्वचिपांडुभावं ॥

**अर्थ**–मैथुन, आंबट, खारट, मद्य, मृत्तिका, दिवानिद्रा आणि अतितिखट यांचें अतिशय सेवन करणाऱ्या पुरुषाचे रक्तादिकांला वातादिदोष दूषित करून त्वचेच्या ठाईं पांढरेपणा उत्पन्न करितात.

## पूर्वरूप.

त्वक्स्फोटनिष्ठीवनगात्रसादोमृद्भक्षणप्रेक्षणकूटशोथाः ॥
विण्मूत्रपीतत्वमथाविपाकेभविष्यतस्तस्यपुरःसराणि ॥

**अर्थ**–अंगावरची चामडी फुटल्ये, तोंडाला थुंका, आंगगळणें, मृत्तिकेचें भक्षण, नेत्रगोलानां सूज व मळ, मूत्र यानां पिवळेपणा, आणि भोजन केलेल्या अन्नाचा चांगला पाक नहोणें हीं लक्षणें पांडुरोग होण्याच्या पूर्वीं होतात.

## पांडुरोगचिकित्सा.

साध्यंचपांड्वामयिनंसमीक्ष्यस्निग्धंघृतेनोर्ध्वमधश्चशुद्धं ॥ संपादयेत्क्षौद्रघृतप्रगाढैर्हरीतकीचूर्णमयप्रयोगैः ॥ पिबेद्घृतंवारजनीविपक्वंयत्त्रैफलंतैल्वकमेकमेव ॥ विरेचनद्रव्यकृतंपिबेद्वायोगांश्चवैरेचनिकान्घृतेन ॥ विधिःस्निग्धोत्रवातोत्थेतिक्तःशीतश्चपैत्तिके ॥ श्लैष्मिकेकटुरूक्षोष्णःकार्योमिश्रस्तुमिश्रजे ॥

अर्थ-पांडुरोगी साध्य आहे, असें पाहून तूप पाजून स्निग्ध करावा; आणि रेचन व वमन देऊन शुद्ध करावा; नंतर मध, तूप व हरीतकी ज्या चूर्णांत पुष्कळ आहे; अशा औषधांचा उपचार करावा, व हळद घालून कढवलेलें तूप प्यावें; किंवा त्रिफळा आणि हिंगणबेट याणि सिद्ध केलेलें तूप प्यावें; अथवा कांहीं एक औषधानीं रेचन सिद्ध करून घेत जावें; अथवा रेचक घृतावरोबर प्यावें; आतां सामान्य उपचार वातपांडुवर स्निग्ध पित्तपांडुवर कडु व शीत; आणि कफपांडुवर तिखट, रूक्ष, व उष्ण; आणि द्वंद्वजावर मिश्र, याप्रमाणें उपचार करावे.

## वातपांडुनिदान.

त्वङ्मूत्रनयनादीनांरूक्षकृष्णारुणाभता ॥
वातपांड्वामयेकंपतोदानाहभ्रमादयः ॥

अर्थ-त्वचा, मूत्र, नयन यांस रुक्षपणा व कृष्णवर्णमिश्रित आरक्तपणा येतो; व कंप, तोद, पोटास बद्धता व भ्रम इत्यादिक वातपांडूचीं लक्षणें जाणावीं.

## मंडूराद्यारिष्ट.

मंडूरस्यतुशुद्धस्यतुलार्धंपरिकीर्तितं ॥ तद्वल्लोहस्यपत्राणितिलोत्सेध प्रमाणतः ॥ पुराणगुडपंचाशत्कोलप्रस्थत्रयंतथा ॥ निकुंभचित्रका भ्यांचपलेद्वेद्वेसुचूर्णिते ॥ पिप्पलीनांविडंगानांकुडवंचपृथक्पृथक् ॥ त्रींश्चापित्रिफलाप्रस्थान्जलद्रोणेसमावपेत् ॥ अर्धमासस्थितोधान्येपे योरिष्टप्रमाणतः ॥ दोषानुभयतःस्राव्यपांडुरोगंनियच्छति ॥ कृमीनर्शां सिकुष्ठंचकासंश्वासकफामयान् ॥ एषोरिष्टस्तुमंडूरःसर्वपांड्वामयापहः ॥

अर्थ-शुद्ध मंडूर, दोनशे तोळे, तितकेच लोखंडाचे पत्रे तिळाइतक्या जाडीचे, जुना गुळ, २९२ तोळे, जळवेल आणि चित्रक यांचे चूर्ण प्रत्येकीं ८ तोळे, पिंपळी आणि वावडिंग प्रत्येकीं १६ तोळे, हिरडे ६४ तोळे, बेहेडे ६४ तोळे व आंवळकाठी ६४ तोळे, हीं सर्व औषधं १०२४ दहाशें चौवीस तोळे पाण्यात घालून पंधरादिवस पर्यंत धान्यात ठेवावीं; नंतर अरिष्ट देण्यानें प्रमाण असेल त्याप्रमाणें द्यावा. तेणें करून तो दोहोंद्वारांनीं दोष पाडून पांडुरोगाचा नाश करील. तसेंच कृमि, मुळव्याध, कुष्ठ, कास, श्वास व कफरोग यांचा हि नाश करील. याला अरिष्टमंडूर ह्मणतात. हा सर्वप्रकारचे पांडुरोगांचा नाशक आहे.

## पित्तपांडुनिदान.

पीतमूत्रशकृन्नेत्रोदाहतृष्णाज्वरान्वितः ॥
भिन्नविट्कोतिपीताभःपित्तपांड्वामयीनरः ॥

अर्थ—पित्तपांडूमध्ये रोग्याचें मूत, मळ व नेत्र हे पिंवळे होतात. व आंगाचा दाह, ताहान व ज्वर यांणीं युक्त असतो, मळ पातळ होतो; आणि शरीर फार पिंवळें होतें.

## आमलक्यवलेह.

रसमामलकानांतुसंशुद्धंयंत्रपीडितं ॥ द्रोणंपचेच्चमृद्वग्नौतत्रेमानिप्रदापयेत् ॥ चूर्णितंपिप्पलीप्रस्थंमधुकाद्विपलंतथा ॥ प्रस्थंगोस्तनिकायाश्चद्राक्षायाःकल्कपेषितं ॥ शृंगबेरपलेद्वेतुतुगाक्षिर्याःपलद्वयं ॥ तुलार्धंशर्करायाश्चघनीभूतंसमुद्धरेत् ॥ मधुप्रस्थसमायुक्तंलेहयेत्पलसंमितं ॥ हलीमकंकामलांचपांडुत्वंचापकर्षति ॥

अर्थ—आवळ्याचा रस स्वच्छ १०२४ तोळे शिजत ठेवावा; त्यांत पिंपळीचें चूर्ण ६४ तोळे, जेष्टीमध ८ तोळे, काळीं द्राक्षें बिया काढून कुसकरून ६४ तोळे, सुंठ व वंशलोचन ८ तोळे व साकर २०० तोळे, इतके पदार्थ टाकून घट्ट झाल्यावर उतरावा; नंतर त्यांत ६४ तोळे मध घालून ठेवावा. तो ४ तोळे प्रमाणे खावा; ह्मणजे हलीमक, कामला व पांडुरोग हे जातील.

## दुग्धयोग.

लोहपात्रस्थितंक्षीरंसप्ताहंपथ्यभोजनं ॥
पिबेत्पांडूामयीशोषीग्रहणीदोषपीडितः ॥

अर्थ—लोखंडाचे पात्रांत तापवून ठेवलेलें दूध सात दिवस प्यावें; आणि पथ्य करावें, व तेणेंकरून पांडुरोग, क्षय व संग्रहणी हे रोग दूर होतात.

## कफपांडुनिदान

कफप्रसेकश्वयथुस्तंद्रालस्यातिगौरवैः ॥
पांडुरोगीकफाच्छुक्लैस्त्वङ्मूत्रनयनाननैः ॥

अर्थ—तोंडावाटे कफाचा स्राव, सूज, झांपड, आळस, जडपणा, आणि त्वचा, मूत, डोळे व तोंड यांना पांढरेपणा. या लक्षणानीं कफजपांडुरोग जाणावा.

## दशमूलादिकाढा.

द्विपंचमूलीक्वथितंसविश्वंकफात्मकेपांडुगदेपिबेत्तत् ॥ ज्वरेतिसारेश्वयथौग्रहण्यांकासेरुचौकंठहृदामयेषु ॥

अर्थ—दशमुळें आणि सुंठ यांचा काढा कफयुक्त पांडुरोग, ज्वर, अतिसार, सूज संग्रहणी, खोकला, अरुचि, कंठरोग व हृद्रोग, यांच्या नाशार्थ प्यावा.

## नागरादियोग.

नागरंलोहचूर्णंवाकृष्णांपथ्यामयोश्मजां ॥
गुग्गुलुंवाथमूत्रेणकफपांड्वामयीनरः ॥

**अर्थ**—सुंठ आणि लोहभस्म, अथवा पिंपळी, हिरडा, आणि लोह, शिळाजीत, अथवा गुग्गुळ, गोमूत्र, इतके योग कफपांडूचे नाशक आहेत.

## लोहभस्मयोग.

अतिशुद्धमयोभस्मसर्पिःक्षौद्रयुतंलिहेत् ॥
पांडुरोगस्यनाशायकामलानांचसर्वशः ॥

**अर्थ**-अत्युत्तम लोहभस्म, मध व तूप यांचे बरोबर द्यावें; म्हणजे तो पांडुरोग व कामला यांचा नाश करील.

## मधुमंडूर.

गृहीत्वाभिषक्प्रस्थमंडूरभागंशृतेत्रैफलेमर्दयित्वाचयामं ॥ पुटेपाचयेद्यामयुग्मंकृशानौपुटानीहदेयानिचंद्राक्षिवारं ॥ तथाधेनुमूत्रेकुमारीरसेचविधेयश्चपंचामृतेयोगराजः ॥ भवेत्सिंधुनागैःपुटैःसिद्धिदोयमचिंत्यप्रभावश्चमंडूरएषः ॥ मधुमंडूरकएषकणामधुनाचिरपांडुगदंनुहेममितः ॥ जनकोरुधिरस्यनिहंतिपरंविविधार्तिहरस्त्वनुपानबलैः ॥

**अर्थ**—६४ तोळे लोहकीटाचें चूर्ण त्रिफळ्याचे काढ्यांत प्रहरभर खलून दोन प्रहर अग्निपुट द्यावें. याप्रमाणें एकवीस पुटें द्यावीं; नंतर गोमूत्र, कोरफडीचा रस, आणि पंचामृत यांच्या काढ्याची प्रत्येकीं एकवीस पुटें द्यावीं; ह्मणजे ८४ पुटांनीं सर्व सिद्धि देणारा, अचिंत्यप्रभाव, असा हा मंडूर सिद्ध होतो. आतां पचामृत ह्मणजे सुंठ, सफेद मुसळी, गुळवेल, शतावरी व गोखरु या पांच औषधांस पंचामृत असें ह्मणतात. असा सिद्ध झालेला मधुमंडूर, पिंपळी व मध, यां बरोबर साहा गुंजा सेवन केला तर पांडुरोगाचा लवकर नाश करील; आणि शरीरांत रक्त उत्पन्न करील आणखी अनुपान भेदेंकरून नानाप्रकारचे रोग दूर करील.

## मंडूरवटक.

सुराब्ददार्वीकटुपट्कताप्यंवेल्लंवराचेतिसमांशचूर्णं ॥ मंडूरभागद्वयमष्टमूत्रपक्त्वागवांतक्रसमंचदेयं ॥ कामलापांडुमेहार्शःशोफकुष्ठकफामयान् ॥ ऊरुस्तंभमजीर्णंचप्लीहानंनाशयेद्धिच ॥

अर्थ—देवदारु नागरमोथे, दारुहळद, सुंठ, मिरे, पिंपळी, चवक, चित्रक, पिंपळमूळ, सुवर्णमाक्षिक भस्म, वावडिंग व त्रिफळा हीं सर्व एक एक भाग; आणि मंडूर, भस्म दोन भाग घेऊन सर्वांचे चूर्ण एकत्र करून अष्टमूत्रांत अथवा गाईचे ताकांत घालून प्यावें. तेणेंकरून कामला, पांडुरोग, मेह, अर्श, शोफ, कुष्ठ, कफरोग, उरुस्तंभ, अजीर्ण, प्लीहा, यांचा नाश होईल. अष्टमूत्रें ह्मणजे गाय, म्हैस, शेळी, मेंढी, गाढव, घोडा, उंट व हत्ति, यांची मूत्रें होत.

## मंडूरलवण.

कृत्वाग्निवर्णमलमायसंतुमूत्रेभिषिंचेद्बहुशोगवांच ॥ तत्रैवसिंधूत्थसमंविपाच्यंनिरुद्धधूमंचविभीतकाग्नौ ॥ तक्रेणपीतंमधुनाथवापिबिभीतकाख्यंलवणंप्रयुक्तं ॥ पांडूामयिभ्योहितमेतदस्मात्पांडूामयघ्नंनहि किंचिदन्यत् ॥

अर्थ—लोखंडाचें कीट अग्निप्रमाणें लाल तापवून गोमूत्रांत विझवावें. याप्रमाणें पुष्कळ वेळा करून नंतर सैंधव आणि तें लोहकीट गोमूत्रांत खलून धूर न जाईल असें बिब्याचा अग्नीनें पचवावें. याला बिभीतकाख्यलवण असें ह्मणतात. हें ताकाबरोबर किंवा मधाबरोबर घ्यावें. पांडुरोगावर हितकारक आहे. यापेक्षा पांडुनाशक दुसरें औषध नाहीं.

## सन्निपातपांडुनिदान.

सर्वान्नसेविनःसर्वेदुष्टादोषास्त्रिदोषजं ॥
लिंगैःकुर्वंतिदोषाणांपांडुरोगंसुदारुणं ॥

अर्थ—नानाप्रकारचें अपथ्यअन्नभक्षण करणाऱ्या पुरुषाचे शरीरांत वातादिदोष कुपित होऊन पूर्वोक्त वातादिकांच्या सर्व लक्षणांनीं युक्त व अतिभयंकर अशा पांडुरोगाला उत्पन्न करितात. तो सन्निपातपांडुरोग जाणावा.

## पांडूचें असाध्य लक्षण.

ज्वरारोचकहृल्लासच्छर्दितृष्णाक्लमान्वितः ॥
पांडुरोगीत्रिभिर्दोषैस्त्याज्यःक्षीणहतेंद्रियः ॥

अर्थ—ज्वर, अरोचक, लालास्राव, ओकारी, तृष्णा व अनायासानें श्रम, यांणीं युक्त व जो अत्यंत क्षीण, आणि ज्याच्या इंद्रियांची स्वस्वविषय ग्रहणशक्ति नष्ट झाली. असा जो सन्निपातिक पांडुरोगी तो असाध्य जाणावा.

## असाध्यलक्षण.

शूनाक्षिकूटगंडभ्रूःशूनपन्नाभिमेहनः ॥ कृमिकोष्ठोतिसार्यैतमलंचा

सृक्कफान्वितं ॥ पांडुरोगश्चिरोत्पन्नःखरीभूतोनसिध्यति ॥ कालप्रकर्षाच्छूनांगोयोवापीतानिपश्यति ॥ बद्धाल्पविट्सहरितंसकफंयोतिसार्यते ॥ दीनःश्वेतातिदिग्धांगश्छर्दिमूर्छातृडर्दितः ॥

अर्थ—नेत्रगोल, गाल, भिंवई, पाय, बेंबी, आणि शिश्न यांला सूज; व कोठ्यांत कृमि होऊन रक्तकफयुक्त मळ होतो. हे लक्षण जेज्जटमतें सर्व पांडूमध्ये होतें, व इतरआचार्यमतें मृद्भक्षणजन्यपांडुरोगामध्यें मात्र हे लक्षण होतें. जो पांडु फारादिवसांवर उत्पन्न झाला व फार वाढला, व फारदिवस झाल्यामुळें सुजलेला व संपूर्ण पदार्थ पिवळे पाहातो, तो रोगी साध्य नव्हे. किंवा गांठळ, थोडा, पिंवळा व कफयुक्त असा अतिसार; व ग्लान. व फटफटीत पांढरा झाला. ओकारी, मूर्छा व ताहान याणीं पीडित पांडुरोगी बरा होत नाहीं.

## दुसरा प्रकार.

सनास्त्यसृक्क्षयादींश्चपांडुश्वेतत्वमाप्नुयात् ॥ पांडुदंतनखोयस्तुपांडुनेत्रश्चयोभवेत् ॥ पांडुसंघातदर्शीचपांडुरोगीविनश्यति ॥

अर्थ—ज्या रोग्याचें रक्त ऊर्ध्वाधरमार्गांनीं जाऊन शरीर पांढरें निस्तेज होतें; आणि दंत, नख व नेत्र हे पांढरे निस्तेज होतात; आणि तो रोगी सर्व पदार्थ पांढरे पाहातो तो असाध्य जाणावा.

## तिसरा प्रकार.

अंतेषुशूनंपरिहीनमध्यंम्लानंतथांतेषुचमध्यशूनं ॥ गुदेचशेफस्यथमुष्कयोश्चशूनंप्रताम्यंतमसंज्ञकल्पं ॥ विवर्जयेत्पांडुकिनंयशोर्थीतथातिसारज्वरपीडितंच ॥

अर्थ—ज्या पांडुरोगामध्यें रोग्याचे मध्यभागीं सूज न येतां हातपायांनां सूज आली, अथवा हातपायांना सूज नसून मध्यदेशीं सूज व ग्लानि आली; किंवा गुद, शिश्न व वृषण यानां सूज; अतिसार आणि ज्वर याणीं अत्यंत क्लेश पावणारा व मृतप्राय असा पांडुरोगी यशाची इच्छा करणाऱ्या वैद्यानें सोडावा.

## त्रिफलादिलेह.

त्रिफलायास्त्रयोभागास्त्रयस्त्रिकटुकस्यच ॥ भागश्चित्रकमूलस्यविडंगानांतथैवच ॥ पंचाश्मजतुनोभागास्तथारूप्यमलस्यच ॥ शुद्धलोहस्यरजसोभागाश्चाष्टौप्रकल्पयेत् ॥ अष्टौभागासितायास्तुतत्सर्वंमधुसंयुतं ॥ श्लक्ष्णचूर्णंसुसंस्थाप्यमायसेभाजनेशुभे ॥ उदुंबरसमांमात्रांततःखादेद्यथाग्निना ॥ दिनेदिनेप्रयोक्तव्यंजीर्णेभोज्यंयथोचितं ॥ वर्ज

पिबकुलित्थांस्तुकाकमाचीकपोतकान् ॥ पांडुरोगंविषंकासंयक्ष्माणंविषमज्वरं ॥ कुष्ठानिजठरंमेहंश्वासंशोफमरोचकं ॥ विशेषाद्व्यपस्मारंकामलांगुदजानिच ॥

अर्थ–हिरडा, बेहेडा, आवळकाठी, सुंठ, मिरीं, पिंपळी, चित्रकमूळ, वावडिंगे हीं एक भाग, व शिलाजित, रौप्यभस्म व मंडूर, हीं पांच भाग. शुद्ध लोह, सतापाचें बी हीं आठ आठ भाग. या सर्वांचें चूर्ण मध घालोन तें सर्व लोखंडाच्या भांड्यात भरून ठेऊन त्यांतून अग्निबळ पाहून एक तोळा पर्यंत प्रतिदिवशीं द्यावें. व जिरल्यावर यथायोग्य पथ्य द्यावें; परंतु कुळीथ, कावळी व कवडे हे वर्ज करावे; ह्मणजे पांडुरोग, विष, खोकला, राजयक्ष्मा, विषमज्वर, कोड, उदर, प्रमेह, दमा, सूज, अरुचि, फेपरे, कावीळ, आणि मुळव्याध, हे रोग नाश पावतात.

## फळत्रिकादिकाढा.

फलत्रिकामृतावासातिक्ताभूनिंबनिंबजः ॥
क्वाथःक्षौद्रयुतोहन्यात्पांडुरोगंसकामलं ॥

अर्थ–हिरडा, बेहेडा, आवळकाठी, गुळवेल, अडुळसा, कुटकी, किराइत व कडु लिंब याचा काढा मध घालोन प्यावा; ह्मणजे पांडुरोग व कामला यांचा नाश करील.

## पुनर्नवादिकाढा.

पुनर्नवानिंबपटोलशुंठीतिक्तामृतादार्व्यभयाकषायः ॥
सर्वांगशोफोदरपांडुरोगस्थौल्यप्रसेकोर्ध्वककामयेषु ॥

अर्थ–घेटोळी, कडुलिंब, कडु पडवळ, सुंठ, कुटकी, गुळवेल, दारुहळद व हिरडा यांचा काढा सर्वांगसूज, उदर, पांडु, स्थूलता, तोंडात नेहमी खाकेरा येणें, व कफ रोग यांचा नाशक आहे.

## वासादिकाढा.

वासामृतानिंबकिरातकट्वीकषायकोयंसमधुर्निपीतः ॥
सकामलंपांडुमथास्रपित्तंहन्याद्धलीमंचकफादिकान्गदान्

अर्थ–अडुळसा, गुळवेल, कडुनिंब, किराइत व कुटकी यांचा काढा मध व तूप घालोन द्यावा; ह्मणजे कामला, पांडुरोग, रक्तपित्त, हलीमक, आणि कफादिकव्याधी यांचा नाश करितो.

## दार्व्यादिवटक.

दार्वीत्वङ्माक्षिकोधातुर्ग्रंथिकोदेवदारुच ॥ एतांद्विपलिकान्भागान्कृत्वाचूर्णंपृथक्पृथक् ॥ मंडूरंद्विगुणंचूर्णंशुद्धमंजनसन्निभं ॥ मूत्रेचाष्ट

गुणेपक्त्वातस्मिंस्तत्प्रक्षिपेन्नरः ॥ उदुंबरसमान्कृत्वावटकांस्तान्यथाग्निच ॥ उपयुंजीततक्रेणजीर्णेसात्म्यंचभोजनं ॥ मंडूरवटकाह्येतेप्राणदाः पांडुरोगिणः ॥ कुष्ठानिप्रवरंशोथमूरुस्तंभंकफामयान् ॥ अर्शांसिकामलांमेहंप्लीहानंशमयंतिच ॥

अर्थ—दारुहळद, दालचिनी, माक्षिकभस्म, पिंपळीमूळ, देवदार, हीं आठ तोळे, व मंडूर १६ तोळे हीं सर्व एकत्र करून आठपट मुतांत पचन करावीं; नंतर त्यांतून एक तोळ्याचा वटक करून तो अग्निबल पाहून द्यावा. त्यावर जुनें आणि सोसेल असें अन्न द्यावें. हा मंडूरवटक पांडुरोग्याला प्राणदायक होतो; आणि कोड, सूज, ऊरुस्तंभ, कफरोग, मुळव्याध, कामला, मेह व प्लीहा यांतें शमवितो.

## किरातादिमंडूर.

किराततिक्तंसुरदारुदार्वीमुस्तागुडूचीकटुकापटोलं ॥ दुरालभापर्पटकंसनिंबाकटुत्रिकंवन्हिफलत्रिकंच ॥ फलंविडंगस्यसमांशकानिसर्वैःसमंचूर्णमथायसंच ॥ सर्पिर्मधुभ्यांवटिकाविधेयातत्रानुपानाद्भिषजाप्रयोज्या ॥ निहंतिपांडुंचहलीमकंचशोथंप्रमेहंग्रहणीरुजंच ॥ श्वासंचकासंचसरक्तपित्तमर्शांस्यथोर्वोर्ग्रहमामवातं ॥ व्रणांश्वगुल्मान्कफविद्रधींश्वश्वित्रंचकुष्ठंसततप्रयोगात् ॥

अर्थ—किराइत, देवदार, दारुहळद, नागरमोथा, गुळवेल, कुटकी, कडुपडवळ, धमासा, पित्तपापडा, कडुनिंब सुंट, मिरें, पिंपळी, चित्रक, हरडा, बेहेडा, आंवळकाठी व वावडिंग, हे सर्व समभाग; व लोहभस्म सर्व चूर्णाच्या समान घेऊन त्याच्या मध व तूप यांत गोळ्या कराव्या; त्या अनुपानाशीं द्याव्या, ह्मणजे पांडुरोग, हलीमक, सूज, प्रमेह, संग्रहणी, दमा, खोकला, रक्तपित्त, मुळव्याध, ऊरुग्रह, आमवात, व्रण, गुल्म, कफ, विद्रधी, आणि श्वेतकोड, यांचा नाश करितात.

## अयादिमोदक.

अयस्तिलत्र्यूषणकोलभागैःसर्वैःसमंमाक्षिकधातुचूर्णं ॥
तैर्मोदकःक्षौद्रयुतोहिभुक्तःपांड्वामयेदूरगतेपिशस्तः ॥

अर्थ—लोहभस्म, तीळ, सुंठ, मिरें, पिंपळी व बोरीचे फळाची साल हीं समभाग घेऊन यासर्वांचे बरोबरीनें माक्षिक भस्म घालोन याची गोळी करून मधाबरोबर खावी; ह्मणजे असाध्य देखील पांडुरोगी बरा होतो.

## पांडुरिरस.

रसगंधाभ्रलोहैक्यंपांडुरिःपुटितंत्रिधा ॥
कुमार्यातुचतुर्वल्लंपांडुकामलपूर्वहृत् ॥

अर्थ–पारा, गंधक अभ्रकभस्म, लोहभस्म हीं एकत्र करून त्याला कोरफडीचे रसा च्या तीन भावना द्याव्या; ह्मणजे हा पांडुरिरस होतो, तो चार वाल प्रमाणे सेवन केला असतां; कामला व पांडु यांचा नाश करितो.

## पुनर्नवादिवटक.

पुनर्नवात्रिवृद्व्योषविडंगंदारुचित्रकं ॥ कुष्ठंहरिद्रेत्रिफलादंतीचव्यंक लिंगकं ॥ कटुकापिप्पलीमूलंमुस्तंशृंगीचकारवी ॥ यवानीकट्फ लंचेतिपृथक्पलमितंमतं ॥ मंडूरंद्विगुणंचूर्णंगोमुत्रेऽष्टगुणेपचेत् ॥ गु डवद्वटकान्कृत्वातक्रेणालोडयतान्पिबेत् ॥ पुनर्नवादिमंडूरवटोऽश्वि भ्यांविनिर्मितः ॥ पांडुरोगंपुराणंचकामलांचहलीमकं ॥ श्वासंका संचयक्ष्माणंज्वरंशोथंतथोदरं ॥ शूलप्लीहप्रदध्मानमर्शांसिग्रहणींकृ मीन् ॥ वातरक्तंचकुष्टंचसेवनान्नाशयेद्ध्रुवं ॥

अर्थ–पुनर्नवा, तेंड, सुंठ, मिरें, पिंपळी, वावडिंग, देवदार, चित्रक, कोष्ठ, हळद, दारुहळद, हरडा, बेहेडा, आवळकाठी, दांतीमूळ, चवक, कुडयाच्या बिया, कुटकी, पिंपळमूळ, नागरमोथा, कांकडशिंगी, बडीशेप, ओवा, कायफळ, हीं प्रत्येकीं ४ तोळे आणि मंडूर ८ तोळे, एकत्र करून आठपट गोमूत्रांत पचन करावी; गुळास रिखा पाक झाला; ह्मणजे त्याच्या गोळ्या कराव्या. त्या ताकाशीं द्याव्या. हा पुनर्नवादिमंडूर अश्विनी कुमारांनीं जुनाट पांडुरोग, हलीमक, श्वास, कास, क्षय, ज्वर, सूज, उदर, शूळ, प्लीहो- दर, आध्मान, मुळव्याध, संग्रहणी, कृमि, वातरक्त व कोड यांच्या नाशाविषयीं उत्पन्न केला, याच्या सेवनानें पूर्वोक्त व्याधि नाश पावतात.

## लोहासव पांडुरोगादिकांवर.

लोहचूर्णंत्रिकटुकंत्रिफलांचयवानिकां ॥ विडंगमुस्तकंचित्रंचतुःसं ख्यापलंपृथक् ॥ धातकीकुसुमानांतुप्रक्षिपेत्पलविंशतिः ॥ चूर्णीकृ त्वाततःक्षौद्रंचतुःषष्टिपलंक्षिपेत् ॥ दद्यात्गुडंतुलांतत्रजलद्रोणद्वयंत था ॥ घृतभांडेविनिःक्षिप्यनिदध्यान्मासमात्रकं॥ लोहासवममुंमर्त्यः

पिबेदग्निकरंपरं ॥ पांडुश्वयथुगुल्मानिजठराण्यर्शसांरुजं ॥ कुष्ठंप्लीहामयंकंडूकासंश्वासंभगंदरं ॥ अरोचकंचग्रहणींहृद्रोगंचविनाशयेत् ॥

अर्थ–लोहभस्म, सुंठ, मिऱ्यें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकाठी, अजमोदा, वावडिंग, नागरमोथे व चित्रक हीं अकरा औषधें चार चार पळें व धायटीफुलें वीसपळें घेऊन साऱ्याचें चूर्ण करून चौसष्ट पळ मध व एक तुला गुळ एकाजागी करून त्यांत तें चूर्ण टाकून दोन द्रोण पाणी त्यांत मेळवून तीं सारीं तुपाच राबल्या मडक्यांत घालून त्याचे तोंडाला मुद्रा देऊन एक मास पर्यंत ठेऊन नंतर मुद्रा काढावी; याला लोहासव ह्मणतात, हा आसव पोटांत घ्यावा. तेणेंकरून जठराग्नि प्रदीप्त होतो, व पांडुरोग, सूज, पोटांत गुल्मे होतात तीं, मुळव्याध, कुष्ठ, पोटांत डावेकडे कवळूरोग होतो तो, कंडु, श्वास, खोकला, भगंदर, आंवढणें, संग्रहणी व हृद्रोग हे दूर होतात.

## गोमूत्रलोह.

सप्तरात्रंगवांमूत्रेभावितंचायसोरजः ॥
पांडुरोगप्रशांत्यर्थंपयसाप्रपिबेन्नरः ॥

अर्थ–गोमूत्रांत सप्तरात्र लोह भिजत घालून ठेवावा; आणि तो दुधाशीं पांडुरोगावर द्यावा.

## गोमूत्रसिद्धमंडूर.

गोमूत्रसिद्धमंडूरचूर्णंसगुडामिश्रितं ॥
पांडुरोगःक्षयंयातिपक्तिशूलंचदारुणं ॥

अर्थ–मंडूर गोमूत्रांत पचन करून तो गुळाशीं द्यावा; ह्मणजे पांडुरोग आणि पक्तिशूल हे नाश पावतात.

## नवायसादिचूर्ण पांडुरोगादिकांवर.

चित्रकंत्रिफलामुस्तंविडंगंत्र्यूषणानिच ॥ समभागानिकार्याणि नवभागाहतायसः ॥ एतदेकीकृतंचूर्णंमधुसर्पिर्युतंलिहेत् ॥ गोमूत्रमथवातक्रमनुपानेप्रशस्यते ॥ पांडुरोगंजयत्युग्रंत्रिदोषं चभगंदरं ॥ शोथकुष्ठोदरार्शांसिमंदाग्निमरुचिंकृमीन् ॥

अर्थ–चित्रक, हिरडा, बेहडा, आवळकाठी, नागरमोथे, वावडिंग, सुंठ, मिऱ्यें व पिंपळी हीं नऊ औषधें समभाग घेऊन चूर्ण करून त्याचे समभाग लोहभस्म घेऊन चूर्णांत मिळवावें. मग तें चूर्ण मध व तूप एकाजागीं करून त्यांत घ्यावें; अथवा गोमूत्रांत किंवा गाईच ताकांत घ्यावें. तेणेंकरून मोठा उग्र असा पांडुरोग दूर होतो; व त्रिदोष, भगंदर, सूज, कुष्ठ, उदररोग, मूळव्याध, अग्निमांद्य व जंतविकार हे नष्ट होतात.

## दुसरें नवायसचूर्ण.

त्र्यूषणंत्रिफलामुस्ताविडंगंचित्रकंसमं ॥ नवायोरजसोभागास्तच्चूर्णंमधुसर्पिषा ॥ भक्षयेत्पांडुहृद्रोगकुष्ठार्शःकामलापहं ॥ गोमूत्रेणपिबेद्वातपांडुरोगंचनाशयेत् ॥ शोथहृद्रोगमुदरंक्रमिकुष्ठंभगंदरं ॥ नाशयेदग्निमांद्यंचदुर्नामकमरोचकं ॥ आर्द्रकस्यरसेनापिलिह्यात्कफसमृद्धिमान् ॥ गुंजामेकांसमारभ्ययावत्स्युर्नवरक्तिकाः ॥ तावल्लोहंसमश्नीयाद्यथादोषबलंनरः ॥ नवायसमिदंचूर्णनरोष्टादशरक्तिकाः ॥ प्रलिह्यान्मधुसर्पिर्भ्यांपिबेत्तक्रेणवासह ॥

अर्थ–संठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहेडा, आवळकाठी, नागरमोथा, वावडिंग, चित्रक, हे समभाग; आणि लोह ९ भाग एकत्र करून त्यांतून मध व तूप यांशीं पांडुरोग, हृद्रोग, कोड, मूळव्याध, कावीळ; यांवर द्यावें. हें गोमूत्राशीं द्यावें; ह्मणजे वातपांडु, सूज, हृद्रोग, उदर, कृमि, कुष्ट, भगंदर, अग्निमांद्य, मूळव्याध व अरुचि हे रोग नाश पावतात, व आल्याच्या रसाशीं द्यावें; ह्मणजे कफ नाश पावतो, हें चूर्ण एकगुंजेपासून नऊ गुंजा पर्यंत द्यावें; किंवा अठरा गुंजापर्यंत मध व तूप, किंवा ताक यांशीं द्यावें.

## लोहादिचूर्ण जीर्णपांडुवर.

लोहंकटुत्रिकंकोलंतिलंवाचूर्णसमंकीलमाक्षिकयुक्तं ॥
क्षौद्रयुतंचमतक्रमेवहिजीर्णतरेखिलपांडुगदेपि ॥

अर्थ–लोहभस्म. संठ, मिरीं, पिंपळी, कंकोळ, तिळ, माक्षिकभस्म यांचें चूर्ण १ तोळा मध, किंवा ताक यांशीं द्यावें; ह्मणजे फार दिवसांचा पांडुरोग नाश पावतो.

## शिलाजितादियोग.

शिलाजतुक्षौद्रविडंगसर्पिर्लोहोभयाशर्करयासमक्षं ॥
आपूर्यतेदुर्बलदेहधारीत्रिपंचरात्रेणयथाशशांकः ॥

अर्थ–शिलाजित, मध, वावडिंग, तूप, हरीतकी, आणि साकर यांचीं समभाग चूर्णें करून द्यावीं; ह्मणजे पंधरा दिवसांत देह बलवान् होतो. जसा चंद्र पूर्ण होतो तसा.

## मंडूरवज्रवटक.

पंचकोलंसमरिचंदेवदारुफलत्रिकं ॥ विडंगमुस्तायुक्ताश्चभागास्त्रिफलसंमिताः ॥ यावंत्येतानिचूर्णानिमंडूरंद्विगुणंततः ॥ पक्त्वाष्टगुणितेमूत्रेतद्घनीभूतमुद्धरेत् ॥ ततोक्षमात्रान्वटकान्पिबेत्तक्रेणतक्रभुक् ॥

पांडुरोगंजयेत्तद्वन्मंदाग्निंत्वमरोचकं ॥ मंडूरवज्रवटकोरोगानीकप्रभेदनः ॥ अर्शांसिग्रहणीशोफमुरुस्तंभंहलीमकं ॥ कृमिप्लीहानमुदरंगलरोगंचनाशयेत् ॥

अर्थ–पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, मिरीं, देवदार, हरडा, बेहेडा, आवळकाठी, वावडिंग व नागरमोथे हीं सर्व समभाग व मंडूर सर्वांच्या दुप्पट घेऊन सर्वांच्या आठपट गोमूत्र घालून पचन करून दाट झाल्यावर त्यांतून हा मंडूरवटक १ तोळा घेऊन ताकाशीं द्यावा; व ताक भात पथ्यास द्यावा; ह्मणजे पांडुरोग, अग्निमांद्य, अरुचि मुळव्याध, संग्रहणी, सूज, उरुस्तंभ, हलीमक, कृमि, प्लीहा, उदर, गळरोग, आणि अनेकरोग, यांचा नाश करितो.

## हंसमंडूर.

मंडूरंचूर्णयेत्श्लक्ष्णंगोमूत्रेष्टगुणेपचेत् ॥ पंचकोलंदेवदारुमुस्तव्योषफलत्रयं ॥ विडंगंस्यात्प्रतिपलंपाकांतेचूर्णितंक्षिपेत् ॥ भक्षयेत्कर्षमात्रं चतक्रेतक्रंचभोजने ॥ पांडुंशोफंहलीमंचउरुस्तंभंचकामलां ॥ अर्शांसि हंतिनोचित्रंहंसमंडूरउच्यते ॥

अर्थ–मंडुरामध्यें आठपट गोमूत्र घालून त्याला पचन करावा. दाट झाल्यावर त्यांत पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, देवदार, नागरमोथे, सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहेडा, आवळकाठी व वावडिंग या प्रत्येकाचें चार तोळे चूर्ण घालून त्याचा १तोळयाचा वटक करावा, तो ताकांतून द्यावा, व पथ्याला ताकभात घालावा; ह्मणजे पांडुरोग, सूज, हलीमक, उरुस्तंभ, कावीळ, आणि अर्श, यांचा नाश करितो. याला हंसमंडूर ह्मणतात.

## सिद्धमंडूर.

मंडूरस्यपलान्यष्टौगोमूत्रेष्टगुणेपचेत् ॥ पुनर्नवात्रिवृत्शूपंविडंगंदेवदारुकं ॥ द्विनिशापुष्करंवन्हिर्दंतीचव्यंफलत्रिकं ॥ कुटजस्यफलंतिक्ता पिप्पलीमूलमुस्तकं ॥ विपंचप्रतिकर्षस्यचूर्णंकृत्वविमिश्रयेत् ॥ मंडूरस्यचपाकांतेअक्षमात्रंवटीकृतं ॥ पांडुशोफोदरानाहशूलसत्कृमिगुल्मनुत् ॥ इत्येवंसिद्धमंडूरःसर्वरोगविनाशकृत् ॥

अर्थ–मंडूर ३२ तोळे आणि गोमूत्र २५६ तोळे एकत्र करून पचन करावें. दाट झाल्यावर त्यांत पुनर्नवा, निशोतर, सुंठ, मिरीं, पिंपळी, वावडिंग, देवदारु, हळद, दारुहळद, पुष्करमूळ, चित्रक, दंतिमूळ, चवक, हरडा, बेहेडा, आवळकाठी, इंद्रजव,

कुटकी, पिंपळीचें मूळ, नागरमोथे, अतिविष यां प्रत्येकाचें, तोळा चूर्ण घालोन मिळवावें. पाक झाला, ह्मणजे १ तोळ्याच्या वड्या बांधाव्या. हा सिद्धमंडूरवटक पांडुराग, सूज, उदर, आनाह, शूल, कृमि, आणि गुल्म व सर्वरोग यांचा नाश करितो.

## अमृतहरीतकी.

शतावरीभृंगराजपुनर्नवकुरंटकैः ॥ प्रतिसप्तपलंचूर्णंजलेक्वाथ्यचतुर्गुणे ॥ पादशेषंकषायंतुवस्त्रपूतंसमाहरेत् ॥ हरीतकीपलंतस्मिन्षष्ट्याधिकशतत्रयं ॥ पाचयेद्विधिवच्चैवत्रिंशद्दुग्धपलंपचेत् ॥ भित्वानिवारयेदंडंतद्गर्भेसर्वमौषधं ॥ षट्पलंरसगंधौचशुद्धेपात्रेक्षणंपचेत् ॥ उत्तार्यचालयेत्तावद्यावत्कठिणतांव्रजेत् ॥ चूर्णयित्वामृतासत्वंपलंसप्तविमिश्रयेत् ॥ मधुनावटिकाकार्याषष्ट्याधिकशतत्रयं ॥ एकैकाह्यभयागर्भेक्षिप्त्वासूत्रेणबंधयेत् ॥ मधुभांडेक्षिपेत्पश्चादेकैकांभक्षयेद्दिनं ॥ शुष्कपांडुहरंसम्यगमृतायाहरीतकी ॥

**अर्थ**–शतावरी, माका, पुनर्नवा व कोरांटा या प्रत्येकाचें २८ तोळे चूर्ण घेऊन चतुर्गुण पाण्यात चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा, त्यांत हरीतकी १४४० तोळे घालोन त्यांत १२० तोळे दूध घालोन त्या शिजवाव्या. नंतर त्याफोडून त्याची आंठी काढून टाकावी; आणि पारा २४ तोळे, गंधक २४ तोळे पात्रांत क्षणमात्र पचन करावे, ते घट्ट झाले ह्मणजे; त्याचें चूर्ण करून त्यांत गुळवेलीचें सत्व २८ तोळे मिसळून मधांत ३६० गोळ्या कराव्या. त्या पूर्वी आंठी काढून टाकलेल्या हरीतकीत भरून सुतानें बांधून त्या मधाच्या भांड्यांत घालोन ठेवाव्या. त्यांतून दररोज एक खात जावी; ह्मणजे ही अमृतहरीतकी शुष्कपांडूचा नाश करिते.

## पंचकोलघृत.

पंचकोलंयवाग्रंचक्षीरंदध्नाघृतंपुनः ॥ समांशेनतुयोज्यानिभार्गीकुष्ठंचपौष्करं ॥ शतंतत्रहरीतक्याजलेनैवचतुर्गुणं ॥ क्वाथंचैकत्रयोज्यांतेक्वाथयेन्मृदुवन्हिना ॥ मृदुपाकघृतंसिद्धंपानेनस्येचबस्तिषु ॥ गुणाधिक्यंभवेन्नृणांपांडुरोगेहलीमके ॥ क्षयेचराजयक्ष्मेचशस्तमुक्तंभिषग्वरैः

**अर्थ**–पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, यवांची कुसें, दूध, दहिं, तूप, भारंगमूळ, कोष्ठ, पुष्करमूळ हे समभाग ;आणि ३०० बाळहर्डया यांचा काढ्यांत तूप मंदाग्नीवर सिद्ध करावें, तें पान, नस्य, आणि बस्ति, यांच्याविषयीं योजावें, हें मनुष्यांला उत्तम गुणकारक आहे. हें पांडुरोग, हलीमक, क्षय व राजयक्ष्म, यांवर देण्यास प्रशस्त आहे.

नर्नवोत्थैः ॥ पृथगग्निकृतं घनं विपाच्यं गुटिकागुंजमितानिजानुपा नैः ॥ ज्वरपांडुतृषास्रपित्तगुल्मक्षयकासस्वरभंगमंदमूर्छाः ॥ पवनादिपुदुस्तराष्टरोगानुमकलंपित्तहरंनदावृतंच ॥ बहुनाकिमसौयथार्थनामास्यकालव्याधिहरोमदेभसिंहः ॥

अर्थ—पारा, गंधक, हरडा, बेहडा, आवळकाठी, ताम्र, शंख, लवंग, अभ्रक, कांत, तिखें व मुंडलोह, यांचीं भस्में; व हिंगुळ व टाकणखार, हे समभाग; व या सर्वांच्या तिप्पट मंडूर, हीं सर्व गोमूत्रांत शोधून नंतर भाजून काढावीं; आणि हरडा, बेहडा, आवळकाठी, माका व आलें यांच्या रसांत खलून सुकवावें; नंतर त्रिफला, गुडुची व कांटेशेवती यांच्या आठ आठ रसांच्या भावना देऊन त्याला पुनर्नव्याचा स्वरस घालोन दाट होईपर्यंत पचन करून एक गुंजेची गोळी करून ती रोगानुमानाने द्यावी; ह्मणजे ज्वर, पांडु, तृषा, रक्तपित्त, गुल्मक्षय, कास, स्वरभंग, अग्निमांद्य, मूर्छा, वातव्याधि, आठ असाध्यव्याधि, पित्तव्याधि, यांचा नाश करितो. हा संपूर्णव्याधिगजनाशनाविषयीं सिंहासारिखा आहे.

## त्रैलोक्यनाथरस.

पलानिचत्वारिरसस्यपंचगंधस्यसत्वस्यगुडूचिकायाः ॥ व्योषस्यचूर्णस्यसतालमूलामुशालमल्यैहपलत्रयंस्यात् ॥ पृथक्पृथक्षड्गगनस्यचाष्टौलोहस्यसर्वंत्रिफलाजलेन ॥ घृष्टंचतुःषष्टिमितंतदर्धाःस्युर्भावनायार्द्रकजद्रवस्य ॥ द्विसूत्थनीरेणचषोडशाष्टौतथानलोत्थागृहकन्यकायाः ॥ आर्द्रद्रवस्येतिरसोयमुक्तोपांडुक्षयश्वासगदार्तिहर्ता ॥ क्षौद्रेणवैशर्करयाघृतेनकर्षार्धमेनस्यभजेत्प्रयत्नात् ॥

अर्थ—पारा १६ तोळे, गंधक २० तोळे व गुळवेलीचें सत्व, सुंठ, मिरीं, पिंपळी, तालमुळी व सांवरीचा चीक हीं प्रत्येकीं १२ तोळे, अभ्रक २४ तोळे, लोह ३२ तोळे, हीं संपूर्ण एकत्र करून त्यांस त्रिफळाच्या काढ्याच्या ६४ भावना, आल्याच्या रसाच्या ३२, शतावरीच्या रसाच्या १६, चित्रकरसाच्या ८, कुमारकांड्याच्या ८, आल्याच्या रसाच्या ८ या प्रमाणें भावना देऊन त्यांतून मध, साकर व तूप, यांशीं ६ मासे द्यावा; ह्मणजे पांडु, क्षय व श्वास यांचा नाश करितो.

## उदयभास्कर.

भागैकंरसगंधकंद्विगुणितंशुल्बंचभागाष्टकंशैलेयास्त्रयतालकद्वयमिदंशुद्धंचखल्वेकृतं ॥ मर्द्यंव्योषजवेदभागसहितंभागद्वयंचामृतंनिर्गु

इद्यार्द्रकभृंगराजसहितंभाव्यंजयंतीरसैः ॥ प्रत्येकंदिनसप्तकंतुसुदृढं शोष्यंचसूर्यातपेयोज्यंगुंजमितंरसार्द्रसाहितंव्योषेणसंमिश्रितं ॥ पांडूकामलरोगशोफदहनंसन्नेत्रिदोषेज्वरेमेहप्लीहजलोदरंग्रहणिकाकुष्ठं धनुर्वातजं ॥ पथ्यंषष्टिकतंदुलेनवनितंतक्रंचशाल्योदनंदेयंचोदयभास्करःक्षितितलेसर्वांधकारान्जयेत् ॥

अर्थ—पारा १, गंधक २, ताम्र ८, शिलाजित ३, हरताळ २, त्रिकटु ४, व बचनाग २ भाग, हीं सर्व एकत्र करून त्यांला निर्गुड, आलें, माका, आणि टांकळा, या प्रत्येकांच्या रसांत सात सात दिवस मर्दन करावें; आणि उन्हांत सुकवावें. त्यांतून एक गुंज आल्याचा रस व त्रिकटु यांतून द्यावें; ह्मणजे पांडुरोग, कावीळ, सूज, अग्निमांद्य, त्रिदोषजज्वर, मेह, प्लीहा, जलोदर, संग्रहणी, कोड, धनर्वात, यांचा नाश करील. यावर पथ्याला साठकीच्या तांदळांचा भात, ताक आणि शाल्योदन द्यावें. हा उदयभास्कर संपूर्ण रोगरूप अंधकाराचा नाश करितो.

## कामेश्वररस.

पलंसूतंपलंगंधंवन्हिपथ्यात्रयंत्रयं ॥ मुस्तैलापत्रकानांचमितंचार्धपलंपलं ॥ त्र्यूषणंपिप्पलीमूलंविषंचैवपलंपलं ॥ नागकेसरकपैंकरेणुकार्धपलंतथा ॥ पुरातनगुडेनैवतुलार्धेनप्रपाचयेत् ॥ मर्दयेच्चार्द्रकद्रावैर्यामैकंतद्घृतेनच ॥ गुटिकाबदराकाराकारयेद्भक्षयेत्सदा ॥ शोफपांडुहरःसोयंरसःकामेश्वराह्वयं ॥

अर्थ—पारा व गंधक चार भाग, चित्रक व हरीतकी बारा भाग, नागरमोथे, एलची व पत्रज दोन दोन भाग, आणि त्रिकटु, पिंपळीमूळ व बचनाग चार चार भाग, नागकेसर १ व रेणुकबीज २, याप्रमाणें तोळेवार एकत्र करून जुना गूळ २०० तोळे घेऊन त्यांत पचन करून आल्याच्या रसांत १ प्रहर व गाईच्या तुपांत १ प्रहर मर्दन करून त्याची बोराएवढी गोळीकरून द्यावी. ती सूज व पांडुरोग, यांचा नाश करित्ये; हिला कामेश्वर रस ह्मणतात.

## कालविध्वंसकरस.

शुद्धसूतंहेमतारंताम्रंतुल्यंविमर्दयेत् ॥ जंबीरनीरसंयुक्तमातपेशोषयेद्दिनं ॥ सर्वतुल्यंपुनःसूतंक्षिप्त्वापिष्टिंप्रकल्पयेत् ॥ आदायबंधयेद्वस्त्रे इष्टिकायंत्रगंपचेत् ॥ जंबीरैर्गंधकंपिष्ट्वाअधश्चोर्ध्वंचदापयेत् ॥ तुल्यंतुल्यंपुनर्देयंरुध्वालघुपुटेपचेत् ॥ षड्गुणेगंधकेजीर्णेतदुद्धृत्याविचूर्ण

येत् ॥ लोहभस्मसमांशंचदत्वामर्द्यंद्रवैर्दिनं ॥ कंटकार्याबृहत्याचत थाग्निधमनद्रवैः ॥ प्रतिद्रावैर्दिनंमर्द्यंपचेत्पंचभिरुत्पलैः ॥ एवंगजपुटं देयंद्रवद्रावैस्त्रिधात्रिधा ॥ वन्ह्यर्कचिरबिल्वानांद्रावैर्द्वाभ्यांपुटेपचेत् ॥ अंधमूषागतंपाच्यमादायाचूर्णयेत्पुनः ॥ दशांशेनविषंयोज्यंगुंजामा त्रंप्रयोजयेत् ॥ कालविध्वंसकोनामरसःपांडुगदापहः ॥

अर्थ–शुद्ध पारा, सुवर्ण, रुपें व ताम्र हीं समभाग घेऊन जंबीरलिंबाच्या रसांत घालू-न खलून उन्हांत ठेऊन सुकवावीं; आणि या सर्वांच्या समभाग पुनः पारा घालून त्याची कज्जली करावी; आणि वस्त्रांत पोटळी बांधावी; नंतर जंबीराच्या रसांत गंधक घोटून तो त्या पोटलीच्या समभाग वर खालीं देऊन इष्टिकेंत पचन करावें. याप्रमाणें समान गंधक देऊन षड्गुण गंधकजारण करावें; नंतर काढून चूर्ण करून त्याच समान लोहभस्म घालून रिंगणी, डोरली व कडानिंब यांच्या रसांत एकेक दिवस खलून पांच गोवऱ्यांचें पुट द्यावें; या प्रमाणें प्रत्येकांची तीन तीन अशीं नऊ पुटें झाल्यावर चित्रक, रुई व करंज यांच्या दोन दोन भावना द्याव्या; व प्रतिभावनेला अंधमूषेंत ठेऊन पचवावा. नंतर चूर्ण करून दशमांश बचनाग मिळवून त्यांतून गुंजामात्र द्यावा; ह्मणजे हा कालविध्वंसक रस पांडुरोगाचा नाश करितो.

## पांडुरि.

रसगंधकलोहैकंपांडुरिःपुटितस्त्रिधा ॥
कुमार्याक्तश्चतुर्वल्लःपांडुकामलपूर्वनुत् ॥

अर्थ–पारा, गंधक व लोह हीं समभाग घेऊन त्यांस कुमारीच्या रसाच्या तीन भावना देऊन प्रतिभावनेस गजपुट द्यावें; त्यांतून हा पांडुरिरस चार वाल द्यावा; ह्मणजे पांडुरोग व कामला यांचा नाश करितो.

## पांडुसूदन.

रसंगंधंमृतंताम्रंजयपालंचगुग्गुलुं ॥ समांशमाज्यसंयुक्तंगुटि कांकारयेन्मितां ॥ एकैकांप्रददेद्वैद्यःशोथपांडुपनुत्तये ॥ शीत लंचजलंचाम्लंवर्जयेत्पांडुसूदने ॥

अर्थ–पारा, गंधक, ताम्रभस्म, जेपाळ व गुग्गुळ हे समभाग घेऊन त्यांची तुपांत गोळी करावी, ती एकेक अग्निबलपाहून द्यावी; ह्मणजे सूज, पांडुरोग. यांचा नाश करिते. हीवर थंडपाणी व आंबट रस हे वर्ज करावें. हिला पांडुसूदन ह्मणतात.

## वंगेश्वर.

वंगमृतकयोःकृत्वासारणांकन्यकाद्रवैः ॥ संमर्द्यवटिकाःकृ

त्वापाचयेत्काचभाजने ॥ यावच्चंद्रनिभःशुभ्रोवंगेश्वरसमोगु
णैः ॥ पांडुप्रमेहदौर्बल्यकामलांतकनाशनः ॥

अर्थ—कथोल व पारा हे एकत्र मिळवून कारफळाच्या रसांत खलून काचेच्या भांड्यांत पचन करावें; ह्मणजे चंद्रासारिखा शुभ्र व गुणानीं वंगेश्वरासारिखा; आणि पांडुरोग, प्रमेह, दुबलता व कावीळ यांचा नाश करणारा असा दुसरा वंगेश्वरच होतो.

## पांडुनिग्रहरस.

अभ्रभस्मरसभस्मगंधकंलोहभस्मसुमलीविमर्दितं ॥ शाल्मलीरसततो
गुडूचिकाक्वाथकेश्वपरिमर्दितंदिनं ॥ भावयेत्त्रिफलयार्द्रकन्यकावान्हि
शिग्रुजरसैश्चसप्तधा ॥ जायतेहिभवरोगिवर्जनंशोथपांडुनिवृत्तिदाय
कं ॥ वल्लयुग्मपरिमाणतस्त्विमंलेहयेद्घृतमाक्षिकान्वितं ॥ पथ्यमत्रप
रिभाषितंपुरात्तद्वियत्परिवर्जयेद्धितं ॥ शोथपांडुविनिवृत्तिदायकःनिषि
तस्तुयवचिंचिकाद्रवैः ॥ नागराग्निजयपालकैस्तुवावर्ज्यदुग्धपरिपक्व
सर्पिषा ॥ तक्रभक्तमिहभोजयेदतिस्निग्धमन्नमतिनूतनंत्यजेत् ॥

अर्थ—अभ्रकभस्म, पारदभस्म, गंधक, लोहभस्म आणि मुसळीचे चूर्ण हीं समभाग एकत्र करून त्याला सांवरीच्या रसांत व गुळवेलीचा काढा यांत एकेक दिवस खलून नंतर त्रिफळयाचा काढा, आलें, कुमारी, चित्रक, शेवग्याचा रस, यांच्या सात भावना द्याव्या; ह्मणजे तो पांडुनिग्रह रस होतो. हा दोन वाल मध व तूप यांशी द्यावा; ह्मणजे सूज व पांडुरोग यांचा नाश करितो. यावर यव, चिंच, सुंठ, चित्रक, जेपाळ, आणि दूध तापवून त्यांत तूप घालून तें, अतिस्निग्धान्न, आणि अति नूतनान्न, हें वर्ज करावें. पथ्याला ताकभात द्यावा.

## अनिलरस.

ताम्रभस्मरसभस्मगंधकंवत्सनाभमपितुल्यभागिकं ॥ वन्हितो
यपरिमर्दितंपचेद्यामपादमथमंदवन्हिना ॥ रक्तिकायुगलमा
नतोनिलःशोथपांडुघनपंकशोषिता ॥

अर्थ—ताम्रभस्म, पारदभस्म, गंधक व बचनाग हे समभाग घेऊन ते चित्रकाच्या रसांत मंदाग्नीवर दोन घटिका घोटून दोन गुंजांची गोळी करून द्यावी; ह्मणजे हा अनिलरस सूज व पांडुरोग या चिखलाला शोषून टाकितो.

## लोहसुंदर.

सूतभस्ममृतलोहगंधकैर्भागवर्धितमिदंविनिक्षिपेत् ॥ दीर्घनालदृढ

कूपिकोदरेमृत्स्नयाचपरिवेष्टितांक्षिपेत् ॥ चुल्लिकोपरिसुकूपिकामुखे प्रक्षिपेच्चवरशाल्मलिद्रवं ॥ त्रैफलंवसुगुडूचिकारसंपाचयेच्चमृदुवन्हिनादिनं ॥ स्वांगशीतलमिदंप्रगृह्यचत्र्यूषणार्द्रकरसेनभावयेत् ॥ लोहसुंदररसोयमीरितःशुष्कपांडुविनिवृत्तिदःपरः ॥

अर्थ—पारदभस्म १, लोहभस्म २ व गंधक ३ याप्रमाणें भाग मिळवून काचेच्या कुपींत भरून चुलीवर वालुकायंत्रांत एक दिवस मंदाग्नीनें पचन करावा. चुलीवर कुपी असतांच तींत सांवरीचा रस, त्रिफळ्याचा काढा, वसूचा काढा व गुळवेलीचा रस, हे घालावे. पचन होऊन तयार झाल्यावर स्वांगशीत उतरून त्याला त्रिकटु व आल्याचा रस यांची भावना द्यावी, हा लोहसुंदररस शुष्कपांडूचा नाश करितो.

## चंदनादितैल.

चंदनंसरलंदारुयष्ट्यैलावालकंसठी ॥ नखशैलेयकंपद्मत्वापद्मकंघनकंसर ॥ कंकालकमुरामासीशैलयद्बहरातकी ॥ त्वगूरेणुकाकिरातचसारिवातिक्ताकागरु ॥ नलिकावालकंद्राक्षाकषायंसुपरिशृतं ॥ तैलमस्तुनथालाक्षारसेनसमभागिकं ॥ मंदाग्नौपाचयेत्तैलंसिद्धंपानेपुवस्तिषु ॥ नस्येचाभ्यंजनेचैवयोजयेच्चभिषग्वरः ॥ हंतिपांडुंक्षयंकासंग्रहघ्नंबलवर्णकृत् ॥ मंदज्वरमपस्मारंकुष्ठपामाहरंपुनः ॥ करोतिबलपुष्ट्यौजोमेधाप्रज्ञाविवर्धनं ॥ रूपसौभाग्यदंप्रोक्तंसर्वभूतवशीकरं ॥

अर्थ—चंदन, सरला, देवदार, दारुहळद, ज्येष्ठमध, एलची, वाळा, कचोरा, नखला, शिलाजित, पद्मकाष्ठ, नागरमोथे, नाकेशर, कंकोळ, मोरवेल, मांसी, शिलाजित, दगडफूल, बाळहरडी, दालचिनी, रेणुकबीज, किराइत, उपरसाळ, कुटकी, कृष्णागरु, उतरिणी, वाळा व द्राक्षें यांचा काढा करून त्यांत तेल, ताकाची निवळी व लाखेचें शिरें, हीं समभाग, घालून मंदाग्नीवर तेल सिद्ध करावें, तें प्राशन, बस्तिकर्म, नस्य व आंगास लावणें यांविषयीं योजावें; म्हणजे पांडुरोग, क्षय, खोकला, ग्रहबाधा, मंदज्वर, अपस्मार, कोड व खरूज यांचा नाश करितें; आणि बळ, वर्ण, पुष्टि, तेज, बुद्धि, स्मृति, रूप, सौभाग्य, आणि सर्वभूतवशीकरण यांस करितें.

## मृत्तिकाभक्षणजपांडुनिदान.

मृत्तिकादनशीलस्यकुप्यत्यन्यतमोमलः ॥ कषयामारुतंपित्तमूषरामधुराकफं ॥ कोपयेन्मृद्रसादींश्चरौक्षाद्रक्तंचरूक्षयेत् ॥ पूरयत्यविपक्वैवश्रोतांसिनिरुणध्द्यपि ॥ इंद्रियाणांबलंहत्वाते

जोवीर्यौजसितथा ॥ पांडुरोगंकरोत्याशुबलवर्णाग्निनाशनं ॥

**अर्थ**–मृत्तिकाभक्षण करणाराचे शरीरांत वातादिकांतून कोणता येखादा दोष कुपित होतो. असाकीं; तुरट मृत्तिकेच्या भक्षणानें वायु; क्षारमृत्तिकेच्या भक्षणानें पित्त; आणि मधुर मृत्तिकेच्या भक्षणानें कफ कुपित होतो; आणि ती मृत्तिका रसादि सप्तधातूंला दूषित करते; आणि आपल्या रुक्ष स्वभावानें जें जें भक्षावें त्यातें रुक्ष करितें; आणि ती मृत्तिका कोष्ठाश्रित होऊन जठराग्निनें पक्क न होतां रस वाहिनीशिरांमध्यें शिरून त्याला रोवित्यें, त्यांच्या प्रवाह होउं देत नाहीं; नंतर इंद्रियांची स्वस्वविषयग्राहकशक्ति, कांति, शरीरशक्ति व ओजस, ह्मणजे सर्व तेज यातें नष्ट करून शरीरसामर्थ्य, वर्ण व जठराग्नि यांचा नाश करणारा अशा पांडूला त्वरित उत्पन्न करित्ये.

## केशरादिकाढा.

तद्वत्केसरयष्ट्याव्हपिप्पलीसुरसाव्हयैः ॥
मृद्रूपणायतल्लोल्यैवितरेद्भावितांमृदं ॥

**अर्थ**–नागकेशर, जेष्टीमध, पिंपळी व निशोत्तर यांचा काढा करून त्याच्या भावना मातीला द्याव्या; नंतर ती मातीखाणारास द्यावी; ह्मणजे खाल्लेली माती पडून विकार दूर होतो.

## घृत.

व्योषबिल्वद्विरजनीत्रिफलाद्विपुनर्नवा ॥ मुस्ताचायोरजःपा
ठाविडंगंदेवदारुच ॥ वृश्चिकालीचभार्गीचसक्षीरैस्तैर्घृतंशृतं ॥
सर्वान्प्रशमयत्याशुविकारान्मृत्तिकाकृतान् ॥

**अर्थ**–सुंट, मिरें, पिंपळी, बेल, हळद, दारुहळद, हिरडा, बेहडा, आवळकाठी, पांढरी वसु, तांबडी वसु, नागरमोथा, लोहभस्म, पहाडमूळ, वावडिंग, देवदार, मेडशिंगी व दूध, इतक्यानीं सिद्ध केलेलें तूप मृत्तिकेपासून झालेल्या सर्व विकारांचा नाश करित्ये.

---

## कामलाकर्मविपाक.

कामलीभक्तचोरःस्यात्तस्यवक्ष्यामिनिष्कृतिं ॥ कुर्याच्चपक्षिराजानं
विष्णोर्वाहनमुत्तमं ॥ सुवर्णेनयथाशक्त्यापक्षयोर्मौक्तिकद्वयं ॥ ना
सिकायांतथावज्रमुत्तरीयंचराजतं ॥ एवंकृत्वागरुत्मंतंघृतद्रोणोपरि
न्यसेत् ॥ श्वेतवस्त्रेणसंवेष्टयश्वेतमाल्यैःसमर्चयेत् ॥ सर्वशास्त्रार्थतत्व

ज्ञोवैष्णवोधर्मपाठकः ॥ ब्राह्मणस्त्वर्चितोभक्तयायजमानेनशक्तितः ॥
उपचारैःषोडशभिर्द्विजमभ्यर्चयेत्तथा ॥

अर्थ–जो कोणी शिजलेल्या भाताची चोरी करितो, तो कामलारोगी होतो. त्याचें प्रायश्चित्त सांगतो. सोन्याचा गरुडपक्षी करून त्याच्या पाखांवर मोती, नाकावर हिरा, आणि त्याचें रुप्याचें वस्त्र असा गरुड करून (१०२४) तोळे तुपावर ठेऊन पांढरें वस्त्र प्रावरण घालून पांढऱ्या फुलांनीं पूजा करावी; आणि संपूर्णशास्त्रांचें तत्वजाणणारा वैष्णव, धर्म व पाठ करणारा अश्या ब्राह्मणाची यजमानानें यथाशक्ति षोडशोपचार पूजा करून त्याला तो दान द्यावा.

## प्रतिमादान.

पीतांगःकामलारोगःकपालमुसलान्वितः ॥
पूजाविधानंत्वातंकोदेवतात्वमुदाहृतः ॥

अर्थ-कामलारोग्यानें आतंकदेवीची प्रतिमा कांतीनें पिवळी, हातांत कपाल व मुसल धारण करणारी अशी करून तिची पूजा करून ब्राह्मणास दान द्यावी.

## कामलानिदान.

पांडुरोगीनुयोत्यर्थपित्तलानिविषेवते ॥
तस्यपित्तमसृङ्मांसंदग्ध्वारोगायकल्पते ॥

अर्थ–जो पांडुरोगी अत्यंत पित्तकारक पदार्थ भक्षितो, त्याचें पित्त शरीरांतील रक्त व मांस, यानां जाळून कामलानामक रोगाला उत्पन्न करितें; अथवा पांडूवांचून ही पित्तल पदार्थ भक्षिल्यानें कामला होत्ये, असें जाणावें.

## लक्षण.

हारिद्रनेत्रःसुभृशंहारिद्रत्वङ्नखाननः ॥ रक्तपीतशकृन्मत्रो भेकवर्णोहतेंद्रियः ॥ दाहाविपाकोदौर्बल्यंसदनारुचिकर्शितः ॥
कामलाबहुपित्तैषाकोष्ठशाखाश्रयामता ॥

अर्थ–कामलारोग झाला असतां; मनुष्याचे नेत्र, त्वचा, नख, मुख, हीं अत्यंत हळदीसारखीं पिवळीं होतात; आणि रक्तमिश्रित, पीतवर्ण, असें विष्ठा व मूत्र, होतें, व मनुष्याची इंद्रियशक्ति नष्ट होऊन वर्षाकाळींचे बेडकासारिखा पिवळा होतो, व दाह, अजीर्ण, अशक्तपण, ग्लानि व अरुचि, याहींकरून पीडित होतो. हा कामलारोग पित्तापिक आहे; व कोष्ठ किंवा शाखा ( रक्तादिधातु ) यांच्या आश्रयानें होतो.

## कामालाचिकित्साक्रम.

रेचनंकामलार्तस्यस्निग्धस्यादौप्रयोजयेत् ॥

ततःप्रशमनीकार्याक्रियावैद्येनजानता ॥

अर्थ–ज्ञाता वैद्य असेल त्याणें कामलेने पीडित अशा मनुष्यास दूध, तूप काहींतरी स्निग्ध पाजून रेचन द्यावें; नंतर दोषशामक उपचार करावे.

## नस्य व अंजन.

हिंगुवालोचनैर्न्यस्तंकामलोन्मूलनेक्षमं ॥

कामलार्तस्यचैरंडपिप्पल्योर्नावनांजने ॥

अर्थ–कामलेच्या नाशनाविषयीं हिंगाचें अंजन करावें; अथवा एरंडाचा रस व पिंपळीचे चूर्ण यांचे नस्य द्यावें.

## जालिनीफलादिनस्य.

जालिनीफलमाध्मानंनस्यंवातंडुलांभसा ॥

जालिनीफलमध्यस्थंश्यामासर्षपनस्यतः ॥

अर्थ–कडुदोडकीच्या फळाचे तांदुळाच्या धुवणांत नस्य करावें; किंवा कडुदोडक्यांत पिंपळी व मोहऱ्या भरून ठेवाव्या; आणि त्या वाटून त्यांचे नस्य करावें.

## कुमारीकंदनस्य.

किंवातोयेनसर्पिष्टःकुमारीकंदनस्यतः ॥

जायतेकामलापेतापित्तनेत्रांतकामला ॥

अर्थ–कोरफडाच्या कांद्याचा रस काढून त्यांत तूप घालून नस्य करावें; ह्मणजे कावीळेने डोळे पिवळे झाले तत्रापि तिचा नाश होतो.

## कामलेवर अन्न.

यवगोधूमशाल्यन्नंरसैर्जांगलजैःशुभैः ॥

मुद्गाढकीमसराद्यैस्तद्योर्भोजनमिष्यते ॥

अर्थ–सातु, गहूं व शाली यांचे अन्न, अरण्यसंबंधि जें मांस त्याच्या रसानीं युक्त, किंवा मूग, ममुरा इत्यादिकानीं युक्त जें भोजन तें कामलावान् पांडुरोगी यानां असावें.

## कामलेवर काढा.

त्रिफलावागुडुच्यावादार्व्यानिंबस्यवारसं ॥

प्रातर्मधुयुतंवैद्यःकामलार्तायपोजयेत् ॥

अर्थ–हिरडा, बेहेडा, आवळकाठी, यांचा काढा, किंवा गुळवेलीचा, किंवा दारुहळदीचा, किंवा कडुलिंबाचा काढा मध घालून प्रातःकाळीं वैद्याने कामलेनें पीडितास द्यावा.

## पुनर्नवादिकाढा.

पुनर्नवानिंबपटोलतिक्ताविश्वाभयादारुनिशामृतानाम् ॥
कषायकःपांडुगदंनिहंतिसश्वासकाकोदरशूलशोथम् ॥

अर्थ–पुनर्नवा, निंब, कडुपडवळ, काडेकिराइत, सुंट, हिरडा, दारुहळद व गुळवेल यांचा काढा पांडुरोग, श्वास, कास, उदर, शूल व सूज, यांचा नाशक आहे.

## त्रिफलादिकाढा.

त्रिफलानिंबकैराततिक्तावासामृताभवंः ॥
क्काथोमधुयुतोहंतिकामलांपांडुतामपि ॥

अर्थ–त्रिफळा, कडुलिंब, काडेकिराइत, कटुकी, अडुळसा, गुळवेल, यांचा काढा मध घालून प्यावा. तो कामला व पांडु यांचा नाशक आहे.

## गोदुग्धपान.

अयेमनोज्ञकुंडलेस्फुरन्मुखेंदुमंडले ॥
गवांपयःसनागरंप्रियेनिहंतिकामलां ॥

अर्थ–अई सुंदरकुंडले, दैदीप्यमान नखरूप इंदुमंडल, सुंठीशीं युक्त गाईचें दूध कामलेचा नाश करितें.

## हरीतक्याद्यंजन.

हरीतकीचधात्रिकातथामनोज्ञगैरिका ॥
इतिप्रयोजितांजनंनिहंतिकामलाननं ॥

अर्थ–हरीतकी, वेखंड, आवळकाठी व सोनगेरू यांचें नस्य कामलेचा नाश करितें.

## खरविट्स्वरस.

खरविड्दधिनासार्धंसम्यक्संमर्द्यपाययेत् ॥
महत्पित्तोद्भवंरोगंकामलांचप्रणश्यति ॥

अर्थ–गाढवाची लीद दह्यांशीं वाटून तिचा रस काढून द्यावा, तो महान् पित्तापासून झालेल्या रोगाचा आणि काविळीचा नाश करितो.

## गुडूचीकल्क.

गुडूचीपत्रकल्कंवापिबेत्तक्रेणकामली ॥

अर्थ–गुळवेलीचे पानाचा कल्क ताकाबरोबर कामलीमनुष्यानें प्यावा.

## धात्र्यादिचूर्ण.

धात्रीलोहरजोव्योपनिशाक्षौद्राज्यशर्कराः ॥

लीढानिवारयंत्याशुकामलामुद्धतामपि ॥

**अर्थ**–आवळकाठी, लोहभस्म, सुंठ, मिरीं, पिंपळी, हळद, मध, साकर, हीं रोज घेत गेलीं असतां; मोठ्या वाढलेल्या कामलेचा नाश करितात.

## अयोरजादिचूर्ण.

अयोरजोव्योपविडंगचूर्णंलिह्याद्धरिद्रात्रिफलान्वितंवा ॥

सशर्कराकामलिनांत्रिभंडीहितागवाक्षीसगुडाचशुंठी ॥

**अर्थ**–लोखंडाचें भस्म, सुंठ, मिरीं, पिंपळी, वावडिंग, हळद, हरडा, बेहेडा, आवळकाठी, यांचें चूर्ण किंवा निशोत्तर, आणि साकर, अथवा वृंदावनाचा गीर, सुंठ, आणि गूळ, हे द्यावे; ह्मणजे कामलेवर हितावह होतात.

## व्योषादिचूर्ण.

व्योषाग्निवल्लत्रिफलामुस्तैस्तुल्यमयोरजः ॥ चूर्णितंतक्रमध्वाज्यंकोष्णतोयोपयोजितं ॥ कामलापांडुहृद्रोगकुष्ठार्शोमेहनाशनं ॥

**अर्थ**–सुंठ, मिरीं, पिंपळी, चित्रक, मिरीं, हरडा, बेहेडा, आवळकाठी, नागरमोथा, हे समभाग व लोहभस्म, एकत्र करून तें ताक, मध, तूप, किंवा कोमट पाणी यांशीं द्यावें; ह्मणजे कावीळ, पांडुरोग, हृद्रोग, कोड, मळव्याध, आणि मेह, यांचा नाश करितें.

## अयोरजादियोग.

तुल्यमयोरजःपथ्याहरिद्राक्षौद्रसर्पिषा ॥

चूर्णितंकामलीलिह्याद्गुडक्षौद्रेणवाभया ॥

**अर्थ**–लोहभस्म, हरीतकी, हळद, यांचें चूर्ण मध व तूप यांशीं द्यावें; किंवा हरीतकी मधाशीं द्यावी; ह्मणजे कामला नाश पावते.

## अंजन.

अंजनंकामलार्तानांद्रोणपुष्पीरसंशुभं ॥

निशागैरिकधात्रीणांचूर्णंवासंप्रकल्पयेत् ॥

**अर्थ**–पांढरें गोकर्णीचा रस, किंवा दारुहळद, तुरटी व आवळकाठी यांचे अंजन कामलानाशक आहे.

## नस्य.

वेणीफलरसःस्वच्छोनस्यतस्तस्यसादरं ॥

कामलाकामलोपेतायातिदूरंचसर्पिषा ॥

अर्थ–देवडांगरीचे फळाचा रस स्वच्छ काढून त्यांचे नस्य द्यावें; ह्मणजे कामला जाईल, अथवा किंचिद्दोषानीं युक्त जी कामला ती तूप प्याले असतां जाईल.

## लोहादिचूर्ण.

लोहचूर्णनिशायुग्मंत्रिफलाकटुरोहिणी ॥

प्रलिह्यमधुसर्पिर्भ्यांकामलार्तःसुखीभवेत् ॥

अर्थ–लोहभस्म, हळद, दारुहळद, हरडा, बेहडा, आवळकाठी व कुटकी यांचे चूर्ण मध व तूप याशीं द्यावें; ह्मणजे कामळारोगी बरा होतो.

## एलादिचूर्ण.

एलाजीरकभूधात्रीसितागव्येनभावयेत् ॥

प्रातःसंसेवनंकुर्यात्कामलानाशनंपरं ॥

अर्थ–एलची, जिरें, भुयआवळी व साकर हीं दुधांत पचन करून प्रातःकाळी सेवन करावीं; ह्मणजे काविळीचा नाश होतो.

## हरिद्राचूर्ण.

निशाचूर्णकर्षमितंदध्नःपलमितंतथा ॥

प्रातःसंसेवनंकुर्यात्कामलानाशनंपरं ॥

अर्थ–हळदीचे चूर्ण १ तोळा; आणि दहीं चार तोळे एकत्र करून प्रातःकाळीं सेवन करावें; ह्मणजे तें कामलचा नाश करितें.

## दार्व्यादिचूर्ण.

दार्वीसत्रिफलाव्योषविडंगानयसोरजः ॥

मधुसर्पिर्युतंलिह्यात्कामलापांडुरोगवान् ॥

अर्थ–दारूहळद, हरडा, बेहडा, आवळकाठी, सुंठ, मिरीं, पिंपळी; आणि लोह हे समभाग घेऊन मध व तूप याशीं. पांडुरोगी व कामली यानीं सेवन करावें.

## घृत.

हरिद्रात्रिफलानिंबबलामधुकसाधितं ॥

सक्षीरंमाहिषंसर्पिःकामलापहमुत्तमं ॥

अर्थ–हळद, हिरडे, बेहडे, आवळकाठी, कडुनिंब, चिकणा; आणि जेष्ठीमध इतक्यानीं सिद्ध केलेलें महिषीचें तूप महिषीचे दुधाबरोबर प्यावें; ह्मणजे कामला नाश करितें.

## एरंडस्वरस.

वातारेश्चजटाद्रावंकर्षार्धंदुग्धमिश्रितं ॥ पाययेत्तुप्रतिदि
नमेवमेवदिनत्रयं ॥ घृतंदुग्धोदनंपथ्यंकुर्याद्वैलवणंविना ॥
कामलांनाशयत्याशुवायुनाभ्रंहरेद्यथा ॥

अर्थ–एरंडाच्या कोंवळ्या डिऱ्या घेऊन त्यांचा रस साहा मासे व दूध तीन दिवस द्यावें; आणि तूप व दूध पथ्यास द्यावें. मीठ वर्ज करावें; ह्मणजे काविळीचा नाश होतो.

## कटुकीयोग.

पिबेत्कवोष्णेनजलेनतिक्तांसशर्करांपाणितलप्रमाणां ॥
निहंतिदुष्टामपिकामलांसाहरीतकीवामधुनाप्रयुक्ता ॥

अर्थ–कोमटपाण्याशीं कुटकी; आणि साकर मिळून तोळाभर घ्यावी; किंवा मधाशीं हरीतकी द्यावी; ह्मणजे दुष्टकामलेचा नाश होतो.

## कुंभकामलानिदान.

कालांतरात्खरीभूताकृच्छ्रास्यात्कुंभकामला ॥

अर्थ–कामलारोग आंगांत फारदिवस राहून विकोपास गेला, ह्मणजे तो कोष्ठांत उतरतो, त्याला कुंभकामला ह्मणतात.

## कामलेचें असाध्य लक्षण.

कृष्णपीतशकृन्मूत्रोभृशंशूनश्चमानवः ॥
सरक्ताक्षिमुखच्छर्दिविण्मूत्रोयश्चताम्यति ॥

अर्थ–जा रोग्याचा मळ कृष्णवर्ण, आणि मूत्र पीतवर्ण, आणि सर्वांगाला फार सूज आलेला, व डोळे, तोंड, ओकारी, विष्ठा व मूत्र हीं रक्तवर्ण, व मोह पावतो, तो असाध्य जाणावा.

## दुसरा प्रकार.

दाहारुचितृडानाहतंद्रामोहसमन्वितः ॥
नष्टाग्निसंज्ञःक्षिप्रंहिकामलावान्विपद्यते ॥

अर्थ–जो कामलारोगी दाह, अरुचि, तृषा, पोटाला फुगारा, झांपड व मोह यांणीं युक्त; आणि जाचा अग्नि व स्मृति ही नष्ट झाली; तो कुंभकामलारोगी नाश पावतो.

## कुंभकामलेचें असाध्यलक्षण.

छर्द्यरोचकहृल्लासज्वरक्लमनिपीडितः ॥
नश्यतिश्वासकासार्तोविड्भेदीकुंभकामली ॥

**अर्थ**—वांति, अरुचि, मळमळ, ज्वर, ग्लानि, श्वास, खोकला, आणि अतिसार यांणीं क्षीण झालेला कुंभकामलारोगी नाश पावतो.

## कुंभकामलाचिकित्साक्रम.

कुंभाख्यकामलायांतुहितःकामलिकोविधिः ॥

**अर्थ**—कुंभकामलेवर कामलेवरचे ही उपचार हितकारक आहेत.

## शिलाजितयोग.

गोमूत्रेणपिबेत्कुंभकामलायांशिलाजतु ॥

**अर्थ**—गोमूत्रांत शिलाजीत प्यावें; म्हणजे कुंभकामला नष्ट होत्ये.

## मंडूर

दग्ध्वाक्षकाष्ठैर्मलमायसंतुगोमूत्रनिर्वापितमष्टवारान् ॥
विचूर्ण्यलीढंमधुनाचिरेणकुंभाव्हयंपांडुगदंनिहंति ॥

**अर्थ**—बेहेडयाच काष्ठानीं लोखंडाचें कीट जाळून गोमूत्रांत विझवावें. याप्रमाणे आठवेळा करून नंतर बारीक खलून दोन किंवा तीन गुंजा शक्तिप्रमाणे मधाबरोबर चाटावें; म्हणजे तें कुंभकामलेचा लवकर नाश करील.

## नस्यादियोग.

अर्कमूलंहरेन्नस्यात्कामलांतंदुलोदकैः ॥ एरंडमूलिकापीतामधुनाहंतिकामलां ॥ अपामार्गशिफापीतासतक्राकामलापहा ॥ विष्णुक्रांतशिफातक्रपीतावातद्विनाशिनी ॥ लांगलीपत्रचूर्णंवापिबेत्तक्रेणकामलीं ॥ गुडार्द्रकयुताहंतिकामलांत्रिफलाशिता ॥

**अर्थ**—कामलेवर रुईच्या मुळाचें तांदुळाचे धुवणाशीं नस्य करावें; एरंडाची मुळी मधाशीं प्राशनार्थ द्यावी; आघाडयाची मुळी ताकांत उगाळून प्यावी; विष्णुक्रांतेची मुळी ताकाशीं द्यावी; कळलावीच्या पाल्याचे चूर्ण ताकाशीं द्यावें; अथवा त्रिफळयाचे चूर्ण, गुळ व आले एकत्र करून द्यावे; म्हणजे कामला नाश पावत्ये.

## पांडुरोगामध्यें केव्हां हलीमक होतो.

यदातुपांडुवर्णःस्याद्धरितश्यावपीतकः ॥ बलोत्साहक्षयस्तंद्रामंदाग्नित्वंमृदुज्वरः ॥ स्त्रीष्वहर्षोंगमर्दश्चश्वासस्तृष्णारुचिर्भ्रमः ॥ हलीमकंतदातस्यविद्यादनिलपित्ततः ॥

**अर्थ**—ज्याकाळीं रोगी वर्णानें हळदिवा, निळा, किंवा पिवळा होतो; आणि त्याचें बल व उत्साह हे नष्ट होतात, व झांपड, अग्निमांद्य, लघुज्वर, स्त्रीविषईं अप्रीति, आंग-

मोडे, श्वास, तृष्णा, अरुचि व भ्रम इत्यादिक उपद्रवांनीं युक्त असतो, त्या रोगाला हलीमक ह्मणतात. तो वातपित्तजन्य जाणावा.

## पानकीलक्षण.

संतापोभिन्नवर्चस्त्वंबहिरंतश्चपीतता ॥
पांडुतानेत्ररोगश्चपानकीलक्षणंवदेत् ॥

**अर्थ**—पित्ताच्या स्वभावेंकरून शरीराचा दाह होतो, व विड्भेद होतो, शरीर पांडुवर्ण होतें, व अभिष्यंदादि नेत्ररोग होतात; हीं पानकीची लक्षणें जाणावीं.

## हलीमकपरिभाषा.

पांडुरोगक्रियांसर्वायोजयेच्चहलीमके ॥
कामलायांतुयादृष्टासापिकार्याभिषग्वरैः ॥

**अर्थ**—जे पांडुरोगावरचे उपचार व कामलेवरचे उपचार असे दोन उपचार वैद्यांनीं हलीमकावर योजावे.

## अयोभस्मयोग.

मारितस्यायसश्चूर्णमुस्ताचूर्णेनसंयुतं ॥
खदिरस्यकषायेणपिबेद्रुर्तुहलीमकं ॥

**अर्थ**—लोहभस्म; आणि नागरमोथ्याचे चूर्ण हीं एकत्र करून खैराच्या काढ्याबरोबर घ्यावीं; ह्मणजे तें हलीमकनाशक आहे.

## सितादिलेह.

सितातिक्ताबलायष्टीत्रिफलारजनीयुगैः ॥
लेहंलिह्यात्समध्वाज्यंहलीमकनिवृत्तये ॥

**अर्थ**—साकर, कुटकी, चिकणा, जेष्ठीमध, त्रिफळा, हळद व दारुहळद, यांचा लेह मध व तूप घालून चाटावा; ह्मणजे हलीमकनिवृत्ति होईल.

## अमृतादिघृत.

अमृतलतारसकल्कप्रसाधितंतुरगविद्विपःसर्पिः ॥
क्षीरेचतुर्गुणमेतद्धितरेच्चहलीमकार्तेभ्यः ॥

**अर्थ**—गुळवेलीचा रस, अथवा कल्क यांनी सिद्ध केलेलें महिषीचें तूप त्याचे चौपट दुधांत घालोन जो हलीमकानें पीडित असेल त्यास द्यावें.

## गुडूचीस्वरसयोग.

गुडूचीस्वरसेसर्पिःसक्षीरंमाहिषंघृतं ॥

चतुर्गुणेनपयसापाययेत्तद्धलीमके ॥

अर्थ–गुळवेलीचा रस, तूप आणि दूध घालोन पाजावा; अथवा म्हैशीचें तूपांत चोपट दूध घालोन पाजावें; ह्मणजे हलीमकाचें निवारण होतें.

## पांडु, कामला, कुंभकामला, हलीमक, यांवर पथ्य.

छर्दिर्विरेचनंजीर्णायवगोधूमशालयः ॥ मुद्गाढकीमसूराणांयुषाजांगलजारसाः ॥ पटोलंवृद्धकूष्मांडंतरुणंकदलीफलं ॥ जीवंतीक्षुरमत्स्याक्षीगुडूचीतंदुलीयकं ॥ पुनर्नवाद्रोणपुष्पीवार्ताकंलशुनद्वयं ॥ पक्वाम्रमभयाबिंबीशृंगीमत्स्योगवांजलं ॥ धात्रीतक्रंघृतंतैलंसौवीरकतुषोदकं ॥ नवनीतंगंधसारोहरिद्रानागकेसरं ॥ यवक्षारोलोहभस्मकषायाणिचकुंकुमं ॥ यथादोषमिदंपथ्यंपांडुरोगवतांभवेत् ॥

अर्थ–ओकारी, रेच, जुने यव, गहूं, भात, मूग, तुरी व मसुरा यांचें यूष; अरण्यांतील प्राण्यांचें मांसरस, पडवळ, जुना कोहळा, जून केळें, गुळवेल, काळा ऊस, मत्स्याक्षी, गुळवेल, तांदूळजा, पुनर्नवा, द्रोणपुष्पी, वांगें, कांदा, लसूण, पिका आंबा, हरीतकी, तोंडलें, शृंगीमासा, गोमूत्र, आंवळे, ताक, तूप, तेल व यव व गहूं यांची कांजी, कोंडयाचा काढा, नवनीत, गंधसार, हळद, नागकेसर, यवक्षार, लोहभस्म, तुरट पदार्थ व केशर हे पांडुरोग्याला दोष पाहून पथ्य योजावें.

### अपथ्य.

रक्तस्रुतिर्धूमपानंवमिवेगविधारणं ॥ स्वेदनंमैथुनंशिंबीपत्रशाखाग्निरामठं ॥ माषांबुपानंपिण्याकंतांबूलंसर्षपंसुरा ॥ सर्वाण्यम्लानिदुष्टानिविरुद्धाध्यशनानिच ॥ गुर्वन्नंचविदाहीनिपांडुरोगवतांविषं ॥

अर्थ–रक्तस्राव, धूमपान, वांति, मलमूत्रादिकांच्या वेगाचें धारण, घाम, मैथुन, शेंगा व पाला यांची भाजी, चित्रक, हिंग, उडीद, उदकपान, पेंड, तांबूल, शिरस, मद्य, संपूर्ण आम्लवर्ग, दुष्टान्न, विरुद्धान्न, भोजनोत्तर लागलेंच भोजन, जड व विदाहि अशीं अन्नें, हीं पांडुरोग्याला अपथ्यें समजावीं.

### पांडुरोगावर दंभ.

दाहश्चरणयोःसंधौनाभेर्द्व्यंगुलकादधः ॥
मस्तकंहस्तयोर्मूलेमध्येचस्तनकुक्षयोः ॥

अर्थ–पांडुरोग्याला दोहों पायांचे संधीवर व बेंबीच्या खालीं दोन आंगळांवर, मस्तक; आणि स्तन व कूस यांमध्यें डाग द्यावा.

## कामलेवर दंभ.

कामलेषुकरपृष्ठविभागेदंभयेद्रविशलाकयैव ॥
कूर्परार्धमितमध्यप्रदेशेद्रावितंद्रवतिनिश्चयेनरोगः ॥

अर्थ—कामलेवर हाताच्या मागल्या बाजूस कोपराचे खालीं मध्येंच कोपरापासून मणगटापर्यंत निंमे भागावर तांब्याच्या पट्टीनें डाग द्यावा; आणि त्याला वाहूं द्यावा; ह्मणजे निश्चयानें रोगशांति होय.

---

## रक्तपित्तीं कर्मविपाक-

मद्यपोरक्तपित्तीस्यात्सदद्यात्सर्पिषाघटं ॥
मधुनोर्धघटंचैवसहिरण्यंविशुद्धये ॥

अर्थ—जो मनुष्य मद्यपान करितो, तो रक्तपित्ती होतो; त्याणें तुपाची घागर भरून त्याबरोबर मधाचा अर्धा घट भरून सहिरण्य दान द्यावा; ह्मणजे तो त्यापासून मुक्त होतो.

### ज्योतिःशास्त्राभिप्राय.

चंद्रक्षेत्रेयदाभौमोजायतेमनुजस्तदा ॥
रक्तपित्तेनदुर्नाम्नोनानाव्याधिसमाकुलः ॥

अर्थ—जन्मकाळीं चंद्राचे क्षेत्रीं भौम असतो, तो रक्तपित्त व अर्श अशा अनेक व्याधि उत्पन्न करितो.

### दुसरा प्रकार.

रक्तपित्तंज्वरंदाहमग्निवाय्वोरुपद्रवं ॥ लभतेनात्रसंदेहश्चं
द्रमध्येयदाअजः ॥ भौममंत्रजपःकार्योहोमःखादिरजैस्तिलैः ॥
घृतेनचसमायुक्तंदानंरक्तवृषस्यच ॥

अर्थ—चंद्रामध्यें भौम आला असतां; रक्तपित्त, ज्वर, दाह, वायु, यांचा उपद्रव होतो. तन्नाशनार्थ मंगळाचा जप करावा; आणि खैराच्या समिधा, तिळ, तूप यांचा होम करावा. आणि लाल बैल दान द्यावा.

### ज्योतिःशास्त्रोक्तचिकित्सा.

बिल्वचंदनबलाशणपुष्पैर्हिंगुलूकफलिनीबकुलैश्च ॥
स्नानमद्भिरिहमग्निपुनाभिर्भौमदोषविनिवारणमाशु ॥

अर्थ—बेल, चंदन, चिकणा, रानताग, हिंगुळ, काळा उंबर, बकुळीचीं फळें हे पदार्थ घालोन पाणी तापवून त्याणें रोग्यास स्नान घालावें; ह्मणजे चंद्रस्थानस्थित भौम-दोषाचा नाश होतो.

## रक्तपित्तनिदान.

घर्मव्यायामशोकाध्वव्यवायैरतिसेवितैः ॥ तीक्ष्णोष्णक्षारलवणैरम्लैः कटुभिरेवच ॥ पित्तंविदग्धंस्वगुणैर्विदहत्याशुशोणितं ॥ ततःप्रवर्ततेरक्तमूर्ध्वंचाधोद्विधापिवा ॥ ऊर्ध्वंनासाक्षिकर्णास्यैर्मेढ्रयोनिगुदैरधः ॥ कुपितंरोमकूपैश्चसमस्तैस्तत्प्रवर्तते ॥

अर्थ—घाम, व्यायाम, शोक, मार्गातिक्रमण व मैथुन, इत्यादिकांच्या अतिसेवनेंकरून; व तीक्ष्ण, ऊष्ण; यवक्षारादिक्षार , लवण, आम्ल, तिखट यांच्या सेवनेंकरून पित्त कुपित होऊन आपले दाहादिक गुणानीं रक्ताला त्वरित जाळतें; नंतर तें रक्त ऊर्ध्वगति होऊन नाक, डोळें, कान व तोंड यावाटे बाहेर निघतें; आणि अधोगत होतें; तें शिस्न, योनी व गुद या द्वारानीं निघतें, व रोग प्राबल्यकरून अतिकुपित झाले असतां, सर्वरोमांचापासून ही निघूं लागतें.

### पूर्वरूपलक्षण.

सदनंशीतकामित्वंकंठधूमायनंवमिः ॥
लोहगंधश्चनिःश्वासोभवत्यस्मिन्भविष्यति ॥

अर्थ—रक्तपित्त होणार असतां, शरीर म्लान होतें, शीत पदार्थ प्रिय वाटतात, कंठांतून सधूम व करपट ढेंकरा येतात, ओकारी सुटत्ये, श्वासोश्वासाला लोहाचा गंध येतो.

### असाध्यलक्षण.

मांसप्रक्षालनाभंक्वथितमिवचयत्कर्दमांभोनिभंचमेदःपूयास्रकल्पंय कृदिवयदिवापक्वजंबूफलाभं ॥ यत्कृष्णंयच्चनीलंभृशमतिकुणपंयत्र चोक्ताविकारास्तद्वर्ज्यंरक्तपित्तंसुरपतिधनुषायच्चतुल्यंविभाति ॥

अर्थ—जा रक्तपित्ताचा वर्ण मांस धुतलेल्या पाण्यासारिखा; किंवा गढूळलेलें पाण्यासारिखा अथवा मेद, पू, रक्त यांसारिखा व यकृतासारिखा, अथवा पिकलेल्या जांबळासारिखा. कृष्ण व नीलवर्ण होतो, व त्यास प्रेतासारिखा दुर्गंध येतो, व जा जा दोषाचे विकार सांगीतले, त्यांचे सारिखा वर्ण होतो, व इंद्रधनुष्यासारिखा नानाप्रकारचा होतो, त्या रक्तपित्तरोग्याला वैद्यानें सोडावें.

### वातिकरक्तपित्तनिदान.

श्यावारुणंसफेनंचतनुरूक्षंचवातिकं ॥

**अर्थ**–वातयुक्तरक्तपित्ताचा कोप झाला असतां, रक्त काळें, अरुणवर्ण, फेनयुक्त, पातळ, आणि रूक्ष असें होतें.

## भोजन.

शालिषष्टिकनीवारचणमुद्गामसूरकाः ॥
श्यामाकाश्चप्रियंगुश्चभोजनंरक्तपित्तिनां ॥

**अर्थ**–तांदूळ साठसाळीचे, नाचणी, वरी, हरभरे, मूग, मसूर, सांवे व राळे इतकीं धान्यें रक्तपित्तीमनुष्यास भोजनास योग्य आहेत.

## रक्तपित्तशास्त्रार्थ.

अतिप्रवृद्धदोषस्यपूर्वंलोहितपित्तिनः ॥
अक्षीणबलमांसाग्नेःकर्तव्यमपतर्पणम् ॥

**अर्थ**–ज्याचा दोष फार वाढला; व बल, मांस आणि अग्नि क्षीण झाले नाहींत; त्याला उपाय करावा.

ऊर्ध्वगेरेचनंशस्तमधोगेवमनंहितम् ॥

**अर्थ**–ऊर्ध्व रक्त जाणारें असेल, तर रेचन द्यावें; आणि अधोगत असेल, तर वमन द्यावें.

[illegible]शमयेन्नादौप्रवृत्तंबलिनःसृतं ॥
हृ[illegible]ग्रहणीरोगप्लीहगुल्मोदरादिकृत् ॥

**अर्थ**–बळकट मनुष्याचें रक्तपित्त प्रथमतः शमवूं नये, जर होतांक्षणीच शमविलें, तर हृद्रोग, पांडु, संग्रहणी, प्लीहा, गुल्म व उदर हे रोग उत्पन्न होतात.

क्षीणमांसबलंबालंवृद्धंशोषानुबंधिनं ॥
अवाम्यमविरेच्यंचशमनीयैरुपाचरेत् ॥

**अर्थ**–ज्याचें मांस आणि बल क्षीण आहे, व जो बाल व वृद्ध व ज्यास शोषाचा उपद्रव आहे, व जो वमन किंवा विरेचनयोग्य नाहीं; अशा मनुष्याचा रक्तपित्तावर शामक औषधानीं उपचार करावा.

शालिपर्ण्यादिनासिद्धोपेयोयूषस्त्वधोगते ॥
रक्तातिसारहंताचयोज्योविधिरशेषतः ॥

**अर्थ**–अधोद्वाराने जाणाऱ्या रक्तपित्तावर सालवण इत्यादि औषधांनीं सिद्ध केलेला मंड द्यावा; आणि रक्तातिसारावरचा सर्व उपचार करावा.

पयांसिशीतानिरसाश्चजांगलाःसतीनयूषाश्चसशालिषष्टिकाः ॥
हितानिचैतानिसरक्तपित्तेचान्यान्यपिस्युःकिलपित्तहानि ॥

अर्थ–रक्तपित्तावर थंड दूध, जंगलांतील मांसाचा रस, वाटाणे, साठ्यासाळींचा मंड, हितकारक आहे; आणि जेवढीं पित्तनाशक तेवढीं यावर हितकारक आहेत.

मसूरमुद्गचणकाःसमकुष्टाढकीफलाः ॥

प्रशस्ताःसूपयूषार्थेकल्पितारक्तपित्तिनां ॥

अर्थ–रक्तपित्तिमनुष्यास, मसूर, मूग, हरभरे, मठ व तुरी हे वरण किंवा मंड करण्याविषयीं प्रशस्त आहेत.

दाडिमामलकंबिल्वानम्लार्थंचापिदापयेत् ॥

अर्थ–रक्तपित्तिमनुष्याला आंबट देणे झाल्यास डाळिंब, आवळा, बेलफळ हीं द्यावीं.

पटोलनिंबवेत्राग्रप्लक्षवेतसपल्लवाः ॥

शाकार्थंशाककामानांतंडुलीयादयोहिताः ॥

अर्थ–रक्तपित्तिमनुष्यांस भाजीची इच्छा झाल्यास पडवळ, [illegible] कडुलिंब, वेत, पायरी व जलवेत यांचे कोंब अथवा तांदुळजा इत्यादिकांच्या भाज्या हि[illegible]कारक आहेत.

## रक्तपित्तादिकांवर कामदेवघृत.

अश्वगंधातुलैकास्यात्तदर्धोगोक्षुरःस्मृतः ॥ बलामृताशालिपर्णीविदारीचशतावरी ॥ पुनर्नवाश्वत्थशुंठीकाश्मर्यास्तुफलान्यपि ॥ पद्मबीजंमाषबीजंदद्याद्दशपलंपृथक् ॥ चतुर्द्रोणांभसापक्त्वापादशेषंशृतंनयेत् ॥ जीवनीयगणःकुष्ठंपद्मकंरक्तचंदनं ॥ पत्रकंपिप्पलीद्राक्षाकपिकच्छूफलंतथा ॥ नीलोत्पलंनागपुष्पंसारिवेद्वेबलेतथा ॥ पृथक्कर्षसमाभागाःशर्करायाःपलद्वयं ॥ रसश्चपौंड्रकेक्षूणामाढकैकंसमाहरेत्॥ घृतस्यचाढकंदत्वापाचयेन्मृदुनाग्निना ॥ घृतमेतन्निहंत्याशुरक्तपित्तमुरःक्षतं ॥ हलीमकंपांडुरोगंवर्णभेदंस्वरक्षयं ॥ वातरक्तंमूत्रकृच्छ्रंपार्श्वशूलंचकामलां ॥ शुक्रक्षयमुरोदाहंकार्श्यमोजःक्षयंतथा ॥ स्त्रीणांचैवाप्रजातानांगर्भदंशुक्रदंनृणां ॥ कामदेवघृतंनामत्वृष्यंबल्यंरसायनं ॥

अर्थ–आसंध एक तुळाप्रमाण व त्याचे अर्धे गोखरू घ्यावे. चिकणामूळ, गुळवेल, रानगांजा, विदारीकंद, शतावरी, पुनर्नवा, पिंपळमूळ, सुंठ, शिवणीचे फळ, कमळबीज, उडीद हीं अकरा औषधे दहा दहा पलप्रमाण घेऊन थोडीं थोडीं कुटून सारीं एकाजागीं करून त्यांत कल्क करून टाकावयाचीं औषधें येणेंप्रमाणे. ज्येष्ठमध, विदारी

कंद, आसंध, हरणवेल, ज्येष्ठीमध, रानमुगी, रानउडीद, हीं जीवनीयगणाचीं औषधें जाणावीं. कोष्ठ, पद्मकाष्ठ, रक्तचंदन, तमालपत्र, पिंपळी, द्राक्षें, कवचबीज, निळें कमळ, रानकेशर, काळी उपळसरी, पांढरी उपळसरी, चक्रमेंड, नागबला, हीं वीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून काढयांत घालावा, व साखर दोन पळें घालावी, पांढऱ्या उसाचा रस, तूप हीं दोन्हीं एकेक अढक प्रमाण त्या काढयांत घालून हलक्या अग्नीनें तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तें तूप गाळून पोटांत घ्यावें; तेणेंकरून रक्तपित्त, उरक्षतरोग, पांडुरोगाचा भेद, हलीमक रोग, स्वरक्षय, वातरक्त, मूत्रकृच्छ्र, पाठीचा शूल, डोळ्यांत कावीळ होते ती, धातुक्षय, उरांत रोग होतो तो, शरीराचीकृशता, शरीराचे तेजाचा क्षय. हे सारे रोग दूर होतात. हें तूप ज्या स्त्रियांस मुलें होत नाहींत त्यांस मुलें देतें, व पुरुषांस धातु उत्पन्न करितें, हृदयास प्रियकर होतें, व बळ देतें, व हें तूप रसायन आहे, याला कामदेवघृत असें ह्मणतात.

## दुर्वाद्यघृत.

दूर्वामुत्पलकिंजल्कमंजिष्ठाचैलवालुकं ॥ शिवालोध्रमुशीरंचमुस्ता चंदनपद्मकैः ॥ विपचेत्कार्षिकैःकल्कैर्घृतप्रस्थंमुखाग्निना ॥ तंदुलांबुमजाक्षीरंदत्वाचैवचतुर्गुणं ॥ तत्पानाद्वमतोरक्तंनावनान्नासिकागतं ॥ कर्णाभ्यांयस्यगच्छेच्चतस्यकर्णौप्रपूरयेत् ॥ चक्षुर्भ्यांविणिरक्तेचपूरयेत्तेनचक्षुषी ॥ मेढ्रपायुप्रवृत्तेषुबस्तिकर्मप्रकारयेत् ॥ रोमकूपेप्रवृत्तेचतदभ्यंगेप्रयोजयेत् ॥ सर्वेषुरक्तपित्तेषुतस्माच्छ्रेष्ठमिदंघृतं ॥

अर्थ—दूर्वा, कमळाचे केशर, मंजिष्ठ, वाळा, हरितकी, लोध्र, काळावाळा, नागरमोथा, चंदन व पद्मकाष्ट, ही प्रत्येकी तोळा तोळा घेऊन त्यांचा कल्क व तूप ६४ तोळे; व तांदळाचें धोण, शेळीचें दूध, हें चतुर्गुण घालोन मंदाग्नीवर पचन करून घृत सिद्ध करावें, तें प्राशन केलें असतां; रक्ताची वांती, नासारक्त, कर्णांतून जाणारें रक्त, नेत्रांतून जाणारें रक्त व पू व शिस्न, गुद, यांपासून जाणारें रक्त यांवर; व रोमकूपांतून जाणाऱ्या रक्तावर, अभ्यंग करावें, हें सर्वरक्तपित्तावर देण्यास श्रेष्ठ आहे.

## शतावर्यादिपेय.

शतावरीबलारास्नाकाश्मर्यसपरूषकं ॥
पाययेद्रक्तपित्तघ्नंसद्यःशूलहरंपरं ॥

अर्थ—शतावरी, चिकणा, रास्ना, शिवण, आणि फालसा यांचा काढा प्राशन करावा; ह्मणजे रक्तपित्ताचा नाश करून शूलाचाही नाश करितो.

## पैत्तिकरक्तपित्तनिदान.

रक्तपित्तंकषायाभंकृष्णंगोमूत्रसन्निभं ॥

मेचकांगारधूमाभमंजनाभंचपैत्तिकं ॥

अर्थ–जें पित्ताश्रित रक्तपित्त तें काढीसारिखें, काळें, गोमूत्रासारिखें, काळेंसावळें, किंवा धूर, काजळ यांसारिखे असतें.

## त्रिफलादिकाढा

त्रिफलाकृतमालभवंक्वथनंसितयामधुनामिलितंहरति ॥

ननुशोणितपित्तरुजंविविधांघनदाहकपित्तशूलहरं ॥

अर्थ–त्रिफला व बाहावा यांचा काढा साकर व मध घालोन प्यावा, तो अनेअप्रकारचे रक्तपित्त, दाहा व पित्तशूल, यांचा नाशक आहे.

## अतस्यादिकाढा.

अतसीकुसुमसमंगावटप्ररोहास्तृणांभमापीताः ॥

साधयंतिरक्तपित्तंयदिभुंक्तेमुद्गयूषेण ॥

अर्थ–जवसाचें फुलें, मंजिष्ठ, वडाच्या पारंब्या व रोहिसगवताच्या मुळ्या यांचा काढा प्यावा, व मुगांचे मंडाशीं भात खावा; ह्मणजे तो रक्तपित्ताचा नाश करील.

## वासादिलेह.

वासकस्वरसैःपथ्यासप्तधापरिभाविता ॥

कृष्णावामधुनालीढारक्तपित्तंद्रुतंजयेत् ॥

अर्थ–आडुळशाचे रसाच्या सात भावना दिलेली हरीतकी सेवन केली, तर रक्तपित्त जिंकील; अथवा पिंपळी मधाबरोबर चाटली असतां, तीही रक्तपित्तनाशक आहे.

## कूष्मांडकावलेह रक्तपित्तादिकांवर.

निष्कुलीकृत्यकूष्मांडखंडंपलशतंपचेत् ॥ निःक्षिप्यद्वितुलंनीरमर्धाशिष्टंचगृह्यते ॥ तानिकूष्मांडखंडानिपीडयेत्दृढवाससा ॥ आतपेशोषयेत्किंचिच्छूलाग्रैर्बहुशोव्यधेत् ॥ क्षिप्त्वाताम्रकटाहेचदद्यादष्टपलंघृतं ॥ तेनकिंचिद्भर्जयित्वापूर्वोक्तंतज्जलंक्षिपेत् ॥ खंडापलशतंदत्वासर्वमेकत्रपाचयेत् ॥ सुपक्वेपिप्पलीशुंठीजीरकंद्विपलंपृथक् ॥ पृथक्पलार्धधान्याकंपत्रैलामरिचत्वचं ॥ चूर्णीकृत्याक्षिपेत्तत्रघृतार्धंक्षौद्रमावहेत् ॥ खादेदग्निबलंदृष्ट्वारक्तपित्तीक्षयीज्वरी ॥ शोषस्तृषातम

श्छर्दिकासश्वासक्षतातुरः ॥ कूष्मांडकावलेहोयंबालवृद्धेषुयुज्यते ॥

उरःसंधानकृत्वृष्योबृंहणोबलकृन्मतः ॥

अर्थ–चांगला कोहळा जून आणून वरची साल काढून त्याचे बारीक बारीक तुकडे करून ते शंभर पळ प्रमाण वजन घेऊन त्यांत पाणी दोन तुळा प्रमाण घालून अर्धे पाणी राही, तों पावेतों काढा करून गाळून ठेवावा. मग त्या कोंहळयाचे तुकडे घट्ट फडक्यांत घालून पिळून त्यांतील पाणी काढून मग त्या तुकडयानां किंचित् उष्ण देऊन सुयांनीं बहुत बहुत छिद्रें पडत असें टोंचून मग तांब्याचे भांडयांत आठपळप्रमाण तूप घालून त्यांत ते तुकडे थोडे थोडे परतून मग पहिल्या कोंहळयाचा काढा ठेविला आहे, तो त्यांत टाकून व साखर १०० पळप्रमाण वजन घेऊन त्या काढयांत घालून घण होई तोंपर्यंत पाक करावा, त्यांत चूर्ण करावयाचीं औषधें येणे प्रमाणें. पिंपळी, सुंठ, जिरें, हीं तीन औषधें दोन दोन पळें व धनें, तमालपत्र, विलायची, मिऱ्यें, दालचिनी, हीं पांच औषधें अर्ध अर्ध पळ प्रमाण घ्यावीं. मग साऱ्यांचें चूर्ण करून पाकांत टाकावें, व मध चार पळ प्रमाण त्यांत मिळवावी. याला कूष्मांडकावलेह ह्मणतात. हा लेह रोग्यानीं आपली शक्ति व अग्नीचें बळ पाहून घ्यावा, तेणेंकरून रक्तपित्त, क्षय, ज्वर, शोष, तहान, डोळयांपुढें अंधारी येते ती, ओकारी, श्वास, कास, उरःक्षत हे रोग दूर होतात, व हा अवलेह बाळकांस व वृद्धांस उपयोगी पडतो, व उरांत अन्नाचा रस येतो त्याला साधक होतो, व स्त्रीसंगाविषयीं इच्छा देतो, व धातूची वृद्धि कारितो, व बळ देतो.

## कफयुक्तरक्तपित्तनिदान.

सांद्रंसपांडुसस्नेहंपिच्छलंचकफात्मकं ॥

अर्थ–रक्तपित्तामध्यें कफाचे प्राबल्य असतां, रक्त दाट व किंचित पांडुरवर्ण, सस्नेह व कफमिश्रित असें होतें.

## अभयाभक्षण.

अभयामधुसंयुक्तापाचनीदीपनीमता ॥

श्लेष्माणंरक्तपित्तंचहंतिशूलातिसारजित् ॥

अर्थ–हरीतकी मधाबरोबर सेवन केली असतां; पाचक, दीपक व कफ, रक्त व पित्त यांची नाशक व शूल अतिसार याते जिंकणारी अशी आहे.

## कफवायूचे संबंधानें रक्ताचा प्रवर्तनमार्ग.

ऊर्ध्वगंकफसंसृष्टमधोगंमारुतानुगं ॥

अर्थ–कफयुक्त रक्तपित्त ऊर्ध्वगति होतें, व वातयुक्त रक्तपित्त अधोमार्गानें जातें.

## आज्यपान.

शृतेनाज्येनपयसासुपिष्टंकुंकुमंपिबेत् ॥
ऊर्ध्वंरक्तविनाशायतेनैवाज्येनभोजनं ॥

**अर्थ**—शेळीचे दुधांत केशर शिजवून प्यावें; आणि शेळीचे दुधाबरोबर भात खावा; ह्मणजे ऊर्ध्वरक्त बंद होतें.

## ऱ्हीबेरादिजल.

ऱ्हीबेरचंदनोशीरंमुस्तपर्पटकैःशृतं ॥
केवलंशृतशीतंवादद्यात्तोयंपिपासिते ॥

**अर्थ**—वाळा, चंदन, काळा वाळा, नागरमोथा, पित्तपापडा, यांचा काढा किंवा यांचे चाहासारिखें पाणी उतरून तें थंड करून पिण्याकरितां द्यावें; ह्मणजे ताहान शमतें.

## मृद्वीकादिगुटी.

लोहगंधनिभश्वासेउद्गारेरक्तगंधिनि ॥
मृद्वीकोपणमात्रातुखादेद्द्विगुणशर्करा ॥

**अर्थ**—रक्तपित्तानें श्वासोश्वास रक्तगंधि होतात, व ढेंकर ही रक्तगंधि येतात. त्यावर गोस्तनीद्राक्षें, मिरीं, यांचें दुप्पट साकर घालून गोळी करून भक्षण करावी.

## पारावतादियूष.

पारावतकपोतांश्चलावान्रक्ताक्षवर्तकान् ॥ शशान्कपिंजलानेणान्हरिणान्कालपुच्छकान् ॥ रक्तपित्तहरान्विद्याद्रसंतेषांप्रयोजयेत् ॥

**अर्थ**—पारवा, कवडा, लावा, खबूतर व पांढरी टिटवी हे पक्षी; आणि ससा, भेकरें, चितळ व हरण हे पशु रक्तपित्तहारक आहेत; ह्मणून यांचा रस करून प्यावयास द्यावा.

## घृतसैंधवयोग.

ईषदम्लाननम्लांश्चघृतभृष्टान्ससैंधवान् ॥
कफानुगेयूषशाकंदद्याद्वातानुगेरसं ॥

**अर्थ**—कफजरक्तपित्तावर किंचित आंबट किंवा गोड पदार्थ तुपांत भाजून सैंधव घालून द्यावे; किंवा यूष व शाका द्याव्या; तेंच वातानुबंध असेल, तर त्याला मांसरस द्यावे.

## पथ्यजलपान.

पथ्यंसतीनयूषेणससितैर्लाजसक्तुभिः ॥
जलंखर्जूरमृद्वीकामधुकैःसपरूपकैः ॥

अर्थ–वाटाण्याचा यूष, लाह्या, सातु व साकर हे पथ्यास द्यावे; आणि खजूर, द्राक्षें, ज्येष्ठमध व फालसा यांचा काढा करून निववून तें पाणी पिण्याकरितां द्यावें.

## द्वंद्वजसन्निपातरक्तपित्तनिदान.

संसृष्टलिंगंसंसर्गात्त्रिलिंगंसान्निपातिकं ॥

अर्थ–दोहों दोषांचीं लक्षणें असतां, द्वंद्वज रक्तपित्त जाणावें; व सर्वदोषांची लक्षणें असतां, सान्निपातिक जाणावें.

## असाध्यरक्तपित्तलक्षण.

द्विमार्गंकफवाताभ्यामुभाभ्यामनुवर्तते ॥ ऊर्ध्वंसाध्यमधोयाप्यमसा ध्यंयुगपद्गतं ॥ एकमार्गंबलवतोनातिवेगंनवोत्थितं ॥ रक्तपित्तंसुखे कालेसाध्यंस्यान्निरुपद्रवं ॥ एकदोषानुगंसाध्यंद्विदोषंयाप्यमुच्यते ॥ यत्त्रिदोषमसाध्यंतन्मंदाग्नेर्नातिवेगवत् ॥

अर्थ–रक्तपित्त कफ व वात यांशीं युक्त असतां, ऊर्ध्वाधोमार्गानें बाहेर निघतें, त्यांत ऊर्ध्वमार्गानें जाणारें रक्तपित्त साध्य व अधोमार्गानें जाणारें दुःसाध्य आणि उभयगतिक असाध्य असें जाणावें; अथवा एकमार्गानें प्रवृत्त होऊन त्यांमध्यें वेदना मंद असतात, व जें नूतन उत्पन्न, व रोगी बलवान् आणि सुखकाळीं (हेमंतशिशिरादिक ऋतूंत) उत्पन्न होतें, तें सुखसाध्य; व एकदोषेंकरून युक्त जें रक्तपित्त तें सुखसाध्य, व द्विदोषज दुःसाध्य, आणि ज्यामध्यें त्रिदोषांचा संबंध असून मंदवेग व मंदाग्नि असें असतें, तें रक्तपित्त सर्वथा असाध्य जाणावें.

## असाध्यलक्षण.

व्याधिभिःक्षीणदेहस्यवृद्धस्यानश्नतश्चयत् ॥

अर्थ–ज्याचें शरीर व्याधींनीं क्षीण, जो वृद्ध व उपास करणारा. अशाचें रक्तपित्त असाध्य जाणावें.

## रक्तपित्ताचे उपद्रव.

दौर्बल्यंश्वासकासज्वरवमथुमदाःपांडुतादाहमूर्छाभुक्तेघोरोविदाहस्त्व धृतिरपिसदात्हृद्यतुल्याचपीडा ॥ तृष्णाकोष्ठस्यभेदःशिरसिचतपनंपू तिनिष्ठीवनत्वंभक्तद्वेषाविपाकौविकृतिरपिभवेद्रक्तपित्तोपसर्गाः ॥

अर्थ–अशक्तपणा, श्वास, कास, ज्वर, वांति, उन्माद, पांढरेपणा, दाह, मूर्छा, भक्षिल्याअन्नाचा उग्र दाह, अधीरपणा व सुखकारकपीडा, तृषा, कोष्ठगतमळाचा भेद व मस्तकाला नम्रता, थुंक्याला दुर्गंध, अन्नद्वेष, अजीर्ण, इत्यादिक रक्तपित्ताचे उपद्रव होत.

## असाध्यलक्षण.

येनचोपहतंरक्तंरक्तपित्तेनमानवः ॥ पश्येद्दृष्टंवियच्चापितच्चा साध्यमसंशयं ॥ लोहितंछर्दयेद्यस्तुबहुशोलोहितेक्षणः ॥ लोहितोद्गारदर्शीचम्रियतेरक्तपैत्तिकः ॥

अर्थ–ज्याचें रक्तपित्तानें रक्त वाहून गेलें, व आकाश पडतेंसें पाहतो, तो निःसंशय असाध्य; अथवा फार रक्ताची वांति, डोळे रक्तवर्ण, ढेंकर रक्तयुक्त; आणि पदार्थमात्र आरक्त पाहतो, तो रक्तपित्तरोगी मरण पावतो.

## वृषादिस्वरस.

वृषपत्राणिनिष्पीड्यरसंसमधुशर्करम् ॥
अनेनप्रशमंयातिरक्तपित्तंसुदारुणम् ॥

अर्थ–अडुळशाचा रस, मध, साकर, एकत्र करून प्यावें; ह्मणजे भयंकर रक्तपित्त शांत होतें

## मातुलिंग्यादि पेय.

मूलानिपुष्पाणिचमातुलिंग्याःसमंपिबेत्तंदुलधावनेन ॥
घ्राणप्रवृत्तेजलमाशुदेयंसशर्करंनासिकयोःपयोवा ॥

अर्थ–महाळुंगीचीं मुळें किंवा फुलें तांदुळाचे धुणांत वांटून प्यावीं; किंवा त्यांचा रस काढून त्यांत साकर किंवा दूध घालून नाकांत घालावा; ह्मणजे नाकांतील रक्त बंद होईल.

## उदुंबरादियोग.

उदुंबराणिपक्वानिगुडेनमधुनापिवा ॥
उपभुक्तानिनिघ्नंतिनासारक्तंनृणांध्रुवं ॥

अर्थ–उंबराचीं पिकलेलीं फळें गुळाबरोबर किंवा मधाबरोबर खाल्लीं असतां, नाकांतून पडणारें रक्त बंद करतात.

## अश्वत्थपत्रयोग.

अश्वत्थपत्राग्ररसात्षडंशोबोलोथतस्माद्द्विगुणंमधुस्यात् ॥
रक्तप्रवाहंहृदयस्थितंवावातोयथाभ्रंहरतेतथैव ॥

अर्थ–पिंपळाचे पानाच्या अग्राचा रस एक भाग आणि साहा भाग रक्तयाबोळ, त्याचे दुप्पट मध असें एकत्र करून प्यावें; ह्मणजे रक्ताचा प्रवाह किंवा हृदयांत सांचलेलें रक्त, वारा जसा मेघास दूर करितो याप्रमाणें दूर करील.

## चित्रकचूर्णयोग.

जयेन्नासाश्रितंरक्तंलीढंवाक्षौद्रपावकम् ॥

अर्थ–मधाबरोबर चित्रकचूर्ण चाटावें; ह्मणजे नाकांतील रक्त नाहिसें होतें.

## गंधकादिप्राशन.

गंधसूतंमाक्षिकंलोहचूर्णंसर्वंघृष्टंत्रैफलेनोदकेन ॥

लौहेपात्रेगोपयसाचधृत्वारात्रौदद्याद्रक्तपित्तप्रशांत्यै ॥

अर्थ–गंधक, पारा, माक्षिकभस्म, लोहभस्म, सर्व एकत्र करून लोखंडाचे पात्रांत त्रिफळ्याचे काढयानें खलावें; आणि गाईचे दुधाबरोबर रात्रीं घ्यावें; ह्मणजे रक्तपित्त शांत होतें.

## दुग्धादियोग.

पयःसिताढयंशृतशीतमाज्यंगव्यंपयोवाप्रसमीक्ष्यवन्हिं ॥ यष्टीमधूकार्जुनभावनीयंद्राक्षाघनागोक्षुरकैःशृतंवा ॥ द्राक्षयाफल्गिनीभिर्वाविलयानागरेणवा ॥ श्व[illegible]याशतावर्यारक्तजित्साधितंपयः ॥

अर्थ–गाईचें किंवा शेळीचे दूध, ज्येष्ठीमध, मोह व सादडा यांशीं, किंवा द्राक्ष, चिकणा व गोखरूं याशीं, किंवा द्राक्ष व गहुला याशीं; अथवा चिकणा व सुंठ यांशीं, किंवा गोखरूं व शतावरी यांशीं तापवून शीत करून द्यावें; ह्मणजे ते रक्तपित्ताला शमवितें

## वासास्वरस.

वासायांविद्यमानायामाशायांजीवितस्यच ॥

रक्तपित्तीक्षयीकासीकिमर्थमवसीदति ॥

अर्थ–भूमीवर अडुळसा आहे; आणि जीविताची इच्छा आहे तर; रक्तपित्ती, ज्वरी, खोकलेकरीपुरुषानीं कां क्लेश भोगावे.

## लक्षादियोग.

क्षीरेणलाक्षामधुमिश्रितेनप्रपीयजीर्णेपयसानुमद्यं ॥

सद्योनिहन्याद्रुधिरंक्षतोत्थंकांतार्जुनानामथवापिकल्कः ॥

अर्थ–दुधांत लाक्षा व मध घालून प्यावें; तें जिरल्यावर. दुधांत मद्य घालून प्यावें; ह्मणजे तात्काळ क्षतापासून निघणारें रक्त बंद करील; किंवा लोहकांतभस्म अर्जुनवृक्षाच्या सालीचे चूर्णाशीं द्यावें, तें रक्तनाश करील.

## मध्वादिपेय.

मध्वाटरूपकरसौयदितुल्यभागौकृत्वानरःपिबतिपुण्यतरःप्रभाते ॥

तद्रक्तपित्तमतिदारुणमप्यवश्यमाशुप्रशाम्यतिजलैरिववन्हिपुंजः ॥

अर्थ—मध व अडुळशाचा रस दोन्ही समभाग करून प्रातःकाळीं जर प्राशन करील, तर दारुण ही रक्तपित्त लवकर शांत होईल. जसें उदक अग्निराशीचा नाश करितें.

## मधुकादिकल्क.

कल्कंमधूकत्रिफलार्जुनानांनिशिस्थितंलोहमयेसुपात्रे ॥

साज्यंविलिह्यानुपिबेत्सुशीतंसशर्करंछागपयःक्षतार्तः ॥

अर्थ—मधुकाष्ठ, हरडा, बेहडा, आवळकाठी व सादडा यांचा कल्क रात्रीं लोखंडाच्या भांड्यांत ठेऊन प्रातःकाळीं तूप घालून द्यावा; व मागून शेळीचें दूध तापवून शांत साकर घालोन द्यावें; ह्मणजे रक्तपित्ताचा नाश होतो.

## र्‍हीबेरादिकाढा.

र्‍हीबेरमुत्पलंधान्यंचंदनंयष्टिकामृता ॥ उशीरंचवृषश्चैषांक्काथःसमधु शर्करः ॥ पाययेत्तेनसद्योहिरक्तपित्तंप्रणश्यति ॥ रक्तपित्तंजयत्युग्रंतृ ष्णादाहंज्वरंतथा ॥

अर्थ—वाळा, कमळ, लोध्र, धने, रक्तचंदन, ज्येष्ठी [illegible] गुळवेल, काळा वाळा, अडुळसा यांचा काढा मध व साकर घालोन द्यावा; हा उग्र रक्तपित्त, तृषा, दाह, आणि ज्वर यांचा नाश करितो.

## पद्मोत्पलादिकाढा.

पद्मोत्पलानांकिंजल्कःपृष्टिपर्णीप्रियंगुका ॥ वासापत्रसमुद्भूतोरसःस मधुशर्करः ॥ क्काथोवाहरतेपीतोरक्तपित्तंसुदारुणं ॥

अर्थ—पद्में व कमळें यांचे केसर, पिठवण, राळे व अडुळशाचा पाला यांचा स्वरस किंवा काढा प्राशन केला असतां, अत्यंत कठिण ही रक्तपित्ताचा नाश होतो.

## इक्ष्वादिकाढा.

इक्षूणांमध्यकांडानिसकंदंनीलमुत्पलं ॥ केसरंपुंडरीकस्यमोचंमधुक कपद्मके ॥ वटप्ररोहशुंगाश्चद्राक्षाखर्जूरमेवच ॥ एतानिसमभागानि कषायमुपकल्पयेत् ॥ युषितंमधुसंयुक्तंकषायंशर्करान्वितं ॥ सप्रमेहं रक्तपीत्तंक्षिप्रमेतंनियच्छति ॥

अर्थ—उंसाचीं मधलीं पेरें, कंदासहवर्तमान निळें कमळ, पांढऱ्या कमळाचें केसर, मोचरस, ज्येष्टिमध, पद्मकाष्ट, वडाचे पारंबे, शुंग, द्राक्षें, व खजूर हे समभाग घेऊन त्यांचा

काढा करावा; आणि तो शिळा झाला, ह्मणजे त्यांत मध व साकर घालून द्यावा; तो प्रमेह व रक्तपित्त यांचा नाश करितो.

## चंदनादिकाढा.

चंदनेंद्रयवापाठाकटुकासुदुरालभा ॥ गुडूचीबालकंलोध्रंपि
प्पलीक्षौद्रसंयुतं ॥ कफान्वितंजयेद्रक्तंतृष्णाकासज्वरापहं ॥

**अर्थ**–चंदन, इंद्रजव, पाहाडमूळ, कुटकी, धमासा, गुळवेल, वाळा, लोध्र व पिंपळी यांचा काढा करून त्यांत मध घालून दिला असतां; तो कफ, रक्तपित्त, तृषा, कास, आणि ज्वर यांचा नाश करितो.

## उशीरादिकाढा.

उशीरंचंदनंपाठाद्राक्षामधुकपिप्पली ॥
सक्षौद्रंपाययेत्क्वाथंरक्तपित्तहरंध्रुवं ॥

**अर्थ**–काळा वाळा, चंदन, पाडळ, द्राक्षे, ज्येष्ठमध व पिंपळी यांचा काढा मध घालोन घ्यावा; ह्मणजे शीघ्र रक्तपित्ताचे हरण करितो.

## अमृतादिकाढा.

अमृतामधुकंचैवखर्जूरंगजपिप्पली ॥
क्वाथःक्षौद्रयुतोह्येषरक्तपित्तविकारनुत् ॥

**अर्थ** गुळवेल, ज्येष्ठमध, खजूर व गजपिंपळी यांचा काढा मध घालोन घेतला असतां; तो रक्तपित्तसंबंधि विकारांचा नाश करितो.

## ऱ्हीवेरादिकाढा

ऱ्हीवेरधान्यकंशुंठीचंदनंमधुयष्टिका ॥ वृषोशीरयुतःक्वाथः
शर्करामधुयोजितः ॥ रक्तपित्तंजयत्युग्रंतृष्णांदाहज्वरंतथा ॥

**अर्थ** वाळा, धने, सुंठ, चंदन, जेष्टीमध, अडुळसा व काळावाळा यांचा काढा साकर व मध घालोन घ्यावा; ह्मणजे रक्तपित्त, तृषा, ज्वर हे दूर होतात.

## मुद्गादिकाढा.

मुद्गाःसलाजाःसयवाःसकृष्णाःसोशीरमुस्ताःसहचंदनेन ॥
बलाजलैःपर्युषितःकषायःसरक्तपित्तंशमयत्युदीर्णं ॥

**अर्थ**–मूग, लाह्या, सातु, पिंपळी, वाळा, नागरमोथा, चंदन, चिकणा हा पूर्वदिवशीं भिजत घालून दुसरे दिवशीं काढा करून प्यावा; ह्मणजे रक्तपित्त शांत होते.

## यष्ट्यादिकाढा.

यष्टीमधुसमायुक्तंक्षीरसंक्वाथ्यशीतलं ॥
शर्करामधुसंमिश्रंरक्तपित्तापहंपिबेत् ॥

**अर्थ**–जेष्टीमध, दुध यांचा काढा करून थंड झाला; ह्मणजे त्यांत साकर व मध घालोन घ्यावा; ह्मणजे तो रक्तपित्ताचा नाश करील.

## पलाशकल्क व काढा.

पलाशकल्कःक्वाथोवासुशीतःशर्करान्वितः ॥
पिबेद्वामधुसर्पिर्भ्यांगवाश्वशकृतोरसं ॥

**अर्थ**–पळसाचीं फुलें वाटून त्यांत साकर घालोन घ्यावीं; अथवा त्यांचा काढा करून त्यांत साकर घालोन घ्यावा; अथवा गाईचे शेणाचा रस, अथवा घोडयाचे लेंड्याचा रस घालोन त्यांत मध व तूप घालोन घ्यावा; ह्मणजे रक्त बंद होतें.

## आटरूषादिकाढा.

आटरूषकनिर्यूहःप्रियंगूमृत्तिकांजने ॥
विनीयलोध्रंसक्षौद्रंरक्तपित्तहरंपिबेत् ॥

**अर्थ**–अडुळशाचा रस, सांवे, तुरटी, रसांजन, लोध्र, यांचा काढा मध घालोन घ्यावा; ह्मणजे रक्तपित्तनाश करितो.

## वासादिकाढा.

वासाकषायोत्पलमृत्प्रियंगुलोध्रांजनांभोरुहकेसराणि ॥
पीत्वासिताक्षौद्रयुतानिजह्यात्पित्तासृजोवेगमुदीर्णमाशु ॥

**अर्थ**–अडुळसा, कमळ, तुरटी, सांवे, लोध्र, रसांजन, कमळकेसर यांचा काढा साकर व मध घालून घ्यावा; ह्मणजे रक्तपित्तनाश करील.

## उशीरादिचूर्ण.

उशीरकालीयकलोध्रपद्मकंप्रियंगुकाकट्फलशंखगैरिकं ॥ पृथक्पृथक्चंदनतुल्यभागिकंसशर्करंतंदुलधावनप्लुतं ॥ सरक्तपित्तंतमकंपिपासांदाहंचपीतंशमयेद्विसद्यः ॥

**अर्थ**–वाळा, दारुहळद, लोध, पद्मकाष्ठ, राळे, कायफळ, शंख व गेरू या सर्वांचे समभाग चूर्ण घेऊन ते साकर व तांदुळांचें धुवण यांशीं द्यावें; ह्मणजे रक्तपित्त, तमक, ताहान, आणि दाह, हे शमन होतात.

## मृद्विकादिचूर्ण.

मृद्वीकाचंदनंलोध्रंप्रियंगुंचविचूर्णयेत् ॥ चूर्णमेतत्पिबेत्क्षौद्रवासारससमन्वितं ॥ नासिकामुखपायुभ्योयोनिमेंढ्राच्चवेगतः ॥ रक्तपित्तंस्रवद्धंतिसिद्धयेसप्रयोगराट् ॥ यच्चशस्त्रक्षतेनैवरक्तंस्रवतिवेगतः ॥ नदप्यनेनचूर्णेनतिष्ठत्येवावचूर्णितं ॥मेढ्रतोतिप्रवृत्तेस्रेवास्तिरुत्तरइष्यते ॥

अर्थ—द्राक्षे, चंदन, लोध्र व कुटकी यांचें चूर्ण करून तें मध व अडुळशाचा रस यांशीं घ्यावें; ह्मणजे नाक, तोंड, शिश्न, गुद व योनि यांपासून जाणारें रक्त, स्रवणारें रक्तपित्त, व्रणापासून निघणारें रक्त, यांला बंद करितें; किंवा शिश्नापासून रक्त वाहूं लागलें असतां, या औषधांचा उत्तर बस्ति करावा; ह्मणजे बंद होतें.

## चंदनादिचूर्ण.

चंदनंनलदंलोध्रमुशीरंपद्मकेसरं ॥ नागपुष्पंचबिल्वंचभद्रमुस्तंसशर्करं ॥ ऱ्हीवेरंचैवपाठाचकुटजोत्पलमेवच ॥ शृंगवेरंसातिविषाधातकीसरसांजना ॥ आम्रास्थिजंबुसारास्थितथापाचरसोपच ॥ नीलोत्पलसमंगाचसूक्ष्मेलादाडिमत्वचः ॥ चतुर्विंशतिरेतानिसमभागानिकारयेत् ॥ तंदुलोदकसंयुक्तंमधुनासहयोजयेत् ॥ अतिसारान्तथाछर्दिस्त्रीणांचापिरजोग्रहं ॥ प्रच्युतानांचगर्भाणांस्थापनंपरमिष्यते ॥ अश्विनोःसंमतोयोगोरक्तपित्तनिबर्हणः ॥

अर्थ—चंदन, जटामांसी, लोध्र, वाळा, कमळाचे केसर, नाकेशर, बेलफळ, भद्रमोथे, साकर, काळा वाळा, पाहाडमूळ, कुडयाच्या बिया, कमळ, सुंठ, अतिविष, धायटीचीं फुलें, रसांजन, आंब्याची कोय, जांबळीची आंठी, पाच, निळें कमळ, मंजिष्ठ, एलची, डाळिंबाची साल, हेच वीस पदार्थ समभाग घेऊन चूर्ण करून तांदुळाच्या धुवणाशीं मध घालोन द्यावें; ह्मणजे संपूर्ण अतिसार, वांति, स्त्रियांचा विटाळ यांचा नाश करितें, व हा गर्भस्थापन करणारा आहे. हा योग रक्तपित्तनाशनाविषयीं अश्विनी कुमारांला मान्य आहे.

## पत्रकादि चूर्ण.

पत्रत्वगेलानतचंदनानांश्यामाकशुंठीमधुकोत्पलानां ॥ स्यात्धात्रिवासाद्विगुणोत्तराणांचूर्णंसिताक्षौद्रसमन्वितानां ॥ खादेज्ज्वरेलोहितरक्तपित्तेकासेक्षयेलोहितमूत्रकृच्छ्रे ॥ रक्तेतिनिष्ठीवतिगात्रसादेदाहेचसद्यःस्मृतिविभ्रमेच ॥ देहस्थितेतूर्ध्वगतेचवातेश्वासेसहिक्कास

त्हृदामयेषु ॥ मनोभितापेसततांगतापेयोन्यामयेसप्रदरेचरोगे ॥ रक्तेतिमात्रंपतितमुखाभ्यांगुदेथनासामुखमेढ्रयोनौ ॥ रक्तस्यपित्तस्य विनाशनार्थंसूक्तंचशिष्टेनमहद्रदघ्नं ॥

अर्थ—तमालपत्र १, दालचिनी ४, एलची ६, तगर ८, चंदन १०, सातें १२, सुंठ १४, ज्येष्ठीमध १६, कमळ १८, आवळाकाठी २० व अडुळसा २२, या औषधांचें द्विगुणोत्तर भागाप्रमाणें चूर्ण एकत्र करून तें साकर व मध यांशीं द्यावें; ह्मणजे ज्वर, रक्तपित्त, खोकला, क्षय, रक्तकृच्छ्र, रक्ताची वांति, गात्रें गळतात तीं, स्मृतिनाश, ऊर्ध्ववात, दमा, खोकला, त्हृद्रोग, मनःसंताप, अंगताप, योनिरोग, प्रदररोग, मुख, गद, नाक, शिश्न व योनि, यांपासून अतिरक्त जातें तें; आणि रक्तपित्त यांचा नाश करितें.

## कर्पूरादि चूर्ण.

कर्पूरकंचकंकोलंजातीफलदलंसमं ॥ लवंगंस्यात्समरिचंकृष्णाशुंठी विवृद्धितः ॥ चूर्णसमसितंत्हृद्यंदीपनंवन्हिकारकं ॥ रक्तपित्तंप्रतिश्यायंश्वासंकासमरोचकं ॥ त्हृद्रोगंचजयेच्छीघ्रमिंद्रारिमशनिर्यथा ॥

अर्थ—कापूर, कंकोळ, जायफळ, जायपत्री, लवंगा, मिऱ्यें, पिंपळी व सुंठ हे पदार्थ एकोत्तर वृद्धीनें घेऊन एकत्र करून त्या चूर्णाच्या समान साकर मिळवून द्यावें, तें त्हृद्य दीपन व अग्निकारक आहे; आणि रक्तपित्त, पडसें, दमा, खोकला, अरुचि व त्हृद्रोग यांचा नाश करितें; जसें वज्र इंद्राच्या शत्रूंचा नाश करितें तसें.

## वासापुटपाक.

पिष्टानांवृषपत्राणांपुटपाकोरसोहिमः ॥
मधुयुक्तोजयेद्रक्तपित्तकासज्वरक्षयान् ॥

अर्थ—अडुळशाचीं पानें वाटून पुटपाकानें उकडून त्याचा रस काढून थंड जाल्यावर मध घालून द्यावा; ह्मणजे रक्तपित्त, खोकला, ज्वर, क्षय, यांचा नाश करितो.

## एलादिगुटी रक्तपित्तादिकांवर.

एलापत्रत्वचोद्राक्षाःपिप्पल्यर्धपलंतथा ॥ शिलामधुकखर्जूरमृद्वीकाश्चपलोन्मिताः॥ संचूर्ण्यमधुनायुक्तांगुटिकांसंप्रकल्पयेत्॥ अक्षमात्रां ततश्चैकांभक्षयेत्तांदिनेतथा ॥ कासश्वासंज्वरंहिक्कांछर्दिंमूर्छांमदंभ्रमं ॥ रक्तनिष्ठीवनंतृष्णांपार्श्वशूलमरोचकं ॥ शोषंप्लीहंमूढवातंस्वरभेदंक्षतक्षयं ॥ गुटिकातर्पणीवृष्यारक्तपित्तंविनाशयेत् ॥

अर्थ—एलची, तमालपत्र, दालचिनी, द्राक्षें व पिंपळी हीं प्रत्येकीं दोन दोन तोळे;

शिलाजित, ज्येष्ठिमध, खजूर व द्राक्षे, हीं प्रत्येकीं चार चार तोळे एकत्र चूर्ण करून मधाशीं गोळी कर्षाची करावी; त्यांतून एक दररोज खात जावी; ह्मणजे खोकला, श्वास, ज्वर, उचकी, वांति, मूर्छा, उन्मत्तता, भ्रम, तोंडांतून रक्त पडतें तें; ताहान, पार्श्वशूल, अरुचि, शोष, प्लीहा, मूढवात, स्वरभंग, क्षतक्षय, आणि रक्तपित्त, यांचा नाश करिते. व वृष्य, आणि तृप्ति देणारी अशी आहे.

## हरीतक्यादिनस्य.

हरीतकीदाडिमपुष्पदूर्वालाक्षारसोनस्यविधानयोगात् ॥
निवारयत्येवचिरप्रवृत्तमप्याशुनासांतरशोणितौघम् ॥

**अर्थ**–हिरडा, डाळिंबीचें फूल, दूर्वांचा रस नांकांत घातला; ह्मणजे फार दिवस पडणारें जें नांकांतील रक्त तें बंद होईल.

## मस्तकलेप.

नासाप्रवृत्तंरुधिरंवृतभ्रष्टंश्लक्ष्णपिष्टमामलकं ॥
सेतुरिवरुधिरवेगंरुणद्धिमूर्ध्निप्रलेपतः ॥

**अर्थ**–आवळकाठी तुपावर भाजून तिचें बारीक चूर्ण करून मस्तकावर लेप करावा; ह्मणजे तो लेप नाकांतून रक्तपित्तानें रक्तस्राव होतो, त्याला बंद करितो.

## कल्क व घृत.

शीतलामलकल्केनशतधौतघृतेनच ॥
मुंडयित्वाशिरोलेपःकरणीयःपुनःपुनः ॥

**अर्थ**–थंड अवळ्यांचा कल्क व शतधौत घृत यांचा मस्तकाचें मुंडन करून त्यावर थंड लेप वारंवार करावा.

## नस्य.

नस्यंदाडिमपुष्पोत्थंरसोदूर्वाभवोथवा ॥ निवारयत्येवचिरंप्रवृत्तमित्याशुनासांतरशोणितौघं ॥ आम्रास्थिजपलांडोर्वानासिकास्राविरक्तजित् ॥ नासाप्रवृत्तेरुधिरेजलनस्यंप्रशस्यते ॥

**अर्थ**–डाळिंबाच्या फुलांच्या रसाचें; किंवा दूर्वांच्या रसाचें; अथवा आंब्याच्या कोइचें; अथवा कांद्याचा रसाचें किंवा पाण्याचें; नस्य द्यावें; ह्मणजे नासिकेंतून रक्तस्राव होतो, त्याला बंद करितें.

## दुसरा प्रकार.

भृंगीगृहंतुक्षीरेणनारीणांनावनाज्जयेत् ॥

लोहंखदिरसारेणनासिकारक्तनाशनं ॥

अर्थ—कुंभारीमाशीचें घर स्त्रियांचे दुधांत उगाळून नस्य करावें, व लोहभस्म आणि कात एकत्र मिळवून नस्य करावें; ह्मणजे रक्त बंद होतें.

## आर्द्रकादिनस्य.

शृंगगैरिकयोःकल्कंधातक्यामधुकस्यच ॥

घ्राणस्रुतेसृजिप्रोक्तंयोषित्क्षीरेणनावनं ॥

अर्थ—आलें, तुरटी, धायटीचें फुल, जष्टीमध इतक्यांचें चूर्ण स्त्रियांचे दुधांत घालोन नस्य करावें; ह्मणजे नाकांतून पडणारें रक्त बंद होतें.

## हरीतक्यादि नस्य.

अभयादाडिमीपुष्पंलांगलीपिष्टमंभसा ॥ नस्यतोहंतिनासा यारक्तस्रावमतिस्रुतं ॥ त्रिदिनंशर्कराक्षीरप्लुतंगोधूमचूर्णकं ॥ नासारक्तंवारयतिवेगतोवहमानकं ॥

अर्थ—हरीतकी, डाळिंबाचीं फुलें, कळलावी, हीं पाण्यांत वाटून त्यांचें नस्य करावें; किंवा साकर व दूध घालोन गव्हाचें पीठ द्यावें; ह्मणजे नासिकेतून वाहणाऱ्या रक्ताचा नाश होतो.

## कूष्मांडकावलेह.

खंडकामलकेभ्यस्तुरसःप्रस्थद्वयोन्मितः ॥ खंडकूष्मांडमेकैकंसंस्विद्यरसमाहरेत् ॥ अन्यत्रखंडकूष्मांडेसंमतःसकलोरसः ॥ पंचाशच्चपलं स्विन्नंकूष्मांडात्प्रस्थमाज्यतः ॥ पक्वंपलशतंखंडंवासाक्वाथाढकेपचेत् ॥ शिवाधात्रीफलंभार्गीत्रिसुगंधैश्चकार्षिकैः ॥ तालीसविश्वधान्याकमरिचैश्चपलांशकैः ॥ पिप्पलीकुडवंचैवमधुनासंप्रदापयेत् ॥ कासंश्वासंज्वरंहिक्कांरक्तपित्तंहलीमकं ॥ हृद्रोगमम्लपित्तंचपीनसंचव्यपोहति ॥

अर्थ—साकर व आवळ्यांचा रस प्रत्येकीं १२८ तोळे व कोहळ्याचे तुकडे वाफून त्यांचा रस २०० तोळे, तूप ६४ तोळे, शिजलेले कोहळ्याचे तुकडे ४०० तोळे, अडुळशाचा रस २५६ तोळे, काढ्यांत पचन करून दाट झाल्यावर हरीतकी, आवळकाठी, भारंगमूळ, तज, तमालपत्र व एलची हीं प्रत्येकीं तोळा तोळा व तालीसपत्र, संठ, धने व मिरीं, हीं प्रत्येकीं चार चार तोळे, आणि पिंपळी १६ तोळे व मध ३२ तोळे घालोन ठेवावा, त्यांतून अग्निबल पाहून द्यावा; ह्मणजे खोकला, दमा, ज्वर, उचकी, रक्तपित्त, हलीमक, हृद्रोग, आम्लपित्त, आणि पडसें यांचा नाश करितो.

## दुसरा प्रकार.

पुराणंपीनमानीयकूष्मांडस्यफलंदृढं ॥ तद्बीजाधारबीजत्वक्शिराशू न्यंचकारयेत् ॥ ततस्तस्यचखंडानिपचेज्जलतुलाद्वये ॥ तस्मिन्नीरार्ध शिष्टेनुयत्नतःशीतलीकृते ॥ तानिकूष्मांडखंडानिपीडयेत्दृढवाससा ॥ यत्नतस्तज्जलंनीत्वापुनःपाकायधारयेत् ॥ कूष्मांडंशोषयेद्घर्मेताम्रपा त्रेततःक्षिपेत् ॥ क्षिप्त्वातप्तघृतप्रस्थंकूष्मांडंतेनभर्जयेत् ॥ मधुवर्णंतदा लोक्यतज्जलंतत्रनिःक्षिपेत् ॥ सितायाश्चतुलांतत्रक्षिप्त्वातल्लेहवत्पचे त् ॥ सुपक्वेपिप्पलीशुंठीजीराणांद्विपलेपृथक् ॥ पृथक्पलार्धधान्याकप त्रैलामरिचत्वचा ॥ चूर्णमेषांक्षिपेत्तत्रघृतार्धंक्षौद्रमाहरेत् ॥ क्षौद्राधिका सिताकेचित्क्षौद्रात्केचित्सितार्धकं ॥ द्राक्षार्धानिलवंगानिकर्षंकर्पूरकं क्षिपेत् ॥ तद्यथाग्निबलंखादेद्रक्तपित्तक्षतक्षयी ॥ कासश्वासीततश्छर्दि तृष्णाज्वरानिपीडितः ॥ वृष्यंपुनर्नवकरंबलवर्णप्रसादनं ॥ उरःसंधान करणंबृंहणंस्वरबोधनं ॥ अश्विभ्यांनिर्मितंश्रेष्ठंकूष्मांडकरसायनं ॥

अर्थ—जून व पुराणें कूष्मांडफल घेऊन त्याची साल, बिया व गर इत्यादि काढून त्याचे तुकडे करावे, ते ८०० तोळे पाण्यांत अर्धें पाणी आटे तों शिजवून खाली उत. रून गार झाल्यावर ते तुकडे वस्त्रांत बांधून पिळावे. तें पाणी पुनः चुलीवर ठेऊन तो कोहळयाचा चोथा सुकवून ६४ तोळे तूप टाकून त्यावर परतून लाल झाला ह्मणजे त्यापाण्यांत टाकून त्यांत साकर ४०० तोळे घालोन त्याचा पाक करावा. तो पाक लेहा- सारिखा झाला ह्मणजे त्यांत पिंपळी, सुंठ व जिरें; हीं प्रत्येकीं ८ तोळे; व धने, तमाल. पत्र, एलची, मिरें, दालचिनी यांचे चूर्ण दोन दोन तोळें; व मध ३२ तोळे घालोन त्यांत साकर कोणाच्या मतें मधाहून जासती, कोणाच्या मतें मधाहून निमी साकर या प्रमाणें घालावी, व १६ तोळे द्राक्षें, लवंग व कापूर एक तोळा घालावें; आणि घृत भांडात भरून ठेवावें. हें कूष्मांडकरसायन अग्निबळ पाहून द्यावें. तें रक्तपित्त, क्षतक्षय, खोकला, दमा, ओकारी, ताहान व ज्वर यांवर द्यावें. हें वृष्य व तारुण्यकारक, बल, वर्ण यानां करणारें, उरःक्षताचें संधान करणार, पौष्टिक, आणि स्वर चांगला करणारें आहे, हें अश्विनीकुमारानीं उत्पन्न केलें.

## तिसरा प्रकार.

पुराणंपीनमानीयकूष्मांडस्यफलंदृढं ॥ तद्बीजाधारबीजत्वक्शिराशू न्यंचकारयेत् ॥ ततोतिसूक्ष्मखंडानिकृत्वातस्यतुलांपचेत् ॥ गोदुग्ध

स्यतुलायुग्मेमंदाग्नौचालयेच्छनैः ॥ शर्करायास्तुलार्धंचगोघृतंप्रस्थमात्रकं ॥ प्रस्थार्धमाक्षिकंचापिकुडवंनारिकेरतः ॥ प्रियालफलमज्जानांद्विपलंत्रिखुरीपलं ॥ क्षिपेदेकत्रविपचेल्लेहयेत्साधुसाधयेत् ॥ भिषग्भिपक्वमालोक्यज्वलनादवतारयेत् ॥ काष्ठौषध्यःक्षिपेदेषां चूर्णंतानिवदाम्यहं ॥एकोक्षःशतपुष्पायाअथजीरोयवानिका॥ गोक्षुरःक्षुरकःपथ्याकपिकच्छूफलानिच ॥ सप्तमीत्वक्कसर्वेषामेषामक्षयुगंपृथक् ॥ धान्यकंपिप्पलीमुस्तमश्वगंधाशतावरी ॥ तालमूली नागबलावालकंपत्रकंशठी ॥ जातीफलंलवंगंचसूक्ष्मैलाबृहदेलिकान् ॥ शृंगाटकंपर्पटकंसर्वंपलमितंपृथक् ॥ चंदनंनागरंधात्रीफलंचापिकसेरुकं ॥ प्रत्येकंपंचकर्षाणिचोत्तार्येतानिनिःक्षिपेत् ॥ पलद्वयमुशीरस्यपलान्यष्टौपणानिच ॥ कूष्मांडस्यावलेहोयंभक्षितःपलमात्रकः ॥ किंवायथावन्हिबलंभुंजन्रोगान्विनाशयेत् ॥ रक्तपित्तंशीतपित्तमाम्लपित्तमरोचकं॥ वन्हिमांद्यंमदाहंचतृष्णाप्रदरमेवच ॥ रक्तार्शोपित्तजिच्छर्दिपांडुरोगंचकामलां ॥ उपदंशंविसर्पंचजीर्णंचविषमज्वरं ॥ लेहोयंपरमोवृष्योबृंहणोबलवर्धनः ॥ स्थापनीयोविशेषेणभाजनेमृन्मयेनवे ॥

**अर्थ**—जून व पुष्ट कोहळयाचें फळ घेऊन सोलून बीज व गर इत्यादि काढून त्याचे फार बारीक तुकडे करावे. ते ४०० तोळे घेऊन ८०० तोळे दुधांत मंदाग्नीनें चाळवून चाळवून शिजवावे. दाट होऊं लागलें ह्मणजे साकर २०० तोळे, गाईचें तूप ६४ तोळे, मध ३२ तोळे, नारळ १६ तोळे, चारोळया ८ तोळे, व गोखरू ४ तोळे, एकत्र करून दाट चाटण्याजोगा झाला ह्मणजे उतरून त्यांत शेपू १ तोळा, व जिरें, ओंवा, गोखरू, तालिमखाना, हरीतकी, कवासकुहिरी, दालचिनी, हा प्रत्येकीं दोन दोन तोळे; व धने, पिंपळी, नागरमोथा, अश्वगंध, शतावरी, तालमूळी, नागबला, वाळा, पत्रज, कचोरा, जायफळ, लवंग, एलची बारकी व मोठी, शिंगाडे, पित्तपापडा, हीं प्रत्येकीं चार चार तोळे; व चंदन, सुंठ, आवळकाठी, नागकेशर, हीं प्रत्येकीं पांच पांच तोळे; वाळा दोन तोळे, व मिरें ८ तोळे, यांचीं चूर्णें तें खालीं उतरून मग टाकावीं; हा कूष्मांडकावलेह, चार तोळे भक्षण करावा. किंवा अग्निबळ पाहून जास्त कमी द्यावा; ह्मणजे रक्तपित्त, शीतपित्त, आम्लपित्त, अरुचि, अग्निमांद्य, दाह, तृष्णा, प्रदर, रक्तार्श, पित्तजवांति, पांडुरोग, कावीळ, उपदंश, विसर्प, जीर्णज्वर, व विषमज्वर यांचा

नाश करितो, हा लेह अत्यंत वृष्य, पौष्टिक व बळ वाढविणारा असा आहे. हा मातीच्या कोऱ्या भांड्यांत घालून ठेवावा.

## चौथा प्रकार.

कूष्मांडकस्यस्वरसंपलानांशतमात्रकं ॥ रसतुल्यंगवांक्षीरंधात्रीचूर्णं पलाष्टकं ॥ मृद्वग्निनापचेत्तावद्यावद्भवतिपिंडवत् ॥ धात्रीतुल्यासितायोज्यापलार्धंलेहयेदनु ॥ खंडकूष्मांडकंह्येतद्रक्तमभ्यासतोहरेत् ॥ रक्तपित्तह्यम्लपित्तंदाहंतृष्णांचकामलां ॥

अर्थ—कोहळ्याचा स्वरस ४०० तोळे, गाईचें दूध ४०० तोळे, आणि आवळकाठीचें चूर्ण ३२ तोळे हीं सर्व मंदाग्नीवर पचन करून गोळा झाला; ह्मणजे त्यांत साकर ३२ तोळे घालून त्यांतून दोन तोळे भक्षण करीत जावा. हा खंडकूष्मांडलेह अभ्यासानें भक्षण केला असतां, रक्तपित्त, आम्लपित्त, दाह, तृषा, आणि कावीळ, यांचा नाश करितो.

## वासाखंड.

तुलामादायवासायाःपचेदष्टगुणेजले ॥ तेनपादावशेषेणपाचयेदाढकंभिषक् ॥ चूर्णानामभयानांतुखंडंशतपलंतथा ॥ शीतीभूतेतन्निदध्यात्क्षौद्रस्याष्टौपलानिच ॥ वंशोद्भवाचचत्वारिपिप्पलीद्विपलंतथा ॥ चातुर्जातंपलंत्वेकंचूर्णितंतत्रदापयेत् ॥ रक्तपित्तंनिहंत्याशुकासश्वासंक्षतक्षयं ॥ विद्रधिंजाठरंगुल्मंतृष्णाल्हद्रोगपिनिसान् ॥ पलार्धंभोजनंचास्ययथेष्टंतत्रभोजनं ॥

अर्थ—अडुळसा ४०० तोळे घेऊन ३२०० तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून त्यांत हरीतकीचूर्ण १०२४ तोळे व खडिसाकर ४०० तोळे घालून पचन करून थंड झाल्यावर ३२ तोळे मध १६ तोळे वंशलोचन ८ तोळे पिंपळी, आणि चातुर्जात ४ तोळे या सर्वांचे चूर्ण करून त्यांत घालावें; आणि त्यांतून दोन तोळे हा वासाखंड घेत जावा; ह्मणजे रक्तपित्त, खोकला, दमा, क्षतक्षय, विद्रधि, उदर, गुल्म, ताहान, हृद्रोग व पीनस यांचा नाश करितो. यांवर यथेष्ट भोजन करावें.

## उशीरासव रक्तपित्तादिकांवर.

उशीरंबालकंपद्मंकाश्मरीनीलमुत्पलं ॥ प्रियंगुपद्मकंलोध्रंमंजिष्ठाधन्वयासकः ॥ पाठाकिराततिक्तंचन्यग्रोधोदुंबरंसठी ॥ पर्पटंपुंडरीकंचपटोलंकोचनारकं ॥ जंबूशाल्मलिनिर्यासंप्रत्येकंपलसंमितान् ॥

भागान्सुचूर्णितान्कृत्वाद्राक्षायाःपलविंशतिः ॥ धातकींषोडशपलां जलद्रोणद्वयेक्षिपेत् ॥ शर्करायास्तुलांदत्वाक्षौद्रस्यैकतुलांतथा ॥ मासंचस्थापयेन्भांडेमांसिमिरिचधूपिते ॥ उशिरासवइत्येषरक्तपित्तनिवारणः ॥ पांडुकुष्ठप्रमेहार्शःक्रमिकोशापहस्तथा ॥

अर्थ—वाळा, नेत्रवाळा, तांबडें कमळ, शिवण, निळें कमळ, वाघांटीचें मूळ अथवा राळे, पद्मकाष्ठ, लोध्र, मजिठ, धमासा, पाहाडमूळ, किराइत, कटुकी, वडाची साल, उंबराची साल, कचोरा, पित्तपापडा, पांढरें कमळ, आणि पटोल, कांचनवृक्षाची साल, जांभळीची साल, सांवरीचा डिक, हीं बेवीस औषधें पळ पळ प्रमाण व द्राक्षें २० पळें, धायटीची फुलें १६ पळें घेऊन साऱ्यांचे चूर्ण करून दोन द्रोण प्रमाण पाणी घेऊन त्यांत तें चूर्ण व साकर एक तुळा प्रमाण मडक्यांत घालून जटामांसी व मिऱ्यें यांची धुरी देऊन त्यांत तीं सारीं औषधें घालून मडक्याचे तोंडाला मुद्रा देऊन एक महिना ठेऊन नंतर मुद्रा काढावी. याला उशीरासव ह्मणतात. हा आसव पोटांत घ्यावा. येणेकरून रक्तपित्त, पांडुरोग, कुष्ठ, परमा, मुळव्याध, जंतविकार, शोष, हे रोग दूर होतात.

## वमन.

मुस्तेंद्रयवयष्ट्याव्हमदनाव्हंपयोमधु ॥
शिशिरंवमनंयोज्यंरक्तपित्तहरंपरं ॥

अर्थ—नागरमोथे, इंद्रजव, जेष्ठीमध, गेळफळ, दूध व मध हीं थंड गार करून वमन द्यावें; ह्मणजे तें रक्तपित्तनाशक आहे.

## यष्ट्यादि वमन.

यष्टीमधुकसंयुक्तंसक्षौद्रंवमनंहितं ॥

अर्थ—जेष्ठीमध व मध याचेंच वमन हितकारक आहे.

## आरग्वधादि रेचन.

आरग्वधेनधात्र्यावात्रिवृतापथ्ययाथवा ॥
विरेचनंप्रयोक्तव्यंशर्करामाक्षिकोत्तरं ॥

अर्थ—बाहावा व आवळकाठी, अथवा तेड व हिरडा, यांचा काढा करून त्यांत मध साखर घालून प्यावा; ह्मणजे रेच होऊन रक्तपित्त बंद होतें.

## विरेचन.

द्राक्षामधुककाश्मर्यःसितायुक्तंविरेचनं ॥

**अर्थ**–रक्तपित्तावर द्राक्षें, जेष्ठीमध, शिवण इतकीं औषधें साकरेबरोबर विरेचनार्थ द्यावीं.

## आपतर्पण.

जलंखर्जूरमृद्वीकामधूकैःसपरूपकैः ॥

शृतंजलंप्रयोक्तव्यंतर्पणायसशर्करं ॥

**अर्थ**–वाळा, खजूर द्राक्षें, जेष्ठीमध, फालसा या औषधांच्या काढ्यांत साकर घालून द्यावा.

## दुसरा प्रकार.

तर्पणंसघृतक्षौद्रंलाजाचूर्णैःप्रदापयेत् ॥

ऊर्ध्वगेरक्तपित्तेतत्कालेदेयंपिपासिने ॥

**अर्थ**–लाह्यांचें चूर्ण करून त्यांत तूप व मध हें एकत्र करून ऊर्ध्वगरक्तपित्तामध्यें तृषा लागल्यास प्राशनार्थ द्यावें.

## पारावतशकृल्लेह.

सक्षौद्रंग्रंथितेरक्तेलिह्यात्पारावतंशकृत् ॥

**अर्थ**–शरीरांत रक्ताच्या गांठी वळल्या असतां, मधाबरोबर पारव्याची विष्ठा खावी.

## केशरलेह.

अतिनिसृतरक्तोवाक्षौद्रेणरुधिरंपिबेत् ॥

**अर्थ**–ज्याच्या अंगातून फार रक्त गेलें त्याणें मधाबरोबर केशर खावें.

## खदिरादिलेह.

खदिरस्यप्रियंगूनांकोविदारस्यशाल्मलेः ॥

पुष्पचूर्णानिमधुनालिह्याद्वारक्तपित्तनुत् ॥

**अर्थ**–खैर, राळे, कोरळ, सांवरी यांचे फुलाचें चूर्ण मधाबरोबर चाटावें; ह्मणजे रक्तपित्त दूर होतें.

## उदुंबरादिलेह.

पक्वोदुंबरकाश्मर्यपथ्याखर्जूरगोस्तनीः ॥

मधुनाघ्नंतिसंलीढारक्तपित्तंपृथक्पृथक् ॥

**अर्थ**–पिकलेलें उंबराचें फळ, शिवणीचें फळ, हिरडा, खजूर, मनुका यांतून कोणतें एक फळ मधाबरोबर खाल्लें असतां, रक्तपित्तनाशक आहे.

## खंडकाद्यवलेह.

शतावरीमुंडितकाबलामृतापलंत्वचःपुष्करमूलभांर्गी ॥ वृषोबृहत्यौ

खदिरस्यमूलीपृथक्पृथक्पंचपलानिमात्रा ॥ पक्कंजलेद्रोणमितेष्ट मांशंयावद्भवेच्छेषमथैवपूतं ॥ विमूर्छितस्यापिनिधायधीमान्पलानि चद्वादशमाक्षिकस्य ॥ तथासुवर्णस्यचलोहजस्यविद्याद्बितंखंडघृत स्यतुल्यं ॥ देयंपलंषोडशकंविधिज्ञोविपाचयेल्लोहमयेकटाहे ॥ गुडे नतुल्यंचयदाभवेत्तदातुगाविडंगंमगधाचशुंठी॥द्वेजीरकेकर्कटकंफल त्रिकंधान्यंमरीचंसकणासकेसरं ॥ पलेनमात्राविदधीततत्पृथक्सुघ द्दितंचूर्णमिदंघृतेन ॥स्निग्धेकटाहेप्रणिधाययुंज्यात्कर्षप्रमाणंविदधीत चूर्णं ॥ प्रभातकालेन्नसदुग्धपानंगुरूणिचान्नानिचभोजनानि ॥ रक्तं सपित्तंसहसानिहंतिरक्तप्रवाहंचसरक्तशूलं ॥ रक्तातिसारंरुधिरप्रमेहं तथैवबस्तौविहितंनराणां ॥ भगंदरार्शःश्वयथुंनिहंतितथाम्लपित्तंकिल राजरोगं ॥ विशेषतःकुष्ठयुजश्वगुल्मानूबलप्रदंवृष्यतमंप्रदिष्टं ॥ वा तरक्तंप्रमेहंचशीतपित्तंवमिंक्रमीन् ॥ श्वयथुंपांडुरोगंचकुष्ठंप्लीहोदरंत था ॥ आनाहोमूत्रसंस्रावमम्लपित्तंनिहंतिच ॥ चक्षुष्यंबृंहणंवृष्यंमांग ल्यंप्रीतिवर्धनं ॥ आरोग्यपुत्रदंश्रेष्ठंकामाग्निबलवर्धनं ॥ श्रीकरं लाघवकरंखंडकाद्यंप्रकीर्तितं॥ छागंपारावतंमांसंतित्तिरंकुकराशशं ॥ कुरंगाःकृष्णसाराश्चमांसमेषांप्रयोजयेत् ॥ नारिकेलपयःपानंसुनिष ण्णकवास्तुकं ॥ शुष्कमूलकजीवाख्यंपटोलंबृहतीफलं ॥ फलंवार्ता कपक्काम्रंखर्जूरंस्वादुदाडिमं ॥ ककारपूर्वकंपंचमांसंचानूपसंभवं ॥ वर्जनीयंविशेषेणखंडकाद्यंसमश्नता ॥

अर्थ–शतावरी, मुंडितका, चिकणा व गुळवेल हीं ४ तोळे; व दालचीनी, पोखर-मूळ, भारंगमूळ, अडुळसा, रिंगणी, डोरली, खादिरमूळ, हीं प्रत्येकीं २० तोळे घेऊ-न त्यांचा १०२४ तोळे पाण्यांत अष्टमांश काढा करून गाळून घ्यावा, त्यांत ४८ तोळे स्वर्णमाक्षिकभस्म, ४८ तोळे सुवर्णभस्म, ४८ तोळे लोहभस्म, आणि साकर व तूप ६४ तोळे अशीं सर्व एकत्र करून त्यांचा लोहकढईत पाक करावा. तो गुळा-सारिखा पाक झाला; ह्मणजे त्यांत वंशलोचन, वावडिंग, पिंपळी, सुंठ, जिरें, शाहाजिरे, कांकडीचें बी, हरडा, बेहडा, आवळकाठी, धने, मिरीं, पिंपळी, नागकेशर, हीं प्रत्येकीं चार चार तोळे घालोन संपूर्ण एकत्र करून तो खंडकाद्यवलेह स्निग्धभांड्यात ठे वावा, त्यांतून एक तोळा घ्यावा. वर दूध प्यावें; आणि जडान्न भोजन करावें; ह्मणजे

रक्तपित्त, रक्तप्रवाह, रक्तशूल, रक्तातिसार, रक्तमेह, भगंदर, मुळव्याध, सूज, आम्लपित्त, क्षय, कोड, गुल्म, वातरक्त, प्रमेह, शीतपित्त, वांति, कृमि, पांडुरोग, प्लीहा, उदर, आनाह, मूत्रकृच्छ्र, यां सर्वांचा नाश करितो, आणि चक्षुष्य, पौष्टिक, मांगल्य, प्रीति वाढवणारें, आरोग्य व पुत्र देणारें व काम, अग्नि, बल, श्री व लाघव, यांतें करितें. यावर बकरा, पारवा, तित्तिर, खेकडे, ससा, हरण, काळवीट, यांचें मांस भक्षण करावें; आणि नारळ, दूध, कुरडु, चाकवत, सुखे मुळे, जीवंती, पडवळ, वांगे, वेलवांगे, पिके आंबे, खजूर, गोडें डाळिंब, ककारादि पांच जलस्थलजजंतूंचीं मांसें, हे पदार्थ खंडकाद्यवलेहभक्षण करणारानें विशेषें करून वर्ज करावे.

## रक्तपित्तकुठाररस.

शुद्धपारदबलिप्रवालकंहेममाक्षिकभुजंगरंगकं ॥ मारितंसकलमेतदुत्तमं भावयेच्चविततंद्रवैस्त्रिशः ॥ चंदनस्यकमलस्यमालतीकोरकस्यवृषपल्लवस्यच ॥ धान्यवारणकणाशतावरीशाल्मलीवटजटामृतस्यच ॥ रक्तपित्तकुलकंडनाभिधोजायतेरसवरोस्रपित्तिनां ॥ प्राणदोमधुवृषद्रवैरयंसेवितस्तुवसुकृष्णलोमतः ॥ नास्त्यनेनसममत्रभूतलेभेषजंकिमपिरक्तपित्तिनां ॥

अर्थ–शुद्ध पारा, गंधक, प्रवाल, सुवर्णमाक्षिक, नाग, कथील, यांचीं भस्में समभाग एकत्र करून नंतर चंदन, कमळ, मोगरीचीं फुलें, अडुळसा, धने, गजपिंपळी, शतावरी, सांवर, वडाचे पारंबे, गुळवेल, या प्रत्येकांच्या रसाच्या तीन भावना द्याव्या. हा रक्तपित्तकुलकुठार रस एक मासा अडुळशाचा रस व मध यांशीं द्यावा; ह्मणजे रक्तपित्ताचा नाश करितो.

## वासामृत.

आटरूपनवपल्लवद्रवंपालिकारसकभस्मवल्लकं ॥
कर्षसंमितमधुप्रयोजितंप्राश्यनश्यतिचरक्तपित्तकं ॥

अर्थ–अडुळशाच्या कोंवळया पाल्याचा रस चार तोळे व पाऱ्याचें भस्म, एकत्र करून त्यांत मध घालून एक तोळा द्यावा; ह्मणजे रक्तपित्ताचा नाश होतो.

## बोलपर्पटीरस.

सूतगंधकसुकज्जलिकायाःपर्पटीसमयुतासमभागं ॥ बोलचूर्णविहितंप्रतिवाप्यंस्याद्रसोयमसृगामयहारी ॥ वल्लयुग्मयुगलंप्रतिदेयंशर्करामधुयुतःकिलदत्तः ॥ रक्तपित्तगुदजस्रुतियोनिस्रावमाशुविनिवारयतीशः ॥

अर्थ–पारा व गंधक, यांची कज्जली, आणि बोळाचें चूर्ण हीं एकत्र करून तें लोह

पात्रांत तापवून गोमयावर केळीचें पान ठेवून त्यावर ओतून त्यावर केळीचें पान व शेण घालावें; ह्मणजे ही रक्तरोगनाश करणारी बोलपर्पटी होत्ये, ही दोन वाल साकर व मध यांशीं द्यावी; ह्मणजे रक्तपित्त, मुळव्याध, रक्तस्राव व योनिस्राव, यांचा नाश करित्ये.

## सुधानिधिरस.

गंधसूतंमाक्षिकंलोहचूर्णसर्वंघृष्टंत्रैफलेनोदकेन ॥
लोहेपात्रेगोलिकासाचकृत्वारात्रौदद्याद्रक्तपित्तप्रशांत्यै ॥

अर्थ-गंधक, पारा, स्वर्णमाक्षिक व लोह हे सर्व समभाग घेऊन त्यांचा त्रिफळ्या-च्या काढ्यांत लोखंडाच्या भाड्यांत खल करून त्याची गोळी करावी, ती रक्तपित्त-नाशार्थ रात्रौ द्यावी.

## आटरूषाद्यर्क.

आटरूपकमृद्वीकापथ्यार्कश्चसशर्करः ॥ वृषार्कोवासमधुकोरक्तपित्त निवारणः ॥ लोध्रप्रियंगुमृद्वीकाचंदनार्कोरसान्वितः ॥ वासायाःक्षौद्रसंयुक्तऊर्ध्वाधोरक्तपित्तहृत् ॥ अर्कोदाडिमपुष्पोत्थोमृद्वीकासंभवोपिवा ॥ पानात्तस्यहरेन्नासारक्तमाम्रास्थिजोपिवा ॥

अर्थ-अडुळसा, द्राक्षें व हरीतकी यांच्या अर्कांत साकर घालून द्यावा; किंवा अडुळ-सा व मधुकाष्ठ, यांचा अर्क द्यावा; किंवा लोध्र, राळे, द्राक्षें व चंदन यांच्या अर्कांत अडुळशाचा रस व मध घालोन द्यावा; अथवा डाळिंबाचीं फुलें व द्राक्षें यांचा अर्क द्यावा; किंवा आंब्याच्या कोईचा अर्क द्यावा; ह्मणजे वातरक्त नाश पावतें.

## शतावरीघृत.

शतावरीदाडिमतिंतिडीकंकाकोलिकंवामधुकंविदारी ॥ पिष्ट्वाचमूलंफलपूरकस्यपचेद्घृतंक्षीरचतुर्गुणंतत् ॥ कासज्वरोन्मादविबंधशूलंतद्रक्तपित्तंविविधंनिहंति ॥

अर्थ-शतावरी, डाळिंब, चिंच, कंकोळ, ज्येष्ठीमध, भुयकोहळा, आणि महाळुं-गाचें पंचांग घेऊन त्याचा कल्क करून त्यांत चौपट दूध घालोन त्यांत तूप सिद्ध करावें. तें खोकला, ज्वर, उन्माद, मलबद्धता, शूल, आणि अनेकप्रकारचें रक्तपित्त यांचा नाश करितें.

## दूर्वादितैल.

दूर्वामधुकमंजिष्ठाद्राक्षेक्षुरसचंदनैः ॥ सारिवाघननक्ताह्वैस्तैलप्रस्थं

विपाचयेत् ॥ क्षीरंचतुर्गुणंदत्वासिद्धमभ्यंजनेहितं ॥ रक्तपित्तहरंह्ये तद्बल्यंवातघ्नमुत्तमं ॥ दूर्वातैलमितिख्यातंसुवर्णकरणंमहत् ॥

अर्थ–दूर्वा, ज्येष्टीमध, मंजिष्ठा. द्राक्षें, उसांचा रस, चंदन, पांढरी उपळसरी, नागरमोथा व हळद हीं समभाग घेऊन त्यांचे काढयांत ६४ तोळे गोडें तेल पचन करावें. त्यांत दूध चौपट घालोन कढऊन सिद्ध झालें, तें अंगाला लावण्यास हितकर आहे. हें रक्तपित्ताचा नाश करितें, व बल देतें. हें उत्तम वातनाशक आहे. हें दूर्वातैल अंगकांति चांगली करितें.

## दुसरा प्रकार.

दूर्वाभव्यफलंमाषकुलित्थौवंशपत्रिका ॥ जलस्थलोद्भवौकर्णमोचकौ खरमंजरी ॥ दंडोत्पलस्यमूलंतुनिःक्वाथ्याष्टगुणेंभसि ॥ तत्पादशेषि तेतैलंतुल्यंकृत्वाविपाचयेत् ॥ तत्तैलंप्रतिघर्षेणआनाहाख्यंगदंजयेत् ॥

अर्थ–दूर्वा, नीवाचें फळ, उडीद, कुळिथ, वंशजातिगवत, जलामध्यें व स्थलामध्यें होणारी मोचा, आधाडा व सहदेवीची मुळ हीं सर्व समभाग घेऊन औषधांचें आठपट पाणी ठेऊन चतुर्थांश काढा उरवावा; आणि तो तितकेंच तेल घालून पुनः पचवावा. या तैलानें अभ्यंग केलें असतां, आनाहाख्य रोगाला दूर करितें.

## रक्तपित्ताला पथ्य.

अधोगतेछर्दनमूर्ध्वनिर्गमेविरेचनंस्यादुभयत्रलंघनं ॥ पुरातनाःषष्टि कशालिकोद्रवाःप्रियंगुनीवारयवप्रसादकाः॥ मुद्गामसूराश्चणकास्तु वर्योमकुष्टकश्चाढकुवार्मिमत्स्याः ॥ शशःकपोतोहरिणैणलावःशरारि पारावतवर्तिकश्च॥ बकाउरभ्राश्चसकालपुच्छाःकपिंजलाश्चापिकपा यवर्गाः॥ गवामजायाश्चपयोघृतंचघृतंमहिष्याःपनसंप्रियालं॥ रंभा फलंकंचनतंदुलीयपटोलवेत्राग्रमहार्द्रकाणि ॥ पुराणकूष्मांडफलंच पथ्यंतालानितद्बीजजलानिवासा ॥ स्वादूनिचिल्लानिचदाडिमानि खर्जूरधात्रीमिशिनारिकेरं ॥ कसेरुशृंगाटकपौष्कराणिकापित्थशालू कपरूषकानि ॥ भूनिंबशाकंपिचुमंदपत्रंतुंबीकलिंगानिचलाजसक्तु ॥ द्राक्षासितामाक्षिकमिक्षवश्चशीतोदकंचोद्भिदवारिचापि ॥ सेकाव गाहःशतधौतसर्पिरभ्यंगयोगःशिशिरःप्रदेशः॥हिमानिलश्चंदनमिंदु

पादाःकथाविचित्राश्चमनोनुकूलाः ॥ धाराग्रहंभूमिगृहंसुशीतंवैडूर्यमुक्तामणिधारणंच ॥ रक्तोत्पलांभोरुहपत्रशय्याक्षौमांबरंचोपवनं सुशीतं ॥ प्रियंगुचंदनरूषिकांतामालिंगितंचापिवरांगनानां ॥ पद्माकराणांसरितोद्भतानांचंद्रोदयानांहिमशीकराणां ॥ सुशीतलानां गिरिनिर्झराणामतिप्रशस्तानिचकीर्तनानि ॥ प्रतीरनीरंहिमवालुकानिमित्रंनृणांशोणितपित्तरोगे ॥

अर्थ—अधोगत रक्तपित्त झालें असतां, वमन द्यावें; व ऊर्ध्वगत झालें असतां, रेचक द्यावें; आणि दाहा मार्गांनीं जात असतां, लंघन करवावें; आणि जुने साउकी भाताचे तांदूळ, सावे, वर्या, यव, देवभात, मूग, मसुरा, चणे, तुरी व रानमूग हीं धान्यें; व गंडजाति व शूर्पाकार असे मत्स्य; आणि ससा, कवडा, हरिण, कृष्णसार, लावे, बगळा, पारवा, वनचटक, बक, मेंढा, भेकर, कपिंजलपक्षी व तुरटवर्ग; आणि गाईचें व शेळीचें तूप, दूध, आणि म्हशीचें तूप, पनस, चारोळी, केळें, कंचन, तांदुळजा, पडवळ, वेत्राग्र, मोठें आलें, जुना कोहळा, ताडफळ, ताडी, अडुळसा, गोड चिलीची भाजी, डाळिंब, खजूर, आवळकाठी, बडीशेप, नारळ, कचरा, शिंगाडे, पुष्करमूळ, कवीठ, पद्मकंद, फालसा, किराईत, शाक, कडलिंबाचीं पानें, पांढरा भोपळा, कुडा, लाह्या, सातु, द्राक्ष, साकर, मध, ऊंस, थंड पाणी, झऱ्याचं पाणी, जलाचें सिंचन, पाण्यांत बुडद्या मारणें, शतधौतघृताचें अभ्यंग, शीतळ उटणें, थंड वारा, चंदन, चांदणें, विचित्र व मनाला चांगल्या अनुकूल अशा गोष्टी, जलधारागृह, शीतळ भुयार वैडूर्य, मोत्य व रत्नें यांचे धारण; तांबडें कमळ, कमळपत्रांचा बिछाना, रेशमाचें वस्त्र, शीतळ बाग, सांवे, चंदनर्चर्चितस्त्रियांचें आलिंगन, कमळें फुललीं तळें किंवा नदी; चंद्रोदय, चांदणे, शीतळझऱ्याचें पाणी, तीराचें पाणी व थंड वाळवंट, हीं रक्तपित्तरोगावर पथ्यकारक आहेत.

## रक्तपित्तीं अपथ्य.

व्यायामाध्वनिषेवणंरविकरास्तीक्ष्णानिकर्माणिचस्रोतोवेगविधारणंचपलताहस्त्यश्वपानानिच ॥ स्वेदांबुप्रतिधूमपानसुरतक्रोधःखलुस्याद्गुडोत्रार्तांकीतिलमाषसर्षपदधिक्षीराणिकौपंपयः ॥ तांबूलंललदंबुमद्यलशुनंशिंबीविरुद्धाशनंकटूम्लंलवणंविदाहिचगणस्त्याज्योस्रपित्तेनृणां ॥

अर्थ—व्यायाम, मार्गचालणें, सूर्यकिरण, उग्रकर्म, मलमूत्रादिवेगाचें धारण, चपलता, हत्ती व घोडे यांवर बसणें, घाम काढणें, धूमपान, मैथुन, क्रोध, वांगें, तीळ, उडीद,

मोहऱ्या, दहीं, दूध, विहिरीचें पाणी, तांबूल, सांचलेलें पाणी, मद्य, लसूण, शिंबीधान्य, विरुद्धाशन, तिखट, आंबट, मीठ व विदाहिगण हे पदार्थ रक्तपित्तीमनुष्यानें टाकावे.

---

## क्षयावर कर्मविपाक:

ब्रह्महाक्षयरोगीस्यात्क्षयीस्यात्क्षेत्रमारणे ॥

अर्थ—ब्रह्महत्या, किंवा क्षेत्र, बाग, स्त्रिया इत्यादिकांचा नाश केला असतां, क्षयरोग होतो.

### कदलीदान.

कारयेत्कदलींदिव्यांपत्रैःसर्वत्रसंयुतां ॥ फलपूगेनसंयुक्तांसुवर्णस्यपलेनतु ॥ यथाविभवतःकुर्याद्वस्त्रेणावेष्टयसूत्रकैः ॥ ब्राह्मणान्भोजयेच्चापि भक्षैर्नानाविधैःशुभैः ॥ होमंचकारयेत्तत्रपूर्ववद्ब्राह्मणेनच ॥ तस्मैतांकदलींदद्याद्वस्त्रालंकारपूर्विकां ॥ पूजितायदरिद्रायव्रतस्थायात्मवेदिने ॥ धर्मज्ञायातिदांतायमंत्रेणानेनतांक्षयी ॥ हिरण्यगर्भपुरुषपरात्परजगन्मय ॥ रंभादानेनदेवेशक्षयंक्षपयमेप्रभो ॥ पुण्याहवाचनंकार्यंब्राह्मणैर्वेदपारगैः ॥ शिष्टैरिष्टैर्बंधुभिश्चसहभोजनमाचरेत् ॥

अर्थ—क्षयरोग्यानें—द्रव्यानुसार सुवर्णाची फलपत्रांनीं युक्त कदली करून तिला वस्त्र गुंडाळून सूत्रानें वेष्टन करावी, व नानाप्रकारची पक्वान्नें करून ब्राह्मणास भोजन घालावें, होम करावा; नंतर अलंकारपूर्वक ती केळ. दरिद्री, व्रतस्थ, आत्मज्ञ, धर्मज्ञ, व शांत अशा ब्राह्मणास पुढें लिहिलेल्या हिरण्यगर्भ इत्यादि मंत्रानें पूजा करून दान द्यावी; पुण्याहवाचन करावें; नंतर उत्तम ब्राह्मण, इष्ट, बंधु, यांचे पंक्तीस भोजन करावें.

### ब्रह्मचर्यादियोग.

ब्रह्मशास्त्राण्यविज्ञायप्रायश्चित्तंददातियः ॥ राजयक्ष्माभवेत्तस्यरोगोपीडातिदारुणा ॥ पूर्वोक्तेनविधानेनप्रदद्यात्प्रतिरूपकं ॥ राजयक्ष्माकृशतनुःशंखोपासिततर्जनिः ॥ दधान्त्रिनेत्रोदंष्ट्राभ्यांदृष्टोहंहेतुमुद्यतः ॥

अर्थ—जो धर्मशास्त्र जाणल्यावांचून प्रायश्चित्त देतो, त्याला राजयक्ष्मा होतो. त्याची पीडा फार कठीण होते. त्याणे पूर्वीं सांगितलेल्या विधानानें क्षयरोगाची कृश, तर्जनीनें शंख धरणारी, त्रिनेत्र, दाढांनीं चावणारी व तारण्याकरितां येणारी अशी मूर्ति करून दान द्यावी.

## ज्योतिशास्त्राभिप्राय.

ब्रह्मचर्येणदानेनतपसादेवतार्चनैः ॥ सत्येनाचारयोगेनरविमंडलसे
वया ॥ वैद्यविप्रार्चनाच्चैवरोगराजोनिवर्तते ॥

अर्थ–ब्रह्मचर्य, दान, तप, देवपूजा, सत्य, आचारयोग, सूर्याची सेवा, वैद्य व ब्राह्मण यांची पूजा या योगानें क्षयरोग नाश पावतो.

## दुसरा प्रकार.

कुष्ठकंडुविकारैश्चक्षयरोगभगंदरैः ॥
गजादिवाहनभयंभवेद्यइनगेबुधे ॥

अर्थ–जन्मकाळी सूर्यक्षेत्री किंवा सूर्यसंयोगानें बुधग्रह पडेल; तर कुष्ठ, कंडु, क्षय भगंदर, किंवा गजादिक वाहनापासून भय प्राप्त होईल.

## देवपूजादियोग.

चंद्रक्षेत्रेयदाचांद्रिर्जायतेयस्यजन्मनि ॥
सजातःक्षयरोगीस्यात्कुष्ठादीनिचपांडुता ॥

अर्थ–जन्मकाळीं चंद्र क्षेत्रामध्यें जर बुधाचा योग असेल; तर त्या लग्नावर उत्पन्न झालेला प्राणी क्षयरोगी होईल; किंवा कुष्ठ, पांडु, इत्यादिक रोग होतील.

## शास्त्रार्थ.

नित्यंस्वदेवपूजाभक्तिर्भेषज्यदेवतागुरुषु ॥
छागलमांसपयोश्नन्जीवतियक्ष्मीचिरंधृतिमान् ॥

अर्थ–नित्य देवाची पूजा व औषध, देवता; आणि गुरु, यांची भक्ति; आणि बकऱ्याचें मांस व दूध यांचें भक्षण या उपायानीं क्षयरोगी चिरकाल वाचतो.

उपद्रवान्सरवरवैकृतादीन्जयेद्यथाक्षिप्रसमीक्ष्यशास्त्रं ॥
त्यजेत्कुवैद्यप्रतिपादितानिबुद्धेर्विरुद्धानिचभेषजानि ॥

अर्थ–क्षणामध्यें जो विकृति होतात, त्या शास्त्रांत सांगितल्या मार्गानें कुशल वैद्याकडून जिंकाव्या. कुवैद्याचें औषध घेऊ नये, व समजल्यावरविरुद्ध औषधें सेवन करू नयेत.

## गीतादिउपाय.

गीतवादित्रइष्टैश्चप्रियस्तुतिभिरेवच ॥
हर्षणाश्वासनैर्नित्यैर्गुरूणांसमुपासनैः ॥

अर्थ–गीत, वाद्य, इष्टपदार्थ, प्रिय अशा स्तुति, आणि आनंददायक पदार्थ, आश्वासनवाक्य, व नित्य गुरूंची उपासना, या उपायांनीं क्षय जिंकावा.

## राजयक्ष्माक्षयनिदान.

वेगरोधात्क्षयाच्चैवसाहसाद्विषमाशनात् ॥
त्रिदोषोजायतेयक्ष्मागदोहेतुचतुष्टयात् ॥

अर्थ–वातादिकांचा व मलमूत्राचा वेगरोध, रसादि धातुक्षय, साहसकर्म, आणि विषमाशन या चार कारणानीं त्रिदोषात्मक, क्षय (राजयक्ष्मा) व्याधि उत्पन्न होतो.

## अनुलोम व प्रतिलोम क्षयाची संप्राप्ति.

कफप्रधानैर्दोषैस्तुरुद्धेषुरसवर्त्मसु ॥ अतिव्यवायिनोवापिक्षीणेरेत स्यनंतराः ॥ क्षीयंतेधातवःसर्वेततःशुष्यतिमानवः ॥ राज्ञश्चंद्रमसो यस्मादभूदेषकिलामयः ॥ तस्मात्तंराजयक्ष्मेतिकेचिदाहुर्मनीषिणः ॥

अर्थ–कफप्रधान वातादिदोषानीं रसवाहिनी सर्व शिरा रुद्ध जाहाल्या असतां, सर्व रस जागचे जागीं आटतात; नंतर अनुक्रमें करून रस, रक्त, मांस, इत्यादि समग्रातु क्षीण होतात. हा अनुलोमक्षय जाणावा; आणि अतिमैथुन करणाऱ्या पुरुषाचे वीर्य क्षीण जालें असतां वायूचा कोप होतो; आणि तत्समीपस्थ मज्जादि विलोमसर्वधातु क्षीण होतात, त्यामुळें मनुष्य शुष्क होतो. हा रोग औषधींचा राजा जो चंद्रमा त्यासही झाला, यास्तव याला राजयक्ष्मा म्हणतात.

## पूर्वरूप.

श्वासांगसादकफसंस्रवतालुशोषवम्यग्निसादमदपीनसकासनिद्राः॥
शोषेभविष्यतिभवंतिसचापिजंतुःशुक्लेक्षणोभवतिमांसपरोरिरंसुः ॥
स्वप्नेषुकाकशुकशल्लकिनीलकंठगृध्रास्तथैवकपयःकृकलासकाश्च ॥
तंवाहयंतिसनदीर्विजलाश्चपश्येत्शुष्कांस्तरून्पवनधूमदवार्दितांश्च॥

अर्थ–श्वास, अंगग्लानि, तालुशोष, कफाचा स्राव, ओकारी, अग्निमांद्य, मद, पडसें, खोकला व निद्रा इत्यादिक क्षय उत्पन्न होण्यापूर्वीं लक्षणें होतात. रोग्याचे डोळ्यास पांढरेपणा, मांस भक्षणाची इच्छा, स्त्रीसहवर्तमान क्रीडेची इच्छा इत्यादि होतात; आणि स्वप्नामध्यें काक, शुक, साळशिंदरी, मयूर, गीध, वानर, व सर्डा इत्यादिकांवर बसलों आहें असें पाहतो. व नद्या शुष्क झाल्या, अरण्यांत शतावधी शुष्क वृक्ष दावाग्नीनें जळतात, व वायू आणि धूम ईहीं करून व्याप्त, आणि भोजनकाळीं अन्नांत केश व व तृणें पडलीं आहेत असें स्वप्नांत पाहतो. इत्यादिक राजयक्ष्म्याचीं पूर्वरूपें जाणावीं.

## क्षयाचें सामान्य त्रिरूपलक्षण.

अंसपार्श्वाभिसंतापःसंतापःकरपादयोः ॥
ज्वरःसर्वांगगश्चैवलक्षणंराजयक्ष्मणः ॥

अर्थ—अंस व पार्श्व यांचा संताप, व हातपायांची आग, आणि सर्वांगाला ज्वर हें राजयक्ष्माचें लक्षण जाणावें.

## एकादशरूप, षड्रूप, आणि त्रिरूप क्षयाचें कारण.

स्वरभेदोनिलाच्छूलंसंकोचश्चांसपार्श्वयोः ॥ ज्वरोदाहोतिसारश्चपित्ताद्रक्तस्यचागमः ॥ शिरसःपरिपूर्णत्वमभक्तच्छंदएवच ॥ कासःकंठस्यचध्वंसोविज्ञेयःकफकोपतः ॥ एकादशभिरेतैर्वाषड्भिर्वापिसमन्वितं ॥ कासातिसारपार्श्वार्तिस्वरभेदारुचिज्वरैः ॥ त्रिभिर्वापीडितं लिंगैर्ज्वरकासासृगामयैः ॥ जह्याच्छेपार्दितंजंतुमिच्छन्सुविपुलंयशः ॥

अर्थ—त्रिदोषोत्पन्नक्षयरोगामध्यें वातप्रधान असेल, तर स्वरभेद, खांदे आणि बरगड्या यांत शूळ व आंत ओढून धरल्या सारिखी पीडा होत्ये, व पित्ताधिकामध्यें ज्वर, दाह, अतिसार, आणि तोंडांतून रक्त पडणें इत्यादिक लक्षणें होतात; आणि कफाधिकामध्यें मस्तकाला जडत्व, अन्नद्वेष, खोकला, आणि स्वरभेद हीं लक्षणें होतात; या सर्व अकरा लक्षणानीं; अथवा खोकला, अतिसार, पार्श्वशूळ, स्वरभेद, अरुचि, आणि ज्वर या साहा लक्षणानीं; किंवा ज्वर, खोकला, आणि रक्तविकार ह्या तीन लक्षणानीं युक्त जो क्षयरोगी तो यश इच्छिणाऱ्या वैद्यानें टाकावा.

## पुनःअसाध्यलक्षण.

सर्वैरर्धैस्त्रिभिर्वापिलिंगैर्मांसबलक्षयैः ॥ युक्तोवर्ज्यश्चिकित्स्यैस्तुसर्वरूपस्ततोन्यथा ॥ महाशनंक्षीयमाणंअतीसारनिपीडितं ॥ शूनमुष्कोदरंचैवयक्ष्मिणंपरिवर्जयेत् ॥

अर्थ—ज्याचा मांस आणि बल यांचा क्षय झाला, आणि एकादश लक्षण, अथवा षड् लक्षण, अथवा त्रिलक्षण युक्त जो क्षयरोगी तो असाध्य जाणावा; आणि जो पुष्कळ अन्न खात असून क्षीण होणारा, अतिसारानें पिडित आणि ज्याचे उदरास व वृषणास सूज, असा क्षयरोगी वैद्यानें सोडावा.

## साध्यलक्षण.

ज्वरानुबंधरहितंबलवंतंक्रियासहं ॥
उपक्रमेदात्मवंतंदीप्ताग्निमकृशंनरं ॥

अर्थ–ज्या रोग्याला ज्वर नसून बलवान, चिकित्सा सहन करणारा, विचारवान, व ज्याचा अग्नी प्रदीप्त, आणि केवळ कृश नव्हे अशा रोग्याला उपचार करावे.

## असाध्यलक्षण.

शुक्लाक्षमन्नद्वेष्टारंऊर्ध्वश्वासनिपीडितं ॥
कृच्छ्रेणबहुमेहंतंयक्ष्माहंतिचमानवं ॥

अर्थ–ज्या रोग्याचे नेत्र शुक्लवर्ण, अन्न द्वेष करणारा, ऊर्ध्व श्वासी, आणि कष्टानें फार मुतणारा, अशा रोग्याला क्षय मारितो.

## क्षयहारकपदार्थ.

वृंताककारवेल्लंचतैलंबिल्वंचराजिकां ॥
मैथुनंचदिवानिद्रांक्षयीकोपंविवर्जयेत् ॥

अर्थ–वांगें, कारलें, तेल, बेलफळ, मोहऱ्या, मैथुन, दिवसास झोंप इतकीं क्षयी मनुष्यानें वर्ज करावीं.

सधान्ययवगोधूमामुद्गाश्चापिसदाहिताः ॥
स्त्रियश्चतुष्पदेश्रेष्ठाःपुमांसोविहगामताः ॥

अर्थ–धने, सातु, गहूं, मूग चार पायांचे जनावरामध्यें स्त्री जाती; आणि पक्षांत पुरुष जाती हे क्षयरोग्यास हितकारक आहेत.

छागंमांसंपयश्छागंसर्पिश्छागंसशर्करं ॥
छागोपसेवासततंछागमध्येतुयक्ष्मनुत् ॥

अर्थ–शेळीचें मांस, दूध, तूप साकर सहित, शेळ्यांची सेवा, व त्यांत बसणें, हें सर्व क्षयरोगनाशक आहे.

गीतवादित्रशब्दैश्चप्रियस्तुतिभिरेवच ॥ हर्षणाश्वासनैर्नित्यंगुरूणां समुपासनैः ॥ ब्रह्मचर्येणदानेनतपसादेवतार्चनैः ॥सत्येनाचारयोगेन रविमंडलसेवया ॥ वैद्यविप्रार्चनाच्चैवरोगराजोनिवर्तते ॥

अर्थ–गीत, वाद्य. घोष, प्रियस्तुति, हर्ष, आश्वासन, गुरुसेवा, ब्रह्मचर्य, दान, तप, देवतार्चन, सत्य, आचार, सूर्याची सेवा, वैद्य व ब्राह्मण यांची सेवा व पूजा केली; ह्मणजे राजयक्ष्मा निवृत्त होतो.

## षडंगयूष.

द्रव्यतोद्विगुणंमांसंसर्वतोष्टगुणंजलं ॥
पदस्थंसंस्कृतंचाज्यंषडंगोयूषउच्यते ॥

अर्थ–औषधापेक्षां मांस दुप्पट घ्यावें, व सर्वांच्या आठपट पाणी घालावें. चतुर्थांश आटल्यावर तूप घालावें; याला षडंग यूष ह्मणतात.

## ज्वरदाहीं क्रिया.

ज्वराणांशमनीयोयःपूर्वमुक्तोक्रियाविधिः ॥
क्षयिणांज्वरदाहेषुससर्वोपिप्रशस्यते ॥

अर्थ–जो पूर्वी ज्वरांच्या शमनार्थ क्रियेचा प्रकार सांगितला, तो संपूर्ण क्षयामध्यें ज्वर व दाह इत्यादिकांवर योजावा.

## वर्खभक्षणाचें माहात्म्य.

नवनीतसितामधुप्रयुक्तोवरखोहेमभवःक्षयंक्षिणोति ॥
वितथःप्रभवेदयंप्रयोगोयदितन्मेशपथःसदाशिवस्य ॥

अर्थ–लोणी, खडीसाखर, मध, यांशीं सोन्याचा वर्ख सेवन केला असतां, क्षयाचा क्षय होतो. मी माझा उपास्य जो सदाशिव त्याचीच शपथ वाहून सांगतों कीं; हा प्रयोग कधीं व्यर्थ होणार नाहीं.

## च्यवनप्राश्यावलेह.

पाटलारणिकाश्मर्यबिल्वारलुकगोक्षुराः॥पर्ण्यौबृहत्यौपिप्पल्यःशृंगी द्राक्षामृताभयाः ॥ बलाभूम्यामलीवासाऋद्धिर्जीवंतिकाशठी ॥ जीवकर्षभकोमुस्तंपौष्करंकाकनासिका॥ मुद्गपर्णीमाषपर्णीविदारीचपुनर्नवा ॥ कांकोल्यौकमलंमेदेसूक्ष्मैलागरुचंदनं ॥ एकैकंपलसंमानं स्थूलचूर्णितमौषधं ॥ एकीकृत्यबृहत्पात्रेपंचामलशतानिच॥ पचेत् द्रोणजलेक्षिप्त्वाग्राह्यमष्टांशशेषितं॥ ततस्तुतान्यामलानिनिष्कुलीकृत्यवाससा ॥ दृढहस्तेनसंमर्दक्षिप्त्वातत्रततोघृतं ॥ पलसप्तमितंतोयं किंचित्भृष्टाल्पवन्हिना॥ ततस्तत्रक्षिपेत्क्वाथंखंडंचार्धपलोन्मितं ॥ लेहवत्साधयित्वाचचूर्णानीमानिदापयेत् ॥ पिप्पलीद्विपलाज्ञेयातुगाक्षीरीचतुःपला॥ प्रत्येकंचत्रिशाणाःस्युस्त्वगेलापत्रकेशराः॥ ततस्त्वकीकृतेतस्मिन्क्षिपेत्क्षौद्रंचषट्पलं॥ इत्येवंच्यवनप्रोक्तंच्यवनप्राशसंज्ञिकं ॥ लेहंवन्हिबलंदृष्ट्वाखादेत्क्षीणोरसायनं॥ बालवृद्धक्षतक्षीणानारीक्षीणाश्चशोषिणः ॥ हृद्रोगिणःस्वरक्षीणायेनरास्तेपुयुज्यते ॥

कासंश्वासंपिपासांचवातास्रमुरसोग्रहं ॥ वातपित्तंशुक्रदोषंमूत्रदोषं चनाशयेत् ॥ मेधांस्मृतिंस्त्रीषुहर्षंकांतिंवर्णंप्रसन्नतां ॥ अस्मात्प्रयोगादाप्नोतिनरोजीर्णविवर्जितः ॥

अर्थ-पाडळ, ऐरण, शिवण, बेलमूळ, टेटू, गोखरू, रानगांजा, रानभाल, रिंगणी, मोतरिंगणी, पिंपळी, कांकडशिंगी, द्राक्ष, गुळवेल, हरीतकी, चिकणामूळ, भूयआवळी, अडुळसा, ऋद्धि व सिद्धि या दोन मिळत नाहींत, यांचे आभावीं वाराहीकंद व हरणवेल योजावी. कचोरा, जीवक व ऋषभक या दोहोंचे आभावीं विदारीकंद; नागरमोथे, पोखरणीचे मूळ, कावळभिळ, रानमुंगी, रानउडीद, विदारीकंद, पुनर्नवा, कांकोली, क्षीरकाकोली, या दोहोंचे आभावीं आसंध; कमळ, मेदा व महामेदा या दोहोंचे आभावीं ज्येष्ठमध, विलायची, कृष्णागर हीं सारी औषधें एक एक पळ प्रमाण घेऊन थोडी थोडी कुटून एकाजागी करून मग मोठे मोठे आवळे पांचशे मोजून घेऊन त्या मोठ्या मडक्यांत ते आवळे व तीं सारीं औषधें घालून त्यांत पाणी एक द्रोण प्रमाण टाकून आठवा हिस्सा पाणी राही, तों पावेतों काढा कढवून गाळून ठेवावा; मग त्या औषधांतलि आवळे काढून घ्यावे. औषधें टाकावीं. मग चांगले बळकट फडके घेऊन कल्हैच्या भांड्याचे तोंडाला बांधून त्याजवर ते आवळे ठेऊन हाताने बळकट मर्दन करून खाली चिखलासारखा आवळयाचा मगज पडेल तो घ्यावा; मग सात पळ प्रमाण तूप घेउन त्यांत तो आवळयाचा मगज हलक्या अग्नीवर थोडा थोडा परतवून पाहिला काढा ठेविला आहे, त्यांत तो मगज व साकर अर्धतुलाप्रमाण टाकून घण होई तो पर्यंत त्याचा पाक करावा. त्यांत चूर्ण टाकावयाची औषधें येणे प्रमाणें. पिंपळी दोन पळें, वंशलोचन चार-पळें, दालचिनी, विलायची, तमालपत्र, नागकेशर, हीं चार औषधें तीन तीन शाण प्रमाणें घ्यावीं; मग साऱ्यांचे चूर्ण करून त्या पाकांत घालून मध साहा पळ प्रमाण घेऊन पाकाला मळवावा; या प्रकारचा हा अवलेह च्यवननामकऋषीनीं सांगितला ह्मणून याला च्यवनप्राश्य असें ह्मणतात; हा च्यवनप्राश क्षीणमनुष्यानीं आपली शक्ति व अग्नीचे बळ पाहून घ्यावा; तेणेकरून क्षीणत्व दूर होत; बाल, वृद्ध व क्षतेंकरून जे क्षीणमनुष्य ते व स्त्रीसंग फार करून करून ज्यांची धातु नष्ट होते ते मनुष्य व ज्या मनुष्यांना शोष आहे, ते मनुष्य व ज्यानां छातीचा रोग आहे. ते व ज्यांच्या कंठाचा स्वर क्षीण आहे. ते इतक्या मनुष्यांस हा अवलेह योजावा. श्वास, कास, तहान, वातरक्त, उरोग्रह, वातपित्तविकार, धातुदोष व मूत्रदोष हे रोग दूर होतात; व या अवलेहेंकरून बुद्धि वाढते, स्मरण चांगले राहातें, व स्त्रीसंगाविषयीं इच्छा होते; शरीराची कांति व वर्णही चांगले होतात; मन प्रसन्न राहातें व मनुष्य साऱ्या रोगांपासून दूर होतो.

## एलाद्यचूर्ण.

एलापत्रंनागपुष्पंलवंगाभागस्त्वेषांद्वौचखर्जूरकस्य ॥

द्राक्षायष्टीशर्करापिप्पलीनांचत्वार्यैतत्क्षौद्रयुक्तंक्षयेस्यात् ॥

अर्थ—वेलदोडे, तमालपत्र, नागकेशर, लवंग, यांचा एक भाग; खजूर दोन भाग, मनुका, जेठीमध, साकर, पिंपळी, यांचे भाग चार सर्व एकत्र करून चूर्ण करावें, आणि मधाबरोबर खावें. हें क्षयावर प्रशस्त आहे.

## अश्वगंधाचूर्ण.

अश्वगंधादशपलंतदर्धंनागरान्वितं ॥ तदर्धंकणसंयुक्तंमरीचंचचतुर्थकं ॥ चातुर्जातंवरांगंचभार्गीतालीसपत्रकं ॥ कचोराजाजिकैटर्यमांसिकंकोलमुस्तकं ॥ रास्नाकटुकरोहिण्याजीवंतीकुष्ठकंतथा ॥ प्रायःकर्षमितंचूर्णंचूर्णेनसमशर्करा ॥ प्रातःकालेत्विदंचूर्णंजलेनोष्णेनसेवयेत् ॥ वातपित्तक्षयेचैवअजागोघृतसंयुतं ॥ श्लेष्मक्षयेक्षौद्रयुक्तंनवनीतेनमेहजित् ॥ शिरोभ्रमणपित्तार्तिंगोक्षुरेणसमन्वितं ॥ क्षतक्षीणंच देहंचविशेषबलवर्धनं ॥ मेदोदरंचमंदाग्निकुक्षिशूलोदरापहं ॥ अनुपानविशेषेणसर्वरोगहरंपरं ॥

अर्थ—अश्वगंध चाळीस तोळे, संठ वीस तोळे, पिंपळी दाहा तोळे, मिऱ्यें चार तोळे व चातुर्जात, जाडी दालचिनी, भारंगमूळ, तालीसपत्र, कचोरा, ओंवा, कायफळ, जटामांसी, कंकोळ, नागरमोथे, रास्ना, कुटकी, जीवंती, कुष्ठ, हीं एकेक तोळा घेऊन चूर्ण करावीं. व सर्व चूर्णाबरोबर साकर घालावी. हें चूर्ण प्रातःकाळीं ऊन पाण्याशीं द्यावें, व वातक्षय, पित्तक्षय, यांवर शेळीच्या किंवा गाईच्या तुपाशीं द्यावें; व कफक्षयावर मधाशीं, मेहावर लोण्याशीं, शिरोभ्रमण व पित्तव्याधि यांवर गोखरूशीं द्यावें; हे विशेषानें क्षतक्षीण व क्षीणदेह, यांचें बलाची वृद्धि करितें; व मेद, उदर, मदाग्नि, कुक्षिशूल, उदर, यांचा व सर्व रोगांचा नाश करितें.

## द्राक्षादिचूर्ण.

द्राक्षालाजसितोपलंसमधुकंखर्जूरगोपीतुगाऱ्हीवेरामलकाब्दचंदननतंकंकोलजातीफलं ॥ चातुर्जातकणासधान्यकमिदंचूर्णंसमंशर्करापातर्भक्षितमात्मकेनविधिनापित्तंसदाहंजयेत् ॥ मूर्छांछर्दिमरोचकंचशमयेत्कायस्यकांतिप्रदंपांडूकामिलरक्तपित्तमुदरंदाहज्वरारोचकं ॥ यक्ष्माणंरुधिरप्रमेहहरणंतद्योनिदोषापहंरक्तार्शोत्रविवृध्धिविद्रधिहरंद्राक्षादिचूर्णोत्तमं ॥

अर्थ–द्राक्षें, लाह्या, खडीसाकर, ज्येष्ठीमध, खजूर, उपलसरी, वंशलोचन, वाळा, आवळकाठी, नागरमोथे, चंदन, तगर, कंकोळ, जायफळ, दालचिनी, तमालपत्र, एलची, नागकेसर, पिंपळी व धनें, हीं समभाग व या सर्वांचे बरोबर साकर घालून हें चूर्ण प्रातःकाळीं सेवन केलें असतां, पित्त, पित्तदाह, मूर्छा, ओकारी व अरुचि यांतें शमवितें; व शरीराला कांति देतें; आणि पांडु, कावीळ, रक्तपित्त, उदर, दाह, अरुचि, राजयक्ष्मा, रक्तमेह, योनिदोष, रक्तार्श, अंत्रवृद्धि, विद्रधि, यांचा नाश करितें. हें द्राक्षादि चूर्ण सर्वचूर्णांत उत्तम आहे.

## यवादिचूर्ण.

यवगोधूमचूर्णंवाक्षीरसिद्धंघृतप्लुतं ॥
तत्कृत्वासर्पिपाक्षौद्रसिताकंक्षयशांतये ॥

अर्थ–यव व गहूं यांचें चूर्ण दुधांत शिजवून त्यांत तूप, मध व साकर घालून द्यावें; ह्मणजे क्षयरोग शांत होतो.

## कर्पूरादिचूर्ण.

कर्पूरंचोचकंकोलजातीफलदलैःसमैः॥ लवंगमांसीमरिचैःकृष्णाशुंठीविवर्धितैः ॥ चूर्णंसितासमंह्लद्यंसदाहक्षयकासजित् ॥ वैवर्ण्यपीनसश्वासछर्दिकंठामयापहं ॥ प्रयुंज्याचानुपानैर्वाभिषजद्वेषिणांहितं ॥

अर्थ–कापूर, दालचिनी, कंकोळ, जायफळ, पत्री, हीं समभाग व लवंगा १ जटामांसी, २ मिरीं, ३ पिंपळी, ४ सुंठ, ५ भाग याप्रमाणें घेऊन चूर्ण करून चूर्णा बरोबर साकर घालून द्यावें. तें हितावह आहे, व दाह, क्षय, कास, वैवर्ण्य, पीनस, दमा, ओकारी व कंठरोग यांवर अनुपानाशीं द्यावें. हें औषधाचा द्वेष करण्याऱ्या रोग्याला हितावह आहे.

## त्रिकटवादिचूर्ण.

त्रिकटुत्रिफलैलाभिर्जातीफललवंगकैः॥ नवभागोन्मितैरेतैःसमंतीक्ष्णं मृतंभवेत् ॥ संचूर्ण्यालोडयेत्क्षौद्रेनित्यंयःसेवतेनरः ॥ कासंश्वासंक्षयं मेहंपांडुरोगंभगंदरं ॥ ज्वरंमंदानलंशोथंसंमोहंग्रहणींजयेत् ॥

अर्थ–त्रिकटु, त्रिफला, वेलदोडे, जायफळ, लवंगा, यांच्या चूर्णांबरोबर पोलाद-भस्म घेऊन एकत्र करून दररोज मधाबरोबर खावें; ह्मणजे कास, श्वास, क्षय, मेह, पांडुरोग, भगंदर, ज्वर, मंदाग्नि, सूज, मोह, संग्रहणी, यांचा नाश करील.

## शंखपोटलीरस.

रसंगंधकंवोभासितमपिकापर्दभासितंमरीचंभूचंद्रांबुधिरस

सहस्रांशुलविकं ॥ रसांध्यंशंटंकंसकलमपिचूर्णीकृतमि
दंक्रमाद्यावन्निष्कंघृतसहितमद्यात्क्षयहरं ॥

अर्थ–पारा १, गंधक १, शंखभस्म ४, कवडीचें भस्म ६, मिरें १२ व टांकणखाराची लाही दीड, या भागाप्रमाणें यांचें बारीक चूर्ण करून नित्य सुमारें मासाभर तुपाशीं भक्षावें; ह्मणजे क्षयाचें निवारण होतें.

## शिलाजतुयोग.

फलत्रिककाथविशुद्धमादौसिद्धंगुडूच्यादशमूलसिद्धम् ॥
स्थिरादिकाकोलियुगादिसिद्धंशिलाजतुस्यात्क्षयिषुप्रशस्तं ॥

अर्थ–हिरडा, बेहडा, आवळकाठी, यांचे काढ्यांत शिलाजीत बारीक करून पुरचुंडी बांधून शिजवून शुद्ध करून नंतर गुळवेलीचा काढा, दशमुळांचा काढा, स्थिरादि काढा काकोल्यादिकाढा यांच्या भावना देऊन सिद्ध केलेला शिलाजीत क्षयावर प्रशस्त. आहे.

## पिप्पल्यासव क्षयादिकांवर.

पिप्पलीमरिचंचव्यंहरिद्राचित्रकोघनः ॥ विडंगंक्रमुकोलोध्रःपाठा
धात्र्यैलवालुकं ॥ उशीरंचंदनंकुष्ठंलवंगंतगरंतथा ॥ मांसीत्वगेला
पत्रंचप्रियंगुर्नागकेशरं ॥ एषामर्धपलान्भागान्सूक्ष्मचूर्णीकृतान्शुभा
न् ॥ जलद्रोणद्वयेक्षिप्त्वादद्यात्गुडतुलात्रयं ॥ पलानिदशधातक्या
द्राक्षापष्टिपलाभवेत् ॥ एतान्येकत्रसंयोज्यमृद्भांडेचविनिःक्षिपेत् ॥
ज्ञात्वागतरसंसर्वंपाययेदग्न्यपेक्षया ॥ क्षयंगुल्मोदरंकार्श्यंग्रहणींपां
डुतांतथा ॥ अर्शांसिनाशयेच्छीघ्रंपिप्पल्याद्यासवस्त्वयं ॥

अर्थ–पिंपळी, मिऱ्यें, चवक, हळद, चित्रक, नागरमोथे, वावडिंग, सुपारी, लोध्र, पाहाडमूळ, आवळकाठी, एलवालुक, पांढरा चंदन, कोष्ठ, लवंगा, तगर, जटामांसी, दालचिनी, विलायची, तमालपत्र, वाघाटीचें मूळ, अथवा राळे, नागकेशर, हीं बवीस औषधें पळ पळ प्रमाण घेऊन बारीक चूर्ण करून दोन द्रोण प्रमाण पाणी घेऊन त्यांत तें चूर्ण टाकून गूळ तीन तुळा प्रमाण घेऊन त्यांत घालावा; व धायटीचीं फुलें दाहापळें, द्राक्षें साठ पळें, हीं दोन्हीं बारीक करून त्यांत मेळवून मडक्यांत घालून त्याचे तोंडाला मुद्रा देऊन मास पक्ष ठेऊन त्या औषधांचा चांगला रस जाला असें जाणून नंतर मुद्रा काढावी. याला पिप्पल्यासव ह्मणतात. हा आसव शक्तितारतम्य पाहून पोटांत द्यावा. येणेंकरून क्षयरोग, गुल्म, उदररोग, शरीराची कृशता, संग्रहणी, पांडुरोग व मूळव्याध हे रोग लवकर दूर होतात.

## कृष्णाद्यवलेह.

कृष्णाद्राक्षासितालेहःक्षयहाक्षौद्रतैलवान् ॥
मधुसर्पिर्युतोवाश्वगंधाकृष्णामितोद्भवः ॥

अर्थ—पिंपळी, मनुका, साकर, मध व शिरसाचें तेल यांचा लेह क्षयनाशक आहे; व मध, आस्कंद, पिंपळी, साकर यांचा ही लेह क्षयनाशक आहे.

## रास्नादिचूर्ण.

रास्नाकर्पूरतालीसभेकपर्णीशिलाजतु ॥ त्रिकटुत्रिफलामुस्ताविडंग दहनाःसमाः ॥ चतुर्दशायसोभागास्तच्चूर्णंमधुसर्पिषा ॥ लीढंकासं ज्वरंश्वासंराजयक्ष्माणमेवच ॥ बलवर्णाग्निपुष्टिंचवर्धनंदोषनाशनं ॥

अर्थ—रास्ना, कापूर, तालीसपत्र, मंजिष्ठ, शिलाजित, त्रिकटु, त्रिफला, नागरमोथा, वावडिंग व चित्रक हीं सर्व समभाग आणि लोहभस्म १४ भाग, याप्रमाणें घेऊन सर्व एकत्र करून मध, तुपावरोबर शक्तिप्रमाणें चाटावें; ह्मणजे तें श्वास, कास, ज्वर, राजयक्ष्मा, यांचा नाश करितें. व बल, वर्ण, अग्नि यांना वाढवितें; व दोषांचा नाश करितें.

## अगस्त्यहरीतकी क्षयादिकांवर.

हरीतकीशतंभद्रयवानामाढकंतथा ॥ पलानिदशमूलस्यविंशतिश्चनि योजयेत् ॥ चित्रकःपिप्पलीमूलमपामार्गःशठीतथा ॥ कपिकच्छुःशं खपुष्पीभार्गीचगजपिप्पली ॥ बलापुष्करमूलंचपृथक्द्विपलमात्रया ॥ पचेत्पंचाढकेनीरेयवैःस्विन्नैःशृतंनयेत् ॥ तत्राभयाशतंदद्यात्क्वाथेत स्मिन्विचक्षणः ॥ सर्पिस्तैलाष्टपलकंक्षिपेत्गुडतुलांतथा ॥ पक्त्वाले हत्वमानीयसिद्धेशीतेपृथक्पृथक् ॥ क्षौद्रंचपिप्पलीचूर्णंदद्यात्कुडवमा त्रया ॥ हरीतकीद्वयंखादेत्तेनलेहेननित्यशः ॥ क्षयंकासंज्वरंश्वासंहि क्काशोरुचिपीनसान् ॥ ग्रहणीनाशयेदेपवलीपलितनाशनः ॥ बलवर्ण करःपुंसामवलेहोरसायनः ॥ विहितोगस्त्यमुनिनासर्वरोगप्रणाशनः ॥

अर्थ—जव एक आढक प्रमाण वजन घेऊन थोडे कुटून त्यांत पाणी चौपट घालून चवथाई पाणी राही तों पर्यंत काढा करून गाळून ठेवावा. जव टाकून द्यावे. मग दश मुळांचीं औषधें १० तीं वीस पळ प्रमाण, चित्रक, पिंपळमूळ, अघाडा, कचोरा, कवचबीज, शंखपुष्पी, भारंगमूळ, गजपिंपळी, चिकणामूळ, पोखरणीचें मूळ, हीं दाहा औषधें दोन दोन पळप्रमाण एकंदर वीस औषधं याप्रमाणें घेऊन थोडीं थोडीं कुटून त्यांत पाणी पांच आढक प्रमाण घालून चवथाई पाणी राही तों पर्यंत काढा करून गाळून त्या ज-

यांचे काढ्यांत मिळवून त्यांत थोर थोर हिरडे शंभर घालून तूप व तिळांचें तेल, आठ आठ पळ प्रमाण व एक तळा प्रमाण गूळ त्या काढ्यांत टाकून घण होई तों पावेतों पाक करून थंड जाहाल्यावर पिंपळीचें चूर्ण व मध हीं कुडव कुडव प्रमाण घेऊन पाकांत मेळवावीं. या प्रकारें हा अवलेह अगस्त्यऋषीनी सांगितला, ह्मणोन याला अगस्त्यहरीतकी ह्मणतात. यांतून रोग्यांनीं दोन हिरडे; लेहाबरोबर खावे; तेणेंकरून क्षय, कास, ज्वर, श्वास, उचकी मुळव्याध, आंवढणें, पीनसरोग नाकांत होतो तो व संग्रहणी हे रोग दूर होतात. अंगाला वळकुट्या पडतात त्या मोडोन केश पांढरे असतात, ते काळे होतात. बळ व कांति येते. हा अवलेह रसायन आहे. यापासून सारे रोग दूर होतात.

## आटरूषादिकषाय.

आटरूपोशिरिपाश्वगंधश्चेतिपुनर्नवा ॥
एतैःकाथ्यपयःपीतंक्षयरोगविनाशनं ॥

अर्थ–अडुळसा, अश्वगंध, शिरसवृक्षाचें मूळ, रक्तबोळ, आणि पुनर्नवा यांचा काढा करून प्यावा; ह्मणजे क्षयरोगाचा नाश होतो.

## अश्वत्थवल्कलादिलोह.

अश्वत्थवल्कलंचैवात्रिकटुर्लोहकिट्टकं ॥
गुडेनसहदातव्यंक्षयरोगविनाशनं ॥

अर्थ–पिंपळाची साल, सुंठ, मिरीं, पिंपळी, यांचें चूर्ण आणि मंडूर एकत्र करून गुळाशीं द्यावें; ह्मणजे क्षयरोगाचा नाश होतो.

## ककुभाद्यचूर्ण.

ककुभत्वङ्नागवलाधात्रीवातारिबीजानां ॥
चूर्णमधुघृतयुक्तंसशिवंयक्ष्मादिकासहरं ॥

अर्थ–सांदड्याची साल, सुंठ, चिकणामूळ, आंवळकाठी, आणि एरंड्या यांचें चूर्ण तूप व मध घालून द्यावें; तें क्षयकासादिहारक आहे.

## अश्वगंधाद्यचूर्ण.

अश्वगंधामृताभीरुदशमूलीबलाद्वयं ॥
पुष्करातिबलाघ्नंतिक्षयंक्षीररसाशिनः ॥

अर्थ अश्वगंध, गुळवेल, शतावरी, दशमुळें, बला, अतिबला, नागबला व पुष्करमूळ, यांचें चूर्ण द्यावें; आणि दुग्धादिक पथ्याला द्यावें; ह्मणजे क्षयाचा नाश होतो.

## तालिसाद्यचूर्ण.

तालीसपत्रमरीचनागरंपिप्पलीतुगा ॥ यथोत्तरंभागवृध्यात्वगेलाचा

र्धभागिका ॥ पिप्पल्यष्टगुणाचात्रप्रदेयासितशर्करा ॥ कासश्वासारु
चिहरंतच्चूर्णंदीपनंपरं ॥ पांडुहृद्ग्रहणीदोषप्लीहशोपज्वरापहं ॥

अर्थ—तालीपत्र, मिरीं, सुंठ, पिंपळी व वंशलोचन हीं एकोतर वृद्धीनें घ्यावीं. व दालचिनी व एलची ह्या अर्धभाग, पिंपळी ८ भाग, आणि पांढरी साकर चूर्णासमान घालून द्यावें. तें खोकला, दमा, अरुचि, पांडु, हृद्रोग, संग्रहणी, प्लीहा, शोष, आणि ज्वर, यांचा नाश करितें; व उत्कृष्ट दीपन आहे.

## नवनीतयोग.

शर्करामधुसंयुक्तंनवनीतंलिहेत्क्षयी ॥
क्षीराशीलभतेपुष्टिंमधुकुल्याजमाक्षिके ॥

अर्थ—साकर, मध, आणि लोणी हें द्यावें; किंवा दूध, मध व तूप, एकत्र करून द्यावें; ह्मणजे पुष्टि येते.

## सितोपलाचूर्ण.

सितोपलाषोडशस्यादष्टौस्याद्वंशरोचना ॥ पिप्पलीस्याच्चतुःकर्षाए
लास्याच्चद्विकर्षिका ॥ एककर्षाचत्वग्ग्राह्याचूर्णयेत्सर्वमेकतः ॥ शी
तोपलादिकंचूर्णंमधुसर्पिर्युतंलिहेत् ॥ कासश्वासक्षयहरंहस्तपादांगदा
हजित् ॥ मंदाग्निसुप्तजिव्हत्वंपार्श्वशूलमरोचकं ॥ ज्वरमूर्ध्वगतंर
क्तंपित्तमाशुव्यपोहति ॥

अर्थ—खडीसाकर १६ तोळे, वंशलोचन ८ तोळे, पिंपळी ४ तोळे, एलची २ तोळे व दालचिनी १ तोळा, यासर्वांचें चूर्ण एकत्र करावें. त्याचें नाव शीतोपलादि चूर्ण हें मध व तूप यांशीं द्यावें; ह्मणजे खोकला, दमा, क्षय, आणि हात, पाय व आंग यांचा दाह, अग्निमांद्य, जिव्हेचें स्पर्शाज्ञान, पार्श्वशूल, अरुचि, ज्वर, ऊर्ध्वगत रक्तविकार, आणि पित्त, यांचा शीघ्रनाश करितें.

## तवराजादि चूर्ण.

तवराजकणाद्राक्षाखर्जूरंमधुकंत्रुटी ॥ लवंगंपत्रकंचैवनाग
केसरनामतः ॥ मधुनाभक्षितंहंतिचूर्णमेषांहिनिश्चितं ॥ भ्रमं
दाहंशिरःपीडांक्षयरोगंनसंशयः ॥

अर्थ—साकर, पिंपळी, द्राक्षें, खारीक, ज्येष्ठीमध, बारकी एलची, लवंगा, तमालपत्र व नागकेशर यांचें चूर्ण मधाशीं द्यावें; ह्मणजे भ्रम, दाह, मस्तकशूल, आणि क्षयरोग यांचा नाश करितें.

## अडुळसायोग.

आयुर्यदास्याद्गलवज्जराणांसरक्तपित्तश्वसनक्षयीणां ॥
मधुप्रयुक्तायशसाप्रतीतावासातदाकिंनकरिष्यतीयं ॥

अर्थ—जर रोग्याचें आयुष्य सबळ आहे, तर त्याचे रक्तपित्त, श्वास, क्षय, हे रोग अडुळशा मधाशीं घेतला असतां, कांहींच प्रचीति देत नाहीं काय?

## द्राक्षादिचूर्ण.

द्राक्षाखर्जूरसर्पिर्भिःपिप्पल्याचसहरमृतं ॥
सक्षौद्रंज्वरकासघ्नंश्वयथुंचप्रयोजयेत् ॥

अर्थ—द्राक्षे, खारीक, आणि पिंपळी, यांचें चूर्ण मध व तूप घालून तें ज्वर, खोकला व सूज यांवर द्यावें.

## स्वर्णमाक्षिकादि चूर्ण.

मधुताप्यविडंगाश्मजतुलोहंघृतंमतं ॥
हंतियक्ष्माणमत्युग्रंसेव्यमानंहिताशिनः ॥

अर्थ—स्वर्णमाक्षिक, वावडिंग, शिलाजित, लोह, यांचीं एकत्र चूर्णें करून तें चूर्ण मध व तूप यांशीं द्यावें; आणि पथ्य करावें; ह्मणजे उग्रक्षयाचा नाश करितें.

## शिलाजितादि चूर्ण.

शिलाजतुमधुव्योपताप्यलोहरजांसिच ॥
क्षीरियुग्लेहिनःश्वासःक्षयःक्षयमवाप्नुयात् ॥

अर्थ—शिलाजित, सुंठ, मिरीं, पिंपळी, स्वर्णमाक्षिक व कांतभस्म हे दूध, मध व साकर यांशीं द्यावें; ह्मणजे क्षय व श्वास यांचा नाश होतो.

## लाक्षाकूष्मांडरस.

कूष्मांडकागिरोत्थेनरसेनपरिपेपितं ॥
लाक्षाकर्पद्वयंपीत्वाजयेद्रक्तक्षयंतथा ॥

थर्थ—कोहळ्याच्या गिराचा रस घेऊन त्यांत दोन तोळे लाखेचें चूर्ण घालून द्यावें; ह्मणजे रक्तक्षयाचा नाश करितें.

## मार्कवादिचूर्ण.

द्वेपलेमार्कवंधात्रीमाक्षिकंसपुनर्नवा ॥ तुगास्पृक्काशालिपर्णीवासकं सदुरालभं ॥ चूर्णार्धेनसमंयोज्यंत्रिगंधंमरिचानिच ॥ तालिसंमगधा

चैवतदर्धेनशिलोद्भवं ॥ शिलाभेदंतदर्धेनसर्वंचैकत्रमिश्रयेत् ॥ समेनतिलचूर्णेनशर्कराचसमाहृता ॥ भक्षयित्वापयःपानंशस्यतेघृतसंयुतं ॥ तेनक्षयोराजयक्ष्माकामलाचविनश्यति ॥ अश्माश्मरींजयत्याशुबलवीर्याधिकोभवेत् ॥ शाम्यंतिचमहारोगाःशुक्राढ्योजायतेनरः ॥

अर्थ–माका, आवळकाठी, स्वर्णमाक्षीक, पुनर्नवा, वंशलोचन, लाजाळूकंद, शालिपर्णी, अडुळसा व धमासा हे समभाग; व यां सर्वांचा निमे दालचिनी, तमालपत्र, एलची, मिऱ्यें, तालीसपत्र, पिंपळी; व यांचा निमें शिलाजित, पाषाणभेद, व यां सर्व चूर्णासमान तिळांचें चूर्ण, आणि साकर, हीं सर्व एकत्र करून चूर्ण करावें. तें भक्षण करून नंतर तूप घालोन दूध प्यावें; ह्मणजे क्षय, राजयक्ष्मा, कावीळ, मळव्याध, अश्मरी, मूत्रकृच्छ्र व महारोग, यांचा नाश करितें; आणि रोग्याला बल येऊन धातु पुष्ट होतो.

## बलादिचूर्ण.

बलाविदारीलघुपंचमूलीपंचैवक्षीरावृतत्वकूप्रयोज्या ॥ पुनर्नवामेघतुगाचभृंगःसंजीवनीयैर्मधुकैःसमांशैः ॥ अक्षप्रमाणानिचमानिकानिसर्वाणिचैतानिविचूर्णयित्वा ॥ विमिश्रयेत्तत्कणाशतानिपंचांशगोधूमयवाश्चपिष्टा ॥ तुगासमांशंसिततंदुलानांपिष्टंसशृंगाटकामिश्रितंतु ॥ प्राक्चूर्णक्वाथेनवियोजनीयंसर्वांशकेनाप्यथवाप्रयोज्यं ॥ विभावयेच्चामलकीरसेनवारत्रयंगोपयसाविभाव्यं ॥ ततोस्यसर्वैःसमशर्करावाघृतेनचैवंपुनरेवभाव्यं ॥ तद्भक्षयेत्क्षौद्रयुतंपलार्धंजीर्णेचभोज्यंकटुकाम्लवर्ज्यं ॥ क्षीरंघृतंवाशितशर्करंवायवान्नगोधूमकशालिमद्यान् ॥ ज्ञात्वाग्निपाकंजठरेनरस्यदेयोविधिज्ञैःक्षयरोगशांत्यै ॥

अर्थ–चिकणामूळ, भुयकोहळी, लघुपंचमूळ, वड, उंबर, पिंपळी, पायरी व नांदरुखी यांची साल; पुनर्नवा, नागरमोथा, वंशलोचन, माका, व जीवनीयगण, ज्येष्ठीमध हीं सर्व सममाग चूर्णे एकत्र करून त्या चूर्णाचा पांचवा हिस्सा गहूं व यव यांचें पीठ व वंशलोचनासमान तांदुळ व शिंगाडे यांचें पीठ. हीं सर्व चूर्णे एकत्र करून वर सांगितलीं जी चिकणमूळापासून ज्येष्ठीमधपर्यंत औषधें, तीं पुनः घेऊन त्यांच्या काढ्याची भावना चूर्णाला द्यावी; नंतर आवळीचें रसाच्या भवना ३, गाईच्या दुधाच्या ३ भावना व तुपाची १ भावना, देऊन सर्वचूर्णासमान साकर मिळवून तें अर्धा तोळा चूर्ण मधाशीं द्यावें, चार घटिका गेल्यावर तिखट व आंबट वर्जून दूध, तूप, साकर, गहूं, यव, भात व मद्य हें पथ्य द्यावें. याप्रमाणें अग्निबळ जाणून क्षयरोगाच्या नाशार्थ द्यावें.

## जातीफलादिचूर्ण.

जातीफलंविडंगानिचित्रकंतगरंतिलाः ॥ तालीसंचंदनंशुंठीलवंगमुपकुंचिका ॥ कर्पूरश्चाभयाधात्रीमरीचंपिप्पलीतुगा ॥ एषामक्षसमाभागाश्चातुर्जातकसंयुताः ॥ पलानिसप्तभंगायाःसितासर्वसमामता ॥ चूर्णमेतत्क्षयंकासंश्वासंचग्रहणीगदं ॥ अरोचकंप्रतिश्यायंतथाचानलमंदतां॥एतान्रोगान्निहंत्येववृक्षानिंद्राशनिर्यथा॥

अर्थ—जायफळ, वावडिंग, चित्रकमूळ, तगर, तिळ, तालीसपत्र, चंदन, सुंठ, लवंग, एलची, कापूर, हरितकी, आवळकाठी, मिरें, पिंपळी, वंशलोचन व चातुर्जात हीं प्रत्येक तोळा तोळा, व भांग सात तोळे व सर्वांसमान साकर एकत्र करून तें चूर्ण क्षय, खोकला, दमा, संग्रहणी, अरुचि, पडसें, आणि अग्निमांद्य, यांचा नाश करितें.

## शिवगुटी.

त्रीन्वारान्प्रथमेशिलाजतुजलेभाव्यंभवेत्त्रैफलेनिःक्काथेदशमूलजेथतदनुच्छिन्नोद्भवायारसैः॥क्काथेबालकजेपटोलसलिलेयष्टीकषायेपुनर्गोमूत्रेथपयस्यथापिचगवामेपांकपायेततः ॥ द्राक्षाभीरुविदारिकाद्वयपृथक्पर्णीस्थिरापौष्करैःपाठाकोटजकर्कटाख्यकटुकारास्नांबुदालंबुदैः ॥ दंतीचित्रकचव्यवारुणकणावीराष्टवर्गौषधैरष्टोर्णेचरणस्थितेपलमितैरेभिःपृथक्भावयेत् ॥ धात्रीमेषविषाणिकात्रिकटुकैरेभिःपृथक्पंचकैर्द्रव्यैश्चद्विपलोन्मितैरपिपलंचूर्णविदारीभवं ॥ तालीसात्कुडवंचतुःपलमिहप्रक्षिप्यतेसर्पिषस्तैलस्यार्धपलंपलाष्टकमथक्षौद्रंभिषग्योजयेत् ॥ तुल्यंपलैःषोडशभिःशितायास्त्वक्क्षीरिकापत्रककेसरैश्च ॥ बिल्वांशकैस्त्वगत्रटिसंप्रयुक्तैरित्यक्षमात्रागुटिकाप्रकल्प्या ॥ तासामेकतमांप्रयोज्यविधिवत्प्रातःपुमान्भोजनात्प्राग्वामुद्गदलांबुजांगलरसंशीतंशृतंवाजलं ॥ माक्षिकंमदिरामगुर्वशनभुक्पीत्वापयोवागवांप्राप्नोत्यंगमनोभवःसुभवनंसंपन्नमानंदकृत् ॥शोफग्रंथिविबंधवेपथुवमिपांड्वामयंश्लीपदंप्लीहार्शःप्रदरंप्रमेहपिटिकांमेहाश्मरींशर्करां ॥ हृद्रोगार्बुदवृद्धिविद्रधियकृद्योन्यामयःसानिलश्चोरुस्तंभभगंदरज्वररुजस्तृणीप्रतूणीतथा॥ वातासृक्प्रबलंप्रवृद्धमुदरंकु

ष्ठंकिलासंकृमीन्कासंश्वासमुरःक्षतक्षयमसृक्पित्तंसमानात्ययं ॥ उन्मादंमदमप्यपस्मृतिमतिस्थौल्यंकृशत्वंतनोःमालस्यंचहलीमकंचशमयेन्मूत्रस्यकृच्छ्राणिच ॥

अर्थ–शुद्ध शिलाजीत घेऊन त्याला त्रिफळ्याच्या ३ भावना द्याव्या. दशमुळांचा काढा, गुळवेलीचा रस, वाळ्याचा काढा, कडुपडवळाचा रस, ज्येष्ठीमध, गोमूत्र, गाईचें दूध, द्राक्षे, शतावरी, भुयकोहळी, कोहळी, डाय, डोला, पुष्करमूळ, पाहाडमूळ, कुड्याचें पाळ, कांकडी, कुटकी, रास्ना, नागरमोथे, वाळा, दंतीमूळ, चित्रकमूळ, चवक, गजपिंपळी, भुयआवळी, जीवक, ऋषभक, मेदा, महामेदा, ऋद्धि, वृद्धि, काकोली, क्षीरकाकोली, हीं प्रत्येक चार तोळे औषधें घेऊन त्यांच्या पृथक् पृथक् भावना द्याव्या; नंतर आवळकाठी, मेषशृंगी, सुंठ, मिरीं, पिंपळी, हीं प्रत्येकीं ८ तोळे, भुयकोहळ्याचें चूर्ण ४ तोळे, तालीसपत्र १६ तोळे, तूप १६ तोळे, तेल २ तोळे, आणि मध ३२ तोळे आणि साकर ६४ तोळे व वंशलोचन, तमालपत्र, नागकेशर, दालचिनी, बारीक वेलची हीं चार चार तोळे घालून त्याची १ तोळ्याची गोळी करावी. ती प्रातःकाळीं द्यावी; किंवा भोजनाच्या पूर्वीं द्यावी; आणि पथ्याला मुगांचें काट, मुगदळ, जांगलमांसाचे रस, तापवून थंड झालेलें पाणी, मध, मद्य, लघु अन्न व गाईचें दूध हे पदार्थ द्यावे; ह्मणजे कामाला प्रदीप्त करित्ये; व सूज, ग्रंथि, विट्बंध, कफ, वांति, पांडु, श्लीपद, प्लीहा, अर्श, प्रदर, प्रमेहपिटिका, प्रमेह, मूत्राश्मरी, त्वद्रोग, अर्बुद, अंडवृद्धि, विद्रधि, यकृत्, योनिरोग, वातरोग, ऊरुस्तंभ, भगंदर, ज्वर व तूणी व प्रतूणी वायु, वातरक्त, वाढलेला उदररोग, कुष्ठ, किलासकुष्ठ, कृमि, कास, श्वास, उरःक्षत, क्षय, रक्तपित्त, उन्माद, मद, अपस्मार, अतिस्थूलता, अतिकृशता, आळस, हलीमक, मूत्रकृच्छ्र, वली व पलित यांचा नाश करित्ये.

## लघुशिवगुटी.

कौटजंत्रिफलांनिंबपटोलंधननागरैः ॥ भावितानिदशाहानिरसैर्द्वित्रिगुणानिच ॥ शिलाजतुपलान्यष्टौतावतीसितशर्करा ॥ त्वक्क्षीरीपिप्पलीधात्रीकर्कटाख्यापलोन्मिता ॥ निदिग्धीफलमूलाभ्यांपलंयुंज्यात्त्रिजातकात् ॥ मधुत्रिपलसंयुक्ताकुर्यादक्षसमागुटी ॥ दाडिमाम्लपयःक्षीररसयूषसुरासवान् ॥ तान्भक्षयित्वानुपिबेन्निरन्नोहितभक्ष्यभाक् ॥ पांडुकुष्ठज्वरप्लीहतमकार्शोभगंदरं ॥ नाशयेन्मूत्रकृच्छ्राणिमूत्रस्थानविबंधनुत् ॥ यद्यत्रमेलितंयेनकांतलोहंतथाभ्रकं ॥ पलंपलंचमिलितं

तदास्याक्किमतःपरं ॥ तीव्रदुःखप्रदंपांडुंप्रमेहमपरिग्रहं ॥ राजरोगं चव्याधिंत्रजयेदितिकिमद्भुतं ॥

अर्थ–शुद्ध शिलाजतु ३२ तोळे घेऊन त्याचा कुड्याची साल, हरडा, बेहेडा, आवळकाठी, कडुनिंब, कडुपडवळ, नागरमोथे व सुंठ, यांच्या काढ्यांत एक महिना खल करावा. त्यांत खडीसाकर ३२ तोळे व वंशलोचन, पिंपळी, आवळकाठी, कर्टोली, हीं प्रत्येकीं चार चार तोळे, व पंचांगरिंगणी ४ तोळे व दालचिनी, तमालपत्र, एलची, आणि मध, हे १२ तोळे, यांचा खल करून त्याची १० माशांची गोळी करावी; ती भक्षण केल्यानंतर डाळिंबाचे सार, दूध, क्षीर, रस, यूष, मद्य, किंवा आसव यांतून कोणतें ही प्राशन करावें. व हित भोजन करावें; ह्मणजे पांडु, कोड, ज्वर, प्लीहा, तमक, अर्श, भगंदर, मूत्रकृच्छ्, मूत्रसंबंधी रोग व मूत्रबंध यांचा नाश करिते या गोळीमध्यें कोणी कांतलोह, आणि अभ्रक हे प्रयेकीं चार चार तोळे मिळवितात. तेव्हां हिचे गुण काय वर्णावे. ही पांडु, सर्व मेह, क्षय, आणि अनेक व्याधि यांचा नाश करील यांत काय आश्चर्य आहे?

## सूर्यप्रभागुटी.

दार्वीव्योपविडंगचित्रकवचापीनाकरंजामृतादेवाव्हातिविपात्रिवृत्स कटुकाकुस्तंबरुःकारवी ॥ द्वौक्षारौलवणत्रयंगजकणाचव्यंतथाहृष्करं तालीसंकणमूलपुष्करजटाभूनिंबसंज्ञैर्युतं ॥ मार्ङ्गीपद्मकजीरकौशकुटजोदंतीत्वचाभद्रकंसर्वंकर्पसमांशकंसुभिपजासूक्ष्मंचसंचूर्णितं ॥ तद्वत्पंचपलंवरागिरिजतुस्यात्पंचमुष्टिःपुरोर्लोहस्याद्विपलंपलद्वयमथोताप्यस्यसंमिश्रितं ॥ क्षिप्त्वापंचपलानिशुभ्रसिकतावश्यंपलंयोजितंत्वेकैकत्रिसुगंधवस्तुपलिकंक्षौद्रैर्घृतैर्लेहवत् ॥ एकीकृत्यसमांशमेवगुटिकाकार्यासुवर्णान्विितासाचब्रह्ममुखांबुजप्रकटितासूर्यप्रभानामतः ॥ शोषंकासमुरःक्षतंसतमकंपांडवामयंकामलंगुल्मंविद्रधिपार्श्वशूलमुदरंस्त्रीपुक्षयंचकृमीन् ॥ कुष्ठार्शोविपमज्वरग्रहणिकामूत्रग्रहंनाशयेद्भुक्त्वैकांगुटिकांप्रहृष्टमनसायोज्यंयथेष्टाशनं ॥ नास्त्येतत्सममौषधंत्रिजगतिचक्रेहितंप्राणिनामुद्दामप्रमदामदद्विपदराट्सिंहस्तुसूर्यप्रभा ॥

अर्थ–दारुहळद, सुंठ, मिरीं, पिंपळी, वावडिंग, चित्रक, वेखंड, हळद, करंज, गरुडवेल, देवदार, अतिविष, तेड, कुटकी, कोथिंबिर, ओवा, यवखार, टांकणखार, सैंधव, बीडलोण, काचलोण, गजपिंपळी, चवक, बिबंव, तालीसपत्र, पिंपळामूळ, पुष्करमूळ

किराइत, भारंगमूळ, पद्मकाष्ट, जिरें, जायफळ, कुड्याची साल, दांतीची साल, नागरमोथे, हीं प्रत्येकीं तोळा व त्रिफळा २० तोळे, शिलाजित २० तोळे, गुग्गुळ ८ तोळे व लोह २८ तोळे, सुवर्णमाक्षीक ८ तोळे, साकर २० तोळे व वंशलोचन दालचिनी, तमालपत्र, एलची, हीं सर्व चार चार तोळे अशीं एकत्र करून तूप व मध यांत शिजवून त्याची १ तोळा वजनाची गोळी करावी, ही ब्रह्मदेवानें सूर्यप्रभा या नावानें सांगितली, ही शोष, खोकला, उरःक्षत, तमक, पांडुरोग, कामला, गुल्म, विद्रधि, पार्श्वशूल, उदर, स्त्रियांचा क्षय, कृमिरोग, कोड, अर्श, विषमज्वर, संग्रहणी व मूत्ररोध यांचा नाश करिते. ही भक्षण केल्यावर यथेष्ट पथ्याला वागावें; या पृथ्वीतलांत सूर्यप्रभागुटीसारिखी दुसरी गोळी नाहीं.

## गुडूच्यादिमोदक.

गुडूचींखंडशःकृत्वाकुट्टयित्वासुमर्दयेत् ॥ वस्त्रेणविधृतंतोयंस्रावयेत्तच्छनैःशनैः ॥ शुद्धशंखनिभंचूर्णमेतैःसंमिश्रयेद्भिषक् ॥ उशीरंवालकंपत्रंकुष्ठंधात्रींचमौसलीं ॥ एलांहरेणुकंद्राक्षांकुंकुमंनागकेसरं ॥ पद्मकंदंचकर्पूरंचंदनद्वयमिश्रितं ॥ व्योपंचमधुकंलाजाअश्वगंधःशतावरी ॥ गोक्षुरंमर्कटाख्यंचजातीतक्कोलचोरकं ॥ रसश्चवंगलोहैश्च संमिश्रंकारयेद्बुधः ॥ एतानिसमभागानिद्विगुणाभूतशर्करा ॥ मत्स्यंडयाज्यमधूपेतंभक्षयेत्प्रातरुत्थितः ॥ क्षयंचरक्तपित्तंचपाददाहमसृग्दरं ॥ मूत्राघातंमूत्रकृच्छ्रंवातकुंडलिकांतथा ॥ निहन्याच्चप्रमेहांश्चसोमरोगंचदारुणं ॥ रसायनमिवर्षीणाममृतंचामृतांधसां ॥

अर्थ—गुळवेलीचे बारीक तुकडे करून ते कुटावे; नंतर चांगले मर्दन करून वस्त्रांत बांधून त्यांतून पाणी गाळून तें सुकून शुद्ध शंखासारिखें चूर्ण होईल तें (ह्मणजे गरुडवेलीचें सत्व) घेऊन त्यांत वाळा, पीतवाळा, तमालपत्र, कोष्ठ, आवळकाठी, मुसळी, एलची, पित्तपापडा, द्राक्षे, केशर, नागकेशर, कमलकंद, कापूर, चंदन, रक्तचंदन, सुंठ, मिरीं, पिंपळी, ज्येष्ठमध, लाह्या, अश्वगंध, शतावरी, गोखरू, कुयलीच्या बिया, जायफळ, कंकोळ, चोरओंवा, पारा, वंग व लोह हे संपूर्ण समभाग एकत्र करून त्यांत दुप्पट साकर मिळवावी, तें चूर्ण खडीसाकर, मध व तूप याशीं प्रातःकाळीं भक्षण करावें; ह्मणजे क्षय, रक्तपित्त, पाददाह, रक्तप्रदर, मूत्राघात, मूत्रकृच्छ्र, वातकुंडली, प्रमेह व सोमरोग यांचा नाश करितें. हें चूर्ण रसायन आहे. व देवानां जसें अमृत तसें.

## इक्ष्वादिमोदक.

उद्धरेदिक्षुरसःप्रोद्रंतुगाक्षीर्याश्चबुद्धिमान् ॥ प्रस्थंप्रस्थंपृथक्गृह्यशर्करा

र्धनुलातथा ॥ आत्मगुप्ताफलानांचकुडवंमरिचस्यच ॥ त्रिसुगंधंकृ तावापंमंथानेनविमंथयेत् ॥ पलिकान्मोदकान्कृत्वास्थापयेद्भाजनेशु भे॥ एतद्द्विकालमेकंवाखादेदग्निबलंप्रति ॥ वटिकांनियताहारोब्रह्म चारीजितेंद्रियः॥ ग्रहण्यांयक्ष्मिणेसद्यश्चैकादशविधेतथा ॥ स्वरवर्णब लौदार्यतुष्टिपुष्टिविवर्धनं ॥ आयुष्यंपौष्टिकंचाथभूतोपहतचेतसां ॥ व्याकुलीकृतदेहानांवृद्धानांक्षीणरेतसां ॥ वाजीकरणमप्येवंवंध्यानां पुत्रदंपरं ॥ धनुस्त्रीमद्यभारैश्चखिन्नानांबलवर्धनं ॥ हृत्प्लीहग्रहणीदोष मूत्रकृच्छ्रापतंत्रकं ॥ अपस्मारविषोन्मादनाशनंतद्रसायनं ॥

अर्थ—गुंजेचीं पानें, उंसाचा रस, मद्य, वंशलोचन, हीं प्रत्येकीं ६४ तोळे. व साकर २०० तोळे, आणि कुहिलीच्या बिया, मिरीं, दालचिनी, तमालपत्र, एलची, हीं प्रत्येकीं १६ तोळे घेऊन यांचे चूर्ण करून त्यांत घालोन रवीनें मंथन करून त्याचे चार तोळ्यां-चे मोदक करून भरून ठेवावे. त्यांतून दोन वेळ किंवा एक वेळेस मोदक अग्निबळ पाहून द्यावा, यावर पथ्य चांगलें करावें; व जितेंद्रिय, ब्रह्मचर्य राहावें; ह्मणजे तो मोदक संग्र-हणी, एकादश प्रकारचा क्षय, यांचा नाश करितो; आणि जे वृद्ध. व्याकुळ झाले, व धातक्षीण झाले त्यांना हें वाजीकरण आहे. व वंध्यांना पुत्र देतो; आणि धनुष्य, स्त्री. मद्य व भार यांणीं श्रमलेल्या पुरुषांच्या बलाला वाढवितो; आणि हृद्रोग, प्लीहा, संग्रहणी, मूत्रकृच्छ्र, अपतंत्रक, अपस्मार, विष व उन्माद यांचा नाश करितो. हा रसायन आहे.

## द्राक्षासव.

मृद्वीकायास्तुलार्धंतुद्विद्रोणेपांविपाचयेत् ॥ पादशेषेकषायेचपूतेशी तेप्रदापयेत् ॥ गुडस्यद्वितुलांभाविधातक्याघृतभाजने ॥ विडंगंफ लिनींकृष्णात्वगेलापत्रकेसरं ॥ मरिचंचभिषक्चूर्णंसम्यक्दत्वावि चक्षणः ॥ क्षिपेच्चपलिकैर्भागैःस्थापयेज्जातपेदिने ॥ ततोयथाबलंपी त्वाकासश्वासगलामयान् ॥ हंतियक्ष्माणमत्युग्रमुरःसंधानकारकं ॥ चतुर्थभागोद्राक्षायाधातकीमत्रकेचन ॥ प्रयच्छंतितनोर्वीर्यमेनस्यो चैःप्रजायते ॥

अर्थ—द्राक्षें २०० तोळे घेऊन तीं ४०९६ तोळे पाण्यांत चतुर्थांश राही तों काढा करून गाळून घ्यावा. निवाल्यावर गूळ ८०० तोळे, धायटीच्या फुलाचें चूर्ण ८०० तोळे घालोन तें सर्व तुपाच्या भांड्यांत भरून त्यांत वावडिंग. त्रायमाण, पिंपळी, दालचिनी, एलची, तमालपत्र, नाकेशर व मिरीं या प्रत्येकाचें चार तोळे चूर्ण घालून दिवसास उ-

ऱ्हांत ठेवावा. मासपक्ष गेल्यावर अग्निबळ पाहून द्यावा; ह्मणजे उग्र क्षयरोग व उरःक्षत यांचा नाश करितो. या आसवांत कोणी द्राक्षांचा चतुर्थांश धायटीफूल घालावें असें ह्म णतात. कारण याला अधिक वीर्य उत्पन्न होतें.

## खर्जूरासव.

पंचप्रस्थंसमादायखर्जूरस्यविचक्षणः ॥ द्रोणांभसिपचेत्सम्यकृततो त्तार्यचगालयेत् ॥ कुंभेंसुधूपितंकृत्वाप्रक्षिपेत्तंरसंशुभं ॥ हपुषाताम्र पुष्पीचकषायंतत्रनिःक्षिपेत् ॥ द्वारंनिरुध्यमुदृढंनिक्षिपेद्वसुधातले॥ सप्तकद्वययोगेनसिद्धोयमासवोरसः ॥ रोगराजंतथाशोफंप्रमेहंपांडु कामलां ॥ ग्रहणींपंचगुल्मांश्चनाशयत्यतिवेगतः ॥

अर्थ–खजूर ३२० तोळे घेऊन २०४८ तोळे पाण्यांत चतुर्थांश कढवून उतरून गाळून घ्यावा; नंतर घागरीला उदादिकांची धुरी देऊन त्यांत तो काढा घालावा; नंतर थोर शेरणी व धायटीचीं फुलें यांचा काढा त्यांत घालून तोंड बंद करून ती घागर ज- मिनींत १४ दिवस पुरून ठेवावी; ह्मणजे हा खर्जूरासव तयार झाला. हा क्षय, सूज, प्रमेह, पांडुरोग, कावीळ, संग्रहणी, आणि पांच प्रकारचे गुल्म यांचा नाश करितो.

## दशमूलासव.

दशमूलंतुलार्धंचपौष्करंचतदर्धकं ॥ हरीतकीनांप्रस्थार्धंधात्रीप्रस्थ द्वयंतथा ॥ चित्रकंपुष्करमितंचित्रकार्धंदुरालभा ॥ गुडूच्यादिःशत पलंविशालापलपंचकं ॥ खदिरस्यपलान्यष्टौतदर्धंबीजकंतथा ॥ मं जिष्ठामधुकंकुष्ठंकापित्थंदेवदारुच॥विडंगंचविकंलोध्रंभागंचाष्टकव र्गकं ॥ कृष्णाजाजीपिप्पलीचक्रमुकंपद्मकंसठी ॥ प्रियंगुसारिवा मांसीरेणुकानागकेसरं ॥ त्रिवृतारजनीरास्नामेषशृंगीपुनर्नवा ॥ शतावरींचेंद्रयवामुस्ताद्विपलिकान्जले॥चतुर्गुणेपादशेषेद्राक्षाषष्टि पलंक्षिपेत् ॥ त्रिंशत्पलानिधातुक्यागुडंपलचतुष्टयं॥ मधुद्वात्रिंशत्प लंचसर्वमेकत्रकारयेत् ॥ भांडेपुराणेस्निग्धेवामांसीमरिचधूपिते ॥ पृ थक्द्विपलिकानेतान्पिप्पलींचंदनंजलं ॥ जातीफलंलवंगंचत्वगेला पत्रंकेशरान् ॥ कर्पमात्रांचकस्तूरींदत्वापक्षंनिधापयेत्॥ कनकद्रुपलं चूर्णंक्षिपेन्निर्मलभावितं ॥ पक्षादूर्ध्वंपिबेद्यस्तुमात्रयाचयथाबलं॥ धा तुक्षयंजयत्येवकासंपंचविधंतथा॥ अर्शांसिषट्प्रकाराणितथाष्टावुदरा

णिच ॥ प्रमेहंचमहाव्याधिमरुचिंपांडुरुक्तथा ॥ सर्ववातांस्तथाशूलंश्वासंछर्दिमसृग्दरं ॥ अष्टादशैवकुष्ठानिशोफंशूलंभगंदरं ॥ शर्करांचमूत्रकृच्छ्मश्मरींचविनाशयेत् ॥ कृशस्यपुष्टिंकुरुतेपुष्टस्यचमहाबलं ॥ महावेगोमहातेजामहावीर्योविलोक्यते ॥ कामपुष्टिकरोह्येषवंध्यानांपुत्रदोभवेत् ॥

अर्थ-दशमुळें २०० तोळे, पुष्करमूळ १००, हरीतकी ८०, आवळकाठी १२८, चित्रकमूळ १००, धमासा ५०, गुडूच्यादि ४००. कडुवृंदावन २०, खदिरसार ३२, महाळुंग १६ तोळे, व मांजिष्ठ, ज्येष्ठमध, कोष्ठ, कंवट, देवदार, वावडिंग, चवक, लोध्र, व जीवक, ऋषभक, मेद, महामेद, ऋद्धि, वृद्धि, कांकोली, क्षीरकांकोली, हीं चार चार तोळे; व पिंपळी, जिरें, गजपिंपळी, चिकणी सुपारी, पद्मकाष्ठ, कचोरा, राळे, कावळी, जटामांसी, पित्तपापडा, नाकेशर, तेड, हळद, रास्ना, मेषशृंगी, पुनर्नवा, शतावरी, इंद्रजव व नागरमोथा, हीं प्रत्येक ८ तोळे, याप्रमाणें सर्व औषधें घेऊन सर्वांच्या चौपट पाणीं घालून चतुर्थांश काढा उतरून घ्यावा. त्यांत द्राक्ष २४० तोळे, धायटीफुलें १२० तोळे, गुळ १६ तोळे, मध १२८ तोळे, हे सर्व एकत्र करावें; आणि जुनी तुपाची घागर घेऊन तिला जटामांसी आणि मिरीं यांचा धूप देऊन तींत तें सर्व भरून त्यांत पिंपळी, चंदन, वाळा, जायफळ, लवंग, दालचिनी, एलची, तमालपत्र, नाकेशर, हीं प्रत्येकीं ८ तोळे; कस्तूरी १ तोळा, व धोतऱ्याचें चार तोळे चूर्ण घालून पंधरा दिवस ठेवावा. नंतर अग्निबळ पाहून त्यांतून काढून घ्यावा. तो धातुक्षय, पांच प्रकारचा खोकला, साहा प्रकारची मुळव्याध, आठ प्रकारचीं उदरें, प्रमेह, महाव्याधि, अरुचि, पांडुरोग, संपूर्ण वातरोग, शूल, श्वास, वांति, रक्तप्रदर, अष्टादश कुष्ठें, मूत्रशर्करा, मूत्रकृच्छ्र, अश्मरी, यांचा नाश करितो. कृशाला पुष्टि देतो. व पुष्टाला बलवान् व महातेजस्वी, महावीर्यवान्, करितो, व काम, पुष्टि, यांला देतो. व वंध्याना पुत्र देतो.

## कुमारीपाक.

कुमारीकंदमादायपलंविंशतिसंख्यया॥चतुर्गुणंचगोदुग्धंपाचयेन्मंदवन्हिना ॥ यावच्चजीर्यतेदुग्धंतावत्पाचनकंकुरु ॥ छायाशुष्कंचकुर्वीतच्चूर्णयेद्बुद्धिमान्भिषक् ॥ पिप्पलीमरिचंशुंठीप्रत्येकंचपलत्रयं ॥ जातीफलंजातिपत्रीलवंगंपलमेवच ॥ गोक्षुरंकर्कटीबीजंप्रत्येकंचपलंपलं ॥ चातुर्जातपलंचैवचित्रकंचपलंतथा ॥ सर्वेषांसूक्ष्मचूर्णंचकारयेद्बुद्धिमान्भिषक् ॥ सितापलंचविंशत्यागोघृतंचपलंदश ॥ तत्समंमहिषीदुग्धंतत्समंमधुमिश्रितं ॥ लोहपात्रेविनिःक्षिप्यपाचयेन्मृदुव

न्हिमा ॥ चूर्णंनिःक्षिप्ययत्नेनदर्व्यासम्यग्विचालयेत् ॥ यावद्घृतंप्रद
श्येततावत्पाचनकंकुरु ॥ कर्षमेकंलोहभस्मसुवर्णंतत्समंततः ॥ सिं
दूरंकर्षमेकंतुदापयेद्भिषगुत्तमः ॥ कोलप्रमाणवटकान्भक्षयेद्बुद्धिमा
न्नरः ॥ जीर्णज्वरंक्षयंकासंश्वाससंतापशूलनुत् ॥ अजीर्णमामवात
घ्नंप्रदरंपंचनाशनं ॥ स्त्रीणांवंध्यात्वहरणंपुत्रंचैवप्रसूयते ॥ अंडवृद्धि
हरंचैवस्त्रीणांरमयतेशतं ॥ इदंगोप्यमिदंगोप्यमश्विनीदेवनिर्मितं ॥

**अर्थ**–कुमारीकंद ८० तोळे व गाईचें दूध ३२० तोळे, अशीं एकत्र करून मंदाग्नीवर दूध सुके तों आटवून छायेंत वाळवून चूर्ण करावे; नंतर पिंपळी, मिरीं व सुंठ हीं प्रत्येकीं बारा तोळे; जायफळ, जायपत्री, लवंग, गोखरू, कांकडीचें बीज, चातुर्जात व चित्रक हीं चार तोळे. यांचें सूक्ष्म चूर्ण करून त्यांत मिसळावें. व साकर ८० तोळे व गाईचें तूप ४०, म्हशीचें दूध ४०, व मध हीं प्रत्येकीं ४० तोळे; घालून तीं सर्व लोखंडाच्या भांड्यांत भरून मंदाग्नीने पचन करून त्यांत सर्व चूर्ण टाकून पळीनें चांगलीं परतावीं. जों पर्यंत तूप दिसूं लागे तों पर्यंत पचन करून त्यांत लोहभस्म, सोनें, रससिंदूर, हीं प्रत्येकीं १ तोळा घालून १ तोळ्याचा वटक करावा. तो जीर्णज्वर, क्षय, खोकला, दमा, संताप, शूल, अजीर्ण, आमवात व प्रदर यांचा नाश करितो. व स्त्रियांचें वंध्यात्व, पुरुषाचें षंढत्व, यानां दूर करून शंभर स्त्रिया भोगण्याची शक्ति देतो. हा कुमारीपाक अश्विनीकुमारानीं सांगितला. हा अति गोप्य आहे.

## धात्रीपाक.

धात्रीफलानिपक्वानितीक्ष्णलोहेनवेधयेत् ॥ विश्वावरणपत्रैश्चफला
निस्वेदयेद्दृशं ॥ ततोदुग्धेचसंस्वेद्यंजलेचतदनंतरं ॥ मधुमध्येक्षिपे
द्भांडेस्थापयेद्दिनविंशतिः ॥ दिनष्टंमधुसंत्यज्यमधुमध्यंपुनःक्षिपेत् ॥
सिताधात्रीफलान्येवपेपयेत्करिणामह ॥ एलाचैवतुगाक्षीरीलोहवं
गंतथैवच ॥ मेलयित्वासुनक्षत्रेप्रातःकर्षमितंभजेत् ॥ बलेक्षीणेक्षये
चैवपथ्यंमधुरमाचरेत् ॥ प्रमेहंमूत्रकृच्छ्रंचनाशयेत्तत्क्षणादपि ॥ वी
र्यवृद्धिकरंचैववाजीकरणमुत्तमं ॥ कुष्ठंपित्तप्रकोपंचनाशयेन्नात्रसं
शयः ॥ एतेन्येपित्तजारोगाःशोणिताद्यास्तथैवच ॥ तेसर्वेप्रशमंयां
तियात्रीपाकस्यसेवनात् ॥

**अर्थ**–पिकलेले आवळे घेऊन ते सुयीने टोंचावे; नंतर आल्याच्या पात्या पाण्यांत घालून शिजवावे, त्यांतून काढून पुनः दुधांत शिजवावे; नंतर पाण्यांत शिजवून ते मधा-

नें भरलेल्या भांड्यांत घालावें; आणि वीस दिवस ठेवावें; नंतर खराब झालेला मद्य टाकून पुन: दुसरा मद्य घालावा; व साकर, आवळकाठी, गजपिंपळी, एलची, वंशलोचन, लोहभस्म व वंगभस्म हे त्यांत घालून उत्तम दिवस पाहून प्रात:काळीं १ तोळा बल-क्षय, क्षय, यांवर द्यावा; आणि मधुर पदार्थ पथ्याला द्यावे; ह्मणजे प्रमेह, मूत्रकृच्छ्र, कुष्ठ, पित्तप्रकोप, पित्तजन्य सर्वरोग व रक्तविकार हे नाश पावतात; आणि वीर्यवृद्धि करून उत्तम वाजीकरण करितो.

## शेवंतीपाक.

श्वेतपुष्पसहस्रंतुघृतप्रस्थेविपाचयेत् ॥ घृतेपक्केकृतेतत्रनि:क्षिपेदौप धांभिषक् ॥ सितापलाचतुष्कंचचातुर्जातंपलंपलं ॥ मृद्वीकापट्पलं चैवक्षिप्त्वामधुपलाष्टकं ॥ धारासत्वंतवक्षीरंश्वेतजीरंपृथक्पृथक् ॥ नागवंगपलार्धंचसर्वमेकत्रकारयेत् ॥ कर्पूरंवल्लमात्रंचदत्वास्थाप्यमु कुंभके ॥ भक्षयेन्निष्कमात्रंतुप्रातरेवहिपथ्यभुक् ॥ जीर्णज्वरेक्षयेकासे अग्निमांद्येप्रमेहके ॥ दिनरात्रिज्वरेचैवशिरोरोगेप्रशस्यते ॥ प्रदरंरक्त जानूरोगान्कुष्ठार्शांसिचनाशयेत् ॥ नेत्ररोगान्मुदुष्टांश्चतथासर्वान्मुखे स्थितान् ॥ नाशयेन्नात्रसंदेहोमंडलस्यचसेवनात् ॥

अर्थ—पांढरे शेवंतीचीं फुलें हजार घेऊन तीं ६४ तोळे तुपांत परतावीं; नंतर खडीसाकर २५६ तोळे, चातुर्जात १६ तोळे, द्राक्षें २४ तोळे, मद्य ३२ तोळे, गुळवेलीचें सत्व तवकीर, पांढरें जिरें, नाग व वंग हीं प्रत्येकीं २ तोळे या प्रमाणें सर्व एकत्र करून वालभर कापूर आंत मिळवावा; आणि घागरींत भरून ठेवावा. त्यांतून अर्धा तोळा घेत जावा, पथ्य करावें; ह्मणजे जीर्णज्वर, क्षय, खोकला, अग्निमांद्य, प्रमेह, दिनज्वर, रात्रिज्वर, मस्तकरोग, रक्तप्रदर, रक्तजरोग, कोड, अर्श, नेत्ररोग व मुखरोग यांचा नाश करितो.

## महाकनकसुंदररस.

रसगंधकनागाश्चरसकोमाक्षिकाभ्रके ॥ कांतविद्रुममुक्तानांवंगभस्म चतालकं ॥ भस्मकृत्वाप्रयत्नेनप्रत्येकंकर्षसंमितं ॥ सर्वतुल्यंशुद्धहे मभस्मकृत्वाप्रयोजयेत् ॥ मर्दयेत्त्रिदिनंसर्वंहंसपादरिसैर्भिषक् ॥ त तोवैगोलकान्कृत्वाकाचकुप्यांविनि:क्षिपेत् ॥ रुध्वातत्काचकूप्यांच सप्तवस्त्रेणवेष्टितं ॥ ततोवैसिकतायंत्रेत्रिदिनंचोक्तवन्हिना ॥ पश्चात्तं स्वांगशीतंचमर्द्यपूर्वोदितेरसे ॥ विनि:क्षिप्यकरंडेथसंपूज्यरसराजकं ॥

महाकनकसिंदूरोराजयक्ष्महरःपरः ॥ पांडुरोगंश्वासकासकामलाग्रहणी गदान् ॥ कृमिशोफोदरावर्तगुल्ममेहगुदांकुरान् ॥ मंदाग्निच्छार्दिम रुचिमामशूलहलीमकान् ॥ ज्वरान्द्वंद्वादिकान्सर्वान्सन्निपातांस्त्रयोद श ॥पैत्तरोगमपस्मारंवातरोगान्विनिःक्षिपेत् ॥ रक्तपित्तप्रमेहांश्चस्त्रीणां रक्तस्रुतिंतथा ॥ विंशतिश्लेष्मरोगांश्चमूत्ररोगंनिहंत्यसौ ॥ हेमवर्णश्चब लयश्चआयुःशुक्रविवर्धनः ॥ महाकनकसिंदूरःकाश्यपेनविनिर्मितः ॥

अर्थ—पारा, गंधक, नागभस्म, कलखापरी, माक्षीकभस्म, अभ्रकभस्म, कांत, पोंवळीं, मोत्यें, वंग व हरताळ यांचीं भस्में हीं समभाग एकत्र करून यांत या सर्वांच्या समभाग सुवर्णभस्म घालून हंसपादीच्या रसांत तीन दिवस घोटून गोळी करून ती काच कुपींत भरून तिला सात सात कापडें करून ती वालुकायंत्रांत तीन दिवस सांगीतल्या प्रमाणें अग्नि लाऊन पचन करावी. स्वांगशीत झाल्यावर काढून हंसपादीरसांत घोटून करंडयांत भरून ठेवावा. हा महाकनकसुंदररस राजयक्ष्मा, पांडुरोग, श्वास, कास, कावीळ, संग्रहणीरोग, कृमिरोग, सूज, उदर, उदावर्त, गुल्म, मेह, मुळव्याध, आममांद्य, वांति, अरुचि, आमशूल, हलीमक, सर्व ज्वर, द्वंद्वज्वर, तेरा सन्निपात, पित्तरोग, फेंपरें, वातरोग, रक्तपित्त, प्रमेह, स्त्रियांचें रक्तप्रदर, वीस प्रकारचे कफरोग व मूत्ररोग यांचा नाश करितो; आणि शरीराचा सुवर्णासारिखा वर्ण करणारा व आयुष्य व धातु यांना वाढविणारा हा योग काश्यपानें सांगितला.

## क्षयकेसरी रस.

नेत्रलोचनचंद्रेंदुप्रमाणंभागमाहरेत् ॥ वह्निजंफटकीमृष्टागर लंनवसागरं ॥ चूर्णमेषांसितायुक्तंगुंजार्धंयोजयेद्भिषक् ॥ क्ष यकेसरिनामायंरसःपरमदारुणः ॥

अर्थ—चिरी २ फटकीची लाही २ बचनाग १ व नवसागर १ भाग यांचें चूर्ण साकरेशीं अर्धी गुंज द्यावें. हा क्षयकेसरिनामक रस क्षयावर अत्यंत उपयुक्त आहे.

## शंखेश्वररस.

शंखस्यवलयंनिष्कंचतुर्निष्कंवराटिका ॥ कर्षार्धंनीलतुत्थंस्यात्सर्व तुल्यंतुगंधकं ॥ गंधतुल्यंमृतंनागंनागतुल्यंमृतंरसं ॥ टंकणंरसतुल्यां शंमर्द्यंपाच्यंमृगांकवत् ॥ राजरोगहरःसोयंनाम्नाशंखेश्वरोरसः ॥ प ड्गुंजातुकणाक्षौद्रैःक्षयेवामरिचंघृतं ॥

अर्थ—शंखाचे तुकडे ॥ तोळा, कवडया २ दोन तोळे, मोरचूत ।॥ तोळा व या

सर्वांच्या समभाग गंधक, शिशयाचें भस्म, पारदभस्म व टांकणखार हे प्रत्येकीं गंधका-समान एकत्र करून गजपुट द्यावें. यावर पथ्य मृगांकासारिखें करावें. हा शंखेश्वररस साहा गुंजा पिंपळी व मध किंवा मिरीं व तूप यांशीं द्यावा; ह्मणजे क्षयाचा नाश करितो.

## हररुद्ररस.

तीक्ष्णंशुल्वंनागतारंस्वर्णंचमारितंपृथक् ॥ एकद्वित्रिचतुःपंचक्रमषट् शुद्धसूतकं ॥ चांगेर्याश्चद्रवैर्मर्द्यंदिनैकंकृतगोलकं ॥ मृगांकवत्पचे त्स्थाल्यांवालुकाभिःप्रपूरितं ॥ उद्धृत्यचूर्णयेत्श्लक्ष्णंहररुद्रोरसोत्तमः ॥ मृगांकवत्क्षयंहंतितद्वन्मात्रानुपानकं ॥

अर्थ–तिखयाचें भस्म १, ताम्रभस्म २, शिशाचें भस्म ३, रौप्यभस्म ४, सुवर्णभस्म ५ व ६ भाग शुद्ध पारा, याप्रमाणें तोळेवार भस्में एकत्र करून चुक्याच्या रसांत एकदिवस घोटून त्याचा गोळा करावा; आणि मृगांकासारिखा वालुकायंत्रांत पचन करावा. शीत झाल्यावर घोटून बारीक करावा. हा हररुद्ररस मृगांकरसासारिखा क्षयाचा नाश करितो. याला अनुपान व पथ्य मृगांकासारिखेंच करावें.

## नीलकंठरस.

विषंक्षुद्राउशीरंचहरिद्रागोपयोमधु ॥ कुटजस्यत्वचाचूर्णसमांशं माषमात्रकं ॥ राजयक्ष्महरंख्यातोरसोयंनीलकंठकः ॥

अर्थ–बचनाग, रिंगणी, वाळा, हळद, कुडयाच्या सालीचें चूर्ण हें समभाग घेऊन त्यांचें चूर्ण मध व गाईचें दूध याशीं एक मासा द्यावें; हा नीलकंठरस भक्षण केला असतां, क्षयनाशक आहे.

## शंखगर्भपोटलीरस.

शंखनाभिर्गवांक्षीरैःपेषयेन्निष्कषोडश ॥ तेनमूषाप्रकर्तव्यातन्मध्येभस्म सूतकं ॥ निष्कार्धंगंधकंत्रीणिचूर्णीकृत्यविनिःक्षिपेत् ॥ रुध्वातद्वेष्टयेद्व स्त्रेमृत्तिकांलेपयेद्बहिः ॥ शोष्यंगजपुटेपश्चान्मूषयासहचूर्णयेत् ॥ गुंजैक मनुपानैश्चक्षयंहंतिमृगांकवत् ॥ पोटलीशंखगर्भोयंयोजयेद्वातपित्तजित् ॥

अर्थ–शंखाची नाभी ८ तोळे घेऊन बारीक चूर्ण करून त्याची मूस करावी; तींत पाऱ्याचें भस्म घालून त्यावर दीड तोळा गंधकाचें चूर्ण करून वर घालावें; नंतर मुशी-चें तोंड रोधून त्याच्या बाहेर मातकापड करावें; सुकल्यानंतर गजपुट देऊन शीत झाल्यावर काढून मुसेसहवर्तमान बारीक घोटावी; हा शंखगर्भपोटलीरस एक गुंज द्यावा; आणि पथ्य मृगांकासारिखें करावें; ह्मणजे क्षय, आणि वातपित्त यांचा नाश करितो.

## हेमगर्भरस.

रसभस्मद्विनिष्कंतुनिष्कैकंस्वर्णभस्मकं ॥ शुद्धगंधकद्वौनिष्कौमर्द्येच्चित्रकद्रवैः ॥ द्वियामांतेविशोष्याथतेनपूर्यंवराटिका ॥ गोक्षीरेष्टंकणंपिष्ट्वातेनरोध्यवराटिका ॥ वराटीमृन्मयेभांडेरुध्वागजपुटेपचेत् ॥ स्वांगशीतेविचूर्ण्याथपोटलीहेमगर्भकः ॥ मृगांकवच्चतुर्गुंजाभक्षितोराजयक्ष्मनुत् ॥

अर्थ—पाऱ्याचें भस्म १ तोळा, अर्धा तोळा स्वर्णभस्म, शुद्ध गंधक १ तोळा, हे एकत्र करून चित्रकाच्या रसांत दोन प्रहर खलावें; नंतर सुकवून कवड्यांत भरून त्यावर गाईच्या दुधांत टांकणखार घोटून त्याणें कवड्यांचीं तोंडें बंद करून त्या कवड्या बोळक्यांत भरून बोळक्याचें तोंड बंद करून गजपुट द्यावें. आपोआप थंड झाल्यावर काढून घोटून बंद करून ठेवावा; याचें नांव हेमगर्भपोटली. हा चार गुंजा द्यावा. व पथ्य मृगांकासारिखें द्यावें; ह्मणजे तो क्षयाचा नाश करितो.

## नागेश्वररस.

मृतसूतंमृतंनागंगंधकंतुत्थटंकणं ॥ प्रत्येकंकर्षनिष्कंस्यान्मृतशुल्वंद्विनिष्ककं ॥ शंखचूर्णंद्विनिष्कंस्यान्नवनिष्कंवराटिका ॥ पूरयेत्पूर्वचूर्णंपुटयेल्लोकनाथवत् ॥ ततश्चार्कदलद्रावैर्मर्द्यरुध्वापुटेपचेत् ॥ आदायचूर्णयेत्श्लक्ष्णंतुल्यांशैर्मरिचैर्युतं ॥ चूर्णाच्चतुर्गुणंगंधमेकीकृत्यविचूर्णयेत् ॥ पंचमाषघृतैर्लेह्यमसाध्यंराजयक्ष्मजित् ॥ शोफोदराशोग्रहणीज्वरंगुल्मंचनाशयेत् ॥

अर्थ—पारदभस्म, नागभस्म, गंधक, मोरचूत, टांकणखार, हे प्रत्येकीं दीड दीड तोळा, ताम्रभस्म व शंखभस्म हीं एकेक तोळा, कवड्या ४॥ तोळे, घेऊन पूर्वी प्रमाणे कवड्यांत भरून लोकनाथासारिखें पुट द्यावें; नंतर रुईच्या पानांच्या रसांत खलून गजपुट द्यावें. थंड झाल्यावर काढून समान मिऱ्यें घालोन बारीक खलून त्याच्या चौपट गंधक त्यांत मिसळावा; ह्मणजे हा नागेश्वर रस तयार होतो. हा पांच मासे घेऊन तुपाशीं द्यावा; ह्मणजे असाध्य क्षयरोग, सूज उदर, मूळव्याध, संग्रहणी, ज्वर, आणि गुल्म यांचा नाश करितो.

## कालांतकरस.

कुर्याल्लोहमयींमूषामुन्नतांद्वादशांगुलां ॥ मर्दितंस्वर्णवागाहिग्रहकन्या

रसैरसं ॥ लशुनैर्यामनमात्रंचपिंडीकृत्वानिवेशयेत् ॥ कृत्वापूर्वोक्तमूपायांसूतपादंचगंधकं ॥ निर्गुंडीरससंपिष्टंतन्मूषायांविनिःक्षिपेत् ॥ आच्छाद्यलोहचक्रेणरुद्रयंत्रेणजारयेत् ॥ एवमष्टगुणेजीर्णेसमुद्धृत्य विचूर्णयेत्॥ पंचगुंजामितंखादेदनुपानंमृगांकवत् ॥ अनंकालांतको नामरसोयंराजयक्ष्मजित् ॥

अर्थ—बारा आंगळें उंच लोखंडाची मूस करावी. त्यांत धोतरा, डुकरकंद, कुमारी, व लसूण, या प्रत्येकांत प्रहर प्रहर घोटलेला पारा गोळा करून त्या पूर्वोक्त मुसेंत चतुर्थांश गंधक निर्गुंडीच्या रसांत खलून त्या मुसेंत घालून त्यावर तो पारा ठेऊन वर गंधक देऊन लोखंडाचा पत्रा मुशीच्या तोंडावर लाऊन ती रुद्रयंत्रांत पचन करावी. या प्रमाणें आठपट गंधक जिरला ह्मणजे तो रस काढून घोटावा; आणि मृगांकादिकाच्या सारख्या अनुपानाशीं पांच गुंजा द्यावा. हा कालांतकनामक रस क्षयाचा नाश करितो.

## चंद्रायतनरस.

शुद्धसूतसमंगंधंसूततुल्यंचसैंधवं ॥ शमीश्वेतदलाद्रावैर्मर्दितंगोलकीकृतं ॥ नागवल्लीदलव्योषैःपाच्यंपाचनयंत्रके ॥ दिनांतेउर्ध्वलग्नंतुग्राह्यंभक्ष्यंत्रिगुंजकं ॥ पर्णखंडेनसंयुक्तंमासैकंराजयक्ष्मजित् ॥ रसश्चंद्रायतोनामह्यनुपानंमृगांकवत् ॥

अर्थ-शुद्ध पारा, शुद्ध गंधक व सैंधव हीं समभाग घेऊन पांढऱ्या शमीच्या पाल्याच्या रसांत घोटून गोळा करून तो सुंठ, मिरीं पिंपळी व पानवेलीचीं पानें यांशीं डमरूयंत्रांत भरून तें एकदिवस चुलीवर ठेऊन खालीं अग्नि करावा. सायंकाळीं डमरुयंत्रांत वर लागलेला पारा घेऊन तो तीन गुंजा विड्याशीं एक महिनाभर द्यावा; याला अनुपान व पथ्य मृगांकासारिखें आहे.

## प्राणनाथरस.

लोहभस्मपलैकंतुद्विपलंभृंगजद्रवैः ॥ वराभार्गीभवंद्रावंपलैकैकंनियोजयेत् ॥ पलैकंत्रैफलेक्काथेसर्वंमर्ज्यंचखर्परे ॥ लोहांशंमाक्षिकंशुद्धंमर्द्यंपूर्वोदितैर्द्रवैः ॥ रुध्वात्रिभिःपुटैःपाच्यद्रवैर्मर्द्यंपुनःपुनः ॥ मृतंसूतंमृतंवंगंनिष्कंनिष्कंविमिश्रयेत् ॥ द्वौनिष्कौशुद्धगंधस्यचतुर्निष्कावराटिका ॥ एकीकृत्यपुटेपाच्यंपूर्वलोहाविमिश्रितं ॥ पूर्वोक्तैस्तुद्रवैर्मर्द्यंपुटेनैकेनपाचयेत् ॥ चूर्णयेन्मरिचंसप्ततूल्यटंकणयोर्दश ॥ मेलये

च्च पृथङ्निष्कंप्राणनाथाव्हयोरसः ॥ भक्षयेन्निष्कपादार्धमसाध्यराज यक्ष्मनुत् ॥ शोफोदरार्शोग्रहणीज्वरगुल्महरंतथा ॥

अर्थ—लोहभस्म ८ तोळे घेऊन त्याला ८ तोळे माक्याच्या रसांत खलावें; नंतर गुळवेल व भारंगी यांचा काढा व त्रिफळयाचा काढा चार चार तोळे, एकत्र करून अग्नीवर ठेऊन खापरांत भाजावा. व लोहाइतकें शुद्ध माक्षीक घालून पूर्वोक्तरसाशीं घोटावें; आणि पुट द्यावें. या प्रमाणें तीन पुटें द्यावीं; नंतर पारदभस्म व ताम्रभस्म हीं प्रत्येकीं सहा सहा मासे, शुद्ध गंधक १ तोळा, कवडया चार तोळे, एकत्र करून त्याला पुट देऊन तें त्या लोहांत मिसळून पूर्वोक्त रसाच्या भावना देऊन पुनः एक पुट द्यावें; नंतर काढून त्यांत ३॥ तोळे मिऱ्यें, मोरचूत व टांकणखार पांच पांच तोळे त्यांत मिसळावें; ह्मणजे हा प्राणनाथरस तयार झाला. हा ६ गुंजा द्यावा; असाध्य क्षय सुज, उदर, मुळव्याध, संग्रहणी, ज्वर; आणि गुल्म यांचा नाश करितो.

## सुवर्णपर्पटीरस.

शुद्धंसुवर्णदलमष्टगुणेनशुद्धसूतेनपिंडितमयोवसुभागभाजं ॥ गंधद्रुतेदग्दवन्हितुलोहपात्रेदत्वाविलोडयलघुलोहशलाकयातत् ॥ मंदंनिरस्यसुरभीमलमंडलस्थरंभादलेतदुपरिप्रणिधायचान्यत् ॥ रंभादलंलघुनियंव्यतदाददीतशांतिंसुवर्णरसपर्पटिकाभिधानं ॥ पित्तोल्बणेसमितयानुगयाथवातश्लेष्मोल्बणेकिलतुगामधुपिप्पलीभिः ॥ क्षीणेविरेकिणिचशोषिणिमंदवन्हौपांडौप्रमेहिणिचिरज्वरिणिग्रहण्यां ॥ वृद्धशिशौसुखिनिराज्ञितदेवमार्यभैषज्यमेतदुदितंहितमामयघ्नं ॥

अर्थ—सोन्याचें वर्ख १ भाग, शुद्ध पारा ८ भाग व लोह ८ भाग, हीं सर्व एकत्र खलोन लोहपात्रांत गंधक तापवून त्यांत हिंगूळ १ व चित्रक १ यांसहवर्तमान पूर्वोक्त औषधें घालोन पळीच्या दांडयानें ढवळून नंतर गोमयाचें मंडळ करून त्यांत केळीचें पात्र ठेऊन त्यावर तें सर्व ओतून पुनः दुसरें केळीचें पान वर घालोन झांकावें. शीत-झाल्यावर काढून घ्यावें. याला सुवर्णपर्पटी ह्मणतात. ही पित्ताधिक्यव्याधीवर वंशलोचन व साकर यांशी व वातश्लेष्माधिक्यव्याधीवर वंशलोचन, मध व पिंपळी याशीं घ्यावी; आणि ही क्षीणत्व, रेच झालें असतां, क्षयावर, अग्निमांद्य, पांडू, प्रमेह, ज्वर, संग्रहणी, वृद्ध, बाळक व राजा याला देण्यास योग्य. ही संपूर्ण रोगांचा नाश करित्ये.

## प्राणदा पर्पटी.

सूताभ्रायोहिवंगोपणविषमखिलांशेनगंधेनकृत्वाकोलाग्नौविद्रुतेनक्षण

ममलमिदंढालितंगोमयस्थे ॥ रंभापत्रेमुनान्येनचदृढपिहितंप्राणदाप र्पटीस्यात्पांडौरेकेग्रहण्यांज्वररुजिकसनेयक्ष्ममेहाग्निमांद्ये ॥ प्राणदा पर्पटीसैषाभाषिताशंभुनास्वयं ॥ तत्तद्रोगानुपानेनसर्वरोगविनाशिनी ॥

अर्थ—पारा, अभ्रक, लोह, वंग, मिरें व बचनाग, हीं समभाग व सर्वांबराबर गंधक घेऊन लोहपात्रांत बोरीच्या काष्ठाच्या अग्नीवर पातळ करून त्यांत सर्व औषधे घालोन गोमयमंडलांत केळीचें पान ठेऊन त्यावर आनून दुसरें पान झांकण घालावें. शीत झालें ह्मणजे घ्यावें.या औषधास प्राणदा पर्पटी ह्मणतात. हीं पांडुरोग, रेच, ग्रहणी, ज्वर, अरुचि, कास, क्षय, मेह व अग्निमांद्य यांवर द्यावी. ही प्राणदा पर्पटी महादेवानें स्वतः सांगीतली. ही योग्य अनुपानाशीं दिलीं असतां, सर्वरोगांचा नाश करील,

## कुमुदेश्वररस.

पारदंशोधितंगंधमभ्रकंचसमंसमं ॥ तदर्धंदरदंदद्यात्तदर्धंचमनःशिलां ॥ सर्वार्धंमृतलोहंचखल्वमध्येविनिःक्षिपेत् ॥ द्विःसप्तभावनादेया शतावर्यारसेनच ॥ततःसिद्धोभवत्येषकुमुदेश्वरसंज्ञकः॥ सितयामरिचेनाथगुंजाद्वित्रिप्रमाणतः॥ भक्षयेत्प्रातरुत्थायपूजयित्वेष्टदेवताः ॥ यक्ष्माणमुग्रंहंत्येववातपित्तकफामयान् ॥ ज्वरादीनखिलान्रोगान् यथादैत्यान्जनार्दनः ॥ सतताभ्यासयोगेनवलीपलितनाशनः ॥

अर्थ—शुद्ध पारा, शुद्ध गंधक व अभ्रकभस्म हीं समभाग; त्याचे निमा हिंगूळ, त्याचे निमा मनशीळ व सर्व औषधाचे निमें मृतलोह हीं सर्व खलांत घालोन शतावरीचे रसाच्या चवदा भावना द्याव्या; ह्मणजे हा कुमुदेश्वर सिद्ध झाला. हा साकर व मिरें यांबरोबर दोन किंवा तीन गुंजा प्रातःकाळीं इष्टदेवतेचे पूजन करून घ्यावा; ह्मणजे उग्र क्षय, वात, पित्त, कफरोग; आणि ज्वरादिक संपूर्ण रोगांचा नाश करितो. जसा विष्णु दैत्यास मारितो तसा, हा रस संपूर्ण रोगांचा नाश करितो. या रसाचें सतत सेवन केल्याने वलीपलित नाश पावतें.

## पंचामृताख्यरस.

भस्मीभूतसुवर्णतारदिनकृत्सूताभ्रसत्वैःक्रमात्संवृद्धैस्त्रितयंत्रयःक्रमिहरांभोदैर्युतःकट्फलैः ॥ निर्गुंडीदशमूलवन्हिरजनीव्योषार्द्रकैर्भावितो गोलंकृत्यविशेषतोनिगदितःपंचामृताख्योरसः॥ नानेनसदृशःकोपिरसोस्तिभुवनत्रये ॥ निहंतिसकलान्रोगान्भवरोगमिवाच्युतः ॥ सर्वरोगहरःसूतस्तत्तद्रोगानुपानतः॥ अयंपंचामृतोनृणांत्रिदशानामिवामृतं॥

अर्थ—सुवर्णभस्म, रौप्यभस्म, ताम्रभस्म, पारदसत्व व अभ्रकसत्व हीं क्रमानें एकोत्तर वृद्धीनें घ्यावीं; व वावडिंग नागरमोथे, कायफळ हीं तीन तीन भाग एकत्र करून नंतर निर्गुंडी, दशमूळ, चित्रक, हळद, त्रिकटु व आलें यांचे रसाच्या भावना देऊन गोळा करावा; ह्मणजे पंचामृताख्यरस होतो. या रसासारिखा त्रिभुवनांत दुसरा रस नाहीं. हा संपूर्णरोगांचा नाश करितो. जसा विष्णु जन्ममरणाचा नाश करितो. तसा हा संपूर्ण रोगांचा योग्य अनुपानानें नाश करितो. हा पंचामृतरस मनुष्याला अमृतप्रमाण आहे.

## स्वयमग्निरस.

शुद्धसूतंद्विधागंधंकुर्यात्खल्वेनकज्जलीं ॥ तयोःसमंतीक्ष्णचूर्णंमर्दयेत्कन्यकाद्रवैः ॥ द्वियामांतेकृतंगोलंताम्रपात्रेविनिःक्षिपेत् ॥ आच्छाद्यैरंडपत्रेणयामार्धेत्युष्णतांभवेत् ॥ धान्यराशौन्यसेत्पश्चादहोरात्रात्समुद्धरेत् ॥ संचूर्ण्यगालयेद्वस्त्रेसत्यंवारितरंभवेत् ॥ भावयेत्कन्यकाद्रावैःसप्तधाभृंगजैस्तथा ॥ काकमाचीकुरंटोत्थद्रवैर्मुंड्यापुनर्नवैः ॥ सहदेव्यमृतानील्यानिर्गुंड्याश्चित्रजैस्तथा ॥ सप्तधातुपृथक्द्रावैर्भाव्यंशोष्यंतथातपे ॥ सिद्धयोगोह्ययंख्यातःसिद्धानांचमुखागतः ॥ अनुभूतोमयासत्यंसर्वरोगगणापहः ॥ स्वर्णादीन्मारयेदेवंचूर्णीकृत्यतुलोहवत् ॥ त्रिफलामधुसंयुक्तःसर्वरोगेषुयोजयेत् ॥ त्रिकटुत्रिफलैलाभिर्जातीफललवंगकैः ॥ नवभागोन्मितैरेतैःसमःपूर्वरसोभवेत् ॥ संचूर्ण्यलोडयेत्क्षौद्रैर्भक्ष्यंनिष्कद्वयंद्वये ॥ स्वयमग्निरसोनाम्नाक्षयकासनिकृंतनः ॥

अर्थ—शुद्ध पारा एकभाग व गंधक दोन भाग घेऊन दोहोंला एका जागीं खलून कज्जली करून त्याच समभाग पोलादी लोहाचें चूर्ण घेऊन त्यांत मेळवून कोरफडाचे रसांत दोन प्रहर खलून त्याचा गोळा करून नंतर तांब्याचे ताह्मनांत तो गोळा ठेऊन त्याजवर सुरती एरंडाचीं पानें झांकण घालून चार घटकापर्यंत ठेवावा. तेणेंकरून तो गोळा फार उष्ण होतो. त्याला धान्याचे राशीमध्यें एक अहोरात्र पुरून ठेऊन दुसरे दिवशीं बाहेर काढावा, तो त्याचे भस्म होतें. त्याचा खल करून फडक्यांत गाळून पाण्यावर टाकिलें असतां, निश्चयें करून तरतें, यांत संशय नाहीं. मग त्या भस्माला खलांत घालून ज्या वनस्पतीचीं पुटें द्यावयाचीं त्या येणे प्रमाणें. कोरफडाचे रसांत खलून उन्हांत तापवून वाळल्यावर फिरून त्याच रसांत खलोन उन्हांत तापवून वाळवावें, याप्रमाणें सातपुटें कोरफडाचीं द्यावीं. तशींच माक्याचे रसाचीं व कांगोणीचे रसाचीं, कोऱ्हांटयाचे रसाचीं व मुंडीचे रसाचीं व पुनर्नव्याचे रसाचीं व सहदेवी व गुळवेल, नीळी व निर्गुंडी व चित्रक यांचे रसाचीं पुटें वेगळीं वेगळीं सात द्यावीं तेणेकरून हे

रसायन सिद्ध होतें, याला स्वयमग्निरस असें ह्मणतात. हा रस विख्यात आहे. महान् महान् सिद्ध पुरुषानीं सांगितला; यास्तव त्यां अनुभव घेऊन कथिला. हा स्वयमग्निरस सारे रोग दूर करण्याविषयीं त्रिफळेचें चूर्ण व मध या अनुपानाशीं दोन निष्क प्रमाण द्यावा. तेणेंकरून सारे रोग दूर होतात. सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळ-काठी, विलायची, जायफळ, लवंग, हीं नऊ. औषधें समभाग घेऊनं चूर्ण करून त्याचे समभाग हा स्वयमग्निरस घेऊन दोन्हीं एकत्र करून मधीत मेळवून दोन निष्कप्रमाण द्यावा. तेणें करून क्षयरोग व कासरोग हे जातात, व रसायनाचे रीतानें स्वर्णादिक धातूचें लोहासारखें चूर्ण करून भस्में करावीं. तीं होतात.

## राजमृगांक.

रसभस्मत्रिभागंस्याद्भागैकंहेमभस्मकं ॥ मृततास्रस्यभागैकंशिला गंधकतालकं ॥ प्रतिभागद्वयंशुद्धमेकीकृत्वाविचूर्णयेत् ॥ वराटान्पूरयेत्तेनचाजाक्षीरेणटंकणं ॥ पिष्ट्वातेनमुखंरुध्वामृद्भांडेसन्निधापयेत् ॥ शुष्कंगजपुटेपाच्यंचूर्णयेत्स्वांगशीतलं ॥ रसोराजमृगांकोयंचतुर्गुंजः क्षयापहः ॥ एकोनत्रिंशन्मरिचैर्घृतेनसहभक्षयेत् ॥ दशानांपिप्पलीनां चचूर्णंदत्वाप्रदापयेत् ॥ क्षयेकासेज्वरेपांडौग्रहण्यांचातिसारके ॥

अर्थ—पाऱ्याचें भस्म ३, सुवर्ण भस्म १, ताम्र भस्म १ भाग व मनशीळ, गंधक, हरताळ हीं प्रत्येक २ भाग एकत्र खलोन कवडयांत भरून नंतर शेळीचे दुधांत टांकणखार खलोन त्या कवडयांची तोंडें टांकणखारानें बंद करावीं, शुष्क झाल्यावर मडक्यांत भरून तोंड बंद करून गजपुट द्यावें. स्वांगशीत झाल्यावर खलावें, याला राजमृगांक ह्मणतात. एकुणतिस मिऱ्याचे चूर्ण, अथवा दहा पिंपळ्यांचें चूर्ण; आणि तूप याचें बरोबर चार गुंजा खावा; ह्मणजे क्षय, खोकला, ज्वर, पांडु, ग्रहणी व अतिसार यांचा नाश करील.

## दुसरा प्रकार.

रसेनतुल्यंकनकंतयोस्तुसाम्येनयुज्यान्नवमौक्तिकानि ॥ रसप्रमाणो बलिरग्निभागःक्षारश्चसर्वंतुपवारिणातु ॥ संमर्द्यवस्त्रेतुविधायगोलंदिनंपचेत्तंलवणेनपूर्णे ॥ भांडेमृगांकोयमतिप्रगल्भःक्षयाग्निमांद्यग्रहणीगदेषु ॥ साज्योषणाभिर्मधुपिप्पलीभिर्वल्लोस्यदेयोननतोधिकस्तु ॥ पथ्यंहितंशीतलमेवयोज्यंत्याज्यंसदापित्तकरंविदाहि ॥

अर्थ—पारा, सुवर्ण, या दोहोंचे बरोबर मोतीं आणि पाऱ्याचे समभाग गंधक, टांकणखार ३ भाग, या प्रमाणे घेऊन भाताचे कोंडयाच्या कषायानें खलून वस्त्रांत गोळी बांधून मडक्यांत खाली वर मीठ घालून ती गोळी मध्यें ठेऊन गजपुट द्यावें;

म्हणजे हा मृगांक मोठा प्रगल्भ होतो. हा क्षय, अग्निमांद्य, संग्रहणी, यांवर तूप, मिरपूड, अथवा मध, पिंपळी, यांचे बरोबर वालभार द्यावा; अधिक देऊ नये. यावर शीतल पदार्थ पथ्यास द्यावे. पित्तकारक व उष्ण असे देऊ नये.

## लोकेश्वर.

पलंकपर्दचूर्णस्यपलंपारदगंधयोः ॥ माषष्टंकणकस्यैकोजंबीराद्भिर्विमर्दयेत् ॥ पुटेल्लोकेश्वरोनाम्नालोकनाथोयमुत्तमः ॥ ऋतेकष्टंरक्तपित्तमन्यरोगान्क्षयंजयेत् ॥ पुष्टिवीर्यप्रसादौजःकांतिलावण्यदःपरः ॥ कोस्तिलोकेश्वरादन्योनृणांशंभुमुखोद्गतात् ॥

अर्थ–कवडीभस्म, पारा व गंधक, हीं प्रत्येकीं ४ तोळे, टांकणखार एक मासा या प्रमाणें घेऊन लिंबाच्या रसांत खलावें, नंतर पुट द्यावें; म्हणजे हा लोकेश्वररस होतो. याला लोकनाथ ही म्हणतात. हा कष्टावाचून रक्तपित्त, क्षय, इत्यादि रोगनाश करील; आणि पुष्टि, वीर्याचा निर्दोषपणा, कांति, सुंदरपणा, यांप्रत करील. हा शंभुमुखापासून निघालेला लोकेश्वर, याहून दुसरा मनुष्यास सुख देणारा कोण आहे.

## नवरत्नराजमृगांक.

सूतंगंधकहेमताररसकंवैक्रांतकांतायसंवंगंनागपविप्रवालविमलामाणिक्यगारुत्मतं ॥ तार्प्यंमौक्तिकपुष्परागजलजंवैडूर्यकंशुल्बकंशुक्तिस्तालकमभ्रहिंगुलशिलागोमेदनीलंसमं ॥ गोक्षूरैःफणिवल्लिसिंहवदनामुंडीकणाचित्रकैरिक्षुच्छिन्नरुहाहरप्रियजयाद्राक्षावरजिद्रवैः ॥ कंकोलैर्मदनागकेसरजलैर्भाव्यंपृथक्सप्तधाभांडेसिंधुभृतेमृगांकवदयंपाच्यःक्रमाग्नौदिनं ॥ भूयःप्राक्समुदाहृतैर्द्रववयैस्तंभावयेत्पूर्ववत्पश्चात्तुल्यविभागशीतलरजःकस्तूरिकाभावना ॥ गोप्याद्गोप्यतरंरसायनमिदंश्रीशंकरेणोदितंगुंजासिंधुयुतःकणामधुयुतःशोफेसपांड्वामये ॥ वातव्याधिमुपद्रवैश्चसहितंमेहांस्तथाविंशतिंसंयोज्यस्तुहरीतकीगुडयुतोवातास्रकेदुर्जये ॥ गंभीरेचगुडूचिसत्वचपलाक्षौद्रैस्तुसंयोजितश्चाध्मानारुचिशूलमांद्यकसनापस्मारवातोदरान् ॥ श्वासान्संग्रहणींहलीमकमथोसर्वज्वरान्नाशयेद्वानून्पुष्यतिक्षियंक्षपयतिश्यामाशतंयौवनं ॥ प्रौढाटोपयुतंकरोतिसहसातारुण्यगर्वोज्झितांसिद्धोराजमृगांकएवजयतिस्वस्यानुपानैर्गदान ॥

अर्थ–पारा, गंधक, सुवर्णभस्म, रौप्यभस्म, कलखापरी, वैक्रांतभस्म, कांतलोहाचें भस्म, वंगभस्म, शिशाचें भस्म, हिऱ्याचें भस्म, प्रवालभस्म, विमलमण्याचें भस्म, माणिकभस्म, पाचेच्या मण्याचें भस्म, सुवर्णमाक्षिकभस्म, मौक्तिकभस्म, पुष्कराजभस्म, शंखभस्म, वैडूर्यभस्म, ताम्रभस्म, शिंपांचें भस्म, हरताळभस्म, अभ्रकभस्म, हिंगूळ, मनशीळ, गोमेदमण्याचें भस्म, नीलमण्याचें भस्म, हीं सर्वसमभाग घेऊन गोखरू, नागवेल, अडुळसा, गोरखमुंडी, पिंपळी, चित्रक, ऊंस, गुळवेल, धोत्रा, भांग, द्राक्ष, शतावरी, कंकोळ, कस्तुरी, नागकेशर, यांचे रसाच्या अथवा ज्याचा रस न निघेल त्याच्या काढ्याच्या पृथक् पृथक् सात सात भावना द्याव्या. त्यांतून एकंदर १०५ भावना देऊन गोळा करून एकामडक्यांत सैंधव भरून त्यामध्यें तो गोळा ठेऊन क्रमानें मंदाग्नि, मध्याग्नि, तीक्ष्णाग्नि, देऊन मृगांकाप्रमाणें पचवावा; नंतर पुनः पूर्वी सांगितल्या प्रमाणें भावना द्याव्या; नंतर कापूर आणि कस्तुरी समभाग घेऊन यांची भावना द्यावी; ह्मणजे हा सिद्ध झाला, हा गुह्यापेक्षां अत्यंत गुह्य असा हा रस श्रीशंकरानें सांगितला. हा गुंजभार सैंधवाबरोबर सेवन केला, तर सूजनाशक; आणि मध व पिंपळी यांबरोबर पांडुरोग, आणि उपद्रवासहित वातरोग, वीस प्रकारचे मेह यांचा ही नाशक आहे, आणि हिरडा व गुळ यांचे बरोबर वातरक्तनाशक आहे; व आध्मान अरुचि, शूल, अग्निमांद्य, कास, अपस्मार, वातोदर, श्वास, संग्रहणी, हलीमक, ज्वर, क्षय, यांवर अनुपानसहित सेवन केला असतां, त्यांचा नाशक आहे, आणि धातुपुष्टीकरणारा, शंभर तरुणस्त्रियांचा गर्व दूरकरणारा, शक्ति देणारा आहे. ह्याला राजमृगांक ह्मणतात. हा योग्यअनुपानाशीं सर्व रोगाचा नाश करील.

## मृगांकरस.

रसबलितपनीयंयोजयेत्तुल्यभागंतदनुयुगुलभागंमौक्तिकानांशुभानां ॥ यवजचरणभागंमर्दयेत्सर्वमेतद्दिनमपितुषवारागोलकंलब्धमात्रे ॥ विधायमुद्रांविदधीचभांडेचुल्यांसमुद्रेलवणेनपूर्णे ॥ दिनंपचेत्तानुमृगांकनामाक्षयाग्निमांद्यग्रहणीविकारे ॥ योज्यःसदावल्लिजसर्पिषावाकृष्णामधुभ्यांसततंत्रिगुंजः ॥ वर्ज्यंसदापित्तकरंहिवस्तुलोकेशवत्पथ्यविधिर्निरुक्तः ॥

अर्थ–पारा, गंधक व सोनें हीं समभाग, मौक्तिक २ भाग, यवक्षार १ भाग हीं एकत्र करून भाताच्या कोंडयाच्या काढयांत गोळा होई तों खलून गोळा करून मातकापड करून तो मिठानें भरलेल्या भांडयांत ठेऊन वर मीठ घालून भांडयाचें तोंड बंद करून एक दिवस चुलीवर अग्नि द्यावा. शीत झाल्यावर काढून घ्यावा. हा मृगांकरस क्षय, अग्निमांद्य, संग्रहणी, यांवर मध व पिंपळी यांशीं तीन गुंजा द्यावा; आणि पित्तकारक वस्तु वर्ज्य कराव्या; व लोकनाथाप्रमाणें पथ्य द्यावें.

## कनकसिंदूर.

रसःकनकमार्क्षिकःकनकमाक्षिकस्तालकःशिलारसकगंधकारससमाः सतुल्याइमे ॥ विमर्धपयसारवेःसकलमेतदस्योपरिद्रवैःप्रतिदिनंपृथक् तदितिभावयेद्बुद्धिमान् ॥ जयामुनिकलिप्रियादहनभृंगवासोद्रवैर्विभाव्यचरसस्ततःसुदृढगोलकंस्वेदयेत् ॥ मृगांकवदथार्द्रकद्रवभरेणतंसप्तधाविमर्द्यचकटुत्रयांबुभिरयंक्षयस्यांतकृत् ॥ रसःकनकसिंदुरोभवतिसन्निपातेप्ययंसदार्द्रकरसैस्तथापवनगुल्मशूलादिहृन् ॥ सविश्वघृतयोजितःसकलमत्रपथ्यंहितंमृगांकवदथापरंकिमपिनैवयोज्यंक्कचित् ॥

अर्थ–पारा, सोनें, सुवर्णमाक्षिक, हरताळ, मनशिळ, कलखापरी, गंधक व मोरचूत हीं समभाग घेऊन पारा व गंधक यांची कज्जली करून सर्व औषधें एकत्र करून रुईचे चिकांत त्याचा खल करावा; नंतर शेवरी, हातगा, बेहेडा, चित्रक, माका व अडुळसा या प्रत्येकांचे रसांत एकेक दिवस खल करावा; नंतर गोळा करून भूधरयंत्रांत मृगांकासारखें पुट द्यावें; नंतर काढून आल्याच्या रसाच्या सात भावना द्याव्या; नंतर सुंठ, मिरीं व पिंपळी यांच्या काढयाच्या सात सात भावना द्याव्या. हा कनकसिंदूर क्षयरोगाचा नाश करितो. हा आल्याच्या रसाशीं सन्निपातावर द्यावा; आणि सुंठ व तूप याशीं वातव्याधीवर द्यावा. याला मृगांकासारिखें पथ्य करावें. त्याहून अधीक कांहीं भक्षण करूनये.

## हेमाभ्रकरससिंदूर.

अभ्रकंरससिंदूरंमिश्रितंहेमभस्मना ॥ समभागंप्रकुर्वीतरसेनार्द्रकयोजितं ॥ क्षयंचक्षयपांडुंचक्षयकासचकुंभकं ॥ जयेन्मंडलपर्यंतंपूर्वकर्मविपाकवित् ॥

अर्थ–अभ्रकभस्म, रससिंदूर व सुवर्ण भस्म हीं समभाग घेऊन आल्याचे रसांत खलून दोन गुंजा सेवन करावीं; ह्मणजे क्षय, क्षयपांडु, कास, कुंभकामला यातें जिंकील. कर्मविपाक जाणणारा असेल त्याणें मंडळपर्यंत घ्यावें.

## सुवर्णभूपति.

शुद्धंसूतंसमंगंधंमृतशुल्बंतयोःसमं ॥ अभ्रलोहकयोर्भस्मकांतभस्मसुवर्णजं ॥ रजतंचविषंसम्यक्पृथक्सूतसमंभवेत् ॥ हंसपादीरसैर्मर्द्यंदिनमेकंवटीकृतं ॥ काचकूप्यांविनिःक्षिप्यमृदासंलेपयेद्बहिः ॥ शुष्कासावालुकायंत्रेशनैर्मृद्वग्निनापचेत् ॥ चतुर्गुंजमितंदेयंपिप्पल्यार्द्रद्रवे

णतु ॥ क्षयंत्रिदोषजंहंतिसन्निपातांस्त्रयोदश ॥ आमवातंधनुर्वातंशृं खलावातमेवच ॥ आढ्यवातंपंगुवातंकफवाताग्निमांद्यनुत् ॥ कटीवातंसर्वशूलंनाशयेन्नात्रसंशयः ॥ गुल्मशूलमुदावर्तंग्रहणीमतिदुस्तरां ॥ प्रमेहमुदरंसर्वामश्मरींमूत्रविट्ग्रहं ॥ भगंदरंसर्वकुष्ठंविद्रधिंमहतींतथा ॥ श्वासंकासमजीर्णंचज्वरमष्टविधंतथा ॥ कामलांपांडुरोगंच शिरोरोगंचनाशयेत् ॥ अनुपानविशेषेणसर्वरोगान्विनाशयेत् ॥ यथा सूर्योदयेनश्येत्तमःसर्वगतंतथा ॥ सर्वरोगविनाशायसर्वेषांस्वर्णभूपतिः ॥

अर्थ–पारा १, गंधक १, ताम्रभस्म२ व अभ्रक, लोह, कांत, सुवर्ण व रुपें या प्रत्येकाची भस्में १ भाग व बचनाग १ भाग या प्रमाणें घेऊन रक्तलाजाळूचा रसांत एक दिवस खलोन गोळी करून कांचेच्या कुपींत भरून मातकापड करून शुष्क करून वाळुका यत्रांत मृदु अग्नि लावून पचन करावें. पिंपळी व आल्याचा रस. यांचे बरोबर चार गुंजा प्रमाणे द्यावा; ह्मणजे त्रिदोष, क्षय, सन्निपात तेराप्रकारचे, आमवात, धनुर्वात, शृंखलावात, आढ्यवात, पंगुवात, कफवात, अग्निमांद्य, कटिवात, सर्वशूल, गुल्मशूल, उदावर्त, संग्रहणी, प्रमेह, उदर, सर्वाश्मरी, मूत्रकृछ्र, विट्ग्रह, भगंदर, सर्वकुष्ठ, मोठा विद्रधी, श्वास, कास, अजीर्ण, आठ प्रकारचा ज्वर, कामला पांडुरोग, शिरोरोग इत्यादि सर्व रोगास अनुपानविशेषेंकरून नाशाप्रत घालवील. जसा सूर्योदय झाला असतां; सर्व ठिकाणचा अंधकार नष्ट होतो, याप्रकारेंकरून हा स्वर्णभूपति सर्वांचा रोग नाशार्थ उत्पन्न झाला आहे.

## लक्ष्मीविलासरस.

सुवर्णताराभ्रकताम्रवंगंत्रिलोहनागामृतमौक्तिकंच ॥ एतत्समंयेज्यरसस्यभस्मखल्वेकृतंस्यात्कृतकज्जलींकं ॥ संमर्दयेन्माक्षिकसंप्रयुक्तंतच्छोषयेद्द्वित्रिदिनंचघर्मे ॥ तत्कल्कमूषोदरमध्यगामीयत्नात्कृतंतार्क्ष्यपुटेन पक्कं ॥ यामाष्टकंपावकमर्दितंचलक्ष्मीविलासोरसराजएषः ॥ क्षयेत्रिदोषप्रभवेचपांडौसकामलासर्वसमीरणेषु ॥ शोकप्रतिश्यायविनष्टवीर्येमूलामयंसर्वसशूलकुष्ठं ॥ हत्वाग्निमांद्यंक्षयसन्निपातंश्वासंचकासंच हरेत्प्रयुक्तं ॥ तारुण्यलक्ष्मीप्रतिबोधनायश्रीमद्विलासोरसराजएषः ॥

अर्थ–सोनें, रुपें, अभ्रक, ताम्र, कथिल, बद्धलोह, सिसें, बचनाग, व मोतीं यांचीं भस्में समभाग आणि सर्वांचे बरोबर पाऱ्याचें भस्म घेऊन खलून तीं कज्जली मधामध्यें खलून शुष्क करावीं; नंतर मुशींत घालून तार्क्ष्यपुट द्यावें; नंतर चित्रकाच्या काढ्यांत

आठ प्रहर खलावें; ह्मणजे हा लक्ष्मीविलासरस सिद्ध होतो. हा रसांचा राजा होय, हा त्रिदोषापासून झालेला क्षय, पांडु, कामला, सर्व वायु, सूज, पडसें, नष्ठवीर्य, मुळव्याध शूल, कुष्ठ, अग्निमांद्य, संन्निपात, श्वास, व कास यांचा नाश करील. आणि तारुण्य, लक्ष्मी वाढविणारा, श्रीमंत लोकांस हा विलासच आहे असा होईल.

## शिलाजत्वादिलोह.

शिलाजतुयुतंलोहंवल्लंतुविधिमारितं ॥
पथ्याशीसेवतेयस्तुसयक्ष्माणंव्यपोहति ॥

अर्थ–लोहभस्म दोनगुंजा शिलाजिताबरोबर सेवन करून पथ्य केलें असतां; राजयक्ष्मा नाश पावतो.

## पंचामृतरस.

भस्मसूताभ्रलोहानांशिलाजतुविषंसमं ॥ गुडूचीत्रिफलाक्काथसंकृतं गुगुलंतथा ॥ मृतनैपालताम्रंवासूततुल्यंनियोजयेत् ॥ एकीकृत्यद्वि गुंजंतुभक्षयेद्राजयक्ष्मनुत् ॥ पंचामृतोरसोनामह्यनुपानंचपूर्ववत् ॥

अर्थ–पारा, अभ्रक व लोह यांचीं भस्में, शिलाजित व बचनाग हे समभाग घेऊन बेहेडा व आवळकाठी यांत घोटून गुग्गुळ, व नेपाली तांब्याचें भस्म, हे पाऱ्यासमान मिळवून घोटून त्यांतून दोनगुंजा अनुपानाशीं द्यावा; ह्मणजे हा पंचामृतरस राजयक्ष्माचा नाश करितो.

## अमृतेश्वररस.

रसभस्मामृतासत्वंलोहंमधुघृतान्वितं ॥
अमृतेश्वरनामायंषड्गुंजाराजयक्ष्मजित् ॥

अर्थ–पारदभस्म, गुळवेलीचें सत्व व लोह हीं एकत्र करून मध व तूप यांशीं साहा गुंजा प्रमाण द्यावा, याला अमृतेश्वर ह्मणतात, हा क्षयनाशक आहे.

## चिंतामणिरस.

रसेंद्रवैक्रांतकरौप्यताम्रसलोहमुक्ताफलगंधहेम्नां ॥ त्रिर्भावितंचार्द्र कमार्कवन्हिरसैरजागोपयसातथैव ॥ अर्शक्षयंकासमरोचकंचजीर्णज्व रंपांडुमापप्रमेहान् ॥ गुंजाप्रमाणंमधुमागधीभ्यांलीढंनिहन्याद्विषमंच वातं ॥ चिंतामणिरितिख्यातःपार्वत्यानिर्मितःस्वयं ॥

अर्थ–पारा, वैक्रांत, रुपें, तांबें, लोखंड, मोतीं, व सुवर्ण, यांचीं भस्में, व गंधक हीं समभाग घेऊन त्यास आलें, माका, व चित्रक, यांच्या रसाचा तिन तिन भावना; आणि

शेळी, गाय, यांच्या दुधाच्या तिन तिन भावना दिल्या; ह्मणजे चिंतामणिरस होतो. हा गुंजभार मध व पिंपळी यां बरोबर खावा; ह्मणजे मुळव्याध, क्षय, कास, अरोचक, अजीर्ण, ज्वर, पांडु व प्रमेह यांचा नाश करील. हा पूर्वी पार्वतीनें स्वत: निर्माण केला आहे.

## दुसरा त्रैलोक्यचिंतामणि.

सूताभ्रस्वर्णताराऽरुणभिदुरशिलाताप्यगंधप्रवालायोमुक्ताशंखतालंव
रमिदमनलक्काथत:सप्तभाव्यं ॥ निर्गुंडीसूरणांभ:पविरविपयसात्रि:
पृथग्भावयित्वाचापूर्यैतैर्वराटानथमिहिरपयष्टंकणालिप्तवक्त्रान् ॥ कृ
त्वाभांडेचरुध्वागजपुटजठरेयुक्तितस्तत्तुपक्त्वोत्थृत्यैतन्मर्दयित्वातद
खिलतुलितंसूतभस्मप्रदद्यात् ॥ वैक्रांतंसूततुर्यांशकमथमिलितंसप्तशः
शिग्रुमूलंत्वग्बाणस्तेनतुल्यंविषमनलवरंटंकणंचोषणंच ॥ पथ्याजाती
फलंचामरकुसुमकणानागरंवत्सनाभंतुर्यांशंमेलयित्वापृथगथदिवसंम
र्दयेल्लुंगतोयैः ॥ एषत्रैलोक्यचिंतामणिरखिलगदध्वांतविध्वंसहंसस्त
त्तद्रोगानुपानानुषसिकवलित:सार्धवल्लप्रमाण: ॥ वातव्याध्यामवात
ज्वरजठरकृमिश्वासशूलास्त्रवातासृक्पित्तक्षैण्यकासक्षयकफजगदोरः
क्षताजीर्णमेहे ॥ कुष्ठातीसारपांडुग्रहणिषुतमकेपुव्रणार्शःप्रकृष्टेखांजेखं
जाढयवातेश्रुतिभगजगदेसर्वथैपप्रशस्तः ॥

अर्थ–पारा, अभ्रक, सुवर्ण, रुपें, माणिक, हिरा, मनशीळ, सुवर्णमाक्षिक, गंधक, प्रवाळ, लोह, मोतें, शंख व हरताळ यांचीं भस्में, पारा व गंधक यांची कज्जली, हीं सर्व एकत्र करून त्यास चित्रकाचे काढयाच्या सात भावना द्याव्या; नंतर निर्गुंडी, सुरण, यांचा रस, निवडुंग व रुई यांचा चीक, या प्रत्येकांच्या तीन तीन भावना द्याव्या; नंतर कवडयांत भरून रुईच्या चिकांत टांकणखार खलून त्यानें त्या कवडयांचीं तोंडें बंद करावीं; नंतर मडक्यांत भरून मुद्रा द्यावी; आणि गजपुट द्यावें. शीत झाल्यावर काढून खलावें; आणि सर्व चूर्णाचे समभाग पाऱ्याचें भस्म, तोरमल्लिचें भस्म पाऱ्याच्या चतुर्थांश, हीं सर्व एकत्र करून त्याचे सातपट शेवग्याच्या मुळांचें चूर्ण, पांच भाग दालचिनी व रक्त्याबोळ, चित्रक, टांकणखार, मिरें, हीं पाव पाव भाग, बाळहर्डी, जायफळ, लवंगा, पिंपळी, सुंठ व बचनाग हीं प्रत्येक चतुर्थांश मेळऊन नंतर त्याचा महाळुंगाचे रसांत एकदिवस खल करावा. हा त्रैलोक्यचिंतामणि संपूर्ण रोगरूपअंधकारनाश करण्या विषईं सूर्यासारिखा. हा रोगोक्त अनुपानाशीं तीन गुंजा घेतला असतां, संपूर्ण रोगांचा नाश करितो. हा वातव्याधि, आमवात, ज्वर उदर, कृमि, श्वास, शूल, रक्तवात, रक्तपित्त,

क्षीणता, कास, क्षय, कफरोग, उरःक्षत, अजीर्ण, मेह, कुष्ठ, अतीसार, पांडु, ग्रहणी, तमकश्वास, व्रण, अर्श, पंगुवात, आढ्यवात, कर्णरोग व योनिरोग, यांवर प्रशस्त आहे.

## वसंतकुसुमाकर.

प्रवालरसमौक्तिकाभ्रकमिदंचतुर्भागभाक्पृथक्पृथगथस्मृतेरजतहेम निद्व्यंशके ॥ अयोभुजगरंगकंत्रिलवकंविमर्द्याखिलंशुभेहनिविभाव येद्भिषगियंधियासप्तशः ॥ द्रवैर्वृषनिशेक्षुजैःकमलमालतीपुष्पजैरसैः कदलिकंदजैर्मलयचंदनादुद्भवैः ॥ वसंतकुसुमाकरोरसपतिर्द्विवल्लोशि तःसमस्तगदत्द्दवेत्किलनिजानुपानैरयं ॥ क्षिपेच्चसमधूषणैःक्षयगदेषु सर्वेष्वपिप्रमेहहजिरात्रिभिःसमधुशर्कराभिःसह ॥ सितामलयजद्र वैर्महतिरक्तपित्तेथवासितामधुसमन्वितैर्वृषभपल्लवानांद्रवैः ॥ त्रिजा तगरुचंदनैरपिचतुष्टिपुष्टिप्रदोमनोभवकरःपरोवमिषुशंखपुष्पीरसैः ॥ अभीरुरसशर्करामधुभिरम्लपित्तामयेपरेपुचयथोचितंननुगदेषुसंसेवयेत् ॥

अर्थ—प्रवाळ, पारा, मौक्तिक व अभ्रक हीं चार चार तोळे; रौप्यभस्म व सुवर्णभस्म हीं दोन दोन तोळे; लोह, सिसें व कथील यांचीं भस्में तीन तीन तोळे हीं सर्व एकत्र खलून अडुळशाचा रस, हळदीचा काढा, उसांचा रस, कमळ व मोगरी यांचे फुलांचा रस, केळीच्या कांद्याचा रस, कृष्णागरु व चंदन यांचा काढा; यां प्रत्येकाच्या त्यास सात सात भावना द्याव्या. हा वसंतकुसुमाकर दोन वाल रोगोक्त अनुपानाशीं घेतला ह्मणजे संपूर्णव्याधिनाश करितो. मध व मिरीं यां बरोबर क्षयावर द्यावा; प्रमेहावर हळदीचें चूर्ण व मध साकर यांशीं; चंदनाचा काढा व साकर यांशीं रक्तपित्तावर; किंवा साकर, मध, अडुळशाचा रस यांशीं द्यावा; व दालचिनी, तमालपत्र व वेलची यांचे चूर्णाशीं दिला असतां तुष्टि व पुष्टि, देऊन कामोद्दीपन करितो; आणि शंखाहुलीचे रसाशीं वांतीवर; शतावरीरस, साकर व मध यांशीं आम्लपित्तावर; व सर्वरोगांवर योग्यअनुपानाशीं सेवन करावा.

## लोकेश्वरपोटली.

रसस्यभस्मवाहिमपादांशेनप्रकल्पयेत् ॥ द्विगुणंगंधकंदत्वामर्दयेच्चि त्रकांबुना ॥ वराटकांश्चसंपूर्यटंकणेननिरुध्यच ॥ भांडेचूर्णप्रलिप्ते थशोध्रंरुध्येत्तुमृन्मये ॥ शोषयित्वापुटेगर्तेरत्निमात्रेपराण्हके ॥ स्वां गशीतलमुत्धृत्यचूर्णयित्वाथविन्यसेत् ॥ एषलोकेश्वरोनामवीर्यपुष्टि विवर्धनः ॥ गुंजाचतुष्टयंखादेत्पिप्पलीमधुसंयुतः ॥ भक्षयेत्परयाभ

नयालोकेशःसर्वदर्शनः ॥ अंगकार्श्येग्निमांद्येचकासेपित्तेरसःस्वयं ॥ मरीचैर्घृतसंयुक्तैःप्रदातव्योदिनत्रयं ॥ लवणंवर्जयेत्तत्रसाज्यंदधिच योजयेत् ॥ एकविंशद्दिनंयावन्मरिचंसघृतंपिबेत् ॥ पथ्यंमृगांकवत् ज्ञेयंशयीतोत्तानपादतः ॥ येशुष्काविषमाशनैःक्षयरुजाव्याप्ताश्च येकुष्टिनोयेपांडुत्वहताःकुवैद्यविधिनायेशोषिणोदुर्भगाः ॥ येतप्ताविविधज्वरैर्भ्रममदोन्मादैःप्रमादंगतास्तेसर्वेविगतामयाहिपरयास्युः पोटलीसेवया ॥

अर्थ—पारदभस्म ४, सुवर्ण भस्म १, व गंधक ८, याप्रमाणे भाग घेऊन त्यांस चित्रकाचे काढयाशीं खलावें; नंतर कवडयांत भरून कवडयांची तोंडें रुईचे चिकांत टांकणखार खलून त्या टांकणखारानें बंद करावीं; नंतर मडक्याला चुना सारवून त्या मडक्यांत कवडया भरून तोंड बंद करून सुमारें मंडा हातभर खांच खणून त्यांत तें मडकें ठेवून तिसऱ्ये प्रहरानंतर पुट देऊन भस्म करावें. थंड झाल्यावर काढून खलून ठेवावें. ह्याला लोकेश्वर रस असे ह्मणतात. हा मत्र व पिंपळी यां बरोबर चार गुंजा घेतला असतां, मोठया निष्ठेनें खाल्ला असतां; सर्व सुख दाखविणारा आहे. अंगाचा बारीकपणा, अग्निमांद्य, कास, पित्त, यांवर तूप व मिरपूड यां बरोबर तिन दिवस खावा, व मीठ वर्ज करावें. तूप व दहीं हें बरेंच खावें; आणि एकवीस दिवस होत तों पर्यंत तूप व मिरपूड खात असावी; आणि मृगांकाप्रमाणें पथ्य करावें. पाय उताणे करून निजावें; आणि जे कोणि विषमाशनानीं शुष्क, क्षयरोगानें व्याप्त, कुष्ठी, पांडुरोगी, कुत्सित वैद्यांच्या उपचारानें, शोषयुक्त, दुर्भग, नानाप्रकारचे ज्वरानीं तप्त, भ्रमी, उन्मादी, आणि वेडे, असे सर्व रोगी या लोकेश्वर पोटलीच्या सेवनेंकरून निरोगी होतील.

## लोहरसायन क्षयादिकांस.

शुद्धंरसेंद्रंभागैकंद्विभागःशुद्धगंधकं ॥ क्षिपेत्कज्जलिकांकुर्यात्तत्रतीक्ष्णभवंरजः ॥ क्षिप्त्वाकज्जलिकातुल्यंप्रहरैकंविमर्दयेत् ॥ ततःसंजायतेतस्यसोष्णोधूमोद्गमोमहान् ॥ अत्यंतंपिंडितंकृत्वाताम्रपात्रेनिधाय्च ॥ मध्येधान्यकशूकस्यत्रिदिनंधारयेद्बुधः ॥ उद्धृत्यतस्मात्खल्वेचक्षिप्त्वाघर्मेनिधायच ॥ रसैःकुठारछिन्नायास्त्रिवेलंपरिभावयेत् ॥ संशोष्यधमकाथैश्चभावयेत्त्रिकटोस्त्रिधा ॥ लोहपात्रेततःक्षिप्त्वाभावयेत्त्रिफलाजलैः ॥ निर्गुंडीदाडिमत्वग्भिर्बिसभृंगकुरंटकैः ॥ पलाश

कदलीद्रवैर्बीजकस्यशृतेनवा ॥ नीलीकालंबुपाद्रावैर्बुब्बूलफलिकार सैः ॥ त्रित्रिवेलंयथलाभंभावयेदेभिरौषधैः ॥ ततःप्रातर्लिहेत्क्षौद्रघृताभ्यांकालमात्रकं ॥ पलमात्रंवरक्काथंपिबेदस्यानुमानकं ॥ मासत्रयंशिलीतंस्याद्वलीपलितनाशनं ॥ मंदाग्निश्वासकासौचपांडुतांकफमारुतौ ॥ पिप्पलीमधुसंयुक्तंहन्यादेतन्नसंशयः ॥ वातास्त्रंमूत्रदोषांश्चग्रहणींतोयजांरुजं ॥ अंडवृद्धिंजयेदेतच्छिन्नासत्वमधुप्लुतं ॥ बलवर्णकरंवृष्यमायुष्यंपरमंस्मृतं ॥ कूष्मांडंतिलतैलंचमाषान्नंराजिकातथा ॥ मद्यमम्लरसंचैवत्यजेल्लोहस्यसेवकः ॥

**अर्थ**–शुद्ध पारा १ भाग, शुद्ध गंधक २ भाग, दोन्ही खलांत घालोन खलून कज्जली करून तिचे समभाग मिऱ्यांचे चूर्ण घेऊन त्या कज्जलींत घालून एक प्रहर पर्यंत खल करून नंतर कोरफडाचे रसांत तीन दिवसपर्यंत खल करावा; नंतर त्या औषधांतून गरम गरम मोठा धूर निघतो; नंतर त्याचा घट्ट गोळा करून तांब्याचे भांड्यांत ठेऊन साळीचे भातांमध्ये तीन दिवस पुरून ठेवावा, चवथे दिवशीं तो गोळा बाहेर काढून खलांत घालून उन्हांत ठेऊन रानतुळशीचे रसांचीं पुटें तीन द्यावी; नंतर सुंठ, मिऱ्यें, पिंपळी यांचे वेगळे वेगळे काढे करून एकेकाचीं पुटें तीन तीन द्यावीं; नंतर अडुळसा, गुळवेल व चित्रक या तिहींचे रस वेगळे वेगळे काढून क्रमेंकरून एकेकाची पुटें तीन द्यावीं; नंतर तें रसायन लोखंडाचे कढईंत घालून त्याला दुसरें औषधांचीं पुटें द्यावयाचो तीं औषधें येणेंप्रमाणें. हिरडा, बेहडा, आवळकाठी, निर्गुंडी, डाळिंबसाल, कमळाचा देठ, माका, पिंवळा कोळिस्ता, पळस, केळीचा कांदा, बिबळा अथवा आसाणा, नीलपुष्पी, मुंडी, बाभळीचे शेंगाचा रस, या चवदा औषधांचे वेगळे वेगळे रस काढून क्रमेंकरून एकेकारसाचीं तीन तीन पुटें द्यावी. मग तें रसायन कोलप्रमाण मध व तूप एका जागीं करून त्यात घालून घ्यावें. त्याजवर लागलाच त्रिफळेचा काढा करून तो एकपळ प्रमाण घ्यावा. या प्रमाणें तीन महिने पर्यंत हें रसायन घेतलें असतां, आंगाच्या वळकट्या मोडून पांढरे केशाचे काळे केश होतात; व मध पिंपळी बरोबर घेतले असतां अग्निमांद्य, श्वास, कास, पांडुरोग, कफवायु हे रोग दूर होतात; व गुळवेलीचे सत्वाबरोबर मधांत घेतलें असतां, वातरक्त, मूत्रदोष, पाण्यापासून झाली जी संग्रहणी ती व अंडवृद्धि हे रोग दूर होतात. हें रसायन बळ कांति व स्त्रीगमनाविषयीं इच्छा देणारें व आयुष्याची वृद्धि करणारें आहे. असे जाणावें; व कोहळा, तिळाचें तेल, उडीद, मोहऱ्या, मद्य व आंबट पदार्थ हे सर्व वर्ज करावे.

## रत्नगर्भपोटली.

रसंवज्रंहेमतारंनागंलोहंतथाभ्रकं ॥ तुल्यांशंमारितंयोज्यंमुक्तामाक्षिकविद्रुमं ॥ राजावर्तंचवैक्रांतंगोमेदंपुष्कराजकं ॥ शंखंचतुल्यतुल्यांशंसप्ताहंचित्रकद्रवैः ॥ मर्दयित्वाविचूर्ण्याथतेनापूर्यवराटकान् ॥ टंकणंरविदुग्धेनपिष्ट्वातन्मुखमालिपेत् ॥ मृद्भांडेतान्सुसंयत्र्यसम्यग्गजपुटेपचेत् ॥ आदायचूर्णयेत्सम्यङ्निर्गुंड्याःसप्तभावनाः ॥आर्द्रकस्यरसैःसप्तचित्रकस्यैकविंशति ॥द्रवैर्भाव्यंततःशुष्कंदेयंगुंजाचतुष्टयं ॥ क्षयरोगंनिहंत्याशुसत्यंशिवइवांधकं ॥ योजयेत्पिप्पलीक्षौद्रैःसघृतैर्मरिचैश्चवा ॥ पोटलीरत्नगर्भोयंसर्वरोगहरोमतः ॥

अर्थ—पारद, वज्र, सुवर्ण, रुपें, शिसें, लोखंड, अभ्रक, मोतीं, माक्षिक, पोंवळें, राजावर्त, वैक्रांत, गोमेद, पुष्कराज व शंख इतक्यांचीं भस्में समभाग घेऊन सातदिवस चित्रकाचा काढयांत खलून तें चूर्ण कवडयांत भरून रुईचे चिकांत टांकणखार वांटून त्याणें कवडयांचीं तोंडें लिंपावीं; नंतर त्या कवडया मडक्यांत भरून तोंड बंद करून त्यास गजपट द्यावें; नंतर त्यांतून काढून चूर्ण करून त्यास निर्गुंडीचा रसाचा सात भावना, आल्याच्या रसाचा सात भावना व चित्रकाचे काढयाचा एकवीस भावना देऊन शुष्क झाल्यावर खलून चार गुंजाप्रमाणें मध पिंपळी अथवा तूप व मिरपूड यांचा बरोबर द्यावा; ह्मणजे जसा सांबानें अंधक दैत्याचा नाश केला, त्याप्रमाणें हा रत्नगर्भ पोटली रस क्षयाचा नाश करील, व सर्व रोगांचा ही नाश करील.

## हेमगर्भपोटलीरस कफक्षयादिकांस.

सूतात्पादप्रमाणेनहेम्नःपिष्टंप्रकल्पयेत् ॥ तयोःस्याद्द्विगुणोगंधोमर्दयेत्कांचनारिणा ॥कृत्वागोलंक्षिपेन्मूषासंपुटेमुद्रयेत्ततः ॥ पचेद्भूधरयंत्रेणवासरत्रितयंबुधः ॥ ततउद्धृत्यतत्सर्वंदद्याद्गंधंचतत्समं ॥ मर्दयेच्चार्द्रकरसैश्चित्रकस्वरसेनच ॥ स्थूलपित्तवराटांश्चपूरयेत्तेनयुक्तितः ॥ एतस्मादौषधात्कुर्यादष्टमांशेनटंकणं ॥ टंकणार्धंविषंदत्वापिष्ट्वासेहुंडदुग्धकैः ॥ मुद्रयेत्तेनकल्केनवराटानांमुखानिच ॥ भांडेचूर्णप्रलिप्तेथधृत्वामुद्रांप्रदापयेत् ॥ गर्तेहस्तोन्मितेधृत्वापुटेद्गजपुटेनच ॥ स्वांगशीतंरसंज्ञात्वाप्रदद्याल्लोकनाथवत् ॥ पथ्यंमृगांकवज्ज्ञेयंत्रिदिनंलवणंत्यजेत् ॥ यदाछर्दिर्भवेत्तस्यदद्याच्छिन्नाशृतंतदा ॥ मधुयुक्तंतथाश्ले

ष्मकोपेदद्याद्गुडार्द्रकं ॥ विरेकेभर्जितामंगाप्रदेयादधिसंयुता ॥ ज येत्कासंक्षयंश्वासंग्रहणीमरुचितथा ॥ अग्निंचकुरुतेदीप्तंकफवातानिय यच्छति ॥ हेमगर्भःपरोज्ञेयोरसःपोटलिकाभिधः ॥

अर्थ—शुद्धपारा एकभाग व त्याचे चवथा हिस्सा खल केलेला सोन्याचा चुरा व दोहोंच्या दुप्पट गंधक घेऊन तिन्हीं कंचनाचे रसांत खलोन त्याचा गोळा करून मातीचे शरावसंपुटांत घालोन कापडमातीकरून त्याला भूधरयंत्रांत पचवावा. मग थंड जाहाल्यावर बाहेर काढून त्याचे समभाग गंधक घेऊन दोहोंचा आल्याचे रसांत खल करून नंतर चित्रकाचे रसांत खल करावा. मग मोठया पिवळ्या कवडया आणून त्यांत तें औषध युक्तीनें भरून साऱ्या औषधांचा आठवा हिस्सा टांकणखार, टांकणखाराचे निम्में बचनाग घेऊन दोहोंचा निवडुंगाचे दुधांत खल करून त्या कवडयाचें तोंडाला त्याची मुद्रा द्यावी; नंतर मडक्याचे बुडाला चुना सारऊन त्यांत त्या कवडया ठेऊन मडक्याचे तोंडावर दुसरें मडकें उपडें घालून त्याचे संधीला कापडमाती करून हातभर खाडा खणून रानगोवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. थंड झाल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध काढून घ्यावें. याला हेमगर्भपोटलीरस असें म्हणतात. हा हेमगर्भ लोकनाथरसाचे रितीने द्यावा. पथ्य मृगांकरसायनासारखें करावें; व याहून विशेष पथ्य तीन दिवस अलवण करावें. मग या औषधापासून ओकारी येऊ लागली; तर गुळवेलीचा काढा करून त्यांत मध घालून द्यावा. तेणेंकरून ओकारी दूर होते, व कफाचा प्रकोप जाहाला असतां, गूळ व आलें एकाजागीं करून द्यावें. तेणेंकरून कफ दूर होतो; व ढाळ होऊं लागले असतां भांग थोडी भाजून दह्यांत द्यावी, तेणेंकरून ढाळ बंद होतात. व या हेमगर्भपोटलीरसापासून खोकला, क्षय, श्वास, संग्रहणी व अरुचि हे रोग दूर होतात, व अग्नि प्रदीप्त होतो, व कफवायूचा प्रकोप दूर होतो.

## दुसरा प्रकार.

रसस्यभागाश्चत्वारस्तावंतःकनकस्यच ॥ तयोश्चापिष्टिकांकृत्वागंधो द्वादशभागिकः ॥ कुर्यात्कज्जलिकांतेषांमुक्ताभागाश्चषोडश ॥ चतु र्विंशच्चशंखस्यभागैकंटंकणस्यच ॥ एकत्रमर्दयेत्सर्वंपक्वनिंबूकजैर सैः ॥ कृत्वातेषांततोगोलंमूषासंपुटकेन्यसेत् ॥ मुद्रांदत्वाततोहस्त मात्रेगर्तेचगोमयैः ॥ पुटेद्गजपुटेनैवस्वांगशीतंसमुद्धरेत् ॥ पिष्ट्वा गुंजाचतुर्मानंदद्याद्व्याज्यसंयुतं ॥ एकोनत्रिंशदुन्मानमरिचैःसहदी यते ॥ राजनेमन्मयेपात्रेकाचजेवावलेहयेत् ॥ लोकनाथसमंपथ्यंकु

यात्शुचिनमानसः ॥ कासेश्वासेक्षयेवातेकफग्रहणिकागदे ॥ अतिसारेप्रयोक्तव्यापोटलीहेमगर्भिका ॥

अर्थ—पारा चारभाग व सोन्याचें बारीक चूर्ण चारभाग घेऊन दोन्हीं एकाजागीं चांगलें पीठ होई तोंपर्यंत खलून पाऱ्याचे बारा भाग गंधक घेऊन त्यांत घालून तिहींचा खल करून कज्जली करावी; नंतर पाऱ्याचे सोळा भाग मोतीं, चोविस भाग शंख, एकभाग टांकणखार घेऊन त्या औषधांत मेळऊन पिकल्या निंबाचे रसांत खलून त्याचा गोळा करून मातीचे शरावसंपुटांत घालून त्याला कापडमाती करून त्यास गाईच्या शेणाच्या गोवऱ्यांचें गजपुट द्यावें. थंड जाहाल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध घेउन खलून ठेवावें. याला हेमगर्भपोटली असें ह्मणतात. हा हेमगर्भ चार गुंजा प्रमाण एकुणतीस मिऱ्यांचें चूर्णाशीं रुप्याचे पात्रांत अथवा मातीचे अथवा कांचेचे प्याल्यांत गाईचें तूप घालून घ्यावा; व अंतःकरण स्वस्थ करून लोकनाथरसासारखें पथ्य करावें, तेणेंकरून श्वास, क्षयरोग, वातविकार, कफ व संग्रहणी अतिसार हे रोग दूर होतात.

## लोकनाथरस क्षयादिकांस.

शुद्धोबुभुक्षितःसूतोभागद्वयमितोभवेत् ॥ तथागंधस्यभागौद्वौकुर्यात्कज्जलिकांतयोः ॥ सूताच्चतुर्गुणेष्वेवकपर्देषुविनिःक्षिपेत् ॥ भागैकंटंकणंदत्वागोक्षीरेणाविमर्द्दयेत् ॥ तथाशंखस्यखंडानांभागानष्टौप्रकल्पयेत् ॥ क्षिपेत्सर्वंपुटस्यांतश्चूर्णलिप्तशरावयोः ॥ गर्तेहस्तोन्मितेधृत्वापचेद्गजपुटेनच ॥ स्वांगशीतंसमुद्धृत्यपिष्ट्वातत्सर्वमेकतः ॥ षड्गुंजासंमितंचूर्णमेकोनत्रिंशदूषणैः ॥ घृतेनवातजेदद्यान्नवनीतेनपित्तजे ॥ क्षौद्रेणश्लेष्मजेदद्यादतीसारेक्षयेतथा ॥ अरुचौग्रहणीरोगेकार्श्येमंदानलेतथा ॥ कासेश्वासेषुगुल्मेषुलोकनाथोरसोहितः ॥ तस्योपरिघृतान्नंचभुंजीतकवलत्रयं ॥ मंदेक्षणैकमुत्तानःशयीतानुपधानके ॥ अनम्लमन्नंसघृतंभुंजीतमधुरंदधि ॥ प्रायेणजांगलंमांसंप्रदेयंघृतपाचितं ॥ सुदुग्धभक्तंदद्याच्चजातेग्नौसाध्यभोजने ॥ सघृतान्मुद्गवटकान्व्यंजनेष्वेवचारयेत् ॥ तिलामलककल्केनस्नापयेत्सर्पिषाथवा ॥ अभ्यंजयेत्सर्पिषाचस्नानंकोष्णोदकेनच ॥ क्वचित्तैलंनगृण्हीयान्नबिल्वंकारवेल्लकं ॥ वार्ताकंशफरींचिंचांत्यजेद्व्यायाममैथुनं ॥ मद्यंसंधानकंहिंगुशुंठीमापान्मसूरकान् ॥ कूष्मांडराजिकांकापंकांजिकंचैवव

र्जयेत् ॥ त्यजेतुयुक्तनिद्रांचकांस्यपात्रेचभोजनं ॥ ककारादियुतंसर्वं त्यजेच्छाकफलादिकं ॥ पथ्योयंलोकनाथस्तुशुभनक्षत्रवासरे ॥ पूर्णा तिथौशुक्लपक्षजातेचंद्रबलेतथा ॥ पूजयित्वालोकनाथंकुमारीभोजये त्ततः ॥ दानंदद्याद्द्विघटिकामध्येग्राह्योरसोत्तमः ॥ रसात्संजायतेता पस्तदाशर्करयायुतं. ॥ सत्वंगुडूच्यागृण्हीयाद्वंशरोचनयायुतं ॥ ख र्जूरंदाडिमंद्राक्षामिक्षुखंडानिचारयेत् ॥ अरुचौनिस्तुषंधान्यंघृतभृष्टंस शर्करं ॥ दद्यात्तथाज्वरेधान्यंगुडूचीक्वाथमाहरेत् ॥ उशीरवासकक्वा थंदद्यात्समधुशर्करं ॥ रक्तपित्तेकफेश्वासेकासेचस्वरसंक्षये ॥ अग्निभृ ष्टजयाचूर्णमधुनानिशिदीयते ॥ निद्रानाशेतिसारेचग्रहण्यांमंदपाव के ॥ सौवर्चलाभयाकृष्णाचूर्णमुष्णजलैःपिबेत् ॥ शूलेजीर्णेतथाकृष्णा मधुयुक्ताज्वरेहिता ॥ प्लीहोदरेवातरक्तेछर्द्यांचैवगुदांकुरे ॥ नासिका दिपुरक्तेपुरसदाडिमपुष्पजं ॥ दूर्वायाःस्वरसंनस्येप्रद्याच्छर्करयायुतं ॥ कोलमज्जाकणाबर्हिपक्षभस्मसशर्करं ॥ मधुनालेहयेच्छर्दिहिक्काको पस्यशांतये ॥ विधिरेषप्रयोज्यस्तुसर्वस्मिन्पोटलीरसे ॥ मृगांकेहेम गर्भेचमौक्तिकाख्येरसेषुच ॥ इत्ययंलोकनाथोक्तोरसःसर्वरुजोजयेत् ॥

अर्थ–शुद्ध होत्साता जो बुभुक्षित असा पारा दोन भाग व शुद्ध केलेला गंधक दोन भाग, या दोहोंनां एकाजागीं खलोन कज्जली करून पाऱ्याचे चौपट कवड्या घेऊन त्यांत ती कज्जली भरावी; नंतर टांकणखार एक भाग घेऊन गाईचे दुधांत खलोन त्या कवड्यांचे तोंडाला त्याची मुद्रा द्यावी; नंतर शंखाचे तुकडे आठ भाग वजन घेऊन मातीचे दोन शराव आणून त्या एकांत चुना सारवून त्यांत शंखाचे तुकडे अर्धे खालीं घालून त्याजवर त्या कवड्या ठेऊन त्याजवर अर्धे तुकडे राहिले ते घालून त्याजवर दुसरा शराव उपडा घालून कापडमाती करून एक हात खाडा खणून रान गोवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. मग थंड जाहाल्यावर बाहेर काढून त्या शरावसंपुटाचे आंत साऱ्यांचे भस्म होतें, तें एका जागीं खलून ठेवावें. याला लोकनाथरस असें ह्मणतात. हा लोकनाथरस साहा गुंजाप्रमाण एकुणतीस मिऱ्यांचें चूर्ण करून त्यांत मेळवून वायूचा रोग असतां तुपांत द्यावा; व पित्तरोग असतां लोण्यांत द्यावा, व कफरोग असतां मधांत द्यावा; व अतिसार, क्षय, आवटणें, संग्रहणी, कृशता, अग्निमांद्य, खोकला, श्वास, व गुल्म इतके रोग दूर होण्याविषयीं हा लोकनाथरस प्रशस्त आहे. याची मात्रा घेऊन त्याजवर तुपभाताचे तीन घांस घ्यावे; नंतर माच्यावर बिछाना न घालतां क्षणभर उ-

ताणें निजावें, आंबट पदार्थ वर्ज्य करून तुपाशीं भोजन करावें; व चांगलें मधुर गोड दहीं असल्यास तेंही भोजनाबरोबर घ्यावें; रानातील हरिणादिकाचें मांस तुपांत तळून खावें. संध्याकाळीं भूक लागली असतां दुधभात खावा. व तोंडीं लावण्यास मुगांच्या वड्या तुपांत तळून खाव्या. तीळ व आवळकाठी यांचा कल्क करून अंगास लावून स्नान करावें; अथवा तूप लावून करावें. स्नानाशिवाय अंगास लावणें तें तूपच लावावें. स्नानास पाणी कोमट कोमट घ्यावें; तेलाचा स्पर्श करूंनये. व बेलफळ, कारलें, वांगें, बारीक मासळी, चिंच, श्रमकरणें, मैथुन, मद्य, संधान, हिंग, सुंठ, उडीद, मसुर, कोहळें, राई, कांजी यांचा त्याग करावा, व रोष सोडावा. दिवसास निजूं नये कांशाचे ताटांत भोजन करूं नये. ककार ज्यानां आदि आहे अशा भाज्या व फळें इत्यादिक पदार्थ वर्ज्य करावे. याप्रमाणें लोकनाथरसाचें पथ्य करावें. चांगला दिवस, चांगला वार, पूर्णा तिथी, शुक्लपक्ष व आपलें चांगलें चंद्रबळ पाहून लोकनाथ रसाची पूजा करून नंतर कुमारीस्त्रीस भोजन द्यावें; नंतर कांहीं एक सुवर्णादि दान देऊन लोकनाथरस घ्यावा; नंतर दोन घटिकांनीं शरीराचा संताप जाहला असतां साकर, गुळवेलीचें सत्व व वंशलोचन तिन्हीं एकाजागीं करून घ्यावीं. तेणें करून संताप दूर होतो. खजूर, डाळिंब, द्राक्षें, उसाचे तुकडे हे पदार्थ थोडे थोडे खावे. तेणेंकरून संताप, अवढणें दूर होतें. व धने कुटून त्याचा कोंडा काढून तुपांत भाजून त्यांत साकर घालोन त्यांत लोकनाथरस घ्यावा. तेणेंकरून आवढणें दूर होतें. धने व गुळवेल यांचा काढा करून त्यांत हा रस घ्यावा, तेणेंकरून ज्वर दूर होतो; वाळा व अडुळसा या दोहोंचा काढा करून मध साकर मेळवून त्यांत लोकनाथरस घ्यावा, तेणेंकरून रक्तपित्त व कफ, श्वास, कास, स्वरभंग हे रोग दूर होतात. भांग थोडी भाजून चूर्ण करून त्यांत हा रस घालोन मधींत रात्रीस घ्यावा, तेणेंकरून निद्रा येत नसली तर येते. अतिसार व संग्रहणी हे रोग दूर होतात. अग्नि प्रदीप्त होतो. पादेलोण, बाळहिरडे, पिंपळी या तीन औषधांचें चूर्ण करून त्यांत लोकनाथरस घालोन ऊष्ण पाण्यांत घ्यावा, तेणेंकरून शूळ व अजीर्ण हीं दूर होतात. मध व पिंपळीशीं लोकनाथरस घेतला असतां ज्वर दूर होतो. डाळिंबाच्या फळाचे रसांत घेतला असतां पोटांत डावेकडे कवळू रोग होतो तो, वातरक्त, ओकारी, मुळव्याध, नाकावाटे रक्त पडतें तें हे सारे रोग दूर होतात. दूर्वांचा रस काढून त्यांत साकर व लोकनाथरस घालोन नाकांत नस्य दिलें असतां नाकांतून रक्त पडतें तें बंद होतें. बोराचे आंठींतला मगज, पिंपळी, मोराचे पिसांचें भस्म हीं तीन औषधें एकाजागीं करून त्यांत साकर व मध मेळवून त्यांत लोकनाथरस घालोन घेतला असतां ओकारी व उचकी हीं दूर होतात. या प्रमाणें संपूर्ण जितके पोटलीरस आहेत त्यांचे ठायीं व मृगांक व हेमगर्भ व मौक्तिकारव्यरसायन यांचे ठायीं या प्रमाणेंच विधि करावा. याप्रकारें लोकनाथरस सांगितला. हा लोकनाथ संपूर्ण रोग दूर करितो. असें जाणावें.

## लघुलोकनाथरस.

वराटभस्ममंडूरंचचूर्णयित्वाघृतेपचेत् ॥ तत्सममरिचंचूर्णनागवल्याविभावितं ॥ तच्चूर्णमधुनालेह्यमथवानवनीतकैः ॥ मापमात्रंक्षयंहंतियामेयामेचभक्षितं ॥ लोकनाथरसोह्येपमंडलाद्राजयक्ष्मनुत् ॥

अर्थ—कवड्यांचे भस्म एक भाग, मंडूर एक भाग, मिऱ्ये दोहोंच समभाग, हीं तीन औषधें एकाजागीं करून तुपांत खदून तूप कोरडें जाहल्यावर विड्याचे पानाचे रसांत खलून मसा मासा प्रमाण गोळ्या बांधाव्या. याला लघुलोकनाथरस असें ह्मणतात. हा लोकनाथ मधांत अथवा लोण्यांत प्रहरा प्रहरानीं घेतला असतां: सामान्यक्षय दूर होतो. याप्रमाणें एकमंडळ घेतला असतां राजयक्ष्मा ही दूर होतो.

## मृगांकपोटलीरस.

भूर्जवत्तनुपत्राणिहेम्नःसूक्ष्माणिकारयेत् ॥ तुल्यानितानिसूतेनखल्वेक्षिप्त्वाविमर्दयेत् ॥ कांचनाररसेनैवज्वालामुख्यारसेनवा ॥ लांगल्यावारसैस्तावद्यावद्भवतिपिष्टिका ॥ ततोहेम्नश्चतुर्थांशंटंकणंतत्रनिःक्षिपेत् ॥ पिष्टमौक्तिकचूर्णंचहेमद्विगुणमावपेत् ॥ तेपुसर्वसमंगंधं क्षिप्त्वाचैकत्रमर्दयेत् ॥ तेपांकृत्वाततोगोलंवासोभिःपरिवेष्टयेत् ॥ पश्चान्मृदावेष्टयित्वाशोषयित्वाचधारयेत् ॥ शरावसंपुटस्यांतेतत्रमुद्राप्रदापयेत् ॥ लवणापूरितेभांडेधारयेत्तंचसंपुटं ॥ मुद्रांदत्वाशोषयित्वाबहुभिर्गोमयैःपुटेत् ॥ ततःशीतिसमाहृत्यगंधंमृतसमंक्षिपेत् ॥ घृष्ट्वाचपूर्ववत्खल्वेपुटेद्गजपुटेनच ॥ स्वांगशीतंततोनीत्वागुंजायुग्मंप्रकल्पयेत् ॥ अष्टभिर्मरिचैर्युक्तोकृष्णात्रययुतोथवा ॥ विलोक्यदेयोदोषादीनेकारसरक्तिका ॥ सर्पिषामधुनावापिदद्याद्दोषाद्यपेक्षया ॥ लोकनाथसमंपथ्यंकुर्यात्स्वस्थमनाःशुचिः ॥ श्लेष्माणंग्रहणीकासंश्वासंक्षयमरोचकं ॥ मृगांकोयंरसोहन्यात्कृशत्वंबलहानितां ॥

अर्थ—सोन्याचे भूर्जपत्रासारखे पातळ पत्रे करून त्याचे समभाग शुद्ध पारा घेऊन दोहोंचें एकाजागीं कंचनाचे रसांत अथवा भारजांभळीचे रसांत जों पर्यंत एकाजागीं मिळोन चांगलें पीठ होई तों पर्यंत खल करावा; नंतर सोन्याचे चतुर्थांश टांकणखार व सोन्याचे दुप्पट मोत्याचें खल केलेलें चूर्ण व सोन्याचे बराबर गंधक घेऊन सार्व एकाजागीं खलोन एक गोळा करून त्याचे भोंवते कपडें गुंडाळून त्यांजवर मातीचें

लेप करून वाळल्यावर मातीचे दोन शराव आणून त्या एकांत तो गोळा ठेऊन त्याजवर दुसरा शराव उपडा घालोन त्याला कापडमाती करून मातीचे मडक्यांत मीठ घालोन त्यांत तो शरावसंपुट ठेऊन त्याजवर दुसरें मीठ घालोन मडक्याचे तोंडावर दुसरें लाहान मडकें उपडें घालोन त्याचे संधीला कापडमाती करून गजपुटअग्नीपेक्षां कांहीं अधिक गाईचे शेणाच्या गोवऱ्या घेऊन अग्नि द्यावा. थंड जहाल्यावर बाहेर काढून फिरून त्या पाऱ्याचे बरोबर गंधक घेऊन सार औषध खलांत घालोन पहिल्यानें ज्या वनस्पतीचे रसांत खल केला आहे, त्या वनस्पतीचे रसांत खल करून पाहिल्या कृतिप्रमाणें कृति करून गजपुट अग्नि द्यावा. थंड जाहाल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध काढून घ्यावें. याला मृगांक पोटलीरस असें ह्मणतात. हा पोटलीरस दोन गुंजा प्रमाण आठ मिऱ्यांशीं अथवा तीन पिंपळ्यांशीं घ्यावा. व दोषांचें तारतम्य पाहून एक गुंज ही घ्यावा. जशी दोषांची अपेक्षा असेल तसा तुपांत अथवा मधांत घ्यावा. व अंतःकरण स्वच्छ करून शुचिर्भूत होऊन लोकनाथरसासारखें पथ्य करावें. या प्रमाणें आचरण केलें असतां; या रसायनापासून कफरोग, संग्रहणी, कास, श्वास, क्षयरोग, आवदर्णे, शरीराची कृशता व बलहानि हे रोग दूर होतात.

## गोक्षुराद्यघृत.

दुरालभाश्वदंष्ट्राचचतस्रःपर्णिनीबला ॥ भागान्पलोन्मितान्कृत्वापर्पटकस्यच ॥ पचेद्दशगुणेतोयेदशभागावशेषितं ॥ रसेपूतेतुद्रव्याणामेषांकल्कंसमावपेत् ॥ सठीपुष्करमूलानांपिप्पलीत्रायमाणयोः ॥ तामलक्याकिरातस्यतिक्तस्यकटुकस्यच ॥ पलानांसारिवायाश्चतान्पिष्टाकर्षसंमितान् ॥ तैःसाधयेद्घृतप्रस्थंक्षीरंद्विगुणितंभिषक् ॥ ज्वरंदाहंतमःश्वासंकासंपार्श्वशिरोरुजं ॥ तृष्णाच्छर्दिमतीसारमेतत्पानंव्यपोहति॥

अर्थ–गोखरु, धमासा, चारपर्णिनी, चिकणा, पित्तपापडा हीं चार चार तोळे, घेऊन त्यांचा दसपट पाण्यांत दशांश काढा करावा. तो गाळून घ्यावा; नंतर कचोरा पोखरमूळ, पिंपळी, त्रायमाण, हरीतकी, किराइत, तेजबळ, कुटकी, श्वेत उपळसरी, हीं प्रत्येकीं एकेक तोळा घेऊन त्यांचा कल्क व ६४ तोळे तूप, १२८ तोळे दूध घालून घृत सिद्ध करावें. ते ज्वर, दाह, तमकश्वास, पार्श्व व मस्तक यांतील शूल, वाढान, वांति व अतिसार यांचा नाश करितें.

## जीवंत्यादिघृत.

जीवंतिकावत्सकयष्टिकानांसपौष्करंगोक्षुरकेबलेद्वे ॥ नीलोत्पलंतामलकंयवासासत्रायमाणामगधाचकुष्ठं ॥ द्राक्षामलक्यारसमेकप्रस्थ

प्रस्थद्वयंछागलकंपयश्च ॥ प्रस्थंतथायोज्यदधिश्चधीमान्पचेत्घृतंवा मृदुवान्हिनातत् ॥ पानेप्रशस्तंहितमेतदेवनस्येचबस्तौविनियोजयेत्तु ॥ विनाशयत्याशुचराजयक्ष्माहलीमकंकामलपांडुरोगं ॥ मूर्छाभ्रमश्लेष्मशिरोर्तिशूलंमदाश्मरींवागुदकीलकुष्ठं ॥ शिरोगदंनाशमुपैतितस्यनस्यप्रदानेननियोजितेन ॥ पानेनपांड्वामयराजयक्ष्मानाशंसमायातिहलीमकंच ॥ बस्तिप्रदानेनगुदोद्भवश्चरोगोविनाशंसमुपैति पुंसां ॥ विसर्पविस्फोटकमृक्षणेननश्यंत्यनेनैवगदाःसमस्ताः ॥

अर्थ-गुळवेल, कुडयाची साल, ज्येष्ठीमध, पुष्करमूळ, गोखरू, चिकणा तांबडा व पांढरा, निळें कमळ, भुयआवळी, धमासा, त्रायमाण, पिंपळी, कोष्ठ, द्राक्षे व आवळे, यांचा रस ६४ तोळे, शेळीचें दूध १२८ तोळे, दहीं ६४ तोळे व तूप ६४ तोळे घालून मंदाग्नीनें पचन करावें. तें घृतपान, नस्यकर्म व बस्ति याविषयीं योजावें; ह्मणजे शीघ्र राजयक्ष्मा, हलीमक, कामला, पांडुरोग, यांचा व बस्तिकर्मानें गुदसंबंधी व्याधिचा अंगास लावल्यानें विसर्प, विस्फोटक, यांचा आणि अनेक व्याधींचा नाश करितें.

## बलाद्यघृत.

बलाश्वदंष्ट्राकलशीबृहतीधावनीस्थिरा ॥ निंबपर्पटकंमुस्तात्रायमाणंदुरालभा ॥ कृत्वाकषायंपेयार्थंदद्यात्तामलकीसठी ॥ द्राक्षापुष्करमूलंचमेदाह्यामलकानिच ॥ घृतंपयश्चतत्सिद्धंसर्पिर्ज्वरहरंपरं ॥ क्षयकासप्रशमनंशिरःपार्श्वरुजापहं ॥

अर्थ-चिकणा, गोखरू, पिठवण, रिंगणी, डोरली, सालवण, कडूलिंब, पित्तपापडा, नागरमोथा, त्रायमाण, धमासा, हरीतकी, कचोरा, द्राक्षे, पुष्करमूल, मेदा व आवळकाठी याचा काढा व दूध, तूप, घालून तूप तयार करावें. तें अत्यंत ज्वरनाशक आहे व क्षय, मस्तक व पार्श्व यांतील शूल, यांचा नाश करितें.

## कोलाद्यघृत.

कोललाक्षारसेतद्वत्क्षीराष्टगुणसाधितं ॥ कल्कैःषडंगदार्वीत्वग्द्राक्षाक्षोटफलान्वितं ॥ घृतंखर्जूरमृद्वीकामधूकैःसपरूषकैः ॥ सपिप्पलीकं वैस्वर्यकासश्वासरुजापहं ॥

अर्थ-बोरीच्या लाखेच्या काढयांत अष्टमांश दूध व गोखरू, दारुहळद, दालचिनी द्राक्षें, अक्रोड, खजूर, गोस्तनी द्राक्षें, ज्येष्ठीमध, फालसा व पिंपळी यांचा कल्क आणि तूप घालून तूप सिद्ध करावें. तें स्वरभंग, खोकला व दमा यांचा नाश करितें.

## कणाद्यघृत,

कणापलंपंचगुडांभसश्चसज्यंघृतंवैविपचेत्समांशं ॥
पानेथवाभोजनकेप्रशस्तंक्षयेचराजक्षयनाशहेतु ॥

अर्थ–पिंपळी २० तोळे, गुळाचें पाणी २० तोळे, आणि तूप हे समभाग एकत्र करून घृत तयार करावें. तें पिण्यास, किंवा भोजनांत द्यावें; ह्मणजे क्षय व राजयक्ष्मा, यांचा नाश होतो.

## पाराशरघृत

यष्टीबलागुडूचीचपंचमूलंसमांशकं ॥ क्वाथेनसदृशंधात्रीरसंचेक्षुरसंतथा ॥ विदार्यायारसंचैवघृतंचसमभागिकं ॥ क्षीरंदधिसमंचात्रनवनीतंतुतत्समं ॥ द्राक्षातालीससंयुक्तंपथ्यालाभेनयोजयेत् ॥ सिद्धंघृतंचपानीयेनस्येबस्तौप्रदापयेत् ॥ हरतेराजयक्ष्माणंपांडुरोगंचदारुणं ॥ हलीमकार्शसीनित्यंरक्तपित्तनिवारणं ॥ लेपनंदुष्टवीसर्पपित्तदग्धव्रणापहं ॥

अर्थ–ज्येष्टीमध, चिकणा, गुळवेल व पंचमुळें, ह्या समभागांचा काढा, तितकाच आवळ्यांचा रस, उसांचा रस, भुयकोहळीचा रस आणि तूप, दूध, दहीं, लोणीं, द्राक्षें, व तालीसपत्र, हे यथालाभ पदार्थ घालोन तूप सिद्ध करावें. तें प्राशन, नस्य किंवा बस्ति यांविषयीं द्यावें; ह्मणजे क्षय, पांडुरोग, कावीळ, हलीमक, मुळव्याध, रक्तपित्त यांचा नाश करितें; व अंगास लाविलें असतां पित्त आणि दग्ध व्रण, यांचा नाश करितें.

## जलाद्यघृत.

जलद्रोणेविपक्तव्यंयावत्पादावशेषितं ॥ पिप्पलीचंदनंलोध्रंह्रीबेरोशीरपर्पटं ॥ पाठाभूनिंबयष्ट्याव्हात्रायंतीनीलमुत्पलं ॥ मुस्तकेंद्रयवाशुंठीकटुकंसदुरालभं ॥ त्वक्पत्रंवृषमूलंचकल्कैरर्धपलैर्भिषक् ॥ अजाक्षीरेणतूर्णेनघृतप्रस्थंविपाचयेत् ॥ हंतियक्ष्माणमत्युग्रंरक्तपित्तंत्रिदोषजं ॥ श्वासकासक्षतक्षीणदाहशोकरुजापहं ॥

अर्थ–१०२४ तोळे पाण्यांत पिंपळी, रक्तचंदन, लोध्र, वाळा, काळा वाळा, पित्तपापडा, पाहाडमूळ, किराइत, जेष्टीमध, मेंदी, काळें कमळ, नागरमोथे, इंद्रजव, सुंठ, कटुकी, धमासा, दालचिनी व अडुळशाचे मूळ हीं प्रत्येक २ तोळे घेऊन त्यांचा चतुर्थांश काढा आणि या सर्वांचे बरोबर शेळीचें दूध आणि ६४ तोळे तूप हें सर्व एकत्र कढवावें. हें तूप क्षयरोग, त्रिदोषापासून झालेलें रक्तपित्त, श्वास, कास, क्षीणता, दाह व शोक, यांचा नाश करील.

## वासाद्यघृत.

वासामृतारिष्टनिदिग्धिकानांरसेश्वगंधेभबलार्जुनानां ॥
सिद्धंसपंचोषणपुष्कराणांकल्कैर्घृतंछागपयस्तुशोषे ॥

अर्थ–अडुळसा, गुळवेल, कडुलिंब, रिंगणी, आस्कंद, महाबला, अर्जुन, यांच्या काढ्यांत तूप, सुंठ, मिरें, पिंपळी, चवक, पिंपळमूळ, पोखरमूळ, यांच्या कल्का बरोबर शेळीचें दुध घालोन सिद्ध करावें. तें घृत क्षयनाशक आहे.

## खर्जूरादि घृत.

घृतंखर्जूरमृद्वीकामधूकैःसपरूषकैः ॥
सपिप्पलीकैर्वैस्वर्यकासश्वासज्वरापहं ॥

अर्थ–खजूर, द्राक्षें, जेष्टीमध, फालसा व पिंपळी, इतक्यानीं सिद्ध केलेलें तूप. स्वरभंग, कास, श्वास, ज्वर, यांचें नाशक आहे.

## पिपल्याद्यघृत.

पिप्पलीगुडसंयुक्तंछागमांसयुतंघृतं ॥
एतदग्निविवृध्यर्थंप्रदेयंक्षयकासिनां ॥

अर्थ–पिंपळी, गुळ व बोकडाचे मांस, यांणि सिद्ध केलेलें तूप क्षय व खोकला, यांवर द्यावें.

## दुसरा प्रकार.

पिप्पलीपिप्पलीमूलचव्यचित्रकनागरैः ॥ सयावशूकैश्वक्षीरं
स्रोतसांशोधनंपरं ॥ कल्कोत्रपादिकःकार्यःक्षीरंवापिचतुर्गुणं ॥

अर्थ–पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, जवखार, याणीं सिद्ध केलेलें तूप स्रोतःशुद्धि करणारें आहे. एथें औषधांचा कल्क १ भाग आणि तूप ४ भाग या प्रमाणें घेउन तूप सिद्ध करावें.

## दशमूलाद्यघृत.

दशमूलीशृतात्क्षीरात्सर्पिर्यदुदियान्नवं ॥ सपिप्पलीकंसक्षौद्रंतत्परं
स्वरशोधनं ॥ शिरःपार्श्वांगशूलघ्नंकासश्वासज्वरापहं ॥

अर्थ–दशमुळांचें बरोबर कढलेलें दुधापासून उत्पन्न केलेलें तूप, मध व पिंपळी यां बरोबर सेवन केलें असतां स्वर निट करणारें आणि मस्तक, कुशी, यांतला शूल, कास, श्वास, ज्वर, याचें नाशक आहे.

## तिळाचें तैल.

क्षीरेचतुर्गुणेतैलंप्रस्थद्वयतिलोद्भवं ॥ शतशःपावितंयष्टीपलकल्केन यत्नतः ॥ पाननस्यादिभिर्यक्ष्महरमामयपांडुजित् ॥ ऊर्ध्वजत्रुगरोन्मादरक्तपित्तविसर्पनुत् ॥

अर्थ-१२८ तोळे तिळांचे तेल, ५१२ तोळे दूध, ४ तोळे जेष्टीमधीचे चूर्ण, हे एकत्र पुष्कळवेळ कढवून गाळून घ्यावें; म्हणजे राजयक्ष्मा, पांडु, खांद्यांचे वरचे भागीं, रोग,उन्माद, रक्तपित्त, विसर्प, यांचा नाश करील.

## चंदनादितैल.

चंदनांबुनखैर्याम्यंयष्ट्याशैलेयपद्मकं ॥ मंजिष्ठासरलंदारुसेव्यैलंपूतिकेसरं ॥ हरिद्रासारिवातिक्तालवंगागरुकुंकुमं ॥ त्वग्रेणुनलिकाचेति तैलंमस्तुचतुर्गुणं ॥ लाक्षारससमंसिद्धंग्रहघ्नंबलवर्धनं ॥ अपस्मारज्वरोन्मादकृत्यालक्ष्मीविनाशनं ॥ आयुःपुष्टिकरंचैववशीकरणमुत्तमं ॥ विशेषात्क्षयरोगघ्नंरक्तपित्तहरंपरं ॥

अर्थ-चंदन, वाळा, नखला, चंदन, ज्येष्ठीमध, शिलाजित, पद्मकाष्ठ, मंजिष्ठा, सरल वृक्ष, देवदार, काळा वाळा, जवादें, हळद, उपलसरी, कुटकी, लवंगा, अगर, केशर, दालचिनी, रेणुकबीज व नलिका हीं समभाग; आणि यांचे चौपट तेल व दह्यांवरील साय, आणि सर्वांचे बरोबर लाखेचा काढा घालून तैल सिद्ध करावें. तें ग्रहनाशक, बल वाढविणारें व फेंपरें, ज्वर, उन्मादरोग, कृत्या व अलक्ष्मी, यांचा नाश करितें; आणि आयुष्य, पुष्टि व वशीकरण यांस करितें; व विशेषेकरून क्षयरोग, आणि रक्तपित्त यांचा नाश करितें.

## लक्ष्मीविलासतैल.

एलाश्रीखंडरास्नाजतुनखशशितक्कोलकंचाथमुस्ताबल्कत्वग्दारुकृष्णागरुतगरजटाकुष्ठमेतत्समांशं ॥ त्रैगुण्यंकालरालंसुदृढडमरुकायंत्रसिद्धंतुतैलंगंधैःपुष्पैश्चभाव्यंपरिमलललितंनामतोगंधतैलं ॥ एतल्लक्ष्मीविलासंजनयतिजगतीनायकैःसंप्रयोगंयुक्त्यारोगान्निखिलगदहरंवातसंघातहंतृ ॥ पीतंतांबूलवल्लीदलमिलितमलंजाठरंवन्हिसिद्धंकुर्याद्दुर्नामयक्ष्मक्षयमपिनितरामंगसंमर्दनेन ॥

अर्थ-एलची, चंदन, रासना, लाख, नखला, कापूर, कंकोळ, नागरमोथा, चिकणा,

दालचिनी, दारुहळद, पिंपळी, अगरु, तगर, जटामांसी, कोष्ट हे समभाग; आणि तिप्पट राळ हे सर्व पदार्थ डमरुयंत्रांत घालून तैल काढावें. त्याचें नाव लक्ष्मीविलास हे अत्यंत परिमलानीं युक्त याला गंधतैल ह्मणतात. हे स्त्रीपुरुषांची प्रीति उत्पन्न करितें. युक्तीनें उपयोग केला असतां अनेक रोग व अनेक वातरोग यांचा नाश करितें; व विड्याच्या पानाशीं घेतला असतां; जठराग्नीला प्रदीप्त करितें; व अंगास लाविलें असतां मुळव्याध, क्षय, यांचा नाश करितें.

## व्यवायजन्यशोष.

व्यवायशोकवार्धक्यव्यायामाध्वप्रशोषितान् ॥
व्रणोरःक्षतसंज्ञौतुशोषिणोलक्षणंशृणु ॥

**अर्थ**—व्यवायशोष, शोकशोष, वार्धक्यशोष, व्यायामशोष, अध्वशोष, व्रणशोष, उरःक्षतशोष, यांचीं लक्षणें सांगतों.

## व्ययायशोषिलक्षण.

व्यवायशोषीशुक्रस्यक्षयलिंगैरुपद्रुतः ॥
पांडुदेहोयथापूर्वंक्षीयंतेचास्यधातवः ॥

**अर्थ**—अतिमैथुनानें क्षीण झालेल्या पुरुषाच्या शिश्नाला आणि वृषणाला वेदना, मैथुनाविषयीं अशक्तता, मैथुनकेलें तरीं चिरकालानें अल्पशुक्र किंवा रक्त यांचा स्राव, या सुश्रुतोक्तधातुक्षयचिन्हांनीं युक्त होतो; आणि देह पांढरा फटफटीत होतो; व त्याचे शुक्रापासून रसपर्यंत उलटे धातु क्षीण होतात.

## व्यवायदोषचिकित्सा.

व्यवायशोषिणंक्षीररसमांसाज्यभोजनैः ॥
सकलैर्मधुरैर्हृद्यैर्जीवनीयैरुपाचरेत् ॥

**अर्थ**—व्यवायशोषिपुरुषाला दूध, मांस, तूप, यांणीं युक्त भोजनकरावें; व संपूर्ण गोड, प्रिय, आयुष्यवर्धक, अशा औषधांनीं उपचार करावे.

## शोकशोषिलक्षण.

प्रध्यानशीलःस्रस्तांगःशोकशोष्यपितादृशः ॥
विनाशुक्रक्षयकृतैर्विकारैरुपलक्षितः ॥

**अर्थ**—शोकशोषी हा चिंताकरणारा, हातपायगळालेला व शुक्रक्षयव्यतिरिक्त क्षयलक्षणानीं युक्त असतो.

## शोकशोषचिकित्सा.

हर्षणाश्वासनैःक्षीरैःस्निग्धैर्मधुरशीतलैः ॥
दीपनैर्लघुभिश्चान्नैःशोकशोषमुपाचरेत् ॥

अर्थ—शोकजन्यक्षयावर—हर्षण, आश्वासन व क्षीर, स्निग्ध, मधुर, शीतल, दीपन आणि लघु, अशीं अन्नें, या पदार्थांनीं उपचार करावा.

## जराशोषलक्षण.

जराशोषीकृशोमंदवीर्यबुद्धिबलेंद्रियः ॥ कंपनोरुचिमान्भिन्नकांस्य पात्रहतस्वरः ॥ ष्ठीवतिश्लेष्मणाहीनोगौरवारुचिपीडितः ॥ संप्रस्रुता स्यनासाक्षिःशुष्करूक्षमलच्छविः ॥

अर्थ—म्हातारपणामुळें क्षीण झालेला पुरुष कृश होतो; व त्याचीं वीर्य, बुद्धि, बल व इंद्रियें, हीं मंद होतात; आणि कंप व अरुचि होत्ये, त्याचा स्वर फुटक्या कांशाच्या भांड्यासारिखा होतो, कफावांचून थुंकतो; व जडता, अरुचि यांची पीडा होत्ये; आणि तोंड, नाक व नेत्र हे वाहातात; व खडा व रूक्ष असा मळ होतो.

## अध्वशोषलक्षण.

अध्वप्रशोषीस्रस्तांगःसंभृष्टपरुषच्छविः ॥
प्रसुप्तगात्रावयवःशुष्कक्लोमगलाननः ॥

अर्थ—अतिमार्गगमनानें क्षय झाला असतां; आंग गळतें, शरीराचा वर्ण भाजल्या सारिखा खरखरीत होतो, सर्वांगाला मेहरी येते; व क्लोम ( पिपासास्थान ) गळा व तोंड हीं कोरडी पडतात.

## अध्वशोषचिकित्सा.

आस्यासुखैर्दिवास्वप्नैःशीतैर्मधुरबृंहणैः॥
अन्नमांसरसाहारैरध्वशोषमुपाचरेत् ॥

अर्थ—बसण्याचें सुख, दिवसा निद्रा व शीत, मधुर, पौष्टिक अशीं अन्नें, मांसाचे रस, यांचें सेवन या उपायांनीं अध्वशोषावर चिकित्सा करावी.

## व्यायामशोषलक्षण.

व्यायामशोषीभूयिष्ठमेभिरेवमुपद्रुतः ॥
लिंगैरुरःक्षतसमैःसंयुक्तश्चक्षतंविना ॥

अर्थ—फारश्रमानें क्षीण झालेला रोगी अध्वशोषोक्त जी स्रस्तांगतादि लक्षणें; त्यांनीं युक्त असतो; आणि उरःक्षत नसतां उरःक्षतजनितक्षयलक्षणानीं युक्त असतो.

## व्यायामशोषचिकित्सा.

व्यायामशोषिणांस्निग्धैःक्षतक्षयकरैर्हितैः ॥
उपाचरेज्जीवनीयैर्विधिनाश्लेष्मिकेणतु ॥

**अर्थ**–व्यायामशोषिरोग्याला स्निग्ध, क्षतक्षयावर हितकारक व शरीराला हितकारक, श्लेष्मल व जीवनीयगणोक्त असे उपचार करावे.

## व्रणशोषलक्षण.

रक्तक्षयाद्वेदनाभिस्तथैवाहारयंत्रणात् ॥
व्रणिनश्चभवेच्छोषःसचासाध्यतमोमतः ॥

**अर्थ**–रक्तक्षयानें, व्रणांच्या वेदनांनीं व आहार तुटल्यानें, जो व्रणयुक्त मनुष्याला क्षय होतो; तो फार असाध्य जाणावा.

## व्रणशोष.

व्रणशोषंजयेत्स्निग्धैर्दीपनैःस्वादुशीतलैः ॥
ईषदम्लैरनम्लैर्वायूपमांसरसादिभिः ॥

**अर्थ**–स्निग्ध, दीपन, गोड, शीतल, किंचित् आंबट व गोड असे यूष, मांसरस, इत्यादिकानीं व्रणशोषाला जिंकावा.

## रसवर्धन.

गुडूचीशृंगवेरंचयवानांक्वथितंजलं ॥ मरीचैःक्वथितंदुग्धंपाने रात्रौप्रशस्यते ॥ रसस्यतेनवृध्धिःस्यात्क्षयंशीघ्रंविमुंचति ॥

**अर्थ**–गुळवेल, आलें व यव यांचा काढा किंवा मिरीं घालोन तापविलेलें दूध, हें प्राशन करावें; ह्मणजे रसधातूची वृद्धि होऊन शीघ्र रसक्षयाचा नाश होतो.

## रक्तवर्धन.

गोधूमयवशालीनांजांगलानिविशेषतः ॥ घृतदुग्धसिताक्षौद्र मरीचानिचपिप्पली ॥ पानंशस्तंमनुष्याणांरक्तवृध्धिकरंपरं ॥

**अर्थ**–गहूं, यव, साळी, जंगलांतील मांसें, तूप, दूध, साकर, मध, मिरीं, आणि पिंपळी, यांचें प्राशन मनुष्यांला रक्तवृद्धिकरण्याविषयीं उत्तम आहे.

## मांसवर्धन.

अनूपानिचधान्यानिलशुनादीनिकल्पयेत् ॥
कुल्यासघृतदुग्धादीन्सेवयेन्मधुराणिच ॥

अर्थ—आनूप मांसें, आनूप धान्यें, लसुण, हरणदोडी, तूप, दूध, आणि मधुर पदार्थ हे भक्षण करावे.

## मेदवर्धन.

तालिसाद्यंहितंचूर्णसेवनंमधुरांस्तथा ॥
रसांश्वजांगलान्दद्यात्सेवनार्थंभिषग्वरः ॥

अर्थ—तालीसादिकचूर्ण, मधुररस व जांगल मांसांचे रस हे पदार्थ भक्षणास द्यावे.

## दुसरा प्रकार.

सीतोपलादिकंचूर्णमजाक्षीरंसकौलकं ॥
हितंपानंक्षयेचैवकल्पयेत्प्रातराशनैः ॥

अर्थ—सितोपलादि चूर्ण, शेळीचें दूध, रानडुकराचें मांस व हितकारक पान, हे पदार्थ क्षयनाश करून मेदवृद्धि करितात.

## अस्थिवर्धन.

घृतपक्वानिशस्तानिक्षीराणिविविधानिच ॥ चंदनादीनिद्राक्षादि
चूर्णानिचभिषग्वरैः ॥ जांगलानिचसर्वाणिसेवनीयानिपुत्रक ॥
मधुराणितथान्नानिसर्वाणिसंप्रयोजयेत् ॥

अर्थ—घृतपक्व पदार्थ, दूध, चंदनादि, व द्राक्षादि चूर्णे, जंगलांतील मांसें, मधुर अन्न व पानें, हीं सर्व योजावी.

## शुक्रवृद्धि.

शुक्रक्षयेम्लपक्वानिसराणिचविशेषतः ॥
नवनीतंतथाक्षीरंमधुराणिचसेवयेत् ॥

अर्थ—शुक्रक्षय झाला असतां; आम्लानें सिद्ध केलेले पदार्थ, विशेषेकरून सारक पदार्थ, लोणी, दूध आणि मधुर रस हे योजावे.

## दुसरा प्रकार.

कर्कटीमूलपयसाविदारीकंदशाल्मली ॥
सिताढ्यंचहितंपानंशस्यतेमधुनासह ॥

अर्थ—कांकडीचें मूळ, दूध, भुयकोहळा व सांवरीचा कंद, हे साकर व मध घालून प्राशनार्थ द्यावें.

## गरुडवेलीचा रस वांतिवर.

पिबेद्वांतिप्रशांत्यर्थंक्षौद्रंछिन्नरुहारसं ॥ मातुलुंगस्यमूलंवालाजाचूर्णंससैंधवं ॥ पिप्पलीमधुसंयुक्तंखादेद्वांतिप्रशांतये ॥

**अर्थ**–क्षयामध्यें वांतिनाशार्थ गरुडवेलीचा रस, मध किंवा महाळुंगाचें मूळ, लाह्यांचें चूर्ण, सैंधव, पिंपळी व मध हीं एकत्र करून द्यावें.

## दुसरा प्रकार.

रजनीपूगखंडंचनिष्कैकंवांतिनाशकं ॥ निष्कार्धंटंकणंवाथकाकमाचीद्रवैःपिबेत् ॥ सुगंधंवापिबेत्स्वादेत्सर्ववांतिप्रशांतये ॥

**अर्थ**–हळद, सुपारी व साकर यांचें एक तोळा चूर्ण वांतीचा नाश करितें; किंवा अर्धतोळा कावळीच्या रसांत टाकणखाराची लाही द्यावी; अथवा सुगंधपदार्थांचें भक्षण किंवा प्राशन करावें; ह्मणजे सर्व वांतीची शांति होते.

## रक्तवांतिवर.

आलक्तकरसैःक्षौद्रंरक्तवांतिहरंपरं ॥ पुष्यार्केकाकतुंड्यास्तुमूलंगोक्षीरमर्कटं ॥ रक्तवांतिहरंपेयंमदाहेनिष्कनिष्ककं ॥

**अर्थ**–लाखेचा रस व मध एकत्र करून द्यावा; किंवा कावळीचें मूळ पुष्यार्कयोगावर घेऊन गाईच्या दुधांत उगाळून द्यावें. तें दाहयुक्त रक्ताच्या वांतीचा नाश करितें.

## उशीरादिचूर्ण.

उशीरंतगरंशुंठींकंकोलंचंदनद्वयं ॥ लवंगंपिप्पलीमूलंकृष्णैलानागकेसरं ॥ मुस्तामलककर्पूरंतवक्षीरंचपत्रकं ॥ कृष्णागरुसमंचूर्णंसिता स्यादष्टमांशतः ॥ रक्तवांतिंचहृत्तापंनाशयेन्नात्रसंशयः ॥

**अर्थ**–वाळा, तगर, सुंठ, कंकोळ, चंदन, रक्तचंदन, लवंगा, पिंपळीमूळ पिंपळी, एलची, नागकेशर, नागरमोथा, आवळकाठी, कापूर, तवक्षीर, तमालपत्र. कृष्णागरु, हे समभाग व साकर अष्टमांश घालून चूर्ण तयार करावें. तें रक्तवांति व हृदयाचा संताप यांचा नाश करितें.

## श्लेष्म्यावर.

विकारेश्लेष्मणोजातेभक्षयेत्कदलीफलं ॥ भृष्टंतन्मरिचैःसाज्यंहंतिश्लेष्माणमुल्बणं ॥

**अर्थ**–कफविकार झाला असतां केळें भाजून मध व मिरीं यांशीं द्यावें; ह्मणजे वाढलेल्या कफाचा नाश करितें.

## कुस्तुंबर्यादि चूर्ण.

घृतंकुस्तुंबरीचूर्णपाययेच्छर्करायुतं ॥
एलाम्मरिचसंयुक्तंखादेदरुचिशांतये ॥

अर्थ—धने, एलची व मिरीं यांचें चूर्ण तूप व साकर यांशीं खावें; ह्मणजे अरुचि नाश पावत्ये.

## अरुचीवर.

खादेदरुचिशांत्यर्थमार्द्रकंवासमाक्षिकं ॥

अर्थ—अरुचीच्या नाशार्थ आलें व मध खावा.

## दाहावर.

कांचनारस्यत्वक्पिष्टंसजीरंतापनाशकं ॥
कर्पूरेणसमायुक्तंरसंतापेप्रयोजयेत् ॥

अर्थ—कांचनाराच्या सालीचा रस, जिऱ्याचें चूर्ण व कापूर घालून खावा; ह्मणजे संतापाचा नाश करितो.

## शोषावर.

कोकिलाक्षस्यबीजैर्वाजीरकेणगुडेनवा ॥ वमनेचास्यशोषेवाफलंजातयाःप्रशस्यते ॥ मत्स्याक्षीपाटलामेघनादमूलंचशोषजित् ॥

अर्थ—कोलिस्त्याचें बी, जिरें व जायफळ यांचें चूर्ण गुळाशीं खावें; किंवा मत्स्याक्षी, पाडळ व तांदुळजा, यांचें मूळ खावें, तें शोषनाशक आहे.

## उरःक्षतक्षयनिदान.

धनुरायम्यतोत्यर्थंभारमुद्वहतोगुरुं ॥ युध्यमानस्यबलिभिःपततोविषमोच्चतः ॥ वृषंहयंवाधावंतंदम्यंचान्यंनिगृण्हतः ॥ शिलाकाष्ठाश्मनिर्घातान्क्षिपतोनिघ्नतःपरान् ॥ अधीयानस्यवात्युच्चैर्दूराद्वाव्रजतोभृशं ॥ महानदींचातरतोहयैर्वासहधावतः ॥ सहसोत्पततोदूरंतूर्णंवापिप्रनृत्यतः ॥ तथान्यैःकर्मभिःक्रूरैर्भृशमभ्याहतस्यच ॥ विक्षयतेवक्षसिव्याधिर्बलवान्समुदीर्यते ॥ स्त्रीषुचातिप्रसक्तस्यरूक्षाल्पप्रमिताशिनः ॥ उरोविरुज्यतेत्यर्थंभिद्यतेथविदह्यते ॥ प्रपीड्यतेतथापार्श्वेशुष्यत्यंगंप्रवेपते ॥ क्रमाद्वीर्यंबलंवर्णोरुचिरग्निश्चहीयते ॥ ज्वरोव्यथामनोदैन्यंविड्भेदाग्निवधावपि ॥ दुष्टःश्यावःसदुर्गंधःपीतोविग्रथितोबहु ॥ कासमानस्यचाभिक्ष्णंकफस्रावःप्रवर्तते ॥ सक्षतीक्षीयतेत्यर्थंतथाशुक्रौजसःक्षयात् ॥

अर्थ–जो फार वेळ बळानें तिरंदाजी करितो, बळवंताशीं मल्लयुद्ध करितो, उंचनीचा वरून पडतो; किंवा बैल, घोडा इत्यादिकांबरोबर धांवतो; किंवा बळानें धरतो; व मोठेद गड व मोठे लाकुड हे दुर फेकतो. मोठयानीं अध्ययन करितो. दूरपावेतो धावतो. मोठें नदीचें पात्र पोहतो. लांबीची उडी मारतो. जलद नृत्य करितो; इत्यादि साहसकर्मे, अथवा अभिघात इत्यादिकारणानीं ऊर फुटून त्यामध्यें मोठा व्याधि उत्पन्न होतो, त्याला उरःक्षय ह्मणतात; किंवा अतिमैथुन करणारा, रोज कमीप्रमाणानें अन्न खाणारा त्याला उरःक्षत होतें, त्याणें उरांत फाटल्यासारिख्या, किंवा टोंचल्यासारिख्या वेदना होतात. ऊर फटतासा वाटतो. जळती लागत्ये. बरगडया दुखतात. अंगसुकत्ये. कंप सुटतो; व क्रमानें वीर्य, बल, कांति, रुचि, आणि अग्नि यांचा नाश होतो; आणि ज्वर मनोग्लानि, दीनपणा, पातळ रेच, अग्निनाश व खोकल्याबरोबर खराब, काळसर, दुर्गंध पिवळा, गांडूळ, आणि पुष्कळ कफ पडतो; याप्रमाणें उरःक्षती, शुक्रक्षयी, आणि ओजःक्षयी हे क्षीण होतात.

## उरःक्षताचें पूर्वरूप.

अव्यक्तंलक्षणंतस्यपूर्वरूपमितिस्मृतं ॥

अर्थ–त्याचें अव्यक्त जें लक्षण तें पूर्वरूप जाणावें.

## क्षतक्षीणाचें असाध्यलक्षण.

उरोरुक्शोणितच्छर्दिकासोवैशेषिकःक्षते ॥
क्षीणेसरक्तमूत्रत्वंपार्श्वपृष्ठकटिग्रहः ॥

अर्थ–उरःक्षताचे ठाईं उरांत पीडा, रुधिराचें वमन आणि इतर कासांपेक्षा विलक्षण कास हीं पूर्वरूपें होतात; व रक्तक्षयाचे ठायीं मूत्र आरक्तवर्ण होतें; व पार्श्व, पृष्ठ, कटी हीं ताठल्यासारिखीं होतात.

## असाध्यलक्षण.

अल्पलिंगस्यदीप्ताग्नेःसाध्योबलवतोनवः ॥ परिसंवत्सरो याप्यःसर्वलिंगंविवर्जयेत् ॥ परंदिनसहस्रंतुयदिजीवतिमानवः ॥ सुभिषग्भिरुपक्रांतस्तरुणःशोषपीडितः ॥

अर्थ–उरःक्षत आणि क्षय यांमध्यें अल्प लक्षणेंकरून युक्त असून ज्या रोग्याचा जठराग्नी प्रदीप्त आहे; व रोगी बलयुक्त आहे; तर साध्य जाणावा; व जो नूतन उत्पन्न क्षय, तोहि साध्य जाणावा; आणि ज्यास एक संवत्सर अतिक्रांत झाला आहे, तो दुःसाध्य जाणावा; आणि सर्वलक्षणें करून युक्त जो क्षय तो असाध्य जाणावा हा क्षय, झाला असतां; परमावधी सहस्र दिवस पर्यंत तो रोगी वांचेल; परंतु जर तरुण आहे; आणि उत्तम वैद्याचा आश्रय केला आहे तर,

## उरःक्षतक्षयचिकित्साक्रम.

यद्यच्चतर्पणंशीतमविदाहिहितंलघु ॥
अन्नपानंनिषेव्यंतत्क्षतक्षीणैःसुखार्थिभिः ॥

अर्थ जें जें तृप्तिकारक, शीत, विदाहि नव्हे, हितकारक, लघु, असें असेल, तें तें अन्नोदकसेवन, उरःक्षतानें क्षीण झालेले, आणि सुखाची इच्छा करणारे, त्यांस योग्य आहे.

## चिकित्साक्रम.

शोकंस्त्रियःक्रोधमसूयतांचत्यजेदुदारान्विषयान्भजेच्च ॥ तथाद्विजातीं
स्त्रिदशान्गुरूंश्चवाचश्चपुण्याःशृणुयाद्द्विजेभ्यः ॥

अर्थ— उरःक्षतानें क्षीण झालेल्या मनुष्यानें शोक, स्त्री, दुसऱ्याच्या गुणावर दोषारोप करणें, हे सोडावें; व कथा, पुराण, इत्यादिक विषय सेवन करावे. देव, ब्राह्मण व गुरु यांची सेवा करावी, ब्राह्मणांपासून पुण्यकारक वाणी श्रवण करावी.

## दशमूलादि काढा.

दशमूलबलारास्नापुष्करामरदारुनागरैःक्वथितं ॥
पेयंपार्श्वांसशिरोरुक्क्षतकासादिशांतयेसलिलं ॥

अर्थ—दशमुळ, चिकणा, रास्ना, पोखरमूळ, देवदार, नागरमोथा यांचा काढा प्यावा; ह्मणजे कुशी, खांदे, डोकें या ठिकाणचा शूळ, उरःक्षत, खोकला, श्वास हे शांत होतील.

## बलादिकाढा.

बलाविदारीश्रीपर्णीबहुपत्रीपुनर्नवा ॥ पयसानित्यमभ्यस्ताः
शमयंतिक्षतक्षयं ॥ शृतंपयोमधुयुतंसितधार्थानांपिबेत्क्षयी ॥

अर्थ—चिकणा, भुईकोहळा, शिवण, कांटेशवती, घेटोळी, हीं वांटून दुध व मध याबरोबर घ्यावी; ह्मणजे उरःक्षतक्षयाचा नाश करील.

## एलादिगुटिका

एलापत्रत्वचोद्राक्षापिप्पल्यर्धपलंपृथक् ॥ सितामधुकखर्जूरमृद्वीका
श्चपलोन्मिताः ॥ संचूर्ण्यमधुनायुक्तावटिकाःसंप्रकल्पयेत् ॥ अक्ष
मात्रास्ततश्चैवभक्षयेच्चदिनेदिने ॥ क्षतक्षयंज्वरंकासंश्वासंहिक्कांव
मिंभ्रमं ॥ मूर्छांमदंतृषांशोषंपार्श्वशूलमरोचकं ॥ प्लीहानमाढ्यवातं
चरक्तपित्तंज्वरंक्षयं ॥ एलादिगुटिकाहंतिवृष्यासंतर्पणीपरा ॥

अर्थ—वेलदोडे, तमालपत्र, दालचिनी, द्राक्षें, पिंपळी, हीं प्रत्येक २ तोळे. साकर,

जेष्टीमध, खजूर, द्राक्षे, हीं प्रत्येक चार तोळे. या प्रमाणें घेऊन त्यांत मध घालून खलून गोळ्या एक तोळा प्रमाणाच्या कराव्या. त्यांतून दररोज एकेक खावी; ह्मणजे उरःक्षत क्षय, ज्वर, कास, श्वास, हिक्का, वांमे, भ्रम, मूर्छा, मद, तृषा, शोष, पार्श्वशूल, अरोचक, प्लीहा, आढयवात, रक्तपित्त, ज्वर व क्षय यांचा नाश करील; अशी ही एलादिगुटिका वृष्य व तृप्तिकारक आहे.

## द्राक्षादिघृत.

द्राक्षायाःप्रस्थमेकंतुमधुकस्यपलाष्टकं ॥ पचेत्तोयाढकेशुत्थेपादशेषे णतेनतु ॥ पलिकेमधुकद्राक्षेपिष्टंकृष्णापलद्वयम् ॥ प्रदायसर्पिषः प्रस्थंपचेत्क्षीरेचतुर्गुणे ॥ सित्वेशतिपलान्यष्टौशर्करायाःप्रदापयेत् ॥ एतद्द्राक्षाघृतंसित्वंक्षतक्षीणसुखावहं ॥ वातपित्तज्वरश्वासविस्फोट कहलीमकान् ॥ प्रदररक्तपित्तंचहन्यान्मांसबलप्रदं ॥

अर्थ—द्राक्षे ६४ तोळे, जेष्ठीमध ३२ तोळे व पाणी २५६ तोळे. अशीं तिन्हीं एकत्र कढवून चतुर्थांश पाणी उरले ह्मणजे गाळून घेउन त्यांत जेष्ठीमध आणि द्राक्षे यांचें चूर्ण ४ तोळे. पिंपळीचें चूर्ण ८ तोळे, तूप ६४ तोळे, आणि सर्वांचा चौपट दूध घालून शिजवून थंड झाल्यावर ३२ तोळे साकर घालून काल्यावे; ह्मणजे हे द्राक्षाघृत सिद्ध होते. उरःक्षताने क्षीणमनुष्यास हितावह आहे; आणि वातपित्तज्वर, श्वास, विस्फोटक, हलीमक, प्रदर व रक्तपित्त यांचा नाश करील; व मांस बल यांतें देईल.

## बलादि घृत.

घृतंबलानागबलार्जुनांबुसिद्धंसयष्टीमधुकल्कपादं ॥
हृद्रोगशूलक्षतरक्तपित्तंकासानिलार्शान्शमयत्युदीर्णान् ॥

अर्थ—चिकणा, मोठा चिकणा व सादडा यांचे काढयांत ज्येष्ठीमधाचा कल्क घालून सिद्ध झालेलें तूप सेवन केले असतां; हृद्रोग, शूल, उरःक्षत, रक्तपित्त, कास, वायु व मुळव्याध हे अति वाढलेले असले तरीं त्यांचा नाश करील.

## पथ्यादि घृत.

पथ्याव्हनागबलयोःक्वाथेक्षीरसमेघृतं ॥
पयसापिप्पलीवासाकल्कासिद्धंक्षतेहितं ॥

अर्थ—हिरडा व चिकणाभेद यांच्या काढयांत बरोबरीनें दूध, पिंपळी व अडुळसा यांचे कल्क घालून त्यांत सिद्ध केलेलें तूप उरःक्षतक्षयाचे नाशक आहे.

## गोक्षुराद्यघृत.

श्वदंष्ट्रोशीरमंजिष्ठाबलाकाश्मर्यकट्तृणं ॥ दर्भमूलंपृष्ठिपर्णीबला सर्षपकास्थिरा ॥ पलिकान्साधयेत्तेषांरसेक्षीरेचतुर्गुणे॥ कल्कैःस्वगु प्तर्षभकमेदाजीवंतिजीवकैः ॥ शतावर्यादिमृद्वीकाशर्कराश्रावणी वृषैः ॥ प्रस्थंसिद्धंघृतंवातपित्तहृद्रोगगुल्मनुत् ॥ मूत्रकृच्छ्रप्रमेहा र्शकासशोषक्षयापहं ॥ धनुःस्त्रीसंगभाराध्वखिन्नानांबलमांसदं ॥

अर्थ-गोखरूं, वाळा, मांजिष्ठ, चिकणा, कट्तृण, दर्भमूळ, पिठवण, अतिबला, शिरस व सालवण हे चार चार तोळे घेऊन यांचा रस व चौपट दूध, आणि श्वेत लाजाळू, पांढरी वस, मेदा, जीवंती, जीवक, शतावरी, द्राक्षे, साकर, मुंडी व अडुळसा, यांचे कल्क, आणि १ शेर तूप इतकें घालून तूप सिद्ध करून घेतलें असतां; वात, पित्त, हृद्रोग, गुल्म, मूत्रकृच्छ्र, प्रमेह, अर्श, खोकला, शोष व क्षय यांचा नाश करितें.

## अमृतप्राश्यावलेह.

क्षीरधात्रीविदारीक्षुक्षीरिणांचतथारसे ॥ पचेत्समेघृतप्रस्थेमधुकैरिक्षु णान्वितैः ॥ द्राक्षाद्विचंदनोशीरशर्करोत्पलपद्मकैः ॥ मधूककुसुमानं ताकाश्मरीतृणसंज्ञकैः ॥ प्रस्थार्धमधुनःशीतोशर्करायास्तुलांतथा ॥ प लार्धकांश्चसंचूर्ण्यत्वगेलापद्मकेसरान्॥विनीयतस्यसंलिह्यान्मात्रांनित्यं सुयंत्रितः ॥ अमृतप्राश्यमित्येतन्निर्मितंत्रिपुरारिणा ॥ क्षीरमांसाशिनो हंतिरक्तपित्तक्षतक्षयान् ॥ तृष्णारुचिश्वासकासच्छर्दिहिक्काप्रमर्दनं ॥ मू त्रकृच्छ्रज्वरघ्नंचबल्यंस्त्रीरतिवर्द्धनं ॥

अर्थ-दूध, आवळ्यांचा रस, भुयकोहाळ्याचा रस, उसांचा रस, क्षीरवृक्षांचा रस व एकशेर तूप हीं चांगली पचवून नंतर त्यांत ज्येष्ठीमध, ऊंस, द्राक्षे, चंदन, रक्तचंदन, वाळा, साकर, कोष्ठ, पद्मकाष्ठ, मोहाचीं फुलें, धमासा, शिवण व कट्तृण यांचीं चूर्णे घालून लेह सिद्ध करावा. थंड झाल्यावर ३२ तोळे मध, साकर ४०० तोळे व दालचि नी, तमालपत्र, नागकेशर, यांचें चूर्ण दोन तोळे घालून भरून ठेवावा. यांतून आग्नेब ल पाहून द्यावा. दूध व मांस इत्यादिक पदार्थ पथ्याला द्यावे; ह्मणजे रक्तपित्त, क्षतक्षय, ताहान, अरुचि, दमा, खोकला, वांति, उचकी, मूत्रकृच्छ्र व ज्वर यांचा नाश करितो; आणि बल व स्त्रियांशीं रति यातें वाढवितो, याला अमृतप्राश्यावलेह असें नाव आहे.

## रसराज.

मुक्ताप्रवालरसहेमशिताभ्रकांतवंगंमृतंसकलमेतदलंविभाव्य ॥ छि
न्नारसेनचवरीसलिलेनसप्तपश्चाद्ददेन्मधुहविर्मरिचेनसार्कं ॥ लि
ह्यादुरःक्षतहरंरसराजकाख्यंमाषप्रमाणमतनूद्भवहेतुमेनं ॥

अर्थ—मोतीं, पोंवळी, पारा, सोनें, काळा अभ्रक, कांतलोह व कथील या सर्वांचीं समभाग भस्में घेऊन त्यांस गुळवेल व शतावरीच्या मुळांचा रस, यांच्या प्रत्येकीं सात सात दिवस भावना द्याव्या; नंतर या रसराजांतून १ मासा घेऊन मध, तूप व मिरीं यांशीं द्यावा; ह्मणजे तो उरःक्षताचा नाश करितो; व कामाला प्रदीप्त करितो.

उरोमंथिक्षतोलाजान्पयसामधुसंयुतान् ॥ सद्यएवपिबेज्जीर्णेपयसा
द्यात्सशर्करं ॥ पार्श्वबस्तिरुजिस्वल्पपित्ताग्निस्तानसुरायुतान् ॥

अर्थ—उरःक्षतक्षयरोग्यानें लाह्या, दूध व मध यांशीं भक्षण कराव्या, त्या जीरल्यावर-साकर घालून दूध प्यावें; व पार्श्व आणि बस्ति यां मध्यें शूल आणि अग्नि व पित्त हे मंद असतील तर त्याणें मद्याशीं लाह्या भक्षण कराव्या.

लाक्षाचूर्णमुष्टकृतंक्षौद्राज्येनान्वितंपयः ॥
शमयतिशोषोद्भूतंवमनंतस्यसिद्धमिव ॥

अर्थ—चांगलें बारीक लाखेचे चूर्ण, मध, तूप आणि दूध हे एकत्र करून घ्यावें. हें क्षयानें वांती होत्ये, त्यावर सिद्धऔषधासारिखा गुण करितें.

## क्षयावर पथ्य.

दोषाधिकस्यबलिनोमृदुशुद्धिरग्र्येगोधूममुद्गचणकावनशालयश्च ॥
छागानिमांसनवनीतपयोघृतानिक्रव्यादमांसमपिजांगलजारसाश्च ॥
मार्तंडचंद्रकिरणैःप्रतिशोषितानिलेह्यानिपक्कपललानिसुचूर्णितानि ॥
रागाःसकांबलिकतर्वडवेसवाराभक्ष्याशशांककिरणैर्मधुरोरसश्च ॥
पक्कानिमोचपनसाम्रफलानिधात्रीखर्जूरपौष्करपरूषकनारिकेरं ॥ सौ
भांजनंबकुलकंनवतालसस्यद्राक्षाफलानिभिषजापिइमानिदद्यात् ॥
सिंहास्यपत्रमपिगोमहिषीघृतंचच्छागाश्रयश्चहितदंतकमूत्रलेपः ॥ म
त्स्यंडिकाशिखरिणीमदिरारसालाःकर्पूरकंमृगमदःशितिचंदनंच ॥
अभ्यंजनानिसुरभीण्यनुलेपनानिस्थानानिवेश्मरचनान्यवगाहनानि ॥

हर्म्यंस्रजःस्मरकथामृदुगंधवाहःशीतानिलास्यमपिचंद्ररुजोविपंची॥ संदर्शनंमृगदृशामपिहेमपूर्णमुक्तामणिप्रचुरभूषणधारणंच ॥ होमप्रदानममरद्विजपूजनानिदिव्यानुपानमपिपथ्यगणःक्षयार्ते ॥

अर्थ–जो दोषाधिक क्षयरोगी त्याची प्रथमतः मृदुरेचकादिकानीं शुद्धि करावी; व गहूं, मूग, चणे, देवभात, बकरीचें मांस, लोणी, दूध तूप, क्रव्यादपक्ष्याचें मांस, जंगलांतील मांसाचा रस, सूर्यकिरणांत तापवून आटलेले लेह्यपदार्थ, पक्क केलेलीं व बारीक केलेली मांसें, खांडवादिराग; आणि कांबालिक (मुळें व फळें यांचें काढ्यांत समभाग तिळपुष्पांचो आंब घालतात तो) तर्पंड, वेसवार, चांदणें, मधुर रस, पिकलेलीं केळीं, फणस, आंबे, आवळे, खजूर, पुष्करमूळ, चारोळया, नारळ, शेवगा, बकुळ, कोंवळेताडाचें फळ, ओलीं द्राक्षें, अडुळसा, गाई व म्हशी यांचें तूप, सर्वदा मेढयांचा आश्रय, त्याच्या पायां खालचें मुतानें भिजलेल्या मातीचा आंगाला लेप, खडीसाकर, शिखरिणी, मद्य, रसाळा, कापूर, कस्तूरी, पांढरा चंदन, आंगाला सुगंधतेलाचें अभ्यंग, उत्तम, सुंदर व मनोरम अशीं स्थानें व गृहें, माळाधारण, गाणें, कथा व पुराण यांचें श्रवण, मृदु व शीत असा वारा, नाच, चांदणे, वीणा, स्त्रियांचें दर्शन व सुवर्ण, मोत्यें, रत्नें यांच्या अलंकारांचें धारण व होम, दान, देव व ब्राह्मण, यांची पूजा आणि उत्तम उत्तम अनुपानें, हा क्षयरोगावर पथ्यगण सांगीतला.

## क्षयावर अपथ्य.

विरेचनंवेगविधारणंचश्रमश्चसुस्वेदनमंजनंच ॥ प्रजागरंसाहसकर्मसेवारूक्षंचपानंविषमाशनंच ॥ तांबूलकालिंगकुलिंगमांसंरसोनवंशांकुररामठानि ॥ अम्लानितिक्तानिकषायकाणिकटूनिसर्वाणिचपत्रशाकं ॥ क्षारान्विरुत्थाध्यशनानिबिंबीकर्कोटकंचापिविदाहिसर्वं ॥ कुटिल्लकंकृष्णमपिक्षयेषुविवर्जयेत्संततमप्रमत्तः ॥

अर्थ–विरेचन, मलमूत्रादिवेगधारण, श्रम, स्वेदन, अंजन, जागरण, साहसकर्म, रूक्षान्न, रूक्षपान, विषमाशन, विडा, कलिंगड, चिमणापक्षी यांचें मांस, लसूण, वेळवाचे कोंब, हिंग व आंबट, तिखट, तुरट, कडु हे रस, पाल्याचा भाज्या, क्षार, विरुद्धाशन, अध्यशन, तोंडलें, कर्टोलें, आणि दाहकारक पदार्थ, रक्त व श्वेत पुनर्नवा हे पदार्थ क्षयरोग्यानें वर्ज्य करावें.

## कासीं कर्मविपाक.

द्रव्याणिचाल्पसाराणांस्तेयंकृत्वान्यवेषतः ॥
चरेत्सांतपनंकृच्छ्मित्येवंमनुरब्रवीत् ॥

अर्थ–दुर्बळलोकाचें द्रव्य चोरितो तो पुरुष कफरोगी होतो. त्याणें कृच्छ्र आणि सांतपन, अशीं प्रायश्चित्तें करावीं, असें मनूनें सांगीतलें आहे.

### दुसरा प्रकार

त्रपुहारीचपुरुषोजायतेश्लेष्मलःसदा ॥
उपोष्यादिवसंसोपिदद्यात्पलशतंत्रपु ॥

अर्थ–कथलि चोरणारा पुरुष कफरोगी होतो, त्याणें एक दिवस उपोषण करून चारशें तोळे कथील दान करावें.

### तिसरा प्रकार.

नित्यानुष्ठानविमुखःकफरोगीभवेन्नरः ॥ पराभवंसचाप्नोतीत्याहवै भगवान्यमः ॥ तच्छांतयेमासमेकंयावकंभक्षयेन्नरः ॥ सहस्रनाम पाठश्चहोमश्चाष्टोत्तरायुतं ॥ नाममंत्रेणकुर्वीतचर्वाज्यंचहविर्भवेत् ॥

अर्थ–जो नित्यकर्म संध्यादिक करीत नाहीं, तो कफरोगी होतो. त्याला कफापासून किंवा शत्रूंपासून पीडा होत्ये. असें यमानें सांगीतलें आहे, त्यांच्या शांत्यर्थ एक महिना पर्यंत यावकान्न खावें; आणि विष्णुसहस्रनामाचा पाठ व नाममंत्रानें चरु व आज्य ह्या द्रव्यानीं अष्टोत्तरशत होम याप्रमाणें विधि करावा.

### ज्योतिःशास्त्राभिप्राय.

सूर्येकुलीरजातेबुधेनदृष्टेविगतनेत्रः ॥
कफमारुतरोगार्तःपरस्वहारीविलोलमतिचेष्टः ॥

अर्थ–जन्मकाळीं कर्कराशिस्थ सूर्य असून बुधाची त्यावर दृष्टि आहे, तर नष्टदृष्टि होतो; किंवा कफवातरोगी होतो, किंवा चोरी व चंचळपणा हीं कर्मे करितो.

### कारण, संप्राप्ति, आणि निरुक्ति.

धूमोपघाताद्रजसस्तथैवव्यायामरूक्षान्ननिषेवणाच्च ॥ विमार्गगत्वा दपिभोजनस्यवेगावरोधात्क्षवथोस्तथैव ॥ प्राणोह्युदानानुगतःप्र दुष्टःसंभिन्नकांस्यस्वनतुल्यघोषः ॥ निरेतिवक्त्रात्सहसासदोषोम नीषिभिःकासइतिप्रदिष्टः ॥

अर्थ–नाकांत व तोंडांत धूर किंवा धुरळा भरून गुदमुरल्यानें, श्रम व रूक्ष अन्न यांच्या सर्वकाळ सेवनानें, किंवा भोजन भलत्याच मार्गानें पोटांत गेल्यानें व मल, मूत्र, किंवा शिंका इत्यादिकांच्या वेगरोधानें, वायु दुष्ट होऊन कंठगतवायूशीं मिळून फुटक्या कांस्यपात्राच्या ध्वनीसारिखा शब्द करीत अकस्मात मुखावाटे कफयुक्त थुंका निघतो, त्याला ज्ञाते खोकला ह्मणतात.

## संख्या, रूप, संप्राप्ति.

पंचकासाःस्मृतावातपित्तश्लेष्मक्षतक्षयैः ॥
क्षयायोपेक्षिताःसर्वेबलिनश्चोत्तरोत्तरं ॥

अर्थ–(कास) खोकला– पांच प्रकारचा. तो कफ, वात, पित्त, उरःक्षतज, आणि क्षयज असा आहे. यांतून कोणत्याविषयीं ही उपेक्षा केली असतां; क्षयाला उत्पन्न करितो. हे पांच ही एकाहून एक बलवान् आहेत.

## पूर्वरूप.

पूर्वरूपंभवेत्तेषांशूकपूर्णगलास्यता ॥
कंठेकंडूश्चभोज्यानामवरोधश्चजायते ॥

अर्थ–खोकला– उत्पन्न होण्यापूर्वीं तोंडांत बारीक कांटे येतात; व गळ्यांत खाजवतें; आणि भोजनमार्गाचा अवरोध होतो.

## वातिककासनिदान.

हृच्छंखमूर्द्धोदरपार्श्वशूलीक्षामाननःक्षीणबलस्वरौजाः ॥
प्रसक्तवेगस्तुसमीरणेनभिन्नस्वरःकास्यतिशुष्कमेव ॥

अर्थ–वातिक खोकला झाला असतां; हृदय, शंख, मस्तक, उदर, पार्श्व यांस शूल होतो, मुख म्लान होतें; बल, तेज व स्वर हीं क्षीण होतात. निरंतर खोकल्याचे वेग येतात; व स्वरभेद होऊन कोरडी ढांस उत्पन्न होत्ये.

## कासचिकित्सापरिभाषा.

रूक्षस्यानिलजंकासमादौस्नेहैरुपाचरेत् ॥ सर्पिर्भिर्बस्तिभिःपेयाक्षीरयूषरसादिभिः ॥ ग्राम्यानूपोदकैःशालियवगोधूमषष्टिकैः ॥ रसैर्मांसात्मगुप्तानांयूषैर्वाभोजयेद्धितैः ॥

अर्थ–रूक्ष रोग्याच्या वातकासाला प्रथम स्नेहपानादि उपचार करावे; व घृतें, बस्तिकर्म इत्यादि करावीं; आणि पेया, क्षीर, यूष, रस, ग्राम्य व अनूप उदकें, साळी, यव, गहूं, साटकी, हीं धान्यें व मांस व कुहिरी यांचे रस किंवा यूष यांचे भोजन द्यावें.

## रुद्रपर्पटी.

शुद्धसूतंद्विधागंधंसंमर्द्यैषांद्रवैःपुनः ॥ वातारिरार्द्रकंशृंगीकाकमाच्या दिकर्णिका ॥ दिनैकंमर्दयेत्खल्वेपाचयेत्पर्पटींतथा ॥ द्वयोःपादंमृतंता म्रंक्षिप्त्वामृद्वग्निनापचेत् ॥ रक्तवर्णंभवेद्यावत्तावत्पाच्यंप्रचालयेत् ॥ प्रक्षिपेत्कदलीपत्रेस्थाप्यस्निग्धपुटेपुनः ॥ आच्छाद्यतेनयोगेनअधश्चो र्ध्वंचगोमयं ॥ दग्धंविचूर्णयेत्पश्चाच्चूर्णपादंविषंक्षिपेत् ॥ रुद्रपर्पटिकाह्येषादेयागुंजाद्वयंद्वयं ॥ चूर्णितंकटुनिर्गुंड्यामूलंनिष्कद्वयंपिबेत् ॥ भृंग राजरसेनैवलिहेद्वामधुनासह ॥ वातकासंनिहंत्याशुसर्वथैवनसंशयः ॥

**अर्थ**–शुद्ध पारा १ भाग, गंधक २ भाग, यांची कज्जली करून ती एरंडमूळ, का. कडशिंगी, कावळी व ऐरण यांच्या रसांत एक दिवस खलून नंतर ती पचवून पर्पटी तयार करावी, तींत दोघांचें चतुर्थांश ताम्रभस्म घालोन मंदाग्नीवर पचन करावी, आ. रक्तवर्ण दिसूं लागली ह्मणजे केळीच्या पानावर ओतून त्यावर दुसरें केळीचें पान दडपून त्याच्या खालीं वर शेण घालावें, थंड झाल्यावर काढून चूर्ण करून त्यांत चतुर्थांश बच- नाग मिळवावा. ही रुद्रपर्पटी दोन गुंजा अनुपानाशीं द्यावी; आणि मागून काळ्या निर्गुंडीच्या मुळाचें चूर्ण साहा मासे खावें; किंवा माक्याचा रस व मध यांशीं द्यावी; ह्मण जे सर्वप्रकारच्या वातकासाचा नाश करिते.

## भूतांकुशरस.

शुद्धसूतस्यभागैकंद्विभागंशुद्धगंधकं ॥ भागत्रयंमृतंताम्रंमरीचंद शभागिकं ॥ मृताभ्रस्यचतुर्भागंभागमेकंविषंक्षिपेत् ॥ भूतांकुश स्यभागैकंसर्वमाम्लेनमर्दयेत् ॥ रसोभूतांकुशोनाममासैकोवा तकासजित् ॥ अनुपानंलिहेत्क्षौद्रंबिभीतकफलत्वचः ॥

**अर्थ**–शुद्ध पारा १ भाग, गंधक २ भाग, ताम्रभस्म ३ भाग, मिरीं १० भाग, अ भ्रकभस्म ४ भाग, बचनाग १ भाग, व नाकशिकणी १ यां सर्वांला एकत्र करून त्यांचा लिंबाच्या रसांत खल करावा. हा भूतांकुश रस एक मासा घेऊन बेहेड्याचें चूर्ण व मध यांशीं द्यावा; ह्मणजे वातकासाचा नाश करितो.

## सठ्यादिलेह.

सठीशृंगीकणाभार्गीगुडवारिदयासकैः ॥
सतैलैर्वातकासघ्नोलेहोयमपराजितः ॥

अर्थ—कचोरा, कांकडशिंगी, पिंपळी, भारंगमूळ, गुळ, नागरमोथे व धमासा यांचा लेह करून त्यांत तैल घालून सेवन केला असतां; निश्चयानें वातकासाचा नाश करितो.

## भार्ङ्यादिलेह.

भार्ङीद्राक्षासठीशृंगीपिप्पलीविश्वभेषजं ॥
गुडतैलयुतोलेहोहितोमारुतकासिनां ॥

अर्थ—भारंगमूळ, द्राक्षे, कचोरा, कांकडशृंगी, पिंपळी व सुंठ यांचा गुळाशीं लेह करून तैल घालून सेवन केला असतां; वातकासी रोग्याला हित होतें.

## विश्वादिलेह.

विश्वाभार्ङीकणासोमवल्कद्राक्षासठीसिताः ॥
लीढातैलेनवातोत्थंकासंजयतिदुस्तरं ॥

अर्थ—सुंठ, भारंगमूळ, पिंपळी, कायफळ, द्राक्षे व कचोरा, यांच्या तैलाशीं लेह करून त्यांत साकर घालून घेतला असतां; मोठा दुस्तर वातकास नाश पावतो.

## दशमूलीघृत.

दशमूलीकषायेणभार्ङीकल्कैर्घृतंपचेत् ॥
दशातित्तिरनिर्व्यूहैस्तत्परंवातकासनुत् ॥

अर्थ—दशमूळांचा काढा, भारंगमूळांचा कल्क व दहा तित्तिरपक्ष्यांचे मांसाचा काढा, यांत तूप तयार करावें, तें वातकासनाशाविषयीं उत्तम आहे.

## कट्फलादिपेय वातकफकासावर.

कट्फलंकट्तृणंभार्ङीमुस्तधान्यंवचाभया ॥ शुंठीपर्पटकं
शृंगीसुराह्वंचजलेशृतं ॥ मधुहिंगुयुतंपेयंकासेवातकफा
न्विते ॥ कंठरोगेमुखेशूलेहिक्काश्वासज्वरेषुच ॥

अर्थ—कायफळ, रोहिसगवत, भारंगमूळ, नागरमोथा, वेखंड, धने, हिरडा, सुंठ, पित्तपापडा, कांकडशिंगी, देवदार, यांचा काढा मध, हिंग, घालून प्यावा; म्हणजे तो वातकफयुक्तकास, कंठरोग, मुखरोग, शूळ, हिक्का, श्वास व ज्वर, यांच्यावर प्रशस्त आहे.

## शुंठ्यादिचूर्ण.

शुंठीदुरालभैरंडमूलंकर्कटशृंगिका ॥ चचुंदरोदेवदारुश्चू
र्णमेषांसमांशतः ॥ उष्णेनवारिणाकिंवातैलेनालोड्यभक्षि
तं ॥ वातजंश्लेष्मजंकासंनाशयत्यातिवेगतः ॥

अर्थ-सुंठ, धमासा, एरंडमूळ, कांकडशिंगी, चचुंदर, देवदार, यांचे समभाग चूर्ण उनपाण्याशीं, किंवा तेलाशीं घेतलें असतां; वातोत्पन्न व कफोत्पन्न खोकल्याचा नाश करितें.

## चित्रकादिलेह.

चित्रकंपिप्पलीमूलंव्योषंमुस्तादुरालभा ॥ शठीपुष्करमूलंचश्रेयसीसुरसावचा ॥भार्ङ्गिछिन्नरुहारास्नाकर्कटाख्याचकर्षिका ॥कल्कोग्निदग्धद्वितुलांकषायेपलविंशतिः ॥ मत्स्यंडिकायादशवासर्पिषः कुडवंपचेत् ॥सिद्धेसीतेपृथक्क्षौद्रपिप्पलीकुडवान्वितं ॥चतुःपलंतु गाक्षीर्याश्चूर्णंतत्रप्रदापयेत् ॥ लेहयेत्कासत्दृद्रोगश्वासगुल्मनिवारणं ॥

अर्थ-चित्रकमूळ, पिंपळीमूळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, नागरमोथा, धमासा, कचोरा पुष्करमूळ, हरीतकी, तुळस, वेखंड, भारंगमूळ, गरुडवेल, रास्ना, कांकडशिंगी, यासमभाग, औषधांचा कल्क आणि राख ८० तोळे हीं त्या औषधांच्या ८०० तोळे काढ्यांत घालून त्यांत खडिसाकर ४० तोळे व तूप ६४ तोळे घालून तो काढा पचवावा; ह्मणजे लेह सिद्ध झाला; त्यांत मध, पिंपळी, व वंशलोचन हीं प्रत्येकीं १६ तोळे घालावी; आणि त्यांतून देत जावा; ह्मणजे खोकला, त्दृद्रोग, दमा आणि गुल्म, यांचे निवारण करितो.

## शुंठ्यादिलेह वातकासावर.

चूर्णिताविश्वदुःस्पर्शाशृंगीद्राक्षाशठीसिता ॥
लिहेत्तैलेनवाताद्यंकासंजयतिदुस्तरं ॥

अर्थ-सुंठ, धमासा, कांकडशिंगी, द्राक्षे, कचोरा व साकर यांच्या तेलाशीं लेह करून द्यावा, तो दुस्तर वाताधिक खोकल्याचा नाश करितो.

## दशमूलांचा काढा.

दशमूलीशृताविश्वाकासहिक्कारुजापहा ॥
यवागूर्दीपनीवृष्यावातरोगविनाशनी ॥

अर्थ-दशमूळें व सुंठ, यांचा काढा कास व उचकी, यांचा नाशक आहे; आणि यवागू, साहापट पाणी घालून पातळ केलेला भात, दीपन, कामोद्दीपक व वातरोगांचा नाश करणारा आहे.

## पंचमूलकाढा.

पंचमूलीकृतःक्काथःपिप्पलीचूर्णसंयुतः ॥
रसान्नमश्नतोनित्यंवातकासमुदस्यति ॥

अर्थ–शालिपर्णी, पृष्ठिपर्णी, रिंगणी, डोर्ली व गोखरू यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून घ्यावा; व रसयुक्त भोजन करावें; म्हणजे वातकासाचा नाश करितो.

## कर्कटकरस.

रसंकर्कटकानांवाघृतभृष्टंसनागरं ॥
वातकासप्रशमनंशृंगीमत्स्यस्यवापुनः ॥

अर्थ–खेकड्याचा रस घृतांत भाजून त्यांत सुंठ घालून द्यावा; किंवा शृंगीमत्स्याचा रस घृतांत भाजून सुंठ घालोन द्यावा; म्हणजे वातकास शमतो.

## शुंठ्यादिचूर्ण.

शुंठीदुरालभाद्राक्षाकर्चूरस्तवराजकं ॥
वातकासंनिहंत्याशुतैलभुक्तंहिचूर्णकं ॥

अर्थ–सुंठ, धमासा, द्राक्षें, कचोरा व यवासशर्करा यांचे चूर्ण तेलांतून द्यावें; म्हणजे वातकासाचा नाश करितें.

## पित्तकासनिदान.

उरोविदाहज्वरवक्त्रशोषैरभ्यर्दितस्तिक्तमुखस्तृषार्तः ॥
पित्तेनपीतानिवमेत्कटूनिकासेत्सपांडुःपरिदह्यमानः ॥

अर्थ–पित्ताधिक कास झाला असतां; उरांत दाह, ज्वर, तोंडास कोरड, तोंड कडु तृषा फार, पित्तमिश्रित व कटु असा थुंका सुटतो, रोगी पांडुवर्ण होतो; व सर्वांगाची आग होत्ये, असें जाणावें.

## सिंहास्यादिकाढा.

सिंहास्यामृतासिंहीनांक्काथंमधुयुतंपिबेत् ॥
पिबेत्सपित्तकफजेकासेश्वासेज्वरेक्षये ॥

अर्थ–अडुळसा, गुळवेल व रिंगणी यांच्या काढ्यांत मध घालून घ्यावा, तो पित्तकफात्मक कास, दमा, ज्वर, आणि क्षय यांचा नाश करितो.

## बलादिकाढा.

बलाद्विबृहतीद्राक्षावासाभिःक्वथितंजलं ॥
पित्तकासापहंपेयंशर्करामधुयोजितं ॥

अर्थ–चिकणामूळ, रिंगणी, डोर्ली, द्राक्षें व अडुळसा यांचा काढा साकर व मध घालोन घ्यावा, हा पित्तकासनाशक आहे.

## सठ्यादिकाढा.

सठीन्हीबेरबृहतीशर्कराविश्वभेषजं ॥
पक्त्वारसंपिबेत्पूतंसघृतंपित्तकासनुत् ॥

अर्थ–कचोरा, वाळा, रिंगणी व सुंठ यांचा काढा गाळून आंत तूप व साकर घालोन ध्यावा; ह्मणजे तो पित्तकासाचा नाश करितो.

## शरादिकाढा.

शरादिपंचमूलस्यपिप्पलीद्राक्षयोस्तथा ॥
कषायेणशृतंक्षीरंपिबेत्समधुशर्करं ॥

अर्थ–शर, इक्षु, दर्भ, कसई, साळीभात, यांच्य मुळांचा कषाय करून त्यांत दूध घालोन आटवून मध साकर घालोन द्यावा, तसाच पिंपळी व द्राक्षें यांचा काढा करून आंत दूध घालोन आटवून मध व साकर घालोन द्यावा; ह्मणजे तो पित्तकासाचा नाश करितो.

## सठ्यादिकाढा

सठीद्विपंचमूलस्यपिप्पलीद्राक्षयोस्तथा ॥
कषायेणशृतंक्षीरंपिबेत्समधुशर्करं ॥

अर्थ–कचोरा, दशमूळें, पिंपळी आणि द्राक्षें यांच्या काढ्यांत तापिवलेलें दूध, मध, व साकर घालोन द्यावा, तो कासनाशक आहे.

## त्वक्क्षीरलेह.

त्वक्क्षीरपिप्पलीलाजाद्राक्षाजलदशर्कराः ॥
सर्पिर्मध्वावलेहोयंपित्तकासविनाशनः ॥

अर्थ–तवखीर, पिंपळी, लाह्या, द्राक्षें, नागरमोथा व साकर यांचा लेह तूप व मध यांतून द्यावा, हा पित्तकासाचा नाश करितो.

## कंटकार्यादिकाढा.

कंटकारियुगंद्राक्षावासाकचेरवालकैः॥ नागरेणचपिप्पल्या
क्वथितंसलिलंपिबेत् ॥ शर्करामधुसंयुक्तंपित्तकासहरंपरं ॥

अर्थ–रिंगणी, डोरली, द्राक्षें, अडुळसा, कचोरा, वाळा, सुंठ आणि पिंपळी, यांचा काढा साकर व मध घालोन द्यावा, तो पित्तकासाचा नाश करण्याविषयीं उत्कृष्ट आहे.

## पिप्पल्यादिचूर्ण.

पिप्पलीतवराजश्चतवक्षीरंत्रयंसमं ॥
मधुसर्पिर्युतंभुक्तंपित्तकासविनाशनं ॥

अर्थ–पिंपळी, यवासशर्करा व तवखीर हीं समभाग घेऊन त्याचें चूर्ण मध व तूप घालोन द्यावें; ह्मणजे पित्त कासाचें निवारण होतें.

## मधुकादिचूर्ण.

मधुकंपिप्पलीमूलंदूर्वाद्राक्षाकणासमं ॥
घृतेनमधुनायुक्तंपित्तकासविनाशनं ॥

अर्थ–ज्येष्ठीमध, पिंपळीमूळ, दूर्वा, द्राक्षें, आणि पिंपळी, यांचें समभाग चूर्ण करून तें मधाशीं द्यावें; ह्मणजे पित्तकासाचें निवारण होतें.

## अर्धावर्तितकाढा.

अर्धावर्तितपानीयंसलाजंपिप्पलीमधु ॥
त्र्यंसर्पियुतंभुक्तंपित्तकासविनाशकृत् ॥

अर्थ–निमें आटलेलें पाणीं, लाह्या व पिंपळी यांचा काढा करून त्यांत मध व तूप घालोन घ्यावा; ह्मणजे पित्तकासाचें निवारण होतें.

## मातुलिंगादिलेह.

मातुलिंगरसोहिंगुत्रिफलामधुशर्करा ॥
सर्पिर्मध्वावलेहोयंपित्तकासविनाशकृत् ॥

अर्थ–महाळुंगाचा रस, हिंग व त्रिफला यांचा काढा मध व साकर घालोन द्यावा; ह्मणजे पित्तकासाचें निवारण होतें.

## खर्जूरादिलेह.

खर्जूरंपिप्पलीद्राक्षासितालाजाःसमांशकाः ॥
मधुसर्पियुतोलेहःपित्तकासहरःपरः ॥

अर्थ–खजूर, पिंपळी, द्राक्षें, साकर व लाह्या ह्या समभाग औषधांचा लेह मध व तूप घालोन सेवन केला असतां; पित्तकासाचा नाश करितो.

## द्राक्षामलकादिलेह.

द्राक्षामलकखर्जूरंपिप्पलीमरिचान्वितं ॥
पित्तकासहरंह्येतल्लिह्यान्माक्षिकसर्पिषा ॥

अर्थ–द्राक्षें, आवळकाठी, खजूर, पिंपळी, मिरें हीं एकत्र खलून मध व तूप यांबरोबर खावीं, तीं पित्तकासनाशक आहेत.

## क्षीरामलकघृत.

महिष्यजाविगोक्षीरधात्रीफलरसैःसमैः ॥

सर्पिःप्रस्थंपचेद्युक्त्यापित्तकासनिबर्हणं ॥

अर्थ–म्हैस, शेळी, मेंढी व गाय, यांची दुधें व आवळ्यांचा रस हीं समभाग घेऊन त्यांत ६४ तोळे तूप घालोन युक्तीनें पचन करावें; आणि घ्यावें; ह्मणजे तें पित्तकासनाश करितें.

## रस.

भस्मताम्राभ्रतीक्ष्णानांकासमर्दवरीरसैः ॥ मुनिजैर्वेतसाम्ले

नदिनंमर्दयेत्पीडितं ॥ निष्कार्धंपित्तकासार्तंभक्षयेन्नात्रसंशयः ॥

अर्थ–ताम्रभस्म, अभ्रकभस्म व कांतभस्म, एकत्र करून त्याला कासिवदा, शतावरी, हातगा, गलगला आणि मद्य यांत घोटून दोन मासे पित्तकासी रोग्याला द्यावा.

## लोकेश्वररस.

रसोलोकेश्वरोप्यत्रपिप्पलीमधुनासह ॥

दातव्योविनिहंत्येवपित्तकासंसुदारुणं ॥

अर्थ–लोकेश्वररस व पिंपळी, मध यांतून द्यावा, तो दारुणपित्तनाशक आहे.

## कफकासनिदान.

प्रलिप्यमानेनमुखेनसीदन्शिरोरुजार्तःकफपूर्णदेहः ॥

अभक्तरुग्गौरवकंडुयुक्तःकासेद्भृशंसांद्रकफःकफेन ॥

अर्थ–कफकास झाला असतां; सर्वकाळ कफाचे चिकटयानें तोंड सर्वदा लिप्त, अशक्तपणा, सर्वशरीर कफानें व्याप्त, मस्तकास शूल, अरोचक, जडत्व, घशांत कंडू, खोकतानां कफाचे गोळे पडतात, इत्यादि लक्षणें जाणावीं.

## कफकाससामान्यचिकित्सा.

कफजेवमनंकार्यंकासेलंघनमेवच ॥

शस्तापवाताप्रकृतिर्यूषाश्चकटुतिक्तकाः ॥

अर्थ–कफजकासावर प्रथमतः वमन व लंघन हे उपचार व मुख्यत्वेंकरून वात रहित प्रकृति राखणें; आणि कडु, तिखट असे यूष देणें, इत्यादि उपचार करावे.

## नवांगयूष.

मुद्गामलाभ्यांयवदाडिमाभ्यांकर्कंधुनामूलसशुष्ककेन ॥

शुंठीकणाभ्यांसकुलित्थकेनयूषोनवांगःकफकासहंता ॥

अर्थ–मूग, आवळकाठी, यव, डाळिंब, बोरें, सुके मुळे, सुंठ, पिंपळी, आणि कुळिथ यांचा यूष करावा; हा नवांगयूष कफकासाचा नाश करितो.

## पिप्पल्यादिकाढा.

पिप्पलीकट्फलंशुंठीशृंगभिंर्ङीतथोषणं ॥ कारकंकंटकारीचसिंधुवारोयवानिका ॥ चित्रकोवासकश्चैषांकषायंविधिवत्कृतं ॥ कफकासविनाशायपिबेत्कृष्णारजोयुतं ॥

अर्थ–पिंपळी, कायफळ, सुंठ, कांकडाशिंगी, भारंगमूळ, मिरें, ओंवा, रिंगणी, निर्गुंडी, अजमोद, चित्रक व अडुळसा यांचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे कफकासाचें निवारण करितो.

## पित्तश्लेष्मकास.

वासकःस्वरसःपेयोमधुयुक्तोहिताशिना ॥
पित्तश्लेष्मकृतेकासेतालीसाद्यंचयोजयेत् ॥

अर्थ–पित्तश्लेष्मकासावर अडुळशाचा रस मध घालून द्यावा, व पथ्य करावें; किंवा तालिसादिचूर्ण द्यावें.

## अवलेह.

सठीसातिविषामुस्ताशृंगीकर्कटकस्यच ॥ अभयांशृंगवेरंचसमान्शुठ्यादिपेषयेत् ॥ हिंगुसैंधवसंयुक्तंतक्रोदकपरिप्लुतं ॥ श्लेष्मकासीलिहेदेवमवलेहंमुहुर्मुहुः ॥

अर्थ–कचोरा, अतिविष, नागरमोथा, कांकडाशिंगी, काकडाचे झाड, हरीतकी, आलें; आणि सुंठ, हीं समभाग घेऊन चूर्ण करून तें ताकाच्या निवळीशीं हिंग व सैंधव घालून वारंवार चाटावयास द्यावें; ह्मणजे कफकास नाश पावतो.

## बिभीतकधारण.

बिभीतकंघृताभ्यक्तंगोशकृत्परिवेष्टितं ॥
स्विन्नमेतन्निहंत्याशुकासमास्यविधारितं ॥

अर्थ–बहेडेदळाचें चूर्ण तुपांत मळून त्याला पानें बांधून त्याच्या बाहेरून शेण थापून भाजून काढावें, तें मुखांत धरिलें असतां; कासाचा नाश करितें.

## भद्रमुस्तादि चूर्ण.

भद्रमुस्ताकणाचूर्णसमांशंमधुनासह ॥
निहंतिभक्षितंशीघ्रंश्लेष्मकासंनसंशयः ॥

अर्थ–नागरमोथा व पिंपळी, यांचे समभाग चूर्ण मधाशीं भक्षणार्थ द्यावें; ह्मणजे श्लेष्मकास नाश पावतो.

## पथ्यादि चूर्ण.

पथ्याविश्वाकणामुस्तादेवदारुःसमांशकं ॥
एतच्चूर्णमधूपेतंश्लेष्मकासापनुत्तये ॥

अर्थ–हरीतकी, सुंठ, पिंपळी, नागरमोथा व देवदार यांचें समभाग चूर्ण एकत्रकरून मधाशीं द्यावें; ह्मणजे श्लेष्मकासाचा नाश करितें.

## चित्रकादि चूर्ण.

चित्रकंपिप्पलीमूलंपिप्पलीगजपिप्पली ॥
एतच्चूर्णसमंयुक्तंमधुनाश्लेष्मकासनुत् ॥

अर्थ–चित्रकमूळ, पिंपळीमूळ, पिंपळी व गजपिंपळी यांचें चूर्ण समभाग एकत्र करावें; आणि मधाशीं द्यावें; ह्मणजे श्लेष्मकासाचा नाश करितें.

## शिलादि लेह.

शिलाव्योषाभयाहिंगुविडंगसैंधवंसमं ॥
लेह्यंसाज्यमधुश्वासहिक्काकासेषुशस्यते ॥

अर्थ–मनशीळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, हरीतकी, हिंग, वावडिंग व सैंधव यांचें चूर्ण मध व तूप यांशीं द्यावें; तें श्वास, उचकी व कास यांवर उत्तम आहे.

## व्योषादि घृत.

व्योषाजमोदचित्रकजीरकषड्ग्रंथिचव्यकल्कितंसर्पिः ॥
कफकासश्वासहरंवासकरससाधितंसमधु ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, अजमोद, चित्रक जिरें, वेखंड व चवक, या समभाग औषधांचा कल्क करून त्यांत तूप, अडुळशाचा रस व मध घालून सेवन केला असतां; तें कफसंबंधि कासश्वासांचा नाश करितें.

## कटुत्रयादि चूर्ण.

कटुत्रयंपावकदेवदारुरास्नाविडंगत्रिफलामृतानां ॥
चूर्णसमांशंसितयासमेतंकासंजयेद्विष्णुगदेवदैत्यान् ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, चित्रक, देवदार, रास्ना, वावडिंग, हरडा, बेहडा व आवळकाठी, यांचे चूर्ण साकर घालून द्यावें; ह्मणजे कासाचा नाश करितें.

## बोलबद्धरस.

रसभस्मविषंतुल्यंबोलाद्याद्विगुणंमतं ॥ बोलतालकपाठाग्निककोटीमाक्षिकंनिशा ॥ कंटकारीयवक्षारंलांगलीजीरसैंधवं ॥ मधूकसारसंचूर्णस

सप्ताहंचार्द्रकद्रवैः ॥ छायायांभावयेत्पश्चात्सप्ताहंचिंचकद्रवैः ॥ गुटिकाब दराकाराश्लेष्मकासापनुत्तये ॥भक्षयेद्बोलबद्धोयंरसःस्यात्श्वासपांडुजित् ॥

अर्थ—पारदभस्म व बचनाग हीं समानभाग, व बोळ, हरताळ, पाहाडमूळ, काकडाचें झाड, सुवर्णमाक्षिक, हळद, रिंगणी, जवखार, कळलावी, जिरें, सैंधव, ज्येष्ठीमध व जाई यांचे चूर्ण सातदिवस आल्याच्या रसांत खलावें; नंतर छायाशुष्क करून सातदिवस चित्रकाच्या रसाच्या भावना देऊन गोळी बोराएवढी करावी, ती कफरोग, श्वास व पांडुरोग यांवर द्यावी.

## दंतीधूम.

दंतिमूलस्यधूमंवानिर्गुंडींचापियोजयेत् ॥
श्लेष्मकासंनसंदेहोधूमपानेनतत्क्षणात् ॥

अर्थ—दांतीच्या मुळांचा किंवा निर्गुंडीचा धूम घ्यावा; ह्मणजे तो श्लेष्मकासाचे तत्क्षणीं निवारण करितो.

## उरःक्षतकासनिदान.

अतिव्यवायभाराध्वयुद्धाश्वगजनिग्रहैः ॥
रूक्षस्योरःक्षतंवायुर्गृहीत्वाकासमावहेत् ॥

अर्थ—अतिमैथुन, अतिओझें घेणें, अतिमार्गगमन, मल्लयुद्ध, अश्व व गज, यानां मोठ्या श्रमानें आवरणें इत्यादिकारणानीं रूक्ष देहिपुरुषाचा कुपित वायु उराचे ठायीं क्षत करून कास उत्पन्न करितो.

## क्षतकासलक्षण.

सपूर्वंकासतेशुष्कंततःष्ठीवतिशोणितं ॥ कंठेनरुजतात्यर्थंविभिन्नेनेव चोरसा ॥ सूचीभिरिवतीक्ष्णाभिस्तुद्यमानेनशूलिना ॥ दुःखस्पर्शेन शूलेनभेदपीडाभितापिना ॥ पर्वभेदज्वरश्वासतृष्णावैवर्ण्यपीडितः ॥ पारावतइवाकूजन्कासवेगात्क्षयोभवेत् ॥

अर्थ—उरःक्षतकासाचा ठायीं रोग्यास कोरडी ढास व तोंडावाटे रक्तमिश्रित व कफयुक्त थुंका, कंठात वेदना, खोकता खोकता उर फाटतो असा भास, त्यात दाभण टोंचल्यासारिखा व हृदयस्फोटजनितपीडा व संताप इहीं करून युक्त व दुस्पर्श असा शूल होतो, तेणेंकरून रोगी फार पीडा पावतो; व सांधे दुखून नंतर ज्वर, श्वास, तृष्णा व स्वरभेद यांही पीडित होतो; व क्षतोद्भवकासाच्या योगेकरून पारव्यासारिखा घुमतो असें जाणावें.

## क्षयकासनिदान.

विषमासात्म्यभोज्यातिव्यवायाद्वेगनिग्रहात् ॥ घृणिनांशोच

तांनृणांव्याप्यंतेग्नौत्रयोमलाः ॥ कुपितास्क्षयजंकासंकुर्युर्देहक्षयप्रदं ॥

अर्थ–विषम व न सोसणारें अन्नाचें भोजन, अतिमैथुन, मलमूत्रादिकांच्या वेगाचें धारण, यांपासून किंवा अत्यंत दया व शोक यांला करणाऱ्या मनुष्यांच्या अग्नीला कफादिदोष मंद करितात; व ते कोपून क्षतक्षयनिमित्तक व देहक्षयकारक अशा खोकल्याला उत्पन्न करितात.

## क्षयकासलक्षण.

सगात्रशूलज्वरदाहमोहात्प्राणक्षयंचोपलभेच्चकासी ॥ शुष्कंविनिष्ठी वतिदुर्बलस्तुप्रक्षीणमांसोरुधिरंसपूयं ॥ तंसर्वलिंगंभृशदुश्चिकित्स्यंचि कित्सितज्ञाःक्षयजंवदंति ॥ इत्येषक्षयजःकासोक्षीणानांदेहनाशनः ॥ साध्योबलवतांवास्याद्याप्यस्त्वेषनवोत्थितः ॥

अर्थ–ज्या क्षयकासरोग्याचा सांध्याचे ठायीं शूल, ज्वर, दाह व मोह हे होतात, तो रोगी आणि जो क्षयकासरोगी दुर्बल होऊन पूयमिश्रित रुधिर तोंडावाटे थुंकतो, व ज्याचें सर्व मांस क्षीण झालें, त्या कासाला वैद्य त्रिदोषात्मक, परम दुश्चिकित्स्य, क्षयजन्यकास असें ह्मणतात. हा क्षयजकास क्षीण झाल्यापुरुषांचा देह नाश करितो; आणि बलवंत मनुष्याचा कदाचित् साध्य किंवा याप्य होतो.

## साध्यासाध्यविचार.

नवैकदाचित्साध्येतामपिपादगुणान्वितौ ॥ स्थविराणांजराकासःसर्वो याप्यःप्रकीर्तितः ॥ त्रीन्पूर्वान्साधयेत्साध्यान्पथ्यैर्याप्यांस्तुयापयेत् ॥

अर्थ–जेव्हां नवोत्पन्नक्षयकासरोगी, वैद्य, परिचारक व द्रव्य इत्यादिगुणेंकरून युक्त आहे, तेव्हां तो रोगी कदाचित् झाला तर साध्य होतो; व वृद्ध रोग्याचा जो जराकास, तो सर्व याप्य जाणावा; आणि वातादिजनित तीन प्रकारचे जे कास ते साध्य; ते औषधानें बरे करावे; व याप्यकास पथ्येंकरून कमी करावा.

## चिकित्साप्रक्रिया.

कासेतुक्षतजेबल्यैपाचनैर्बृंहणैरपि ॥
शमनैःपित्तकासघ्नैरन्यैश्चमधुरौषधैः ॥

अर्थ–क्षयकासाला पाचन, पौष्टिक व शमन; आणि पित्तकासाला शमविणारीं औषधें व दुसरीं मधुर औषधें याणीं शमवावा.

यवागुंवापिबेत्सिद्धांक्षतोरस्कःसुशीतलां ॥ इक्ष्विक्षुवालिकापद्ममृणा लोत्पलचंदनैः ॥ शृतांपेयांमधुयुतांसंधानार्थंपिबेत्क्षती ॥

अर्थ–उरःक्षतकासीरोग्यानें ऊंस, कसईचें बीज, कमळाचीं बिसें, निळें कमळ, व चंदन याणीं सिद्ध केलेली शीतळ यवागू क्षतसंधानार्थ प्राशन करावी.

## इक्ष्वाद्यावलेह.

इक्षिक्षुवालिकापद्ममृणालोत्पलचंदनैः ॥ मधुकंपिप्पलीद्राक्षालाक्षा शृंगीशतावरी ॥ द्विगुणाचतुगाक्षीरीसितासर्वैश्चतुर्गुणा ॥ लिह्यात्तंम धुसर्पिभ्र्यांक्षतकासनिवृत्तये ॥

अर्थ–ऊंसाचा रस, लघु कसई, कमळाचीं बिसें, (देंठी) कमळ, पांढरा चंदन, ज्येष्ठीमध, पिंपळी, द्राक्षें, लाख, कांकडशिंगी व शतावरी हीं समभाग, २ भाग वंशलोचन व सर्वऔषधांच्या चौपट साकर घेऊन अवलेह सिद्ध करावा; व त्यांत मध व तूप घालून चाटीत जावा; ह्मणजे क्षतकास जातो.

## मंजिष्ठाद्यचूर्ण.

मंजिष्ठमूर्वानतवन्हिपाठाकृष्णाहरिद्राविदधीतचूर्णाः ॥
क्षौद्रेणकासेविलिहेत्क्षतोत्थेपिबेद्घृतंचेक्षुरसेविपक्कं ॥

अर्थ–मंजिष्ठ, मूर्वा, तगर, चित्रक, पाहाडमूळ, पिंपळी व हळद, यांचें चूर्ण मधाबरोबर चाटावें; किंवा उसाचे रसांत तूप शिजवून प्यावें; हे दोन ही योग क्षतजकासावर प्रशस्त आहेत.

## क्षुद्रावलेह.

समूलकंटकारिचचपलाचपलाजटा ॥ अपामार्गस्यबीजानिजीर्णसामुद्रकंतथा ॥ मधुनालेहयेत्सर्वंकासश्वासहरंपरं ॥ उरःक्षतक्षयेतीव्रेकफरक्तवमीषुच ॥

अर्थ–पंचांगरिंगणी, पिंपळी, पिंपळमूळ, आघाड्याचें बीं, जिरें, आणि सैंधव, यांचा लेह सिद्ध करून द्यावा, तो खोकला, दमा, उरःक्षत, आणि कफरक्तवांति यांचा नाश करितो

## तारेश्वररस.

रसपादंमृततारंशिलाताप्यंचतुर्गुणं ॥ वासाचेक्षुरसाभ्यांचमर्दयेत्प्रहर द्वयं ॥ द्वियामंवालुकायंत्रेस्वेद्यमादायचूर्णयेत् ॥ गुंजाद्वयंनिहंत्याशु कासंक्षतभवंध्रुवं ॥ रसस्तारेश्वरोनामह्यनुपानंचकथ्यते ॥ दाडिमंत्रिफला॰षंत्रयाणांचसमंगुडं ॥ चूर्णितंभक्षयेत्कर्षंक्षतकासापनुत्तये ॥

अर्थ–पारा १भाग, रौप्यभस्म पाऱ्याच्या चतुर्थांश, मनशीळ व सुवर्णमाक्षिक, हीं चतुर्गुण घेऊन अडुळसा व उसांचा रस यांत दोन प्रहर मर्दन करावीं; आणि काचकुपींत भरून वालुकायंत्रांत दोन प्रहर पचवून काढून वाटून त्यांतून दोन गुंजा हा तारेश्वर रस डाळिंब,

त्रिफळा, सुंठ, मिरीं, पिंपळी व या सर्वांसमान गूळ घालोन यांच्या एक तोळा चूर्णाशीं द्या; ह्मणजे क्षतक्षयकासाचा नाश करितो.

## सूर्यरस.

रसमेकंद्विधागंधंत्रितार्प्यंपंचतालकं ॥ सर्वशुद्धंविचूर्ण्याथचतुर्भागमृताभ्रकं ॥ वचाकुष्ठहरिद्राग्निटंकणंसैंधवंविषं ॥ सपाठालांगलीव्योषंसर्वंप्रत्येककर्षकं ॥ भावितंभृंगिसारेणदिनैकंतंचभक्षयेत् ॥ माषःसूर्यरसोनामहिक्कावैस्वर्यकासजित् ॥ अष्टगुंजामितंभक्ष्यंविख्यातारसपर्पटी ॥ त्रिकंटमूलशुंठीचअजाक्षीरसमोदकं ॥ क्षीरावशिष्टंतंक्काथंसकणंपाययेन्निशि ॥

अर्थ–पारा १, गंधक २, सुवर्णमाक्षिक ३, हरताळ ५ व अभ्रकभस्म ४ भाग आणि वेखंड, कोष्ठ, हळद, चित्रक, टांकणखार, सैंधव, बचनाग, पाहाडमूळ, कळलावी, सुंठ मिरीं व पिंपळी, हीं प्रत्येकीं एकेक तोळा घेऊन सर्व चूर्णें एकत्र करून माक्याच्या रसांत एक दिवस खल करावा. हा सूर्यरस एक मासा द्यावा; ह्मणजे उचकी, स्वरभंग व खोकला यांचा नाश करितो; किंवा ८ गुंजा रसपर्पटी घेऊन नंतर रात्रीं गोखरू, सुंठ, शेळीचें दूध व दुधाबरोबर पाणी घालोन दूध शेष राही तों काढा करावा. त्यांत पिंपळीचें चूर्ण घालोन द्यावा.

## पिप्पल्यादिलेह.

पिप्पलीपद्मकंलाक्षासुपक्वंबृहतीफलं ॥
घृतक्षौद्रयुतोलेहःक्षयकासनिबर्हणः ॥

अर्थ–पिंपळी, पद्मकाष्ठ, लाख व चांगलें पिकलेलें रिंगणीचें फळ हीं समभाग घेऊन वाटून त्यांचा तूप व मध यांशीं लेह करून सेवन केला; ह्मणजे क्षयकासाचा नाश करितो.

## कुलित्थगुड.

कुलित्थानांशतपलंदशमूलंतथाशतं ॥ शतब्राह्मणयष्ट्याव्हाचतुर्गुणजलेशृतं ॥ पादावशेषतःपूतेगुडस्यार्धतुलांपचेत् ॥ पाकंज्ञात्वावतार्यैवंसुशीतेश्लक्ष्णचूर्णितं ॥ षट्पलंचतुगाक्षीर्यापिपल्याद्विपलंतथा ॥ कुडवंमधुनादद्यात्स्थापयेद्भाजनेशुभे ॥ खादेदग्निबलापेक्षीनाशयेदचिराद्गदान् ॥ यक्ष्माणंपित्तजंकासंश्वासंजीर्णमजीर्णकं ॥ जीर्णज्वरंपांडुरोगंत्दद्रोगंश्लेष्ममारुतौ ॥ कुलित्थगुडइत्युक्तःसर्वोपद्रवनाशनः ॥

अर्थ-कुळीथ ४०० तोळे, दशमुळें ४०० तोळे, व भारंगमूळ ४०० तोळे घेऊन १६०० तोळे पाण्यांत काढा करून चतुर्थांश उतरून घ्यावा, त्यांत गुळ २०० तोळे घालून चांगला पाक करून उतरावा. निवाल्यावर २४ तोळे वंशलोचन ८ तोळे पिंपळी व १६ तोळे मध घालून चांगल्या भांड्यांत भरून ठेवावा. त्यांतून अग्नि व बल पाहून द्यावा; ह्मणजे क्षय, पित्तकास, श्वास, आंगांत जिरलेलें अजीर्ण, जीर्णज्वर, पांडुरोग, हृद्रोग, आणि कफवात, यांचा व संपूर्ण उपद्रवांचा हा कुलित्थगुड नाश करितो.

## वासाकूष्मांडावलेह.

पंचाशतपलंस्विन्नंकूष्मांडंप्रस्थमाज्यतः ॥ पक्कंपलशतंखंडंवासाक्काथाढकेपचेत् ॥ शुभ्राधात्रीघनोभार्ङीत्रिसुगंधिश्चकर्षकैः ॥ एलोपविषधान्याकमरिचैश्चपलांशकैः ॥ पिप्पलीकुडवंचैवमधुमानंप्रदापयेत् ॥ कासंश्वासंक्षयंहिक्कांरक्तपित्तहलीमकान् ॥ हृद्रोगमम्लपित्तंचपीनसंचव्यपोहति ॥

अर्थ- २०० तोळे कोहळ्याचे तुकडे घेऊन ते ६४ तोळे तुपांत घालून पचन करावे. त्यांतून शंभर तोळे तुकडे घेऊन अडुळशाच्या २५६ तोळे काढ्यांत शिजवून त्यांत वंशलोचन, आवळकाठी, नागरमोथा, भारंगमूळ, तज, तमालपत्र व एलची हीं प्रत्येक तोळा तोळा; आणि एलची, अतिविष, धनें व मिऱ्यें हीं प्रत्येकीं ४ तोळे; आणि पिंपळी १६ तोळे व मध ३२ तोळे, घालून भरून ठेवावा. त्यांतून हा वासकूष्मांडावलेह अग्नि व बल पाहून द्यावा; ह्मणजे खोकला, श्वास, क्षय, उचकी, रक्तपित्त, हलीमक, हृद्रोग, अम्लपित्त आणि पडसें यांचा नाश करितो.

## ककुभलेह.

चूर्णंककुभविपिष्टंवासकरसभावितंसुबहुवारान् ॥
मधुघृतसितोपलाभिर्लेह्यंक्षयकासपित्तहरं ॥

अर्थ-अर्जुनवृक्षाच्या सालीचें चूर्णास अडुळशाचे रसाच्या पुष्कळ भावना देऊन मध, तूप व खडीसाकर यांच्या बरोबर चाटावें, तें क्षयकास व पित्त यांचे नाशक आहे.

## पिप्पल्यादि घृत.

पिप्पलीगुडसंसिद्धंछागक्षीरयुतंघृतं ॥
एतदग्निविवृध्यर्थमुक्तंचक्षयकासिनां ॥

अर्थ-पिंपळी व गुळ यांणी सिद्ध केलेलें तूप शेळीच्या दुधाबरोबर प्यावें, तें क्षयकासी याचा अग्नि प्रदीप्त करण्याविषयीं प्रशस्त आहे.

## पिप्पल्यादिलेह.

पिप्पलीमधुकंपिष्टंकषायंससितोपलं ॥ प्रस्थैकंगव्यमाज्यंचक्षीरमिक्षुरसस्तथा ॥ यवगोधूममृद्वीकाचूर्णमामलकीरसं ॥ तैलंचप्रसृतांशानितत्सर्वंमृदुवन्हिना ॥ पचेल्लोहंघृतक्षौद्रयुक्तःसश्वासकासनुत् ॥ क्षयत्हृद्रोगकासघ्नोहितोवृद्धाल्परेतसाम् ॥

अर्थ—पिंपळी व जेष्ठीमध कुटून त्यांच्या चूर्णाचा काढा साकर मिळविलेलें गाईचें दूध, तूप व उंसाचा रस हीं प्रत्येकीं ६४ तोळे, सातूचें पीठ, गव्हांचें पीठ, द्राक्षे आवळयांचा रस व शिरसाचें तेल हीं प्रत्येकीं ८ तोळे घेऊन एकत्र मृदुवन्हीनें पक्क करावीं; ह्मणजे हा लेह होतो. तो मध व तूप यां बरोबर चाटावा; ह्मणजे श्वास, कास, क्षय व त्हृद्रोग यांचा नाशक आणि वृद्ध व अल्पवीर्य पुरुष यांस हितकारक आहे.

## स्वयमग्निरस.

शुद्धसूतंद्विधागंधंकुर्यात्खल्वेचकज्जलीं ॥ तयोःसमंतीक्ष्णचूर्णमर्दयेत्कन्यकाद्रवैः ॥ द्वियामांतेकृतंगोलंताम्रपात्रेविनिःक्षिपेत् ॥ आच्छाद्यैरंडपत्रेणयामार्धेत्युष्णतांव्रजेत् ॥ धान्यराशौन्यसेत्पश्चाद्द्विदिनांतेसमुद्धरेत् ॥ संपेष्यगालयेद्वस्त्रेसत्यंवारितरंभवेत् ॥ त्रिकटुत्रिफलाचैलाजातीफललवंगकं ॥ एतेषांनवभागानांसमंपूर्वरितंभवेत् ॥ संचूर्ण्यलोडयेत्क्षौद्रैर्भक्ष्यंनिष्कद्वयंद्वयं ॥ स्वयमग्निरसोनामक्षयकासनिकृंतकः ॥ इंद्रवारुणिकामूलंभृंगीकृष्णातिलैःसह ॥ भक्षयेत्क्षयकामार्तोनिष्कमात्रंप्रशांतये ॥

अर्थ—शुद्ध पारा १ भाग व गंधक २ भाग घेऊन त्याची कज्जली करावी; आणि कज्जलीच्या समान तिख्याचें चूर्ण घालून तें कोरफडाच्या रसांत दोन प्रहर घोटून गोळा करावा, तो ताम्रसंपुटांत घालून त्यावर एरंडाचीं पानें दडपून चार घटका तसाच ठेवावा; ह्मणजे ऊष्ण होतो. नंतर साळीच्या राशींत दोन दिवस पुरून ठेवावा, तिसरे दिवशीं काढून घोटून वस्त्रावर गाळावा; ह्मणजे पाण्यावर तरणारा लोह होतो. तो लोह व सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहेडा, आवळकाठी, एलची, जायफळ व लवंगा या नऊ जिनसांचें चूर्णासमान लोह मिळवून तो मधाशीं आठमासे पर्यंत द्यावा. हा स्वयमाग्निरस क्षयकासाचा नाश करितो; अथवा वृंदावनाचें मूळ, भांग, पिंपळी आणि तीळ यांशीं ४ मासे द्यावा; ह्मणजे क्षयकासाची शांति करितो.

## सन्निपातकास.

सन्निपातभवोह्येषःक्षयकासःसुदारुणः ॥
सन्निपातहितंतस्मात्कार्यमत्रचिकित्सितं ॥

अर्थ–हा दारुणक्षयकास सन्निपातापासून होतो. या करितां जे सन्निपातावर हित कारक उपाय तेच उपाय यावर करावे.

## अमृतादिकाढा.

अमृतानागरफंजीव्याघ्रिपर्णीसुसाधितः ॥

क्काथःपिप्पलिचूर्णाढ्यःकासश्वासौजयत्यलं ॥

अर्थ–गुळवेल, सुंठ, फांज, रिंगणी व सालवण यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे खोकला आणि दमा यांचा शीघ्र नाश करितो.

## भांर्ग्यादिकाढा.

भार्ङ्गीसनागरासिंहीकुलित्थंमूलकंतथा ॥

पिबेत्पिप्पलिचूर्णेनकासश्वासंव्यपोहति ॥

अर्थ–भारंगमूळ, सुंठ, रिंगणी, कुळीथ व मुळे यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून प्यावा; ह्मणजे खोकला आणि दमा यांचा नाश करितो.

## स्वरसादियोग.

स्वरसंशृंगवेरस्यमाक्षिकेणसमन्वितं ॥

पाययेच्छ्वासकासघ्नंप्रतिश्यायकफापहं ॥

अर्थ–आल्याच्या रसांत मध घालून प्यावयास द्यावा; ह्मणजे श्वास, खोकला, पडसें, आणि कफ यांचा नाश करितो.

## मरीच्यादिचूर्ण.

सेवितंमधुखंडाभ्यांचूर्णंमरिचजंयदि ॥

किमर्थंक्रियतेचिंताकासश्वासपराजितैः ॥

अर्थ–मध व साकर यांशीं मिऱ्यांचें चूर्ण दिलें असतां; खोकलेकरी व दमेकरी याणी चिंता कशा करितां करावी.

## कुलित्थादिकाढा.

कुलित्थंकंटकारीचतथाब्राह्मणयष्टिका ॥

शुंठीसुरभिसंयुक्तःकासश्वासज्वरापहः ॥

अर्थ–कुळिथ, रिंगणी, भारंगमूळ, संठ आणि राळ यांणी युक्त काढा करावा. तो खोकला, श्वास, आणि ज्वर यांचा नाश करितो.

## पुष्करादिकाढा.

पौष्करंकट्फलंभार्ङ्गीविश्वपिप्पलिसाधितं ॥

पिबेत्क्वाथंकफोद्रेकेकासेश्वासेचत्द्द्रदे ॥

अर्थ–पुष्करमूळ, कायफळ, भारंगमूळ, सुंठ, आणि पिंपळी यांचा काढा करून द्यावा, तो कफाधिक दमा, खोकला आणि हृद्रोग यांचा नाश करितो.

## कुनटयादिलेह.

कुनटीसैंधवंव्योषविडंगामरुहिंगुभिः ॥

लेहःसाज्यमधुःकासहिक्काश्वासनिवारणः ॥

अर्थ–मनशीळ, सैंधव, सुंठ, मिरीं, पिंपळी, वावडिंग, अमरु, आणि हिंग, यांचा लेह करून त्यांत तूप व मध घालोन द्यावा; तो खोकला, उचकी व श्वास यांचे निवारण करितो.

## बर्हिपादादि व मरिचादिलेह.

श्वासकासहराबर्हिपादाचक्षौद्रसर्पिषा ॥

लिह्यान्मरिचचूर्णवासघृतक्षौद्रशर्करं ॥

अर्थ–पिंवळ्या टेंटूचें चूर्ण मध व तूप घालोन द्यावें; किंवा मिऱ्यांचें चूर्ण तूप, साकर आणि मध यांतून द्यावें.

## भांर्ग्यादिचूर्ण.

भांर्गीशुंठिकणाचूर्णगुडेनश्वासकासनुत् ॥ संयुतोमधुसर्पिभ्यांचूर्ण त्रिकटुसंभवं ॥ निहंतितरसाकासंश्वासानिवसतांहरिः ॥

अर्थ–भारंगमूळ, सुंठ व पिंपळी यांचें चूर्ण गुळाशीं, किंवा सुंठ, मिरीं व पिंपळी यांचें चूर्ण मध व तूप यांतून द्यावें; ह्मणजे श्वासकासाचा नाश होतो.

## घनादिगुटी.

घनविश्वशिवागुडजागुटिकात्रिदिनंवदनांबुजमध्यधृता ॥

हरतिश्वसनंकसनंललनेललनेवहिमंत्हृदयेनिहिता ॥

अर्थ–नागरमोथा, सुंठ व हरितकी यांचें चूर्ण करून त्याची गुळांत कालवून गोळी करावी, ती तीन दिवस तोंडांत धरिली असतां; श्वास व कास यांचा नाश करित्ये.

## निर्गुंड्यादिघृत

निर्गुंडीरसभागैकंरसाच्चतुर्गुणंघृतं ॥ पाच्यंघृतावशेषंचचव्यंवन्हिविडंगकं ॥ चतुर्जातंकटुःकुष्ठंसमंचूर्ण्यघृतेपचेत् ॥ अष्टमांशघृतंचूर्णंनिर्गुंड्याख्यंघृतंपिबेत् ॥ यवागूःकृष्णशाल्यस्तुतंडुलैःपरिपाचितैः ॥ निर्गुंडीघृतसंयुक्तंकासश्वासहरंपिबेत् ॥

अर्थ–निगडीचा रस १ भाग, व त्याच्या चौपट तूप घालोन तो तूप शेष राही तों पचवून त्यांत चवक, चित्रक, वावडिंग, दालचिनी, एलची, तमालपत्र, नाकेशर, मोहो ग्या व कोष्ठकोळिंजन यांचें चूर्ण घृताच्या अष्टमांश घालून घृताबरोबर पचन करावें; नंतर काळे साळीचा पेजबुडा भात घालोन पचन करावे, तें निर्गुंडीघृत खोकला व दमा यांच्या नाशनार्थ प्राशन करावें.

## धूमपान

अपामार्गस्यपंचांगंसंपिष्टंनलिकारसैः ॥ तल्लिप्तवस्त्रेवालिप्यता लकंचमनःशिला ॥ तंक्षिप्त्वाग्नौपिबेत्धूमंसप्ताहंश्वासकासजित् ॥

अर्थ–आघाडयाचें पंचांग घेऊन बारीक वाटून तें नलुकाच्या रसांत कालोन त्यांत हरताळ व मनशीळ घोटून त्याचा वस्त्रास लेप करावा, सुकल्यावर अग्निसंयोगानें धूर घ्यावा; ह्मणजे सातदिवसांत श्वास व कास यांचा नाश होतो.

## वारुणीपत्रधूम.

उत्तरावारुणीपत्रंशालितंडुलतालकं ॥ संपेष्यगुटिकाकार्या बदरांडप्रमाणकं ॥ मुखीतंडुलपिष्टेनकर्तव्याछिद्रसंयुता ॥ दीप्तांगारेवटींक्षिप्त्वामुखमाच्छादयेत्ततः ॥ धूममेरंडनालेन पिबेद्भुक्तोत्तरंशनैः ॥ तांबूलपूरितमुखंपथ्यंक्षीरोदनंहितं ॥ तत्क्षणान्नाशयेत्कासंसिद्धयोगउदाहृतः ॥

अर्थ–वृंदावनाचीं पानें, साळीचे तांदुळ व हरताळ हे एकत्र वाटून गोळी बोराच्या आंठीएवढी करून ती तांदळांच्या पिठांची चिलीम करून तींत ठेऊन वर अग्नि ठेऊन त्यावर झांकण ठेउन एरंडाच्या नळीनें भोजनोत्तर धूम प्राशन करावा. वर विडा खावा; आणि पथ्याला दूधभात द्यावा; ह्मणजे तत्क्षणीं खोकला नाश पावतो. हा सिद्ध योग सांगितला आहे.

## हेमगर्भपोटली.

रसस्यभागाश्चत्वारस्तावंतःकनकस्यच ॥ तयोश्चपिष्टिकांकृत्वागंधो द्वादशभागिकः ॥ कुर्यात्कज्जलिकांतेषांमुक्ताभागाश्चषोडश ॥ चतु र्विंशश्चशंखस्यभागैकंटंकणस्यच ॥ एकत्रमर्दयेत्सर्वंपक्वनिंबूकजैरसैः ॥ कृत्वातेषांततोगोलंमूषासंपुटकेन्यसेत् ॥ मुद्रांदत्वाततोहस्तमात्रेग र्तेचगोमयैः ॥ पुटेद्गजपुटेनैवस्वांगशीतंसमुद्धरेत् ॥ पिष्टागुंजाचतु र्मानंदद्यात्क्षौद्राज्यसंयुतं ॥ एकोनत्रिंशदुन्मानमरिचैःसहदीयते ॥

राजतेमृन्मयेपात्रेकाचजेवावलेहयेत् ॥ लोकनाथसमंपथ्यंकुर्याच्छुचितमानसः ॥ कासेश्वासेक्षयेवातेकफग्रहणिकागदे ॥ अतिसारेप्रयोक्तव्यापोटलीहेमगर्भिका ॥

अर्थ–पारा चार भाग व सोन्याचें बारीक चूर्ण चार भाग घेऊन दोन्हीं एकाजागीं चांगलें पीठ होई तोंपर्यंत खलोन पाऱ्याचे बारा भाग गंधक घेऊन त्यांत खलोन तिहीं-चा खल करून कज्जली करावी; नंतर पाऱ्याचे सोळा भाग मोतीं, चोवीस भाग शंख व १ भाग टांकणखार घेऊन त्या औषधांत मेळवून पिकल्या निंबाचे रसांत खलोन त्या-चा गोळा करून मातीचे शरावसंपुटांत घालोन त्याला कापडमाती करून १ हात खाडा खणून त्यांत गाईचे शेणाच्या गोवऱ्या घालोन त्यांत तो शरावसंपुट ठेऊन गज-पुट अग्नि द्यावा. थंड जाल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध घेऊन खलून ठेवावें. या-ला हेमगर्भपोटली असें ह्मणतात. हा हेमगर्भ ४ गुंजा प्रमाण २९ मिऱ्यांचे चूर्णाशीं रुप्याचे पात्रांत अथवा मातीचे अथवा कांचेचें प्याल्यांत गाईचें तूप घालोन ध्यावा; व अंतःकरण स्वस्थ करून लोकनाथरसासारखें पथ्य करावें. तेणेंकरून श्वास, कास, क्षय रोग, वातविकार, कफ, संग्रहणी व अतिसार हे रोग दूर होतात.

## कासविधूननरस.

रसभागोभवेदेकोगंधकोद्वौतथैवच ॥ यवक्षारंत्रिभागंस्याद्रुचकंचचतुर्गुणं ॥ मरीचंपंचभागंस्याच्छुद्धंरसविमर्दितं ॥ कासंपंचविधंहन्याच्छ्वासंपंचविधंहरेत् ॥

अर्थ–पारा १ भाग, गंधक २ भाग, जवखार ३ भाग, पादेलोण ४ भाग, मिरें ५ भाग, हीं शुद्ध घेऊन आल्याच्या रसांत खलोन घ्यावें; ह्मणजे ५ प्रकारचे श्वास, ५ प्रकारचे खोकले यांचा नाश करील.

## ताम्रपर्पटी.

मृतंताम्रंत्रिभागंचरसंगंधंचतत्समं ॥ भागमेकंवत्सनाभंकज्जलींखल्वमध्यगां ॥ गोघृतेनकृतंकल्कंलोहपात्रेविपाचयेत् ॥ ढालयेदर्कपत्रस्थपर्पटीरससिद्धये ॥ गुंजाद्वयंत्रयंचैवपिप्पलीमधुसंयुतं ॥ त्रिःसप्तरात्रयोगेनरोगराजंचनाशयेत् ॥ आर्द्रकस्यरसेनैवसन्निपातंनियच्छति ॥ त्रिफलाखंडसंयुक्तंसर्वपांडुविनाशयेत् ॥ वातारितैलसंयुक्तंसर्वशूलनिवारणं ॥ कुमारीरसयोगेनवातपित्तोपशांतये ॥ बाकुचीरससंयुक्तंसर्वदद्रुविनाशनं ॥ त्रिफलामधुसंयुक्तंसर्वमेहनिवारणं ॥ खदिरक्काथपानेनकुष्ठाष्टादशनाशनं ॥ मंथानभैरवेणोक्तालोकानांहितकाम्यया ॥

अर्थ–ताम्रभस्म, पारा व गंधक हे प्रत्येकीं २ भाग व बचनाग १ भाग यांची कज्जली करून गाईच्या तुपांत खलून लोखंडाचे पात्रांत पक्व करून रुईच्या पानावर ओतावी; ह्मणजे पर्पटीरस सिद्ध होतो. हा दोन किंवा तीन गुंजा मध व पिंपळी बरोबर २१ दिवस खावा; ह्मणजे राजयक्ष्मा, नाश पावेल. आल्याचे रसाबरोबर सेवन केला तर सन्निपाताचा नाश करील. त्रिफळा व खडीसाकर यांच्या अनुपानानें सर्व पांडुरोग, एरंडेल तेलाचे अनुपानानें शूल, कोरफडीचे रसाचे अनुपानानें वातापित्त, बांबचीचे रसाच्या अनुपानानें सर्व कुष्ठ, त्रिफळा व मध यांच्या अनुपानानें सर्व मेह, खैराचे काढ्याच्या अनुपानानें अठरा कुष्ठें, याप्रमाणें अनुपानभेदानें ते ते रोग नाशील. हा मंथानभैरवानें लोकांचे हितार्थ पर्पटीरस सांगीतला आहे.

## कंटकार्यादि चूर्ण.

कंटकार्याःकणायाश्चचूर्णंसमधुकासहृत् ॥

अर्थ–रिंगणी व पिंपळी यांचें चूर्ण मधाशीं द्यावें, तें खोकल्याचा नाश करितें.

## लवंगादिचूर्ण.

लवंगजातीफलपिप्पलीनांभागाश्चकल्प्याक्षसमानपूर्वाः ॥ पलार्धमानंमरिचंप्रदेयंपलानिचत्वारिमहौषधस्य ॥ सितासमस्तेनसमाप्य चूर्णंरोगानिमानाशुबलान्निहंति ॥ कासज्वरारोचकमेहगुल्मश्वासाग्निमांद्यग्रहणीविकारान् ॥

अर्थ–लवंगा, जायफळ व पिंपळी हीं एक तोळा, बेहेडा ३ तोळे, मिरीं २ तोळे व सुंठ १६ तोळे, या सर्वचूर्णांबरोबर साकर घालून द्यावें; तें चूर्ण खोकला, ज्वर, अरुचि, मेह, गुल्म, श्वास, अग्निमांद्य, आणि संग्रहणी यांचा नाश करितें.

## बिभीतकादि चूर्ण.

द्वौभागौचबिभीतक्याभागैकंपिप्पलीयुतं ॥
चूर्णंमधुयुतंलेह्यंकासरोगहरंपरं ॥

अर्थ–बेहेडा २ भाग व पिंपळी १ भाग यांचें चूर्ण एकत्र करून मधाशीं द्यावें. तें खोकल्याचा नाश करण्याविषयीं उत्कृष्ट आहे.

## पंचकोलादिचूर्ण.

पिप्पलीपिप्पलीमूलंशुंठीचूर्णंबिभीतकं ॥
मधुनालेहयेच्चाशुहरेत्कासंत्रिदोषजं ॥

अर्थ–पिंपळी, पिंपळमूळ, सुंठ, आणि बेहेडे यांचें चूर्ण मधाशीं द्यावें, तें त्रिदोषज कासाचा नाश करितें.

## बदरीकल्क.

बदरीपत्रकल्कंवाघृतभृष्टंससैंधवं ॥
ज्वरोपघातेश्वासेचलेहमेतंप्रयोजयेत् ॥

अर्थ–बोरीचे पानाचा कल्क करून त्यांत सैंधव घालून तुपावर तळावा, तो स्वरभंग व श्वास यांवर द्यावा.

## कर्पूरादि चूर्ण.

कर्पूरवालकंकोलजातीफलदलंसमं ॥ लवंगंनागमरिचंकृष्णा शुंठीविवर्धिता ॥ चूर्णंसितासमंग्राह्यंरोचनंक्षयकासजित् ॥ वैस्वर्यश्वासकासघ्नंछर्दितृष्णाक्षयापहं ॥

अर्थ–कापुर, वाळा, कंकोळ, जायफळ व जायपत्री हे समभाग; आणि लवंगा नाकेशर, मिरीं, पिंपळी आणि सुंठ हे एकोत्तर वृद्धीनें घेऊन चूर्ण करावें, त्या सर्व चूर्णाबरोबर साकर घालावी; आणि द्यावें. तें रोचक आहे; आणि क्षयकास, स्वरभंग, श्वास, कास, ओकारी, यांचा नाश करितें.

## त्रिकटुकादिचूर्ण.

कटुत्रिकंछिन्नलताकृशानुफलत्रिकंवेल्लभवंसरासना ॥
सशर्करंचूर्णमिदंतुसेव्यंकासाटवीदाहदवानलाख्यं ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, गुळवेल, चित्रकमूळ, हरडा, बेहेडा, आवळकाठी, मिरीं व रासना यांचें चूर्ण करावें, तें साकर घालून द्यावें; ह्मणजे कासरूप अरण्याला अग्नी सारिखें जाळून टाकितें.

## देवदार्वादिचूर्ण.

देवदारुबलारास्नात्रिफलाव्योषपद्मकैः ॥
सविडंगैःसितातुल्यंतच्चूर्णंसर्वकासनुत् ॥

अर्थ–देवदार, चिकणा, रास्ना, हरडा, बेहेडा, आवळकाठी, सुंठ, मिरीं, पिंपळी, पद्मकाष्ठ व वावडिंग, यांचें चूर्ण करून तें समान साकर घालून द्यावें; ह्मणजे सर्व कासांचा नाश करितें.

## द्विक्षारादि.

द्वौक्षारौपंचमूलानिपंचैवलवणानिच ॥ सठीनागरकोदीच्यकल्कंवा वस्त्रगालितं ॥ पाययेद्घृतोन्मिश्रंसर्वकासमिवर्हणं ॥

अर्थ–जवखार, साजेखार, पंचमुळें; व जवखार, पुष्कर, साजेखार, पळस व तिळ

नाळ यांचे क्षार; कचोरा, सुंठ व काळावाळा यांचा कल्क करून तो वस्त्रावर गाळावा; त्यांत तूप घालून द्यावा; ह्मणजे तो संपूर्ण कासांचा नाश करितो.

## ग्रंथिकादि.

ग्रंथिकमागधिकाक्षमहौषधैरचितंचूर्णमिदंमधुनायुतं ॥
हरतिकासभवंदरमाततंविविधदोषहरंचनिषेवितं ॥

अर्थ-पिंपळीमूळ, पिंपळी, बेहडा व सुंठ यांचें चूर्ण मधाशीं द्यावें; ह्मणजे तें खोकल्याची भीति व अनेक दोष यांचा नाश करितें.

## कटुत्रिकादि.

कटुत्रिकंचचूर्णितंगुडेनसर्पिषायुतं ॥
निहंतिकासजंदरंनिषेवणंनिरंतरं ॥

अर्थ-सुंठ, मिरीं व पिंपळी यांचें चूर्ण गूळ व तूप यांशीं फार दिवस द्यावें; ह्मणजे खोकल्याच्या भयाचा नाश करितें.

## हरीतक्यादिगुटी.

हरीतकीकणाशुंठीमरिचंगुडसंयुतं ॥
कासघ्नोमोदकःप्रोक्तोपरंचानलदीपनः ॥

अर्थ-हरीतकी, पिंपळी, सुंठ व मिरीं यांचें चूर्ण गुळांतून द्यावें; ह्मणजे कास नाश पावतो; व दीपन आणि पाचन आहे.

## त्रिजातादि.

त्रिजातमर्धकर्षंचपिप्पल्यर्धपलंसिता ॥ द्राक्षामधुकखर्जूरंपलांशंश्लक्ष्णकल्कितं ॥ मधुनागुटिकाघ्नंतितावृष्याःपित्तशोणिते ॥ कासश्वासारुचिच्छर्दिमूर्छाहिध्मामदभ्रमान् ॥ क्षतक्षयेस्वरभ्रंशप्लीहशोषाढ्यमारुतान् ॥ रक्तनिष्ठीवहृत्पार्श्वरुक्पिपासाज्वरानपि ॥

अर्थ-दालचिनी, तमालपत्र व एलची हे अर्धतोळा, पिंपळी २ तोळे; व खडीसाकर, द्राक्षे, ज्येष्ठमध, खजूर, हीं प्रत्येकीं ४ तोळे घेऊन बारीक वाटून त्यांचा कल्क करावा. त्याचीं मधाशीं गोळी करून द्यावी, ती वृष्य आहे; व पित्तरक्त, दमा, खोकला, अरुचि, वांति, मूर्छा, उचकी, मद, भ्रम, क्षतक्षय, स्वरभ्रंश, प्लीहा, शोष, आढयवात, रक्ताची वांति, हृद्रोग, पार्श्वशूल, तांहान, आणि ज्वर यांचा नाश करित्ये.

## मरीच्यादिगुटी.

मरीचंकर्षमात्रंचपिप्पलीकर्षसंमिता ॥ अर्धकर्षोयवक्षारोकर्षयुग्मं

चदाडिमं ॥ एतच्चूर्णीकृतंयुंज्यादष्टकर्षगुडेनहि ॥ शाणप्रमाणगुटिकाकृत्वावक्त्रेविधारयन् ॥ अस्याःप्रभावात्सर्वेपिकासायांत्येवसंक्षयं ॥

अर्थ–मिरीं १ तोळा, पिंपळी १ तोळा, यवक्षार अर्धा तोळा व डाळिंबसाल २ तोळे या सर्वांचें चूर्ण करून त्यांत ८ तोळे गूळ घालोन ४ माशयांची गोळी करून तोंडांत धारण करावी. ह्या गोळीच्या प्रभावानें संपूर्ण प्रकारचे खोकले नाश पावतात.

## लवंगादिगुटी.

तुल्यालवंगमरिचाक्षफलत्वचस्युःसर्वैःसमोनिगदितःखदिरस्यसारः ॥

बब्बूलवल्कलकषाययुताविभाव्यात्कासान्निहंतिगुटिकाघटिकाष्टकांते ॥

अर्थ–लवंगा, मिरीं व बेहेडेदळ हीं तिन्हीं समभाग; व सर्वांच्या समान कात घालोन बाभळीच्या काढ्यांत घोटून गोळी करावी, ती तोंडांत धरिली असतां; ८ घटीका मध्यें खोकल्याच्या नाश करित्ये.

## धनंजयवटी.

धनंजयत्रिजातकंकणाजटाकटुत्रिकं ॥

रसार्द्रकेनभावितंजयेच्चकासमाततं ॥

अर्थ–अर्जुनसादडा, दालचिनी, तमालपत्र, एलची, पिंपळीमूळ, सुंठ, मिरीं, व पिंपळी यांचें चूर्ण आल्याच्या रसांत घोटून द्यावें, तें खोकल्याचा नाश करितें.

## खदिरादिगुटी.

खदिरंपौष्करंशृंगीकट्फलंद्विजयष्टिका ॥ हरीतकीलवंगंचव्योषंचातिविषंतथा ॥ कारवीयासममृताबृहतीद्वयमक्षकं ॥ पृथक्कर्षद्वयंग्राह्यं सूक्ष्मचूर्णंतुकारयेत् ॥ सर्वैःसमंखादिरंचमेलयित्वाविभावयेत् ॥ दाडिमत्वक्तथाक्षुद्राखादिरांभोभिरार्द्रकैः ॥ बब्बूलत्वग्दलैःक्वाथोश्चाटरूषजलंतथा ॥ सप्तधाभावयेद्बध्वागुटिकाखादिराभिधा ॥ कासश्वासौनिहंत्याशुदुस्तरौचिरजावपि ॥

अर्थ–कात, पुष्करमूळ, कांकडशिंगी, कायफळ, भारंगमूळ, हरीतकी, लवंग, सुंठ, मिरीं, पिंपळी, अतिविष, ओंवा, धमासा, गुळवेल, रिंगणी, डोरली व बेहेडेदळ हे प्रत्येक दोन तोळे घेऊन सूक्ष्म चूर्ण करून त्या सर्वचूर्णाबरोबर कात मिळवून डाळिंबाची साल, रिंगणी, खैराची साल, बाभळीची साल व पानें, अडुळसा, यांच्या काढ्यांत किंवा रसांत सातवेळ घोटावा. त्याची गोळी बांधावी, ती खादिरवटी खोकला व दमा हे फार दिवसांचे असले तरी त्यांचा नाश करित्ये.

## व्योषादिगुटी.

व्योषाम्लवेतसंचव्यंतालीसंचित्रकंतथा ॥ जीरकंतित्तिडीकंचप्रत्येकं कर्षभागिकं ॥ त्रिसुगंधित्रिशाणंस्याद्गुडःस्यात्कर्षविंशतिः ॥ सर्वमेकत्रसंकुष्यगुटिकाकर्षसंमिता ॥ भक्षयेत्प्रातरुत्थायसर्वान्कासान्व्यपोहति ॥ पीनसंश्वासमरुचिंस्वरभेदंव्यपोहति ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, आम्लवेतस, चवक, तालीसपत्र, चित्रकमूळ, जिरें व चिंच हे प्रत्येकीं, एकेक तोळा आणि तज, तमालपत्र व एलची, हे चार चार मासे व गूळ २० तोळे, हे सर्व एकत्र कुटून माशांची गोळी करावी. ती प्रातःकाळीं भक्षण करावी; ह्मणजे संपूर्ण खोकले, पडसें, श्वास, अरुचि, आणि स्वरभंग यांचा नाश करिते.

## पिप्पल्यादिगुटी.

सपिप्पलीपुष्करमूलपथ्याशुंठीशठीमुस्तकसूक्ष्मचूर्णं ॥
गुडेनयुक्तागुटिकाप्रयोज्याश्वासेषुकासेषुविवर्धितेषु ॥

अर्थ–पिंपळी, पुष्करमूळ, हरीतकी, सुंठ, कचोरा व नागरमोथा यांचें बारीक चूर्ण करून त्याची गुळांत गोळी करावी, ती वाढलेल्या कासश्वासावर द्यावी.

क्षवथौगंधनाशेचधूमपानंप्रयोजयेत् ॥

अर्थ–शिंक व गंधनाश जाहाल्यास धूमपान योजावें.

## अर्कमूलादिधूम.

अर्कमूलशिलेस्तुल्यंततोर्धेनकटुत्रिकं ॥ चूर्णितंवन्हिनिःक्षिप्तं पिबेद्धूमंतुयोगवित् ॥ भक्षयेदथतांबूलंपिबेद्दुग्धमथापिवा ॥
कासःपंचविधोयातिशांतिमाशुनसंशयः ॥

अर्थ–रुईचें मूळ व मनशिळ यांचे निमे सुंठ, मिरीं व पिंपळी यांचें चूर्ण अग्निवर टाकून त्याचा धूर घ्यावा; आणि वर विडा खावा किंवा दुध प्यावें; ह्मणजे पांच प्रकारचा खोकला शांत होतो, याविषयीं संशय नाहीं.

## मनःशिलादिधूम.

मनःशिलाभिर्मरिचमांसीमुस्तेंगुदीयुतं ॥ धूमंतस्यानुपचयं सुखोष्णंसगुडंपिबेत् ॥ एषकासान्पृथग्द्वंद्वसन्निपातसमुद्भवान् ॥ शतैरपिप्रयोगाणांसाधयेदप्रसाधितान् ॥

अर्थ–मनशिळ, मिरीं, जटामांसी, नागरमोथा व नेपती यांत गूळ मिश्र करून त्याचा सुखोष्ण धूर घ्यावा; ह्मणजे हा दोषज, द्वंद्वज, सान्निपातिक व शेंकडो औषधानीं बरे न होणारे खोकले शांत करितो.

## दुसरा प्रकार.

मनःशिलालिप्तदलंबदर्यातपशोषितं ॥
सक्षीरंधूमपानंचमहाकासनिबर्हणं ॥

अर्थ–बोरीच्या पानांला मनशीळ लाऊन उन्हांत वाळवून त्यानां चिलमीत घालून गुडगुडीवर ठेंऊन धूमपान करावें; ह्मणजे महाकासाचा नाश करितो.

## धत्तूरादिधूम.

पिष्ट्वात्रिपुटधत्तूरमूलव्योषमनःशिलाः ॥ तेनप्रलिप्यवसनंधूम
वर्तिंप्रकल्पयेत् ॥ धूमंतस्याःपिबेद्यस्तुकासोनश्येद्दिनत्रयात् ॥

अर्थ–धोतऱ्याचे मूळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, आणि मनशीळ एकत्र वाटून त्याणे वस्त्राला लेप करावा; नंतर सुकवून त्याची वात करावी, तिचा धूर प्राशन केला असतां; तीन दिवसांत खोकला नाश पावतो.

## जातिपत्रादिधूम.

जातिपत्रंशिलारालैर्योजयेद्गुग्गुलुंसमं ॥
अजामूत्रेणपिष्टोयंधूमःकासहरःपरः ॥

अर्थ–जायपत्री, मनशीळ, राळ, आणि गुग्गूळ हे समभाग घेऊन त्यांचा शेळीच्या मुतांत खल करावा; नंतर सुकवून धूर द्यावा, तो खोकल्याचा नाश करितो.

## जातिमूलादिधूम.

जातीजटाकिसलयैर्बदरीदलैश्चजातामसूरकफलैःसमनःशिलाभिः ॥
स्यात्धूमवर्तिरिहगुग्गुलुनासमेतैःकासेस्थितेबदरिकाग्निविदह्यमानैः ॥

अर्थ–जाईचे मूळ, जाईचा पाला, मसूरा, मनशीळ, आणि गुग्गुळ, यांत घोटून बोरीच्या पाल्याला लेप करून सुकवावी, ती चिलमींत ठेऊन वर बोरीचा अग्नि ठेवावा; आणि धूमपान करावें; ह्मणजे खोकला नाश पावतो.

## हरिद्राधूम.

रात्रिद्वयशिलाधूमपानात्कासश्रुतिःकुतः ॥
जलपानादपितथाक्षणेनक्षणदाक्षये ॥

अर्थ–हळद, दारुहळद व मनशीळ यांचा धूम पान करावा; किंवा उषःपान करावें; ह्मणजे कोणाचा खोकला शांत होणार नाही?

## बिभीतकावलेह.

अजस्यमूत्रस्यशतंपलानिशतंपलानांचकलिद्रुमस्य ॥
पक्कंसमध्वाशुनिहंतिकासंश्वासंचतद्वत्सबलंबलासं ॥

अर्थ—शेळीचें मूत ४०० तोळे व बेहेडेदळ ४०० तोळे एकत्र करून शिजवून अवलेह करावा; आणि तो अवलेह मधाशीं द्यावा; ह्मणजे खोकला, श्वास, आणि कफ, यांचा नाश करितो.

## कंटकार्यवलेह.

कंटकारींतुलांनीरेद्रोणेपक्त्वाकषायकं ॥ पादशेषंगृहीत्वाचतस्मिन्चूर्णानिदापयेत् ॥ पृथक्पलांशान्येतानिगुडूचीचव्यचित्रकं ॥ मुस्तकर्कटशृंगीचव्यूषणंधन्वयासकं ॥ भार्गीरास्नासठीचैवशर्करापलविंशतिः ॥ प्रत्येकंचपलान्यष्टौप्रदद्यात्घृतलोहयोः ॥पक्त्वालेहत्वजातेचशीतेमधुपलाष्टकं ॥ चतुःपलंतुगाक्षीरीपिप्पलीनांचतुःपलं ॥ क्षिप्त्वानिदध्यात्सुदृढेमृन्मयेभाजनेशुभे ॥ लेहोयंहंतिकासार्तिहिक्काश्वासानशेषतः॥

अर्थ—रिंगणी ४०० तोळे, पाणी २०४८ तोळे एकत्र करून चतुर्थांश काढा करून घ्यावा. त्यांत गुळवेल, चवक, चित्रक, नागरमोथा, कांकडशिंगी, सुंठ, मिरीं, पिंपळी, धमासा, भारंगमूळ, रास्ना व कचोरा, हीं प्रत्येकी चार चार तोळे; व साकर ८० तोळे व घृत ३२ तोळे व लोह ३२ तोळे अशीं एकत्र करून, शिजवावीं. लेहासारिखे झालें ह्मणजे थंड करून आंत मध ३२ तोळे, वंशलोचन १६ तोळे, आणि पिंपळी १६ तोळे, घालोन हा लेह मातीच्या घट्टभांडयांत ठेवावा; आणि त्यांतून द्यावा. हा खोकला, उचकी, संपूर्ण श्वास यांचा नाश करितो.

## अगस्तिहरीतक्यवलेह.

दशमूलीस्वयंगुप्ताशंखपुष्पीशठीबला ॥ हस्तिपिप्पल्यपामार्गपिप्पलीमूलचित्रकान् ॥ भार्गीपुष्करमूलंचाद्विपलांशंयवाढकं ॥ हरीतकीशतंचैवजलेपंचाढकेपचेत् ॥ यवैःस्विन्नैःकषायेचपूतंतच्चाभयाशतं ॥ पचेद्गुडतुलांदत्वाकुडवंचपृथग्घृतं ॥ तैलात्पिप्पलिचूर्णाच्चसिद्धशीतेचमाक्षिकात् ॥ लिह्याद्द्वेचाभयेनित्यमतःखादेद्रसायनं ॥ वलिंचपलितंहन्याद्वर्णायुर्बलवर्धनं ॥ पंचकासान्क्षयान्श्वासान्हिक्कांचविषमज्वरान् ॥ हन्यात्तथाग्रहण्यर्शोहृद्रोगारुचिपीनसान् ॥ अगस्तिविहितंधन्यमिदंश्रेष्ठंरसायनं ॥

अर्थ–दशमुळें, कवासकुहिरी, शंखाहुली, कचोरा, चिकणा, गजपिंपळी, अघाडा, पिंपळीमूळ, चित्रक, भारंगमूळ, पुष्करमूळ हीं प्रत्येकीं ८ तोळे; यव १०२४ तोळे, हरीतकी ४०० तोळे व पाणी ५१२० तोळे घालोन पचन करावें. यव शिजून कषाय झाला, ह्मणजे गाळून त्यांत ४०० तोळे हरीतकी घालोन शिजवावी; आणि गूळ ४०० तोळ, तूप १६ तोळे, तेल १६ तोळे व पिंपळीचें चूर्ण १६ तोळे घालोन सिद्ध करावा. खालीं उतरून थंड झाल्यावर मध १६ तोळे घालावा; आणि भरून ठेवावा. त्यांतून २ हरीतक्या नित्य खात जाव्या. हा हरीतक्यवलेह. वली, पलित, व ५ प्रकारचे कास, क्षय, श्वास, उचकी, विषमज्वर, संग्रहणी, मुळव्याध, अरुचि व पडसें यांचा नाश करितो; आणि वर्ण, आयुष्य व बल हीं वाढवितो. हा अगस्तिनें सांगितला, याला हरीतकीलेहरसायन ह्मणतात.

## व्याघ्र्यादिघृत.

व्याघ्रीस्वरसविपक्वंरास्नाकट्फलगोक्षुरव्योषैः ॥
सर्पिःस्वरोपघातंनिहंतिकासंचपंचविधं ॥

अर्थ–रिंगणीच्या स्वरसांत रास्ना, कायफळ, गोखरू, सुंठ, मिरीं, पिंपळी, आणि तूप घालून तें सिद्ध करावें; आणि द्यावें; ह्मणजे स्वरभंग व पांच प्रकारचा खोकला यांचा नाश होतो.

## गुडूच्यादिघृत.

सर्पिर्गुडूचीवृषकंटकारीक्वाथेनकल्केनचसिद्धमेतत् ॥
पेयंपुराणज्वरकासशूलप्लीहाग्निमांद्यग्रहणीगदेषु ॥

अर्थ–गुळवेल, अडुळसा व रिंगणी यांचा काढा व कल्क यांत सिद्ध केलेलें घृत जीर्णज्वर, खोकला, शूल, प्लीहा, अग्निमांद्य, आणि संग्रहणी यांवर द्यावें.

## त्र्यूषणादिघृत.

त्र्यूषणंत्रिफलाद्राक्षाकाश्मर्याटपरूषकं ॥ द्वेपाठेदेवदार्व्यब्दसगुडूचि त्रकंसठी ॥ व्याघ्रीतामलकीमेदाकाकनासाशतावरी ॥ त्रिकंटकंविदारीचपिष्टाकर्षसमान्घृतात् ॥ प्रस्थंचतुर्गुणंक्षीरेसिद्धंकासहरंपिबेत् ॥ ज्वरगुल्मारुचिप्लीहाशिरोहृत्पार्श्वशूलनुत् ॥ कामलार्शोनिलाष्ठीलाक्षतशोपक्षयापहं ॥ त्र्यूषणंनामविख्यातंघृतमेतन्महोत्तमं ॥

अर्थ–सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहडा, आवळकाठी, द्राक्षें, शिवण, अडुळसा, पाहाडमूळ, वल्लीपाडळ, देवदारु, नागरमोथे, कवासकुहिरी, चित्रक, कचोरा, रिंगणी, भुयआवळी, मेदा, कावळी, शतावरी, गोखरूं व भुयकोहळी हीं सर्व एकेक तोळा, तूप

६४ तोळे व दूध २५६ तोळे घालून घृत सिद्ध करावें. तें खोकला, ज्वर, गुल्म, अरुचि प्लीहा व मस्तक, हृदय, पार्श्व, यांतील शूल; कावीळ, मुळव्याध, वाताष्ठीला, क्षतक्षय व क्षय यांचा नाश करितें. हे त्र्यूषणनामक घृत महाविख्यात आहे.

## कंटकारीघृत.

समूलफलपत्रायाःकंटकार्यारसाढकं ॥ घृतप्रस्थंबलाव्योषविडंगशठि दाडिमं ॥ सौवर्चलंयवक्षारंविश्वामलकपौष्करैः ॥ वृश्चिवद्बृह तीपथ्यायवानीचित्रकादिभिः ॥ मृद्वीकाचव्यवर्षाभूदुरालभाम्लवेत सैः ॥शृंगीतामलकीभार्ङ्गीरास्नागोक्षुरकैःपचेत् ॥ कल्कैस्तुसर्वकासे षश्वासहिध्मासुशस्यते ॥ कंटकारीघृतंसिद्धंपंचकासनिषूदनं ॥

अर्थ–रिंगणीच्या पंचांगाचा रस १०२४ तोळे, तूप ६४ तोळे व चिकणा, सुंठ, मिरीं, पिंपळी, वावडिंग, कचोरा, डाळिंब, पादेलोण, जवखार, सुंठ, आवळकाठी, पुष्करमूळ, रक्त, पुनर्नवा, रिंगणी, हरीतकी, ओंवा, चित्रकमूळ, द्राक्षे, चवक, श्वेतपुनर्नवा, दुरालभा, आम्लवेतस, काकडशिंगी, भुइआंवळी, भारंगमूळ, रास्ना, गोखरू यांचा काढा व कल्क घालून तूप सिद्ध करावें; तें संपूर्ण प्रकारचा खोकला, श्वास व उचकी यांवर देण्यास प्रशस्त आहे. हें सिद्ध कंटकारीघृत पांच प्रकारच्या खोकल्याचा नाश करितें.

## दुसरा प्रकार.

कंटकार्यातुलांक्षुण्णांकृत्वाद्रोणेंभसःपचेत् ॥ तेनाढकेनक्काथस्यघृतप्र स्थंपिचून्मितैः ॥ रास्नादुस्पर्शपड्ग्रंथिपिप्पलीद्वयचित्रकैः ॥ सौवर्चल यवक्षारकृष्णामूलैश्चतज्जयेत् ॥ कासश्वासकफष्ठीवहिध्मारोचकपीनसान् ।

अर्थ–रिंगणी ४०० तोळे कुटून २०४८ तोळे पाण्यांत तीं निमी आटे तों काढा करून त्यांत तूप ६४ तोळे व रास्ना, धमासा, पिंपळीमूळ, पिंपळी, गजपिंपळी, चित्रक, पादेलोण, यवखार, पिंपळीमूळ हीं एकेक तोळा घालोन तें घृत सिद्ध करावें. तें कंटकारीघृत खोकला, दमा, कफाची वांति, उचकी, अरुचि, आणि पडसें यांचा नाश करितें.

## भार्गोत्तरवटी.

रसगंधकणापथ्याकलिद्रुफलवासकः ॥ भार्ङ्गीचेतिक्रमाद्वृद्ध्यमेतज्जं बीरजद्रवैः ॥ अष्टाविंशत्तमानेतान्कुर्यात्क्षौद्रेणगोळकान् ॥ कर्षप्र माणमेतस्यतमेकंप्रातरुत्थितः ॥ अद्यान्मासत्रयंक्षुद्राक्काथंदशकणायु तं ॥ पिबेत्तदनुकासाच्चश्वासाच्चपरिमुच्यते ॥

अर्थ–पारा, गंधक, पिंपळी, हरीतकी, बेहडा, अडुळसा व भारंगमूळ हीं क्रमवृद्धी

ने घेऊन त्याचें चूर्ण करून लिंबाच्या रसांत घोटून मधाशीं तोळयाची एक अशा अठ्ठावीस गोळया करून त्यांतून दररोज एक या प्रमाणे तीन महिने भक्षण कराव्या; आणि मागून दाहा पिंपळया वाटून प्याव्या; ह्मणजे खोकला आणि श्वास यां पासून मुक्त होतो.

## पर्पटी.

भागौरसस्यद्वावेकौद्वावेकौलोहभस्मनः ॥ एतद्द्रुतेद्रवीभूतंमृद्वग्नौक दलीदले ॥ पातयेद्गोमयगतेतथैवोपरियोजयेत् ॥ ततःपिष्ट्वाद्रवैरेभि र्मर्दयेत्सप्तधापृथक् ॥ भार्ङीशुंठीमुनिवराजयानिर्गुंडिकाद्रवैः ॥ व्यो षवासककन्यार्द्रद्रवैःशुष्कैःपुटेल्लघु ॥ अगंधखर्परोनाम्नापर्पटीतिरसो भवेत् ॥ सर्वरोगहरःस्वैस्वैरनुपानैर्द्विमाषतः ॥ तांबूलपत्रसहितः कास श्वासहरःपरः ॥ सकणःसुरसाक्काथोनुपानंवासगोजलं ॥

अर्थ–पारा बारा भाग व लोहभस्म बारा भाग हे मंदाग्निवर पातळ करून केळीच्या पानांवर ओतावें; नंतर भारंगमूळ, सुंठ, पुंडरीकवृक्ष, टाकळी, निर्गुंड, सुंठ, मिरीं, पिंपळी, अडुळसा, कोरफड व आलें यांच्या काढयांत किंवा रसांत घोटून लघु पुट द्यावें. तो अगंधखर्परनामक रस होतो याला पर्पटी ह्मणतात. हा अनुपानाशीं २ गुंजा प्रमाणें दिली असतां; संपूर्णरोगांचें हरण करितें. हा विडयाशीं घ्यावा. मागून तुळशीच्या काढयांत पिंपळी घालोन प्यावा; किंवा गोमूत्र प्यावें; ह्मणजे कास व श्वास यांचा नाश होतो.

## कासश्वासविधूननरस.

रसभागोभवेदेकोगंधकद्वौतथैवच ॥ यवक्षारास्त्रिभागःस्याद्रुचकं चचतुर्गुणं ॥ मरिचंपंचभागंस्याच्छुद्धंरसविमर्दितं ॥ कासंपं चविधंहन्याच्छ्वासंपंचविधंतथा ॥

अर्थ–पारा १ भाग, गंधक २ भाग, यवक्षार ३ भाग, पादेलोण ४ भाग व मिरीं ५ भाग, हे सर्व शुद्ध घेऊन पारदाशीं खलावें; आणि द्यावें; ह्मणजे ५ प्रकारचा खोकला व पांच प्रकारचा श्वास यांचा नाश करितात.

## गुरुपंचमूलीकाढा.

अतःपरंकोमलवाणिकासश्वासप्रतीकारमुदीरयामि ॥ निहंतिकासंगुरुपंचमूलक्कतःकषायश्चपलासहायः ॥

अर्थ–हे कोमलवाणि चंद्रकले इतउपर कासश्वासप्रतीकार सांगतो. बृहत्पंचमुळांचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे खोकल्याचा नाश होतो.

## वासादिकाढा.

वासाहरिद्राधनिकागुडूचीभार्ङ्गीकणापौष्कररिंगणीनां ॥
क्काथेनमारीचरजोन्वितेनकासःक्षयंयातिनकस्यपुंसः ॥

अर्थ–अडुळसा, हळद, धने, गुळवेल, भारंगमूळ, पिंपळी, पुष्करमूळ व रिंगणी यांचा काढा मिऱ्यांचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे कोणाचा खोकला नाश पावत नाहीं.

## सिंहीकषाय.

अयिरत्नकलेनीलनलिनच्छदनेक्षणे ॥
सिंहीकषायःसकणःकासग्रासकरःक्षणात् ॥

अर्थ–हे कमलनेत्रे रत्नकले रिंगणीचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे खोकल्याचा क्षणांत ग्रास करितो.

## वृषादिकाढा.

पुलोमजावल्लभसूनुपत्नीतातात्मभूशेखरवाहनस्य ॥
सौंदर्यदूरीकृतरामरामेकषायकःकाससमीरसर्पः ॥

अर्थ–अडुळशाचा कषाय कासवायुला सर्पाप्रमाणें भक्षितो.

## आर्द्रकावलेह.

आर्द्रादर्धतुलागुडादपितथार्धाभ्रंचकुस्तुंबरीदीप्यायोजरणा
त्रिजातकटुकादेतत्पचेद्युक्तितः ॥ लेहोरत्नकलेतवैवकथि
तःप्राणप्रियायामयाकासार्शोज्वरपीनसश्वयथुहृग्गुल्मक्षयध्वंसनः ॥

अर्थ–आलें २०० तोळे, गूळ २०० तोळे, धने २ तोळे व ओवा, लोह, जिरें, दालचिनी, तमालपत्र, एलची, कटुकी या प्रत्येकांचें चूर्ण २ तोळे करून युक्तीनें पचन करून लेह करावा. हा खोकला, मुळव्याध, ज्वर, पडसें, सूज, गुल्म, आणि क्षय यांचा नाश करितो.

## व्याघ्रीहरीतक्यवलेह.

समूलपुष्पच्छदकंटकार्यातुलाजलेद्रोणपरिप्लुताच ॥ हरीतकीनांच
शतंनिदध्यादेतत्तुपक्त्वाचरणावशेषं ॥ गुडस्यदत्वाशतमेतदग्नौविप
क्कमुत्तार्यततःसुशीते ॥ कटुत्रिकंचत्रिपलप्रमाणंपलानिपट्पुष्परस
स्यचापि ॥ क्षिपेच्चतुर्जातपलंयथाग्निप्रयुज्यमानोविधिनावलेहः ॥ वा
तात्मकंपित्तकफोद्भवंचद्विदोषकासानपिसन्निपातान् ॥ क्षतोद्भवंका

सक्षयंचहन्यात्सपीनसश्वासमुरःक्षतंच ॥ यक्ष्माणमेकादशमुग्रभूयंभृ
गूपादिष्टंहिरसायनंस्यात् ॥

अर्थ-रिंगणीचें पंचांग ४०० तोळे व ४०० तोळे हरीतकी घेऊन तीचा २०४८ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून त्यांत ४०० तोळे गुळ घालून चांगला लेह होण्याजोगा पाक झाला ह्मणजे उतरून थंड झाल्यावर त्यांत सुंठ, मिरीं व पिंपळी हीं चार चार तोळे व मध २४ तोळे; व दालचिनी, तमालपत्र, एलची, नाकेशर हीं चार तोळे घालून त्यांतून सोसेल तसा द्यावा; ह्मणजे वात, पित्त, कफ, द्विदोष, सन्निपात यांपासून झालेले व क्षतकास, क्षयकास, पीनस, उरःक्षत, एकादशरूप क्षय यांचा नाश करितो. हें रसायन भृगूनें सांगितले आहे.

## कासकंडनावलेह.

अजामूत्रंशतपलंमंदाग्नौगुडपाकवत् ॥ पक्त्वाबिभीतकंचूर्णंपलद्वय
मितंक्षिपेत् ॥ पलंपिप्पलिचूर्णंचपलमात्रंमृतायसं ॥ कंटकारीफल
रजोनिःक्षिपेच्चपलद्वयं ॥ ततोमापद्वयंखादेट्टंककर्षमथापिवा ॥ क्षौ
द्ररंभांबुनावापिसर्वकासात्प्रमुच्यति ॥ असाध्यमपिजात्यक्ताचिरजा
पथ्यवर्जिताः ॥ येकासास्तेरवनेनाशुप्रणश्यंतिनसंशयः ॥ कासकं
डननामायंयोगआत्रेयभाषितः ॥

अर्थ-शेळीचें मूत ४०० तोळे, मंदाग्नीवर गुडपाकासारिखें आटवून त्यांत बेहड्याचें चूर्ण ८ तोळे, पिंपळीचें चूर्ण ४ तोळे, मृतलोह ४ तोळे, रिंगणीच्या फळाचें चूर्ण ८ तोळे घालून एकत्र करावें; ह्मणजे तो कासकंडन अवलेह झाला. त्यांतून दोन मासे, दाहा मासे, किंवा तोळा घेऊन तो मधाशीं किंवा केळीच्या उदकाशीं द्यावा; ह्मणजे जे फार दिवसांचे वैद्यानीं सोडिले, आणि पथ्यहीन असे कासरोग शीघ्र नाश करितो. हा आत्रेयानीं सांगितला.

## हेमगर्भपोटली.

शुद्धसूतंत्रिभागंचतत्समंलोहभस्मच ॥ भागैकंगंधकंदद्यात्तदर्धंस्वर्ण
मेवच ॥ कज्जलींकारयेत्तत्तुखल्वकेसप्तवासरं ॥ अथनिर्गुंडिकाद्रा
वैर्मर्दयेद्दिनसप्तकं ॥ अथवाकनकद्रावैर्गुटिकांकारयेत्ततः ॥ किंचि
च्छलिसमायुक्तवस्त्रेगोलंनिधायच ॥ बध्नीयात्पोटलीमेवंततश्चत्रिपु
टंपचेत् ॥ दृढमृन्मयपात्रस्थेगंधंदत्वाधरोत्तरं ॥ तन्मध्येपोटलींन्य
स्यनिर्वातभवनांतरं ॥ वितस्तिप्रमितांगर्तांतस्यांसंस्थाप्यमुद्रयेत् ॥

अंगुलीमुद्रिकाभिश्चज्वालयेदिंधनानिच ॥ यामेनसिद्धतांयातिहेमग र्भाख्यपोटली ॥ अनुपानानुसारेणसर्वरोगेषुयोजयेत् ॥

अर्थ शुद्ध पारा ३ भाग, लोहभस्म ३ भाग, गंधक १ भाग, व सुवर्ण अर्धा भाग, यांची खलांत कज्जली करून तिला निर्गुंडीच्या रसांत सात दिवस भावना द्यावी; आणि धोतऱ्याच्या रसांत खलून गोळी करावी, ती विरळ वस्त्रांत बांधावी; आणि ती मातीच्या भांड्यांत गंधक घालून मध्यें गोळी ठेवून वर गंधक घालावा; आणि निर्वात जागेंत वीतभर खळी काढून तींत तें पात्र ठेवून त्यावर मुद्रा द्यावी. तीवर माती अंगुळभर घालून त्यावर एक प्रहर लांकडांचा अग्नी द्यावा; ह्मणजे हेमगर्भपोटलीरस सिद्ध होतो, हा अनुपानाशीं सर्व रोगांवर द्यावा.

## हेमगर्भ.

रसस्यभागाःश्चत्वारस्तदर्धंकनकस्यच ॥ तदर्धंताम्रकंचैवमौक्तिकंवि द्रुमंसमं ॥ तत्समानेनबलिनासर्वंखल्वेविमर्दयेत् ॥ कृत्वातुगोलकं पश्चात्पचेद्भूधरयंत्रके ॥ मृदुनावन्हिनाचैवस्वांगशीतंसमुद्धरेत् ॥ ब लिमेवचसम्यग्वैषड्गुणंजारयेत्सुधीः ॥ हेमगर्भरसोनामत्रिषुलोकेषु विश्रुतः ॥ कासश्वासेषुसर्वेषुशूलेषुचहितस्तथा ॥ तत्तद्रोगानुपाने नसर्वान्रोगान्जयेत्परं ॥

अर्थ—पारा ४ भाग, सुवर्ण २ भाग, ताम्रभस्म १ भाग, मौक्तिक ११ भाग, पोवळें १ भाग व गंधक १ भाग हे सर्व खलांत घालून काजळा सारिखें खलून त्याचा गोळा करून तो भूधरयंत्रांत मंदाग्निनें. पचन करावा. स्वांगशीत झाल्यावर काढून पुनः गंधकाशीं खलून पुनः पुट द्यावें; या प्रमाणें षड्गुण गंधक जारण करावा. हा हेमगर्भ रस तीन ही लोकांत कास, संपूर्ण श्वास, शूल, यांचा नाश कर्ता प्रसिद्ध आहे; आणि तो रोगोक्त अनुपानाशीं सर्वरोगांचा नाश करितो.

## दुसरा प्रकार.

शुद्धसूतंपलंचैकंपादांशंशुद्धहेमकं ॥ शुद्धगंधस्यमाषैकंप्रतिकर्षेणयो जयेत् ॥ त्रयमेकत्रकुर्वीतश्लक्ष्णचूर्णंचकारयेत् ॥ सुदृढंबंधयेद्वस्त्रेब हिःसूतंसमंबलिं ॥ वस्त्रंगृहीत्वागुटिकातदंतर्बंधयेत्पुनः ॥ शरावसंपु टेन्यस्यमुखेमुद्रांचकारयेत् ॥ भूमिसंपुटगंकृत्वाभूधराख्येपचेत्पुटे ॥ स्वांगशीतंसमुधृत्यत्यजेज्जीर्णंचगंधकं ॥ पुनःसंचूर्ण्यगुटिकासुदृढंबं

धयेद्भिषक् ॥ तयाबहिर्वलिंदत्वाभूधराख्येपुनःपचेत् ॥ एवंदत्वामु निपुटंरसस्याद्धेमगर्भकः ॥ श्वासकासेषुसर्वेषुशूलेसुविहितस्तथा ॥

अर्थ—शुध पारा ४ तोळे, शुद्ध सोनें १ तोळा व शुद्ध गंधक १ मासा प्रतिकर्षास, याप्रमाणें सर्व एकत्र करून त्यांचें बारीक चूर्ण करावें; आणि घट्ट वस्त्रांत बांधून त्या वस्त्राच्या बाहेरून पाऱ्या इतका गंधक घालून दुसरे वस्त्रानें चांगली गोळी बांधावी; नंतर शरावसंपुटांत ठेऊन तोंडावर मुद्रा द्यावी; आणि भूमीला खळगा काढून त्यांत संपुट ठेऊन वर माती लोटून त्यावर अग्नी देऊन पचन करावा. थंड झाल्यावर काढून जळका गंधक टाकून द्यावा. पुनः चूर्ण करून घट्ट गोळी बांधून पूर्ववत बाहेरून गंधक बांधून भूधरयंत्रांत पुन: पचन करावी. याप्रमाणें सात पुटें द्यावीं; ह्मणजे हेमगर्भ होतो. हा खोकला, दमा, व शूल यांवर हितकारक व अनुपानाशीं सर्व रोगांचा नाश करितो.

## कासकेसरी.

दरदंमरिचंमुस्तंटंकणंचाविषंसमं ॥ जंबीराद्भिश्वसंमर्द्यकुर्यान्मु द्गनिभांवटीं ॥ आर्द्रकस्वरसेनैवकासंश्वासंव्यपोहति ॥

अर्थ—हिंगुळ, मिरीं, नागरमोथा, टांकणखार व बचनाग, यांची जंबीररसांत खलून मुगां एवढी गोळी करावी, ती आल्याच्या रसाशीं द्यावी; ह्मणजे ती खोकला, आणि श्वास, यांचा नाश करिते.

## रसेंद्रवटी.

कर्षंशुध्दरसेंद्रस्यगंधकस्याभ्रकस्यच ॥ ताम्रस्यहरितालस्यलोहस्य चविषस्यच ॥ मरिचस्यचसर्वेषांश्लक्ष्णचूर्णंपृथक्पृथक् ॥ मानोल्वी खंडकर्षंचनिर्गुंडीकाकमाचिका ॥ केशराजभृंगराजस्वरसेनसुभावितं ॥ कलायपरिमाणांतुगुटिकांकारयेद्भिषक् ॥ कृत्वादौशिवमभ्यर्च्यद्विजा दीन्परितोपितान् ॥ जीर्णान्नोभोजयेत्पश्चात्क्षीरमांसरसाशनः ॥ अपिवै द्यशतैस्त्यक्तमम्लपित्तंनियच्छति ॥ कासंपंचविधंहंतिश्वासंचैवसुदुर्जयं ॥

अर्थ—शुद्ध पारा, गंधक, अभ्रक, ताम्र, हरिताल, लोह, बचनाग, आणि मिरीं यांचें बारीक चूर्ण करून तें निर्गुड, कावळी, निळामाका व माका यांच्या रसांत भावना देऊन वाटाण्या एवढी गोळी करून ती शिवाची पूजा करून, ब्राह्मणाला दानें देऊन गोळी घ्यावी; आणि अन्न जिरल्यावर पुन: भोजन करावें, ते क्षीर व मांसरस भक्षण करावें; ह्मणजे शेंकडों वैद्यानां बरें नहोणारें असें अम्लपित्त, ५ प्रकाचा खोकला; आणि दुर्जय श्वास यांचा नाश करितें.

## नीलकंठरस.

सूतकंगंधकंलोहंविषंचित्रकपत्रकं ॥ वरांगरेणुकामुस्ताग्रंथिकंनागकेसरं ॥ फलत्रिकंत्रिकटुकंशुल्बंतुल्यंतथैवच ॥ एतानिसममागानिगुडोद्विगुणमुच्यते ॥ संमर्द्यगुटिकांकृत्वाभक्षयेच्चणमात्रकं ॥ कासेश्वासेतथागुल्मेप्रमेहेविषमज्वरे ॥ मूत्रकृच्छ्रेमूढगर्भेवातरोगेचदारुणे ॥ नीलकंठरसोनामशंभुनानिर्मितःस्वयं ॥

**अर्थ**—पारा, गंधक, लोह, बचनाग, चित्रक, तमालपत्र, जाडी दालचिनी, पित्तपापडा नागरमोथा, पिंपळीमूळ, नागकेशर, हरडा, बेहेडा, आवळकाठी, सुंठ, मिरीं, पिंपळी व ताम्र हीं सर्व समभाग; व सर्वांच्या दुप्पट गूळ घालोन घोटून हरभऱ्या एवढी गोळी करून ती खोकला, दमा, गुल्म, प्रमेह, विषमज्वर, मूत्रकृछ्र, मूढगर्भ व वातरोग, यांवर भक्षण करावी. हा नीलकंठनामक रस शंभूनें स्वतः उत्पन्न केला.

## लोकनाथपोटली.

कृत्वाजंभरसेनगंधरसयोस्तत्तुल्यताम्रावृतंगोलंलावणयंत्रगर्भनिहितंरुध्वापचेत्तंशनैः ॥ यामानष्टकपर्दजेनसकलंतुल्येनतद्भस्मनायुक्तंचित्रकवारिणालघुतरंपिष्ट्वापुटंदापयेत् ॥ संशुद्धामितिपोटलींसहविषंमारीचचूर्णेनतांमृद्गीयादितिलोकनाथविधिनादौर्बल्यकाशादिषु॥ शोफामानिलगुल्मशूलकसनश्वासग्रहण्यार्शसीप्रौढेयक्ष्मणिपांडुरोगसहितेसंतापमांद्यारुचौ ॥

**अर्थ**—गंधक व पारा यांची कज्जली करून ती लिंबाच्या रसांत खलून त्या कज्जली इतका वजन तांब्याचा करंडा घेऊन त्यांत ती कज्जली भरून बंद करावा; आणि बोळक्यांत मीठ अर्धे भरून त्यांत तो करंडा मध्यें ठेऊन त्यावर तोंडापर्यंत मीठ घालोन तोंडावर पणती लाऊन मातकापड करून तें बोळकें आठ प्रहर अग्नींत पचन करावें. शीत झाल्यावर काढून त्या करंड्यासुद्धा वाटून त्यांत समभाग कवड्याचें भस्म घालोन चित्रकाच्या रसांत घोटून पुट द्यावें; नंतर काढून त्यांत बचनाग व मिऱ्यांचे चूर्ण घालून घोटावी. ही लोकनाथपोटली लोकनाथरसाप्रमाणे द्यावी; ह्मणजे दुर्बलता, कृशता, सूज, आमवात, गुल्म, शूल, खोकला, दमा, संग्रहणी अर्श, क्षयरोग, पांडुरोग, संताप अग्निमांद्य, आणि अरुचि, यांचा नाश करिते.

## अमृतार्णवरस.

पारदंगंधकंशुद्धंमृतलोहंचटंकणं ॥ रास्नाविडंगत्रिफलादेवदारुकटु

त्रयं ॥ अमृतापद्मकंक्षौद्रंविषंतुल्यांशचूर्णितं ॥ त्रिगुंजंसर्वकासार्तसे
त्रयेदमृतार्णवं ॥

अर्थ-पारा, गंधक, लोहभस्म, टाकणखार, राला, वावडिंग, त्रिफळा, देवदारु, त्रिकटु, गुळवेल, पद्मकाष्ठ, मध व बचनाग, हीं सर्व समभाग घेऊन चूर्ण करून तीन गुंजा सर्वकासानीं युक्त रोग्याला द्यावें, याला अमृतार्णव ह्मणतात.

## अग्निरस.

रसगंधकपिप्पल्योहरीतक्याक्षवासकः ॥ यष्ट्यांतरगुडंचूर्णंबब्बूलक्काथ
भावितं ॥ एकविंशतिवारेणशोषयित्वाविचूर्णयेत् ॥ भक्षयेन्मधुनाहं
तिकासमग्निरसोह्ययं ॥

अर्थ-पारा, गंधक, पिंपळी, हरीतकी, बेहडा, अडुळसा व ज्येष्ठीमध यांचे समभाग चूर्णास बाभळीच्या काढ्यांत एकवीस भावना द्याव्या; आणि वाळवून घोटून तें मधाशीं द्यावें; ह्मणजे खोकल्याचा नाश करितें, याला अग्निरस ह्मणतात.

## कासकर्तरी.

वंगंकृष्णाभयाक्षाटरूषभार्ङ्यःक्रमोत्तराः ॥ तत्समंखादिरंक्षा
रंबब्बूलक्काथभावितं ॥एकविंशतिवारंचमधुनाकासकर्तरी ॥
कासंश्वासंक्षयंहिक्कांहंत्येतन्नात्रसंशयः ॥

अर्थ-लवंग, पिंपळी, हरीतकी, बेहेडा, अडुळसा व भारंगमूळ हे क्रम वृध्दीनें घेऊन त्या सर्वांच्या समान खैराचा खार एकत्र करून बाभळीच्या काढ्यांत एकवीस वेळ भावना द्यावी. तो कासकर्तरीरस मधाशीं द्यावा; ह्मणजे खोकला, दमा, क्षय व उचकी यांचा नाश करितो, यांत संशय नाहीं.

## कफाग्निवटी.

कर्पूरमर्धकर्षमृगमदमपिदेवकुसुमयुगं ॥ मरिचंकणाक्षकुलिं
जनमेकैकंशुक्तिपरिमाणं ॥ दाडिमफलवल्कलपलमखिल
समंखदिरसारमवचूर्ण्य ॥ वटिकामुद्गसमानाकृताधृतास्ये
कफघ्नीस्यात् ॥

अर्थ-कापूर व कस्तूरी एकेक तोळा लवंगा २ तोळे, व मिरीं, पिंपळी, बेहेडा, कोळिंजन हीं प्रत्येकीं अर्धा तोळा; व डाळिंबाचीसाल ४ तोळे हीं सर्व काताशीं घोटून त्याची मुगाएवढी गोळी करून तोंडांत धरावी; ह्मणजे ती कफनाश करिते.

## कासपथ्य.

शालिषष्टिकगोधूममाषमुद्गकुलित्थकाः ॥ छाग्याःपयोघृतंबिंबीवार्ताकंबालमूलकं ॥ कासमर्दकजीवंतीवास्तुकंबीजपूरकं ॥ गोस्तनीलशुनंलाजाव्योषमुष्णोदकंमधु ॥ पथ्यमेतद्यथादोषमुक्तंकासगदातुरे ॥

अर्थ—साळी साठकी, गहूं, उडीद, मूग, कुळीथ व शेळीचें दूध व तूप, तोंडलें, वांगें, कोंवळे मुळे, कासिवदा, जीवंती, वास्तुक, महाळुंग, गोस्तनीद्राक्षे, लसुण, लाह्या, सुंठ, मिरीं, पिंपळी, ऊन पाणी, आणि मध हे पदार्थ कासरोगावर पथ्य सांगीतले आहेत.

## अपथ्य.

मैथुनंस्निग्धमधुरंदिवास्वापंपयोदधि ॥
पिष्टान्नंपायसादीनिकासीधूमंचवर्जयेत् ॥

अर्थ—मैथुन, स्निग्ध व मधुर पदार्थ, दिवा निद्रा, दूध, दहीं, पिष्टान्न, क्षिर, आणि धूम हे खोकलेकरीरोग्यानें सोडावें.

---

# हिक्काकर्मविपाक.

योकृत्वाब्राह्मणोभुंक्तेस्नानहोमजपादिकं ॥ सहिक्कारोगसंयुक्तस्तत्पापस्यापनुत्तये ॥ चांद्रायणत्रयंकुर्यात्त्रीन्कृच्छ्रांश्चसमाचरेत् ॥

अर्थ—जो ब्राह्मणस्नान, होम, जपादि नकरितां भोजनकरितो. तो (हिक्का) उचकी, रोगी होतो. त्याणें त्यापापापासून मुक्त होण्याकरितां तीन चांद्रायणें व तीन कृच्छ्र प्रायश्चित्त करावें.

## हिक्कानिदान.

विदाहिगुरुविष्टंभिरूक्षाभिष्यंदिभोजनैः ॥ शीतपानाशनस्नानरजोधूमातपानिलैः ॥ व्यायामकर्मभाराध्ववेगघातापतर्पणैः ॥ हिक्काश्वासश्चकासश्चनृणांसमुपजायते ॥

अर्थ—विदाहि (करीर, मद्य, मरीचकादिक) गुरु, विष्टंभि, रुक्ष, अभिष्यंदि, अशीं जीं अन्नें त्यांच्या भोजनें करून व शीतपान, शीताशन, शीतोदकस्नान, रज, धूम, उष्ण व वायु यांच्या संबंधानें व्यायाम, भार, अति मार्गगमन, मूत्रपुरीषादिवेगांचा अवरोध व अनशन इत्यादि कारणेंकरून मनुष्यांस उचकी, श्वास व खोकला हे उत्पन्न होतात.

## संप्राप्ति.

मुहुर्मुहुर्वायुरुदेतिसस्वनोयकृत्प्लिहांत्राणिमुखादिवाक्षिपन् ॥
सघोषवानाशुहिनस्तियस्माततस्तुहिक्केत्यभिधीयतेबुधैः ॥

अर्थ हृदयस्थ वायु कंठदेशस्थवायुला मिळून यकृत प्लीहा व आंतडी यांते आक्षित करीत वारंवार विलक्षण शब्दयुक्त मुखावाटे बाहेर निघतो; आणि हा वायु त्वरित प्राणनाश करितो, यास्तव या व्याधीला वैद्य हिक्का ह्मणजे उचकी असें ह्मणतात.

## हिक्केचे भेद सांगतों.

अन्नजांयमलांक्षुद्रांगंभीरांमहतींतथा ॥
वायुःकफेनानुगतःपंचहिक्काःकरोतिच ॥

अर्थ—अन्नजा, यमला, क्षुद्रा, गंभीरा, आणि महती या नांवेंकरून पांच प्रकारच्या उचक्या कफमिश्रित वायु उत्पन्न करितो, असें जाणावें.

## पूर्वरूप.

कंठोरसोगुरुत्वंचवदनस्यकषायता ॥
हिक्कानांपूर्वरूपाणिकुक्षेराटोपएवच ॥

अर्थ—कंठ व ऊर यांस गुरुत्व येतें, तोंड तुरट होतें; व कुशी वोढिल्यासारिख्या होतात. इत्यादि उचक्यांचीं पूर्वरूपें जाणावीं.

## सामान्यचिकित्सा.

यत्किंचित्कफवातघ्नमुष्णंवातानुलोमनं ॥
भेषजंपानमन्नंवाहिक्काश्वासेषुतद्धितं ॥

अर्थ—जें काहीं कफवातघ्न, उष्ण, वायूला अनुलोमन करणारें असें औषध, पान, अन्न, हे उचकी व श्वास याविषयीं हितकारक होतें.

हिक्काश्वासातुरेपूर्वंतैलाक्तेस्वेदइष्यते ॥
ऊर्ध्वाधःशोधनंशक्तेदुर्बलेशमनंमतं ॥

अर्थ—उचकी व श्वास यांणीं पीडित रोग्याला तैलाभ्यंग करून घाम काढावा; व सशक्त असल्यास वांति व रेचन द्यावें; व रोगी असला तर शमन हितकारक होतें.

प्राणावरोधतर्जनविस्मापनशीतवारिपरिषेकैः ॥
चित्रैःकथाप्रयोगैःशमयेद्धिक्कांमनोभिघातैश्च ॥

अर्थ—श्वास कोंडणें, भिवविणें, किंवा आश्चर्यकारक गोष्टी सांगणें, थंड पाणी आंगावर शिंपणें, आणि नानाप्रकारच्या गोष्टी सांगणें, किंवा मन खट्टु करणें, या उपचारानीं उचकी शमवावी.

## त्याज्यहिक्का.

वातेनहिक्काःप्रभवंतिपंचतासामसाध्यत्वमुदाहरंति ॥
अक्षीणमांसस्यभवंतिसाध्याःप्रांतेचहिक्केपरिवर्जनीये ॥

**अर्थ**-वायूनें पांच प्रकारच्या उचक्या उत्पन्न होतात, त्या असाध्य आहेत; परंतु ज्या रोग्याचा मांसक्षय झाला नाही त्याच्या बऱ्या होतात; व शेवटच्या दोन हिक्का वैद्यानें सोडाव्या, त्याला औषध देऊं नये.

कासप्रकरणोक्तंचभिषगत्रनियोजयेत् ॥
क्षयोक्तंवातकासेचहिक्काश्वासेनियोजयेत् ॥

**अर्थ**-जे संपूर्ण कासावर प्रकार सांगितले, ते व क्षयावरील उपचार हे संपूर्ण वात कास, उचकी, आणि श्वास यांवर योजावे.

## अन्नजाहिक्कानिदान.

पानान्नैरतिसंयुक्तैःसहसापीडितोनिलः ॥
हिक्कयत्यूर्ध्वगोभूत्वाविद्यात्तामन्नजांभिषक् ॥

**अर्थ**-पानें व अन्नें हीं फार सेवन केलीं असतां; त्याणीं वायु कुपित होऊन अकस्मात् ऊर्ध्वगतिक होतो; व उचकी उत्पन्न करितो. तिला अन्नज हिक्का ह्मणतात.

## यूष.

कासमर्दकपत्राणांयूषःसौभांजनस्यच ॥
शुष्कमूलकमंडस्तुहिक्काश्वासनिवारणः ॥

**अर्थ**-कांशिद्याचे पानांचा, अथवा शेवग्याचे मुळांचा, किंवा वाळल्या मुळ्याचा मंड हिक्का व श्वास यांचा निवारक आहे.

सदधिव्योषसर्पिष्कोयूषोवातार्कजोहितः ॥

**अर्थ**-वांग्याचा मंड, दहीं, सुंठ, मिरें, पिंपळी व तूप याणीं मिश्रीत करून प्यालें अ-असतां; हिक्केवर हितकारक आहे.

## कुलित्थादिकाढा.

कुलित्थानागरव्याघ्रीवासाभिःक्वथितंजलं ॥
पीतंपुष्करसंयुक्तंहिक्काश्वासनिवारणं ॥

**अर्थ**-कुळिथ, सुंठ, रिंगणी व अडुळसा यांचा काढा पुष्करमुळांचें चूर्ण घालून द्यावा. हा उचकी व दमा यांचें वारण करितो.

## हरिद्रादिलेह.

हरिद्रामरिचंद्राक्षागुडंरास्नाकणाशठी ॥ लिह्यात्तैलेनविलि
हन्श्वासंप्राणहरामपि ॥ हिक्कांहरतिप्रबलांश्वासातिप्रभूतंनिवारयति ॥

**अर्थ**–हळद, मिरीं, द्राक्षें, गूळ, रास्ना, पिंपळी व कचोरा यांचें चूर्णाचा तेलांतून लेह करून द्यावा; तो श्वास, प्राणहारक उचकी व आते वाढलेला श्वास यांचा नाश करितो

## अभयादिकल्क.

अभयानागरकल्कंपौष्करयावशूकमरिचकल्कंवा ॥
तोयेनोष्णेनपिबतःश्वासहिक्कांनियच्छति ॥

**अर्थ**–हरीतकी व सुंठ, यांचा किंवा पुष्करमूळ, यवांचें कूस व मिरीं यांचा कल्क करून तो ऊन पाण्याशीं प्राशन केला असतां; दमा, आणि उचकी, हीं शांत होतात.

## चंद्रसूरकाढा.

चंद्रसूरस्यबीजानिक्षिपेदष्टगुणेजले ॥ यदामृदूनिगृण्हीया
त्ततोवाससिगालयेत् ॥ हिक्कातिवेगकललस्तज्जलंपलमात्र
या ॥ पिबेत्पुनःपुनश्चापिहिक्काशीघ्रंप्रणश्यति ॥

**अर्थ**–नागरमोथ्याचें बीज घेऊन तें आठपट पाण्यांत भिजत घालावें. मऊ झालें ह्मणजे वस्त्रावर गाळून त्याचें पाणी चार तोळे वारंवार प्राशन करावें; ह्मणजे उचकी चा लवकर नाश होतो.

मधुनाकटुकाचूर्णंलीढंहिक्कानिवारणं ॥

**अर्थ**–कुटकीचें चूर्ण मधाशीं द्यावें. तें उचकी निवारण करितें.

## यमलाहिक्कानिदान.

चिरेणयमलैर्वेगैर्याहिक्कासंप्रवर्तते ॥ कंपयंतीशिरो
ग्रीवंयमलांतांविनिर्दिशेत् ॥

**अर्थ**–चिरकाळें करून दोन वेग एकदांच येऊन मस्तक व मान यातें कांपवून जी उचकी उत्पन्न होते; तिला यमला असें ह्मणतात.

## दशमूला यवागू.

दशमूलीसठीरास्नापिप्पलीविश्वपौष्करैः ॥ शृंगीतामलकीभार्ङ्गीगु
डूचीनागरादिभिः ॥ यवागूंमधुनासिद्धांकषायंवापिबेन्नरः ॥ कास
हृद्ग्रहपार्श्वार्तिहिक्काश्वासप्रशांतये ॥

अर्थ–दशमुळें, कचोरा, रास्ना, पिंपळी, सुंठ, पोखरमूळ, कांकडशिंगी, भूयआवळी भारंगमूळ, गुळवेल, नागरमोथा, यांणीं सिद्ध केलेली यवागू मधाबरोबर खावी; अथवा यांचा काढा प्यावा; ह्मणजे कास, हृद्रोग, कुशींतला वायु, श्वास, हिक्का यांची शांति होईल.

हिंगुसौवर्चलाजाजीबिडपुष्पकाचित्रकैः ॥

सिद्धाकर्कटशृंग्याचयवागूःश्वासहिक्किनां ॥

अर्थ–हिंग, पादेलोण, जिरें, बिडलोण, पोखरमूळ, चित्रक व कांकडशिंगी इतक्यांची सिद्ध झालेली कांजी श्वास व हिक्का हीं ज्यांना आहेत, त्यांस प्रशस्त आहे.

## क्षुद्राहिक्कानिदान.

विकृष्टकालैर्यावेगैर्मंदैःसमभिवर्तते ॥

क्षुद्रिकानामसाहिक्काजत्रूमूलात्प्रधावति ॥

अर्थ–जी हिक्का मंदवेग असून खांका, ऊर, आणि मान यांच्या संधिपासून प्रवृत्त होत्ये; तिला क्षुद्राहिक्का ह्मणतात.

## दशमूलीकाढा.

दशमूलीजलयुतंहितंहिक्कासुयोजयेत् ॥

श्वासकासहरःसर्वोविधिरत्रापियुज्यते ॥

अर्थ–दशमुळांचे काढ्याशीं उचकीवर जे हितपदार्थ ते योजावे; व संपूर्ण श्वास व कास यांची नाशक अशीं औषधें उचकीवर योजावीं.

## कुलित्थादिकाढा.

कुलित्थयवकोलांबुदशमूलबलाजलम् ॥

पानार्थकल्पयेत्कासहिक्काश्वासप्रशांतये ॥

अर्थ–कुळिथ, यव, बोरें, दशमूळें व चिकणा यांचा काढा. कास, उचकी व श्वास शांत होण्याकरितां प्यावयास द्यावा.

## धात्र्यादिकाढा.

धात्रीचमागधीशुंठीक्काथश्चैषांसितायुतः ॥

हिनस्तिहृदयोद्भूतांहिक्कांप्राणापनोदिनीं ॥

अर्थ–आवळकाठी, पिंपळी व सुंठ यांचा काढा साकर घालोन घेतला असतां; प्राणाचा नाश करणाऱ्या उचकीचा नाश करितो.

## गंभीराहिक्कानिदान

नाभिप्रवृत्तायाहिक्काघोरागंभीरनादिनी ॥ शुष्कास्यकंठजिव्हास्या

च्छ्वासकासरुजाकरी ॥ अनेकोपद्रववतीगंभीरानामसास्मृता ॥

अर्थ–जी हिक्का नाभीपासून उत्पन्न होत्ये; व गंभीर शब्द होतो; आणि मुख, कंठ व जिव्हा हीं शुष्क होतात; व श्वास, अनेक उपद्रव यांतें करणारी, तिला गंभीरा ह्मणतात.

## पाटल्यादियोग

पाटल्याफलतोयेनक्षौद्रेणचसमन्वितं ॥
हेमभस्मनिहंत्येवहिक्काःपंचातिदुस्तराः ॥

अर्थ–पाडळीच्या फळांचा रस व मध यांशी सुवर्णभस्म घेतलें असतां; अतिकठीण अशा ५ प्रकारच्या उचकीचा नाश करितें.

## दशमूलीकाढा.

दशमूलीकषायेणमधुनाचसमन्वितं ॥
कांतायोभस्महिक्कानांपंचानांपंचतांनयेत् ॥

अर्थ–दशमुळांचा काढा व मध यांशीं कांतलोहाचें भस्म घेतलें असतां; पांच प्रकारच्या उचकीचा नाश करितें.

## छागदुग्धयोग.

हिक्कार्तस्यपयश्छागंहंतिनागरसाधितं ॥
रसान्पचेत्फलाम्लांश्चलाजचूर्णससैंधवं ॥

अर्थ–उचकीवर सुंठ घालोन तापवलेलें शेळीचें दूध, किंवा अम्लवेतसानें सिद्ध आम्ल रस; अथवा लाह्यांचें पीठ सैंधवयुक्त द्यावें.

## मधुसौवर्चलयोग.

मधुसौवर्चलोपेतंमातुलिंगरसंपिबेत् ॥
हिक्कार्तोमधुनालिह्याच्छुंठीधात्रीकणान्वितं ॥

अर्थ–उचकीच्या रोग्यानें माहाळुंगाचा रस, मध व पादेलोण घालोन प्यावा; किंवा, माहाळुंगाच्या रसांत सुंठ, आवळकाठी व पिंपळी यांचें चूर्ण व मध घालोन चाटीतजावा.

## शिखिलेह.

शिखिपिच्छभस्मकृष्णाचूर्णमधुमिश्रितंमुहुर्लीढं ॥
हिक्कांहरतिप्रबलांश्वासंचैवातिदुस्तरांछर्दिं ॥

अर्थ–मोराचे पिसांची राख व पिंपळीचें चूर्ण हीं दोनी मधाशीं वारंवार चाटीत गेलें असतां; प्रबल उचकी, श्वास, फार कठीण ओकारी, यांचें शमन होतें.

## पिप्पल्यादिलेह.

पिप्पलीमूलमधुकंगुडगोश्वशकृद्रसान् ॥
हिध्माभिष्पंदकासघ्नान्लिहेन्मधुघृतान्वितान् ॥

अर्थ–पिंपळीमूळ, ज्येष्ठमध, गुळ, आणि गायींचें शेण व घोड्याची लीद यांचा दाट काढा करून मध व तूप घालोन वारंवार चाटला असतां; उचकी, अंगस्फुरण व खोकला, यांचा नाश करितो.

कपित्थस्वरसोवापिरसआमलकस्यच ॥
पिप्पलीक्षौद्रसंयुक्तोहिक्काश्वासनिवारणः ॥

अर्थ–कंवठाचा आंगरस, किंवा आवळ्याचा आंगरस, मध व पिंपळी या सहित घेतला असतां; तो हिक्का व श्वास यांचा निवारक आहे.

खर्जूरंपिप्पलीद्राक्षाशर्कराचेतितत्समं ॥
मधुसर्पिर्युतोलेहोहिक्काश्वासनिवारणः ॥

अर्थ–खजूर, पिंपळी, मनुका, साकर हीं समभाग घेऊन त्यांत मध व तूप घालोन लेह करावा, तो हिक्का व श्वास यांचा निवारक आहे.

## कटुकादिभस्म.

कटुकागैरिकाभ्यांचमुक्ताभस्मतथैवच ॥
बीजपूरस्यतोयेनताम्रंतद्वत्समाक्षिकं ॥

अर्थ–कुटकी, सोनगेरु व मोत्यांचें भस्म हीं समभाग घेऊन माहाळुंगाचे रसांत घालोन त्यांत मध घालोन द्यावें; अथवा कुटकी, गेरु, माहाळुंगाचा रस व मध यांत ताम्रभस्म घालोन प्राशन करावें; म्हणजे हिक्कानाश होतो.

## कोलमज्जालेह.

कोलमज्जांजनंलाजास्तिक्ताकांचनगैरिकं ॥ कृष्णाधात्रीसिताशुंठीकासीसंदाधनामच ॥ पाटल्याःसफलंपुष्पंकृष्णाखर्जूरमुस्तकं ॥ षडेते पादिकालेहाहिक्काघ्नामधुसंयुताः ॥

अर्थ–बोराच्या आंठितला मगज, सुरमा व लाह्या हा एक; कटुकी, नागकेशर व सुवर्ण हा दुसरा; पिंपळी, आवळकाठी, साकर व सुंठ हा तिसरा; हिराकस व कवंठ हा चवथा; पाडळीचें फळ व पुष्प हा पांचवा; पिंपळी, खजूर व नागरमोथा हा साहावा हे चतुर्थांश पाणी घालून केलेले निरनिराळे हिक्कानाशक लेह जाणावे.

## हेममात्रा.

हेममुक्तार्ककांतानांभस्मवल्लमितंवरं ॥ बीजपूररसक्षौद्रसौवर्च
लसमन्वितं ॥ हंतिहिक्काशतंसत्यमेकमात्राप्रयोगतः ॥ का
कथापंचहिक्कानांहरणेपुनरुच्यते ॥

**अर्थ**—सुवर्ण, मोतीं, ताम्र, लोहकांत या तिहींचे भस्म दोन गुंजा, माहाळुंगाचा रस, मध व पादेलोण यांच्या बरोबर एक वेळा भक्षण केले असतां; शंभर उचक्यांचा नाश करील. मग पांच उचक्याच्या नाशाविषयीं काय कथा?

## पिप्पल्यादिलोह.

पिपल्यामलकीद्राक्षाकोलास्थिमधुशर्करैः ॥ विडंगपौष्करैर्युक्तोलो
होहंतिसुदुर्जयां ॥ छर्दिंहिक्कांतथातृष्णांत्रिरात्रेणनसंशयः ॥

**अर्थ**—पिंपळी, आवळकाठी, द्राक्षे, बोराची आंठी, मध, साकर, वावडिंग व पोखरमूळ यांचे चूर्णाबरोबर लोहभस्म सेवम केले असतां; तीन दिवसांत ओकारी, उचकी, व तृषा यांचा नाश करील.

## शंखचूलरस

रसाभ्रहेमभस्मानिवैक्रांतंसर्वतुल्यकं ॥ सर्वैःपंचगुणंशंखचूर्णं
शुष्कंविमर्दयेत् ॥ लेहयेन्मधुनामाषचतुष्कंसानुपानकं ॥ हि
क्कांपंचविधांहंतिमुमूर्षोरपितत्क्षणात् ॥

**अर्थ**—पारा, अभ्रक व सुवर्ण, यां तिहींचीं भस्में समभाग, आणि या तिहींचे बरोबर वैक्रांताचें भस्म; आणि या चहोंचे पांचपट शंखभस्म अशीं एकत्र खलून त्यांतून चार मासे भस्म मधाबरोबर अनुपानासहित खावें; ह्मणजे मरणोन्मुख जरी असेल तथापि त्याचा पांचप्रकारच्या हिक्कांचा त्याच क्षणीं नाश करील.

## मेघडंबररस.

तंदुलीयद्रवैःपिष्टंसूततुल्यंचगंधकं ॥ वज्रमूषागतंचैवभूधरेभस्मतां
व्रजेत् ॥ दशमूलकषायेणभावयेत्प्रहरद्वयं ॥ गुंजाद्वयंहरत्येषहिक्का
श्वासंज्वरंकिल ॥ अनुपानेनदातव्योरसोयंमेघडंबरः ॥

**अर्थ**—तांदुळजाच्या रसांत परा व गंधक समभाग घेऊन घोटावे; नंतर वज्रमूषेत घालून भूधरयंत्रानें पचन करावे; ह्मणजे भस्म होतें; नंतर दशमुळांच्या काढ्यांत दोन प्रहर घोटून त्यांतून दोन गुंजा हा मेघडंबर रस द्यावा; ह्मणजे हा उचकी, श्वास व ज्वर यांचा नाश करितो.

## महाहिक्कानिदान.

मर्माण्युत्पीडयंतीवसततंयाप्रवर्तते ॥
महाहिक्केतिसाज्ञेयासर्वगात्रप्रकंपनी ॥

अर्थ–जी हिक्का शरीराच्या सर्वमर्मस्थानातें पीडा करित निरंतर सर्व शरीरास कंप देऊन उत्पन्न होत्ये; तिला महती ह्मणतात.

## कटुत्रिकलेह.

कटुत्रिकयवासकट्फलककारवीपौष्करैःसशृंगिभिरतिद्रुतंमधुयुतोवलेहोजयेत् ॥ सहिध्मकसनःकफश्वसनमंभसासिंधुजंप्रदत्तमपिवानने झटितिसर्वहिक्काहरं ॥

अर्थ–संठ, मिरें, पिंपळी, धमासा, कायफळ, ओंवा, पुष्करमूळ व कांकडाशिंगी यांचा मध घालून लेह करुन द्यावा; तो उचकी, खोकला, कफ व श्वास यांचा नाश करितो; किंवा सैंधव व पाणी यांचें नस्य द्यावें; ह्मणजे तें संपूर्ण प्रकारच्या उचकीचा नाश करितें.

## असाध्यहिक्कानिदानलक्षण.

आयम्यतेहिक्कतोयस्यदेहोदृष्टिश्चोर्ध्वंताम्यतेयस्यनित्यं ॥ क्षीणोन्नद्विट्क्षौतियश्चातिमात्रंतौद्वौचांत्यौवर्जयेद्धिक्कमानौ ॥ अतिसंचितदोषस्यभक्तच्छेदकृशस्यच ॥ व्याधिभिःक्षीणदेहस्यवृद्धस्यातिव्यवायिनः ॥आयासायासमुत्पन्नाहिक्काहंत्याशुजीवितं ॥ यमिकाचप्रलापार्तिमोहतृष्णासमन्विता ॥

अर्थ–उचकी देत असतां; ज्या मनुष्याचा देह ताणल्या सारिखा होतो, दृष्टि उर्ध्व होऊन आकुंचित होत्ये, रोगी मोह पावतो, अन्नद्वेष होतो; व शिंका बहूत येतात. इत्यादि उपद्रवयुक्त जी हिक्का त्या व गंभीरा आणि महती ह्या तीन ही हिक्का असाध्य जाणाव्या; व जी शरीरांत बहुत काळ राहून रोग्यास अरोचक व कृशत्व उत्पन्न करित्ये, ती व व्याधीकरून ज्याचा देह क्षिण झाला आहे, जो वृद्ध व अतिव्यवायी त्याची ही हिक्का असाध्य जाणावी; व आयासेकरून जी उत्पन्न होत्ये ती त्वरित प्राणनाश करित्ये; व प्रलाप, पीडा, मोह, तृष्णा ईहीं करून युक्त अशी यमिका हिक्का ही प्राणनाश करत्ये, असें जाणावें.

## असाध्यलक्षण.

अक्षीणश्चाप्यदीनश्चस्थिरत्वादिंद्रियश्चयः ॥
तस्यसाधयितुंशक्यायमिकाहंत्यतोन्यथा ॥

**अर्थ**–जो मनुष्य क्षीण व ग्लान नाही; आणि ज्याची इंद्रियें यथास्थित आहेत. त्याची यमिकासंज्ञक हिक्का साध्य जाणावी; आणि पूर्वलक्षणेंकरून रहित ती असाध्य जाणावी.

## यष्ट्यादिचूर्ण.

यष्ट्याह्वंवामाक्षिकेणावलीढंकृष्णाचूर्णंशर्करोढ्यंचकिंवा ॥
सर्पिःकोष्णंक्षीरमुष्णंरसोवाहन्यादिक्षोःपानतःपंचहिक्काः ॥

**अर्थ**–जेष्ठीमध व मध; अथवा पिंपळी व साकर, अथवा कोमट तूप; अथवा कढत दूध; अथवा उसाचा रस हे पांच प्रकारचे हिक्केचे नाश करितात.

## विश्वादिचूर्ण.

विश्वाशिवाकणाचूर्णःससितःसमधुःस्मृतः ॥
गुडूचीनागरंनस्यंहिक्काधिक्कारकारकं ॥

**अर्थ**–सुंठ, हरीतकी व पिंपळी यांचें चूर्ण मध व साकर यांशीं द्यावें; किंवा गुळवेल व सुंठ यांचें नस्य द्यावें; तें हिक्केचा नाश करितें.

## रक्तचंदनयोग.

नारीपयःपिष्टमुरक्तचंदनंकृतंसुखोष्णंचससैंधवंच ॥
पिष्टंतथासैंधवमंबुनावानिहंतिहिक्कांननुनावनेन ॥

**अर्थ**–स्त्रीचे दुग्धांत रक्तचंदन उगाळून किंचित गरम करून त्यांत सैंधव घालून द्यावें; अथवा पाण्यांत मिळवून त्याचें नस्य द्यावें; ह्मणजे उचकी नाश पावये.

## कृष्णाचूर्ण.

कृष्णामलकशुंठीनांचूर्णंमधुसितायुतं ॥
मुहुर्मुहुःप्रयोक्तव्यंहिक्काश्वासनिवारणं ॥

**अर्थ**–पिंपळी, आवळकाठी, सुंठ यांचें चूर्ण मध व साकर यांशीं वारंवार सेवन केलें असतां; उचकी व श्वास यांचें निवारण होतें

## शृंग्यादिचूर्ण.

शृंगिकटुत्रिकफलत्रयकंटकारीभार्ङ्गीसपुष्करजटालवणानिचैषां ॥
चूर्णंपिबेदशिशिरेणजलेनहिक्कांश्वासोर्ध्ववातकसनारुचिपीनसेषु ॥

**अर्थ**–कांकडशिंगी, सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहेडा, आवळकाठी, रिंगणी, भारंगमूळ, पोखरमूळ व सैंधव, यांचें चूर्ण ऊनपाण्याशीं द्यावें; ह्मणजे उचकी, श्वास, ऊर्ध्ववात व खोकला, अरुचि व पडसें यांचें शमन होतें.

## भार्ग्यादिचूर्ण.

हिक्काश्वासीपिबेद्भार्ङ्गींसविश्वामुष्णवारिणा ॥
नागरंवासिताभार्ङ्गींसौवर्चलसमन्वितं ॥

अर्थ–उचकी व श्वास जाला आहे, त्याणी भारंगमूळ व सुंठ यांचें चूर्ण ऊन पाण्या बरोबर प्यावें; अथवा सुंठ, साकर, भारंगमूळ व पादेलोण यांचें चूर्ण खावें.

## हिक्कानस्य.

हरेणुकापिप्पलिकाकषायोहिंग्वन्वितोपोहतिपंचहिक्काः ॥
नस्यंतथालक्तकसंभवंचस्तन्येनवापोहतिमाक्षिकाविट् ॥

अर्थ–निर्गुंडी अथवा कपिला व पिंपळी यांचा काढा करून तो हिंग घालून पाजावा; ह्मणजे पांच प्रकारच्या उचक्या दूर होतात; किंवा अलित्याचें नस्य द्यावें, अथवा माशीची विष्ठा स्त्रीदुधांत कोवळून त्याचें नस्य द्यावें.

## मधुकनस्य.

मधुकंमधुसंयुक्तंपिप्पलीशर्करान्विता ॥
नागरंगुडसंयुक्तंहिक्काघ्नंनावनत्रयं ॥

अर्थ–ज्येष्ठीमध व मध, पिंपळी व साकर, सुंठ व गूळ, हीं तीन नस्यें हिक्कानाशक आहेत.

## मक्षिकानस्य.

स्तन्येनमक्षिकाविष्ठानस्येवालक्तकांबुना ॥
योज्याहिक्काभिभूतेभ्यःस्तन्यंवाचंदनान्वितं ॥

अर्थ–मक्षिकांची विष्ठा स्त्रीदुग्धाशीं किंवा अलित्याच्या पाण्याशीं कालवून नस्य करावें; किंवा स्त्रीच्या दुधांत चंदन उगाळून नस्य करावें; ह्मणजे उचकी शमते.

## शिलाजितधूम.

शिलामूलस्यपानंवानालिकायंत्रयोगतः ॥ नेपाल्यागोविषाणाद्वाकुष्ठसर्जरसस्यवा ॥ धूमंकुशस्यवासाज्यंपिबेद्धिक्कोपशांतये ॥

अर्थ–शिलाजित व मुळा; किंवा कस्तूरी व बाभूळ; किंवा कोष्ठकोळिंजन व सर्जरस; किंवा दर्भ याला घृताचा योग करून त्याचा गुरगुडीनें धूर प्राशन करावा. हा उचकीचा नाश करितो.

## श्वासावरोधयोग.

श्वासावरोधतोहिक्काशमयत्यतिवेगतः ॥
चूलकैर्वाजलंपीतंधृत्वाश्वासैर्निवर्तते ॥

अर्थ—श्वासाचा अवरोध केल्यानें, किंवा चुळक्यानें पाणी पिऊन श्वास धरिला असतां; अतिवेगानें उचकीचा शम होतो.

## माषादिधूम.

धूमोमाषनिशारजोयुतशणत्वक्संभवोहंत्यलं ॥
श्वासोर्ध्वानिलकासरुद्गलरुजोहिध्माःसमस्ताअपि ॥

अर्थ—उडीद व हळद यांचें चूर्ण आणि ताग यांचा धूर प्राशन केला असतां; श्वास, ऊर्ध्ववात, खोकला, गळरोग, आणि सर्वप्रकारची उचकी यांचा नाश होतो.

## हिंग्वादिधूम.

निर्धूमांगारसंक्षिप्तहिंगुमाषरजोद्भवं ॥
हिक्काःपंचापिहंत्याशुधूमःपीतोनसंशयः ॥

अर्थ—निर्धूमअंगारावर हिंग व उडीद यांचें चूर्ण घालोन त्याचा धूर प्राशन करावा; ह्मणजे तो पांच प्रकारच्या उचकीचा नाश करितो.

## हिक्कापथ्य.

स्वेदनंवमनंनस्यंधूमपानंविरेचनं ॥ निद्रास्निग्धानिचान्नानिमृदूनि लवणानिच ॥ जीर्णाःकुलित्थागोधूमाःशालयःषष्टिकायवाः ॥ एण तित्तिरलावाद्याजांगलामृगपक्षिणः ॥ उष्णोदकंमातुलिंगंमाक्षिकंसु रभीजलं ॥ पक्वंकपित्थंलशुनंपटोलंबालमूलकं ॥ पौष्करंकृष्णतुल सीमदिराचलदंबुच ॥ अन्नपानानिसर्वाणिवातश्लेष्महराणिच ॥ शी तांबुसेकःसहसात्रासोविस्मापनंभयं ॥ क्रोधोहर्षःप्रियोद्वेगःप्राणायाम निषेवणं ॥ दग्धसिक्तमृदाघ्राणंकूर्चधाराजलार्पणं ॥ नाभ्यर्धपीडनं दाहोदीपदग्धहरिद्रया ॥ पादयोर्द्व्यंगुलान्नाभेरूर्ध्वंचेष्टानिहिक्किनां ॥

अर्थ—घाम, ओकारी, नस्य, धूम्रपान, रेचन, निद्रा, स्निग्ध व मृदु अशीं अन्नें, लवणें, आणि जुनें कुळीथ, गहूं, साळी, साठकी, यव, हीं जुनीं धान्यें; व हरिण, तित्तिर, लावे, आणि जंगलांतील मृग व पक्षी, यांचीं मांसें; ऊन पाणी, महाळुंग, मध, गोडें पाणी, पिकलेलें कवठ, लसूण, पडवळ, कोंवळे मुळे, पुष्करमूळ, काळी तुळस, मद्य, हलणारें उदक, आणि वातकफनाशक अशीं अन्नें व पानें, अकस्मात् थंड पाण्याचें सेवन, त्रासकारक व आश्चर्यकारक पदार्थ किंवा गोष्टी, भीति, क्रोध, हर्ष, प्रिय व उद्वेग करणारे पदार्थ, प्राणायाम, भाजलेले मातीवर पाणी शिंपून तिचा वास, किंवा कूर्च अथवा धारा यांणीं जलसेचन, आणि अर्धनाभीवर जळक्या हळदीनें डाग देणें, किंवा पायांपासून दोन आंगळांवर, अथवा बेंबीच वर दोन अंगळांवर डाग हे प्रकार उचकीच्या रोग्याला हितकारक आहेत.

## हिक्का अपथ्य.

वातमूत्रोद्गारकासशकृद्वेगविधारणं ॥ रजोनिलातपायासान्विरुद्धा न्यशनानिच ॥ विष्टंभीनिविदाहीनिरुक्षाणिकफदानिच ॥ निष्पाव माषपिण्याकवारिजानूपमामिषं ॥ अविदुग्धंदंतकाष्टंबस्तिमत्स्यांश्च सर्षपान् ॥ आम्लंतुंबीफलंकंदंतैलभृष्टमुपोदिकां ॥ गुरुशीतंचान्न पानंहिक्कारोगीविवर्जयेत् ॥

अर्थ—वायु, मूत्र, ढेंकर, खोकला व शौच यांच्या वेगाचें धारण व धूलि, वायु, निबर, आयास, विरुद्धान्न, विष्टंभकारक, विदाही, रूक्ष, कफकारक अशा पदार्थांचें सेवन व पावटे, उडीद, पिंड, उदकांतील व जलस्थलवासी प्राण्याचीं मांसे, शेळीचें दूध, दंतकाष्ठ, बस्तिकर्म, मासे, मोहऱ्या, आम्लरस, पांढरा भोंपळा, कंद, तेलांत तळलेले पदार्थ, मयाळ, आणि जड व थंड, अशीं अन्नें व पानें, असे सर्व पदार्थ उचकीच्या रोग्यानें वर्ज्य करावे.

## श्वासकर्मविपाक.

कृतघ्नोजायतेमर्त्यःकफवान्श्वासकासवान् ॥ उष्णज्वरीचनित्यंहिपित्त रोगसमन्वितः ॥ चांद्रायणत्रयंकुर्यात्पंचाशद्विप्रभोजनं ॥ विष्णोर्ना मजपंकुर्यात्तथाचैवद्विजोत्तमान् ॥ पूजयेद्भोजयेद्दद्यात्तन्मनानान्यमानसः ॥

अर्थ—जो कृतघ्नपणा करितो, तो कफ, श्वास, खोकला, उष्णज्वर आणि पित्तरोग यांनीं पीडित होतो, त्याणें तीन चांद्रायण प्रायश्चित्त करून ५० ब्राह्मण जेऊं घालावे. विष्णुच्या नामाचा जप करून ब्राह्मणाची पूजा करून त्याला भोजन घालावें व दान द्यावें.

### दुसरा प्रकार.

कुरुक्षेत्रादिदेशेषुकालेषुग्रहणादिषु ॥ महादानानिगृण्हीयान्निषिद्धा न्यथवास्वयं ॥ अपात्रभूतोदातृभ्योनिषिद्धेभ्यश्चमानवः ॥ सपामा श्वासकासैश्चकुक्षिस्यकृमिभिस्तथा ॥ कंडूत्याचैवपीड्येततद्रोगस्यप्र शांतये ॥ महिषींयमदैवत्यांदद्याद्वित्तानुसारतः ॥ काम्यंयद्दीयते दानंतत्समग्रंसुखावहं ॥ असमग्रंतुदोषायभवतीहपरत्रच ॥ जपेन्ना रायणस्याथनाम्नांचैवसहस्रकं ॥ हिरण्यंरक्तवासांसिपंचाशद्विप्रभोज नं ॥ सहस्रकलशस्नानंप्रकुर्याद्रोगशांतये ॥

अर्थ-जो कोणी कुरुक्षेत्रादि पुण्यदेशामध्यें ग्रहणादि पुण्यकाळीं, निषिद्ध पुरुषापासून आपण दान घेण्यास योग्य नसतां; व तें दान ही योग्य नसतां घेतो; तो खरूज, श्वास, कास, कुक्षिरोग, कृमि व कंडू यांणीं पीडित होतो. तच्छमनार्थ, यमदेवताक महिषीचें दान करावें. जें काम्यकर्म करावें तें संपूर्ण झालें असतां; सुख देतें; आणि अर्धें राहिलें तर दुःख होतें; व इहलोकीं आणि परलोकीं पातक लागतें. त्याणें विष्णुसहस्रनामाचा जप करावा; अथवा सुवर्ण, रक्तवस्त्रदान करावें; व ५० ब्राह्मण भोजन घालावें; किंवा सहस्र कलशांनीं स्नान करावें, तेणें करून रोग शांत होतो.

## तिसरा प्रकार.

पिशुनोनरकस्यांतेजायतेश्वासकासवान् ॥
घृतंतेनप्रदातव्यंसहस्रपलसंख्यया ॥

अर्थ-पिशुन पुरुष नरकाचे अंतीं श्वासकासरोगी होतो, त्याणें चारशें तोळे घृतदान करावें.

## श्वासनिदान.

महोर्ध्वच्छिन्नतमकक्षुद्रभेदैश्चपंचधा ॥
भिद्यतेसमहाव्याधिःश्वासएकोविशेषतः ॥

अर्थ-श्वास हा व्याधि मोठा कठीण असतां; तो महान्, ऊर्ध्व, छिन्न, तमक व क्षुद्र या भेदानीं पांच प्रकारचा होतो.

## प्राग्रूप.

प्राग्रूपंतस्यहृत्पीडाशूलमाध्मानमेवच ॥
आनाहोवक्त्रवैरस्यंशंखनिस्तोदएवच ॥

अर्थ-हृदयांत पीडा, पोटांत शूल, पोटफुगणें व दोन्हीं कुशी बांधिल्या सारिख्या होणें, तोंडाची चव जाणें व शंखास व्यथा होणें इत्यादि श्वासाचीं पूर्वरूपें जाणावीं.

## संप्राप्ति.

यदास्रोतांसिसंरुध्यमारुतःकफपूर्वकः ॥
विष्वग्व्रजतिसंक्रुद्धस्तदाश्वासंकरोतिच ॥

अर्थ-वायु कफाला साहाय्य होऊन सर्व शिरांना रोधून आपण ही कोंडल्या सारिखा होतो; तो नंतर आसमंताद्भागीं फिरत फिरत कुपित होउन श्वास उत्पन्न करितो, असें जाणावें.

## सामान्यचिकित्सा.

यत्किंचित्कफवातघ्नमुष्णंवातानुलोमनं ॥ भेषजंपानमन्नंवा

हिक्काश्वासेषुतद्धितं ॥ हिक्काश्वासातुरेपूर्वंतैलाक्तेस्वेदइष्य
ते ॥ ऊर्ध्वाधःशोधनंवन्हेर्दुर्बलेशमनंमतं ॥

अर्थ–जे कांहीं कफवातघ्न, उष्ण, वायूला अनुलोमन करणारें असें औषध, पान व अन्न तें हिक्का व कास यांवर योजावें; किंवा उचकी व श्वास हे रोग जाला आहेत, त्याला पूर्वी अंगाला तैल लाऊन घाम काढावा; आणि वमन व अग्निदीपक क्रिया करावी.

## दुसरा प्रकार.

स्नेहबस्तिमृतेकेचिदूर्ध्वंचाधश्चशोधनं ॥ मृदुप्राणवतांश्रेष्ठंश्वासि
नामादिशंतिहि ॥ सर्वेषुश्वासरोगेषुवातश्लेष्मनिबर्हणं ॥ विदधी
तविधिविद्वानादौस्वेदंमृदुंतथा ॥

अर्थ–स्नेह व बस्तिकर्म, यांवांचून ऊर्ध्वाधःशोधन, वांति व रेच इत्यादिक; आणि वातश्लेष्मनाशक औषधें व मृदु स्वेद हीं श्वासरोग्याला चिकित्सा करावी.

## महाश्वासलक्षण.

उद्धूयमानवातोयःशब्दवद्दुःखितोनरः ॥ उच्चैःश्वसितिसंरुद्धमत्तर्ष
भइवानिशं ॥ प्रनष्टज्ञानविज्ञानस्तब्धोविभ्रांतलोचनः ॥ निवृत्ता
क्ष्याननोबद्धमूत्रवर्चाविशीर्णवाक् ॥ दीर्घंप्रश्वसितंचास्यदूराद्विज्ञा
यतेभृशं ॥ महाश्वासोपसृष्टस्तुक्षिप्रमेवविपद्यते ॥

अर्थ–ज्याचा श्वास वर येऊन सशब्द, मोठ्या दुःखानें व मातलेल्या बैलासारिखा रात्रंदिवस उच्चस्वरानें सोडितो; आणि त्याचें ज्ञान व स्मृति हीं नष्ट होतात; व डोळे स्तब्ध असून फिरल्यासारिखे उघडलेले असे राहतात. तोंड वासतें; आणि मळ मूत्र बंद होतात; शब्द बोलवत नाहीं, बोलला तर कष्टानें हळू बोलतो; व त्याचा दीर्घ श्वास दूरून ऐकूं येतो; अशा महाश्वासानें पीडितरोगी लौकर मरण पावतो.

## शृंग्यादिचूर्ण.

शृंगीकटुत्रिकफलत्रयकंटकारीभार्ङीपुष्करजटालवणानिपंच ॥
चूर्णंपिबेदशिशिरेणजलेनहिक्काश्वासोर्ध्ववातकसनारुचिषुप्रशस्तं ॥

अर्थ–कांकडशिंगी, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकाठी, रिंगणी, भारंगमूळ, पोखरमूळ, जटामांसी, सैंधव, पादेलोण, बिडलोण, काचलोण व मीठ यांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर घ्यावें; ह्मणजे तें हिक्का, श्वास, ऊर्ध्ववात, खोकला व अरुचि यांचा नाश करील.

## शुंठ्यादिचूर्ण.

शुंठीकणामरिचनागदलंत्वगेलाचूर्णकृतंक्रमविवर्धितमूर्ध्वमंत्यात् ॥

खादेदिदंसमसितंगुदजाग्निमांद्यकासारुचिश्वसनकंठहृदामयेषु ॥

अर्थ—सुंठ ६, पिंपळी ५, मिरें ४, विड्याचीं पानें ३, दालचिनी २ व वेलदोडा १, याप्रमाणे घेऊन चूर्ण करून बरोबरीनें साकर घालून खाल्ले असतां; मुळव्याध, अग्निमांद्य, खोकला, अरुचि, श्वास, कंठरोग व हृद्रोग यांवर प्रशस्त आहे.

## मर्कटीचूर्ण.

मर्कटीनांतुबीजानांचूर्णमाक्षिकसर्पिषा ॥

प्रलिह्यात्प्रातरुत्थायश्वासार्तःस्वास्थ्यमाप्नुयात् ॥

अर्थ—कुइलीच्या बियांचें चूर्ण प्रातःकाळीं मध व तूप यां बरोबर चाटावें; ह्मणजे श्वासानें पीडित असेल तो स्वस्थ होईल.

## शठ्यादिचूर्ण.

शठीभार्ङीवचाव्योषपथ्यारुचककट्फलं ॥

तेजोव्हापौष्करशृंगीसक्षौद्रंश्वासकासहृत् ॥

अर्थ—कचोरा, भारंगमूळ, वेखंड, सुंठ, मिरीं, पिंपळी, बाळहर्डी, पादेलोण, कायफळ, तेजबळ, पुष्करमूळ व कांकडशृंगी यांचें चूर्ण मधाशीं घेतलें असतां; श्वासकासांचा नाश करितें.

## गुडादिलेह.

गुडोषणानिशारास्नाद्राक्षामागधिकाःसमाः ॥

तैलेनचूर्णितालीढास्तीव्रश्वासनुदःस्मृताः ॥

अर्थ—गुळ, मिरीं, हळद, रास्ना, मनुका व पिंपळी यांचें समभाग चूर्ण तेलाशीं सेवन केलें, ह्मणजे तीव्र अशा श्वासाचा नाश करितें.

## भार्ङ्यादिचूर्ण.

भार्ङीनागरयोश्चूर्णंलीढमार्द्रकवारिणा ॥

श्वासंनिहंतिदुर्धर्षंपंचाननइवद्विपं ॥

अर्थ—भारंगमूळ व सुंठ यांचें चूर्ण आल्याच्या रसाशीं सेवन करावें; ह्मणजे मोठ्या कठीण ही श्वासाचा नाश करितें. जसा सिंह हत्तीचा नाश करितो तसा.

## ऊर्ध्वश्वासनिदान.

ऊर्ध्वंश्वसितियोदीर्घंनचप्रत्याहरत्यधः ॥ श्लेष्मावृतमुखस्रोताःक्रुद्ध गंधवहार्दितः ॥ ऊर्ध्वदृष्टिर्विपश्यंश्चविभ्रांताक्षइतस्ततः ॥ प्रमुह्यन्वेदनार्तश्चशुष्कास्योरतिपीडितः ॥

अर्थ—वायु कुपित होऊन त्याणें मुख व श्वास वाहक मार्ग कफानें बंद होतात, तेणेंकरून श्वास वर ओढतो, खालीं आणवत नाहीं; आणि चंचलदृष्टीनें ऊर्ध्वभागीं इकडे तिकडे पाहतो, मोह पावतो, तोंड सुकतें; व चैन पडत नाहीं. हीं ऊर्ध्वश्वासाचीं लक्षणें जाणावीं.

## श्वास खाली न येण्याचें कारण.

ऊर्ध्वश्वासेप्रकुपितेह्यधःश्वासोनिरुध्यते ॥
मुह्यतस्ताम्यतश्चोर्ध्वश्वासस्तस्यैवहंत्यसून् ॥

अर्थ—ऊर्ध्वश्वास कोपला असतां; श्वास खालीं उतरत नाहीं कोंडून राहतो. त्या रोग्याला ग्लानि व मोह हे होतात, असा श्वास रोग्याचा प्राण घेतो.

## दुल्हरीचूर्ण.

दुल्हरीसैंधवंमांसीलवणंचसुवर्चलं ॥ त्रिकटुब्रह्मदंडीचत्रिफलैरंडमूलिका ॥ पीतमुष्णांभसाकासमूर्ध्वश्वासंनिवारयेत् ॥ बिडादिलवणंसर्वंमासंश्लक्ष्णंविचूर्णितं ॥

अर्थ—दुल्हरी, सैंधव, जटामासी, मीठ, पादेलोण, सुंठ, मिरीं, पिंपळी, ब्रह्मदंडी, हरडा, बेहडा, आवळकाठी व एरंडमूळ यांचें चूर्ण किंवा बिडादिसंपूर्ण लवणें एक महिना पर्यंत बारीक घोटून तें चूर्ण ऊन पाण्याशीं द्यावें; ह्मणजे खोकला, आणि ऊर्ध्वश्वास यांचा नाश करितें.

## शुंठ्यादिचूर्ण.

शुंठीदारुकणाचूर्णंपीतमुष्णांभसासमं ॥
ऊर्ध्वश्वासहरंकिंवाशुंठीपिप्पलिचूर्णकं ॥

अर्थ—सुंठ, देवदार व पिंपळी यांचें किंवा सुंठ व पिंपळी यांचें चूर्ण ऊन पाण्याशीं द्यावें; ह्मणजे ऊर्ध्वश्वासाचा नाश करितो.

## शिलाद्यवलेह.

शिलाहिंगुविडंगंचमरिचंकुष्ठसैंधवं ॥
मध्वाज्याभ्यांलिहेत्कर्षंश्वासकासकफापहं ॥

अर्थ—शिलाजित, हिंग, वावडिंग, मिरीं, कोष्ठ व सैंधव यांचें चूर्ण मध व तूप यांशीं एक कर्ष द्यावें; ह्मणजे श्वास, खोकला व कफ यांचा नाश करितें.

## विडंगादिचूर्ण.

विडंगंपिप्पलीचैलात्वचंचप्रतिकर्षकं ॥ द्विकर्षंमरिचंचूर्णंनागरंचचतुःपलं ॥ सर्वैस्तुल्यासितायोज्याकर्षमात्रंचभक्षयेत् ॥ श्वासकासज्वरप्लीहपांडुरोगज्वरापहं ॥

अर्थ—वावडिंग, पिंपळी, एला व दालचिनी, हीं प्रत्येकीं एकेक तोळा; मिरीं २ तोळे व सुंठ १६ तोळे या सर्वांच्या चूर्णासमान साकर घालोन तें १ तोळा भक्षण करावें; ह्मणजे श्वास, खोकला, ज्वर, प्लीहा व पांडुरोग यांचा नाश करितें.

## दाडिमादिचूर्ण.

दाडिमंनागरंहिंगुकृष्णाचलवणंसमं ॥
आम्लवेतससंयुक्तंश्वासहृद्रोगजिद्भवेत् ॥

अर्थ—डाळिंब, सुंठ, हिंग, पिंपळी, मीठ, आणि आम्लवेतस हे समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करून द्यावें; ह्मणजे दमा, खोकला व हृद्रोग यांचा नाश करितें.

## विडंगादिचूर्ण.

विडंगपिप्पलीहिंगुसाजिसैंधवनागरं ॥ रास्नयाचसमंचूर्णंकर्षमद्या
द्घृतप्लुतं ॥ कफश्वासहरंख्यातंविडंगादिचनामकं ॥

अर्थ—वावडिंग, पिंपळी, हिंग, ओंवा, सैंधव, सुंठ आणि रास्ना यांचे समभाग चूर्ण करून तें एक तोळा चूर्ण तुपाशीं द्यावें; ह्मणजे कफ व श्वास यांचा नाश करितें. याला विडंगादिचूर्ण ह्मणतात.

## आर्द्रकस्वरस.

एकएवार्द्रकरसःसमधुश्वासकासजित् ॥
रतिवल्लभचांपेयचापचारुकलेवरे ॥

अर्थ—हे स्त्रिये एकटा आल्याचा रस मध घालोन द्यावा; ह्मणजे श्वास व खोकला यांचा नाश करितो.

## अक्षकवल.

रावणस्यसुतोहन्यान्मुखवारिजधारितः ॥
श्वसनंकसनंवापितमिवानलनंदनः ॥

अर्थ—बेहडा तोंडांत धरिला असतां; श्वास व खोकला यांचा नाश करितो.

## आटरूषरस.

आटरूषरसोगव्यनवनीतेनपाचितः ॥
तेनत्रिफलजंचूर्णंभक्षितंश्वासवारकं ॥

अर्थ—अडुळशाचा रस व गाईचें लोणी एकत्र कढवून त्यांतून त्रिफळ्याचें चूर्ण द्यावें; तें श्वासाचें निवारण करितें.

## छिन्नश्वासनिदान.

यस्तुश्वसितिविच्छिन्नंसर्वप्राणैर्निपीडितः॥नवाश्वसितिदुःखार्तोमर्म

भेदरुजार्दितः ॥ अनाहस्वेदमूर्छार्तोदह्यमानेनबस्तिना ॥ विप्लुताक्षः परिक्षीणःश्वसनूरक्तैकलोचनः ॥ विचेताःपरिशुष्कास्योविवर्णःप्रलपन्नरः ॥ छिन्नश्वासेनविच्छिन्नःसशीघ्रंविजहात्यसून् ॥

अर्थ–छिन्नश्वासाचे ठायीं राहून राहून अथवा मध्यें तुटलेला असा श्वास होतो, सर्व इंद्रियांस पीडा होत्ये, अथवा पंच प्राणास पीडा होत्ये, पोट फुगणें, स्वेद व मूर्छा ईहीं-करून रोगी पीडित होतो; आणि बस्तींत आग जळत्ये. तेणेंकरून पीडित होतो. नेत्र उदकानें भरून येतात, अत्यंत क्षीण होतो, श्वासोश्वासेंकरून नेत्र आरक्त होतात, उदासपणा येतो, तोंड शुष्क होतें, निस्तेजपणा येतो; व रोगी प्रलाप करितो. याप्रकारें विछिन्नश्वासानें व्याप्त जो रोगी तो त्वरित प्राणातें सोडितो असें जाणावें.

## तमकश्वासलक्षण.

प्रतिलोमंयदावायुःस्रोतांसिप्रतिपद्यते ॥ ग्रीवांशिरश्चसंगृह्यश्लेष्माणंसमुदीर्यच ॥ करोतिपीनसंतेनरुद्धोघुर्घुरकंतथा ॥ अतीवतीव्रवेगंचश्वासंप्राणप्रपीडकं ॥ प्रताम्यतिसवेगेनत्रस्यतेसन्निरुध्यते ॥ प्रमोहंकासमानश्चसगच्छतिमुहुर्मुहुः ॥ श्लेष्मणामुच्यमानेनभृशंभवतिदुःखितः ॥ तस्यैवचविमोक्षांतेमुहूर्तंलभतेसुखं ॥ तथास्योध्वंसतेकंठःकृच्छ्राच्छक्नोतिभाषितुं ॥ नचापिलभतेनिद्रांशयानःश्वासपीडितः ॥ पार्श्वेतस्यावगृण्हातिशयानस्यसमीरणः ॥ आसीनोलभतेसौख्यमुष्णंचैवाभिनंदति ॥ उच्छ्रिताक्षोललाटेनस्विद्यताभृशमार्तिमान् ॥ विशुष्कास्योबहुश्वासोमुहुश्चैवावधम्यते ॥ मेघांबुशीतप्राग्वातैःश्लेष्मलैश्चविवर्धते ॥ सयाप्यःस्तमकश्वासःसाध्योवास्यान्नवोत्थितः ॥

अर्थ–ज्याकाळीं वायु विपरीतपणें करून शिरांतें व्यापितो. त्याकाळीं ग्रीवा व मस्तक यांचें ग्रहण करून कफाला कोपवितो; नंतर त्या कफेंकरून तो रुद्ध होऊन पडसें उत्पन्न करितो, पुनः पडशाशीं व्याप्त होऊन कंठाचे ठाईं घुरघुर शब्द उत्पन्न करून तीव्र वेगयुक्त व प्राणस्थानातें पीडा देणारा असा श्वास उत्पन्न करितो, त्या श्वासेंकरून रोगी मोह, श्वास व प्राणनिरोध यातें पावतो; आणि कदाचित मोठ्या दुःखानें कफ सुटून पडला असतां; क्षणभर रोगी सुख पावतो; आणि पुनः कफ संचित झाला असतां; कंठास कंडू उत्पन्न करितो. रोगी मोठ्या क्लेशेंकरून भाषण करितो. झोंप येत नाहीं. निजला असतां श्वासपीडा अधिक होत्ये. दोन्ही कुशी वायूनें ओढिल्यासारिख्या होतात, बसला असतां सुख होतें; व उष्ण उष्ण प्रिय वाटतें. याचें कारण या तमकाचे ठायीं

वातकफात्मक प्रकृति असल्ये; यास्तव डोळयांचीं पोटें उचलल्यासारिखीं होतात. कपाळाला घाम येतो; व पीडा पावतो. तोंड शुष्क होतें; आणि वारंवार भाल्यासारखा श्वास होतो. तेणेंकरून हत्तीवर बसल्यासारिखा वारंवार डोलतो; व मेघोदक, शीत, पूर्वदिशेचा वायु व कफकारक पदार्थ यांच्या संबंधानें हा तमक अधीक वाढतो. हा याप्य जाणावा. हा नवोत्पन्न असतां; कदाचित साध्य हि होतो असें जाणावें.

## प्रतमकनिदान.

ज्वरमूर्छापरीतस्यविंद्यात्प्रतमकंनुतं ॥ उदावर्तरजोजीर्णक्लि
न्नकायनिरोधजः ॥ तमसावर्धतेत्यर्थंशीतैश्चाशुप्रताम्याति ॥
मज्जतस्तमसीवास्यविंद्यात्प्रतमकंतुतं ॥

अर्थ–तमकाला पित्त, मूर्छा, अथवा ज्वर यांचा संबंध असतां; त्याला प्रतमक ह्मणतात. हा प्रतमक उदावर्त धूलि, विदग्धाजीर्ण व मूत्रपुरीषादिवेगनिरोध याहीं. करून उत्पन्न होतो, मानसिक तमोगुणदोषेंकरून वृद्ध होतो; आणि शीतपदार्थसंबंधेंकरून शांत होतो असें जाणावें. यामुळें रोग्याला अंधकारांत गेल्यासारिखें वाटतें.

## सठ्यादिचूर्ण.

सठीपुष्करजीवंतीत्वङ्मुस्तंपुष्कराव्हयं ॥ सुरसातामलक्ये
लापिप्पल्यागरूनागरं ॥ वालुकंचसमंचूर्णंकृत्वाद्विगुणशर्क
रं ॥ सर्वथातमकश्वासेहिक्कायांचप्रयोजयत् ॥

अर्थ–कचोरा, कमळकंद, गरुडवेल, दालचिनी, नागरमोथा, पुष्करमूळ, तुळस, भुयआवळी, एलची, पिंपळी, कृष्णगरु, सुंठ व भिमसेनीकापूर हीं समानभाग चूर्णें घेऊन सर्व चूर्णांच्या दुप्पट साकर घालावी. हें चूर्ण बहूत करून तमकश्वास व उचकी यांवर योजावें.

## व्याघ्रीजीरकादिगुटिका.

व्याघ्रीजीरकधात्रीणांचूर्णंमधुयुतंलिहेत् ॥
ऊर्ध्ववातमहाश्वासतमकैर्मुच्यतेक्षणात् ॥

अर्थ–रिंगणी, जिरें व आवळकाठी या तिन औषधांचें चूर्ण करून मधांत घेतलें असतां; ऊर्ध्ववायु, महाश्वास व तमकश्वास हे रोग क्षणांत दूर होतात.

## क्षुद्रावलेह.

व्याघ्रीशतंस्यादभयाशतंचद्रोणेजलस्यप्रपचेत्कषायं ॥ तुलाप्रमाणेन
गुडेनयुक्तंपक्त्वाभयाभिःसहताभिरत्र ॥ शीतेक्षिपेत्षण्मधुनःपलानि
पलानिचत्रीणिकटुत्रयस्य ॥ त्वक्पत्रकैलाकारिकेसराणांचूर्णात्पलंचे

तिविदेहदृष्टः ॥ क्षुद्रावलेहःकफजान्विकारान्सश्वासशोषानपिपंचकासान् ॥ हिक्कामुरोरोगमपस्मृतिंचहत्वाविवृद्धिंकुरुतेनलस्य ॥

**अर्थ**–रिंगणी व हरीतकी हीं प्रत्येकीं १०० तोळे १०२४ तोळे पाण्यांत घालून काढा करून गाळून त्यांत ४०० तोळे गुळ घालून पुनः ते शिजलेले हिरडे त्यांत घालून पक्क करावें. तें थंड झाल्यावर त्यांत २४ तोळे मध, आणि सुंठ, मिरीं, पिंपळी हीं प्रत्येकीं ४ तोळे, दालचिनी, तमालपत्र, वेलदांडे, नागकेशर हीं प्रत्येकीं १ तोळा, याप्रमाणें घालून लेह करावा. याला क्षुद्रावलेह ह्मणतात. हा विदेहनामक कोणी होता त्याणे हा प्रथम पाहिला. हा कफविकार, श्वास, शोष, कास, हिक्का, उरोरोग व अपस्मार, यांचा नाशक आणि अग्निदीपक आहे.

## कंटकार्यावलेह श्वासकासावर.

कंटकारितुलांनीरद्रोणेंपक्त्वाकषायकं ॥ पादशेषंगृहीत्वाचतस्मिंश्चूर्णानिदापयेत् ॥ पृथक्पलानिचैतानिगुडूचीचव्यचित्रकाः ॥ मुस्तंकर्कटशृंगीचत्र्यूषणंधन्वयासकः ॥ भार्ङीरास्नासठीचैवशर्करापलविंशतिः ॥ प्रत्येकंचपलान्यष्टौप्रदद्याद्घृततैलयोः ॥ पक्त्वालेहत्वमानीयशीतेमधुपलाष्टकं ॥ चतुःपलंतुगाक्षीर्याःपिप्पलीनांचतुःपलं ॥ क्षिप्त्वानिदध्यात्सुदृढेमृन्मयेभाजनेशुभे ॥ लेहोयंहंतिहिक्कार्तिश्वासकासानशेषतः ॥

**अर्थ**–रिंगणी एक तुळा प्रमाण वजन घेऊन थोडी कुटून त्यांत पाणी १ द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा; नंतर गुळवेल, चवक, चित्रक, नागरमोथे, काकडशिंगी,सुंठ, मिरीं, पिंपळी, धमासा, भारंगमूळ, रास्ना व कचोरा हीं बारा औषधें पळ पळ प्रमाण घेउन चूर्ण करून त्या काढ्यांत घालावीं. साकर वीसपळें, तूप आठ पळें व शिरसेल तेल आठ पळें हीं सारीं काढ्यांत घालून मिळून कढवून लेह करून थंड झाल्यावर त्यांत मध आठ पळें घालून मग वंशलोचन ४ पळें व पिंपळी चार पळें यांचें चूर्ण त्या अवलेहांत मिळवून चांगले बळकट मडकें घेऊन त्यांत तो अवलेह ठेवून मग तो अवलेह नित्य घेत जावा, तेणेकरून उचकी व सारे श्वास व कासरोग दूर होतात.

## क्षुद्रश्वासनिदान.

रूक्षायासोद्भवःकोष्ठेक्षुद्रोवातमुदीरयेत् ॥ क्षुद्रश्वासोनसोत्यर्थंदुःखेनांगप्रबाधकः ॥ हिनस्तिनसगात्राणिनचदुःखंयथेतरे ॥ नचभोजनपानानिनिरुणध्युचितांगतिं ॥ नेंद्रियाणांव्यथांवापिकांचिदापादये

द्भुजं ॥ ससाध्यउक्तोबलिनःसर्वोवाव्यक्तलक्षणः ॥ क्षुद्रःसाध्यत मस्तेषांतमकःक्षुद्रउच्यते ॥

अर्थ–रुक्षान्न व आयास यांपासून उत्पन्न झालेला क्षुद्रश्वास कोष्ठाचे ठायीं वायु उत्पन्न करितो. हा क्षुद्रश्वास फार दुःख देत नाहीं; व प्राणवियोग ही करीत नाहीं. जसे इतर दुःख देतात तसा हा देत नाहीं. अन्नपानादिकांचा निरोध करीत नाहीं. इंद्रियास व्यथा देत नाहीं. हा क्षुद्रश्वास बलवंत पुरुषांचा साध्य जाणावा; आणि बलवंत पुरुषांचे सर्व श्वास अल्प लक्षण असतां;साध्य जाणावे. सर्वांमध्ये क्षुद्रश्वास पुरुषांचा सुसाध्य जाणावा.

## असाध्यलक्षण.

त्रयःश्वासानसिध्यंतितमकोदुर्बलस्यच ॥ कामंप्राणहरारो गाबहवोनतुतेतथा ॥ यथाश्वासश्चहिक्काचहरतःप्राणमाशुच ॥

अर्थ–सर्वलक्षणेंकरून युक्त जे महोर्ध्वादिक तीन श्वास ते असाध्य जाणावे; आणि दुर्बल रोग्याचा तमक हा आसाध्य जाणावा; जसे श्वास व हिक्का हे त्वरित प्राणनाश करितात, तसे इतर संनिपातादिक त्वरित प्राणहरण करीत नाहींत.

## सामान्य उपचार.

श्वासहिक्कातुरंप्रायःस्निग्धैःस्वेदैरुपाचरेत् ॥ युक्तैर्लवणतैला भ्यांतैरस्यग्रथितःकफः ॥ श्वासोविलयमायातिमारुतश्चोपशा म्यति ॥ स्निग्धंज्ञात्वाततश्चैनंभोजयेच्चरसौदनं ॥

अर्थ–श्वास व उचकी यांणी आतुर झालेल्या मनुष्यास सैंधव व तेल यांहीं स्निग्ध असा घाम काढण्याचा उपचार करावा. तेणेंकरून त्या मनुष्याचा गोठलेला कफ पातळ होऊन श्वासाचा नाश होतो; आणि वायु शमतो; नंतर तो मनुष्य स्निग्ध झाला हे जाणून पातळ भात भोजनास घालावा.

## शृंगवेररस.

स्वरसंशृंगवेरस्यमाक्षिकेणसमन्वितं ॥
पाययेच्छ्वासकासघ्नंप्रतिश्यायकफापहं ॥

अर्थ–आल्याचा स्वरस मध घालोन प्राशन करावा; ह्मणजे श्वास, कास, पडसें व कफ, यांचा नाश होतो.

## बिभीतकावलेह

प्रस्थंबिभीतकानामास्थिविनासाधयेदजामूत्रे ॥
अयमवलेहोलीढामधुसहितःश्वासकासघ्नः ॥

अर्थ—एकशेर बेहेडेदळ शेळीच्या मुतांत पचन करावें; आणि त्याचें चूर्ण मधाशीं चाटीत गेलें असतां; श्वास व कास हे नाश पावतात.

## द्राक्षाद्यवलेह.

द्राक्षांहरीतकींमुस्तांकर्कटाख्यांदुरालभां ॥
सर्पिर्मधुभ्यांविलिहन्श्वासान्हंतिसुदारुणान् ॥

अर्थ—मनुका, हिरडा, नागरमोथा, कांकडशिंगी व धमासा यांचा लेह, मध व तूप घालोन करावा, तो खाल्ला असतां; मोठा भयंकर श्वास दूर करील.

## दशमूलाद्यवागू.

दशमूलीसठीरास्नापिप्पलीविश्वपौष्करैः ॥ शृंगीतामलकी
भार्ङीगुडूचीनागराग्निभिः ॥ यवागूंविधिनासिद्धांकषायंवा
पिबेन्नरः ॥ श्वासत्दृद्ग्रहपार्श्वार्तिहिक्काकासप्रशांतये ॥

अर्थ—दशमुळें, कचोरा, रास्ना, पिंपळी, सुंठ, एरंडमूळ, कांकडशिंगी, भूयआवळी, भारंगमूळ, गुळवेल, सुंठ व चित्रक या औषधांनीं सिद्ध केलेली कांजी, प्राशन करावी; अथवा काढा करून प्यावा, ह्मणजे श्वास, ह्रदयव्यथा, पार्श्वपीडा, उचकी व खोकला यांची शांति होय.

## दशमूलकाढा.

दशमूलस्यवाक्काथःपौष्करेणावचूर्णितः ॥
श्वासकासप्रशमनःपार्श्वशूलविनाशनः ॥

अर्थ—दशमुळांचा काढा करून त्यांत एरंडमुळांचें चूर्ण घालोन प्राशन केलें असतां; श्वास, कास व पार्श्वशूल हे नाश पावतात.

## रंभादिकुसुमपान.

रंभाकुंदशिरीषाणांकुसुमंपिप्पलीयुतं ॥
पिष्ट्वातंदुलतोयेनपीत्वाश्वासमपोहति ॥

अर्थ—केळीचें फूल, कुंदाचें फूल व शिरसाचें फूल हीं तिन्हीं पुष्पें पिंपळी घालोन तांदुळांच्या धुवणाशीं वांटावीं; आणि प्राशन करावीं, ह्मणजे श्वास नाश पावतो.

कटुतैलेनसंयुक्तोगुडोयावन्नसेवितः ॥
तावन्नश्यतिकिंश्वासःपीयूषमधुराधरे ॥

अर्थ-शिरसाचे तेल, आणि गूळ जोंपर्यंत सेवन केला नाहीं तोंपर्यंत हे अमृततुल्य मधुरओष्ठे श्वास नष्ट होईल कीं काय.?

## शृंग्यादि चूर्ण.

शृंगीमहौषधकणाघनपुष्कराणांचूर्णंशठीमरिचयोश्चसिताविमिश्रं ॥
क्वाथेनपीतममृतावृषपंचमल्याःश्वासंत्र्यहेणविनिहंतिहिघोररूपं ॥

अर्थ–कांकडशिंगी, सुंठ, पिंपळी, नागरमोथा, एरंडमूळ, कचोरा व मिरीं यांचें चूर्ण सममाग करून गुळवेल, अडुळसा व पंचमूळ यांचा काढा करून त्या काढ्यांत चूर्ण व साकर घालून प्राशन केला असतां, मोठा घोररूप श्वास तीन दिवसांत नाहींसा होतो.

## शुंठ्यादि काढा.

अयिप्राणप्रियेजातिफललोहितलोचने ॥
शुंठीभार्ङीकृतःक्वाथःश्वासत्रासायपाययेत् ॥

अर्थ–हे प्राणप्रिये श्वास जाण्याकरितां सुंठ व भारंगमूळ यांचा काढा पाजावा.

## पंचमूलीयोग.

पंचमूलीतुसामान्यापित्तेयोज्याकनीयसी ॥
महतीमारुतेदेयासैवदेयाकफाधिके ॥

अर्थ–सामान्यतः लघुपंचमूळ पित्तश्वासावर द्यावें; आणि बृहत्पंचमूळ वातश्वास व कफश्वास यांवर द्यावें.

## कूष्मांडशिफाचूर्ण.

कूष्मांडकशिफाचूर्णंपीतंकोष्णेनवारिणा ॥
शीघ्रंशमयतिश्वासंकासंचापिसुदारुणं ॥

अर्थ–कोहळ्याच्या मुळाचें चूर्ण कोमट पाण्याशीं प्राशन केलें असतां; दारुण ही श्वास व कास शीघ्र शमतात.

## हरिद्राद्यवलेह.

हरिद्रामरिचंद्राक्षांकणांरास्नांशठींगुडं ॥
कटुतैलंलिहन्हन्याच्छ्वासान्प्राणहरानपि ॥

अर्थ–हळद, मिरें, द्राक्षे, पिंपळी, रास्ना, सुंठ व गूळ यांचें चूर्ण मोहऱ्यांच्या तेलाशीं चाटिलें असतां; प्राणाचा नाशकारक जरी श्वास असला तरी त्याचा नाश होतो.

## भार्ङीगुड.

शतंसंगृह्यभार्ङ्यास्तुदशमूल्यास्तथाशतं ॥ शतंहरीतकीनांचपचेत्तोये
चतुर्गुणे ॥ पादावशेषेतस्मिंस्तुरसेवस्त्रनिपीडिते ॥ आलोड्यचतुलां

पूतांगुडस्याप्यभयांततः ॥ पुनःपचेन्मृदग्नौयावल्लेहत्वमेतितत् ॥ शीतेचमधुनस्तत्रषट्पलानिविनिःक्षिपेत् ॥ त्रिकटुत्रिसुगंधंचपलमात्रंपृथक्पृथक् ॥ यवक्षारंकर्षयुग्मंसंचूर्ण्यप्रक्षिपेत्ततः ॥ भक्षयेदभयामेकां लेहस्यार्धपलंतथा ॥ श्वासंसुदारुणंहंतिकासंपंचविधंतथा ॥ अर्शांस्यरोचकंगुल्मंशकृद्भेदंक्षयंतथा ॥ स्वरवर्णप्रदोह्येषजठराग्नेःप्रदीपनः ॥ नाम्नाभार्ङ्गीगुडःख्यातोभिषग्भिःसकलैर्मतः ॥

अर्थ-भारंगमूळ, दशमुळें व हरीतकी, हीं प्रत्येकीं १०० तोळे घेऊन १२०० तोळे पाण्यांत टाकून कढवावीं. चतुर्थांश काढा उरला ह्मणजे गाळून घेऊन त्यांत ४०० तोळे गूळ व ते शिजलेले हिरडे टाकून पुनः मंदाग्नीवर जोंपर्यंत दाट होई तोंपर्यंत शिजवावें. थंड झाल्यावर त्यांत २४ तोळे मध आणि सुंठ, मिरें, पिंपळी, दालचिनी, वेलदोडे व तमालपत्र हीं प्रत्येकीं ४ तोळे व जवखाराचें चूर्ण २ तोळे, याप्रमाणे टाकून ढवळावें; ह्मणजे लेह सिद्ध झाला, यांतून दोन तोळे लेह, आणि त्यांतला एक हरडा नित्य प्रातःकाळीं खावा; ह्मणजे मोठा भयंकर श्वास, पांच प्रकारचा खोकला, मुळव्याध, अरुचि, गुल्म, अतिसार व क्षय यांचा नाश करील; आणि स्वर व वर्ण निट करणारा, व अग्निदीपक असा आहे. ह्याला भार्ङीगुड असें ह्मणतात. हा सर्व वैद्यांस मान्य आहे.

## द्राक्षादिकाढा.

द्राक्षामृतानागरमुष्णतोयंकृष्णाविपाकंबहुरोगनिघ्नं ॥
श्वासंचशूलंकसनंचमांद्यंजीर्णज्वरंचैवजयेच्चतृष्णां ॥

अर्थ-द्राक्षें, गुळवेल व सुंठ यांच्या काढयांत पिंपळीचें चूर्ण घालोन द्यावा; ह्मणजे श्वास शूल, खोकला, अग्निमांद्य, जीर्णज्वर; आणि ताहान यांचा नाश करितो.

## कुलित्थादिकाढा.

कुलित्थनागरव्याघ्रीवासाभिःक्वथितंजलं ॥
पीतंपौष्करसंयुक्तंश्वासकासनिवारणं ॥

अर्थ-कुळिथ, सुंठ, रिंगणी, अडुळसा, आणि पुष्करमूळ यांचा काढा प्राशन केला असतां; श्वास व कास यांचें निवारण करितो.

## देवदार्व्यादिकाढा.

देवदारुवचाव्याघ्रीविश्वकट्फलपौष्करैः ॥
कृतःक्वाथोजयत्याशुश्वासकासावशेषतः ॥

अर्थ-देवदार, वेखंड, रिंगणी, सुंठ, कायफळ आणि पुष्करमूळ यांचा काढा द्यावा; ह्मणजे दमा व खोकला यांचें शीघ्र निवारण करितो.

## सिंव्ह्यादिकाढा.

सिंव्हीनिशासिंहमुखीगुडूचीविश्वोपकुल्याभृगुजाघनानां ॥
कृष्णामरीचैर्मिलितःकषायःश्वासाटवीदाहपयोदएषः ॥

अर्थ–रिंगणी, हळद, अडुळसा, गुळवेल, सुंठ, पिंपळी, भारंगमूळ व नागरमोथे यांचा काढा करून त्यांत पिंपळी व मिऱ्ये यांचे चूर्ण घालून द्यावा; हा श्वासरूप अरण्याग्नीला मेघासारिखा शांत करितो.

## वासादिकाढा.

वासाहरिद्रामगधागुडूचीभार्ङ्गीघनानागररिंगणीनां ॥
क्काथेनमारिच्यकणान्वितेनश्वासःशमंयातिनकस्यपुंसः ॥

अर्थ–अडुळसा, हळद, पिंपळी, गुळवेल, भारंगमूळ, नागरमोथे, सुंठ व रिंगणी यांचा काढा मिऱ्यांचे चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे कोणत्या पुरुषाचा श्वास शांत होणार नाही.

## भार्ङ्यादिलेह.

प्रलिह्यान्मधुसर्पिर्भ्यांभार्ङ्गीमधुकसंयुतां ॥
पथ्यांतिक्ताकणाव्योषयुक्तांवाश्वासनाशनीं ॥

अर्थ–भारंगमूळ, ज्येष्ठीमध, हरीतकी, पिंपळी, कुटकी, सुंठ, मिरीं व पिंपळी यांचें चूर्ण मध व तूप यांतून द्यावें; ह्मणजे श्वासाचा नाश करितें.

## गुडाद्यवलेह.

गुडदाडिममृद्वीकापिप्पलीविश्वभेषजैः ॥
मातुलिंगरसंक्षौद्रंलीढंश्वासनिबर्हणं ॥

अर्थ–गूळ, डाळिंब, द्राक्षें, पिंपळी व सुंठ यांचें चूर्ण माहळुंगाच्या रसातून द्यावें; ह्मणजे श्वासाचा नाश करितें.

## वासाद्यवलेह.

वासातुलामष्टगुणेचनीरेविपाच्यतांपादजलेनसाकं ॥ क्षुण्णाढकंतद्विपचेच्छिवानांखंडाप्रयोज्यासकलस्यतुल्या ॥ ततःसमुत्तार्यपलानिचाष्टौ क्षौद्रस्यचद्वेकिलवंशजायाः ॥ क्षिपेत्तथामागधिकापलार्धपलंचतुर्जातभवंप्रयोज्यं ॥ योज्यंपलार्धश्वसनेचकासेक्षयेस्रपित्तेकफपीनसेच ॥ हृद्रोगकार्श्येकिलविद्रधौचउरःक्षतेशोणितवातिकोपे ॥

अर्थ–अडुळसा ४०० तोळे व ३२०० तोळे पाणी घेऊन त्यांत चतुर्थांश काढा

करून त्यांत हरीतकीचूर्ण २९६ तोळे घालून पुनः पचन करावा. दाट झाला ह्मणजे उतरून शीत झाल्यावर मध ३२ तोळे, वंशलोचन ८ तोळे, पिंपळी २ तोळे व चातुर्जात ४ तोळे घालून त्यांतून दोन तोळे घेत जावा; ह्मणजे श्वास, कास, क्षय, रक्तपित्त, कफ, पडसें, हृद्रोग, कृशता, विद्रधी, उरःक्षत, आणि रक्ताची वांति यांचा नाश करितो.

## सितादिचूर्ण.

सिताद्राक्षाकणाचूर्णसमांशंतैलपाचितं ॥
भक्षितंदारुणंश्वासंनिवर्तयतिवेगतः ॥

अर्थ—साकर, द्राक्षें व पिंपळी यांचे समभाग चूर्ण तैलांत पचन करावें. ते भक्षण केलें असतां; अतिदारुणश्वासाचा वेगानें नाश होतो.

## शिलाद्यवलेह.

शिलाव्योषभयाहिंगुमणिमंथविडंगकैः ॥
लेहःसाज्यमधुःकासहिक्काश्वासेषुशस्यते ॥

अर्थ—मनशिळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, हरीतकी, हिंग, सैंधव, आणि वावडिंग यांचा लेह मध व तूप यांतून द्यावा, हा श्वास व खोकला यांवर प्रशस्त आहे.

## राजिकादिगुटी.

राजिकाक्षीरिकंदश्चचपलाचरसोनकं ॥ ऊपणातिविषादेवकु
सुमंचविचूर्णितं ॥ मार्कवार्ककुमारीभिर्निर्गुंडीमुंडिचित्रकैः ॥
भावयित्वापृथक्सर्वैःश्वासकासनिकृंतनं ॥

अर्थ—मोहऱ्या, पांढरा भुयकोहळा, पिंपळी, लसूण, मिरीं, अतिविष व लवंग यांचे चूर्ण एकत्र करून त्याला माक्याचा रस, रुईचा चीक, कोरफड, निर्गुड, *मुंडी व चित्रक यांच्या प्रत्येकांच्या भावना द्याव्या, ह्या गोळ्या श्वास व खोकला यांचा नाश करितात.

## सूर्यावर्तरस.

सूतार्धबलिमेकयाममभितःकृत्वारसैर्मर्दयेत्तत्तुल्यंद्वैनसमंतुशुल्वजलदंलि
प्त्वाघटीयंत्रकैः । पक्त्वैकाहमथाहरेन्निगदितोवल्लोन्मितःश्वासजि
त्सूर्यावर्तरसोथगंधमरिचैःसाज्यःकफश्वासजित् ॥

अर्थ—पारा १ भाग व गंधक ॥ भाग हीं एक प्रहर घोटून त्यांच्या समान ताम्र घालून नागरमोथ्याने लिंपून घटीयंत्राने एक दिवस पचऊन काढून एक वाल गंधक, मिरीं व तूप यांजबरोबर द्यावा; ह्मणजे कफश्वास नाश पावतो.

## अमृतार्णवरस.

पारदंगंधकंशुद्धंमृतंलोहंचटंकणं ॥ रास्नाविडंगत्रिफलादेव दारुकटुत्रयं ॥ अमृतापद्मकंक्षौद्रंविषंतुल्यंसचूर्णितं ॥ त्रिगुंजंश्वासकासार्तंसेवयेदमृतार्णवं ॥

अर्थ—पारा, गंधक, लोहभस्म, टाकणखार, रास्ना, वावडिंग, हरडा, बेहडा, आवळकाठी, देवदार, सुंठ, मिरीं, पिंपळी, गुळवेल, पद्मकाष्ठ, मध व बचनाग या सर्वांचे चूर्ण एकत्र करून तें तीन गुंजा श्वास व खोकला यांणीं पीडित मनुष्याला द्यावें, ह्याला अमृतार्णवरस ह्मणतात.

## श्वासहेमाद्रिरस.

आच्छादितांशिलांताम्रेद्विगुणंवालुकाह्वये ॥ पक्त्वासंचूर्ण्य गंधेशौदिनार्धंतांपुनःपचेत् ॥ श्वासहेमाद्रिनामायंमहाश्वा सविनाशनः ॥ वर्णवृद्धिकरोह्येषसौवर्ण्यश्चनसंशयः ॥

अर्थ—मनशीळ तांब्याच्या करंड्यांत भरून वालुकायंत्रांत पचवावा; नंतर करंड्या-सुद्धां चूर्ण करून त्यांत पारद व गंधक यांचा कज्जली देऊन पुनः अर्धादिवस पचन करावा, हा श्वासहेमाद्रिनामा रस, माहाश्वासाचा नाश करितो.

## उदयभास्कर.

धान्याभ्रंसूतकंगंधंश्वेतापामार्गजद्रवैः ॥ तुल्यांशंमर्दयेच्चायःपात्रेपाच नकंपचेत् ॥ ऊर्ध्वलग्नंततोग्राह्यंरसोत्युदयभास्करः ॥ श्वासंपंचविधं हंतिगुंजाद्वयानुपानतः ॥ निष्कैकंलेहयेच्चानुक्षौद्रेणकटुरोहिणीं ॥

अर्थ—धान्याभ्रक घेऊन त्यांत गंधक व पारा अभ्रकाच्या समान घालोन पांढऱ्या आघाड्याच्या रसांत त्याचा खल करावा; नंतर डमरूयंत्रांत घालोन अग्नि द्यावा; ह्मणजे वरचे भाड्यांत लागलेला पारा काढून घ्यावा, ह्याला उदयभास्कर ह्मणतात. हा २ गुंजा अनुपानाशीं द्यावा. वर मध व कुटकीचें चूर्ण द्यावें; ह्मणजे ५ प्रकारच्या श्वासाचा नाश होतो.

## श्वासकालेश्वर.

मृतंवंगंमृतंलोहंमृतार्कंमृतमभ्रकं ॥ शुद्धसूतंतथागंधंमाक्षिकंहिंगुलं विषं ॥ जातीफलंलवंगंचत्वगेलानागकेसरं ॥ उन्मत्तकस्यबीजानि जैपालंरात्रिदुर्लभं ॥ एतानिसमभागानिमरिचंहरनेत्रयोः ॥ सर्वंत च्चाक्षिपेत्खल्वेलोहदंडेनमर्दयेत् ॥ तावच्चूर्णीकृतंधीमान्यावत्सूताने दृश्यते॥शक्रासनस्यस्वरसैर्भावनाएकविंशतिः ॥ द्विगुंजाउत्तमामा

त्राआर्द्रकस्वरसैर्युता॥तदर्धंबालवृद्धेषुपथ्यंदेयंतदुच्यते॥ पंचश्वासान्क्ष यंकासंराजयक्ष्मनिवारणं॥श्वासकालेश्वरोनामलोकानामपिदुर्लभः॥

अर्थ–लोहभस्म, ताम्रभस्म, अभ्रकभस्म, शुद्ध पारा, शुद्ध गंधक, सुवर्णमाक्षिक, हिंगुळ, बचनाग, जायफळ, लवंगा, दालचिनी, एलची, नाकेशर, धोतऱ्याचें बी, जेपाल, हळद व कचोरा हीं समभाग; व मिरीं ३ भाग या प्रमाणें सर्व खलांत घालोन लोखंडाच्या बत्यानें पारा मिळून जाईपर्यंत घोटून कुडयाच्या स्वरसांत २१ भावना द्याव्या. त्यांतून २ गुंजा आल्याच्या रसाशीं सशक्ताला द्यावा; आणि बाल व वृद्ध यानां १ गुंज द्यावा; आणि पथ्य करवावें; ह्मणजे ५ प्रकारचे श्वास, क्षय, खोकला, राजयक्ष्मा, यांचा नाश करितो. हा श्वासकालेश्वरनामक रस देवानां ही दुर्लभ आहे.

## पारदादिगुटी.

पारदंगंधकंनागंताम्रंव्योषानलैःसमं ॥ सर्जरसेनसंचूर्ण्यप्रदे याभावनादश॥ पुनःपत्ररसेसम्यक्चार्द्रकस्यरसैस्तथा ॥ मि रिप्रमाणाकफजित्कार्यासागुटिकोत्तमा ॥ मंदाग्निकफरोगेषु श्वासकासेविशेषतः ॥आध्मानप्रतिपन्नार्तप्रदेयासुखकारिणी ॥

अर्थ–पारद, गंधक, नाग, ताम्र, संठ, मिरीं, पिंपळी, चित्रक, आणि सर्जरस यांचें समभाग चूर्ण करून पानवेलीच्या रसांत त्यास १० भावना द्याव्या; व आल्याच्या रसाच्या १० भावना द्याव्या; आणि मिऱ्यां प्रमाणें गोळ्या कराव्या. ती मंदाग्नि, कफरोग, श्वास, कास, आणि पोटाची फुगवटी यांवर द्यावी; ह्मणजे सुखदायक होत्ये.

## लवंगादिगुटी.

लवंगमरिचेतुल्येत्रिफलारसभाविते ॥
बब्बूलत्वचयाकार्यागुटीश्वासकफापहा ॥

अर्थ–लवंग, मिरीं व त्रिफला यांचें चूर्ण समभाग एकत्र करून त्याची बाभळीच्या सालीच्या काढयांत गोळी करावी. ती श्वास व कफ यांचा नाश करित्ये.

## दुसरा प्रकार.

लवंगत्रिकटूनागभृंगीक्षुद्राविभीतकैः ॥
कन्यारसेनगुटिकाकार्याश्वासनिवारिणी ॥

अर्थ–लवंगा, संठ, मिरीं, पिंपळी, बचनाग, माका, रिंगणी व बेहेडा यांचे समभाग चूर्ण एकत्र करून कोरफडाच्या रसांत घोटून गोळ्या कराव्या. त्यांतून एकेक द्यावी; ह्मणजे श्वासाचा नाश करित्ये.

## त्रिकटुवटी.

त्रिकटुटंकणंनागपत्रेणक्रियतेवटी ॥
मिरीप्रमाणाकफजिन्नाम्नात्रिपुरभैरवी ॥

अर्थ—हरडा, बेहडा, आवळकाठी व टाकणखार यांचें चूर्ण समभाग घेऊन एकत्र करून त्याला विड्याच्या पानांच्या रसांत घोटून गोळी मिऱ्या एवढी करावी. ती त्रिपुरभैरवी कफाचा नाश करित्ये.

## फलत्रयगुटी.

फलत्रयंनागरदारुकृष्णाविषानपावेल्लसुवर्णबीजैः ॥
दिनत्रयंभृंगरसैर्विमर्द्यकार्यागुटीश्वासकफापहारिणी ॥

अर्थ—हरडा, बेहेडा, आवळकाठी, सुंठ, देवदार, पिंपळी, बचनाग, वाळा, मिरीं व धोत ऱ्याचें बीं हीं माक्याच्या रसांत घोटून गोळी करावी. ही श्वास, कफ यांचा नाश करित्ये.

## स्नुहीदुग्धयोग.

वल्लयुग्मंस्नुहीदुग्धंगुडयुक्तंनिषेवणात् ॥
कासःश्वासःक्षयरोगोहृद्रोगश्चप्रणश्यति ॥

अर्थ—दोन वाल निवडुंगाचें दूध घेऊन गुळाशीं खावें; ह्मणजे खोकला, श्वास, क्षय, आणि हृद्रोग हे नाश पावतात.

## श्वासकुठार.

रसोगंधोविषंचापिटंकणंचमनःशिला ॥ एतानिकर्षमात्राणिमरिचं चाष्टकर्षकं ॥ कटुत्रयंकर्षयुग्मंपृथगत्रविनिःक्षिपेत् ॥ रसःश्वासकुठारोयंसर्वश्वासनिवारणः ॥

अर्थ—पारा, गंधक, बचनाग, टाकणखार व मनशीळ हीं एकेक तोळा, मिरीं तोळे, सुंठ, मिरीं व पिंपळी हीं २ तोळे यांचीं चूर्णें एकत्र करून खल करावा; ह्मणजे हा श्वासकुठार संपूर्ण श्वासरोगांचा नाश करितो,

## दुसरा प्रकार.

रसंगंधंविषंचैवटंकणंचमनःशिला ॥ एतानिटंकमात्राणिमरिचंचाष्ट टंककं ॥ एकैकंमरिचंदत्वाखल्वेसूक्ष्मंविमर्दयेत् ॥ त्रिकटुटंकषट्कं चदत्वापश्चाद्विचूर्णयेत् ॥ सर्वमेकत्रसंयोज्यकाचकूप्यांविनिःक्षिपेत् ॥ श्वासेकासेचमंदाग्नौवातश्लेष्मामयेषुच ॥ गुंजामात्रंप्रदातव्यंपर्णखं

डेनधीमतां ॥ सन्निपातेचमूर्छायामपस्मारेतथापुनः ॥ अतिमोहत्व मापन्नेनस्यंदद्याद्विचक्षणः ॥ रसःश्वासकुठारोयंसर्वश्वासगदप्रणुत् ॥

अर्थ—पारा, गंधक, बचनाग, टाकणखार व मनशीळ हीं एकेक तोळा, मिर्‍यें ८ तोळे, सुंठ, मिरीं व पिंपळी, हीं प्रत्येकीं दोन तोळे घेऊन त्यांचीं वस्त्रगाळ बारीक चूर्ण करून एकत्र खल करून काचकुपींत भरून ठेवावा; आणि श्वास, कास, मंदाग्नि, वातश्लेष्मसंबंधी रोग, यांवर विड्याचे पानाशीं एक गुंज द्यावा; व संन्निपात, मूर्छा, अपस्मार व अतिमोह पावलेल्या रोग्यांस याचें नस्य द्यावें. हा श्वासकुठार संपूर्ण श्वासरोगाचा नाश करितो.

## मरीच्यादिगुटिका कासादिकावर.

मरिचंकर्षमात्रंस्यात्पिप्पलीकर्षसंमिता ॥ अर्धकर्षोयवक्षारःकर्षयु ग्मंचदाडिमं ॥ एतच्चूर्णीकृतंयुंज्यादष्टकर्षगुडेनहि ॥ शाणप्रमाणां गुटिकांकृत्वावक्त्रेविधारयेत् ॥अस्याःप्रभावात्सर्वेपिकासायांत्येवसंक्षयं॥

अर्थ—मिर्‍यें एक कर्ष, पिंपळी एक कर्ष, जवखार अर्धा कर्ष, डाळिंबसाल २ कर्ष, या चार औषधांचें चूर्ण करून आठ कर्ष गूळ घेऊन त्यांत तें टाकून गोळ्या शाणप्रमाण कराव्या; आणि गोळी मुखांत धरावी. तेणेंकरून सारे कास दूर होतात, या विषयीं संशय नाहीं.

## श्वासेपथ्य.

विरेचनंस्वेदनधूम्रपानप्रच्छर्दनानिस्वपनंदिवाच ॥ पुरातनाःषष्टिक रक्तशालिकुलित्थगोधूमयवाःप्रशस्ताः ॥ शशाहिभुक्तित्तिरिलाव दक्षःशुकादयोधन्वमृगाद्विजाश्च ॥ पुरातनंसर्पिरजाप्रभूतंपयोघृतंवा पिसुरामधूनि ॥ पटोलवार्ताकरसोनबिंबीजंबीरतंदूलीयवास्तुकंच ॥ द्राक्षातृटिःपौष्करमुष्णवारिकटुत्रयंगोजनितंचमूत्रं ॥ अन्नानिपाना निचभेषजानिश्लेष्मानिलघ्नानिचपथ्यवर्गः ॥

अर्थ—विरेचन, स्वेदन, धूम्रपान, वांति, दिवानिद्रा व जुन्या साठकी साळी, कुळिथ, गहूं, यव, आणि ससा, मोर, तित्तिर, लावा, चाष, शुक, धन्वदेशांतील मृग, पक्षी, आणि शेळीचें जुनें तूप, दूध, मद्य, मध, आणि पडवळ, वांगे, लसुण, तोंडली, जांबीर, तांदुळजा, चारोळी, द्राक्षें, बारीक वेला, पुष्करमूळ, उष्णोदक, त्रिकटु, गोमूत्र, आणि कफवातनाशक अन्न, पान व औषध, असा हा श्वासरोग्याला पथ्यवर्ग सांगितला.

## अपथ्य.

रक्तस्रावंपर्ववातान्नपानंमेषीसर्पिर्दुग्धमंभोपिदुष्टं ॥ मत्स्याःकंदाःस

र्षपाश्चात्यपानंरूक्षंशीतंगुर्वपिश्वासिवर्ज्यं ॥मूत्रोद्गारच्छर्दितृट्श्वास रोधोनस्यंबस्तिर्दंतकाष्ठंश्रमंच ॥

अर्थ–रक्त काढणें, पूर्वेचा वायु, पूर्वेचें अन्न, पाम व शेळीचें दूध, तूप व बिघडलेलें पाणी, मासे, कंद, मोहऱ्या, रुक्ष व जड अन्न व पान हे पदार्थ श्वासरोग्यानें वर्ज्य करावे.

## दंभ.

कक्षप्रदेशादपिपार्श्वयुग्मेकरस्थयोर्मध्यमयोर्धयोश्च ॥
प्रदीप्तलोहेनचकंठकूपेदाहोपिचश्वासिनिदंभउक्तः ॥

अर्थ–काखेपासून खाली समूर बाहूचे अधप्रदेशाचे समारानें दोहों बाजूस बिरखडीवर लोह तापवून डाग द्यावा; किंवा गळयाच्या खळगींत डाग द्यावा.

---

# अथ स्वरभेदनिदान.

अत्युच्चभाषणविषाध्ययनाभिघातसंदूषणैःप्रकुपिताःपवनादयस्तु ॥
स्रोतःस्सुतेस्वरवहेषुगताःप्रतिष्ठांहन्युःस्वरंभवतिचापिहिषड्विधःसः ॥

अर्थ–अत्युच्चभाषण, विष, अत्युच्चस्वरें करून अध्ययन व कंठाचा ठायीं लाकुडादि. कांचा अभिघात इत्यादि कारणानीं वातादि दोष कुपित होऊन स्वरवाहिनीशिरांप्रत जाऊन त्यानां दुष्ट करितात; आणि स्वराचा नाश करतात तो स्वरभेद साहा प्रकारचा. ते प्रकार वात, पित्त, कफ, सन्निपात, क्षय, मेद, यांणीं होतात असे जाणावे.

## चिकित्साप्रक्रिया.

वातेसलवणंतैलंपित्तेसर्पिःसमाक्षिकं ॥
कफेसक्षारकटुकंक्षौद्रंकेवलमिष्यते ॥

अर्थ–वातस्वरभेदावर क्षार व तैल; आणि पित्तस्वरभेदावर तूप व मध; आणि कफस्वरभेदावर क्षार व तिखट रस व मध असे उपचार योजावे.

गलेतालुनिजिव्हायांदंतमूलेषुचाश्रितः ॥
तेननिष्क्रमतेश्लेष्मास्वरश्चाशुप्रसीदति ॥

अर्थ–कफ, गळा, तालू, जिभ, दंतमूल, यांचा आश्रय करून राहाला. तो वरच्या औषधांनीं निघून गेला असतां; स्वर स्वच्छ होतो.

## स्वरभेदसामान्यचिकित्सा.

वातादिजनितश्वासकासघ्नाथेप्रकीर्तिताः ॥
योगास्तानत्रयुंजीतयथादोषंचिकित्सकः ॥

अर्थ-वातादिक दोषांपासून झालेल्या स्वरभेदावर वातादिजनित श्वासकासांवरचे उपचार योजावे.

स्वरोपघातेमेदोजेकफवद्विधिरिष्यते ॥
क्षयजेसर्वजेवापिप्रत्याख्यायचरेत्क्रियां ॥

अर्थ मेदापासून झालेल्या स्वरभेदावर कफजनितस्वरभेदावरचे उपचार करावे; आणि क्षयज व त्रिदोषज स्वरभेद असाध्य समजून; नंतर त्यांवर योग्य क्रिया करावी.

## वातिकस्वरभेदनिदान.

वातेनकृष्णनयनाननमूत्रवर्चाभिन्नंशनैर्वदतिगर्दभवत्स्वरंच ॥

अर्थ-वातेंकरून स्वरभेद झाला असतां; रोग्याचे नेत्र, मुख, पुरीष व मूत्र हीं कृष्णवर्ण होतात; आणि गर्दभाचे स्वरासारिखा स्वर सावकाशीनें कंठांतून काढितो.

## मरीचघृतपान.

स्वरोपघातेनिलजेभुक्त्वोपरिघृतंपिबेत् ॥
मरीचचूर्णसहितंमरुत्स्वरहतिप्रणुत् ॥

अर्थ-वायुपासून झालेल्या स्वरभेदावर जेवण झाल्यावर तूप व मिरपुड खावी; म्हणजे वातस्वरभेद दूर होईल.

## [illegible]गुडोदन.

आद्येकोष्णजलंपयंजग्ध्वाघृतगुडोदनं ॥
पीतंघृतंहंत्यनिलंसिद्धंमार्कवजेरसे ॥

अर्थ-तूपभातांत गुळ घालोन खावा, वर ऊन पाणी प्यावें; म्हणजे वातापासून झालेला स्वरभेद नीट होतो. तसेंच माक्याचा रस व तूप एकत्र करून रस आटवून तें तूप प्यावें; म्हणजे वातानें बिघडलेला स्वर नीट होतो.

## कासमर्दादिघृत.

कासमर्दरसंदत्वाभार्ङीकल्कंशनैःशनैः ॥
सिद्धंसर्पिर्हितंपीतंस्वरभेदंमरुद्भवम् ॥

अर्थ-कासविंद्याचा रस, आणि भारंगमुळाचें चूर्ण, याणीं मंदाग्नीवर सिद्ध केलेलें तूप प्यालें असतां; वातोत्पन्न स्वरभेदावर प्रशस्त आहे.

## व्याघ्रीघृत.

व्याघ्रीस्वरसविपक्वंरास्नावाट्यालगोक्षुरैःसिद्धं ॥
सर्पिःस्वरोपघातंहन्यात्कासंचपंचविधं ॥

अर्थ–रिंगणीचा स्वरस, रास्ना, चिकणा व गोखरु यांचा कल्क; किंवा काढा यांत सिद्ध केलेलें तूप स्वरभंग व ५ प्रकारचा खोकला यांचा नाश करितो.

## पैत्तिकस्वरभेदनिदान.

पित्तेनपीतनयनाननमूत्रवर्चाब्रूयाद्गलेनसचदाहसमन्वितेन ॥

अर्थ–पैत्तिक स्वरभेदामध्यें नेत्र, मुख, मूत्र व विष्ठा इत्यादि पीत वर्ण होतात; आणि बोलत्येवेळीं गळा दाहयुक्त होतो.

## सामान्यचिकित्सा.

पैत्तिकेतुविरेकःस्यात्पयश्चमधुरैःशृतं ॥
लिह्यान्मधुरवस्तूनांचूर्णमधुसमन्वितं ॥

अर्थ–पैत्तिकस्वरभेदावर रेचन द्यावें, साकर किंवा दुसरे मधुर पदार्थ घालून तापलेलें दूध अथवा गोडपदार्थांचें चूर्ण मधाबरोबर सेवनार्थ द्यावें.

## ज्येष्ठीमधकाढा.

अश्नीयाच्चससर्पिष्कंयष्टीमधुकषायकं ॥

अर्थ–पैत्तिकस्वरभेदावर जेष्ठीमधाचा काढा तूप घालून प्यावा.

## पयःपान.

शर्करामधुमिश्राणिशृतानिमधुरैःसह ॥
पिबेत्पयांसियस्योच्चैर्वदतोपिहतःस्वरः ॥

अर्थ–मोठ्यानें बोलोन ज्याचा स्वरभेद झाला त्यानें साकर, मध यांणीं मिश्रित, आणि कांहीं गोड पदार्थ घालोन तापलेलीं अशीं दुधें प्यावीं.

## शतावरीचूर्ण.

शतावरीचूर्णयोगंबलाचूर्णमथापिवा ॥
लाजाशतावरीचूर्णंलिह्यान्मधुसितायुतं ॥

अर्थ–शतावरी व चिकणा यांचें चूर्ण अथवा लाह्या व शतावरी यांचें चूर्ण मध व साकर यांचे बरोबर खावें; ह्मणजे पित्तस्वरभेद स्वच्छ होतो.

## शुंठीघृत

शुंठीत्वचोदुग्धवतांद्रुमाणांसंपिष्यदुग्धेविपचेत्तुनेन ॥
कल्केनयष्टीमधुकस्यसर्पिःसशर्करंपित्तरुजामयघ्नं ॥

अर्थ–सुंठ व दालचीनी, यांचें चूर्ण, वड इत्यादिक जे क्षीरीवृक्ष यांचे दुधांत शि-जवून तुपसाकरेबरोबर खावें; अथवा जेष्ठीमधाचें चूर्ण तुपसाकरेबरोबर खावें; तें पि-त्तापासून झालेल्या स्वरभेदाचें नाशक आहे.

## पित्तस्वरभेद.

कासमर्दकवार्ताकमार्कवैःस्वरसैर्युतं ॥
क्षीरानुपानंपैत्तेषुपिबेत्सर्पिरतंद्रितः ॥

अर्थ–कासविंदा, वांगें व माका यांचा अंगरस तूप घालोन प्यावा, वर दूध प्यावें; ह्मणजे पित्तापासून झालेला स्वरभेद नीट होतो.

## कफस्वरभेदनिदान.

ब्रूयात्स्वनेनसततंकफरुद्धकंठःस्वल्पंशनैर्वदतिचापिदिवाविशेषात् ॥

अर्थ–कफजनितस्वरभेदामध्ये निरंतर कफानें गळा रोधलेला असतो, या करितां हळू व सावकास भाषण करितो; परंतु कफ दिवसास मंद असतो, या करितां दिवसास भाषणानें सुख होते; व रात्री फार क्लेश होतात.

## पिप्पलीयोग.

पिप्पलीपिप्पलीमूलंमरिचंविश्वभेषजं ॥
पिबेन्मूत्रेणमतिमान्कफजेस्वरसंक्षये ॥

अर्थ–पिंपळी, पिंपळमूळ, मिरें व सुंठ, यांचें चूर्ण गोमूत्रांत घालून प्यावें; ह्मणजे कफापासून बिघडलेला स्वर नीट होतो.

## आम्लवेतसादिचूर्ण.

चव्याम्लवेतसकटुत्रयतिंत्तिडीकंतालीसजीरकतुगादहनैःसमांशैः ॥
चूर्णंगुडप्रमुदितंत्रिसुगंधियुक्तंवैस्वर्यपीनसकफारुचिषुप्रशस्तं ॥

अर्थ–चवक, आम्लवेतस, सुंठ, मिरें, पिंपळी, आंबसोल, तालीसपत्र, जिरें, वंशलो-चन, चित्रक, दालचिनी, तमालपत्र व वेलदोडे यांचें चूर्ण गुळाबरोबर खावें; ह्मणजे स्वरभेद, पीनस, कफ व अरुचि यांवर प्रशस्त आहे.

## गंडूष.

आर्द्रकस्वरसोपेतंसैंधवंचकटुत्रिकैः ॥

बीजपूररसैःसार्धंगंडूपःकफकेसरी ॥

अर्थ—आल्याचा रस, सैंधव, त्रिकटु, माहाळुंगाचा रस यांचा गंडूष ह्मणजे चूळ भरून टांकणें हें कफगजाला सिंव्हासारिखें नाश करणारें आहे.

## कटुकादिकाढा.

कटुकातिविपापाठादारुमुस्तकालिंगकाः ॥

गोमूत्रक्कथिताःपेयाःकंठरोगविनाशनाः ॥

अर्थ—कटुकी, अतिविष, पाहाडमूळ, दारुहळद, नागरमोथे व इंद्रजव हीं गोमूत्रांत कढवून प्यावीं; ह्मणजे तीं कंठरोगनाशक आहेत.

## सन्निपातस्वरभेदनिदान.

सर्वात्मकेभवतिसर्वविकारसंपत्तंचाप्यसाध्यमृपयःस्वरभेदमाहुः ॥

अर्थ—सन्निपातस्वरभेद पूर्वोक्त सर्व लक्षणेंकरून युक्त असतो, त्यालाच ऋषि असाध्य ह्मणतात.

## अजमोदादिचूर्ण.

अजमोदानिशाधात्रीक्षारंवन्हिंविचूर्णयेत् ॥

मधुसर्पिर्युतंलीढ्वात्रिदोपस्वरभंगनुत् ॥

अर्थ—अजमोदा, हळद, आवळकाठी, जवखार व चित्रक यांचें चूर्ण मध व तूप यांचे बरोबर चाटावें; तें त्रिदोषापासून झालेल्या स्वरभेदाचा नाश करील.

## फलत्रिकचूर्ण.

फलत्रिकत्र्यूपणयावशूकचूर्णानिहन्युःस्वरभंगमाशु ॥

किंवाकुलित्थंवदनांतरस्थंस्वरामयंहंत्यथपौष्करंवा ॥

अर्थ—त्रिफळा, त्रिकटु व जवखार यांचें चूर्ण अथवा कुलित्थ, अथवा पोखरमूळ हीं स्वरभेदाचीं नाशक आहेत.

## निदिग्धिकावलेह.

निदिग्धिकातुलाग्राह्यातदर्धंग्रंथिकस्यतु ॥ तदर्धंचित्रकस्यापिदशमूलंचतत्समं ॥ जलद्रोणद्वयेक्काथ्यंगृण्हीयादाढकंततः ॥ पूतेक्षिपेत्त दर्धंतुपुराणस्यगुडस्यच ॥ सर्वमेकत्रकृत्वातुलेहवत्साधुसाधयेत् ॥ अष्टौपलानिपिप्पल्यास्त्रिजातकपलंतथा ॥ मरिचस्यपलंचैकंसर्वमेक

त्रचूर्णितं ॥ मधुनःकुडवंदत्वातदश्नीयाद्यथानलं ॥ निदिग्धिकावले हीयंभिषग्भिर्मुनिभिर्मतः ॥ स्वरभेदहरोमुख्यःप्रतिश्यायहरस्तथा ॥ कासश्वासाग्निमांद्यादीन्गुल्ममेहगलामयान् ॥ अनाहंमूत्रकृछ्राणिह न्याद्ग्रंथ्यर्बुदानिच ॥

अर्थ–रिंगणी ४०० तोळे, पिपळमूळ २०० तोळे, चित्रक १०० तोळे व दशमुळें १०० तोळे, याप्रमाणे घेऊन २०२८ तोळे पाण्यांत कढवून २५६ तोळे पाणी उरलें ह्मणजे गाळून घेऊन त्यांत १२८ तोळे जुना गुळ घालावा; आणि पुनः मंदाग्नीवर ठवळून दाट लेहाप्रमाणे करावें; नंतर ३२ तोळे पिंपळी, आणि दालचिनी, वेलदोडे, तमालपत्र, मिळून ४ तोळे; मिरें ४ तोळे, इतके टाकून नंतर १६ तोळे मध घालावा; आणि कालवून यथाशक्ति खावें. ह्याला निदिग्धिकावलेह असें ह्मणतात. वैद्य व ऋषि यांस मान्य आहे. मुख्यत्वेंकरून स्वरभेदनाशक आणि पडसें यांचा नाशक आहे. कास, श्वास, अग्निमांद्य, गुल्म, मेह, कंठरोग, आनाह, मूत्रकृच्छ, ग्रंथि व अर्बुद इतक्यांचा ही नाशक आहे.

## क्षयकृतस्वरभेद व मेदजस्वरभेद निदान.

धूम्येतवाक्क्षयकृतेक्षयमाप्नुयाच्चमेदेपुचापिहतवाक्परिवर्जनीयः ॥ अंतर्गतस्वरमलक्ष्यपदंचिरेणमेदःक्षयाद्वदतिदिग्धगलस्तृषालुः ॥

अर्थ–धातुक्षयकृतस्वरभेदाचे ठाई बोलतेवेळीं वाणींतून धूर निघाल्या सारिखे भासतें; आणि शब्दाचा क्षय होतो. या धातुक्षयकृतस्वरभेदामध्ये हतवाक् रोगी सोडावा; व मेदक्षयजन्यस्वरभेदाचा ठायीं मेदानें किंवा कफानें कंठ लिप्त होतो. त्यामुळें वाक्य समजून येत नाहीं असें सावकाशीनें बोलतो; व रोग्याचा कंठ शुष्क होतो; आणि तृषा लागते.

## असाध्यलक्षण.

क्षीणस्यवृद्धस्यकृशस्यचापिचिरोत्थितोयश्चसहजोपिजातः ॥ मेदस्विनः सर्वसमुद्भवश्चस्वरामयोनापिहिसिद्धिमेति ॥

अर्थ–क्षीण, वृद्ध, कृश, यांचा व बहुत दिवसांचा व जन्मकाळीं देहाबरोबर झालेला मेदक्षयजनित व सन्निपातिक, हे सर्व स्वरभेद असाध्य जाणावे.

## क्षयज व मेदजस्वरभंग चिकित्सा.

क्षयजेस्वरभेदेतुतत्रोक्तंविधिमाचरेत् ॥
कटुतिक्तकषायाद्यैर्मेदःस्वरहृतिंजयेत् ॥

अर्थ–क्षयापासून झालेल्या स्वरभेदावर क्षयावरचा उपचार करावा; आणि मेदजस्वरभेदावर तिखट, कडु व तुरट इत्यादि औषधांनीं उपचार करावा.

## जातीफलावलेह.

जातीफलैलामधुमातुलिंगैःपत्रैश्चलाजैर्युतपिप्पलीकैः ॥
कृतोवलेहःकुरुतेनराणांकंठेध्वनिंकिंनरनादतुल्यं ॥

अर्थ—जायफळ, वेलदोडे, मध, महाळुंग, तमालपत्र, लाह्या व पिंपळी यांचा लेह किंनराचे स्वराप्रमाणे मनुष्यकंठाचा स्वर करितो.

## काकजंघादिधार्य.

काकजंघावचाकुष्ठंपिप्पलीमधुसंयुतं ॥
सप्तरात्रंमुखेधार्यंकिंनरैःसहगीयते ॥

अर्थ—लघुकावळी, वेखंड, कोष्ठ, पिंपळी व मध यांची गोळी मुखांत सात दिवस धरली तर, किंनराचे बरोबर गाईल.

## जातीदलादिलेह.

जातीदलैलापिप्पलिलामज्जकमधुमातुलिंगदललेहः ॥
सतताभ्यासात्कुरुतेकिन्नरमधुरस्वरंरुचिरं ॥

अर्थ—जाईचीं पानें, वेलदोडे, पिंपळी, पिवळें गवत, मध, माहाळुंग व तमालपत्र, यांचा लेह संतत सेवन केला असता; किंनरासारखा मधुर व सुंदर स्वर होतो.

## गुडूच्यादिलेह.

गुडूच्यपामार्गविडंगशंखिनीवचातथाशुंठिशतावरीसमं ॥
घृतेनलीढंप्रकरोतिमानवंत्रिभिर्दिनैःश्लोकसहस्रधारिणं ॥

अर्थ—गुळवेल, आघाडा, वावडिंग, यवतिक्ता, वेखंड, सुंठ व शतावरी, यांचें चूर्ण तुपाबरोबर चाटलें असतां; मनुष्याला तीनदिवसांत नित्य सहस्रश्लोकधारण करण्याची शक्ति येते.

## बदरीकल्क.

बदरीपत्रकल्कंवाघृतभृष्टंससैंधवं ॥
स्वरोपघातेकासेचलेहमेनंप्रयोजयेत् ॥

अर्थ—बोरीचे पानाचा कल्क सैंधवासहवर्तमान तळावा, तो लेह स्वरोपघात, कास यांवर द्यावा.

## आरनालचूर्ण.

विहितमसृणचूर्णान्यारनालेनसार्धं ॥
कलितरुफलकृष्णासैंधवानिप्रलिह्यात् ॥

अर्थ–बेहडा, पिंपळी व सैंधव यांचें चूर्ण बारीक करून कांजीत घालून घ्यावें; म्हणजे स्वरभेदाचा नाश होतो.

अभिलपतिविजेतुंयःस्वरस्यप्रणाशं ॥
सपिबतिसहदुग्धेनामलक्याःफलंवा ॥

अर्थ–स्वरभेद जिंकण्याची जो इच्छा करील, त्याणें दुधांत आवळकाठीची पूड टाकून घ्यावें.

## खदिरधार्य.

तैलाक्तंस्वरभेदेवाखादिरंधारयेन्मुखे ॥
पथ्यापिप्पलियुक्तंवासंयुक्तंनागरेणवा ॥

अर्थ–शिरसाचे तेलांत भिजवून कात तोंडांत धरावा; अथवा हिरडा व पिंपळी यांचे बरोबर अथवा सुंठीचे बरोबर तोंडांत धरिला असतां; नीट स्वर होतो.

## गोरक्षवटी.

रसभस्मार्कलोहस्यभावितस्यत्रिसप्तधा ॥ क्षुद्राफलरसैर्मुद्गतु
ल्याकार्यावटीशुभा ॥ मुखस्थाहरतेसर्वंस्वरभंगमसंशयं ॥
गोरक्षनाथैर्गदितास्वरामयिकृपालुभिः ॥

अर्थ–पारदभस्म, ताम्रभस्म व लोहभस्म या तिघांस एकत्र करून रिंगणीच्या फळाचे रसाच्या २१ भावना देऊन मुगाप्रमाणें गोळ्या कराव्या. त्यांतील गोळी तोंडांत धरली असतां; निःसंशय स्वरभेदहरण करील. गोरक्षनाथ म्हणून कोणी होते त्यांणी कृपाळु होऊन ही स्वरभेदावर गुटिका सांगितली आहे.

## ब्राह्म्यादिचूर्ण.

ब्राह्मीमुंडीवचाशुंठीपिप्पलीमधुसंयुता ॥
सेवितासप्तरात्रेणजायतेकिंकिणिध्वनिः ॥

अर्थ–कारिवणा, मुंडी, वेखंड, सुंठ व पिंपळी यांचें चूर्ण मधाशीं द्यावें; म्हणजे कोकिळेसारिखा स्वर होतो.

## वचादिचूर्ण.

ब्राह्मीवचाभयावासापिप्पलीमधुसंयुता ॥
अस्यप्रयोगात्सहसाकिंनरैःसहगीयते ॥

अर्थ–ब्राह्मी, वेखंड, हरीतकी, अडुळसा व पिंपळी यांचे चूर्ण मधाशीं घ्यावें; म्हणजे किन्नरासारिखा स्वर होतो.

## दुग्धामलकपान.

दुग्धंप्रयुक्तामलकंनराणांनष्टस्वराणांसुखमातनोति ॥
यथामृगाक्षीसुरकिंनराणांकंदर्पदर्पप्रतिपीडनंच ॥

अर्थ—आवळकाठीचें चूर्ण दुधांत घालून द्यावें; ह्मणजे स्वरभंगीरोग्याला सुख होतें.

## पथ्य.

स्वेदोबस्तिर्धूमपानंविरेकःकवलग्रहः ॥ नस्यंभालशिरावेधोयवा लोहितशालयः ॥ हंसाटवीताम्रचूडकेकिमांसरसाःसुराः ॥ गोकंट कःकाकमाचीजीवंतीबालमूलकं ॥ द्राक्षापथ्यामातुलिंगंलशुनंलव णार्द्रकं ॥ तांबूलंमरिचंसर्पिःपथ्यानिस्वरभेदिनां ॥

अर्थ—घामकाढणें, बस्तिकर्म, धूम्रपान, रेच, मखांत औषध धरणें, नस्य, गालाच्या शिरांचा वेध, यव, तांबडे भात, आणि हंस, रानकोंबडा व मोर यांच्या मांसाचे रस; मध, गोखरू व कावळी, जीवंती, कोंवळ मुळे, द्राक्षें, हरीतकी, महाळुंग, लसूण, मीठ, आलें, विडा, मिरीं व तूप, हे पदार्थ स्वरभेदरोग्याला हितकारक आहेत.

## स्वरभेदावर अपथ्य.

आम्रःकपित्थंबकुलंशालूकंजांबवानिच ॥ तिंदुकानिकषाया णिवमिस्वप्नंप्रजल्पतां ॥ अन्नपानंविरुद्धंचस्वरभेदेविवर्जयेत् ॥

अर्थ—आंबा, कंवठ, बकुल, शाळें, जांबूळ, चारोळी, तुरट पदार्थ, वांति, झोंप, बड बड, आणि विरुद्ध असें अन्न व पान हीं स्वरभेदरोग्यानें वर्ज्य करावीं.

---

# अरुचीचा कर्मविपाक.

श्रद्धाहीनोधनीअदातादानरतिर्वातामसगुणान्वितोयः ॥ सोरुचिमान् शूलीवाजायते ॥ तस्यप्रायश्चित्तं ॥ कृच्छ्रमतिकृच्छ्रंचांद्रायणंव्यस्तंसम स्तंवाव्याधितारतम्येनकुर्यात् ॥ अत्राशक्तौधनीचनित्यंपंचाशद्ब्राह्मणभोज नंप्रतिदिनंमिष्टान्नेनकारयेत् ॥ अत्राप्यशक्तौ ॥ जपंहोमंतथातीर्थस्ना नंवापिसमाचरेत्॥ तीव्रवैराग्यसंयुक्तःकुर्याद्ब्राह्मणभोजनं ॥

अर्थ—जो मनुष्य धनाढ्य असून श्रद्धाहीन, अदाता; किंवा दान केलें तत्रापि ताम सदान करितो, त्याला अरुचि किंवा शूल होतो, त्याचें प्रायश्चित्त सांगतो. त्याणें कृछ्र, अतिकृछ्र, चांद्रायण, हीं संपूर्ण किंवा यांतून ऐखादें व्याधीच्या तारतम्यानें प्रायश्चित्त करावें. हीं प्रायश्चित्तें करण्याविषयीं अशक्त असून धनिक आहे तर; त्याणें प्रतिदिवशीं पन्नास ब्राह्मणाला मिष्टान्न भोजन द्यावें, हें हि न होई तर जप,होम व तीर्थस्नानें, हीं करावीं, तीव्रवैराग्यधारण व ब्राह्मणभोजन करावें; म्हणजे रोगापासून मुक्त होतो.

## ज्योतिःशास्त्राभिप्राय. तत्प्रतीकार.

अतिपरिभूतक्षपणःसहजयुतोमानवोभवति ॥ जीवेमंदाग्निविजितो दुश्चित्तकोपापकर्माच ॥ दुश्चिकित्स्यस्थानस्थितगुरोःप्रागुक्तजपहोमस्नानादिकंविदध्यात् ॥

अर्थ—ज्याच्या जन्मकाळीं सहजस्थानीं क्रूर ग्रह आहेत; किंवा गुरु सहजस्थानीं क्रूर ग्रहयुक्त आहे; तर तो मंदाग्नि, पापकर्ता, शत्रूनीं जित व दुश्चित्त असा उत्पन्न होतो, त्याणें दुश्चिकित्स्यस्थानस्थितगुरुदोष जाण्याकरितां पूर्वीं सांगीतलेले जपहोमादि करावे.

## अरोचकनिदान.

परीक्ष्यसंमुखेचान्नंजंतोर्नस्वादतेमुहुः ॥ अरोचकःसविज्ञेयोभक्तद्वेषमथोशृणु ॥ चिंतयत्यथमनसादृष्ट्वादृष्ट्वातुभोजनं ॥ द्वेषमायातियोजंतुर्भक्तद्वेषःसउच्यते ॥ यस्यान्नेनभवेच्छ्रद्धासभक्तच्छंदउच्यते ॥ कुपितस्य भयार्तस्यज्वारितस्यविरोधकः ॥

अर्थ—वारंवार मुखामध्यें अन्न घातलें असतां; मनुष्यास स्वाद लागत नाही, त्या विकाराला अरोचक म्हणतात; आणि अन्नाचें श्रवण, स्मरण, दर्शन, स्पर्शन यांणीं जे मन कंटाळतें त्या विकाराला भक्तद्वेष म्हणतात; व ज्या विकारेंकरून अन्नावर वासनाच होत नाही, त्याला भक्तच्छंद म्हणतात. तो कुपित,भयार्त व ज्वरित अशा रोग्याचा असाध्य जाणावा.

## अरोचककारणें.

वातादिभिःशोकभयातिलोभक्रोधैर्मनोघ्नाशनरूपगंधैः ॥
अरोचकाःस्युःपरिहृष्टदंतःकषायवक्त्रश्चनरोनिलेन ॥

अर्थ—वात, पित्त, कफ, संनिपात, शोक, भय, अतिलोभ व क्रोध यांहींकरून ८ प्रकारचे अरोचक आहेत, ते मनाला किळस येणारें अन्न, रूप व गंध या कारणानीं उत्पन्न होतात; व वायूच्या अरोचकामध्ये दांत आंबतात; आणि तोंड तुरट होतें.

## सामान्यशास्त्रार्थ.

बस्तिःसमीरणेपित्तेविरेकोवमनंकफे ॥
सर्वजेसर्वकामार्थहर्षणंस्यादरोचके ॥

अर्थ–वातापासून अरुचि असेल तर बस्ति द्यावा, पित्तापासून असेल तर रेच द्यावा, कफापासून असेल तर वमन द्यावें, त्रिदोषापासून असेल तर त्रिदोषशामक व मनास हर्ष-करणारे असें औषध द्यावें.

अरुचौकवलग्राहोधूमोसुमुखधावनं ॥
मनोज्ञमन्नपानंवाहर्षणाश्वासनानिच ॥

अर्थ–अरुचीवर सामान्यतः कवलग्रह ( मुखांत औषधांची गोळी धरणें. ) धूर पिणें, औषधांचे पाण्याणें चूळ भरून तोंड खुळखुळावून टाकणें, चांगले स्वच्छ अन्न व उदक, अंतःकरणास कोणत्याहि हरउपायानीं हर्ष उत्पन्न करणे व आश्वासन देणें, हे उपचार करावे.

सात्म्यान्स्वदेशरचितान्विविधांश्चभक्ष्यान्पानानिमूलफलखांड
वरागलेहान् ॥ सेवेद्रसांश्चविविधान्विविधप्रयोगैर्भुंजीतचा
पिलघुरूक्षमनःसुखानि ॥

अर्थ–प्रकृतीस मानलेलें, आपले देशाच्या चालिचे असे नानाप्रकारचे भक्ष्य पदार्थ ह्मणजे लाडू व पोळ्या इत्यादि पक्वान्नें, आंबटी, सांभारीं, भाज्या, कोशिंबिरी, चटण्या, लोणचीं, पंचामृत, गुळांबे, मुरांबे, श्रीखंड, रायतीं, पन्हीं इत्यादि पदार्थ, लघु, रूक्ष, अंतःकरणास सुख करणारे असे पदार्थ सेवन करावे; ह्मणजे तोंडाला रुचि येईल.

## वचादिस्नेहपान.

वांतोवचाद्भिरनिलेविधिवत्पिबेत्तुस्नेहोम्लतोयमदिरान्यतमेनचूर्णं ॥
कृष्णाविडंगयवभस्महरेणुभार्ङीरास्नैलहिंगुलवणोत्तमनागराणां ॥ पै
त्तेगुडांबुमधुकैर्वमनंप्रशस्तंलेहःससैंधवसितामधुसर्पिरिष्टः ॥ निंबांबु
नाकृतवमेःकफजेनुपानंराजद्रुमांबुमधुनासहदीप्यकाढ्यं ॥ चूर्णंतदु
क्तमथवानिलजेतदेवसर्वैस्तुसर्वकृतमेनमुपक्रमेत ॥

अर्थ–वातापासून अरोचक होतें त्यावर वेखंडाचे काढ्याची वांति देऊन ओकवून नतर स्नेह, आंबट रस किंवा मद्य यांतून एकाबरोबर पिंपळी, वावडिंग, जवखार, रेणुकाबीज, भारंगमूळ, राम्ना, वेलदोडे, हिंग, सैंधव व सुंठ यांचें चूर्ण खावें. पित्तारुचीवर गुळ, उदक व ज्येष्ठिमध यांचे वमन द्यावें; आणि सैंधव, साकर, मध व तूप, यांचा लेह द्यावा.

कफारुचीवर कडुलिंबाच्या रसाचें वमन देऊन नंतर बाहाव्याच्या काढ्यांत मध आणि ओं व्याचें चूर्ण घालोन पाजावें; अथवा वातारुचीवर जें चूर्ण सांगितलें तें द्यावें; आणि सर्वदोषांपासून झालेल्या अरुचीवर पुर्वीचे सर्व उपचार करावे.

## सामान्यचिकित्सा.

इच्छाविनाशभयजेषुचबाधकेंषुभावान्भवायवितरेत्खलुसाध्यरूपान् ॥
अर्थेषुचातिपतितेषुपुनर्भवायपौराणिकैःश्रुतिपथैरनुमानयेत्तं ॥

अर्थ–इच्छानाश, किंवा भय यांपासून झालेल्या अरुचीवर सुख होण्याकरितां इच्छित पदार्थ मिळण्यासारखे असतील ते द्यावे, भयनिवारण करावें; आणि द्रव्यनाशापासून झालेल्या अरुचीवर पुराणवाक्यानीं व श्रुतिवाक्यानीं ज्ञान उत्पन्न करावें.

## पित्तजन्यअरोचकनिदान.

कट्वाम्लमुष्णंविरसंचपूतिपित्तेनविद्याल्लवणंचवक्त्रं ॥

अर्थ–पित्तजन्यअरोचकाचे ठायीं कटु, आम्ल, उष्ण, विरस, दुर्गंधयुक्त व खारट असें तोंड होतें.

## कफजन्यअरोचकनिदान.

माधुर्यपैच्छिल्यगुरुत्वशैत्यविबद्धसंबद्धयुतंकफेन ॥

अर्थ–कफजन्य अरोचकाचे ठायीं तोंड गोडिळ, बुळबुळित, जड व गार असें होतें; व आंतून कफानें लिप्त झालेलें असतें.

अरोचकेशोकभयातिलोभक्रोधाद्यहृद्याशुचिगंधजेस्यात् ॥ स्वाभा
विकंचास्यमथारुचिश्चत्रिदोषजेनैकरसंभवेत्तु ॥ हृच्छूलपीडनयुतंप
वनेनपित्ततृड्दाहचोषबहुलंसकफप्रसेकं ॥ श्लेष्मात्मकंबहुरुजंब
हुभिश्चविद्याद्वैगुण्यमोहजडताभिरथापरंच ॥

अर्थ–शोक, भय, अतिलोभ, क्रोध व बिभत्स इत्यादि मनाला न आवडणारा, अमंगळ इत्यादि गंध यांच्या संबंधेंकरून अरोचक होतें. त्याचा ठायीं मुखमाधुर्यादि पूर्वोक्त गुणेंकरून युक्त स्वभावतः असतें; आणि तोंडाची चव जातें; व त्रिदोषसंबंध असतां; मुख खारट, तुरट व कडु असें अनेकरस युक्त असतें. वायुच्या योगेंकरून जें अरोचक होतें, तें हृदयशूल व पीडा यांहीं युक्त असतें, पित्तसंबंधानें जें अरोचक तें तृष्णा, दाह व शोष यांहीं युक्त असतें; आणि कफसंबंधेंकरून कफप्रसेकयुक्त असतें; व त्रिदोषसंबंधेंकरून असतां नाना वेदना, मोह, जडता, वैगुण्य ह्मणजे मनाची व्याकुळता हे उपद्रव होतात.

## गंडूष.

किंचिल्लवणसंयुक्तमारनालंविपाचयेत् ॥
तेनगंडूषमात्रेणआस्यवैरस्यमृच्छति ॥

अर्थ–थोडेसें मीठ घालोन कांजी करून चूळभरून टाकावे; ह्मणजे मुखाचा विरसपणा जातो.

## कवलग्राह.

सिताव्योषकपित्थानांचूर्णंक्षौद्रेणतद्वटी ॥
सर्वारोचकशांत्यर्थंधारयेद्वदनांबुजे ॥

अर्थ–साकर, सुंठ, मिरें, पिंपळी, कंवठ यांचे चूर्णाची मधांत गोळी करून तोंडांत धरावी; ह्मणजे अरुचि शांत होते.

## विडंगचूर्ण.

विडंगचूर्णकर्षंकंक्षौद्रैश्चतुर्गुणैर्युतं ॥
असाध्यमपिसंहन्यादरुचिंवक्त्रधारणात् ॥

अर्थ–वावडिंगाचें चूर्ण १ तोळा, मध ४ तोळे, यांची गोळी तोंडांत धरावी; ह्मणजे असाध्य जरी अरुचि असली, तरी तिचा नाश करील.

## अम्लिकाकवल.

अम्लिकागुडतोयंचत्वगेलामरिचान्वितं ॥
अभक्तच्छंदरोगेषुशस्तंकवलधारणं ॥

अर्थ–अन्नावर अरुचि जास होतें, त्याणें चिंचेचें सरबत, गूळ, पाणी, दालचिनी, वेलदोडें मिरें घालोन करावें; आणि त्याचे बराबर जेवावें.

## कुष्ठादिकवल.

कुष्ठसौवर्चलाजाजीशर्करामरिचंबिडं ॥ धान्येलापद्मकोशीरपिप्पल्यश्चंदनोत्पलं ॥ लोध्रतेजोवतीपथ्यात्र्यूषणंसयवाग्रजं ॥ आर्द्रदाडिमनिर्यासःसाजाजीशर्करायुतं ॥ सतैलमाक्षिकाह्येतेचत्वारःकवलग्रहाः ॥ चतुरोरोचकान्घ्नंतिवाताद्येकजसर्वजान् ॥

अर्थ–कोष्ठ कोलिंजन, पादेलोण, जिरें, साकर, मिरें व बिडलोण, यांचें चूर्ण; धने, वेलदोडे, पद्मकाष्ठ, वाळा, पिंपळी, चंदन व कमळ यांचें चूर्ण; लोध्र, माल्कांगुणी, हिरडा सुंठ, मिरें, पिंपळी, जवखार यांचें चूर्ण; आल्लें डाळिंब यांचा रस जिरें साकरयुक्त हे चार योग शिरसाचें तेल व मध यांचे बरावर योजिले असतां; कवळ ह्मणजे घांस याचे ग्रा हक होतात; आणि वात, पित्त, कफ, व सन्निपात यांपासून झालेली ४ प्रकारची अरुचि तीचा नाश करितात.

## लिंबाचें पन्हें.

भागैकंनिंबुजंतोयंषड्भागंशर्करोदकं ॥ लवंगमरिचोन्मिश्रंपानकंपा नकोत्तमं ॥ निंबूरसभवंपानमत्यम्लंवातनाशनं ॥ वन्हिदीप्तिकरं रुच्यंसमस्ताहारपाचकं ॥

अर्थ—लिंबाचा रस १ भाग व साकरेचें पाणी ६ भाग घेऊन त्यांत लवंगाची व मिऱ्याची पूड टाकून पन्हें करावें, हें सर्वपन्ह्यांत उत्तम आहे, हें लिंबाचे रसाचें पन्हें अति आंबट, वातनाशक, अग्निप्रदीप्तकरणारें, रुचिकारक व सर्वआहाराचें पाचक असे आहे.

## मुखधावन.

अजाजीमरिचंकुष्ठंबिडंसौवर्चलंतथा ॥
मधुकंशर्करातैलंवातिकेमुखधावनं ॥

अर्थ—जिरें, मिरें, कोष्ठकोळिंजन, बिडलोण, पादेलोण, जेष्ठीमध, साकर, शिरसाचें तेल, हीं एकत्र करून याणें तोंड धुवावें; ह्मणजे वाताची अरुचि जाते.

## दुसरा प्रकार.

कारंजंदंतकाष्ठंचविधेयमरुचौसदा ॥ किंचिल्लवणसंयुक्तमार नालंविपाचयेत् ॥ तेनगंडूपकंकुर्यादास्यवैरस्यशांतये ॥

अर्थ-तोंडाची रुचि गेली असतां; करंजाचे काष्ठानें दांत घासावे; आणि थोडें मीठ घालून कांजी करून त्याचा चूळ टाकावा.

## तिसरा प्रकार.

त्रित्र्यूपणानित्रिफलारजनीद्वयंचचूर्णीकृतानियवशूकविमिश्रितानि ॥
क्षौद्रान्वितानिवितरेन्मुखधावनार्थमन्यानितिक्तकटुकानिचभेषजानि ॥

अर्थ—दालचिनी, वेलदोडे, तमालपत्र, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकाठी, हळद, दारुहळद, सातूचीं कुसें यांचें चूर्ण मधाशीं मिश्र करून तोंड धुण्यास घ्यावें, आणखी हीं कडु व तिखट औषधें घ्यावीं; ह्मणजे अरुचीचा नाश होतो.

## शर्करादिभक्ष.

शर्करादाडिमंचाथद्राक्षाखर्जूरमेवच ॥ केसरंमातुलिंगस्यासिं धुनामधुनापिवा ॥ आस्यवैरस्यशमनंभक्षयेत्कर्पसंमितं ॥

अर्थ—साकर, डाळिंब, मनुका, खजूर, महाळुंगाचे केसर, सैंधवाशीं किंवा मधाशीं युक्त, यांतून कोणतें एक सुमारें तोळाभर भक्षिलें असतां; तोंडास रुचि येते.

पक्काम्लिकासितार्शीतवारिणावस्त्रगालितं ॥ एलालवंगकर्पू
रमरीचैरवधूलितं ॥ पानकस्यास्यगंडूपंधारयित्वामुखेतुरः ॥
अरुचिंनाशयत्येवपित्तंप्रशमयेद्यथा ॥

**अर्थ**-पिकलेली चिंच कुंवळून त्यांत साकर, थंडपाणी, एलची, लवंग, कापूर व मिरीं यांचे चूर्ण घालून पन्हें करावें. त्याचें तोंडांत धारण केलें असतां; अरुचीचा नाश होतो; व पित्त शमतें.

## तालीसादि चूर्ण.

तालीसंमरिचंशुंठीपिप्पलीवंशरोचना ॥ एकद्वित्रिचतुःपंचकर्षैर्भागा
न्प्रकल्पयेत् ॥ एलात्वचोस्तुकर्षार्धंप्रत्येकंभागमावहेत् ॥ मृतवंगं
मृततांम्रंसमभागानिकारयेत् ॥ द्वात्रिंशत्कर्षतुलिताप्रदेयाशर्कराबुधैः॥
तालीसाद्यमिदंचूर्णरोचनंपाचनंस्मृतं ॥ कासश्वासज्वरहरंछर्द्यतीसार
नाशनं ॥ शोषाध्मानहरंप्लीहाग्रहणीपांडुरोगजित् ॥

**अर्थ**-तालीसपत्र एक कर्ष, मिऱ्ये २ कर्ष, सुंठ ३ कर्ष, पिंपळी ४ कर्ष, वंशलोचन ५ कर्ष, विलायची व दालचिनी अर्धा अर्धा कर्ष, वंगभस्म व ताम्रभस्म हीं दोन्हीं आठ आठ कर्ष व साकर ३२ कर्ष घ्यावी. मग सारी औषधें कुटून चूर्ण करून त्यांत ती साकर मेळवून घेतलें असतां; तोंडास रुचि येते; व अन्न पचन होतें; व कास, श्वास, ज्वर ओकारी, अतिसार, शोष, पोटफुगी, कवळू, संग्रहणी व पांडुरोग हे दूर होतात.

## खांडवचूर्ण

तुल्यंतालीसचव्योषणलवणगजाह्वैःकणाग्रंथ्यजाजीवृक्षाम्ला
ग्नित्वचंत्रिर्घनबदरधनैलाजमोदाम्लविश्वम् ॥ सार्धश्वेतोंग्नि
सारोतिसृतिकृमिवमीखांडवोरुच्यजीर्णगुल्माध्मानानलास्यो
दरगलगुदहृन्मृद्भदश्वासकासे ॥

**अर्थ**-१ तालीसपत्र, १ चविक, १ मिरे, १ सैंधव, १ नागकेशर, २ पिंपळी, २ पिंपळमूळ, २ जिरें, २ चिंच, २ चित्रक, २ दालचिनी, ३ नागरमोथे, ३ बोर वाळलेलें, ३ धने, ३ एलची, ३ अजमोदा, ३ अम्लवेतस, ३ सुंठ, आणि साकर १९ तोळे, व ९॥ तोळे दाडिमसाल, ह्या सर्व औषधांचे बारीक चूर्ण करून अनुपानपरत्वें अतिसार, कृमि, वांति, अरुचि, अजीर्ण, गुल्म, पोटफुगणें, अग्निमांद्य, मुखरोग, उदररोग, गलरोग, मूळव्याध, हृद्रोग, मृत्तिकाजन्यरोग, श्वास; आणि खोकला यांवर योजावें.

## यवानीखांडवचूर्ण अरोचकादिकांवर.

यवानीदाडिमंशुंठीतिंतिडीकाम्लवेतसौ ॥ बदराम्लंचकुर्वीतचतुःशाणमितानिच ॥सार्धद्विशाणंमरिचंपिप्पलीदशशाणिका ॥ त्वक्सौवर्चलधान्याकंजीरकंद्विद्विशाणकं ॥ चतुःषष्टिमितैःशाणैःशर्करामत्र योजयेत् ॥ चूर्णितंसर्वमेकत्रयवानीखांडवाभिधं ॥चूर्णजयेत्पांडुरोगं हृद्रोगंग्रहणीज्वरं ॥ छर्दिशोषातिसारांश्चप्लीहानाहविबंधतां ॥ अरुचिशूलमंदाग्निमर्शोजिव्हागलामयान् ॥

अर्थ—अजमोदा, डाळिंबसाल, सुंठ, चिंचेची साल, आम्लवेतस, आंबट बोर ही चार औषधें चार चार शाण घ्यावी, अडीच शाण मिर्‍ये व पिंपळी १० शाण, घ्यावीं. दालचिनी, संचळखार, धने, जिरें, हीं चार औषधें दोन दोन शाण घ्यावीं, साकर ६४ शाण घ्यावी. मग सारीं औषधें कुटून चूर्ण करावें. या चूर्णाला यवानीखांडवचूर्ण असें ह्मणतात. हें चूर्ण घेतलें असतां; पांडुरोग, हृद्रोग, संग्रहणी, ज्वर, ओकारी, शोष, अतिसार, पोटांत डाव्याकडे कवळूरोग, कंठरोग हे सारे रोग दूर होतात.

## कारव्यादिगुटिका.

कारव्यजाजीमरिचंद्राक्षावृक्षाम्लदाडिमं ॥ सौवर्चलंगुडःक्षौद्रमेषां कार्यावटीशुभा ॥ बदरास्थिमितास्येधार्यारोचकनाशिनी ॥

अर्थ—वडिशेप, जिरें, मिरें, द्राक्षें, आमसोल, डाळिंब, पादेलोण, गूळ व मध, हीं सर्व एकत्र खलोन बोराचे आंठीप्रमाणे गोळी करून तोंडांत धरावी, ती अरुचिनाशक आहे.

## खंडार्द्रकयोग.

आर्द्रकस्यसितायाश्चद्विगुणाष्टपलानिच ॥ निष्कद्वादशकंतीक्ष्णमष्टनिष्काचमागधी ॥ अष्टनिष्कंचतन्मूलंपंचनिष्कंचनागरं ॥ जातीफलैलादहनवंशाख्याःपंचनिष्कका: ॥सर्वाण्येतानिशुष्काणिचूर्णकृत्वापृथक्पृथक् ॥ आर्द्रकंखंडशःकृत्वागोघृतेष्टपलेपचेत् ॥ शर्करापूर्णचूर्णचआर्द्रकंसहमेलयेत् ॥ मंडलंसेवयेन्नित्यंमहापित्तविनाशनं ॥ आम्लपित्तंनिहंत्याशुसर्वपित्तविकाराजित् ॥ सर्वारुचिंवातरोगंमंदाग्निंचनियच्छति ॥

अर्थ—आलें ६४ तोळे, साकर ६४ तोळे, मिरें ४ तोळे, पिंपळी ३ तोळे, पिंपळमूळ ३ तोळे, सुंठ १॥ तोळा, जायफळ, वेलदोडे, चित्रक, वंशलोचन हीं प्रत्येकीं १॥ दीड तोळा, हीं सर्व औषधें वाळवून निरनिराळें चूर्ण करून नंतर आल्याचे तुकडे बा-

रीक करून ३२ तोळे तुपांत घालून तळावें; मग साकर आणि तीं चूर्णें सर्व आल्यांत मिळवून दररोज चाळीस दिवसपर्यंत तो लेह सेवन करावा. हा खंडार्द्रकयोग महापित्तनाशक, आम्लपित्त, सर्व पित्तविकार, सर्व अरुचि, वातरोग व मंदाग्नि यांचा नाशक आहे.

## राजिकादिशिखरिणी.

राजिकाजीरकोकुष्ठोभृष्टहिंगुचनागरं ॥ सैंधवंदधिगोःसर्वं
वस्त्रपूतंप्रकल्पयेत् ॥ तावन्मानंक्षिपेत्तत्रयथास्याद्रुचिरुत्तमा ॥
तक्रमेतद्भवेत्सद्योरोचनंवन्हिदीपनं ॥

अर्थ—मोहऱ्या, जिरें, कोष्ठ, भाजलेला हिंग, सुंठ, सैंधव व गाईचें दहीं हे सर्व पदार्थ यथायोग्य एकत्र करून वस्त्रावर गाळून घ्यावें, तें ताक अरुचीचा नाश करितें; व अग्नीला प्रदीप्त करितें .

## आर्द्रकयोग.

धौतंखंडितमार्द्रकंचसलिलैःक्षिप्तंसुतप्तेघृतेसिंधूत्थंमरिचंमुजीरयुगुलं
चूर्णीकृतंप्रक्षिपेत् ॥ चूर्णंभृष्टयवोद्भवंचवितुषंहिंग्वाज्यधूमेदहेदित्थं
दोषविहीनमार्द्रकवरंसुस्वादुसंजायते ॥

अर्थ—आलें पाण्यानें स्वच्छ धुवून तुकडे करून तूप कढवून त्यांत टाकावें; नंतर पक्क करून सैंधव, मिरें, जिरें व शाहाजिरें यांचें चूर्ण त्यांत टाकून किंचित तापवावें; नंतर सातु भाजून त्यांचें चाळलेलें पीठ तुपांत हिंग घालून परतावें; आणि त्यांत मिळवावें. या प्रमाणें केलेलें आलें दोषहीन, स्वादिष्ठ व अरुचिनाशक असें होतें.

## ताम्राशिखरिणी.

गव्यमावर्तितंदुग्धंनिबद्धंदधिमाहिषं ॥ एकीकृत्यपटेघृष्टंशु
भ्रशर्करयाशुभं ॥ एलालवंगकर्पूरमरिचैश्चसमन्विता ॥ ता
म्राशिखरिणीकुर्याद्रुचिंसकलवल्लभा ॥

अर्थ—गाईचें दूध व म्हशीचें दहीं एकत्र करून तें वस्त्रावर साकरेशीं घासून गाळून घ्यावें. त्यांत एलची, लवंगा, कापूर व मिरीं हे पदार्थ यथायोग्य घालून त्याची शिखरिणी तयार करावी. तिचें नांव ताम्राशिखरिणी ही रुचीला उत्पन्न करिते; व सर्व लोकांस प्रिय आहे.

## आमलकाद्य चूर्ण.

आमलंचित्रकःपथ्यापिप्पलीसैंधवंतथा ॥ चूर्णितोयंगणोज्ञेयःसर्वज्वर
विनाशनः ॥ भेदीरुचिकरःश्लेष्मजेतादीपनपाचनः ॥

अर्थ—आवळकाठी १ चित्रक २ बाळीहिरडे ३ पिंपळी ४ सैंधव ५ हीं पांच औषधें समसमान घेऊन चूर्ण करून घेतलें असतां; सारे ज्वर दूर होतात;व मलादिकांचा भेद होतो; व रुचि येते, व कफ दूर होतो व अग्नि प्रदीप्त होतो, आणि अन्नाचें पचन होतें.

## कर्पूरादिचूर्ण.

कर्पूरचोचकंकोलजातीफलदलैःसमैः ॥ लवंगनागमरिचंकृष्णाशुंठी विवर्धिताः ॥ चूर्णसितासमंग्राह्यंरोचनंक्षयकासजित् ॥ वैस्वर्यश्वास गुल्मार्शश्छर्दिकंठामयापहं ॥ प्रयुक्तंचान्नपानेषुभिषजारोगिणांहितं ॥

अर्थ—कापूर, दालचिनी, कंकोळ, जायफळ व तमालपत्र हीं सर्व प्रत्येक एकेक तोळा, लवंगा २ तोळे, नागकेसर ३ तोळे, मिरीं ४ तोळे, पिंपळी ५ तोळे व सुंठ ६ तोळे, या प्रमाणे घेऊन चूर्ण करून साखरेबरोबर घ्यावें. हें रुचिकारक, कास जिं-कणारें व स्वरभेद, श्वास, गुल्म, अर्श, छर्दि, कंठरोग, यांचें नाशक आहे; आणि हें भाताबरोबर किंवा पाण्याबरोबर द्यावें; ह्मणजे रोग्याला हितकारक होतें.

## चव्यादिचूर्ण.

चव्याम्लवेतसकटुत्रयतिंतिडीकतालीसजीरकरकतुगादहनैःसमांशैः ॥ चूर्णंगुडप्रमुदितंत्रिसुगंधियुक्तंवैस्वर्यपीनसकफारुचिपुप्रशस्तं ॥

अर्थ—चवक, आम्लवेतस, सुंठ, मिरें, पिंपळी, आंबसाल, तालीसपत्र, जिरें, वंशलो-चन, चित्रक, दालचिनी, तमालपत्र, वेलदोडे, यांचें चूर्ण गुळाबरोबर खावें; ह्मणजे स्वर भेद, पीनस, कफ, अरुचि यांवर प्रशस्त आहे.

## आर्द्रकमातुलुंगावलेह.

आर्द्रकस्वरसंप्रस्थंतदर्धांशंगुडंक्षिपेत् ॥ कुडवंबीजपूराम्लंगालयि त्वाविचक्षणः ॥ सर्वंमंदाग्निनापक्त्वातत्रेमानिविनिःक्षिपेत् ॥ त्रिजा तकंत्रिकटुकंत्रिफलायासमेवच ॥ चित्रकंग्रंथिकंधान्यंजीरकद्वयमे वच ॥ कर्षांशंश्लक्ष्णचूर्णंतुमेलयित्वातुभक्षयेत् ॥ अरोचकक्षयहरम ग्निदीप्तिकरंपरं ॥ कामलापांडुशोकघ्नंकासश्वासहरंपरं ॥ आध्मानो दरगुल्मांश्चप्लीहंशूलंचनाशयेत् ॥

अर्थ—६४ तोळे आल्याचा रस, ३२ तोळे गूळ, १६ तोळे माहाळुंगाचा रस, हीं सर्व मंदाग्नीनें पक्क करून त्यांत दालचिनी, तमालपत्र, वेलदोडे, सुंठ, मिरें, पिंपळी, हर-डा, बेहेडा आवळकाठी, धमासा, चित्रक, पिंपळमूळ, धने, जिरे व शाहाजिरें, यां प्रत्येकांचें चूर्ण तोळा तोळा घालून कालवून खावें; ह्मणजे अरुचि, क्षय, अग्निमांद्य, का-मला, पांडु, शोथ, कास, श्वास, आध्मान, उदर, गुल्म, प्लीहा व शूल, यांचा नाश करील.

## जीरकादिघृत.

पिष्ट्वाजाजींसधान्याकंघृतप्रस्थंविपाचयेत् ॥
कफपित्तारुचिहरंमंदानलवमिंजयेत् ॥

अर्थ–जिरें व धनें यांचा कल्क ६४ तोळे तुपांत घालून घृत पक्क करावें. तें घृत कफपित्त यांपासून झालेल्या अरुचीचा नाश करितें; आणि मंदाग्नि व ओकारी यांचा नाश करितें.

## सूतादिगुटिका.

सूतंगंधाभ्रमगधाम्लीकामगधसैंधवैः ॥
गुटिकारोचकहरीजिव्हावदनशुध्दिकृत् ॥

अर्थ–पारा, गंधक, अभ्रकभस्म, पिंपळी, चिंच, पिंपळमूळ व सैंधव यांची गोळी अरुचिनाशक, जिव्हा व मुख यांची शुद्धि करणारी अशी आहे.

## लघुचुक्रसंधान.

गुडक्षौद्रारनालानिसमस्तानियथोत्तरं ॥ शंसंतिद्विगुणान्भागान्सम्य क्सूक्तस्यसिद्धये ॥ यन्मस्त्वादिशुचौभांडेसक्षौद्रंगुडकांजिकं ॥ त्रिरा त्रंधान्यराशिस्थंसूक्तंचुक्रंतदुच्यते ॥

अर्थ–गुळ १ भाग, मध २ भाग व कांजी ४ भाग, याप्रमाणे घेऊन राबलेल्या मड क्यांत भरून धान्यराशींत तीन दिवस ठेवावें, ह्याला सूक्तचक्र असें ह्मणतात.

## केसरादिलेह.

केसरंमातुलुंगस्यसैंधवंमधुनापिवा ॥
आस्यवैरस्यशमनंभक्षयेत्कर्षसंमितं ॥

अर्थ–माहाळुंगाचें केसर सैंधव अथवा मध, यांचे बरोबर तोळाभर खावें; ह्मणजे तोंडाची विरसता शमवील.

शमयतिकेसरमरुचिंसलवणघृतमाशुमातुलिंगस्य ॥
दाडिमचर्वणमथवाचरकोरुचिकारिसूचयामास ॥

अर्थ–माहाळुंगाचे केसर, सैंधव, तूपसहीत अरुचिनाशक आहे; अथवा डाळिंबाचें चर्वण ह्मणजे खाणें रुचिकारक आहे, असें चरकानें सुचविलें आहे.

## आर्द्रकदाडिमयोग.

जिव्हाकंठविशोधनंतदनुचस्याच्छृंगवेरान्वितंसिंधूत्थंहितमत्रचाथम

धुनाशस्तोरसोदाडिमः ॥ अग्न्युद्बोधकराण्यजीर्णशमनान्याहुस्तथा
भेषजान्यन्नारोचकत्दृत्प्रयोगमसकृत्तत्प्रदेयानिच ॥

**अर्थ**–पूर्वी जिव्हा व कंठ यांची शुद्धिकरणारें असें औषध घेऊन नंतर आलें आणि सैंधव खावें; अथवा डाळिंब आणि मध खावा; आणि अग्निप्रदीप्त करणारी व अजीर्ण नाशक औषधें सेवन केल्यानें अरुचि दूर होते.

## दाडिमचूर्ण.

द्विपलेदाडिमादष्टौखंडाद्व्योषात्पलत्रयं ॥ त्रिसुगंधिपलंचैकंचूर्ण
मेकत्रकारयेत् ॥ दीपनंरोचनंत्दृद्यंपीनसश्वासकासजित् ॥

**अर्थ**–डाळिंब ८ तोळे, साकर ३२ तोळे, सुंठ, मिरीं, पिंपळी हीं ४ तोळे, दालचिनी, एलची व तमालपत्र हीं ४ तोळे. या सर्वांचे एकत्र चूर्ण करावें. तें दीपन, रोचन व त्दृद्य आहे; व पीनस, श्वास व खोकला यांचा नाश करितें.

## पिप्पल्यादिचूर्ण.

पिप्पलीपिप्पलीमूलंचव्यचित्रकनागरैः ॥ मरिचंदीप्यकंचैववृक्षाम्लं
साम्लवेतसं ॥ एलालवंगशालूकदधित्थंचेतिकार्षिकं ॥ प्रदेयंचाति
शुद्धायाःशर्करायाश्चतुःपलं ॥ चूर्णमग्निप्रसादःस्यात्परमंरुचिवर्धनं ॥
प्लीहकार्श्यमथार्शांसिश्वासंशूलंज्वरंवमिं ॥ निहंतिदीपयत्यग्निंबलव
र्णरुचिप्रदं ॥ वातानुलोमनंत्दृद्यंजिव्हाकंठविशोधनं ॥

**अर्थ**–पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, मिरीं, ओंवा, आमसोल, आम्लवेतस, एलची, लवंग, जायफळ व कवठ हे एकेक तोळा, शुद्ध साकर १६ तोळे यांचे चूर्ण करावें. ते अग्निप्रदीप्त करणारें, रुचि देणारें व प्लीहा, कार्श्य, अर्श, श्वास, शूल, ज्वर व वांति यांचा नाश करितें; व वायूचे अनुलोमन करितें; आणि त्दृदय, जीभ व गळा यांची शुद्धि करितें.

## छत्रादिचूर्ण.

छत्राबीजंतितिडीकंद्राक्षादाडिमजीरकं ॥
सौवर्चलंगुडंक्षौद्रंसर्वारोचकनाशनं ॥

**अर्थ**–आवळकाठी, चिंच, द्राक्षे, डाळिंब, जिरें, पादेलोण, गूळ व मध हे सर्व पदार्थ अरुचीचा नाश करितात.

## अम्लिकादिपेय.

सौवर्चलगुडंक्षौद्रंसर्वारोचकनाशनं ॥

अर्थ-पादेलोण, गुळ व मध हे द्यावे, ते अरुचिचा नाश करितात.

## शुंठ्यादिचूर्ण.

त्रुटित्वक्केसरंपुष्पंवह्निजंसकणौषधं ॥ समखंडंभागवृद्धंचूर्णि
तंभक्षयेद्वदी ॥ श्वासकासप्रसेकेषुहृत्पार्श्वारुचिजेगदे ॥ ग
लामयेप्रशस्तंचमुखपाकविधौहितं ॥

अर्थ-गारकी एलची, दालचिनी, नाकेशर, लवंगा, मिरीं, पिंपळी व सुंठ हे पदार्थ एकोत्तर वृद्धीने घ्यावे; व सर्वचूर्णासमान साकर घालून तयार करावें. तें दमा, खोकला, तोंडाला पाणी सुटतें तें व हृदय, पार्श्व, अरुचि, गलरोग आणि मुखपाक यांवर प्रशस्त आहे.

## त्र्यूषणादिवटी.

त्र्यूषणकपित्थशर्करारोचकेनचसाधयेद्वटी ॥
सेविताचसाजायतेजरोभीमसेनवद्भक्षयेल्लालसः ॥

अर्थ-सुंठ, मिरीं, पिंपळी, कवठ, साकर व पादेलोण यांची गोळी करून द्यावी; ह्मणजे जरा दूर होत्ये; व भीमसेनासारिखी क्षुधा लागत्ये.

## अमृतप्रभावटी.

मरिचंपिप्पलीमूलंलवंगंचहरीतकी ॥ यवानीतिंत्तिडीकंचदाडिमंलव
णत्रयं ॥ एतानिपलमात्राणिमागधीक्षारचित्रकं ॥ द्विजाजीनागरंधा
न्यंएलाधात्रीफलंसमं ॥ एतान्द्विपलिकान्भागान्भावयेद्विजपूरकैः ॥
भावनात्रितयंदत्वागुटिकांकारयेद्बुधः ॥ छायाशुष्कांप्रकुर्वीतअजी
र्णस्यप्रशांतये ॥ अग्निंचकुरुतेघोरंगुटिकाचामृतप्रभा ॥

अर्थ-मिरीं, पिंपळमूळ, लवंगा, हरीतकी, ओंवा, चिंच, डाळिंब, बीडलोण, काचलोण हीं प्रत्येकीं ४ तोळे, पिंपळी, जवखार, चित्रकमूळ, जिरें, सुंठ, धने, एलची, आवळकाठी हीं प्रत्येकीं ८ तोळे या सर्वांचें चूर्ण एकत्र करून त्यास महाळुंगाच्या रसाच्या तीन भावना देऊन गोळी करावी, ती छायेंत वाळवून द्यावी; ह्मणजे अजीर्णाचा नाश करित्ये; व अग्नीला वाढवित्ये, हिला अमृतप्रभा गुटिका ह्मणतात.

## आकल्लकादिचूर्ण.

आकल्लकंसैंधववन्हिशुंठीधान्यूषणंदीप्यसमांशपथ्या ॥ रसेनभाव्यं
फलपूरकेणमंदानलत्वेह्यमृतप्रभेयं ॥ कासेगलामयेश्वासेप्रतिश्याये
चपीनसे ॥ अपस्मारेतथोन्मादेसन्निपातेसदाहिता ॥

अर्थ—अकलकरा, सैंधव, चित्रक व सुंठ, आवळकाठी, सुंठ, मिरीं, पिंपळी, ओंवा व हरीतकी, यांचें समभाग चूर्ण एकत्र करून त्याची महाळुंगाच्या रसांत गोळी करावी. तिचें नांव अमृतप्रभा. ही मंदाग्नि, अरुचि, खोकला, गलरोग, दमा, पडसें, पीनस, फेंपरें उन्माद व सन्निपात, यांवर हितकारक आहे.

## लवणार्द्रकयोग.

भोजनाद्रौसदापथ्यंलवणार्द्रकभक्षणं ॥
रोचनंदीपनंवन्हेर्जिव्हाकंठविशोधनं ॥

अर्थ—भोजनाच्या पूर्वी मीठ व आलें यांचें भक्षण करावें. तें रोचक, अग्निदीपक, व कंठ, आणि जिव्हा, यांची शुद्धि करणारें आहे.

## शृंगवेरादिलेह.

शृंगवेररसंवापिमधुनासहयोजयेत् ॥
अरुचिश्वासकासघ्नंप्रतिश्यायकफापहं ॥

अर्थ आल्याच्या रसांत मध घालोन द्यावा. तो अरुचि, दमा, खोकला, पडसें, आणि कफ यांचा नाश करितो.

## त्वङ्मुस्तादिचूर्ण.

त्वङ्मुस्तमेलाधान्यानिमुस्तामामलकत्वचा ॥ त्वक्चदार्वी यवान्याश्चपिप्पलीतिजवत्यपि ॥ यवानीतिंत्रिडीकंचपंचैतेमुखशोधनाः ॥ श्लोकपादैरभिहिताःसर्वारोचकनाशनाः ॥

अर्थ—दालचिनी, नागरमोथा, एलची, धनें, किंवा नागरमोथा, आवळकाठी, दालचिनी, दारुहळद, ओंवा; अथवा पिंपळी व जळपिंपळी; अथवा ओंवा आणि चिंच हे पांच योग. मुखाची शुद्धि व अरुचीचा नाश यातें करितात.

## दाडिमरस.

विडंगचूर्णसंयुक्तोरसोदाडिमसंभवः ॥
असाध्यामपिसंहन्यादरुचिंवक्त्रधारितः ॥

अर्थ—डाळिंबाच्या रसांत वावडिंगाचें चूर्ण घालून तो रस तोंडांत धरायास द्यावा. तो असाध्य अशा अरुचीचा नाश करितो.

## जीरकादिचूर्ण.

अजाजिनिष्कमात्रंचकर्षैकंसितशर्करा ॥
पलंक्षौद्रेणसंयुक्तंपीतंरुचिकरंमुखे ॥

अर्थ–जिरें ॥- सोळा, साकर १ तोळा, मध ४ तोळे एकत्र करून तोंडांत धरण्या करितां द्यावें. तें रुचि उत्पन्न करितें.

## कपित्थादि चूर्ण.

कपित्थमज्जात्रिकटुचूर्णक्षौद्रसितायुतं ॥
अरोचकेषुसर्वेषुप्रशस्तंधारयेन्मुखे ॥

अर्थ–कवठाचा गीर, सुंठ, मिरीं व पिंपळी यांचें चूर्ण मध, साकर यांशीं तोंडांत धरावें, तें सर्व अरोचकांवर प्रशस्त आहे.

## शुंठ्यादिगुटी.

शुंठ्येकभागाद्विगुणाचकृष्णानिशोत्रपथ्यात्रिगुणातथाच ॥ सार्ध्यैकभागामलकीचतीक्ष्णंचतुर्गुणंसैंधवमम्लमर्द्यं ॥ शाणैकमात्रागुटिकानिषेव्यानिहंतिमंदानलजंप्रकोपं ॥

अर्थ–सुंठ १, पिंपळी २, निशोत्तर ३, हरीतकी ३, आवळकाठी १॥, मिरीं ४, व सैंधव ४ भाग, या सर्वांचें चूर्ण करून निंबाच्या रसांत खलावें, त्याची ४ माशांची गोळी करावी. ती अग्निमांद्याचा नाश करिते.

## अरुचीवर पथ्य.

बस्तिर्विरेकोवमनंयथाबलंधूमोपसेवाकवलग्रहस्तथा ॥ तिक्तानिकाष्ठानिचदंतघर्षणेचित्रान्नपानानिहितैःकृतान्यपि ॥ गोधूममुद्राढकिशालिषष्टिकामांसंवराहालिशशर्णसंभवं ॥ वेगोझषांडमधुरालिकेलिशःप्रोष्ठीखलेशःकवचीचरोहितः॥कर्कारुवेत्राग्रनवीनमूलकंवार्ताकसौभांजनमोचदाडिमं ॥ भव्यंपटोलंरुचकंपयोघृतंबालानितालानिरसोनसूरणं ॥ द्राक्षारसालंललदंबुकांजिकमद्यंरसालांदधितक्रमार्द्रकं ॥ कंकोलखर्जूरप्रियालतिंदुकंपक्वंकापित्थंवदरंविकंकतं ॥ तालादिमज्जाहिमवालुकासितापथ्यायवानीमरिचानिरामठं ॥ स्वाद्वम्लतिक्तानिचदेहमार्जनंवर्गोयमुक्तोरुचिरोगिणांहितः ॥

अर्थ–रोग्याचें बळ पाहून त्याला बस्तिकर्म, रेचन व वमन द्यावें; आणि धूमपान, मुखांत औषधांचा कवल व कडुकाष्ठानें दांत घांसणें व नानातऱ्हेचीं हितकारक अन्नें व पानें. गहूं, मूग, तुरी, साळी, साठकीभात; आणि डुकर, कीट, ससा व हरण यांचें मांस व माशांचीं अंडी, साळोंखी; केलिश, प्रोष्ठी, खलेश, कवची व रोहित ह्याप्रकारचे मासे; व तांबडा भोपळा, कांकडी, वेताचे कोंब, कोंवळे मुळे, वांगे, शेवगा, केळें, डा

लिंब, निंब, पडवळ, सैंधव, दूध, तूप, कोवळी ताडाची फळें, लसूण, सुरण, द्राक्षें, आंबा, वाहणारें पाणी, कांजी, मद्य, शिकरण, दहीं, ताक, आलें, कंकोल, खजूर, चारोळी, धेंडशीची भाजी, पिकें कवठ, बोर, वेहेकळ, ताडाचें खोबरें, थंड वाळवंठ, साकर, हरीतकी, ओंवा, मिरें, हिंग, आणि गोड, आंबट, कडु, हे रस व स्नान हा अरुचीच्या रोग्याला पथ्यवर्ग सांगितला.

## अरुचीवर अपथ्य.

तृष्णोद्गारक्षुधानेत्रवारिवेगविधारणं ॥ अहृद्यान्नमसृङ्मोक्षं क्रोधंलोभंभयंशुचं ॥ दुर्गंधारूपसेवांचनकुर्यादरुचौनरः ॥

अर्थ—ताहान, ढेकर, क्षुधा व रोदन यांच्या वेगाचें धारण, अप्रिय अन्न, रक्तमोक्ष, क्रोध, लोभ, भय, शोक, दुर्गंध, आणि विद्रूपपदार्थदर्शन, अरुचि रोग्यानें सेवन करूं नये.

---

## छर्दिरोग कर्मविपाक.

योब्राह्मणायकेशकीटकाकसारमेयाद्युपहतमन्नंजानन्नेवप्र मादात्प्रयच्छतिसच्छर्दिमानन्यजन्मनि ॥

अर्थ—जो कोणी ब्राह्मणाला केश, कीट, कावळे व कुतरें यांणीं बिघाडलेलें अन्न उन्मत्तपणानें आणून देतो, तो दुसरे जन्मीं वांतीनें पीडित होतो.

विश्वासघातकीच्छर्दियुक्तोभवतितदुपशांतये ॥ पंचाशद्ब्राह्मणभोजनंकारयेत् ॥ अन्नदानंचयथाशक्त्याआज्ययुक्तंचकुर्यात् ॥ तेनोपशांतिर्भवति ॥

अर्थ—जो विश्वासघात करितो, तो वांतिरोगानें पीडित होतो. त्याणें त्या दोषाच्या शमनार्थ पन्नास ब्राह्मणाला भोजन द्यावें; व घृतयुक्तअन्नाचें दान करावें; त्याणें शांति होईल.

## ज्योतिषशास्त्राभिप्राय.

रिपुस्थानेयदास्यातांचंद्रशुक्रौततोभवेत् ॥ छर्दिमान्मनुजस्तृष्णापक्षेवाइवलोकिते ॥ क्षीणचंद्रावलोकीतुषष्टस्थानस्थितोबुधः ॥ शुक्रबाधोपशांतयेबुधस्यपूर्वोक्तमेवसकलंजपादिविदध्यात् ॥

अर्थ—जन्मकाळीं षष्ठस्थानीं चंद्र व शुक्र हे ग्रह असले किंवा त्यांची दृष्टि असेल तर तो वांतिरोगी; किंवा तृष्णारोगी होतो; किंवा बुध षष्ठस्थानीं असून त्याची क्षीणचंद्रावर दृष्टि असेल तर तो वांति; किंवा तृष्णारोगी होतो. त्याणें शुक्र व बुध यांच्या करितां पूर्वोक्त जपादिक संपूर्ण करावें.

## छर्दिनिदान, संप्राप्ति व लक्षण.

दुष्टैर्दोषैःपृथक्सर्वैर्बीभत्सालोकनादिभिः ॥ छर्दयःपंचविज्ञेयोस्तासां लक्षणमुच्यते ॥ अतिद्रवैरतिस्निग्धैरत्दृद्यैर्लवणैरपि ॥ अकालेचाति मात्रैश्चतथासात्म्यैश्चभोजनैः ॥ श्रमाद्भयात्तथोद्वेगादजीर्णात्क्रमिदोष तः ॥ नार्याश्चापन्नसत्वायास्तथातिद्रुतमश्नतः ॥ बीभत्सैर्हेतुभिश्चान्यै र्द्रुतमुत्क्लेशितोबलात् ॥ छादयन्नाननंवेगैरर्दयन्नंगभंजनैः ॥ निरु च्यतेछर्दिरितिदोषोवक्त्रंप्रधावति ॥

अर्थ–पृथक् वातकफादि दोष, सन्निपात व बीभत्सपदार्थांचें अवलोकन यांहीं करुन छर्दि पांच प्रकाराची ती अतिद्रव, अतिस्निग्ध, अंतःकरणास कंटाळा देणारें व क्षार, यांच्या सेवनेंकरून किंवा अकाळीं अतिरिक्त भोजन व न सोसणारें असें अन्न; आणि श्रम, भय, उद्वेग, अजीर्ण, आणि जंतांची विकृति या कारणानीं; व गरोदरपणामुळें, अतित्वरितभोजनानें, कंटाळवाण्यापदार्थांच्या दर्शनानें; आणि इतर दुसऱ्या कारणानीं, कोष्ठगत दोष जोरानें वर येतो, त्याकाळीं आंगाला मोडल्यासारिखी पीडाकरीत व आपल्या वेगानें तोंडाला पूर्ण करीत मुखवाटे दोष बाहेर निघतो. त्या व्याधीला छर्दि (वांति किंवा ओकारी) असें ह्मणतात.

## पूर्वरूप.

त्दृल्लासोद्गारसंरोधैःप्रसेकोलवणस्तनुः ॥
द्वेषोन्नपानेचभृशंवमीनांपूर्वलक्षणं ॥

अर्थ–उह्मासे येतात, ढेकरांचा प्रतिबंध होतो, तोंडाला खारट पाणी सुटतें, अन्न व पान यां विषईं द्वेष होतो, हें ओकारीचें पूर्वरूप जाणावें.

## वातछर्दिलक्षण.

त्दृत्पार्श्वपीडामुखशोषशीर्षनाभ्यर्तिकासस्वरभेदतोदैः ॥ उद्गारश ब्दप्रबलंसफेनंविभिन्नकृष्णंतनुकंकषायं ॥ कृच्छ्रेणचाल्पंमहताचवेगे नार्तोनिलाच्छर्दयतीहदुःखं ॥

अर्थ–वातछर्दीमध्यें ऊर,बरगड्या, मस्तक व बेंबी यांत शूल; तोंडाला कोरड, खोकला, स्वरभंग व सुया टोचल्यासारिखी पिडा यां सहवर्तमान मोठ्या वेगानें व मोठ्या कष्टानें व मोठ्या उद्गारशब्दानें काळें, तुडकळ, सफेत, तुरट व पातळ असें थोडें ओकतो.

## सैंधवयोग.

सैंधवंसर्पिषापीतंवातच्छर्दिनिवारणं ॥

अर्थ–सैंधव व तूप एकत्र करून प्यावें, ह्मणजे वातच्छर्दि निवारण होते.

### लवणत्रयप्रयोग.

लवणत्रयसंयुक्तंसंयुक्तंलवणेनवा ॥
हन्यात्क्षीरोदकंपीतंछर्दिंपवनसंभवां ॥

अर्थ–सैंधव, बिडलोण व काचलोण, यांचे बरोबर अथवा मिठाबरोबर दूध व पाणी एकत्र करून प्यालें असतां; वायुपासून झालेली ओकारी व उमासे यांचा नाश होतो.

### धान्याकयूप.

धान्याकविश्वदशमूलकषायसिध्दान्यूपानूरसान्पवनवम्यरुचिप्रशांत्यै ॥
पीत्वासुखानिलभवेंतेमधुमिश्रितंवाशंखाव्हयास्वरसमूषणचूर्णयुक्तं ॥

अर्थ–धने, सुंठ व दशमूळें, यांचे काढे, मंड किंवा रस हे वातछर्दि व वातारुचि यांचे शांतिसाठीं प्यावे; ह्मणजे सुख होतें; अथवा शंखाहुलीचे रसांत मध व मिर्‍यांचे चूर्ण घालून प्यावा; ह्मणजे सुख होतें.

### पित्तच्छर्दिलक्षण.

मूर्छापिपासामुखशोपमूर्धताल्वक्षिसंतापतमोभ्रमार्तः ॥
पीतंभृशोष्णंहरितंसतिक्तंधूम्रंचपित्तेनवमेत्सदाहं ॥

अर्थ–पाणी पिण्याची इच्छा, तोंडाची कोरड व मस्तक, तालु व नेत्र, यांस संताप, अंधारी, भ्रम, इहींकरून रोगी पीडा पावतो; आणि पीतवर्ण, उष्ण, कडु, हरितवर्ण, किंवा धूम्रवर्ण, व दाहयुक्त असे पित्तछर्दिमध्ये ओकतो.

### तंडुलजलपान.

पित्तछर्दिंत्र्जेद्दूर्वातंडुलोदकपानतः ॥
धात्रीरसेनवापीताःसितालाजाश्चछर्दिजितां ॥

अर्थ–दूर्वांचा रस तांदुळांचे धुणाबरोबर प्यावा; अथवा आवळ्याचा रस साकर व लाह्या एकत्र करून खाव्या; ह्मणजे पित्तच्छर्दि निवारण होते.

### लाजादियूष.

लाजामसूरयवमुद्गकृतायवागूश्छर्द्यांहितामधुयुताबहुपित्तजायां ॥
यूषाःसुगंधिमधुतिक्तरसाःप्रयुक्ताम्रृद्दग्धलोष्टभवमंबुहितंतृषायां ॥

अर्थ–लाह्या, मसूर, सातु व मूग यांची आंबील मध घालून प्यावी, ती अतिपित्तापासून छर्दि होते तीवर प्रशस्त आहे; अथवा सुगंध पदार्थ, मध व कडुरस, यांचाशीं युक्त जो मंड तोहि प्रशस्त आहे; आणि मातीचें ढेकूळ तापवून पाण्यांत विझवावें तें पाणी तृषेवर हितकारक आहे.

## पर्पटादिकाढा.

क्काथःपर्पटजःपीतःसक्षौद्रःशिशिरीकृतः ॥
पित्तच्छर्दिशिरस्तापचक्षुर्दाहानपोहति ॥

अर्थ–पित्तपापडयाचा काढा थंड करून मध घालून प्यावा. तो पित्तछर्दि, मस्तकाचा ताप, डोळयाचा दाह यांचा नाश करील.

## मक्षिकाविडवलेह.

सिताचंदनमध्वाढ्यंविलिहेन्माक्षिकाशकृत् ॥
सोपद्रवापित्तभवाच्छर्दिरेतेनशाम्यति ॥

अर्थ–साकर, चंदन व मध यांचे बरोबर माशीची विष्ठा चाटली असतां; उपद्रव सहित पित्तछर्दि शांत होत्ये.

## गुडूच्यादि काढा.

गुडूचीत्रिफलारिष्टपटोलैःक्कथितंजलं ॥
क्षौद्रयुक्तंनिहंत्याशुच्छर्दिंपित्तसमुद्भवां ॥

अर्थ–गुळवेल, त्रिफळा, कडुलिंब व कडुपडवळ, यांचा काढा मध घालून प्याला असतां; तो पित्तच्छर्दिनाश करील.

## लाजसक्तुपान.

सर्पिःक्षौद्रसितोपेतान्लाजसक्तून्लिहेत्ततः ॥
पित्तच्छर्दिश्चतेनाशुप्रशाम्यतिसुदुस्तरा ॥

अर्थ–लाह्यांचें पीठ, तूप, साकर व मध, एकत्र करून चाटावें; ह्मणजे दुस्तर पित्त छर्दि शांत होईल.

## कफच्छर्दिलक्षण.

तंद्रास्यमाधुर्यकफप्रसेकसंतोषनिद्रारुचिगौरवार्तः ॥
स्निग्धंघनंस्वादुकफाद्विशुद्धंसलोमहर्षोल्परुजंवमेत्तु ॥

अर्थ–कफछर्दीचे ठायीं झांपड, तोंडाला गोडी, कफप्रसेक, क्षुधेविषयीं संतोष, निद्रा, अरुचि, जडपणा. यांसहवर्तमान चिकट, दाट, गोड व पांढरें असें ओकतो; व रोग्याच्या शरीरावर रोमांच येतो, व अल्प पीडा होत्ये.

## सामान्यचिकित्सा.

छर्द्यांकफोद्भवायांतुवमनंकारयेद्भिषक्॥तोयैःसर्षपसिं

धूत्थराठनिंबकणायुतैः ॥ शस्यंतेशालिगोधूमयव
मुद्गमकुष्ठकाः ॥ षष्टिकातत्रयूपश्चपटोल्याश्चभोजनं ॥

अर्थ—कफापासून झालेल्या ओकारीवर शिरस, सैंधव, गेळफळ, कडुलिंब व पिंपळी यांचे काढ्यानें वमन द्यावें; आणि साळि, गहूं, साठु, मूग, मठ, साठेसाळी यांचे पदार्थ, व मंड, पडवळ, इत्यादि भोजनांत द्यावे.

## शालिभक्त.

आरक्तशालिभक्तंगोदधिशर्करावामिश्रंच ॥
कुर्याद्भोजनमेतत्कफच्छर्दिच्छिदंजंतोः ॥

अर्थ—तांबडे साळींचा भात, गाईचें दहीं व साकर यांचें भोजन करावें; ह्मणजे कफच्छर्दीचा नाश होतो.

## विडंगादि चूर्ण.

विडंगत्रिफलाव्योषचूर्णंमधुयुतंलिहेत् ॥
शाम्यत्यनेनकफजाच्छर्दिःसोपद्रवानृणां ॥

अर्थ—वावडिंग, त्रिफळा व त्रिकटु यांचें चूर्ण मधाबरोबर चाटावें, तेणेंकरून सोपद्रव कफच्छर्दि शांत होते.

## जांबवादियोग.

सजांबवंबादरचूर्णमम्लंमुस्तायुतंकर्कटकंसशृंगी ॥
दुरालभावामधुनाचयुक्तालिह्यात्कफच्छर्दिविनिग्रहार्थं ॥

अर्थ—जांभूळ, बोर, माहाळुंग व नागरमोथा यांचें चूर्ण उंसाच्या रसाबरोबर प्यावें; अथवा काकडशिंगी व धमासा यांचे चूर्ण मधाबरोबर चाटावें; ह्मणजे कफछर्दीला बंद करील.

## सन्निपातच्छर्दिलक्षण.

शूलाविपाकारुचिदाहतृष्णाश्वासप्रमोहप्रबलाप्रसक्तं ॥
छर्दिस्त्रिदोषाल्लवणाम्लनीलंसांद्रोष्णरक्तंवमतांनृणांस्यात् ॥

अर्थ—त्रिदोषज वांतीमध्यें शूल, अजीर्ण, अरुचि, दाह, तृष्णा, श्वास, मोह, यांणीं युक्त मोठ्या वेगानें, खारट, आंबट, नीलवर्ण, दाट व रक्तमिश्रित, असें ओकतो.

## बिल्वादिकाढा.

बिल्वत्वचोगुडूच्यावाक्काथःक्षौद्रेणसंयुतः ॥
जयेत्त्रिदोषजांछर्दिंपर्पटःपित्तजांतथा ॥

अर्थ–बेलाचे सालीचा अथवा गुळवेलीचा काढा मध घालून प्यावा, तो त्रिदोष छर्दिनाशक आहे; आणि पित्तपापड्याचा काढा पित्तच्छर्दिनाशक आहे.

## कोलाद्यवलेह.

कोलामलकमज्जानौमक्षिकाविट्सितामधु ॥
सकृष्णातंदुलोलेहच्छर्दिमाशुव्यपोहति ॥

अर्थ–बोर व आवळा यांची मज्जा, माशीची विष्ठा, साकर, मध, पिंपळी, तांदुळांचे धुवण यांचा लेह छर्दिनाशक आहे.

## सुरसापान.

सुरसास्वरसैर्युक्तंतृटिकामर्दिताभृशं ॥
वांतिंशमयतिक्षिप्रंवातपित्तकफोद्भवां ॥

अर्थ–तुळसीच्या स्वरसांत बारकया वेलचीचें चूर्ण घालून द्यावें; म्हणजे त्रिदोषवांतीचा नाश होतो.

## मनःशिलादियोग.

मनःशिलामागधिकोषणानांचूर्णंकपित्थाम्लरसेनयुक्तं ॥
लाजैःसमांशैर्मधुनावलीढंछर्दिंप्रसक्तामसकृन्निहंति ॥

अर्थ–मनशीळ, पिंपळी व मिरें, हीं समभाग; आणि यांचे बरोबर ३ भाग लाह्या यांचें चूर्ण एकत्र करून कवठांचे व माहाळुंगाचे रसांत मध आणि तें चूर्ण घालून चाटावें.

## अश्वत्थवल्कलादियोग.

अश्वत्थवल्कलंशुष्कंदग्धंनिर्वापितंजले ॥
तज्जलंपानमात्रेणछर्दिंजयतिदुर्जयां ॥

अर्थ–पिंपळाची साल जाळून पाण्यांत विझवून तें पाणी पितांक्षणींच दुर्जय छर्दीचा जय करील.

## लाजादियोगत्रयं.

लाजाकपित्थमधुमागधिकोषणानांक्षौद्राभयात्रिकटुधान्यकजीरकाणां ॥
पथ्यामृतामरिचमाक्षिकपिप्पलीनांलेहास्त्रयःसकलवम्यरुचिप्रशांत्यै ॥

अर्थ–लाह्या, कंवठ, मध, पिंपळी व मिरें यांचा लेह, तसाच मध, हरीतकी, त्रिकटु, धने व जिरे यांचा लेह, तसाच हिरडा, गुळवेल, मिरें, मध व पिंपळी यांचा लेह, हे सर्वप्रकारची ओकारी व अरुचि यांची शांति करणारे आहेत.

## धात्रीफलपान.

पिष्ट्वाधात्रीफलंद्राक्षांशर्करांचपलोन्मितां ॥ दत्वामधुपलंचैवकुडवंस
लिलस्यच ॥ वाससागालितंपीतंहंतिछर्दिंत्रिदोषजां ॥

अर्थ–आवळकाठी, द्राक्षे, साकर व मध हीं प्रत्येकीं ४ चार तोळे प्रमाणे घेऊन ६४ तोळे पाण्यांत घालून कुसकरून पाणी वस्त्रांत गाळून प्यावें, तें त्रिदोषोत्पन्नछर्दीचें नाशक आहे.

## मसूरसक्तु.

मसूरसक्तवःक्षौद्रंमर्द्दितादाडिमांभसा ॥
पीतानिवारयत्याशुच्छर्दिंदोपत्रयोद्भवां ॥

अर्थ-मसूरा, सांतूचें पीठ व मध हें डाळिंबाचे रसाबरोबर खलून प्यावें. तें त्रिदोष छर्दिनिवारक आहे-

## एलाद्यचूर्ण.

एलालवंगगजकेसरकोलमज्जालाजाप्रियंगुघनचंदनपिप्पलीनां ॥
चूर्णसितामधुयुतंमनुजोविलिह्यछर्दिनिहंतिकफमारुतपित्तजातां ॥

अर्थ–वेलदोडे, लवंगा, नागकेसर, बोराची मज्जा, लाह्या, कांग, नागरमोथे, चंदन, पिंपळी यांचें चूर्ण मध साकरेबरोबर चाटलें असतां; त्रिदोषोत्पन्न छर्दीचा नाश करील.

## पद्मकादिघृत.

पद्मकामृतनिंबानांधान्यचंदनयोःपचेत् ॥
कल्केक्काथेचहविषःप्रस्थंछर्दिनिवारणं ॥

अर्थ–पद्मकाष्ठ, मठ, कडुलिंब, धने व चंदन यांचे काढयांत किंवा कल्कांत ६४ तोळे सिद्ध केलेलें तूप छर्दिनिवारक आहे.

## चंदनादिपान.

चंदनंचमृणालंचवालकंनागरंवृषम् ॥
सतंदुलोदकक्षौद्रैःपीतःकल्कोवमिंजयेत् ॥

अर्थ–चंदन, कमलाचा देंठ, वाळा, नागरमोथा, अडुळसा हीं तांदुळाचे धुणांत वाटून मध घालून तें प्यावें; ह्मणजे ओकारीला जिंकील.

## उदीच्यजल.

सोदीच्यगैरिकंदेयंसेव्यंवातंदुलांबुना ॥ जातीपत्ररसंकृष्णामरि
चंशर्करान्वितं ॥ एतानिमधुयुक्तानिघ्नंतिछर्दिंचिरोद्भवाम् ॥

अर्थ–वाळा, गेरु तांदुळांचे धुणांत वांटून मध घालून प्यावें, अथवा जाईचे पानाचे रसांत पिंपळी, मिरें, यांचें चूर्ण मध व साकर घालून प्यावें; ह्मणजे फार दिवसांची ओकारी बंद होईल.

## चंदनपान.

चंदनेह्यक्षमात्रेचसंयोज्यामलकीरसं ॥
पिबेन्माक्षिकसंयुक्तंछर्दिस्तेननिवार्यते ॥

अर्थ–तोळाभर चंदन घेऊन चूर्ण करून त्यांत आवळ्याचा रस मधमिश्र करून प्यावा; तेणेंकरून ओकारीचें निवारण होतें.

## मुद्गकाढा.

कषायोभृष्टमुद्गानांसलाजमधुशर्करः ॥
छर्द्यतीसारदाहघ्नोज्वरघ्नःसंप्रकाशितः ॥

अर्थ–भाजलेल्या मुगांचा काढा लाह्या, मध व साकर यांणीं युक्त ओकारी, अतिसार, दाह वज्वर यांचा नाशक आहे.

## कोलमज्जा.

कोलमज्जाकणाबर्हिपक्षभस्मसशर्करं ॥
मधुनालेहयेच्छर्दिहिक्काकोपस्यशांतये ॥

अर्थ–बोराचे आंठीचा मगज, पिंपळी, मोराचे पंखाची राख, साकर, मध हीं एकत्र चाटली असतां; ओकारी व उचकी यांचा कोप शांत होतो.

## बीजपूरादिपुटपाक.

बीजपुराम्रजंबूनांपल्लवानिजटापृथक् ॥ विपचेत्पुटपाकेनक्षौ
द्रयुक्तश्चतद्रसः ॥ छर्दिंनिवारयेत्सद्यःसर्वदोषसमुद्भवाम् ॥

अर्थ–महाळुंग, आंबा, जांबूळ यांचे पल्लव अथवा मूळें पुटपाकानें पक्व करून त्यांचा रस मधयुक्त सर्वदोषांपासून जरी ओकारी असली, तरी तिचें शीघ्र निवारण करतो.

## हरीतकीचूर्ण.

हरीतकीनांचूर्णंतुलिह्यान्माक्षिकसंयुतं ॥
अधोभागीकृतेदोषेछर्दिस्तेननिवार्यते ॥

अर्थ–हिरड्याचे चूर्ण मधाबरोबर खावें. तेणेंकरून दोष अधोभागीं गेले ह्मणजे छार्दीचें निवारण होतें.

मृद्दृष्टलोष्टप्रभवंसुशीतंसलिलंपिबेत् ॥

**अर्थ**—मातीचें ढेकूळ तापवून पाण्यांत बिझवावें. तें पाणी थंड झाल्यावर प्यावें; ह्मणजे छर्दिनिवारण होतें.

## जंब्वाम्रपल्लवरस.

जंब्वाम्रपल्लवोशीरवटशृंगावरोहजः ॥ क्वाथःक्षौद्रयुतःशीतःपीतोवा विनियच्छति ॥ छर्दिंज्वरमतीसारंमूर्छांतृष्णांचदुर्जयाम् ॥

**अर्थ**—जांबूळ, आंबा यांचे पल्लव, वाळा, वडाच्या पारंब्या अथवा पल्लव यांचा काढा थंड करून मधासहित घ्यावा; ह्मणजे ओकारी, ज्वर, अतिसार, मूर्छा व तृष्णा, हीं दुर्जय असलीं तरी त्यांचा नाश होतो.

## हिंग्वादिपान.

हिंगुनासारिवामूलंसर्ववांतिहरंपरं ॥
जातीफलंवमौशोपेजागरेविप्रयोजयेत् ॥

**अर्थ**—हिंगासहित लघु उपळसरीचें मूळ सर्वप्रकारचे ओकारीचें नाशक आहे; व जायफळ ओकारि, शोष व जागरण यांच्यावर प्रशस्त आहे,

## उग्रगंधादियोग.

उग्रगंधारनालेनपीताछर्दिंनिवारयेत् ॥

**अर्थ**—वेखंड कांजीबरोबर प्यालें असतां; छर्दिनिवारण होईल.

## सामान्यचिकित्सा.

आमाशयोत्क्लेशभवाहिसर्वाःस्युश्छर्दयोलंघनमेवतस्मात् ॥
प्रकारयेन्मारुतजांविनातुसंशोधनंवाकफपित्तहारि ॥

**अर्थ**—आमाशयाचा उत्क्लेश यापासून संपूर्ण वांति उत्पन्न होतात. याकरितां लंघन करावें; परंतु वातजवांतिवांचून. किंवा शोधन द्यावें. तें कफ व पित्त यांचा नाश करितें.

हितंनलंघनंपूर्वंवमिषुमारुताभिधे ॥
अथापिवामयेदमुंविरेचयेद्यथार्हतः ॥

**अर्थ**—वातजवांतीवर पूर्वी लंघन करवूं नये. त्याला योग्य असे वामक; किंवा रेचक द्यावें.

## जातीपत्रचूर्ण.

जातीपत्ररसंकृष्णामरिचंशर्कराचितं ॥
एतानिमधुयुक्तानिघ्नंतिछर्दिंचिरोद्भवां ॥

अर्थ–जायीचे पाल्याच्या रस, पिंपळी, मिरीं, साकर, आणि मध हीं एकत्र करून द्यावीं. म्हणजे चिरकालजवांतीचा नाश होतो.

## असाध्यच्छर्दिलक्षण.

विट्स्वदमूत्रांबुवहानिवायुःस्रोतांसिसंरुध्ययदोर्ध्वमेति ॥ उत्प न्नदोपस्यसमाचितंतंदोषंसमुत्धूयनरस्यकोष्ठात् ॥ विण्मूत्रयो स्तत्समगंधवर्णतृट्श्वासकासार्तियुतंप्रसक्तं ॥ प्रच्छर्दयेद्दुष्टमिहा तिवेगात्तयार्दितश्चाशुविनाशमेति ॥

अर्थ–जाकाळीं वायु विष्ठा, घाम, मूत्र, आणि उदक यांला वाहणाऱ्या मार्गाला रोधून वर येतो; त्याकाळीं कोष्ठांतून वर आलेल्या दोषासहवर्तमान मोठ्यावेगानें विष्ठा व मूत्र यांच्या गंधानें व वर्णानें युक्त असे दोष अतिशय ओकतो. त्याकाळीं तृषा, दमा व खोकला याणी रोगी पीडित होतो, तो रोगी शीघ्र मरतो.

## आगंतुकच्छर्दिलक्षण.

बीभत्सजादौर्हृदजामजाचअसात्म्यतोवाक्रिमिजाचयाहि ॥ सापंच मीताश्चविभावयेत्तुदोषोच्छ्रयेणैवयथोक्तमादौ ॥ शूलहृल्लासबहुला कृमिजाचविशेषतः ॥ कृमिहृद्रोगतुल्येनलक्षणेनचलक्षिता ॥

अर्थ–बीभत्सपदार्थांच्या अवलोकनानें व डोहळे लागल्यामुळें होत्ये. ती व अजीर्णानें झालेली व नसोसणाऱ्या पदार्थानें व जंतांच्याउपद्रवानें होत्ये ती ह्या सर्व छर्दि वातादिकांच्या लक्षणानीं जाणाव्या; परंतु कृमिजाछर्दिचे ठायीं हृच्छूल, लालास्राव, हे विशेषेंकरून होतात; आणि कृमिरोग व हृद्रोग यांचे लक्षणासारिखीं लक्षणें होतात.

क्षीणस्ययाच्छर्दिरतिप्रसक्तासोपद्रवाशोणितपूययुक्ता ॥
सचंद्रिकांतांप्रवदेदसाध्यांसाध्यांचिकित्सेदनुपद्रवांच ॥

अर्थ–क्षीणमनुष्याची अतिबळकट वाढलेली, उपद्रवानें युक्त व रक्त, पू याणीं युक्त, आणि जींत चंद्रिका दिसत्ये तो छर्दि असाध्य जाणावी; व कास, श्वासादि उपद्रव नसतां औषधादिकेंकरून साध्य जाणावी.

## उपद्रव.

कासश्वासोज्वरोहिक्कातृष्णावैचित्यमेवच ॥
हृद्रोगस्तमकश्चैवज्ञेयाश्छर्देरुपद्रवाः ॥

अर्थ-कास, श्वास, ज्वर, उचकी, तृष्णा, चिंता, हृद्रोग, तमक व श्वास, हे छर्दिचे उपद्रव जाणावे.

## सामान्यचिकित्सा.

बीभत्सजामबीभत्सैर्हेतुभिःसंहरेद्वमिं ॥
दौर्हृदोत्थांवमित्वृयैःकांक्षितैर्वस्तुभिर्जयेत् ॥

अर्थ–घाणेऱ्या व वाईट अशा पदार्थांच्या पाहण्यानें किंवा गंधाने जी ओकारी होत्ये. ती चांगले स्वच्छतेचे कारणानीं दूर करावी; आणि जी डोहोळ्यापासून होत्ये, ती चांगले सुंदर अंतःकरणास प्रिय अशा पदार्थांनीं जिंकावी.

लंघनैर्वमनैर्वापिसात्म्यैर्वासात्म्यसंभवां ॥
कृमिहृद्रोगवच्चापिसाधयेत्कृमिजांवमिं ॥

अर्थ–आपल्यास मानत नाहीं अशा वस्तूपासून झालेली ओकारी ती लंघन, वमन व आपल्या प्रकृतीस मानलेले पदार्थ अशानें घालवावी; आणि कृमिपासून जी होत्ये, ती कृमि व हृद्रोग, यांवर जे उपचार सांगितले त्या उपचारानीं बंद करावी.

यथादोषंचविचरेच्छस्तंविधिमनंतरं ॥
पवनघ्नीचिरोत्थासुप्रयोज्याछर्दिषुक्रिया ॥

अर्थ–सांगितलेले उपचार जसा जसा दोष, असेल, तसा तसा विचार करून मग ते करावे; आणि पुष्कळ दिवसाची जी ओकारी आहे, तीवर वातनाशक उपचार करावे.

## आम्रास्थिकाढा.

आम्रास्थिबिल्वनिर्यूहःपीतःसमधुशर्करः ॥
निहंतिच्छर्द्यतीसारंवैश्वानरइवाहुतिं ॥

अर्थ–आंब्याची कोय व बेल यांचा काढा मध व साकर घालून प्यावा; ह्मणजे तो छर्दि व अतिसार, यांचा नाश करतो. जसा अग्नि आहुतीचा नाश करतो.

## जंबूपल्लवादि काढा.

जंब्वाम्रपल्लवशतंक्षौद्रंदत्वासुशीतलंतोयं ॥
लाजैरवचूर्ण्यपिबेच्छर्द्यतिसारेपरंसिद्धं ॥

अर्थ–जांभळीची आणि आंब्याची मिळून शंभर पानें कोंवळीं घेऊन त्यांचा काढा करून त्यांत लाह्यांचें चूर्ण आणि मध घालून प्यावा; तो ओकारी व अतिसार यांवर हितकारक आहे.

## मयूरपक्षभस्मावलेह.

मयूरपक्षंनिर्दग्ध्वातद्भस्मसमधुमिश्रितं ॥
लीढंनिवारयत्याशुच्छर्दिंसोपद्रवामपि ॥

अर्थ–मोराचीं पिसें जाळून भस्म करून तें भस्म मधाबरोबर चाटावें. तें उपद्रवासहित छर्दि निवारण करील.

## गोण्याद्यभस्मयोग.

पुराणगोणिभस्मांभोमधुयुक्तंनिपीयतु ॥
छर्दींछनात्तिमनुजस्तृणान्येवहुताशनः ॥

अर्थ–पुराणगोणीचें भस्म पाण्यांत घालून गाळून त्यांत मध घालून प्यावें, ते छर्दिनाश करितें, जसा अग्नि तृणाचा नाश करतो.

## पटोलाद्यघृत.

पटोलशुंठ्योःकल्काभ्यांकेवलंकुलकेनवा ॥
घृतप्रस्थंविपक्तव्यंकफपित्तवमिंहरेत् ॥

अर्थ–पडवळ व सुंठ, यांचे कल्काबरोबर. अथवा केवळ पडवळाचे कल्काबरोबर ६४ तोळे तूप कढवून ते तूप प्यावें; ह्मणजे कफपित्तापासून झालेली ओकारी बंद होईल.

## रंभाकंदयोग.

रंभाकंदरसोवापिमधुनाच्छर्दिनाशकृत् ॥

अर्थ–केळीचे कांद्याचा रस मधाबरोबर प्यावा, हा योग छर्दिनाशक आहे.

## दधित्थरसादिलेह.

दधित्थरससंयुक्तंपिप्पलीमाक्षिकंतथा ॥
मुहुर्मुहुर्नरोलिह्याच्छर्दिभ्यःप्रतिमुच्यते ॥

अर्थ–कंवठाच्या रसांत मध, पिंपळी घालून वारंवार चाटावी; ह्मणजे छर्दिपासून मुक्त होईल.

## करंजादिलेह.

कोमलकरंजपत्रंसलवणमम्लेनसंयुक्तं ॥
यःखादतिदीनवदनोच्छर्दिकफौतस्यकुत्रेह ॥

अर्थ–करंजाची कोवळीं पानें, महाळुंग व सैंधव यांचा कल्क खावा; ह्मणजे ओकून दीनवदन जरी असेल, तरी त्याला छर्दि व कफ राहाणार नाहींत.

## करंजबीजादि योग.

ईषत्भृष्टंकरंजस्यबीजंखंडीकृतंपुनः ॥
मुहुर्मुहुर्नरोभुक्त्वाछर्दिंजयतिदुस्तरां ॥

अर्थ–करंजाची बी किंचित भाजून तुकडे करून वारंवार खावी, ती दुस्तरछर्दीचें निवारण करील.

## शंखपुष्पीरसादिपान.

शंखपुष्पीरसंटंकद्वयंसमरिचंमुहुः ॥
सक्षौद्रंमनुजःपीत्वाछर्दिभ्यःकिलमुच्यते ॥

अर्थ– शंखाहुलीचा रस दोन तोळे मध व मिरपूड घालून प्यावा; ह्मणजे छर्दिपासून निश्चयें करून मुक्त होईल.

## जीरकादिधूप.

जीरान्वितंपट्टवस्त्रंवर्तिंकृत्वाथधूपयेत् ॥
आघ्राणाद्विलयंयांतिसर्वाश्छर्दश्चिरोद्भवाः ॥

अर्थ–पितांबराचे फडक्यांत जिरे घालून विडी करून पेटवून नाकानें ओढावी, तेणें करून फारदिवसांची छर्दि नाश पावेल.

## वांतिल्हृद्रस.

अयःशंखबलीसूतःखल्वेतुल्यंविमर्दयेत् ॥ कन्याकनकचांगेरीरसै गोलंविधायच ॥ तप्तमृत्कर्पटैर्लिप्त्वापुटितोवांतिल्हृद्रसः ॥ द्विव ल्लःकृमिरोगेपिसाजमोदःसवेल्लकः ॥ वांतिहारेणमुनिनाप्रोक्तोयंम धुनायुतः ॥ पिप्पलक्षारपानीयंपाययेद्वांतिल्हृद्भिषक् ॥

अर्थ–लोखंडाचें चूर्ण, शंखाचें चूर्ण, गंधक व पारा हीं सर्व समभाग खलांत घालून कोरफड, धोत्रा व चुका यांचे रसांत पृथक् खलून गोळा करून त्या गोळ्या भोंवतीं सात मातकपडे करून गजपुट द्यावें; ह्मणजे हा वांतिल्हृद्रस होतो, हा दोन वाल प्रमाणें अजमोदा व वावडिंग यांच्या बरोबर कृमीवर आणि मधाबरोबर वांतीवर द्यावा; व पिंपळाच्या खाराचे पाणी पाजावें, तें वांतिनाशक आहे. हा रस वांतिहार या नावाचा ऋषि होता त्याणें सांगितला आहे.

## जातीरसपान.

जात्यारसःकपित्थस्यपिप्पलीमरिचान्वितः ॥
क्षौद्रेणयुक्तःशमयेल्लेहोयंछर्दिमुल्बणां ॥

अर्थ–जाईचा रस, कंवठाचा रस, पिंपळी व मिरीं, यांचा लेह आंत मध घालून द्यावा, हा फारउग्रवांतीचा नाश करितो.

## यष्ट्यादिपान.

यष्ट्याव्हाचंदनोपेतंसम्यक्क्षीरेणपेषितं ॥
तेनैवालोड्यपातव्यंरुधिरच्छर्दिनाशनं ॥

अर्थ–ज्येष्ठीमध व चंदन, हे दुधात उगाळून व दुधांत कालऊन प्यावें; ह्मणजे रक्ताच्या वांतीचा नाश करितात.

## गुडूच्यादिहिम.

गुडूच्यारचितंहंतिहिमंमधुसमन्वितं ॥

दुर्निवारामपिच्छर्दित्रिदोषजनितांबलात् ॥

अर्थ–गुळवेलीचा हिम करून त्यांत मधघालून द्यावा; ह्मणजे दुर्निवारवांतीचा ही नाश करितो.

## पारदादिचूर्ण.

रसबलिघनसारकोलमज्जामरकुसुमांबुधरप्रियंगुलाजाः ॥

मळयजमगधात्वगेलपत्रंदलितमिदंपरिभाव्यचंदनाद्भिः ॥

मधुमरिचयुतंरजोस्यमाषंजयतिवमिंप्रबलांविलिह्यमर्त्यः ॥

अर्थ–पारा, गंधक, कापूर, बोराचा मगज, लवंगा, नागरमोथे, कांग, लाह्या, कृष्णागरु, पिंपळी, दालचिनी, वेलदोडा व तमालपत्र यांचें चूर्ण चंदनाचे काढ्याच्या भावना देऊन तें मध व मिरपुड यांचे बरोबर एक मासा खावें; ह्मणजे मोठी प्रबल ओकारी नाश पावते.

## जीरकादिरस.

अजाजीधान्यपथ्याभिःसक्षौद्रैःसकटुत्रिकैः ॥

एतैःसार्धंसूतभस्मसद्योवांतिंविनाशयेत् ॥

अर्थ–जिरें, धने, हिरडे व त्रिकटु यांचें चूर्ण व मध, यांच्या सहवर्तमान पाऱ्याचे भस्म सेवन केलें असतां; तात्काळ वांतिनाश करील.

## वमनामृतयोग.

गंधकःकमलाक्षश्चयष्टीमधुशिलाजतु ॥ रुद्राक्षोटंकणश्चैवसारंगस्यचशृंगकं ॥ चंदनंचतवक्षीरीगोरोचनमिदंसमं ॥ बिल्वमूलकषायेणमर्दयेद्याममात्रकं ॥ मात्रांचैवप्रकुर्वीतवल्लस्यैवप्रमाणतः ॥ नानाविधानुपानेनच्छर्दिंहंतित्रिदोषजां ॥ वमनामृतयोगोयंकमलाकरभाषितः ॥

अर्थ–गंधक, कमलाक्ष, जेष्ठीमध, शिलाजित, रुद्राक्ष, टांकणखार, हरणाचें शिंग, चंदन, तवखीर व गोरोचन हीं सर्व समभाग घेऊन चूर्ण करून बेलाच्या मुळांचे काढ्यांत प्रहरभर खलावें; नंतर एकवालभारप्रमाणाची मात्रा नानाप्रकारचे अनुपानाबरोबर सेवन केली असतां; त्रिदोषाची छर्दि नाश पावेल. ह्याला वमनामृतयोग ह्मणतात. हा योग कमलाकर ह्मणून कोणी एक होता, त्याणे सांगितला आहे.

## छर्दिपथ्य.

विरेचनंछर्दनलंघनानिस्नानंजपोलाजकृतश्चमंडः ॥ पुरातनाःशालिक षष्टिमुद्गाकलायगोधूमयवामधूनि ॥ शशाहिभुक्तित्तिरिलावकाद्यामृग द्विजाजांगलसंज्ञिताश्च ॥ मनोज्ञनानारसगंधरूपारसाश्चयूषाअपिखां डवाश्च ॥ गवांजलंकांबलिकाःसुराचवेत्राग्रकुस्तुंबरिनारिकेरं ॥ जं बीरधात्रीसहकारकोलद्राक्षाकपित्थानिपचेलिमानि ॥ हरीतकीदाडि मबीजपूरंजातीफलंवालकनिंबवासा ॥ सिताशताव्हाकरिकेसराणिभ क्ष्यामनःप्रीतिकराहिताश्च ॥ भुक्तस्यवक्त्रेशिशिरांबुसेकःकस्तूरिकाचंदन मिंदुपादाः ॥ मनोज्ञगंधान्यनुलेपनानिपानानिपुष्पाणिफलानिचापि ॥ रूपाणिशब्दाश्चरसाश्चगंधाःस्पर्शाश्चयोज्याःस्वमनोनुकूलाः ॥ दाहश्च नाभेस्त्रिकपार्श्वपृष्ठेशस्तंहिपथ्यंवमनातुरस्य ॥

अर्थ-रेचक, वमन, लंघन, स्नान, जप, लाह्यांचा मंड, आणि जुने साटकीचे तांदूळ, साठिमूग, वाटाणे, गहुं, यव, मधें; व ससा, मोर, तित्तिर, लावे इत्यादि जंगलांतील मृग व पक्षी यांचीं मांसें, व चांगले अनेकप्रकारचे रस व सुवास रस, यूष, रागखांडव गोमूत्र, आणि (कांबलिक ह्मणून मुळे व फळें यांचे कढण काढून त्यांत समभाग तिळ पुष्पाची आंब घालावी तो), मद्य, वेशांकुर, धने, नारळ, जांबीर, आवळे, आंबे, बोरें, द्राक्षें, कंवठ, उडीद, हरीतकी, डाळिंब, महाळुंग, जायफळ, वाळा, कडुनिंब, अडुळसा, साकर, बडीशेप, नाकेशर व मनाला प्रीतिकरणारे, आणि हितकारक पदार्थ, भोजनोत्तर मुखांत थंड पाणीं शिंपणें, कस्तुरी, चंदन, चांदणें, उत्तम गंध व मनाला अनुलोमन करणारीं पानें व फळें, फुलें, मनाला प्रिय असे शब्द, स्पर्श, रूप, रस, आणि गंध, हे योजावे; आणि तिडें, बेंबी, पार्श्व, आणि पाठ, यांचे ठिकाणी डाग द्यावा, हें वांतिरोग्याला पथ्य सांगितलें.

## अपथ्य.

नस्यंबस्तिस्वेदनंस्नेहपानंरक्तस्रावंदंतकाष्ठंद्रवान्नं ॥ वियत्प्रेक्षांभीतिमुद्वेगमुष्णंस्निग्धासात्म्यंत्वद्यवैरोचकान्नं ॥ लंबाबिंबीकोषवंत्यौमधूकंचित्रामलीसर्षपादेवदाली ॥ व्यायामंवासात्म्यदुष्टान्नपानंछर्द्यांसद्योवर्जयेदप्रमत्तः ॥

अर्थ—नस्य, बस्तिकर्म, घाम, स्नेहपान, रक्तस्राव, दंतकाष्ठ, पातळ अन्न, आकाशाचें अवलोकन, भय, उद्वेग, ऊन, स्निग्ध, असात्म्य, अप्रिय, अरुचिकारक असें अन्न, दुधभोंपळा, तोंडलीं, दोडकीं, ज्येष्टमध, मोगरी, शिरस, देवडांगरी, व्यायाम, असात्म्य व खराब असें अन्न व पाणी, हे पदार्थ वातिरोग्यांनि सावध पणानें वर्जावे.

---

## तृष्णाकर्मविपाक.

पथिचाध्वपरिश्रांतंब्राह्मणंगामथापिवा ॥
नपाययेज्जलंयस्तुमतृष्णामूर्छितोभवेत् ॥

अर्थ—जो मनुष्य ब्राह्मण किंवा गाई मार्गामध्यें श्रांत होऊन ताहानेनें पीडित झाली, त्यांला पाणी पाजीत नाहीं त्याला तृष्णारोग उत्पन्न होतो.

पानीयंपायसंभुक्त्वाशर्कराघृतसंयुता ॥
इदमावश्यतोदेयंमूर्छातृष्णोपशांतये ॥

अर्थ—पाणी, दूध किंवा तूपसाखर हे पदार्थ ब्राह्मणाला अवश्य द्यावें व भक्षावें; ह्मणजे तृष्णाजनित मूर्छेचा नाश होतो.

## तृष्णानिदान.

भयश्रमाभ्यांबलसंक्षयाद्वाऊर्ध्वंचितंपित्तविवर्धनैश्च ॥
पित्तंसवातंकुपितंनराणांतालुप्रपन्नांजनयेत्पिपासां ॥

अर्थ—भय, श्रम व बलक्षय याणीं वायु कुपित होतो, तो पित्त वाढवणारे पदार्थांच्यासंबंधेकरून पित्त स्वथानीं ह्मणजे हृदयाचे ठायीं संचित होऊन नंतर ऊर्ध्वगतिक होऊन वातासहवर्तमान मनुष्याचें तालुमूल व पिपासास्थान यांप्रत जाऊन तृष्णा उत्पन्न करितें, तालुमूल ह्मणजे गळा.

## तृष्णार्दिताचें स्वरूप.

सततंयःपिबेत्तोयंनतृप्तिमधिगच्छति ॥
पुनःकांक्षतितोयंचतंतृष्णार्दितमादिशेत् ॥

अर्थ—जोमनुष्य वारंवार पाणी पिऊन तृप्त होत नाहीं; व पुनःपुनः जलप्राशनाची इच्छा करितो, त्याला तृष्णारोगी ह्मणावा.

## तृष्णासंप्राप्ती.

स्रोतःस्वपांवाहिषुदूषितेषुदोषैश्चतृट्संभवतीहजंतोः ॥
तिस्रःस्मृताःसाक्षतजाचतुर्थीक्षयात्तथाह्यामसमुद्भवाच ॥
भक्तोद्भवासप्तमिकेतितासांनिबोधलिंगान्यनुपूर्वशश्च ॥

अर्थ-वातादि दोषानीं उदक वाहिनी शिरा दूषित झाल्या; असतां मनुष्याला तहान उत्पन्न होत्ये, ती वातादि दोषांनीं तीन प्रकारची, क्षतापासून चवथी, क्षयापासून पांचवी, आमापासून साहावी, आणि अन्नापासून सातवी, त्यांची अनुक्रमाने लक्षणें सांगतों.

## वातजतृष्णानिदान.

क्षामास्यतामारुतसंभवायांतोदस्तथाशंखशिरस्सुचापि ॥ स्रोतोनिरोधोविरसंचवक्त्रंशीताभिरद्भिश्चविवृद्धिमेति ॥ ताल्वोष्ठकंठस्यच तोददाहसंतापमोहभ्रमविप्रलापाः ॥ पूर्वाणिरूपाणिभवंतितासामुत्पत्तिकालेषुविशेषतोहि ॥

अर्थ-वातसंभवतृष्णेचे ठायीं मुख म्लान होतें, शंख व मस्तक यांस पीडा होत्ये, रसवाहिनीशिरांचा निरोध होउन तोंड विरस होतें; आणि ही तृष्णा शीतोदकप्राशनेंकरून फार वाढत्ये; व तालु, ओंष्ठ व कंठ यांस शूळ व दाह होतो; आणि संताप, मोह, भ्रम व प्रलाप इत्यादिक वाततृष्णेचीं लक्षणें जाणावीं.

## वाततृष्णाजयप्रकार.

वातघ्नमन्नपानमिष्टंलघुशीतंचवाततृष्णायां ॥
स्याज्जीवनीयसिद्धंक्षीरघृतंवातजेतर्षे ॥

अर्थ-वातनाशक, लघु व शीतळ असें अन्न, पान आणि जीवनीयगणानें सिद्ध केलेलें दूध व तूप हें वाततृष्णेवर प्रशस्त आहे.

## दुसरा प्रकार.

वातोद्भवायांतृष्णायांपानान्नंवातनुत्स्मृतं ॥
स्वर्णरूप्यैरग्नितप्तैर्लोष्टैःसोष्टाजलंतथा ॥

अर्थ-वातोत्पन्नतृष्णेवर वातनाशक पान, अन्न, अथवा सुवर्णाच्या, लोष्ठाच्या किं रौप्याच्या योगानें अग्नीवर तापलेलें पाणी द्यावें.

## तेल.

देयंसुगंधितैलंशिरसिचगात्रेषुसर्वेषु ॥

अर्थ- मस्तकावर आणि सर्वांगास सुगंधि तेल लावावें.

## पाणी.

सुवर्णरौप्यादिभिरग्नितप्तैर्लोष्टैःकृतंवासिकतोत्करैर्वा ॥
जलंसुखोष्णंशमयेत्तुतृष्णांसशर्करंक्षौद्रयुतंजलंवा ॥

**अर्थ**—सोनें, रुपें, मातीचें ढेकूळ व वाळू यांतून एकादें तापऊन पाण्यांत विझवून तें पाणी किंचित् उष्ण प्यावें; अथवा पाण्यांत मध व साकर घालून तें पाणी प्यावें; ह्मणजे तृषा शांत होइल.

## पित्ततृष्णानिदान.

मूर्छान्नविद्वेषविलापदाहरक्तेक्षणत्वंप्रततश्चशोषः ॥
शीताभिनंदामुखतिक्तताचपित्तात्मिकायांमुखधूपनंच ॥

**अर्थ**—मूर्छा, अन्नविद्वेष, विलाप, दाह, नेत्रांस आरक्तता, अत्युत्कृष्ट तृष्णा, शीतपदार्थांची प्रीति, मुखाला कडुपणा, मुखांतून धूर निघाल्यासारिखा भास व विट्, मूत्र व नयन आदिकरून यांस पीतवर्णता हीं पित्ततृष्णेचीं पूर्वरूपें जाणावीं.

## पित्ततृष्णाचिकित्सा.

पित्तजायांसितायुक्तःपक्वोदुंबरजोरसः ॥

**अर्थ** पित्तापासून तृषा असली तर, पिकलेले उंबराचा रस साखरेसहित प्यावा.

स्वादुतिक्तंद्रवंशीतंपित्ततृष्णापहंपरं ॥
आतपात्संशृतंपथ्यमुदकंलाजसक्तुभिः ॥

**अर्थ**—स्वादु, कडु, पातळ व थंड अशा जा वस्तु त्या तृष्णाहारक आहेत; आणि उन्हांत तापलेल्या पाण्यांत लाह्यांचें पीठ घालून तें पाणी हितकारक आहे.

## तंदुलोदकपान.

जीर्णेभुक्तेपिबेद्वापिसक्षौद्रंतंदुलोदकं ॥

**अर्थ**—भोजन जिरल्यावर तृषा लागली तर, तांदुळांचे धुवणांत मध घालून तें प्यावें.

## मधूकादिफांट.

मधूकपुष्पंगंभारीचंदनोशीरधान्यकैः ॥ द्राक्षयाचकृतःफांटःशीतःशर्करयापुनः ॥ तृष्णापित्तहरःप्रोक्तोदाहमूर्छाभ्रमान्जयेत् ॥

**अर्थ**—मोहाचीं फुलें, थोर शिवण, चंदन, वाळा, धनें व मनुका यांचा फांट थंड करून साकर घालून प्यावा, तो तृष्णा, पित्त, दाह, मूर्छा व भ्रम यांचा नाशक आहे.

## कफतृष्णानिदान.

बाष्पावरोधात्कफसंवृतेग्नौतृष्णाबलासेनभवेत्तथानु ॥

निद्रागुरुत्वंमधुरास्यताचतृष्णार्दितःशुष्यतिचातिमात्रं ॥

अर्थ–कांहीं एक कारणेकरून नयनोदकाचा अवरोध झाला असतां; कफानें जठराग्नि व्याप्त होऊन तृष्णा उत्पन्न हात्ये, त्या तृष्णेमध्यें निद्रा, मस्तकास जडपणा, तोंड गोडीळ, हीं लक्षणें व तो रोगी तृष्णेकरून पीडित होत्साता फार कृश होतो, असें जाणावें.

## कफतृष्णासामान्यचिकित्सा.

तिक्तद्रवंकदुष्णंचकफतृष्णानिवारणं ॥
अन्नपानौषधंसर्वंप्रदद्यात्कफतृड्युते ॥

अर्थ–कडु, पातळ, किंचित्उष्ण, कफ व तृष्णानिवारक असें अन्न, पान व औषध कफतृष्णेवर द्यावें.

## बिल्वादिकाढा

बिल्वाढकीधातकिपंचकोलदर्भैषुसिध्धंकफजांनिहंति ॥
हितंभवेच्छर्दनमेवचात्रतप्तेननिंबप्रसवोदकेन ॥

अर्थ–बेलफळ, तुरी, धायटीची फुलें, सुंठ, मिरें, पिंपळी, चवक, चित्रक, दर्भमूळ व तिळकांडें, यांचा काढा द्यावा; आणि कडुलिंबाच्या पाल्याच्या काढ्याचें वमन द्यावें; ह्मणजे कफवांतीचा नाश होऊन हित होईल.

## कफतृष्णाप्रयोग.

यथोक्तंकफतृष्णायांछर्द्यांतथैवकार्यस्यात् ॥ स्तंभारुच्याविपाकालस्यच्छर्दिषुकफानुगांतृष्णां ॥ज्ञात्वामधुदधितर्पणलवणेनजलैर्वमनमइलक्षणं ॥ दाडिममम्लफलंवान्यासकषायमवलेहं॥ पयोथवाप्रदद्याद्रजनीमधुशर्करायुक्तं ॥

अर्थ–जसें कफतृष्णेचे ठायीं औषध सांगितलें असेल, तसेंच छर्दीचे ठायीं करावें; व स्तंभ, अरुचि, अजीर्ण, आलस्य व छर्दि यांच्या ठिकाणीं जी तृष्णा असत्ये ती, कफ संबंधाची असत्ये; ह्मणून मधु व दहीं अशा तृप्तिकारक वस्तु द्याव्या; व मीठ, पाणी, इतक्यानीं वमन द्यावें; आणि डाळिंब, कोकंब, किंवा आणखी दुसरें कांहीं तुरट पदार्थ चाटावयाला द्यावें; अथवा हळद व साकर, घालून दूध द्यावें.

## क्षतजतृष्णानिदान.

क्षतस्यरुक्शोणितनिर्गमाभ्यांतृष्णाचतुर्थीक्षतजामतातु ॥

अर्थ–क्षतसंबंधीं वेदना व रक्तस्राव यां पासून जी होत्ये, ती चवथी क्षतज तृष्णा जाणावी.

## क्षतजतृष्णाचिकित्सा.

क्षतोद्भवांरुग्विनिवारणेनजयेद्रसानामसृजश्चपानैः ॥

अर्थ-क्षतापासून तृषा होत्ये, तीचें क्षतनिवारणानें निवारण करावें; आणि औषधीरसाच्या पानानें रक्ताचें निवारण करावें.

## क्षयजतृष्णानिदान.

रसक्षयाद्वाक्षयसंभवासातथाभिभूतस्तुनिशादिनेषु ॥

पेपीयतेंभःससुखंनयातितांसन्निपातादितिकेचिदाहुः ॥

रसक्षयोक्तानिचलक्षणानितस्यामशेषेणभिषक्चिकित्सेत् ॥

अर्थ-रसादिधातूंच्या क्षयेंकरून तृष्णा उत्पन्न होत्ये, ती क्षयजा जाणावी. तिणें व्याप्त मनुष्य रात्रंदिवस उदकपान करीत असतांही तृप्ति पावत नाहीं, हिला कोणी वैद्य संनिपातजन्या ह्मणतात, हिचे ठायीं रसक्षयसंबंधी सर्व लक्षणें असतात, असें जाणावें.

## क्षयजतृष्णा.

क्षयोत्थितांक्षीरजलंनिहन्यान्मांसोदकंवामधुकोदकंवा ॥

अर्थ-क्षयापासून जी तृषा होत्ये, ती दुधाच्या काढ्यानें, किंवा मांसरसानें, किंवा जेष्टीमधीचे काढ्यानें शांत करावी.

## आमजतृष्णानिदान.

त्रिदोषलिंगामसमुद्भवाचहृच्छूलनिष्ठीवनसादकर्त्री ॥

अर्थ-आमजातृष्णेचे ठाईं वात, पित्त, कफ या तिघांची लक्षणें असतात; व ही तृष्णा हृच्छूल, कृशत्व, वमन, याहीं करून युक्त असत्ये, असें जाणावें.

## आमजतृष्णा.

आमोद्भवांबिल्ववचायुतानांजयेत्कषायैरपिदीपनानां ॥

उल्लेखनैर्गुर्वशनप्रजातांजयेत्क्षतोत्थांनुविनापिपासां ॥

अर्थ-आमांशापासून जी तृषा होत्ये, ती बेलफळ व वेखंड, याणी युक्त जे दीपन काढे, त्याणीं जिंकावी; आणि गुरुपदार्थभक्षणानें जी होत्ये, ती लेखनपदार्थांनीं जिंकावी; परंतु ती क्षतापासून नसली तर.

## अन्नजातृष्णानिदान.

स्निग्धंतथाम्लंलवणंचभुक्तंगुर्वन्नमेवाशुतृषांकरोति ॥

अर्थ-स्निग्ध, आम्ल, गुरु यांच्या भक्षणेंकरून तृष्णा उत्पन्न होत्ये, तिला अन्नजा ह्मणतात.

## अन्नजाचिकित्सा.

स्निग्धान्नेभुक्तेयातृष्णास्यात्तांगुडांबुनाशमयेत् ॥
अतिरूक्षकदुर्बलानांतृषांशमयेन्नृणामिहांबुपयः ॥

अर्थ–स्निग्ध अन्नाच्या भक्षणानें जी तृषा होत्ये, ती गुळाचे पाण्यानें शांत करावी; आणि अतिरूक्ष व दुर्बल अशा मनुष्यांची तृषा वाळयाच्या काढ्यानें शांत करावी.

## उपद्रव व असाध्यलक्षण तृष्णा.

दीनस्वरःप्रताम्यंदीनाननसंशुष्कत्हृदयगलतालु ॥ भवतिखलुसोपसर्गातृष्णासाशोषिणीकष्टा ॥ ज्वरमोहक्षयकासश्वासाद्युपसृष्टदेहानां ॥ सर्वास्त्वतिप्रसक्तारोगकृशानांवमिप्रसक्तानां ॥ घोरोपवद्रवयुक्तातृष्णामरणायविज्ञेया ॥

अर्थ–उपसर्गजतृष्णेचे ठायीं, म्लान भाषण, मोह, मुखग्लानि व गळा, तालु व हृदय यांना शोष, इत्यादि उपद्रव होतात. अशी ही शोष व कष्टकरणारी तृष्णा जाणावी. व ज्वर, मोह, क्षय, श्वास व कास यांहीकरून युक्त ती असाध्य जाणावी. तशाच सर्व तृष्णा अति वाढल्या असतां व रोगी कृश झाला असतां व ओकारीनें व्याप्त झाला असतां त्याला तृष्णा मारित्ये, असें जाणावें.

## जलपाननियम.

सात्म्यान्नपानभैषज्यैस्तृष्णार्तस्यजयेत्तृषां ॥ तस्यांजितायामन्योपि व्याधिःशक्यश्चिकित्सितुं ॥ तृषितोमोहमायातिमोहात्प्राणान्विमुंचति ॥ तस्मात्सर्वास्ववस्थासुनक्वचिद्वारिवार्यते ॥ अन्नेनापिविना जंतुःप्राणान्संधारयेत्क्वचित् ॥ तोयाभावेपिपासार्तःक्षणात्प्राणैर्विमुच्यते ॥

अर्थ–प्रकृतीस मानलेलें जें अन्न, पान व औषध यांणी तृषार्त मनुष्याची तृषा जिंकावी. ती जिंकली असतां दुसरा व्याधि जिंकण्यास शक्य होतो; नाहींतर तृषित मनुष्य मोह पावतो; आणि मोहापासून प्राण सोडतो, यास्तव सर्व अवस्थांचा ठाईं कधींही उदक बंद करूं नये. अन्नावांचून ही एकादा प्राण धारण करील; परंतु तृषार्त मनुष्य पाण्यावांचून क्षणमात्र प्राण धारण करणार नाहीं.

## गंडूष.

पटोलीमूलिकासार्द्रातुवरीमधुयष्टिका ॥ क्रमुकंचिक्कणंकंदःश्छल्लीच खदिरान्विता ॥ कटुकीरवराजोत्थक्राथोमीषांसुशीतलः ॥ गंडूपधारणात्धंतिगलशोषंसुदारुणं ॥

अर्थ—कडुपडवळीचें ओलें मूळ, तुरी, ज्येष्ठीमध, चिकणी सुपारी, ताहानवेलीचा कंद, खदिर व गठोना यांचा काढा करून तो थंड झाल्यावर तोंडांत धरण्यास द्यावा; ह्मणजे दारुण गलशोषाचा नाश करितो.

## गंडूष.

श्रीखंडंपद्मकंमुस्तधान्यकंनिंबवल्कलं ॥ कूष्मांडंखदिरोदूर्वामूलं कितवराजकं ॥ अष्टावशेषितोमिषांक्वाथःशीतलतांगतः ॥ गंडूषकरणाद्धंतिरोगिणःशोकमुल्बणं ॥

अर्थ—चंदन, पद्मकाष्ठ, नागरमोथें, धने, निंबाची साल, कोंहळा, खैरसाल, दूर्वा व पांढरा धोतरा, यांचा अष्टमांश काढा करून थंड झाल्यावर गंडूषधारणर्थ द्यावा; ह्मणजे तो रोग्याचा वाढलेल्या शोषाचा नाश करितो.

## लेप.

जलंमलयजंरक्तचंदनंपद्मकेसरं ॥
उशीरेणांचितैर्लेपोमस्तकेतृड्निवारणः ॥

अर्थ—वाळा, मलयागर, रक्तचंदन, पद्मकेशर व काळा वाळा यांचा मस्तकावर लेप करावा; ह्मणजे तो तृष्णेचें निवारण करितो.

## चूर्ण.

कणाजीरंसितानागकेसरंदाडिमीफलं ॥
मधुनाभक्षणादेषारोगोगच्छतिरोगिणः ॥

अर्थ—पिंपळी, जिरें, साकर, नागकेसर व डाळिंब, यांचें चूर्ण मधाशीं द्यावें; ह्मणजे तृष्णानिवारण करितो.

## कुष्ठादिचूर्ण.

कुष्ठंकासोद्भवंमूलंमधुकंपिष्टमंजसा ॥
भक्षितंतद्द्रुतंहंतिपिपासांचिरकालजां ॥

अर्थ—कोष्ठकोळिंजन, काशिवद्याचें मूळ व ज्येष्ठीमध ही पाण्यांत वांटून द्यावीं; ह्मणजे फार दिवसांची तृषा शांत होत्ये.

## चूर्ण.

कुशःकुष्टजतुर्यष्टीलाजातप्तेनवारिणा ॥
पीतोचूर्णस्तृषांहंतिशोकसंतापसंभवां ॥

अर्थ–कुशमूळ, कोष्ठ, लाख, ज्येष्ठीमध व लाह्या यांचें, चूर्ण ऊन पाण्यांशीं द्यावें; ह्मणजे शोक व संताप यां पासून झालेल्या तृषेची शांति करितें.

## वटाद्यवलेह.

वटबालाशिवाकृष्णामधुकंमधुनासह ॥
अवलेहःकृतोमीषांतृष्णारोगोविनश्यति ॥

अर्थ–वडाचे पारंबे, हरीतकी, पिंपळी व ज्येष्ठीमध यांचा लेह मधाशीं द्यावा; ह्मणजे तृषारोग नाश पावतो.

## दुसरा प्रकार.

वटशृंगासितालोध्रंदाडिमंमधुकंमधु ॥
पिबेत्तंदुलतोयेनतृष्णाच्छर्दिनिवारणं ॥

अर्थ–वडाचे पारंबे, साकर, लोध्र, दाळिंब व मधुकाष्ठ यांचा कल्क मध घालून तांदळांच्या धुवणांत प्राशनार्थ द्यावा; ह्मणजे ताहान व ओकारी यांचा नाश होतो.

## अवलेह.

अर्धावर्तितपानीयंसलाजैःशीतलंमधु ॥
तवराजयुताद्राक्षामुखेक्षिप्तातृषांजयेत् ॥

अर्थ–पाण्यांत लाह्या घालून निमें आटें तोंपर्यंत कढवून थंड झाल्यावर त्यांत मध घालून द्यावा; किंवा द्राक्षे व साकर यांची गोळी तोंडांत धरण्याकरितां द्यावी; ह्मणजे तृषा नाश पावत्ये.

## ताम्रादिरस.

ताम्रंचक्रिकयाबद्धंसूतंतालंसतुत्थकं ॥
वटांकुररसैर्मर्द्यंतृष्णांनुल्लवमात्रया ॥

अर्थ–ताम्रभस्म, पारा, हरताळ, आणि मोरचूत हे वटांकुराच्या रसांत खलून त्याची चक्रिका बांधून पुट द्यावें, त्यांतून लवमात्र द्यावें; ह्मणजे ताहानेचा नाश होतो.

## श्रीखंडयोग.

अर्धाढकंरुचिरपर्युषितस्यदध्नःखंडस्यषोडशपलानिशशिप्रभस्य॥ सर्पिःपलंमधुपलंमरिचंद्विकर्षशुंठ्यापलार्धमपिचार्धपलंतृटेश्च ॥ श्लक्ष्णे पटेललनयामृदुपाणिघृष्टेकर्पूरधूलिसुरभीकृतचारुभांडे ॥ एषावृकोदरकृतासुरसारसालासुस्वादिताभगवतामधुसूदनेन ॥

अर्थ–पूर्वदिवसीं सुंदर विरजलेलें चक्का दहीं दोन शेर, पांढरी शुभ्र खडीसाकर १ शेर,

तूप ४ तोळे, मध ४ तोळे, मिरें २ तोळे, सुंठ २ तोळे व वेलाचे दाणे २ तोळे इत-के पदार्थ बारीक महुमदी फडक्यांत घालून कापराच्या चूर्णानें सुगंधित अशा पात्रामध्यें स्त्रीचे मृदु हस्तानें मर्दवावें. याला श्रीखंड ह्मणतात, हें सेवन केलें असतां; मनुष्याची तृषा शांत होत्ये, यास कोणी (रसाला किंवा शिखरिणी) असें ही ह्मणतात, याप्रमाणेंच श्रीखंड पूर्वी भिमसेनानें केलें होतें, तें श्रीकृष्णानें मोठया आवडीनें भक्षण केलें.

## आमलक्यादिगुटिका तृष्णादिकांवर.

आमलंकमलंकुष्ठंलाजाश्चवटरोहकं ॥ एतच्चूर्णस्यमधुनागुटि
कांधारयेन्मुखे ॥ तृष्णांप्रवृद्धांहंत्येषामुखशोषंचदारुणं ॥

अर्थ—आवळकाठी, कमळ, कोष्ठ, साळीच्या लाह्या, वडाच्या कोंवळ्या पारंब्याच्या डिऱ्या या पांच औषधांचें चूर्ण मधांत मेळवून गोळी करून तोंडांत धरली असतां; तहान फार लागते ती व तोंडास कोरड फार पडते ती हीं दोन्हीं दूर होतात.

## वटी.

उत्पलंमधुलाजाश्चवटरोहोगदस्तथा ॥
एतैःकृतावटीनित्यंतृष्णांनाशयतिक्षणात् ॥

अर्थ—निळें कमळ, मध, लाह्या, वटांकुर व कोष्ठ, यांची वटी मखांत धरावी, ती त त्क्षणीं तृषेचा नाशक करित्ये.

## गुटी.

खर्जूरमृद्वीकमधुःसखंडंपृथक्पलंमागधिकात्रिगंधे ॥
तथार्धबिल्वेमधुनागुटीयंतृण्मोहपित्तास्रजयेतिशस्ता ॥

अर्थ—खजूर, द्राक्षें, ज्येष्ठीमध, खडीसाकर, हीं प्रत्येकीं ४ चार तोळे; पिंपळी, दा लचिनी, तमालपत्र, एलची, हीं २ दोन तोळे यांची मधाशीं गोळी करून द्यावी, ती तृषा, मोह व रक्तपित्त, यांचा नाश करित्ये.

## काश्मर्यादिकाढा.

काश्मर्यशर्करायुक्तंचंदनोशिरपद्मकं ॥
द्राक्षामधुकसंयुक्तंपित्ततृष्णोजलंपिबेत् ॥

अर्थ—लघुशिवणीचें फळ, साकर, चंदन, वाळा, पद्मकाष्ठ, मनुका व जेष्टीमध, यांचा काढा पित्तापासून तृषा लागते त्यावर प्रशस्त आहे.

## जीरकादि चूर्ण.

सजीरधान्यार्द्रक शृंगवेरसौवर्चलान्यर्धपरिप्लुतानि ॥

मद्यानिहृद्यानिचगंधवंतिपीतानिसद्यःशमयंतितृष्णां ॥

अर्थ–जिरें, धने, वेळू, आलें, पादेलोण यांचें चूर्ण अर्ध पडे भिजेल इतकें मद्य, चांगलें सुगंधियुक्त प्यालें असतां तृष्णा शमेल.

## आम्रादिकाढा.

आम्रजंबूकषायंवापिबेन्माक्षिकसंयुतम् ॥
छर्दिंसर्वांप्रणुदतितृष्णांचैवापकर्षति ॥

अर्थ–आंबा व जांबूळ यांचे सालीचा काढा मध घालून प्याला असतां; ओकारी, तृषा यांचा नाशक आहे.

## द्राक्षादि नस्य.

गोस्तनीक्षुरसक्षीरयष्टिमधुमधूत्पलैः ॥
नियतंनस्यतोपीतैस्तृष्णाशाम्यतितत्क्षणात् ॥

अर्थ–काळीं द्राक्षें, ऊंस, दूध, जेष्टीमध, मध व कमळ यांचें नस्य केलें असतां; नेमानें त्याच क्षणीं तृष्णा शांत होत्ये.

## जीरकादियोग.

जीरकुस्तुंबरीद्राक्षाचंदनोत्पलशीतलं ॥
शीतलेनसमंदद्यात्तृष्णांहंत्यतिशीतलं ॥

अर्थ–जिरें, धने, मनुका, चंदन, कापूर, हीं सर्व वाटून थंड पाण्याबरोबर प्यावीं. ह्मणजे तृष्णानाश होईल.

## कोष्ठादियोग.

रुग्लाजाब्दवटप्ररोहमधुकैर्मध्वान्वितैःकल्पितान्युग्रामा
शुतृषांभृशंप्रशमयेदास्यांतरस्थागुटी ॥

अर्थ–कोष्ठकोलिंजन, लाह्या, नागरमोथा, वडाचे अंकूर, जेष्टीमध, मध हीं एकत्र वाटून गोळी करून तोंडांत धरावी; ह्मणजे अतितृष्णा जरी असली तरी लौकर शांत होईल.

## तप्तलोष्टादियोग.

निर्वापितंतप्तलोष्ठकपालसिकतादिभिः ॥
तृष्णायांवमनोत्थायांसगुडंदधिशस्यतें ॥

अर्थ–ढेंकूळ, खापरी व वाळू यांतून काहीं एक तापवून दह्यांत विझवून तें दहीं गूळ घालून प्यावें; ह्मणजे वांतीपासून झालेली तृषा बंद होईल.

## मंथादियोग.

आतपात्ससितंमंथंयवकोलजसक्तुभिः ॥
सर्वाण्यंगानिविलिंपेत्तिलपिण्याककांजिकैः ॥

**अर्थ**–उनापासून तृषा असली तर मठ्ठयांत साकर, सातु व बोरें यांचें पीठ घालोन प्यावा; आणि सर्वांगाला तिळांची पेंड व कांजी यांचा लेप करावा.

रोगोपसर्गजातायांधान्यांबुससितामधु ॥ वटप्ररोहयष्ट्याऽन्हृ
कणामधुकृतावटी ॥ मुखस्थाचिरकालोत्थांतृष्णांहन्यात्सुदुस्तरां ॥

**अर्थ**–रोगाचे संबंधानें तृषा असली तर; धन्यांचें पाणी, मध, साकर घालून प्यावें; आणि फार वेळ तृषा लागून दुःसाध्य असली तर वडाचे पल्लव अथवा कोंवळ्या पारंब्या, जेष्टीमध, पिंपळी व मध यांची गोळी मुखांत धरावी.

## रसादिगुटी.

रसरजतगुटींपटीयसींयोवदनसरोरुहमध्यगांदधाति ॥
सजयतितृषितस्तृषांमनुष्योभृशमघमिवत्रिमार्गगांभः ॥

**अर्थ**–पारा व रुपें, यांची खलुन घट्ट गोळी करून मुखकमलांत धरली असतां; तृषित मनुष्य आपल्ये तृषेचा जय करील, जसें तीन मार्गांनीं जाणारें उदक ह्मणजे गंगा पातकाचा नाश करित्ये.

## रसादिचूर्ण.

रसगंधककर्पूरैःशैलोशरिमरीचिकैः ॥ रसितैःक्रमवृध्धैश्वसूक्ष्मंकृत्वा
त्वहर्मुखे ॥ त्रिगुंजाप्रमितंखादेत्पिबेत्पर्युषितांबुच ॥ भृशंतृष्णांनि
हंत्येवमाश्विभ्यांचप्रकाशितं ॥

**अर्थ**–पारा १, गंधक २, कापूर ३, शिलाजित ४, वाळा ५, मिरें ६ व साकर ७ याप्रमाणें भाग घेऊन बारीक करून तीन गुंजा प्रमाणें प्रातःकाळीं खावें; नंतर शिळें पाणी प्यावें; ह्मणजे अत्यंत तृष्णा नाश पावत्ये, हें अश्विनीकुमारानीं प्रगट केलें आहे.

## लेप.

अरुणचंदनचंदनवालकैर्नलदपद्मकतुल्यकृतांशकैः ॥
शिरसिलेपनमाचरतांनृणांतृडपयात्युपशांतिमसंशयं ॥

**अर्थ**–रक्तचंदन, चंदन, वाळा, काळा वाळा व कमळ, हीं समभाग घेऊन वाटून त्यांचा मस्तकावर लेप करावा; ह्मणजे निश्चयेंकरून तृषा शांत होत्ये.

## गुटी.

नीलांबुजाब्दमधुलाजवटावरोहैः श्लक्ष्णीकृतैर्विरचितागुटिकामुखस्था ॥ तृष्णांनिवारयतितत्क्षणमेवतीव्रांमृत्योःस्पृहामिवयतेःपरमार्थचिंता ॥

अर्थ—काळें कमळ, नागरमोथा, मध, लाह्या व वडाच्या पारंब्या, हीं वाटून गोळी करून तोंडांत धरावी; ह्मणजे तत्क्षणींच तृषानिवारण करत्ये, जशी संन्याशाची परमार्थाविषयीं चिंता मृत्यूचे इच्छेचें निवारण करत्ये तशी.

## उपसर्गतृष्णा सामान्यविधि.

तृष्णातिवृद्धावुदरेचपूर्णेसंछर्दयेन्मागधिकोदकेन ॥
विलोमसंचाररहितंविधेयंस्याद्दाडिमाम्रातकमातुलिंगैः ॥

अर्थ—तृष्णा अतिवाढली आणि पाणी पिऊन पोट फार भरलें असतां; पिंपळीचे काढ्याचें वमन द्यावें; आणि वायूचा अनुलोम संचार होईल, असें हितकारक डाळिंब, आंबाडा व माहाळुंग, यांचें औषध करून द्यावें.

मधुरैःसंजीवनीयैःशीतैश्चसतिक्तकंशृतं ॥
क्षीरंपानाभ्यंजनसेकेत्विष्टंमधुशर्करायुक्तं ॥

अर्थ—मधुर, जीवनीयगण, शीत पदार्थ, कुटकी, यांणीं तयार केलेलें दूध, मध व साकर घालून त्याचें अभ्यंजन व सेक, यांविषयीं उत्तम आहे.

## कसेर्वादिकाढा.

कसेरुशृंगाटकपद्मबीजबिसेक्षुसित्थंससितंचवारि ॥
तृष्णांक्षतोत्थामपिपित्तजातांनिहंतिपीतंशिशिरीकृतंच ॥

अर्थ—कचोरा, शिंगाडे, कमळाक्ष, कमळाची देंठी व ऊंस यांचा शीत झालेला काढा साकर घालून प्यावा; ह्मणजे क्षतापासून किंवा पित्तापासून झालेली तृष्णा नाश पावत्ये.

मधुयुक्तंजलंशीतंपिबेदाकंठमातुरः ॥
पश्चाद्वमेदशेषंतत्तृष्णातेनप्रशाम्यति ॥

अर्थ—मध व पाणी एकत्र करून कंठमर्यादा होसतो पर्यंत प्यावें; नंतर सर्व पाणी ओकून टाकावें, तेणेंकरून तृषा शांत होईल.

## क्षौद्रादिगंडूष.

सक्षौद्रमाम्रजंबूत्थंपिबेत्क्वाथंसुपाचितम् ॥

सतृष्णोमधुनाकुर्याद्गंडूषान्शिशिरस्थितं ॥

अर्थ–आंबा व जांबूल यांचा काढा मध घालून थंड करून प्यावा; आणि मध व पाणी एकत्र करून त्याची चूळ भरावी; ह्मणजे तृषा शांत होत्ये.

क्षीरेक्षुरसमृद्वीकाक्षौद्रसिंधुगुडोदकैः ॥

सहवृक्षाम्लगंडूषस्तालुशोषतृडंतकृत् ॥

अर्थ–दूध, उसाचा रस, मनुका, मध, सैंधव, गूळ व उदक हीं एकत्र करून चूळ भरून टाकावी; ह्मणजे तालुशोष व तृषा यांचा नाश होतो.

## लेप.

दाडिमदधिकपित्थलोध्रैःसविदारीबीजपूरकैःशिरसः ॥

लेपोगौरामलकैःशृतारनालयुतैःसहितैः ॥

अर्थ–डाळिंब, दहीं, कंवठ, लोध्र, भुईकोहोळा, माहाळुंग, कमळाचें केसर व आवळे हीं सर्व वाटून आंबिलींत कालवून मस्तकास लेप करावा; ह्मणजे पिपासा शांत होत्ये.

## दुसरा प्रकार.

दाडिमंबदरंलोध्रंकपित्थंबीजपूरकं ॥

पिष्ट्वालेपःशिरस्येषांपिपासादाहनाशनः ॥

अर्थ–डाळिंब, बोर, लोध्र, कंवठ व माहाळुंग हीं वाटून त्यांचा मस्तकास लेप करावा; ह्मणजे पिपासा व दाह, हे शांत होतात.

## पानात्ययजतृष्णा.

छागमांसरसंसाज्यंशीतंसमधुशर्करं ॥

पीत्वाजयतिदुर्दाहमूर्छाच्छर्दिमदात्ययान् ॥

अर्थ–बोकडाचे मांसाचा रस, तूप, साकर व मध घालून प्यावा; तो दुस्तर दाह, मूर्छा, छर्दि व मदात्यय यांतें जिंकील.

## तृष्णारोगपथ्य.

शोधनंवमनंनिद्रास्नानंकवलधारणं ॥ कोद्रवाःशालयःपेयविले पीलाजसक्तवः ॥ अन्नमंडोधन्वरसःशर्करारागखांडवैः ॥ भृष्टमुद्गैर्मसूरैर्वाचणकैर्वाकृतोरसः ॥ रंभापुष्पंतक्रकूर्चंद्राक्षापर्पटवल्कलं ॥ कपित्थंमालिकाकोलंकूष्मांडकमुपोदिका ॥ खर्जूरंदाडिमंधात्रीकर्कटीललदंबुच ॥ जंबीरंकरमर्दश्चबीजपूरोगवांपयः ॥ मधूकपुष्पंह्री

बेरंतिक्तानिमधुराणिच ॥ वालतालांबुसीतांबुपयःपेयंप्रपानकं ॥ माक्षिकंसरसीतोयंशताव्हानागकेसरं ॥ एलाजातीफळंपथ्याकुस्तुंबरिकुचंदनं ॥ घनसारोगंधसारःकौमुदीशिशिरोनिलः ॥ चंदनार्द्र प्रियाश्लेषोमुक्ताभरणधारणं ॥ गाहनंलेपनंचास्यपथ्यमेतत्तृषातुरे ॥

अर्थ–रेचन, वमन, निद्रा, स्नान, कवलधारण, हरीक, साळी, पेया, विलेपी, लाह्या व सातु, चवदापट पाणी घालून तादळांच्या शितांवांचून भात, निर्जलदेशांतील पशूंच्या मांसाचा रस, साकर व मध व मधुर दहीं एकत्र करून गाळावा तो रागखांडव; व मुगांचा, मसुरेचा, किंवा चण्याचा रस, केळफुलें, ताक, कूर्च, द्राक्षें, पित्तपापडा, वाल, कंवट, बोर, माला, कोहळा, मयाळ, खजूर, डाळिंब, आवळें, कांकडी, वाहतें पाणी, जांबीर, करवंद, महाळुंग, गाईचें दूध, मोहाचीं फुलें, वाळा, कडुरस, गोड, वाळ्याचें पाणी, ताडाचें पाणी, थंडपाणी, दूध, पनें, मध, तळ्याचें पाणी, शतावरी, नाकेशर, एलची, जायफळ, हरीतकी, धने, रक्तचंदन, कापूर, कापूरकाचरी, चांदणे, थंडवारा, चंदन लावलेल्या स्त्रिया, मोत्यांचे दागिने, नदींत स्नान करणें व लेपन हे तृषेनें आतुररोग्याला पथ्यास द्यावें.

## तृष्णारोगअपथ्य.

स्नेहांजनंस्वेदनधूमपानंव्यायामनस्यातपदंतकाष्ठं ॥
गुर्वन्नमम्लंलवणंकषायंकटुत्रिकंदुष्टजलानितीक्ष्णं ॥
एतानिसर्वाणिहिताभिलाषीतृष्णातुरोनैवभजेत्कदाचित् ॥

अर्थ–आंगास तैलादिक लावणें, अंजन, घामकाढणें, धूमपान, व्यायाम, नस्य, निबर, दंतकाष्ठ, जडान्न, आंबट, खारट, तुरट हे रस, सुंठ, मिरीं, पिंपळी, खराब पाणी व तिखट हीं सर्व जा तृष्णातुररोग्याला हिताची इच्छा आहे, त्याणें कधीं सेवन करूं नयेत.

---

# मूर्छाभ्रमनिद्रासंन्यासनिदान.

क्षीणस्यबहुदोषस्यविरुद्धाहारसेविनः ॥ वेगाघातादभीघाताद्धीनसत्वस्यवापुनः ॥ करणायतनेषूग्राबाह्येष्वाभ्यंतरेषुच ॥ निवसंते यदादोषास्तदामूर्छंतिमानवाः ॥

अर्थ–जो क्षीण झाला, जाचे वातादिक दोष वाढले व देश, काल; आणि प्रकृति यांला विरुध आहार करणारा, मलमूत्रादिकांच्या वेगांला बंद करणारा, काष्टादिकांचा आघात, जाचा सत्वगुण नष्ट झाला त्याच्या कर्मेंद्रियावर व ज्ञानेंद्रियावर दोष वाढतात, त्या कारणानें मूर्छा, ह्मणजे मोह उत्पन्न होतो.

## संप्राप्ति.

संज्ञावहासुनाडीषुपिहितास्वनिलादिभिः ॥ तमोभ्युपैतिसहसासु
खदुःखव्यपोहकृत् ॥ सुखदुःखव्यपोहाच्चनरःपततिकाष्ठवत् ॥
मोहोमूर्छेतितामाहुःषड्विधासाप्रकीर्तिता ॥ वातादिभिःशोणिते
नमद्येनचविषेणच ॥ षट्स्वप्येतासुपित्तंतुप्रभुत्वेनावतिष्ठति ॥

अर्थ—ज्ञान वाहाणाऱ्या नाडी वातादिकांनीं आच्छादित झाल्या असतां; अकस्मात् सुखदुःखनाशक असा तमो गुण वाढतो, त्याणें संज्ञा नष्ट होऊन प्राणी काष्ठासारिखा निश्चेष्ट पडतो. त्याला मोह किंवा मूर्छा ह्मणतात. ती मूर्छा साहाप्रकारची. वातादि तीन दोषापासून ३ प्रकारची, व रक्त, मद्य, आणि विष, या तिघांपासून तीन प्रकारची, या साहा मूर्छांमध्यें वायु प्रधान असतो.

## पूर्वरूप.

हृत्पीडाजृंभणंग्लानिःसंज्ञानाशोवलस्यच ॥
सर्वासांपूर्वरूपाणियथास्वंतंविभावयेत् ॥

अर्थ—हृदयांत पीडा, जांभया, ग्लानि, ज्ञानाचा नाश, आणि बलाचा नाश, हीं संपूर्ण मूर्छांची पूर्वरूपें जाणावीं; आणि त्या वातादिमूर्छा जशा असतील तशा जाणाव्या.

## वातादिमूर्छालक्षण.

नीलंवायदिवाकृष्णमाकाशमथवारुणं ॥ पश्यंस्तमःप्रविशतिशीघ्रं
चप्रतिबुध्यते ॥ वेपथुश्चांगमर्दश्चप्रपीडाहृदयस्यच ॥ कार्श्यंश्या
वारुणाछायामूर्छायेवातसंभवे ॥

अर्थ—वातजमूर्छेमध्यें निळें, काळें, किंवा अरुणवर्ण आकाश पाहून तमोगुणांत जातो. कांहीं जाणत नाहीं; आणि ही लौकर सोडित्ये; व कंप, आंगमोडे, हृदयशूल, कृशपणा व शरीराचा काळसर किंवा अरुण वर्ण, हीं लक्षणें होतात.

## पित्तमूर्छानिदान.

रक्तंहरितवर्णंचवियत्पीतमथापिवा ॥ पश्यंस्तमःप्रविशतिसस्वेदश्च
प्रबुध्यते ॥ सपिपासःससंतापोरक्तपीताकुलेक्षणः ॥ जातमात्रेप्रपत
तिशीघ्रंचप्रतिबुध्यते ॥ सभिन्नवर्चाःपीताभोमूर्छायेपित्तसंभवे ॥

अर्थ—पित्तमूर्छेमध्यें, आकाश रक्तवर्ण अथवा हरित व पीतवर्ण असें पाहून मूर्छित होतो, घाम येऊन सावध होतो; व पिपासा, संताप, व नेत्रानां रक्त मिश्रित पीतवर्ण होतो,

ही मूर्छा होतांच पडतो, पुनः त्वरित सावध होतो; रोग्याचा मळ पातळ होतो; व शरीर पीतवर्ण होतें, असें जाणावें.

## कफमूर्छा.

मेघसंकाशमाकाशमावृतंवातमोघनैः ॥ पश्यंस्तमःप्रविशतिचिराच्चप्रतिबुध्यते ॥ गुरुभिःप्रावृतंरगैर्यथावार्द्रेणचर्मणा ॥ सप्रसेकःसत्दल्लासोमूर्छागेकफसंभवे ॥

अर्थ—कफमूर्छेचा ठायीं मेघासारिखें, मोठ्या अंधकारानें युक्त, किंवा मेघांनीं भरलेलें आकाश पाहातो; आणि मूर्छित होतो; व फार वेळानें सावध होतो; आणि ह्या रोग्याचें अंग पांघरुणानीं किंवा ओल्याचर्मानीं वेष्टिल्यासारिखें जड होतें, तोंडाला पाणी सुटतें, उम्मासे येतात, असें जाणावें.

## संनिपातमूर्छानिदान.

सर्वाकृतिःसंनिपातादपस्मारइवापरः ॥
सजंतुपातयत्याशुविनाबीभत्सचेष्टितैः ॥

अर्थ—संनिपातमूर्छेचा ठायीं, पूर्वोक्तवातादिकांचीं लक्षणें होऊन अपस्मारासारिखी मूर्छा येऊन मनुष्याला त्वरित निश्चेष्ट पाडिते; परंतु अपस्माराचीं जीं लक्षणें म्हणजे तोंडास फेंस येणें, जीभ बाहेर काढणें, डोळे फिरवणें इत्यादिक लक्षणें हिचा ठायीं नाहींत.

## रक्तमूर्छानिदान.

पृथिव्यापस्तमोरूपंरक्तगंधश्चतन्मयः ॥
तस्माद्रक्तस्यगंधेनमूर्छंतिभुविमानवाः ॥
द्रव्यस्वभावइत्येकेदृष्ट्वायदिचमूर्छति ॥

अर्थ-पृथ्वी व उदक हीं तमोगुणाचीं रूपें आहेत; आणि रक्तगंध हा पृथ्वी व उदकरूप आहे; यास्तव रक्तगंध व दर्शन यांहीं करून मूर्छा उत्पन्न होते, कोणी आचार्य म्हणतात; कीं वस्तुस्वभावच असा कीं ज्याचे दर्शनेंकरून मूर्छा येते.

## विषमद्यमूर्छानिदान.

गुणास्तीव्रतरत्वेनस्थितास्तुविषमद्ययोः ॥
तएवतस्मादाभ्यांतुमोहौस्यातांयथेरितौ ॥

अर्थ—लघु, रूक्ष व तीक्ष्ण इत्यादि दाहा गुण तैलादिकांचा ठायीं असतात, तेच गुण विष व मद्य यांचा ठायीं तीव्रतर असतात, यास्तव विष व मद्य यांणीं मनुष्य मूर्छित होतात, तैलादिकेंकरून होत नाहींत, ती मूर्छा मद्यादिक जशी असतील तशी न्यूनाधिक होते, असें जाणावें.

## रक्तादिमूर्छांचीं लक्षणें.

स्तब्धांगदृष्टिस्त्वसृजागूढोच्छ्वासश्चमूर्छितः ॥ मद्येनविलपन्शेतेनष्टवि भ्रांतमानसः ॥ गात्राणिविक्षिपन्भूमौजरांयावन्नयातितत् ॥ वेपथुःस्व मतृष्णाःस्युस्तमश्चविषमूर्छिते ॥ वेदितव्यंतीव्रतरंयथास्वंविषलक्षणैः ॥

अर्थ—रक्तसंबंधी मूर्छेचा ठायीं मनुष्याची दृष्टि व अंग हीं स्तब्ध होतात, श्वास खोल जाऊन मूर्छित पडतो, मद्यसंबंधी मूर्छेचा ठायीं मनुष्य बडबड करितो, निजून राहातो, त्याचें अंतःकरण नष्ट होतें; अथवा भ्रांत होतो, हात व पाय अस्ताव्यस्त भूमीवर आपटितो; जो पर्यंत मद्य जीर्णावस्थेप्रत जाई तो पर्यंत असेंच करितो; विषमूर्छेचा ठायीं आंगास कंप सुटतो, निद्रा, तृष्णा, डोळयांपुढें अंधेऱ्या ही येतात; व ही मूर्छा मूल, पत्र, फल, कंद, क्षीर, इत्यादि विषामधून जाविषाचे संबंधाची असेल, तशी तीव्र मंद व न्यून अशी जाणावी; आणि विष आपल्या आपण पक्व होऊन शांत होत नाहीं, यास्तव हिचा ठायीं मूर्छित पडून राहातो.

## मूर्छाभेद कारणविशेषेंकरून सांगतो.

मूर्छापित्ततमःप्रायारजःपित्तानिलाद्भ्रमः ॥ तमोवातकफात्तंद्रानिद्राश्लेष्मतमोभवा ॥ इंद्रियार्थेष्वसंवृत्तिर्गौरवंजृंभणंक्लमः ॥ निद्रार्तस्येवयस्यैतेतस्यतंद्राविनिर्दिशेत् ॥ योनायासश्रमोदेहप्रवृद्धश्वासवर्जितः ॥ क्लमःसइतिविज्ञेयइंद्रियार्थप्रबोधकः ॥

अर्थ—पित्त व तमोगुण यांहीं मूर्छा येत्ये; व रजोगुण पित्त व वायु यांणीं भ्रम होतो; व तमोगुण, वायु व कफ यांणीं तंद्रा होत्ये, कफ व तमोगुण यांणीं निद्रा होत्ये, निद्रेचा ठायीं विषयांचें अज्ञान होतें, गौरव, जांभया व क्लम हे होतात, तंद्रेचा ठायीं हीं सर्व असून अर्धोन्मीलित नेत्रत्वादि, व चेष्टा असत्ये, इतुका निद्रेचा व तंद्रेचा भेद जाणावा; व शरीराच्या आयासावांचून देहाला श्रम होतो; आणि इतर आयासांमध्यें जो मोठा श्वास असतो; तो नसतो; व सर्वविषयांचे ठायीं इंद्रियांची प्रवृत्ति होत नाहीं, अशा अवस्थेला क्लम ह्मणतात.

## संन्यास सांगतात.

दोषेषुमदमूर्छायागतवेगेषुदेहिनाम् ॥
स्वयमेवोपशाम्यंतिसंन्यासोनौषधैर्विना ॥

अर्थ—मद व मूर्छा यांना उत्पन्न करणाऱ्या दोषाचा वेग शांत झाला असतां; त्या औषधावांचून स्वतःशांत होतात; आणि संन्यास औषधावांचून शांत होत नाहीं.

## संन्यासलक्षण.

वाग्देहमनसांचेष्टाआक्षिप्यातिबलामलाः ॥ संन्यस्यंत्यबलंजंतुंप्रा
णायतनमाश्रिताः ॥ सनासंन्यासंसंन्यस्तःकाष्ठीभूतोमृतोपमः ॥
प्राणैर्विमुच्यतेशीघ्रंमुक्त्वासद्यःफलांक्रियां ॥

अर्थ—अति वाढलेले वातादि दोष, आणि देह, आणि मन यांच्या क्रिया बंद करून हृदयांत राहून निर्बळरोग्याला निचेष्ट पाडितात, तो संन्यासग्रस्तरोगी मेल्यासारिखा काठवत् पडतो, त्याला सद्यःफल देणाऱ्या दंभादिक्रिया न केल्या तर तत्काळ मरतो.

## मूर्छा.

मूर्छामोहोद्विधास्यात्प्रभवतिसहजागंतुभेदेनभिन्नस्तत्रागंतुस्त्रिधास्या
द्रुधिरविषसुराजन्मभेदाद्विभिन्ना ॥ प्रत्येकंदोषभेदाद्भवतिसहजासा
त्रिधापटूत्सुपित्तंप्राधान्येनेहतिष्ठेदभिदधतिचतांद्वंद्वजांसन्निपातात् ॥

अर्थ—मूर्छासंबंधी मोह, सहज व आगंतुक या भेदानें दोन प्रकारचा त्यामध्यें आगंतुक, रक्त, विष व मद्य यांकारणानीं तीन प्रकारचा आणि सहजमूर्छामध्यें पित्त प्रधान असतें; व ही द्वंद्वज आणि सन्निपात यांपासून हि होत्ये.

## चिकित्साक्रम.

सेकावगाहामणयःसहाराःशीताःप्रदेहाव्यजनानिलाश्च ॥
शीतानिपानानिचगंधवंतिसर्वासुमूर्छास्वनिवारितानि ॥

अर्थ—आंगावर पाणी शिंपणें, स्नान करणें, रत्नें, रत्नांचे हार व थंड लेप यांचें धारण विंजण्याचा वारा, सुगंध व शीत अशीं पानें, हे उपचार सर्व मूर्छांवर अबाध आहेत.

## दुरालभादिकाढा.

दुरालभाकषायस्यघृतयुक्तस्यसेवनात् ॥
भ्रमःशाम्यतिगोविंदचरणस्मरणादिव ॥

अर्थ—धमासाचा काढा करून तूप घालून द्यावा; म्हणजे भ्रमाची शांति होत्ये; जसें गोविंदचरणस्मरणानें पातकाचा नाश होतो तसें.

## पंचमूलादिकाढा.

पंचमूलकषायंचमधुनासितयापिबेत् ॥
ज्वरघ्नांस्तुकषायांश्चतान्यथास्वंप्रयोजयेत् ॥

अर्थ—मूर्छेवर पंचमूलांचा काढा, मध व साकर घालून द्यावा; आणि जे ज्वरनाशक कषाय तेही दोष पाहून द्याव.

## क्षुद्रादिकाढा.

क्षुद्रामृताग्रंथिकनागराणांमूर्छांजयेद्दारुणकाकषायः ॥

अर्थ–रिंगणी, गुळवेळ, पिंपळमूळ, सुंठ, आणि वायवर्णा यांचा काढा मूर्छेचा नाश करितो.

## द्राक्षादिकाढे.

द्राक्षासितादाडिमलाजवंतिकल्हारनीलोत्पलपद्मवंति ॥

पिबेत्कषायाणिचशीतलानिपित्तज्वरंयानिचयापयंति ॥

अर्थ–द्राक्षें, साकर, डाळिंब, लाजाळू, तांबडें कमळ, निळें कमळ व कमळ यांचे काढे द्यावे; किंवा जे पित्तज्वरावर काढे देतात, ते काढे द्यावे.

## रक्तजादिमूर्छावर शास्त्रार्थ.

रक्तजायांचमूर्छायांहितःशीतक्रियाविधिः ॥ मद्यजायांवमेन्मद्यंनिद्रां

सेवेद्यथासुखम् ॥ विषजायांविषघ्नानिभेषजानिप्रदापयेत् ॥

अर्थ–रक्तापासून मूर्छा असली तर, थंड औषध हितकारक आहे, मद्यापासून मूर्छा असली तर मद्य ओकून टाकावें; आणि निद्रा करावी, विषापासून मूर्छा असली तर विषनाशक औषधें घ्यावीं.

## कोलादियोग.

कोलमज्जाकणोशीरकेसरंशीतवारिणा ॥

पीतंमूर्छांजयेल्लीढ्वाकृष्णांवामधुसंयुतां ॥

अर्थ–बोराचे आंटोचा मगज, पिंपळी, वाळा, नागकेशर हीं पाण्यांत वाटून प्यावीं; अथवा मधाबरोबर पिंपळी खावी; म्हणजे जाईल.

## त्रिफलादियोग.

मधुनाहंत्युपयुक्तात्रिफलारात्रौगुडार्द्रकंप्रातः ॥

सप्ताहात्पथ्यभुजोमदमूर्छाकासकामलामोहान् ॥

अर्थ–रात्रीस मधाबरोबर हिरडा, बेहेडा, आवळकाठी यांची पूड खावी; आणि गूळ आलें एकत्र करून प्रातःकाळीं खावें; पथ्य करावें, या प्रमाणें सात दिवस केलें असतां; मद, मूर्छा, कामला व मोह यांचा नाश होईल.

महौषधामृताद्राक्षापौष्करग्रंथिकोद्भवम् ॥

पिबेत्कणायुतंक्वाथंमूर्छायांचमदेषुच ॥

अर्थ–सुंठ, गुळवेल, मनुका, पोखरमूळ व पिंपळमूळ यांचा काढा पिंपळीच्या सहीत मूर्छा व मद यांचे ठायीं प्रशस्त आहे.

## दुरालभादि काढा.

पिबेद्दुरालभाक्काथंसघृतंभ्रमशांतये ॥

अंजनान्यपिपीडाश्चधूमाःप्रधमनानिच ॥

अर्थ–धमाशाचा काढा तूप घालून प्यावा, अथवा अंजन घालावें; व्यथा करावी; कांहीं ओढायाला द्यावें; ह्मणजे मूर्छा शांत होते.

## सामान्य.

सुचीभिस्तोदनंशस्तंदाहपीडानखांतरे ॥

लुंचनंनखलोम्नांचदंतैर्दशनमेवच ॥

अर्थ–सुया टोंचाव्या, पाय वगैरे, ओरपावे, नखें दाबावीं व ओढावीं; केश ओढावे, तोडावे व उपटावे, दांतानीं डसावें.

## आत्मगुप्तादियोग.

आत्मगुप्तावघर्षश्चाहितस्तस्यावबोधने ॥

अर्थ–कुहिली अंगास चोळावी ह्मणजे शुद्धि येते.

## नारिकेलादियोग.

नारिकेलांबुनापीताःसक्तवःसमशर्कराः ॥

पित्तहृत्कफतृण्मूर्छाभ्रमादीन्हंतिदारुणान् ॥

अर्थ–नारळाच्या पाण्यांत सातुचें पीठ आणि साकर घालून प्यावें; ह्मणजे हृदयांतला कफ, तृष्णा मूर्छा, भ्रम हे भयंकर जरी असले, तरी त्याचा नाश करील.

अंडयोर्घर्षणंचापिहितमेतैर्विबोधनं ॥ नासावदनरोधेननस्यैर्मरिचानिमितैः ॥ नरंजागरयेद्भूमौमूर्छितंमंदमारुतैः ॥

अर्थ–आंडाचे ठायीं कुहिली इत्यादिकाने घर्षण करणें हे मूर्छेस हितकारक आहे. मूर्छा येऊन भूमीवर पडलेल्या मनुष्यास मिऱ्यांचे नस्य देऊन तोंड व नाक दाबून धरावें; ह्मणजे मूर्छा जाऊन जागृत होतो.

## मृणालाद्यवलेह.

शीतेनतोयेनभृशंमृणालंकृष्णाचपथ्यामधुनावलिह्यात् ॥

कुर्याच्चनासावदनावरोधंक्षीरंपिबेद्वाप्यथमानुषीणां ॥

अर्थ–थंड पाण्याशीं बिसें, पिंपळी व हरीतकी हीं वाटून त्यांत मध घालून त्याचें चाटण करून द्यावें; किंवा तोंड, आणि नांक यांतील वायूचा किंचित् प्रतिबंध करावा; किंवा मनुष्याचें दूध द्यावें.

## अंजन.

शिरीषबीजंगोमूत्रंकृष्णामरिचसैंधवैः ॥
अंजनंस्यात्प्रबोधायसरसोनशिलावचैः ॥

अर्थ–शिरीषवृक्षाचें बीं, पिंपळी, मिरीं व सैंधव हीं गोमूत्रांत उगाळून त्याचें; किंवा लसूण, मनशीळ व वेखंड यांचें अंजन बोधनार्थ नेत्रांत घालावें.

## दुसरा प्रकार.

अंजनंसम्यगाख्यंमधुसिंधुशिलोषणैः ॥
प्रमोहद्रोहिभवतिभाषितंभिषजांवरैः ॥

अर्थ–मध, सैंधव, मनशीळ आणि मिरीं यांचें अंजन घालावें; ह्मणजे तें मोहाचा नाश करितें, असें वैद्यानीं सांगितलें आहे.

## सामान्य उपचार, अंजन.

धूमांजनप्रधमनान्यथपीडनानिनिस्तोददाहकचलोमविलुंठनानि ॥
संदंशितानिदशनैःकपिकच्छुघर्षैर्हितस्थितंसकलमोहविनाशनाय ॥

अर्थ–धूम व अंजन नाकांत व कानांत फुंकणें, पीडा करणें, टुचिवणें, डाग देणें, केश, लोम उपटणें, दांतानीं चावणें, कुयेल, खाजकोलती, हे आंगास चोळणें इत्यादि सर्व उपचार मोहनाशाविषयीं हितकारक आहेत.

## स्विन्नामलकादिलेह.

स्विन्नमामलकंपिष्ट्वाद्राक्षयासहसंसृजेत् ॥ विश्वभेषजसंयुक्तंमधुना सहलेहयेत् ॥ तेनास्यशाम्यतेमूर्छाकासश्वासस्तथैवच ॥

अर्थ–ऊब देऊन मऊ झालेला आवळा वाटून द्राक्षें व सुंठ आणि मध त्यांत मिळवून चाटावा, तेणेंकरून मूर्छा, कास, श्वास, हे शांत होतात.

## पथ्यादिघृत मदज मूर्छेवर.

पथ्याक्वाथेनसंसिद्धंघृतंधात्रीरसेनवा ॥
सर्पिःकल्याणकंवापिमदमूर्छापहंपिबेत् ॥

अर्थ–हिरडयाच्या काढयानें अथवा आंवळयाच्या रसानें सिद्ध केलेलें तूप अथवा कल्याणघृत प्यावें, तें मद व मूर्छा यांचा नाश करील.

## रस.

कणामधुयुतंसूतंमूर्छायामनुशीलयेत् ॥
शीतसेकावगाहादिसर्वंवापीडनंहितं ॥

अर्थ–पिंपळी, मध व पारा एकत्र खलून सेवन करणें तसेंच थंड पाणी अंगावर शिंपडणें व डोळ्यावर ओतणें, इत्यादि पीडाहितकारक आहे.

## ताम्रादिचूर्ण.

ताम्रचूर्णसमोशीरकेसरंशीतवारिणा ॥
पीतंमूर्छांद्रुतंहन्याद्वृक्षमिंद्राशनिर्यथा ॥

अर्थ–रक्तचंदन, वाळा व नागकेशर यांचें चूर्ण थंड पाण्याशीं घ्यावें; म्हणजे शीघ्र मूर्छेचा नाश करितें, जसें वज्र वृक्षांचा नाश करितें तसें.

## शुंठ्यादिगुटी.

शुंठीकणाशताव्हानांसाभयानांपलंपलं ॥
गुडस्यषट्पलान्येषांगुटिकाभ्रमनाशिनी ॥

अर्थ–सुंठ, पिंपळी, शतावरी, आणि हरीतकी या प्रत्येकांचें चार चार तोळे चूर्ण; आणि गूळ २४ तोळे यांच्या गोळ्या करून खाव्या, त्या भ्रमाचें निवारण करितात.

## मूर्छापथ्य.

धूमोंजनंनावनरक्तमोक्षोदाहश्चसूचीपरितोदनानि ॥ रोम्णांकचानां परिलुंचनानिनखांतपीडादशनोपदंशः ॥ नासामुखद्वारमरुन्निरोधो विरेचनंछर्दनलंघनानि ॥ क्रोधोभयंदुःखकरीचशय्याकथाविचित्रासु मनोहराश्च ॥ छायानभोंभःशतधौतसर्पिर्मृदुश्चतिक्तानिचलाजमंडः ॥ जीर्णायवालोहितशालयश्चकौंभंहविर्मुद्गसतीनयूषाः ॥ धन्वोद्भवामां सरसाश्चरागाःसखांडवागव्यपयःसिताच ॥ पुराणकूष्मांडपटोलमोचह रीतकीदाडिमनारिकेरं ॥ मधूकपुष्पाणिचतंदुलीयतुषोदकान्नानिलघू निचापि ॥ निरंतरंचंदनचर्चनंचकर्पूरनीरंहिमवालुकाच ॥ अत्युच्चश ब्दोद्भुतदर्शनानिगीतानिवाद्यानिचचोत्कटानि ॥ श्रमस्मृतिश्चिंतनमा त्मबोधोधैर्यंचमूर्छास्वितिपथ्ययोगः ॥

अर्थ–धूम, अंजन, नस्य, रक्तमोक्ष, डाव, सुयानीं टोंचणें, लोम व केश उपटणें, नखानीं चिचकुरे घेणें किंवा ओरबाडणें, दातानीं चावणें, नाक व तोंड यांतील वायूचा अवरोध करणें, रेचन, वांति, लंघन, क्रोध, भय, दुःखकारक बिछाना, विचित्र व कर्णप्रिय अशा गोष्टी, छाया, पर्जन्य, शतधौतघृत, मृदु, कडु रस, लाह्यांचा मंड, जुने यव, तांबड्या साळी, घागरींतलें तूप, मूग व वाटाणे यांचे यूष, धन्वदेशांतील मांसाचे रस,

रागखांडव, गाईचें दूध, साकर, जुनां कोहळा, पडवळ, केळें, हरीतकी, डाळिंब, नारळ, मोहाचीं फुलें, तांदुळजा, तुषोदक, लघु अशीं अन्नें, वारंवार चंदनाचें उटणें, कापूर, वारा, थंड वाळवंट, मोठयानीं भाषण, अद्भुत पदार्थांचें दर्शन, उत्तम गितें, उत्तम वाद्यें, श्रम न करणें, आत्मबोधाचें चिंतन, आणि धैर्य इत्यादि मूर्छारोग्याला पथ्य पदार्थांचा वर्ग सांगितला.

## मूर्छा अपथ्य,

तांबूलंपत्रशाकानिदंतघर्षणमातपं ॥ विरुध्धान्यन्नपानानि
व्यवायंस्वेदनंकटु ॥ विण्मूत्रवेगरोधंचतक्रंमूर्छामयीत्यजेत् ॥

अर्थ–तांबूल, पालेभाजा, दांत घांसणें, ऊन घेणें, विरुद्ध भक्षण, प्राशन, मैथुन, घाम काढणें, तिखटपदार्थसेवन, मलमूत्राचा रोध व तक्र इतकीं मूर्छेचा ठायीं वर्ज करावीं.

---

## पानात्यय परमद पानाजीर्ण पानविभ्रम निदान-

येविषस्यगुणाःप्रोक्तास्तेपिमद्येप्रतिष्ठिताः ॥
तेनमिथ्योपयुक्तेनभ्रमत्युग्रोमदात्ययः ॥

अर्थ–जे विषाचे दाहा गुण सांगीतले, ते मद्याचा ठायीं राहातात, यास्तव मद्य, अविधीनें प्राशन केलें असतां; महान उग्र असा मदात्यय होतो.

कितुमद्यंस्वभावेनयथैवान्नंतथास्मृतं ॥
अयुक्तियुक्तंरोगाययुक्तियुक्तंतथामृतं ॥

अर्थ- मद्य स्वभावेंकरून अन्नासारिखें आहे; परंतु अविधीनें प्राशन केलें असतां; रोगाचें कारण होतें; आणि विधिपूर्वक प्राशिलें असतां; अन्नासारिखें अमृत होतें. याविषयीं दृष्टांत·

प्राणाःप्राणभृतामन्नंतदयुक्तंतुहंत्यसून् ॥
विषंप्राणहरंयत्तुयुक्तियुक्तंरसायनं ॥

अर्थ–मनुष्यादि सर्वजीवांचे प्राण अन्नाच्या आश्रयेंकरून राहातात. यास्तव (प्राणाः अन्नं) ह्मणजे प्राणच अन्न जाणावें; परंतु तें अन्न अपरिमित सेवन केलें असतां; प्राण नाश करितें. विष वस्तुतः प्राणनाशक; परंतु यथाशास्त्र घेतलें असतां; रसायन होतें; ह्मणजे शरीराला धारण करितें.

## मद्याचा सेवनप्रकार सांगतो.

विधिनामात्रयाकालेहितैरन्नैर्यथाबलं ॥ प्रहृष्टोयःपिबेन्मद्यंतस्यस्या दमृतोपमं ॥ स्निग्धैःसदन्नैर्मांसैश्वभक्ष्यैश्वसहसेवितं ॥ भवेदायुःप्र कर्षायबलायोपचयायच ॥

अर्थ—यथाशास्त्र, यथाकाळीं, परिमित व स्वप्रकृतीला मानणारें तितुकें व स्निग्ध गोधूम पिष्टादिक, मांस व भक्ष्य, यां सहवर्तमान स्वस्थांतःकरणेंकरून सेविलें असतां; अमृता सारखें शरीरास हितकारक होतें; आणि आयुष्याची व शरीराची वृध्दि करितें, बळ देतें.

काम्यतामनसस्तुष्टिस्तेजोविक्रमएवच ॥
विधिवत्सेव्यमानेतुमद्येसन्निहितागुणाः ॥

अर्थ—मद्य विधिपूर्वक सेविलें असतां सुंदरपणा, अंतःकरणास संतोष, बल व पराक्रम, हे होतात, हे गुण विधिपूर्वक सेविलेल्या मद्यामध्यें सर्वकाळ राहातात.

शुद्धकायःपिबेत्प्रातःसोमदंशंपलद्वयं ॥ मध्यान्हेद्विगुणंतच्चस्नि ग्धाहारेणपाययेत् ॥ प्रदोषेष्टपलंतद्वन्मात्रामद्यरसायने ॥

अर्थ—प्रातःकाळीं दंतधावनादि शरीरशुध्दीचीं कर्में करून आठ तोळे मद्य प्राशन क रावें, मध्यान्हीं स्निग्धपदार्थासहवर्तमान द्विगुणित प्राशन करावें, रात्रीचे प्रारंभवेळेस चतुर्गुण प्राशन करावें, याप्रमाणें सेवन केलें असतां; रसायण होतें.

## त्रिविधमदाचें लक्षण.

बुद्धिःस्मृतिप्रीतिकरःसुखश्चपानान्ननिद्रारतिवर्धनश्च ॥
संपाठगीतस्वरवर्धनश्चप्रोक्तोतिरम्योप्रथमोमदोहि ॥

अर्थ—प्रथम मदानें ठायीं बुध्दि, स्मृति, सुख, प्रीति, निद्रा, अन्न व पान, यांविषयीं रति, यांचें वर्धन होतें; व पठणशक्ति, गति; व स्वर यांची वृध्दि होत्ये. याप्रमाणें प्रथम म द ह्मणजे ८ तोळे, रम्य जाणावा.

## मध्यममदलक्षण.

अव्यक्तबुध्दिस्मृतिवाग्विचेष्टःसोन्मत्तलीलाकृतिरप्रशांतः ॥
आलस्यनिद्राभिहतोमुहुश्चमध्येनमत्तःपुरुषोमदेन ॥

अर्थ—मदाचा दुसऱ्या मानानें ह्मणजे १६ तोळे याणीं बुध्दि, स्मृति, वाग्विसर्ग हे अस्पष्ट होतात; व त्याची चेष्टा व आकृति, उन्मत्तासारिखी होत्ये, उन्मत्ता सारखी क्रीडा करितो, चंचळ चित्त होतें; आणि आळस व निद्रा, याणीं वारंवार व्याप्त होतो, असें जाणावें.

## तृतीयमदलक्षण.

गच्छेदगम्यांश्चगुरून्नमन्येत्खादेदभक्ष्याणिचनष्टसंज्ञः ॥
ब्रूयाच्चगुह्यानिहृदिस्थितानिमदेतृतीयेपुरुषोस्वतंत्रः ॥

अर्थ–तृतीयमदेंकरून उन्मत्त झाला असतां; तो पुरुष अगम्य जा गुरुदारादिक त्यां प्रत गमन करितो; व गुरु, आदिकरून लोकाला मानीत नाही, अभक्ष्य पदार्थ भक्षितो, ज्ञानशून्य होतो; व मनांतील गुह्यगोष्ट, बोलून दाखवितो; व त्याचें शरीर त्याचे स्वाधी न नाहीं असें होतें. तृतीय मद ३२ तोळे जाणावा.

## चतुर्थमदलक्षण.

चतुर्थेतुमदेमूढोभग्नदारुविनिःक्रियः॥ कार्याकार्यविभागाज्ञोमृतादथप परोमृतः ॥ कोमदंतादृशंगच्छदुन्मदमिवचामरं॥ बहुदोषमिवारूढकां तारंस्ववशःकृती ॥

अर्थ–चतुर्थमदानें ह्मणजे ३२ तोळ्यांहून जासती प्राशन केलें असतां; ज्ञानशून्य होऊ न काष्ठासारिखा निश्चेष्ट पडतो; व कार्याकार्यविभाग रहित होऊन मेल्यापेक्षां मेला होतो; याकरितां असल्या उन्मदासारिख्या मदाला विवेकी मनुष्य कोणता तरी जाईल काय ? कोणी ही जाणार नाहीं. याविषई दृष्टांत दुर्मार्गांप्रत व नाना कंटकाद्युपद्रवादिदो षयुक्त अरण्यांत जसा कोणीच जात नाहीं.

## अविधीनें सेवित मद्य जें त्याचें अन्य विकार सांगतो.

निर्भुक्तमेकांततएवमद्यंनिषेव्यमाणंमनुजेननित्यं ॥
आपादयेत्कष्टतमान्विकारानापादयेच्चापिशरीरभेदं ॥

अर्थ–आहारावांचून निरंतर मद्यपान केलें असतां; नाना प्रकारचे विकार उत्पन्न करितें; व शरीरनाश ही करितें.

## अन्नासह मद्यपानकेल्याने विकार.

क्रुद्धेनभीतेनपिपासितेनशोकाभितप्तेनबुभुक्षितेन ॥ व्याया मभाराध्वपरिक्षतेनवेगावरोधाभिहतेनचापि॥ अत्यन्नभक्ष्या वततोदरेणसाजीर्णभुक्तेनतथाबलेन ॥ उष्णाभितप्तेनचसेव्य मानंकरोतिमद्यंविविधान्विकारान् ॥

अर्थ–क्रोध, भय, पिपासा, शोक, क्षुधा, व्यायाम, भार, मार्गश्रम व मलमूत्रादि वे गावरोध याणीं युक्त; व फारभोजन केल्यावर, अजीर्ण, झालें असतां;व जो अशक्त; उष्णेक- रून तप्त, अशा पुरुषानीं मद्यपान केलें असतां; तें नानाप्रकारचे विकार उत्पन्न करितें.

पानात्ययंपरमदंपानाजीर्णमथापिवा ॥
पानविभ्रममुग्रंचतेषांवक्ष्यामिलक्षणं ॥

अर्थ–पानात्यय, परमद, पानाजीर्ण व पानविभ्रम यांचीं लक्षणें सांगतो.

## वातादिसंबधं मदात्ययलक्षणं.

हिक्काश्वासःशिरःकंपपार्श्वशूलप्रजागरैः ॥
विद्यात्बहुप्रलापस्यवातप्रायमदात्ययं ॥

अर्थ–हिक्का, श्वास, शिरःकंप, पार्श्वशूल, निद्रानाश व प्रलाप हिं लक्षणें वातजन्य मदात्ययाचा ठायीं होतात.

## पित्तजन्यमदात्ययनिदान.

तृष्णादाहज्वरःस्वेदमोहातीसारविभ्रमैः ॥
विद्यात्धरितवर्णस्यपित्तप्रायंमदात्ययं ।

अर्थ–तृष्णा, ताप, दाह, ज्वर, स्वेद, मोह, अतीसार, विभ्रम व मनुष्याची कांति पीतवर्ण, हीं लक्षणे पित्तजन्य मदात्य याचा ठायीं जाणावीं.

## कफजमदात्ययनिदान.

छर्द्यरोचकहृल्लासतंद्रास्तैमित्यगौरवैः ॥
विद्याच्छीतपरीतस्यकफप्रायंमदात्ययं ॥

अर्थ–ओकारी, अरोचक, लालास्राव, तंद्रा, स्तैमित्य, गौरव व आंग थंड कालाशा-रिखे होणें हीं चिन्हें कफात्मक मदात्ययाचा ठायीं होतात.

## त्रिदोषजमदात्ययनिदान.

ज्ञेयस्त्रिदोषजश्चापिसर्वैर्लिंगैर्मदात्ययः ॥

अर्थ–त्रिदोषज मदात्यय याचा ठायीं वातादिदोषांचीं सर्व लक्षणें होतात.

## परमदलक्षण.

श्लेष्मोच्छ्रयोंगगुरुताविरसास्यताचविण्मूत्रसक्तिरथतंद्रिररोचकश्च ॥
लिंगंपरस्यतुमदस्यवदंतितज्ज्ञास्तृष्णारुजाशिरसिसंधिषुचापिभेदः ॥

अर्थ कफाला अधिकपणा, अंगाला गुरुपणा, तोंड पचपचीत, मळ व मूत्र यांची क्षणोक्षणीं प्रवृत्ति अथवा अत्यंत अप्रवृत्ति, तंद्रा, अरोचक, तृष्णा, शिरोरुक् व संधिभेद, हीं परमदाचीं लक्षणे जाणावीं.

## वातमदात्ययीं सौवर्चलादि.

मद्यंसौवर्चलव्योषयुक्तंकिंचिज्जलान्वितं ॥

जीर्णमद्यायदातव्यंवातपानात्ययापहं ॥

अर्थ-मद्य, पादेलोण व त्रिकटुचूर्ण, असें एकत्र करून थोडेसें पाणी घालून ज्याचें मद्य पिऊन जिरलें असेल त्यास द्यावें; ह्मणजे वातपानात्ययाचा नाश होतो.

## सूक्तशृंग्यादि.

सूक्तंसौवर्चलंशृंगीत्र्यूषणार्द्रकदीपकैः ॥
मद्यंपीत्वाजयत्युग्रंपवनोत्थंमदात्ययं ॥

अर्थ-कांजी, पादेलोण, कांकडशिंगी, त्रिकटु, आलें व चित्रक यांच्या बरोबर मद्य प्यावें, तें वातपानात्ययाचा नाश करील.

## आम्लस्निग्धादि.

आम्लंस्निग्धोष्णलवणंरसाजांगलजाहिताः ॥
पानकानिचमद्यानिहन्युर्वातमदात्ययं ॥

अर्थ-आंबट, स्निग्ध, उष्ण व जंगलांतील मांसाचे रस, पन्हीं, आणि मद्य, हे पदार्थ वातमदात्ययाचा नाश कारितात.

## पित्तमदात्यय.

पित्तपानात्ययेपेयंवटशृंगंहिमांबुना ॥
सशर्करंपुनर्मद्यंपिबेत्किंचिज्जलान्वितं ॥

अर्थ-वडाच्या पारंब्या थंडपाण्यांत वाटून प्याव्या; नंतर थोडेसें पाणी घालून मद्य प्यावें, तें पित्तपानात्ययनाशक आहे.

## क्षुद्रामलकादिपान.

क्षुद्रामलकखर्जूरपरूषकहिमंपिबेत् ॥
सिताविमिश्रितंपीतंपानात्ययविकारनुत् ॥

अर्थ-लघु आंवळा, खजूर, फालसा, कापूर व साकर एकत्र मिश्र करून प्यावें, तें पानात्ययाचा विकार दूर करील.

## सामान्य.

पित्तोत्थेतुहितंमद्यंमधुरौषधिसाधितं ॥
उल्लिखेदथवामद्यंपीत्वेक्षुरससंयुतं ॥

अर्थ-पित्तजन्यमदावर मधुरऔषधांपासून काढलेलें मद्य, किंवा उसाच्या रसाशीं मिश्र केलेलें मद्य द्यावें.

## कफमदात्ययसामान्य.

पानात्ययेकफोत्थेतुतत्पीत्वोल्लेखनंचरेत् ॥
यथाबलंलंघनंचदीपनीयौषधानिच ॥

अर्थ--कफापासून पानात्यय होतो, त्यावर वमन द्यावें, यथाशक्ति लंघन करवावें; व अग्निदीपक औषधें द्यावीं.

## अष्टांगलवण.

सौवर्चलमजाजीचवृक्षाम्लंसाम्लवेतसं ॥ त्वगेलामरिचार्धांशं शर्कराभागयोजितं ॥ एतल्लवणमष्टांगमग्निसंदीपनंपरं ॥ मदात्ययेकफोत्थेतुदद्यात्स्रोतोविशोधनं ॥

अर्थ– पादेलोण, जिरें, आमसोल, अम्लवेतस, दालचिनी, वेलदोडे, मिरें आणि यां सर्वांच्या दुप्पट साकर, घेऊन एकत्र करावें, याला अष्टांग लवण, असे ह्मणतात. हे अग्निदीपक आणि कफमदात्ययावर स्रोतः शुद्धिकरणारें प्रशस्त आहे.

## सुपारीच्या मदावर.

पूगान्मदःप्रशमयत्यचिरेणजंतोराघ्रायशंखरजसःप्रबलस्यगंधं ॥
पानेनवाशिशिरपुष्करणीजलस्यसंसेवितैरतिहितैर्व्यजनानिलैश्च ॥

अर्थ–सुपारीच्या भक्षणानें झालेला मद नखल्याच्या चूर्णाच्या वासानें;अथवा थंडगार पुष्करणीच्या जलपानानें, अथवा अत्यंत हितकारक विंझण्याचे वाऱ्यानें,लवकर शांत होतो.

## दुसरा प्रकार.

अवघ्राणेनधूमस्यसितालवणभक्षणात्॥शर्कराकेवलाहंतिदुःसहांपूगजांरुजं॥

अर्थ–सुपारीच्या मदावर नासिकेवाटे धूर घ्यावा; अथवा साकर किंवा मीठ द्यावें; अथवा साकर तोंडांत धरण्यास द्यावी; ह्मणजे तो नाश पावतो.

## कोद्रवधत्तूर.

कूष्मांडरसःसगुडःशमयतिमदमाशुकोद्रवजः ॥
धत्तूरजंचदुग्धंसशर्करंपानयोगेन ॥

अर्थ–कोहाळ्याचा रस गुळ घालून घ्यावा; ह्मणजे कोद्रूचे मदाचा नाश होतो; व धोत्र्याचें मदावर दूध साकर घालून घ्यावें; तें मद लवकर शांत करितें.

## जायफळाच्या मदावर.

जातीफलेषुनवनीतसिताप्रयुक्तंपत्रींतथामसृणचंदनशर्करांवा ॥
रंभाजलेनमदिरांविषमुष्टिगव्यंहन्यान्मदंसकलशीघ्रमिदंप्रयुक्तं ॥

अर्थ–जायफळाच्या उन्मादावर लोणी, साकर व जायपत्री द्यावी; किंवा लोणी, चंदन व साकर द्यावी; व मद्यावर केळीचें पाणी द्यावें; व कुचल्याचा मदावर गाईच्या दुधाचें तूप द्यावें; ह्मणजे बुद्धिगत ही मदाचा लौकर नाश होतो.

## दुसरा प्रकार.

जातीफलमदंशीघ्रंहंतिपथ्यानिषेविता ॥
शीततोयावगाहश्चशर्करादधियोजिता ॥

अर्थ–जायफळाच्या मदावर हरीतकी द्यावी; किंवा थंड पाण्यांत स्नान करावें; अथवा दह्यांशीं साकर द्यावी, ती त्याचा नाश करित्ये.

## कज्जलीरस.

धात्रीस्वरसनिपीतारसगंधककज्जलीसितासहिता ॥
हरतिमदात्ययरोगान्गरुत्मानिवोरगान्सहसा ॥

अर्थ–आवळयाच्या रसांत पारा व गंधक, यांची कज्जली करून घालावी; आणि साकरेसहित प्यावी, ती मदात्यय रोगाचा नाश करित्ये. जसा गरूड सर्पाचा नाश करितो.

## सामान्य.

सर्वजेसर्वमेवेदंप्रयोक्तव्यंचिकित्सितं ॥
आभिःक्रियाभिःसिद्धाभिःशांतियातिमदात्ययः ॥

अर्थ–त्रिदोषजमदात्ययावर हें पूर्वोक्त सर्व योजावें; आणि ह्या सर्व क्रिया सिद्ध झाल्या असतां; मदात्यय शांत होतो.

## पानाजीर्णलक्षण.

आध्मानमुग्रमथवोद्गिरणंविदाहःपानेत्वजीर्णमुपगच्छतिलक्षणानि ॥
ज्ञेयानितत्रभिषजासुविनिश्चितानिपित्तप्रकोपजनितानिचकारणानि ॥

अर्थ–पोट फुगणें, अत्युग्र वमन, ढेकर व विदाह हीं पानाजीर्णाचा ठायीं लक्षणें होतात, याचें कारण पित्तप्रकोप आहे, असें वैद्यानीं निश्चयेंकरून जाणावें.

## पानविभ्रमलक्षण.

त्दृद्गात्रतोदकफसंस्रवकंठधूममूर्छावमिज्वरशिरोरुजनप्रदाहाः ॥
द्वेषःसुरान्नविकृतेष्वपितेषुतेषुतंपानविभ्रममुशंत्यखिलेनधीराः ॥

अर्थ–हृदय व गात्रें यांस पीडा होत्ये, कफस्राव होतो, कंठांतून धूर निघतो, मूर्छा, वमन, ज्वर, शिरोरुक् व तोंडाला कफाचा चिकटा इत्यादि लक्षणें जा मद्य विकाराचे ठायीं राहातात त्याला पानविभ्रम ह्मणतात.

## असाध्य लक्षण.

हीनोत्तरोष्ठमतिशीतममंददाहंतैलप्रभास्यमतिपानहतंत्यजेत्तु ॥
जिव्हौष्ठदंतमसितंत्वथवापिनीलंपीतेचयस्यनयनेरुधिरप्रभेवा ॥

अर्थ–वरला ओंठ, यत्किंचित् न्यून होऊन हालत नाहींसा होतो, शरीरबाह्यदेश शीत होतो, अभ्यंतरीं दाह होतो, तोंडावर तेल लाविल्यासारखी तुकतुकी येते, या प्रकारें जो मद्यपी व्याकुळ जाला, त्याला वैद्य सोडितात; व जिव्हा, ओंठ व दंत यांला कृष्णवर्ण, किंवा नीलवर्ण, नेत्र पीतवर्ण अथवा रक्तवर्ण झाले, ह्मणजे त्यातें वैद्य सोडितात.

## पानोपद्रव.

हिक्काज्वरौवमथुवेपथुपार्श्वशूलाःकासभ्रमावपिचपानहतंत्यजेत्तं ॥

अर्थ–उचकी, ज्वर, वमथु, कंप, पार्श्वशूल, खोकला व भ्रम इत्यादि उपद्रव पानेंकरून ग्लान जाहालेल्या रोग्याला मारितात.

## मथिततैल.

मथितंगोदधिसहितंतैलंकर्पूरसंमिश्रं ॥
आस्वाद्यपीतमाशुक्षपयतिपानात्ययंरोगं ॥

अर्थ–गाईचें दहीं आणि तेल एकत्र करून घुसळून कापूर मिश्रित करून हुंगून प्यावें, तें पानात्ययरोगाचा लवकर नाश करील.

## मद्योपशम.

मद्यंपीत्वायदिवातत्क्षणमेवलेह्याशर्करासघृता ॥
मदयतिनजातुमद्यंमनागपिप्रथितवीर्यमपि ॥

अर्थ–मद्य पिऊन नंतर तूपसाकर चाटावी; ह्मणजे उंची जरी दारू असेल तथापि किंचित् देखील मद आणणार नाहीं.

## कृष्णादि पनें.

कृष्णाधान्यपरूपकामरतृटीजीरैःसनागोपणैःसंपन्नंमसितंमधूकसहितंयुक्तंदधित्थद्रवैः ॥ कर्पूरेणसुवासितंमदगदान्पीतंजयेत्पानकंत्हृद्यंरोचनमग्निदीपनमिदंपूर्वैर्भिषग्भिःस्मृतं ॥

अर्थ–पिंपळी, धने, फालसा, देवदार, एलची, जिरें, नागकेशर, मिरीं, साकर, ज्येष्टीमध व कंवठाचा रस यांचें पनें करून त्याला कापुराचा वास लावावा; आणि द्यावें. हें पनें ह्रदयाला प्रिय, रोचक, दीपक, आणि मदनाशक आहे, असें प्राचीन वद्यांनीं सांगितलें आहे.

## सर्वजमदात्ययीं त्रिफलादिपान.

मधुनाहंत्युपयुक्तात्रिफलारात्रौगुडार्द्रकंप्रातः ॥
सप्ताहात्पथ्यभुजोमदमूर्छाकामलोन्मादान् ॥

अर्थ–त्रिफळ्याचें चूर्ण मद्याबरोबर रात्रीस खावें; आणि आलें गूळ प्रातःकाळीं खावें, त्या प्रमाणें सात दिवस खाऊन पथ्य भोजन केलें असतां; तें मद, मूर्छा व कामला यातें जिंकतें.

## दुःस्पर्शादियोग.

दुःस्पर्शेनसमुस्तेनमस्तपर्पटकेनवा॥जलंमुस्तैःशृतंवापिदद्या द्दोषविपाचनं ॥ एतदेवचपानीयंसर्वत्रापिमदात्यये ॥ नि रंतरंपीयमानंपिपासाज्वरनाशनं ॥

अर्थ–धमासा व नागरमोथा याचा; अथवा नागरमोथा व पित्तपापडा यांचा; अथवा केवळ नागरमोथ्याचा काढा दोषविपाचनार्थ द्यावा; आणि पाण्याचें ऐवजीं हाच काढा मदात्ययावर द्यावा. हा निरंतर प्याला ह्मणजे तो पिपासा व ज्वर यांचा नाश करितो.

## चव्यादिचूर्ण.

चव्यंसौवर्चलंहिंगुपूरकंविश्वभेषजं ॥
चूर्णमद्येनपातव्यंपानात्ययरुजापहं ॥

अर्थ–चवक, पादेलोण, हिंग, महाळुंग व सुंठ यांचें चूर्ण मद्याबरोबर प्यावें, तें पानात्ययव्याधीचा नाश करितें.

## शतावरी, पुनर्नवा घृत.

शतावरीरसक्षीरयष्टीकल्कैःशृतंघृतं ॥
पुनर्नवाक्राथपयोपानात्ययमपोहति ॥

अर्थ–शतावरीचा काढा, दूध व जेष्टीमधीचें चूर्ण, यांचे बरोबर सिद्ध केलेलें तूप; अथवा पुनर्नव्याच्या काढ्याबरोबर कढलेलें दूध पानात्ययनाशक आहे.

## माषघृत.

कट्फलमुस्तगुडूचीमाषैःक्रमवर्धितैश्चतत्सर्वैः ॥
घृतमर्दितैर्माषघृतंहन्याद्गंधंसुराभवंसपदि ॥

अर्थ–जायफळ १, नागरमोथे २, गुळवेल ३, व उडीद ४, याप्रमाणे भाग घेऊन तुपांत खलावें; ह्मणजे त्यास माषघृत असें ह्मणतात, तें सुरागंध दूर करणारें आहे.

## सामान्यशास्त्रार्थ.

अहानिसप्तचाष्टौवानृणांपानात्ययःस्मृतः॥ पानंहिमज्जतेजीर्णमतऊर्ध्वंविमार्गगं ॥ पानाजीर्णविनाशायकुर्यात्कफहरंविधिं ॥

अर्थ—मनुष्यांस पानात्यय, सात दिवस किंवा आठ दिवस होतो, आठांदिवसांचे पलीकडे पान जीर्ण होऊन आगांत मुरून भलते मार्गाने गति करितें, त्याला पानाजीर्ण ह्मणतात, त्याचे नाशार्थ कफहारक विधि करावा.

## खर्जूरादिमंथ

मंथःखर्जूरमृद्वीकावृक्षाम्लाम्लीकदाडिमैः ॥
परूषकैःसामलकैर्युक्तोमद्यविकारनुत् ॥

अर्थ—खजूर, द्राक्षें, आमसोळ, जलवेतस, डाळिंब, फालसा व आवळे यांणी केलेला मंथ सरबताप्रमाणे होतो, तो मद्यविकारनाशक आहे.

## मदात्ययपथ्य.

संशोधनंसंयमनंस्वपनंलंघनंभ्रमः ॥ संवत्सरसमुत्पन्नाशालयःषष्टिकायवाः ॥ मुद्गाश्चमाषगोधूमालावतित्तिरकादयः ॥ वेसवारोविचित्रान्नंस्ट्द्यंमद्यंपयःसिता ॥ तंदुलीयंपटोलंचमातुलिंगंपरूषकं ॥ खर्जूरंदाडिमंधात्रीनारिकेरंचगोस्तनी ॥ सर्पिःपुराणंकर्पूरंप्रतीरंशिशिरोनिलः ॥ धारागृहंचंद्रपादामणयोमित्रसंगमः ॥ क्षौमांबरंप्रियाश्लेषोगीतंवादित्रमुद्भतं ॥ शीतांबुचंदनंस्नानंसेव्यमेतन्मदात्यये ॥

अर्थ—मदात्यय झाला असतां; त्याणें रेचन, वेगनियमन, निद्रा, लंघन, श्रम, एकवर्षाचे जुनें भात, साटक्या, यव, मूग, उडीद, गहूं व लावे, तित्तिर, ह्यांचें मांस, वेसवार, खिचडी, प्रियमद्य, दूध, साकर, तांदळजा, पडवळ, माहाळुंग, फालसा, खजूर, डाळिंब, आवळे, नारळ, द्राक्षें, जुनें तूप, कापूर, वाळवंट, थंड वारा, जलमंदिर, चांदणें, मित्राचा समागम, उंचें वस्त्र, स्त्रीचें आलिंगन, गीत, वाद्य, थंड पाणी, चंदन, आणि स्नान, हे उपचार करावे, ते मदात्ययनाशक आहेत.

## मदात्ययीं अपथ्य.

स्वेदांजनंधूमपानंनावनंदंतघर्षणं ॥
तांबूलंचाप्यपथ्यंस्यान्मदात्ययविकारिणां ॥

अर्थ—घामकाढणें, अंजन, धूमपान,नस्य,दांत घासणें, विडा, हे मदात्ययावर अपथ्य जाणावें.

## दाहरोगकर्मविपाक.

पुनरग्नौष्ठीवतितंकपिलनामग्रहोगृण्हाति ॥ तत्क्षणाज्ज्वरशूलसर्वांगदा हपीतनयनश्चभवति ॥ बलिंचनिशिचतुष्पथेपिष्टलाजापिण्याकरुधिरति लाश्वगंधपुष्पैर्मिश्रेणदद्यात् ॥ गृण्हीष्वचबलिंचेमंकपिलाख्यमहाग्र ह ॥ आतुरस्यसुखंसिद्धिंप्रयच्छत्वंमहाबल ॥

**अर्थ**—जो अग्नीत थुंकतो त्याला कपिलनामक ग्रह पीडा करीतो; व तत्क्षणीं ज्वर; शूळ, सर्वांगदाह व नेत्रांना पीतता हे उपद्रव होतात. त्यांच्या शमनार्थ चव्हाठ्यावर पीठ, लाह्या, पेंड रक्त, तिल, अश्वगंध, आणि फुलें यांणीं युक्तकरून (गृण्हीष्वचबलिंचेमं) यामंत्रानें बलि द्यावा.

### ज्योतिःशास्त्राभिप्राय.

तनौभवतिभूपुत्रोरंध्रेभवतिभास्करः ॥
जन्मकालेयदायस्यसदाहज्वरवान्भवेत् ॥

**अर्थ**—ज्याच्या जन्मलग्नीं मंगळ, आणि अष्टमस्थानीं सूर्य आहे, तो दाह व ज्वर यांणीं युक्त होतो.

## दाहनिदान.

त्वचंप्राप्तःसमानोष्मापित्तरक्ताभिमूर्छितः ॥
दाहंप्रकुरुतेघोरंपित्तवत्तत्रभेषजं ॥

**अर्थ**—मद्यपानसंबंधि ऊष्मा, पित्त व रक्त यांणीं वृद्धि पाऊन त्वचेमध्यें जातो; आणि उग्रदाह उत्पन्न करितो, त्यावर पित्तशामक औषधें योजावीं.

### सामान्यचिकित्सा.

उत्तुंगकुचसंसर्गवीणानांहरिणीदृशाम् । गायनंसुकुमारीणांदाहमु त्सादयेदद्रुतम् ॥ रसौषधसमुद्भूतेतापेपिसकलेहितं ॥

**अर्थ**—तरतरीत उभ्या कुचांचा संबंध ज्या वीणेस आहे अशी वीणाघेऊन सुस्वर गायन करणाऱ्या तरुण सुकुमारस्त्रीचा गायनानें रस व औषधानीं झालेले सर्वताप शांत होतात.

कोलामलकयुक्तैर्वाधान्याम्लैरपिबुद्धिमान् ॥ छादयेत्तस्यसर्वांगमार नालार्द्रवाससा ॥ लामज्जकेनयुक्तेनचंदनेनानुलेपयेत् ॥ चंदनांबु कणस्यंदितालवृंतोपवीजनं ॥

**अर्थ**—बोरें, आंवळे, यांणी युक्त आंबील आंगास चोळावी; अथवा वस्त्रास लाऊन तें व

स्त्र पांघरावें; अथवा लघु रोहिस गवत व चंदन, यांचा लेप आंगास करावा; व चंदना चें पाणी शिंपून ताडाच्या विझुण्याचा वारा घालावा.

## दुसराप्रकार.

स्वप्याद्दाहार्दितोंभोजकदलीदलसंस्तरे॥ परिषेकावगाहौचव्यजनानां

चसेवनं ॥ शस्यतेशिशिरंतोयंदाहतृष्णोपशांतये ॥

**अर्थ**—दाहपीडित मनुष्यानें कमळें, केळीचीं पानें इत्यादिकांची शय्या करून निजावें, आंगावर पाणी शिंपावें, पाण्यांत बुडी मारावी, पंख्याचा वारा घ्यावा; व गारपाणी प्यावें; ह्मणजे दाह व तृषा शांत होते.

## रक्तजदाहलक्षण.

कृत्स्नदेहानुगंरक्तमुद्रिक्तंदहतिध्रुवं॥ संचूष्यतेतृष्यते

चाताम्राभस्ताम्रलोचनः ॥ लोहगंधांगनयनोवन्हिने

वावकीर्यते ॥ पित्तज्वरसमःपित्तात्सचाप्यस्यविधिःस्मृतः ॥

**अर्थ**—रक्तजदाहामध्यें सर्वशरीरांतील रक्त कुपित होऊन दाह उत्पन्न करितें, तेणेकरून मनुष्य अग्नीप्रमाणें तप्त व तृषित होतो. त्याचे शरीराची कांति; व नेत्र हे आरक्त होतात; आणि तोंडाला व आंगाला रक्ताचीगंधी येते, आंगावर अग्नि टाकिल्याप्रमाणे दाह होतो; आणि पित्तज दाहामध्यें पित्तज्वराचीं लक्षणें होतात; व त्यावर चिकित्सा ही पि त्तज्वरा प्रमाणें करावी.

## रसादिगुटी.

रसबलिघनसारचंदनानांसनलदसेव्यपयोदजीवनानां ॥

अपहरतिगुटीमुखास्थितेयंसकलसमुत्थितदाहमाश्रयेत्तां ॥

**अर्थ**—पारा, गंधक, कापूर, चंदन, काळावाळा, नागरमोथे, व तूप यांची गोळी तोंडात धरली असतां; ती त्रिदोषदाहाचा नाश करील, यास्तव ही मुखात धरावी.

## चंद्रकलारस.

गगनदरदयुक्तंशुल्वसूतंचगंधंप्रहरमधुसुपिष्टंवल्लयुग्मंनरोद्यान् ॥

ज्वरहरगदसिंहोशृंगवेरोदकेनप्रथमजनितदाहंतक्रभक्तंचभोज्यं ॥

**अर्थ**—अभ्रकभस्म, हिंगूळ, पारा व गंधक एकत्र मधांत प्रहरभर खलावें; नंतर दोन वालभार आल्याचे रसाबरोबर चाटावें. हें वाताचे कोपापासून झालेला दाह शांत करील. ह्याला ताकभाताचें पथ्य करावें, हा ज्वरनाशक ही आहे. ह्याला गदसिंह असें ह्मणतात.

## तृष्णानिरोधजदाहलक्षण.

तृष्णानिरोधादब्धातौक्षीणेतेजःसमुत्थितं ॥ सबाह्याभ्यंतरंदेहंप्रदहेन्मं दचेतसः ॥ संशुष्कगलताल्वोष्ठोजिव्हांनिष्कृष्यवेपते ॥

अर्थ–तृषेचे निरोधेंकरून रस क्षीण झाला असतां; पित्तोष्मा वृद्ध होऊन मनुष्यास बाहेर आंत असा दाह उत्पन्न करितो, त्याणें रोगी बेशुद्ध होतो; व कंठ, तालु, ओष्ठ, जिव्हां, हीं शुष्क होतात; आणि जीभ बाहेर काढून कांपवितो.

## तृष्णानिरोधजदाह.

सशर्करंसेंदुशैलंशीतमंभःपिबेन्नरः ॥
तृष्णानिरोधजंदाहंहंतितोयमिवानिलं ॥

अर्थ–साकर, कापूर, शिलाजित यांचें चूर्ण थंडपाण्यांत घालून तें पाणीं प्यावें; ह्मणजे तृषेचा निरोधाने झालेल्यादाहाचा नाश करितें; जसें पाणी अग्नीचा नाश करितें तसें.

## यवादिमंथ.

पाचितैःशीतनीरेणसघृतैर्यवसक्तुभिः ॥
नातिसांद्रद्रवैर्मंथस्तृषादाहार्तिपित्तहा ॥

अर्थ–भाजलल्या सातूंचें पीठ, तूप व थंडपाणी हीं एकत्र करून जो फार पातळ नव्हे असा जो रस करतात त्यास मंथ ह्मणतात. तो तृष्णा, दाहपीडा व पित्त यांचा नाशक आहे.

## मृतसंजीवनीगुटी.

यष्टीमधुलवंगंचाशिलाकल्कंत्रुटिस्तथा ॥ सहस्रभावनाकार्यानवतं दुलवारिणा ॥ याममात्रंदृढंमर्द्यवटीकोलसमास्मृता ॥ कृष्णकार्पासनीरेणतृष्णादाहज्वरान्जयेत् ॥ मूर्च्छाद्यमुग्ररोगंचवातंपित्तंचनाशयेत् ॥ मृतसंजीवनीप्रोक्तापूज्यपादैरुदीरिता ॥

अर्थ - जेष्ठीमध, लवंग, शिलाजित व वेलदोडे यांचे चूर्णास नव्या तांदुळांच्या धुवणाच्या सहस्रभावना द्याव्या; नंतर एक प्रहर चांगळें खलून बोराप्रमाणें गोळी करून काळे कापशीचे रसांत कालवून द्यावी; ती तृष्णा, दाह, ज्वर, मूर्च्छादि उग्ररोग व वातपित्त यांचा नाश करील. हीला मृतसंजीवनी असें ह्मणतात. श्रेष्ठ पुरुषानी सांगितली आहे.

## रक्तपूर्णकोष्टजदाह.

असृजःपूर्णकोष्ठस्यदाहोन्यःस्यात्सुदुस्तरः ॥

अर्थ–शस्त्रादिकांचा प्रहार होऊन रक्तानें कोष्ट भरतो, त्या पासून दाह होतो, तो फार असाध्य आहे. कोष्ठशब्दानें आमादिकांचीं स्थानें घ्यावीं.

## रक्तपूर्णकोष्टजदाह.

धान्याकधात्रीवासानांद्राक्षापर्पटयोर्हिमः ॥

रक्तपित्तंज्वरंदाहंतृष्णांशोषंचनाशयेत् ॥

**अर्थ**–धने, आवळकाठी, आडुळसा, द्राक्षे, पित्तपापडा यांचा हिम रक्तपित्त, ज्वर, दाह, तृषा व शोष यांचा नाशक आहे.

## दुसराप्रकार.

पीत्वावेणुत्वचःक्काथंसक्षौद्रंशिशिरंनरः ॥

रक्तसंपूर्णकोष्ठोत्थदाहंजयतिदुस्तरम् ॥

**अर्थ**– वेळुच्या सालीचा काढा थंड करून मध घालून प्यावा; ह्मणजे रक्तपूर्णकोष्ठांतला दाह दुस्तर जरीं असेल तथापि त्यास जिंकील.

## दशसारचूर्ण.

यष्टीधात्रीफलाद्राक्षाएलाचंदनवालकम् ॥ मधूकपुष्पंख

र्जूरंदाडिमंपेषयेत्समं ॥ सर्वतुल्यासितायोज्यापलार्धंभक्षये

त्सदा ॥ दशसारमिदंख्यातंसर्वपित्तविकारनुत् ॥

**अर्थ**–जेष्टीमध, आवळकाठी, मनुका, वेलदोडे, चंदन, वाळा, मोहाचें फूल, खजूर व डाळिंब यांचें समभाग चूर्ण करून त्याचे बरोबर साकर घालून कालवून २ तोळे प्रमाणे सेवन करावें, ह्याला दशसार चूर्ण ह्मणतात, हें सर्व पित्तविकार दूर करणारें आहे.

## धातुक्षयजन्यदाह.

धातुक्षयोत्थोयोदाहस्तेनमूर्छातृषान्वितः ॥

क्षामस्वरःक्रियाहीनःससीदेद्भृशपीडितः ॥

**अर्थ**–रसादिधातूच्या क्षयापासून जो दाह होतो, त्याणें मूर्छा येते, ताहान लागते, स्वर खोल जातो, निश्चेष्ट पडतो; व अत्यंत दुःखित होऊन मरतो.

## खर्जूरादि चूर्ण.

खर्जूरामलबीजानिपिप्पलीचशिलाजतु ॥ एलामधुकपाषाणचंदनैर्वा

रुबीजकं ॥ धान्यकंशर्करायुक्तंपातव्यंज्येष्ठिवारिणा ॥ अंगदाहंलिं

गदाहंगुदजंक्षीणशुक्रजं ॥ शर्कराश्मरिशूलघ्नंवृष्यंबलकरंपरं ॥ नाश

येन्मूत्ररोगांश्चतथाशुक्रभवानपि ॥

**अर्थ**–खजूर, आवळे, पिंपळी, शिलाजित, वेलदोडे, ज्येष्ठमध, पाषाणभेद, चंदन, कांक-

डीचें बीं, धने व साकर याचें चूर्ण जेष्ठमधाच्या काढ्याबरोबर प्यावें. तेणेंकरून अंग दाह, लिंगदाह, गुददाह, क्षीणशुक्रजदाह, शर्करा, अश्मरी व शूल यांचा नाश होईल; व हे वृष्य व बलदेणारें आहे; आणि मूत्ररोग, शुक्रापासून झालेले रोग, यांचा नाश करील.

## धातुक्षयजदाह.

धातुक्षयोत्थंदाहंतुजयेदिष्टार्थसाधनैः ॥
क्षीरमांसरसाहारैर्विधिनोक्तेनतत्रच ॥

अर्थ–धातुक्षयामध्यें दाह होतो, तो इष्टसाधनानीं किंवा क्षीर, मांसरस यांचा आहार इत्यादि विधीनीं जिंकावा.

## पित्तदाह.

पित्तज्वरहरःसर्वोपित्तदाहेविधिर्मतः ॥

अर्थ–पित्तदाहावर संपूर्णपित्तज्वरनाशक विधि करावा.

औदुंबरस्यनिर्यासःसितयादाहनाशनः ॥

अर्थ–उंबराचा चिक साखर घालून द्यावा, तो दाहनाश करितो.

छिन्नासारःसितायुक्तःपित्तज्वरनिषूदनः ॥

अर्थ–गरुडवेलीचें सत्व साकरेशीं द्यावें, तें पित्तज्वरनाश करितें.

## क्षतजदाह.

क्षतजेनाश्नतश्चान्यःशोचतोवाप्यनेकधा ॥
तेनांतर्दह्यतेत्यर्थंतृष्णामूर्छाप्रलापकं॥

अर्थ–क्षत, उपोषण, आणि शोक यांपासून दाह होतो. त्यामध्यें अभ्यंतरीं अत्यंत दाह, ताहान, मूर्छा, आणि बडबड हीं लक्षणें होतात.

## चंदनादिचूर्ण.

चंदनोशीरकुष्ठाब्दधात्रीचोरकमुत्पलं ॥ मधुकंमधुपुष्पंचद्राक्षाखर्जूरकंत था ॥ चूर्णंकृत्वासमसितंप्रातःशीतांबुनापिबेत् ॥ रक्तपित्तंतथाश्वासंपैत्तं गुल्मंसमुद्धरेत् ॥ अंगदाहशिरोदाहंशिरोविभ्रममेवच ॥ कामलां चप्रमेहांश्चपैत्तज्वरविनाशनं ॥ चंदनाद्यमिदंचूर्णंपूज्यपादेनभाषितम् ॥

अर्थ–चंदन, वाळा, कोष्ठकोळिंजन, नागरमोथा, आवळा, गठोणा, कमळ जेष्ठमध मोहाचें फूल, द्राक्षें व खजूर यांचें चूर्ण करून त्या चूर्णाबरोबर साकर घालून प्रात काळीं थंड पाण्याबरोबर खावें. तेणेंकरून रक्तपित्त, श्वास, पित्तगुल्म, अंगदाह, शिरो

दाह, मस्तकांतील भ्रम, कामला, प्रमेह, पित्तज्वर यांचा नाश होईल. याला चंदनाद्यचूर्ण असें ह्मणतात; हें मोठया श्रेष्ठपुरुषानीं सांगितलें आहे.

## रक्तजदाहावर.

शाखाश्रयांयथान्यायंरोहिणींव्यधयेच्छिरां ॥
रक्तजातस्ततोदाहःप्रशाम्यतिनसंशयः ॥

अर्थ–हाताची रोहिणी या नावाची शीर आहे, ती शस्त्रानीं टोंचून रक्त काढावें; ह्मणजे रक्तापासून झालेला दाह शांत होतो यांत संशय नाहीं.

## चंदनादि काढा.

चंदनंपर्पटोशीरीनीरनीरदनीरजैः ॥ मृणालमिसिधान्याक
पद्मकामलकैःकृतः ॥ अर्धशिष्टःसितासीतःपीतःक्षौद्रसम
न्वितः ॥ क्वाथोविपोथयेद्दाहंतत्क्षणंपरमोल्बणं ॥

अर्थ–चंदन, पित्तपापडा, वाळा, नागरमोथा, कमळ, बिसें, बडीशेप वन, पद्मकाष्ठ व आवळकाठी, यांचा काढा द्वितीयांश करून त्यांत साकर व थंड झाल्यावर मध घालून द्यावा; ह्मणजे तत्क्षणीं मोठया वाढलेल्या दाहाचा नाश करितो.

## योग.

रसौषधिसमुद्भूतेनापिपित्तकलेहितं ॥ पानीयामलकीद्राक्षा
नारिकेलेक्षुशर्कराः ॥ सेवनायहितातापेकोमलंमूत्रलंफलं ॥

अर्थ–मात्रा किंवा औषधि यापासून दाह झाला असतां; तच्छमनार्थ पाणी, आवळे, द्राक्षे, नारिकेल, ऊस, साकर; किंवा कांकडी हे पदार्थ द्यावे. ते हितकारक होतात.

## लाजादि काढा.

लाजाव्हचंदनोशीरक्वाथोंतःशर्करान्वितः ॥
शीतःपीतोनिहंत्याशुदाहंपित्तज्वरंनृणां ॥

अर्थ–काळा वाळा, रक्तचंदन व वाळा यांचा काढा साकर घालून थंड करून द्यावा. तो दाह व पित्तज्वर यांचा नाश करितो.

शीतांबुचंदनसुगंधिकषाययुक्तमाश्लिष्यचार्द्रवसनोपल्हतांबुपूर्णाः ।
तैलैर्मधूककुसुमागरुचंदनाद्यैर्द्रोणींप्रपूर्यशिशिरैरवगाहयेत्तं ॥

अर्थ–दाह झालेल्या रोग्याला. थंडपाणी, चंदन व सुगंध पदार्थांचे कषाय यांत, भिजविलेलें वस्त्र आंगावर द्यावें; व पाण्यांत; किंवा मोहाचीं फुलें, अगरु व चंदन इत्यादिकांचे थंडकाढे; व तेलें यानीं टांके भरून त्यांत स्नान करवावें.

## कमलादि पान.

पाययेत्कमलस्यांभःशर्करांभःपयोपिवा ॥
क्षीरमिक्षुरसंवापिकारयेत्पित्तबुद्धिभिः ॥

अर्थ—जाला पित्त वाढलें असें वाटतें त्याणीं कमळांच्या सुगंधाचें पाणी, किंवा साकर पाणी, किंवा दूध, अथवा उंसाचा रस हे पदार्थ भक्षण करावे.

## कोष्ठपूर्णरक्तदाह.

धृत्वापात्रेकांस्यजेताम्रजेवानाभौपुंसांदाहरोगातुरस्य ॥
धारापातैःशीतलंतत्रतोयंनिक्षेप्तव्यंकोष्ठदाहोपशांत्यै ॥

अर्थ—रोग्याच्या कोष्ठाचा दाह होऊं लागल्यास त्याच्या नाभीवर तांब्याचें किंवा कांशाचें पात्र ठेवून त्यांत थंड पाण्याची धार धरावी; ह्मणजे दाह शांत होतो.

## दाहरोगतैल.

कुशादिशालिपर्णीचजीवकर्षभसाधितं ॥
तैलंघृतंवादाहघ्नंवातपित्तविनाशनं ॥

अर्थ—कुशादिगण, सालवण, जीवक आणि ऋषभक याच्या कल्कानें व काढ्यानें सिद्ध केलेलें तेल किंवा तूप, दाह, वायु, आणि पित्त यांचा नाश करितें.

## तिलतैल.

तिलतैलंभवेत्प्रस्थंतत्षोडशगुहाशनैः ॥
कांजिकेविपचेत्तस्माद्दाहज्वरहरंपरं ॥

अर्थ—तिळांचें तेल ६४ तोळे घेऊन त्याच्या सोळापट कांजी घालून सिद्ध करावें, तें दाह व ज्वर यांचा नाश करितें.

## पुनर्नवादि तैल.

श्वेतंपुनर्नवामूलंपलंशतमितंशुभं ॥ कृष्णाज्यदुग्धमध्येचपेपयेदाढके भिषक् ॥ तत्समंतिलतैलंचपृथग्द्रव्याणियोजयेत् ॥ धूपंषोडशभागंचम रीचाष्टवरालकं ॥ कचोरमुशिरंश्वेतंकृष्णोशीरस्तथैवच ॥ मंजिष्ठंर गचूर्णचश्रीगंधरक्तचंदनं॥ कृष्णागरुंचरुद्राक्षान्पलमेकंप्रयोजयेत् ॥ तच्चूर्णंतैलमध्येचनिक्षिपेत्पाचयेत्सुधीः ॥ मेहारिकाष्ठयुक्तेनपाचये त्कोमलाग्निना ॥ सुपक्वंतैलमुधृत्यरात्रौवंगंचमर्दयेत् ॥ अंगशूल मंगदाहान्नेत्ररोगान्सपीनसान् ॥ पांडुकामलमुष्णानिसूतिकासान्नि

पाताजित् ॥ करदाहान्पाददाहान्तंद्रांकटिसमीरजान् ॥ क्षयकुष्ठा दिकंडूंश्चगजकर्णादिकंतथा ॥ शिरोरोगानभ्रमान्पित्तंनेत्राणांदृष्टिगोचरं ॥ अमृतंमात्रतश्चैवज्वराणांजीर्णिनामपि ॥ अस्थिगतंज्वरंचैव मेहज्वरप्रशांतये ॥ सर्वांगेमर्दनंचैवमंगलस्नानमाचरेत् ॥ शिवोदितमिदंतैलमश्विभ्यांगोचरीकृतं ॥ सर्वरोगहरंचैवदुर्लभंभिषजैर्भुवि ॥ साधयेद्गुरुमुखेनैवसिद्धिर्भवतिनान्यथा ॥

अर्थ–श्वेतपुनर्नव्याचे मूळ ४०० तोळे, घेऊन तें काळयागाईच्या २५६ तोळे तुपांत व दुधांत वाटावें; व ४०० तोळे तिळांचें तेल व धूप १६, मिरीं व राळ ८ भाग, कचोरा, वाळा, काळा वाळा, मंजिष्ठ, काथ, चंदन, रक्तचंदन, कृष्णागर व रुद्राक्ष, हे प्रत्येकीं ४ तोळे, यांचें चूर्ण त्या तेलांत वाटून तें मेहारीच्या काष्ठाच्या योगानें मंदाग्नीवर सिद्ध करून उतरावें; आणि त्या तेलानें रात्रीं अंगमर्दन करावें; ह्मणजे अंगशूळ, अंगदाह, नेत्ररोग, पडसें, पांडुरोग, कावीळ, उष्णता, बाळंतरोग, सन्निपात, हातपायांचा दाह, झांपड, कटिवात, क्षय, कुष्ठ, कंडू, गजकर्ण, मस्तकरोग, भ्रम, पित्त, नेत्ररोग, दृष्टिरोग, जीर्णज्वर, अस्थिज्वर व मेहज्वर यांवर हें सर्वांगाला मर्दन करून मंगळस्नान करावें, हें तैल पूर्वी शिवानी सांगितलें; आणि अश्विनीकुमारानीं प्रसिद्ध केलें. हें संपूर्ण रोगनाशक आहे, हें वैद्यानां पृथ्वीवर दुर्लभ, हें सिद्ध केलें असतां; सर्व सिद्ध होतें, यांत संशय नाही.

## तंदूलीयादिपान.

तंदुलीयकमूलानिधान्यजीरकजंपयः ॥
तुलसीस्वरसंटंकंतापेपिपिबतोहितं ॥

अर्थ–तांदुळजाच्या मुळया व जिरें यांचें पाणी व तुळशीचा रस हीं सर्व मिळून एक तोळा एकत्र करून घ्यावे, तें दाहावर आणि संतापावर ही हितकारक आहे.

फलिनीलोध्रसेव्यांबुहेमपत्रंकुटंनटं ॥
कालीयकरसोपेतंदाहेशस्तंप्रलेपनं ॥

अर्थ–मेंदी, लोध्र, काळा वाळा, वाळा, धोत्र्याचीं पानें, लाहान नागरमोथा व पीत चंदन यांचा लेप दाहशांत करतो.

ऱ्हीबेरपद्मकोशीरचंदनक्षोदवारिणा ॥
संपूर्णामवगाहेतद्रोणींदाहार्दितोनरः ॥

अर्थ–वाळा, कमळ, काळा वाळा व चंदन यांचें चूर्ण पाण्यांत टाकून त्या पाण्याने भरलेलें पिंप वगैरे त्यांत बुडी मारावी.

बदरीपल्लवोत्थेनफेनेनारिष्टकस्यवा ॥
सुरामंडाबुदध्यम्लंमातुलिंगरसोमधु ॥

अर्थ–बोरीचे पाल्याचा फेस, लिंबाचे पाल्याचा फेस, मद्यावरलें पाणीं दह्यांची निवळ व महाळुंगाचा गोड रस इतके दाहशामक आहेत.

वाप्यःकमलहासिन्योजलयंत्रगृहाःशुभाः ॥
नार्यश्चंदनदिग्धांग्योदाहदैन्यहरामताः ॥

अर्थ–कमळानीं शोभणाऱ्या मोठ्या विहिरी, जळमंदीर, चंदनाचा लेप केलेल्या स्त्रिया, दाहापासून दैन्य झालेलें दूर करतात.

प्रातःपर्युषितंधान्यंलुलितंसितयायुतं ॥
अंतर्दाहंहरेत्पीतंदुःखंमृत्युंजयोयथा ॥

अर्थ– रात्रीं धने पाण्यांत भिजत घालून प्रातःकाळीं कुसकरून तें पाणी साकर घालून प्यावें; ह्मणजे अंतर्दाह शांत करील जसें. दुःखाचें शमन सांब करितो तसें.

सहस्रधौतेनघृतेनदिग्धदेहस्यदाहःकृशतांबिभर्ति ॥
अन्यांगनासंगमसादरस्यस्वीयेषुदारेषुयथाभिलाषः ॥

अर्थ–सहस्र वेळा धुतलेलें तूप अंगास चोळलें असतां; दाह कमी होतो. जसा परस्त्रीशीं संसक्त पुरुषाचा मनोरथ स्वस्त्रीचे ठायीं कमी होतो तसा.

तृड्दाहमोहाःप्रशमंप्रयांतिनिंबप्रवालोत्थितफेनलेपात् ॥
यथानराणांधनिनांधनानिसमागमाद्वारविलासिनीनां ॥

अर्थ–कडुलिंबाचीं पानें आणि पोंवळें यांचा फेस अंगास चोळावा; ह्मणजे तृषा, दाह, मोह, हे शांत होतात. जसें धनिकलोकांचें धन वेश्यासमागमाच्या योगानें नष्ट होतें.

दाहेतिशिशिरंतोयंक्रियाकार्यासुशीतला ॥

अर्थ–अति थंड पाणी प्यावें; आणि शीत उपचार करावे; ह्मणजे दाह शांत होतो.

सर्वांगेचंदनालेपश्चंद्रकस्तूरिकायुतः ॥
सितनीरजलेपोवाधारागारनिवेशनं ॥

अर्थ–कापूर व कस्तूरीयुक्तचंदनाचा सर्वांगास लेप करावा; अथवा पांढरे कमळाचा लेप करावा आणि तळघरांत बसावें; ह्मणजे दाह शांत होतो.

सहजस्नेहसोत्साहमुग्धमंजुललापिनां ॥
बालकानांसमाश्लेषस्तापंनिर्वापयेज्जवात् ॥

अर्थ–स्वाभावीक स्नेहयुक्त आणि उत्साहानें लाडकें मंजूळ असें बोलणाऱ्या मुलाच्या आलिंगनानें ताप शांत होतो.

उशीरागारशयनंतालवृंतानुवर्तनं ॥
साहित्यसरसावाणीकवीनांतापत्त्रयं ॥

अर्थ–वाळ्याचे गृहांत शयन, पंख्याचा वारा, कवींचें साहित्यशास्त्रयुक्त सुरस भाषण हीं तीन तापशामक आहेत.

पानीयामलकीद्राक्षानारिकेलंसुशर्करं ॥
गायनंसुकुमारीणांदाहमूर्च्छाहरेद्द्रुतं ॥

अर्थ– आवळा व द्राक्षें यांचा रस प्यावा, नारळाचे पाणी साकरेसहित प्यावें; सुकुमारीस्त्रियांचें गायन ऐकावें; ह्मणजे ताप आणि मूर्च्छा यांचें हरण होईल.

सेवनायहितंतापेकोमलंमूत्रलंफलं ॥

अर्थ–दाह झाला असतां; मूत्रकरणारें कोंवळें फळ सेवन करावें.

## दुसरा चंद्रकळारस.

प्रत्येकंतोलमादायसूतंताम्रंतथाभ्रकं ॥ द्विगुणंगंधकंचैवकृत्वाकज्जलिकांशुभां ॥ मुस्तादाडिमदूर्वोत्थैःकेतकीस्तनजद्रवैः ॥ सहदेव्याः कुमार्याश्चपर्पटस्यापिवारिणा ॥ रामशीतलिकातोयैःशतावर्यारसेन च ॥ भावयित्वाप्रयत्नेनदिवसेदिवसेपृथक् ॥ तिक्तागुडूचिकासत्वं पर्पटोशीरमाधवी ॥ श्रीगंधंसारिवाचैषांसमानंसूक्ष्मचूर्णितं ॥ द्राक्षादिककषायेणसप्तधापरिभावयेत् ॥ ततोधान्याश्रयंकृत्वावटयःकार्याश्चणोपमाः ॥ अयंचंद्रकलानाम्नारसेंद्रःपरिकीर्तितः ॥ सर्वपित्तगदध्वंसीवातपित्तगदापहः ॥ अंतर्बाह्यमहादाहविध्वंसनमहाघनः ॥ ग्रीष्मकालेशरत्कालेविशेषेणप्रशस्यते ॥ कुरुतेनाग्निमांद्यंचमहातापज्वरंहरेत् ॥ भ्रमंमूर्छांहरत्याशुस्त्रीणांरक्तंमहास्रुतिं ॥ ऊर्ध्वाधोरक्तपित्तंचरक्तवांतिंविशेषतः ॥ मूत्रकृछ्राणिसर्वाणिनाशयेन्नात्रसंशयः ॥

अर्थ–पारा, ताम्रभस्म व अभ्रकभस्म हीं प्रत्येक एकतोळा, गंधक २ तोळे, यांची बारीक कज्जली करून, त्यास नागरमोथे, डाळिंब, दूर्वा, केतकीचें पारंबे, सहदेवी, कोरफड, पित्तपापडा, आरामशीतलिका व शतावरी इतक्यांच्या रसाची एक एक दिवस निराळी भावना द्यावी; नंतर कटुकी, पित्तपापडा, वाळा, मधुमालती, चंदन, उपळसरी यांची चूर्णे आणि गुळवेलीचें सत्व, हीं सर्व समभाग घेऊन भावना दिलेल्या औषधांत मिळवून पुनः द्राक्षादिककाढ्याच्या भावना सात द्याव्या; नंतर धान्यांत ठेऊन

कांहि दिवसांनी काढून चण्याप्रमाणे गोळ्या कराव्या, हा चंद्रकला या नांमेंकरून रसेंद्र असा कथित आहे. हा सर्व पित्तरोग, वातपित्तरोग, अंतर्बाह्य दाह शमविण्याविषईं ज सा मेघ, हा ग्रीष्मकाळीं व शरत्काळीं विशेषंकरून प्रशस्त आहे. हा अग्निमांद्य न क रतां मोठा संताप, ज्वर, भ्रम, मूर्छा, स्त्रियांचा रक्तस्राव, उर्ध्वरक्तपित्त अधोरक्तपित्त, रक्त- वांत्ति, सर्वमूत्रकृच्छ्र यांचा नाश करिल यांत संशय नाहीं.

## मर्माभिघातजदाह.

मर्माभिघातजोप्यस्तिसोसाध्यःसप्तमोमतः ॥

अर्थ—मर्माचे ठायीं अभिघात झाला असतां; दाह होतो, तो असाध्य हा सातवा दाह आहे.

## असाध्यलक्षण.

सर्वएवविवर्ज्याःस्युःशीतगात्रस्यदेहिनः ॥

अर्थ—अंग थंड झालें असतां सर्व दाह असाध्य होतात, ते सर्व सोडावे.

## पथ्य.

शालयःषष्टिकामुद्गामसूराश्चणकायवाः ॥ धन्वमांसरसालाजमंडंवैस क्तुवासिता ॥ शतधौतंघृतंदुग्धंनवनीतंपयोभवं ॥ कूष्मांडंकर्कटीमो चापनसस्वादुदाडिमं ॥ पटोलपर्पटीद्राक्षाधात्रीफलपरूषकं ॥ बिंबी तुंबीपयःपेठीखर्जूरंधान्यकंमिशी ॥ वालतालंप्रियालंचशृंगाटंचकसे रुकं ॥ मधूकपुष्पंह्रीबेरंपथ्यातिक्तानिसर्वशः ॥ शीताप्रदेहाभूवेश्मसे कोभ्यंगोवगाहनं॥ फुल्लोत्पलदलक्षौमशय्याशीतलकाननं॥ कथाविचि त्रागीतानिवाद्यंमंजुलभाषणं ॥ उशीरचंदनोलेपःशीतांशुःशिशिरोनि लः ॥ धाराग्रहंप्रियास्पर्शोप्रतीरंहिमवालुकं ॥ सुधांशुरश्मयःस्नानं मणयोमधुरोरसः ॥ पुरोयानिविधेयानिपित्तहारीणितानिच ॥ इतिदा हवतांनृणांपथ्यवर्गउदाहृतः ॥

अर्थ—साठक्यासाळी, मूग, मसूरा, चणे, यव, धन्वदेशांतील मांसांचे रस, लाजमंड, सक्तु, साकर, शतधौतघृत, दूध, दुधाचें लोणीं, कोहळा, काकडी, केळें, फणस, गोडंदा- ळिंब, पडवळ, पित्तपापडा, द्राक्षे, आवळकाठी, फालसा, तोंडलें, पांढरा भोपळा, आलें' खजूर, धने, बडीशेप, कोंवळें ताडफळ, चारोळ्या, शिंगाडे, कचेरा, मोहाचीं फुलें, वा ळा, हरीतकी, कडुपदार्थ, साकर, पेंड बांधणें, भुयार, सेचन, अभ्यंग, स्नान, फुललेल्या कमळांची शय्या, थंड बगीचा, कथा, गायन, मंजुल भाषण, वाळा व चंदन यांचा लेप,

चांदणें, थंड वारा, जळघर, स्त्रियांचें आलिंगन, वाळवंट, चंद्रकिरण, स्नान, रत्नधारण, मधुररस, आणि पूर्वी जे पित्तनाशक योग सांगितले ते इत्यादि सर्व दाहवान रोग्याला पथ्यवर्ग सांगितला.

## अपथ्य.

विरुध्धान्यन्नपानानिक्रोधोवेगविधारणं ॥ श्रमंव्यवायमाध्मानंक्षारं पित्तकराणिच ॥ व्यायाममातपंतक्रंतांबूलंमधुरामठं ॥ व्यवायंक टुतिक्तोष्णंदाहवान्परिवर्जयेत् ॥

अर्थ—क्षीरमत्स्यादि विरुध्धान्न, विरुध्धपानें, क्रोध, मलमूत्रादिकांचा वेगरोध, श्रम, स्त्रीगमन, पोटफुगणें, क्षार, पित्तकर वस्तु, व्यायाम, ऊन, ताक, विडा, मध हिंग, कडु, तिखट, उष्ण, हे पदार्थ दाहरोग्यानें वर्ज करावे.

---

## उन्मादरोग, कर्मविपाक.

मोहयित्वापरान्यस्तुभुंक्तेवस्तुविगर्हितं ॥ सोन्मादवातयुक्तःस्या त्कृच्छ्रंचांद्रायणंतथा ॥ कुर्यात्सारस्वतंनामजपेद्ब्राह्मणतर्पणं ॥

अर्थ—जो कोणी दुसऱ्याला मोह घालून निंद्य वस्तु भक्षण करितो, तो उन्माद, व वायु, यांणीं पीडित होतो, त्याणें चांद्रायण व कृच्छ्र अशीं प्रायश्चित्तें, किंवा सरस्वतीच्या नामाचा जप करावा; ब्राह्मणभोजन करावें.

### उन्माद व भूतोन्मादनिदान.

मदयंत्युद्धतादोषायस्मादुन्मार्गगामिनः ॥
मानसोयंमतोव्याधिरुन्मादइतिकीर्तितः ॥

अर्थ—वातादिदोष आपला मार्ग सोडून अन्यमनोवाहिनीधमनींप्रत जाऊन चित्त विभ्रम करितात, यास्तव या रोगाला मनोव्याधि उन्माद असें ह्मणतात.

### उन्मादभेद व निदान सांगतात.

एकैकशःसर्वशश्चदोषैरत्यर्थमूर्छितैः ॥ मानसेनचदुःखेनसपंचविधउ च्यते ॥ विषाद्भवतिषष्ठश्चयथास्वंतत्रभेषजं ॥ सचाप्रवृद्धस्तरुणोमद संज्ञांबिभर्तिच ॥ विरुद्धदुष्टाशुचिभोजनानिप्रधर्षणंदेवगुरुद्विजानां ॥ उन्मादहेतुर्भयहर्षपूर्वोमनोभिघातोविषमाश्चचेष्टाः ॥

अर्थ—वातादिदोषांनीं पृथक् तीन प्रकारचा सन्निपातज उन्माद, मानस दुःखजन्य,

आणि विषोत्पन्न, याप्रकारें साहा प्रकारचा उन्माद जाणावा. याविषयीं औषध ज्या संबंधाचा जो असेल त्याचें शामक द्यावें. उदाहरण वातसंबंधाचे उन्मादाला वातावरचीं औषधें द्यावीं. हा विकार जोंपर्यंत वाढतो आहे व तरुण आहे तोंपर्यंत मद अशी संज्ञा पावतो. मद होण्याचीं सामान्य कारणें सांगतो, विरुद्ध ह्मणजे क्षीर मत्स्यादिक, विषमंत्रादिकानीं दुष्ट, चांडाळादिकानीं स्पृष्ट अशा प्रकारच्या अन्नाचें सेवन, देव व ब्राह्मण यांची निंदा, भय, हर्ष, कांहीं कारणानीं अंतःकरणाचा पराभव होतो त्याणें व नाना प्रकारच्या शरीर चेष्टा हीं सर्व उन्मादाचीं कारणें होत.

## संप्राप्ति सांगतो.

तैरल्पसत्वस्यमलाःप्रदुष्टाबुद्धेर्निवासंहृदयंप्रदुष्य ॥
स्रोतांस्यधिष्ठायमनोवहानिप्रमोहयंत्याशुनरस्यचेतः ॥

अर्थ–ज्या मनुष्याचा सत्वगुण अल्प आहे, त्या मनुष्याचे वातादिदोष पूर्वोक्त कारणें करून दुष्ट होऊन जें बुद्धीचें निवासस्थान (हृदय) त्यातें दूषित करून मनोवहस्रो तसांतें आक्षिप्त करून मनुष्याचे चित्ताला त्वरित मोहित करितात.

## पूर्वरूप.

धीविभ्रमःसत्वपरिप्लवश्चपर्याकुलादृष्टिरधीरताच ॥
अवद्धवाक्यंहृदयंचशून्यंसामान्यमुन्मादगदस्यलिंगं ॥

अर्थ–बुद्धीस भ्रांति पडत्ये, चित्त चंचळ होतें, दृष्टि व्याकुळ होत्ये, अधिरपणा येतो, अबद्ध भाषण करितो; व अंतःकरण निर्विषय होतें हीं सामान्य उन्मादाचीं पूर्वरूपें जाणावीं.

## वातोन्मादलक्षण.

रूक्षाल्पशीतान्नविरेकधातुक्षयोपवासैरनिलोतिवृद्धः ॥ चिंतादिदुष्टं हृदयंप्रदुष्यबुद्धिंस्मृतिंचाप्युपहंतिशीघ्रं ॥ अस्थानहासस्मितनृत्य गीतवागंगविक्षेपणरोदनानि ॥ पारुष्यकार्श्यारुणवर्णताचजीर्णेबलं चानिलजस्यरूपं ॥

अर्थ– रूक्ष, अल्प व शीत असें अन्न, विरेच व वांति यांची प्रवृत्ति, रसादिधातुक्षय व उपवास यांणी वायु कुपित होऊन चिंतादिकानीं दुष्ट जालें जें मन त्याप्रत प्रवेश करून बुद्धि व स्मृति यांतें त्वरित नाहींशा करितो; नंतर तो मनुष्य कारणावांचून गालांतल्या गालांत थोडथोडें हसणें, हास्य, नृत्य, गीत, वाग्विक्षेप, अंगविक्षेप व रोदन यांतें करतो; आणि त्याचें शरीर कृश, अरुण वर्ण असें होतें, व आहार जीर्ण झाला असतां; व्याधीचें बळ फार होतें. हीं वातोन्मादाचीं रूपें जाणावीं.

## पित्तोन्मादनिदान.

अजीर्णकट्वम्लविदाहिशीतैर्भोज्यैश्चितंपित्तमुदीर्णवेगं ॥ उन्मादमत्युग्रमनात्मकस्यहृदिस्थितंपूर्ववदाशुकुर्यात् ॥ अमर्षसंरंभविनग्नभावाःसंतर्जनाभिद्रवणौष्ण्यदोषाः ॥ प्रच्छायशीतान्नजलाभिलाषाःपीतास्यतापित्तकृतस्यलिंगं ॥

**अर्थ**— अजीर्ण, तिखट, आंबट, विदाही, उष्ण, अशा आहारानीं पित्त संचय होऊन तें चितादिकांनीं दुष्ट झालेल्या अंतःकरणाला व बुद्धीला भ्रमिष्ट करून अत्युग्र उन्माद उत्पन्न करितें; तेणें करून असहिष्णुता, क्रोध, गर्व, वस्त्रत्याग, निंदाकरणें, पलायनकरणें, ओष्ठविकार, (ओठचावणेंवगैरे) दाह हीं लक्षणें होतात. छाया, शीत, अन्न व जल यांची इच्छा होत्ये; व शरीराची कांति पीतवर्ण होत्ये. हीं पित्तजउन्मादाचीं लक्षणें जाणावीं.

## कफोन्माद.

संपूर्णैर्मंदविचेष्टितस्यसोष्माकफोमर्मणिसंप्रवृद्धः ॥ बुद्धिंस्मृतिंचाप्युपहंतिचित्तंप्रमोहयन्संजनयेद्विकारं ॥ वाक्चेष्टितंमंदमरोचकश्चनारीविविक्तप्रियतातिनिद्रा ॥ छर्दिश्चलालाचबलंचभुक्तेनखादिशौक्ल्यंचकफात्मकेस्यात ॥

**अर्थ**—नानाप्रकारच्या अपरिमितभोजनानीं, निरुद्योगीपणामुळें कफ, पित्तासहवर्तमान मर्मस्थानाप्रत जाऊन वृद्ध होऊन बुद्धि व स्मृति यांतें नष्ट करून चित्तातें मोहित करीत उन्मादाला उत्पन्न करितो. त्यामुळें वाग्व्यापार मंद होतो, व अरोचक, स्त्रीविषईं प्रीति अतिशय, निद्रा, लालाप्रसेक इत्यादि होतात; तो मनुष्य नखें खातो; आणि नख व नेत्र पांढरे होतात. हीं कफोन्मादाचीं लक्षणें जाणावीं.

## सन्निपातजउन्मादनिदान.

यःसन्निपातप्रभवोतिघोरःसर्वैःसमस्तैरपिहेतुभिःस्यात् ॥ सर्वाणिरूपाणिबिभर्तितादृग्विरुद्धभैषज्यविधिर्विवर्ज्यः ॥

**अर्थ**—त्रिदोषजउन्माद पूर्वोक्त सर्वकारणेंकरून उत्पन्न होतो, तो अत्यंत प्रबल व उग्र असतो; आणि सर्वउन्मादाचीं लक्षणें धरितो. ह्या त्रिदोषजउन्मादाविषयीं वातादिकांचे उपचार परस्पर विरुद्ध होतील ते करावे.

## दुःखोन्मादलक्षण.

चोरैर्नरेंद्रपुरुषैररिभिस्तथान्यैर्वित्रासितस्यधनबांधवसंक्षयाद्वा ॥ गाढंक्षतेमनसिचप्रिययारिरंसोर्जायेतचोत्कटतमोमनसोविकारः ॥

चित्रंब्रवीतिचमनोनुगतंविसंज्ञोगायत्यथोहसतिरोदितिचापिमूढः ॥

अर्थ–चोर, राजाचे दूत, शत्रु, किंवा आणखी दुसऱ्या कारणाने द्रव्य व प्रियबंधु यांचा क्षय झाल्यामुळे अंतःकरणाला फार दुःख झाले, किंवा एकादी स्त्री भोगण्याची इच्छा होउन ती नमिळाली इत्यादि अनेक कारणांनीं मनाला मोठा विकार होतो. त्याणें बेफाम होऊन भलतेंच किंवा मनातील गोष्ट बडबडतो, गातो, हंसतो आणि मूर्खासारिखा रडतो.

## विषजउन्मादलक्षण.

रक्तेक्षणोहतबलेंद्रियभाःमुदीनःश्यावाननोविषकृतेनभवेद्विसंज्ञः ॥

अर्थ–विषानें झालेल्या उन्मादामध्यें डोळे रक्तवर्ण होतात, इंद्रियें व कांति हीं नष्ट होतात, अत्यंत दीन होतो, तोंड काळसर होतें; आणि संज्ञेचा नाश होतो. हीं लक्षणें होतात.

## असाध्य लक्षण.

अवाङ्मुखस्तून्मुखोवाक्षीणमांसबलोनरः ॥
जागरूकोह्यसंदेहमुन्मादेनविनश्यति ॥

अर्थ–जो उन्मादरोगी तोंड वर किंवा खाली धरून राहतो; व ज्याचें बल आणि मांसक्षीणझालें, सर्वकाळ जागा राहतो, असा उन्माद रोगी निःसंशय मरतो.

## उन्मादशास्त्रार्थ.

कामशोकभयक्रोधहर्षेर्ष्यालोभसंभवात् ॥
परस्परप्रतिद्वंद्वैरेभिरेवशमंनयेत् ॥

अर्थ–काम, शोक, भय, क्रोध, हर्ष, अक्षमा व लोभ यांपासून उत्पन्न झाले रोग ते त्याचे प्रतिद्वंद्वी जे कामशांत्यादिक याणीं निवारण करावे; ह्मणजे कामापासून उत्पन्न झाला जो कामज्वर तो कामशांति झाली ह्मणजे जातो, तसें.

## सामान्यउपचार.

वातिकेस्नेहपानंप्राग्विरेकःपित्तसंभवे ॥
कफजेवमनंकार्यंपरोबस्त्यादिकःक्रमः ॥

अर्थ–वातोन्मादावर स्नेहपान, पित्तोन्मादावर विरेचन व कफोन्मादावर वमन याप्रमाणें उपचार करावे; दुसरे ही बस्तिक्रिया इत्यादिक योग करावे.

## सामान्यचिकित्सा.

यच्चोपदिश्यतेकिंचिदपस्मारेचिकित्सितं ॥
उन्मादेतच्चकर्तव्यंसामान्याद्दोषदूष्ययोः ॥

अर्थ–जी काय चिकित्सा अपस्मारावर सांगितली असेल ती सर्व उन्मादावर करावी, कारण दोन ही रोगांत दोष आणि दूष्य हीं एकच आहेत, ह्मणोन.

## सामान्यउपचार.

स्नेहादिनाक्रमेणादावुन्मादिसमुपाचरेत् ॥
बस्तिभिःस्नेहकल्कैश्चनिरूहैःस्वेदनांजनैः ॥

अर्थ-स्नेहपानादि क्रमेकरून, बस्ति, स्नेह व कल्क, निरूहबस्ति, घाम काढणें व अंजन इत्यादि उपचार उन्मादावर करावे.

## शास्त्रार्थ.

अश्वासयेत्सुहृद्वाक्यैर्ब्रूयादिष्टविनाशनं ॥
दर्शयेदद्भुतंकर्मताडयेच्चकशादिभिः ॥

अर्थ-ज्याला उन्माद झाला, त्याला उत्तम गोष्टींनीं अश्वासन द्यावें; इष्ट वस्तूंचा नाश झाला ह्मणून सांगावें; किंवा अद्भुत चेष्टा व कोरड्याचा मार इत्यादि उपचार करावे.

सुबद्धंविजनेगेहेत्रासयेदहिभिर्धिया ॥
बद्धंसर्षपतैलाक्तंन्यसेदुत्तानमातपे ॥

अर्थ-उन्मादरोग्याला एकांतस्थानीं बांधून त्रास द्यावा, सर्प दाखउन भिववावा; व आंगाला सर्षपांचें तेल लाउन उन्हांत उताणा बांधोन ठेवावा.

कपिकच्छाथवातप्तलोहतैलजलैःस्पृशेत् ॥
वक्त्राभिधानेकूपेवासततंचनिवेशयेत् ॥

अर्थ-उन्मादरोग्याला कुहिली, किंवा तापविलेलें लोखंड, तेल, किंवा उदक याणीं स्पर्श करावा; किंवा तोंडांत तापलें लोहादि घालण्याचें भय दाखवावें.

सततंधूपयेच्चैनंगोमांसैश्चसपूतिभिः ॥
कामशोकभयक्रोधहर्षेर्ष्यालक्षसंभवात् ॥

अर्थ-उन्मादरोग्याला कुसक्या मांसाची धुरी द्यावी; व काम, शोक, भय, क्रोध, हर्ष व ईर्षा इत्यादि मनोविकार उत्पन्न करावे.

परस्परप्रतिद्वंद्वैरेभिरेवशमंनयेत् ॥ जलाग्निद्रुमशैलेभ्यो
विषमेभ्यश्चतंसदा ॥ रक्षेदुन्मादिनंचैवसद्यःप्राणहरंहितत् ॥

अर्थ-वर सांगीतल्याप्रमाणें परस्पर विरुद्ध चेष्टानीं त्याला स्वाधीन करून घ्यावा; आणि जल, अग्नि, वृक्ष, पर्वत व कठीण जागा यांपासून त्याचें संरक्षण करावें, तीं स्थानें सद्यः प्राणहारक आहेत.

## लशुनादिघृत.

लशुनस्याविनष्टस्यतुलार्धंनिस्तुषीकृतं ॥ तदर्धंदशमूल्यास्तुचाढकेवा विपाचयेत् ॥ पादशेषेघृतेप्रस्थंलशुनस्यरसंतथा ॥ कोलामलकवृक्षाम्लमातुलिंगार्द्रकैरसैः ॥ दाडिमांबुसुरामस्तुकांजिकाम्लैस्तदर्धकैः ॥ साधयेत्त्रिफलादारुलवणव्योषदीप्यकैः ॥ यवानीचव्यहिंग्वाम्लवेतसैश्चपलार्धकैः ॥ सिद्धमेतत्पिबेच्छूलगुल्मार्शोजठरापहं ॥ व्रणपांड्वामयप्लीहयोनिदोषकृमिज्वरान् ॥ वातश्लेष्मामयंचान्यमुन्मादंचापकर्षति ॥

अर्थ—चांगली उत्तम लसूण सोललेली २०० तोळे व दशमुळें १०० तोळे एकत्र करून त्यांचा १०२४ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून त्यांत तूप व लसणीचा रस ६४ तोळे व बोरें, आवळे, आंमसोल, महाळुंग, आलें व डाळिंब यांचे रस प्रत्येकीं ३२ तोळे व त्रिफला, देवदार, मीठ, मिरीं, ओंवा, अजवान, चवक, हिंग व आम्लवेतस, या प्रत्येकांचे दोन दोन तोळे, कल्क घालून तूप सिद्ध करावें, तें प्राशन केलें असतां; शूल, गुल्म, अर्श, उदर, व्रण, पांडुरोग, प्लीहा, योनिदोष, कृमि, ज्वर, आणि वायु व कफ यांचे व्याधि; आणि उन्माद यांचा नाश करितें.

## चंदनादि तैल.

चंदनांबुनखंयाव्यंयष्टीशैलेयपद्मकं ॥ मंजिष्ठासरलंदारुषड्बलापूतिकेसरं ॥ पत्रंतैलंमुरामांसीकंकोलंवनितांबुदं ॥ हरिद्रेसारिवातिक्तालवंगागरुकुंकुमं ॥ त्वग्रेणुनलिकाश्चैतितैलान्मस्तुचतुर्गुणं ॥ लाक्षारसंसमंसिध्धंग्रहघ्नंपरमंमतं ॥ अपस्मारहरोन्मादकृत्यालक्ष्मीविनाशनं ॥ आयुःपुष्टिकरंचैववशीकरणमुत्तमं ॥

अर्थ—चंदन, वाळा, नखला, जवखार, ज्येष्टमध, शिलाजित, पद्मकाष्ठ, मंजिष्ठा, सरल देवदार, षड्बला, जवादि, नाकेशर, तमालपत्र, लोध्र, सुरा, जटामांसी, कंकोळ, गहुंला, नागरमोथा, हळद, दारुहळद, उपलसरी, कुटकी, लवंगा, अगर, केशर, दालचिनी, पित्तपापडा, नलिका व तेल, आणि तेलाच्या चौपट ताकाची निवळी, आणि लाखेचा रस यांशीं तैल सिद्ध करावें, तें ग्रह अपस्मार, उन्माद, कृत्या, अलक्ष्मी, यांचा नाश करितें; आणि आयुष्य, पुष्टि व लोकवशता यांतें करितें.

## अंजन.

त्र्यूषणंहिंगुलवणवचाकटुकरोहिणी ॥ शिरीषनक्तमालानां

बीजंश्वेताश्चसर्षपाः ॥ गोमूत्रपिष्टैरेतैस्तुवर्तिर्नेत्रांजनेहिता ॥
चातुर्थिकमपस्मारमुन्मादंचनियच्छति ॥

अर्थ-सुंठ, मिरें, पिंपळी, हिंग, सैंदेलोण, वेखंड, कुटकी, शिरिस, करंजाचें बीं व पांढरे शिरिस हीं सर्व गोमूत्रांत वाटून त्यांत वात भिजवून त्या वातीनें नेत्रांस अंजन करावें; ह्मणजे चातुर्थिक ज्वर, अपस्मार व उन्माद यांचा प्रतिबंध करील.

## शिरिषादिनस्य.

शिरीषंलशुनंहिंगुनागरंमधुकंवचा ॥
कुष्टंचबस्तमूत्रेणपिष्टंस्यान्नावनांजनं ॥

अर्थ-शिरस, लसूण, हिंग, सुंठ, जेष्टीमध, वेखंड व कोष्ठकोळिंजन, हीं बोकडाच्या मुतांत वाटून त्याचें नस्य व अंजन करावें; ह्मणजे उन्माद जाईल.

## व्योषाद्यंजन.

तद्वद्व्योषंहरिद्रेद्वेमंजिष्ठागौरसर्षपाः ॥
शिरीषबीजमुन्मादग्रहापस्मारनाशनं ॥

अर्थ-तसेंच त्रिकटु, दारुहळद, हळद, मंजिष्ठ, पांढरे शिरस व काळे शिरस यांचें अंजन व नस्य उन्माद, ग्रह व अपस्मार, यांचे नाशक आहे.

## धूप.

कर्पासास्थिमयूरपिच्छबृहतीनिर्माल्यपिंडीतकत्वङ्मांसीवृषदं
शविट्तुषवचाकेशाहिनिर्मोचनैः ॥ नागेंद्रद्विजशृंगाहिंगुमरिचै
स्तुल्यैस्तुधूपःकृतःस्कंदोन्मादपिशाचराक्षससुरावेशज्वरघ्नःस्मृतः ॥

अर्थ-कापसाच्या सरक्या, मोरपीस, रिंगणी, निर्माल्य, गेळफळ, दालचिनी, जटामांसी, मांजराची विष्ठा, तुस, वेखंड, केंस मनुष्याचे, सर्पाची मेंग, हस्तिदंत, सांबरशिंग, हिंग व मिरें हीं समांश घेऊन धूप करावा. तो घेतला असतां; स्कंदोन्माद, अपस्मार, उन्माद, पिशाच, राक्षस, देवसंचार व ज्वर यांचा नाश करितो.

## पर्पटीरस.

कृष्णाधत्तूरजैर्बीजैःपंचभिःपर्पटीरसः ॥
साज्योयोज्यःप्रशांत्यर्थमुन्मादस्यशुभानने ॥

अर्थ-पिंपळी, धोतऱ्याच्या पांच बिया व पर्पटीरस तुपातून द्यावा; ह्मणजे उन्माद नाश पावतो.

## शिरीषाद्यंजन.

सिद्धार्थकवचाहिंगुकरंजोदेवदारुच ॥ मंजिष्ठात्रिफलाश्वेताकटभी

त्वक्कटुत्रिकाः ॥ समांशंचप्रियंगुश्चशिरीषोरजनीद्वयं ॥ बस्तमूत्रे णपिष्टुंदमगदंपानमंजनं ॥ नस्यमालेपनंचैवस्नानमुद्वर्तनंतथा ॥ अपस्मारविषोन्मादकृत्यालक्ष्मीज्वरापहं ॥ भूतेभ्यश्चभयंहंतिराजद्वारे चशस्यते ॥ सर्पिरेतेनसिद्धंवासगोमूत्रंतदर्थकृत् ॥

**अर्थ**—पांढरें शिरस, वेखंड, हिंग, करंजाची बी, देवदार, मंजिष्ठ, हरडा, बेहडा, आवळकाटी, तुरटी, लघु कांगोणी, दालचिनी, सुंठ, मिरें, पिंपळी, राळे, शिरीष, व दारुहळद हीं बोकडाचे मुतांत वाटून प्यावीं; व अंजन, नस्य, लेप व स्नान करावें; व अंगाला चोळावें; ह्मणजे अपस्मार, विष, उन्माद, कृत्या, दुर्दशा, ज्वर व भूतबाधा यांचे नाशक आहे; आणि राजाकडे जाणें असल्यास ही योग करावा, याप्रमाणेंच या औषधानीं सिध्द केलेलें तूप गोमूत्रसहीत सेवन केलें असतां गुण करणारें आहे.

## ब्राह्म्यादिरस.

ब्राह्मीकूष्मांडबिलषट्ग्रंथाशंखपुष्पिकास्वरसाः ॥
दृष्टाउन्मादहराःपृथगेतेकुष्ठमधुमिश्राः ॥

**अर्थ**—ब्राह्मी, कोहाळा, वेखंड व शंखाहुली यांचे पृथक् पृथक रस कोष्ठ व मध यांनीं मिश्रित करून घेतलें असतां; उन्मादनाशक आहेत.

## ब्राह्म्यादिकल्क.

ब्राह्मीरसःस्यात्सवचःसकुष्ठःसशंखपुष्पःससुवर्णचूर्णः ॥
उन्मादिनामुन्मदमानसानामपस्मृतोभूतहतात्मनांहि ॥
नस्येंजनेपानविधौचशस्तोब्राह्मीरसोयंसवचादिचूर्णः ॥

**अर्थ**—ब्राह्मीचा रस, वेखंड, कोष्ठकोळिंजन, शंखाहुली व नागकेशर यांच्या चूर्णानीं युक्त करून त्याचें नस्य, अंजन, किंवा पिणें इतक्यांत योजला असतां; उन्माद, अपस्मार, भूतोन्माद, हे रोग जातील.

## सितकुसुमबलादियोग.

सितकुसुमबलायाःसार्धकर्षत्रयंयःशिखरिचरणकेनक्षीरपाकेनपक्कं ॥
पिबतितदनुनित्यंप्रातरुत्थायशीतंजयतिझटितिघोरंव्याधिमुन्मादसंज्ञं ॥

**अर्थ**—श्वेतफुलांचा चिकणा ३॥ तोळे चूर्ण करून दूधांत घालून ते दूध आघाडयाच्या मुळासहित कढवून थंड करून नित्य प्रातःकाळीं प्यावें; ह्मणजे उन्मादरोगाचा लवकर पराजय करील.

## दशमूलादियोग.

दशमूलांबुसघृतंयुक्तंमांसरसेनवा ॥

ससिद्धार्थकचूर्णवाकेवलंनावनंघृतं ॥

अर्थ—दशमुळांचा काढा घृतयुक्त अथवा मांसरसाशीं युक्त उन्मादावर हितकारक आहे; अथवा पांढऱ्यामोहऱ्याचें चूर्ण तुपाशीं युक्त करून नस्य केलें असतां; तें हितकारक आहे.

उन्मादशांतयेपेयोरसोवाकालशाकजः ॥
प्रयोज्यंसार्षपंतैलंनस्याभ्यंजनयोःसदा ॥

अर्थ—उन्मादरोगशांतिसाठीं शंखपुष्पीचा रस प्यावा; अथवा शिरसाच्या तेलाचें नस्य व अभ्यंजन करावें.

## भूतोन्मादलक्षण.

अमर्त्यवाग्विक्रमवीर्यचेष्टाज्ञानादिविज्ञानबलादिभिर्यः ॥
उन्मादकालोनियतश्चयस्यभूतोत्थमुन्मादमुदाहरंति ॥

अर्थ—भूतोन्माद झाला असतां; मनुष्याची वाणी, पराक्रम, शक्ति व शरीरचेष्टा ह्या अलौकिक होतात, याचा उन्मादकाल नियमित असतो, इत्यादि लक्षणें होतात. हें सर्व भूतोन्मादाचें सामान्य लक्षण आहे.

## देवजुष्टउन्मादलक्षण.

संतुष्टःशुचिरतिदिव्यमाल्यगंधोनिस्तंद्रिरवितथसंस्कृतप्रभाषी ॥
तेजस्वीस्थिरनयनोवरप्रदाताब्रह्मण्योभवतिनरःसदेवजुष्टः ॥

अर्थ—सर्वकाळसंतोषी, अतिपवित्र, उत्तमफुलें व गंध यांची प्रीति करणारा, जागृत, खरें व संस्कृत बोलणारा, तेजस्वी, डोळे वटारलेला, मनासयेतील तसे वर देणारा व ब्राह्मणभक्त असा देवग्रहानें धरलेला रोगी होतो.

## असुरउन्माद.

संस्वेदीद्विजगुरुदेवदोषवक्ताजिह्माक्षोविगतभयोविमार्गदृष्टिः ॥
संतुष्टोनभवतिचान्नपानजातैर्दुष्टात्माभवतिचदेवशत्रुजुष्टः ॥

अर्थ—रक्षासानीं धरलेला मनुष्य, घामयेणारा व ब्राह्मण, गुरु, देव यांचे दोष बोलणारा, वक्रदृष्टि, निर्भय, वेदविरुद्धमार्गावर लक्ष ठेवणारा व कोणतें ही अन्न आणि पान याणीं संतुष्ट न होणारा, आणि दुष्टबुद्धि असा होतो.

## गंधर्वजुष्टउन्माद.

हृष्टात्मापुलिनवनांतरोपसेवीस्वाचारःप्रियपरिगीतगंधमाल्यः ॥
नृत्यन्वैप्रहसतिचारुचाल्पशब्दंगंधर्वग्रहपरिपीडितोमनुष्यः ॥

अर्थ—गंधर्वग्रहानें ग्रस्त मनुष्य, हर्षयुक्त, नदीतीर, बाग, बगीचे यांत राहणारा, स

दाचारयुक्त, गीत, माला व अनेकतऱ्हेचे गंध यांते सेवनकरणारा, नृत्यकरणारा, हसणारा, गोड व अल्प भाषणकरणारा असा होतो.

## यक्षग्रस्तउन्मादलक्षण.

ताम्राक्षः प्रियतनुरक्तवस्त्रधारीगंभीरोद्रुतगतिरल्पवाक्सहिष्णुः ॥
तेजस्वीवदतिचकिंददामिकस्मैयोयक्षग्रहपरिपीडितोमनुष्यः ॥

अर्थ–यक्षग्रहग्रस्त मनुष्याच्या नेत्रांनां लाली व चांगलें, बारीक, रक्तवर्ण असें वस्त्र धारण करणारा, खोलबुद्धीचा, जलद चालणारा, थोडें बोलणारा, सहनशील, तेजस्वी आणि कायपाहिजे तें पाहिजे त्यास देतों ह्मणणारा असा होतो.

## पितृग्रहग्रस्तउन्मादलक्षण.

प्रेतानांदिशतिससंस्तरेषुपिंडान्भ्रांतात्माजलमपिचापसव्यवस्त्रः ॥
मांसेप्सुस्तिलगुडपायसाभिकामस्तद्भक्तोभवतिपितृग्रहाभिजुष्टः ॥

अर्थ–पितरानीं धरलेला मनुष्य दर्भांवर प्रेतानां पिंड देणारा, भ्रांतिमान्, आणि अप सव्य वस्त्र धारण करून तर्पण करणारा व मांस, तिळ, गुळ व खीर यांची इच्छा करणारा, आणि पितृभक्त असा होतो.

## सर्पग्रहग्रस्तउन्मादलक्षण.

यस्तूर्व्यांप्रसरतिसर्पवत्कदाचित्सृक्किण्यौविलिहतिजिव्हयातथैव ॥
क्रोधालुर्गुडमधुदुग्धपायसेप्सुर्विज्ञेयोभवतिभुजंगमेनजुष्टः ॥

अर्थ–सर्पग्रहोन्मादरोगी पृथ्वीवर सापासारिखा लोळतो वारंवार जिभोळ्या चाटतो, क्रोधिष्ट व गूळ, मद्य, दूध, आणि खीर यांची वारंवार इच्छा करणारा असा होतो.

## राक्षसजुष्टउन्मादलक्षण.

मांसासृग्विविधसुराविकारलिप्सुर्निर्लज्जोभृशमतिनिष्ठुरोतिशूरः ॥
क्रोधांधोविपुलबलोनिशाविहारीशौचद्विड्भवतिचराक्षसैर्गृहीतः ॥

अर्थ–राक्षसग्रहानें धरलेला मनुष्य मांस व रक्त यांचे पदार्थ, अनेक तऱ्हेचीं मद्यें यांचा भक्षणाविषयीं इच्छा करणारा, निर्लज्ज, अत्यंत क्रूर व शूर, सर्वकाळ क्रोधी, बलवान्, रात्रीं फिरणारा, आणि अमंगळ असा होतो.

## ब्रह्मराक्षसउन्मादलक्षण.

देवविप्रगुरुद्वेषीवेदवेदांगनिंदकः ॥
आत्मपीडाकरोहासीब्रह्मराक्षससेवित. ॥

अर्थ–ब्रह्मराक्षस लागलेला मनुष्य देव, ब्राह्मण व गुरु यांचा द्वेष करणारा, देव, वेद व वेदांगें यांची निंदा करणारा, आपल्या देहाला पीडा करणारा, आणि हंसणारा असा होतो.

## पिशाचजन्यउन्माद.

उद्धस्तःकृशपुरुषोचिरप्रलापीदुर्गंधोभृशमशुचिस्तथातिलोलः ॥
बव्हाशीविजनवनांतरोपसेवीव्याचेष्टन्भ्रमतिरुदन्पिशाचजुष्टः ॥

अर्थ–पिशाच्च लागलेला मनुष्य हात वर करून धरणारा, कृश, फारवेळ बडबड करणारा, दुर्गंधयुक्त, अत्यंत अमंगळाची आवड करणारा, फार चंचळ, फार खाणारा, निर्जनस्थळीं राहणारा, आणि चेष्टा करीत व रडत फिरणारा असा होतो.

## असाध्यलक्षण.

स्थूलाक्षोद्रुतमटनःसफेनलेहीनिद्रालुःपततिचकंपतेचयोति ॥
यश्चाद्रिद्विरदनगादिविच्युतःस्यात्सोसाध्योभवतिचतथात्रयोदशाब्दे ॥

अर्थ–सामान्यतःभूतोन्माद रोगी डोळे वटारून धरणारा, जलद फिरणारा, वारंवार ओंठावरची लाळ चाटणारा, सार्वकाळ झोंप घेणारा, वारंवार पडणारा, अति कांपणारा, व जो पर्वत, हत्ती, टेकाड यांवरून पडलेला, आणि तेरा वर्षे लोटलेला असा असाध्य होतो.

## देवतादिसंबंधीउन्मादांचा ग्रहणकाळ.

देवग्रहाःपौर्णिमास्याममुराःसंध्ययोरपि ॥
गंधर्वाःप्रायशोष्टम्यांयक्षाश्चप्रतिपद्दिने ॥

अर्थ–देवग्रह पौर्णिमेस, असुर दोन संधीमध्ये, गंधर्व अष्टमीस, यक्ष प्रतिपदेस असे मनुष्यास ग्रहण करितात.

पितृग्रहास्तथादर्शपंचम्यामपिचोरगाः ॥
रक्षांसिरात्रौपैशाचाश्चतुर्दश्यांविशंतिहि ॥

अर्थ–पितृग्रह दर्शाचेठायीं, सर्प पंचमीस, राक्षस रात्रीस व पिशाच चतुर्दशीस, मनुष्याचे शरीरांत प्रवेश करितात, यांच्या शांत्यर्थ त्यात्या तिथींचाठायीं बलिदान करावे.

दर्पणादीन्यथाछायाशीतोष्णंप्राणिनोयथा ॥ स्वमणीभास्करांशुश्चयथा देहंचदेहधृक् ॥ विशंतिचनदृश्यंतेग्रहास्तद्वच्छरीरिणां ॥

अर्थ–जसें आर्शांत प्रतिबिंब, शरीरांत शीतोष्ण, सूर्य मण्यांमध्ये सूर्य किरण व शरीरांत आत्मा हे सर्व प्रवेश करीत होतसाते दिसून येत नाहींत. त्या प्रकारें देवतादिक शरीरांत प्रवेश करितात; परंतु दिसून येत नाहींत.

## निशादिघृत.

निशायुक्त्रिफलाश्यागावचासिद्धार्थहिंगुभिः ॥ शिरीषकटभिश्वेतागंजिष्ठाव्योपदारुभिः ॥ समैःकृतंघृतंमूत्रेसिद्धमुन्मादनाशनं ॥

अर्थ–दारुहळद, हळद, त्रिफळा, उपळसरी, वेखंड, पांढऱ्या मोहोऱ्या, हिंग, शिरस, मालकांगोणी, श्वेत कांचन, मंजिष्ठ, त्रिकटु व देवदार हीं समभाग घेऊन गोमूत्रांत घालून त्यांच्या बरोबर सिद्ध केलेलें तूप उन्मादनाशक आहे.

## कल्याणकघृत.

विशालात्रिफलाकौंतीदेवदार्व्येलवालुकं ॥ स्थिरानंताहरिद्रेद्वेसारिवेद्वेप्रियंगुका ॥ नीलोत्पलैलामंजिष्ठादंतीदाडिमवल्कलं ॥ विडंगंपृश्निपर्णीचकुष्ठचंदनपद्मकैः ॥ तालीसंबृहतीपत्रंमालत्याःकुसुमंनवं ॥ एतैःकर्षसमैःकल्कैर्विंशत्यष्टाभिरेवच ॥ चतुर्गुणंजलंदत्वा घृतप्रस्थंविपाचयेत् ॥ अपस्मारज्वरेशोषेकासेमंदानलेक्षये ॥ वातरक्तेप्रतिश्यायेतृतीयकचतुर्थके ॥ वातार्शेमूत्रकृच्छ्रेचविसर्पोपहतेषु ॥ कंडुपांड्वामयोन्मादविषमेहगदेषुच ॥ भूतोपहतचित्तानांगंडदानामचेतसां ॥ शस्तंस्त्रीणांचवंध्यानांधन्यआयुर्बलप्रदं ॥ अलक्ष्मीपापरक्षोघ्नंसर्वग्रहनिवारणं ॥ कल्याणकमिदंसर्पिःश्रेष्ठंपुंस्त्वप्रदंनृणां ॥

अर्थ–कंवडळ, त्रिफळा, रेणुकाबीज, देवदार, शेंदाड, सात्वण, धमासा, दारुहळद, हळद, श्वेतऊपळसरी, उपळसरी, धायटी, काळें कमळ, वेलदोडे, मंजिष्ठा, दांतिमूळ, डाळिंबाची साल, वावडिंग, पिठवण, कोष्ठकोळिंजन, चंदन, पद्मकाष्ठ, तालीसपत्र, रिंगणी, तमालपत्र, व जाईचीं ताजीं फुलें; हीं प्रत्येकीं तोळा तोळा प्रमाण घेऊन त्यांचा कल्क करून, त्याच्या चौपट पाणी घालून त्यांत ६४ तोळे तूप कढवावें, तें अपस्मार, ज्वर, शोष, कास, मंदाग्नि, क्षय, वातरक्त, पडसें, तृतीयक, चातुर्थक, ज्वर, वातार्श, मूत्रकृच्छ्र, विसर्प, कंडू, पांडुरोग, उन्माद, विष, मेह, भूतोन्माद, इत्यादि रोगाचे नाशक. आणि वंध्यास्त्रीला अपत्य देणारें, आयुष्य व बल, यांतें देणारें, व दारिद्र्य, पाप व राक्षसादि सर्वग्रह, याचे निवारक आहे, याला कल्याण घृत ह्मणतात, हें मोठें श्रेष्ठ, पुरुषांस पौरुष देणारें असें आहे.

## हिंग्वादिघृत.

हिंगुसौवर्चलव्योषद्विपलांशैर्घृतंशृतं ॥
चतुर्गुणेगवांक्षीरेसिद्धमुन्मादनाशनं ॥

अर्थ–हिंग, पादेलोण व त्रिकटु हीं सर्व मिळोन ८ तोळे आणि तूप व तुपाच्या चौपट गाईचें दूध, हीं सर्व एकत्र पक्क करावीं; ह्मणजे हें सिद्ध झालेलें तूप उन्मादनाश करतें.

## सारस्वतघृत.

त्रिफलालक्ष्मणानंतासमंगासारिवावचा ॥ ब्राह्मीपाठाबृहतिकाद्विः स्थिराद्विःपुनर्नवा ॥ सहदेवीसूर्यवल्लीवयस्थागिरिकर्णिका ॥ तोयकुंभेपचेदेतत्पलांशंपादशेषिते ॥ नतंकौंतिवचाकुष्ठंकृष्णासैंधवसार्षपं ॥ नीरुक्सवर्णवत्सयाःसंसिद्धंपयसाचगोः ॥ पुष्ययोगेघृतप्रस्थंसुस्नेहकलशेस्थितं ॥ पानाभ्यंजनतोमेधास्मृत्यायुःपुष्टिवर्धनं ॥ रक्षोघ्नंचाविषघ्नंचसारस्वतमिदंघृतं ॥

अर्थ–त्रिफळा, श्वेतरिंगणी, धमासा, मंजिष्ठ, उपळसरी, वेखंड, ब्राह्मी, पाडळमूळ, रिंगणी, रानमूग, रानउडीद, रक्त पुनर्नवा, श्वेत पुनर्नवा, सहदेवी, सूर्यफूलवल्ली, आवळी व श्वेत गोकर्णी, हीं प्रत्येकीं चार चार तोळे प्रमाणे घेऊन पाण्यांत घालून चतुर्थांश पाणी राही तोपर्यंत कढवून गाळून घेऊन त्यांत तगर, रेणुकाबीज, वेखंड, कोष्ठ, पिंपळी, सैंधव, आणि निरोगी असून तीचा व वांसराचा एक वर्ण अशा गाईचे दूध घालून त्यांत ६४ तोळे तूप पुष्यनक्षत्र असेल तेदिवशीं सिद्ध करून राखलेल्या मडक्यांत ठेवावें; नंतर पिणें किंवा अभ्यंजन करणें यार्णी बुद्धि, स्मृति, आयुष्य व पुष्टि याचें वर्धन करतें; आणि राक्षसबाधा व विषबाधा, यांचा नाश करतें, याला सारस्वत घृत असें ह्मणतात.

## उन्मादगजकेसरी रस.

सूतगंधंशिलातुल्यंस्वर्णबीजंविचूर्ण्यच ॥ भावयेदुग्रगंधायाःक्काथेमुनिदिनंपृथक् ॥ रास्नाक्काथेनसप्तैवभावयित्वाविचूर्णयेत् ॥ रसःसंजायतेनूनमुन्मादगजकेसरी ॥ अस्यमाषःससर्पिष्कोलीढोहंतिहठाद्वदं ॥ उन्मादाख्यमपस्मारंभूतोन्मादमपिज्वरं ॥

अर्थ–पारा, गंधक, मनशीळ, आणि या सर्वांच्या बरोबर धोत्र्याचें बीं हीं सर्व एकत्र खलून वेखंड व रास्ना, यांचे पृथक् काढे करून त्याच्या सात सात भावना द्याव्या; नंतर चूर्ण करावें; ह्मणजे उन्मादगजकेसरी रस होतो. हा तुपाबरोबर एक मासा भार चाटावा; ह्मणजे मोठ्या जलदीनें उन्माद, अपस्मार भूतोन्माद व ज्वर यांचा नाश करील.

उन्मादेपर्पटींदद्यात्साचाविपयसान्वितां ॥
अपस्मारेपितत्प्रोक्तमेतत्पाराशरेणच ॥

अर्थ–उन्मादरोगावर पर्पटीरस शेळीच्या दुधांतून द्यावा, तो फेंपरें व उन्माद यांचा नाश करितो.

## विगतोन्मादलक्षण.

प्रसादश्चेंद्रियार्थानांबुध्यात्ममनसामपि ॥ धातूनांप्रकृतिस्थत्वंविग तोन्मादलक्षणं ॥ यच्चोपदेशतःकिंचिदपस्मारेचिकित्सितं ॥ उन्मा देतच्चकर्तव्यंदोषसामान्यदूष्ययोः ॥

अर्थ–ज्याचा उन्माद शांत झाला; त्याची मन, बुद्धि, इंद्रियें, धातु, आणि प्रकृति हीं सर्व स्वच्छ होतात. अपस्मार व उन्माद यांचे दोष व दूष्य एकसारिखेच आहेत, याकरितां अपस्मारावरील सर्व उपचार उन्मादावर करावे.

## भूतोन्मादीं अंजन व नावन.

शिरीषपुष्पंलशुनंशुंठीसिद्धार्थकंवचा ॥ मंजिष्ठरजनीकृष्णा बस्तमूत्रेणपेषयेत् ॥ वटीछायासुशुष्कायासाहितानावनांजने ॥

अर्थ–शिरसाचें फूल, लसुण, सुंठ, पांढऱ्या मोहोऱ्या वेखंड, मंजिष्ठ, हळद, व पिंपळी, हीं सर्व बोकडाच्या मूतांत वाटून गोळी करून सावलींत वाळवून ती नस्य किंवा अंजन याविषईं योजावी, ही हितकारक आहे.

## भूतभैरवरस.

रसःसतालःसशिलःसलोहःस्रोतोंजनंसार्कामिदंहिगंधं ॥ पिष्ट्वाजमूत्रेण समंसमस्ताद्दयोद्विभागोथबलिःपचेच्च ॥ लोहेक्षणंहंतिघृतेनमाषोपस्मा रमस्योन्मदमानसत्वं॥पिबेदनुत्र्यूपणहिंगुयुक्तंसर्पिर्नृमूत्रंरुचकेनसार्द्धं ॥ भूतोन्मादेषुसर्वेषुरसोयंभूतभैरवः॥स्वर्णजैःपंचभिर्बीजैर्देयःसर्पिर्विमिश्रितः॥

अर्थ–पारा, हरताळ, मनशीळ, लोहभस्म, सुरमा, ताम्रभस्म व गंधक, हे सर्व समभाग बोकडाच्या मुतांत खलून सर्वांच्या दुप्पट गंधक लोहपात्रांत घालून हें त्यांत पचवावें; नंतर एक मासाभार घेऊन तूपाबरोबर खावें, तेणेंकरून अपस्मार व उन्माद यांचा नाश करील, हें औषध सेवन केल्यावर त्रिकटु व हिंग, यांचे चूर्ण घृताबरोबर खावें; अथवा मनुष्याचे मुतांत पादेलोण घालून ते प्यावें; हा सर्व भूतोन्मादावर भूतभैरव रस धोत्र्याच्या पांच बियां आणि तूप याचे बरोबर द्यावा.

## भूतरावघृत.

फलात्रिकव्योपकलिंगजोग्रानिशाद्वयैलाचविकासुराव्हा ॥ तुत्थंप्रियं ग्वामपकालमेषीमनःशिलापद्मककंटकार्याः ॥ यवाव्हयष्टीकटुकुंकमां भोरिष्टाव्हसिद्धार्थपूगच्छदानि ॥ रसांजनंग्रंथिमधूकसारंबलारसोनाव्ह

नतानिचूर्णात् ॥ एषामजामूत्रदधिप्रयुक्तात्संजातमाज्यंननुभूतरावं ॥ लोकेपुनाम्नाविदितंसमस्तैर्वैद्यैःसमुक्तंजगतांहिताय ॥ पानेननस्येन चमर्दनेनानेकोग्रभूतग्रहजातिपीडां ॥ निहंनिरक्षांसिचडाकिनीनांमं त्रायथातारकंनामधेयं ॥

अर्थ—हरडा, बेहेडा, आवळकाठी, सुंठ, मिरीं, पिंपळी, इंद्रजव, वेखंड, हळद, दारु-हळद, एलची, चवक, देवदार, मोरचूत, कुटकी, कोष्ठ, मंजिष्ठ, मनशीळ, पद्मकाष्ठ, रिंगणी, धमासा, ज्येष्ठमध, कडुपडवळ, केशर, वाळा, रिंठ, मोहऱ्या, आपटा, रसांजन, पिंपळमूळ, मोहाचीं फुलें, काथ, चिकणा, लसूण व तगर यांचें चूर्ण व शेळीचें मूत व दहीं एकत्र करून त्यांत तूप घालून सिद्ध करावें. हें प्राशन, नस्य, मर्दन यांविषयीं योजावें, ह्मणजे भूत, ग्रहजाति, राक्षस व डाकिनी यांच्या पीडेचा नाश करितें, हें वैद्यानीं जगताच्या हिताकरितां प्रसिद्ध केलें; व लोकानां अनुभव ही आहेत.

## धूप.

ऋक्षजंबुकरोमाणिशल्लकीलसमंतथा ॥ हिंगूमूत्रंचबस्तस्यधूपमस्यप्र योजयेत् ॥ धूपेनशाम्यतिक्षिप्रंबलवानपियोग्रहः ॥

अर्थ—आस्वल व कोल्हा यांचे केस, साळइचे पीस, हिंग व बोकडाचें मूत यांचें धूपानें लवकर बलवान देखील ग्रह शांत होतो.

येचस्युर्भुविगुह्यकाश्चप्रमथास्तेषांसमाराधनं ॥
देवब्राह्मणपूजनंचशमयेदुन्मादमागंतुकं ॥

अर्थ—जे कोणी गुह्यक, प्रमथ, इत्यादिकांचें आराधन व देव, ब्राह्मण यांचें पूजन करितील तर, त्यांच्या आगंतुक उन्मादाची शांति लवकर होईल.

शिरीपनक्तमालानांबीजानिमधुसर्पिषा ॥
भक्ष्याश्चसर्वेसर्वेषांसामान्योविधिरुच्यते ॥

अर्थ—शिरस, करंजाचें बीं, मध व तूप यांबरोबर खावें; आणि भक्ष्य पदार्थ सर्व सर्वांस योग्य आहेत, हा सामान्यविधि सांगितला.

## भूतोन्मादचिकित्साशास्त्रार्थ.

बुध्वादोषंवयःसात्म्यंदेशंकालंबलाबलं ॥
चिकित्सितमिदंकुर्यादुन्मादेभूतदोषजे ॥

अर्थ—दोष, वय व प्रकृतीस मानेल तें, देश, काल, बल, किंवा अशक्तपणा, हें सर्व जाणून भूतोन्मादावर चिकित्सा करावी.

देवर्षिपितृगंधर्वैरुन्मत्तेषुचबुद्धिमान् ॥ त्यजेन्नस्यांजनादीनि तीक्ष्णानिक्रूरकर्मच ॥ सर्पिःपानंसूर्यजपहोममंत्रादिरिष्यते ॥

अर्थ—देव, ऋषि, पितर व गंधर्व, यांचे बाधेनें उन्मत्त झालेल्या मनुष्यास नस्य व अंजन, इत्यादि क्रूरकर्म करूं नये; तर घृतपान, सूर्याचा जप, होम, मंत्र,इत्यादि करावीं.

पूजावल्युपहारशांतिविषयोहोमेष्टिमंत्रक्रियादानंस्वस्त्ययनं व्रतादिनियमःसम्यग्जपोमंगलं ॥ प्रायश्चित्तविधानमंजलि रथोरत्नौषधीधारणंभूतानामधिपस्यविष्टरपतेर्गौरीपतेरर्चनं ॥

अर्थ—पूजा, बळि, नैवेद्य, शांतिनिमित्त होम, मंत्र, दान, पुण्याहवाचन, व्रतनियम, जप, मंगल, प्रायश्चित, नमस्कार, मणि व औषधि यांचें धारण, विष्णु व सांब, यांचें पूजन इत्यादि भूतोन्मादावर उपचार करावे.

## महापैशाचिकघृत.

जटिलापूतनाकेशीचारटीमर्कटीवचा ॥ त्रायमाणाजयावीराचोर कंकटुरोहिणी ॥ कायस्थासूकरीछत्रासातिपत्रापलंकषा ॥ महापुरुषदंताचवयस्थानाकुलीद्वयं ॥ कटंभरावृश्चिकालीस्थिराचैतैर्घृतंपचेत् ॥ तत्तुचातुर्थिकोन्मादग्रहापस्मारनाशनं ॥ महापैशाचिकंनाम घृतमेतद्यथामृतं ॥ बुद्धिमेधास्मृतिकरंबालानांचांगवर्धनं ॥

अर्थ—जटामांसी, सुगंध जटामांसी, लघुनीली, कुहिली, वेखंड, त्रायमाण, शेवंती, भुयआवळी, गठोणा, कुटकी, हर्तकी, डुकरकंद, बडिशोप, साग, गोखरू, महाशतावरी, ब्राह्मी, दोन प्रकारची नाकुली, कुटकी, थोर आग्या, आणि उंदीरकानी यांच्या कल्कांत तूप घालून सिद्ध करावें. तें चातुर्थिक ज्वर, उन्माद, ग्रहबाधा व अपस्मार यांचा नाश करितें. हें महापैशाचिक घृत, अमृतासारिखें आहे. हें बुद्धि, मति व स्मृति यांला उत्पन्न करितें; आणि बाळकाला पुष्टि देतें.

## कल्याणकघृत.

कल्याणकंप्रयुंजीतमहद्वाचैत्तसंघृतं ॥
तैलंनारायणंवापिबृहन्नारायणंतथा ॥

अर्थ—कल्याणघृत, अथवा नारायणतेल, अथवा बृहन्नारायणतेल, हीं उन्मादावर योजावीं.

## उन्मादपथ्य.

गोधूममुद्गारुणशालयश्चधारोष्णदुग्धंशतधौतसर्पिः ॥ घृतंनवीनंचपु

रातनंचकूर्मामिषंधन्वरसारसाला ॥ पुराणकूष्मांडफलंपटोलंब्राह्मीद लंवास्तुकतंदुलीयं ॥ द्राक्षाकपित्थंपनसंचवैद्यैर्विधेयमुन्मादगदेषुपथ्यं ॥

अर्थ—गहूं, मूग, तांबड्या साळी, धारोष्ण दूध, नवें किंवा जुनें शंभर वेळां धुतलेलें तूप, कांसवाचें मांस, साकर, जुना कोहोळा, पडवळ, ब्राह्मी, चाकवत, तांदुळजा, द्राक्षें, कवठ, फणस इतके पदार्थ उन्मादरोगावर पथ्यास वैद्यांनी योजावे.

## उन्माद अपथ्य.

मद्यंविरुद्धाशनमुष्णभोजनंनिद्राक्षुधातृट्क्षुतवेगधारणं ॥
तिक्तानितीक्ष्णानिभिषक्समादिशेदुन्मादरोगोपहतोहिगर्हितं ॥

अर्थ—मद्य, विरुद्धाशन, उष्ण पदार्थांचें भक्षण, निद्रा, क्षुधा, तृषा, शिंक, यांच्या वेगाचें धारण, कडु, व तीक्ष्ण इतके उन्मादरोगावर निंद्य आहेत, असें वैद्यानें सांगावें.

---

# अपस्मार.

## कर्मविपाक.

गुरौस्वामिनिवस्तंयःप्रतिकूलंसमाचरेत् ॥
सोपस्मारीभवेत्तत्रकुर्याच्चांद्रायणंनरः ॥

अर्थ—जो गुरु किंवा स्वामी यांजवळ राहून त्यांचें प्रतिकूळ वागतो, त्याला अपस्मार व्याधि होतो, त्याणें चांद्रायण प्रायश्चित करावें.

ब्राह्मणश्वासरोधेनह्यपस्मारीभवेन्नरः ॥
वक्ष्येतस्यप्रतीकारंदानहोमक्रियाविधिः ॥

अर्थ—ब्राह्मणाच्या श्वासाचा रोध करणारा अपस्मारी होतो, त्याविषयीं दान व होम इत्यादिकांनीं प्रतीकार सांगतो.

## ज्योतिःशास्त्राभिप्राय.

शनिभूसुतदिननाथानिधनस्थायस्यजन्मकालेस्युः ॥ नानाव्याधिव धाद्यैःपीडांचापस्मारसंभवांतस्य ॥ अष्टमस्थानस्थशनिमंगलसूर्यजनितापस्मारशांतयेग्रहप्रीतयेपूर्वोक्तमेवसकलंजपादिकुर्यात् ॥

अर्थ—ज्याच्या जन्मकाळीं शनि, मंगळ आणि सूर्य हे अष्टमस्थानीं आले; तर त्याला ना

नाप्रकारच्या व्याधि, किंवा अपस्मार, यांपासून पीडा उत्पन्न होते, त्याणे अष्टमस्थानस्थ, शनि, मंगळ व सूर्य यांपासून झालेल्या अपस्माराच्या शांत्यर्थ व ग्रहतुष्ट्यर्थ पूर्वोक्त जपादि सर्व उपचार करावे.

## अपस्मारनिदान.

तमःप्रवेशसंरंभोदोषोद्रेकहतःस्मृतिः ॥
अपस्मारइतिज्ञेयोगदोघोरश्चतुर्विधः ॥

अर्थ—अंधकारांत प्रवेश केल्या सारिखें वाटणें, डोळे विकारयुक्त होणें, हस्तपाद विक्षेप होणे व वातादिकांच्या प्रकोपामुळें स्मृत्यात्मक ज्ञान नष्ट होणें, ह्या व्याधीला अपस्मार ह्मणतात; तो वात, पित्त, कफ, सन्निपात, या भेदेंकरून चार प्रकारचा जाणावा, याला फेंपरें किंवा घुरें ह्मणतात.

## पूर्वरूप.

हृत्कंपःशून्यतास्वेदोध्यानंमूर्च्छाप्रमूढता ॥
निद्रानाशश्चतस्मिंश्चअपस्मारेभविष्यति ॥

अर्थ—हृदयास कंप व शून्यपणा, घाम, मनाला व इंद्रियांना मोह, निद्रानाश, हीं अपस्माराचीं पूर्वरूपें जाणावीं.

## वातजन्य अपस्मार.

कंपतेप्रदशेद्दंतान्फेनोद्वामीश्वसत्यपि ॥
परुषारुणकृष्णानिपश्येद्रूपाणिचानिलात् ॥

अर्थ—वातिक अपस्माराचा ठायीं आंगास कंप सुटतो, रोगी दांत चावतो, तोंडाला फेंस येतो, श्वासोश्वास मोठ्यानें टाकितो; व आरक्त व कृष्णवर्ण अशीं रूपें पाहतो.

## पैत्तिक अपस्मार.

पीतफेनांगवक्त्राक्षःपीतासृग्रूपदर्शनः ॥
सतृष्णोष्मानिलव्याप्तलोकदर्शीचपैत्तिकः ॥

अर्थ—पित्तापस्माराचा ठायीं तोंडाला पिवळा फेण येतो; व हात, पांय, तोंड व डोळे हे पिवळे होतात; व त्याच्या डोळ्यांपुढें तांबडें पिवळे, असें रूप दिसतें; आणि तृष्णा उष्ण, वायु, पाणी अथवा तृष्णासंबंधीं उष्ण, श्वास व सर्व जगत् अग्नीनें व्याप्त झालें, असें पाहातो.

## कफापस्मार.

शुक्लफेनांगवक्त्राक्षःशीतहृष्टांगजोगुरुः ॥

पश्येच्छुक्लानिरूपाणिश्लैष्मिकोमुच्यतेचिरात् ॥

**अर्थ**—कफजन्य अपस्माराचा ठायीं तोंडाला पांढरा फेस येतो, हात, पाय, तोंड व डोळे हे पांढरे होतात; रोग्याचें शरीर फार थंड होतें, रोमांच उभे राहातात, आंगाला जड पणा येतो; पांढरीं रूपें पाहातो. हा फार वेळानें रोग्याला सोडितो.

## संनिपातापस्मारनिदान.

सर्वैरेभिःसमस्तैश्चालिंगैर्ज्ञेयस्त्रिदोषजः ॥

अपस्मारःसचासाध्योक्षीणश्चानश्वतश्चयः ॥

**अर्थ**—वातादि तीन ही दोषांचीं लक्षणें झालीं असतां; तो संनिपातात्मक अपस्मार जाणावा. तो असाध्य आहे; आणि जोक्षीण व भोजन न करणारा अशा ही पुरुषाचा अपस्मार असाध्य जाणावा.

## असाध्यलक्षण.

प्रस्फुरंतंचबहुशःक्षीणंप्रचालितभ्रुवं ॥

नेत्राभ्यांचाविकुर्वाणमपस्मारोविनाशयेत् ॥

**अर्थ**—जा अपस्मारामध्यें मनुष्य फार कांपतो, क्षीण होतो, ज्याच्या भिवई चंचल हो, त्ये,नेत्र फिरतात, त्याचा अपस्मार असाध्य जाणावा.

## अपस्माराचा काळ नियम सांगतो.

पक्षाद्वाद्वादशाहाद्वामासाद्वाकुपितामलाः ॥ अपस्मारायकुर्वंतिकिंचिद्वेगमथांतरं ॥ देवेवर्षत्यपियथाभूमौबीजानिकानिचित् ॥ शरदि प्रतिरोहंतितथाव्याधिसमुच्छ्रयः ॥

**अर्थ**—वातादिदोष पक्षानंतर अथवा बारादिवसानंतर, किंवा मासानंतर कुपित होऊन अपस्माररोग निर्माण करितात, अन्यदिवशीं सूक्ष्मरूपेंकरून असतात, यांविषयीं दृष्टांत काहीं बीजें पर्जन्य काळीं पर्जन्य पडला असतां; भूमिगत असतात; परंतु उगवत नाहींत, तींच बीजें शरत्कालीं आपल्या आपण उगवतात, याप्रमाणें व्याधीचा उद्भव स्वस्वकाळीं होतो असें जाणावें.

## मधुकघृत.

मधूकाद्विपलेकल्केद्रोणेचामलकीरसे ॥

तस्मिन्सिद्धंघृतप्रस्थंपित्तापस्मारभेषजं ॥

**अर्थ**—८ तोळे जेष्ठमधाचें चूर्ण व १०२४ तोळे आवळ्याचा रस, यांत बरोबर सिद्ध केलेलें ६४ तोळे घृत अपस्मारावर औषध आहे.

## काशघृत.

काशक्षीरेक्षुरसयोःकाश्मर्यष्टगुणेरसे ॥ कार्षिकैर्जीवनीयैश्चसर्पिः

प्रस्थंविपाचयेत् ॥ वातपित्तोद्भवंक्षिप्रमपस्मारंनियच्छति ॥

**अर्थ**–काशसंज्ञक तृणाचा काढा, आणि उंसाचा रस यांचे आठपट शिवणीचा रस त्यांत जीवनीय गणोक्त प्रत्येक औषधांचें चूर्ण, तोळा तोळा प्रमाण घालून त्यांत ६४ तोळे तूप कढवून सिद्ध करावें, तें वातपित्तापासून झालेला अपस्मार लवकर नाशितें.

## कफअपस्मारीं वचाद्यघृत.

वचाशम्याककैडर्यवयस्थाहिंगुचोरकैः ॥

सिद्धंपलंकषायुक्तंवातश्लेष्मात्मिकंघृतं ॥

**अर्थ**–वेखंड, बाहावा, घाणेरा करंज, आवळकाठी, हिंग, गठोणा व लघुगोखरू यांच्या कल्काबरोबर सिद्ध केलेलें तूप, अपस्मारनाशक आहे.

## मधुवचायोग.

यःखादेत्क्षीरभक्ताशीमाक्षिकेनवचारजः ॥

अपस्मारंमहाघोरंसुचिरोत्थंजयेत्ध्रुवं ॥

**अर्थ**–जो दूधभात जेवणारा मनुष्य वेखंडाचें चूर्ण मधाबरोबर खाईल तो फार दिवसांचा घोर अशा अपस्माराचा निश्चयें करून पराजय करील.

## मुस्तकमूलयोग.

उत्तरदिग्गतमुस्तकमूलंबुध्यासमुत्धृतंपेष्य ॥

पीतंपयसाहन्यादपस्मृतिंगोःसवर्णवत्सायाः ॥

**अर्थ**–नागरमोथ्याचें उत्तरेकडील मूळ, वासराचा आणि जीचा एकवर्ण अशा गाईच्या दूधांत वाटून जो पिईल; तो अपस्माराचा नाश करील .

## कूष्मांडकादियोग,

कूष्मांडकगिरोत्थेनरसेनपरिपेषितं ॥

अपस्मारविनाशाययष्ट्याव्हंसापिवेत्र्यहं ॥

**अर्थ**–कोहळ्याच्या गिराच्या रसांत जेष्ठीमध उगाळून प्यावी; ह्मणजे तीन दिवसांत अपस्माराचा नाश होईल.

## भैरवरसायन.

वचामृताव्योपमधूकसाररुद्राक्षसिंधूद्भवबार्हनानि ॥ फलंसमुद्रस्यर

सोनकल्कंध्मातंहिनासापुटमध्यदेशे ॥ अपस्मृतिश्लेष्ममरुच्छिरोरु कप्रलापतंद्राभ्रमजाड्यमोहान् ॥ ससंनिपातश्रुतिकाक्षिभंगान्सपीनसंहंतिहलीमकंच ॥ रसायनंभैरवनामधेयंज्ञातंविचारात्कविविठ्ठलेन ॥

अर्थ—वेखंड, गुळवेल, सुंठ, मिरें, पिंपळी, मोहाचा डीक, रुद्राक्ष, सधव, रिंगणीचें फळ, समुद्रफळ व लसूण हीं सर्व एकत्र वाटून नाकांत ओढावें; ह्मणजे अपस्मार वायु, कफ, मस्तकपीडा, बडबड, तंद्रा, भ्रम, जाड्य, मोह, सन्निपात, कर्णरोग, अक्षिभंग, पिनस, हलीमक, इतक्यांचा नाश करील. याला भैरव रसायन असें ह्मणतात. विठ्ठल पंडिताला विचारानें हें समजलें आहे.

## स्मृतिसागर रस.

रसगंधकतालानांसशिलाताम्रभस्मनां ॥ शुल्वानांमूर्च्छितानांचचूर्णंभाव्यं वचामृतैः ॥ एकविंशतिधापश्चाद्ब्राह्मीवारातथैवच ॥ कटभीबीजतैलेन भावयेदेकवारकं ॥ स्मृतिसागरनामायंरसोपस्मारनाशनः ॥ सर्पिषा माषमात्रोयंभुक्तोहन्यादपस्मृतिं ॥

अर्थ—पारा, गंधक, हरताळ, मनशीळ व ताम्रभस्म हीं शुल्व मूर्च्छित करून त्यांच्या चूर्णास वेखंड आणि ब्राह्मी यांच्या प्रत्येकीं एकवीस भावना देऊन ज्योतिष्मतीच्या तेलाची एक भावना द्यावी; ह्मणजे हा स्मृतिसागरनामक रस अपस्मारनाशक होतो, हा तुपाबरोबर मासाभार खावा.

## पानीयकल्याणघृत आपस्मारादिकांवर.

त्रिफलाद्वेनिशेकौंतीसारिवेद्वेप्रियंगुका ॥ शालिपर्णीपृष्ठपर्णीदेव दार्व्येलवालुकं ॥ नतंविशालादंतीचदाडिमंनागकेशरं ॥ नीलो त्पलैलामंजिष्ठाविडंगंकुष्ठपद्मकं ॥ जातीपुष्पंचंदनंचतालीसंबृहती तथा ॥ एतैःकर्पसमैःकल्कैर्जलंदत्वाचतुर्गुणं ॥ घृतप्रस्थंपचेद्धीमान पस्मारेज्वरेक्षये ॥ उन्मादेवातरक्तेचकासेमंदानलेतथा ॥ प्रतिश्याय कटीशूलेतृतीयकचतुर्थके ॥ मूत्रकृच्छ्रेविसर्पेचकंडूपांड्वामयेतथा ॥ विषद्वयेप्रमेहेषुसर्वथैवोपयुज्यते ॥ वंध्यानांपुत्रदंभूतयक्षरक्षोहरंस्मृतं ॥

अर्थ—हिरडा, बेहेडा, आवळकठी, हळद, दारुहळद, रेणुकबीज, काळी उपलसरी, पांढरी उपलसरी, वाघांटीचें मूळ, अथवा राळें, रानगांजा, रानभाल, देवदार, एलवालुक, तगर, कंवडळमूळ, डाळिंबाची साल, दांतीमूळ, नागकेशर, निळें कमळ, विलायची, गं-

जिष्ठ, वावडिंग, कोष्ठ, पद्मकाष्ठ, जाईचीं फुलें, चंदन, तालीसपत्र व रिंगणी हीं अठ्ठावीस औषधें कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्याच्या चौपट पाणी घेऊन त्यांत तो कल्क व तूप शेष राहीं तों पर्यंत पाक करून नंतर तें तूप गाळून पोटांत घ्यावें. तेणें करून फेंपरें, ज्वर, क्षयरोग, उन्मादरोग, वातरक्त, खोकला, अग्निमांद्य, पडसे, कंबरेचा शूल, तृतीयकज्वर, चातुर्थिकज्वर, मूत्रकृच्छ्र, इसब पायाना होतो तो, पांडुरोग, सर्पादिकांचे विषाविकार, बचनागादिक विषविकार व परमा हे रोग दूर होतात; व हें तूप वांझोटया बायकांस पुत्र देतें; व या तुपापासून भूतबाधा दूर होते.

## शंखपुष्पीघृत.

शंखपुष्पीवचाकुष्ठैःसिद्धंब्राह्मीरसेघृतं ॥
पुराणंहंत्यपस्मारंमेध्यमुन्मादनाशनम् ॥

अर्थ—शंखाहुली, वेखंड, कोष्ठकोळिंजन यांचें चूर्ण तूप व ब्राह्मीचा रस एकत्र शिजवून रस आटला ह्मणजे तूप सिद्ध झालें, तें फार दिवसांचा अपस्मार व [illegible] यांचें नाशक आहे.

## सैंधवादिघृत.

घृतसैंधवहिंगुभ्योकर्षैर्वातैश्चतुर्गुणैः ॥
मूत्रैःसिद्धमपस्मारंहृद्ग्राहयामनाशनं ॥

अर्थ—तूप, सैंधव व हिंग हीं एक एक तोळा आणि बारा तोळे गोमूत्र घेऊन एकत्र शिजवावें, मूत्र आटलें ह्मणजे तूप सिद्ध झालें, तें तूप अपस्मार व हृद्रोग यांचें नाशक आहे.

## ब्राह्मीघृत.

ब्राह्मीरसेवचाकुष्ठशंखपुष्पीभिरेवच ॥
पक्वंपुरातनंसर्पिरपस्मारहरंघृतं ॥

अर्थ— ब्राह्मीच्या रसांत वेखंड, कोष्ट, शंखपुष्पी, जुनें तूप घालून सिद्ध करावें, तें अपस्माराचा नाश करितें.

## कूष्मांडघृत.

कूष्मांडकरसेसर्पिरष्टादशगुणेपचेत् ॥
यष्टयाव्हकल्कैस्तत्पानादपस्माराविनाशनं ॥

अर्थ -एक भाग तूप, आणि अठरा भाग कोहाळ्याचा रस, याप्रमाणें घेऊन पक्क करून जेष्ठीमधाच्या चूर्णाबरोबर खावें; तें अपस्मारनाशक आहे.

## पंचगव्यघृत.

गोशकृद्रसदध्यम्लक्षीरमूत्रैःसमंघृतं ॥

सिद्धंचातुर्थिकोन्मादग्रहापस्मारनाशनं ॥

**अर्थ**—गाईच्या शेणाचे पाणी, दहीं, महाळुंग, दूध, व गोमूत्र, यांच्या बरोबर सिद्ध केलेले तूप, चातुर्थिकज्वर, उन्माद, ग्रह व अपस्मार यांचे नाशक आहे.

## अपस्मार नस्य.

अरण्यत्रपुसीचूर्णनस्येनापस्मृतिंजयेत् ॥

**अर्थ**—लघुराळे, कंवडळ यांचें चूर्णाचें नस्य अपस्मारनाशक आहे,

निर्गुंडीभवअक्रूरंनावनांजनयोगतः ॥

उपैतिसहसानाशमपस्मारोनसंशयः ॥

**अर्थ**—निर्गुंडीच्या रसांत अक्रोड उगाळून नस्य, किंवा अंजन केलें असतां; तात्काळ अपस्माराचा नाश करील यांत संशय नाहि.

श्वशृगालबिडालानांकपिलानांगवामपि ॥

पित्तानिनस्यतोहन्युरपस्मारंपृथक्पृथक् ॥

**अर्थ**—कुत्रें, कोल्हा, मांजर, कपिला गाय, या प्रत्येकांच्या पित्ताचे नस्य केलें असतां; अपस्मार नाश पावतो.

## अंजन.

[illegible]नःपित्तमपस्मारघ्नमंजनम् ॥

तदेवसर्पिषायुक्तंधूपनंपरमंहितम् ॥

**अर्थ**—पुष्यनक्षत्राचे ठायीं कुथ्याचें पित्त काढून अंजन करावें; अथवा मिश्र करून धूप करावा; ह्मणजे अपस्माराचा नाश करितें.

मनोव्हाताक्ष्यंकंचैवशकृत्पारावतस्यच ॥

अंजनंहंत्यपस्मारमुन्मादंचविशेषतः

**अर्थ**—मनशीळ, रसांजन व पारव्याची विष्ठा यांचें अंजन अपस्मार व उन्माद यांचा नाश करितें.

यष्टिहिंगुवचावज्रीशिरीषलशुनामयैः ॥

साजमूत्रैरपस्मारेसोन्मादेनावनांजने ॥

**अर्थ**—जेष्ठीमध हिंग, वेखंड, निवडुंगाचा चीक, शिरीस, लसूण व कोष्ठकोळिंजन यांचें अंजन आणि नस्य, बोकडाचें मुता बरोबर केलें असतां; अपस्मार व उन्माद हे रोग जातात.

करंजदारुसिद्धार्थकठभीरामठंवचा ॥ समंगात्रिफलाव्योषप्रियंगुश्चसमांशकः ॥ बस्तमूत्रेणसंपिष्टानस्यपानांजनादिषु ॥

योज्योयोगोयमुन्मादेपस्मारेभूतरोगिषु ॥

अर्थ–करंज, देवदार, पांढऱ्या मोहोऱ्या, मालकांगोणी, हिंग, वेखंड, मंजिष्ठ, त्रिफळा, त्रिकटु व राळे हीं सर्व समभाग घेऊन बोकडाच्या मुतांत वाटून प्यावें; व अंजन करावें. हा योग अपस्मार, उन्माद व भूतोन्माद, याचे ठिकाणीं योजावा.

नकुलोलूकमार्जारगृध्रकीटाहिकाकजैः ॥

तुंडैःपक्षैःपुरीपैश्चधूपनंकारयेद्भिषक् ॥

अर्थ–मुंगूस, घुबड, मांजर, गिधाड, किड, सर्प व कावळा इतक्यांची, तोंडें, पक्ष व विष्टा यांचा धूप अपस्मारनाशक आहे.

दुश्चिकित्स्योह्यपस्मारश्चिरकारीमहागदः ॥ तस्माद्रसायनैरेतैःप्राय शःसमुपाचरेत् ॥ त्दृत्कंपोक्षिरुजायस्यस्वेदोहस्तादिशीतता ॥ दश मूलीजलंतस्यकल्याणाज्यंचयोजयेत् ॥

अर्थ–अपस्माररोग कष्टसाध्य, फारदिवस राहाणारा, असा आहे, यास्तव अपस्मार प्रकरणीं जीं रसायनें सांगीतली आहेत, त्यांणीं बहुतकरून उपचार करावा; आणि त्दृद यास कंप, डोळ्यांस पीडा, अंगास घाम, हातापायांस गारपणा, असें ज्यास असेल त्याला दशमुळांचा काढा आणि कल्याणघृत योजावें.

## त्रिकत्रयलेह.

त्रिकत्रयसमायुक्तंजीवनीययुतंतथा ॥

हंत्यपस्मारमुन्मादंवातव्याधिंसुदुस्तरां ॥

अर्थ–हरडा, बेहेडा, आवळकाठी, सुंठ, मिरीं, पिंपळी, दालचिनी, एलची, तमाल, पत्र, आणि जीवनीयगण या सर्वांचा लेह करावा. तो अपस्मार, उन्माद, आणि दुस्तर वातरोग यांचा नाश करितो.

## कल्याणचूर्ण.

पंचकोलंसमरिचंत्रिफलाबिडसैंधवं ॥ कृष्णाविडंगपूतीकयवानीधा न्यजीरकं ॥ पीतमुष्णांबुनाचूर्णवातश्लेष्मामयापहं ॥ अपस्मारेत थोन्मादेदुर्नामग्रहणीगदे ॥ एतत्कल्याणकंचूर्णनष्टस्याग्नेश्चदीपनं ॥

अर्थ–सुंठ, मिरें, पिंपळी, चवक, चित्रक, मिरें, त्रिफला, बिडलोण, सैंधव, पिंपळी, वावडिंग, करंज, ओंवा, धनें व जिरें यांचें चूर्ण ऊन पाण्या बरोबर प्यालें असतां; वातश्लेष्मरोग, अपस्मार, उन्माद, दुर्नाम, संग्रहणी, याचें नाशक व अग्निदीपक होतें. याला कल्याणक चूर्ण ह्मणतात,

## लेप व डाग.

गोमूत्रयुक्तैःसिद्धार्थैःप्रलेपोद्वर्तनंहितं ॥

धूमस्तीक्ष्णानिनस्यानिदाहःसूच्याकपोलयोः ॥

अर्थ--अपस्मारीरोग्याला मोहऱ्या गोमूत्रांत वाटून त्यांचा आंगाला लेप, किंवा उटणें, किंवा धूम, तिखट नस्यें व गालावर सुईचे डाग, हे उपचार करावे.

द्वौकीटमेषौविधिवदानीयरविवासरे ॥

कंठेभुजेवासंधार्यजयेदुग्रामपस्मृतिं ॥

अर्थ--दोन वाळूंतील भोंवर किडे रविवारी आणून कंठ, किंवा भुजें, यांत धारण करावे. ते उग्र अपस्माराचा नाश करितात.

## चंदनादिअवलेह.

चंदनंतगरंकुष्ठंत्रिसुगंधीचवास्तुकं ॥ मंजिष्ठाभीरुमृद्वीकापाठाश्या माप्रियंगुभिः ॥ स्वयंगुप्तापीलुपर्णीविपरास्नागवादनी ॥ कंकोलि जीवकोमेदपुष्करंघनवालकं ॥ शाल्मलीनस्यनिर्यासस्तुगाकालीय कंतथा ॥ तिंत्तिडीकंचवृक्षाम्लंत्रिफलाकाश्मरीफलं ॥ जातीफलंतु गोक्षीरीकृष्णागरुचनागरं ॥ खर्जूरंचसमांशानिसूक्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ भावितंबीजपूरस्यस्वरसेनचसप्तधा ॥ समशर्करयायुक्तामाटरूपर सेनतु ॥ भावितंसप्तधातत्तुनात्रकार्याविचारणा ॥ एपलेहःसदाश स्तोह्यपस्मारेसुदारुणे ॥ उन्मादेकामलारोगेपांडुरोगेहलीमके ॥ रक्तपित्तेराजरोगेपित्तातीसारपीडिते ॥ रक्तातिसारशोथेचशिरोरो गेसदाज्वरे ॥ तमकेस्तन्यरोगेचच्छर्दौदाहेमदात्यये ॥ अष्टादशसु मेहेषुकासेश्वासेसपनिसे ॥ बालानांचहितंतच्चशृणुमात्रामतःपरं ॥ उत्तमाकर्षमात्रातुपादहीनातुमध्यमा ॥ बलवीर्यकरीप्रोक्तासयःग र्वेगुणाभवेत् ॥ नरकुंजरवाहानांचोपयुक्तोहितोमतः ॥ चंदनाद्यो महायोगःकृष्णात्रेयेणपूजितः ॥

अर्थ--चंदन, तगर, कोष्ठ, दालचिनी, एलची, तमालपत्र, चाकवत, मंजिष्ठ, शता- वरी, द्राक्षे, पाहाडमूळ, हरीतकी, राळे, कुहिली, मोरवेल, अतिविष, रास्ना, वृंदावन, कंकोळ, जीवक, मेदा, पोखरमूळ, नागरमोथे, वाळा, सांवरीचा चीक, वंशलोचन, दा-

रुहळद, चिंच, आमसोल, हरडा, बेहेडा, आवळकाठी, शिवणीचीं फळें, जायफळ, तवकीर, कृष्णागर, सुंठ, आणि खारीक, हीं समभाग, घेऊन चूर्ण करून एकत्र करावीं त्या सर्व चूर्णासमान साकर घालून त्याला महाळुंगाचा रस व अडुळशाचा रस, यांच्या सात सात भावना द्याव्या. हा लेह. दारुण अपस्मार, उन्माद, कावीळ, पांडुरोग, हलीमक, रक्तपित्त, राजयक्ष्मा, पित्तातिसार, रक्तातिसार, सूज, मस्तकरोग, सततज्वर, तमक, स्तन्यरोग, वांति, दाह, मदात्यय, अष्टादश कुष्ठें, मेह, खोकला, दमा व पीनस, यांवर द्यावा; व हा बालानां हितकारक आहे. ह्याचें १० माशांचें उत्तम मान ७॥ माशांचें मध्य. म हा घेतला असतां; बल व वीर्य यांतें करितो; व हा मनुष्य, हत्ती, घोडे, या सर्वांच्या उपयोगीं व हितकारक आहे. हा चंदनादि अवलेह कृष्ण आत्रेयानें सांगितला.

## द्राक्षाद्यवलेह.

द्राक्षादारुनिशायुतंसमधुकंकृष्णाविशालात्रिवृत्पृथ्वीकात्रिफलाविडंगकटुकंश्रीचंदनंबालकं ॥ चातुर्जातकनिंबकांचनतुगातालीसपत्रंघनंमेदाद्वौसुरदारुकुष्ठकमलंधात्रीसमंगाबला ॥ भार्ङीकोलकदाडिमाम्लसहितंकाश्मर्यशृंगाटकंकाचाव्हामलघंटिकालघुतराक्षुद्राचरास्नायुतं ॥ चूर्णंशर्करयासमंमधुघृतंखर्जूरकैःसंयुतंलिह्यात्कर्षमिदंसमस्तबलवान्हन्यादपस्मारकं ॥ उन्मादंचसुदारुणंक्षयमथोगुल्मंसपांडुंतथाकासश्वासमसृक्प्रवाहमुदरंस्त्रीणांहितंशस्यते ॥

अर्थ–द्राक्षे, दारुहळद, ज्येष्ठीमध, पिंपळी, कंवडळ, तेज, एलची, हरडा, बेहेडा, आवळकाठी, वावडिंग, कुटकी, चंदन, वाळा, दालचिनी, तमालपत्र, एलची, नाकेशर, कडुलिंब, कांचनार, वंशलोचन, तालीसपत्र, नागरमोथा, मेदा, महामेदा, देवदार, कोष्ठ, कमळ, आवळकाठी, मंजिष्ठ, चिकणा, भारंगमूळ, बोर, डाळिंब, शिवण, शिंगाडे, हळद, कापूर, थोर ताग, लहान ताग, रिंगणी व रास्ना हे सर्व समभाग घेऊन यांच्या सर्व चूर्णासमान साकर, मध, तूप व खारीक घालून तो लेहासारखा करून ठेवावा- त्यांतून दाहा मासे द्यावा; ह्मणजे बलवान् अपस्मार, उन्माद, क्षय, गुल्म, पांडुरोग, खोकला, दमा, प्रदर, उदर, बाळंतरोग यानां शमवितो.

## शास्त्रार्थ.

पूर्वंयुंज्यादपस्मारेबुद्धिमान्छर्दनादिकं ॥ वातिकंबस्तिभिःप्रायः पैत्तिकंप्रायंविरेचनैः ॥ कफजंवमनप्रायैरपस्मारमुपाचरेत् ॥

अर्थ-अपस्मारव्याधीवर पूर्वी बुध्दिमंत वैद्यानें वांति इत्यादिक द्यावीं. वातिक अपस्मार प्रायः बस्तिकर्मांनीं जिंकावा; व पैत्तिकाला विरेचन द्यावें; आणि कफज अपस्मारावर वमन द्यावें.

## पलंकषातैल.

पलंकषावचापथ्यावृश्चिकाल्यर्कसर्षपैः ॥ जटिलापूतनाकेशीला गलीहिंगुरोचकैः ॥ लशुनातिरसोचित्रोकुष्ठैरेभिश्चपक्षिणां ॥ मांसाशिनांयथालाभंबस्तमूत्रेचतुर्गुणे ॥ सिद्धमभ्यंजनंतैलमपस्मारविनाशनं ॥

अर्थ–रास्ना, वेखंड, हरीतकी, थोर आग्या, रुई, शिरस, जटामांसी, सुगंध जटामांसी, कळलावी, हिंग, पादेलोण, लसुण, मोरवेल, चित्रक, कोष्ठ, यांचे काढे व वल्क आणि मांस खाणाऱ्या पक्ष्याचे मांसरस व शेळीचें मूत्र सर्वांच्या चौपट एकत्र करून त्यांत तेल घालून सिद्ध करावें, तें अपस्माराचा नाश करितें.

## कटभ्यादितैल.

कटभीनिंबकटुंगमधुशिग्रुत्वचारसे ॥
सिद्धंमूत्रयुतंतैलमभ्यंगार्थंप्रशस्यते ॥

अर्थ–मालकांगोणी, कडुलिंब, गोडा शेवगा व दालचिनी यांचा काढा, व गोमूत्र यांचे बरोबर सिद्ध केलेले तेल अपस्मारावर अभ्यंगाविषईं प्रशस्त आहे.

## शिग्रुतैल.

शिग्रुकुष्ठवचाजाजिलशुनव्योपहिंगुभिः ॥
बस्तमूत्रेशृतंतैलंनावनंस्यादपस्मृतौ ॥

अर्थ–शेवगा, कोष्ठ, वेखंड, जिरें, लसूण, त्रिकटु व हिंग, हीं सर्व समभाग बोकडाच्या मूत्रांत घालून त्यांत तेल कढवावें, तें नस्याचे योगानें अपस्मारनाशक आहे.

तैलप्रस्थंघृतप्रस्थंजीवनीयैःप्रलेपनैः ॥
क्षीरद्रोणेपचेसिद्धमपस्मारविमोक्षणं ॥

अर्थ–तेल अथवा तूप, ६४ तोळे घेऊन जीवनीयगणोक्त औषधांचे चूर्णाबरोबर १०२४ तोळे दुधांत कढवून सिद्ध करावें, तें अपस्मारनाशक आहे.

अभ्यंगेसार्षपंतैलंबस्तमूत्रेचतुर्गुणे ॥
सिद्धंस्याद्गोशकृन्मूत्रेस्नानाच्छादनमेवच ॥

अर्थ–शिरसाचें तेल, बोकडाचे मुतांत, अथवा गाईचे शेणाचें पाणी व गोमूत्र यांत सिद्ध करून अभ्यंग करावें, तें अपस्मारनाशक आहे.

## अपस्मारपथ्य.

लोहिताःशालयोमुद्गागोधूमाःप्रततंहविः ॥ कूर्मामिषंधन्वरसोदुग्धं ब्राह्मीजलंवचा ॥ पटोलंवृत्धकूष्मांडंवास्तुकंस्वादुदाडिमं ॥ सौभांजनं

पयःपेटीद्राक्षाधात्रीपरूषकं ॥ अपस्मारगदेनृणांपथ्यमेतदुदीरितं ॥

अर्थ–तांबड्या साळी, मूग, गहु, जुनें तूप, कांसवाचे मांस, धमाशाचें पाणी, दूध, ब्राह्मी, वाळा, वेखंड, पडवळ, जुना कोहोळा, चाकवत, गोड डाळिंब, शेवगा, पयःपेटी, द्राक्षे, आवळा व फालसा, हीं अपस्मारावर पथ्यकारक आहेत.

## अपस्मार अपथ्य.

चिंताशोकभयक्रोधमद्भुतंदर्शनानिच ॥ मद्यमत्स्यविरुद्धान्नंतीक्ष्णोष्ण गुरुभोजनं ॥ अतिव्यवायमायासंपूज्यपूजाव्यतिक्रमं ॥ पत्रशाकानि सर्वाणिबिंबीमाषाढकंफलं ॥ तृषानिद्राक्षुधावेगानपस्मारीनरस्त्यजेत् ॥

अर्थ–चिंता, शोक, भय, क्रोध, अद्भुत पदार्थांचें दर्शन, मद्य, मांस, विरुद्धान्न, तिखट, ऊष्ण, जड असें भोजन, अतिस्त्रीगमन, आयास, पूज्य व पूजक यांचा बदल, संपूर्ण पत्रशाका, तोंडलें, उडीद, तुरी, ताहान, निद्रा, क्षुधा, यांच्या वेगाचें धारण हा वर्ग अपस्माररोग्यानें सोडावा.

---

# वातव्याधि कर्मविपाक.

देवानांब्राह्मणानांवाधनापहरणात्तथा ॥
स्वामिद्रोहाद्वातरोगीभवेदस्यापिनिष्कृतिः ॥

अर्थ–देव किंवा ब्राह्मण याच्या धनाचा अपहार, किंवा धनाचा द्वेष केला असतां; वातरोग होतो, त्याची निष्कृति करावी.

## वातरोगहर.

गुरुप्रत्यर्थितांयातोवातरोगीभवेन्नरः ॥
नाममंत्रेणकुर्वीतजपंहोमंचशांतये ॥

अर्थ–जो गुरुशीं द्वेष करितो, तो वात रोगी होतो; त्याणें त्या वातरोगाच्या शांत्यर्थ पुढें सांगावयाचे जे अच्युत, अनंत व गोविंद इत्यादि नाममंत्र त्याणीं जप व होम करावा.

## धनुर्वातहर.

अनिच्छंत्यक्षतांयस्तुउपभुंक्तेपरस्त्रियं ॥ बलादाक्रम्यसनरःसर्वसंधिषु वेदनां ॥ तीव्रामाप्नोत्यरुचिमान्धनुर्वातयुतोभवेत् ॥ ज्वरीतदुपशांत्यर्थंमहिषीदानमाचरेत् ॥ कृच्छ्रातिकृच्छ्रौकुर्वीतचांद्रायणमथापरं ॥

सूर्यनामजपंचैवशक्त्याब्राह्मणतर्पणं ॥ नामत्रयंजपेन्मर्त्योरोगशांत्यर्थ मात्मनः ॥ सहस्रनामकंचापिस्तोत्रंसम्यग्विधानतः ॥ अच्युतानंत गोविंदेत्येतन्नामत्रयंद्विजः ॥ अयुतत्रितयावृत्याजपेद्रोगस्यशांतये ॥

**अर्थ**—इच्छा न करणारी व अक्षतयोनि अशा परस्त्रीचा बलात्कारानें जो उपभोग करितो, त्याच्या सर्व संधीत तीव्रकळा व अरुचि, धनुर्वायु आणि ज्वर, हे रोग होतात. त्याणें तच्छांत्यर्थ महिषीदान, कृच्छ्र, अतिकृच्छ्र व चांद्रायण हीं प्रायश्चित्तें व सूर्यनामाचा जप, ब्राह्मणभोजन,नाममंत्राचा जप, सहस्रनामाचा जप, हें विधानपूर्वक करावें. नाममंत्र अच्युत, अनंत, गोविंद, ह्या तीन नामांचा ३० हजार जप करावा; ह्मणजे रोगापासून मुक्त होतो.

## पक्षवातहर.

सभायांपक्षपातीचजायतेपक्षघातवान् ॥ निष्कत्रयमितंहेमसदद्याच्च द्विजातये ॥ श्राद्धंचवैष्णवंकुर्यादात्मनोहितमिच्छता ॥ सप्तधा न्यानिदद्याच्चगोदानंतत्रकारयेत् ॥

**अर्थ**—सभेमध्यें पक्षपात करणाराला पक्षघात वायु होतो, तच्छमनार्थ त्याणें तीन निष्क हेम ब्राह्मणाला द्यावें; व विष्णुश्राद्ध व सप्तधान्याचें दान आणि गोदान करावें.

## रक्तवातहर.

रक्तवस्त्रप्रवालानांहारीस्याद्रक्तवातवान् ॥
सवस्त्रांमहिषींदद्यात्पद्मरागसमन्वितां ॥

**अर्थ**—जो तांबडीं वस्त्रें व पोंवळीं इत्यादिक चोरतो, तो वातरक्ती होतो. त्याणें पद्मरागासहवर्तमान सवस्त्र ह्मैस दान करावी.

## रक्तवातपित्तहर.

सवर्णागमनेवातरक्तवान्जायतेनरः ॥ सवर्णागमनेवातपित्तवा नपिजायते ॥ लक्ष्मीनारायणंरूपंसुवर्णेनप्रकल्पयेत् ॥ फलेनवात दर्धेनतदर्धेनाथवापुनः ॥ लक्ष्मीनारायणंरूपंसर्वदासर्वकामिकं ॥

**अर्थ**—सवर्णस्त्रीशीं गमन करणारा वातरक्तवान् किंवा वातपित्तवान् होतो, त्याणें चार दोन अथवा एक तोळा सुवर्णाची लक्ष्मीनारायणमूर्ति करून ती दान द्यावी. ही लक्ष्मीनारायणमूर्ति सर्वकाळीं सर्व कामनांविषयीं दान करावी.

## वातपित्तहर.

लशुनंगृंजनंतालफलंवाश्नातियोद्विजः ॥
सवातपित्तरोगीचभवेच्चांद्रायणंचरेत् ॥

अर्थ—लसूण, गाजर, किंवा तालफळें जो ब्राह्मण असून भक्षण करितो, तो वातपित्तरोगी होतो; त्याणें चांद्रायण प्रायश्चित्त करावें.

## ज्योतिःशास्त्राभिप्रायेण वातव्याधिनिदान.

अतिमारुतरोगार्तोपरस्वहारीविलोलमतिचेष्टः ॥
कर्कटसंस्थेभानौस्वपुत्रदृष्टेपुमान्पिशुनः ॥

अर्थ—जन्मकाळीं कर्कराशीला सूर्य असून शनिदृष्ट असेल तर तो पिशुन, वातरोगी, चोर व चंचळमतीचा असा पुरुष होतो.

वातपित्तोद्भवापीडाहीनजैर्ह्यविग्रहः ॥
विदेशगमनंचापिसौरीमध्येयदाशिखी ॥

अर्थ—जन्मकाळीं शनि, किंवा केतु आले तर वातपित्त होतें; व हीनजातीपासून बंधन होतें, अथवा विदेशगमन होतें.

वायुरायुर्बलंवायुर्वायुर्धाताशरीरिणां ॥ वायुर्विश्वमिदंसर्वंप्रभुर्वायुः प्रकीर्तितः ॥ अशीतिवातजारोगाजायंतेतत्प्रकोपतः ॥ सामान्यंभेषजंतेषांस्नेहनंस्वेदनंतथा ॥ विशेषेणतुयद्दृष्टमुच्यतेत्रसमासतः ॥

अर्थ—वायु जिवाचें आयुष्य, बल, आधार, पोषक, सर्व विश्वाचा आत्मा व प्रभु असा आहे. त्याच्या प्रकोपानें ८० प्रकारचे वातरोग होतात. त्याविषयीं सामान्य औषधें, स्वेदन व स्नेहन, हीं आहेत; परंतु मीं विशेष पाहिला तो संक्षेपेंकरून सांगतो.

## वातव्याधिनिदान.

रूक्षशीताल्पलघ्वन्नव्यायामातिप्रजागरैः ॥ विषमादुपचाराच्चदोषासृक्स्रवणादपि ॥ लंघनप्लवनात्यध्वव्यायामातिविचेष्टनैः ॥ धातूनांसंक्षयाच्चिंताशोकरोगातिकर्षणात् ॥ वेगसंधारणादामादभिघातादभोजनात् ॥ मर्मबाधाद्गजोष्ट्राश्वशीघ्रयानादिसेवनात् ॥ देहेस्रोतांसिरिक्तानिपूरयित्वानिलोबली ॥ करोतिविविधान्व्याधीन्सर्वांगैकांगसंश्रयान् ॥

अर्थ—रूक्ष, थंड, थोडें व लघु असें अन्न, श्रम, जागरण, नमानतील ते उपचार; व मल, मूत्र, कफ, पित्त, इत्यादिदोष; आणि रक्त, यांचें अतिगमन, खाडा इत्यादिकांवरून उडीमारणें, पाण्यांत बुडणें, अतिमार्गगमन, मेहेनत, अयासकारक चेष्टा, रसादिधातूंचा क्षय, चिंता, शोक, दीर्घरोगानें कृशपणा, मलमूत्रादिवेगधारण, आमांश, लांकडादिकांचा मोटा धक्का, उपवास, मर्माला पीडा, हत्ती, उंट, अश्व यांवरून जलद गमन. याकारणानीं वायु देहामध्यें रिक्त झालेले नाडीमार्ग पूर्ण करून आपण बलवान् होऊन एकांगाला किंवा सर्वांगाला होणाऱ्या अशा अनेक वात्तरोगांला उत्पन्न करितो.

## वायूचें पूर्वरूप.

अव्यक्तंलक्षणंतेषांपूर्वरूपमितिस्मृतं ॥

अर्थ–त्या वातव्याधीचे जें अव्यक्त लक्षण त्यालाच पूर्वरूप समजावें.

## रूप सांगतो.

आत्मरूपंतुतद्व्यक्तमपायोलघुतापुनः ॥ संकोचःपर्वणांस्तंभोभंगोस्थ्नांप र्वणामपि ॥ लोमहर्षःप्रलापश्चपार्श्वपृष्ठशिरोग्रहः ॥ खांजपांगुल्यकुब् जत्वंशोथोंगानामनिद्रता ॥ गर्भशुक्ररजोनाशःस्पंदनंगात्रसुप्तता ॥ शिरोनासाक्षिजत्रूणांग्रीवायाश्चापिहुंडनं ॥ भेदस्तोदार्तिराक्षेपोमोहश्चा यासएवच ॥ एवंविधानिरूपाणिकरोतिकुपितोनिलः ॥ हेतुस्थानविशे षाच्चभवेद्रोगविशेषकृत् ॥

अर्थ–वातरोगाचें जें व्यक्त लक्षण तें त्याचें रूप. तें असें; अंगनाश, शरीराला हलकेप- णा, संधींचा संकोच, हाडें व सांधे, यांचा स्तंभ आणि भंग, रोमांच, बडबड व बर- गड्या, पाठ आणि मस्तक, हे जखडून राहणें व लंगडेपणा, पांगळेपणा, कुबडेपणा, कोणतेही भागाला सूज, निद्रानाश, व गर्भ, शुक्र व रज यांचा नाश, कंप, आंगाला मेहरी व मस्तक, नासिका, नेत्र आणि मान हीं आंत जाणें किंवा वांकडी होणें, टोंच ल्या सारिखी पीडा, शूळ, ठणका, आक्षेपक, मोह व आयास इत्यादि रूपें कुपित वायु करितो. तसाच हेतुविशेष व स्थानविशेष या कारणानीं विशिष्ट रोग उत्पन्न करितो.

## वातचिकित्सोपक्रम.

अभ्यंगंस्वेदनंबस्तिर्नस्यंलेहोविरेचनं ॥ स्निग्धाम्ललवणस्वादुवृष्यंवा तामयापहं ॥ स्वाद्वम्ललवणैःस्निग्धैराहारैर्वातरोगिणः ॥ अभ्यंगस्नेह बस्त्याद्यैःसर्वानेवोपपादयेत् ॥ पित्तेनावरणेवातरोगेशीतोष्णभेषजं ॥ कफसावरणेवायौरूक्षोष्णंभक्ष्यभेषजं ॥ केवलेपवनव्याधौस्निग्धोष्णं भक्ष्यभेषजं ॥ स्निग्धोष्णरूक्षशीताद्यैर्वातजोयोनशाम्यति ॥ विकारा स्तत्रविज्ञेयादुष्टशोणितसंभवाः ॥

अर्थ–अंगाला तेलादिक लावणें, घाम, बस्तिकर्म, नस्य, लेह, रेचक, हे व स्निग्ध, आंबट, खारट व गोड हे रस, वृष्यपदार्थ व वातनाशक पदार्थ, गोड, आंबट, खारट, स्निग्ध, असे आहार व आंगास तेलादिक लावणें, स्नेहन व बस्ति इत्यादि उपचार क- रावे; आणि पित्तयुक्त वायु असतां; शीतोष्ण औषध द्यावें, तोंच कफाधिक असला तर रूक्ष व उष्ण असें औषध व आहार द्यावा, केवल वातविकारावर स्निग्ध व उष्ण असें

अन्न व औषध द्यावें. जो वातव्याधि स्निग्ध, उष्ण, रूक्ष, शीत इत्यादि उपचारानीं शांत होत नाहीं, तर तो दुष्ट रक्ताश्रित विकार जाणावा.

## दुसरा प्रकार.

मधुरलवणमम्लंस्निग्धमस्योष्णनिद्रागुरूरविकरबस्तिस्वेदसंतर्पणानि ॥
दहनदलविशेषाभ्यंतसंमर्दनानिप्रकुपितपवमानंशांतमेतानिकुर्युः ॥

अर्थ—गोड, खारट, आंबट, स्निग्ध, ऊष्ण, निद्रा, ऊन, बस्ति, घाम, तर्पण, अग्नि, ऊनपाणी, अभ्यंग, आणि अंगमर्दन हे उपचार कोपलेल्या वायूच्या शांत्यर्थ करावे.

## तिसरा प्रकार.

वातरोगस्त्वसाध्योयंदैवयोगात्सुसिध्यति ॥
अनुमानेनकुर्वंतिवैद्यकंतत्प्रतिज्ञया ॥

अर्थ—वातरोग असाध्य आहे, हा दैववशेंकरून बरा होतो; आणि वैद्य ही औषध अनुमानानें देतात, कोणी प्रतिज्ञा करून देत नाहींत.

## कोष्ठगतवातलक्षण.

वातेकोष्ठाश्रितेदुष्टेनिग्रहोमूत्रवर्चसोः ॥
वर्ध्मंत्दृद्रोगगुल्मार्शःपार्श्वशूलंचजायते ॥

अर्थ—कोष्ठाश्रित वायु दुष्ट झाला असतां; मल व मूत्र हीं बंद होतात; आणि अंडवृद्धि, त्दृद्रोग, गुल्म, अर्श व पार्श्वशूल, हे विकार होतात.

## कोष्ठलक्षण.

स्थानान्यामाग्निपक्कानांमूत्रस्यरुधिरस्यच ॥
त्दृदुंदुकःफुप्फुसश्चकोष्ठइत्यभिधीयते ॥

अर्थ—अमाशय, पक्काशय, अग्न्याशय, मूत्राशय, रुधिराशय, त्दृदय, उंदुक, (पोट) व फुप्फुस यांना कोष्ठ संज्ञा आहे.

## अमाशयोक्त.

अत्रद्वितीयंदिनमारभ्यषड्दिनपर्यंतमामाशयोक्तषट्चरणयोगोदेयः ॥

अर्थ—दुसऱ्या दिवसापासून या व्याधीवर आमाशयावर सांगीतलेला षट्चरण योग द्यावा.

## कोष्ठवातचिकित्साक्रम.

विशेषतस्तुकोष्ठस्यवातेक्षीरंपिबेन्नरः ॥ व्योषसौवर्चलाजाजीपथ्या लवणपंचकं ॥ सारिवाबृहतीपाठाकलिंगाग्नियवाग्रजं ॥ चूर्णीकृतंद

धिसुरातन्मंडोष्णांबुकांजिकैः ॥ पिबेदग्निविवृध्यर्थकोष्ठवातहरंपरं ॥

**अर्थ**—कोष्ठगत वातविकार झाला असतां; विशेषें करून दुग्ध प्राशन करावें; आणि सुंठ, मिरीं, पिंपळी, पादेलोण, जिरें, हरीतकी, लवण, टांकणखार, सैंधव, बिडलोण, संचळ, उपलसरी, रिंगणी, पाहाडमूळ, इंद्रजव, चित्रक व यवखार यांचें चूर्ण दहीं, मद्य, ताकाची निवळी, गरम पाणी व कांजी यांतून एकाशीं द्यावें, तें अग्नि वृध्दि करितें; आणि कोष्ठवायूचा नाश करितें.

## चिकित्सा.

पाचनीयैरसैर्युक्तैरन्यैर्वापाचयेन्मलान् ॥

विशेषतःपिबेत्क्षीरंनरःकोष्ठगतेनिले ॥

**अर्थ**—पचन करणाऱ्या रसाशीं कोणतेंही पाचक औषध देऊन मल पचन करावें; परंतु कोष्ठाश्रित वातविकार असतां; विशेषेंकरून दूध प्यावें.

## आमाशयगतवातलक्षण.

ह्रत्पार्श्वोदरनाभीरुक्तृष्णोद्गारविषूचिकाः ॥

कासःकंठास्यशोषश्चश्वासश्चामाशयेनिले ॥

**अर्थ**—आमाशयगत वातविकार झाला असतां; ह्रदय, पार्श्वभाग व बेंबी यांमध्ये तिडका, ताहान, ढेंकर, रेच, खोकला, गळा व तोंड यांला शोष आणि श्वास हे विकार होतात.

## आमाशयलक्षण.

नाभिस्तनांतरंजंतोराहुरामाशयंबुधाः ॥

**अर्थ**—नाभि व स्तन यां मध्यें आमाशय आहे, असें पंडित सांगतात.

## आमाशयगतवातचिकित्सा.

आमाशयस्थेत्वनिलेप्रशस्तंप्राग्भोजनंदीपनपाचनंच ॥

प्रच्छर्दनंतीक्ष्णविरेचनंचमुद्गायवाःशालियुताःपुराणाः ॥

**अर्थ**—आमाशयगत वायूवर भोजनाच्या पूर्वी दीपन व पाचन द्यावें; आणि वांति व तीक्ष्ण रेचक द्यावें; व जुने मुग, यव व साळी हे पदार्थ त्याला द्यावे.

## आमाशयगतवात.

आमाशयगतेवातेछर्दिःस्वापोयथाक्रमं ॥

देयःषट्चरणोयोगःसप्तरात्रमथांबुना ॥

**अर्थ**—आमाशयाश्रित वायु झाला असतां; वांति व निद्रा हे उपचार करावे; किंवा षट्चरणयोग सातदिवस पाण्याशीं द्यावा.

### षट्चरणयोग.

चित्रकेंद्रयवापाठाकटुकातिविषाभया ॥
महाव्याधिप्रशमनोयोगःषट्चरणःस्मृतः ॥

अर्थ–चित्रक, इंद्रजव, पाहाडमूळ, कुटकी, अतिविष आणि हरीतकी हा षट्चरण योग महान्व्याधीचें शमन करितो.

### तीन काढे.

भूतीकपथ्याशठिपुष्कराणिबिल्वामृतादारुकनागराणि ॥
उग्राविषामागधिकाबिडानिक्काथास्त्रयःसामसमीरणघ्नाः ॥

अर्थ– ओंवा, हरीतकी, कचोरा व पुष्करमूळ यांचा; किंवा बेलफळ, गुळवेळ, देवदार व सुंठ यांचा; अथवा वेखंड, अतिविष, पिंपळी व बिडलोण यांचा काढा द्यावा. हे तीनही काढे आमवातनाशक आहेत.

प्रातःपिबेदुष्णजलेनयत्नाच्छिन्नामरीचंस्हृदयानिलघ्नं ॥
गुडेनवानागरदारुचूर्णंत्हृद्वातपीडापरिपीडितस्तु ॥

अर्थ–गुळवेल व मिरीं, यांचे चूर्ण प्रातःकाळीं ऊनपाण्याशीं घ्यावें; किंवा सुंठ, देवदार, यांचें चूर्ण गुळाशीं द्यावें; ह्मणजे त्हृदयवायुची पीडा नाश पावत्ये.

### पक्काशयस्थवायु.

पक्काशयस्थोंत्रकूजंशूलाटोपौकरोतिच ॥
मूत्रकृच्छ्रपुरीपत्वमानाहंत्रिकवेदनां ॥

अर्थ–पक्काशयगत वायूचा कोप झाला असतां; आंतड्यांत कुरकुरशब्द, शूल, पोटांत गुडगुडशब्द, मूत्रकृच्छ्र, मलमूत्रस्तंभ, पोट फुगणें, आणि तिड्यांत ठणका हे विकार करितो.

### चिकित्सा.

वन्हेःसंवर्धनंकार्यंकर्मोदावर्तिकंतथा ॥
देयःस्नेहविरेकश्चपक्काशयगतेनिले ॥

अर्थ–पक्काशयगत वायु कुपित झाला असतां; अग्नि प्रदीप्त करून उदावर्तावरच उपचार करावा; आणि स्निग्ध विरेचन द्यावें.

वातेजठरगेदद्यात्क्षारचूर्णादिदीपनं ॥
शुंठीकुटजबीजाग्निचूर्णंकोष्णांबुकुक्षिगे ॥

अर्थ–उदरांतला वायु कुपित झाला असतां; क्षारचूर्णादि दीपन औषध द्यावें; व कुक्षिगतवायु कुपित झाल्यावर सुंठ, इंद्रजव व चित्रक यांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर घ्यावें.

पक्काशयगतेवातेहितंस्नेहैर्विरेचनं ॥
बस्तयःशोधनीयाश्चप्राशाश्चलवणोत्तराः ॥

अर्थ—पक्काशयगत वायु दुष्ट झाला असतां; स्निग्ध, विरेचन, शोधन करणारें बीस्त व लवण यांशीं युक्त प्राशसंज्ञक औषधें द्यावीं.

## हृदयवात.

हृदयानिलनाशायगुडूचींमरिचान्वितां ॥
पिबेत्प्रातःप्रयत्नेनमुखतप्तांभसासह ॥

अर्थ—हृदयांतला वायु नाश पावण्याकरितां गुळवेल, मिरें, हीं ऊनपाण्यांत वाटून प्रातःकाळीं द्यावीं.

पिबेदुष्णांभसापिष्टंसाश्वगंधंबिभीतकं ॥
गुडयुक्तंप्रयत्नेनहृदयानिलनाशनं ॥

अर्थ—आस्कंद, बेहेडा व गूळ, हे ऊनपाण्यात वाटून प्यावें; ह्मणजे हृदयांतील वायु नाश पावतो.

देवदारुसमायुक्तंनागरंपरिपेषितं ॥
हृद्वातवेदनायुक्तःपीत्वासुखमवाप्नुयात् ॥

अर्थ—देवदार, सुंठ, यांचें चूर्ण ऊनपाण्याबरोबर प्यावें; ह्मणजे हृदयांतले वायूच्या वेदना दूर होऊन सुख पावेल.

## सर्वांगवातलक्षण.

सर्वांगपवनेक्रुद्धेगात्रस्फुरणभंजनं ॥
वेदनाभिःपरीतास्यस्फुटंतीवास्यसंधयः ॥

अर्थ—सर्वांगाचा ठायीं वायु कुपित झाला असतां; गात्राचें स्फुरण होतें; व गात्रें मोडल्या सारिखीं होतात; आणि आंग वेदनायुक्त असून संधींत फूट लागत्ये.

## चिकित्सा.

सर्वांगगतमेकांगगतंवास्यसमीरणं ॥
तैलावगाहनंहंतितोयवेगमिवाचलः ॥

अर्थ—दुष्ट वायु सर्वांगांत असो किंवा एकांगांत असो, त्यावर आंगाला तेल लाऊन ऊन पाण्यानें स्नान करावें; ह्मणजे तो नाश पावतो, जसा पर्वत उदकवेगाला बंद करितो.

## अवशिष्टवात.

प्रलापेभीरुतापेचप्रसुप्तौचित्तवैकृते ।

स्वेदनाशेबलक्षैण्येकौशिकःसघृतोहितः ॥

अर्थ—प्रलाप, भीरुताप, प्रसुप्ति, चित्तवैकृत, स्वेदनाश व बळक्षीणता, इतक्याचे ठायीं घृतयुक्त गुग्गुळ प्रशस्त आहे.

शब्दाज्ञतामयेचापिलेहःकल्याणकोहितः ॥ शीततांरोमहर्षचशि
रापूरणमेवच ॥ कटुतिक्तैर्जयेद्रव्यैःस्नेहस्वेदनमर्दनैः ॥

अर्थ—शब्दाची अज्ञता या रोगावर कल्याणलेह हितकारक आहे; आणि शीतता, रोमहर्ष, शिरापूरण यांवर कडु स्निग्ध व स्वेदन इत्यादि औषधें व मर्दन हे उपचार योग्य आहेत.

वाताप्रवृत्तिरुद्गारमंत्रकूजनमेवच ॥
निरूहबस्तिनाथांगकाठिन्यंस्नेहगाहनात् ॥

अर्थ—वारा नसरणें, ढेंकरा देणें व आंतडी वाजणें यांवर निरूहबस्ति द्यावा; आणि शरीराचा कठिणपणा, स्निग्ध पदार्थांनीं स्नान करून घालवावा.

## कुरंटकादिकाढा.

सहचरामरदारुसनागरंक्कथितमंभसितैलविमिश्रितं ॥
पवनपीडितदेहगतिःपिबन्द्रुतविलंबितगोभवतीच्छया ॥

अर्थ—पिंवळा कोरांटा, देवदार व सुंठ यांचा काढा एरंडेल मिश्र करून प्यावा; म्हणजे ज्याचें शरीर वायुनें जखडलें असेल तरी नीट होऊन तो शीघ्र व मंद जसा पाहिजे तसा चालेल.

## महारास्नादि.

रास्नैरंडामृतोग्रासहचरचविकारामसेनाब्दभार्ङीदीप्यानंतायवानीवृ
किमुरक्रमिजिच्छृंगिशुंठीबलाभिः ॥ मूर्वातिक्तासमंगाद्विविषश
ठिवरापिप्पलीयावशूकैरक्तश्रीखंडकारग्वधकटुकफलैर्वत्सवृश्चीकयु
क्तैः॥ सर्वैरेतैर्दशांघ्रिप्रयुतसमलवैःसाधितोष्टावशेषःक्काथोरास्नादि
रादौमहदुपपदवान्कौशिकोक्तोनिहंति॥सर्वांगैकांगवातान्श्वसनक
सनतृट्स्वेदशैत्यातितंद्राशूलंतूनीप्रतूनींगलगदनिखिलांगव्यथाकंप
खल्लीः ॥ विश्वाचीश्लीपदामानिलनिखिलमहासूतिकारोगसुप्ति
जिव्हास्तंभापतानंस्फुटनविमथनःक्लीबताक्षेपकौब्जं ॥ शोभाटोपा
पतंत्रार्दितखुडनहनुगृध्रसीपादशूलंवायुंश्लेष्मोत्थरोगानपिगिरितन
यावल्लभेनोपदिष्टः ॥

अर्थ–रास्ना, एरंडमूळ, गुळवेल, वेखंड, पीतकोरांटा, चवक, कवचबीज, नागरमोथा, भारंगमूळ, ओंवा, किरमाणी ओंवा, पाहाडमूळ, देवदार, वावडिंग, कांकडशिंगी, सुंठ, चिकणामूळ, मोरवेल, कुटकी, मंजिष्ठ, काळें व पांढरें अतिविष, कचोरा, हरडा, बेहेडा, आवळकाठी, पिंपळी, जवखार, रक्तचंदन, बाहव्याचा मगज, कायफळ, कुटज, रक्त घेंटोळी व दशमूळें हीं सर्व समभाग घेऊन त्यांचा अष्टमांश काढा करावा. हा महारास्नादि काढा कौशिकानें सांगीतला. हा सर्वांगवात, एकांगवात, श्वास, कास, घाम, शैत्य, अतितंद्रा, शूल, तूनी, प्रतूनी, गलरोग, सर्वांगांतला ठणका, कंप, वात, खल्लीवात, विश्वाची, श्लीपद, आमवात, संपूर्ण नाळंत रोग, सुप्तिवात, जिव्हास्तंभ, अपतान, ठणका, दुखणें, क्लीबवात, आक्षेपक, कुब्जवात, सूज, आटोप, अपतंत्र, अर्दित, खुडवात, हनुग्रह, गृध्रसी, पादशूल; आणि वातश्लेष्मव्याधि हीं नाश करितो, असें शिवानीं सांगीतलें आहे.

## दुसरा प्रकार.

रास्नाद्विगुणभागास्यादेकभागास्तथापरे ॥ धन्वयासबलैरंडदेवदारुशठीवचा ॥ वालकोनागरंपथ्याचव्यमुस्तापुनर्नवा ॥ गुडूचीवृधदारुश्चशतपुष्पाचगोक्षुरः ॥ अश्वगंधाप्रतिविपाकृतमालःशतावरी ॥ कृष्णासहचरश्चैवधान्यकंबृहतीद्वयं ॥ एभिःकृतंपिबेत्क्वाथंशुंठीचूर्णेनसंयुतं ॥ कृष्णाचूर्णेनवायोगराजगुग्गुलुनाथवा ॥ अजमोदादिनावापितैलेनैरंडजेनवा ॥ सर्वांगकंपेकुब्जत्वेपक्षाघातेवबाहुके ॥ गृध्रस्यामामवातेचश्लीपदेचापतानके ॥ अंत्रवृद्धौतथाध्मानेजंघाजानुगदेर्दिते ॥ शुक्रामयेमेंढ्रवातेवंध्यायोन्यामयेषुच ॥ महारास्नादिराख्यातोब्रह्मणागर्भधारणे ॥

अर्थ– रास्ना २ भाग, १ धमासा, चिकणा, एरंडमूळ, देवदार, कचोरा, वेखंड, अडुळसा, सुंठ, हरीतकी, चवक, नागरमोथा, पुनर्नवा, गुळवेल, वृध्दारु, शोप, गोखरु, अश्वगंध, अतिविष, बाहवा, शतावरी, पिंपळी, कोरांटा, धने, रिंगणी व डोरली, हीं सर्व समभाग व रास्ना मात्र दोन भाग घालून अष्टमांश काढा उतरून आंत सुंठीचें चूर्ण, किंवा पिंपळीचें चूर्ण, अथवा योगराज गुग्गुल, अजमोदिक; किंवा एरंडतैल घालून घ्यावा; ह्मणजे सर्वांगकंप, कुब्जवात, पक्षाघात, अवबाहुक, गृध्रसी, आमवात, श्लीपद, अपतान, अंत्रवृद्धि, आध्मान, जंघावात, जानुवात, अर्दित, शुक्रदोष, मेंढ्रवात, वंध्येचे योनिरोग, इतक्यांवर हा महारास्नादिकाढा सांगीतला आहे. हा गर्भधारक आहे, असें ब्रह्मदेवानें सांगीतलें.

## महाबलादि काढा.

महाबलामूलमहौषधाभ्यांक्काथंपिबेन्मिश्रितपिप्पलीकं ॥
शीतंसकंपंपरिदाहयुक्तंविनाशयेत्द्वित्रिदिनप्रयुक्तः ॥

अर्थ– मोठ्याचिकण्याचें मूळ व सुंठ यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून घ्यावा; ह्मणजे शीतवात, कंपवात व दाह यांचा दोन तीन दिवसांत नाश करितो.

## पंचमूलादियोग.

पंचमूलीकृतःक्काथोदशमूलीकृतोथवा ॥
रूक्षस्वेदस्तथानस्यंमन्यास्तंभेप्रशस्यते ॥

अर्थ– पंचमुळांचा काढा, किंवा दशमुळांचा काढा, रूक्षस्वेद व नस्य हे मानेच्या स्तंभावर उपचार करावे.

## वाजिगंधादि काढा.

वाजिगंधाबलास्तिस्रोदशमूलीमहौषधं ॥
गृध्रनख्यौचरास्नाचगणोमारुतनाशनः ॥

अर्थ– आस्कंद, चिकणा, मोठा चिकणा, लघुचिकणा, दशमुळें, सुंठ, बोर, लघुबोर, रास्ना यांचा काढा वातनाशक आहे.

## समीरदावानल.

भल्लातकानांशकलानिकृत्वात्रिकोलमानंपरिगृह्यवैद्यः ॥ चतुःपलंतोयम
न्वितोयंक्काथोचतुर्थांशमितंप्रगृह्य ॥ सिताहविर्गोपयमिश्रितंचकोलंप
लार्धपलमेकयुक्तं ॥क्रमेणपीतोखलुहंतिवातान्समीरदावानलनामधेयः ॥

अर्थ– बिब्याचे तुकडे १॥ तोळा व पाणी ४ तोळे यांचा काढा चतुर्थांश शेष पाणी उरलें ह्मणजे काढून घ्यावा. त्यांत साकर ॥ तोळा, तूप २ तोळे, गाईचें दूध ८ तोळे घालून पुनः कढवून ताकाबरोबर प्यावा, तो सर्ववातनाशक आहे. ह्याला समीरदावानल असें ह्मणतात.

## गुदस्थितवायुकार्य.

ग्रहोविण्मूत्रवातानांशूलाध्मानाश्मशर्कराः ॥
जंघोरुत्रिकहृत्पृष्ठरोगशोफोगुदेस्थिते ॥

अर्थ–गुदस्थानीं वायूचा कोप झाला असतां; मळ, मूत्र व अपानवायु यांचा प्रतिबंध, शूळ, पोट फुगणें, मुतखडा, शर्करा व मांड्या, पोटऱ्या, तिडे, पाठ यांत शूल आणि सूज हे रोग करितो.

## चिकित्सा.

वातेगुदाश्रितेदुष्टेकर्मोदावर्तिकंहितं ॥

अर्थ–गुदाश्रित वात दुष्ट झाल्यास त्यावर, उदावर्तावरचे उपचार करावे.

## चिकित्साक्रम.

दशमूलीकषायेणमातुलुंगरसेनवा ॥

पिबेदेरंडतैलंवावस्तिकुक्षिगुदेश्रिते ॥

अर्थ–बस्ति, कुक्षि व गुद, या ठिकाणींचा वात कुपित झाल्यावर दशमुळांचे काढ्या बरोबर, अथवा महाळुंगाचे रसाबरोबर एरंड तेल प्यावें.

## श्रोत्रादिगतलक्षण.

श्रोत्रादिष्विंद्रियवधंकुर्यात्क्रुद्धः समीरणः ॥

अर्थ–कर्णादि इंद्रियांचे ठायीं क्रुद्ध झालेला वायु इंद्रियांचा नाश करील.

## चिकित्सा.

श्रोत्रादिष्वनिलेदुष्टेकार्योवातहरःक्रमः ॥

स्नेहाभ्यंगोपनाहाश्चमर्दनालेपनानिच ॥

अर्थ–कर्णादि इंद्रियांचे ठायीं दुष्ट झालेल्या वायूवर वातनाशक उपचार करावे. ते स्नेहपान, अभ्यंग, उपनाह, मर्दन व लेप, इत्यादि जाणावे.

## जृंभा.

पीत्वैकंश्वासमलिलंपुनस्त्यजतिवेगवान् ॥

आलस्यनिद्रायुक्तश्चसजृंभइतिकथ्यते ॥

अर्थ–एक श्वास पिऊन शांत न जाहल्या तों दुसरा घेऊन कोंडलासा होऊन जोराने टाकितो; व आलस्य निद्रा यांणीं युक्त असतो, त्याला जृंभ असें ह्मणतात.

## चिकित्सा.

शुंठीपिप्पल्यूषणंदीप्यकश्चसिंधूद्भवंचेतिसर्वंपृथग्वा ॥

तद्रूपंवासूक्ष्मचूर्णीकृतंवाजृंभाभंगस्तत्क्षणस्यात्सदैव ॥

अर्थ–सुंठ, पिंपळी, मिरें, ओंवा, सैंधव हीं सर्व किंवा एका एकाचें चूर्ण करून, किंवा नुसतींच सेवन केलीं तर तत्काळ जृंभेच्या वेगाचा नाश होईल.

जृंभावेगेसमुत्पन्नेशोभनेशयनेनरं ॥

स्वापयेत्तेननियमाज्जृंभावेगःप्रशाम्यति ॥

अर्थ–जृंभावेग उत्पन्न झाल्यावर चांगली शय्या करून निजावें; ह्मणजे नियमेंकरून जृंभावेग शांत होतो.

## जृंभाचिकित्सा.

जृंभावेगःक्षयंयातिकटुतैलेनमर्दनात् ॥
भोजनात्स्वादुभोज्यानांतथातांबूलभक्षणात् ॥

अर्थ–जांभईचा वेग शिरसाचें तेल चोळल्यानें, गोडपदार्थांच्या भोजनानें, किंवा तांबूल भक्षणानें नाश पावतो.

## प्रलापक.

स्वहेतुकुपिताद्वातादसंबत्धंनिरर्थकं ॥
वचनंयन्नरोब्रूतेसप्रलापःप्रकीर्तितः ॥

अर्थ–आपल्या कारणानें कुपित झालेल्या वायुपासून ज्यांत संबंध नाहीं व अर्थ नाहीं असें भाषण बोलतो; त्याला प्रलापक ह्मणतात.

## चिकित्सा.

सतगरवरतिक्तारेवतांभोदतिक्तानलदतुरगगंधाभारतीहारहूराः ॥
मलयजदशमूलाशंखपुष्प्यःसुपक्काःप्रलपनमतिहन्युःपानतोनातिदूरात् ॥

अर्थ–तगर, पित्तपापडा, बाहावा, नागरमोथा, कटुकी, वाळा, आस्कंद, ब्राह्मी, काळीं द्राक्षें, चंदन, दशमूळें व शंखाहुली यांचा काढा घ्यावा, तो लवकर प्रलापकाचा नाश करील.

## रसाज्ञाननिदान.

भुंजानस्यनरस्यान्नंमधुरप्रभृतीन्रसान् ॥
रसनायन्नजानातिरसाज्ञानंतदुच्यते ॥

अर्थ-अन्न व मधुर इत्यादि रस, खाणाऱ्या मनुष्याची जिव्हा मधुर किंवा आंबट इत्यादि जाणत नाहीं, त्याला रसाज्ञान ह्मणतात.

## चिकित्सा.

घर्षेज्जिव्हांजडांसिंधुत्र्यूषणैःसाम्लवेतसैः ॥ आम्लवेतसकाभावेचुक्रं दातव्यमीरितं ॥ किराततिक्तकःकट्वीकुटकस्यफलंत्वचा ॥ ब्राह्मीफ लंचपालाशंराजिकाकृष्णजीरकं ॥ पिप्पलीपिप्पलीमूलंचित्रंनागरमू षणं ॥ एषांकल्कैर्मुहुर्घर्षेज्जिव्हिकामार्द्रिकारसैः ॥ तेनसम्यग्विजाना तिरसनासकलान्रसान् ॥

अर्थ–जिव्हा जड झालेली सैंधव, त्रिकटु व फालसा यांच्या चूर्णानें घांसावी. आम्लवेतस न मिळेतर आमसोल घ्यावें; अथवा काडेकिराईत, कटुकी, इंद्रजव, कुड्याची साल, ब्राह्मी, पळसपापडी, मोहोऱ्या, शाहाजिरें, पिंपळी, पिंपळमूळ, चित्रक, सुंठ व मिरें यांचें चूर्णानें किंवा त्यांचा आल्याचे रसाशीं कल्क करून त्यानें वारंवार जीभ घांसावी, तेणेंकरून जिव्हा सर्व रस जाणते.

## किरातादिकल्क.

कल्कःकिराततिक्तादिर्जिव्हायाःशून्यतांहरेत् ॥

अर्थ–किराततिक्तादि कल्क वर सांगितला आहे; तो जिव्हेची शून्यता हरण करील.

## त्वक्शून्यतानिदान.

स्पृश्यमानात्वचायातुशीतोष्णंमृदुकर्कशं ॥
नजानातिबुधैस्त्वक्साशून्येतिपरिकीर्त्यते ॥

अर्थ–त्वचेला स्पर्श केला असतां; शीत, उष्ण, मृदु व कठीण हे जाणत नाहीं; त्याला त्वक्शून्यता ह्मणतात.

## चिकित्सा.

सुप्तवातेत्वसृङ्मोक्षंकारयेद्बहुशोभिषक् ॥
दिह्याच्चलवणागारधमैस्तैलसमन्वितैः ॥

अर्थ–सुप्तवातावर वारंवार रक्तमोक्ष करावा; आणि सैंधव, घरोसा व तेल एकत्र करून त्याचा लेप करावा.

## रसगतवायूचें लक्षण.

त्वग्रूक्षास्फुटितासुप्ताकृशाकृष्णाचतुद्यते ॥
आतन्यतेसरागाचमर्मरुक्त्वग्गतेनिले ॥

अर्थ–त्वचेमध्यें वात कोपला असतां;त्वचा रूक्ष,फुटिळ, मेहेरलेली. पातळ,काळी व तींत टोंचल्या प्रमाणें पीडा,लाल होऊन ओढल्या सारखी, मर्मस्थानीं पीडा इत्यादि उपद्रव कारितो.

## रक्तगतवायूचें लक्षण.

रुजस्तीव्राःससंतापावैवर्ण्यंकृशतारुचिः ॥
गात्रेचारूंषिभुक्तस्यस्तंभश्चासृग्गतेनिले ॥

अर्थ–रक्तगतवातकोप झाला असतां; अत्यंत पीडा, संताप, विवर्णता, कृशपणा, अरुचि, आंगावर व्रण व भोजनोत्तर आंगाचा स्तंभ हे विकार करितो.

## मांसगत वायु.

गुर्वंगंतुद्यतेत्यर्थंदंडमुष्टिहतंयथा ॥

सरुक्स्तिमितमत्यर्थंवातेमांससमाश्रिते ॥

अर्थ–वायु मांसाश्रित झाला असतां; आंग जड होतें, दुखतें, ताठतें, दांड्यानें किंवा मुष्टीनें चेंचल्या सारिखें दुखतें; व अत्यंत निश्चळ होतें.

## मेदाश्रितवातलक्षण.

तथामेदाश्रितःकुर्याद्ग्रंथीन्मंदरुजोव्रणान् ॥

अर्थ–मेदाश्रित वायु झाला असतां; अंगावर गांठी किंवा थोडे दुखणारे व्रण यानां उत्पन्न करितो.

## अस्थिवातक्षण.

भेदोस्थिपर्वणांसंधिशूलंमांसबलक्षयः ॥

अस्वप्नःसंततारुक्चवातेदुष्टेस्थिसंश्रिते ॥

अर्थ–वायु दुष्ट होऊन अस्थिमध्यें राहिला असतां; हाडें व पेरें, यांचा ठायीं ठणका, आंगाच्या संधीचा ठायीं शूल, मांस व बल यांचा क्षय, निद्रानाश, आणि अंगांत निरंतर ठणका हे विकार होतात.

## मज्जागतवातलक्षण.

वातेमज्जागतेपीडानकदाचित्प्रशाम्यति ॥

अर्थ–दुष्ट वायु मज्जाश्रित झाला असतां; अंगांतील ठणका केव्हांही शांत होत नाहीं.

## शुक्रगतवातलक्षण.

क्षिप्रंमुंचातिबध्नातिशुक्रंगर्भमथापिवा ॥

विकृतिंजनयेच्चापिशुक्रस्थःकुपितोऽनिलः ॥

अर्थ–शुक्रगत वायु कुपित झाला असतां; गर्भाला किंवा शुक्राला बाधतो; किंवा विवर्णादि करितो; किंवा सोडतो; अथवा गर्भ आणि शुक्र यांला विकृति उत्पन्न करितो.

## सप्तधातुगतवातचिकित्सा.

वायौत्वगाश्रितेस्नेहोभ्यंगःस्वेदश्चकारयेत् ॥

रक्तस्थेशीतलान्लेपान्विरेकंरक्तमोक्षणं ॥

अर्थ–त्वग्गत वायु दुष्ट झाला असतां; स्नेहपान, अभ्यंग व घाम काढणें हे उपचार करावे; रक्तगत झाला असतां; शीतल लेप, विरेचन व रक्तमोक्ष हे उपचार करावे.

## मांसमेदोगत.

मांसमेदोगतेवातेसविरेकंनिरूहणं ॥

अर्थ–मांसगत व मेदोगत वायु कुपित झाला असतां; विरेक, निरूहबस्ति हे उपचार करावे.

## अस्थिमज्जागत.

अस्थिमज्जागतेस्नेहंबहिरंतश्चयोजयेत् ॥

अर्थ—अस्थिगत व मज्जागत वायु कुपित झाला असतां; स्नेहपान व स्नेहानें मर्दन हे उपचार करावे.

## केतकादि तैल.

केतकनागबलातिबलानांयद्बहुलेनरसेनविपक्कं ॥

तैलमनल्पतुषोदकसिक्थंमारुतमस्थिगतंविनिहंति ॥

अर्थ—केवडा, चिकणा व मोठा चिकणा यांचा पुष्कळ रस आणि तुसाचें पुष्कळ पाणी घेऊन त्यांत सिद्ध केलेलें तेल, अस्थिगत वायुचा नाश करील.

## शुक्रगत.

हर्षोन्नपानंशुक्रस्थेबलशुक्रकरंहितं ॥

अर्थ—शुक्रगत वायु कोपला असतां, हर्षोत्पादन आणि बल व धातु यांना वाढविणारें असें अन्न व पान द्यावें, तें हितकारक आहे.

## शिरागतवायु.

कुर्याच्छिरागतःशूलंशिराकुंचनपूरणं ॥

सबाह्याभ्यंतरायामंखल्लींकुब्जत्वमेवच ॥

अर्थ—शिरागतवायूचा कोप झाला असतां; शूळ, शिरा आंखुडणें, शिरा स्थूल होणें, बाह्यायाम, अंतरायाम, खल्लीवात; किंवा कुब्जवात, इत्यादि विकार करितो.

## चिकित्सा.

स्नेहाभ्यंगोपनाहांश्चमर्दनालेपनानिच ॥

वातेशिरागतेकुर्यात्तथाचासृग्विमोक्षणं ॥

अर्थ—शिरागत वायूवर स्नेहपान, आंगाला तेलमर्दन, पोंड, मर्दन, लेप आणि रक्त काढणें, हे उपचार करावे.

## स्नायुगतवातलक्षण.

शूलमाक्षेपकःकंपःस्तंभःस्नाय्वनिलेभवेत् ॥

अर्थ—स्नायुगत वातामध्यें शूल, वातरोग, कंप व स्तंभ हीं लक्षणें होतात.

सर्वांगैकांगरोगांश्चकुर्यात्स्नायुगतोनिलः ॥

अर्थ—स्नायुगतवात कुपित झाला असतां; सर्वांगरोग किंवा एकांग रोग यांना उत्पन्न करितो.

## चिकित्सा.

स्वेदोपनाहाग्निकर्मबंधनोन्मर्दनानिच ॥
कुर्यात्स्नायुगतेवातेकारयेत्कुशलोभिषक् ॥

अर्थ—स्नायुगतवातावर घाम काढणें, पेंड बांधणें, डाग देणें, बांधणें व मर्दन करणें हे उपचार कुशल वैद्यानीं करावे.

## संधिगतवातनिदान.

हंतिसंधिगतःसंधीन्शूलशोथौकरोतिच ॥

अर्थ—संधिगतवायूचा कोप झाला असतां; संधीचा नाश, शूल व सूज हे विकार करितो.

## सामान्य चिकित्सा.

कुर्यात्संधिगतेवातेदाहस्वेदोपनाहनं ॥

अर्थ—संधिगतवायूवर चांचे, घामकाढणें व पेंड बांधणें इत्यादि उपचार करावे.

## इंद्रवारुणी चूर्ण.

इंद्रवारुणिकामूलंमागधीगुडसंयुतं ॥
भक्षयेत्कर्षमात्रंतत्संधिवातंव्यपोहति ॥

अर्थ—कडुवृंदावनाचें मूल, पिंपळी, आणि गूळ हीं एकत्र करून तें एक तोळाभर भक्षण करावें; म्हणजे संधिवात नाश पावतो.

## पित्तकफाश्रित प्राण.

प्राणेपित्तावृतेच्छर्दिर्दाहश्चैवोपजायते ॥
दौर्बल्यंसदनंतंद्रावैरस्यंकफकावृते ॥

अर्थ—प्राणवायु पित्तयुक्त दुष्ट झाला; असतां; वांति, आणि दाह उत्पन्न करितो; व तोच कफयुक्त कोपला असतां; दुर्बलपणा, आंग गळणें, झापड व तोंड बेचव होणें हे विकार करितो.

## पित्तकफाश्रित उदान.

उदानेपित्तयुक्तेतुदाहोमूर्छाभ्रमःक्लमः ॥
अस्वेदहर्षौमंदाग्निःशीतताचकफावृते ॥

अर्थ—पित्तयुक्त उदानवायु दुष्ट झाला असतां; दाह, मूर्छा, भ्रम व अनायास श्रम, हे विकार करितो; व तोच उदानवायु कफयुक्त दुष्ट झाला असतां; घाम येत नाहीं, रोमांच उभारतात, अग्निमंद होतो; आणि थंडी वाजत्ये.

## पित्तकफाश्रित समान.

स्वेददाहौष्ण्यमूर्छाःस्युःसमानेपित्तसंयुते ॥

कफेनसंगोविण्मूत्रेगात्रहर्षश्चजायते ॥

अर्थ–पित्तयुक्त समानवायु कोपला असतां; घाम, दाह, उष्णता व मूर्छा हे विकार करितो, तोच कफयुक्त कोपला असतां; मळमूत्राचा अवरोध; आणि रोमांच उभारणे हे विकार करितो.

## पित्तकफाश्रित अपान.

अपानेपित्तयुक्तेतुदाहौष्ण्यंरक्तमूत्रता ॥

अधःकायेगुरुत्वंचशीततचकफावृते ॥

अर्थ–पित्तयुक्त अपानवात कोपला असता; दाह,उष्णता,आणि लघ्वी रक्तासारखी हे विकार करितो, तोच कफयुक्त कोपला असतां; कमरेखालीं शरीर जड व थंडी हे विकार करितो.

## पित्तकफाश्रित व्यान.

व्यानेपित्तावृतेदाहोगात्रविक्षेपणंक्लमः ॥

स्तंभनोदंडकश्चापिशोथशूलौकफावृते ॥

अर्थ–व्यानवायु पित्ताश्रित झाला असतां; दाह, आंग गळणें व श्रम हीं लक्षणें होतात; व कफाश्रित जाहाला तर; आंग ताठणे, सूज व शूल हीं लक्षणें होतात.

## चिकित्सा.

वातेसपित्तेकुर्वीतवातपित्तहरींक्रियां ॥

सकफेतत्रकुर्वीतवातश्लेष्महरींक्रियां ॥

अर्थ–पित्तयुक्त वायूचा कोप झाला असतां; वातपित्तहारक क्रिया करावी, तोच वायु कफाश्रित दुष्ट झाला असतां; वातश्लेष्मनाशक चिकित्सा करावी.

## आक्षेपकाचे सामान्यलक्षण.

यदातुधमनीःसर्वाःकुपितोभ्येतिमारुतः ॥ तदाक्षिपत्याशु

मुहुर्मुहुर्देहंमुहुश्चरः ॥ मुहुर्मुहुस्तदाक्षेपादाक्षेपकइतिस्मृतः ॥

अर्थ–ज्याकाळीं सर्व धमनीमध्यें वायूचा कोप होतो, त्याकाळीं वारंवार, होणाऱ्या वायूच्या वेगाने हत्तीवर बसल्या प्रमाणे देहाला, व सर्व गात्राला, चाळवितो; आणि वारंवार शरीर उचलून टाकिल्या प्रमाणे करितो, त्याला आक्षेपक ह्मणतात.

## आक्षेपकाचे चार भेद.

पित्तश्लेष्मान्वितोवायुर्वायुरेवचकेवलः ॥

कुर्यादाक्षेपकंचान्यश्चतुर्थमभिघातजः ॥

अर्थ-पित्तवात, श्लेष्मवात व केवळवात यांपासून तीन आणि चवथा अभिघातापासून असे चार प्रकारचे आक्षेप जाणावे.

## केवलवातजाक्षेप.

पाणिपादशिरःपृष्ठश्रोणीस्तभ्नातिमारुतः ॥

दंडवत्स्तब्धगात्रस्यदंडकःसोनुपक्रमः ॥

अर्थ-हात, पाय, मस्तक, पाठ, माज, यानां वायु स्तब्ध करितो; व दंडासारिखा आंगाला ताठवितो, तो दंडक हा चिकित्सा करण्यास योग्य नाहीं.

## सामान्यचिकित्सा.

आक्षेपकेशिरांविध्येत्कुर्याद्वातहरींक्रियां ॥

तीक्ष्णैःप्रधमनैर्नस्यैस्तथासंज्ञांसविंदति ॥

अर्थ-आक्षेपक वायूवर शिरावेध आणि वातहारक व तीक्ष्ण अशीं औषधें नाकांत फुकणें व त्याचें नस्य देणें इत्यादि उपचार करावे.

## आक्षेपकचिकित्सा.

बलामूलकषायस्यदशमूलीशतस्यच ॥ यवकोलकुलित्थानांक्वाथस्यपयसस्तथा ॥ अष्टावष्टौस्मृताभागास्तैलादेकस्तदेकतः ॥ पचेदावाप्यमधुरंगणंसैंधवसंयुतं ॥ तथागुरुंसर्जरसंसरलंदेवदारुच ॥ मंजिष्टांपद्मकंकुष्ठमेलांकालांचसारिवां ॥ मांसींशैलेयकंपत्रंतगरंसारिवांवचां ॥ शतावरीमश्वगंधांशतपुष्पांपुनर्नवां ॥ तत्साधुसिद्धंसौवर्णराजतेमृन्मयेपिवा ॥ प्रक्षिप्यकलशेसम्यक्स्वनुगुप्तंनिधापयेत् ॥ एतन्महाबलातैलंप्रयुक्तमविलंबितं ॥ सर्वानाक्षेपकादींस्तुवातव्याधीन्व्यपोहति ॥ हिक्कांश्वासमधीमंथंगुल्मंकासंसुदुस्तरं ॥ षण्मासादुपयुक्तंतदंत्रवृद्धिंचनाशयेत् ॥ यथाबलमलंमात्रांसूतिकायैप्रदापयेत् ॥ याचगर्भार्थिनीनारीक्षीणशुक्रश्चयःपुमान् ॥ वातक्षीणेमर्महतेमथितेभिहतेतथा ॥ भग्नेश्रमाभिपन्नेचसर्वथैतत्प्रयुज्यते ॥ एतद्धिराज्ञाकर्तव्यंकर्तव्यंराजपूजितैः ॥ सुखिभिःसकुमारैश्चधनिभिर्मानवैःसदा ॥

अर्थ-चिकण्याच्या मूळांचा काढा, दशमुळांचा काढा, यव, बोरें व कुळीथ, यांचे काढे; आणि दूध, हीं आठ आठ भाग, तेल १ भाग, मधुरगण, सैंधव, अगरु, राळ, सुरु, देवदार, मंजिष्ठा, पद्मकाष्ठ, कोष्ठकोळिंजन, इलाची, नागबला, उपळसरी, जटामांसी,

शिलाजित, तमालपत्र, तगर, लघुउपळसरी, वेखंड, शतावरी, अश्वगंध, शोप व पुनर्नवा हीं एकेक तोळा घेऊन त्यांचा काढा करून घालावा; आणि तेल पचन करून सिद्ध झालें ह्मणजे सुवर्णाच्या, रुप्याच्या किंवा मातीच्या भांड्यांत ठेवावें. हें महाबलातैल घेतलें ह्मणजे जलद संपूर्ण आक्षेपक वायु व वातव्याधि यांचा नाश करितें; व उचकि, श्वास, अधिमंथ, गुल्म व खोकला यांचा नाश करितें; व साहामहिने लाविलें असतां, अंडवृद्धीचा नाश करितें; आणि बाळंतिणीला बळ व काळ पाहून द्यावें; व जीला गर्भाची इच्छा असेल व क्षीणधातु पुरुषाला, किंवा वायूनें क्षीण झालेल्याला मर्माचा ठाई ताडण झालेल्याला, मोडलेल्याला, व श्रमलेल्याला, द्यावें. हें तेल राजानीं किंवा राजमान्यपुरुषानीं व सुखी, सुकुमार व धनिक मनुष्यानीं करून घ्यावें.

## आक्षेपकाचा भेद अपतंत्रक.

क्रुद्धःस्वैःकोपनैर्वायुःस्थानादूर्ध्वंप्रवर्तते ॥ पीडयन्हृदयंगत्वाशिरःशंखौचपीडयेत् ॥ धनुर्वन्नामयेत्गात्राण्याक्षिपेन्मोहयेत्तथा ॥ सकृच्छ्रादुच्छ्वसेच्चापिस्तब्धाक्षोथनिमीलकः॥ कपोतइवकूजेच्चनिःसंज्ञःसोपतंत्रकः॥

अर्थ–आपआपल्या कोप होणाऱ्या कारणानीं कुपित वायु स्थानापासून उर्ध्वगत होतो; आणि ऱ्हदयांत जाऊन पीडा करून मस्तक व आंख यांत शूल उत्पन्न करितो, शरीराला धनुष्या सारिखा वांकवून गात्रें कांपवितो, मोह करितो, कष्टानें श्वासोश्वास सोडितो; व डोळे ताठतात; किंवा मिटून राहतात; आणि कपोतासारिखा कुंथतो; व निःसंज्ञ पाडतो, त्याला अपतंत्रक ह्मणावा.

## चिकित्सा.

अथापतंत्रकेनार्तमातुरंनापतर्पयेत्॥ निरूहवस्तिवमनंमेवयेन्नकदाचन॥ श्वसनाःकफवाताभ्यांरुद्धास्तस्यविमोक्षयेत् ॥ तीक्ष्णैःप्रधमनैःसंज्ञांतासु मुक्तासुविंदति ॥

अर्थ–अपतंत्रकानें पीडित झालेल्या मनुष्यास रेचन, निरूहबस्ति, वमन हें कधीहीं देऊं नये; कफवायुनें कोंडलेल्या श्वासवाहि मार्गाला तीक्ष्णनस्यानीं मोकळा करावा, तो मोकळा झाल्यावर शुद्धीवर येतो.

## हरीतक्यादिलेह.

हरीतकीवचारास्नासैंधवंसाम्लवेतसं ॥ घृतमार्द्रकसंयुक्तमपतंत्रकनाशनं ॥ अम्लवेतसकाभावेचुक्रंदातव्यमीरितं ॥

अर्थ–हरीतकी, वेखंड, रास्ना, सैंधव, आम्लवेतस, तूप व आलें यांचा लेह अपतंत्रकाचा नाशक आहे, आम्लवेतस नमिळेतर आमसोल घ्यावें.

## मरीचादिचूर्ण.

मरिचंशिग्रुबीजानिविडंगंचफणिज्जकं ॥
एतानिसूक्ष्मचूर्णानिदद्याच्छीर्षविरेचनं ॥

अर्थ–मिरीं, शेवग्याचें बीं, वावडिंग व फांगळा यांचें चूर्ण मस्तकरेचनार्थ द्यावें.

## दंडापतानक.

कफान्वितोयदावायुर्धमनीष्वेवतिष्ठति ॥
सदंडवत्स्तंभयतिकृच्छ्रोदंडापतानकः ॥

अर्थ–जाकाळीं वायू कफयुक्त होउन धमनींत राहतो; आणि दंडाप्रमाणें अंगाला स्तंभन करितो, तो दंडापतानक, हा कष्टसाध्य आहे.

## अपतानक.

दृष्टिंसंस्तभ्यसंज्ञांचहत्वाकंठेनकूजति ॥ हृदिमुक्तेनरःस्वास्थ्यंयाति मोहंवृतेपुनः ॥ वायुनादारुणंप्राहुरेकेतमपतानकं ॥

अर्थ–डोळे ताठतात, संज्ञानाश होतो, पारव्यासारिखा घुमतो, वायूचा वेग कमी झाला ह्मणजे रोगी स्वस्थ होतो, पुनः वायूचा वेग चढला ह्मणजे रोगी, मोह पावतो. या रोगाला ही अपतानवायु असें कोणी ह्मणतात.

## असाध्यत्व सांगतो.

गर्भपातनिमित्तश्चशोणितातिस्रवाच्चयः ॥
अभिघातनिमित्तश्चनसिध्यत्यपतानकः ॥

अर्थ–गर्भपातानें, अतिरक्त गेल्यानें, अभिघातनिमित्तक असे झालेले तीन अपतानकवायू बरे होत नाहींत.

## चिकित्सा.

अथापतानकेनार्तमस्रस्ताक्षमवेपनं ॥
अखट्वापातिनंचैवत्वरयासमुपाचरेत् ॥

अर्थ–जो रोगी अपतानवायूनें व्याप्त व ज्याचे डोळे निवळ, कंपरहित, केवळ खाटल्यावर नपडणारा अशाला त्वरेनें उपचार करावे.

अपतानकिनेशस्तंदशमूलीशृतंजलं ॥
पिप्पलीचूर्णसंयुक्तंजीर्णेमांसरसौदनं ॥

अर्थ–अपतान रोगावर दशमूलाचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा, जिरल्यावर मांसरस द्यावा.

## चिकित्साप्रक्रिया.

तैलेनमर्दनंस्वेदस्तथातीक्ष्णेननावनं ॥
स्रोतोविशोधनंपश्चात्सर्पिःपानंहितंस्मृतं ॥

अर्थ–अपतानरोग्याला तेलानें मर्दन करावें, स्वेद काढावा, तीक्ष्ण औषधानीं नस्य द्यावें, शिरा काढाव्या; नंतर घृतपान करवावें.

हंत्यभुक्तवतापीतमम्लंदध्यपतानकं ॥
मरीचेनसमायुक्तंस्नेहवस्तिरथापिच ॥

अर्थ–जेवणाच्या पूर्वीं आंबट दहीं मिरपूड घालून प्राशन करावें; किंवा स्नेहबस्ति करावा; ह्मणजे अपतान नाश पावतो.

## धनुस्तंभलक्षण.

धनुस्तुल्योनमेद्यस्तुसधनुस्तंभसंज्ञितः॥ विवर्णवत्थवदनःस्रस्तांगो नष्टचेतनः ॥ प्रस्विद्यंश्चधनुस्तंभीदशरात्रंनजीवति ॥

अर्थ–धनुष्याप्रमाणें जो वांकतो त्याला धनुस्तंभ असें ह्मणतात; आणि त्या मध्यें वर्ण बदलतो, दांतखिळी बसते, गात्रें शिथिल होतात, बेशुद्ध पडतो व खेद पावतो; हा धनुस्तंभरोगी दाहा दिवस वाचत नाहीं; व यांत अंतरायाम बाह्यायाम यांचीं लक्षणें नसतात, हा यांत व त्यांत भेद आहे.

## दुसरा प्रकार.

कंठावरोधोधनुराकृतिःस्यात्हृदिव्यथादंतनिबंधनंच ॥
मुखस्यशोषःशिशिरस्यकांक्षायस्मिन्धनुर्वायुरुदाहृतःसः ॥

अर्थ–गळ्याचा अवरोध, धनुष्यासारिखें वांकिवणें, हृदयांत शूळ, दांतखिळी बसणें, मुखशोष व थंडीची इच्छा हीं ज्यामध्यें लक्षणें होतात, त्याला धनुर्वात ह्मणतात.

## कुब्जलक्षण.

हृदयंयदिवापृष्ठमुन्नतंक्रमशःसरुक् ॥
क्रुद्धोवायुर्यदाकुर्यात्तदातंकुब्जमादिशेत् ॥

अर्थ–कुपित झालेला वायु जेव्हां हृदय, किंवा पाठ, यांला वेदनासहित उंच करतो, तेव्हां त्याला कुब्ज असें ह्मणतात.

वातघ्नैर्दशमूल्याचनवंकुब्जमुपाचरेत् ॥
स्नेहैर्मांसरसैश्चापिप्रवृद्धंतंविवर्जयेत् ॥

अर्थ—वातनाशक औषधें, दशमुळांचा काढा, स्नेहपान व मांस रस इत्यादि उपचार करावे; परंतु तो अत्यंत वाढलेला असला तर करूं नये.

## अंतरायामलक्षण.

अंगुलीगुल्फजठरहृद्वक्षोगलसंश्रितः ॥ स्नायुप्रतानमनिलोयदाक्षिपतिवेगवान् ॥ विष्टब्धाक्षस्तब्धहनुर्भग्नपार्श्वःकफंवमन् ॥ अभ्यंतरंधनुरिवयदानमतिमानवः ॥ तदासोभ्यंतरायामंकुरुतेमारुतोबली ॥

अर्थ—कोपलेला वायु बोटांच्या अंगळ्या, गुल्फ, पोट, हृदय, वक्षस्थळ, आणि गळा यांच्या आश्रयेकरून सर्वस्नायुजाळाला खेचतो; त्याकाळीं डोळे व हनवटी हीं स्तब्ध होतात; व पार्श्वभाग मोडतो, कफाची वांति होत्ये; आणि आंतल्या बाजूस धनुष्यासारिखा देहाला नमवितो. त्याकाळीं त्याला अंतरायाम ह्मणतात.

## बाह्यायामलक्षण.

महाहेतुर्बलीवायुःशिराःसस्नायुकंडराः ॥ मन्यापृष्ठाश्रिताबाह्याःसंशोष्यानामयेद्बहिः ॥ यत्रतंबहिरायामंप्रवदंतिभिषग्वराः ॥ तमसाध्यंबुधाःप्राहुर्वक्षःकट्यूरुभंजनं ॥

अर्थ—महान् हेतूनीं कुपित वायु मान व पाठ यांच्या बाहेरील स्नायु व कंडरा यानां शोषून मागें नमवितो; ह्मणून वैद्य ह्या वायूला बहिरायाम ह्मणतात, हा ऊर, कंबर व मांड्या मोडितो. हा असाध्य होय.

## सामान्य.

बाह्यायामेंतरायामेविधेयार्दितवत्क्रिया ॥

अर्थ—बाह्यायाम व अंतरायाम वायूवर, अर्दितवायूवर सांगीतलेली क्रिया करावी.

## दुसरा प्रकार.

बाह्यायामांतरायामपार्श्वशूलकटिग्रहान् ॥
खल्लीदंडापतानौचस्नेहस्वेदपुरैर्नयेत् ॥

अर्थ—बाह्यायाम, अंतरायाम, पार्श्वशूल, कटिशूळ, खल्लीवात, आणि दंडापतानक हे स्नेहन व घाम या उपायांनीं जिंकावे.

## चिकित्सा.

बाह्यायामेंतरायामेधनुस्तंभेचकुब्जके ॥ योज्यंप्रसारिणीतैलंतेनतेषांशमोभवेत् ॥ वातव्याधिषुसामान्यायाःक्रियाःकथिताःपुरा ॥ कर्तव्याएवताःसर्वास्तैलमेतद्विशेषतः ॥

अर्थ-बाह्यायाम, अंतरायाम, धनुस्तंभ व कुब्जक यांचा ठाईं चांदवेलिच्या काढ्यानें सिद्ध केलेलें तेल यांजावें, तेणेंकरून त्याची शांति होईल. वातव्याधीवर सामान्य उपचार सांगितले आहेत ते करावे; परंतु हें तेल विशेषेकरून प्रशस्त आहे.

## सर्जतैल.

धनुर्वायुःशमंयातिसर्जतैलस्यमर्दनात् ॥
दशमूलीकषायोवापानेनस्येचशस्यते ॥

अर्थ-धनुर्वाताला सर्जतेलाचें मर्दन करावें; किंवा दशमुळांचा काढा प्ाशनार्थ द्यावा; अथवा त्याचेंच नस्य द्यावें; ह्मणजे शमन पावतो.

## एरंडादिकाढा.

एरंडबिल्वंबृहतीद्वयंचसौवर्चलंव्योषविरामठंच ॥
समातुलुंगीलवणोत्तमंचकाथंधनुर्वातहरंप्रशस्तं ॥

अर्थ-एरंडमूळ, बेलमूळ, रिंगणी, डोर्ली, पादेलोण, मिरीं, सुंठ, पिंपळी, हिंग, महाळुंगाचें मूळ व सैंधव यांचा काढा धनुर्वातनाशनाविषयीं प्रशस्त आहे.

## पक्षवध.

गृहीत्वार्धतनोर्वायुःशिराःस्नायूर्विशोष्यच ॥ पक्षमन्यतरंहंतिसंधिबंधान्विमोक्षयन् ॥ कृत्स्नोर्धकायस्तस्यस्यादकर्मण्योविचेतनः ॥ एकांगरोगंतंकेचिदन्येपक्षवधंविदुः ॥

अर्थ-जो वायु देहाचा अर्धभाग ग्रहण करून शिरा व स्नायु यांच्या जाळाला शोषून व संधींच्या बंधनाला शिथिल करून कोणचाही एका अंगाचा नाश करतो, त्याणें मनुष्याचा अर्धा देह ह्मणजे नृसिंहासारिखा किंवा अर्धनारीश्वराप्रमाणें एक अंग चेतना व कर्म यां विरहित करतो; त्याला कोणी एकांगरोग किंवा कोणी पक्षवध असें ह्मणतात.

## सर्वांगरोगलक्षण.

सर्वांगरोगंतंकेचित्सर्वकायाश्रितेनिले ॥

अर्थ-संपूर्ण अंगांत वायूचा कोप होऊन शिरा व स्नायु इत्यादिकांला शोषून सर्व शरीरास निरुपयुक्त करितो, त्याला कोणी सर्वांगरोग ह्मणतात.

दाहसंतापमूर्छाःस्युर्वायौपित्तसमन्विते ॥ शैत्यशोथगुरुत्वानितस्मिन्नेवकफान्विते ॥ शुद्धवातहतंपक्षंकृच्छ्रसाध्यतमंविदुः ॥ साध्यमन्येनसंसृष्टमसाध्यंक्षयहेतुकं ॥ गर्भिणीसूतिकाबालवृद्धक्षीणेष्वसृक्स्रुतौ ॥ पक्षाघातंपरिहरेद्वेदनारहितोयदि ॥

अर्थ–वायु पित्तयुक्त असला तर; दाह, संताप आणि मूर्छा हे विकार होतात; व तोच कफयुक्त असतां; शैत्य, सूज व जडता हे विकार होतात. केवळ वायूच्या विकारानें झालेला पक्षवध अत्यंत कष्टसाध्य जाणावा; व दुसऱ्याच्या दोषाच्या संयोगानें झालेला पक्षवध साध्य आहे; आणि जो क्षयापासून झालेला तो असाध्य व गर्भिणी, बाळंत, बाळक, वृद्ध व क्षीण यांचा व रक्तस्रावापासून झालेला पक्षघात वेदनारहित असला तरी तो वैद्यानें सोडून द्यावा.

## माषादि काढा.

माषात्मगुप्तावातारिवाटयालकजलश्रितं ॥ हिंगुसैंधवसंयुक्तं पक्षाघातंविनाशयेत् ॥ माषकेहिंगुसिंधूत्थेजरणाद्यास्तुशाणिकाः ॥

अर्थ–उडीद, कुहिली, एरंडमूळ व लघुचिकणामूळ यांचा काढा करून त्यांत हिंग व सैंधव घालून घ्यावा; ह्मणजे पक्षाघाताचा नाश करितो. यामध्यें हिंग व सैंधव हीं एकेक मासा व जिरें आदिकरून तीन मासे घालावीं.

## ग्रंथिकादितैल.

ग्रंथिकाग्निकणाशुंठीरास्नासैंधवकल्कितं ॥
माषक्वाथाश्रितंतैलंपक्षाघातंव्यपोहति ॥

अर्थ–पिंपळीमूळ, चित्रक, पिंपळी, सुंठ, रास्ना व सैंधव यांचा कल्क करून उडदाच्या काढ्यांत व पूर्वकल्कांत तैल सिद्ध करून अंगाला लावावें; ह्मणजे पक्षाघातवायूचा नाश करितें.

## माषादितैल.

माषात्मागुप्तातिविषाऋबूकरास्नाशताव्हालवणैःसुपिष्टैः ॥
चतुर्गुणेमाषबलाकषायेतैलंशृतंहंतिहिपक्षघातं ॥

अर्थ-उडीद, कुहिली, अतिविष, एरंडमूळ, केळ, शतावरी, सैंधव, उडीद व चिकणा यांच्या काढ्यांत चतुर्थांश तैल घालून सिद्ध केलें ह्मणजे तें पक्षवाताचा नाश करितें.

## माषादिसप्तक.

माषबलाशूकाबिंबीकटृतृणरास्नाश्वगंधोरुबूकाणां ॥ क्वाथःप्रातःपीतोरामठलवणान्वितःकोष्णः ॥ अपनयतिपक्षघातंमन्यास्तंभसकर्णनादरुजं ॥ दुर्जयमर्दितवातंसप्ताहाज्जयतिचावश्यं ॥

अर्थ–उडीद, चिकणा, कुहिली, सुगंधिगवत, रास्ना, आस्कंद व एरंड, यांचा काढा हिंग व सैंधव, घालून प्रातःकाळीं प्यावा. तो पक्षघात, मन्यास्तंभ, कर्णनाद व अर्दितवायु, यांचा सात दिवसांत पराजय करितो.

## माषतैल.

ग्रंथिकाग्निकणारास्नाकुष्टंनागरसैंधवं ॥
माषंक्काथेनतत्तैलंपक्षाघातविनाशनं ॥

अर्थ–पिंपळमूळ, चित्रक, पिंपळी, रास्ना, कोष्टकोळिंजन, नागरमोथे, सैंधव व उडीद, यांच्या काढयाबरोबर सिद्ध केलेलें तैल पक्षघातनाशक आहे.

## कपिकच्छादिकाढा.

कपिकच्छूबलैरंडमापनागरसाधितं॥ससैंधवंपिबेत्क्काथंनासारंध्रेणमानवः ॥पक्षाघातंनिहंत्याशुशिरोरोगंहनुग्रहं ॥अर्दितंसंधिवातंचमन्यास्तंभंसुदारुणं ॥

अर्थ–कुयलीच्या बिया, चिकणामूळ, एरंडमूळ, उडीद व सुंठ यांचा काढा सैंधव घालून नाकानें प्राशन करावा; ह्मणजे पक्षाघात, मस्तकरोग, हनुग्रह, अर्दित, संधिवात व मन्यास्तंभ यांचा नाश करितो.

## गुग्गुल पक्षाघातावर.

कृष्णाजटानागरचव्यवन्हिपाठाविडंगेंद्रयवैःसमांशैः ॥ हिंगूग्रगंधाद्विजयष्टिकौंतीमातंगकृष्णातिविषान्वितश्च॥समर्पपाजाजियुगाजमोदान्वितैःसमस्तस्त्रिफलाद्विभागा॥ एभिःसमोगुग्गुलराजमिश्रोभुक्तोहरेत्पक्षभवानिलार्तिं ॥

अर्थ–पिंपळीमूळ, सुंठ, चवक, चित्रक, पाहाडमूळ, वावडिंग, इंद्रजव, हिंग, वेखंड, भारंगमूळ, रेणुकबीज, गजपिंपळी, अतिविष, शिरस, जिरें, शाहाजिरें व अजमोदा हे समभाग. या सर्वांच्या दुप्पट त्रिफला व सर्वांच्या समान गुग्गुल, घालून त्यांतून अग्नि व बल पाहून द्यावा; ह्मणजे तो पक्षावातवायुचा नाश करितो.

## राळतैल.

समुत्धरेत्सर्जतैलंयंत्रेचनलिकाभिधे ॥
विमर्दनंतेनतनौपक्षाधातंविनाशयेत् ॥

अर्थ–राळीचें चूर्ण करुन त्याचें नलिकायंत्रानें तेल काढावें; आणि आंगाला मर्दन करावें; ह्मणजे तें पक्षाघातवायुचा नाश करितें.

पक्षाभिघातकटुतुंबिबीजंतैलंतथानिंबफलोद्भवंच ॥
गोमायुपारावतकुक्कुटानांपित्तैःप्रलेपःप्रशमायवायोः ॥

अर्थ–पक्षाघातवायूवर कडव्या पांढऱ्या भोंपळ्याचें बीज वाटून त्याचा, किंवा नि-नोळ्याच्या तेलाचा अथवा कोल्हा, पारवा व कोंबडे यांच्या पित्ताचा लेप करावा; ह्मण-जे वायु शांत होतो.

## शुंठीचूर्ण.

लघुशुंठीकृतंचूर्णपलसप्तमितंबुधैः ॥ तत्समंगोघृतंदत्वाभर्जयित्वाततोबुधः ॥ शुंठीसमंरसोनंचपिष्ट्वातत्रविनिःक्षिपेत् ॥ पक्षाघातंहनुस्तंभंकटिभंगंतथैवच ॥ बाहुपीडांजयेत्तीव्रांवातरोगंचनाशयेत् ॥

अर्थ-सुंठीचें चूर्ण २८ तोळे, गाईचें तूप २८ तोळे घालून ती सुंठ तुपांत भर्जित करावी; नंतर लसूण सोलून वाटून २८ तोळे त्यांत घालावी; आणि अग्निबळ पाहून द्यावी; ह्मणजे ती सुंठ पक्षाघात, हनुस्तंभ, कटिभंग, बाहुपीडा, आणि वातरोग यांचा नाश करिते.

## अर्दितनिदान.

उच्चैर्व्याहरतोत्यर्थंखादतःकठिनानिच ॥ हसतोजृंभतोभाराद्विषमाच्छयनासनात् ॥ शिरोनासौष्ठचिबुकललाटेक्षणसंधिगः ॥ अर्दयत्यनिलोवक्त्रमर्दितंजनयेत्ततः ॥ वक्रीभवतिवक्त्रार्धंग्रीवाचाप्यपवर्तते ॥ शिरश्चलतिवाक्संगोनेत्रादीनांचवैकृतं ॥ ग्रीवाचिबुकदंतानांतस्मिन्पार्श्वेचवेदना ॥ तमर्दितमितिप्राहुर्व्याधिविशारदाः ॥ वातात्पित्तात्कफाच्चस्यात्त्रिविधंतंसमासतः ॥

अर्थ–मोठ्याने पुष्कळ बोलणें, कठिण पदार्थ खाणे, जांभई देणें, भार सहन करणें, वेडे वांकड्या जाग्यावर निजणें किंवा बसणें, या कारणानीं मस्तक, नाक, ओंठ, तोंड, कपाळ, डोळे, यांचा संधिगत वायु कुपित होऊन पीडा करतो; आणि तोंड बांकडें करतो, अर्धे तोंड वांकडें होऊन मान देखील फिरत्ये, मस्तक कांपतें, शब्द उमटत नाहीं, नेत्रादिकांस विकार होतो मान, तोंड व दांत जा बाजूला फिरतात त्या बाजूस वेदना होतात, असें जा रोगांत होतें. त्याला अर्दितवायु ह्मणतात, हा वातव्याधीमध्यें श्रेष्ठ आहे. याचे वात, पित्त व कफ या दोषभेदेंकरून तीन प्रकार संक्षेपेंकरून सांगितले आहेत.

## वातार्दित.

लालास्रावोव्यथाकंपःस्फुरणंहनुवाग्ग्रहः ॥
ओष्ठयोःश्वयथुस्थूलश्चार्दितेवातजेभवेत् ॥

अर्थ—लाळ गळणें, वेदना होणें, कंप, फुरफुरणें, हनुवटी आणि भाषण यांचा प्रतिबंध व ओंठाला फार सूज इतकीं लक्षणें वातार्दिताची जाणावीं.

## पित्ताश्रित व कफाश्रित अर्दितलक्षण.

पीतमास्यंज्वरस्तृष्णापित्तजेमोहधूपने ॥
गंडेशिरसिमन्यायांशोथःस्तंभःकफात्मके ॥

अर्थ—पित्तात्मक अर्दितवायुमध्यें मुखाला पिवळेपणा, ज्वर, ताहान, मोह, आणि कफ हे विकार होतात; व कफात्मक अर्दितामध्यें गाल, मस्तक व मान यांवर सूज, आणि स्तंभ हे विकार होतात.

## चिकित्सा.

स्नेहपानानिनस्यंचभोज्यान्यनिलहंतिच ॥
उपनाहाश्चशस्यंतेस्वेदनंचतथार्दिते ॥

अर्थ—स्नेहपान, नस्य, वातनाशक भक्ष्यपदार्थ व स्वेद काढणें इत्यादि उपचार अर्दितवायुवर प्रशस्त आहेत.

दशमूलीकषायेणमातुलुंगरसेनवा ॥
बलायाःपंचमूल्यावाक्षीरंवातात्मकेहितं ॥

अर्थ—दशमुळांच्या काढ्याबरोबर, किंवा महाळुंगांच्या रसाबरोबर, अथवा चिकण्याच्या काढ्याबरोबर, अथवा पंचमुळांच्या काढ्याबरोबर दूध प्यावें, तें वातात्मक अर्दितवायुवर प्रशस्त आहे.

पिष्टंमाषकृतंजग्ध्वानवनीतेनसोर्दितः ॥
क्षीरंमांसरसैर्भुक्त्वादशमूलीरसंपिबेत् ॥

अर्थ—उडदांचें पीठ लोण्याबरोबर खाऊन अथवा मांसरसाबरोबर दूध पिऊन, दशमुळांचा काढा प्यावा. तो अर्दितावर प्रशस्त आहे.

## पित्तार्दित.

अर्दितेपित्तजेशीतान्स्नेहोत्थांश्चैवनिर्दिशेत् ॥
घृतबस्तिप्रसेकंचरक्तस्रावंतथैवच ॥

अर्थ—पित्तज अर्दितवायुवर, स्निग्धपदार्थांपासून झालेले शीत उपचार करावे; आणि घृतानें बस्ति व सिंचन किंवा रक्तस्राव करावा.

जिह्मीभूताननोमूकोदाहवान्योर्दितभिवेत् ।

कुर्यात्प्रतिक्रियांतस्यवातपित्तविनाशिनीं ॥

अर्थ–अर्दितवायुनें ज्याचें तोंड वांकडें झालें, आणि मुकेपणा व दाह हे उपद्रव झाले तर; त्यावर वातपित्तनाशक उपचार करावे.

## कफार्दित.

श्लेष्मभागेक्षयंनीतेबृंहणैःसमुपाचरेत् ॥

अर्दितेशोथसंयुक्तेवमनंचप्रशस्यते ॥

अर्थ–अर्दितवायुनें कफ क्षीण झाला असतां; बृंहण उपचार करावे; आणि शोथयुक्त अर्दितवायुवर वमन प्रशस्त आहे.

रसोनकल्कंतिलतैलमिश्रंखादेन्नरोयोर्दितरोगयुक्तः ॥

तस्यार्दितंनाशमुपैतिशीघ्रंवृंदंघनानामिववायुवेगात् ॥

अर्थ–लसुणाचा कल्क, तिळांचें तेल मिसळून खावा; ह्मणजे अर्दित वायु नाश पावतो. जसा मेघांचा समुदाय वायुवेगापासून नाश पावतो, तसा.

फलत्रिकंनिंबफलोरसश्चवासापटोलीक्कथितंतुसर्वं ॥

सकौशिकंरात्र्यवसानकालेपीतंभवेदर्दितवातहारि ॥

अर्थ–हरडा, बेहेडा, आवळकाठी, निंबोळयांचा रस, अडुळसा व कडुपडवळ यांचा काढा करून त्यांत गुगुळ घालून प्रातःकाळीं द्यावा; ह्मणजे अर्दितवायूचा नाश होतो.

## अर्दितसाध्यासाध्य.

क्षीणस्यानिमिषाक्षस्यप्रसक्ताव्यक्तभाषिणः ॥

नसिध्यत्यर्दितंगाढंत्रिवर्षंवेपनस्यच ॥

अर्थ–क्षीणाचा, डोळे मिटत नाहीं त्याचा; आणि अव्यक्त भाषण करणाराचा, तीन वर्षांचा जुना व कंपयुक्त असा अर्दित वायु बरा होत नाहीं.

गतेवेगेभवेत्स्वास्थ्यंसर्वेष्वाक्षेपकादिषु ॥

अर्थ–सर्व आक्षेपकवायुमध्यें वातवेग कमी झाला असतां; रोगी स्वस्थ होतो.

## दुसरा प्रकार.

नवनीतेनसंयुक्तांखादेन्माषेंडरींनरः ॥

दुर्वारमर्दितंहंतिसप्तरात्रान्नसंशयः ॥

अर्थ–लोण्याबरोबर, उडदांचे वडे करून खावे, ते दुर्निवार अशा अर्दितवायूचा सात दिवसांत नाश करितील.

## लशुनविधि.

पलमर्धपलंवापिरसोनस्यसुकुट्टितं ॥ हिंगुजीरकसिंधूत्थसौवर्चलकटु त्रिकैः ॥ चूर्णितैर्माषकोन्मानैरवचूर्ण्यविलोडितं ॥ यथाग्निभक्षितंप्राता रुबुकाथानुपानतः ॥ दिनेदिनेप्रयोक्तव्यंमासमेकंनिरंतरं ॥ वातामयं निहंत्येवमर्दितंचापतंत्रकं ॥ एकांगरोगिणांरोगंतथासर्वांगरोगिणां ॥ ऊ रुस्तंभगृध्रसींचशूलद्वंद्वंक्रमीनपि ॥ कटिपृष्ठामयंहन्याज्जाठरंचसमीरणं ॥

अर्थ—चार तोळे किंवा दोन तोळे लसुणीच्या रसांत हिंग, जिरें, सैंधव सौवर्चल ह्मणजे पादेलोण व त्रिकटु हीं प्रत्येक मासा प्रमाण घेऊन चूर्ण करून घालावीं; नंतर यथाशक्ति भक्षण करावें, याला अनुपान एरंडमुळांचा काढा, हा प्रातःकाळीं दररोज एकमहिनापर्यंत सेवन केला असतां; सामान्य वातरोग, अर्दित, अपतंत्रक, एकांगवात, सर्वांगवात, ऊरुस्तंभ, गृध्रसी, शूल, द्वंद्वरोग, कृमि, कटिरोग, पृष्ठरोग व पोटांतला वायु इतक्यांचा नाश करील.

## हनुग्रहनिदान.

जिव्हानिर्लेखनाच्छुष्कभक्षणादभिघाततः ॥ कुपितोहनुमूलस्थःस्रंस यित्वानिलोहनुं ॥ करोतिविवृतास्यत्वमथवासंवृतास्यताम् ॥ हनुग्र हःसतेनस्यात्कृच्छ्राच्चर्वणभाषणं ॥

अर्थ—जिव्हा फार घांसल्यानें, शुष्क पदार्थ भक्षणानें; किंवा अभिघातामुळें हनुवटीच्या मूलस्थानीं कुपित झालेला वायु हनुवटी शिथिल करून तोंडाला उघडून किंवा मिटून धरतो, त्याला हनुग्रह ह्मणतात. तो झाल्यामुळें पदार्थ चावणें किंवा भाषण हे संकटानें होतें.

हनुग्रहेहनुस्तंभेमन्यास्तंभेर्दितेपिबेत् ॥
दशमूल्याःसमाकृष्णाअश्वत्थस्वरसेनच ॥

अर्थ—हनुग्रह, हनुस्तंभ, मानेचा स्तंभ; आणि अर्दित वायु यांवर दशमुळे व पिंपळी यांचा काढा द्यावा; किंवा पिंपळाच्या रसांत पिंपळी घालून द्यावी.

## चिकित्सा.

संवृतंचुबुकंस्निग्धंस्विन्नमुन्नमयेद्भिषक् ॥
विवृतंनमयित्वातुकुर्यात्प्राप्तामिहक्रियां ॥

अर्थ मिटून धरलेलें तोंड स्निग्ध पदार्थ चोळून वाफारा देऊन उघडावें; आणि वा सलेलें असेल तर त्यावर सांगितलेले उपचार करून दाबून मिटावें.

पिप्पलीचार्द्रकंचापिसंचर्व्यंचमुहुर्मुहुः ॥
निष्ठीवेत्ततस्तोयेनशोधयेद्वदनांतरी ॥

अर्थ–पिंपळी व आलें वारंवार चाऊन थुंकावें; व ऊन पाण्याने तोंड धुवावें.

## हनुग्रहचिकित्सा.

निष्कुष्यलशुनंसम्यक्संक्षुद्यतिलतैलवत् ॥
सैंधवेनान्वितंखादेद्धनुस्तंभार्दितोनरः ॥

अर्थ–लसूण सोलून तिळांच्या तेलांत वाटून सैंधव घालून खावी. ती हनुस्तंभावर प्रशस्त आहे.

## रसोनवटक.

रसोनगुटिकांमापविदलंपरिपेच्यच ॥ योजयेत्पिष्टिकांकांतां
सैंधवार्द्रकहिंगुभिः ॥ततस्तुवटकान्कृत्वातिलतैलेपचेच्छनैः ॥
भक्षयेत्तान्यथावन्हिहनुस्तंभमुखीभवेत् ॥

अर्थ–लसुणीचा गोळा, आणि उडदांची वाटलेली डाळ एकत्र करून त्यांत सैंधव, हिंग व आलें घालून त्याचे वडे तेलांत तळून शक्तिप्रमाणें खावें. तें हनुस्तंभाचा नाश करितील.

## अभ्यंजन.

अभ्यज्यपक्कतैलेनस्वेदयेन्मृदुनाग्निना ॥
वस्तिंविधारयेन्मूर्ध्नितैलेनपरिपूरयेत् ॥

अर्थ–कढलेल्या तेलानें अभ्यंग करून मंद शेक द्यावा; व तेलाचा शिरोबस्ति द्यावा.

## प्रसारणीतेल वातकफजन्य वायुवर.

प्रसारणीपलशतंजलद्रोणेनपाचयेत् ॥ पादशिष्टोशृतोग्राह्यस्तैलंद
धिचतत्समं ॥ कांजिकंचसमंतैलात्क्षीरंतैलाच्चतुर्गुणं ॥ तैलात्तथाष्ट
मांशेनसर्वंकल्कांनियोजयेत् ॥ मधुकंपिप्पलीमूलंचित्रकःसैंधवंव
चा ॥ प्रसारणीदेवदारूरास्नाचगजपिप्पली ॥ भल्लातःशतपुष्पाच
मांसीचैभिर्विपाचयेत् ॥ एतत्तैलंवरंपक्कंवातश्लेष्मामयान्जयेत् ॥
कौब्जत्वंखंजपंगुत्वंगृध्रसीमर्दितंतथा ॥ हनुपृष्ठशिरोग्रीवाकटिस्तं
भंचनाशयेत् ॥ अन्यांश्चविषमान्वातान्सर्वानाशुव्यपोहति ॥

अर्थ–चांदवेल शंभर पळें वजन घेऊन त्यांत पाणी एक द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. त्यांत तेल दहीं व कांजी काढ्याचे समभा-

ग घालून त्यांत तैलाचे चौपट गाईचें दूध घालावें; व त्यांत कल्क करून घालावयाचीं औषधें येणेप्रमाणें. ज्येष्ठमध, पिंपळमूळ, चित्रक, सैंधव, वेखंड, चांदवेल, देवदार, रास्ना, गजपिंपळी, भिलावे, बडीशोप व जटामांसी हीं बारा औषध तेलाचे अष्टमांश घेऊन कल्क करून तेलांत घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तेल गाळून अंगास लावावें. तेणेंकरून वातश्लेष्मजन्य विकार व मनुष्य जेणेंकरून कुबडा होतो तो वायु, खंजवायु, व जेणेंकरून पांगळा होतो तो वायु, गृध्रसी वायु, अर्दितवायु, हनु, पृष्ठ, शिर, ग्रीवा, कटि यांचा स्तंभ करितो तो वायु; हे सर्ववायु दूर होतात; व याशिवाय दुसरे विषमवायु, लाहान मोठे जे असतील तेही या तेलानें दूर होतात.

## मन्यास्तंभ.

दिवास्वप्नाशनस्नानविकृतोर्ध्वनिरीक्षणैः ॥
मन्यास्तंभंप्रकुरुतेसएवश्लेष्मणायुतः ॥

अर्थ–दिवसास निद्रा, विकृत अन्न, विकारकारक जर्जर स्नान व मलपाच स्थितीनें फार वेळ वर पाहाणें इत्यादि कारणांनीं वायु कुपित होऊन तो कफाशीं युक्त होतो; तेव्हां मानेच्या शिरा ताठून मानेचा स्तंभ करितो. त्याला मन्यास्तंभ ह्मणतात.

## चिकित्सा.

दशमूलीकृतंक्वाथंपंचमूल्यापिकल्पितं ॥
रूक्षंस्वेदंतथानस्यंमन्यास्तंभेप्रयोजयेत् ॥

अर्थ–दशमुळांचा किंवा पंचमुळांचा कल्क द्यावा, रूक्षपदार्थांनीं शेक काढावा, नस्य द्यावें. हे उपाय मन्यास्तंभावर करावे.

तैलेनाज्येनवाथवाभ्रष्टयार्कदलैस्तथ ॥
एरंडपत्रैर्वाक्ताव स्वेदयेद्बहुशोमितम् ॥

अर्थ–मानेस तेल किंवा तूप लावून रुईच्या किंवा एरंडाच्या पानांनीं शेकून पुष्कळ वेळ घाम काढावा.

कुक्कुटांडद्रवैश्चूर्णैःसैंधवाज्यसमन्वितैः ॥
ग्रीवांसंमर्दयेत्तेनमन्यास्तंभःप्रशाम्यति ॥

अर्थ–कोंबड्याच्या अंड्यातील रस, सैंधव व तूप घालून ऊन करून मानेला मर्दन करावा. तेणेंकरून मन्यास्तंभ शांत होतो.

## जिव्हास्तंभ.

वाग्वाहिनीशिरासंस्थोजिव्हांस्तंभयतेनिलः ॥
जिव्हास्तंभःसतेनान्नपानवाक्येष्वनीशता ॥

अर्थ–वाग्वाही शिरागतवायु जिव्हेचें स्तंभन करून अन्नपाण्याचें सेवन व भाषण यांविषयीं असमर्थ करतो त्याला जिव्हास्तंभ ह्मणतात.

## चिकित्सा.

जिव्हास्तंभेयथावस्थंवातव्याधिचिकित्सितं ॥
सामान्योक्ताक्रियाश्चात्रार्दितस्यापिहितामता ॥

अर्थ–जिव्हास्तंभावर जसे दोष असतील तसे पाहून वातव्याधिवरची चिकित्सा करावी; आणि वातव्याधिवर व अर्दितवातावर जा सामान्य क्रिया सांगितल्या त्या हितकारक आहेत.

## दुसरा प्रकार.

जिव्हास्तंभेक्रियाश्रेष्ठासामान्योक्तातुयार्दिते ॥

अर्थ–जी अर्दित वायूवर सामान्य क्रिया सांगीतली, ती जिव्हास्तंभावर श्रेष्ठ आहे.

## कल्याणकावलेह.

सहरिद्रावचाकुष्ठंपिप्पलीविश्वभेपजं ॥ अजाजीचाजमोदाचयष्टी मधुयुतंघृतं ॥ एकविंशतिरात्रेणभवेच्छ्रुतधरोनरः ॥ मेघदुंदुभिनिर्घोषोमत्तकोकिलनिःस्वनः॥जडवागादिमकत्वंलेहोकल्याणकोजयेत् ॥

अर्थ–हळद, वेखंड, कोष्ठकोळिंजन, पिंपळी, सुंठ, जिरें, अजमोदा, जेष्ठीमध व तूप यांचा लेह एकवीस दिवस सेवन केला असतां; बहिरेपणा, तोतरेपणा व मुकेपणा, यांचा नाश करून चांगला मेघासारखा किंवा नौबतीसारखा,गंभीर किंवा कोकिळेसारखा मंजुळ शब्द करतो.

## शिरोग्रह.

रक्तमाश्रित्यपवनःकुर्यान्मूर्धधराःशिराः॥
रूक्षाःसवेदनाःकृष्णाःसोसाध्यःस्याच्छिरोग्रहः ॥

अर्थ–जो कुपितवायु रक्ताचा आश्रय करून मस्तकाला धारण करणाऱ्या शिरांला रूक्ष, वेदनायुक्त व काळ्या अशा करितो. तो शिरोग्रह वायु असाध्य जाणावा.

## चिकित्सा.

शिरोग्रहेतुकर्तव्याशिरागतमरुत्क्रिया ॥ दशमूलीकषायेणमातुलुंगरसेनच ॥ शतेनतैलेनाभ्यंगःशिरोबस्तिश्चयुज्यते ॥

अर्थ–शिरोग्रहवायूवर शिरागतवायूचा उपचार करावा; आणि दशमुळांचा काढा व महाळुंगाचा रस, यांच्या बरोबर तेल कढवून त्याणें अभ्यंग किंवा शिरोबस्ति करावा.

## गृध्रसीलक्षण.

स्फिक्पूर्वा कटीपृष्ठजानुजंघापदं क्रमात्॥ गृध्रसीस्तंभरुक्तोदैर्गृह्णातिस्पंदतेमुहुः ॥ वाताद्वातकफाभ्यांसाविज्ञेयाद्विविधापुनः ॥

अर्थ–कुले, गुदद्वार, मांड्या, कंबर, पाठ, गुडघे, पोटऱ्या, पाय, इतक्याठिकाणीं, क्रमेकरून स्तंभ, ठणका, टोंचल्याप्रमाणें होणें, हे उपद्रवांसहित जो आंखडून धरतो; आणि चलन पावतो, त्याला गृध्रसी असें ह्मणतात. तो वायु दोनप्रकारचा वातानें किंवा वातकफानें होतो.

## वातजगृध्रसीनिदान.

वातजायांभवेत्तोदोदेहस्यातीववक्रता ॥
जानुजंघोरुसंधीनांस्फुरणंस्तंभताभृशं ॥

अर्थ–वातजगृध्रसीमध्यें ठणका, देहाला वक्रता, मांडी व मांडीची पोटरी व ऊरु यांचें संधीचें स्फुरण व अत्यंत स्तब्धता होते.

## वातश्लेष्मजगृध्रसीनिदान.

वातश्लेष्मोद्भवायांतुगौरवंवन्हिमार्दवं ॥
तंद्रामुखप्रसेकश्चभक्तद्वेपस्तथैवच ॥

अर्थ–वातकफोत्पन्न गृध्रसीमध्यें जडता, अग्निमांद्य, आंवड, लालास्राव व भक्तद्वेष इत्यादि लक्षणें होतात.

## गृध्रसीचिकित्सा.

गृध्रस्यांतुनरंसम्यग्रेकेणवमनेनवा ॥
ज्ञात्वानिरामंदीप्ताग्निंबस्तिभिःसमुपाचरेत् ॥

अर्थ–गृध्रसीच्या रोग्याला रेचन व वमन देऊन दीप्ताग्नि झाला असें जाणून मग बस्त्यादिक उपचार करावे.

नादौबास्तिविधिःकुर्याद्यावदूर्ध्वंनशुध्यति ॥
स्नेहोनिरर्थकःसस्यात्भस्मन्येवहुतंतथा ॥

अर्थ–गृध्रसीमध्यें जोंपर्यंत ऊर्ध्व शुद्धि झाली नाही तोंपर्यंत बस्तिविधि करूं नये, केला असतां; स्नेह बस्ति निरर्थक होतो. जसें भस्मामध्यें हवन केलेलें व्यर्थ जातें तसें.

## एरंडतैलयोग.

तैलमेरंडजंप्रातर्गोमूत्रेणापिबेन्नरः॥
मासमेकंप्रयोगोयंगृध्रस्यूरुग्रहापहः ॥

अर्थ-एरंडतेल गोमूत्रांत घालून एक महिना पर्यंत नित्य सेवन करावें. तें गृध्रसी व ऊरुस्तंभ यांचा नाश करील.

तैलंघृतंसार्द्रकमातुलुंगरसंससचुक्रंसगुडंपिबेद्वा ॥
कटयूरुपृष्ठत्रिकशूलगुल्मगृध्रस्युदावर्तहरःप्रयोगः ॥

अर्थ-तेल किंवा तूप यांतून कोणा एकाशीं आलें व महाळुंग यांचा रस; आम्लवेतस व गुळ हीं एकत्र करून प्यावा; ह्मणजे कंबर, मांडया, पाठ व माकडहाड यां ठिकाणचा शूल, गुल्म, उदावर्त व गृध्रसीवायु यांचा नाश करील.

निष्कुष्यैरंडबीजानिपिष्ट्वाक्षीरेविपाचयेत् ॥
तत्पायसंकटीशूलेगृध्रस्यांपरमौषधं ॥

अर्थ-एरंड्या सोलून कुटून त्यांची दुधांत शिजवून लापशी करावी. ती कंबरेचा शूल व गृध्रसी यांवर उत्कृष्ट औषध आहे.

## गृध्रसीहरतैल.

द्वेपलेसैंधवात्पंचशुंठ्याग्रंथिकचित्रकात् ॥ द्वेपलेभल्लकास्थीनिविंशतिर्द्वेनधाटके ॥ आरनालेतचेत्प्रस्थंतैलस्यैतैरपत्यदं ॥ गृध्रस्यूरुग्रहार्शोतःसर्वांवातविकारनुत् ॥

अर्थ-सैंधव ८ तोळे, सुंठ, पिंपळमूळ व चित्रक हीं प्रत्येकीं २० तोळे, बिब्याचा मगज ८ तोळे, कांजी ८८ तोळे व तेल [illegible] तोळे, सर्व एकत्र पक्क करून शक्तिप्रमाणें प्यावें, तें अपत्य देणारें व गृध्रसी, ऊरुस्तंभ, [illegible] व सर्व वातविकार यांचें नाशक आहे.

## [illegible] गृध्रसीवर.

[illegible]तुंगुले ॥
यदि[illegible]कनिष्ठिकां ॥

अर्थ-लिंगाखालीं चार आंगळांवर शिरावेध करावा; ह्मणजे गृध्रसी शम पावते. जर शम न पावली तर पायांची करंगळी डागावी.

## [illegible]कल्क.

महानिंबजटाकल्कोगृध्रसीनाशनःस्मृतः ॥

अर्थ-बकाणलिंबाच्या पाळाचा कल्क गृध्रसीनाशक आहे.

पिप्पलीपिप्पलीमूलंभल्लातकफलानिच ॥
एतत्कल्कश्चशैत्रंऊरुस्तंभनिवारणः ॥

अर्थ–पिंपळी, पिंपळमूळ व बिब्बे यांचा कल्क, मधाशीं सेवन केला असतां; ऊरुस्तंभाचें निवारण करील.

पंचमूलीकषायंतुसुखोष्णंत्रिवृतायुतं ॥
गृध्रसींगुल्ममूलंचपयःपीतोनियच्छति ॥

अर्थ–पंचमुळांचा काढा, तेंडाचें चूर्ण घालून प्यावा. तो गृध्रसी व गुल्म यांचा तत्काळ नाश करील.

## गृध्रसीचिकित्सा.

एरंडमूलंबिल्वंचबृहतीकंटकारिका ॥ कषायोरुचकोपेतःपीतोवृषण
बस्तिजं ॥ गृध्रसीजंहरेच्छूलंचिरकालानुबंधिच ॥

अर्थ–एरंडमूळ, बेलमूळ, रिंगणी व डोरली, यांचा काढा पादेलोण घालून प्याला. तो वृषण, बस्ति, गृध्रसीवात यांचे ठायीं झालेला फार दिवसांचा शूल नाश करितो.

गोमूत्रैरंडतैलाभ्यांकृष्णाचूर्णंपिबेन्नरः ॥
दीर्घकालस्थितंहंतिगृध्रसींकफवातजां ॥

अर्थ–गोमूत्र, एरंडतेल व पिंपळीचें चूर्ण, एकत्र करून प्यावें. तें फार दिवसांचा कफवातजगृध्रसीचा नाश करील.

सिंहास्यदंतीकृतमालकानांपिबेत्कषायंकृतुतैलमिश्रं ॥ योगृध्रसीन
ष्टगतिःप्रसुप्तःसशीघ्रगामीभवितांकिमत्रचित्रं ॥

अर्थ–आडुळसा, दंतीमूळ व बाहवा यांचा काढा एरंडतेल मिश्र करून प्यावा; ह्मणजे ज्याचें चालणें बंद झालें, स्पर्श कळत नाहीं, अशा गृध्रसीवायूचा रोगी शीघ्र गमन करणारा होईल, यांत आश्चर्य नाहीं.

बृहन्निंबतरोःसारोवारिणापरिपेषितः ॥
सपीतोनाशयेत्क्षिप्रमसाध्यामपिगृध्रसीं ॥

अर्थ–बकाणलिंबाचा सार पाण्यांत उगाळून प्याला, तो असाध्य गृध्रसीचा नाश करील.

शेफालिकादलैःक्वाथोमृद्वग्निपरिपाचितः ॥
दुर्वारंगृध्रसीरोगंपीतमात्रःप्रणाशयेत् ॥

अर्थ–मंदाग्नीवर केलेला काळे निर्गुडीच्या पानांचा काढा प्राशन केल्याबरोबर दुर्वार गृध्रसीरोगाचा नाश करील.

## रास्नागुग्गुलु.

रास्नायास्तुपलंचैकंपंचकर्षाणिगुग्गुलोः ॥

सर्पिषावटिकांकृत्वाभक्षयेद्गृध्रसीहरीं ॥

अर्थ–रास्ना ४ तोळे व गुग्गुळ ५ तोळे, तुपांत खलून गोळी करून शक्तिप्रमाणे खावी, ती गृध्रसीनाशक आहे.

## रास्नाकाढा.

रास्नामृतारग्वधदेवदारुत्रिकंटकैरंडपुनर्नवानां ॥
क्वाथंपिबेन्नागरचूर्णमिश्रंजंघोरुपृष्ठत्रिकपार्श्वशूली ॥

अर्थ–रास्ना, गुळवेल, बाहवा, देवदार, गोखरू, एरंडमूळ व पुनर्नवा यांचा काढा सुंठीचें चूर्ण मिश्र करून प्यावा; ह्मणजे पोटऱ्या, पाठ, माकडहाड, कशी या ठिकाणचा शूल नाश पावतो.

## पथ्यागुग्गुल.

पथ्याबिभीतामलकीफलानांशतंक्रमेणद्विगुणाभिवृध्धं ॥ प्रस्थेनयुक्तं चपलंकपाणांद्रोणेजलेसंस्थितमेकरात्रं ॥ अर्धावशेषंक्वथितंकषायंभांडेपचेत्तत्पुनरेवलोहे ॥ अमूनिवन्हेरवतार्यदद्याद्द्रव्याणिसंचूर्ण्यपलार्धकानि ॥ विडंगदंतीत्रिफलागुडूचीकृष्णात्रिवृन्नागरकोपणानि ॥ यथेष्टचेष्टस्यनरस्यशीघ्रंहिमांबुपानानिचभोजनानि ॥ निषेव्यमाणोविनिहंतिरोगान्सगृध्रसींनूतनखंजतांच ॥ प्लीहानमुग्रंजठराणिपंगुपांडुत्वकंडूवमिवातरक्तं ॥ पथ्यादिकोगुग्गुलुरेपनाम्नाख्यातःक्षितावप्रतिमप्रभावः ॥ बलेननागेंद्रसमंमनुष्यंजवेनकुर्यात्तुरगेन तुल्यं ॥ आयुःप्रकर्षंविदधातिचक्षुर्बलंतथापुष्टिकरोविपन्नः ॥ क्षतस्यसंधानकरोविशेषाद्रोगेषुशस्तःसकलेषुतज्ज्ञैः ॥

अर्थ–हिरडे १००, बेहेडे २००, आवळे ४०० व कणगुग्गुळ ६४ तोळे हे १०२४ तोळे पाण्यांत रात्रिस भिजत घालून प्रातःकाळीं कढवून अर्धे शेष उरलें ह्मणजे गाळून घेऊन पुनः लोखंडाचे पात्रांत कढवावें; आणि उतरल्यावर त्यांत वावडिंग, दांतीमूळ, त्रिफळा, गुळवेल, पिंपळी, निशोत्तर, सुंठ व मिरें या प्रत्येकाचें चूर्ण दोन तोळे प्रमाणे टाकावें; ह्मणजे हा गुग्गुळ तयार होतो. हा यथेष्ट आचरण व यथेष्ट भोजन करणाऱ्या मनुष्यानें ही सेवन केला असतां; रोगनाश करील. हा गृध्रसी, नूतन खंजता, प्लीहा, उग्र जठर, पंगुता, पांडुत्व, कंडू, वमि व वातरक्त यांचा नाश करणारा आहे. पथ्यादि गुग्गुळ पृथ्वीवर अप्रातिम सामर्थ्यवान् असा प्रसिध्द आहे; आणि बळेंकरून हत्तीसारि

खें, वेगेंकरून घोड्यासारखें मनुष्यास करतो; व आयुष्य, चक्षुर्बल व पुष्टि यांतें करतो; व विषनाशक, क्षत बरें करणारा असा व सर्व रोगांचा ठायीं वैद्यांनीं योजला आहे.

तुरंगगंधासितखंडयुक्ताघृतेनभुक्ताकटिपृष्ठहंत्री ॥

अर्थ–अश्वगंध व खडीसाकर यांचें चूर्ण तुपाशीं द्यावें. तें कटिशूलनाशक आहे.

## एरंडतैलयोग.

वाजिगंधाबलाविश्वादशमूलंविसाधितं ॥
गृध्रस्यांतैलमैरंडंबस्तौपानेचशस्यते ॥

अर्थ- अश्वगंध, चिकणा, सुंठ आणि दशमुळें यांच्या काढ्यांत व कल्कांत एरंडतैल घालून सिध्ध करावें; तें गृध्रसीवायुवर बस्तीविषयीं किंवा प्राशन करण्यास उत्तम आहे.

## विश्वाचीलक्षण.

तलंप्रत्यंगुलीनांयाःकंडराबाहुपृष्ठतः ॥
बाव्होःकर्मक्षयकरीविश्वाचीतिहसोच्यते ॥

अर्थ–बाहूच्या पृष्ठभागापासून हाताच्या बोटांचे वरलेभागापर्यंत प्रत्येक बोटांच्या ज्या कंडरा ह्मणजे मोठ्या शिरा आंखडून हाताचा व्यापार बंद करतो. त्याला विश्वाची असें ह्मणतात.

## चिकित्सा.

दशमूलीबलामाषक्काथंतैलाज्यमिश्रितं ॥
सायंभुक्त्वाचरेन्नस्यंविश्वाच्यामवबाहुके ॥

अर्थ–दशमुळें, चिकणा व उडीद यांचा काढा तेल किंवा तूप मिश्र करून संध्याकाळीं भोजन झाल्यावर त्याचें नस्य करावें; ह्मणजे विश्वाची व अवबाहुक यांचा नाश करील.

## माषतैल.

माषसिंधुबलारास्नादशमूलकहिंगुभिः ॥ वचाशतजटाख्याभिःसिध्धंतैलंसनागरं ॥ ऊर्ध्वभक्ताशनाद्धन्याद्बाहुशोषावबाहुकौ ॥ विश्वाचीमुद्धतांचापिपक्षाघातंतथार्दितं ॥

अर्थ–उडीद, सैंधव, चिकणा, रास्ना, दशमुळें, हिंग, वेखंड व शतावरी यांच्या काढ्याबरोबर सिद्ध केलेलें तेल, सुंठीशीं युक्त भोजनोत्तर सेवन करावें. तें बाहुशोष, अवबाहुक, विश्वाची, पक्षाघात व अर्दित, यांचा नाश करील.

## क्रोष्टुशीर्षलक्षण.

वातशोणितजःशोथोजानुमध्येमहारुजः ॥
ज्ञेयःक्रोष्टुकशीर्षस्तुस्थूलःक्रोष्टुकशीर्षवत् ॥

अर्थ—वात आणि रक्त यां पासून जो गुडघ्यामध्यें शोथ उत्पन्न होतो; आणि कोल्ह्याचे डोक्याप्रमाणें मोठा गुडघा होतो त्याला क्रोष्टुशीर्षक असें ह्मणतात.

## चिकित्सा.

गुग्गुलुंक्रोष्टुशीर्षेतुगुडूचींत्रिफलांभसा ॥
क्षीरेणैरंडतैलंवापिबेद्वावृध्दारुकं ॥

अर्थ—क्रोष्टुशीर्षावर गुळवेल व त्रिफळा ३, यांचे काढयांत गुग्गुळ १ घालून घ्यावा; अथवा ४ तोळे दुधाबरोबर १ तोळा एरंडतेल अथवा वरधारेचें चूर्ण सेवन करावें.

## सामान्यचिकित्सा.

रसैस्तित्तिरिमांसस्यपीतैर्गुग्गुलुसंस्थितैः ॥
वातरक्तक्रियाभिश्चजयेज्जंबुकमस्तकं ॥

अर्थ—तित्तिरिपक्ष्यांच्या मांसरसांत गुग्गुळ घालून घ्यावा; आणि वातरक्तावरचे उपाय करावे; ह्मणजे क्रोष्टुशीर्षक नाश पावेल.

## खंज व पंगूचें लक्षण.

वायुःकटयाश्रितःसक्थ्नःकंडरामाक्षिपेद्यदा ॥
खंजस्तदाभवेज्जंतुःपंगुःसक्थ्नोर्द्वयोर्वधात् ॥

अर्थ—वायु कमरेचा आश्रय करून मांडीची मोठी शीर निर्जीव करतो. त्याला खंज ह्मणतात. याप्रमाणें दोन्ही मांडयाच्या शिरा त्याला पंगु ह्मणतात.

## चिकित्सा.

उपाचरेदभिनवंखंजंपंगुमथापिवा ॥
विरेकस्थापनस्वेदगुग्गुलुस्नेहवस्तिभिः ॥

अर्थ—खंज, किंवा पंगु नूतन असेल तर विरेचन, स्नान करविणें, घाम काढणें, गुग्गुळ, स्नेहपान व बस्ति इत्यादि उपचार करावे.

## कलायखंजलक्षण.

कंपतेगमनारंभेखंजन्निवचलक्ष्यते ॥
कलायखंजतंविद्यान्मुक्तसंधिप्रबंधनं ॥

अर्थ—गमनाचे आरंभी कांपतो; आणि लंगडयाप्रमाणें भासतो, त्याच्या सर्व संधि शिथिल होतात. त्याला कलायखंज ह्मणतात.

## चिकित्सा.

क्रमःकलायखंजस्यखंजपंग्वोरिवस्मृतः ॥

विशेषात्स्नेहनंकर्मकार्यमत्रविचक्षणैः ॥

अर्थ–कलायखंजावर खंज व पंगु या प्रमाणेच उपचार सांगितले आहेत. विचक्षण वैद्यानीं विशेषें करून स्निग्ध उपचार करावे.

## चिकित्साक्रम.

जयेत्कलायखंजंतुहेतुत्यागरसोनतः ॥

अर्थ–कलायखंजवायूला निदानपरिवर्जन व लसुणभक्षण यांणीं जिंकावा.

## वातकंटकनिदान.

रुक्पादेविषमेन्यस्तेश्रमाद्वाजायतेयदा ॥
वातेनगुल्फमाश्रित्यतमाहुर्वातकंटकं ॥

अर्थ–पाय वेडावांकडा टाकला किंवा श्रम झाले या कारणानें घोटयाला ठणका होतो, त्याला वातकंटक असें ह्मणतात

## चिकित्सा.

रक्तावसेचनंकुर्यादभीक्ष्णंवातकंटके ॥
पिबेदेरंडतैलंवादहेत्सूचीभिरेवच ॥

अर्थ-वातकंटकावर वारंवार रक्तमोक्ष करावा; एरंडेल प्यावें; सुयानीं डाग द्यावा,

## पाददाहलक्षण.

पादयोःकुरुतेदाहंपित्तासृक्सहितोनिलः ॥
विशेषजश्चंक्रमणात्पाददाहंतमादिशेत् ॥

अर्थ–वायु, रक्त आणि पित्त यांच्याशीं युक्त होऊन पायांचे ठायीं दाह करतो, [illegible]ल पडल्यावर विशेषेंकरून दाह करतो, त्याला पाददाह असें ह्मणतात.

## चिकित्सा.

वातरक्तक्रमंकुर्यात्पाददाहेविशेषतः ॥ मसूरविदलैःपिष्टैःशृतशीतेनवारिणा ॥ चरणौलेपयेत्सम्यक्पाददाहप्रशांतये ॥ नवनीतेनसंलिप्तौवन्हिनापरितापितौ ॥ मुच्येतेचरणौक्षिप्रंपरितापात्सुदारुणात् ॥

अर्थ–पाददाहावर विशेषेंकरून वातरक्तावरचा क्रम करावा; आणि मसूरांची डाळ तापवून निवालेल्या पाण्यांत वाटून पायांला लेप करावा; अथवा लोणी चोळून पाय तापवावे; ह्मणजे क्षणमात्रेंकरून पाददाह शांत होतो.

## पाददाहावर लेप.

गुडूच्यैरंडबीजानिदध्नापिष्ट्वाप्रलेपयेत् ॥

पाददाहेहितंप्रोक्तंमहानिंबफलानिच ॥

अर्थ–गुळवेल व एरंडयांचे गोळे दह्यांत वाटून त्याचा; किंवा कडुनिंब व चिकणामूळ वाटून त्यांचा पायांना लेप करावा; ह्मणजे पाददाहावर हित होतें.

## पादहर्षलक्षण.

हृष्येतेचरणौयस्यभवतश्चप्रसुप्तकौ ॥
पादहर्षःसविज्ञेयःकफवातप्रकोपजः ॥

अर्थ–पांयांस मेहेरी येऊन स्पर्श कळेनासा होतो; त्याला पादहर्ष ह्मणतात. तो कफ वाताच्या कोपापासून होतो.

## चिकित्सा.

पादहर्षेतुकर्तव्यःकफवातहरोविधिः ॥

अर्थ–पाद हर्षावर कफवातनाशक उपचार करावे.

## बाहुशोषनिदान.

अंसदेशस्थितोवायुःशोषयेदंसबंधनं ॥
अंसबंधनशोषःस्याद्बाहुशोषःसवेदनः ॥

अर्थ–वायु स्कंधप्रदेशीं राहून खांद्याचें बंधन व शोषण करितो. ज्याला अंसबंधन शोष ह्मणतात; व तो वेदनायुक्त असतां; बाहुशोष ह्मणतात.

## चिकित्सा.

बाहुशोषेपिबेद्भुक्त्वासर्पिःकल्याणकंमहत् ॥ बलामूलशृतंतोयं सैंधवेनसमन्वितं ॥ बाहुशोषकरेवातेमन्यास्तंभेचशस्यते ॥

अर्थ–बाहुशोष झाला असतां; भोजन करून नंतर (बृहत्कल्याणक घृत) प्राशन करावें; किंवा चिकण्याच्या मुळांचा काढा करून सैंधव मिसळून घ्यावा; हा बाहुशोष व मन्यास्तंभवात यांवर प्रशस्त आहे.

## रसोनकल्क.

क्षीरेणतैलेनघृतेनवापिमांसेनसार्धंलशुनानिखादेत् ॥ शाल्योदनेनापिचषष्टिकेनपलार्धवृध्यादिवसानिसप्त ॥ वातोत्थरोगान्विषमज्वरांश्चशूलान्सगुल्मान्दहनस्यमांद्यं ॥ प्लीहानमुग्रंभुजपार्श्वशूलंशिरोव्यथांकृंततिशुक्रदोषान् ॥

अर्थ–दूध, तेल, तूप किंवा मांस याजबरोबर अथवा साठके भाताबरोबर दोन दोन तोळे लसूण चढती या प्रमाणें सात दिवस भक्षण केली असतां; वातापासून झालेले

व्याधि, विषमज्वर, शूल, गुल्म, अग्निमांद्य, प्लीहा; व भुज, पार्श्व, आणि मस्तक यांचा शूळ व शुक्रदोष यांचा नाश करितो.

## बाहुशोषचिकित्सा.

बलामूलभवःक्वाथःसैंधवेनसमन्वितः ॥

बाहुशोषगदंनस्यात्धन्यान्माषरसोथवा ॥

अर्थ–चिकण्याच्या मुळांचा काढा करून त्यांत सैंधव घालून द्यावा; किंवा उडदाचे काढे काढून त्याचे नस्य द्यावें; ह्मणजे बाहुशोषवात नाश पावतो.

## अवबाहुकलक्षण.

शिराःसंकोच्यबाहुस्थःसकुर्यादवबाहुकः ॥

अर्थ–बाहुचा आश्रय करुन जो शिरांचा संकोच करतो, त्याला अवबाहुक असें ह्मणतात.

## चिकित्सा.

परमौषधमवबाहुकमन्यास्तंभोर्ध्वजत्रुगतरोगे ॥

शीतलजलेननस्यंतदुपशमेजिंगिनीचपुरः ॥

अर्थ–अवबाहुक, मन्यास्तंभ व खांद्याच्या वरील भागाचे रोग, यांवर मंजिष्ठ आणि गुग्गुळ, थंड पाण्यांत उगाळून त्याचें नस्य करावें. हें उत्तम औषध आहे.

मूलंबलायास्त्वथपारिभद्रात्तथात्मगुप्तास्वरसंपिबेद्वा ॥ युंजी

तयोमाषरसेननस्यंभवेदसौवज्रसमानबाहुः ॥

अर्थ–चिकणामूळ व कडुलिंबाचें मूळ, यांचा काढा अथवा कुहिलीचा रस, प्यावा; अथवा उडदांच्या काढयाचे नस्य करावें; ह्मणजे वज्राप्रमाणे बाहु होतात.

## माषतैल.

माषातसीयवकुरंटककंटकारीगोकंटटुंटुकजटाकपिकच्छुतो

यैः ॥ कार्पासकास्थिशणबीजकुलत्थकोलक्वाथेनबस्तपिशि

तस्यरसेनचापि ॥ शुंठयासमागधिकयाशतपुष्पयाचसैरंडमू

लकपुनर्नवयाहरण्या ॥ रास्नाबलामृतलताकटुकैर्विपक्कंमा

षाख्यमेतदवबाहुहरंहितैलं ॥

अर्थ–उडीद, जवस, सातु, पिवळा कोरांटा, रिंगणी, गोखरूं, टेंटू, जटामांसी, कुहिली, वाळा, कापसाच्या बिया, तागाचें बीं, कुळिथ व बोर यांचा काढा, बोकडाच्या मांसाचा रस, सुंठ, पिंपळी, बडिशेप, एरंडमूळ, पुनर्नवा, हरणवल्ली, रास्ना, चिकणा,

गुळवेल व कटुकी यांचें चूर्ण एकत्र करुन यांचे बरोबर कढवलेलें तेल अवबाहुकाचें नाशक आहे. याला माषाख्यतेल ह्मणतात.

अतसीखल्लिविश्वरजोगुडेनसंमर्द्यमोदकोभुक्तः ॥
अपहरत्यवश्यमवबाहुकृतकौतुकंनात्रसंदेहः ॥

अर्थ–अळशी, देवदार व संठ, यांचें चूर्ण गुळाशीं मर्दन करुन त्याची गोळी खावी; ह्मणजे अवश्य अवबाहुकवायूचा नाश करित्ये. हें कौतुक आहे, यांत संदेह नाहीं.

## माषतैलादि मर्दन.

माषतैलरसोनाभ्यांबाहोश्चपरिमर्दनात् ॥
दशांघ्रिमाषक्काथेनजयेद्वैयोवबाहुकं ॥

अर्थ–माषतेल आणि लसूण एकत्र करून बाहूंचें मर्दन करावें; अथवा दशमुळें व उडीद यांचा काढा प्यावा; ह्मणजे अवबाहुकाचा नाश होतो.

## मूक, मिम्मिण व गद्गद निदान.

आवृत्यवायुःसकफोधमनीःशब्दवाहिनीः ॥
नरान्करोत्यवचनान्मूकमिम्मिणगद्गदान् ॥

अर्थ–वायु कफाशीं युक्त होऊन शब्दवाहिनी शिरा आंखडून धरून मनुष्यास तोत्रेपणा मुकेपणा, गेंगाणेपणा व गळा दाटून बोलणें असे विकार उत्पन्न करतो.

## सारस्वत घृत.

प्रस्थंघृतस्यपलिकैःशिग्रुवचालवणधातकीलोध्रैः ॥ आजेपयसिविपक्कंसिद्धंसारस्वतंनाम्ना ॥ विधिवदुपयुज्यमानंजडगद्गदमूकतां क्षणाज्जित्वा ॥ स्मृतिमतिमेधाप्रतिमाःकुर्यात्सस्पष्टवाग्भवति ॥

अर्थ–तूप ६४ तोळे व शेवगा, वेखंड, सैंधव, धायटीचीं फलें, आणि लोध्र, हीं प्रत्येक ४ तोळे, या प्रमाणें घेऊन शेळीच्या दुधांत पक्क करावीं; ह्मणजे हें सारस्वतघृत सिद्ध होतें. तें यथाविधि सेवन केलें असतां; सर्व वाणीचे दोष दूर करून बुद्धि, स्फूर्ति, व स्पष्ट भाषण यांतें देतें.

दशमूलस्यनिर्यूहोहिंगुपुष्करचूर्णितः ॥
शमयेत्परिपीतस्तुवाणींमिम्मिणसंज्ञितां ॥

अर्थ–दशमुळांचा काढा हिंग व पोखरमूळ यांचें चूर्ण घालून प्यावा; तो वाणीचा मिम्मिणतादोष दूर करतो.

## तूनीलक्षण.

अधोयावेदनायातिवर्चोमूत्राशयोत्थिता ॥
भिंदतीवगुदोपस्थंसातूनीनामतोमता ॥

अर्थ—गुद व शिश्न यांच्या ठिकाणीं भेदल्यासारिखी वेदना होऊन अधोभागीं जात्ये तिला तूनी ह्मणतात.

## प्रतूनीलक्षण.

गुदोपस्थोत्थिताचैवप्रतिलोमंविधाविता ॥
वेगैःपक्वाशयंयातिप्रतूनीचेहसोच्यते ॥

अर्थ—जी वेदना गुद व शिश्न यांचा ठायीं होऊन वर पोटाकडे चढून पक्वाशयाप्रत येत्ये, तिला प्रतूनी ह्मणतात.

## त्यांवर चिकित्सा.

तून्यांचप्रतितून्यांचप्रशस्तास्नेहबस्तयः ॥ पिबेद्वास्नेहलव
णंपिप्पल्यादिमथांबुना ॥ उष्णेनरामठक्षारप्रगाढमथवाघृतं ॥

अर्थ—तूनी व प्रतूनी यांवर स्नेहबस्ति करावें; किंवा लवण व तूप हें प्राशन करावें; अथवा पिंपळीचें चूर्ण पाण्याबरोबर घ्यावें; किंवा ऊन पाण्याबरोबर हिंग व सैंधव घ्यावें; अथवा घृत प्राशन करावें.

## आध्मानलक्षण.

साटोपमत्युग्ररुजमाध्मातमुदरंभृशं ॥
आध्मानमितिजानीयाद्घोरंवातनिरोधजं ॥

अर्थ—पोटांमध्यें गुडगुड शब्द होउन शूळ होतो; व पोट फुगतें त्याला आध्मान जाणावें. हें महाभयकारक आहे. हें वातनिरोधानें उत्पन्न होतें.

## चिकित्सा.

आध्मानेलंघनंपूर्वंदीपनंपाचनंततः ॥
फलवर्तिक्रियांकुर्याद्बस्तिकर्मचशोधनं ॥

अर्थ—आध्मानाचा ठायीं पूर्वीं लंघन करावें; नंतर दीपन व पाचन करावें; आणि फलवर्ती, बस्तिकर्म व रेचक, हे उपाय करावे.

## नाराचचूर्ण.

कर्षमात्राभवेत्कृष्णात्रिवृतास्यात्पलोन्मिता ॥ खंडादपिपलं
ग्राह्यंचूर्णमेकत्रकारयेत् ॥ मधुनाक्षमितंलिह्याच्चूर्णमाध्माननाशनं ॥

अर्थ—एक तोळा पिंपळी, तेड ४ तोळे, खडीसाखर ४ तोळे, या प्रमाणें चूर्ण एकत्र करून तीन मासे मधाशीं सेवन केलें असतां; पोटाची फुगवटी दूर होत्ये.

## दारुषट्कलेप.

दारुहैमवतीकुष्ठशताव्हाहिंगुसैंधवैः ॥
लिंपेत्कोष्णैरम्लपिष्टैःशूलाध्मानयुतोदरं ॥

अर्थ—देवदारु, वेखंड, कोष्ठकोळिंजन, शतावरी, हिंग व सैंधव हे पदार्थ लिंबाच्या रसांत वाटून ऊन करून उदराला लेप केला असतां; शूळ व पोटाची फुगवटी यांचा नाश होतो.

## महानाराचरस.

अभयारग्वधोधात्रीदंतीतिक्तास्नुहीत्रिवृत् ॥ मुस्ताप्रत्येकमेतानिग्राह्याणिपलमात्रया॥ तानिसंक्षुद्यसर्वाणिजलाढकयुगेपचेत्॥ तत्रतोयेष्टमंभागंकषायमवशेषयेत् ॥ निस्त्वग्जैपालबीजानिनवानिपलमात्रया ॥ तनुवस्त्रधृतान्येवतस्मिन्क्वाथेशनैःपचेत् ॥ ज्वालयेदनलंमंदंयावत्क्काथोघनोभवेत्॥ ततःखल्वेक्षिपेद्भागानष्टौजैपालबीजतः॥ भागांस्त्रीन्नागराद्द्वौचमरिचाद्द्वौचपारदात्॥ गंधकाद्द्वौचतानीहयावद्यामंविमर्द्दयेत्॥ रसोनाराचनामायंभक्षितोरक्तिकामितः॥ जलेनशीतलेनैवरोगानेतान्विनाशयेत्॥ आध्मानंशूलमानाहंप्रत्याध्मानंतथैवच॥ उदावर्तं तथागुल्ममुदराणिहरत्यसौ॥ वेगेशांतेचभुंजीतशर्करासहितंदधि ॥ ततस्तत्सैंधवेनापिततोदध्योदनंमनाक् ॥

अर्थ—हरीतकी, बाहव्याचा मगज, आवळकठी, जेपाळ, कुटकी, निवडुंग, तेड व नागरमोथा हीं प्रत्येकीं चार तोळे घेऊन कुटून ५१२ तोळे पाण्यांत अष्टमांश काढा करून गाळून घ्यावा; आणि त्या काढ्यांत जेपाळाच्या सोललेल्या बिया ४ तोळे वस्त्रांत पोटली बांधून मंदाग्नीवर शिजवाव्या. जोपर्यंत काढा घट्ट होई तोंपर्यंत आटवून नंतर खलामध्यें त्या जेपाळबीजाचे ८ भाग, सुंठ ३ भाग, मिरीं, पारा व गंधक हीं दोन दोन भाग सर्व एकत्र करून त्यांचा एक प्रहर खल करावा. हा नाराचरस थंड पाण्याशीं एक गुंज घ्यावा; ह्मणजे आध्मान, शूल, वायूचा अवरोध, प्रत्याध्मान, उदावर्त, गुल्म व सर्व उदरें यांचा नाश करितो. रेचांचा वेग शांत झाल्यावर साकर व दहींभात भक्षण करावे; किंवा दहींभात व सैंधव हें पथ्याला थोडें द्यावें.

## प्रत्याध्माननिदान.

विमुक्तपार्श्वहृदयंतदेवामाशयोत्थितं ॥

प्रत्याध्मानंविजानीयात्कफव्याकुलितानिलं ॥

अर्थ–कफानें वायूचा रोध होऊन पार्श्वशूल व ऊर यां वांचून आमाशयाचा ठायींच फुगवटी येते, त्याला प्रत्याध्मान ह्मणावें.

## चिकित्सा.

प्रत्याध्मानेसमुत्पन्नेकुर्याद्वमनलंघने ॥
दीपनादीनिप्रयुंजीतपूर्ववद्बस्तिकर्मच ॥

अर्थ–प्रत्याध्मान उत्पन्न झाला ह्मणजे वमन आणि लंघन करावें; नंतर दीपनादिक उपचार व बस्ति इत्यादि उपचार करावे.

## वाताष्ठीलानिदान.

नाभेरधस्तात्संजातःसंचारीयदिवाचलः ॥ अष्ठीलावद्घनोग्रंथिरूर्ध्वमायतमुन्नतः ॥ वाताष्ठीलांविजानीयाद्बहिर्मार्गावरोधिनीं ॥

अर्थ–बेंबीच्या खालीं आठळेतारिखा लांब व उंच फिरणारा किंवा अचल असा जो ग्रंथि होतो; आणि मल व मूत्र या मार्गांचा रोध करितो; त्याला वाताष्ठीला ह्मणतात.

## प्रत्यष्ठीला.

एतामेवरुजोयुक्तांवातविण्मूत्ररोधिनीं ॥
प्रत्यष्ठीलामितिवदेज्जठरेतिर्यगुत्थितां ॥

अर्थ–वरच्या प्रमाणेंच बेंबीखालीं पोटाकडे तिरकस ग्रंथि होऊन फार दुखतो; आणि मल व मूत्र या मार्गांचा रोध करितो, त्याला प्रत्यष्ठीला ह्मणतात.

## हिंग्वादि चूर्ण.

हिंगुग्रंथिकधान्यजीरकवचाचव्याग्निपाठाशठीवृक्षाम्लंलवणत्रयंत्रिकटुकंक्षारद्वयंदाडिमं ॥ पथ्यापौष्करवेतसाम्लहपुषाजाज्यस्तदेभिःकृतंचूर्णंभावितमेतदार्द्रकरसैःस्याद्बीजपूरद्रवैः ॥

अर्थ–हिंग भाजलेला, पिंपळमूळ, धनें, जिरें, वेखंड, चवक, चित्रक, पाडळ, कचोरा, चिंच, सैंधव, बिडलोण, मीठ, सुंठ, मिरीं, पिंपळी, यवक्षार, टांकणखार, डाळिंब, हरीतकी, पोखरमूळ, आम्लवेतस, थोरशेरणी व शेताजिरें यांचें चूर्ण करून त्यास आल्याचा रसाच्या व माहाळुंगाच्या रसाच्या भावना द्याव्या; आणि योग्य अनुपानाशीं अष्ठीलेवर योजावें.

## प्रत्यष्ठीलादिचिकित्सा.

प्रत्यष्ठीलाष्ठीलकयोर्गुल्मेभ्यंतरविद्रधौ ॥

क्रियाहिंग्वादिचूर्णंचशस्यतेत्रविशेषत: ॥

अर्थ-प्रत्यष्ठीला, अष्ठीला, गुल्म व अंतरविद्रधि यांवर हिंग्वादि चूर्ण द्यावें; व विशेषेकरून हीच क्रिया प्रशस्त आहे.

## दुसरा प्रकार.

हिंग्वाम्लत्रिकटूग्रपट्कटुशठीवृक्षाम्लदीप्यालकापाठाजाज्यजगंध
मूलहपुषाद्विक्षारसाराभया ॥ हिध्माध्मानविबंधवर्ध्मकसनश्वासा
ग्निसादारुचिप्लीहार्शोखिलशूलगुल्मगदहृद्रोगाश्मपांडुप्रणुत् ॥

अर्थ-हिंग, अम्लवेतस, सुंठ, मिरीं, पिंपळी, वेखंड, सुंठ, मिरीं, पिंपळी, चवक, चित्रक, पिंपळमूळ, कचोरा, आमसोल, ओंवा, कंकोळ, पाडळ, जिरें, आस्कंध, पोखरमूळ, मोठी शरणी, जवखार, टांकणखार, चारोळी व हरीतकी, यांचें समभाग चूर्ण करुन घ्यावें; म्हणजे उचकी, पोटाचा फुगारा, मलबद्धता, अंडवृद्धि, कास, श्वास, अग्निमांद्य, अरुचि, प्लिहा, अर्श, सर्व शूळ, गुल्म, हृद्रोग, अश्मरी व पांडु यांचा नाश करितें.

## हिंग्वादियोग.

हिंगूग्रगंधाविडशुंठ्यजाजीहरीतकीचित्रकमूलकुष्ठं॥
भागोत्तरंचूर्णितमेतदिष्टंगुल्मोदराष्ठीलविषूचिकासु ॥

अर्थ-हिंग, वेखंड, बिडलोण, सुंठ, जिरें, हरीतकी, चित्रकमूळ व कोष्ठकोळिंजन हे पदार्थ भागोत्तरवृद्धीनें घेऊन चूर्ण एकत्र करावें. तें गुल्म, उदर, अष्ठीला व तरळ यांवर प्रशस्त आहे.

## नादेयादिकाढा.

नादेयीकुटजार्कशिग्रुबृहतीस्नुग्बिल्वभल्लातकव्याघ्रीकिंशुकपारि
भद्रकरंजोपामार्गनीपाग्निकान् ॥ वासामुस्तकपाटलामलवणान्
जग्ध्वारसंपाचितंहिंग्वादिप्रतिवापमेतदुचितंगुल्मोदराष्ठीलिषु ॥

अर्थ-भुयजांभूळ, कुड्याची साल, रुई, शेवगा, रिंगणी, मोठे निवडुंग, बेल, बिबवा, डोर्ली, पळस, कडुनिंब, पित्तपापडा, आघाडा, कळंब, चित्रक, अडुळसा, नागरमोथा, पाडळ, यांचा काढा करून आंत सैंधव व हिंग घालून घ्यावा. हा गुल्म, उदर व अष्ठीला यांवर योग्य आहे.

## विडंगासव.

विडंगंपिप्पलीमूलंपाठाधात्र्येलवालुकं॥ कुटजत्वक्फलंरास्नाभार्ङी
पंचपलोन्मितान् ॥ अष्टद्रोणेंभस:पक्त्वाद्रोणशेषंतुकारयेत् ॥ पूतेशी

तेक्षिप्तेत्तस्मिन्माक्षिकस्यशतत्रयं ॥ धातक्याविंशतिपलंचूर्णंकृत्वानुदापयेत् ॥ व्योपस्यचतुलान्चाष्टौत्रिजातंद्विपलंतथा ॥ फलिनीहेमतोयानांसलोध्राणांपलंपलं ॥ घृतभांडेसमाधायमासमेकंविधारयेत् ॥ एषयोगोहरत्येवप्रत्यष्ठीलाभगंदरान् ॥ ऊरुस्तंभाश्मरीमेहगंडमालांसविद्रधिं ॥ आढ्यवातंहनुस्तंभंविडंगाख्योमहासवः ॥

अर्थ–वावडिंग, पिंपळीमूळ, पाडळ, आवळकाठी, वाळा, कुड्याची साल, इंद्रजव, राश्ना व भारंगमूळ हीं प्रत्येक वीस वीस तोळे, घेऊन १३ मण १३ शेर पाणी घालून बाकी ३६ शेर १६ तोळे राहीतों पर्यंत आटवून गाळून घ्यावा; आणि त्यांत ३०० तोळे मध, धायटीफूल ८० तोळे, सुंठ, मिरीं व पिंपळी हीं ३२०० तोळे व दालचिनी, विलायची, तमालपत्र हीं प्रत्येक ८ तोळे; आणि गाठे, पानव्याचें बीज, वाळा व लोध्र हीं प्रत्येक ४ तोळे घालून तुपानें माखलेल्या मडक्यांत भरून एक महिना बंद करून ठेवावें. हा योग प्रत्यष्ठीला, भगंदर, ऊरुस्तंभ, अश्मरी, मेह, गंडमाळा, विद्रधि, आढ्यवात व हनुस्तंभ यांचा नाश करितो. ह्याला विडंगासव ह्मणावें.

## बस्तिवातलक्षण.

मारुतेनुगुणेवस्तौमूत्रंसम्यक्प्रवर्तते ॥
विकाराविविधाश्चापिप्रतिलोमेभवंतिहि ॥

अर्थ–बस्तीचा ठायीं वायु राहिला असतां; मूत्रप्रवृत्ति चांगली होत्ये; आणि विकृत होऊन राहात असतां; नानाप्रकारचे मूत्रकृच्छ्रादि विकार होतात.

## चिकित्सा.

बलामूलत्वचश्चूर्णंसमितंकर्पसंमितं ॥
पिबेत्कुडवदुग्धेनमुहुर्मूत्रणशांतये ॥

अर्थ–चिकण्याच्या मुळांच्या सालीचें चूर्ण एक तोळा व साकर एक तोळा, हीं सोळ तोळे दूधांत घालून प्यावीं; ह्मणजे वारंवार मुतण्याची शांति होत्ये.

## हरितक्यादिचूर्ण.

पथ्याबिभीतधात्रीणांचूर्णंचूर्णमृतायसः ॥
मधुनासहसंलीढंमुहुर्मूत्रणशांतिकृत् ॥

अर्थ–हरीतकी, बेहडे, आवळकाटी यांचे चूर्ण व लोहभस्म एकत्र करून मधाशीं चेतलें असतां; वारंवार मुतण्याची शांति करितें.

## यवक्षारचूर्ण.

यवक्षारस्यचूर्णंतुसंयोज्यसितयासह ॥
भक्षयेन्नियतंतस्यप्रशाम्येन्मूत्रनिग्रहः ॥

अर्थ–यवक्षाराचें चूर्ण, साकरेशीं घेत गेलें असतां; मूत्रग्रह शांत होतो.

## कूष्मांडबीजयोग.

कूष्मांडस्यतुबीजानिबीजानित्रपुसस्यच ॥
बस्तौसंधारयेत्तेनप्रशाम्येन्मूत्रनिग्रहः ॥

अर्थ–कोहाळ्याचें बीज व कांकडीचे बीज, हीं दोन्हीं एकत्र वाटून बस्तीवर धारण केली असतां; मूत्रनिग्रह शांत होतो.

## आमलक्यादियोग.

आमलक्याश्चकल्केनबस्तिभागंप्रलेपयेत् ॥
तेनप्रशाम्यतिक्षिप्रंनियमान्मूत्रनिग्रहः ॥

अर्थ-आवळकाठीचा कल्क बस्तिभागावर घातला ह्मणजे नियमेंकरून मूत्रनिग्रह शांत होतो.

## चंदनादिवर्ति.

मेहनस्याथवायोनेर्मुखस्याभ्यंतरेशनैः ॥
घनसारयुतांवर्तिंधारयेन्मूत्रनिग्रहे ॥

अर्थ–मूत्रनिग्रहनाशनार्थ लिंगामध्यें किंवा योनिमुखांत, चंदनानें भिजवून वात धारण करावी.

## बस्तिगतवायुचिकित्साक्रम.

अथबस्तिगतेवातेकार्योबस्तिविशोधनः ॥

अर्थ–बस्तिगत वात कुपित झाला असतां; बस्तिशोधनविधि करावा.

## कंपवायु.

सर्वांगकंपःशिरसोवायुर्वेपथुसंज्ञकः ॥

अर्थ–सर्वांगाचा व विशेषेकरून मस्तकाचा कंप होतो, त्याला कंपवात ह्मणतात.

## खल्लीलक्षण.

खल्लीतुपादजंघोरुकरमूलावमोटनी ॥

अर्थ–जो वायु पाय, मांड्या, गुडघे, बाहु, यानां आंखडून धरितो, त्याला खल्लीवात असें ह्मणतात.

## चिकित्सा.

कुष्ठसैंधवयोःकल्कश्चुक्रतैलसमन्वितः ॥
सुखोष्णोमर्दनेयोज्यःखल्लीशूलनिवारणः ॥

अर्थ–कोष्ठकोळिंजन व सैंधव यांचा कल्क चुक्रतैल (या निदानांत सांगितलें आहे) त्याशीं मिळवून गरम करून गरम गरम असें मर्दन करावें; ह्मणजे खल्लीवात व शूल यांचें निवारण करितो.

## स्थाननामलक्षणवातव्याधिनिदान.

स्थाननामानुरूपैश्चलिंगैःशेषान्विनिर्दिशेत् ॥ सर्वेष्वेतेषुसंसर्गंपित्तादेरुपलक्षयेत् ॥ प्रथमंह्स्वकेशत्वंततोवाचालतापिच ॥ आटोपःपार्श्वशूलंचपुरीषस्यातिगाढता ॥ तथामलाप्रवृत्तिश्चकंपस्तंभश्चरूक्षता ॥ कार्श्यकार्ष्ण्यंचशैत्यंचलोमहर्षोव्यथातथा ॥ तोदोभेदःशिरास्फूर्तिरंगमर्दोंगशुष्कता ॥ संकोचश्चांगविभ्रंशोमोहश्चंचलचित्तता ॥ निद्रानाशःस्वेदनाशोबलहानिश्चभीरुता ॥ शुक्रक्षयोरजोनाशोगर्भनाशःपरिश्रमः ॥ एवंविधानिरूपाणिकरोतिकुपितोनिलः ॥ हेतुस्थानविशेषेणभवेद्रोगविशेषकृत् ॥

अर्थ– बाकी राहिलेले वायूंचा त्या त्या स्थानानुरूप नाम निर्देश करावा; आणि ह्या सर्व वायूमध्ये पित्तादिकांचा संसर्ग जाणावा. ते वातभेद सांगतो. ह्स्व केशत्व, वाचाळपणा, गुडगुड शब्द, पार्श्वशूल, शौचाला खडा धरतो, मळबद्धता, कंप, स्तब्धता, रूक्षता, कृशता, कृष्णता, शैत्य, रोमहर्ष, ठणका, शूळ, भेद, शिरांचें स्फुरण, अंगमर्द, अंगशुष्कता, अंगसंकोच, अंगभ्रंश, मोह, चित्ताला चंचळपणा, निद्रानाश, स्वेदनाश, बलहानि, भ्याडपणा, शुक्रक्षय, रजःक्षय, गर्भनाश व श्रम या प्रमाणें वायु कुपित झाला असतां; हेतु व स्थान यांच्या योगानें नानाव्याधि उत्पन्न करितो.

## चिकित्सा.

सामान्यवातरोगाणांयाचिकित्साप्रवर्तते ॥
एषांसैवविधातव्याततस्तेयांतिसंक्षयं ॥

अर्थ–सामान्यवातरोगावर जी चिकित्सा सांगितली आहे, ती यांवर करावी; ह्मणजे नाश पावतील.

## लशुनसेवन.

अन्नप्रकारैःपललप्रकारैर्गोधूमकैर्वायवसक्तुभिर्वा ॥

दुग्धेनतैलेनघृतेनचापियुक्तानिशीतिल्शुनानिखादेत् ॥

अर्थ–भक्ष्यपदार्थांशीं किंवा मांसाच्या प्रकाराशीं; किंवा गोधूम, यव, सातु, दूध, तेल व तूप यांबरोबर शीतनाशार्थ लसूण भक्षण करावी.

## शुंठ्यादिकाढा.

विश्वैरंडशिफादारुगुडूचीसहचरास्तथा ॥

एतत्क्काथोऽस्तिसंधिस्थंवातंहंतिनिषेवितः ॥

अर्थ–सुंठ, एरंडमूळ, देवदार, गुळवेल व कोरांटा यांचा काढा घेतला असतां; अस्थिगत व संधिगत वायूचा नाश करितो.

## दशमूलादिकाढा.

दशमूलीकषायेणपिबेद्वानागरांभसा ॥

कटिशूलेषुसर्वेषुतैलमैरंडसंभवं ॥

अर्थ–दशमुळांच्या काढ्याशीं, किंवा सुंठीच्या काढ्याशीं एरंडाचें तेल द्यावें.

## कटिवातावर लाडू.

आलिवंखाखसंखाचंखर्जूरंमेथिकातिला:॥ मिशिद्वयंचभल्लास्थिवाता मंबब्बुलतथा ॥ सारंचैवपलंग्राह्यंगुडोद्विकुडवस्तथा ॥ घृतंद्विकुडवं चैवलड्डकान्कारयेद्भिषक् ॥ द्विकर्षंभक्षयेत्प्रातःकटिवातविनाशनं ॥ धातुस्तंभंधातुवृद्धिंकुरुतेनात्रसंशयः ॥

अर्थ–अहाळींव, खसखस, खारीक, मेथ्या, तिळ, शोप, बाळंतशोप, बिबव्याचे गोळे, बदाम, गोंद व चारोळ्या हीं प्रत्येक ४ तोळे; गूळ व तूप हीं प्रत्येक ३२ तोळे घेऊन यांचे दोन तोळ्याचे लाडू करावे. त्यांतून प्रातःकाळीं एक भक्षण करावा. तो कटिवायूचा नाश करितो; व धातूचें स्तंभन व धातूची वृद्धि करितो, यांत संशय नाहीं.

## ऊरुस्तंभावर सामान्यविशेषचिकित्सा.

ऊरुस्तंभंजयेद्रुक्षस्वेदमर्दनकौशिकैः ॥ पिप्पलीपिप्पलीमूलं भल्लातकफलानिच ॥ एतत्कल्कश्चसक्षौद्रऊरुस्तंभनिवारणः॥

अर्थ–ऊरुस्तंभव्याधि–रूक्षस्वेद, मर्दन व गुग्गुळ या उपचारानीं शमवावा; व पिंपळी, पिंपळमूळ व बिबवे यांचा कल्क मधासीं द्यावा. तो ऊरुस्तंभाचा नाश करितो.

## सामान्यसंज्ञा.

वामनत्वांगसंकोचभंगभेदग्रहव्यथाः॥ मर्दनैर्बस्तिभिःक्काथैःस्वेदनैश्च

भिषक्जयेत् ॥ अपतानव्रणायामौसस्नेहैर्व्रणचिकित्सितैः ॥ अंगरौक्ष्य स्तंभकंपकार्श्यकापिशतोदनैः ॥ दौर्बल्यस्फुरणेभ्रंशेस्नेहैर्मर्दनमिष्यते ॥ शुक्रकार्श्यशुक्रनाशेशुक्रस्यातिप्रवर्तने ॥ विड्ग्रहेबद्धविट्केचस्ने हपानंहितंमतं ॥

अर्थ–कुब्ज, अंगाचा संकोच, ठणका व आंग धरणें इत्यादिकांला मर्दन, बस्ति, काढे इत्यादि देणें, घाम काढणें यांणीं जिकावें; आणि अपतान व व्रणायाम यांला स्नेह व व्रणचि कित्सा करावी; व आंगाची रुक्षता, अंगस्तंभ, कंप, कृशता, काळेपणा, ठणका, दुर्बळता, अंगस्फुरण व अंगभ्रंश यांवर स्नेहादिकांनीं मर्दन करावें; आणि धातुक्षीण, धातुनाश, धातु फार जाऊं लागली तर, विड्ग्रह व बद्धविट्क यांला स्नेहपान हितकारक व मान्य आहे.

## ऊर्ध्ववातलक्षण.

अधःप्रतिहतोवायुःश्लेष्मणामारुतेनच ॥
करोत्युद्गारबाहुल्यमूर्ध्ववातःसउच्यते ॥

अर्थ–श्लेष्मवातानें अधोभागीं कोंडलेला वायु फार ढेंकरा उत्पन्न करितो, त्याला ऊर्ध्ववात ह्मणतात.

## शुंठ्यादिचूर्ण.

भागादशविश्वायास्तत्तुल्यावृद्धदारुकस्यापि ॥ पथ्यात्रपंच भागाचतुरंशोहिंगुसंभृष्टं ॥ एकःसैंधवभागस्तत्तुल्यंचित्रकं चात्र ॥ संवृद्धमूर्ध्ववातंहंत्येतच्चूर्णितंभुक्तं ॥

अर्थ–सुंठ व वृद्धदारु १० तोळे, हरीतकी ५ तोळे, भाजलेला हिंग चारतोळे, सैंधव व चित्रक, एक एक तोळा या सर्वांचे चूर्ण तयार करून घ्यावें; ह्मणजे फार वाढले ल्या ऊर्ध्ववाताचा नाश करितें.

श्यामामूलंक्षीरपिष्टंनिपीतंवासायुक्तंनाशयेदूर्ध्ववातं ॥

अर्थ–पिंपळीचें मूळ दुधांत वाटून त्यांत अडुळशाचा रस घालून द्यावें; ह्मणजे ऊर्ध्ववात नाश पावतो.

## त्रिकशूललक्षण.

स्फिक्सक्थ्नोःपृष्ठवंशास्थ्नोर्यःसंधिस्तत्त्रिकंस्मृतं ॥
तत्रवातेनयापीडात्रिकशूलंतदुच्यते ॥

अर्थ–मानेजवळच्या व कटिच्या त्रिकामध्यें जो वायूनें शूळ होतो, त्याला त्रिकशूल ह्मणतात.

## चिकित्सा.

कारयेद्वालुकास्वेदं त्रिकशूली प्रयत्नतः ॥
खट्वाधस्तत्करीषाग्निं धारयेत्सततं नरः ॥

अर्थ–त्रिकशूलीरोग्याने वाळवेचा शेक घ्यावा; आणि मंचकाखालीं निरंतर शें वऱ्यांचा अग्नि ठेवून शेक घ्यावा.

## अभादित्रयोदशांगगुग्गुलु.

आभाश्वगंधाहपुषागुडूचीशतावरीगोक्षुरकश्चरास्ना ॥ श्यामाशता ह्वाचशठीयवानीसनागराचेतिसमंविचूर्ण्य ॥ सर्वैःसमंगुग्गुलुमत्र दद्यात्क्षिपेदिहाज्यंचतदर्धभागं ॥ तद्भक्षयेदर्धपिचुप्रमाणंप्रभातका लेसुरयाथयूषैः ॥ मद्येनवाकोष्णजलेनवाथक्षीरेणवामांसरसेनवापि॥ त्रिकग्रहेजानुहनुग्रहेचवातेभुजस्थेचरणस्थितेच॥संधिस्थितेचास्थिग तेचतस्मिन्मज्जास्थितेस्नायुगतेचकोष्ठे॥रोगान्हरेद्वातकफानुविद्धा न्वातेरितान्हृद्ग्रहयोनिदोषान्॥भग्नास्थिविद्धेषुचखंजतायांसगृध्र सीकेखलुपक्षवाते॥महौषधंगुग्गुलुमेतमाहुस्त्रयोदशांगंभिषजःपुराणाः॥

अर्थ–बाभळीचें बीं, असगंध, शेरणी, गुळवेल, शतावरी, गोखरु, रास्ना, पिंपळी बडिशोप, कचोरा, ओंवा व सुंठ या सर्वांचीं समभाग चूर्णे घेऊन सर्वांबरोबर शुद्ध केलेला गुग्गुलु व गुग्गुलूच्या निमें तूप घालावें; ह्मणजे सिद्ध झाला. हा एककर्ष प्रातः काळीं सुरबरोबर, किंवा यूषबरोबर अथवा मद्य, कोमट पाणी, दूध किंवा मांसरस, यां बरोबर घ्यावा; ह्मणजे त्रिकांतील ग्रह, जानुग्रह, भुजस्थवात, चरणस्थित, स्नायुगत, कोष्ठवात व वातकफापासून झालेला व्याधि, वातापासून झालेला हृदयशूल, योनिदोष, भग्नास्थि, फुटलेलें हाड, खंजवात, गृध्रसी, पक्षवात, यांचा नाश करितो. हा त्रयोदशांग गुग्गुलु, मोठें औषध आहे, असें पूर्वींचे वैद्य सांगत आले.

## रसोनाष्टक.

रसोनपक्वकंदस्यगुलिकानिस्तुषीकृताः ॥ पाटयित्वाचमध्यस्थंदूरी कुर्यात्तदंकुरं ॥ निश्युग्रगंधनाशायदध्नासंनीयरक्षयेत् ॥ ततःप्रक्षाल्य संशोष्यशिलायांपरिपेषयेत् ॥ कल्कस्यपंचमंभागंचूर्णमेषांविनिःक्षिपे त् ॥ सौवर्चलंयवानींचभर्जितंहिंगुसैंधवं ॥ कटुत्रिकंजीरकंचसमभा गंविचूर्णयेत् ॥ तिलतैलंचकल्कस्यतुर्यांशंतत्रमिश्रयेत् ॥ खादेत्कर्षमि

तंप्रातःकिंवादोषाद्यपेक्षया ॥ अनुपानंप्रकुर्वीतवातारिशृतमन्वहं ॥ सर्वांगैकांगजंवातमर्दितंचापतंत्रकं ॥ अपस्मारंतथोन्मादमूरुस्तंभंच गृध्रसीं ॥ उरःपृष्ठकटीपार्श्वकुक्षिपीडांकृमीन्हरेत् ॥ मद्यंमांसंतथाम्लं चरसंसेवेतनित्यशः ॥ व्यायाममातपंरोषमतिनीरंगुडंस्त्रियं ॥ रसोन मश्नन्पुरुषस्त्यजेदेतन्निरंतरं ॥ वर्जयेत्तदतीसारिप्रमेहीपांडुरोगवान् ॥ अरोचकीगर्भिणीचमूर्छार्शोरोगसंयुतः ॥ रक्तपित्तीचशोषीचयक्ष्मीछर्य दितोनरः ॥ पित्तेतुपथ्यया कुर्यात्प्रयोगांतेविरेचनं ॥ अन्यथातस्यजा यंतेकुष्ठपांड्वामयादयः ॥ स्त्रीस्तन्यांतरितंदद्याद्बालानामप्यनिच्छतां ॥ तथापिलभतेसिद्धिंमहावीर्याद्रसोनतः ॥

अर्थ—जून लसुणीच्या पाकळया सोलून फोडून आंतिल कोंब काढून घाण जाण्याकरि- तां रात्रीं दह्यांत घालून ठेवाव्या. प्रातःकाळीं धुवून स्वच्छ पुसून घ्याव्या; नंतर त्यांचा वाटून कल्क करावा, त्या कल्कांत संचळ, ओंवा, भाजलेला हिंग, सैंधव, सुंठ, मिरीं, पिंपळी व जिरें ह्यांचें समभाग चूर्ण करून कल्काचे पंचमांश घालावें; व तिळांचें तेल कल्काचे चतुर्थांश घालून सर्व एकत्र करून प्रातःकाळीं एक तोळा भक्षण करावें; किंवा दोष व बल पाहून घ्यावें. याला अनुपान एरंडमुळांचा काढा घ्यावा; ह्मणजे सर्वांग व एकांगगतवात, अर्दित, अपतंत्रक, अपस्मार, उन्माद, ऊरुस्तंभ, गृध्रसी, उर, पाठ, कंबर, पार्श्व व कुक्षि यांची पीडा व कृमि, यांचा नाश करितो. हें औषध घेतलें असतां; मद्य, मांस, अम्लरस हे नेहेमीं सेवन करावे; आणि व्यायाम, ऊन, रोष, फार पाणी, गूळ, स्त्रीसेवन, हीं लसूण भक्षण करणाऱ्या पुरुषानें नेहमीं सोडावीं. हें औषध अतीसारी, मेही, पांडुरोगी, अरोचकी, गर्भिणी, मूर्छावान्, अर्शरोगी, रक्तपित्तवान्, क्षयी, शोषी, ओकारीचा रोगी, याणीं घेऊं नये. पित्त झालें असतां; बाळहरडीचें ढाळक घ्यावें. रेचक न घेतलें असतां; कुष्ठ व पांडु इत्यादि रोग होतात. स्त्रीच्या दुग्धाशीं बालानां इच्छा नसली तरी द्यावें दिलें असतां; ह्या लसुणीच्या औषधानें रोग शांति होत्ये.

## व्रणायाम सांगतो.

मर्माश्रितंव्रणंप्राप्यवायुर्यःसर्वदेहगः ॥
वेगैरानामयेद्देहंव्रणायामंतुतंत्यजेत् ॥

अर्थ—सर्वशरीरगत वायु मर्मस्थानींच्या व्रणाप्रत जाऊन आपल्या वेगें करून देहाला नम्र करितो. त्याला व्रणायाम ह्मणतात. तो असाध्य जाणावा.

ह्रदयंयदिवापृष्ठमुन्नतंक्रमितःसह ॥

कुब्धोवायुर्यदाकुर्यात्तदातंकुब्जमादिशेत् ॥

अर्थ—हृदय अथवा पृष्ठ हीं वायु क्षुब्ध होऊन उंच होतात, त्याला कुब्ज ह्मणतात.

## कृच्छ्रसाध्यत्व.

हनुस्तंभार्दिताक्षेपपक्षाघातापतानकाः ॥ कालेनमहतावातायत्ना

त्सिध्यंतिवानवा ॥ नवान्बलवतस्त्वेतान्साधयेन्निरुपद्रवान् ॥

अर्थ—हनुस्तंभ, अर्दित, आक्षेपक, पक्षघात व अपतानक हे वातरोग मोठ्या यत्नें करून हेमंत व शिशिरऋतूंत सिद्ध होतात; आणि नूतन असून उपद्रवरहित असतां; व रोगी क्षीण झाला नसतां; औषधादिकें करून साध्य होतात.

## वातरोगाचें असाध्यत्व.

विसर्पदाहरुक्संगमूर्छारुच्यग्निमार्दवैः ॥ क्षीणमांसबलंवातातघ्नंति

पक्षवधादयः ॥ शूनंसुप्तत्वचंभग्नंकंपाध्माननिपीडितं ॥ रुजार्तिमंतंच

नरंवातव्याधिर्विनाशयेत् ॥ अव्याहतगतिर्यस्यस्थानस्थःप्रकृतिस्थि

तः ॥ वायुःस्यात्सोधिकंजीवेद्वीतरोगःसमाःशतं ॥

अर्थ—विसर्प, दाह इत्यादि नानाप्रकारची पीडा व मूत्र, पुरीष, अपानवायु याचा अवरोध, मूर्छा, अरुचि व अग्निमांद्य इत्यादि उपद्रवें करून ज्याचें मांस व बळ क्षीण झालें, आणि सूज व त्याचा सप्तत्वचा बधिर व भग्न जाल्या आहेत; व कंप आणि पोट फुगणें यांहीं करून पीडित होऊन ज्यास ठणका होतो अशा मनुष्याचा वातरोग नाश करितो; व जा मनुष्याचा वायु अव्याहतगति असून आपलें स्थान व प्रकृति सोडित नाहीं, तो मनुष्य निरोगी असून शत वर्षांपेक्षां अधिक वांचतो.

## बत्तिसी काढा

रास्नागुडूचीह्येरंडदेवाव्हाचाभयासठी ॥ वलोग्रगंधापाठाचशतपुष्पा

पुनर्नवा ॥ पंचमूलीविषामुंडीसौर्यकश्चदुरालभा ॥ यवानीपौष्करं

मूलमश्वगंधाप्रसारिणी ॥ गोक्षुरंचाटरूपंचत्रपुषावृद्धदारुकं ॥ श

तावरीतथाब्राह्मीगुग्गुलीक्षीरकंचुका ॥ समभागैरिमैःसर्वैःकषायमुप

कल्पयेत् ॥ कृष्णाचूर्णेनवायोगराजगुग्गुलुनाथवा ॥ अजमोदादि

नावापितैलेनैरंडजेनवा ॥ वातरोगेपुसर्वेषुकफशोफेप्रतानके ॥ मन्या

स्तंभेतथाशोषेपक्षाघातेसुदारुणे ॥ अर्दितक्षेपकुब्जेचहनुग्रहस्वरग्रहे ॥

आढ्यवातेतथामूकेखंजेचैवाववाहुके ॥ गृध्रस्यांजानुभेदेचगुल्मेशू

लेकटिग्रहे ॥ सामेचैवनिरामेचसप्तधातुगतेनिले ॥ आवृतेचैवानावृतेचवातरक्तेविशेषतः ॥ एषद्वात्रिंशकःक्काथःकृष्णात्रेयेणभाषितः ॥

अर्थ—रास्ना, गुळवेल, एरंडमूळ, देवदार, हरीतकी, कचोरा, चिकणामूळ, वेखंड, पाहाडमूळ, शेपा, पुनर्नवा, पंचमुळें, अतिविष, मुंडी, बिब्बळा, धमासा, ओंवा, पुष्करमूळ, अश्वगंध, लाजाळू, गोखरू, अडुळसा, कांटेखिरणी, वृद्धदारू, शतावरी, ब्राह्मी, गुग्गुळ; आणि क्षीरकंचुका हे पदार्थ समभाग घेऊन त्यांचा काढा करावा; आणि त्यांत पिंपळीचें चूर्ण, योगराजगुग्गुल, अजमोदादिचूर्ण किंवा एरंडतेल, यांतून कोणतेंही एक घालून संपूर्ण वातरोग, कफशोष, प्रतान, मन्यास्तंभ, शोष, पक्षघात, अर्दित, आक्षेपक, कुब्ज, हनुग्रह, स्वरभंग, आढ्यवात, मूकवात, खजवात, अवबाहुक, गृध्रसी, जानुभेद, गुल्म, शूल, कटिग्रह, आमवात, निरामवात, सप्तधातुगत वात, आवृत, अनावृत, आणि वातरक्त यांवर द्यावा. हा द्वात्रिंशांग काढा अत्रिगोत्रोत्पन्न कृष्णनामक पुरुषानें सांगितला आहे.

## लघुरास्नादि काढा.

रास्नागुडूचीवातारिदेववारुमहौषधैः ॥
पिबेत्सर्वांगिकेवातेसमज्जास्थिसमांसगे ॥

अर्थ—रास्ना, गुळवेल, एरंडमूळ, देवदार व सुंठ यांचा काढा सर्वांगवात, मज्जागत, अस्थिगतवात; आणि मांसगतवात यांवर द्यावा.

## दुसरा प्रकार.

रास्नैरंडशिफादारुवचाशुंठीदुरालभा ॥ अभयातिविषामुस्ताशतमूलीवृषातथा ॥ अमीषांक्काथपानेनकासामश्लेष्मसंधिगः ॥ मज्जास्थिस्नायुसर्वांगवायुर्नश्यतिनिश्चितं ॥

अर्थ—रास्ना, एरंडमूळ, देवदार, वेखंड, सुंठ, धमासा, हरीतकी, अतिविष, नागरमोथा, शतावरी व अडुळसा यांचा काढा प्राशनार्थ द्यावा; म्हणजे खोकला, आमवात, श्लेष्मवात, संधिवात व मज्जा, अस्थि व स्नायू यांतील वायु आणि सर्वांगवायु हे निश्चयानें नाश पावतात.

## रास्नादिचूर्ण.

रास्नाकुष्ठनतद्रुपटुकटुशठीपाठावचासारिवाभूनिंबत्रिफलादशजटानिर्गुंडिकैरंडकं ॥ हिंग्वाम्लार्द्रकवस्तगंधकवरीक्षारौपटूनांत्रयंचूर्णंपुष्करतैलयुक्तमखिलान्वातानशीतिर्जयेत् ॥

अर्थ—रास्ना, कोष्ठ, तगर, सुंठ, मिरीं, पिंपळी, चवक, चित्रक, पिंपळमूळ, कचोरा पाहाडमूळ, वेखंड, उपळसरी, कांडचिराईत, त्रिफळा, चिकणा, दशमूळ, निर्गुड, एर-

डमूळ, हिंग, आम्लवेतस, आलें, रानतुळस, बाभूळ, जवखार, टांकणखार, सैंधव, बिडलोण व पादेलोण, यांचें चूर्ण पोखरमुळाचे काढ्याबरोबर सिद्ध केलेलें तेल, याशीं सेवन केलें असतां; ऐशीं प्रकारच्या वायूचा नाश होतो.

## आभादिचूर्ण.

आभारास्नागुडूचीचशतावर्योमहौषधं ॥ शतपुष्पाश्वगंधाचहपुषा वृध्दारुकं ॥ यवानीचाजमोदाचसमभागानिकारयेत् ॥ सूक्ष्मचूर्णमिदंकृत्वाबिडालपदकंपिबेत् ॥ मद्यैर्मांसरसैर्यूषैस्तक्रैरुष्णोदकेनवा ॥ सर्पिषावापिबेद्यस्तुदधिमंडेनवापुनः ॥ अस्थिसंधिगतंवायुंस्नायुमज्जाश्रितंचयत् ॥ कटिग्रहंगृध्रसींचमन्यास्तंभंहनुग्रहं ॥ येचकोष्ठगतारोगास्तांश्चसर्वान्विनाशयेत् ॥ आभाद्योनामचूर्णोयंसर्वव्याधिनिबर्हणः ॥

अर्थ–बाभळीचें बीं, रास्ना, गुळवेल, शतावरी, महाशतावरी, सुंठ, बडिशेप, अस्कंध, शेरणी, वरधारा, ओंवा, अजमोदा. हीं सर्व समभाग घेऊन त्यांचे चूर्ण करून मद्य, मांसरस, यूष, तक्र, ऊनपाणी, तूप व दह्यांचा मंड त्यांतून एका अनुपानाशीं २ दोन तोळें प्रमाणें खावें; ह्मणजे अस्थि, संधि, स्नायु, मज्जा व कंबर या ठिकाणचा वायु, गृध्रसी, मन्यास्तंभ, हनुग्रह व कोष्ठगतरोग या सर्वांचा नाश करील. याला आभादिचूर्ण ह्मणतात. हें सर्व व्याधिनाशक आहे.

## रास्नादि चूर्ण.

रास्नाशतावरीदारुकंकोलंलांगलीकणा ॥ रक्तचंदनमंजिष्ठावृध्दिसैंधवपद्मकः ॥ अश्वगंधामृतापाठामुस्तैलाशालिपर्णिका ॥ शतपुष्पाजमोदाचशुंठीकुष्ठंसमांशतः ॥ संघृष्टंचूर्णमेतेषांभक्षितंतप्तवारिणा ॥ त्वगास्थिस्नायुसंभूतंमारुतंहंतिवेगतः ॥

अर्थ–रास्ना, शतावरी, देवदार, कंकोल, कळलावी, पिंपळी, रक्तचंदन, मंजिष्ठा, वृध्दि, सैंधव, पद्मकाष्ठ, अश्वगंध, गुळवेल, पाहाडमूळ, नागरमोथा, एलची, शालिपर्णी, शतपुष्पा, अजमोद, सुंठ व कोष्ठ हीं समभाग घेऊन एकत्र करावें; आणि तें गरमपाण्याशीं द्यावें; ह्मणजे त्वचा, अस्थि व स्नायु यांतील वातव्याधीचा वेगानें नाश करितें.

## शिग्रुमूलादिचूर्ण.

शिग्रुमूलकणारास्नाशुंठीगोक्षुरसैंधवं ॥ वन्हिश्चैरंडमुलंचअमीषांचूर्णसंभवा ॥ गुटिकाप्रत्यहंतासामेकैकामदतिध्रुवं ॥ सर्वांगकुपितोवायुःशमंयात्यतिवेगतः ॥

अर्थ—शेवग्याचें मूळ, पिंपळी, रास्ना, सुंठ, गोखरू, सैंधव, चित्रक व एरंडमूळ यांचें चूर्ण करुन त्याची गोळी करावी. ती दररोज एकेक भक्षण करावी; ह्मणजे सर्वांगामध्यें कोपलेला वायु अतिवेगानें शमन पावतो.

## अजमोदादि चूर्ण.

अजमोदाकणारास्नागुडूचीविश्वभेषजं ॥ शतपुष्पाश्वगंधाचशतमूली समांशतः ॥ सुश्लक्ष्णंचूर्णमेतेषांभक्षितंसर्पिषासह ॥ हृत्कुक्षिकोष्ठकंठस्थंमारुतंहंतिवेगतः ॥

अर्थ—अजमोदा, पिंपळी, रास्ना, गुळवेल, सुंठ, शोपा, अश्वगंध व शतावरी यांचें समभाग चूर्ण करून तें तुपाशीं भक्षण करावें; ह्मणजे हृदय, कुशी, कोष्ठ व कंठ यांतील वातविकारांचा अतिवेगानें नाश करितें.

## कुष्ठादि चूर्ण.

कुष्ठेंद्रयवापाठापावकोतिविषानिशा ॥
एतेषांचूर्णमुष्णांबुपीतंहंत्यनिलान्बहून् ॥

अर्थ—कोठ, इंद्रजव, पाहाडमूळ, चित्रक, अतिविष आणि हळद यांचें चूर्ण ऊनपाण्याशीं प्राशनार्थ द्यावें, तें अनेकवातविकारांचा नाश करितें.

## शुंठ्यादि चूर्ण.

शुंठीमरिचदारूणांचूर्णंक्वाथस्यपानतः ॥
सर्वेवाताविनश्यंतिदेहोपद्रवकारिणः ॥

अर्थ—सुंठ, मिरीं व देवदार यांचें चूर्ण त्यांच्याच काढ्याशीं द्यावें; ह्मणजे देहाला उपद्रव करणारे सर्व वातविकार नाश पावतात.

## रास्नादि चूर्ण.

रास्नापुनर्नवाशुंठीगुडूच्येरंडजंशृतं ॥
सप्तधातुगतेवातेवातेसर्वांगगेपिबेत् ॥

अर्थ—रास्ना, पुनर्नवा, सुंठ, गुळवेल व एरंडमूळ यांचा काढा साधातुगत वात, आमवात आणि सर्वांगवात यांवर द्यावा.

## द्वात्रिंशकगुग्गुलु.

त्रिकटुत्रिफलामुस्तंविडंगंचव्यचित्रकौ ॥ वचैलापिप्पलीमूलंहपुषासुरदारुच ॥ तुंबरुंपौष्करंकुष्ठंविषाचरजनीद्वयं ॥ बाष्पिकाजीरकंशुंठीशतपत्राबुरालभा ॥ सौवर्चलंविडंगंचक्षारौद्विरदपिप्पली ॥

सैंधवंचसमानेनतुल्यंदत्वाचगुग्गुलुं ॥ साधयित्वाविधानेनकोलमात्रांवटींचरेत् ॥ घृतेनमधुनावापिभक्षयेत्तामहर्मुखे ॥ आमंहन्यादुदावर्तमंत्रवृद्धिंगुदक्रमीन्॥महाज्वरोपसृष्टानांभूतोपहतचेतसां ॥ आनाहोन्मादकुष्ठानिपार्श्वशूलहृदामयान् ॥ गृध्रसींचहनुस्तंभंपक्षाघातापतानकान् ॥ शोफप्लीहानमत्युग्रंकामलामपचींतथा ॥ नाम्नाद्वात्रिंशकोह्येषगुग्गुलुःकथितोमहान् ॥ धन्वंतरिकृतोयोगःसर्वरोगनिकृंतनः॥

अर्थ—त्रिकटु, त्रिफळा, नागरमोथा, वावडिंग, चवक, चित्रक, दालचिनी, वेलदोडे, पिंपळमूळ, कोरणी, देवदार, चिरफळ, पोखरमूळ, कोष्ठकोळिंजन, अतिविष, दारुहळद, हळद, बाभळी, जिरें, सुंठ, विशेष, धमासा, पादेलोण, वावडिंग, जवखार, टांकणखार, गजपिंपळी व सैंधव हीं एक एक भाग या सर्वांच्या बरोबर गुग्गुळ घेऊन रीतिप्रमाणें सिद्ध करून बोराप्रमाणें गोळी करून मधाबरोबर किंवा तुपाबरोबर प्रातःकाळीं भक्षण करावी; ह्मणजे आम, उदावर्त, अंत्रवृद्धि, गुदकृमि यांचा नाश करील; व महाज्वरानें पीडित, भूतबाधा झालेला, आनाह, उन्माद, कुष्ठ, पार्श्वशूल, हृद्रोग, गृध्रसी, हनुस्तंभ, पक्षाघात, अपतानक, शोफ, प्लीहा, कामला व अपची हे रोग झालेल्या मनुष्यांस हितकारक आहे. ह्याला द्वात्रिंशनामा गुग्गुल, असें ह्मणतात. हा मोठा धन्वंतरिकृत योग सर्व रोगांचा नाश करणारा आहे.

## योगराजगुग्गुळ वातादिरोगांवर.

नागरंपिप्पलीचव्यंपिप्पलीमूलचित्रकैः ॥ भृष्टंहिंग्वजमोदंचसर्षपाजीरकद्वयं ॥ रेणुकेंद्रयवाःपाठाविडंगंगजपिप्पली ॥ कटुकातिविषाभार्ङीवचामूर्वेतिभागतः ॥ प्रत्येकंशाणिकानिस्युर्द्रव्याणीमानिविंशतिः ॥ द्रव्येभ्यःसकलेभ्यश्चत्रिफलाद्विगुणाभवेत् ॥ एभिश्चूर्णीकृतैःसर्वैःसमोदेयस्तुगुग्गुलुः ॥ वंगंरौप्यंचनागंचलोहसारंतथाभ्रकं ॥ मंडूरंरससिंदूरंप्रत्येकंपलसंमितं॥गुडपाकसमंकृत्वाइमंदद्याद्यथोचितं ॥ एकपिंडंततःकृत्वाधारयेत्घृतभाजने ॥ गुटिकाःशाणमात्रास्तुकृत्वाग्राह्यायथोचिताः ॥ गुग्गुलुर्योगराजोयंत्रिदोषघ्नोरसायनः ॥ मैथुनाहारपानानांत्यागोनैवात्रविद्यते ॥ सर्वान्वातामयान्कुष्ठानर्शांसिग्रहणीगदं ॥ प्रमेहंवातरक्तंचनाभिशूलंभगंदरं ॥ उदावर्तंक्षयंगुल्ममपस्मारमुरोग्रहं ॥ मंदाग्निंश्वासकासांश्चनाशयेदरुचिंतथा ॥ रेतोदोष

हरःपुंसांरजोदोषहरःस्त्रियां ॥ पुंसामपत्यजनकोवंध्यानांगर्भदस्तथा ॥ रास्नादिक्काथसंयुक्तोविविधंहंतिमारुतं ॥ काकोल्यादिशृतात्पित्तंक फमारग्वधादिना ॥ दार्वीशृतेनमेहांश्चगोमूत्रेणैवपांडुतां ॥ मेदोवृद्धिं चमधुनाकुष्ठंनिंबशृतेनवा ॥ छिन्नाक्काथेनवातास्रंशोथंशूलंकणाशृ तात् ॥ पाटलाक्काथसहितोविषंमूषकजंजयेत् ॥ त्रिफलाक्काथसहि तोनेत्रार्तिंहंतिदारुणां ॥ पुनर्नवादेःक्काथेनहन्यात्सर्वोदराण्यपि ॥

अर्थ–सुंठ, पिंपळी, चवक, पिंपळमूळ, चित्रक, भाजलेला हिंग, अजमोदा, शिरस, जिरें, शाहाजिरें, रेणुकबीज, इंद्रजव, पाहाडमूळ, वावडिंग, गजपिंपळी, कटुकी, अतिविष, भारंगमूळ, वेखंड, मोरवेल हीं वीस औषधें शाण शाण प्रमाण घ्यावी; व या औषधांचे दुप्पट त्रिफळा घ्यावी, मग हीं सारीं औषधें कुटून चूर्ण करून त्याचे समभाग शुद्ध केले ला गुग्गुळ घेऊन बारीक वाटून गुळाच्या पाकासारिखा पातळ करून त्यांत हें चूर्ण घा लावें. मग वंगभस्म, रौप्यभस्म, नागभस्म, लोहभस्म, अभ्रकभस्म, मंडूरभस्म व रससिंदूर हीं सात भस्में पळ पळ प्रमाण त्या गुग्गुळांत घालून साऱ्यांचा एक पिंड करून त्याच्या गोळ्या शाण शाण प्रमाण बांधून तुपाचे राबल्या मडक्यांत ठेवाव्या. याला योगराज गुग्गु ळ असें ह्मणतात. हा गुग्गुळ घेतला असतां; त्रिदोष दूर करितो; व हें रसायन आहे, याला मैथुन व खाणें, पिणें यांचा निषेध नाहीं. पथ्य केल्यावांचून गुण होतो, यापासून सारे वायूचे रोग, कुष्ठें, मुळव्याध, संग्रहणी, परमा, वातरक्त, नाभीचा शूळ, भगंदर, उदावर्तवायु, क्षयरोग, गुल्म, फेंपरें, उरोग्रहरोग, अग्निमांद्य, कास, श्वास व आवटणें हे रोग दूर होतात. हा योगराज गुग्गुळ पुरुषाचे धातूचा विकार दूर करितो, स्त्रियांच्या विटाळाचा दोष दूर करितो, पुरुषाची धातु वाढवून पुत्र देणारा होतो, वांझोट्या स्त्रि. यांनां गर्भ देतो, रास्नादिकाढ्यांत घेतला असतां; नानाप्रकारचे वायु दूर होतात, कांकोल्यादि काढ्यांत घेतला असतां; पित्तरोग दूर होतो, आरग्वधादि काढ्यांत घेतला असतां; पांडुरोग जातो, शरीरांत मेद दुष्ट होउन शरीर वाढलें असतां; मधांत घ्यावा, कु ष्ठरोगांस कडूनिंबाचे काढ्यांत घ्यावा, रक्तवायूवर गुळवेलीचे काढ्यांत, शूळ व सूज यांजवर पिंपळीचे काढ्यांत उंदिराचे विषावर पाडळीचे काढ्यांत, डोळ्यांचे रोगांवर त्रिफळेचे काढ्यांत, पुनर्नवादिकांचे काढ्यांत साऱ्या उदररोगांवर घ्यावा. याप्रमाणें अनुपानें जाणावीं.

## षडशीतिगुग्गुळ.

सैर्यकासविपादाहृव्याघ्रीयुक्चविकाद्य्रपः ॥ कृष्णाब्दोग्राघनाभीरुवा ट्यालमिशिवल्लरी ॥ पथ्याशुंठीछिन्नरुहाशठ्यारग्वधगोक्षुरं ॥ वि शाखामोदकीतिक्तग्रंथिभांर्डीविदारिका ॥ अलंबुषाहस्तिकर्णीबस्तगं

धाविषाणिका ॥ शिवाक्षमुसलीकौंतिकाकोलीदीप्ययुग्मकं ॥ त्रिवृद्दंतीशिखीशृंगीकोकिलाक्षोदुरालभा ॥ पंचमूलंमहद्वीरतरुःकुष्ठंचजोंगकं ॥ जातिपत्रीफलैलंचकेसरंत्वकूकिरातकं ॥ कुंकुमंदेवकुसुमंविशालानिशिसैंधवं ॥ मंदारमूलंक्रमिजिद्भेमदुग्धारविप्रिया ॥ गजपिप्पल्यपामार्गवानरीनक्तमूलकं ॥ एतैःसमारसाचाभाद्विगुणातैःपुरःसमः ॥ सूतगंधकहिंगूलंटंकणंलोहमभ्रकं ॥ शुल्बंवंगंसूतभस्मनागंताप्यमयोरजः ॥ मीलितंपुरपादंचसर्वमेकत्रकारयेत् ॥ पचेच्चतुर्गुणेक्काथेपुरंषट्कटुजेपुरा ॥ तुर्यांशशोषितेक्काथेपूतेचात्रविनिक्षिपेत् ॥ चूर्णानिपुरमुख्यानिपाचयेन्मृदुवन्हिना ॥ यावद्धनतरंतावद्वटिकाःकारयेत्ततः ॥ स्वर्णप्रमाणासेव्यास्तामधुसर्पिःसमन्विताः ॥ सप्तधातुगतान्यातान्शिरास्नाय्वस्थिसंधिगान् ॥ सामान्निरामान्संसृष्टान्श्लेष्मजान्हंतिकेवलान् ॥ यक्ष्माणमग्निमांद्यंचज्वरंधातुगतंतथा ॥ गुल्मजानूरुकट्यूरोदरहृत्कुक्षिकक्षगान् ॥ अंसमन्याहनुश्रोत्रभ्रूललाटाक्षिशंखगान् ॥ प्रमेहंमूत्रकृच्छ्रंचशूलमाध्मानमश्मरीं ॥ किंपुनर्भेदकान्वातान्प्रत्यंगस्थान्जयत्यलं ॥ गुग्गुलुःषडशीतिर्वैनाम्नाभोजेनकीर्तितः ॥ क्षीयमाणेनशिष्येणप्रार्थितेनपुनःपुनः ॥ सएपराजयोगोयंनदेयोयस्यकस्यचित् ॥ वत्सरेणास्ययोगेनषंढोपिप्रमदाप्रियः ॥ वाजीकरणमन्यच्चपरंनास्माद्विशेषतः ॥ गुणोस्यसेवनान्नित्यंयोस्यात्सोस्याद्ब्रवीमिकिं ॥

अर्थ-श्वेत कोरांटा, धमासा, अतिविष, देवदार, रिंगणी, डोरली, चवक, अडुळसा, पिंपळी, नागरमोथा, वेखंड, धने, शतावरी, लघुचिकणा, बडिशेप, देवदारु, हरीतकी, सुंठ, गुळवेल, कचोरा, बाहव्याचा मगज, गोखरु, पुनर्नवा, मोगरी, कुटकी, पिंपळीमूळ, भारंगमूळ, भुयकोहळा, मुंडी, कांसाळ, अजमोदा, कांकडशिंगी, आवळकाठी, मुसळी, रेणुकबीज, कांकोली, ओंवा, खुरासनी ओंवा, निशोत्तर, दांती, चित्रक, कांकडशिंगी, तालीमखाना, रक्त धमासा, बृहत्पंचमूल, वेलतूर, कोष्ठ कोळिंजन, कृष्णागरु, जातीपत्री, जायफळ, एला, नाकेसर, दालचिनी, किराईत, केशर, लवंग, थोर कवंडळ, हळद, सैंधव, मांदारमूळ, वावडिंग, सिसोळाभेद, सूर्यफूळ, गजपिंपळी, अघाडामूळ, कवचबीज, करंजमूळ, यां सर्वांबरोबर रास्ना, बाभळीचे बीज सर्वांचे दुप्पट, यां सर्वांबरोबर गुग्गळ, पारा, गंधक, हिंगूळ, टांकणखार, लोहभस्म, अभ्रकभस्म, ताम्र, वंग, रससिंदूर, शिसें,

सुवर्णमाक्षीक, मंडूर, हीं सर्व गुग्गुळाचे चतुर्थांश अशीं सर्व एकत्र करून षट्कटूच्या काढयामध्यें गुग्गुळ शोधून तो काढा चतुर्थांश राही तोंपर्यंत अटवून गाळून घ्यावा. त्यांत हीं वरची सर्व चूर्णें टाकून मंद अग्नीनें पचन करावा. घट्ट झाला ह्मणजे गोळ्या. बांधून ठेवाव्या; आणि सामर्थ्य पाहून मद्य व तूप याशीं द्यावा. तोसप्तधातुगत वात, शिरा, स्नायू, अस्थि व संधि यांतील वायु, सामवात, निरामवात, सन्निपातिकवात, केवल श्लेष्मवात, क्षय, अग्निमांद्य, धातुगत ज्वर, गुल्म, जानु, ऊरु, कटी, ऊर, हृदय, कुस, खाक, बाहुमूल, मान, हनवटी, कान, भ्रुकुटि, ललाट, नेत्र, नेत्रांजवळच आंख यांतले वायु, प्रमेह, मूत्रकृच्छ्र, शूल, आध्मान व अश्मरी यांचा नाश करितो; व हा वरकड अमांतील वायु जिंकील यात संशय नाहीं. हा षडशीतिनामक गुग्गुलु भोजानें आपल्या क्षीण झालेल्या शिष्यानें प्रार्थना केली ह्मणून सांगीतला. हा राजयोग यःकश्चिताला देऊं नये. हा योग एक संवत्सर सेवन केल्यानें षंढ पुरुष ही स्त्रियांना प्रिय होईल विशेषें करून याहून दुसरें वाजीकरण नाहीं. याच्या सेवनानें जे गुण होतात ते अनुभवावरून समजावे. मी फार काय सांगू.

## विश्वाद्यगुग्गुलु.

विश्वैरंडशिफाशुंठीदारुकुष्ठससैंधवं ॥ रास्नामृतोद्भवंचूर्णंगु
ग्गुलुर्द्विगुणस्तथा ॥ एकैकागुटिकातस्यप्रत्यहंभाक्षितासती ॥
पथ्याशिनोतिवेगेनहंतिविभ्रममारुतं ॥

अर्थ–शतावरी, एरंडमूळ, सुंट, दारुहळद, कोष्ठ, सैंधव, रास्ना, गुळवेल, आणि या सर्व चूर्णांच्या दुप्पट गुग्गुळ असे एकत्र करून त्याची एकेक गोळी द्यावी; आणि पथ्य करावें; ह्मणजे भ्रमवात नाश पावतो.

## दुसरा प्रकार.

शुंठीकणाकणामूलंविडंगंदारुसैंधवं ॥ रास्नावन्हिर्यवानीच
मरिचोग्रभयासमं ॥ द्विगुणंगुग्गुलोश्चूर्णमाज्ययुक्तंनिहंतिता
न् ॥ वातंविषूचिकांगुल्मंशूलंकंपंचगृध्रसीं ॥

अर्थ-सुंठ, पिंपळीमूळ, वावडिंग, देवदार, सैंधव, रास्ना, चित्रक, ओंवा, मिरीं, कोष्ठ, आणि हरीतकी हीं समभाग; व दुप्पट गुग्गुळ असे एकत्र करून तुपाशीं द्यावा; ह्मणजे वायु, मोडशी, गुल्म, शूळ, कंप आणि गृध्रसी यांचा नाश करितो.

## रास्नादिगुग्गुलु.

रास्नामृतैरंडसुराव्हविश्वंतुल्येनगाढंपुरुणाविमर्द्य ॥
खादेत्समीरीसशिरोगदीचनाडीव्रणीचापिभगंदरीच ॥

अर्थ-रास्ना, गुळवेलीचें सत्व, एरंडमूळ, देवदार, सुंठ हीं एकेक भाग; आणि या सर्वांबरोबर गुग्गुळ घेऊन एकत्र खलून खावा; ह्मणजे वायु, शिरोरोग, नाडीव्रण, भगंदर यांचा नाश होतो.

## दुसरी योगराजगुटी.

नागरंपिप्पलीमूलंचव्यमूषणचित्रकं ॥ भृष्टहिंग्वाजमोदाचसर्षपा जीरकद्वयं ॥ रेणुकेंद्रयवापाठाविडंगंगजपिप्पली ॥ कटुकातिवि षाभार्ङीवचामूर्वाचपत्रकं ॥ देवदारुवचाकुष्ठंरास्नामुस्ताचसैंधवं ॥ एलात्रिकंटकःपथ्याधान्यकंचविभीतकं ॥ धात्रीचत्वगुशीरंचयवक्षा रस्तिलान्यपि ॥ एतानिसमभागानिसूक्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ यावंत्ये तानिसर्वाणितावद्देयोत्रगुग्गुलुः ॥ संमर्द्यसर्पिषापश्चात्सर्वंसंमिश्रये च्चतत् ॥ एकपिंडंततःकृत्वाधारयेद्घृतभाजने ॥ गुटिकाष्टंकमात्रा स्तुखादेत्ताश्चयथोचिताः ॥ गुग्गुलुर्योगराजोयंमहान्मुख्योरसायनं ॥ मैथुनाहरपानानांनियमोनात्रविद्यते ॥ सर्वान्वातामयान्हन्यादाम वातमपस्मृतिं ॥ वातरक्तंतथाकुष्ठंतथादुष्टव्रणानपि ॥ अर्शांसिग्रहणी रोगंप्लीहगुल्मोदराण्यपि ॥ आनाहमग्निमांद्यंचश्वासंकासमरोचकं ॥ प्रमेहंनाभिशूलंचकृमिक्षयमुरोग्रहं ॥ शुक्रदोषमुदावर्तभगंदरविनाश नः ॥ आदौशाणोन्मितंखादेत्ततःकर्षार्धमात्रकं ॥ ततःकर्षमितंखादे द्गुग्गुलुंक्रमतोनरः ॥ दिनानांसप्तकंपूर्वंगुग्गुलुःशाणमावहेत् ॥ द्वि तीयेकर्षमर्धंतुपूर्णकर्षंततःपरं ॥ रास्नादिक्काथसंयुक्तोसर्ववातामयान् हरेत् ॥ काकोल्यादिशतापित्तंकफमारग्वधादिना ॥ दार्वीशृतेनमे हांश्चगोमूत्रेणचपांडुतां ॥ मधुनामेदसोवृद्धिंकुष्ठंनिंबशृतेनच ॥ छि न्नाक्काथेनवातास्रंशूलंमूलकजंशृतं ॥ पाटलाक्काथसहितोविषमूषक संभवं ॥ त्रिफलाक्काथसंयुक्तोदारुणानेत्रवेदना ॥ पुनर्नवादिक्काथेन हंतिसर्वोदराण्यपि ॥

अर्थ-सुंठ, पिंपळीमूळ, चवक, मिरीं, चित्रक, भाजलेला हिंग, अजमोदा, शिरस, जिरें, शाहाजिरें, रेणुकबीज, इंद्रजव, पाहाडमूळ, वावडिंग, गजपिंपळी, कुटकी, अतिविष, भारंगमूळ, वेखंड, मोरवेल, तमालपत्र, देवदार, पिंपळी, कोष्ठ, रास्ना, नागरमो-

था, सैंधव, एलची; गोखरू, हरीतकी, धने, बेहेडा, आवळकाठी, दालचिनी, वाळा, यवक्षार, तीळ या प्रत्येकांचीं समभाग चूर्णें, आणि सर्व चूर्णांसमान गुग्गुळ घालून तुपाशीं मर्दन करावा, सर्व एकवट झाल्यावर गोळा करून तुपाच्या भांड्यांत भरून ठेवावा, त्यांतून अर्धतोळा मात्रा भक्षण करावी. हा योगराजगुग्गुलु मुख्यत्वानें जरा व व्याधि यांचा नाश करितो. हा घेतला असतां मैथुन, भोजन व पान यांचा कांहीं नियम नको. हा संपूर्ण वातरोग, आमवात, अपस्मार, वातरक्त, कुष्ठ, दुष्टव्रण, अर्शरोग, प्लीहा, गुल्म, उदर, आनाह, अग्निमांद्य, श्वास, कास, अरुचि, प्रमेह, नाभिशूल, कृमि, क्षय, हृद्रोग, शुक्रदोष, उदावर्त, आणि भगंदर यांचा नाश करितो. हा तीन माशां पासून सात सात दिवसानी तोळ्यापर्यंत वाढवावा. हा सर्व वातरोगांवर रास्न्याच्या काढ्याशीं, मेहावर दारुहळदीच्या काढ्याशीं, पांडुरोगावर गोमूत्राशीं, मेदवृद्धीवर मधाशीं, कोडावर लिंबाच्या काढ्याशीं, वातरक्तावर गुळवेलीच्या काढ्याशीं, शूळावर मुळ्याच्या काढ्याशीं, उंदरांच्या विषावर पाहाडमुळांच्या काढ्याशीं, उग्रनेत्ररोगावर त्रिफळ्याच्या काढ्याशीं आणि संपूर्ण उदरांवर पुनर्नव्यादिकाढ्याशीं द्यावा.

## रसोनसंधान.

रसोनस्यतुतत्क्षुण्णंतदर्धंलुंचितास्तिलाः ॥ पादेतुतक्रंगव्यस्यपृष्ठेद्रव्यैस्तुसंक्षिपेत् ॥ त्रिकटुधान्यकंचव्यंचित्रकोहस्तिपिप्पली ॥ त्वगेलाग्रंथिकंपत्रंतालीसंचपलांशकं ॥ शर्करायापलान्यष्टौपंचाजाज्याःपलानिच ॥ कृष्णाजाज्याश्चचत्वारिमधूकस्यगुडस्यवा ॥ आर्द्रकस्यचचत्वारिसर्पिषाष्टौप्रकल्पयेत् ॥ तिलतैलस्यतावंतोसूक्तस्यापिचविंशतिः ॥ सिध्दार्थकस्यचत्वारिराजिकायास्तथैवच ॥ कर्षप्रमाणंदातव्यंरामठंलवणानिच ॥ एकीकृत्यदृढेभांडेधान्यराशौविनिःक्षिपेत् ॥ द्वादशाहंसमुत्धृत्यततःखादेद्यथाबलं ॥ सुरासौवीरकंचैवमधुरंचपिबेदनु ॥ जीर्णेयथोप्सितंभोज्यंदधिपिष्टविवर्जितं ॥ एकमासप्रयोगेणसर्वंवातान्व्यपोहति ॥ अशीतिर्वातजान्रोगान्चत्वारिंशच्चपैत्तिकान् ॥ विंशतिश्लेष्मजांश्चैवप्रमेहाणांचविंशतिं ॥ श्वयथौयोनिशूलेचसर्वान्वातान्व्यपोहति ॥ च्युतसंधेश्चभग्नस्यसंधानकरणंभवेत् ॥ बलवर्णकरंत्दृद्यंवृष्यंबीजविवर्धनं ॥

अर्थ—लसूण सोलून वाटलेली घेऊन तिच्या निमें स्वच्छ तिळ मिळवून त्याच्या चतुर्थांश गाईचें ताक घालून त्यांत सुंठ, मिरीं, पिंपळी, धने, चवक, चित्रकमूळ,

गजपिंपळी, दालचिनी, एलची, पिंपळीमूळ, तमालपत्र व तालीसपत्र हीं प्रत्येकीं ४ तोळे; आणि साकर ३२ तोळे, जिरें २० तोळे; व काळें जिरें, ज्येष्ठमध, गूळ व आलें हीं प्रत्येकीं १६ तोळे, तूप ३२ तोळे, तिळांचें तेल ३२ तोळे, कांजी ४० तोळे, मोहऱ्या १६ तोळे, शिरस १६ तोळे, हिंग १ तोळा व संपूर्ण लवणें एकेक तोळा घालून सर्व एकत्र करून बंद करून तें भाताच्या राशींत बारा दिवस पुरून ठेवावें; नंतर काढून अग्निबळ पाहून भक्षणार्थ द्यावें; नंतर वर मद्य किंवा कांजी अथवा मधुर रस प्राशन करावे; जिरल्यावर दहीं व पीठ यांवांचून पथ्य द्यावें. याप्रमाणें एक महिना सेवन केलें असतां; संपूर्ण वातरोग नाश पावतात; व ऐशीं प्रकारचे वातरोग, चाळीस प्रकारचे पित्तरोग; आणि वीस प्रकारचे कफरोग, वीस प्रकारचे मेह, सूज, योनिशूळ, आणि संपूर्ण वात, यांचा नाश होतो; आणि सुटलेल्या संधि, मोडलेलें अस्थ्यादिक, यानां बरें करितें. बल व वर्ण यानां उत्पन्न करितें; व हितकारक आहे व हें धातूला वाढवितें; आणि वृष्य ही आहे.

## भुजंगी गुटिका.

एषाकर्षमितावटीमुघटिताजीर्णेगुडेयुक्तितोद्विघ्नंदीप्यतुषंपल
द्वयमितंशुंठीतथातेजनी ॥ भक्ष्यैकानिलरोगिणाघृतयुतापथ्या
शिनातत्वतोवातव्रातविनाशिनीसुमतिभिःख्याताभुजंगीवटी ॥

अर्थ–ओंव्याचें फूल १६ तोळे व सुंठ आणि स्वर्ण तेजबळ ८ तोळे यांचें चूर्ण करून त्याची जुन्या गुळांत युक्तीनें १० माशांची गोळी बांधावी. ती वातरोग्यानें तुपाशीं भक्षण करावी; आणि पथ्य करावें. ही वातसमुदायाचा नाश करिते. हिला ज्ञाते भुजंगी वटी ह्मणतात.

## दुसरा प्रकार.

तेजोव्हाप्रस्थमेकंपयसिगजगुणेपाकयुक्त्याविपाच्यव्योषंपथ्याशताव्हा
क्रिमिरिपुमनलंग्रंथिकंचाजमोदां ॥ उग्राकुष्ठाश्वगंधासुरतरुममृतंपालि
कानिप्रदद्यात्सर्वान्वातान्वटीयंघृतमधुसहितानास्तिभावान्करोति ॥

अर्थ–तेजबळ ६४ तोळे व दूध ५१२ तोळे घेऊन त्यांचा पाकासारिखा खवा करून त्यांत सुंठ, मिरीं, पिंपळी, हरीतकी, शतावरी, वावडिंग, चित्रक, पिंपळीमूळ, अजमोदा, वेखंड, कोष्ठ कोळिंजन, अश्वगंध, देवदार, आणि तूप हीं प्रत्येकीं चार चार तोळे घालून त्याची गोळी करावी; आणि ती मध व तूप याशीं बल पाहून द्यावी; ह्मणजे सर्व वातव्याधींचा नाश करिते.

## निर्गुंड्यादिवटी.

निर्गुंडीदीप्यकंवन्हिहरिद्राविश्वभेषजं ॥
तक्रकांजिकसंपक्कंवातघ्नंवन्हिवर्धनं ॥

अर्थ-निर्गुंडी, ओंवा, चित्रक, हळद व सुंठ यांचें चूर्ण ताक व कांजी यांत पचन करावें; तें वातनाशक आणि अग्नि वाढविणारें आहे.

## कणादिगुटी.

कणामूलंकणादारुविडंगंवन्हिसैंधवं ॥ सपुष्पाद्यजमोदाचमरिचंसम चूर्णकं ॥ गुडाचितस्यतस्याथगुटिकाएकविंशतिः ॥ भक्षितास्तास्त्रिस प्ताहंमारुतंघ्नंतिसर्वतः ॥

अर्थ-पिंपळीमूळ, पिंपळी, देवदार, वावडिंग, चित्रक, सैंधव, ओंव्याचें फूल, अजमोदा व मिरीं, यांचें समान भाग चूर्ण करून त्याच्या गुळाशीं एकवीस गोळया कराव्या; आणि दररोज एक भक्षण करावी; ह्मणजे सर्व वातव्याधींचा नाश करितें.

## अमरसुंदरवटी.

त्रिकटुत्रिफलाचैवग्रंथिकारेणुकानलं ॥ मृतलोहंचतुर्जातंपारदंगंधकं विषं ॥ विडंगाकल्लकंमुस्तासर्वेभ्योद्विगुणोगुडः ॥ चणकप्रमाणगुटि कानाम्नाअमरसुंदरी ॥ अपस्मारेसन्निपातेश्वासेकासेगुदामये ॥ अ शीतिवातरोगेषुउन्मादेषुविशेषतः ॥

अर्थ-सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहेडा, आंवळकाठी, पिंपळमूळ, रेणुकाबीज, चित्रक, लोहभस्म, दालचिनी, तमालपत्र, एलची, नागकेशर, पारा, गंधक, बचनाग, वावडिंग, अक्कलकरा व मोथा हीं सर्व समभाग व सर्वांच्या दुप्पट गूळ घालून चण्या एवढी गोळी करावी. हिचें नाव अमरसुंदरी. ही अपस्मार, सन्निपात, दमा, खोकला, मुळव्याध, ऐंशीं प्रकारचे वातरोग आणि उन्माद यांचा नाश करितें.

## अजमोदादि वटी.

अजमोदाकणावेल्लंशतपुष्पासनागरं ॥ मारिचंसैंधवादेवभागैकंच पृथक्पृथक् ॥ पंचभागाहरीतक्याःशुंठीचदशभागिका ॥ वृध्धदा रुर्दशांशःस्यात्षट्त्रिंशद्गुडभागिकाः ॥ गुडपाकैर्वटींकृत्वामात्राकर्ष प्रमाणतः ॥ संधिवातप्रदेयंतदामवातेसुदारुणे ॥ उष्णोदकानुपानेन सर्ववातान्नियच्छति ॥ आढ्यवातेहनुस्तंभेशिरोवातापतानके ॥ भ्रूशंखकर्णनासाक्षिजिव्हास्तंभेचदारुणे॥ कलायखंजतापंगुसर्वांगै कांगमारुते ॥ अर्दितेपादहर्षेचपक्षाघातेप्रशस्यते ॥

अर्थ-ओंवा, पिंपळी, वावडिंग, बडीशेप, नागरमोथा, मिरीं व सैंधव हीं प्रत्येक ए

क एक भाग, हरीतकी ९ भाग, सुंठ १० भाग, वृद्धदार १० भाग व भारंगमूळ ३६ भाग या प्रमाणें औषधांची चूर्णे घेऊन गुळाच्या पाकांत वटी करावी. ती गरम पाण्याशीं द्यावी; ह्मणजे संधिवात, आमवात, संपूर्णवात, आढ्यवात, हनुस्तंभ, शिरोवात, अपतानकवात व भृकुटी, आंख, कान, नाक, डोळे व जिभ यांचा स्तंभ, कलायखंज, पंगुवात, सर्वांगवात, एकांगवात, अर्दित, पादहर्ष, आणि पक्षघात यांच्या नाशनाविषयीं प्रशस्त आहे.

## लघुराजमृगांक.

घृततीक्ष्णयुतःसुरसास्वरसोलघुराजमृगांकइतिप्रथितः ॥
अपहंत्यनिलान्सबलान्बहलान्निजभक्तमलानिवचक्रधरः ॥

अर्थ--मिऱ्याचें चूर्ण, तूप आणि तुळशीचा रस याला लघुराजमृगांक ह्मणतात. हा संपूर्ण वातरोगांचा नाश करितो. जसा भगवान् अपल्या भक्ताचें पातक दूर करितो तसा.

चूर्णाःकषायागुटिकाघृतानितैलानिभाग्येनवियोजितानां ॥
विलासिनांवातविनाशनायविलासिनीनांपरिरंभणानि ॥

अर्थ--चूर्णें, काढे, गोळ्या, घृतें व तैलें यांची योजना केली असतां; ही विलासी पुरुषाच्या वातव्याधिनाशनार्थ स्त्रियांचें आलिंगन युक्त आहे.

## दुसरा एरंडपाक.

निस्तुषंबीजमेरंडंपयस्यष्टगुणेपचेत् ॥ तस्मिन्पयसिसंशोष्यतद्बीजं परिपेषयेत् ॥ पश्चाद्घृतेनसंयुक्तंसंपचेन्मृदुवन्हिना ॥ कटुत्रिकंलवंगंचएलात्वक्पत्रकेसरं ॥ अश्वगंधाशिफारास्नाषड्गंधारेणुकावरी ॥ लोहंपुनर्नवाश्यामाउशीरंजातिपत्रकं ॥ जातीफलमभ्रकंचसूक्ष्मचूर्णंतुकारयेत् ॥ शीतीभूतेवलेहोयंतस्मिन्खंडसमोदयं ॥ वातारिपाकनामायंप्रातरुत्थायभक्षयेत् ॥ अशीतिवातरोगांश्चचत्वारिंशच्चपैत्तिकान् ॥ उदराणितथाचाष्टौस्वयंरोगान्निहंतिच ॥ विंशतिर्मेहजान्रोगान्पृष्टिनाडीव्रणानिच ॥ हंत्यष्टादशकुष्ठानिक्षयरोगांश्चसप्तच ॥ पंचैवपांडुरोगांश्चपंचश्वासान्प्रणाशयेत् ॥ चतुरोग्रहणीरोगान्दृष्टिरोगंगलग्रहं ॥अनेकवातरोगांश्चतान्सर्वांश्चविनाशयेत् ॥ शुक्लपाकमिदंख्यातंसर्वरोगनिवारकं ॥

अर्थ--एरंडाचे सोललेले गोळे घेऊन ते आठपट दुधांत पचन करावे; नंतर सुकवून वारीक वाटून तुपांत मंदाग्नीवर पचन करावें; आणि त्यांत सुंठ, मिरीं, पिंपळी, लवंग, एलची, दालचिनी, तमालपत्र, नागकेशर, अश्वगंध, रास्ना, षड्गंधा, रेणुकबीज, शताव

री, लोहभस्म, पुनर्नवा, हरीतकी, वाळा, जायपत्री, जायफळ, आणि अभ्रकभस्म यांची समभाग चूर्णे व पूर्व दुधाचा खवा इतकीं त्यांत घालून साकरेच्या पाकांत मिसळून तयार करावा; हा वातारिनामक पाक प्रातःकाळीं उठून भक्षण करावा; ह्मणजे ऐंशी प्रकारचे वातरोग व चाळीस प्रकारचे पित्तरोग, आठप्रकारचीं उदरें, वीस प्रकारचे मेह, साहा प्रकारचे नाडीव्रण, अठरा प्रकारचीं कोडें, सात प्रकारचे क्षय, पांच प्रकारचे पांडुरोग, पांच प्रकारचे श्वास, चार प्रकारची संग्रहणी, हृद्रोग, गलग्रह, आणि अनेक प्रकारचे वायु यांचा नाश करितो. याला शुक्रपाक रसायण ह्मणतात. हें सर्व रोगनाशक आहे.

## एरंडपाक.

वातारिबीजंप्रस्थंतुसुपक्कंनिस्तुषीकृतं ॥ क्षीरद्रोणार्धसंयुक्तंभिषङ्मंदाग्निनापचेत् ॥ घृतप्रस्थार्धयुक्पक्कंखंडप्रस्थद्वयंक्षिपेत् ॥ त्र्यूषणंसचतुर्जातंग्रंथिकंवन्हिचव्यकं ॥ शत्रामिशिशठीबिल्वदीप्यौजीरेनिशायुगं ॥ अश्वगंधाबलापाठाहपुषावेल्लपुष्करं ॥ श्वदंष्ट्रारुग्वरादारुवेल्लर्यवालुकावरी ॥ एतानिपिचुमात्राणिचूर्णितानिविनिःक्षिपेत् ॥ वातव्याधिंचशूलंचशोफंवृद्धिंतथोदरं ॥ आनाहंबस्तिरुग्गुल्ममामवातंकटिग्रहं ॥ ऊरुग्रहंहनुस्तंभंनाशयेदपियोगतः ॥

अर्थ–६४ तोळे एरंडयांचे गोळे, ५१२ तोळे दुधांत मंदाग्नीवर पक्व करावे; नंतर त्यांत ३२ तोळे तूप, १२८ तोळे खडीसाकर, त्रिकटु, दालचिनी, वेलदोडे, तमालपत्र, नाकेशर, पिंपळमूळ, चित्रक, चवक, बडिशेप, बाळंतशेप, कचोरा, बेल, ओंवा, जिरें, शाहाजिरें, दारुहळद, हळद, अश्वगंध, चिकणा, पाहाडमूळ, शेरणी, वावडिंग, पोखरमूळ, गोखरू, कोष्ठ, त्रिफला, देवदार, वरधारा, बाभळीचें बीं, अळु व शतावरी यांचीं प्रत्येक तोळा तोळा चूर्णे करून त्यांत टाकून एकत्र करून पुनः पक्व करावा. हा पाक वातव्याधि, शूळ, शोफ, उदर, आनाह, बस्तिवात, गुल्म, आमवात, कटिग्रह, ऊरुस्तंभ व हनुस्तंभ यांचा नाश करणारा आहे.

## रसोनपाक.

तेपूग्रगंधनाशायरात्रौतक्रेविनिःक्षिपेत् ॥ प्रातर्निष्कास्यतत्पिष्ट्वाततोदुग्धेविपाचयेत् ॥ निस्तुषंलशुनंप्रस्थंक्षीरंप्रस्थचतुष्टयं ॥ विपाच्यसांद्रीभूतेस्मिन्सर्पिषःकुडवंक्षिपेत् ॥ रास्नावटीवृषाछिन्नाशठीविश्वासुरद्रुमं ॥ वृध्दारुकदीप्याग्निशताव्हासपुनर्नवा ॥ फलत्रयंपिप्पलीचक्रमिघ्नःकर्षसंमितं ॥ विचूर्ण्यशीतेमधुनःकुडवंतत्रयोजयेत् ॥

सितयाभक्षयेन्मात्रामाढ्यवातेहनुग्रहे ॥ आक्षेपकादिभग्नेचकटयूरु स्तंभत्दृद्ग्रहे ॥ सर्वांगेसंधिभंगेचवातजाशीतिरोगिणः ॥ पथ्योल शुनपाकोयंवर्णायुःपुष्टिकारकः ॥

**अर्थ**–लसुणीची घाण जाण्या करितां रात्रीं ताकांत भिजत घालून प्रातःकाळीं काढून वाटून गाईच्या दुधांत शिजवावी, ती अशी जर लसूण ६४ तोळे तर दूध २५६ तोळे तें दाट झाल्यावर १६ तोळे तूप, आणि रास्ना, शतावरी, अडुळसा, गुळवेल, कचोरा, सुंठ, देवदार, वृध्दार, ओंवा, चित्रक, शेपा, पुनर्नवा, हरडा, बेहेडा, आवळकाठी, पिंपळी, वावडिंग, ह्यां प्रत्येकाचें तोळा तोळा चूर्ण टाकून शीत झाल्यावर १६ तोळे मध घालून त्यांतून साकरेशीं थोडा द्यावा. तो आढ्यवात, हनुग्रह, आक्षेपक, भग्नवात, कटिवात, ऊरुस्तंभ, त्दृद्रोग, सर्वांगवात, संधिभंगवात आणि ऐशीं प्रकारचे वात यांचा नाश करितो. हा पथ्य लशुनपाक वर्ण, आयुष्य, आणि पुष्टि यानां देतो.

## कुबेरपाक.

कुबेरंप्रस्थनीरेचक्षिप्त्वारात्रौचतुर्गुणं ॥ क्षीरेप्रातःपचेत्सम्यग्घृतेनमृदु वन्हिना ॥ शीतंकृत्वासुनिष्पन्नेंमध्येमधुनियोजयेत् ॥ चातुर्जातंत्रिक टुकंजातिपत्रफलंतथा ॥ देवपुष्पंविडंगंचामिशीजिरंघनंबला ॥ निशा द्वयंतथालोहंशुल्बंवंगंपलार्धकं ॥ प्रत्येकंचूर्णितंक्षिप्त्वाभक्षयेच्चपलंबुधः ॥ सर्वान्वातमयान्हंतिअग्निमांद्यंबलक्षयं ॥ प्रमेहंमूत्रकृच्छ्रंचअश्मरीगुल्म पांडुनुत् ॥ पीनसंग्रहणीदोषमतीसारमरोचकं ॥ मधुपक्कःकुबेरोयंभक्ष येन्नितरांबुधः ॥ कामवृद्धिकरस्तस्यधातुवृध्दिश्चजायते ॥ कांतिपुष्टि करोबल्यःकुबेराख्योरसोत्तमः ॥

**अर्थ**–सागरगोटे रात्रीं पाण्यांत भिजत घालून फोडून त्यांतील गोळ्याच्या चौपट दुधांत तूप घालून मंदाग्नीवर पचन करावें; नंतर शीत झाल्यावर त्यांत मध, दालचिनी, तमालपत्र, एलची, नागकेशर, सुंठ, मिरीं, पिंपळी, जायपत्री, जायफळ, लवंगा, वावडिंग, बडीशोप, जिरें, नागरमोथा, चिकणामूळ, हळद, दारुहळद, लोहभस्म, ताम्रभस्म व वंगभस्म हीं प्रत्येक दोन दोन तोळे घालून पाक तयार करावा. त्यांतून चार तोळे दर रोज भक्षण करावा; ह्मणजे संपूर्ण वायु, अग्निमांद्य, बलक्षय, प्रमेह, मूत्रकृच्छ्र, अश्मरी, गुल्म, पांडुरोग, पीनस, संग्रहणी, अतिसार व अरुचि यांचा नाश करितो. हा मधुपक्क कुबेराक्ष भक्षण केला असतां; कामवृद्धि, धातुवृद्धि, कांति, पुष्टि व बळ यांना देतो.

## लशुनपाक.

निस्तुषंलशुनंप्रस्थंक्षीरकुंभेपचेत्सुधीः ॥ घृतंपलचतुष्कंचपचेच्चमृदुव

न्हिना ॥ सुनिष्पन्नोमधुनिभोखंडंप्रस्थद्वयंक्षिपेत् ॥ व्यूषणंचचतुर्जा तंग्रंथिकंचव्यचित्रकं ॥ बिडंगंरजनीयुग्मंहपुषावृत्धदारुकं ॥ पौष्क रंदीप्यपुष्पंचसुरदारुपुनर्नवा ॥ श्वदंष्ट्रानिंबरास्नाचशतपुष्पावरी सठी ॥ अश्वगंधात्मगुप्ताचद्रव्याणिपिचुमात्रया ॥ शुक्रेयथावलंसे व्यंरसोनाख्यंरसायनं ॥ सर्वान्वातामयान्शूलमपस्मारमुरःक्षतं ॥ गुल्मोदरवमिप्लीहवधर्मवृद्धिकृमीन्जयेत् ॥ विबंधानाहशोफांश्चवन्हि मांद्यंबलक्षयं ॥ हिक्कांश्वासंचकासांश्चअपतंत्रकमेवच ॥ धनुर्वातंत थायामंपक्षघातापतानकं ॥ अर्दिताक्षेपकंकुब्जंहनुग्रहशिरोग्रहं ॥ विश्वाचीगृध्रसीखल्लीपंगुवातंचसंधिजं ॥ बाधिर्यंसर्वशूलंचनाशयेद तिवेगतः ॥ वातव्याधिगजेंद्रस्यकेसरीवकृतःशुभः ॥ कफव्याधिप्र शमनोबलपुष्टिकरःस्मृतः ॥

अर्थ—लसूण चांगली सोलून ती ६४ तोळे घेऊन १०२४ तोळे दुधांत १६ तोळे तूप घालोन शिजवावी; तिचा चांगला पाक होऊन मधुवर्ण झाली ह्मणजे त्यांत १२८ तोळे साकर, सुंठ, मिरीं, पिंपळी, दालचिनी, एलची, तमालपत्र, नागकेशर, पिंपळीमूळ, चवक, चित्रकमूळ, वावडिंग, हळद, दारुहळद, शेरणी, वृद्धदार, पुष्करमूळ, ओंवा, लवंगा, देवदार, पुनर्नवा, गोखरू, कडुनिंब, रास्ना, शोप, शतावरी, कचोरा, अश्वगंध, व कुहिलीचें बीज यांचीं प्रत्येकीं एकेक तोळा चूर्ण घालून तयार करावा. हा रसोनाख्य पाक अग्नि व बल पाहून सेवन करावा; ह्मणजे संपूर्ण वातरोग, शूल, अपस्मार, उरःक्षत, गुल्म, उदर, वांति, प्लीहा, अंडवृद्धि, कृमि, मळबंध, अनाहवात, सूज, अग्निमांद्य, बलक्षय, उचकी, दमा, खोकला, अपतंत्रकवात, धनुर्वात, अंतरायाम, पक्षघात, अपतानवायु, अर्दितवायु, आक्षेपकवात, कुब्जवात, हनुग्रह, शिरोग्रह, विश्वाची, गृध्रसी, खल्लीवात, पंगुवात, संधिवात, बधिरपणा, आणि संपूर्णशूल, यांचा अति जलद नाश करितो. हा लशुनपाक वातव्याधिरूप हत्तींचा सिंहासारिखा नाश करितो; आणि कफव्याधीला शांत करून बल व पुष्टि यांना करितो.

## लेप.

प्रच्छित्वाचक्षुरेणांगंकेवलानिलपीडितः ॥ तत्रप्रदेहंदद्याच्च पिष्ट्वागुंजाफलैःकृतं ॥ तेनावबाहुजापीडाविश्वाचीगृध्रसी तथा ॥ अन्यापिवातजाःपीडाःप्रशमंयांतिवेगतः ॥

अर्थ—ज्या जागीं वायूचा उपद्रव होतो त्या जागेवर वस्त्र्यानें फासण्या टाकून त्या-वर गुंजा वाटून त्यांचा पेंड बांधावा; ह्मणजे त्याणें अवबाहु, विश्वाची, गृध्रसी आणि अ-न्यवातसंबंधिपीडा त्वरित शांत होतात.

## मर्दन व नस्य.

यवानीचूर्णसंमिश्रःशृंगवेररसस्तनौ ॥
मर्दनान्नस्यतोहंतिकुपितंमारुतंद्रुतं ॥

अर्थ—अल्याच्या रसांत ओंव्याचें चूर्ण घालून त्याणें अंगमर्दन करावें; आणि त्याचेंच नस्य द्यावें; ह्मणजे वातकोपाची शांति होत्ये.

## स्वेदविधि.

कार्पासास्थिकुलत्थकातिलयवैश्चैरंडमाषातसीवर्षाभूशणवीज
कांजिकयुतैरेकीकृतैर्वापृथक् ॥ स्वेदःस्यादतिकूर्परोदरहनुस्फि
कूपाणिपादांगुलीगुल्फस्तंभकटीरुजोविजयतेसामाःसमीरोद्भवाः ॥

अर्थ—सरक्या, कुळीथ, तिळ, यव, एरंड, उडीद, अळसी, पुनर्नवा व तागाचें बीं यांच्या कांजीनें किंवा पृथक् योगानें घाम काढावा. तो कोंपर, उदर, हनवटी, नितंब, हात व पाय यांच्या अंगुली व गुडघ्यांचा स्तंभ, कटिशूल, आणि आमाश्रितवायु यांचा नाश करितो.

## पेंडबांधणें.

रास्नाशताव्हासुरदारुकुष्ठमाषार्द्रकंतैलवचाकुलत्थाः ॥
एतैःप्रदेहोनिलरोगिणांहितस्नेहैश्चतुर्भिर्दशमूलयुक्तैः ॥

अर्थ—रास्ना, शतावरी, देवदार, कोष्ठ, उडीद, तेल, वेखंड, कुळीथ, आणि दशमु-ळें यांचा पेंड वातरोग्याला हितकारक होतो.

## स्वेद व लेप.

उष्णोष्णमत्स्यादिकवेसवारैःस्वेदस्तथावातविनाशनःस्यात् ॥
फाणिज्जकोत्थेनरसेनवातंग्रस्तंप्रदेशंपरिलेपयेत्तु ॥

अर्थ—ऊष्ण ऊष्ण असे मासे व वेसवार यांणीं शेकून घाम काढावा. तो वातनाश करितो; किंवा फांगळ्याच्या रसानें वातयुक्त प्रदेशावर लेप करावा.

## लेप व स्वेद.

सारंनवंसैंधवकृष्णबोलंविषंसमुद्रस्यफलानिकुष्ठं ॥
जेपालमज्जात्वहिजोबलाचजंवीरनीरेणविमर्दनीयं ॥
संस्वेद्यतल्लेपनमात्रकेणअशीतिवातान्सहजान्निहंति ॥

अर्थ–नवसागर, सैंधव, काळा बोळ, बचनाग, समुद्रफळ, कोष्ठ, जेपाळाचे गोळे, अफू आणि चिकणामूळ यांचें चूर्ण लिंबाच्या रसांत खलून गरम करून त्याचा लेप करावा. तो ऐशीप्रकारच्या वायूचा सहज नाश करितो.

## शतपुष्पादिलेप.

शतपुष्पसुरद्रुदिनेशपयोगदरामठसिंधुभवंहरति ॥
अपिलेपननोस्थिगतंमरुतंकटिसंधिभवंत्रिदिनात्सततं ॥

अर्थ–शोपा, देवदार, कोष्ठ व सैंधव यांचें चूर्ण रुईच्या चिकांत भिजवून त्याणें लेप करावा; ह्मणजे अस्थिवात, कटिवात व संधिवात यांचा तीन दिवसांत नाश करितो.

## लेप.

सुरतरुरामठशुंठीशतपुष्पासैंधववचार्कपयसा ॥
अस्थिगतानपिवातान्निहंतिचैकेनलेपेन ॥

अर्थ–देवदार, हिंग, सुंठ, बडिशेप, सैंधव व वेखंड यांचें चूर्ण रुईच्या चिकांत खलून लेप करावा, त्याणें अस्थिगतवातनाश पावतो.

## वातहा पोटली.

पुन्नागैरंडनिंबैर्बकुलधवनटंनारिकलैःकरंजैःकार्पासैःशिग्रुडोलाफल सुनिपणकैःसर्पपाकोलबीजैः ॥ रास्नाकुष्ठकुलित्थैस्तिललशुनवचा हिंगुसित्थार्थविश्वैःसर्वैःस्नेहैःकृतंतत्सकलपटुयुतःपोटलीवातभंजी ॥

अर्थ–उंडीण, एरंड, निंब, बकूळ, धावडा व अशोक यांच्या साली, नारळ, करंज बीज, सरकया, शेवग्याची साल, दोलाफळ, कुरडू, शिरस, अंकोलफळ, रास्ना, कुष्ठ, कुळिथ, तिळ, लसुण, वेखंड, हिंग, मोहऱ्या व सुंठ यां सर्वांचीं चूर्णें करून त्यांत मीठ घालून तुपांत किंवा तेलांत परतून त्यांची पोटली बांधून शेकावी. ती वातनाशक आहे.

## महाशाल्वण योग.

कुलित्थमाषगोधूमैरतसीतिलसर्पपैः ॥ शतपुष्पादेवदारुशेफालीस्थूलजीरकैः ॥ एरंडबिल्वमूलैश्चरास्नामूलैश्चशिग्रुभिः ॥ मिशीकृष्णाकुठेरैस्तुलवणैरम्लसंयुतैः ॥ प्रसारण्यश्वगंधाभ्यांबलाभिर्दशमूलकैः ॥ गुडूचीवानरीबीजैर्यथालाभंसमाहृतैः ॥ क्षुण्णैःस्विन्नैश्चवस्त्रेणबद्धैः संस्वेदयेन्नरं ॥ महाशाल्वणसंज्ञोयंयोगःसर्वानिलार्तिजित् ॥

अर्थ–कुळित्थ, उडीद, गहूं, जवस, तिळ, शिरस, बडिशेप, देवदार, निगुंडी, कलोंजी जिरें, एरंडमूळ, बेलाचें मूळ, रास्नामूळ, शेवगा, जटामांसी, पिंपळी, नांदुरकी,

सैंधव, मीठ, पादेलोण, बिडलोण, अम्लवेतस, चांदवेल, आस्कंद, चिकणा, मोठा चिकणा, लघुचिकणा, दशमुळें, गुळवेल व कवचबीज हीं जितकीं मिळतील तितकीं आणून कुटून शिजवून पोचंडीत घालोन शेक द्यावा. याला महाशाल्वण योग ह्मणतात. हा संपूर्ण वातपीडानाशक आहे.

## कढी.

प्रियंगुपिप्पलीमूलंचंदनंचव्यदीपकं ॥ वरालंचंपकंकुष्टमंजिष्ठामिशिसर्षपाः ॥ निर्गुडीदीप्यकंवन्हिहरिद्राविश्वभेषजं ॥ तक्रकांजिकसंपक्कंवातघ्नंवन्हिवर्धनं ॥

अर्थ–राळे, पिंपळीमूळ, चंदन, चवक, चित्रक, लवंग, चांपा, कोष्ठकोळिंजन, मंजिष्ठा, बडीशेप, शिरस, निर्गुंडी, ओंवा, लिंबू, हळद, सुंट, ताक व कांजी, यांमध्ये वरच्या पदार्थांची चूर्णे घालून कढवावें. ती कढी वातनाशक व वन्हिदीपक होत्ये.

## स्वेदलेपविधि.

एरंडार्ककरंजमोरटबलातर्कारिसोमस्नुहीनिर्गुंडीतलपोटशिग्रुलवणास्फोताश्वगंधादिजैः ॥ पत्रैःकांजिकमूत्रचुक्रसहितैःस्विन्नैर्घटस्थैः कृतःस्वेदःक्रुध्यसमीरणार्तवपुषांसद्यःसुखोत्पादकः ॥

अर्थ–एरंड, रुई, करंज, मोरवेल, चिकणा, टाकळी, रक्तचंदन, निवडुंग, निर्गुंड, ताड, लहान देवनळ, शेवगा, चुका, श्वेत गोकर्ण व अस्कंध या औषधींची पानें घेऊन कांजी, गोमूत्र, आमसोल, हीं एकत्र वाटून त्याचा पानास लेप करून ती मडक्यांत भरून बांधून त्या पानानीं शेकावें; ह्मणजे वातकोप शांत होऊन रोग्याला तात्काळ सुख होतें.

## लेप.

निर्गुंडयाचोपनाहंचसकरंजैःसपित्तलैः ॥
भेषजैःसेकलेपादिअभिषेकादिकंचरेत् ॥

अर्थ–निर्गुंडीचा पेंड बांधावा; व करंज आणि पित्तकर औषधें यांणीं सेचन, लेप व अभिषेक इत्यादि उपचार करावे.

## दुसरा रसोनकल्क वातरोगावर.

पक्ककंदरसोनस्यगलिकानिस्तुषीकृता ॥ पाटयित्वाचमध्यस्थंदूरीकुर्यात्तदंकुरं ॥ तदुग्रगंधनाशायरात्रौतक्रेविनिःक्षिपेत् ॥ अपनीयचतन्मध्याच्छिलायांपेषयेत्ततः ॥ तन्मध्येपंचमांशेनचूर्णमेषांविनिःक्षिपेत् ॥ सौवर्चलंयवानीचभर्जितंहिंगुसैंधवम् ॥ कटुत्रिकंजीरकंचसमभागानि

चूर्णयेत् ॥ एकीकृत्यततःसर्वकल्कंकर्षप्रमाणतः ॥ खादेदग्निबलापे क्षीऋतुदोषाद्यपेक्षया ॥ अनुपानंततःकुर्यादेरंडसृतमन्वहं ॥ सर्वांगै कांगजंवातमर्दितंचापतंत्रकं ॥ अपस्मारगदोन्मादमूरुस्तंभंचगृध्रसीम् ॥उरःपृष्ठकटीपार्श्वकुक्षिपीडांकृमीन्जयेत्॥ अजीर्णमातपंरोपमातिनीरंपयोगुडं ॥ रसोनमश्नन्पुरुपस्त्यजेदेतान्निरंतरम् ॥ मद्यंमांसंतथाम्लंचरसंसेवेतनित्यशः ॥

अर्थ—चांगली पक्की लसूण घेऊन वरचीं सालपटें काढून त्या बियांतील अंकूर काढून मग त्या लसुणीचा वास येतो ह्मणोन रात्रीस ताकांत भिजत घालून प्रातःकाळीं ती लसूण काढून पाट्यावर बारीक वाटून तिचा कल्क करावा; मग पादेलोण, अजमोदा, भाजला हिंग, सैंधव, सुंठ, मिऱ्यें, पिंपळी, जिरें या आठ औषधांचें चूर्ण त्या लसुणीचे कल्काचा पांचवा हिस्सा घेऊन त्या कल्कांत मेळवून एकत्र करून मग एरंडयाचे मुळयांचा काढा करून त्यांत तो कल्क एक कर्ष प्रमाण टाकून प्यावा; व आपली शक्ति व ऋतु कोण आहे, हें पाहून जसा सोसेल तसा घ्यावा; तेणेंकरून सर्वांग वायु व एकांग वायु व तोंड वांकडें होतें जणें करून तो अर्दित वायु व धनुर्वायु, फेंपरें व उन्माद रोग व मांडयांचा स्तंभ करितो तो ऊरुस्तंभवायु व गृध्रसी वायु व ऊर पाठ, कंबर व कुशी यांचा शूळ व जंतविकार हे दूर होतात.

## रसोनकल्क वायु व विषमज्वर यांजवर.

शुद्धकल्कोरसोनस्यतिलतैलेनमिश्रितः ॥
वातरोगान्जयेत्तीव्रान्विषमज्वरनाशनः ॥

अर्थ—लसुणीचा कल्क करून त्यांत तिळाचें तेल मेळऊन प्यावा, तेणेंकरून दारुण वायूचें रोग व विषमज्वर हे दूर होतात.

## त्र्यथवा लसूणकल्क.

पिष्ट्वातुसूक्ष्मंलशुनंघृतेनविलिह्यहन्यात्पवनोत्थरोगान् ॥
तथेंद्रबीजाग्निमहौषधानांचूर्णंहरेद्वातभवान्विकारान् ॥

अर्थ—लसुण वाटून तुपाशीं द्यावी; किंवा इंद्रजव, चित्रक व सुंठ यांचें चूर्ण तुपाशीं द्यावें. तें संपूर्ण वातविकारांचा नाश करितें.

## स्वच्छंदभैरव रस.

शुद्धसूतंमृतंलोहंताप्यंगंधकतालकं ॥ पथ्याग्निमंथनिर्गुंडीत्र्यूपणंटंकणंविपं ॥ तुल्यांशंमर्दयेत्खल्वेदिनंनिर्गुंडिकाद्रवैः ॥ मुंडीद्रावैर्दिनैकं

तु द्विगुंजंवटकीकृतं ॥ भक्षयेद्वातरोगार्तोनाम्नास्वच्छंदभैरवः ॥ रास्नामृतादेवदारुशुंठीवातारिजंसृतं ॥ सगुग्गुलुंपिबेत्कोष्णमनुपानंसुखावहं ॥

अर्थ—शुद्ध पारा, लोहभस्म, स्वर्णमाक्षिकभस्म, गंधक, हरताळ, बाळहिरडे, एरंड, निरगुंडी, सुंठ, मिरें, पिंपळी, टाकणखाराची लाही, बचनाग शुद्ध केलेला, हीं तेरा औषधें समभाग घेऊन त्यांचा निरगुंडीच्या रसांत एक दिवस खल करावा; नंतर भुंडीचे रसांत एक दिवस खलून दोन दोन गुंजा प्रमाण गोळ्या बांधाव्या. याला स्वच्छंदभैरव रस असें ह्मणतात. तो भैरवरस रास्ना, गुळवेल, देवदार, सुंठ, एरंडमूळ या पांच औषधांचा काढा करून त्यांत गुग्गुळ मेळवून ध्यावा. तेणेंकरून वायूचा रोग दूर होतो.

## समीरपन्नग.

अभ्रगंधविषव्योषरसटंकान्समांशकान् ॥ भावयेत्सप्तधाभृंगरसेन स्यात्समीरहा ॥ आर्द्रद्रवेणवल्लोवाखंडव्योषेणयोजितः ॥ महावातान्जयत्याशुनासाध्मातंसुसंज्ञकृत् ॥

अर्थ—अभ्रकभस्म, गंधक, बचनाग, सुंठ, मिरें, पिंपळी, पारा व टाकणखार हीं समांश घेऊन खलून त्यांस माक्याच्या रसाच्या सात भावना द्याव्या; ह्मणजे हा वातनाशक रस होतो. आल्याचे रसाबरोबर किंवा खडिसाखर आणि त्रिकटूचूर्ण यांच्याबरोबर एक वालभर द्यावा; ह्मणजे मोठयाही वायूला क्षणांत जिंकील. नाकांत ओढला असतां; शुद्धि आणणारा आहे.

## वातविध्वंसन.

रसंगंधकंनागवंगंचलोहंतथाताम्रजंव्योमनिश्चंद्रिकंच ॥ कणाटंकणंव्यूषणंनागरंवैपृथक्भागमेकंविमर्द्यैकयामं ॥ ततोवत्सनाभंचतुःसार्धभागंदृढंमर्दयेद्भावनाव्योपजाभिः ॥ वराचित्रकैर्मार्कवैःकुष्ठजाभिस्त्रिभिर्भावयेन्निर्गुडीभानुदुग्धैः ॥ महाधात्रिजैश्चार्द्रकैर्निंबुनीरैःसमंभावयेद्वातविध्वंसनोयं ॥ समीरेचशूलेमहाश्लेष्मरोगेग्रहण्यांतथासन्निपातेचमौढ्ये ॥ स्त्रियःसूतिकावातरोगेषुदद्यान्निषेवेतगुंजाद्वयंसूतमेनं ॥

अर्थ—पारा, गंधक, सिसें, कथील, लोखंड व तांबे यांची भस्में, अभ्रकभस्म, पिंपळी, टाकणखार, त्रिकटु व सुंठ. हीं प्रत्येक एकेक भाग घेऊन प्रहरभर खलून नंतर त्यांत बचनाग ४॥ भाग घालून पुनः पुष्कळ खलावें; नंतर त्यास त्रिकटु, त्रिफळा, चित्रक, माका व कोष्ठकोळिंजन या प्रत्येकांच्या तीन तीन भावना द्याव्या; व निर्गुंडीचे रसाच्या तीन, रुईचे चिकाच्या तीन, थोर आवळी, आलें व लिंबू. यांचे रसाच्या निरनिराळ्या

भावना द्याव्या; ह्मणजे हा वातविध्वंस रस होतो. हा दोन गुंजा प्रमाणें. वायु, शूल, कफरोग, संग्रहणी, सन्निपात, मौढ्य, प्रसूतिवात, इतक्यांवर योजावा.

## वातराक्षस.

मृतंसूतंतथागंधंकांतंचाभ्रकमेवच ॥ ताम्रभस्मकृतंसम्यङ्मर्दयित्वा समांशकं ॥ पुनर्नवागुडूच्यग्निसुरसाव्यूषणंतथा ॥ एतेषांस्वरसेनैव भावयेत्रिदिनंपृथक् ॥ दत्वालघुपुटंसम्यक्स्वांगशीतंसमुत्धरेत् ॥ वातराक्षसनामायंवातरोगेप्रयोजयेत् ॥ तत्तद्रोगानुपानेनाद्विगुंजामात्र सेवनात् ॥ ऊरुस्तंभंवातरक्तंगात्रभंगंतथैवच ॥ आमवातंधनुर्वातंवेदनावातमेवच ॥ पक्षाघातंकंपवातंसर्वसंधिगतंतथा ॥ सुप्तवातंवात शूलमुन्मादंचविनाशयेत् ॥ तत्तद्रोगानुपानेनवाताशीतिविनाशनः ॥

अर्थ—पारदभस्म, गंधक, कांतभस्म, अभ्रकभस्म व ताम्रभस्म, हीं समभाग एकत्र खलून पुनर्नवा, गुळवेल, चित्रक, तुळस व त्रिकटु यांचे स्वरसाशीं निराळे तीन तीन दिवस खलून भावना द्याव्या; नंतर लघुपुट देऊन थंड झाल्यावर काढावा. याला वातराक्षसरस ह्मणतात, हा वातरोगावर योजावा. त्या त्या रोगाच्या अनुपानाशीं दोन गुंजा सेवन केला असतां; ऊरुस्तंभ, वातरक्त, गात्रभंग, आमवात, धनुर्वात, वेदनावात, पक्षघात, कंपवात, सर्वसंधिगतवात, सुप्तवात, वातशूल व उन्माद यांचा नाश करील. त्या त्या अनुपानाशीं योजला तर ऐंशीं वायूंचा नाश करील.

## वातारिरस.

रसोगंधोवरावन्हिगुग्गुलुःक्रमवर्धितः ॥ तत्रैकभागःसूतःस्याद्गंधको द्विगुणस्ततः ॥ त्रिभागात्रिफलायोज्याचतुर्भागस्तुचित्रकः ॥ गुग्गुलुः पंचभागःस्याद्रुबुतैलेनमर्दितः ॥ क्षिप्त्वातत्रोदितंचूर्णंतेनतैलेनमर्दयेत् ॥ गुटिकांकर्षमात्रांतुभक्षयेत्प्रातरेवहि ॥ नागरैरंडमूलानांकषायंप्रपिबेदनु ॥ अभ्यज्यैरंडतैलेनस्वेदयेत्पृष्ठदेशकं ॥ विरेकेपारणामेनु स्निग्धमुष्णंचभोजयेत् ॥ वातारिसंज्ञकोह्येषरसोनिर्वातसेवितः ॥ मासेनमरुतोरोगान्हरेत्सुरतवर्जितः ॥

अर्थ—पारा एक, गंधक दोन, त्रिफळा तीन, चित्रक चार, गुगुळ पांच, या प्रमाणें भाग घेऊन चूर्ण करून तें एरंडेलांत खलून एक तोळाभार गोळी प्रातःकाळीं भक्षण करावी; नंतर सुंठ व एरंडमूळ यांचा काढा प्यावा; व पाठीला एरंडेल चोळून शेकावी.

ढाळ पुरेसे झाले ह्मणजे स्निग्ध व उष्ण असें भोजन करावें; व वारा घेऊं नये, मैथुन करूं नये; एक महिन्याने वातरोग सर्व हरण करील. ह्याला वातारिरस असें ह्मणतात.

## समीरगजकेसरी.

नवाहिफेनंकुचिलंनवानिमरिचानिच ॥ समभागानिसर्वाणिरक्तिकाप्रमितानिच ॥ देयात्समीरेचैतानिपुनस्तांबूलचर्वणं ॥ कुब्जेचखंजवातेचसर्वजेगृध्रसीग्रहे ॥ अवबाहौप्रयोक्तव्यःशोफेकंपेप्रतानके ॥ विषूच्यामरुचौदेयमपस्मारेविशेषतः ॥

अर्थ—नवी अफू, कुचल्याचें बीज व नवीं मिर्यें यांचें समभाग चूर्ण एकत्र करावें; आणि त्यांतून एक गुंज द्यावें. वर तांबूल भक्षण करावें; ह्मणजे कुब्जवात, खंजवात, सर्वजवात, गृध्रसी, अवबाहुक, सूज, कंप, प्रतानकवायु, मोडशी, अरुचि, आणि अपस्मार यांचा नाश करितें.

## मृत संजीवनी रस.

म्लेंछस्यभागाश्चत्वारोतदर्धंविषसंयुतं ॥ टंकणंदंतिबीजंचआर्द्रकस्यरसेनवै ॥ एतत्सर्वंक्षिपेत्स्वल्वेमर्दयामद्वयंभिषक् ॥ भानुदुग्धैर्महोदर्याद्द्विगुंजंभक्षयेत्सदा ॥ वातव्याधिमुरुस्तंभमामवातंविशेषतः ॥ ग्रहण्यर्शोविकारेषुज्वरमष्टविधंतथा ॥ निहंतितत्क्षणादेवतमःसूर्योदयोयथा ॥ मृतसंजीवनोनामप्रख्यातोरससागरः ॥

अर्थ—हिंगूळ ३ भाग, बचनाग २ भाग, टांकणखार व जेपाळ एकेक भाग, या प्रमाणें एकत्र करून त्यांचा आल्याच्या रसाशीं दोन प्रहर खल करावा; नंतर रुईचा चीक व शतावरीचा रस यांच्या त्यास भावना द्याव्या. हा दोन गुंजा प्रमाणें दिला असतां; वातरोग, ऊरुस्तंभ, आमवात, संग्रहणी, अर्श व आठ प्रकारचा ज्वर यांचा नाश करितो. याला मृतसंजीवन किंवा रससागर ह्मणतात.

## वातारि रस.

सूतहाटकवज्राणिताम्रंलोहंचमाक्षिकं ॥ तालंनीलांजनंतुत्थमहिफेनंसमांशकं ॥ पंचानांलवणानांचभागमेकंविमर्दयेत् ॥ वज्रक्षीरैर्दिनैकंतुरुध्वातंभूधरेपचेत् ॥ माषैकमार्द्रकद्रावैर्लेहयेद्वातनाशनं ॥ पिप्पलीमूलजंक्वाथंसकृष्णमनुपानकं ॥ सर्ववातविकारांस्तुनिहन्यात्क्षेपकादिकान् ॥ रसःसर्वत्रविख्यातोनाम्नावातारिचस्मृतः ॥

अर्थ–पारा, सोनें, हिरा, ताम्र, लोह, स्वर्णमाक्षिक, हरताळ, सुरमा, मोरचूत व अफीण हीं सर्व समभाग; व पांच लवणें मिळून एक भाग, याप्रमाणें सर्व एकत्र करून त्याला निवडुंगाच्या चिकांत एक दिवस खलून नंतर संपुटांत घालून मातकापड करून भूधरयंत्रांत पचन करावा. हा वातारिरस एक मासाभर आल्याच्या रसाशीं द्यावा; आणि पिंपळमुळाच्या काढ्यांत पिंपळीचें चूर्ण घालून मागून प्यावा; ह्मणजे सर्व आक्षेपकादिक वातविकारांचा नाश करितो. हा वातारि सर्वत्र प्रसिद्ध आहे.

## वातगजांकुश.

मृतंसूतंमृतंलोहंगंधतालकमाक्षिकं ॥ पथ्याशृंगीविषंत्र्यूपमग्निमंथंच टंकणं ॥ तुल्यंखल्वेदिनंमर्द्यंमुंडीनिर्गुंडिजैर्द्रवैः ॥ द्विगुंजांवटिकां खादेत्सर्ववातप्रशांतये ॥ साध्यासाध्यंनिहंत्याशुरसोवातगजांकुशः ॥

अर्थ–पारदभस्म, लोहभस्म, गंधक, हरताळ, स्वर्णमाक्षिकभस्म, हरीतकी, कांकडशिंगी, बचनाग, सुंठ, मिरीं, पिंपळी, थोर ऐरण व टांकणखार हे समभाग घेऊन त्याचा एक दिवस मुंडी व निर्गुंडी यांच्या रसांत खल करावा. तो दोन गुंजा द्यावा; ह्मणजे साध्य व असाध्य अशा सर्व वातविकारांचा नाश करितो.

## व्याधिगजकेसरी.

पारदंगंधकंतालंविषंत्र्यूषणकंसमं ॥ त्रिफलाटंकणक्षारंप्रत्येकंशाण मात्रकं ॥ दंतिबीजंचटंकैकंसूक्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ भृंगराजरसेनैव मर्दयेद्दिनसप्तकं ॥ काकमाचीरसेनैवनिर्गुंडीरसकंतथा ॥ मरिचाभा वटीकार्यादोषमापेक्ष्यदापयेत् ॥ क्षीरेणसहदातव्याचाष्टज्वरनिवृत्त ये ॥ अशीतिर्वातजान्हंतिनिर्गुंडीवस्तुकेनवा ॥ गुडेनसहदातव्याच त्वारिंशच्चपैत्तिकान् ॥ अनुपानेनसंयुक्तस्तत्तद्रोगहरःस्मृतः ॥

अर्थ–पारा, गंधक, हरताळ, बचनाग, सुंठ, पिंपळी, हरडा, बेहेडा, आवळकाठी व टांकणखार हीं प्रत्येक अर्धा तोळा; व जेपाळबीज १ तोळा घेऊन सर्वांचें सूक्ष्म चूर्ण करून त्यास माका, कावळी व निर्गुंड यांच्या रसाच्या सात भावना द्याव्या; आणि त्याच्या मिऱ्या एवढ्या गोळ्या कराव्या; आणि दोष पाहून द्याव्या; अशा कीं आठ प्रकारच्या ज्वरांवर दुधाशीं, ऐंशीं प्रकारच्या वायूवर निर्गुंडी व नागरमोथा यांच्या काढ्याशीं, चाळीस प्रकारच्या पित्तव्याधिवर गुळाशीं; आणि सर्व व्याधीवर योग्य अनुपानाशीं दिली असतां; त्या त्या व्याधीचा नाश करित्ये.

## सूर्यप्रभागुटी.

चित्रकांत्रिफलानिंबपटोलंमधुयष्टिका ॥ वरांगकेसरंचैवयवानीचाम्लवेतसं ॥ भूनिंबकंचदार्व्येलामुस्तापर्पटकंतथा ॥ तुत्थकंकटुकाभार्ङ्गीच व्यपद्मकदीप्यकैः ॥ पिप्पलीमरिचंदंतीशठीशुंठीसपुष्करं ॥ विडंगंपिप्पलीमूलंजीरकंदेवदारुच ॥ पत्रकंकुटजंरास्नादुरालंभामृतात्रिवृत् ॥ लतारुष्करतालीसंवृक्षाम्लंलवणत्रयं ॥ धान्यकंचाजमोदाचकारवीधातुमाक्षिकं ॥ जातीफलंतुगाक्षीरीवाजिगंधासदाडिमं ॥ कंकोलकमुशीरंचाद्विक्षारंमरिचंतथा ॥ एतानिपलमात्राणिसूक्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ गिरिजस्यपलान्यष्टौद्वेपलेचैवगुग्गुलोः ॥ प्रस्थमेकंसितायाश्चघृतस्यकुडवंतथा ॥ गिरिजस्यसमंलोहंप्रस्थार्धमाक्षिकस्यच ॥ सर्वमेकत्रसंमिश्र्य स्निग्धभांडेनिधापयेत् ॥ वातव्याधिमुरुस्तंभमर्दितंगृध्रसींतथा ॥ विद्रधिश्लीपदंगुल्मंपांडुरोगंहलीमकं ॥ कासंपंचविधंघोटंमूत्रकृच्छ्रंगलग्रहं ॥ आनाहमश्मरीवर्ध्मग्रहणीमवबाहुकं ॥ अरोचकंपार्श्वशूलमुदरंसभगंदरं ॥ हृद्रोगंशूलमुत्कंपविषमज्वरनाशनं ॥ उरःक्षतेचयेदोषा मुखरोगेचदारुणे ॥ प्राशयेद्गुटिकाचापिचूर्णपाणितलोन्मितं ॥ विविधान्नानिभुंजीतयथेष्टंचयथासुखं ॥ गुटिकाभास्करिनाम्नासृष्टादेवेनशंभुना ॥ प्रमेहंरक्तपित्तंचपांडुरोगंसकामलं ॥ अग्निसंदीपनंहृद्यंदीर्घायुःपुष्टिदोभवेत् ॥ येवातप्रभवारोगायेचपित्तसमुद्भवाः ॥ कफरोगाश्चयेकेचितद्वंद्वजाःसान्निपातिकाः ॥ तेसर्वेप्रशमंयांतिभास्करेणतमोयथा ॥ रोगविद्राविणीकार्यागुटिकासूर्यवत्प्रभा ॥

अर्थ–चित्रक, हरडा, बेहडा, आवळकाठी, कडुनिंब, पडवळ, ज्येष्टीमध, जाडी दालचिनी, नाकेशर, ओंवा, आम्लवेतस, किराईत, दारुहळद, एलची, नागरमोथा, पित्तपापडा, रसांजन, कुटकी, भारंगमूळ, चवक, पद्मकाष्ठ, खुरासनीओंवा, पिंपळी, मिरीं, जेपाळ, कचोरा, सुंठ, पुष्करमूळ, वावडिंग, पिंपळमूळ, जिरें, देवदार, तमालपत्र, कुडयाची साल, रास्ना, धमासा, गुळवेल, तेड, कुवलिचें बीज, तालीसपत्र, आमसोल, सैंधव, बिडलोण, काचलोण, धने, अजमोदा, शोप, स्वर्णमाक्षीक, जायफळ, वंशलोचन, अश्वगंध, दाडिमसाल, कंकोळ, वाळा, यवक्षार, साजेखार, आणि मिरीं, हीं प्रत्येकीं चार तोळे व शिलाजित ३२ तोळे, गुग्गुळ ८ तोळे, लोहभस्म ३२ तोळे, माक्षिकभस्म ८

तोळे, या सर्वांचें चूर्ण एकत्र मिळवून तुपानें राबलेल्या भांड्यांत भरून ठेवावें; त्यांतून १ तोळा किंवा कमी अग्निबल पाहून देत जावें; ह्मणजे वातव्याधि, ऊरुस्तंभ, अर्दित, गृध्रसी, विद्रधि, श्लीपद, गुल्म, पांडुरोग, हलीमक, पांच प्रकारचा खोकला, मूत्रकृच्छ्र, गलरोग, आनाह, अश्मरी, अंडवृद्धि, संग्रहणी, अवबाहुक, अरुचि, पार्श्वशूल, उदर, भगंदर, हृद्रोग, शूल, ऊर्ध्वकंप, विषमज्वर, उरःक्षत, मुखरोग, प्रमेह, रक्तपित्त, पांडुरोग, कामला व वातोत्पन्न, कफोत्पन्न, द्वंद्वज, सन्निपातिक इत्यादिरोग, या गुटिकेच्या प्रभावानें जातात. लोकहितार्थ ही घेतली असतां; खाण्यापिण्याचा नियम नाहीं. ही भास्करी गुटिका महादेवानें लोकहितार्थ निर्माण केली.

## लघुवातविध्वंसमात्रा.

पारदष्टंकणोगंधपाषाणभिद्विषनागोवराटस्तथातालकश्च ॥ त्र्यूषणंहेम नीरेणतन्मर्दयेद्रक्तिकाभावटीवातविध्वंसकः ॥ सन्निपातकेमारुतेकफे शीतमांद्यकेश्वाससंभवे ॥ संग्रहाभिधेशूलजेगदेकाससंस्मृतौयोजयेत्सदा ॥

अर्थ—पारा, टांकणखार, गंधक, पाषाणभेद, बचनाग, कवड्याचें भस्म, हरताळ, सुंठ, मिरीं व पिंपळी हीं समभाग व शुद्ध असीं एकत्र करून त्यांचा धोत्र्याच्या रसाशीं खल करावा; आणि गुंजे एवढी गोळी करावी. तिला वातविध्वंस ह्मणतात. हा सन्निपात, कफ, वायु, शीत, अग्निमांद्य, श्वास, संग्रहणी, शूल, आणि खोकला यांवर योजावा.

## वन्हिकुमार.

टंकणःपारदोगंधशंखौकपर्दःसमोवत्सनाभस्त्रिभागस्तथा ॥ वल्लिजं अष्टभागंवन्हिपूर्वःकुमारःस्मृतोभृंगनीरेणसंमर्दितः ॥ वातरोगेषुसर्वे पुश्वसनेवन्हिमांद्यके ॥ कफामयेप्लीहकासेशूलेत्वग्निकुमारकः ॥

अर्थ—टांकणखाराची लाही, पारा, गंधक शंखभस्म व कवडीचें भस्म, हीं समभाग, व बचनाग ३ भाग व मिरीं ८ भाग एकत्र करून त्यांचा माक्याच्या रसांत खल करावा. याला वन्हिकुमार ह्मणतात. हा संपूर्ण वातरोग, श्वास, अग्निमांद्य, कफ, प्लीहा, खोकला; आणि शूल, यांवर द्यावा.

## वातविध्वंस.

रसंगंधंविषंचैवताम्रंलोहंसमाक्षिकं ॥ एतत्सर्वंसमंयोज्यंविषंचद्विगुणंभवेत् ॥ जेपालंतालकंचैवरसेनसहयोजयेत् ॥ त्र्यूषणंचसमंयोज्यं सर्वमेकत्रकारयेत् ॥ निर्गुंडीसूरणद्रावैर्भानोश्चपयसस्तथा ॥ तर्कारी भृंगराजश्चनतोन्मत्तरसस्यच ॥ भावनाखलुदातव्यासप्तसप्तक्रमादि

तः ॥ द्विगुंजंभक्षयेत्प्रातर्मरिचैश्चसमन्वितं ॥ जानुजंघाकटिस्थूण पादगुल्फौष्ठशीर्षकं ॥ मन्यास्तंभंहनुस्तंभंत्रिकस्तंभंचशुष्ककं ॥ जिव्हास्तंभंबाहुभवंत्रिकस्तंभंचपादजं ॥ अधोभागेचयेवाताःसर्वांगेविचरंतिये ॥ सर्वान्वातान्जयेदाशुदैन्यंनारायणोयथा ॥

अर्थ–पारा १, गंधक १, बचनाग २, ताम्रभस्म १, लोहभस्म १, माक्षीकभस्म १, जेपाल १, हरताळ १, सुंठ, मिरीं व पिंपळी मिळून १ भाग, हीं सर्व एकत्र करून त्याला निर्गुंड, सुरण, रुई, टांकळी, माका, आणि धोतरा, या प्रत्येकांच्या सात सात भावना द्याव्या. हा वातविध्वंस दोन गुंजा मिऱ्याच्या चूर्णाशीं द्यावा; ह्मणजे मांड्या, गुडघे, कंबर, पोटऱ्या, पाठीचा कणा, पाय, घोंटे, ओंठ, मस्तक, आणि मान यांचा स्तंभ, हनुस्तंभ, त्रिकस्तंभ, शुष्कवात, जिव्हास्तंभ, बाहुस्तंभ, पादस्तंभ व अधोभागीं होणारे वायु; आणि सर्वांगांत संचार करणारे वायु, अशा सर्व वात रोगांचा नाश करितो. जसा भगवान् भक्तांचें दैन्य नाश करितो.

## दुसरा समीरपन्नग.

सूतंतालकमाक्षिकायसरजोगंधंसमांशंकृतंपथ्याव्यूषणवन्हिमंथसुरसाशृंगीविषंटंकणं ॥ क्षिप्त्वाखल्वतलेचवारिसुरसामुंडीरसेमर्दितंमात्रावल्लमितासरौंधवयुताशुंठीतथाचित्रकैः ॥

अर्थ–पारा, हरताळ, स्वर्णमाक्षिक भस्म, लोहभस्म, गंधक, हरीतकी, सुंठ, मिरीं, पिंपळी, थोर ऐरण, रास्ना, कांकडशिंगी, बचनाग व टांकणखार हीं समभाग घेऊन तुळस व मुंडी यांच्या रसांत खलून त्याची वालप्रमाण गोळी करावी. ती सैंधव, सुंठ आणि चित्रक यांच्या रसाशीं वायूवर द्यावी.

## वातारि रस.

रसभस्मचभागैकंगंधकोद्विगुणोभवेत् ॥ त्रिगुणंचविषंग्राह्यंकणाचैवचतुर्गुणा ॥ वृंतात्रयंतथाप्रोक्तंसर्वमेकत्रकारयेत् ॥ गुंजामात्राप्रदातव्यासर्ववातविकारिणां ॥

अर्थ–पारदभस्म १ भाग, गंधक २ भाग, बचनाग ३ भाग, पिंपळी ४ भाग व रेणुकबीज ३ भाग, हे पदार्थ एकत्र करावे; आणि संपूर्ण वातविकारांवर १ गुंज प्रमाण द्यावे.

## दुसरा प्रकार.

भागैकंचविषंचैवद्विभागंटंकणंतथा ॥ चतुर्भागंचमरिचंसहैकत्रप्रयोजयेत् ॥ आर्द्रकस्यरसैर्मर्द्यंवल्लमेकंप्रमाणतः ॥ मरिचैश्चसमायुक्तंसर्ववातनिकृंतनं ॥

अर्थ-बचनाग एकभाग, टांकणखार दोनभाग व मिरीं चारभाग, हे एकत्र करून त्यांचा आल्याच्या रसाशीं खल करून त्याची एकवाल मात्रा मिऱ्यांच्या चूर्णाशीं द्यावी. ती सर्व वायूंचा नाश करित्ये.

## रसेंद्रचिंतामणि.

सूतात्पंचार्कतश्चैकंकृत्वापिष्टिंसगंधकं ॥ सूतांशंनागवल्याश्चद्रवैःपिष्ट्वाप्रलेपयेत् ॥ ताम्रपृष्ठेप्रलिप्यैतांरुध्वागजपुटेपचेत् ॥ द्विगुंजंत्र्यूषणेनार्धवपुवातंसकंपकं ॥ निहंतिदाहसंतापमूर्छापित्तसमन्विताः ॥

अर्थ-पारा ५ भाग, तांबें १ भाग व गंधक ५ भाग, यांची कज्जली करून नागवेलीच्या रसांत घालून त्याणें तांब्याचे पत्रे लिंपून पुणतींत ठेऊन गजपुट द्यावें, तें भस्म दोन गुंजा सुंठ, मिरीं व पिंपळी यांचा चूर्णाशीं द्यावें. ह्मणजे अर्धांगवात, कंपवात, दाह, संताप, मूर्छा; आणि पित्त यांचा नाश करितें.

## कालकंटकरस.

वज्रसूताभ्रहेमार्कतीक्ष्णमंडंक्रमोत्तरं ॥ मारितंमर्दयेदम्लवर्गेणदिवसत्रयं ॥ त्रिक्षारंपंचलवणंमर्दितस्यसमंसमं ॥ दत्वानिर्गुंडिकाद्रावैर्मर्दयेद्दिवसत्रयं ॥ शुष्कमेतद्विचूर्ण्याथविषंचास्याष्टमांशतः ॥ टंकणंविषतुल्यांशंदत्वाजंबीरजैर्द्रवैः॥भावयेद्दिनमेकंतुरसोयंकालकंटकः॥ दातव्यःसर्वरोगेषुसन्निपातेविशेषतः ॥ द्विगुंजमार्द्रकद्रावैर्घृतैर्वावातरोगिणां ॥ निर्गुंडीमूलचूर्णंतुमाहिषाख्यंचगुग्गुलुं ॥ समांशंमर्दयेदाज्येतद्वटीकर्षसंमिता ॥ अनुयोज्याघृतैर्नित्यंस्निग्धमुष्णंचभोजनं ॥ मंडलान्नाशयेत्सर्वान्वातरोगान्नसंशयः ॥ सन्निपातेपिवेच्चानुरविमूलकषयार्कं ॥

अर्थ-हिरा, पारा, अभ्रक, सुवर्ण, ताम्र, तिखें व मुंडलोह यांचीं भस्में एकोत्तरवृध्दीनें घेऊन त्यांला तीन दिवस अम्लवर्गाची भावना द्यावी; नंतर त्रिक्षार व पंचलवणें हीं त्याच्या समान घालून नंतर निर्गुंडीच्या रसांत त्याचा तीन दिवस खल करावा; शुष्क झाल्यावर अष्टमांश बचनाग व टांकणखार घालून लिंबाच्या रसांत १ दिवस खलावा. याला कालकंटकरस ह्मणतात. हा संपूर्ण रोगावर द्यावा; परंतु विशेषेकरून सन्निपातावर द्यावा. आल्याच्या रसाशीं किंवा तुपाशीं दोन गुंजा वातरोगावर द्यावा; निर्गुंडीच्या मूळाचें चूर्ण व ह्मशागुग्गुळ हे समान घेऊन तुपाशीं खलून एक तोळ्याची गोळी शीं द्यावा; आणि स्निग्ध व ऊष्ण असें भोजन करावें; ह्मणजे तें चाळीस दिवसांत

संपूर्ण वातरोगांचा नाश करील; आणि हा रस घेऊन वर रुईच्या मुळांचा काढा प्राशन केला असतां; संनिपातास हटवील.

## त्रिगुणाख्यरस.

गंधकाष्टगुणंसूतंशुध्धंमृद्वग्निनाक्षणं ॥ पक्त्वावतार्यसंचूर्ण्यचूर्णंतुल्यभयायुतं ॥ सप्तगुंजमिदंखादेद्वर्धयेच्चदिनेदिने ॥ गुंजैकैकंक्रमेणैवयावत्स्यादेकविंशति ॥ क्षीराज्यशर्करामिश्रंशाल्यन्नंपथ्यमाचरेत् ॥ कफवातप्रशांत्यर्थंनिर्वातेनिवसेत्सदा ॥ त्रिगुणाख्योरसोनामत्रिपक्षात्कफवातनुत् ॥

अर्थ–गंधक आठ भाग घेऊन तो मंदाग्नीवर पातळ करून त्यांत पारा १ भाग मेळवावा, क्षणभर अग्नीवर ठेऊन त्याच्या समान हरीतकीचें चूर्ण मिसळून ते प्रथम दिवशीं सात गुंजा द्यावें; आणि एकवीस गुंजा होत तों दररोज एक गुंज वाढवीत जावें; आणि दूध, तूप, साकर व भात हें पथ्य करावें; व निवाऱ्यास राहावें; ह्मणजे हा त्रिगुणाख्य रस तीन पक्षांमध्यें कफवायूचा नाश करितो.

## अर्केश्वर.

रसस्यगंधंद्विगुणंविमर्द्यताम्रस्यचक्रेणसुतापितेन ॥आच्छादयित्वाचततःप्रयत्नाच्चक्रेविलग्नंचततःप्रगृह्य ॥ संचूर्ण्यचद्वादशधार्कदुग्धैःपुटेतवन्हित्रिफलाजलेन ॥ संभावितार्केश्वरएषसूतोगुंजाद्वयंचास्यफलत्रयेण ॥ ददेतमानत्रितयेनसुप्तिवाताद्विमुक्तोहिभवेत्थिताशी ॥ क्षारंसुतीक्ष्णंदधिमांसमाषंवृंताकमध्वादिविवर्जनीयं ॥

अर्थ–पारा १ भाग व गंधक २ भाग एकत्र करून तांब्याचें भांडें तापवून त्याणें घोंटावा; आणि आच्छादन करावा. जो तांब्याच्या चक्राला लागेल तो काढून घ्यावा; नंतर खलांत घालोन त्याला रुईच्या चिकाच्या आणि चित्रक व त्रिफळा यांच्या काढयाचा दाहा भावना द्याव्या. याला अर्केश्वर ह्मणतात. हा दोन गुंजा त्रिफळ्याशीं द्यावा; आणि पथ्याला हितकारक अन्न द्यावें; व खारट, तिखट, दहीं, मांस, उडीद, वांगें व मध हे पदार्थ वर्ज करावे; ह्मणजे सुप्तिवायूपासून मुक्त होतो.

## एकांगवीर.

शुद्धगंधंमृतंसूतंकांतंवंगंचनागकं ॥ ताम्रंचाभ्रंमृतंतीक्ष्णंनागरंमरिचंकणा ॥ सर्वमेकत्रसंचूर्ण्यभावयेच्चपृथक्त्रयं ॥ वराव्योषकनिर्गुंडीवन्हिमार्द्रकजैर्द्रवैः ॥ शिग्रुकुष्ठद्रवेणापिततोधात्र्याद्रवेणच ॥ विषमु

ष्टयार्कहाटैश्चआर्द्रकस्यरसैस्तथा ॥ रसश्चैकांगवीरोसोसुसिद्धोरसरा ड्भवेत् ॥ पक्षघातंचार्दितंचधनुर्वातंतथैवच ॥ अर्धांगंगृध्रसींवापिवि श्वाचीमवबाहुकं ॥ सर्वान्वातामयान्हंतिसत्यंसत्यंनसंशयः ॥

अर्थ—शुध्द गंधक, पारदभस्म, लोहकांत, वंगभस्म, नागभस्म, ताम्रभस्म, अभ्रकभस्म, तिख्याचें भस्म, सुंठ, मिरीं व पिंपळी या सर्वांचें एकत्र चूर्ण करून त्याला त्रिफळ्याचा काढा, त्रिकटूचा काढा, निर्गुंडी, आलें, चित्रक, शेवगा, कोष्ठ, आंवळे, कुचला, रुई, कांडवेल; आणि आलें या प्रत्येकाच्या तीन तीन भावना द्याव्या; ह्मणजे हा एकांगवीर रस सिध्द होतो. हा पक्षघात, धनुर्वात, अर्धांगवात, गृध्रसी, विश्वाची, अवबाहुक, आणि सर्वप्रकारचे वातरोग यांचा नाश करितो. या विषयीं संशय नाहीं.

## वातरक्तावर रस.

पारदंचक्रियाशुद्धंतत्तुल्यंशुद्धगंधकम् ॥ अभ्रकंतद्द्वयोस्तुल्यंत्रिभिस्तुल्यंतु गुग्गुलुम् ॥ सर्वांशममृतासत्वंभावयेदौषधैःपृथक् ॥ निर्गुंडीगोक्षुराच्छि न्नाकोकिलाख्यांघ्रिजैरसैः ॥ सप्तवारंततोयुंज्याद्वातरक्तेत्रिवल्लकं ॥ को किलाख्यस्यमूलानांपानीयमनुपाययेत् ॥

अर्थ—पारा, शुद्धगंधक समभाग दोघांचे बरोबर अभ्रकभस्म, तिघांचे बरोबर गुग्गुळ, सर्वांचे बरोबर गुळवेलीचें सत्व, हीं एकत्र करून निर्गुंडी, गोखरू, गुळवेल, कांकोलीचे काढ्याच्या ७ भावना द्याव्या; नंतर वातरक्तरोगावर तीन वाल प्रमाण खावा. वर कांकोलीच्या मुळांचा काढा प्यावा.

## तालकभस्म.

तालंरसंतुवरिकांनयनेंदुबाणभागैर्विशुद्धवसुजातरसेविमर्द्य ॥ दत्वाश रावयुगुलेप्रविधायमुद्रांदद्याद्गजाव्हपुटमस्यभवेत्सुभस्म ॥ दृष्ट्वाकृति प्रकृतिमप्यखिलामवस्थांदृष्ट्वापुनश्चबहुधाबहुधाविचार्य ॥ दद्याच्चतं दुलमिताहरितालमात्रांविद्यामयायतिवरादियमापयत्नात् ॥

अर्थ—तालभस्म ॥, हरताळ २, पारा १ व तुरटी ५ हीं एकत्र करून पांढऱ्या धें टुळीच्या रसांत खल करावा; आणि सुकल्यानंतर त्याची वडी करून खापराच्या तवलीं- त घालून त्यावर दुसरें खापर पालथें घालावें; आणि संधिलेप करून गजपुट द्यावें; ह्म- णजे सुंदर भस्म होतें. ही हरताळमात्रा ज्या रोग्यास देणें असेल त्याची आकृति, प्रकृति, आणि रोगाची सर्व अवस्था पाहून वारंवार विचार करून तांदळा इतकी द्यावी. ही विद्या म्या एका महान् सन्याशापासून प्रयत्नानें मिळविली आहे.

## गंधक रसायन.

शुद्धोबलिर्गोपयसाविभाव्यततश्चतुर्जातगुडूचिकाभिः ॥पथ्याक्षधात्र्यौ षधभृंगराजैर्भाव्योष्टवारंपृथगार्द्रकेण ॥ सितेसितांयोजयतुल्यभागांर सायनंगंधकपूर्वकंस्यात् ॥कर्षोन्मितंसेवितमेतिमर्त्योवीर्यंचपुष्टिंदृढदे हवन्हि ॥ कुष्ठंसकंडूंविषदोषमुग्रंमासद्वयंयोजयतीचयोगः॥घोराति सारंग्रहणीगदंचसवातरक्तंसहशूलयुक्तं ॥ जीर्णज्वरंमेहगणंचतीव्रंवा तामयानांग्रहणेसमर्थः ॥ प्रज्ञाकरंकेशमतिविकृष्णंससोमरोगंसहमुष्क वृद्धिं ॥ हरतिसकलरोगान्गंधकाख्योतियोगोमृतसदृशनराणांप्राण दोदीर्घमायुः ॥ तदनुविहितयोगंभस्मसूतंसहेमरमयतित्रिदशानांदी प्तिरूपंसुखंच ॥

अर्थ—शुद्ध गंधक घेऊन त्याला गाईचें दूध, दालचिनी, एलची, तमालपत्र, नाकेशर, गुळवेल, हरीतकी, बेहेडा अवळकाठी, सुंठ, माका, व आलें यांच्या प्रत्येकीं आठ आठ भावना देऊन सिद्ध झाला ह्मणजे त्यांत समान साकर मिसळावी. याला गंधक रसायन ह्मणतात. हें दाहा मासे सेवन केलें असतां; वीर्य, पुष्टि, देहाला दृढता, अग्निदीप्ति, यांना करितें; व कुष्ठ, कंडू, विषदोष, घोर अतिसार, संग्रहणी, वातरक्त, शूल, जीर्णज्वर, संपूर्ण मेह, तीव्र वातव्याधि, अंडवृद्धि, सोमरोग, आणि संपूर्ण रोग यांचा नाश करितें; व बुद्धि, आयुष्य, केशांला काळेपणा आणि सर्व रोग यांचा नाश करितें. हे मनुष्यांला प्राण व आयुष्य, देण्याविषयीं समर्थ आहे; आणि यांत पारदभस्माचा योग केला असतां; कांति करितें; आणि अनेक स्त्रिया भोगण्याचें सामर्थ्य देतें.

## लघु विषगर्भतैल.

तैलाढकंसमतुषांबुहयारिहेमनिर्गुंडिभास्करशिफासृतयातुसिद्धं ॥ ध त्तूरकुष्ठफलिनीविषहेमदुग्धारास्नाहयारिकटभीमरिचोपचित्रा॥मांसी वचादहनसर्षपदेवदारुदार्वानिशाऋबुजतुत्रिफलासमंगा ॥ पिष्टासि पेत्पलमितांविषगर्भमेतत्तैलंसमस्तपवनामयनाशनंस्यात् ॥

अर्थ—२५६ तोळे तेलांत, त्याचे बरोबर तुसाचें पाणी व कणेर, धोत्रा, निर्गुंडी, आणि रुईचें मूळ यांचा काढा घालून सिद्ध करावें, नंतर धोत्र्याच्या बिया, कोष्ठकोळिंजन, कळलावी, बचनाग, उंबर रास्ना, कणेर, मालकांगोणी, मिरें, बृहद्दंती, जटामांसी, वेखंड, चित्रक, शिरस, देवदार, दारुहळद, हळद, एरंडमूळ, लाख, त्रिफळा, मंजिष्ठ, हीं प्रत्येकी ४ तोळे घेऊन चूर्ण करून तें त्या तेलांत टाकावें; ह्मणजे झाला विषगर्भ तेल ह्मणतात. हें सर्व वातरोगनाशक आहे.

## दुसरा प्रकार.

धत्तूरस्यरसस्यपंचकुडवंतैलंतथाकांजिकंप्रस्थानांचचतुष्टयंगदवचा चित्रात्परंशाणकाः ॥ स्वत्धात्रीमरिचात्पृथङ्नवविषात्षट्स्वर्णबीजात्पटोःस्युःसप्ताधिकविंशतिःपरिमितंतीव्रानिलध्वंसनं ॥ पक्षाघातंहनुस्तंभंमन्यास्तंभंकटिग्रहं ॥ पृष्ठत्रिकशिरःकंपंसर्वांगग्रहणंतथा ॥

अर्थ–धोतऱ्याचा रस ८० तोळे, तेल ८० तोळे, कांजी ६४ तोळे, कोष्ठकोळिंजन, वेखंड, चित्रक हीं एकेक तोळा, हितवल्ली, मिरें, दोन्ही नऊ नऊ तोळे, बचनाग ६ तोळे, धोत्र्याचें बीं २७ तोळे व सैंधव २७ तोळे हीं सर्व एकत्र करून तैल सिध्द करावें. तें तीव्रवायु, पक्षघात, हनुस्तंभ, मानेचा स्तंभ, कटिग्रह, पाठ, तिडे व मस्तक यांचा कंप, आणि सर्वांगग्रहवात यांचा नाश करितें.

## महाविषगर्भतैल.

कनकंतुचनिर्गुंडीतुंबिनीचपुनर्नवा ॥ वातारिश्चाश्वगंधाचप्रपुन्नाटंस चित्रकं ॥ सौभांजनंकाकमाचीकलिकारीचनिंबकं ॥ महानिंबेश्वरी चैवदशमूलंशतावरी ॥ कारवल्लीसारिवाचश्रावणीचविदारिका ॥ वज्रयर्कौमेषशृंगीचकरवीरद्वयंवचा ॥ काकजंघापामार्गबलाचाति बलाद्वयं ॥ व्याघ्रीमहाबलावासासोमवल्लीप्रसारिणी ॥ पलोन्मितानि चैतानिद्रोणेंभसिविनिःक्षिपेत् ॥ पचेत्पादावशेषेस्मिन्कल्कस्यकुडवं क्षिपेत् ॥ त्रिकटुंविषतिंदुंचरास्नाकुष्ठंविपघनं ॥ देवदारुर्वत्सनाभो द्वौक्षारौलवणानिच ॥ तुत्थकंकट्फलंपाठाभार्ङ्गीचनवसागरं ॥ त्रायंतीधन्वयासंचजीरकंचेंद्रवारुणी ॥ तैलप्रस्थंसमादायपाचयेन्मृदु वन्हिना ॥ विषगर्भमिदंनाम्नासर्वान्वातान्व्यपोहति ॥ वक्षोरुकटि जंघानांसंधानंश्रेष्ठमेवच ॥ गृध्रसींचमहावातान्सर्वांगग्रहणंतथा ॥ दंडापतानकंचैवकर्णनादंचशून्यतां ॥ वनमध्येयथासिंहात्पलायंतेय थामृगाः ॥ तथाश्वगजभग्नानांनराणांचचतुष्पदां ॥ नाशयेन्नात्रसं देहोविषगर्भप्रलेपनात् ॥

अर्थ–धोत्रा, निर्गुंडी, श्वेत भोपळा, पुनर्नवा, एरंड, अश्वगंध, टाकळा, चित्रक, शेवगा, कावळी, बेहेडा, कडुनिंब, निंबारा, वांझकर्टोली, दशमुळें, शतावरी, लघुकार.

ळी, श्वेत उपळसरी, मुंडी, भुयकोहाळी, निवडुंग, रुई, मेषशृंगी, तांबडी व पांढरी कण्हेर, वेखंड, कापळी, आघाडा, चिकणा, अतिबला, नागबला, रिंगणी, महाबला, अडुळसा, सोमवेल व चांदवेल हीं प्रत्येकीं ४ च्यार तोळे घेऊन १०२४ तोळे पाण्यांत कढवून चतुर्थांश पाणी उरलें ह्मणजे त्यांत त्रिकटु, कुचला, रास्ना, कोष्ठकोळिंजन, अतिविश, नागरमोथा, देवदार, बचनाग, जवखार, टांकणखार, सैंधव, बिडलोण, पादेलोण, मीठ, मोरचूत, कायफळ, पाहाडमूळ, नवसागर, मेंदी, धमासा, जिरें व कंवडळ यांचें चूर्ण १६ तोळे घालून त्यांत ६४ तोळे तेल मंदाग्निवर पक्क करावें. ह्याला विषगर्भतेल ह्मणतात. हें सर्व वातरोगांस नाशितें; आणि ऊर, मांड्या, कंबर, जंघा व संधि या ठिकाणचा वायु, आढ्यवात, गृध्रसी, महावात, सर्वांगवात, दंडापतानक, कर्णनाद व शून्यता, यांचा नाश करील; आणि अरण्यांत सिंव्हापासून जसे मृग भिऊन पळतात, या प्रमाणें अश्व व गज, यां वरून पडून भग्न झालेले नर अथवा पशु यांच्या व्याधीचा नाश करील यांत संशय नकोच.

## प्रसारिणीतैल.

समूलपत्रांपुष्पाढ्यांजातसारांप्रसारिणीं ॥ कुट्टयित्वापलशतंकटाहे समधिश्रयेत् ॥ दध्नस्तत्राढकंदद्यात्द्विगुणंचाम्लकांजिकं ॥ भेषजानितुपेष्यानितत्रेमानिसमावपेत् ॥ शुंठीपलानिपंचैवरास्नायाश्चपलद्वयं ॥ प्रसारिणीपलेद्वेचद्वेपलेमधुकस्यच ॥ एतत्सर्वसमालोड्यशनैर्मृद्वग्निनापचेत् ॥ एतत्प्रभंजनेश्रेष्ठंनस्यकर्मणिशस्यते ॥ एकांगग्रहणंवापिसर्वांग्रहणंतथा ॥ अपस्मारंतथोन्मादंविद्रधिंमंदवन्हितां ॥ त्वग्गताश्चापियेवाताःशिरासंधिगताश्चये ॥ अस्थिसंधिगतायेचयेच शुक्रार्तवेस्थिताः ॥ सर्वान्वातामयान्नूनंनाशयत्येवसर्वथा ॥ हयंनरंगजंवापिवातजर्जरितंभृशं ॥ सद्यःप्रशमयेत्तैलमेतन्नात्रविचारणा ॥ इंद्रियस्थप्रजननंवंध्यानांचप्रजाकरं ॥ वृद्धानांबालकानांचस्त्रीणांराज्ञांहितंपरं ॥ पंगुर्वापीठसर्पिर्वापीत्वैतत्संप्रधावति ॥

**अर्थ**–मुळें, पानें व फुलेंसुद्धां, व जींत सत्व झालें आहे अशी चांदवेल ४०० तोळे कुटून एका कढईंत शिजवावी. त्यांत २५६तोळे दहीं ५१२ तोळे आंबट कांजीघालून नंतर सुंठ २०तोळे, रास्ना ८ तोळे, चांदवेल ६ तोळे, जेष्ठीमध ८तोळे, याप्रमाणें त्यांत टाकून ढवळून मंदाग्निवर पक्क करावें. हें वायूवर नस्य करण्यास प्रशस्त आहे. एकांगग्रहण, सर्वांगग्रहण, अपस्मार, उन्माद, विद्रधि, अग्निमांद्य, त्वचा, मस्तक, शिरा, अस्थि, शुक्र,

आर्तव, इतक्या ठिकाणचे वात. सर्व वातरोग यांचा निश्चयेंकरून नाश करील; व घोडा, मनुष्य, हस्ति यांतून कोणीजरी वायूनें जर्जर झाला असला तरी तात्काळ हें तेल आरोग्य करील, यांत संशय नाहीं. इंद्रियजनक, वंध्यास्त्रीला प्रजा करणारें, वृद्ध, बालक, स्त्रिया, व राजे यानां हितकारक आहे. व पांगळा किंवा काखेंत कुबडया धरून चालणारा असा मनुष्य हें तेल पिऊन धावूं लागेल.

## नारायणतैल.

बिल्वोग्निमंथःस्योनाकपाटलापारिभद्रकाः ॥ प्रसारिण्यश्वगंधाचबृहतीकंटकारिका ॥ बलाचातिबलाचैवश्वदंष्ट्रासपुनर्नवा ॥ एषांदशपलान्भागान्चतुर्द्रोणांभसापचेत् ॥ पादशेषंपरिस्राव्यतैलपात्रेप्रदापयेत् ॥ शतपुष्पादेवदारुमांसीशैलेयकंवचा ॥ चंदनंतगरंकुष्ठमेलापर्णीचतुष्टयं ॥ रास्नातुरगगंधाचसैंधवंसपुनर्नवं ॥ एषांद्विपलिकान् भागान्पेषयित्वाविनिःक्षिपेत् ॥ शतावरीरसंचैवतैलतुल्यंप्रदापयेत् ॥ आजंवायदिवागव्यंक्षीरंदत्वाचतुर्गुणं ॥ पानेबस्तौतथाभ्यंगेभोज्येनस्येप्रयोजयेत् ॥ अश्वोवावातभग्नोवागजोवायदिवानरः ॥ पंगुर्वाभग्नहस्तोवाभग्नपादोथवानरः ॥ अधोभागेचयेवाताःशिरामध्यगताश्चये ॥ दंतशूलेहनुस्तंभेमन्यास्तंभेपतंत्रके ॥ एकांगग्रहणेवापिसर्वांगग्रहणेतथा ॥ क्षीणेंद्रियानष्टशुक्राज्वरक्षीणाश्चयेनराः ॥ लालजिव्हाश्चबधिराविस्वरामंदमेधसः ॥ मंदप्रजाचयानारीयाचगर्भंनविंदति ॥ वातार्तौवृषणौयेषामंत्रवृध्दिश्चदारुणा ॥ एतत्तैलंवरंतेषांनाम्नानारायणंस्मृतं ॥

अर्थ—बेल, ऐरण, टेंटु, पाडळ, कडुलिंब, चांदवेल, आस्कंद, रिंगणी, डोरली, चिकणा, मोठा चिकणा, गोखरू, पुनर्नवा हीं प्रत्येकीं ४० तोळे प्रमाणें घेऊन ४०९६ तोळे पाण्यांत शिजवून चतुर्थांश पाणी शेष उरलें ह्मणजे गाळून घेऊन तेलाचे पात्रांत टाकावें; नंतर त्यांत बडिशेप, देवदार, जटामांसी, शिलाजित, वेखंड, चंदन, तगर, कोष्ठकोळिंजन, वेलदोडे, साल्वण, दालचिनी, वेलदोडे, तमालपत्र, नागकेसर, रास्ना, आस्कंद, सैंधव, श्वेत पुनर्नवा या प्रत्येकांचें ८ तोळे चूर्ण घालावें; व तेलाचे बरोबरीनें शतावरीचा रस घालावा. शेळीचें किंवा गाईचे दूध तेलाचे चौपट घालावें. याप्रमाणे घालून सिद्ध झालेले तेल पान, बस्ति, अभ्यंग, भोज्यपदार्थांशीं सेवन व नस्य यांविषईं योजिलें असतां अश्व, हस्ति, नर, पांगळा; किंवा हातापायांत मोडलेला बरा होतो; आणि अधोभागींचे वात, शिरामध्यगत, दंतशूल, हनुस्तंभ, मन्यास्तंभ, अपतंत्रक, एकांगग्रहण, सर्वांगग्रहण,

क्षीणेंद्रिय, नष्टशुक्र, ज्वरक्षीण, लालजिव्ह, बहिरे, विस्वर, अल्पबुद्धि, अल्पप्रजा स्त्री, वंध्या, वृषणवात, अंत्रवृद्धि इतक्यांवर, हें नारायण तेल अतिप्रशस्त आहे.

## दुसरा प्रकार.

अश्वगंधाबलाबिल्वंपाटलाबृहतीद्वयं ॥ श्वदंष्ट्रातिबलानिंबस्योनाकं चपुनर्नवा ॥ प्रसारिणीमग्निमंथःकुर्याद्दशपलंपृथक् ॥ चतुर्द्रोणेजले पक्त्वापादशेषंसृतंनयेत् ॥ तैलाढकेनसंयोज्यशतावर्यारसाढकं ॥ क्षिपेत्तत्रचगोक्षीरंतैलात्तस्माच्चतुर्गुणं ॥ शनैर्विपाचयेदेभिःकल्कैर्द्विपलिकैःपृथक् ॥ कुष्ठैलाचंदनंमूर्वावचामांसीससैंधवैः ॥ अश्वगंधाबलारास्नाशतपुष्पेंद्रदारुभिः ॥ पर्णीचतुष्टयेनैवतगरेणैवसाधयेत् ॥ तत्तैलंनावनेभ्यंगेपानेबस्तौचयोजयेत् ॥ पक्षघातंहनुस्तंभंमन्यास्तभं गलग्रहं ॥ खल्लत्वंबधिरत्वंचगतिभंगंगलग्रहं ॥ गात्रशोषेंद्रियध्वंसेअसृक्शुक्रेज्वरेक्षये ॥ अंडवृद्धिकुरंडंचदंतरोगंशिरोग्रहं ॥ पार्श्वशूलंचपांगुल्यंबुद्धिहानिंचगृध्रसीं ॥ अन्यांश्चविषमान्वातान्जयेत्सर्वांगसंश्रयान् ॥ अस्यप्रभावाद्वंध्यापिनारीपुत्रंप्रसूयते ॥ मर्त्योगजोवा तुरगस्तैलाभ्यंगात्सुखीभवेत् ॥ यथानारायणोदेवोदुष्टदैत्यविनाशनः॥ तथैवंवातरोगाणांनाशनंतैलमुत्तमं ॥

अर्थ—आसंध, चिकणामूळ, बेलमूळ, पाहाडमूळ, रिंगणी, मोतरिंगणी, गोखरू, अतिबला, कडुनिंब, टेंटू, पूनर्नवा, चांदवेल, ऐरण हीं तेरा औषधें दहा दहा पळें घेऊन थोडीं कुटून त्यांत पाणी चार द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही तों पर्यंत काढा करून गाळून घ्यावा. त्यांत तिळांचें तेल एक एक आढक घालावें; व शतावरीचा आंगरस एक आढक व गाईचें दूध चार आढक प्रमाण तेलांत घालून नंतर त्यांत कल्क करून टाकावा. याचीं औषधें येणेंप्रमाणें कोष्ठ, विलायची, पांढरा चंदन, वेखंड, जटामांसी, सैंधव, आसंध, चिकणामूळ, रास्ना, बडिशोप, देवदार, रानगांजा, रानभाल, रानमुंगी, रानउडदी, तगर हीं सत्रा औषधें दोन दोन पळ प्रमाण घेऊन कल्क करून त्या तेलांत घालून हलक्या अग्नीनें तेल शेष राही तों पर्यंत पाक करून तें तेल गाळून घ्यावें. याला नारायण तेल ह्मणतात. हें तेल नाकांत घालण्याविषयीं व अंगास लावण्याविषयीं व प्यावयाविषयीं व बस्तिकर्माविषयीं योजावें. यापासून पक्षघात ह्मणजे अर्धांगवायु, हनुस्तंभ, मन्यास्तंभ व गलग्रहवायु, मांड्या, पोटऱ्या, पाय इत्यादिकांचे ठायीं खल्ली या नामेंकरून वायु होतो तो, व ज्या वायूनें बहिरेपणा येतो तो वायु, गतिभंगवायु, कटि

ग्रह, हस्तपादादि गात्रांचें शोषण करणारा वायु, चक्षुरादिक इंद्रियांचा नाश करणारा वायु, रक्तविकार, धातुक्षयरोग, अंत्रवृद्धि, करंड ह्मणजे जेणेकरून वृषण मोठा होतो तो वायु, दंतरोग, मस्तकाचा वायु व पार्श्वशूळ व जेणेंकरून, पांगुळपणा येतो तो वायु, बुद्धिभ्रंश व कंबरेपासून पायांपर्यंत गृध्रसी या नामेंकरून वायु होतो, तो हे सारे वायु दूर होतात. यां शिवाय दुसरे विषमवायु, लहान मोठे सर्वांगाचे ठायीं अथवा अर्धांगाचे ठायीं जे वात असतील तेही दूर होतात; व या तेलाचे प्रभावेंकरून वांझोट्या स्त्रियेला मुलें होतात; व हें तेल अंगास लावलें असतां; मनुष्यास सुख होतें. हत्तीचे व घोड्याचे अंगास लाविलें असतां; त्यानांही सुख होतें; या विषयीं दृष्टांत जसा नारायण देव दुष्ट दैत्याचा नाश करितो, तसें हें तेल सर्व वायूचा नाश करितें.

## शतावरीतैल.

शतावरीबलायुग्मंपर्ण्यौगंधर्वहस्तकः ॥ अश्वगंधाश्वदंष्ट्राचबिल्वःकाशःकुरंटकः ॥ एषान्सार्धपलान्भागान्कल्पयेच्चविपाचयेत् ॥ चतुर्गुणेननीरेणपादशेषंसृतंनयेत् ॥ नियोज्यतैलप्रस्थेचक्षीरप्रस्थंविनिःक्षिपेत् ॥ शतावरीरसप्रस्थंजलप्रस्थंचयोजयेत् ॥ शतावरीदेवदारूमांसीतगरचंदनं ॥ शतपुष्पाबलाकुष्ठमेलाशैलेयमुत्पलं ॥ ऋद्धिर्मेदाचमधुकंकाकोलीजीवकस्तथा ॥ एषांकर्षसमैःकल्कैस्तैलगोमयवन्हिना ॥ पचेत्तेनैवतैलेनस्त्रीषुनित्यंवृषायते ॥ नारीचलभतेपुत्रंयोनिशूलंचनश्यति ॥ अंगशूलंशिरःशूलंकामलांपांडुतांगरं ॥ गृध्रसींप्लीहशोषांश्चमेहान्दंडापतानकं ॥ सदाहंवातरक्तंचवातपित्तगदार्दितं ॥ असृक्दरंतथाध्मानंरक्तपित्तंचनश्यति ॥ शतावरीतैलमिदंकृष्णात्रेयेणभाषितं ॥

अर्थ—शतावरी, चिकणामूल, चक्रभेंडीचें मूळ, रानगांजा, रानभाल, एरंडमूळ, आसंध, गोखरूं, बेलमूळ, कसई ह्मणजे कसाड व कोन्हांटा, हीं अकरा औषधें दीड दीड पळ प्रमाण घेऊन त्यांत पाणी चौपट घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून तिळांचें तेल एक प्रस्थ प्रमाण घालावें; व गाईचें दूध एक प्रस्थप्रमाण व शतावरीचा रस एक प्रस्थ व पाणी हीं त्या तेलांत घालून त्यांत कल्क करून टाकावयाचीं औषधें तीं येणेंप्रमाणें. शतावरी, देवदार, जटामांसी, तगर, पांढरा चंदन, बडिशोप, चिकणामूळ, कोष्ठ, विलायची, फत्तरफूल, कमळ, ऋद्धीचे आभावीं वाराहीकंद, मेदाचे आभावीं ज्येष्ठमध, मोहाची साल, कांकोलीचे आभावीं आसंध, व जिवक यांचे तोळा तोळा कल्क करून त्याचें चौपट एरंडेल तेल घेऊन त्यांत तो कल्क टाकून व पाक होण्याविषयीं कल्काचे चौपट पाणी त्या तेलांत घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर

तेल गाळून घ्यावें. हें तेल ज्या मनुष्यास वातरक्त आहे त्या मनुष्यांनीं अंगास लावावें. तेणेंकरून वातरक्त दूर होतें.

## माषतैल.

माषप्रस्थंसमावाप्यपचेत्सम्यग्जलाढके ॥ पादशेषेरसेतस्मिन्क्षीरंदद्याच्चतुर्गुणं ॥ प्रस्थंचतिलतैलस्यकल्कंदत्वाक्षसंमितं ॥ जीवनीयानियान्यष्टौशतपुष्पाससैंधवं ॥ रास्नात्मगुप्तामधुकंबलाव्योषंत्रिकंटकं ॥ पक्षघातार्दितेवातेकर्णशूलेचदारुणे ॥ मंदश्रुतौचश्रवणेतिमिरेचविदोषजे ॥ हस्तकंपेशिरःकंपेबाहुशोषेवबाहुके ॥ शस्तंकलायखंजेचपानाभ्यंजनबस्तिभिः ॥ माषतैलमिदंश्रेष्ठमूर्ध्वजत्रुगदापहं ॥

अर्थ–उडीद ६४ तोळे घेऊन ते २५६ तोळे पाण्यांत पचन करावे, चतुर्थांश शेष राहिला ह्मणजे त्यांत चौपट दूध व तिळाचें तेल ६४ तोळे व जीवनीय गणाचीं आठ औषधें, बडिशेप, सैंधव, रास्ना, कुहिलीच्या बिया, ज्येष्ठमध, चिकणा, सुंठ, मिरीं, पिंपळी, गोखरूं, हीं प्रत्येकीं तोळा घेऊन त्यांचें कल्क घालून तैल सिद्ध करावें. तें पक्षघात, अर्दितवायु, कर्णशूल, बधिरपणा, तिमिररोग, सन्निपातजरोग, हस्तकंप, शिरःकंप, बाहुशोष, अपबाहुक व कलायखंज यांवर पोटांत घेणें किंवा आंगास लावणें, बस्तिकर्म, यांविषयीं योजावें. हें माषतैल ऊर्ध्वजत्रुगतरोगनाशनाविषयीं श्रेष्ठ आहे.

## चौथें विषगर्भतैल.

तैलंकृष्णतिलोद्भूतंसर्षपैरंडसंभवं ॥ उभावपिचतुल्यांशंसर्वंद्रोणमितंपचेत् ॥ वक्ष्यमाणौषधीभिस्तुलोहपात्रेक्रमाग्निना ॥ पश्चान्मानद्रवंक्काथेवस्त्रपूतंविधायच ॥ गर्भेविषंप्रदातव्यंतस्मात्तद्विषगर्भकात् ॥ धत्तूरकरवीरार्कलांगल्यंकोष्णवज्रकं ॥ महानिंबत्रिवृद्दंतीदेवदालीप्रसारिणी ॥ ज्योतिष्मतीशिग्रुमूलंकेतकीचपुनर्नवा ॥ कुलित्थमाषकार्पासबीजंभृंगरसान्वितं ॥ लाक्षारसंछागमांसंशणबीजंसमंपृथक् ॥ व्याघ्रवाराहजंबूकवसाप्रस्थद्वयंद्वयं ॥ विषमष्टपलंज्ञेयमन्यत्सर्वंपलद्वयं ॥ प्रत्येकमौषधंग्राह्यंमंजिष्ठायाद्विप्रस्थकं ॥ त्रिकटुत्रिफलाकुष्ठंरास्नामांसीसठीवचा ॥ चित्रकंदेवदारुश्चवाकुचींद्रयवामृता ॥ विडंगरेणुकामुस्तंपंचकोलंयवानिका ॥ शम्याकंखदिरंसारंमधूकद्रुमबीजयोः ॥ अजमोदाचतगरंसैंधवंरक्तचंदनं ॥ हरिद्राद्वयसिक्थंचचतुर्जा

तंसचंदनं ॥ लोहभस्माभ्रकंवंगंपाकंकासीसमेवच ॥ मनःशिलालेदर दकृष्णागरुनखांडिकं ॥ सिल्हाररसगोधूमंकुंकुमेदमृगांडजं ॥ सर्वमेत त्सुगंधार्थंसित्थतैलेविनिःक्षिपेत् ॥ अशीतिर्वातजान्रोगानामवाता न्सुदुस्तरान् ॥ वातश्लेष्मसमुद्भूतान्कटिजानूरुजंघजान् ॥ गृध्रसीं चहनुस्तंभंमन्यास्तंभंप्रकंपनं ॥ पक्षघातंपंगुतांचनाशयेदवबाहुकं ॥

अर्थ—काळ्यातिळांचे तेल, शिरसेल व एरंडेल, हीं सर्व मिळून १०२४ तोळे घेऊन तें लोहपात्रांत घालून त्यांत धोतरा, कणेर, रुई, कळलावी, कोष्ठ, निवडुंग, बकाणनिंब, तेड, जेपाळ, देवडांगरी, चांदवेल, मालकांगोणी, शेवग्याचा कंद, केतक, पुनर्नवा, कुळीथ, उडीद, कापसाच्या सरक्या हीं प्रत्येक ८ आठ तोळे घेऊन त्याचे काढे; व माक्याचा रस, लाखेचेशिरें, बकऱ्याचें मांस व तागाचें बीं, ही सर्व प्रत्येक १२८ तोळे व व्याघ्र, डुकर; आणि कोल्हा, या प्रत्येकांची चर्बी १२८ तोळे; आणि बचनाग ८ तोळे, मांजिष्ठ १२८ तोळे आणि सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, बेहेडा, आंवळकटी, कोष्ठ, रास्ना, जटामांसी, कचोरा, वेखंड, चित्रक, देवदार, बावची, इंद्रजव, गुळवेळ, वावडिंग, रेणुकबीज, नागरमोथा, पिंपळी, पिंपळीमूळ, चवक, चित्रक, सुंठ, ओंवा, बाहव्याचा मगज, खदिरसार, मोहाट्या, मोहाची साल, अजमोदा, तगर, सैंधव, रक्त चंदन, हळद, दारुहळद, मेण, दालचिनी, एलची, तमालपत्र, नाकेशर, पांढरा चंदन, हीं प्रत्येक ८ तोळे घेऊन त्यांचें काढे घालून तेल सिद्ध करावें. त्यांत लोहभस्म, वंग, भस्म, सैंधव, हिराकस, मनशीळ, हिंगळूक, कृष्णागर, नखला, जवादे, शिलारस, गव्हला, केशर व कस्तूरी हे पदार्थ सुगंधार्थ, सिद्धतैलांत घालावे. हें तेल, ऐंशीप्रकारचे वायु, आमवात, वातकफ, कंबर, मांड्या व ढोंपर यांतील वायु, गृध्रसी, हनुस्तंभ, मन्यास्तंभ, कंप, पक्षघात, पांगळेपणा, आणि अवबाहुक यांचा नाश करितें.

## लघु नारायणतैल.

एलाबलानतकुचंदनदारुसौम्याशैलेयकुष्ठकुटिलावरुणश्रितेन ॥ तैलंसदुग्धमितिसित्थमभीरुकंदतोयेनतेनलुलितेनसमीरणघ्नं ॥

अर्थ—इलाची, चिकणा, तगर, रक्तचंदन, दारुहळद, वृंदावन, दगडफूल, कोष्ठ कोळिंजन, मोरवेल व वायवर्णा यांच्या काढ्याशीं तिळतैल, दूध, मिसळून कढवून सिद्ध झालें; ह्मणजे शतावरीचे कांद्यांचा रस घालून उपयोग केला असतां; वातनाश करितो.

## शतावरी नारायणतैल.

शतावरीचांशुमतीपृश्निपर्णीसठीबला ॥ एरंडस्यचमूलानिबृहत्यौपूतिकस्यच ॥ गवेधुकस्यमूलानितथासहचरस्यच ॥ एतान्दशपलान्भा

गानूजलद्रोणेपचेद्बुधः ॥ पादावशेषेपूतेचगर्भैचैतान्समावपेत् ॥ पुनर्नवावचादारुशताव्हाचंदनागरुः ॥ शैलेयंतगरंकुष्ठंत्रुटीमांसीस्थिराबला ॥ आश्वाव्हासैंधवंरास्नामंजिष्ठाघनचोरकं ॥ कौंतीप्रियंगुस्थौणेयं पलार्धंकल्पयेत्पृथक् ॥ गव्याजपयसोःप्रस्थौद्वौद्वावत्रप्रयोजयेत् ॥ शतावरीरसप्रस्थंतैलप्रस्थंभिषक्पचेत् ॥ लवंगनखकंकोलवेल्लकंजीरकं भिषक् ॥ त्वक्कटूकंचकर्पूरंतुरुष्कश्रीनिवासकं ॥ स्पृक्काकुंकुमकस्तूरी दद्यादत्रावतारिते ॥ अश्वतैलस्यसिद्धस्यशृणुवीर्यमतःपरं ॥ अश्वानांवातरुग्णानांकुंजराणांतथानृणां ॥ तैलमेतत्प्रयोक्तव्यंसर्ववातविकारनुत् ॥ आयुष्मांश्चनरःपीत्वानिश्चयेनदृढोभवेत् ॥ गर्भमश्वतरीविंद्यात्किंपुनर्मानुषीतथा ॥ हृच्छूलंपार्श्वशूलंचतथैवार्धावभेदकं ॥ अपचींगंडमालांचवातरक्तंहनुग्रहं ॥ कामलामश्मरींपांडुमुन्मादंचनियच्छति ॥ नारायणेनगदितंतैलमेतत्कृपालुना ॥ नारायणमितिख्यातंनाम्नातस्मादिदंभुवि ॥

अर्थ—शतावरी, सालवण, पिठवण, कचोरा, चिकणा, एरंडमूळ, रिंगणी, डोरली, करंज, कसईचें मूळ, पीतकोरांटामूळ, हीं प्रत्येक ४० तोळे, पाणी १०२४ घेऊन त्यांत घालून चतुर्थांश काढा घालून घ्यावा; आणि त्यांत पुनर्नवा, वेखंड, दारुहळद, शतावरी, चंदन, कृष्णागर, शिलाजित, तगर, कुष्ठकोळिंजन, सूक्ष्मएला, जटामांसी, तुळस, चिकणा, असगंध, सैंधव, रास्ना, मंजिष्ठा, नागरमोथा, गठोना, रेणुकबीज, गहुला, ग्रंथिपर्णीचा भेद हीं प्रत्येक ५ तोळे घेऊन यांचे कल्क, गाई व शेळी यांचे दूध प्रत्येक २ शेर, शतावरीरस १ शेर व तेल १ शेर हीं एकत्र करून तेल सिद्ध करून उतरल्यावर लवंग, नखला, कंकोल, वावडिंग, जिरें, दालचिनी, कुटकी, कापूर, शिलारस, करडु, श्वेत पाच, केशर, कस्तूरी हीं औषधें तेल उतरल्यावर आंत टाकावीं; ह्मणजे तेल सिद्ध झालें. हें वायूने पीडित घोडे, हत्ती, आणि मनुष्य, यानां दिलें असतां; सर्व वातविकार नाश पावतात; हे जो पुरुष प्राशन करील तो दीर्घायु होऊन बळकट होतो. ह्या तेलानें घोडीला गर्भ राहील मग मनुष्याची काय कथा? हें तेल, हृदयशूल, पार्श्वशूल, अर्धशिशी, अपची, गंडमाला वातरक्त, हनुग्रह, कामला, अश्मरी, पांडु, उन्माद यांचा नाश करितें. हें तेल कृपाळु नारायणानें सांगितलें ह्मणून याला हीं नारायण तेल ह्मणतात.

## दुसरें शतावरीतैल.

मृग्दारुद्रविडाप्रियंगुतगरंत्वक्पत्रकौंतीनखैर्मत्सीसर्जरसांबुचंदनव

चाशैलेयलामज्जकैः ॥ मंजिष्ठासरलागुरुद्विपबलारास्नाश्वगंधावरी वर्षाभूमिसिसिंधुभिश्चसकलैरेभिःपचेत्कल्कितैः ॥ तुल्यंगोपयसावरीरससमंतैलंविपक्वंमृदुस्याद्वातघ्नमिदंनृणामितिवरीतैलंभिषक्पूजितं ॥

अर्थ—कोष्ठकोळिंजन, दारुहळद, इलाची, राळे, तगर, दालचिनी, तमालपत्र, रेणुकबीज, नखला, जटामांसी, सर्जरस, वाळा, चंदन, वेखंड, शिलाजित, पिवळें गवत, मांजिष्ठ, देवदार, अगरु, नागबला, रास्ना, अश्वगंध, शतावरी, पुनर्नवा, शोप व सैंधव यांचा कल्क करून त्यांत शतावरीचा रस व तितकेंच गाईचें दूध घालून पचन करावें, तें मनुष्याला उत्तम वातनाशक आहे, हें वैद्यांनीं पूजित आहे.

## दशमूलादितैल.

दशमूलकषायविपक्वमथोपयसाचसमेनबलाब्दनलैः॥ त्रुटिचंदनदारुलतानलदैररुणाजतुकुष्ठवचाकुटिलैः ॥ इतिपक्वमिदंतिलजंजयति प्रसभंपवनामयमाशुनृणां ॥ बलशुक्रविभारुचिवन्हिकरंनृपवृद्धशिशुप्रमदासुहितं ॥

अर्थ—दशमूळांचा काढा व दूध, हीं समभाग, बला, नागरमोथा, तालीसपत्र, इलाची, चंदन, दारुहळद, माळकांगोणी, वाळा, मंजिष्ठ, लाख, कोष्ठकोळिंजन, वेखंड, व तगर यांचा कल्क, तिळांचें तेल, हीं सर्व एकत्र करून पचन करावीं; ह्मणजे तेल सिद्ध झालें, तें तेल आपल्या बलानें संपूर्ण वातरोगांला जिंकितें; आणि बल, धातु, कांति, रुचि, अग्नि यांना वाढवितें; व राजे, वृद्ध, बाल, व स्त्रिया, यांना हितकारक आहे.

## तिसरें प्रसारिणीतैल.

समूलदलशाखायाःप्रसारण्याःशतत्रयं ॥ शतमेकंशतावर्याअश्वगंधाशतंतथा ॥ केतकीनांशतंचैकंदशमूलंशतंशतं ॥ वाटयालकस्यापिशतंशतंसहचरस्तथा ॥ जलद्रोणेशतंदत्वाशतभागावशेषतः ॥ ततस्तेनकषायेणकषायद्विगुणेनच ॥ सुव्यक्तेनारनालेनदधिमंडाढकेनतु ॥ क्षीरशुक्तेक्षुनिर्यासछागमांसरसाढकैः ॥ तैलद्रोणसमायुक्तंदृढेपात्रेनिधापयेत् ॥ द्रव्याणियानिक्षेप्याणितानिवक्ष्याम्यतःपरं ॥ भल्लातकंनतंशुंठीपिप्पलीचित्रकंसठी ॥ वचास्पृक्काप्रसारिण्यापिप्पलीमूलमेव च ॥ देवदारुशताव्हाचसूक्ष्मैलात्वचफालकं ॥ कुंकुमंमदमंजिष्ठा

स्पृक्कानखिकागुरु ॥ कर्पूरंकुंदरुनिशालवंगंध्यामचंदनं ॥ कंकोलं नलिकामुस्ताकालियोत्पलपत्रकं ॥ सठीहरेणुशैलेयंश्रीवासंचसकेतकं ॥ त्रिफलाकच्छुराभीरूसरलंपद्मकेसरं ॥ प्रियंगूशीरबलदंजीवकाद्यंपुनर्नवा ॥ दशमूलानिगंधंचनागपुष्पंरसांजनं ॥ कटुकाजातिपुन्नागोफलानिसल्लकीरसं ॥ भागांस्त्रिपलिकान्दत्वाशनैर्मृद्वग्निनापचेत् ॥ विस्तीर्णेसुदृढेपात्रेपाच्यैपातुप्रसारिणी ॥ प्रयोगःषड्विधश्चात्ररोगार्तानांप्रशस्यते ॥ अभ्यंगात्त्वग्गतंहंतिपानात्कोष्ठगतंतथा ॥ भोजनात्सूक्ष्मनाडीस्थान्नस्यादूर्ध्वगतांस्तथा ॥ पक्वाश्रयगतेबस्तिर्निरूहःसार्वकायिके ॥ एतद्धिबटुकार्तानांकिशोराणांयथामृतं ॥ एतदेवमनुष्याणांकुंजराणांगवामपि ॥ अनेनैवचतैलेनशुष्यमानामहाद्रुमाः ॥ सिक्ताःपुनःप्ररोहंतिभवंतिफलशालिनः ॥ वृद्धोप्यनेनतैलेन पुनश्चतरुणायते ॥ नप्रसूयेतयानारीपाययित्वाप्रसूयते ॥ अप्रजःपुरुषोयस्तुपीत्वाशुलभतेसुतं ॥ अशीतिर्वातजान्रोगान्पैत्तिकान्श्लैष्मिकानपि ॥ सन्निपातसमुत्थांश्चनाशयेत्क्षिप्रमेवच ॥ एतेनांधकवृष्णीनांकृतंपुंसवनंमहत् ॥ कृत्वाविष्णोर्बलिंचापितैलमेतत्प्रयोजयेत् ॥

अर्थ—लाजाळूचें पंचांग २०० तोळे, शतावरी ४०० तोळे, अश्वगंध ४०० तोळे, केतकें ४०० तोळे, दशमूळें प्रत्येक ४०० तोळे, चिकणामूळ ४०० तोळे, कोरांटा ४०० तोळे, आणि पाणी ४ खंडी १९ शेर, हे शतांश आटवून १०२४ तोळे बाकी राहिले ह्मणजे त्या काढयांत काढयाच्या दुप्पट कांजी, दह्यांचें पाणी १०२४. दूध, पांढऱ्या उसाचा रस, आणि बकऱ्याच्या मांसाचा रस, हे प्रत्येकीं १०२४ तोळे आणि तिळांचें तेल १०२४ तोळे, घालून नंतर त्यांत बिबवा, तगर, सुंठ, पिंपळी, चित्रक, कचोरा, वेखंड, मोरवेल, लाजाळू, पिंपळीमूळ, देवदार, शतावरी, एलची, दालचिनी, वाळा, केशर, कस्तूरी, मांजिष्ठ, बिबवा, नखला, अगरु, कापूर, कुंदागवत, हळद, लवंगा, रोहिषगवत, चंदन, कंकोल, उतरणी, नागरमोथे, दारुहळद, कोष्ठ, तमालपत्र, कचोरा, रेणुकबीज, शिलारस, कृष्णागरु, केतक, हरडा, बेहेडा, आवळकाठी, कापूरकचरी, शतावरी सरलदेवदार, कमळाचे केसर, राळे, वाळा, जीवक, ऋषभक, मेदा, महामेदा, कांकोली, क्षीरकांकोली, रानमूग, रानउडीद, सफेत मुसळी, काळी मुसळी, पुनर्नवा, दशमुळें, रक्तयाबोळ, नागकेशर, रसांजन, कुटकी, जाई, उंडिणीचीं फळें, सालयीचा रस, हीं प्रत्येकीं १२ बारा, तोळे घेऊन त्यांचा कल्क करून घालावा; आणि मंदाग्नीवर मोठया भांडयांत

तैल सिद्ध करावें. तें अभ्यंगानें त्वचागत, प्राशनानें कोष्ठगत, भोजनांतून सूक्ष्मनाडीगत, नस्यानें ऊर्ध्वगत, बस्तीनें पक्षाश्रित व निरूहबस्तीनें सर्वांतर्गत याप्रमाणें साहा प्रकारांनीं उपयोगीं पडतें; व लेकरें, रोगी व बालक यांनां अमृतासारिखें आहे; व हें हत्ती, घोडे, गाई यांनांही द्यावें; व सुकणाऱ्या वृक्षांला याणें शिंपिलें असतां; पुनः उत्तम प्रकारानीं वाढतात; व फलपुष्पयुक्त होतात. वृद्धही या तैलानें तरुण होतो. जी बाळंत होत नसेल तिळा दिलें असतां; प्रसूत होत्ये. जाला पुत्र होत नाहींत त्याणें घेतलें असतां; पुत्र होतील. हें वात, पित्त, कफ आणि सन्निपात संबंधी व्याधीला जलद नाश करितें. याच तैलानें अंधक, वृष्णी इत्यादि यादवानां पुत्रोत्पत्ति झाली; व हें तेल विष्णुबलीकरून तयार करावें.

## चवथें प्रसारिणीतैल.

प्रसारिणीक्वाथपयोंबुतक्रमस्त्वारनालंदधिभिस्तुतैलं ॥ कल्कीकृतं विश्वघनांबुकुष्ठमांसीशताव्हामरदारुमेव्यैः ॥ शैलेनरास्नागुडसारिवाभिःसिंधूत्थबिल्वानिलमंथमोचैः ॥ सामृगलतांभोजपुनर्नवाख्यस्योनाकयष्ट्याव्हकुटंनटैश्च ॥ छिन्नोद्भवादार्व्यभयाकरंजमेदानिशाद्रेसफलत्रयैश्च ॥ एरंडमेकंकटुजीविताश्चतत्साधितंहंत्यनिलोत्थरोगान् ॥ सर्वांश्चदोषानपिपक्षघातान्वाताश्रितानाहहनुग्रहादीन् ॥ सगृध्रसीविश्वविवाहुशोफंहृन्मूर्धसंस्थांश्चगदांश्चतांस्तान् ॥ संशुष्कभग्नंप्रवलांगयष्टिंयोसाध्यतामुल्बणमारुतेन ॥ नीतःपुमांस्तस्यभवेदवश्यंप्रसारिणीतैलमिदंहिताय ॥

अर्थ—लाजाळूचा काढा, दूध, ताक, दह्याची निवळी, कांजी, दहीं व तेल असें एकत्र करावें; व सुंठ, नागरमोथा, बाळा, कोष्ठ, जटामांसी, शतावरी, देवदार, काळा वाळा, शिलाजित, रास्ना, गूळ, उपळसरी, सैंधव, बेलफळ, एरंडमूळ, मोचरस, रानमूग, पुनर्नवा, रुद्राक्ष, बाहव्याचा मगज, जेठमध, टेंटु, गुळवेल, दारुहळद, हरीतकी, करंज, मेदा, हळद, दारुहळद, हरडा, बेहडा, आवळकाठी, एरंड्या व चित्रक यांचा कल्क घालून तेल सिद्ध करावें. तें वातरोग, संपूर्ण पक्षवात, वातसंबंधी व्याधि, आनाह, हनुग्रह, गृध्रसी, विश्वाची, अवबाहुक, शोफ व हृदय मस्तक यांतील रोग, शुष्कवात, आंगमोडे; आणि उल्बण वातरोग यांवर हितकारक होतें.

## पंचम प्रसारिणीतैल.

चतुःप्रस्थंप्रसारिण्यापचेत्तोयार्मणेशुभे ॥ पादेशिष्टेसमंतैलंदधिदद्यात्सकांजिकं ॥ द्विगुणंचपयोदद्यादन्येषांकल्ककांगतथा ॥ चित्रकंपिप्पली

मूलंमधुकंसैंधवंवचा ॥ शतपुष्पादेवदारुरास्नावारणपिप्पली ॥ प्रसारण्याश्चमूलानिमांसीभल्लातकानिच ॥ पचेन्मृद्वग्निनातैलंवातश्लेष्मामयान्जयेत् ॥ अशीतिर्नरनार्युत्थान्वातरोगान्व्यपोहति ॥ कुब्जंस्तिमितपंगुंचगृध्रसींखंडकार्दितं ॥ हनुपृष्ठशिरोग्रीवास्तंभंचापिनियच्छति ॥

अर्थ—लाजाळू २५६ तोळे घेऊन त्याचा १०२४ तोळे पाण्यांत काढा करावा. चतुर्थांश राहिला ह्मणजे त्याचे समभाग तेल, दहीं, कांजी घालून दूध काढयाच्या दुप्पट घालावें; आणि चित्रक, पिंपळीमूळ, जेष्ठमध, सैंधव, वेखंड, शोपा, देवदार, रास्ना, गजपिंपळी, लाजाळूचीं मुळें, जटामांसी व बिबवे यांचा कल्क घालून तैल सिद्ध करावें. तें वात कफरोग स्त्रियांचे व पुरुषांचे वातरोग यांचा नाश करितें.

## पांचवें विषगर्भतैल.

विषंचपुष्करंकुष्ठंवचाभार्ङ्गीशतावरी ॥ शुंठीहरिद्रालशुनंविडंगंदेवदारुच ॥ अश्वगंधाजमोदाचमरिचंग्रंथिकंबला ॥ रास्नाप्रसारिणीशिग्रुगुडूचीहपुषाभया ॥ दशमूलानिनिर्गुंडीमिशिपाठाचवानरी ॥ निशालाशतपुष्पाचप्रत्येकंपलिकानिमान् ॥ चतुर्गुणेजलेपक्त्वापादशेषंसमुद्धरेत् ॥ पलमेकंविषंचात्रसूक्ष्मंकृत्वाविनिक्षिपेत् ॥ सर्वेषुवातरोगेषुसदाभ्यंगोविधीयते ॥ संधिवातेसान्निपातेत्रिकपृष्ठकटिग्रहे ॥ पक्षाघातेतथार्धांगेगात्रकंपेतिदारुणे ॥ कुब्जकेचधनुर्वातेगृध्रस्यांचापतानके ॥ विषगर्भमिदंतैलंयोजनीयंसदाबुधैः ॥

अर्थ—बचनाग, पुष्करमूळ, कोष्ठ ,वेखंड, भारंगमूळ, शतावरी, सुंठ, हळद, लसूण, वावडिंग, देवदार, अश्वगंध, अजमोदा, मिरीं, पिंपळीमूळ, चिकणा, रास्ना, लाजाळू, शेवग्याची साल, गुळवेल, हंसपादी, हरीतकी, दशमूळें, निर्गुंडी, बडीशेप, पाहाडमूळ, कुहिलीचें बीं, वृंदावन, व शोपा हीं प्रत्येकीं चार चार तोळे घेऊन त्याचे चौपट पाण्यात काढा करावा. चतुर्थांश राहिला ह्मणजे ओतून घेवून त्यांत बचनाग४ तोळे बारीक चूर्ण करून टाकावें; आणि तेल घालुन सिद्ध करावें. त्याचें संपूर्ण वातरोगांवर अभ्यंग करावें; ह्मणजे संधिवात, सन्निपात, त्रिकग्रह, पृष्ठग्रह, कटिग्रह, पक्षाघात, अर्धांग, कंपकुब्जक, धनुर्वात, गृध्रसी व अपतान यांचा नाश करितें, याला विषगर्भ तैल ह्मणतात.

## साहवें विषगर्भ तैल.

निर्गुंडिकारसप्रस्थंप्रस्थमार्कवजाद्रसात् ॥ रसोधत्तूरजःप्रस्थोगोमूत्रंप्रस्थसंमितं ॥ वचाकुष्ठंहेमबीजंतेजोह्वाकट्फलंतथा ॥ पलार्धां

शानिसर्वेस्तुवत्सनागःसमोमतः ॥ तैलप्रस्थंपचेद्युक्त्यावातरोगेषुश
स्यते ॥ हेमंतेहरिणाक्षिणांगाढमालिंगनंतथा ॥

अर्थ—निर्गुंडीचा रस, माक्याचा रस, धोतऱ्याच्या रस, गोमूत्र हीं प्रत्येकीं ६४ तोळे आणि वेखंड, कोष्ठ, धोतऱ्याचें बीज, कांगोणी व कायफळ हीं प्रत्येक औषधें दोन दोन तोळे; व बचनाग सर्वांच्या समभाग यांचा काढ्यांत व कल्कांत तिळाचें तेल ६४ तोळे घालून युक्तीनें पचन करावें. तें वातव्याधीवर प्रशस्त आहे.

## दार्व्यादितैल.

दारुकुष्ठंकणारास्नाविश्वाग्निबृहतीपुरं ॥ भागोत्तरमिदंसर्वं
भानिर्यासपाचितं ॥ संक्वाथ्यदुग्धतैलाभ्यांपक्वस्याभ्यंगतोध्रुवं ॥
सर्वेवाताविनश्यंतिप्रत्यंगंभंगकारिणः ॥

अर्थ—देवदार, कोष्ठ, पिंपळी, रास्ना, सुंठ, चित्रक, रिंगणी, आणि गुग्गुळ हे भाग वृद्धीनें घेऊन त्यांचा काढा, केळीचा रस, दूध, आणि तैल एकत्र करून सिद्ध करावें. त्याचा अभ्यंग केला असतां; सर्व वातरोग नाश पावतात.

## दशमूलतैल.

श्रीपर्णीवन्हिमंथश्वबिल्वःस्योनाकपाटला ॥ गोक्षुरःशालिप
र्णीचबृहतीकंटकारिका ॥ पृष्ठिपर्णीचएतेषांदशमूलानितद्युतं ॥
तैलंपक्वंप्रलेपेनहंतिवातानऩेकधा ॥

अर्थ—शिवण, टाकळी, बेलमूळ, टेंटु, पाहाडमूळ, गोखरू, सालवण, रिंगणी, डोर्ली, व पिठवण हीं दशमूळें घेऊन त्यांच्या काढ्यांत किंवा कल्कांत तेल सिद्ध करावें. तें आंगाला लाविलें असतां; अनेक प्रकारच्या वायूंचा नाश करितें.

चरणैरंडवातारिमुंडिशिग्रुशतावरी ॥ कांडवेलीबृहत्यौद्विना
गकर्णीशिफादश ॥ एषांतैलप्रलेपेनत्वगस्थिस्नायुसंभवं ॥
सर्वांगकुपितोवायुर्विनश्यतिहिवेगतः ॥

अर्थ—एरंडमूळ, निर्गुंडीरस, मुंडी, शेवग्याचें मूळ, शतावरी, कांडवेल, रिंगणी, डोर्ली, व रक्तैरंडमूळ हीं प्रत्येक दाहा तोळे घेऊन त्यांच्या काढ्यांत तिळांचें तेल सिद्ध करावें. तें अभ्यंगानें त्वचा हाडें, स्नायु, आणि सर्वांगामध्यें कोपलेल्या वायूचा नाश करितें.

ज्योतिष्मतीचंद्रसूराकलाजाजीयवानिका ॥ मेथीतिलांश्वसंपिष्ययंत्रेतै
लंसमुद्धरेत् ॥ अभ्यंगान्मारुतव्याधिंसमस्तंसंप्रणाशयेत् ॥

अर्थ–मालकांगोणी, रानमेथी, शाहाजिरें, ओंवा, मेथ्या आणि तिळ यांचें चूर्ण करून त्याचें यंत्रांत तेल काढावें; आणि आंगास लावावें; ह्मणजे सर्व वातव्याधींचा नाश करितें.

## लघुमाषादि तैल.

माषसिंधुबलारास्नादशमूलकहिंगुभिः ॥
वचाशतजटाख्याभिःसिद्धंतैलंसनागरं ॥

अर्थ–उडीद, सैंधव, चिकणामुळ, दशमूळें, हिंग, वेखंड, शतावरी, आणि सुंठ हे पदार्थ घेऊन तेल सिद्ध करावें, तें सर्ववातनाशक होतें.

## विजयभैरवतैल.

रसंगंधंशिलांतालंसर्वंकुर्यात्समांशकं ॥ चूर्णयित्वाततःश्लक्ष्णमारनाले नपेषयेत् ॥ तेनकल्केनसंलिप्यसूक्ष्मवस्त्रंततःपरं ॥ तैलाक्तांकारयेद्वर्तिं मूर्ध्वभागेचवापयेत् ॥ वर्त्यधःस्थापयेत्पात्रंतैलंपततिशोभनं ॥ लेपयेत्तेनगात्राणिभक्षणायचदापयेत् ॥ नाशयेत्तत्सुखंतैलंवातरोगान शेषतः ॥ बाहुकंपंशिरःकंपंजंघाकंपंततःपरं ॥ एकांगंचतथावातंहंतिलेपान्नसंशयः ॥ रोगशांत्यैप्रदातव्यंतैलंविजयभैरवं ॥ द्रव्यतस्तिलजंतैलंदातव्यंचचतुर्गुणं ॥

अर्थ–पारा, गंधक, मनशीळ व हरताळ हे सर्व समान भाग घेऊन त्यांचें बारीक चूर्ण करावें; आणि कांजींत वाटून त्या कल्कानें बारीक वस्त्रास लेप करून त्याची वात करावी. ती पारदादिद्रव्यांच्या चौपट तिळांचे तेलांत बुडवून उंचावर लोंबती ठेऊन तीचे खालीं पात्र ठेऊन ती वात पेटवावी. तीपासून तैल खालचे पात्रांत पडेल, तें आंगास लावावें; किंवा भक्षणार्थ द्यावें; ह्मणजे अनेक वातव्याधि, बाहुकंप, शिरःकंप, जंघाकंप व एकांग वात यांचा नाश करितें, याला विजयगर्भ तैल ह्मणतात.

## दुसरें प्रसारिणीतैल.

समूलपत्रामुत्पाट्यशरत्कालेप्रसारिणीं ॥ शतंवाप्यालकांतंद्विशतावर्याःशतंतथा ॥ बलाश्वगंधात्मगुप्ताचकेतकीनांशतंशतं ॥ चतुर्द्रोणेनतोयेनद्रव्यैस्तैलाढकंपचेत् ॥ मस्तुमांसरसैर्युक्तंदधिदुग्धंतथाढकं एतैःसर्वैःसमोयुक्तंपाचयेन्मृदुनाग्निना ॥ द्रव्याणांचप्रदातव्यामात्राचार्धपलोन्मिता ॥ तगरंमदनंकुष्टंकेसरंमुस्तकंवचा ॥ रास्नासैंधवपिप्पल्योमांसीमंजिष्ठयष्टिका ॥ जीवकर्षभकौमेदामहामेदातथानतं

शतपुष्पाव्याघ्रनखंशुंठींदेवाव्हमेवच ॥ कांकोलीक्षीरकांकोलीबला भल्लातकंतथा ॥ पेषयित्वासमंचैतान्साधनीयाप्रसारिणी ॥ नातिसिद्धंनातिपक्कंसिद्धंपूतंनिधापयेत् ॥ यत्रयत्रप्रदातव्यंतन्मेनिगदतःशृणु कुब्जानामथपंगूनामवतानांतथैवच ॥ यस्यशुष्यतिचैकांगंयेचभग्नास्थिसंधिजाः ॥ वातशोणितदुष्टानांवातोपहतचेतसां ॥ स्त्रीभिश्चक्षीणशुक्राणांवाजीकरणमुत्तमं॥ पानेबस्तौतथाभ्यंगेभोज्येचैवप्रदापयेत्॥ प्रयुक्तंशमयत्याशुवातजान्विविधान्गदान् ॥

अर्थ—शरदृतुमध्यें पंचांगासहवर्तमान लाजाळू ४०० तोळे घ्यावे; व महाबला ४०० तोळे, शतावरी ८०० तोळे व चिकणामूळ, अश्वगंध, कुहिली व केतकी हीं प्रत्येक चारशें तोळे, घेऊन त्यांचा १०९६ तोळे पाणी घालून काढा करून त्यांत २५६ तोळे, तेल व दह्यांची निवळी, मांसरस, दहीं व दूध हीं प्रत्येक २५३ तोळे; आणि तगर, गेळ, कोष्ठ, नाकेशर, मोथा, वेखंड, रास्ना, सैंधव, पिंपळी, जटामांसी, मंजिष्ठ, जेष्ठमध, जीवक, ऋषभक, मेदा, महामेदा, तगर, शोपा, निवडुंग, सुंठ, देवदार, कांकोली, क्षीर कांकोली, चिकणा व बिबवे ह्या प्रत्येकांचे दोन दोन तोळे, कल्क घालून मध्यम प्रकारानें तैल सिद्ध करावें. तें कुब्जवात, पंगुवात, धनुर्वात, शुष्कांगवात, संधिभग्नवात, वातरक्त व वायु यांचा नाश करितें; व क्षीण शुक्रानां स्त्रीप्रसंगीं उत्तम वाजीकरण आहे. हें प्राशन, बस्ति, अभ्यंग, आणि भोजन यांविषयीं योजावें. हें सेवन केलें असतां; अनेक वातव्याधि नाश पावतात.

## व्याघ्रतैल.

व्याघ्रंशिरःसमादायकुट्टयित्वाजलेबहु ॥ क्काथ्यपादावशेषंतुरसंनीत्वासुगालितं ॥तैलमर्धजलंदत्वाछागगव्यपयोन्वितं॥ मदिरामस्तुधान्याम्लंतैलमानेनदापयेत् ॥ दत्वाकटाहेसुदृढेपचेत्पाकविधानतः द्रव्याण्येतानिमतिमान्पादमानेनदापयेत् ॥ देवदारुवचाकुष्ठंतगरंचंदनंघनं ॥ मंजिष्ठापौष्करंरास्नाचतुर्जातंचसैंधवं ॥ पिप्पलीमरिचंशुंठीमांसीसहचरंजलं ॥ अश्वगंधात्मगुप्ताचचित्रकंवंशजंवरी ॥ श्वदंष्ट्राकेतकीमूर्वायष्टीमधुगिरेर्मृदा ॥ जातीफलंचसुमनःपत्रिकंकटुरोहिणी ॥ ग्रंथिकंशुक्लकंदाचशतपुष्पापुनर्नवा ॥ जीवनीयोगणश्चैवरालंबोलंसकेसरं॥ नखंचकृष्णसारंचवत्सनागंसुचूर्णितं॥ अस्यतैल

स्यपक्कस्यशृणुवीर्यमतःपरं ॥ अशीतिवातजान्रोगान्हन्यादाशुजराम
पि ॥ अश्वानांवातभग्नानांगजानांशुष्यतामपि ॥ वृष्यंतुष्टिप्रदंपुष्टिमे
धाग्निबलवर्धनं ॥ श्रुतिभ्रंशेखंजवातेक्रोष्टुशीर्षेकटिग्रहे ॥ मन्यास्तं
भेहनुस्तंभेवातेमेदस्तथांतरे ॥ वंध्यानांपुत्रजननंषंढानांकामवर्धनं ॥
अश्विभ्यांनिर्मितंचैतत्प्रजानांहितकाम्यया ॥ अनेनैवविधानेनमृता
क्षंविपचेद्भिषक् ॥

अर्थ—वाघाचें मस्तक घेऊन तें पाण्याशीं खूब ठेचावें; नंतर त्याचा चतुर्थांश रस गाळून घेऊन त्यांत त्या पाण्याच्या निमें तेल, शेळी व गाय यांचें दूध, मद्य, दह्यांची निवळ, कांजी, हें सर्व तैलाचे समान घालावें; नंतर कढईंत ठेऊन त्यांत देवदार, वेखंड, कोष्ठ, तगर, चंदन, नागरमोथा, मंजिष्ठ, पुष्करमूळ, रास्ना, दालचिनी, एलची, तमालपत्र, नाकेशर, सैंधव, पिंपळी, मिरीं, सुंठ, जटामांसी, कोरांटा, वाळा, अश्वगंध, कुहिली, चित्रक, वंशलोचन, शतावरी, गोखरू, केतकी, मोरवेल, जेष्ठमध, गेरू, जायफळ, लवंग, पत्री, कुटकी, पिंपळमूळ, श्वेत अतिविष, शोपा, पुनर्नवा, जीवनीयगणाचीं सर्व औषधें, राळ, बोळ, नाकेशर, नखला, कृष्णागरु व बचनाग यांचें कल्क तैलाच्या चतुर्थांश घालोन मंदाग्नीवर पचन करून सिद्ध करावें. तें ऐशीं प्रकारचे वायु व ह्मातारपणा यांचा नाश करितें; व वायूनें धरलेले घोडे, रोडके हत्ती, यानांहीं द्यावें; व तें वृष्य, तुष्टि, पुष्टि बुद्धि व अग्निबल यांतें वाढवितें; आणि हें श्रुतिभ्रंश, खंजवात, गुडघी, कटिग्रह, मान धरणारा वायु, हनुस्तंभ व मेदवात यांचा नाश करितें; व वंध्यानां पुत्र देतें, षंढानां काम वृद्धि करितें. हें व्याघ्रतैल लोकहितार्थ अश्विनीकुमारानीं उत्पन्न केलें. याप्रमाणें आस्वलाचे ही तेल काढावें.

## महाबलातैल.

बलामूलकषायस्यदशमूलीशृतस्यच ॥ यवकोलकुलित्थानांक्काथस्य
पयसस्तथा ॥ अष्टावष्टौशुभान्भागान्तैलादन्यंतदेकतः ॥ पचेदावा
प्यमधुरंगणंसैंधवसंयुतं ॥ तथागरुंसर्जरसंसरलंदेवदारुच ॥ मंजि
ष्ठाचंदनंकोष्ठमेलाकोलांजनंवरा ॥ मांसीशैलेयकंपत्रंतगरंसारिवाव
चा ॥ शतावरीमश्वगंधंशतपुष्पापुनर्नवा ॥ तत्साधुसिद्धंसौवर्णेराज
तेवाथमृन्मये ॥ प्रक्षिप्यसकलंसम्यक्सुगुप्तंस्थापयेद्बुधः ॥ बलातैल
मिदंख्यातंसर्ववातविकारजुत् ॥ यथाबलंभिषङ्मात्रांसूतिकायैप्रदा
पयेत् ॥ याचगर्भार्थिनीनारीक्षीणशुक्रश्चयःपुमान् ॥ क्षीणेवातेमर्महृ

तेमथितेपीडितेतथा ॥ भग्नेस्थिन्यभिपन्नेचसर्वथैवप्रयोजयेत् ॥ सर्वा नाक्षेपकादींश्चवातव्याधीन्व्यपोहति ॥ प्रत्युग्रधातुपुरुषोभवेच्चास्थिर यौवनः ॥ राज्ञामेतद्धिकर्तव्यंराजमान्यैस्तथानरैः ॥

अर्थ– चिकण्याच्या मुळांचा काढा व दशमुळें यांचा काढा व यव, बोरें व कुलित्थ यांचा काढा; आणि दूध या प्रत्येकांचे आठ आठ भाग तैल १, मधुरगण आणि सैंधव. हे घालून नंतर अगर, राळ, सरळधूप, देवदार, मंजिष्ठा, चंदन, कोष्ठ, एलची, बोर, काळा शेवगा, हरडा, आवळकाठी, जटामांसी, शिलारस, तमालपत्र, तगर, उपरसाली, वेखंड, शतावरी, अश्वगंध, शेपा व पुनर्नवा यांचे कल्क घालावे; आणि पचन करून तैल सिद्ध करावें. तें फार जतनेनें उत्तम भांड्यांत ठेवावें. हें बलातैल संपूर्ण वातविकारांचा नाश करितें. याची बाळंतिणीला बल पाहून मात्रा द्यावी; आणि वंध्यास्त्री व धातुक्षीण पुरुष, क्षयी, वांति दिलेला मर्मताडित, हत, ठेचलेला, पीडायुक्त, हाड मोडलेला अशा रोगांनीं पीडित मनुष्यास द्यावें. हें संपूर्ण आक्षेपादि वायूंचा नाश करितें; व याचें सेवन करणारा धातुपुष्ट व तरुण होतो. हें तैल राजांनीं किंवा राजमान्य पुरुषांनींच करावें.

## दुसरें शतावरी तैल.

वऱ्हंघ्रिकामूलरसोथतैलंदुग्धंपलंप्रस्थयुतंक्रमेण ॥ सश्वेतपुष्पानवदेव दारुश्शैलेयमांसीमिलितंसमांशं ॥ तैलावशेपंकथितंसमस्तंनारायणंतै लमिदंवदंति ॥ नानानिलापीडितमानुषाणामभ्यंगयोगात्थितमेतदेव ॥

अर्थ–शतावरीच्या मुळांचा रस, तेल व दूध हीं प्रत्येक ६४ तोळे व वावचरणा, टेंटू, देवदार, शिलाजित व जटामांसी हीं प्रत्येक चार तोळे घेऊन कल्क घालून तेल सिद्ध करावें. त्याला नारायणतैल म्हणतात. हें अनेकप्रकारच्या वातव्याधींवर अभ्यंगार्थ योजिलें असतां; तें हितकारक होतें.

## तिसरा प्रकार.

दुग्धंप्रस्थद्वयंतैलमेकप्रस्थंतथारसं ॥ शतावरीवचाकुष्ठंचंदनंदेवदारुच ॥ कांकोलीधिंटुलारास्नामंजिष्ठैलारुदंतिका ॥ शैलेयमश्वगंधाचमांसीचिकणिकाखिलं ॥ अर्धार्धपलमानंस्यात्पक्कंमृद्वग्निनाशनैः ॥ एकांगयुग्मभग्नास्थिभग्नसंधितृपांतथा ॥ कुब्जवामनपंगूनां पानादभ्यंगतस्तथा ॥ वातान्नानाविधान्हंतितैलमेतन्नसंशयः ॥ शतावरीतैलमिदंप्रोक्तंबुधिविशारदैः ॥

अर्थ–दूध १२८ तोळे तेल ६४ तोळे व शतावरीचा रस ६४ तोळे व वेखंड, कोष्ठ, चंदन, देवदार, कावळी, घंटूली, रास्ना, मांजिष्ठा, एला, रुदंती, शिलाजित, अश्वगंध, जटामांसी व चिकणा हीं प्रत्येक दोन तोळे घेऊन त्यांचे काढे किंवा कल्क दोन दोन तोळे घालून मंदाग्नीवर पचन करावें. तें एकांगवात, सर्वांगवात, भग्नास्थि, संधिभग्न, तृषा, कुब्जवात, वामनत्व व पंगुवात याचा पानानें व अभ्यंगानें नाश करितें. हें शतावरीतैल अनेकप्रकारच्या वायूंचा नाश करितें.

## चवथा प्रकार.

शतावरीजातरसंगृण्हीयाद्यंत्रपीडितं ॥ प्रभूतंतद्रसंलीढ्वातैलस्याढकमेवच ॥ दधिक्षीरेणविपचेत्द्रव्याण्येतानिदापयेत्॥ शतपुष्पावचाकुष्ठमांसीशैलेयचंदनैः ॥ प्रियंगुपद्मकंमुस्तंन्हीबेरोशीरकट्फलं॥ सैंधवंमधुकंलोध्रंत्रणेयककुचंदनं ॥ चंडाएलामुरास्पृक्कानालिकंपद्मकेशरं ॥ श्रीविष्टकंसर्जरसंजीवकर्षभकौसठी ॥ पतंगरेणुकादार्वी कर्चूरंसारिवातथा ॥ मंजिष्ठामधुकंचैवद्रव्यैरेतैःपलोन्मितैः ॥ मध्यपादंविजानीयात्तत्रतदवतारयेत् ॥ पथ्येपानेतथाभ्यंगेनस्येभोज्येचदापयेत् ॥ पीड्यमानेतथावायौपक्षाघाताधिमंथके ॥ अर्दितेकर्णशूलेचऊरुस्तंभेकटिग्रहे ॥पवनेचशिरःकंपेसूतिकायांप्रदापयेत् ॥ मन्यास्तंभेधनुःकंपेअस्थिभंगेचदारुणे ॥ तथासर्वांगगेवायौशुष्यमाणेषुधातुषु ॥ अनार्तक्षिणिरेतस्सुवंध्यायांगर्भिणीषुच ॥ वृष्यंपुनर्नवकरंवल्यमारोग्यदंमहत् ॥ शतावरीतैलमिदंसर्ववातविकारनुत् ॥

अर्थ–शतावरीच्या मुळांचा यंत्रांत काढलेला रस पुष्कळ घेऊन त्यांत तेल २५६ तोळे, दहीं, दूध व शेपा, वेखंड, कोष्ठ, जटामांसी, शिलाजीत, चंदन, राळे, पद्मकाष्ठ, नागरमोथा, वाळा, काळा वाळा, कायफळ, सैंधव, ज्येष्ठमध, लोध्र, कळलावी, रक्तचंदन, उंदिरकानी, एलची, एकांगीमुरा, लाजाळू, बिसें, कमळकेसर, विशेषधूप, राळ, जीवक, ऋषभक, कचोरा, पतंग, रेणुकबीज, दारुहळद, कचोरा, उपरसळी, मंजिष्ठ, ज्येष्ठिमध, हीं प्रत्येक ४ तोळे घेऊन त्यांचे कल्क व काढे घालून मध्यमानानें तैल सिद्ध करावें. तें वायुची पीडा, पक्षघात, अधिमंथ, अर्दित, कर्णशूळ, ऊरुस्तंभ, कटिग्रह, कंपवायू, बाळंतरोग, मन्यास्तंभ, धनुर्वात, कंपवात, अस्थिभंग, सर्वांगवात, धातुशुष्क होणारा वायुरोगी, धातुक्षीणत्व व वंध्यात्व यांवर पथ्यांत प्राशनास, आंगाला अभ्यंग करण्यास, नस्य, आणि भोजन यांमध्यें द्यावें; आणि हें शतावरीतैल वृष्य, वयःस्थापक बल व आरोग्य यानां देतें व गर्भिणीला ही हितावह होतें.

## चंदनादि तैल.

चंदनंपद्मकंकुष्ठमुशीरंदेवदारुच ॥ नागकेसरपत्रेलात्वङ्मांसीतगरं जलं ॥ जातीफलंघोटफलंकुंकुमंजातिपत्रिका ॥ नखंकुंदरुकस्तुरी चंडाशैलेयमार्द्रकं ॥ पतंगंपुष्करंमुस्तारक्तचंदनसारिवा ॥ सठीकर्पूरमंजिष्ठालाक्षायष्टिप्रियंगुभिः ॥ शतपुष्पावरीमूर्वाअश्वगंधामहौषधं ॥ पद्मकेसरश्रीवेष्टरसागरुहरेणुभिः ॥ स्पृक्कालवंगकंकोलद्रव्यैरेभिर्द्विकार्षिकैः ॥ दशमूलकषायस्यषड्भागाःपयसस्तथा ॥ यवकोलकुलित्थानांबलामूलस्यचैकतः ॥ निक्वाथ्यक्काथोभागश्चतैलस्यच चतुर्दश ॥ ततःपक्वंविजानीयात्क्षिप्रंतदवतारयेत् ॥ शुभेपात्रेविनिक्षिप्यमौषधैःससुगंधिभिः ॥ प्रतिवासंततःकार्यमेषांसंयोजनेविधिः ॥ प्रायोयंसकुमाराणामीश्वराणांसुखात्मनां ॥ स्त्रीणांस्त्रीवृंदगर्भाणामलक्ष्मीकलिनाशनं ॥ अशीतिर्वातजान्रोगान्वातरक्तंविशेषतः ॥ सूतिकाबालममर्मास्थिहतक्षीणेपुपूजितं ॥ जीर्णज्वरंसदाहंचशीतंवाविषमज्वरं ॥ शोषापस्मारकुष्ठघ्नंवंध्यायांचसुखप्रदं ॥ व्याधितानांहितार्थाययेतुकंडूतिपीडिताः ॥ विशेषाद्रुक्षदेहानांश्वित्रिणांचविशेषतः ॥ सर्वकालप्रयोगेणकांतिलावण्यपुष्टिदं ॥ विनिर्मितमिदंतैलमात्रेयेणमहर्षिणा ॥ नचास्मात्सहसारोगोप्रभवत्यूर्ध्वजत्रुजः ॥ अस्यप्रयोगात्तैलस्यजरानलभतेनरं ॥ चंदनाद्यमिदंतैलंलोकानांचहितंमतं ॥

अर्थ–चंदन, पद्मकाष्ठ, कोष्ठ, वाळा, देवदार, नाकेशर, तमालपत्र, एलची, दालचिनी, जटामांसी, तगर, वाळा, जायफळ, घोटफल, केशर, जायपत्री, नखला, गगुळ, कस्तूरी, ऑवा, दगडफूल, आल्याचा रस, पतंग, पुष्करमूळ, नागरमोथा, रक्तचंदन, उपलसरी, कचोरा, कापूर, मंजिष्ठ, लाख, जेष्ठमध, कुटकी, बडीशेप, शतावरी, मोरवेल, अश्वगंध, सुंठ, कमळकेसर, विशेषधूप, पाहाडमूळ, कृष्णागरु, रेणुकबीज, श्वेतलाजाळु, लवंग, आणि कंकोळ- हीं प्रत्येक दोन तोळे घेऊन त्यांच्या काढ्यांत दशमुळांचा काढा साहा भाग, दूध ६ भाग, व यव, बोरें, कुळीथ आणि चिकणामूळ हे एक भाग आणि काढ्याचा चवदावा भाग तेल याप्रमाणें एकत्र मिळवून पचन करावें, तेल सिद्ध झालें ह्मणजे उतरून चांगल्या भांड्यांत धूपादि. वास देऊन त्यांत भरून ठेवावें. प्रायः हें चंदनादि तेल सुकुमार, धनिक व सुखी, अशा लोकांनां, स्त्रियां व स्त्रियांचे

गर्भ याविषयीं उत्तम आहे. हें अशीति वातरोग, वातरक्त, बाळंतीण, बालक, मर्महत, अस्थि मोडलेला आणि क्षीण यानां हितकारक आहे; व जीर्णज्वर, दाहज्वर, शीतज्वर, विषमज्वर, शोष, फेंपरें व कुष्ठ यांचा नाश करितें; व वांझस्त्रियानां हितकारक होतें. व्याधि कंडू, देहाची रूक्षता व कोड यांला विशेषें करून हितकारक होतें. याचा सर्वकाल उपयोग केल्याने लावण्य आणि पुष्टि यांला देतें. हें आत्रेयऋषीनीं निर्माण केलें. या तेलाच्या सेवनानें मानेच्या उर्ध्व भागाचे रोग व जरा हीं कधीं प्राप्त होणार नाहींत. हें लोकांनां फार हितकारक आहे.

## माषादितैल.

माषस्यार्द्धाढकंदेयंतुलार्द्धंदशमूलतः॥ पलानिछागमांसस्यत्रिंशद्द्रोणेंभसःपचेत्॥ चतुर्भागावशेषंतंकपायमवतारयेत्॥ प्रस्थेद्वेतिलतैलस्यपयोदद्याच्चतुर्गुणं॥ जीवनीयानिमंजिष्ठचव्यचित्रककट्फलं॥ सव्योपंपिप्पलीमूलंरास्नामलकगोक्षुरं॥ आत्मगुप्तातथैरंडःशताव्हा लवणत्रयं॥ देवदार्वमृताकुष्ठमश्वगंधावचाशठी॥ एतैरक्षमितैःकल्कैःपाचयेन्मृदुनाग्निना॥ पक्षाघातार्दितेपुंसिहनुस्तंभेतथार्दिते॥ कर्णशूलेशिरःशूलेतिमिरेचत्रिदोपजे॥ पाणिपादशिरोग्रीवाश्रवणे मंदएवच॥ कलायखंजेपंगौचगृध्रस्यामवबाहुके॥ पानेबस्तौतथाभ्यंगेनस्येकर्णादिपूरणे॥ तैलमेतत्प्रशंसंतिसर्ववातविकारनुत्॥ महामाषादिनामेदंभाषितंमुनिभिःपुरा॥

**अर्थ**—उडीद १२८ तोळे, दशमुळें५१२ तोळे, मेंढयाचें मांस १२० तोळे यांचा १०२४ पाण्यांत काढा करून चतुर्थांश उतरून त्यांत तिळांचें तेल १२८ तोळे, दूध २५६ तोळे, जीवनीयगणांची औषधें, मंजिष्ठ, चवक, चित्रक, कायफळ, सुंठ, मिरीं, पिंपळी, पिंपळीमूळ, रास्ना, आवळकाठी, गोखरूं, कुहिली, एरंडमूळ, शतावरी, सैंधव, बीड, काच, देवदारू, गुळवेल, कोष्टकोळिंजन, असगंध, वेखंड व कचोरा हीं प्रत्येक एकेक तोळा घेऊन त्यांचे कल्क करून त्या तेलांत घालावे; आणि तें मृदुअग्नीवर सिद्ध करावें; तें पक्षघातानें पीडित रोग्याला हितकर आहे; व हनुस्तंभ, अर्दित, कर्णशूल, मस्तकशूल, त्रिदोषजतिमिर, हात, पाय, मस्तक, मान, कान यांचा बधिरपणा, कलायखंज, पंगुवात, गृध्रसी आणि अवबाहुक यांवर हें प्रशस्त आहे; व हें प्राशनार्थ किंवा बस्तिकर्म, अभ्यंग, नस्य व कानांत घालण्याविषयीं या तेलाची फार प्रशंसा करितात. हें संपूर्णवातविकारनाशक आहे. हें महामाषादिनामक तेल पूर्वीं मुनीनीं सांगितलें.

## महानारायणतैल.

तिलतैलंसमादायचतुराढकसंमितं ॥ पंचपल्लवकल्केनशोधयेद्दोप शांतये ॥ तत्राजंदुग्धमथवागव्यंतैलसमंपचेत् ॥ शतावरीरसंचापितैलतुल्यंपचेद्भिषक् ॥ दशमूलीबलारास्नाशिग्रूत्पलपुनर्नवाः ॥ शेफालिकानागबलातिवलाचप्रसारिणी ॥ अश्वगंधासहचरोदर्भमूलंकरंजकः ॥ खदिरश्चंदनोलोध्रंवचाशनपलाशकं ॥ ककुभैरंडवरुणशालयुग्मकटंभराः ॥ शिरीषःशिखरीवासाहिंस्राजंबूविभीतकं ॥ कांचनारःकपित्यश्चपारिभद्रःप्रियालकं ॥ पापाणभेदसंपाकदुग्धिकादाडिमीफलं ॥ उदुंबरःसप्तलाचकन्यकामालतीत्वचा ॥ माधवीनरमूलंचयवकोलकुलत्थकं ॥ आत्मगुप्तार्ककार्पासबीजंवत्सादनीस्नुही ॥ केतकीमूलधत्तूरलांगलीगर्दभांडकं ॥ चित्रकंचमहानिंबंपंचवल्कलमेवच ॥ मुंडीटंकारिमुसलीहंसपादीविशल्यकं ॥ एषांदशपलान्भागान्वारिण्यष्टगुणेपचेत् ॥ पादशेषंपरिस्राव्यतत्रतैलंपुनःपचेत् ॥ छागोमेषश्चहरिणएणश्चबहुशृंगकः ॥ शशःशल्यःशिवागोधासिंहोव्याघ्रश्चभल्लुकः ॥ वन्योवराहःखड्गीचमहिषोघोटकस्तथा ॥ कपिर्बभ्रुर्विडालश्चमूषकश्चोरुदर्दुरः ॥ वर्तीकस्तित्तिरिर्लावःखंजरीटश्चकोरकः ॥ उलूकोनीलकंठश्चवनकुक्कुटएवच ॥ गृध्रश्चगरुडोहंसश्चक्रःकारंडवोपिच ॥ कपोतःसारसःक्रौंचोवन्यःपारावतस्तथा ॥ रोहितोमद्गुरश्चापिशिलींध्रःशृंगकस्तथा ॥ इल्लिसोगर्गरोवर्मिःक्वथिकाकविकापिच ॥ महामत्स्यःकच्छपश्चशिशुमारश्चसांकुचिः ॥ मकरोघंटिकाकारस्तदलाभेतुगोधिका ॥ यथालाभममीपांचक्वाथंतैलसमंपचेत् ॥ रास्नाश्वगंधामिशिदारुकुष्ठपर्णीचतुष्कागुरुकेशराणि ॥ सिंधूत्थमांसीरजनीद्वयंचशैलेयकंपुष्करचंदनंच ॥ एलासयष्टीतगराब्दपत्रंभृंगोष्टवर्गस्तुवचापलाशी ॥ स्थौणेयवृश्चीवकचोरकाख्यंमूर्वात्वचंकट्फलपद्मकंच ॥ मृणालजातीफलकेतकाख्यंसनागपुष्पंसरलंमुराच ॥ जीवंतिकोशिरवरास्तथैवदूरालभावानरिकानखश्च ॥ कैवर्तमुस्तार्जुनतिक्त

कंचवातामखर्जूरकतुंबराश्च ॥ सधातकीग्रंथिकपर्पटाश्चपटोलहेमाव्हजयंतिकाच ॥ त्रायंतिकालंबुपशक्रबीजरसांजनाभात्रिवृतारुणाश्च ॥ द्राक्षाकणाद्रोणपुनर्नवाश्चकौंतीकमिघ्नोहयमारकश्च ॥ नीलोत्पलंपद्मककारवीभ्यांरंभानलोगोक्षुरकःक्षुरश्च ॥ कंकोलकालीयकुसुंभपुष्पंतुरुष्ककाश्मीरकसिक्थकंच ॥ लवंगकर्पूरसपालकांडकस्तूरिकावालकमंबरंच ॥ कल्कानमीषांविपचेत्सुवैद्यःपृथक्पृथक्कर्षयुगोन्मितानां ॥ शुभेचनक्षत्रमुहूर्तलग्नेसंतोष्यविप्रांश्चभिषग्वरांश्च ॥ संपूज्यनारायणनामधेयंदेवंत्रिनेत्रंजगतामधीशं ॥ पात्रेतुहेम्नःखलुराजतेवाताम्रेथवालोहमयेपिरक्षेत् ॥ अभ्यंजनेजनेनस्येनिरूहेचावगाहने ॥ पानेचैतद्यथाव्याधिप्रयुंजीतचिकित्सकः ॥ बहुनात्रकिमुक्तेनतैलमेतत्प्रयोजितं ॥ अवश्यंवातजान्व्याधीनशितीनपिनाशयेत् ॥ एतस्याभ्यासतोजंतोर्जराजातुनजायते ॥ पततिवलयोनांगेपलितंनैवजायते ॥ नेत्रेतेजश्चनितरांगरुडस्येवजायते ॥ नोच्चैःश्रुतिर्नवाधिर्यंकर्णनादोनजायते ॥ पाणिकंपःशिरःकंपःप्रलापश्चनजायते ॥ बुद्धिभ्रंशोनजायेततस्यस्यात्कर्मपाटवं ॥ यथाजलेनसिक्तस्यशाखिनःपल्लवादयः ॥ वर्धतेधातवस्तद्वद्देहिनोनेननित्यशः ॥ आमगर्भंत्यजेद्यातुसूतिकासृक्स्रुताचया ॥ याबहुप्रसवक्षीणाताभ्यएतद्धितंपरं ॥ वंध्याचलभतेपुत्रंगर्भपातोनजायते ॥ योनिरोगाःप्रणश्यंतिप्रदरश्चप्रशाम्यति ॥ अस्मात्तैलवरादन्यत्कुत्रचिन्नास्तिभेषजं ॥ बल्यंवृष्यंबृंहणंचरसायनमिदंमहत् ॥ पुरादेवासुरेयुद्धेदैत्यैरभिहतान्सुरान् ॥ भिन्नान्भग्नास्थिकान्वित्थान्विच्छिन्नान्व्यथयार्दितान् ॥ दृष्ट्वाहितायदेवानांनराणांचाब्रवीदिदं ॥ तैलंनारायणोदेवोमहानारायणाभिधं ॥

अर्थ–तिळांचें तेल १०२४ तोळे, घेऊन तें वड, पिंपळ, आंबा, जांबूळ व पायरी यांच्या कल्कानें शुद्ध करावें. त्या तेलांत गाईचें किंवा शेळीचें दूध व शतावरीरस तेलाबरोबर; दशमुळें, चिकणा, रास्ना, शेवगा, कमळ, पुनर्नवा, निर्गुंड, मोठा चिकणा, लघु चिकणा, चिकणा, चांदवेल, आसकंध, पीत कोरांटा, दर्भमूळ, करंज, खदिर, चंदन, लोध्र, वेखंड, आसाणा, पळस, अर्जुन, एरंड, वायवर्णा, लघु राळवृक्ष, थोर राळवृ

क्ष, कुटकी, शिरस, आघाडा, अडुळसा, जटामांसी, जांबूळ, बेहेडा, कांचन, कवठ, कडुनिंब, चारोळी, लकडी पाषाणभेद, बाहवा, दुधी, डाळिंब, उंबर, साविण, कोरफड, जाई, दालचिनी, मधुमालती, सादडामूळ, सातु, बोर, कुळीथ, कुहिली, रुई, कापांसबीज, (सरक्या,) गुळवेल, निवडुंग, केतकीमूळ, धोतऱ्याचें बीज, खडया नाग, पारोसा पिंपळ, चित्रक, बकाणा निंब, पिंपळ, वड, पायरी, नांदरुखी, जांबूळ, गोरखमुंडी, टंकारी, मुसली, रक्तलाजाळू, वेहेकळ, हीं प्रत्येकीं १० तोळे घेऊन त्यांचा ८ पट पाण्यांत काढा करून चतुर्थांश उरवून गाळून घ्यावा; आणि त्यांत तें तेल घालून त्यांत बोकड, मेंढा, हरीण, काळविट, सांबर, ससा, साळसिंदर, कोल्हा, घोरपड, सिंह, व्याघ्र, अस्वल, रानडुकर, गेंडा, टोणगा, घोडा, वानर, मुंगुस, मांजर, उंदीर, मोठा बेडुक, टिटवी, तित्तिरी, लावा, चाप, चकोर, घुबड, मोर, रानकोंबडा, गिधाडा, गरुड, हंस, चक्रवाक, कारंडव, कवडा, सारस, करढोकपक्षी, पारवा, तांबडा मासा, मद्गुर, शिलींध्र, शिंगाचा मासा, इल्लीस, गर्गर, वर्मी, कथिका, कविका, महामत्स्य, कांसव, सुसर, सांकुची, मकर, घंटिकाकार, यांच्या अभावीं घोरपड घ्यावी; आतां यांतून जे मिळतील ते घ्यावे; आणि यांच्या रसांत तेल पचन करावें; आणि त्यांत रास्ना, अश्वगंध, बडिशोप, दारुहळद, कोष्ठकोळिंजन, शालिपर्णी, पृश्निपर्णी, मुद्गपर्णी, माषपर्णी, कृष्णागर, उंडिण फळें, सैंधव, जटामांसी, हळद, दारुहळद, शिलाजित, पांखरमूळ, चंदन, इलाची, जेष्ठमध, तगर, नागरमोथा, तमालपत्र, माका, जीवक, ऋषभक, मेद, महामेद, ऋद्धि, वृद्धि, कांकोली, क्षीरकांकोली, वेखंड, कचोरा, गाठोवन, पुनर्नवा, कचोरा, मोरवेल, दालचिनी, कायफळ, पद्मकाष्ठ, कमळाचीं बिसें, जायफळ, केतक, नागदवणी, मुरु, एकांगी मुरा, गुळवेल, वाळा, त्रिफळा, धमासा, कुहिली, नला, बकाणलिंब, नागरमोथा सादडा, किराईत, बदाम, खजूर, चिरफळ, धायटीचें फूल, पिंपळीमूळ, पित्तपापडा, कडुपडवळ, कल्हार कमळ, हळद, त्रायमाण, लाजाळू, इंद्रजव, रसांजन, बाभळीचें बी, तेंड, वायवर्णा, द्राक्षें, पिंपळी, द्रोणीचें मोठ, पुनर्नवा, रेणुकबीज, वावडिंग, कण्हेर, निळें कमळ, पद्मकाष्ठ, मेथी, केळीचा कंद, चित्रक, गोखरू, विखरा, कंकोळ, दारुहळद, कुसुंब, शिलारस, केशर, मेण, लवंग, कापूर, पाळकांडें, कस्तूरी, वाळा, अंबर, हीं प्रत्येक औषधें दोन दोन तोळे घेऊन त्यांचा कल्क दोन दोन तोळे घालून तेल सिद्ध करावें. मग चांगला दिवस पाहून देव, ब्राह्मण व वैद्य यांची पूजा करून व श्रीनारायण व माहादेव यांची पूजा करून हें तेल सोन्याचे, रुप्याचे, तांब्याचे किंवा लोखंडाचे भांडयांत रक्षण करून ठेवावें. हें आंगाला लावणें, अंजन, नस्य, निरुहबस्ति, स्नान, प्राशन याविषयीं जशी व्याधि असेल तसें द्यावें. फारकरून ह्या तेलाच्या प्रयोगानें अवश्य ऐंशी प्रकारचे वात व्याधींचा नाश होतो. या तेलाचें नेहमी सेवन केले असतां; ह्यातारपण कधींही येणार नाहीं; व आंगाला वळया आणि

केश पांढरे होणार नाहींत; नेत्रामध्यें गरुडनेत्राच्या तेजासारिखें तेज येतें, मोठ्यानें बोलल्यावांचून लवकर आइकतो, बहिरा होत नाहीं, कर्णामध्यें नाद होत नाहीं, हात व मस्तक कांपत नाहींत; व रोगी बडबडत नाहीं, बुद्धिभ्रंश नहोतां कर्मकुशल होतो. जसें वृक्षाला उदकानें शिंपिला असतां; त्याची पालवी वाढत्ये तसें हें देहाचें तेज वाढवितें. जा स्त्रीचा गर्भपात होतो; व जा बाळंतिणीचें फार रक्त गेलें; व जी फारदा बाळंत होऊन क्षीण झाली, अशा स्त्रियांनां हें फार उत्कृष्ट हितकारक आहे. या तैलानें वंध्येला पुत्र होतो, गर्भपात होत नाहीं, योनिरोग नाश पावतात, प्रदर शांत होतो, या तैलाहून दुसरें औषध कोठे ही नाहीं. बल्य, वृष्य, बृंहण व रसायण असें हें तेल आहे. पूर्वीं देव व असुर यांच्या युद्धामध्यें दैत्यानीं ताडण केलेले देव मोडले, चेंचले, ठेंचले व पीडित झाले असें पाहून हें तेल नारायणानें देवांला सांगीतलें, हें महानारायण तैल आहे.

## दुसरा प्रकार.

बलाश्वगंधाबृहतीश्वदंष्ट्रास्योनाकवाट्यालकपारिभद्रा ॥ क्षुद्राकठिल्लातिबलाग्निमंथरास्नारणीकःकणिकच्छुराश्च॥ निर्गुंडिकैरंडकुरंटकानांमूलानिबर्पासरणीयुतानि ॥ मूलंविदध्याद्दशपाटलानांसंकुट्यपादांशवतोद्धृतानां ॥ द्रोणैरपामष्टभिरेवपक्त्वापादावशेषेणरसेनतेन॥ तैलाढकाभ्यांसमदुग्धमत्रगव्यानिदद्यादथवाउयदुग्धं ॥ दद्याद्रसंचैव शतावरीणांतैलंचतुल्यंपुनरेवतत्र ॥ पक्त्वादिनैकंकृतवस्त्रपूतंकल्कानिचैषांहिसमावपेच्च ॥ रास्नाश्वगंधामिशिदारुकुष्ठपर्णीतुरुष्कागरुकेसराणि ॥ सिंधूत्थमांसीरजनीद्वयंचशैलेयकंपुष्करचंदनानि ॥ एलासयष्टीतगरांबुपत्रभृंगाष्टवर्ग्यंचजयापलाशं ॥वृश्चीवएेलेयकचोरकाख्यंमूर्वात्वचापुष्करपद्मकंच ॥ मृणालजातीफलकेतकीचसनागपुष्पंसरलंसुराच ॥ जीवंतिकाचंदनकंद्युशीरंदुरालभावान्नरिकानखंच ॥ कैवर्तकंतालशिरःसतिक्तंखर्जूरिमुस्तंसमभागमेषां ॥एतैःसमैःसार्धपलप्रमाणैर्भागानताष्टौकिलकालमेष्यः ॥ एणःकुरंगोहरिणोमयूरोगोधाशशःशक्रकचक्रवाकौ ॥ वर्तीरलावौवरतित्तिरीचसत्सारचक्रौचककंबुवर्णः॥आनूपकूर्माइहमांसपुष्टाःक्रमात्क्षिपेच्चात्रयथैवलाभं ॥ रोहीतकोथोशववेत्रनामाकसाढवौमुद्गरशृंगिकेच ॥पाठीनकालीयकतोडिकाचसरोखरायेकुरुदादयश्च ॥ येचापितोयेशिशुमारमु

ख्यालभ्याश्वयेश्वभ्रमताभुजंगाः ॥ अन्येपियेभूचरखेचराश्च पूर्णाअमी पांक्रमशोत्रयोज्याः ॥ सुताम्रपात्रेप्यथमृत्तिकाचकर्पूरकाश्मीरमृगांडजंवा ॥ दद्यात्सुगंधायवदंतिकेचित्प्रक्षेदर्दौगंध्यविनाशनाय ॥ वदंतिकेचिद्द्विपदःसमेतंशुभेनिधायाथमुहूर्तलग्ने ॥ संतोष्यविप्रान्भिषजोर्थिनश्चसुभोजनेयज्ञघृततथैव ॥ पानेचनस्येचनिरूहणेचभोज्यंप्रदेयंततएवनूनं ॥ अभ्यंगमादौचसदाप्रशस्तंनिर्वाप्यतेकर्मसुकेषुचिन्हं ॥ उन्मादशोपक्षतरक्तपित्तश्वासाभ्रमूर्च्छादिपुमूर्च्छितेषु ॥ कासाग्निवाताहनुमूलदंतकमीष्ठयुग्मोहिसतोददाहान् ॥ सतालुमूलं श्रवणाक्षिशूलंवाधिर्यमुग्रज्वरपीडितंच ॥ मंदेंद्रियत्वंचतथाग्निमांद्यंनष्टप्रशुक्रत्वमथांगकंडूः ॥ निहंतिसत्वंनगुणप्रभावात्कटिग्रहापस्मृतिगृध्रसींच ॥ पक्षाभिघातंचरणाभिघातंहस्ताभिघातंचशिरोग्रहंच ॥ प्रक्षीणमुग्रंसकलप्रमेहान्नासाक्षिकर्णप्रभवान्विकारान् ॥ वातादिजातान्किलभूतजातान्कृत्यादिजातान्ग्रथितान्विकारान् ॥ रोगःसनास्त्येवनरस्यदेहेनानेनशांतिसमुपैतिमोहः ॥ सद्योव्रणानस्थिविचूर्णितंवानाडीव्रणान्वापिचयोजयित्वा ॥ सुवर्णवर्णंवितनोतिरूपंनारायणाख्योखिलतैलराजः ॥ वंध्यःपुमान्वापिवरांगनावासुपुत्रमाप्नोतिविलेपतोस्य ॥ सिंच्यत्यनेनैवानियोजितेननिदाघदग्धःप्रहतोपिवृक्षः ॥ अन्यस्यकाकाभणितिर्निरस्यरोगस्यजंतोरपरस्यचापि ॥ नारायणोक्तंतदिदंतुतैलंनारायणंनामततःप्रसिद्धं ॥

अर्थ—चिकणामूळ, अश्वगंध, डोरली, गोखरू, दिंडा, तुपकडया, निंब, शिगणी, कांटिल, अतिबला, एरण, राम्ना, टाकळा, कुयली, निर्गुड, एरंडमूळ, कोरांटा, शहाजिरें, चांदवेल, दशमुळें व पाडळ यांचीं मुळें, कुटून ८१९२ तोळे पाण्यांत त्यांचा काढा करून चतुर्थांश राहून घ्यावा. त्यांत तेल ५१२ तोळे व तितकेंच गाईचें व शेळीचें दूध घालून कढवून पुनः तेल ५१२ तोळे घालून एक दिवस शिजऊन वस्त्रगाळ करून त्यांत राम्ना, अश्वगंध, बडिशोप, दारुहळद, कोष्ठ, शालिपर्णी, शिलारस, कृष्णागरु, नाकेशर, सैंधव, जटामांसी, हळद, दारुहळद, दगडफूल, पोखरमूळ, चंदन, एलची, जेष्ठमध, तगर, वाळा, तमालपत्र, माका, जीवक, ऋषभक, मेदा, महामेदा, ऋद्धि, वृद्धि, काकोली, क्षीरकाकोली, शमी, पळस, पुनर्नवा, एलावालुक, कचरा, मोरवेल,

दालचिनी, कमळकंद, पद्मकाष्ठ, कमलबिसें, जायफळ, केतक नागदवणी, देवदार सरल, तांदळांचें मद्य, जीवशाक, हरिचंदन, पीत वाळा, धमासा, कुयलीबीज, नखला, बकाण निंब, ताडाचा मस्तकाचा गाभा, किराईत, खजूर, भद्रमोथा, हीं प्रत्येक साहा साहा तोळे; व तगर आठ तोळे, मांजिष्ठ आठ तोळे, इतक्यांचे कल्क व हरण, कुरंग, काळ विट, मोर, घोरपाड, ससा, शक्र, चक्रवाक, वर्तिकपक्षी, लावा, टिटाटवली, सारस, करढोंक, बगळा, पाणथळजीव, कांसव, यांचा व रोहिस, शवनेत्र, कस, आढव, मुद्गर, शृंगिका, पाठीन, कालीयक, तोंडिका इत्यादि सरोवरांतील मत्स्य व उखर जाग्याचे मत्स्य कुरुदादिक व जे सुसरादिकरून जे मिळतील ते जलचर, बिळांत राहाणारे सर्पादिक व जे आकाशीं फिरणारे पक्षी व भुयीवरील जीव जे मिळतील त्यांचें मांसरस घालून तेल सिद्ध करावें; नंतर गाळून तांब्याच्या भांड्यांत किंवा मातीच्या भांड्यांत भरून त्यांत सुगंधाकरितां व दुर्गंध जाण्याकरितां कापुर, केशर व कस्तूरी हे पदार्थ घालून शुभ मुहूर्त पाहून ब्राह्मण, वैद्य, देव व याचक यांची पूजा करून नंतर तें तेल पान नस्य व निरूहबस्ति यांचा ठायीं योजावें. हें अंगास प्रशस्त आहे; आणि उन्माद, शोष, क्षत, रक्तपित्त, श्वास, भ्रम, मूर्छा, कास, अग्निवात, हनुमूल, दंतमूल, कृमि, इष्टिगुम्नी, ठणका, दाह, तालुशूल, कर्णशूल, नेत्रशूल, बहिरेपणा, ज्वरवृद्धिगत, मंदेंद्रियपणा, धातुक्षय, कंडू, कटिग्रह, अपस्मार, गृध्रसी, अर्धांग वायु, हस्ताभिघात, पादाभिघात, मस्तकशूल, कृशत्व, सर्वमेह, नाक, कान व डोळे यांची व्याधि, सर्व वातव्याधि, भूतोन्माद, कृत्योन्माद, ग्रंथिविकार, सद्योव्रण, अस्थिभंग व नाडिव्रण, इत्यादिकांचा नाश करितें. या तेलानें न जाणारा असा व्याधीच नाहीं; व हें सुवर्णासारिखी कांति करितें; आणि पुरुष व स्त्रियांचें वंध्यात्व घालवितें. किंबहुना उष्णानें जळालेला वृक्षही शिंपून जिवा होईल. मग अन्य कोणतेही रोग नाश करील हें सांगायाला नको. हें तेल नारायणानें स्वमुखानें सांगीतलें. यास्तव यास नारायण तेल नाम प्रसिद्ध जाहालें.

## जंबूकाद्यतैल.

वृद्धंशृगालमादायपादोक्तोदरमध्यगा ॥ त्यक्ताशेषंचसंगृह्यदत्वा वारिचतुर्गुणं ॥ चतुर्भागावशेषंचग्राह्यंतैलसमंपचेत् ॥ अजश्चर्म विनिर्मुक्तोत्यक्त्वाशृंगशिरादिकं ॥चरणायुधमांसंचजलेद्रोणद्वयेपचेत् ॥ तेनपादावशेषंचपाचयेच्चपृथक्पृथक् ॥ शतावरीणांचरसंतैलतुल्यंप्रदापयेत् ॥ छागंगव्यंपयःशुल्कंमस्तुवारुणिचोत्तमं ॥ पात्रमात्रेणसंग्राह्यंततोनंतरमौषधं॥शालिपर्णीपृष्ठपर्णीबलाचबहुपुत्रिका॥एरंडस्यचमूलानिबृहत्यापूतिकस्यच ॥गवेधुकस्यमूलानितथासहचर

स्यच ॥ प्रसारिण्याश्वगंधाचतालमूलीपुनर्नवा ॥ रास्नागोक्षुरकंपा
ठापाटलापारिभद्रकं ॥ अर्कमूलंबृहद्दंतीकटभीकांचनारिका ॥ चक्रम
र्दमपामार्गमंकोटंबैल्वमूलकं॥स्योनाकनकमालाब्दवासानंतापटोल
कं ॥ मेगुडीमुंडिकातुंबीलांगलीशिग्रुपीलुका ॥ खर्जूरीकासमर्दंचगुं
जामूलंविधारकं ॥ अमृताशंखपुष्पीचभृंगराजककुंदरैः ॥ वटश्चकु
टजोदीच्यमदनंवान्नरीस्नुही ॥ महानिंबोविशालाचशिरीषोकर
वीरका ॥ पलंपलंचसंगृह्यकषायंसाधयेत्सुधीः ॥ चतुर्भागावशेषंतुतै
लतुल्यंचदापयेत्॥चंदनंदेवकाष्ठंचकुष्ठंमांसीपुनर्नवा॥पूतीकरास्ना
त्रिवृतारेणुकाशिग्रुगुग्गुलुः ॥ चातुर्जातकमंजिष्ठाहरिद्रेद्वेचपुस्तकं ॥
धातकीपुष्पपतंगंतथाक्षारद्वयंवचा ॥ एलाशैलेयकंव्योपंलवणानिच
पंचकं ॥ एभिर्द्रव्यैःपलार्द्धंस्याच्छनैर्मृद्वग्निनापचेत् ॥ सौगंधार्थंच
दातव्यंलवंगंजातिकाफलं ॥ कस्तूरीघनसारंचसिल्हारंनखवालकं ॥
कृष्णागरुनतंचैवपत्रकंजातिपत्रिका ॥ यथालाभंचसंगृह्ययोजयेत्तत्रत
द्बुधः ॥ तैलेनानेननश्यंतिसर्वरोगासमीरणा ॥ अशीतिर्वातजा
रोगाःशोफशूलकटिग्रहाः ॥ कुब्जानामथपंगूनांवामनानांतथैवच ॥
अधोभागेचयेवाताःशिरोमध्यगताश्चये ॥ मन्यास्तंभेहनुस्तंभेवातरो
गेगलग्रहे ॥ यस्यशुष्यतिचैकांगंयेचभग्नास्थिसंधयः ॥ पक्षाघातेपु
सर्वेपुअर्दितेचहनुग्रहे ॥ मंदश्रुतौचश्रवणेतिमिरेचत्रिदोपजे ॥ हृ
च्छूलेपार्श्वशूलेचबाधिर्येमूकमिम्मिणे ॥ कामलापांडुरोगेचखल्लीशू
लकटिग्रहे ॥ हस्तकंपेशिरःकंपेगात्रकंपेशिरोग्रहे ॥ कलायखंजगृ
ध्रस्यामवबाहुंचनाशयेत् ॥ बाधिर्येकर्णनादेचसर्ववातविकारनुत् ॥
दंडापतानकश्चैवमन्यास्तंभेविशेषतः ॥ हनुस्तंभेप्रशस्तंस्यात्सूतिका
वातनाशनं ॥ बाल्येमांसप्रदंचैवशुक्राग्निबलवर्धनं ॥ अंत्रवृध्दिमंद
वृध्दिमपचींनाशयेत्ततः ॥ योनिशूलमसृग्दोपमाध्मानंविनिहंतिच ॥
वातशोणितदुष्टानांवातोपहतचेतसां ॥ अश्वानांवातभग्नानांकुंजरगणां
नणांतथा ॥ तैलमेतत्प्रयोक्तव्यंसर्ववातविकारनुत् ॥ अस्थिमेदोगता

वाताक्षीणाश्चार्शोभगंदराः ॥ भूतग्रहपिशाचाश्चतथादुष्टग्रहानपि ॥ दद्रूविचर्चिकापामाकुष्ठकंडूव्रणापहं ॥ शृगालाद्यमिदंख्यातंबहुपीडांचनाशयेत् ॥ एतत्तैलेननश्यंतिरोगाःसर्वेविशेषतः ॥

अर्थ–मारलेला कोल्हा घेऊन त्याचे पाय व पोटांतील आंतडी काढून टाकून त्याचे मांसाचे बारीक तुकडे करून मांसाच्या चौपट पाणी घालून चतुर्थांश रस गाळून घ्यावा. त्यांत त्या रसाइतकें तेल. घालून पचवावें; व बोकडाचें चांबडें, मस्तक व पाय हे काढून त्याच्या काढ्यांत; आणि कोंबड्याचे मांसाच्या रसांत निरनिराळें पचन करावें; नंतर शतावरीचा रस तैलासमान व शेळीचें दूध, ताकाची पांढरी निवळी, उत्तम मद्य, हीं प्रत्येक तैलाइतकीं घालून त्यांत सालवण, पिठवण, चिकणा, लघु शतावरी, एरंड मूळ, रिंगणी, करंज, कसईचें मूळ, कोरांटामूळ, लाजाळूकंद, अश्वगंध, काळी मुसळी, पुनर्नवा, रास्ना, गोखरु, पाहाडमूळ, पाडळीचें मूळ, निंब, रुईचें मूळ, थोर दांती, किन्ही, नागकेशर, टाकळा, आघाडा, अक्रोड व बेल यांचीं मुळें, बाहावा, करंज, नागरमोथा, अडुळसा, धमासा, कडुपडवळ, निर्गुंडी, मुंडी, कडुभोपळा, कळलावी, शेवगा, पीतवर्ण तुरटी, खारीक, कासिवदा, गुंजेचें मूळ, विधारा, गुळवेल, शंखाहुली, माका, कुंद, वड, कुडा, वाळा, गेळा, कुहिली, सोटे निवडुंग, बकाणनिंब, वृंदावन, शिरसवृक्ष, व मनशीळ, हे प्रत्येक चार चार तोळे घेऊन यांचा चतुर्थांश काढा तैलासमान घालावा; नंतर चंदन, देवदार, कोष्ठ, जटामांसी, पुनर्नवा, करंज, रास्ना, तेड, रेणुकबीज, शेवगा, गुग्गुळ, दालचिनी, एलची, तमालपत्र, नागकेशर, मंजिष्ठ, हळद, दारुहळद, नागरमोथा, धायटीचीं फुलें, पतंग, यवखार, टांकणखार, वेखंड, एलची, शिलारस, सुंठ, मिरीं, पिंपळी; आणि पंच लवणें हीं दोन दोन तोळे घ्यावीं; आणि त्यांचा कल्क करून त्या तैलांत मिसळून मंदाग्नीवर सिद्ध करावें; आणि त्यांत सुगंध येण्याकरितां लवंगा, जायफळ, कस्तूरी, कापूर, शिलारस, नखला, वाळा, कृष्णागर, तगर, तमालपत्र व जायपत्री, यांतून जे मिळतील ते घेऊन त्यांत घालावें; हें तेल संपूर्ण रोग, ऐशीं प्रकारचे वायु, सूज, शूल, कमर धरते ती, कुबडे, पांगळे, खुजे, अधोभागगत वातरोग, मस्तकांतील वातरोग, मन्यास्तंभ, हनुस्तंभ, वातरोग, गळग्रह, एकांगवात, अस्थिभंग, संधिभंग, पक्षघात, अर्दित, हनुग्रह, बहिरेपणा, मूकवात, मिंमिणवात, कावीळ, पांडुरोग, खल्लीवात, शूल, कटिग्रह, हस्तकंप, शिरःकंप, गात्रकंप, मस्तकशूल, कलायखंजवात, गृध्रसी, आणि अवबाहुक यांचा नाश करितें; आणि बहिरेपणा, कर्णनाद, संपूर्णवात, दंडापतानक, मन्यास्तंभ, हनुस्तंभ, बाळंतरोग, हे नाश पावतात. बालपणामध्यें देहाला मांसल करणारें, बळ व शुक्र यांनां वाढविणारें, अंडवृद्धि, अंत्रवृद्धि, अपची, योनिशूळ, रक्तदोष, आध्मान, वातरक्त, वातरोग, वायूनें बिघडलेले हत्ती, घोडे व गाई, यांच्या वातविकाराचा नाश करितें; व अस्थिगत, मेदगतवायु, क्षय, अर्श, भगंदर, भूतबाधा, ग्रहबाधा,

पिशाचबाधा, दुष्टग्रह, दद्रुपामा, विचर्चिका, कुष्ठ, कंडू व व्रण, यांचा हें शृगादि तैल नाश करितें. या तेलाच्या सेवनानें विशेषेंकरून संपूर्ण रोग नाश पावतात.

## तिसरें माषतैल.

माषक्काथेबलाक्काथेरास्नायादशमूलजे ॥ यवकोलकुलित्थानांछाग मांसरसेपृथक् ॥ प्रस्थेतैलस्यचप्रस्थंक्षीरंदद्याच्चतुर्गुणं ॥ रास्नात्मगुप्तासिंधूत्थशताह्वैरंडमुस्तकैः ॥ जीवनीयबलाव्योषपचेदक्षमितैःपृथक् ॥ हस्तकंपेशिरःकंपेबाहुकंपेवबाहुके ॥ वस्त्यभ्यंजनपानेपुनावनेचप्रयोजयेत् ॥ माषतैलमिदंश्रेष्ठमूर्ध्वजत्रुगदापहं ॥

अर्थ—उडीद, चिकणा, रास्ना, दशमुळें, सातु, बोर व कुळित्थ यांचा पृथक् पृथक् ६४ तोळे काढा, मांसरस ६४ तोळे, इतक्यांत ६४ तोळे तेल निर निराळे पक्क करून पुनः तेलाचे चौपट दूध घालून रास्ना, कुहिली, सैंधव, शतावरी, एरंड, नागरमोथे, जीवनीयगण, चिकणा व त्रिकटु यांची प्रत्येक तोळा प्रमाणें चूर्ण करून टाकावीं; नंतर पक्क करून ठेवावें. ह्याला माषतैल असें ह्मणतात. हें हस्तकंप, शिरःकंप, बाहुकंप, अवबाहुक, या रोगांवर बस्ति, अभ्यंजन, नस्य व पान याचे ठायीं योजावें. हें खांद्यांच्या वरच्या भागाच्या रोगांचें नाशक आहे.

## रास्नापूतीकतैल.

दशमूलबलादारुअश्वगंधाशतावरी ॥ वरुणैरंडनिर्गुंडीतर्कारीशिग्रुमोरटं ॥ सहचरंचित्रमूलंकरंजांकोलमूलकं ॥ पुनर्नवंचभूपीलुअर्कपुंखीदुरालभा ॥ जीवंतीविषतिंदुश्चवातारिर्हिंस्त्रशिग्रुकं ॥ अलर्कयवकोलंचकुलित्थानांकषायकं ॥ एतेषांचसमंरास्नापूतीकंचतयोःसमं ॥ अष्टभागावशेषंतुकषायमवतारयेत् ॥ तत्पादंतिलतैलंचअजाक्षीरंचतत्समं ॥ गुग्गुलंतगरंमांसीत्रिकटुत्रिफलानिच ॥ चातुर्जातंकचोरंचविडंगामरदारुच ॥ हिंगुरास्नावचातिक्तापाठायष्टिकचित्रकं ॥ प्रियंगुपिप्पलीमूलंचंदनंचव्यदीपकं ॥ वरालंचपकंकुष्ठंमंजिष्ठामिशिसर्षपाः ॥ जातीफलंसुगंधंचपाठोशीरंसमांशकं ॥ एतत्तैलस्यषष्ठांशंकल्कद्रव्याणिदापयेत् ॥ सुमुहूर्तेसुनक्षत्रेनववस्त्रेण पीडयेत् ॥ पानलेपननस्याद्यैःशिरोवस्तिप्रयोजितं ॥ धनुर्वातांनरायामंगृध्रसीमवबाहुकं ॥ आक्षेपकेत्रणायामेविश्वाच्यामपतंत्रके ॥ आ

ढ्यवातेहनुस्तंभेशिरावातापतानके ॥ भ्रूशंखकर्णनासाक्षिजिव्हास्तंभेचदारुके ॥ कलायखंजतापंगुसर्वांगैकांगमारुते ॥ अर्दितेपादहर्षेचपक्षाघातेप्रशस्यते ॥ ऊरुस्तंभंसुप्तवातंनाशयेन्नात्रसंशयः ॥ रास्नापूतीकनामैतत्तैलमात्रेयनिर्मितं ॥

अर्थ– दशमुळें, चिकणा, दारुहळद, आस्कंद, शतावरी, वायवर्णा, एरंड, निर्गुंडी, थोर ऐरण, शेवगा, उसांचे मूळ, पीतकोरांटा, चित्रक, करंज, आंकोल, मुळा, पुनर्नवा, भूपीलु, अर्कपुंखी, धमासा, जटामांसी, कुचला, रक्त एरंड, रक्त रुई, सातु, बोर व कुलित्थ ह्या औषधांच्या बरोबर रास्ना आणि सर्वांचे बरोबर करंज, याप्रमाणें घेऊन त्यांचा अष्टमांश काढा उतरला ह्मणजे त्याचे चतुर्थांश तेल आणि तितकेंच शेळीचें दूध आणि गुग्गुळ, तगर, जटामांसी, त्रिकटु, त्रिफळा, दालचिनी, वेलदोडे, तमालपत्र, नागकेशर, कचोरा, वावडिंग, देवदार, हिंग, रास्ना, वेखंड, कटुकी, पाहाडमूळ, जेष्ठीमध, चित्रक, गहुला, पिंपळमूळ, चंदन, चवक, ओंवा, लवंग, चांपा, कोष्ठकोळिंजन, मंजिष्ठ, बडिशेप, शिरस, जायफळ, रोहिगवत, पाहाडमूळ, वाळा ह्या सर्व औषधांचें चूर्ण तेलाचे षष्ठांश त्यांत टाकून सर्व एकत्र मंदाग्नीवर कढवून चांगला दिवस पाहून गाळून ठेवावें; आणि पिणें, लेपन, शिरोबस्ति यांचे ठिकाणीं योजलें असतां; धनुर्वात, अंतरायाम, गृध्रसी, अवबाहुक, आक्षेपक, व्रणायाम, विश्वाची, अपतंत्रक, आढ्यवात, हनुस्तंभ, शिरावात, अपतानक, भ्रू, शंख, कर्ण, नासा, अक्षि व जिव्हा यांचा स्तंभ, दारुक, कलायखंजता, पंगुता, सर्वांगवात, एकांगवात, अर्दित, पादहर्ष, पक्षाघात, ऊरुस्तंभ व सुप्तवात इतक्यांचा नाश करील, यांत संशय नाहीं. त्याला रास्नापूतिक नामक तेल ह्मणतात. हें आत्रेयनिर्मित आहे.

## बलातैल वातादिकांवर.

बलामूलकषायेणदशमूलशृतेनच ॥ कुलित्थयवकोलानांक्काथेनपयसस्तथा ॥ अष्टाष्टभागयुक्तेनभागमेकंचतैलकं ॥ गणेनजीवनीयेनशतावर्यैंद्रदारुणा ॥ मंजिष्ठाकुष्ठशैलेयतगरागुरुसैंधवैः ॥ वचापुनर्नवामांसीसारिवाहयपत्रकैः ॥ शतपुष्पाश्वगंधाभ्यामेलयाचविपाचयेत् ॥ गर्भार्थिनीनांनारीणांपुंसांचक्षीणरेतसां ॥ व्यायामक्षीणगात्राणांसूतिकानांचयुज्यते ॥ राजयोग्यमिदंतैलंसुखिनांचविशेषतः ॥ बलातैलमितिख्यातंसर्ववातामयापहं ॥

अर्थ–चिकणामूळ आठ प्रस्थ घेऊन त्यांत पाणी बत्तीस प्रस्थ घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. दशमुळें आठ प्रस्थ घेऊन त्यांत पा-

णी बत्तीस प्रस्थ घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. कुळित्थ, जव, बोराच्या आंठयांतील बीज, हीं तीन औषधें वेगळीं वेगळीं आठ प्रस्थ घेऊन त्या एकेकांत पाणी बत्तीस बत्तीस प्रस्थ घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढे करून वेगळे वेगळे गाळावे. मग ते पांचही काढे एकाजागीं करून त्यांत गाईचें दूध आठप्रस्थ घालून व तिळांचें तेल एक प्रस्थ घालावें. त्यांत चूर्णें टाकावयाचीं तीं औषधें येणें प्रमाणे. जीवनीयगणाचीं औषधें, शतावरी, मंजिष्ठ, देवदार, कोष्ठ, पत्थरफूल, तगर, अगरू, सैंधव, वेखंड, पुनर्नवा, जटामांसी, पांढरी उपळसरी, काळी उपळसरी, तमालपत्र, बडिशेप, आसंध व विलायची, हीं चोवीस औषधें तेलाचें चतुर्थांश घेऊन कल्क करून त्या तेलांत घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तेल गाळून घ्यावें. याला बलातैल ह्मणतात. हें तेल ज्या स्त्रियांस गर्भाची इच्छा आहे त्यांचे आंगास लावावें. ज्या पुरुषांची धातुक्षीण आहे त्यांस व दूर जाणें, येण्याजाण्याच्या परिश्रमकरून क्षीण आहेत गात्रें ज्या पुरुषाचीं त्यांस व बाळंत स्त्रियास योजावें; व हें तेल विशेषेकरून राजांस व सुखीमनुष्यांस योग्य आहे. यापासून सारे वायूचे विकार दूर होतात.

## माषादितैल ग्रीवास्तंभादिकांवर.

माषायवातसिक्षुद्रामर्कटीचकुरंटकः ॥ गोकंटटुंटुकश्चैषांकुर्यात्सप्त पलंपृथक् ॥ चतुर्गुणांबुनापक्त्वापादशेषंसृतंनयेत् ॥ कार्पासास्थी निबदरंशणबीजंकुलित्थकं ॥ पृथक्चतुर्दशपलंचतुर्गुणजलेपचेत् ॥ चतुर्थांशावशिष्टंचगृण्हीयात्क्काथमुत्तमं ॥ प्रस्थैकंछागमांसस्यचतुः षष्टिपलेजले ॥ निःक्षिप्यपाचयेद्धीमान्पादशेषंरसेनयेत् ॥ तैलप्रस्थं ततःक्काथान्सर्वानेतान्विनिःक्षिपेत् ॥ कल्कैरेभिश्चविपचेदमृताकुष्ठ नागरैः ॥ रास्नापुनर्नवैरंडैःपिप्पल्याशतपुष्पया ॥ बलाप्रसरणीभ्यां चमांसीकटुकयातथा ॥ पृथगर्धपलैरेतैःसाधयेन्मृदुवन्हिना ॥ हन्या त्तैलमिदंशीघ्रंग्रीवास्तंभापबाहुकौ ॥ अर्धांगशोषमाक्षेपमूरुस्तंभापता नकौ ॥ शाखाकंपंशिरःकंपंविश्वाचीमार्दितंतथा ॥ माषादिकमिदंतै लंसर्ववातविकारनुत् ॥

अर्थ—उडीद, जव, आळशीचें बीज, रिंगणी, कवचबीज, कोऱ्हांटा, गोखरूं, टेंटू हीं आठ औषधें सात सात पळें घेऊन त्यांत पाणी साऱ्या औषधांचें चौपट घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा; व कापसाच्या सरक्या, बोरांच्या आंठया, तागाचें बीज व कुळित्थ हीं चार औषधें चवदा चवदा पळें घेऊन त्यांत पाणी चौपट घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. बोकडाचें मांस एक

प्रस्थप्रमाण घेऊन त्यांत पाणी चवसष्ट पळें घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळावा. मग तिळांचें तेल एक प्रस्थप्रमाण घेऊन त्यांत ते सारे काढे मिळवावे. त्यांत कल्क टाकावयाचीं औषधें तीं येणेंप्रमाणें. गुळवेल, कोष्ठ, सुंठ, रास्ना, पुनर्नवा, एरंडमूळ, पिंपळी, बडिशोप, चिकणामूळ, चांदवेल, जटामांसी, कटुकी हीं बारा औषधें अर्धें अर्धें पळ घेऊन कल्क करून तेलांत घालून हलक्या अग्नीनें तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तेल गाळून घ्यावें. याला माषादि तैल ह्मणतात. हें तेल अंगास लावलें असतां; ग्रीवास्तंभ वायु, अपबाहुक वायु, अर्धांग वायु, आक्षेपक वायु, ऊरुस्तंभवायु, अपतानक वायु, हस्तपादादिक शाखा कांपवितो तो वायु, मस्तक कांपवितो तो, विश्वाची वायु व अर्दितवायु हे सारे वायु दूर होतात.

## सुगंधतैल.

तगरागरुकुंकुमकुंदुरुभिःसलवंगवरांगकुरंगमदैः ॥ सरलामरदारुदलद्रविडीनखकेशररुङ्नलिनीनलदैः ॥ सतुरुष्कहरेणुबलाक्कथनैरिति तैलमिदंपयसाविपचेत् ॥ नृपतिप्रमदाशिशुभिःस्थविरैरुपयोज्यमिदंपवनामयजित् ॥

अर्थ—तगर, अगरु, केतक, कुंदागवत, लवंग, जाडी दालचिनी, कस्तुरी, सुरु, देवदार, वेलचीदाणे, नखला, नाकेशर, कोष्ठकोळिंजन, कमळिणी, वाळा, शिलारस, मेंदी व चिकणा यांचा काढा व दूध एकत्र करून तैल सिद्ध करावें. तें राजाच्या स्त्रिया पुत्र व ह्मातारे यांणीं याचें सेवन करावें. हें वातविकाराचा नाश करितें.

## एलादि तैल.

एलामुरासरलशैलजदारुकौंतीचंडाशठीनलदचंपकहेमपुष्पं ॥ स्थौणेयगंधरसपूतिदलंमृणालश्रीवासकुंदुरुनखांबुलवंगकुष्ठं ॥ कालीयकंजलदकर्कटचंदनश्रीजात्याःफलंसविकसंसहकुंकुमेन ॥ स्पृक्कातुरुष्कलवुलयंतथाविनीयतैलंबलाक्कथनदुग्धदधिप्रपक्कं ॥ मंदानलेनहितमेतदुदाहरंतिवातामयेषुबलवर्णहुताशकारी ॥

अर्थ—वेलदोडे, एकांगी मुरा, सुरु, दगडफूल, देवदार, रेणुक बीज, गठोणा, कचोरा व सोनचांपा, थोर नाहावा, गांठिवन, रक्यावोळ, पीत लोभ्र, कमळाची देंठी, विशेष धूप, साळईचा डीक, नखला, वाळा, लवंग, कोष्ठकोळिंजन, दारुहळद, नागरमोथा, ऊंस, चंदन, बेलफळ, जायफळ, रक्त पुनर्नवा, केशर, मोरवेल, शिलारस व पीतवर्ण वाळा यांचीं चूर्णें घालून चिकण्याचा काढा दुग्ध व दहीं यांचाशीं युक्त मंदाग्नीनें पक्क केलेलें, तेल, वातरोगावर हितकारक व बल वर्ण आणि अग्नि यांतें देणारें असें आहे.

## महालक्ष्मीनारायणतैल.

दशशतांघ्रिशिवेतरमल्लिकादहननागबलाऋबुत्राप्पिका ॥ कितवलां गळकीवनमल्लिकाकुटजहेदुवृकीखरशृंगिका ॥ मधुकबीजकचंपक मालतीस्नुहिबलाक्रमिहाप्रपुंनाटकाः ॥ शतदलाश्ववराहकवासनी ऋबुकधन्वनपिप्पलिरक्तिका ॥ अतिबलाद्विविषाशकदाडिमीशिरिशाल्मलिसिंधुकतुंडिका ॥ सुपिरफंगुलकाशसुमर्कटीवरककुंभनिकुंभजयंतिका ॥ कुसरिपिच्छलिकाकरमर्दिकाकसनमर्दककेवणिरूषिका ॥ अतसिवत्सकगृध्रमहीरुहोविदुलकुंजलिकाद्वितयोच्चटा ॥ दधिफलस्रुववृक्षमृगादनीमधुरसामगधाजलपत्रिका ॥ रुदंतिकापृगेभ्यजटासुधीसमनुगृह्यदशांघ्रिकं ॥ मुनितरुमलयतपनापामार्गबीजनक्तमालशृंगाटी ॥ प्रपुंनाटोहेमदुग्धाकलेरुहाणांतुबीजानि ॥ धात्रीशिग्रुकरंजबब्बुलमधुष्ठीलेंगुदीनिपतीनीपारग्वधरक्तसारवदरीविस्फूर्जनोकांचनः ॥ चिंचोदुंबरतापसीद्रुमयुगांकोलद्वयंमल्लकीगायत्रीकलिवृक्षभंडिकदराश्वत्थाभयापादपाः ॥ मल्लीकिंशुकमेषशृंगिकिहिनीभूतांकुशःशल्यकःकोशाम्रार्जुनपारिभद्रकमहावृक्षाःकुमार्यासनैः ॥ कुंभिरक्तधनंजयोनियमनोवातारिमोखाव्हयाएतेपांपरिगृह्यवल्कलमथोरंभाविदारीवरी ॥ आलूकेक्षिरकंदवाजिसुवहाकर्कोटिकागृष्टिकाखर्जूरीसुरसूरणप्रभृतिकान्कंदांश्चसाधूनपि ॥ छिन्नाटरूपकाशिवप्रियमाषपर्णीज्योतिष्मतीयुगुलपर्पटमेषवल्ली ॥ भूपर्णिकासजटिकामृगराजमुंडीयुक्तर्तरीकुल्कयुग्मफलार्कभक्ता ॥ भूनिंबवन्हिदमनोगिरिकर्णिकायुक्चिल्हारकाखदिरकाविजयाकुमार्यः ॥ गंगावतीयुगकवेणविकासुगंधालंबासुपर्णलतिकासहदेविकाच ॥ गोपीयुगंमृगसुरसिरणीचकंगुमोर्थश्चनागदमनीमधुपुष्पिकाच ॥ एतानिगृह्यनिखिलानितथाद्रयुग्मंचूतास्थितोतरुरुहोवटसंप्ररोहान् ॥ भूशर्करामदकराकुसुमंचपीलुबर्हिःशिखाकनककेतकिसंप्ररोहान् ॥ व्याघ्राटिकांघ्रिकरकं

तिनिरोत्थसारंकंडूकापित्थमवलोहजटागृहीत्वा ॥ मुष्टिप्रमाणंविधिनो द्धतानिद्रोणैर्जलानांतिसृभिर्विपक्त्वा ॥ पादावशेषंपरिगृह्यपोतंप्रस्थत्र यंतच्चतिलोत्थतैलं ॥ हिंस्रारक्तावरिष्ठासुररजनियुगंसैंहलंगंधसारंशृंगा रंनागपुष्पंपलितकटुफलंरक्तकाष्ठंनतंच ॥ षड्ग्रंथाजोंगकाश्वारुचकक रुहंरोचनारक्तसारंकोरंजीपालकाव्हंक्रमिरिपुमधुकंसिंधुजंस्निग्धदा रु ॥ तालीसंजातिसस्यंमलयजममृतंपद्मकंजातिपत्रीसेव्यंपद्मंयवानी कतकुनुरवतीकेशरंपद्मकस्य ॥ पाठीनोराजपुत्रीजलधरचविकासो मवल्कोमधूकंपाकयःस्वर्जीशताव्हावनजमगधजामत्स्यपित्ताशठी च ॥ कारुचीपुत्रजीवास्तपनकनकजंबीजभृंगाररेचीवृक्षाम्लंदेवधूपो जरणरसरसाकल्कराकुट्टिमंच ॥ मृद्वीकासाकुरंडंनियमनधनिकाध न्वयासंचब्राह्मीविश्वंकैरातकेक्षुरकरिकणामोदकंबस्तमोदा ॥ शक्रा व्हातिल्वलाख्यश्छुरपुरसुपर्वीमेथिकाशृंगिकाचप्रत्येकंसंगृहीत्वापि चुदलतुलितामुंचचासकृत्प्रपिष्टा ॥ तानिःक्षिप्याशुपात्रेशुचिजनवि त्ततंनिर्मलंवैद्यवर्योगव्यंवादुग्धमाजंयुगपरिगणितंपूर्वमुक्ताच्चतैलात् ॥ नारायण्यस्वरसकमथोरंगमातारसंचतैलोन्मानंविपचरविजेभाजनंप्र त्यहंवा ॥ तस्मिन्पाकंगतवतियथाविध्यनुप्रक्षिपेच्चसौगंधार्थैशिशिर किरणंकुंकुमंवेधमुख्यं ॥ गोधूमाख्यंमुसुरभियुतंगंधकर्चूरकंचजाती पुष्पंशतदलसमंमल्लिकंचंपकंच ॥ लोबानेनत्वतिसुरभितेकाचभांडे निधायतैलंचैतन्नृपतिसदनेधारयेद्वैद्यवर्यः ॥ पानेबस्तौविहितमशनेना वनाभ्यंजनेचमातंगेवामनुजघनयोर्वातरोगाभिभूते ॥ वाताष्ठीलांग लहनुशिरोगृध्रसीपादशूलंपक्षाघातंश्रवणनयनभ्रूललाटेपुशूलं ॥ ऊरू स्तंभार्दितबधिरतैकांगरोगापतानंमन्यास्तंभंत्रिकहृदयरुङ्मूकताक्षेप खांज्यं ॥ जिव्हास्तंभंगतिविकलतांकुब्जतांदंतशूलंस्तन्योगुल्मद्वयंवा गुदकटिचरणभ्रंशगुल्फौचसुप्तिं ॥ विश्वाचींवावृषणपवनंधातुवाताप तानंमूकंकंपंजयतिसकलान्वातरोगाननुक्तान् ॥ रेतोवृद्धिंजनयति नवंयौवनंपौंस्त्ववृद्धिंबुद्धिंप्राणंवितरतितथापुष्टिमायुष्यकारि ॥ वं

ध्यायाः पुत्रदं स्यात्ज्वरविहिततनौशोषदौर्भाग्यहं तत्तैलं भूपोपयोग्यं विनिगदितमिदं नामनारायणं च ॥

**अर्थ**–शतावरी, बोर, मोगरा, मोठा चिकणा, एरंड, बाफळी, धोतरा, खडयानाग, रानमोगरा, कुंडा, हेदी, पाहाडमूळ, खरमंजळ, जेष्ठमध, माहाळुंग, चांपा, जाई, निवडुंग, चिकणा, वावडिंग, टाकळा, बडिशेप, अस्कंध, वाराहीकंद, वासनवेल, रक्त एरंड, धामण, नांदरुखी, पतंग, फार मोठा चिकणा, काळी व शुभ्र वाघांटी, घेटूळ, डाळिंब, आघाडा, कांटे शेवरी, निर्गुंडी, कडु तोंडली, देवनळ, पांगली, कास दर्भभेद, कावकुहिली, भार्डीमूळ, तेड, दंती, टाकळी, कुसरी, गोंधणी, करंद, काशिवदा, केवणी, अर्क, जवस, काळा कुडा, बोर, वेत, साल, पृथु साल, श्वेत गुंजा, कवठ, घोटी, वृंदावन, मोरवेल, पिंपळी, कमळिणी, रुदंती, दशमुळे, या सर्वांचीं मूळें घ्यावीं. अगस्त्या, चंदन, बिबवा, आघाडा, करंज, शिंगाडा, टाकळा, कारेळी, सागरगोटी यांचीं बीजें घ्यावीं. आवळी, शेवगा, करंज, बाभूळ, मोहाचा वृक्ष, हिंगणबेट, करंडकांगोणी, नेपती, कळंब, बाहवा, सिसवा, बोर, टेंभुर्णी, कांचनार, चिंच, उंबर, अगस्त्याद्वय, (तांबडा पांढरा) अंकोल, पांढरा अंकोल, रायआवळे, खैर, बेहेडा, भेंडी, श्वेत खैर, अश्वत्थ व हरीतकी यांचीं पंचांगें घ्यावीं. बिबवा, पळस, मेढशिंगी, किन्हई, नाकशिकणी, गेळीचें झाड, कोकंब, सादडा, कडुनिंब, निवडुंग, कोरफड, द्रोणपुष्पी, आसाणी, कुंभा, रक्तसादडा, वायवर्णा, वावळा व खुळखुळा, यांच्या साली घ्याव्या. केळ, बेदरी, शतावरी, आळुकंद, क्षीरकंद, अश्वगंधा, गुंगुरवेल, वंध्याककोंटोली, बिबोळी, मुसलीकंद, अमरकंद व सुरण यांचे कंद घ्यावे. गुळवेल, अडुळसा, बेल, रानउडीद, कांगोणी, मालकांगोणी, पित्तपापडा, मेंढवेल, वासनवेल, गुंजा, माका, मुंडी, निर्गुंडी, कातरी निर्गुंडी, कडु पडवळ, गोड पडवळ, उतरणी, आदित्या, यांचीं पंचांगें घ्यावीं. चिराईत, चित्रक, दवणा, काळी व पांढरी गोकर्णी, लाजाळू, खैर, भांग, कोरफड, गंगावतीद्वय, वृधदारु, तेरडा, कडु भोपळा, कांडवेल, महाबला, उपरसळी, लहान व मोठी हरणखरी, हरणवेल, कांग, मोरवेल, नाय व मोहाचें झाड, यांचीं पंचांगें मूळ घ्यावीं. नागरमोथा, भद्रमोथा, आंब्याची कोय, बादांगूळ, वडाचे पारंबे साकरकंद, धायटीफूल, अक्रोड, मोरशिखा, सोनकेवड्याचे पारांबे, वाघाटी, दाळिंब, कुहिलीचीं पाळें, कवटीचें मूळ, लोखंडीमूळ, हीं चार चार तोळे घ्यावीं; आणि त्यात ३०७२ तोळे पाणी घेऊन त्यात घालून चतुर्थांश काढा गाळून घ्यावा. त्यांत १९२ तोळे तिळाचें तेल घालावें; आणि जटामांसी, मंजिष्ठ, काळा वाळा, देवदार, हळद, दारुहळद, दालचिनी, चंदन, लवंग, नागकेशर, गुग्गुल, कायफळ, पतंग, तगर, वेखंड, कृष्णागरु, अस्कंध, पादेलोण, नखला, गोरोचन, रक्तचंदन, तरटी, कोष्ठकोळिंजन, वावडिंग, ज्येष्ठीमध, सैंधव, तेल्यादेवदार, तालीसपत्र, जायफळ, धने, मलयागर, बचनाग, कमलाक्ष, जायपत्री, वाळा, कमळ, ओवा, निवळीचें बीं, तुरटी, कमळकिंजल्क, चित्रक, रेणुका, भद्रमोथे, चवक,

बावंची, ज्येष्ठमध, जवखार, सर्जीखार, बडिशोप, चिरफळ, पिंपळी, कुटकी, कचोरा, बाफळी, पुत्रजीवफल, बिबवा, धोतऱ्याचें बीं, माका, निशोत्तर, चिंच, गुग्गुळ, जिरें, राळ, रास्ना, अकलकरा, डाळिंबाची साल, द्राक्षे, अक्रोड, निंब, धनें, धमासा, कारिवणा, सुंठ, किराइत, तालिमखाना, गजपिंपळी, आंवा, अजमोद, इंद्रावण, लोध्र, कुहिलीचें मूळ, गुग्गुळु, लघु कारली, मेथी, कांकडशिंगी, गाईचें किंवा शेळीचें दूध तेलाचे दुप्पट; आणि तेलाचें दुप्पट शतावरीचा रस व तितकाच लाखेचा काढा हीं सर्व एकत्र करून तांब्याच्या भांड्यांत पचन करावीं; आणि त्यांत सुगंधा करितां कापूर, केशर, कचोरा, गहुला, कापूरकचरी, जाई, शेवंती, मोगरी व चापा यांचीं फुलें घालून नंतर उदानें काचेचें भांडें उदकून त्यांत भरून ठेवावें. तें प्राशनार्थ, बस्ति, खाण्यास, नस्य, आंगास लावणें, हत्ती किंवा मनुष्य, यांनां वातरोग झाला असतां; आणि वाताष्ठीला, गलग्रह, हनुग्रह, शिरोग्रह, गृध्रसी, पादशूल, पक्षाघात, कान, नाक, भोंवया व ललाट यांचा शूल, ऊरुस्तंभ, अर्दित, बधिरता, एकांगरोग, अपतानक, मन्यास्तंभ, तिडवें, ऊर यांतील शूळ मुकेपणा, आक्षेपक, खंज, जिव्हास्तंभ, लंगडेपणा, कुबडा, दंतशूल, स्तनरोग, गुल्म, गुद, कंबर व पाय यांचा भ्रंश, खल्ली, सुप्ति, विश्वाची, वृषणवात, धातुवात, अपतानक, मुकेपणा, कंप व संपूर्ण उक्तानुक्त वातरोगांनां जिंकितें, वीर्य वाढवितें, यौवन देतें, पुंस्त्ववृद्धि करतें, प्राण, बल, पुष्टि व आयुष्य यांतें देणारें, वंध्येला पुत्र देणारें, ज्वर, क्षय व दुर्भगता यांचें नाशक आहे. हें तेल राजांनां योग्य याला महालक्ष्मीनारायण तेल ह्मणावें.

## रास्नाद्यघृत.

रास्नापौष्करशिग्रुमूलदहनंसिंधूत्थगोक्षूरकंपिष्टापिप्पलिसंयुतंचलगदेपेयंसदासर्पिषा ॥ संपाच्याथचतुर्गुणेनपयसावावाजिगंधायुतंसर्पिः पेयमसाध्यवातगदजेशुक्रक्षयेदारुणे ॥

अर्थ—रास्ना, पुष्करमूळ, शेवग्याचें मूळ, चित्रक, सैंधव, गोखरू आणि पिंपळी यांचें कल्क, घृत व चौपट दूध घालून घृत सिद्ध करावें; आणि अश्वगंधाच्या चूर्णाबराबर असाध्य वायु आणि शुक्रक्षय यावर प्राशनार्थ द्यावें.

## पंचतिक्तघृत.

निंबामृतावृषपटोलनिदिग्धिकानांभागान्पृथग्दशपलानिपचेद्घटेपां ॥ अष्टावशेषितरसेनपुनश्चतेनप्रस्थंघृतस्यविपचेत्पिचुतुल्यकल्कैः ॥ रास्नाविडंगसुरदारुगजोपकुल्याद्विक्षारनागरनिशामिशिचव्यकुष्ठैः ॥

तेजोवतीमरिचवत्सकदीप्यकाग्निरोहिण्यपुष्करवचाकणमूलयुक्तैः ॥
मंजिष्ठपातुविषयात्रिवृतायवान्यासंशुद्धगुग्गुलुपलैरपिपंचसंख्यैः ॥
तत्सेवितंघृतमतिप्रबलंसमीरसंध्यस्थिमज्जगतमप्यथकुष्ठमीदृक् ॥
नाडीव्रणार्बुदभगंदरगंडमालाजत्रूर्ध्वंवातगदगुल्मगुदोत्थमेहान् ॥
यक्ष्मारुजश्वसनपीनसकासशोफहृत्पांडुरोगमयविद्रधिवातरक्तं ॥

अर्थ—कडु निंब, गुळवेल, अडुळसा, पटोल व रिंगणी हीं प्रत्येक ४० तोळे घेऊन १०२४ तोळे पाणी घालून अष्टमांश उतरून गाळून घ्यावा; आणि त्यांत तूप ६४ तोळे घालून त्यांत रास्ना, वावडिंग, देवदार, गजपिंपळी, यवक्षार, टांकणखार, सुंठ, हळद, बडिशेप, चवक, कोष्ठकोळिंजन, मालकांगोणी, मिरें, कुड्याची साल, ओंवा, चित्रक, कुटकी, पोखरमूळ, वेखंड, पिंपळीमूळ, मांजिष्ठ, अतिविष, निशोत्तर व किरमाणी ओंवा हीं प्रत्येक एक एक तोळा घेऊन त्यांचा कल्क करून त्या तुपांत घालावा; व त्यांत गुग्गुळ पांच तोळे घालून घृत सिद्ध करावें. तें सेवन केलें असतां; अति वाढलेला वायु, संधि, अस्थि व मज्जा यांतील वायु, कुष्ठ, नाडीव्रण, अर्बुद, भगंदर, गंडमाला, जत्रूच्या वरील भागाचे वायुरोग, गुल्म, अर्श, मेह, क्षय, श्वास, कास, पीनस, सूज, पांडु, विद्रधी व वातरक्त या व्याधींचा नाश करितें.

## वातरोगीं पथ्यापथ्य.

कुलित्थामापगोधूमारक्ताभाःशालयोहिताः॥पटोलंशिग्रुवार्ताकंदाडिंमंचपरूपकं ॥ ॥ मत्स्यंडिकाघृतंदुग्धंकिलाटंदधिकूर्चिका ॥ बदरं लशुनंद्राक्षातांबूलंलवणंतथा ॥ चटकःकुक्कुटोबर्हिस्तित्तिरश्चैतिजांगलाः ॥ शिलींध्रःपर्वतोनक्रोगर्गरःखुडिशोझषः ॥ यथाश्रमंयथावश्यंयथाचरणमेवहि ॥ वातव्याधौसमुत्पन्नेपथ्यमेतन्नृणांभवेत् ॥

अर्थ—कुलित्थ, उडीद, गहूं, रातें तांदूळ, पडवळ, शेवगा, वांगें, डाळिंब, फालसा, खडिसाकर, घृत, दूध व दहीं समान एकत्र शिजवून केलेला खरवस, कीलाट, बोर, लसूण, द्राक्षें, विडा, मीठ, चिमणी, कोंबडा, मोर, तित्तिर, अरण्यपशु, भूछत्र, किराइत, सुसर, गर्गर, खुडिश, झष हे मत्स्य, इतके पदार्थ जसे श्रम, जशी आवश्यकता, जसें आचरण असेल तसें पाहून वातव्याधि उत्पन्न झाला असतां; पथ्यास योजावें.

## अपथ्य.

चिंताप्रजागरणवेगविधारणानिछर्दिःश्रमोनशनताचणकाकलायाः॥

श्यामाकजूर्णकुरविंदुनिवारकंगुमुस्तास्तडागतटिनीसलिलंकरीरं ॥ क्षौद्रंकषायकटुतिक्तरसाव्यवायोहस्त्यश्वयानमपिचंक्रमणंचखट्वा ॥ आध्मानिनोर्दितवतोपिपुनर्विशेषात्स्नानंप्रदुष्टसलिलैर्द्विजघर्षणंच ॥ निःशेषतंत्रपरिकीर्तितएषवर्गोनृणांसमीरणगदेषमुदंनदत्ते ॥ वातरोगस्त्वसाध्योयंदैवयोगात्सुसिध्यति ॥ अनुमानेनकुर्वंतिवैद्यकंनप्रतिज्ञया ॥

अर्थ–चिंता, जागरण, वेगधारण, ओकारीचें औषध, श्रम, उपोषण, हरभरे, वाटाणे, सांव्याचे पीठ, गुरु साळी, वऱ्या, नाचण्या, कांग, नागरमोथा, तळें व नदी यांतील पाणी, वेळूचे कोंब, मध, तुरट, तिखट, कडु, इतके रस, मैथुन, हत्ती व घोडा यांवर बसणें, फार फिरणें, बाजेवर निजणें हीं वातव्याधीवर अपथ्य आहेत; आणि आध्मान व अर्दित हे जास आहेत त्याणी विशेषेंकरून दुष्ट पाण्याचें स्नान, दांत घासणें, हे हि वर्ज्य करावें. हे सर्व ग्रंथ अवलोकन करून अपथ्य निवडून काढले आहे. वातरोग तर असाध्य आहे; परंतु दैवयोगानें सुसाध्य होतो. याकारणास्तव वैद्यानीं अनुमानेंकरून चिकित्सा करावी. प्रतिज्ञेनें करूं नये.

## वातरोगीं पथ्य.

अभ्यंगोमर्दनंबस्तिःस्नेहःस्वेदोवगाहनं ॥ संवाहनंसंशमनप्रवृत्तिर्वातवर्जनं ॥ अग्निकर्मोपनाहश्चभूशय्यास्नानमासनं ॥ तैलद्रोणीशिरोबस्तिःशमनंनस्यमातपः ॥ संतर्पणंबृहणंचकीलाटदधिकूर्चिकाः ॥ सर्पिस्तैलंवसामज्जास्वाद्वम्ललवणारसाः ॥ नवीनास्तिलगोधूममाषाःसंवत्सरोषिताः ॥ शालयःषष्टिकाश्चापिकुलित्थानांरसाःपुरः ॥ ग्राम्यानूपखरोष्ट्राश्वरासभच्छागलादयः ॥ आनूपाःकोलमहिषन्यंकुखड्गिगजादयः ॥ औदकाहंसकादंबचक्रमर्दबकादयः ॥ बिलेशयभेकगोधानकुलश्चद्विजादयः ॥ चटकःकुक्कुटोबर्हिस्तित्तिरश्चेतिजांगलाः ॥ शिलींध्रःपर्वतोनक्रोगर्गरःकवयीलिशः ॥ एरंडचुलकीकर्मारिशुमारास्तिमिंगिलः ॥ रोहितोमद्गुरोशृंगीवर्मीचखुडिशोझषः ॥ पटोलंशिग्रुवार्ताकंलशुनंदाडिमद्वयं ॥ पक्वंतालंरसालंचलकुचंबुपरूषकं ॥ जंबीरंबदरंद्राक्षानागरंगोमधूकजं ॥ प्रसारिणीगोक्षुरकःशुक्लाक्षीपारिभद्रकः ॥ पयांसिचपयःपेटीसवुतैलंगवांज

लं ॥ मत्स्यंडिकाचतांबूलंधान्याम्लंतिंत्तिडीफलं ॥ स्निग्धोष्णानि चभोज्यानिस्निग्धोष्णंचानुलेपनं ॥ विशेषाद्वमनार्तानामामाशयमुपागते ॥ पक्काशयस्थेमांसस्थेतथास्निग्धंविरेचनं ॥ प्रत्याध्मानाध्मानयोर्वावर्तिलंघनदीपनं ॥ अष्ठिलाख्येमूत्रविधिःशुक्रस्थेक्षयजित्क्रिया ॥ त्वंङ्मांसासृक्शिराप्राप्तेहितंशोणितमोक्षणं ॥ यथाश्रमंयथावस्थंयथाचरणमेवहि ॥ वातव्याधौसमुत्पन्नेपथ्यमेतन्नृणांभवेत् ॥

अर्थ—अभ्यंग, मर्दन, बस्ति, स्नेह, घाम, स्नान, आंगासलावणें, वातशामक, वायूची अधोभागानें प्रवृत्ती, वारा बंदकरणें, डाग, पेंड, भूमिवरशयन, स्नान, आसन, तेलाच्या द्रोणीत बसणें, मस्तकबस्ति, शमन, ऊन, संतर्पण, बृंहण, ताकाची निवळ, तूप, तेल, वसा, मज्जा, गोड, आंबट, खारट, हे रस व ताजे तोळ व गहूं उडीद, साटकधासाळी, व कुळीथ यांचे रस, गुग्गुळ, ग्राम्य, आनूपमांसे व गाढव उंट, बोकड, बिबवे, डुकर, रेंडा, सांवर, गेंडा व हत्ती यांची; व हंस कलहंस, चक्रवाक, बगळा, हे उदकसमीप राहणारे; व बेडूक, घोरपड, मुंगुस, हे बिळांत राहणारे व ओढ्यांत राहणारे चिमणी, कोंबडा, मोर व तित्तिर, हे; व साळशति पर्वत, नक्र, गर्गर, कंव, इलिश, एरंड, गंडुपविधी, सुसवर, तिमिंगिल, रोहित, मद्गुर, शृंगी, वर्मी, खुडिश, हे मासे व पडवळ शेगवा, वांगे, लसूण, खाटें व गोडें डाळिंब, पिकें ताडफळ, आंबा, वाहातें पाणी, फालसा, जांबीर, बोर, द्राक्षें, नारिंग, मधुकाष्ठ, लाजाळूं, गोखरू, धावडा, निंब, दुग्धें, पयःपेटी, एरंडेल, गोमूत्र, खडीसाकर, तांबूल, कांजी, चिंच व स्निग्ध आणि ऊष्ण अशीं भोजनें व अनुलेपनें व विशेषें करून वांतिनें पीडित, आमाश्रित दोष, पक्काशयाश्रित व मांसाश्रित, दोषानां स्निग्ध औषधानीं रेच, आणि प्रत्याध्मान व आध्मान वायु याला गुदवर्ति, लंघन व दीपन औषध, अष्ठीला वायूला मूत्रल औषधें व शुक्रगतवायूवर क्षयनाशक औषध, आणि त्वचा, मांस, रक्त, आणि शिरा यांमध्यें वातविकार असतां रक्त काढणें. याप्रमाणें जसे श्रम व अवस्था असेल तसें आचरण करावें. हें वातव्याधिष्ठ मनुष्याला पथ्य सांगितलें.

## अपथ्य.

चिंताप्रजागरणवेगविधारणानिछर्दिःश्रमोनशनताचणकाःकलायाः॥ नीवारकंगुशरवैणवकोरदूषश्यामाकचूर्णकुरुविंदमुखानियानि ॥ धान्यानितालतृणजातिचराजमाषामुद्गागुडांगतादिनीसलिलंकरीरं ॥ जंबूकसेरुनलकंक्रमुकंमृणालंलिक्षारबीजमपितालफलास्थिमज्जा ॥ शा

लूकतिंदूककटिल्लकादीन्रसालशिंबीचवेत्रवरशारदमृद्वरंच ॥ शीतां बुरासभपयोपिविरुद्धमन्नंक्षारोपिशुष्कपललंक्षतजस्रुतिश्च ॥ क्षौद्रंक पायकटुतिक्तरसाव्यवायोहस्त्यश्वयानमपिचंक्रमणंचखट्वा ॥ आध्मा निनोदिनवतोपिपुनर्विशेषान्स्नानंप्रदुष्टसलिलेद्विजघर्षणंच ॥ निःशे षतंत्रपरिकीर्तितएषवर्गोनृणांसमीरणगदेषुमुदंनदत्ते ॥

**अर्थ**-चिंता, जागरण, मलमूत्रादिकांच्या वेगाचें धारण, वांति, श्रम, उपवास, हर-भरे, वाटाणे, देवभात, कांग, शरजातितृण, वेळवाचे कोम, हरीक, साव्याचें पीठ, व व्रीहिशाळी, हीं धान्यें तालफल, तृणधान्यें, चवळया, मुग, गूळ, नदीचें पाणी, वंशांकुर, जांबूळ, कचरा, पद्माक्ष, सुपारी, बिसें, लिक्षारबीज, ताडगोळे, कमळकंद, घेंडशी, कांटलें, आंबा, खरसंबळ, वेत्राग्र, हिरवे मूग, तुरटी, थंडपाणी, गाढवाचें दूध, विरु-ध्दान्न, क्षार, सुकलेलेंमांस, रक्तस्राव, मध, तुरट रस, तिखट व कडू हे रस, स्त्रीसंग, हत्ती व घोडा यांवर बसणें, हवाखात फिरणें, खाटलें व पोट फुगलें असतां पुनः भो-जन, खराबपाण्यानें स्नान, दांत घांसणें, हे संपूर्ण वैद्यकतंत्रांमध्यें वातरोग्याला अपथ्य वर्ग सांगितला.

